वीरशैवधर्माचें परिवर्तनशील स्वरूप सदर पक्षाला मान्य नाही असाच बोध होतो. म्हणून बाळेहाळ्ळी जगद्गुरु वा त्यांचे शिष्य बसवादिक प्रमथाविरुद्ध बोलतात ही तक्रारच सदर पक्षाकडून कोर्टापुढें यावयास नको होती. सध्याचा काळ बुद्धिवादाचा आहे. ह्या काळास अनुसरून कोणीहि कोणाविरुद्ध बोलणारच. ज्याच्या बोलण्यांत तथ्य व सत्य असेल त्याचे लोकांस पटेल. नाहीतर पटणार नाहीं. ह्यावर विश्वास ठेवून चालणेंच सद्यस्थितींत प्रत्येक सुज्ञाला योग्य आहे. ह्यांत आनंदाची गोष्ट ही कीं, बाळेहळ्ळी पंचाचार्य महास्वामींनी बसवादि प्रमथाची निंदा केली नाहीं, उलट, प्रसंगीं स्तुतिच केली, हें मॅजिस्ट्रेट्साहेबांच्या नजरेस आल्यामुळे व तसा स्पष्ट पुरावा मिळेपर्यंत मॅजिस्ट्रेटनीं भाषण-बंदीचा हुकूम केला नाही ही संतोषाची गोष्ट होय.

पण एवढ्याने पंचाचार्यपक्षाने फुलून जातां कामा नये. बाळेहळ्ळी महास्वामीतर्फे रा. ब.पाटील ह्यांनी मॅजिस्ट्रेटपुढें सांगितलें कीं, आमच्या स्वामींकडून बसवादि प्रमथांची प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नालस्ती होत नाहीं. ह्यावरुन धारवाडचे मॅजिस्ट्रेट मि. देसाई ह्यांचा हुकूम म्हणजे पंचाचार्य-पक्षीयांना वाटेल तेंव्हा वाटेल त्या बसवादि प्रमथा विरुद्ध बोलण्याकरिता स्वातंत्र्य देणारा आहे असें मात्र पंचाचार्यपक्षीयांनी समजूं नये व ह्याचा फायदा घेऊन जीभ वा लेखणी [illegible] प्रमथा-विरुद्ध स्वैर सोडूं नये. वास्तविक [illegible] न्यायाधिशांकडे न जातां ह्या बाबतीत [illegible] एकमेकांना स्वातंत्र्य द्यावयास [illegible] पाहिजे अशी आमची समजूत आहे. पण हें [illegible] दोन्ही पक्ष आपणांस साक्षात शिव समजतात, राजे [illegible] समजतात, वतनदार समजतात, व आपणाविरुद्ध को[illegible]हि ब्र उच्चारूं नये अशी इच्छा धरतात. पण तेंहि [illegible] सामर्थ्य अंगीं पूर्ण नसल्यामुळे, अखेर संरक्षणार्थ मॅ[illegible]श्रय करावा लागतो व तोच शिव [illegible]नावें लागतें. हें स्पष्ट होत असतां वीर[illegible]देवा-चांची नवी पिढी, पुण्य[illegible]तरीक

[illegible] हासणार नाहीत अशी काळजी ह्यानंतर दोन्ही पक्षांनी घ्यावी अशी आमची उभयतांना कळकळीची विनंती आहे.

परंतु हें प्रकरण एवढ्यावरच संपलें नाही तर सदर स्वामी जगद्गुरु म्हणवितात तेव्हा त्यांच्या पक्षाच्या वीरशैवांनीच त्यांना जगद्गुरु मानावे, इतर वीरशैवांनी मानूं नये, असाहि एक मुद्दा विरक्तपक्षातर्फे श्री. पावटे ह्यांनी उत्पन्न केला होता. ह्याचा स्पष्ट व सरळ अर्थ हा आहे कीं, पंचाचार्यसिंहासनाधीशांना जगद्गुरु मानणारा एक वर्ग वीरशैवांत आहे व तो धारवाडांत बल आहे ही कबूली विरक्तपक्षातर्फे दिली गेली. अर्थात् पंचाचार्यपक्ष विरक्त जगद्गुरुंना " जगद्गुरु " मानणार नाही हेंहि त्याबरोबर उघड होतें. ह्मणजे वीरशैवांत पंचाचार्य-जगद्गुरुंची एक शाखा व विरक्त जगद्गुरुंची एक शाखा अशा दोन परस्परविरुद्ध शाखा आहेत ही कबूली दिल्यासारखें होतें. पण मॅजिस्ट्रेटने

"The Lingayats of the Dharwar District are informed that the District Magistrate has no objection to the touring in this District of the Swami of Balhonoor Math who is referred to by the applicants as Jagadguru Shivanand Rajendra."

म्हणजे सदर स्वामी पक्षाच्या अर्जदारांनी म्हटल्या-प्रमाणे, जगद्गुरु शिवानंद [illegible] जिल्ह्यांत फिरावयास हरकत [illegible] स्वामी-च्या अनुयायांनी त्यांना 'जगद्गुरु' म्हणून [illegible] ह्याला मॅजिस्ट्रेटची हरकत नाही इतकेंच. कोणाला 'जगद्गुरु' मानावें हा मॅजिस्ट्रेटचा अधिकार नव्हे हें खरें. शिवाय बिरुदावलीसह [illegible] पाल-खीतून मिरवावयास परवानगी मिळाल्यामुळे व सदर बिरुदावली वीरशैवधर्माची द्योतक असल्यामुळे सर्व वीरशैवांनी सदर स्वामींना, जगद्गुरु [illegible]

मानणें अवश्यच आहे असाहि ह्या हुकुमांतून बोध होतो. ह्या हुकुमाचा अर्थ: मॅजिस्ट्रेटने स्वामी शिवानंदांना जगद्गुरु मान्य केले असा जसा होत नाही; त्याचप्रमाणे आडव्या पालखीचे व वीरशैव विरूदावलीचे अधिकृत जगद्गुरु नव्हतच असाहि होत नाही. वास्तविक पाहिलें असतां पंचाचार्यांना पूर्वपरंपरेस अनुसरून सर्व वीरशैवांच्या जगद्गुरूंचा जसा व जितका अधिकार, तसा व तितकाच अधिकार शून्यसिंहासनाधीशांनाहि आहे. हे दोघेहि वीरशैवमताचे अधिकृत जगद्गुरु होत. कालपरत्वें व स्थानपरत्वें ह्या सर्वांचीं भिन्न कार्यें असतील. [तथा]पि प्रस्तुतच्या वीरशैवधर्माच्या समाजघटनेंत दोघांहि इतका एकजीव झाला आहे कीं, ही विरक्त वीरशैवशाखा व ही पंचार्य वीरशैवशाखा हा भेदच पाडतां येत नाहू. व तो भेद पाडणें म्हणजे जुन्या रूढ भेदांत आणखी एका भेदाची भर पाडण्याचा समाजघातकी प्रयत्न करणेंच होय. पंचाचार्य हे सर्वस्वी त्यागाचे पुरस्कर्ते नसले व विरक्त हे सर्वस्वी त्यागमूर्ति असले तरी प्रस्तुत वीरशैवघटनेंत जन्मापासूनच्या शिवैक्यपदापर्यंतच्या विधींत पंचाचार्यांची व विरक्तांची ह्या दोघांचीहि अवश्यकता भिन्नभिन्न परिस्थितींत मान्य झाली [अ]सून, ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, व संन्या[स] अशा चार आश्रमधर्माची परिपूर्णता झाली आहे. आणि अष्टावरण व षट्स्थलाच्या परिपूर्ण क्रियेंत प्रगतीच्या निरनिराळ्या पायऱ्यांच्या वेळीं ह्या उभयतांचीहि प्रत्येक वीरशैवांला जरुरी आहे. म्हणून प्रत्येक वीरशैवाने पंचाचार्यांप्रमाणेच विरक्तांनाहि आपल्या जगद्गुरुत्वाचा मान देणें अवश्य आहे. ह्या आवश्यकतेच्या दृष्टीने विचार केला असतां विरक्तांना जगद्गुरु मानणारा एक वर्ग व पंचाचार्यांना जगद्गुरु मानणारा एक वर्ग असा भेद पाडणें शहाणपणाचें खास नव्हे. जगद्गुरुपदावर असलेले बहुतेक स्वामी, त्यांचे शास्त्रीपंडित, हे स्वतःमध्ये इतके तल्लीन झालेले असतात कीं, त्यांना स्वत:पलीकडे जगांत काय चाललें आहे हें दिसत नसते. त्यांच्या फाजील स्वाभिमानी, एककल्ली व दुराग्रही स्वभावामुळे जरी असे अनर्थ उत्पन्न होत असले तरी नवीन सुशिक्षितांनी त्या उभयपक्षीय माथेफिरू शास्त्रीपंडितांच्या आहारीं न जातां आहे त्या समाजस्थितींतिल ही फाटाफूट टळेल व सर्व वीरशैवसमाज अधिकच संघटित होईल असा प्रयत्न करणें जरुर झालें आहे. त्या जरूरीकरिताच आम्हांला धारवाडांतील पंचाचार्य-विरक्तप्रकरणविषयीं शिवप्रेरणेने उभयपक्षीयांना आप्रिय वाटणारें पण सत्य दिसलें तें आम्हांला लिहावें लागलें. करिता उभयतांनी पक्षविशेषबुद्धि सोडून सर्व आपण एकाच वीरशैवधर्माचे घटक आहोंत अशी कल्पना करून शांत व निर्विकल्प होऊन विचार करणेंच सद्यःस्थितींत [इ]ष्ट आहे.

लघुकथा १ ली.



# नंदिकेश्वराची पट्टराणी

'सासूबाईचं केवढं सोवळं! पोटचं पोरसुद्धां ओवळ्यानं शिवलेलं चालत नाहीं. सासरा तर तिन्हीसांज लिंगपूजेंत गर्क असतो. पादोदक व प्रसाद झाल्यानाचून अन्न पोटांत घेत नाही. नवरा मुलगा तर देव माणुसच दिसतो. गाई-ह्मशीचं शेण काढावं, गवऱ्या थापाव्यात, व दुकानाचा व्यवहार पहावा, ह्यांत मोठा वाकबगार. उत्पन्न कमी नाही. सालची वीस हजारांची प्राप्ति. कंबरपट्ट्यापासून तों गळ्यांतल्या सरीपर्यंतचे सारे दागिने सोन्याचे मिळतील. तेव्हा ह्या घरांत पडायला नाही ह्मणूं नकोस.' आईचा हा उपदेश ऐकतांच ठकी हातांतील पुस्तक मिटवून झटक्यानं माडीवर निघून गेली. ठकीचं हें वर्तन पाहून आईला राग आला व तीहि वर गेली व रागाच्या भरांत तिनं ठकीच्या पाठींत दोन अशा भडकावल्या कीं, बाजूला चुट्टा ओढींत असलेले रुद्राप्पा धावत आले व ह्मणाले कीं, 'काग, ठकीला कां मारतेस? तिनं कांहीं तुझ्या बाचं खाल्लं आहे? पाहुणे घरांत पोरीला पहायला आलेत, अशा वेळीं पोरीला मारायचं का? शुद्ध जंगली आहेस.' ह्यावर 'अहो, मी जंगली नाही तर ह्या पोरीचा बाप जंगली ह्मणून हीहि जंगली निघाली. तिला शाळेंत कशाला पाठवलं? ती साफ ह्मणते कीं, मला लग्नच करायच नाहीं. मी ह्मणत होतें कीं, शाळेंत पोरी जाऊं लागल्या कीं पोरी अशा शेफारतील; पण तेव्हा कुठं अक्कल सुचली? तुह्मी कभिटीचे मेंबर झालां व मेल्या त्या बामनाच्या नादीं लागून त्याच्या पोरीबरोबर आपल्याहि पोरीला शाळेंत पाठवूं लागलां. आता आणा तिला पढीक नवरा. ती ह्या शेणकाढ्याच्या व पुड्यावांध्याच्या घरांत जावयाला तयार नाही. तिला खातें घर आवडत नाही. भीकमाग्याच्या पदरांत पडते ह्मणते.' असा ठकीच्या आईने रुद्राप्पाला रोख ठोक जबाब दिला. ह्या वेळीं ठकी शेंगदाण्याच्या एका पोत्याशेजारीं पुस्तकांत तोंड घालून व सर्व अंग पोत्यावर रेटून स्फुंदत होती.

ठकीचें स्फुंदन व तिच्या आईची गर्जना ऐकून बसलिंगस्वामी आंत आले व ह्मणाले, 'वहिनी केवढ्यानं बोलतां? सोयरे काय ह्मणतील? पोरीचं आई मोठी कजाग आहे? अन् ठके, तूं कां रडतेस? आप्पा, इथं असं डोक्याला हात लावून कां बसलां? चला बैठकींत?' हे बसलिंगस्वामी ह्मणजे रुद्राप्पाचे कुळगुरु. ह्यांच्या सल्लामसलतीवाचून रुद्राप्पाच्या घरचें पानसुद्धां इकडचें तिकडे होत नसे. 'बसलिंगस्वामी, माझा ठणठण आवाज तुह्माला' ऐकूं आला पण ह्या कारटीची करणी नाही दिसली. अहो, तिला साहेब नवरा पाहिजे. हा तुह्मी आणलेला भस्मांगळ्या नको' असें ठकीच्या आईने बसलिंगस्वामींना सांगितलें. बसलिंगस्वामी ह्मणतात, 'छे! छे! घर मोठें खानदानी आहे. नित्य शिवशिवपूजा व जंगमार्चना चाललेली असते. शिवाय, खायला व [illegible] घरांत सुबलक आहे. तेव्हा ठकीनें हें स्थळ [illegible]? ठकी तशी शहाणी मुलगी [illegible] कांही आंता लंहान नाही. इंग्रजी दुसरींत आहेस, ना ग? इंग्रजी शिकलं ह्मणजे घरांत खायला नको असं स्थळ का पहायला पाहिजे? अग, बामणांतल्या बी. ए. एम्. ए. झालेल्या मुलीसुद्धा आय. सी. एस्. नवरा धुंडाळतात. नसता शिकलेलाच वर पहात नाहीत. अग

दोंडाप्पाच्या घरचं सालचं वीसहजारांचं उत्पन्न ह्मणजे किती तरी आय्. सी. एस्. चा 'गार आहे. दोंडप्पाचे एकुलते एक शिवाप्पा चिरंजीव ह्मणजे उत्पन्नाने दोन आय्. सी. एस्. आहेत. आज-कालची विद्वत्ता अन्नाला मोताद झाली आहे हें लक्षांत ठेव?' इतक्यांत ठकीचा भाऊ सोमप्पा प्रवेश करितो व म्हणतो कीं, 'ठके, सालचं वीस हजारांचं उत्पन्न लाभलं कीं बैलाबरोबरहि लग्न करावयास चुकूं नकोस. नंदिकेश्वराची पट्टराणी झाल्यासारखं होईल! मग हेच बसलिंगस्वामी तुझ्यावर व तुझ्या या बैलावर बेलफुलें वाहतील. पण बसलिंगस्वामी, तुह्मांला त्याबद्दल किती दक्षिणा यावी लागेल हो?' रुद्राप्पा ह्मणतो 'बसलिंगस्वामी, बोला दक्षिणा व सोमाप्पा ह्मणतो तसें मुकदां होऊं या.' ठकीच्या आईलाहि आपल्या [illegible]ताच्या ह्मणण्यांतील अर्थ कळला नाहीं. ती ह्मणते 'बाबा, तूं तर कॉलेजांत शिकतोस–पण तूं पाड्या शाहणा? अन् ही ठकी तर नंदिकेश्वराची रुढ राणी व्हावयासच कचरते. सांग कांहीं तिला समाकल.' सोमप्पा ह्मणतो, 'आई, तिला कांय सर्वनकल येणार? शिवाय ती आपल्याच घरांतील सर्वरीं नाहीं? आई, बाबा, मी व ठकी आपण चौघेहि घटनेंतलेपासून दूर आहोंत; दुकान चालते ह्मणून विर्धीत[illegible]जा बाबास सुचते, अन् त्यामुळेच तूं स्वयंपाक अवघ[illegible]रतेस; आपल्या घरांत अक्कल असेल तर ती आपल्या बसलिंगस्वामींनाच; त्यांनीं सांगावं, आपण ऐकावं.' रुद्राप्पा व रुद्रव्वा (ठकीचे व सोमप्पाचे आईबाप) म्हणतात कीं, 'बाबा, हें गुरुकृपेचेंच फळ आहे; मग कसं काय बसलिंगस्वामी, बोला दक्षिणा व बनवा ठकीस नंदिकेश्वराची पट्टराणी! सोमाप्पा बसलिंगस्वामीस म्हणाला.

बसलिंगस्वामींना ह्या वेळीं सोमप्पाचा फार राग आला होता. पण रुद्राप्पाचा तो एकुलता एक लाडका मुलगा. शिवाय कॉलेजमध्यें शिकत होता. त्यामुळे अधिक बोलतां येईना. तथापि बसलिंगस्वामी म्हणाले कीं, ये[illegible] दक्षिणेचा प्रश्न नाहीं. घर चांगलें [illegible] ठकी वाढली आहे, म्हणून लग्न झालेलं बरं. म्हणून मी ठकीला पाहण्याकरिता मुलास व त्याच्या बापास घेऊन आलों. सोमाप्पा म्हणतो—फार चांगलं केलं. ठके, नाहीं म्हणूं नकोस. लग्न व कैलास एकाच वेळीं गाठण्याची वेळ आहे. रुद्रव्वा म्हणते 'म्हणजे कायरे?' सोमप्पा म्हणतो, 'आई, जो नवरा ठकीला चालून आला आहे तो वयाने ३५ वर्षांचा आहे. मिशांचे पाणी तोंडांत जाऊं नये म्हणून मिशा कापतो. त्यामुळे पंचविशीचा दिसतो. शिवाय ठकी ही त्याची पांचवी बायको होणार. रुद्रव्वा म्हणते 'काय, पांचवी?' 'होय, पाचवी,' असें सोमाप्पा उत्तर देतो. व सांगतो कीं, 'त्याच्या दोन बायका घरांत सासूच्या जाचापायीं विहिरीत पडून मेल्या नव्हे कैलासाला गेल्या. तिसरी तर रुईच्या झाडांत गुप्तरूपाने आहे. चौथी तर घर सोडूनच पळाली. अन् आता ही पांचवी आपली ठकी!

'नको! नको! माझी पोरगी वाढली तरी चालेल पण अशा घरीं मी तिला देणार नाहीं' अशी ठकीची आई रुद्रव्वा म्हणते. 'पण मी देईन, तूं कोण नाहीं म्हणणार?' असें ठकीच्या आईस ठकीचा बाप ह्मणतो. कारण वाढलेली पोर बीजवर पत्करणार; दुसरा कोण पत्करणार? शिवाय दोन बायका मेल्या व एक पळाली ही सबब व्यर्थ आहे. कारण माझी ठकी शहाणी आहे. 'ठके, आहेस कीं नाहींग शहाणी?' असें ह्मणून रुद्राप्पा तिच्या पाठीवरून लाडाने हात फिरवितो. पण 'पुरे झाला लाड' म्हणून रुद्राव्वा ठकीचा हात धरते व तिला घेऊन खालीं माजघरांत जाऊन बसते. हा सर्व प्रकार दुंडाप्पा व त्याचा मुलगा शिवाप्पा ऐकत होते. त्यांनी बसलिंगस्वामींना हाक मारली व सांगितलें कीं, आम्हा मोंगलाईतील लोकांना ह्या इंग्रजींतील शिकल्या-सवरल्या पोरी नकोतच! आम्ही चाललों कसें? असें म्हणून हे दोघे बापलेक परत गेले. बसलिंगस्वामी व रुद्राप्पा हिरमुसले होऊन बसले. सोमाप्पा बहिणीजवळ गेला व तुला गिळावयास आलेला राक्षस पळाला म्हणून दोघे बहिण-भाऊ आनंदाने नाचूं लागले.

कांहीं दिवसांनी मॅट्रिक झालेल्या एका गरीब तरुणाशीं सोमप्पाने आपल्या बहिणीचा विवाह करून दिला. इतकेंच नव्हे तर एक दुकान दिलें. त्यावर हें जोडपें आनंदाने व सुखाने नांदत आहे. इतकेंच नव्हे तर हा संसार सर्व नव्यांना व जुन्यांना आदर्शभूत होत आहे असें समजतें.

# वीरशैवांचें संघटन

## महाराष्ट्रीय वीरशैवांचा परिचयपट

मराठी भाषा ज्याला बोलतां येते व लिहितां-वाचतां येते असा वीरशैव कर्नाटकांत राहणारा असो, तेलंग वा सीलोन आज त्याच्या वास्तव्याचें स्थान असो, किंवा गुजराथ वा उत्तरहिंदुस्थान येथे आज त्याला राहण्याचा प्रसंग असो, ह्या सर्वांची संघटना व्हावी अशी आमची फार दिवसांची इच्छा. ह्याचा अर्थ असा कोणीं कृपा करून घेऊं नये कीं, ज्यांना मराठीचा गंध नाही, ज्यांना कानडी, तेलगू, वा हिंदीच येते, त्यांची आह्मी संघटना करूं इच्छीत नाही अथवा होत असल्यास तिला आमचा विरोध आहे. संघटनेची आमची जी कल्पना आहे ती जर कर्नाटकांतील वा तेलंगणांतील वीरशैव बंधूंना पसंत पडली, तर त्यांनी आपल्या भाषेंतून आमच्याचप्रमाणे उपक्रम सुरू केला तर सर्वच वीरशैव एका सूत्रांत लवकर येतील. तेव्हा त्यांच्यापैकीं ज्यांना हा उद्योग करावयाचा असेल त्यांनी तो खुशाल करावा, व आह्माला कळवावें. अशा प्रकारें निरनिराळ्या भाषेंतून झालेले उद्योग प्रत्येक भाषेंतून प्रसिद्ध होऊं लागले ह्मणजे सर्वांचीच होत असलेली संघटना सर्वांच्याच परिचयाची होईल. निरनिराळ्या भाषेंतील साधनें आज आमच्याजवळ उपलब्ध नसल्यामुळे मराठी जाणणाऱ्या वीरशैवांचीच संघटना करण्याचें आह्मीं योजिलें आहे.

कोणत्याहि संघटनेचें बीज प्रथम परस्पर-परिचयांत असतें. हा परिचय व्हावयास साधन उपलब्ध झालें म्हणजे एकमेकांच्या गरजा भागविण्याची एकमेकाला अवश्यकता वाटूं लागते. पण कोणत्याहि प्रकारचा परिचयच नसला तर एकमेकांत एकमेकांच्या गरजा भागविण्याचें सामर्थ्य असूनहि गरजा भागविण्याला मदत होत नाही. महासभा अथवा परिषदा ह्यांचे होणारे ठराव कृतींत जेव्हां येतील तेव्हा येवोत; परंतु प्रथम परिचय होणें हें कार्य ह्यामुळे साधतें व त्यामुळेच पुढे कार्याचें बीजारोपण होऊं लागतें. परंतु महासभा वा परिषदा ह्याद्वारां होणाऱ्या परिचयापेक्षाहि परिचय होण्याचा सुलभ व टिकाऊ मार्ग आम्हीं काढला आहे, व तो आमच्या भावी संघटनेस व कार्यास पोषक होईल अशी उमेद आहे. ह्या उमेदीमुळेच 'महाराष्ट्रीय वीरशैवांचा परिचयपट' तयार करण्याची कल्पना आम्हाला सुचली, व ती पहिल्या अंकापासूनच अंमलांत आणण्याचें आम्हीं ठरविलें.

असाच परिचय वाढावा व संघटना व्हावी म्हणून 'महाराष्ट्र-वीरशैवसंघा'-ची कल्पना आम्हाला सुचली होती, व तिला मूर्तस्वरूप येण्याचा योगहि आला होता. पण तो योग नाहीसा झाला. आजच्या योजनेंतून महाराष्ट्रवीरशैवसंघाचें कार्य चालू होणारच नाही असें नाही. पण थोडा अवधि लागेल. महाराष्ट्रवीरशैवसंघाचें कार्य, फंड, व त्या फंडांतून योग्य कचेरीची व प्रसाराची तरतूद करण्याचा आमचा विचार होता. परंतु आता फंड जमणें अशक्य व जमविणेंहि दुर्लभ. कारण लोकांची आर्थिक स्थिति दिवसानुदिवस कठिण होत चालली. अशा परिस्थितींत फंड जमविणें व त्याची व्यवस्था उत्तम तऱ्हेने लावणें ह्या दोन्ही गोष्टी कठिण आहेत. पण कार्य फंडानेच

होतें व फंडावाचून होत नाही असें मुळीच नाही. महाराष्ट्र-वीरशैवसंघाचें कार्य फंडावाचून चालावें अशी आमची इच्छा आहे. आणि तेंहि परंपरेने चालावें असा त्याचा पाया आम्हांला घालावयाचा आहे.

आपल्या वीरशैवसमाजांत आज शिक्षणाचा प्रसार होत असून, मनुष्य अधिकाधिक विचार करूं लागला. ह्यामुळे नवे शिक्षित व जुने शिक्षित, सुधारक बुद्धीचे व सनातनी वृत्तींचे, निव्वळ श्रद्धाळू व निव्वळ बुद्धिवादी, असे निरनिराळे वर्ग पडूं लागले. शिवाय, वीरशैवधर्म सर्वच लिंगधारी लोकांत साम्यता दर्शविणारा असला तरी जन्म-जातीमुळे श्रेष्ठ व कनिष्ठ असा जातिभेद रूढ होऊन बसलाच आहे. ह्या रूढ जातिभेदाला चिकटून असावें असें ह्मणणारा वर्गहि जागृत झाला आहे. आणि हा रूढ जन्मजात विषमतेचा मार्ग आमूलाग्र नाहीसा करावा असें ह्मणणारा वर्गहि पुढे येत आहे. वास्तविक ह्या दोहोंपैकीं कोण कोणावर मात करील हें सांगतां येत नाही. समाजाचें जीवन ज्या परिस्थितींत ज्या गोष्टीवर व ज्या साधनावर अवलंबून असतें त्याच गोष्टी रूढीबद्ध होऊं लागतात. ह्यामुळेच दर वेळीं जुन्याचें नवें होतें. पण ह्याचा अर्थ नव्याने जुन्यावर मात केली असा होत नाही; तर ती समाजाची नैसर्गिक वाढ आहे असेंच ह्मणावें लागेल. ह्मणूनच जुनें तेवढेंच चांगलें असें ह्मणण्याचाहि आमचा आग्रह नाही व नवें तेंच उत्तम असेंच सर्वस्वीं म्हणावें इकडेहि आमची प्रवृत्ति नाही. कालानुरूप प्राप्त होणाऱ्या स्थितींत समाजाचें जीवन चालावें हेंच आम्ही पाहणार. कारण समाज सुदृढ व संघटित राहिला तरच धर्महि जिवंत राहील. समाज नसल्यावर धर्म कोणाचा व कोणा-च्या उद्धारार्थ राहणार ? ह्याकरिता समाज अधिक सुदृढ, अधिक संघटित, समृद्ध व विवेकी होण्यास कालानुरूप काय योग्य आहे हें पाहणें हेंच धर्म जिवंत ठेवण्याचें पहिलें साधन. ह्या साधनाचा पाया प्रथम परस्परपरिचयावर आम्हाला घालावयाचा आहे; सुधारक वा दुर्धारक, पंचाचा-र्यानुयायी वा विरक्तपक्षीय, गुरु कीं भक्त, शिक्षित कीं आशिक्षित, शीलवंत आहे कीं पंचम आहे, लिंगा-यतांतील अमक्या पोटजातींतील आहे कीं तमक्या पोटजातींतील आहे, हें आम्हांला काहींच पहावयाचें नाही. आमचा परिचयपट विरक्तपंचाचार्यादि माहेश्वरांपासून लिंगधारी कोणाहि वीरशैवांतील पोटजातीकरिता मोकळा आहे. पण तो २॥ रुपये एका वर्षाचे आगाऊ देऊन वीरशैव-संजीवनीचा वर्गणीदार मात्र असला पाहिजे. वर्गणी न दिलेला कोणीहि असला तरी त्याचें नांव मात्र परिचय-पटांत दाखल व्हावयाचें नाही.

कारण परिचयपटांतील माहिती वीरशैव-संजी-वनींत छापून प्रसिद्ध होईल, व वर्षाअखेर त्या परि-चयपटाचें स्वतंत्र पुस्तक छापून तयार होईल. इतकेंच नव्हे तर 'वीरशैव संजीवनी' जितकी वर्षे निघेल तितक्या प्रत्येक वर्षाच्या पटांत नव्याची भरती तर होईलच; पण जुन्याच्या माहितींतहि बदल होत जाईल. अशा रीतीने दर वर्षाचा हा परिचयपट प्रत्येकाच्या माहितीकरिता ताजा राहील. पण परिचयपटांत ज्यांची नांवें दाखल होतील त्या सर्वांनी शिवाला स्मरून अशी प्रतिज्ञा करावी लागेल कीं, प्रत्येक वीरशैवाशीं, मग तो कोणत्याहि पोटजातींतील असो, परस्परसहानुभू-तीने, प्रेमाने, व आदराने वागूं आणि एकमेकांच्या सामाजिक, धार्मिक, आर्थिक, व शैक्षणिक अडच-णींत स्वार्थत्यागपूर्वक सहाय्य करूं.' निरनिराळ्या पोटजातींत रोटीबेटीव्यवहार सरसहा घडवून आणणें असा त्या प्रतिज्ञेचा अर्थ आहे अशी मात्र कोणीं कल्पना करूं नये. आम्हीं हा प्रश्न ज्याच्या त्याच्या खुशीवर अवलंबून ठेवला आहे, व तो केव्हाहि खुशीचाच राहणार. तथापि कोणत्याहि वीरशैवाच्या लग्नकार्यांत एकमेकांनीं अक्षता टाकावयास जाणें व त्या कामीं शक्य ती अन्य मदत करणें, अंत्यविधीच्यावेळींसुद्धा एकमेकांनी एकमेकांस सहाय्य करणें, आर्थिक मदत देऊन उद्योगास वा शिक्षणास मदत करणें ह्या ठिकाणीं पोटजात वा रोटीबेटीबंद व्यवहार आड आणूं

नये. एवढें घडलें तरी सर्व वीरशैव संघटित होऊन एकमेकांच्या अधिक जवळ येतील. म्हणूनच प्रतिज्ञा वरचेवर कानावर जाऊन तिचे संस्कार मनावर व्हावयास पाहिजेत.

अशा प्रकारची प्रतिज्ञा केल्यावर १२-कलमांचा परिचयपट भरावा. त्यांत कुटुंबांतील सर्व स्त्रीपुरुषांची व मुलांमुलींची पूर्ण नांवें लिहावींत, सर्वांच्या वयाचा उल्लेख करावा, विवाहित कीं अविवाहित ही स्थिति लिहावी, धंद्याचा उल्लेख करावा, शिक्षणाचा दर्जा लिहावा, मराठीच्या ज्ञानाचा उल्लेख करावा, आपल्या गांवच्या वीरशैवांच्या संख्येचा उल्लेख करावा, धार्मिक व सामाजिक कार्याप्रीत्यर्थ सालच्या खर्चाचा उल्लेख करावा, आणि परोपकारार्थ सालची किती रक्कम खर्च होते व करण्याची इच्छा आहे हेंहि लिहावें. त्याचप्रमाणे संघटनेविषयी कोणाला कांहीं अधिक सुचत असल्यास तेंहि त्यांनी कळवावें. अशा प्रकारचा शे-दडिशे कुटुंबियांचा परिचयपट जरी प्रसिद्ध झाला तरी हा परिचय कोणत्याहि महासभेपेक्षा अधिक उपयुक्त व अधिक कारणी पडण्यासारखा आहे. कोणत्या दर्जाची कोणती कुटुंबें कोठे राहतात ही माहिती मिळाल्यावर कोणाचें कोणतेंहि कार्य सुलभ होतें आणि उगीच भटकत बसण्यापेक्षा अनेक कार्ये पत्रव्यवहारांनीहि होऊं लागतात हा केवढा लाभ ? ह्याशिवाय ह्यांतून पुष्कळ गोष्टी निघतील. पण ह्या वर्षी परिचयपट तयार करणें व तो 'वीरशैव संजीवनी'-च्या दर अंकांत जसजशीं नांवें येतील तसतसा प्रसिद्ध करणें व वर्षाअखेर ह्या जंत्रीचें पुस्तक परिचयपट भरणारास देणें एवढेंच आमचें कर्तव्य आहे. सदरप्रमाणें भरावयाचा परिचयपट छापून तयार आहे. ज्याने 'वीरशैव संजीवनी'-ची वर्गणी भरली असेल त्याच्याचकडे तो भरण्याकरिता रवाना होईल. इतरांकडे तो जाणार नाही. ज्याच्याकडे ज्या पाकीटांतून तो रवाना होईल त्याने त्याच पाकीटांत घालून व सव्वा आण्याचें पोष्टाचें तिकीट लावून आमचेकडे पाठवावा. ह्या पटांतून ज्या कुटुंबांची वा मठाची आम्हाला माहिती येईल ती प्रसिद्ध झाल्यावर हेच भावी वीरशैवसंघटनेचे खरे आधारस्तंभ पुढील पिढींत गणले जातील. इतर मात्र जन्मले तसे गेले असें होणार. तरी आत्मस्वरूपी शिवाचें ज्याला अमरत्व पटलें आहे, त्या वीरशैवाने वीरशैवसंजीवनीचे वर्गणीदार होऊन परिचयपट भरावा व अमरत्व उपभोगण्यास सिद्ध व्हावें ही प्रार्थना आहे

# ' संजीवनी '-चें शुभ चिंतन.

श्रीमन्निरंजन निजगुण स्वामी, किरीटमठ, सोलापूर; सौ पंचव्वाबाई सरदार, ( बॅ.सरदार-हयांच्या पत्नी असून, हे उभयतांहि आमच्याच प्रमाणे जन्मजात माहेश्वर अर्थात जंगम कुळापैकीं आहेत. ) श्र. बाबासाहेब वारद [ कै. आप्पासाहेब वारद-ह्यांचे चिरंजीव ] बॅ. एम्. एस्. सरदार, सोलापूर; श्री. सि. म. कल्याण-शेट्टी बी. ए. एल्. एल् बी. व मोमनाबादचे वकील. श्री. शेटे ह्यांचे शुभचिंतनपर संदेश खालीलप्रमाणे आले आहेत ते पुढील अंकीं देऊं.

—:०:—

# वीरशैवांतील चळवळी

**आर्यसमाज व वीरशैव**

हैदराबाद संस्थानांत आर्यसमाजाने वीरशैवांना इष्टलिंगाच्या उपासनेंतून सोडवून यज्ञोपवीत देण्याचा उपक्रम सुरूं केला. अशा प्रकारें सहा तरुण लिंगायतांकडून वीरशैवपंथाचा त्याग झाला. त्यांत म्हैसूर महाराजा-कॉलेजमधील ज्युनिअर इन्टरक्लासमधील एक विद्यार्थि आहे. आर्यसमाजाच्या ह्या आक्रमणाबद्दल श्री. भंजाप्पा हार्डीकर हे एकटे चळवळ करीत आहेत. परंतु विरक्त महास्वामी व पंचाचार्य गुरुवर्य संघ ह्या आक्रमणाविरुद्ध काय उपाय सुचवीत आहेत हें अद्यापि जाहीर होत नाही. नुसत्या निषेधाच्या सभा ह्या कामीं काय उपयोगी पडणार ?

**नवी लिंगधारणा.**

जुने लिंगधारणेपासून परावृत्त होत आहेत हें आर्यसमाजाच्या वरील हकिकतीवरून नजरेस येतेंच. पण हुबळी येथे तेलगू बणजीग जातीच्या आठ कुटुंबांना श्री. पावटे ह्यांच्या नेतृत्वाखाली श्री. शंकरदेव विरक्त ह्यांनी लिंगधारणदीक्षा दिल्याचा समारंभ झाला. हें कार्य प्रथम तेथील कांही पट्टदेवरू करीत होते. पण रु. ५०० दाक्षिणा मागत होते. पण ही अट चांगली नाहीं म्हणून इतर प्रमुख वीरशैवांनी हा लिंगधारणदीक्षाविधी जाहीरपणें करून, वीरशैवपंथ वाढविण्याचा जुना स्तुत्य उद्योग सुरूं केला त्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे.

**पुन्हा दुसरा लिंगायतदीक्षेचा विधी.**

विजापूर जिल्हयांतील शिंदगी तालुक्यांत यंकची म्हणून गांव आहे. तेथे लिंगायत व सोनार ह्यांची मिश्र संतति फार होती. त्यापैकीं ८१ स्त्रीपुरुषांना बसवपुराणसमाप्तीच्यावेळीं विजापूरहून श्री. शंकरआप्पा धनशेट्टी, गुंडाप्पा शाबादी, वगैरे वीरशैव पुढाऱ्यांनी जाऊन लिंगधारणदीक्षा दिली, व सहभोजन वगैरे करून प्रसंग यशस्वी रीतीने पार पाडला.हा दीक्षासमारंभविधी यरगलच्या शांतवीर महास्वामी ह्या पट्टाधि-

काऱ्याच्या हस्तें झाला. त्याबद्दल विशेष आनंद होतो. ह्यावरून आखिल भारतीय गुरुवर्य संघास ही गोष्ट मान्य आहे हें स्पष्ट होत असल्यामुळे सदर संघाचें कोण अभिनंदन करणार नाही ?

## ख्रिश्चन लिंगायत झाले व लग्नहि लागलें.

हुबळीपासून तीन मैलांवर असलेल्या उणकल्ल गांवीं ५० वर्षांपूर्वी एकहजार लिंगायत ख्रिश्चन झाले होते. त्यांनी शिवदीक्षा घेऊन परत वीरशैव-धर्मांत यावें म्हणून हुबळीच्या वीरशैवसंघटना-संघाने उद्योग चालविला होता. शेवटी विजापूरच्या पट्टाधिकाऱ्यासह उणकल्ल येथे जाऊन मिस मेरी लुथिसा व इतर २०० ह्यांची शुद्धि करून घेतली. ह्या समारंभास विरक्त स्वामी व अनेक वीरशैव शास्त्री पंडित वगैरे ५०० सद्गृहस्थ हजर होते. शिवदीक्षा व लिंगधारणा झाल्यानंतर यांतील कु० शांता हिचा मूळ वीरशैवपैकी कल्लप्पा संकण्ण-वर ह्याच्याशीं विवाह झाला, मिरवणूक निघाली, व सहभोजन होऊन विधी आटोपला. ह्या समारंभा-वरून पूर्वीचा खरा वीरशैवधर्म जागृत झाला असें मोठ्या अभिमानाने म्हणावें लागतें. महाराष्ट्रांत ठिकठिकाणी स्थापन होत असलेल्या तरुण वीरशैव संघांनीं ह्या गोष्टी आदर्शभूत नाहीत ?

## रड्डींना लिंगधारणा व सहभोजन

गुलबर्गा जिल्ह्यांतील नावदंगी येथील २२ घरा-ण्यांतील ९७ रड्डी जातींना हंप्पय्या हिरेमठ स्वामींनी लिंगधारणदीक्षा शास्त्रोक्त देऊन त्या सर्वांसह व प्रमुख वीरशैवांसह सहभोजन झालें. प्रत्येक स्वामींनी व सद्गृहस्थांनी ह्रा उद्योग केला तर वीरशैवांची संख्या वाढून वीरशैवसंस्कृतीच्या प्रसाराने किती पतितांचा उद्धार केल्याचें पुण्य लागेल ? सर्व महाराष्ट्रांत हा उद्योग सुरू होवो ! व होईलच होईल.

## एक तोतया स्वामी

नांदेड [ मोगलाई ] जिल्ह्यांतील खानापूरगांवीं निजलिंग स्वामी म्हणून एक बढाईखोर स्वामी निर्माण झाला व लोक त्याच्या नादीं बरेच लागले व पैसाहि देऊं लागले. कारण पूजेच्या वेळीं इष्ट लिंगाचें अंतर्धान होतें व नंतर तें येतें असा चमत्कार हा स्वामी करतो. पण जपाकरिता तोंड झाकल्यावर इष्ट लिंग लंगोटींत घालणें व नंतर तें काढणें हा त्याचा क्रम एकाने उघडकीस आणून त्याचें तोतयेपण जाहीर केलें. खोट्या तपानुष्ठानवाल्याचें बंड असेंच मोडावयाचें.

## खरा तपोनिधि

लाडतीरा येथील पट्टाधिकाऱ्याचे शिष्य तपो-निधि पर्वतमरी देशिकेंद्र हे वैशाख वद्य २ पासून तों कार्तिक वद्य २ पर्यंत तपाला बसले होते. शेवटी गणाराधना झाली. ८०-९० हजार लोक प्रसाद घेऊन गेले. ह्या समारंभाला विस्तीर्ण मंडप वगैरे देऊन अनेक धनिकांनी सहाय्य केलें व अखेर सदानंदबुवांचें कीर्तन होऊन समारंभ मोठ्या आनंदाने संपला.

## लिंगायत तेली परिषद्

कोल्हापूर येथे येत्या जानेवारींत लिंगायत तेली परिषद् भरविण्याचा तेथील कार्यकर्त्यांत विचार सुरू आहे.

## पंढरपूर वीरशैव तरुणसंघ

सदर संघाचें सहावें सम्मेलन श्री. गुरु होटगी-कर स्वामी ह्यांच्या अध्यक्षतेखालीं लवकरच भर-णार आहे.

## माठेमठाला अधिकारी नाही

माठे मठाचा कारभारी वयोवृद्ध, व मठास पीठा-धिकारी नाही. तेव्हा हा पट्टाभिषेक कोणास व केव्हा होणार म्हणून कुरकुर सुरू झाली आहे.

## मंगळवेढे

श्री. गुरु सिद्धाराम स्वामींचे अध्यक्षतेखालीं मंगळवेढे येथे वीरशैवांची सभा भरून राचप्पा पट्टणशेट्टी, पांडुरंगअप्पा चिंचकर, व पंढरपूरचे श्री. शंकरआप्पा भादुले, ह्यांचीं भाषणें होऊन ओतूरकरांच्या इतिहासांत वीरशैवाविषयींच्या मज-कुरांत सुधारणा व्हावी, व पुणे येथील हिंदुमहा-सभेंत वीरशैवांनी भाग घ्यावा, असे ठराव पास झाले.

### शोचनीय निधन

कुर्डुवाडीचे काशीनाथ स्वामी लडगे हे वयाच्या ६७ व्या वर्षी कैलासवासी झाले. ते सदर्न मराठा व जी. आय्. पी. रेल्वेंत स्टेशनमास्तर होते. वीरशैवसमाजाच्या चळवळीकरिता ते झटत होते. स्वामी परान्डकर व कै. करमाळेकर ह्यांचें ऐक्य होऊन 'वीरशैव केसरी' चालावा अशी त्यांची फार इच्छा होती.

### हावेरी येथे जगद्गुरुंची आडवी पालखी

आजचे रंभापूर सिंहानसाधीश जगद्गुरु शिवानंद राजेंद्र ह्यांच्या अड्ड पालखीचा महोत्सव हावेरी येथे मोठ्या उत्साहाने पार पडला. ह्या मिरवणुकींत ३०००० वीरशैवांचा समुदाय होता. मिरवणूक संपल्यावर जगद्गुरुंनी भक्त मंडळीस निरोप दिला. ह्या समारंभास हुबळीपासून मंडळी आली होती.

### हुबळी येथील लाथाळी.

पंचवक्र गणाधिश्वर हाच वीरशैवाचा मूळ पुरुष होय. म्हणूनच पंचमसाली ह्या नांवाने संबोधिले जाणारे पोटजातीचे लोकच गुरुवंशाचे मूळ अधिकारी होत, व त्यांनीच पंचाचार्यांना वीरशैव बनविले. तत्पूर्वी पंचाचार्य हे निराळे शैव होते, वगैरे मजकूराचें पत्रक प्रसिद्ध झाल्यावरून तेथील वीरशैवांत लाथाळी माजली व पत्रके जाळण्याचा व एकमेकांचा निर्बंध करण्याचा उपक्रम सुरू झाला.

### बसवेश्वर व दयानंद सरस्वती.

आलमट्टीच्या 'शरण संदेश' ह्या कानडी पत्राचे संपादक श्री. मंजाप्पा हार्डीकर ह्यांनीं 'बसवेश्वर व दयानंद सरस्वती' ह्या विषयावर लेखमाला लिहून बसवेश्वरास दयानंदाचे पूर्वज ठरविलें. उमरावतीचे श्री. बामणगांवकर ह्यांनीहि 'शरण संदेश' पत्राच्या 'हिंदुसभा' अंकास संदेश पाठवून वीरशैवधर्म हा आर्यसमाज व आजची हिंदुसभा ह्यांचें खरें मूळ होय असें प्रतिपादिलें आहे.

### आर्थिक व व्यापारी वृत्त.

१९३४ सालीं हिंदुस्थानांतील लोखंड व कोळसा ह्यांच्या खाणींत काम करणाऱ्या मजूरांत तेवीस हजारांनी वाढ झाली. एकंदर संख्या २ लक्ष ३० हजार आहे.

आस्ट्रेलियांतून हिंदुस्थानांत एक कोटीचा माल येतो, व हिंदुस्थानांतून तेथे तीन कोटींचा माल जातो. ही देवघेव वाढावी म्हणून आस्ट्रेलियन व्यापारी प्रतिनिधि ह्या देशांत आले.

हिंदुस्थानांतील भांडवलवाले व कामगार ह्यांच्यांत गेल्या वर्षाच्या पहिल्या तिमाहीत ४१ तंटे उत्पन्न झाले. ह्या पायीं कामगारांचे पावणेदोन लक्ष दिवस बिनामजुरींत गेले.

### धर्मोद्धारक शास्त्रीपंडित

बेळगांवांत कांहीं दिवसापूर्वी गुरु लिंगाप्पा व गौरी शंकर शास्त्री ह्यांनी बसवदेवाचे गुण वर्णन करतांना पंचाचार्यपक्षीयांवर मारा केला. त्याला पंचचार्यपक्षातर्फे वीरभद्र शास्त्री वृहन्मठाचें पट्टाधिकारी व गुरु किंकर बंकापूर ह्यांनी तसेंच झणझणीत उत्तर दिलें व त्यावद्दल दोन्ही पक्षांतर्फे एकमेकांच्या निषेधाच्या सभा व एकमेकानां धमक्या देणारे लेख 'सुदर्शन' व 'वीरशैव गर्जने'तून प्रसिद्ध होत आहेत. वाद कशाबद्दल आहे हें उभयताचीहि बाजू वाचून कळेल तर शपथ. कारण दोन्ही बाजूला विद्वान् शास्त्री पंडित आहेत म्हणतात. धर्मप्रवचने म्हणजे शिमगा हेच दोघांकडूनहि उघड होतें.

२५ ,, विश्वनाथ तुकारामआप्पा ऊर्फ बाबुराव चौधरी, बी. ए. अमरावती.
२६ ,, मारोतीआप्पा सदुआप्पा ऊर्फ बाबाप्पा गाढवे, मोर्शी.
२७ ,, सदाशीवआप्पा शंकरआप्पा बोनते, कारंजा.
२८ ,, भाऊराव देवाप्पा विभूते, कारंजा
२९ ,, देवाप्पा कोंडाप्पा साखरकर. ,,
३० ,, सोमाप्पा नथाप्पा पांगरे, ,,
३१ ,, विश्वनाथ दगडाप्पा तांदळे, ,,
३२ ,, नामदेव आप्पाजी कोरे, दारव्हा.
३३ ,, माधवराव बापूआप्पा खंदाडे, ,,

---

## संजीवनीला सहानुभूति.

श्रीयुत आप्पासाहेब एकलारे, बी ए; एल्. एल् बी; पुसद. श्री. वि. तु. चौधरी, बी. ए. श्री. गोदाजीराव मुखरे व आप्पाराव कोल्हे हे बार्शी, सोलापूर, अक्कलकोट, विजापूर, वगैरे भागांकडे गेले असतां ज्यांनी 'संजीवनी'-च्या कार्याला सहानुभूति दाखविली त्यांचीं नांवे.—

**बार्शी:**—श्री. गुरुमूर्ति स्वामी परान्डकर, श्रीमंत अण्णासाहेब कथले. बार्शी म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष गवसणे वकील श्री. मल्लिकार्जुनआप्पा भातकर.

**सोलापूर:**—श्री गुरुमूर्ति निजगुण स्वामी, बॅ. सरदार, सौ. पंजव्याबाई सरदार, श्री. बाबासाहेब वारद, 'सुदर्शन'कार श्री. कल्याणशेट्टी, श्री. झुंजे वकील, श्री. नागाप्पा अण्णा अबदुलपुरकर सोलापूर-म्यु० कमिटीचे अध्यक्ष, डॉ जगदेवराव देशमुख, श्री तात्यासाहेब चव्हाण, श्री. बसवंती कल्याणशेट्टी, सौ. संगव्वा मडकी,

**अक्कलकोट:**—श्री. एस्. पी. कापसे सबजज्ज, श्री. पट्टगे जेलर, श्री. बी. आर जंगम वकील, श्री. भिमपुरे म्यु० प्रसिडेन्ट व ऑनररी-मॅजिस्ट्रेट व श्री. लाकापुरे

**विजापूर:**—रावसाहेब हलवट्टी ए. सी. अंगडी वकील.

# वर्गणीदारांस विनंती.

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्या वांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह व परगांवच्या टपालखर्चासह ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाहीं करितां व्ही. पी. करा असें कोणीहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटे आगाऊ आली पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणीहि ५०० शब्दावर लिहिलेला नसावा, बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे व बातमीप्रसारापेक्षां विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमूना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

अंक २ रा ) ता० १५ जानेवारी १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— ' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथें निघत असून वीरशैवांत सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल् एल्. बी. हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधीं चांगल्या लेखकाचे लेखहि येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापक.— ' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरुराचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु २ आणे १२ आहे.

व्यवस्थापक.—' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

# वांचें एकीकरण

## विवाह



श्रीमंत बाबासाहेब मुखरे, सावकार व जमीनदार,
मु. पुसद बोरी, जि. यवतमाळ (वऱ्हाड).

### आशीर्वाद :

जसांत वाढलेली आहे. ह्या उभयतांचा विवाह मुखरे-घराण्याचा लौकीक वाढविण्यास कारणी- होवो अशी आमची परमेश्वरचरणीं प्रार्थना आहे. वडिलार्जित संपत्तींत वाढ करून तिचा योग गोरगरीबांच्या सर्व प्रकारच्या कल्याणार्थ करण्याच्या व समाजाच्या सर्वतोपरीं उत्कर्ष इच्छि- च्या कामीं सतत होवो असें आम्ही इच्छितों. वराने कै. आप्पासाहेब वारदाप्रमाणें आपला व आपल्या ण्याचा लौकीक सर्वतोमुखीं निरभिमान वृत्तीनें कसा होईल व आपण समाजाच्या हितार्थ कसे नित्य योगी पडूं ह्यांचेंच चिंतन करावें आणि सत्शील व सदाचारी होऊन सर्वांचे धन्यवाद घ्यावेत. वधूने सवाबाई वारद ह्यांचें ध्येय समोर ठेवून पतीकडून समाजसेवा घडेल व त्याच्या कार्यात सहाय्य येईल असें वागावें. ह्या वधूवरांना दीर्घायुष्य यावें. अशी आमची ईशचरणीं नम्र प्रार्थना आहे.

 

# महाराष्ट्रीय वीरशै

## पहिला मंगल



सोलापूरचे कै० श्रीमंत चनबसप्पा चव्हाण ह्यांची कन्या, व बार्शीचे श्रीमंत अण्णासाहेब कथले ह्यांची भाची चि. गंगुताई ऊर्फ माईसाहेब, सोलापूर ( मुंबई इलाखा ).



### : वधुवरांना शुभ

वऱ्हाडच्या यवतमाळ जिल्ह्यांतील पुसद बोरीचे सुप्रसिद्ध सावकार व जमीनदार श्रीमंत गोदाजीराव ऊर्फ बाबासाहेब सखाराम आप्पा मुखरे यांच्याशीं सोलापूरचे सुप्रसिद्ध चव्हाण ह्यांच्या घराण्यांतील कै० चनबसप्पा चव्हाण ह्यांची मुलगी, व श्रीमंत सातप्पा चव्हाण ह्यांची पुतणी आणि बार्शीचे श्रीमंत अण्णासाहेब कथले ह्यांची भाची चि. गंगुताई ऊर्फ माईसाहेब ह्यांचा मंगल विवाह ता० २१ डिसेंबर रोजीं बार्शी मुक्कामी मोठ्या समारंभाने झाला. आणि ह्या विवाहाने दोन भागांतील दोन प्रसिद्ध वीरशैवांचीं घराणीं एकत्र झालीं ह्याबद्दल आह्मास अत्यंत आनंद वाटतो.

वर बाबासाहेब तरुण आहेत व सुशिक्षित आहेत आणि परंपरेने श्रीमंत आहेत. वधूसुद्धां श्रीमंत व प्रसिद्ध घराण्यांतील असून इंग्रजी पाचवीपर्यंत शिक्षण घेतलेली आणि सुज्ञ व

सम
भूत
वि
ण्य
घर
उप
कै
हो

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय: ।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति पौष व॥ ६ शके १८५७ ( अंक २ रा.

# आर्यसमाज व वीरशैव

निजाम-हैदराबाद इलाख्यांत गुलबर्गा ह्मणून एक गांव आहे व तेथें आर्यसमाजाची एक शाखा आहे. सदर शाखेच्या वाढीला व उत्क-र्षाला वीरशैवसमाजाचा पैसा व मदत हीच कारण झाली. पण त्या आर्यसमाजाला सध्या जे एक चिटणीस लाभले आहेत त्यांना अशी दुर्बुद्धि सुचली कीं, वीरशैवांपैकीं कित्येकांना आर्यसमाजी धर्माची दीक्षा द्यावी. ह्याप्रमाणें एक हजारावरील वीरशै-वांना इष्टलिंग सोडावयास लावणे व त्यांना जानवी चढविणें हा उद्योग करण्याची त्याने जाहीरपणें भीषण प्रतिज्ञा केली आहे. व कांही वीरशैवांना इष्टलिंगधारणेपासून त्याने पराङ्मुख केलें आहे. त्यामुळे वीरशैवसमाज व आर्यसमाज ह्यांच्यांत या भागांत विलक्षण वैर उत्पन्न झालें आहे.

आर्यसमाजाचे संस्थापक दयानंदसरस्वती-विषयीं व त्यांच्या आर्यसमाजाने केलेल्या कार्या-विषयीं आह्माला व आमच्या सर्वच वीरशैव बंधूंना आदर आहे. कारण आर्यांचें आर्यत्व व त्यांच्या संस्कृतिसंरक्षकत्वाची कामगिरी ह्या वीसाव्या शतकांत आर्यसमाज-पंडितांनी स्वत:चे बळी देऊन केली आहे. त्यांच्या शाळा, त्यांची विद्यालयें, त्यांची व्यासंगी वृत्ति, व त्यांची संघटना ही कोणाहि धर्मरक्षकास व प्रसारकास अनुकर-णीय व वंदनीय आहे. मूर्तिपूजेचा तिटकारा हा जर या समाजाचा विशेष नसता तर अनेक हिंदु सुधारकांचा प्रथमपासूनच ह्या समाजाला पाठिंबा मिळाला असता. परंतु पुढे मुसलमानांचें आक्रमण एकंदर हिंदु ह्मण-विणाऱ्यावर जसजसें सुरु झालें व हिंदुसंघटनेचा प्रश्न जसजसा उत्पन्न होऊं लागला तसतशी आर्य-समाजाने हिंदूंच्या मूर्तिपूजेवरील मोहिमेला आळा

घातला व आर्यसमाज एकंदर हिंदुसंघटनेंत सामील झाला. इतकेंच नव्हे तर हिंदूंच्या संरक्षणाचा तो समाज बालेकिल्ल्यासारखा आहे असें गेल्या दहा वर्षांत अनुभवास आलें.

परंतु गुलवर्गा येथील आर्यसमाजाच्या एका बेजबाबदार मंत्र्याने वीरशैवावरच आक्रमण करण्यास सुरवात केली. त्या भागांत एक मुसलमान स्वतःला चन्नबसवेश्वराचा अवतार म्हणवीत फिरतो आणि तो अनेक अडाणी लिंगधारी स्त्रीपुरुषांना आपल्या जाळ्यांत अडकवितो. गुलवर्गा-आर्यसमाजाने अशा तोतया चन्नबसवेश्वराच्या आक्रमणापासून संरक्षण व्हावें म्हणून वीरशैवांना मदत देण्याचें सोडलें व आर्यसमाजी मंत्री वीरशैव समाजावर व पंथावरच उलटला. अशा प्रकारें एका आर्यसमाजी मंत्र्याने तोतया चन्नबसवेश्वराच्या आहारीं जावें व हिंदूंनीच हिंदूंवर आक्रमण करण्यास प्रवृत्त व्हावें हें निंद्य नव्हे असें कोणाहि समंजस हिंदूस म्हणतां येणार नाही. आर्यसमाजाचें तत्वज्ञान पटून व त्याची संघटना प्रत्ययास येऊन त्यांच्या व्यासंगी व उद्यमशील वृत्तीवर खुष होऊन कोणी वीरशैव खुषीने आर्यसमाजाची दीक्षा घ्यावयांस तयार झाला तर त्याला कोणीहि नांव ठेवणार नाहीं. असे कांही वीरशैव खुषीनेच ह्यापूर्वी आर्यसमाजी झाले आहेत हें आह्माला माहित आहे व त्याकरिता समंजस वीरशैवांनी आर्यसमाजाविरुद्ध तक्रारहि केली नाही.

गुलवर्गा हा मोंगलाईंतलि एक भाग आहे. तेथे वीरशैवांची ( लिंगायतांची ) संख्या अधिक आहे. अधिक संख्येंत वाढतें दारिद्र्य असतें व आशीक्षितपणांहि कायमचाच असतो. अशा परिस्थितींत सर्व वीरशैवांना पूजनीय व वंदनीय असलेल्या बसवादि प्रमथांची व शरणांची निष्कारण निंदा फैलावण्याचें पाप करणें व सर्व वीरशैवांचा रोष करुन घेणें हें हिंदुसंघटनेचें खात्रीने ब्रीद नव्हे. गुलवर्गा-आर्यसमाजाच्या मंत्र्यानें अनेक हस्तपत्रकें हिंदीमध्ये काढून त्यांत बसवादिकांची व्यर्थ निंदा केली आहे व सर्वसामान्य वीरशैव जनतेच्या श्रद्धेला कारण नसतां दुखविलें आहे. बसवादिशरणांना भक्तपदाचा मान आहे पण गुरुपदाचा मान नाही म्हणून सद्यास्थितींतहि गुरु ह्मणविणारांचें व्यर्थ बंड माजविणारा असा एक पक्ष सध्या वीरशैवांत रूढ झाल्यासारखा दिसतो. ह्या पक्षाने बसवादिकांची निंदा केलेलीं अनेक पत्रकें कानडींतून काढलीं ह्मणतात व तींच गुलबर्गा-आर्यसमाजमंत्र्याने आधारास घेऊन बसवादिकांची निंदा चालविली असाहि एक लोकपवाद आमच्या कानांवर आला आहे. ह्यांत तथ्य आहे असें मानलें तरी ह्या वादाच्या मुळाशीं बसवादिशरण हें गुरुशीं तन्मय होऊन राहणारे महान् भक्त होते व अशा शिवभक्तास आजच्या कांही वीरशैवांनी श्रद्धेने गुरुपद दिलें तर त्यांत कोणताहि दोष नाहीं. गुरु आजचा असो वा कालचा असो; मग तो विरक्त ह्मणविणारा असो; वा आचार्य म्हणविणारा असो; कोणा तरी गुरुवर श्रद्धा ठेवून त्याचेजवळून दक्षिा घेऊन आणि अत्युत्कट भक्ति प्रकट करूनच त्यांस इतरांचें गुरुपद लाभत असतें व तोच सहजगत्या गुरुपदाचा अधिकारी होतो. बसवदेवास संगमदेव असेच आचार्य लाभले होते व त्या संगमदेवाच्या ठिकाणीं स्वतःचें सर्वस्व विसरून बसवाने अशी भक्ति व्यक्त केली कीं, ‘संगम-बसवदेव’ असें गुरुशिष्यसाम्यभाववाचक नांव रूढ झालें. अशा स्थितींत आजचा गुरु ह्मणविणारा कोणीही जर मीच बसवाचा गुरु ह्मणवील तर तो मूर्ख नाही का ठरावयाचा? वास्तविक आजच्या विरक्तास व आजच्या आचार्यास बसवदेवासारखा भक्त लाभल्यावाचून गुरुपद प्राप्तच होत नाहीं. नुसते एखाद्या मठाच्या गादीवर आरूढ होणें ह्मणजे गुरु होणें नव्हे, व तेच गुरु होणें होय असें कोणीं ह्मटलें तर शहाणे तरी त्यास मूर्खांत काढल्यावाचून राहणार नाहींत. परंतु बसवादिशरणांना भक्तांत काढून त्या सर्वांवर आजचें आपलें गुरुपद लादण्याचा कोणाचा प्रयत्न असेल असें आम्हांस वाटत नाही. निदान आमच्या अनुभवास तरी तसें आलें नाही. तेव्हा

ह्या बाबतींत वाद असलाच तर तो बसवादिकांना वीरशैव दीक्षा देणारे बसवापूर्वी कोणी योग्य गुरुहोते किंवा नाहीं एवढाच असावा. आणि होते हें ऐतिहासिक सत्य कोणासहि कबूल करावें लागतें.

ह्यामुळे बसवदेव वीरशैवधर्माचे संस्थापक कीं प्रसारक असा एक शाब्दिक वाद वीरशैवा-वीरशैवांत सुरू आहे. आर्यसमाजाच्या संस्थापकांनी आर्यसमाजाची स्थापना एकोणीसाव्या शतकांत केली आहे. एवढ्यावरून ज्याला आपण आर्यधर्म ह्मणतो तो एकोणीसाव्या शतकांत महर्षि दयानंदांनी स्थापिला असे होत नाही व म्हणतांहि येत नाही. परंतु संस्थापक हें विशेषण बसवेश्वरास जे लावतात व प्रसारक हें विशेषण जे लावतात त्यांच्यांत शब्दांशिवाय दुसरा फरक नाही. दोन्ही शब्दांमागे दोघांच्याहि मनोवृत्तींतील बसवदेवाचें श्रेष्ठत्वच प्रतिबिंबित होतें. अशा स्थितींत वीरशैवांतील ह्या अंतर्गत वादाचा मतलबाकरिता एखाद्या आर्यसमाजाच्या मंत्र्याने फायदा घेणें हें सद्हेतूचें लक्षण खास नव्हे. दरिद्री समाजांत धर्माचे आचारविचार कायम रहात नसतात. वीरशैवांचें दारिद्र्य पाहून त्यांच्या दरिद्री स्त्रियांची व चालीरीतीची नालस्तीहि एका पत्रकांत गुलबर्गा-आर्यसमाजमंत्र्याने केली आहे. आर्यसमाजीयांतील अशा किती तरी स्त्रियांची व पुरुषांची नालस्ती कोणासहि करितां येईल व तेवढ्यावरून आर्यसमाजाच्या मुळ प्रवर्तकांनी प्रतिपादन केलेल्या ध्येयाचीहि कुचेष्टा करितां येईल. असें करणें खऱ्या धर्मसेवकाचें लक्षण नव्हे. पण जें खऱ्या धर्मसेवकास शोभत नाही तें गुलबर्गा-आर्यसमाजमंत्री करूं लागला हें आश्चर्यांतील आश्चर्य होय.

आर्यसमाज आर्यधर्मांतील उच्चतत्वांची सेवा करण्यास महर्षि दयानंदांनी स्थापन केला. वीरशैवधर्म वा समाज जो बसवकाळीं व बसवकाळापूर्वी अस्तित्वांत आला त्याचें मूळ पाहिलें तर तात्विक दृष्ट्या आर्यसमाज व वीरशैवसमाज ह्यांत फारसा फरक आढळावयाचा नाही. आर्यसमाज द्वैतवादी आहे. ते निर्गुणाचे उपासक असून, मूर्तिपूजेचे द्वेष्टे आहेत. वीरशैवधर्म व समाज हा इष्टलिंगधारणेच्या उपासनेवर उभारला आहे. शिवाला ब्रह्माचें स्वरूप प्राप्त झाल्यावर व शिवशक्ति-ब्रह्म-माया-ह्यांच्या संयुक्त शक्तीने सर्व सृष्टीचे व्यवहार चालतात ही कल्पना ज्या वेळीं समाजांत परिणत झाली त्या वेळीच इष्टलिंगधारणा व त्याची उपासना रूढ झाली. इष्टलिंग हें शिवशक्ति ह्यांच्या संयुक्त शक्तीचे ध्यानार्थ मानलेलें एक चिन्ह आहे. वास्तविक ती मूर्ति नव्हे. ह्या बाबतींत बसवपूर्वकालीन व बसवकालीन अनेक वीरशैवधर्मप्रवर्तक अशा थोरांचे आधार देतां येतील. इष्टलिंग ज्या तत्वविचाराचें प्रतिबिंब आहे त्या तत्वविचारास शक्तिविशिष्टाद्वैत असें म्हणतात. अर्थात् द्वैत व अद्वैत ह्यांचा सांधा ह्या तत्वज्ञानाने जुळविला. ईश्वरास साकार कल्पून त्याची मूर्ति मानणें ह्यापेक्षा इष्टलिंगाच्या धारणेची कल्पना फार निराळी व अत्यंत श्रेष्ठ आहे. सगुण मनुष्यास ध्यानयोगाने निर्गुण उपासनेचें पुण्य घडावें एवढ्याकरिता इष्टलिंगधारणेची उपासना वीरशैवांत प्रचलित झाली. पण शिवाला ब्रह्म कां मानतां असा वाद घालूनच वीरशैव हे मूर्तिपूजक आहेत असें कोणास म्हणावयाचें असेल तर त्यास उत्तर देणेंहि योग्य नव्हे. शिवाय वीरशैव मूर्तिपूजक आहेत असें कोणीं म्हटल्यास त्यांत कमीपणाहि नाही. पण निर्गुणाचा उपासक ध्यानाकरिता ओंकाराची कल्पना करतो तें ॐ हें अक्षरहि एक प्रकारची मूर्तिच होय. ह्यावरून शिवाच्या ठिकाणीं ब्रह्मस्वरूपाची कल्पना करणें आणि द्वैत व अद्वैत ह्यांत सांगड घालणें हा आर्यसमाजाच्या व वीरशैवसमाजाच्या प्रवर्तकांत तात्विक भेद असला तरी तो तीव्र नव्हे.

शिवाय आर्यसमाज चारहि वर्ण गुणकर्मविभागशः मानतो. तेथे जन्मजातित्व तो मानीत नाही, वीरशैवधर्माचे प्रवर्तक तरी दुसरें काय म्हणतात ? वीरशैवधर्म-प्रवर्तकांनी वर्णभेद व लिंगभेद न मानतांच इष्टलिंगधारणेचा उपयोग व प्रचार

केला आहे, आणि एका उपासनेने चारहि वर्ग व त्यांतील अठरापगड जाती स्त्रीपुरुष भेद न मानतां संघटित करण्याचा प्रयत्न केला आहे. आर्यसमाजाचें तरी आज अभिनंदनीय कार्य कोणतें ? जें कार्य आर्यसमाजाने एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत केलें तेंच अनेक शतकांपूर्वी वीरशैव-समाजाच्या अनेक प्रवर्तकांनी केलें आहे. अशा स्थितींत त्या समाजाच्या प्रवर्तकांची निंदा प्रसृत करण्याचें पाप आर्यसमाजाच्या एखाद्या मंत्र्याने करणें म्हणजे आर्यसमाजाच्या मूळावरच घाला घालणें होय. बसवादिकांच्या निंदेंत दयानंदादि महर्षींची निंदा आहे हें जर गुलबर्ग्याच्या आर्य-समाजीयांस कळलें असतें तर त्यांनी हें धाडस केलें नसतें. वीरशैवांनी आर्यसमाजी होण्यापेक्षा ह्या गुलबर्ग्याचा आर्यसमाजी मंत्रीच जर वीरशैव झाला तर अधिक समंजस व अधिक उदारमतवादी तो होईल आणि ' सत्यार्थप्रकाशा ' पेक्षांहि बसवबोध कसा अधिक साम्यवादी आहे हें त्याच्या निदर्शनास येईल. पण ह्या-करितां त्याने यज्ञोपवीत टाकून 'शरण-संदेश'-कार श्री. मंजाप्पा हार्डीकर ह्यांचें शिष्यत्व पत्करावेंहि व मंजाप्पांनीहि त्याच्या डोक्यावर वरदहस्त ठेवण्याची कृपा करावी. अशी आमची इच्छा आहे.

हिंदुमहासभेच्या दृष्टीने विचार करितां हा तंटा हिंदुसमाजांतील अंतर्गत तंटा होय. तो सुखाने मिटला जावा असा ठराव स्वागतमंडळामार्फत पुणे-हिंदुमहासभेच्या अधिवेशनांत श्री. बामणगां-वकर ह्यांनी विषयनियामक-मंडळाच्या विचारार्थ पाठविला होता, आणि सदर अधिवेशनाला जे वीरशैव प्रतिनिधी आले होते त्यांनी आपली सभा पुणें येथे श्री. अय्यासाहेब मानुरकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरवून श्री. पावटे, मं. हार्डीकर, डॉ. देशमुख, विटेकर, ह्यांचें शिष्टमंडळ अध्यक्षांकडे हा प्रकार समजावून सांगण्याकरिता पाठविण्याचा ठरावहि झाला व तो अध्यक्ष पं. मालवीय ह्यांच्या हातींहि दिला होता. परंतु वेळ थोडा व कार्य फार ह्यामुळे हा प्रश्न तेथे मागे पडला. परंतु गुलबर्गा-आर्यसमाजमंत्र्याने चालविलेली वीरशैव-प्रवर्त-कांची निंदा पाहून सर्वच वीरशैवसमाजांत खळबळ उडली आहे, व त्याबद्दल सर्वत्र निषेध व्यक्त करण्यांत येत आहे. ' शरण संदेश '-कार मंजाप्पा हार्डीकर ह्या कामीं जी मेहनत घेत आहेत ती सर्वतोपरीं पूर्णपणें अभिनंदनीय आहे. त्याचप्रमाणें सोलापूरचें ' सुदर्शन ' व बार्शीचें-' वीरशैव गर्जना ' ही पत्रेंसुद्धा गुलबर्गा-आर्य-समाजाच्या आक्रमणाविरुद्ध आपसांतील मतभेद विसरून निषेध व्यक्त करीत आहेत. अशा प्रकारें कर्नाटकांतून व महाराष्ट्रांतून सर्व प्राचीन वीरशैवमत-प्रवर्तकांच्या व बसवादि शिवशरणांच्या अब्रूच्या संरक्षणार्थ सर्व वीरशैव एक होऊन झटत आहेत हें अभिनंदनीय होय. पंढरपूरचे तरुण पंचाचार्यभक्त श्री. भादोले ह्यांनी पंढरपूर व बार्शी येथे सभा भरवून निषेध व्यक्त केला आहे. आपल्या ठिकाणी बसून निषेध व्यक्त केल्याने कांही कार्यभाग व्हावयाचा नाही. ह्याकरिता गुलबर्गा-आर्यसमाजाच्या बालिश पत्रकांच्या आधारें एक ठराव कानडी, इंग्रजी, व मराठी, ह्या तिन्ही भाषांत लिहूंन तो ठराव हिंदुमहासभेच्या कार्याध्यक्षाकडे व आर्यसमाजाच्या मुख्य चालकाकडे सर्व ठिकाणीं अनेक वीरशैवांच्या सभा भरवून पाठविण्याचा उद्योग झाला पाहिजे. गुलबर्गा-आर्यसमाज-मंत्र्याला वीरशैवधर्मप्रवर्तकांची निंदा परत घ्यावयास भाग पाडेपर्यंत ही चळवळ केली पाहिजे. त्याशिवाय वीरशैवांच्या धर्ममतावद्दल जें तिन्हाइतांत अज्ञान पसरलें आहे तें दूर व्हावयाचें नाही व इतरांच्या आदरास वीरशैव मत पात्र व्हावयाचें नाही. ह्या वेळीं ही चळवळ इतकी जोराने केली पाहिजे कीं, कर्नाटक व महाराष्ट्र ह्यांतील सर्व वर्तमानपत्रें ह्याच माहितीने भरलीं पाहिजेत. ह्याकरितां विरक्तपंचाचार्य, भक्त, व गुरु वा शरण व अशरण, हे सर्व वाद मिटते घेऊन गुलबर्गा-आर्यसमाजाच्या निषेधार्थ सर्व लिंगधारी एकाच व्यासपीठावर विराजमान् झालेले दिसले पाहिजेत. अशी

एकोप्याने चळवळ झाली ह्मणजे वीरशैवांचें योग्य तत्वज्ञान, इष्टलिंगधारणेंतील आध्यात्मिक बीज, व त्यांच्या सामाजिक संघटनेंतील योग्य तत्वें सर्वत्र प्रसृत होतील. आणि मग कोणीहि सुज्ञ वीरशैवधर्माचा त्याग करणार नाही व त्याग करावयास लावायला कोणताहि गुलबर्गा-पंडित पुढे येणार नाही. पण गुलबर्गा–आर्य-पंडिताने केलेला आघात माझ्यावर केला आहे ही भावना मात्र प्रत्येक लिंगधाऱ्यांत प्रज्ज्वलित झाली पाहिजे व प्रज्ज्वलित केली पाहिजे. जगद्गुरु पंचाचार्य आहेत कीं विरक्त आहेत ह्या वादाच्या काथ्याकुटांत जे जे लक्ष घालतात ते सर्व जर ह्याच वादांत आपलें सर्वस्व खर्च करतील तर वीरशैवधर्म तारल्याचें, संरक्षण केल्याचें, व परिपालन केल्याचें त्यांस पुण्य लाभेल, हें पुण्य जे जोडतील तेच वीसाव्या शतकांतील वीरशैवांचे जगद्गुरु ठरतील ! हें पुण्य जे जोडतील तेच खरे आचार्यभक्त व विरक्तभक्त ठरतील ! आणि तेच तेच प्राचीन शिव-शरणांचे वा गणांचे आजचे नवे अवतार ठरतील !

——:०:——

# हिंदु-महासभा व वीरशैवसमाज

## ...ा विरक्त...

स ध्याच्या ना ... व ना जात अडप्पा रेवणसिद्धप्पा झुंजे वकील आचाराने व बरेच दिवस टिकलें. हिंदुत्व ... कानें व द्रव्यहानि भयं- आंग्लविद्यां ... सर्व राष्ट्रांस भोगावे अग्रणी ह्या राष्ट्रें दोन्ही बाजूंस कोणी पुरुष असेल तर ते पं... थांबे ना. भयंकर हानि होत. म. गांधी हे हिंदुच ... तास्थापनेकरिता राष्ट्रसंघ तात, व हिंदुधर्मांतर्गत अ... अपजय आलेलीं राष्ट्रें ते शोधीत आहेत हें स... मिळालेल्या राष्ट्रांचीहि हिंदुत्व ह्याचा विचार ... मुळे तीं राष्ट्रेंहि आर्थिक मालवीय म. गांधीपेक्षा ... त्या परिणाम सर्व देशावर आहेत. इतकेंच नव्हे ... आर्थिक संकटांत सांपडलें. हिंदु कसा आदर्शभूत ... केव्हांहि वाईटच. युद्धामध्ये पं. मालवीयांच्या पवित्र ... होते, व शेवटी जय मिळाला नाही. अशा वंदनीय हिंदु पुढाऱ्यांच्या ... होते तीच हानि येथे हिंदुमहासभेचें अधिवेशन पार पडलें. ह्या अधिवेशनाला कांही वीरशैव पुढारीहि हजर होते. वार्शीहून 'वीरशैव-गर्जना'-कार व भारतीय गुरुवर्य ...क कार्यकर्ते स्वामी परान्डकर, हुबळीचे श्री. पावटे, बी. ए., एल् एल्. बी., शरण संदेश'-कार श्री. मंजाप्पा माणसें त्या कलतीचे श्री. बामणगांवकर, सोला- नालस्ती, विटंबनेवराव देशमुख, पुण्याचे श्री. महमिकेने करीत ... डॉ. वडेगांवकर, इत्यादि आपापला पक्ष सा... व पुढारी हजर होते. अशा त्या उपायाचें अव... भेच्या आधिवेशनांत वीरशैव करून स्वतःहि नाश... ला होता. अग्न्यस्त्र, वायवास्त्र मशीनगन्स, विषारी ... ची आहे ह्मणजे हिंदुस्थानांत प्रतिपक्षास जेरीस ... कृतीचीं, धर्माची, व जातीची कार्यांतील कलहामु... हिंदूंना वाव आहे व अवैदिक करिता अपशब्दाचें ... मुळीच नाही. 'यं शैवाः वाग्वस्त्र सोडीत अस... चढवितात. ... ते ब्रह्मेति वेदान्तिनो , बौद्धा अशाच प्रकार ... पटवाः कर्तेति नय्यायिकाः । चार्य यांमध्ये ... शासनरतः कर्मेति मीमांसकाः । युद्धांत कांही ... तोतु वांच्छित फलं त्रैलोक्यनाथो हरिः ॥ हीं जी ... प्रार्थना हिंदुमहासभेच्या सुरुवातीला झटली गेली तीवरून वीरशैव हे हिंदुच आहेत

व तेहि वैदिक वेदांत्यांतील हिंदूपैकीं हिंदु आहेत हें स्पष्ट होतें. शिवाय वीरशैवांचे प्रमुख आचार्य शरण, व भक्त, येथेच जन्मलेले आहेत. काशी, बदरिकेदार, उज्जयिनी, वाळेहाळ्ळी, व श्रीशैल, येथे त्यांचे प्रमुख मठ असून, विरक्त व कुमार ह्यांचेहि मठ हिंदुस्थानांत व ह्मैसूर संस्थानांत आज विराजित आहेत. अशा प्रकारें हिंदुभूमि, हिंदूंचे वेद, हिंदूंचा वेदान्त, व हिंदूंच्या देवतांच्या उपासनेच्या अनेक अंगांपैकी कांहीं अंगांची उपासना ज्या वीरशैवांनी केली व चालविली ते हिंदु नाहीत व ते हिंदुसभेच्या कक्षेंत येत नाहीत असें कोणालाहि ह्मणतां येणार नाही.

असें जरी आहे, तरी वीरशैव हा एक वैदिकांतील व वेदांत्यांतील स्वतंत्र पंथ आहे हेंहि त्याबरोबर नाकारतां येत नाही. हिंदुसभेशीं वीरशैवांना जो संबंध ठेवावासा वाटतो तो ह्या देशांतील सर्व संस्कृतींनी एकमेकाशीं पोषक राहून एकमेकाच्या संस्कृतींचे व चालीरीतीचे एकमेकांनी संरक्षण करण्यास मदत करावी ह्मणून. कर्नाटक, तैलंगण, ह्मैसूर, वगैरे भागांत वीरशैवांची लोकसंख्या विशेष प्रमाणांत असली तरी महाराष्ट्रांत ती सर्वत्र तुरळक पसरली आहे. अल्पसंख्याकांना बहुसंख्य हिंदूंचें सहाय्य मिळावें व तेथेहि परकीयांच्या हल्ल्यापासून आपल्या संस्कृतीचें सरक्षण करितां यावें हाच हेतु हिंदुमहासभेच्या संघटनेंत सामील होण्यांत असतो. सर्वत्र पसरलेला वीरशैवसमाज धनिकांचाच व सुशिक्षितांचाच नाही; तर दरिद्री व अडाणी अशी संख्या फार. वीरशैव कसाहि असला तरी तो मद्यमांसाशनापासून परंपरेने अलिप्त सांपडेल. ठिकठिकाणी परधर्मीय गुंडाकडून वीरशैवांतील गरीब स्त्रियांवर व पुरुषांवर हल्ले होतात. ह्या हल्ल्यापासून बचाव करण्यास शिकावयाचें असल्यास सर्व हिंदु म्हणविणाऱ्यास सहाय्य देणें व सहाय्य घेणें हाच एक शुभ मार्ग आहे. म्हणूनच हिंदुमहासभेविषयी व तिच्या संघटनेविषयी प्रत्येक वीरशैवांत आस्था उत्पन्न व्हावयास पाहिजे. ही आस्था उत्पन्न करावयाची ह्मणजे अंत-गत संघटनेस पारखे व्हावयाचें असें मुळीच नाही. शेजाऱ्याशीं मैत्री करावयाची, त्याच्या सुख-दुःखाची काळजी घ्यावयाची, ह्मणजे आपलें घर गमावावयाचे असा त्याचा मुळीच अर्थ नाही. जो घर गमावतो त्याला शेजार उरत नसतो. म्हणून महासभेशीं संघटन करतांना तिच्या द्वारीं स्वतःचें संघटन करावयास शिकणें व तसें शिकून स्वतःचें घर मजबूत व स्वच्छ ठेवणेंहि तितकेंच जरूर आहे.

महासभेंत वीरशैव आहेत, वैष्णव आहेत, वेदानुयायी हिंदु आहेत, शीख आहेत, बौद्ध व जैनहि आहेत. ह्या सर्वांनाच महासभा आपसांत संघटित व मजबूत होण्यास शिकविते. जन्मजात विषमता शास्त्रास मान्य नाही व सार्वजनिक ठिकाणीं स्पृश्यास्पृश्यभेद मानण्यास शास्त्राचा आधार [illegible] असा हिंदुमहासभेंतील विद्वानांचा निर्णय आ[illegible] निर्णय सनातनीय वैदिक हिंदूंना आज मान्य [illegible] नाहीं. त्याचप्रमाणे आह्मा वीरशैवांतहि सनात[illegible] वीरशैव पुढे सरसावत आहेत. ते जन्मावरून [illegible]स महत्व देणारे आहेत. वास्तविक वीरशैवांच्या कोणत्याहि आचार्यांनें जन्मजातीस महत्व दिलें नाही. गुरु, लिंग, व जंगम ह्यांचें महत्व ज्यांत आहे त्या वीरशैवधर्मांत जन्मजातीस महत्व नाही तर गुणास व ज्ञानासच महत्व आहे. ज्या संगमदेवाने बसवास लिंगदीक्षा दिली व ज्या बसवाने गुरुनिष्ठेकरिता ब्राम्हणजात व वडिलांचें नांव सोडून मोठ्या भक्तिभावाने संगमबसव असेंच म्हणवून घेतलें आणि गुरु, लिंग व जंगम ह्यांचें महात्म्य ज्याने मुक्तकंठाने गाइलें तो 'संगमबसवदेव' ज्या धर्मांत वाढला तो धर्म व तत्पूर्वींचा वीरशैवधर्म जन्मजातीस मानणारा होता असें मानणें रूढीबद्ध असले तरी शास्त्रोक्त खास नव्हे. तथापि परंपरागत चालीरीतीने ज्यांनी आपले आचारविचार शुद्ध राखले असतील व ते तसेच शुद्ध राखले जावेत अशी ज्या ज्या महानुभावाची इच्छा असेल, त्यांनी जन्मजातीस महत्व दिलें असलें तर आश्चर्यहि नाही. कारण शुद्ध आचाराच्या व विचाराच्या प्रस-

तरि आज जितकीं कालानुरूप साधनें अनुकूल आहेत तितकीं मागील शतकांत नव्हती. त्यामुळे स्वतःपुरती दृष्टि आकुंचित होणें व त्यांतच माझेपण आहे ही भावना कायम होणें जरूरच होतें. पण त्याशिवाय शुद्ध आचारविचार आजवर जिवंतहि राहिले नसते. म्हणून एकेकाळीं जन्मजात मानणें क्षम्य असलें तरी आजच्या ज्ञानप्रसाराच्या कार्यांत तें क्षम्य ठरत नाही. तथापि त्या जुन्या रूढीसच ग्राह्य मानून प्रामाणिकपणें ज्याला आचरावयाचें असेल त्यांनी आचरावें. पण जाहीरपणें जन्म-जातीला महत्व देऊन समाजांतील वाढत्या गुणास, ज्ञानास, व विचारांच्या विकासाला, पायबंद घालण्याचें पाप करूं नये अशी आमची वीरशैवां-तील आजच्या सनातनीयांस नम्र प्रार्थना आहे. ही प्रार्थना मानली तर गुरुचे गुरुत्व मान्य होईल, शिष्यांचें शिष्यत्व पावन होईल आणि सर्वत्र शिवमय असल्याचा पुण्यप्रद व शुद्ध भावनांचे निनाद निघत असल्याचा आनंद प्रत्ययास येईल. महासभेपासून ह्याप्रमाणे अंतर्घटना करण्यास वीरशैवसमाज जर शिकला तर स्वतःचें घर मजबूत ठेवल्याचें पुण्य त्याला लागेलच, पण त्याचबरोबर शेजाऱ्यास मदत करण्यासहि तो आधिक पात्र ठरेल. इतकेंच नव्हे तर हिंदूंचा तो खराच सहाय्यकर्ता ठरेल. ह्या-करिता हिंदुसभेंत वीरशैवांना सामील होणें म्हणजे वीरशैवत्वाला मुकणें नव्हे तर दुप्पट जोमाने समान दर्जावर सर्व वीरशैव संघटित करणें होय. ह्याकरिता जेथे जेथे इष्टलिंगाची धारणा आहे तेथे तेथे पावनता व शुद्धता आहे ही एक भावना वीरशैवांच्या अतःकरणांत वीरशैवां-तील सामाजिक व सामाजिक व्यवहारांत दृगोचर व्हावयास पाहिजे.

---

# पुरे आता हा विरक्त-पंचाचार्यवाद

लें० — बंडप्पा रेवणसिद्धप्पा झुंजे वकील, सोलापूर.

महायुद्ध सुरू झालें व तें बरेच दिवस टिकलें. महायुद्धापुळे मनुष्यहानि व द्रव्यहानि भयं-कर झाली, व त्याचे परिणाम सर्व राष्ट्रांस भोगावे लागले. महायुद्धांत बरींच राष्ट्रें दोन्ही बाजूंस सामील झालीं. युद्ध लवकर थांबे ना. भयंकर हानि होऊं लागली म्हणून शांततास्थापनेकरिता राष्ट्रसंघ स्थापावा लागला. युद्धामुळे अपजय आलेलीं राष्ट्रें संकटांत पडलीं तर जय मिळालेल्या राष्ट्रांचीहि भयंकर अर्थहानि झाल्यामुळे तीं राष्ट्रेंहि आर्थिक संकटांत सांपडलीं. याचा परिणाम सर्व देशावर होऊन अनेक देशहि आर्थिक संकटांत सांपडले. युद्ध म्हणजे हानि.हानि केव्हांहि वाईटच. युद्धामध्ये उभयपक्षांची हानि होते, व शेवटी जय मिळाला तरी हानि भरून निघत नाही.

युद्धामुळे राष्ट्राची जी हानि होते तीच हानि एखाद्या कुटुंबांतील अगर समाजांतील कलहांतहि होते. कांही तरी कारणावरून कलह उत्पन्न होतो व त्या कलहास भयंकर स्वरूप प्राप्त होतें. बरींच माणसें त्या कलहांत सामील होतात व प्रतिस्पर्ध्यांची नालस्ती, विटंबना, हीं उभयपक्ष मोठमोठ्या अह-महमिकेने करीत असतात. स्वपक्षांध बनल्यामुळे आपापला पक्ष सांवरून धरण्याकरिता नाही नाही त्या उपायाचें अवलंबन करितात, व दुसऱ्याचा नाश करून स्वतःहि नाश पावतात. युद्धामध्ये ज्याप्रमाणें अग्न्यस्त्र, वायवास्त्र, अगर आधुनिक पद्धतीचे मशीनगन्स, विषारी धूर प्रतिपक्षावर सोडतात व प्रतिपक्षास जेरीस आणितात त्याप्रमाणे सामाजिक कार्यांतील कलहामध्ये प्रतिपक्षाला चीत करण्या-करिता अपशब्दाचें निंदाप्रचुर अग्न्यस्त्र अगर वाग्बस्त्र सोडीत असतात. गनीमी काव्याचे हल्लेहि चढवितात.

अशाच प्रकारचें वाग्युद्ध हल्लीं विरक्त व पंचा-चार्य यांमध्ये गेलीं आठ-दहा वर्षें सुरू आहे. या युद्धांत कांही लोक या पक्षास तर काही लोक त्या पक्षास कमी-जास्त प्रमाणांत सामील झाले आहेत. परंतु धर्मपीठ हें शांतीचें सिंहासन, धर्मपीठ हें

न्यायाचें आसन, धर्मपीठ हें पूज्य स्थान, धर्मपीठ हें सत्स्वरूपाचें आगर, धर्मपीठ हें ज्ञानाचें वसतिस्थान, असें असून अशा पूज्य व पवित्र धर्मपीठावद्दल निंदाव्यंजक शब्द काढून त्यांची नालस्ती करण्याचा प्रकार हल्लीं घडत आहे हें पाहून फार खेद होतो. पंचाचार्य व बसवेश्वर हे दोघेहि महापुरुष होते. दोघांनीहि धर्माभिवृद्धीचें कार्य केलें. त्या दोघांत श्रेष्ठ-कनिष्ठ कोण ह्याची चर्चा करणें ह्मणजे आपणास कनिष्ठ ठरवून घेणें होय. बसवेश्वरांनी पंचाचार्यांची कधीं निंदा केली नाही अगर बसवकालीन पंचाचार्यांनी बसवेश्वराची कधी निंदा केली नाही. पंचाचार्यांच्या तत्वांत व बसवेश्वराच्या तत्वांत मतभेद दिसत नाही. तसा मतभेद असता तर पंचाचार्यांचा एक पक्ष व बसवेश्वरांचा एक विरुद्ध पक्ष असे दोन पक्ष बसवेश्वरकालींच निर्माण झाले असते. पण तसें नाही.

मग उगीच वाद कां? पंचाचार्य व विरक्त यांचें वेगवेगळें कार्यक्षेत्र आहे. आपापल्या कार्यक्षेत्राची मर्यादा दोघांनीहि न उल्लंघिणें बरें. दोघांनीहि एकोप्याने वीरशैवधर्माचें खरें रहस्य व धर्माचा खरा मूळ इतिहास प्रामाणिकपणें व प्रांजलपणाने शोधून काढून तो जगापुढे ठेवण्याचे कार्याकडे लक्ष दिल्यास वीरशैवधर्माची थोरवी सर्व जगास कळून येईल, व दोघांबद्दलहि वीरशैव-समाजाचा आदर वाढेल. पण हल्लीच्या वादामुळे दोघांबद्दलहि अनादर वाढत आहे ही गोष्ट दोघांस व त्यांचे अनुयायांस लांछनास्पद आहे.

हें लांछन दोघांनीहि ह्यापुढे परस्परनिंदेचा मजकूर जो कोणी बोलेल अगर प्रसिद्ध करील त्याचा धिःकार करून नाहींसें करावें. आपल्या अनुयायांनी दुसऱ्याची अवहेलना केलेली पाहणें म्हणजे स्वतःची अवहेलना होय. सर्व जग पुढे चाललें असतांना आपण आपल्या समाजांत धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक जागृति करण्याचे कार्याकडे लक्ष न देतां भलत्याच वादांत पडून समाजाची हानि करण्यास प्रवृत्त व्हावें यासारखी अन्य दुःखद गोष्ट कोणती? याकरिता यापुढे विरक्त-पंचाचार्यकलह थांबवून समाजोन्नतिकडे सर्व जणांनी एकदिलाने लक्ष द्यावें ह्यांतच सर्वांचें हित आहे. कलह केव्हांहि नाशासच कारणीभूत होतो ह्याचा पूर्ण विचार करावा व हा वाद बंद करावा.

—:०:—

# वीरशैवांतील चळवळी

## म. वीरशैव परिचय पट

आतापर्यंत आमच्या दोन वर्गणीदारांपासून महाराष्ट्र वीरशैव परिचयपट भरून आला आहे. पुढील अंकापासून परिचयपटाचें प्रसिद्धीकरण सुरू होईल. तरी ज्यांना भरून पाठवावयाचा असेल त्यांनी लवकर भरून पाठवावा.

## बार्शी येथील विवाह

वऱ्हाडचे पुसदवोरी येथील श्रीमंत वाबासाहेव इखरे ह्यांचा वार्शी येथे श्रीमंत अण्णासाहेव कथले ह्यांच्याकडे त्यांच्या भाचीशीं ह्मणजे चि. माईसाहेब चव्हाण ह्यांच्याशीं झालेल्या विवाहाकरिता रोहीणखेडचे श्रीमंत रामआप्पा कुळी, उमरावतीचे बामणगांवकर, कोल्हे, जोगुरे, चौधरी, व पुसदचे एकलारे व नागपुरचे डोंगरे वगैरे मंडळी गेली होती.

## पुणे-हिंदुमहासभा व वीरशैव

श्री गुरु परांडकर, श्री. बामणगांवकर, डॉ. जगदेवराव देशमुख, डॉ. वडगांवकर, मंजाप्पा हार्डीकर, वगैरे वीरशैव पुढारी हिंदुमहासभेला प्रतिनिधी म्हणून हजर होते. त्या वेळी ह्या सर्व वीरशैव प्रतिनिधींचें संमेलन पुणे येथील श्री कर्मप्रयत्नेश्वरमंदिरांत भरलें होतें. ह्या वेळी पुण्यांतील श्री अप्पासाहेब माणुरकर आदिकरून सर्व प्रमुख वीरशैव पुढारी हजर होते. तेथील श्री अडके व वाटेकर ह्या तरुण पुढाऱ्यांना ह्या संमेलनाचें श्रेय आहे

## आर्यसमाजाचा निषेध

पंढरपूर, बागलकोट, गोडची, गदग, विजापूर, गुलबर्गा, वगैरे ठिकाणीं गुलबर्गा-आर्यसमाजाचा निषेध करण्याकरिता वीरशैवांच्या जाहिर सभा भरल्या व अनेक ठिकाणी भरत आहेत.

## वीरशैव तरुणाचें धाडस

सोलापूरच्या सिद्धेश्वर तलावांत जीवाची पर्वा न करिता उडी घेऊन श्री. सिद्राम शिवप्पा बिरजदार ह्या १९ वर्षें वयाच्या तरुणाने बुडत असलेल्या चौघांना वाचविलें आहे.

# ' संजीवनी '-चें शुभचिंतन.

### श्रीमन्निरंजन निजगुणस्वामी किरीटमठ सोलापूर.

वीरशैवसंजीवनीच्या पुनर्प्रकाशनास श्री. नानासाहेब बामणगांवकर उद्युक्त झालेले समजतांच आह्मांस कल्पनातीत हर्ष वाटत आहे. मृतप्राय झालेल्या वीरशैवसमाजास या "संजीवनी"-च्या द्वारां नवजीवन व नवचैतन्य प्राप्त होऊन ती जयिष्णु व वर्धिष्णु होवो असें मी इच्छितों.

### श्रीमंत बाबासाहेब वारद, सोलापूर.

वीरशैवसंजीवनीचें मी अंतःकरणपूर्वक स्वागत करतों व तिला चिरायुत्व इच्छितों. वीरशैवांच्या अत्युदात्त तत्वज्ञानाचें संजीवनीकडून पुनरुज्जीवन व्हावें आणि अखिल-मानवजातीच्या उद्धारार्थ वीरशैवधर्माचा प्रसार तिच्या द्वारीं सतत व्हावा असें मोझें परमेश्वराजवळ मागणें आहे.

### सौ० पंचव्वाबाई सरदार, सोलापूर

मला सांगावयाचें तें एवढेंच कीं, वीरशैवसंजीवनी ही खरोखरच संजीवनी या नांवास सार्थ होणारी असेल तर तिनें आपली दृष्टि समाजांतील एका पुरुषवर्गाकडेच ठेवून चालावयाचें नाहीं, तर समाजाच्या दुसऱ्या अंगाचा विचारच तिनें प्रामुख्यानें करावयास पाहिजे. कारण आपला नेहमीचा अनुभवच आहे कीं, संजीवनीची ( औषधांची ) गरज पुरुषांपेक्षां स्त्रियांनाच जास्त व वरचेवर लागते. ह्मणूनच आमच्या प्राचीन पूज्य शिवशरणांनीं प्रथम स्त्रियांच्या उन्नतीचा व त्यांना बरोबरीचें स्थान देण्याचा प्रयत्न केला, व त्यांच्या प्रयत्नामुळेंच आपल्या समाजांत अक्कमहादेवी-नीलांबिकादि साध्वी स्त्रिया मोठ्या कवयित्री होऊन गेल्या आहेत. त्यांच्या त्या प्रयत्नानेच लिंगायत-समाजांत स्त्रियांनाहि पुरुषाप्रमाणेच व पुरुषांच्या इतकेच धार्मिक हक्क व स्वातंत्र्य प्राप्त झालें. तरी यापुढे ही वीरशैवसंजीवनी वीरशैव स्त्रियांमध्ये नवजीवन उत्पन्न होण्यास कारणीभूत होवो, व त्यामुळे सर्व समाजालाच नवजीवन प्राप्त होवो अशी आशा प्रदर्शित करून मी माझे दोन शब्द आज एवढ्यावरच संपविते.

### एम्. एस्. सरदार, बी. ए. ( ऑक्सन् )-, बार-ॲट-लॉ, सोलापूर

श्री. ना. रा. बामणगांवकरासारख्यांच्या दीर्घ अनुभवाचा फायदा महाराष्ट्र-लिंगायतसमाजाला मिळण्याचा हा योग प्राप्त झाला. 'वीरशैव-केसरी'-मध्ये त्यांचे लेख प्रसिद्ध झाले; त्यावरून ते तडफदार व निस्पृही बाण्याचे लेखक हल्ली वीरशैव-समाजात चाललेल्या ' विरक्त गुरुस्थळ ' किंवा ' श्रीबसवेश्वर पंचाचार्य ' अशा अनिष्ट व समाजघातकी चळवळींत पडणारे नाहींत हें स्पष्ट झालें. आणि आतां तरी ते वीरशैवांच्या सर्वांगीण उत्कर्षाकरिता हें पाक्षिक पत्र काढणार आहेत. तेव्हा हें पत्रहि निर्भीड व निःपक्षपाती असेंच राहील असें समजण्यास मुळीच हरकत नाही.

### सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी बी. ए. एल एल. बी. सोलापुर

दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांसारख्या निर्भीड, व निस्पृही समाजधुरीणांनीं ' वीरशैव संजीवनी '-च्या द्वारां ह्या मरणोन्मुख समाजाला संजीवनी देण्याचा विचार केल्याचें ऐकून सर्व महाराष्ट्रीय वीरशैवांच्या हृदयांतील निराशेच्या काळोखांत आशेची किरणें दिसूं लागलीं आहेत. आज सुमारे २५ वर्षांपूर्वीच या संजीवनी मातेचें कांहं

वळसे नानासाहबांनी देऊन समाजांत जो जोम उत्पन्न केला त्याचाच गुण अद्यापिहि वीरशैवांत शिल्लक आहे. परंतु तो गुण पुरा नामशेष होण्याच्या आंत संजीवनीचा पुन्हा मारा करण्याचें श्री. बामणगांवकरांनी ठरविलें हें योग्यच होय.

## नागपुर–वीरशैव तरुणसंघ

२५-१२-३५ ला नागपूर येथील वीरशैव-तरुण-संघाच्या कार्यकारी मंडळाची सभा भरून तींत पुढीलप्रमाणे ठराव पास करण्यात आला. वीरशैव-तरुण-संघाची ही सभा मध्यप्रांत आणि वऱ्हाड येथे वीरशैवसमाजांत वर्तमानपत्राची जी उणीव भासत होती ती उणीव श्री. दे. भ. बामणगांवकर ह्यांनी "वीरशैव संजीवनी' या पत्राचें संपादकत्व स्वीकारून नाहीशी केली ह्याबद्दल त्यांचें हार्दिक अभिनंदन करते, व ह्या पत्रास यश येवो अशी ईश्वराजवळ प्रार्थना करिते.

## श्री वि. व. सगरे, व्य. सिध्देश्वर प्रेस, विटे जि. सातारा यांजकडून

आपण ता. १ जानेवारी १९३६ पासून आपले समाजाचे सर्वांगीण उन्नतीसाठी 'वीर' व संजीवनी' पुन्हा सुरूं करणार हें पाहून समाधान वाटत आहे. आपल्या समाजांत प्रथम वर्तमानपत्र प्रसिद्ध करण्याचा मान महाराष्ट्रापुरता तरी आपणास आहे व त्याप्रमाणे पूर्वी आपण समाजसेवेसाठी वृत्तपत्र सुरूंहि केलें होतें. परं समाजांत वाङ्मयाची अभिरुचि कमी व उदासीनता यामुळे त्या वेळी जरी समाज आपल्या ज्ञानाला मुकला व आपणास आपले आवडते राष्ट्रीय विषयास वाहून घेण्याची संधि दिली तरी आतां दिवसेंदिवस समाज जागृत होऊन आपल्या-सारख्या सरस्वतीभक्ताच्या ज्ञानाची, मार्गदर्शक धुरीणत्वाची व निरलस समाजसेवेची मार्गप्रतिक्षा करीत आहे व त्याचेंच दृश्यफल ह्मणजे आपणांस पुन्हा वीरशैवसंजीवनी सुरूं करावयास लावून महाराष्ट्रीय समाजधुरीणाचे जूं मानेवर घेण्यास भाग पाडलें हें होय व आपणहि तें आनंदाने पत्करिलें हें समाजाचे उन्नतीचेंच लक्षण होय. ह्याप्रमाणे उत्तरोत्तर आपलेकडून ' वीरशैव-समाजाचें संघटन घडून समाजांतील अनिष्ट व घातुक रूढीस आळा बसून तो सुसंस्कृत होऊन हल्लीचे हलाखीचे दिवसांत प्रतिष्ठितपणें जगो ' अशी परमेश्वरचरणीं प्रार्थना आहे. कळावे.

## श्री. जी. आर. झुंजे वकील सोलापुर

वर्तमानपत्रें अगर मासिकें हीं समाजाची अगर राष्ट्राची वाचा आहे. समाजास जो रोग जडला आहे त्याची चिकित्सा करून तो रोग नाहींसा करण्याचे उपाय सांगण्याचें वर्तमानपत्र हें एक साधन आहे. महाराष्ट्रांतील वीरशैवसमाजामध्यें हीं साधनें आजपर्यंत नसल्यामुळे त्यास आपलें दुःख अगर त्यावरील उपाय बोलून दाखवितां येत नसे. त्यामुळे समाजामध्यें सामाजिक अवनतिरूप रोगाची वृद्धि होऊन समाज क्षीण होऊन हालचाल करण्यास असमर्थ बनला. अशा वेळीं वीरशैव रोगग्रस्त समाजास ' संजिवनी'ने रोगमुक्त करून त्यांत नवचैतन्य निर्माण करण्याचे कार्यास आपण आरंभ केला आहे हें पाहून आनंद होत आहे. आपल्या ' संजीवनी स वीरशैवसमाज आश्रय देऊन दीर्घायु करो व वीरशैवसमाजाची उन्नति होवो अशी त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना आहे.

# संजीवनीचें नवें तेज

**श्रीयुत खेटे वकील, मोमिनाबाद यांजकडून—**

इ. स. १९१० सालीं उदयास आलेल्या "वीरशैव-संजीवनी"—द्वारां श्रीगुरुमूर्ति नानासाहेबांच्या तेजस्वी लेखणीचा अनुभव कालांतरामुळे जरी सर्वसाधारण जनतेच्या स्मरणांत नसला, तरी "वीरशैव-केसरीं"—तून त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचा ठसा आजहि महाराष्ट्रीय वीरशैवांच्या अंतःकरणांवर ताजा असलेला आढळून येईल. श्रीगुरुमूर्ति नानासाहेबांची राष्ट्रीय कामगिरी थोड्या वेळाकरिता दृष्टि आड केली, तरी वीरशैव-समाजाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत ओतप्रोत भरलेला अभिमान व कळकळ, महाराष्ट्रवाङ्मयांतील त्यांचा उच्च दर्जा, सरस्वतीदेवाच्या दालनांतील त्यांची अनेक तपांची एकनिष्ठ तपश्चर्या, सामाजिक कार्यांतील अनेक तपांचा त्यांचा खडतर अनुभव, वीरशैवसमाजाचें वीरशैवत्व जिवंत ठेवणारी त्यांची कल्पक व प्रतिभाशाली लेखणी इतकी प्रखर व ओजस्वी आहे कीं, साऱ्या उभ्या महाराष्ट्रांत तिला अग्रपूजेचा मान मिळाला आहे. वीरशैवसमाजाच्या वीरकुळांत जन्मलेल्या या नररत्नाविषयी महाराष्ट्रीय वीरशैवसमाजास धन्यता वाटत असल्यास नवल नाहीं. अशा थोर, प्रातःस्मरणीय व अधिकारी पुरुषांकडून आह्मा महाराष्ट्रीय वीरशैवांस पुनरपि संजीवनी गुटिका चाखावयास मिळत आहे हें पाहून कोणा सहृदय वीरशैवास आनंद होणार नाही ?

'वीरशैव-केसरी' बंद होतांच श्री. गु. मू. नानासाहेबांनी वीरशैवसमाजाकरिता एखादें पत्र सुरू करावें अशी माझ्या मित्रांची व माझी इच्छा "सुदर्शन' मधून जाहीर केली होती. तसेंच, खासगी रीतीनेहि वारंवार विनंती केली होती. शेवटी सर्वांच्या जाहीर विनंतीस मान देऊन गु. मू. नानासाहेबांनी आह्मा महाराष्ट्रीय वीरशैवांकरिता "वीरशैव-संजीवनी" पाक्षिक सुरू केलें; याबद्दल मी यांचा अत्यंत आभारी आहें. वीरशैवसमाजांतील लहानापासून मोठ्या घटकास आपलेपणाने व प्रेमाने गोंजारून सर्वांना संघटितपणें गुण्या गोविंदाने वागविण्यास लावणारी वीरशैव-संजीवनीसारखी दिव्य गुटिका आह्मास हवी आहे. आमच्या आपआपसांतील मतभेदाने व द्वेषाने आमची संघटित शक्ति लयास गेली, समाजांतील आपलेपणाची भावना नाहीशी झाली, एक दुसऱ्याकडे परकेपणाने पाहूं लागला, तरुणांची कुचंबणा होऊं लागली. अशांत आचार्य-विरक्तवादाचें इतकें काहूर माजलें कीं, सारा महाराष्ट्र हादरून गेला. समाजांतील मोठमोठे व जबाबदार लोक ह्या वादांत भाग घेऊं लागले समाजाच्या पैशाचा, शक्तीचा व कालाचा निरर्थक कार्यांत व्यय होऊं लागला. या वादाच्या उष्णतेचा पारा इतक्या थरास जाऊन पोंचला कीं, आचार्यपक्षाने महात्मा बसवेश्वरासारख्या थोर शिवशरणावर शिंतोडे उडविण्यास प्रारंभ केला, तर विरक्तांनी वीरशैवांना पूज्य असलेले वीरशैवांचे आद्यधर्मपीठ श्री. बाळेहळ्ळी यावरच हल्ला चढविला. दोन्ही पक्ष आपआपसांतील वादांत इतके गर्क झाले आहेत कीं, त्यांना आपल्या समाजावर व धर्मावर होत असलेल्या परकीयांच्या धार्मिक हल्ल्यास तोंड देण्यासहि अवसर नाही—मग समाजसुधारणेच्या गोष्टी दूरच राहिल्या. एकंदरीत महाराष्ट्र-वीरशैवसमाजरूपी नौका संकटांत व बिकट परिस्थितींत सांपडली आहे. अशा ऐन आणिबाणीच्या प्रसंगीं महाराष्ट्र-वीरशैवसमाजाच्या क्षितिजावर उगवलेला हा वीरशैव-संजीवनीरूपी तेजस्वी तारा वीरशैवसमाजरूपी नौकेस दीपस्तंभाप्रमाणें मार्गदर्शक होईल अशी आशा आहे. वीरशैव-संजीवनीच्या पवित्र दाळनांत दरेकास महाराष्ट्र वीरशैव-

समाजपुरुषाचें विराटस्वरूप पहावयास मिळावें, द्वेष, असुया, अहंपणा, ह्यांचा वासहि येऊं नये. पुराणमतवाद्यांना पाहिजे असलेला पुराणमतवाद व नवमतवाद्यांना पाहिजे असलेला नवमतवाद सारख्याच प्रमाणांत चाखावयास मिळावा, इतके वी० संजीवनीचें ध्येय व्यापक, उच्च, व पवित्र आहे. अशा ध्येयास वाहून घेतलेल्या पत्राची आमच्या महाराष्ट्र-वीरशैवसमाजास अत्यंत अवश्यकता होती. ह्मणून जाहीर विनंतीद्वारा गु. मू. नानासाहेबांनी या कार्यास प्रारंभ करावयास लावलें. केलेली ही विनंती अस्थानीं झाली असें मला वाटत नाही. जाहीर विनंतीपत्रांत माझें नांव प्रसिद्ध होतांच माझ्या कांही मित्रांनी पत्रद्वारें या कार्याविषयी अविश्वास जाहीर करून मला यांत भाग न घेण्याविषयी सुचविलें. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्यांना मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, दरेकाने आपआपल्या बुद्धिनुसार व मगदुराप्रमाणे दुसऱ्यांचा द्वेष न करितां निरलसपणाने आवडीनुसार वीरशैवसमाजाची सेवा करावी, यांतच मतस्वातंत्र्याचा जिवंतपणा आहे. वरील ध्येय जोपर्यंत वीरशैवसंजीवनीच्या आत्म्यांत वास करीत आहे तोपर्यंत मी या संजीवनीची सेवा कुडींत जीव असेपर्यंत शक्तिनुसार करणार एवढेंच त्यांना सांगावयाचें आहे. या बाबतींत सहानुभूति दाखविणाऱ्या माझ्या मित्रांचा मी अत्यंत आभारी आहें. तसेंच, सहृदय महाराष्ट्रीय वीरशैवसमाजास विनंती आहे कीं, " वी० संजीवनी "-स चिरकालत्व प्राप्त करून देण्याची योजना करून " वी० संजीवनी "-च्या उच्च व उदात्त वाङ्मयाचा झरा महाराष्ट्रांत अखंड चालू राहील असें करावें.

आमच्या वाङ्मयक्षेत्रांतील " वीरशैवसंजीवनी "-रूपी उगवलेला हा तेजस्वी तारा अखिल वीरशैवसमाजास मार्गदर्शक व आल्हाददायक होवो असें चिंतून " वीरसजीवनी " ला यश इच्छितों.

---

लघुकथा २ री.

# आयत्या पीठावर ठोमप्पा

'अरे, जा आपल्या मोटार-ड्रायव्हरला सांग कीं, मोटार दारापुढे आण. मी कपडे घालून खालीं येतोच.' सायंकाळीं ४॥ च्या सुमारास थंडीच्या दिवसांत विलासनगरच्या कँपांतील एका दोन मजली सुंदर व भव्य बंगल्यांतून हा आवाज निघाला. ज्याच्या आजाने व बापाने हाडांची काडें करून सालचे वीस हजारांचें उत्पन्न करून ठेवलें होतें त्या ठोमप्पाचा हा आवाज होता. ठोमप्पाचें वय तीस वर्षांचें. एवढ्या अवधींत तीन स्त्रियांचा पति होण्याचा त्यांनी मान मिळविला. पण बिचाऱ्याला धर्मपत्नी एकच, अवांतर दोन स्त्रिया सुख भोगावयास मात्र धर्मपत्नीवर ताण करीत होत्या. वास्तविक त्या विजातीय असून अविवाहित पत्नी ह्या सदरांत येण्यासारख्या. पण श्रीमंत व विलासी तरुणाची रखेली समाजांतील लाळघोट्यांत धर्मपत्नीपेक्षाहि अधिक मानमान्यतेला चढत असते. ठोमप्पा हे गर्भश्रीमंत असून इंग्रजी चौथीपर्यंत शिक्षण घेतलेले होते. वयांत येतांच आईचे व वडीलांचें नियंत्रण दुरावलें. अशावेळीं श्रीमंतांचीं लेकरें हीं हीन दर्जाच्या स्नेह्यांच्या कक्षेंत अधिक जातात. याप्रमाणे ठोमप्पाहिं गेला. श्रीमंतांच्या मुलांची लहर संभाळण्याचा धंदा

दारिद्र्यांत वाढलेल्या दुर्व्यसनी व चैनी वृत्तीच्या लोकांना जितका साधतो तितका अवांतरास साधत नाही. अशा मित्रांच्या नादीं लागून आमचा ठोमप्पा विलास भोगण्यांत वडिलार्जित संपत्ति खर्च करूं लागला. मुंबई शहरांतील विलासी वस्तु त्यांच्या येथे सदासर्वदा नांदत. त्यामुळे अधिकारीवर्गांतील फुकटे विलासी देखील ठोमप्पाला उदार म्हणत व त्याच्याजवळून देणग्या उपटत. त्यांच्या क्लबांत खेळणें व त्यांच्यावरोबर मौज उडविणें हा ठोमप्पाचा धंदा झाल्यामुळे व त्यांतच ऑनररी-मॅजिस्ट्रेटी व रावसाहेब ही पदवी सरकारांतून बहाल झाल्यामुळे ठोमप्पाच्या इष्टमित्रांनी ठोमप्पाचें सरकारदरबारांत फार वजन म्हणून अफवा उडवून दिल्या होत्या. श्रीमंत मूर्ख असला तरी त्याला आपल्या प्रभावळींत नित्य नाचावयास लावणें हें धूर्त अधिकाऱ्यांचें एक कामच असतें. आणि अनियंत्रित कारभारास सुव्यवस्थेचें स्वरूप आणणाऱ्या अधिकाऱ्यांचें तर हें पहिलें कर्तव्य असतें. परंतु हें ठोमप्पास कळत नव्हतें, व त्याच्या सोबत्यांनाहि ह्याची जाणीव नव्हती. त्यामुळे त्यांचा उन्मत्तपणा कळसाला जाऊं लागला.

ठोमप्पाच्या आवाजासरशी मोटार दाराशीं येऊन उभी झाली आणि ठोमप्पाहि सजून खालीं उतरले होते. पण मोटारींतून एकटें जावें कीं दुसऱ्या अविवाहित पत्नीपैकीं कोणास बरोबर न्यावें हा विचार त्यांच्या मनांत घोळत होता, व याकरिता जिवलग स्नेह्यांशीं चर्चा करण्यांत ते गुंग होते. इतक्यांत ग्रंथ पिशवींत घातलेला एक ग्रंथविक्या ग्रंथकार आंत शिरला. ग्रंथ धर्मपर होता. 'श्रीमंतांनी हा वाचावा म्हणून ग्रंथकारांनी तो मोठ्या आदबीनें त्यांना नजर केला. इतक्यांत श्रीमंतांच्या परिवारापैकीं एक दुर्जन म्हणतात कीं, ' श्रीमंतास वेळ नाही, चालता हो. ' श्रीमंत म्हणाले, मला कोणतेंहि ' हरप वाचतां येत नाही. करिता क्षमा करावी. हा ग्रंथविक्या ग्रंथकार हिरमुसला झाला व चालता झाला. इतक्यांत मोटारींत एक सुंदरशी अविवाहित पत्नी येऊन बसली. ठोमप्पा मोटारींत बसले व मोटार भरधाव चालूं लागली. ठोमप्पाच्या मोटारीमागून दुसरी एक मोटार चालू लागली. पण दोन मैलांवर ठोमप्पाची मोटार जातांच तिचें ऐंजिन एकाएकी थांबलें. यामुळे मागची मोटार जवळ आली. सदर मोटारींत दोन तरुण होते. पैकीं एक मोटार हाकांत होता, व एक त्याच्या शेजारी बसला होता. शेजारी बसलेल्या तरुणाने थांबलेल्या मोटारींत ठोमप्पा व त्याची दुर्गा रखेली आहे हें दुर्बिणींतून पूर्वीच पाहून ओळखून ठेवलें होतें. त्यामुळे ठोमप्पाची मोटार थांबतांच ह्या दुसऱ्या मोटारीची गति मंद झाली आणि तींतून ठोमप्पा व त्याची रखेली ह्यांच्यावर गोळ्या झाडण्यांत आल्या. ठोमप्पाच्या ड्रायव्हरलाहि मर्मी एक गोळी लागली. गोळी मर्मी लागतांच ठोमप्पाची रखेली दुर्गा ओरडली कीं, ' माझा भाऊ व माझा नवरा ! ' इतक्यांत गोळ्या झाडणारी मोटार निघून गेली. शेवटी दोन तासांनी ठोमप्पा, त्याची रखेली, व त्याचा ड्रायव्हर, हे तडफडून गतप्राण झाले.

ह्या वेळी रात्रीचे आठ वाजले होते. इकडे ठोमप्पाच्या घरीं असा चमत्कार घडला कीं, त्याच वेळी त्याची गरोदर असलेली धर्मपत्नी बाळंतीण झाली, व तिला मुलगा झाला म्हणून जुन्या गडी-माणसांत आनंद पसरला असतांच ठोमप्पा ठार झाल्याचें वर्तमान आलें व तें पुढे गांवात पसरलें. ठोमप्पाच्या मित्रांनी मोटारी मृत्युस्थानीं नेल्या. प्रेत परत बगल्यांत आणलें. धर्मपत्नीवर केवढें हें दुःख ! दुसऱ्या दिवशीं प्रेतसंस्कार झाला, आणि पुढे ठोमप्पाची इस्टेट कोर्ट ऑफ वॉर्डच्या ताब्यांत गेली. ही मोजदाद झाली तेव्हा ती सालची चार हजार उत्पन्नाची निघाली. अवघ्या सात वर्षांत सोळा हजाराचें उत्पन्न लक्ष्मीच्या उन्मादांत ठोमप्पांनी उडविलें असें जो तो म्हणूं लागला. वाडलार्जित लक्ष्मी सत्कार्यीं खर्च न करितां उडविली म्हणून तिचा शाप ठोमप्पास बाधला. पण वडिलांच्या पुण्याईने त्याच वेळी जन्मास आलेला पुत्र चांगला कुलदीपक निघो म्हणून सज्जन प्रार्थना करूं लागले. आणि विलासी, मूर्ख व व्यसनी श्रीमंतांच्या मुलांना ऐत्या पिठावरील नागोबा न म्हणतां ठोमप्पा म्हणण्याची रीत गांवांत रूढ झाली.

# नवमतवाद

ले०—श्री० विश्वनाथ तुकाराम आप्पा चौधरी, बी. ए., उमरावती.

**लेखांक १ ला.**

"Old order changeth yielding place to new."
**Lord Tennyson.**

*"नव्या परिस्थितीत नवा वीरशैव दिसूं लागावा ही आमची इच्छा आहे."*
("सुदर्शन" १६-८-३५.)—बामणगांवकर.

काही शब्द असे असतात कीं, ज्यांचे उच्चाराबरोबर निरर्थकच नसल्या कल्पनांचें वातावरण त्यांचे अर्थाभोंवती घिरट्या घालीत असतें. ह्या कल्पना 'बुजग बाहुल्या' प्रमाणे समाजांत निष्कारण भेडसावण्याचें कार्य करतात. 'सुधारक' व 'नवमतवाद' शब्द हे त्यांतीलच होते. परंतु निर्विकार व शांत मनाने विचार करणाऱ्याला हे शब्दप्रयोग प्रगतिपथावरील सामाजिक जीवनांचे निदर्शक आहेत असेंच आढळून येईल. पण परंपरेच्या वाच्यार्थांतच घिरट्या घालणाऱ्या दुबळ्या मनाला हा खोल अर्थ कसा उमगणार ? 'सुधारक सुधारक' किंवा 'नवमतवादी' म्हणून तरुण पिढीची कुचेष्टा करण्याचें व्यसनच असलेला शाब्दिक सनातनी कृतीने सुधारक व नवमतवादीच असतो. पण हें कबूल करण्याचा प्रामाणिकपणा ठराविक चाकोरींतून जाणाऱ्या परंपरागतिक मनांत असता तर नव्या-जुन्याचा वादच कसा माजूं शकेल ? आगरकरी-सुधारक मतांवर तोंडाने टीकेची झोड उठवून देणारे तत्कालीन सनातनी कृतीनें 'आगरकरी-सुधारक मतांना' सक्रिय सहानुभूतीच दाखवीत होते ह्याची साक्ष आजची सभोंवतालचीं समाजचित्रें व परिस्थिति निःपक्षपातपणें देत नाही काय ? पण टीका करीत करीत टीकाविषयानुवर्ती आचरण करणें हें तर बुरसटलेल्या सनातनी आचारधर्माचें वैशिष्ट्यच आहे.

परिस्थितिविरोधामुळे आचारपरिवर्तनाला नसला तरी तर्कशुद्ध विचारपरिवर्तनाला अल्पसंख्याकच कां होईना पण प्रामाणिक मताभिमान्यांचा एक वर्ग सनातन्यांत असतो व हा वर्ग नेहमी परिस्थितीच्या निरुंद चौकटींत स्वतःची कुचंबणा करून घेत असतां आणि बदलत्या परिस्थितींत यांचे आचारहि बदलत असतात. हे प्रवाहपतित असतात. ह्यांना संधीसाधु नवमतवादी सुधारक म्हणतात. व्यक्तिविकासाकरिता परिस्थितीची चौकट फोडून आपल्या प्रामाणिक सुधारणावादी नवमतवादी मतांकरितां एका विशिष्ट सामाजिक घटनेने बुरसटून पंगू बनलेल्या समाजांतील पुराणपुरुषांचे टीकेचे हल्ले, निंदेचे प्रवाह, वगैरेचा मारा सहन करीत आपल्या विशुद्ध सोज्ज्वल चारित्र्यावर

व आत्यंतिक प्रामाणिक मतानुवर्ती श्रद्धेवर विश्वसून खरे सुधारक व नवमतवादी सभोंवतालच्या धार्मिक व सामाजिक परिस्थितीला स्वमतानुवर्ती कलाटणी देऊन मानवी जीवनांत नवोदित आकांक्षांची व चैतन्याची भर टाकून, त्याला प्रगतिपथावर आणून ठेवून आखिल मानवी जीवनांत गोड संगीताची सुरेल शांतता व समाधान निर्माण करतात, तेव्हा निव्वळ सुधारक किंवा नवमतवाद या शब्दप्रयोगाने बुजण्याचें कांहीच कारण नाही. त्यांच्या दुसऱ्या प्रगतिपर उज्ज्वल बाजूकडे, त्यांतील खोल अर्थाकडे, लक्ष देऊन कलहजन्य परिस्थितींत बदल किंवा नाश या निसर्गनियमानुसार मानवी जीवन संगति करणेंच व्यक्तिविकासाचे दृष्टीने इष्ट आहे. व हया आखिल मानवी जीवनांत आपलें सामाजिक, धार्मिक व राजकीय स्थान निश्चित करून घेणें प्रत्येक समाजाला आवश्यक आहे. हया सर्वसाधारण दृष्टीने आपल्या वीरशैव-समाजाचें स्थान ह्या वादांत कोणतें आहे हेंहि ठरविणें समंजसपणाचें ठरेल.

सुधारणाजन्य नवमतवाद्यांचें म्हणजे आमच्या मंडळींचें म्हणणें तरी काय व सामाजिक सुधाणेंतील कमाल व किमान मर्यादा व नवमतवाद्यांची भूमिका कोणती व आमचें उद्दिष्ट काय हा प्रश्न प्रथम सोडविला पाहिजे. सनातनी विरोधकांच्या विरोधाला न जुमानतां समाजाचें सर्वांगीण प्रगतिकरितां व सुधारणेकरिता प्रामाणिक नवमतवादी मतप्रचार अविरत करीत राहणे हेंच ज्यांनी आपलें जीवितकार्य कल्पिलें आहे, त्या आमच्या नवमतवादी वीरशैव धर्मबंधु व सहकाऱ्यांची भूमिका काय आहे व त्यांच्या नियोजित भावी कार्याची पुसटच कां होईना पण कल्पना यावी म्हणून सूत्ररूपाने आमच्या विचाराची थोडक्यांत खाली मांडणी केली आहे. तेव्हा ' सुधारक ' किंवा ' नवमतवाद ' हया शद्बोच्चाराबरोबर अंगावर शहारे येऊन बुजून जाण्यासारखें खरोखरच त्यांत कांही आहे कीं काय ह्याचा शांतपणें विचार करण्याची वेळ आज आली आहे.

दे भ. नानासाहेब बामणगांवकरांचे आज्ञेवरून सोलापूर-बार्शीकडील भागांत ' वीरशैव संजीवनी 'चे प्रचारकार्यार्थ नवमतवाद्यांचे पुढारी व माझे स्नेही श्री. आप्पासाहेब एकलारे वकील पुसदकर ह्यांचेबरोबर फिरत असतांना अत्यंत उत्साहजनक जो अनुभव आला, तो हा कीं, " संजीवनी "-ची आवश्यकता समजावून सांगतांना प्रदर्शित केलेली ' नवमतवादी विचारसरणी ' तिकडील बहुतेक सर्वच पुढारी मंडळींना पटली.

ह्या दृष्टीने विचार करितां आमच्या धार्मिक जीवनाविषयी बोलावयाचें म्हणजे कुणीहि सांगतील तो धर्म मानावयाला आमची साफ तयारी नाही. जिज्ञासु, चिकित्सक, व तर्कशुद्ध विचारसरणीला पटेल अशीच धर्माची उभारणी असावी असें आमचें प्रामाणिक मत आहे. धर्म ह्मणजे लोकांचे अज्ञानावर उभारलेलें बुवाबाजीचें थोतांड किंवा ढोंग नसावें. समाजांतील धर्मविषयक अज्ञानावर पोसल्या जाणाऱ्या बुवाबाजीला किंवा तिच्या परंपरेला उचलून धरणें किंवा तशा स्वरूपाचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रयत्न करणें ह्याला आह्मी किंवा कुणीहि सुशिक्षित, सुसंस्कृत, व समंजस वीरशैव आज धर्म समजणार नाही. धर्मांत परिस्थितिनुसार बदलणाऱ्या समाजाच्या सर्वांगीण प्रगतीची, उन्नतीची, व उत्कर्षाची, योजना मुळें व बीजें असावींत. जीर्ण रूढी व खुळचट पारंपरिक कल्पना व धार्मिक अज्ञान ह्यावर उभारलेल कोणताहि धर्म जास्त दिवस टिकूं शकत नाही व तो खरा धर्महि पण नव्हे ! कालपरिस्थितिनुसार समाजांतील अधिकारीवर्गाकडून धार्मिक आचार-विचारांची अधिकृत जंत्री तयार करून घेऊन समाजाला आपल्या आवश्यक धार्मिक आचार-विचाराची स्पष्ट ओळख करून देण्याची आज वेळ आली आहे.

# ' संजीवनी '-चें कार्यक्षेत्र.

श्रीयुत तु० ना० कावकर, V. M., T. T. C., मुख्याध्यापक,
पो.- बेंबला, जि.- चांदा. C. P.
यांजकडून —

वीरशैवसमाजाच्या गतकालाचें सिंहावलोकन केलें असतां प्रत्येक ज्ञेय वीरशैवास असें आढळून येईल कीं, ' वीरशैव केसरी ' ' वीरप्रभा ' ' वीरशैव गर्जना ' ' प्रभृति ' नियतकालिकें जन्मास आलीं व कशीं तरी दोन दिवस जगून त्यापैकीं कांहीं कालाधीन-शिवैक्यें-झालीं याचें कारण शोधूं पहातां त्या त्या नियतकालिकांचें संचालकत्व, ध्येय, स्वरूप आणि या सर्वांवर अवलंबून असलेली लोकप्रियता व खप हीं होत. अजूनहि त्यांतील कांहीं मेषवत् ,आयुष्य कंठीत आहेत. मधून-मधून तीं मला बघायला मिळतात. मोठ्या आपुलकीने हातांत घेतों. पण त्यांतील लिखाण दृष्टीस पडतांच भालावर आठ्या आल्या-शिवाय राहत नाहींत. धार्मिक नांवाखालीं निघणारी नियतकालिकें नुसत्या जाहिराती व एखाद-दुसऱ्या वर्तमानाच्या उतान्याने सच भरलेलीं., त्यांत पुरते दोन-चार रकानेसुद्धा वाचण्यासारखे नसतात. अशा पत्राबद्दल वाचकांना आदर वाटावा कसा ? आणि त्याची उन्नति व्हावी कशी हा मोठा गहन प्रश्न आहे.

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या नेतृत्वाखालीं ' वीरशैव संजीवनी '-चा उदय होणार हें माझ्या मानसचक्षूला गोचर होतांच माझ्या सर्व भावना एकदम फुलल्या आणि अंतस्थ जें ठेवत आहे तें संजीवनीच्या नव्या वाचकां-समोर प्रकाशित करण्यास प्रवृत्त झालों. (१) पाक्षिकाचें नांव जसें धार्मिक भावनेने मर्यादित केलें आहे तसें त्याचें स्वरूप नसावें. स्वरूप व्यापक व सर्वांगीण असावें. (२) आंतररचना विभागलेली असावी. त्यांत निरनिराळे खंड असावे. जसे — वीरशैव-विभाग; यांत वीरशैवमताचींच सर्व लिखाणें असावींत. याशिवाय इतर समाजाकरिता पुनः एक-दोन निराळे खंड पाडून त्यांतून सार्वजनिक वाङ्मयाची चर्चा करावी. यामुळे दुहेरी फायदा होईल. तो असा — एक तर इतर वाङ्मय असल्यामुळे इतर समाजांत सदर पाक्षिकाची आवड उत्पन्न होईल. आणि यानिमित्ताने त्यांना या वीरशैवधर्माचा परिचय होईल. ही योजना संचालकांनी स्वतःच्या सोयीप्रमाणे श्रेयस्कर ठरवावी. (३) पाक्षिकाचें स्वरूप व उद्दिष्ट स्पष्ट आणि उच्च असावें. (४) एकंदरीत मतितार्थ हा कीं, ज्ञातिसमाज तर त्यामुळे आकर्षित झालाच पाहिजे; पण त्याबरोबरच ज्ञानवान् समाजावरहि छाप पडली पाहिजे.

भविष्यकाळ आपला आहे ह्या दृष्टीने पहातां ' जुने तेवढें सोनें ' ह्मणून भागत नाहीं. ज्या योजनेने उद्दिष्ट कार्य कळसास पोहचेल तोच यशस्वी मार्ग असें माझ्या मतें वाटतें. सारासार विचारांतीं जें मनांत आलें तें पांढऱ्यावर काळें केलें. असो. अशा पडत्या काळांत-सुद्धां नानासाहेबांना आपण आपलें धैर्य प्रकट करून ' वीरशैव संजीवनी ' च्या द्वारें वीरशै-वांना संजीवित करण्यास प्रवृत्त झालें हें धडाडीचें कार्य केव्हांहि अभिनंदनाला पात्र आहे. यांत एखाद्याची वाखाणणी करावी असें कांहीं नाहीं. प्रथमसूचनाच कंटाळवाणी होऊं नये ह्मणून येथेच विश्रांति देतो.

—:०:—

२१

# वीरशैवसंजीवनी

अंक ३ रा ) ता० १ फेब्रुवारी १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येताच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापक:—' उदय '
उमरावती ( वऱ्हाड

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथें निघत असून वीरशैवांत सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल् एल्. बी. हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखहि येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापक.—' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथ श्रीगुराचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु २ आणे १२ आहे.

व्यवस्थापक.—' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

# " वीरशैव धर्म माझा "

( कविः– नथ्थुआप्पा मारुतीआप्पा आदेवार, नागपूर ).

चालः–– आनंदकंद ऐसा.

श्रेष्ठांत श्रेष्ठ समजा । वीरशैव धर्म माझा ॥ ध्रु. ॥
धर्मांत धर्म पाही । तो वीरशैव धर्म गायी ।
अष्टांग शील साचा । वीरशैव धर्म माझा ॥ १ ॥
हिंसेंत सार नाहीं । मिथ्यांत तथ्य नाहीं ॥
गाजे असा नगारा । वीरशैव धर्म माझा ॥ २ ॥
एकींत जीव आहे । नीतींत सौख्य आहे ।
हें जो कथी जगाला । वीरशैव धर्म माझा ॥ ३ ॥
बसवादी देव बापा । बसवर्वार होई त्राता ।
करीती जया पसारा । वीरशैव धर्म माझा ॥ ४ ॥
बारदादि धर्ममुकुट । चन्नबसवादि निकट ।
करिती स्वधर्म प्रकट । वीरशैव धर्म माझा ॥ ५ ॥
* " जगताप " वीररत्न । धर्मा करी प्रयत्न ।
संदेश हाच दिधला । वीरशैव धर्म माझा ॥ ६ ॥
देवाधि देव मुनिला । सकलांस वंद्य झाला ।
जयनाद हा तयाचा । वीरशैव धर्म माझा ॥ ७ ॥
सत्संग सौख्यकारी । सद्गुण प्रेम धारी ।
पसरी सुगंध ज्याचा । वीरशैव धर्म माझा ॥ ८ ॥
शांती क्षमा अहिंसा, । होती जयास सीमा ।
जयघोष हो तयाचा । वीरशैव धर्म माझा ॥ ९ ॥
कलहादि दोष त्यागा । ना द्या रिपूस जागा ।
ठावा जयास मार्गा । वीरशैव धर्म माझा ॥ १० ॥

टीपः— * जगताप हे " लिंगायत बुरुड " समाजाचे प्रेसिडेंट आहेत. या ठिकाणीं ज्यांनीं त्यांनीं आपल्या स्थानिक पुढाऱ्याचे नांव घालून (आपल्या धर्माच्या) हें पद्य म्हणावें.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

: वीरशैव संजीवनी :

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य,येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति माघ शु॥ ९ शके १८५७ ( अंक ३ रा.

# पुण्यांत श्री. पावटे यांची शोभा झाली काय ?

पुणे येथे जें हिंदुमहासभेचें अधिवेशन झालें त्यानिमित्ताने जे ठिकठिकाणच्या भागांतील प्रमुख वीरशैव प्रतिनिधी आले होते त्या सर्वांचें संमेलन घडावें व ओळखदेख व्हावी ह्याच एका हेतूने श्री. विटेकर व श्री. आडके ह्या तरुण मंडळींनी ता. ३० दिसेंबर रोजीं रात्रौ पुणे येथे श्रीकमंप्रयत्नेश्वरमंदिरांत सर्व पाहुणे मंडळींना व पुणेकर प्रमुख वीरशैवांना एकत्र जमविण्याचा प्रयत्न केला व त्याप्रमाणे हुबळीचे ॲडव्होकेट श्री. भिद्रामप्पा पावटे, बी. ए., एल एल. बी., श्री. मंजाप्पा हार्डीकर, संपादक 'शरण संदेश' आलमट्टी , जि. विजापूर;श्री. गुरु राचलिंगस्वामी परान्डकर,संपादक 'वीरशैव गर्जना' बार्शी,श्री.शिवमूर्तिशास्त्री तुंकूर,डॉ. जगदेवराव देशमुख, सोलापूर; डॉ. वडगांवकर, मुंबई; उमरावती–वीरशैव संजीवनीचे संपादक श्री. बामणगांवकर, श्री. प्रभुराय वकील उदगीर, वगैरे परगांवची मंडळी तेथे उपस्थित होती.त्याचप्रमाणे पुण्याचे श्री.अय्यासाहेब माणुरकर, श्री. रंगनाथ बाबाजी इसापुरे, श्री. हणमंतराव कंठाळे, श्री. नारायणआप्पा आडके, श्री. गणपतराव फुटाणे, श्री. त्र्यंबकशेट वाळेकर, वगैरे प्रमुख 'वीरशैव'-हि हजर होते. जमण्याचा हेतु तेथे गुरुस्थळ-विरक्तवाद उकरून काढावा असा मुळीच नव्हता. पण हा वाद सदर सभेंत निघाला व श्री. पावटे ह्यांच्यासारख्या विद्वानांची तेथें शोभा झाली असें कांहींनी जाहीर केलें तें खरें कीं काय असें आम्हांला एका सद्गृहस्थाने पत्र पाठवून विचारलें आहे.

व असा मजकूर कांहीं वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाल्याचेंहि आमच्या निदर्शनाला आणलें आहे. आह्मी स्वतः ह्या सभेत हजर होतो. त्यामुळे ह्या सभेविषयी खरें तें लिहिणें आमचें कर्तव्य आहे.

वास्तविक भेटी होऊन परस्परपरिचय वाढावा हाच ह्या संमेलनाचा हेतु होता. त्याला असें जाहीर स्वरूप येण्याची अवश्यकता नव्हती. पण खाई त्याला खवखवे ह्या न्यायाने ती आली हें आमचें दुर्दैव होय. श्री. पावटे व मंजाप्पा हार्डीकर ह्यांचा व आमचा फार जुना परिचय. पण पुष्कळ दिवसांनी अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर हे तेथे आह्मांस भेटले. हीच भेट आधिक द्विगुणित व्हावी म्हणून आह्मी श्रीकर्मप्रयत्नेश्वराचे मंदिरांत एकत्र व्हावयास तयार झालों. श्री. पावटे व हार्डीकर हे प्रमुख वीरशैव आहेत व ते आपल्या मार्गाने समाजोद्धारणेचा प्रयत्न करीत आहेत. म्हणून त्यांच्याविषयी आह्मांला आतिशय आदर वाटतो व वाटत होता. पुणे येथील परिचयाने तो अधिकच वाटूं लागला हें नमूद करणें आह्माला अवश्य वाटतें. श्री. पावटे व मंजाप्पा हार्डीकर ह्यांच्या मताचा आह्मांला पूर्ण परिचय नाही ह्याचें कारण त्यांचीं मतें बहुधा कानडींतून प्रकट होतात. आणि ह्या भाषेसंबंधाने दुर्दैव हें कीं, आह्मीं पूर्ण अनभिज्ञ आहों. तथापि अॅ. पावटे ह्यांचें 'Veershaio philosophy' हें इंग्रजी पुस्तक व 'वीरशैव परिचयः' हें संस्कृत पत्रक आह्मीं वाचलें आहे, आणि मंजाप्पा हार्डीकर ह्यांनी गुलबर्गा–आर्यसमाजाला 'सत्यार्थ-प्रकाश' व 'बसवबोध' ह्यांत तुलना करून जें उत्तर दिलें तेंहि आह्मीं 'सुदर्शन'-मधून वाचलें आहे. त्यांतील प्रत्येक विधान व प्रत्येक विवेचन हें जरी आह्माला पटण्यासारखें नसलें तरी अॅ. पावटे ह्यांच्यासारख्या आधुनिक विद्वानाची स्वधर्मावरील तीव्र श्रद्धा व त्यांचा व्यासंग पाहून त्यांच्याविषयी आम्हांस आदरच वाटला. त्याचप्रमाणें मंजाप्पा हार्डीकर हे कानडी वाङ्मयांतील दर्दी आहेत व वीरशैवमतप्रसाराची त्यांना चिंता आहे हें पाहून त्यांच्याविषयी आह्मांस आदर वाटूं लागला. वीरशैव वीरशैवाकरिता, झटतो, लेख लिहून झटतो, सभा करून, करवून संस्था स्थापून झटतो व त्याकरिता वेरे-वाइट म्हणवून घेतो, हाच आमच्या आदराचा खरा विशेष.

अॅ. पावटे ह्यांनी वीरशैवांचें तत्वज्ञान इंग्रजींतून व संस्कृतांतून तर्कशुद्ध रीतीने प्रस्तुत करण्याचा जो उद्योग चालविला त्या उद्योगाबद्दल आह्मांस अधिक कांहीं करितां येत नसलें तरी त्यांच्या त्या धर्मसेवेबद्दल ह्या वृद्ध तपस्व्याच्या चरणीं आपला माथा नम्र करावा असें आमच्या मनाला वाटतें. शास्त्री-पंडितांत, महास्वामींतसुद्धा इतक्या कळकळीने आपलीं धर्ममतें प्रस्तुत करण्याची इच्छा नाही. आणि आधुनिक पंडितांत तर नाहीच नाही. अॅ. पावटे व मंजाप्पा हे उभयता भक्तजातींत जन्मले व आम्ही गुरुजातींत जन्मलों, तेव्हा त्यांच्या चरणीं माथा कसला नम्र करतां, असा आमच्यावर आरोप येईल. पण स्वतःपलीकडे दृष्टि देऊन जो धर्माकरिता व समाजाकरिता कांहीं ना कांहीं करतो तोच खरें शिवाचें पूजन करतो, तेथेच शिवाचें वास्तव्य आहे, अशा भावनेने आम्हाला पछाडलेलें असल्यामुळे तेथे आमचा माथा नम्र होतो. सद्वाक्य बालकाने उच्चारलें तरी त्याला गुरु मानावें, ब्रम्हाची जाणीव होऊन जो बोलतो व आचरतो त्यासच नमन करावें, एवढें साधें शास्त्रच आह्मांस अवगत. म्हणून पावटे ह्यांच्याविषयीं आम्हांस आदर वाटतो. आमच्याविषयी त्यांना काय वाटतें हा येथे प्रश्न नाही. आम्हास असेंहि सांगणारांनी सांगितलें कीं, अॅ. पावटे व हार्डीकर तुह्मीं गुरुपुत्र म्हणून तुम्हास तुच्छ समजतात व त्यांतहि तुम्ही महाराष्ट्रीय आहां. आह्मीं म्हटलें, त्यांत बिघडलें काय ? ते आम्हाला काय समजतात हा प्रश्नच आह्मी कधीं विचारांत घेत नाही. अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर हे सरस्वतीचे भक्त आहेत व ती सरस्वती त्यांच्या लेखणींतून व वाणींतून धर्मरूपाने प्रगट होते तेव्हा तिच्यापुढे नम्र होणें हा प्रत्येक सरस्वतीभक्ताचा हक्क आहे. सरस्वतीला जात नसते, गोत नसते, लहान-मोठा भेद नसतो. म्हणूनच विद्वान् हा राजांनाहि पज्य असतो. अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर हे

विद्वान् आहेत म्हणूनच ते पूजनीय आहेत. आणि वीरशैवांतील प्रत्येक विद्वान् ह्यामुळेच आम्हाला पूज्य वाटतो. अशा पूज्य विद्वानाची पुण्यांत शोभा झाली म्हणजे काय झालें हें आम्ही तेथे हजर असूनहि आमच्या कानाला ऐकूं आलें नाही व आमच्या डोळ्यांना दिसलें नाही. डॅ. पावटे ह्यांचीं सर्वच मतें आम्हास मान्य आहेत असें नाही. पण मतें मान्य नसलीं म्हणून ते सर्वस्वीं अनादरास वा कुटाळीस पात्र होतात असें मानणें आह्मी निंद्य समजतों.

आह्मास कांही कळलें नाही तर आह्मी कळवून घेऊं, तें कळवून घेण्याकरिता वैऱ्याच्याहि सभेंत एकटे जाऊं, तेथे बसूं, तेथे बोलूं, तेथे निंदा झाली तरी हासत ऐकूं, मारले तरी हासत मार खाऊं. कारण आह्मी गुरुपुत्र आहों. विद्वानांत बसण्याची-उठण्याची, वाद घालण्याची, वादांत हारण्याची तशीच जिंकण्याची आम्हास हौस आहे. कोणत्याहि सबबीवर तेथून पलायन करणें आमचें ब्रीद नव्हे. पण येथे ह्यापैकीं तसा कांहीच प्रसंग नव्हता. निरनिराळ्या भागांतील चार लिंगधारी कार्यकर्ते एका ठिकाणी बसले, गप्पा-गोष्टी केल्या व एकमेकांचें क्षेम चिंतीत परत गेले एवढेंच. अशा परिस्थितींत पावटे ह्यांची शोभा ती काय झाली असेल व कोणीं केली असेल? उगीच एखाद्या वयोवृद्ध विद्वानाची हेटाळणी करावी अशा क्षुद्र मनोवृत्तीचा एकहि वीरशैव तेथें हजर नव्हता. पुणे येथील श्रीकर्मप्रयत्नेश्वरमंदिरांत श्री. पावटे व कांही मंडळी प्रथम येऊन बसली होतीं. नंतर आह्मी डॅ. जगदेवराव व डॅ. वडगांवकर जाऊन पोहोंचलों. पानसुपारी खात व विड्या ओढीत आह्मीं अॅ. पावटे ह्यांना प्रश्न केला कीं, ऐतिहासिक दृष्टीने आम्हाला कांही बसवाची माहिती सांगा. जन्मतःच लिंगधारणा झाली असल्या काव्यकल्पना आम्हाला नकोत. ठीक आहे. मी त्याच दृष्टीने सांगतों असें पावटे ह्यांनी आनंदाने कबूल केलें. वस्तुत: अॅ. पावटे हे बसवेश्वर-तत्वज्ञानांत मुरलेले विद्वान् गृहस्थ असल्यामुळे बसवेश्वरास जन्मतःच लिंगधारणा झाली असें भारूड सांगूं नका असें आम्हीं म्हणतांच त्यांनी चवताळावयास पाहिजे होतें. पण त्यांनी तसें न करितां आठव्या वर्षीं बसवेश्वरास संगमदेवाने वीरशैवदीक्षा दिली हें ऐतिहासिक सत्य सांगितलें. ह्याकरिता शैवांमध्ये तत्पूर्वी अद्वैत-द्वैत ह्या मतांचा तत्वज्ञानदृष्ट्या कसा विकास होत गेला ह्याचें इंग्रजींतून तर्कशुद्ध दृष्टीने त्यांनी विवेचन केलें व त्यांचा संयोग कसा होण्याची वेळ आली व बसवदेवांनी स्वतःची जात विसरून व स्वतःचा बापहि विसरून आणि संगमदेवाशीं तद्रूप होऊन इष्टलिंगधारणेच्या रूपाने वीरशैवतत्वज्ञानाचा त्यांनी कसा प्रसार केला हें बसववचनाचे आधार देऊन व तद्रूप होऊन सांगण्यास सुरुवात केली. त्यांना माहिती विपुल, पाठांतर पुष्कळ व सांगण्याची शैली तर्कशुद्ध असल्यामुळे ११॥ झाले तरी ते बोलतच होते. पण मध्यंतरी कंटाळवाणें होतें कीं काय असा तेच प्रश्न टाकीत. विषय तत्वज्ञानाचा व तोहि इंग्रजींतून चालला होता. इंग्रजी न समजणारास व्यर्थ वेळ चालला असें वाटणें स्वाभाविक होतें. पुढे ही चर्चा बंदच झाली. कारण उघड्या जागेंत सर्व बसले होते, व त्यांच्याहि पायास मुंग्या येऊं लागल्या होत्या. चर्चा संपतांना डॅ. जगदेवराव, बासणगांवकर, व विटेकर ह्यांनी असा प्रश्न माहिती मिळविण्याकरिता टाकला कीं, बसवांना ज्या अर्थी लिंगदीक्षा दिली गेली त्या अर्थी बसवपूर्वकालींच इष्टलिंगधारणा सुरू होती हें खरें ना? त्यांनी होय हेंच उत्तर दिलें. बसव हाच इष्टलिंगधारणेचा उत्पादक वा प्रसारक असें त्यांनी प्रतिपादन केलें नाही. परंतु त्या काळांत स्वतःची ब्राह्मण जात सोडून इष्टलिंगाशीं व गुरुशीं तद्रूप बनून कानडी वाङ्मयाला शिवभक्तीचा महिमा पटविणारा पहिला महासंत कवि बसवेश्वर होय म्हणून त्यास वीरशैवधर्मसंस्थापकहि म्हणतात. अर्थात् कानडी वाङ्मयांत लिंगायतधर्माचा संस्थापक म्हणून बसवेश्वरास प्राधान्य आलें असलें तर आश्चर्य नाही. कारण भागवतधर्म हा फार

पुरातन. पण महाराष्ट्रांत तो नामदेव तुकारामादि संतांनी प्रथम मराठींतून सांगितल्यामुळे महाराष्ट्रांत भागवतधर्माचे संस्थापक म्हणून नामदेव-तुकाराम आदिकरून संतांना मानण्याची प्रथा पडली म्हणून काय बिघडलें ? कानडी वाङ्मयांत प्रथम जैनवाङ्मय आहे व नंतर बसवापासून लिंगायतांनी निर्माण केलेलेंच वाङ्मय आहे. त्यांत बसवेश्वरास आद्यस्थान मिळत असल्यामुळे लिंगायतधर्माचा उदय बसवेश्वरापासून झाला असें कानडीच्या इतिहासांतून विधान उत्पन्न झालें तर त्याला बसवेश्वर काय करणार ? पण इष्टलिंगधारणेचा मूळ उत्पादक बसवेश्वर नव्हे हें ऐतिहासिक सत्य अॅ. पावटे ह्यांना मान्य आहे. तें त्यांनी लपविलें नाही, व त्यांनी केलेल्या दोन-अडीच तासांच्या चर्चेंत विरक्तपंचाचार्यवादाचा शब्दहि उच्चारला नाही. तें लिंगायतधर्माचे पंचाचार समजून सांगत असतां 'पंचाचार' हा शब्द ते उच्चारीत. यामुळे इंग्रजी न समजणारांना पचाचार्यांचाच ते उल्लेख करीत आहेत असें वाटलें तर नवल नाही.

वास्तविक प्रस्तुतच्या पंचाचार्यविरक्तवादाबद्दल अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर ह्या उभयतांशीं आमची जी खाजगी चर्चा झाली त्यावरून ते एकाहि पक्षाचे अभिमानी नाहीत असा आमचा ग्रह झाला. पण बसवेश्वराची व्यर्थ निंदा करणारे जे आहेत त्यांना मात्र ते उत्तर देतात. कारण बसवेश्वरांनी जन्मजात भेद मानला नाही व इष्टशिवभक्त सारे समान मानले म्हणून ह्या उभयतांना बसवेश्वराविषयी अत्यंत अभिमान वाटतो. त्या अभिमानाच्या भरांत कां होईना पण ती जी समाजसेवा करतात त्याबद्दल त्यांचे उतराई होणें हेंच भल्या माणसाचें कर्तव्य आहे. बसवबोध ही अत्युत्कट अशी मानवी जीवितोद्धाराची भावना आहे, पण तें समाजशास्त्र नव्हे, हें आम्हासहि मान्य आहे. नामदेव, एकनाथ, तुकारामादि महाराष्ट्रीय संतांचीं वचनें जी भावना प्रगट करतात तीच भावना बसवेश्वरांनी बसवबोधांतून प्रकट केली आहे. आणि ह्या बसवबोधाचा व्यासंग अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर ह्यांनी जीवेंभावें केला आहे. श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर व धुळ्याचे श्रीयुत शंकर श्रीकृष्ण देव हे जसे संतवाङ्मयाचे व दासवाङ्मयाचे आधारस्तंभ म्हणून गणले जातात त्याचप्रमाणे बसवादिकांच्या वाङ्मयांत मुरलेले अॅ. पावटे व मंजाप्पा हार्डीकर हे आहेत अशी आमची समजूत झाली आहे. अशा स्थितींत सध्याच्या विरक्तावर सध्याच्या पंचाचार्यभक्तास राग काढावयाचा झाला व तो त्यानें बसवेश्वरावर काढला तर अॅ. पावटे ह्यांनी कां सहन करावा ? आणि आपसांत अशा प्रकारें एकमेकाची भावना दुःखविण्याचे उद्योग करणें ह्यांत समाजकार्य नसून समाजघात आहे. पुणे येथील चर्चेंत कोणाची कोणींच भावना दुखविली नाही. जें झालें तें सर्व एकमेकांना एकमेकाशीं सौम्य व सभ्य वर्तन ठेवूनच झालें. तेथे कोणींच कोणाची शोभा केली नाही तर सर्वांनीच सर्वांची शोभा वाढविली. विद्वत्परिषदेपुढे जाण्यासारखा कोणताहि गहन प्रश्न तेथे नव्हता. आणि विद्व परिषदेंतील विद्वानांना जें कळलें नसेल त्यापेक्षा अधिक कळत असलेले लोक तेथे असल्यामुळे विद्वत्परिषदेपुढे जाऊन ते नवें काय शिकणार व नवें ते तरी काय शिकविणार ?

पण विद्वान् म्हणविणारे जे सनातनी शास्त्री-पंडित असतील त्यांनी शिकण्यासारख्या अनेक गोष्टी ह्या चर्चेंत दिसून आल्या. त्या ह्या कीं, पंडितांनी पंडिताविषयी आदर बाळगून बोलणें व आचरणे, आणि आपआपल्या मताविषयी पूर्ण अभिमानी राहून इतरांच्या मताकडे तुच्छतेने न पाहणें. कारण जे मतभेद आहेत वा असतील ते वीरशैवांचे वीरशैवांतीलच आहेत. तेव्हा येथे परमतसहिष्णुता एकमेकांत असणें अत्यंत जरूर. ही सहिष्णुता ज्यांच्यांत नसेल तो पंडित वा विद्वान् आहे, निदान त्याला विद्वानाची वा विद्वत्तेची चाड आहे, असें कसें म्हणावयाचें? वीरशैवांत विद्वान् आहेत व ते परमतसहिष्णुता धारण करणारे आहेत हें जर उघड करावयाचें

असेल तर त्यांनी प्रथम पंचाचार्यविरक्तवाद मिटवावा. ह्या वादांतील शिमगापांडित्य ज्यांना बंद करितां येत नाही त्यांना आ ही फाल्गुन-पंडित म्हणूं. अशा फाल्गुनी पांडित्याचा वासहि ज्या चर्चेत आला नाही त्या चर्चेत अॅ. पावटे ह्यांची शोभा झाली हें खोटेंच लिहिणें व सत्य न समजून घेतां तें प्रसिद्ध करण्याचें धाडस करणें अप्रबुद्धपणाचें लक्षण आहे. तुमच्याशीं चर्चा करण्याची इच्छा नाही असें उद्धट वाक्य उच्चारून अॅ. पावटे ह्यांना एकानेहि दुःखविलें नाही. पुढे गुलबर्गा आर्यसमाजाच्या आक्रमणा-बद्दल चर्चा झाली व सर्वांनी एकमेकांचा अत्यादर-पूर्वक व अत्यानंदाने निरोप घेतला. ही वस्तुस्थिति असल्यामुळे पुण्याच्या खाजगी सभेंत अॅ. पावटे ह्यांची शोभा झाली हें विधान सर्वस्वीं खोटें असून, तेथे अॅ. पावटे ह्यांच्यामुळे शोभा आली हेंच खरें आहे. अॅ. पावटे ह्यांची शोभा झाली असें खोटें विधान करून बसवेश्वराचें खंडन होत नाही व पंचाचार्यांचें मंडन होत नाही. मग अशा बातम्या उठविण्यांत व पसरविण्यांत काय फायदा ? उलट, आपण विद्वानाचा मत्सर करतो व सरस्वतीला शिमग्यांत नाचवितो असें दिसत नाही काय ? मतभेद असले तरी सरस्वतीभक्ताने सरस्वतीभक्ताची अशी खोटीच आगळीक करावयास शिकणें निंद्य होय असेंच स्पष्ट म्हणणें भाग आहे.

# उज्जयनी-महास्वामींचें शिवैक्य

उज्जयनी ( जि. बळ्ळारी ) येथील पचां-चार्यांच्या मुख्य पीठावरील जगद्गुरु महास्वामी सिद्धलिंग शिवाचार्य हे ता. १३ रोजीं शिवरूप झाले व त्यांनी इहलोकींची यात्रा संपविली असें वर्तमान 'वीरशैव गर्जनें'-त प्रसिद्ध झालें आहे. सिद्धलिंग-शिवाचार्यांसारख्या तपोनिधी महास्वामींच्या समाधिकालाबद्दल व्यावहारिक लोकांप्रमाणे दुःख व्यक्त करणें उचित नाही हें खरें; पण सदर महास्वामी तपोनिधि असले व त्यांनी व्यवहार तुच्छ मानला असला तरी तुम्ही-आम्ही सर्व व्यावहारिकांनी महास्वामींच्या ठिकाणी जी श्रद्धा ठेवली होती व जी वारंवार व्यक्त केली होती ती आपणा व्यावहारिकांना त्यांनी नित्य पावन करावें ह्याकरिताच व्यक्त केली होती. याप्रमाणे आपण सर्व पतित व्यावहारिक पावन होण्यापूर्वीच सिद्धलिंग महास्वामींसारखी विभूति आपणा सर्वांना सोडून शिवलोकीं गेली ह्याबद्दल आपणाला अत्यंत दुःख होणें स्वाभाविक आहे.

सिद्धलिंग महास्वामींचें सिंहासन हें पंचा-चार्यांच्या सिंहासनापैकीं सिंहासन होय. अशा सिंहासनावर अधिष्ठित होऊन सदर महास्वामींनी आपलें आयुष्य अध्ययन व अध्यापन ह्यांत घाल-वून जी तपश्चर्या केली त्यामुळे त्यांच्या ठिकाणीं भक्तगणांची भक्तिहि विशेष प्रकारची जडली होती. गेल्या दोन-तीन वर्षांत बार्शी, सोलापूर, पंढरपूर, मंगळवेढे, वगैरे ठिकाणीं महास्वामींचें वास्तव्य झालें होतें व त्याचा त्या भागांतील महाराष्ट्रीयांना परिचयहि झाला होता. त्या परिचयामुळे महा-स्वामींसंबंधी लोकांची विलक्षण भक्ति बसली हें निदर्शनास आलें. सोलापूरसारख्या वीरशैववस्तीच्या मुख्य शहरीं महास्वामी जात असतां त्यांची आडवी पालखी बिरुदावलीसह निघूं नये असा कित्येकांचा निर्धार होता. आणि महा-स्वामींची निगर्वी वृत्ति अशी कीं, आपण आडव्या-पालखींतून मिरवलों तरच महास्वामी असें त्यांना वाटतहि नव्हतें. ह्या निगर्वी वृत्तीचा परिणाम वीरशैव-जनतेवर विलक्षण झाला व त्यांनी महा-स्वामींना सोलापुरांत सन्मानाने नेले व तेथे त्यांची मिरवणूक निघून ह्यांच्याविषयी विलक्षण आदर व्यक्त करण्यांत आला. अशा प्रकारें भक्तांचीं मनें आपलीशीं करण्याचें लोकोत्तर सामर्थ्य महास्वामींत होतें हें उघड झालें.

खुद्द बार्शी येथे महास्वामींचा सत्कार करतांना जे कधी एक झाले नसते तेहि सर्व एक झालेले आढळून आले. असामान्य विभूतींचे चरण लागतांच बार्शी येथे हा चमत्कार घडला होता. श्री. गुरुमूर्ति परान्डकर व श्रीमंत अण्णासाहेब कथले हे व तेथील सर्वच पक्षोपपक्ष महास्वामींच्या सेवेप्रीत्यर्थ अनेक दिवसांत एक झाल्याचें चित्र कित्येकांनी पाहिलेलें आहे. योग्य अधिकार व योग्य तपःश्चर्या पाठीशीं असल्यामुळे द्वैतांत अद्वैत व अद्वैतांतहि विशिष्ठ शक्तीचें प्रभुत्व सिद्धलिंग महास्वामी दाखवूं शकले तर नवल काय? बार्शी-प्रमाणेंच ठिकठिकाणीं ज्या लिंगायतांच्या फळ्या आहेत त्याला कांही तात्विक वा हितकर कारणें आहेत असें मुळीच नाही. इष्टलिंगद्वारां प्रकट होणारें शिवदेवाचें ब्रम्हस्वरूप आपल्यापलीकडे नाही अशी कोती व आकुंचित भावना जेथे असते तेथेच फळ्या उत्पन्न होतात व चालतात. पण ह्या आकुंचित भावनांचा लोप महास्वामींच्या महान् तपःश्चर्येच्या तेजापुढे आपोआप होतो. तसेंच, उज्जयिनी महास्वामींच्या महाराष्ट्रांतील संचारामुळे झाले होतें. पण संचार संपला, महास्वामींनीहि शिवलोकीं गमन केलें, पण त्यानंतर आह्मी सर्व व्यावहारिक पूर्वी जसे फत्तर होतो तसेच फत्तर राहिलों. तेव्हा आम्ही सर्व फत्तरांनी महास्वामी गेल्यावर रडूं नये तर काय करावें ? होय. रडावेंच! आणि प्रार्थना करावी कीं, हे महातपोनिधे, आम्हाला दगड ठेवूनच गेलांत तेव्हा पुन्हा अवतार घ्या व आम्हा दगडांत शिवरूप-ब्रह्माचें तेज निर्माण करून सर्व लिंगधाऱ्यांकडे आपुलकीच्या भावनेने पाहण्याची शक्ति निर्माण करा!

महास्वामींच्या शिवैक्याची वार्ता कानीं येतांच बार्शी येथे सर्व वीरशैवांचे व्यवहार बंद पडले आणि श्री. गुरु औंधकरस्वामी ह्यांच्या अध्यक्षतेखाली गुरु परान्डकर व श्रीमंत अण्णासाहेब कथले आदिकरून सर्व वीरशैव एकत्र होऊन त्यांनी अशाच अर्थाची प्रार्थना केली असावी. ह्या प्रार्थनेला महास्वामींच्या पुण्यात्म्याने वर दिला तर श्रीगुरु औंधकरस्वामी, परान्डकर व अण्णासाहेब कथले हे सर्वच सदासर्वदा वीरशैवांच्या कल्याणार्थ एकाच व्यासपीठावर व एकाच कार्यार्थ झटलेले आढळतील. जें महास्वामींच्या शिवैक्याने दिसलें तेंच निरंतर तेथे व सर्वत्र दिसलें तर महास्वामींचें शरीर दिसणार नाही. पण त्यांचें अवतारकार्य चालूं असलेलें दिसेल ! पण विद्वानाने गर्व सोडला पाहिजे, अज्ञानाने ज्ञात होण्याची कास धरली पाहिजे, व लक्ष्मीपुत्राने शिवापेक्षा लक्ष्मीच्याच तोऱ्यांत नाचण्याची बुद्धि सोडली पाहिजे. हें सुटेल. पण केव्हा ? तर महास्वामींचें पूजन जर निरहंकार वृत्तीने व शुद्ध सात्विक भावनेने केलें असेल तरच ! महास्वामी तपोनिधि होते. उत्कृष्ट उपदेशक होते. दगडांत चैतन्य भरण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य होतें. हें सर्व खरें. पण तो उपदेश ज्यांनी ऐकला, व श्रींचें सान्निध्य ज्यांना ज्यांना लाभलें, ते दगड नसले तरच त्यांचा उपयोग ना ? आम्ही दगड आहोंत कीं आपसांत मत्सर करणारे, इष्टलिंगाच्या ठिकाणीं कनिष्ठ व श्रेष्ठ असा भेद करणारे आहोंत ? आम्ही खरे गुरु नाही, आम्ही खरे विरक्त नाही. आम्ही खरे शास्त्री नाही, आम्ही खरें पंडित नाही, आम्ही खरे आधुनिक विवेकी नाही. आम्ही शुद्ध स्वार्थी व दगड आहोंत. आमचा उद्धार करण्याकरिता, आह्मी भक्त गुरु कसें व्हावें हें शिकविण्याकरितां, आह्मी भक्त कसे व्हावें हें दाखविण्याकरितां, खरें शास्त्र पांडित्य करूनहि निगर्वी होऊन त्याचा प्रकाश कसा पाडावा हें दाखविण्याकरिता, उज्जयनी जगद्गुरु सिद्धलिंग शिवाचार्यांनी पुन्हा अवतार घ्यावा अशी अन्यनभावें सर्वांनी प्रार्थना करणेंच योग्य आहे. असा गुरु गुरुस्थानास लाभणें हें भाग्यच असतें. पण तें भाग्य आज हरपलें म्हणून आम्हा व्यावहारिकांना दुःख होणें शक्य आहे. पण ह्या दुःखाच्या अश्रूंनी श्रीशिवाचा कैलास भिजला पाहिजे व सिद्धलिंगदेव आमच्या कल्याणार्थ पुन्हा अवतरले पाहिजेत.

# बादशहा पंचमजॉर्ज ह्यांचें निधन

इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा ह्यांचें निधन झाल्याचें अत्यंत दुःखद वर्तमान ऐकून त्यांच्या इतर प्रजाजनांप्रमाणेंच सर्व वीरशैव प्रजाजनांनाहि अत्यंत दुःख झालें आहे. महाराणी सरकाराच्या कारभारापासून तों पंचमजॉर्ज ह्यांच्या कारभारांत इतर समाजाप्रमाणें वीरशैवसमाजाचीहि शिक्षणांत व सामाजिक आणि धार्मिक बाबतींत प्रगति झाली ह्यांत संशयच नाही. अशीच प्रगति बादशहा आठवे एडवर्ड ह्यांच्या कारकिर्दीत होवो. आणि पंचमजॉर्ज ह्यांच्या आत्म्यास पूर्ण शांति लाभो असें परमेश्वराजवळ आमचें मागणें आहे.

# वीरशैवांतील चळवळी

## नागपूर तरुण वीरशैव संघ

सदर संघाची सभा श्री. वि. तु. चौधरी, बी. ए., ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरली. [१] संघाचा वार्षिकोत्सव श्री. बामणगांवकरांचे अध्यक्षतेखाली साजरा करणें; [२] वीरशैवसंजीवनीला वर्गणीदार मिळविणे, व संजीवनीकार व त्यांचे सहकारी ह्यांचें अभिनंदन. [३] बाबासाहेब मुखरे ह्यांच्या विवाहाबद्दल वधुवरांचें अभिनंदन.

## सोलापूर येथील दुखवट्याची जाहीर सभा

श्रीमद्वीरशैवमतस्थापनाचार्य उज्जयिनी-सद्धर्म सिंहासनाधीश्वर १०८ जगद्गुरु श्री सिद्धलिंग-शिवाचार्य महास्वामी हे शिवैक्य झाल्याबद्दल दुःखप्रदर्शनार्थ सोलापूर येथील श्रीमल्लिकार्जुनाचे देवालयांत ता. १९।१।३६ रविवार रोजीं सायंकाळी ७ वाजता वीरशैवसमाजाची जाहीर सभा झाली.

प्रथमतः श्री. बंडाप्पा झुंजे वकील यांनी प्रास्ताविक भाषण करून सभा भरविण्याचा उद्देश सांगितला, व वीरशैवसमाजास पूज्य असलेले श्री. चन्नवीर शिवाचार्य बृहन्मठ, होटगी, स्वामी महाशय, यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली. सदर सूचनेस श्री. सिद्रामप्पा खानापुरे यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले. अध्यक्षांनी श्री शिवैक्य झाल्याबद्दल प्रास्ताविक भाषण केल्यानंतर येथील डॉ. जगदेवराव देशमुख यांनी खालीलप्रमाणे पहिला ठराव मांडला.

ठराव १ लाः—

श्रीमद्वीरशैवमतस्थापनाचार्य उज्जयिनी सद्धर्म सिंहासनाधीश १०८ जगद्गुरु श्रीसिद्धलिंग शिवाचार्य महास्वामी, जिल्हा बल्लारी, हे शिवैक्य झाल्यामुळे आम्हा सोलापूरवासी वीरशैवसमाजास अत्यंत दुःख होत आहे. श्रींच्या शिवैक्यामुळे गुरुवर्गांतील अत्यंत पूज्य, विद्वान्, सदाचारसंपन्न असे थोर महात्मे नाहीसे झाल्यानें वीरशैवसमाजाची भयंकर हानि झाली आहे, याबद्दल आम्हांस अत्यंत दुःख होत आहे.

सदरहू ठरावास श्रीगुरु जगदीशशास्त्री नालवार, श्रीगुरु मल्लिकार्जुनशास्त्री मणूर मठाध्यक्ष, श्री. सिद्रामप्पा धुम्मा, वकील, येथील म्युनिसिपल व श्रीसिद्धेश्वर देवस्थानाचे प्रेसिडेंट श्री. नागप्पा आण्णा अबदुलपूरकर यांना अनुमोदन व पुष्टि दिली. सदर ठरावावर भाषण करतांना वरील वक्त्यांनी श्रींच्या आंगीं असलेल्या अनेक सद्गुणांचें, त्यांच्या योगसामर्थ्याचें, त्यांच्या सदाचारसंपन्नतेचें व विद्वत्तेचें वर्णन करून श्रींनी गेल्या तीन वर्षांमागें सोलापूर येथें त्यांचा मुक्काम असतांना येथील वीरशैवसमाजास प्रवचनद्वारें आपल्या अमोघ वाणीने बोधामृत पाजून वीरशैव-समाजांत धर्मजागृति केली व येथील श्रीमद्वारद-पाठशाळेंत पांच हजार रुपयांची उदार देणगी देऊन समाजोन्नतीचे कार्यास मदत केली वगैरे अनेक सद्गुणांचें वर्णन केलें व अशा महान् श्रेष्ठ विभूतीच्या वियोगाने समाजास अत्यंत दुःख होत आहे वगैरे आशययाचें भाषण केलें. सदरहू ठराव सर्वांनी उभे राहून पास केला व श्रींच्या शिवैक्याबद्दल दुःख व्यक्त केलें, आणि श्रींच्या तसवीरीस पुष्पहार अर्पण करून त्यांचेबद्दल पूज्यभाव व्यक्त केला. त्यानंतर श्री. शिवलिंगप्पा माळगे यांनी खालीलप्रमाणे दुसरा ठराव मांडला.

ठराव २ रा. सदरहू ठराव उज्जयिनी सिंहासनाकडे व त्याप्रमाणेच बाळीहळ्ळी, श्रीक्षेत्र काशी, श्रीकेदार, व श्रीशैल्य येथील सिंहासनाधीशाकडे अध्यक्षांनी पाठवावा, याबद्दल ही सभा अध्यक्षास अधिकार देत आहे.

या ठरावास श्री. शंकरप्पा घाकोते यांनी अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें पास झाला.

त्यानंतर अध्यक्ष महाशयांनी श्रींच्या सान्निध्यांत असतांना श्रींच्या थोर अंतःकरणाचें, त्यांच्या आनंदमय वृत्तीचें, व सर्व लहानथोरांत निरभिमानवृत्तीने राहून त्यांच्या सर्वव्यापक व समान दृष्टीचें व अनेक अनुभवांचें वर्णन केलें. श्री हे जीवरूप धारण करीत असतांनादेखील शिवरूप झाले होते असें आपल्या भाषणांत सांगून ते शिवैक्य झाले तरी त्यांचें अमोलिक बोधामृत आपल्या हृदयांत आहे त्याची सर्वांनी आठवण ठेवून त्याप्रमाणे वागावें असा कळकळीचा उल्लेख करून अध्यक्षांनी आपलें भाषण संपविलें.

# नवमतवाद

ले०— श्री. विश्वनाथ तुकाराम आप्पा चौधरी, बी. ए., उमरावती. *

लेखांक २ रा.

"Old order changeth yielding place to new."

**Lord Tennyson.**

*"नव्या परिस्थितीत नवा वीरशैव दिसूं लागावा ही आमची इच्छा आहे."*

("सुदर्शन" १६-८-३५. )--बामणगांवकर.

समाजाच्या धार्मिक जीवनाच्या अभ्युदयार्थ व उत्कर्षाकरिता पूर्वजांनी गुरुवर्ग, मठसंस्थाने व मठपति, वगैरे ज्या कांही धार्मिक संस्था निर्माण केल्या आहेत त्यांतील ' सार्वजनिक स्वरूप व निर्मात्यांचा पवित्र हेतु नाहींसा होऊन केवळ बुवाबाजीचें व उदरंभरणाचें ' निंद्य स्वरूप जर एखाद्या धार्मिक संस्थेला आलें असेल तर केवळ पूर्वजांविषयीच्या खोट्या अभिमानाला किंवा धार्मिक संस्थांच्या ऐतिहासिक परंपरेच्या सनातनी भावनेला बळी न पडतां त्या संस्थांना सामजाचे प्रगतिपथावरील धोंड नाहीशी करण्याकरिता ' गचांडी ' देणेंच योग्य होणार आहे. पुराणवस्तुसंग्रहालयांत जरी अशा संस्थांचे अवशेषांना ऐतिहासिक महत्व असलें तरी उपयुक्ताशून्य, जीर्ण, व निष्क्रिय धार्मिक संस्थांना सामाजिक जीवनाच्या कलहजन्य व्यवहारी जगांत कांहीच किंमत नाही. निर्जीव कलेवराला किंवा हाडांच्या सांगाड्याला उराशीं कवटाळण्यांत काय हंशील आहे? व्यक्तिविकास व सामाजिक प्रगति हा धर्माचा हेतु आहे. प्रगतिपथावरील ' धोंड ' होऊन बसणें हा हेतु मात्र खात्रीनें नव्हे. निर्मात्याच्या मूलभूत उपकारक सद्हेतूशीं क्रियाशून्यतेमुळे विसंगत कृति जर धार्मिक संस्थांचे कडून होत असेल व त्या कार्यप्रवण किंवा कार्यक्षम होऊं शकत नसल्या तर अशा संस्था शक्य तितक्या लौकर नाहीशा करणेंच आज सामाजिक प्रगतीच्या दृष्टीने आवश्यक आहे. आमचा विरोध धार्मिक संस्थांना नाही, त्यांच्या अपकारक स्वरूपाला व कृतीला आहे.

आमच्या सामाजिक जीवनाकडे पाहिलें तर तेथेहि सुधारणेची गरज आहे. आर्थिक व सामाजिक विषमतेच्या ठराविक सांच्यांत घडलेल्या सामाजिक घटनेंतील वैवाहिक रूढ कल्पनांमुळें आमच्या वैवाहिक व तशीच सामाजिक जीवनालाहि कीड लागली आहे. सामाजिक जीवनाची सुखदुःखें हीं तत्कालीन वैवाहिक कल्पनांशीं निगडित झालेलीं असतात. आमच्या मतें विवाह हा दोन व्यक्तींचा खाजगी प्रश्न आहे. तो त्यांनी आपली वैयक्तिक व सामाजिक जबाबदारी ओळखून सोडवून घ्यावयास पाहिजे व वडिलधाऱ्या मंडळींनी हें कार्य सुकर व्हावें म्हणून आवश्यक तेथे सल्ला व मदत केली पाहिजे.

* वरील दोन्ही लेखांत प्रदर्शित केलेल्या विचारसरणीविषयी वाचकांनी आपलीं अनुकूल वा प्रतिकूल मतें लेखकांस कळविल्यास लेखक आभारी होईल.— लेखक.

प्रीतिविवाह हा केव्हाहि व कोणत्याहि काळीं सर्वश्रेष्ठच मानला गेला आहे. 'प्रीतिविवाह' हा दोन ध्येयनिष्ठ जीवांचा भावनागर्भ—तात्विक प्रश्न आहे. ते जीव चारित्र्यावर विश्वासून खंबीर मनाने समाजाचा बरावाईट विरोध सहन करीत आपल्या ध्येयपूर्तीकडे जात असतात 'प्रीतिविवाह' हा सर्वसाधारण नियम केव्हांहि होणें शक्य नाही, ती एक अनपेक्षित घटना आहे, तो योगायोग आहे, अपवाद आहे, नियम मात्र नव्हे !! वैवाहिक कल्पनांना शुद्ध स्वरूप येण्याकरिता व वैवाहिक जीवन सुधारण्याकरिता योग्य शिक्षण व शिक्षणप्रसाराची आवश्यकता आहे. वैवाहिक जीवनास कीड लावणारे प्रकार म्हणजे बालविवाह, जरठकुमारीविवाह, किंवा आपल्या व इतरहि मागासलेल्या समाजांतून 'पुनर्विवाह'-पद्धतिचा विकृत रीत्या फायदा घेणारे जरठ-पुनर्विवाह असले विषम विवाहच वैवाहिक जीवनांत विसंगति उत्पन्न करून असमाधानाचें बीज पेरतात. तेव्हा असले प्रकार बंद होणें आवश्यक आहे. ह्यापुढे सहवासोत्तर प्रौढ विवाहच होणें योग्य आहे. परंतु शिक्षण व इतरहि दृष्टीने मागासलेल्या आमच्या समाजांत हें आमचें मत फारच धाष्ट्र्याचें समजल्या जाईल हें आम्ही जाणून आहोंत. १-२ पिढ्यांनंतरहि हें मत पचनीं पडेल कीं नाही ही शंकाच आहे. परंतु म्हणून आमचें प्रामाणिक मत आम्हीं प्रदर्शित करूं नये असें मात्र नव्हे ! किंबहुना, तें प्रदर्शित करणेंच आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

सहवासोत्तर विवाहांतील विवाहपूर्व सहवासांतील धोक्याची स्थळें आम्ही विसरतों किंवा मुद्दाम दृष्टिआड करतों असें नाही. पालकांच्या जबाबदारीची जाणीव आम्ही ओळखून आहों. विवाहापूर्वी निदान वडिलधाऱ्या मंडळींच्या देखरेखीखालीं कांही ठराविक मर्यादेपर्यंत वधुवरांना परिचयाची संधि देणें आवश्यक आहे. त्या योगाने एकमेकांचे स्वभावविशेष व गुणदोष कळून विवाहोत्तर परस्परांवरील जबाबदारीची त्यांना आगाऊच कल्पना येईल. रूढ सामाजिक कल्पनांना बळी पडून दोन अपरिचित जीवांना एका ठिकाणीं आणून लग्नाच्या बेडीने त्यांना जन्मभर जखडून टाकणें हा मानवतेवर निव्वळ जुलूम आहे. ही त्या दोन जीवांना 'जन्मठेपेची' शिक्षाच आहे.

वडील मंडळींनी स्वतःच्या हौसेखातर किंवा घरांतील म्हातारा किंवा म्हातारी ह्यांच्या डोळ्यांचें पारणें फेडण्याकरिता नातवंडे उजविण्याचे उद्देशाने केलेल्या बालविवाहांना लहान मुलांनी करमणुकीखातर घरकुटांत लाविलेल्या निर्जीव बाहुला-बाहुलींच्या विवाहापेक्षा जास्त काय किंमत आहे ? व असल्या विवाहामुळे निर्माण झालेल्या बहुसंख्याक विषम जोडप्यांच्या सांसारिक जीवनांतून असमाधान व निराशेचे विसंवादी सूर सारखे किती तरी ऐकावयाला येतात !! बालविवाहाची चाल समाजांतून तावडतोब बंद होणें अत्यंत आवश्यक आहे. आजच्या आपल्या सामाजिक परिस्थितींत 'सहवास-जन्य' विवाह जरी होऊं शकले नाहीत, तरी निदान पुढील प्रौढविवाह पालकांच्या संमतीने पण वधु-वरांच्या पसंतीने होणेंच वैवाहिक जीवनांतील समाधान व यशस्वितेकरिता आवश्यक आहे. व्यक्तीचा सामाजिक दर्जा ठरवितांना जन्मजात श्रीमंती, गरीबी किंवा कुल हा दंडक न ठेवतां व्यक्तीचें शील, त्याचें चारित्र्य, कर्तव्यक्षमता, बुद्धिमत्ता, वगैरे सद्गुणांवरच सामाजिक दर्जा ठरविणें योग्य होणार आहे. कारण 'जन्मजात श्रीमत' किंवा गरीब होणें हें मानवी कर्तृत्वातीत बाब आहे. सबब श्रीमंती हा सद्गुण नव्हे, तसेंच गरीबी हाहि गुन्हा नाही. ह्या समानतेच्या तत्वावर भावी समाज व राजकीय घटना असावी व कर्तबगार व्यक्तींना सारींच कार्यक्षेत्रें मोकळीं असावींत असें आमचें मत आहे व त्या दृष्टीने लिंगायतसामाजांतील तरुण इतर सामाजांतील तरुणाप्रमाणे कार्यक्षम व्हावेत व इतरांच्या बरोबरीने धार्मिक, औद्योगिक, सामाजिक, व राजकीय क्षेत्रांत त्यांनीहि आघाडी मारावी एवढीच आमची इच्छा आहे. आणि म्हणून ही "नवमतवादी रत्नप्रभा" आमच्या आयुःपंथावर दीपस्तंभाचें नियोजित कार्य पार पाडो एवढीच तूर्त प्रभुचरणीं प्रार्थना आहे.

# वीरशैवांचा अज्ञातवास कधीं संपणार ?

लेखकः—
बंडाप्पा रेवणसिद्धाप्पा
झुंजे वकील,
सोलापूर.

कौरवपांडवांच्या द्यूतक्रियेमध्ये पांडवांनी आपलें राज्य घालविलें व बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास याप्रमाणे तेरा वर्षे हालअपेष्टेंत त्यांस काल घालवावा लागला. वनवासानंतर पांडवांना आपलें राज्य परत मिळविण्याकरिता कौरवांबरोबर युद्ध करावें लागलें. श्रीकृष्णांनी पांडवांचें सारथ्य पत्करिलें, व युद्धाकरिता कौरवपांडवसैन्याच्या मध्यभागीं अर्जुनाचा रथ उभा केला. त्या वेळी अर्जुनाचे मनावर मोह उत्पन्न होऊन दुर्योधन, दुःशासन, द्रोणाचार्य, भीष्माचार्य, कर्णादि आपलेच बांधव व गुरु यांजवर शस्त्र चालवून त्यांना ठार करून राज्य करणें मला नको असें अर्जुन श्रीकृष्णास ह्मणाला. त्या वेळी श्रीकृष्णांनी अठरा अध्यायांची गीता अर्जुनास सांगून दुष्टांचा संहार हा केलाच पाहिजे असा मार्ग दाखवून त्यास युद्धप्रवृत्त केलें व श्रीकृष्णाच्या उपदेशाप्रमाणे अर्जुन मोठ्या उत्साहाने लढला व त्याने राज्यपद मिळविलें. त्याप्रमाणेच प्रत्येक मनुष्याने अगर समाजाने या जगांत वागून सौख्याचा लाभ करून घेतला तरच त्याच्या जीविताचें सार्थक होय, नाहीतर तो मनुष्य हीनावस्थेंत जाऊन त्याचा सर्वस्वीं नाश होतो.

गीतेची शिकवण आपणास काय आहे याचा विचार प्रत्येकाने केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, दुष्टांचा संहार करणें व सुष्टांचें पालन करणें हाच धर्म व हीच नीति. दुर्योधन दुःशासनादि दुष्ट विचाराने, दुर्बुद्धीने, व कपटाने अंतःकरण व्याप्त झालेले दुर्जन व सुविचाराने, नीतिपथाने, व न्यायाने वागणारे भीमार्जुनादि पराक्रमी वीर यांपैकीं दुर्जनांचा संहार करून सुजनांस आश्रय देऊन व त्यांजवर प्रेम करून त्यांचा पाठिराखा होणें—नव्हे, प्रत्यक्ष त्यांचें सारथ्य पत्करून त्यांची सेवा करण्याचें कार्य श्रीकृष्णास करावें लागलें.

या जगांतील अनुभव पाहिला असतां आपणास प्रत्यहीं असेंच दिसून येतें कीं, दुर्जनांचा पाडाव व सज्जनांचा उत्कर्ष हीं नेहमी घडत असतात असत्य कांही काल टिकलें तरी तें शेवटी असत्यच ठरतें, व सत्य तें सत्यच होतें, हा सृष्टीचा नियमच आहे. सत्य वस्तूंचा शोध ज्ञानाशिवाय होत नाही व सत्यावाचून आनंद व सुख नाही. या ब्रह्म व मायामिश्र जगांत माया ही असत् आहे व ब्रह्म हें सत्य आहे याचें ज्ञान एकदा झालें ह्मणजे केवळ एक ब्रह्मच राहतें व ब्रह्म ह्मणजे अखंड सुख, अखंड आनंद होय. हें अखंड सुख प्राप्त करून घेण्यास गीतेमध्ये कर्म, उपासना, ज्ञान इत्यादि साधनें सांगितलीं आहेत.

कर्म म्हणजे निष्काम कर्म, उपासना ह्मणजे निर्व्याज भक्ति अगर प्रेम, ज्ञान ह्मणजे सद्वस्तूची जाणीव करून घेण्याचें साधन, या त्रिविध मार्गांनी मनुष्य ज्याप्रमाणे मोक्ष मिळवितो त्याचप्रमाणें प्रपंचांत अगर सामाजिक कार्यांत निष्काम कर्म, निर्मल उपासना, आणि आपलें ध्येय ज्या उपायांनी ज्या मार्गांनी, गांठतां येईल तो उपाय अगर मार्ग या साधनत्रयीचा अवलंब केल्याशिवाय आपणास आपला प्रपंच अगर सामाजिक कार्य चांगल्या रीतीने पार पाडतां येणार नाही.

पांडवांचें सर्वस्व जाऊन त्यांस ज्याप्रमाणे वनवास पत्करावा लागला त्याप्रमाणे हल्लीं वीरशैव-समाजाची स्थिति झाली आहे. व्यापारामध्यें निष्णात होऊन ज्या एके काळीं वीरशैवसमाज सर्व प्रकारें सधन व संपन्न होता तो आपला व्यापार व द्रव्य घालवून हीनदीन बनला आहे. वीरशैव-समाजाचीं कित्येक कुटेंबेंच्या कुटुंबें हल्लीं आपलें सर्वस्व घालवून विपन्नावस्थेस जाऊन पोहोंचलीं आहेत, व वनवास व अज्ञातवासांत कालक्रमणा करीत आहेत. हा वनवास व अज्ञातवास आपणास कशामुळे प्राप्त झाला याचें कारण शोधूं पाहतां शिक्षणामुळे वीरशैवसमाजाचें मन सुसंस्कृत न झाल्यामुळे त्यास आपला व्यापार व द्रव्य हीं टिकवून आपलें वैभव त्यास कायम राखतां आलें नाही. वीरशैवांचें, विशेषतः महाराष्ट्रांतील वीरशैव-समाजाचें तरी अद्यापि शिक्षण-संपादनाकडे अगर शिक्षणप्रसाराकडे ज्या मानाने लक्ष्य असावयास पाहिजे त्या मानाने त्यांनी लक्ष्य दिलें नाही ह्मणून आधुनिक कालाबरोबर पाऊल टाकण्यास तो असमर्थ झाला आहे.

याप्रमाणे वीरशैवसमाज अशिक्षित राहिल्यामुळे त्यांचेजवळ संपत्ति असूनहि त्यास दुर्व्यसन, दुर्वि-कार, निरुद्योगीपणा, वृथाभिमान, अदूरदृष्टि वगैरे दुर्गुणांनी पछाडलें व अशा दुर्गुणी व अज्ञानी मनुष्याच्या हातीं संपत्ति गेल्यामुळे त्या संपत्ती-सहि त्या दुर्गुणी मनुष्याचा त्याग करून इतरत्र स्थलांतर करावें लागलें. हे दुर्गुण म्हणजेच दुष्ट कौरव. या कौरवांचा म्हणजे दुर्गुणांचा संहार केल्याशिवाय वीरशैवसमाजास स्थैर्य येणार नाही. परंतु वीरशैवसमाजाचें या दुर्गुणाबरोबर इतकें सहचर्य झालें आहे कीं, या दुर्गुणांस मारून टाकण्याचा मोह अद्यापि त्यास होत नाही. म्हणू-नच त्या दुर्गुणांचें जास्त फावलें आहे व कौरवा-प्रमाणे ते आपलें हरण केलेलें सर्वस्व आपल्या हातास लागूं देत नाहीत. याकरिता प्रथमतः आपल्यांतील दुर्गुणाबरोबर आपण युद्ध करून त्यांस ठार केलें पाहिजे, व आपली धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक व आर्थिक उन्नति करण्याचे मार्गास लागलें पाहिजे, तरच आपला तरणोपाय आहे.

पण त्यास श्रीकृष्णासारखा सारथी व त्याची अनुज्ञा पाळणारा अर्जुनासारखा वीर अशी जोडी मिळाल्याशिवाय म्हणजे वीरशैवांची उन्नति होण्या-करिता मनोभावें झटणारा निःस्वार्थी निष्कामकर्मी पुढारी व त्या पुढाऱ्याची अनुज्ञा पाळणारा अर्जुना-सारखा एकनिष्ठ वीरशैवसमाज अशी जोडी जमल्याशिवाय वीरशैवांची प्रगति होणार नाही. आणि म्हणूनच वीरशैवसमाजाचा अज्ञातवास कधी संपणार याचा काल निश्चित करितां येत नाही. पांडवांचा अज्ञातवास तेरा वर्षांच्या वनवासानंतर तरी संपला, पण आपला अज्ञातवास गेलीं कित्येक वर्षे झालीं तरी अद्यापि संपला नाही म्हणून हल्लीं वीरशैवसमाजास वनवासांत दिवस कंठावे लागत आहेत. वीरशैवसमाज पूर्ण जागृत झाल्यास व शिक्षणप्रसाराचें व स्वोन्नतीचें कार्य जोराने करूं लागल्यास तो काल लवकरच येईल. नाहीतर त्यास कालाच्या जबड्यांत जावें लागेल. याचा विचार करून वीरशैवसमाजाने निष्काम कर्म, निर्व्याज भक्ति, ध्येय-साधनांचें ज्ञान, याचा अवलंब करून संघशक्तीने स्वोन्नतीचे कार्यास लागावें म्हणजे त्याचा अज्ञातवास लवकरच संपेल.

---

## नागपूर तरुण वीरशैव-संघ

ता० २५ डिसेंबरला नागपूर येथे वीरशैव-तरुणसंघाची सभा भरून तींत खालील ठराव सर्वानुमतें पास झाला. येथील वी. त. संघाचे आर्थिक मदतीकरिता कांही सद्गृहस्थांचे सूचने-वरून वीरशैवांचे प्रत्येक दुकानांत पेट्या ठेवाव्यात. त्यांत त्यांनीं आपला धर्मादाय-फंड जमा करावा अशी वीरशैवांना नम्र विनंती आहे.

# महाराष्ट्रीय वीरशैवांचा परिचयपट

'वीरशैवसंजीवनी'-च्या ज्या वर्गणीदारांची १९३६ सालची २॥ रुपये वर्गणी मनिऑर्डरीने आली त्या सर्वांकडे पहिल्या अंकांत जाहीर केलेल्या महाराष्ट्रीय वीरशैवांच्या परिचयपटाचा नमुना पाठविला आहे. ज्यांना मिळाला नसेल त्यांनी लिहावें. पुन्हा पाठविण्यांत येईल. ज्यांना पट मिळाला व स्वखुषीने भरून पाठविला त्यांची माहिती ह्या सदराखालीं दिली आहे, व जे पट भरून पाठवितील त्यांची माहिती दर अंकांत देण्यांत येईल व पुढे वर्षाअखेर वीरशैवसंजीवनीच्या फाइलाबरोबर ती पुस्तकरूपोन प्रसिद्ध होईल.

## १ सोलापूरचे झुंजे-कुटुंब

कुटुंबांतील कर्ता बंडाप्पा रेवणसिद्धाप्पा झुंजे, वय ५२, विवाहित, धंदा वकील, शिक्षण जिल्हा-वकीलीची परीक्षा पास, मराठी लिहितां-वाचतां येते. मु. सोलापूर, सोलापुरांत वीरशैवांची संख्या अदमासे २००००. दीक्षवंत, गुरुमठ मादन हिपरगी ( निजाम इलाखा ) कुटुंबाचा धार्मिक, शैक्षणिक व सामाजिक खर्च सालचा ३०० रु. ह्याच खर्च कुटुंबाबाहेर रु. ५०, कुटुंबाबाहेर सालचे रु. २५ खर्च करण्याची इच्छा.

ह्या कुटुंबांत चालकाखेरीज मंडळी आठ (१) निलव्वा भ्र. बंडाप्पा झुंजे, वय ४७, विवाहित घरकाम करते. लिहिणें-वाचणें नाही. (२) रखमाबाई भ्र. मल्लिकार्जुनआप्पा झुंजे, वय ५०, विधवा, घरकाम, लिहिणें वाचणें नाही. [३] सुशीलाबाई भ्र. नागेशआप्पा ऊर्फ बाबूराव मल्लिकार्जुनआप्पा झुंजे, वय, १६ विवाहित, घरकाम, मराठी चौथीपर्यंत शिक्षण. [४] नागेशआप्पा ऊर्फ बाबूराव मल्लिकार्जुनआप्पा झुंजे, वय २०, भाच्याचें उत्पन्न, शिक्षण इंग्रजी चौथी इयत्ता, [५] शिवशंकर बंडाप्पा झुंजे, वय १८, विद्यार्थी, इंग्रजी सहावी शिकत आहे. अविवाहित. [६] राजशेखर बंडाप्पा झुंजे, वय १४, अविवाहित, विद्यार्थि, इंग्रजी चौथी शिकतो. [७] बसवेश्वर बंडाप्पा झुंजे, वय १०, अविवाहित, विद्यार्थि, इंग्रजी पहिली शिकतो. [८] महाबलेश्वर बंडाप्पा झुंजे, वय ६, अविवाहित, विद्यार्थि, प्राथमिक शिक्षण घेत आहे.

## २ कारंजा येथील पेन्टे कुटुंब

मुक्काम पोष्ट कारंजा, ता. मूर्तिजापूर, जि. अकोला प्रांत वऱ्हाड. आप्पा मुंजाप्पा पेन्टे, पोट जात कानडी, परंपरागत मठ वाशीम, वय ३०, विवाहित, दुकानदारी, शिक्षण नागपूर युनिव्हर्सिटीचे इन्टर सायन्स, मराठी लिहितां-वाचतां येतें. कारंजा येथे वीरशैवांची अदमासे लोकसंख्या ३००, कुटुंबाचा धार्मिक सामाजिक व शैक्षणिक खर्च ४०, कुटुंबाबाहेर ह्याच खर्च परोपकारार्थ रु. १५ पर्यंत होतो व तितकाच सालचा परोपकारार्थ करण्याची इच्छा. [१] यमुनाबाई जवजे पुंजाप्पा पेन्टे, वय ६०, विधवा, शिक्षण नाही. [२] त्रिवेणी जवजे आप्पा पेन्टे, वय २४, विवाहित, मराठी दुसरीपर्यंत शिक्षण. [३] चंद्रकलाआप्पा पेन्टे, वय ४, कुमारी [४] शकुंतला आप्पा पेन्टे, वय १॥ कुमारी. येणेंप्रमाणें कुटुंबकर्ते सोडून एकंदर चारांचें हें कुटुंब आहे.

## ३ वडांगलीचे जांभळे कुटुंब

नागाप्पा भिकाप्पा जांभळे, पंचम, मु. वडांगळी, पोष्ट सिन्नर, जि. नासिक, परंपरागत मठ वडांगळी, वय ४०, विवाहित, पोष्ट ऑफिसांत क्लार्क, शिक्षण मॅट्रिक फेल, मराठी येते. वीरशैवांची लोकसंख्या १२०. धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक खर्च कुटुंबाकरिता सालचा ९० रुपये. ह्याच खर्च परोपकारार्थ रु. ११ दरसाल येतो व करण्याची इच्छा. [१] विश्वंभर भिकाप्पा जांभळे, वय ३७, विवाहित, रेल्वे पोलीसांत नोकरी, शिक्षण मराठी सहावी. [२] गणपत भिकाप्पा जांभळे, वय २५, विवाहित, रेल्वे-पोलीस नोकरी, शिक्षण मराठी ६ वी [३] पार्वती नागाप्पा जांभळे, वय ३४, विवाहित, शिक्षण नाही. [४] प्रमिला नागाप्पा जांभळे, वय १४, अविवाहित, इंग्रजी दुसरी शिकत असून मराठी फायनलची तयारी करीत आहे. [५] कुसुम नागाप्पा जांभळे, वय ५, [६] शिवबालक नागाप्पा जांभळे, वय १० महिने, (७) काशीबाई विश्वंभर जांभळे, वय ३० विवाहित [८] प्रभाकर विश्वंभर जांभळे, वय ५, [९] मधुकर विश्वंभर जांभळे, वय ३, [१०] गंगाबाई भ्र. गणपत जांभळे, वय १५, विवाहित.

# संजीवनी वाचून काय वाटलें ?

[ ले.— रत्नाप्पा भरमाप्पा कुंभार बी. ए., वीरशैव लिंगायत बोर्डिंग कोल्हापूर. ]

पहिल्या वर्षाचा अगर जुन्या चौथ्या वर्षाचा 'वीरशैव संजीवनी' चा पहिला अंक माझ्या वाचनांत आला. सव्वीस वर्षांच्या दीर्घ कालाने 'वीरशैव संजीवनी' चा पुनर्जन्म होणें हा मानवी जीवितांतील खरोखरच अद्भुतरम्य चमत्कार नव्हे तर काय ? यावरून पुनरुज्जीवित 'संजीवनी' कडून वीरशैवसमाजाची सेवा अद्भुतरम्य चमत्कारांनीच घडणार असेल असें मानण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? आज निरनिराळ्या पोटजातींतील वैमनस्य, पंचाचार्यविरक्तवाद, ह्यासारख्या आपापसांतील अनेक भ्रामक व घातुक यादवींमुळे आमचा वीरशैवसमाज विस्कळित होऊन अत्यंत निकृष्टावस्थेस पोहोंचलेला आहे. आमचा समाज समाज या नांवाने ओळखण्यासदेखील नालायक झाला आहे. अशा परिस्थितींत 'संजीवनी'-चा नवजीवित अवतार हा एक आमच्या समाजाच्या जीवितांतील अद्भुतरम्य चमत्कारच कोणालाहि वाटल्याशिवाय राहणार नाही. ह्या ठिकाणीं भगवद्गीतेंतील 'यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत......' या उक्तीची आठवण होतेच होते.

हें विधान अतिशयोक्तीचें वाटण्याचा संभव आहे; पण आपण 'जुन्या संजीवनीचा नवा अवतार' ह्या मथळ्याखाली अस्खलित, जोरदार व मधुर अशा शब्दांत लिहिलेली 'संजीवनी' ची उद्देशपत्रिका वाचणाऱ्यांस वरील विधानाची सत्यता सहज पटून येण्यासारखी आहे. आपली उद्देशपत्रिका प्रत्येक लिंगायताने आपल्या हृदयपटावर कोरून ठेवण्यासारखी आहे. त्यांतील प्रत्येक वाक्य साधारण समजुतीच्या माणसांसदेखील सहजासहजी समजणार आहे. पण अहंभावनेने पछाडलेले, एककल्ली, फाजील स्वाभिमानी व दुराग्रही असे जगद्गुरुपदावर असलेले बहुतेक स्वामी व त्यांचे शास्त्रीपंडित व या माथेफिरू शास्त्रीपंडितांच्या एक ना अनेक कारणांनी आहारीं जाणारा सुशिक्षितवर्ग यांना ती कशी रुचते व पटते कोण जाणे. पण समंजस व सत्यान्वेषी लिंगधाऱ्यांना याचा विचार करण्याचें कांहीच कारण नाही. श्रीबसवेश्वर यांस हिणकस समजण्याची निराधार मनोवृत्ति, धर्मप्रसारक या नात्यानें बसवेश्वरांचा आजच्या कोणाहि विरक्तापेक्षा व पट्टाधिकाऱ्यापेक्षा फार मोठा दर्जा, बसवजयंतीच्या प्रसाराची जरूरी, आद्यपंचाचार्यप्रणीत व बसवप्रसृत धर्माची शुद्धता राखण्याची जरूरी पंचाचार्यविरक्तवादाचें खाजगी व भिक्षुकी थाटाचें प्रतिपादिलेलें स्वरूप, अंतःकलहाची घातुक परिणती, यांची कल्पना व संघटित कार्याची जरुरी, पंचाचार्यसनातन धर्म व बसवेश्वर विरक्तधर्म यांतील निराधार व भ्रामक भेदाभेदाची जाणीव, कार्यवाहक गुरुसंघाची जरुरी, हक्कदारी व वतनदारीपेक्षा धर्मप्रसार व धर्मसंघटना यालाच प्राधान्य देण्याची जरुरी, इत्यादि आपल्या उद्देशपत्रिकेंतील माणिकमोत्यांची माळ ओवावी तितकी थोडीच. या माणिकमोत्यांची माळ हातीं धरून दिव्य प्रकाशांत जेवढे लिंगधारी तेवढे माझे व मी त्यांचा या भावनेने आम्ही प्रत्येकजण हा शिवस्वरूपी साम्यवाद व्यवहारांत आचरूं लागलों तर आगमांनी प्रतिपादिलेल्या, पचाचार्यादि पंडितांनी विस्तारलेल्या व बसवादिकांनी बाराव्या शतकांत आचरून प्रसृत केलेल्या वीरशैवधर्माला नवजीवन दिल्यासारखें होणार आहे.

उद्देशपत्रिकेंत आपण बेटीव्यवहाराला गौणत्व दिलें हें ठीक आहे. पोटजातीयुक्त व निरनिराळ्या धंदेवाईकयुक्त अशा वीरशैवसमाजांत बेटीव्यवहारास पुष्कळशी अडचण आहे. शिवाय अत्यंत सात्विक अशा उच्च भावनेने हा विचार केल्यास लग्नाची बाब व्यक्तिविषयक खुणीवरच ठेवणें योग्य व प्राप्त आहे. पण ह्याच कायदा रोटी-

व्यवहारासहि लागू करून त्याला आपण गौणत्व कां दिलें हें समजत नाही. लिंगायत म्हटला कीं तो शाकाहारीच असला पाहिजे आणि शाकाहारी असणाऱ्या एकजातीय लोकांमध्ये रोटीव्यवहारास अडचण ती काय आहे ? असें असतांना रोटी-व्यवहार व्यक्तिविषयक खुषीवर कां ठेवावा याचा कांहीं उलगडा होत नाहीं. असो.

' वीरशैव संजीवनी ' चें आणखी एक वैशिष्ठ्य महाराष्ट्र-वीरशैवांच्या परिचयपटाची कल्पना होय. ही प्रथा फक्त मराठींतच आज होत असली तरी ती इतर भाषांत विशेषतः कानडी भाषेमध्ये सुरु होणें आवश्यक आहे. अशा प्रकारें दिव्यदृष्टियुक्त अंतरंगाने रंगलेल्या आपल्या ' संजीवनी '-च्या आज्ञेप्रमाणे प्रत्येक लिंग-धारी वागला तर— आणि प्रत्येकाना तसे वागणे-विषयीं माझी विनंती आहे—आमच्या सुप्त समाजास जागे करण्याचें कार्य ' संजीवनी '-स सोपें जाईल. आपला, आपले व्यवसायबंधु श्री० एकलारे व चौधरी व इतर ' संजीवनी ' चे प्रेरक यांनी तिला हा नवा अवतार प्राप्त करून दिल्याबद्दल, मी समाजांतील एक घटक या नात्याने अत्यंत आभारी आहें. शेवटी या नाविन्यपूर्ण ' संजी-वनी '-स नवचैतन्य प्राप्त होऊन आपल्या व आपले व्यवसायबंधु श्री. एकलारे व चौधरी यांच्या बलशाली नेतृत्वाखाली एकच वर्ष नव्हे तर तिचें अवतारकार्य संपेपर्यंत सतत चालो अशी शिवप्रभूजवळ नम्रभावाने प्रार्थना करून पुरे करतों.

---

# वीरशैव-संजीवनीचा अवतार

लेखक.- एच. डी. देवधर,
संचालकः- वीरशैव-स्नेहवर्धक मंडळ, मुंबई.

आज बरेच दिवस असलेली उणीव 'संजी-वनी 'च्या अवताराने भरून निघाली आहे. समाजबांधवांनी तिचा जर योग्य तो सत्कार केला तर मृतावस्थेप्रत गेलेला आपला वीरशैवसमाज जिवंतपणा दाखवूं लागेल असें भाकीत करणें अस्थानीं होणार नाही. 'वीरशैव केसरी' पत्र व फंड, तसेच, महाराष्ट्रीय वीरशैवसंघ, या बाबतींत लोकांना जो आर्थिक भूदंड सहन करावा लागला तो आता या संजीवनी-वल्लीमुळे सहज सहन होऊं शकेल असें संजीव-नीच्या प्रस्तावनेंत जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांवरून वाटतें, व सर्वांनी वाटून घ्यावें. 'वीरशैव संजीवनी'-ची मतें, कार्याची पद्धति, व दिशा, हीं आमच्या मतांशीं बहुतांशीं जुळत असल्यामुळे तिच्या अवताराचा आह्मी सानंद सत्कार करून यथाशक्ति साह्य करण्याची इच्छा प्रगट करतों.

आपल्या समाजाला हरतऱ्हेची बाधा झाली आहे आणि तो सांप्रत घायाळ झाला आहे. विशेषतः— खरें मत व नांव याचें अज्ञान, जन्मजाती भेद रूढता, प्रांत व भाषा भेद, फाजील धर्मभोळेपणा, अनवश्यक व अयोग्य दानधर्म, आणि वैवाहिक जीवनांतील विषमता, इत्यादि बाबी होत. वीरशैवसंजीवनीला या प्रत्येक बाबीचा यथासांग समाचार घ्यावा लागणार आहे ! तरच निद्रिस्थ समाज शुद्धीवर येऊन हातपाय हालविण्याचा प्रयत्न करील. कौटुंबिक पद्धतीवर सुरूं होणारी समाजसुधा-रणा व संघटना अधिक सुगम व साह्यकारी होईल अशी माझी खात्री आहे. तरी तिचा सर्वांनी अवलंब करावा अशी विनंती आहे.

---

# अक्कलकोट-तरुणसंघाचें मत

लेखकः-वीरभद्राप्पा गुरुपादप्पा लोकापुरे
सेक्रेटरी, वीरशैव तरुणसंघ अक्कलकोट

वीरशैव संजीवनीची १ जानेवारीपासून अगदीं चातकासारखा वाट पहात होतो. ता. ८ जानेवारीस एकदांचा अंक हातीं पडला. ' जुन्या संजीवनीचा नवा अवतार ' या शीर्षका-खालील प्रास्ताविक भागांत म्हटल्याप्रमाणें कोणाहि सुज्ञ वीरशैवास या पंचाचार्यविरक्तवादाचा वीट आला असून, जितक्या लवकर या वादाचा नायनाट होईल, तितक्या लवकर तो होणें इष्ट आहे. वास्तविक रीत्या या भिक्षुकी वादापासून अलिप्त राहून वीरशैवधर्माच्या उन्नतिप्रीत्यर्थ ज्या पूज्य विरक्तपंचाचार्यांनी परिश्रम घेतले त्याबद्दल योग्य तो आदरभाव व्यक्त करून वीरशैवांची सर्वांगीण उन्नति होण्याकडेच ' वीरशैव संजीवनी 'ची शक्ति खऱ्या अर्थाने खर्ची पडो; आणि ' वीरशैवसंजी-वनी 'ची महाराष्ट्रीय वीरशैवांचा परिचयपटाबद्दलची अभिनव कल्पना फलद्रूप पावो. पण संपादक-महाशय, ' वीरशैव संजीवनी ' बिलकुल ' रोडकी ' दिसते तरी तिला लवकरच 'बाळसें' येईल तर बरें!

## साभार-स्वीकार

१ सुदर्शन, सोलापूर. २ बालसन्मित्र, मालवण. ३ भारतमाता, ऊरण-इस्लामपूर. ४ भविष्यभास्कर, मुंबई. ५ दक्षिण-महाराष्ट्र, सांगली. ६ प्रबोधचंद्रिका, जळगांव. ७ प्रागतिक, जळगांव. ८ नवाकाळ, मुंबई. ९ वीरशैवगर्जना, वार्शी. १० किर्लोस्कर मासिक मुंबई. ११स्त्री मासिक मुंबई, १२ शरणसंदेश कानडी मु.आटमट्टी जि.विजापूर १३ रविकिरण साप्ताहिक, कराची. १४ वैनतेय, सावंतवाडी. हीं भावंडें भेटीस येऊं लागलीं म्हणून त्यांचें आम्ही अभिनंदन करतों.

## "वीरशैव संजीवनी"-विषयी लोकमत

हें पाक्षिक २६ वर्षांनंतर पुनर्जन्म पावत आहे. हें वीरशैवसंप्रदायाच्या प्रचारार्थ निघालें आहे. यांत वीरशैवांचा परिचयपट हें एक या समाजाचें व्यक्तिशः माहिती करून देणारें सदर राखण्यांत आलें आहे. याशिवाय वीरशैवांतील चळवळी वगैरे सदरें राखण्यांत आलीं आहेत.

—' नवाकाळ ' ता. १३-१-३६.

पूर्वी बंद पडलेल्या ' संजीवनीस ' नवजीवन प्राप्त झालें हें पाहून आम्हांस आनंद होत आहे. कांही प्रतिगामी मताच्या अयोग्य शुक्राचार्यांपासून उत्पन्न होत असलेल्या जीवांना ही " संजीविनी " योग्य मार्ग दाखवो हेंच आम्ही इच्छितों. असें जर " संजीवनी "च्या हातून होईल, तर ' सुदर्शन ' चें अर्धें काम झाल्यासारखें होईल. सं. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर अधिक उत्साहाने पुढचे अंक काढतील अशी आशा बाळगून या नूतन भावंडाचें आम्ही अभिनंदन करतों.

—' सुदर्शन ' सोलापूर ता. ६-१-३६

हें वीरशैवसमाजाला जागृत करण्याकरिता चालू केलें असून, संपादक श्री. नारायणराव बामणगांवकर हे आहेत. पहिल्या वर्षाचा पहिलाच अंक निघाला असून, ह्या अंकावरून तें समाजाला मार्गदर्शक होईल असें दिसतें.

—प्रागतिक जळगांव ता. १४-१-३६

**वीरशैव संजीवनी**—उमरावतीच्या 'उदय' अर्धसाप्ताहिकाचे विद्वान् संपादक दे. भ. बामणगांवकर यांच्या संपादकत्वाखाली सदर पाक्षिक पुस्तक याच महिन्यापासून उमरावती येथे निघूं लागलें आहे. मराठी भाषा बोलणाऱ्या लिंगायत बंधूंचें संघटन करण्याचा संपादकांचा मुख्य हेतु असून, प्रस्तुत अंकांतील लेख त्याला पोषक असेच आहेत. आमच्या जिल्ह्यांतील लिंगायत बंधूंनीं या मासिकास अवश्य आश्रय द्यावा. वार्षिक वर्गणी २॥ रुपये.

—कुलाबासमाचार ता. १८-१-३६

हें पाक्षिक कांही वर्षांपूर्वी दे. भ. बामणगांवकर काढीत होते परंतु त्या वेळी समाजाकडून योग्य तऱ्हेने सदर पत्रास पाठिंबा मिळाला नसल्याने त्यांना तें नाइलाजास्तव बंद करावें लागलें. तथापि तें योग्य संधीची वाट पहात होतें. वीरशैवकेसरीला त्याच उद्देशानें त्यांनी साह्य केलें होतें. याची आठवण अद्यापि ताजीच आहे. दे. भ. बामणगांवकरांच्या अनुभवाचा समाजास फायदा मिळावा म्हणून वऱ्हाडच्या मंडळीचे विनंतीवरून त्यांनी सदर पत्र सुरू केलें. व्यवसायबंधूच्या नात्याने आम्ही त्यांचें स्वागत करतों.

जुनें ते सोनें या म्हणीप्रमाणें आम्ही जुन्या मतांतील सर्वच गोष्टी चांगल्या आहेत असा म्हणण्याचा आग्रह धरीत नाही तरी पण हल्ली जी नवमताची वावटळ सुटली आहे त्यामुळे भलतीच उलथापालथ होणार आहे ही गोष्ट सकृत्दर्शनीं जरी पटण्यासारखी नसली तरी दूरवर विचार केला असतां त्यांतील स्वारस्य काय आहे तें कळून येईल. बदल व्हावा पण तो क्रांतीच्या स्वरूपाचा नसून उत्क्रांतीच्या स्वरूपाचा असावा असें आमचें म्हणणें आहे. स्वाभिमानाची ज्योत प्रज्ज्वलित ठेवावयाची असेल व ती तशी ठेवणे इष्ट असलेमुळें स्थिर पायावर उभे राहून कार्य केलें पाहिजे. नवीन मतांत यथेष्ट आचरणाची प्रथा जोरावली असल्याने या मतांचे लोकांचे हातीं समाजरूपी तारूचें सुकाणूं पडल्यास ते भलतीकडे वाहात जाऊन त्यास धोका पोहोंचण्याचा संभव आहे. इतकेंच नाही तर अशी खात्री वाटते. अशा स्थितींत दे. भ. बामणगांवकरांनीं पूर्ण दक्षतेनें आपलें ' वीरशैव-संजीवनी' चें कार्य चालू ठेवावें. याप्रमाणे त्यांचेकडून कार्य झाल्यास त्यांना समाजाकडून पाठिंबा मिळेल.

—' वीरशैव गर्जना ' ता. १६-१-३६

# वीरशैवसंजीवनी

अंक ४ था ) ता० १५ फेब्रुवारी १९३६ ( वर्ष १ लें

अनुक्रमणिका



टीप:– ह्या अंकात 'पुन्हा वीरशैवसंजीवनीचा अवतार' ह्या लेखाचे सुरवातीचे पृष्ठावर व पुढे पृष्ठक्रमांक ४९, ५०,...... इ. चुकीने पडले आहेत; ते त्या पृष्ठापासून अनुक्रमें ५७, ५८,......असे वाचावेत.

वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडातील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ५. मनिऑर्डरनें येताच वर्षभर वक्तशीर सुरूं करितां येते.

व्यवस्थापक:—'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून, वीरशैवांत सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखहि येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपालखर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापक.—'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथ श्रीगुरुराचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु २ आणे १२ आहे.

व्यवस्थापक.—'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

: वीरशैव संजीवनी :

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति माघ व॥ ७ शके १८५७ ( अंक ४ था.

# वीरशैवधर्माचा संस्थापक कोण ?

'वीरशैव वा लिंगायतधर्माचा संस्थापक कोण?' असा प्रश्न उत्पन्न करून श्री. बसवेश्वरच वीरशैवधर्माचे स्वयंसिद्ध व स्वयंस्फूर्त संस्थापक होत असें ऐतिहासिक दृष्टीने क्रानडी भाषेंतून उत्तर देणारें एक छोटें पुस्तक श्री. बसवलिंगाप्पा जिरगे, म्हैसूर-हायकोर्टाचे सेवानिवृत्त भाषांतरकार, ह्यांनीं लिहिलें. त्याचेंच इंग्रजी भाषांतर त्यांच्या चिरंजीवांनी प्रसिद्ध केलेलें आमचेकडे अभिप्रायार्थ आलें आहे. सदर इंग्रजी पुस्तक जिरगे के. बसवप्पा, बी. ए., २ कॉटन-पेठ बंगलोर शहर, ह्यांचेकडे किंमत ८ आण्यांस मिळतें. वीरशैवधर्मांचा संस्थापक कोण ? असा प्रश्न उत्पन्न करणें सोपें, पण त्याला ऐतिहासिक दृष्टीने साधार उत्तर देणें कठिण. पण हें कठिण काम करावयास जी उद्योगी व निष्ठावंत वृत्ति लागते ती वृद्धाप-काळीं श्री. बसवलिंगाप्पा जिरगे ह्यांनीं प्रकट करून हें छोटें पुस्तक लिहिल्याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

'वीरशैव संजीवनी'च्या मागील जन्मीं अशाच तऱ्हेचा उद्योग आमचे मित्र कै. श्री. कल्याणशेट्टी, बी. ए., सबरजिस्ट्रार गोकाक, ह्यांनी केला असतां त्याचें परीक्षण करण्याचा योग आम्हास आला होता. 'संजीवनी'-च्या नव्या अवतारांत-सुद्धा तशाच प्रकारच्या उद्योगाचें परीक्षण कर-ण्याचा योग आम्हास आला आहे. ह्या दोन्ही उद्योगांचे हेतु मात्र परस्परविरुद्ध आहेत. कै. कल्याणशेट्टी, बी. ए., ह्यांनीं बसवेश्वरापूर्वींच्या व नंतरच्या वीरशैवांच्या स्थितीचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार करून वीरशैव बसवेश्वरांपूर्वी होते व ते ज्ञानसंपन्न, पराक्रमी, व्यापारादि धंद्यांत प्रमुख होते, इतकेंच नव्हे तर आज ज्या पोटजाती वीरशैवांत दिसतात ह्या सर्वच बसवेश्वरापूर्वी होत्या, मठांचाहि विकास ह्यापूर्वींच पूर्णपणें झाला होता, इत्यादि गोष्टी ऐतिहासिकदृष्टीने साधार त्यांनी पुढें मांडल्या होत्या.

परंतु जिरगे ह्यांनी लिहिलेल्या सांप्रतच्या पुस्तकांत बसवपूर्वी वीरशैव नव्हतेच व जी कांहीं वीरशैवांचीं लक्षणें आहेत तीं सर्व बसव-निर्मित आहेत असा सिद्धान्त मांडून एकटा बसवदेवच वीरशैवधर्माचा मूळ संस्थापक होय असा ठसा त्यांनी आपल्या वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा आपल्यापरीं कसून प्रयत्न केला आहे. अर्थात् कल्याणशेट्टींना बसवपूर्व स्थितींत ऐतिहासिक दृष्ट्या वीरशैवधर्मीयांचा लख्ख प्रकाश दिसला व बसवानंतर अंधार दिसला तर बसवलिंगाप्पा जिरगे ह्यांना बसवपूर्व स्थितींत अंधार दिसतो व नंतरच्या स्थितींतच सर्व प्रकाश दिसतो. अशा प्रकारें हे दोन ग्रंथकार परस्परविरुद्ध हेतूचे आहेत. संगतवार व मुद्देसूद लिखाण ज्याला ह्मणतात तें दोन्ही ग्रंथकारांजवळ सारखेंच आहे. कल्याणशेट्टीचा ग्रंथ मराठींतूनच प्रकाशित झाल्यामुळे तो ओबड-धोबड मराठींत जरी असला तरी संगतवार व मुद्देसूद लिहिला आहे. जिरगे ह्यांचा ग्रंथ मूळ कानडींत लिहिला गेला. त्याचें फक्त इंग्रजी भाषांतर आमच्यासमोर आहे. हें इंग्रजी इंग्रजीच्या दृष्टीने कसें आहे हा येथे परीक्षणाच्या दृष्टीने गौण मुद्दा आहे. परंतु तें इंग्रजी सरळ व सुबोध आहे एवढें खरें.

ह्या दोन्ही ग्रंथकारांचा एक विशेष असा कीं, त्यांनी आपआपलें ह्मणणें ऐतिहासिक दृष्ट्या पुढे मांडण्याचा प्रयत्न केला आहे. आणि आमच्या अल्प माहितीप्रमाणे असा प्रयत्न करणारे हे दोन वीरशैवांतील ग्रंथकार होत. परमेश्वरास पांच मुखें व त्या मुखांतून पांच आचार्य निघाले, किंवा ब्रम्हदेवास चार तोंडें व त्या चार तोंडांतून चार वेद निघाले, त्याचप्रमाणे शिवास धर्मप्रसाराची स्फूर्ति झाली व नंदीस तशी आज्ञा केली व तो नंदीच बसव होऊन पुढे आला आणि वीरशैवधर्म सांगितला अशा दैववादाच्या आख्यायिकावर विश्वास ठेवून धर्म समजून घेण्याचा काल संपला असल्यामुळे ह्यापलीकडची जी बुद्धीची गति असते तिला प्राधान्य देऊन वीरशैवांचा काळ शोधण्याचा उद्योग करणें व तो उद्योग तर्क व वस्तुस्थितीच्या कसोटीवर लावून करणें हें काम अत्यंत दुर्धर आहे. पण हेंच दुर्धर कार्य ह्या उभयतांनी करण्याची प्रथा पाडली म्हणून आह्मास त्यांचें अभिनंदन करावेसें वाटतें.

कै. कल्याण शेट्टीच्या ग्रंथाचें परीक्षण आह्मीं वीरशैव संजीवनीच्या पूर्वकाळींच केलें असल्यामुळे त्याच्या परीक्षणाची गरज नाही. फक्त जिरगे ह्यांच्या नव्या उद्योगाचें व नव्या दृष्टीचें परीक्षण करीत असतां शुद्ध ऐतिहासिक दृष्टीचा ग्रंथ म्हणून त्याची आम्हास आठवण झाली. इतकेंच नव्हे तर हा ग्रंथ १९०८ मध्येच लिहिला गेला असतां त्याला पर्यायाने उत्तर देणारा बसवालिंग आप्पा जिरगे १९३५ मध्ये उदयास आला हेंहि एक नवल आहे. ही नवलाई घडावयास काय करण घडलें? ह्या सत्तावीस वर्षांच्या अवधींत काय कानडींत नवें वीरशैव वाङ्मय उदित झालें? नाही, तर वाङ्मय जुनेंच पण तें अधिकाधिक प्रकाशित होऊन त्यावर अधिकाधिक स्वतंत्र बुद्धीने विचार करणारा वर्ग पुढे येऊं लागला. हें प्रगतीचें चिन्ह असल्यामुळेच जिरगे ह्यांच्या प्रयत्नाचें आम्हांस कौतुक करावेसें वाटतें. कै. कल्याणशेट्टी व श्री. जिरगे ह्यांच्या ग्रंथरचनेंत २७ वर्षांचें अंतर पडलें व ह्या सत्तावीस वर्षांत जी शहाणपणाची, चिकित्सेची व धर्मबुद्धीची वाढ झाली त्यामुळेच विरक्त हे धर्मसंस्थापक कीं पंचाचार्य धर्मसंस्थापक, कीं एकटे बसवेश्वरच धर्मसंस्थापक असे वाद पुढे येऊन त्यावर मतभेद व पक्षभेद माजले, आणि परस्परमत्सराच्या खवळलेल्या सागरांत हे सर्वच गटांगळ्या खात आहेत असें दिसूं लागलें. पण हे सर्व इष्ट शिवाचेच उपासक असल्यामुळे शिवप्रभूच्या शक्तीनें ह्या सर्वांचे प्राण वाचवावेत अशी तिची प्रार्थना करणें अवश्य आहे. त्याकरिताच आज जिरगे ह्यांच्या छोट्या ग्रंथाचें आह्मीं थोड्या-विस्तारानें पण क्रमशः परीक्षण करण्याचें योजिलें आहे. त्याची आज ही प्रस्तावना आहे. बसव-जयंतीचा उत्सव येण्यापूर्वीच हे लेख जर प्रसिद्ध झाले तर वीरशैवसमाज व धर्म ह्यासंबंधीची ऐतिहासिक दृष्टीची साधार माहिती पुढे येईल व ती भावी कार्यास उपयुक्त होईल असा आह्मांला विश्वास वाटतो.

# पंढरपूरांतील एक स्तुत्य उद्योग

सुप्रसिद्ध बालतपस्वी चन्नवीर शिवाचार्य स्वामी, होटगी, व बार्शीचे 'वीरशैव गर्जने'चे संपादक श्रीगुरु परान्डकर ह्यांच्या परिश्रमाने आणि पंढरपूरक्षेत्रांतील वीरशैव सद्भक्तांच्या सहाय्याने पंढरपुरांत तीन संस्मरणीय समारंभ झाले. एक सामुदायिक दीक्षासमारंभ, दुसरा श्री. शंकरआप्पा कटप ह्यांच्या संन्यासदीक्षेचा, व तिसरा पंडिताराध्य मंदिराची मुहूर्तमेढ उभारून गुरुकुल स्थापण्याचा, असे हे तीन समारंभ होत. ह्या समारंभास परगांवचे वीरशैव आले होते व समारंभ मोठ्या उत्साहाने पार पडले ह्याबद्दल समस्त पंढरपूरनिवासी वीरशैव सद्भक्तांचे व महास्वामीद्वयांचे आह्मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

सामुदायिक शिवदीक्षेत 'कांहीं लिंगायत तेली, गवळी, वगैरे पोटजाती सामील झाल्या होत्या' असें वर्णन 'अखिल भारतीय गुरुवर्य संघा'च्या विद्यमानें प्रसिद्ध होणाऱ्या 'वीरशैव गर्जनें'-त आहे. दीक्षा हा एक संस्कार आहे.आणि 'संस्कारात् द्विज उच्यते' असें शास्त्र आहे. तेव्हा दीक्षेपूर्वी, 'जन्मना जायते शूद्रः' ह्या सनातनी न्यायधर्मानें दीक्षा घेणारे सर्वच एका क्षुद्र कोटींत होते. ह्या संस्काराने द्विजाचा एकच अधिकार सर्वांना सारखा प्राप्त झाला हेंच स्पष्ट होतें. अशा प्रकारें हा दीक्षासमारंभ सर्वच पोटजातींत समभाव निर्माण करणारा झाला असेल तर 'वीरशैव गर्जना'-काराच्या गुरुवर्यसंघाचें प्रगतिपथावर पाऊल पडत आहे हें पाहून सर्व नवमतवादी अधिकच निष्ठावंत होऊन त्यांच्यापुढे नम्र होतील ह्यांत संशयच नाही.

पंढरपूरचे श्री. शंकरआप्पा कटप ह्यांचा संन्यासग्रहणाचा संकल्पसमारंभहि तसाच मननीय आहे. श्री. शंकरआप्पा हे एक समाजसेवक होते. त्यांनीं होटगी स्वामीच्या हस्तें संन्यासदीक्षा घेऊन संसारत्याग केला. 'वीरशैव गर्जनें'तील ह्या बावतींतील हकीकत वारकाईने वाचली ह्मणजे धर्मगुरु ह्मणविणारांना विरक्त निर्माण करण्याचा अधिकार आहे हें स्पष्ट व्हावें ह्याकरिताच हा समारंभ झालेला दिसतो. आचार्य-अवस्था व विरक्तस्थिति ह्या सर्वांना गुरुची प्रेरक शक्ति असते हें सर्व खरें पण हे दोघेहि निर्माण करून निर्माण होत नसतात. म्हणूनच त्यांना स्वयंभू ह्मणतात. तशाच 'स्वयंभू'-चा हा समारंभ असेल तर सर्वच तेथे आपोआप नम्र होतील ह्यांत संशयच नाही. सन्यासदीक्षा ह्मणजे भगवी वस्त्रें, दंड आणि कमंडलु, झोळी व खडावा ह्या बाह्य चिन्हांनी मंडित होणें असलें तरी 'उरलों उपकारापुरता' हीच एक भावना दीक्षा देणाराच्या व घेणाराच्या मनांत पाहिजे. दीक्षा देणारांची व घेणाराची जी भावना 'वीरशैव गर्जनें'-त व्यक्त झाली आहे तीवरून हा परस्पर-श्रद्धेचाच विषय आहे हेंच स्पष्ट होतें व तो तसाच असतो हें खरें. आह्मी तर असेंच ह्मणतो कीं, शंकरआप्पा कटप डोकीवर रुद्राभिषेक करून घेण्याकरिता ज्या सुतकट्टी पट्टस्वामीपुढे पाटावर बसले, ज्या परान्डकर स्वामींनी त्यांच्या डोक्यावर आपला पाय ठेवला व ज्या होटगी स्वामीचे पादचरणाखालीं भगवी वस्त्रें शंकरआप्पास लाभलीं, ते सर्वच साक्षात् शिव होते व शंकरआप्पाहि आता साक्षात् शिवच होणार हें सर्व खरें! पण अज्ञानांत लोळणाऱ्या, अन्नास मौताद झालेल्या, बहुजन वीरशैवसमाजास ह्याचा काय फायदा ?

त्यांचें शिवरूप कसें होईल ? म्हणजे ते कसे कल्याण करून घेतील हाच प्रश्न. तेव्हा पूर्वाश्रमाचे शंकरआप्पाना व नव्या लिंगानंद यतींना आमची प्रार्थना ही कीं, स्वयं-चर-पर ह्या शब्दांचे कालानुरूप अर्थ करून सकल वीरशैवांचें कल्याण कसें होईल ह्याकरिताच आपण झटावें. तरच ही सन्यासदीक्षा समाजधारणेचा धर्म परिणत करावयास उपयोगी पडली असें सर्व सुज्ञ म्हणतील. अस्तु

पंडिताराध्य मंदिराची मुहूर्तमेढ म्हणजे गुरुकुलाची योजना होय. ही फलद्रूप होऊन कालानुरूप योग्य गुरु जर तेथे निर्माण झाले तर हा उद्योग स्तुत्य आहे असेंच कोणालाहि म्हणावें लागेल. चारहि वेद मुखोद्गत म्हणणारा तेलंगा ब्राह्मण आज पैशालासुद्धा महाग आहे असे शब्द-पंडित निर्माण करून भावी गुरुना अज्ञानदशा येऊं नये. "आजचे विद्वान् शास्त्री-पंडित मोठ्या उत्पन्नाच्या मठाचे वारस होण्याकरिता टपलेले असतात." त्याकरिताच समाजांत नवे झगडे उत्पन्न होतात. तरी नव्या पंडिताराध्य गुरुकुळांत नवे शिष्य निर्माण करणारे, वाढविणारे व नवे मठ अस्तित्वांत आणणारे सामर्थ्यवान् आचार्य निघाले पाहिजेत. ते तसे निघेत असाच कार्यक्रम त्यांत राहील. म्हणून ह्या योजनेला सर्वांनी मदत करावी. पंढरपूरचें हें नवें गुरुकुल अखिल भारतीय वीरशैवांचें खरें गुरुकुल बनावयास कारणीभूत व्हावें अशी आमची इच्छा आहे. व तशीच संस्थापकांची असेल अशी उमेद आहे. त्याकरिता पैसा पाहिजे, इतकेंच नव्हे तर मध्यवर्ती शक्ति इतकी प्रबल पाहिजे कीं, तिला नव्या-जुन्यांचा संधि साधतां येऊन नवचैतन्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य पाहिजे. तें ह्या नव्या गुरुकुलाला लाभो अशी आमची प्रार्थना आहे.

# हा पहा खरा पट्टाधिकारी !

'तरुण कर्नाटक' म्हणून कानडी वर्तमानपत्र आहे. त्यांत हुलीमठाच्या पट्टाधिकाऱ्याची हकीकत प्रसिद्ध झाली आहे. बेळगांव जिल्ह्यांत बैलहोंगल म्हणून गांव आहे. तेथे सांबव्वा नांवाची लिंगायतेतर सोनार जातीची बाई रहात असे, तिला मुलांबाळांसह वीरशैवधर्म स्वीकारण्याची इच्छा झाली. पण ती तिच्या इष्टमित्रांना कळून तसा योग येण्यापूर्वीच तिला कालवश व्हावें लागलें. पण अंतकाळच्या वेळी आपल्या तिन्ही मुलांना वीरशैव-दीक्षा मिळावी अशी तिनें इच्छा प्रगट केली. आपल्या मातोश्रीची अंतकाळची इच्छा पूर्ण व्हावी एतदर्थ तिची वडील मुलगी बसवण्णव्वाने धाकट्या बहिणीसह व भावासह वीरशैवदीक्षा घेण्याचें ठरविलें. ह्या गोष्टीचा तेथील वीरशैवसमाजाने विचार केला. त्याच वेळी हुलीमठाचे पट्टाधिकारी तेथे आले होते. त्यांनी ह्या कार्यास संमति दिली. त्याप्रमाणें माघशुद्ध २ ला ह्या तिघांना वीरशैवदीक्षा झाली. त्याच प्रसंगीं ख्रिश्चन झालेल्या एका वीरशैवासहि पावन केलें. आणि सर्वांनीं मिळून सहभोजन केलें. असा वृत्तान्त प्रसिद्ध झाला आहे. महाराष्ट्रांतहि ह्या प्रकारचे पट्टाधिकारी निघाले व इकडलि तरुण वीरशैव असेंच कार्य करूं लागले तर कर्नाटकच्या मार्गे महाराष्ट्र- वीरशैवसमाज आहे असें म्हणण्याची कोणाची प्राज्ञा आहे ? पण महाराष्ट्रांतील बहुतेक पट्टाधिकारी चिमणीच्या खोप्यांत झोपले आहेत व तरुण वीरशैव अद्यापि यावेत तसे धैर्यानें पुढें येत नाहींत.

# 'सुदर्शन'-चें प्रदर्शन

आमचे तरुण व विद्वान् मित्र श्री.कल्याणशेट्टी, बी. ए., एल् एल्. बी., हे सोलापूर येथे 'सुदर्शन' नांवाचें साप्ताहिक पत्र मराठींतून चालवितात. त्यांची जन्मभाषा कानडी असूनहि ते मराठींतून पत्र चालवितात ह्याबद्दल त्यांचें आम्हाला कौतुक करावेंसें वाटतें. शिवाय त्यांच्यासारखा नवा सुविद्य पुरुष वीरशैवांकरिता चालविलेल्या मराठींतील वृत्तपत्राचा पहिलाच संपादक असल्यामुळे त्यांच्या ह्या चिकाटीबद्दल व धाडसाबद्दल आम्हास विशेष अभिमान वाटतो. नाही म्हणावयास कोल्हापूरचे कै. श्रेष्ठी, बी. ए., हे एक मराठींतील वीरशैवाच्या पत्राचे पहिले सुविद्य संपादक होत. कै. श्रेष्ठी जसे आम्हास परिचित तसेच कल्याणशेट्टीहि परिचित. म्हणून त्यांचीं मतें कांहीहि असलीं तरी त्यांच्यासंबंधाने आम्हाला विशेष अभिमान वाटतो.

सध्या जो विरक्त-गुरुस्थळवाद सुरूं आहे त्यांत आमच्या कल्याणशेट्टींचें 'सुदर्शन' विरक्तपंथाचें म्हणवितें. कोणी गुरुस्थळाचा व कोणी विरक्ताचा वा कोणी नुसत्या बसवाचाच अभिमान धरणें हा दोष आहे असें आह्मी समजत नाही. मुलाने बापाचा अभिमान धरणें व त्याच बापाचा मुलगा म्हणून त्याने जाहीरपणें मिरवणें हें दोषावह नाही. परंतु आपण आपल्या बापाचा अभिमान धरीत असतां दुसरा आपल्या बापाचा मुलगाच नव्हे असें म्हणणें व तेंहि काही काल-वेळ न [illegible] पाहतां म्हणणें हें भलेपणाचें लक्षण नव्हे. विरक्त काय, गुरुस्थळ काय, किंवा बसवराजीयें काय, आज सर्वच इष्टलिंगधारी आहेत हें विसरून चालतां येत नाहीं. ह्यांत कोणाचें रक्त अधिक जुनें हा प्रश्न महत्वाचा नसून आज सर्वांचें रक्त एक आहे हें सर्वांनीच ओळखावयास पाहिजे. निदान सुविद्य पुरुषावर तरी ही जबाबदारी विशेष आहे.

उज्जयनीचे जगद्गुरु महास्वामी नुकतेच समाधिस्थ झाले. सदर महास्वामी विरक्तविरोधी वृत्तीचे असतील व त्याकरिता त्यांनी कांही प्रयत्नहि केले असतील. पण त्यांच्या शिवैक्याविषयीं दुखवट्याचे चार शब्द लिहीत असतां वादाचा अंकुश टोंचणें हें सहृदय पुरुषाचें कर्तव्य नव्हे. कारण कोणीहि पुरुष मर्त्यदेह सोडून गेला ह्मणजे त्याच्याविषयीं त्याचे शत्रुसुद्धा गुणग्राहकता दाखवितात हें आपण नित्यव्यवहारांत पाहतो. कारण ही व्यवहारांतील माणुसकी आहे. 'सुदर्शन'-कारांनी ता. २७ जानेवारीच्या अंकांत उज्जयनीमहास्वामींच्या शिवैक्यासंबंधी लिहीत असतां ही साधी माणुसकी दाखविली नाहीं ह्याबद्दल आह्मास वाईट वाटतें.

विद्वान् 'सुदर्शन'-कार दुःखप्रदर्शन करतांना लिहितात कीं, ग्वाल्हेर संस्थानांतील उज्जयनीचे (अवंतीनगरीचे) वीरशैवपीठ नामशेष झाले, व बळारी जिल्ह्यांतील उज्जयनींत ते उगवले. ह्या उज्जयनींत शिवैक्य झालेले सिद्धालिंगमहास्वामी हे खऱ्या उज्जयनीचे पीठाधीश नव्हत त्यांनी आरंभीच स्पष्ट ध्वनित केलें आहे

राजाभोजाच्या अवंतीनगरींत व आजच्या ग्वाल्हेर संस्थानांतील उज्जयनींत वीरशैवांचा मठ होता व तो बळारी जिल्ह्यांतील उज्जयनीच्या मठापूर्वी होता ह्याला कांहीं ऐतिहासिक पुरावा आहे काय ? नामसादृश्यावरून कोणाचीहि कुचेष्टा करावयाची झाली तर बसवदेवाचे कल्याण ह्मणजे मुंबईजवळचे ' कल्याण ' होय असें कोणीं आज ह्मटलें तर तो जसा इतिहासकार ठरावावयाचा नाही, तद्वतच ' सुदर्शन '-च्या ऐतिहासिक ज्ञानाच्या अकलेचें हें प्रदर्शन आहे व तेंहि उज्जयनी महास्वामींचा मृत्युलेख लिहितांना त्यांनी केलें आहे.

एवढ्यावरच थांबलें असतें तरी पुरें होतें. पण श्री मूळचे विद्वान् नव्हते. त्यांनी मागाहून विद्वत्ता संपादन केली. कोणी काशीनाथ शास्त्री आहेत त्यांच्या नादीं ते लागले व बसवादि प्रमथांचे ते निंदक बनले. वीरशैवांत जन्मजात चातुर्वर्ण्य आहे. गुरु हे जन्मजात आहेत. शेन्डी ठेवावी, बायकांनी कासोटा घालावा, इत्यादि गोष्टी ते बोलत. निलगरप्रकरणांत न्याय दिला नाही, सोलापूरच्या वारदपाठशाळेस पांच हजाराऐवजी ३३०० रुपयेच त्यांनीं दिले, वगैरे वगैरे मजकूर लिहून महास्वामींतील ' सुदर्शन '-कारास वाटणारे दोषच त्यांनी प्रदर्शित केले आहेत. परंतु ' सुदर्शन '-कारांच्या साम्यबुद्धीचा विचार करून जर ह्या सर्व दोषांकडे पाहिलें, तरी त्यांतून साम्यता सिद्ध करतां येते, हे साम्यतेस मारक नसून पोषक आहेत. बरें ते मारक आहेत असें गृहीत धरलें तरी महास्वामीस वाटलेल्या मताकरिता कां होईना पण ते झटत होते व तसेंच सर्वांनी झटावें एवढेंच साधें साम्यस्वरूप प्रकट करून ' सुदर्शन '-कारास योग्य गुणाशीं आपली समाधी लावतां आली असती आणि समाधीसुखाचा आनंद अनुभवतां आला असता.

आणि तसें झालें असतें तर एका प्रमुख लिंगधाऱ्याकरिता एक लिंगधारी विद्वान् संपादक जीवेंभावें हळहळला ह्मणून आजच्याहि स्थितींत सर्वांहृदयीं सर्वांच्या हृदयावरील इष्ट शिवदेव एकरूपाने प्रगट झाला हें मंगलदायक चित्र दिसलें असतें. ह्यांत विरक्तपक्षांतील खरी विरक्त वा निराभारवृत्ति दिसून आली असती. बसवदेवाची गुरुभक्ति ह्यांत प्रकट झाली असती. परंतु विद्वान् व सुबुद्ध संपादक पक्षभेदाच्या आहारीं पडून आपल्या सांप्रदायाचें खरें उदात्त स्वरूप प्रकट करण्यास येथे विसरला हें मात्र स्पष्ट झालें. ह्यांत विरक्तपक्षाचा वा बसवपक्षाचा गौरव खास नाही. ' सुदर्शन '-कारांचे प्रतिस्पर्धीसुद्धा अशाच विकारानें पछाडलेले आहेत हें जरी खरें, तरी सुबुद्धांनी हृदयाचें थोरपण विकारास बळी न पडतां प्रकट करीत राहणें हेंच उत्तम. हें अंगींचें उत्तमत्व प्रगट करावयास जेथे विद्वान् विसरतात तेथे अप्रबुद्धांनाच कसें नांव ठेवावें ? महास्वामीच्या शिवैक्याचा प्रसंग असा कीं, पक्षभेद व मतभेद विसरून योग्य त्या गुणांचाच उठाव करून हृदय हालेल असें लिहिणेंच सर्वतोपरीं उचित्. कारण आपण सर्वच एका इष्टशिवदेवाचे एकनिष्ठ उपासक आहों. तो विसरून भई होणें हें काय विरक्ताच्या प्रासादिकांत व बसवादिशरणांच्या शरणास साजणारें आहे ? मुळीच नाही. ' सुदर्शन '-कार भलत्याच प्रसंगीं व भलत्याच वेळीं विकारास बळी पडले ह्याबद्दल आह्मास पराकाष्ठेचा खेद होतो.

# महाराष्ट्रीय वीरशैवांचा परिचयपट

**सूचना**—'वीरशैव संजीवनी'ची वार्षिक वर्गणी रु० २॥ मनिऑर्डरनें आगाऊ आल्यावांचून परिचयपट कोणासहि भरून पाठवितां येत नाही. मोबदल्यांत वा कांहीं सभ्यांकडे संजीवनी मोफत जात असेल; पण त्यांना परिचयपट भरण्याचा आधिकार नाही हें पुन्हा आम्हास स्पष्ट करणें भाग पडलें आहे. वर्गणी ज्याची आली असेल पण वर्गणीदार नंबर मिळाला नसेल, त्यांनी परिचयपट खुशाल भरून पाठवावा.

**चुकीची दुरुस्ती**—गेल्या अंकांत 'वडांगळ्याचे जांभळे कुटुंब' असें छापलें आहे. तें 'नासिकचे जांभळे-कुटुंब' असें वाचावें. परिचयपट भरणाराने पूर्वीच्या गांवाचा उल्लेख न करितां हल्लीच्याच गांवाचा उल्लेख करावा.

### यावलचें बारजीभे-कुटुंब.

(१) रावसाहेब विश्वनाथआप्पा बनःशामआप्पा बारजीभे, पोटजात दिक्षवंत, वय ५८, विवाहित, वकील-शेती-देवघेव, वकीलीची पास, मराठी येते, मु० पो० यावल जि० पूर्वखानदेश, लोकसंख्या ४०, धार्मिक व सामाजिक वगैरे खर्च कालपरत्वें व कार्य जाणून. (२) गणपत विश्वनाथ बारजीभे, वय ३५ बी. ए., एल्‌ एल्‌. बी., विवाहित, [३] शिवलिंग विश्वनाथ बारजीभे, वय २२, विवाहित, एल्‌ एल्‌. बी.-चा अभ्यास सुरू आहे; व बी. ए. पास झाले आहेत. [४] सिद्धाप्पा गणपतआप्पा बारजीभे, वय १५, अविवाहित, हायस्कूलमध्यें शिकत आहे. [५] जगाप्पा गणपतआप्पा बारजीभे, वय १०, अविवाहित, मराठीशाळेंत शिकत आहे. [६] पंढरी गणपत आप्पा, वय ८, अविवाहित, मराठी शिकत आहे. [७] सोमप्पा शिवलिंग आप्पा वय ६ महिने, [८] लिलाबाई बाप गणपतआप्पा, वय ५, अविवाहित [९] सौ. काशीबाई भ्र. विश्वनाथआप्पा बारजीभे, वय ५०, विवाहित, गृहकृत्य, मराठी समजते, [१०] सौ. शेवंतीबाई भ्र. विश्वनाथआप्पा बारजीभे, वय ३०, विवाहित, गृहकृत्य, मराठी समजते ( ११ ) सौ. सावित्रीबाई भ्र. शिवलिंग-आप्पा, वय १६, विवाहित, गृहकृत्य, मराठी समजते. गुरुमठ निमसोड कोळे.

### ५. खानापूरचें जंगम-कुटुंब

( १ ) रामलिंग महादय्यास्वामी, जंगम, पूर्णेचा करबसय्या मठ, ह. मु. तमलूर, पो. शहापूर, ता. देगलूर, जि. नांदेड, प्रांत निजाम. वय ३३, विवाहित, सरकारी शाळामास्तर, मिडलट्रेन्ड पास, मराठी येते. खानापुरी वीरशैव लोकसंख्या ५००, सालचा कौटुंबिक धार्मिक व सामाजिक खर्च रु. २५, परोपकारार्थ १५, इतर परोपकारार्थ १० रु. करण्याची इच्छा. ( २ ) महादेवअय्या स्वामी, वय ६५, विधुर, शेतकी. ( ३ ) कु. वत्सला वय- ९, अविवाहित, शाळेंत शिकते, ( ३ ) कुमारी वत्सलेची आई ( म्हणजे कुटुंबकर्त्यांची पत्नी, नांव लिहावयाचें नाही अशी परिचयपट भरणारांची प्रतिज्ञा दिसते. ) वय २५, गृहकृत्य, मराठी येते, ( ४ ) विश्वनाथ-स्वामी, वय २१, विधुर, मराठी पांचवी शिकत आहे.

### ६. मलवडीचें जंगम कुटुंब

( १ ) महादेव नारायणस्वामी, जंगम, गुरुमठ करमाळे, मु. मलवडी, ता. माण जि.

सातारा, ह. मु. मुंबई नं. ४, ९९ फर्स्ट पठाण स्ट्रीट, वय ३२, विवाहित, व्यापार, मराठी येते, मलवडीची वीरशैव लोकसंख्या १००, धार्मिक व सामाजिक खर्च सालचा रु. २५, परमार्थ रु. ५ [२] भक्तआठ्या मारुतीस्वामी, तडवळेकर, वय ५०, विवाहित, उपाध्याय, मराठी येते, सालचा धार्मिक व सामाजिक खर्च रु. ३००, परोपकारार्थ रु. ७५. (३) बाबूराव नारायणस्वमी, वय २२, अविवाहित, उपाध्याय, मॅट्रिकपास, [४] सौ. अनुसया भ्र० भाऊस्वामी, [५] सौ. पार्वतीबाई भ्र. महादेवस्वामी,

### ७. सौंसरचे जगदंबे कुटुंब

(१) आत्माराम गडीआप्पा जगदंबे, मु. सौंसर, जि. छिंदवाडा, मध्यप्रांत, दिक्षवंत काचार, गुरुमठ वाढोना, हल्ली मुक्काम इंदूर संस्थान, वय ४६, विधुर, वैद्य, मराठी शिक्षित, इंदूर येथें वीरशैव संख्या ६०, धार्मिक खर्च परोपकारार्थ रु. ५ सालचा (२) नारायणआप्पा जगदंबे, वय ४०, विवाहित, शेती, मु. वाढोना, (३) नारायणआप्पा जगदंबे, वय ३५, विवाहित, कामधंदा, मराठी येते, ह. मु. यवतमाळ, (४) रामचंद्रआप्पा जगदंबे, मु. इंदूर, वय २९, विवाहित, नोकरी, (५) सदाशिवआप्पा जगदंबे, मु. नागपूर, वय २५. विधुर, शाळा मास्तर. (६) बाबूराव जगदंबे, वय २४, विवाहित, मु. सौंसर, व्यापार. (७) विश्वेश्वर जगदंबे, वय २० मॅट्रिकचा अभ्यास करीत आहे, अविवाहित

ह्या कुटुंबांत चार स्त्रिया विवाहित असून मराठी शिक्षण घेतलेल्या दोन आहेत व दोन निरक्षर आहेत. सर्वच गृहकृत्यें करतात. एक कुमारी वय ७ असून, मराठी शिकत आहे. ह्या सर्वांचीं नांवें अनुक्रमें सौ. भीमाबाई, वय ३२; सौ. अनुसया वय २५, सौ. लक्ष्मी वय २२, सौ. अनुसया, वय १५, कु. सुमन, वय ७.

## पंढरपूरचा वीरशैव-तरुणसंघ

पंढरपूरला स्थापन झालेल्या वीरशैवतरुण-संघानें जागृति व चर्चा ह्या दृष्टीनें गेल्या सहा वर्षांत संस्मरणीय अशी कामगिरी केली आहे. ह्या संघाचें सहावें संमेलन श्रीगुरुवर्य राचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली नुकतेंच पार पडलें. सेक्रेटरी श्री. शंकरआप्पा कटप ह्यांनी अहवाल सादर करतांना जें भाषण केलें त्यावरून संघ अधिकाधिक कार्यक्षम होणार असें स्पष्ट दिसतें. तो कार्यक्षम व्हावा आणि जेथे इष्ट शिवदेव आहे तेथे तेथे पूर्णपणें ऐक्यभाव उत्पन्न करून संघटना निर्माण करण्याची शक्ति शिवकृपेने संघांत यावी अशी आह्मी प्रार्थना करतों.

## पंढरपुरांत वीरशैव स्त्रियांची सभा

संमेलनानंतर ता. १५ जानेवारीला रात्रौ मन्मथ-स्वामीच्या मठांत सोलापूरच्या सौ. बसव्वाबाई नंदीमठ ह्यांच्या अध्यक्षतेखाली सोलापूरच्या सौ. भागीरथीबाई कटप ह्यांचें वीरशैव स्त्रियांचें कर्तव्य ह्या विषयावर मननीय भाषण झालें. महाराष्ट्रांतील वीरशैव भगिनींत उत्तरोत्तर ही प्रगति होत आहे ह्याबद्दल त्यांचें अभिनंदन प्रत्येक वीरशैवानें करणें अवश्य आहे.

# पुन्हा वीरशैवसंजीवनीचा अवतार

( लेखकः— सिद्धराम बसाप्पा धुम्मा वकील, सोलापूर. )

ख्रिश्चन व मुसलमान धर्मांचे लोकांत कोणत्या ना कोणत्याहि मार्गानें आपल्या धर्माचा प्रसार व्हावा म्हणून चालू असलेल्या अहमहमिकेकडे पाहिलें असतां इतर धर्मांचे लोकांना त्यांच्या ह्या धर्माभिमानाबद्दल प्रथमदर्शनी बरेंच कौतुकहि वाटेल ! परंतु त्यांच्या या चळवळीच्या परिणामाकडे जर थोडेसें कोणीं लक्षपूर्वक पाहिलें तर इतरांनी व विशेषतः हिंदु म्हणविणाऱ्यांनी तरी यापुढे आपल्या धर्मरक्षणाची लौकरच योग्यपणें तरतूद न केली तर आपल्या प्राणाहूनहि प्यार अशा आपल्या प्रियधर्मास त्यांना अगर त्यांच्या वंशजांना थोड्याच अवधींत मुकण्याची पाळी आल्याशिवाय राहणार नाही हें दिसून येईल! पेटलेला वणवा जरी दुरून निरुपद्रवी दिसला तरी त्याचा गुणधर्म सारखा चोहोंकडे वाढण्याचा व सपाट्यांत सांपडेल त्याचा स्वाहा करण्याचा असल्यामुळे, शहाणे लोकांस त्याचें दर्शन होतांच ते त्यास जागचे जागीं थंड करण्याचा प्रयत्न करितात; व तसें करणें म्हणजेच त्यापासून आपला बचाव करणें हें होय! पण तसें न करितां जर कोणी ' वणवा अद्यापि लांब आहे व तो आपणाकडे येईलच हें कशावरून? तर चला आपल्या नेहमींच्या उद्योगाला' असें म्हणून निष्काळजीपणानें वागूं लागला तर ह्या दीड शहाण्यावर शेवटीं कोणता कठिण प्रसंग येईल हें नव्यानें सांगण्याची मुळींच जरूरी नाही.

चाणाक्ष व स्वार्थी लोकांच्या धर्मप्रसाराच्या गलबल्यांत आमचा अगदीं पुरातन काळचा पंचाचार्यप्रणीत असा वीरशैवधर्म ह्या जगाच्या अंतापर्यंत जीव धरून टिकण्यासारखा आहे किंवा धर्मग्लानीमुळे मध्येंच ' राम ' म्हणण्याच्या पंथास लागला आहे याचा विचार आमच्या वीरशैव बांधवांनी आता तरी करावा हाच माझा वरील मजकूर लिहिण्याचा हेतु आहे! जगाच्या आतापर्यंतच्या प्रगतिकडे आम्हीं वीरशैवांनी अद्यापपर्यंत पाहिलेंसुद्धां नाही! आमच्यांतील कूपमंडूकवृत्ति नाहींशी झाल्याशिवाय आम्हांस बाहेरील भीषण सागराची कल्पना तरी कशी येईल? राष्ट्र टिकविणें अगर वाढविणें हें जसें राष्ट्रजागृतिवर अवलंबून आहे, तद्वतच कोणताहि धर्म टिकविणें अगर वाढविणें हें त्यांतील धर्मजागृतिवरच अवलंबून आहे. तर अशी धर्मजागृति आमच्यामध्ये सध्या जिवंत आहे काय ? नाहीं ! नाहीं !! नाहीं !!! असेंच लिवार कोणालाहि उत्तर द्यावें लागेल! इतकेंच नव्हे तर आपल्यांतील बरेच लोक अद्यापि गाढ अज्ञानांधकारांत निष्काळजीने घोरत पडले आहेत तर कांही प्रमुख पुढारी व धर्माधिकारी 'पंचाचार्य' श्रेष्ठ कीं विरक्त श्रेष्ठ ? दक्षिणा घेण्याचा हक्क तुमचा किंवा आमचा ! अशा क्षुल्लक बाबींवर आपआपसांत दुहीची रणें माजवून आपल्या परमपूज्य धर्मगुरुंची व शिवशरणांची विनाकारण जाहीरपणें निर्भत्सना करीत आहेत! एकीकडे मुसलमानधर्मीचा व दुसरीकडे ख्रिश्चनधर्माचा आमच्यावर मारा होत असतां व त्यांतच आगींत तेल ओतल्याप्रमाणें नुकतेच आमच्या हिंदुधर्मापैकीच आर्यसमाजाकडून आमच्या धर्माविरुद्ध घेतलेल्या घोर प्रतिज्ञेची भर पडली असतां, त्यास आम्ही एकजुटीने तोंड द्यावयाचें कीं वरीलप्रमाणें आत्मघातकीपणानें एकमेकांवर आपआपसांत हल्ले चढवून आपण सर्वत्र मूर्खपणानें दुसऱ्यांच्या भक्षस्थानीं पडावयाचें ह्याचा कोणींच विचार करूं नये काय ?

आपल्या धर्मावर आलेलें हें गंडांतर कोणत्या संजीवनीने टळेल ह्या काळजींतच आम्ही होतो इतक्यांत 'यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत' या उक्तीप्रमाणें भगवद्गीतेंतील भगवान्मूर्ति नारायणाने ज्याप्रमाणे कृष्णाचा अवतार घेऊन धर्माचें योग्य काळीं रक्षण केलें त्याप्रमाणें आमच्या वीरशैवधर्माची ग्लानि नाहींशी करून त्यावरील संकट दूर करण्याकरिताच अगदी ऐन प्रसंगीं उमरावतींतील देवमूर्ति नारायणाने पुन्हां 'वीरशैव सजीवनी' रूपाने अवतार धारण केलेला पाहून त्यांचे आम्ही कितीहि धन्यवाद गाईले तरी ते थोडेचे आहेत! वीरशैवसंजीवनीने आपल्या समाजसेवेसाठीं केलेल्या यापूर्वीच्या तिच्या निर्भीडपणाच्या व निपःक्षपातीपणाच्या कामगिरीकडे पाहतां यापुढील तिच्या कार्यांतहि तिला निःसंशय यश येईल यांत मुळींच संदेह नाही ! तर ह्या गुणकर संजीवनीच्या वेळींच लाभ घेऊन सुरक्षित व अजरामर राहण्याची सुबुद्धि आम्हां सर्व वीरशैवांना होवो अशी त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना करून मी रजा घेतों.

# अंधश्रद्धा कमी कशी होईल?

लेखकः—
बी० नारायण स्वामी
मलवडी,
(सातारा).

पूर्वीपासून परंपरागत चालत आलेल्या रुढी-प्रमाणे प्रत्येक समाज चालत आहे. तद्वतच आपलाहि समाज चालत आहे. नैसर्गिक, आर्थिक अगर अन्य कांहीं कारणाने त्यापूर्वीच्या काळीं सुलभ रीतीने आचरणांत आणतां येणाऱ्या रूढी, आज आचरणांत आणणें अपरिहार्य होऊं लागलें असतांनासुद्धां, आणि कष्ट-दगदग सोसूनहि, त्या अंमलांत आणण्याचा सारखा अट्टाहास दाखविण्यांत येतो जे याविरुद्ध बंड पुकारून उठतात, त्यांना धर्मलंड बनविण्यांत येते. ही पूर्वापार चालत आलेली जी रुढी ऊर्फ श्रद्धा समाजांतील जुन्या वळणाच्या लोकांच्या अंगीं अगदीं पूर्ण भिनलेली आहे, ती आजच्या काळीं योग्य आहे कीं अयोग्य आहे याचा प्रस्तुत लेखांत अल्प प्रमाणावर विचार करण्याचा इरादा आहे.

रूढी पुष्कळ प्रकारच्या आहेत; या धार्मिक बाबीमध्ये येण्यास त्या काळीं तशींच कांहीं महत्वाचीं कारणें घडलीं असतील, त्या काळीं त्या उपयुक्तहि असतील यांत बिलकूल संदेह नाहीं; परंतु त्या हल्लींच्या काळीं जशाच्या तशाच लागूं करणें परिस्थितीने त्या अतिशय जाचक होत असतां कायम ठेवण्याचा अट्टाहास धरणें, आचरणांत आणणाऱ्यांच्या सोयी-गैरसोयीकडे लक्ष न देता आपलेंच घोडें पुढें दामटण्याचा प्रयत्न करणें, या गोष्टीला आह्मी अंधश्रद्धेमध्ये स्थान द्यावें असें ह्मणतों. आज समाजांत व नित्याच्या आचरणांत येणाऱ्या, त्याचप्रमाणें लग्नकार्यांत आचरणांत येणाऱ्या, अंत्यविधीप्रसंगाच्या षोडष संस्कारा-पैकींच्या रुढी सगळ्याच टाकाऊ आहेत असें माझें ह्मणणें नाही. परंतु त्यापैकीं बराचशा आज निरर्थक व हास्यास्पद आहेत असेंच ह्मणावें लागतें.

## सामाजिक अंधश्रद्धाः—

लिंगायतसमाजांत निरनिराळ्या जाती आहेत. प्रथम जेव्हां लिंगायतांना लिंगाची दीक्षा दिली तेव्हां दीक्षा देणाऱ्या श्रीबसवेश्वरांचा समता स्थापन करावी असाच उद्देश असावा. सर्व पापी (?) जीव परमेश्वराची उपासना करण्यास पात्र असावेत असाच असला पाहिजे. असें असतांना समाजांतील विविध कार्य करण्याची जबाबदारी विविध मंडळींनी घेतली आणि तीं पिढीजात करीत आले म्हणून त्यांना एक विशिष्ट जात असें नांव देण्यांत आलें. समाजाच्या उदरंभरण, योगक्षेम, आरोग्य, वगैरे गोष्टीसाठी सर्व प्रकारचे धंदे समाजांतील प्रत्येक घटकांस करावे लागतात. ही गोष्ट खरी असतांना समाजोपयोगी धंदेच कमी-अधिक उच्चनीचतेचे ठरविले गेले. ब्राम्हण वेदपठण करणारे श्रेष्ठ, क्षत्रिय त्यापेक्षा हलके, वैश्य त्याहिपेक्षा हलके व शूद्र तर शेवट नंबर. शूद्राकडे किंवा अस्पृश्य-समाजांतील असणाऱ्या जातींकडे पाहिलें तर ते राष्ट्रविघातक, समाजविघातक धंदा करतात काय? नाहीं. उलटपक्षीं, समाजाच्या आरोग्यांत भर घालण्यासाठी त्यांना करतां येण्यासारखे धंदे करीत असतात. ते जर त्यांनी केले नाहीत तर आमचें इतकें अडून बसणार आहे कीं कल्पना करवत नाही. परंतु या महत्वाच्या सहकार्याच्या गोष्टीकडें मुळीच लक्ष न दिलें जातां त्यांना दूर ठेवण्याची अंधश्रद्धा रूढ आहे. ही अखिल हिंदुधर्माची बाब आहे. मग त्या धर्माचा घटक वीरशैवसमाज त्याहून कसा निराळा असूं शकेल? आता आपण आपल्या समाजाच्या दृष्टीने विचार करूं.

या समाजांत जंगम (गुरु), शीलवंत, दीक्षावंत, पंचम, तिराळी, तांबोळी, काचारी, कोष्टी, माळी, तेली, साळी, वगैरे पोटभेद महाराष्ट्रांत तरी दिसून येतात. जुनी दंतकथा अशी ऐकिवांत आहे कीं, ज्यांना तांबोळी व काचारी या जाति नांवाने संबोधण्यांत येते त्यांचे पूर्वज बऱ्याच वर्षांपूर्वी पंचम होते. परंतु त्यांनीं पानें विकणें आणि बांगड्या वनविणें हे धंदे सुरू करतांच त्यांना उपरोल्लिखित जातींमध्ये घालण्यांत आलें. आणि रूढी अशी पडली कीं, ह्या सर्वच पोटजाती एकमेकापासून स्वतःला अलग समजूं लागल्या, व एक दुसऱ्यापेक्षां अलग अशा भावनेनें वागूं लागल्या. इष्टदेव सर्वांचा एक असून, तो भंगला व आम्हाला अधोगति प्राप्त झाली. तरी सर्वांचा शिव एक आहे ह्या भावनेने वागून शिवाचें अभंग स्वरूप समाजांत जागृत करणें जरूर आहे.

# महाराष्ट्रीय वीरशैव मागे कां?

लेखकः—
पी० एस्० जिरगे,
सोलापूर.

'महाराष्ट्रीय वीरशैव मागे कां?' हा प्रश्न सर्वांपुढे आहे. या प्रश्नाचें उत्तरहि कांही कठिण नाही. आपण महाराष्ट्रांतील वीरशैव मागें कां ह्याची कारणें आपणास कळतात. पण तीं निवारण्याचें कार्य मात्र आपणाकडून होत नाही. शिक्षणाचा अभाव, जुन्या रूढींचें आवरण, नव्या कालाकडे पाहण्याची आकुंचित दृष्टि, कृत्रिम जातिभेदाचा बुजबुजाट, व आपसांतील दुही यामुळे आपला समाज मागासला आहे. आखिल भारतांतील इतर समाजांवरहि या अवगुणांनी जेथे छाप पाडली आहे तेथे आपला समाजहि त्यापासून परावृत्त कसा राहूं शकेल. परंतु या बाबतींत ब्राह्मण, गुजराथी, जैन, मुसलमान आणि आपल्या समाजांत महदंतर आहे. कारण इतर समाजांत त्याबद्दल जागृति उत्पन्न होऊन, उन्नतीच्या शिखराकडे जात आहेत व आपली भरभराट करून घेत आहेत. पण आपला समाज अद्यापि गिरिकंदराच्या पायथ्याशीं चांचपडूं लागला आहे.

समाजांतील प्रत्येक व्यक्ति—स्त्री अगर पुरुष—कोणीहि असो आपल्या स्थितिबद्दल दुर्लक्ष करतो. समाजांतील मंडळींत संघटित विचाराची प्रवृत्तिच नाही. संघ, क्लब, किंवा गट करून कार्य करण्यानें कोणत्याहि कार्याची उभारणी उत्तम तऱ्हेनें होऊन तीस गोड फळेंहि लवकर येतात, व त्यांचा सर्वांस उपभोग घेतां येतो. विचारशक्ति ही जोपर्यंत जागृत होत नाही तोपर्यंत कोणतेंहि कार्य घडून येत नाही. आणि त्यास पाया म्हणजे शिक्षणप्रसार हेंच होय. समाजांत शिक्षणप्रसार जितका होईल तितका समाज सुधारत जाईल. प्रत्येक पालक आपल्या मुलाबाळांस शिक्षण देत असतातच पण कित्येकांना गरीबीमुळे शिक्षणदान साध्य होत नाही; त्याकरिता मोफत वसतिगृहें व शिक्षणालयें आणि पाठशाळा काढल्या पाहिजेत. महाराष्ट्रांत यांची फार उणीव आहे. कित्येकांना या साधनाच्या उणीवेमुळे आपल्या मुलाबाळांचें शिक्षण अपुरेंच ठेवावें लागतें. परंतु यापेक्षा प्रौढ

जनांच्या शिक्षणाचीहि अत्यंत जरूरी आहे. त्याकरतां शाळा, हायस्कूल, किंवा नाइट स्कूल्स हीं नाहीत. पण वाचनालयें देखील नाहीत. फक्त शाळा-कॉलेजांतच शिक्षण मिळविंतां येते असें काही नाही. लहानपणीं मिळवलेल्या तुटपुंज्या शिक्षणांचा वाचनालयांतील विविध वर्तमानपत्रांतील लेखनांनी, ज्ञानी ग्रंथकारांच्या पुस्तकांच्या वाचनाने, मनुष्यास असाधारण ज्ञानप्राप्तिहि होऊं शकते. शिवाय तेथे जमणाऱ्या सहाध्यायाशीं वाचण्यांत आलेल्या प्रकर्णांवर विचारविनिमय करतां येऊन सहविचाराने ज्ञानलाभांत भर पडते. के. हरि नारायण आपटे, नाथमाधव, गोविंदाग्रज [ गडकरी ] व वासुदेव शास्त्री खरे ह्या प्रतिभासंपन्न लेखकांनी मराठी साहित्यांत आपलें नांव अजरामर केलें असून, त्यांच्या ग्रंथांचें अलीकडे विद्यापीठांत अध्ययन चालू आहे. त्यांच्या ज्ञानवृद्धीस कारण वाचनालयेंच होत. याशिवाय व्यापारी, शास्त्रीय, आणि कलाविषयक वाङ्मयांत रोज भर पडत असल्याने त्या त्या क्षेत्रांतील मंडळीस आपल्या इच्छित ध्येयांत नवीन ज्ञानप्राप्ति करून घेऊन मोठा लाभहि मिळवतां येतो. अशा वाचनालयांची महाराष्ट्रीय वीरशैव ज्ञातिबांधवांत कमतरता आहे. ती कमतरता नाहीशी करण्याकरता समाजांतील मंडळींचा प्रयत्नच होत नाही.

अलीकडे सात-आठ वर्षांपासून कांहीसे प्रयत्न विधायक दृष्टीने चालू आहेत. पण त्याकडे पाहतां ते प्रयत्न संघशक्तीच्या अभावीं अयशस्वी होत चालले आहेत. वीरप्रभा, विजय, व वीरशैव केसरी, ह्या वृत्तपत्रांनी कांहीशी कामगिरी केली. पण बाल्यावस्थेंतच त्यांचा लय झाला. संध्या सुदर्शन, वीरशैव गर्जना, व वीरशैवसंजीवनी, या नियतकालिकांनी कार्य चालवलें आहे. या प्रत्येक पत्राविषयी मत प्रदर्शित करणें कठिणच आहे. पण सर्वसाधारण दृष्ट्या त्यांजबद्दल लिहावयाचें म्हणजे जेणेंकरून समाजाभिवृद्धि होईल इकडे प्रत्येकाने लक्ष दिलें पाहिजे. वीरशैवगर्जना व सुदर्शन या पत्रांतील लिखाणांकडे पाहिल्यास विरक्त गुरुस्थल, बसवादिमहाशरण व पंचाचार्यवादाचा ध्वनि काही काही वेळां अवलोकनांत येतो. वाद हा असावा पण त्याची दिशा तत्वान्वेषणाकडे असावी. तशी दिशा असलेली दृष्टीस येत नाही. श्री. बसवेश्वर-आदि महाशरण आणि पंच आचार्यांनी वीरशैव-धर्माचा प्रसार केला तरी आपणहि तसाच प्रसार न करतां उलट आहोंत त्यांतच अवनति करून घेऊं लागलों व घट होऊं दिला तर त्यांचा अभिमान सांगण्यास आपणास हक्कच पोंचत नाही. श्रीबसवादि महाशरण व पंचाचार्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास करून त्यास नवस्वरूपांत रूपांतरित करून त्यांनी प्रस्थापिलेल्या धर्माची ज्योति दिवसें-दिवस प्रज्ज्वलित करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. सदर पत्रांतील लिखाणावरून पाहतां त्यांची कांही प्रसंगीं कर्तव्यच्युति होत असते असें खेदाने म्हणावें लागतें; कारण अशा लिखाणांनी समाजांत पक्षभेद माजून समाजघातास ते कारणीभूत होतात. श्रीबसवादि महाशरण व पंचाचार्यांच्या वाङ्मयाचें संशोधन करून कानडी भाषेंतील साहित्य-रत्नभांडार मराठी भाषेच्या ज्ञातिबांधवांना उपलब्ध करून दिलें पाहिजे. तसा प्रयत्न सोलापूर—सुदर्शन-ग्रंथमालेकडून थोड्या प्रमाणावर चालू झाला आहे हें स्तुत्य आहे. तसेंच, श्री. करवीरपा छत्रे, निपाणी, यांच्या ग्रंथमालेकडूनहि चांगली कामगिरी झाली आहे. त्यांस सर्वांनी मदत केली पाहिजे. निर्विकार; निःपक्षपतीपणें श्री. शंकरराव देव धुळे रा. ब. देशमूख नगर, ह. भ. प. पांगारकर नाशीक या कार्याप्रमाणें शरणवाङ्मय व आचार्यवाङ्मयाची वाढ झाली पाहिजे. श्रीरामदाससेवक शंकरराव देव व पांगारकर बुवा आणि प्रो. दांडेकर पुणें यांनी संतवाङ्मयाची महाराष्ट्रांत केवढी मोठी कामागिरी केली आहे तशीच कामगिरी वीरशैवांनी केल्यास सध्या माजत असलेला अनिष्ट वाद कमी होत जाईल.

कर्नाटकांतील वीरशैवबांधवांनी संघटितपणें कार्य करून समाजोद्धारक संस्था काढल्या आहेत तसेंच आपणहि कार्य केल्यास आपला मागासलेपणा नष्ट होईल. कर्नाटकांतील आपले बांधव इतर समाजाबरोबर राष्ट्रकार्यांत धर्मकार्यांत व साहित्यक्षेत्रांत उजळमाथ्यानें भाग घेतात याचें कारण ते सर्व तऱ्हेने पुढारले आहेत. आपण महाराष्ट्रीयहि त्याप्रमाणे होण्यास सत्वर कार्यास लागावें.



# स्त्रीशिक्षण व आदर्श वीरशैव महिला

लेखकः— आंबणप्पा महांतप्पा भैरोपाटील, ज्युनियर बी. ए. क्लास,
राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

" Education is the manifestation of perfection in man. "
—SWAMI VIWEKANAND.

*" मानवजातीचें अर्धांग शिक्षित व अर्धांग अशिक्षित राहिल्यास त्या दोघांचा मिलाफ कधींहि व्हावयाचा नाहीं. "*

आपणास परिचयाचीच गोष्ट आहे कीं, कांही बैल किंवा घोडे एखादी मोटार किंवा आगगाडी दृष्टीस पडतांच बिचकतात व प्रसंगीं उधळतातहि. परंतु पुढे-पुढे हींच जनावरें अशा मोटारीस वगैरे बिचकत नसतात. त्या बापड्यांना कदाचित् वाटत असेल कीं, 'हें एक आपल्याप्रमाणेच वाहन आहे, किंबहुना आपल्यापेक्षा अधिक सुधारलेले व वेगवान् आहे, व तशांत अशा गोष्टीस आपण सरावलेलों आहोंत, तर मग ह्यांत भिण्यासारखें असें काय आहे ?' अशीच स्थिति कांही वर्षा-पूर्वी ब्राह्मण, पारशी, वगैरे समाजांची होती. स्त्रीशिक्षण हें नांव उच्चारल्याबरोबर कांही सनातनी व अज्ञ लोक बिचकत असत, व अशा चळवळीस पूर्ण विरोध करण्याचा ते चंगहि बांधीत असत.परंतु पुढे ह्याच लोकांना स्त्रीशिक्षणाचें महत्व कळूं लागलें;व आता सुदैवाने ब्राह्मण,पारशी,वगैरे समाजांत स्त्रीशिक्षणास विरोध करणारेहि कोणी नाहींत.

परंतु दुर्दैवाने वीरशैवसमाजाची तशी स्थिति नाहीं. स्त्रीशिक्षण ह्मणजे एक मोठें अवडंबर व थोतांड आहे अशी कित्येक वीरशैव बंधूंची व भगिनींची समजूत आहे. 'स्त्रीशिक्षण' हा शब्द ऐकल्याबरोबर त्यांना कसेसेंच होतें. स्त्रीविषयीं त्यांची कल्पना ह्मणजे " चूल आणि मूल " प्रात:कालपासून सायंकाळपर्यंत चुलीवरची कामें व मूल असल्यास त्याची जोपासना करणें इत्यादि गृहकृत्यांतच तिने वेळ घालवावा अशी आमच्या आजीबाईची इच्छा असते. तथापि, ह्यावरून कोणीं गैरसमज करून घेऊं नये कीं, स्त्रियांनी गृहकृत्यांत बिलकुल लक्ष घालूं नये. माझें ह्मणणें एवढेंच कीं, कारागिरास ज्याप्रमाणे धंदा मुख्य व शिक्षण हें उपांग असतें त्याचप्रमाणे स्त्रियांसहि गृहकृत्य मुख्य व शिक्षण आनुषंगिक असतें. कोणत्याहि माणसास—मग तो सुतार, चांभार किंवा चित्रकार असो— शिक्षण दिलें असतां तो आपलीं कर्तव्यें करण्यास अधिक समर्थ व योग्य होतो. हा शिक्षणाचा मूलभूत परिणाम असतो. तद्वतच स्त्रियांना शिक्षण दिलें असतां त्या आपलीं गृहकृत्यें करण्यास अधिक समर्थ व योग्य होतात.मग सहाजिकच प्रश्न उद्भवतो कीं, तें स्त्रीशिक्षण कोणतें व कसें असावें? त्याची मर्यादा कोणती व कोठपर्यंत असावी?

प्रथम आपण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, स्त्री व पुरुष ह्यांचीं कर्तव्यें ह्या जगात भिन्न-भिन्न आहेत व त्यामुळे कधींहि एकाचें शिक्षण दुसऱ्यास जुळणार नाही. अर्थात् स्त्रियांस असें शिक्षण हवें कीं, ज्या शिक्षणाने त्यांच्या मानसिक, बौद्धिक व शारीरिक प्रगतिबरोबरच त्यांना संसारांत जीं कर्तव्यें आहेत तीं त्यांना अशा शिक्षणाने चांगलीं बजावतां येतील.

तें शिक्षण प्रथम संसारोपयोगी व नंतर व्यवहारोपयोगी पाहिजे, म्हणजे त्यांना भवसागर यशस्वी रीतीने तरून जातां येईल.

तर मग स्त्रियांना प्रथम प्राथमिक शिक्षण हवें व त्यांना नीट लिहितां-वाचतां यावयास पाहिजे व पुढे हायस्कुलांतील इंग्रजी शिक्षण द्यावें. तात्पर्य, ज्यायोगें गृहकृत्यांचा व धर्माचा कंटाळा येणार नाही, थोडेंबहुत प्राथमिक, व इंग्रजी भाषा अवगत होईल व सासरीं किंवा माहेरीं रोजचें थोडें-बहुत काम करून मधल्या वेळांत स्त्रीधर्मास व वीरशैवधर्मास उचित असें शिक्षण पाहिजे. त्याचप्रमाणे आधुनिक सोव्हिएट रशिया व इंग्लंड वगैरे देशांतल्या 'उदार शिक्षण' दिलेल्या वकील, एडिटर, डॉक्टर किंवा कारकूनीवर किंवा औद्योगिक व व्यापारी धंदा करणाऱ्या स्वतंत्र अशा सुशिक्षित स्त्रियाहि हव्या. अर्थात् स्त्रीशिक्षणाची ही परमावस्था होय. तथापि हा वर्षशतकांचा किंवा सहस्रांचा प्रश्न आहे. आपले वीरशैवांतील स्त्रीशिक्षण फारफार मागासलेलें आहे. मग तेवढी घाई करण्यांत कांहीं अर्थ नाही व तें एकदम होणेंहि शक्य नाही. मागे सांगितल्याप्रमाणे पहिली पायरी म्हणजे प्राथमिक व दुय्यम शिक्षण.

परंतु ह्या बौद्धिक व मानसिक शिक्षणाबरोबरच शारीरिक शिक्षणाची जरूरी आहे. व ह्याबरोबरच ती स्त्री "सुगृहिणी सुमाता व सुभगिनी" ह्या पदास पात्र व्हावयला पाहिजे. सुगृहिणीपदास अनुरूप असें शिवणकला, स्वयंपाक, आरोग्य व बालसंगोपनशास्त्र व गायनवादन वगैरे कलांचें शिक्षण अत्यावश्यक आहे. कांहीं वीरशैव भाविक व सनातनी बंधूंना हें जरा धाष्टर्याचें वाटेल, परंतु त्यांनी लक्षांत ठेवावें कीं, स्त्री म्हणजे फक्त चुलीची मालकीण नव्हे. स्त्री म्हणजे वृक्षावर वाढणारी वेल .अशी जी स्त्रीजीवनाची व्याख्या आहे ती बदलून वृक्षाप्रमाणें वेलीलाहि अर्थात् पुरुषाप्रमाणें स्त्रीलाहि स्वतंत्र जीवन आहे. स्त्री ही पतीची सहचारीण व मैत्रीण आहे. व हुशार स्त्री आपल्या पतीची मार्गदर्शक बनते हें विसरतां कामा नये.

त्याचप्रमाणे सुशिक्षित स्त्री "सुमाताहि" पाहिजे. स्त्रिया आपल्या मुलांच्या बालपणीं त्यांचे खरे शिक्षक होत. ह्या बाबतींत शिवाजीची माता जिजाबाई ह्यांचें उदाहरण प्रसिद्धच आहे. मातेच्या शिकवणुकीप्रमाणेंच मुलाच्या पुढच्या आयुष्यास वळण मिळतें. नंतर ती 'सुभगिनी' असावयास पाहिजे म्हणजे समाजकार्यदक्ष. तिला स्वतःच्या समाजाबद्दल व राष्ट्राबद्दल अहर्निश कळकळ पाहिजे. स्त्रियांना जसें कौटुंबिक जीवन आहे, तसेंच त्यांना सामाजिक व राष्ट्रीय जीवनहि आहे.

परंतु वीरशैवसमाजामध्ये अशी एखादी पूर्ण सुशिक्षित सुमाता किंवा सुभगिनी क्वचित् सांपडेल. जेथे सुशिक्षित पुरुषच बोटावर मोजण्याइतके निघतील तेथें सुशिक्षित स्त्रिया हुडकणें म्हणजे हास्यास्पद होय. नुसते बाळबोध किंवा कानडी भाषा लिहितां-वाचतां येणाऱ्या स्त्रिया फारच थोड्या आढळतील. बसवादि प्रमथांच्या काळीं पुष्कळ सुधारक सुशिक्षित स्त्रिया सांपडतील. महादेवी अक्कांचें उदाहरण सुप्रसिद्ध आहे. खुद्द श्रीभगवान् बसवेश्वराने बाराव्या शतकांतच स्त्री-स्वातंत्र्य व स्त्रीशिक्षण यांचा पुरस्कार केला. परंतु ह्या उदात्त तत्वाकडे आपल्याकडील फारच थोड्या समाजसुधारकांचें लक्ष गेलेलें आहे. आपणास अन्य समाजाच्या प्रगतिपर स्त्रीशिक्षणाकडे लक्ष द्यावयास पाहिजे. ब्राह्मण बांधवांनी पुणे येथे सेवासदन व सोलापुरीं त्याची शाखा स्थापन केलेली आहे. गुरुवर्य कर्वे यांनी 'महाराष्ट्र महिला विद्यापीठ' स्थापिलें आहे. व तेथे पुष्कळ स्त्रिया पदवीधरहि झालेल्या आहेत. सोलापूर येथे १८९५ सालीं स्थापन झालेले सरस्वतीमंदिर प्रसिद्धच आहे. खुद्द सोलापूर येथील आपल्या वीरशैवसमाजांतील श्री. बसवाबाईवारद ह्या हें सरस्वती मंदिर अस्तित्वांत आणण्यांत बऱ्याच अंशीं कारणीभूत झालेल्या आहेत. त्यांना वीरशैवसमाजसुधारणेची फार कळकळ आहे. अशाच स्त्रिया ह्या खऱ्या आदर्श वीरशैव महिला.

असो! स्त्रीशिक्षणाचें महत्व, जरूरी, व तें कसें असावें व फक्त सुशिक्षित सुगृहिणी, सुमाता व सुभगिनी अशाच स्त्रिया कसे आदर्श वीरशैव महिला होऊं शकतात ह्याच्याविषयी वर विवेचन केलेंच आहे. शेवटीं जातांजातां एवढेंच सांगावयाचें कीं, अखिल भारतीय वीरशैव भगिनींनी श्री. बसवाबाई वारदांचा कित्ता गिरवावा व त्याचप्रमाणें वीरशैव बांधवांनीहि स्त्रीशिक्षणाकडे अवश्य लक्ष द्यावें. आतां लेखविस्तारहि बराच झालेला आहे तेव्हा येथेंच थांबणें बरें.

# वीरशैवांतील चळवळी

## धुळे येथील जाहीर सभा

धुळे येथे ता. १५ जानेवारीला तेथील तरुण वीरशैव-संघातर्फे वीरशैवांची जाहीर सभा श्री. शंकरआप्पा हवाप्पा कानडे, बी. ए., ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. तींत गुलबर्गा-आर्यसमाजाने चालविलेल्या आक्रमणाबद्दल आर्यसमाजाचा तीव्र निषेध करणारा ठराव श्री. बाळाआप्पा राधाप्पा पराळसांदे ह्यांनी आणला. श्री. दिगंबर रामाप्पा झाडबुके ह्यांनी अनुमोदन दिलें. तो सर्वानुमतें पास झाला. श्री. दगाप्पा त्र्यंबकआप्पा गोंधळे ह्यांनी ' आर्यसमाजांत गेलेल्यांना वीरशैवधर्मांत घ्यावें, व त्यांनी यावें, असा दुसरा ठराव आणला. त्यास श्री. काशीनाथ पाराप्पा डोंबरे ह्यांनी अनुमोदन दिलें, व तो पास झाला. गुरुवर्गांनीं आर्यसमाजाच्या आक्रमणाविरुद्ध जोराने प्रयत्न करावेत व जे प्रयत्न करणार नाहींत ते सहानुभूतीस पात्र नाहीत असें मानावें असा तिसरा ठराव श्री. शाहीर मुचाटे ह्यांनी अत्यंत जोरदार भाषेंत मांडला, व त्यास श्री. पंढरीनाथ रामाप्पा झाडबुके ह्यांनी अनुमोदन दिलें व पास झाला. ह्यानंतर श्री. मंजाप्पा हार्डीकर ह्यांनी जे आर्यसमाजाच्या आक्रमणाविरुद्ध प्रयत्न चालविले त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणारा व हे सर्व ठराव योग्य तिकडे पाठविण्याची व्यवस्था करण्याचा अध्यक्षास अधिकार देण्यारा असे दोन ठराव पास झाले. ह्यावर नागाप्पा रामाप्पा वाले, विश्वनाथ बाळाप्पा नगरकर, शाहीर मुचाटे, शंकरप्पा विठोबाप्पा खरवंडीकर, ह्यांचीं भाषणें झालीं. सदर सभेला गवळी, बुरुड, वगैरे सर्व जातींचा वीरशैवसमाज बराच मोठा हजर होता. [ बातमीदाराकडून ]

## बार्शीवृत्त

बार्शी येथे जगद्गुरु सिद्धलिंग शिवाचार्य शिवैक्य झाल्याची बातमी येतांच हरताळ पडला व औंधकर स्वामीच्या अध्यक्षतेखाली स्वामी परान्डकर, श्रीमंत कथले, श्री. जायगांवकर, वगैरेंचीं भाषणें झालीं. तेथील सर्व वीरशैव नागरिकांत शोकजनक वातावरण निर्माण झालें होतें.

## आर्यसमाजाचा निषेध.

गुलबुर्गा–आर्यसमाजाचा वीरशैवसमाजाकडून ठिकठिकाणी सभा भरवून निषेध होत आहे. दावणगीर, होसपेठ, इलकल, दुमकुया, हुनगुद, अथणी, सुलेपेठ, चितापूर, हाळकेरी, वगैरे ठिकाणीं वीरशैवांच्या प्रचड सभा भरल्या व भरत असल्याचें वीरशैवांच्या कानडी पत्रावरून निदर्शनास येतें.

## मंगळवेढेवृत्त

वीरशैव-तरुण-संघातर्फे सर्व स्त्री पुरुषांची जाहीर सभा ता. २१-१-३६ मंगळवार रोजीं श्री. आरुबा भिमदे मास्तर यांचे अध्यक्षतेखाली भरुन येथे श्री. प. ब्र. चन्नवीर शिवाचार्य होटगीपटाध्यक्ष यांचे नेतृत्वाखाली दीक्षासमारंभ घडवून आणण्याचें ठरलें. श्री १०८ जगद्गुरु सिद्धलिंग शिवाचार्य यांचे पुण्यसरणार्थ श्री. ज. सिद्धलींग शिवाचार्य वैदिक मंडळ पंढरपूरचे आचार्यभक्त धर्माभिमानी व धर्मज्ञ श्री. शंकरराव आदुले यांचे हस्तें स्थापन करण्यांत आलें. वरील दीक्षासमारंभ सदर मंडळातर्फे करण्याचें ठरलें आहे.

श्री सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामी जगद्गुरु संस्थान उज्जयनी हे पौष व॥ ४ रोज रविवारी शिवैक्य झाले अशी तार श्रयुत शंकरराव कटप पंढरपूर यांना येऊन त्यांनी आम्हास पत्रानें मंगळवेढे येथें कळविलें. सर्व वीरशैवांनी आपआपलीं दुकानें बंद केलीं. ता. १४।१।३६ रोजी सायंकाळी

७ वाजतां श्रीगुरु केदारय्या स्वामी यांचे मठांत सभा भरवली. सभेस वीरशैव बंधुभगिनी मंडळी व इतर वगैरे सर्व समुदाय बराच हजर होता. मयत श्रीयुत अरुबा होनाप्पा भिमदे मास्तर, राचाप्पा पट्टणशेटी, चुडाप्पा सिधाप्पा चिखले, सिद्राम शंकर मठपती, व बसापा रेवापा तटपटे, वगैरेनी शोकपर व महास्वामींचे गुणवर्णनपर भाषणें केल्यावर यांनी महास्वामी शिवैक्य जाहले त्यांचे दुःखाप्रीत्यर्थ ठराव जमलेल्या सर्व मंडळींनी उभे राहून पास केला. दुःख प्रदर्शित केल्यानंतर पंचाचार्यांच्या जयघोषांत सभा विसर्जन जाहली.

### पुण्यतिथी व अग्निकुंड

नांदगांव [ जि. चांदा C. P. ] येथील मठांतील श्रीमडवलय्या महाराजांचा पुण्यतिथीदिन व अग्निकुंड दरवर्षीप्रमाणें यंदाहि रथसप्तमी [ ता. ३०-१-३६ ] ला उत्साहयुक्त समारंभाने म. मु. विरय्या महाराज यांचे नेतृत्वाखाली पार पडला. समारंभास नागपूरचे म. मु. नानाजी पेंटय्या पल्लेकार, नागभीडचे श्री. तु. ना. काटकर आणि या भागांतील प्रमुख वीरशैवसमाज उपस्थित होता.

### वीरशैवसमाज व बादशहांचें निधन

ता० २३-१-३६ रोजीं सोलापूर-म्युनिसिपालिटीचे प्रेसिडेंट श्री० नागप्पा अण्णा आबदुलपूरकर यांचे अध्यक्षतेखालीं सोलापूर येथील वीरशैवसमाजाची 'परमपूज्य बादशहा पंचम जॉर्ज यांचे शोचनीय निधनाबद्दल' दुःखप्रदर्शनार्थ सभा भरली. दुखवट्याचा ठराव श्री. धुम्मा वकील यांनीं मांडला. त्यास श्री० काडादी व श्री० झुंजे वकील यांनीं अनुमोदन दिल्यावर सदहू ठराव सर्वांनीं उभे राहून पास केला. वरील सर्व वक्त्यांनी व अध्यक्षांनीं बादशहांच्या आंगीं असलेल्या सद्गुणांचें वर्णन केलें व त्यांच्या कारकीर्दीत मॉंटेग्यू-चेम्सफर्ड व व्हाइटपेपर-सुधारणा हिंदुस्थानास मिळाल्या व बादशहांनीं गेल्या नाताळांत नुक्तेंच हिंदुस्थानास संदेश पाठवून हिंदुस्थानबद्दल आपली कळकळ व प्रेम व्यक्त केलें, वगैरे बादशहांचे गुणगौरवपर भाषण केलें .सदहू ठराव अध्यक्षांनी योग्य आधिकाऱ्यांकडे पाठवावा म्हणून ही सभा अध्यक्षास आधिकार देत आहे असा दुसरा ठराव श्री० झुंजे वकील यांनीं मांडला. त्यास श्री. शिवलिंगप्पा माळगे यांनी अनुमोदन दिल्यावर सदर ठराव पास झाला.

---

# आमच्याविषयीं लोकमत

उमरावतीचे सुप्रसिद्ध मराठा-क्षत्रियांचे इतिहासकार व सुबोधग्रंथमालेचे संचालक— श्री. के. बी. देशमुख लिहितात कीं:—

'वीरशैव संजीवनी' च्या जानेवारी १९३६ च्या प्रथमांकाची प्रेमभेट पावली. आभारी आहे. सव्वीस वर्षांनंतर 'संजीवनी'-ला संजीवन देऊन पुनर्जन्म दिल्याबद्दल 'संजीवनी'-काराच्या जीवनवैशिष्ट्याचें साभिमान कौतुक केल्यावाचून राहवत नाही. मूठभर लिंगायतसमाजांत 'संजीवनी'-ची जीवनयात्रा किती काळ जीव धरूं शकेल याची अंक वाचण्यापूर्वी मला भारी शंका होती. पण 'संजीवनी' च्या नव्या अवतारांतील 'संजीवनी'-ची 'संजीवनीशक्ति' आणि 'वीरशैवांचा परिचयपट' या दोन हृदयस्पर्शी लेखांतील सजीव संजीवनी मंत्रांचा प्रशंसनीय उपक्रम वाचून माझ्या अंतःकरणांत लख्ख प्रकाश पडला. परिचयपटाच्या सुंदर योजनेला जर संघटनात्मक मूर्त स्वरू

प्राप्त झालें तर मूठभर वीरशैवसमाज मोटभर शैवेतर गबाळ हिंदूंना गुरुस्थानीं होईल. 'वीरशैवांतील चळवळी '-ची माहिती आदर्शवत् व अनुकरणीय आहे. नंदिकेश्वराच्या पट्टराणीनें तर सनातनीयांच्या पाषाणी हृदयाचें पाणी पाणी करून सोडलें. सारांश, या प्रथमांकाची सजावट सर्वांगसुंदर व उठावदार असून, संजीवनीकारास भूषणावह आहे. असें माझें प्रामाणिक मत आहे.'

**श्रीगुरु सिद्धय्या जंगम सिद्धगीर मठ,** उमरावती, लिहितात:—इंद्रजिताने शक्ति मारून लक्ष्मणास मूर्छित पाडले होते. 'वीरशैव संजीवनी' त्याचप्रमाणे कालाच्या ओघांत सांपडून मूर्छित पडली होती. पण मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश व मोगलाई-भागांतील वीरशैव पुढाऱ्यांनी 'उदय'-च्या संपादकांना आश्रय देण्याचें कबूल करून त्यांच्या कडून संजीवनीची मूर्छा घालविण्याचा व तिला पूर्ववत् जिवंत करण्याचा जो उद्योग केला तो प्रशसनीय आहे. आणि 'संजीवनी'-कारांनी अनेक सार्वजनिक कार्यांचा त्यांच्या अंगावर भार असतांहि 'वीरशैव संजीवनी'-चें पुनरुज्जीवन करण्याचें कार्य पत्करलें ह्याबद्दल त्यांनाहि धन्यवाद जितके द्यावेत तितके थोडेच आहेत. सर्व वीरशैव जागृत होऊन संजीवनीचें प्राशन करून चिरंजीव होतील अशी उमेद आहे.

## शरण संदेश

(अलमट्टीचें कानडी साप्ताहिक ता. २०-१-३६ च्या अंकांत लिहिते) 'वीरशैव संजीवनी' हें एक मराठी पाक्षिक पत्र असुन, तें उमरावती येथे महाराष्ट्रांतील प्रमुख राजकीय पुढारी व वीरशैवांचे प्रमुख नेते श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध होतें. श्री. बामणगांवकर हे मराठीचे सुप्रसिद्ध लेखक आहेत व 'उदय' अर्धसाप्ताहिक हें राष्ट्रीय धोरणाचें पत्र ते चालवीत आहेत. सव्वीस वर्षांपूर्वीच्या संजीवनीस त्यांनी पुन्हा जन्म दिला ह्याबद्दल ते व त्यांना प्रोत्साहन देणारे त्या भागांतील सर्व वीरशैव पुढारी अभिनंदनास पात्र आहेत. राष्ट्रीयत्व व समाजसुधारणा ह्या गोष्टी परस्पराविरुद्ध आहेत असें ह्मणतात. पण 'उदय'-द्वारें राष्ट्रीय व संजीवनीद्वारें समाज ह्यांची सांगड घालण्याचें कौशल्य ह्यांच्यांत असल्यामुळे ते दोन्हींची सांगड परस्परास पोषक अशा तऱ्हेने घालीत आहेत. ह्यांचे विचार प्रगतिपर असतात. गुरु व विरक्त असा माजलेला सध्याचा कलह ह्यांत सत्य दिसेल तेंच ते लिहितात, असा प्रथमांकावरूनच बोध होतो. संजीवनीच्या पुनर्जन्माने महाराष्ट्रांतील वीरशैवांत जागृति होवो व वीरशैव-मताचें खरें तत्वज्ञान प्रकट होण्यास मदत होवो अशी आमची इच्छा आहे.

## श्रीगुरु विरूपाक्ष स्वामी देशिकेंद्र महाराज

सं. लिंगायत धर्म ग्रंथ प्रसारक ऑफिस, लातूर, लिहितातः—'अंतर्गत कलहाने मृतकळा येत चाललेल्या वीरशैवसमाजास ज्ञान-संजीवनाने तेजस्वी बनविण्याचा पूर्ण संकल्प सिद्धीस नेण्याकरता अवतरलेल्या नूतन संजीवनीचा प्रथमांक पाहून फार संतोष झाला. उमामहेश्वर संजीवनीला दीर्घायु करो' ठरलेल्या ध्येयाप्रमाणें एकांगी धोरण न ठेवतां समाजास सुपथावर आणण्याचें कार्य नेटाने होईल अशी आशा आहे. महाराष्ट्र वीरशैवसमाजांत संजीवनीचा वडीलपणाचा [अग्रेसरत्वाचा] मान आहे. "सर्वत्र समदर्शिनः" या उच्च तत्वानुसार कार्य ईशकृपेने होईल अशी खात्री आहे.

**श्री. रामशंभुलिंग पुराणिक, दारव्हा** लिहितात कीं, 'संजीवनी'-चे दोन अंक पोचले. आपण 'संजीवनी'ला पुनरुज्जीवित करण्याचें बहुमोल धाडस केलेलें पाहून आनंदातिशयाने हृदय उचंबळूं लागलें. आपल्या 'संजीवनी'-ला जनताजनार्दनाच्या प्रेमळतेने दीर्घायुष्य लाभावें आणि उत्तरोत्तर तिच्या ऊर्जितावस्थेची कळकळीची काळजी समाजाने आपुलकीच्या भावनेने घ्यावी अशी वीरशैवसमाजबांधवांना आमची आग्रहाची विनंति आहे. समाजाकडून उदासीनपणें अवहेलना करण्याने आजवर किती नुकसान झालें, आणि किती वर्तमानपत्रांना जिवंत समाधि घ्यावी लागली, इकडे दृष्टि वळावेल्यास अत्यंत वाईट वाटतें. सदरहू लेखकालाहि या बाबतींत आम्ही वीरशैव पत्र सुरु केलें असतांना जो कटु अनुभव आला आणि ज्या योगें निरुपायाने आपल्या ध्येयापासून च्युत व्हावें लागलें तसला प्रसंग आता तरी आमच्या वीरशैवधर्माभिमान्यांनी संजीवनीवर येऊं देऊं नये अशी आग्रहाची सूचना पुन्हा एकदां करावीशी वाटते. तो जगच्चालक शिवप्रभु आमच्या या नूतन बालिकेला चिरायु करो.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती.

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात म्हणून वाटणावळीसह व परगांवच्या टपालखर्चासह म्हणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा, बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे. व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गत्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

अंक ५ वा ) ता० १ मार्च १९३६ ( वर्ष १ लें

## ❁ अनुक्रमणिका ❁



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडातील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून, वीरशैवांत सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., हे संपादक आहेत, ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखहि येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपालखर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापक.— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरुराचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापक.— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

: वीरशैव संजीवनी :

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति फाल्गुन शु॥ ९ शके १८५७ ( अंक ५ वा.

# वीरशैव धर्माचा संस्थापक कोण ?

श्रीयुत जिरगे ह्यांनी लिहिलेल्या पुस्तकांत बसवदेवच वीरशैव वा लिंगायतधर्माचा संस्थापक होय. बसवेश्वरापूर्वी वीरशैव हा शब्दसुद्धा नव्हता असा सिद्धान्त त्यांनी मोठें धाडस करून पुढे मांडला आहे. कारण बसवेश्वरापूर्वी वीरशैव मत होतें असें कोणींच प्रतिपादिलें नाही असेंहि ते ह्मणतात जिरगे ह्यांच्या ह्या विधानाचा विचार करण्यापूर्वी त्यांनी काय प्रतिपादन केलें व कसें प्रतिपादन केलें ह्याची माहिती आमच्या वाचकांना होणें जरूर आहे. ह्याकरिता प्रथम त्यांच्या ह्मणण्याचा सारांशच आपण विचारांत घेऊं. ' वीरशैवमताची ' मूलभूत तत्वें अष्टावरण, पंचाचार, व षट्स्थल, ह्याचा बसवेश्वरापूर्वी विचार केला आहे असा कोणी पुरुष, कोठे व कोणत्या तारखेस निर्माण झाला ह्याचा दाखला आजमितिपर्यंत सांपडत नाही. ज्यांचा उल्लेख केलेला सांपडतो ते फक्त ' शैव, लकुलिस शैव, पाशुपत शैव, व कालमुख शैव हेच होत ' असें जिरगे ह्यांचें ह्मणणें. ' बसवेश्वरापूर्वी शैवांचे कांही मठ होते. आणि त्यांत लकुलिस शैव होते. पण त्यांत एकहि वीरशैवमठ नव्हता ' असें ह्मणून जिरगे मोकळे झाले.

ह्यावर आक्षेप घेतां येऊं नये ह्मणून जिरगे ह्मणतात कीं, ' बसवकालीन इतिहासाचें परिशीलन केलें तर पंचाचार्य म्हणविणारांतील रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, पंडिताराध्य, एकोराम, आणि विश्वाराध्य ह्यांपैकीं कांही बसवेश्वरकालीन होते व हे पूर्वी कालमुख वा इतर शैव होते. पण बसवकालांत ते वीरशैवगुरु झाले आणि त्यांच्या मठांच्या स्थापना तर बसवानंतर झाल्या '.

आधारावाचून विधान जाऊं नये एतदर्थ हंपय्या हरिश्वर ह्यांनी इ. स. ११६५ मध्ये लिहिलेल्या रेवणसिद्ध काव्याचा त्यांनीं आधार दिला आहे व त्यांत रेवणसिद्ध हा प्रथम लकुलिस शैव होता असें झटल्याचें सांगितलें आहे. हंपय्या हरिसर्वे ह्यांचें काव्य हें ११६५ मधले असलें, तरी तें कानडींतून आहे ही गोष्ट येथे लक्षांत ठेवली पाहिजे आणि ११६०-६५ इ. स. हाच बसवेश्वराच्या कर्तृत्वाचा ऐतिहासिक दृष्टया खरा काल होय. ह्याचप्रमाणें एकोराम हा प्रथम शैव होता व नंतर वीरशैव झाला ही गोष्ट १६५० इ. स. मध्ये हरदनहल्लीनंजनाचार्य ह्यांनी लिहिलेल्या एकोरामपुराणावरून सिद्ध होते असें जिरगे ह्यांनी मोठ्या डौलांत सांगेतलें आहे ॲ. पावटे ह्यां यात्रमाणें बसवेश्वर हा आदिभक्त होता असें गृहीत धरून बसवदेवावर केवढीहि स्तुतिसुमनें जिरगे ह्यांनी अर्पण केलीं असतीं तरी आह्मीं तिला नांव ठेवलें नसतें. कारण तो भक्तीचा प्रश्न होता. भक्ति वा श्रद्धा आंधळी असते. तिच्याकडे चिकित्सक वा तर्ककर्कशबुद्धीने पाहणें योग्य नव्हे हें आह्मास समजतें.

पण जिरगे हे ऐतिहासिक विवेचन करावयास बसले आहेत. ह्याकरिता हंपय्याचे रेवणसिद्धपुरण ११६५ मध्ये लिहिलें गेलें व हरदनहळ्ळीचे एकोराम पुराण १६५० इ. स. लिहिलें आहे ह्याला आधार काय? सनाची खूण बरोबर पटेल असे आधार त्या पुराणांत आहेत काय? आणि कानडीमधील जुन्या काव्यग्रंथांत वा पुराणांत असे आधार घालून लिहिण्याची प्रथा होती काय हेंहि समजावयास मार्ग नाही इतकी सुगम प्रथा जर कानडींतून उपलब्ध असती तर बसवेश्वराचा काळ अमुक इसवीसनापासून तों अमुक इसवी सनापर्यंत अशा अशा क्रमांत गेला हें त्यांनी ह्या छोट्या पुस्तकांत स्पष्ट करावयाला पाहिजे होतें. कारण बसवकाळीं व बसवानंतरहि बसवदेवावर स्तुतिसुमनें ओवाळणारे अनेक कवि, शरण, व लेखक झालेले आहेत. त्यांच्या लिखाणांतून बसवेश्वरचरित्राची तारीखवार नसली तरी वर्षवार जंत्री देतां येणें सोपें झालें असतें. पण आजहि दुर्दैव हें कीं, बिज्जलराजाशीं मंत्री ह्मणून जर बसवेश्वराचा संबंध आला नसता तर बाराव्या शतकांत कां होईना पण बसवेश्वर ही एक विभूति होऊन गेली हें निश्चितपणें ह्मणतां आलें नसतें. बसवेश्वरविषयक कानडी वाङ्मयावरून बसवेश्वराची वर्षवार जंत्री जेथे अद्यापि तयार करण्यांत येत नाही तेथे बसवसमकालीन पुरुषांचेच सन कसे सांपडतात? अर्थात् जिरगे येथे इतिहास लिहावयास बसले नव्हते हेंच उघड होतें. जो इतिहासाच्या दृष्टीने बोलतो तो पुराणांतील लेचापेच्या आधाराने बोलत नाही. ज्याप्रमाणे अठरा मतांच्या अठरा पुराणाला एकच एक व्यास कर्ता होता हें मानणें जसें वेडेपणाचें, तद्वतच रेवणसिद्ध वा एकोराम हे मागाहून वीरशैव झाले असें पुराणकथेवरून खरें मानणें हें वेडेपणाचें आहे.

शिवाय एकोराम हा रामनाथलिंगाचा उपासक. तो शुद्ध शैव समजून ही उपासना करीत असे. तेथे कैलासांतून शंखकर्ण गणाधीश्वर आले त्यांनी वीरशैवमताचा एकोरामास उपदेश केला. तेव्हापासून वीरशैवदीक्षा मिळावी अशी तळमळ त्यास लागली, व ती दीक्षा त्यास सुदनूरमंदिरांत व रामेश्वर लिंगापासून मिळाली.' हेंहि कांही उतारे देऊन जिरगे ह्यांनी स्पष्ट केलें. ह्या उताऱ्यापासून काय बोध होतो तें आतां आपण पाहूं? एकोराम हा बसवपूर्व असो, बसवसमकालीन असो, वा बसवानंतरचा असो; पण वीरशैवदीक्षा त्यास बसवापासून मिळाली नाही. त्याची स्फूर्तिदेवता व स्फूर्तिस्थान निरालेंच आहे. अशा स्थितींत त्याच पुस्तकांत वीरशैवमत प्रथम एकट्या बसवेश्वरासच स्फुरलें असें विधान करणें अत्यंत चुकीचें आहे. तद्वतच रेवणसिद्ध, पंडिताराध्य, एकोराम व मरुलसिद्ध बसवेश्वराच्या

शिवानुभव मंडपांत गेले, तेथे जंगमत्वाचा स्वीकार केला व अल्लमप्रभूंनी त्यांना कांही समाधीचें ज्ञान करून दिलें असें जे इ. स. १६०० मधील संगमबसवेश्वर वचनाधारें दाखविलें आहे हयालाहि कांही अर्थ नाही. बसवेश्वराच्या शिवानुभव मंडपांत ते गेले असतील; पण हयाला ऐतिहासिक आधार सन १६०० मधील संगमबसवेश्वरवचनें देणें ह्मणजे इतिहास लिहिणें नव्हे ? बसवेश्वर निराळा व संगमबसवेश्वर कोणी निराळा काय? प्रत्येक बसववचन हें कुडल संगमदेवास अनुलक्षून आहे तेव्हां बिज्जल मंत्री बसवेश्वर निराळा व वचनकार संगमबसवेश्वर निराळा काय ? हे दोघेहि एकच असतील तर ह्यांत पांचशें वर्षांचें अंतर कोठून आलें ? का बाराव्या शतकांतील बसवेश्वरच वचनें लिहून ठेवण्याकरिता संगम बसवेश्वर हें नांव घेऊन सोळाव्या शतकाच्या अखेरीला अवतरला ? श्री. जिरगे हे इतिहास लिहावयास बसले कीं निर्बुद्धांना भाकडकथा सांगावयास बसले हें कळत नाही.

पुढे १६९८ इ. स.मध्ये संपदनय्या ह्यांनी लिहिलेल्या चतुराचार्यपुराणांत अल्लमाकडून रेवणसिद्धास वीरशैवोपदेश झाला म्हणून लिहिलें असल्याचा दाखला दिला आहे. अर्थात् बसवानंतर व रेवणसिद्धानंतर ५०० वर्षांनी लिहिलेल्या ग्रंथांतीलच हा आधार सदर ग्रंथकाराने बसवमहात्म्य वाढविण्याकरिता कल्पनेच्या भरांत रेवणसिद्ध व अल्लम यांचा संबध जोडला नसेल कशावरून ? कारण अनेक पुराणकारांनी आपल्या दैवतांचें महत्व वाढावें ह्मणून अनेक पुराणांत अनेक कल्पनिक गोष्टी घुसडल्या आहेत. त्यांतून १७ व्या शतकांतील हा पुराणकारच कसा सुटला असेल ? हा पुराणकार त्यांतून सुटला नाही हें स्पष्ट व्हावें ह्मणूनच कीं काय श्री. जिरगे हयांनी निजाम इलाख्यांतील सिरीबाला येथील सिद्धलिंगेश्वर देवळांतील ११८७ मधील एका शिलालेखांतील श्लोक उद्धृत करून दिले आहेत. हेतु हा कीं, रेवणसिद्ध हा बसवेश्वरानंतर वीस वर्षेपर्यंत जगला होता हें सिद्ध व्हावें. पण बसवेश्वर कोठून कोठपर्यंत जगला ह्याबद्दल एक वाक्यहि पुस्तकांत लिहिलें नाही. फिलिच ब्राऊन ह्यांचा 'कर्नाटक अॅनालॉजी' हा ग्रंथ जिरगे ह्यांच्या अवलोकनांत गेला नसेल असें आम्हाला म्हणतां येत नाही. पण ह्यांत पान ४१ वर 'बसवेश्वर हा वीरशैवधर्माचा संस्थापक [ Founder ] होता असें इ. स. ११६० पूर्वी कोठेंहि नमूद नाही' असें जें वाक्य आहे त्यावरून इ. स. ११६० चा सुमार हाच बसवेश्वरप्रसिद्धीचा काळ होय. सन ११८७ मधील सिद्धलिंगेश्वर देवळावरील शिलालेख हा रेवणसिद्धाच्या काळाचीच साक्ष देणारा असला, तरी रेवणसिद्धाच्या समाधीपूर्वी हा लेख लिहिला कीं नंतर असा एक प्रश्न येथे उत्पन्न होतो. कारण ह्या शिलालेखांत रेवणसिद्धचरित्रपर जे श्लोक आहेत त्यांवरून त्याची स्मृति ह्मणूनच हा शिलालेख लिहिला असावा. ह्मणजे सन ११६० मध्ये बसव समाधिस्थ झाले असले तर रेवणसिद्ध ११८० मध्यें समाधिस्थ झाले असावेत. आणि त्यानंतर सात वर्षांनी हा लेख लिहिला असावा. त्याशिवाय रेवणसिद्ध बसवेश्वरानंतर वीस वर्षे होते ह्या विधानाची संगति लागत नाही. पण ह्या शिलालेखांतील सहा श्लोकांत जो रेवणसिद्धप्रताप वर्णन केला आहे त्यांतील एकाहि वाक्यांत बसवेश्वर, वीरशैव, व अल्लमप्रभु असा शब्द नाही. तेव्हा ह्यापैकी एकाचेंहि अस्तित्व नव्हतें असें मानावें काय ? का ह्या कालानंतर ५०० वर्षांनीच कोणी बसवेश्वर, कोणी अल्लम व कोणी रेवणसिद्ध उत्पन्न झाले ? कारण ह्या सर्वांचा संबंध पांचशे वर्षांनंतरच आलेला आहे असें वर्णन पुराणांत सांपडतें. व त्याच्याच आधारावर श्री. जिरगे ह्यांनी आपलें पुस्तक लिहिलें. अशा कुचक्या आधारावर ऐतिहासिक सत्य प्रतिपादन करतों असें ह्मणणें गौण आहे.

रेवणसिद्धाच्या चमत्काराविषयीं सन ११८७ मधील ज्या शिलालेखाचा आधार दिला त्यावरून रेवणसिद्ध हा वीरशैवधर्मप्रवर्तक होता हें जसें ह्मणतां येणार नाही तद्वतच- त्यांनी पुढे तरी वीरशैवधर्म स्वीकारला असेंहि ह्मणतां येत नाही. रेवणसिद्धास जी सिद्धी प्राप्त झाली होती ती कोणत्या धर्मामुळे ? श्री. जिरगे ह्मणतील लकुलिस शैवधर्मामुळे. परंतु लकुलिस शैव, कालमुख शैव, आराध्य शैव, आदि शैव, ह्या सर्वांचीं लक्षणें काय होतीं ह्याचा विचार करणें अवश्य होतें. तो विचार करून वीरशैवांच्या विशेषाचा विचार झाला असता तर जिरगे ह्यांच्या प्रतिपादनास अधिक जोर चढला असता. अशा स्थितींत रेवणसिद्ध हा मूळचा वीरशैव नव्हेच हें ह्मणणें लटकें वाटणेंच स्वाभाविक आहे. कारण " पंचाचार्य म्हणविणारे वीरशैवधर्माचे आचार्य हे बसवकाळीं नव्हते आणि बसव व तत्कालीन शरण ह्यांनी एकाचाहि उल्लेख केला नाही ' असें श्री. जिरगे ह्यांचें ह्मणणें. कारण रेणुकादि चार वा पांच आचार्य जरी बसवकाळीं असले तरी ते शैव होते. पुढे ते वीरशैव झाले म्हणून त्यांचा शेवटी शेवटी उल्लेख होऊं लागला आणि नंतरच त्यांना आचार्यपद प्राप्त झालें ' असें जे जिरगे म्हणतात तें कशाकरितां ? तर बसवेश्वर हेच वीरशैवधर्माचे मूळ प्रवर्तक होत हें सिद्ध करण्याकरितां. ' वेद, आगम उपनिषदें वगैरे कोणत्याहि ग्रंथाशीं संबंध न ठेवतां अगदी स्वतंत्रपणें बसवेश्वराने हा वीरशैवधर्म स्थापन केला. त्याकरिता पहिले वीरशैवधर्मपाठ अल्लम प्रभूचे बसवेश्वराने स्थापन केले व नंतर बाळेहाळ्ळी बदरीकेदार वगैरे पीठें स्थापन झालीं असें त्यांनी ऐतिहासिक सत्यकथन करण्याचें धैर्य दाखविलें आणि ह्याला आधार बसवेश्वरानंतर दोनशे पासून ते पांचशे वर्षांनी उशीरा लिहिलेल्या काव्यांचे व पुराणांचे दिले आहेत. अर्थात् ऐतिहासिक दृष्ट्या ह्या आधारांचा विचार करितां त्यांतील बराच भाग प्रक्षिप्त व काल्पनिक असावयाला पाहिजे. ह्याकरिता डॉ. नंदीमठांनीं ' सुदर्शन ' मध्ये काय लिहिलें ? श्री. चिं. वि. वैद्य हे काय म्हणतात, व जे एन्. फरकुहर काय लिहितात, इकडे आम्हाला पाहण्याची गरज नाही. त्याचप्रमाणे कोणता वीरशैवमठ कोणत्या शतकांत कोणीं स्थापन केला ह्याहि ऐतिहासिक सत्यासत्यांत फिरकण्याची जरूरी वाटत नाही. श्री. जिरगे ह्यांच्या सर्व आधाराचा पाया इतका ठिसूळ आहे कीं, तें ऐतिहासिक व तर्कशुद्ध लिखाण आहे असें ह्मणण्याचें धाडस आमच्याने होत नाही.

बसवेश्वर हे आदि व अनादि भक्त आहेत हें आम्हाला मान्य आहे. परंतु वीरशैवधर्माचा पहिला उपदेश त्यांच्याच मुखांतून निघाला हें आम्हास मान्य नाही. त्याचप्रमाणें वीरशैवमठ बसवानंतरच स्थापन झाले व तत्पूर्वी नव्हतेच हें ऐतिहासिक सत्यहि आम्हास पटत नाही. इष्टलिंगधारणा हा वीरशैवांचा पहिला प्राण. गुरुलिंग, जंगमादि अष्टावरण पंचाचार, व षट्स्थल ही त्यांची लक्षणें खरीं, पण तीं प्रथम बसवेश्वरांनीच सांगितलीं एवढेंच ह्यांतलें सत्य नव्हे. खुद्द बसववचनेंच आम्हाला ह्याकरिता आधारभूत दिसतात. बसवेश्वरांनी लिहिलेलीं वचनें कुडलसंगमदेवास अनुलक्षून लिहिलीं आहेत. बसवकालीं कुडल संगम देव ही एक महान् तपस्वी अशी प्रत्यक्ष देहधारी जंगम विभूति होती कीं देवालयांतील ह्या नांवाचें तें एक शिवलिंग होय ह्याचा स्पष्ट बोध करून देणारें वाङ्मय अद्यापि आमच्यासमोर नाही. पण जिरगे हे हंपच्या हरिश्वरकृत: बसवराजदेव काव्याधारें सांगतात कीं, वयाच्या सोळाव्या वर्षीं बसवेश्वराने आईबापांशीं भांडून जानव्याचा त्याग केला आणि संगमेश्वराच्या भक्तिप्रीत्यर्थ तेथे गेला. तेथे एका रात्रीं झोपला असतां त्याला स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत देहधारी संगमाने असें सांगितलें कीं, येथील नंदीच्या मुखांतून उद्या सकाळीं लिंग

येईल तें नित्य धारण कर. दुसरे दिवशीं तसेंच झालें व बसवेश्वराने तें लिंग धारण केलें. ज्या हंपय्या हरिश्वर कवीने हें काव्य लिहिलें तो बसवकाळीं होता: असें जिरगे मानतात. व ते वरील स्वप्नाचा असा: अर्थ करतात कीं, संगमदेवास साक्षी ठेवून बसवेश्वराने स्वयंस्फूर्तीने लिंग बांधलें. म्हणून इष्टलिंगधारणेचा पहिला प्रवर्तक बसवेश्वरच होय असें जिरगे: ह्यांचें ह्मणणें आणि ह्याप्रमाणेच बसवाने पहिलें लिंग अनिमसय्यास दिलें व त्याने ते अल्लमप्रभूस दिलें. म्हणून बसवेश्वर हाच स्वयंस्फूर्त गुरु व हाच स्वयंस्फूर्त भक्त असें जिरगे ह्यांचें प्रतिपादन. हें प्रतिपादन ज्या वरील गोष्टीच्या आधारें त्यांनी केलें त्यांत संगमदेव हे देवळांतील एक शिवलिंग होय हाच बोध ह्यांतून स्पष्ट होतो. ह्यावरून बसवेश्वर प्रथम स्थावरशिवपूजक झाला व नंतर तो लिंगधारणा करूं लागला. ह्यावरून स्थावर शिवपूजक शैवच वीरशैवांच्या लिंगधारणेची प्रेरक शक्ति होय असें जर शैवाने ह्मटलें तर त्याला जिरगे काय उत्तर देतील ? परंतु लिंगमुद्रा धारण करणें, वा लिंग शरीरावर बांधणें, हा सांप्रदाय बाराव्या शतकांतच नव्हता तर इसवी सनापूर्वी शंभर-दीडशें वर्षें अगोदर होता अशीं वर्णनें Budhist of India वगैरे ग्रंथांत सांपडतात. आणि म्हैसूर शिलालेख व कर्नाटक ॲनॉलॅजी वगैरे पुस्तकांतहि शरीरावर लिंगधारणा करणारे राजे होते हें स्पष्ट होतें. शैव जेव्हा ज्ञानी होऊं लागला व तो शिवलिंगाच्या ठिकाणींच जेव्हा परब्रह्माची कल्पना करूं लागला तेव्हापासून लिंगमुद्रा व शरीरावर लिंगधारणा प्रचारांत येऊन ह्या शिवरूप परब्रम्हाची उपासना सुरूं झाली. गुरु, लिंग व जंगम हे शब्द प्रचारांत आले. अष्टावर्ण, पंचाचार व षट्स्थलज्ञान ह्याची आवश्यकता रूढ झाली. बसववचनांत जंगम शब्द अनेकदा आला आहे. जंगम कसा असावा, त्याची निंदा कां करूं नये, वगैरेचा बसववचनांत उल्लेख आहे. हे जंगम लिंगधारी होते ह्मणूनच लिंग व जंगम हे एक असून हेच अग्निमुख होय व हा अग्नि अन्नदानाने शांत करणें हाच यज्ञ होय इत्यादि विचार खुद्द बसववचनांतूनच बाहेर पडले आहेत. ह्यावरून खुद्द बसवकालांतच व तत्पूर्वी जंगम होते हें स्पष्ट होतें. बसवेश्वराने स्वयंस्फूर्तीने जरी लिंगधारणा केली असली तरी त्या स्फूर्तीस प्रत्यक्षाचा कांही आधार असतोच. ह्मणून लिंगधारणा बसवेश्वरकाळीं होती व तत्पूर्वींहि होती.

त्याचप्रमाणे बसववचनांत षट्स्थळज्ञानाच्या व अष्टावरणाच्या पायऱ्या कोठेहि वर्णन केलेल्या आढळत नाहीत. पण हें सर्व ज्ञान बसवेश्वराच्या ठिकाणी होतें एवढें वर्णन आहे. अर्थात् बसव आपल्या भक्तिबलाने अष्टावर्ण व षट्स्थळ ह्यांचा अधिकारी झाला हें सत्य: आह्मासहि मान्य आहे. पण एवढ्यावरून अष्टावर्ण व षट्स्थळ ह्यांचा जनक बसवेश्वर होय हें आह्मास पटत नाही. पण बसवपूर्वी वीरशैवधर्म होता; तो कसा होता व त्याचाच अनुवाद तंतोतंत बसवेश्वराने कसा केला हेंच ऐतिहासिक दृष्टया ह्या लेखमालेंत आह्मी दाखविणार आहोंत. इतकेंच नव्हे तर वैदिकधर्मास अनुसरूनच त्यांनी वीरशैवमताचें प्रतिपादन केलें ह्याचेंहि विवेचन त्यांत येईल. जिरगे ह्यांनी बसवेश्वराच्या मतप्रतिपादनांत अवैदिकत्व आहे असें दाखविलें आहे. पण तें चूक आहे. वैदिक धर्म कसा परिणत झाला हें जर जिरगे ह्यांना कळलें असतें तर बसवेश्वराच्या हरएक वचनांत वैदिकत्व भरलें आहे असें त्यांना आढळलें असतें. बसवेश्वर हा वीरशैवधर्माचा संस्थापक नव्हे तर वीरशैव तत्वज्ञानाचा बाराव्या शतकांत स्वीकार करून वैदिक धर्माच्या उदात्तत्वाचा प्रसारक व खरा सुधारक. वैदिक मताला आज जिवंत करावें असें ज्यांना ज्यांना वाटत असेल त्या सर्व हिंदूंनी बाराव्या शतकांतील हा पुरुष आपल्या गुरुस्थानीं मानला पाहिजे अशा योग्यतेचा होऊन गेला हेंच आह्माला ह्या लेखमालेंत सिद्ध करावयाचें आहे.

---

# वीरशैवांतील चळवळी

## उदगीरचा वीरशैवसमाज

सदर समाजाला बाहेरगांवाहून खालीलप्रमाणे देणग्या मिळाल्या असें चिटणीसाकडून जाहीर होंत आहे. ५१ रु. वीर भगवंतराव पाटील; ५१ रु. भीमरावजो पाटील; ३१ रु. संगप्पा स्वामी; ११ रु. शंकरआप्पा स्वामी; ७ रु. लिंगप्पा शेटे; १५ रु. विश्वनाथ स्वामी; ५ रु. शिवलिंगप्पा गिरके; ५ रु. रामलिंग आप्पा; करजकर; ५ रु. संगप्पा गीरके; ५ रु. संगप्पा देगांवकर; ५ रु. एकनाथ आप्पा शेटे; ५ रु. गुरुनाथ पाटील; २ रु. हुनप्पा स्वामी हुंडेकार; २ रु. विश्वनाथ डुकरे. हे सर्व राहणार चाकूर.

## यवतमाळ येथे कोंडेश्वरमहाराज

चांदा जिल्ह्यांतील धावा मुक्कामचे सुप्रसिद्ध साधुवंत स्वामी गुरुवर्य माहेश्वर कोंडिश्वर महाराज हे यवतमाळ येथे रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांच्या निमंत्रणावरून ता. २० जानेवारीला आले होते. महादेवआप्पा जुननकार ह्यांनी स्वामींची मिरवणूक काढून स्वागत केलें व त्यांना रावसाहेब देशमुख ह्यांचे बंगल्यावर पोहोचविलें. ह्या प्रसंगीं आसपासची शेकडो वीरशैव मंडळी स्वामींच्या दर्शनास आली होती. स्वामींचें वय १०० वर्षांचें आहे. यवतमाळकर वीरशैव मंडळींना स्वामींच्या दर्शनाने फार आनंद झाला.

## मोमिनाबादचे झाडे ह्यांचें निधन

मोमिनाबाद येथील वीरशैवबालसमाजाचे आधारस्तंभ व बीड वीरशैव युवक परिषदेचे सेक्रेटरी श्री. शंकरआप्पा झाडे ह्या तरुण व उत्साही समाजकार्यकर्त्यांस अकालीं कालाने गाडले म्हणून सर्वत्र दुःख व्यक्त करण्यात येत आहे. श्रीयुत झाडे हे वीरशैवबालसमाजाचे सतत तीन वर्षेपर्यंत सेक्रेटरी होते. त्यांच्या परिश्रमाने त्या भागांतील वीरशैवसमाजांत बरीच जागृति झाली होती. त्यांच्या मृत्यूची बातमी ऐकून लातूर व परळी येथील वीरशैवबाल-समाजाकडून दुखवट्याचे सन्देश आले. श्री. सी. एल्. हिरेमठ, बी. ए., एल् एल्. बी., श्री.उमाशंकरप्पा संकामे, बी.ए.,हैद्राबाद, त्यांनीहि संदेश पाठवून दुःख व्यक्त केलें आहे. त्यांच्या स्मशानयात्रेला मोमिनाबादची सर्व लहानथोर मंडळी हजर होती. लातूरच्या बालसमाजाने तर उपवासच केला होता. मोमिनाबाद-बालसमाजाची श्री. व्ही. एम्. शेटे वकील ह्यांच्या अध्यक्षते-खाली वीरशैवांची जाहीर सभा भरून दुखवट्याचा ठराव पास झाला व ह्या प्रसंगीं श्री. नागनाथ एसके, विश्वनाथप्पा दामा, त्र्यंबक आप्पा वाघमारे, नागनाथ आप्पा दामा, वगैरेंचीं हृदयस्पर्शी भाषणें होऊन दुखवट्याचा ठराव झाडे ह्यांच्या कुटुंबाकडे पाठविण्याचा अधिकार देण्यांत आला. पार्वतीपरमेश्वर मृतात्म्यास शांति देवो.

## उज्जयनीमठाचे महास्वामी

उज्जयनीपीठाचे जगद्गुरु महास्वामी श्री. सिद्धलिंगशिवाचार्य ह्यांची एकाएकी इहलोकींची यात्रा संपतांच ता. २६ जानेवारीला मोठ्या समारंभाने सिद्धपूरमठाच्या त्रिलोचन महास्वामीला उज्जयनीसिंहासनाचे अधिकार देण्याचा विधी पार पडला. ह्याकरिता होटगीपट्टाधिकारी, परान्डकरस्वामी, सदानंद बुवा करवे, बाळाबुवा कवाडी, सौ. भागीरथीबाई कादप, वगैरे महाराष्ट्रांतील वीरशैव मंडळी हजर होती. हे नवे महास्वामी गतमहास्वामींचा लौकीक संभाळतील अशी आह्माला आशा आहे. प्रत्येक

मनुष्याला जन्म आहे व तो कोणा तरी जातींत जन्माला येतोच हें जरीं खरें, तरी जन्मतःच ह्याच्यावर संस्कार नसतात. ते संस्कार करावे लागतात. व ह्या संस्कारानें मनुष्याला श्रेष्ठत्व येते हा वीरशैवांच्या आचार्यांचा सिद्धान्त आहे. ह्या सिद्धान्ताला अनुसरून जन्मजातीच्या उद्धाराचा प्रसार नव्या महाराजांनी करावा व सर्व वीरशैवांत समानता प्रस्थापित करण्याचा उद्योग करावा अशी आमची त्यांना प्रार्थना आहे. तर्कशुद्ध विद्वत्ता आंगीं नसल्यास ती मागाहून आंगीं आणणें हा कांही दोष नव्हे हें लक्षांत ठेवूनहि वागण्यास कसूर करूं नये. तद्वतच सोलापूरच्या वारदपाठशाळेला पांच हजारापैकीं साडेतीन हजार गत स्वामींनीच दिले आहेत. राहिलेले नवीन स्वामींनी देऊन उज्जयनीसिंहासनाला सत्यवचनी ठरविणें ही जबाबदारीहि नव्या महास्वामींवर आहे. स्त्रियांनी कासोटा घालावा असा जुन्या महास्वामींचा उपदेश होता. त्याप्रमाणे सुधारणा करावयास व तसा बोध करावयास नव्या स्वामींनी भिऊं नये. तद्वतच गुरु-भक्तवादाचा श्रीमुखांतून चुकूनहि उल्लेख येऊं नये. मी भक्तांचा व सर्व भक्त माझे अशी उदार मताचीच घोषणा श्रीमुखांतून सदासर्वदा होणें हेंच उचित्. पुष्कळदा सिंहासन प्राप्त करून घेणें सोपें असतें व होतें, पण त्याचा दर्जा संभाळणें हेंच कठिण असतें. हें कठीण कार्य नवे महास्वामी तत्परतेने करतील अशी आह्मी उमेद बाळगतों. आचार्यपीठाचे व विरक्तपीठाचे अधिकारी कोणीं व्हावें ह्याबद्दल सर्व वीरशैवसमाजाने सद्यःस्थिति लक्षांत घेऊन कांही नियम केले पाहिजेत. व त्याकरिता चळवळीहि केली पाहिजे. ह्याविषयी आम्ही आपलीं मतें लवकरच जाहीर करूं.

## मुरघाराजेंद्र महास्वामींचा संचार

चित्रकलदुर्गाचे श्रीमन्महाराजं निरंजन जगद्गुरु मुरघाराजेंद्र महास्वामी हे संचारार्थ निघाले आहेत. दावणगिरीचे श्रीमंत राचप्पा ह्यांनीं वीरशैववसतीगृहाची कोनशिला बसविण्याचा समारंभ त्यांचे हस्तें मोठ्या थाटानें झाला. व्यापाऱ्यांतर्फे मानपत्रहि दिलें. तरुणसंघाच्या वाचनालयाचें उद्घाटनहि महास्वामींचें हस्तें झालें. नंतर श्री. एच. एम्. सिद्धरामप्पा ह्यांनी वाचून दाखविलेलें मानपत्र समर्पण झालें. सदर महास्वामींनी अनेक संस्थांस देणग्या देऊन लोकोपयोगी संस्थांना उत्तेजन दिल्याचा इतिहास मानपत्रांत उल्लेखिला आहे. कोणत्याहि महास्वामींना वा जगद्गुरूंना हें उदाहरण अनुकरणीय नाही काय ?

## वीरशैव अनाथ बालकाश्रम

गुलबर्गा येथे मार्गशीर्ष शु० प्रतिपदेला अनाथ बालकें, विधवा स्त्रिया, ह्यांना उपयुक्त शिक्षण देऊन त्यांना स्वावलंबी बनविण्याच्या उद्देशाने वीरशैव अनाथ बालकाश्रम स्थापन करण्यांत आला. अध्यक्ष श्रीमंत बसण्णपा हालप्पा असून, मुख्य कार्यवाह श्री. नुरंदय्या स्वामी मिरगी हे आहेत. स्तुत्य उद्योग. प्रयत्न यशस्वी होवो.

## अहमदनगर जिल्हा-तरुण संघ

अहमदनगर वीरशैव तरुणसंघाचें रूपांतर अहमदनगर जिल्हा संघात करण्यांत येऊन, संघाला नवे नियम केले आहेत. आणि कार्यक्रमहि आखला आहे.

## श्री सिद्धरामेश्वर महास्वामींचें शिवैक्य

वटंमूरी [ जि. बेळगांव ] पट्टाधिकारी व हागडवाडी महापीठाचे अधिकारी शून्यसिंहासनाधीश श्रीमन्निरंजन सिद्धरामेश्वर स्वामी ता. ४-२-३६ रोजीं समाधिस्थ झाले. ह्यांच्या कारकिर्दीत मोडकळीस आलेलें पीठ उर्जितावस्थेला आलें व त्यांनी वीरशैवसंघटना करून सर्व समभावाने वागतील असे प्रयत्न केले.

## अक्कलकोटचा वीरशैव महिलासमाज.

अक्कलकोट वीरशैव महिला समाजाच्या विद्यमानें सौ. शांताबाई भिमपुरे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन शाळेंतील मुलींनी केलेलीं

निरनिराळीं कामें पाहून संतोष व्यक्त करण्यांत आला. ह्या प्रसंगीं सौ. गंगुबाई पटणे, हेडमिस्ट्रेस, व सौ. बसवलिंगव्वा जंगम, ह्यांचीं उचित व उत्साहवर्धक अशीं उपदेशपर भाषणें झालीं.

### दारव्हा तालुका वीरशैव परिषद्.

यवतमाळ जिल्ह्यांतील दारव्हा तालुक्यांत तळेगांव येथे उज्जयनीशाखेचा मठ आहे. त्या मठाचे अधिपति कोंडलिंग स्वामी हे मोठे सत्पुरुष होऊन गेले. त्यांच्या पुण्यतिथी-प्रीत्यर्थ वीरशैव व वीरशैवेतर असे हजारो लोक जमत असतात. त्याप्रमाणे ता. १६ फेब्रुवारीला ही पुण्यतिथी मोठ्या उत्साहाने साजरी झाली. शेकडो वीरशैव तेथे जमले होते. अवांतर समाजहि तेथे होता. पुण्यतिथीप्रीत्यर्थ उमरावतीचे ह. भ. प. दादामहाराज नागपूरकर ह्यांचें कीर्तन झालें. रुद्राभिषेक, महानैवेद्य, व काला, वगैरे झाल्यावर दादामहाराज ह्यांचे अध्यक्षतेखालीं दारव्हा तालुक्याची वीरशैव परिषद् झाली. तींत पांच ठराव सर्वानुमतें मंजूर झाले. (१) समाजोन्नति होण्यास नव्यांना लिंगधारणा करण्याचा उपक्रम धर्मगुरुंनी करावा. (२) दीक्षेचा संस्कार प्रचारांत आणून धर्मगुरुंनी दीक्षा द्यावी. [३] वीरशैवेतराशीं फक्त रोटीबेटीव्यवहार करूं नये. (४) अस्पृश्य बंधूंनीं हिंदुधर्म सोडूं नये. [५] गोमातेचा कसायाला विक्रय करूं नये. असे पांच ठराव सर्वानुमतें मंजूर झाले. परिषदेला वीरशैव व वीरशैवेतर मिळून दीड दोन हजार समुदाय हजर होता. परिषदेंत अध्यक्ष दादा महाराज व श्री. चव्हाण ह्यांचीं सुश्राव्य भाषणें झालीं. असें 'बातमीदार' लिहितात.

### लिंगाप्पा कटप सन्याशी झाले

पंढरपूरांतील स्तुत्य उद्योग ह्या मथळ्या खाली लिहितांना तेथील सुप्रसिद्ध समाजसेवक श्री. शंकरआप्पा कटप ह्यांनी सन्यासदीक्षा घेतली असें आम्हीं गेल्या अंकीं लिहिलें. परंतु शंकरआप्पा कटप ह्यांनी सन्यासदीक्षा घेतली नसून, लिंगाप्पा आप्पा कटप ह्यांनी ती दीक्षा घेतली व लिंगानंद यती हें नांव धारण केलें. आमच्याकडून शंकरआप्पा कटप हें नांव चुकून पडलें ह्याबद्दल वाईट वाटतें. तरी आमच्या वाचकांनी लिंगाप्पा कटप ह्यांनी सन्यासदीक्षा घेतली असेंच दुरुस्त करून वाचावें.

---

## सौ. सावित्रीबाई देशमुख ह्यांचें निधन

श्रीमती सौ. सावित्रीबाई देशमुख ह्या रावसाहेब माधवराव देवराव देशमुख सुप्रसिद्ध जाहागीरदार, पारवा, यवतमाळ, यांच्या पत्नि ता. २१-२-३६ रोजी महाशिवरात्रीच्या दिवशीं सकाळी साडेतीन वाजतां कैलासवासी झाल्या हें कळविण्याला अत्यंत दुःख होत आहे. ह्या जाहागिरदार घराण्यापैकी असून मध्यप्रांत-सरकारनी पहिल्या स्त्री जेल व्हिजिटर सन १९३१ पासून यवतमाळ-जेलवर नेमिल्या होत्या. त्यांनी दुसऱ्या बऱ्याच संस्थांवर काम केलें. त्या पैकीं मुख्यतः रेड क्रॉस सोसायटी, महिला समाज, शिशु संगोपन संस्था, न्यु गर्ल ए. व्ही. स्कूल, इत्यादि. यांचें वय २७ वर्षांचें असून यांनी स्त्रीसुधारणेच्या कामात बराच भाग घेतला. मध्यप्रांताचे गव्हर्नर सर मॉन्टेग्यू बटलर यांनीं सन १९२८ मध्ये यवतमाळ शहराला भेट दिली त्या वेळेस यांनी प्रामुख्याने भाग घेतला होता. त्या यवतमाळ जिल्हा ग्राम-सेविकासंघ याच्यावर नेमिल्या गेल्या होत्या. (अंडर दी पेट्रनेज ऑफ लेडी गोवेन वाइफ आफ एच. इ. दी गव्हरनर आफ सी. पी.) अशा सुप्रसिद्ध वीरशैव भगिनी इहलोक सोडून गेल्या बद्दल सर्वांस दुःख होत आहे. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो.

---

### महाराष्ट्रीय वीरशैव परिचयपट

ह्याचा तिसरा हप्ता पुढील अंकीं विस्तारशः प्रसिद्ध होईल. ह्या अंकीं स्थलाभावास्तव जागा राहिली नाही त्याची क्षमा करावी.

लघुकथा ३ री.



# नव्या पार्वतीपरमेश्वराचा संसार

अक्का धांवत धांवत आली आणि आपल्या आईला ह्मणाली ' आई, वहिनी कीं नाही भलं मोठं पुस्तक हातांत घेऊन वाचत बसली आहे.' अक्काची आई ह्मणते ' पुस्तक वाचते काय? आतां पुस्तक काय नवऱ्याला स्वयंपाक करून घालणार आहे ? सूर्य इकडचा तिकडे होत चालला, धुणं तसंच पडलं, भांडीं घासायचींच आहेत. येईल तिचा नवरा व करील सर्व. मी कशाला करूं ? ' अक्काच्या वहिनीने सासूच्या तोंडचे हे शब्द ऐकले, पुस्तक मिटलें, व धुणें धूवूं लागली व भांडीं घासू लागली.

सांगवा येथील एका घरांतील हा प्रकार आहे. मोडकळीस आलेलें हें वीरशैव व्यापाऱ्याचें घराणें. होतं नव्हतं तें गमावून आमचा वीरण्णा नुकताच बी. ए. झाला होता. अक्का ही आठ वर्षांची त्याची धाकटी बहीण. आई सुगव्वा ही अगदींच जुन्या चालीरीतीची. पण चाळीशी उलटलेली. सरळ पण थोडी तापट बाई. वीरण्णाचे वडील मरून पांच वर्षें झालीं. तेव्हा प्रपंच वीरण्णावरच पडला. वीरण्णाचें दैव असें अनुकूल होतें कीं, एक श्रीमंताची सुंदर मुलगी त्याला चालून आली होती. हुंडाहि बराच मिळत होता. पण वीरण्णाने तो नाकारला व मुलगीहि नाकारली. वीरण्णाचें हें कृत्य त्याच्या आईला पसंत नव्हतें हें सांगावयास नकोच.

वीरण्णाजवळ वडिलार्जित असें कांहीं फारसें उरलें नव्हतें हें जरी खरें, तरी पैशाकरिता कोणा-च्याहि कोणत्याहि मुलीचा स्वीकार करावा हें त्याला मान्य नव्हतें. तो प्रीतिविवाहाचा भोक्ता होता. शिवाय नवमतवादी होता. वीरशैवांतील पोटजाती जरी आपणाला मोडतां आल्या तरी पुष्कळ असें त्याला वाटत असे. शेवटी मॅट्रिक-पर्यंत शिक्षण घेतलेली एका वकीलाची मुलगी त्यास पसंत पडली. अर्थात् हे वकील जिल्हा-वकील होते. व ते वीरशैवांतील कोष्टी ह्मण-विणाऱ्या जातीचे होते. त्यांचें नांव शंकरआप्पा ऐनावार. ह्यांच्या वकीलीचें उत्पन्न दरमहा शंभरावर गेलें नव्हतें. त्यामुळे बचत अशी त्यांस करितां येईना. वीरण्णा व बसव्वा ह्यांचें प्रेम जडलेलें जेव्हा त्यांनी पाहिलें तेव्हा वर अनुरूप आहे अशी त्यांची खात्री झाली. पण विवाह चांगला थाटाचा व्हावा व त्याकरिता दोन पैसे कर्जाऊ काढण्याचा प्रसंग आला तरी चालेल पण वराला चांगले गौरवावें म्हणून लग्न लांबविण्याचा उद्योग शंकरआप्पाचा सुरू होता.

वीरण्णा व बसव्वा ह्या दोघांच्या लक्षांत ही गोष्ट आली व लग्न पांच रुपयांत उरकावयाचें, नाही तर रजिष्टर करून येऊं, अशी बसव्वाने बापास थोडी प्रेमादरपूर्वक धमकी दिली. शंकरा-प्पाचे गांवीं कांही पट्टाधिकारी रहात. त्यांच्या-पुढे व प्रतिष्ठित पंचापुढे त्यांनी आपली अडचण ठेवली. अगोदरच दोन भिन्न पोटजातींचा मिश्र

विवाह व तोहि पैशावाचून करणें हें कोणासहि पटेना. लग्न रजिष्टर होण्यापेक्षा विधियुक्त होणें अधिक चांगलें असें मात्र शंकरआप्पास वाटे, व वधु-वरासहि वाटे. पण योग येईना. शेवटी एक परस्थ पट्टस्वामी शंकरआप्पाकडे पाहुणे आले व सहज-गत्या ही अडचण दूर झाली. मुहूर्त पाहिला व एका दिवसांत निव्वळ पानसुपारीवर लग्नाचा सोहळा उरकावयाचा हें जाहीर झालें. गांवांतील पट्टदेवरू व त्यांच्या प्रभावळींतील जुने पंच लग्न बहिष्कृत करावें असें म्हणूं लागले. पण वीरण्णा तरुण मंडळींत लोकप्रिय होता. आणि बसव्वा हीहि आपल्या तरुण मैत्रिणींत चाहती होती. त्यामुळे काही जुनीं खोडें सोडलीं तर लग्नाला प्रत्येक घरचे कोणीना कोणी हजर होते. शेवटी लग्नाची टाळी वाजली व वधूवर परतले जुने जरठ म्हणूं लागले 'धर्म बुडाला.' नवे जुन्याला म्हणूं लागले कीं, धर्मसमजुतीचा मक्ता जणुं कांही तुम्हालाच लाभला.

वीरण्णाने बसव्वाशीं प्रीतिविवाह करून पोटजातींचें एकीकरण साधण्याचें समाजकार्य केलें हें खरें; पण बसव्वासारखी शिक्षित व थोडी निराळ्या जातीची मुलगी आपल्या घरांत आली हें वीरण्णाच्या आईस खपलें नाही. तिचें म्हणणें असें कीं, शिक्षित बायका नट्टापट्टयांतच गुंग असतात. गृहकृत्य त्यांच्या जीवावर यायचें. शिवाय कोष्टयाची मुलगी--'वकीलाची असली' म्हणून काय झालें ? दीक्षावंताच्या घरांत येते हेंहि तिला सहन होईना. पण एकुलत्या एका मुलाच्या लोभास्तव ती लग्नाला गेली व नाक मुरडूनच सून घरांत घ्यावयास तयार झाली. पण मनांतला राग कांही जाई ना. तो आरंभी सांगितल्याप्रमाणें व्यक्त होत असे.

वीरण्णा स्वभावाने उतावळा व चिक्षर. शिवाय नवा डौल सर्व कांही आपणासच कळला असें त्यास वाटे हाच त्याचा दोष. बसव्वा धुणें आपटीत असतांच वीरण्णा आपल्या कांही मित्रांसह घरांत आला. घराच्या मुख्य दरवाजासमोरच चौक व तेथेच धुण्याची व्यवस्था असल्यामुळे वीरण्णा स्नेहीमंडळीसह दारांत येतांच धुणें धुणारीन बसव्वा ह्या सर्वांच्याच दृष्टीला पडली. पण तिनें ह्या सर्वांना पाहतांच धुणें हातचें टाकून माज-घरांत पळ काढला व वीरण्णा थोड्या खिन्न मुद्रेने स्नेही मंडळीस घेऊन चौकांतील दादऱ्याने वर माडीवर गेला. हे वीरण्णाचे स्नेही गांवांतील नव्हते तर त्याचे कॉलेजमधील बरोबरीचे मित्र होते. त्यांना तो चहाकरिता घेऊन आला होता व त्यानिमित्ताने आपली लाडकी नववधू त्यांच्या परिचयाची करून यावी हाहि त्यांत त्याचा विचार होता. पण ती धुणें वाळवीत असतांना आपल्या मित्रांच्या नजरेस पडलेली पाहून खिन्न झाला. कारण ह्यांत आपलें दारिद्र्य तर दिसलेंच दिसलें पण स्त्रियांना वागविण्याचें क्रौर्यहि दिसलें असें त्याच्या मनास वाटूं लागलें. कारण नवा उद्योग मिळेपर्यंत पंचवीस-तीस रुपये भाड्याच्या उत्पन्नांत वीरण्णा दिवस काढीत होता.

बसव्वा धुणें टाकून थोडी घाबरल्यासारखी घरांत आलेली पाहून तिच्या सासूलाहि तिची कींव आली व ती तिच्या पाठीवर हात ठेवून विचारते ' बसव्वा, का ग एकाएकी घाबरलीस ? ' बसव्वा म्हणते ' सासुबाई, मी घाबरले नाही. पण चौकांत धुणें धूत असतां ते आपल्या मित्रासह एकाएकी आले, त्यामुळे मी एकदम आंत आले. बसव्वाच्या ह्या बोलण्यांत तिच्या सासूला तिचा सनम्र स्वभाव जसा दिसला तद्वतच तिची कष्टिक वृत्तिहि दिसली व तिला बसव्वाविषयीं आपले-पणा वाटूं लागला. शेवटीं सासूबाईने आळस झाडून धुण्याचें काम पत्करलें व बसव्वाला पाहुण्याकरिता चहा करावयास सांगितलें.

पण वीरण्णा मनांत इतका खिन्न झाला कीं, तो कांही चहा सांगावयास खाली येईना. शेवटी सासूबाईचें धुणें संपलें व बसव्वाचा चहा तयार

होऊन चहापाण्याचा साजहि तयार झाला. फक्त चहा वर जावा कसा व न्यावा कोणीं एवढाच प्रश्न उरला. शेवटीं सासूबाई सुनबाईला म्हणाल्या कीं तूंच आतां वर घेऊन जा. तुझ्या नवऱ्याला हेंच आवडतें म्हणून त्यानें तुला पसंत केलें. अन् तूंहि जर आमच्याचसारखी झाली तर त्याची फजितीच आहे. बसव्वाच्या मनांत चहा घेऊन जाण्याचें येई; पण सासूपुढे धीर होई ना. शेवटीं सासूंनीच सूनेला पुढे करून जीना चढविले. बसव्वांनी योग्य ठिकाणीं चहापात्रें ठेवलीं व अत्यंत नम्रतेनें लागलीच खाली आली. वीरण्णाने काहीं तिला थांब म्हटलें नाही व स्नेही मंडळींशीं तिची त्यानें ओळख करून दिली नाही. शेवटीं चहा घेणें झाल्यावर रिकामी चहापात्रें वीरण्णाच खालीं घेऊन आला व लागलीच वर गेला. शेवटीं मित्रांपैकीं एक मित्र म्हणाला कीं, 'काय हो, आप्पासाहेब, कुठे आहेत आपल्या सुशिक्षित व प्रीतिविवाहाच्या पत्नि'. दुसरा म्हणतो : अरे, हा लिंगायत, असेल चार-पांच पुस्तकें शिकलेली पोरगी. ह्यांच्यांत कसलेंरे शिक्षण व कसले प्रीतिविवाह.' आपले ते पंडित खान व ती आपली पंडिता ह्यांचा विवाह हा खरा सुशिक्षितांचा प्रीतिविवाह. ह्यावर सर्वच हसूं लागले. वीरण्णाला सुद्धा हासल्यावाचून गत्यंतर नव्हतें. पण त्याला ज्या तऱ्हेने मित्रापुढे ऐट मिरवावयाची होती ती त्याची ऐट सहज जिरली. ह्यानंतर तिसरा मित्र गंभीर मुद्रा करून म्हणतो 'नाही.' आप्पाची बायको सुशिक्षित व प्रीति-विवाहाची आहे ह्यांत संशयच नाही.' पण तूं पाहिली काय ती? असा एकाने मध्येच प्रश्न केला. 'मींच काय; पण तुम्हीं सर्वांनीच पाहिली. अरे, आपण घरांत प्रवेश करतांच जी धुणें बडवीत असतांच आंत पळाली व जी खालीं मान घालून मुकाट्याने चहा ठेवून गेली तीच. ती जर मोलकरीण असती तर गाढवांनो इतकी लाजाळू असती काय?' 'आं'! आप्पा, तीच कारे तुझी बायको! आणि तूंहि तिची ओळख करून द्यावयास लाजलास? हा काय लिंगायतीप्रीतिविवाह? असें म्हणून सर्व मित्र वीरण्णाला हासूं लागले. हें सर्व भाषण इतक्या मोठ्याने चाललें कीं, तें खाली माजघरांत असलेल्या सासासूनांना ऐकूं जात असे. शेवटीं ह्या मोकळ्या मनाच्या थट्टामस्करीने वीरण्णाहि थोडा धीट झाला व म्हणाला कीं, 'आमच्यांत जशी मिळाली तशी केली.' शेवटीं सर्वांनीं योग्य म्हणूनच त्याची पाठ थोपटली. कारण प्रीति तीच कीं, जी परिस्थितीशीं तद्रूप बनते. परिस्थितीला अगदीच निराळा फाटा फोडणें हें प्रीतीचें लक्षण नव्हे. शेवटी ह्याच स्नेह्यांच्या साह्याने वीरण्णा एका फिल्म कंपनीचा मॅनेजर झाला. आणि सासासुना सुखाने नांदून चांगला संसार होऊं लागला. वीरण्णाच्या लग्नाला नांवें ठेवणारे सगे-सोयरेसुद्धा व स्वामीसुद्धा वीरण्णाकडे येऊन पोटभर जेवूं लागले. आणि पार्वतीपरमेश्वराचे जोडपें म्हणून वीरण्णा व बसव्वा ह्यांना आशीर्वाद देऊं लागले.

---

# वीरशैवपरिचय *

भाषांतरकारः—श्री. एल्. एस्. एकलारे, बी. ए. एल्. एल्. बी., वकील पुसद (वऱ्हाड),

॥ शिवभक्तीने तेजस्वी असलेला, शिवभक्तांच्या आनंदसागराचा जणुं काय पूर्णचंद्र, सर्व शास्त्रांच्या रहस्याने परिपूर्ण अशी ज्याची भाषा, लोककल्याण हाच ज्याचा धर्म, आणि भक्तीच्या सांठ्याने परिपूर्ण, अशा त्या श्रीवसवेशाचा जयजयकार असो ॥

या भारतवर्षांत वेदादि इतर शास्त्र व नाना प्रकारचे सांप्रदाय असल्यामुळे ही भूमि धर्मभूमि म्हणून प्रसिद्ध आहे; आपल्या हिंदुसमाजांत निरनिराळे समाजाचे वर्ग असल्यामुळे जी अनवस्था दिसून येते ती निवारण्यासाठी निरनिराळ्या संप्रदायांचा एकमेकाशीं कसा संबंध आहे ह्याचें ज्ञान अत्यंत उपयुक्त आहे; 'हिंदुमहासभा' या यथार्थ नांवाने प्रसिद्ध असलेली ती संस्था अशाच तऱ्हेचा प्रयत्न करीत आहे, आणि म्हणूनच त्याच दृष्टीने हे चार शब्द मी आपणापुढें मांडीत आहें. इ० सनाच्या बाराव्या शतकांत कर्नाटकदेशांत श्री. बसवनांवाच्या सुप्रसिद्ध पुण्यपुरुषाचा अवतार झाला. त्या महात्म्याने शिवभक्तीचें त्या काळचें शैथिल्य अवलोकून व शिवभक्तीचें खरें रहस्य जाणून ती शिवभक्ति लोकोद्धाराचें केवळ एकमेव साधन आहे हें ओळखून तो कुंडलसंगमेश नांवाच्या सद्गुरुजवळ गेला व त्याचेपासून लिंगदीक्षा घेऊन त्याच्या उपदेशाने आपली मति सुसंस्कृत करून घेऊन, सर्व उपनिषदांतील शिवरहस्य एकत्रित करून शैवपद्धति स्थापन केली. त्या शिवपद्धतीचें तत्वज्ञान, आचारधर्म, व तदनुरूप समाजरचना, ह्या तिन्ही गोष्टींचें मी यथामति विवरण करितों.

विद्येमध्ये श्रुति श्रेष्ठ आहे
श्रुतिमध्यें अकरारुद्र श्रेष्ठ आहेत
त्यांमध्यें पंचाक्षरी श्रेष्ठ आहे

व त्यामध्ये 'शिव' हीं दोन अक्षरें श्रेष्ठ आहेत. इत्यादि प्रमाणांनी ज्याचा महिमा वर्णिलेला आहे त्या पंचाक्षरीस अनुसरून असलेल्या धर्माचा आपण आता विचार करूं:— नम शब्दाने आत्म्याचा बोध होतो, शिवशब्दाने शिवाचा बोध होतो, व अय शब्दाने त्यांचेमधील असलेला एकत्वाचा संबंध दर्शविल्या जातो. "तत्त्वमसि" अशा वाक्यानेदेखील हाच

* हुबळीचे श्री. सिद्धराम दुंडप्पा पावटे, बी. ए., एल्एल्. बी., ह्यांनी 'वीरशैव परिचय' ह्या नांवानें संस्कृतमध्ये लिहिलेले पत्रक पुणे हिंदुमहासभेच्या वेळी त्यानी प्रसिद्ध केले व तेथे वाटले. त्याचे हें भाषांतर आहे.–सं. वी. सं.

अर्थबोध होतो. श्वेताश्वेतरादि उपनिषद् व शिवागम हे ग्रंथदेखील शिवभक्ति हेंच एक मोक्षाचें साधन आहे ह्यास प्रमाण आहेत; आणि तें ध्येय संपादण्यासाठीं शरीरावर इष्टलिंग धारण केलें पाहिजे, मनामध्ये नेहमी शिवाची मूर्ति डोळ्यांसमोर जागृत ठेवली पाहिजे, व आपण या शिवस्वरूपाशीं समरस झालों आहोंत अशी सदैव समाधान वृत्ति ठेवली पाहिजे.

हें इष्टलिंग धारण केल्यामुळे माणसाचें पूर्वसंचितकर्मामुळे प्राप्त झालेलें जाड्य नाहीसें होतें व मी अमुक एका विशिष्ट जातीमध्ये जन्मलों अशी संकुचित भावना नष्ट होऊन, मी शिवाचा अंश आहें व त्यामुळे मला यज्ञादि कर्मांची अगर विधींची जरूरी नाही; फक्त शिवाचीच भक्ति केल्यामुळे केवळ ती एक शिवभक्तिच सर्व कर्मबंधनांतून मुक्त करण्यास समर्थ आहे व शिव हा सर्व आत्म्यांचे ठिकाणीं वास करीत असल्यामुळे, व आत्मज्ञानाचा अधिकार सर्वांना असल्यामुळे, शिवधर्माचें अवलंबन करण्यास व लिंगधारण करण्यास कोणत्याहि जातीला प्रतिबंध असूं शकत नाही. शिवाचीच भक्ति करण्याच्या हेतूने सर्व कर्में होत असल्यामुळे तीं कर्में करणाऱ्या व लिंगधारण करून ज्यांचीं शरीरें पवित्र झालीं आहेत अशा शिवभक्तांमध्ये कोणताहि जातिभेद अथवा वर्णभेद याची भावना राहूं शकत नाही.

शिवभक्तीची ज्यांना आवड आहे अशा सर्व ब्राह्मणांना व इतर जनांना लिंगधारणेचा संस्कार करणें अवश्य आहे. वीरशैवांमध्ये जन्मलेल्या सर्व शिवभक्तांनी जन्मापासूनच लिंगधारणा करावी, आपलीं योग्य तीं कर्में शिवाला संतुष्ट करण्याचे बुद्धीने व शिवसमाजाचीच सेवा करण्याचे बुद्धीने व.रावींत. शिवलिंगधारणेमुळे व शिवमंत्राचे उपदेशानेच आपले गुरुने मंत्रदेह उत्पन्न केला आहे आणि ह्मणून ह्या समाजांतील लोक हे विशेष सुधाररलेले श्रेष्ठ असे द्विज आहेत.

मनुष्यदेहाच्या स्वाभाविक प्रवृत्तींना वश होऊन तदनुसार आचरण ठेवणाऱ्या वृत्तीस "प्राकृतत्व' ह्मणतात; परंतु चित्सुख मिळविण्यासाठी नेहमी शिवधर्माचें आचरण करून आपल्या स्वतःचे त्या शिवस्वरूपाशीं ऐक्य साधण्याची जी वृत्ति तिला 'अप्राकृतत्व' म्हणतात; आणि ह्या प्रवृत्तिमध्ये ज्ञान आणि क्रिया यांमध्ये भेद नसून त्या दोहोंचें सदैव साहचर्य आहे; ह्यामुळे केवळ ज्ञानाचें अनुष्ठान करण्यासाठीं, प्राप्त कर्मांचा त्याग करावा लागला तरी, यज्ञोपवितप्रमाणे आपण शरीरावर धारण केलेल्या लिंगाचा त्याग करावयास नको; ह्या अप्राकृतत्वाच्या वृत्तीने वीरशैव आपलीं कर्में शिवाराधनानुरूप करीत असल्यामुळे व शिवाराधनेचें आत्म्याशीं ऐक्य असल्यामुळे ते पुनर्जन्म मानीत नाहीत. ह्या जन्मींची देह धारणा ही अखेरचीच देहधारणा आहे असें ते मानतात—असें हें संक्षिप्त वीरशैव तत्वज्ञान आहे.

आतां वीरशैवधर्माप्रमाणे कोण कोणतीं कर्में व विधे करावयास पाहिजेत त्याचें वर्णन करितों. शिवभक्ति ही सर्व मानवजातीला सुख देण्याचे हेतूने झाली असल्यामुळे त्यांत स्त्रियांनाहि अधिकार आहे. सबब पुरुषाप्रमाणे स्त्रियांनाहि लिंग धारणा करणें जरूर आहे. वीरशैवांचा असा सिद्धांत आहे कीं, वीरशैवधर्माचें आचरण केलें म्हणजे शिवाची कृपा होते. ह्या वीरशैव धर्माला श्वेताश्वेतरादि उपनिषद् व कामिकादि आगमाचे उत्तरभाग हे ग्रंथ प्रमाण मानून, त्याअन्वयें त्या काळीं आपला प्राप्त धर्म कोणता याचा शोध करून श्रीबसवेशाने अष्टावरण व पंचाचार ह्या स्वरूपाच्या धर्माचाराचें स्पष्टीकरण केलें तें असें:— गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, भस्म, रुद्राक्ष, आणि मंत्र हे अष्टावर्ण होत; व लिंगाचार, शिवाचार, सदाचार, भृत्याचार व गणाचार हे पंचाचार होत. अष्टावरणाचे अर्थ खालीलप्रमाणे आहेतः— फक्त एका शिवाचेच ठिकाणीं भक्ति अगर प्रेम उत्पन्न होऊन इतर विषयांवरील आसक्ति नाहीशी होईल अशा तऱ्हेच्या विवेकाचा उदय स्वतःचे अंतःकरणांत झाला म्हणजे त्या विवेकासच गुरु समजावें; स्वतःचे आत्म्यांत सदैव वास करीत असलेला जो शिव त्यासच

लिंग समजावें. अंतःकरण शुद्ध ठेवून इंद्रियांच्या प्रवृत्तींचें नियंत्रण म्हणजेच जंगम होय. शिवाराधन सुखाच्या रसाचा आस्वाद म्हणजेच शिवपादोदक होय. सर्व इन्द्रियांना व्यापणारा असा जो मायामोह त्यास दूर करणें हाच प्रसाद होय व शिवतेज हेंच भस्म होच. सर्वत्र शिवरूप पाहणें म्हणजेच रुद्राक्ष होय.

सदासर्वकाळ सर्व प्रकारच्या स्थितींत हा देह प्राकृत आहे–मी मूढ आहें–मी अज्ञानी आहें ह्या गोष्टीची जाणीव प्रकाशाइतकी स्पष्ट ठेवून त्यांतून सुटण्यासाठी मी स्वतः शिवस्वरूपच आहें असा आत्मानुभव मिळविण्याचा प्रयत्न हाच मंत्र होय. आणि या सर्वांची प्रतीकें येणेंप्रमाणें आहेत. स्वतःचा गुरु म्हणजे स्वतःचे देहावर धारण केलेलें लिंग, शिवयोगी म्हणजे गुरुलिंग; जंगम आणि लिंग यांना अर्पण करून उरलेलें उदक म्हणजेच भस्म, रुद्राक्षाच्या माळा व जपलेले मंत्र हे होत आणि वीरशैवांनी वरील दोन्ही प्रकारच्या अष्टावरणाची सेवा केली पाहिजे.

स्वतःचे व आपल्या बायका-मुलांचे अंगावर लिंगधारण करणें हा लिंगाचार होय. ज्यांनी आपले अंगावर लिंगधारणा केली आहे व जे शास्त्रोक्त आचार पाळतात त्यांची पूर्वीची जात विसरून जाण्याचा प्रयत्न करणें म्हणजेच शिवाचार होय; संत व मोठे लोक ज्याप्रमाणें आचरण ठेवतात ह्या आचारांचें अनुकरण करणें म्हणजेच सदाचार होय. शिवाची निंदा मी ऐकणार नाही, शिवाचारपद्धतिची विटंबना मी ऐकणार नाही, जर निंदा करणारास दंड करण्याचें सामर्थ्य असेल तर त्यास मी दंड करील, व नसेल तर मी तेथून निघून जाईल, अशा तऱ्हेचा निश्चय व वागणूक यास गणाचार म्हणावें. शिवभक्तांचा मी चाकर आहें, व त्यांची सेवा केल्यानेच शिवसेवा घडते व त्यासाठीच माझें हें जीवन आहे अशा तऱ्हेची बुद्धि अगर भावना ठेवून निरभिलाष वृत्तीनें स्वतःची कर्तव्यें करून त्याप्रमाणेच शिवभक्तांशीं आचरण ठेवून संतोष वृत्तीनें जीवन कंठणें हा भृत्याचार होय.

दररोज सकाळी व सायंकाळी आपल्या शरीरावर धारण केलेल्या लिंगाची पूजा करावी, त्यांत कधींहि चुकूं नये; शिवभक्तांचा आदर-सत्कार करावा, सन्मार्ग सोडूं नये, सर्व प्राणिमात्रांवर दया करावी, हिंसा न करणें, वगैरे धर्माचरण होय. याप्रमाणे एकत्रित झालेल्या लोकांच्या समाजामध्ये ऐक्याची वृद्धि होते व संपत्तीची वाढ स्वाभाविकपणेंच घडून येते; अमुक एक जात ही अमूक एका जातीपेक्षा अमूक जात कनिष्ट आहे अशा तऱ्हेच्यां कल्पनांनी आपसामध्ये द्वेष वाढतो. आपआपल्या वर्णानुसार नफ्या-तोट्याची क्षिति न बाळगतां कार्यें करीत रहावीं असें भगवत्गीतेंतदेखील सांगितलें आहे. हा भगवत्-गीताधर्म व आपला वीरशैवधर्म यांमध्ये बरेंच साम्य आहे; परंतु गीताधर्मामध्यें वर्ण-भेद मानतात एवढा फरक आहे. श्रीवसवाच्या मतानें वीरशैव धर्मामध्ये जातिभेद नाही, आणि ह्मणून ह्या वीरशैवधर्माच्या प्रभावामुळे पुष्कळशा जातींच्या लोकांनी आपण शूद्रांत गणले जाऊं या भीतीनें वीरशैवधर्माचा अंगीकार केला आहे. या धर्मांतील सरलता पाहून पुष्कळ ब्राम्हण देखील लिंगायत झालेले आहेत व पुष्कळशा राजेलोकांनी देखील या धर्माला मान देऊन त्या धर्माचे व धर्मीयांचे व्यवहाराला आश्रय दिला आहे. कर्नाटक देशामध्ये हल्ली देखील इतर समाजापेक्षा वीरशैवसमाजाची संख्या जास्त आहे. या धर्माच्या उत्कर्षकाळामध्ये ब्राम्हणापासून तों थेट चांभारापर्यंत ज्या ज्या लोकांनी अष्टावरण व पंचाचार पाळले ते सर्व आपणाला एकाच कुटुंबांतल्या घटकाप्रमाणे समजूं लागले; परंतु सध्याचा काळच असा आला आहे कीं, आता सारासार विचारच फारसा उरलेला नाहीं, हल्लीसुद्धा वीरशैवसमाजामध्ये स्मार्त व वैदिक धर्माप्रमाणे जरी जास्त नसले तरी थोडे तरी प्रमाणांत जातिभेद आहेत; कांही कांही जाती ज्या वीरशैव धर्मापासून भ्रष्ट झाल्या आहेत त्या जाती त्यांच्या दोषामुळें भ्रष्ट झालेल्या नसून लिंगायतांतील कांही लोकांमधील उच्चनीचभावनेच्या अहंकारामुळे अलग झाल्या आहेत. स्मार्तधर्माप्रमाणे वर्णभेद असणें इष्ट आहे अशा मताचे अजूनहि कित्येक लोक या धर्मांत आहेत; परंतु श्री बसवेशांनी प्रतिपादिलेल्या तत्वांमध्येंच एवढें सामर्थ्य आहे कीं, त्यांचे हे सर्व प्रयत्न निष्फळ ठरतील. हा काळच असा आहे कीं, सध्या प्रत्येक जातीला आपल्या जातीचा अभिमान उत्पन्न होत आहे; तरी पण मला अशी आशा आहे कीं, वीरशैवसमाजाचें तत्व हिंदुसमाजसंघटनेला मार्गदर्शक होईल.

# वीरशैव संजीवनीची-प्रथम गुटिका

लेखकः—
एन्. बी. साखळीकर,
इंग्लिश टीचर, सोनाळा
तालुका:- जळगांवजामोद
बुलठाणा.

वीरशैवसंजीवनीची जाहिरात वाचल्यावर त्यांत गोवलेल्या तत्वानुसारच हें पाक्षिक निघेल असा विश्वास मनांत उत्पन्न होईना. कारण समाजांत रूढ असलेली कांहीं वर्तमानपत्रें आमच्या पाहण्यांत येतात. परंतु समाजाची लंगडी बाजू कोणती व समाज इमारतीच्या कोणत्या भागाला जरूर ती डागडुगी करावयाची, ह्या ज्ञानाचें परिपूर्ण ज्ञान करून घेऊन, त्याच तत्वाचे आस्थेने गुटके देणारीं वृत्तपत्रें समाजांत हवीं आहेत. चालू कालांत सर्व समाजाच्या शर्यतींत आपला समाज किती मागें पडला व तो इतर उन्नतिपर समाजाबरोबर येयास योग्य कसा होईल, ह्या दृष्टीनें विवेचन करणारें वर्तमानपत्र आज समाजांत पाहिजे. समाजाच्या विविध अंगांपैकीं कोणत्या अंगांस, कोणत्या प्रमाणांत, किती गति द्यावी म्हणजे समाजाचें यंत्र इतर सुधारलेल्या समाजाप्रमाणें कार्यक्षम होईल; ह्याच विचारानें परिपूर्ण भरलेलीं वृत्तपत्रें समाजाला आज हवीं आहेत. वीरशैव संजीवनीचीं आज्ञास आतापर्यंत तीन पाक्षिकें पाहण्यास मिळालीं व त्यांचें विचारपूर्वक वाचन केल्यावर आमच्याच अंतःशक्तीने आमची खात्री करून दिली कीं वाढत्या विचाराने समाजाच्या असलेल्या मंदगतीस कालानुसार योग्य चलन देण्यास, हें पाक्षिक खात्रीने कारणीभूत होईल.

संपादकीय लेखांत लेखकाने समाजाच्या कांहीं बाबींच्या सत्य विचारास लगामाने आवरून धरलें किंवा सत्याकरिता प्राणांची पर्वा न करणाऱ्या लेखकाची लेखनी, समाजाचे अंतःसंघटन घडणाऱ्या कारणाचें सत्य विवेचन करतां करतां शाई झटकून मोकळी झाली असें जरी प्रथमदर्शनीं आपणास वाटलें, तरी संजीवनीचें ते प्रथमरूप आहे. सुप्त बालकास जागृत करताना आई त्यास प्रथम गोंजारीत नाही काय? व पूर्ण निद्राभंगस्थितीवर बालक आला म्हणजे तेच गोंजारणारे हात वज्रासारखे अवयावावर फिरून प्रत्येक अवयवाची घाण बाहेर फेकून, बालकास स्वच्छतेचा धडा देण्यास कारणीभूत होत नाहीत काय? तद्वतच समाजाबद्दल असल्या मातृतुल्य गुणांची ज्योत ज्याच्या हृदयांत तेवत आहे, त्याच्या विचारसरणीची ही प्रथमगति प्रशंसनीयच ठरेल, ह्यांत शंका नाही.

आता लघुकथा वाचून, मुलांच्या मासिकाची हटकून आठवण होते, असे कित्येक सुज्ञ वाचकांस वाटण्याचा संभव आहे. तरीही पण त्यांत कोणत्यातरी उच्च तत्वाचें विवेचन असतें. संजीवनीचे कांही गुटके पचनीं पडेपर्यंत तरी असल्या लघुकथा आपल्या समाजांतील पुष्कळ भागास उद्बोधक होतील, असें आज्ञास वाटतें. जे सुज्ञ व तरुण आहेत, त्यांनी नवमतवादाचें मनन केल्यास, ते लेख त्यांना उन्नतिमार्गावर जाण्यास, मदतगारच आहेत. ह्याशिवाय इतरत्र लेखांत, निरसपणाऐवजी, विचारपूर्वक वाचल्यास उच्च तत्वाचाच वास भरलेला आहे, असें विचारी वाचकांस वाटल्याशिवाय राहणार नाहीं. एकूण वृद्ध-तरुण, सुज्ञ-अज्ञ, गरीब-श्रीमंत ह्या सर्व वीरशैवांपैकीं आपल्या मगदूरीप्रमाणें ज्ञानाचें तिकीट घेऊन, प्लॅटफॉर्मवर उभे असलेल्या प्रवाश्यांना नेण्यास, संजीवनी गाडींत योग्यतेनुसार फर्स्टक्लास, सेकंडक्लास, थर्डक्लासची योजना दिसते. फक्त टिकेट घेऊन प्रत्येक डबा शोधून 'स्त्रियाकरितां' ही अक्षरें न दिसल्यामुळें हिरमुसल्या झालेल्या फारच थोड्या व्यक्ति प्लॅटफॉर्मवर उभ्या असल्यास, त्यांच्या सीटची पूर्ण भरती झाल्याबरोबर संजीवनी त्यांना स्थळ दिल्याशिवाय राहील काय? अर्थात् नाही.

ह्या वेळच्या संजीवनीच्या गाडीला तर खास रिफ्रेशमेंट कॅरेज ह्मणून थोडी संगीताचीहि जोड मिळाली आहे. शिवाय पाक्षिकाने परिचयपटाची काढलेली क्लुप्ति ह्मणजे आपल्या समाजाला तर वीसाव्या शतकांतील रेडीओचाच शोध. अहो, हें विधान ह्मणजे अतिशयोक्ति नव्हे, तर ह्याच-वेळेला दूरच्या तीन वीरशैव गृहस्थांनीं खास आमचे बैठकींत, बसल्या ठिकाणीं, त्यांच्या घरांतील लहान-थोर मंडळीचा आह्मास परिचय करून दिला. आणि थोड्याच काळांत बहुतेक सर्व वीरशैवधर्मांची कुटुंबें आह्मी आमच्या बैठकींत मोठ्या अभिमानानें दाखवूं शकूं.

अखिल सृष्टीच्या बागेंत संजीवनी ह्या जोरदार निपजणाऱ्या वनस्पतीस आपल्या वनस्पतीपेक्षा अधिक सुवासिक फुल येणार हें चाणाक्ष दृष्टीने जाणणाऱ्या कांहीं परजात असहिष्णुतता सुज्ञांनी ओळखून वेळीच कांही वीरशैव संजीवनीवर जडणारें प्रेम झाडण्याचा प्रयत्न केला असें दिसून आल्यावरून मला हें लिहिण्याची स्फूर्ति झाली व ह्या लिखाणाचा योग्य उपयोग झाल्यास, वरील सुज्ञ कारणीभूत झाल्या-बद्दल त्यांचे आभार मानणें मला क्रमप्राप्तच आहे. असल्या पराङ्मुख करूं पाहणाऱ्या व्यक्तीच्या मताने संजीवनीबद्दल ठरणाऱ्या कमकुवत मुधांत आमच्या समाजाच्या पुढच्या काळाकरिता किती शक्ति साठवलेली दिसते हेंच मला माझ्या बांधवांना दाखवून द्यावयाचें आहे. परंतु सर्व वीरशैव बंधूंस विनंतीने व कळकळीने कळवितों कीं, असला प्रयत्न कोठे झाल्यास, भावनावश होऊन त्या प्रयत्नास बळी पडणें योग्य नाही. जी संजीवनी आज निरुत्साही वीरशैव वीरास उठवून चांदमारीचें शिक्षण समाजाची प्रथमावस्था पाहून देत आहे, तीच संजीवनी उद्या तिच्या छद्म शक्तीच्या प्रयोगाने आपणास जगाच्या रणांगणांत झुंज खेळण्यास प्रवृत्त करील, असा पक्का विश्वास ठेवून तिच्यावर जडत असलेलें प्रेम वृद्धिंगत होऊं द्या; आमच्या वीरशैव संजीवनीस ह्या अंधारांत चाचपडणाऱ्या समाजास सुपंथास लावण्याकरिता दीर्घायुष्य दे, व हे संजीवनीचे प्रथम गुटके पचविण्याची शक्ति समाजास दे, अशी त्या शिवस्वरूपी शक्तीस मी प्रार्थना करतों.

---

# पोंच व अभिप्राय

सोलापूरच्या ' सुदर्शन ग्रंथ मालें '-तून प्रसिद्ध झालेली पुढील पुस्तकें आमच्याकडे अभिप्रायार्थ आलीं आहेत. बसवबोध, बसवेश्वर व दयानंद, शिवयोगी सिद्धराम, श्रीअक्का महादेवी, श्रीसिद्धरामेश्वर, कित्तूरचे गतवैभव बसवबोधांत बसववचनांचें मराठी भाषांतर व त्यावर स्पष्टीकरण असल्यामुळे मराठींतून बसववचनाचा उत्तम तऱ्हेने परिचय होतो. हा मराठींत पहिलाच परिचय होय. ह्याची किंमत ६ आणे असून, तो प्रत्येक वीरशैवाने मनन करण्यासारखा ग्रंथ आहे. बसवेश्वर व दयानंद ह्यांची साधार तुलना करून बसवेश्वराने वैदिकधर्मांत १२ व्या शतकांत कशी क्रांति व उत्क्रांति केली हें श्री. मंजाप्पा हार्डीकर ह्यांनी आपल्या कानडी ' शरण संदेश ' पत्रांतून लिहिलेल्या लेखांचा मराठी अनुवाद होय. गुलबर्गा-आर्यसमाजाने जें वीरशैवांवर आक्रमण चालविलें त्याला ह्या लेखमालेंत साधार उत्तर दिलें. ह्याची किंमत एक आणा आहे. जगद्गुरु शिवयोगी सिद्धराम हे सोलापूरांत होऊन गेले. त्यांचें चरित्र व त्यावर केलेलें निरनिराळ्या वीरशैव लेखकांनी निरुपण त्यांत एकत्र केलें आहे. ह्याच्या वाचनाने इतिहास व वीरशैवांचें तत्वज्ञान ह्याची ओळख पटते. किंमत आठ आणे. श्री. अक्का महादेवी ही महान् साध्वी अशी प्रमुख वीरशैव महिला होय. तद्वतच कित्तूरची सुप्रसिद्ध वीरशैव राणी कशी पराक्रमी व चतुर होती हें ह्या ऐतिहासिक चरित्रावरून स्पष्ट होतें. हीं चरित्रें प्रत्येकी अर्धा आणा किंमतीचीं आहेत. तीं प्रत्येक साक्षर वीरशैवाने वाचून आपल्या पूर्वजांचें प्रातःस्मरण करावें. श्रीसिद्धरामेश्वर हे बॅ. सरदार ह्यांनी लिहिलेलें चरित्र आहे. तें ऐतिहासिक असल्यामुळे बसवकालाचा म्हणजे बाराव्या शतकांतील वीरशैवांचा त्यापासून बोध होतो ह्याचीहि किंमत अर्धा आणा आहे. सुदर्शन ग्रंथ मालेचे प्रवर्तक श्री.कल्याणशेट्टी, बी. ए. एल्. एल. बी., ह्यांनी हीं पुस्तकें प्रसिद्ध करुन मराठीला कानडींतील वीरशैवांचा परिचय करून दिला आहे म्हणून त्यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे पण अभिनंदन सक्रीय करावयाचें झाल्यास हीं पुस्तकें वाचावींत व यावर पूर्ण विचार करावा.

# वीरशैवसंजीवनी

अंक ६ वा ) ता० १५ मार्च १९३६ ( वर्ष १ ले

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. } { किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडातील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येताच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापक:—' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून, वीरशैवांत सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल् एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखहि येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपालखर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापक.—' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथ श्रीगुरुराचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु २ आणे १२ आहे.

व्यवस्थापक.—' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

# कै० सावित्रीबाई देशमुख



यवतमाळचे सुप्रसिद्ध वीरशैव जहागीरदार रावसाहेब माधवराव
देशमुख ह्यांच्या ह्या पत्नि महाशिवरात्रीच्या दिवशीं कैलास-
वासी झाल्या. स्त्रियांच्या सामाजिक व शैक्षणिक चळ-
वळींत त्या मोठ्या आस्थेनें भाग घेत होत्या. ह्या
प्रांतांतील एक प्रमुख वीरशैव महिला कैलासवासी
झाल्यामुळे सर्वत्र दुःख पसरलें आहे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति फाल्गुन व॥ ६ शके १८५७ ( अंक ६ वा.

# वीरशैव मताचा संस्थापक कोण?

## बसवेश्वर जंगम होता.

लेखांक तिसरा.

इष्टलिंगाची उपासना प्रथम बसवेश्वरासच स्फुरली असें नाही. बसवकाळांतच ती अनेकांत स्वयंस्फूर्तीनेच उत्पन्न झाली असा बोध श्री· जिरगे ह्यांच्या पुस्तकावरूनच कसा होतो ह्याचें विवेचन गेल्या लेखांकांत आम्हीं केलें आहे. कारण जिरगे ह्यांनी आपल्या पुस्तकांत पृष्ट १६ व १७ वर एकोरामाविषयी 'एकोराम पुराणावरून असा स्पष्ट बोध केला आहे कीं, He ( Ekoram ) become a virshaiva after obtaining Lingadharana from his personal deity Ramanath Ling of mudannru ह्यावरून बसवेश्वरास जशी संगमेश्वराच्या साक्षात्कारामुळे लिंगधारणा झाली त्याचप्रमाणे एकोरामासहि मदनूरच्या रामनाथलिंगाच्या उपासनेपासूनच लिंगधारणेची प्रेरणा झाली. अशा स्थितींत एकटे बसवेश्वरच इष्टलिंगाची मूळ प्रेरकशक्ति असें कसें ह्मणावें ? शिवाय, सोलापूरच्या सिद्धारामदेवतेचें चरित्र तर प्रसिद्ध आहे. रेवणसिद्धाच्या प्रसादाने वृद्ध आईबापांच्या पोटीं सिद्धराम जन्मले. ते लहानपणीं गाई राखीत असतां एक जंगम मूर्ति त्यांना दिसली. तिच्या दर्शनार्थ सिद्धराम श्रीशैलपर्यंत गेले.

तेथेहि ती जंगममूर्ति दिसेना. ह्याकरिता सिद्ध-राम कड्याखाली उडी घेण्याला सज्ज झाला. तेव्हा कोठे श्रीशैलची मल्लिकार्जुन देवता जंगम-रूपाने त्यांचेपुढे उभी राहिली. आणि सिद्धराम तेथूनच मल्लिकार्जून नांवाचें लिंग घेऊन आला व तेंच सोलापूरच्या मल्लिकार्जूनमंदिरांत आहे असें आजहि ह्मणतात. अशा स्थावर शिवलिंगाच्या ध्यानांतूनच इष्टलिंगधारणेचा उगम झाला हें मानावें लागतें. ज्या रेणुकाचार्यांनी चंद्रमौळी लिंग आद्यशंकराचार्यांस दिलें होतें ह्मणतात तें चंद्रमौळी लिंग हें इष्टलिंग नव्हे; इष्टलिंग हें एक दुसऱ्यास देऊं शकत नाही. त्याची दीक्षा देऊन एक दुसऱ्यास स्वतंत्र निर्माण करावयास सांगत असतों व ते दुसरा प्राण समजूनच त्याला अखेरपर्यंत बाळगावें लागतें. इष्टलिंगधारणेचा व त्याच्या उपासनेचा जो विशेष आहे तो ह्या प्रकारचा आहे.

हा प्रकार केव्हा रूढ झाला व कसा रूढ झाला ह्याचा पूर्ण विचार जेव्हा होईल तेव्हाच इष्टलिंगधारणेचा उगम केव्हा कसा व कां झाला ह्याप्रश्नाचें उत्तर बाहेर येईल. आणि मग वीरशैवमताचें व तत्वज्ञानाचें बीज केव्हा पेरलें गेलें हें स्पष्ट होईल. ह्याकरितां बसवबोधांच्या 'भक्तस्थळां'-तील पहिली पांच वचनेंच विचारांत घेऊं. सर्व चराचरांत व्यापलेला परमेश्वर जिवंत आहे. पण त्याचें ज्ञान झालें पाहिजे. ह्मणून 'रम्य कुसुमांच्या अंतरंगीं, गुप्त परिमळ तरंगीं; तैसा तूं जगदीश लिंगांगीं, रहस्यरूपें असशी पां' असें वर्णन बसवेश्वरांनी केलें आहे. दुसऱ्या वचनांत 'सगुण आणि निर्गुण, तुझें ठायीं अव्यक्त जाण, परि साकाररूपें दृश्यमान, कलातीत असशी तूं' असें ह्मणून तें स्वरूप संगमेशांत बसवदेवास कसें दिलें ह्याविषयीं ते ह्मणतात, 'तव डोळा आणि वदन, बाहुआदि सर्वांग जाण; चराचर सृष्टीशीं व्यापून, राहती संगमेशा,' ह्यावरून जी परमेश्वरी शक्ति सर्व चराचरीं सगुण व निर्गुणरूपाने आहे ती संगमेशांत वा संगम नांवाच्या स्थावरलिंगांत बसवदेवास दिसूं लागली. इतकेंच नव्हे तर ह्या स्वरूपांत अनेकत्व वास करतें असें मानणें हें मूर्खपणाचें लक्षण होय असेंहि त्यांनी तिसऱ्या वचनांत म्हणून ठेवलें आहे. ह्याकरितांच चौथ्या वचनांत परमेश्वराला नांवें अनेक असलीं तरी तो एकच असें मानून देव एकच ही एकत्वाची कल्पना पुढे केली. ह्या अनेक नांवांच्या देवांत देव एकच. 'जैसे पतिव्रतासि देख, एकमेव पती' असें म्हणून 'कवटाळि-ला लिंग, तया त्यजुनी करि नाना छंद, नाना परीचे खाती नैवेद्य, तया दुष्टा काय ह्मणूं' असा लिंग-उपासना सोडून इतरांची उपासना करणारांवर ताशेरा झाडला आहे. तेंव्हा 'भवपाशांत वारवार जो तूं सांपडतोस ह्याचें कारण लिंगास व जंगमास तूं टाकलेस' असें पांचव्या वचनांत सांगितलें आहे. ह्याचा सरळ व स्पष्ट अर्थ हा कीं, लिंग व जंगम ह्यांच्या ठिकाणींच सर्वव्यापी परमेश्वराचें रूप आहे अशी भावना ठेवून तूं वाग म्हणजे भवपाश तुटलेच समज. बसवबोधाच्या भक्तस्थळांतील पहिल्या पांच वचनांचा अर्थ ह्याप्रमाणे आहे. हा बसवबोधवचनांचा मराठी अर्थ आह्मीं सोलापूरच्या 'सुदर्शन'-कारांनी प्रसिद्ध केलेल्या 'बसवबोध' ह्या पुस्तकांतून घेतला आहे हे येथे नमूद करणें जरूर आहे.

इष्टलिंगाची उपासना सांगतांना परमेश्वराची ब्रह्मांडस्वरूपी व्याप्ति, इष्टलिंगाच्या ठिकाणी तीच भावना, व जंगमाच्या स्वरूपांत तीच ब्रह्म-शक्ति आहे हा विश्वास इतक्या गोष्टी खुद्द बसवेश्वरासच आरंभी गृहीत धराव्या लागल्या. त्या कां धराव्या लागल्या ? परमेश्वराचें चराचर व्यापी स्वरूप हें काय प्रथम बसवेश्वरासच स्फुरलें ? इष्टलिंगांत ब्रह्मस्वरूप आहे ही कल्पनाहि काय बसवेश्वराचीच ? ब्रह्मस्वरूपीं लीन झाल्यावांचून लिंग जंगमीं साम्यभाव प्रकट केल्यावाचून, भवपाश कायमचे तुटत नाहीत व जन्ममृत्यूच्या नित्य लीलांतून जीव मुक्त होत नाही ही कल्पनाहि काय मूळ बसवेश्वराचीच ! मुळींच नव्हें ? ह्या दृश्य व अदृश्य सृष्टीच्या मुळाशीं, तिच्या सर्व व्यापांत, वाढींत व तिच्या लयानंतरहि ज्या शक्तीचें वास्तव्य राहूंच शकते ती परमेश्वरशक्ति प्रथम ज्यास

स्फुरली, व ज्याच्या बुद्धीस तसा प्रथम प्रत्यय आला त्याची ती ब्रह्मसंशोधक बुद्धिच इष्ट-लिंगाच्या कल्पनेचें मुख्य बीज. ह्या मुख्य बीजाला शिवलिंगच त्या ब्रह्माचें पहिलें प्रतिक ह्या कल्पनेचा अंकुर फुटला. त्याला पुढे निरनिराळ्या फांद्या फुटल्या हें निराळें. ह्याकरितां सर्वसृष्टीच्या मूळाशीं जो अनंतस्वरूपी एक परमेश्वर आहे व तो शिवलिंगांत अंतर्भूत आहे हें केव्हा रूढ झालें असेल ? मनुष्याच्या बुद्धीचा विकास होत होत ती शुद्धज्ञानापर्यंत जेव्हा पोहोंचली असेल तेव्हाच मानवी जीव जन्म घेतांना प्रथम श्वासोच्छ्वास, नंतर स्वर, पुढे शब्द व नंतर ज्ञान असाच आजहि वाढतो हें आपण निश्चय पाहतों. ह्याच दृष्टीने एकंदरींत मानवी जीविताचा, त्याच्या बुद्धीचा व ज्ञानाचा, विकास कसा झाला हेंच आपणाला पाहिलें पाहिजे. ह्याकरिता हिंदुसंस्कृतीच्या विकासा-चाच इतिहास प्रथम नजरेसमोर घ्यावा लागतो.

हिंदुस्थानांत विकास पावलेल्या मानवी जीवित संस्कृतीचा इतिहास पहावयाचा झाला तर तो वेद-कालापासूनच पहावा लागतो. वेदकाल हा इसवी सनापूर्वी आठ हजार वर्षांचा आहे असे इतिहास संशोधक मानतात. पुराणमतवाद्यांना हीं वर्षें मोजतां येत नसल्यामुळे ते वेदकाळ म्हणजे सृष्टीचा आरंभकाळ मानून मोकळे होतात. परंतु वेदांचे अर्थ करणारे इतिहासकार वेदकाल व यज्ञकाल ह्यांच्या ध्येयाची मीमांसा करतांना यज्ञकाळीं स्वर्ग गाठणें मानवी जीविताचें इति कर्तव्य मानलें जात होतें. यज्ञऋत्विजांनी हें ध्येय ज्या वेळी ह्या देशात रूढ कारण्याचा प्रयत्न केला त्याच वेळी किंवा थोडी तत्पूर्वींहि कैलास गाठणें हें ध्येयहि रूढ होतें, अशा ह्या दोन ध्येयांच्या संधि-काळांतच वेद; परिणत झाले. स्वर्ग गाठूं इच्छिणा-ऱ्यांच्या ध्येयाची पूर्तता करणाऱ्या देवता सूर्य व अग्नि इत्यादि असत. कैलास गाठूं इच्छिणाऱ्यांची देवता स्मशानवासी नररुंडमालाधर पार्वती-परमेश्वर ही असे. अशा उपासनाकाळांतच आर्य-संस्कृति, द्राविडीयन संस्कृति व मोंगोलियन संस्कृति ह्यांचा ह्या देशांत परस्परावर आघात होऊन विकास होत गेला. शंकरपार्वतीविवाह हा दोन भिन्नभिन्न गणलेल्या मानवी संस्कृतींतील संमिश्र विवाह होय असेहि मानता येते. आणि दक्ष-यज्ञविध्वंसनाचा प्रसंग हा ह्या संस्कृतींतील अखेरचा झगडा होय असाहि प्रत्यय येतो. शंकराच्या अनुयायास गण म्हणत व त्या गणांचा नायक पुढे शंकर पुत्रगणपति झाला. आणि हा गणपति अनेक कलांचा, विद्येचा विधाता होता व तो मोठा पराक्रमीहि होता. त्याने त्या वेळच्या सर्व मानवी वंशाचे संयुक्तिकरण केलें. त्यामुळे ह्या संयुक्त संस्कृतींतून हिंदुस्थानांत वाढलेल्या सर्व मानवी वंशांतील सामाजिक मंगलकार्यांत गणपति-पूजन रूढ झालें. ह्या गणपतीच्या पराक्रमामुळेच त्याच्या बापास म्हणजे शंकरास वा शिवास यज्ञ-विधींत पुढेपुढे प्राधान्य आलें.

सूर्य व अग्नी ह्यांच्या उपासना ज्याप्रमाणे निसर्ग शक्तीच्याच उपासना होत, त्याचप्रमाणे शिवपार्वती ह्यांच्या संयोगाचें जें प्रतिक शिवलिंग तीहि एक मानवी जीविताच्या उत्पत्तीची, वाढीची, व लयाची नैसर्गिक शक्ति होय. म्हणूनच ह्या प्रतीकाच्या पूजनाचा वा प्रार्थनेचा इतिहास चार वेद परिणतावस्थेंत येण्यापूर्वीचा सांपडतो. ही प्रतिक शिवपूजा हिंदुस्थानांतच नव्हे तर हिंदु-स्थानाबाहेरहि सर्वत्र फार पुरातनकाळीं रूढ होती हें आजहि आढळतें. पं. श्री. काशिनाथ शास्त्री ह्यांचीं जीं इंग्रजींतून व्याख्यानें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांतील पहिल्या व्याख्यानांत त्यांनीं ही गोष्ट अनेक इतिहासकारांचे आधार दाखवून स्पष्ट केली आहे. ह्याकरिता त्यांच्या व्याख्यानांच्या इंग्रजी पुस्तकांतील पृ० ६ ते ८ ह्यांतील मजकूर अवश्य वाचावा. ह्याप्रमाणे शिवप्रतिक मानण्याचा इतका प्रघात पडला कीं, सर्वच याज्ञिक शिवो-पासक झाले होते हेंहि प्रत्ययास येतें. ह्या प्रत्ययाचा निश्चित काळ सांगणें इतिहासकारास कठिण आहे. तो बुद्धपूर्वकाल कीं तो बुद्धोत्तरकाळ ! बहुधा बुद्धोत्तर काळांतीलच ही परणती असावी. अर्थात् आद्य शंकराचार्य अवतीर्ण

होण्यापूर्वीच शिवोपासकांनीं याज्ञिकांना शिवदीक्षा दिली असावी. यज्ञाच्या अग्निउपासनेंत जें पुण्य तेंच शिवलिंगाच्या उपासनेंत पुण्य ही कल्पना रूढ झाली असावी. कारण शिवलिंग हें अग्निरूप आहे व त्याचा खरा उपासक हा त्या अग्नीचें चालतें-बोलतें प्रतीक आहे हें ह्याच वेळीं रूढ झालें असावे. स्थावर पूजेबरोबरच जेथें बसूं तेथे शिव आहे हें घरोघरच्या याज्ञिकांच्या अग्नीपूजेला शह देतां यावा म्हणून जंगम पार्थीवाचें पूजन रूढ झालें. ह्या प्रकारच्या जंगम पार्थिवपूजनाचा जो काळ तोच इष्टलिंगाच्या उपासनेच्या कल्पनेचा खरा काळ. त्याचा निश्चित शक सांगता येत नाहीं. त्याचा अमुकच उत्पादक हेंहि सांगता येत नाहीं. म्हणून साक्षात् शिवच ह्याचा उत्पादक, त्यालाच स्फूर्ति झाली, तोच पार्वतीशीं बोलूं लागला, व पार्वतीनें गणांना आज्ञा केली व ते गणच निरनिराळ्या काळीं, निरनिराळ्या वेळीं, निरनिराळ्या रुपाने शिवधर्मांचा प्रसार करूं लागलें असें आगमकार काय किंवा पुराणकार काय बोलूं लागले. घरोघरचा याज्ञिक वा निरनिराळ्या स्थळीं संचारणारा याज्ञिक जेव्हा अग्नि-ऐवजी जंगम पार्थीव शिवोपासक बनला त्यावेळीं मूळच्या स्वर्ग व कैलास ह्या ध्येयात्मक भिन्न भिन्न कल्पना एक झाल्या. मोक्ष वा लिंगांग-सामरस्य हें त्यांस स्वरूप आलें. बुद्धाच्या निर्वाणाची कल्पनाहि त्यांत जाऊन बसली. शिव काय, अग्नि काय, सूर्य काय हे सर्व एक होत. एकाच ब्रह्माची तीं स्वरूपें होत. ती ब्रम्हप्राप्ति हाच स्वर्ग, हाच कैलास, हाच मोक्ष, हेंच निर्वाणपद हें मानवी जीविताच्या उद्धाराचें व अखंड सुखाचें ध्येय त्याच्यांपुढे आलें. मानवी जीवनसुखाच्या काळाच्या ह्या परिणावस्थेलाच ज्ञानकाल असें म्हणतात. उपनिषदे व आगम ही ह्याच काळांत मनुष्याच्या आचारांत येऊं लागली म्हणूनच इतिहासकार प्रथम वेदकाल, नंतर उपनिषद् वा आगमकाळ असें मानवीजीवित-सुखांच्या विकासाचे काल खंड पाडतात.

वेद हे परमेश्वराचें उश्वास होत व आगम हे परमेश्वराचे शद्व होत ह्या काव्यमय कल्पनेंतूनहि हाच बोध होतो. प्रथम उश्वास व नंतरच शद्व उत्पन्न होतो हा परमेश्वरनिर्मित मानवाजीवित-वाढीचा नैसर्गिकधर्मच आहे. तेव्हा वेदानंतर उपनिषदें सांगण्यांत आलीं, वेदानंतरच आगमांचें ज्ञान रूढ झालें असें म्हटलें तर ह्यांत कमीपणा नाहीं. 'अ' नंतरच 'ज्ञ' हा स्वर व्यंजनांचा क्रम आहे. तेव्हा 'अ' नंतरच 'ज्ञ' येतो असें म्हटल्याने 'ज्ञ'-वायास कमीपणा काय? याज्ञिक व शिवोपासक हे जेव्हा एक झालें त्यावेळीं यज्ञाचें बाह्य स्वरूप बदललें पण शिवोपासनेंत तें तत्वरूपाने रूढ झालें. म्हणून शिवोपासक हे याज्ञिक धर्मांतील सुधारक असें त्यास पुढे स्वरूप प्राप्त झालें. आणि ह्या सर्वांनांहि सुधारणारा 'ब्रम्हसत्यं जगन्मिथ्या' ह्या सिद्धवचनाची घोषणा करणारा आद्य-शंकराचार्य जेव्हा अवतरला तेव्हा तर त्यास सर्व वैदिक व याज्ञिक प्रच्छन्न: बौद्ध ह्मणूं लागले. बसवप्रणित वीरशैवधर्म हा अवैदिक आहे असें ह्मणणारे श्री. जिरगे हे आद्यशंकराचार्यासहि अवैदिक म्हणतील काय? वैदिक कोण व अवैदिक कोण हें जर व्याख्येने ठरवूं लागले तर यज्ञोपवीत-जानवें-घालणारा व लिंगधारण करणारा ह्या दोघांनाहि अवैदिक ठरवावें लागेल. कारण यज्ञकाळीं व वेदकाळीं प्रस्तुतचें जानवें होतें काय? इष्टलिंगधारणेला, जंगम-पार्थिव शिवपूजेला, लिंगमुद्राधारण-कल्पनेला शह देण्याकरितां जुन्या याज्ञिकांनी यज्ञाच्या उपवितांचें म्हणजे वस्त्रांचें चिन्ह म्हणून प्रस्तुतचें जानवें रूढ केलें असावें आणि तेंहि आद्यशंकराचार्यांनंतर रूढ झालें असावें. असेंच वाटतें. परंतु आद्यशंकराचार्यांपूर्वी शिवपूजा रूढ होती. ह्या शिवपूजकांनी बौद्धधर्मीयांस शह दिला. वैदिकधर्माचें शिवोपासनेंनें वाढवून पुनर्जीवन केलें हा इतिहास तर अगदीं स्पष्ट आहे. आणि ह्या शिवोपासनेच्या प्रकारांत; स्थावरपूजन, पार्थिवपूजन, जंगम-लिंगपूजन (म्हणजे चर-लिंगपूजन. शृंगेरी मठांतील

चंद्रमौळी लिंग रेवणसिद्धासारख्या शिवोपासक तपोनिष्ठापासून त्या मठाच्या संस्थापकाकडे आले असा जो इतिहास आहे तो चरलिंगपूजनाचा म्हणजे जंगम-लिंगपूजनाचाच निदर्शक आहे. ) त्याचप्रमाणें लिंगमुद्राधारण करणें व लिंगधारणा हा प्रकारहि आद्य शंकराचार्यकाळींच रूढ होता हेंहि शंकर-दिग्विजयावरून उघड होतें. लिंगधारणेबद्दलचा स्पष्ट पुरावा आज असा सांपडतो कीं, देवी सरस्वती आदिकरून अनेक देवतांच्या जुन्या मूर्तींना लिंगधारणा होती हें त्या त्या मूर्तीवरून आजहि दिसतें. म्हणूनच ' विष्णुब्रम्हादयो देवा मुनयो गौतमादयः । धारयंति सदा लिंगमुत्तमांगे विशेषतः असें म्हणण्याचा परिपाठ रूढ झाला. अशा प्रकारें अनक देवमूर्तींवरहि लिंगधारकांनी विजय मिळवून शिवधर्माचा प्रसार केला. आणि आद्य-शंकराचार्यांनीं ' आदित्यमंबिकां विष्णु गणनाथ महेश्वरम् ' असा घोष करून सर्व देवता एकाच ब्रम्हाची रूपें आहेत म्हणून सर्व देवतांच्या उपासकांना एकाच वैदिक शक्तींत विलीन केलें हें निराळें. लिंगधारणेची कल्पना प्रथम बसवेश्वरासच स्फुरली हा जो जिरगे ह्यांचा हटवाद आहे त्यांत तथ्य नाही हें स्पष्ट होतें. लिंगधारणा तत्पूर्वीची आहे व ती वैदिक कल्पनेशीं तत्वतः संलग्न झाली आहे हा जो मुद्दा पं. काशिनाथशास्त्री ह्यांनी आपल्या व्याख्यानातून पुढे केला तो आजच्या विरक्तांना व बसवभक्तांनामुद्धां बोधप्रद आहे. फक्त पंढरपूरचा विठोबा, त्रिवेंद्रमचा विष्णु, सोंडूरचे कुमारस्वामी, तुळजापूरची भवानी आणि गुद्दापूरची ज्ञानम्मा ह्या मूर्ति केव्हा घडल्या गेल्या ह्याचा जर शोध लागला तर शरीरावर इष्टलिंगधारणा केव्हा रूढ झाली ह्याचा काल ऐतिहासिकदृष्ट्या अधिक स्पष्ट होईल.

पं. काशिनाथशास्त्री ह्यांच्या विधानांतलि पंचाचार्य उत्पत्ती आज आह्मी बाजूला ठेवतों. त्या उत्पत्तीच्या त्यांच्या कल्पनेंत व आमच्या कल्पनेंत जमीन अस्मानाचा फरक आहे. बसवच सर्वप्रथम व पहिला ही जशी जिरगे ह्यांची कल्पना हास्यास्पद आहे तशीच हास्यास्पद रीतीने पंडित काशीनाथशास्त्री त्यांनी पंचाचार्यांच्या उत्पत्तीची कल्पना पुढे केली आहे. आणि वीरशैवांची वर्णाश्रमधर्माची कल्पनाहि त्याचबरोबर त्यांनी विकृत करून मांडली आहे. बसवपंथीय ' जिरगेस्कूल ऑफ थॉट ' व पंचाचार्यपंथीय ' काशिनाथशास्त्री स्कूल ऑफ थॉट ' ह्यांत जो झगडा आहे तो ह्यांतच आहे. आणि तो दोघांच्याहि हटवादीपणामुळे कसा चुकीचा आहे ह्याचें विवेचन ह्यापुढे स्पष्ट व्हावयाचें असल्यामुळे येथे त्या वादाचा उल्लेख करूनच थांबणें अवश्य आहे. येथे आज आह्माला लिंगधारणेच्या उपासकांचा ऐतिहासिक काळच फक्त निश्चित करावयाचा आहे. एक गोष्ट स्पष्ट आहे आणि ती ही कीं, जंगम हा वर्ग बसवपूर्वकाळीं होता. ' सुदर्शन '-कारांनी तेलंगणांत नुकतीच सफर केली. आराध्य ब्राह्मण हे इष्टलिंगधारी आहेत व त्यांचे आचारविचार आजच्या वीरशैवासारखे आहते हें त्यांनी सांगितलें आहे. आता ते आराध्य लिंगधारणेबरोबर यज्ञोपवीत जानवें वापरतात हें खरें. पण हें जानवें लिंगधारणेनंतर त्यांना लाभलें कीं, जानव्यानंतर त्यांना लिंगधारणेचा प्रसंग प्राप्त झाला त्याची चिकित्सा व्हावयास पाहिजे. चार्लस् ब्राऊन हा दक्षिणेंतील राजांचा इतिहास लेखक झाला. त्याने Karnatic Chronology दक्षिण राजवंशावळ लिहिली आहे. त्यांत तेलगू हा शब्द त्रिलिंग नायक शब्दावरून साधला, आहे असें म्हटलें आहे. इष्ट, प्राण, व भाव, अशा तीन लिंगाची कल्पना फक्त वीरशैव तत्वज्ञानाच्या विकासांतच आढळते. ह्यावरून तेलंगणांत वीरशैवमत इष्टलिंग धारणेच्या रूपाने एकेकाळी फार प्रचारांत असावें असें वाटतें. व पुढे त्या प्रांतातील इष्टलिंगधारकांना याज्ञिक परंपरेचें स्वरूप देण्याकरिता जानवें चढविण्याचा व देण्याचा उद्योग झाला असावा. तेच आराध्य असावेत. परंतु जंगम हा त्याहिपूर्वीचा. चरलिंगाचा जो उपासक तो जंगम. स्थावर लिंगातून चिरलिंगाची उपासना रूढ झाली. सांख्यांचा योग, व पुढे समाधि वगैरे शास्त्राची जोड घेऊन ज्यांनी वाटेल तेथे जाऊन, बसून, व फिरून ही उपासना वाढविली त्यांना जंगम म्हणण्याचा परिपाठ पडला असावा असे जंगम बसवकाळी कर्नाटकांत,

तेलंगणांत व तत्पूर्वी उत्तरेकडे होते हा उल्लेख तर सर्वत्र सांपडतो.

केदार व काशी ही बारा ज्योतिर्लिंगापैकी दोन मुख्य लिंगांची ठिकाणें. तेथे कांही शिलालेख सांपडतात. केदारनाथाच्या सेवेकरिता जनमेजयराजाने मी ज्ञानलिंग जंगमास म्हणजे श्री-गोस्वामी आनंद लिंग जंगमाच्या शिष्यास युधिष्ठिर शक ८९ प्लवंग मार्गशीर्षांत बरीच जमीन दान केली आहे व ती अद्यापि चालूं आहे. तेंच स्थान आज वीरशैवपीठाचें स्थान आहे. बसवकाळ हा बाराव्या शतकाचा काळ. युधिष्ठर शक ८९ प्लवंग त्या पूर्वीचा किती तरी जुना. तद्वतच काशी पीठास जयनंद देवराजाने ६ व्या शतकांत श्री. मल्लिकार्जुन शिवयोगी नांवाच्या शिवयोग्यास ज्ञान केल्याचा उल्लेख आहे. ह्या जंगम पुरांतच आज वीरशैव आचार्यांचा मठ आहे. अर्थात् हीहि गोष्ट बसवपूर्व पांच-सहाशें वर्षांची आहे. पं. काशिनाथ शास्त्री ह्यांनी आपल्या भाषणांत ह्या दोन्ही पीठांच्या देणग्याचा उल्लेख केली आहे. परंतु हे दोन्ही मठ बसवानंतर वीरशैवाचे झाले. कारण तत्पूर्वींचे हे शिवयोगी जंगम असले तरी वीरशैव नव्हते, इतर शैव होते असा जिरगे ह्यांचा आरोप दिसतो. पण तो निराधार आहे. हे सर्व इष्टलिंग धारी शिवयोगीच जंगम होते. त्यांना यज्ञोपवीत जानवें नव्हतें. बऱ्याच बुद्ध भिक्षूंचे जे शिवभक्तींत रुपांतर झालें त्यांतच हे इष्टलिंगधारी जगम शिवयोगी जन्माला आले. ह्या बुद्धभिक्षूंतूनच कित्येक जानवीं घालून ब्राम्हण म्हणवूं लागल्याचाहि उल्लेख आढळेल. बुद्धानंतर शैवधर्माची जी स्थावरतेचर लिंगाच्या उपासनेपर्यंत परिणती झाली त्यांतच जंगमवर्ग पुढे आला. आणि ह्याच वर्गाला अनेक राजे व वैश्य अनुयायी मिळाले. यज्ञोपवीत नसलेला इष्टलिंगधारी जो शिवयोगी तो जंगम अशी पूर्व संज्ञा दिसते. बसवेश्वराने जानवें सोडून इष्टलिंग धारण केलें व अनुभंडप उभारून जी शिवोपासना सुरूं केली व तीहि कुडल-संगमेश्वराच्या अनुग्रहाने. तेव्हां हें हें सत्य आहे तें तरी कशाचें दर्शक? तर बसवेश्वर हा जंगम झाला ह्याचेंच दर्शक ज्यावेळी बसवेश्वरास जानवें सोडण्याची बुद्धि झाली त्याअर्थी जानवें प्रसृत होण्यापूर्वींच्या वीरशैवधर्माची त्यांच्यांत जागृति झाली असेंच होतें. कोल्लिपाकीच्या सोमेश्वर लिंगाच्या उपासनेपासून रेणुकाचार्य हा एक वीरशैव आचार्य अवतीर्ण झाला, वटवृक्ष सिद्धेश्वर लिंगापासून दारुकाचार्य, रामनाथ लिंगापासून एकोराम, श्रीशैल मल्लिकार्जून लिंगापासून पंडिताराध्य, काशीच्या विश्वनाथ लिंगापासून विश्वाराध्य असें आचार्य जसे अवतीर्ण झाले तद्वतच कुडलसंगमेश्वराच्या दृढ उपासनेपासून जानवें टाकून इष्टलिंगधारी बसवेश्वर अवतीर्ण झाला असें जरी मानलें तरी तो जंगम झाला असेंच नाहीं कां ह्मणतां येत? पण बसवेश्वर गृहस्थ होता व तो शिवोपासनेबरोबर इतर व्यवहार करीत होता ह्मणून त्यास भक्त ह्मणण्याची प्रथा पडली व तोहि निरभिमानवृत्तिनें भक्त ह्मणवीत असें. नावांच्या शेवटीं आराध्य हें उपपद धारण करणारे पंचाचार्य हे इष्टलिंगाबरोबर जानवें घालणारे आराध्य ब्राह्मण होते असें मानलें तरी स्थावरलिंगाच्या उपासनेंतूनच त्यांना इष्टलिंगधारणेची प्रेरणा झाली हे त्यांच्या लिंगोद्भव व उत्पत्तिवरूनहि सिद्ध होते; व बसवेश्वरासहि तशीच झाली आहे हेंहि खरें. रेवणसिद्ध वगैरे बसवपूर्वी व बसावानंतर होते ही गोष्ट श्री. जिरगे कबूल करतात. तेव्हा बसवेश्वरास जें स्फुरलें तें त्यांनीं जें पाहिलें व ऐकिलें तेच स्फुरलें; नवे कांहींच स्फुरलें नाहीं हे नाही कां त्याबरोबर स्पष्ट होत? अर्थात् वीरशैवधर्माचे मूळ प्रेरक काशिनाथशास्त्री ह्मणतात त्याप्रमाणें पांच आचार्य असोत कीं, जिरगे ह्मणतात त्याप्रमाणे एकटा बसवच असो. आणि ह्या सर्वांचे थोड्या कमी अधिक प्रमाणांत एकच काळ वा स्थळ असो वा नसो पण ह्या सर्वांना जें स्फुरलें, तें त्यांच्यापूर्वी होतें हें मात्र खरें. ह्मणून हे सर्वच वीरशैवधर्माच्या घटनेंत येतात. त्या घटनेबाहेर एकासहि पाऊल टाकतां येत नाही. हेंहि तितकेंच खरें. ह्याच गोष्टीच्या सिद्धीकरिता पुढील लेखांकांत बसवपूर्व काळाचा आणखी ऐतिहासिक दृष्ट्या विचार करूं, आणि वीरशैव धर्म व समाज इसवीसनापूर्वी व बसवकाळी व बसवानंतर कसा एकाच सूत्रांत परिणत होत गेला हेंहि क्रमशः पाहूं. करिता वाचकवृंदांनी ह्या निरस विवेचनाला इतक्यांतच कंटाळू नये.

ग्रंथ परीक्षण

# वीरशैवांनीं वाचण्यालायक दोन ग्रंथ

## Sayings of Basavanna — बसवबचेन

हें श्री. एम्. व्यंकटेश आयंगार, एम्. ए. ह्यांनी बसववचनाचें इंग्रजी भाषांतर केलेलें पुस्तक आमचेकडे अभिप्रायार्थ आलें आहे. बाराव्या शतकांत बसवेश्वर ह्मणून जी महान् विभूति वीरशैवधर्मोद्बोधक ह्मणून होऊन गेली त्या विभूतीचीं जीं वचनें कानडींत सर्वत्र प्रसिद्ध आहेत, इतकेंच नव्हे तर कानडी-वाङ्मयांत ह्या वचनांना अग्रस्थान मिळालें आहे. मराठींत ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी त्याचप्रमाणे कानडींत 'वसवण्णा' व 'बसवण्णा-वचनें' प्रसिद्ध आहेत. ह्या वचनांचें इंग्रजी भाषांतर झाल्यामुळें बाराव्या शतकांत कानडींतून कोणत्या विचारांचा व भावनांचा ध्वनि निघत होता हें कानडी नजाणणारांसहि समजावयाला ह्या इंग्रजी भाषांतरामुळें सोपें झालें आहे. ह्या वाङ्मयाचा मराठी वाङ्मयावर कसा परिणाम झाला हें जर कोणास तुलनेने पहावयाचें असेल तर मराठी संत वचनें व बसववचनें हीं एकाच अर्थांनीं वाटतील. फक्त शिवाऐवजी विठ्ठल व विठ्ठला ऐवजी शिव वा लिंग शद्बाची योजना केली ह्मणजे झालें. मराठींतील संतवाङ्मयाच्या अभ्यासूंनी हें इंग्रजी पुस्तक वाचून बसववचनाप्रमाणेंच अनेक अभंग वा ओंव्या मराठी संतांच्या आढळतील. विशेषतः एकनाथ, तुकाराम व रामदास हे मराठी संत आणि बसवेश्वर ह्यांत बरेंच साम्य आढळेल. बसववचनें इंग्रजींत झाल्यामुळें बाराव्या शतकांत हिंदुस्थानांतलि कानडी भाषेंत कोणता विचारप्रवाह सुरू होता हें सर्व जगताच्या वाङ्मयाशींहि तोलून पाहतां येईल. गदगच्या वीरशैव तरुणसंघानें हें भाषांतर प्रसिद्ध करून बसवेश्वर व वीरशैवधर्म ह्यांचीच सेवा केली नाही तर बाराव्या शतकांतील कानडींतील विचारप्रवाहाला आज जगताच्या वाङ्मयांत प्रविष्ट करून सोडल्याचें पुण्य संपादन केलें आहे. भगीरथाने भागीरथी जशी भूमंडळावर लोकोद्धारार्थ आणली तसेंच हें पुण्य गदगच्या वीरशैवतरुणसंघानें संपादन केलें आहे म्हणून आम्हांस आनंद वाटतो. इंग्रजी भाषांतर सोपें असून अत्यंत उद्बोधक आहे. किंमत ४ आणे असून, वीरशैव तरुणसंघ मु. पो. गदग, जि. धारवाड येथे मिळतें.

### पं. श्री. काशिनाथ शास्त्री ह्यांचीं भाषणें

नागनूरचे बृहन्मठाध्यक्ष पं. श्री. काशिनाथ शास्त्री हे विरक्त पंचाचार्य वादांतील पंचाचार्य पक्षीयांचे प्रमुख आधारस्तंभ आहेत. ह्यांनी ठिकठिकाणीं वीरशैव आचार्य जयंतीच्या प्रसंगीं जीं व्याख्यानें दिलीं त्या व्याख्यानांचा इंग्रजी भाग 'Speeches by P, Shri Kashinath Shastri म्हणून १९३४ मध्ये प्रसिद्ध झालेला आमच्या पाहण्यांत आला. पंडितजी संस्कृत मध्ये विद्वान् आहेत. व कानडी भाषेवर त्यांचें प्रभूत्व आहे वीरशैव आचार्यां विषयी त्यांचा अभिमान तर सर्वश्रुत आहे. त्यांच्या व्याख्यानाच्या ह्या इंग्रजी भाषांतरावरून असें वाटतें कीं, पंडितजी हे वीरशैवधर्मांचा व तत्वज्ञानाचा इतिहास सांगत आहेत.व तो त्यांनी आपल्यास्पष्ट भाषणांत करण्याचा प्रयत्नहि केला आहे. शैवांतूनच वीरशैव मताचा उद्भव झाला हाच बोध ह्यांच्या व्याख्यानांतून स्पष्ट होतो, आणि हें ऐतिहासिक सत्यहि आहे. हें ऐतिहासिक सत्य निर्भीडपणें प्रतिपादन केल्या-

बद्दल पंडितजींचें कोणीहि अभिनंदन करील. पंडितजींच्या व्याख्यानांत वीरशैवांच्या प्राचीन आश्रमव्यवस्थेचा भाग आहे. पंडितजीपासून तो अॅ. पावटे ह्यांच्यापर्यंत वा आजच्या पंचाचार्यांपासून तों आजच्या विरक्तपीठापर्यंतचे सर्व भक्त माहेश्वर ज्या वीरशैवसमाजघटनेचे घटक आहेत ती केव्हां कशी परिणत झाली त्याविषयी पंडितजींचें जें विवेचन आहे तें मात्र ऐतिहासिक दृष्ट्या समाधानकारक नाही. त्याकरिता दाखविलेले आधार अर्थपूर्ण नाहीत व नमूद केलेले ग्रंथहि कोणत्याकाळीं लिहिले गेले ह्याचा स्पष्ट उल्लेख नाही. त्यामुळें बसवपूर्वीचे वीरशैव व बसवानंतरचे वीरशैव असा जो त्यांनीं एक भेद केला आहे तो भेद तर्क व सत्य ह्यास धरून नाही. त्यामुळे बसवापूर्वी आश्रमव्यवस्था होती व बसवानंतर ती विघडली असा जो स्पष्ट ध्वनि ह्या ग्रंथांतून निघतो तो आम्हाला शास्त्रदृष्ट्याच ग्राह्य वाटत नाही.' तो कसा ग्राह्य वाटत नाही. ह्याचें विवेचन 'वीरशैव धर्माचा संस्थापक कोण ?' ह्या लेखमालेंत आह्मी करणारच आहोत. म्हणून येथे त्याविषयीं आम्ही अधिक लिहीत नाही. श्री. जिरगे ह्यांच्या 'वीरशैव-मत संस्थापक कोण ?' ह्या इंग्रजी पुस्तकाचें परीक्षण करीत असतांनाच पंचाचार्य पक्षाच्या प्रमुख अध्वर्यूंचें म्हणणें काय हें आम्हाला ह्या पुस्तकावरून कळावयास मदत झाली. त्यामुळे आमची लेखमाला लांबेल हें खरें; तथापि मूळ पंचाचार्यप्रणित वीरशैवधर्म व बसवेश्वर प्रणित वीरशैवधर्म ह्यांत फरक नाही व ह्यांत जे फरक करतात व इच्छितात ते वीरशैवधर्मतत्वाचा उच्छेद करतात हें जें आमचें स्वतंत्र व पूर्वीचें मत तें अधिक साधारपूर्वक प्रतिपादन करावयास पं. काशिनाथ शास्त्री ह्यांच्या इंग्रजी भाषणाच्या ग्रंथामुळे मदत होत आहे म्हणून ग्रंथकार, ग्रंथप्रकाशक व आमच्याकडे तो मोठ्या आस्थेने पाठविणारे आमचे सहानुभुतीकार ह्यांचे आह्मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

# वीरशैवांतील चळवळी.

## उमरावती येथील मरीस्वामीचें निधन

उमरावती येथें अंबादरवाज्याचे आंत कै० चनबसस्वामीचा मुरघी—मृगेंद्र मठ आहे त्या मठाचे प्रामाणिक व्यवस्थापक मरीअय्यास्वामी वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षी संग्रहणीच्या आजारानें ता. ४ मार्च बुधवारी रात्रौ निधन झालें हें कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें. मरीस्वामीचें गुरु चनबसय्या स्वामी हें अत्यंत कष्टाळु स्वामी होते. मरीस्वामी त्यांचेच शिष्य. पण त्यांनीं गादीवर आरूढ न होतां गृहस्थाश्रम स्वीकारला व मठाची सेवा मरेपर्यंत प्रामाणिकपणे केली, सदर मठाच्या गादीवर बसावें ह्मणून त्यांनी एक बटु निर्माण केला होता. पण त्यासहि गृहस्थाश्रम स्वीकारावा लागला. शेवटीं त्याला अल्पवयींच कालानें गांठलें. ह्या सर्व संकटांना टक्कर देऊन मरीस्वामींनी मठाची व्यवस्था उत्तम ठेवली. बहुधा मठाचे हक्कदार वा व्यवस्थापक मठाचें उत्पन्न बुडवितात व मठहि घालवितात. पण मरीस्वामींनी व्यवस्थापक ह्या नात्यानें काम करून मठाचे उत्पन्न महिन्यास रु० २०० पर्यंत वाढविलें. कोणत्याहि मठास असा व्यवस्थापक लाभणें कठीण. शिवाय आलेल्या दुःखण्यांतून आपण जगत नाही अशी त्यांची खात्री होताच त्यांनी मठाची व्यवस्था पंचांची नेमणूक करून त्यांच्या स्वाधीन केली. अशा प्रकारें योग्य पंचांच्या स्वाधीन मठाची व्यवस्था कायमची करणारे व्यवस्थापक वा अधिकारीहि मठांना अलीकडे लाभत नाहीत. नेमलेल्या पंचांत श्रीमंत सोमेश्वरआप्पा मेन्डसे व श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे व श्री. लिंगाप्पा बड्डे वगैरे प्रमुख, तरुण व कर्तव्यदक्ष असे समजदार लोक आहेत. बरींच जुनी खोडें पंच नेमून काय अव्यवस्था होते ह्याचा अनुभव ह्यापूर्वी आ' त्यामुळे मरीस्वामींनी आपली धाव नव्याकडे घेतली हें त्यांचें कृत्य तर अत्यंत अभिनंदनीय होय. मरीस्वामी स्वभावाने गरीब, श्रद्धाळू व सचोटीने वागणारे होते. त्यांच्या स्मशानयात्रेला बराच वीरशैव स्त्री-पुरुष समाज हजर होता. मरीस्वामीच्या आत्म्यास शिवदेव शांति देवो!

# वीरशैवांची खरी सुधारणा

चाल:— दिंडी

लेखक:— एच. डी. देवघरकर, मुंबई

वीरशैवांचा भाव खरा शीवा
अन्य देवांसि ना कधीं भजेना
परी आतां बहुसंख्य देवतांची
भक्ति नाशाचि गोष्ट होय साची ॥ १ ॥

वीरशैवांचें तत्व एक सारें
वीरशैवांना भेद भाव ना रे;
परी आतां बहुसंख्य भेद झाले
हीच नाशी खरि गोष्ट तुह्मां बारे! ॥ २ ॥

वीरशैवांचे पंथ कितिक नाना
अज्ञ, दाखविती आपुले जनांना;
जगीं होतें जरि हास्य आपणातें
तरी मानू नये खेद आज कां रे? ॥ ३ ॥

गुरू आम्हां जरि वंदनीय आहे,
कार्य केल्याविना वृथा मान कां रे?
तयें आह्मां बहु पंगु फार केले
अधीकारांतीं दडपुनि अह्मांते ॥ ४ ॥

गुरु हे पंथांसि मोडितो ह्मणेना
पंथभेदांचा अभीमान त्यांना;
गुरू आहे जरि पूज्य तुह्मां आह्मां
तरि तो जातीचा श्रेष्ठ मी ह्मणेना. ॥ ५ ॥

धर्मग्रंथीं जरि खूप काय आहे,
परि हो स्वार्थासाठींच तें लिहिलें.
कितिक गोष्टि त्या जुन्या पुराण्या हो!
त्याज्य काळा ह्या खास तुह्मि पहाहो! ॥ ६ ॥

# महाराष्ट्र-वीरशैव-परिचयपट

सूचना — महाराष्ट्रवीरशैव-परिचयपट भरून पाठविताना फक्त एकाच घरांतील कुटुंबांतील मंडळींची माहिती असावी, एकाची अनेक घरें झालीं असलीं व कांही कुटुंबांतील मंडळींनीं स्थलांतर करून तेथे निराळें घर स्थापन केलें असलें तर त्यांचा एकाच कुटुंबांत समावेश करूं नये, करिता कुटुंब म्हणजे फक्त एकाच घरांतील कुटुंब. त्याचप्रमाणे मठांत मठवाल्यांचे पूर्वाश्रमांचे नातलग जवळ रहात असल्यास त्यांचाहि समावेश होणार नाही. ह्या सूचने-व्यतिरिक्त कोणीं माहिती पाठविल्यास ती गाळली जाईल.

## ८. दारव्हा कोरे कुटुंब

प्रांत-वऱ्हाड, जिल्हा यवतमाळ, मु. पो. दारव्हा येथें मोतीबागेंत ( १ ) नामदेव आप्पाजी कोरे, दिक्षवत, वय ३४, विवाहित, व्यापारी, शिक्षण इंग्रजी ४ था वर्ग, दारव्हा येथे वीरशैव लोकसंख्या १२५, घरचा धार्मिक व सामाजिक परोपकारार्थ सालचा खर्च करण्याची इच्छा वेळ काळपरत्वें. ( २ ) गणपत आप्पाजी कोरे वय ३० विवाहित व्यवसाय, व्यापार, शिक्षण इंग्रजी ४ था वर्ग, मराठी येते. [३] सौ जनाबाई भ्र. नामदेव आप्पा, वय २८, घरकाम, शिक्षित नाही. ( ४ ) कु० मधुकर नामदेवआप्पा कोरे वय ६ वर्षे प्राथमिक शिक्षण. (५) कु. शांता नामदेव, कोरे वय ३ वर्षे. [ ६ ] सुशिला गणपतआप्पा कोरे वय २ वर्षे. ( ७ ) लिलावती नामदेवआप्पा कोरे ६ म. ( ८ ) सौ. मनाबाई भ्र. गणपतआप्पा कोरे, वय २०, घरकाम शिक्षित नाही.

## ९. लातूरचे झुंजारे कुटुंब.

मु. पो. लातूर जि. उस्मानाबाद, प्रांत निजाम येथे ( १ ) सिद्धमल आप्पा झुंजारे, दिक्षवंत, मादन हिपरगीमठ, वय, ७५, विधुर, लिहितां-वाचतां येते. शेती, व्यापार व सावकारी, वीरशैव लोकसंख्या ६०००, धार्मिक सामाजिक खर्च रु. १०० दरसाल, परोपकारार्थ खर्च करण्याची इच्छा रु. २५. ( २ ) मन्मथ सिद्धमलआप्पा झुंजारे, वय २०, विवाहित, व्यापार, उर्दु, मराठी, व इंग्रजी समजते. ( ३ ) सौ. चिमनव्वा भ्र. मन्मथ, वय १५, घरकाम, मराठी, येते, ( ४ ) पार्वतीबाई झुंजारे, वय, २५. विधवा, घरकाम, [ ५ ] भागीरथीबाई झुंजारे, वय २२, विधवा, घरकाम.

## १० यवतमाळचे डबरे कुटुंब मु० पो०

यवतमाळ [ वऱ्हाड ] येथें मारुतिआप्पा सांभाशिवआप्पा डबरे, पंचम, मठ नेरपिंगळाई हे राहतात. वय ४३, विवाहित, मराठी येते, व्यापार, वीरशैवलोकसंख्या २५०, धार्मिक सामाजिक खर्च रु. ५१ दरसाल, परोपकारार्थ रु. १५, परोपकारार्थ बाहेर खर्च करण्याची इच्छा रु. १० [ २ ] गयाबाई, वय ५८, विधवा, ( ३ ) लक्ष्मण सांभशिव, वय ३८, विवाहित, मराठी येते. ( ४ ) सौ. द्रौपदीबाई भ्र. मारुति-आप्पा, वय, २८. [ ५ ] सौ. शेवंतीबाई भ्र. लक्ष्मणआप्पा, वय २५, [ ६ ] कु. नारायण लक्ष्मण, वय १३, मराठी शिक्षण चालू. ( ७ ) कु. शांति लक्ष्मण, वय ९, मराठी पहिलींत. ( ८ ) कु. निळकंठ मारुति, वय ८, मराठी पहिलींत.

## ११ पानगांवचे उरगुंडे कुटुंब

मु. पो. पानगांव ता. मोमिनाबाद जि. बीड [ निजाम प्रांत ] ( १ ) शिवबस सिद्रामप्पा उरगुंडे, गुरुमठ वळेसंग, वय ३५, विवाहित, व्यापार, मराठी येते, लोकसंख्या ५०. [ २ ]

गं. भा. लक्ष्मीबाई, वय ५० ( ३ ) रतनाबाई, वय २२, [ ४ ] कु. शरणाप्पा, वय १२, ( ५ ) कु. गंगुबाई वय २॥ ( ६ ) सौ. सरस्वतीबाई, वय १६,

### १२ केळवदचे आदेवार कुटुंब

मु. पो. केळवद. ता. सावनेर जि. नागपूर, येथे (१) नथुआप्पा मारुतिआप्पा आदेवार, शिलवंत, मठ काशी, वय २८, विवाहित, शिक्षक, हे राहतात. लोकसंख्या १५०, परोपकारार्थ सालचे रु. ५ खर्च करण्याची इच्छा. ( २ ) सौ. कुसुमावतीबाई आदेवार, वय १६, गृहकृत्य, मराठी लिहिणे-वाचणे, ( ३ ) गं. भा. सखुबाई वय ३७, विधवा बांगड्यांचें दुकान.

### १३ सोलापूरचे धुम्मा कुटुंब

( १ ) सिद्धरामप्पा बसाप्पा धुम्मा, पोटजात दिक्षावंत, गुरुमठ अहिरवाडी, मु. सोलापूर वय ४८, विवाहित, वकीली व व्यापार, जिल्हा कोर्ट वकीली परीक्षा पास, मराठी येते, सोलापूरची वीरशैव लोकसंख्या सरासरी वीस हजार, कुटुंबाचा सामाजिक व धार्मिक खर्च सुमारे ३०० रु. सालीना सहज परोपकारार्थ खर्च रु. ५०, कुटुंबाबाहेर परोपकारार्थ खर्च करण्याची इच्छा सालीना रु. २५. [ २ ] मल्लिकार्जून बसाप्पा धुम्मा, वय ३७, पुनर्विवाहित, व्यापार, इंग्रजी पांचवी मराठी येते. ( ३ ) गं. भा. निंबवाभाई भ्र. बसाप्पा वय ७० विधवा, घरकाम, ( ४ ) सौ. राधाबाई धुम्मा, वय २९, मराठी लिहितां-वाचतां येते, घरकाम, [ ५ ] सौ. काशीबाई भ्र. मल्लिकार्जून धुम्मा, वय २५, पुनर्विवाहित. घरकाम, कानडी लिहिणे वाचणे, मराठी नाही. [ ६ ] कु. विश्वनाथ ऊर्फ बसाप्पा मल्लिकार्जून, वय १२, मराठी प्राथमिक शाळेंत जातो. [ ७ ] कु. कमलादेवी सिद्धराम धुम्मा, वय ७, मराठी प्राथमिक शाळा, [ ८ ] कु. शांतादेवी मल्लिकार्जून वय ६, मराठी प्राथमिक शाळेंत प्रवेश, ( ९ ) कु. सुमन ऊर्फ रेवणसिद्धप्पा सिद्धरामप्पा वय ३,

### १४ कीनगांवचे वीरशैवमतधुरंधर

( १ ) मलकार्जून आप्पाराव आंधळे वीरशैव-मतधुरंधर, वय ६१, विवाहित, दिक्षवंत, मठ लेकुळेगी, मु. किनगांव, पो. गंगाखेड, ता. अहमदपूर, जि. गंगाखेड ( निजामप्रांत ) पीठाची गिरणी व व्यापार, मराठी सहावी मराठी येते, गांवची एकंदर लोकसंख्या ३३६ सामाजिक व धार्मिक खर्च रु. ४०, परोपकार रु. १५, बाहेर इच्छा रु. १०. [ ३ ] त्र्यंबक महानदी शेटे, चाकूरकर, वय २२, व्यापार, मराठी येते, विवाहित, ( ३ ) सौ. सीताबाई भ्र. मल्लिकार्जूनआप्पा, वय ५०, विवाहित, घरकाम, [ ४ ] सौ. रुद्रव्वा भ्र मल्लिकार्जूनआप्पा, वय ४०, पुनर्विवाहित, घरकाम, ( ५ ) सौ. भागिरथीबाई भ्र. मल्लिकार्जूनआप्पा, वय ३५, पुनर्विवाहित (६ सौ. वत्सलाबाई भ्र त्र्यंबकआप्पा शेटे, वय १३, विवाहित मराठी ४ थी शिकत आहे. ( ७ ) कु. त्रिवेणीबाई मल्लिकार्जून, वय ३, ( ८ ) गं. भा. हारीबाई भ्र० महालिंगआप्पा सोलपुरे, वय ३५ विधवा, घरकाम, मराठी-चौथीचें शिक्षण.

### १५ साताराचें लखापती कुटुंब.

[ १ ] शंकर दगडाप्पा लखापति, दीक्षवंत पंचम तेली, गुरुमठ औंध, मु. सातारा, वय ५८, पुनर्विवाहित, मराठीशाळेचे मॅनेजर, साताराची वीरशैव लोकसंख्या ५०० धार्मिक सामाजिक कुटुंब खर्च २५ रु. परोपकार रु. १०, बाहेर परोपकारांची इच्छा रु. ५, [ २ ] राजाराम दगडाप्पा. वय ४५, विवाहित. व्यापार, मराठी येते, [ ३ ] गंगाराम बाळशेठ, वय ४०, पुनर्विवाहित, व्यापार, मराठी येते. ( ४ ) शंकर हरी, वय ४५, विवाहित, व्यापार, मराठी येते, [ ५ ] रामचंद्र कृष्णाप्पा, वय ४०, विवाहित, व्यापार, मराठी येते. ( ६ ) सौ. कृष्णाबाई भ्र० शंकर दगडाप्पा लखापति वय ५०, विवाहित. घरकाम, [ ७ ] सौ. अनुसया भ्र० राजाराम, वय ३०, विवाहित, वगैरे.

१६ लातूरचे यरटे कुटुंब.

( १ ) सिद्धप्पा कोलप्पा यरटे, दिक्षवंत, गुरुमठ आळूर मु. पो. लातूर, जि. उस्मानाबाद [ निजामप्रांत ] वय २८, विवाहित, व्यापार, व्यापारी शिक्षण झालें, मराठी येतें. लातूरची वीरशैव लोकसंख्या ४५०, धार्मिक व सामाजिक सालचा खर्च रु.२१ परोपकारार्थ रु.५ [ २ ] सौ० निलव्वा भ्र. सिदप्पा, वय १८, विवाहित, घरकाम.

१७ कसबे रेनापुरचा विरक्तमठ

[ १ ] विरक्तमठ [ निलगा ] मुकत्यार बाळय्यास्वामी, वय ५०, इनाम जमीन व भीक्षा, मराठी येते [ २ ] शिष्य महालिंग स्वामी, वय १४, मराठी चौथी, येथील वीर शैवलोकसंख्या २००, मठाचा सालचा धार्मिक खर्च रु. ७५, परोपकारार्थ रु. १०,

## परिचयपटवार्ता.

कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें कीं, वीरशैव संजीवनींत प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या अंकाच्या परिचयपटांतील नं. १ चे सोलापूरचे झुंजे कुटुंब त्यांतील नं. ८ चे कु. महाबलेश्वर बंडाप्पा झुंजे वय ६ हा सात आठ दिवस कर्णमूळानें आजारी होऊन ता. २७-२-३६ गुरुवार रोजी पहाटे ५ वाजतां ऑपरेशन केल्यावर एकाएकी कैलासवासी झाला.

---

# अंधश्रद्धा कमी कशी होईल?

लेखकः— बी. नारायणस्वामी मलवडी ( सातारा )

## लेखांक २ रा.

मागील लेखांत वर्णन केलेल्या वीरशैवांतील पोटजाती तांबोळी, तेली, तिराळी, माळी, काचारी पैकीं आपल्या समाजांतील माणसांनीं जर आम्हाला शिधासामुग्री आणून दिली तर त्याला धार्मिक दृष्ट्या कांही बाध नाही. इतकेंच नव्हे तर आमच्यांतील उपाध्याय-वर्गास अस्पृश्यांचा शिधाहि पचनीं पडला आहे. त्याचप्रमाणें त्यांनी जर आम्हांला पाणी आणून दिलें तर तेंहि आम्ही मोठ्या आनंदाने सोवळें नेसून घटाघट पितों, त्या पाण्यानें स्वयंपाक करतो, वगैरे. लग्नकार्यांतून अशा मंडळीकडून बिन्-दिक्कत सहाय्य घेतां येतें! त्यांनी आणून दिलेला शिधा, व त्यांनींच आणलेलें पाणी आम्ही आपल्या हाताने त्या शिध्यांत घालून स्वयंपाक बनवूं लागलों तर मात्र लगेच त्यांत सोवळें उत्पन्न होतें. आमच्या पंथाचा उच्चपणा त्यांत शिरतो. मग शिधासामुग्री-पाणी वगैरे आणून देणाऱ्या मंडळींनीं धावळी नेसून जरी शिवायचें म्हटलें तरी 'छट् तें नाहीच जमायचें!' हा प्रकार लिंगायतेतर समाजाच्या ध्यानांत आला तर खरोखरीच ते हांसतात — उपहास करतात; व आमच्या अंधश्रद्धेची कींव करतात. ज्ञातिबांधवहो, या गोष्टीवर नाही का तुम्ही विचार करणार?

स्वामींच्या बाबतींतहि असाच हास्यास्पद प्रकार! पूर्वीच्या काळीं या मंडळीमध्यें कांही दैवी सामर्थ्य होतें म्हणे! व त्याबद्दल त्या काळीं त्यांना त्यांच्या विद्वत्तेनुरूप मानपान होता. श्राद्धप्रसंगीं त्यांना त्यांच्या पाद्यपूजेचें तीर्थ लिंगपूजेच्या उपयोगांत आणलें जात असे. पण अलीकडे कांही बंडखोरांच्या [?] बंडखोरीला विजय मिळाल्याने ही पाद्य-पूजेची चाल बंद पडूं लागली आहे. मला हास्यास्पद प्रकार सांगायचा आहे तो असा कीं, पूर्वीच्या काळचे विद्वान् गुरु [जंगम] हल्लीच्या काळीं परंपरागत धंदा बनून उपाध्यायपणा करूं लागले. हे गुरु म्हणून तिराळी, तेली, तांबोळी, साळी वगैरे पंथांतील मंडळीकडे अन्न ग्रहण करितात; व दीक्षावंत, शिलवंत व पंचम स्वतःला उच्च समजणारे यांचेकडेहि अगदीं घराच्या पवित्र देव्हाऱ्याजवळ यजमानाच्या पाटाला पाट लावून सुग्रास भोजनावर आग्रहा-नुसार यथेच्छ ताव मारतात! हा नित्याचा व्यवहार आहे. परंतु या सर्वांना त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं! तें ह्मणतात, "गुरुला कसला बाट आला आहे?" वगैरे असमाधान-कारक उत्तरें देतात. पण त्यामुळें जिज्ञासूंचें समाधान होत नाहीं. आजच्या परिस्थितिवरून विचार केला तर या जंगम ऊर्फ माहेश्वरी मूर्तीं-नाच या धार्मिक बाबतींत कन्सेशन (सवलत) काय ह्मणून? हा मुद्दा जरी पक्षपातीपणाचा आहे म्हणून नजरेआड केला, तरी तांबोळी, तेली, काचारी यासारख्या, दीक्षावंत, शिलवंत, पंचम यांच्या दृष्टीनें हलक्या समजणाऱ्यांच्या घरीं जेवणाऱ्या माहेश्वरांना जर दीक्षावंत, शिल-वंत व पंचम आपल्या पंक्तीला घेतात तर आम्हाला [तांबोळी वगैरे यांना] त्यांच्या पंक्तीला भोजनास बसण्याला कां परवानगी नसावी? हा पंचमांचा अगर तत्सदृश पोटजातींचा पक्षपात नाहीं काय? बाकीच्या सर्व पोटजातींतील कमींत कमी अंदाजे शेंकडा २५,-कारण खेडेगांवांतील जनता शहरवासीयांच्या इतकी पुढे गेली नाहीं म्हणून शहरांतील प्रमाण शेंकडा ५० तरी खास त्या सर्वांची सरासरी शेंकडा २५ धरतो. कदाचित् हा आंकडा बरोबरहि असूं शकणार नाहीं— समाज हॉटेलांतील चहा-भज्यावर सपाटून ताव मारतो. मग तें हॉटेल वीरशैवेतराचें असलें तरी पर्वा नसतें. हॉटेलांतील हे जिन्नस देणारा मुलगा कोणत्याहि जातीचा असला तरी चालतो. त्या वेळी पंचमांचा अपमान, व धर्म मुळींच भ्रष्ट होत नाहीं. बाजूच्या खुर्चीवर बसलेला मनुष्य अस्पृश्य असला तरी त्याच्या सोवळेबद्ध धर्माला मुळींच विटाळ होऊं शकत नाहीं. आणि घरीं जर कां त्रिकाळ नव्हे परंतु एककाळ मनोभावें लिंगपूजा करणारा तिराळी, काचारी, तांबोळी, तेली वगैरे पोटभेदांतील मनुष्य आला तर धर्म विगलित होतोच होतो! हा प्रकार हास्यास्पद नाहीं काय?

हे सर्व प्रकार आमचे धर्मगुरुपीठाधिकारी उघड्या डोळ्यांनीं पाहात आहे. पुढें धर्मगुरुसंबंधीं विचार करूं.

# वीरशैवसमाज व जातीभेद.

( लेखक.—श्री. नथ्थुआप्पा मारुतीआप्पा आदेवार, नागपूर. )

कोणत्याहि समाजाचें अस्तित्व, त्यांतील, मूलतत्वापेक्षां त्याच्या सुसंघटनेवर जास्त अवलंबून असतें. आपल्या वीरशैवसमाजांत जातीय-पोटभेद फार असून उच्चनीच भावनाहि फार आहे. व त्यामुळें कित्येक वीरशैवबंधूंनी धर्मांतरें केल्याची उदाहरणें पुष्कळच दाखवितां येतील. स्वत:स देवांग म्हणविणाऱ्या, व लिंगायत बुरड वगैरे अनेक लोकांनीं लिंगत्याग व धर्मत्याग केलेला आहे. त्यांनीं धर्मत्याग कां केला असावा असा जर मला कोणीं सवाल केला तर मी त्याचें हेंच उत्तर देऊं शकेन कीं, त्यांना आपला समाज समान दर्जानें वागवीत नव्हता!

पुष्कळ ठिकाणीं उच्चनीचतेच्या भावनेमुळें दुफ्या उत्पन्न झालेल्या आहेत. याचें कारण शोधून पाहिलें असतां धर्मांधतेमुळें, व अज्ञानपणामुळें आपणास उच्च म्हणविणारे वीरशैव पोटजातींतील वीरशैवांना त्यांच्या धंद्यावरून तुच्छ लेखतात हें होय, पण धंदा हें सामाजिक दर्जा ठरविण्याचें मोजमाप होऊं शकत नाहीं.

" लीनं गच्छति यस्मिन्सा माया दुर्घटकारिणी ।
तल्लिङमिति सन्मार्गं रूप्यते पारमार्थिकैः ॥

ज्यामध्यें महेश्वर शक्ति [ माया ] विलीन होते त्याला लिंग म्हणतात.

वरील श्लोकावरून लिंग कशाला म्हणावें यासंबंधी यथार्थ कल्पना होऊं शकते. वीरशैव म्हटला व त्याचे गळ्यांत ' लिंग ' दिसलें म्हणजे आमचे वीरशैवांचे ठिकाणीं आपलेपणाची भावना एकदम उत्पन्न झाली पाहिजे, व त्याला दूर न लोटतां जवळ केलें पाहिजे व त्याच्याशीं निदान ' अन्नपानादि ' व्यवहार केला पाहिजे, व असें जोपर्यंत घडून येणार नाही तोपर्यंत समाजास संघटित स्वरूप प्राप्त होणें कठीणच आहे. अशी जर आपले समजाचे पुढारीवर्गाकडून दिरंगाई झाली तर आपल्या समाजाची सुधारणा घडून येण्यास आणखी कित्येक वर्षें तरी लागतील असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. एवढी सुधारणा घडून आल्यावर आमचा धर्म सोडून जाण्याची कोणत्या तरी वीरशैव बंधूची छाती होईल काय? खास नाहीं.

' स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥

वीरशैव बंधूंनो तुम्ही आपल्यासमोर वरील तत्त्व ठेवा, व आपल्या धर्मांतील धर्मांतर करणाऱ्या लोकांना थांबवून, त्यांना ' सामाजिक दर्जाप्रमाणे वागविण्याचें आश्वासन द्या., आपले समाजास सुसंघटित स्वरूप आणा अशी आपणांस माझी विनंती आहे.

वर्णभेद आणि जातीभेद ह्या एकाच संस्थेच्या निव्वळ पायऱ्या आहेत. समाजांतील जातिभेदांतील उत्पत्ति हा सामाजिक शास्त्रांतला मोठा विकट प्रश्न आहे. आपल्या वीरशैवसमाजांत जातिभेद इतका दृढमूल झाला कीं, काहीं विचार करावयास नको. आपला श्रेष्ठत्वाचा तोरा मिरविणारे चिमूटभर वीरशैव बहुसंख्य पोटजातींतील वीरशैवांशीं मोठ्या अभिमानानें वागून त्यांना तुच्छ समजून दूर लोटतात. असल्या प्रकारच्या बाबीमुळें, समाजोन्नतीचे कामामध्यें बरेच अडथळे उत्पन्न होतील.

जातिभेद हा समाजोन्नतीचे आड येतो. समाजोन्नति करण्यास, समाजांतील व्यक्तींचे एकमेकांवर प्रेम असावयास पाहिजे. जातिभेद कायम ठेवून जातिमत्सर कमी करणें शक्य नाहीं. जातीभेद हा सर्व प्रगतीचे आड येत आहे. ह्यापुढें तरी आपणांकडून संघटनेचा जास्त जोरदार प्रयत्न होणें जरूर व अगत्याचें आहे. तसेंच, आपले समाजांतील शैक्षणिक व औद्योगिक, प्रगतीकडेहि प्रत्येकानें लक्ष दिलें पाहिजे आणि त्याबरोबर स्वच्छता, आचार, विचार, रहाणी यांच्यांतहि अवश्य त्या सुधारणा होणें जरूरीचें आहे.

अविचार, दुराग्रह जाऊन त्या ठिकाणीं प्रेम व सहानुभूति येण्यास, रोटीव्यवहार हा सर्वांना होणें इष्ट आहे. व त्यामुळेंच जातिभेदाचें निर्मूलन व उच्चाटन होईल, व हा अनिष्ट जातीभेद, निरनिराळे पोट-भेद, यांचें एकीकरण शक्य तितक्या लौकर होईल. ह्या दिशेनें सर्वांनीं एकीनें, संघटनेने तयारीस लागून प्रयन्त करावा.

एवढें तूर्त पूरे. इतकें लिहून रजा घेतों.

# आमच्याविषयीं लोकमत

**पं० चि० म० वीरभद्र शास्त्रीः** -- प्रिंसिपाल, शंकर-संस्कृत-कॉलेज, यादागिरी लिहितात कीं, आपल्या 'संजीवनी' च्या 'माला' आतापर्यंत चार अनुभविल्या आहेत. त्या माला कांही दुर्वादमृतांना अवश्यमेव जीवन देणाऱ्या आहेत. गंमत अशी आहे कीं, कर्नाटकांतील वीरशैव आपल्याला शिक्षित समजतात. पण त्यांच्याकडून एकसुद्धा निःपक्षमताचें पत्र चालविलें जात नाही. ही गोष्ट आपल्या [ महाराष्ट्र वीरशैवा ]-कडूनच घडून आलेली पाहून फार समाधान वाटत आहे. पण संजीवनीची माला थोडे मोठे प्रमाणांत आकार वाढवून दिली पाहिजे. सर्व कर्नाटक पत्रांतील वीरशैवांच्या मुख्य गोष्टी संग्रहित होणें अवश्य आहे. आपल्यासारख्या निपुण चिकित्सकाचे हातून संजीवनीचे प्रयोग सफल होतील अशी मला आशा आहे. मीहि संजीवनीची साक्रिय अभिवृद्धी इच्छितों. बेंगळूराहून कोणी पं. संगय्या नांवाच्या महाशयानी 'वीरशैव' म्हणून एक निःपक्ष मासिक आताच सुरू केलें आहे. पण त्याचा दर्जा 'संजीवनी'-इतका नाही.

श्री. वीरप्पा बिळेअंगडी, बी. ए., एल्‌ एल्‌. बी., वकील, हुबळी हे 'सुदर्शन' ता० २४ फेब्रुवारीच्या अंकांतील 'मठस्वामीचा अभिमान कोणीकडे' ह्या लेखांत लिहितात कीं, सोलापूरच्या 'सुदर्शन' पत्राच्या तारीख १०-९-३६ च्या अंकांत उमरावतीच्या वीरशैव संजीविनीचे संपादक श्री. बामणगांवकर यांचा लेख पासिद्ध झाला आहे. त्याची लेखनशैली किती मार्मिक, किती निर्दंभ व निस्वार्थी आहे ह्याचा अनुभव येतो. वीरशैवसमाज व त्यांतील विद्वानांविषयीं असलेला त्यांचा निस्सीम अभिमान व पूज्यभाव पाहून अशा विचाराचे लोकच समाजधुरीण होण्यास योग्य आहेत. कोणत्या तरी सिंहासनावर बसलेले तथापि पीठास योग्य असें ज्ञान, आचार वगैरे नसलेले लोक स्वामी असले तरी ते मानास व पुढारीपणास योग्य नाहींत हें निःसंशय होय. ख्रिस्ती मिशनऱ्याप्रमाणें निरभिमानी श्री. बामणगांवकरासारखे लोक आमच्या समाजांत आजहि आहेत, ही अभिमानाची गोष्ट होय. त्याचप्रमाणें निरभिमानी निस्वार्थ समाजसेवा करण्यास आमच्या गुरुविरक्तांनींहि लागावें एवढेंच सुचवून हा लेख पुरा करतों.

विजापूर 'साप्ताहिक उदय,'- (कानडी पत्र) ता. १-३ ३६ च्या अंकांत लिहिते कीं, 'वीरशैवसंजीवनी' ही उमरावतींत निघणारी मराठी पाक्षिक पत्रिका आहे. महाराष्ट्रांतील राजकीय अध्वर्यु व वीरशैवांचे नेते श्री. नारायण रामलिंग वामणगांवकर हे तिचे संपादक आहेत. हे महाराष्ट्रामध्ये प्रसिद्ध लेखक असून हल्ली 'उदय' नामक राजकीय धोरणाचें अर्धसाप्ताहिक ते संपादित आहेत. २६ वर्षांपूर्वींच्या 'वीरशैव संजीविनि' पत्रिकेला त्यांनी पुनर्जन्म दिला आहे हें अभिनंदनीय होय. ह्या पत्रिकेच्याद्वारें महाराष्ट्रांतील वीरशैवांची उन्नति होवो असें आम्ही इच्छितों.

हुबळीचें 'लोकमत'— (कानडी) २०-२-३६ च्या अंकांत लिहिते कीं, वीरशैव–संजीविनी नांवाचें मराठी पाक्षिक पत्र उमरावती [ वऱ्हाड ] येथे अरुण मुद्रणालयांत छापून प्रसिद्ध केलें जात आहे. त्याचे एक–दोन अंक आमचे अवलोकनांत आले आहेत. वीरशैव संजीविनी ह्यापूर्वी उमरावतींत निघत असे; पण कांही वर्षें ती बंद पडली होती. महाराष्ट्रास मुख्यत्वेंकरून वऱ्हाड-मध्यप्रांताला वीरशैवसमाजाचें हें मुखपत्र म्हणून

एक पत्रिका असावी असें तेथील पुढाऱ्यांना वाटल्यामुळे पुनः ही पत्रिका सुरूं झाली. वऱ्हाड-प्रांताचे लिंगायतसमाजाचे पुढारी, प्रसिद्ध काँग्रेस-कार्यकर्ते आणि मराठी " उदय " पत्रिकाकार दे० भ० नारायणस्वामी बामणगांवकर हे ही पत्रिका प्रथम चालवीत होते. आतांहि आपल्या समाजबांधवांच्या आग्रहावरून पुनः हें पाक्षिक प्रसिद्ध करूं लागले. दे. भ. बामणगांवकर यांची विद्वत्ता, लोकोत्तर देशसेवा, समाजाबद्दल कळकळ, ही पाहिली म्हणजे त्यांच्या नेतृत्वांत चालणारी ही नूतन पत्रिका महाराष्ट्रीय वीरशैवसमाजांत जागृति केल्याशिवाय राहणार नाही. म्हणून श्री. बामण गांवकर यांचें त्यांच्या ह्या नूतन साहसाबद्दल मी अभिनंदन करतों.

हावेरीचें 'बसवराज कानडीपत्र.—ता. २०-१-३६ च्या अंकांत लिहिते कीं, मराठी भाषा बोलणाऱ्या लिंगायतांच्या उन्नतिकरितां वृत्तपत्र प्रसिद्ध करणारे पहिले वृत्तपत्रकार म्हणून उमरावतीचे श्री. बामणगांवकर ह्यांनाच पहिला मान आहे. १९१०मध्ये' वीरशैव संजीवनी ' काढून ह्यांनी कांही दिवस चालविलें. त्या वेळीं मिळावें तसें उत्तेजन न मिळाल्यामुळे तें बंद करावें लागलें. श्री. बामणगांवकर हे राजकारणांत चांगले मुरलेले, लोकमान्य टिळकांच्या राजकीय तालमींत बरेच दिवस काढलेले असून, ते मराठी भाषेचे तज्ञ आहेत. त्यांचे नाट्यग्रंथ मराठींत प्रसिद्ध आहेत. त्यांनी आता पूर्वीच्या ' संजीवनी ' ला पुन्हा प्रकाशांत आणलें आहे. ' संजीवनी '-चे दोन अंक आम्हीं पाहिले आहेत. लेखनकलेंत-प्रवीण असलेल्या संपादकाच्या लेखनशैली विषयीं कांही लिहावयास नकोच. हें पाक्षिक पुस्तक-रूपाचें असल्यामुळे संग्राह्य आहे. वार्षिक वर्गणी २॥ रु. आहे. तूर्त एक वर्षाच्या संकल्पाने हें प्रसिद्ध होत आहे. मराठी भाषा जाणणाऱ्यांनी ह्या पत्राला सहाय्य देऊन चिरायु करावें अशी आमची मनःपूर्वक इच्छा आहे. पत्र भेटीस येतें ह्याबद्दल आम्ही आभारी आहोंत.

---

## दर्गनतळ्ळीचें बातमीपत्र

ता. सोलापूरपैकीं दर्गनहळ्ळी येथें ता. २१-२-३६ रोजी शुक्रवारीं श्रीजगद्गुरु पंडिताराध्य व जगद्गुरु विश्वाराध्य-जयंति-महोत्सवानिमित्त अत्यंत थाटानें आडव्या पालखींतून पवित्रमय मिरवणूक लिंवण्णप्पा यांच्या घरापासून निघून गांवभर परम-पावनकृत होऊन शेवटीं गांवांत प्रमुख अशा महादेवालयांत पोहोंचली. नंतर श्रीगुरु प. ब्र. होटगीकर महाराजांच्या अध्यक्षतेखालीं सभा भर-वून विश्वाराध्य होनमुर्गीकर, आण्णप्पा मास्तर व बापुराव पाटील मोघे यांचीं व्याख्यानें झालीं. शेवटीं अध्यक्षांचें व्याख्यान होऊन अध्यक्षांच्या हस्तें " श्रीजगद्गुरु सिद्धलिंगसेवासंघ " व संघामार्फत " श्रीजगद्गुरु पंडीताराध्य वाचनालय स्थापन करण्यांत आलें. ता. २३-२-३६ इ. रविवारीं संघाचे कार्यकारी मंडळांची सभा पंडिताश्रमांत संघाध्यक्ष राचप्पा बिराजदार यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती. गांवांतलि अत्यंत प्रज्वलितरीतीनें भडकलेला कलहाग्नि होटगीकर महाराजांपुढें चेनप्पा बिराजदार व गंगप्पा बिराज-दार, शिवराम बिराजदार वगैरे प्रमुख मंडळींनीं आपापसांत शांत करून घेतल्याबद्दल ही सभा अत्यानंद व्यक्त करीत आहे असा ठराव अध्य-क्षांकडून मांडून सर्वांनुमतें पास करण्यांत आला. शेवटीं आरती होऊन सभा विसर्जन झाली. संघाध्यक्ष राचप्पा गंगप्पा बिराजदार व उपाध्यक्ष संगप्पा गुरुसिद्धप्पा बिराजदार हे आहेत.

---

## वीरशैव संजीवनीचे प्रचारार्थ दौरा.

पुसदचे श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, नागपूरचे दे. भ. राजाभाऊ डांगरे व श्री. बाबु-राव चौधरी, बी. ए, हे वीरशैवसंजीवनीचे प्रचार-कार्यार्थ पुढील महिन्यांत-धुळें, चाळिसगांव, यावल, वगैरे खानदेशकडील भागांत व नागपूर, खापा, सावनेर, पांढुर्णा, सावरगांव, काटोल, वगैरे नागपूरकडील भागांत दौरा काढणार आहेत.

# वीरशैवसंजीवनी

अंक ७ वा ) ता० १ एप्रिल १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीविनी

जुनें वर्ष चौथें

| ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।<br>लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥<br>पारमेश्वरागम प. १ (५६) | मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः<br>स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्<br>भगवद्गीता अ.९ (३२) |
| --- | --- |

नवें वर्ष १ लें ) मिति चैत्र शु॥ १० शके १८५७ ( अंक ७ वा.

# वीरशैव धर्मांचा संस्थापक कोण ?

लेखांक ४ था.

## सर्व वीरशैव द्विजत्वाचे अधिकारी.

ज्यांच्या इंग्रजींतील ' who is the founder of the Veershaio religion ग्रंथाच्या परीक्षणाच्या निमित्तानें ' वीरशैवधर्मांचा संस्थापक कोण ?' ही लेखमाला लिहिण्याची व त्यानिमितानें वीरशैव मताचें परिशीलन करण्याची आह्माला प्रेरणा झाली ते श्री. बसवलिंगाप्पा जीरगे शिवैक्य झाल्याचें दुःखद वर्तमान आमच्या कानीं आलें म्हणून आम्हाला अतिशय हळहळ वाटत आहे. श्री. जिरगे हे वयोवृद्ध होते हें जरी खरें, तरी बसवदेवप्रेरणेने त्यांना अधिक थोडें आयुष्य लाभलें असतें तर आमची ही लेखमाला पूर्ण होतांच ती त्यांच्या दृष्टीला पडेल अशी आह्मी व्यवस्था करणार होतो आणि त्यांच्याकडून आमच्या कांही चुका असल्यास त्या दुरुस्त करून घेणार होतो. कारण ऐतिहासिक दृष्ट्या बसवेश्वरच वीरशैवधर्मतत्वाचा उत्पादक आमच्या मतें ठरत नाही. त्याचप्रमाणे वीरशैवधर्म हा वैदिक धर्मापासून आमूलाग्र भिन्न आहे हेंहि त्यांचें मत आम्हांला ग्राह्य नव्हतें. अशा परिस्थितींत ह्या वादाचा निर्णय ह्यांच्यासारख्या

व्यासंगी, श्रद्धाळू व वयोवृद्ध भीष्माचार्यांच्या जिवंतपणींच लागला असता तर आम्हाला अधिक आनंद झाला असता. श्रीयुत जिरगे ह्यांच्या आकस्मिक निधनाने तें भाग्य आमच्या वाट्याला आलें नाही म्हणून आम्हाला पराकाष्ठेचें दुःख होत आहे व तें शब्दाने व्यक्त करावयाला आम्ही असमर्थ आहों.

श्रीयुत जिरगे हे इहलोक सोडून गेले तरी ते ग्रंथरूपाने जिवंत आहेत, आणि थोर पुरुष आपल्यासारखे कोणीतरी आपलें कार्य चालविण्याला निर्माण केल्यावाचून इहलोक सोडीत नसतात. श्री. जिरगे ह्यांचे 'समदर्शनीयः' असे अनुयायी असतीलच. ते ह्याचा विचार करतील असा विश्वास धरूनच सदर बाबतींतील आम्ही आपली लेखमाला पूर्ण करणार आहों. कारण श्री. जिरगे ह्या व्यक्तीचा येथे प्रश्न नाही. त्यांच्या विवेकबुद्धीवर सर्व समाजाची मालकी होती. व आम्हालाहि जें लिहावयाचें तें समाजाकरिताच लिहावयाचें आहे. समाजाच्या ठिकाणी परमेश्वराचेंच स्वरूप नित्य व्यक्त होतें. त्या स्वरूपाच्या पूजेंत, लेखमाला बंद करून, खंड पडूं देणें म्हणजे पाखंडी होणें होय. श्री. जिरगे पाखंडी नव्हते. आम्ही पाखंडी नाही. कारण वीरशैव मृत होत नाही. म्हणून त्याला सुतक नाही हें जिरगे ह्यांना जसें मान्य तसेंच आम्हालाहि मान्य आहे. अशा स्थितींत श्री. जिरगे इहलोक सोडून गेले ह्या भावनेने आम्हीं आपली लेखमाला बंद केली तर शिवरूप झालेले जिरगे आमचा खात्रीने धिक्कार करतील. साक्षात् शिवाच्या धिक्काराला पात्र होऊं नये म्हणून श्री. जिरगे ह्यांच्या पुस्तकाच्या निमित्ताने सुरु केलेली ही लेखमाला पूर्ण करणें अवश्य आहे.

गेल्या लेखांकांत शिवप्रतीकाचें वैदिक प्रतीकांत कसें समीकरण झालें-असावें ह्याचा अंदाज मानवी बुद्धीच्या सहजस्वाभाविक प्रगतीकडे लक्ष देऊन आम्हीं सांगितला. अथर्ववेदाची संहिता ज्यांच्या लक्षांत असेल त्यांना त्यांत महालिंगाची आलेली कथा आढळेल. ह्या कथेवरूनच महालिंग व उपस्तंभ ह्यांचें एकीकरण कित्येकांनी कल्पिलेलें आहे हयांतच याज्ञिक व शैव ह्यांचे वैदिक एकीकरण रूढ झाल्याचा प्रत्यय येतो. फक्त यज्ञाचा हेतु कायम राहून त्याचें परिस्थितिनुसार बाह्य स्वरूप बदलत गेलें. म्हणूनच यज्ञांतील पशु-हत्या बंद होत गेली. यज्ञांतील 'यूपस्तंभा'-ला परब्रम्हाचें स्वरूप आलें, व पशूला जीवाचें ( मायावेष्टित आत्म्याचें ) स्वरूप प्राप्त झालें. शिवजीवैक्य वा लिंगागसामरस्य ह्या विद्येचा उगम व वाढ ह्याच कल्पनेंत आहे. तेव्हा अथर्ववेदसंहितेंत महालिंगाची कथा सांगणारा हा तरी निदान ऐतिहासिक दृष्ट्या शिवजीवैक्यविद्येचा पहिला पुरस्कर्ता ठरतो. पं. काशिनाथ शास्त्री हयांचे लिंगोद्भव पंचाचार्य व जिरगे ह्यांचा बसवेश्वर हया कोणाकडेच हया विद्येचें जनकत्व येत नाही. परंतु बसवेश्वरांनी भक्तीच्या व सद्भावनेच्या उद्रेकांत बाराव्या शतकांत हया विद्येचा प्रसार केला तर त्याच सुमारास व तत्पूर्वी थोडे व नंतरहि शास्त्रीय बुद्धीची जोड देऊन ह्या विद्येचा प्रसार केला. जिरगे ह्यांच्या पुस्तकांत पंचाचार्यांपैकीं बरेच आचार्य बसवपूर्वी जन्माला आल्याचा व बसवानंतर हयात असल्याचा उल्लेख आहे. पं. काशिनाथ शास्त्री मात्र पांचहि आचार्यांना लिंगोद्भव म्हणून मोकळे होतात. परंतु कोणत्या मूळ आचार्यांना कोणत्या मठांत प्रथम आचार्यपद लाभलें ह्याचा ते ऐतिहासिक दृष्ट्या उल्लेख करीत नाहीत. ती माहिती त्यांना अजून उपलब्ध झाली नसेल. पुढे होईल. परंतु काशी व बद्रिकेदारमठाची जागा प्रथम ज्या जंगमांना दान मिळाली ते जंगम बसवकाळापूर्वीचे फार प्राचीन दिसतात एवढें मात्र खरें. परंतु पं. काशिनाथ शास्त्री व श्री. जिरगे ह्या दोघांच्या माहितीची संगती लावून बोलावयाचें झाल्यास बाराव्या शतकाच्या मध्यांत बसवकाळांत-बसवेश्वर व कांही आचार्य ह्यांनी

अनुभवमंटपांत एक होऊन वीरशैवमतावर जी कांत चढली होती ती झाडली व त्याच सुमाराला वा थोडे नंतरहि सध्याचे पंचाचार्यमठ पंचाचार्यांच्या मालकीचे होण्याची प्रथा रूढ झाली असावी. पंडिताराध्य हा आराध्य ब्राह्मण होता. त्यांनी यज्ञोपवीत सोडलें व जंगमपूजकाकडे जेवावयाला गेला ही बसवपूर्वीची हकीकत सुदर्शनकारांनी तेलंगणांतील फेरफटक्यांत दिली. अर्थात जंगम ह्मणविणाराकडे वीरशैवमताचा पुरस्कार अवलंबून आहे ही गोष्ट तर ऐतिहासिक दृष्ट्याच सिद्ध होते.

ह्या जंगमाच्या ठिकाणी कांही दैवी सामर्थ्य आहे हें जाणून अनेक राजे, क्षत्रीय, वैश्य, व शूद्रवर्णीयसुद्धा त्यांच्या भक्तगणांत जात असत. ह्या जंगमाचे अनेक मठ बसवपूर्वीच होते. तसेंच, लिंगधारी क्षत्रीय व वैश्यहि होते. कल्याणच्या चालुक्य राजाचा बिज्जराजा मांडलिक होता. ह्या बिज्जलाने इ. स. ११६० पासून ११६८ इ.स. पर्यंत राज्य केल्याचा उल्लेख फ्लीटसाहेबांच्या Dynasties of Canari District ह्या पुस्तकांत सांपडतो. हा बिज्जलराजा ( He honoured much Shaivas who assisted him in disposing the chalukya king ) शैवांना फार मान देत असे. कारण ह्या शैवांनीच मदत करून बिज्जलाला चालुक्याच्या मांडलिकगिरींतून अर्थात् साम्राज्यशाहींतून मुक्त केलें होतें असा फ्लीटसाहेबांनी उल्लेख केला. बसवेश्वर हा बिज्जलाचा मंत्री होता. तो वीरशैव होता ह्याबद्दल वाद नाही. तेव्हा अशा वीरशैवांना अनुसरूनच फ्लीटसाहेबांनी Shaiv-शैव शब्द वापरला हें उघड होतें. त्याला अधिकें पुरावा पाहिजेच असेल तर मि. राइस ह्यांचे म्हैसूर शिलालेख ( Mysore Inscription हें पुस्तक वाचावें. ह्यांत पृष्ठ २१० वर पुढील वाक्य आहे. On the upper part of the Picture appear the apsaras or nymphs of the Indra's paradise who according to the Veershaio doctrines are the portion of brave warriors and bear them in their arms or in the trimphal cars direct from the field of battle to the paradise. गंगवंशांतील इरयप्पा नांवाचा राजा इ.स. ८५० मध्ये राज्य करीत असतां त्यांनी मिळविलेल्या अनेक विजयाचे आधार पाहून रीससाहेबांनी वरील उद्गार काढले आहेत. तेव्हा बसवेश्वरापूर्वी तीन शतकें अगोदर वीरशैवांत अनेक लढाऊ क्षत्रीय होते ही गोष्ट तर ह्यावरून स्पष्ट होते.

मतांतराचे व पंथांतराचें बंड बसवपूर्वकाळीं व बसवानंतरहि बरेंच होतें. त्यामुळे जंगमवर्गाचे लोक अनेकांना शिवदीक्षा देत व पंथ वाढवीत आणि त्यांना त्यांच्या तपःसामर्थ्यामुळे क्षत्रीय, वैश्य, वगैरे त्याचे शिष्य होऊन त्यांना मदत करीत. ह्मणूनच गुरु व भक्त ह्या दोन जन्मजाती नव्हे तर वर्ग समाजांत रूढ झाले. वरचेवर मतांतरांची व पंथांतराची प्रथा जेथे रूढ असते तेथे पोटजातींत जन्मजात विषमता मानण्याची रुढी रहात नाही. म्हणूनच वीरशैव म्हणविणाऱ्या पोटजातींत प्रस्तुतसारखा रोटी-बेटी-व्यवहार बंद होता असें दिसत नाही. तसें असतें तर अनेक राजे जैनांचे वीरशैव झाले, अनेकांनी जानवें सोडून लिंगधारण केलें, व ते सर्व लिंगधारी एकत्र समानदर्जाने वागून प्रसादार्थ एक होत असलेले जे आढळते ते कां ? शिवाय जन्मजात विषमतेचा आधार वैदिक धर्मालाच नाही तर वीरशैवधर्मांतच कोठून येईल ? पं. काशीनाथशास्त्री ह्यांच्या इंग्रजी पुस्तकांतील पृ० ४० व ४१ ह्यांत जे आधार दिले आहेत तेसुद्धा जन्मजात बिषमता वीरशैवमतांत मानली ह्याचे दर्शक नाहीत. वर्णाश्रमधर्म ह्मणजे जन्मजात विषमता नव्हे, तर तो निव्वळ समाजाचा गुणकर्मविभाग आहे.

ह्या कोणत्याहि समाजव्यवस्थेंत आजहि आढळतो. आजच्या नव्या रशियांतसुद्धा ही गुणकर्मांची विभागणी अस्तित्वांत येऊं लागली. श्रीरेणुकाचार्यांच्या वीरशैवसिद्धान्तावरून 'वर्णाश्रमादि धर्माणां व्यवस्थाहि द्विधा मता, एका शिवेन निर्दिष्टा ब्रह्मणा कथिता परा' असा काशिनाथशास्त्री ह्यांनी आधार दिला आहे. ह्या आधाराच्या अर्थावरून काय बोध होतो? शिवोपासना जरी सर्वांना मान्य असली तरी त्यांत वर्णाश्रमव्यवस्था आहेच. जे जंगम अनेक क्षत्रीय व वैश्य ह्यांना शिवदीक्षा देऊन वीरशैव बनवीत व ते आपलें क्षात्र व वैश्यकर्मच चालूच ठेवीत तेथे वर्णाश्रमव्यवस्था नव्हती असें कसें म्हणतां येईल? पण वर्णाश्रमाची व्यवस्था ह्मणजे जन्मजात विषमता होय असा अर्थ त्यांतून काढणें मूर्खपणाचें आहे. वर्णाश्रमव्यवस्थेला जन्मजात विषमतेचें बंधन घातलें कीं वर्णाश्रमांनी होणारी समाजाची प्रगति खुंटलीच. रेणुकाचार्य व रेवणसिद्ध हे एक होते असें मानलें तर ज्या रेवणसिद्धाच्या प्रसादाने सोलापुरीं बाराव्या शतकांत वृद्ध आईबापाच्या पोटीं सिद्धराम जन्माला आला तो आला असता काय? तेव्हां जन्मजात विषमतेच्या अर्थाने वर्णाश्रमव्यवस्था रेणुकाचार्यांनी मान्य केली असें ह्मणणें रेणुकाचार्य हे धर्मप्रवर्तक नव्हते असेंच ह्मणण्यासारखें आहे. कोणत्याहि धर्मप्रवर्तकाला जन्मजात विषमतेला लाथ मारूनच धर्माचा प्रसार करावा लागतो ह्मणून रेणुकाचार्यांच्या सिद्धान्तशिखामणींचा 'स्वमार्गाचारनिरताः सजातीया द्विजास्तु ये। तेषां गृहेषु भुंजीत नेतरेषां कदाचन" असा जो पुढे पं. काशीनाथशास्त्री ह्यांनी आधार दिला आहे त्याचाहि अर्थ वीरशैवांतील सर्व द्विजांनी आपसांतच भोजन केलें पाहिजे असा स्पष्ट केला आहे. जन्मापूर्वी प्रत्येक वीरशैव क्षुद्र असतो. लिंगधारणेनंतरच तो द्विज होतो. अर्थात जन्मतः लिंगधारणा केल्यावर वा केव्हांहि लिंगधारणा केल्यानंतरच द्विजत्व येते व ह्या वीरशैवद्विजांनी आपसांतच भोजन करावें इतरांशीं करूं नये असा स्पष्ट नियम सांगितला आहे. ह्यावरून जेवढे सारे लिंगधारी ते सारे समानदर्जाचे द्विज होत आणि द्विजत्वाचा अधिकार, फक्त त्रैवर्णिकांनाच असतो. शिवोक्तापलीकडचें द्विजत्व जो मानील तो 'शिवोक्तां जातिमर्यादां योऽतीत्य भुवि वर्तते। स चंडाल इति ज्ञेयः सर्वकर्म बहिष्कृतः।' ह्मणजे शिवभक्त सोडून अन्यभक्तीय जातीयांकडे जो जाईल तो चांडाल होय व त्याला बहिष्कृत करावें अशी आज्ञा वीरशैवधर्मशिरोमणी ग्रंथावरून पं. काशीनाथशास्त्री ह्यांनी निवेदन केली आहे. तिचा अर्थ हाच कीं, वीरशैवांनी अन्यांशीं व्यवहार केला असतां तो चांडाल मानावा हाच. तेव्हा ह्यावरून वीरशैवांनी आपसांत जन्मजात विषमता मानावी व आपसांत रोटीबेटीव्यवहार बंद ठेवावा ह्याला आधार नाही. ह्मणून वीरशैववर्णाश्रमवादी आहेत असें ह्मटलें कीं ते जन्मजात विषमता मानणारे आहेत असें आजच्या बसवपंथीयांनी कां समजावें? त्याचप्रमाणे पंचाचार्यपक्षीयांनी आचार्य वर्णाश्रमवादी होते हें ह्मणत असतां ते जन्मजात विषमतेचे हल्लीप्रमाणे पुरस्कर्ते होते असें कां ह्मणूं लागावें? बसवपूर्वकालीन कोणताहि जंगम जन्मजात विषमता मानीत नव्हता. बसवकालीं हेच जंगम व बसव एकत्र झाले. अर्थात गुरु-भक्तसाम्यभाव प्रकट करून अनुभवमंटपांत तपःश्चर्या करूं लागले व व भक्तगण वाढवूं लागले.

जंगम बसवपूर्वी होते. क्षत्रीयहि वीरशैवांत बसवपूर्वी होते हें ऐतिहासिक आधारानें सिद्ध होतें. बेळ्ळीगांवीं असलेले शिलालेख राइससाहेबांनीं एकत्र केले आहेत. त्यांत इ. स. १०५४ मध्ये व इ. स. ११९२ मध्ये त्या गांवीं हिरेमठ, पंचलिंगमठ, त्रिपुरांतक मठ, वामशक्ति मठ, व कोडीयमठ असे पांच मठ होते, व त्यांना १०५५ मध्ये मूळिगममधुकेश्वर पंडित, सर्वेश्वरपंडित व ज्ञानशक्तिदेव, असे आचार्य होते.

असा उल्लेख आढळतो. वामशक्तिमठांत विद्याभरणय्या आचार्य इ. स. ११२९ मध्यें होता. ह्या मठांतील केदारशक्ति मठांत श्रीकंठ शिवयोगी हा फार विद्वान् व शरीरावर लिंगधारण करणारा होता असा स्पष्ट उल्लेख आहे. रिसक्त mysore inscription पुस्तकाची ह्याकरिता ८२ ते १३४ पृष्ठें वाचावींत. ह्या श्रीकंठशिवयोगीच ब्रह्मसूत्रावर ' क्रियासार ' नामक भाष्य लिहिणारा असावा असा आमचा तर्क आहे. ह्या भाष्याचा कांही भाग वारदग्रंथमालेंतून प्रसिद्ध झाला आहे. बसववचनें, हें भाष्य, सिद्धान्तशिखामणी वगैरे ग्रंथ वाचले असतांना सर्वांतून एकच सूर निघतो. जन्मजात विषमतेला सर्वांनी सारखेंच धिक्कारलें. गुणावरून आश्रमधर्माला सर्वांनीच मान्यता दिली. लिंगधारण ज्याला ज्याला होईल त्या सर्वांना द्विजत्व सर्वांनीच दिलें आहे. वीरशैवद्विजांत रोटीबेटीव्यवहाराचा कोणींच निषेध केलेला आढळावयाचा नाही. अष्टाचरण, षडस्थळ, वगैरेंना सर्वांनीच सारखीच किंमत दिली आहे. ह्याचें विवरण अधिक स्पष्ट प्रमाणांत निराळ्या स्वतंत्र लेखांत करूं. पण वीरशैवसमाजघटनेंत बसवघटना व पंचाचार्यघटना कांही भिन्न आहेत व त्यांतील अमुक नवी व अमुक जुनी असा जो भास होत आहे तो खोटा. बसवपूर्वकाळीं जें होतें तेंच बसवकाळीं होतें व बसवनंतर होतें. पण ह्या सर्वांचे वंशज म्हणविणारे आह्मी मात्र खोटा भेद पाडूं लागलों. रीसक्त म्हैसूर-शिलालेखाचे पुस्तक वाचलें असतां शेट्टी, लिंग बणजीग वगैरे परदेशगमन करणारे वैश्यहि बसवपूर्वी होते असा उल्लेख सांपडतो. कै० कल्याणशेट्टी ह्यांनी बसवपूर्वींची वीरशैवांची स्थिति हें पुस्तक लिहून ह्यासंबंधी अधिक आधार दिले आहेत- सोलापूरच्या वारदग्रंथमालेकडे हें पुस्तक मिळतें. तेव्हा वीरशैवांत द्विजत्व आहे व गुणकर्मविभागशः वर्णाश्रम मान्य केला आहे व ती बसवपूर्व प्रथा आहे ही गोष्ट ऐतिहासिक दृष्ट्या स्पष्ट सिद्ध होते. बसवपुराणांत माचिदेवाने बसवेश्वराचा गर्वहरण केला व दासिमय्याने देवरदासिमय्याचा गर्व हरण केल्याची कथा आहे. देवरदासिमय्या व शंकरदासीमय्या ह्यांच्या कथा बसवपुराणांत अशा प्रसंगीं सांगण्यांत आल्या कीं हे शरण बसवपूर्व होते असाच त्यावरून बोध होतो. तेव्हा शरणनिर्मिती हीसुद्धा बसवपूर्वकालीन गोष्टच आहे. हे शरण जंगमभक्त होते. परंतु विद्वानापासून तों शरणापर्यंत सर्व वीरशैवद्विजांना अनुभवमंटपांत आणण्याचा जो संघटित उद्योग बसवेश्वरांनी केला तेंच खरें त्याचें वैशिष्ठ्य. तेव्हां तुह्मी आचार्य म्हणवा वा आचार्यभक्त ह्मणवा; तुह्मी विरक्त ह्मणवा वा विरक्तभक्त ह्मणवा; तुह्मीं बसवेश्वर ह्मणवा वा बसवेश्वरभक्त म्हणवा, शरण म्हणवा वा शरणभक्त म्हणवा, तुम्ही सर्वच एकाच वीरशैवधर्माचे घटक आणि सर्वच लिंगधारी द्विज म्हणविण्याचे अधिकारी हीच एक गोष्ट स्पष्ट होते.

---

## ' सारडा '—कायद्यान्वयें लग्न थांबविलें

**( एका नागरिकाकडून )**

ता. १४-३-३६ इ. रोजी मोर्शी मुक्कामी, नांदोरा, ता. आर्वी, येथील मालगुजार रा० तुकाप्पा यांचे मुलांचे लग्न मोर्शी येथील रा. इसराप्पा यांचे नऊ वर्षे वयाचे मुलीशीं सायंकाळी होणार होतें. त्याप्रमाणे ५०-६० गाड्या भरून वऱ्हाड आले परंतु उमरावतीहून ऐनवेळी ५॥ वाजतां रा. मारोती देवाजी गवळी, रा. मोर्शी, यांनी मनाई हुकूम आणून मुलीचे पालक बाप व चुलता तसेच नवरदेव व त्याचा बाप यांवर नोटीसा बजाविल्याने व लग्न ' सारडा कायदा '-विरुद्ध असल्याने थांवलें. वरील प्रकरणांत रा. यशवंत नारायण खरे, वकील, उमरावती. यांनी फार मेहनत घेऊन अर्ध्या दिवसांत सेशन-कोर्टाचा हुकूमआणवून हुकूम बजावण्यास फार मदत केली. वरील प्रकाशामुळे मोर्शी तालुक्यांत फार खळबळ उडाली आहे.

---

# वीरशैवांतील चळवळी

## " मुंबईंतील वीरशैवसमाचार "

येथील सुप्रसिद्ध वीरशैवसमाजाचे गोलनागेश्वर देवळाचे ( Round Temple ) एक प्रमुख ट्रस्टी आणि मुंबईंतील फुलांचे प्रसिद्ध व्यापारी श्री. साधुशेठ शंकर तोडकरी, कुंभारवाडा भंडारी स्ट्रीट येथील, यांच्या खाजगी मालकीच्या घरांत श्रीराममंदिरांतील जीर्ण झालेल्या मूर्ति व देऊळ यांचा जीर्णोद्धारसमारंभ झाला. जीर्ण मूर्तींचें समुद्रांत विसर्जन करून, प्रभु रामचंद्राच्या मूर्तीची नवीन प्रतिष्ठापना करण्यांत आली. सदर पवित्र कार्याकरिता मुंबईंतील सुप्रसिद्ध वे० शा.-संपन्न सावळाराम भटजी व त्यांचे ज्ञातिबांधव यांची उपाध्याय म्हणून मुद्दाम योजना करण्यांत आली होती. मिति फाल्गुन शु॥ १२ शके १८५७ बुधवार रोजीं सकाळीं स्थापना झाली. उपरोल्लिखित उपाध्यायवर्गाव्यतिरिक्त वीरशैवसमाजांतील बराचसा उपाध्यायवर्गहि ( जंगम ) उपस्थित होता; आणि दुपारीं अंदाजें ३० वीरशैव माहेश्वरमूर्तींना सुग्रास भोजन देऊन, आठ आणे दक्षिणा देऊन संतुष्ट (?) करण्यांत आलें. सदर प्रसंगीं श्री. साधुशेट यांनीं कांहीं शेंकडो रुपये या पवित्र कार्याप्रीत्यर्थ खर्च केले, व हा समारंभ समाप्त झाला.

## वी० संजीवनी प्रचारकार्यास अडथळा

' वीरशैव संजीवनी '-त ता. १-३-३६ चे अंकांत दारव्हा तालुका वीरशैव-परिषद् तळेगांव येथे भरल्याचें जें वातमीपत्र प्रसिद्ध झालें आहे त्याच परिषदेकरिता व श्री. गुरु कोंडलिंग स्वामींचे पुण्यतिथीकरिता मी गेलों होतो. बरोबर वीरशैव-संजीवनीचें विनंतीपत्रक व पावतीबुकेंहि मुद्दाम घेऊन गेलों होतो. तेथे वीरशैवसमाज ५-७ शे चे वर जमला होता. माझे उद्देशाची व कार्याविषयीची अध्यक्षांना सूचना देऊन मीं सभेंत बोलण्याविषयी परवानगी मागितली; परंतु अध्यक्षांनी वेळ बराच झाला आहे व पुढे हरिकीर्तनासारखा महत्वाचा कार्यक्रम आहे ह्या सबबीवर मला सभेंत भाषण करूं दिलें नाही. सभेंत वी. संजीवनीचें प्रचारकार्य करण्याची मला जर संधि मिळाली असती तर कमीतकमी सहज २०-२५ वर्गणीदार खात्रीने मिळाले असते व संजीवनीची सेवा केल्याचें समाधान मला मिळालें असतें. परंतु अध्यक्षांना स्वतःच्या कीर्तनाचा कार्यक्रम ' संजीवनी प्रसारा '-पेक्षा अधिक महत्वाचा वाटल्यामुळे माझा नाइलाज झाला असें नामदेव आप्पाजी कोरे, सराफ, दारव्हा, हे कळवितात.

## कल्याणच्या मठपतीचें धर्मांतर.

स्वतः एका न्हाव्याला लिंगदीक्षा देऊन त्याच्याशीं धार्मिक व्यवहार ठेवण्याचा ८-१० वर्षांपासून केलेल्या उपक्रमाला समाजाची मान्यता मिळत नाही व उलट आपली निंदा व बहिष्कार सुरूं आहे अशा परिस्थितीला कंटाळून कल्याणच्या एका माडिवाळय्या नांवाच्या मठपतीनें नुकताच मुसलमानीधर्म स्वीकारला व १००-२०० लिंगायत परधर्मांत नेण्याची प्रतिज्ञा केल्याचें वृत्त ' सुदर्शन '- वरून समजतें आपल्यासारख्याच लोकांच्याहि प्रामाणिक समजूती असतात व विशेषतः समाजसुधारकांचे हेतु उच्च व प्रामाणिक असतात-असं न मानतां त्यावर टीका करून बहिष्कार घालणारे सनातनी कर्मठ वीरशैव तर मूर्ख आहेतच. पण सनातन्यांच्या बहिष्काराला कंटाळून त्रागयाने धर्मांतर करणाऱ्याला कोणीहि शहाणा म्हणणार नाही. कोणत्याहि चांगल्या सामाजिक सुधारणेच्या हेतूवर आरोप करून सनातनी कर्मठ कूपमंडूक विरोध करीत असतातच, किंबहुना खरी सुधारण

असल्याच विरोधांतून जन्माला येते व खरा सुधारक तोच कीं, जो सनातन्यांच्या मूर्ख विरोधाच्या तीव्र परिस्थितींतूनहि चिकाटीने व नेटाने आपले सुधारणेचें कार्य करीत असतो. विरुद्ध परिस्थितीशीं टक्कर देऊन शांतपणें आपलें समाज सुधारण्याचें कार्य करण्याचें मनोधैर्य व शांत चित्तवृत्ति यांची नसेल त्यांनी ह्या धकाधकीच्या मामल्यांतपडून त्राग्याने स्वतःचा व समाजाचाहि घात करण्यास प्रवृत्त होऊ नये, व म्हणूनच सनातन्याबरोबरच कल्याणच्या मठपतीच्याहि मूर्खपणाची कींव येते.

## उदगीर-वीरशैवसमाजाचा वार्षिकोत्सव

' वीरशैव समाज उदगीर ' ह्या संस्थेचा वार्षिकोत्सव यंदा मोठ्या प्रमाणावर दे. भ. नानासाहेब वामणगांवकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली ता. २३,२४,२५ एप्रिल १९३६ रोजी होणार आहे. दे. भ. नानासाहेब वामणगांवकर ह्यांचेबरोबर वऱ्हाडांतून श्री. महादाप्पा शंकरआप्पा ऊर्फ अण्णासाहेब हुंडेकर, श्री. गोदाजीराव ऊर्फ बाबासाहेब मुखरे, श्री. आप्पासाहेब एकलारे, श्री. बाबुराव चौधरी,वगैरेहि वीरशैव पुढारी येणार आहेत. तसेंच, कर्नाटकाचे पुढारी व ' शरणसंदेश '-चे संपादक श्री. मंजाप्पा हर्डीकर हेहि हजर राहणार आहेत. उत्सवप्रसंगीं शुद्धिसंस्कार व व्यायामाचे खेळ वगैरेहि कार्यक्रम होईल. तरी निजामस्टेट व इतरहि प्रांतांतील वीरशैव बंधूंनी कार्यक्रमास हजर राहण्याची संधि दवडूं नये. असें प्रभुराव वकील, सेक्रेटरी, लिंगायतसमाज, उदगीर ( निजामस्टेट ) हे कळवितात.

## अक्कलकोटची आदर्श महिला

श्रीमंतीमुळे ऐषारामांत लोळणाऱ्या व आळसांतील वेळ " शिक्षण घेणाऱ्या लोकांच्या लेकीसुनांवर निष्कारण टीका " करणे व शेजाऱ्या-पाजाऱ्यांची निंदा करण्यांत घालविणाऱ्या आमच्याकडील श्रीमंत भगिनी व तसेंच ' कामांमुळे वेळ मिळत नाही ' म्हणून सबब सांगणाऱ्या मध्यमवर्गीतील आमच्या भगिनींनी अक्कलकोटच्या सौ. गंगाबाई पटणे ह्यांचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवल्यास इच्छा व तत्प्रीत्यर्थ सतत चिकाटीने प्रयत्न केल्यास वयांतील कोणत्याहि अवस्थेंत सुशिक्षित होतां येतें हें लक्षांत येईल. अक्कलकोटचे जेलर व वीरशैव सन्माननीय नागरिक मि. रेवणसिद्धाप्पा पट्टणे ह्यांचेशीं विवाह होण्यापूर्वी सौ. गंगाबाई अगदींच निरक्षर होत्या. लग्नानंतर त्या शाळेंत जाऊं लागल्या व शाळेंत जाऊन त्या नुसत्या साक्षरच झाल्या नाहीत तर त्यांनी मुलकी परीक्षा पास करून ट्रेनिंग कॉलेजांत प्रवेश केला. कौतुकाची व अभिमानाची गोष्ट म्हणजे घरांतील सारं कामकाज व दोन लहान मुलांचा सांभाळ करून त्यांनी ट्रेनिंग-कॉलेजचं शिक्षण पुरं केलें व आज त्या अक्कलकोट-गर्लस स्कूलच्या हेडमिस्ट्रेस आहेत. हल्ली नौकरी आणि घरांतील स्वयंपाकापासून तों मुलांचें शिक्षण वगैरे सर्व कामें त्या स्वतः करतात. इतकी सगळी जबाबदारी संभाळून त्यांना किती वेळ शिल्लक राहत असेल ? अकरा-वाजतां नौकरीवर जावें लागतें व ह्यापूर्वी स्वयंपाकाचें काम ? पण इतर आळसी व बुद्धिमंद स्त्रियांना वेळ नसला तरी त्यांना वेळ मिळतो व ह्या सर्व कामांतूनहि वेळ काढून त्या इंग्रजीचा अभ्यास करतात व त्यांची इच्छा मॅट्रिकला बसावयाची आहे. व त्या त्यांत यशस्वीपणें उत्तीर्ण होतीलहि. मोठेपणीं संसारांत पडणाऱ्यांनी किंवा लग्न झाल्यावर " शिक्षण शक्य नाही म्हणणाऱ्या आमच्या भगिनींनी इकडे लक्ष द्यावें. सौ. गंगाबाई हे स्वतःचेच शिक्षणाकडे निव्वळ लक्ष देणाऱ्या नाहीत शिक्षण, घरकाम, व नौकरी सांभाळून आठवड्यांतील दोन दिवस गांवांतील इतर स्त्रियांना हस्तकौशल्याचें शिक्षण त्या देतात. त्यांचा अखिल-भारतीय-महिला-परिषदेशींहि संबंध आहे. अक्कलकोटच्या प्रतिनिधी म्हणून त्या पुण्यास भरलेल्या गेल्या महिला-परिषदेंत हजर होत्या. अर्थातच ह्या त्यांच्या ' आदर्शवत जीवना '-चें श्रेय त्यांच्या पतीच्या प्रेमळ सहानुभूतीला व उत्तेजनाला आहे. स्वतः पूर्ण शिक्षित नसल्यामुळे व म्हणून स्त्रीशिक्षणाचें महत्व न कळून अजाणपणानें ' स्त्रीशिक्षणाने मुली बिघडतात ' म्हणून व्यर्थ कंठशोष करणाऱ्या आमच्याकडील ' सनातनी बांधवांना ' ह्या अक्कलकोटच्या आदर्श कुटुंबापासून कांहीच धडा घेतां येणार नाही काय ???

## महाशिवरात्रीमहोत्सवः—

वीरशैव लिंगायत कक्कया समाज [ धारावी ] मुंबई ह्या समाजाचा सालाबादप्रमाणे यंदाहि शुक्रवार ता. २१-२-३६ रोजी महाशिवरात्रीचा उत्सव मोठ्या थाटाने साजरा झाला. शिवपूजा, प्रसाद, स्त्रियांचें हळदी-कुंकू झालें. सौ. सत्यभामाबाई कवंडे ह्यांनी हळदी-कुंकवाची व आदर सत्काराची सारी व्यवस्था ठेविली होती. ५०-६० स्त्रिया हळदीकुंकवाला जमल्या होत्या.

समाजसेवकसंघातर्फे मर्दानी खेळ झाले. श्रींच्या पालखीची मोठी मिरवणूक निघाली होती. तींत ४-५ शे मंडळी सामील झाली होती. निरूपणें, कानडी व मराठी भजनें, वगैरेहि कार्यक्रम झाले. व सर्व मंडळींनी मोठ्या उत्साहाने भाग घेतला होता. असें सेक्रेटरी परशुराम येल्लाप्पा पोळ हे कळवितात.

## श्री १०८ जगद्गुरु रेणुकाचार्य यांचे जयन्तीमहोत्सवः—

सोलापूर:—श्रीजगद्गुरु रेणुकाचार्यजयन्ति-महोत्सव मित्ति फाल्गुन शु॥ १३ शुक्रवार ता. ६-३-३६ रोजीं चारी गल्लींत डॉ. जगदेवराव देशमुख ह्यांचे अध्यक्षतेखालीं मोठ्या थाटाने साजरा झाला. वे. पं. जगदीशशास्त्री गुरुवर्य सुतकट्टी वे. रुद्रस्वामी हिरेमठ वगैरेंची श्रींच्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. डॉ. जगदेवराव ह्यांनी धर्म व संस्कृति ह्याविषयींच्या विद्वत्तापूर्ण माहितीने भरलेल्या भाषणांनी उत्कृष्ट समारोप केला.

तसेंच, वीरशैव महिला समाजतर्फे हिरेमठांत जयंत्युत्सव साजरा करण्यांत आला. कुमारिकांनी स्तुतिस्तोत्रें म्हटलीं व सौ. बसम्मा नंदमिठ, गुरम्मामठपती कु. सुगूलादेवी ह्यांचींहि भाषणें शेवटीं झालीं. सौ. भागिरथीबाई कटप ह्यांचें भाषण व भजन झालें. वरीलप्रमाणेच-मंगळवेढे, किनगांव, सरसंब, दरगन-हळ्ळी, दर्शनहाळ, वगैरे ठिकाणीहि उत्सव साजरे झाले.

## शुद्धीकृतांशीं सहभोजन:—

श्री. घनलिंग चक्रवर्ती मंगेरी हिरेमठ ह्यांनी इलकल [ जिल्हा विजापूर ] येथे वीरशैव व शुद्धीसंघटनाच्या वतीनें १६ जणांना लिंगधारणा व वीरशैव दीक्षा दिली, व त्यांना शुद्ध करून घेतलें. व ह्या शुद्ध झालेल्या लिंगायतांशीं गांवांतील सर्व वीरशैव बांधवांनी सहानुभूति दाखवून ता. १८-२-३६ रोजी सहभोजन केलें. अभिनंदनीय व स्तुत्य उपक्रम.

## अलिंगीयांना लिंगधारणा:—

येलेरी ता. यादगिरी जि. गुलबर्गा, येथील श्री. नागप्पा शंकरआप्पा गडेकर यांच्या कुटुंबांतील १२ लोकांना लिंगधारणादीक्षा देवविण्यांत आली. तसेंच, पूर्वी लिंगधारणा असलेल्या पण आचारभ्रष्ट झालेल्या ३२ जणांनाहि शुद्ध करून घेऊन व दीक्षा देऊन ह्या एकंदर ४४ शुद्धीकृतांना वीरशैवसमाजाने ता. १९-२-३६ रोजी पंक्तिपावन करून घेतलें. ह्या सर्व शुद्धि व दीक्षाविधींचें श्रेय श्री. घनलिंग चक्रवर्ती कोटप्पास्वामी मठ पट्टाधिकारी ह्यांनाच आहे. आमचेकडील पट्टाधिकारी कधी जागे होणार!

## शोचनीय निधन :—

बेंगळूरचे प्रसिद्ध वीरशैव पुढारी उत्तम लेखक, वक्ते, व पहिल्या दर्जाचे समाजसेवक, श्री. बसवलिंगाप्पा जीरगे, रिटायर्ड हायकोर्ट ट्रान्सलेटर, हे गेल्या ९-३-३६ ला लिंगैक्य झाल्याचें कळतें. त्यांचे सामाजिक व धार्मिक विषयावरचे लेख सोलापूरचे 'सुदर्शन', हावेरीचे 'बसवराज', व विजापूरच्या 'शिवानुभव' पत्रांतून वरचेवर येत असत. लिंगायतसमाजाची सर्वांगिण उन्नति व्हावी अशी त्यांना अहोरात्र तळमळ लागलेली असे व ह्याचा ध्वनि त्यांचे प्रत्येक लिखाणांतून निघत असे. बसवजयंतीला स्वतंत्र पत्रिका छापण्याची प्रथा काढून कांही लहानमोठी पुस्तकेंहि त्यांनी लिहिलीं आहेत, व त्याचा स्वखर्चानें छापून मोफत प्रचारहि त्यांनी केला होता त्यांच्या निधनाने बेंगळूरच्या वीरशैवसमाजाचेंच नव्हे तर आखिल लिंगायतसमाजाचें नुकसान तर झालेंच; परंतु साहित्यसृष्टींतील एका उत्तम साहित्यकाला आपण मुकलों आहोत. जीरगे ह्यांच्या कुटुंबियांचे ह्या आपत्तीला नुसतें कौटुंबिक स्वरूप राहिलें नसून त्याला एक तऱ्हेचें सामाजिक स्वरूप आलें आहे व त्यांत आम्हीहि सहभागी आहोत. ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो.

॥ ॐ ॥

# जय नाद हाच बोला

[ चालः— आनंदकंद ऐसा० ]

वीरशैवधर्मनीती, अहिंसा सत्य शांती ॥
हें ब्रीद मुख्य ज्याला, जय नाद हाच बोला ॥१॥
रवितुल्य तेज ज्यांचे, सिद्धराज मन्मथाचे ॥
ते श्रेष्ठ योगी बोला, जय नाद हाच बोला ॥२॥
शैवांत 'वीर' विशेष, जग गात सदैव येश ॥
चन्नम्मा असूनि अबला, जय नाद हाच बोला ॥३॥
वश लोकनाथ केला, मृत धर्म जीववीला ॥
बसवेश एक झाला, जय नाद हाच बोला ॥४॥
संग्रामीं वीरवृत्ती, 'मल्ला'-स शोभली ती ॥
कीर्ती करूनि गेला, जय नाद हाच बोला ॥५॥
जीवित वित्त आपुले, सर्वस्व अर्पियेलें ॥
शिर संगी भूप झाला, जय नाद हाच बोला ॥६॥
वशिष्ट गौतमाला, आचार्य शंकराला ॥
दिक्षाणि लिंग दिधला, जय नाद हाच बोला ॥७॥
नीज धर्म स्थापकाना, आचार्य पंचकांना ॥
वंदोनी धन्य झाला, जय नाद हाच बोला ॥८॥
चिरकाल मग्न ध्यानी, मडीवाळ माची-मुनी ॥
शरणांत थोर झाला, जय नाद हाच बोला ॥९॥
रामचंद्र रावणानीं, श्रीकृष्ण पांडवांनी ॥
शिवलिंग ध्याइयेला, जय नाद हाच बोला ॥१०॥
युग उभा अठ्ठावीस, शिरीं लिंग पंढरीस ॥
तुळजा तशी पुरीला, जय नाद हाच बोला ॥११॥
होऊनी एक जीव, विसरा गुरु विरक्त भाव ॥
कार्या करावयाला, जय नाद हाच बोला ॥१२॥
वोपी संजीवनीस, वसुनी अमरावतीस ॥
प्रणाम नारायणाला; जय नाद हाच बोला ॥१३॥

सदानंदस्वामी ऊर्फ होनय्यास्वामी.

# सुदर्शनकारांचें आह्माला पत्र

श्री. एस्. एस्. कल्याणशेट्टी, बी. ए. एल् एल्. बी.,
संपादकः—' सुदर्शन '-सोलापूर. यांजकडून

सुदर्शनमधील श्री. बिळेअंगडी वकीलांचा लेख आपण वाचलाच असेल. त्या लेखाचा रोख गुरुविरक्त दोघांवरही असून धारवाड येथें नुकत्याच विरक्त स्वामीकडून झालेल्या ७७० मंडपपूजेवर ती टीका आहे. तसेंच, आमचा 'आंध्रविहार' लेख पाहिल्यास आमच्या धोरणाबद्दल आपणाला कल्पना येईल. मूळ पंचाचार्यांबद्दल कोणाहि वीरशैवाला अनादरवृत्ति असणार नाही आणि आम्हाला तरी नाहींच नाही. पण केवळ पूर्वजांच्याच नांवावर विकून घेऊन मोठेपणाचा दिमाख दाखविणाराशीं व धर्माच्या मूलभूत तत्वांना बाध आणूं पाहाणाराशीं आमचा विरोध आहे व तो राहील. जन्मजात जातिभेदाचें विषबीज दृढ करून वीरशैवांतहि गुरुवर्ग व भक्तवर्ग या जन्मजाती जाती कल्पून त्या विचाराचा फैलाव करणाऱ्या कांही विरक्तांशींहि आमचा विरोध आहे; व तो आम्हीं स्पष्टपणें अनेक वेळां जाहीरहि केला आहे.

आतां 'सुदर्शनचें प्रदर्शन' याबद्दल मला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. मला माझ्या अंतःकरणापासून जें वाटतें व जें सत्य असून सार्वजनीक व्यक्ति म्हणून श्रींचा तितका संबंध आला तेवढ्याचाच आम्हीं विचार केला आहे. आणि तसा विचार करणें केव्हाहि अयोग्य नाही. मृताच्या सार्वजनीक आयुष्याबद्दल साधक-बाधक चर्चा करण्याचाच प्रघात असून तसें करण्यांत वावगें असें कांहीच नाही.

आमच्या लेखांतील कोट्टूर उज्जनी व उज्जयनी नगरींतील मठाचे उल्लेख ही कांही कुचेष्टेची बाब नसून हें ऐतिहासिक सत्य आहे. कोटर उज्जनीचा, म्हणून हल्ली जो मठाचा फोटो प्रसिद्ध होत आसतो तो मठाचा नसून तेथील मरुळसिद्धेश्वर देवळाचा आहे व त्या देवळाचे हक्कदार पुजारी म्हणजे उज्जनी मठाचे स्वामी होत. ईस्ट इंडिया कंपनीच्या इनाम-कमिशनपुढे या उज्जनी मठाचे तिसरे स्वामी चनवीरस्वामी हे होत. त्यांनी आपल्या जबाबांत आपण मठाचे तिसरे स्वामी असून मठ अस्तित्वात आल्याला ३०-४०- वर्षे झालीं, मठाला सुमारे १०-१५ एकर इनाम जमीन तेवढीच उत्पन्नाची बाब आहे वगैरे मजकुराच्या जबाबाची नक्कल दावणगिरी येथे आमच्या पहाण्यांत आली आहे. आता ग्वाल्हेर संस्थानांतील उज्जयिनी येथें वीरशैवमठ असल्याचे पुरावे हल्लीहि तेथे मिळत असून तो मठ 'कालिका उज्जयिनी' मठ म्हणून प्रसिद्ध आहे, व त्या मठाच्या स्वामींनी इतर चारी आचार्यमठाच्या स्वामीप्रमाणें चित्रदुर्ग जगद्गुरुना लिहिलेलीं विनंतीपत्रें आह्मीं पाहिलीं असून, तीं चित्रदुर्ग मठांत अद्यापि कोणासहि पहाण्यास मिळतील. त्यांच्या छापील प्रतीचें पुस्तक आमच्येकडेही आहे. दुसरा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश भागांत उज्जनी शाखेचे मठच ३०० च्या वर असून तेथील वीरशैव बहुजनसमाज त्या शाखेचाच आहे व फत्तेखेर्ड्यांचा प्रसिद्ध प्राचीन पन्डसिद्ध मठहि त्या शाखेचाच आहे. उज्जनी शाखेचें प्राबल्य तेथल्या इतके कर्नाटकांतहि नाही. याबरूनच तें पीठ ग्वालेर उज्जयिनी येथेंच

असावें हें सिद्ध होत असून आमच्या वऱ्हाड-खानदेशच्या प्रवासवृत्तांत आह्मीं ही गोष्ट जाहीर केली होती. व त्याचें निराकरण अद्यापिही कोणीं केलें तर नाहींच पण उलट गुरुवर्यसंघाच्या वीरशैव गर्जनेनें आपल्या ता. १६-१-३६ च्या अग्रलेखांतील दुसऱ्या कॉलमवर "उज्जनी पीठाजवळच एक मंदिर आहे, त्यांतील शिला-लेखावरून हे पांड्य राजांच्या कारकीर्दीत ह्मणजे इ.सन दुसऱ्या शतकांत बांधल्याचा दाखला सांपडतो, व सप्तपुऱ्यापैकी उज्जनी (अवंती) या पीठाचा मठ असल्याची माहिती लागते "असें लिहिलें. यांत उल्लेखिलेलें मंदिर मरुळसिद्धाचेंच असून, त्यांतील शिलालेख या देवळाबद्दल आहे, मठा-बद्दल नव्हे. व अवंतीनगरीला मठ असल्याची कबूली त्यांनींहि दिली आहे. यावरून "नाम-सादृश्यामुळें आह्मीं कुचेष्टा केली नाही" हेंच दिसेल. आतां राहिला प्रश्न प्राचीनत्वाचा तो आमच्या ह्मणण्याप्रमाणें सिद्ध करण्याइतका पुरावा उपलब्ध आहे. यावरून आह्मीं जें लिहिलें आहे तें आमच्या ऐतिहासिकज्ञानाचें प्रदर्शन नसून वस्तुस्थितीचें निदर्शन होय असेंच दिसेल.

आतां राहिली बाब मृत्युलेखाची. मृत्युलेख म्हणजे मृताच्या कर्तबगारीचा व त्याच्या सार्व-जनीक आयुष्याचा अहवाल होय. तो लिहितांना सत्य लोपलें जाऊं नये याबद्दल खबरदारी तरी घ्यावीच; पण त्यांच्या गुणदोषाच्या विवेच-नामुळे इतर कार्यकर्त्यांनाहि बोध व्हावयास पाहिजे आतां हे सर्व विचार पूर्ण आमच्या मनांत जागृत ठेऊनच आह्मी तो लेख लिहिला आहे. आह्मी पूर्ण आदरानेंच त्यांच्याबद्दल लिहिले असून त्यांतच त्यांची स्तुति आहे. आह्माला त्यांचे दोषच दाखवावयाचे असते तर त्यांचा अत्यंत तामसी स्वभाव, ते प्रसिद्ध उत्तंगी प्रकरण सर्व खुलासेवार लिहिलें असतें. तसेच त्यांनी नंतर विद्या संपादली या लिहिण्यानें तरी त्यांचा विद्याव्यासंगच स्पष्ट होत असून, त्यांत व्यंगोक्ति किंवा कुत्सितपणा मुळींच नाहीं.

आतां त्यांचें सोलापुरांत आगमन कोणत्या परि-स्थितींत झालें, मोठमोठ्या श्रीमंतांचे गुरु ४।६ महिने येथें येऊन आपापल्या शिष्यांना शपथा वगैरे देऊन श्रींना सोलापुरास आणण्या-बद्दल कसा अट्टाहास करीत होते, शेवटीं 'आह्मी शरणनिंदक नाहीं' अशी शरणचिठ्ठी त्यांनीं येथील एका प्रतिष्ठिताजवळ कशी लिहून दिली, नंतर येथे मिळेल त्या दक्षिणेच्या पैशावर एक 'गुरुकुल' स्थापण्याचें कसें आश्वासन दिलें, अनेक प्रयासांनीं येथें आल्यानंतर मिळणारी रोजची दक्षिणा दररोज मनिऑर्डरीनें कशी जाऊं लागली, त्यामुळें गांवांत पुन्हा मसलती व मजलसी कशा झाल्या, व त्याबद्दल स्थानिक-वृत्तपत्रांतून व जाहीरातीद्वारां कशी विचारणा होऊं लागली व शेवटी ५००० रु. वारदपाठ-शाळेस देणगी कशी जाहीर झाली, त्यापैकीं सोलापूर मुक्कामीं फक्त १२०० रु. व जिल्ह्याच्या संचारांतून २१०० रु. असे रु. ३३०० शेंच कसे मिळाले वगैरे सर्व हकीकत दिली असती.

आतां नीलगार प्रकरणः—नीलगारांना सन १९२६ सालीं सोलापूरच्या सर्व वीरशैवांच्या सहीनें व संमतीनें शुद्ध करून घेऊन अष्टावरणांचे अधिकार देण्यांत आले. त्या वेळीं होटगीपट्टा-धिकाऱ्यासह गावांतील प्रमुख वीरशैवांनीं पंक्ती-व्यवहारहि केला. त्यावेळीं नीलगारांनीं कांहीं रक्कम सार्वजनीककार्यास देऊ केली होती. पुढें ती रक्कम कांहीं पुढाऱ्यांनी सिद्धेश्वर देवस्थान-करितां मागितली. परंतु देवस्थानला उत्पन्न पुष्कळ असूनहि हिशेब समाधानकारक नसल्या-मुळें त्यांनीं देण्याचें नाकारलें. पण वीरशैव एकी-करण व शुद्धीकार्याकरितां रु. १२००० च्या इस्टेटीचा ट्रस्ट ह्मणजे सालीना रु. ७५० चें उत्पन्न येण्याजोगा ट्रस्ट केला. ती गोष्ट त्यां प्रमुखांना खपली नाहीं. इतक्यांत या शुद्धी-कृत नीलगारांच्या पराठिकाणच्या आप्तस्वकी-यांच्या शुद्धीचा प्रश्न उद्भवला. त्याला हे पंचलोकांनीं रक्कम दिल्याशिवाय संमती देण्याचें

नाकारलें. नंतर कांहीं तरुणांनीं पंचांना धाब्यावर बसवून शुद्धीकार्य पार पाडलें. इतकेंच नव्हेतर श्री. रेवणसिद्धप्पा बहिरोपाटील या तरुणानें सन १९२६ सालीं या शुद्धीकृत नीलगारांच्या कन्येशीं विवाह लावला. त्यामुळें पंचांचीं डोकीं फिरलीं. त्यांनी श्री. बहिरोपाटील, नलिगार, व कांहीं तरुणांवर बहिष्कार पुकारला. इकडे त्या तरुणांनी वै. सरदार यांच्या अध्यक्षते-खालीं जाहीरसभा भरवून पंचांना बहिष्कृत केलें. व दोन तट पडले. तरी बहिष्कार जोरांत राहिला नाही. जगदीशशास्त्री वगैरे मंडळी चोरून त्यांच्यांत भोजनास जातच राहिली. या बहिष्कारामुळें येथील श्री. नालतवाड शिवशरणांच्या पुण्यतिथीतला भोजनसमारंभ मात्र बंद पडला व त्यांची मुलगी रुद्रम्मा यांचा राग नीलगारांवर राहिला.

. . . . . . . .

उज्जनी स्वामीचे सोलापूरी आगमन झालें. निदान हे जगद्गुरु म्हणवितात त्यांच्या हातून तरी हे पतित पावन होऊन कार्य सुरळीत होवो असा बूट निघाला. त्याकरिता श्रीकडे डेप्युटेशन गेलें. मोठी सभा श्री. थोपडे यांच्या माडीवर भरविण्यांत आली. अर्ज स्वीकारण्यांत आला. अर्जाला स्टँप ड्यूटी ह्मणून रुपये ५ घेण्यांत आले. श्री. बहिरोपाटील नीलगारातर्फे मुखत्यार म्हणून बोलूं लागले, पण मुखत्यारनामा नाही ह्मणून मुखत्यारनामा स्टँप ड्यूटी ह्मणून रु. ५ घेण्यांत आलें, व पंचायतीला सुरवात झाली. प्रथमचाच मुख्य मुद्दा म्हणून नीलगार शुद्धी ही चित्रदुर्ग जगद्गुरुला अनुमताने व निजगुणस्वामी आदि विरक्त स्वामींच्या नेतृत्वाखालीं झाल्यामुळे या शुद्धी-कार्याला पंचाचार्यांची संमती नाही या मुद्यावर ती निषिद्ध ठरविण्याचा प्रयत्न झाला. त्यावेळी श्री. बहिरोपाटील यांनीं प्रथम रजिस्टर पत्रें पाचही आचार्यांना पाठविल्याबद्दल व त्यांची उत्तरे न दिल्यानें ' म्हैसूर स्टार ' या प्रमुख पत्रांतून पंचाचार्यांना जाहीर विनंती केल्याबद्दलचें रेकॉर्ड हजर केलें. नंतर गांवांतील संमती नव्हती ह्मणून हें शुद्धकार्य अयोग्य असा मुद्दा निघाला. त्या वेळीं जरी मागील प्रोसीडींग पंचांनीं अभी अर्पण केलें होतें तरी त्यावेळीं त्या प्रोसिडींगचे घेतलेले फोटो व निगेटिव्ह त्यांच्याशीं सहभोजन करतांना घेतलेले फोटो वगैरे हजर करण्यांत आले. यामुळे आता सर्व बाजू उलटणार असें वाटून पचांनीं सभा थांबविली; व या प्रकरणाच्या श्रींच्या निर्णयाकरिता हें प्रकरण तहून राहिलें. नीलगाराकडचें आमंत्रण स्वीकारण्यास जबर दक्षिणा सांगण्यांत आली. आता श्रींचा मुक्काम वाढल्यास कदाचित् इच्छेविरुद्ध प्रकार होतील ह्मणून पंचांनीं श्रींची पाठवणी करण्याची तयारी तातडीने केली. नीलगारांना हें समजलें; त्यांनीं दोन दिवस उपवासी राहून थोबड्यांच्या घरापुढें सत्याग्रह. केला पण केवळ पंचांच्या भीडेला पडून या जगद्गुरु श्रींनीं पतितपावन करून घेण्याचें आपलें पवित्र कर्तव्य न करितां, व समाजांतील ऐक्याचे सांधे न जोडतांच सोलापूरांतून व महाराष्ट्रांतून पाय काढला. या येवढ्या गाजलेल्या प्रकरणाचा उल्लेख श्रींच्या कारकीर्दीचें वर्णन करीत असतांना आल्याशिवाय कसा राहील ?

आतां श्रींच्या प्रवचनाबद्दल त्यांची तेथें १०-१२ प्रवचनें झालीं पण त्यांत शेंडी-कासोटी विरक्त गुरुस्थळ याशिवाय दुसरा मजकूर निघतच नसे. त्यामुळे कदाचित् श्रींची अगाध विद्वत्ता लोकांना दिसेल या भीतीने होटगीस्वामींचे उमचगी-शास्त्रीचें प्रवचनच जास्तवेळ होत असे. पण त्याचाहि लोकांवर परिणाम होईना. ह्मणून विजापूरच्या शंभुलिंग स्वामींना मुद्दाम आणवून त्यांचीं प्रवचनें करविलीं अशी वस्तुस्थिति असल्याने आम्हीं जें लिहिलें आहे त्यांत अतिशयोक्ति तरी नाहीच पण तो उल्लेखहि अगदी अल्प आहे अशीच आपली खात्री होईल.

आम्ही ' वीरशैव संजीवनी '-च्या चौथ्या अंकांत ' सुदर्शन '-चें प्रदर्शन ' असा लेख प्रसिद्ध केला होता. त्यास ' सुदर्शन '-काराकडून आम्हास

खाजगी उत्तर आलें होतें. सदर उत्तरांत त्यांनीं आपण विरक्त-पंचाचार्यवादाचे पुरस्कर्ते नसून मूळ पंचाचार्यांविषयीं त्यांना आदर आहे असें त्यांनी लिहिलें व आह्माला कांही माहितीहि पुरविली. सदर खाजगी पत्र प्रसिद्ध व्हावें अशी आह्मी इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्यांनी तें प्रसिद्ध करण्यास खुल्या दिलाने परवानगी दिली ह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

सुदर्शनकार मूळ पंचाचार्यांना मानणारे आहेत व त्यांना त्यांच्याविषयीं आदर आहे ही गोष्ट त्यांच्या पत्रावरून स्पष्ट होत असल्यामुळें आम्हाला त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करावेसें वाटतें. त्यांनी ह्या लेखांत अशी कबूली दिली कीं, शिवपदी पोहोंचलेले उज्जयनी स्वामी ह्यांचे आम्हीं दोष दाखविले नसून वस्तुस्थिति सांगितली आहे. ह्या-बद्दलहि त्यांना धन्यवाद देणे जरूर आहे. उज्ज-यनीला (अवंती नगरीला) मूळ पंचाचार्यांचा मठ होता अशी ते ग्वाही देतात तेव्हा सध्याच्या उज्जयनी मठापूर्वी तो होता ह्याविषयी त्यांनी कांही ऐतिहासिक आधार आम्हाला कळविले तर बसवपूर्वी वीरशैव होते ह्या आमच्या ऐतिहासिक विधानास अधिक पुष्टि मिळेल. अवंतीनगरींतील उज्जयनी मठाची संस्थापना केव्हां व कोणीं केली ह्याविषयीं माहिती आली तर सध्यांचा उज्जयनीमठ पहिला कीं अवंतीनगरी (उज्जयनी) मठ पहिला ह्याचा निर्णय लागेल. आणि ह्या निर्णय लागल्या-वाचून सध्याच्या उज्जयनीमठाला अलीकडचा ह्मणतां येत नाहीं. सुदर्शनकारांनीं 'वीरशैव गर्जना' ता. १६-१-३६ च्या अंकांतील एका लेखाचा आधार देऊन उज्जयनीपीठाजवळील मंदिर दुसऱ्या शतकांत बांधले गेलें ह्याचा उल्लेख केला. परंतु वीरशैव गर्जनाकारांनीं व त्यांच्याच आधारावर उड्या मारणाऱ्या सुदर्शन कारांनीं हा उल्लेख अवंतीनगरी उज्जयनीबद्दल आहे कीं काय हें अधिक स्पष्ट करावें. त्याकरितां शिलालेखांतलि वाक्य व त्याचें भाषांतर उद्धृत करणें हाच एक मार्ग राहतो. नाहींतर वीरशैवगर्जनेंत 'उज्जयनी' (अंवती) असें छापलें गेलें एवढ्यावरच सुदर्शनकार फसले हें तर स्पष्ट होईलच पण वीरशैव-गर्जनाकारहि शुद्ध अडाणी आहेत असें ह्मणावें लागेल. ह्मणून अवंती ही उज्जयनी मठाची आद्यजननी कीं कोट्टर उज्जयनी ही उज्जयनी-मठाची मूळ जननी हा प्रश्न अजून साधार सुटला नाहीं हें मात्र खरें."

'संपादक,

---

# पोंच व अभिप्राय.

**श्री बसव पत्नि निलांबिका.**— बाराव्या शतकांतील वीरशैव मतप्रसारक श्री बसवेश्वर हे कुडल संगमेश्वरांत अंतर्धान पावतांच ह्मणजे समा-धिस्थ होतांच त्यांच्या प्रिय पत्नि सौभाग्यवती निलांबिका देवी ह्याहि इष्टलिंगाची उपासना करितां-करितां समाधिस्थ झाल्याचें तीन रंगी सुंदर चित्र सोलापूरचे सुप्रसिद्ध फोटोग्राफर श्री. जिरगे ह्यांनी तयार केलेलें आमचेकडे अभिप्रायार्थ आलें आहे. चित्राची छपाई सुंदर असून तें अत्युत्कृष्ट भाव-दर्शक वठलें आहे. निलांबिका देवीची लिंगपूजा करीत असलेली ध्यानस्थ गंभीर वृत्ति पाहून भक्तिभाव उचंबळणार नाही असा सद्भक्त विरळा. ह्मणून सोलापूरचे जिरगे फोटोग्राफर यांचेकडून हें चित्र मागून घ्यावें, व ते प्रत्येक वीरशैवानें आपल्या देवमूर्तीत नित्य पूजनार्थ ठेवावें असें साधलें आहे.

# " वीरशैव-हितसंवर्धक मंडळ "

लेखक:—श्री० वि. तु. चौधरी, बी. ए. संजीवनी ऑफिस अमरावती.

वीरशैव संजिवनीचे पुनर्प्रकाशन व्हावें व दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे अधिकारयुक्त मार्गदर्शकत्वाचा लाभ वी. समाजाला सामाजिक, धार्मिक, राजकीय व शैक्षणिक बाबतींत आखिल वीरशैवसमाजाला व्हावा, ह्या मूळ उद्देशानेच माझे बंधुतुल्य स्नेही व सहकारी श्री. त्रिंवक गुराप्पा ऊर्फ आप्पासाहेब कापुसकर व पुसदचे श्री. लक्ष्मण सोमाप्पा ऊर्फ आप्पासाहेब एकलारे बी. ए. (ऑनर्स) वकील ह्यांचे सहमतानें आम्हीं दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांना आग्रहाची विनंती करून, 'संजीवनीचें पुनप्रकाशन तर घडवून आणलें. ह्या कार्यांत विनंतीपत्रकावर सह्या करणारे व आज वर्गणीच्या रूपानें मदत करणाऱ्या सर्व वीरशैवांचे आम्ही आभारी आहोंत. परंतु एवढ्यावरच वी. सामाजिक कार्याविषयीची इच्छा किंवा महत्वाकांक्षा आमची पूर्ण झाली असें नाही. किंबहुना ह्या आग्रहाचे विनंतींतच बीजरूपानें उन्नतिकरतां संजीवनीचे रूपानें प्रचारकार्य झाल्यावर वी. समाजाच्या सर्वांगीण उन्नत्तिकरितां सर्वप्रकारें दक्ष राहून खटपट करणारी एखादी संस्था किंवा मंडळ असणें जरूर आहे. केवळ शैक्षणिक दृष्टीनें विचार करणारी व वी. समाजास मदत करणारी अशी दे. भ. नानासाहेब बामणगांवकर व श्री. अण्णासाहेब हुंडेकर ह्यांनी १९१५ सालीं स्थापन केलेली व आजतागायत परिस्थितीनुरूप आपल्या शक्तिनुसार कार्य करणारी मध्यप्रान्त व वऱ्हाड वीरशैव-शिक्षणप्रसारकमंडळ ह्या नांवाची उमरावती येथे एक संस्था आहे. व ती आपल्यापरीनें खटपट करीत आहेच. परंतु केवळ शिक्षणप्रसारच नव्हे तर वी. समाजाच्या सर्वांगिण उन्नतीचा विचार व कार्य करणारी एकादीसंस्था वी. समाजाचे संघटनेच्या दृष्टीनें आवश्यक आहे, व ह्याची आवश्यकता " सोलापूर, वार्शीकडील दौऱ्याचेवेळीं " दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, श्री. बाबासाहेब मुखरे, श्री. रामचंद्रशेट कुळी रोहिणखेडकर, श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, वगैरे मंडळींना ह्या विषयावर चर्चा करून पटवून दिली. परंतु ह्या बाबतींत निश्चित स्वरूपाचें कार्य व योजना करण्याकरितां व वी. संजिवनीची कायमस्वरूपाची घटना ठरविण्याकरितां लौकरच वऱ्हाड-मध्यप्रांतांतील निवडक कार्यकर्त्या मंडळींनीं एकाद्या मध्यवर्ती ठिकाणीं जमणें आवश्यक आहे. ह्या बाबतींत रोहिणखेडचे उत्साही समाजसेवक श्रीमंत रामचंद्रशेट कुळी ह्यांनी 'उदय' 'सुदर्शन' वृत्त पत्रांतून वगैरे जाहीररीत्या गेल्या आक्टोंबर, नोहेंबरांत खटपट केली होती. व तशा तऱ्हेची चर्चा करण्याचें आश्वासनहि मीं दिलें होतें. अशा तऱ्हेची चर्चा करण्याची आतां वेळ आली आहे. वऱ्हाड-मध्यप्रांताकरिता अमरावती हें 'मध्यवर्ती ठिकाण' सोईस्कर पडतें. परंतु श्री. रामचंद्रशेट कुळी ह्यांनी समक्ष व खाजगीरित्या पत्रद्वारे अशी बैठक रोहिणखेडासच भरवावी ह्मणून अनेकवार आग्रहाची विनंती व सदिच्छा प्रगट केल्यामुळें ही बैठक रोहिणखेडासच भरेल व ही बैठक ह्मणजे ह्या महिन्यांत किंवा पुढील महिन्यांत भरवावयाची आहे, नक्की तारीख लौकरच जाहीर करूं, परंतु तत्पूर्वी ह्या बाबतींत कुणाहि वीरशैवास कांहीं योग्य व व्यवहार्य सूचना व सक्रिय मदत करणें झाल्यास त्यांनी वरील पत्त्यावर शक्यतों लौकर पत्रव्यवहार केल्यास मी आभारी होईन.

# काशीक्षेत्रांतील रेणुकाचार्यजयंति.

( खास प्रतिनिधीकडून )

श्री जगद्गुरु विश्वाराध्य सिंहासन जंगमवाडी मठामध्ये याच वर्षी ता. ६-३-३६ रोजी श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांच्या जयंतीनिमित्त काशी-वीरशैव-विद्वत्संघाची विशेष सभा बहु अट्टाहासाने झाली. या प्रसंगीं ता. २-३-३६ रोजी सोमवारी सायंकाळी सहा पासून दहा वाजेपर्यंत काशीचे सुप्रसिद्ध पं. साहित्याचार्य महोपाध्याय श्री गौरीनाथ पाठक यांच्या अध्यक्षतेखाली वीरशैव विद्वत्संघाच्या सभेस प्रारंभ झाला.

प्रथम स्तवन झाल्यानंतर संघसेक्रेटरींच्या सूचनेप्रमाणे श्रीवागीश शिवाचार्यांनीं हिंदी भाषेमध्ये ' काशी वीरशैव विद्वत्संघ ' याचा परिचय दिला. नंतर श्री महिसाळ पट्टस्वामींनी ' वीरशैव-मत ' याविषयीं संस्कृतमध्ये व्याख्यान केलें. नंतर अध्यक्षांनीं ' धार्मिकरक्षा ' या विषयावर हिंदी भाषेमध्ये एक तासपर्यंत बहु मनोहर असें भाषण केलें. यांच्या भाषणामुळे उत्पन्न झालेला आनंद आचार्यांच्या जयघोषाने व करताडनमूलक मध्ये मध्ये व्यक्त करण्यांत येत होता. अध्यक्षांचें भाषण संपल्यानंतर त्यांना काशी-वीरशैव विद्वत्संघाचे सेक्रेटरीकडून सन्मान केला गेला. नंतर आरती करून आचार्यांच्या जयघोषाने सभा विसर्जन केली गेली.

ता. ३-३-३६ रोजी मंगळवारी काशीचे सुप्रसिद्ध पं. न्यायाचार्य, तर्कतीर्थ पदवी प्रतिष्ठित श्री. वामाचरण भट्टाचार्य व साहित्याचार्य काव्यतीर्थ पदवीधर टीकमणी संस्कृत कॉलेज प्रिन्सिपाल श्री. ताराचरण भट्टाचार्य यांच्या अध्यक्षतेखाली प्रथमदिवसाप्रमाणेंच सभा चालली. त्या दिवशीं श्री वृषभलिंग शिवाचार्य विचाली यांनी ' वीरशैव मताचार ' हा विषय संस्कृतमध्ये सांगितला. नंतर अध्यक्ष श्री वामाचरण भट्टाचार्यांनीं ' हिंदु मततत्व ' व श्री ताराचरण भट्टाचार्यांनीं ' सनातन धर्म ' या विषयावर निर्गलपणें भाषण करून सर्व सभिकांना संतोषसागरामध्यें बुडविलें. नंतर उभय पंडितांना सेक्रेटरींनी वीरशैवविद्वत्संघाच्या वतीने सन्मान केला. मंगलारती होऊन सभा संपली.

तिसऱ्या दिवशीं ह्मणजे ता. ४-३-३६ बुधवारी हिंदुकॉलेजचे प्रधान साहित्याध्यापक व 'सुप्रभात' या नांवाच्या संस्कृत पत्राचे संपादक प्रसिद्ध विद्वान् पं. श्री. केदारनाथ शर्मा यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. प्रतिदिवसाप्रमाणें आचार्यस्तवन व संघपरिचय झाल्यानंतर श्रीमल्लिकार्जुन शिवाचार्यांनी ' लिंगधारण ' व वृषभलिंग शिवाचार्यांनीं ' वीरशैव मताचार ' या विषयावर संस्कृत भाषेमध्ये व्याख्याने दिलीं. नंतर सभाध्यक्षाबरोबर आलेले प्रसिद्ध वक्ते श्री. पं. सुरेश्वरी प्रसाद यांचें हिंदीमध्ये ' संघशक्ती '–विषयी सुमनोहर व्याख्यान झालें. तत्पश्चात् अध्यक्षांनी ' संघे शक्तिःकलौयुगे ' विषयावर बहुपरिणामकारक भाषण करून वीरशैवादि वैदिक मतोन्नतिविषयीं असलेली उत्कटापेक्षा प्रकट केली. तदनंतर सन्मान वगैरे करून आचार्यांच्या जयघोषामध्यें सभा विसर्जन झाली. चौथ्या दिवशीं ता० ५-३-३६ गुरुवारी अति प्रसिद्ध पंडित साहित्याचार्य न्यायकाव्यतीर्थ दर्शनकेसरी श्री. गोपालशास्त्री व पं. श्री. विंधेश्वरप्रसाद शास्त्री व श्रीमान् रामदास गौड, एम्. ए., यांचें आगमन झालें होतें. पं. श्रीगोपालशास्त्री यांच्या अध्यक्षतेखालीं सभेस सुरुवात झाली. यथाप्रकार प्रथम आचार्यस्तवन व संघपरिचय सांगण्यांत आला. श्रीमल्लिकार्जुन शिवा-

चार्य व श्री वृषभलिंग शिवाचार्य यांनीं प्रथम-दिवसाप्रमाणें संस्कृतमध्ये "लिंगधारण" व वीरशैवमताचार या विषयावर भाषणें केलीं. नंतर श्रीवागीश शिवाचार्यांनीं "वीरशैवमत-स्थापनाचार्य" याविषयीं हिंदी भाषेमध्यें व्याख्यान सुस्पष्टपणें सांगितलें.

नंतर श्रीमान् रामदास गौड, एम्. ए., यांचें "हिंदुत्व" या विषयावर एक तास अति मनोहर भाषण झालें. नंतर श्रीविंधेश्वरी प्रसाद-जींनीं "धर्मतत्व" या विषयावर व्याख्यान करीत करीत शिवजीवैक्याविषयीं फार मनोहर-पणें सांगितलें. तदनंतर सभाध्यक्ष महोदय श्री. पं. गोपालशास्त्रींनी "सर्वाद्वैत" विषय घेऊन समस्त वेदान्ततत्व उघड करून दाखवीत व शक्ति विशिष्टाद्वैत, भेदाभेद, द्वैताद्वैत मत रहस्य अत्यंत सुलभ शैलीमध्यें बोध करीत वीरशैव मतस्थापक पंचाचार्यांचे सिद्धान्त सारसंग्रहरूपानें अस्खलित वाणीनें हिंदीमध्यें व्याख्यान दिलें. अध्यक्षमहाशयांचें भाषण झाल्यानंतर संघसेक्रे-टरींनी या त्रिमूर्ति विद्वानांचा सन्मान करून त्यांचे आभार मानण्यांत आले.

या चार दिवसांमध्यें अध्यक्षपदवी अलंकृत विद्वानांनीं व इतर विद्वानांनी "काशी वीरशैव विद्वत्संघाच्या सम्मतिपुस्तकांमध्यें (शेराबु-कांमध्ये) आपापले योग्याभिप्राय दिले आहेत.

पांचव्या दिवशीं ६-३-३६ शुक्रवारी विशेष उत्साहपूर्वक श्रीजगद्गुरु रेणुकाचार्यांची जयंती झाली. त्या दिवशीं श्रीरेणुकाविग्रहाची विशेषपूजा व श्रीसोमनाथ लिंगास रुद्राभिषेकादि होऊन त्या दिवशीं सायंकाळीं ८ वाजतांपासून १० वाजे-तोंपर्यंत पंचाचार्य व शिवभजना होऊन गुरुतत्परांना प्रसाद वाटून कार्य सांगपणें संपविण्यांत आलें. यासमयीं साहित्यसुधाकर वे. पं. गुरुशांत शास्त्री होळगुंदी यांनी श्री. रेणुकाचार्यजयंतीनिमित्त महागणाराधना केली. श्री. जगदाचार्यांच्या कृपेनें दिने दिने 'काशी वीरशैव विद्वत्संघ' अभिवृद्धी पावो अशी प्रार्थना करितों.

# आमच्याविषयीं लोकमत

## वीरशैव संजीवनीचें प्रकाशन

'महाराष्ट्र' नागपूर ९-२-३६ च्या अंकावरून.

बरेच दिवसापासून गाजत असलेल्या वीरशैव-संजीवनी पाक्षिकाचें पुनः प्रकाशन करण्यांत आलें असून, आतांपर्यंत दोन अंक निघाले आहेत. लिंगायतसमाजाच्या निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांनीं विनंति केल्यावरून दे. भ. नारायणराव बामणगांवकर यांनी हें पत्र स्वतःच्या संपादकत्वा-खालीं पुनः सुरू केलें. त्यास सगळीकडून उत्तेजन व आश्रय मिळत असल्याचें ह्या दोन अंकांवरून दिसून येतें. लिंगायतसमाजाच्या ठिकाणी राष्ट्रीय भावनेवर जागृति व संघटना घडवून आणणें व सुधारलेल्या मतांचा पुरस्कार करणें हे जे दोन हेतु चालकांनी आपल्यासमोर ठेवलेले आहेत, ते साध्य करणारे असेच लेख या दोन्ही अंकांत आलेले आहेत. दे. भ.बामणगांवकर यांना सुदैवानें या खेपेस पुसदचे श्री. एकलारे वकील व उमरावतीचे श्री. बाबूराव चौधरी हे दोन तरुण व पूर्णपणें राष्ट्रीय बाण्याचे पदवीधर सहकारी मिळाल्यामुळे व वीरशैव संजीवनीच्या जबाबदारीचा बोजा धारण करण्यास त्यांनीं तयारी दाखविल्या-मुळें ही नवी जबाबदारी पत्करणें शक्य झालें, असें संपादकांनीं प्रारंभींच सांगितलें आहे. दुसऱ्या अंकांतील श्री. चौधरी यांचा नवमत-वादावरील लेख त्यांच्या राष्ट्रीय भावनेचा व योग्य सुधारणांच्या आकांक्षांचा दर्शक आहे. वऱ्हाड, कर्नाटक, खानदेश, व महाराष्ट्रांतील उदयोन्मुख अशा लिंगायतसमाजाच्या ह्या पत्रास पाठिंबा मिळाला असल्याने तें यापुढें चांगलें उत्कर्ष पावेल यांत शंका नाहीं.

# रोहिणखेड जि. बुलडाणा

येथे

मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश येथील

प्रमुख

# वीरशैव पुढाऱ्यांची सभा

यवतमाळ जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध वीरशैव जाहागीरदार

## श्री. द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख

## ह्यांच्या अध्यक्षतेखालीं

रविवार ता० १९ एप्रिल १९३६ रोजीं भरणार आहे

स्वागताध्यक्षः— श्री. रामाप्पाशेट कुल्ली हे आहेत.

ह्या प्रांताचे

## वीरशैव हितसंवर्धक मंडळ

स्थापन करणें हा हेतु आहे.

उमरावती, यवतमाळ, आकोला, व बुलडाणा, ह्या जिल्ह्यांतील सर्व प्रमुख वीरशैव हजर राहणार आहेत.

" अरुण " छापखाना, उमरावती.

# वीरशैवसंजीवनी

अंक ८ वा ) ता० १५ एप्रिल १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

: वीरशैव संजीवनी :

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥

पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्

भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति चैत्र व॥ ८ शके १८५८ ( अंक ८ वा.

# वीरशैव धर्माचा संस्थापक कोण ?

### लेखांक शेवटचा

## आचार्य व बसवेश्वर एकच

आतापर्यंत केलेलें विवेचन बरेंच लांबलें. पण तें करावें लागलें. कारण, पूर्वी नव्हते असे अनेक पक्ष सध्यांच्या वीरशैवसमाजघटनेंत गेल्या वीस वर्षांत निर्माण झालेले आढळूं लागले. पक्ष जर तत्वाभिमानावर उभे असते तर त्याबद्दल आम्हाला विषाद वाटला नसता. पण एक पक्ष पंचाचार्यांनाच घेऊन बसला, एक विरक्ताचाच अभिमानी बनला.एक पक्ष फक्त बसवेश्वरच मानतो. एवढेंच नव्हे तर ह्या पक्षाभिमानाने दूषित होऊन पंचाचार्यपक्षीयांनी बसवेश्वरास तुच्छ समजावें व बसवेश्वरपक्षीयांनी पंचाचार्यांस तुच्छ समजावें व विरक्तपक्षीयांनी त्वयार्धम् मयार्धम् करून आपलाच गाजावाजा करून घ्यावा आणि त्या भरांत ह्या सर्वांनीं एकमेकांची अशी निंदा करावी कीं, त्या निंदेने वेदप्रणित अशी वीरशैव-समाजघटना अन्यांच्या दृष्टीने दूषित ठरावी. ज्या वादाचे अगर पक्षाभिमानांचे आघात मूळ समाजघटनेवर होऊं लागले तो पक्षाभिमान समाजाच्या उत्कर्षाला कारणीभूत होईल असें कोणीं मानावें ? अशा प्रकारें ज्या वादामुळें समाजाचा ऱ्हास होतो असें आमच्या प्रामाणिक बुद्धीस वाटलें म्हणून त्या वादाचें स्पष्टीकरण व्हावें–बुद्धिवादी अशा चिकित्सक तरुण पिढीपुढे तें स्पष्टीकरण नित्य रहावें ह्याकरिता ही लांब लेखमाला आम्हीं लिहिली.

पं. काशीनाथशास्त्री ह्यांनी पंचाचार्यांना प्राधान्य देऊन वीरशैवतत्वाचें पृथक्करण केलें व त्यांत वीरशैवसमाजघटना वर्णाश्रमधर्मावर उभी आहे असें विधान केलें. सदर विधानाकरिता दिलेले सिद्धान्तशिखामणी वगैरे ग्रंथांतील आधार पाहिले तर तो वर्णाश्रमधर्म वीरशैवसमाजघटनेंत जन्मजात विषमतेवर उभारला आहे असें मुळींच स्पष्ट होत नाही. ही गोष्ट गेल्या लेखांकांतच आह्मीं स्पष्ट केली. सिद्धान्तशिखामणी वगैरे ग्रंथांतील आधार पं. काशीनाथशास्त्री ह्यांनीं जे दिले ते आजच्या सर्वसामान्य अशा सुज्ञ वीरशैवास अपरिचित आहेत असें नव्हे. पण ह्या आधाराच्या जोरावर जो जन्मजात विषमतेचा ध्वनि निघतो त्यामुळेच बसवेश्वरपक्षीयांना बसवेश्वरच एकुलता एक संस्थापक ह्मणण्याचा प्रसंग आला. ह्याप्रमाणे ह्या वादांतील सर्वपक्षीयांचें ह्मणणें पाहून आमचीहि समजूत झाली. पं. काशीनाथ शास्त्री ह्यांनी वर्णाश्रमधर्म वीरशैवांस मान्य आहे ह्मणजे काय मान्य आहे ह्याचें जर स्पष्ट विवेचन त्यांनी केलें असतें तर कदाचित् हा वाद वाढलाहि नसता. पण त्यांनी ह्याकरिता दिलेले आधार वर्णाश्रमधर्मास पोषक नाहींत. लिंगायतेत रांशीं संबंध नाही व ते आमचे कोणीच नव्हत, असें म्हटल्याने लिंगायतांत अगर वीरशैवांत जन्मजातीवर वर्णाश्रमधर्म मानला असें कसें म्हणावें ?

वास्तविक ज्या हिंदु वा वैदिक धर्मांत वर्णाश्रमधर्म मानला आहे तोच जेथे जन्मजातीवर नाही तेथे त्याच वैदिक धर्माची एक शाखा असलेला वीरशैवधर्म जन्मजातीवर वर्णाश्रमधर्म मानील हें शक्य कसें ? वास्तविक वैदिक धर्मांतच परिस्थित्यनुसार क्रांति व उत्क्रांति होत होतच चार वर्ण, चार आश्रम, व चार पुरुषार्थ, ह्यांत त्याची परिणति झाली आहे. सन्यास व मोक्ष ह्या कल्पनाच वैदिकांत व याज्ञिकांत मागाहून आल्या आहेत, व त्या वेदविरुद्ध नाहीत असे मानून त्या वैदिकांनी पचनीं पाडून घेतल्या आहेत. त्याच कल्पनेवर व आधारावर अनेक वीरशैव शास्त्री पंडितांनी वीरशैवधर्मास वैदिक धर्मांचा आधार आहे असें प्रतिपादिलें आहे. पं. काशीनाथ शास्त्री ह्यांना पंचाचार्यांची भाष्यें आहेत असा शोध लागला आहे. पण ती भाष्य जवळ करून त्यांतील आधार ते देऊं शकले नाहीत. पुढे मागे ही भाष्ये उपलब्ध होतील तेव्हा पंचाचार्यांचा वर्णाश्रम-धर्म कोणता हें अधिक साधार पुढे येईल. परंतु आज सिद्धान्तशिखामणी ग्रंथावरच त्यांचा जोर कोणत्याहि वर्णीयास शिवदीक्षा देऊन वीरशैवधर्म स्वतंत्रपणें लिंगांगसामरस्यार्थ वा मोक्षार्थ कारणीभूत आहे हें प्रचारांत यावें ह्याकरिता शिवदीक्षेचा संस्कार सर्व वर्णीयांस सांगितला आहे. अशा प्रकारें शिवदीक्षा घेतलेले त्रैवर्णिक आपसांत एकत्र खाऊं पिऊं शकतात हेंहि त्यांत स्पष्ट केलें आहे.

सिद्धान्त शिखामणीकार हे रेणुकाचार्य व चंद्रमौळी लिंग शृंगेरीमठास देणारा रेवणसिद्ध हेएकच हें ऐतिहासिक दृष्ट्या आह्मासहि पटत नाही. पं. काशीनाथ शास्त्री ह्यांनी शृंगेरीमठ, चंद्रमौलीश्वर लिंग व रेवणसिद्ध सांप्रदाय ह्यांची सांगड के. रा. ब. एच्. कृष्ण शास्त्री अय्यर, बी. ए., ह्यांच्या शिवरत्नाकर ग्रंथाच्या प्रस्तावनेवरून घातली आहे. पण Revana sidh», we know, is a welknown shaiva teacher, whom the veershaivas still claim as one of their earliest ach»ryas असें त्यांनी त्याच प्रस्तावनेंत लिहून ठेवलें, इकडे मात्र पं. काशीनाथ शास्त्री ह्यांचें लक्ष गेलें नाही. ह्याचा स्पष्ट अर्थ असा कीं, 'रेवणसिद्ध हा प्रसिद्ध शैवधर्मप्रसारक होता हें आह्मी जाणतों. ज्याला वीरशैव लोकहि आपलाच जवळचा आचार्य अद्यापि समजतात.' अर्थात् कृष्णशास्त्री स्वतः कांहीं रेवणसिद्धास वीरशैवसांप्रदायाचा प्रसारक मानीत नाहीत. शिवाय रेवणसिद्ध हे वीरशैवसांप्रदायिक असते तर त्यांनी शिवदीक्षा दुसऱ्यास दिली असती व इष्टलिंगधारणाहि केली असती. पण

चंद्रमौळीलिंग एकाने दुसऱ्याला पूजेकरिता देणे ही क्रिया इष्टलिंगधारणेच्या उपासनेंत येत नाही. ह्मणून सिद्धांतशिखामणीकार रेणुकाचार्य व रेवणसिद्ध हे एकच वा भिन्नकालांतील भिन्न अवतार हें ह्मणणें ऐतिहासिक दृष्ट्या ग्राह्य वाटत नाही. तथापि सिद्धान्तशिखामणी हा ग्रंथ वीरशैव-धर्मप्रतिपादक आहे ह्यांत संशयच नाही. परंतु हाच आचार्यग्रंथ ह्मणून त्यावरच विसंबून रहावें असाहि आमचा आग्रह नाही. आनंदाची गोष्ट येथे एकच कीं, पं. काशीनाथ शास्त्री व अॅ. पावटे हे दोघेहि सिद्धान्तशिखामणी हा ग्रंथ मानतात आणि अॅ. पावटे हे ज्या ग्रंथांतून जन्मजात विषमतेवर वीरशैवधर्म घटना उभारली नाही ह्मणून सांगतात त्याच ग्रंथावरून पं. काशीनाथ शास्त्री जन्मजात गुणावर वीरशैवांत वर्णाश्रम-धर्म उभारला आहे असें कसे सांगतील ? ह्मणून पं. काशीनाथ शास्त्री पंचाचार्यांचे अभिमानी असले व वर्णाश्रमाचे चाहते असले तरी जन्मजात विषमतेवर वीरशैवांत वर्णाश्रमधर्म उभारला आहे असें ते ह्मणत आहेत असें आह्माला वाटत नाही.

पं. काशीनाथशास्त्री व अॅ. पावटे ह्या दोघांत तत्वत: फरक नाही. आगमाधारें वीरशैव मत कसें परिणत झालें ह्याबद्दल दोघांचेंहि एकमत आहे. आणि हें मत वैदिक मताला धरून आहे हें दोघेहि प्रतिपादन करतात. पण पं. काशिनाथ शास्त्री लिंगोद्भव पंचाचार्यांना महत्व देऊन हें प्रतिपादन करतात तर अॅ. पावटे शिवपार्वती व आगम व सिद्धान्तमणी ग्रंथ ह्यांना प्राधान्य देऊन हेंच मत प्रतिपादन करतात-आणि पं.काशिनाथ शास्त्री वगैरेनीं वर्णाश्रमधर्म शब्द उच्चारला कीं जन्मजात विषमता आली असें मानून जन्मजात विषमता वीरशैवधर्मानें मान्य केली नाही हें ठासून प्रतिपादन करतात. ह्याकरितां ते आगमकाळावरून उडी मारून बसवकाळावर अधिष्ठित होतात. ह्याप्रमाणे पं. काशिनाथ शास्त्र्यांची इंग्रजींतील भाषणें वाचून व अॅ. पावटे ह्यांचें वीरशैव तत्वज्ञान हें इंग्रजी पुस्तक वाचून आमचा ग्रह झाला आहे. पण इष्टलिंगधारणा, अष्टावर्ण, पंचाचार, षट्स्थळ वगैरे मूलभूत सिद्धान्ताविषयी कोणाचाहि मतभेद नाही. के. जिरगे ह्यांनी तर पं. काशिनाथ शास्त्र्यांचे पंचाचार्य व अॅ. पावटे ह्यांचे आगम ह्या सर्वांचेंच अधिष्ठान बसवेश्वराच्या काळांत व काळानंतर ठरविण्याचा अट्टाहास धरला आहे. अर्थात् कांही शब्दांचा ह्या शब्दांच्या अर्थाचा व कांही व्यक्तींच्या नांवाचा दुरभिमान बाजूला ठेवला तर ह्या तिघांत कांही तात्विक भेद आहे असें आह्माला वाटत नाही.

ऐतिहासिक दृष्टीने वीरशैवधर्माची उपपत्ति सांगत असतां ज्यांना शिवयोगी ह्मणत, ज्यांना जंगम ह्मणत, अशा वर्गाकडून वीरशैवधर्माचा प्रसार झाला ही गोष्ट ह्यापूर्वीच्या एका लेखांकांत आह्मीं सांगितली आहे. हे जंगम जन्मजात नव्हत. हा त्यागी वृत्तीच्या विद्वान् व योग्य अशा शिवयोग्यांचा सांप्रदाय. ऋषि-महर्षींना जशी जात नाही, वर्ण नाही, त्याच कोटींतील हे जंगम वा शिवयोगी. ह्यांत निरनिराळ्या परिस्थितींत पं. काशिनाथ शास्त्री ह्यांनी सांगितलेले आचार्य जसे उत्पन्न झाले तसेच बसवेश्वराने शिवभक्ति करीत असतां जंगमनिंदा करणें महापाप आहे असें ज्यांना पाहून झटलें ते योग्य जंगमहि निर्माण झाले. क्रियासारकार नीलकंठ शिवाचार्य हे ह्याच कोटींतील शिवयोगी होत.त्यांचा हा ग्रंथ प्रस्थानत्रयी-वर भाष्य करणारा असल्यामुळे तो खरा शास्त्रग्रंथ होय. ह्या ग्रंथांत पंचाचार्यांपैकी एकाहि आचार्याचे नांव नाही व बसवेश्वराचेंहि नांव नाही. पण इष्टलिंगधारणा, पंचाचार, अष्टावर्ण व षट्स्थळ ह्यांचें ह्या ग्रंथांत सर्वोत्कृष्ट असें स्पष्टीकरण आहे. ह्मणून बसवेश्वरापूर्वी, इतकेंच नव्हे तर लिंगोद्भव पंचाचार्य प्रणालिका रूढ होण्यापूर्वीच हा आचार्य वा शिवयोगी निर्माण झाला असावा. शिवाय त्यांच्या ग्रंथाच्या संस्कृत भाषेवरून तरी हा बसवकाळापूर्वीचा ग्रंथकार असावा असें वाटतें. वेद व वेदभाष्यें, संहिता, उपनिषदें, स्मृति

आगम व पुराणे ही त्या ग्रंथकारास अवगत होती! त्या सर्वांचे परिशीलन करून त्यांनी हा ग्रंथ लिहिलेला दिसतो! ह्या ग्रंथांत जंगम शब्द नाही. त्याचप्रमाणे सिद्धान्तशिखामणी वगैरे ग्रंथाचें नांवहि नाही. ह्मणून उपलब्ध सर्व ग्रंथांत आचार्यग्रंथ कोणता तर 'क्रियासार' असेंच स्वाभिमानाने ह्मणावें लागतें.

'अथातो ब्रह्मजिज्ञासा' ह्या सूत्रावर भाष्य करीत असतां शक्तिरूप ब्रह्मशक्ति हेंच इष्टलिंग होय असें ह्या ग्रंथकारानें प्रतिपादिलें आहे. 'तन्निष्ठस्य मोक्षोपदेशात्' ह्यावर भाष्य करीत असतां इष्टलिंग हें ब्रह्मच होय' व त्याच्याशीं तादात्म्यता हा लिंगांगसामरसभाव होय हें त्यांनी प्रतिपादिलें आहे. 'शब्दादेव प्रमितः" "हृद्यपेक्षया तु मनुष्याधिकारत्वात्" "तदुपर्यपि बादरायणः संभवात्" इत्यादि सूत्रावर भाष्य करून जन्मकर्मबंध तोडावयाचा असला तर इष्टलिंगधारणाच योग्य असें प्रतिपादिलें आहे. हें इष्टलिंग मनुष्य व देव यांनी धारण करावें. पण स्त्रियांनी व शूद्रांनी धारण करावें असा प्रश्न उत्पन्न झाला असतां 'भावं तु बादरायणोऽस्तिहि' ह्या सूत्रावर भाष्य करून संस्कारयुक्त होणारास लिंगधारण करावें. शूद्रांना संस्कार नसल्यामुळे (ह्मणजे शिवोपासनेला जे विरुद्ध ते शुद्र. तेव्हां त्यांना संस्कार कसले? पण हे संस्कार ज्यांना आहेत व करून घ्यावेत अशी ज्यांची इच्छा आहे त्यांना इष्टलिंगधारणेचा अधिकार आहे.) लिंगधारणेचा अधिकार नाही असें ह्या ग्रंथकाराचें ह्मणणें आणि पुढे वैदिकमताच्या आगमनानुसार अष्टावर्ण व षट्स्थलें ह्यांचें स्पष्टिकरणहि केलेलें आहे. परंतु वर्णाश्रमधर्मावर व जन्मजात विषमतेवर ह्या भाष्यांत कोठेहि जोर दिला नाही.

बसववचन भक्तस्थल १७१ मध्यें 'लिंग हेंच शिव' असें ह्मटलें आहे. ह्यावरून क्रियासारकाराप्रमाणेंच ब्रह्म व इष्टलिंग एकच असें बसवेश्वरांचें मत होतें हें उघड आहे. लिंगांगसामरस्य व जन्मकर्मबंध इष्टलिंगाच्या उपासनेवाचून तुटत नाही हेंहि बसववचनावरून स्पष्ट होतें. त्याचप्रमाणें भक्तस्थळ ८९ वाचलें असतां लिंगसंस्काराव्यतिरिक्त असलेले जुनाट शूद्रजातीय पूर्वसंस्कार गुरुहस्तें इष्टलिंगधारणा करून घेऊन घालवून घ्यावेत. ते संस्कार केलें नाहीत तर शिवसायुज्यता न लाभतां नर्क लाभेल हेंहि स्पष्ट सांगितलेलें आढळेल. तात्पर्य काय कीं, शिवभक्त व शिवयोग आणि ह्यांत जे रंगले तेच आपले व तेच वीरशैव असा बोध बसववचनें व क्रियासारादि शास्त्रीय ग्रंथ ह्यांतून सारखाच निघतो. ह्मणून बसव पहिला कीं आचार्य पहिला कीं विरक्त पहिला हा वाद व्यर्थ असून, ज्या-ज्या सर्वांनीं वीरशैवधर्माचें ज्ञानामृत पाजलें ते सर्वच वंदनीय. हे महापुरुष आपसांत झगडले नाहीत. तूं श्रेष्ठ कीं मी श्रेष्ठ असा गर्व त्यानीं केला नाही. पण त्यांच्या नांवावर जगूं इच्छिणारे आह्मी त्यांचे गुण अंगीं न आणतां आपसांत झगडतों व वीरशैवसमाजघटनेचा मूळ पाया अधिकाधिक ढिला व विस्कळित करतों. पूर्वपचाचार्य आजच्या पंचाचार्यवाद्यांस, पूर्वबसवेश्वर आजच्या बसवेश्वरवाद्यांस, पूर्वीचे खरे गुरु आजच्या गुरु ह्मणविणारांना, व पूर्वीचे भक्त आजच्या भक्त ह्मणविणाराना, आज शिवलोकांतून काय म्हणत असतील? हरहर! ती कल्पनाच करूं नये.

मोक्ष, सन्यास, योग व ध्यान ह्या कल्पना शिव ब्रम्ह एकच ह्या कल्पनेशीं जेव्हां जुळत्या झाल्या व हा संयोगकाळ जेव्हा हिंदु म्हणविणाऱ्या समाजांत निरनिराळ्या काळीं व ठिकाणीं परिणत होत गेला तेव्हा वीरशैवसमाजाची घटना अस्तित्वांत आली. पं. काशीनाथशास्त्री ह्यांच्या व्याख्यानांतील वीरशैव व वैष्णव ह्यांच्या ध्येयाचें, साध्याचें व रीतीचें जें साम्यवर्णन केलें आहे तें सर्वोत्कृष्ट आहे. अशा परिस्थितींत वीरशैवधर्माचा संस्थापक कोण हें ठरविणें कठिण आहे. कठीण आहे म्हणूनच एकाच परमेश्वराने पांच आचार्यांच्या मुखाने व अनेक

शिवगणांनी भक्त होऊन वीरशैवधर्माची संस्थापना केली ही कल्पना हृदयंगम व बोधप्रद कशी नव्हे ? म्हणून बसवपूर्वकाळीं आगमाच्या आधाराने वैदिक धर्माचा आश्रय घेऊनच वीरशैव-धर्माची वाढ झाली हें तत्व अॅ. पावटे ह्यांच्या-प्रमाणे के. जिरगे ह्यांनी मान्य करून जर आपला छोटा ग्रंथ लिहिला असता तर तो बुद्धिग्राह्य असा विचारार्ह ठरला असता. परंतु वीरशैवांना वर्णाश्रमधर्म मान्य आहे असें ह्मणतांच कांही लोक त्याचा जन्मजात विषमता मान्य आहे असा अर्थ करूं लागले व त्यामुळेहि अधिक घोटाळा झाला.

वास्तविक चार वर्ण ही वैदिक धर्माची व समाजाची नैसर्गिक परिणतावस्था होय. त्याशिवाय समाजाचे संबंध सुसंगत रहात नाहीत. पण पुढे ब्राह्मणाच्या मुलास ब्राह्मण, राजाच्या मुलास राजा, वैश्याच्या मुलास वैश्य, व क्षुद्राच्या मुलास क्षुद्र, मानण्याचा परिपाठ रूढ झाला. आणि लिहिणे वाचणे, परिचय होणे, विचार प्रसृत करणे ह्या गोष्टीला सध्या इतकीं अनुकूल साधनें पूर्वकाळी नव्हती ह्मणून आपआपल्या वर्णाची संस्कृति राखिली जावी ह्या अभिमानाने व जरूरीने प्राबल्य वाढलें.पण ह्या प्राबल्यावर वेळोवेळी हल्लेहि झाले. कारण संस्कृतीच्या रक्षणापेक्षा वा संस्काराचें प्राबल्य होण्यापेक्षा जन्मजातीच्या कल्पनेने संस्काराचें कार्य आकुंचित होऊं लागलें. इतकेंच नव्हे तर तें उलट दिशेला जाऊं लागलें. ह्मणून संस्कृति व संस्कार ह्यांत गुणाचेंच प्राबल्य रहावें ह्याकरिता धर्मशुद्धीच्या व समाजसुधारणेच्या अनेक चळवळी ह्या देशांत झाल्या, वीरशैवधर्माची लाट ही त्यापैकीच एक होय. परंतु वैदिक धर्म ह्मटला कीं चार वर्ण व चार आश्रम मान्य आहेत की नाही असाहि प्रश्न उत्पन्न झाला तो प्रश्न आजचा नाही तर चन्नबसवेश्वराचे काळचाच प्रश्न आहे. चन्नबसवेश्वर सुधापुरांत असतांना मुरप्पानामक पंडितापुढे हा प्रश्न होता. त्यांकरिता मुरप्पा पंडिताला ' वीरशैवोत्कर्ष प्रदीपिका ' ग्रंथ लिहावा लागला. इष्टलिंगधारी आराध्य ब्राह्मण वैदिक कीं यज्ञोपवित न वापरणारे पण इष्टलिंग धारण करून राहणारे वीरशैव ब्राह्मण वैदिक असा प्रश्न सदर पंडितापुढे होता. वीरशैव ब्राम्हण हे अत्याश्रमी होत असा त्यांनी निर्णय दिला. अर्थात् आश्रमधर्म मान्य आहे हीच गोष्ट प्रत्ययास येते.

ब्रम्हचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास ह्या चारहि आश्रमधर्मांतून ' वरिशैवास गेल्यावाचून गत्यंतर नाही अशीच त्याची क्रिया आहे. वीरशैवांत ब्रम्हचर्यास मज्जाव नाही. गृहस्थाश्रमाचा सर्वस्वीं त्याग केला नाही. प्रसादिक होऊन वानप्रस्थाश्रम घेण्याची प्रथा होती व आहे. आणि संन्यासधर्म तर आहेच आहे. विरक्तदीक्षा ही त्यापैकीच होय. ह्या दीक्षेला अत्याश्रमी दीक्षा असेंहि म्हणण्याचा प्रघात आहे. ही विरक्तावस्था विरक्तांनाच नाही तर जे पंचाचार्यपीठ आज भूषित करतात त्यांनाहि लागू झाली. फरक फार थोडा. विरक्त गांव सोडून असूं शकतो तर आचार्यपीठाधीश भक्ताकरिता सिंहासनाचें वैभव भोगतो. विरक्तालासुद्धा हें वैभव पुढे प्राप्त झालें. तथापि भक्तांचे सर्व संस्कार हे आचार्य ह्मणविणाराकडे गेले व विरक्त सिंहासनाधीशाकडे ह्या सर्वांना आशीर्वाद देण्याचा अधिकार आला. अशा प्रकारें अधिकारविभागणी झाली. पण अधिकारलालसा सुटली नाही. ती लालसा हेंच विरक्त आचार्यवादाचें बीज. सत्तेला वतनदारीचें स्वरूप लाभलें ह्मणजे जें विकृत स्वरूप प्राप्त होतें त्याचप्रमाणे भिक्षुकीला वा खऱ्या त्यागधर्मास वतनदारीचें स्वरूप आलें कीं असा कलह माजावयाचाच. ह्या कलहाला नियंत्रण घालावयाचें झालें तर ब्रम्हचर्य, गृहस्थ व वानप्रस्थ ह्या तिन्ही आश्रमांतून चौथ्या आश्रमांत खुबीनें गेलेल्या पंडितास व योग्यासच विरक्तपीठ वा आचार्यपीठ लाभावें अशी सुधारणा होणें जरूर आहे. पण लग्न न केलेल्या ह्मणजे कायदेशीर पत्नी न उपभोगणाऱ्याच्याच नशीबीं हीं पीठें येऊं लागलीं व सर्व आश्रमधर्म थट्टेचा विषय होऊन बसला.

असें अत्याश्रमी शिवयोगी जेव्हां धर्म प्रसृत करीत असत तेव्हा तिन्ही वर्णांचें व चारहि आश्रमांचे लोक त्यांचें शिष्य होत. हें शिष्यत्व पत्करूनच वर्णधर्मांचें पालन त्यांच्याकडून योग्य तऱ्हेनें होई. कारण योग्य गुरुकडून योग्य क्षत्रियास, ब्राह्मणास, वैश्यास व शूद्रास शिवदीक्षा लाभली व लिंगांगसामरस्यज्ञान त्याला झालें तर त्याची बुद्धि, त्याचा पराक्रम, त्याचा पैसा व त्याची सेवा शिव प्रमुरूप असलेल्या समाजरूपी परमेश्वरास निष्काम बुद्धीने अर्पण करण्याची प्रवृत्ति ह्यांच्यांत होते. इतकेंच नव्हे तर शेवटीं गुरु व चारहि वर्णांतील व आश्रमांतील भक्त ह्यांत साम्यता दिसते व नित्यानंदाचा उपभोग समाजाला लाभतो. ह्याचकरिता सिद्धान्तशिखामणीकाराप्रमाणेंच बसवेश्वराचे भक्तस्थलांतील ८५ वें वचन आहे. त्यांत शिवभक्तीहिन, शुद्र व ब्राह्मण हे सर्व भवी जाण.तेत्याज्य. पण ब्राह्मणापासून तो अंत्यजापर्यंत जे शिवाचे .सद्भक्त आहेत ते सर्व समान होत असें प्रतिपादिलें आहें. ह्यावरून चारहि वर्ण व चारहि आश्रम ह्यांत अंति साम्य- निर्माण करून समाजधारणेच्या धर्माचें कार्य सुरळीत चालावें, ह्याकरिताच आचार्यांनी सांगितलेला व बसवांनी मातृमार्षेतून सर्वसामान्य जनतेंत प्रसृत केलेला वीरशैवधर्म एकच ह्मणून आचार्य काय, विरक्त काय, आगमपंथीय काय, व बसवपंथीय काय, सर्व वीरशैव एकाच धर्माचे घटक ठरतात. म्हणून कोणीं वर्णाश्रमधर्म प्रतिपादन केला कीं तो रूढ जन्मजातीय विषमतेचा चाहता अशी समजूत करून घेणें योग्य नव्हे. तद्वतच कोणी शेंडी ठेवा म्हटले अगर स्त्रियांनी कासोटा घालावा असें म्हटलें तर हें परिस्थित्यनुरूप आवडी-निवडीचे प्रश्न होत. कारण शेन्डींत व मुंडनांत वीरशैवधर्माने ज्या चारहि वर्णांस व आश्रमांस लिंगांगसाम्यबोध करण्याचें कंकण बांधलें तें ह्या कोणत्याहि बाह्य चिन्हांत नाही. त्याला अंतःकरण पाहिजे. म्हणूनच धनदाराचा मोह असणारा, मृत्यूला न भीणारा असा जो शिवभक्त त्याच्या घरीं मी श्वान होईन अशी शिवजवळ बसवेश्वराने प्रार्थना केली आहे. आम्ही सर्वच आज त्याच्या उलट नाही काय? तेव्हा मी आचार्यभक्त, मी विरक्तभक्त, मी बसवभक्त, असें आम्ही कोणत्या तोंडाने म्हणावें ? संपली ही लेखमाला. कमी-आधिक निघून गेले असल्यास क्षमा करावी.

---

# रोहिणखेड-परिषद्

**रविवार तारीख १९ एप्रिल १९३६ इ० चा**

**—* कार्यक्रम *—**

सकाळीं ६॥ ते ७॥ अध्यक्षांचें आगमन व मिरवणूक. सकाळीं ७॥ ते १० परिषदेस सुरुवात. दुपारीं १ ते३ " वीरशैव हितसंवर्धक मण्डळ "-ची घटना-कमिटीची बैठक; व परिषदेपुढील ठरावांची चर्चा. सायंकाळीं ५ च्या पुढे परिषद्.

टीप:—निमंत्रित पाहुण्यांना उतरण्याची वगैरें व्यवस्था मलकापूर येथे श्रीमन्त जव्हारमल दामोदरदास ह्यांचे बंगल्यांत केली आहे. मलकापूरस्टेशनवर स्वयंसेवक हजर राहतील. मलकापूर ते रोहीणखेड मोटार-सर्व्हिस सुरू आहे. तसेंच बुलडाणाहूनमोटारमार्गें येणारांना वागजाळ फाट्यावर धामणगांव-रस्त्यावर बैलगाड्यांची सोय केली आहे.

# रोहीणखेडचे वीरशैव सम्मेलन

### मुख्य कार्यकारी ठराव

एप्रिलच्या एकोणीस तारखेला पारवा, जि० यवतमाळ, येथील सुप्रसिद्ध जहागीरदार श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख ह्यांच्या अध्यक्षतेखाली मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश ह्या भागांतील प्रमुख वीरशैवांचें संमेलन भरणार आहे. हें संमेलन भरविण्याचें श्रेय रोहीणखेडचे श्रीमंत रामाप्पा कुल्ली ह्यांच्यासारख्या सुबुद्ध व सुहृद सद्गृहस्थांना आहे. सदर संमेलनांत ह्या भागांतील वीरशैवांच्या धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, व आर्थिक परिस्थितीचा विचार तर होईलच; परंतु हा विचार करून व नुसते ठराव पास करून न राहतां कांही तरी भरीव कामगिरी व्हावी ह्याकरिता एक वीरशैव हितसंवर्धक मंडळ स्थापन करणें व त्यामार्फत सतत काम चालेल अशी व्यवस्था करणें हा मुख्य हेतु आहे.

### वीरशैव हितसंवर्धक मन्डळ

मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश ह्या भागांतील सर्व प्रकारच्या वीरशैवांत परस्परस्नेहभाव, संघटन, परस्परास मदत, करितां यावी म्हणून मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश वीरशैव हितसंवर्धक मंडळ स्थापन करावें असें हें संमेलन ठरवितें.

### मंडळाची घटना

मंडळाची घटना तयार करण्याकरिता संमेलनाचे अध्यक्ष व स्वागताध्यक्ष ह्यांच्यासह खालील सद्गृहस्थांची एक कमिटी हें संमेलन नेमीत आहे. ह्या कमिटीने येत्या जूनपूर्वी आपली घटना प्रसिद्ध करावी असें हें संमेलन ठरवितें.

### घटना-कमिटीच्या मर्यादा

(१) एकदाच रुपये ५०० चे वर देणगी देणारे व दर सालचे रुपये पंचवीस आगाऊ देणारे गृहस्थ वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे सभासद समजले जातील. दर वर्षाला ह्या सभासदांनी आपलें कार्यकारी मंडळ सभा भरवून वा पत्रव्यवहाराने निवडावें.

(२) दरसाल रु० १० व रु.५ देणारे सद्गृहस्थ. ह्याना हितचिंतक वर्ग एक व दोन समजावे. वर्ग १ मधील हितचिंतकांनी आपल्या १० च्या प्रमाणांत एक सभासद कार्यकारी मंडळांत पाठवावा. तद्वत दुसऱ्या वर्गांतील हितचिंतकांनी २० ला एक ह्या प्रमाणांत एक सभासद कार्यकारी मडळांत पाठवावा.

(३) रुपये ५०० च्या वर देणगी देणारे हे मंडळाचे तहाहयात सभासद राहतील व त्यांना कार्यकारी मंडळांतहि हक्काने बसण्याचा अधिकार राहील.

(४) तहाहयात सभासदासह एकंदर सभासदाच्या संख्येतून ¼ पेक्षा अधिक संख्या कार्यकारी मंडळाची जाणार नाही ही खबरदारी घ्यावी.

(५) कार्यकारी मंडळास आपल्यांतील बहुमताने मंडळाच्या उद्देशाला अनुसरून कार्य करण्याचा, पैसा खर्च करण्याचा, व तो रक्षण करण्याचा अधिकार राहील. कार्यकारी मंडळांत तीव्र मतभेद झाला तर सर्वसाधारण सभासदांतील बहुमताच्या मान्यतेखेरीज कार्यकारी मंडळाने कोणतेंहि काम करूं नये. अशा प्रसंगीं कार्यकारी मंडळांतील अल्पसंख्याकांना सर्व सभासदांची सर्वसाधारण सभा बोलावण्याचा वा त्यांचीं लेखी मतें मागविण्याचा अधिकार राहील व तो अधिकार कार्यकारी मंडळांतील बहुमतवाल्यांनी अंमलांत आणण्याची तत्परता दाखवावी. पण ज्या सभासदांची ज्या वर्षाची वर्गणी येणार नाही त्यांना त्या वर्षी मत देण्याचा अधिकार राहणार नाही.

(६) मंडळाचे तहाहयात सभासद तीनवर होतांच व वार्षिक सभासद ५० होतांच मंडळ रजिस्टर करावें.

(७) मंडळाचा १०० रुपयांवरील सर्व पैसा खजीनदारामार्फत चांगल्या शहाजोग बँकेंतच असावा.

(८) चिटणीसाचे कामाकरिता सभासदाबाहेरील पगारी वा विनपगारी मदतगार चिटणीस प्रसंगोपात निवडण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास आहे.

ह्या आठ कलमास अनुसरून घटना-कमिटीने घटना प्रसिद्ध करावी.

### मंडळाचे सभासद वाढविणारी कमिटी.

जून अखेरपर्यंत मंडळाचे सभासद वगैरे गोळा करण्याचा अधिकार खालील तात्पुरत्या कार्यकारी मंडळास देत आहे.

### मंडळाचा मुख्य उद्देश.

मध्यप्रांत-वऱ्हाड खानदेश ह्या भागांत वीरशैव अल्पसंख्याक आहेत. ह्या सर्वांची एकमेकांना माहिती व्हावी व सर्वांत सख्य व ऐक्य नांदावें आणि त्या सर्वांची धार्मिक, सामाजिक शैक्षणिक व औद्योगीक प्रगति होईल असे प्रयत्न करावेत.

ह्याकरितां वीरशैवसंजीवनी हें पाक्षिक टिकाऊ करण्याचा प्रयत्न करणें व त्याद्वारें मंडळाच्या तहाहयात सभासदांचा कुलवृत्तांत व वार्षिक आयुष्यक्रम प्रसिद्ध करणे, सभासदांचासुद्धां वार्षिक आयुष्यक्रमाची माहिती देणें व त्याचप्रमाणें हितचिंतक वर्गाचासुद्धां परिचय करून देणें व त्यांच्या गांवांतील व शहरांतलि वीरशैवांची लोकसंख्या, त्यांची धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक परिस्थिती ह्याची माहिती गोळा करून ती प्रसिद्धी करणें. आणि ह्या सर्व माहितीची दरवर्षाला प्रसिद्ध करून त्या परिस्थितीवर विचार करून कार्य करणें हा ह्या मंडळाचा मुख्य उद्देश आहे व तो क्रमशः अंमलांत आणावयाचा आहे.

ह्याप्रमाणें कार्य जर आपल्या भागांतील वीरशैवांनीं केलें तर बहुसंख्याक भागांतील वीरशैवाइतके कार्यक्षम व वजनदार होण्यास वेळ लागणार नाही.

---

# वीरशैवातील चळवळी

**अमरावती** 'वीरशैव'-शिक्षणप्रसारक मंडळातर्फे बसवेश्वरचौकांत दरवर्षी होणाऱ्या बसवेश्वरजयंति-उत्सवाकरिता यंदाचे वर्षी अध्यक्षपदाकरिता नागपूरचे दे. भ. राजाभाऊ हांगे ह्यांना विनंती करण्यांत आली. असें सेक्रेटरीकडून समजतें. बसवेश्वरजयंत्युत्सव यंदा ता. २४ एप्रिलला आहे.

**अमरावतीः**—रोहिणखेड (जि. बुलडाणा) येथे ता. १९ एप्रिल रोजी भरणाऱ्या वीरशैव पुढाऱ्यांच्या परिषदेचे " नियोजित अध्यक्ष श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारवा [ जि. यवतमाळ ] हे, शुक्रवार ता. १७ रोजी अमरावती येथे सायंकाळी येणार आहेत; व प्रथम ते "उदय" व " संजीवनी " कार्यालयाला भेट देतील. रात्रौ ९ वाजतां 'वीरशैव' शिक्षण प्रसारक मंडळाचा २० वा वाढदिवस, व वार्षिकोत्सव त्यांचे अध्यक्षतेखाली लासीन मठांत साजरा होणार असल्याचें समजतें.

**अमरावतीः**—रोहिणखेड येथे ता. १९-४-३१ रोजी भरणाऱ्या वीरशैव पुढाऱ्यांच्या परिषदेचे स्वागताध्यक्ष बुलडाणा जिल्हयांतील प्रसिद्ध वीरशैव पुढारी व निःस्वार्थी कार्यकर्ते श्री. रामचंद्र विठोबा शेट कुल्ली हे ता. ८ रोजी परिषदेच्या पूर्वतयारीविषयीची स्थानिक पुढाऱ्यांशीं चर्चा करून परत गेले. येथील थोड्याशा मुक्कामांत त्यांनी "वी. संजीवनी" ऑफिसला भेट दिली व संजीवनी कार्याविषयी समाधान व्यक्त केलें. वी. संजीवनी कार्यालयातर्फे श्री. बाबुराव चौधरी बी. ए. ह्यांनी त्यांना हार वगैरे घालून सत्कार केला व पानसुपारी दिली.

# संस्कृति आणि सुधारणा

लेखकः— श्री. बाबाप्पा निंबाप्पा चपळगे, (Inter Arts) हिंगणघाट.

लेखांक १ ला

पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवाशिष्यते ॥

श्रेष्ठ संकृतीचा जन्म जीवाला परमेश्वरपदाला पोहोंचविण्याकरितां असतो. परमात्मा परिपूर्ण आहे व हें विश्वहि पूर्ण आहे कारण पूर्ण अशा परब्रम्ह तत्वापासून पूर्ण असेंच कार्य उत्पन्न झालें पाहिजे म्हणून प्रयत्न केला असतां जीवाला पूर्णता येणें शक्य आहे हा आशादायी सिद्धांत वरील दोन ओळींत प्रतिपादन केला आहे. वीरशैवसंस्कृतीचा अवतार अखिल मानवजातीला पूर्णत्व प्राप्त करून देण्याकरिता झाला आहे. पण हें ध्येय साधण्याकरिता कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, संस्कृति आणि सुधारणा म्हणजे काय, इत्यादि गोष्टींचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. समाजाचा जिवंतपणा हा त्याच्या संस्कृतिवर आणि सुधारणेवर अवलंबून असतो. समाजाची संस्कृति नाश पावूं लागली म्हणजे मनुष्याची प्रगतिप्रियता बंद होऊन समाज अधोगतीच्या मार्गास लागतो. मग मनुष्य आणि पशु यांत बुद्धिशिवाय कांहींच फरक रहात नाही. यास्तव वीरशैवसमाजाची संस्कृति व सुधारणा कशी आहे तें पाहूं.

संस्कृति शब्दांतच चांगलेपणा गर्भित आहे. मनुष्याच्या अंतःकरणावर सुसंस्कार करून त्याची मलिनता व विकारवशता कमी करून त्याच्यांतील पशुत्व काढून टाकून त्याला माणुसकी देऊन हळूहळू देवत्वाकडे नेणारे जे आचारविचार त्यांना संस्कृति म्हणतां येईल. समाजांतील विद्वान् व्यक्तींनी समाजाच्या ऐहिक व पारलौकिक ध्येयाकरिता जीं तत्वें आणि विचारसरणी वेळोवेळी प्रगट केलेली असते ती मिळून समाजाची संस्कृति तयार होत असते. सुसंस्कृत समाजाला आवश्यक असणाऱ्या गोष्टींनी त्या समाजाची संस्कृति बनत असते. तथापि उत्तम संस्कृति आणि हीन संस्कृति म्हणण्याची पद्धति आहे. एखादा मनुष्य कितपत सुसंस्कृत आहे हें त्याच्या श्रेष्ठ आणि कनिष्ट आचारविचारावरून समजतें. त्याचप्रमाणें सामाजिक आचारविचारावरून सामाजिक संस्कृति कळून येते.

वीरशैवाचे धार्मिक व सामाजिक आचारविचार एकेकाळीं श्रेष्ठ दर्जाचे होते आणि त्यामुळे वीरशैवसंस्कृति उच्च प्रतीची होती. श्री. बसवेश्वरांनी याच दिव्य संस्कृतीशीं समरस होऊन तिला आपल्या विलक्षण सामर्थ्याने नवचैतन्य प्राप्त करून दिलें. धर्मांतील फाजील दंभाचार आणि समाजांतील उच्चनीचत्वाचें उच्चाटन करून खरा बंधुभाव आणि धर्म वीरशैवांत जागृत केला. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचें स्थान देऊन समाजांतील पोटभेद नाहीसे केले. साधी राहाणी व थोर विचारसरणी यांवर जोर देऊन

प्रयत्नाची शिकवण समाजांत सुरू केली. समर्थांनी प्रयत्नाचें महत्व फार वर्णिलें आहे. प्रयत्न तो देव जाणावा असें त्यांचें वचन असून, प्रयत्नानें मनुष्यास सर्व कांही साध्य होते असा त्यांचा दृढ समज आहे. कालांतराने बसवदेवाने उज्वलित केलेलो संस्कृति लयास जाऊन भ्रामक आचारविचारांना वीरशैवांत महत्व येऊन नसता भेदभाव, अहंकार, आणि पोटभेद समाजांत बोकाळले. विचित्र धर्मभावनांना हृदयाशीं कवटाळून बुद्धि व ज्ञानहीन धर्मगुरूंना समाजाच्या शिरस्थानीं अधिष्ठित करण्यांत आलें. यामुळे वीरशैवांच्या दिव्य संस्कृतीचा लोप झाला.

दिव्य संस्कृति निर्माण होण्यास समाजांत खऱ्या विद्वानांची गरज असते. विद्वत्ता अंगीं येण्यास ज्ञान संपादन करण्याचा व्यासंग हवा आणि ज्ञान मिळविण्यासाठी सतत अभ्यास करावयास पाहिजे. वीरशैवांत विद्येचा व्यासंग असणारे किती होते आणि हल्ली आहेत? धूमकेतूप्रमाणे बसवदेवासारखे हाताच्या बोटावर मोजण्याइतके दिव्य पुरुष वीरशैवांत क्वचितच आणि कित्येक वर्षांनी निर्माण होतात. याचें कारण आपल्यांत आळस झोंडून बुद्धीस प्रज्ज्वलित करणारें ज्ञान, तें मिळविण्याची हौस नाही. यामुळें पूर्वपरंपरेने चालत आलेल्या दिव्य संस्कृतीचा लोप होऊन हीन संस्कृति अस्तित्वांत आली. शिक्षणाचें महत्त्व कमी होऊन द्रव्य संपादण्याचा स्वार्थीपणा लोकांत शिरला. समाजाच्या उन्नतिकरिता प्रत्येक व्यक्तींत जो त्याग हवा असतो तो जाऊन त्यांची जागा स्वार्थाने घेतली. द्रव्यामुळे प्रत्येकांत मी मोठा हा अहंभाव जागृत होऊन प्रेमाची आणि परसहिष्णुतेची भावना लुप्त झाली. अशा रीतीने वीरशैवसमाज दुबळा आणि स्वार्थी बनला. गरीब परंतु हुशार आणि तरतरित तरुणांची बुद्धि द्रव्यापाई लुली पडली आणि तिचा समाजाच्या उन्नतिसारख्या थोर कार्यांत उपयोग न होतां पोट भरण्याचा प्रश्न सोडविण्याकडे उपयोग होऊं लागला. नसत्या पोटभेदामुळे नवीन पिढींत सकुंचित व परकेपणाची भावना उत्पन्न झाली आणि त्यालाच दिवसानुदिवस महत्त्व येऊन तेच आचारविचार आज समाजांत रूढ होऊन बसलेत.

व्यक्ति ही समाजाशिवाय जिवंत राहूं शकत नाही. समाज व्यक्तीस तिच्या धार्मिक व सामाजिक कार्यांत वेळोवेळीं मदत करीत असतो. त्यामुळे प्रत्येक मनुष्यावर समाजाचें ऋण असतें आणि त्याने त्याची फेड करण्यासाठीं स्वतःचा स्वार्थ व सुख बाजूस सारून समाजाकरिता झीज आणि त्याग करावयास पाहिजे. समाजाची बळकटी कोत्या विचारांच्या स्वार्थी लोकांनी वाढत नाही तर उदात्त विचाराच्या साध्या लोकांनी वाढते. थोर व्यक्तींनी जीं सामाजिक ध्येयें आणि आचारविचार घालून दिले असतील त्याचा नीट अभ्यास करून व ते आचारविचार आत्मासात करून त्यामध्यें स्वतःच्या विचारांची नवीन भर घालून पुढची पिढी जास्त सुसंस्कृत कशी होईल, ती समाजाला जास्त उपयोगी कशी पडेल, याचा विचार करून त्याप्रमाणें समाजाची संस्कृति बनवून ती नवीन पिढीच्या स्वाधीन केली पाहिजे. अशी परंपरा चालू ठेविली तरच समाजाची संस्कृति जिवंत आणि उज्ज्वल रहाते.

अगदीं अलीकडील काळांत फारच थोड्या वीरशैवविद्वानांचा बसवकालीन संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्याचा आणि त्यांत नवीन भर घालण्याचा प्रयत्न चालूं आहे. पण त्या प्रयत्नांतसुद्धां बरेच अडथळे होत आहेत. त्यामुळे त्यांच्या प्रगतीस विरोध होत आहे. परंतु नवचैतन्याने संचारलेल्या तेजस्वी शक्तीपुढे, जुन्या आणि कुजलेल्या शक्तिहीन मळ्याचा तिजपुढे कितीसा टिकाव लागणार आहे! आज वीरशैवसमाज सर्वत्र विस्कळीत व अज्ञानांधकारांत चाचपडत आहे. ज्याप्रमाणे पूर्ण काव्यबोधाच्या योगाने माधुर्याची आणि सौंदर्याची आवड वाटूं लागते पण प्रत्येक शब्द वेगळा पाहूं लागलों तर निरर्थकत्व दिसू लागतें, त्याचप्रमाणे समाजाच्या एकींत प्रेमाचें माधुर्य आणि

कर्तव्याची सौंदर्यता दिसून येते पण विस्कळीत समाज सहारावाळवंटाप्रमाणें निरस दिसतो. दारुण परिस्थितीच्या असह्य कोंडमाऱ्यांतून वीरशैवसमाजास आपली सुटका करून घ्यावयाची असल्यास त्याने आपल्या हल्लीच्या हीन संस्कृतीचा त्याग करून बसवकालीन दिव्य संस्कृतीच्या दिव्य प्रकाशांत त्याने आपला पुढील मार्ग चोखाळला पाहिजे. अभ्यासाने अज्ञानाचा अंधकार घालवून ज्ञानाच्या दिव्य प्रकाशांत खरी संस्कृति ह्मणजे काय याचा त्याने नीट विचार केला पाहिजे.

---

# मथळा ओळखा, बक्षीस मिळवा

१ ..............................

[ लेखकः-- श्री. नथ्थुआप्पा मारुतिआप्पा आदेवार, नागपूर ]



आमच्या 'वीरशैवसमाजांत' सोवळ्या-ओवळ्याचा गोंधळ बराच माजलेला आहे. कर्मठ लोकांपलीकडेहि यांचें सोवळें गेलेलें आहे, व या सोवळयास आमचा समाज सुधारणा असें नांव देऊं पहात आहे पण ती सुधारणा नसून, सुधारणेचें सोंग मात्र आहे. त्यामुळें आपल्यास इतरत्र सुधारलेल्या समाजांतील लोक हांसतात व हेटाळणी करतात आणि सुधारणेचें पाऊल पुढे पडण्यास अडथळा होत आहे. अंधश्रद्धेमुळे जुनेंमतवादी त्या परंपरेस चिकटून राहतात. उ.—विहिरीवरून पाणी भरून आणतांना रस्त्यावरून पाणी टाकत जाणें व टाकलेल्या पाण्यावरून पाऊल ठेवून चालणें. अशीं हास्यास्पद किती तरी उदाहरणें देतां येतील. नमुनेदार ह्मणून एक उदाहरण दिलें आहे ! हें अशा प्रकारचें सोवळें केल्यामुळे काय धर्मावर श्रद्धा आहे असा जुन्या लोकांना विश्वास वाटतो ? माझें ह्मणणें सोवळें करूं नका असें नाहीं. पण असे हास्यास्पद प्रकार नकोत. सोवळें करा पण तें दिखाऊ नसून टिकाऊ मात्र पाहिजे असें माझें ह्मणणें आहे.

वीरशैवसमाजाचा उद्धारक श्रीबसवेश्वर यांनी कुलजातीकडे लक्ष न पुरवितां सर्व मनुष्यें परमेश्वराची लेकरें आहेत असा त्यांचा अढळ विश्वास होता. त्यांच्या येथे अस्पृश्य-

वर्गातील हरळय्य, चन्नय, कन्नय, वगैरे मनुष्यें प्रामुख्याने वास करीत होती. इतकेंच नव्हे तर श्री. बसवेश्वर त्यांना वडीलाप्रमाणे मान देत असे. मात्र त्यांचा आचार-विचार, राहाणी, पवित्र होती व ते अष्टवर्णाला धरून चालणारे व नेहमी शिवभक्तपरायण होते म्हणूनच त्यांना वरील-प्रमाणे मान मिळत असे.

कांही ठिकाणी तर कर्मठ लोकांप्रमाणे, इतरांनी शिजविलेलें अन्न पाहिलें म्हणजे दृष्टिदोषांची बाधा लागते. त्याचप्रमाणे आमच्याहि समाजास लागलेली आहे. व ते समाजोन्नतीचे व प्रगतीचे आड येत आहे; आतापर्यंत विवेचन केल्याप्रमाणे उगीच दिखाऊपणा नको, टिकाऊपणा मात्र पाहिजे, व त्यामुळेच आपला खराखुरा फायदा व समाज-हित आहे.

आता धर्मगुरुशीं थोडें हितगुज व विनंती करून हा लेख पुरा करूं या—

आपला धर्म कायम टिकावा आणि अजरामर व्हावा म्हणून धर्माच्या प्रसारार्थ वीरशैवसमाजांत मठाधिकारी म्हणून धर्मगुरुची योजना केलेली असते. आपल्या समाजांत शिवाशिवी, पोटभेद, अनिष्ट चालीरीती अजूनहि आहेतच. मी आज मठाधिकाऱ्यांना नम्रपणें कांही प्रश्न विचारून त्यांना त्रिवार वंदन करणार आहें.

महाराज, ( १ ) आपल्या समाजांत जे अनेक पोटभेद व अनेक शाखा आहेत त्या चांगल्या आहेत असें आपण समजतां काय ? ( २ ) ते पोटभेद शास्त्रसंमत आहेत काय ? [ ३ ] पोट-शाखेंतील लोकांना आपण निराळे लेखतां काय ? व लेखीत असल्यास ते कां ? ( ४ ) त्यांचे वीर-शैवधर्मशास्त्र निराळें आहे काय ? ( ५ ) तुम्हीं पोटशाखेंतील सर्व वीरशैवांकडे जेवणखाण करितां काय ? करीत नसल्यास तें कां करीत नाही ? ( ६ ) आपणांस जसें इष्टलिंग आहे तसेंच त्यांनाहि आहेना ? ( ७ ) आपण अष्टवर्गाला धरून चालता तसे तेहि चालतात ? ( ८ ) अशा तऱ्हेने पोटशाखेंतील आपण हलक्या समजणाऱ्या वीरशैवांनीं धर्मांतर केल्यास, ( त्यांना समान दर्जा नसल्यामुळे ) त्याची जबाबदारी कोणावर येऊं शकते ? माहेश्वरमूर्ति व धर्मगुरु किंवा मठाधिकारी योग्य तो खुलासा करतील अशी अपेक्षा आहे. अशा तऱ्हेच्या चालीरीतीचें विवेचन केलें आहे एवढें लिहून रजा घेतों. धर्मगुरुंनो, आपणांस त्रिवार वंदन असो. या लेखापासून काय बोध घ्यावा हें वाचकांनीं ठरवावें.

टीप:-सदरहू लेखाचा " मथळा " ओळखून देणाऱ्या कोणत्याहि वीरशैव स्त्रीपुरुषास [ मात्र तो वीरशैव संजीवनीचा वर्गणीदार असावा.] रौप्यपदक बक्षीस देण्यांत येईल. उत्तर लेखकाकडे ता. ३० एप्रिल १९३६ इ. चे आंत पाठवावें. या बाबतींत दिलेला लेखकाचा निर्णय अखेरचा राहील. पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करावा. श्री न. मा. आदेवार, शिक्षक, स. नं. २ श्री. आशन्ना मिस्त्रीचे जुनें घर, गणेशपेठ नागपूर सी. पी.

---

लघुकथा ४ थी.



# शिवकांचीआप्पाची ८ वी बायको

Man is as old as he feels
Woman is as old as she looks

ROSARY.

—त्रिवेणितनय

पुरुषांचें वय हें त्यांच्या समजूतीवर व स्त्रियांचें वय त्यांच्या चेहऱ्यावर अवलंबून असतें असें एका प्रसिद्ध इंग्रजी ग्रंथकाराचें ह्मणणें आहे. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे पुरुषाची समज व स्त्रीचा चेहरा ही त्यांचीं वयोमापक यंत्रेंच होत. पण पुरुषाची समजूत त्याचे स्वतःवरच अवलंबून असल्यामुळे त्यांच्या समजूतीला कांहींच मर्यादा किंवा बंधनें घालतां येत नाहीत. पण स्त्रीच्या बाबतींत थोडासा परावलंबीपणा आहे. कारण तिचा चेहरा हा जरी वयनिदर्शक असला व एखाद्या वयस्क बाईने कितीहि कसबानें तरुण दिसावें ह्मणून चेहरा कलाकुसरीने तयार केला, तरी अखेर तिच्या वयासंबंधाचें अनुमान काढणें हें परावलंबी ह्मणजे लोकांचे मतांवर अवलंबून असल्यामुळे तिचा हा परावलंबीपणा तिच्या समजुतीला एक तऱ्हेनें मर्यादा किंवा बंधन घालूं शकतो. एकूण लोकांच्या अनुमानाचें नियंत्रण पुरुषांना लागू नाही, स्त्रियांना लागू आहे, व त्यामुळेच पुष्कळ वेळा पुरुषाची आपल्या तारुण्याच्या चिरंतनतेची समजूत [illegible]ापेक्षा समाजाला जास्त उपद्रवभूत होते.

असाच कांहीसा प्रकार लातूरच्या शिवकांची-आप्पाच्या समजुतीमुळे झाला होता. शिवकांची-आप्पाची आपण तरुण असल्याची समज ते ६०–६५ वर्षांचे झाले होते तरीदेखील कायम होती व ती मरण्यापूर्वी बदलेल असें त्यांच्या वर्तनावरून कुणालाहि वाटलें नसतें. ह्या त्यांच्या "अक्षयी तारुण्याच्या समजुती"-मुळेच त्यांना ८ व्यांदा बायको करण्याचा योग आला होता, किंवा लोकांनी आग्रह करून आणला होता असेंहि ते ह्मणत! बरोबरीच्या मुलाबाळांच्या संसारांतच समाधान मानून उतारवयांतहि विधुरावस्थेची कळ सोसून घेण्याची तयारी, किंवा मनाचा भलेपणा, नसल्यामुळे, व आपल्याला आपली मुलें सन्मानानें मूठमाती देतील किंवा नाही व शवाबरोबर रडतील किंवा नाही ह्याची खात्री नसल्यामुळे, ह्मणजे मुलांचे प्रेमावर पूर्ण विश्वास नसल्यामुळे, दोनदोन-चारचार बायका करून बसलेले शिवकांचीचे सगेसोयरे 'ह्मातारपणांत हातपाय दुखल्या-सुखल्याला असो' ह्या लंगड्या पण गंभीर तत्वज्ञानाचा आधार घेऊन 'शेपूट तुटलेल्या कोल्ह्या'-प्रमाणे स्वतःप्रमाणेंच त्यांनाहि उतार-वयांत 'बायको करण्याचा' सल्ला देत देत शिवकांचीला अष्टनायकांचा अधिपती तर वयाच्या

६५ व्या वर्षापर्यंत बनविले होते, व ते हरहमेश 'शिवकांचीआप्पा तरुण आहेत, अजून काय झालं आहे' अशा तऱ्हेचीं लाघवी भाषणें नेहमी सुरूं ठेवून एक तऱ्हेचें 'चिरंजीव तारुण्या'-चें वेडच शिवकांचीच्या मनांत त्यांनी भरून दिलें होतें व नवतारुण्य प्राप्त करून देणारीं निरनिराळीं औषधें, कलप, दातांच्या कवळ्या, वगैरे तारुण्यदायक व निदर्शक वस्तु व औषधीसंग्रह ह्यामुळे शिवकांचीचें घर ह्मणजें एक प्रदर्शनच झालें होतें.

अलीकडील माणसांच्या व माकडाच्या ग्रंथींची शस्त्रक्रियेने अदलाबदल केली तर जरठांना पुन्हा तारुण्य प्राप्त होतें हा नवीन शोध शिवकांचीच्या हितचिंतक मित्रांना माहीत नव्हता असें नाही. परंतु शिवकांचीच्या 'माकडचेष्टांचा'-उपद्रव आपल्या घरादारांत होऊं नये ह्मणून त्याच्या मित्रमंडळींनी धूर्तपणाने एवढा एकच प्रयोग त्याचेवर करावयाचा शिल्लक ठेविला होता.

आह्माला वस्तुतः आमच्या "कथानायिके"-विषयीं ह्मणजे शिवकांचीच्या ८ व्या बायकोविषयींच सांगावयाचें आहे. शिवकांचीच्या ७ बायकांचा इतिहास ह्मणजे एक त्याचे बाळपणींच लग्न होऊन वारली. पुढे आणखी २ लग्नांच्या, कीं ज्यांची मुलें-बाळें शिवकांचीच्या बरोबरीची झालीं होती व लेकी-सुनांनी वाडा नेहमी गजबजलेला दिसे. त्याहि पुढे वारल्यानंतर २ बायका पुनर्विवाहाच्या. त्यांनी आत्महत्या करून प्राण दिला. नंतरच्या २ ह्मणजे नं. ६ व ७ ह्या पुनर्विवाहानंतर कांहीं दिवसांनी ज्या माहेरीं गेल्या-कुणी ह्मणतात त्या पळून गेल्या होत्या-त्या पुन्हा परत आल्या नाहीत. असा हा ७ बायकांचा इतिहास आहे. ७ वी बायको पळून गेल्यानंतर निदान इभ्रतीकरिता तरी शिवकांचीला ८ वी बायको करणें क्रमप्राप्तच झालें होतें. निदान त्याच्या सग्या-सोयऱ्यांनीं तरी त्याचा तसा समज करून दिला होता.

लातुरांत शिवकांचीचें घराणें बरेंच नांवाजलेलें होतें, व बऱ्या वाईट मार्गाने कां होईना पण शिवकांचीचे वाडवडीलांनी व स्वतः शिवकांचीनेहि बरीच माया गोळा केली होती.

कांही तुरळक अपवाद खेरीज करून ज्या गोरगरीबांनी विश्वासाने कांही ठेवी शिवकांचीकडे ठेविल्या होत्या त्या पुन्हा ज्याच्या त्याच्याकडे परत केल्याचें क्वचितच घडत असे. तसेंच, व्याज बट्टयाच्या सवाई दिढीच्या हिशेबाने गोरगरीबांच्या घरादाराचें झालेलें वाटोळें व त्यामुळे बऱ्याच गोरगरीबांची 'हळा कळा' शिवकांचीला व त्याच्या कुटुंबियांना भोवत असे, व अशा रीतीने जमा केलेला पैसा कुण्या ना कुण्या निमित्ताने हजार वाटांनी घराबाहेर जात असे. रोगराई, मुलांचा उनाडपणा, हीं बाहेरून दिसणारीं तात्कालिक करणें असत.

शिवकांचीचें घराणें शिस्तीसाठी व व्यवहारदक्षतेसाठी फार नांवाजलेलें होतें व ह्या आपल्या पिढीजाद नांवलौकीकाचा स्वतः शिवकांचीलाहि मोठा अभिमान होता. घरांतील सुतळीच्या तोड्यापासून तों तिजोरीच्या किल्लीपर्यंत ह्याची "व्यवहार-दक्ष" नजर सारखी फिरत असे.

गायी-ह्मशींची संख्या तीच कायम असतांना यंदा १० हजारांत दहा गोंवऱ्या कां कमी झाल्या? सकाळी बाजारांतून आणलेल्या १ पैशाच्या सांवारांतील सांबार काढून टाकून उरलेल्या काड्यांत ठराविक मापाच्या ताकाच्या कढीला कां बरोबर वास येत नाही? दुकानांतून सांबाराच्या काड्या तर गडीमाणसांनी चोरून नेल्या नव्हत्या ना? अशा क्षुल्लक गोष्टीदेखील त्यांचें मनःस्वास्थ्य बिघडवावयास पुरेशा होत असत!! घरांतील चूल सारवण्यापासून व रवी लावण्यापासून तों लग्नांतील मानाचा नारळ हातीं घेण्यापर्यंत सारीं कामें ते स्वतः जातीने दक्षतेने करीत असत, व अशा वेळीं असलीं हलकीसलकीं कामें करण्याच्या आपल्या फाजील

उत्साहावर पांघरूण घालण्याकरिता ' स्वावलंबन ' ह्या विषयावर व्याख्यान द्यावयास मात्र ते कधीहि विसरत नसत.

शिवकांचीच्या ह्या अति शिस्तशीर व फाजील व्यवहारदक्षतेमुळेच त्यांच्या घरांतील शिस्त बिघडत चालली होती, व त्यांच्या इस्टेट मिळविण्याच्या ब्ऱ्याःबाईट मार्गाच्या इतिहासामुळे लातुरांत त्यांचेसंबंधी आदर व प्रेम असें कुणाच्याच मनांत नव्हतें. पण " सर्वे गुणः कांचनमाश्रयन्ते " ह्या न्यायानें सर्वांनीच त्यांना लाखांत असा माणूस नाही असें म्हणण्याचा जणुं विडाच उचलला होता. कारण अशा तोंडपुजेपणामुळे तरी बिचाऱ्यांचीं हलकीं-सलकीं कामें होत.

शिवकांचींला ८ वी बायको करण्याचा सल्ला देणारामध्ये ह्याच लोकांचा भरणा विशेष होता, व ह्या निमित्ताने तरी बिचाऱ्यांना प्रवास होऊन ४ नवी ठिकाणें दिसत होतीं. शिवकांचीच्या ८ व्या बायकोच्या मोहिमेंत सोलापूरकडील एका स्वारींत मंडळींना थोडेसें अपेश आलें होतें. अपेश येण्याचें कारण कांही तसं महत्वाचं नाही. शिवकांचीच्या पांढऱ्या केसांनी ऐनवेळी दगा दिलं व ठरविलेली स्वरूपसुंदर तरणीताठी पोर वऱ्हाडच्या ५-१० वर्षें कमी असलेल्या एका सिद्धण्णाने लाटली होती. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, सिद्धण्णाचे केंस पांढरे झाले नव्हते; पण कलपापेक्षा न्हाव्याच्या वस्तऱ्यावरील भरवसा प्रसंगीं दगा देत नाही असें दूरदृष्टीने सांगणारा व रोज सिद्धण्णाचा ' नारळी गोटा ' खास आपल्या देखरेखीखाली गुळगुळीत करून घेणारा धूर्त नाना फडणवीस सिद्धण्णाने बरोबर नेला होता. ह्याच नाना फडणविसाने ' शिवकांची आणि मंडळी '-च्या व अप्रत्यक्ष रीत्या पेरीच्या माहेरच्या मंडळींच्याहि हातावर तुरी देऊन सोलापुरची बसव्वा वऱ्हाडच्या सिद्धण्णाची गृहिणी बनविली.

अशा तऱ्हेने ' शिवकांची आणि मंडळी '-चे ८ व्या बायकोच्या मोहिमेला सोलापूरकडे अपेश आल्यामुळे ह्या सर्वांनी पोक्तपणाने मोगलाईतील ह्या ' कल '-दार इंग्रजी अमलांत चालविण्यापेक्षा मोगलाईतच चालविणे अधिक शहाणपणाचें ठरवून सर्वांनी हुमनाबादेकडे मोर्चा वळविला.

तसं पाहिलं तर शिवकांचीला शारीरिक वैगुण्य कांहीच नव्हतं. त्याला काळजाचा रोग व बहुतेक नेहमीच फेपरे येत असे एवढेंच कुणी ह्मणतात. ह्या त्यांच्या फेपरामुळे कंटाळून त्याच्या दोन बायकांनी आत्महत्त्या केली होती व दोघी पळून गेल्या. लोकांच्या तोंडावर हात देतां येत नाही पण लोकवार्ता अशीहि आहे कीं, घरांतील जाचाला व सावत्र सुना व मुलांच्या कटकटीला त्रासूनच चौघींनी चार मार्ग स्वीकारले. एकूण एवढं खरं कीं, शिवकांचीआप्पाची बदलामी मात्र वरील प्रकारांच्यामुळे फार झाली होती व त्यांचे एका पुनर्विवाहाचे मिरणुकीचे प्रसंगीं तर कांही वाह्वट समाजसुधारक तरुण मुलांनी मागाहून " शेण फेकून मारून " जरठपुनर्विवाहाबद्दलहि आपला निषेधहि व्यक्त केला होता. कांहीहि असलं तरी शिवकांचीला आतां लातुरकडील भागांत बायको मिळणं ही गोष्ट सोपी राहिली नव्हती !!

पण तेवढ्याने धीर खचूं देण्याइतके शिवकांचीचे साथीदार कच्च्या दिलाचे नव्हते. अखेरचा प्रयत्न ह्मणून फिरून एकदां सर्वांनी " कंवरा बांधून " " गुलबकावलीचें फुल " आणावयास निघणाऱ्या ताजुलमुल्कांच्या उत्सहालाहि लाजविणाऱ्या उत्साहानें " पणाचे विडे " उचलून ८ व्या बायकोच्या संशोधनार्थ आपल्या मोहिमेचा मोर्चा हुमणाबादकडे वळविला. हुमनाबादला एका श्रीमंताचे घरीं एक १६-१७ वर्षांची बालविधवा स्वरूपसुंदर मुलगी असल्याची बातमी शिवकांचीचे चित्रगुप्ताकडून " शिवकांचीविवाह-कार्यकारीमंडळी "-चे ऑफिसांत येऊन धडकली. बातमी येण्याचाच अवकाश ! हां हां ह्मणतां हुमनाबादच्या गुरु शांताप्पाच्या घराभोवती शिवकांचीच्या हेरांचा गराडा पडून टेहळणी सुरूं

झाली. लौकरच ' शिष्टमंडळ ' येऊन धडकलें— ' शिष्टमंडळाचे झोरके ' महालिंगाप्पा बोपशेट्टी ह्यानी लगेच गुरुशांताप्पाना आपल्या वाक्पांडित्याने व स्वभावसौंदर्याने भुरळ पाडून शिवकांचीचें नाणें एकदाचे त्यांचे पेढीवर पटविलें.

शिवगौराने साहजिकपणेंच प्रथम ' नवऱ्या मुलाला ' पाहिल्याखेरीज होकार देण्याचें नाकारलें. परंतु तिच्या माहेरच्या मंडळींनी तिचे काय मन भरवून दिलें कुणास ठाऊक, तीहि लगेच तयार झाली. कुणी ह्मणतात् कीं तिच्या आईकडील माहेरच्या इस्टेटीवरचा ताबा उडविण्याकरितां हिची ब्याद त्यांना घरांतून काढावयाचीच होती, व ह्मणूनच तिच्या पूनर्विवाहाची अशी घिसाडघाई करण्यांत आली–कांहीहि असलें तरी शिवगौराला पुनर्विवाहाला ' तयार केलें ' एवढें मात्र खरें ! ! !

शिवगौरा तिचे वडील, व दोन भाऊ, हे लातूरला लगेच आले. पण शिवकांचीला ' नवरा मुलगा ' ह्मणून पहातांच गुरु शांताप्पा व त्याची दोन्ही मुलें नाराज झाले. पण महालिंगप्पाने त्यांना एकीकडे नेऊन त्यांच्याहि तोंडाला कुलुप घालावयास कमी केलें नाही—

शिवगौराला तर बिचारीला शेवटच्या घटकेपर्यंत व पुढेहि कांहीं काळपर्यंत झालेली " फसवणूक " कळली नाही !! शेवटी ' शिवकांची आणि मंडळी "–चा डाव सिद्धीस जाऊन शिवकांचीला अनुक्रम नं. ८ वी बायको एकदाची मिळाली एवढें मात्र खरें ! ! ह्या झातारपणाच्या पुनर्विवाहाने शिवकांचीने १० वर्षांनी येणारें मरण दोन वर्षांनीच ओढवून घेतलं. पण ह्या " उतावळ्या नवऱ्या मुलाला " एवढा पोंच कोठला राहणार ! ! शिवकांचीच्या करणीचें फळ बिचाऱ्या बरोबरीच्या मुलांना समाजांत कुचेष्टाचे रूपाने भोगावें लागलें.

शिवकांचीची ८ वी बायको ! ! बिचारी शिवगौरा–तिच्या जीवाचे धिंडवडे काय सांगावयाचे ? शिवकांचीच्या लेकी सूना नातु, पणतु, मुले–पुतणे, वगैरे मंडळींनी गजबजलेल्या व तिच्यापेक्षाहि वयाने मोठ्या असलेल्या तिच्या नाती व नातसूनामध्यें ह्या " चिमुरड्या आजीबाईला " वापरतानां व बोज ठेवतां ठेवतां पुरे वाट होत असे व नव्याचे नऊ दिवस संपल्यावर त्या मोठ्या कुटुंबांतील ह्या " जवरीच्या अनाहूत पाहुणीला " सर्वांचीं ' घालून पाडून सुरूं असलेली अचकट विचकट बोलणीं ऐकून जीव नकोसा होत असे.

लौकरच तिच्या नातसूनेला व तिलाहि एकाच वेळी मुलगी झाली. नुकत्याच जन्मलेल्या आजीबाईचे व नातीचें बारसें एकाच दिवसी एकाच पाळण्यांत उरकण्यांत आलें. अशा तऱ्हेचे हास्यास्पद प्रसंग त्या कुटुंबांत वरचेवर येत!!

शिवकांचीचे निरनिराळे बायकांचे पासून झालेल्या मुलांत इस्टेटीचे हिस्सेवाटीबद्दल वरचेवर भांडणें सुरुं असत व अशा तऱ्हेच्या झगड्याचे प्रसंग ह्मणजे शिवकांचीचा एखादा आजार किंवा त्यांची 'फेपरे' येणारी वेळ. बिचारा हा फेंपरामुळे बेशुद्ध व्हावयाचा व इकडे मुलांत हिस्सेवाट्या करिता भांडणें लागावयाचीं. एवढ्या सगळ्या हलकल्लोळांत ही चिमुरडी आजीबाई बिचारी शिवगौरा आपल्या अपंग लेकराला सडकेवर ठेवून जोराने धाय मोकलून आधी मृत्युपत्र तयार करा, मला तुमचे मरणानंतर ह्या घरांत पाणीहि पिऊं द्यावयाचे नाहीत असा आक्रोश करीत असे.

दुसरेच वर्षी बिचाऱ्या शिवगौराचें ह्मणणें खरें झालें व तिला आपल्या अज्ञान लेकराला पुढे घालून अखेर हुमनाबादचाच रस्ता धरावा लागला. शिवकांचीचे मृत्युमुळे कुटुंबांतील एक कर्ता पुरुष व त्यावरील छत्र नाहींसें झाल्यामुळे सांच्याच कुटुंबांतील मंडळींना दुःख झालें होतें व ह्या प्रसंगीं सर्वांनाच रडें कोसळलें–पण शिवकांचीच्या ८ व्या बायकोला–बिचाऱ्या शिवगौराला रडावयाला–किंबहुना आक्रोश करावयाला आणखी एक जास्तीचें कारण होतें व तें ह्मणजे शिवकांचीने मरणापूर्वी मृत्युपत्र हिस्सेवाटे वगैरे करून शिवगौराची कांहीच तरतूद करून ठेविली नव्हती हें होय ! ! !

# वीरशैवसंजीवनी

अंक ९ वा ) ता० १ मे १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्चैचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति वैशाख शु॥ १० शके १८५८ ( अंक ९ वा.

## रोहिणखेड (जि॰ बुलढाणा)

# वीरशैव पुढाऱ्यांची परिषद्.

अध्यक्षः—

## श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख, जहागीरदार

ह्या परिषदेचें अध्यक्षस्थान मला देऊन आपण माझ्यावर मोठेंच ओझें लादलें आहे. कारण येथे माझ्यापेक्षा वयाने, ज्ञानाने व अनुभवाने वडील असलेले अनेक सद्गृहस्थ हजर आहेत. त्यांच्यासमोर मी अधिक काय बोलणार व करणार ? हा अध्यक्षपदाचा मान मला देण्यापेक्षां माझ्यापेक्षां सर्वतोपरीं योग्य व लायक असलेल्या सद्गृहस्थांना दिला असता तर अधिक उत्तम झालें असतें. पण आपण हें ओझें माझ्यावर लादलें. वडिलांची पुण्याई फक्त माझ्यामागें उभी आहे. त्यापलीकडे माझ्यांत कोणतेंहि सामर्थ्य नाही. अध्यक्षपदाचा मान मला देऊन आपण माझ्यामागे असलेल्या वडिलार्जित पुण्याईचा गौरव केला ह्याबद्दल मी आपणा सर्वांचा अत्यंत आभारी आहें. आपण सर्वांनी मला सहाय्य केलें तर आपण लादलेलें हें ओझें आपणच उचलण्याला सहाय्य केलें असें होईल. व आपण तसें सहाय्य कराल असा मला भरवसा आहे. ह्मणून अध्यक्षपद दिल्याबद्दल पुन्हा एकदा आभार मानतों.

मागे १९११ मध्ये उमरावती येथे अशी एक आपल्या प्रान्ताची परिषद् भरली होती. त्या वेळी आपल्या जिल्ह्यातील श्रीमंत शेठ त्र्यंबक तोताराम हे अध्यक्ष होते. हे अध्यक्ष त्या वेळी माझ्याप्र सारखे तरुण असावेत अशी माझी समजूत आहे. ह्या परिषदेनंतर मधून-मधून अनेक परिषदा

आपल्या प्रांतांत भरल्या. आज माझ्यासारखा तरुण आपण अध्यक्षस्थानीं चढविला.ह्मणजे पंचवीस सव्वीस वर्षें झालीं कमी-अधिक प्रमाणांत आपण विचारविनिमयार्थ एकत्र जमत आहों. आजवर झालेला व पुढे होणारा हा उपक्रम आपल्या समाजाला पुढे-मार्गे हितावह होईल ह्यांत संशयच नाही. पण ह्या उपक्रमांतून कांहीतरी भरीव व टिकाऊ स्वरूपाचें समाजकार्य निघावें असें आपणाला वाटायला पाहिजे. नाहीतर १९११ मधील उमरावती-परिषद् जशी पहिली तशी ही शेवटची ठरण्याचा प्रसंग येईल. तो न येऊं देण्याची जबाबदारी आज तुह्मा-आह्मा सर्वांवर आहे.

मध्यप्रांत, वऱ्हाड व खानदेश ह्या भागांत आपला वीरशैवसमाज फारच अल्पसंख्याक आहे आणि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, दिवसानुदिवस तो अधिकाधिकच अल्पसंख्यांक होत आहे. अल्पसंख्यांक असणें हें सर्वस्वीं वाईट आहे असें नव्हे. पण हा अल्पसंख्यांक समाज धार्मिक, सामाजिक शैक्षणिक व आर्थिक दृष्ट्या समर्थ व समान दर्जाचा असता तर अल्पसंख्याकांनासुद्धा उत्तम तऱ्हेने जीवित काढणें शक्य झालें असतें. आणि अशा तऱ्हेचा अल्पसंख्याकसमाज बहुसंख्यांकांमध्ये हिऱ्यासारखा चमकला असता ह्यांत संशयच नाही. सध्याचें युग फार नवें आहे. ह्या युगांत प्रत्येक व्यक्तीला आपल्यापुरताच विचार करून जगतां येणें शक्य नाही. आणि असा व्यक्तीने व्यक्तिपुरता विचार करून जगण्याचा काळ निघून गेला. मग तें जगणें स्वार्थमूलक असो वा परमार्थमूलक असो. बंगालचे सुप्रसिद्ध साधुवर्य श्रीरामकृष्ण परमहंस ह्यांची शताब्दि नुकतीच साजरी झाली. त्यांच्या चरित्रांतून असा स्पष्ट बोध होतो कीं, आत्मोन्नति ह्मणजे एकाने स्वतःचा उद्धार करणें नव्हे तर सर्व जीवांना आपले जमजून त्यांची चिंता वाहणें व त्याकरिता झटणें ह्यांत खरा अर्थ आहे. रामकृष्ण परमहंसाचें हें वचन व बसवदेववचन ह्यांत मोठें विलक्षण साम्य आहे. शिवच जीव आहे हीच बसवदेवाची मुख्य शिकवण मोठमोठ्या वीरशैव आचार्यांनीसुद्धां हीच शिकवण दिली आहे. शिवच जीव असल्यानंतर जे जीव शिवभक्त आहेत त्याकरिताच माझें सर्वस्व खर्च व्हावें, त्यांच्याकरिता त्यांच्या येथील दासाचा दास होण्याचा मला प्रसंग आला तरच आनंद आहे, असें बसवदेवाने कळकळीने उपदेशिलें आहे. शिवजीवसाम्यभाव वा लिंगांगसामरस्य ज्याला ह्मणतात तें हेंच!

तास न तास नाक धरून व हात गोमुखींत घालून शिवपूजा केली व जिवंत शिवभक्त समोर आला असतां त्याच्या सुखदुःखाची चिंता वाहिली नाही तर असले शिवभक्त निंद्य होत असें बसवदेवाने मानलें आहे. दगडाचा नाग करावयाचा, त्याला पूजावयाचा, त्याला दूध पाजावयाचें, पण जिवंत नाग निघाला असतां त्याला मारा मारा ह्मणत ओरडावयाचें ही भक्ति नव्हे व हें ज्ञानहि नव्हे असें बसवदेवाने व आपल्या अनेक पूर्वजांनी प्रतिपादन केलें आहे. सर्व लिंगधारी जीव पूजावयाचे, त्यांच्या संतोषांत आनंद मानावयाचा, ही जी प्रथा आपल्यांत आहे त्याचा अर्थ हाच कीं, सजीव पूजनांत खरें देवपूजन आहे हाच. असें सजीवपूजन करिता आल्यावाचून खरें शिवपूजन घडत नाही. अशा प्रकारें व्यक्तीने व्यक्ती पुरता विचार करणें हें आपल्या सांप्रदायानेच त्याज्य मानलें आहे. आणि सध्याचें युग तर असें आहे कीं, स्वतः पुरते पाहून कोणालाच धर्म, समाज, शिक्षण, अर्थ, व राष्ट्रदृष्ट्या जगतां येणार नाही. ह्या नव्या युगाचे वर्णन लोकसत्ताक काळ असें करतात. ह्या काळांत गुणवानांनाच सत्ता लाभते असें नाही. बहुधा ह्या देशांत तरी अनुभव हा कीं, बहुसंख्याकांना व अति श्रीमंतानाच ह्या सत्तेचा लाभ मिळतो. ज्या तीन प्रांतांतील वीरशैवांची ही परिषद आहे त्या प्रांतात वा भागात आपण वीरशैव संख्येने तर तुरळक आहोच, पण श्रीमंतीनेहि फारच मागे आहोत. अशा अवस्थेत गुणांची वाढ व्हावी म्हटलें तर त्याहि दृष्टीने अद्यापि आपण फार मागे आहोत.

अशा परिस्थितींत धर्म दृष्ट्या व समाज दृष्ट्या आपण अल्पसंख्यांक वीरशैवांनी जगावें कसें ह्या प्रश्नाचा विचार आपण परस्पर सहकार्याने केला नाही तर जगणे अशक्य आहे.

गेल्या पन्नास-पाऊणशे वर्षांचाच ह्या प्रांताचा इतिहास पाहिला तर तो आशा जनक दिसत नाही. संख्या पूर्वी पेक्षा घटत चालली. पैसाहि पूर्वीपेक्षा कमी होत चालला. धर्मगुरूंचे मठहि ओस पडत चालले. गुरु व भक्त ह्यांत असावें तसें सख्य राहिलें नाही. एकंदर परिस्थिति बदलतच चालली ह्यांत आनंद इतकाच की पूर्वीपेक्षा साक्षरता वाढत चालली, व नव्या युगांत नवे होऊन जगावें ही इच्छाहि त्याबरोबर प्रबल होऊं लागली. पण संघटना नाही. त्यामळे एका विचाराचे व एका-शीलाचे कोण कोठे आहेत ह्याची एकमेकास माहिती नाही. त्यामुळे समानशील कोठे आहे हें एकमेकास कळत नाही व सख्य वाढत नाही. सख्य वाढावयास समानशील पाहिजे हें विसरतां येत नाही. ह्या समानशीलाची व्यवस्था ज्या घरांत वा कुटुंबांत असते तें घर कुटुंब उत्तम, तऱ्हेने जगतें. तसेंच समाजाचेंहि आहे. समाजांत शीलाची उणीव पडूं लागली कीं, कुटुंबांतहि शील कमी पडते. आणि चांगलीं कुटुंबेंहि धुळीस मिळतात व नव्यांत पुन्हा शीलाची वाढ न होतां सर्वत्र बजबजपुरी वाढते. ही बजबजपुरी वाढली कीं धर्म, समाज व अर्थ ह्या दृष्टीने ऱ्हास होऊं लागतो. आपला ऱ्हास ह्याच दृष्टीने झाला आहे व होत आहे.

शुद्धबुद्धीयुक्त ज्ञान व श्रद्धा ह्यांवरच शीलाची इमारत उभारलेली असते. शिव-जीव ऐक्याच्या ज्ञानांत व त्याच्या श्रद्धेवर ही शीलाची उभारणा आपल्या पूर्वजांनी केली. त्यांनी आपल्या आचरणाने आपणाला कित्ता घालून दिला. पण आपण तें विसरलों. पूर्वजांचें नाममात्र अनुयायी उरलो.गुरुवर्ग निराळे,भक्तवर्ग निराळा, विरक्त वर्ग निराळा, असे पक्षभेद माजत असल्याचेंहि आपण ऐकतो. पण गुरु तोच कीं, जो भक्ताला स्वत:शीं तद्रूप बनवितो. भक्त तोच कीं जो गुरुशीं तद्रूप होतो, व विरक्त तोच कीं, ज्यांत मूर्तिमंत त्यागाशिवाय कांहीच आढळत नाहीं. पण आज ह्याप्रमाणे वाद घालणारांत कांही आढळते कां ? त्यांच्यांत ज्ञान असेल तथापि ते मलिन झालें आहे. त्यांच्यांत श्रद्धा असेल, पण ती शुद्ध राहिली नाही. ह्मणूनच शीलाचा सर्वत्र अभाव भासतो शीलाचा अभाव दिसू लागला ह्मणून आपसांतील मित्रत्व लयास जाऊं लागलें. धर्माला येथेंच कीड लागली. आणि धर्माला कीड लागली ह्मणून समाज धारणा हें जें त्याचें मुख्य कार्य ते बिघडलें. व आह्मी दिवसानुदिवस खालच्या अवस्थेला जाऊं लागलों. शील वाढावें आणि सख्य नांदावें. ह्मणजे धर्म व समाज प्रगतिपर होऊन टिकेल ह्या दृष्टीने आपसांतील निष्कारण व खोटे पक्ष नष्ट होणें जरूर आहे. व तो उद्योग आपल्या वऱ्हाडांतून ' वीरशैव संजीवनी ' मार्फत सुरूं झाला. मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश ह्या प्रांतांतील वीरशैव पुढाऱ्यांच्या सहाय्याने व स्फुर्तीनें सुरूं झाला ह्मणून मला आनंद वाटतो, व ह्यांतच ह्या भागांतील आपणा अल्पसंख्याकांचा भाग्योदय उदित झाला अशी माझी समजूत आहे. ज्यांनी हा उद्योग सुरूं केला व ज्यांनी ह्याउद्योगाला प्रोत्साहन दिलें त्या सर्वांचें मनःपूर्वक अभिनंदन करणें माझें कर्तव्य आहे.

आपणालिंगधाऱ्यांत सख्य व शील नांदावें ह्मणून आपण नानातऱ्हेचे ठराव पास कराल. परंतु ठराव पास करणें सोपें आहे. हातून आचरण घडणेंच कठिण आहे. आपली ह्या भागांत संख्या कमी असल्यामुळें अनेक अडचणी येतात. योग्य गुरु योग्य वेळीं मिळत नाहीत. सामाजिक जीवनांतसुद्धां नानातऱ्हेच्या अडचणी येतात. अशा अडचणीत नानातऱ्हेचे पोटभेद अधिकच भर घालूं लागले. समानशील निर्माण व्हावयास जात

व कुळच कारण असतें असे सिद्धान्तपूर्वक ह्मणतां येत नाही. ज्यावेळीं परस्परपरिचयाची वाढ व्हावयाला विवक्षित मर्यादा होत्या त्यावेळीं जात व गोत ह्यांतच परिचय मर्यादित रहात असे व तें योग्यहि असे. पण आज रेल्वे, मोटारी, जहाजे, व विमानें हीं प्रवासाला सुलभ झालीं. पोष्ट-तार व बिनतारा ह्यांनी मनुष्याचे दळण-वळण वाढूं लागलें. छापखाने, वर्तमानपत्रें, व ग्रंथ ह्यांनीं अनेक व्यवहारांशीं परिचय होऊं लागला. ह्या सर्वांचा विचार करून समानशील लिंगधाऱ्यांचा परिचय होणें व त्यांनी एकमेकांच्या धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक अडचणींत एकमेकांस सहाय्य करावयास शिकणें व त्याकरिता सदासर्वदा ह्या भागांतील वीरशैवांची वार्षिक जंत्री तयार होऊन ती एकमेकांना उपयोगी पडेल अशी सोय सरणें अवश्य आहे. ठराव पास केल्यानंतर त्या ठरावानां आचारार्चे स्वरूप येण्याकरिता त्या कार्याची रूपरेषा आखणें हें अधिक महत्वाचें कार्य आहे ह्मणून नुसते ठराव पास करून थांबूं नका अशी माझी आपणाला विनंती आहे.

ह्या भागांतील अल्पसंख्याकांचा सांधा जुळविण्याकरिता 'वीर-शैव हितसंवर्धक मंडळ' स्थापन करण्याची कल्पना आपणापुढें व्यापदृष्टीने विचारार्थ येत आहे. ह्या मंडळांत आपण ह्या भागांतील वीरशैव येऊन बसूं व त्यांत बंधूभावाने असें वागूं कीं, वीरशैव हे कसे संघटित असतात ह्यांचें चित्र सुधारलेल्या व पुढारलेल्या जातींना सुद्धा आश्चर्यकारक वाटावें. सर्व वीरशैवजीवांत समानशील व समानधर्म निर्माण करावयास ह्या मंडळाची वाढ करणें हाच एक सक्रीयमार्ग आहे. दर वर्षाला परिषदा भरविण्याच्या उपक्रमापेक्षा दरवर्षाला मंडळांतील सभासदांचा सामाजिक जीवनक्रम जंत्रिरूपाने प्रसिद्ध झाला तर तो अधिक पोशक होईल. ह्यांत आपण पास करीत असलेल्या ठरावांना मूर्त स्वरूप देण्याचा पाया आहे हें लक्षांत घ्या. ह्या मंडळांत गुरु-भक्त विरक्त अशा सर्वच लहान मोठ्या लिंगधाऱ्यांत साम्यभाव प्रकट होईल. शिवजीवैक्यविधेचा सक्रीय बोध करून देणारा प्रतिभावान् वीरशैव ह्या मंडळांच्या सभासदांतून उत्पन्न होईल असा विश्वास धारण करून कार्यास लागा ह्मणजे कार्य केल्याचें, त्यांचें खरें मंदिर उभारल्याचें श्रेय आपणाला मिळेल. मंडळाचा प्रत्येक सभासद एकमेकास शिव समजून एकमेकांचें मनोभावें पूजन करूं लागल्यावर त्यांत पंचाचार्यांची ज्ञानशक्ति, बसवेश्वराची भक्ति, विरक्तांची वैराग्यवृत्ति प्रकट होत असलेली कशी प्रत्ययास येणार नाही ? भाव पाहिजे ह्मणजे देव दिसतो शिव तेथेच प्रकट होतो ह्मणून आपण त्याच मार्गाला लागू परमेश्वर मला व आपणाला हें कार्य करावयास शक्ति देवो मी लेकराने ह्यापेक्षा अधिक काय सांगावें ? आपण सुज्ञ आहांत. सर्व बाजूंनी विचार कराल अशी आशा आहे. चकलों असेल तर क्षमा मागून मी आपली रजा घेतों.

---



# सुशिक्षित मुलींचें कर्तव्य

लेखिकाः—कु. रत्नावती मल्लाप्पा कुऱ्हे, गर्ल्स हायस्कूल, उमरावती.

" मातृरूपानें तुम्हाला जन्म देणाऱ्या, पत्नीरूपानें तुमची जन्माची सोबतीण होणाऱ्या, कन्यारूपानें तुमच्या उदरीं जन्म घेणाऱ्या तुमच्या आयुष्यातल्या तिन्ही अवस्थांत तुम्हाला कोंवळ्या प्रेमाची साक्ष पटवून पुत्र पति आणि पिता या चढत्या पदवींना नेणाऱ्या स्त्री-जातीची किंमत इतकी कमी समजूं नका. विश्वांतल्या प्रेमाच्या, मांगल्याच्या, कोमलतेच्या, सौंदर्याच्या आणि पावित्र्याच्या सारभूत सर्वस्वाची स्त्री ही एकरूप विजयपताका आहे ! ! "

**कै० गडकरी—पुण्यप्रभाव.**

कोणत्याहि राष्ट्रांत ज्या कांहीं प्रामुख्यानें अस्तित्वांत येणाऱ्या सार्वजनिक गरजा असतात त्या सर्वांमध्यें शिक्षण ही गरज सर्वांत अग्रगण्य तशीच ठरली जाते. बहुजनसमाजांत विशेषतः ...ि शिक्षणाचा प्रसार झाल्यावाचून त्यांना ...ीं कर्तव्यें नीटपणें बजावितां येणें शक्य नाही.

...ध्यां सुधारणेच्या काळांत शिक्षणाची अत्यंत ...यकता आहे. ज्यांचेपासून फायदा होईल ...उच्च प्रतीचें शिक्षण प्रत्येक मनुष्यानें घेतलें ...जे. त्यापासून अंगांत बाणलेलें अपूर्व ज्ञानच ...त्या आयुष्याला उपयुक्त होतें; इतकेंच नव्हे ...अंगांत एक प्रकारचें नाविन्ययुक्त चैतन्य ...होऊन महत्वाचीं कार्यें करण्यास तो उद्युक्त ... आयुष्याला सुखकर तसेंच सारासार व ...पांग विचार करून; मनाला पटेल असलेंच ...ष्ठ प्रकारचें आपलें उच्च ध्येय बनल्यामुळें ...ण त्या ध्येयाला अनसरून पुढे वागतो. आणि ...प्रकारें मनांतली डांबून ठेवलेली महत्वाकांक्षा पूर्णत्वास येऊन शेवटी त्याची कीर्तिरूपी मधुर फळें आपणांस प्राप्त होतात. शिक्षणाचें महत्व किंवा त्यांतील मर्मत्व ज्यांना अक्षरओळखदेखील नाही, अथवा इतर अनेक बाबतींत ज्याचें अज्ञान आहे; या जातींतील लोकांना कळत नसल्याने त्यांचें जीवन कष्टमय आणि अत्यंत हृदयद्रावक अशा मनाला पाझर फोडणाऱ्या हालअपेष्टेंत जातें. तशी स्थिति सुशिक्षित स्त्री अगर पुरुष यांची होत नाही. कारण त्यांना सर्व बाबतींतील ज्ञान झालेलें असतें. स्त्री–पुरुषांनी बरोबरीने शिक्षण घ्यावें; परंतु बहुतेक पुरुषांसारखें उच्च प्रतीचें शिक्षण घेण्याचें भाग्य स्त्रियांस लाभत नाही. याचें कारण त्या पुरुषांसारख्या स्वतंत्र नसतात. शिवाय त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न होतात.

सुशिक्षित मुलींना कार्य करण्यास योग्य स्थळ म्हणजे त्यांचें घर हें होय. आपल्या समाजांत स्त्रिया व पुरुषांमध्ये बरेंच भिन्नत्व आहे. त्यामुळे पुरुष वाटेल तेथे राहून कर्तव्यें करूं शकतो तसें स्त्रियांना करतां येत नाहीं. स्त्रिया बऱ्याच ठिकाणीं नोकरी–सारखीं कामें करूं लागल्या तरी. पुरुषाइतका

रांकटपणा त्यांच्या अंगीं उपजत नसतो; त्यामळें त्यांचे हांतून वाहेरच्यीं श्रमाचीं कामें होत नाहीत. अलिकडील काळांत परिस्थितिनुसार स्त्रिया निरनिराळीं कामें करीत आहेत तरी त्यांना कार्य करण्यास योग्य ठिकाण त्यांचें घर हेंच मुख्य होय.

गृहिणीसंबधीं तिची घरांतील व बाहेरील कर्तव्यें म्हटलीं म्हणजे प्रत्येक गृहिणी ही गृहकृत्यांत दक्ष असणें अवश्य आहे. मग ती कितीहि सुशिक्षित असो वा नसो, तिनें आपल्या नवऱ्याला दर्जाप्रमाणें किंबहुना त्यांच्या ऐपतीस साजेलसा आपला ससार सुंदर तऱ्हेने पार पाडला पाहिजे. पुष्कळवेळा पाहण्यांत येतें कीं, ज्यांना थोडी विद्या प्राप्त झाली अशा मुली गर्वानें फुगून जातात. इतकेंच नव्हे तर त्यांना वाटतें कीं, अशिक्षित परंतु ज्यांच्या शीलाचा केवळ कित्ताच घ्यावा अशा आदर्श थोर स्त्रियांहून आम्ही कितीतरी श्रेष्ठ आहों. पण त्यांची ही कल्पना चुकीची होय. एखाद्या स्त्रीला घरांतली कामें करावीं लागलीं नाहींत तरी त्यांवर देखरेख ठेवणें, टापटीप, स्वच्छता ठेवणे, विशेषतः, सर्वांत महत्वाचें कार्य म्हणजे मुलांचा नीटपणें सांभाळ व उत्तम प्रकारें जोपासना करणें हें होय. कारण भावी तरुण पिढी हाच राष्ट्राचा आधारस्तभ आहे. तेव्हा मुलामध्ये देशाबद्दल प्रेम, आदर, शौर्य, इत्यादि सद्गुण त्यांचे अंगांत त्यांचे बाल्यावस्थेंतच बाणण्याकरिता स्त्रियांनी विशेष काळजी घेतली पाहिजे. एखाद्या स्त्रीला व्याकरण चांगलें करतां किंवा सांगतां येत असेल परंतु घरची व्यवस्था नीट लावितां येत नाही अगर ती चांगली लेखक असेल परंतु घरांतील मंडळींचा कोप झाला असता तो गोड विनयशील शब्दाने हटवितां येत नसेल तर ती सुशिक्षित स्त्री नव्हे.

ज्या स्त्रीचे अंगीं प्रसंगावधान, इंद्रियदमन, उपकारशीलत्व शांति, औदार्यादि आहेत व जी नेहमी स्वतःचाच विचार न करता दुसऱ्याच्या कल्याणासाठी झटते तिला जरी B. A. ची पदवी नसली तरी ती B. A. अर्थात् Be Able आहे असेंच म्हटलें पाहिजे. सुगृहिणीला व्यवहारज्ञान असलें पाहिजे त्यांनी अशिक्षित स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांना सुशिक्षित करण्याची त्यांची प्रवृत्ति असावी त्याचप्रमाणे नेहमी व्यवहारांत उपयोगी पडणाऱ्या औषधीची माहिती असणे, समाजांत सुधारणा करणें, परहितार्थ झटणें, विशेषतः अनाथ दीन-दुबळ्या लोकांना तुच्छ न लेखतां त्यांच्या गरजा भागवून त्यांना सर्वतोपरी आनंद होईल अशा गोष्टी कृतीने आचरणांत आणणें इतकेंच नव्हे तर "मरावें परी कीर्तरुपी उरावें" या सुभाषिताला अनुसरून स्वतःच्या चारित्र्याने स्त्री समाजाला वळण लावून त्यांना चांगली आदर्शमय कृत्य करण्याविषयी प्रोत्साहन देणे हीं कर्तव्यें जर एकजुटीने वीरशैवसमाजांतील प्रत्येक समंजस स्त्रिया करूं लागल्यास अखिल वीरशैवसमाज सुधारण्यास फारसा त्रास पडणार नाही.

खरी सुशिक्षित स्त्री उच्च मानसिक शिक्षणामुळे आपल्या समाजांतील बंधुभगिनींची सेवा करण्यांत आनंद मानिल कारण तिला माहित असतें कीं, सेवा करणें हें अधिकार चालविण्यापेक्षां थोर आहे. तीच स्त्री चार चौघांत मानपमानाची इच्छा करणार नाही, तर दुसऱ्यांच्या गरजाकडे आनंदाकडे लक्ष पुरवील. ती क्षणिक आनंदापेक्षां कर्तव्यामुळें मिळालेल्या आनंदाला जा त महत्व देईल. कारण कर्तव्याचा आनंद चिरकाल टिकतो.

सुशिक्षित मुली ह्याच राष्ट्राच्या भावी माता होत. त्यांच्यापासून राष्ट्रांस फार महत्वाचे फायदे होतात. बालकास कसें वळण लावावे, त्यांना कसल्या प्रकारचें शिक्षण द्यावें हें त्या जाणून असतात. जसें वट वृक्षाचें मोहरी येवढें बी प्रचंड वटवृक्ष होण्यासाठीं उगवले जातें, तद्वतच प्रत्येक लहान बालक सर्व शक्ती, कला पूर्णत्वास नेण्यासाठीं जन्मास आलेलें असते ( याच उलट अज्ञान मातांचे ) आपल्या मुलांना त्याच्या पुढील आयुष्यांत मार्गदर्शक होईल असें सर्वांग उपयुक्त शिक्षण किंवा वळण लावण्याऐवजीं त्या नेहमी त्यांना मूर्ख, गाढव, मठ्ठ ठोंब्या इत्यादि नांवानें दूषवीत हिणवीत असतात. मुलांचा पावलो पावली निरुत्साह करणें हे आईचे कृत्य भयंकर अविचाराचें ठरतें.

मनुष्य हा समाजप्रिय असून समाजाचे एक अंगच आहे असें म्हटल्यास कांहीच अतिशयोक्ति होणार नाही. प्रत्येक स्त्री-पुरुषांवर समाजाचेंच नव्हें तर देशाचें देखील हित अवलंबून आहे.

शिवाजीसारख्या बालकांना उत्पन्न करणाऱ्या आणि त्यांच्या अंगीं मातृभूमिविषयीं प्रेम, आदर, शौर्य इत्यादि उत्कर्षवत् सद्गुण शिकविणाऱ्या माता समाज सुसंघटित करण्याला किती तरी हितकारक असतात. खरोखर ज्या राष्ट्रांत किंवा समाजांत अशा सद्गुणी आदर्श माता असतील त्या राष्ट्रांची किंवा समाजाची उन्नति व भरभराटच होईल यांत संशय नाही. वरीलप्रमाणें आचरण आपल्या समाजांतील भावी तरुण मातांनी कृतीनें करावें हेंच त्यांचें आद्य कर्तव्य ठरतें. शिक्षणाच्या बाबतींत मुलाप्रमाणें मुलींनाहि शिक्षण द्यावें. वडील मंडळीं ( अर्थात् जुन्या मतांची ) ह्मणतांना आपण पुष्कळदां ऐकतो कीं, मुलींना शिक्षण देवून काय करावयाचें. मुलीं कितीही शिकल्या तरी त्यांना अखेर चुल आणि मूल याचेंच साम्राज्य मिळावयाचें ह्यांत तथ्य असलें तरी आशिक्षित मुलीपेक्षां सुशिक्षित मुलींच " चूल मूलाचें राज्य उत्तमप्रकारें पार पाडतील. जेव्हां आपण एखाद्या वनश्रीनें पूर्ण भरलेल्या उच्च डोंगराकडे पाहातों; तेव्हां त्याची सर्व शोभा एकदम पाहिल्यास आपल्या नजरेत पडत नाही. त्याचप्रमाणें शिक्षणाचें आहे. विद्या ही बुद्धीचा विकास करणारी असून फायद्याची आहे, हें खरें पण ज्ञान ही ईश्वरी देणगी जरी असली, तरी ते वाढविणे व त्याचा योग्य उपयोग करणे हे सुशिक्षणावर अवलबून आहे. राष्ट्राच्या भावी माता ह्या नात्याने स्त्रियांनी सुशिक्षित व कर्तव्यदक्ष सुगृहिणी ह्मणून आपली प्रापंचीक जबाबदारी व सामाजिक दर्जाची योग्य जाणिव ठेऊन राष्टीय लढयात भाग घेणे क्रमप्राप्तच आहे. वरील कर्तव्याचें पालन फक्त सुशिक्षित मुलींनींच करावें असें नव्हें; तर आपल्या समाजातील अत्यंत पुज्य अशा इतरहि समंजस स्त्रियांनी केल्यास वीरशैवसमाज वैभवाच्या उच्च शिखरावर नेण्याचें कार्य सुकर व सफल होईल. व असे करण्यांस अर्थात पुरुषांची मदत पाहिजे असते,त्यांच्या अनुमती शिवाय कोणतीच गोष्ट आजच्या आमच्या समाजव्यवस्थेत स्त्रीला शक्य नाही. तेव्हा निदान अविवाहित सुशिक्षित मुलींनी आपल्या भावी आकांक्षा व कार्याची आवड लक्षांत घेऊनच शक्य असल्यास आपल्या भावी पतीची वडिलाच्या संमतीने निवड करावी ह्मणजे तिच्या भावी आयुष्याच्या यशस्वितेच्या दृष्टीने ते फलदायक होईल. असो, स्त्रियांच्या कार्यात पुरुषांनी देखील सक्रिय सहानुभूती दाखवून प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. व असें प्रोत्साहन उत्तरोत्तर आमच्या बंधुवर्गाने द्यावें एवढीच शेवटी नम्र विनंती आहे.

# संस्कृति आणि सुधारणा

लेखकः— श्री. बाबाप्पा निंबाप्पा चपळगे, ( Inter Arts ) हिंगणघाट.

## लेखांक २ ला

उत्तम संस्कृति कोणती हें समजून घेतलें असतां सुधारणा सहज घडून येते. सुधारणा ह्या नवीनच असतात आणि त्या नवीनच घडवून आणल्या पाहिजेत असें नव्हे. नवीन सुधारणा प्रचारांत आल्यास त्यामुळे धर्मात मोठी क्रांति होईल असेंहि नव्हे. तर नवीन सुधारणा अंमलांत आल्यास मनुष्यांत आणि समाजांत जे दोष आहेत ते नाहीसे होऊन मनुष्य आणि समाज पूर्वीपेक्षा जास्त विवेकी, कर्तव्यतत्पर, त्यागी, आणि सत्धर्माचरणी कसा होईल हें बघावयाचें असतें. सर्वच गोष्टी कांही नवीन आचारांत आणावयाच्या नाहीत. पूर्वी एका काळी त्या समा-

जांत होत्याच. त्याचें पुनरुज्जीवन करणें म्हणजेच सुधारणा होय. समाज हा चल आहे. त्यामध्ये कोणतीहि गोष्ट सर्वकाळ सारखी आणि स्थिर राहूं शकत नाही. प्रत्येक गोष्टींत काल स्थल आणि परिस्थिति यानुरूप स्थित्यंतर घडून येत असतें आणि तें तसें घडून यावयास पाहिजे तरच तो समाज जिवंत राहील, नाहींपेक्षां तो समाज जगाच्या मागे राहून स्वतःच्या अस्तित्वाचा नाश करून घेईल.

एकेकाळीं वीरशैवसमाजांत आचारविचारांचा शुद्धाशुद्धतेचा धरबांध राहिला नसेल ह्मणून मनुष्याच्या धार्मिक आचारविचारावर आणि शुद्धा-शुद्धपणावर समाजाला कडक निर्बंध घालणें अवश्य वाटलें असेल. लिंगधारणा केलेला इतर समाज शिक्षणांत व शुद्ध आचारविचारांत, धार्मिक व तेजस्वी वीरशैवाच्या मागे पडून त्याने वीरशैव-समाजांत कमीपणा आणला असेल ह्मणून त्या वेळी समाजांत पोटभेद निर्माण झाले असतील. प्रौढ अथवा प्रीतिविवाहाची प्रथा एकेकाळी उच्च टोकाला पोहोचल्यामुळे समाजाला त्यावर निर्बंध घालावे लागून त्यामुळे गुडघ्याला बाशींग बांध-ण्याची अथवा निरस अशा बाहुला-बाहुलीच्या लग्नाची चाल समाजाला अवश्य वाटली असेल. पण बालविवाह चांगले किंवा प्रौढविवाह चांगले हीं विधानें परिस्थितिनिरपेक्ष केव्हांहि करितां येणार नाहीत. बालविवाहाचा अतिरेक झाला किंवा परिस्थितीशीं तो जमेनासा झाला ह्मणजे प्रौढविवा-हाचा पुरस्कार करणें ही सुधारणा होईल. याच्या उलट प्रौढविवाहाचा अतिरेक होऊन त्याचे अनिष्ट परिणाम दिसूं लागले म्हणजे बालविवाहाचा पुरस्कार करणे ही सुधारणा होईल. आज वीरशैव-समाज सुशिक्षित व सद्वर्तनी असल्यास पोटभेद किंवा रोटीबेटीव्यवहाराच्या निर्बंधाची अवश्यकता नसेल. स्त्रियांचा आजचा अशिक्षितपणा हें वैगुण्य आणि कमीपणा आणणारें लक्षण ठरत असेल तर त्यांना शिक्षण देणें हीच गोष्ट आज न्यायाची ठरेल. समाजाच्या एका काळीं अमुक एका पोषा-खाची चाल असेल [illegible] बदलून त्या परिस्थिति-

योग्यशी पत्करणे ठीक दिसेल. पण तुम[illegible] खांत फरक करून बाकी आहे तो [illegible] न सोडणे ह्मणजे डोम्बकावळ्याने मोरा[illegible] खोवण्यासारखें होईल पोशाखाप्रमाणेच [illegible] विचारांत फरक घडून आला पाहिजे. [illegible] फेरबदल करण्याऐवजी अंतःकरणांत ब[illegible] ह्मणजे ईश्वर प्रसन्न होईल. तो तुमच्या पोषाखाकडे पहात नाही तर भक्तीचे नाम[illegible] करून तुझी त्याचें प्रेमसुख कसें भोगतां पहात असतो व त्यानेच तो संतुष्ट होतो.

कोणत्याहि सुधारकाने अमुक ए[illegible] त्रिकालाबाधित चांगली आहे असें समजू[illegible] किंवा पुढील लोकांना शिध्या देण्याचें करूं नये व आपल्या काळाला अवश्यक ती सुधारणा करण्यास कचरूं नये. शुद्ध [illegible] ताजव्यांत जो सर्व कर्तव्यास तोलून प[illegible] शुद्ध बुद्धीच्या शिलेवर जो सर्व कर्तव्यें लावून पहातो, तो सुधारक होय. सामाजिक [illegible] या समाजाच्या सर्वांगीण विकासाची आहेत. ध्येयावर नजर ठेवून हीं साधनें असतात. आजपर्यंत बदललेलीं आहेत. [illegible] पाहिजेत. व्यक्तीची आणि समाजाची उन्नति होणें, त्याचा विकास होत जाऊन पूर्णता येणें हें ध्येय, हें साध्य, सनातन [illegible] साध्याची साधनें—मात्र सनातन नाहीत. शिव होणें, पूर्ण अशा परमेश्वराची प्राप्ति पूर्ण होऊन करून घेणें, हें सनातन ध्येय संस्कृतीने अखिल मानवजातीपुढे ठेविलें या ध्येयाला अनुकूल अशा सुधारणा आणणें आणि व्यक्ति व समाज यांच्या विचारावर अवश्य तीं नियंत्रणें घालणें हें विद्वानांचें कर्तव्य होय. तें पार पाडण्याची दारी सर्वस्वीं त्यांच्यावर आहे. साम[illegible] त्यांच्या आज्ञेचें पालन करणें हें त्यांचें होय. एकेकाळी समुद्रपर्यटन करणें [illegible] समजलें जात असे पण आज तीच गोष्ट झाली आहे, तिला कोणी नांवें ठेवीत ना[illegible]

प्रमाणे आज कुधारणा गणल्या गेलेली गोष्ट उद्याच्या काळांत सुधारणा गणल्या जाईल. पोटभेद किंवा धार्मिक आचारविचार हे समाजाच्या कल्याणाकडे नजर देऊन बदलणे यांत अधर्म कांहीच नाही. धर्माला समाजाच्या कल्याणाशीं कांही कर्तव्य नाही असें म्हणणाऱ्या लोकांना धर्म म्हणजे काय तें समजलें नाही असें म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें हेंच योग्य ठरेल. धर्म हें एक ज्ञानाचें उच्च शिखर व परमार्थाचें भांडार आहे. तें पैसे देऊन घेतां येईल, अगर ग्रंथ वाचल्याने मिळेल हें स्वप्नींहि आणूं नये.

समाजाच्या प्रगतीचे दोन शत्रू असतात. एक कधींच व कशांतच बदल करण्यास तयार नसलेले, आणि दुसरे रूढीलाच धर्म समजून सुधारकांना शिव्या देणारे लोक. परंतु खरा धर्म आणि संस्कृति समजून घेऊन आपल्या पूर्वजांनी वीरशैव-संस्कृतीच्या उन्नतिसाठी जो स्वार्थत्याग केला, ज्या सुधारणा घडवून आणल्यात, त्यांचें स्मरण करून एकमेकांविषयीं तिरस्कार आणि अहंभाव व्यक्त करूं नये. रूढीलाच धर्म समजून पोटभेद न वाढवितां खरी संस्कृति आणि सुधारणा यावर लक्ष देऊन पोटभेद व भेदभाव मोडून वीरशैवसमाज सुसंस्कृत व सत्धर्मी आणि एकजीव कसा होईल याकडे सर्वांचें लक्ष वेधलें पाहिजे. आज वीरशैवसमाजांतील कित्येक व्यक्ति परधर्म पत्करतात तो कशासाठीं ? तर त्यांना दुसऱ्या धर्मांत एकमेकांविषयीं प्रेम, आदर, व बंधुभाव दृष्टीस पडतो. मुसलमान व ख्रिश्चन यांना स्वतःच्या लोकांविषयीं प्रेम आणि बंधुभाव असल्यामुळे त्यांची लोकसंख्या सारखी फुगत आहे. याचें कारण खरी भूतदया वीरशैवांत नाही. खरी भूतदया जेथे असते तेथे जातीपातीची विचारपूस होत नाही. आपण आपल्या समाजांतील भेदभावावर आणि अज्ञानावर अधिष्ठित असलेल्या रूढी बदलावयास तयार नाही. आपणास एकमेकांचा वरचढपणा खपत नाही. प्रत्येकजण एकमेकांस खाली ओढण्याचा हट्टाने आणि दुराग्रहाने प्रयत्न करतो. म्हणून व्यक्ति व समाज यांची प्रगति न होतां त्यांचे दिवसानुदिवस एक-एक पाऊल इतर सुसंस्कृत समाजांच्या मागें पडत आहे. त्यांना इतर समाजांच्या बरोबरीने आपलें पाऊल ठेवितां येत नाही. याकरिता प्रत्येकाने आपला दुराग्रह सोडून अवश्य त्या सुधारणा घडवून आणण्याच्या कामांत एकमेकांस साह्य केलें पाहिजे. वीरशैवसमाज निर्बल व पंगू झाल्यामुळें त्यांच्या संस्कृतीला इतर समाजाकडून मान मिळत नाही. स्वजातीकडूनहि तिचा उपहास होत आहे. तर तिचा उपहास करण्यापेक्षां संस्कृतींत जे दोष असतील ते काढून अवश्य त्या सुधारणा वीरशैवसमाज-व्यवस्थेंत घडवून आणणें हें प्रत्येक सुशिक्षिताचें कर्तव्य होय. वीरशैवांच्या शिवरूपी संस्कृतींत किती अद्भुत आणि प्रचंड शक्ति आहे याचें एकच उदाहरण येथे नमूद करितों. ता. १५-३ रोजी पंडित मालवीयजी हे नाशीक येथे आपल्या भाषणांत म्हणाले कीं, ' मनुष्यजात तेथून सर्व सारखी. असें असतां आपल्या देशांत अस्पृश्यांसारखा भेद पडला. देशकालपरिस्थित्यनुरूप तो भेद घालविणें हें आपलें कर्तव्य आहे. ख्रिस्त्यांना जसा बाप्तिस्मा, मुसलमानांत जशा कल्मा, त्याप्रमाणे हिंदूंमध्ये स्पृश्यास्पृश्यांना सर्वमान्य असा धर्मविधि नाही यासाठी प्रत्येक हिंदुमात्रास हिंदुधर्माची दीक्षा द्यावयास पाहिजे. द्विजांना गायत्रीमंत्राचा अधिकार आहे परंतु ज्यांना तो नाही त्यांना व द्विजांनाहि जो मंत्र घेतां येईल असा मंत्र ' ॐ नमः शिवाय ' हा आहे. सर्वांचें शिव कल्याण करण्याचें सामर्थ्य या मंत्रांत आहे ' यावरून प्रत्येक वीरशैवास आपल्या दिव्य संस्कृतीविषयी अभिमान वाटावयास पाहिजे.

---

# सुगृहिणी

लेखिका:—
सौ० शांता गंगाधरआप्पा सातेकर
नूतन कन्याशाळा, अमरावती.

## जिच्या हातीं पाळण्याची दोरी तीच जगा उद्धारी.

देशाचा भावी उत्कर्ष किंवा ऱ्हास हा सर्वस्वीं भावी तरुण पिढीवरच अवलंबून असतो आणि स्त्रिया ह्या भावी तरुण पिढीच्या माता असतात. तेव्हा भावी तरुण पिढी ही चांगली निपजण्याकरिता बरीचशी जबाबदारीहि त्यांच्या किंवा स्त्रिया यांच्यावरच असते व त्याकरिता स्त्रिया ह्या सुशिक्षित आणि स्वतःची जबाबदारी ओळखणाऱ्या असाव्या लागतात.

प्रत्येक स्त्रीने आपली जबाबदारी ओळखली पाहिजे. सुगृहिणीच्या ठिकाणीं खालील अत्यावश्यक गुण असले पाहिजेत.

(१) प्रत्येक सुगृहिणीने शिक्षण हें अवश्य घेतलेंच पाहिजे. कमीतकमी शिक्षण हें म्याट्रीक पर्यंत घेतलें पाहिजे व प्रत्येक स्त्रीनें आपल्या शीलाचें संरक्षण करणें हें तिचें आद्यकर्तव्य होय, व स्त्रीला नेहमीं वाचण्याचा नाद असावा, कारण या शिक्षणामुळे बुद्धीचा विकास होऊन तिचें ज्ञान वाढतें व यापुढे शिक्षण घेतल्यास अधिकच उत्तम. प्रत्येक स्त्रीला संस्कृतचें ज्ञान असणें हें अवश्य आहे. कारण आपले सर्व धर्मग्रंथ हे संस्कृत भाषेतूनच लिहिलेले आहेत. आणि त्या धर्मग्रंथाचें ज्ञान होण्याकरिता ह्या भाषेची आवश्यकता आहे.

(२) स्त्रीला साधारणपणें इतिहासाचें ज्ञान व कांही सत्पुरुषांच्या चरित्रांचें ज्ञान अवश्य असावें. कारण त्यापासून तिची स्वतःची उन्नति होते आणि ती आपल्या संततीचीहि उन्नति करूं शकते. उदाहरणार्थ जिजाबाई शिवाजीला लहान असतांना त्याला रामायण महाभारतांतील कथा व कांही युद्धाच्या कथा सांगत असे आणि शिवाजीने लहानपणापासूनच त्या विरश्रीच्या कथा ऐकल्या व त्याला अशा रीतीने लहानपणीच लष्करी शिक्षण मिळालें. दादोजी कोंडदेव व मातोश्री जिजाबाई यांनी त्याला लहानपणापासूनच त्याच्या कर्तव्याची जाणीव करून दिली होती. आणि म्हणूनच शिवाजीला लहानपणीं मातोश्रीच्या व गुरु दादोजी कोंडदेवांच्या उपदेशामुळे तो मोठा पराक्रमी राजा झाला. हा सर्व मातोश्रीच्या शिक्षणाचा व तिने दिलेल्या उपदेशाचा परिणाम होय.

(३) प्रत्येक स्त्रीच्या ठिकाणी तिसरा महत्वाचा गुण म्हटला म्हणजे तो गृहदक्षता हा असावयास पाहिजे. ती आपल्या गृहकृत्यामध्ये फारच दक्ष असली पाहिजे. अतिथीचा आदरसत्कार करणें हें तिचें योग्य कर्तव्य होय. व तिच्या ठिकाणीं सौम्यता, शांतता हे गुण अवश्य असावेत.

[४] प्रत्येक स्त्रीने दररोज सकाळी सूर्योदयाच्या आधी उठून आपले प्रातर्विधी आटपून नित्याच्या उद्योगास लागावें. घरांतील सर्व वडील माणसांशीं नम्रतेने वागावें, स्त्रियांच्या ठिकाणी मर्यादा हा गुण अवश्य असावयाला पाहिजे.

[५] पांचवा अवश्य असणारा गुण म्हणजे घरगुती औषधांचें ज्ञान असणें. लहान मुलांना खोकला, पडसे, हिंवताप इत्यादि नेहमीच्या मामुली रोगांवर औषधोपचार कसे करावे याबद्दलचें ज्ञान तिला अवश्य असावें.

[६] स्त्रियांचे ठिकाणी कांही कलांचें ज्ञान अवश्य असावें, उदाहरणार्थ चित्रकला, कोकरी

काम, सुतारचें काम, विणकाम, इत्यादि ह्या गुणां-मुळे स्वतःजवळ असलेल्या कलांचा उपयोग होऊन लोकांमध्ये प्रशंसा केली जाते.

[ ७ ] सातवा अत्यंत महत्वाचा गुण म्हटला म्हणजे गायनाचें ज्ञान तिला अवश्य असावें. हा गुण अत्यंत महत्वाचा होय. ह्या गुणामुळे स्वतःचीहि करमणूक होऊन दुसऱ्याच्या मनाचीहि करमणूक करिता येते, व रागावलेल्या माणसाचा राग शांत करिता येतो. लहान मुलांना निजवितांना विशेषतः या गुणाचा फार उपयोग होतो. तिला सुंदर-सुंदर गाण्यांचें ज्ञान असावें व तिचा कंठ मधुर असावा.

आणि तिच्या ठिकाणी विनयशीलता, चांगुल-पणा आणि वहाव्या न करणे इत्यादि इतरहि सुद्गुण असावेत. वरील सर्व सद्गुण ज्या स्त्रीच्या ठिकाणी आहेत तीच स्त्री आपल्या मुलाला लहानपणींच योग्य शिक्षण देऊन त्याच्या भावी आयुष्याचें बीज पेरून ठेविते. पुढे तींच मुलें नांव-लौकीकास चढतात व मोठे पराक्रमी होतात. अशा आदर्श स्त्रिया सुदैवानें हिंदुस्थानला लाभल्या तर भावी तरुण पिढी ही चांगली निपजून, पूर्वीचे चांगले दिवस हिंदुस्थानला लाभतील व पुन्हा हिंदुस्थान देश वैभवाच्या व उत्कर्षांच्या कळसास पोहोचेल हें अगदीं निःसंशय आहे.

---

# कोडें सोडवा व बक्षीस मिळवा.

## कोडें नं. १ चें उत्तर

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | ॐ शिव | ५ | शंकर | ९ | महेश्वर |
| २ | परमेश्वर | ६ | जगदीश्वर | १० | दिनकर |
| ३ | बसवेश्वर | ७ | ओंकारेश्वर | ११ | प्रभाकर |
| ४ | ईश्वर | ८ | विश्वेश्वर | १२ | श्रीकर |

### बक्षीस मिळविणारांचे नांवें.

१ सौ. भगिनी भागीरथीबाई कपट मु. सोलापूर ह्यांना चांदीचा कुंकु करंडा देण्यांत येत आहे.

२ श्रीयुत रघुनाथ बुधाप्पा कापशे मु. नागपूर टेकडीरोड ह्यांना चांदीचें मेडल १ देण्यांत आलें. तरी वीरशैव बंधूभगिनींनी लक्षांत ठेवावें कीं, ता. १५ मे-ला जें कोडें नं.२ प्रसिद्ध होईल त्यांत बक्षीस ह्मणून चांदीचा कप ठेविला आहे. तरी ताबडतोब वर्गणीदार होऊन वर्गणीचें चौपट बक्षीस मिळवा.

रामचंद्र आपा बळीराम आपा जगदंबे, नंदलालपूरा
कबूतरखाना घर नं. ५६.
मु. इंदोर (मालवाप्रांत).

# अंधश्रद्धा कमी कशी होईल ?

लेखकः—
वी० नारायण स्वामी
मळवडी
सातारा

हे धर्मगुरु कोण ? कुठले ? त्यांचें अस्तित्व कशासाठी ? त्यांना अधिकार कशासाठीं दिलेला आहे ? हे आमच्यावर हक्क कशासाठी गाजवितात ? वगैरे गोष्टींचा खुलासा धर्मगुरु कधी करतात काय ? विवाहप्रसंगीं शिष्याच्या घरीं येणें, मेजवानीवर सपाटून ताव मारणें, व मोठ्यात मोठी दक्षिणा मिळविणें—शिष्य श्रीमंत असल्यास त्याच्या दुष्कृत्यावर पांघरूण घालणें, गरीब असल्यास त्याला दंड करणें, किंवा सामाजिक अथवा धार्मिक बहिष्कार घालून त्याला जेरीस आणून त्याच्या दृष्टीने बरें न दिसणाऱ्या गोष्टीपासून परावृत्त करण्याचा अट्टाहास धरणें, वगैरे गोष्टी आज दिसून येतात. आमच्या समजुतीप्रमाणे धर्मपीठांचे—ह्या पीठाधिकाऱ्यांचे मूळपुरुष हल्लींच्या धर्मांत सांगितलेल्या गोष्टींचे मूर्तिमान पुतळे असावेत ! त्यांच्या पश्चात् त्यांच्यामागून त्या थोर पुरुषांनी आपल्या आयुष्यांत धर्मासाठीं केलेल्या कामगिरीचा ओघ बंद पडूं नये म्हणून एखाद्या लहान मुलाची त्या गादीवर स्थापना करीत असत. ह्या मूळपुरुष स्वतः ज्ञानी –निरिच्छ-धर्माचें पालन करणारा असा असल्याने समाजामध्ये फार काय वीरशैवेतरांवरहि त्याच्या वागणुकीची छाप पडत असे; आणि ते आपल्या आचरणाने इतरांचें सहज लक्ष वेधीत असत; आणि ह्याच गोष्टीमुळे ते आपलें विशिष्ट स्थान निर्माण करीत असत. यालाच पुढे पीठ अथवा गादी संबोधण्यांत येत असे. कांही वेळा त्यांच्यांतील त्यांच्या शिष्यवृंदांपैकी योग्य अशा शिष्याची निवड करण्यांत येत असे.

या गुरुवर्यांनी मिळविलेली सहानुभूति व तज्जन्य अधिकार आणि संपत्ति यांचे वारस ठरत असत. परंतु गुरुंच्या आंगचे सर्वच गुण त्याच्या अंगीं उतरले असतील अशी आशा करणें व्यर्थ ! कांही वेळा वर उल्लेखिल्यांप्रमाणें मुलें जर गादीवर बसविली गेली तर सर्व शिष्यवृन्दांनी त्या मुलाचें " महाराज-महाराज " म्हणून स्तोम माजवावें, मान द्यावा, व त्या मुलाने कांही कालांतराने दुरुपयोग करावा एवढा मान मिळविण्याला, एवढी संघटना करण्याला, एवढी धर्मजागृति करण्याला इतक्या लोकांचें मन आकर्षण करून घेण्याला पीठसंस्थापकाला किती कष्ट सोसावे लागले असतील, आचरण किती शुद्ध व पवित्र ठेवावें लागलें असेल, याची यत्किंचितहि कल्पना या मुलाला नसल्याने तें मूल लाडावतें, तेथील कार्यकर्त्यांचा अपमान करूं लागतें. मठामध्ये संपत्तीची रेलचेल असल्याने " बडे बापके बेटे ". जसे वागतात त्याप्रमाणे वागूं लागते ! आपणाला कोणत्या महत्कार्यासाठी इथें आणून भगवी वस्त्रें दिलीं आहेत ? हीं भगवीं वस्त्रें परिधान करितांना आपल्यावर किती गोष्टींची जबाबदारी येऊन पडली आहे, याची त्याला कल्पनाहि नसते. इतर मुलांप्रमाणेंच सर्व गोष्टींचा विकास त्या मुलाच्या ठायीं होत असतो. आजूबाजूच्या मुलांची विचारसरणी त्याच्या मनामध्ये शिरकाव करते; आणि त्याप्रमाणे वागण्याचा तें प्रयत्न करितें; परंतु ज्या कार्यासाठी त्याला गादीवर बसविण्यांत आलें असतें तें कार्य व इतर मुलांची वागणूक ही छत्तीसाच्या आंकड्याप्रमाणे असल्यामुळे बाहेरच्या मुलांचें अनुकरण, मठामध्ये प्रतिबंध होत

असतांहि तें चोरून करण्याचा प्रयत्न करितें. सर्वच मुलें असें करतात असें ह्मणावयाचें आह्मी धाष्टर्य करीन नाहीं; परंतु बरेच जण करतात यांत संदेह नाहीं; व याबद्दल आह्मी त्यांना दोष देऊं इच्छीत नाहीं. त्याची जबाबदारी त्यांना बसविणाऱ्यावरच असते.

आमच्या मतें या बाबतींत लहान अज्ञान बाल-काला – कीं ज्याला आपणावर केवढी मोठी जबाब-दारी येऊन पडत आहे याची यत्किंचित्‌हि जाणीव नाही अशाला — त्याच्या अज्ञानपणाचा फायदा घेऊन त्याचे आईबाप आणि पीठ-चालक त्याजवर हें अधिकारपद लादतात ? आणि एक प्रकारें वर दर्शविल्याप्रमाणे पीठाची बदनामी होण्याला अप्रत्यक्ष मदतच करीत असतात. त्या-ऐवजी ज्याने हाल-अपेष्टांत राहून पीठाच्या-ज्ञातीच्या नांवाला शोभेल असें पीठाच्या तत्त्वा-नुसार आचरण ठेवलें आहे— ज्याची गद्दे (?) पंचवीशी उलटली आहे—ज्यांनी 'सुख' 'सुख' ज्याला ह्मणतात अशा सांसारिक सुखाचा अनुभव घेतला आहे परंतु त्याला तें मनापासून आवडत नाही; इतकेंच नव्हे तर वीट आला, आणि ज्याच्या मनाला आपण आपल्या समाजा-साठीं– पीठासाठीं कांही तरी स्वार्थत्याग मना-पासून करावासा वाटतो, अशा माणसाची पीठा-धिकाऱ्याच्या जागीं जर निवड केली तर खात्रीने वीरशैवसमाजाला ऊर्जितावस्था आल्यावाचून राहणार नाही. तो हीं सूत्रें आपल्या हातीं घेत असतांना आपल्या जबाबदारीची जाणीव लक्षांत ठेवून इथपासून पुढच्या आयुष्याचा प्रत्येक क्षण या पवित्र व महत्वाच्या कार्यासाठीं खर्च करण्यांत कसूर करणार नाही आणि यायोगेंच पीठाचें आणि वीरशैवसमाजाचें कल्याण होईल.

# वीरशैवांतील चळवळी

**अमरावतीः**—वीरशैव शि. प्रसारक मंडळ अमरावती ह्या मंडळाचा २० वा वाढदिवस व वार्षिकोत्सव श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर जहागीरदार ह्यांचे अध्यक्षतेखाली सोमवार ता. २०-४-३६ रोजी रात्री ९ वाजतां लासिन-मठांत साजरा झाला. सभेंत दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, श्री. दादामहाराज नागपूरकर, श्री. त्रिंबकआप्पा कापुसकर, श्री. वि. तु. चौधरी, बी. ए., श्री. फकिराप्पा हेगु वकील, व श्री. बाबाप्पा चपळगे व सौ. शांताबाई सातेकर ह्यांचीं प्रसंगोचित भाषणें झालीं.

**अमरावतीः**— श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारवा यांनी सोमवार ता. २०-४-३६ रोजी सायंकाळीं 'उदय' व 'वीरशैव-संजीवनी' ऑफिसास भेट दिली. दोन्ही कार्या-लयांतर्फे त्यांचें स्वागत व सत्कार करण्यांत आला व फोटोहि घेतला. सायंकाळी त्यानी श्रीरामेश्वर संस्थेस भेट दिली. श्रीसिद्धाश्रमचे मालक चनाप्पा गदगकर, श्री. संगेकर फ्रेममेकर, श्री. दानाप्पा जोगुरे वगैरे मंडळीकडेहि त्यांचा सत्कार होऊन पानसुपारी झाली.

**मंगळवेढेः**-वीरशैव तरुण संघातर्फे मिति चैत्र शुद्ध १ रोजी रात्री ९ वाजता श्री. गुरु केदार अय्यास्वामींचे मठांत श्री. सिद्धेश्वर बाळाप्पा अण्णा म्हेत्रे ह्यांचे अध्यक्षतेखाली सभा भरुन वीरशैव संजीवनी पत्राबद्दल समाधान व्यक्त करणारे व श्री. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे अभिनंद-नपर व गौरवार्थ श्री. राचाप्पा पट्टणशेटी श्रीगुरु भिमाशंकर स्वामी हिरेमठ श्री. पांडुरंग पिलाप्पा चिंचकर प्रभृतींचीं भाषणें झालीं. असें श्री. राचाप्पा पट्टणशेटी, सेक्रेटरी, कळवितात.

**सोनाळा**—येथील वीरशैवसमाजास आडगांव ता. आकोट येथील प्रसिद्ध वीरशैव पुढारी व कार्यकर्ते श्रीमंत काशिनाथ शंकरआप्पा धाके ह्यांनी भेट देऊन समाधान व्यक्त केलें व दोन गरीब विद्यार्थ्यांचे मदतीकरिता ३ रु. देणगी दिली व ह्या विद्यार्थ्यांचें शिक्षण पुरें होईपर्यंत आठ आणे मासिक वर्गणी देण्याचें अभिवचन दिलें. असें सदहू समाजाचे सेक्रेटरी हरि नारायण-वाणी शेटे हे कळवितात. स्तुत्य व अनुकरणीय !!

# रोहिणखेड येथील वीरशैव पुढाऱ्यांची यशस्वी परिषद्.

( आमच्या खास बातमीदाराकडून )

वर्तमानपत्रांतून जाहीर झाल्याप्रमाणें रोहिणखेड, जि. बुलडाणा, येथे रविवार ता. १९-४-३६ रोजीं वऱ्हाड-मध्यप्रांत व खानदेश येथील प्रमुख वीरशैव पुढाऱ्यांच्या परिषदेला सकाळीं ७॥ वाजतां सुरुवात होऊन रात्रौ ९ वाजतां ती अत्यंत यशस्वीपणें पार पडली.

शनिवारी रात्रौ १० वाजतां मुंबईमेलने अध्यक्ष श्रीमंत द. कृ. उर्फ बाबासाहेब देशमुख जहागिरदार पारवा हे दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, बाबुराव चौधरी, डॉ. आप्पाराव संगेकर, दे. भ. राजाभाऊ डांगरे वगैरे प्रतिनिधी व श्री. भाऊसाहेब प्रायव्हेट सेक्रेटरी, बाबासाहेबांचे मामा श्रीमंत गणपतराव काळे इजारदार श्री. बाळाभाऊ वगैरे मंडळीसह मलकापूर-स्टेशनवर उतरले. स्टेशनवर स्वागताध्यक्ष श्रीमंत रामचंद्र शेट कुळी व स्वागतमंडळाचे इतर सभासद, प्रमुख वीरशैव, वगैरे बरीच मंडळी जमली होती. रात्रौ मलकापूर येथे जव्हारमल दामोदरदास ह्यांचे बंगल्यांत सर्व मंडळींचा मुक्काम होता. रात्रौ एक्सप्रेसने पुसदहून श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, मि. एस्. जी. जतकर नायब तहसिलदार, मि. गुळकर सिमलर वगैरे मंडळीहि येऊन दाखल झाली. मलकापूरहून सर्व मंडळी सकाळीं मोटारनें रोहिणखेडास येऊन पोहचल्यावर सकाळीं ६॥ वाजतां अध्यक्षांची मिरवणूक काढण्यांत आली. मिरवणुकींत रोहिणखेड येथील इतरहि ज्ञातींतील प्रमुख लोक हजर होते. बरोबर ७॥ वाजतां राष्ट्रीय गीताने परिषदेला सुरुवात झाली. स्वागताध्यक्ष श्री. रामचंद्र शेट कुळी ह्यांचें स्वागतपर भाषण करून श्रीमंत बाबासाहेब देशमुख ह्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें ह्मणून सूचना केली. त्याला नागपूरविभागातर्फे दे. भ. राजाभाऊ डांगरे, बुलठाणा जिल्ह्यातर्फे श्रीमंत गोविंदराव बोंद्रे, यवतमाळ जिल्ह्यातर्फे श्री. आप्पासाहेब एकलारे, उमरावती जिल्ह्यातर्फे बाबूराव चौधरी, आकोला जिल्ह्यातर्फे श्रीमंत काशीनाथआप्पा आडगांवकर, खानदेशविभागातर्फे सावद्याचे कोरे वगैरे मंडळींनी अध्यक्षाच्या सूचनेला पाठिंबा दिला. श्रीमंत बाबासाहेबांनी अध्यक्षस्थान स्वीकारल्यावर यावलचे बारजिभे वकील, पुसदचे श्रीमंत बाबासाहेब मुखरे, अमरावतीचे श्री. त्रिंबकआप्पा कापुसकर, दारव्ह्याचे नामदेवआप्पा कोरे, वगैरे मंडळीकडून परिषदेस यशचिंतनपर आलेले संदेश वाचून दाखविण्यांत आले.

अध्यक्षांचे भाषणानंतर एक "धार्मिक सुधारणेची आवश्यकता" ह्या विषयावर श्री. विश्वनाथआप्पा कुळी यांनी लिहिलेला सुंदर संवाद विद्यार्थ्यांनी ह्मणून दाखविला. नंतर दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी परिषदेपुढील मुख्य कार्य "वीरशैवहितसंवर्धक मंडळाची स्थापना" ह्याविषयी प्रास्ताविक भाषण केलें. नंतर श्री. गोविंदराव बोंद्रे ह्यांनी 'पळसिद्ध मठ रोहिणखेड'चा प्रसिद्ध केलेला अहवाल वाचून दाखविला व नंतर विषयनियामक कमेटीची निवडणूक झाल्यावर सकाळी १०॥ वाजतां परिषद् तहकूब करण्यांत आली. परिषदेला निरनिराळ्या ठिकाणाहून ४००-५०० वीरशैव प्रतिनिधी हजर होते. त्यांत खालील मंडळी विशेष प्रामुख्याने जिल्हानिहाय विषयनियामक कमेटींत दिसत होती.

## बुलठाणा जिल्हा

श्रीमंत मलकाप्पाशेट बोन्दरे, चिखली; २ श्रीमंत गोविंदराव रंगाप्पा बोंदरे, चिखली; ३ शिवाप्पा नथाप्पा सातगांव, ४ शिवकशंकर ईश्वरआप्पा भादोला,५ लक्ष्मण श्रीसिद्धलिंग आप्पा, ६ रघुनाथआप्पा बटवे बुलडाणा, ७ बापुशेट सुपडूशेट धामणगांव, ८ सदाशिव जयराम आप्पा मलकापूर, ९ शंकर गोविंदआप्पा सांकोडी, १० मार्तंड गुणाप्पा साखरखेड, ११ रोडाप्पा चिमणाप्पा वाकतकर बी. ए. सेहेकर.

## यवतमाळ जिल्हा.

१२ स्वामी रामचंद्र पुराणिक दारव्हा, १३ श्री. माधवराव शेटे यवतमाळ १४ टी. एन्. गुळकर सिमलर पुसद, १५ श्री. आप्पासाहेब एकलारे वकील पुसद, १६ श्री. एस्. जी. जतकर, नायबतहसिलदार पुसद, १७ श्रीमंत गणपतराव काळे पारवा.

## अमरावती जिल्हा

१८ दे. भ. नानासाहेब बामणगांवकर अमरावती, १९ डॉ. आप्पाराव संगेकर चांदूरबाजार, २० श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., अमरावती.

## आकोला जिल्हा

२१ श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर, २२ विश्वनाथआप्पा आडगांव २३ भाऊराव देवाप्पा विभूते कारंजा २४ सोनाप्पा नथाप्पा पांगरे कारंजा २५ श्री. पापडे कारंजा,

## नागपूरविभाग.

२६ दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूर,

## खानदेश.

२७ श्री. नामदेव आप्पा कोरे सावदा, २८ श्री. मोतीलाल आप्पा वरणगांव २९ श्रीहरी पाटील राहेरा, ३० श्री. काशिनाथआप्पा फत्तेपूर.

विषयनियामक कमेटीची बैठक दुपारी१॥वाजतां अध्यक्षांचे निवासस्थानीं भरली. वीरशैवहितसंवर्धक मंडळाच्या स्थापनेसंबंधीचा ठराव श्री. बाबुराव चौधरी अमरावती ह्यांनी मांडला व त्याला श्री. आप्पासाहेब वकील ह्यांनी अनुमोदन दिलें. ठराव एकमताने पास करण्यांत आला व मंडळाचें कार्य व घटना तयार करण्याकरितां पुढीलप्रमाणें तात्पुरतें कार्यकारीमंडळ व प्रचारकार्यार्थ सहाय्यक मंडळहि निवडण्यांत आलें.

## कार्यकारी मंडळ—

अध्यक्षः—श्रीमंत बाबासाहेब देशमुख,पारवेकर जहागिरदार. उपाध्यक्ष—श्री. आप्पासाहेब एकलारे वकील पुसद श्री. रामचंद्र विठोबाशेट कुळी रोहिणखेड. खजिनदार—श्रीमंत काशिनाथआप्पा आडगांवकर. जनरल सेक्रेटरी—श्री. बाबुराव चौधरी बी. ए. अमरावती, जॉइंट सेक्रेटरी—१ दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूर, २ श्री. रोडाप्पा वाकतकर बी. ए.

## मंडळाचे सभासद

१ दे. भ. नानासाहेब बामणगांवकर,अमरावती-जिल्हा २ श्रीमंत गोदाजीराव उर्फ बाबासाहेब मुखरे, यवतमाळ जिल्हा, ३ श्रीमंत गोविंदराव बोंदरे, बुलडाणा जिल्हा, ४ श्री. सोनाप्पा नथाप्पा पांगरे, आकोला जिल्हा, ५ श्री. महादेव शिवाप्पा जुननकर, नागपूर विभाग, ६ श्री. बाबुराव बाळाप्पा, बिल्डिंग, कॉंट्रॅक्टर धुळे-खानदेश.

## प्रचारक व सहाय्यक मंडळ उमरावती जिल्हा

१ श्रीमंत आप्पाराव रामाप्पा कोल्हे,अमरावती.
२ श्रीमंत सोमेश्वर शंकरआप्पा मेंडसे अमरावती.
३ डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर चांदूर बाजार
१ श्रीमंत बाबुआप्पा गुंडाप्पा करणे कोकर्डा.

## आकोला जिल्हा

१ श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूते कारंजा
२ श्री. काशिनाथआप्पा लक्ष्मणआप्पा कारंडकर-

बाळापूर ३ श्री. विश्वनाथआप्पा गणाप्पा आडगांव ४ श्रीमंत ओंकारआप्पा काशिनाथआप्पा धाके आडगांव.

### यवतमाळ जिल्हा

१ श्री. नामदेव आप्पाजी कोरे दारव्हा २ स्वामी रामशंभु पुराणिक दारव्हा ३ श्री. माधवराव तुकारामआप्पा शेटे यवतमाळ.

### बुलढाणा जिल्हा

१ श्रीमंत विश्वनाथआप्पा लक्ष्मणआप्पा कुळी, रोहिणखेड २ श्री. स्वामी रामलिंग उमाकांत खामगांव ३ श्री. शिवाप्पा नथाप्पा लांबदाढे सातगांव ४ श्री. वैजिनाथआप्पा मलकाप्पा बोंदरे चिखली ५ श्री. भिमाप्पा सदाशिवआप्पा वरवण ६ श्री. रामचंद्र सुपडु शेट धामणगांव

### खानदेशविभाग

श्री. नारायणआप्पा गणाप्पा लोनवाडी २ श्री. नामदेवआप्पा कोरे सावदा ३ श्री. त्रिंबक सुपडु शेटे पहूर.श्री.सिद्धेश्वर मारुतिआप्पा नगरे जळगांव.

### नागपूरविभाग

१ श्री. गजाननराव कापसे खापा २ श्री. नथ्थुआप्पा आदेवार नागपूर ३ श्री. कृष्णाप्पा सद्राप्पा कल्डरे चांदा ४ श्री. बुद्धाप्पा शिवाप्पा कापसे नागपूर ५ श्री. वामन विठ्ठल डांगरे नागपूर.

वरीलप्रमाणे योजना झाल्यावर तेथल्या तेथेच खालीलप्रमाणे सभासद झालेत.

### तहाह्यात सभासद २५० रु. वर्गणी

१ श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर २ श्री. गोदाजीराव ऊर्फ बाबासाहेब मुखरे पुसद ३ श्री. रामचंद्र विठोबा कुळी रोहिणखेड ४ श्री. काशिनाथआप्पा आडगांवकर. श्री. रंगाप्पा गंगाप्पा बोंदरे चिखली ६ श्री. मलकाप्पा बोंदरे चिखली.

### २५ रु. वार्षिक वर्गणीचे सभासद

१ श्रीयुत आप्पासाहेब एकलारे वकील पुसद २ श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूते कारंजा ३ श्री.सोनाप्पा नथाप्पा पांगरे कारंजा ४ श्री. एस्. जी. जतकर नायब तहसिलदार पुसद श्री. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर अमरावती.

वार्षिक १० रु. वर्गणी देणारे सभासद १ डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर चांदूर बाजार, २ श्री. टी. एन्. गुळकर सिमलर,–पुसद. ३ श्री. स्वामी रामलिंग उमाकांत,–खामगांव. ४ श्री. काशिनाथ आप्पा माहोरे, चिखली, ५ श्री. सदाशिवआप्पा जयरामआप्पा मलकापूर. वार्षिक ५ रु. वर्गणी देणारे सभासद.–१ श्री. रघुनाथआप्पा रंगाप्पा बटवे बुलडाणा. वार्षिक २ रु. वर्गणी देणारे सभासद-१ निंबाजी बाबुआप्पा सदावर्ते मलकापूर.

वरीलप्रमाणें परिषदेने " वीरशैव हितसंवर्धक मंडळ " स्थापन करून सामाजिक बाबतींत खालील इतरहि महत्वाचे ठराव पास केले आहेत.

### ठराव १ ला

निजामस्टेटमधील उदगीरभागांतील एका आर्यसमाजाचे माणसानें वीरशैवांचे परमात्मस्वरूपी पवित्र लिंग व धर्मोद्धारक महात्मा बसवेश्वर यांचेबद्दल निंदास्पद शब्द वापरले त्याबद्दल ही सभा त्याचा तीव्र निषेध करीत आहे. सूचक– दगडूआप्पा गणूआप्पा तोडकरी नेरी बु॥ पूर्वखान

### वर्गणीदारांस सूचनाः—

" वीरशैव संजीवनी "-ची वर्गणी — मॅनेजर, " वीरशैवसंजीवनी ", उमरावती, या पत्त्यावर पाठवावी.

देश, अनुमोदक—नामदेआप्पा कोरे, सावदा.

### ठराव २ रा

लिंगधारणा करतांना जी शिवदीक्षा देतात तिचे योगाने सर्वच लिंगधारी वीरशैवधर्मशास्त्राने द्विज ठरतात. लिंगायतेतर जे ते वीरशैवधर्मांच्या मतें द्विजेतर अशा चौथ्या वर्णांत पडतात. हिंदुकायद्या प्रमाणे लिंगायतांचे हक्कवारशाचे वगैरे कज्जे कायद्याच्या कोर्टांत गेले असतां लिंगायतांचीच उलट द्विजाबाहेर जी गणना होते ती सर्वथैव योग्य व सशास्त्र नसल्यामुळे सर्व लिंगधारी वीरशैवांनी आपल्या अनेक संस्थांतर्फे सर्व लिंगधारी ह्यांची लिंगधारणदीक्षेमुळें द्विजांत गणना होते असे ठराव पास करून त्यांच्यांत जागृति करावी. आणि इत:पर कायद्याच्या कोर्टांत प्रश्न गेला असतां तेथील निकाल द्विजांच्या वा त्रैवर्णिकांच्या हक्काप्रमाणें लागेल अशी व्यवस्था सर्वलिंगधाऱ्यांनी परस्परसहकार्याने झटून करण्याचा निर्धार करावा अशी ही परिषद् सर्व वीरशैवांना विनंति करते.

सूचकः—नानासाहेब बामणगांवकर, अनुमोदकः—श्री. एकलारे.

### ठराव ३ रा

आचार्यपीठाचा व विरक्तपीठाचा अधिकार बालब्रह्मचाऱ्यास देण्याची प्रथा बंद पाडून वीरशैवांतील जे विद्वान् व सत्शील गृहस्थाश्रमी गृहस्थ पुढे स्वेच्छेने सन्यासदीक्षा घेतली अशांनाच आचार्यपीठाचे व विरक्तपीठाचे मुख्य अधिकार देण्याची चाल रूढ होणें सद्यस्थितींत अवश्य आहे. तरी सर्व मठाधिकाऱ्यांनी व सर्व वीरशैवभक्त माहेश्वरांनी व त्यांच्या महासभेसारख्या व इतर लहानमोठ्या संस्थांनी ह्या प्रकारचे ठराव पास करून व ते समाजांत प्रसृत करून आणि वीरशैव लोकमत जागृत करून ही नवी प्रथा सुरूं होईल इकडे अवश्य लक्ष द्यावें आणि मठांची पवित्र संस्था अधिक शुद्ध व तेजस्वी राहील अशी काळजी घ्यावी अशी ह्या परिषदेची विनंति आहे.

सूचकः—गोविंदआप्पा बोंद्रे, अनुमोदकः—रामशंभूस्वामी पुराणिक.

### ठराव ४ था

आपल्या समाजांत रूढ असलेल्या पुनर्विवाहपद्धतीचा विकृतरीत्या फायदा घेणारे जरठकुमारी किंवा जरठ-पुनर्विवाहाचा निषेध करणें, तसेंच असल्या पुनर्विवाहांत विशेषतः बालविधवापुनर्विवाहाचें कार्य लग्नविधिप्रमाणेच मंगल स्वरूपांत पार पाडावें व तद्विषयक चालू रूढ कुत्सित व अभद्र चालीरीती बंद करणें.

सूचक—श्री. बाबुराव चौधरी. अनुमोदक—दे. भ. नानासाहेब बामणगांवकर.

### ठराव ५ वा

श्रीमंतीच्या किंवा मोठेपणाच्या खोव्या भावनेला व इभ्रतीच्या कल्पनेला बळी पडून ह्यापुढें लग्न किंवा इतरहि कार्यांत वीरशैवांनी अनावश्यक व्यर्थ खर्च करूं नये. उलट शक्य तितका कमी खर्च करून सामाजिक कार्याला व सार्वजनिक संस्थांना देणग्यांच्या रूपानें मदत करणे.

सूचक—श्रीमंत सोनाप्पा नयाप्पा पांगरे.अनुमोदक—श्री. काशिनाथ आप्पा आडगांवकर.

### ठराव ६ वा

वीरशैवसमाजांतील मठसंस्थानें ही सार्वजनिक मालमत्ता आहे व त्यावर सर्व समाजाची मालकी आहे. पंच किंवा मठपति ( जंगम ) हे मालक नसून निव्वळ वहिवाटदार आहेत. जेथें पंच किंवा मठपति ह्यांचा वैयक्तिक मालकी हक्क सुरू असेल व ह्या सार्वजनिक मालमत्तेचा दुरुपयोग होत असेल तेथे लोकजागृति करून अशा कृत्यास आळा घालावा व शक्यतों समाजाची सार्वजनिक मालकी प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करावा.

सूचक—श्री. रामलिंगस्वामी खामगांव. अनुमोदक—स्वामीरामशंभू पुराणिक दारव्हा,

### ठराव ७ वा.

आर्थिक बिकट परिस्थिति लक्षांत घेऊन इतर समाजाप्रमाणे धंद्याच्या जातीवर किंवा स्वरूपांवर धंदा करणारांनी स्वतःचे मानापमानाचा प्रश्न अवलंबून ठेवून निष्कारण क्षुल्लक अडचणी निर्माण करून न घेतां वीरशैवांनी स्वतःच्या शीलाने व चारित्र्याने कोणत्याहि धंद्यांत पडून स्वतःचें पोट भरून त्या धंद्याला ऊर्जितावस्था आणावी.

अध्यक्षाकडून:—

ठराव ८ वा.

वीरशैवसमाजाची सर्वांगीण उन्नति व्हावी ह्या उद्देशानें दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी "वीरशैवसंजीवनी" पुन्हा काढून अखिल वीरशैवसमाजाला उपकृत केलें ह्याबद्दल ही परिषद् त्यांचें अंतःकरणपूर्वक सादर अभिनंदन करते. सूचक-दे. भ. राजाभाऊ डांगरे, नागपूर. अनुमोदक-श्री. विश्वनाथआप्पा गणाप्पा आडगांव.

ठराव ९ वा

कर्नाटक, सिरसंगी फंड, व धारवाड फंडाबाबत इकडील विद्यार्थ्यांना मदत मिळत नाही. तर ती कां मिळत नाही ह्याविषयी कमेटी नेमून पत्रव्यवहार करावा.

ठराव १० वा

"वऱ्हाड-मध्यप्रांत-खानदेश व निजामसरहद्द वीरशैवसमाजाचे सर्वांगीण उन्नतिकरता व संघटणेकरिता वीरशैवहितसंवर्धकमंडळ स्थापन करणे व त्याकरिता खालील कार्यकारी मंडळ व प्रचारक व सहाय्यक मंडळ मंजूर करणें."

सूचक—श्री. बाबूराव चौधरी बी.ए. उमरावती.
अनुमोदक-श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, पुसद.

वरीलप्रमाणे परिषदेंत ठराव पास झाल्यावर अध्यक्षाचा सुंदर समारोप झाला, व नंतर श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी परिषदेंतील प्रतिनिधींच्या तर्फे व्यवस्था उत्तम ठेविल्याबद्दल स्वागताध्यक्ष श्रीमंत रामचंद्र शेट कुळी व त्यांचें स्वागतमंडळ ह्यांचे आभार मानले. अशा रीतीने रोहिणखेड-परिषद् अत्यंत यशस्वी तऱ्हेने पार पडली.

# आमच्याविषयींचें लोकमत

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर यांना क्र. सा. न. वि. वि. दोन तपापूर्वीच समाजास झालेली क्षयाची भावना ओळखून आपण संजीवनीचा उपयोग केला. परंतु समाजाचे दुर्दैवामुळे अमृततुल्य असलेली संजीवनी कडू निंब समजून समाजाने टाकून दिली.

दोन तपानंतर का होईना, जर समाजास बाकीच्या सुधारलेल्या जगाबरोबर सन्मानाने टिकावयाचे असेल तर संजीवनीमात्रेचा उपयोग समाजाने जरूर करून घ्यावा.

तूर्त शाब्दिक सहानुभूतिशिवाय मी कांही करूं शकत नाही ह्याबद्दल मनास फार हुरहुर वाटते, व कांही दिवस आपल्या सेवेस अतरलों त्याबद्दल माफी असावी ही विनंती. संगाप्पा रेवाप्पा मुचलंबे, मु.- किन्हीराजा, हे कळवितात.

वीरशैवसंजीवनी (पाक्षिक, संपादक श्री. ना. रा. बामणगांवकर उमरावती) 'उदय' पत्राचे संपादक श्री. नानासाहेब बामणगांवकर यांनी हें पाक्षिक उमरावती येथे सुरु केलें असून त्याचे आजवर सहा-सात अंक प्रसिद्ध झाले आहेत. वीरशैवांची संघटना करुन त्यांच्यांत नवचैतन्य निर्माण करण्याच्या हेतूने हें पाक्षिक चालविण्यात येत आहे. त्या दृष्टीने या प्रांतातील तरुण वीरशैव कार्यकर्ते श्री. वि. तु. चौधरी यांचे प्रारंभीच्या कांहीं अंकांतून प्रसिद्ध झालेले "नवमतवादा"-वरील लेख विशेष उल्लेखनीय वाटतात. श्री. चौधरी यांनीं कांहीं सामाजिक रुढींविरुद्ध लेखणी सरसावली आहे. वीरशैवसमाजांत त्यांच्या या लेखनानें चेतना निर्माण होईल अशी आशा करण्यास हरकत नाही. उद्बोधनाबरोबरच ज्ञातीय संघटणा व पंथाचे दृढीकरण हे पाक्षिकाचे उद्देश असल्यानें वीरशैवांच्या पंथविशिष्ट चळवळींचीही या पाक्षिकांत आस्थापूर्वक नोंद केलेली आढळते. त्यावरूनहि जुन्या नव्यांचा समन्वय करण्याचें धोरण संपादकानी स्वीकारल्याचें दिसून येतें. श्री. नानासाहेब बामणगांवकर यांच्या अनुभविक व कुशल धुरीणत्वाखाली हें पाक्षिक ज्ञातिसंघटनेचे कार्य यशस्वीपणे करील अशी आम्हाला खात्री वाटते. वीरशैवज्ञातींतील आबालवृद्धांना तें प्रिय होवो असें आम्ही अंतःकरणपूर्वक इच्छितों.

वऱ्हाडशाळापत्रक-एप्रिल १९३६.

# वीरशैवसंजीवनी

अंक १० वा ) ता० १५ मे १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय:।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:
स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति वैशाख व॥ ९ शके १८५८ ( अंक १० वा.

# वीरशैवमहासभेचें कर्तव्य

**अध्यक्ष ना० कंबळी**

वीरशैवमहासभेचें नवें अधिवेशन रायचूर येथे जूनच्या आरंभी ना. कंबळी, मुंबई-सरकारचे शिक्षणमंत्री, हुबळीचे सुप्रसिद्ध वीरशैव वकील आणि ब्राह्मणेतरपक्षाचे एक अध्वर्यु ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरणार असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. महासभेच्या यंदाच्या अधिवेशनाला ना. कंबळीसारखा नेता अध्यक्षपदाकरिता लाभला ह्याबद्दल प्रत्येक वीरशैवाला आनंद होणें स्वाभाविक आहे. ना. कंबळी हे ब्राम्हणेतरपक्षीय आहेत वा त्यांचीं राजकीय मतें अमुक प्रकारचीं आहेत, वा त्यांनी दिवाण म्हणून काय कार्य केलें, ह्या दृष्टीने आम्हाला त्यांची योग्यायोग्यता मापावयाची नाही. आम्ही वीरशैव आहों व ना कंबळीहि वीरशैव आहेत—इतकेंच नव्हे तर आजच्या वीरशैवांत ते एक श्रीमंतीने, विद्वत्तेनें व दर्जाने फार मोठे पुरुष आहेत, हीच एक गोष्ट त्यांच्याविषयीं आदर वाळगण्याला आह्माला पुरेशी आहे. तेव्हा आपल्या समाजांतील एक श्रेष्ठ दर्जाचा पुरुष यंदाच्या महासभेला अध्यक्षस्थानीं लाभला ह्यास्तव प्रत्येक वीरशैवघटकास आनंद होणें स्वाभाविकच आहे.

**महासभेचें कार्यक्षेत्र.**

वीरशैवसमाज कर्नाटक, तेलंग, महाराष्ट्र, वगैरे भागांत सर्वत्र पसरला आहे. कर्नाटकांत आमच्या समाजाची विशेष वस्ती आहे. आणि बाराव्या शतकांत कानडी वाङ्मयावर प्रभुत्व गाजविणारे अनेक थोर पुरुष, ग्रंथकार, व कवि कर्नाटकांतच उत्पन्न झाल्यामुळे कर्नाटक व

वीरशैव ह्यांचा विशेष प्रमाणांत एकजीव झालेला दिसला तर आश्चर्य नाही. शिवाय महासभेचीं आधिवेशनें कर्नाटकांतूनच सुरू झालीं व कर्नाटकामध्येच तीं अधिक प्रमाणांत आजवर भरलीं. त्यामुळे महासभेच्या पुढाऱ्यांत कर्नाटकी वीरशैव पुढाऱ्यांचाच भरणा विशेष दिसला तर आश्चर्य नाही. आणि ह्याबद्दल तेलंगणीय व महाराष्ट्रीय वीरशैवांना विषादहि वाटण्याचें कारण नाही. कारण ज्या भाषीयांचा समाजांत विशेष भरणा व ज्यांचें कर्तृत्वच महासभेच्या विकासाला कारणीभूत झालें ते सूत्रधार असणें शक्य आहे, व जरूरहि आहे. तथापि महासभेचें क्षेत्र ह्मणजे निव्वळ कर्नाटक नव्हे व कानडी भाषाहि नव्हे. महासभेचें क्षेत्र भाषा व प्रांत ह्यांनी मर्यादित नाही तर वीरशैव जेथे जेथें पसरला आहे तेथे तेथे महासभेचें क्षेत्र आहे, ही गोष्ट सूत्रधारांच्या लक्षांत असली पाहिजे व असावी असा आमचा विश्वास आहे.

## कार्यक्षेत्राची आकुंचित वृत्ति नको.

वीरशैवांचा प्रसार विशेष कर्नाटकांत असला तरी तेलंगण, महाराष्ट्र व इतर हिंदुस्थानचे विभाग ह्यांतहि ते प्रामुख्याने आज वावरत आहेत. वीरशैवांची मूळ भाषा कानडी व मूळ प्रांतहि कर्नाटकच होय असें एकतर्फी विधान करणें योग्य नव्हे. परंतु बसवेश्वर कर्नाटकांत उत्पन्न झाला व त्यांनी आपल्या प्रासादिक वचनांनी कानडी भाषेला उजळा आणला ह्मणून कर्नाटक हेंच वीरशैवांचें मूळस्थान, आणि कानडी हीच वीरशैवांची धर्म वा समाजभाषा, असा आकुंचित वृत्तीचा सिद्धान्तहि कित्येकांच्या जिव्हेवरून व कित्येकांच्या लेखणींतून बाहेर पडूं लागला. प्रांतीय हेंच क्षेत्र धरलें तर तेवढ्यापुरती ही गोष्ट शोभून उठते. पण भारतीय वीरशैवांचा विचार करावयाला बसल्यावर असें बोलणें कर्णकटु ठरतें. एक तर ह्या बोलण्यांत ऐतिहासिक सत्य असलें तर तें फार थोडें आहे. वीरशैवांचा उगम प्रथम उत्तरहिंदुस्थानांतून झाला, तेलगणांतून झाला, कीं कर्नाटकांतून झाला, हें इतिहासाच्या दृष्टीने निश्चित होणें जरूर आहे. बसवेश्वरापूर्वी वीरशैवांचा उगम प्रथम उत्तरहिंदुस्थानांत, नंतर तेलंगणांत व त्यानंतर कर्नाटकांत झाला असें आह्माला वाटतें. करिता भारतीय वीरशैव ह्मणून विचार करावयाला बसल्यावर इतर प्रांतीय वीरशैवांना—ते अल्पसंख्याक असले तरी, न दुखविण्याची जबाबदारी प्रस्तुत महासभेच्या सूत्रधारांनी घेतली पाहिजे. करिता कर्नाटक हाच वीरशैवांचा प्रांत, कानडी हीच वीरशैवांची भाषा, व बसवदेव हाच वीरशैवांचा आद्यपुरुष, आणि बसव-वचनें हेंच वीरशैवांचें शास्त्र ही भावना व्यक्त न करणें अधिक शहाणपणाचें. इतकेंच नव्हे तर बसवदेवांनी जी सर्वश्रेष्ठ अशी पतितोद्धाराची भावना प्रकट केली आहे तिचा विकास झालेला व्यक्त करावयाचा असला तर बसवाभिमान्यांनीच आपणहून बसवदेवावरील खऱ्या निष्ठेकरिता हा आकुंचितपणा सोडावयाला पाहिजे.

## महासभेंत भारतीय वीरशैवांचें क्षेत्र

जे बसव-निष्ठ हा आकुंचितपणा आपणहून सोडणार नाहीत त्यांनी आह्मी समाजसुधारणावादी आहोत असें म्हणूं नये. कारण सनातनीयांत ज्या आकुंचित भावनांचा पदोपदीं उद्रेक होत असलेला दिसतो त्यापलीकडे बसवनिष्ठ ह्मणवीत सुधारक वा नवमतवादी ह्मणविणारांचें पाऊल पडलें नाही असेंच ह्मणावें लागेल. अशा परिस्थितींत ना. कंबळीसारखे सर्वप्रांतीय वीरशैवांच्या भावनांशीं परिचित झालेले महासभेचे अध्यक्ष आपल्या भाषणांतून ह्या आकुंचित व कोत्या दृष्टीला प्रेमळपणाने दूर सारून वीरशैव-महासभा ही अखिल भारतीय वीरशैवांच्या हितसंबंधाकरिता आहे हें स्पष्ट करतील व सर्वत्र वीरशैवांत महासभेविषयी आपुलकीची भावना उत्पन्न होईल असा एक नवा प्रघात घालतील अशी आह्माला आशा आहे. असें करतांना कानडी बहुमतवाल्या वीरशैवांच्या हितसंबंधांना कोणताहि

बाध येत नाही, आणि येऊं नये अशी आमची इच्छा आहे. ह्याकरिता अखिल भारतीय वीरशैवांच्या हितसंबंधाचे प्रश्न निराळे करावेत, व ज्या प्रांतांत वीरशैवमहासभेचें अधिवेशन भरते अथवा ज्या प्रांतांत वीरशैवमहासभेचे कार्यकर्ते विशेष प्रमाणांत आढळतात त्या प्रांतांतील वीरशैवांच्या हितसंबधाचे प्रश्न वेगळे असे दोन भाग स्पष्ट करावेत. असे दोन भाग स्पष्ट झाले म्हणजे अल्पसंख्याक व बहुसंख्याक असे प्रश्न उद्भवत नाहीत. शिवाय भाषाभिन्नत्वामुळे व देशरूढीप्रमाणे कर्नाटकी वीरशैव, तेलगुवीरशैव व महाराष्ट्रीय वीरशैव असे जे भाग पडलेले दिसतात ते एकमेकाविरुद्ध जावयाला धजावयाचे नाहीत. तात्पर्य काय कीं, वीरशैवमहासभा भाषावार भेदावर न उभारतां सर्व वीरशैवांचा एक धर्म व एक समाज ह्याच भावनेवर उभारली जावी.

## महासभेची घटना बदला

ह्याकरिता प्रस्तुतच्या महासभेच्या घटनेंतहि आमूलाग्र बदल व्हावा अशी आमची इच्छा आहे. महासभा ही सर्व वीरशैवांची आहे. अर्थात् तिच्या कक्षेंत आचार्य व आचार्यभक्त, विरक्त व विरक्तभक्त, बसव व बसवभक्त, ह्या प्रकारचे सर्व माहेश्वरवर्ग व भक्तवर्ग येतात. अशा प्रकारें सर्व लिंगधाऱ्यांना तिच्या कक्षेंत कोणताहि भेदभाव न करितां येऊन बसण्याचा अधिकार आहे. ह्या अधिकाराला सक्रिय स्वरूप देण्याची आता वेळ आली आहे. म्हणूनच तिच्या घटनेंत बदल व्हावा असें आम्हाला वाटतें. वीरशैवमात्रांच्या सद्यस्थितीचा विचार करितां पूर्वीपेक्षा साक्षरता पसरत आहे, सार्वजनिक सेवेची जाणीवहि समाजांत उत्पन्न होऊन सर्वांनाच ठिकठिकाणी संघटित व्हावें असें वाटत आहे, कर्नाटक, तेलंग व महाराष्ट्र ह्या तिही भागांतील वीरशैवांच्या आजच्या स्थितीकडे पाहिलें तर जेथें जेथें वीरशैवांची वस्ती आहे तेथे तेथे त्यांनी आपल्या संघटित संस्था स्थापन करण्याचा उद्योग चालविला आहे असें निदर्शनाला येतें. आचार्यवर्गीयांचा गुरुवर्यसंघ, वीरशैवांचे तरुणसंघ, बसवांचे शुद्धिसंघटनसंघ, शिक्षणसंस्था, वाचनालयें, संस्कृत पीठें, वसतिगृहें, अशा अनेक संस्था निघाल्या आहेत व निघत आहेत. ह्यापैकीं पुष्कळ संस्था नांवारूपाला आल्या आहेत, कित्येक नाममात्रहि असतील, हें सर्व खरें. पण सर्व वीरशैवांच्या— मग त्यांत कक्षया वीरशैवसमाजाच्या संस्था असल्या तरी ह्या सर्व संस्था वीरशैवमहासभेच्या मूळ घटकांत समाविष्ट व्हाव्यात. ह्याकरिता महासभेला जे प्रतिनिधी येतील ते ह्या संस्थांतर्फे निवडलेले यावेत, असा नियम असावा. प्रतिनिधींची संख्या मर्यादित न करितां जे प्रतिनिधी जेथून येतील ते तेथील वीरशैवांच्या कोणत्या तरी संस्थेतर्फे आले अशी नोंद व्हावयास पाहिजे.

## वीरशैवांच्या संस्था ह्याच महासभेचा पाया

म्हणजे वीरशैवांच्या कोठे कोणत्या संस्था आहेत ह्याची नोंद महासभेच्या दप्तरांत राहील. इतकेंच नव्हे तर महासभेची कचेरी कर्तृत्ववानांची असली तर ह्या संस्थांचा वाढता इतिहास त्यांच्याकडे पूर्ण पत्त्यासह आपोआप येईल व त्यांची तिच्या कचेरींत नोंदहि होईल. ही नोंद प्रत्येक महासभेच्या अधिवेशनांच्या स्वागतमंडळास मिळाली तर प्रतिनिधी निवडून पाठवावयास पत्रव्यवहार करावयाला सोपें जाईल. आणि अशा संस्थांचे प्रतिनिधींची संस्था म्हणून तिचा पाया मजबूत केल्याचें पुण्य लाभेल. शिवाय वीरशैवमहासभा हीच मुळी वीरशैवांची पहिली संघटित संस्था. तिच्या प्रेरणेनेच ठिकठिकाणी लहान-लहान वीरशैवांच्या संस्था जन्माला आल्या. ह्या सर्व लहानसहान संस्थांची नोंद म्हणजे वीरशैवमहासभेच्या कर्तृत्वाचाच इतिहास होय. महासभेसारख्या संस्थांच्या सभा वर्षांतून तीन दिवस वा तीन वर्षांतून तीन दिवस भरत असतील. त्यापायीं होणारा खर्च व्यर्थ गेला असें वरवर पहाणारास दिसत असेल. पण तिच्या अदृश्य कर्तृत्वाची कालांतराने कशीं फळें येतात तें प्रत्यक्षपणें समाजाच्या मनावर बिंबवावयाचें असल्यास ठिकठिकाणी स्थापन झालेल्या व होणाऱ्या संस्थांची नोंद

करून त्यांनाच आपआपल्या हद्दींतील प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क देणें हेंच अधिक स्फूर्तिप्रद व व योग्य आहे. अशा प्रकारें वीरशैवांच्या ह्या लहान-मोठ्या संस्था तिच्या घटकांत येऊं लागल्यावर प्रांतवार, जिल्हावार वा भाषावार होणाऱ्या वीरशैवांच्या परिषदा वा सभा ह्याच घटनेवर उभ्या राहतील. आणि त्यांना वीरशैवमहासभेच्या घटकांतच आपण वावरतों असें सहज वाटूं लागेल. ह्या योगानें वीरशैवमहासभेचें विराट स्वरूप प्रकट होण्याला सुरुवात होईल. रायचूरमहासभेचे सुज्ञ प्रतिनिधी, योग्य कर्णधार, आणि यंदाच्या महासभेचे ना. कंवळीसारखे अध्यक्ष, आमच्या ह्या सूचनेचा विचार करतील अशी आम्हाला आशा आहे.

## लिंगधारणा व द्विजत्व

अशा प्रकारें मूळ घटनेचा एक अत्यंत महत्वाचा प्रश्न सोडविल्यावर सर्व वीरशैवमात्रांत एकच एक भावना सदासर्वदा खेळवीत ठेवण्याचा उद्योग करणें हें एक अत्यंत महत्वाचें कार्य आहे. वीरशैवांतील आचार्य-विरक्त ह्या वर्गापासून तों शरणांतील शरण ह्या वर्गापर्यंत सारेच प्रथम जन्मतःच लिंगधारणदीक्षेचे संस्कार करून घेतात. अर्थात् लिंगधारणदीक्षेचा हा जन्मतःच पहिला संस्कार सर्व वीरशैवांना होत असल्यामुळे हा संस्कार झालेला प्रत्येक वीरशैव हा सर्वत्र पसरलेल्या वीरशैवसमाजाचा खरा मूळ घटक होय. ह्या घटकांतूनच शरण, भक्त, प्रासादिक, माहेश्वर, आचार्य व विरक्त असे उत्पन्न होतात. हा लिंगधारणदीक्षेचा संस्कार ज्यांना होत नाही ते सर्व लिंगायतेतर वा वीरशैवेतर हे वीरशैवशास्त्रदृष्ट्या शुद्र होत. जन्मतः जें नैसर्गिक शुद्रत्व येतें तें लिंगधारणदीक्षेच्या संस्कारानें जातें व स्त्री-पुरुष असा भेद न करितां लिंगधारणदीक्षेच्या संस्कारानें सर्व वीरशैवांस द्विजत्व प्राप्त होतें, असा वीरशैवधर्मशास्त्राचा नियम आहे. आणि लिंगधारणदीक्षा जन्मतःच देण्याची वहिवाट सर्वत्र सुरू आहे. हिंदुकायद्यानें जे त्रैवर्णिक गणले जातात त्यांच्यांत आठव्या वर्षानंतर मुंजीचा संस्कार होतो. परंपरेनें हा संस्कार ज्यांना होतो ते सर्व वहिवाटीमुळें हिंदुकायद्यानें त्रैवर्णिकांत घातले. पण जन्मतःच लिंगधारणदीक्षेच्या संस्कारानें ज्यांना सहजगत्या द्विजत्व येतें ते मात्र हिंदुकायद्यानें शूद्रांत घातले. मग तो माहेश्वर असो वा भक्त असो, तो दीक्षवंत असो वा ककयापंथीय शरण असो. ह्या सर्वच लिंगधाऱ्यांची गणना हिंदुकायद्यानें शूद्रांत होते. ह्याचें कारण एकच आणि तें हें कीं, आपणाला जे धर्मसंस्कार जन्मतः होतात ते कां होतात ह्याची आपल्याला जाणीव नाही. म्हणून ही जाणीव सर्व वीरशैवांना करून देण्याचा उद्योग महासभेच्या व्यासपीठावरून झाला पाहिजे. आमच्या भागांत रोहीणखेड येथे जी वीरशैव प्रांतिक परिषद् भरली तिने नंबर दोनचा ठराव पास केला आहे. महासभेचे, तिच्या अध्यक्षाचे, व स्वागताध्यक्षाचे लक्ष ह्या ठरावाकडे जावें व त्यावर त्यांनी आपलें मत प्रगट करावें अशी आमची इच्छा आहे.

> पुढील अंकीं
> 'सुदर्शन'-च्या बसव-अंकाचें
> **समालोचन**
> हा अग्रलेख प्रसिद्ध होईल.

## द्विजत्वाच्या प्रसारांतील मर्म

आम्हाला तर असें वाटतें कीं, वीरशैवमहासभेनें जर ह्या ठरावाला चालना दिली तर खोटे मतभेद, पक्षभेद, वा तूं श्रेष्ठ कीं कनिष्ठ अशा क्षुद्र भावना बळावत जाऊन वीरशैवसमाजाच्या मूळ एकीकरणाच्या शुद्धभावनेस जी कीड लागलेली प्रत्ययास येते ती कीड आपोआप निघून जाईल. आणि सर्व वीरशैवमात्रास द्विज म्हणून पुन्हा एका माळेंत घातल्याचें पुण्य लाभेल. लिंगधारणदीक्षेच्या संस्कारानें प्रथम द्विजत्व लाभल्यावाचून शरणास-शरण होतां येत नाही, दीक्षावंतास दीक्षवंत होतां येत नाही, शीलवंतास

शीलवंत होतां येत नाही, माहेश्वरास माहेश्वर होतां येत नाही, आचार्यास आचार्यपीठ घेतां येत नाही, व विरक्तास विरक्तपीठ लाभत नाही. ह्याकरिता सर्वांना आपल्या मूळ स्वरूपाची द्विज-शब्दाने जाणीव करून देणें हें सर्वांत महत्वाचें कार्य आहे व त्याकरिता सर्वांना एका व्यासपीठा-वर आणलें तर हे सर्व एक असल्याचें प्रत्ययास येईल. सर्व लिंगधाऱ्यांत प्रसंगी रोटीबेटीव्यवहार रूढ होऊन सर्वांचें एकीकरण घडवून आणावयाचें असलें तर त्याचें पहिलें बीज, त्यांच्या ठिकाणी द्विजत्वाची शास्त्रशुद्ध भावना जागृत करणे ह्यांत आहे. शिवसृष्टींतील हें द्विजत्व पटलें, त्यांतील निरनिराळ्या दीक्षासंस्कारांनी होणारें वर्णत्व वा आश्रमत्व एकदा पटलें, ह्मणजे प्रत्येक वीरशै-वाच्या घटकास आपलें मूळ स्वरूप कळलें असें होईल. आणि हें मूळस्वरूप कळल्यावर जी जी सुधारणा परिस्थितिनुसार आपण करूं ती सर्व लिंगधाऱ्यांची सुधारणा होईल. ज्याला स्वतः सुधारावयाचें नाही तर स्वतःबरोबर स्वतःचा समाज सुधारावयाचा आहे त्याला स्वतःच्या समाजाचें मूळस्वरूप कळलेंच पाहिजे व त्याच्यासह सुधार-ण्याचा संकल्प केला पाहिजे. नव्या सर्वच आधुनिक सुधारणांचें बीज आमच्या समाजरचनेंत आहे. पण त्याची आह्मांला जाणीव नाही.त्याच्या वहिवाटींतील अर्थहि कळले नाहीत.ह्मणून हिंदु-कायद्यांत क्षुद्र वाचा डाग लिंगधाऱ्यांना जो लागला तो काढावयाचा अस-ल्यास संस्कार व वहिवाट ह्याचा इतिहास नमूद कर-णारें एक कमिशन चार वकीलांचे व चार शास्त्र्यांचें अखिल वीरशैवांत महासभेने फिरवावें. त्यांनी साक्षी घ्याव्यात आणि एक रिपोर्ट कानडी, तेलगू, मराठी,अशा तीन भाषांतून प्रसिद्ध करावा. ह्या रिपो-र्टांत धर्मशास्त्र,संस्कार, व वहिवाट, ह्यांची संगति लावलेली असावी. त्याला अनुरूप लिंगायतांच्या हक्कवारशाचे व दत्तकाचे निकाल हिंदुमधील वीरशैवांची स्वतंत्र वहिवाट व संस्कार ह्मणून द्विज ह्या नात्याने लागेल अशी खबरदारी सर्वत्र घेतली जावी. ह्मणजे कायद्याने लागलेला शुद्रत्वाचा कलंक निघून जाईल. करिता लिंगधाऱ्यांचें द्विजत्व प्रस्था-पनेची चळवळ महासभेनेच हातीं घेणें व ह्याकरिता सर्व धर्माधिकाऱ्यांत एकीकरण प्रस्थापित करणें अवश्य झालें आहे.ह्मणून धार्मिक व सामा-जिक दृष्टीने द्विजत्वाच्या जाणीवेचा प्रश्न हातीं घेणें अवश्य झालें आहे.

## धर्मगुरुच्या मठाच्या सुधारणा

ह्यानंतर मठाच्या सुधारणेचा प्रश्नहि हातीं घ्यावा. बालब्रह्मचारीच मठाधिकारी बनविण्यापेक्षा योग्य विवाहित गृहस्थाश्रमी वा चौथा आश्रम खुषीने घेतलेला विद्वान् व विनयशील पुरुषाला हा हक्क विरक्तांनी व पंचाचार्यांनी द्यावा असें लोकमत जागृत करणें अवश्य आहे. तद्वतच मठ ही संस्था सार्वजनिक असल्यामुळे तो कोणी गहाण ठेवूं शकत नाही व विकूंहि शकत नाही. त्याचप्रमाणे कोणी गहाण घेतल्यास व विकत घेतल्यास तें रद्द ठरेल असे उद्योग होणें व तो उद्योग करणारांना उत्तेजन देणें जरूर आहे. ह्मणून महासभेने मठसुधारणेबावतहि आपले विचार प्रगट करूं लागले पाहिजे. तद्वतच आचार्य व विरक्त ह्या वादामुळे कलह उत्पन्न होऊं लागला तो बंद पडेल इकडेहि महासभेने लक्ष दिलें पाहिजे. कांही प्रमुख विरक्तपीठांना आणि आचार्यपीठांना आडव्या पालखीचे हक्क आहेत. त्या हक्कांचें संरक्षण करणें वीरशैव ह्मणून प्रत्येक वीरशैव घटकांचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य आजच्या स्थितींत पार पाडावयाचें असलें तर हा आडव्या पालखीचा वा दिवसा मशालीचा हक्क पूर्वापार पुरुषांनी आपल्या पराक्रमाने मिळविलेला असतो हें त्यांच्या आजच्या वंशजास कळावयाला पाहिजे. त्यांना हें कळत नसलें तर महासभेसारख्या संस्थेने त्यांना आज ही गोष्ट समजून द्यावयाला पाहिजे. ती कशी समजून द्यावयाची ? तर जेथे आडव्या पालखीची मिरवणूक निघेल तेथे त्या पालखींतून मूळ गुरुच्या पादुका वा प्रतिमाच मिरवली जावी. आजच्या वंशजांनी मात्र सन्मानाने सदर पालखीच्या मागे सर्वांच्या आघाडीवर चालावें परंतु ह्या वंशजाने त्या पालखींत मात्र बसूं नये एवढा निर्बंध पाळावा. ह्या निर्बंधाची महासभेने प्रस्तुतच्या सर्व महास्वामींना जाणीव करून दिली ह्मणजे प्रस्तुतच्या वादाला सहजगत्याच नेमस्त स्वरूप येऊं लागेल. ह्मणून मठ संस्थांच्या बाबतींत महासभेने वरील सुधारणा सुचविणें आज जरूर झालें आहे, व रायचूरमहासभा हें कर्तव्य पार पाडील असा आह्मांला भरवसा आहे.

---

# निजाम प्रांतीय वीरशैव परिषद् उदगीर

## (आमच्या खास बातमीदारांकडून)

उदगीर हे निजामप्रांतांत ८-१० हजार लोकवस्तीचें तालुक्याचें ठिकाण आहे व तेथे जवळ जवळ १ हजार लिंगायत वस्ती आहे. निजामप्रांतांत धार्मिक व सामाजिक अशा सार्वजनिक स्वरूपाच्या चळवळीची जीं कांहीं ४-५ ठिकाणें आहेत त्यांपैकी उदगीर हेंहि एक प्रमुख स्थान आहे. तेथे आर्यसमाजाची चळवळ बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सुरुं आहे. तसेंच,श्री. सिद्रामआप्पा हायकोर्ट वकील, प्रभुराव वकील,वगैरे लिंगायत कार्यकर्त्यांच्या प्रेरणेने वीरशैवसमाज स्थापन होऊन संघटनेच्या दृष्टीने फारच मोठ्या प्रमाणांत चळवळ सुरुं आहे. अर्थातच त्यांचे धक्के इतर समाजांना, विशेषतः आर्यसमाजाला बसल्यामुळे त्यांनी आपल्या चळवळीच्या धोरणांत थोडीशी चढाईच्या स्वरूपाची अशी निराळीच दिशा पत्करली आहे, व गेल्या १२ वर्षांत वीरशैवधर्म, त्याचे प्रसारक श्री. बसवेश्वर, वगैरे सत्पुरुषांबद्दलहि अवास्तव गोष्टींनी भरलेल्या जाहिरातीचा व सभांचा सारखा सुळसुळाट झाला होता. व वीरशैवधर्मानुयायी तरुण मुलांना आर्यसमाजाची दीक्षा देणें वगैरे प्रकारहि अशांत सुरुं झाले होते. अर्थातच ‘ क्रिया तेथें प्रतिक्रिया ’ ह्या न्यायाने ‘ वीरशैवसमाज ’ ह्या न्यायाने ‘ वीरशैवसमाज ’ ह्यामुळे खडबडून जागा झाला व ह्याला सांघिक उत्तर देण्याच्या दृष्टीने निजामप्रांतीय आखिल वीरशैवांची संघटना करण्याच्या तो जारीने तयारीस लागला व ह्यांतच इतर प्रांतस्थ वीरशैवांच्या संघटनेच्या साखळींत आपलाहि दुवा जोडून द्यावा व अखिल भारतीय वीरशैवांच्या संघटनेंतील आपलेंहि स्थान ओळखून त्याप्रमाणे एक घटक ह्या नात्याने कार्य करण्याची तयारी असल्याची जाहीर घोषणा करण्याकरिता “ निजामप्रांतीय वीरशैव परिषद् ” उदगीर येथें बोलाविण्यांत आली होती. त्याबरोबरच ता० २४ रोजीं उदगीर-वीरशैवसमाजाचा वार्षिकोत्सव व बसवेश्वरजयंतीउत्सव हेहि उत्सव होतेच. ह्या प्रसंगाकरिता कर्नाटकचे पुढारी व ‘ शरणसंदेश ’ चे संपादक देशभक्त मंजाप्पा अण्णा हर्डीकर यांना अध्यक्ष म्हणून वीरशैव प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष म्हणून महाराष्ट्रीय वीरशैवांचे पुढारी दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनाहि आग्रहाचें निमंत्रण होतें.परिषदेचे नियोजित अध्यक्ष दे. भ. नानासाहेब बामणगांवकर हे श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., ह्यांचेसह उदगीर स्टेशनवर ता. २४-४-३६ रोजी सकाळी ११॥ वाजतां येऊन पोंचतांच ‘ वीरशैवधर्मकी जय ’ ह्या ‘ जयघोषांत ’ श्री. प्रभुराव वकील व स्वागतमंडळांचे सभासद व इतरहि ३००-४०० शें लिंगायत मंडळींनी स्वागत केलें. व हार वगैरे घालून सत्कार केल्यावर स्टेशनपासून अध्यक्षांचे निवासस्थानापर्यंत मिरवणूक काढण्यांत आली होती. ता. २३ ते २७ पर्यंत उदगीरांत. वीरशैवसमाजाच्या ह्या उत्सवानी गांवांत खूपच खळबळ उडवून दिली होती. दोन्ही पुढाऱ्यांचीं प्रसंगोचित उत्साहवर्धक व माहितीपूर्ण भाषणें झालीं. निजामस्टेटमधील बहुतेक सर्व शहरांतून व खेड्यांतून प्रमुख लिंगायत परिषदेला आलेले होते. जवळ जवळ ३-४ हजार लिंगायत पुरुष २-३शे स्त्रिया परिषदेला हजर होत्या. परिषदेंत निजाम प्रांतीय वीरशैवांचे सर्वांगीण उन्नतीचे व संघटणेच्या दृष्टीने ८ उपयुक्त ठराव पास करण्यांत आले. वीरशैवसंघ प्रांतभर स्थापन करणे; वीरशैवांचे करिता एक वर्तमानपत्र काढणें, वीरशैव विद्यार्थ्यांकरितां वसतिगृह काढणे, वीरशैव धर्मज्ञानप्रसाराकरितां प्रचारक नेमणे, बसवजयंतिदिन म्हणून अक्षयतृतियेच्या दिवशी निजाम संस्थानांत

सार्वत्रिक सुट्टी देण्याविषयीं सरकारांस विनंती वगैरे व इतरहि महत्वपूर्ण ठराव पास झाले. परिषदेला वीरशैव तरुणसंघ गुलबर्गा ह्यांतील कार्यतत्पर व धडाडीच्या तरुणांनीं हजर राहून परिषदेंत चैतन्य निर्माण झालें होतें. विशेषतः परिषदेचे नियोजित अध्यक्ष दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचेबरोबर वऱ्हाडांतून आलेले वीरशैव-संजीवनीचे नवमतवादी लेखक व कार्यकर्ते श्री. बाबुराव चौधरी बी.ए. ह्यांनी आपल्या नवमतवादी विचारांनी बरीच खळबळ उडवून दिली होती, व ह्यांना मंडळींनी आग्रह करून ३ व्याख्याने द्यावयास लाविलीं. वीरशैवसंजीवनीचाहि बराच प्रसार झाला. व ह्या उद्बोधक व्याख्यानाचा इकडील लिंगायतांवर व विशेषतः तरुण लिंगायत मंडळींचेवर बराच परिणाम झाला. त्यांनी निजाम-स्टेटमधे श्री. चौधरी ह्यांचें नवमतवादी विचार-प्रसाराचें कार्य करण्याची हमी घेतली, व विशेषत: 'वीरशैवतरुणसंघ गुलबुर्गा' ह्यांनी त्या दिशेने प्रचारकार्यहि सुरु केलें. ता. २७ रोजी परिषदेचें कार्य आटपून दे. भ. नानासाहेब बामणगांवकर व श्री. बाबुराव चौधरी हे हैद्राबादमार्गाने वऱ्हाडांत यावयास निघाले असतांना स्टेशनवर 'वीरशैव-धर्मकी जय' ह्या घोषांत प्रेमाने निरोप द्यावयास ३००-४०० शे लिंगायत मंडळी जमली होती. स्टेशनवर दोघांनाहि हार घालून मंडळींनी पुढील वर्षाचें आमंत्रण देऊन निरोप दिला.

# वीरशैवांतील चळवळी

### श्री. जै. वि. कुरझडकर

नागपूर लॉ कॉलेजच्या अन्त्य एल एल. बी.च्या वर्गांत असलेले तरुण लिंगायत विद्यार्थी श्री. जै. वि. कुरझडकर हे वकीलीची अखेरची परीक्षा पास झाले ह्याबद्दल आम्ही त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों व त्यांचे धंद्यांत त्यांना यश चिंतितों.

### हायस्कूल-एन्ट्रन्स पास

कु. रत्नावती मल्लाप्पा कुन्हे:—अमरावती येथील प्रसिद्ध लिंगायत पुढारी श्रीमंत मल्लाप्पा विराप्पा कुन्हे ह्यांची कन्या व येथील गर्ल्स हायस्कूल मधील एकटीच लिंगायत विद्यार्थिनी कु. रत्नावती कुन्हे तसेच अमरावती येथील दहिसार्थींतील दादा वैद्य, आयुर्वेदिक दवाखान्याचे चालक, श्रीयुत शिवरुद्राप्पा वैद्य ह्यांची कन्या कु. इंदिरा वैद्य ह्याहि खानगीरित्या हायस्कूल-एन्ट्रन्स-परीक्षा पास झाल्या. ह्या उभय कुमारिकांना लाभलेल्या यशाबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. आणि वरील दोन्ही यशस्वी वीरशैव विद्यार्थिनींनी आपला अभ्यासक्रम एवढ्यांतच न आटोपतां कमीत कमी मॅट्रिक पास व्हावें असें आम्ही इच्छितों.

### अमरावती

वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळातर्फे सालाबादप्रमाणे यंदाहि बसवेश्वरचौकांत शुक्रवार तां. २४-४-३६ रोजी रात्रौ ८॥ वाजता बसवजयंति उत्सव मोठ्या थाटांत साजरा झाला. यंदाच्या उत्सवाचें विशेष म्हणजे नागपूरचे प्रसिद्ध देशभक्त व वीरशैव पुढारी राजाभाऊ डांगरे ह्यांची अध्यक्षस्थानीं योजना हें होय. दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांचें बसवचरित्रावर अत्यंत मननीय व महत्वपूर्ण असें अध्यक्षीय भाषण झालें. ह्याशिवाय 'सुबोध माला'कार श्री. काशिरावबापु देशमुख श्री. त्रिंबकआप्पा कापुसकर, नागोराव कोल्हे, परभणीचे गणपतआप्पा कापशे, वगैरे वक्त्यांचींहि प्रसंगा[illegible] भाषणें झालीं व एकंदर कार्यक्रम यशस्वी [illegible] पार पडला. तसेच, येथील नवीनच [illegible] आलेल्या वीरशैव-प्रेमसंवर्धन मंडळाचेहि [illegible] फकिराप्पा हेगु ह्यांचे अध्यक्षतेखाली बसव[illegible] उत्सव साजरा केला. त्या प्रसंगीं श्रीमंत [illegible] कुन्हे, श्री. काशिरावबापु देशमुख, 'सुबोधमाला[illegible]' श्री. विश्वनाथआप्पा आवंके, श्री. [illegible] हेगु, वगैरे वक्त्यांचीं प्रसंगोचित भाषणें झा[illegible] उत्सव आनंदाने पार पडला.

### पंढरपुर येथील मठसंस्थानः—

पंढरपूर येथील मठसंस्थानांतील व्यवस्[illegible] गैरवर्तनामुळे मठसंस्थानाचा कारभार बरोब[illegible] नाही. म्हणून मठसंस्थान हें व्यवस्थापकाचे [illegible]तून काढून घेऊन पंचांचे ताब्यांत देण्यां[illegible] असा बरेच दिवसांपासून पंढरपूरचे वी[illegible] कोर्टांत दावा सुरू केला होता, व त्याज[illegible] त्यांचे मनाप्रमाणेच निकाल लागला. मठसं[illegible] वैयक्तिक मालमत्ता नसून ती सार्वजनिक [illegible] आहे व प्रसंगीं दुर्वर्तनी मठाधीशालाहि [illegible] काढून टाकण्याचा वीरशैवांना हक्क आहे [illegible] प्रयत्न करून यशस्वी निकाल लावून घेत[illegible] व मठसंस्थाने हीं ' सार्वजनिक मालमत्ता' हें तत्व कोर्टांतून सिद्ध केल्याबद्दल आम्ही [illegible]पूरच्या वीरशैवांचें अभिनंदन करतों. [illegible]कडील वीरशैव कधी जागे होणार !!!

—हुबळी येथे ता. २८-२९ मे रोजी वीरशैव परिषद् भरणार असल्याचें कळतें.

—अखिल भारतीय वीरशैव-परिषद [illegible] येथे ता. २ व ३ जुन रोजी दिवाण बहादूर [illegible] कंबळी शिक्षणमंत्री, मुंबई सरकार, ह्यांचे [illegible]खाली भरण्याचें निश्चित झालें आहे.

लघुकथा ९ वी.



# भावना आणि व्यवहार

लेखकः-- त्रिवेणितनय

मूर्ख कोठला; ह्मणे मुलगी पसंत नाही.– शिक्षणामुळं मुलं बिघडतात हेंच शवटी खरं आहे ! तें कांही नाही. शंकरआप्पा! बाळासाहेबांना ह्मणावं कीं त्याला देशमुखाच्या सुशिलेशींच लग्न करावं लागेल, मुर्खाला अजून व्यवहार कळत नाही ! ! ”

‘पण नानासाहेब, ‘सुशिला पसंत नसतांना तिच्याशीं लग्न करून आयुष्याचं नुकसान कां करून घेऊं व पसंतीच्या अभावीं तिच्यावर प्रेमहि बसणं शक्य नाही’ असं बाळासाहेबांचं म्हणणं आहे.’

तुह्मी मूर्ख आहांत. शंकरआप्पा, त्या कारट्यासारखं तुमचंहि डोकं फिरलेलं दिसतं ! वडील माणसं कांही करतात तें काय मुलाचं नुकसान व्हावं ह्मणून करतात वाटतें—अनुभव नाही ह्मणतात तो असा ! काय संबंध आहे हो लग्नाचा अन् पसंति ना पसंतीचा ? शंकरआप्पा, आमचं हें पांचव कुटुंब आहे ! आमचे अण्णाच पहावयाला गेले होते—त्यांनी सांगितलं ‘नाना लग्नाला तयार हो !’ आह्मी डोळे मिटून निमूट तयार झालों. कधी तक्रार नाही कीं कुरकुर नाही. आमच्या मागच्या दोन कुटुंबांना तर लग्न होईपर्यंत मींच काय पण घरांतील कुणाहि माणसानं पाहिलं नव्हतं—सारं पत्रोपत्रीं काम झालं. आपला हुमनाबादचा अडत्या आहे ना, त्यानंच हें सारं परभारें जुळविलं आणि आह्मी ऐन वेळेवर बोहल्यावर हजर ! अरे वडिलांनाहि कांही मान आहे कीं नाही ? ह्मणे प्रेम बसणार नाही ! — काय संबंध आहे हो प्रेमाचा नी लग्नाचा ? प्रेम नसल्यामुळं कुणाचे संसार का अडले आहेत ? आमचा तरी कुठं मोठा प्रीतिविवाह झाला होता ह्मणून बाळासाहेबांचा व त्यांच्या पाठीवरल्या ७–८ मुलांचा जन्म त्यामुळं अडून राहिला होता काय ? – तें कांही नाही. बाळासाहेबांना आह्मी शिक्षण दिलं तें कांही उलट उत्तर ऐकून घेण्याकरितां नव्हे –– “शिक्षणानें मुलं बिघडतात हेंच खरं. मग तीं मुलं असोत कीं मुली असोत. ह्मणे आह्माला शिकलेली बायको पाहिजे—शंकरआप्पा, शिक्षणाचा व संसाराचा काडीइतका तरी संबंध आहे कां ? अहो आमच्या हिला धुळाक्षरं येत नाहीत–धुळाक्षरं ! ह्मणून आमच्या संसाराचा गाडा कुठं थांबला काय ? –– ते कांही नाही. हा सगळा शिक्षणाचा परिणाम ! सुशिलेला काय नाक नाही कीं डोळे नाही ! कीं ती लंगडी लुली आहे ? काय व्यंग आहे हो सुशिलेंत ? शंकरआप्पा, बाळासाहेबाला निक्षून सांगा कीं त्याला सुशिलेशींच लग्न करावं लागेल. ह्या बाबतींत त्याचं आह्मी कांहीच ऐकणार नाही.”

× × ×

नानासाहेब हे सोलापुरांतील एक घरंदाज व श्रीमान् गृहस्थ होते, व बाळासाहेब हे त्यांचे

# वीरशैवांतील चळवळी

### श्री. जै. वि. कुरझडकर

नागपूर लॉ कॉलेजच्या अन्त्य एल एल. बी.च्या वर्गांत असलेले तरुण लिंगायत विद्यार्थी श्री. जै. वि. कुरझडकर हे वकीलीची अखेरची परीक्षा पास झाले ह्याबद्दल आह्मी त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों व त्यांचे धंद्यांत त्यांना यश चिंतितों.

### हायस्कूल-एन्ट्रन्स पास

कु. रत्नावती मल्लाप्पा कुन्हेः—अमरावती येथील प्रसिद्ध लिंगायत पुढारी श्रीमंत मल्लाप्पा विराप्पा कुन्हे ह्यांची कन्या व येथील गर्ल्स हायस्कूल मधील एकटीच लिंगायत विद्यार्थिनी कु. रत्नावती कुन्हे तसेच अमरावती येथील दहिसार्थीतील दादा वैद्य, आयुर्वेदिक दवाखान्याचे चालक, श्रीयुत शिवरुद्राआप्पा वैद्य ह्यांची कन्या कु. इंदिरा वैद्य ह्याहि खानगीरित्या हायस्कूल-एन्ट्रन्स-परीक्षा पास झाल्या. ह्या उभय कुमारिकांना लाभलेल्या यशाबद्दल आह्मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. आणि वरील दोन्ही यशस्वी वीरशैव विद्यार्थिनींनी आपला अभ्यासक्रम एवढ्यांतच न आटोपता कमीत कमी मॅट्रिक पास व्हावें असें आह्मी इच्छितों.

### अमरावती

वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळा-तर्फे सालाबादप्रमाणे यंदाहि बसवेश्वरचौकांत शुक्रवार तां. २४-४-३६ रोजी रात्रौ ८॥ वाजता बसवजयंति उत्सव मोठ्या थाटांत साजरा झाला. यंदाच्या उत्सवाचें विशेष ह्मणजे नागपूरचे प्रसिद्ध देशभक्त व वीरशैव पुढारी राजाभाऊ डांगरे ह्यांची अध्यक्षस्थानीं योजना हें होय. दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांचें बसवचरित्रावर अत्यंत मननीय व महत्वपूर्ण असें अध्यक्षीय भाषण झालें. ह्याशिवाय 'सुबोध माला'कार श्री. काशिरावबापु देशमुख श्री. त्रिंबकआप्पा कापुसकर, नागोराव कोल्हे, परभणीचे गणपतआप्पा कापशे, वगैरे वक्त्यांचींहि प्रसंगा[nu] भाषणें झालीं व एकंदर कार्यक्रम यशस्वी रीतीने पार पडला. तसेच, येथील नवीनच काढ[ण्यात] आलेल्या वीरशैव-प्रेमसंवर्धन मंडळानेहि [श्री.] फकिराप्पा हेगु ह्यांचे अध्यक्षतेखाली बसवजं[यंति] उत्सव साजरा केला. त्या प्रसंगीं श्रीमंत म[ल्लाप्पा] कुन्हे, श्री. काशिरावबापु देशमुख, 'सुबोधमाला'[कार] श्री. विश्वनाथआप्पा आवंके, श्री. करवीर[प्पा] हेगु, वगैरे वक्त्यांचीं प्रसंगोचित भाषणें झाल[ीं व] उत्सव आनंदाने पार पडला.

### पंढरपुर येथील मठसंस्थानः—

पंढरपूर येथील मठसंस्थानांतील व्यवस्था[पकाच्या] गैरवर्तनामुळे मठसंस्थानाचा कारभार बरोबर [चालत] नाही. म्हणून मठसंस्थान हें व्यवस्थापकाचे ता[ब्यां]तून काढून घेऊन पंचांचे ताब्यांत देण्यांत [यावें] असा बरेच दिवसांपासून पंढरपूरचे वीर[शैवांनी] कोर्टांत दावा सुरू केला होता, व त्याचा [नुकताच] त्यांचे मनाप्रमाणेच निकाल लागला. मठसंस्था[न ही] वैयक्तिक मालमत्ता नसून ती सार्वजनिक मा[लमत्ता] आहे व प्रसंगीं दुर्वर्तनी मठाधीशालाहि गा[दीवरून] काढून टाकण्याचा वीरशैवांना हक्क आहे [असा] प्रयत्न करून यशस्वी निकाल लावून घेतल[ा] व मठसंस्थाने हीं ' सार्वजनिक मालमत्ता [आहे] ' हें तत्व कोर्टांतून सिद्ध केल्याबद्दल आह्मी [पंढर]पूरच्या वीरशैवांचें अभिनंदन करतों. [इक]डील वीरशैव कधी जागे होणार !!!

—हुबळी येथे ता. २८-२९ मे रोजी वीरशैव परिषद् भरणार असल्याचें कळतें.

—अखिल भारतीय वीरशैव-परिषद [...] येथे ता. २ व ३ जुन रोजी दिवाण बहादुर [...] कंबळी शिक्षणमंत्री, मुंबई सरकार, ह्यांचे अ[ध्यक्षते]खाली भरण्याचें निश्चित झालें आहे.

लघुकथा ५ वी.



# भावना आणि व्यवहार

लेखकः-- त्रिवेणितनय

"मूर्खं कोठला; ह्मणे मुलगी पसंत नाही.– शिक्षणामुळं मुलं बिघडतात हेंच शेवटी खरं आहे ! तें कांही नाही. शंकरआप्पा! बाळासाहेबांना ह्मणावं कीं त्याला देशमुखाच्या सुशिलेशींच लग्न करावं लागेल, मुर्खाला अजून व्यवहार कळत नाही ! !"

'पण नानासाहेब, 'सुशिला पसंत नसतांना तिच्याशीं लग्न करून आयुष्याचं नुकसान कां करून घेऊं व पसंतीच्या अभावीं तिच्यावर प्रेमहि बसणं शक्य नाही' असं बाळासाहेबांचं म्हणणं आहे.'

तुह्मी मूर्ख आहांत. शंकरआप्पा, त्या कारव्यासारखं तुमचंहि डोकं फिरलेलं दिसतं ! वडील माणसं कांही करतात तें काय भुलावं नुकसान व्हावं ह्मणून करतात वाटतें–अनुभव नाही ह्मणतात तो असा ! काय संबंध आहे हो लग्नाचा अन् पसंति ना पसंतीचा ? शंकरआप्पा, आमचं हें पांचव कुटुंब आहे ! आमचे अण्णाच पहावयाला गेले होते–त्यांनी सांगितलं 'नाना लग्नाला तयार हो !' आह्मी डोळे मिटून निमूट तयार झालों. कधी तक्रार नाही कीं कुरकुर नाही. आमच्या मागच्या दोन कुटुंबांना तर लग्न होई पर्यंत मींच काय पण घरांतील कुणाहि माणसानं पाहिलं नव्हतं—सारं पत्रोपत्रीं काम झालं. आपला हुसनाबादचा अडत्या आहे ना, त्यानंच हें सारं परभारें जुळविलं आणि आह्मी ऐन वेळेवर बोहल्यावर हजर ! अरे वडिलांनाहि कांही मान आहे कीं नाही ? ह्मणे प्रेम बसणार नाही ! — काय संबंध आहे हो प्रेमाचा नी लग्नाचा ? प्रेम नसल्यामुळं कुणाचे संसार का अडले आहेत ? आमचा तरी कुठं मोठा प्रीतिविवाह झाला होता ह्मणून बाळासाहेबांचा व त्यांच्या पाठीवरल्या ७–८ मुलांचा जन्म त्यामुळं अडून राहिला होता काय ? – तें कांही नाही. बाळासाहेबांना आह्मी शिक्षण दिलं तें कांही उलट उत्तर ऐकून घेण्याकरितां नव्हे -- "शिक्षणानें मुलं बिघडतात हेंच खरं. मग तीं मलं असोत कीं मुली असोत. ह्मणे आह्माला शिकलेली बायको पाहिजे—शंकरआप्पा, शिक्षणाचा व संसाराचा काडीइतका तरी संबंध आहे कां ? अहो आमच्या हिला धुळाक्षर येत नाहीत–धुळाक्षरं ! ह्मणून आमच्या संसाराचा गाडा कुठं थांबला काय ? -- ते कांही नाही. हा सगळा शिक्षणाचा परिणाम ! सुशिलेला काय नाक नाही कीं डोळे नाही ! कीं ती लंगडी लुली आहे ? काय व्यंग आहे हो सुशिलेंत ? शंकरआप्पा, बाळासाहेबाला निक्षून सांगा कीं त्याला सुशिलेशींच लग्न करावें लागेल. ह्या बाबतींत त्याचं आह्मी कांहीच ऐकणार नाही."

× × ×

नानासाहेब हे सोलापूरांतील एक घरंदाज व श्रीमान् गृहस्थ होते, व बाळासाहेब हे त्यांचे

एकुलते एक चिरंजिव होते – त्यांच्या पाठीवर झालेली सारी भावंडे कालवश झालीं होतीं, व म्हणून बाळासाहेबांवर आप्पासाहेबांचं साहजिकच फार प्रेम होतं. पण ह्या लग्नविषयक भानगडीमुळें–व मतविरोधामुळे गेल्या ६ महिन्यांपासून बापलेकांत वरकरणी तरी निदान तेढ उत्पन्न झाली होती.

अण्णाराव देशमुखांची सुशिला रूपानें बऱ्यापैकीं व ४ इयत्ता शिकलेली मुलगी होतीं. अण्णारावांना २ च मुली होत्या. पैकी वडिल मुलगी वऱ्हाडांत दिली होती. सुशिला अण्णारावांची दुसरी म्हणजे कनिष्ट मुलगी होती. अण्णारावांचे जवळ बरीचशी " माया " आहे असा सर्वत्र समज होता, व त्यांची स्थावर इस्टेटहि बरीच होती व अण्णारावांचे पश्चात्–अर्थातच ती इस्टेट त्यांच्या दोन मुलींना म्हणजे पर्यायाने जावयाला मिळणार होती.

नानासाहेब लिंगायत पोटजातीपैकी शीलवंत होते तर अण्णाराव पंचम होते व ह्या दोन पोटजातींत अजून बेटीव्यवहार रूढ झाला नव्हता. पंचांत सुशिक्षित वर मिळेना ! व शिलवंत व दिक्षवंत पंच यांशीं सोयरेसंबंध करून आपली सनातनी हाडं बाटवून घ्यावयाला तयार होईनात. आणि ह्यामुळेच दिसावयाला बऱ्यापैकी असूनहि विचाऱ्या सुशिलेच्या लग्नाचा प्रश्न ती उपवर झाली तरीहि लोंबकळतच राहिला होता.

नानासाहेब पुराणमताभिमानी शीलवंत होते व त्यांनादेखील हा संबंध मनांतून पसंत नव्हता. परंतु अण्णारावांच्या इस्टेटीमुळे त्यांच्या तोंडाला पाणी सुटलं होतं व त्यांच्या तोंडांतून " पोटजाती मोडण्याचा सुधारणावाद ' अलीकडे वारंवार बाहेर पडत असे. सुधारणेच्या भावनेच्या तळमळीपेक्षा इस्टेटीच्या फायद्याच्या व्यवहारी दृष्टीने हा ' वस्तुलाभ ' त्यांना बरा दिसत होता.

नानासाहेबांच्या निव्वळ व्यवहारी मनाची व बाळासाहेबांच्या भावनागर्भ तत्वानुयायी मनाची सांगड बसतां बसेना -.

आपल्या आयुष्यांतील भल्या-बुऱ्या प्रसंगांना धैर्यानें व निश्चलमनानें तोंड देणाऱ्या संकटांत न कचरणाऱ्या तसेच आनंदांत गुरफटून न जाणाऱ्या खऱ्या सहचारिणीला - खऱ्या सहधर्मचारिणीला हुडकून काढून तिच्याशींच लग्न करून तिला वैभवाला चढविण्याचा बाळासाहेबांनी मनाशी निश्चय केला होता.

बापलेकांतील ह्या मतभिन्नतेमुळें व त्यामुळे उत्पन्न झालेल्या घरांतील गंभीर वातावरणामुळें–नानासाहेबांचे दिवाणजी—शंकरआप्पा यांची मात्र मोठी केविलवाणी स्थिति झाली होती.

संध्याकाळीं बाळासाहेब फिरून आल्यावर पुन्हां त्यांनी ह्या बाबतींत समज काढण्याच्या उद्देशानें बोलावयाला सुरुवात केली.

" बाळासाहेब नानासाहेब, तुमचे वडील आहेत आणि ते शहाणे आहेत. "

" शंकरआप्पा, नानासाहेब माझे वडील आहेत ही वस्तुस्थिति आहे पण म्हणून ते शहाणे असलेच पाहिजेत असा तुमचा आग्रह कां ? " बाळासाहेब ! म्हणजे नानासाहेब मूर्ख आहेत असं तुमचं म्हणणं आहे काय ? "

" नानासाहेब मूर्ख आहेत असं मी मुळीच म्हणत नाही- व तसा तुम्ही निष्कारण गैरसमज करून घेऊं नका ! माझं म्हणणं एवढंच कीं वडिलकी हें कांहीं शहाणपणाचं मोजमाप नव्हे. ! ! " बाळासाहेब ! नानासाहेब तुमचे जन्मदाते आहेत व जन्मदात्यासंबंधीं अशी भाषा लहानांनी वापरूं नये—ते तुमचे जन्मदाते आहेत व म्हणून शहाणेहि आहेत. "

" दिवाणजी ! जन्मदातृत्व व शहाणपणा ह्यांचा कांही अर्थाअर्थी संबध आहे काय ? शहाणपणाचा संबंध बुद्धीशीं आहे—व जन्मदातृत्वाचा संबंध शरीराशीं आहे. कारण जनावरांनाहि मुलं होतात व त्यांना बुद्धि, व शहाणपण नसतं असं आपणच नाही का म्हणत ! !

आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणे बाप हा मुलांपेक्षां शहाणा असतोच हा सिद्धांत धरून चालल्यास प्रत्येक जन्म घेणारा मुलगा जन्म देणाऱ्या बापापेक्षां मूर्ख असलाच पाहिजे असा सिद्धांत झाला, व ह्या सिद्धांताप्रमाण प्रत्येक पिढीहि बौद्धिक अधोगतीकडे ऱ्हासाकडे जात आहे असेंच ह्मणणं भाग आहे. पण वस्तुस्थिति तर ह्या सिद्धांताच्या अगदीच उलट आहे. इतर बाबतींतील प्रश्न जरी अजून वादग्रस्त असले तरी जग हें बौद्धिक प्रगतीच्या मार्गावर आहे—प्रत्येक पिढी गेल्या पिढीपेक्षा अधिक बुद्धिमान् व शहाणी ठरत आहे—हा नियमच नव्हे तर ही अनुभवसिद्ध वस्तुस्थिति आहे.

## उदगीर खास अंक

रोहिणखेड येथे ता. १९-४-३६ रोजी भरलेल्या महत्वपूर्ण परिषदेची राहिलेली हकिकत देण्याकरिता तसेंच निजामप्रांतीय वीरशैव परिषद् व वीरशैव समाजाचा वार्षिकोत्सव व इतरहि महत्वपूर्ण हकिकती प्रसिद्ध करण्याकरता वीरशैवसंजीवनीचा 'उदगीर खास अंक' काढावयाचें घाटत आहे. व जमल्यांस ता. १-६-३६ रोजीच 'उदगीर खास अंक' प्रकाशित होईल. तरी परिषदेस हजर राहिलेल्या निजामप्रांतीय वीरशैव बंधूंनी 'लेखकास सूचना' मधील नियम लक्षांत ठेवून त्यांना माहिती असलेली व प्रसिद्धीस योग्य अशी माहिती लेखांच्या द्वारे शक्य तितक्या लौकर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक,:— वी. सं.

"बाळासाहेब ह्या भलत्याच वादांत मला गरिबाला काय कळत व त्यांत मला पडावयाचेंहि नाही. मी आपल्या लग्नाविषयी विचारावयाला नानासाहेबांनी सांगितलं म्हणून आलों आहें. देशमुखांची सुशिला दिसावयाला सुंदर आहे. त्यांतून ४ वर्ग शिकलेली आहे, व पुन्हा अण्णाराव आपल्यापेक्षा थोडेसे कनिष्ट पोटजातींतील असल्यामुळे तुमच्या वडिलाचा ह्या लग्नामुळ सुधारकाग्रणी ह्मणून मोठा बोलबाला होईल, व उत्तम वस्तुलाभाबरोबरच द्रव्यलाभहि कांही थोडा थोडका नाही. सुशिला ही अण्णारावांची कनिष्ठ व आवडती कन्या! अण्णारावांना दोन मुलींखेरीज एवढ्या मोठ्या इस्टेटीला जवळपास कुणीच वारस नाही. तेव्हा बाळासाहेब! थोडासा व्यवहारहि पाहिला पाहिजे!!

"शंकरआप्पा, सुशिला ४ वर्ग शिकली आहे हें मला कबूल आहे पण ४ वर्गांचें शिक्षण ह्मणजे कांही खरं शिक्षण नव्हे. खरं शिक्षण तेंच कीं जे आचारविचारांत क्रांति करते. मग ती क्रांति ४ वर्ग शिकून होवो किंवा कांहीहि न शिकतां होवो. मला समजस व सुसंस्कृत मनाची वधू पाहिजे आहे!

आणि शंकरआप्पा! स्वरूपसौंदर्याविषयीच बोलावयाचें झालें तर सौंदर्याची व्याख्या अजूनपर्यंत कुणालाहि ठरवितां आली नाही. ते दृष्टिसापेक्ष असते. एकाला जें सुंदर दिसतें तर तें दुसऱ्याला दिसलेंच पाहिजे असं नाही. तेव्हां मी फक्त "हृदयाच्या सौंदर्यालाच" जास्त किंमत देणारा माणूस आहे व एरव्हीं मुलगी नार्की-डोळीं निटस् असली म्हणजे झालं. व "हृदयाचें सौंदर्य" हें सांस्कृतिक मन परंपरा व सभोवतालचें वातावरण यांवर अवलबून असते—व निव्वळ स्वरूप सुंदर मुलीशीच लग्न करावयाचें असल्यास—संगमरवरी दगडाचे निर्जीव पुतळे कमी कां सुंदर असतात?

आणि नानासाहेबांच्या समाजसुधारणेच्या हौसेखातर मला पसंत नसलेल्या मुलीशीं लग्न करावं ही जबरी कां?

वडिल मंडळींनी आपली समाजसुधारकी हौस" वधुवरांच्या आवडीनिवडीचा विचार न करतां दोन अपरिचित जीवांच्या लग्नबंधनांवरच कां अवलंबून ठेवावी? शंकरआप्पा! ही खरी समाजसुधारणा नव्हे—हे स्वार्थी मनोवृत्तीचें द्योतक आहे हें सुधारणेचें ढोंग आहे—खरी सुधारणा नव्हे!!!

" बाळासाहेब मला बापड्याला कशाला ही व्याख्यानें ऐकवितां मी नानासाहेबांना आपला काय निरोप सांगू ? ? "

" नानासाहेबांना म्हणावं कीं मी ज्या मुलींना सर्वतोपरी पसंत आहे व जी मला सर्व-दृष्ट्या पसंत आहे अशी सुखदु:खांत मला साथ देणारी-- खऱ्या सहधर्मचारिणीपदाला योग्य मुलगी मिळेपर्यंत मी लग्नच करीत नाही-व अशी मुलगी नच मिळाल्यास मी अविवाहित राहीन. लग्न हें जर मानवी जीवनांत सुख व समाधानाकरितां असेल तर कोणत्याहि नापसंत मुलीशीं लग्न करून घेऊन मन:स्वास्थ्य विघडवून घेण्यापेक्षां -मी अविवाहित राहण्यातच मला जास्त मानसिक सुख व समाधान मिळणार आहे आणि ह्मणून म्हणतो कीं कोणत्याहि मुलीशीं लग्न करून घेऊन आयुष्याची नासाडी करून घ्यावयास मी साफ तयार नाही. "

× × ×

लग्नाच्या बाबतींत रोज वडिलांशीं खडाजंगी किंवा कटकटी करण्यापेक्षां घरच सोडणं बरं अशा विचारानें—एक दिवस बाळासाहेब कुठं तरी निघून गेलेः ! - कुणि ह्मणतात ते रवींद्राच्या शांतिनिकेतनांत गेले- कणि ह्मणतात ते परदेशीं गेलें ! ! नक्की कांहीच पत्ता लागला नाही.

× × ×

बाळासाहेब बेपत्ता झाले ह्मणून जगाचे व्यवहार थोडेच थांबणार आहेत ! !

जगाचं रहाटगाडग सुरुंच होतं. " भावना आणि व्यवहार " ह्यांचा झगडा सुरूंच अहे— अधिकाधिक तीव्रतर स्वरूपांत सुरू आहे—हा झगडा केव्हा मिटेल तो सुदिन ! ! ! !

# नवमतवाद्यांचा इशारा

लेखकः-- वि० तु० चौधरी बी. ए, अमरावती.

वीरशैवसंजीवनीचे २ ऱ्या व ३ ऱ्या अंकांत माझा ' नवमतवाद ' हा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर त्यावर ज्यांनी आपलीं प्रामाणिक अनुकूल व प्रतिकूल मतें व्यक्त करणारीं खाजगी पत्रें मला पाठविलीं त्याबद्दल मी सर्वांचा आभारी आहें विशेषत: ' महाराष्ट्र ' ' हितवाद ' ' वऱ्हाड-शाळापत्रक ' ह्या वीरशैवेतर वृत्तपत्रांनी माझ्या ' नवमतवाद ' लेखावर अत्यंत अनुकूल अशीं साभिप्राय मतें व्यक्त करून मला एक तऱ्हेने उपकृत करून ठेविलें आहे असें मी समजतों. " नवमतवाद " ह्या लेखावर पूर्वग्रहदूषित भावनेला बळी पडून केवळ व्यक्तिविषयक टीकेच्या आहारीं न जातां ज्यांनी आपलीं अनुकूल वा प्रतिकूल मतें व्यक्त केलीं आहेत त्या सर्वांना मी लौकरच " नवमतवाद, त्याचे ध्वनि व प्रतिध्वनि " हा लेख लिहून उत्तर देणारच आहे. परंतु दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे-बरोबर निजाम-प्रांतांत मी गेलों असें पाहून ज्यांनी माझे गैरहजरीचा फायदा घेऊन नवमतवाद्यांच्या विरुद्ध यथेच्छ धुडगूस घातला व ज्या धुडगुसाच्या विश्वसनीय बातम्या मला समजल्या त्या आमच्या ' कृतीने नवमतवादी ' पण केवळ विरोधाखातरच विरोध करणाऱ्या ढोंगी कंपूला

पहिला व शेवटचाच उत्तरवजा इशारा माझ्या व माझ्या सहकाऱ्यांच्यातर्फे देण्याचें मीं आज ठरविलें आहे.

ज्या लोकांचा आम्हीं आपल्या समाजांत प्रचारीत असलेल्या 'नवमताला' प्रामाणिक विरोध असेल त्यांच्याशीं व्यक्तिविषयक टीका करण्याकरता नव्हे तर शास्त्रीय दृष्टया वादविवाद करण्यास कोणत्याहि वेळी व कोठल्याहि सभेंत 'वादविवाद' करावयाची माझी माझ्या सहकाऱ्यासह तयारी आहे.

डोंबाऱ्याच्या खेळाकरिता जमलेल्या गर्दीचा फायदा घेऊन नाटकी सभेंत लोकांनी लिहून दिलेलं व्यक्ति विषयक शिव्याशापांनी भरलेलं चोपडें कसें-बसें वाचून दाखविण्याचा पोरकट व निंद्य, चव्हाटाळपणा आम्हाला करावयाचा नाही.

नवमतवादी आपली मतें जाहीर सभांतून किंवा लेखनद्वारा उघडपणें व्यक्त करावयाला कचरत नाहीत किंवा तदनुसार प्रत्यक्ष कृति करण्याची वेळ येतांच-प्रसंगी मानहानि झाली तरीहि,किंवा केवढाहि मोठा स्वार्थत्याग करून आचरून दाखविण्यास, माघार घेणार नाहीत.

इतर विषयांबरोबरच आपल्या समाजांतील विवाहविषयक चालीरीतीबद्दलहि नवमतवाद्यांचीं मतें जाहीर आहेत. आम्ही प्रौढ संमतिविवाहाचे पुरस्कर्ते आहोंत व ह्या बाबतींत गरज असलेल्याला सल्ला व आवश्यक जागीं त्वनिष्ठेकरिता उत्तेजन देणें आम्ही आमचें कर्तव्य समजतों. नवमतवादी मतप्रसारास उत्तम शील व निर्मल चारित्र्याची जोड अत्यावश्यक आहे हें आमचें प्रामाणिक मत आहे.

परंतु वैषयिक पिपासेने ज्यांची दृष्टि अंध बनली आहे व ज्यामुळे जवळची नातीं-गोतीं हीं ज्यांनी ओळखलीं नाहीत व ज्यांनी आपल्या कलंकित पूर्वचारित्र्याने जिवंतपणीं स्वतःची समाधी (civil Death) बांधून घेतली व ज्यांचे सार्वजनिक आयुष्याचे कधीच थडगें उभारलें गेलें होतें व ज्या थडग्यावर आज कित्येक दिवसांपासून हरळी फुटली आहे—त्या लोकांनी पुन्हा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या पुनरुत्थानाचा प्रयत्न करण्याच्या भानगडींत पडणे पुढे-मागे फाजील किंमत देऊनहि हास्यास्पद ठरल्याशिवाय राहणार नाही. केवळ प्रतिकूल सांपत्तिक परिस्थितीमुळेच ज्यांच्या बाहेरख्याली वर्तनाला कांहीसा आंळे बसला आहे व ज्यांच्या शीलहीनतेची प्रतीकें घाणेरड्या वस्तींत रांगतांना किंवा खेळतांना प्रत्यहीं दृष्टीला पडतात, त्यांनी 'नवमतवाद्यांना' निदान 'शीला' संबंधी इशारा देण्याच्या भानगडींत न पडलेलेंच बरें ! !

दुनियेच्या पाठीवर कुणीहि रडत राऊत घोड्यावर बसलेला किंवा लोकांनी जबरदस्तीने बसविल्यामुळें घोड्याच्या पाठीवरून न घसरतां कायम राहिलेला कोणीं पाहिला नाही ! !

मोर नाचतो म्हणून लांडोरांनीहि नाचून पहाण्यांत कांही मौज नाही. " मोराची पिसें खोवून नाचणाऱ्या डोंमकावळ्यांचें वास्तवस्वरूप लोकांचे नजरेस पडावयास मुळींच वेळ लागत नाही.

नवमतवाद्यांच्या " विरोधाच्या सोंगा "-खाली नवमतवाद्यांचे चारित्र्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष शिंतोडे उडविण्याचा कोणींहि प्रयत्न करू नये-नवमतवादी सर्वांत जास्त किंमत जर कशाला देत असतील तर स्वमताच्या आग्रहाबरोबरच शीलाला व चारित्र्याला ते किंमत देतात हें कुणींहि चुकून विसरूं नये किंवा मुद्दाम दृष्टिआड करूं नये.

वैषयिक कल्पनेशिवाय किंवा शारीरसंबंधाखेरीज तरुण स्त्री-पुरुष एकमेकांजवळ येऊच शकत नाहीत अशीच ज्यांची ठाम समजूत झाली आहे किंवा अशाच वातावरणांत ज्यांनी आपलें आयुष्य व्यतीत केलें आहे व स्त्रीशिक्षणामुळे मुली बिघडतातच व त्या शीलभ्रष्ट होतात अशीच ज्यांची दोषैकदृष्टि आहे त्या महानुभावांचे संबंधी आम्हाला कांहीच म्हणणें नाही.

स्त्रियांविषयी भगिनी व मातृभावना असूं शकतात हेंच ज्यांना कळत नाही व अखिल स्त्री जातीकडे केवळ वैषयिक भावनेनेच पहाण्याची ज्यांना संवय झाली आहे. व खाल्ल्या घरचेच वांसे मोजण्याची कमालीची कृतघ्न मनोवृत्ति जेथे वास करते त्यांना 'नवमतवाद' स्त्रीशिक्षण ह्या चळवळींत भ्रष्टतेखेरीज दुसरा कसलाच वास आला नाही तर नवल काय? हा त्यांचा स्वभाव व चारित्र्यदोष आहे. "नवमतवाद" किंवा स्त्रीशिक्षणाचा नाही!"

त्यांना आमचें एवढेंच नम्रपणें सांगणें आहे कीं, "बाबांनो आपल्या पूर्वचारित्र्याचें सिंहावलोकन करा."

लोकांचे मुलीबाळींचे शीलावर केवळ स्त्रीशिक्षणाचे विरोधी म्हणून शिंतोडे उडविणें अत्यंत गर्हणीय आहे असें आम्ही समजतों व केवळ मतविरोधाकरिता कुणाचे शीलावर शिंतोडे उडविणे व त्यांतूनहि स्त्रियांचे शीलावर शिंतोडे उडविण्याचा प्रयत्न करणें ह्यासारखा मनाचा नादानपणा दुसरा कोणताहि नाही, व विस्मयाची गोष्ट एवढीच कीं, जन्मभर कोळशांचीच दलाली केल्यामुळे ज्यांचे हाताचा काळा रंग अजून निघाला नाही त्यांनी तरी भलत्याच फंदांत पडूं नये—"कांचाच्या घरांत राहणारांनी दुसऱ्यांचे घरांवर दगड मारण्याचा मूर्ख उपद्व्याप करण्याचें भलतेंच धाष्टर्य दाखवूं नये-बरी वाईट कृति करणाऱ्या व्यक्ति आपलीं कृष्णकृत्यें कदाचित् विसरत असतील किंवा अशा तऱ्हेने विसर्णें त्यांना परवडत असेल; परंतु म्हणून आजूबाजूचे लोक किंवा समाज त्यांचीं तीं कृत्यें विसरत नसतो. आणि म्हणून ह्या "नवमतवाद्याच्या दुसऱ्या विरोधकांना" आमचें स्पष्ट सांगणें आहे कीं, आपले पूर्वचारित्र्याचा कोळसा पुन्हां चारचौघांत उगाळण्याचा प्रसंग दुसऱ्यांवर आणू नका. अजून वीर वामनराव जोशी ह्यांचे संपादकत्वाखालीं १९२६ सालीं निघत असलेल्या "स्वतंत्रहिंदुस्थान" वर्तमानपत्राचे फाईलें जळालीं नाहीत. विशेषत: ता. २४-४-१९२६ व १-५-१९२६ चे दोन अंकांतील ह्या आजच्या आमच्या विरोधकांचे चारित्र्यावर प्रकाश पाडणारा मजकूर अजून पुसट्न गेला नाही. "स्वतंत्र हिंदुस्थान"-ची फाईले किंवा तद्जनक पत्रव्यवहार अजून जाळल्या गेला नाही तो जेथल्या तेथे आजहि सहीसलामत आहे. तरी नवमतवाद्यांच्या नव्या-जुन्या विरोधकांनी भलत्याच भूमिकेवर उभे राहून 'हात दांखवून अवलक्षण' करून घेऊं नये. नवमतवादी आपल्या वरील मतप्रसादाची व तद्विषयक शील व चारित्र्याची जबाबदारी पूर्ण जाणून आहेत. व स्वतःचे मताकरिता कृति करावयाची वेळ येतांच प्राणांतींहि माघार घेणार नाहीत. तरी "नवमतवादा" सारख्या महत्वाच्या विषयावर भलत्याच "लुंग्या सुंग्या भडभुंज्यानी" स्वतःचे पूर्वचरित्र विसरून उपदेश करण्याचा आव आणण्याच्या भानगडींत पडूं नये. तसेंच मला पुढारी करा म्हटल्यानें किंवा जाहिराती वाटून जगांत कुणीहि आतापर्यंत पुढारी झाले नाहीत. तेव्हा स्वतःला पुढारी करीत नाहीत म्हणून कुरकुरत बसून भलत्याच आडमार्गांने जाण्यापेक्षा "First deserve and then desire" ह्या राजमार्गाचाच अवलंब करणें परिणामीं हितकारक ठरेल असा मी माझ्या व माझ्या सहकाऱ्यांच्यातर्फे पहिला व शेवटचाच स्पष्ट इशारा देऊं इच्छितों.

## वर्गणीदारास सूचना:—

"वीरशैव संजीवनी"-ची वर्गणी — मॅनेजर, "वीरशैवसंजीवनी", उमरावती, ह्या पत्त्यावर पाठवावी.

# माझें सुखस्वप्न

लेखकः— 'रिकामटेकडा'

पुष्पलतांनीं वेष्टित अशा लहानशा मोकळ्या जागेंत शुभ्र वस्त्रें परिधान केलेली एक तरुण व्यक्ति उभी होती. तिच्याभोंवती कांहीं माणसें अर्धवर्तुळ करून बसली होती. त्या व्यक्तीचें आवेशयुक्त कळकळीचें भाषण सर्व सभा गंभीर वातावरणांत शांतचित्तानें ऐकत होती. ती गुरुवर्गापैकीं असावी. मला कांहीं भाषण जरी बरोबर ऐकूं आलें नाहीं तरीपण बरेंच ऐकूं आलें. सकाळीं पुन: पुन: तो देखावा माझ्या मन:श्चक्षूसमोर दत्त ह्मणून उभा राहून त्या व्यक्तीचें तें भाषण कर्णरंध्रांत सारखें घुमत होतें. त्या भाषणापैकीं जेवढें मला आठवलें तेवढें सकाळीं लिहून काढलें व तेंच खालीं दिलें आहे.

'आमचें जीवित आपल्याच पैशावर व मदतीवर अवलंबून आहे. आह्मीं आपली समाजसेवेचीं सर्व कर्तव्यें पार विसरलों. अध्ययनाचें व पठणाचें तर नांवच नको. प्रवचनें कशीं असतात हें आम्हांला ठाऊक नाहीं. देवपूजा व ईश्वरध्यानाचा कंटाळा येऊन कृतीनेच नास्तिक बनलों हो! कारण वाणीनें तसें प्रतिपादूं लागलों तर, जर ईश्वरच नाहीं तर ईश्वराशीं भेट करून देणाऱ्या दलालाला कोण पुसणार? व अशानें आमच्याच मिळकतीवर गदा येणार? धर्माबद्दल ह्मणाल तर आह्मांलाच माहिती नाहीं तर आह्मी तुह्माला कोठून पुरविणार? निरनिराळ्या गांवीं हिंडून शिष्यांच्या भेटी घेऊन त्यांना उपदेश करणें व शिष्यसंख्या वाढवून धर्मप्रसाराचें पवित्र कार्य करणें याऐवजी आपल्या धर्मांतील अनेक पोटजातींचें भिन्नत्व चव्हाट्यावर आणून तुह्माला आपसांत वितंडवाद घालण्यास प्रवृत्त करतों. या सर्व गोष्टींना तुह्मीच कारणीभूत नाहीं काय?

गुरु हा ईश्वरी अंश आहे या अंधभावनेनें वेडे होऊन मरणोत्तर सौख्य वा मोक्ष मिळेल या भावी पोकळ व खुळचट आशेवर हल्लीं मात्र हाडांचीं काडें व रक्ताचें पाणी करून, अहोरात्र श्रम करून, स्वतःच्या शैक्षणिक व मुलाबाळांच्या पोटाला चिमटा घेऊन त्यांच्या शैक्षणिक व इतर अत्यावश्यक गोष्टींकरिता कराव्या लागणाऱ्या खर्चाला कात्री लावून वाटेल त्या परिस्थितींत आह्मांला मदतरूपानें आमच्या ऐषआरामाला व सुखोपभोगाला मदत करून आमच्या स्वेच्छाचारी वृत्तीला प्रोत्साहन देतां आह्मी आपल्या हलाखीच्या परिस्थितीकडे शून्य दृष्टि ठेवून, आमचा गुरुकुलांत जन्म झालेला आहे—पुष्कळ वेळां तर असें खोटेंच भाविक जनाला भासवून—आह्मांला तीर्थयात्रा करावयाच्या आहेत किंवा नवीन देवळें बांधणें, जुनें दुरुस्त करणें, आगी करणें, अशा किंवा यासारख्या अनेक वायफळ कंड्या उठवून, पैसा उकळतो व चैन करतों. शिष्यांचा—बहुतेक दीन-दुबळ्या व गरीब—पैसा निरनिराळ्या युक्त्या लढवून आपल्या घशांत उतरेल या एकाच गोष्टीकडे आमची अव्याहत तंद्री लागलेली असते. यापैकी क्वचितच पैसा निराश्रित लोकांच्या कल्याणाकरितां खर्च होतो. बऱ्याचशा देणग्या व उपजीविकेच्या वस्तु आवश्यकतेच्या पलीकडे मिळाल्यामुळे निसर्गाच्या कार्यामुळे जागच्याजागीच नाश पावतात.

ह्या ठिकाणीं जर कोणी ह्मणेल कीं दानाची पद्धति तर फार पूर्वीपासून चालत आलेली आहे तर गोष्ट खरी आहे; पण हा घोटाळा आपल्या समजुतींत थोडा फरक झाल्यामुळे झालेला आहे. पूर्वी लोक दान करीत तें कोण्याहि व्यक्तीला करीत नसून, त्यांच्या अंगच्या समाजसेवेसारख्या अलौकिक गुणांना करीत असत. पण आतां तर बहुतेक गुरुजन विषयासक्त होऊन कांही एक कार्य न करतां निव्वळ आळसांत दिवस घालवून 'भीक मागण्याचा अधिकार कोणालाहि नाही' असें बसवेश्वराचें वचनें असतां—पोटाची खळगी भरण्याकरिता 'हक्क' ह्मणून भीक मागतात व याच्या मोबदल्यांत खुळचट समज व खोट्या कल्पना समाजांत कायम राखून सत्य व खऱ्या हितापासून समाजाला परावृत्त करतात. आपलें कृष्णहृदय भगव्या पवित्र वस्त्राआड लपवून छूवाच्छापुरीच्या चमत्कारावर साधुत्वाचा आव आणणाऱ्या या साधुमुळे खरे साधु समाजाच्या दृष्टिआड होतात, व अजूनहि असले समज कायम ठेवणें ह्मणजे प्राण निघून गेलेल्या शरीराला प्रेमाने कवटाळण्याप्रमाणें आहे.

बाबारे, श्रेष्ठ कुलांत जन्म झाला ह्मणजे त्याच्या अंगीं सर्व सद्गुणच असले पाहिजेत या ह्मणण्यांत किती तथ्यांश आहे ? त्याला गुरु कसें ह्मणतां येईल ? गुरुपद हें आचरणानें मिळवावें लागतें. जे लोककल्याणार्थ झटून; समाजाच्या व धर्माच्या उन्नतीप्रीत्यर्थ झिजतात, तेच खरे गुरु. मग ते जंगम असोत वा नसोत.

स्वतः गर्त्यांत पडल्यामुळे दुःखातिरेकाने उद्विग्न होऊन आपल्याबरोबर दुसऱ्यालाहि गर्त्यांत ओढणाऱ्या लेखकाच्या आहारीं जाणें धोक्याचें आहे. समाजाचें हित करण्याचा लेखकाचा हेतु समाजाला उघड दिसला पाहिजे. खाजगी द्वेषाने मलिन झालेली लेखणी समाजहित करूं शकेल काय ? समाजहिताच्या आड येणाऱ्या प्रतिष्ठित समाज-कंटकावर प्रसंगीं सुधारणेचे कोरडे ओढणें क्षम्यच होईल.

श्रीबसवेश्वरमहाराजांनी एकीला बाधा आणणाऱ्या विटाळाला व जातिभेदाला पार झुगारून देऊन मध्यंतरीं क्षीण होत चाललेल्या या लिंगाईत धर्मवृक्षाला सुधारणेचें पाणी देऊन ऊर्जितावस्थेला नेऊन पोंहोचविलें. जाति ह्या इतर समाजाचें अनुकरण ह्मणून व धंद्याला अनुसरून निर्माण झाल्या. जातिभेदापासून अलिप्त असलेल्या या इमारतीला शेवटी जातिभेदाची उधळी लागलीच हें पाहून मनाला थोडा खेद वाटतो. हिंदुधर्मांतील सर्व जाती एकत्रित करून स्पर्शास्पर्शतेचें स्तोम घालविण्याची सर्व जगांत चळवळ चालूं आहे. असा वणवा सभोंवती पेटला असतांनादेखील आपल्याला मूळस्थितीची जाणीव न होतां उलट शांत झोप येते याचें आश्चर्य वाटतें. गुलामगिरींत कांही काळ लोटल्यावर त्यांतच आनंद वाटूं लागतो त्यासारखेंच हें आहे.

तेव्हा राष्ट्राच्या हिताकरिता व वैभवाकरिता एकीला बाध आणणारे व परिस्थितीला अनुचित असलेल्या बंधनाचे पाश तटातट तोडून टाकण्याचा प्रत्येकाने जारीने प्रयत्न केला पाहिजे. निदान पुराणमताच्या स्वार्थी लोकांनी अविचाराने अडथळा तरी करूं नये. पारंपरिक रूढीच्या ओघांत वहात जाऊन एखाद्या खडकावर आपटून नाश करून घेण्यापेक्षा परिस्थितीशीं धैर्याने झगडून व इतर राष्ट्रें सुधारणेच्या जोरावर वैभवाच्या शिखरावर पोहोंचलेलीं पाहून धैर्याने व जोमाने एकीच्या नावेंत बसून तरून जाणें केव्हाहि श्रेयस्करच ठरेल. सिंहाच्या छाव्याला जरी कोल्ह्याच्या पिलाबरोबर वाढविले तरी एक दिवस आपल्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झाल्याबरोबर तो सिंहाच्याच कळपांत जाऊन हत्तीच्याच गंडस्थळावर मोत्याची इच्छा करणार नाही काय ? एकीशिवाय आजपर्यंत कोणतेंहि कार्य पार पडलें नाही, व पडणारहि नाही हें त्रिकालाबाधित सत्य नेहमी हृदयांत जागे असूं द्या. इतक्यांत मला जाग आल्यामुळे माझें 'सुख स्वप्न' संपलें पण तो देखावा व भाषण जागृत आहे. जागृत राहण्याइतकेंच महत्वाचें तें आहे.

# वीरशैवसंजीवनी

अंक ११ वा ) ता० १ जून १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# मध्यप्रांत-वऱ्हाड-खानदेश-प्रांतिक-
# वीरशैवपरिषदेचे अध्यक्ष

( रोहिणखेड, ता. १९-४-३६ ).



श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख, जहागीरदार,

मु० पारवा. जि० यवतमाळ (वऱ्हाड).

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रियां वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति ज्येष्ठ शु॥ १२ शके १८५८ ( अंक ११ वा.

# 'सुदर्शन'-च्या बसवेश्वर-अंकाचें समालोचन

## ( पूर्वभाग )

### 'सुदर्शन' कारांचें अभिनंदन

सोलापूरच्या 'सुदर्शन' पत्राने साठ-बासष्ठ पृष्ठांचा खास बसवेश्वर-अंक काढून महाराष्ट्रीय वीरशैवांना बसवेश्वराच्या वाङ्मयाविषयी व एकंदर तत्कालीन परिस्थितिविषयीं माहिती देण्याचा जो उद्योग सुरू केला आहे तो अत्यंत उपयुक्त आहे. 'सुदर्शन' पत्राने वीरशैव-समाजाची जी सेवा चालविली आहे ती इतकी उत्तम व सर्वश्रेष्ठ आहे कीं, कर्नाटकांतील सुविद्य वीरशैवबंधूंचे विचार महाराष्ट्रीय वीर-शैवबंधूंना कळूं लागले. अशा प्रकारें भाषा भिन्न राहूनहि उभयतांच्या अंतःकरणाचा एक-मेकांना परिचय होणें हें कार्य समाजाच्या सर्वांगीण उत्कर्षाला अधिक पोषक ठरतें. ह्मणून बसवेश्वर-अंक काढून 'सुदर्शन'-कारांनी केलेल्या समाजसेवेबद्दल आह्मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

### खास अंकाचें महत्व.

'सुदर्शन'-च्या खास बसवेश्वर-अंकांतील सर्वच माहिती योग्य, चित्ताकर्षक व बोधप्रद असली तरी श्रीमन्निरंजन निजगुणस्वामी ह्यांचा 'वाङ्मयोपासक बसवदेव', श्री. सिद्धरामप्पा

पावटे, ॲडव्होकेट, हुबळी ह्यांचा 'श्रीबसवेश्वर अर्थात् वीरशैव धर्ममूर्ति', श्री. वीरप्पा बसवलिंगप्पा बिळेॲंगडी, हुबळी, ह्यांचा लेख, असे तीन लेख अत्यंत महत्वाचे आहेत. त्यांतहि ॲ. पावटे ह्यांचा लेख अत्यंत विस्तृत व माहितीने पूर्ण भरलेला आहे. तो वाचून बाराव्या शतकांत कर्नाटक प्रांतांत महाभाग बसवेश्वरांनीं केलेलें वीरशैवधर्म व समाजसुधारण्याचें कार्य स्पष्ट डोळ्यांपुढे उभें राहतें. तें कार्य डोळ्यांपुढे ठेवून त्यांतील सत्यासत्य सद्यस्थितींत समाजोपयोगी कसें लावावें हा ज्याच्या त्याच्या मनोधर्माचा व ग्रहणशक्तीचा प्रश्न आहे. आमचा समाज सध्या अत्यंत विस्खलित आहे. तो आर्थिक दृष्ट्या नागावलेला आहे, सामाजिक दृष्ट्या त्याला योग्य ध्येय नाही, धार्मिक दृष्ट्या त्याला कांहीं कळेनासें झालें आहे; शैक्षणिक दृष्ट्या तो जावा तितका उच्चस्थितीला अद्यापि गेला नाहीं. ह्याला कारणें परिस्थितिनुसार निरनिराळीं घडलीं आहेत. पण तो आज सर्व बाजूंनीं खालावलेला आहे व खालावत चालला आहे एवढें मात्र खरें. ही परिस्थिति कर्नाटकांत जशी आहे, तशीच तेलंगणांत आहे व तेलंगणांत जशी आहे तशीच महाराष्ट्रांतहि आहे. ही स्थिति दूर व्हावयास पाहिजे अशी सदिच्छा ज्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली आहे व होत आहे अशा व्यक्ति ठिकठिकाणीं निर्माण होत आहेत व त्या आपआपल्या परीनें कार्यहि करीत आहेत. पण कार्यांत एकसूत्रीपणा नाहीं. प्रथम आपण कोण व कुठे जावयाचें आहे ह्याचीच जाणीव नाहीं व त्या जाणीवींत ऐक्यहि नाहीं हें जाणीवेचें ऐक्य जर ह्या खास अंकांतील कांहीं लेखांच्या समालोचनाने साध्य होत असलें तर ह्यासारखी आनंदाची गोष्ट दुसरी कोणतीहि नाही. कारण आह्मास आचार्यहि हवेत, विरक्तहि हवेत व बसवेश्वरीयहि हवेत. ह्या सर्वांत एकसूत्रीपणा आहे ही जाणीव सर्वत्र स्पष्ट दिसूं लागल्यावाचून सद्यस्थितींत जी आह्मांला दुर्धरावस्था प्राप्त झाली आहे तींतून कसें बाहेर पडणार? आणि धर्माच्या, समाजाच्या, ह्या दुर्धरावस्थेंतून ऐतिहासिक थोर पुरुषांच्या चारित्र्यापासून कोणता बोध घेऊन पार पडतां येईल हें पाहणें जरूर आहे. असें सामर्थ्य जर आमच्यांत उत्पन्न होत नसेल व उत्पन्न करून घेण्याचें जर आमच्यांत बळ नसेल तर आमचा धर्म, आमचा समाज, आमचे अमुक ऐतिहासिक पुरुष असा कोरडा अभिमान तरी आम्हीं कां धरावा? हा अभिमान धरतां येईल असे कांहीं गुण ह्या खास अंकांत आहेत कीं काय हेंच आह्मांला पहावयाचें आहे. व त्याच दृष्टीने हा खास अंक आह्मांला महत्वाचा वाटतो.

## वाङ्मयोपासक बसवदेव.

सोलापूरचे किरीट मठाधीश निजगुणमहास्वामींनी आपल्या लेखांत बसवेश्वराच्या वाङ्मयसेवेची माहिती दिली आहे. 'बसवापूर्वी संस्कृतमध्यें व कानडीमध्ये काव्यरूपानें ग्रंथरचना करण्याचा प्रघात होता. पण बसवेश्वरांनी वचनशास्त्र नांवाच्या गद्यपद्धतीचा नवा प्रघात पाडला' ही एक विशेष गोष्ट त्यांनीं नमूद केली. ह्यावरून स्पष्ट बोध असा होतो कीं, वीरशैवामध्यें बसवपूर्वी संस्कृतमध्ये व कानडींत काव्यग्रंथ लिहिणारे पुरुष होते. मग बसवेश्वरांनी गद्यरचना करून विशेष काय साधलें? तर (१) षट्स्थलवचन, (२) कालज्ञानवचन, (३) मंत्रगोप्यवचन (४) घटचक्रवचन, (५) राजयोगवचन, (६) शिखारत्नवचन अशी सहा वचनग्रंथांची निर्मिती केली. ह्या सहा ग्रंथांत 'षट्स्थलवचन' ग्रंथ जो आहे त्यांत वीरशैवधर्म व समाज ह्याविषयीचाच बोध आहे. ह्या ग्रंथाची वचनसंख्या ९६० आहे व ती निरनिराळ्या स्थलविभागांत विभागलेली आहे. ह्मणजे बसवेश्वरांनी वीरशैवधर्म व वीरशैवसमाज एवढीच सृष्टि आपल्यासमोर ठेवून आपलें आयुष्य काढलें नाही तर वीरशैवांखेरीज जो मानवसमाज आहे त्या मानव-

समाजाशीं दळणवळण रहावें व त्यांचाहि उत्कर्ष चिंतितां यावा ह्याकरिता 'षट्स्थळ वचना'- खेरीज पांच उपयुक्त अशी वचनग्रंथरचना केली असा ह्या माहितींतून बोध होतो. ह्मणजे सर्व चराचरसृष्टींतील मानव्य ज्या ज्या लिंगमय कल्पनेंत अंतर्भूत झालें होतें व त्याच दृष्टीने ज्याची ग्रंथरचना झाली तो विशिष्ट चिन्हांनी विशिष्ट उपासनेने बद्ध झालेल्याकरितांच होता असें नव्हे तर जगाच्या कल्याणाकरिता संताच्या विभूति ह्या कोटींतील तो थोर पुरुष होत हेंच स्पष्ट होतें. आणि ह्मणूनच बसवेश्वर हा बाराव्या शतकांतील विवेकानंद होय असें आम्ही प्रथम-पासून म्हणत आलों. बसवेश्वराची वाङ्मयसेवा साधार पुढे करून श्रीमन्निरंजन निजगुणमहा-स्वामींनी आपल्या लेखाद्वारें बसवेश्वर-कानडीचाच नव्हे, कर्नाटकचाच नव्हे, कर्नाटकांतील वीरशैवां-चाच नव्हे तर सर्व वीरशैवांचा व अखिल भरतखंडाचा बाराव्या शतकांतील महान् सुपुत्र होय हें हक्काने म्हणण्याचा अधिकार आम्हांला प्राप्त करून दिला म्हणून त्यांच्या उपयुक्त माहि-तीचें आम्हाला अत्यंत महत्व वाटतें. कारण बसवदेवांनी कोणत्या भाषेंतून व कोणत्या प्रांतांत निर्माण होऊन आपले विचार कथन केले हा येथे आमच्या मतें दुय्यम प्रश्न आहे. त्यांनी जी सर्व वचनग्रंथरचना केली ती अखिल मानव्याच्या उद्धारार्थ केली हाच ह्यांत विशेष महत्वाचा मुद्दा.

## ॲ. पावटे ह्यांच्या लेखाचें परीक्षण

ॲ. पावटे ह्यांच्या लेखांत नित्याप्रमाणे माहिती भरपूर आहे, आणि भरपूर माहिती असलेल्या लेखाला विद्वत्तापूर्वक लेख म्हणण्याचा जुना प्रघात आहे. ह्या प्रघाताच्या ओघांत आपणाला निश्चित काय सांगावयाचें आहे इकडे त्यांचें लक्ष कमी जात असलें तर नवल नाही. बसवेश्वर धर्म शब्दाचा अर्थ काय समजले ह्याचें विवेचन त्यांनी आरंभीच केलें आहे. 'एखादा संस्कारसमारंभ' एखादे विधिविधान किंवा भक्तिभावनेचे एखादे कृत्य म्हणजे धर्म नव्हे' अशी त्यांनी आरंभीच कबूली दिली आणि परमेश्वराचा जीवात्म्याशीं संबंध वर्णन केलेल्या काव्यमय बसववचनाच्या आधारें 'आत्म्याचें निजस्वरूप प्रगट करणारी शक्तिच धर्म होय' असें म्हटलें. हें आत्म्याचें निजस्वरूप प्रगट करावयास संस्कार लागत नाहीत, विधि-विधान लागत नाही व भक्तिभावहि लागत नाही हा सिद्धांत ॲ. पावटे ह्यांचा लेख वाचून कसा बाहेर पडतो हें सुबुद्धास कळणें कठिण आहे. कारण हीच धर्मव्याख्या मान्य करून बसव-चरित्र सांगण्याचा ॲ. पावटे ह्यांनी प्रयत्न केला. त्यांत बसवाच्या आईने पुत्र नाही म्हणून नंदीव्रताचें आचरण केल्याचा उल्लेख आहे. बसव-देवाने जन्म घेतल्यावर आठव्या वर्षी मुंज करून घेतली नाही ह्या संस्काराचा त्याने त्याग केला म्हणून बसवेश्वराला संस्कार नव्हता असें कसें मानावें? नंदीव्रताचा संस्कार ज्याच्या जन्माला कारण झाला व आठव्या वर्षापासून कुडलसंगम ह्या महान् तपस्व्याकडे जो बसवेश्वर जाऊं लागला व जन्मतःच ह्या तपस्व्याकडून ज्या बसवेश्वराला लिंगधारणेचा संस्कार झाला म्हणून पुराणोक्त कथावर विश्वास ठेवून ज्या बसवेश्वराचें चरित्र ॲ. पावटे सांगतात तो बसवेश्वर संस्कारावर, विधीविधानावर व भक्ति-भावावर विश्वास ठेवणारा नव्हता असें आरंभीच सांगण्यांत पावटे ह्यांचा काय बरें हेतु असावा? मुंज हाच एक संस्कार आहे ही संस्कारासंबं-धाची त्यांची आकुंचित कल्पना त्यांना नडली कीं बसवेश्वर हे एक स्वयंसिद्ध पुरुष होते हें त्याना सांगावयाचें होतें? बसवेश्वराची स्वयं-सिद्धता जर त्यांना सिद्ध करावयाची होती तर कै. जिरगे ह्यांच्याप्रमाणें कुडलसंगमेश्वराच्या जव-ळील नंदीच्या मुखांतून बसवेश्वरास लिंग प्राप्त झालें हा दैवी चमत्कार तरी त्यांनी पुढे करावयाला पाहिजे होता. पण बसवेश्वराचा जन्म नंदीव्रता-चरणामुळें झाला, कुडलसंगमेश्वर ह्या तपस्व्या-कडून लिंगसंस्कार झाला, हें वर्णन तर द्यावयाचे व बसवेश्वर संस्कारास धर्म मानणारा नव्हता हें

विधान तर ठोकून द्यावयाचें ! वास्तविक धर्माची व्याख्याच अँ. पावटे ह्यांनी एकतर्फी केली. आत्मोन्नति हा व्यक्तिगत धर्म असेल.; पण बसवेश्वराचा धर्म समाजोन्नतिकरिता होता. ह्मणून समाजधारणेला—वीरशैवसमाजधारणेला पोषक होईल असा आत्मोन्नतीचा मार्ग त्यांनीं कसा आचरला व सांगितला हें गृहित धरून धर्माची व्यापक व्याख्या पुढें करावयाला पाहिजे होती. पण तसें केलें तर सध्याच्या आचार्यपंथीयांत आपण जाऊं अशी त्यांना भीति वाटली असावी. कोणत्याहि धर्मपुरुषाला धर्म आचरावयाचा असला व सांगावयाचा असला ह्मणजे कोणते तरी संस्कार, विधीविधान व भक्तिभावना ही त्याला स्वीकारावी लागतेच व सांगावी लागतेच. ह्यालाच गुरुसंस्कार ह्मणतात. कुडलसंगमदेवाकडून हा गुरुसंस्कार बसवेश्वरास झाला ही गोष्ट अँ. पावटे ह्यांनी मान्य केल्यामुळे बसवेश्वरास गुरु होता व गुरु हा भक्तापेक्षा श्रेष्ठ होय असें जर कोणीं ह्मटलें तर त्याबद्दल कोणत्याहि बसवेश्वरीयास राग मानण्याचें कारण नाहीं ही एक गोष्ट अँ. पावटे ह्यांच्या लेखावरून सिद्ध होते. इतकेंच नव्हे तर लिंगधारणा कशी आली हें कामिकागमाच्या आधारें सांगतांना पृष्ठ १० वर अँ. पावटे लिहितात, ' शिवपूजा दोन प्रकारची आहे. एक आपल्याकरितां व दुसरी इतराकरितां. गुरुहस्तें दिलेल्या लिंगाची पूजा स्वत:करितां असून देवळांतील स्थावर लिंगपूजा इतराकरिता आहे. ' ह्यावरून गुरुदत्तलिंगाचें महत्व अँ. पावटे ह्यांनीं कबूल केलें आहे. गुरुवर्य संघवाल्यांनासुद्धा हेंच पाहिजे. अयोग्य गुरूंना माना असा दुराग्रह गुरुवर्यसंघाचाहि नाहीं. अशा परिस्थितींत अँ. पावटे ह्यांना प्रथम कोणीं गौरविण्याची जरूरी असेल तर ती गुरुवर्यसंघवाल्यांना आहे हाच ह्यापासून बोध होतो.

### वीरशैवांचें वैदिकत्व.

यज्ञ, याज्ञिक, शिवलिंग, इष्टलिंग, वगैरेचा इतिहास सांगत असतां अँ. पावटे ह्यांच्या लेखांत घोटाळे आहेत. यज्ञपूजा व शिवपूजा ही एकमेकांची प्रतीकें आहेत व त्या एकाच धर्माच्या परिस्थितिनुसार धर्मसुधारणेच्या भिन्न-भिन्न शाखा होत एवढेंच. त्यांची बाह्यरूपें बदललीं असतील पण हेतु व तत्व एक होतें व अजून आहे. ह्मणूनच शैवास व इष्टलिंगधारी वीरशैवास अवैदिक ह्मणतां येत नाहीं व ह्मणवूनहि घेतां येत नाहीं. आता एकाच धर्माच्या दोन शाखा जेव्हा एकमेकाविरुद्ध उलटतात तेव्हा त्या एकमेकाना तूं माझ्यासारखा नाहीस असें दुसऱ्याला ह्मणतच असतात. पण मूळ समाजधारणेच्या धर्माची ते दोघेहि जोपासनाच करतात. याज्ञिक हे वर्णाश्रमधर्माचे पुरस्कर्ते व ते प्रथमपासूनच जन्मजात माननारे होते अशी पुष्कळांची कल्पना. पण जन्मजात विषमता ही कोणत्याच धर्मानें मान्य केलेली नाहीं. जन्मजात विषमता हा देशपरिस्थितिमुळे सहजगत्या उत्पन्न झालेला दोष आहे व तो काहींनी पुढे मान्य केला इतकेंच. याज्ञिकांच्या वा वैदिकांच्या मूळ वर्णाश्रमधर्माचें हें व्यापक स्वरूप जर अँ. पावटे ह्यांना पटलें असतें तर यज्ञांतील पशुहत्त्या सोडून याज्ञिकांचा सुसंगतवार विकास हेंच शैव व वीरशैवधर्माचें मूळ स्वरूप आहे हें त्यांना पटलें असतें व त्यांना ' यज्ञाहून पुढें लिंगपूजा स्वतंत्र झाली ' असें ह्मणण्याचा प्रसंग आला नसता. पण हा येथे थोडा गौण मुद्दा आहे. मुख्यत: वीरशैव हे वैदिक आहेत हें अँ. पावटे ह्यांना मान्य आहे व तेंच अभिनंदनीय आहे. हें वीरशैवांचें वैदिकत्व अँ. पावटे ह्यांच्यापेक्षा त्रिळेअंगडी ह्यांनी अधिक स्पष्टपणें, साधार व सुसंगतवार सिद्ध केलें आहे ह्यांत संशयच नाहीं. परंतु वैदिकत्व मान्य केलें कीं वर्णाश्रमत्व मान्य करावें लागतें, आणि वर्णाश्रमत्व मान्य केलें कीं, जन्मजात विषमतेला प्राधान्य द्यावें लागतें ही दोघांच्याहि मनास भीति. वास्तविक वैदिकधर्मांत वा हिंदुधर्मांत वर्णाश्रमाच्या कल्पनेचा जो विकास झाला तो जन्मजात विषमतेवर झाला नसून, संस्कारावर झाला हें मूळ कोणालाहि विसरण्याचें कारण नाहीं.

## बसवेश्वरापूर्वीचा जातिभेद

मानवी सृष्टीचा व्यवहार नैसर्गिक रीत्या चार वर्णांवर उभारला. ईशभक्तीला एकेश्वरी उपासनेचें स्वरूप जसजसें प्राप्त झालें तसतसें जातिधर्माला ह्या देशांत ऊत आला. आणि परस्परांचा परिचय कमी व परिचय होण्याचीं साधनें पूर्वी दुर्लभ म्हणून जातीभेद, जन्मजातित्व व मानवामानवांत रोटी-बेटीव्यवहारबंधनें ह्या गोष्टी रूढ झाल्या. काहींनीं ह्यांनाच धर्म म्हटलें व काहींनीं ह्यावर हल्ले चढविले. बसवेश्वरांनी जन्मजात विषमतेवर हल्ला चढविला ही गोष्ट खरी व तीच गोष्ट पावटे वगैरेंनी प्रतिपादन केली. त्याकरिता त्यांनी जे आधार दिले त्या आधारावरून बसवासंबधानें काय बोध होतो हाच महत्वाचा मुद्दा आहे. कारण आज वीरशैवसमाजांत जो जातिभेद आहे त्याचें हल्लीचें स्वरूप काय ? तो आज नाहीसा करावयाचा म्हणजे काय करावयाचें ? व तो नाहीसा करून समाजाचा परिस्थितिनुसार सर्वांगीण उत्कर्ष होईल काय, हेंहि त्याबरोबर पाहिलें पाहिजे. अॅ. पावटे ह्यांनाहि आमच्याचप्रमाणें जन्मजात विषमता नको पण त्यांना सनातनीय स्वरूपाचा वीरशैवधर्म जागृत व्हावा असें वाटतें. तसा सनातनीय साधनांनी व त्याच ध्येयांनी युक्त झालेला वीरशैव जर आज निर्माण झाला व केला तर तो इह व परमार्थ ह्यांस पोषक व्हावयाचा नाही. बसवेश्वरांनी आपल्या काळची परिस्थिति लक्षांत घेऊन जशी सुधारणा केली तशीच सुधारणा करावयास शिकणें हाच बसवचरित्रापासून खरा बोध होतो. हा खरा बोध अॅ. पावटे ह्यांच्या लिखाणाने होत नाही. वीरशैव अष्टावर्णाने युक्त हवा हें आम्हांसहि मान्य आहे. पण पावटे म्हणतात तसा अष्टावर्णाचा वीरशैव जर समोर कल्पनेने उभा केला तर लंगोटधारी लिंगधारी गोसावच्चि डोळ्यांपुढे उभा राहतो. तोच अष्टावर्णाचा आदर्शभूत अधिकारी मानावा लागेल. तसे जे आज दिसत नाहीत ते वीरशैव नव्हत असें म्हणण्याचा प्रसंग ! तसें असलें तर अॅ. पावटे काय, ना. कंबळी काय, आम्ही काय, किंवा कित्येक आचार्य व विरक्त ह्यांनाहि अष्टावर्णच नाही असें आज म्हणावें लागेल व सर्वच घोटाळा माजेल. बाराव्या शतकांत कुडलसंगम देवाने बसवदेवास अष्टावरणाचा जो उपदेश केला म्हणून पृष्ट ६ वर अॅ. पावटे सांगतात तो काय हें पाहूनच अॅ. पावटे ह्यांच्या विचारांची आज युक्तायुक्तता आम्हाला पहावयाची आहे. अॅ. पावटे ह्यांनी मात्र विरक्त व आचार्य म्हणविणारापेक्षाहि सनातन वृत्ति आपल्या लेखांत प्रगट केली. ती आम्हास मान्य नाही. व तोच बसवचरित्रापासून बोध नव्हे, हेंच आम्ही पुढील लेखांत दाखविणार आहों.

---

## आभारप्रदर्शन

श्रीमंत बापुराव कृष्णाप्पा ऊर्फ बापुसाहेब हिंगमिरे विठ्ठिगमास्तर हिंगणघाट, जि. वर्धा व श्रीमंत गब्रुआप्पा गुंडाप्पा करणे कोकर्डा, जि उमरावती, ह्यांनी वीरशैव हितसवर्धकमंडळाची तहाहयात सभासदत्वाची २५० रु. वर्गणी भरून सभासद होण्याचे कळविल्याबद्दल त्यांचे मंडळातर्फे सादर आभार मानतों तसेंच श्री विठुआप्पा पुंजाप्पा सपाटे सयदापूर व श्री महादाप्पा काशिआप्पा मास्तर उंबरी हे अनुक्रमे वार्षिक ५ व २ रु. वर्गणी देणारे सभासद झालेत ह्याबद्दल त्यांचाहि आभारी आहें.

वि. तु. चौधरी, जनरल सेक्रेटरी,
वि. हितसंवर्धक-मंडळ.

# महाराष्ट्र-वीरशैव-परिचयपट

## १८ मोर्शीचे गाढवे कुटुंब

(१) मारोती सदाशिव ऊर्फ बाबूराव गाढवे वीरशैव लिंगी ब्राम्हण वय ३७, मराठी येते. गुरुमठ नेरपिंगळाई ता मोर्शी, जि. उमरावती [वऱ्हाड]. (२) सदाशिव आप्पा, वय ८०, धंदा शेती, सावकारी व किराणा दुकान, मराठी येते. एकंदर वीरशैव लोकसंख्या ८४, कुटुंबाचा धार्मिक व सामाजिक खर्च रु. १००, परोपकारार्थ रु. १००, व तितकाच करण्याची इच्छा. (३) सौ. लक्ष्मीबाई, वय २७, घरकाम, मराठी येते. सौ. गयाबाई, वय २०, घरकाम मराठी येते. (४) कु. वामन मारोती वय ८ [५] कु. कुसुम मारोती. वय ५, (६) कु. कमला, वय १॥

## १९ नागभीडचे काटकर कुटुंब

(१) तुळशीराम नागय्या स्वामी काटकर दीक्षवंत जंगम ( वी. लिं. ब्राम्हण ) गुरुमठ बेम्बाळ ता. ब्रह्मपुरी जि. चांदा ( C. P. ) वय २७ अध्यापकाची परीक्षा पास. अध्यापक [२] साळुबाई भ्र. नागय्यास्वामी काटकर वय ५५ विधवा आशिक्षित (३) सौ. सरस्वतीबाई भ्र. टी. काटकर वय १८ वर्षे मराठी ४ इयत्ता शिक्षण. (४ कुमार प्रभाकर वय ३॥ वर्षे (५) एकंदर वीरशैवांची संख्या २०० (६) कुटुंबाचा धार्मिक व सामाजिक खर्च १२५ रु. परोपकारार्थ रु. १० सालीना खर्च व रु. ५ करण्याची इच्छा.

## २० सितावर्डी नागपूर येथील कापसे कुटुंब

१ बुद्धाप्पा शिवाप्पा कापसे शीलवंत गुरुमठ कारीन वसमत वय ४४ विधुर मिलिटरी कॉंट्रॅक्टर मॅट्रिकपर्यंत शिक्षण. (२) भाऊराव बुद्धाप्पा कापसे वय २२ वायरलेस कॉंट्रॅक्टर मॅट्रिकपर्यंत शिक्षण. (३) कु. मधुकर वय १४ हायस्कूलांत शिकतो (२) कु. रघुनाथ वय १० प्रायमरी स्कूलांत. (३) कु. रामचंद्र विश्वनाथ कापसे वय ४. (४) सौ. पार्वती भाऊराव कापसे वय १५ मराठी येते. (५) श्रीमती लक्ष्मीबाई भ्र. विश्वनाथ वय २० विधवा आशिक्षित. [६] कु. इंदिरा बुद्धाप्पा कापसे वय १३ प्राथमिक शिक्षण सुरु. [७] कुटुंबाचा धार्मिक व सामाजिक खर्च २००० रु. परोपकारार्थ सालिना २००. तितकाच करण्याची इच्छा. [८] वीरशैवांची संख्या २००

## साताराचे लखापति कुटुंब

वी. संजिवनी ता. १५-३-३६ मधिल म. वीरशैव परिचयपट अनुक्रम नं. १५ मधील दुरुस्ती.

[१] शंकर दगडाप्पा लखापति, दीक्षवंत पंचम तेली, गुरुमठ औंध, मु. सातारा वय ५८ पुनर्विवाहित, मराठी शाळेचे मॅनेजर. साताराची लोकसंख्या ५०० धार्मिक सामाजिक कुटुंबखर्च २५ परोपकार रु. १० बाहेर परोपकाराची इच्छा रु. ५ (२) राजाराम दगडाप्पा लखापति वय ४५ विवाहित. व्यापार, मराठी येते. (३) काशिनाथ शंकर लखापति वय २५ विवाहित शाळामास्तर मॅट्रिकपर्यंत शिक्षण (४) शिवमूर्ति शंकर लखापति वय १७ विवाहित इंग्रजी शिकत आहे- (५) जगन्नाथ राजाराम लखापति वय १६ अविवाहित मराठी सहावी.

(६) सौ. कृष्णाबाई भ्र० शंकर दगडाप्पा लखापति वय ५० घरकाम [७] सौ. पार्वतीबाई भ्र. काशिनाथ शंकर लखापति वय २० घरकाम (८) सौ. अनुसया भ्र. राजाराम दगडाप्पा लखापति वय ३० घरकाम.

# वीरशैवांतील चळवळी

## मॅट्रिक परीक्षेंत पास

नागपूर-युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परीक्षा यशस्वीपणें उत्तीर्ण झाल्याबद्दल पुढील वीरशैव विद्यार्थ्यांचें आम्ही जाहीर अभिनंदन करतों. श्री भाऊराव त्रिंबकआप्पा येसके, २ दिगांबर सोमाप्पा संगेकर, ३ विजय संगाप्पा मुचळंबे, ४ मनोहर रुद्राप्पा मिटकरी.

## नवमतवाद्यांचा पहिला विजय-

### अभिनंदनीय विधवापुनर्विवाह

वीरशैवसमाजांतील सध्याची विधवांची दुर्दशा व त्यांची समाजांतील उपेक्षणीय स्थिति पाहून समाजांत त्यांचा दर्जा वाढावा व त्यांनाहि कुटुंबांत इतर स्त्रियांप्रमाणेच मानाचें स्थान मिळावें व इतर स्त्रियांबरोबरच इस्टेट व इतरहि बाबतींत त्यांना कायदेशीर हक्काचें स्थान प्राप्त व्हावें ह्या दृष्टीनें आज कित्येक दिवसांपासून श्री. चौधरी वगैरे मंडळी व्याख्यानांतून प्रचार करीत होते. व ह्याच दिशेनें विधवांचा पाट किंवा गंधर्व न होतां पुनर्विवाह व्हावा, विशेषत: बालविधवांचे पुनर्विवाहच ह्यापुढे व्हावेत ह्या सद्हेतूने रोहिणखेड येथील परिषदेंत "विधवाविवाहाविषयी" ठराव नं. ४ श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., ह्यांनी पुढे मांडला व त्याला दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी अनुमोदन दिलें. अशा रीतीनें रोहिणखेड-परिषदेने ह्या प्रश्नाला चालना दिली "विधवांचा कौटुंबिक व सामाजिक दर्जा वाढविणे" हे वी. हि. संवर्धक मंडळांतील अनेक उद्दिष्टांपैकी एक उद्दिष्ट कार्य आहे. ५०-६० वर्षांच्या थेरड्यांनाहि आपली लग्नाची हौस केवळ आपण पुरुष ह्मणून भागवितां येते. किंबहुना भागविलेली आपण पहातो. पण स्त्रिया 'ह्या केवळ अबला' ह्मणून अशा विधवांची समाजांत अवहेलना होते तेव्हां ही अवहेलना ह्यापुढे बंद व्हावी व त्यांच्याकडे निदान त्यांनाहि "भावना" असतात ह्या न्यायानें माणुसकीचे हक्क मिळावेत व सुख प्राप्त व्हावें ह्मणून ह्यापुढे शास्त्रोक्त लग्नपद्धतीनेंच बालविधवांचें पुनर्विवाह रूढ करण्याचे वी. हि. संवर्धकमंडळानें रोहिणखेड—परिषदेनंतर ठरविलें होतें. अत्यंत आनंदाची गोष्ट ह्मणजे अशा तऱ्हेचा पुनर्विवाह पहिल्यांदाच मुर्तिजापूरचे बालटे अँड-सन्सचे मालक श्री. नारायणराव बालटे व येथील भदाप्पा गुळवे ह्यांची बालविधवा कन्या तुळसाबाई ह्यांचा पूर्ण शास्त्रोक्त लग्नपद्धतीनें बुधवार ता. २७-५-३६ रोजी गोरजमुहूर्तावर श्रीमंत रामाप्पा गव्हानें सराफ ह्यांचे घरीं झाला. पौरोहित्य येथील श्रीगुरुमुर्ति करबसअय्यास्वामी लासिनकरमठ ह्यांनी केलें. प्रसंगाला दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, श्रीमंत मल्लाप्पा कुन्हे,

> ## उदगीर खास अंक
>
> आज ता. १-६-३६ रोजी प्रकाशित होणार असल्याचें जाहीर केल्या गेलेला वीरशैव संजीवनीचा "उदगीर खास अंक" कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें सोमवार ता. १५-६-३६ रोजी प्रसिद्ध होईल.
>
> व्यवस्थापक,

श्री. बाबा वैद्य, श्री. अण्णासाहेब हुंडेकर, श्री. दानाप्पा जोगुरे, श्री दत्तुआप्पा अंबेकर, श्री. सोमाप्पा मेंडसे, कोल्हे, चौधरी, श्री. पारटकर, एकलारे, परगांवहून श्री. सोमाप्पा संगेकर चांदूर-बाजार श्री. गणपतआप्पा कोल्हे. श्री. बुद्धाप्पा कापसे सिरींकर वगैरे प्रमुख व इतरहि स्त्री-पुरुष मुलाबाळासह हजर होते रोहिणखेड-परिषदेंतील ठरावानुसार घडलेला हा पहिलाच नवमतवादी विधवापुनर्विवाह होय ! त्याबद्दल आह्मी उभयता वधुवरांचे व तसेच पौरोहित्याब-द्दल श्रीगुरुमूर्ति करबसअप्पास्वामी व वधूपक्षाक-डील श्री. दानाप्पा जोगुरे व श्री. गणपत आप्पा कोल्हे सिरींकर व वरपक्षातर्फे श्री. सोमाप्पा संगेकर; श्री. दत्तुआप्पा अंबेकर व नवमतवादी कार्यकर्ते श्री. नाना एकलारे ह्यांचेंहि आह्मी अभिनंदन करतों.

त्याबरोबरच ह्या नवमतवादी कार्यांत सर्व वृद्ध मंडळींनी हजर राहून सक्रिय सहानुभूति व आशी-र्वाद दिला त्याबद्दल आम्ही त्यांचेहि आभारी आहोत. ह्या शुभकार्याबद्दल श्री. नारायणआप्पा बाल्टे ह्यांनी वीरशैव हि. सं. मंडळाला २ रु. ची देणगी दिल्याचें जाहीर केलें. स्तुत्य व अनुकरणीय !! विधवापुनर्विवाह हे ह्या व इतर प्रांतांतून वीरशैवांत रूढ होतील अशी आम्हास आशा आहे.

## महादेवस्वामी जर्मनींत जाणार !!

येथील भिमाशंकर मठांतील अधिपती श्रीगुरु-मुर्ति महादेव स्वामी हे येथील हनुमान व्यायाम प्र. मंडळांतील खेळाडुबरोबर लौकरच जर्मनींत जाणार असल्याचें समजतें. त्यांचें जाहीर अभि-नंदन व निरोप देण्याकरितां लौकरच वी. शिक्षण प्रसारक मंडळ व वी. हितसंवर्धक मंडळातर्फे जाहीर सभा भरणार आहे.

## अनुकरणीय विवाह

नुकतेच मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झालेले येथील तरुण लिंगायत विद्यार्थी श्री. भाऊराव त्रिंबकआप्पा येसके ह्यांचा चाळिसगांवचे के. श्रीमंत शंकरआप्पा भादरशेटे ह्यांची कनिष्ट कन्या चि. 'लीला' हिचेशीं नाशिक मुक्कामीं ता. १७-५-३६ रोजी विवाह झाला. महाराष्ट्र-वीरशैवसमाजांतील हा दुसरा अनुकरणीय प्रौढ संमतिविवाह होय. आह्मी उभय वधुवरांचें हार्दिक अभिनंदन करतों.

## अखिल भारतीय वीरशैव महिला परिषद्

अखिल भारतीय वीरशैव महासभेच्या वेळी वरील परिषद् धारवाडच्या श्रीमान् सौ. पार्वती-देवी केसरी ह्यांचे अध्यक्षतेखाली ता. २ व ३ जून ३६ ला रायचूर येथे भरण्याचें ठरलें आहे.

## अखिल-भारतीय वीरशैव तरुण परिषद्

सदरहू परिषदेचें अधिवेशन बळ्ळारीचे उत्साही तरुण पुढारी श्रीमान् वाय. महाबळेश्वरआप्पा अध्यक्ष डिस्ट्रिक्टबोर्ड ह्यांचे अध्यक्षतेखाली रायचूरास ता. २-३ जून रोजी भरणार आहे.

## श्रीबसवेश्वर व वेद

दावणगिरी येथे ता. ४-४-३६ रोजी श्रीम-न्निरंजन जगद्गुरु मुरघाराजेंद्र महाराज ह्यांच्या सन्मुख बसवेश्वरजयंती साजरी झाली त्या वेळी संगमेश्वर शास्त्री ह्यांनी जाहीर केलें कीं, बसवे-श्वरास वेद मान्य नव्हते ह्मणणें चुकीचें आहे. वीरशैवांना वेदपठणाचें महत्व कमी वाटत असेल म्हणून त्यांना वेद मान्य नाहीत किंवा ते अवैदिक ठरत नाहीत. वीरशैवधर्म वेदास अप्रमाण ह्मणून केव्हांहि मानीत नाही. फक्त हिंसादि कर्मकांड मात्र त्यांना त्याज्य आहे. बाकी वेदविद्या म्हणजे ब्रह्मविद्या हे तर सर्वांना मान्य आहे व आवश्यक आहे.

## अमरावतींत नवा उपक्रम !

अमरावती येथे ता. २८-५-३६ रोजी रात्रौ कांही वीरशैव मंडळींनी खाजगी चर्चा करून एक वी. प्रेमसंवर्धक कीं प्रेमसंवर्धनमंडळ स्थापन करून श्री. शंकरआप्पा पारटकर अध्यक्ष, श्री. करवीर आप्पा हेगु उपाध्यक्ष, श्री. नानाआप्पा एकलारे हे चिटणीस नेमल्या गेल्याचें समजतें. स्तुत्य उद्योग !!

# वीरशैवांतील चळवळी

## पळसिद्धमठाचा अहवाल.—

रोहिणखेड येथील श्रीपळसिद्धमठाचा अहवाल श्री. गोविंदराव बोंद्रे चिखली ह्यांनी ता. १९-४-३६ चे परिषदेंत वाचून दाखविला. सदर्हू अहवाल त्या मठांत वास्तव्य करणारे सध्याचे स्वामी विरुपाक्ष आप्पा गुरु गंगाधर स्वामी ह्यांनी व्यवस्थापक ह्या नात्याने प्रसिद्ध केला आहे. त्यांत जमाखर्चाचा हिशेब दिला आहे. मठसंस्थानांचे हिशेब व अहवाल प्रसिद्ध होणें ही अत्यंत आवश्यक गोष्ट आहे व हें उदाहरण घालून दिल्याबद्दल आह्मी प्रकाशकांचे आभार मानतों. मठसंस्थानासारख्या सार्वजनिक मालमत्तेच्या संस्थेचे किंवा पंचाच्या ताब्यात मृत्युपत्राने आलेल्या इस्टेटीचे जमाखर्चाचे अहवाल जर प्रसिद्ध होत गेले तर कोणालाहि पंचांच्या किंवा मठसंस्थानांतील व्यवस्थापकांच्या सद्हेतुविषयीं शंका घेण्याचें कांहींच कारण पडणार नाही. परंतु दुर्दैवानें वस्तुस्थिति–निदान अमरावती येथील तरी अगदींच विपरीत आहे. 'जेथल्या तेथेच.' "तेरीबी चुप और मेरीबी चूप' ह्या न्यायाने पंचांच्या ताब्यांतील ईस्टेटी पचल्या गेल्याचा, निदान त्याचा मृत्युपत्राप्रमाणेच योग्य उपयोग न झाल्याचा इतिहास व कटु अनुभव उपलब्ध आहे व सर्व जुन्या पंचांची हाडं अशीच कामें करून रंगलीं आहेत. अंबादरवाज्याचे आंतील मृगेंद्रमठाचा वार्षिक जमाखर्चाचा अहवाल प्रसिद्ध करून नवी पंचमंडळी आपलें नांव सार्थ करून इतरांना उदाहरण घालून देतील काय?

## तळेगांव परिषदेंत नामदेव आप्पा कोरे

"दारव्हा तालुका परिषद्; तळेगांव येथील अध्यक्ष लक्ष्मण शंकर ऊर्फ दादा महाराज कीर्तनकार, यांजकडून .— ता. १ एप्रिलचे 'वी. संजीवनी'-चे अंकामध्ये 'वीरशैव संजीवनी'-चे प्रचारकार्यास अडथळा' या मथळ्याखाली एक लेख दारव्हा मुक्कामीं रहाणारे सद्गृहस्थ श्री. नामदेवआप्पा कोरे सराफ ह्यांनी लिहिला आहे. दार्व्हा स्टेशनपासून उत्तरेस दोन कोस हें एक खेडें गांव आहे. त्या ठिकाणी उज्जनी शाखेचा मठ आहे. तो परमपूज्य कैलासवासी कोंडलिंग स्वामींचे नांवाने प्रसिद्ध आहे. तेथे हल्ली त्याचे शिष्यसांप्रदायी श्री. इरलिंग स्वामी हे चालक आहेत. तेथे माघ वद्यामध्ये श्रींचे पुण्यतिथीनिमित्त दार्व्हा तालुका परिषद् भरविली होती. त्या परिषदेचें अध्यक्षस्थान माझेकडे होतें सभेस वीरशैव व इतर प्रेक्षकसमाज दीड-दोन हजारांचेवर होता. सभेचें काम झाल्यानंतर सहावा ठराव ह्मणून वी. सं. चे प्रचारक नामदेवआप्पा कोरे आणि संस्थानचे चालक श्री. इरलिंग स्वामी ह्या परस्परांतील देवघेवीचा चारशे रुपयांचा व्यवहार सभेपुढे मांडण्यांत आला तो असा कीं.— नामदेव आप्पाचे चारशे रुपये जे संस्थानकडे घेणे आहेत त्याचें व्याज न घेतां मुद्दल रुपये घेऊन महाराजांस ऋणमुक्त करावें, व महाराजांनी स्वहस्तें-परहस्तें तावडतोब रकमेची योजना करावी. ह्या सहाव्या ठरावासहि लोकमत जास्त अनुकूल झालें आणि नामदेव आप्पाचे चारशे रुपयांचे व्याजास बहुमताने तिलांजलीचा प्रसंग जेव्हा आला त्यानंतर नामदेव आप्पा झोपेंतून जागे झाले. त्यापूर्वी तीन साडेतीन तास चालू असलेल्या सभेमध्ये नामदेव आप्पा कोण व कुठले ह्याचा नामनिर्देशहि झाला नाही व हे वी. सं चे प्रचारक कोठे चमकलेहि नाहीत.व माझे आणि त्यांचें तर दर्शनदेखील नाही.

जेव्हा ह्यांचे चारशे रुपयांचे व्याजावर गदा पडण्याची वेळ आली तेव्हा हे वी. सं. चे प्रचारक नामदेव आप्पा समोर येऊन फक्त मला थोडे बोलण्याची परवानगी मिळावी इतकेंच ह्मणू लागले. पण लोकमत इरलिंगस्वामी ह्यांचेकडे पूज्यभावनेमुळे जास्त सहानुभूति-दर्शक असल्याकारणाने नामदेव आप्पांना व्याज न घेण्यासंबंधाने अभिवचन द्यावें लागलें, व तें कसेंतरी त्यांनी दिलेंहि. तशा प्रसंगीं बरीच सभेंत खळबळ उडाली. तें असो. पण वी. सं. चे प्रचारकार्यासंबंधी नामदेवआप्पांचे मुखांतून जर कांहीं उद्गार निघाले असतील तर ते अशा तऱ्हेने निघाले हें मात्र स्पष्ट जाहीर झालें पाहिजे. सभेचय़ा कोणा कार्यकर्त्याकडून निघाले असल्यास तसा पुरावा द्यावा अथवा स्वत: कुलदेवतेला स्मरून प्रतिज्ञेने पुन्हा जाहीर करावें कीं, "मला वी. सं. चे प्रचारकार्याकरिता दोन शब्द बोलण्यास परवानगी मिळावी असा स्पष्ट नामनिर्देश करून मी परवानगी मागितली असतां तरी अध्यक्षांकडून दिली गेली नाही असें प्रतिज्ञेवर लिहावें. उलट, दुसरे दिवशी सकाळी यांचें व माझें भाषण झालें. त्यांत त्यांनी प्रांजळपणाने कबूलहि केलें कीं, मला काल दारव्हा येथून येण्यासच वेळ झाला. आणि सभेंत जी देवघेवीचे ठरावाची खळबळ उडाली तीमुळें मला वी. सं. चें स्मरण झालें नाही. अशा तऱ्हेने झलेला सभेचा व्यवहार अमरावतीस येतांच मी स्वतः श्री. नानासाहेब बामणगांवकर यांचेजवळ निवेदन केला. अशी खरी हकीगत असतां मला खात्री आहे कीं, नामदेव आप्पा प्रतिज्ञेवर असा खोटा लेख केव्हांहि जाहीर करणार नाहीत. आणि परमेश्वराजवळ अशी प्रार्थना करितों कीं, पवित्र अशा वी. सं. चे प्रचारकार्यासंबंधी त्यांना सद्बुद्धि अधिकाधिक देऊन समाजसेवेचें पुण्यच त्यांचे पदरीं पडो अशी प्रभूजवळ प्रार्थना आहे.

---

# निजाम प्रांतिक वीरशैव परिषद् उदगीर

## अधिवेशन १ लें

तारीख २५ एप्रिल-१९३६ रोजी परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर अमरावती यांचे अध्यक्षतेखाली परिषदेस प्रारंभ झाला.

प्रथम नियोजित अध्यक्षांना आपलें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल श्रीविरुपाक्षस्वामी देशिकेंद्र महाराज लातूर ह्यांनी सूचना दिली आणि या सूचनेला श्री. संग्रामप्पा साहेब वकील उदगीर यांनी अनुमोदन दिल्यानंतर अध्यक्ष श्री. नानासाहेब बामणगांवकर यांनी प्रचंड टाळ्यांच्या गजरांत आपलें स्थान स्वीकारलें. प्रथम श्री. कल्ल्यास्वामी, बी. एस्. सी., ह्यांनी आपल्या मधुर वाणांने प्रार्थना म्हटली. ह्यानंतर परिषदेचे सेक्रेटरीकडून सबजेक्ट-कमिटीचा अहवाल वाचून दाखविण्यांत आला. ह्यानंतर नियोजित अध्यक्ष श्री. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचें एक तासपावेतो अत्यंत विचारपरिप्लुत मार्मिक, व जोरदार भाषण झालें. अध्यक्षांनी

आपल्या भाषणांत वीरशैवसमाजाच्या सर्वांग-सुंदरपणाकडे जनतेचें लक्ष वेधिलें. त्यानंतर खालील ठराव बहुमताने पास करण्यांत आले.

### ठराव नं १

निजाम वीरशैव विद्यावर्धक फंड यादगीर ह्या संस्थेचें केंद्र ठिकाण, यादगीरऐवजी हैद्राबाद [ द. ] येथे एक वर्षांकरितां ठेवण्यात यावें.

ठराव मांडणार—श्रीनिवासरावसाहेब वकील, हायकोर्ट. हैद्राबाद, अनुमोदक—सिद्दप्पासाहेब.

### ठराव नं. २

कानडी भाषेचा प्रचार व्हावा याकरिता प्रांतांतील वीरशैव वस्तीच्या मोठमोठ्या ठिकाणी कानडी शाळा उघडण्यांत याव्यात.

मांडणार— पंडित सिद्धप्पासाहेब. अनुमोदक— अप्पारावसाहेब वकील.

### ठराव नं. ३

गुलबर्गा–आर्यसमाजाने प्रसिद्ध केलेल्या " लिंगायतोंकी दिशाभूल " पत्रिकेंतील हकीकत खोटी व निराधार असून, त्यांतील शब्द लिंगायत जनतेचें अंतःकरण दुखविणारे आहेत म्हणून या पत्रिकेचा निषेध करण्यांत येत आहे.

मांडणार–शेटे वकील, मोमिनाबाद. अनुमोदक—श्री विश्वनाथराव वकील, उदगीर. नागनाथस्वामी भालकीकर वकील.

### ठ० नं० ४

वीरशैवसमाजांत आधुनिक पद्धतिनुसार धर्मज्ञानाचा प्रसार व्हावा याकरिता धर्मप्रचार व भजनीक ह्यांची नेमणूक करण्यांत यावी.

मांडणार--श्री. पंडित संग्रामप्पासाहेब वकील उदगीर. अनुमोदक—श्रीनिवासराव साहेब वकील, हैद्राबाद, व बसवराज गुलबर्गा.

### ठ० नं० ५

निजाम प्रांतीय वीरशैवांना आपली सामाजिक माहिती व सामाजिक वाङ्मय लहान लहान पुस्तकरूपाने हिन्दी भाषेंतून प्रसिद्ध करण्याकरिता एका हिन्दी वृत्तपत्राची व वाङ्मयमंडळाची अत्यंत जरूरी आहे. याकरिता प्रांतिक परिषदेकडून हिन्दी भाषेंतून एक मुखपत्र चालविण्यात यावें आणि लहान लहान पुस्तकांना प्रसिद्धीकरण देण्यात यावें. आणि याकरिता एका स्वतंत्र प्रेसची योजना करण्यात यावी.

मांडणार—पंडित नागनाथरावसाहेब वकील श्री. भीमन्नासाहेब ओन्हरसीअर, व मन्मथप्पा साहेब वकील, मोमिनाबाद.

### ठ० नं० ६

हैद्राबाद संस्थानांत अक्षयतृतियेच्या दिवशी बसवजन्मदिनानिमित्त संस्थानकडून सरकारी रीत्या सार्वत्रिक सुट्टी नेमण्यात यावी याकरितां सरकारास विनंती करण्यात येत आहे.

मांडणार – पंडित भीमराव साहेब वकील, अनुमोदक - राचप्पा साहेब तांडुर.

### ठ० नं० ७

( अ ) हैद्राबाद येथे विद्यार्जन करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सोयीकरिता एक वीरशैव वसतिगृह उघडण्यात यावें आणि उस्मानिया-विद्यापीठाच्या सरकारी वसतीगृहांत वीरशैव विद्यार्थ्यांची सोय व्हावी ह्याकरिता सदर विद्यापीठाच्या चॅन्सलर-साहेबांना विनंती करण्यात येत आहे.

[ ब ] निजाम प्रांतांतील वीरशैव वस्तीच्या मोठमोठ्या ठिकाणी वीरशैव विद्यार्थ्यांच्या सोयीकरिता वसतिगृहें उघडण्यात यावीं.

मांडणार—श्रीनिवासराव साहेब वकील हैद्राबाद अनुमोदक —डॉ. एम्.रुद्राप्पा साहेब हैद्राबाद, श्री. मठम वीरय्या हैद्राबाद [ द. ]

### ठ० नं० ८

निजाम प्रांतांतील वीरशैवसमाजाच्या संघटनेकरिता प्रांतांतील दरेक वीरशैव वस्तीचे ठिकाणी वीरशैवसंघ स्थापावेत आणि या संघाचा संबंध परिषदेस जोडावा तसेंच, सध्या ज्या कांही संस्था व संघ चालू असतील त्यांनी आपला संबंध संघटनेकरिता प्रांतिक परिषदेस जोडावा.

ठ० मांडणार—श्री. विरुपाक्षस्वामी देशिकेंद्र महाराज, लातूर. अनु०—महादेवराव साहेब वकील उदगीर.

येणे प्रमाणें एकंदर ८ उपयुक्त ठराव पास करण्यात आले आणि यानिमित्त नियोजित वक्त्यांचीं मार्मिक व परिणामकारक अशीं भाषणें झालीं.

परिषदेकरिता स्वतंत्र मंडप उभारण्यात आला होता. मंडप स्त्री-पुरुषांनी विकार भरला होता.

वरील ठराव व अनेक वक्त्यांचीं भाषणें झाल्यानंतर अध्यक्षांचे समारोपादाखल थोडक्यांत मुद्देसूद व परिणामकारक असें भाषण झालें.

समारोपाचें भाषण संपल्यानंतर अध्यक्षांना पुष्पहारमंडित करण्यात येऊन परिषदेचे सेक्रे. श्री. संग्रामप्पा वकील यांनी त्यांचा गुणगौरव करून अभिनंदन केलें. तसेच परिषदेकरितां जमलेल्या सर्व प्रतिष्ठित पाहुण्यांचे आभार मानण्यात आले आणि परिषदेचा कार्यक्रम संपविण्यात आला. येणेप्रमाणें यशस्वीपणें परिषद् पार पडली.

तारीख २४-४-३६ रोजी उदगीर-वीरशैव-समाजाच्या वार्षिकोत्सवानिमित्त निजाम प्रांतांतील सर्व भागांतून प्रमुख वीरशैवमंडळी आली असतां सर्वांच्या विचाराने 'निजाम वीरशैव प्रांतिक परिषद्,' स्थापली जावी असें ठरून यानिमित्त खालील गृहस्थांची एक स्टँडिंग कमिटी बहुमताने नेमण्यात आली आहे.

कर्नाटक भागांतून निवडून आलेले प्रतिनिधी:-

(१) श्री. बी. ए. पाटील, सिरवार, रायचूर (२) पंडित सिद्रामप्पा यरमरख वकील, रायचूर. (३) श्री. शिवराज साहेब गुलबर्गा (४) श्री. राचप्पा साहेब तांदूर, (५) श्री. शरणप्पा फत्तेपुरे. (६) श्री. मडिवाळप्पा खेणे (७) संग्रामप्पा साहेब वकील (८) श्री. प्रभुराव वकील (९) श्री. रुद्रप्पा साहेब.

**महाराष्ट्रः—**

(१) श्री. मल्लिकार्जुन तोडकरी, बी ए., एल एल. बी., उस्मानाबाद (२) श्री. प्रभुअप्पा वकील, परभणी (३) श्री. योगाराज साहेब वकील बीड. (४) श्री. प्रभुअप्पा जवळे लातूर (५) श्री. संगय्या स्वामी वकील (६) श्री. विरुपाक्ष स्वामी देशिकेंद्र महाराज लातूर (७) श्री. व्ही. एम्. शेटे वकील मोमिनाबाद.

**आंध्रः—**

(१) श्री. डॉ. के. एम्. रुद्रय्या हैद्राबाद (२) श्री मठमवीरय्या हैद्राबाद [३] श्री. वीरप्पा साहेब वकील सिरसला करीमनगर [४] श्री. सामेश्वरराव साहेब वकील विकराबाद [५] श्री. श्रीनीवासराव साहेब वकील हैद्राबाद.

## निवडून आलेलें अधिकारी मंडळ

अध्यक्षः—श्रीनीवासराव साहेब वकील हायकोर्ट हैद्राबाद.

उपाध्यक्षः—श्री. विरुपाक्ष स्वामी देशिकेंद्र महाराज लातुर.

सेक्रटरीः—श्री. संग्रामप्पा साहेब वकील हायकोर्ट उदगीर

अ. सेक्र. व खजिनदारः—श्री. प्रभुराव साहेब वकील उदगीर

---

# संवाद

रचनाकार,—
श्री. विश्वनाथआप्पा कुलूं
रोहिणखेड.

( रोहिणखेड, जि. बुलडाणा, येथे ता० १९-४-३६ रोजीं भरलेल्या वीरशैव पुढाऱ्यांचे परिषदेसमोर लहान मुलांनी म्हटलेला उद्बोधक संवाद— )

पात्रें:——बसवआप्पा, यशवंतआप्पा, शांतलिंग स्वामी.

**बसवआप्पा:**—वारे आमचा समाज ! काय ह्या आमच्या समाजाची विपन्नावस्था ! चोहोंकडून आमच्या समाजावर आपत्ति आली असतांनासुद्धां आह्मीं जागे होत नाही! दैवदुर्विलास, दुसरें काय ?

**शांतलिंगस्वामी:**—अहो बसवआप्पा आपल्या समाजांत धर्मच राहिला नाही. सर्वस्त्रीं भ्रष्टाकार माजला असूंन जुन्या गोष्टी सर्व लयास गेल्या आहेत. कांहीं दिवसांनीं धर्माचें नांवहि राहणार नाही.

**यशवंतआप्पा:**—अहो शांतलिंगस्वामी, धर्म बुडाला ह्मणजे काय ? याचा अर्थ स्पष्ट करून सांगाल तर ठीक होईल.

**शांतलिंग:**—अहो काय विचारता, लिंगाईत लोकांनाः लिंग जवळ ठेवण्याची लाज वाटते; मग पूजाविधी व अष्टावर्ण याप्रमाणें वागणें तर दूरच.

**बसवआप्पा:**—त्याचप्रमाणें आपल्या वीरशैव-समाजानें लिंगाईत बुरड, लिंगाईत तेली, व लिंगाईत कोष्टी यांनीहि रोटीव्यवहार सुरूं केला आहे त्यामुळे धर्म बुडाल्यासारखाच झाला आहे.

**यशवंतआप्पा:**—हें पहा, तुमचें दोघांचें ह्मणणें कांही अंशीं खरें आहे. धर्म व समाज विपन्नावस्थेला गेला याचें कारण आपण आपलें कर्तव्यकर्म सोडून दिलें आहे. त्यामुळें सर्व घोटाळा झाला आहे.

**बसवआप्पा:**—अस्सें काय ? मला आपली कर्तव्यकर्में कोणतीं हें थोडक्यांत सांगा पाहूं.

**यशवंतआप्पा:**—आपले धर्मगुरु शांतलिंगस्वामी हे आपणास सर्व सांगू शकतील.

**शांतलिंगस्वामी:**—हें पहा यशवंतआप्पा आपल्याला हें मुळींच सांगता येणार नाहीं. आम्हाला लिहितां-वाचतांसुद्धां नीट येत नाहीं, व धर्माचीहि विशेष माहिती नाही.

**यशवंतआप्पा:**—झालें तर, आडांतच नाही तर पोहऱ्यांत कोठून येणार व तान्हेल्यांच्या पोटांत कोठून जाणार !

**बसवआप्पा:**—यशवंतरावआप्पा, आपणच थोडक्यांत धर्म ह्मणजे काय तें सांगा व आपल्या समाजास ही अशी वाईट स्थिति होण्याची कारणेंहि सांगा.

**यशवंतआप्पा:**—ठीक आहे. साखर गोड लागणे हा साखरेचा धर्म आहे, तद्वत् मनुष्य-प्राण्याच्या ऐहिक, परमार्थिक व नैतिक उन्नती-करितां घालून दिलेले नियम पाळणें हा मनुष्याचा धर्म आहे. समाजहिताच्या दृष्टीने चालू परिस्थितींत उत्तम असे नियम समाजाला समजावून सांगणें सामाजिक व धार्मिकज्ञानाबद्दल समाजाला माहिती देणें ही धर्मगुरुंची कर्तव्यें त्यांनीं सोडून दिलीं आहेत. मास्तर ज्याप्रमाणे मुलांना शिकविणे व त्यांमुळे मुलें ज्ञानसंपन्न

होतात, त्याप्रमाणें धर्मगुरुंनी केलें पाहिजे. असें शिक्षण म्हणजे समाज सुधारणें. मास्तर मुलांना कांहींच ज्ञान शिकवूं शकत नाही.

**बसवआप्पा:**—यशवंतआप्पा तुमचें म्हणणें मला पटलें. आपला समाज सुधारण्यास आपण काय उपाय केले पाहिजेत म्हणजे आपण सुख-संपन्न होऊं ?

**यशवंतआप्पा:**—ऐका तर. आपली स्थिति सुधारण्याकरितां आपण पहिल्याने आपली संघटना व एकी केली पाहिजे. प्रत्येक लिंगधारी, मग तो कोणताहि धंदा करणारा असो, तो आपला समाजबांधव समजून चालले पाहिजे. आपल्यांत नाना तऱ्हेचे भेद असल्याने आपण एकजुटीने काय करूं शकणार नाही, हें निर्विवाद आहे. याकरिता पोटभेद काढून टाकले पाहिजेत. तसेंच, हल्लींच्या साक्षरतेशिवाय होत नाहीं म्हणून प्रत्येकाने शैक्षणिक बाबतींत शक्य ती प्रगति करणें जरूर आहे. धार्मिक विचारप्रसाराकरितां जागजागीं धर्मगुरुंचे मठ स्थापिले पाहिजेत.

**बसवआप्पा:**— बरें ? धर्मगुरुचे आणि समाजाचे संबंध कसे असले पाहिजेत.

**यशवंतआप्पा:**—धर्मगुरु ह्यांना जंगम ही संज्ञा आहे. जंगम म्हणजे फिरणारे. त्यांनी नेहमी धार्मिक प्रचारार्थ फिरत राहिले पाहिजे. मठ म्हणजे धार्मिक शाळा समजल्या पाहिजेत. व एखादा धर्मगुरु नालायक असल्यास त्याला काढून टाकण्याचा अधिकार समाजाला असला पाहिजे. कारण नासलेला आंबा इतर सर्व आंब्यांना खराब करतो. त्याचप्रमाणें शैक्षणिक फंड उभारणें, गेलेला व्यापार काबीज करणें वगैरे कामें कार्यक्षेत्रांत येऊं शकतात. याप्रमाणें आस्ते आस्ते कार्य केल्यास समाज सुधारेल अशी खात्री आहे.

**बसवआप्पा:**—वा ? यशवंतआप्पा काय चांगली योजना आपण सुचविली ! चला तर आपण सर्व जण त्याप्रमाणें कामगिरी करून सामाजिक कार्य केल्याचें श्रेय मिळवूं.

**शांतलिंग:**—ठीक आहे, मलाहि योजना पसंत आहे, सामाजिक कार्याकरिता व हिताकरिता आम्ही धर्मगुरुंनी आमच्या वैयक्तिक हक्कावर पाणी सोडून पंगु झालेल्या समाजास हातभार लावणें हाच आमचा धर्म आहे.

## संवाद २ रा.

पात्रें:—गंपु अस्पृश्य, मोरोपंत, शिवानंदशास्त्री

**मोरोपंत:**—या शास्त्रीबुवा नमस्कार.

**शिवानंदशास्त्री :**— आशीर्वाद आशीर्वाद. कसें काय चाललें आहे ?

**मोरोपंत:**—आपल्या आशीर्वादेंकरून ठीक चाललें आहे.

(मोरोपत व शिवानंद शास्त्री बोलत असतांना)

**गंपु:**—काय हो मोरोपंत तुमचा बापु घरीं आहे काय ?

**मोरोपंत:**—कारे बुवा तूं कोण आहेस ! आणि तुझे काय काम आहे !

**गंपु:**—माझें नांव गपु असून मी एका अस्पृश्याचा मुलगा आहे. बापु व मी बरोबर शाळेंत शिकत असतो, व त्याच्याशीं मला अभ्यासासंबंधी काम आहे.

**मोरोपंत:**—मग आंत येऊं नकोस. बाहेरच थांब !

**गंपु:**—कां हो इतका आमचा तिरस्कार कां करितां ?

**शिवानंदस्वामी:**—बाळा, पूर्वापार चालत आलेल्या चालिरीतीचा त्याग करणें हें अगदीं अयोग्य आहे म्हणून तुम्ही अस्पृश्यांनी दूर राहणेंच ठीक आहे.

**गंपु:**—महाराज आम्ही असें काय पातक केलें आहे कीं आम्हास हिंदुपासून अलग ठेवण्यात येत आहे ?

**मोरोपंत:**—अरे किती गलिच्छ लोक तुम्ही की सर्व लोकांची तुम्ही घाण काढतां व मद्यमांस खाता!

**गंपु:**—आम्ही तुमची घाण काढतो म्हणून तुम्ही आम्हाला गलिच्छ समजतां काय !

आमच्याप्रमाणें आपली मातोश्री व पत्नीहि आपली घाण काढते...

**मोरोपंतः**- गंपु ही चाव समाजांत रूढ झालेली आहे.

**गंपुः**—कांहो मोरोपंत रेल्वेंत—मोटारींत बसतांना, तसेच साहेब लोकांना होणाऱ्या मेजवान्यांचे वेळीं, स्पृश्यास्पृश्यांनी एकाच टेबलावरून मेजवानी घेण्याची रूढी पूर्वीपासूनच चालत आलेली आहे काय ?

**मोरोपंतः**—अरे बाळा, परिस्थितिनुरूप तसें करावें लागतें. शिवाय तुह्मी लोक मेलेल्या गाई, म्हशी, रेडे, बैल ह्यांचें मांस भक्षण करतां ह्मणून तुह्मांस अस्पृश्य मानण्यांत येतें.

**गंपुः**—काय हो शिवानंद शास्त्री, हा तुमचा शास्त्राचा न्याय आहे काय ? काय हो प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाने पवित्र मानलेल्या गोमातेस तुमच्या देखत जिवंत कापून तिचें मांस भक्षण करणाऱ्या लोकांस तुह्मी अस्पृश्य मानीत नाही व आह्मी निसर्गनियमानुसार मृत्यु पावलेल्या जनावरांचें मांस भक्षण करतो ह्मणून आह्माला अस्पृश्य मानतात हें काय तुमचें शास्त्र आहे, कीं आह्मा अस्पृश्यांवर तुमचें उगारलेलें शस्त्र आहे ? वारे हिंदुधर्मशास्त्र !

**शिवानंदशास्त्रीः**—मोरोपंत ( गाणें )

**अस्पृश्यता ही असें आर्य कलंकची नासें।**
**निजकार्यांते बहुमोल आर्य जनाचे ॥ध्रु॥**

खरोखर आपण किती रूढीप्रिय अविचारी लोक आहोत. या मुलाचें तात्विक व हृदयस्पर्शी बोल ऐकून माझे अंतःकरण अस्पृश्यावद्दलच्या प्रेमाने भरून आलें. चला तर यांना योग्य सवलत देण्याची आपण जोराने खटपट करू.

**मोरोपंतः**—काय शास्त्रीबोवा यांना आपल्या बरोबर भोजनास बसण्याचीहि सवलत द्यायची काय?

**गंपुः**—नाही महाराज, मी आपणास ती सवलत मागत नाहीं, भिल, कोळी, मुसलमान या लोकांशीं आपण रोटीव्यवहार करतां कां ?

**मोरोपंतः**—नाहीं.

**गंपुः**—मग आह्मी ती सवलत कशी मागूं ?

**मोरोपंतः**—मग तुह्मांस कोणत्या सवलती पाहिजेत ?

**गंपुः**- सर्वांबरोबर कामें करणें, सार्वजनिक विहिरीवर पाणी भरणें, देवदर्शनासाठी देवळांत जाणें, थोडक्यांत सांगायचें ह्मणजे बाह्यात्कारी कामांत आमचा विटाळ मानला जाऊं नये, हीच आपणास मागणी आहे.

**मोरोपंतः**—ठीक आहे. ही तुझी मागणी योग्य आहे.

---

# वीरशैवांच्या प्रगतिपथावरील धोंड

## ( पूर्वार्ध )

लेखांक १ ला

लेखकः— श्री. तु० ना० काटकर, नागभीड, [ बी. एन्. रेल्वे. ]



रशैवधर्माविषयीं स्थूल मानाने जरी विचार केला तरी तो इतक्या अवनत दशेंत कां येऊन पोहोचला हें सहज गत्या कोणत्याहि विचारवंत वीरशैवाच्या चटकन लक्षांत येईल. ह्याला मुख्य कारणें दोनच. एक महत्वाचें कारण रूढी; आणि त्यावर अवलंबून असलेलें दुसरें कारण शिक्षणाचा अभाव. यांतील पहिलें कारण कितीहि वयोवृद्ध नव्हे बलिष्ट झालें असलें तरी त्याचें निर्मूलन

करण्याची शक्ति दुसऱ्या कारणांत ओतप्रोत साठलेली आहे. असा हा नाका-तोंडाचा संबंध किती निकट आहे, इकडे सहसा कोणाचें लक्षच पोहोचत नाही.

रूढी ही कितीहि पुरातनकालापासून चालत आलेली असलीं, आणि तिचें स्वरूप कितीहि व्यापक असलें, तरी कोणताहि सुशिक्षित नवमतवादी पुरुष सारासार विचारांनीं तिच्यावर मात करतोच. मात करणें अशक्य कोटींतील गोष्ट नाही; पण ती करण्याकरिता अंगीं जें धार्ष्ट्य हवें आहे, असा धार्ष्ट्यवान् वीरशैवसमाज फारच अत्यल्प आहे आणि तोच काय तो अफाट पसरलेल्या समाजसागरांत हात-पाय हालवीत आहे. आपण आपलें कर्तव्य म्हणून आपल्या समाजांत धर्मजागृति करण्याचा प्रयत्न करीत आहोंत खरें, पण या जागृतीचा व्हावा तसा सुपरिणाम होत नाही. कारणें दिसत आहेत पण त्या मार्गानें आपले प्रयत्न होत नाहीत. आपण आपल्या बृहन्समाजाविषयी विचार केला तर त्यांतील बहुसंख्य समाज विरळ विरळ प्रमाणांत कां होईना पण-खेड्यांतूनच रहाणारा आहे, आणि हाच समाज धर्माच्या नावाखाली भोळ्या भाबड्या अंधश्रद्धेच्या आहारीं पडलेला आहे. त्याचा सार्वजनिक कार्याशीं म्हणावा तसा संबंध येत नाही त्यामुळे जगांत तर राहोच पण आपल्या समाजांतसुद्धा काय चाललें आहे हें त्यांच्या ध्यानींमनींहि नसतें. कधींकाळीं त्यांच्याशीं गांठ पडलीच तर त्यांच्या मतें स्वतःला दोषी ठरवून घेण्यापलीकडे आपले प्रयत्न जात नाहीत. 'अहो! यांना काय, ही इंग्रजी शिकलेली आज-कालची पोरें अशींच धर्मबुडवी अन् कुळउधळी निघायचीं! यांचें ऐकल्यानें कोणी कधी भाग्याला आला आहे काय?' असा त्यावर पुनः एक त्यांचा हमखास ताशेरा ठेवलेलाच.

आमचा वीरशैवसमाज या दृष्टीनें पहातां फारच तळाशी ढळत पडलेला आहे हें माझें विधान केव्हांहि अतिशयोक्तीचें होणार नाही. आज नवविचारप्रवर्तकांची संख्या अगदींच अल्प आहे. तीहि शहरांतून. शहरें जर वगळलीं तर नवमतवादाला पाठिंबा देणारे औषधालाहि मिळणें दुर्लभ. आज नवमतवादी समाजानें जे जारीनें प्रयत्न चालविले आहेत तेहि शहरांतूनच. वास्तविक पाहातां या कार्याची शहरवासीयांना मुळी जरूरच भासत नाही. शहरी वातावरणांतील स्वयंसिद्ध संस्कारांनी आपली प्रगति करून घेण्यास तीं समर्थ आहेत बीसाऱ्या शतकांतलि जाणत्या समाजाकडे लक्ष पुरविणेंच मुळीं अज्ञानपणाचें आहे. आणि सुज्ञांची घोडचूक होत आहे ती येथेच. सुधारलेल्यांची सुधारणा घडवून आणण्यांत कोणता पुरुषार्थ आहे! आज शेंकडों खेड्यांतून बहुसंख्य वीरशैवसमाज गाढ अज्ञानांधकारांत घोरत पडलेला आहे त्यांना प्रथम जागें करणें-नव्हे तर त्यांचा उद्धार करणें किती आवश्यक आहे याचा प्रत्येक समंजस वीरशैवानें आपल्या आपल्या सदसद्विवेकबुद्धीनें विचार करून पहावा. आणि तनमनधनाच्या बळावर अज्ञज्ञातिबांधवांच्या आचारविचारांत क्रान्ति घडवून आणावी. त्याशिवाय आपल्या पंथांतील जातिभेद, जातींचे पोटभेद, नष्ट व्हावयाचे नाहीत व हे जोपर्यंत नष्ट होत नाहीत तोपर्यंत रोटीव्यवहार नि बेटीव्यवहारासारखीं अवजड कार्यें सर्रास उरकण्याची आशाच बाळगावयास नको. आमच्या प्रगतीच्या मार्गावरील हे तीक्ष्ण पण आडदांड कंटक आहेत. यांचें उच्छेदन केल्याशिवाय वीरशैवांना सर्रास आघाडी मारतां येणें कदापिहि शक्य नाही. धर्माधिकारी व सुशिक्षित नि विद्वान् वर्गांनी परस्परांचे संकोच सोडून आजच्या काळांत बृहन्वीरशैवांचें एकीकरण घडवून आणण्यांतच वीरशैवांचें हित साधणार आहे.

( अपूर्ण )

---

'नवमतवादा'-सारख्या शब्दप्रयोगांनीं बुजून जाण्याचें कांहीं कारण नाही. श्री. वि तु चौधरी बी. ए. यांनी आपल्या 'नवमतवाद' या लेखांत त्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे. तेव्हा पुनः आम्हाला चर्वितचर्वण करण्याचें कारण नाही.

# वीरशैवसंजीवनी

अंक १२ वा ) ता० १५ जून १९३६ ( वर्ष १ लें

## खास उदगीर अंक

### अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

श्री. द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख, जहागीरदार पारवा ह्यांची

—: ' उदय ' व ' वीरशैव संजीवनी ' कार्यालयाला भेट :—

तारीख २०-४-१९३६



( मध्यभागी-खुर्चीवर:— श्री. बा‍ळणगांवकर व श्रीमंत बाबासाहेब देशमुख )

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति ज्येष्ठ व॥ ११ शके १८५८ ( अंक १२ वा.

# उदगीर - परिषद् व बसवजयंती - उत्सव

रिपोर्ट पाठविणारः—व्हि० एम्० शेटे वकील, मोमिनाबाद.

## दिवस १ ला.

ता. २३-४-३६-ला कर्नाटकगांधी दे. भ. श्री. मंजाप्पा हर्डेकर यांचें आगमन उदगीरनगरीस झालें. रेल्वे-स्टेशनप्लॅटफॉर्मवर गुलबर्गा-वीरशैव--तरुण संघाचे जागरुक व कार्यतत्पर मेंबर आणि उदगीर--वीरशैवसमाजाचे श्री. संग्रामप्पाप्रभृति मंडळी आणि इतर जनता श्री. हर्डेकरांचे स्वागताप्रीत्यर्थ मुद्दाम उपस्थित झाली होती. श्री. हर्डेकरांचें आगमन होतांच त्यांना वीरशैवसमाज, उदगीर,-कडून पुष्पहारमंडित करण्यांत येऊन त्यांचा जयजयकार करण्यांत आला. स्टेशनपासून वीरशैवसमाज-मंदिरापर्यंत मोठ्या थाटाची मिरवणूक काढण्यांत आली. दे. भ. हर्डेकरजीच्या आगमनाने जिकडे तिकडे आनंदी आनंद पसरला होता. मिरवणूक विसर्जन झाल्यानंतर उदगीर-वीरशैव-समाजमंदिरांत 'झेंडावंदना'--चा चित्ताकर्षक व हृदय हालवून सोडणारा कार्यक्रम झाला. सोलापुरचे प्रो. फुलारी यांचे देखरेखेखाली तरबेज झालेल्या उदगीरच्या वीरशैवस्वयंसेवकदलाने व धर्माभिमानाने ओतप्रोत भरलेल्या गुलबर्गा-वीरशैवसंघाच्या तरुणांनी "हृदयस्पर्शी" वीरशैव-समाजगीत गाऊन "झेंडा-वंदन" केलें. सायंकाळी तीन वाजतां व्याख्यानास प्रारंभ

झाला. प्रथम गुलबर्गा-वीरशैवसंघाच्या सेक्रेटरीनें "बसव-संदेश" ह्या विषयावर बसववचनानुधारें अत्यंत जोरदार व मार्मिक भाषण झालें. त्यांनी आपल्या भाषणांत श्री. बसवेश्वर हे १२ व्या शतकांतील गांधी होत असें सांगितलें आणि तुलनात्मक दृष्ट्या श्री. बसवेश्वराच्या कार्याचें विवेचन केलें.

ह्यानंतर गुलबर्गा वी. संघाचे तडफदार व स्वाभिमानी तरुण श्री. बसवराज यांचें सुधारणा व बसवेश या विषयावर दणदणीत व निर्भीडपणानें भाषण झालें. यांनी आपल्या भाषणांत धर्म-ग्रंथाचे अंधभक्त बनूं नका, बुद्धीच्या कसोटीस जो धर्म व व जीं तत्वें उतरतील त्यांचाच स्वीकार करा, पुराणादि थोतांड व पोटभरू ग्रंथांस धर्मग्रंथ समजूं नका, जगांत चिकित्सक वृत्तीने रहावें, अशा आशयाचें भाषण केलें. यानंतर लातूर-वीरशैववालसमाजाचे लाईफ मेंबर श्री. नागुरे यांनी शिक्षण या विषयावर अर्धा तासपावेतो अत्यंत विचारपरिप्लुत असें भाषण केलें. याशिवाय बऱ्याच लहान मोठ्या वक्त्यांचीं भाषणें झालीं.

सायंकाळी सात वाजतां हैद्राबाद येथील लिंगायत डॉक्टर मि. एम्. रुद्रप्पा यांचें 'अष्टावर्ण व षट्स्थल' या विषयावर एक तासपर्यंत माहितीपूर्ण असें गंभीर भाषण झालें. विषय अवघड व गंभीर स्वरूपाचा असूनहि डॉ. मजकुरांनी विनोदपूर्ण वाणीनें जनतेच्या अंतःकरणांत विषयाचें महत्व बिंबविलें, आणि आधुनिक पद्धतीने व चिकित्सकबुद्धीने अष्टावर्ण व षट्स्थल ह्या मार्मिक विषयांचें मार्मिकपणाने पण कुशलतेने वर्णन केलें. यानंतर भजनाचा कार्यक्रम झाला, आणि जनतेस संगीताचें द्वारें मधुर आवाजांत बसव-संदेशाच्या व शिव-शरणसंदेशाच्या मधुर गुटिका देण्यांत आल्या. भजनाचा कार्यक्रम संपल्यानंतर पहिल्या दिवसाचा कार्यक्रम संपविण्यात आला.

## दिवस २ रा.

ता. २४-६-३६ रोजी सकाळी ९ ते १२ पर्यंत श्रीबसवजयंतीउत्सव साजरा करण्यांत आला. या प्रसंगीं श्रीबसवेश्वराची महती व कार्यकीर्ति सांगितली. याशिवाय परस्थ विद्वान् वक्त्यांची श्री. बसवेश्वराबद्दल साधक-बाधक व्याख्यानें झालीं.

### श्री. बामणगांवकरांचें आगमन

दोनप्रहरी १२॥ वाजतां श्री. नानासाहेब बामणगांवकर संपादक 'उदय' व 'वीरशैव-संजीवनी' उमरावती, ह्यांचे उदगीरास आगमन झालें. रेल्वेस्टेशन-प्लॅटफॉर्मवर नानासाहेबांच्या स्वागताकरितां चिकार गर्दी झाली होती. निजाम प्रांतांतील नानासाहेबांचें हें पहिलेंच आगमन असल्यामुळे प्रत्येकजण अत्यंत आतुरतेने व उत्सुकतेने नानासाहेबांच्या अगमनाची मार्गप्रतिक्षा करीत होता. प्लॅटफॉर्मवर अगमन होतांच स्फूर्तिदायक जयघोषांत नानासाहेबांना उदगीर-समाजाकडून पुष्पहारमंडित करण्यांत आलें.

### मिरवणूक

रेल्वेस्टेशनपासून ते बिऱ्हाडापर्यंत मोठ्या जनसमूहासह मिरवणूक काढण्यांत आली. मिरवणुकींत स्वयंसेवकदलाने उत्तम व्यवस्था ठेविली होती.

### श्री. चौधरी यांचें आगमन

श्री. नानासाहेब यांचे सोबत उमरावतीचे श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., यांचेंहि आगमन झालें.

### विषयनियामक-कमिटीची बैठक

सायंकाळी ३ वाजतां निजाम-प्रांतिक परिषदेच्या विषयनियामक कमिटीस प्रारंभ झाला. या बैठकीस निजाम प्रांतांतील प्रत्येक जिल्ह्यांतील प्रमुख कार्यकर्ते हजर होते. सतत दोन तासपावेतो या बैठकींत अनेक समाजपोषक विषयांवर साधक-बाधक चर्चा झाली शेवटी ५ वाजतां विषयनियामक-कमिटीचें काम संपलें.

### व्याख्यान

सायंकाळीं ५-३० वाजतां प्रार्थना झाल्या-नंतर डॉ. एस्. रुद्रप्पा वगैरे वक्त्यांचीं भाषणें झालीं.

### नानासाहेबांचें भाषण

यानंतर श्री. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर प्रचंड टाळ्यांचे गजरांत बसवजयंतीनिमित्त भाषण करावयास उभे राहिले. सतत १॥ तासपावेतो अस्खलित वाणीने अत्यंत विचारपरिप्लुत व परि-णामकारक असें पुढील आशयाचें भाषण झालें. "बाराव्या शतकांत भगवान बसवेश्वरांनी वीरशैव-धर्माचाच पुनरुद्धार केला नाही तर एकंदर वैदिक धर्मांतच सर्व मानवांच्या कल्याणार्थ धर्म व समाज ह्यांत एक प्रकारची क्रांति केली. वीरशैवधर्म ही एक वैदिक धर्माचीच प्रमुख शाखा आहे. वर्णाश्रमधर्म त्यास मान्य आहे. पण त्याची उभारणा जन्मजात विषमतेवर झाली नसून, गुणकर्मविभागावर झाली आहे. कक्कयादि शरणांना आईबाप मानण्याकडे जो बसवेश्वराचा कल होता त्याचाच अर्थ हा कीं, खऱ्या धर्मास जन्मजात आडवी येत नसून अंतःकरणाची शुद्धता व त्यांतील गुणधर्म समान झाले कीं ते एकमेकांस जवळ आणतात व तेथे श्रेष्ठ व कनिष्ठ असा भेद रहात नाही. जंगम वर्ग व गुरु ह्यांना श्रेष्ठ स्थानीं बसवेश्वरां-नीच चढविलें. अर्थात् ते जंगम वा गुरु पूज्य असावेत असेंहि त्यांचें मत असे. अशा स्थितीमुळें बसवेश्वर आमचा कोणीच नव्हे हें आजच्या वीरशैवांतील कोणत्याहि गुरुस म्हणतां येत नाही. त्याचप्रमाणे बसवेश्वर हाच गुरु होत असें मानून गुरुविषयी अंधश्रद्धा उत्पन्न करणें म्हणजे गुरुकडून ज्या गुणांच्या प्राप्तीकरितां संस्काराची जरुरी असते ती नाकारणेंच होय. पण असले वाद जे सुरू आहेत त्याचें कारण बसवकालीन आज गुरुहि उरले नाहीत व भक्तहि उरले नाहीत. म्हणून वीरशैवांच्या इष्ट-लिंगधारणेंत वेदांतील रुद्राचे विराट व अग्निरूप स्वरूप व्यक्त होतें. इष्टलिंगाची उपासना ही मूर्तिपूजा नव्हे तर ॐ स्वरूपाच्या चिन्हाचें तें पूजन आहे. वीरशैवांच्या अष्टावर्ण चिन्हांत निराळ्या तऱ्हेने याज्ञिक ऋषींचे गुण-धर्म प्रतित होतात. तऱ्हा निराळी पण हेतु तोच समोर ठेवून कालानुरूप वैदिक धर्मांत बसवेश्व-रानें सुधारणा घडवून आणली. आजच्या वैदिक धर्मांतील सर्व सुधारकांचा बसवेश्वर हा गुरु होय. बसवेश्वरांनी वचनें कथन केलीं त्यांत त्यांचें वाङ्मयावरील प्राधान्य तर प्रतीत होतेच; पण ह्या वचनांत प्रतिपादन केलेल्या सत्याला अनुभवाचें स्वरूप देतां यावें म्हणून त्यांनी जी 'अनुभव-मंटपा'-ची स्थापना केली त्यांत त्यांचें विशेष वैशिष्ट्य आहे. 'अनुभवमंटप' म्हणजे प्रत्यक्ष ज्ञानाचा अनुभव घेणारें व त्याचा प्रसार करणारे महान विद्यालय, विश्वविद्यालयांची योग्यता 'पार्ले-मेन्ट' पेक्षा मोठी असते. म्हणून 'अनुभव मंटप' ह्यास 'पार्लमेन्ट' न म्हणतां युनिव्हर्सिटी म्हणणें हेंच सार्थ होय. अशा महानुभाव बसवेश्वराची जे स्वधर्मीय वा परधर्मीय आज निंदा करतात ते स्वतःचीच निंदा करतात. कारण ह्या सर्वांना आज जें पाहिजे तेंच बाराव्या शतकांत बसवेश्व-रानें सांगितलें. नुसतें सांगितलेंच नाही तर आचरलें."

### श्री. दे. भ. हर्डेकरांचें भाषण

यानंतर दे. भ. मंजप्पाण्णा हर्डेकर, संपादक "शरण-संदेश", आलमट्टी, ह्यांनी आपल्या भाषणास प्रारंभ केला. यांनी आपल्या भाषणांत श्री. बसवण्णाची वचनानुधारें पूर्ण माहिती दिली. आणि श्री. बसवण्णाचा संदेश जनतेच्या अंतःकर-णांत उत्तम तऱ्हेने रुजविला. १२ व्या शत-कांतलि श्री. बसवण्णाच्या समाजसुधारणेचें विवेचन अत्यंत मार्मिकपणाने केलें. त्यांच्या भाषणाचा सारांश पुढीलप्रमाणें :—

प्रिय बंधुभगिनींनो,

आजचा दिवस बसवण्णाचा जन्मदिवस आहे. बसवण्णा हे स्वतःस 'अण्णा' 'जगदण्णा' अथवा 'स्वामी आचार्य किंवा परमेश्वर असें कांहीं कधीहि संबोधून घेत नसत; बसवण्णा असेंच म्हणवून घेत असत. कारण ते खरोखर 'अण्णा'-च होते. शिवभक्तांचे सहोदरच ते. अगदी सख्खे भाऊ. म्हणूनच सगळे शिवशरण त्यांना 'बसवण्णा' असेच संबोधीत असत. हा बंधुभावच वीरशैवत्वाचा मूळ पाया होय.

मी आचार्य आहें, मी स्वामी आहें, असें सांगून या आमच्या 'अण्णा' नी कोणाकडूनहि पूजा-अर्चा करून घेतलेली नाही. त्यांनीच दुसऱ्यांची पूजा केली आहे. शिवभक्तांचा आचार हाच होय.

॥ माझ्यापेक्षा निम्न कोणी नाही ।

शिवभक्तांपेक्षां उच्च नाही कोणी ॥

अशी घोषणा करून त्याप्रमाणें ते वागले आहेत. या जयंतीच्या दिवशीं आम्हीं हेंच प्रथम समजून घेतलें पाहिजे. लिंगांगी जे आम्ही आहोंत ते सगळे बंधुभावंडे आहोत असें समजून वागले पाहिजे.

या आमच्या अण्णांनीं आम्हासाठीच कित्येक दिव्य मार्ग दाखविले आहेत. मरणानंतरच स्वर्ग-प्राप्ति होईल किंवा सगळें सोडून देऊन मोक्षेच मार्गे लागा असें कांही तरी त्याने सांगितलें नाही. मृत्यूनंतर मिळत असेल तें सुख वांच्छिणें म्हणजे उसाचीं शेंडीकडील पेरें (वरचा भाग कट्ट रसाचा असतो; गोड तर मुळीच नसतो.) खाण्याप्रमाणे आहे असें बसवण्णाने सांगितलें आहे. आपण जिवंत असतांनाच स्वर्गसुख अनुभविलें पाहिजे; म्हणजे तेंच उसाचा गोड भाग खाण्याप्रमाणे होईल.

मरणानंतर स्वर्ग आहेच आहे—आता तुमच्या-जवळ आहे तें सगळें आमच्या स्वाधीन करा व त्यागी व्हा, स्वर्गांत तुम्हांस भोग मिळेलच, इ० उपदेश करणारे भोंदूच आहेत असें समजलें पाहिजे. बसवण्णांनी तर तसें कांहीहि सांगितलें नाही.

सत्य, दया, इत्यादि नैतिक आचरण पालन करा, शिवाविषयी भक्तिवंत व्हा, मद्यमांस अपेयपान, अभक्ष्यभक्षण, इ० वर्ज्य करा. असें वर्तन ठेवलें तर येथेंच स्वर्ग आहे. असें आचरीत असणाऱ्या शिवभक्ताचें अंगण काशीक्षेत्र आहे, त्याचें शरीर कैलास आहे, अशी बसवण्णाने घोषणा केली आहे.

॥ जो मारतो तोच मांग । जो अभक्ष्य खातो तोच अस्पृश्य—( होलेय ) ।

कुल म्हणजे काय ? त्यांचें कुल काय कामाचें ! सर्व प्राण्यांच्या कल्याणाबद्दल जे आमचे कुडल संगाचे शरण चिंतन करतात तेच कुलज होत. ॥

जन्मावरून उच्चनीचत्व येत नाही. मोठेपणा तर शिवभक्ति, सद्गुण, सदाचार, ह्यांनीच प्राप्त होतो असें सांगतांना बसवण्णा म्हणाले:—

॥ विटाळ झाल्याशिवाय पिंडस्थापणें घडतच नाही । जलाचा काय, बिंदूचा काय ? व्यवहारण सारखेंच. आशा, आमिष, रोष, हर्ष, विषय, सगळे सारखेच. अमुक पठन केलें; तमुक श्रवण केले; म्हणजे काय झालें ? कुलज असें सांगण्यास दृष्टांत तरी काय ?

॥ सप्तधातुसमं पिंडं समयोनि समुद्भवम् ।
आत्मजीवसमायुक्तं वर्णानां किं प्रयोजनम् ? ॥

असें सांगितलेलें नाही काय ? लोहादि तापवितो म्हणून लोहार झाला; कपडे धुण्याने परीट झाला, तसेंच विणण्याने पट्टसाली ( कोष्टी), वेद वाचल्याने ब्राह्मण, असे संबोधिले जातात. कर्णांतून जन्मलेले आहेत का कोणी जगांत ? ह्यास्तव हे कुडल संगम देव, लिंगस्थळ ज्याला माहीत तोच कुलज होय.

" आर्य लोक जेव्हा ह्या देशांत आले, तेव्हा ब्राह्मणादि कल्पना प्रादुर्भूत झाली. आणि तिनेच राष्ट्राचा घात केला. बसवण्णांनी ह्या वर्णांच्या बेड्या तोडून टाकून आर्यपूर्व द्राविडसंस्कृतीचा उद्धार केला. हिंदुजनांगांत जोपर्यंत ही वर्ण-कल्पना कायम असते तोपर्यंत त्यांचा उत्कर्ष होऊं शकत नाही. आठशे वर्षांपूर्वी बसवण्णाने ज्याप्रमाणे उपदेश केला त्याप्रमाणे आह्मी जर वागलों असतो तर डॉ. अंबेडकरांच्या घोषणेची जरूरीच नसती." येणेप्रमाणें दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम पार पडला.

## दिवस ३ रा

ता. २५-६-३६ रोजी सकाळी ८ वाजतां ठराविक नियमाप्रमाणे कार्यक्रमास आरंभ झाला. प्रार्थना झाल्यानंतर गुलबर्गासंघाच्या कांहीं तरुणांचीं उत्तेजक भाषणें झालीं.

## श्री. चौधरी यांचें भाषण

यानंतर श्री. नानासाहेब बामणगांवकर यांचेसह आलेले तडफदार व नवमतवादी तरुण श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., उमरावती, यांचें अत्यंत जोरदार व परिणामकारण भाषण झालें. यांना हिंदी भाषा अवगत नसतांहि मोठ्या धाडसाने प्रथमच हिन्दी भाषेंत भाषण करून जनतेच्या व तरुणांच्या अंतःकरणांत आपल्याबद्दल आदर उत्पन्न करून घेतला. यांच्या भाषणांतील प्रत्येक शब्द तरुणांच्या अंतःकरणांत बदल करीत होता. चालत्या काळाबरोबर वीरशैवसमाज आपल्या परिस्थितींत व वागणुकींत बदल न करील तर समाज जिवंत रहाण्याची आशाच नाही याचें स्पष्ट विवेचन केलें. जगाच्या सुधारणेबरोबर आमच्यांतहि सुधारणा झाल्या पाहिजेत याचें स्पष्ट विवरण करून प्रचंड टाळ्यांच्या गजरांत आपलें दणदणीत भाषण संपविलें.

## शुद्धि

यानंतर कांहीं कालापूर्वी अज्ञानपणाने पर-धर्मांत गेलेल्या व परत स्वधर्मांत येण्याविषयीं तळमळणाऱ्या १०-१२ जणांना योग्य पटाधि-काऱ्याकडून शास्त्रोक्तरीत्या शुद्ध करून पुन्हां त्यांना आपल्या स्वधर्मांत घेण्यांत आले, आणि त्यांचेबरो-बर मोठ्या समारंभासह सहभोजनाचा कार्यक्रमहि झाला.

## प्रांतिक परिषदेचें खुलें अधिवेशन

सायंकाळीं तीन वाजतां प्रांतिक परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. नानासाहेब बामणगांवकर यांचे अध्यक्षतेखालीं निजाम प्रांतिक परिषदेच्या खुल्या अधिवेशनास प्रारंभ झाला.

प्रथम वे. मू. कल्लय्यास्वामी बी.ए,बी.एस्.सी.; यांचे मधुर प्रार्थनेने परिषदेस आरंभ झाला. नंतर स्वागतीय भाषण होऊन श्री. विरुपाक्ष स्वामी देशिकेंद्र महाराज लातूर यांनी अध्यक्षाची माहिती सांगितली. यानंतर प्रचंड टाळ्यांच्या गजरांत अध्यक्षांनी सतत दीड तास पावेतो अत्यंत विचार-परिप्लुत व समाजपोषक असें पुढील आशयाचे भाषण केलें. परिषदेचें अध्यक्षस्थान दिल्याबद्दल आभार मानून अध्यक्ष ह्मणाले कीं, "काल बऱ्याच गोष्टी मीं सांगितल्या. आमच्यांत आज अनेक पोट-जाती आहेत. पण त्यांची उभारणा रूढीने झाली आहे. धर्म व धर्मशास्त्राने पोटजातींतील जन्म-जात विषमता मानली नाही ही गोष्ट प्रत्येक वीरशैवाने लक्षांत ठेवली पाहिजे. जन्मतःच लिंग-धारणेचा संस्कार प्रत्येक लिंगधाऱ्यास होत असल्यामुळे त्याचें जन्मजात शुद्रत्व नष्ट होऊन त्यास द्विजत्वाचा अधिकार होतो. वैदिकांतलि द्विजांचें आठव्या वर्षी संस्कार झाल्याने जन्मजात शुद्रत्व जातें, तर प्रत्येक वीरशैवाला जन्मतःच लिंगधारणा होतांच द्विजत्व येते. ह्या द्विजांत संस्कारानेच माहेश्वरत्व,पट्टचरत्व,विरक्तत्व दीक्षावं-तत्व, शिलवंतत्व प्रासादिकत्व वगैरे आश्रमत्व प्राप्त होतें. चार वर्ण हा समाजाच्या विकासाचा व परस्परसहकार्याचा नैसर्गिक गुण आहे. प्रत्येक व्यक्तींत व पशूंत सुद्धा नैसर्गिक रीत्या हें चातु-र्वर्ण्य आहे. चातुर्वर्ण्यांत जन्मजात विषमतेच

लागलेला डाग वीरशैवधर्मानेच काढून टाकला. बाराव्या शतकांत हिंदुस्थानांतच आजच्यासारखा तीव्र जातिभेद नव्हता असें दिसतें. म्हणूनच स्वतःची जन्मजात सोडून अनेक जातींचे लोक बसवेश्वरास वीरशैवधर्मशाखेंत बसवितां आले. आजचा काळ फार पुढे गेला आहे. मतप्रसारास अनेक साधनें उपलब्ध झालीं आहेत. तरी कोणाहि थोर पुरुषाला सर्व जातींची एक जात करतों म्हणणें आज सोपें नाही. पण बाराव्या-शतकांत सर्व जातींत एकोपा निर्माण करून त्यांचा एक वीरशैवसमाज बसवेश्वरकाळीं बनूं शकला. ह्यावरून त्या काळांतच आजच्यासारखा तीव्रतर जातिभेद नसावा. वीरशैवांत संस्कार आहे, त्यांत वर्णाश्रमत्व मान्य केलें आहे. मोक्ष वा शिवसायुज्यता ह्यास प्राधान्य दिल्यामुळे पुनर्जन्माची काळजी नको ह्यावर त्याची रचना झाली. ह्यामुळे श्राद्धकर्मास गौण मानलें. ह्यावरून वीरशैव अवैदिक आहेत असें म्हणतां येत नाही तर वैदिकांतील एक प्रमुख शाखा आहे असें म्हणतां येईल. याज्ञिकाकडेच वैदिक म्हणविण्याचा मक्ता दिला तर वैदिकधर्माचें परिणत स्वरूप नष्ट केल्याचें पाप आहे. वीरशैवांनी ह्यानंतर आपलें द्विजत्व सिद्ध करण्याचा एकोपा करून प्रयत्न केला पाहिजे. पाटाच्या चालींत सुधारणा करून त्याऐवजी योग्य विधवेचा दुसरा विवाह लग्न-संस्कारपद्धतीनेच झाला पाहिजे. सर्वच मठांत बालब्रह्मचारी ठेवण्याची प्रथा बंद पाडून चांगले गृहस्थाश्रमी व गृहस्थाश्रम सोडलेले लोकच पंचाचार्यपीठावर वा विरक्तपीठावर बसले पाहिजेत. शिक्षणाचा प्रसार करून नव्या युगांत व नव्या रूपांत वीरशैव संघटित होऊन जगला पाहिजे. अष्टावर्ण व षट्स्थल ह्यांचे अर्थ लक्षांत घेऊन जगाच्या सुधारणेकडे पाहिलें म्हणजे आम्ही अष्टावर्ण व षट्स्थल शब्दरूपानें व चिन्हरूपानेच घेऊन बसलों पण जग अर्थरूपानें ह्याचा स्वीकार करून पुढे जात आहे असें म्हणावें लागतें. खरें वीरशैवतत्त्व तेथे प्रगट होत आहे. आपसांत वाद माजूं नयेत पण माजले. त्यांतील विष शिवांनी जसें हालाहल पचविलें तसें शिवभक्त म्हणविणारांनीं पचविलें पाहिजे. म्हणजे एकोपा कठिण नाही. असा वीरशैव बनला म्हणजे तो प्रत्येक वीरशैव आजच्या आर्यसमाजाचा गुरु होऊन राहील. " अशा आशयाचें अध्यक्षांचें भाषण झाल्यांवर या परिषदेंत एकंदर आठ ठराव पास करण्यांत आले. आणि अत्यंत यशस्वीपणानें प्रांतिक परिषद् पार पडली.

## गायन

प्रांतिक परिषदेचें अधिवेशन संपतांच जनतेच्या मनोरंजनार्थ वीरशैव पदवीधर तरुण श्री. कल्लय्यास्वामी बी.ए., बी.एस्.सी., यांचें गायनाचा कार्यक्रम अर्धातासपावेतो झाला.

## काव्य

यानंतर कल्याण कर्नाटक - प्रेसचे मॅनेजर व गुलबर्गा-तरुणसंघाचे तडफदार कार्यकर्ते व वीरशैव-कविरत्न यांचें काव्यगायन झालें. यांनी हिन्दी व कानडी भाषेंत केलेलें काव्य अत्यंत मनोहर व परिणामकारक आहे.

## श्री. हर्डेकरांचें भाषण

यानंतर दे. भ. मंजप्पाण्णा हर्डेकर यांचें 'आर्यसमाज व वीरशैवसमाज' या विषयावर अत्यंत कळकळीचें व परिणामकारक असें भाषण सतत १ तास पावेतो झालें. यांनी आर्यसमाजास आव्हान देऊन सांगितलें कीं, मी जिवंत असेपर्यंत हा लढा लढवीन. जोपर्यंत आर्यसमाज आपले शब्द परत घेणार नाही तो-पर्यंत मी आपला प्राण पणास लावून आर्य-समाजाबरोबर धर्मयुद्धास तयार आहे.

## धनसहाय्य

यानंतर उदगीर-वीरशैवसमाजाचे आधारस्तंभ श्री. पंडित संग्रामआप्पासादेव वकील यांनी उदगीरसमाजाची आर्थिक हलाखीची स्थिति

सांगून जनतेस धनसहाय्याची विनंती केली. एकूण १५०० ची मागणी जनतेस केली.

## पैशाचा पाऊस

मागणी करण्यास अवकाश तोंच तेथल्या तेथे सभागृहांत अनेक स्त्री-पुरुषांकडून लहान-मोठ्या देणग्या येऊं लागल्या आणि अवघ्या अर्ध्या-तासाच्या आंत देणग्यांचा आकडा १५०० च्या बाहेर गेला. यांत प्रामुख्याने देणगी देणारांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| श्रीमंत मडिवाळप्पा खेणी | रु. ५०१; |
| " शरणप्पा अण्णा फत्तेपूर | " २०१; |
| श्रीमन्निरंजन चन्नवसबस्वामी भालकी, | " १०१; |
| श्रीमंत विश्वनाथप्पा हत्तेसिंदखेडकर, | " १०१; |
| " विश्वनाथप्पा चौंडा अहमदपुर, | " १०१; |
| " राचप्पा शंभु, | " ५१; |
| " सिद्धरामप्पा पांढरे उदगीर | " ५०; |
| " सिद्धप्पा आठआणे | " ३१; |
| | ११३७ रु. |

याशिवाय लहान देणग्या सुमारे चारशे साडेचा-रशेच्या मिळाल्या. एकूण उदगीरसमाजाची मागणी लिंगायत जनतेने मोठ्या आनंदाने पूर्ण केली. यानंतर संग्रामप्पा शेटे वकीलांनी मोठ्या कळ-कळीने सर्वांचे आभार मानून तिसऱ्या दिवसाचा व महत्वाचा कार्यक्रम संपविला.

## दिवस ४ था

ता. २६-६-३६ रोजी सकाळीं आठ वाजतां व्यायामशाळेचा कार्यक्रम झाला. सोलापूरचे व्यायामपटु प्रो. फुलारी यांचे देखरेखीखाली शिकून तयार झालेल्या स्वयंसेवकांची कवाईत, लाठी, काठीं, दांडपट्टा, लेजीम वगैरेंचे प्रेक्षणीय खेळ झाले. तसेच मानेवरून ओझ्याने भरलेली वैलगाडी नेणे वगैरे धाडसाचे व आश्चर्य उत्पन्न करणारे प्रयोग झाले. स्वयंसेवकांच्या ह्या कार्यास पाहून जनतेस त्यांच्याविषयीं अत्यंत आदर व प्रेम वाटलें. मुख्यमुख्य स्वयंसेवकांना व धाडसाचे प्रयोग करणाऱ्यांना पदकें व इतर बक्षीसें देण्यात आलीं.

## श्री. चौधरी यांचें भाषण

व्यायामाचे प्रयोग संपतांच पुन्हां व्याख्या-नास प्रारंभ झाला. प्रथम प्रार्थना व भजन झालें. नंतर गुलबर्गा-तरुणसंघाच्या २-३ सभा-सदांचीं जोरदार भाषणें झालीं. शेवटी उमरावतीचे तरुण श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., हे भाषण करावयास उभे राहिले. यांनी आपलें भाषण जनतेच्या आग्रहास्तव मराठी भाषेंतून केलें. यांच्या निर्भीड सडेतोड, सत्य व मोहक भाषणाला सारा तरुणवर्ग हपापलेला दिसत होता. त्यांच्या नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे हेंहि भाषण अत्यंत उठावदार व परिणामकारक झालें.

## श्री. हर्डेकरांची रवानगी

दोनप्रहरी १२ च्या गाडीने दे. भ. मंजप्पाण्णा हर्डेकर, डॉ. एम्. रुद्रप्पा, श्री. पंडित श्रीनिवा-सराव साहेब वकील हायकोर्ट, श्री. मठमवीरय्या वगैरे मंडळी हैद्राबादेस जाण्याकरिता निघाली. यांना पोंहचविण्याकरिता स्टेशनवर सर्व प्रतिष्ठित मंडळी हजर होती.

## तरुणसम्मेलन

सायंकाळी तीन वाजतां पराठिकाणाहून आलेल्या सर्व वीरशैव तरुणांचें संम्मेलन भरविण्यात आलें. ह्या सम्मेलनांत एकमेकाच्या ओळखी, मुलाखती झाल्या. प्रार्थना व भजन झाल्यानंतर तरुणांचीं अत्यंत परिणामकारक व जोरदार व्याख्यानें झालीं. गुलबर्गा-तरुणसंघाच्या सभासदांनी व मि. बसवराज आदिकरून तरुणांनी यांत अत्यंत मनःपूर्वक भाग घेतला. श्री. बाबु-राव चौधरी, बी ए., ह्यांचें लोकाग्रहास्तव हिंदु-मुसलमान प्रतिष्ठित समाजा समोर ( New-Lamps for the Old ) ह्या विषयावर इंग्रजींतून पुढील आशयाचें भाषण झालें.

" Comrades,

I was under the impression that this morning's speech should be the last before this gathering of Veershaivas; but your secretary asked me to address this mixed gathering of lingayats, hindus and muslim gentry of this place.

I am sorry, comrades, it is an irony of fate that I am forced to address this gathering in a tongue which is a foreign one, a language that belongs neither to your forefathers nor mine. (cheers)

As to our subject " New lamps for the Old " I mean-let us march forward on the path of progress in the dazzling lights of sciences—let us throw away those old dim and flickering candles--I mean let us stand equal to the new requirements of the society in the rapidly changing situation of the world.

Let us be one with the forces and take our destined place; let us stand to the test of the fight and come out trimphant-" survival of the fittest is the law of nature. "

As for religion, comrades, religion should be the rational understanding of a man and his duty towards god and his comrades asides.

Religious fanaticism is not a safe ground to tread upon but a most deceptive way, the strength lasts as long as there is a sentiment but one who follows out of conviction has a peculiar strength from that conviction creating a permanent and perpetual loving bond of unity.

I am not talking for any particular religion but for a religion of humanity.

True religion can not be understood without knowledge. True knowledge is always directed towards perfection of humanity, towards cultural upliftment of mankind.

Education cannot create culture but develops if there is any. It raises the moral tone of man and woman and society as a whole.

In the religion of humanity there should be no barrier of caste or creed, and irrespective of inheritance and sex one should be given all possible chances to rise to his full manhood, " necessaries for all before luxuries to any " should be the golden law of the coming society. (cheers)

Comrades, let us proclaim that world-religion - religion of

humanity--religion of rational understanting and convictions. Comrades, in a tumultous fanatic crowd there are always thousand for religion but one for reason.

I am for that higher religion, religion of rationality, religion of humanity. Comrades, let us work for that religion and human brotherhood and pray for the salvation of the whole mankind.

No doubt we are not satisfied with the present order of things. Let us uproot the wornout traditions and bury deep conventions and customs that have outlived their usefulness. Let us sound the deathknell of the old ideology and conservative mentality. Let there be intellectual rebelliousness amongst the youthful-world. Let us revolutionise the whole aspect of society and establish a new order; where freedom—social, political or economic is the keynote or golden law of the society that is to come and I believe which is bound to come [ cheers ].

The law of revolution, I mean social revolution is that there should be irresistible urge for the change; there should be discontent and dissatisfaction with the present order of things, which in reality is the seed of revolution and progress.

Our present national hero and idol of the youth often said " The voice that claims revolution must be the voice of revolt. "

My appeal is to the young, not to the yovng who have become prematured old in appearance as well as in thought, but to the young not in age but in spirit– " to march forward " because it is often said that " youths are always the standard bearers of revolution. "

Comrades, let us face the realities and face it boldly. Let us not retrace the step by the difficulties in our way. Let us not forget

" Without storm<br>
no sailor<br>
without war<br>
no soldier ".

( Prolonged cheers )

त्यानंतर

---

**तरुण कविरत्न**

यांचें काव्यगायन झालें. श्री. प्रभुराव वकील, उदगीर, ह्यांनी आर्यसमाजाबरोबर चालू असलेल्या लढ्याची साधारण माहिती दिली. अत्यंत कौतुकाची व अनुकरणीय गोष्ट ह्मणजे उदगीर येथील वयोवृद्ध व अनुभविक वकील पंडित श्री. महादेवआप्पा ह्यांनी श्री. बसवेश्वराबद्दल

एक कविता तयार करून ती सभेंत ह्मणून दाखविली. आजपर्यंत सभेंतून यांनी भाग कधींच घेतला नव्हता. परंतु उत्सवाच्या स्फूर्तीने अशा उतारवयांतहि त्यांच्या अंतःकरणांत जागृति उत्पन्न झाली. व सहजरीत्या त्यांचे मुखांतून सुधारणेचें बसवगीत बाहेर पडलें.

### आभार व विसर्जन

पंडित श्री. संग्रामआप्पा शेटे वकील उदगीर यांनी हजर असलेल्या सर्व बंधुभगिनींचे आभार मानून सभेचा कार्यक्रम समाप्त झाल्याचें जाहीर केलें

### दिवस ५ वा

ता. २७-६-३६ रोजी श्री. संग्रामप्पा शेटे वकील यांचे मार्डीत श्री. नानासाहेब बामणगांवकर व श्री. चौधरी यांचेबरोबर अनेक लोकांची चर्चा व मुलाखत झाली व वीरशैव-संजीवनीचें प्रचारकार्यहि झालें.

### नानासाहेबांची मुलाखत

उदगीरचे आर्यसमाजाचे पुढारी श्री. पंडित शामलालजी वकील यांनी श्री. नानासाहेब बामणगांवकर यांची मुलाखत ५ मिनीटपावेतो घेतली. या मुलाखतींत श्री. नानासाहेबांनी स्पष्टपणें सांगितलें कीं, लिंगायतसमाज व आर्यसमाज यांत तुमच्या प्रांतांत चालु असलेला लढा हानिकारक आहे तरी हा वाद सामोपचाराने आपसांत मिटवावा.

### श्री. बामणगांवकरांची रवानगी

दोन प्रहरी १२ वाजतां श्री. नानासाहेब बामणगांवकर व बाबुराव चौधरी यांना निरोप देण्याकरिता स्टेशनवर सर्व प्रतिष्ठित मंडळी हजर होती. दोघांनाहि पुष्पहार घालून वीरशैव-समाजाच्या जयघोषांत निरोप देण्यांत आला. येणेप्रमाणें जयंतीउत्सवाचा व सभेचा कार्यक्रम निर्विघ्नपणें पार पडला.

उदगीरसभेकरितां बाहेरून आलेली प्रतिष्ठित व समाजकळकळ बाळगणारी मंडळी:—श्री मन्निरंजन चन्नबसवस्वामी भालकी, श्री. अमरेश्वराचार्य अवराद. दुवळगुंडी व मुधोळचे पट्टाधिकारी, श्री. करीबसवस्वामी ब्रम्हचारी, श्रीमंत खेणी, श्रीमंत फत्तेपुरे.

हैद्राबादः—श्रीनीवासराव वकील हायकोर्ट, डॉ. एम्. रुद्रप्पा, श्री. मठमवीरय्या सेक्रेटरी वीरशैव समाज हैद्राबाद, श्री. कल्लय्या, बी.एस्.सी., गुलबर्गाः— मि. बसवराज, शरणय्या, बी. सिद्धलिंगप्पा वगैरे तरुणसंघाचे २०–२५ सभासद.

वीदर:— शिवरुद्रप्पा वकील. लातूर:-श्रीमंत गिरवलकर, जवळे, उटगे. केराळे, नागुरे, खुणा वगैरे श्री. एस. जी. पाटील स्टेट फोटो आर्टिस्ट श्री. नागनाथस्वामी वकील भालकीकर, श्री. संगय्यास्वामी वकील चाकूर, श्री. गु भ. बाळाबुवा कबाडी वडांगळी, श्री. गंगाधरप्पा चौधरी सेक्रेटरी वीरशैवसमाज परळी, श्री महादेवप्पा महाजन सेक्रेटरी वीरशैवसमाज वरदापुर, श्री. विश्वनाथप्पा दामा सेक्रे. वीरशैवसमाज मोमिनाबाद श्री. चौधरी व शेटे वकील मोमिनाबाद, श्रीमती महादेवी वाघमारे व सौ. गंगाबाई शेटे मोमिनाबाद, वगैरे

---

# आर्यसमाज व वीरशैव

ले०:— एस्. देशमुखे, (मोमिनाबाद)

ता. २४ रोजी उदगीर येथे निजाम प्रांतिक परिषद् महाराष्ट्राचे प्रसिद्ध पुढारी देशभक्त नानासाहेब वामणगांवकर, सं. "वीरशैवसंजीवनी" यांच्या अध्यक्षतेखाली भरून जे कांही ठराव पास झाले ते सर्व वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकी मुख्य ठराव आर्यसमाज गुलबुर्गा याने पीवळें पत्रक प्रसिद्ध केलें आहे त्याचे निषेधाचा होता.तो ठराव नागनाथस्वामी वकील भालकी यांनी मांडला. विषय-नियामक कमेटींत ज्या वेळी हा निषेधाचा प्रश्न निघाला त्या वेळी निषेध कोणीं करावा याबद्दल चर्चा चालली. कांही लोकांनी नागनाथस्वामींचें नांव सुचविलें. परंतु पुष्कळ लोकांनी ही शंका घेतली कीं, नागनाथस्वामी कधी निषेध करणार नाहीत कारण ते आज सतत पंधरा-वीस वर्षांपासून आर्यसमाजाचें कार्य करीत आहेत व शामलाल व बन्सीलाल त्यांचे मित्र आहेत. परंतु परधर्मांपेक्षा स्वधर्म प्रत्येकाला जास्त प्रिय असतो. ज्या मनुष्याला स्वधर्मांचा अभिमान नसतो तो जिवंत असून मेल्यासारखा आहे. आजपर्यंत नागनाथस्वामींनी जें आर्यसमाजाचें काम केलें तें आर्यसमाजी विचाराने केलें नसून हिंदुसंघटन या विचाराने ते तें करीत आले आहेत.

सदरील ठराव सभेंत मांडून नागनाथस्वामींनी जें भाषण केलें त्याचा सारांश:—

"आजकाल आर्यसमाजाचे प्रचारक आर्यसमाजाच्या तत्वाविरुद्ध आपली प्रतिष्ठा वाढविण्यास्तव मनसोक्त व्यवहार करीत आहेत. त्यांच्या आचार-विचाराने श्रीस्वामी दयानंदसरस्वतीच्या उज्ज्वल कीर्तीस काळीमा लागण्याचा संभव आहे. श्रीबुधदेव हा आर्यसमाजाचा मुख्य प्रचारक. तो आपल्या पुज्य गुरुस लाथ मारतो आणि त्याचा अनुयायी म्हणवितो. शामलाल हा श्रीबसवेश्वरास श्रीदयानन्दाच्या पादधुलीसमान समजतो. बन्शीलाल वीरशैवाचे इष्टलिंग हरण करून यज्ञोपवित धारण करविण्याची प्रतिज्ञा करतो. गुलबूर्गा-आर्यसमाज वीरशैवाच्या पवित्र स्त्रियांच्या पावित्र्यावर निंदास्पद लेख लिहितो. इतके सर्व आम्ही सहनशीलतेने स्वीकार करितो तर आमच्यासारखे नामर्द जगांत दुसरे कोणी नाही. अगर आपल्याला आपल्या धर्मांचा अभिमान आहे तर असल्या हितशत्रूपासून सावध राहावें." नागनाथस्वामींचें भाषण फारच आवेशाने चालू होतें. लोक प्रक्षुब्ध होत चालले. अध्यक्षाच्याहि मनावर भाषणाचा परिणाम झाल्यावाचून राहिला नाही. त्यांनी संपूर्ण पत्रिका त्याचवेळी वाचून पाहिली व त्यांच्या मनावरहि एक प्रकारचा विचित्र परिणाम झाला. सभेंत चोहोंकडून शेम-शेम चा आवाज निघत होता. कांही लोकांनी पात्रिका जाळून टाकण्याची सूचना केली. परंतु अध्यक्षांनी परवानगी दिली नाही. त्यानंतर सर्वानुमतें ठराव पास झाला.

# नंदीशेटचें पंच-पांडित्य

लेखकः— बी. नारायणस्वामी मळवडी, [सातारा]

"नंदीशेट मल्लिकार्जुन हजर हे ऽ ऽ" बेलिफानें नांव पुकारतांच धिम्मे धिम्मे चालत आरोपीच्या पिंजऱ्यांत एक गृहस्थ जाऊन उभे राहिले. त्यांच्या वेषावरून ते कोणीतरी बडे व्यापारी असावेत.

लगेच मळकट कपडे परिधान केलेला वादीहि घाईघाईने आपल्या जागेवर जाऊन उभा राहिला.

"काय हो, या माणसाला तुह्मीं पंक्तींतून उठवून याचा अपमान केलात् काय ?" असा मॅजिस्ट्रेटनी प्रश्न केला.

"हें सर्व खोटें आहे साहेब !" आरोपी नंदीशेट यांनी चेहरा गोरामोरा करून उत्तर दिलें.

"तुह्मी यांना जेवावयाला बोलाविलें होतें ना ?"

"होय साहेब."

"मग त्यांना पंक्तींत जेवूं दिलें काय ?"

"नाही."

"मग वादी जेवले नाहीत काय ?"

"नाहीत, पण एका बेजबाबदार माणसाने त्यांच्या कांही खाजगी कारणावरून त्यांना पंक्तींतून घालवून दिलें." आरोपीने उत्तर दिलें.

"असें आहे तर तुमच्यावर फिर्याद करण्याचें कारण काय ?" लेखणीचें मागचें टोंक गालाला लावीत मॅजिस्ट्रेट बोलले.

"ज्या संस्थेतर्फे प्रयोजन घालण्यांत आलें होतें त्या संस्थेचा मी एक सरपंच आहे ह्मणून !"

"एकंदरींत तुह्मीं वादीला बाहेर घालविले तर !"

"होय सरकार."

"काय हो, गुन्ह्याची हकीगत कशी घडली ?" न्यायदेवतेने वादीकडे दृष्टि करून विचारिलें.

"मी एक फळांची फेरी करणारा माणूस आहें." मळकट कोटाची बटणें लावीत—लावीत वादी शरणाप्पा बसप्पा यांनीं बोलण्यास सुरुवात केली. "आखजीच्या चौथ्या दिवशीं आमच्या लिंगायत वाण्यांच्या पंचायतीतर्फे एक मोठें जेवण झालें. आमच्या जातींतील सर्व लोकांबरोबर त्या जेवणाचें मलाहि मठपत्याकडून आमंत्रण आलें. नेहमींप्रमाणे ठराविक दिवशीं मी अर्धीच फेरी ठेवून जेवायला आलों. मोठ्या—मोठ्या श्रीमंत लोकांची पहिली पंगत उठून गेली होती; आणि पात्रें उचलण्याचें काम चालू होतें. मी आल्याबरोबर कपडे काढून पात्रें उचलायला सुरुवात केली. पात्रें उचलून झाल्यावर दुसऱ्या पंक्तींत शिवा सुपारीवाल्याजवळच्या पात्रावर बसलों. सर्व वाढ वगैरे झाली. आणि आमच्या जातींतील रिवाजाप्रमाणें लिंगनैवेद्य करून आतां घांस घेणार, तोंच बंडाप्पा कळलावे हा माझ्याजवळ नंदीशेट यांना बरोबर घेऊन आला, दोघांनी मिळून 'तूं आतां उठून येथून चालता हो, घरीं भ्रष्टाकार करून येथल्या लोकांना बाट

बयाला आला आहेस काय ? ऊठ ! चालता हो इथून ! ' असें म्हणत मला लाख शिवी मोजली. पंक्तीपैकीं एकहि माईचा पूत याला कां उठवितो असें म्हणाला नाही. मी उठणार इतक्यांत माझ्या देहाला धरून ओढून बाहेर काढलें. पंक्तींतील सर्व लोक या नंदीशेटच्या कोणी कर्जानें, कोणी नोकरीनें, व कोणी मोठेपणानें मिंधे असल्यामुळे, माझ्या बाजूनें एक सुद्धा कोणी बोलला नाही. त्यांच्या हिसक्यादसक्यींत मीं कपडे घेतले आणि बाहेर पडलों. हा सर्व प्रकार त्या वेळीं धर्मशाळेसमोर बसलेले हे गृहस्थ आपणास सांगतीलच. माझी तक्रार एवढीच आहे कीं, मी भ्रष्ट होतो तर मला आमंत्रण कां दिलें ? आणि एवढ्या मोठ्या समाजसमुदायांतून मला उठवून लावून माझी बदनामी केली. "

मॅजिस्ट्रेटनी वादीच्या साक्षीदाराला विचारिलें. त्यांचेंहि तसेंच म्हणणें पडलें. पुन्हा मॅजिस्ट्रेटने आरोपीकडे वळून विचारिलें, " यावर तुमचें काय म्हणणें आहे ? "

आरोपीला काहींच सुचेनासें झालें, व त्याला गोंधळलेला पाहून मॅजिस्ट्रेटने हें प्रकरण आपसांत मिटवा नाहीतर मला न्याय द्यायचा तो मी देईन," असें म्हणून दुसऱ्या कामास सुरवात केली.

वादी व आरोपी कोर्टाच्या बाहेर आले व नंदीशेट शरणाप्पा फेरीवाल्यास शरण आले; व बंडाप्पा तर पुढे आलेच नाही ! नंदीशेटनी शरणाप्पाचे पाय धरिले व सांगितलें, " अरे तूं हें काय करतोस ? मी चुकलों मला माफ कर ! "

शरणाप्पाच्याने पुढे बोलवेना. त्यांनी नंदीशेठना उठविलें; व कोर्टांत जाऊन, आमचा तंटा मिटला असें न्यायदेवतेला सांगितलें.

× × ×

मोठे व्यापारी जास्त श्रीमंत होणे, व मध्यम व्यापारी, नोकर अगर फेरीवाले बनणे, या ऐतिहासिक तत्वानुसार फेरीवाला बनलेला शरणाप्पा पूर्वीचें वैभव गतकालांत लुप्तप्राय झाल्यावर मुंबई शहरांत नोकरी न करतां स्वतंत्र रीतीने फळांची फेरी करून आपली कशी तरी गुजराण करीत होता. या स्वतंत्रतेच्या पायीं त्याला पुष्कळ वेळां उपासमार सहन करावी लागे. अशा परिस्थितींत तो बंडाप्पा कळलावे यांच्या ओळखीने ते राहात असलेल्या चाळींत आपल्या गांवच्या दोघा मराठे मित्रांबरोबर भाड्याने खोली घेऊन राहात असे. सकाळी बाजारांतून एकदम फळें खरेदी करून आणून दिवसभर विकीत असे. हा क्रम बरेच दिवस चालला असतां, बंडाप्पाची कांहीं घरगुती कामें करावयाला, फेरीहून दमून-भागून आल्यानंतर चार दोन वेळां सवड न मिळाल्यामुळे दररोज हॉटेलबाजी करणाऱ्या बंडाप्पा कळलाव्यानी " हा मराठ्याला शिवून खातो " असें कुभांड रचून त्याला वर वर्णन केल्याप्रमाणे पंक्तींतून उठवून त्याचा अपमान केला. या अपमानाचा शरणाप्पाने नंदी ( ? ) शेटला शरण आणून वचपा काढला.

वीरशैवसमाजांतील श्रीमंत लोक पंचायतींतील मुख्य जागा केवळ पैशाने हातांत घेऊन न्यायदेवतेचा आव आणून सदोदित गोरगरीबांचा छळ करितात; पण एखादे वेळीं असे तडाख्यांत सांपडले म्हणजे त्यांच्यावर वरप्रमाणे प्रसंग भोगण्याची पाळी येते !



# श्रीबसवेश्वर व महिलांचें कर्तव्य

लेखिका:—श्रीमति महादेवी वाघमारे, मोमिनाबाद [निझामस्टेट].

आठशे वर्षांच्या पूर्वी ज्या महान् विभूतीने या भूतलावर अवतार धारण करून शेकडों लोकांचा उद्धार केला आहे त्यांची दरवर्षी मोठ्या प्रमाणांत सारे वीरशैव जयंति साजरी करतात ही एकच गोष्ट त्यांच्या-बद्दल असलेला भक्तिभाव दाखविण्यास पुरेशी आहे. महात्मा बसवेशांनी आमच्याकरिता काय केलें आहे असें जर कोणीं मला विचारलें तर मी त्याला परत विचारीन कीं, त्यांनी आमच्याकरिता काय केलें नाही? एखाद्या लहान मुलाची आई मरावी आणि त्याचें पालनपोषण त्याच्या मावशीने करावें व पुढे चलून मुलाने मावशीलाच आई ह्मणावें यांत अनैसर्गिक अशी कोणती गोष्ट आहे? आमच्या बसवेशाचा संबंध वीरशैवसमाजाशीं असाच आहे. महात्मा बसवेशांना पुष्कळशा इतिहासकारांनी 'वीरशैवमतसंस्थापक' असें ह्मटलें आहे. वीरशैवसमाजांतीलहि पुष्कळसे लोक त्यांना तसेच समजतात. पंचाचार्यांनी ह्या मताची स्थापना केली आणि त्याच्या प्रसारार्थ दुसऱ्या धर्मीयांप्रमाणेच मठशाखेची व त्यांतून शिष्य-गणांकडून त्या मतप्रसाराची परंपरा त्यांनी पाडली असें आमचे बांधव म्हणतात. पंचाचार्यांनी ठिक-ठिकाणी चालविलेल्या या संस्थानांनी समाजसेवा केली असेल, समाजाच्या धारणेंत या लोकांकडून अमोलिक साह्यहि झालें असेल; पण आमच्या बसवेशाचा ज्या काळीं जन्म झाला, निदान त्या वेळेस तरी आचार्यभक्तांकडून समाजसेवेची खडतर तपश्चर्या चांगल्या रीतीने होत नव्हती हें इतिहासावरून सिद्ध आहे. भोवतालीं बौद्ध चार्वाक वगैरे आपलें मत जोरांनी प्रतिपादन करीत होते. ह्या वेळेस या वीरशैवसमाजास सांभाळणारा कोणी नव्हता. तेव्हा समाजबाळाचें महात्मा बसवेशांनी पालनपोषण केलें आहे आणि त्या वेळेस त्यांच्यासारखी महान् बुद्धिवान् निःस्वार्थी व केवळ पावित्र्याची मूर्ति जर निपजली नसती तर वीरशैवमताचे काय परिणाम झाले असते याची कल्पनाच केलेली बरी.

या समाजाचें दुर्दैव कीं, महात्मा जास्त दिवस याची सेवा करूं शकले नाहीत. तरी थोड्या अवधींतच यांनी संस्मरणीय अशी सेवा बजावलेली आहे. ती इतकी कीं, परकीय तर राहोच पण स्वकीयसुद्धा ह्यांनाच समाजमाता मानतात.

महात्मा बसवेशांनी व त्यांच्या अनुयायांनी समाजाची जेवढी सेवा केलेली आहे व करीत आहेत तेवढी इतरांकडून झालेली नाही. जगांत जेवढे ह्मणून महात्मे होऊन गेलेले आहेत त्या सर्वांत ठळक अशी कोणती गोष्ट दिसत असेल तर ती इतरांकरिता—मग ते स्वधर्मीय असो वा परधर्मीय—आपल्या स्वतःचे ध्येयसुद्धा वेळीं-अवेळीं खर्ची घालण्यास तयार असणें ही होय. इतिहास सांगतो कीं, जगांत धर्माच्या नांवावर मनुष्यांनी स्वजातीयांवरच अत्यंत अमानुष हल्ले केलेले आहेत. धर्माच्या नांवावरच गुलामगिरी, अस्पृश्यता, वगैरे अद्यापि कायम आहेत. याच पवित्र धर्माच्या नांवावर ज्यांच्या उदरीं त्यांचा जन्म होतो त्या स्त्रीसमाजावर नाना प्रकारची बंधनें लावलेलीं आहेत. जी गोष्ट पुरुष केवळ पुरुष ह्मणून करूं शकतात त्याच गोष्टी स्त्रिया

या केवळ क्रिया आहेत म्हणूनच करूं शकत नाहीत. धर्म हा केवळ थोड्या लोकांचा होता. जीं कांहीं धार्मिक पुस्तकें म्हणून होतीं त्यांना केवळ थोडेच लोक जाणत होते. पुष्कळशा इतर समाजाला या थोड्याशा स्वार्थसाधू लोकांनीं धार्मिक पुस्तकांचें ज्ञान होऊं दिलें नाही, व केवळ समाजाच्या या अज्ञानावरच त्यांनी आपली तुंबडी भरून त्यांवर आपलें वर्चस्व राखिलें आहे.

ज्याप्रमाणे आज वीस वर्षांपूर्वीपर्यंत पुष्कळशा लोकांनीं जे उत्तम-उत्तम ग्रंथ लिहिले आहेत ते इंग्रजींत लिहिले आहेत; कारण राज्यसत्ता ज्यांच्या हातीं होती त्यांची भाषा ती आहे; त्याचप्रमाणे आमच्या बसवेशाच्या जन्मापूर्वी उत्तम उत्तम ग्रंथ फार करून संस्कृतांतच लिहिले गेले. सामान्य जनतेला ज्याप्रमाणे या वेळेस इंग्रजी येत नाही तशीच तेव्हा संस्कृत भाषा त्यांना येत नव्हती. सारांश, थोड्याशा स्वतःला सुसंस्कृत व विद्वान् म्हणविणाऱ्या लोकांकडून बहुसंख्य जनांवर अनन्य रीतीने त्रास होत होता. या अन्यायाचा प्रतिकार होणें साहजिक आहे. मनुष्य थोडे दिवसपर्यंत अन्याय सहन करूं शकतो, पण सदा सर्वकाळ त्याला अन्यायाच्या दडपणाखालीं ठेवतां येत नाहीं. तसेच थोड्या लोकांना पुष्कळ दिवसांकरिता फसविणें शक्य आहे किंवा बहुसंख्य जनांला थोड्या वेळपर्यंत चकविणेंहि होऊं शकेल, पण बहुसंख्य जनाला बहुकाळपर्यंत चकविणें शक्य नाही. अन्यायाचा प्रतिकार केव्हां तरी होणार ही ठरलेली गोष्ट. मग बसवेशांसारखा बुद्धिमान् नेता भेटल्यावर मग काय विचारता. सगळे महात्मे हे आपल्या काळचे सुधारकमतवादी असतात. यांना त्या काळचा समाज अधर्मी लेखीत असतो, पण हे महात्मे कशालाच जुमानीत नाहीत. सत्यावर त्यांचा जबरदस्त भरवसा, पावित्र्य हा त्यांचा मरभक्कम पाया, मग यश त्यांच्या चरणीं लोळत आल्यास नवल तें काय? महात्म्यांना हातीं घेतलेल्या कार्याबद्दल एक विलक्षण प्रकारचा आत्मविश्वास असतो. सारें जग जरी एकीकडे झालें तरी त्यांचा विश्वास आपल्या तत्त्वावरून चळत नाही, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. महात्मा बसवेशांना त्यांच्या काळच्या जैनसमाजाकडून पुष्कळ त्रास झाला. राज्य जैनांचें होतें तर त्यांनी काय काय केलें असेल याची कल्पना करा. पण आमचा मर्द बसवेश कशाला जुमानीना. इतकेंच काय पण आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर त्यांनी जैनराज्याचें मंत्रीपद मिळविलें. मंत्री म्हणजे प्रतिराजा. याच्यापेक्षा जास्त यश तें कोणतें आहे?

आपल्याला पुत्र व्हावा अशी बसवेशाच्या मातेची अत्यंत तीव्र इच्छा होती. तिला केवळ पुत्रच नको होता तर तिला एक अत्यंत पराक्रमी, बुद्धिमान्, मुलगा आपल्या उदरीं जन्म घ्यावा असें वाटत होतें. ती नेहमी याच विचारांत असत होती. तिचे विचार, आचार, आणि प्रयत्न याच दिशेने चालू होते. म्हणूनच तिच्या उदरीं असा पराक्रमी नरवीर जन्मूं शकला. मातांनो! आमचीसुद्धा हीच इच्छा असावयास पाहिजे. आमचे आचार-विचार याच प्रकारचे नरवीर जन्मतील असे असले पाहिजेत. पुराणांत कुठें लिहिलेलें नाही कीं बसवेशाच्या बापाकडून त्याला कितीसें वळण मिळालेलें आहे. पण एकंदरींत गोष्टी लक्षांत घेतां हेंच अनुमान निघतें कीं, त्यांच्या बापाचा त्यांच्या आचारविचारावर फारच कमी परिणाम झालेला आहे. बसवेश बनले ते त्यांच्या मातेकडून व परमपूज्य गुरु संगमेशाकडून. आयांनो! लक्षांत ठेवा कीं, लोकांना आमच्या उदरीं एक दिवस नाही दोन दिवस नाहीं तर नऊ महिने वास करावयाला पाहिजेत. या संबंध काळांत आमच्या आचारविचाराची, आमच्या आहार-विहाराचीच आमच्या संततीवर छाप पडणार. आम्ही जर चांगले बुद्धिमान् सुशील व सुदृढ असूं तरच आमची भावी प्रजा उत्तम—बसवेशासारखी होऊं शकेल. म्हणूनच माझी तुम्हा लोकांना अत्यंत नम्रपणें विनंती आहे कीं, बसवमाता बना, नाहीतर वांझपणा उत्तम. पुत्र व्हावा तर बसवेशासारखा बुद्धिमान् व महात्मा, मुलगी व्हावी तर बसवेश्वराच्या मातेसारखी. माझ्या मतें आम्ही खरी जयंति तेव्हांच साजरी केली असें होईल कीं, जेव्हा आमच्या कृतीने व उक्तीनें आमच्यांत बसवपणा आलेला असेल.

# श्रीमद्वीरशैवसमाजांत झालेली शैक्षणिक क्रांति

( लेखकः— आ० क० कुरणे, ॲडव्होकेट, मिरज ).

कर्नाटकांत गेल्या १५–२० वर्षांत ठिकठिकाणी शिक्षणफंड जमा होऊन वीरशैव विद्यार्थ्यांची संख्या कशी झपाट्याने वाढत आहे. तें खालील लेखांवरून कळेल:—

कर्नाटकांत शिरसंगी ट्रस्टफंड व धारवाड शिक्षणफंड हे दोन मोठे जुने फंड असून, त्याचा विनियोग फार कुशलतेने तज्ञ व जबाबदार इसमांकडून केला जातो. याशिवाय कर्नाटकांत वीरशैवसमाजाने चालविलेलीं वसतिगृहें, व हायस्कूल्स व कॉलेज असून त्यांत बऱ्याच लिंगायत विद्यार्थ्यांना बऱ्याच सवलती मिळतात.

हल्लीं मुंबई–विश्वविद्यालयाचे परीक्षेंत दरवर्षी खालीलप्रमाणे अजमासे वीरशैव विद्यार्थी पास होतात.

( १ ) मॅट्रीक २००-२५० ( २ ) ग्रॅज्युएट्स [ आर्टस, सायन्स वगैरे मिळून ] १००-१२५ ( ३ ) एल्. एल्. बी. व ॲडव्होकेट्स ३०–३५ याशिवाय मेडिकल व इंजिनिअरींग एम्. ए. वगैरे प्रत्येक परीक्षेंत २–३ विद्यार्थी पास होतात.

परदेशांत उच्च शिक्षणाकरिता सुमारें ८-१० विद्यार्थी नेहमी असतात.

हल्ली मुंबई इलाख्यांत खालीलप्रमाणे लिंगायत लोक सरकारी नोकरींत आढळून येतात.

[ १ ] मंत्री १; [२] मुख्य कलेक्टर १; (३) संस्थान हायकोर्ट जज्ज१; (४) डी.डे कलेक्टर ४; [ ५ ] डि. जज्ज २; ( ६ ) शेतकी डायरेक्टर [ दक्षिण भाग ] १ ; (७) सबजज्जेस १२ ; [८] मामलेदार १६ ; ( ९ ) कॉलेज प्रोफेसर ८ ; [ १० ] इंजिनिअर्स ४.

याशिवाय परदेशांत उच्च शिक्षण घेऊन आलेले लोक खालीलप्रमाणे आहेत.:—

[ १ ] आय्. सी. एस्. १ ; [ २ ] बॅरिस्टर ३ ; [ ३ ] एम. ए. पी एच. डी. ३ ; [४] दंतवैद्यकींत शिक्षण घेतलेले १ ; [ ५ ] शेतकी एकानॉमिक्स एम. एस. सी. १ ; [ ६ ] मेडिकल शिक्षण घेऊन आलेले ३ ;

यापैकीं डॉ. सौ. कृष्णाबाई पाटील बडोदे या एक होत. त्या खेरीज करून वीरशैवमहिलावर्गामध्यें दुय्यम अथवा उच्च शिक्षण घेतलेल्या महिला विशेष आढळून येत नाहीत. थोडेबहुत प्राथमिक शिक्षण घेतलेल्या दिसून येतात.

सुमारें वीस वर्षापूर्वी मॅट्रिक परीक्षेंत अवघे ३०–४० विद्यार्थी पास होत होते. त्यावरून पुढील परीक्षेंत त्या वेळी किती विद्यार्थी पास होत होते हें अनुमानानेच वाचकांच्या लक्षांत येईल.

पूर्वी व हल्ली कर्नाटकांत शिक्षणाचा प्रसार वीरशैवलिंगायतांत दिसून येतो. त्याचें बहुतेक श्रेय शिरसंगी ट्रस्ट फंड व धारवाड एज्युकेशन फंड यांसच आहे.सर्वच विद्यार्थी फंडाची मदत घेतात असें नसून कांही थोडे सधन विद्यार्थी स्वतःच्या खर्चानें शिक्षण घेतात.

शिरसंगी–फंडाची मदत महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांस मिळत नाही अशी कांही लोकांची समजूत आहे ती निराधार आहे. महाराष्ट्रांतील कांही विद्यार्थ्यांना सदर फंड मिळालेला आहे हें महाराष्ट्रांतील विद्यार्थी व कर्नाटकांतील विद्यार्थी हा भेदभाव विद्यादानाचे कामीं फंडाचे ट्रस्टी कधीं करीत नाहीत. या फंडांतून दरवर्षी अजमासे पाऊण लाख

रुपये विद्यार्थ्यांमध्ये वाटले जातात. फंडाचा पैसा कर्नाटकांत पुष्कळ विद्यार्थी असल्याने तेथेच खपतो व महाराष्ट्रांतील सर्वच विद्यार्थ्यांना मदत करणे ट्रस्टीजनांना परवडत नाही. तरी महाराष्ट्रांतहि वीरशैव लिंगायतांनी आपला स्वतःचा शैक्षणिक फंड उभारावा, तो स्वत: चालवावा, अगर शिरसंगी फंडात अगर धारवाडफंडांत सामील करून ठेवावा म्हणजे महाराष्ट्रांतील विद्यार्थी कोठेहि शिक्षण घेत असल्यास त्यांना फंडाची मदत मिळू शकेल.

वरील विवेचनावरून वाचकांस दिसून येईल कीं, पास होणारांची संख्या फार मोठी दिसून आली तरी लोकसंख्येच्या मानाने ती फारच अपुरी आहे. दरवर्षी मॅट्रिक परीक्षेंत निदान २ हजार विद्यार्थी पास झाले पाहिजेत, व त्याच प्रमाणांत पुढील परीक्षांतहि बरेच विद्यार्थी पास व्हावयास पाहिजेत, व सरकारी नोकरींतहि फार थोडे लोक आहेत. त्या संख्येंतहि बरीच वाढ होणे जरूर आहे. म्हणजे आपल्या समाजास इतर समाजाच्या मानाने जगांत बरोबरीच्या नात्याने राहण्याजोगी परिस्थिति निर्माण होईल.

# वीरशैवांच्या प्रगतिपथावरील धोंड

## उत्तरार्ध २ रा

श्री. तु० ना० काटकर, नागभीड, (बी. एन्. रेल्वे).

या लेखाच्या पूर्वार्धांत वीरशैव-समाजासंबंधी साधक-बाधक चर्चा झाली; पण प्रस्तुत लिखाणांत त्यांचीं मर्मस्थानें कोणतीं याविषयीं अवश्य तो विचार करावयाचा आहे.

अहो ! आमचें नांव काय तर 'वीर'. नुसत्या नांवाचा उच्चार होतांच ऐकणाराची गाळण उडा-यची ! पण कृति बघावी तर, निव्वळ 'भीरु'. दिसतांक्षणींच कींव येण्यालायक ! आम्हाला 'वीर' ही संज्ञा प्राप्त होण्याला कधीं काळीं तरी आमच्या पूर्वशैवधर्मीसमाजाकडून वीरश्रीच्या नौबती झडल्या असल्याच पाहिजेत. त्याशिवाय अनेक धर्मांच्या लाटांचा प्रतिकार करून आज हिंदुस्थानांतच नव्हे इतर खंडांतहि त्याचा अंकुर दिसताना ! पण त्याला वीसाव्या शतकांत इतकीं ग्लानि कां यावी ! हें तत्व तर अगदींच भिन्न आहे. आज ही भाषा बोलणेंच मुळीं पंगूपणाचें लक्षण आहे. प्रत्येक समाज वा धर्म या शतकांत पुढे येण्याचा प्रयत्न करीत आहे, येत आहे, किंबहुना आमच्यापेक्षा त्यांचें पाऊल किती तरी पुढेच आहे. आम्ही मात्र त्यांच्या मानाने अजून किती तरी मागेंच आहोंत हें खास.

शैवमताचें वीरशैवांत केव्हा रूपांतर झालें किंवा रूपांतर होण्यास काय कारण झालें हें निश्चित सांगतां येणें कठिण आहे. तरी पण चातु-र्वर्ण्यांतिल उच्चनीचपणाचा भेदभाव कारणीभूत झाला असावा हें बसवेश्वर व तत्पूर्व कालांतील वीरशैवांच्या अद्वैत प्रगतिवरून म्हणावयास कांही हरकत नाही. वीरशैवांचे मुख्य केंद्रिस्थ पांच धर्मपीठें. त्या पीठांच्या शाखा–उपशाखांनी हिंदुस्थानचा बराचसा भाग — पृथक्-पृथक् कां होईना पण—व्यापलेला आहे. खरें पाहिलें असतां पीठ आणि मठ ह्या सार्वजनिक पण धर्मदीप-संस्था. मुख्य पीठावरील जगद्गुरुच्या योजने-

व्यतिरिक्त आपल्या व इतर भागांतीलहि मठांतील पट्टाधिकाऱ्यांची योजना वीरशैवसमाजाकडून विचारपूर्वक केलीं जात नाही. किंबहुना पट्टाधिकारी लोक समाजाच्या अधिकाराची कांही जरूरच ठेवीत नाहीत ह्मटल्यास वावगें होणार नाही. पट्टाधिकारी ह्मटला कीं, न्यायानेसुद्धा तो धार्मिक मतांचा आणि मठाचा सर्व सत्ताधारी खराच. पण त्याबरोबरच मठाच्या संरक्षणार्थ असलेल्या स्थावर-जंगम इस्टेटीचासुद्धा सर्वाधिकारी बनतो. ह्मणजे-त्यांना त्या इस्टेटीचा वाटेल तसा उपभोग घेतां येतो, व वाटेल तसा धुव्वा उडवितां येतो. अशा तऱ्हेने हे लोक मठाधिपतीपेक्षा कौटुंबिक विशेष शोभतात. मग इस्टेटीचा वारसाहक्क शाबीत करण्याकरिता ह्मणून समाजाची कांही दिक्कत न बाळगतां स्वसत्तेखालीं आपल्याच पूर्वाश्रमांतील एखादा वंशज पहायचा आणि एकदांचा दीक्षाविधी उरकून टाकला कीं गुळाचा गणपती करून मठारूढ करायचा असें आजकाल बहुतेक मठांतून आढळून, येत आहे. प्रत्यक्षपणेंसुद्धा कित्येक मठांची माहिती देतां येईल पण तें आज नको.

पट्टाधिकाऱ्यांची योजना करतांना त्याचें शिक्षण किती झालें, विद्वत्तेने त्याचा दर्जा काय आहे, तो त्या पदाला खरोखर योग्य अधिकारी आहे काय, याचा कांहीच का विचार करायला नको ! अशा तऱ्हेने मठांतून वारसा हक्कदार होऊं लागल्यावर, समाजाची उन्नति होणार कशी आणि करणार कोण ? मठाधिकारी समाजजागृतिकरिता आहेत कीं, सिंहाचे कातडें पांघरून सर्वस्वीं गिळंकृत करण्याकरिता ? अशा या लोकांच्या स्वार्थी प्रकारांकडे अजून आमच्या सुज्ञ लोकांची डोळेझांकच चालली आहे. याकडे लक्ष घालणें किती अगत्याचें आहे याचा विचारवंतांनी अवश्य विचार करावा. एवढेंच नाही तर प्रत्येक मठाला एकेक संरक्षक मंडळ नेमून त्यांच्या सल्ल्याने मठांचें संचालन करण्यांत यावें. त्याशिवाय समाजाचा प्रवाह अखंड प्रगतिपर चालण्याची आशाच करायला नको.

कालौघाबरोबर धार्मिक मतांत उत्क्रान्ति घडवून आणणें याचेंच नांव प्रगति. प्रगति घडून येण्यास संघटनेचा पाया अढळ पाहिजे. त्याविना नव्या परिस्थितींत नवा वीरशैव कसा दृष्टीस पडेल मुख्य केंद्रें आणि शहरें सोडलीं तर इतर मठ आणि त्यांचे सत्तेंत वावरणाऱ्या अज्ञ वीरशैव समाजाची काय स्थिति आहे! धर्माच्या नांवाखाली नुसतें पाखंड बोकाळलें आहे. या पाखंडामुळे ज्ञानवान् समाजाला कसे हात टेकावे लागतात याची कल्पना प्रत्यक्ष त्यांच्यांत शिरल्याशिवाय करून घेणें आंधळेपणाचें होणार आहे. शेकडो खेड्यांतून राहणाऱ्या बहुसंख्य वीरशैवांत सर्वांत हानिकारक ह्मणून जर कांही असेल तर परंपरागत आचार वा रूढी वा नानाविध खुजट नि कुजट धर्मभोळ्या भावना ह्या होत. धर्माची मूलभूत तत्वें कोणती होतीं ! धर्माचें व्यापक स्वरूप कां नष्ट झालें ?? व दिवसेंदिवस एकेक पाऊल मागे कां ??? इत्यादि बाबींचा विचार केला असतां आज वीसाव्या शतकांत असेंच म्हणावें लागतें कीं, कोणताहि धर्म प्रिय व बलवान् होण्यास त्यावें ध्येय उदात्त तत्वाचें असावें लागतें. ते सद्यास्थितींत आपल्या धर्मात नाहीं. ते उदात्त बनण्यास स्वसमाजांत सर्रास शिक्षणाचा-विशेषतः उच्च शिक्षणाचा-प्रसार होणें अत्यावश्यक आहे. प्रत्येकाला समजूं लागल्यावांचून त्यांच्या ध्येयांत उत्क्रांति होणें कठिण आहे.

अलीकडे सत्हृदयतेने शुद्धिकरण आणि सहभोजनासारखीं कार्यें घडत असल्याचें मधून-मधून दृष्टोत्पत्तीस येतात. ही त्यांची धडाडी आजच्या कालांत समाजाच्या सहानुभूतीच्या दृष्टीने अत्यंत महत्वपूर्ण असून अभिनंदनास पात्र आहे. ह्याच धाष्टर्याच्या बळावर आमचा नवमतवादाच्या प्रगतीचा विजय-ध्वज चिरायु होणार हें विसरून चालावयाचें नाही.

वीसाव्या शतकांतील सुशिक्षित व ज्यांना कांही तारतम्यज्ञान आहे असाच तरुणवीरशैवसमाज स्वधर्माच्या नवमताला प्रोत्साहन देईल. पण चाळीशी उलटलेले सनातनी एकदाचे मरणास तयार होतील पण स्वधर्माच्या उन्नत मतांना

कदापिहि पाठिंबा देणार नाहीत. आज **वीरशैवांच्या प्रगतिपथावरील धोंड** म्हणून जर कोणी असतील तर ती ही कर्मठमतवादी नानाकल्पविकल्पांनी पछाडलेलं जुनाट पिढींतील पितामह—आणि त्यांच्यावर सर्वस्वीं अवलंबून असलेले दंभाचारी मठाधिकारी — व त्यांच्या मतांचा पुरस्कार करणारा खेड्यांतील अज्ञ व अशिक्षित अंधश्रद्धेने अनुकरण करणारा बहुसंख्यांक वीरशैवसमाज हे होत. यांच्या खुजट नि कुजट मतांचें उच्चाटन केल्याविना वीरशैवांना सर्वांगीण नवमताची सुधारणा सर्रास राजरोसपणें घडवून आणण्याचें धाडस करणें हमखास अतिशयोक्तीचें होईल यांत शंका ती काय बाळगावी ! किंबहुना नियतकालिकांच्याद्वारें ही सुधारणा घडवून आणण्याच्या निमित्ताने कंबर बांधली तरी ज्यांच्यांत सुधारणा करायची तो समाज तर कट्टर अक्षरशत्रु. थोडाबहुत साक्षर असला तरी त्यांतील नवमतबोधामृत चाखण्याइतका अक्कलवंत आहे कोठें ! एवढ्यापुढे जाण्यापेक्षा वर्तमानपत्रें नी पाक्षिकें-मासिकें हीं काय चीज आहेत व ते कशाशीं खातात, एवढें तरी ज्ञान कोठलें असायला! पण जर का तारतम्यज्ञानाने यांच्यातून एखादा दुसरा जरी नवमताचा पुरस्कर्ता निघाला तरी तो 'उकिरड्यांत हिरा' वा 'भांगेंत तुळस' वा 'कंटकांत पुष्प' असाच शोभेल. एवढें धैर्य सरसावणारे खरोखरीचे 'वीर' पुरुष उपर्युल्लिखित वीरशैवांतून निघूं शकतील काय? हा मात्र प्रश्नच आहे!

याकरितां धर्माधिकारी पुरुषांनी तनमनधनें-करून नवमताच्या ध्वजाखालीं अविश्रांतपणें झगडूनच कर्मठमतवाद्यावर स्वामित्व गाजविणें आजच्या परिस्थितींत आत्यंतिक महत्वाचें आहे. त्याविना रुढीजात दिशाभूल करणाऱ्या भावना व ही बोकाळलेली जातिभेदाची विषमता जाऊन बृहन्वीरशैवसमाज एका नवमताच्या ध्वजाखालीं आपला प्रगतीचा मार्ग आक्रमण करील अशी आशा धरणेंच केवळ मृगजलाभास होणार आहे ! शेवटीं माझ्या ज्ञातिबांधवास हाच माझा प्रेमाचा इशारा आहे.

---

# वीरशैवांतील चळवळी

## वीरशैव-तेली-परिषद्

कोल्हापूर येथे नुकत्याच होऊन गेलेल्या वीरशैव-तेली-परिषदेंत तेलीसमाजसुधारणेच्या दृष्टीने १२ ठराव पास करण्यांत आले. तेली-समाजाच्या उन्नतिकरतां वर्तमानपत्र काढणें, मंडळ स्थापन करणे वगैरेहि ठराव झाले व ठरावा-नुसार एस्. आर. फल्ले ह्यांचे संपादकत्वाखाली "वीरशैव हितवादी" नांवाचें पाक्षिक वर्तमानपत्र ता. ५ जून १९३६ पासून सुरु झालें व तेली-समाजाचे नवजीवन नांवाचें मंडळहि नुकतेंच स्थापन झालें. तेली (लिंगायत) समाजांत वरील उपक्रम व चळवळींना यश येऊन सुधारणा घडून येवो असें आम्ही इच्छितों.

## मि. एस्. जी. जतकर

पुसद येथील लिंगायत नायब-तहसिलदार व समाज कार्याविषयीची कळकळ व आवड असणारे मि. एस्. जी. जतकर ह्यांना ता. १८-५-३६ पासून ऑफिसिएटिंग तहसिलदार म्हणून नेमण्यांत आल्याचें आनंददायक वर्तमान समजतें.

## पुनर्विवाहास तयार

एक २० वर्षे वयाची मराठी ४ थी पास झालेली प्रतिष्ठित व कुलीन घराण्यांतील लिंगायत विधवा पुनर्विवाहास तयार आहे. २५ ते ३० वर्षे वयाच्या अविवाहित किंवा विधुर गरजूंनी आपली सांपत्तिक शैक्षणिक व पोटजातीचे खुलाशासह व्यवस्थापक, वीरशैव संजीवनीकडे चौकशी करावी.

## जंगमांस जेवणबंदी, रायचूर.

अखिल भारतीय वीरशैव महिला परिषदेंत महासभाध्यक्षाचे सूचनेवरून सोलापूरचे सुप्रसिद्ध गुरुवर्गीय बॅरिष्टर एम्. एस्. सरदार यांच्या सुविद्य विदुषी पत्नी सौ. पंचव्वाबाई सरदार (जंगम) यांनी "गुरुविरक्तकलहामुळें समाजाची हानि होत आहे ती लौकर मिटेपर्यंत जंगमांना जेवणास बोलावूं नये." अशा आशयाचा ठराव मांडला व तो पसार झाला. शेवटी स्त्रियांनीच पुढाकार घेतला म्हणावयाचा ! व त्यांतूनहि गुरुवर्गीय ! ! स्तुत्य व अभिनंदनीय ! ! !

## वीरशैव लिंगायत तरुणानें केलेली वाघाची शिकार

तेरगांव (ता. हळियाळ, जि. कारवार) गांवानजीकच्या जंगलांत श्रीमंत अडिवेप्पा चनाप्पा कित्तूर यांना ता. २-५-३६ रोजी रात्रीं ८ वाजतां भल्या मोठ्या वाघाची शिकार केली. श्री. कित्तूर यांचें वय अवघे पंचवीस वर्षांचें असून ते हळियाळ-म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष आणि कारवार डि. लो. बोर्डाचे सभासद आहेत. शिकार केलेला वाघ १०॥ फूट लांब होता. गेल्या तीन वर्षांत त्याने जवळ जवळ ३०० शे जनावरें मारलीं होतीं. आणि लोकांना भयंकर उपद्रव दिला होता. श्री. कित्तूर यांनीं ही शिकार करून लोकांचा दुवा मिळविला.

## जामठी (पूर्व खानदेश)

येथील मे० एस्. के. वडियर असि० कलेक्टर [पूर्व खानदेश] यांचा दौरा जामठी येथे असतांना ता. ३०-५-३६ रोजी साहेब बहादूरांस तेथील वीरशैवसमाजांतील प्रमुख श्रीमंत शेट शंकर विठोबाआप्पा नवलाखे यांनी थाटाची पानसुपारी-समारंभ केला. सदर प्रसंगीं, पहूरचे श्री. त्र्यंबक सुपडूआप्पा हे वीरशैव-बोर्डिंग स्थापण्यासाठीं जेवढी रक्कम देतील त्याच्या वीसपट रक्कम देण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें आहे. जिल्ह्याचे मुख्य ठिकाणीं बोर्डिंग स्थापण्याचें ठरलें आहे. स्तुत्य व अभिनंदनीय !

## मंगळवेढे

अखिलभारतीय वीरशैव माळी समाजोन्नति परिषद् श्री. नाभाजी अक्काप्पा माळी यांचे अध्यक्षते-खाली ता. १३ व १४ जून रोजी भरणार होती.

## लातूर

येथील प्रसिद्ध लिंगायत तरुण कार्यकर्ते श्रीमंत त्र्यंबकआप्पा गिरवलकर यांचें लग्न अथणीचे बी. ए. रेवणसिध्दप्पा हिपरगी यांची कन्या चि. सौ. कां. सुंदराबाई इचेशीं ता. २३-५-३६ रोजी गोरज-मुहूर्तावर झालें. लग्नप्रसंगीं गांवांतील सर्व प्रमुख मंडळी हजर होती.

## अभिनंदनीय विवाह

कोंडोली (कोल्हापूर) येथे नुकतेच लिंगायत-समाजांतील सहा विवाह दहा रुपयांत एकाच वेळी झाले. म्हणजे प्रत्येक लग्नास सुमारे एक रुपया साडे दहा आणे खर्च आला. अशीं एकदम पुष्कळ लग्नें होतील तर याहूनहि किती तरी कमी खर्च येईल. स्तुत्य व अनुकरणीय !!!

## श्रीशरण बसवेश्वर स्कूल गुलबर्गा

निजाम संस्थानांत वीरशैवांचे मातृभाषेंतून शिक्षण देणारी हीच एक संस्था आहे. त्यांत सध्या ७५ वीरशैव विद्यार्थी व ३ शिक्षक आहेत. ही संस्था वीरशैवतरुणसंघ व श्री. आप्पासाहेब यजमान संस्थान यांचे हस्तें २९-१-३६ रोजी कायम करण्यांत आली. विद्यार्थ्यांची संख्या वाढत्या प्रमाणांत आहे. संस्थेस आर्थिक सहाय्याची अत्यंत आवश्यकता आहे. वीरशैव धनिकांनी आपल्या दातृत्वाची दिशा अशा उपयुक्त संस्थेकडे वळविणें योग्य होईल.

## रोहिणखेड-वीरशैवसमाज

ता. २४-४-३६ रोजी रोहिणखेड-वीरशैव-समाजाने बसवेश्वरजयंत्युत्सव साजरा करावयास सुरवात केली. दुसरे दिवशी भोजनसमारंभ व रात्रौ श्री. गोविंदआप्पा चिखलीकर यांचें धार्मिक विषयावर कीर्तन व व्याख्यान वगैरे कार्यक्रम झाला.

# वीरशैवसंजीवनी

अंक १३ वा ) ता० १ जुलै १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २।। रु. किरकोळ अंकास २ आणे.

# ह. व्या. मंडळांतील खेळाडूंस जर्मनीस जातांना जाहीर निरोप

नामदार दादासाहेब खापर्डे.



सिद्धरामस्वामी माजलगांवकर, भिमाशंकर मठ संस्थान उमरावती.



नामदार दादासाहेब खापर्डे ह्यांचे अध्यक्षतेखाली मंगळवार ता० ३० रोजी स्वामींना ह० व्या० मंडळातील इतर खेळाडूं-बरोबर जर्मनीस जाताना वी. हि. सं. मंडळ व वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळातर्फे जाहीर सन्मानाने निरोप देण्यात आला.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

| | |
|---|---|
| ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥ | मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् |
| पारमेश्वरागम प. १ (५६) | भगवद्गीता अ.९ (३२) |

नवें वर्ष १ लें ) मिति आषाढ शु॥ १२ शके १८५८ ( अंक १३ वा.

# जंगमवर्गासंबंधी दोन अध्यक्षांचे स्पष्टोद्गार

## १ दिवाणबहादूर एस्. टी. कंबळी.

अध्यक्षः—अखिल भारतीय वीरशैव महासभा-रायचूर [निजामप्रांत]
अधिवेशन १२ वें

ता० २ व ३ जून ३६.

## २ श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख,

जहागिरदार-पारवा, जि. यवतमाळ.

अध्यक्षः—वीरशैव पुढाऱ्यांची परिषद्, रोहिणखेड-वऱ्हाड
१९-४-३६.

### १. दिवाणबहादूर कंबळी ह्यांचे रायचूर-महासभेपुढील जंगमवर्गासंबंधीचे समारोपाचे भाषणांतील स्पष्टोद्गारः—

त्यानंतर त्यांनी पहिल्या व दुसऱ्या ठरावाचें महत्व निवेदन करून तिसऱ्या ठरावाबद्दल सांगितलें कीं, "जंगमस्थळ म्हणजे समतेचें चिन्ह होय. अशा जंगमस्थळांतील लोकांकडून हल्लीं जी भेदाभेदाची व उच्चनीचतेची चळवळ चालविण्यांत येत आहे ती अत्यंत अनिष्ट होय. त्यामुळे समाजांत दुही माजून आपल्यांतील अनैक्यतेचें हिडीस चित्र सर्व जगाला व इतर समाजाला दिसत आहे. काल विषयनियामक कमिटींत एका

स्वामीला वर्णभेदाचे समर्थनाबद्दल जाब विचारला असतां त्याने जवाब दिला कीं, मी वृत्तपत्रांतून खुलासा करीन. या जंगमांनी आपल्या स्वार्थी वर्चस्वाकरिता एक-दोन पत्रें काढून, त्यांत अभद्र शिव्या देऊन समाजाची शोभा सर्व जगाला दाखविण्याचा प्रयत्न चालविला आहे. त्यांच्या त्या निरुपयोगी वृत्तपत्रांचा दुष्परिणाम कूपमंडुकाप्रमाणे मठाच्या आवारांत व मूढभक्तांच्या घोळक्यांत वावरणाऱ्या या जंगमांना दिसत नसल्यास तो आह्माला स्पष्ट दिसत असून त्यामुळे बरेच वेळां आह्माला माना खालीं करण्याचा प्रसंग येतो. या जंगमांना स्वधर्माची चाड व अभिमान मुळींच नाही, स्वार्थी मानमरातबापुढे त्यांना समाजाची पर्वा नाही. नुकतेच मुंबईला एका कमिशनपुढे साक्ष देतांना **'लिंगायत हे शूद्र आहेत' असा जबाब एका जंगमानेच दिला आहे हें लक्षांत ठेवा.** हें पाहिलें कीं, हृदयांत कालवाकालव होऊन मन संतापून जातें. जंगमस्थान हें समतेचें द्योतक असतांना भेदाभेदाचें विषबीज त्यांच्याकडूनच पसरविण्यांत येत असून समाजस्वास्थ्य नाहींसें होत आहे. ह्मणून प्रत्येक वीरशैवांला अशी आग्रहाची सूचना आहे कीं,त्यांनी जंगमांना पाहिल्यास नमस्कार करून विचारावें कीं, तुमच्यांतील वाद मिटला काय ? नाही असें ह्मटल्यास त्यांना भिक्षा घालूं नका, त्यांचें तीर्थ घेऊं नका. माझ्या भगिनींना माझी कळकळीची विनंती आहे कीं, भगिनींनो जंगम दिसला कीं त्याला नमस्कार करून हा भेदाभेदांचा झगडा मिटला कीं नाहीं असें विचारा. मिटला नसेल तर त्यांना पीठ वाढूं नका, दान देऊं नका, जेवण घालूं नका. ह्मणजे हें भांडण आपोआप मिटेल. नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाहीं हें लक्षांत ठेवा. आणि जंगमांनो ! तुह्माला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, आता काल बदललेला आहे. तुमचें वाक्य प्रमाण असें समजून मूढभक्तीने तुमच्या कच्छपी लागणारे लोक समाजांत कमी आहेत. प्रत्येक बाबींत चिकित्सक [illegible]णाने प्रश्न करणारे लोकच जास्त आहेत. पुरुषांच्या एवढ्या मोठ्या सभेंत स्त्रीने छातीठोकपणे व्याख्यान दिलेलें तुह्मीं पूर्वी पाहिलें होतें काय ? ज्या स्त्रिया घरातल्या दिवाणखान्यांत येत नव्हत्या आज पुरुषांच्या भरसभेंत बोलूं शकतात. यावरून तुह्मीं आपसांतील भांडण मिटवून समाजांतील समतेचें चिन्ह ( कुरुह ) अशा जंगमस्थानास योग्य असें वर्तन केल्यासच तुमचा मान राहील. पण तसें न करितां तुमच्या त्या वर्तमानपत्राच्या जोरावर कलहच पसरवूं लागला, **भक्तांचे खाऊन व भक्तांकडून पोसलें जाऊन त्यांचीच निंदा नालस्ती कराल तर त्याला कोणी किंमत देणार नाही. व तुमचें महत्व कमी होईल. अशा वर्तमानपत्रांना आग लावा, असेंच समाज** झणेल. तरी जागृत व्हा आणि स्वकर्तव्य जाणून व जंगमस्थानाचें महत्व जाणून वागा ह्मणजे तुमचा योग्य मान राहून तुह्मी सुखी व्हाल व आपल्या समाजालाहि सुखी कराल. माझ्या भाषणांत कठोरपणा दिसत असला तर तो सार्वजनिक हिताकरिता व सार्वजनिक नात्यानेच आहे हें लक्षांत आणून आपण त्याबद्दल कोणताहि किंतू मनांत बाळगूं नये अशी मी आशा करितों." अशा आशयाचें अत्यंत कळकळीचें समारोपाचें भाषण अध्यक्षांनीं केलें.

---

## २. रोहिणखेड—परिषदेचा समारोप करतांना श्रीमंत बाबासाहेब देशमुख ह्यांनी काढलेले स्पष्टोद्गारः—

"यापुढील प्रश्न जरा नाजुक स्वरूपाचा आहे. तो ह्मणजे आह्मा लिंगायतांच्या गुरुस्थानीं असणाऱ्या जंगमवृंदासंबंधीं होय. कोणत्याहि एका व्यक्तीचा अपमान करण्याचा माझा उद्देश नाही हें मी आगोदरच सांगून ठेवितों. आज या वर्गाकडे पाहिलें तर असें दिसून येईल कीं, तो फारच अवनतीस गेलेला आहे. ज्याच्यापासून आह्मा गृहस्थाश्रमीयांना अध्यात्मिक उ[illegible]

तीचा उपदेश मिळावयाचा त्याच लोकांना धर्माच्या तत्वांसंबंधीं मुळींसुद्धा कल्पना नाही असेंच बहुश: दिसून येतें. आह्मी सर्व लिंगाइ-तांच्या गुरुस्थानीं आहों सबब आह्माला त्या योग्यतेने वागविण्यात आलेच पाहिजे असा नुस्ता पोकळ अट्टाहास धरून बसण्यांत मोठासा पुरुषार्थ आहे असें मला वाटत नाही. मी कसाहि असलों तरी माझ्या जन्मजात हक्कामुळे मला मोठा समज-ण्यांत यावें असे ह्मणणाऱ्याचा युक्तिवाद, वीसाव्या शतकांतील सुधारलेल्या पिढीला कसा पटणार ?

जन्मजात हक्कामुळे गुरुपणाच्या उच्चपदावर बसण्याचा हव्यास धरण्यापेक्षां, समाजाचे गुरु ह्मणून समजले जाण्यासाठीं आवश्यक असणारें अध्ययन आपण करा, पवित्र आचरण ठेवा, आणि आपला दैनिक कार्यक्रम असा ठरवा कीं, तो सर्व समाजाला आदर्शभूत होईल. इतकें झालें तर, आपण न ह्मणतांहि, सर्व वीरशैवसमाज आपल्या चरणीं लोटांगणें घालीत आपोआप येईल. चरितार्थ चालविण्यासाठी लागणारें द्रव्य जमवावें ह्मणून, पै, पैसा, अथवा जें मिळेल तें मागण्यासाठीं लोकांचे उंबरठे झिजविणाऱ्यासंबंधी पूज्यभाव कसा उत्पन्न व्हावा! ही भिक्षावृत्तिसुद्धां क्षमार्ह ठरेल; पण केव्हां ? आपल्या संचारामध्यें आपण कांही धार्मिक जागृतीचें कार्य अव्याहत करीत रहाल तेव्हा.

आपल्या पूर्वजांनी ज्या उद्देशाने निरनिराळ्या ठिकाणीं लहान-मोठे मठ स्थापन केले तो उद्देश सफल करून दाखविण्याचा किती मठपती आज प्रयत्न करीत आहेत ? मठाच्या चरितार्थासाठी दिलीं गेलेलीं लहान-मोठीं वर्षासनें अगर इनाम आज कशा रीतीनें खर्च केलीं जातात हें पाहिलें ह्मणजे अंतःकरणांत विषाद उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. मठाला मिळालेलीं इनामें ही आपली खाजगी जायदाद समजून तिची मठपतींकडून बऱ्या वाईट कामांत होतें असलेली उधळपट्टी पाहिली ह्मणजे मन विषण्ण होतें. बरें; मठपतींच्या विद्वत्तेकडे अगर नित्याच्या आचरणाकडे पहावें तर तिकडूनहि निराशाच होते. ज्या ठिकाणांतून धर्माची स्फूर्ति मिळावयास पाहिजे तिथला स्फूर्तीचा झरा आटून ज्ञानांधःकारांत गडप होऊन बसलेला कोरडा पाषाणच हातास लागतो.

मी स्वत: अत्यंत पापभीरु मनुष्य आहें. माझ्याकडे येणाऱ्या याचकांची माझ्या अल्प शक्तीप्रमाणें सेवा करण्यास सहसा मागें-पुढे पहात नाही. परंतु प्रत्येकवेळीं मनामध्यें पूज्य-भाव उत्पन्न झाल्यामुळेच मी ती सेवा करीत असतो असें ह्मटल्यास माझ्यावर ढोंगीपणाचा आरोप कोणालाहि सहज घेतां येईल.

**मी जें करितों तें कर्तव्य ह्मणून करितों, पूज्यभाव ह्मणून नव्हे.**

अंधश्रद्धेचा काळ जाऊन आजच्या सुधारलेल्या मनुमध्यें, व्यक्ति पूजार्ह आहे किंवा नाहीं, तसेंच दानधर्म करितांना दान घेणारी व्यक्ति सत्पात्र आहे किंवा नाहीं, या गोष्टींची चिकित्सा करण्याचीच प्रवृत्ति उदयोन्मुख पिढीमध्ये साहजिक दिसून येते आणि तीच बरोबर आहे असें कोणीहि सूज्ञ मनुष्य कबूल करील. तेव्हा आपल्या-संबंधीं जनतेच्या मनांत पूज्यभाव आणि आदर उत्पन्न होण्यासाठीं लागणारे गूण आपल्यामध्यें सुशिक्षणाने बाणून घेण्याचा निश्चय या वर्गानें केला तर जनतासुद्धा ही आपली जबाबदारी विसरणार नाहीं.

धर्मप्रचार व विस्तार करण्याची कामगिरी ज्या व्यक्तींची अगर समाजाची आहे त्यांनी ती पार न पाडल्यामुळें आपल्या धर्माचे अनुयायी इतके मर्या-दित आहेत; त्यांमध्यें अखंड भर पडत गेली

असती तर आपली संख्या आज दिसते इतकी अल्प खास दिसली नसती. अनादिकालापासून चालत आलेल्या आपल्या धर्मांत कांहीं वैशिष्टय आहे म्हणूनच तो, परकीयांच्या हल्ल्याला न जुमानतां, व विपरीत परिस्थितींना तोंड देऊन जिवंत राहिला आहे हें स्पष्ट दिसतें. असें असतांना त्याची हेळसांड कां ? होऊन गेलेल्या गोष्टींचीं कारणें शोधीत बसण्यांत कालापव्यय करण्यापेक्षां,ही स्थिति सुधारण्यास काय उपाययोजना केली पाहिजे याचा आपणा सर्व वीरशैवांना विचार करणें भाग आहे. व एखादी योजना सर्वांच्या विचाराने निश्चित झाली म्हणजे ती यशस्वी करण्याची अव्याहत खटपट सुरूं ठेवणें हें या धर्मांतील प्रत्येकाचें आद्य कर्तव्य आहे.

वीरशैवांच्या हितसंवर्धनाकरिता सदैव तत्पर राहणार असलेली संस्था आणि शिथिलगात्र झालेल्या वीरशैवसमाजामध्यें नवचैतन्य उत्पन्न करण्यास बद्धपरिकर झालेली "संजीवनी" यांनी अंगीकारिलेल्या समाजसुधाणेच्या कामांत सुयश लाभो अशी त्या महेश्वराला माझी प्रार्थना आहे.

आपण माझें भाषण शांतपणाने ऐकून घेतल्याबद्दल व मला मदत करून ही परिषद् यशस्वी केल्याबद्दल आपला व स्वागताध्यक्ष श्रीमंत रामचंद्रशेट कुळी व त्यांच्या स्वागतमंडळाचा मी आभारी आहें."

---

# व्य क्ति

लेखकः—
श्री. एस्. एस्. मोगलाईकर,
सी. बी. ए. धुळे,
( पू. खानदेश )

स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर साहेबी पोषाख केलेले सद्गृहस्थ इकडून तिकडे सिगारेटचे झुरके सोडीत फिरत असतां, एकाएकी स्टेशनला साष्टांग नमस्कार करावा व जमलेल्या लोकांनी चौकशी केली असतां केळीच्या सालपटावरून साहेबांची स्वारी घसरली असें कळतांच जो हास्यतरंग व्हावा, अशी व्यक्ति कदाचित् वाचकवर्गापुढे उभी राहिल्या-शिवाय रहाणार नाही. किंवा इब्सेनने लिहिलेलें [ Doll's house ] 'घरकुल' नांवाच्या नाटकामधील नायिकेने नवऱ्याबरोबर न पटल्यामुळे धाड्दिशीं घराचें दार बंद करून रस्त्यावर गेली व आजसुद्धां अशा व्यक्ति धाड्धाड् आवाज करून तुमचीं अंत:करणें कंपायमान् करीत आहेत. त्याचप्रमाणे प्रादेशिक वाङ्मयांत के. गडकऱ्यांनी लिहिलेल्या 'एकच प्याला' या नाटकांतील नायिकेने आयुष्यभर त्रास मोठ्या आनंदाने सहन करून पतिधर्माची त्याचप्रमाणे समाजाची उन्नति करण्याचा प्रयत्न केला व आपलें उदाहरण प्रत्येक महिलावर्गापुढे ठेविलें अशी ती सिंधू तुमच्या दृष्टिक्षेपांत आली असेल. किंवा शेक्सपीयरच्या एका दुःखांत नाटकांतील नायकाने अमर्याद महत्वाकांक्षेला बळी पडून निरुपद्रवी प्राण्यांच्या रक्ताने पाटच्या पाट वाहविले व 'करावें तसें भरावें' ह्या म्हणीप्रमाणे आपल्या रक्ताचामुद्धा प्रवाह पहिल्या प्रवाहांत मिळवून दिला असा तो मॅक्बेथ तुमच्यासमोर असूं शकेल.

परंतु असा लाल भडक रंग करण्याचा लेखकाचा बिलकूल हेतु नाही. कल्पना करा कीं, एक नवीन पालवी फुटलेलें मोठें झाड समुद्राच्या तीरावर आहे, व त्यावर एक पोपट येऊन बसला व आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहूं लागला. त्याच झाडाखाली तुम्ही विसावा घेण्यास गेला व वर वर्णिलेला नयनमनोहर

देखावा पाहून तुमच्या अंतःप्रदेशांत ( miner region ) कोणत्या लाटा उसळतील ? तुम्हांला असेंच वाटूं लागेल कीं, आपल्या वर्तणुकीमुळे जगांत चांगली किंवा वाईट प्रतिबिंबें उमटलीं जातात व कित्येक वेळेस वाईट मार्गानें आपण गेल्यास आपल्या आयुष्याचा नाशसुद्धां होतो. असें म्हणतात कीं, वर्तणूक हें आयुष्यांतील शिरोभूषण होय. आपला तिच्यावर चांगल्या प्रकारें ताबा बसला म्हणजे धनानेसुद्धां न झालेलीं कामें होऊं शकतात. अशाच व्यक्ति जगाचा कारभार हांकूं शकतात. सुधारणा, समाजशक्ति, व्यापारधंदे, कायदे हे सर्व आपल्यावरच अवलंबून आहेत. आपल्याभोंवती चित्रविचित्र रंगांनी भरलेलें जग आहे. त्यांतून आपल्या आयुष्याला पोषक अशा गोष्टींचें परिशीलन करण्याची शक्ति प्राप्त झाली पाहिजे. पांडवांनी आपल्या बाजूला कृष्णाला घेतलें व कौरवांनी कृष्णाचें सैन्य घेतलें व ह्या पसंतीमुळे भारतीय युद्धाचा काय परिणाम झाला हें आपणा सर्वांना माहितच आहे.

आपल्या अंगीं स्फूर्ति पाहिजे. प्रथमतः एखादें काम हातीं घेण्यापूर्वी त्याचा पूर्ण विचार केला पाहिजे व योग्य विचार केल्यावर आपलें ध्येय गांठण्याच्या उद्योगास लागलें पाहिजे. शेवटी आपणास चांगलाच मोबदला मिळेल. कदाचित् आपलें ध्येय साध्य करण्याकरिता ज्याप्रमाणे नदीला खडकाळ प्रदेशांतून वाहण्याचा प्रसंग येतो त्याचप्रमाणे आपण अडचणी दूर करण्याचा प्रयत्न केला म्हणजे आपल्या ध्येयाच्या जवळ-जवळ चाललों असें खचित होईल. येथे वाचकांना कोलंबसाची आठवण करून द्यावी असें मला वाटतें. आपल्याला माहितच आहे की, कोलंबसाने स्वतः अत्यंत त्रास सहन करून व शेवटी शेवटी खलाशांनी बंड केलें, अन्नसामुग्री संपली, तरीसुद्धां मनाचा समतोलपणा ठेवून जगांत अमेरिका नांवाचें एक खंड आहे. असा शोध लावण्याचा अग्रेसर मान मिळविला.

आई बाप व मुलें, पति व पत्नि, गुरु व शिष्य, राजा व प्रजा, अशा प्रकारचे शब्दद्वय आपणा सर्वांनाच माहित आहेत. ह्या द्वयाचें एकीकरण करणें हें इष्टच होणार आहे. मला असें वाटतें कीं, शारीरिक दास्य भोगणें सोपें, परंतु मानासिक भोगणें कठिण. मनावर जुलूम करणारे कामक्रोधादिक रिपु, तसेंच अज्ञान यांचा जुलूम अतिशय जुलमी राजाच्यापेक्षांहि मोठा असतो. प्रत्येकानें मानसिक स्वतंत्रता मिळवावी. असा स्वतंत्र मनुष्य समाजाच्या कल्याणाची वृद्धि करूं शकणार नाही काय ? परंतु काय सांगावं बुवा, कदाचित् इतक्या वेळपर्यंत मारलेल्या गप्पा खोट्या असूं शकतील. पण हे पहा डिझरायलीसाहेब काय म्हणतातः—जो मनुष्य वर पाहणार नाही तो खाली पाहूं लागतो आणि जें अंतःकरण अत्युच्च स्थानाकडे भरारी मारत नाही तें खरोखरच मातीला मिळतें.

---

# चौधरींचा नवमतवाद आणि त्याचा सुवर्णमध्य

लेखकः—तु० ना० काटकर, नागभीड, B. N. Ry.

## प्रास्ताविक

माझे स्नेही व नवमतवाद्यांचे एक पुढारी श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., यांनी प्रतिपादिलेल्या 'नवमतवादा' विषयीं माझें स्पष्ट मत मी माझ्या स्वज्ञातीय वाचकवृंदापुढे आज मांडीत आहें.

सृष्टींतील अनंत जन्य प्राणीमात्रामध्ये मानव हा एकच बुद्धिजीवी असून 'नवमतवाद' आणि 'सुधारणा' ह्या शाब्दिक वाक्प्रचाराप्रमाणे घडून येणारी कृति ही त्यांच्या प्रगतीचें द्योतक आहे. दरवेशाने अस्वल-माकडांना तबला, सतार, वाजविण्याची आज्ञा करावी नी त्या बिचाऱ्या अबुंध प्राण्यांनी अचूक नक्कल करावी; वा सर्कल-मधील वाघ-सिंहास येथें बैस, अशी उडी मार नी तसा पळायला लाग असे मालकाने हुकूम फर्मावावें व त्यांनी तसे करावे; किंवा गाडीवानाने गाडीला बैल जुंपावे व नेहमीच्या ठराविक चाकोरींतून खुशाल हाकीत न्यावे; पण ह्यांत त्याचा बिचाऱ्यांचा काय दोष आहे. तीं जाणून बुजूनच बुद्धिहीन जनावरें! पण त्यांच्याप्रमाणेच मनुष्याने वागूं ह्मटल्यास मात्र तें त्याला लांछनास्पद होणार आहे. मनुष्य हा उच्च कोटींतील असून त्यास परमेश्वराने सदसद्विवेकबुद्धिसारखी अमुल्य देणगी दिली आहे. तिचा त्याने योग्य प्रकारें सदुपयोग करुन घेतला नाही तर त्यांतच त्याचें अज्ञान आहे. मग आमच्यापेक्षा वर उल्लेखनीय जनावरें बरीं ह्मटल्यास चालेल. बिचाऱ्यांना कांही अक्कल नसतांनासुद्धा केवळ मनुष्याच्या धाकास्तव आपापलीं कामें निमूटपणें काल जशीं केलीं होती तशीच आजहि करितात व उद्याहि करण्यास सदैव तयार असतात. मनुष्याच्या बाबतींत मात्र हा न्याय कदापिहि लागू पडायचा नाही. मनुष्यानेहि असाच निर्धार केला असता तर हजारो वर्षांपूर्वी ते ज्या स्थितींत होते तसेच आजहि कोरेच्या कोरेच राहिलो असते, आणि आजच्या आगगाड्या मोटार्स, विमाने व सिनेमा इत्यादि सुखसोयींस अंतरावें लागले असतें. एक काळ असा होता कीं, जलपर्यटन ह्मणजे धर्मबाह्यच समजलें जाई. पण आज मात्र अशी परिस्थिति निर्माण झाली आहे कीं, जलनौका ह्मणजे विलायतच्या यात्रेच्या देव्हा होऊन बसल्या आहेत. पण त्याबद्दल कोणाच्याहि मनांत आज कांही किलिमशसुद्धां येत नाही. याला कारण एकच. 'नवमतवादी' लोकांनी पुरातन कल्पनांच्या निरर्थक चालीरीतीचा पडदा वा आडकाठी झुगारून लावली आणि आपल्या बौद्धिक सामर्थ्याने कोणाचीहि भीडमुर्वत न करितां बुद्धिग्राह्य प्रामाणिक मनाला अखंड गति दिली. त्यामुळे अभिजात संवयीने तसेंच सोईच्या आवश्यकतेने नी द्रव्याच्या व शारीरिक त्रासाच्या बचावाने धर्मांआड येणारी बाब उलट कर्माला पोषक झाली. किंबहुना बिचाऱ्या त्या यात्रेकरूंच्या पुण्याईनेच जगाच्या बरोबरीने चालण्याचे डोहाळे सुचले, चालू लागले, चालत आहेत, एवढेंच नव्हे तर कित्येकांनी त्यांच्यावरहि वरचढपणा

केला. पण आमचे वीरशैव मात्र अजून जुन्यालाच घट्ट मिठी मारून बसले आहेत. त्यांना तो भोळा-शंकर केव्हा आझापील कोण जाणे.

नवमतवाद ह्मणजे कांही बकासुर नव्हे. तो आह्मां-तुह्माला भक्षिणार नाही तर त्याचा अंगीकार केल्यास उलट तो सर्वांचें कल्याण करील, सर्वांना सुधारणेच्या शिखरावर नेऊन पोंहचवील.' नवमत-वादनी सुधारणा '-ह्या शाब्दिक बुजाटाला भिण्याचें कांहीच प्रयोजन नाही. कित्येक काळापासून धार्मिक सदराखाली चालत आलेल्या आगांतुक नि वेडगळ रूडी वा प्रथा ह्यांत कालमानाप्रमाणे इष्ट बदल घडवून आणणें अवश्य आहे आणि हा बदल जुन्या व नवीन पिढीला बुद्धि-पुरस्सर पटवून प्रमाणशः आचरणांत आणावयास लावणें ह्मणजेच नवमतवाद प्रस्थापित करणें होय. कित्येक शब्दच असे असतात कीं, त्यांचा नुसता उच्चार होतांच मस्तकांत तिडीक उत्पन्न होते. आणि आमचा खराखुरा अज्ञानपणाहि पण ह्यातच प्रगट होतो. कोणत्याहि मतांचा योग्य विचार केल्याशिवाय गैरसमज करून घेणें ह्मणजे समाजाला अधो-गतीला पोहोंचविण्याचें लक्षण आहे. असेंच अट्टाहासानें वागूं लागले तर आज जो मुठभर वीरशैव-समाज दृष्टीस पडत आहे तोसुद्धां कांही दिवसांनी हमखास नामशेष झाल्याविना रहाणार नाहीं.

अगोदरच आमचा समाज इतर सुधारलेल्या समाजाच्या दृष्टीने हास्यास्पद होऊन बसला आहे. वीरशैव लिंगायत-झटला कीं कोणीहि नाकें मुरडतात. अशा वेळीं जर आह्मीं जुन्यांचेच अंधानुकरणाने अवलंबन करूं लागलों तर मग कांही विचारायलाच नको. ' जितं मया ' ! पण आज तो काळ राहिला नाही. प्रत्येक समाजाच्या उत्कर्षाचें हें युग आहे. ह्या अर्थी प्रत्येक वीरशैवाने नवमताचा चष्मा चढवून त्यांतून अवलोकन करण्याची आज वेळा आली आहे. अशा वेळी आमच्या समाजांत असलेला हा रूढीजात कलंक धूवून काढण्या-करिता वैय्यक्तिक तशीच सामाजिक सुधारणा नवमताच्या तत्वावर घडवून आणणें आज प्रत्येक वीरशैव ह्मणविणाऱ्या वीरांचें आद्य कर्तव्य आहे.

—: अपूर्ण :—

## —: जाहिर सूचना :—

वी. संजीवनीचे प्रचाराचे वेळी समक्ष व इतरत्र पत्रद्वारां ज्या कांहीं परिचित किंवा अपरिचित स्नेही व इतर मंडळींनी " आमचेकडे वी. संजीवनी सुरूं करा, आह्मी वर्गणी पाठवूं किंवा व्ही. पी. करा " ह्मणून सांगितलें होतें व ज्यांचेकडे आतांपर्यंत अंक विनावर्गणीनें सुरुं आहेत त्या सर्वांस नम्रपणें सुचविण्यांत येते कीं, त्यांनी ता. १-७-३६ चे आंत वी. संजीवनीची वार्षिक वर्गणी २॥ रु. मनिऑर्डरने " मॅनेजर वी. संजिवनी अमरावती " ह्या पत्त्यावर पाठवून द्यावी. व्ही. पी. करण्यांत निष्कारण दोघां-नाहि खर्च पडतो व व्ही. पी. परत आल्यास आह्माला भुर्दंड पडतो. तरी ज्यांचेकडे विना-वर्गणी अंक सुरुं आहेत त्यांनी तात्बडतोब वर्गणी पाठवावी—नाहीतर ता. १-७-३६ पासून अंक बंद केल्या जाईल. तसेच वर्गणीदारांनी " अंकाबाबत " कांहीं तक्रार करणे असल्यास आपला रजिष्टर नं. कळवीत जावा.

आपला नम्र.

वि. तु. चौधरी बी. ए.,

३

# आमच्या मठाधिशांची दिनचर्या.

(लेखकः- डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर, चांदूर बाजार)

## 'माझा बनारसचा प्रवास'

आम्ही तीर्थयात्रा करण्यास निघालों. बनारसला जातांना आम्हाला जवलपूरला गाडी बदलावी लागली. आह्मी गाडींतून उतरतांच आमचेसभोवती पंड्यांची गर्दी झाली. 'बाबुसाब, आप हमारे यहांपर चलो, बहोत आराम होगा, अपने यहां बडा मकान है,' असें ह्मणून एकच गिल्ला करूं लागले. त्यांपैकी एक भगवें वस्त्र परिधान केलेली एक व्यक्ति मला ह्मणाली, आपण कोण जात ! मीं त्यांना उत्तर दिलें कीं, मी लिंगी ब्राह्मण आहें. माझे शब्द ऐकतांच महाराज हंसतमुख करून मला म्हणाले, आपण जंगमवाडींतच उतरावें. मीं त्यांना होकारार्थी उत्तर दिलें व गाडी चालूं झाली. सकाळी नऊला आह्मी बनारसला जाऊन पोहोचलों. तेथून जंगमवाडींत विश्वाराध्यमठ आहे. मठाचा समोरील भाग पाहिला ह्मणजे जुन्या शिल्पकलेची आठवण होते. आह्माला एक खोली देण्यांत आली व आह्मी तेथे राहूं लागलों. मठाची जागा भव्य व प्रशस्त आहे. मठाची ती देऊळवजा कमानी असलेली इमारत व तिच्या भोवतालची प्रशस्त जागा पाहून माझे मनांत पूज्य भावना उत्पन्न झाली. सदर मठांत एक घोडा व बरेच अस्ताव्यस्त पडलेलें सामान दृष्टीस पडलें. या मठास कांहीं इनाम जमिनी वगैरे आहेत व मठाचें सालीम उत्पन्न पंचवीस ते तीस हजारांचें आहे असें समजलें. मी महाराजांची भेट घेण्याकरिता आतुर झालों परंतु स्वामीमहाराज कैलासमंडपांतून बाहेरचे बाजूस येत नाहीत अ[से] समजलें. आह्मी महाराजांचे दर्शनास मंडपां[त] गेलों. महाराजांची स्वारी संसारी माणसाप्रमाणे पेोषाख करून खुर्चीवर बसलेली होती. हेच [ते] महाराज म्हणून आम्हाला सांगण्यांत आले [व] आम्हीं त्यांना प्रणिपात केला. स्वामींचा स्वभा[व] तामसी आहे असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिस[ून] आलें. मी कोण, कोठला, वगैरे प्रश्न स्वामींनीं मला विचारल्यावर मीं त्यांना माझें नांव, गां[व] सांगितलें. आमच्या पूर्वकाळच्या स्वामींनीं आपल्या तपोबलाने व सदाचाराने स्थापन केले[ला] मठ व त्याचें अवाढव्य उत्पन्न पाहून मीं संतो[ष] व्यक्त केला व आमच्या मूळ स्वामींच्या कर्त[ब]गारीचा व वीरशैवधर्माची परम्परा टिकां[वी] म्हणून त्यांनी मठ स्थापन केल्याबद्दल मला फा[र] अभिमान वाटला. स्वामीमहाराज रोज सकाळीं उठून स्नान करून, शुचिर्भूत होऊन रोज [च]ार तास शिवपूजा करीत असत व त्यानंतर आहा[र] घेऊन निद्रासुख घेत असत. दुपारच्या सुमारा[स] उठून मुखमार्जन करून एका खुर्चीवर आराम [करीत] असत. नंतर इनाम जमिनीचे व कोर्टांचे कागदप[त्र] पहात असत. सायंकाळी शिवपूजा व आहा[र] आटपून निद्रा घेत असत. याशिवाय त्यांचे [का]हीं खाजगी कार्यक्रम असल्यास मला माहीत ना[हीं] व तो खाजगी कार्यक्रम असल्यामुळे खाज[गीच] रहाणेंच बरें. स्वामीचे राजेश्वर नांवाचे शि[ष्य] मठाचा कारभार पहातात. एवढें मोठें मठा[चे] उत्पन्न स्वामीमहाराज काय करतात याची [...]

विचारपूस केली परंतु मठाचें उत्पन्न मठाचे खर्चा-सच पुरेपुर होतें असें कळलें. मठाचे बाजूस एक पाठशाळा आहे व तेथे पंधरा ते वीसपर्यंत विद्यार्थी संस्कृत शिक्षण घेत असतात. विद्यार्थ्यांचा खाण्याचा खर्च महाराजच देतात. बरेचसे विद्यार्थी गप्पागोष्टी करण्यांतच वेळ घालवितात. महाराजांचे पाठशाळेकडे मुळीच लक्ष नाही. स्वामीमहाराजांचें एवढें मोठें उत्पन्न व महाराज एकटे त्या मठाचे सूत्रधार मालक. त्यांना आमच्यासारखीं लग्नकार्यें वगैरे प्रपंच नाही. त्यांचा प्रपंच म्हणजे वीरशैव-धर्माची जोपासना, त्यांची प्रगति व्हावी, त्यांना धर्मतत्वें समजावून देऊन आचारसंपन्न करावें. याकरिता मठाचें अस्तित्व. वीरशैवांचें धर्मशिक्षण व इतर शिक्षणाचे कामीं उपयोग होतो काय पाहिलें. परंतु कांहीच नाही. या मठांत धर्माचे पुराण-प्रवचन वगैरे द्वारा लोकांस ज्ञान द्यावयास पाहिजे, परंतु कांहीच नाही. तेथे दर गुरुवारी भजनाचा कार्यक्रम होतो. परंतु त्यांतहि भक्ति-रसाचा गंध नाही. कांही तरी, चार मंडळी जमतात व हां, हां, ही, ही करून कार्य पार पाडतात. ही आमच्या मठांतील व्यवस्था. वरील प्रकार पाहून मला फार विषाद वाटला. मठांतील स्वामीचा नित्य कार्यक्रम व कालाचा व मठाचा उत्पन्नाचा अपव्यय होत आहे हें पाहून माझें मन फार खिन्न झालें व मूळ संस्थापकाचा हेतु सिद्धीस जात नाही याबद्दल मला फार दुःख झालें. आम्हीच जर लक्ष देत नाही तर सुधारणा होणार कशी? पहाटे उठावें, दुकानावर जावें, उद्योगधंदा करावा व रात्री येऊन जेवण करून निजावें यापलीकडे आपल्यांतील मठ, मठाधिपति त्यांचें उत्पन्न कोठे जातें याकडे लक्ष देतो कोण ? आचा-र्यांचे मुख्य मठाची जर ही व्यवस्था तर इतरांची काय कथा ? वरील सर्व परिस्थितीमुळे आपल्या वीरशैवधर्मास ग्लानि आली आहे हें माझ्या लक्षांत आलें व मला फार खेद वाटला. आम्ही तेथील मुक्काम संपवून दुसरे दिवशी निघालों व आपले गांवीं परत आलों. माझे वीरशैव बांधव मठ सुधारण्याकडे व मठाधिकाऱ्यांच्या स्वैर वर्तनाकडे लक्ष देतील काय ?

---



# स्त्री-शिक्षणाचें ध्येय कसें असावें ?

लेखिकाः—सौ० गंगाबाई पटणे, हेडमिस्ट्रेस गर्ल्सस्कूल, अक्कलकोट.

मुलांप्रमाणें मुलींकरितांहि ट्रेनिंग कॉलेजें पाहिजेच आहेत. कारण, उच्च शिक्षण मुलांनीच घ्यावें व मुलींनी घेऊं नये असें मला वाटत नाही. उलट आपल्या देशांतील एकंदर प्राथमिक व बालशिक्षण, स्त्रीवर्गाच्या हातीं आलें पाहिजे, असें मला वाटतें. कारण बालसंगोपनाची निसर्गजात पात्रता स्त्रियांत पुरुषांपेक्षा अधिक आहे, म्हणून प्राथमिक शिक्षणाचे प्रथमारंभीचे वर्ग स्त्रियांनीच चालविले पाहिजेत. निरपेक्षबुद्धीने शिक्ष-णाचें चीज करावयाचें झटल्यास तें पुरुषांपेक्षा बायकांनाच अधिक साधेल. शिक्षण, शिशुसंवर्धन, हे व्यवसाय ध्येयप्रेरित वृत्तीने चालविणें आणि त्या मार्गाने भावी राष्ट्राचें व समाजाचें भवितव्य बनविणें हें कार्य घराप्रमाणें दारांतहि स्त्रियांना जसें साधेल, तसें तें पुरुषांना साधणार नाहीं.

'जिच्या हातीं पाळण्याची दोरी ती जग उद्धरी,' असें सुभाषित आहे. त्याचा खोल अर्थहि हाच आहे. बायकांवर घरांतील एकंदर कारभार सोपविला जातो तो केवळ आह्मांस गुलाम ह्मणून राबविण्याकरिता नाही. जे हलके लोक आपल्या स्त्रीवर्गाला गुलामाप्रमाणें वागवितात, ते उलटपक्षी अशा गुलामांचे दासानुदास बनून जगांत गुलामवृत्ति स्वीकारतांना दिसून येतात असा इतिहासाचा अनुभव आहे. आज पाश्चात्य देशांत स्त्रियांची उन्नति बरीच झालेली दिसून येते, व त्यांचें स्थानहि त्यांनीं ठरवून घेतलेलें दिसतें. तेव्हां तो इतिहास वीरशैव-महिलासमाजाने पाहिला पाहिजे. स्त्रियांनी आपली पात्रता वाढविण्याचा प्रयत्न केल्याखेरीज तें स्थान प्राप्त व्हावयाचें नाही. अर्थात ज्यांना आर्थिक परिस्थिति बरी आहे अशा वीरशैवमहिलांनी उच्च शिक्षण वाढविल्याखेरीज कोणत्याच दृष्टीने स्त्रियांचें पाऊऊ पुढें पडणार नाही. तेव्हा ह्याची सर्व जबाबदारी आजच्या सुशिक्षित स्त्री-वर्गावरच आहे. ह्मणून प्रत्येक सुशिक्षित स्त्रीने तें जाणून वीरशैव-महिलासमाज पुढे यावा याकरिता झटले पाहिजे. आपल्या कर्तबगारीने दृढनिश्चयपूर्वक प्रयत्न करून तें स्थान मिळविलें पाहिजे. स्त्रियांचें स्थान पुरुषांचे बरोबरीचें आहे. किंबहुना आपलें काम पुरुषांचे कामापेक्षा कांकणभर जास्तीच महत्वाचें आहे. इंग्लंडमध्ये स्त्रियांचे हक्काचा पुरस्कार जरी कांहीं पुरुषांनी केला असला तरी त्या कामीं महत्त्वाचें कार्य स्त्रियांनींच केलें. त्यांनी संधानमंडळास नाना तऱ्हेने भंडावलें. लोकांनाहि आपल्या हक्काची जाणीव व्हावी ह्मणून व्याख्याने वगैरे दिलीं. त्यांचा शिक्षणप्रसार अगोदरच झालेला असल्यामुळे त्यांचे कार्यास लवकरच यश आलें. आज जरी पार्लमेंटमध्यें स्त्री सभासदांची संख्या थोडी असली तरी त्यांना मतदानाचा हक्क मिळाला असल्यामुळे त्यांचें महत्व वाढलें आहे.

पाश्चात्य देशांतील विशेषतः अमेरिकेंतील स्त्रियांनी शिक्षणाच्या क्षेत्रांत बहुमोल कामगिरी केलेली आहे. प्राथमिक शिक्षण असो किंवा दुय्यम शिक्षण असो, बहुधा स्त्री-शिक्षकच काम करितात. शिक्षकांची संख्या पाहिली तर त्यांत शेंकडा ७५ स्त्री शिक्षकच असतात. आपल्या हिंदुस्थानांत असा काळ येण्यास पुष्कळ वर्षें लागतील ह्यांत शंका नाही. हा काळ जवळ आणणें किंवा लांबविणें हें स्त्रियांचेच हातीं आहे. ह्या कामीं स्त्रियांनीच सहाय्य केलें पाहिजे, मन त्यांत घातलें पाहिजे. कारण ज्या-ज्या वर्गाचीं दुःखें स्त्रियांना बरोबर समजतात तेव्हा तीं नाहींशी करण्याची इच्छा आपणासच झाली पाहिजे. आपण ह्या कामीं अंतःकरणपूर्वक झटलें पाहिजे.

स्त्रीशिक्षणाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होण्यासाठी स्त्रियांनीच आरडाओरड केली पाहिजे. इतर लोक आपणास मदत करतील परंतु स्वानुभवाने दुःखें लवकर पटतात तशी शाब्दिक वर्णनें पटत नाहीत हें ध्यानांत ठेवावें. सध्या पुरुषांसाठीं व स्त्रियांसाठी होणाऱ्या खर्चाचें प्रमाण १०: १ आहे. ह्यावरून पुरुषाचें शिक्षण पुरेसें झालें आहे असें नव्हे परंतु आज स्त्रीशिक्षणावर प्रमाणानेहि खर्च होत नाही इतकेंच दिसून येईल.

आता स्त्रियांना कायदेकौन्सिलांत जाण्याचा हक्क मिळाला आहे. त्याचा उपयोग करून तेथ जाऊन मोठ्यानें ओरडावें; दुखणें वेशीवर टांगल्याखेरीज भागत नाही, पार्लमेंटांत बसण्याचा व मतदानाचा हक्क मिळविण्यासाठी इंग्लंडांतील स्त्रियांनी कसें आकाश-पाताळ एक केलें ह्मणूनच तें स्थान प्राप्त झालें ह्मणून वर मीं सांगितलेंच आहे. पण आतां निमूटपणें बसून किंवा मुळुमुळु रडून हें काम होणार नाही. क्रमाक्रमाने आपली स्थिति सुधारून तें स्थान प्राप्त करून घ्यावयाचें असतें. हल्ली पुरुष व स्त्रिया यांचें साक्षरतेचें प्रमाण शेंकडा १४:२. ही निरक्षरता घालविण्यास स्त्रियांनीच झटले पाहिजे. सुशिक्षित स्त्रियांनी अशिक्षित स्त्रियांना विद्यामृत पाजण्याचें कार्य करावें, आपल्या सवडीप्रमाणे त्यांना शिक्षण द्यावें।

तसेंच ज्या स्त्रिया थोड्याशा सुशिक्षित असतात त्यांच्याशीं विचार-विनिमय करून प्रौढ स्त्रियांसाठी वर्ग चालविण्याची खटपट करावी. शिक्षणप्रसार करणें हें महत्त्वाचें कार्य आहे. त्याचे योगानेच धर्मग्रंथ, पुराण, पोथ्या पुस्तकें वाचून स्वतः ज्ञान मिळवितां येईल, स्त्रीपुरुषांचा समान दर्जा शिक्षणावरच अवलंबून आहे.

प्राचीनकाळीं स्त्रियांना विद्या शिकतां येत होती. तसेंच मुलीचा विवाह झालाच पाहिजे अशीहि त्या वेळीं समजूत नव्हती. कित्येक स्त्रियांनी अविवाहित राहून आजन्म विद्याभ्यासांत घालविला. उदा०:—सरस्वती, वीरशैव आक्कमहादेवी, वगैरे:—

अशा स्त्रियांस ब्रम्हनवादिनी ह्मणत. पूर्वी लहानपणीं विवाह नव्हते. ' अष्टवर्षा ' कन्येचे विवाह सुरू झाल्यापासून आर्यांचा ऱ्हास होण्यास सुरवात झाली. रा. चिंतामणराव वैद्य ह्यांनी रामायण व महाभारत यांचेकाळी बालविवाह कोठेंच आढळत नाहीत असें स्पष्ट सांगितलें आहे. पूर्वी क्षत्रियांत तर स्वयंवरच होत असे. यावरून तेव्हा स्वयंवर करणाऱ्या मुली सज्ञान असल्याच पाहिजे हें सांगावयास नकोच.

आज आह्मी ज्या सुधारणांसाठीं धडपडत आहोंत त्यांचा उपयोग आपले वाडवडील एकेकाळीं घेतच होते. आज आह्मी अधोगतीस पोंचलों आहोत. त्यामुळें आपण पूर्वी कोण होतों हें विसरलों व रूढीच्या शृंखलांनी बांधलें गेलों. आतां ह्या वेडगळ कल्पना घालविण्यास स्त्रियांनीच पुढें आले पाहिजे. आपली नेहमींची एक अडचण अशी असते कीं, माझ्या एकट्याच्या हातून काय होणार आहे ? देश केवढा, लोकसंख्या किती मोठी ! पण ही अडचण खरी नाही. काम करूं लागलें कीं एकाचीं एकवीस व पांचांचीं पंचवीस होतात. कोणत्याहि संस्थेचा उगम एका-दोघांतच असतो; पण कांहीं काळानें तीच संस्था फार मोठी झालेली दिसते हें लक्षांत ठेवावें, कार्यकर्त्या माणसांत आपल्या समाजाची व राष्ट्रोन्नतीची कळकळ, तीव्र भावना व उत्कृष्ट इच्छा असली ह्मणजे त्यांचे हातून कार्य होतें. अशा कार्यकर्त्यांचा पुढे एक संघ होतों. मग कामाची वाटणी करून कार्य साधितां येतें. सैनिक व सेनापति ह्यांचें उदाहरण पहावें. सेनापतीचें यश सैनिकांवरच अवलंबून असतें. त्याप्रमाणें अनेक स्त्रीसंघांनी कार्य करण्यास सुरुवात केली कीं त्यापैकींच कोणता तरी संघ किंवा त्यांतील व्यक्ति यशस्वी होतात. स्वतः थोडें कार्य केलें तरी जो आनंद होतो तो सांगतां येणार नाहीं. आपण आपल्या हाताने बागेंत फलझाडें लावून त्यावरचीं फुलें तोडून आणिल्यानें जो आनंद होईल तो बाजारांतून विकत आणिलेल्या फुलांनी होणार नाही.

स्त्रीपुरुष या दोघांनीं आपापले व्यवसाय व कर्तव्यें उत्तम रीतीने पार पाडलीं तर त्यांत दोघांनाहि उत्तम स्वातंत्र्य व आत्मोद्धाराचा लाभ झाल्याशिवाय रहात नाहीं. हा प्रश्न उच्चनीचपणाचा नसून निसर्गजात नियमानुसार योग्य श्रमविभागाचाच ह्मटला पाहिजे. शक्यतोंवर स्त्रियांनी गृहलक्ष्मी ह्मणून नांदावें, आणि पुरुषांनीं जगांतील एकंदर उलाढालीची योग्य जबाबदारी सांभाळावी, हा नियम सर्वसाधारणपणें जरी खरा असला तरी हल्ली हें योग्य नाहीं. मुलींना अगर स्त्रियांना जें शिक्षण द्यावयाचें तें केवळ चुलीपुरतेंच असावें असें माझें मत नाहीं. हल्लीच्या परिस्थितीस योग्य असेंच शिक्षण मुलामुलींनी अवश्य घेतलेंच पाहिजे आणि मुलींनी फक्त पुस्तकी शिक्षण घेऊन बसणें किंवा अनेक पदव्या मिळविणें हें कधीहि योग्य होणार नाहीं तर गृहशिक्षण, व बालसंगोपन ह्याबद्दल शिक्षण घेऊन पूर्णता करावी.

# धर्मात्म्यांची हृदयांतील हाक

लेखकः—श्री० एन. बी. साखळीकर, इंग्लिशटीचर, सोनाळा-बुलडाणा.

अखिल सृष्टीवरील जें राष्ट्र, समाज वा धर्म थोड्या काळांत आर्थिक, धार्मिक, राजकीय वगैरे सर्व अथवा कांही बाबींत नावाजलेले दिसतात त्यांचीं कारणें शोधूं गेल्यास, ह्या स्थितीप्रत येण्यास त्यांच्या अनेक कारणाच्या पायाशीं एक नाजुक भावना सदोदित जागृत असलेली दिसेल. ही भावना प्रत्येकाच्या हृदयांतील गाभाऱ्यांत असल्यामुळे, हिताची घड व अहिताची मोड, ह्या न्यायाने त्यांच्या घडामोडी हां हां म्हणतां घडून येतात. आणि ती पवित्र भावना म्हणजे 'आपलेपणा' ही होय. 'आपल्या' ह्या शब्दांत अशीच कांही जादू आहे कीं, त्याकारिता कोणीहि आपलें सर्वस्व अर्पण करण्यास तयार असतो. दोन मुसलमान [एक उत्तरध्रुवाकडील व एक दक्षिणध्रुवाकडील] एकत्र जेवावयास बसले तेव्हा प्रत्येकाला वाटतें कीं, मी अखिल सृष्टीवरील ४० कोट मुसलमानांपैकीं एक आहे. म्हणजे त्यांच्या ह्या भावनेच्या पाठीशीं ४० कोटींचें बळ एकवटल्या गेलें. दुसरें असें कीं, आपलेपण निर्माण करणारी समाजरचना व विस्कळित समाजरचना ह्याच्या कार्यांतहि तसाच फरक पडतो. एका समाजांत एक शूद्र प्राणी समाज-हितार्चे जें कार्य करेल, तेंच कार्य दुसऱ्या समाजांत एखादा महात्मा देखील करूं शकणार नाही. आपला समाज 'आपलेपणा'-पासून फार दूर आहे. जाती-पोट जाती, पंथ-उपपंथ, स्पृश्य-अस्पृश्य, रोटीबेटीव्यवहारबंदी, वगैरे भेदाभेदाने आपल्या समाजाचीं इतकीं शकलें पडलीं कीं, प्रत्येक जण एकमेकास ओळखेनासा झाला. अलीकडे कांहींना—निदान सुशिक्षितांना व तरुणांना ही समाजाची गति असह्य वाटूं लागली. नव्या-जुन्या विचाराचें आंदोलन होण्याचा काळच विभूति निर्माण करते व तो काळ आपल्या समाजास प्राप्त झाला आहे.

ज्यांनी आपला उभा जन्म 'वीरशैवधर्म' म्हणजे काय ह्याच्या अभ्यासांत घातला आहे त्यांनी पहिल्याने भोवतालच्या समाजाकडे व नंतर आपले समाजाकडे पाहिलें. भोवतालचे बरेच समाज आपसांतील भेदभाव विसरून, सर्वांना आपलेपणाच्या भावनेने सरसहा आपले पंक्तींत बसवून, समाजाचा संघशक्ति वाढवीत आहेत; तर आपला समाज त्याच वेळीं भेद-भावाच्या गलबल्यांत अज्ञानगुहेंत दूर खोल खोल जात आहे हें पाहून धर्मात्म्यांचें मन तिळ-तिळ तुटूं लागलें, हृदयांत कालवाकालव सुरू झाली. धर्माच्या वाटेकडे पाठ फिरवून समाज भलतीकडे चालला आहे, हें पाहून त्यांचा धर्मानें ओथंबलेला आत्मा त्यांना स्वस्थ बसूं देईना. चांगल्या मार्गावर येण्याकरिता त्यांनी समाजास हाक मारण्यास सुरुवात केली. ही हाक आपणास 'वीरशैव संजीवनी'-त ऐकावयास येते.

लिंगधारणेचा हेतु विषमता उत्पन्न करण्याचा मुळीच नाही. सबब जातीभेदाला धर्मांत कोठेच थारा सापडत नाही. जातीभेदाच्या विषमतेच्या परिणामाने धर्मात्म्यांचें हळहळणारें हृदय संपादक, रा. नारायणस्वामी मलवडी, रा. जिरगे, रा. नथ्थुआप्पा आदेवार, ह्यांचे लेखावरून स्पष्ट दृग्गोचर होतें. मठसंस्थेचा कांटा जनहितापेक्षा स्वार्थाकडे झुकला व चुकीची विवाहपद्धति समाजाचे उन्नतीस किती घातुक आहे, हें श्री. चौधरी ह्यांनी साधार दाखविलें

आहे. अंधश्रद्धेचा फोलपणा दाखवून, समाजास चांगल्या रस्त्यावर येण्यास समाजास किती कळकळीने हांक मारली, हें रा. नारायणस्वामी मलवडी यांचा लेख वाचल्याने समजून येईल. रोटी-बेटीव्यवहारबंदीने समाजांत आपपरभाव माजला, समाजहिताला अडथळा आला, संघटनेला समाज दूरावला; ह्या टोचणीने विदीर्ण झालेलें हृदय रा. नानासाहेब बामणगांवकर व रा. नथ्थुआप्पा आदेवार ह्यांच्या लेखांत तरुणांनी व सुशिक्षितांनी जरूर पाहावें. दोघेहि कंठरवाने सांगत आहेत कीं, रोटीबेटीव्यवहारबंदीला आपल्या शिवधर्मांत कोठेहि थारा नाही आणि ह्या बंदीचा परिणाम धर्मांतरांत होतो. धर्माचा अभिमान असणाऱ्या वीरशैवाने ह्या दोघांच्या दोन विधानांचा विचार करणें जरूर नाही काय ? तसेंच, समाजोन्नतीला शिक्षण व वर्तमानपत्रांचा प्रसार ह्याची अवश्यकता पटवून देणाऱ्या रा. जिरगे ह्यांच्या लेखास समाजप्रेमी व्यक्तीने तितक्याच कळकळीने क्रियेनें उत्तर देणें जरूर नाहीं काय ? एकंदरीत भाराभर गुळवेल जसा सत्वाच्या रूपानें मासाभर व्हावा अथवा डालीभर फुलाचा अर्क बोटभर शिशींत साठवावा, तद्वतच वीरशैवधर्माचें सांगोपांग परिशीलन करून, त्यांतील सत्व वरील लेखकांनी 'वीरशैव संजीवनीं'त सांठविण्याचा प्रयत्न सुरूं केला आहे. शिक्षितांनीं, विशेषतः प्रत्येक तरुणानें हे लेख जरूर वाचावे.

तरुणाबद्दल बोलावयाचें म्हणजे तरुण हे समाजाचे भावी अधारस्तंभ आहेत. इतर सुधारलेल्या समाजाकडे पाहून, आपल्या समाजाची वर्तमानकाळीं व भविष्यकाळीं टोलेजंग, भव्य व भारदस्त इमारत उठविण्याकरिता समाजाची धर्मानुसार योग्य ती समाजरचना करून देणें, हें त्यांचें आद्यकर्तव्य आहे. कांही तरुण अशिक्षित असतील, त्यांची दृष्टि वरील पक्षभेदाने अंध झाली असेल; परंतु सुशिक्षितांपैकी कांही धर्म व समाजाबद्दल बेफिकीर असतील तर कांही सनातन्यांच्या कचाट्यांत सांपडलेले असतील. समाजाची व धर्माची खरी कळकळ असणाऱ्या तरुणांनी वरील तरुणांस इशारा देऊन, समाजहिताच्या प्रत्येक कार्यांत आपली आहुती देण्यास सज्ज असले पाहिजे. संपादकाच्या 'लेखकास सूचना' ह्यांतील नियमाप्रमाणें येथेच पूर्णविराम देण्याचे आगोदर एवढीच आकांक्षा प्रदर्शित करतों कीं, वरील धर्मात्म्यांच्या हृदयांतील कळकळीच्या हाकेस आमचा तरुण 'ओ' देण्यास कधीं तयार होईल ?

# वीरशैवांतील चळवळी

## मागील कोड्याबाबत खुलासा

ता. १५ एप्रिल १९३६ च्या "वीरशैव संजीवनी"-चे अंकांत श्री. नत्थुआप्पा आदेवार यांनी जो 'मथळा ओळखा व बक्षीस मिळवा' हा लेख लिहिला त्यासंबंधी खुलासा:—

मंगळवेढे, सोनाळा, बुलढाणा, अमरावती इ ठिकाणाहून मथळयाबद्दल उत्तरें आलीत. पण तीं सर्व चुकीचीं असल्यामुळें मीं जें "रौप्य पदक" बक्षीस देण्याचें जाहीर केलें होतें तो माझा विचार रहित करावा लागत आहे. याबद्दल मी दिलगीर आहें.

त्याचा मथळा "वीरशैवांतील श्रीमंतांचा मेळ कसा जमेल" असा आहे.

## श्री. चौधरींचें श्री. हेगूंना उत्तर.

' वीरशैवगर्जना ' ता. ११ जून १९३६ मध्यें श्री. करवीरआप्पा हेगू ह्यांचा " नवमतवाद्यास इशारा " हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्याला श्री. चौधरींचें आमचेकडे प्रसिद्धीकरिता आलेलें उत्तर खाली देत आहोंत.

—संपादक

"वीरशैव गर्जने"-च्या संपादकांनी आमचे येथील मूठभर सन्यातन्यांतील एक सनातनी, तसेंच, पंचाचार पट्स्थलज्ञानी व अष्टावर्णी श्री. करवीर आप्पा हेगू ह्यांचा " नवमतवाद्यास इशारा " हा लेख ता. ११-६-३६ च्या अंकांत प्रसिद्ध केला आहे. श्री. हेगूंचा हा लेख ह्मणजे " अठराधान्यांचें कडबोळेंच आहे तेव्हा अशा अठराधान्यांच्या कडबोळ्याला काय उत्तर द्यावयाचें ? जवळ जवळ ४ कॉलम व्यक्तिविषयक विपर्यस्त निंदेने भरलेले आहेत. मला व्यक्तिविषयक व त्यांतूनहि विपर्यस्त व अकारण सहेतुक टीकेला कांहीच उत्तर द्यावयाचें नाही. श्री. करवीर आप्पांना किंवा निमित्तमात्र त्यांना पुढे करून त्यांच्या " आडून तीर मारणाऱ्या अर्जुनांना " सव्याज उत्तर द्यावयाला—त्यांच्या वाक्यालाच नव्हे तर शब्दन् शब्दाला उत्तर द्यावयाला " भविष्यकाळ " समर्थ आहे ! ! वीरशैवगर्जनेंतील लेखाला किंवा लेखकाला उत्तर देऊन लेखाला किंवा लेखकाला नसतें महत्व देण्याच्या भानगडींत मी तूर्त पडत नाही. तसेच, "वीरशैव-संजीवनी " व " वीरशैव हितसंवर्धक मंडळ " ह्या दोन संस्थांशीं असलेल्या माझ्या भल्याबुऱ्या संबंधामुळे त्या संस्थांचें काय नफानुकसान होत असेल ह्याबद्दलची पूर्ण जागरूकता व व काळजी त्या संस्थांचे अधिकारीवर्गाला आहे. त्यांना शहाणपण शिकविण्याच्या भानगडींत करवीर आप्पांनी न पडलेलेंच बरें !! शिवाय मी व करवीरआप्पा दोघेहि अमरावतींतच राहतों व दोघांचीहि येथील लिंगायतसमाजाला पूरी माहिती आहे. किंबहुना माझ्यापेक्षा १०-५ पावसाळे करवीर आप्पांनी जास्त पाहिल्यामुळे हीच काय पण गेली पिढी देखील करवीर आप्पांना चांगलीच ओळखून आहे ! ! !

मला फक्त एकाच गोष्टीचा खुलासा करावयाचा होता कीं ज्यामुळें करवीर आप्पांचा गैरसमज झाला आहे व त्यांच्या लिखाणामुळे दुसऱ्यांचाहि होणे संभवनीय आहे. व तो ह्मणजे " मी वीरशैवसंजीवनी "-च्या व्यवस्थापक नाही. " वी. संजिवनी " व " उदय " कार्यालयाचे व्यवस्थापक श्री. शंकरराव फणसाळकर आहेत. मी फक्त दे. भ. नानासाहेब वामणगांवकरांच्या पत्नीचे आजारामुळे त्यांच्या विनंतीवरून त्यांचे गैरहजरींत " वी. संजिवनी " विषयक पत्रव्यवहार पाहतों एवढेंच ! ! मी वीरशैव-हितसंवर्धक मंडळाचा जनरल सेक्रेटरी आहें ही गोष्ट जाहीरच आहे ! ! "

## महासभेंत मॅजिस्ट्रेटचा आविर्भाव.

ता. ३ रोजीं विषयनियामक-कमिटी रात्री १० वा. भरली होती. त्या वेळीं एका विषयावर अध्यक्षांनी मतें विचारलीं. ( हात वर करण्यास सांगितलें. ) यावर ' एकाने ज्यांना मताभिमान आहे त्यांनी ' असें ह्मटलें. त्यावर अध्यक्ष रागावले आणि हुकूम सोडला. माफी मागता कीं बाहेर जाता ? हैद्राबाद बोर्डिंगविषयीं एका विद्यार्थ्यास प्रश्न विचारीत असतां विद्यार्थ्यास धमकी देऊन खाली बसण्यास सांगितलें. कित्येक निजामप्रांतीय वीरशैवांना अध्यक्षांनी अपमानास्पद उत्तरें दिली. " अध्यक्षाची अमूल्य वाक्यें " माझे विरुद्ध मत आहे. टिपून घ्या. अध्यक्षाचे उत्तर-मला वेळ नाही. लिहिण्यास कागद नाही. महाराष्ट्रांतील लिंगायत-मराठ्यासारखे शिवदेवाल्यांत परधर्मीय लोकांकडून त्रास होतो. याबद्दलचा ठराव अध्यक्षांचे उत्तर कोर्टांत जा. मी वकीली करण्यास आलों नाही. मला वेळ नाही. मी चाललों. बस्स काय ही अध्यक्षमहाशयाची सहनशीलता.

( कानडीचे भाषांतरकाराकडून )—सं. संदेश.

## नमुनेदार लग्न

सीनिअर असिस्टंट कमिशनर श्रीमान् जी. रुद्रप्पा, एम्. ए., ( ऑकसन ) बार ॲट. लॉ, यांची कन्या शशिमुखी ही श्री. चनबसप्पा वळ्ळुळी, एम्. ए., एल्. एल्. बी., दावणगेरीकर यांना देऊन ता. २२-५-३६ रोजी मोठ्या थाटाने लग्न करण्यांत आलें. रुद्राप्पा हे कोष्टी असून चनबसप्पा पचम लिंगायत आहेत.

## श्रीकाशीक्षेत्र येथील यशस्वी लिंगायत विद्यार्थी

श्रीमन्निरञ्जन जगद्गुरु जयदेव मुरुघराजेन्द्र फ्री. बोर्डिंगांतील विद्यार्थ्यांच्या १९३६ इसवीचा परीक्षेचा फलितांश :- व्याकरणशास्त्रीपरीक्षा (बनारस क्वीन्स् कॉलेज ) ( १ ) शिवलिङ्गदेवरु, शास्त्री तृतीयखण्ड ( प्रथमश्रेणी ) (२) षण्मुखा-येद शास्त्री द्वितीय खण्ड ( द्वितीयश्रेणी ) [३] बसवार्थरु शास्त्री प्रथमखण्ड [४] प्रथमखंड मल्लिकार्जुनदेवरु कलकत्तान्यायआद्य (द्वितीयश्रेणी)

(५) मृत्युञ्जयदेवरु मुधोळ बनारस संपूर्ण दर्शनमध्यमा, कलकत्ता न्याय आद्य, मध्यमा, ( द्वितीयश्रेणी ); [६] रेणुकाराध्यरु, बनारस संपूर्ण व्याकरणमध्यमा ( प्रथमश्रेणी ) [७] शिवमूर्तिदेवरु, व्याकरणमध्यमा ( ४ थें खण्ड ) ( द्वितीय, श्रेणी ) [८] मृत्युञ्जयदेवरु व्याकरणमध्यमा ( ४ थें खण्ड ) प्रथमश्रेणी [ ९ ] षण्मुखय्या पुराणिक-बी. ए. ( बनारस हिंदु युनिव्हर्सिटी )

## यशस्वी रायचूर-परिषदा

गेल्या महिन्याचे प्रारंभी रायचूर येथे भरलेल्या वीरशैवमहासभा, युवक व महिलासभा ह्यांनी पास केलेले ठराव व पुढील वर्षात ते ठराव अंमलांत आणण्याकरिता व विधायक कार्या-करिता नियोजित केलेली कार्यकारी मंडळें वगैरे गोष्टींकडे लक्ष दिल्यास अखिल भारतीय-वीरशैव चळवळींत ह्या परिषदांनी एक नवें चैतन्य उत्पन्न करून कार्याची नवीन व निश्चित दिशा दाखविली असें टीकाकारांनादेखील कबूल करावें लागेल. व ह्या दृष्टीने विचार केला तर रायचूरने वीरशैव-सामाजिक जीवनांत नवक्रांतीचें बीजारोपण केलें असें स्पष्ट दिसतें व ह्याच दृष्टीने ह्या परिषदा यशस्वी व महत्वपूर्ण झाल्या असें आम्हाला वाटतें.

" वीरशैव हितसंवर्धक मंडळा "-च्या स्थापनेच्या मूळ हेतूने रोहिणखेड ( वऱ्हाड ) येथे २ महिन्यांपूर्वी दे.भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे मार्गदर्शकत्वाखाली भरविण्यांत आलेल्या परि-षदेंत वीरशैव पुढाऱ्यांनी वीरशैव सामाजिक जीवनांत आमूलाग्र क्रांति व नवमार्ग सुचविणारे जे स्पष्ट शब्दांत मठसंस्थाने, मठाधिपती, श्रमगौरव वगैरे महत्वाचे विषयांवर निश्चित मतानिदर्शक ठराव पास केले त्या ठरावांची कमी-अधिक छाया रायचूर परिषदांवर पडलेली कुणाहि निःपक्षपाती वीरशैवाला दिसून येईल. महासभेने जरी मठाधिकाऱ्यांच्या बाबत चांचरत चांचरत अर्धवट ठरावाच्या रूपाने आपलें मत व्यक्त केलें असलें तरी, युवकपरिषदेने ह्या बाबतींत निःसंदिग्ध शब्दांत आपलें मत ठरावरूपाने जाहीर केलें आहे. व ह्याबद्दल आम्ही युवक-परिषदेचें अभिनंदन करतों. महासभेने ह्या बाबतींत आज जरी मनोधैर्य दाखविलें नाहीं तरी आजपर्यंतच्या रूढ व ठराविक चाकोरींतून महासभेचा गाडा बाहेर काढल्या जाऊन नव्या मार्गावर तिचें पाऊल निश्चितपणें पडल्याचें आज जाहीर झालें आहे. व नवमतवाद्यांच्या महासभेंतील उद्याच्या विजयाची अस्पष्ट स्वरूपांत कां होईना, पण क्रांतिपूर्ण पूर्वचिन्हें महासभेच्या ठरावांतहि सूक्ष्म निरीक्षकाला दिसल्यावाचून राहत नाहीत. तीनहि परिषदांतून बुवाबाजीविध्वंसन, सामाजिक जीवन-क्रांति व नवमतवाद ह्याच क्रांतीचे वारे कमी-अधिक प्रमाणांत वहात होते, व वीरशैवमहिला-युवकपरिषदेने तर निधड्या छातीने नवमतवाद्यांच्या विजयध्वजाचें रोपण व वंदन करून एकमुखाने नवनवोदित आकांक्षापूर्ण नवमताची तुतारी फुंकून वीरशैवांतील नव्या मनूच्या प्रारंभाची द्वाही फिरवली आणि हें जर युवक व महिला-परिषदेने केलें नसतें तर आपल्या नांवाला सार्थ कृति त्यांनीं केली नाही असाच कोणीं दोष दिला असता !

रायचूर-परिषदांचे पुढे निसर्गनियमानुसार एकच महत्वाचा प्रश्न होता " Change or perish is the law of nature" तो प्रश्न निसर्गनियमाप्रमाणे एकंदर वीरशैव सामाजिक जीवनांत बदलतत्व स्वीकारून त्यांत चिरंतनत्व ह्या परिषदांनी दिलें. ह्याबद्दल हटवादी व दुराग्रही धर्मलंड सनातनींचा अपवाद खेरीज करून कुणाहि स्वाभिमानी वीरशैवाला आनंद व समाधानच वाटेल.

## अखिल भारतीय वीरशैव तरुण परिषद

## मध्यवर्ती कार्यकारी मंडळ

तरुण परिषदेत ता. ३।६।३६ रोजीं विधायक कार्य करण्याकारितां परिषदेनें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें. त्याची प्रांतवार नांवें:—

**दक्षिणकर्नाटकः**—मि. व्ही. एस्. बसवनाळ धारवाड, मि. के. बी. दुंदूर हुबळी, श्री. हालप्पवनवरू, हावेरी, मि. अडुणगी बेळगांव, डॉ. नंदीमठ बेळगांव, श्री. लिंगप्पा जंगिन बागलकोट, श्री. बशेट्टीआप्पा बळुटगी हुनगुंद.

**उत्तर कर्नाटकः**—बॅरिस्टर सरदार सोलापूर, श्री. व्ही. जी. लोकापुरे अक्कलकोट, श्री. एस. एम. कल्याणशेट्टी सोलापूर.

**मुंबई महाराष्ट्रः**— श्री. बाळासाहेब डांगे मुंबई, श्री. गुळवे, नासिक, श्री. शंकरराव कानडे धुळे, रावसाहेब कल्याणी, सातारा.

**वऱ्हाड मध्यप्रांत.**— श्री. एल. एस. एकलारे वकील पुसद, श्री. वि. तु. चौधरी बी. ए. उमरावती.

**दक्षिणी संस्थानें:**—श्री.एस जी. कोरे वकील मिरज, श्री. एम. एस. हिरेमठ वकील सांगली.

**निजाम इलाखा:**—श्री. प्रभुराव वकील उदगीर, श्री. राचप्पा हिऊर तांडूर, श्री. बसवराज गुलबर्गा, श्री. सिद्रामप्पा यरमरसू.

**मद्रास इलाखाः**—श्री. वाय. महाबळेश्वरप्पा बळ्ळारी, [ अध्यक्ष ] श्री. बेल्लद चन्नप्पा, श्री. शिंदगी लिंगण्णा.

**म्हैसूरः**—श्री. ए. रेवप्पा तुमकूर, श्री. टी. एन. चन्नप्पा बेंगळूर, श्रीमन्निरंजन महादेवस्वामी बेंगळूर, श्री. उर्विकोंडी मुरगप्पा दावणगिरी.

**कूर्गः**—श्री. सिद्धलिंगप्पा वकील.

### अभिनंदन

“ वीरशैव संजिवनी ” व “ वीरशैव हितसंवर्धक मंडळ ” ह्या दोन संस्थांशीं निकटवर्ति संबंध असणारे पुसदचे श्री. आप्पासाहेब एकलारे बी. ए. ( ऑनर्स ) वकील पुसद व श्री. वि. तु. चौधरी, बी. ए. ह्यांना “ अखिल भारतीय वीरशैव तरुण परिषदेनें मध्यवर्ती कार्यकारी मंडळावर ” वऱ्हाड-मध्यप्रांततर्फे प्रतिनिधी निवडले ह्या बहुमानाबद्दल आम्ही उभयतांचेंहि अभिनंदन करतों.

## रायचूर-महासभेंत वऱ्हाडमध्यप्रांताचे प्रतिनिधी

वीरशैव हि. सं. मंडळाचे तहाहयात सभासद श्रीमंत बी. के. ऊर्फ बापुसाहेब हिंगमिरे, वीव्हिंग मास्तर, हिंगणघाट मिल्स, ह्यांनी हे वऱ्हाड-मध्यप्रांताचे प्रतिनिधी ह्मणून रायचूर येथे गेल्या महिन्यांत भरलेल्या वी. महासभेंत भाग घेतला. त्यांनी वी. महासभेच्या ऑलइंडिया–वर्किंग-कमेटीवर दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, अमरावती; श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार पारवा; व श्री. आप्पासाहेब एकलारे वकिल पुसद ह्यांचीं नांवें सुचविलीं होतीं.

### महासभेच्या अध्यक्षाविरुद्ध तक्रार

“ ता. २२-६-३६ चे ‘ सुदर्शनां ’-त ‘ तरुण कर्नाटक ’ पत्रांतून महासभेचे अध्यक्ष दि. ब. ना. कंबळी व ‘ वीरशैव गर्जना ’-कार श्री. गुरुमूर्ति परांडकरस्वामी ह्या उभयतांमध्यें महासभेच्या विषयनियामक मंडळांत झालेला संवाद जो प्रसिद्ध झाला आहे तो सत्य आहे कीं असत्य आहे, त्यांतील कोणतीं मतें योग्य आहेत कीं अयोग्य आहेत, हा प्रश्न जरी बाजूला ठेवला; तरी अध्यक्षांनी वापरलेली भाषा परांडकरांची समाजसेवा लक्षांत घेतां कीचकाप्रमाणे उर्मट व कर्णकठोर वापरली ” असें स्वामी दादा शास्त्री कीर्तनकार अमरावती आपलें मत कळवितात.

### सन्मित्रसुधारक मंडळ तळेगांव ( दारव्हा )

ह्या मंडळास यवतमाळचे रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांनी ता. १४-६-३६ रोजी भेट दिली. त्यांना मंडळाचे कार्यालयांत श्री. वीरलिंग स्वामी ह्यांचे मठांत मोठ्या थाटांत पानसुपारी दिली. श्रीमंत रावसाहेबांचे अध्यक्षतेखाली मंडळाचे पुढारी श्री. वीरलिंगस्वामी ह्यांचें “ सामाजिक सुधारणा ” ह्या विषयावर व्याख्यान दिलें.

### हिंगणें

मे० एस्. के. वडियार अ० कलेक्टर ह्यांना मलकापूरचे श्रीमंत व प्रसिद्ध लिंगायत व्यापारी सदाशिवआप्पा जयरामआप्पा ह्यांनी एदलाबाद बोदवड रोडवर हिंगणे येथे ता. २६-५-३६ रोजी पानसुपारी दिली. प्रसंगीं ५०-६० प्रतिष्ठित मंडळी हजर होती.

## अमरावतीच्या दादागाढव्याची बिनशर्त माफी

येथील वीरशैवांतील प्रेमसंवर्धनाच्या मंडळाचे एक सेक्रेटरी दादागाढवे ह्यांनी " बक्षीस समारंभ "-च्या सभेच्या जाहिराती छापण्याच्या वेळी मंडळाचे ज. सेक्रेटरी श्री. नानाआप्पा एकलारे " हें झोपलें होते " म्हणून त्यांचे नांव छापले नाही व त्यांत वाईट हेतू कोणताहि नव्हता असे सांगून दादागाढव्यांनी बक्षीस समारंभाचे वेळी बिनशर्त श्री एकलाऱ्यांची माफी मागितली !! असे सभेत हजर असणारे एक गृहस्थ कळवितात. हे ठरलेलेच होतं, असे न घडते तरच आश्चर्य ???

## अमरावतीच्या माहेश्वरमंडळाचे उपाध्यक्षाचा राजीनामा

" संपादक " वीरशैव संजीवनी कार्यालय खालील मजकूर आपल्या " संजीवनी "-चे येत्या अंकांत प्रसिद्ध करावा.

" मी येत्या जुलैमध्ये जागतिक सामन्यात भाग घेण्याकरितां श्री. ह. व्या. प्र. मंडळाबरोबर परदेशांत जात असल्यामुळे श्री. पंचाचार्य प्रासादिक माहेश्वर मंडळाचे उपाध्यक्षाचे काम पाहण्यास मला मुळीच अवसर नाही. त्याबद्दल दिलगिरी वाटते. आणि म्हणून मी माझ्या जागेचा राजीनामा देत आहे " ता. २९-६-३६

आपला
श्री सिद्धारामस्वामी माजलगांवकर.
भिमाशंकरमठः—बुधवारा उमरावती.

हा राजिनामा माहेश्वर मंडळाला " प्रथमग्रासे मक्षिका पातः " ह्या न्यायाचा न ठरो !!

## मुंबई-विद्यापीठांतील यशस्वी वीरशैव विद्यार्थी

बी. ए. परीक्षा.—श्री. एम् के सोळसे, आर. बी मोटगी सोलापूर, श्री. गिरमलआप्पा काशप्पा मोगले जत.

[illegible]क.—कु. सोनुबाई बळवंत माने [illegible]हापूर

डॉ. सी.--श्री. गंगाधर शिवराम तळेगांव-[illegible]दलाबाद पूर्वखानदेश वरील यशस्वि विद्या[illegible]ाझी अभिनंदन करतों.

## बोदवड

( जि. पूर्वखानदेश ) श्रीगुरु पळसिद्धस्वामी मठांत ता. २९-५-३६ रोजी सुमारे १५०-२०० लिंगायत व लिंगायतेतर मंडळींच्या सभेंत मे० एस्. के. वडियार. अ० कलेक्टर, ह्यांना वीरशैव लिंगायतसमाज व वीरशैव लिंगायत श्रीशंकरभक्त क्लब ह्यांनी पानसुपारीसमारंभ केला. प्रसंगी श्रीमंत रामचंद्रशेठ कुळी ह्यांचें समाजविषयक व्याख्यान झालें. साहेबमजकुरांनीहि प्रसंगोचित भाषण करून आभार मानले. सदर पानसुपारींत श्रीयुत शंकर विठोबा रेंगे, विश्वनाथ बाळाप्पा शेटे, भिकु सखाराम शेटे, बापु विठोबा रेंगे, वगैरेनी विशेष परिश्रम घेतले. असें शंकर नारायण रेंगे, बोदवड, कळवितात.

## मोमिनाबाद

लातूरचे श्री. उमाशंकर संकाये हे बी. ए.-ची परीक्षा पास झाल्याबद्दल बालसमाजातर्फे अभिनंदन करण्यांत आलें.

## श्रीसिद्धाराम स्वामीस जाहीर निरोप.

ना० दादासाहेब खापर्डे ह्यांचे अध्यक्षतेखाली वीरशैव हि. सं. मंडळ व वी. शिक्षणप्रसारक मंडळातर्फे येथील सुंदर व भव्य सुदर्शन-थिएटरांत सन्मानाने जाहीर निरोप देण्यांत आला. प्रथमतः वीर वामनराव जोशी ह्यांची कन्या कु मथुताई जोशी ह्यांनी " वंदे मातरम् " राष्ट्रगीत म्हटलें, व कविरत्न कृष्णमूर्ति ह्यांनी एक कविता म्हटली. समारंभप्रसंगीं दे भ. वीर वामनराव जोशी, नानासाहेब बामणगांवकर, डॉ. पंजाबराव देशमुख, ( माजी दिवाण ), पांढरकवड्याचे मौ० अबदूल रौफशा, व वैद्य हरिहरराव देशपांडे, ह्यांचीं भाषणें झालीं. स्वामींनीहि समायोचित उत्तर दिलें. वीरशैव हि. सं. मंडळाचे ज० सेक्रेटरी श्री. बाबूराव चौधरी, बी. ए., ह्यांनी श्रीगुरुमूर्ति एस्. के. वडियार, डेपुटी कलेक्टर, जळगांव; श्रीमंत बाबासाहेब देशमुख, जहागिरदार, पारवा; व इतरहि बरेचसे थोर लोकांचे अभिनंदनपर संदेश वाचून दाखविले. बऱ्याचशा सार्वजनिक संस्थांचेतर्फे हार घालण्यांत आले. (विस्तृत हकिकत पुढिल अंकीं)

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती.

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरूं होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह,ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरूं होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांची थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

अंक १४ वा ) ता० १५ जुलै १९३६ ( वर्ष १ लें

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# अखिल भारतीय वीरशैव तरुण परिषद्

—: मध्यवर्ती कार्यकारी मंडळ :—

वऱ्हाड मध्यप्रांताचे दोन सन्माननीय प्रतिनिधी



श्री. ल. सो. ऊर्फ आप्पासाहेब एकलारे
बी. ए. ( ऑनर्स ) वकील, पुसद.
उपाध्यक्ष:— वीरशैव हि. सं. मंडळ



श्री. वि. तु. ऊर्फ बाबुराव चौधरी बी. ए. उमरावती
'वीरशैव संजीवनी'चे "नवमतवादी" लेखक, व
ज. सेक्रेटरी:— वीरशैव हि. सं. मंडळ

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति आषाढ व॥ १२ शके १८५८ ( अंक १४ वा:

# श्रीसिद्धाराम स्वामीचे परदेशगमन

अमरावती येथील

## संस्मरणीय सन्मान व जाहीर निरोप

आपल्या व्यायामपद्धतीने व विविध प्रकारच्या शारीरिक खेळांतील नैपुण्याने ज्यांनी साऱ्या भरतखंडांत कीर्ति संपादन केली, शरीरसंवर्धनाच्याच कार्याला वाहून घेऊन ज्या संस्थेने राष्ट्रीय संपदा वाढविण्याचें कंकण हातीं बांधलें, त्या येथील सुप्रसिद्ध ह. व्या. मंडळांतील खेळाडूंबरोबर "जागतिक ऑलिंपिक" सामन्याकरिता "मलखांबतज्ञ खेळाडू" म्हणून श्री. सिद्धारामस्वामी माजलगांवकर हे जर्मनीला गेले आहेत.

श्रीसिद्धारामस्वामी ह्यांचें प्राथमिक शिक्षण आटोपल्यानंतर इतर गुरुवर्गीय बंधूप्रमाणे आपला वेळ निव्वळ 'मिष्टान्नभोजनांत किंवा ऐतोबा-प्रमाणे मठांत वेंगत पडणें किंवा 'फीचर लावणे' व परस्त्रीअभिलाष वगैरें दुर्वर्तनांत कालापव्यय करणें" ह्यांत न घालवितां त्यांनी आपलें लक्ष धार्मिक शिक्षण, चारित्र्यशुद्धि व शरीरसंवर्धन ह्याकडेच दिलें, व ह्या

त्यांच्या आदर्श आयुष्यक्रमामुळेच श्रीसिद्धारामस्वामींचे २०–२१ वर्षांचें तरुण वय असतांनाहि आज येथील वीरशैवसमाजावर त्यांचें स्थानिक गुरुवर्गीयांपेक्षा निःसंशय अधिक वजन आहे व त्याचें प्रत्यंतर ह्मणूनच कीं काय पर्वा वीरशैवहितसंवर्धक व वी. शिक्षणप्रसारक मंडळातर्फे भरलेल्या जाहीर निरोपसमारंभाच्या सभेला पक्षभेद विसरून सारेच वीरशैव स्त्री-पुरुष हजर होते व येथील भव्य व सुंदर ' सुदर्शन थिएटर ' इतरहि प्रतिष्ठित वीरशैवेतर बंधुभगिनींनी चिकार भरून गेलें होतें. जर्मनीस जाण्यापूर्वी महाराजांना गांवांत सारा आठवडाभर वीरशैवांबरोबरच सान्या धर्मांच्या व पंथांच्या लोकांनी सभा व पानसुपाऱ्या करून महाराजांसंबंधीचा आपला आदर व्यक्त केला. बन्सीबागेंत त्यांच्या स्नेही व चाहत्यांनी केलेली पानसुपारी, मठवासियांतर्फेचा समारंभ, श्री सिद्धाश्रम तर्फे झालेली पार्टी व सन्मानसमारंभ, सुदर्शन थिएटरांत गावांतील सर्वच सार्वजनिक संस्थांचेतर्फे घालण्यांत आलेले हार, विशेषतः मध्यप्रांत-वऱ्हाड-माहेश्वरवर्गातर्फे येथील सुप्रसिद्ध लासिनकरमठसंस्थानचे अधिपती श्रीगुरुमूर्ति करबसअय्यास्वामी ह्यांनी हार घालून दिलेला प्रेमाचा निरोप वगैरे गोष्टी लक्षांत घेतल्या असतां महाराजांचे संबंधी भक्त व माहेश्वर ह्यांनी व्यक्त केलेल्या अद्वितीय प्रेम व सहानुभूतीची सार्थ कल्पना येते.

दोन महिन्यांपूर्वीच आमच्या वीरशैवसमाजाचे पुढारी दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या मार्गदर्शकत्वाखाली स्थापन झालेल्या वीरशैव-हितसंवर्धक मंडळातर्फे वीरशैवसंजीवनी व हितसंवर्धक मंडळाचे ह्या अभिमानी स्वामींना "परदेशगमना " करिता निरोप देण्याचा प्रसंग येईल अशी कुणालाहि कल्पना नव्हती, व ह्मणूनच ' वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे इतिहासांत हा योगायोग अद्वितीय ह्मणूनच मानल्या जाईल.

सुदर्शन थिएटरांतील जाहीर निरोपाचा समारंभ व त्या प्रसंगीं हजर राहून प्रतिष्ठित वीरशैव व श्रीगुरुमुर्ति करबसअय्यास्वामी सारख्यांनी दाखविलेली सक्रीय सहानुभूति ह्याचा एकच अर्थ होऊं शकतो व तो म्हणजे ' परदेशगमन ' हे निषिद्ध किंवा परदेशाहून परत आलेल्याला बहिष्कृत ठरविण्याचे दिवस कधीच संपून गेले व ' नव्या परिस्थितींत नवा वीरशैव दिसावा ' ही दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांची आकांक्षा व इच्छा लौकरच फलद्रूप होईल अशी आशा केल्यास अगदींच अस्थानी होणार नाही. श्रीसिद्धरामस्वामींचें हें ' परदेशगमन ' संस्मरणीय होय! कारण सार्वजनिक व राष्ट्रीय दृष्ट्या महत्वपूर्ण अशा कामगिरीकरिता वीरशैवांचे व त्यांतून गुरुवर्गीयांचे सन्माननीय प्रतिनिधीचें असें हे पहिलेंच परदेशगमन होय व ह्मणून अखिल वीरशैवांचे दृष्टीने ही घटना अत्यंत महत्वपूर्ण व संस्मरणीय आहे. स्वामी परदेशाहून परत आल्यानंतर आपल्या पूर्वीच्या व तिकडून मिळवून आणलेल्या ज्ञानाचा फायदा वीरशैवांना विशेषतः त्यांचे गुरुवर्गीय माहेश्वर बंधूना देतील अशी अपेक्षा केल्यास ती योग्यच आहे.

जर्मनीहून वापस आल्यावर स्वतःच्या किंवा एखाद्या अधिकारी माहेश्वरवर्गीय पुढाऱ्याच्या देखरेखेखाली वऱ्हाड-मध्यप्रांतांतील माहेश्वरांचे संघटनेकरिता व सर्वांगीण सुधारणेकरिता माहेश्वरांतील श्रीगुरुमूर्ति हरेश्वर उमाकांतस्वामी खामगांव, वाढोण्याचे श्रीगुरुमूर्ति शंकरअय्यास्वामी दारव्ह्याचे रामशंभू पुराणिक, चिमूरचे काटकर, तळेगांवचे घाटूळकर, आरमोरीचे मुनप्या प्रेंटप्या दंतुले, तसेच स्थानिक गुरुवर्गीय श्री. गुरुमुर्ति करबसअय्यास्वामी, दे. भ. नाना. साहेब बामणगांवकर, सिद्धय्यास्वामी, दादासाहेब कीर्तनकार, वगैरे सुशिक्षित व सुज्ञ गुरुवर्गीयांशी विचारविनिमय करून एखादें ' माहेश्वर मंडळ '

स्थापन केल्यास एकंदर 'माहेश्वर चळवळीला' योग्य दिशा लागेल, व ह्या आमच्या सूचनेकडे महाराज दुर्लक्ष करणार नाहीत असा आम्हाला भरवसा आहे.

## अमरावतीचा अपूर्व निरोपसमारंभ.

श्री. सिद्धारामस्वामी हे जर्मनीस जाणार हें कळतांच येथील एक-दोन अशिक्षित जंगम व मूठभर सनातन्यांनी महाराजांची खाजगी भेट घेऊन परदेशगमन हें निषिद्ध आहे व कदाचित लोक धार्मिक बहिष्कार घालतील अशी गर्भित सूचना व धमकीहि देण्याचा हास्यास्पद प्रयत्न केल्यावर महाराजांनी ह्या बाबतींत दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, अण्णासाहेब हुंडेकर, चौधरी, कोल्हे, मेंडसे वगैरे मंडळींशीं चर्चा करून व त्यांचा आपल्या परदेशगमनाला पाठिंबा आहे असें कळतांच, जाण्याचें निश्चित केलें. व वरील मंडळींनीहि महाराजांच्या परदेशगमनाला व्यक्तिशः त्यांचा पाठिंबा तर आहेच पण साऱ्या समाजांचा व जबाबदार व अधिकारी माहेश्वरांचाहि पाठिंबा आहे हें वीरशैव-हितसंवर्धक व वीरशैव-शिक्षणप्रसारक मंडळातर्फे नवीन 'सुदर्शन' थिएटरांत सभा भरवून व वीरशैवांतील सारींच प्रतिष्ठित स्त्री-पुरुष मंडळी हजर राहून सक्रिय सहानुभूति व्यक्त करून त्यांच्या व मूठभर सन्यातन्यांच्या निदर्शनास आणून दिलें, व महाराज परत आल्यावर एवढ्याच उत्साहाने स्वागत करण्याचेंहि जाहीर आश्वासन दिलें. सभेची खालील हकिकत वाचल्यावर महाराजांचे कार्यांत त्यांना मिळालेल्या वीरशैवांचे सार्वत्रिक पाठिंब्याची कल्पना येईल.

## सुदर्शन-थिएटरांतील जाहीर समारंभ

उमरावती येथील वीरशैव-हितसंवर्धक मन्डळ व वीरशैव-शिक्षणप्रसारक मन्डळ ह्यांच्यातर्फे सिद्धारामस्वामी माजलगांवकर ह्यांना मंगळवार ता. ३०-७-३६ रोजी सायंकाळी नामदार दादासाहेब खापर्डे ह्यांच्या अध्यक्षतेखाली सुदर्शन-नाटकगृहांत जाहीर सन्मानानें निरोप देण्याचा समारंभ झाला. स्त्रीपुरुष नागरिकांनी नाटकगृह चिकार भरलें होतें. व्यासपीठावर धनुर्धारी खानीवाले-असनारेप्रभृति उमरावतीकडून जाणारे खेळाडू, दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, वीर वामनराव जोशी, ऑ. इं. कॉ. साम्यवादीपक्षाचे चिटणीस भाई मसानी, स्वामी शिवानंद, डॉ. पंजाबराव देशमुख, इ. मंडळी प्रामुख्याने दिसत होती.

## उपस्थित असलेले प्रमुख वीरशैव

शिवाय वीरशैवांतील पुढील सद्गृहस्थ उपस्थित होते—श्री. महादाप्पा हुंडेकर, श्री. शिवाप्पा हातोले; दानाप्पा जोगुरे, दत्तुआप्पा आंबेकर, महादाप्पा गाढवे, आप्पाराव कोल्हे, सोमाप्पा मेन्डसे, त्र्यंबक आप्पा कापुसकरी, लिंगाआप्पा वड्डे, गिरजाआप्पा चाकोते; सोमेश्वरआप्पा कोल्हे, मलकाप्पा मामडी, शिवाप्पा कोल्हे, शंकरआप्पा पारटकर, कुन्हेबंधू; बाळाप्पा खुपसरे, आकातेआप्पा भंडारे, तसेच माहेश्वरांतील श्रीगुरुमूर्ति करवसअय्या स्वामी लासीनकर, मठसंस्थान; कीर्तनकार दादाशास्त्री नागपूरकर. बाहेरगांवहून पुढील वीरशैव सद्गृहस्थ मुद्दाम आले होते. श्रीमन्त सोमाप्पा संगेकर, व डॉ. अप्पाराव संगेकर चांदूर बाजार, श्री. विश्वनाथ आप्पा तांदळे, विश्वनाथ आप्पा बोनते, जगन्नाथ सदाशिव आप्पा होनराव, कारंजा इ० मंडळी; वीरशैव भगिनींत श्रीमती त्रिवेणीबाई कापसे, श्रीमती यमुनाबाई कोल्हे, सौ. वत्सलाबाई कोल्हे, सौ. लक्ष्मीबाई कुन्हे, सौ. काशीबाई गाढवे, सौ. बंडूबाई कुन्हे, सौ. पार्वतीबाई कोल्हे, सौ. सावित्रीबाई वैद्य, सौ. शेरणुबाई कापुसकर, कु. इंदिरा वैद्य, कु. रंगुताई कोल्हे, कु. सुमित्रा कोल्हे; तसेंच 'वीरशैव संजिवनी'-च्या लेखिका सौ. शांताबाई सातेकर व कु. रत्नावती कुन्हे; वगैरे सुशिक्षित वीरशैवभगिनीहि प्रामुख्याने दिसत होत्या.

## अभिनंदनपर संदेशवाचन

याशिवाय उमरावती शहरांतील पुढील प्रमुख नागरिक उपस्थित होते. नगराध्यक्ष श्री. अण्णासाहेब कलोती, श्री. नानासाहेब गोखले, डॉ. पटवर्धन, डॉ. भोजराज, श्री. हरिहरराव देशपांडे, डॉ. पातुरकर, डॉ मुल्हेरकर, डॉ. दामले, श्री वि. दा. ब्रह्म वकील, इ.; मे हिदायतअली, मे. अबदुल वहाव इ. स्थानिक मुसलमानपुढारी, व पांढरकवड्याचे मौलाना अबदुल रौफशाहा, एम्. एल्. सी. हेहि हजर होते. हजर असलेल्या वीरशैवेतर भगिनींत सौ. पार्वतीबाई पटवर्धन; व भारतसमाजबालिकाविभागाच्या सेक्रेटरी सौ. उमाबाई पैठणकर ह्या स्वयंसेविकांसह व्यवस्था ठेवावयास हजर होत्या. श्री. बाळ ओझरकर ह्यांच्या भारतसमाजांतील या स्वयंसेविकांनी स्त्रियांची व्यवस्था फारच उत्तम ठेवली होती. या समारंभाचे नियोजित अध्यक्ष लोकनायक अणे हे यवतमाळहून गाडीने येणार होते; पण मध्येच मोटार नादुरुस्त झाल्यामुळे ते वेळेवर येऊं शकले नाहीत. म्हणून ना. दादासाहेब खापर्डे ह्यांना समारंभाचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें. सुरुवातीला दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी समारंभाचा उद्देश सांगून प्रास्ताविक भाषण केलें, व कु. मथुताई जोशी यांनी 'वंदे मातरम्' हें राष्ट्रगीत झटल्यानन्तर समारंभाला सुरुवात झाली. येथील डॉ. कृष्णमूर्ति, कविरत्न, ह्यांनी परदेशांत जाणाऱ्या तरुणांना उद्देशून रचिलेलें स्वकृत काव्य गाऊन दाखविलें. नन्तर वीरशैव-हितसंवर्धक मन्डळाचे सरचिटणीस श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., ह्यांनी बाहेरगांवाहून स्वामींच्या अभिनन्दनपर आलेले पुढील सद्गृहस्थांचें संदेश वाचून दाखविलें:—श्रीगुरुमूर्ति एस्. के. वाडियार, कलेक्टर जळगांव [ खानदेश ], श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारवा ( वीरशैव हितसंवर्धक मंडळाच अध्यक्ष ), श्रीमंत गोदाजीराव ऊर्फ बाबासाहेब व त्यांचे बंधु श्री. शिवाजीराव ऊर्फ बाळासाहेब मुखरे, इजारदार पुसदबेरी, श्री. आप्पासाहेब एकलारे, वकील, पुसद [ मन्डळाचे उपाध्यक्ष ]; श्रीमंत रामचंद्र शेठ कुल्ली, रोहिणखेड [ उपाध्यक्ष ] वऱ्हाड प्रांतिक कॉं. क.-चे अध्यक्ष दे भ. ब्रिजलालजी बियाणी, आकोला; नागपूर विद्यापीठाच्या शारीरिक शिक्षणविभागाचे डायरेक्टर डॉ. लक्ष्मणराव कोकर्डेकर; व डॉ. के. बी. भिवापूरकर, आय. सर्जन, नागपूर; दे. भ. राजाभाऊ डांगरे, नागपूर; श्रीमंत बापूसाहेब हिंगमिरे, वीव्हिंगमास्तर, आर. एस्. आर. एम्. मिल्स हिंगणघाट [ मन्डळाचे तहायत सभासद ]; यावलचे श्री. गणपतराव विश्वनाथ आप्पा बारजिभे वकील, पुण्याचे श्रीमंत अप्पासाहेब माणूरकर, माजी अध्यक्ष, पुना-म्युनिसिपालटी, वगैरेंचे संदेश आले होते.

## सार्वजनिक संघातर्फे सन्मान

या समारंभाचे वेळी स्वामी माजलगांवकर व उपस्थित असलेल्या इतर खेळाडूंना पुढील सार्वजनिक संस्थांतर्फे हार घालण्यांत आले. मध्यप्रांत-वऱ्हाड-माहेश्वरवर्गातर्फे- श्रीगुरुमुर्ति करबसअप्पा स्वामी लासीनकर, मठसंस्थान उमरावती; वीरशैवशिक्षणप्रसारक मंडळातर्फे अध्यक्ष नानासाहेब बामणगांवकर; वीरशैवहितसंवर्धक मंडळातर्फे डॉ. आप्पाराव संगेकर, चांदूर बाजार; 'वीरशैव संजीवनी' कार्यालयातर्फे श्री. बाबूराव चौधरी, बी. ए ; सुवर्णकारसंस्थेतर्फे अध्यक्ष श्री. रामचंद्रराव जाधव, संगेकर फ्रेम वर्क्सतर्फे श्री. रामभाऊ आप्पा संगेकर; श्रीसोमेश्वर-सेकंड हँड बुकडेपोतर्फे श्री. नागोराव विश्वनाथ आप्पा कोल्हे; श्रीसिद्धाश्रमतर्फे मालक श्री. चनाप्पा गदगकर; कारंजा-वीरशैवसमाजातर्फे श्री. विश्वनाथ आप्पा तांदळे, कारंजा; वऱ्हाड मुसलमान समाजातर्फे पांढरकवड्याचे मौलाना अबदुल रौफशहा, एम् एल्. सी.

## अभिनंदनपर भाषणें व निरोप

प्रस्तुत समारंभांत वीर वामनराव जोशी, डॉ. पंजाबराव देशमुख, देशभक्त हरिहरराव देशपांडे, व मौलाना अबदुल रौफशहा ह्यांचीं भाषणें झालीं. सिद्धरामस्वामी हे बुधवाऱ्यांतील रहिवासी असल्यामुळे व आपला लहानपणापासूनच सर्व काळ बुधवाऱ्यातच गेल्यामुळे आपणाला स्वामींना निरोप देण्यात विशेष आनंद वाटतो असें वीर वामनराव जोशी ह्यांनी सांगितलें. डॉ. पंजाबराव देशमुख ह्यांनी स्वामीजींचें यश चिंतून त्यांचें अभिनंदन केलें. दे. भ. हरिहरराव देशपांडे ह्यांनी आपल्या भाषणांत ऑलिम्पिक सामन्यांची माहिती सांगून आजवर हिंदी खेळांना या सामन्यांत भाग घेण्यासाठी निमंत्रण नव्हतें तें बर्लीन येथील सामन्यासाठी मिळालें आहे व तेंहि आपल्या येथील श्री हनुमान व्यायाम-प्रसारक मंडळाला मिळालें आहे असा प्रामुख्यानें उल्लेख केला व परराष्ट्रांतील लोक हिंदी व्यायाम-पद्धतीचें शिक्षण घेण्यासाठी हिंदुस्थानात आले पाहिजे असा प्रयत्न होण्याची आवश्यकता प्रतिपादन करून आपलें भाषण संपविलें. मौलाना अबदुल रौफशहा ह्यांनीहि आपल्या भाषणांत स्वामीजींचें मुसलमानसमाजातर्फे अभिनंदन केलें. उत्तरादाखल सिद्धाराम स्वामी ह्यांनी थोडक्यांत भाषण करून आपला जो सन्मान करण्यात आला त्याबद्दल आभार मानले व हा सन्मान आपला नसून आपण ज्या संस्थेतर्फे जर्मनीला जात आहों त्या संस्थेचा हा मान आहे असे उद्गार काढले. समारंभाचे अध्यक्ष ना. दादासाहेब खापर्डे ह्यांनीहि स्वामींना व इतर खेळाडूंना आशीर्वाद देऊन यश चिंतलें व श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी अध्यक्ष, वक्ते, व उपस्थित स्त्री-पुरुषांचे, तसेच विजय—टॉकीजच्या मालकांचे आभार मानल्यानंतर विशेषतः उमरावतींतील वीरशैव नागरिकांच्या दृष्टीनें अपूर्व असा हा समारंभ संपला. हा समारंभ इतका यशस्वी रीतीने पार पडण्याचें सारें श्रेय वीरशैवहितसंवर्धक मंडळाचे उत्साही सरचिटणीस श्री. बाबूराव चौधरी व वीरशैव शि. प्र. मं. चे चिटणीस श्री. सोमेश्वर डमराप्पा कोल्हे व श्री. गिरजाप्पा रेवणसिद्धाप्पा चाकोते ह्यांनाच द्यावें लागेल.

---

# जयंत्योत्सव व त्याचा हेतु

( लेखकः— श्री. बंडप्पा रेवणसिद्धप्पा झुंजे वकील, सोलापूर. )

आपणांमध्ये जे जे महनीय व वंद्य पुरुष होऊन गेले व ज्यांनी समाजामध्ये अलौकिक कार्य घडवून आणिलें त्या त्या थोर महात्म्यांची स्मृति आपल्या अंत:पटलावर राहून त्यांच्या अंगीं असलेल्या सद्गुणांचा व शक्तीचा आपण स्वीकार करावा, त्यांच्या चरित्राकडे आपलें लक्ष जाऊन त्यांच्या हातून जशीं सत्कृत्यें घडलीं तशीं आपल्या हातून घडावीं, या हेतूने आपण आपल्यांतील थोर

थोर वंदनीय पुरुषांची जयंति आपण करितों, त्यांच्या प्रतिमेची आपण पूजाअर्चा करितों, त्यांच्या प्रतिमेची आपण मिरवणूक काढतों, कथा, कीर्तन, व्याख्यान, प्रवचनद्वारां त्यांचें गुणवर्णन करितों, जयंत्युत्सवासाठी आपण एकत्र जमतों, पैसाहि खर्च करतों व चार-दोन दिवस आपण आनंदानें काल घालवितों. पण उत्सवाचें कार्य संपलें म्हणजे आपला उत्साह पार मावळून जातो व आपणांस जडावस्था प्राप्त होते. त्या जयंत्योत्सवाचा परिणाम आपलेवर कांहीहि घडून न येतां आपणामध्यें कांहीहि सुधारणा होत नाही.

श्रीएकोरामाध्याय, श्रीबसवेश्वर, इत्यादि महान् विभूतींच्या जयंत्या नुकत्याच गेल्या वैशाख शुा। ३ च्या दिवशीं ठिकठिकाणीं साजऱ्या करण्यांत आल्या. त्याप्रीत्यर्थ जागजागीं उत्सव करण्यात आले. आजपर्यंत दरसाल आपण या जयंत्या करितों. परंतु या जयंत्यांपासून आपल्या मनोवृत्तींत कांहीं क्रांति घडून आली आहे किंवा कसें, ह्या थोर पुरुषांच्या चरित्रांतील आदरणीय सद्गुणांचा ठसा आपल्या मनावर उमटलेला आहे किंवा नाही, या थोर महात्म्यांच्या सत्कृत्यांची आठवण आपल्या अंतःकरणांत प्रतिबिंबित झाली आहे किंवा नाही, या परमश्रेष्ठ विभूतींच्या उत्सवानें आपणांमधील क्रोधमत्सरादि षड्रिपूंनी आपलें प्रस्थान उठविलें आहे किंवा नाही, हें आपण शोधून पहात नाही. या थोर सत्पुरुषांच्या आंगीं असलेली समबुद्धि, त्यांच्या निर्मल अंतःकरणाचें तेज, त्यांच्या वचनांतील रहस्य, ह्यांची साठवण आपल्या मेंदूंत झाली आहे किंवा नाही याचा आपण विचार करीत नाही. या सत्पुरुषांनी आपल्या धर्माभिवृद्धीकरिता, आपल्या समाजाच्या अस्तित्वाकरिता केलेले अविश्रांत प्रयत्न यांनी आपल्या बुद्धीच्या ठायीं प्रवेश केला आहे किंवा नाही याचा पडताळा आपण पहात नाही.

या सर्व कारणांमुळे आपण या महात्म्यांचा जयंत्योत्सव केला तरी आपण जड राहतों, आपण त्यांच्या प्रतिमेची मिरवणूक काढिली तरी आपण कोरे राहतो, आपण या थोर सत्पुरुषांचें कीर्तन वगैरेद्वारां आपल्या वाणीने त्यांचें गुणवर्णन केलें व ऐकिलें तरी आपलें मन त्या महात्म्याच्या आंगीं असलेल्या सद्गुणांचें ग्रहण करून त्याप्रमाणें आपण आपलें वर्तन ठेवीत नाही. त्या थोर विभूतींचीं वचनें आपल्या कर्णरंध्रांतून आपल्या मेंदूचे कपाट फोडून तें हस्तगत करीत नाहीत. ते थोर महात्मे कर्तबगार झाले व त्यांचे हातून उत्क्रांति झाली आणि आम्ही मात्र कर्तव्यशून्य व कलहप्रिय बनलों, व समाजांतील संघशक्ति नष्ट करण्यास कारणीभूत झालों.

आपणांतील कलह, मत्सर, उद्योगशून्यता, परस्परांबद्दल अनास्था या गोष्टींमुळे उत्तरोत्तर आपली अपक्रांति घडून येत आहे. एकमेकांबद्दल सहानुभूति व उपकृतिऐवजी उपेक्षा व अपकृति घडत आहे, हा प्रकार सर्वत्र वरचेवर जास्त व्यापक होऊं लागला आहे. एकोरामाध्यायजयंति व बसवेश्वरजयंति आपणांस हेंच शिकविते काय ? त्यांची जयंति आपण याच हेतूनें करितों काय ? केव्हांहि नाही. कारण या दोन्ही जयंत्यांच्या वेळीं त्या त्या थोर विभूतींचे सद्गुण आपण वर्णन करितों. ते थोर महात्मे होते असें आपण सांगतों. ते थोर होते म्हणूनच आपण त्यांची जयंति करितों. ते थोर होते म्हणूनच त्यांचा थोरपणा आपल्या मनावर ठसावा म्हणून आपण त्यांची थोरवी गातो.

थोरांचें काय वर्णन करावें ? थोर माणसें एकमेकांचा हेवादावा करीत नाहीत. थोर माणसें एकमेकांस तुच्छ लेखीत नाहीत. त्याप्रमाणे एकोरामाध्याय व बसवेश्वर या थोर विभूतींनी कोणासहि तुच्छ मानिलें नाही. थोर माणसें सर्व जगास पुनीत करितात. थोर माणसें सर्वांस एकत्र करून लोकांस आदरणीय होतात. थोर माणसांच्या हातून थोर कृत्येंच घडतात. आणि थोर कृत्यें धर्म आणि समाजाचें पोषण व वर्धन करितात.

अशा थोर विभूतींची मनोभावें पूजाअर्चा करावी म्हणून आपण त्यांच्या जयंत्या करितों. त्या पूजेस निर्मल अंतःकरणाचें उदक, आपल्या शुद्ध मनाची सुमनें, आपल्या दुर्विकारांची राख करून तयार केलेलें भस्म, मत्सरास अग्नि पेटवून त्याची कर्पूरारति व ज्ञानाचा दीप ओवाळून सत्कृत्यांचा नैवेद्य हीं त्यांस अर्पण करून आपण त्यांची पूजा केली पाहिजे. तरच आपण जयंत्या केल्याचें सार्थक होईल. अशा पूजेचा परिणाम–आपलें अज्ञान नाहींसें झाल्यामुळे आपल्या मनाची शुद्ध भूमिका हीं अद्वैतांत प्रवेश करून एकोरामाध्याय, बसवेश्वर, अगर इतर कोणत्याहि महान विभूति या एकच आहेत असें आपणांस दाखवून देईल. वास्तविक ते एकच असून त्यांची पाठ एकमेकांच्या पाठीकडे व दोघांची तोंडें दोन दिशांस आपण करितों व समाजाचीं तोंडेंहि एकमेकांच्या विरुद्ध दिशेस होतात. सात आठशें वर्षांपासून एकोरामाध्याय व बसवेश्वर यांचीं तोंडें समोरासमोर असून ते उभयतांहि एकमेकांच्या हातांत हात घालून आनंदानें वागत होते. पण गेल्या पांच-पंचवीस वर्षांतच त्यांचा हात एकमेकांपासून अलग करून विरुद्ध दिशेस त्यांचें तोंड करण्याचे प्रयत्न करणारे आहेच. आणि म्हणूनच कांहीजण फक्त एकोरामाध्यायजयंति करितात तर कांहीजण बसवेश्वर जयंतिच करितात. एकोरामाध्याय व बसवेश्वर हे दोघेहि महात्मे वीरशैवधर्माचे त्राते आहेत. असें असूनहि दोघांबद्दलहि सर्व वीरशैवसमाजास आदर वाटला पाहिजे व जे जे जयंति करितात त्यांनी त्या दोघांहि महात्म्यांची जयंति करून त्या दोघांबद्दल पूज्यभावना व्यक्त केली पाहिजे. एकानें एकाचीच व दुसऱ्यानें दुसऱ्याचीच जयंति करणें म्हणजे आपल्या धर्माकरिता प्रामाणिकपणें व आस्थेनें ज्यांनी कार्य केलें त्या एका महात्म्याबद्दल आदर व दुसऱ्याबद्दल अनादर व्यक्त करणें होय. यामुळे आपल्या आंगीं असलेल्या अज्ञानाचा आदर करून अज्ञानाचें प्रदर्शन मांडल्याचा देखावा दिसून येईल, व जयंत्युत्सवाचा फोलपणा ठरेल आणि अमक्यानें जयंति केली व तमक्यानें तमक्याची जयंति केली असा भेदभाव राहून दोन पक्ष अस्तित्वांत राहून एकमेकांबद्दल एकमेकांचा अनादर वाढत जाईल व आपल्याच धर्माभिमान्याबद्दल अनादर दाखविणें म्हणजे आपल्यांत धर्माभिमानाचा अभाव आहे असें दाखविणें होय. अशा वागणुकीपासून कांहीहि फायदा न होतां उलट द्वेषबुद्धि वाढत जाईल व कोणीहि कोणा एखाद्याचीच जयंति करणें म्हणजे ज्याची जयंति आपण करितों त्यांचे ठायीं असलेल्या समदृष्टीचा अभाव आपले ठिकाणीं आहे असें दाखविणें होय. मग थोर पुरुषांच्या आंगीं असलेल्या सद्गुणांचें अनुकरण करणें हा जो जयंति करण्यामध्ये आपला हेतु आहे तो साध्य होणार नाही. केवळ दुरभिमानास बळी पडून जयंति करावयाची असें होईल. थोडें मन शांत करून द्वैत विसरल्यास ज्ञानमंदिराची द्वारें खुलीं होतील व त्याचा परिणाम ऐक्यांत होईल. व नव्या मनूचा जन्म या जयंत्यांतून झाला म्हणून सर्वत्र प्रेम व आनंद नांदेल. प्रेम व आनंद याकरितांच थोर पुरुषांच्या जयंत्या कराव्या हा आपला हेतु असतो. तो हेतु सफल होण्याबद्दल: श्रीएकोरामाध्याय व श्रीबसवेश्वर यांचे चरणीं अनन्यभावें प्रार्थना आहे.

---

# एकादशीव्रतनिर्णय आणि वीरशैव

( लेखिका.—सुंदरबाई त्र्यबक साकरें, पहूर पूर्वखानदेश. )

श्रीपतिराजाचे आज्ञेवरून धर्मबांधवापुढे दोन शब्द मांडले ते गोड करून घ्यावे.

महाराष्ट्र, वऱ्हाड, निजामस्टेट, खानदेश, सातारा-जिल्हा, वगैरे इतर कांही भागांत वीरशैवांना वीरशैवमततत्वांच्या अज्ञानामुळे स्वधर्माची ओळख नाही. त्यामुळे त्यांच्यांत बऱ्याच अज्ञान-जन्य रूढी व धर्मविरोधी चाली दिसून येतात. वीरशैवमतग्रंथ संस्कृत व कानडी भाषेंतच प्रामुख्याने असल्यामुळे मराठी भाषेंत त्यांचा विशेष प्रसार झाला नसल्यामुळे महाराष्ट्रांतील वगैरे भागांत वीरशैव धार्मिक बाबतींत व व्रतकैवल्या-मध्येहि ते मूढपणें इतरांचें अंधानुकरण करूं लागले, अशा अज्ञानजन्य इतरांच्या रूढींपैकीच " एकादशीव्रत " पाळण्याचीहि रूढी वीरशैवांत पडली आहे. व आषाढी–कार्तिकी, एकादशी करणारेदेखील वीरशैवांत असून, त्यापैकी कित्तेकजण मासिक एकादशीव्रतेंहि पाळतात. पंढरीची वारी करून विठ्ठलाचे वारकरी म्हणवून घेण्यांतहि भूषण समजतात. ही गोष्ट वीरशैव-मताच्या दृष्टीने गौण तर आहेच. पण धर्मविरोधीहि आहे. वीरशैवांनी विठ्ठलभक्त होऊन वारकरी व्हावे व एकादशी व्रतें आचरावीं हें आश्चर्य आहे. कारण प्रत्यक्ष विष्णूदेखील परमशिवभक्त होता. त्याने शिवाची अनन्यभावें सेवा केली आहे, असे शेकडों पुराणांतहि दाखले आहेत. ॥ वैकुंठऽचतुर्दशीसी, विष्णु येतसे पूजेशी ॥ विष्णूने अशा रीतीनें शिवाची पूजा केल्यामुळेच त्या दिवसाला ' वैकुंठ चतुर्दशी ' असें नांव पडलें आहे. शिवाय उपवासव्रतें करणेंहि अयोग्य होय. कारण उपवास अगर व्रतें हीं प्रसादाकरिता करतात. मग प्रसाद हा रोज आपणांस मिळतो. आपण जें अन्न ग्रहण करतों तें लिंगप्रसाद या भावनेने करतों. मग उपवास केल्याने लिंगाला-देखील आपणच उपवासी ठेवल्याप्रमाणे होत नाही काय ? ॥ चांडाळ तो नेमें करि एकादशी ॥ लिंग उपवासी ठेवोनिया ॥ गं. ॥ म्हणूनच जगन्नाथपुरी येथे विष्णु दैवत असतांहि तेथे एकादशी वगैरे व्रत व उपवास करण्यांत येत नाहीत हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. मग जेथे विष्णुदैवत असतां वैष्णवहि उपवासादि व्रतें करीत नाहीत तेथे वीरशैवांनी त्याच देवाची भक्ति करून उपवास करणें अयोग्य होय. शिवाय वीरशैवांनी इष्टलिंगावांचून इतर कोणाचीहि भक्ति, पूजा, व्रतें करूं नयेत असे निर्बंध आहेत. अगदीं कडक नियमाने व एकनिष्ठेने पूजा करणाराच लिंगायत होय.कारण '॥ लिंग हा पति-तनु झाली काया ॥ एकनिष्ठ तया । भजावेगा ॥ ' असे संतांचें वचन आहे. उपवासादिव्रतें आचरणें हा द्वैत-मार्गी सांप्रदाय आहे. व वीरशैवमत हें शक्ति-विशिष्टाद्वैतमत आहे. अशा रीतीने मुळांतच या दोन्हीमध्यें असा भेद असल्यामुळे वीरशैवांनी आपला मार्ग सोडून द्वैतमार्गी बनल्यासारखें नाही काय ? याचा विचार वीरशैवांनीं अवश्य करावयास पाहिजे; व वीरशैवांच्या लिंगप्रसाद-व्रतास विरोध येणारें हें एकादशी व्रत आचरणें टाकलें पाहिजे.

श्लोकः- ' न धारयेत् चंदनं भाले वीरशैवो नरोत्तमा ॥ कदाचित् धारयेद् देवी मातृगमना-समुच्चते ॥ न धारयेत् तुलसीकाष्टं शालीग्राम न पूजयेत ॥ धारयस्तु लिंगांगी कोटि जन्मानी शूकराः॥

वरील श्लोकाचा अर्थ धर्मबांधव व भगिनींनी पूर्णपणें करून आपले गुरुकडून स्वधर्माची तत्वें समजावून घेऊन आपले धर्मोप्रमाणें वागल्यास काय वावगें होणार ? शिवशिव.

# रोहिणखेड-परिषदेची फलश्रुति व 'वीरशैव गर्जना'-कार

[ श्री. लेखकः-- वि० तु० चौधरी, बी. ए , ज० सेक्रेटरी, वी. हि. सं. मंडळ उमरावती ]

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे मार्गदर्शकत्वाखाली व श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर जहागिरदार ह्यांचे अध्यक्षतेखाली भरलेल्या रोहिणखेड-परिषदेला जवळ-जवळ आज ३ महिने झाले आहेत. रोहिणखेड-परिषदेंत स्थापन झालेल्या 'वीरशैव हितसंवर्धक मंडळ' आणि सामाजिक व धार्मिक विषयासबंधी पास झालेले ठराव ह्यांच्या दृष्टीनेच ३ महिन्यांतील कार्यनिष्पत्तीचा विचार करण्याचें आज योजिलें आहे.

'वीरशैव हितसंवर्धक मंडळ' ही संस्था 'वीरशैवसंजीवनी'-चे कायमस्वरुपाचे योजनेकरिता व धोरण-नियंत्रणाकरिता काढण्यात आली आहे. हें मुख्य उद्दिष्ट साध्य झाल्यावर संस्थेचें लक्ष वीरशैवांचे सर्वांगीण उन्नतिकरिता शैक्षणिक आर्थिक धार्मिक व इतरहि क्षेत्रांत वेधणे क्रमप्राप्तच होईल. जागतिक घडामोडी, व त्यामुळे इतर धर्म व समाजांचे जीवनांत होणारे अपरिहार्य प्रत्यक्षाप्रत्यक्ष बदल, ह्यांचा सूक्ष्म जिज्ञासु बुद्धीने अभ्यास करून तर्कशुद्ध विचार-पद्धतीला पटेल अशी आवश्यक क्रांति वीरशैवांचे धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक व सामाजिक जीवनांत घडवून आणणें व ह्या आचारक्रांतीची पूर्वतयारी म्हणून विचार व मतप्रसार करण्याकरितांच 'वीरशैव संजीवनी'-चा पुनरावतार झाला आहे व ह्या आपल्या ध्येयनिष्ठ धोरणामुळे 'वीरशैव संजीवनी' हें वी. हितसंवर्धक मंडळाचें मुखपत्र झाल्यास किंवा पुढे मागें त्या मंडळाचे नियंत्रणाखाली गेल्यास नवल नाही! दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांची नव्या परिस्थितींत नवा वीरशैव दिसावा अशी आकांक्षा व तदनुरोधी त्यांनी केलेली घोषणा ही सार्थ करून दाखविणे किंवा त्या दिशेने प्रयत्न करणेच 'वीरशैव हितसंवर्धक मंडळ' व 'वीरशैव संजीवनी' ह्या दोन्ही संस्थांचें ध्येय आहे व ह्या ध्येयाच्या दृष्टीने ह्या दोन्ही संस्थांचे हितसंबंध परस्पराशीं पूरक कसे होतील हें पाहणें सदरहू संस्थांचे अधिकारी-वर्गाचें काम आहे.

ह्या दृष्टीने विचार करितां वीरशैव-हितसंवर्धक मंडळाची घटना व तदनुसार कार्याला सुरुवात होणें ह्यापूर्वींच आवश्यक होतें. परंतु माझी व माझ्या सहकारी वी. हि संवर्धक मंडळाचे अधिकारी मंडळीची निकडीची इच्छा असूनहि घटना-कमेटीची बैठक अजून मी बोलावूं शकलों नाही ह्याचें मुख्यतः कारण म्हणजे ज्यांचे मार्गदर्शकत्वाखाली वरील दोन्ही संस्थांचें कार्य सुरू आहे त्या दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांना

आह्माला सभेला हजर ठेवतां येईल किंवा नाही याची अजून अनिश्चितता आहे. पत्नीचें प्रकृति-अस्वास्थ्यामुळें आज जवळ जवळ ३-४ महिन्यांपासून जबाबदार रीत्या सार्वजनिककार्यांत पडण्यासारखी किंवा विचारविनिमय करण्यासारखें मनःस्वास्थ्य व वेळहि त्यांना नाही व त्यांच्या गैरहजरीत "घटना—कमिटीसारखी" महत्वाची सभा भरविणें केव्हाहि श्रेयस्कर व हितावें नाही. अशा ह्या विवंचनेंत व अडचणीच्या परिस्थितींत बराच कालावधि गेल्यामुळे मंडळाचे कार्यांत मंडळाचें हितचिंतकांना व तसेच हितशत्रूंनाहि "शैथिल्य" दिसून आल्यास कांहीच नवल नाही."

परंतु अधिक विलंब भावी कार्याच्या दृष्टीनें अनिष्ट होईल. ह्याकरितां दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांच्या सल्लेनेंच ह्याच महिन्यांतील पुढील रविवारी ह्मणजे ता. २६-७-३६ रोजी यवतमाळ येथे सभा बोलाविली आहे. घटना-कमिटीची सभा होऊन व "मंडळाची घटना" पास झाल्यावर मंडळाचे कार्याला जोमानें सुरुवात करावयास मंडळाचे सभासदांना व प्रांतानिहाय व जिल्हानिहाय हितचिंतक प्रचारकांना सोयीचें होणार आहे. तोपर्यंत त्या बाबतींत कांहीहि न लिहिणेंच बरें.

वी.हि.सं. मंडळाची घटना वगैरे अजून निश्चित न झाल्यामुळे प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीने जरी थोडीशी तात्पुरती सभासदांच्या वाढींत कुचंबणा व त्यामुळें दिरंगाई झाली असली, तरी एकंदर परिस्थिति व अडचणींचा विचार केला असतांना ही दिरंगाई क्षम्यच ठरेल.!!

प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें जरी वी. हि. सं. मंडळाकडून दिरंगाई झाली असली तरी रोहिणखेड-परिषदेंत पास झालेल्या ठरावाचा प्रचार व प्रसार प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीत्या सर्वत्र सुरुच आहे; व हें कार्य कांही थोडें नाही. अखिल-भारतीय वीरशैवमहासभेचें अधिवेशन रोहिणखेड-परिषदेनंतर झालें व आमच्या मंडळाच्या महासभेला हजर असलेल्या प्रतिनिधींनी रोहिणखेड-परिषदेंत पास झालेल्या ठरावाप्रमाणे महासभेंत ठराव पास व्हावेत असे विषयनियामक कमिटींत प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रयत्न केले, व त्याचाच परिणाम ह्मणून कीं काय महासभेच्या मठ, संस्थानें, वर्णभेद, श्रमगौरव, ह्या महत्वाच्या ठरावांवर कमीजास्त प्रमाणांत रोहिणखेड-परिषदेचीच छाया पडली आहे असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं, व ह्या दृष्टीने रोहिणखेड-परिषदेंत जमलेल्या व ज्यांच्या नेतृत्वाखाली ती परिषद् पार पडली त्या सन्माननीय सुधारणावादी वीरशैव प्रतिनिधींचा हा नैतिक विजयच होय!

रोहिणखेड-परिषदेंत पास झालेल्या ठरावावरहुकूम जरी महासभेंत ठराव पास झाले नसले, किंवा महासभेच्या धोरणांत 'रोहिणखेड-परिषदे'-च्या ठरावानुवर्ती आमूलाग्र बदल झाला नसला, तरी तो पुढे-मागे होईल अशी आशा करण्यास जागा मात्र निर्माण झाली आहे व हें पुढील भविष्य जाणूनच गुरुवार ता. ४ जून १९३६ च्या 'वीरशैव गर्जने'त "रोहिणखेडच्या सभेंतील सावळागोंधळ" ह्या मथळ्याखाली जवळ जवळ ३ कॉलम अग्रलेख लिहिण्यांत आला व नंतर ता. २ जुलै ३६ च्या 'वीरशैव गर्जने'तहि "परिषदा व तरुणांचा परंपरेवर घाला" ह्या मथळ्याखालील अग्रलेखांत "रोहिणखेड-परिषदे"-चा प्रामुख्यानें उल्लेख करण्यांत आला आहे.

रोहिणखेड-परिषद् ही सनातन्यांची व पारंपरिक बुद्रुकांची काळझोंप उडविण्यास कारणीभूत झाली व विशेषतः माहेश्वरमंडळांत तर हा बॉंबगोळाच पडला असें माहेश्वरमंडळाचे व मठाधिपतींचे हालचालींवरून दिसतें. विशेषतः मठसंस्थानें ही आपली वैयक्तिक मालमत्ता सम-

जणारे माहेश्वर किंवा पंच हे खडबडून जागे झाल्यासारखे दिसतात व ह्या दृष्टीने परिषदेचें नैतिक कार्य बरेंच जोरांत अप्रत्यक्ष रीत्या सुरूं झालें असें म्हटल्यास व त्यांत नवमतवाद्यांनी समाधान मानल्यास कांहीच वावगें नाही. " मठ, संस्थाने, ही सार्वजनिक मालमत्ता आहे, ती वैयक्तिक मालमत्ता नव्हे, व तिचा विनियोग सार्वजनिक हिताच्या कार्यांत झाला पाहिजे ' ह्या तत्वाची घोषणा रोहिणखेड-परिषदेने केल्यापासून ज्यांचे अशा उत्पन्नावर खाजगी प्रपंच आणि वैयक्तिक चैनी व ऐषाराम सुरू आहेत अशा बऱ्याचशा मठपतींचे व पंचांचें पित्त खवळल्यास नवल नाही ! !

पण नुसतें पित्त खवळून किंवा निव्वळ मायेफिक दंडेलीच्या जोरावर ह्या प्रश्नाचा निकाल लागेल असें कोणींहि समजूं नये. कारण ते दिवस कधींच संपले आहेत ! ! व ह्या प्रश्नाचा कोर्टां-तूनच निकाल लावून घ्यावयाचा असेल तर तो पुढेमागे लागेलहि ! !

रोहिणखेड-परिषदेनंतर त्या परिषदेबाबत कांहीं वृत्तपत्रांतून बरींच अनुकूल व प्रतिकूल मतें प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं. स्थानिक खऱ्या व ढोंगी सनातन्यांच्या पोरसवदा व थिल्लर चळवळी व कांहीं " पावसाळी मंडळांच्या " हालचाली वजा केल्यास जबाबदार रीतीने त्या बाबतींत विरोधाखातर प्रदर्शित केलेलीं प्रतिकूल मतें ह्मणजे वर उल्लेखिलेले ' वीरशैव गर्जने 'चे ता. ४ जून व २ जुलै १९३६ चे अंकांतील अग्रलेख होत व त्यांनाच थोडक्यांत मी उत्तर देणार आहें. 'वीरशैव गर्जना'कारांचा मुख्यतः आक्षेप ३ ठरावां-वर आहे व तो ह्मणजे अनुक्रमें ठराव नं. ३, ६, ७, पैकी ठराव नं. ३, माझे चिखलीचे सन्माननीय स्नेही श्री. गोविंदराव बेंद्रे ह्यांनी मांडला होता व त्याला दारव्हयाचे प्रसिद्ध वीरशैव-समाजकार्यकर्ते माहेश्वरमूर्ति रामशंभु पुराणिक ह्यांनी अनुमोदन दिलें होतें.

ठराव नं. ६ मठसंस्थान ही सार्वजनिक मालमत्ता आहे ह्या स्वरूपाचा. ठराव मांडणार व अनुमोदन देणार दोन्ही गुरुवर्गीय माहेश्वरमूर्ति होत्या. ठराव मांडणार श्री गुरुमूर्ति रामलिंग स्वामी खामगांव व अनु-मोदक दारव्ह्याचे स्वामी रामशंभु पुराणिक हे होते.

ठराव नं. ७:- श्रमगौरवाचा. हा अध्यक्षांनीच मांडला होता.

वरील तीनहि ठरावांबावत मला एवढाच तूर्त खुलासा करावयाचा आहे कीं, त्याचा अर्थ कुणाहि सुशिक्षित व समजूतदार माणसांना कळण्यासारखा आहे. परंतु ह्मणतातना कीं ' झोपी गेलेल्याला कुणीहि जागे करील पण झोपेचें सोंग घेणाऱ्याला कुणी कसे जागे करणार ! '

मठसंस्थानांचे सार्वजनिक मालकी हक्काची व्यापकता व अर्थ काय ! हें ' वीरशैव गर्जना '-कारांना मी कसें सांगणार ! ' मालकी हक्क ' ह्मणजे काय व त्याची व्यापकता किती असते ह्याचा संपूर्ण अर्थ कायदेबुकांतील ' मालकी हक्काच्या ' व्याख्येंत त्यांना कळून येईल. ' श्रमगौरवा '-च्या ठरावांबाबतहि असेंच. धंदा करणारा कुणीहि मनुष्य केंव्हाहि कोणताहि नवीन धंदा सुरूं करताना त्या धंद्याबाबत समाजाचें धोरण व आपला सामाजिक दर्जा ह्याकडे जरूर लक्ष देईल. व ह्या सदरांत जो धंदा पडत असेल तो धंदा प्रामाणिकपणानें तो करेल. नं. ३ च्या ठरावाचा आशय " आचार्य व विरक्तपीठाचा अधिकार बालब्रह्मचाऱ्यास न देतां जे सच्छील व विद्वान् गृहस्थाश्रमी संन्यासदीक्षा घेतील त्यांनाच द्यावा " असा आहे. ह्या बाबतींत अधिकृत रीत्या विस्तृत खुलासा दे. भ. नाना-साहेब बामणगांवकर पुढे-मागे करतीलच पण मी तूर्त एवढेंच लिहूं इच्छितों कीं, हा ठराव आण-ण्याचें कारण सार्वजनिक मालकीच्या मठसंस्था-नातून " बालब्रह्मचारित्वांच्या नांवावर आमच्या

मठाधिकाऱ्यांनी समाजांत घातलेला सांवळा-गोंधळ व चालविलेली बुवाबाजी हेंच अशावें, व अशा तऱ्हेचा सांवळा गोंधळ किंवा बुवाबाजी जो-पर्यंत अपवादात्मक होती तोपर्यंत ठीक होतें, परंतु त्याला जेव्हा मठाधिकाऱ्यांनी आपल्या दुर्वर्तनानें सर्वसाधारण नियमांचेंच स्वरूप द्यावयास सुरुवात केली तेव्हा सामाजिक नीति किंवा चारित्र्यसंरक्षणाकरितां ही नवीन प्रथा पाडणेंच कुणाहि स्वाभिमानी वीरशैवाला आवश्यक वाटेल व त्यांत परंपरेवर गदा येत असली तर तें अपरिहार्य आहे.

**परंपरेपेक्षा सामाजिक नीति व चारित्र्य ह्यालाच कोणीहि श्रेष्ट समजेल, व सामाजिक नीति व चारित्र्य ह्यांचें संरक्षणाकरितां परंपरेला मूठमाती देण्याची जर आवश्यकता भासली तर माझी पक्की खात्री आहे कीं, आम्हीच काय पण पवित्र नीतीचे व शुद्ध चारित्र्याचे पुरस्कारार्थ लाखो वीरशैव परंपरेचें थडगें बांधावयास अहमहिकेने पुढें येतील !!!**

मठाधिकाऱ्यांचे सामाजिक जवाबदारीविषयक चारित्र्याबाबतचा प्रश्न घसास न लावणेंच वी. गर्जनाकारांना परवडेल. नाहीतर उदाहरणें देऊन मठाधिकाऱ्यांचे वर्तनावर आम्हाला प्रकाश पाडावा लागेल.

ता. २-६-३६ च्या "वीरशैव गर्जनेत" श्री. शंकरराव कटप, पंढरपूर, ह्यांनी "वीरशैवांना अवश्यक अशी संजीवनी, लेखांक ४ था" ह्यांत 'वीरशैव संजीवनी'-वर टीका करतांना व परिचयपटातील रोटीबेटीव्यवहाराचा मजकूर प्रसिद्ध कां केल्या जात नाही, रोटीबेटीव्यवहाराला लोक प्रतिकूल आहेत काय, असा एक प्रश्न उत्पन्न केला आहे. तरी त्यांच्या लेखाला पुढील अंकांत सविस्तर उत्तर देण्याचें मी अभिवचन देतों.

जातां जातां वीरशैव हि. संवर्धक मंडळाने ठरविलेल्या धोरणानुसार येथील नवमतवादी व सुधारणाप्रिय वीरशैवांनी पार पाडलेल्या दोन समारंभांचा उल्लेख केल्याशिवाय रोहिणखेड परिषदेच्या फलश्रुतीच्या दृष्टीने हें विवेचन अपूर्ण होईल व ते समारंभ म्हणजे माझे स्नेही मूर्तिजापूरचे नारायणराव बालटे ह्यांचा एका वीरशैव बालविधवेशीं विवाहपद्धतीने झालेला पुनर्विवाह व दुसरा प्रसंग म्हणजे श्रीसिद्धारामस्वामी माजलगांवकर ह्यांचें 'परदेशगमन' हाय. ह्या दोन्ही प्रसंगी किरकोळ अडाणी जंगम व मुठभर सनातनी सोडून बाकीच्या अखिल वीरशैवसमाजाने विशेषतः श्रीमंत दानाप्पा जोगुरे, दत्तुआण्णा अंबेकर ह्यांच्यासारख्या अनुभविक व वयोवृद्ध पुढाऱ्यांनी व येथील प्रसिद्ध **लाखिनकर मठसंस्थानचे अधिपति श्री गुरुमूर्ति करबसअय्यास्वामी** ह्यांनी दोन्ही प्रसंगी पुढाकार घेऊन पुनर्विवाहाचें प्रसंगीं पौरोहित्याचें काम करून व दुसऱ्या प्रसंगीं श्री सिद्धाराम स्वामीस माहेश्वरवर्गातर्फे हार घालून आपली सक्रिय सहानुभूति व्यक्त केली ह्याबद्दल श्रीगुरुमूर्तींना व इतरहि वीरशैव बंधु-भगिनींचा वी. हि. संवर्धक मंडळातर्फे मी आभारी आहें.

---

# वीरशैवांचा परिचयपट

'वीरशैवसंजीवनी'-चे वर्गणीदारांकडे परिचयपटाचे नमुने सर्वत्र रवाना झाले होते परंतु अजून १५-२० परिचयपटां-पेक्षा जास्त परिचयपट भरून आले नाहीत. तरी ज्या वर्गणीदारांचे कडून अजून परिचयपट भरून आला नसेल त्यांनी तो तावडतोब भरून पाठवावा. ज्यांना परिचयपट मिळाला नसेल त्यांनी किंवा ज्यांचा हरविला असेल त्यांनी आम्हांस कळविल्यास पुन्हा एक प्रत आम्ही पाठवून देऊं. तरी परिचयपट भरून त्वरित पाठविण्याची वर्गणीदारांनी कृपा करावी.

व्यवस्थापक

# वीरशैवांतील चळवळी

## श्रीसिद्धारामस्वामी माजलगांवकरांचे परदेशगमनास

दोन गुरुवर्गीय अधिकारी पुरुषांचा नैतिक पाठिंबा व आशीर्वाद:—

(१) श्रीगुरुमूर्ति एस्. के. वडियार, कलेक्टर, जळगांव पूर्वखानदेश.

(२) श्रीगुरुमूर्ति अय्यासाहेब माणूरकर माजी-अध्यक्ष —म्युनिसिपालकमेटी-पुना.

पूर्वखानदेश, जळगांव.
ता. २९-६-३६

प्रियमित्र चौधरी,

शारीरिक खेळांतील आपलें नैपुण्य दाखविण्याकरितां लौकरच जर्मनीस जाणाऱ्या श्रीसिद्धरामस्वामी माजलगांवकरांचे सत्कारप्रसंगाचें आपण निमंत्रण पाठविलें त्याबद्दल आभारी आहें.

श्रीसिद्धरामस्वामी हे अखिल-लिंगायतसमाजाचे भूषण आहेत.

सोबतच्या पत्राबरोबर माझी त्यांचे कार्याविषयीची सहानुभूति व सदिच्छा त्यांना कळविण्याची कृपा करावी.

आपला स्नेहांकित
एस्. के. वडियार,

( म. वडियार कलेक्टरसाहेब ह्यांचे इंग्रजी-पत्राचें भाषांतर ) -संपादक.

श्री १२४५ भवानी पेठ,
पुणें शहर.
ता. २९।६।१९३६

श्री. सोमेश्वर हमराप्पा कोल्हे यांस, सेक्रेटरी, वीरशैव शिक्षण-प्रसारकमंडळ, ठि बुधवारा, अमरावती AMRAOTI.

अनेक शरणार्थपूर्वक विज्ञापना:—

उद्या मंगळवार ता. ३०-६-३६ रोजी होणाऱ्या जाहीर सभेचें आमंत्रण-पत्र पावलें. त्याबद्दल आपला फार फार आभारी आहें.

सदरहू सभेस माझें येणें होणार नाहीं हें उघड जाणूनहि आपण ममतेने व अगत्याने पत्र पाठविलें ह्या आपल्या स्नेहभावाबद्दल मला आपले आभार मानल्यावाचून राहवत नाहीं, व ह्मणून तसें करून, हाच लोभ निरंतर असो द्यावा अशी विनंतिहि मी आपणास करीत आहें.

एक जंगम गडी नामांकित खेळाडू ह्मणून जर्मनीस जात आहे हें वाचून फारच संतोष व आनंद झाला. शेंकडो वर्षांच्या परंपरेने चालत आलेली, हीन, दीन व सांप्रत काळीं तिरस्कारली गेलेली अशी ही जंगमांची भिक्षुकी वृत्ति जितकी सुटेल तितकी ती जात चालू काळांत इतरांच्या मागें पडणार नाहीं अशी माझी समजूत आहे व ह्मणून ही जन्मसिद्ध व्यवसाय सोडून इतर कांहींहि करणाऱ्या जंगमाबद्दल मला आदर व प्रीतिच वाटते. त्यांतून आपले सिद्धरामस्वामी माजलगांवकर तर स्वतः लाखांत एक ह्या पदवीला पोंचून इतरांनाहि मोठा नामांकित धडा घालून देत आहेत ह्याबद्दल त्यांचें करावें तितकें अभिनंदन थोडेंच होईल असें मला वाटतें व ह्मणून त्यांच्या ह्या प्रयत्नांत त्यांना महद्यश लाभो व त्यांची कीर्ति साऱ्या मुलुखभर पसरो व ते समाजाचे एक मोठे भूषण होवोत अशी माझी इच्छा व परमेश्वरास प्रार्थना आहे हे विनंति.

आपला,
सी. अ. मानूरकर

## सिद्धाराम स्वामींचें आभारप्रदर्शन

स्थानिक व बाहेरगांवच्या ज्या वीरशैव व वीरशैवेतर सार्वजनिक संस्थांनी मी जर्मनीस जाते वेळी प्रेमाचा निरोप देऊन माझें अभिनंदन केलें त्या सर्वांचा, विशेषतः "वीरशैव संजीवनी संस्था", वीरशैव हितसंवर्धक मंडळ, मे. एस्. के. बडियार डेप्युटी कलेक्टर जळगांव, श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर, श्रीमंत गोदाजीराव व शिवाजीराव मुखरे, श्री. आप्पासाहेब एकलारे पुसद, श्रीमंत बापुसाहेब हिंगमिरे हिंगणघाट, दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूर; वऱ्हाड प्रांतिक काँग्रेस कमेटीचे अध्यक्ष दे. भ. ब्रिजलाल बियाणी, पुण्याचे श्री.अय्यासाहेब माणूरकर, वगैरे व इतरहि मंडळींचा मी आभारी आहें. व्यक्तिशः मी आभारप्रदर्शनाची पत्रें पाठवीत आहेंच परंतु सर्वांचेकडे पत्रें पाठविणे शक्य नसल्यामुळे वी. संजीवनीद्वारा आज सर्वांचेच आभार मानतों. विशेषतः माझ्या परदेशगमनाला संमति व उत्तेजन देऊन जाहीर अभिनंदनाचे द्वारा सक्रिय सहानुभूति दाखविल्या बद्दल आबालवृद्ध वीरशैव व विशेषतः दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, श्री. गुरुमूर्ति करबस अय्यास्वामीसारखी आमची गुरुवर्गीय व तसेच श्री. जोगुरे, हुंडेकर, मेंडसे कापुसकरी, कोल्हे चौधरी वगैरेच्या उत्तेजनपर सहानुभूतीबद्दल मी सर्वांचा आभारी आहें.

आपला.

शुक्रवार ता.३-७-३६ } सिद्धारामस्वामी माजलगांवकर
भिमाशंकर-मठ बुधवारा,
अमरावती.

### श्री. सिद्धारामस्वामीचा सन्मान
### अमरावती

ता. २१-६-३६ रोजी श्रीसिद्धारामस्वामी माजलगांवकर' हे येथील ह. व्या. मं चे खेळाडू म्हणून जागतिक खेळांचे सामन्याकरिता जर्मनीस जातात म्हणून त्यांना त्यांच्या स्नेही व चाहत्या मंडळीकडून जबलपूर येथील हितकारिणी-कॉलेजचे सन्माननीय प्रो. एन्. जी. नगरकर, एम्. ए., एल्. एल्. बी., ह्यांचे अध्यक्षतेखाली जाहीर निरोप देण्यांत आला.

येथील लासिनमठांत ता. २७-६-३६ रोजी रात्री श्री. फकिराप्पा हेगु वकील ह्यांचे अध्यक्षतेखाली श्री. स्वामींचा सत्कार करण्यांत आला व तेचवेळीं वीरशैव-महिला-मंडळाच्या अध्यक्ष श्रीमति त्रिवेणीबाई कापसे ह्यांनींहि हार घालून स्वामींचा सन्मान केला.

ता. २९-६-३६ रोजी श्री. बळिराम आप्पा हवाले ह्यांचे मनोरंजनलॉजतर्फे दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे अध्यक्षतेखाली सन्मानाने निरोप देण्यांत आला.

श्रीसिद्धाश्रमतर्फे ता. ३-७-३६ शुक्रवार रोजी श्री सिद्धाश्रमचे मालक श्री. चनाप्पा गदगकर ह्यांचेतर्फे स्वामींना जाहीर निरोपसमारंभ झाला. त्या प्रसंगी श्रीगुरुमूर्ति करवसअय्यास्वामी लासिनकर, दे. भ.नानासाहेब बामणगांवकर, अण्णासाहेब हुंडेकर, सोमाप्पा मेंडसे,आप्पाराव आप्पा कोल्हे, सोमेश्वर आप्पा कोल्हे, लिंगाप्पा बंडु, सातापा जोगुरे वगैरे मंडळी हजर होती. उपस्थित मंडळींना अल्पोपहार देण्यांत आला. स्वामीजी, श्री गुरुमुर्ति करबस अय्यास्वामी लासिनकर, व दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांना श्री. चनाप्पा गदगकर ह्यांनी हारतुरे अर्पण करून त्यांचा सत्कार केला, व उपस्थित मंडळींचे श्री. चौधरी ह्यांनी आभार मानल्यावर हा गोड समारंभ समाप्त झाला.

ता. ३-७-३६ रोजी महाराज श्री ह. व्या. मंडळांतील खेळाडूबरोबर मुंबईस रवाना झाले. स्टेशनवर खूपच गर्दी जमली होती.

**बडनेरा:**— बडनेर-स्टेशनवर वीरशैव-हितसंवर्धक मंडळ, वी० शिक्षणप्रसारक मंडळ, व 'वीरशैव संजीवनी'—कार्यालयातर्फे श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे, सोमाप्पा मेंडसे, व चौधरी,ह्यांनी अनुक्रमें श्री. स्वामीजी, अण्णासाहेब

असनारे, टीमचे सेक्रेटरी;व श्री. खानीवाले, टीमचे कॅप्टन; ह्यांना हार घालून निरोप दिला. स्टेशनवर श्री. मलकाप्पा मामडी,श्री.लिंगाप्पा वड्डे, वगैरे मंडळी हजर होती.

मलकापूरः– ता. ३ रोजी रात्रौ मुंबईकडे जाणारी मेल रात्रौ १०॥ वाजतां प्लॅटफॉर्मवर येतांच मुद्दाम रोहिणखेडहून आलेले वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे उपाध्यक्ष श्रीमंत रामचंद्र शेट कुळी, तसेच मलकापूरचे सदाशिवआप्पा जयरामआप्पा मंगीरे, व श्रीमान् दामोदर शेट,वगैरे मंडळींनी श्री. सिद्धाराम स्वामी, अण्णासाहेब असनारे, धनुर्धारी खानीवाले, व इतर खेळाडूंना हार वगैरे घालून सन्मान केला व प्रेमाचा निरोप दिला.

## श्री. प्रेम संवर्धन मंडळांत नव्या अनुभविक सेक्रेटरीची योजना

अमरावती:– 'येथील वीरशैवांत प्रेमसंवर्धनाच्या निमित्ताने व हेतूनेहि नुकतेच काढलेल्या एका स्थानिक मंडळांत प्रेमसंवर्धनाच्या व्यापक व वाढत्या कार्यक्षेत्रामुळे किंवा कामाच्या वाढत्या तापामुळेच कीं काय श्री. एकलारे व गाढवे असे दोन सेक्रेटरी असतांना रविवार ता ५-७-३६ रोजी रात्रौ ११-११॥ वाजता सभा भरवून श्री. विश्वनाथ आप्पा आवंखे ह्या, अशा कार्यांतील मुरब्बी,हुशार व बोलक्या तज्ञाची सेक्रेटरी म्हणून योजना केली. श्री. एकलारे व गाढवे ह्या दोघांमध्ये एक जागा निर्माण करून त्या ठिकाणी श्री. आवंख्यांची योजना कां करण्यांत आली हें बऱ्याच मंडळींना एक कोडें आहे. पूर्वीचे दोन सेक्रेटरीपैकी एक सेक्रेटरी कमी करण्याचा हेतु ह्या नवीन उपक्रमाच्या मुळाशीं आहे असेहि बोलवा आहे. व हें जर खरें असलें तर श्री. एकलारे व गाढवे ह्यांपैकी कोण घसरणार ! ! चूक केल्यावर माफी मागावयाची गाढव्यांची नेहमीची तयारी असल्यामुळें व अशा एका चुकी बद्दल नुकतीच त्यांनी जाहीर सभेतून माफी मागितल्यामुळे त्यांचें आसन डळमळेल असें वाटत नाही. बहुतेक श्री. एकलाऱ्यांनाच ह्या नाहीं त्या निमित्तानें बाहेर पडावें लागेल असेंहि कांही लोक सभेतून बाहेर पडतांना बोलले असें सभेला हजर असणारे एक गृहस्थ कळवितात. आमच्या मतें तीनहि सेक्रेटरी राहिले तरी कांही बिघडत नाही. परंतु त्या तिघांचाहि दर्जा सारखाच मानावयाचा कीं त्यांत कुणाला ज० सेक्रेटरी समजावयाचे एवढा खुलासा मंडळाचे अधिकारी किंवा सभेला हजर असणारे गृहस्थ करतील तर बरें ! ! अनुभव व लायकी ह्या दृष्टीने विचार केला असतां श्री. विश्वनाथआप्पा आवंखेच अधिक अनुभवी व हुशार असल्यामुळे त्यांच्या हाताखाली श्री. एकलारे व गाढवे ह्यांनी काम करण्याचीच उभयतांची योग्यता आहे व ह्यामुळे श्री. आवंखेच ज० सेक्रेटरी असावेत अशी सर्वत्र समज आहे. तरी ह्या बाबतींत अधिकृत खुलासा झालेला बरा ! ! !

## वीरशैव बेकार तरुणांची सोय

इंग्रजी ४ इयत्ता किंवा मॅट्रिक पास होऊनहि ज्यांना नोकरी मिळत नाही व जे बेकार फिरतात अशा सुशिक्षित सच्छील व हुशार वीरशैव तरुणांना श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, पुसद, व श्री. बाबुराव चौधरी बी. ए. अमरावती, ह्यांचें प्रशंसापत्रक घेतल्यास कापडाच्या मिल्समध्ये मोफत शिक्षण देण्याचें अभिवचन हिंगणघाटचे श्रीमंत बापूसाहेब हिंगमिरे, वीव्हिंग मास्तर, वी. हितसंवर्धक मंडळाचे तहाहयात सभासद ह्यांनी दिलें आहे. श्रीमन्त बापूसाहेब हिंगमिरे ह्यांच्या ह्या समाजकार्यदक्षता व प्रेमाबद्दल आम्ही अभिनंदन करतों. वीरशैव तरुणांनी बेकार फिरण्यापेक्षा ह्या धंदेशिक्षणाकडे जरूर लक्ष द्यावें.

## लिंगायतांच्या लग्नाची नवी योजना ३५ रुपयांत लग्न

वीरशैवांच्या लग्नांत होणाऱ्या अतिव्ययाकडे लक्ष पुरवून विजापूर येथील सिद्धेश्वरसंस्थेच्या चालकांनी खालीलप्रमाणे नवी योजना काढली आहे- त्याप्रमाणे प्रत्येक ठिकाणच्या वीरशैवाने केल्यास आर्थिक दृष्ट्या फार फायदा होणार आहे,

लग्नाकरता स्थळ- मंडप, भांडे, बाजा, वगैरे सिद्ध करण्याकरिता कमीत कमी १५ दिवस तरी पाहिजेत. एवढेहि करून अनेक अडचणी उत्पन्न होतात आणि पैशांचा फारच अपव्यय होतो. या अनर्थाकडे लक्ष देऊन संस्थेच्या चालकांनी एकाच दिवसांत लग्न करून देण्याचें ठरविलें असून ह्याबाबत फक्त ३५ रुपये घ्यावयाचे संस्थेकडून खालील नियम प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

[ १ ] वधुवरांना जें देणे-घेणे असेल तें त्यांनी आपसात घेणें. [ २ ] दोन्ही पक्षांतर्फे मिळून फक्त १५ मनुष्यांनी यावें. जास्त आणल्यास त्याचा खर्च निराळा द्यावा लागेल. [ ३ ] धर्मकायद्या- प्रमाणे वधु १४ वर्षांची व वर १८ वर्षांचा असावा. [ ४ ] वीरशैवांच्या कांही पोटजातीपैकी लोकांत पुनर्विवाहाची पद्धति नाही. अशा कित्येक गरीब लोकांना वधू न मिळाल्यामुळे अविवाहित राहून काळ कंठावा लागतो. अशा लोकांनी वीरशैवांतील कोणत्याहि जातीपैकी अथवा वीरशैवेतराच्या मुलीस शिवदीक्षा देऊन लग्न करून घेण्याची इच्छा असल्यास ही संस्था लग्न करून देते. [ ५ ] कित्येक लोक बहुजनसमाजाला भोजन देण्याची इच्छा करतात ( लग्नकार्यार्थ ). अशानी २ दिवस अगाऊ कळविल्यास लोकसंख्येच्या मानाने खर्च घेऊन व्यवस्था करण्यात येईल. आमंत्रण देणें व बोलाविणे मालकांनी केलें पाहिजे.

से. श्रीसिद्धेश्वर संस्था विजापूर

# वी. हि. सं. मंडळाचे सभासदांस विनंती:--

वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे कार्यकारी मंडळ व घटना कमेटीची बैठक रविवार ता. २६-७-३६ रोजी श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर जहागिरदार ह्यांचे यवतमाळ येथील बंगल्यात दुपारी १ वाजतां भरणार आहे. तरी मंडळाचे खालील सभासदांनी हजर राहण्याची कृपा करावी. तसेंच ज्या सभासदांनी अजून आपली सभासदत्वाची वर्गणी भरली नसेल त्यानी ती येतांना बरोबर आणावी.

सभेपुढील विषय:—

१. वी० हि० सं० मंडळाची घटना पास करणे.
२. अध्यक्षांचे परवानगीने सभेपुढे येणारे विषय.

स भा स द

(१) श्रीमंत बाबासाहेब देशमुख, अध्यक्ष. (२) श्री. आप्पासाहेब एकलारे, उपाध्यक्ष. (३) श्रीमंत रामचंद्रशेठ कुळ्ळी, उपाध्यक्ष. (४) श्रीमंत काशिनाथआप्पा, आडगांवकर. (५) दे. भ. राजाभाऊ डांगरे, नागपूर. (६) श्री. रोडाप्पा वाकतकर, डोणगांव (७) दे.भ. नानासाहेब बामणगांवकर, अमरावती. (८) श्रीमंत बाबासाहेब मुखरें, पुसद. (९) श्रीमंत गोविंदराव बोंदरे, चिखली. (१०) श्री. सोनाप्पा नथाप्पा पांगरे, कारंजा. (११) श्रीमंत महादेव शिवाप्पा जुननकर, पांढुर्णा. (१२) श्री. बाबुराव बाळाप्पा बिल्डिंग कॉंट्रॅक्टर, धुळे. (१३) श्री. रंगाप्पा गंगाप्पा बोंदरे, चिखली. (१४) श्रीमंत मलकाप्पा बोंदरे, चिखली. (१५) श्रीमंत बी. के. ऊर्फ बापुसाहेब हिंगमिरे विव्हिंग मास्तर, हिंगणघाट. (१६) श्रीमंत बाबुआप्पा गुंडाप्पा करणे, कोकर्डा, ता. दर्यापूर.

वरील सर्व सन्माननीय सभासदांनी सभास्थानीं नियमित वेळी हजर राहण्याची कृपा करावी.

आपला नम्र,

धि० तु० चौधरी, ज० सेक्रेटरी.

## प्रेमसंवर्धन मंडळाचे नवे स्थानिक उपक्रम

अमरावती — येथील श्री. हेगू करवीर व फकिराप्पा व त्यांचे गाढवे सहकारी यांच्या प्रेमसंवर्धक मंडळाच्या प्रेमसंवर्धनकार्याला पहिल्या सभेंतील बाचाबाचीपासून सुरुवात झाली असें ता. ९-७-३६ च्या ' वी. गर्जने 'तील बातमीदार ह्मणतो. [ नुसत्या बाचाबाचींतच सुरुवात झाली हेंच त्यांत नवल !! ] तसेच ह्या मंडळीच्या स्त्री-विभागांतील चळवळीला ' वीरशैव प्रेमसंवर्धक महिलामंडळ ' असें नांव देण्यात आलें होतें परंतु ह्या नावाचा अर्थ विपरीत होतो व हेतूविषयी शंका घ्यावयास कारण दिल्यासारखें होतें ही चूक ' पुरुष मंडळाचे सभासदां ' चे लक्षांत मागाहून आल्यावर व कांही जबाबदार स्त्री सभासदांनीहि तक्रारवजा कुरकूर केल्यामुळे ' वीरशैव प्रेम-संवर्धक महिला मंडळ ' ह्याऐवजी ' वीरशैव महिला मंडळ ' हें नांव ठेवण्यात आलें. नांव कांहीहि असलें तरी चालेल ! हेतु कायम व कार्य सुरू असलें ह्मणजे झालें !!! ' स्थानिक वीरशैवांची खानेसुमारी, जेवण, जेवणाचे आधी किंवा नंतर पुराण व स्मशानाची व्यवस्था " ह्या प्रेमसंवर्धनमंडळाचा येत्या श्रावण महिन्यांतील नियोजित कार्यक्रम ठरला असल्याचें एक सभासद कळवितात. स्तुत्य व अभिनंदनीय उपक्रम !! एकंदर भावी कार्यक्रमांत मंडळाची प्रयोजकता तर दिसतेच पण ' स्मशानव्यवस्थेच्या ' कार्यक्रमामुळे दूरदर्शित्वाचेंहि श्रेय अनायासें मंडळाचे पदरांत पडेल !

तसेच इतर कार्यक्रमाबद्दल जरी आजच कांही सांगतां आलें नाही तरी जर ' साधनसामुग्री ' त्यांना जमवितां आलीच तर ह्या आज-कालच्या सार्वत्रिक बेकारी व हलाखीच्या दिवसांत निदान जेवणाचा ' प्रोग्राम ' मंडळाला खात्रीने यशस्वीपणाने पार पाडतां येईल. कांही लोकांना लग्नाचे निमित्ताने ' उकळी ' [ वर्गणी ] करावयाची, व जमा झालेल्या फंडांतून लग्न करून कांही बचत करावयाची संवय झाली आहे. व त्या लग्नाच्या बायकांना ह्या नाही त्या निमित्ताने फारकती द्यावयाच्या व मग फिरून वर्गणी व फिरून लग्न अशा तऱ्हेने लग्नाचे वर्गणीवरच पोट भरण्याचा धंदा व जुवाबाजी करणाऱ्या व इतरहि बेकारांचे हातीं मंडळाचा फंड किंवा सार्वजनिक जेवणाची साधनसामुग्री पडणार नाही एवढी अधिकारीवर्गानें काळजी घ्यावी अशी एक सभासद कळकळीची विनंती करतात.

बाकी ते अशी काळजी घेतीलच अशी आह्मास खात्री आहे !!!

## श्रीसिद्धरामस्वामीचे राजिनाम्याचे खरें कारण बाहेर पडलें.

महाराष्ट्राचे सन्माननीय व विद्वान् माहेश्वरवर्गीय पुढारी दे. भ. नानासाहेब बामणगांवकर व श्रीगुरुमूर्ति करबसअय्यास्वामी लासिनकर ह्यांचे-सारखी प्रतिष्ठित स्थानिक माहेश्वर जंगम मंडळी उमरावती येथे नुकत्याच स्थापन झालेल्या माहेश्वर-मंडळांत सामील होत नाहीत ह्मणूनच आपण उपाध्यक्षत्वाचे जागेचा ' परदेशगमनाचे ' निमित्त पुढें करून राजीनामा दिला व आपण परत आल्यावर नवीन माहेश्वर मंडळ काढूं असें श्रीसिद्धरामस्वामी जर्मनीस जातेवेळी कांही प्रतिष्ठित मंडळीजवळ बोलल्याचे एक सद्गृहस्थ कळवितात.

नागपूरः—वीरशैवांतील पंचम व परंपरेने लिंगधारी कोसकाती ह्या दोन पोटजातींतील विवाहप्रसंगीं स्थानिक माहेश्वर जंगम मंडळींनी भलताच हट्ट धरून कार्यनाश करण्याचा डाव घातला आहे असें पाहतांच नागपूरचे वीरशैव पुढारी दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांनी पुढाकार घेऊन हें मंगलकार्य निर्विघ्नपणें पार पाडलें व ह्या कार्यांत नागपूरच्या जंगमांच्या विरोधाला भीक न घालतां अमरावतीचे श्री. बंडायास्वामी ह्यांनी सर्व धार्मिक कृत्य उरकवून भोजनांतहि भाग घेतल्याचें वृत्त समजतें.

सदर्हू कार्याबद्दल आह्मी दे. भ राजाभाऊ डांगरे व श्री. बंडाया स्वामींचेंहि अभिनंदन करतों. माहेश्वरमूर्ति बंडायास्वामीनी हें जें सत्कृत्य केलें तें प्रांतांतील सर्वच माहेश्वर मंडळींना अनुकरणीय आहे.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती.

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

अंक १५ वा ) ता० १ आगष्ट १९३६ ( वर्ष १ लें

## ❁ अनुक्रमणिका ❁



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

रोहिणखेड ( जि० बुलढाणा ) येथील वीरशैव पुढाऱ्यांच्या परिषदेंत स्थापन झालेले

# महाराष्ट्र-वीरशैव-हितसंवर्धक मंडळ

कार्यकारी मंडळ व घटनासमितींतील सदस्य



॥ श्रीशिव प्रसन्न ॥


वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें


| ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।<br>लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥<br>पारमेश्वरागम प. १ (५६) | मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः<br>स्त्रिय वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्<br>भगवद्गीता अ.९ (३२) |
|---|---|


नवें वर्ष १ लें ) मिति श्रावण शु॥ १२ शके १८५८ ( अंक १५ वा.


# महाराष्ट्रीय-वीरशैवांचा परिचयपट

'वीरशैवसंजीवनी' वृतपत्र काढावयाचे वेळीं जो कांही प्रचार त्या पत्राचे धोरणासंबंधी करण्यांत आला त्याच वेळीं वीरशैवांचे महाराष्ट्रीय वीरशैवांच्या परिचयपटांचे योजनेसंबंधाचीहि माहिती देण्यात येत होती. आह्मीं लेखनद्वारां व तसेच आमचे सहकारी तरुण मित्रद्वय पुसदचे श्री. आंप्पासाहेब एकलारे वकील व उमरावतीचे श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी सोलापूर विजापूर अक्कलकोट वगैरे भागांकडील आपले 'वीरशैवसंजीवनी'-चे प्रचारांत व्याख्यानांचे वेळी व खाजगी चर्चेंतूनहि ह्या वीरशैवांचे परिचयपटाबाबतीत संपूर्ण माहिती दिली होती व त्यांचे आवश्यकतेसंबंधीहि महत्वपूर्ण खुलासे केले होते. परंतु एवढा प्रचार आमचेकडे वर्गणीदारांचे मानाने जे परिचयपट भरून आले त्यांवरून पुरेसा झाला असें वाटत नाही. एकंदर २०–२२-च परिचयपट काय ते भरून आले आहेत. परिचयपटासंबंधी निदान ह्यापुढे तरी महाराष्ट्रीय वीरशैवांनी उदासीन राहूं नये अशी आमची त्यांना विनंती आहे.

"वीरशैवांना आवश्यक अशी संजीवनी" लेखांक ४ था, ह्या 'वीरशैवगर्जनें'तील ता. ४ जून १९३६ चे अंकांत पंढरपूरचे श्री. शं. बा. कटप लिहितात, "जे कांहीं परिचयपट आजपर्यंत संजीवनीमधून प्रसिद्ध झाले त्यांमध्ये या मह-

त्वाचे सदराचा पत्ताच (पोटजातीमधून रोटी-बेटीव्यवहार सर्रास चालू असावा कीं व्यक्तिगत असावा) नसलेला दिसून येतो. तेव्हा यांतील वस्तुस्थिति काय असावी हा उलगडाच आहे."

'वीरशैवसंजीवनी'-तून प्रसिद्ध झालेल्या परिचयपटां-तून हा सदर प्रसिद्ध केलीं जात नाही ही वस्तु-स्थिति आहे. परंतु त्यांतील हेतु दुसरा कोणताहि नसून इतर कांही अप्रकाशित सदरांप्रमाणे हाहि सदर प्रकाशित केला नाही ह्याचें कारण वर्षाअखेर जे संकलित परिचयपटांचें पुस्तक प्रसिद्ध कर-ण्याचा आमचा मानस आहे त्या वेळीं हेंहि प्रसिद्ध करावें. कारण त्यांत दिलेलीं उत्तरें किंवा मज कूर हा थोडक्यांत नसून, कारणमीमांसेसह आहे, व कारणाशिवाय उत्तरें प्रसिद्ध केल्यास गैरसमज होण्याचा संभव जास्त म्हणून सदहू सदरांचे अप्रकाशनाचा आरोप पत्करूनहि हें महत्वाचें सदर प्रकाशित करण्याचें इतर माहिती-बरोबरच लांबणीवर टाकावें लागलें. व ज्या अर्थी हा श्री. कडपांनी प्रश्नच निर्माण केला आहे त्या अर्थी आम्ही ठोकळ मानाने एवढाच ह्या बाबतीत खुलासा करतों कीं, पोटजातींतील रोटी-व्यवहाराला कांहीं किरकोळ मतभेद बाजूस सारून वीरशैवांची सार्वत्रिक सहानुभूति आहे. बेटी-व्यवहाराचा प्रश्न जास्त गुंतागुंतीचा व महत्वाचा असल्यामुळे व त्या बाबतींत अजून पुरेशी व आवश्यक जागृति न झाल्याकारणाने बहुसंख्यांक वीरशैवांनी आपलें अनुकूल मत प्रसिद्ध केलें नाही. असो.

परंतु महाराष्ट्र वीरशैवपरिचयपटाची योजना वी. संजीवनीद्वारा पुढे मांडतांना आमच्यापुढे फक्त पोटजातींतील रोटीबेटीव्यवहाराचाच प्रश्न होता असें नाही. किंबहुना तो आमचा मूळ उद्देशहि नाही. परिचयपटाचे योजनेची कारणें फार निराळीं व अत्यंत महत्वाचीं आहेत.

अखिल वीरशैवांची खानेसुमारी, त्यांची शैक्षणिक माहिती, मुलां-मुलींचे माहितीमुळे विवाहाबाबतींत अडचणी नाहीशा होणे, एखाद्या घराण्याचा ऐतिहासिक दृष्टीने कांही महत्वपूर्ण शोध लाग-ल्यास त्याचे ऐतिहासिक महत्व वाढविणें, वीरशैव-समाजाचे औद्योगिक व आर्थिक परिस्थितीचें ज्ञान व समालोचन करणे, वगैरे कार्यांचे मूळ कल्पनेने परिचयपटाची योजना करण्यांत आली आहे, व ह्या परिचयपटाच्या प्रसिद्धीकरणांनी सोलापुरांतील एका घरांत बसणाऱ्या वीर-शैवांना अमरावतींतील एका वीरशैवांचे घरांतील माहिती आर्थिक व प्रापंचिक परिस्थिति, उपवर व अविवाहित मुला-मुलींची माहिती, शैक्षणिकदर्जा वगैरेची माहिती, घरबसल्या करून घेतां येतें. व विना-रेल्वेभाड्यांनीं व अवांतर व्यर्थ कोठेहि न फिरतां पत्रोत्तरीं सोयरिकी किंवा इतरहि कार्य अधिक सुकरकरतेनें पार पाडतां येतें.

१०-१५ वर्षांनंतर किंवा १-२ पिढ्यानंतरहि जर कोणी हें 'परिचयपटांचें' पुस्तक उघडून पाहिलें तर त्याला आपल्या वीरशैवसमाजाचे तत्कालिन शैक्षणिक, आर्थिक, प्रापंचिक, व सामा-जिक परिस्थितीची कल्पना देणारा व एकंदर वीरशैवसमाजाच्या सांस्कृतिक व राजकीयदर्जाचे गमकच हा वीरशैवपरिचयपट होणार आहे.

तरी वी. संजिवनीचे वर्गणीदारांनी परिचयप-टाचें महत्व लक्षांत घेऊन ह्यापुढे परिचयपट भरून पाठविण्याचे बाबतींत दिरंगाई न करतां ताबडतोब परिचयपट भरून पाठवून ह्या सामा-जिक कार्याला मदत करून व अप्रत्यक्षरीत्या 'महाराष्ट्रीय वीरशैवांचा सांस्कृतिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय" इतिहास निर्माण करण्याचें पुण्य पदरीं घ्यावें अशी आमची सर्वांना आग्र-हाची नम्र विनंती आहे.

# चौधरींचा
# नवमतवाद आणि त्याचा सुवर्णमध्य

ले०—श्री. तु० ना० काटकर (गुरुवर्गीय) नागभीड.

वीरशैवांच्या क्रान्तीचा काळ आज येऊन ठेपला आहे. फक्त वेळेची वाट बघत आहोंत. आम्हाला जी क्रान्ति घडवून आणायची आहे ती रशियाप्रमाणे नाना प्रयोग करून जगाच्या बाजारांत स्वमताचे धिंडवडे दाखवून स्थिर करावयाची नाही; किंवा पुराणमताला चिकटून राहून हिंदुस्थानांतील कर्मठ गतानुगतिकाप्रमाणे वा आफ्रिकेंतील कांगोभागांतलि निग्रो रहिवाशांप्रमाणे अवनतावस्थेंत जावयाचें नाही. तर कालौघाबरोबर वीरशैवसमाज शैक्षणिक, सामाजिक, व्यावहारिक व औद्योगिक इ० चतुर्विध क्षेत्रांत पुढारलेल्या राष्ट्रांची व लोकांची बरोबरी करूं शकेल-किंबहुना त्यांना आदर्श होऊन त्यांचें लक्ष स्वतःकडे वेधून घेण्याइतका समर्थ बनेल, अशाच घटनेने **आम्हाला आमच्या नवमतवादाचा सुवर्णमध्य स्थापावयाचा आहे.**

तुम्ही कोणत्याहि समाजाकडे बघा, त्यांत मतमतांतराच्या दृष्टीने दोन प्रकारचे लोक आढळलेच पाहिजेत. त्यांपैकी एक पुराणमतवादी वर्ग असून दुसरा नवमतवादी वर्ग आहे. पुराणमतवादी लोक शब्दवादी असून प्रमाणाच्या तत्वावर झगडणारे आहेत; तर नवमतवादी लोक बुद्धिवादी असून कोणतीहि गोष्ट वा तत्व बुद्धिग्राह्य झाल्याविना ते त्याला प्राधान्य न देणारे आहेत. आज बुद्धिवादी वर्ग स्वतःच्या पायावर उभा राहून पुरातनमतांचें खंडन व मंडण करण्यास प्रत्येक समाजामध्ये तयार झाला आहे व होत आहे, तसेच आमच्याहि समाजांत निर्माण होत आहे. पण आज या मतांची सख्या फारच अत्यल्प आहे. तरी दिवसानुदिवस उच्च शिक्षणाने याच लोकांची संख्या अधिक निर्माण होईल अशी आम्हास उमेद आहे. त्या अर्थी निराश बनण्याचें आम्हास कांहीच कारण नाही. श्री. चौधरीसाहेबांच्या शब्दांतच सांगावयाचें झालें तर '**समाजांत नवविचारप्रवर्तक किंबहुना विचारप्रवर्तक हे विजेचे धक्के देत जरी झाले तरी चालेल**' पण आज नाही उद्या आम्ही आमचा वीरशैवसमाज सर्वांगिण बाजूने आदर्श असा बनविणारच !

सहजासहजीं मनुष्यामध्ये किती तरी उत्क्रांति घडून येते. पूर्वजांच्या बाराबंद्या जाऊन शर्ट अंगांत चढले, लँगकोट जाऊन शॉर्टकोट अस्तित्वांत आले, पागोटें जाऊन टोप्याच नव्हेत तर हॅट्सुद्धा वापरूं लागले.

डोक्यावरील केसाचे चक्कर अथवा निसर्गतः सडक केस जाऊन छानदार घुंघुरबाल राखूं लागले. पण ह्या ठिकाणी पुराणमताचा अथवा नवविचारांचा असा कांहीच प्रश्न उद्भवत नाही. पण जाणून-बुजून एखादी नवीन प्रथा अंमलांत आणण्याचा प्रयत्न करा कीं लागलीच पुराणमतवादी लोकांना गतानुगतिक रोगांच्या दाटी येऊनच कीं काय, वसूकन चवताळून उठतात व अमक्या ग्रंथांत असा आधार दिला आहे नी तमक्या शास्त्रांत तसें सांगितलें आहे. ह्मणून मारे जोरजोराने हल्ले चढवितात. पण स्वतःची सारासार विचार करण्याची बौद्धिक शक्ति कोठे गहाण ठेवलेली असते कोण जाणे !

बिचाऱ्यांना काय माहीत कीं, जसा काळ असेल तसें सारस्वत निर्माण होतें ह्मणून. कांही कांही विचार वा तत्वें अशींच असतात कीं, त्यांना त्या त्या काळापुरतें महत्व असतें. पण आमच्या पुराणमतवाद्यांना मात्र पुराणग्रंथांतच सारें साठवलेलें दिसतें, व पुराणमताच्या आधारें चालू काळालादेखील ते पुराणकाळ बनवूं पहातात. अशा वेळी मतभेद होणें साहाजीकच आहे. पुराणग्रंथांचे आधार पुरातन काळीं उपयोगाचे असतील; पुराणग्रंथ ह्मणजे कांही ईश्वरकृत नाहीत; तेसुद्धा पौरुषकृतच आहेत. ह्मणून त्या वेळच्या अधिकारी पुरुषांनी त्या वेळच्या देशकालपरिस्थितिनुरूप आधार दिले आहेत. तो त्यांचा दोष नाही. पण तोच आधार हल्लींच्या काळीं प्रमाण, मानणाऱ्यांना मात्र डोळस असून आंधळे व अक्कल असून बेअकली ह्मणणें भाग पडेत. पूर्वी जें झालें तें आज उपयोगाचें नाही व आज जें निर्माण होत आहे तें भविष्यकाळांत उपयोगी पडेल असा विश्वास कोणी बाळगत असल्यास तो व्यर्थ आहे. ' जैसी जैसी वेळ पडे तैसें तैसें होणें घडे ' ही संतोक्तिच अबाधित सत्य मानावें लागेल.

वैदिक धर्माचा संस्थापक कोण हें सांगणें जसें अशक्यप्राय आहे तसेंच वीरशैव [ शैव ] मताचें वा धर्माचें आहे. * ह्मणजे ज्या धर्माच्या आद्याचा शोध करूं शकत नाहीं पण त्याचें अस्तित्व ज्याच्या नांवाखालीं नुसत्या कमकुवत चालीरीतींनी सद्यःस्थितींत मेषवत् दिवस कंठीत आहे, त्याला जर सोन्याचे दिवस दाखवावयाचे असतील व आद्याप्रमाणें त्याची किमानमर्यादा अनंत करून सोडायची तर आमच्या वीरशैव-धर्ममार्तंडांनी उदार व उदात्त अंतःकरणाने देश-कालपरिस्थितिनुसार त्यांच्या तत्वांना व्यापक स्वरूप देणेंच आज अत्यंत अगत्याचें आहे. त्याविना वीरशैवांना स्वधर्मांच्या चिरंजीवित्वाची आशाच बाळगावयास नको.

आजचा समयच मुळी जुन्यांतून नवें काढण्याचा, अशुभांतून शुभ पहाण्याचा, वाईटांतून चांगलें निवडण्याचा व तमांतून प्रकाश निर्माण करण्याचा ह्मणजेच अशक्यकोटी शक्य करून दाखविण्याचा आला आहे. अशा वेळीं धर्माच्या जंत्रींत आवश्यक तो बदल घडविणें ह्मणजे आह्मांला तरी निदान क्षुल्लकशा बाबीपलीकडे कांहीच वाटत नाही. यांत आमचा हेतुपुरस्सर हेतु एकच. **पुराणमताला बळी पडून स्वधर्माला नामशेष करण्याचें पाप मांथीं लादून घेण्यापेक्षा नवमताला उत्तेजन देऊन त्याला चिरंजीवित्वाची चालना दिल्याचें पुण्य पदरीं पाडून घेतलेलें काय वाईट।** आह्माला खात्री आहे कीं, आमचा सुशिक्षित तरुण वीरशैवसमाज आमच्या

* या विधानाचें कोणी सप्रमाण व स्पष्ट विवेचन केल्यास त्यांचे आह्मी अत्यंत आभारी होऊं. पण त्याची सिद्धता पं. काशिनाथ शास्त्री यांच्या काल्पनिक व संदिग्ध व्याख्याना ( पुस्तकरूप ) प्रमाणें नसून, चिकित्सक मनाला पटेल अशी शोधक पण निश्चित स्वरूपाची असावी.

इच्छेविरुद्ध कदापिहि जाणार नाही. पण राहतां राहिला प्रश्न तो आज ह्यांत असलेल्या आमच्या आद्यपिढींचा; पण त्यांना आमचें एकवार वा द्विवारच नाही तर अनेकवार वंदन करून अखेरचें एवढेंच सांगणें आहे कीं, आमचें नवमत आपणास मान्य नसेल तर आपण अगदीं तटस्थ बसा. आम्हाला उत्साहजनक असें उत्तेजन जरी देऊं शकला नाही तरी विरोधहि पण करूं नका. विरोध केलाच तर त्याची आम्ही पर्वाहि पण करणार नाही. तुमच्यापेक्षा चार दिवस या जगांत आम्हांस अधिक काढावयाचे आहेत हें नीट लक्षांत ठेवा. जन्मास येऊन तुमचे सामाजिक व वैयक्तिक सारेंच कर्तव्य पार पडलें आहे. आतां तुम्हाला आमच्या कालमानपरिस्थितीनुसार उद्दिष्ट कार्यांत ढवळाढवळ करण्याचें कारण नाही. जसा आपणास आपल्या स्वधर्माचा स्वाभिमान आहे तसाच आणि तितक्याच कळकळीचा अंतःकरणापासून आम्हासहि आहे. आमच्या धर्माशिवाय दुसरा कोणताहि धर्म आम्हास कालत्रयीं मान्य नाही. ज्या धर्मांत आम्ही जन्मास आलों त्याच्या उत्कर्षाकरिता आमरणांत झटणार, व शेवटीं त्यांतच विलीन होणार! पण सद्यःस्थितीला चालीरीतींनी व स्वार्थी बुवाबाजींनी आमचा धर्म अधोगतीच्या मार्गाला लागला आहे तीं त्याची पाळेमुळें खोडून काढून सुशिक्षित, सुसंस्कृत व समंजस वीरशैवांच्या तर्कशुद्ध अशा जिज्ञासू व चिकित्सक, बुद्धिमत्तेला पटेल अशाच तत्वांच्या पायावर आमच्या प्रिय 'वीरशैव'-धर्मांचें पुनरुज्जीवन व्हावें असें आमचें स्पष्ट प्रामाणिक मत आहे.

वीरशैवांच्या पुनरुज्जीवनांतील क्रांतीचा पहिला बार सामाजिक सुधारणेंत आहे. आणि ती घडवून आणण्याकरिता बारा स्वयंपाकी नी तेरा चुली ही प्रथा ताबडतोब बंद पाडून एक चूल नी अनेक स्वयंपाकी ही प्रथा राजरोसपणें सुरूं करण्याची आज वेळ आली आहे. त्याशिवाय पोट-जातींच्या एकीकरणांत सहानुभूतीचा दुसरा सुगम मार्ग नाही. या जातिभेदामुळे अनेक मतभेद निर्माण होत चालले आहेत. त्या ठिकाणीं एकीने कार्य करें करावें हा मोठा कठीण प्रश्न आहे. पण त्यावर रामबाण उपाय एकच. वीरशैवांच्या पोटजातींतील स्वतःस श्रेष्ठ समजणाऱ्या जातींनी स्वतःचा मानसिक मोठेपणाहि वाढवून पोटजातींतील सर्वास सहभोजनें घडवून आणावींत. त्याविना परस्परांतील दुमत जाऊन प्रेम व सहानुभूति एकत्र नांदावयाची नाही आणि हें जोपर्यंत होत नाही तोपर्यंत एकीचा अभावच असणार!

नवमतवाद्याची ही नवविचारसरणी कदाचित ह्यांत असलेल्या आमच्या आद्यपिढीला बोचत असेल पण त्यांना मी येथे एकच सत्यकोटींतील अंधःकार नजरेस आणून देऊं इच्छितों. मला खात्री आहे कीं वीसाव्या-शतकांत जन्म पावलेला असा एकहि सुशिक्षित वीरशैवतरुण निघणार नाही कीं, ज्यांनीं वीरशैवेतर हॉटेल्सच्या चमचमीत पक्वानांची मजा लुटली नाही. तसेंच, मी असेंहि म्हणूं शकतों कीं, याच लोकाशीं सहभोजन न केलें म्हणून छातीठोकपणें म्हणणारा एकहि हयात असलेल्या आद्यपिढींतील पिता व पितामह सांपडावयाचा नाही. तर मग असे पडद्याआडून दूषित तीर झेलण्यापेक्षा केवळ स्वधर्माकरितां सामाजिक रणक्षेत्रावरील शुद्ध बाणांचा मारा निधड्या छातीने सहन केलेला काय वाईट! ह्यांतच तुमचा-आमचा मोठेपणा असून पोटजातीविषयीं सहानुभूति आणि स्वधर्माचें दृढीकरण व भूषण आहे.

आज हिंदूंनी वीरशैवधर्माच्या ध्येयाची मर्यादा अगदींच संकुचित झाली आहे. इस्लाम, ख्रिश्चन वा इतर परधर्मीयांनी हिंदूंकडे खाणें-पिणें केलें तरी ते स्वधर्मीच राहूं शकतात पण हिंदूंनीं परधर्मीयाकडे खाणे-पिणे केलें तर त्यांचें हिंदुत्व नाहीसें होतें. काय ही धर्माची केविलवाणी स्थिति! या ध्येयामुळे कित्येक हिंदूंना व वीरशैवांना गमावून बसलों आहोंत. अशाने स्वधर्माचें संख्याबळ दिवसेंदिवस कमी होत असून हिंदुस्थानांतील परधर्मीयांचें संख्याबळ मात्र फुगत चाललें आहे हें शिरगणतीच्या आंकडेवारीवरून सहज लक्षांत येण्यासारखें आहे. याकडे तूर्त लक्ष वेधणें

आत्यंतिक जरूर आहे. हिंदुधर्मासारखा अवाढव्य प्रश्न तात्पुरता बाजूला ठेवला तरी अल्प-संख्याक वीरशैवांनी मात्र याकडे डोळेझांक करून उपयोगाची नाही. आपले ज्ञातिबांधव स्वधर्म सोडून परधर्मात कां गेले? त्यांना स्वधर्माचा कां वीट आला, व कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या, वगैरे कारणांचा दूरवर विचार करून पुन्हा त्यांना सहानुभूतिपूर्वक आपल्यांत घेणे आपलें ब्रीद आहे. एवढेंच नव्हे तर इतर धर्मीयांची इच्छा असल्यास त्यांनासुद्धा आपल्या धर्माची दीक्षा घेऊन खुशाल आपल्यात घ्यावें. यांतच धर्माचा श्रेष्ठपणा आहे. मनुष्यजात तेथून एक. केवळ त्यांच्यांत माणुसकीचें जिवंत रक्त खेळावें म्हणून प्रत्येकाला कोणत्याना-कोणत्या तरी धर्माच्या बंधनाची आवश्यकता आहे. 'धर्मो विश्वस्य जगत: प्रतिष्ठा' अर्थात् धर्म हा सर्व जगाचा आधार आहे.' किंबहुना धर्म हाच चढाओढीच्या तत्वावर मानवांच्या उत्कर्षाचा आत्मा आहे. करिता वीरशैवांनी स्वधर्माचें किमान क्षेत्र विस्तृत करून धर्मांतरकर्त्यांचें पुनः शुद्धीकरण करणें व नवीन धर्मेच्छूंना स्वधर्माची दीक्षा घेऊन सामाजिक बल व संघटण वाढविण्याचा काळ आज येऊन पोंहचला आहे. सामाजिक जीवनाचा विचार करितांना निव्वळ एकांगी मत व्यक्त करून भागावयाचें नाही. ज्या अर्थी संसार हा भवरथ आहे त्या अर्थी स्त्री-पुरुष हे त्या रथाची समान दर्जाचीं दोन चाकें आहेत. तें लहान मोठे, उच नीच वा कमीअधिक असल्यास भवरथ सुरळीत कदापिहि चालणार नाही. म्हणून पुरुषांनी स्वतःच्या बरोबरीनें स्त्रियांना प्रागतिक सुधारणेस उत्तेजन द्यावें. किंबहुना प्रत्येक प्रसुशिक्षित, सुसंस्कृत व समंजस वीरशैवाने तरी निदान सनातन संस्कृतीचा गोषा काढून त्यांना समान दर्जानें वागवून भावी पिढीकरिता मार्ग आखून द्यावा. 'चूल नी मूल' एवढेंच स्त्रियांचें किमान क्षेत्र राखून ठेवतां कामा नये. पुरुषाप्रमाणे स्त्रियांनाहि सार्वजनिक कार्यांत धडाडीने भाग घेण्यास भाग पाडावें. मग तें सामाजिक असो वा राजकीय असो. पुरुषी दडपणाखाली दडपून ठेवण्याचे आज दिवस राहिले नाहीत. पुरुषांच्या खांद्याला खांदा भिडवून इतर सोशल समाजांतील स्त्रियांप्रमाणे आमच्याहि समाजांतील स्त्रियांनी स्वतःचें जीवन सर्वोत्कृष्ट करून सोडावें व त्यांच्या ध्येयास आमच्या नवमतवाद्यांनी अंतःकरणपूर्वक पाठिंबा द्यावा.

आमच्या सुमाता व सुभगिनींची मजल आजच इतक्या वरच्या थराला जाऊन पोहचणार नाही हें आम्हास पूर्णपणें माहित आहे. याचें कारण आमच्या समाजांतील स्त्रियांचें शिक्षण अजून म्हणावें तसें पूर्णावस्थेस पोंहचलें नाही. त्यामुळे त्यांचें अंतःकरण आजच इतकें विस्तृत विस्तारूं शकणार नाही. पण आमच्या मुलांमुलींनी तरी आपल्या सुधारणेची मर्यादा उच्च कोटीला नेऊन भिडवावी अशी आमची प्रबळ इच्छा आहे. सुधारणा म्हटली कीं त्याबरोबर कुधारणा ही तिच्या जोडीला ठेवलेलीच! आज आम्ही सर्वत्र पहातों त्यांत आम्हाला सुधारणेच्या सदराखाली फ्याशन ओतप्रोत भरलेली आढळते. आणि या फ्यॉशनच्याच पायीं सुशिक्षितांत आलेली बेकारी आज कांही नवीन राहिली नाही. तर आमच्या बंधुभगिनींना आमचें एवढेंच सांगणें आहे कीं, सुशिक्षित व्हा, सुधारक बना, फ्याशन करा पण त्याचें चीज करा. बेकारीचे पोशिंदे बनूं नका. तुमच्या ज्ञानाचा उपयोग बेकारीचा नायनाट करण्याकडे व राष्ट्रीय सामाजिक नी औद्योगिक प्रगतीकडे होईल असा करा.

वैवाहिक विवेचन श्री. चौधरी यांनी आपल्या 'नवमतवादा'-त अगदी विचारपूर्वक केलें आहे; व तेंच मत आम्हाला मान्य असल्यामुळे त्यास आमचा पाठिंबा आहे. म्हणून पुनः चर्वितचर्वण करण्याची आमची इच्छा नाही. पुनः कधी संधि लाभल्यास आम्ही आपले विचार आणखी प्रकट करूं. पण सध्या एवढ्यावरच इतिश्री करूं या.

---

# आदर्शभूत कर्मयोग व समाजसुधारणांचें स्वरूप

(लेखक.—श्री. गंगाधर सोमाप्पा खंगेकर, चांदूरबाजार.)

सुसंघटित कर्मयोग व समाजसुधारणा यांच्या मधुर मीलनाचें उगमस्थान प्रेम आहे. प्रेम ह्मणजेच कर्तव्यपरायणता व प्रेम ह्मणजेच समाजाच्या उत्कर्षाची गुरुकिल्ली होय. ज्या कर्माच्या योगाने निस्सीम प्रेम जागृत होतें तेंच खरें कर्तव्य आहे. वैयक्तिक व वैषयिक कल्पनांचें आसुरी तत्व ज्या कर्माच्या मुळाशीं आहे त्या कर्माने जगताचा, राष्ट्रांचा किंवा समाजांचा उत्कर्ष होण्याऐवजी अपकर्षच होईल हें निःसंशय खरें आहे. पृथ्वितलावर जे जे महात्मे होऊन गेलेत व होत आहेत त्यांचें चरित्रावलोकन केल्यास असें प्रत्ययास येतें कीं, त्यांनी जीं जीं सत्कार्यें केलीत तीं सर्व निःस्वार्थतेच्या व सत्याच्या तत्वास धरूनच केलीं यांत तिळमात्र शंका नाही.

' सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परी तेथे भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥
स्वामी रामदास ॥

प्रत्येक व्यक्ति सामर्थ्यवान् आहे पण त्या व्यक्तीची इच्छाशक्ति जोरदार सत्यपूर्ण व ईश्वरत्वाने प्रकाशित झालेली असली पाहिजे. दया, क्षमा, व शांति ही त्रिपुटीच यशाचें व सुधारणांचें भांडार आहे. मानवजाति किंवा आपला समाज उन्नत-दशेला कसा जाईल अशा विचारसरणीच्या मुळाशीं द्वेषातीत व स्वार्थातीत सद्भावनांचें बीज रुजविण्यांत महात्म्यांचें महात्म्य सांठविलेलें आहे. इतिहासप्रसिद्ध सत्पुरुषांनी प्रथम स्वतःची शक्ति कर्मप्रधान व ज्ञानपूर्ण सत्तत्वाच्या ठिकाणीं तन्मय होऊन जागृत केली व तदनंतर जगकल्याणाच्या भूमिकेंत निर्भीडतेने निष्काम कर्माची उभारणी करून जगाला उन्नतीच्या शिखरावर चढविलें हें त्रिकालाबाधित सत्य आहे. ' शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ ' या उक्तींत जसें बीज तसेंच फळ — हा सिद्धांत प्रतिपादन केला आहे. तद्वतच ज्यांच्या रोमरोमांतून स्वहिताबरोबर विश्वहिताची भावना प्रज्ज्वलित झाली, सर्व भूतमात्रांना खरें सुख व प्रेम कसें प्राप्त होईल या विचारसूर्योदयांत ज्यांचें उज्ज्वल चरित्र शोभायमान् झालें, अशा व्यक्तींच्या हृदयांत सर्वात्मप्रेमे नांदत होतें हें निर्विवाद आहे. मानापमानांच्या क्षुद्र कल्पनांना फाटा देऊन निंदेकडे किंवा स्तुतिकडे लक्ष न देतां ते कर्तव्यतत्परच राहिले. ज्यांच्या अचल श्रद्धेला तो दयाघन प्रभु वश झाला त्या सज्जनांनी निरहंकार वृत्तीचा अवलंब करून आपलें शील दैवी गुणांचें आगर करून ठेवलें यात संशय नाही. विवेकसंपन्न होत्साते जे जे लोक आपली बुद्धि प्रगल्भतेच्या निर्मल वातावरणांत फिरवितात, व्यक्तिगत द्वेषाला बाजूला सारून सर्वात्मभावनांच्या कक्षेंत शुभ कार्यें करतात, त्यांचा यशोध्वज फडकल्याशिवाय रहात नाही' टांकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाही या सिद्धांताप्रमाणे मनुष्याला प्रथमावस्थेंत असह्य दुःख सोसावें लागेल, संकटांना धैर्याने तोंड द्यावें

लागेल, सदसद्विवेक जागृत ठेवावा लागेल, एवढेंच नव्हे तर योग्यतेच्या पायरीवर चढतांना सत्याकरिता मृत्यूलाहि कवटाळावें लागेल. सर्व-स्वाचा त्याग करण्याची शक्ति ज्यांच्यांत आहे तोच सर्वस्व प्राप्त करण्यास समर्थ आहे हें विसरून चालणार नाही. सुशिक्षित समाजसुधारकांनो, आपली मनें प्रथम पवित्र बनवा, त्यात ईश्वरत्वाचें बीज पेरा, सुसंस्कृत बनून सेवा करण्याची सादिच्छा धारण करा, आपलें सामर्थ्य ओळखून रहा, ममत्वाच्या आकुंचित भावनांना थारा देऊं नका, वेडगळ धर्मसमजुतींना व रूढींना हाकून लावा व समाज, राष्ट्र व अखिल जगकल्याणाची जबाबदारी आपल्या शिरावर आहे हें लक्षांत असूं द्या. अविचारांना, व्यसनांना व फाजील शानशौकीपणाला बळी पडूं नका. प्रवृत्तिपर आधिभौतिक सुधारणा व निवृत्तिपर वेदान्त यांचें ऐक्य करा. विचार न करतां कोणालाहि बरें किंवा वाईट म्हणूं नका. सद्विचार जागृत ठेवा. तो समर्थ प्रभु सत्यसंकल्पाचा दाता आहे हें तत्व विसरूं नका.

पावित्र्याशिवाय व शीलाशिवाय समाजसुधारणा होणें शक्य नाही. जगताचा घटक राष्ट्र व राष्ट्राचा घटक समाज आहे ही बाब लक्षांत घेऊन समाज-सुधारणांचें स्वरूप कसें असावें याचा विचार करणें योग्य आहे. सुधारकांच्या कर्तव्यावरच समाजाचें कल्याण अवलंबून आहे. अर्थात् सुधारक हा सर्वप्रेमी, विचारी व मनमिळाऊ असणेंच जास्त श्रेयस्कर आहे. सर्व समाजाचें एकमत करून त्याला उत्कर्षाच्या शिखरावर चढविणाऱ्या सुधारकांचीच अत्यंत आवश्यकता आहे. सुधारकांचें चरित्र शुद्ध, प्रेममय व उत्कृष्ट असावें व त्याच्यांत पक्षपाती भेददृष्टीचा लवलेशहि नसावा. ज्या समाजांतील सुधारणा सत्याच्या व प्रेमाच्या पायावर उभारण्यांत आल्या आहेत तोच समाज सुखी व शांत झाला असा प्रत्यक्ष पुरावा आहे. आपसांतील वादविवादांना कायमची मूठमाती देऊन सर्वांनी सहानुभूतिपूर्वक व प्रेमपुरःसर कार्य करून ऐक्यभाव वाढवावा. एकमेकांनी एकमेकांच्या सद्विचारांस बळकटी आणून प्रेम वृद्धिंगत करावें. सुधारणेचें स्वरूप सर्वांगीण असून आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक असावें. फाजील व एककल्ली विचारास सुधारकांनी हृदयांत वावच देऊं नये. 'हळू पण चांगलें' हें तत्व डोळ्यांसमोर ठेवून समाज व राष्ट्र उच्चस्थितीला नेण्याची स्वार्थत्याग करून खटपट करणेंच जास्त सोयीचें आहे.

प्रिय वीरशैवसमाजसुधारकांनो, तत्ववेत्त्यांचा इशारा ऐका, 'सत्याचा अनुभव प्रथमारंभी कटु असतो पण जेव्हा मनुष्य परिस्थितीला न जुमानतां सन्मार्ग सोडीत नाही तेव्हा मात्र त्यास सुख व शांति प्राप्त होते व असा मनुष्य स्वतःबरोबर सहजच सर्वांचें कल्याण करतो हें सत्य आहे.

सत्याचा एक वेळ उदय झाला म्हणजे असत्याच्या राशीच्या राशी त्याच्यासमोर नष्ट होतात हें विसरून चालणार नाही. समाजांत शैक्षणिक व नैतिक ऐक्यभावना स्वतंत्रतेने निष्पन्न व्हाव्यात अशी प्रबळ इच्छा धारण करा व त्याकरिता सर्वतोपरीं खटपट करा अशी हार्दिक व नम्र प्रार्थना आहे. 'प्रेमें प्रेम बळावे, द्वेषाने अधिक वाढतो द्वेष ॥ प्रेमें उदया आले, द्वेषाने ओस पाडिले देश॥' हें लक्षांत ठेवा

सच्चिदानंदरूप सदाशिवाने माझ्या बुद्धीस जागृत करून हा लेख लिहून घेतला त्या शिवाचे पदारविंदीं हें लेखसुमन अर्पण करून मी सर्वांची रजा घेतों. ॐ शान्तिः—

# श्रीसिद्धाराम स्वामीचें भाषण

( जागतिक शारीरिक खेळांच्या सामन्याकरतां जर्मनीस जातांना श्री. सिद्धराम स्वामीस जाहीर सन्मानाने निरोप देण्यास अमरावती—सुदर्शन—थिएटरांत ता० ३०-६-३६ रोजी भरलेल्या वीरशैवेतर व वीरशैव-बंधुभगिनींच्या जाहीर सभेंत उत्तरादाखल केलेलें श्री. सिद्धाराम स्वामी माजलगांवकर ह्यांचें भाषण:— )

सन्माननीय अध्यक्षमहाराज आणि बंधुभगिनींनो, आज आपण मोठ्या थाटाने सन्मान करून मला जर्मनींत जाण्यास प्रेमाचा निरोप दिला त्यावद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. आपण जें बहुमानाने माझें स्वागत केलें व सन्मान केला तो माझा व्यक्तीचा नसून, आपले येथील भरतखंडांत नांवलौकीक संपादन केलेल्या ह. व्या. प्र. मंडळाचाच आहे असें मी समजतों. हनुमान व्या. प्र. मंडळाने अवघ्या २२ वर्षांचे अवधींत एवढा लौकीक संपादन करून सर्वत्र व्यायामाची अभिरुचि पसरून राष्ट्राच्या शरीर-संवर्धनाचें पवित्रतम कार्य केलें हें येथे नव्याने सांगावयास नकोच.

एवढेंच करून ही संस्था थांबली नाही तर पौर्वात्य व्यायामपद्धति ही शरीरसंवर्धनास कशी श्रेष्ठ आहे याचेंहि जगापुढे दिग्दर्शन करण्याची तिची तयारी आहे. एवढ्याचकरिता म्हणून बर्लिन येथे भरत असलेल्या जागतिक सामन्यांत तेथील आमंत्रणावरून भाग घेण्यास आज आमची ही तुकडी रवाना होत आहे.

जुन्या धर्मरूढीप्रमाणे परदेशगमन करणें ही धर्मबाह्य वर्तनाची कल्पना आता बरीच निवळली असून,दिवसेंदिवस परदेशगमनास अनुकूल वातावरण तयार होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. एक-दोन जंगम व कांही किरकोळ सनातनी सोडून अखिल-वीरशैवबंधुभगिनींनी माझें स्वागत करून मला परदेशांत जाण्यास प्रेमाने परवानगी दिली व आज इतर राष्ट्रांवरोबरच सुधारणेच्या २० वे शतकांत प्रगतिपथावर पदार्पण केलें ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

आपले वीरशैवसमाजाचा बौद्धिक व शारीरिक दर्जा पाहिजे तितका वाढला नाही तरी पण निरनिराळीं मंडळें स्थापन होऊन त्या दिशेने कार्यास सुधारणा झाली आहे. परंतु सर्व मंडळांनी आपले धोरणांत एकसूत्रीपणा आणल्यास लौकरच सुधारणा होईल. आपले येथील सन्माननीय दे. भ. नानासाहेब बामणगांवकर यांचे संपादकत्वा-खाली निघणाऱ्या ' वीरशैवसंजीवनी ' व मार्गदर्शकत्वाखालील वीरशैव-हितसंवर्धक मंडळ ह्याद्वारां संघटनेच्या कार्याला सुरुवात झाली आहे ही आनंदाची गोष्ट आहे. तरुणांनी व कार्यक्षम कार्यकर्त्यांनी जोमाने पुढे आल्यास वीरशैवसमाज खात्रीने पुढे आल्याशिवाय राहणार नाही असा मला विश्वास वाटतो.

आपण सर्वांनी प्रेमाने माझें स्वागत करून मला निरोप देत आहांत त्यावद्दल आपलें पुनः एकवार आभार मानून आपलें कृपा-आशीर्वादें-करून हिंदुस्थानचा यशोध्वज फडकवून विजयश्री प्राप्त होवो अशी त्या जगन्नियंत्या परमेश्वराजवळ नम्र प्रार्थना करून माझें भाषण संपवितों.

# वीरशैवसमाजाची वाचन–उदासीनता

लेखकः— बी. नारायणस्वामी मळवडी, [सातारा].

आमच्या समाजाची प्रगति होण्यासाठी थोडेसें शिकलेली माणसें कांही प्रयत्न करीत असतात. परंतु आमचा समाज या बाबतींत किती उदासीन आहे हें कार्यकर्त्यांलाच माहीत! आमच्या समाजामध्ये उधारी मांडण्याकरिता शिकलेले लोक कांही कमी नाहीत. एखाद्या कुळाला उधार देऊन त्याजवर व्याज आकारून चार सहा महिन्यांत उधारीच्या रकमेच्या दुपटीइतक्या रकमेचें गहाणखत करून घेण्यात तरबेज झालेल्या माणसाना कोर्टामध्यें – कोणास कोणीं लुबाडणें, कोणाची जमीन साठ वर्षांची वहिवाट असतांनासुद्धा आपल्यासारखें करून घेणें, खोट्या सह्या करून प्रॉमिसरी नोटींचे हुकूमनामे करून घेणें, अज्ञानाच्या ठेवी किंवा घरें बळकावून बसणे, कोणाच्या घराचा शेंडा पुढे आला आहे त्यासाठी मामलेदाराकडे निनांवी अर्ज करून त्यांचें घर पाडायला लावणें, कोणाचा दूरचा वारस कोठे परगांवीं आहे त्याला शोधून काढून त्याचेजवळ पैसे नसतांना कर्जाऊ देऊन त्याला वाद घालायला लावणें, वगैरे गोष्टी करण्यात आमच्यांतील बऱ्याचशा ऐदी लोकांचा कांही वेळ जातो. हें करण्यासाठीं वकीलांचे किती उंबरठे झिजवावे लागतात, किती उधारीवर पाणी सोडावें लागतें, किती माल खरेदीपेक्षाहि कमी भावांत विकणे भाग पडतें, कितीतरी विड्यांची राख करावी लागते. दुकानांत ठेवलेली पिकदानी भरल्यामुळे तीन-तीनदा ओतून टाकावी लागते. वकील, वकीलांचे क्लार्क, कोर्टांतील कारकून, गांवांतील गुंड व त्यांचे बगलबच्चे यांना लांच द्यावी लागते. या मंडळींनी दिलेल्या शिकवण्या व पोक्त (?) सल्ले वगैरे किती तरी गोष्टी डोक्यांत ठेवाव्या लागतात. डोक्याला किती तरी शीण द्यावा लागतो.

पण आपण हा खोटानाटा व्याप कशासाठी करीत आहोंत ? या व्यापामुळे आपलें उद्दिष्ट जें धनप्राप्ति तें पूर्ण होतें काय ?

आपला ज्ञातिबांधव, आपला व्यापारीबंधु, आपला शेतकरीबंधु, कोठे चुकतो, अज्ञानाने कोठे फसतो, कोठें नडतो, कोण कसा नवीन धंदा काढतो, आणि त्याला आपण चढाओढ करून कसे गोत्यांत आणून त्याची 'जिरवितो', दुकानांतील नोकरांना दुकानावर यायला दोन मिनिटें उशीर लागल्यामुळे त्याचा पगार कमी करणें अगर त्याला दंड करणें, अथवा त्याची असह्याय्य परिस्थिति जाणून हाकलून देणे, किंवा एखादा नोकर आजारी मरणावस्थेंत आहे असें लक्षांत येतांच पटकन् त्याचे घरादाराची विक्री करण्याचे अधिकाराची पावती स्वतःचें कर्ज फेडून घेण्याकरितां— त्याचे डोके फिरेल किंवा मरेल ह्या धास्तीने— घाईघाईनें लिहून घेणें व त्याचें उद्याचें मरण आज ओढविणे याच गोष्टीचा विचार करीत असतो. याच गोष्टीसाठी आह्मी आपलें बुद्धि व सर्वस्व खर्च करीत असतो व यालाच आह्मी धर्म व्यापारी नीति [?] हुशारी समजतों. असें जर भराभर होत नसतें, तर आमल्या समाजांतील काय अगर सर्व जनतेंतील काय बहुजनसमाज अज्ञानदशेला लागलेले दिसते ना. या गोष्टींचा आमच्या सनातनी बंधूंच्या धर्मग्रंथांत उल्लेख केलेला असेल असें मला वाटत नाही.

या गोष्टीकडे इतका ओढा लागण्याचें कारण एकच आहे आणि तें ह्मणजे हल्लींची विषम

समाजपद्धति. हें जरी खरें असलें, तरी आमच्या समाजांतील बराचसा बंधुवर्ग डोळे असून आंधळा आहे—वाचायला येत असून बोटावर मोजण्या-इतक्या व्यक्तिखेरीज न वाचणारा असा आहे. शेंकडों वर्षांचे संस्कार त्यांच्या हाडीं-मांसीं खिळ-लेले आहेत. धर्मग्रंथ जे वाचतील त्याचा योग्य तो परमार्थासाठीं उपयोग न करतां—" तुका ह्मणे माझें तुम्हा संतांवरी ओझें " असें ह्मणून आपल्या-जवळचें ओझ्याचें गाठोडें बरोबरीने चालणाऱ्या ओझें घेतलेल्या मित्राच्या डोक्यावर ठेवणाऱ्या मतलबी बकसाधूप्रमाणें—असा करतील.

पूर्वीचा मनु पालटला. सर्व समाज भराभर पंजाब-मेलच्या वेगाने सुधारत आहेत. हिंदुसमाजांतील गाळ—टाकाऊ, स्पर्श करण्यास अयोग्य, असा समजला जाणारा अस्पृश्यवर्ग डॉ. आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली साऱ्या हिंदुस्थानला हादरून सोडीत आहे. अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या समाजाने आपली एवढी उन्नति—आपलें अस्तित्व कशाच्या जीवावर करून घेतलें ? त्याने सत्यनारायण—वरद-शंकर यांच्या पूजा केल्या, कीं सोळा सोमवार-व्रत केलें, कीं लघु-दीर्घ रुद्र केले, कीं सोमप्रदोष केले ? नाही ! नाही ! ! तिवार नाही ! ! ! त्याने मुळींच नसलेला शिक्षणाचा धर्म अंगिकारिला. त्यांच्यांतील तुरळक लोक लिहिणारे - वाचणारे बनले, आणि त्यांनी आपली जोरदार संघटना केली. आपलीं दुःखें वेशीवर टांगिलीं. पळीपंच-पात्रीबहाद्दर सनातन्यापासून शंकराचार्य डॉ. कुर्तकोटीपर्यंत बेफिकीर मंडळींना अस्पृश्यासंबंधींचा तिरस्करणीय विचार करायला भाग पाडलें. महात्मा गांधींना राजकारणांतील बराचसा वेळ कमी करून आपल्यासंबंधीं विचार करणें भाग पाडलें. ही गोष्ट त्यांना लेखनवाच-नानेच व वाचनाच्या परिणामाने करतां आली.

आमचा उधार मांडण्याइतका पिढीजात शिक-लेला वीरशैवसमाज फक्त उधार मांडूनच आपलें मांडवल उधार देऊन, तें कागदावर उधार मांडून, निर्धन होऊन स्वस्थ बसला. आजूबाजूला काय चाललें आहे, आपल्या शिक्षणांत कोणत्या तऱ्हेने बदल केला पाहिजे, याची जाणीव त्याच्या गावींहि नाही. माझ्या पहाण्यांतील शेंकडो मध्यम-स्थितीतले [illegible] पुरनिवासी व्यापारी लोक वृत्तपत्रां-तील सट्याचे आंकड्याखेरीज इतर मजकूराकडे पाहात असतील तर त्यांच्या सनातनी धर्माची शपथ ! मला माहीत आहे. किती डोकेफोड करून सांगितलें, किती कळकळीने समजावून सांगितलें, तरी त्यांना वाचायला वेळ मिळणार नाही. सिनेमाचें फर्स्टक्लासचें तिकीट काढून एकच पौराणिक खेळ व्रताप्रमाणे पांचवेळ पाहातील, अगर ' बाजी '-च्या अनेक प्रकारांपैकीं आवडत्या प्रकारांत सर्व संपत्तीचें वाटोळें करून बसतील. परंतु ज्ञानवृद्धीच्या कार्यासाठी एक छदामहि खर्च करायला तयार नाहीत. असा कांही प्रश्न आला कीं, हा प्रश्न आपल्या जातगंगेपुढे—जीर्ण पंचायतीपुढें सांवसेवकांच्या सभेपुढे मांडूं आणि मग त्यांनी परवानगी दिली तर आमच्या खाजगी इस्टेटींतील बजेट ( अंदाजपत्रक ) मंजूर करूं असें उत्तर देतील.

वीरशैवज्ञातींतील सुशिक्षित तरुणांनो, या कूपमंडूक लोकांना—अंड्याला विश्व समजणाऱ्या बुद्रुक वृत्तीच्या तरुणांना व बुद्रुकांना सोडून द्या. स्वतःच्या हिंमतीवर—कर्तबगारीवर पुढे या. आणि आपल्या बरोबरीच्या ज्ञातिबांधवांना वाच-नाची गोडी लावा. त्यांना निरनिराळे विषय समजावून द्या. तरच आपणाला सिनेमाच्या रुपेरी पडद्यावरील चित्राप्रमाणे घडोघडीं पालटत अस-लेल्या परिस्थितीला तोंड देतां येईल—सनातनी बंधूंशीं समाजसुधारणेबाबत दोन हात करण्याचें धैर्य येईल. हा कडूचिराइताचा काढा—क्विनाइ-नचा डोस, उदासीनतारूपी समाजाला आलेला ताप [ fever ] घालविण्यासाठी देणें जरूरीचें आहे असें वाटत नाही काय? माझ्या लेखनांत कमी-अधिक शब्द असतील; परंतु ते सत्य आहेत यांत तिळमात्र संदेह नाही.



# स्त्री-शिक्षणाचा खरा हेतु

( लेखिकाः- सौ. शांता गंगाधरआप्पा सातेकर )

*( अमरावती येथील वी. शिक्षण प्र. मंडळाचे २० व्या वाढदिवस-प्रसंगीं सौ. शांताबाई सातेकर ह्यांनीं दिलेलें भाषणः—— )*

अध्यक्षमहाराज आणि येथे जमलेले वीरशैव बंधु आणि भगिनींनो, सभेंतून बोलण्याचा किंवा भाषण वाचून दाखविण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग आहे, व सध्या माझी परीक्षाहि सुरुं आहे. त्यामुळे, मला माझे विचार मोकळे-पणाने व जास्त विस्तृतपणें मांडतां येत नाहीत, ह्याबद्दल क्षमा करा. आजचा शिक्षणप्रसारक मंडळाचा २० वा वाढदिवस आपण साजरा करीत आहोंत.त्या शिक्षणप्रसारक मंडळाने आमच्या ह्मणजे स्त्रीशिक्षणाच्या दृष्टीने काय कामगिरी केली आहे एवढेंच आपणांस पहावयाचें आहे. २० वर्षांचा इतिहास लक्षांत घेतला असतांना ज्या प्रमाणांत पुरुषवर्गाच्या ह्मणजे मुलांच्या शिक्षणाकडे सहानुभूतीने पहाण्याची दृष्टि पुरुषवर्गाची होती व ज्या प्रमाणांत मुलांना मदत करण्यांत आली त्या प्रमाणांत मुलींना मदत दिल्या गेली नाही. व तशा सहानुभूतीने मुलींच्या शिक्षणाच्या प्रश्ना-कडे मंडळाने लक्ष दिलें नाही. ह्या दुर्लक्षाचें कारण सर्वस्वीं मंडळाची उपेक्षा हें नसून, पालकांनाहि मुलींच्या शिक्षणाचें महत्व तितकें वाटत नव्हतें हेंहि असूं शकेल. परंतु अलीकडे समाजांनी स्त्री-शिक्षणाकडे सहानुभूतीने पहावयाचें ठरविल्याबद्दल मी समाजाची फार आभारी आहें, व माझे जे कांही ३-४ इंग्रजी पुस्तकांचें शिक्षण झालें व पुढेहि शिक्षणाची इच्छा आहे ह्याचें कारण म्हणजे समाजांनी व पालकांनी मुलींच्या शिक्षणाकडे अलीकडे लक्ष द्यावयास सुरुवात केली हें होय, व मला फंडाने मदत करावयाला हेंहि एक कारण आहे व त्याबद्दल मी समाजाची आभारी आहें. आपल्या मागासलेल्या समाजांतून इतक्या उशीरा कां होईना पण ज्या कांही थोड्या-फार मुली शाळेंत जात आहेत ह्याचें **कारण पालकांना स्त्री-शिक्षणाचें महत्व आजच कळलें असें** नसून, **अलीकडेच आपल्या समाजांतील सुशि-क्षित मुलांनी, सुशिक्षित मुलींशींच लग्न करण्याविषयींची आपलीं मतें बोलून दाखविल्यामुळे,** अप्रत्यक्ष रीतीने मुलीचे पाल-कांना आपल्या मुलींना शिकविण्याची गरज भासूं लागली आहे. ह्मणजे आज मुलींच्या शिक्षणाविषयी पालकांची दृष्टि ‘ बाजारू माल ’ तयार करण्या-पलीकडे गेली नाही व जशी असावयास पाहिजे तशी सहानुभूति मुलींच्या शिक्षणासंबंधी अजून पालकांत उत्पन्न झाली नाही. दुर्दैवाने पुरुषापेक्षा स्त्रियाच स्त्री जातीच्या अधिक कठोर शत्रु ठरतात. शिकत असलेल्या मुलींच्या हालचालीवर फाजील लक्ष देऊन केवळ वेळ जात नाही ह्मणून व्यर्थ टीका करणाऱ्या स्त्रियांचेंच प्रमाण जास्त सांपडेल, व कुणाच्याहि लेकी-सुनांवर टीका करणें एवढा एकच धंदा असल्या स्त्रियांना असतो. शाळेंत जाणाऱ्या दुसऱ्यांच्या मुलींच्या

नव्या पद्धतीच्या राहणीवर ज्यांनी एकवेळ मनसोक्त टीका करून घेतली त्यांचीच शाळेंत जाणारी मुलगी चार दिवसांनी जेव्हा नव्या तऱ्हा करावयाला लागली तेव्हा तेच पालक मूग गिळून आपल्या मुलीच्या त्याच वर्तनाचें समर्थन करूं लागले; तेव्हा दुसऱ्यांच्या मुलीवर निष्कारण टीका करणाऱ्या अशा गावंढळ व दुतोंडी पालकांच्या टीकेकडे. शाळेंत जाणाऱ्या मुलींनी लक्ष न देतां आपल्या शिक्षणाकडेच लक्ष द्यावें. तसेंच, अशा टीकाकार स्त्रियांना व पुरुषांनाहि माझी कळकळीने हात जोडून विनंती आहे कीं, त्यांनी आपली ही निंदेची संवय टाकून देऊन मुलीचे शिक्षणाचा सहानुभूतीने व केवळ मुलींचें शिक्षण हें लग्नाच्या बाजारांतील माल तयार करण्याकडे आपण देत नसून तें मुलींच्या उन्नतीकरिता तिचा सामाजिक दर्जा वाढविण्याकरिता देतों अशीच सहानुभूतीची भावना ठेवावी. तसेंच, यापुढे 'शिक्षणप्रसारक मंडळाने मुलींच्या शिक्षणाकडे अधिक लक्ष द्यावें व जास्त मदत करावी एवढीच माझी ह्या प्रसंगीं नम्र विनंती आहे, व आपण माझें भाषण शांतपणें ऐकून घेतलें त्याबद्दल मी आपणा सर्वांची आभारी आहें.

---

# वीरशैवांतील चळवळी

## महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ कार्यकारी मंडळाची सभा.

यवतमाळ ता. २६-७-३६

'वी. संजीवनीं'-तून आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणे महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळाचें कार्यकारी मंडळ व घटना कमेटीची सभा रविवार ता. २६-७-३६ रोजी मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार (पारवेकर) यांचे बंगल्यांत दुपारी २ वाजता भरली होती. कार्यकारीमंडळाचे सभासदांबरोबरच खास निमंत्रणावरून श्रीमंत भाऊराव आप्पा विभूते कारंजा, श्रीमंत शिवाजीराव ऊर्फ बाळासाहेब मुखरे इजारदार पुसद बोरी, डॉ. आप्पाराव संगेकर, चांदूर बाजार, श्री. गुरु हरेश्वर मल्लिकार्जुन स्वामी घाटुळकर, तळेगाव, श्रीमंत कृष्णाप्पा बाळाप्पा करजे, कोकर्डा, श्रीगुरु बाळलिंगस्वामी व श्री. माधवराव शेटे, यवतमाळ, वगैरे मंडळीहि सभेला हजर होती. श्रीमन्त रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांनाहि निमंत्रण पाठविलें होते परंतु ते प्रकृति-अस्वास्थ्यामुळे हजर राहूं शकले नाहीत. सभेचें काम दुपारी २ ते सायंकाळी ६ वाजेपर्यंत चाललें होतें. व चार तासांच्या चर्चेनंतर मंडळाचे 'वीरशैव हितसंवर्धक' ह्याऐवजी 'महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक' हें नाव ठेवण्यांत आलें व मन्डळाची घटना व नियम (पुढील अंकीं प्रसिद्ध करूं.) व त्याबरोबरच खालील ठरावहि सर्वांनुमतें पास झालेत.

### सभेला हजर असणारे कार्यकारी मन्डळ व घटना कमेटीचे सभासद

१ श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार अध्यक्ष. २ श्री. आप्पासाहेब एकलारे वकील पुसद उपाध्यक्ष, ३ श्रीमंत रामचंद्र शेटकुळी, रोहिणखेड, उपाध्यक्ष, ४ श्रीमंत काशिनाथआप्पा आडगावकर, खजिनदार, ५ श्रीमंत गोदाजीराव ऊर्फ बाबासाहेब मुखरे, इजारदार, पुसद बोरी ६ श्रीमंत बाबुआप्पा गुंडाप्पा करणे, कोकर्डा ७ श्रीमंत

गोविंदराव बोंद्रे चिखली. ८ दे. भ. राजाभाऊ डांगरे, नागपूर. ९ श्री, वि. तु चौधरी. उमरावती. दे. भ. नानासाहेब बांमणगावकर हे कुटुंबाच्या प्रकृती-अस्वास्थ्यामुळे हजर राहू शकले नाहीत. तसेंच श्रीमंत महादेवआप्पा शिवाप्पा जुननकार, पांडुर्णा, हें कोर्टाच्या कामामुळे हजर राहूं शकले नाहीत, व कारंजाचे श्रीमत सोनाप्पा पांगरे हे आजारी असल्यामुळे येऊ शकले नाहीत. मंडळाच्या सभेंत घटना व नियमाबरोबरच खालील ठराव सर्वांनुमतें पास झालेत. ठराव १ लाः-' महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मडळ ' ही संस्था रजिस्टर करण्याचा अधिकार ही सभा श्री. आप्पासाहेब एकलारे, बी. ए. ( ऑनर्स ), एल एल. बी. वकील पुसद व श्री. वि. तु. चौधरी बी. ए. उमरावती ह्याना देत आहे व ती त्यांनी मार्च १९३७ पर्यंत रजिस्टर करावी.

ठराव २ राः- वीरशैव प्रांतिक परिषद् भरविण्याबाबतींत मडळानी खटपट करावी.

ठराव ३ राः- श्रीगुरु सिद्धारामस्वामी माजलगावकर हे जागतिक शारीरिक खेळाचे सामन्याकरिता जर्मनीस गेले आहेत त्याबद्दल ही सभा त्यांचें अभिनदन करते व त्यांना त्यांचे कार्यांत यश चिंतिते.

ठराव ४ थाः- श्रीमत बापुसाहेब हिंगमिरे, वीव्हिंग मास्तर, हिंगणघाट, ह्यांनी वीरशैव बेकार तरुणांना मोफत शिक्षणाची सोय ( वीव्हिंगच्या धंद्यांतील)केल्याबद्दल ही सभा त्यांचें अभिनंदन करते.

ठराव ५ वाः- महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मडळाचे प्रचारकार्याकरिता ज० सेक्रेटरीचा किंवा अध्यक्ष जी माणसें नेमील त्यांचा प्रवास व प्रचारकार्यार्थ केलेला योग्य खर्च देण्यांत यावा.

ठराव ६ वाः- रोहिणखेड-परिषदेंत प्रांतानिहाय व जिल्हानिहाय सुचविल्या गेलेल्या सहाय्यक व प्रचारमंडळांस ह्यापुढे महाराष्ट्र वी. हि. सवर्धक मंडळाचे सभासद व प्रचार-कार्य करण्याची ही सभा विनंती करीत आहे. व तसेंच आतापर्यंत झालेल्या सर्वसाधारण सभासदांची वर्गणी वसूल करण्याची अधिकारी मंडळानी त्वरा करावी.

## आभार प्रदर्शन

श्रीमंत शिवाजीराव ऊर्फ बाळासाहेब मुखरे इजारदार पुसद बोरी, हे महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे २५० रु. आगाऊ वर्गणी देऊन मंडळाचे पहिल्या वर्गाचे सभासद [ तहाहयात सभासद ] झाले ह्याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहोंत, व ह्याबद्दल आह्मी त्यांचें जाहीर अभिनंदन करतों. तसेंच, श्रीमंत बंडाप्पा एकनाथआप्पा नागठाणे बोरीकर हे मंडळाचे वार्षिक २५ रु. वर्गणी देणारे सभासद झाल्याबद्दल आह्मी त्यांचेहि आभारी आहोंत.

वि. तु. चौधरी, ज. सेक्रेटरी.
रा. वि. डांगरे, सेक्रेटरी.
महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळ.

वरीलप्रमाणे सभेंत सर्वांनुमतें ६ ठराव पास झाले व सायंकाळी ६ वाजता सभेचें काम संपलें. असें श्री.वि.तु. चौधरी,उमरावती,व श्री. राजाभाऊ डांगरे, नागपूर, सेक्रेटरीज कळवितात.

---

## सांगली संस्थान वीरशैव-परिषद्

सांगली संस्थान वीरशैव-परिषदेचें पहिलें अधिवेशन सांगली येथे येत्या सप्टेंबर महिन्यांत भरविण्याचें निश्चित ठरलें आहे. तरी सदर परिषदेविषयीं कोणाहि वीरशैवास कांहीं सूचना करण्याच्या असल्यास त्या त्यांनी खालील पत्त्यावर कळवाव्यात असें नागाप्पा शंकरप्पा माळी सराफ, सांगली हे, कळवितात.

## कै० सौ० लक्ष्मीबाई बामणगांवकर यांचें निधन

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या पत्नी सौ. लक्ष्मीबाई ह्या गेल्या चार वर्षापासून मेंदूच्या विकाराने आजारी होत्या. दरवर्षाला त्यापासून प्रकृतींत हळूहळू अपाय होत होता. गेल्या चार महिन्यांत तर त्या सारख्या अत्यवस्थ स्थितींत होत्या. शेवटी ता. २७ जुलै सोमवारी रात्रौ २ वाजता त्यांचें निधन झालें, मृत्युसमयीं त्यांचें वय ४३ वर्षांचें होतें. स्वभाव निगर्वी, दयाळु, व देवभोळा असा होता. पतीला जपणे ह्याशिवाय त्यांच्या चिंतेचा विषय नसे. लक्ष्मीबाईच्या निधनाने नानासाहेबांचा प्रपंच नाहीसा झाला. प्रेतयात्रेला सर्वप्रकारचे वीरशैव स्त्री-पुरुष नागरिक हजर होते. मंगळवारी रात्रौ बसवेश्वर-चौकांत माहेश्वर मंडळ, वीरशैवप्रेमसंवर्धक मंडळ, व वीरशैव महिला मंडळातर्फे वे.शा. सं. दादाशास्त्री नागपूरकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली वीरशैवांची जाहीर सभा भरून दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला. ह्या प्रसंगीं श्री. रघुनाथआप्पा हेगू वकील, महादेवआप्पा हुंडेकर, मल्लाप्पा कुन्हे, माहादेव आप्पा एकलारे, विश्वनाथआप्पा आवंके वगैरेंचीं भाषणें झालीं.

## दारव्हाचे श्री. नामदेव आप्पाजी कोरे कळवितात

श्री. दादा महाराज किर्तनकार उमरावती यांचे विधानांना उत्तर म्हणून खालील माहिती आपलेकडे पाठवीत आहें, तरी प्रसिद्ध कराल अशी आशा आहे.

१. श्री. दादामहाराजाविषयी मी 'वीरशैव-संजीवनीं'-तून लिहिलेला मजकूर त्यांना बदलाम करण्याच्या दृष्टीने लिहिला नव्हता. खरी वस्तुस्थिति लोकांचे निदर्शनास आणण्याच्या दृष्टीनेच मजकूर प्रसिद्ध केला.

२. तळेगांव येथे ता. १६-२-३६ रोजी एका सत्पुरुषाचे पुण्यतिथीचे निमित्ताने जमलेल्या पर्वाचेंच 'वीरशैवपरिषदेंत' रूपांतर करून स्वतःच अध्यक्ष होऊन कशीतरी सभा पार पडली. परिषदेच्या हस्तपत्रिका वगैरे काहीच रीतसर निघाल्या नव्हत्या, व तशी आगाऊ कुणालाहि कल्पना दिल्या गेली नव्हती. व वीरशैवेतर सन्मित्र सुधारक मंडळाचे खाजगी बैठकीलाच अखेर वीरशैवपरिषदेचें स्वरूप दादामहाराजांनी दिलें

३. माझ्या खाजगी पैशांच्या देवघेवीच्या व्यवहाराचा व व्याजाच्या सुटीचा प्रश्न दीड वर्षापूर्वीच व्याजाची सूट देऊन मी वीरलिंग स्वामींशीं सोडवून घेतला होता, व त्या सभेपुढे तो महत्वाचा प्रश्नहि नव्हता.

४. हातांत 'वीरशैवसंजीवनी'-ची पावतीबुकें व हस्तपत्रिका घेऊन मलाहि ह्या विषयावर काही बोलावयाचें आहे असें दादामहाराजांनी म्हणतांच त्यांनी 'आपले कीर्तनाची' सबब पुढे करून मला परवानगी नाकारली. ह्यामुळे माझाच काय पण कुणाचाहि गैरसमज होईल ! !

नामदेव आप्पाजी कोरे

सभेंत 'वीरशैव-संजीवनी'-च्या प्रचारास परवानगी मागितली असतां वे.शा.सं दादामहाराज नागपूरकर ह्यांनी अध्यक्ष ह्या नात्याने दिली नाही असें प्रथम श्री. कोरे ह्यांनी लिहिलें. त्याला उत्तर दादामहाराजांचें असें कीं, "संजीवनी" चा प्रश्नच सभेंत उत्पन्न झाला नव्हता. व तीच गोष्ट नामदेव आप्पा कोरे ह्यांनी सांगितली. मी 'वी.संजीवनी'-च्या प्रचाराकरितांच बोलणार आहें असें स्पष्ट न सांगितल्यामुळेच वाद व्यर्थ व उभयतांत गैरसमज उत्पन्न होऊन झालेला दिसतो. तरी ह्यानंतर ह्या वादास स्थळ नाही. उभयतांहि 'वीरशैव संजीवनी'-चे हितचिंतकच असल्यामुळे आम्ही त्यांचे आभार मानतों.

—संपादक—वी. सं.

## श्रीवीरशैव शिक्षणोदय पाठशाळा, अमरेश्वर, मंदिर मानवत.

ममप्रिय वीरशैवबांधवहो, इतर धर्मांत पुष्कळशीं बोर्डींगें असून खाणेपिण्याची सोय वगैरे होऊन

इतर धर्म शिक्षणांत पुढें पाऊल टाकीत आहेत, व आमच्या बांधवांना शिक्षण मिळत नाही. कां ? तर खाण्यापिण्याची व्यवस्था होत नाही. करितां येथे एक शाळा उघडण्यांत आली आहे. त्यांत शिक्षण व व्यवस्था खालीलप्रमाणे.:—

### शिक्षण

१ चौथीपासून तों मॅट्रीकपर्यंत शिक्षण मिळेल. २ उर्दू कायद्यापासून तों मॅट्रीकपर्यंत उर्दू शिकविलें जाईल. ३ संस्कृत चौथीपर्यंत शिक्षण देण्यांत येईल. ४ ज्योतीष, रुद्र, महिम्न, वगैरेहि अभ्यास शिकविले जातील. ५ व्यवहारी शिक्षण ह्मणजे वाटेल त्यांना इंग्रजींत पत्रव्यवहार करणे, मोडी पत्रें ओळखणें, व तार वाचणें,वगैरे. ६ पालकांचे इच्छेनुरूप शिक्षण मिळेल. ७ लाठी काठी मलखांब यांचेंहि शिक्षण देण्यांत येईल.

### व्यवस्था व खर्च

१ मुलांचे खाण्यापिण्याची व्यवस्था केली जाईल. प्रत्येक मुलांस खाणेपिणे व शाळेची फी मिळून ६ रु. सुर्ती खर्च पडेल. २ मुलांचे प्रकृतीकडे विशेष लक्ष दिलें जाईल. ३ पुस्तकें व कपडे यांचा खर्च पालकांस भरावा लागेल. ४ वीरशैवांनी अवश्य या संस्थेचा फायदा घ्यावा. विशेष माहितीकरिता खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करणे.

### शिक्षक.

१ नागनाथ शंकराया किर्तनकर, २ नागनाथ काशीनाथअप्पा पिंपरीकर, ३ काशीनाथ दगडाआप्पा साबनेपरळीकर.

### पत्ता.

व्यवस्थापक, गुंडायास्वामी अमरेश्वरमंदिर, मु. पो. मानवत, ता० पाथ्री जि० परभणी.

१ मेंबर-अध्यक्ष. नारायण एकनाथआप्पा तोडकरी. २ नागनाथआप्पा दुधाप्पा डांगे.

### नाशिक वीरशैव बोर्डिंग

रविवार ता. २१ रोजीं नाशिक येथे दुपारीं ३ वाजतां लिंगायत लोकांची सभा श्रीमंत रा. बाबुशेट शिवलिंगाप्पा दिवटे घोडेवेकर यांचे अध्यक्षतेखालीं श्रीमंत व उत्साही तरुण शेट मलिकार्जुन विश्वनाथ महिमाने उर्फ बगोबाशेट, डि. लो. बोर्ड मेंबर,नाशीक, यांचे वाड्यांत भरून खालील ठराव पास झाले.

ठराव १:—महाराष्ट्रांतील प्रत्येक जिल्ह्यांत आपल्या लिंगायतसमाजांत ऐक्य व संघटना घडवून आणून आपला सामाजिक दर्जा वाढवावा, तसेंच शैक्षणिक उन्नति करून घ्यावी, ह्मणून प्रत्येक जिल्ह्यांत वीरशैवलिंगायत-तरुणसंघ स्थापावे, वगैरे रायचूर - महासभेच्या धोरणाप्रमाणे आज रोजीं येथे वरील संघाची स्थापना झाली.

ठराव २:—वरील जिल्हा-संघामार्फत नाशीक जिल्ह्यांत प्रचारकार्य करून येत्या श्रावणांत वडांगळीकर स्वामींचे विचारें जि० सभा भरवावी.

ठराव ३:—जिल्ह्यांत प्रचारकार्य करण्याकरिता रा. गं. कों. गुळवे यांनी ठिकठिकाणीं जिल्हाभर फिरून संघाची व वीरशैव-बोर्डिंगची घटना तयार करावी आणि येत्या जिल्हा-सभेंत बोर्डिंगचा विषय प्रामुख्याने घ्यावा व नाशीक येथे वीरशैवलिंगायत बोर्डिंग स्थापन करावें.

---

## दे. भ. मंजाप्पा अण्णा हर्डीकर ह्यांचे भाषणातील दुरुस्ती

आपल्या वीरशैवसंजीवनीचे ता. १५-६-३६ चे अंकांत आर्यसमाजाला अनुलक्षून उदगीर येथे मीं केलेलें जें भाषण प्रसिद्ध झालें आहे तें खालीलप्रमाणे असावयास पाहिजे होतें.

" आर्यसमाज गुलबर्गा यांनी जी जाहीर पत्रिका प्रसिद्ध केली आहे तिचा निज़ाम राज्यांतले वीरशैवांनी केवळ निषेध केल्याने त्यांचें काम भागलें असें नाही आह्मीं अशी परिणामकारक व शांत चळवळ चालविली पाहिजे कीं, त्यायोगें त्यांतील विधानें परत घेतलीं गेलीं पाहिज़ेत.

बसवेश्वराविषयीं जें निंद्य विधान त्यांनी केलें होतें तें त्यांनी परत घेतलें. तसें केलें नसतें तर ब्रिटिश मुलुखांतले वीरशैवांनी त्यांना कोर्टांत नेण्याची सर्वसिद्धता केली होती.

आर्यसमाज जोपर्यंत ह्या देशांत वर्णविशिष्ट विष पेरीत आहे तोपर्यंत श्रीबसवेशाचा वर्णविध्वंसक संदेश प्रसृत करणें हें माझ्या आयुष्याचें पवित्र कर्तव्य आहे असें मी समजतों "

## कोडे नं. २ चा खुलासा.

श्रीमान् महाशय महोदयजी संपादक महाराज यांचे सेवेशीं जगदंबेचा साष्टांग प्रणिपात. आपणाकडे पाठविलेले कोडें नं. २ चे समाधानकारक उत्तरें न आल्यामुळें बक्षीसाचा कप देतां आला नाहीं.

कोडें न २ मध्यें यशस्वी झालेल्यांची नावें व बक्षीसाचा खुलासा खालीलप्रमाणे आहे.:—

वर्गणीदार नं. १९२, १ पदक, अनुक्रम नं. ३ भिवापा विराप्पा गांढवे, मु. लोही, ता. दारव्हा जि. यवतमाळ (वऱ्हाड). वर्गणीदार नं. ९२, १ पदक, अनुक्रम नं. ४ लिंबक सुपड्ड शेटे, मु. पहूर, ता. जामनेर जि. पूर्व खानदेश. वर्गणीदार नं. १४४, १ पुस्तक, अनुक्रम, नं ५ सदाशिव नामदेव शेटे, मु. निम्रुड, ता. माजलगांव जि. बिड निजामस्टेट. वर्गणीदार नं. ६४५, १ पुस्तक, ६ भ. सौ शांताबाई तोंडारे, मु. नागपूर सीताबर्डी (सी. पी.)

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनती.

' वीरशैव संजीवनी ' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं ' अरुण ' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील ' वीरशैव संजीवनी ' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

अंक १६ वा ) ता० १५ आगष्ट १९२६ ( वर्ष १ ले

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. फिरकोळ अंकास २ आणे.

# जाहीर नोटीस

श्री० पंचाक्षरी अय्या जंगम हल्ली मुक्काम लासिनमठ अमरावती सर्वत्र वीरशैव व वीरशैवेतर लोकांना आमचे अशील श्री गुरुमूर्ती षडाक्षरी स्वामी गुरु रेवण सिद्धस्वामी लासिनकर मालक लासिनमठसंस्थान अमरावतीचे अज्ञान पालन करणार व पंचातर्फेचे वहिवाटदार श्री गुरुमूर्ती करबस अय्या स्वामी गुरु षडाक्षरी स्वामी लासिनकर मठ संस्थान तर्फे कळविण्यात येते कीं लासिनकर मठ संस्थान अमरावती पंचातर्फे आमचे अशील हे वहिवाटदार आहेत व वहिवाटदारीच्या हक्कानें ते सर्वांस कळवितात कीं कुणेही लासिनमठात (कथा, पुराण प्रवचन व व्याख्यान वगैरे) किंवा तेथे उतरावयाचे असल्यास आमचे अशीलाची परवानगी घेणे आवश्यक आहे. तसेच लासिन मठ संस्थानचे कांहीं सामान-सुमानाची अफरातफर झाल्याचे आढळून आले आहे ह्या बाबतींत योग्य ती चौकशी सुरु झाली आहे. तरी ज्याचेजवळ मठसंस्थानचे मालकीचे सामान असेल त्यानीं तें परत संस्थानांत आणून द्यावे. नाहीतर कायदेशीर इलाज केल्या जाईल. श्री. पंचाक्षरी ह्याचा व मठाचा कोणत्याच तऱ्हेने संबंध नाही. तरीही त्याचे कडून मिळालेल्या किंवा विकत घेतलेल्या मठ संस्थानचे मालकीच्या वस्तु बद्दलची जबाबदारी विकत घेणाऱ्यावर; किंवा ती वस्तु ज्याचे जवळ असेल त्याचेवर राहील व त्या बाबतीत काय ती कायदेशीर कारवाई केल्या जाईल. तरी सदहू पंचाक्षरी ह्याचा व मठाचा कांहीच संबंध नसल्यामुळें त्याला कुणीही मठाचा मालक किंवा वहिवाटदार समजण्याची गरज नाही व त्याचे मार्फत मठाशी व्यवहार, मठांत कार्यक्रम किंवा उतारा कुणीही करुं नये. ह्याचे विरुद्ध वर्तन करणारावर कायदेशीर ईलाज केला जाईल. वरील अर्थाची नोटीस शुक्रवार ता० १४-८-३६ चे 'उदय' वर्तमानपत्रातूनही दिली आहे.

नोटीस देणार:— अनंत बाळकृष्ण खापर्डे, बी. ए., एल एल. बी, वकील उमरावती ता० १४-८-३६

for

श्री गुरु करवसअय्या गुरु षडाक्षरी स्वामी लासिनकर अज्ञान पालन करणार व पंचातर्फे वहिवाटदार लासिनमठ संस्थान अमरावती.

(नो. नं. १)

# * महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ *

कार्यकारी मंडळावरील दोन सन्माननीय नवमतवादी प्रतिनिधी

श्रीमंत बाबुराव बाळाप्पा,
बिल्डिंग कॉंट्रॅक्टर, धुळें-खानदेश.



खानदेश-विभागतर्फेचे कार्यकारी मंडळावरील प्रतिनिधी
व खानदेश-विभागातील प्रसिद्ध वीरशैव पुढारी

श्रीमंत गोविंदराव बोंद्रे,
चिखली—( वऱ्हाड )



बुलठाणा जिल्ह्यातर्फेचे कार्यकारी मंडळावरील प्रतिनिधी,
लक्षाधीश वीरशैव व नवमतवादी तरुण कार्यकर्ते पुढारी.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति श्रावण व॥ १३ शके १८५८ ( अंक १६ वा.

# आमच्या विश्रांतींतील घडामोडी

पूर्वभाग

## धर्मपत्नीचा आजार

मनुष्य केवढाहि प्रयत्नवादी असला तरी विधिघटनेंत असे कांही अद्भुत चमत्कार घडतात कीं, त्यापुढे प्रयत्नवाद्यास दिङ्मूढ होऊनच स्वस्थ बसावें लागतें. ' वीरशैव संजीवनी '-चा पहिला अंक जेव्हा आह्मीं काढला तेव्हा आमची पत्नि जरी आजारी होतीच, तत्पूर्वी साडेतीन वर्षांपासून ती मेंदूच्या विकाराने जरी आजारी होती—तरी संजीवनीचा पहिला अंक प्रसिद्ध झाल्यापासून तिचा आजार तिला मृत्यूच्या दरबाराकडे ओढण्याइतका बलवत्तर होईल ही मात्र कल्पना नव्हती. परंतु जी कल्पना नव्हती ती कल्पना वेगगतीने सत्य ठरली, आणि घरांतील अडचणीमुळे नित्याच्या लेखनकलेपेक्षा तिच्या शुश्रुषेकडेच अधिक लक्ष द्यावें लागलें. तथापि ' संजीवनी '-चा अकरावा अंक प्रसिद्ध होईपर्यंत ' संजीवनी '-च्या वाचकांची आम्हीं शक्य ती सेवा ह्याहि बिकट परिस्थितींत केली. पुढे मात्र कोणताहि वेळ मिळाला नाही. ह्या अवधींत म्हणजे अंक बारा ते पंधरापर्यंतच्या काळांत ' संजीवनी 'चा सर्व भार आम्हाला आमचे नवमतवादी मित्र श्री. वि. तु. चौधरी, बी. ए., ह्यांच्यावर टाकून मोकळे व्हावें लागले. अशा प्रकारें वाचकांपासून अंतरण्याचा जो आमच्यावर प्रसंग आला त्याबद्दल आमचे सहृदय वाचक आम्हाला क्षमा करतील अशी उमेद आहे. आमची धर्मपत्नि आम्हाला सोडून गेल्यामुळे ह्यानंतर ' संजीवनी '-कडे लक्ष द्यावयास आम्हाला वेळ मिळेल हें खरें, पण

आरंभींच्या काळांतच परिस्थितीने जर्जर केल्यामुळे मन निराश झालें आहे. म्हणून पुढील वर्षी काय ? असा आमच्यापुढे प्रश्न उभा झाला आहे. त्याचें कोणतेंहि उत्तर द्यावयास आम्ही असमर्थ आहों. कारण ' वीरशैव केसरी '-ला थोडें स्थैर्य येते न येते तोंच १९३० सालीं सत्याग्रही म्हणून तुरुंग आमच्या नशीबीं आला. १९३१ मध्ये तुरुंगांतून सुटल्यावर ' वीरशैव केसरी ' ची जुळवाजुळव करावी न करावी तोंच १९३२ च्या जुलै पासून पत्नीच्या आजाराने एकाएकी उचल खाली, व ' वीरशैव केसरी '-कडे दुर्लक्ष झालें. सदर आजारांतून कांही महिने बरे व कांही महिने वाईट असा प्रकार जरी अनुभवास येत होता तरी काळाची झडप तिच्यावर पडेल असें वाटत नव्हतें. म्हणून ' संजीवनी '-कडे लक्ष देण्याचें ठरविलें. पण तसें लक्ष देतांच जो प्रकार घडला व अनुभवास आला, त्याला विधिघटनेंतील चमत्कार असें ह्मणणेंच भाग आहे. अशा परिस्थितींत उरलेलें आयुष्य समाजसेवेंतच सतत जाईल अशी ग्वाही कशी द्यावी ? कारण जें घडतें तें उलटच ! तथापि योगायोग जसा येईल तसें चालणें भाग एवढें सांगूनच आज मोकळे होतां येते. ' यूंव् करूं व त्यंव् करूं ' ही मनुष्य-मात्राची घमेंड मात्र व्यर्थ ठरते.

## दूषित मनोवृत्तीचा मासला

ह्या मधल्या अवधींत श्री. चौधरींनी ' संजीवनी '-च्या कारभाराकडे लक्ष दिलें ह्मणूनच ' संजीवनी ' प्रसिद्ध होत गेली ह्याबद्दल चौधरींचे आभार मानणें आमचें पहिलें कर्तव्य आहे. परंतु ह्या अवधींत ज्या कांही अनेक घडामोडी झाल्या त्या घडामोडींवर आह्माला आमचे विचार प्रगट करावयास वेळ सांपडला नाही. आणि ह्या अवधींत ' संजीवनी '-त जे प्रगट झाले त्यामुळे कांही आदरणीय व्यक्ति व मित्र दुखावले गेले असेंहि आमच्या प्रत्ययास आलें. तथापि आपले विचार निर्भीडपणें पुढे मांडीत असतां कोणत्या व्यक्तीला कोणत्याहि सबबीवर दुखवावें असा आमचा मानस नाही. कांही स्वामींची दिनचर्या ' संजीवनीं '-त प्रसिद्ध झाली ह्मणून स्वामींचे कांही विद्वान् शिष्य व अभिमानी पुरुष आमच्यावर रुष्ट झालेले आढळून आले. कोणाहि स्वामींच्या दिनचर्येंतील गुणदोष स्पष्ट करणें ह्मणजे स्वामीवर्ग नष्ट करणें असा हेतु नाही, तर सदर वर्गाने कालमान ओळखून अधिक तेज:पुंज व्हावें असेंच आह्माला वाटतें. शिवाय स्वामीवर्गाच्या गुणदोषावर चर्चा आली ह्मणजे इतरांच्या गुणदोषावर पांघरूण घालण्यास आह्मी प्रवृत्त होतो असेंहि नाही. तथापि एखाद्या पंचाचार्यपीठाधिकाऱ्याने स्त्रियांनी कासोटा घालावा असा उपदेश केला ह्मणून तो त्याचा दोष झाला हें ह्मणणें जसें चमत्कारिक, तसेंच भांडखोर जंगमांना पाचारण करूं नये असें कोणीं ह्मटल्याबरोबर अकांडतांडव करणें हेंहि चमत्कारिकच ! इतकेंच नव्हे तर स्त्रीसमुदायांतून भांडखोर जंगमांना बहिष्कृत करण्याची प्रवृत्ति उद्भवली तर तेथे स्त्रियांचा नैसर्गिक स्वभाव प्रगट झाला म्हणून उलट आनंद मानावयास पाहिजे. कारण स्त्रिया कोणावर रागावल्या म्हणजे त्या त्याचे तोंड पहावयाचे टाळतात. अर्थात् ह्या योगाने सामुदायिक बहिष्कार अस्तित्वांत येणें शक्य नसतें. बहिष्कार ही मनोवृत्तीच मुळी क्षणिक त्राग्याची दर्शक आहे. आणि हा त्राग स्त्रियांना शोभला म्हणून पुरुषांनी त्यांत उलट सुलट बाजूने तोंड घालणे ह्मणजे पुरुष ह्मणविणाऱ्याने स्वत:स स्त्रैण म्हणवून घेण्यासारखें हास्यास्पद आहे. पण अलीकडे हा एक वाद सुरु आहे. त्यांत सत्य नसून परस्परांच्या दूषित मनोवृत्तीचाच बोध होतो. ह्या दूषित मनोवृत्तीपासून अलग राहणें हा एक पुरुषार्थ होय अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. ' अरे, कासोटा घाला ' असा उपदेश स्वामीने केला ह्यात निंद्य काय ? ' असा प्र

लेखांत आह्मीं सवाल केला होता. त्यावर एकाने अश्लील कोटी करून ' स्वामींचें स्त्रियांच्या कासोट्यावर लक्ष जाणें ' " संजीवनी " -कारास आवडतें काय ? असा सवाल टाकला होता. त्यावर कोटीला कोटी करून आह्मालाहि उत्तर देतां आलें असतें व ' पोकळ कासोट्याचा तरी पुरस्कार आपण कोणाकरिता करितां ' असा सवाल टाकतां आला असता. पण असें करणें सर्वथैव अनुचित होय. महासभेंत कांही सन्माननीय प्रतिनिधींवर व गु. व. स्वामी परांडकर यांजवर रायचूर-महासभेचे अध्यक्ष अधिकाराक्रमण करून बोलले असें प्रसिद्ध झालें आहे. ह्या प्रकाराने समाजांतील सुज्ञ ह्मणविणारांत सुज्ञतेचा प्रसार होत आहे असें कोणीहि ह्मणणार नाही. सुधारक व दुर्धारक, नवमतवादी व पुराणमतवादी असा वाद ह्यानंतर समाजांत उत्पन्न होणें शक्य व जरूर असलें तरी परस्परांनी सुज्ञतेस फाटा देऊन एकमेकावर आक्रमण करणें म्हणजे प्रामाणिक मताचा प्रचार करणें नव्हे तर दूषित मनोवृत्ति प्रगट करण्याचा धंदा करणेंच होय.

## उमरावतींतील धडामोडी

गेल्या बसवेश्वरजयंतीला उमरावतींतहि दोन जयंतिउत्सव झाले व त्या उत्सवापासून येथेहि नवमतवादी व पुराणमतवादी वाद सुरू असल्याचें स्पष्ट झालें. वास्तविक पाहिलें असतां वीरशैव-समाजांत व त्या धर्मांत नवमतवाद सुरूं होणेंच शक्य नाही. कारण मूळचा वीरशैवधर्मच मुळी सुधारकांचा. पण हे सुधारक समाजवादावर उभे नव्हते तर अध्यात्मवादावर उभे होते. साचार वेदान्ति हा खराखरा सुधारकांचा सुधारक असतो. वीरशैवांचे आचार्य, विरक्त व बसवेश्वर हे सर्वच साचार वेदांति असल्यामुळे आजच्या सर्व सुधारकांचे सुधारक ठरतात. त्यांना आदर्श कल्पून जे विचारांचा व आचारांचा प्रसार करूं इच्छितात त्यांना नवमतवादी जसे म्हणतां येत नाही, त्याचप्रमाणे जे ह्या थोरा-मोठ्यांच्या नांवावर उड्या मारतात त्यांना पुराण-मतवादीहि ह्मणतां येत नाही. वास्तविक ' संजीवनी ' मध्ये कोणत्याहि नवमतवादाचा पुरस्कार केलेला नाही. तथापि जुनें तेवढें सोनें समजून हात-पाय घासित मरावें अशा कूप-मंडूकवृत्तीचा मात्र कोणत्याहि लेखकाने उपदेश केला नाही. ' वीरशैव संजीवनी '-तील सर्व लेखांचा सारांश लक्षांत घेतला तर जुन्या सर्व संस्था व त्यांची संघटना सर्वांनाच पूर्णपणें मान्य असून त्यांचा मूळ हेतु जो आज तडीस जात नाही तो हेतु सिद्धीस जावा एतदर्थ प्रसंगीं कटु बोलावें व प्रसंगीं गोड बोलावें हाच आहे. तथापि ' नवमतवाद ' हा शब्द ऐकतांच कित्येकांचीं मार्थी भडकलीं व हा ' नवमतवाद ' ह्मणजे ' रसेल '-ची आवृत्ति होय असाहि शोध लावण्याचा प्रयत्न कित्येकांनी निष्कारण केला आणि वैयक्तिक उखाळया-पाखाळ्या काढण्यास जाहीरपणें सुरुवात केली. ह्यामुळे जो व्यक्तिगत वाद सुरू होतो तो कोणत्याहि तत्वाचा बोध करीत नाही तर परस्परांच्या मनांत परस्परांविषयी जें किल्मिष भरलेलें असतें त्याचा स्फोट करणेंच होय. ' आह्माला पुढे यावयाचें आहे ', व ' अमका आह्माला पुढें येऊं देत नाही ' ही भाषा कोणाच्याहि तोंडीं असलीं तरी ती खऱ्या कर्तृत्वाचें व शहाणपणाचें दर्शक नसून, मनाच्या थिल्लरपणाचें दर्शक आहे. खरी तत्वनिष्ठा, खरें कर्तृत्व, व खरी निरपेक्ष व निरलस वृत्ति, अंगीं असली ह्मणजे कोणताहि मनुष्य समाजांत सहजगत्या पुढे येतो. त्याला पुढे या असें म्हणावें लागत नाही. पुढें येऊं नकोस असें कोणीं ह्मटल्याने तो पुढे आल्यावाचून थांबत नाही. वास्तविक ' संजीवनी '-मध्ये ' नवमतवाद ' जो शब्द रूढ झाला तो सजातीय वा सवर्णीय प्रीतिविवाह व्हावा ह्या अर्थानें रूढ झाला. बालविवाहाचे दुष्परिणाम अनायासेच शारदाकायद्याने थांबविले आहेत. आणि वीरशैवसमाजांत त्यामुळे सहजगत्याच प्रौढविवाह प्रचारांत येत आहे. प्रौढविवाह

प्रचारांत आला म्हणजे प्रीतिविवाह हा दांपत्य-सुखाचा खरा सहजगत्या मार्गदर्शक ठरतो. अशा परिस्थितींत 'नवमतवाद' ह्या शब्दांत शब्दा-वाचून नवें कांही नाही हेंच स्पष्ट होतें. परंतु विंध्याच्या बुजगावण्यास ज्याप्रमाणे शेतावर पीकाची नासाडी करण्याकरिता येणारीं जंगली श्वापदें बुजून पळतात, तशी स्थिति 'नवमतवादी' शब्दावर कारण नसतां तुटून पडणारांची झाली. तथापि ह्यांत कांही वाईट घडलें असें नाही. पुष्कळदा वाईटांतूनहि चांगलें निघतें त्याप्रमाणे आमच्या कांही नव्या-जुन्या मित्रांनी येथे वीरशैव-प्रेमसंवर्धक मंडळ, श्री पंचाचार्य प्रासादिक मंडळ, वीरशैव – महिलामंडळ, स्थापन करून समाजकार्यास चालना देण्याचा जो उद्योग आरंभिला तो अभिनंदनीय नाही असें कोण म्हणणार ? वास्तविक हा नवा उद्योग असल्यामुळे ह्या सर्वांस कोणीं 'नवमतवादी' म्हटलें तर बिघडतें कोठे ? हे उद्योग आज अपूर्ण असतील तर शुद्ध अंतःकरणाने प्रयत्न झाल्यास ते उद्या पूर्णहि होतील, आणि उमरावतीचा वीरशैव-समाज हा लोकसेवातत्पर आहे हें सर्वत्र प्रत्ययास येईल अशी आम्हाला उमेद आहे. म्हणून ह्या सर्व संस्थांच्या संचालकांचें, चालकांचें, व पदाधिकाऱ्यांचें आम्ही पुन्हा मनःपूर्वक अभिनंदन करतों, व त्यांच्या कार्यांत यश चिंतितों. 'संजीवनी' त्यांच्या कार्याला उपयोगी पडणारी नाही अशी जर त्यांची भावना असेल — नसेल अशीच आमची खात्री आहे—तर आम्ही त्यांना जाहीरपणें आश्वासन देतों कीं, कोणाहि सुबुद्ध, सत्शील, व कर्तृत्ववानाच्या सेवेकरिता 'संजीवनी'-चा दरवाजा खुला आहे. प्रभु-कृपेने मंदिराचे दरवाजे खुले असल्यावर त्यांत प्रवेश करणें हा ज्याच्या - त्याच्या मनोवृत्तीचा प्रश्न आहे. म्हणूनच ह्या मधल्या काळांत उमरावतींत ज्या घडामोडी झाल्या त्यांवरून ह्या शहरांत भांडणें आहेत असा जो गवगवा झाला तो खरा नव्हे, तर तो भांडणाचा सहजगत्या झालेला आभास होय. ध्येय एक, तत्व एक आणि साधनहि एक असल्यावर मतभेदास जागा उरते कोठें ? व सार्वजनिक कार्यांत कलह उत्पन्न होतो तो कसा ? परस्परांचीं मनें परस्परा-विषयी शुद्ध व सोज्ज्वळ असल्यावर समाज-सेवेचें कार्य हाच एक ज्याच्या त्याच्यापुढे प्रश्न असतो व तो परस्परांच्या सहकार्यानें सुटतोच सुटतो. काठीने ज्याप्रमाणे नदीचें पाणी दुभंगत नाही, त्याचप्रमाणे समाजकार्यहि व्यक्तिगत वादाच्या कलहाने दुभंगणार नाही असा प्रत्येकाने विश्वास बाळगावयास पाहिजे.

---

## वीरशैवांचा परिचयपट

'वीरशैवसंजीवनी'-चे वर्गणीदारांकडे परिचयपटाचे नमुने सर्वत्र रवाना झाले होते. परंतु अजून १५-२० परिचयपटां-पेक्षा जास्त परिचयपट भरून आले नाहीत. तरी ज्या वर्गणीदारांचे कडून अजून परिचयपट भरून आला नसेल त्यांनी तो ताबडतोब भरून पाठवावा. ज्यांना परिचयपट मिळाला नसेल त्यांनी किंवा ज्यांचा हरविला असेल त्यांनी आम्हांस कळविल्यास पुन्हा एक प्रत आम्ही पाठवून देऊं. तरी परिचयपट भरून त्वरित पाठविण्याची वर्गणीदारांनी कृपा करावी.

व्यवस्थापक



# स्त्री-सामाजिक सुधारणा

( लेखिकाः— सौ० गंगाबाई पटणे, हेडमिस्ट्रेस, गर्ल्सस्कूल, अक्कलकोट. )

आपल्या समाजाच्या सुधारणेसंबंधाच्या प्रश्नाचा विचार करूं लागले ह्मणजे असें वाटतें कीं, त्यांत कितीतरी बाजूंनी सुधारणा झाली पाहिजे. आणि ही गोष्ट कोणीहि नाकबूल करणार नाहीं. देशाची प्रगति आह्मी आमची सुधारणा कशी करतों यावर बऱ्याच अंशीं अवलंबून आहे.

लग्नाचा मोठा समारंभ होतो आणि तो चार-पांच दिवस चालतो. ही बाब मोठी खर्चाची होऊन बसली आहे. हा खर्च होतां होईल तों कमी करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. ह्या लग्न-समारंभाने पुष्कळ कुटुंबांना जन्माचे रडविलें आहे, एवढेंच नव्हे तर कैक कुटुंबांची धुळदाण केली आहे हें आपण रोज ऐकतों. वीरशैव व ब्राह्मणाशिवाय इतर सर्व जातींत लग्न एका दिवसांत उरकून घेतां येतें, पण अलीकडे इतर जातींचे लोक ब्राह्मणाचें अनुकरण करून आपल्या शक्तीकडे न पहातां पांच दिवस लग्नसमारंभ करूं लागले आहेत. ब्राह्मणांतदेखील पवित्र तीर्थांच्या ठिकाणी लग्न केल्यास सर्व विधी एका दिवसांत उरकून घेतां येतो. अलीकडे ह्या पद्धतीचा वीरशैव-लिंगायतांमध्ये प्रसार होऊं लागला आहे ही आनंदाची गोष्ट होय; परंतु हा प्रसार अद्यापि फारच कमी प्रमाणांत आहे. लग्नाचा समारंभ एक दिवस करा अगर पांच दिवस करा, पण खर्च कमी करण्याच्या प्रश्नाचा विचार करा असें माझें आपल्याला आग्रहाचें व कळकळीचें सांगणें आहे.

अलीकडे लग्नासंबंधाची लाजिरवाणी गोष्ट म्हटली ह्मणजे जबरदस्त हुंड्याची होय. हा व्यवहार जर काय असतो हें आपण पाहिलें तर आपली मुलगी करण्याबद्दल तुह्मी दुसऱ्याला पैसे देतां, किंवा तुमची मुलगी करण्याबद्दल दुसरा तुम्हाला पैसे देतो, ह्मणजे तुमची मुलगी पति विकत आणते, अथवा दुसऱ्याचा मुलगा तुमची मुलगी पत्नी म्हणून विकत नेतो. आणि या व्यवहाराची किंमत पैशाची एक रक्कम असते. खरेंच, माणसांच्या व्यापाराचा हा एक उत्तम धंदा आहे ! एका निराळ्या स्वरूपाचा हा गुलामांचा व्यापार नव्हे का ? ह्या 'कन्याशुल्क' व 'वरशुल्क' यासंबंधीच्या अघोरी चालीचा आमच्या शास्त्रांनी निषेध केला आहे. सुशिक्षित माणसांनादेखील असेंच वाटतें. एवढेंच नव्हे तर हा घाणेरडा व्यवहार करणारांपैकीं कित्येकांना तो नको आहे. पण तो अलीकडे आपल्यांतहि खिळून गेला आहे. तरी तो उपटून टाकणे तुमच्या हातीं आहे. बालविवाह आणि बालवैधव्य यांचा दोष या चालीकडे आल्याशिवाय रहात नाही. ऋतुप्राप्तिनंतर लग्न करणें हें ठीक आहे. अलीकडे 'शारदा कायदा' पास झाल्यामुळे बरें झालेलें आहे. तरीहि पुष्कळ ठिकाणी बालविवाह होत आहेत ही खेदाची गोष्ट होय. या पद्धतीने बालविधवांची संख्या जास्त वाढत आहे. आणि ह्यांची स्थिति दुःखास्पद होत आहे. ह्या हिंदुस्थानांत एका काळीं सतीची चाल प्रबल होती. ह्या चालीने स्त्रीजातीवर आहितकर परिणाम

घडविलेला होता. राजा राममोहनराय हा थोर महात्मा असहायपरित्राणार्थ अवतरला आणि ही चाल बंद करण्याबद्दल त्याने सामाजिक कार्य करणारा अशा दयाळू ग. ज. बेंटींककडून कायदा पास करवून घेतला.आमच्यांतील प्रसिद्ध सुधारणावादी गृहस्थ अकरा-बारा वर्षांखालील मुलींचीं लग्नें न होऊं देण्याबद्दल एकमताने कांही उपाययोजना करण्याचा प्रयत्न करतील तर ही बालविवाहाची चाल बंद होणार आहे. त्यांनी सरकाराकडे जावें आणि ह्यासंबंधाचा कायदा करून घ्यावा. ऋतुप्राप्तीनंतर मुलींचीं लग्नें केलीं तर जातिबहिष्काराची भीति वाटण्याचें मुळींच आता कारण राहिलें नाही. म्हणून या दिशेने सुधारणा होण्यास कांही काळ लागेल ही गोष्ट खरी आहे. सामाजिक सुधारणेविषयी कळकळ बाळगणाऱ्या गृहस्थांनी हा प्रश्न आस्थापूर्वक हातीं घेऊन मोठमोठ्या मठांच्या गुरुंच्या मदतीने योग्य ती सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ' प्रयत्नेन हि सिध्यन्ति कार्याणी न मनोरथैः '

विधवांची स्थिति सुधारण्यासाठी त्यांनी घरबसल्या कशिदा, शिवण, वगैरे करण्याचे धंदे पाहून दिले. मुलींच्या शाळांसाठी शिक्षकिणी तयार केल्या, सुईण-नर्सेची कामें शिकविलीं, तर किती फायदा होईल. अशा बायांची सध्या फार जरूर आहे. शिकल्या—सवरल्या स्त्रीला निर्वाहाचा उद्योग सहज करतां येईल. अशा स्त्रिया घरांत इतर बायकांपेक्षा जास्त उपयोगी पडतील.

वरील सुधारणांना आपलें अंत:करणपूर्वक साहाय्य मिळेल अशी माझी खात्री आहे. हिंदी गृहांची पवित्रतेबद्दल ख्याति आहे. आणि ती पवित्रता कायम राखून तींत सुधारणा करण्याबद्दल माझी सर्व वाचकांना व लेखकांना विनंती आहे. घाणेरडी पुस्तकें आणि अश्लील भाषणें, गाणीं, ह्यांना सर्वांकडून साफ मज्जाव झाला पाहिजे आणि वाईट चालीपासून व वाईट संगतीपासून आमची मुलें दूर राहतील यासंबंधी अखंड खबरदारी घेतली पाहिजे. महाभारतांत मानवी प्रयत्न आणि ईश्वरी इच्छा हीं दोन जीवितसाफल्याचीं उत्तम कारणें सांगितलीं आहेत. प्रयत्न आपल्या हातीं आहे. परमेश्वराची इच्छा आपल्या प्राणिमात्रांच्या अभ्युदयाविषयीं व कल्याणाविषयींच असणार हें उघड आहे.

# गाढ निद्रेंत

लेखक.—
श्री. दिगांबर सोमाप्पा संगेकर,
(I st year arts) चांदूरबाजार.

केल्याने देशाटन पंडितमैत्री, सभेंत संचार ।
शास्त्रग्रंथ विलोकन मनुजा चातुर्य येतसे फार ॥

उपरिनिर्दिष्ट आर्येवरून माझें मनोगत वाचकांच्या लक्षांत आल्यावाचून राहणार नाही. या लेखांत चार मित्रांनी (श्री. सांभाप्पा रामाप्पा चाकोते, श्री. मनोहर रुद्राप्पा मिटकरी, व श्री. नागोराव विश्वनाथआप्पा कोल्हे) अमरावतीपासून अमळनेरपर्यंत केलेला सायकल-प्रवास आहे. या प्रवासामुळे मला जो माझा समाज इतर समाजांच्या मानाने, तद्वतच सुधारणाशिखराची एकएक पायरी चढत असलेल्या या युगाच्या मानाने, किती गाढ

निद्रेंत आनंद मानीत आहे हें पाहून खेद झाला, ह्या सर्वांचें वर्णन देण्याचे अगोदर 'well begun is half done' ह्या म्हणीचा आश्रय करण्याकरिता प्रथम स्वकृत आर्येने प्रभूस वंदन करून नंतर मनःगृहाच्या दाराची कडी उघडतों.

साराया अज्ञतमा आम्हां करिं या अज्ञाच मानूला ॥ जो स्वप्रकाशयोगें दाविल प्रभुजी सुलभ्य मार्गाला ॥

प्रथमकार्य तर एकदांचें संपलें. आता दुसरें कार्य म्हणजे प्रवासवर्णन हें होय. खरोखरच सीतेने रामायणांत उद्गारलेलें वाक्य, 'उत्कट इच्छा व जबर महत्वाकांक्षा असून आयुष्य पुरेसें असल्यास त्या कदापि पूर्ण झाल्याशिवाय रहात नाहीत' हें अगदीं खरें आहे—असें मी स्वानुभवावरून सांगू शकतों. प्रवासास जावें असे विचार किती तरी अगोदरपासून मनांत घोळत होते. परंतु ज्याप्रमाणे मनुष्याचे मागोमागच त्याची छाया धांवत असते, त्याचप्रमाणे ह्या विचारांचे पावलावर पाऊल देऊनच अडचणी ह्या दत्त म्हणून उभ्या रहात. अखेर जबर महत्वाकांक्षेने अडचणींचा पूर्णपणें मोड होऊन परीक्षा संपतांच नऊ दिवसांनी म्हणजे ता. ३०-३-३६ रोज सोमवारीं आम्ही प्रवासास निघालों. प्रवासाची वेळ ही सकाळची व सायंकाळची असे. पण तीन दिवसपर्यंत तर वायुराजाने आम्हांस प्रवासाचें मेघुर चित्रच दाखविलें. एकदांचें हें प्रवासाचें चित्र पाहून पुढे जात नाही तोंच पुन्हा ३ दिवसांनी सहस्रकिरणाधिपतीने तर खरोखरच आपलें उग्र स्वरूप धारण करून आम्हांस 'न भूतो न भविष्यति' असा त्रास दिला. तीन वेळ आम्हीं रात्रीं १० वाजेपर्यंत प्रवास केला. यावेळेस मात्र आनंद होऊन सुधाकराच्या मधुर करांचा आस्वाद आम्हास चकोरपक्षाप्रमाणे मिळत असे. अशा रीतीने हा प्रवास करीत असतांच त्याला मध्येंच म्हणजे अमळनेरलाच समाधी मिळाली. हा एकंदर ३०० मैलांचा प्रवास १० दिवसांत आटोपला. हा सर्व प्रवास बॉम्बे-रोडने झाला. ह्या प्रवासांत त्रास बराचसा होऊनसुद्धां कोणी आजारी झाले नाही याचें कारण म्हणजे, "तुका म्हणे तया भार घातलेंया । उपेक्षिना माझा दयासिंधू ॥" हेंच होय. प्रेक्षणीय स्थळें पं. हंस मुंगसाजी महाराजांची समाधी धामणगाव, श्री. स. गजानन महाराजांचें मंदिर शेगांव, बाळापूरचा किल्ला व छत्री, एदलाबादचें मुक्तामाईचें ठाणें, व संत सखाराम महाराजांची अमळनेरच्या नदीपात्रांतील समाधी हीं होत.

अशा रीतीने प्रवासावतार संपला. परंतु संजीवनीपानामुळे जें नवचैतन्य मला प्राप्त झालें होतें त्यायोगें समाजाची जी माहिती मिळाली ती लिखाणांत उतरवितों. बाळापूर, आकोला, खामगांव, व मलकापूर येथील मठांचा आम्हीं आश्रय घेतला होता. प्रत्येक मठास मोठें प्रवेशद्वार होतें. परंतु चारहि मठ म्हणाल तर त्यांतील एकसुद्धा सुस्थितींत नव्हता. खामगांव व मलकापूर येथील मठ तर कांही विचारूच नका. आकोला व बाळापूरचा मठ हे भव्य खरे; पण त्यांची स्थितिसुद्धा तीच. बाळापूरचा मठ तर दगडी व किल्ल्यासारखा आहे. पण पुरातनत्वामुळेच म्हणा ना, तो मधल्या भागांत मोडकळीस आला आहे. ह्यांत आकोल्याचे मठाधीश हे अगदीं तरुण (वय वर्षें २४ पर्यंत) असून त्यांचें माझ्याशीं बराचवेळ बोलणें झालें. त्यांतील एक वाक्य त्यांचेच बंधु लक्षांत ठेवतील काय? ते म्हणाले, 'मठांच्या उत्पन्नामधून खर्चापुरताच पैसा मठाधिपतींना देऊन बाकीचें सर्व उत्पन्न हें समाजांतील दीन विद्यार्थ्यांच्या किंवा समाजाच्या इतर योग्य कामीं खर्च व्हावें.' खरोखरच हें अभिनंदनीय नाही काय? अहाहा, अखेर तरुणसमाजच नौकेचें सुकाणू ठरणार ना! may god bless them!

एक समाजांतील व्यंग दिसून आल्यावर विचार करतांच समाजांतील दुसरें व्यंगसुद्धां दिसून आलें तें ह्मणजे समाजांतील कितीतरी लोक शिक्षणाचे अभावीं अज्ञानांधकारांत चांचपडत आहेत. ज्यांना अमरावती कोठे आहे, समाज ह्मणजे काय, हेंसुद्धा माहीत नाही असे वीरशैव बांधव मला आढळून आले. मग अशा बापड्यांना सुधारणापथावरून फिरणाऱ्या नूतन जगाची काय कल्पना! तरी 'Frog in the well' अशा तऱ्हेची परिस्थिति झुगारून देण्यास ज्ञानाची आवश्यकता नाही काय? समाजांत दैन्यावस्था-सुद्धां दिसून येते. अशा प्रकारची समाजाची स्थिति दूर करण्यास आपसांतील द्वैतास विसरून माझे वीरशैव बांधव तयार होतलि काय? तमाच्या खोलदरींत असलेल्या ह्या प्रिय वीरशैव-समाजाला गाढ निद्रेंतून जागें करण्यासाठी अद्वैत-भावनेची साक्षात् मूर्ति अनंत तत्वाची खाण असा तो जगन्नियंता प्रभु सांब बसवदेवाचा दुसरा अवतार धारण करणार नाही काय?

आभारप्रदर्शनः—श्री. देवाप्पा साखरे, कारंजा; श्री. नारायणराव बालटे मुर्तिजापूर; श्री. गुरुमूर्ति लिंगूअय्या बाळापूर; श्री. काशिनाथआप्पा मिठकरी खामगांव; श्री. मलकापूरकर स्वामी, श्री. बाळकृष्णाप्पा नांदुरा; श्री. सिद्धेश्वरआप्पा नगरे, जळगांव; श्री. नानाप्पा कापसे, अमळनेर; वगैरे मंडळींचें त्यांनी दिलेल्या प्रेमादरयुक्त आश्रयाबद्दल मनःपूर्वक आभार मानून मी हा लेख संपवितों.

---

# जंगम-जप्तीवारंट

लेखकः— आर. शंभूनाथ ( जन्मजात जंगम )

( सदरील लेखांतील विधानें चुकीची अगर खोडसाळ आहेत असें सिद्ध करणारास अवश्यमेव आव्हान आहे. )

दुरखास्त, प्रोसेस, जप्तीवारंट वगैरे कोर्टाच्या किचकट कामकाजांत उजळ माथ्याने वावरणारे शब्द निर्जीव असले तरी त्यांच्या नामोच्चारांतच असा कांही रुबाब भरलेला आहे कीं, सहसा त्यांच्या कचाट्यांत न सांपडण्याविषयी प्रत्येक अब्रूदार माणूस जागत्या जाणीवेने जपत असतो. कै. नाट्यसम्राट, आणि एक नामांकित खंदे विनोदी लेखक गुरुवर्य गडकरी राम गणेश, यांनी या इरसाल शब्दांच्या बेताल तालावर प्रेमसन्यास नाटकांतील गोकुळ-सारख्या विनोदी पात्राला मनमुराद नाचवून, प्रेक्षकांची हंसतां हंसतां मुरकुंडी वळवली, आणि सामाजिक व्यवहारांतहि या शब्दांचा प्रत्यक्ष प्रयोग होण्याचा योगायोग जर का एखाद्या अब्रूदार असामीवर गुजरला तर प्रेक्षकांमधून हास्याचा हलकल्लोळ उठतो, आणि प्रत्यक्षाला मात्र जीव नकोसा होतो. तसलाच प्रसंग आज आमच्या जंगम (वीरमाहेश्वर) वर्गावर कोसळला आहे असें या जप्ती-वारंटाच्या कचाट्यांत सांपडलेल्या वीर माहेश्वरांच्या सरोष सर्वतो-मुखी अर्जावरून आढळून येत आहे. आणि है जंगम जप्तीवारंट नवमतवादी अर्थात् प्रागते

वितंडवादी अशा लोकांच्या चिथावणीवरून कोर्ट कचेऱ्यांतून उदरंभरणाकरता कज्जेदलालीचा धंदा करणाऱ्या लोकांनी मुद्दाम आमच्या पिढीजाद उच्चकुलोत्पन्न आणि पुराणप्रिय रूढीपरंपरेच्या अब्रू (!) वर काळें फासून आह्मांला समाजांतून उठविण्याच्या हेतूने काढलें आहे असें [ आफेडेवीट ] प्रतिज्ञापत्र त्यांनी ( जंगमांनी ) दाखल केलें आहे. अस्तु !

रोहिणखेड ( वऱ्हाड ) येथील ता. १९।५।१६ च्या परिषदेंत जंगमअधिपतित्वाविरुद्ध पास झालेला ठराव आणि समारोपादाखल सभाध्यक्षांनी केलेल्या भाषणाचा सूर एकमेव आमच्या वृत्तीविरुद्ध होता अशी नुसती कानकुणकुण वऱ्हाडांतील कांही परंपरागतिक गुरुवर्गीयांकडून कांहीकाळ चालली होती, आणि लवकरच या कुजबुजीचे पडसाद श्रीमंतांच्या ( अध्यक्ष श्रीमान् बाबासाहेब देशमूख जहागिरदार पारवा ) पूर्वज आणि पूर्वचारिऱ्याच्या उदार दातृत्वाच्या । दडपणाखाली नामशेष झाले असते. परंतुः—

तारीख २।३ जूनच्या रायचूर येथील वीरशैवमहासभेच्या आधिवेशनप्रसंगीं, महासभेचे अध्यक्ष दिवाणबहादूर कंबळी यांनी अगदी आमच्या काळजाला हात घालण्याचाच अव्यापारेषु व्यापार करून चांगलेच हात धूवून घेतले. आमच्या जन्मसिद्ध जंगम वृत्तीविरुद्ध जंगमजप्तीवारंटाचा कच्चा खर्डा तयार करून दरोबस्त आमची चैनचमन बंद करण्याकरता दरखास्त दाखल केली. दिवाणबहादुरांची ही वृत्ति त्यांनी आजवर मिळविलेल्या, " कर्नाटकप्रांतीय कट्टे ब्राह्मणेतर " या नांवाला सर्वस्वीं साजण्यासारखीच आहे; इतकेंच नाहीतर त्यांच्या आजवरच्या पदव्यांच्या प्रभावळींत " कट्टे वीरमाहेश्वरेतर अर्थात् जंगमेतर अशा एका बहुमानाच्या किताबतीची आणखी एक जादा भर पडली. आणि आजवर ब्राह्मणेतरपक्षांनी जसा ब्राह्मणांचा छळवाद मांडून त्यांना सळो कीं पळो करून सोडले तद्वतच आता हे आह्मा जंगमांनाहि छळल्यावाचून रहायचे नाहीत असा शंखनाद जंगमांतील एक्स्पर्ट शंखवादनपटूंनी चालविला आह्मीहि या उभय अध्यक्षमहाशयांना भीक घातली नसती. कारण, आह्मीं भीक घालणाऱ्या नेभळट वीरशैवांच्या कुळांत जन्मलों नसून, भीक मागणाऱ्या उच्च जंगम कुळांत जन्मलों आहोंत. यांचेंच नव्हे तर यांच्या पूर्वजांचेंदेखील बारसें जेवून उलट गुरुदक्षिणादेखील आह्मीं हातसफाईने आणि हातचलाखीने पचविल्या आहेत. ते आह्मी यांना का हार जाणार ? असेंहि कित्येक बोलतात. पणः—कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ झाला ! जन्मजात वीरमाहेश्वर [ जंगम ] कुलोत्पन्न आणि सुविद्य ह्मणवणाऱ्या सोलापूरच्या सुविख्यात बॅरिष्टर सरदारांच्या पत्नी श्रीमती पंचव्वाबाई यांनी कीं हो महिलासभेच्या अधिवेशनप्रसंगीं आपल्या जातकुळीचा अभिमान अजिबात सोडून दिवाणबहादुरांनी आमच्याविरुद्ध काढलेल्या जंगम जप्ती वारंटाच्या दरखास्तीवर ' जंगमांना जेवणबंदी ' असा शिक्कामोर्तब निधड्या वृत्तीने खुशाल ठोकून दिला ! आमची रसद बंद केली, आम्हाला देशोधडीला लावण्याचें महत्पाप केलें ! आमच्या जीवितसर्वस्वावर गदा आणली ! जीवनाधार अशा आमच्या जन्मसिद्ध ' परान्नं पुष्टिवर्धनम् ', पवित्र हक्काची हकालपट्टी करून, परमपूज्य ' प्रत्यक्ष जंगमस्वरूप शिवाचें, असें आमचें उच्चपद पायदळीं तुडवलें ! हरहर ! महत्पाप ! महत्पाप ! ! शिवाशिव ! केवढी निर्दय आणि निंद्य वृत्ति ही ! हें इंग्रजी शिक्षणाचें फळ बरें - इंग्रजी शिक्षणाचें फळ ! तें असेंच, कडू, सडकें, आणि घाणेरडें, विषारी असायचें ! या आजकाळच्या तरुणांना आचार नाही, विचार नाही, धर्म नाही, कर्म नाही, कांही नाही. यांनी जणु सबगोलंकार करण्याचेंच कंकण बांधलें आहे. ' अखिल-वीरशैवांनी परंपरागत रूढीला शिरोमान्य मानून

आमच्या पायावर मिटल्या डोळ्यांनी लोटांगणें घालायची तों आह्मालाच आता या नवमतवादी अर्थात् वितंडवादी फाजील लोकांच्या पायांवर साष्टांग नमस्कार घालण्याचा दुर्धर प्रसंग ओढवला आहे ! शंभो ! शंभो ! हर ! हर ! हर ! अशा प्रकारचे वार्तालाप रायचूर-महासभेपासून अलीकडे जंगमवर्गाकडून ऐकायला येऊं लागले आहेत. कुठे कुठे या प्रसंगाला तोंड देण्या-करता सोवळ्या सभाहि कोवळ्या करवल्यांना हाताशीं धरून ( ह्मणजे हातांत हात घालून नव्हे हो ) चालू आहेत. कांही तापोनिर्धींनी आपली घोर तपश्चर्या (?) खर्चीं घालून भस्माच्या चिमूटी भरून नवमतवाद्यांना भस्मसात करण्याच्या आपल्या भस्मधारी आराध्य-देवतेच्या शपथेने प्रतिज्ञा केल्या आहेत. पण या त्यांच्या अकांडतांडवनृत्याचा निनाद त्यांनी कितीहि शंखनाद करून नवमतवाद्यांवर विजय मिळवण्याच्या अट्टाहासाने चालविला तरी आह्मी नवमतवादी 'हाथी चालत अपने चालसे.... भूकत वाको भूकवा दो,' अशा प्रतिज्ञेनेच आमचें प्रत्येक पडतें पाऊल नेटाने स्थिर करीत आमचा मार्ग निष्कंटक करून घेऊं असा निधडा निर्धार जाहीर करीत आहेत.

साधक-बाधक दृष्टीने सदसद्विवेकबुद्धीला जागृत करून या वादांची मीमांसा करूं लागल्यास सत्याचा काटा नवमतवादी लोकांच्याच वाट्याकडे झुकलेला दिसतो. आमच्या जंगम ( वीर माहेश्वर ) बंधूंना आमचा असा सीधा साधा सवाल आहे कीं,— 'भवति भिक्षांदेही, हाच आमचा जन्मसिद्ध हक्क अशी परंपरागत फाजील दुबळी समजूत उराशीं बाळगून जंगमांनी कोणत्या महत्पुण्याची जोड जोडली आहे ? कसलीं महत्कृत्यें केलीं आहेत ? कसले ध्वज फडकावले आहेत ? सामाजिक बाबतींत कोणतें उच्च स्थान पटकावलें आहे, हें सोदाहरण सिद्ध करून दाखवावें ! जन्मजात जंगम या नांवावरच जगांतील यच्चयावत् वीरशैवांनी आमचा उदोउदो करून आह्माला डोकीवर घेऊन नाचावें, आमच्या पादोदकाला शिवजटेंतील त्रिभुवनपावनी गंगोदक समजून आपला उद्धार करून घ्यावा, आह्मी सांगूं तोच खरा धर्म मानून मेंढरागत माना वाकवाव्यात, आणि आमच्या पावलांच्या तालावर सदासर्वदा आपला तोल सावरून मार्गक्रमण करावा, असा अट्टाहास आह्मीं (जंगमांनी) कां ह्मणून करावा ! काल-परिस्थितिनुरूप, समाजसुधारणांची क्रांति ही ठरलेलीच आहे. प्रत्येकाने स्वतःचें हितानहित समजून आपला उदयकाल ओळखून वागण्याचा हा काल आहे. परंपरागतिकत्वाची कुरघोडी नवमतवादी विमा-नोड्डानाच्या वाढत्या वेगापुढे टिकाव धरील अशी समजूत उराशीं बाळगण्यांत शहाणपणाचा लवलेश नसून, मूर्खपणाचें उघड उघड प्रदर्शन मांडण्यासारखें आहे हें अजूनहि सोवळ्या रूढीप्रिय मूढांना कसें कळत नाही याचेंच आश्चर्य वाटतें आह्माला ! आमच्याच वर्गापुरता आह्मी विचार करूं लागल्यास 'भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ' या संतवचनाचा कधीकाळीं स्वप्नांतदेखील ' आमच्या जंगमांनी विचारविनिमय केला असेल असें दिसत नाही। व्यक्तीच्या उच्च महत्वाकांक्षेला मातीमोल ठरवणारी, ऊर्जितावस्थेच्या मार्गावरून मार्ग खेचणारी, स्वाव-लंबनाच्या नरड्याला नख लावणारी, आणि माणुसकीला पारखें बनवणारी भिक्षावृत्तिच आमच्या जंगमांना कां आणि कशी प्राणप्रिय वाटते हें कोडें प्रत्यक्ष ब्रम्हदेवाला तरी उलगडेल कीं नाही याचीच शंका येते. या भिक्षावृत्तीचा धिःक्कार कंठरवाने ओरडून कुत्र्यासारखा निर्बुद्ध प्राणीदेखील यज-मानाच्या दारावर 'गुरुधर्मकोराज भिक्षा ' असा साद घालणाऱ्या आमच्या जंगमांचा प्रतिकार करतांना आढळतो. बंधुंनो, तो तुमच्या अंगावर त्याचा स्वभावधर्म ह्मणून भुंकत नसून, आपल्या भिक्षावृत्तीचा धिःकार करून तो आपल्या तोंडावर थुंकतो असें नाही का तुह्माला वाटत ? जगाच्या कुठल्याहि इतिहासांत भिक्षावीरांचें असें एक तरी

उदाहरण दाखवितां येईल का कीं ज्याने या भिक्षेच्या बळावर घरावर सोन्याची कौलें चढविलीं, का एखाद्याने आपल्या बायकापोरांच्या गळ्यांत जडजवाहिराची शोभा मढवली ? उलट, प्रत्येक भिक्षावीराच्या घरादाराचें आणि बायकापोरांचें वर्णन करतांना, अंगा-खांद्यावरील वेषभूषेंत महार-मांगांच्या ( आजकालच्या नव्हे हो ) दैन्याची दीनवाणी कळा, आणि घरादारामधून स्मशानाची अवकळा हेंच एकजात दृष्टोत्पत्तीस येतें !

आमच्यांतील कांही भिक्षावीर आमच्या मठा-धिपती-पटाधिपतींकडे बोट दाखवून त्यांच्या वैभवाची टिमकी वाजवतात. आणि हे पहा जंगमांतील वीर, महावीर, वैभवशाली अतिवीर म्हणून भिक्षावृत्तीच्या थोर कर्तबगारीची निर्लज्जपणें ग्वाही द्यायला तयार असतात. पण या शहाण्यांना हें उमगत नाही कीं, हें त्यांचें स्वतःचें वैभव नसून समाजहितचिंतकांनी समाजोन्नतीच्या उच्च भावनेने निर्माण करून ठेवलेल्या वारुळावरील हे आयत्या बिळावरले नागोबा आहेत. आपल्या अन्नदात्यावर ज्वलज्जहाल विषारी फूत्कार करणें आणि आपला वचक लोकांवर कायम राखणे हेंच यांचें ध्येय ! सारासार विचारशक्तीच्यां कसोटीवर या सुवर्णमूर्तीला कसास लावून पहातां सन्यस्तवृत्तीच्या वेषभूषेचा मुलामा चढवलेल्या अस्सल पितळी पुतळ्याशिवाय यांच्यापैकीं शेंकडा नव्याण्णव व्यक्तींमध्ये दुसरें कांहीच आढळावयाचें नाही. आणि ही बेगडी बेडी, हा अवजड लोखंडी लंगर, समाजाच्या गळ्यांत आता यापुढे अधिक वेळ राहिल्यास त्याची खिळखिळीं झालेलीं हाडें जमीनींत गाडून टाकावीं लागतील अशी नवमत-वाद्यांची खात्री पटली आहे. आणि म्हणूनच नवमतवादी तरुणांनी छातीठोकपणें जंगमजप्ती-वारंटासारखे ठराव पास करून ह्या प्रश्नाला तोंड देण्याचें साहस केलें आहे. या नवमतवाद्यांच्या साहसाला आम्हीं तरी दोष कां आणि कसा द्यायचा ? भगवी वस्त्रें, दंडकमंडलू, जटाभारयुक्त अगर पूर्ण नारळकवचीकवटी, त्रीपुंड्रभस्मांगलेपन, खडावांचा खडखडाट, हीं सन्यस्त वृत्तीचीं द्योतक चिन्हें भोळ्याभावड्या देवभोळ्या पापभीरु लोकांच्या सोज्ज्वळ अंतःकरणाला भुरळ घालण्या-इतकी खंबीर असतील; पण या पवित्रतम वेषाला साजेसें उच्चतम अंतर्याम जर याच्या जोडीला नसलें तर समाजाकडून निराळ्याच प्रकारें पाद्य-पूजा आणि विद्यावे उरकले जातात हें विसरतां कामा नये. काम-क्रोधादि षड्रिपूंवर ज्यांनी विजय संपादन केला तोच खरा संत, तोच सत्य विरक्त बनूं शकतो. आणि तसल्याच परमपवित्र पूज्य विभूतीच्या चरणांवर पृथ्वीपतीहि मस्तक नमवतो — मग इतरेजनांची मात ती काय ? आमच्या जंगम वीरमाहेश्वर बंधूंना आमची आग्रहाची विनंती आहे कीं, त्यांनी स्वतःचें तपोबल वाढवावें, समाजकार्यी वारा वाहील तशी पाठ देऊन समाजाचें हित तेंच आमचें हित अशा भावनेनें दूरदृष्टीने साधक-बाधक विचार करून भिक्षावृत्तीला फाटा देऊन स्वावलंबी बनण्याची आणि इतरांना बनवण्याची प्रतिज्ञा करावी. निष्कारण आपला दाम खोटा, आणि सत्य कथन करणारांच्या माथीं त्रागयाने सोटा हाणण्याचा मूर्खपणा पदरीं घेऊं नये ! उलट, आमचा उर्जितकाल जवळ आला या नवमतवादी लोकांनी आमची आंधळलेली दृष्टि चुरचुरित अंजन घालून सत्याचा आणि समाज-सेवेचा एक उत्कृष्ट मार्ग आम्हाला दाखविला याबद्दल नवमतवाद्यांचे आभार मानावेत ! आमच्या या लेखांतील विधानांनी कोणाकोणाची गैरसमजूत होते आणि कोणकोण या आमच्या नवमतवादाला येऊन मिळतो हेंच आतां पहाणें आहे ! सत्यमेव जयते नृणाम् !

---

## महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळाची घटना

*कांही अपरिहार्य कारणामुळें पुढील अंकीं प्रसिद्ध करण्यात येईल.*

वि. तु. चौधरी,
ज. सेक्रेटरी.

लघुकथा ६ वी. भावचित्रण.

# अश्रूंची कैफियत

( लेखक.—श्री. सिद्रामआप्पा एस. कुऱ्हे, अमरावती. )

विजयेला आपलं चुकतंय कोठे तें कळेना ! आजपर्यंत देशमुखांच्या घरादारांत खेळणारा निर्व्याज आनंद व समाधान आजच कसें हरपलें ह्याची ती मनाशीं वारंवार चौकशी करी, परंतु सारखा विचार करूनहि घरांतील असमाधानाचें कारण तिला सांपडे ना. खरं पाहिलं तर घरांत माणसें सातच. ती, तिचा पती अनिलबाबु, तिची २ लहान मुलें, सासु, तिचा दीर रमेशबाबु, व तिची धाकटी जाऊ सायंप्रभा रमेशची पत्नी. रमेशला सर्व घरांत 'बाबू' व सायंप्रभेला 'प्रभा' म्हणूनच हांक मारीत असत.

विजयेचा सासरा वारल्यानंतर जवळ-जवळ घरांतील सारा कारभार तिलाच पहावा लागे. म्हातारी सासू तर बिचारी असून-नसून सारखीच. तिची कथा-पुराणेंच संपतां संपेनात, व त्यापुढे तिला घरांत लक्ष द्यावयास वेळच मिळत नसे. विजयेचा नवरा अनिल ह्याला ऑफिसची कामें सांभाळतां सांभाळतांच नाकीं नऊ येत असत. व त्यांतून त्याला नुकतीच सरकारी नौकरीची बढती मिळाली होती, व तो एका गांवीं ऑफिसिएटिंग तालुकाधिकारी म्हणून नेमल्या गेला होता. व अर्थातच त्या जागीं त्याची कायम नेमणूक होणें हें त्याच्या अंगहुशारीवर व कामावर अवलंबून होतें, व त्या आशेने तो सारं लक्ष आपल्या कामांत घालीत असे.

कुंडलपूरला अनिलबाबूंचें वडिलोपार्जित घर होतें व तेथेच सर्व मंडळी रहात असत रमेशला अनिलबाबूंनीच शिक्षण वगैरे दिलें होतें, व तो नुकताच लॉ पास होऊन वकीली करूं लागला होता.

विजयेची तक्रार बाबू ( रमेश )-बद्दल नव्हती. उलट त्याचेवर तिचें निरतिशय प्रेम होतें—लहानपणापासून तिने त्याला वाढविलें होते—निरनिराळे हट्ट पुरवून वाढविले होते. पाठच्या भावापेक्षाहि त्याचा तिला अधिक लळा होता. घरांतील ह्या नितांत शांततेवर, आनंद व समाधानावर 'सायंप्रभे'-च्या आगमनाने विरजण पडलें होतें. निदान विजयेची तशी समजूत झाली होती. अलीकडे तर 'विभक्त' रहाण्याचेच विचार सदानकदा तिच्या मनांत घोळत असत. परंतु तिच्या ह्या विचारांना अनिलबाबूंची संमति मिळेना ह्याचें शल्य रात्रंदिवस तिला चैन पडूं देईना; व ह्याच चिंतेने वेळी-अवेळीं तिच्या नेत्रावाटें अश्रुप्रवाह सुरू असे.

'सायंप्रभा', बाबू तिला 'प्रभा' ह्याच एकेरी नांवानें हांक मारी व त्यामुळे कुटुंबांतहि तिचें 'प्रभा' हेंच नांव रूढ झालें होतें. बाबूच्या

लग्नापासून घरांतील आनंद मावळला अशी विजयेची मुख्य तक्रार होती. संथपणाने तिच्या नेत्रावाटें सुरुं असलेला अश्रुंप्रवाह सभोवतालच्या जगाला जणुं कांही पुढील कैफियतच सादर करीत होता.

" आणि तसं पाहिलं तर मामंजीच्या देहांवसानानंतरहि आमचे घरांत सुख व समाधान नांदत होतें. सासूबाई जरी इकडची काडी तिकडे करीत नसत, तरी घरांतील कारभारांत त्या नसती ढवळाढवळ करीत नसल्यामुळे, कुणाला काडीचीहि तक्रारीला जागा देत नसत. बावू [ रमेश ] तर आम्ही आमच्या घराचं भूषण समजत असूं. बावूचा स्वभाव सरळ निष्कपटी, थट्टेखोर, व खेळकर आनंदी वृत्तीचा— चांगला कॉलेजांत जायला लागला तरी त्याची वहिनीची थट्टा, लटकी रुसणी-फुगणी, बंद पडेनात. आणि मला तरी बावूखेरीज कधी करमेना. सायंकाळी बावू आणि मी चार घटका फिरायला जाऊन मोकळेपणानें हंसत-खिदळत गप्पा मारल्या नाहीत तर कांही तरी हरवल्यासारखंच होऊन जाई. कॉलेजांतून मधल्या सुट्टींत एखादे वेळीं बावूचं चहाला येणं झालं नाही तर मला कसं चुकल्या-चुकल्यासारखं होत असे. आणि तिकडनंहि ऑफिसांतून घरीं येणं झाल्यावर प्रथम चौकशी बावूच्या मधल्या चहापाण्याचीच ! रात्रीच्या शांत वेळीं समोर निजलेल्या दोन चिमुकल्या जीवांच्या साक्षीनें बाबूच्या भावी संसाराची कोण पण मनोराज्यें आम्ही करीत असूं ! ! पण ह्या साऱ्या गोड आठवणींची व मनोराज्यांची राखरांगोळी आमच्या कुटुंबांतील प्रभेच्या ' आगमना '-ने झाली.

तसं पाहिलं तर प्रभाच्या वर्तनांत नांव ठेवण्यासारखं असं कांहीच नव्हतं. पण तिचा तो पेहराव व घरांतील मंडळींशीं वागण्याची तऱ्हाच मुळी कांही निराळी. आतां लग्न कां ती आहे ? पण घरांतील कामाला हात लावील तर, शपथ ! तिचा सारा वेळ पुस्तकं वाचण्यांत— तीं कलाकुसरीची कीं काय मेली कामं म्हणतात तीं करण्यांत - कशिदा, भरतकाम, ह्यांतच सारा वेळ जातो.

काय ती लुगडे नेसण्याची तऱ्हा तरी ! आणि केस तरी किती चमत्कारिक तऱ्हेने बांधते ! सरळ भांग पाडणं तर तिला माहितच नाही. तिचा निव्वळ १ तास तर केवळ केशभूषेंत जातो. आम्ही नाही बाई अशा नट्टयापट्टयाच्या तऱ्हा पाहिल्या ! ! स्त्रियांना एवढे चोंचले हवेत तरी कशाला ? मला तो वाकडा भांग ठाऊक नाही, कीं नटण्या-मुरडण्याच्या तऱ्हा माहित नाहीत. चांगला सरळ भांग काढते, व्रतवैकल्यें करते, उरला वेळ कथापुराणांत घालविते. आणि घरची कामें उरकवून वेळ कसा तो मेला बाहेर पडायला मिळतच नाही ! हिचं आपलं सारंच निराळं ! ती काय म्हणे अलीकडे कुठल्याशा बायकांच्या मंडळाची सभासद झाली आहे ! बायकांना कशाला ह्या सभा नी मंडळं हवींत ? आणि स्त्रियांना एवढे चोचले हवेत तरी कशाला ! आणि त्यांनी ह्या नसत्या भानगडींत पडावं तरी कां ? चूल आणि मूल हेंच खरं स्त्रियांचं कार्यक्षेत्र आहे. व हेंच सुगृहिणींचं भूषण आहे.

स्वयंपाकाचं नांव काढलं कीं तिच्या कपाळाला आंठ्या पडतात व कुठल्या तरी सभेच्या निमित्तानें बाहेर पडते. मुलांची किरकीर मला नको म्हणून ती सारखी म्हणते. तरी बरं झाल माझी दोन्ही मुलं पिरपिर लावण्याइतकी लहान राहिलीं नाहीत !

आज कुठं आम्हाला जरा बऱ्यापैकी दिवस दिसायला लागले व तेहि आम्हीं सर्वांनी काटकसरीने व नाना खस्ता खाऊन संसार केला म्हणून ! पण हिला काय त्याचं ! ही श्रीमंतींत वाढलेली व लाडावलेली पोर - हजार तऱ्हांनी हौसेचे प्रकार घेऊन आमचे घरांत आली. परंतु घरांतील जबाबदारी अंगावर घेऊन कामाला हात लावील तर शपथ !

आणि मींच एकटीने काय ह्मणून मर मर मरावं ? तिला नाही का ह्या घरांत राहावयाचं ?

आणि बावू तरी, आता पहिला राहिला कां ! काय ह्या प्रभेने भुरळ घातली कांही कळत नाही. आतां वहिनीची आठवण देखील येत नाही. तिच्या गुलगुल गोष्टींतून व नाटकें-सिनेमांच्या कार्यक्रमांतून माझ्याशीं बोलायला बावूला अलीकडे वेळ मिळेल तर शपथ ! आणि ह्या दोघांना घरांत कांहीहि कामें न करतां आयतोबासारखी चैनच करावयाची असल्यास त्यांनी स्वतंत्र बिन्हाड कां करूं नये ! !

ह्मणजे तरी कळेल कीं संसार ह्मणजे फुल-पांखरांचं जीवन नव्हे; तें एक कटुकर्तव्य आहे ! व हें अंगावर जबाबदारी पडल्याखेरीज त्या दोघांनाहि कळणार नाही.

आणि तिकडनं माझ्या ह्या ह्मणण्याला किती तरी वेळा रुकार देण्यांत आला पण प्रत्यक्ष कृतीच्या वेळी मात्र त्यांचं बंधुप्रेम आडवं येत. शर्थ झाली बाई त्यांच्या बंधुप्रेमाची ! स्वत:च्या सोन्यासारख्या दोन मुलांच्या पुढील बऱ्या-वाईटाची कांहीच का ह्यांना काळजी असूं नये ? बावूला शिक्षण दिलं - संसाराला लावलं — आतां ह्यांनी आमच्यावर भार कां टाकावा ?

स्वतंत्र बिन्हाड करतें म्हणून कितीतरी दिवसांपासून मी ह्मणतें आहें. पण तिकडनं ह्या नाही त्या निमित्तानं मोडता घालण्यांत येतो.

तरी एक सुवर्णसंधि आयती चालून आली होती.—झालं काय कीं, त्यांची कांही महिन्यां-करितां नुकतीच एका गांवीं बदली झाली होती—व ते एकटेच कामावर रुजू झाले होते. व मीहि "हवा पालटण्याच्या" निमित्ताने माहेरीं निघून गेलें. परत आल्यावर मीं गांवांतच निराळं बिन्हाड थाटलं, व तिकडची परत येण्याची वाट पाहूं लागलें.

मधल्या वेळांत बावूनी एकत्रच राहण्याकरिता बऱ्याचदा माझी मनधरणी केली, बावूला सोडून मलादेखील दूर राहवेना—पण ह्या चोवीस तासांच्या आनंदाला व करमणुकीला त्या मेल्या प्रभेकरिता मी दूर लोटावयाला तयार झालें। बाबूंच्या मनधरणीने माझंहि मन द्रवत असे. माझा राग बावूवर का होता ! मला त्या प्रभेचा वरचढपणा व बेफिकीर वृत्ति सहन होत नव्हती. मी बावूला अखेर कौटुंबिक समाधान व सुखाच्या दृष्टीने. " विभक्त राहणी "-च बरी असं मोठ्या नाइलाजाने सांगितलं.

आह्मांला भेटावयाला तिकडची स्वारी सुट्टीत जेव्हा गांवीं आमच्या स्वतंत्र बिन्हाडीं आली तेव्हा मीं त्यांना ' स्वतंत्र बिन्हाडा '-ची कारणें व सध्यां घरांत नांदणारं सुख व समाधान ह्यांचंहि वर्णन केलं. त्यांनी तें सारं निमूट ऐकून घेतलं. पण चेहऱ्यावर प्रसन्नतेचं चिन्ह दिसे ना. तरी पण माझा विचार त्यांना नावडला नसावा अशी मी समजूत करून घेतली. व एवढ्या थोड्क्या कालावधींत आपण आपले मनोरथ पुरे करूं शकलें ह्याच आनंदांत मी गर्क होतें. पण माझा आनद फार वेळ टिकला नाही.

* * * *

स्टेशनवर त्यांना निरोप द्यावयाला गेलेला माझा भाऊ परत आला. त्यांनी सांगितलेल्या बातमीने माझे सारे मनोरथ पार धुळीस मिळाले.

बावूहि स्टेशनवर निरोप द्यावयाला हजर होता. त्याचं तिकडच्यांशीं बराच वेळ बोलणं झालं.

" तूं आणि तुझी वहिनी काय तें ठरवा " असं त्यांनी ह्मटलं !

" मीं वहिनींना ह्या बाबतींत बरंच विनवून पाहिलं- वहिनीखेरीज एकटं राहणं मला शक्य नाही, त्यांची मला वारंवार आठवण होते, वहिनी-शिवाय जगांत राहतांना 'पोरकें' झाल्याची टोंचणी माझ्या मनाला वारंवार त्रास देते "- असं बावू त्यांना ह्मणाला, व नंतरहि बराच वेळ त्यांचं आणि दोघांचं हळूं हळूं बोलणं चाललं होतं.

मला वाटलं,ताई, कीं तुझीच सरशी झाली ! पण गाडी सुटतांच मला उद्देशून अनिलबाबू ह्मणाले कीं, तुझ्या बहिणीला स्वतंत्र बिऱ्हाड मोडून पुन्हा आपल्या पूर्वीच्याच घरीं बाबू व प्रभाजवळ रहावयास सांग, व तसं मला पत्राने कळीव; तरच मी पुन्हा तुझ्या सर्वांना भेटावयाला येईन."

किति हा पुरुषांचा चंचल स्वभाव आणि कठोर हृदय ! स्त्रियांना भावना का नसतात ? बेदरकारपणाने स्त्रियांच्या भावनांना पायाखाली तुडविणाऱ्या पुरुषांना काय ह्मणावं ? आणि ही " कौटुंबिक कुचंबणा " मी कोठपर्यंत सहन करणार ? आणि त्यामुळं नेत्रावाटें होणाऱ्या ह्या अश्रूंच्या प्रवाहाला खंड तरी कसा आणि कधी पडणार ? ? ?"

---

# वीरशैवांतील चळवळी

## विदर्भ प्रांतिक वीरशैव-परिषद्

कारंजा ( लाड ) येथे सर्व वीरशैवांची सभा सोमवार ता. ३-८-३६ रोजी रात्रौ श्रीमंत सोनाप्पा नथाप्पा पांगरे ह्यांचे अध्यक्षतेखाली बारलिंगाचे देवळांत भरली होती.सभेंत दे.भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे पत्नीचे निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव पास झाला. नंतर अमरावतीचे श्री. बाबुराव चौधरी, बी. ए.; चांदूर--बाजारचे डॉ. आप्पाराव सेंगेकर, दारव्ह्याचे श्रीगुरु रामशंभु पुराणिक, व श्री. नामदेवआप्पा कोरे, वगैरे वीरशैव कार्यकर्त्यांची 'प्रांतिक परिषद्' भरविण्याचे आवश्यकतेबद्दल भाषणें झालीं, व सभेंत 'प्रांतिक परिषद्' कारंजा येथे भरविण्याबाबत महाराष्ट्र वी. हितसंवर्धक मंडळाकडे विनंतीवजा मागणी करणारा ठराव पास झाला, व खालील प्रतिष्ठित व वजनदार मंडळींचें स्वागतमण्डळ निवडण्यांत आलें. स्वागताध्यक्षः- श्रीमन्त भाऊराव देवाप्पा विभूते. खजिनदारः- श्रीमन्त सोनाप्पा नथाप्पा पांगरे.ज.सेक्रेटरीजः- दे. भ.सदाशिवआप्पा बोनते, श्री. विश्वनाथआप्पा तांदळे, व सेक्रेटरीजः-- श्री जगन्नाथ सदाशिवआप्पा होनराव; श्री. नागनाथ मारुतीआप्पा पापडे. याप्रमाणे निवडण्यांत आले. स्वागतमण्डळाचे सभासदः- १ श्रीमन्त विश्वनाथ नथाप्पा पांगरे २ रामलिंग आप्पा पापडे, ३ वैजिनाथ आप्पा विभूते, ४ देवाप्पा कोंडाप्पा साखरकर, ५ आप्पा पुंजाप्पा पेंटे, ६ लक्ष्मण आप्पा नन्दे ७ त्रिंबक आप्पा वीर, ८ राघो आप्पा नागाप्पा, ९ गिरमल आप्पा बाळाप्पा विभूते, १० नाना आप्पा नागाप्पा होनराव, ११ नारायण आप्पा तोडकरी, १२ काशिनाथ आप्पा पत्ते, १३ नागाप्पा गणाप्पा राजूरकर, १४ बापुराव आप्पा कल्याणकर, १५ बापुराव आप्पा पांगरे. स्वागतमन्डळाचे सभासद नोंदण्याचें काम सुरू झालें आहे व प्रत्येक जिल्हानिहाय काम लवकरच सुरू होईल. परिषदेला सर्वत्र पाठिंबा मिळत आहे.

## लातूर-वीरशैवांची जागृति

येथील पाशेघरमठांत ता. ६-७-३६ आषाढ वद्य २ सोमवारी सहा वाजता श्री. देशिकेंद्र महाराज यांच्या अध्यक्षतेखाली सर्व ( गावपेठ-गंज ) वीरशैवांची जाहीर सभा भरली होती. सभेस तीनशे चारशे मंडळी हजर होती. ( मंडळी जमविण्याच्या कामीं येथील उत्साही तरुण शिवलिंगाप्पा बेंबळकर वळसंगे मास्तर, सिद्रामप्पा बोपचंडे नागनाथप्पा अंकलकोटे वगैरे मंडळींनी फार परिश्रम घेतले. )

सभेचा मुख्य विषय ' शुद्धिसंघटन ' हा होता. या विषयावर मनमतप्पा केराळे, मारुती-आप्पा सगरे, राचय्यास्वामी, यांचीं भाषणें झालीं. अध्यक्षांनी, वर्तमानकालीं संघटनेची किती अवश्यकता आहे या विषयावर परिणामकारक भाषण केलें. तें ऐकून प्रमुखांच्या मनावर परिणाम झाला. शंकरप्पा उटगे, प्रभुअप्पा जवळे, बसवण्णापा खुबा, गंगारामप्पा संकाय, यांनी आबालवृद्धांचा विचार घेऊन शुद्धिसंघटनेचा ठराव मांडला. तो बिनविरोध पास झाला.

' शुद्धीसंघटन जरूर व्हावें याकरता आम्ही पूर्ण विचार करून सह्या केल्या आहेत. त्याला केव्हांहि विरोध करणार नाही.

### शिवलिंगप्राणप्रतिष्ठा

अमरावतीः—दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांची कै. पत्नी सौ. लक्ष्मीबाई बामणगांवकर ह्यांचे समाधीवर पूर्ण धार्मिक शास्त्रोक्त विधीनें शिवलिंगप्राणप्रतिष्ठा रविवार ता. ९-८-१९३६ रोजीं सकाळीं १० वाजतां करण्यांत आली. प्रथम दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी समाधीची पूजा वगैरे केल्यावर " प्राणप्रतिष्ठा " केली. धार्मिक विधी श्री. दादाशास्त्री नागपूरकर व पंचाक्षरीअय्या लासीनकर ह्यांचे हस्तें झाला. ह्या प्रसंगी श्रीगुरुमूर्ति मल्लिकार्जुनस्वामी पाथरकर, तसेच सोनय्या, बंडाय्या, कंठय्या, वगैरे माहेश्वर मंडळी व श्री. महादेवआप्पा एकलारे, शिवरुद्राआप्पा वैद्य, श्री. बाबुराव चौधरी, श्री. शंकरआप्पा पारटकर, श्री. विश्वनाथ आप्पा आवंखे, व महिलामंडळाच्या अध्यक्ष श्रीमति त्रिवेणीबाई कापसे वगैरे कांहीं भगिनी मंडळी हजर होती.

### तीन शोचनीय निधनें

ह्या महिन्यांत निरनिराळ्या तीन विभागांतील वीरशैव पुढारी व सार्वजनिक कार्यकर्ते ह्यांच्या धर्मपत्नींचीं निधनें हा विलक्षण योगायोग व लिंगायतसमाजाचा दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे! कर्नाटक प्रां. कॉं. कमिटीचे अध्यक्ष व लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे लोकनियुक्त कॉंग्रेस-पक्षीय सभासद श्री. सिद्दप्पा होसमनी; महाराष्ट्रीय वीरशैवांचे पुढारी व वी. संजीवनीचे संपादक दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, तसेच बार्शी-म्युनिसिपालिटीचे प्रेसिडेंट व बार्शीचे सुप्रसिद्ध वकील श्री. डी. जी. गांवसाने ह्या तीनहि पुढाऱ्यांच्या धर्मपत्न्या कैलासवासी झाल्या. त्यामुळे अखिल-लिंगायतसमाजास सहानुभूतिपूर्ण हळहळ वाटणे साहजिक आहे. ह्या सर्वांचे दुःखांत आम्हीहि सहभागी आहोंत ! !

### जाहीर अभिनंदन

पूर्व-खानदेश जिल्ह्याचे वीरशैव प्रांतसाहेब ( डेप्युटी कलेक्टर ) मे० एस. के वडियार यांचे चिरंजीव श्री. राजशेखर वडियार हे डेहराडून येथील " प्रिन्स ऑफ वेल्स रॉयल-इंडियन मिलिटरी कॉलेजां"-त फर्स्ट क्लास फेलो झाले असून, त्यांना सरकारकडून दरसाल रु. १०५ ची शिष्यवृत्ति मिळाली आहे. अशा प्रकारच्या शिक्षणांत शिरून लौकिक संपादिलेले हे पहिलेच वीरशैव तरुण होत. ह्या अपूर्व यशाबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

## विदर्भ प्रांतिक वीरशैव परिषद्

### कारंजा (लाड) येथे भरणार.

**स्वागतमंडळ**

स्वागताध्यक्षः—श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूते.

खजिनदारः—श्रीमंत सोनाप्पा पांगरे.

ज. सेक्रेटरीः—दे. भ. सदाशिवआप्पा बोनते. श्री. विश्वनाथआप्पा तांदळे.

सेक्रेटरीजः—श्री. जगन्नाथआप्पा होनराव. श्री. नाथनाथआप्पा पापडे.

### उदगीर

येथील वीरशैवसमाजातर्फे ता. ५-८-३६ रोजी दुःखवट्याची सभा भरून तींत दे. भ. नानासाहेब

बामणगांवकर ह्यांचे पत्नीचे निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला.

तसेच, ता. ५-८-३६ रोजी वचनसप्ताहसमारंभाचे समाप्तीचे दिवशीं मधुमालती नांवाच्या एका आर्ययुवतीचे शुद्धीकरण करून तिला गगम्मा असें नांव देण्यांत आलें. श्री. गुरप्पा मुधोळ नांवाच्या तरुणाबरोबर तिचा विवाहहि लौकरच होणार आहे तेच दिवशीं सायंकाळी कोहीरगावच्या एका लिंगायताने पालनपोषण केलेल्या ४ वर्षे वयाच्या धनगर मुलाचेंहि शुद्धीकरण झालें व त्याला लिंगधारणा केली. आठ कुंमारास शिवदीक्षा देऊन सामाजिक व्यवहारांत सामील करून घेतले. ह्या कार्यांत गांवांतील सर्व प्रमुख स्त्रीपुरुषांनी मोठ्या उत्साहाने भाग घेतला होता. सुमारे ३०० वीरशैवांनी शुद्धीकृत व दीक्षित लोकांशीं सहभोजन केलें. ह्या सर्व कामांत श्री. संग्रामप्पा वकील ह्यांनी पुढाकार घेतला होता. स्तुत्य व अभिनंदनीय ! !

## नाशिक जिल्हा वीरशैव परिषद

नाशिक जिल्हा वीरशैव परिषदेचें अधिवेशन ह्या महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत ता. २९ व ३० आगष्ट रोजीं पनवेलचे श्रीमंत शेठ आत्माराम महादेव ऊर्फ अण्णासाहेब आठवणे ह्यांचे अध्यक्षतेखाली भरणार असल्याचें जाहीर झालें आहे. आह्मी परिषदेला यश चिंतितों.

**बागलकोटः--** सोलापूरचे श्रीमंत बाबासाहेब वारद हे बागलकोट येथे कापडाची एक नवीन गिरणी काढणार असल्याचें जाहीर झालें आहे. श्रीमंत बाबासाहेब वारद ह्यांच्या ह्या स्तुत्य उपक्रमाबद्दल आह्मी त्यांचें अभिनंदन करतों.

**सांगलीः--** लौकरच सांगली-जिल्हा-वीरशैव-परिषद् भरणार असल्याचें जाहीर झालें आहे. स्तुत्य उपक्रम.

**पोच व अभिप्रायः—** इतर वृत्तपत्रांप्रमाणेच आमच्या लिंगायत माळी बंधूंच्या तर्फे श्री. नाथाजी अकुप्पा माळी ह्यांच्या संपादकत्वाखाली चिकोडी येथे निघणारें "लिंगायत माळी विजय" व लिंगायत तेली समाजांतील श्री. शंकर रुद्राप्पा फल्ले ह्यांचे संपादकत्वाखाली कोल्हापूर येथून निघणारें 'वीरशैव हितवादी' अशी दोन्ही पाक्षिकें आमचेकडे येतात. दोन्ही पाक्षिकांत समाजविषयक माहिती व लेख येत असतात. आह्मी दोन्ही पाक्षिकांना भरभराट व यश चिंतितों.

## दारव्हा येथील बातमीपत्र

दारव्हा येथील वीरशैव सन्मित्र मंडळाची मासिक सभा तारीख ३१—७—३६रोजी मंडळाचे कार्यालयांत बोलावली गेली. मंडळाचे बरेच सभासद व कांहीं इतर मंडळीहि सभेला उपस्थित होती प्रथम 'वी.संजिवनी'पत्राचे संपादक नानासाहेब बामणगावकर यांच्या पत्नीच्या निधनाचा दुखवट्याचा ठराव श्री. पुराणीक यांनी मांडला व त्याला श्री. नामदेवआप्पा कोरे व माधवराव खंदाडे ह्यांनी अनुमोदन दिलें. नानासाहेबांच्या या कोसळलेल्या आपत्तींत आम्ही सर्व वीरशैव बन्धुंशानें भागीदार आहोंत. परमेश्वर मृतात्म्यास सद्गति देऊन श्री. नानासाहेबांनीं जगरहाटीकडे लक्ष देऊन या दुःखापासून आपली चित्तवृत्ति स्थिर राखावी, आणि परमेश्वरानें त्यांना तशी सत्बुद्धि द्यावी असा ठराव पास करण्यांत आला. आणि नंतर इतर कांहीं निकडीचा कार्यक्रम सभेपुढे असतांनादेखील, नानासाहेबांचे चारित्र्यातील अनेक विषयांवर बरीच चर्चा झाली, आणि इतर कार्यक्रमाला तहकुबी दिली गेली.

## सौ. लक्ष्मीबाई बामणगावकर ह्यांचें शोचनीय निधन

'वीरशैव संजीवनी -चे संपादक दे भ. नानासाहेब बामणगावकर ह्यांची पत्नी सौ. लक्ष्मीबाई ह्या सोमवार ता. २७-७-३६ रोजी शिवैक्य पावल्या! दे. भ. नानासाहेबांकडे त्यांच्या बऱ्याचशा स्नेह्यांकडून, सार्वजनिक संस्थांकडून, व सहकाऱ्यांकडून सहानुभूतीच्या तारा व पत्रें आलीं आहेत. त्यांपैकी कांहीं थोडी खाली दिली आहे.

Reg. No. N—645



ताराः—सांङ्गरस्टेट येथून बॅ. रामराव ऊर्फ अण्णासाहेब देशमुख, माजी दिवाण, मध्यप्रांत सरकार पुसद येथून:—श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, उपाध्यक्ष, महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळ. श्रीमन्त बाबासाहेब व बाळासाहेब मुखरे; मे. जतकर, तहसिलदार; बळिरामपंत एकबोटे; डॉ. आप्पाराव संगेकर; बाबुराव चौधरी; टी. एन्. गुळकर;

**दुखवट्याची पत्रें.**— १ श्री. एस्. बी. तांबे, माजी गव्हर्नर, मध्यप्रांत व वऱ्हाड. २ श्रीमंत बाबासाहेब बारद, सोलापूर. ३ डॉक्टर जगदेवराव देशमुख, सोलापूर. ४ श्री. मुंजे वकील, सोलापूर. ५ श्री. गुरुमुर्ति अप्पासाहेब माणुरकर, माजी अध्यक्ष, पुणे-म्युनिसिपालिटी. ६ श्रीमंत मलकार्जुन आप्पा आप्पाराव पाटील, मॅनेजर 'शिवानंद जिनींग फॅक्टरी,' बागलकोट. ७ रावसाहेब माधवराव देशमुख जहागीरदार, यवतमाळ. ८ श्रीमंत रामचंद्रशेट कुश्री, रोहिणखेड. ९ श्रीमंत काशीनाथ आप्पा व विश्वनाथ आप्पा आडगांवकर. १० श्रीमंत बापुसाहेब हिंगमीरे, हिंगणघाट. ११ डॉ० के. बी. भिवापूरकर, आयसर्जन, नागपूर. १२ डॉ. भास्करराव टेंबे, यवतमाळ. १३ पंडित चि. म. विरभद्रशास्त्री सिकंदराबाद. १४ प्रो. अण्णासाहेब खार्डे, हिंदु विश्वविद्यालय, बनारस. १५ श्री. माधवराव केळकर, पुणे. १६ श्री. बी. नारायण स्वामी मुंबई. १७ प्रि. दामोदर केशव ओक, नागपूर. १८ श्री. कृष्णाप्पा कल्लुरे, चांदा; १९ दे. म. दा. वि. गोखले, पुणे; २० श्री. डी. व्ही दिवेकर; 'केसरी' ऑफिस पुणे; २१ श्री. अनंत वा. फडणीस, पुणे. २२ श्री. डी. के. ढोले, मुंबई; २३ श्री. तु. ना. काटकर, चिमूर; २४ श्री. काशिनाथ स. टिळक, मुंबई; २५ श्रीमंत आबासाहेब देशमुख, दर्यापूर; २६ मि यशवंतराज मुदलियार, सर्कल इन्स्पेक्टर, बैतुल २७ मि. बी. ए. मोहरीर, वरुड; २८ श्री. जनार्दन भीमराव जपे, मोर्शी; २९ श्री. र. ह. देशमुख, नागपूर; ३० श्री. र. वि. करंदीकर, वकील, वणी; ३१ श्री. वैजिनाथ गुराप्पा भिटकरी, शेगांव; ३२ श्री. एन्. बी. साखळीकर, बुलडाणा; ३३ श्री. देविदास सखाराम पोतदार, अमरावती; ३४ श्री. डी. जी. गांवसाने, बा. ए., एल एल. बी., वकील, अध्यक्ष, बार्शी म्युनिसिपाल कमेटी, बार्शी; ३५ श्रीगुरु हरेश्वर उमाकांत स्वामी खामगांव;

### संस्थांच्यातर्फे दुखवटाप्रदर्शन

१ महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ, उमरावती. २ 'भविष्य भास्कर' मुंबई. ३ घा. कॉमन वेल्थ इन्शुअरन्स कंपनी नागपूर. ४ 'लोकमान्य' मुंबई. ४ धी मोटार युनिअन इन्शुअरन्स कंपनी मुंबई. ५ एन्. व्ही. वीरकर ॲंड को., फोटोस्टुडियो, मुंबई; ६ वैदर्भीय ब्राह्मण संघ, दर्यापूर; ७ वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळ अमरावती; ८ वीरशैव स्नेहवर्धक मंडळ, मुंबई;

---



हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगावकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १ सप्टेंबर १९३६ ( अंक १७ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# जाहीर नोटीस

श्री करबसअय्या जंगम रा० कारंजा हल्ली मुक्काम उमरावती व सर्वत्र वीरशैव व वीरशैवेतर लोकांना खाली सही करणार श्री. गुरुपंचाक्षरी स्वामी गुरु रेवण सिद्ध स्वामी लासीनकर मठ संस्थान उमरावती यांजकडून नोटीस देण्यांत येत आहे कीं, ता० १४-८-३६ रोजी " उदय " व ' वीरशैव संजीवनी " पत्रांतून दिलेल्या नोटीसीतील माझ्या विषयींचा मजकूर सर्व बुद्धिपुरःस्सर खोडसाळपणाचा आहे व तो माझ्याविषयीं सर्व समाजांत अनादर व बदनामी करण्याच्या हेतूने जाणून बुजून लिहिला असल्यामुळे माझ्याविषयीं गैरसमज उत्पन्न करणारा आहे. मी, श्री. गु. कै० रेवणसिद्ध स्वामी लासीनकर यांचा शिष्य असून सदर लासीनमठसंस्थानशी माझा पूर्वी-पासून चालत असलेला मालकी हक्क अबाधित आहे. व श्री. करबसय्या जंगम यांस माझ्या मठाशी असलेल्या मालकी संबंधाविषयी कांहीही लिहि-ण्याचा अधिकार कोणत्याहि तऱ्हेने नाही. तरी या नोटीसीनें जाहीर कर-ण्यात येत आहे कीं, कुणासही या मठांत ( कथा, पुराण, प्रवचन वगैरे) किंवा तेथे उतरावयाचें असल्यास आमची नेहमी प्रमाणे संमती घ्यावी. श्री करबसअय्या जंगम यांचा मठाशी कोणत्यही तऱ्हेचा संबंध नसल्यामुळे कुणीही त्यांच्याशी मठासंबंधी कसल्याही प्रकारचा व्यवहार करूं नये. याविरुद्ध केल्यास त्यांजवर कायदेशीर कारवाई केली जाईल. ही नोटीस ता० २७-८-३६

सही

पंचाक्षरी स्वामी गुरु रेवणसिद्ध स्वामी लासीनकर
मठसंस्थान उमरावती द. खु.

नो नं. २ ]

## स्वामी माजलगांवकर ह्यांना

# अमरावती-वीरशैवांचा निरोप



[ ता॰ ३० जून रोजीं सुदर्शन-नाटकगृहांत झालेल्या समारंभ-प्रसंगीं घेतलेला फोटो. ]

डावीकडून खुर्चीवर:—( दुसरे ) श्री. अप्पासाहेब हुडेकर, कार्यकर्ते पुढारी व म्यु. कौंसिलर; [ तिसरे ] श्री. सोमाप्पा मेंडसे, उपाध्यक्ष, वीरशैव शि. प्र. मं; [ चौथे ] वीर वामनराव जोशी; [ पांचवे ] स्वामी माजलगांवकर; [ साहावे ] ना. दादासाहेब खापर्डे; [ सातवे ] दे. भ. नानासाहेब बामणगांवकर,

श्री. मेंडसे व वीर वामनराव ह्यांच्यामध्ये उभे:—श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे, सेक्रे., वी. शि प्र. मं ;—स्वामी माजलगांवकर ह्यांच्या मागे:—श्री. बाबूराव चौधरी, जनरल सेक्रेटरी, महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळ. दे. भ. बामणगावकरांच्या मागे:—श्री आप्पासाहेब कापुसकर, उपाध्यक्ष, वी. शि. प्र. मंडळ.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति भाद्रपद शु॥ १५ शके १८५८ ( अंक १७ वा.

# आमच्या विश्रांतींतील घडामोडी

## उत्तरभाग

### महासभेचे ठराव व आह्मी

रायचूरच्या महासभेंत वीरशैवांतील सर्व जातींत रोटीबेटीव्यवहार रूढ व्हावा असा जो ठराव पास झाला आहे तो आह्मास पूर्णपणें मान्य आहे. तथापि त्याकरिता सदर ठरावांत वर्णभेद वीरशैवास मान्य नाही अशी जी भाषा वापरली आहे ती मात्र आह्मास मान्य नाही. वर्णभेद हा सामाजिक विषमतेचें दर्शक आहे ही जी कित्येकांची भावना झाली आहे ती खोटी आहे. वर्णभेदांत सामाजिक विषमता जी उत्पन्न झाली ती रूढीने झाली. वर्णभेद काढला तरी ही विषमता निर्माण होतेच. वर्णधर्मातील विषमता काढावी ह्मणून बसवदेवाने बाराव्या शतकांत अतिवर्णाश्रमी अशा वीरशैवधर्माचा प्रसार केला असें कित्येक सांगतात. ह्मणजे आज आठशे वर्षांपूर्वीच बसवेश्वराने वर्णधर्म झुगारला. मग आठशें वर्षे वर्णधर्म झुगारून जेथे आज झाली तेथे आजच्या महासभेला सर्व पोटजातींत रोटीबेटीव्यवहार सुरूं करा असा ठराव करण्याचा प्रसंग कां यावा ? ह्यावरून वर्णधर्म नाकारल्याने परस्परांतील विषमता नष्ट होते ही भावनाच मुळीं चुकीची आहे,हेंच अधिक स्पष्ट होतें. वीरशैवसमाजाने अतिवर्णाश्रमत्वाला प्राधान्य दिलें हें खरें; परंतु अतिवर्णाश्रमत्व ही मोक्षाची, सन्यासध-

मोंची, लिंगांगसामरस्याची अखेरची पायरी आहे, व ती ह्या जन्मीं नाही तरी पूर्वजन्मीं कां होईना पण वर्णाश्रमधर्म पाळल्यावाचून प्राप्त होत नाही असा अतिवर्णाश्रमी वीरशैव वेदांत्यांचा सिद्धान्त आहे. तो सिद्धान्त मान्य करून ज्यांनी अतिवर्णाश्रमाचें महत्व गायिलें त्यांनी वर्णाश्रमधर्म अमान्य केला असें म्हणतां येत नाही. शिवाय आह्मी अतिवर्णाश्रमी आहोंत असें म्हणून वीरशैवांतील पोटजातींत रोटीबेटीव्यवहार सुरू करतों असें म्हणणें ह्मणजे महासभा, तिचे प्रतिनिधी, व अध्यक्ष, हे सारेच महंतकोटींत गेलेले महापुरुष आहेत असेंच मानावें लागेल. पण त्यांपैकीं कोणीच तसे नाहीत. तेथे जमलेले सारेच वर्णधर्मी मानव होते. वर्णधर्मानें प्रत्येकाचा व्यवहार प्रतीत होत होता, व आश्रमधर्मानें प्रत्येकावर होणारे संस्कार प्रतीत होत होते. अशा स्थितींत अध्यक्षांनी जेव्हा स्वामी परान्डकरांना विषय-नियामकमंडळांत सवाल केला कीं, 'येथे कोणत्या वर्णाचे कोण आहेत तें सांगा?' तेथे आह्मी हजर असतो तर अध्ययन-अध्यापन करण्याचा धंदा करणारे जेवढे – मग ते 'गर्जना'-कार असोत, 'सुदर्शन'-कार असोत वा 'कानडी सन्देश'-कार असोत ते सर्व, व लिंगराज-कॉलेजांतील सर्व अध्यापकवर्ग, हे ब्राह्मण होत, आणि अध्यक्ष हे पैसाच कमावण्याचा धंदा करतात ह्मणून ते वैश्य होत; त्याचप्रमाणे, वतनदार वर्ग—मग त्यांत भक्त येवोत वा पंचाचार्यविरक्तादि महास्वामींची पीठें येवोत, ते सर्व आज क्षत्रीय होत, असें आह्मी उत्तर दिलें असतें. ह्यानंतर चौथा वर्ण कोठे आहे असा प्रश्न आला असता तर तो लिंगायतेतरांचा आहे आणि लिंगायतांत फक्त तीनच वर्ण आहेत असेंच आह्मीं उत्तर दिलें असतें. तथापि हें उत्तर कित्येक पुराणमतवाद्यांना आवडलें नसतें हें खरें. सनातन्यांनीं वरप्रमाणेच प्रश्न केला असता तर वर्णसंकर झाल्यामुळे वर्णधर्माचा लोप झाला आहे असें उत्तर देऊन वर्णधर्माचा नव्या पद्धतीनें पुन्हा उदय होत आहे असें सांगितलें असतें. परंतु वर्णधर्म मान्य नाही हे शब्द आह्मी मान्य केले नसते. कारण वर्णधर्मावरच हिंदुस्थानांतील प्रत्येक पंथाची व धर्माची उभारणा झाली आहे. बुद्ध व जैनधर्मानें वर्णधर्मास आलेलें विषमतेचें स्वरूप जसें नाहीसें केलें, तद्वतच बसवेश्वरानेहि वर्णधर्मांतील विषमतेवर कोरडे ओढले. पण वर्णधर्म नष्ट करण्याचा प्रयत्न केला नाही. उलट वर्णधर्मांतील विषमता जाऊन तो अधिक शुद्ध व तेजःपुंज व्हावा असेच प्रयत्न केले आहेत हाच त्या महापुरुषाच्या वचनांतून बोध होतो. कक्कयादि शरणांस बसवेश्वर कवटाळला ह्याचा अर्थ कक्कयाचा वर्णधर्म त्यांनी नाहीसा केला असा नाहीं; तर त्याच्या वर्णधर्मांतील शुद्धतेला त्यानी गौरविलें व विषमतेला तुडविलें असा त्याचा अर्थ आहे. ह्मणून वीरशैवधर्म वा समाज हा वर्णविरहित वा वर्णहीन आहे असें मानणें ह्मणजे मूळ समाजघटनेलाच झुगारणें होय. आता वर्णशब्दाचा अर्थ जातहि असेल व तो विषमतेचा दर्शक असा योजिला असेल तर त्या शब्दाबाबत आमचा वाद नाही. परंतु पोटजातींचें एकीकरण प्रतिपादीत असतां वा बसवेश्वराची अतिवर्णाश्रमी वृत्ति कथन करीत असतां वीरशैव हे वर्णहीन आहेत असें मानण्याची जी प्रवृत्ति आहे ती योग्य नसून, तींत आमचा समाज वा धर्म सुधारण्याचा प्रश्न प्रतिबिंबित होत नाही तर परकीयांची वर्णहीनतेची व्याख्या घेऊन ती समाजावर लादण्याची बाटोडी प्रवृत्तिच प्रगट करते होय. ह्मणून महासभेच्या ठरावांतील वर्णहीनता हा शब्द आह्मास अर्थशून्य व मूळधर्मकल्पनेचा उच्छेदक असा वाटतो.

## पोटजाती मोडणार काय?

'सुदर्शन'-च्या बसवेश्वरअंकांत बसवेश्वर वर्णधर्माच्या विरुद्ध आहेत हें दाखविण्याचा ओढून-ताणून प्रयत्न झाला आहे. वीरशैवांतील सर्व पोटजातींतील शरण, योगी, व महापुरुष प्रसादाकरिता एकत्र झाले असतील, व ते महापुरुष तत्पूर्वी एकत्र जेवीत असत. ह्मणून धर्मांतर वा पंथांतर लवकर प्रसृत होत असावें. ...

पोटजातींचें एकीकरण हा येथे प्रधान मुद्दा नव्हता. तर एक भक्ति व एक भाव ही वेदान्त्यांची आत्यंतिक वृत्ति त्यांत प्रतिबिंबित होते. ह्या उदाहरणावरून सामान्य मनुष्यसमाजांत एक जात रोटीबेटीव्यवहाराने करणें योग्य आहे असें ह्मणणें उचित नाही; तर सध्याच्या सामाजिक जीवनांत ह्याशिवाय गत्यतर नाही असें स्वतंत्रपणें अट्टाहासाने प्रतिपादणें व तसेच शक्य तोंवर आचरणें हेंच उचित्. ' सुदर्शन '-च्या बसवेश्वरअंकाच्या समालोचनांत हेंच आह्माला दाखवावयाचें होतें. पण आता तें समालोचन एवढ्याच पूर्वभागावर संपवून मोकळे होणें सर्वतोपरीं आह्माला इष्ट वाटतें. वास्तविक पोटजातींचें एकीकरण नुसत्या ठरावाने होत नाही. तें करावयाचें असल्यास आपण सर्व कोण ही एक भावना समाजांत उत्पन्न व्हावयास पाहिजे. त्याकरिता आह्मी वीरशैव त्रैवर्णिक आहोंत असें प्रथम ह्मणावयास शिकणें हेंच पायाशुद्ध होय. त्रैवर्णिक ह्मणवीत असतां वर्ण आहेत, ते समानधर्माचे आहेत, व ह्या सर्व वर्णधर्मातूनच पुढे षट्स्थळद्वारें अतिवर्णाश्रमी बनावयाचे आहे हा बोध होतो. लिंगधारणा, दीक्षाविधी, अष्टावरणाचें महत्व, व षट्स्थळसाध्यता ह्यांत वर्ण व आश्रम-आचारांचा बोध होऊन अंतीं मनुष्य अतिवर्णाश्रमी पद प्राप्त करून घेऊं शकतो. अर्थात गुरु-विरक्तवाद व गुरु-भक्तस्थळें ह्या सर्वांची संगती ह्या विचाराने लागून उलट पूर्वधर्मच आपण पुनरुज्जीवित करीत आहोंत असें वाटूं लागतें. यद्यपि पोटजातींचें एकीकरण करावयाचें झालें तरी त्याकरिता कायद्याकडे लक्ष देऊन त्यांना मान्यता देण्याचा धंदा करणें हें एक कार्यच आहे. पण महासभेंत जमलेल्या एकाहि विद्वानाचें तशा कायद्याकडे लक्ष गेलेलें दिसत नाही. त्यावरून त्यांना नुसता ठरावच पाहिजे होता असें ह्मणावें काय ?

## नवे चार कायदे व समारोप

पोटजाती मोडूं लागा व सरसहा योग्य दिसेल त्याप्रमाणे रोटीबेटीव्यवहार सुरूं करा असें झटलें कीं, रूढीप्रिय लोक ह्मणतात कीं, ह्या बाटोळ्यांच्या काय नादीं लागता ? आपले पूर्वज काय मूर्ख होते ? ह्या रूढीप्रियांचे पूर्वज शहाणे होते. कारण ते परिस्थिति ओळखून रूढींत बदल करीत असत. पण आजचे रूढीप्रिय शहाणे नाहीत. इतकेंच नव्हे तर तर ते आंधळे आहेत ह्मणून आम्हाला त्यांची कींव येते. कारण शारदा-कायदा पास झाल्यामुळे बालविवाहाला पायबंद बसून प्रौढविवाहाला तोंड फुटलें. प्रौढविवाहांतून प्रीतिविवाह व प्रीतिविवाहांतून प्रसंगीं सवर्णत्वाचा लोप होत - होत जातीय विषमतेवर सहज आधात होत जाणार. आता तर लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत चार प्रकारचे कायदे विचारार्थ आहेत. पैकीं एकाने बालविवाहावर शारदा-कायद्यापेक्षाहि नियंत्रण घालण्याचें ठरविलें आहे. दुसऱ्याने हिंदु स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचा वारसाहक्क देण्याचें योजिलें आहे. तिसऱ्याने सर्व अस्पृश्य बंधूंना स्पृश्यांबरोबरीचे हक्क देण्याचा बेत केला आहे. आणि चौथ्या कायद्याने तर हिंदूंमधील मिश्रविवाहांना कायदेशीर मान्यता देण्याचें ठरविलें आहे. ह्या सर्व कायद्यांचा विचार जर महासभेंत झाला असता व त्यांतील गुणदोषांवर चर्चा जर झाली असती, तर पोटजातीच्या एकीकरणाचा प्रश्न सहजगत्या सोडविण्यास सुगम झालें असतें व जे पोटजातीच्या एकीकरणाविरुद्ध आहेत त्यांनाहि नम्रपणें असें विचारण्यांत आलें असतें कीं, हे सर्व कायदे पास झाल्यावर तुमची रूढी कायम राहील ह्याला काय आधार ? तात्पर्य काय कीं, आपसांतील व्यक्तिद्वेष वा मत्सर विसरून अशा कायद्यावर चर्चा सुरु होणें व तीहि चर्चा रूढीप्रियांनी रूढीरक्षण कसें होईल ह्या दृष्टीने व नवमतवाद्यांनी नव्या दृष्टीचे सामाजिक हितसंबंध त्यांत कसे निगडित झाले आहेत ह्या दृष्टीने करणें हें उभयपक्षी हितावह झालें असतें. पण आजचा नवमतवादी उठतो व जंगमावर तुटून पडतो, आणि रूढीवर नुसते कोरडे ओढून स्वस्थ झोंप घेत पडतो. विरक्त गुरुवर्गावर ताशेरा झाडतो

तर गुरुवर्ग विरक्तांच्या संन्यासधर्माची कुचेष्टा करण्यांत गुंग झालेला दिसतो. पोटजातींचे विध्वंसक रूढीप्रियांना हासून त्यांच्या भिक्षुकशाहीच्या सोव्यावर क्रुद्ध होण्याचा धंदा करतात तर भिक्षुकशाहीचे पोशिंदे पोटजातीच्या विध्वंसकाच्या घोटेशाहीवर लाल डोळे करून चालतात. ह्या दोहोंचा विचार केला असतां रूढी पाळतों म्हणणारांची रूढी कशी रक्षण होणार व रूढी मोडतो म्हणणारे रूढी कशी मोडणार हें कळत नाही. तात्पर्य काय कीं, ह्या सर्व प्राप्त परिस्थितींत मूळ धर्माचें तात्त्विक स्वरूप व त्याचा अभिमान कसा जिवंत राहील हें पाहण्याचा उद्योग आज कोणीच करीत नाही. वर्णसंकराचें ह्याशिवाय दुसरें उदाहरण कोणतें ? ह्या वर्णसंकरांतूनच परस्परप्रेम, सहचर्य व समानधर्मांवरील सहकार्य निर्माण होऊन सर्व वीरशैव एकाच धर्माचे घटक ह्मणून कसे जगतील हें पाहणें खऱ्या धर्मनिष्ठाचें काम आहे व तेंच 'संजीवनी'-ला समतोल बुद्धीने करावयाचें आहे. मधल्या आमच्या विश्रांतीच्या काळांत घडलेल्या गोष्टीसंबंधाने इतकें सांगून पुढे दुसऱ्या उद्योगाला लागूं या !

---

# नवमतवाद व वैवाहिक प्रश्नाची मीमांसा

**पूर्वभाग**

लें०—श्री. तु० ना० काटकर, नागभीड.

**—* बालविवाह सदासर्वकाळ त्याज्य *—**

वीरशैव नवमतवाद्यांचे पुढारी श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., अमरावती, ह्यांनी इतर विषयांबरोबरच "नमवतवाद" ह्या 'वीरशैव संजीवनी' अंक २ व ३ मधून प्रसिद्ध झालेल्या लेखांतून आपलीं वैवाहिक प्रश्नासंबंधीची नवमतवादी मतें स्पष्टपणें पुढे मांडलीं आहेत. अशा गंभीर विषयावर ह्यांनी मांडलेल्या महत्वपूर्ण मतांची आजच्या वीरशैव-समाजाची परिस्थिति लक्षांत घेऊन साधकबाधक रीत्या ह्या विषयाचें महत्व लोकांना कळण्याकरिता विस्तृत चर्चा होणें आवश्यक आहे, व ह्याच दृष्टीने मी आपले विचार पुढे मांडीत आहें.

२० वें शतक ह्मणजे तुमचा काय समज आहे ? तें प्रत्येक राष्ट्र नि समाज वा धर्म यांचा उत्क्रान्तीने सुधारणेच्या क्रान्तीचे अत्युच्च अष्टपैलू नामवंत शिखर आहे असें मी समजतों. त्या शिखराचें जर जिज्ञासु संशोधकाने विमानावलोकन केलें तर भूतकालांत

दडलेलें प्रतिबिंब सहज त्यांच्या दृष्टिक्षेपांत आल्याशिवाय रहाणार नाही. कोणत्याहि नवीन सुधारणेचा विचार करतेवेळीं ती टिकेल किंवा नाही हें सारासार तऱ्हेने पहातांना तिच्या आदिहेतूंची चिकित्सा करणें अत्यंत आवश्यक आहे. अगदीं प्राचीन अथवा पौराणिक काळाकडे जरी तात्पुरती डोळेझांक केली तरी गेल्या पन्नास-साठ वर्षांपासून जागतिक वातावरणांत सामाजिक हितदृष्ट्या ज्या अनेक वावटळी उठल्या त्यांपैकीच " वैवाहिक संस्था " सर्वोत्कृष्ट कशी ठरेल ही एक होय. आणि हा क्रांतिवाद हरएक समाजासमोर आज प्रामुख्याने अधिष्ठित आहे. व त्यांना ज्ञान आणि शक्त्यनुसार त्यांत जी जी म्हणून कांही योग्य क्रांति घडवून आणतां येईल. ती आणीत आहेत. कोणतीहि सुधारणा अंमलांत आणतांना ती क्रांतीच्या गतीने आणण्यापेक्षा उत्क्रांतीच्या गतीने रूढ करण्याचा प्रयत्न केला तर तिला स्थैर्य प्राप्त होणे अशक्य असें कांही नाही. एकदम क्रांति उभारली तर तिचा परिणाम फलदायीच होईल असें कोणीहि छातीठोकपणें कबूल करणार नाही.

इ. स. १९३० सालीं " शारदा कायदा " हिंदु जनतेकरिता क्रान्तीच्या स्वरूपांत एकदम लागू करण्यांत आला खरा; पण कायद्याच्या मऊ स्वरूपामुळे अज्ञ व भोळ्याभाबड्या हिंदुजनतेवर त्याचा व्हावा तसा सुपरिणाम अद्यापिहि झालेला दिसत नाही. कायदाहि पूर्णत्वाने आस्तित्वांत आहे व बालविवाहसुद्धा—पूर्णत्वाने नसले तरी—बऱ्याच अंशाने अस्तित्वांत आहेत. बंधनाच्या पलीकडे हाकाटी चालली आहे. तरी कायद्यांत कडकपणा येत नाही. तुमचेच दांत नि तुमचेच ओठ अशी स्थिति जोपर्यंत राहील तोपर्यंत बालविवाह हे होणारच. मग ह्या अज्ञ व भोळ्याबाभड्या राष्ट्रांत अशा मऊ कायद्याने काय रडावें, कीं कायद्याच्या नांवाने शुद्धाने बोंबा माराव्यात ! तें कांही असो. आम्हाला आज जो येथे विचार करावयाचा आहे तो कायद्याच्या दृष्टीने करावयाचा नसून, सामाजिक दृष्टीने करावयाचा आहे.

रशियाने सुधारणेचें अतिक्रमण कुधारणेंत करून गर्भपाताला स्वातंत्र्य दिलें म्हणून त्यांस आम्ही दोष देतों. पण त्यांचा विचार करितांना आपल्या राष्ट्रांतदेखील तींच अधम कृत्यें पडद्याआड कां घडतात इकडे सहसा कोणाचें लक्ष जात असेल अगर नाही ह्याची शंकाच आहे. परक्याच्या डोळयांतील कुसळ कसें अगदीं अचूक दिसतें, पण स्वतःच्या डोळयांतील आडदांड मुसळ मात्र काढून टाकण्याचा कोणी प्रयत्न करीत नाही असेंच अखेरीस म्हणणें प्राप्त होतें. आमची विवाहपद्धति किती सदोष आहे व त्यामुळे होणारे दुष्परिणाम बिचाऱ्या अबलांना कसे सहन करावे लागतात याची जाणीव पुरुषवर्गाला काय असणार ! आज उभ्या हिंदुस्थानांत पंधरा वर्षांखालील १½ लक्ष, आणि एक वर्षांखालील १००८० विधवांची संख्या कां आहे ? याला कारणीभूत कोण आहेत ?? व यांचा परिणाम कोणास भोगावा लागणार आहे ??? एवढें कशाला, दहा-अकरा वर्षांच्या कित्येक मुली माता झाल्याच्या व शेवटीं यमसदनास गेल्याच्या बातम्यासुद्धा अधून-मधून वर्तमानपत्रें तुमच्या-आमच्या कानीं घालतात कीं नाही ? तेव्हा या सर्वांच्या मुळाशीं जर कोणी असतील तर ते ' बालविवाहवादी ' व ' बालविवाह ' हेच होत.

' अहो, मातापित्यांनो ! तुम्हाला तुमच्या मुलामुलींचे, नातनातवंडाच्या लग्नाचे सुखसोहाळे बघायला मिळतात खरें; पण तुमचे सुखाचे क्षण लोटतांच आम्हाला मात्र धगधगीत अग्निकुंडांत होरपळावें लागतें, ह्याचा तुम्ही लग्नापूर्वी कधी विचार केला आहे काय ? डोळ्यांचे क्षणिक पारणें फेडण्याच्या हौसेखातर आमचा सर्वस्वीं सत्यानाश करता काय ? तुमच्या डोळयांदेखत जर आमची लग्नें झालीं नाहीत तर आम्ही काय आमरणांत

अविवाहित राहणार आहोंत ? अहो ! अशा भडकलेल्या अग्निकुंडांत जाणून-बुजून आम्हाला कां बरें लोटतां? त्यामुळे व त्याबरोबरच,तुमच्या ऊर्जित वंशांकुराचा समूळ उच्छेद होतो ना ? याची काय वाट ! आमच्या बालनाटकाचा शेवट करून शेवटीं काय परवंशीय दत्तविधानाचीच आशा करणार ना ? काय ह्या अजाण माता-पित्यांच्या खुळचट भावना ! '

मुलगी १०-११ वर्षांची झाली कीं तिच्या लग्नसोहळ्याची तळमळ मातापितरांत सुरूं होते- ' पोर वाढली आहे, तिला वर पाहिला पाहिजे. अहो ! काय करिता, हें कलियुग आहे ना ! कलिचें महात्म्य पाहून अगोदरच बांध घातलेला काय वाईट ! ' काय हें चोरांच्या मनांत चांदणें! बिचाऱ्या त्या मुलीच्या डोक्यांत अजून लग्नाची व भावी आकांक्षांची कल्पनाहि स्वप्नांतदेखील आलेली असेल किंवा नसेल शंकाच आहे; पण हे उतावीळ पापभीरु आईबापच तिला त्या कल्पनांची ओळख करून देण्यास कारणीभूत होतात हें खास. तिला उपवर होण्यास अजून चार दोन वर्षें बाकीच असतात. असल्यास शिक्षणदेखील जागच्या जागींच राहतें. अधिक ज्ञान मिळविण्याची समाप्ति येथेच होते. आणि बिचाऱ्यांना लग्नाच्या बेड्यांनी बद्ध होऊन शुद्ध विचारांची मालिका तोडून जाणून-बुजून कुविचाराच्या मार्गास लावतात. यांत त्यांचा काय दोष ! अशाने बलवान् संतती निर्माण व्हावयाची कशी ? उघड-उघड कथन करावयाचें म्हणजे अशा वृत्तीचे आईबाप आपल्या मुलामुलींचे हितचिंतक तर नाहीतच नाहीत; पण उलट अनाचाराला पोषक करणारे व आपल्या डोळ्यादेखत आपल्या मुलामुलींना मृत्यूच्या स्वाधीन करण्याचें श्रेय संपादणारे नव्हते काय ? अशा ह्या अविचारी मातापित्यांना ' शतशः धिक् धिक् ज्ञानं नीतिशून्यम्. '

असल्या प्रकारचीं विधानें करितांना आमचे ' गतानुगतिकवादी ' वाचक माझेवर कदाचित् रोषावतील पण त्याला मी काय करणार ! सत्य तें सर्वांसमोर आणायला आह्मी कधीहि कचरणार नाही. कदाचित् ते माझेवर असाहि ताशेरा झाडतील कीं, आजकालचे नवमतवादी लेखकांना ' विवाह ', ' नवमतवाद ', याशिवाय कांहीच का दुसरे सुविचार सुचत नाहीत? उठले-सुटले कीं, पाश्चात्य संस्कृतीचा पुरस्कार करीत सुटतात. पाश्चात्य संस्कृति आदर्श व सर्वसंमत आहे, असें निदान आमचें तरी मत नाही. रशियांतील विवाह-संस्थेंत कशी बेबंदशाही व स्वैराचार सुरू झाले आहेत, हें बघायचें असेल तर जिज्ञासु वाचकाने ' सह्याद्रि ' चा एप्रिल १९३६ चा अंक अवश्य वाचावा. अशा प्रकारें पाश्चात्य विवाहसंस्थेचें दिवाळें वाजत असतांना , त्यांचें अनुकरण आंधळा वा बहिरा तरी करील काय ? आह्माला आमच्याच संस्कृतीचा स्वाभिमान असून तिचाच अवलंब करावयाचा आहे. फरक एवढाच कीं, तो नवीन प्रागतिक जगासमोर नवीन स्वरूपांत अस्तित्वांत आणावयाचा आहे असेंहि कांही नाही. जुन्याच मताचें आज पुनरुज्जीवन करण्याची वेळा आली आहे. याकरिता मी आमच्या वाचकांकरितां म्हणून आपल्या आद्य ऋषिमुनिप्रणित आदरणीय पूर्वजांचें मत येथे प्रकट केल्यास साशंकपणा नाहीसा होईल.—

उनषोडश वर्षायामप्राप्तः पंचविंशतिम् ।
यद्याधत्ते पुमान् गर्भं कुक्षिस्थः स विपद्यते ॥ "

अर्थात्

" जर सोळा वर्षांहून कमी वयाच्या स्त्रीच्या ठिकाणी पंचवीस वर्षांहून कमी वयाच्या पुरुषा कडून गर्भ राहिला तर तो पतन पावतो " व तो जगलाच तर सदा रोगी व अशक्त असा राहतो.

" ब्रम्हचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् "

ह्मणजे

" मुलगी वयाला लायक झाल्यावरच तिचा विवाह करणें योग्य समजावें "

किंवा

" प्राग्रतो : कन्याया न दानम् "

ह्मणजे

" मुलीस ऋतु प्राप्त होण्यापूर्वी तिचा विवाह करूं नये "

वा. रा. अ. कां. स. ११८ मध्ये श्रीसीतादेवी स्वतःच्या विवाहासंबंधाने श्रीअनुसूयेस ह्मणते:—

' पतिसंयोगसुलभं वयो दृष्ट्वा तु मे पिता '

अर्थात्

' माझ्या पित्याने माझें वय पतिसहवासाला योग्य झालें आहे असें पाहिलें तेव्हांच त्याने माझें स्वयंवर आरंभिलें. '

किंबहुना

' मम भर्ता महातेजः वयसा पंचविंशकः ।
अष्टादशोहि वर्षाणि मम जन्म निगण्यते ॥ '

' स्वयंवरकालीं माझ्या परम तेजस्वी पतीचें वय २५ वर्षांचें होतें आणि माझें वय तेव्हा पूर्ण १८ वर्षांचें होतें. '

या अनेक साधार निबंधावरून असेंच सिद्ध आहे कीं, ' **बालविवाह** ' हे परराष्ट्रांतच नाहीं तर खास आपल्या जन्मभूमींत-देखील सदासर्वकाळीं त्याज्य मानले गेले आहेत, मानले जात आहेत, व केव्हांहि मानले जाणारच ' प्रौढविवाह ' ह्मणजे हा एक वेदाङ्कित प्रबल असा अखंड प्रवाह आहे.. याशिवाय आणखी गतकालाकडे दृष्टि फेंकलीच तर दमयंती, रुक्मिणी, सुभद्रा, द्रौपदी, संयोगिताप्रभृतींचीं अनेक स्वयंवरें झालीं तीं प्रौढपणींच ना ? हे आपलेच पूर्वज ना ? मग आमच्यांत ही ' बालविवाहाची ' राक्षसी प्रथा मध्येच कशी रूढ झाली हा मोठा विचारार्ह प्रश्न आहे. पण ह्याला आमचें एक उत्तर आहे. देशकालपरिस्थितिनुरूप केवळ जनतेच्या अज्ञानामुळे ही चाल रुळली गेली असावी व ती आज त्याच लोकांत तशीच हयात आहे. ह्मणून ही प्रथा कोणताहि सुशिक्षित व समंजस पुरुष वा स्त्री कालत्रयींहि मान्य करणार नाही. योग्य तेंच अबाधित सत्य ' महाजनो येन गतः स पंथा ' या तत्वान्वयें आमचा वीरशैवसमाज इकडे आपलें लक्ष वेधणार नाहीं काय ?

## आंतर्जातीय मिश्रविवाह

' **वि**वाह ' ह्मटला कीं, स्त्री आणि पुरुष ह्या दोन भिन्न व्यक्तींचा एकनिष्ठा व संबंधाचा शाश्वतपणा हीं त्यांच्या नात्यांत प्रधान मानलीं जातात. आमचें सामाजिक जीवन ह्मणजे अज्ञानांधकाराची नीलतम रजनी आहे. त्यावर सुधारणेचा 'प्रभाकर' आपले प्रखर किरण जेव्हा पूर्णत्वाने पाडील तोच आमचा सुदिन समजला जाईल. कोणतीहि सुधारणा घडवून आणतांना समाजांत एकी हवी आहे. किंबहुना एकी हाच संघटनेचा आत्मा आहे. एकीनेच सर्व कार्यसिद्धी होत असते. आणि एकीचेंच बीज ' विवाहसंस्थेंत ' पूर्णत्वाने रुजलेलें आहे. बालविवाहासारख्या आसुरी संस्था तर सर्व काळीं व स्थळीं त्याज्य मानल्या गेल्या आहेत, हें प्रथमलेखांकांतच लेखकांनी सिद्ध करून दाखविलें आहे. व आज आपल्याला येथे विवाहसंस्थेच्या दुसऱ्या अंगाचा प्राचीन आधुनिक व प्रचलित अशा अनेक बाजूंनी वीरशैवसमाजाच्या हितेच्छु तत्वावर ऊहापोह करावयाचा आहे.

' शाब्दिक प्रामाण्य ', हें आह्माला अबाधित मान्य नाही तरी पण आमच्या वंदनीय पूर्वजांनी आखून ठेवलेल्या त्यांच्या तत्वाधाराचें जर आजच्या प्रचलित कार्याला सहाय्य होऊं शकत आहे, तर तो येथे कां देऊं नये. येन तेन कोणत्याहि का प्रकारें होईना, आह्माला आमचे उद्दिष्ट हेतु साध्य करावयाचे आहेत. पोहचावयाचे एकाच विशिष्ट स्थळीं असतें. मग ज्याला जो मार्ग परवडेल त्या मार्गाचा तो अवलंब करितो. आणि आज आमच्या समाजाच्या प्रागतिक दृष्टीने त्यांच्यापुढे प्रस्तुत आधार ठेवणेंच इष्ट आहे. पण या सवडीचा मार्ग आपल्या इच्छित कार्याला सरळ पडेल अशीच

ती सवड असावी. सवडीचें रूपांतर सर्रास मेषाचाराकडे न झालें ह्मणजे चालेल. आजच्या चर्चेचा मुख्य हेतु वीरशैवांतील आंतर्जातीयांच्या मिश्रविवाहांचा आहे व तोहि 'मिश्र बालविवाहाचा' नाही तर कायद्याने सज्ञान झालेल्या 'मिश्र प्रौढसंमतिविवाहा'-चा आहे. कायद्याने सज्ञान न झालेल्या मुलामुलींच्या आईबापाने स्वतःचे हौसेखातर किंवा उच्च वर्गीयांत 'पंक्तिपावन' होतां यावें ह्मणून जर एखाद्या वधुवरांचा आंतर्जातीय मिश्रविवाह लावला तर तो खरा सुधारणावादी मिश्रविवाह नव्हे व त्याला नवमतवाद्यांचा पाठिंबाहि मिळणें दुर्लभच. श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी 'नवमतवादां'-त प्रतिपादिलेल्या 'प्रौढसंमतीविवाहा'-चें वास्तवस्वरूप तरी असेंच असावें व त्यांच्या मताशीं आमची मतें विसंगत नाहीत अशी माझी समजूत आहे.

श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी आपल्या नवमतवाद लेखांतून स्थूल मानाने विवाहविषयक चर्चा केली आहे तरी त्यांनी आंतर्जातीय विवाहाबाबत विस्तृत चर्चेसह अधिकृत मत जाहीर करणे आवश्यक आहे. ह्मणजे त्यांच्या सहमतवादीयांना आपआपल्या भागांत आचार-विचारांच्या दृष्टीने कार्यास चालना देण्यास बरें पडेल. हा विचार पुढे घेतांना आपण थोडे गतेतिहासाकडे वळूं या. 'सत्य हें वस्तुतः लंगडें आहे. त्याच्या संरक्षणाकरिता त्याला शक्तीची जोड द्यावी लागते.' परमपूज्य श्रीबसवेश्वर यांच्या कालाकडे नजर टाकली तर बसवकालीं व तत्पूर्वकालीं कोणतीहि पोटजात विषमता मानीत नव्हती, व तदनंतरहि अशी स्थिति नव्हती. ह्मणून आज जी विषमता आपणांत घुसली आहे ती आह्मास नाहीशी करावयाची आहे. "वीरशैव तितुका मेळवावा" हेंच ध्येय दरेक वीरशैव ह्मणविणाऱ्यांनी सदोदित आपले मनःश्चक्षूंपुढे ठेवावें व ह्याच न्यायाने बाराव्या शतकांत मधुवरस नामक अत्यंत कर्मनिष्ठ ब्राह्मणा (जंगम)-ने हळवय्या नामक शूद्रा- (चांभार) च्या मुलास आपली कन्या देऊन मोठ्या समारंभाने असे अनेक विवाह केले गेले— त्या अर्थी त्यांच्या वंशजाशीं न कळत तरी आपला संबंध आलाच पाहिजे. — पण आज आमच्या धर्मबांधवास असें थोर अंतःकरणीय वृत्तीचे ऊर्जितदशेस पोंहचविणारीं कार्यें 'शिव शिव' वाटतात. मनुष्यजात येथून तेथून एक. अफाट पसरलेल्या मानवी जीवनांत केवळ मानुष्कीचें जिवंत रक्त खेळावें म्हणूनच ही सामाजिक बंधनाची रचना आहे. कोणताहि समंजस ती प्रामाणिकपणें मान्य करणारच! मग 'शिव शिव' असे खेदजनक उद्गार कां ह्मणून निघावेत? ह्याला काय ह्मणावें? हें अज्ञान कीं गतानुगतिकत्व! 'सर्व वीरशैव द्विजत्वाचे अधिकारी आहेत' व स्वधर्मभूषण रेणुकाचार्य ह्मणतात 'स्वमार्गाचारनिरताः सजातीया द्विजास्तु ये। तेषां गृहेषु भुंजीत नेतरेषा कदाचन.' अर्थात् 'सर्व द्विजांनी आपापसांत भोजन केलें पाहिजे' अशी धर्माधिकाऱ्यांची स्पष्ट आज्ञा असतांना आपआपल्या परीने पुनः ही खाण्यापिण्याची विषमता कशाला हवी! व्यक्तिगणिक जर धर्माचरण होऊं लागलें तर ऐक्य होणार कसें? जेथे ऐक्य नाही तेथे धार्मिक सामर्थ्य तरी काय नांदणार? अशा वेळीं उत्तरापेक्षा प्रश्नालाच काठिण्य यावें लागतें. आमचे विद्वान लोक वैदिक धर्माला सर्वश्रेष्ठ असा धर्म समजतात, पण आह्माला तरी निदान यांत स्वतःची पाठ स्वतःच थोपटून घेण्यापलीकडे कांहीच वाटत नाही. वर्णव्यवस्थेला अफाट पूर येऊन—शेवटीं एकाच स्थळीं सर्वांचा वास होणार ह्यावें विसारण होऊनच कीं काय—एकाच सरितेला अनेक जातिभेदांचें मुख निर्माण केलें गेलें. पण त्याचा परिणाम मात्र बिचाऱ्या अस्पृश्यांना परधर्मीयांच्या तोंडाकडे पहाण्याच्या दुर्बुद्धींत झाला आहे. श्रीमच्छंकराचार्य कुर्तकोटी; डॉ. म. गांधी, पं. मालवीयजी सारखे प्रणेते अस्पृश्यता नाहीशी करण्याकरिता

संमति देत आहेत - किंबहुना नाहीशी करीत आहेत. बॅ. सावरकरांनी तर स्पृश्यास्पृश्यांचीं सहभोजनें घडवून आणण्याचा विडाच उचलला आहे. पण केवळ सनातन्यांच्या हट्ट-अरेरावीमुळे डॉ. आंबेडकरांनी धर्मांतराची घोषणा केल्यापासून किती तरी अस्पृश्य बांधवांनी इस्लामी धर्मांत पदार्पण केलें आहे, व करीत आहेत. नुकतेच चांदा शहरांतील एका अस्पृश्य जातीच्या प्राथमिक शिक्षकांनी मुसलमानी धर्माची दीक्षा घेऊन तो धर्म स्वीकारला आहे. असा एकेक हिंदु परधर्मांत गेल्याने हिंदुधर्माचें संख्याबळ कमी होण्यास कितीसा वेळ लागणार ! स्वधर्माच्या व्यक्ति परधर्मांत जाऊं देण्याइतकी ज्या धर्माची व धर्माभिमानी सनातन्यांची लायकी, त्याचे यापेक्षा विशेष तें काय वर्णन करीत बसावें ? धन्य आहे ( ! ) त्या प्रचंड क्रांतिकारक बसवेश्वराची ! जें कार्य आज सुधारणेच्या युगांत थोर थोर विभूतींचें वजन खर्ची पडत असतांना यशस्वी होऊं शकत नाही, तेंच कार्य बसवेश्वरांनी १२ व्या शतकांत सुधारणेच्या माथ्यावर नेऊन बसविलें होतें. ' जें जें सत्य आणि न्याय तेंची अंतीं पावे जय. '

असो. एवढेंहि पुढे जाण्याची आह्माला कांहीं जरूर भासत नाही. ज्या अर्थी दीक्षासंस्कारांनी प्रत्येक वीरशैवलिंगायत द्विजत्वाचा अधिकारी आहे त्या अर्थी त्यांच्यांत सर्रास ' रोटीव्यवहार ' तर झालाच पाहिजे हें निर्विवाद आहे. व ही अट क्रमाक्रमाने समाजांतून नाश पावत आहे. पण ती शक्य तेवढ्या लवकर पूर्णपणें नाहीशी व्हावी असेंच कोणाहि सुज्ञ वीरशैवास वाटेल. कारण संघटनेच्या सामर्थ्याचें बऱ्याच अंशाने श्रेय ह्या महत्वाच्या बाबीकडे जातें. याच संघटनेला जर ' दुधांत साखर ' घालण्याचें परम उच्च श्रेय संपादावयाचें, ह्मणजेच वीरशैवांत सरसहा ' मिश्र विवाह ' घडवून आणणाराकडेच जाणार आहे, व आजच्या कालमानाप्रमाणे हेंच प्रत्येक लिंगधाऱ्याने आपलें कर्तव्य मानलें पाहिजे. " प्रसंगानुसार वागण्यांतच धर्माचें व राष्ट्राचें संरक्षण आहे " हें धर्मतत्व नीट लक्षांत ठेवा अशी श्रीमनूचीं स्पष्ट आज्ञा आहे. एकच बंधन सर्वकालांत सर्वांना सारखेंच लागू पडणें असंभाव्य आहे. किंबहुना 'धर्मगुरुचा अधिकार राजामहाराजापेक्षाहि अधिक आहे. ' आहे त्यांतच सुधारणा करणें हेंच खऱ्या सुधारकांचें व धर्मगुरुंचें कर्तव्य आहे आणि देशकालपरिस्थिति - अनुरूप वागणें हेंच खऱ्या जिवंत मानवाचें लक्षण आहे.

आचार वा दांभिक सोवळें हें काही हिंदु वा वीरशैवधर्माचें तात्विक लक्षण वा बंधन नाही. पाश्चात्यांची सध्याची सुधारणा तर ही निःसंदेह अधमाधम कुधारणाच होय. ह्मणून आम्हाला कोणत्येंच मत मान्य नाही. ' वीरशैव ' हा एक ' वैदिक ' धर्माचाच प्रमुख अंश आहे. त्याला त्याच्या भाबंडांच्या मालिकेंत समान हक्क गाजविण्याची सुबुद्धि झाली आहे. पण ती शेवटास जाणें सामाजिक ऐक्याच्या सामर्थ्यांत एकवटली आहे. व सामाजिक ऐक्याचा मूलभूत भक्कम पाया ह्मणजेच वीरशैवांतील आंतर्जातीय 'मिश्रभोजन' नि ' मिश्रविवाह ' ह्या उदात्त संस्था आहेत. ह्या जातिभेदाच्या कच्च्या मातीच्या भिंतीचा विध्वंस आमच्या सुविद्य व समंजस वीरशैव महाशयांनी ' कर्तुः संयोगजं कर्म ' या सृष्टीच्या न्यायान्वयें तूर्त मनावर घेण्यांतच आपल्या धर्माचें हित साधणार आहे.

---

### महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळ
## घटना

कांहीं अपरिहार्य कारणामुळे ह्याहि अंकीं घटना प्रसिद्ध होऊं शकली नाही. ह्याबद्दल दिलगिरी वाटते. लौकरच घटना प्रसिद्ध होईल.

वि. तु. चौधरी, ज. सेक्रेटरी.

# स्वागताध्यक्षांचें भाषण

## श्रीमंत रामचंद्रशेट कुळी,

*अध्यक्ष, महाराष्ट्र-वीरशैव-हितसंवर्धक मंडळ, ह्यांचें स्वागतपर भाषण—*

( रोहिणखेड वीरशैव परिषद् १९-४-३६ )

वीरशैवसमाजाचें स्वागत करण्याचा योग सुदैवाने माझेकडे आलेला असून, आज येथे जमलेल्या मंडळीचें मी प्रेमपूर्वक स्वागत करितों. आपल्या व्यवस्थेच्या बाबतींत अनेक उणीवा असून, त्यामुळे मंडळींना बऱ्याच अडचणी सहन कराव्या लागतील.

रोहिणखेड हा गांव एके बाजूला असून साधारण खेडेवजा असल्याने, शहराप्रमाणें येथे आपले सुखसोयीची व्यवस्था राहाणार नाही. पूर्वकाळी ( दोंडशें वर्षांपूर्वी ) हा गांव वैभवसंपन्न स्थितींत होता, आणि सांगण्यास आनंद वाटतो कीं, त्या भरभराटीचे काळांत ह्या गांवचें सर्व प्रकारचें प्रभुत्व वीरशैवसमाजांतील शेटे (भिकाशेटे) या प्रसिद्ध घराण्याकडे होतें. तसेंच, ह्या घराण्याचें या गांवचे परगण्याखालील गांवावरहि इनाम जमीनी वगैरे प्रकारचें वैभवशाली प्रभुत्व होतें. भिकाशेट या शूर व्यक्तीची साग्र हकिकत आणि त्यानंतर त्या घराण्याची व या गांवचे ऱ्हासाची हकीकत सांगण्याकरिता एक निराळी बखरच लिहावी लागेल. असा ह्या घराण्याचा संक्षिप्त इतिहास सांगण्याला जसा आनंद वाटतो, तसेंच त्या घराण्याचे हल्लीचे शोचनीय स्थितिबद्दल दुःखहि वाटतें. हल्लीं त्या घराण्यांत फक्त नांवापुरते सर्व प्रकारचे ( पोळा, दसरा, हुताशनी वगैरेबद्दलचे ) अग्रेसरत्वाचे मान शिल्लक राहिले असून, रोहिणखेड येथे व परगण्यांतील दुसरे गांवीं कांही इनाम जमिनी शिल्लक राहिल्या आहेत, अशा पूर्वकाळच्या वैभवसंपन्न वीरशैव घराण्याकडे प्रभुत्व असलेल्या (हल्ली खेडेवजा असलेल्या ) रोहिणखेड गांवीं सभा भरण्याचा योग येऊन यवतमाळ जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध जहागीरदार घराण्यांतील श्रीमंत दत्तात्रय कृष्णराव देशमुख यांनी सभापतींचें स्थान मंडित केल्याचा योग सुदैवाने आला आहे. याप्रमाणे आजच्या स्वागताची परिस्थिति आपणापुढे मांडून सभेचा यापुढील कार्यक्रम सभापती सुचवितील त्याप्रमाणे सुरू होणार असून, त्याबद्दल मीं कांही सुचविलें नाही तरी चालण्यासारखें आहे. तथापि समाजसेवक या नात्याने कांही सूचना कराव्या ही इच्छा असल्यावरून त्या पुढे मांडीत आहें.

**शैक्षणिकः**— कोणत्याहि सुधारणेस प्रथम पाया शिक्षणाचा असल्याने समाजांत शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे आणि त्याबरोबरच नैतिक व शारीरिक शिक्षणहि दिले गेलें पाहिजे. अलीकडे नैतिक व शारीरिक शिक्षणाकडे ( काम करण्याच्या प्रवृत्तीकडे ) दुर्लक्ष होत असल्याने शिक्षणापासून समाजाचे सर्वांगीण सुधारणेस फायदा न होतां समाजांत अडचणींचें वातावरण निर्माण होत असतें, आणि कष्टाळू स्वावलंबी वृत्तीचा ऱ्हास होतो. करिता सर्वांगीण सुधारणेच्या शिक्षणाचा प्रसार करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.

सामाजिकः—त्याचप्रमाणें सामाजिक सुधार-णेचे बाबतींत समाजसंघटनात्मक एकीकरण झालें पाहिजे. या एकवाक्यतेला रोटीव्यवहार वगैरे प्रश्नास प्राधान्य दिलें न जातां जेथे जेथ रोटीव्यवहाराची एकवाक्यता होणें योग्य दिसत असेल तेथे तेथे पोटभेद न बाळगतां रोटीव्यवहाराची एक-वाक्यता ठेविली पाहिजे. तसेच, अशा प्रकारच्या एकवाक्यतेचा व्यवहार करणें अयोग्य आहे असा प्रश्न जेथे दिसून येत असेल, अशा बाब-तींत एकवाक्यता करण्याचे भरीस पडूं नये. अशा रीतीने समाजांतील एकवाक्यतेला प्राधान्य दिलें पाहिजे.

धार्मिकः—आपले धार्मिक गुरु ( पीठाधि-कारी मठाधिकारी ) जंगम वर्ग यांचा व भक्त-वर्गाचा ( समाजाचा ) पूर्वापारपरस्परसंबंध प्रेमभावाचा व भक्तिभावाचा आहे. आपल्या समाजांत पंचाचार्यमठापासून तो मठाधिकारी व पीठाधिकारीपावेतो गुरुची परंपरा चालत आलेली असून या गुरुवर्गाकडून समाजाला पोषक असें ज्ञान मिळत असे व समाजहितोपदे-शद्वारां समाजहित साधण्याचें गुरुवर्गाचें ध्येय असे. यायोगें गुरुवर्ग व भक्तवर्ग यांचे संबंध जिव्हाळ्याचे राहून भक्तीची व प्रेमाची भावना उत्कृष्ट रीतीने समाजांत जागृत राहत असे. अलीकडे या भावना बऱ्याच अंशीं कमी झाल्या आहेत. त्या भावना जागृत होण्याबद्दल गुरुवर्ग व भक्तवर्ग यांचेकडून प्रयत्न होणें जरूर आहे.

'आर्थिक':—पन्नास वर्षांपूर्वी ज्या ज्या गांवीं वीरशैवसमाज होता त्या त्या गांवीं व्यापा-राची सूत्रें बहुतेक वीरशैवसमाजाकडे असल्याने सर्व वीरशैवसमाजाची स्थिति आर्थिक दृष्ट्या समाधानकारक होती. अलीकडे व्यापारी धोर-णांत बदल झाला असल्याने पूर्वीचें धोरण कुच-कामी ठरलें आहे. शिक्षणाचे अभावीं बदलत्या परिस्थितींतील व्यापारी धोरणास वीरशैवसमाजाला ( गुजराथी, मारवाडी,कच्छी,वगैरे समाजाप्रमाणे ) तोंड देतां आलें नाही. वीरशैवसमाज हा पूर्वी-पासून बहुतेक व्यापारावर अवलंबून असल्याने व हल्लींचें व्यापारी धोरण वीरशैवांस अवगत नस-ल्याने सावकारी व शेतीचे तुरळक व्यवसायी सोडून बाकीच्या वीरशैवसमाजाची स्थिति खालावली असून, त्यांत आणखी लग्नकार्य वगैरे प्रसंगीं जास्त खर्च करण्याची रूढी यांची भर पडत असल्याने समाजाची स्थिति हल्लीं शोचनीय झालेली आहे. यावर शक्य ती उपाययोजना झाली पाहिजे.

याप्रमाणे समाजाची शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, वगैरे बाबतींत सर्वांगीण सुधा-रणा होण्याकरिता एखादी संस्था स्थापन करण्याचा विचार व्हावा व ह्याच कार्याकरिता निरनिराळ्या ठिकाणची कार्यकर्ती मंडळी येथे अडचणी सोसून जमली आहेत. तरी मी आपणां सर्वांचे पुन्हा मन:पूर्वक स्वागत करतों.

---

# श्री सिद्धराम स्वामींचें जर्मनींतील अपूर्व यश

( आमच्या बातमीदाराकडून, विमान टपाल मार्गाने )

हनुमान व्यायाम प्र. मंडळाचे हिंदी खेळाडूंचा कार्यक्रम पाश्चिमात्य व्यायामपटु व खेळाडूंचे समोर आंतरराष्ट्रीय क्रीडांगणांवर सुरूं झाला. खेळ पहाण्यास मनस्वी गर्दी झाली होती. विशेषतः



प्रेक्षकगणांतील महिलांचा उत्साह अपूर्व होता. निरनिराळ्या राष्ट्रांतील खेळाडू निरनिराळ्या वेश-भूषेंत हजर होते. छायाचित्रें व चलच्चित्रपट घेणाऱ्यांची सारखी धांदल उडून गेली होती.

हिंदी संघाचे कॅप्टन् अण्णासाहेब असनोरे यांच्या अधिपत्याखालीं बरोबर १० वाजतां क्रीडांगणांवर खेळाडूंनी पदार्पण केलें. टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत अगणित जर्मन स्त्री-पुरुषांनी त्यांचें स्वागत केलें. हिंदी खेळाडूंनी शुभ्र व नीलवर्णाचा गणवेष धारण केला होता. प्रथम लेझीम वगैरे खेळ झाल्यावर " मलखांब "-वरील खेळ सुरूं झाला. श्रीगुरुसिद्धराम स्वामी, श्री. नांदूरकर, व देशपांडेप्रभृतींनी आपलें 'मल-खांबा' वरील कौशल्य उत्कृष्टतेने प्रेक्षकांचे नजरेस आणलें. " हिंदी मलखांब " हा पाश्चात्य प्रेक्षकांच्या औत्सुक्याचा व जिज्ञासेचा विषय होता. 'मलखांबा'-वरील चपलतेच्या उड्या व कसरतीचे खेळांचे प्रसंगीं वरचेवर टाळ्या वाजवून सारे प्रेक्षक आपले धन्यवाद दिग्दर्शित करीत. अमेरिकेचे डॉ. नाह, इंग्लंडचे डॉ. मेजर, व डेन्मार्कचे डॉ. क्नुशडेन ह्यांनी "मलखांब" मध्यें अंतर्भूत झालेल्या व्यायामपद्धति-विषयी धन्योद्गार काढले व जर्मन— व्यायाम-पद्धतींत " मलखांब "-चीहि योजना करण्याबद्दल सर्व व्यायाम व शरीरतज्ञांनी विचारविनिमय केला.

श्री सिद्धरामस्वामी ज्या वेळीं " बोथाटी " फिरवावयास लागले त्या वेळी सर्व प्रेक्षकांतून धन्यो-द्गारांचे आवाज बाहेर पडले, व सर्वत्रांनी टाळ्यांच्या निनादांत आपला हर्ष प्रगट केला. बोथाटी फिरविणे थांबतांच—कित्येक व्यायाम-पटूंनी श्रीगुरु माजलगांवकरांचे भोंवती गराडा देऊन त्यांना नाना प्रश्न विचारले. कांहींनी त्यांचे-जवळील बोथाटी घेऊन फिरविण्याचा प्रयत्न केला; पण तें कुणालाच साधलें नाही. अशा तऱ्हेने श्रीगुरु सिद्धरामस्वामी ह्यांनी 'मलखांब' व 'बोथाटी' ह्यांमधील आपल्या खेळनैपुण्याने जर्मनींतील खेळाडूंना आश्चर्योद्गार काढावयास लाविले व जर्मन-व्यायामपद्धतींत " मलखांब व बोथाटी " ह्या दोन खेळांना कायमचें स्थान मिळवून देण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

साऱ्या जर्मन राष्ट्राने त्यांचे खेळांतील नैपुण्या-बद्दल कौतुक केलें. जर्मनींतील ऑलिंम्पिक सामने संपल्यावर हिंदी खेळाडू येथून १७ ऑगस्टला निघून ॲमस्टरडॅम, लंडन, पारिस, व मार्सेलीस या मार्गानें ता. ४ सप्टेंबरचे फ्रेंच बोटीने कोलंबो-कडून हिंदुस्थानांत येणार आहेत.

# उपयुक्ततावादाचें मन्वंतर

[ले.—श्री. ल० सो० एकलारे, बी. ए. (ऑनर्स), एल एल. बी., वकील, पुसद.
उपाध्यक्ष, महाराष्ट्र वीरशैव हित-संवर्धक मंडळ.]

मन्वंतरें बदलती जाती जुनिं तीं नवीं नवीं येती ।
कदली सुफला होती, सुकती, मरती, नवांकुरी जगती ॥

आधुनिक तत्वज्ञानाचे अभ्यासकांना (Utilitarianism) अथवा उपयुक्ततावाद म्हणजे काय हें माहीत झालेलें असतें. उपयुक्ततावादाचे तत्वानुसार कोणत्याहि गोष्टीचें अथवा क्रियेचें मूल्यमापन तिच्या उपयुक्ततेच्या प्रमाणावरून ठरवावयाचें असतें; म्हणजे मानवी कल्याणाचे दृष्टीने ज्या प्रमाणांत एखादी गोष्ट वा क्रिया कमी-आधिक उपयुक्त म्हणजे गरजेची व फायदेशीर असेल, त्या प्रमाणांत ती गोष्ट कमी-आधिक शिष्टसंमत समजली जावी असा या वादाचा मूलभूत सिद्धांत आहे. उपयुक्ततावादी लोक याच सिद्धांतानुसार पूर्वापार व नवीन धर्माचार, नैतिक कल्पना व व्यावहारिक क्रिया या सर्वांची छाननी करून त्या सर्वांना उपयुक्ततेच्या ( Touchstone ) कसोटीवर घांसून त्यावरून त्यांची योग्यता ठरवून त्या गोष्टी आचारसंमत करीत असतात. हा उपयुक्ततावाद नुसत्या तत्वज्ञानाच्या अभ्यासकांनाच नव्हे तर तो सध्याचें काळांत बहुजनसमाजालाहि व विशेषतः आमच्या वीरशैवसमाजाला तरी शिकण्याची व आचरणाची आत्यंतिक जरूरी आहे.



बुद्धि हें निसर्गतःच मनुष्यप्राण्याचें वैशिष्ट्य आहे आणि म्हणून प्रत्येक सुबुद्ध माणसाने कोणत्याहि विशिष्ट आचाराविचारासंबंधी अगर क्रियेसंबंधी स्वाभाविकपणेंच "किम् प्रयोजनम् ?" म्हणून त्याची उपयुक्तता काय असा प्रश्न करणें अगदीच अपरिहार्य आहे. तसें न झालें तर व्यवहारांतील प्रयोजकता म्हणजे चातुर्यच नाहोसें झालें असें म्हणावें लागेल; आणि हा प्रश्न नवीन आचारविचारांचे बाबतींत जसा प्रत्येकाला विचारण्याचा अधिकार आहे तसाच तो जुन्या आचारविचारांना व रूढींनाहि लागूं आहे. या स्वाभाविक प्रश्नास जर खरोखर कांही समाधानकारक व हितावह असें उत्तर मिळत असेल तरच कोणताहि सुबुद्ध माणूस तो विशिष्ट आचारविचार स्वीकारील, नाहींतर तो खुशाल त्याचा त्याग करील. मग तो आचारविचार कितीहि जुना असो व त्याचे

जीर्णत्वास सांवरून धरण्यासाठी त्याचे पाठीमागें कितीहि शास्त्रार्थाची शस्त्रास्त्रें उभीं असोत, त्याची तो खंत बाळगणार नाही. उपयुक्ततेच्या या कसोटीनेच पुराणमतवादी किंवा नवमतवादी आचारविचारांचें परीक्षण करून, अधिकाधिक समाजकल्याणपरिपोषक अशीं जीं जीं तत्वें, विचार, व आचार असतील, त्यांचाच आमच्या वीरशैव बांधवांनी सध्याचे काळांत अवलंब केला पाहिजे, व बाकीची निरर्थक श्रमापव्ययी व कालापव्ययी म्हणून त्याज्य ठरविलीं पाहिजेत.

'वासांसि जीर्णानि यथा विहाय। नवानि गृण्हाति नरोऽपराणि।'-जुनी व टाकाऊ म्हणजे उपयुक्ताहीन झालेलीं वस्त्रें जसा समंजस मनुष्य टाकून देतो व त्याऐवजीं नवीन व आवश्यक तऱ्हेचीं वस्त्रें परिधान करितो, हें मानवी जीवनांतील सदैव दृष्टोत्पत्तीस येणारें व श्रीकृष्णांनी पुनर्जन्म व आत्म्याचें अमरत्व सिद्ध करण्यासाठीं दृष्टांतादाखल भगवद्गीतेंत सांगितलेलें तत्व — धर्मज्ञानविषयक निष्क्रीय बडबडीचे वेळींच फक्त पोपटपंचीप्रमाणें बोलून दाखवावयाचें, परंतु त्याच तत्वाचा आपल्या अगर समाजाच्या नित्याच्या जीवनांत, विचारांत व आचारांत उपयोग करण्याची वेळ आली म्हणजे मात्र "पुराणांतलीं वांगीं पुराणांतच" विसरून आमच्या वीरशैव-समाजांतील कांही धर्ममार्तंडांनी व त्यांच्या खुषमस्कऱ्या कंपूंनी अकांडतांडव करण्याचा हास्यास्पद प्रकार करावा यावरून त्यांच्या मेंदूची विकृति व सुविचारांचें अग्निमांद्य याशिवाय इतर कोणतीहि गोष्ट अधिक स्पष्ट होत नाही.

वृक्षलतांच्या वाढीचा दृष्टांत समाजाचे आचार-विचारासहि लागू पडण्यासारखा आहे. वृक्षलतांची जीर्ण व उपयुक्ताहीन झालेलीं पानें आपोआप गळून पडल्यास, अगर कोणीं तीं बुद्धिपुरस्सर पाडलीं तरी जर एखादा मनुष्य त्याविषयी हळहळ अगर कळवळा दाखवूं लागला तर तें असमंजस-पणाचें निरर्थक ढोंग समजल्या जाईल; किंबहुना "कीं तोडिला तरु फुटे अणखी भराने" या न्यायानुसार समाजवृक्षाच्या आचारविचाराची जीर्ण पिवळट पालवी झाडून व जीवनोत्कर्षास असमर्थ अशा शाखा छाटून त्याऐवजीं नवीन आचारविचारांची हिरवी पालवी व अनेक नवीन शाखा यांची वृद्धि करणें हेंच आमच्यांतील समाजनेत्यांचें व समंजस लोकांचें कर्तव्य आहे.

'वीरशैव संजीवनीं'-त यापूर्वी प्रसिद्ध झालेले श्री. चौधरी यांचे प्रगतिपर विचारप्रवर्तक नवमतवादाचे लेख व त्यांचा यथायोग्य सुवर्णमध्य दाखविणारे श्री. काटकर यांचे तर्कशुद्ध समर्पक लेख, व तसेच, 'संजीवनी'-चे इतर प्रागतिक सुधारणाप्रिय लेखक व लेखिकांचे विचार, ह्या सर्वांचा गुरुत्वमध्य कोठे आहे हें थोडक्यांत एका शब्दांत जर सांगावयाचें झालें तर तो वर स्पष्टीकरण केलेल्या "उपयुक्ततावादांत"-च आहे असेंच म्हणावें लागेल. कारण त्या सर्व लेखांची व विचारांची मांडणी जरी व्यक्तिवैशिष्ट्यानुसार निरनिराळ्या तऱ्हेची असली व त्यांच्या भाषेचे पेहेराव जरी कित्येक दृष्टिदुर्बलांना कमी-अधिक भडक रंगाचे भासत असले, तरी त्या सर्वांचे अंतरंगांतील केंद्र अथवा आत्मा कालमानानुसार उपयुक्ततेच्या व्यावहारिक व व्यवहार्य अशा सर्व-संमत तत्वांतच सांपडतो.

रायचूर येथे गेल्या जून महिन्यांत भरलेल्या अखिल-भारतीय वीरशैवपरिषदेने पास केलेल्या, व तसेच राहिणखेड येथील गेल्या एप्रिल महिन्यांत पार पडलेल्या महाराष्ट्र-वीरशैवपरिषदेंत पास झालेल्या प्रागतिक ठरावांचे बुडाशींदेखील नवोदित समाजसेवकांची ही सद्बुद्धि व तळमळ दिसून येते कीं, आपल्या समाजांतील जास्तीत जास्त लोकांचें जास्तीत जास्त हित साधण्यास जीर्ण व उपयुक्ताहीन आचारविचारास, रूढीस व संस्थांस विरोधाची क्षिति न बाळगतां अंशतः अगर संपूर्ण तिलांजली दिली पाहिजे अगर त्यांत शक्य असल्यास चळवळीचे सामर्थ्याने सध्याचे जीवन-कलहास अवश्य अशा प्रगतिपर सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत; परंतु सखेदाश्चर्याची गोष्ट ही कीं, सदर्हू परिषदांतील ते उत्क्रांतिमय ठराव समाजांतील बहुजनमतांनी मंजूर झाले असतांहि कांही सुधारणापराङ्मुख विशिष्ट सनातनीवर्गाला ते अत्यंत क्रांतिकारक वाटून तेव्हांपासून त्यांची कशी खळबळ उडाली आहे व त्याविरुद्ध चळवळ करण्यास कशा प्रतिस्पर्धी संस्था व कंपू निर्माण होत आहेत हें आमचे वाचकवर्गाचे लक्षांत सहज येत असेल. ह्या निरर्थक कोलाहलामुळे आमच्या समाजप्रगतीचा गाडा थांबेल अगर त्यांच्या बुद्धिपुरस्सर

अपशकुनामुळे आमचें समाजकार्य बंद पडेल असें मुळींच नाही. परंतु समाजप्रगति व समाजसंघटने-सारख्या सामान्य बुद्धीच्या माणसाचें सहमत होण्यासारख्या कार्यांतदेखील कांही थोडे प्रामाणिक स्वयंस्फूर्त व बरेचसे अप्रामाणिक भाडोत्री विरोधक निर्माण होऊं शकतात हें कटु सत्य मात्र आज आमचे समाजास दुर्दैवाने व नाखुषीने पहावें लागत आहे. आणि या दृश्याची तीव्रता शक्य तितक्या लवकर नाहीशी होऊन आजच्या जागतिक मंदीच्या व सामाजिक चढाओढीच्या दुर्दिवसांत आमच्या रूढीप्रियतेच्या सनातनी आक्रमणामुळे बलहीन व किंकर्तव्यमूढ झालेल्या समाजास कार्यक्षम बनविण्यासाठी समाजसेवकांनी कळकळीने स्वार्थत्यागपूर्वक चालविलेल्या प्रगतिपर कार्यास अधिकाधिक लोकांचें अधिकाधिक सहकार्य मिळावें या हेतूने त्यांच्या कार्याचें, साधनांचे, व आचारविचारांचे बुडाशीं व अंतरगांत वस्तुतः जो उपयुक्ततावाद भरलेला आहे त्याचें तात्विक दिग्दर्शन व स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न या लेखांत केला आहे; आणि ह्याद्वारें आम्ही हें येथें अप्रिय परंतु उघड सत्य सांगू इच्छितों कीं, "पुराणमित्येवहि सर्व साधुम्" जुने तेंच सोनें मानण्याचा काळ आतां उरलेला नाही, इतकेंच नव्हे तर 'बाबावाक्यं प्रमाणं' मानण्याची अंधश्रद्धा व भक्तिहि सध्याचे समाजांत उरलेली नाही; कारण शिक्षण व ज्ञानाचे वाढीमुळे व कालमानपरिस्थित्यनुवर्ती इतर ज्या कांही समाजांनी आपली सर्वांगीण उन्नति करून घेतली आहे त्यांच्या व आपल्या तुलनात्मक निरीक्षणामुळे, चालू जीवनाकडे आचारविचार व रूढीकडे फक्त उपयुक्ततेच्याच हितावह दृष्टीने पहाण्याचा व त्या निर्णयानुसार वागण्याचा मनु आता निर्माण झाला आहे. शास्त्र, रूढी व पूर्वापारत्वाच्या कसोटीचा व अंधानुकरणाचा जुना मनु झपाट्याने नाहीसा होत असून, उपयुक्ततावादाचें नवीन मन्वंतर केव्हांच सुरू झालेलें आहे. आणि ही काळाची लाट, व दृष्टिपरिवर्तनामुळे, सध्याचे जीवनकलहास व समाजोत्कर्षास अवश्य अशा सुरू झालेल्या नवीन व्यापक चळवळींचा प्रवाह थांबणें अगर थांबविणें इष्टहि नाही व शक्यहि नाही.

"नवमतवाद" हे शब्द कानीं पडल्यावरोबर जे बुजाडत असतील, व ज्यांचे कान ठणकत असतील, अगर भुताटकीने पछाडल्यासारखी भावना होऊन ज्यांचे अंगास कांटा येत असेल, अगर मेंदूस धक्का बसून ते जणुं स्थानभ्रष्ट होऊन नानाविध विरोधक विचारांचें थैमान घालूं लागत असतील, त्यांना आमचें म्हणणें एवढेंच आहे कीं, त्यांनी तें पथ्यकर पण कडू असें औषध वाटल्यास निषिद्ध म्हणून बाजूस ठेवावें परंतु नवीन चळवळींच्या अंतरंगांतील उपयुक्ततावादाचें तरी थोड्या शांतचित्ताने व पूर्वग्रहदोषरहित व्यापक दृष्टीने निरीक्षण करून व तो पूर्णपणें पटवून घेऊन उपयुक्ततेच्या व्यावहारिक व व्यवहार्य अशा सर्वसंमत तत्वानुसार तरी आपल्या व पर्यायाने सर्व समाजाच्या अभ्युदयार्थ त्यांत शक्यतोंवर सहकार्य करावें; निदान विरोधानें आत्मघातकी व समाजद्रोही पाप तरी करूं नये. इतकेंहि करून विरोध झालाच तर हें स्पष्ट व स्वाभाविकच आहे कीं, आमच्यांतील ध्येयनिष्ठ व समाजकार्योत्सुक नवोदित समाजसेवक प्रगतिपथावरील विरोधाच्या धोंडांना उराशीं न बाळगतां हिंमतीच्या व संघटनेच्या जोरावर अपरिहार्य कर्तव्य म्हणून बाजूस सारून आपला निश्चित मार्ग आक्रमण करतील व कांही खऱ्या व कांही अकाली बनलेल्या म्हाताऱ्यांनी कोंबडे झांकण्याचा व पूर्वदिशेकडे आपले चिमुकले तळहात आडवे करण्याचा किती जरी हास्यास्पद निरर्थक प्रयत्न केला तरी प्राप्तकालानुसार उदित झालेल्या "नवप्रभेच्या" अधिकाधिक स्फूर्तिदायी प्रकाशांत त्यांचें अखंड कार्य चालू राहील, व त्यायोगें आमच्या समाजाची इतर समाजाचे बरोबरीने शैक्षणिक, औद्योगिक, आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय वगैरे सर्व दृष्टींनी कार्यक्षमता वाढून तो बलशाली व वैभवसंपन्न होईल असा विश्वास चालू चळवळीवरून निर्माण होत आहे एवढीहि गोष्ट कार्यकर्त्यांचे उत्साहास व आनंदास पुरेशी आहे.

# महाराष्ट्र-वीरशैव-परिचयपट

**२१. हसूरचंपू मठपती कुटुंबः—**

(१) राचय्या पोवाडयास्वामी गौरीमठ, वय ४१, विवाहित, मराठी कानडी व इंग्रजी ४ इयत्ता; धंदा भिक्षा व शेती; वीरशैव लोकसंख्या ५००; धार्मिक व सामाजिक खर्च १० ते १५ रु.; परोपकारार्थ बाहेर खर्च करावयाची इच्छा रु. ५.

**२२ श्री. तांदळे कुटुंब कारंजाः—**

(१) श्री. विश्वनाथआप्पा दगडाआप्पा तांदळे, मु. पो. कारंजा [लाड]; दिक्षवंत, गुरुमठ माजलगांवकर; वय ४०; पुनर्विवाहित; व्यापारी; मराठी येते, वीरशैव लोकसंख्या २५०. (२) सौ. लक्ष्मीबाई विश्वनाथआप्पा तांदळे, वय ३०, घरकाम, शिक्षित नाही. (३) कु. बबी विश्वनाथआप्पा, वय १३, मराठी ४ थी पास. (४) कु. पद्मि विश्वनाथआप्पा, वय ११, प्रायमरी शिक्षण सुरू. (५) कु. शांता विश्वनाथआप्पा, वय ८, शाळेत जाते. (६) कु. विराप्पा विश्वनाथआप्पा, वय ४.

**२३, श्री. पुराणिक कुटुंब दारव्हाः—**

(१) रामशंभु पुराणिक, वीरमाहेश्वर, गुरुमठ पांढुर्णा, वय ४५, विवाहित; धंदा प्रिंटिंग-प्रेस, स्टेशनरी, औषध व कापडाचें दुकान; मराठी येते. वीरशैव लोकसंख्या ५० ते ५५ दरसाल परोपकारार्थ १२५ रु. परोकारार्थ बाहेर खर्च करण्याची इच्छा ५० रु. (२) सौ. जानकीबाई वय ३०, घरकाम, मराठी लिहितां-वाचतां येते. (३) चि. सौ. इंदुकला, वय १४, प्रायमरी परीक्षा पास. (४) कु. मनोहर, वय १० वर्षें, ए. व्ही. स्कूलांत जातो. (५) कु. मधुकर, वय ६ वर्षें, प्रायमरी शाळेंत जातो. (६) कु. रत्नाकर, वय ३ वर्षें (७) कु. कुसुम, वय ४ महिने.

**२४. शिवडेकर कुटुंब चरेगांवः—**

(१) शंकर मारोतीशेट शिवडेकर (विभुते), लिंगायत पंचम तेली, गुरुमठ महासुलीकर. वय ४६, विवाहित, व्यापारी, मराठी येते. परोपकारार्थ खर्च २५ रु. परोपकारार्थ बाहेर खर्च रु. २० (२) रामचंद्र मारुति शिवडेकर, वय २५, विवाहित, व्यापार, मराठी ६ वी शिक्षण. (३) गणपती शंकर शिवडेकर, वय १५, अविवाहित, ए. व्ही. स्कूलांत जातो. (४) कृष्णकांत शंकर शिवडेकर, वय ३ वर्षें. (५) हरीबाई भ्र० शंकर शिवडेकर, वय १३, विवाहित, घरकाम, अशिक्षित. (६) सौ. सुशिला भ्र० रामचंद्र शिवडेकर, वय १८, घरकाम, अशिक्षित. (७) कु. गंगु शंकर शिवडेकर, वय ८ वर्षें. (८) कु. भागिरथी शंकर शिवडेकर, वय ५ वर्षें. (९) कु. महादु मारुती शिवडेकर, वय २१, व्यापार, मराठी ५ वी पास.

---

# वीरशैवांतील चळवळी

## पुराणाची समाप्ति

उमरावती येथील सुप्रसिद्ध माहेश्वरमूर्ति शिवभक्तपरायण दादाशास्त्री नागपूरकर ह्यांनी श्रावणमासानिमित्त सुरू केलेल्या पुराणाची समाप्ति बुधवार ता. १९ ऑगष्ट रोजी सायंकाळी पाथरकर-मठांत मोठ्या थाटाने झाली. ह्या प्रसंगी शहरांतील सर्व वीरशैवांतील प्रतिष्ठित स्त्री-पुरुष ह्यांची गर्दी झाली होती. पुराणांत सिद्धान्तशिखामणी व अग्निपुराण ह्या दोन ग्रंथांतून वीरशैवधर्माचें स्वरूप विशद करून सांगितलें. पंचाचार्यप्रणीत वीरशैव-धर्मांत वर्णाश्रम आहेत, व ते दीक्षासंस्कारानें व्यक्त होतात. करिता दीक्षासंस्कार रद्द व्हावा हें पुराणांचें सार होतें. दादाशास्त्री हे संगीतज्ञ असल्यामुळे विवेचनाला संगीताची साथ घेतल्यामुळे पुराणाला चांगला रंग चढत असे. समाप्तीच्या दिवशीं ह्मणूनच प्रमुख वीरशैव नागरिकांनी वस्त्र-प्रावरणांनी व योग्य दक्षिणा देऊन त्यांना गौरविलें. आह्मीहि ह्या प्रयत्नाबद्दल त्यांचें अभिनंदन करतों.

# जाहीर नोटीस

श्री. षडाक्षरी स्वामी गुरु रेवणसिद्ध स्वामी लासिनकर अज्ञान पालन करणार श्री. करबसअय्या स्वामी गुरू षडाक्षरी स्वामी लासिनकर, सर्वत्र वीरशैव व वीरशैवेतरांना खाली सह्या करणारे यांच्याकडून कळविण्यांत येतें कीं. ता १४-८-३६ रोजी अनंत बाळकृष्ण खापर्डे वकील यांचे मार्फत "उदय" व "वीरशैव संजीवनी" पत्रांतून दिलेली नोटीस व त्यांतील मजकूर खोडसाळपणाचा आहे व ती नोटीस मठाचे पंचाचे संमतीशिवाय दिलेली आहे. वास्तविक संस्थानचे कोणतेही कार्य हे पंचांच्या संमतिशिवाय करण्याचा अधिकार श्री. करबसअय्या स्वामी ह्यांना कोणत्याही तऱ्हेने नाहीं, आणि ह्मणून ती नोटीस त्यांनी अनधिकारानें दिली आहे, व ह्या नोटीसीमुळें सदहू संस्थानाविषयीं वीरशैव व इतर समाजांत अनादर व अनास्था उत्पन्न होऊन संस्थानांत कलह उत्पन्न होण्याचा व नुकसान होण्याचाच संभव आहे. तरी ती नोटीस वीरशैवसमाजबंधूंनी अगर कोणीही बंधनकारक समजूं नये. ता. ३०-८-३६

पंचाच्या सह्या

१ संगाप्पा रेवप्पा मुचळंबे  २ रेवणसिद्ध यशवंत आप्पा चाकोते

३ महादाप्प सदाशिव आप्पा एकलारे  ४ भाऊराव संगाप्पा कोनलाडे.

नो. नं. ३ ]

---

### वीरशैव स्नेहसंवर्धक-मंडळ मुंबई

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर हे मुंबईला गेले असतां ता. २५ रोजीं सकाळीं वीरशैव-स्नेहसंवर्धक-मंडळाच्या चालकांनी त्यांना भेटीस बोलावले मंडळाचे सर्वाधिकारी श्री. देवघरकर ह्यांनी नानासाहेबांचें स्वागत करून त्यांचा मंडळाला परिचय करून दिला व मंडळाचा त्यांना परिचय करून दिला. हारतुरे, चहापान, वगैरे झाल्यावर श्री. देवघरकर व डॉ. वडगांवकर वगैरे मंडळींशीं मनमोकळेपणाने चर्चा झाली; आणि वीरशैव-स्नेहसंवर्धक मंडळाच्या संघटित कार्याबद्दल त्यांनी उत्कृष्ट शेरा दिला. असें 'मुंबईकर वीरशैव' लिहितात.

### नागपूर-वीरशैव तरुणसंघाचे सेक्रेटरी कळवितात कीं,

" मध्यप्रांतांत 'लिंगायत कोशकाती' ह्मणून एक पोटभेदाचे लोक आहेत. ते पूर्वापार लिंगधारी आहेत. सध्या या लोकांत देवांग लोकांच्या प्रचारामुळें दोन तट पडले आहेत--एक लिंगधारी, दुसरा यज्ञोपवीतधारी. या नूतन यज्ञोपवीतधाऱ्यांमध्ये थोडेसे सुशिक्षित व वजनदार लोक असल्याने त्यांचा पगडा लिंगधारी पक्षावर पडून तेहि लवकरच त्यांच्यांतच मिळण्याचा संभव आहे. यांची एकंदर संख्या ३००० असून, हल्लीं फक्त १५०० शेंच लिंगधारी राहिले आहेत. ह्मणून त्यांच्या (देवांग लोकां) प्रमाणें वीरशैव धर्मतत्वांचाहि प्रचार होणें अत्यावश्यक आहे. इकडे आपल्यांतील समाजपुढारी व धर्मसेवेकरिताच आयुष्य कंठणारे धर्मगुरु लक्ष देतील काय ?

### कारंजा

येथील विश्वनाथआप्पा तांदळे यांची सुशील पत्नी सौ. लक्ष्मीबाई तांदळे ह्या ता. २८-८-३६ रोजी लिंगैक्य झाल्या हे कळविण्यास खेद होत आहे त्या सुशील धर्मनिष्ठ, निगर्वी, व पतिभक्तीपरायण असून अतिथीअभ्यागतांचे आदरसत्कार करण्यात तत्पर असत. यांचे आत्म्यास श्रीसांब चिर शांति देवो.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती

' वीरशैव संजीवनी ' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरूं होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरूं होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग वामणगांवकर ह्यांनीं ' अरुण ' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील ' वीरशैव संजीवनी ' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १५ सप्टेंबर १९३६ ( अंक १८ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# कै. सौ. लक्ष्मीबाई बामणगांवकर



जन्म फाल्गुन व. ४, शके १८१५. मृत्यु श्रावण शु. ९, शके १८५८.

दे.भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या ह्या धर्मपत्नी ता. २७ जुलै १९३६ ला कैलासवासी झाल्या. ह्यांच्या घरगुती जीवनांतील कांही गोष्टी आजच्या नवमतवादाच्या काळांतहि मनोरंजक व बोधप्रद होण्यासारख्या असल्या-मुळें त्यांचा 'संजीवनी' च्या वाचकांकरिता लवकरच परिचय करून देऊं.

त्रि० तु० चौधरी, बी. ए.,
सहसंपादक: — 'वीरशैव संजीवनी'

-ऱ्यांदाहि स्थान दिलें आहे. अशा प्रकारें सर्व लेखकांत शक्य तितका समभाव राखण्याचा आह्मीं प्रयत्न केला आहे. एवढ्यावरहि कांही रुष्ट झाले असले तर त्यांचा रुसवा घालवावयास आह्मीं तरी कोणता मार्ग पत्करावा ? कारण आमचे लेखकबंधु ज्याप्रमाणे मनुष्य ह्याच सदरांत येतात त्याचप्रमाणे आह्मीहि मनुष्य ह्याच सदरांत येतो.

मनुष्यांत असा एक नैसर्गिक दोष असतो कीं, जो तो आपआपल्या समोरच्या अडचणीच प्रथम लक्षांत घेऊन वागतो. आमच्या लेखकांपुढे अडचण ही कीं, माझाच तेवढा लेख संपादकाकडे आहे; व आमच्यापुढे अडचण ही कीं, असलेल्या जागेंत कोणत्या वेळीं कोणत्या विषयास प्राधान्य देऊन कोणता त्यांतल्या त्यांत बरा लेख आहे, तो प्रसिद्ध करावा, ही. ह्या प्रकारें दोघांच्या दोन अडचणी असल्यास व जो तो त्याच अडचणीच्या दृष्टीने मनुष्यस्वभावास अनुसरून पाहणारा असल्यामुळे एकमेकांचा एकमेकावर रुसवा होणें स्वाभाविक आहे. अशा प्रसंगीं जो मनुष्य स्वतःच्या अडचणीबरोबरच दुसऱ्याच्याहि अडचणी लक्षांत घेऊन विचार करतो व वागतो तो थोडा अस्वाभाविक ठरला तरी त्या अस्वाभाविकपणांत त्याचें थोरपण प्रगट होतें. ह्मणूनच इतरांपेक्षा हा मनुष्य विचित्र, वेगळा, वा नवा ह्मणण्याचा सुज्ञांनी प्रघात पाडला आहे. असें नवेपण ज्या लेखक बंधूंत असेल ते आमच्यावर रुसले नसतील अशी आमची खात्री आहे.

तथापि 'संजीवनी'-ला थोडें निराळेंच वळण लावावें असा आमचा मानस होता, व आहे. कारण आतांपर्यंत 'संजीवनी' मध्यें आह्मीं काय व आमच्या इतर लेखकांनी काय, तात्विकच चर्चा केली आहे. परंतु तात्विक चर्चा करणें कोणासहि सोपें असतें. समाजांतील जुनें तें सोनें म्हणणें व तेंच तुणतुणें वाजविणें. ह्याला जशी अधिक अकलेची गरज नाही, त्याचप्रमाणे नवें तेवढेंच चांगलें असें ह्मणावयास अधिक अकलेची गरज नाही. जुन्यांत नव्याला साजेसें काय आहे हें सांगावयाला आणि नवें जें आहे तें जुन्याचेंच खरें बीज आहे हें समजावयाला मात्र अकलेची गरज आहे. 'संजीवनीं'-त काय वा इतर पत्रांत काय, जे लेख नव्या-जुन्याचे मंडनपर वा खंडनपर प्रसिद्ध होतात त्यांत ह्या अकलेचाच अभाव अधिक. तथापि कांही लेखक दोन्ही बाजूला अपवाद आहेत हे गृहीत धरणें अवश्य आहे. तथापि सरसहा बाराटक्के लेख निव्वळ भावनामय व तात्विक अशा स्थूल चर्चेचे आणि चटकदारपणा यावा म्हणून एकमेकावर लाखोली वाहणारेच !

ह्मणून अशा तऱ्हेची पोकळ चर्चा बंद व्हावी असा आमचा मानस आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, लेखांत चटकदारपणा, जोर व विनोद नसावाच असें आह्मी म्हणतो. तथापि विनोद, जोर व चटकदारपणा हे वाङ्मयाचे धर्म सकारण चर्चेकरिता उपयोगी पडावेत. आह्मा वीरशैवांचा स्त्रीसमाज सुधारावा हें ह्मणणें सोपें आहे. पण भाषा व प्रान्त ह्यांच्या विभागणीमुळे निरनिराळ्या भागांत पसरलेल्या वीरशैव स्त्रियांच्या हालचालींत काय दोष आहेत हें कथन व्हावयाला पाहिजे. आणि कोणत्या गुणाच्या प्राप्तीकरिता कोणते दोष निघून कोणते गुण यावयास पाहिजेत ह्याचें स्पष्टीकरण व्हावयास पाहिजे. शेतांत राबणे, दुकान चालविणे, सावकारी करणे, वतनदारी उपभोगणे व पांढरपेशा होणे एवढेच सध्या वीरशैवांना धंदे आहेत. ह्यात प्रगति कां नाही ! प्रगतीला कोणत्या चालीरीतींतील दोष आडवे येतात. साक्षरांना हे धंदे करावे लागले व तशाच पत्नीची त्याला जोड लाभली तर नफा-नुकसान काय, ह्याची चर्चा साधार निबंधरूपाने, लघुकथारूपाने कोणत्याहि व्यक्तीस न दुखवितां शुद्ध राहणे व सुरू करणें अवश्यक आहे. व समाजाला तीच बोधप्रद व फायदेशीर होईल अशी उमेद आहे.

आमचा समाज द्विजत्वावर व त्रैवर्णिकत्वावर उभारलेला. दीक्षासंस्काराने त्यांत आश्रमधर्माची जाणीव होते. ह्या जाणीवेने आपण कोठून आलों व कोठे जाणार हें त्यास कळतें. हें कळण्याकरिता व कळविण्याकरिताच पंचाचार्यपीठें वा विरक्त-पीठें अस्तित्वांत आलीं, व समाजांत सर्वत्र प्रसृत झालीं. आता हीं पीठेंच आपसांत वाद करीत आहेत कीं, कोणीं कोणास प्रथम आडवे जावें? अगोदर कोण ? भिक्षुकी हक्काचा वारसदार कोण ? कळस पांच असावेत कीं सहा असावेत? शेंडी ठेवावी कीं न ठेवावी ? दीक्षासंस्कार पंचाचार्य वंशजांनी करावा कीं विरक्तगुरुवांनी करावा? हे वाद आज व्यर्थ आहेत व ह्यांत समाजाचें हितानहित कांही नाही. तर दोन भिक्षुकांतील हा लढा आहे इतकेंच. तथापि ह्या वादाला कंटाळून ह्या उभ-यतांपासून सर्वस्वीं दूर राहाणेंहि शहाणपणाचें नाही. तर ते सुधारतील कसे व समाजोपयोगी पडतील कसे हेंच पाहिलें पाहिजे. ह्याकरिता पंचाचार्य-पीठें व विरक्तपीठें कशीं सुधारतील व तीं समा-जोपयोगी कशीं पडतील ह्याची आह्मांला चर्चा पाहिजे.ही चर्चा करीत असतां त्यांचें मूळ कसें होतें व आज त्या मूळास कशी कीड लागली हें पाहणेंहि योग्यच आहे. ह्याकरिता सध्याच्या मठाधिका-ऱ्यांची — जुलमी आजन्म ब्रह्मचर्याचें सोंग पोषक आहे कीं मारक आहे ह्याचा विचार करून मठाधिकाऱ्यांनी बाल्यावस्थेंत ब्रह्मचर्य, तरुणा-वस्थेंत गृहस्थाश्रम, उतारवयांत वानप्रस्थवृत्ति, व वृद्धावस्थेंत सन्यासधर्म पत्करला तर मठ-संस्थांना ह्याचा उपयोग आज कसा होईल व तीं संस्था समाजोपयोगी कशी होईल ह्याची अनेक अंगांनी चर्चा ' संजीवनीं '-त यावी अशी आमची इच्छा आहे.

त्याचप्रमाणे आमचें द्विजत्व व त्रैवर्णिकत्व सर्वांस पटून त्यांच्यांत एकसूत्रीपणा यावा ह्या-करिता जन्मापासून तो अंतःकाळापर्यंतच्या धार्मिक संस्काराची जाणीव करून देणारे शास्त्रीय उपप-त्तीचेहि लेख आह्माला पाहिजेत.आमच्या आजच्या विवाहपद्धतींत काय दोष आहेत ? कोणती विवा-हपद्धति आमच्या प्रपंचधर्मास उपयोगी पडेल ? पुनर्विवाहाच्या अतिरेकाचे परिणाम काय ? त्यांत नियमबद्धता किती असावी ? जरठ-कुमारी-विवाहाचे दुष्परिणाम काय होतात ? योग्य विवाह व पुनर्विवाह कोणता ? संततीचे परिणाम व मर्यादा, इत्यादि गोष्टींवर व्यवहार व समाज-रचना लक्षांत घेऊन चर्चा आली तर ती अधिक उपयुक्त ठरण्यासारखी आहे. ह्यांतच पोषाख, खाणे-पिणे, वाढणे ह्यांच्या आरोग्यदृष्ट्या मर्यादा काय व त्यांत आर्थिक काटकसरीच्या दृष्टीने योग्यायोग्य कोणते ह्याचाहि विचार होणें जरूर आहे. तद्वतच तीर्थप्रसाद कोणत्या प्रसंगीं व कोणाचा कां घ्यावा ह्याचाहि कालमानाप्रमाणे विचार झाला पाहिजे. लग्नपद्धति काटकसरीची होऊन तींत धर्मशास्त्रदृष्ट्या व समाजदृष्ट्या योग्य काय हेंहि पाहिलें पाहिजे. त्याचप्रमाणे आर्थिक व्यवहारांत परस्परसहकार्य वाढलें तर काय फायदा होतो त्याचीहि जाणीव समाजांत उत्पन्न केली पाहिजे. त्याचप्रमाणे अनाथ मुलें, मुली, स्त्रिया व बेकार पुरुष-स्त्रिया ह्यांची व्यवस्था ठिकठिकाणी कशी व्हावी ह्याचाहि प्राधान्येंकरून विचार झाला पाहिजे. ह्या दृष्टीने पूर्वीं मठ-संस्थांचा कसा उपयोग होत असे व आता मठांच्या घटत्या उत्पन्नांत मठांचा काल-मानानुसार कसा उपयोग होईल ह्याबद्दल सूचनाहि लेखकांना करतां याव्यात. ह्याप्रमाणे विचार करावयास एवढें विस्तृत क्षेत्र असल्यावर नव्या-जुन्या वादांचें मढें सजविण्याकडे जो लेखकांचा कल आहे तो बदलणें आवश्यक आहे. ह्मणून ' संजीवनी '-च्या लेखक व लेखिकांनी प्रत्येक बाबींतील समाजस्थिति बारकाईने पाहून आपल्यांत किती व कशी सुधारणा पाहिजे ह्यावर साधक - बाधक चर्चा सुरू करावी अगर त्यावरच लघुकथा लिहाव्यात. कोणताहि लेख एक हजार शब्दांवर असूं नये. दोन लेखकांत वाद सुरू झाल्यावर पहिल्याला अखेरचें उत्तर द्यावयास लावून आह्मी तो पाहिजे त्या वेळेला बंद पाडूं.

करिता सर्व लेखकांनी वर दर्शविलेल्या विषयाच्या अंगोपांगावर फक्त हजार शब्दांचा ( अक्षरांचा नव्हे ) कागदाच्या एका बाजूने लिहिलेलाच लेख पाठवावा. असा लेखच वाचून पाहून आम्ही प्रसिद्ध करूं. मोठा लेख असल्यास प्रसिद्धी मिळणार नाही. कारण 'संजीवनी'-चे वर्षाअखेर ग्रंथांत रूपांतर होणार असल्यामुळे उपयुक्त विषयांची थोडक्यांत झालेली चर्चा आजच्या व पुढच्या पिढीला आदर्शभूत होऊन राहील. लेख पाठवितांना तो वजन करून व पोष्टाची तिकिटें बरोबर लावून पाठवावा. पोस्टाची तिकिटें कमी लागल्यामुळे कित्येक लेखाबद्दल आह्मांला पोस्टाला दंड भरावा लागला. तो दंड ह्यानंतर आह्मी भरणार नाही. तो परत आल्यावर ज्याचा त्यास भरावा लागेल. आणि तसें झाल्यावाचून व्यवहार समजणार नाही. लेख परत लागल्यास योग्य पोष्टखर्च पाठवावा लागेल. ह्याप्रमाणे कठोर बनून केलेल्या सूचनांनुसारच आलेले लेख 'संजीवनी'त प्रसिद्ध होतील. पोरकट भाषेच्या लेखांना आह्मी स्थळ देणार नाही. तेव्हा 'संजीवनी'-च्या प्रेमळ लेखक बंधुभगिनींनी केलेल्या सूचनांचा अवश्य विचार करूनच स्वतःहि सुधारावें व 'संजीवनी'लाहि सुधारून अधिक उपयुक्त बनवावें अशी विनंती आहे. कोणत्याहि उच्छृंखल लेखाला स्थळ देऊन 'संजीवनी'-चा दर्जा कमी करण्याचा आमचा मानस नाही. हें स्पष्ट लिहावें लागत आहे ह्मणून आह्मास वाईट वाटतें. पण नाइलाज आहे. क्षमा करावी अशी विनंती आहे.

---

# नवमतवाद व वैवाहिक प्रश्नाची मीमांसा

उत्तरभाग

ले०—श्रीं. तु० ना० काटकर, चिमूर.

## प्रौढविवाह

'विवाह' या वस्तुस्थितींत अर्थाचा जो एक प्रेमळ परिमल दरवळतो तो इतरत्र मिळणें अपरिहार्य आहे. विवाह झटला कीं त्या ठिकाणी दोन भिन्न जीवांच्या एकीकरणाचा प्रश्न आलाच. दोन भिन्न जीव वा व्यक्ति एकत्रित होणें व त्यांचा संमिश्र व्यवहार चालणें ह्मणजे कांही सामान्य किमया नाही. आज शेंकडो कुटुंबांत मतभिन्नता कां आढळून येते याच्या पाठीमागे दडलेला इतिहास जर आपण शोधूं गेलों तर 'बालविवाह' 'पराधीन विवाह' आणि 'सनातनमतवादी मातापितरें' हींच कारणीभूत दिसतात. विवाह होणार मुलांमुलींचा, आमरणांत सुखदुःखांत दिवस कंठावे लागणार त्या जोडप्यांना; आणि विवाहाचा खल करणारे हे आप्त

आईबाप !!! त्यांत वधूवरांच्या संमतीची कांहीच कां जरूर नाही ? कोणत्याहि दोन परस्परअनोळखी व्यक्ति सजवून आणल्या नि टाकल्या एकदाच्या विवाहाच्या शृंखलांनी बद्ध करून ! त्यांच्या भविष्यकाळाचा विचार कधी कोणी मनांत आणतो का ? विवाह ह्मणजे बद्धशृंखलांचा पाश तर खराच! पण त्या प्रेमाच्या शृंखळांचा धागा अगदी हळुवार असावा. दोन जीवांच्या ऐक्याचा हा नाजूक संबंध आहे, व तो शाश्वतीच्या भरभक्कम पायावर उभारलेला असला पाहिजे. ही शाश्वती ' पराधीन विवाहांत ' शेंकडा पन्नास टक्केहि मिळणें दुर्लभ आहे. एकदा पडलेल्या बेडचा कशा तरी थोर अंतःकरणाच्या आविर्भावाने आजन्म निभावून न्याव्या लागतात. पतीपत्नींत कलह माजवून घटस्फोटासारखे नादान प्रकार घडवून आणावयाला हिंदूंचें अंतःकरण सरसावत नाही. पण हा न्याय भूतकाळाकरिता होता. भविष्यकाळाला तो लागूं पडेल किंवा नाही हें कोणीं सांगावें ! आमच्या मतें तरी निदान तो न्याय त्याज्यच मानावा असें आहे. प्रत्येक राष्ट्राचे दिवसेंदिवस एकेक पाऊल प्रगतिपथावर आहे त्या अर्थी महाराष्ट्र नव्हे तर हिंदुस्थान त्यांना कसा अपवाद राहील? असेंच जर आहे तर त्यांतून ' वीरशैव ' थोडेच वगळले जाणार ! हे सोडून कसें चालणार !

आमच्या सामाजिक जीवनाच्या अंतरंगाचें ठळक जरी निरीक्षण केलें तरी तेथे सुधारणेची अत्यंत आवश्यकता आहे. अखंड सुधारणा हीच सामाजिक जीवनाचा प्राण आहे. प्राणाशिवाय या नश्वर देहाला शोभा नाही ह्मणून कालमानाप्रमाणे सुधारणा घडवून आणीत राहणें यांतच मानवी उन्नतीचें अगम्य असें शिखर गांठावयाचें आहे. तें एकदम उडी मारून गांठतां येणें कदापिहि शक्य नाही. ह्मणून कूर्मगतीनेच तें गांठलें पाहिजे.

स्त्रिया झाल्या ह्मणून त्यांच्याकडे हीन दृष्टीने पहाणें यांतच पुरुषी वृत्तीची पारख होते. ' स्त्री ' हीसुद्धां मानवजातीचें दुसरें बरोबरीचें प्रमुख अंग आहे. ' गृहपत्नी यथसो ' [अथर्व] त्या अर्थी पुरुषांनी स्वतःपुरता आपलपोटेपणा करणें त्यांना लांच्छनास्पद आहे. आमच्या समाजांतील स्त्रियांची आज आमच्या बरोबरीने चालण्याची तयारी नाही ह्मणून काय आह्मीं त्यांना तशाच स्थितींत पडून राहूं द्यावें ? स्वयंभू पुरुषसुद्धा इतके प्रगतिपर थोडेच होते ? त्यांचासुद्धा कोणी तरी गुरु आहेच. आज त्या अबलांचें गुरुस्थान पुरुषांनी घेण्यांतच व स्वतःच्या बरोबरीने वागविण्यातच पुरुषांचा थोरपणा व स्त्रियांचा समान दर्जा प्रतीत होणार आहे. विवाहसंस्थांचा विचार करतांना स्त्रीशिक्षणाच्या योग्यतेचा प्रश्न उद्भवल्याशिवाय रहात नाही. त्याशिवाय कितीहि ओरड करून व्यर्थ आहे. प्रौढविवाहाला शिक्षणाची अत्यंत जरूर आहे. भावी होणारीं जोडपीं जर सुसंस्कृत असतील, तरच त्यांच्यांत सुधारणा घडवून आणावयास अवसर मिळतो. नाही ह्मणायला आज आमचा समाज अगदींच कांही मागे नाही. रोजच्या रोज आमचा समाज प्रगतिपथावरच आहे, असेंच आमचें मत बनत चाललें आहे. ह्मणून कोणत्याहि वस्तुस्थितीचा एकांगी विचार करून भागत नाही. केव्हांहि तो दोन बाजूंनीच विचार केला पाहिजे, नि या तत्वान्वयें पहातां आमची विवाहसंस्था अगदींच सदोष आहे, व त्यांत " प्रौढसंमतिविवाहाची " चाल रूढ करून सुधारणा करणें आवश्यक आहे.

पुरुषांना जसे आपली पत्नी सुशील, सुशिक्षित, सुस्वरूप, प्रेमळ, सहधर्मी असावीशी वाटते । तसेंच स्त्रियांनादेखील आपला पती मनाप्रमाणें न मिळावा असें थोडेंच वाटणार आहे ? पुरुष आपल्या पुरुषी काव्याने आपली दाद कशीबशी तरी मनाप्रमाणे लावून घेतात. पण बिचाऱ्या मातापित्याधीन मुलींना माता पिता ज्यांच्या पाशांत घालील त्यांत खुशाल अडकून पडावें लागतें आणि मग त्यांच्या सुदैवाने निभावले तर सर्व आयुष्य मनाजोगें जावयाचें ! नाही तर जन्मभर अश्रु ढाळींत दिवस कंठावे लागणार. यदाकदाचित्

कठिणा-कठिणाचीच गांठ पडली तर मग तेथे ठिणगी उडायला तरी कितीसा वेळ लागतो. असे नादान विवाह टाळण्याकरिता यापुढे श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी प्रतिपादिलेल्या "सहवासोत्तर प्रौढ-विवाह" निदान किमानपक्षी "प्रौढसंमतविवाह"-च ह्यापुढे धाडसाने समाजांत सुरू केले जावेत हें आमचें वैयक्तिक मत नसून, ह्या विचारसरणीला व मताला ह्या भागांतील नवमतवाद्यांचाहि पाठिंबा आहे.

लग्नाआधी! आणि तो भावी पतीपत्नीचा सहवास! असें करण्यास सुचवितांना आमचे सनातनी लोक आमच्यावर एकदम हल्ला चढवितील. पण थोडासा विचार केला असतां ह्यांत विसंगत असें कांहीच नाही. सहवास याचा अर्थ कोणी लैंगिक याच अर्थी करून घेणार असतील तर त्याला आमचा नाइलाज आहे. विवाह हा दोन भिन्न व्यक्तींच्या भावी संघटनेचा स्वतंत्र प्रश्न आहे. ह्मणून तो ज्यांचा त्यांनी स्वानुभवाने सोडून घेतलेला उत्तम. त्या दोन व्यक्तींनी लैंगिक निशेच्या स्वाधीन न होतां विवाहापूर्वी कांही विवक्षित काळ-पर्यंत दररोजचा ठराविक वेळ शुद्ध प्रेमाने घरांतील वडीलधाऱ्या माणसाच्या देखरेखीखाली परस्प-रांच्या सहवासांत घालविल्यास उभयतां-च्या मनोधर्मांचा परस्परांना पूर्ण परिचय घडून येईल आणि विवाहाआधी मनोधर्मांचा निकाल लागल्यामुळे विवाहोत्तर घडून येणारे अनर्थ टळतील, आणि जीवन सुखमय होईल. भावी पतीपत्नीने मनोनिग्रहाने विवाहापूर्वी प्रबंध न तोडला तर नैतिक धर्माचें पाठबळ आधिक दुणावेल. पुढेपुढे तर संवयीने ह्याच प्रथेला आचार-धर्माचें स्वरूप प्राप्त झाल्याविना हमखास रहाणार नाही. पण हा त्या उभयतांच्या प्रामाणिकपणाचा प्रश्न आहे. दोघांनाहि स्वतःच्या अब्रूची चाड असतेच. सहवासांत प्रवेश झाला म्हणून परस्पर-मतें पटून विवाह होईल ह्याची शाश्वतीहि नसते. शिवाय परस्परांच्या धोक्याची स्थळें परस्पर जाणून असतात, त्या अर्थी सुशिक्षितांत या प्रयोगाने व्यभिचार घडून येईल ही साशंक वृत्ति ठेवणेंच मुळीं अज्ञानतम आहे. एवढें कशाला, कोणत्याहि दोन स्त्रीपुरुषांचा विवाहपूर्व सहवास उठले-सुटले कीं घडून येतील असेंहि कोणीं समजूं नये. ज्यांच्या विवाहाची कांही शाश्वती वाटत आहे व ह्या प्रयोगास योग्य व लायक जबाबदार जोडप्यांनाच समाजांत अशी संधि सहजासहजीच मिळत असते, मुद्दाम द्यावी लागत नाही. व तें सुशिक्षित जोडपे आपापली जबाबदारी ओळखून ठराविक काळ दक्षतेने पार पाडतील अशी आह्मास खात्री आहे. त्या अर्थी कुशंकेला स्थळ देण्यात कांही अर्थ नाही. या कुशंकांना अर्धचंद्रच दिले जाऊन नवमताला चालना दिल्यास प्रिं. आगरकरांच्या मालिकेंत आमचें वीरशैव सुधारक हमखास जाऊन बसल्याविना रहाणार नाहीत. मनोनिर्धार

**हाच यशाचा मार्ग आहे.** वीरशैवांनो! पहातां काय? मारा आघाडी नि व्हा हिंदु जनतेला पथ-दर्शक. **वीरशैवांच्या धर्मयुद्धांत त्यांच्या थोरपणाचा मार्ग त्यांच्या क्रान्तीच्या मैदा-नांतून गेला पाहिजे** अशी आमची प्रबळ आकांक्षा आहे.

सत्यान्वेषणाने पहातां आजच एकदम इतकी पूर्णत्वाने आघाडीची भाषा बोलणें आमच्या समा-जाच्या प्रगतीच्या मानाने अगदींच अतिशयोक्तीचें होणार आहे हें आह्मी पूर्ण जाणून आहों. तरी पण बालविवाहास पूर्णपणें 'चॅट' देऊन निदान 'आंतर्जातीय प्रौढ विवाह' तरी वधूवरांच्या संमतीने घडवून आणावेत व त्यांच्या पसंतीच्या आड न येतां उलट पालकांनी सहानुभूति दावी यांतच आमचा उत्कर्ष ठेवला आहे. आज जर ही प्रथा सर्रास सुरू झाली तर कूर्मगतीनेच कां होईना ह्याचें रूपांतर 'सहवासोत्तर प्रौढ विवाहां'त सहजासहजीं होईल. या विवाहाची ती प्रथमा-वस्थाच आहे हें सांगणें नलगे. आतापर्यंतच्या विवेचनावरून आमच्या वाचकांच्या लक्षांत आलेंच

आहे कीं, अनन्यसामान्य प्रेमाची मानवी मनाला नैसर्गिक भूक आहे. दोन जीव पूर्ण समरस झाल्याविना ती भागणें केव्हांहि शक्य नाही. ह्मणून उभयतांचीं सुखदुःखें, रागद्वेष, रागानुराग, समसमान असल्याखेरीज ही समसमता निर्माण होणें शक्य कोटींत दिसत नाही. या मानसिक तसेंच शारीरिक समतेला प्रत्यक्ष सहवासाची अत्यावश्यकता आहे ह्मणून हें सर्व घडवून आणण्याकरिता एकनिष्ठ शुद्ध प्रेम नि नात्याची शाश्वती ज्यांत आहे अशी उपरिनिर्दिष्ट विवाहसंस्थाच होय. करितां त्या ध्येयाला पोहचण्यासाठी सुविद्य, सुसंस्कृत व समंजस सुधारक वीरशैवांनी तनमनधनेंकरून अविश्रांतपणें रूढीशीं झगडूनच उद्दिष्ट विवाह संस्था यशस्वी करून दाखविल्या पाहिजेत. त्याविना तुमच्या-आमच्या सुधारणेला समाजांत स्थान नाही.

---

लघुकथा ७ वी.

एक सत्य कथा.

# नंदिनीचें मोक्षसाधन

( लेखिका:— इन्दुकला क्षीरसागर. )

घनान् घन् ! घनान् घन् !! घनान् घन् !!! असा घंटानिनाद, आणि डडडड डिम् ! डडडड डिम् !! डडडड डिम् !!! असा नगाऱ्याचा गंभीर ध्वनि नित्यक्रमानुसार भाविक भक्त मंडळींना श्रीस्वामी पशुपती महाराजांच्या मठांतील मंगलारतीकरिता पाचारण करीत दशदिशांत घुमूं लागला. हा ध्वनि कानीं येतांच भक्त लोकांची स्वामीच्या प्रसादाकरिता मठाकडे धांव घेण्याची गांवांत जिकडे-तिकडे धांदल उडाली. कोणी पूजासाहित्याची उपकरणें हातांत घेऊन, तर कोणी पंचपक्वान्नांनी भरगच भरलेलीं नैवेद्याचीं ताटें हातांवर ठेवून, तर कोणी नुसता नारळ हालवीत, तर कोणी नुसते हात हालवीतच धावपळ करीत मठांतील मुख्य सभामंडपांत येऊन दाखल झाले. घटका अर्धघटकांत सभामंडप भाविक भक्तमंडळींनी भरगच भरून गेला. मंडपांत एका पुष्पमालाविभूषित रौप्यसिंहासनावर, तुकतुकीत नारळकवचीवर उंची लव्हेंडरचा अभिषेक झाल्याने दशदिशांत दरवळणाऱ्या सुगंधाचा मनमुराद आस्वाद घेत असलेली, स्फटिकांचीं चकचकीत कर्णकुंडलेंविभूषित स्फटिकरुद्राक्षयुक्त सुवर्णगुंफितामाला धारण केलेली, आणि अंगावर अस्सल बनारसी बदामी रेशमाची चमकदार कौपीन धारण केलेली स्वामीमहाराजांची भव्य

आणि दिव्य मूर्ति, अर्धोन्मीलित नेत्रांनी योगसाधनेंत (?) तल्लीन झालेली विराजमान होती. सभामंडपांत दाखल होणारा प्रत्येक भाविक भक्त महाराजांना नमस्कार घालून सांपडेल तेथे जागा अडवीत बद्धहस्त उभा राही. जमलेल्या भक्त मंडळींत विशेषेंकरून महाराजांचा अत्यंत जिव्हाळ्याचा आणि आवडता प्रेमळभक्तवर्ग स्त्रियांचाच अधिक असतो असें ऐकिवांत येत असे! कदाचित् हें खरेंहि असेल. कारण स्त्रियांइतपत भोळी-भावडी आणि प्रेमळ जात इतरत्र क्वचितच सांपडेल !

जमलेल्या जमावाकडे एकवार नीट निरीक्षण करून महाराजांच्या एका पट्टशिष्याने असा कांही एका विशिष्ट प्रकारचा शंखध्वनि सुरू केला कीं, सर्वांचे डोळे महास्वामींकडे खिळले आणि स्वामींचे अर्धोन्मीलित डोळे खाडकन् उघडले जाऊन 'शिव हरोऽम् हर ! शिव हरोऽम् हर !! शिव हरोऽम् हर !!! अशा गर्जनेंत महाराजांनी जमलेल्या भक्त मंडळीकडे विहंगमावलोकन करीत बऱ्याच अंतरावर स्त्रीसमूहांत एका कोपऱ्याला उभ्या असलेल्या एका व्यक्तीकडे हास्यमुखाने पहात आपली दिव्यदृष्टि स्थिर केली.

भक्तजनांची पायपूजेची लोटालोटी अहमहमिकेने जेव्हा सुरू झाली आणि त्याची लाट महाराजांच्या आवडत्या व्यक्तीवर आदळून ती जरा बाजूला झुकली गेली तेव्हा कुठे स्वामीची रोखीव नजर स्वतःला सावरण्याकडे झुकली ! यथाक्रम पायपूजेचा, मंगलारतीचा, वगैरे कार्यक्रम पार पडला. नित्याच्या वहिवाटीप्रमाणे पंचपक्वान्नांनी भरलेली नैवेद्याची ताटें पुढे येऊं लागलीं. ताटें घेऊन येणाऱ्या स्त्रीभक्तांच्या मुखचर्येवरूनच आंतील पदार्थांची रुचि मनकवडेपणाने महाराजांना कळत असे असें दिसलें. कारण कांही ताटांना तुसताच स्पर्श करीत, तर कांहींमधील एकाद-दुसरें बोटच चोखीत तर कांहींमधील चार दोन घास घेत तर कांहींना दूर लोटीत महाराज नैवेद्याची विल्हेवाट लावूं लागले. आणि या महाराजांच्या कृतीचा मनाला पटेल तसा भावार्थ काढीत मंडळीची पांगापांग सुरु झाली. मंडळींचा जमाव बराच ओसरला होता. ज्या कांही चार-दोन व्यक्ती सभामंडपांत मागे राहिल्या त्या महाराजांच्या निर्ढावलेल्या अस्सल पट्टशिष्याच होत्या. त्यांनीहि महाराजांना नैवेद्य समर्पण केला आणि क्रमाक्रमाने काढता पाय घेतला ! रहातां राहिली ती एकटी नंदिनी, आणि स्वामीचा परिचारकवर्ग.

नंदिनी ! हाय ! एक अजाण विधवा बालिका ! कोमेजलेलें पारिजातपुष्प ! बिचारीच्या सौभाग्यतिलकाला तीनच महिन्यांपूर्वी दुर्दैवाने तिलांजली दिली गेली होती. फटफटीत पांढरें कपाळ, गुलाबी गालांवर पांढुरकी पखरण, गोजऱ्या हरण्याडोळ्यांवर उदासीनतेची निस्तेज छाया ! होरपळलेल्या जीवाला, बावरलेल्या चित्तवृत्तीला, स्थिरता प्राप्त होऊन, कोसळलेल्या दुःखाचा विरंगुळा पडावा म्हणून नंदिनीचे आईबाप अत्याग्रहाने पोथ्या, पुराण, कीर्तनादि प्रसंगाला तिला हजर रहाण्याचा उपदेश करूं लागले. संतमहंतादि महात्म्यांची सेवा करायला अट्टाहासाने भाग पाडूं लागले. त्यांतलाच आजचाहि प्रसंग होता. सहज स्त्रीसुलभ विनयवृत्तीने डाव्या हाताने उरोभागाजवळील आणि उजव्या हाताने डोकीवरला पदर नीट सावरून, एका हातावर सुग्रास अन्नांनी भरलेलें ताट आणि दुसऱ्या हातांत स्वच्छ पाण्याने भरलेली सांगली लोटी घेऊन मंद पावलें टाकीत खालच्या मानेने नंदिनी महाराजांना नैवेद्य समर्पण करण्याकरितां पुढे येऊं लागली. महाराजांचें आसन डळमळूं लागलें. शिष्यमंडळांत पालीची नेत्रपल्लवी सुरूं झाली. नसता खोकला उद्भवून कांहींच्या नरड्यांत कफ दाटले गेलें, तर कांहींना कोरडाच ठसका लागला ! नंदिनी स्वामीचे सिंहासनासमीप येतांच निदान या निमित्ताने तरी नंदिनीच्या हस्ताला स्पर्श करण्याचें भाग्य आपणास लाभेल म्हणून स्वामींच्या शिष्यवर्गांपैकी

एक शिष्ट (?) शिष्य तिच्या हातांतील ताटाला हात घालूं लागला पण मध्येच स्वामीजींच्या नेत्रविस्फारणाने त्याला असा हात दाखविला कीं, त्याला आपण सरसावलेला हात चटकन् मागे घ्यावा लागला. ' या ! या ! नंदिनीबाई आज तुह्माला बराच वेळ तिष्ठत रहावें लागलें ! आणि हेंहि एक प्रकारें ठीकच झालें कीं, तुह्मी त्या मंडळीच्या गर्दीत मिसळला नाही ! खरा भक्त हा निवांत एकांताचाच चहाता असतो. आज आह्मी आनंदाने आपल्या हातचा हा अमृतनैवेद्य ग्रहण करणार आणि ईश्वरी संदेशानुसार तुह्माला मोक्षसाधनाची गुरुकिल्ली अर्पण करणार ! नंदिनीवर दुःखाचा कडेलोट झाला.' बिचारी असहाय्य अभागिनी, तिचा उद्धार करा असाच आजच्या योगसमाधींत आह्माला गुरुमहाराजांनी संदेश दिला. नंदिनी ये ! अशी आमच्या सन्निध ये ! आणि आपल्या स्वतःच्या हातांनी हें सुग्रास अन्नाचे अमृतघास आमच्या मुखांत घालून आम्हाला संतुष्ट कर. ये ! ये ! अशी लाजूं नकोस, ' ही स्वामींची साधी सरळ मोक्षमार्गदायक लघळभाषा नांदेनीला कड्डुचिराइताच्या काढ्याहूनहि कडवट भासली. कदाचित तिला या सुसंस्कृत भाषेचें पूर्वज्ञान नसल्या कारणाने तिचा कांही गैरसमज झाला असेल. काय असेल नी काय नसेल तें देव जाणे; पण नंदिनीच्या पांढऱ्या कपाळावर आठ्यांचें जाळें, गालावरील पांढरे गुलाब लाल झालेले, डोळ्यावरील विनयाची जागा तिरस्काराच्या तिटकाऱ्याने व्यापलेली, हृदयाची धडधड वाढत्या विद्युत्वेगाने वाढूं लागलेली, आणि सर्वांगसागर लाटाप्रमाणे थरारलेलें अशी तिची प्रतिमा बनली एवढें मात्र खरें ! कांहीतरी बोलण्याच्या उद्देशाने आंतल्या आंत जिभलीची चलबिचल सुरुं झाली. पण शब्दाची पाऊलवाट कुणीं रोखली हें तिचें तिलाच कळे ना ! नंदिनीची ही चलबिचल वृत्ति पशुपती स्वामींच्या ध्यानीं यायला फारसा वेळ लागला नाही ! कारण हे असल्या किती तरी प्रसंगाला तोंड देऊन निगरगट्ट गलेलठ्ठ बनले होते ! चटकन भाषेवर प्रसंगानुरूप साज चढवून महाराज पुढें बोलूं लागले ' नंदिनी ! तुझा भाग्योदयकाल जवळ आला म्हणूनच तुझ्या उद्धाराची सूचना आह्माला मिळाली. आणि याची जाणीव प्रथमदृष्टिक्षेपदर्शनींच् आह्मीं तुला हास्यमुखाने करून दिली. स्वामीजींच्या या अघळ पघळ भाषणाने नंदिनीची बावरलेली चित्तवृत्ति स्थिर झाली काय ? नाही ! महाराजांच्या आज्ञेप्रमाणे आपण जर महाराजांच्या मुखांत अन्नाचे घास घालूं लागलों तर आपल्या पवित्र पातिव्रत्याला तें कितपत साजण्यासारखें आहे याच विचारतंद्रींत नंदिनी क्षणभर निमग्न झाली ! मात्रा अजून पुरती लागू पडली नाही असें पाहून महाराजांनी शेवटचा निर्वाणीचा बाण फेंकला. ' नान्दिनी ! आमची सेवा करण्यांत तुला इतकें अवघड तें कां वाटावें हेंच कळत नाही. प्रत्येक माता आपल्या लाडक्या मुलांना प्रेमाने घास भरवतांना प्रत्यहीं आढळतातच ना ? आह्मी संत-महंत साधूसन्यासी प्रत्येक स्त्रीला माताच मानीत असतो ! ' माता ! अहाहा ! माता या शब्दांतच असा कांही अजब प्रभाव भरलेला आहे कीं, कसल्याहि कठोर फत्तराला तिथे मेणमऊ बनणें भाग पडतें. मग नंदिनी तर बोलून चालून प्रेमळ स्त्री जात, नंदिनीची चित्तवृत्ति स्थिर झाली ! वादळ नाहीसें होऊन प्रशांत वातावरण तिच्या हृदयाकाशांत पसरलें. प्रेमळ मातृभावनेने नन्दिनी महाराजांना सुग्रास अन्नाचे घास भरवूं लागली. भोजनसमारंभ आटोपला. तांबुलसेवनविधीहि तशाच प्रकारें पार पाडण्याचा महाराजांनी अट्टाहास धरला ! तोहि उरकला ! नन्दिनीने ' येतें मी आता !' ह्मणून नमस्काराकरिता महाराजांच्या पायावर मस्तक टेकलें. स्वामींनी संधि साधून आपले हात आशीर्वादाच्या आविर्भावाने असे कांही तिच्या मस्तकावर ठेवले कीं तिने मस्तक उचलतांच एक हात तिच्या मानेवर आणि दुसरा तिच्या कोमल गालांना स्पर्श करीत तिच्या हनुवटीवर येऊन स्थिर झाला ! स्वामीजी तिच्या मुखाकडे आशाळभूत कावळ्याच्या दृष्टीने बघत

हंसत हंसत म्हणाले, नंन्दिनी ! अशाच प्रकारें सव्वा महिन्याचा नैवद्यसमर्पणविधी पार पडल्यानंतर तुला मोक्षसाधनाची गुरुकिल्ली अर्पण करावी अशी आम्हाला गुरुमहाराजांची आज्ञा आहे ! नन्दिनीने कांही एक न बोलतांच काढता पाय घेतला !

शिवभक्तांना अत्यंत महत्वाचा असा श्रावणमास सुरुं झाला होता. महाराजांच्या पाद्यपूजामहोत्सवाचा काल रात्रौ दहानंतर सुरुं होईल असें जाहीर झालें ! मंडळीचा जमात्र रात्रीच्याहि पाद्यपूजेला नियमितपणें नित्याप्रमाणें जमूं लागला. अर्थात् या भक्तमंडळींत नंदिनीहि प्रामुख्याने हजर असायचीच आणि मोक्षसाधनाचा दीक्षाविधीहि नियमितपणें पार पडायचा ! नंदिनीच्या आईबापांना पोर संतसमागमांत निमग्न झाल्याने आनंद झाला. पण गांवांत मात्र याबावत वरीचं कुजबूज सुरुं झाली. कदाचित् ती गांवकुटाळ कंपूची नंदिनीच्या अब्रूवर शिंतोडे उडवण्याची कारवाई असेल.

आधीच उल्हास आणि त्यांत फाल्गुनमास ! गावांतील टवाळ टोळीचा अत्यंत आवडता महिना म्हणजे फाल्गुनमास ! गल्लोगल्ली, रस्तोरस्तीं, अड्ड्याअड्ड्यावर या फाल्गुनमासांतील पुराणप्रवचनाचे शेलके प्रकार अधिक-मासाहूनहि अधिकतर उत्साहाने उरकले जातात. आणि आमच्या जाहागीरपुरांत तर काय, जिकडे पहावें तिकडे, जिथे जावें तिथे थोरामोठ्यांच्या, पोरासोरांच्या, बाया बापड्यांच्या, तोंडीं एकच एक विषय, आणि एकच सूर ! हरामखोर ! पाजी ! हलकट लेकाचा ! मोठा स्वामी म्हणून मिरवीत होता. हरामखोर, काळें तोंड करून पळून गेला म्हणूनच बचावला. अशा प्रकारचे प्रलाप शिमगापौर्णिमेच्या दिवशी सर्रास सर्वत्र ऐकूं येऊं लागले. शिमग्याची बोंबाबोंब आणि धुळवडीचा शेणमातीखेळ आटोपून स्नानाच्या निमित्ताने कांहीं मंडळी गांवाबाहेरील अंधाऱ्या विहिरीवर गेली. विहिरींत आपल्या कोमल अर्भकाला हृदयाशीं घट्ट धरून एका बाईचें प्रेत पाण्यावर तरंगतांना दृष्टीस पडलें, आणि एकच आवाज अंतराळीं घुमूं लागला कीं हें पहा नांदिनीचें मोक्षसाधन !

# माहेश्वर आणि वीरशैव

[ लेखकः—श्री. विश्वनाथ लक्ष्मणआप्पा कुल्ली, मु. रोहिणखेड, जि. बुलठाणा (वऱ्हाड). ]

वरील मथळा वाचून माहेश्वर या शब्दाचा अर्थ संकुचित स्वरूपाचा आहे असा वाचकांना भास होण्याचा संभव आहे; परंतु माहेश्वर हा शब्द पटाधीश, आचार्यपीठावर अधिष्ठित असलेले धर्मगुरु, आणि जंगम, वगैरेबद्दल वापरलेला आहे. म्हणून वरील माहेश्वर या शब्दाच्या असंदिग्धतेबद्दल त्याचा जरा स्पष्ट व व्यापक खुलासा करणें जरूर वाटलें.

प्रचलित वीरशैव वृत्तपत्रांतून वाचावें, तर हल्ली आपल्या समाजांत एक गोष्ट प्रामुख्याने दृष्टोत्पत्तीस येत आहे; ती म्हणजे माहेश्वर आणि वीरशैव यांच्यांत दिवसें-दिवस वाढत जाणारा तिरस्कार व वैमनस्य ही होय. हा तिरस्कार दिवसानुदिवस इतका वाढत आहे, की त्यामुळे वीरशैवसमाजांत माहेश्वर आणि वीरशैव असे दोन भाग पडतात कीं काय असा भास

होऊं लागला आहे. एकीकडे पाहावें तर आपल्या समाजांत समाज कसा सुधारेल, घटना कशी होईल, समाजाची वाढ व एकी कशी होईल, वगैरे गोष्टींच्या चर्चा, सभा, परिषदा, व वृत्तपत्रें यांच्यांतून ऐकावयास वाचावयास मिळतात; दुसरीकडे पहावें तर एका-बाजूस सनातनी व वीरशैव आणि दुसऱ्या बाजूस नवीन मताचे वीरशैव यांच्यांत एकमेकांवर टीका होत असून क्षुल्लक बाबतींत उगीच वितंडवाद वाढत आहे. यांचा अंतिम परिणाम आपल्या समाजास कसा घातक होतो व तो टाळण्यासाठी काय करणें इष्ट आहे, ह्याचा प्रत्येक वीरशैवाने विचार करणें हें त्यांचें कर्तव्य नाही काय ?

हल्लींचें युग हें क्रांतीचें युग आहे, म्हणजे जुन्या चालीरीति नष्ट होत असून, नव्या चाली-रीती व नवीं तत्वें अस्तित्वांत येत आहेत. तेव्हा सर्व जगच जेथे नव्याकडे धाव घेत आहे त्या वातावरणापासून आपण, आपला चिमूटभर समाज, अगर कोणताहि समाज, अलिप्त राहूं शकेल ही गोष्ट मात्र चालू काळांत कोणत्याहि विवेचक बुद्धीला पटणार नाही. म्हणून कालपरत्वें जुन्याला अंतरून नव्याचा स्वीकार करणें आपणाला इच्छा नसतांहि भाग पडत आहे; याचा दोष कोणावर नसून तो परिस्थितीवर आहे. कारण कोणताहि प्राणी परिस्थितीचा गुलाम असतो. याकरिता आपल्या समाजाने नव परिस्थितीला अनुसरून जुनीं अमूल्य तत्वें फक्त कायम ठेवून तसेच समाजोन्नति हें अंतिम ध्येय कायम ठेवून नुसत्या कार्यपद्धतींत नवीन स्वरूपाचा बदल केल्यास जुन्या-नव्यांची सांगड घातली जाऊन समाजस्वास्थ्यासहि तें हितकारक होणें संभवनीय आहे. म्हणून त्याचा विचारहि या लेखांत व्हावयाचा आहे.

कोणत्याहि समाजांत धार्मिक बाब हें अत्यंत महत्वाचें अंग आहे. तसेंच कोणतेंहि शिक्षण घेण्यास शिक्षकाची अगर गुरुची जरूर असते. तद्वत् धर्मसुधारणेबाबत धर्माचें संपूर्ण ज्ञान होण्यास धर्मगुरुची आवश्यकता असते हेंहि स्पष्टच आहे. अष्टावर्णांतहि गुरु असावा हें प्रथमच सांगितलें आहे. माझ्या मनाचा कल जरी नवमतवादाकडे आहे, तरी आपल्या समाजांतून गुरुवर्गाची जी हकालपट्टी होऊं पहात आहे ती घटनेच्या दृष्टीने अयोग्य दिसत असून गुरुवर्गाला समाजामध्ये धार्मिक कार्यकर्ते अथवा समाजाचे एक घटक म्हणून कांही तरी मर्यादित स्थान असावें असें माझें मत आहे. मुख्य - प्रश्न मात्र गुरुवर्गाच्या लायकीचा आहे. आम्रफळाचें आपण मोठ्या आनंदाने सेवन करितों; कारण त्यांत असलेली माधुरी हें त्या फळाचें वैशिष्ट्य आहे. तद्वत् शुद्धाचरण, भक्तिरसपूर्ण जीवन, तपस्वी वृत्ति, वगैरे वैशिष्ट्याबद्दल समाजांत माहेश्वर-वर्गाविषयी आदर उत्पन्न होऊन समाज त्यांना मानूं लागेल; कारण चमत्कारा-शिवाय या जगांत कोणी नमस्कार करीत नाहीं. सारांश, **गुरुवर्गाची समाजांत आवश्यकताच नाही या मताचे नवमतवादी नसून वरील-प्रमाणे लायक गुरुवर्गाचा सात्विक, नैतिक व स्तुत्य असा उपदेशच नवमतवाद्यांना मान्य होईल, त्यांची दांभिक सत्ता मात्र त्यांना कदापिहि मान्य होणार नाही,** एवढें सांगून या लेखाचा पूर्वार्ध येथेंच पूर्ण करतों.

पुढील अंकीं माहेश्वरवर्ग, सनातनी वीरशैव, आणि नवमतवादी वीरशैव, ह्यांचे समाजहिताच्या दृष्टीने परस्परसंबंध कसे असावेत, व त्यांची एक-मेकाविषयींचीं कर्तव्यें व वागणूक सद्य:स्थितीनुरूप कशी असावी, हें सांगण्याचा मी अल्पमतीप्रमाणें प्रयत्न करीन. परंतु त्या सर्व गोष्टी वाचकांस किंब-हुना सर्व समाजबांधवांस मान्य होतीलच हें मात्र निश्चित सांगतां येणार नाही. कारण मतमतांचा केव्हांहि फरक असणारच.

# नववीरमाहेश्वर मंडळाची आवश्यकता!

[ लेखकः—श्री. राम शंभू पुराणिक ( जन्मजात जंगम ) दारव्हा. ]

कुठल्याहि नव्या वस्तूचा अवतार जगाच्या कौतुकाला कारण होत असतो. गोऱ्या इंग्रजांनी जेव्हा प्रथमच हिंदुस्थानच्या भूमीवर पाऊल टाकलें, तेव्हा हिंदी लोकांना हा कुठला अजव-प्राणी अवतरला म्हणून आश्चर्याने वेड लागलें, तितपतच इंग्रजांनादेखील आमचे हिंदी लोक पाहून आश्चर्य वाटलें. वास्तविक उभयतांची जात मनुष्यप्राण्याचीच! फरक काय, तो रंगारूपांत आणि पोषाखांत. पण उभयपक्षीं चमत्कारिक कौतु-काचा विषय! पण आज तोच विषय इतका अंगवळणीं पडूं लागला कीं, प्रत्येक हिंदी माणूस शारिरिक रंगारूपाने गौरमुखी होण्याचे जरी त्याला आज साध्य होत नसलें, तरी इतर बाबतींत, पोषाख, राहणी, घरगुती वावर,



वगैरे बाबतींत अहमहमिकेने इंग्रजांशीं स्पर्धा करूं लागला आहे. हें कशाचें दृश्य? तर नवें रुळलें कीं गाडी सरळ रुळावरूनच आपोआप चालूं लागते. नवी नवरी-देखील प्रथम सासरीं आली कीं चार दिवस बुजल्या-चुगल्यागत वावरत असते; पण तीच जरा सासऱ्याच्या मंडळींत रुळली कीं, माहेरच्या आठवणींचेंदेखील तिला स्मरण रहात नाही. आणि म्हणूनच आम्हालाहि पूर्णपणें खात्री आहे कीं, नवमतवादाविरुद्ध उगीच नसती हाकाटी करणारे कट्टर पुराणप्रिय नवमतवादाला आज जरी बुजगावणें समजून दूरदूर पळताहेत तरी तेच चार दिवसांनी नवमतवादाचे चहाते होतील. वास्तविक सुधारणा ही सर्वांनाच प्रिय आहे. पण कांही लोक मुद्दामच डोळ्यावर कांतडें ओढून, तर कांही हटवादीपणाने, उगीचं नाकें मुरडण्यांतच भूषण मानतात इतकेंच.

नवमतवाद म्हणजे कांही एखादें भूत-पिशाच्च नव्हे कीं त्याकडे दृष्टि वळविल्यास लाग-लीच तें गट्ट करून टाकील. खरें पाहूं गेल्यास नवमतवाद या शब्दांत नांवाशिवाय तरी कांही दुसरें-तिसरें नवीन आहे असें आम्हाला वाटत नाही. नवमतवाद म्हणजे जुन्या गचाळ आणि गबाळ रूढीकल्पनांवर आजच्या सुधारलेल्या मार्गावरून सरळ बिन्धोक चालंवण्याखातर एक प्रकारचा दिव्य संदेश आहे. ही दृष्टि बाळगल्यास नवमतवादाचें खरें स्वरूप सहजगत्या कुणालाहि पटण्याइतकें व्यापक आणि सत्य आहे. आमच्या वीरशैव समाजांत ' नवमतवाद ', या शब्दाला तरुण आणि तडफदार समाज-हितेच्छु श्री. बाबूराव, चौधरी यांनीच जन्म दिला. आणि हें त्यांचें अपत्य आमच्या वीरशैव समाजाला एक कौतुकाचा विषय होऊन बसलें. प्रत्येक जुन्या चालीरीती अंगवळणीं पडलेले

पुराणप्रिय माणूस स्वतःच्या नातवंडाला जुन्या पद्धतीची झगले आणि कांकडी चिंध्याची विदुषकी टोपी घालण्याची जुनी पद्धति मोडून सुंदरसें विलायती फॅशनकट फीतदार झबलें आणि नव्या-पद्धतीची विनीदार झालर टोपी चढवलेली पाहून जितका दचकला नसेल तितकाच या चौधरीच्या नव्या बालकाला पाहून दचकला. श्री. बाबूराव चौधरी यांनी आपले सामाजिक सुधारणेचे विचार नवमतवाद या नावाखालीं आधुनिक पद्धतीच्या पोषाखांत समाजापुढे मांडण्याचा प्रयत्न केला. पण काय झालें कुणाला ठाऊक. हें नांव कानीं येतांच कांही कट्टर सनातनी पुराणप्रियतमांना धरणीकंपाचा धक्का बसला ! तर उलट सच्च्या समाजहितेच्छूंना भविष्यकालीच्या उज्ज्वल चंद्रि-केची प्रभावशाली प्रतिमा श्री. चौधरीच्या नवमत-वादांत आहे असें वाटलें. आणि आमच्या या आजच्या लेखाला तरी चालना देण्यास तोच विषय कारणीभूत झाला. समाजसुधारणेची खरी तळमळ बाळगणे आणि समाजहितार्थ सर्वतोपरीं आयुष्य खर्ची घालणाऱ्याकरितांच वीरमाहेश्व-रांचा जन्म आहे आणि हेंच त्याच्या जीवित सर्वस्वाचें एकमेव सार आहे असें अट्टाहासानें आमची शास्त्रें सांगतात. परंतु आमचे शास्त्रपुरा-णवादी किती वीरमाहेश्वर या तत्वानुरोधाने वागतात हें एक परमेश्वरालाच ठाऊक ! आणि जोंवर समाजसुधारणेची खरी तळमळ आह्मा वीरमाहेश्वरांना लागणार नाही तोंवर त्यांनाहि समाजांत काडीमात्र मान मिळणार नाही हें आजवरच्या अनुभवावरून आणि नवमतवादी लोकानी जंगमाविरुद्ध चालविलेल्या चळवळीवरून प्रत्येकाच्या प्रत्ययाला येत आहे. आणि ह्मणूनच आह्मी **'नववीरमाहेश्वर मंडळाची आव-श्यकता' आमच्या समाजापुढें मांडण्यास सरसावलों आहों. नववीरमाहेश्वरमंडळाने धडाडीने पुढे पाऊल टाकून, नवमत-वादाच्या धरणीकंपाच्या धक्क्यानें हादरून गेलेल्या पुराणप्रिय सनातन्यांना हात देऊन अगर वेळप्रसंगीं हात दाखवूनहि पतितोद्धाराचें कंकण धारण करावें अशी आमची विनंती आहे.** आज प्रत्येक समाजाला खंबीर वृत्तीच्या निधड्या तरुणाचीच गरज आहे आणि समाजसुधारणेला तरुणांनीच पुढाकार घेतल्यास कार्य सुकर होणार आहे. अतएव आज 'नववीर माहेश्वर मंडळा'-ची स्थापना करणें किती अगत्याचें आहे हें सहजच कुणाच्याहि लक्षांत येईल. या आमच्या सूचनेला अनुकूल पार्श्वभूमि निर्माण करणारे लेख आमचे सजातीय नवमतवादी मित्र श्री. काटकर,नागभीड, श्री. नारायणस्वामी मलवडी यांनी 'संजीवनी'-च्या द्वारें प्रकाशित करून ठेवले याबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे. इतकेंच नाही तर आमच्या या आवश्यकीय सूचनेला, चाळीशी उलटलेले आणि ज्यांनी आमच्यापेक्षा या जागतिक धकाधकीच्या आखाड्यांत चार पावसाळे जास्त अनुभवले आहेत असे विद्वान लोकहि आम्हाला सहाय्य करण्यास तत्पर आहेत हें 'संजिवनी'-च्या वाचकांना तरी नव्याने सांगावें लागणार नाही. समाजाहिताची खरी तळमळ बाळगणाऱ्या मंडळींत प्रामुख्याने श्रीगुरुमूर्ति करवसय्या गुरु ईश्वरय्या लासिनकर मु. लासिनावसमतनगर, अमरावतीचे श्रीगुरुमुर्ति करवसय्यास्वामी लासिनकर, 'संजि-वनी'-चे संपादक श्री. नानासाहेब बामणगांवकर, श्रीगुरु सिद्धय्यास्वामी सिद्धगिरमठ अमरावती, तळेगांवचे श्री. घाटुळकर, खामगांवचे श्री. हरेश्वरस्वामी आणि रामलिंगस्वामी बंधुद्वय वाढोणेकर; श्री. शंकरस्वामी श्रीगुरुमूर्ति वीरलिंग-स्वामी तळेगांवकर, श्री. दादाशास्त्री कीर्तनकार अमरावती आणि इतरहि बरीच प्रतिष्ठित मंडळी आमच्या या नववीरमाहेश्वरमंडळाच्या संस्थापनेला अनुकूल आहेत असें म्हणणें अतिशयोक्तीचें खास नाहीं. कारण असें एखादें मंडळ स्थापण्याची आवश्यकता अमरावती येथील भीमाशंकरमठाचे अधिपती श्रीगुरुमूर्ति सिद्धरामस्वामी माजलगांवकर

यांनी जर्मनीस जातांना, आणि त्याचबरोबर, पंचाचार्यमाहेश्वरमंडळाचे उपाध्यक्षपदाचा राजीनामा देतांना जाहीर रीतीने बोलल्याचें 'संजीवनीं'-त प्रसिद्ध झालें आहे.

अशा प्रकारें नववीरमाहेश्वरमंडळाच्या स्थापनेचें बीजारोपण तरुण वीरमाहेश्वरवर्गीय सुविख्यात व्यायामपटु श्रीगुरुमूर्ति सिद्धरामस्वामी ह्यांच्या परदेशगमनांतूनच झालेलें आहे. परदेशगमन निषिद्ध आहे आणि तुह्मी जर परदेशगमनाला उद्युक्त व्हाल तर समाज तुह्माला बहिष्कृत करील असा कांही कूपमंडुकवृत्तीच्या टारगट वीरमाहेश्वरांनी सिद्धारामस्वामींना धाक घालून त्यांचे पाय मागे खेंचण्याचा आटोकाट प्रयत्न केला इतकेंच नाही तर त्यांच्या अभिनंदनाखातर सभेलादेखील कुणीं जाऊं नये अशा प्रकारचीहि चळवळ करण्यांत आली असें आह्माला खात्रीपूर्वक कळलें आहे. श्री. नानासाहेब वामणगांवकरांनी सिद्धारामस्वामींना जर पाठिंबा दिला नसता तर स्वामींना जर्मनीच्या जागतिक सामन्यांत भाग घेण्याचें आदर्श भाग्य लाभलें असतें कीं नाही याचीच शंका आहे. आणि म्हणूनच अशा प्रकारचे समाजसुधारणेच्या कार्यांत विघाड करणारे, आणि समाजाला पुढे पाऊल न टाकूं देण्यास सरसावणाऱ्या लोकांना समाजसुधारणेचा खरा मार्ग पटवून देणारे नववीरमाहेश्वरमंडळ स्थापणें आज किती अगत्याचें आणि आवश्यक आहे याचा आमचे वीरमाहेश्वरबंधु अवश्य विचार करतील अशी आह्मा आहे. आमच्या मतें वीरमाहेश्वर मंडळाची एखादी साधारण सभा बोलावून या मंडळाची घटना तयार करावी आणि सिद्धारामस्वामीच्या परदेश-आगमनानंतर याला मूर्तस्वरूप द्यावें असा आमचा मानस आहे. तरी या आमच्या सूचनेला सहानुभूतिपर अनुमोदन असणाऱ्या वीरमाहेश्वर मंडळींनी आपली मतें माझेकडे कळविल्यास तदनुरूप पुढे पाऊल टाकण्यास बरें होईल ! ! !

---

# वीरशैवांतील चळवळी

## महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळ
## कार्यकारी व घटनासमितींची सभा

पारवा (जि. यवतमाळ) येथे ता. २७-९-३६ रोजी दुपारी ४ वाजतां महाराष्ट्र-वीरशैव-हितसंवर्धक मंडळाचें कार्यकारी मंडळ व घटना-कमेटीची वैठक, मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार ह्यांचे पारवा (जि. यवतमाळ) येथील रहात्या वाड्यांत होणार आहे. तरी मंडळाचे खालील सभासदांनी हजर राहण्याची कृपा करावी. तसेंच ज्या सभासदांनी अजून आपली सभासदत्वाची वर्गणी भरली नसेल त्यांनी ती येताना बरोबर आणावी.

### सभेपुढील विषय:—

१ गेल्या सभेंत पास झालेल्या घटनेंत जास्तीचे कांहीं नियम घालणें. २ कारंजेकर वीरशैवांनी केलेल्या "प्रांतिक परिषदेच्या" मागणीचा विचार. ३ अध्यक्षांचे परवानगीने सभे पुढे येणारे विषय.

## सभासदः

(१) श्रीमंत बाबासाहेब देशमुख, अध्यक्ष. (२) श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, उपाध्यक्ष. (३) श्रीमंत रामभाऊशेट कुळी रोहिणखेडकर उपाध्यक्ष, (४) श्रीमंत काशिनाथ आप्पा, अडगांवकर, खजिनदार; [ ५ ] श्री. रोडाप्पा वाकतकर, डोणगांव. ( ६ ) दे. भ. नाना साहेब बामणगांवकर, अमरावती- (७) श्रीमंत बाबासाहेब मुखरे इजारदार, पुसद. (८) श्रीमंत शिवाजीराव ऊर्फ बाळासाहेब मुखरे, इजारदार, पुसद. [ ९ ] श्रीमंत गोविंदराव बोंदरे चिखली [ १० ] श्रीमंत रंगाप्पा गंगाप्पा बोंदरे, चिखली, (११) श्रीमंत मलकाप्पा सतानप्पा बोंदरे, चिखली. (१२) श्रीमंत सोनाप्पा नथाप्पा पांगरे, कारंजा, (१३) श्रीमंत महादेव शिवाप्पा जुननकार, पांढुर्णा ( १४ ) श्रीमंत बी. के. ऊर्फ बाबुसाहेब हिंगमिरे, हिंगणघाट. ( १५ ) श्रीमंत बाबुआप्पा गुंडाप्पा करणें, कोकर्डा. [ १६ ] श्रीमंत बाबुराव बाळाप्पा बिल्डिंग कॉंट्रॅक्टर, धुळें. वरील सर्व सन्माननीय सभासदांनी नियमित वेळीं सभास्थानीं हजर रहाण्याची कृपा करावी.

आपले नम्र.

| | |
|---|---|
| वि. तु. चौधरी, अमरावती. | ज. सेक्रेटरी |
| राजाभाऊ वि. डांगरे, नागपूर. | सेक्रेटरी |

## दे. भ. बामणगांवकरांचा दौरा

गेल्या महिन्यांत शनिवार ता. २९-८-३६ रोजी पुसद व रविवार ता. ३०-८-३६ रोजी उमरखेड येथे गणेशोत्सवानिमित्त दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचीं व्याख्याने झालीं. पुसद येथे श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, ह्यांचेकडे ३-४ दिवस त्यांचा मुक्काम होता. लोकशाही-स्वराज्यपक्षाच्या येत्या निवडणुकींतील धोरणाविषयीं बऱ्याच मंडळींनी येऊन त्यांचेशीं चर्चा केली. श्रीमंत बाबासाहेब मुखरे, दे. भ. शंकरराव सरनाईक, व इतरहि प्रतिष्ठित मंडळीकडे त्यांना मेजवान्या-चहापार्ट्या व पानसुपाऱ्या होऊन त्यांचा सत्कार करण्यांत आला.

## श्री सिद्धाराम स्वामींचें आगमन

ता. २७-९-३६ रविवार रोजी दुपारी मुंबई एक्सप्रेसने अमरावतीस येणार.

अमरावती-नागरिकांचेतर्फे होणाऱ्या सार्वजनिक स्वागत व सत्कारसमारंभांत स्थानिक वीरशैवांच्या तर्फे वीरशैवांचे पुढारी महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाचे प्रतिनिधी श्री. अण्णासाहेब हुंडेकर, म्यु. कौंसिलर, हे हार घालतील, व सत्कार-समारंभात भाग घेतील. माहेश्वरवर्गातर्फे श्री गुरुमुर्ति करबसअय्यास्वामी लासिनकर, मठ-संस्थान अमरावती, हे हार घालतील. परदेशांत जातेवेळीं स्थानिक पुढाऱ्यांच्या विचारविनिमय व संमतीने आगाऊ ठरल्याप्रमाणे 'शास्त्रोक्त प्रायश्चित्त-विधीसमारंभ ' श्री गुरुमूर्ति शंकर अय्यास्वामी वाढोणेकर, व श्री. गुरुमूर्ति करबसअय्यास्वामी लासिनकर, मठसंस्थान लासिनावसमंतनगर, ह्यांचे देखरेखेखाली होणार आहे. नंतर श्री. सिद्धारामस्वामी आधीच निमंत्रणें आलेल्या वऱ्हाडांतील प्रमुख शहरीं भेटी देऊन धार्मिक जागृतीचें कार्य करतील.

## श्री सिद्धारामस्वामींचे नगरवासियांतर्फें जाहीर स्वागत व सन्मानसमारंभः

जर्मनी येथे झालेल्या जागतिक ऑलिंपिक सामन्यांत यश मिळवून स्वगृहीं परत येणाऱ्या येथील ह. व्या. मंडळाचे खेळाडूंचा नागरिकांचेतर्फे जाहीर सन्मानसमारंभ होणार आहे. त्याकरिता येथील निरनिराळ्या संस्थांचे प्रतिनिधीची सभा हिंदुहायस्कूलचे हे. मा. श्री. नानासाहेब राजवाडे, एम्. ए., ह्यांचे अध्यक्षतेखाली नगरपंचायतीचे दिवाण-खान्यांत रविवार ता. १४-९-३६ रोजी भरली होती. वीरशैवांच्या म. वी.

हि. संवर्धक मण्डळातर्फे श्री. अण्णासाहेब हुंडेकर, वी. शिक्षण प्रसारक मं. तर्फे श्रीमन्त सोमाप्पा मेंडसे, वी. संजीवनी कार्यालयातर्फे श्री. बाबुराव चौधरी, माहेश्वरवर्गातर्फे श्री गुरुमूर्ति करवस अय्याखामी लासिनकर, सराफा असोसिएशनतर्फे सेक्रेटरी श्रीमंत सोमेश्वरआप्पा कोल्हे, ट्रेडर्स् कॉर्मस असोसिएशनचे अध्यक्ष श्री. त्रिंबकआप्पा कापुसकरी, व 'उदय' कार्यालयातर्फे दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांना सभेला हजर राहण्याकरिता निमंत्रणें आलीं होतीं. वैद्य हरिहरराव देशपांडे, ह्यांनी वीरशैवांच्यातर्फे स्वागतमंडळावर सभासद व सेक्रेटरी ह्मणून श्री. बाबुराव चौधरी, ह्यांचें नांव सुचविलें. परंतु 'पारवा येथील सभेमुळे सन्मानप्रसंगी हजर राहणे शक्य नसल्यामुळे त्यांनी वीरशैवांच्यातर्फे श्री. अण्णासाहेब हुंडेकर ह्यांना स्वागतमंडळावर सभासद म्हणून व श्रीमंत सोमाप्पा मेंडसे, ह्यांना स्वागत मंडळाचे सेक्रेटरी ह्मणून नांवे सुचविलीत व त्याप्रमाणे श्री. सोमाप्पा मेंडसे हे स्वागत-मंडळाचे सेक्रेटरी व वीरशैवांच्यातर्फे श्री. अण्णासाहेब हुंडेकर, व माहेश्वरवर्गातर्फे श्री गुरुमूर्ति करवसअय्यास्वामी लासिनकर ह्यांना 'स्वागत कमेटीवर निवडून दिलें' व सत्कार-समारंभात भाग घेण्यास अधिकार दिला.

## श्रीमंत सोमाप्पा संगेकर

चांदूर बाजार येथील तरुण कार्यकर्ते डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांचे वडील व तेथील प्रमुख नागरिक श्रीमंत सोमाप्पा महादाप्पा संगेकर ह्यांना तेथें नुकत्याच झालेल्या 'नोटिफाईड एरिया कमेटी'-वर सभासद ह्मणून सरकारने नेमले होते. नुकतीच तेथे आधिकारीवर्गाची निवडणूक झाली. त्यांत श्रीमंत सोमाप्पा संगेकर हे उपाध्यक्ष ह्मणून निवडल्या गेले. श्री. संगाप्पा मुचळंबे हे मागे एक वेळ अमरावती म्यु. कमेटीचे उपाध्यक्ष ह्मणून निवडल्या गेले होते. ह्यानंतर स्थानिक संस्थांतून अशा-तऱ्हेचा मान मिळविणारे हे दुसरे लिंगायत सद्गृहस्थ होत. चांदूरबाजारसारख्या ८-१० घरेंच लिंगायत लोकवस्तीच्या गांवांत श्रीमंत सोमाप्पा ह्यांची उपाध्यक्षत्वाचे जागीं निवड झाली हें त्यांच्या वीरशैवेतर समाजांतील लोकप्रियतेचें खास निदर्शक आहे. ह्या बहुमानाबद्दल आह्मी त्यांचें अभिनंदन करतों.

## अहमदनगर

वीरशैव तरुण संघाची सभा ता. १८-८-१९३६ रोजी भरून दे. भ. नानासाहेब बामणगांवकर यांच्या पत्नीच्या निधनानिमित्त दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला.

## चातुर्माससमाप्ति

बोरी खुर्द, ता. पुसद, जि. यवतमाळ, येथील शिवभक्तपरायण उकंडाआप्पा मुखरे यांचा साला-बादप्रमाणे चातुर्मास श्रावण शु॥ ५ रोजी सुरुवात होऊन समाप्ती ता. २-९-३६ रोजी मोठ्या थाटाने साजरी झाली. चातुर्मासांत दररोज नवनाथग्रंथ वाचीत होते. ऐकण्यास बरीच मंडळी येत असे. रात्री भजन होत असे. नंतर खडीसाखरेचा प्रसाद वाटीत असत. दरसोमवारी वीरशैव व वीरशैवेतर मंडळीस अन्नदान होत असे, व समाप्तीचे दिवशी ५०० पाचशे मंडळीस अन्नदान दिलें व रात्री भजन होऊन सकाळीं पोथीची व दिंडीची मिरवणुक मोठ्या थाटाने गांवांत निघाली. तीत सर्व वीरशैव व वीरशैवेतर मंडळीची गर्दी होती. या कामीं सर्व खर्च वरील सद्गृहस्थ आपले स्वतः घरून करितात. याबद्दल आह्मी त्यांचें अभिनंदन करितों.

आपला
मलकार्जुनबाबा आजेगांवकर पुसद.

## मलकापूर:-कर्जलवाद मंडळावर नेमणूक

महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाचे उपाध्यक्ष श्रीमंत रामचंद्र विठोबा ऊर्फ रामभाऊ शेठ कुळी, ह्यांची मलकापूर तालुका-कर्जलवाद मंडळावर सभासद ह्मणून नेमणूक झाली आहे. ह्या बहुमानाबद्दल आह्मी त्यांचें जाहीर अभिनंदन करतों.

---

## सांगली

सांगली संस्थान वीरशैव-परिषदेचें अधिवेशन २६-२७ सप्टेंबर (शनिवार व रविवार) रोजीं "सदासुख" थिएटरांत बेळगांवचे सुप्रसिद्ध पुढारी पंडितप्पा अण्णा चिकोडी, एम्. एल्. सी., ह्यांचे अध्यक्षतेखाली भरणार आहे. स्वागताध्यक्षांचे जागीं सांगलीचे सुप्रसिद्ध वकील श्री. मुरगेंद्र संगय्या हिरेमठ यांची योजना झाली आहे. परिषदेंत सामाजिक बाबतींत प्रागतिक धोरणाचा अवलंब केल्या जाईल अशी उमेद आहे.

## मोभिनाबाद

येथील वीरशैव महिलांची सभा सौ गंगाबाई शेटे ह्यांचे अध्यक्षतेखाली भरून कै. लक्ष्मीबाई वामणगांवकर ह्यांचे अकालीं निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव पास केला. सभेंत श्रीमति महादेवी वाघमारे वगैरे महिलांचीं भाषणें झालीं.

## नागपूर

वीरशैव तरुण-संघ नागपूर ह्या संस्थेची सभा होऊन नानासाहेब वामणगांवकर व दे. भ सिद्धाप्पा ह्यांच्या पत्न्यांच्या निधनाबद्दल दु:खवट्याचे ठराव पास झाले.

Reg. No. N — 645

# वर्गणीदारांस विनंती

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १ ऑक्टोबर १९३६ ( अंक १९ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**श्रीमत रामचंद्र विठोबा ऊर्फ रामभाऊ शेट कुल्ली**
रोहिणखेड जि. बुलठाणा.



महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाचे एक आधारस्तंभ, उपाध्यक्ष, व तहाहयात सभासद, बुलढाणा जिल्ह्यांतील सुधारणावादी सन्माननीय वीरशैव पुढारी व कर्जलवाद-मंडळावरील सरकार-नियुक्त सभासद.

**श्रीमंत बी॰ के॰ ऊर्फ बापुसाहेब हिंगमीरे,**
विव्हिंग मास्तर, हिंगणघाट सी. पी.



वीरशैव तरुणांच्या धंदेशिक्षणाविषयी आस्था बाळगून सहानुभूतिपूर्ण मदत करणारे अखिल भारतीय वीरशैव महासभेच्या कार्यकारी मंडळावरील वर्धा जिल्ह्यातर्फेचे प्रतिनिधि व महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाचे तहाहयात सभासद.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥


# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति आश्विन व॥ १ शके १८५८ ( अंक १९ वा.


# कै० लक्ष्मीबाईच्या जीवनांतील बोधप्रद गोष्टी

## भाग पहिला

[ संग्राहकः--श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., सहसंपादक, 'वीरशैव संजीवनी' ].

---

आपला समाज आजहि असा मागासलेला कीं, सजातीय वा सवर्णीय प्रीतिविवाहाला अजून समाजांत तोंड फुटलेलें दिसत नाही. दोन्ही पक्षांच्या आईबापांनी कोणतेहि वधूवर एकमेकाच्या गळयांत बांधावयाचे व कृतकृत्य झाल्याचा आनंद मानावयाचा अशीच प्रथा. समाजांत आजहि सुरूं आहे. पुनर्विवाह ऊर्फ पाट वीरशैवसमाजांत इतका अतिरेकाला गेला कीं, त्याला वधुवरांच्या वयाची मर्यादा तर राहिली नाहींच पण संख्येची आणि किती वेळ वधूने वा वराने पुनर्विवाह करावा ह्यालाहि मर्यादा राहिली नाही. ह्या अमर्याद स्थितिमुळे आरंभीच्या धर्मलग्नांत घटस्फोटाचे व फारकतीचें जाळें विणलें गेलें, आणि सामाजिक जीवनाला आधारभूत असलेली विवाहसंस्था इतकी हास्यास्पद

होऊं लागली कीं, नको तें विवाहित जीवन असा प्रकार कित्येक कुटुंबांत आढळत असलेला प्रत्ययास येतो. असें असूनहि सवर्णीय प्रीतिविवाह समाजांत एकहि घडल्याचें उदाहरण अजून सांपडत नाही.

ही जर आज स्थिति, तर कै. सौ. लक्ष्मीबाई ह्यांचा विवाह दे भ. नानासाहेब बामणगांवकरांशीं जेव्हा झाला तेव्हा वीरशैवांत काय परिस्थिति असेल ? १९०६ च्या मार्गशीर्षांत नागपूर जिल्ह्यांतील वेळे मुक्कामीं कै. लक्ष्मीबाईशीं नानासाहेबांचा विवाह झाला. अर्थात् हा बालविवाह होता. बालविवाहांत प्रीतीचा उगम नसतो हें सांगणें नकोच. शिवाय वधूवरासभोंवती परिस्थिति इतकी विषम कीं, हा विवाह झालाच कसा व उभयतां मनुष्यस्वभाव लक्षांत घेतां अखेरपर्यंत परस्पराविषयीं अत्यंत सहानुभूतीने ते नांदलेच कसे हें एक मोठें आश्चर्य आहे. मनुष्य जेथे चकीत् होतो तेथेच दैवयोग प्रतीत होतो.

विरूळ, जिल्हा वर्धा, येथे नानासाहेब चार वर्षांचे असतांनाच कॉलऱ्याच्या साथींत सात दिवसांत त्यांच्या विस्तृत कुटुंबांतील तेरा इसम मृत्युमुखीं पडले. त्यांतून नानासाहेब व त्यांची ८५ वर्षांची आजी एवढेच वाचले. ह्या मृत्यूंत आई-बाप-आई-बहीण चुलता वगैरे सर्वच गेले! इतकेंच नव्हे तर जें होतें तेंहि बिनहिशेबी कर्जामुळे सावकाराच्या घरांत गेलें. अशा परिस्थितीने नानासाहेब हे बालवयांतच अगदी अनाथ व पोरके बनले. पण त्यांच्या आईचा, खारतळेगांव व उमरावती येथे राहणाऱ्या आपल्या नणंदीवर फार विश्वास. माझ्या 'बापूंचा ( नानासाहेबांचा ) संभाळ' ती करील असा तिचा विश्वास होता. त्याप्रमाणे तिने म्हणजे नानासाहेबांच्या आतेने नानासाहेबांना शिक्षणाकरिता उमरावतीला आणलें व तेव्हापासून उमरावतीशीं नानासाहेबांचा संबंध जडला. अर्थात् आईबापावाचून एका जंगमाचे पोरके पोर व तेंहि एकुलती एक आत्या पोटच्या-पोराप्रमाणे संभाळते हीच नानासाहेबांची बाल-भूमिका.

परंतु आई बाप व चुलता ह्यांना सुखाचे दिवस होते. आत्याहि घरची सुखी, त्यामुळे जन्मकाळचा सुखाचा डौल पोरकेपणाच्या काळांतहि दैवाने संभाळला. येथे नानासाहेबांचें चरित्र सांगावयाचें नाही. पण त्यांच्या वडिलापेक्षां चुलता संस्कृतज्ञ होता त्यामुळे विद्येचे संस्कार बालपणींच त्यांच्यावर झाले. आई नागपूरची रहिवासी. ती पांढरपेशा जंगमाच्या कुळांत जन्मलेली-वाढलेली. नानासाहेबांचे वडील मात्र मराठी चौथीच्या पलीकडे गेले नव्हते. ह्यांनी शिवलीलामृत दररोज वाचावें व ते अशुद्ध वाचतात हें ऐकून नानासाहेबांच्या संस्कृतज्ञ चुलत्याने ( वडिलांच्या धाकट्या बंधूने ) एकीकडे हासावें. त्या वेळी चुलते जर नानासाहेबांना खेळवित असले तर म्हणत कीं 'तूंहि शिरगनेश्वरा' म्हणण्याइतका विद्वान् होणार काय ?' म्हणून त्यांनी लहानपणीच 'लिंगाष्टक व महिम्नस्तोत्र नानासाहेबांकडून पाठ करून घेतलीं होतीं. घरांतील सर्व कर्ते वडील मृत्युमुखीं पडण्यापूर्वी वयाच्या सातव्या-आठव्या वर्षापर्यंत हे संस्कार नानासाहेबांवर झाले होते.

हे पूर्वसंस्कार घेऊन ते उमरावतींत आले. जंगम मंडळीबरोबर ते लहानपणीं उमरावतींत कोठे लिंगार्चनास गेले व येथे जमणाऱ्या जंगमांच्या तोंडून 'गजरथ तुरंगम्' हा संकल्प म्हणतांना त्यांतील 'गोशते'-च्या ऐवजी 'गौशीचा' हा शब्द ऐकला कीं त्यांनी पोट धरून हसावें. हें लहान पोर आपणास हासते म्हणून त्या वेळचे कित्येक अज्ञानी पण प्रौढ जंगम नानासाहेबांचा लहानपणींच रागहि करीत. पण त्यांच्याहि जवळून 'पार्वती पुसे महादेवाला गर्भाच्या खुणा' हें घंटागीत नानासाहेबांनी पाठ केलें होतें, व त्याचा उपयोग खेड्यापाड्यांत पसमासांत करून थोडी शिक्षणाला मदतहि अडचणीच्या प्रसंगीं मिळविली. त्याचप्रमाणे चुलत चुलत्याची उमरावती शहरांतील मठपतीपणाची

वतनदारी संभाळण्यास व शंख फुंकून वेठी उकळण्याचा धंदाहि त्यांना करावा लागला. इतकेंच नव्हे तर उमरावती शहरांत गुरुवार-शुक्रवारच्या पीठहि भक्तवर्गाच्या येथे त्यांनी इतर जंगमांबरोबर लाजत कां होईना पण मागितल्याचा वृत्तांत माहित आहे असे लोक अद्यापि ह्या शहरांत आहेत. अशा प्रकारें नानासाहेब उमरावती शहरांतील वीरशैवांना परिचित होत असतांच लक्ष्मीबाईशीं त्यांचा विवाह झाला.

उमरावती शहराशीं नानासाहेबांचा संबंध कसा व कोणत्या परिस्थितींत आला हें मी आपणाला सांगितलेंच आहे. उमरावती शहरांत लक्ष्मीबाईचें मामेकुळ प्रसिद्ध होतें. इरायापंतोजी, त्यांची पत्नी यमुनाबाई, ह्यांचे बापुअय्या, लड्डुअय्या व पिल्लुअय्या हे तीन पुत्र उद्योगधंदा वगैरे करून जंगमांत चांगलेच नांदले. ह्यांची बहीण चंद्रुबाई ही लक्ष्मीबाईची आई होय. लक्ष्मीबाईचा जन्म जरी वेळेगांवीं पितृगृहीं झाला होता तरी उमरावती शहराला त्या लहानपणापासून आईमुळे परिचित होत्या. शिवाय लक्ष्मीबाईच्या मामकुळाचे व नानासाहेबांच्या कुळाचे कांही पिढ्यांत नात्यागोत्याचे संबंध जुळले होते. नानासाहेबांची आतेबहीण ही लक्ष्मीबाईच्या वडील मामाची पत्नी होती. त्यामुळे ओळखदेख व्हावयाला उशीर लागला नाही. अशा प्रकारें नानासाहेब व लक्ष्मीबाई लहानपणींच उमरावतींत असतांना शेगांवचे सुप्रसिद्ध साधुपुरुष गजानन महाराज उमरावतीला आले. त्यांचा मुक्काम कै० गणपत आप्पा लांडगे यांच्याकडे बुधवारपेंठेतच होता.

हे साधुपुरुष कोणाशीं बोलत नसत. आपल्याच वृत्तींत रंगलेले असत. ह्या साधूवर लक्ष्मीबाईच्या आजीची ह्मणजे आईच्या आईची अत्यंत श्रद्धा होती. ह्या वेळी लक्ष्मीबाई पांचसहावर्षांच्या असतील. आजीबरोबर त्याहि महाराजांच्या येथे जात येत असत. नानासाहेबहि बुधवारांतच रहात असल्यामुळे शाळेंत जातां-येतां तेथे थोडा वेळ थांबत असत. एकदा लक्ष्मीबाई साधूमहाराजांजवळ पुस्तकवजा ( अंकलिपी ) चोपडें घेऊन खेळत उभी असतां नानासाहेबहि प्रसादाकरितां तेथे गेले. प्रसादाकरिता नानासाहेबांनी हात पुढे करतांच साधूमहाराजांनी लक्ष्मीबाईच्या हातांतील पुस्तक हिसकलें व तें नानासाहेबांच्या हातांत ठेवलें. इतकेंच नव्हे तर लक्ष्मीबाईचा हात नानासाहेबांच्या हातांत दिला व महाराज स्वस्थ राहिले. ह्याचा परिणाम लक्ष्मीबाईच्या आजीवर मात्र झाला आणि तिने घरीं येऊन आपल्या सर्व लेकांना व लेकीला ( ह्मणजे नानासाहेबांच्या सासूला ) बजावलें कीं आपली रंगू ( हें लक्ष्मीबाईचे मातुलगृहींचें व पितृगृहींचें लहानपणचें नांव ) 'नारायण'-लाच द्यायची असें ह्मणून हातांत हात देण्याचा महाराजांच्या कृतीचा वृत्तांत निवेदन केला.

ह्या वृताच्या मुळाशीं भावी प्राक्तन कसें आहे ह्याची जाणीव लक्ष्मीबाईला जशी नव्हती तशीच नानासाहेबांनाहि नव्हती. पण लक्ष्मीबाईची आई व मामे हे नानासाहेबांवर त्यांच्या आतेमार्फत देखरेख ठेवूं लागले व नानासाहेबाने असें निघावें व तसें निघावें अशी चिंता वाहूं लागले. पुढे लक्ष्मीबाईची आजी निवर्तली. पण हा संदेश लेकांना व लेकींना सांगावयास चुकली नाही. लक्ष्मीबाईचा पिता स्वतंत्र उद्योग करून सुखाने संसार करणारा असल्यामुळे त्याचा ओढा लक्ष्मीबाईने चांगल्या परिस्थितींत पडावें असा होता. नानासाहेबांच्या आतेचा व इतर नातलगाचा ओढाहि लक्ष्मीबाईशींच लग्न व्हावें असा नव्हता. फक्त लक्ष्मीबाईची आई व तिचे बंधु एवढेच त्या मताचे. पण वधूवरांचे खरे हक्कदार दुसरीकडेच धांवत असल्यामुळे त्यांचें काय चालणार ? त्या काळीं मुलगा व मुलगी वाढणे पाप समजलें जात असे. म्हणून नानासाहेबांची आत्या दुसरीकडे लग्न जुळविण्याचा प्रयत्न करी. तिथी निश्चित व्हावी, सर्व कांही व्हावें; पण कारण नसतांच विघ्न

यावें. तसेंच लक्ष्मीबाईचें व्हावें व झालेंहि. शेवटी १९०६ चा मार्गशीर्ष आला व अकस्मात् हा विवाह निश्चित झाला व तोच आनंदाने पार पडला.

लक्ष्मीबाईच्या पित्याने लक्ष्मीबाईच्या विवाहा-बरोबरच आपल्या दोन पुतण्याहि उजविल्या. त्या दोघीहि लक्ष्मीबाईपेक्षा वयाने थोड्या मोठ्या होत्या. बालविवाहांत वधूवरांची वरात म्हणजे वधूचे व वधूच्या आप्तेष्टांचे कंठ फोडफोडून रडणें होय. त्याप्रमाणे वेळे मुक्कामाहून बोरखडी स्टेशन व तेथून उमरावतीला वरात यावयाची व त्याच स्टेशनवरून नागपूरकडे लक्ष्मीबाईच्या दोन चुलतबहिणी जावयाच्या. वरात निघतांच लक्ष्मीबाईच्या आई-बापांना रडूं कोसळलें. लक्ष्मी बाईच्या दुसऱ्या बहिणी ओक्साबोक्सी रडूं लागल्या. पण लक्ष्मीबाईच्या डोळ्यांत अश्रूंचा थेंब नाही. उलट पतिशेजारी हसत बसल्या. इतकेंच नव्हे तर रडणाऱ्या बहिणींना म्हणत कीं, 'सुळावर चढल्या म्हणून रडता काय ?' त्यामुळे अवांतर मंडळींत हशा पिकला.वधूपक्षाकडील स्त्रीपुरुषांच्या चेहऱ्यावर आनंदचंद्रमा प्रकट झाला. पण वेळ्यापासून तो बोरखडीस्टेशनपर्यंत लक्ष्मी-बाईच्या दोन बहिणी मात्र सारख्या रडतच होत्या. ही गोष्ट लक्ष्मीबाईच कोणाच्या लग्नाची गोष्ट निघाली म्हणजे हासत सांगत असत.

इतकेंच नव्हे तर १९२९ साल संपेपर्यंत अनेकदा माहेरीं जाण्याचा व येण्याचा त्यांना प्रसंग आला पण माहेरहून सासरीं येत असतां डोळ्यांत अश्रू त्यांच्या आईच्या व पित्याच्या येत असत, पण लक्ष्मीबाई रडावयाच्या नाहीत. आईबाप व मामे ह्या सर्वांना लक्ष्मीबाई एकटीच म्हणून लाडकी. मागेल तें मिळावें ही स्थिति अनुकूल. पण अमुक खावयास पाहिजे व अमुक ल्यावयास पाहिजे असा शब्द बापाजवळ वा मामा-जवळ उभ्या आयुष्यांत त्यांनी चुकून उच्चारला नाही. ही त्यांच्या स्वभावाची एक नैसर्गिक ठेवण. त्यांच्या बरोबरीच्या स्त्रियांत वा नव्या किती स्त्रियांत हा नैसर्गिक गुण रहात असेल हें सांगतां येत नाही. पण वरात उमरावतींत येतांच दुसऱ्या दिवसापासून सकाळीं उठून झाडझूड, सडासारवण करून व स्वयंपाकास लागून नवऱ्याला जेवूं घालण्याची तयारी पाहतांच नानासाहेबांच्या प्रेमळ आतेस काय वाटलें असेल ! कारण घरांत त्या वेळीं आतेसह हे तिघेच. पण जेवण झालें कीं, लक्ष्मीबाईनी खूप झोपावें. नंतर संध्याकाळचें कामकाज.पण घराबाहेर जाणें नको व येणे नको.

अज्ञानावस्थेंत लग्न झालें.मामाचें घर शेजारीच. आई तेथेच उतरलेली. पण आपणहून व घरांत कोणाला न विचारतां त्या घरींहि लक्ष्मीबाईनी जाऊं नये. आई न्यावयास आली तरी विचारल्या-वाचून जावयाचे नाही हा जात्याच स्वभाव. नानासाहेबांची वाढ, त्यांचें सार्वजनिक आयुष्य, व लक्ष्मीबाईचें आयुष्य, ह्याच्यांत विचार केला तर हें अत्यंत विषम जोडपें. पण गृहसुखाचा विचार केला तर तें एकमेकास पोषकच झालें. तें कसें व कोठे पोषक झालें हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. दिसावयास सम पण गृहकृत्यांत विषम अशीं अनेक जोडपीं आपण संसारांत पाहतो. पाहून-परखून केलेल्या व झालेल्या जोडप्यातसुद्धां ही विषमता पदोपदीं संसारांत आढळते. सहवा-सोत्तराच्या कांही प्रीतिविवाहांत मात्र ही विषमता आढळत नाही. पण ह्या विवाहपद्धतीचा तर आपल्या समाजांत अजून गंध नाही. नानासाहेबांचा विवाह तर बाल-विवाह व तोहि दैवगतीनें होऊं नये तो झालेला. एखाद्या सद्गुरुप्पाने दैव ओळखावें व त्याने सहजगाठी घालून द्यावी व तोच योग अखेर जुळावा हा काकतालीय न्याय आहे. तो सर्वांच्याच वाट्याला कसा येईल ! तेव्हा लक्ष्मीबाईच्या चरित्रांतील कांही गमतीतून हें गृहकृत्याचें खरें सुख कोठे भरलें आहे हें आपणाला क्रमशः पहावयाचें आहे.

# नवमतवाद व वैवाहिक प्रश्नाची मीमांसा

( उत्तरार्ध मागील अंकावरून समाप्त )

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

## गतधवांचा पुनर्विवाह

सर्व आयुष्यामध्यें विवाह हा अत्यंत महत्वाचा व आवश्यक विधी आहे. म्हणूनच धर्मानें त्यास विशेष महत्व दिलें आहे. पण कधीं कधीं योगायोग असे येतात कीं, दोघांपैकी कोणा तरी एकास दुःखसागरांत पडावें लागतें. स्त्री जर मृत झाली तर पुरुषांना दुःख होत नाही असें नाही. पण तो तेवढी वेळ त्याच अवस्थेंत घालवून पुनः आपला संसार मनाजोगे थाटतो. पण पतीच्या निधनानें स्त्रियांना मात्र फार हाल हाल सोसावे लागतात. या बाजूनें विचार केला असतां—धर्माची आज्ञा असो वा नसो पण—आमच्या समाजांत गांधर्वविवाहाची जी चाल रूढ आहे ती योग्य व आह्माला भूषणावह आहे. नाही तर इतर उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या समाजामध्ये जसे कुकर्म घडतात व शेवटी आत्महत्त्येपर्यंत मजल जाऊन पोहचते असेच आमचेंहि झालें असतें. पण त्यापासून बऱ्याच मोठ्या अंशानें आह्मी अलिप्त आहोंत. याचें सर्व श्रेय 'गांधर्वविवाह' व त्याच्या जनकाकडेच आहे. एवढें कशाला लो० टिळकदेखील " विधवाविवाहासंबंधानें शास्त्रनिषिद्धता सांगून संकटकाळीं अक्षतयोनी अशा गतधवांचा ( विधवा ) पुनर्विवाह खुशाल करावा ! किंवा ज्यांना अशा विवाहाची आवश्यकता वाटते त्यांना तो करूं द्यावा " असें ह्मणत होते. " हल्लीं म. गांधीदेखील विधवाविवाहाच्या पूर्ण पक्षाचे आहेत. " धर्मनियमांत प्रसंगोपात बदल केला पाहिजे यांतच धर्माचें व जीविताचें संरक्षण आहे, म्हणून 'आग्रह सोडा नि धर्म जोडा.' शास्त्रांत जरी पुनर्विवाहाला स्थान नसलें तरी काळमानपरत्वें शास्त्रांतील वांगीं शास्त्रांतच ठेवून प्रसंगोपात नैतिक धर्माला पोषक होतील असेच आचार करण्यात धर्माचें रक्षण आहे.

पण आमच्यांत गांधर्वविवाहाची जी चाल आहे ती फारच सदोष आहे. त्यामुळे जरठकुमारीविवाह, दुर्बलविवाह, शठविवाह, रोगीविवाह, बहुपत्नीविवाह, यासारखे अघोर प्रकार घडून येत आहेत. गांधर्वविवाह नसावा असें आमचें मत नाही. पण तो स्त्री-पुरुषाचें वय, आरोग्य, व स्वभावसमसमानता, यांनी युक्त असा योग्य झाल्यास भावी पिढीचें उच्च स्थान खात्रीनें वाढेल व विवाहाचा हेतु सफल झाल्याशिवाय रहाणार नाही. ह्मणून उपर्युल्लेखित अनिष्ट विवाहासारखे प्रकार न घडूं देण्याबद्दल सदैव तत्पर असावें. अशा विवाहास ताबडतोब निर्बंध घातला

जावा व योग्य असेच गांधर्वविवाह विधियुक्त करण्यांत यावेत.

प्रस्तुत लेखांकाचा मूळ उद्देश गतधवांचा पुनर्विवाह कां करूं नये हा आहे. पुरुषांना एक सोडून अनेक कुमारिकांशीं विवाहबद्ध होतां येतें पण स्त्रियांनी ह्मणे एकच एक कौमार्यविवाह करावा. पुनः कुमारांशीं विवाह करणें निषिद्ध आहे. वाटल्यास पुन: विवाह केला तरी तो गांधर्वविवाह करावा. मग आह्मी असें ह्मणतो कीं, विधुराने तरी कुमारिकेशीं विवाह काय ह्मणून करावा ? स्त्रीचा पती मरतांच ती इतकी कनिष्ट कां गणली जावी ? पुरुष कां गणले जाऊं नयेत ?

**पुरुषांनी एक सोडून अनेक ठिकाणी शेण खाल्लें तरी तो सदा एकपत्निव्रतच !** पण भावड्या स्त्रियांचे पती वारले व त्या स्त्रीधर्माने निर्दोषपणें वागत असतांना पुन: पुनर्विवाहाचा योग आला तरी तिचा विवाह कां होऊं नये ? जो न्याय पुरुषांना तोच स्त्रियांना नको कां ! 'यो भर्ता सा स्मृतांगना' ह्मणून असा भेदभाव राखण्याचे कांहीं कारण नाही. परस्परांचा दर्जा समान आहे त्या अर्थी 'गांधर्व वा पुनर्विवाह' हा ज्यांचा त्यांच्या इच्छेप्रमाणेंच झाला पाहिजे. **इच्छा आहे तेथे मार्ग आहे. पण ह्याला सामाजिक सामर्थ्याची जोड हवी आहे.** आमचे बुद्धिवादी लोक इकडे लक्ष पुरवितील अशी आह्मास हार्दिक खात्री आहे. ह्मणून दोन शब्द येथे लिहिले आहेत. यासंबंधाने ज्या बंधुभगिनींना आपले अनुकूल वा प्रतिकूल मत व्यक्त करावयाचे असतील त्यांनी अवश्य करावें अशी आमची त्यांना आग्रहाची विनंति आहे. मनुष्याचा स्वभाव ह्मणजे हा एक परस्परविरोधी मताचे व संवयीचे एक अखंड चक्र आहे. त्यामुळे कुशंका ह्या उद्भवणारच व त्या एका परीने उत्तमच ! कारण 'वादे वादे जायते तत्त्वबोध:.'

---

## शैक्षणिक व खर्चिक प्रश्न

वीरशैवमहिलांत शिक्षणाची फार मोठी उणीव आहे असें ह्मणतांना खरोखरच अत्यंत वाईट वाटतें. पण दोष कोणाचा ! आमचाच. चार दोन इयत्तांचें शिक्षण झालें की तिची सुशिक्षितांत गणना करितां येणार नाही. फार तर साक्षरतेंत त्यांचा समावेश होईल. स्वत:च्या पायावर उभे रहाण्याला निदान मॅट्रिकपर्यंत तरी शिक्षण होण्यास पाहिजे. वीरशैवेतर हिंदु महिलांकडे हाच दृष्टिकोण झुकविला तर आमच्या मानाने त्यांची ज्ञानार्जनांत बरीच आघाडी आहे. ह्याला कारणीभूत पंडिता रमाबाई, डॉ॰ ॲनी बेझंट, सरोजिनी नायडू प्रभृतींनी गेल्या २५-३० वर्षांत स्त्री-पुरुषांच्या लक्ष्यांत आणले अविश्रांत श्रम खर्ची घालून स्त्रीशिक्षणांत अमूल्य भर घातली त्याचेंच हें द्योतक आहे. प्रो. कर्वे यांनी स्वतंत्र विद्यापीठ उघडून महाराष्ट्रीय स्त्रियांना सदैव ऋणी करून ठेवलें आहे.

शिक्षणाशिवाय स्त्रियांना योग्य स्थान मिळणें दुर्लभ आहे. तरी वीरशैवांतील सुविद्य माताभगिनीवर्गांनी व ह्यांना सहाय्यक पुरुषांनी स्त्रियांच्या समान हक्काकरिता तनमनधनेंकरून झटावें. त्याविना 'सहवासोत्तर प्रौढविवाह' तर दूरच राहोत पण सर्रास 'प्रौढविवाह' सुद्धां अस्तित्वांत येतील किंवा नाही शंकाच आहे.

विवाह झाला कीं तेथे आनंदाच्या दुंदुभी झडावयाच्याच ! पण याला आमचा विरोध आहे. विवाहप्रसंगीं केवळ संपत्तीचा धुव्वा उडविला तर त्यांत आनंद व समाधान प्रतीत होतें, नाही तर होत नाही, हा समजच मुळी बुद्धिभ्रामक आहे. क्षणिक कीर्तीच्या धुताळपणापायीं कित्येक लक्षाधीश मातीमोल झाल्याची उदाहरणें आमच्या वाचकांच्यासुद्धां डोळ्यासमोर असतीलच ! तेव्हा

स्वतःचा बडेजावे दिसावा अथवा लोकांनी आपली वाहवा गावी म्हणून जर अशा तऱ्हेने संपत्तीचा दुरुपयोग अथवा कर्जाचे डोंगर करून स्वतःच्या शिरावर भार करून घेणें कोणताहि शहाणा पुरुष कबूल करणार नाही.

विवाहप्रसंगीं शक्य तेवढा अल्प पण समंजस-पणाने खर्च करण्यांत यावा. लग्नसोहाळे पांच पांच दिवस चालवून खर्च वाढविण्यापेक्षा एका दिवसांत आटोपलेले उत्तम. वधुवराच्या पित्यांना फजीत होण्याचे व याचेच प्रायःश्चित्त म्हणून शेवटी मुलास नरोटी घेण्यास लावण्याचें कांही प्रयोजन नाही.

अहो ! असें कशाला ? तुमचें धाष्ट्र्य जर धजत नसेल तर हल्ली 'लग्नकार्यां' करिता 'लग्नसंस्था' उघडल्या आहेत. फक्त ३५ रु० त संपूर्ण लग्न ! १५ जुलैच्या वी. सं. अंकांत आपण श्रीसिद्धेश्वर संस्था विजापूर यांची जाहिरात वाचली असावीच. तेव्हा आतां गरिबांना तरी लग्न-कार्याच्या अवडंबर खर्चाची भीति बाळगण्यास नको. म्हणून श्रीमंतांनी पैशांची उधळपट्टी करावी असा कोणीं त्या म्हणण्याचा गैरसमज करून घेऊं नये. अस्तु. लिहावें तेवढें कमीच होणार आहे. शेवटी माझ्या वीरशैव –बंधु –भगिनींना इशारा तो काय देऊं ? ...... हा 'वैवाहिक इशारा' म्हणजे केवळ शाब्दिक कीस अथवा 'परोपदेशे पान्डित्यम्' असें कोणीं समजूं नये.

संपूर्ण




(लेखिका:— इन्दु बुधाप्पा कापसे, सिताबर्डी नागपूर.)

स्त्रीशिक्षणासारखे अनेक प्रश्न पुष्कळ वर्षा-पासून आपल्या समाजांत उत्पन्न झाले असून, त्यांच्यावर पुष्कळसे वादविवादहि झालेले आहेत. स्त्रीशिक्षणाचा प्रश्न कांही दिवसापूर्वी स्त्रियांना इतका भेडसावीत होता कीं, स्त्रीशिक्षण देण्यांत हिंदुसंस्कृतीचें सनातनित्व लयास जाते येथपर्यंत लोकांची ओरड होती. परंतु स्त्रियांकडे पाहण्याचा दृष्टिकोन आता अत्यंत व्यापक व समंजस झाल्यामुळे व स्त्री ही मनुष्यमात्रांपैकी एक असून तिला सर्व सामाजिक गोष्टींचा मनुष्याइतकाच फायदा करून घेण्याचा पूर्ण अधिकार आहे ही समजूत पसरल्यामुळे स्त्रियांना शिक्षणाचा लाभ करून देण्यांत आज समाजाला प्रगतिपर व परिणामीं हितकारक धोरणांचा अवलंब करण्यासारखें वाटत आहे. बरें खरेंहि आहे. हिंदुस्थानांतील अनेक समाजांतील स्त्रिया आता अहमहमिकेने शिक्षण घेत आहेत. परंतु खेदाची गोष्ट कीं, आपला समाज अजून फारसा पुढे गेलेला दिसत नाही. आपल्या समाजांत स्त्रीशिक्षणाची आवश्यकता दिसत असूनहि लोकांनी तिकडे डोळेझांक करावी हें नवल नव्हे काय ?

आता शिक्षण कोणत्या प्रकारचें असावें हा वाद हिंदुस्थानांतच नव्हे तर सर्व जगांत लोकांसमोर आहे. पुरुषी शिक्षणच स्त्रियांना द्यावें कीं त्यांच्या-साठीं स्वतंत्र शिक्षणाची रूपरेषा आखावी, हा प्रश्न समाजधुरंधरांसमोर आहे. पुरुषी शिक्षणामुळे स्त्रियांना कांहीच फायदा नसून उलट तोटाच आहे असें ह्मणणारेच लोक अधिक आहेत. पुरुष आणि स्त्री ही शरिरानेच नव्हे तर मनाने आणि स्वभावानेहि भिन्न आहेत. तेव्हा त्यांचे मनोधर्म व गुण यांचा विकास होऊन ते समाजाला उपयोगी पडतील अशा तऱ्हेचें शिक्षण स्त्रियांना मिळाल्यास समाजाची शक्ति दुपटीनें वाढेल यांत संशय नाही.

प्रथमदर्शनीं शारीरिक शिक्षण आपल्या नजरेसमोर येतें. शारीरिक शिक्षण जितकें माणसाना आवश्यक, तितकेंच स्त्रियांनाहि आहे ह्याबद्दल दुमत होणार नाही. सिंहकटित्व सौंदर्याचें लक्षण असेल, पण आतांच्या तरण्या ताठ्या मुली पाहिल्या म्हणजे त्यांची कटीच नव्हे तर सर्व शरीराने इतकी कृशता धारण केलेली असते कीं, त्यांच्या सौंदर्याची व आरोग्याची माती झालेली दिसते. फिकट चेहरा, खोल गेलेले गाल, आणि मांसहीन शरीर असलेल्या तरुण मुलीकडे पाहून व त्याच पुढे माता होणार आहेत असा विचार मनांत आला ह्मणजे फार दुःख वाटतें. स्त्रियांच्या आरोग्यावर त्यांच्या संततीचे व पर्यायाने समाजाचें आरोग्य अवलंबून आहे, हें ध्यानांत घेऊन स्त्रियांना सोसवेल असें शारीरिक शिक्षण दिलें गेलें पाहिजे.

समाजांतील त्यांचें कार्य व सामाजिक हितांचा संबंध लक्षांत घेऊन त्यांच्या शिक्षणाची रूपरेषा ठरविली पाहिजे. मुलांची जोपासना, वैद्यकीय शास्त्राचें जरूरीपुरतें ज्ञान, गृहकृत्यांत अनेक गोष्टींची माहिती उ० शिवणकाम, विणकाम, वगैरे अशा अनेक गोष्टी त्यांच्या शिक्षणांत समाविष्ट केल्या पाहिजेत.

स्त्रिया ह्या कलेच्या प्रतिमा आहेत. स्त्री [illegible] कलापूर्ण समजली जाते. समाजांतील पुरुष [illegible] पारंगत तर स्त्रिया कलावंत असतात हें तत्व [illegible] कालापासून हिंदुस्थानांत प्रचलित आहे [illegible] स्त्रियांना निसर्गतःच कलेची आवड असते [illegible] लक्षांत घेऊन, गायन, वादन, वगैरेहि कलांचा [illegible] दुसऱ्या अनेक कलांचा समावेश होणें अवश्य [illegible]

तसेंच, स्त्रियांना पुरुषाबरोबर घरावाहेर [illegible] शक्य त्या चळवळींत कामें करतां येतील, [illegible] पुरुषांना हातभार लावूं शकतील, राजकारण [illegible] अनेक गोष्टींचें व जगांतील घडामोडींचें [illegible] पुरतें जरी ज्ञान तिला मिळूं शकलें तर समाज [illegible] कार्य दुप्पट जोराने चालेल असें वाटतें. स्त्रि[illegible] अनेक धाडसांचीं, बुद्धीचीं व चातुर्य[illegible] कामें केलीं आहेत हें विसरूं न[illegible]

स्त्रीशिक्षणाचा प्रश्न महत्वाचा आहे. [illegible] दुर्लक्ष करूं नका. जरूरीच्या सुधारणा क[illegible] थोडासा बदल करून स्त्रियांना शिक्षण देण्या[illegible] आपल्या समाजाने लक्ष पुरवावें. शिक्षणा[illegible] अभावीं अनेक स्त्रियांची दुर्दशा होत अस[illegible] पाहून कोणाचें हृदय पिळवटून येणार नाही[illegible] विधवांचा उदरभरणाचा प्रश्न आपोआप सुटे[illegible] विसरूं नका ! शिक्षणाने समाजाची उन्नति [illegible] आहे, व ती करून घेण्यास आपण पु[illegible] तर आपण आपलें कर्तव्य न केल्याबद्दल [illegible] ठरूं.

---

# अमरावती--लासीन-मठसंस्थानचा खरा मालक कोण ?

लेखकः— श्री. बुद्धाप्पा शिवाप्पा कापसे अँड ब्रदर्स, कॉन्ट्रॅक्टर, सितावर्डी नागपूर.

ता. १५ ऑगष्ट व ता. १ सप्टेंबरच्या "वी. संजीवनीं"-त अमरावतीचे लासीनमठ संस्थानासंबंधी तीन नोटीसा प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांपैकीं पहिल्या दोन सध्याचे लासीनमठसंस्थानचे वहिवाटदार श्रीगुरुमूर्ति करबसअय्यास्वामी ह्यांनी वीरशैव व वीरशैवेतरांना मठसंस्थानांत करावयाच्या धार्मिक व इतर कार्यकामासंबंधी त्यांच्या परवानगीच्या आवश्यकतेविषयीं आहेत. दुसरी नोटीस त्या मठांत राहणारे श्री. पंचाक्षरी जंगम ह्यांनी दिली आहे. व त्यांत ते स्वतःला मालक समजवात. तिसरी नोटीस, पंचांनी श्रीगुरु करबसय्यास्वामी ह्यांना नोटीस देण्याचा अधिकार नव्हता, अशा अर्थाची नोटीस पंचांनी दिली आहे. वरील तीनहि नोटीसांवरून लासीन मठ संस्थानसंबंधी कांही तरी भानगड उत्पन्न झाली आहे अशी लोकांची समजूत होऊन निष्कारण गैरसमज होण्याचा संभव आहे. हें मठसंस्थान माझ्या पूर्वजांनी बांधून दिल्यामुळे मला त्याची पूर्ण माहिती आहे लासीनमठसंस्थानसंबंधी सारे कागदपत्र मीं पाहिले आहेत. तरी ह्या संस्थानचा एक अभिमानी व शिष्य ह्मणून मला खुलासा करणें आपलें कर्तव्य वाटतें.

मठसंस्थानचे मालक श्रीगुरु करबसअय्या किंवा पंचाक्षरी हें दोघेहि नाहीत. मालक करबसअय्याचे अज्ञान चिरंजीव षडाक्षरी स्वामी आहेत, व करबसय्या अज्ञान पालन करणार व पंचातर्फे वहिवाटदार आहेत. त्यांना वहिवाटदार ह्या नात्याने जाहीर नोटीस देण्याचा पूर्ण अधिकार आहे. पंचांना कागदपत्रांचें पूर्ण अज्ञान असः त्याचें त्यांच्या सह्यांवरून कळून येतें. श्री. संगाप्पा मुचळंबे आज तीन वर्षे बाहेरगांवीं रहात असल्यामुळे त्यांना स्थानिक परिस्थितिविषयी जाणीव नसणें व कागदपत्राविषयी विसर पडणें साहजिकच आहे. श्री. संगाप्पा ह्यांचें अमरावतीस वास्तव्य असतें तर त्यांनी सही दिली असती किंवा नाही ही शंकाच आहे. परंतु त्यांचा श्री. पंचाक्षरीला पाठिंबा नाही ह्याबद्दल आम्हाला माहिती व खात्री आहे. व ही गोष्ट आह्मी जाहीर करूं इच्छितों. पंचांच्या नोटीशींतहि पंचाक्षरीचे मालकी हक्काचाच नव्हे तर नुसत्या त्याच्या नांवाचाहि उल्लेख नाही. ह्यावरून पंचांना पंचाक्षरीची मालकी मान्य नाही ही गोष्ट सिद्ध होते. पंचांच्या नोटीशीवरून त्यांचें एकच म्हणणें दिसतें कीं, श्रीगुरुमूर्ति करबसअय्यास्वामी ह्यांना वहिवाटदार ह्या नात्याने नोटीसच देण्याचा अधिकार नव्हता. हा प्रश्न कागदपत्र व व्यवस्थापकपत्रांचें बरोबर ज्ञान नसल्यामुळे कांही पंच व श्रीगुरु करबसअय्या ह्यांच्यामधील गैरसमजुतीमुळे उत्पन्न झालेला आहे व तो प्रश्न वाटल्यास खानगी विचारविनिमयाने किंवा कोर्टांतून ते सोडवून घेतीलहि. नोटीशीवर सह्या करणाऱ्या पंचाशिवाय कागदपत्रांची माहिती असल्यामुळे सह्या न देणारे इतरहि कांही पंच आहेत. सह्या करणाऱ्या पंचांना निव्वळ सह्या करण्यापलीकडे मठसंस्थानविषयीं काळजी दिसत नाही. कारण मठसंस्थानचे मालक श्री. षडाक्षरी स्वामी हे

५-६ महिने अंथरुणावर आजाराने खिळले असतांनादेखील सह्या करणाऱ्यापैकी एकाहि पंचाने वास्त-पुस्त कांहीं केली नाही किंवा मठसंस्थानचे रिपेरीबद्दलहि कधी चौकशी केली नाही. हें मठसंस्थान आमच्या पूर्वजांनी व वडिलांनी बांधून दिल्यामुळे साहाजिकच श्री. पंचाक्षरी जंगम करबसअय्यास्वामी विरुद्ध नोटीसीवर सही मागावयास आला होता. परंतु पंचाक्षरीचा मठाचा मालक किंवा वहिवाटदार ह्या नात्याचा कांहीच संबंध नसल्यामुळे मीं त्याला सही दिली नाही व कधींहि 'गुरुदक्षिणा' दिली नाही व देत नाही व ज्यांना लासिनमठसंस्थानच्या परिस्थितीची माहिती आहे ते कुणींहि त्यांना गुरु समजून दक्षिणा देत नाहीत. पंचाक्षरीचा मठावर कोणत्याच तऱ्हेचा अधिकार नाही. तो रेवणसिद्ध अय्यांचा शिष्य होता. परंतु त्यांनी दोन वेळा लग्न करून दोन्ही बायकांना फारकती दिल्या व लग्न केल्यामुळे त्याचे शिष्यत्व नाहीसें झालें व त्याच वेळीं त्याचा मठाशीं संबंध सुटला. १९२४ सालीं सर्व वीरशैव माहेश्वर मंडळींच्या संमतीने सध्याचे वहिवाटदार श्री. करबसय्यास्वामीं ह्यांचे चिरंजीव श्री. षडाक्षरीस्वामी ह्यांना गादीवर घेतले व तेव्हापासून तेच लासीनकर संस्थानचे पदाधिकारी ह्मणून गादीवर आहेत व ते अज्ञान असल्यामुळे त्यांचेतर्फे त्यांचे वडील श्रीगुरु करबसय्यास्वामी हे १९२६ च्या "व्यवस्थापत्रका" नुरूप कारभार पहातात व ह्या गोष्टी कोर्टदरबारांतून आज कैक वर्षांपूर्वी सिद्ध झाल्यां आहेत. श्री. पंचाक्षरी जंगम ह्यांचा मठांचा कांहीच संबंध नाही. श्रीगुरु करबसय्या वसमतकर स्वामींची केवळ मेहेरबानी. ह्मणून ते तेथें राहूं शकतात. पंचांनीहि नोटीस देण्यापूर्वी निदान कागदपत्र पहण्याची तसदी घेतली असती तर श्रीगुरु करबसय्या स्वामींला नोटीस देण्याच्या भानगडींत ते पडले नसते. ह्या मठसंस्थानसंबंधी किंवा मालकीसंबंधीहि कांही ढवळा-ढवळ करण्याचा अधिकार श्रीगुरु करबसय्या गुरु ईश्वर अय्यास्वामी मुक्काम लासीन व वसमतनगर ह्यांचा आहे. ह्यांनीच १९२६ सालीं येथे येऊन मठसंस्थानसंबंधी जे व्यवस्थापत्रक केलें त्याप्रमाणे कारभार सुरूं आहे. तेव्हा श्री. पंचाक्षरी किंवा पंचांनी ही खऱ्या वस्तुस्थितीच्या ज्ञानाच्या अभावीं निष्कारण "नोटीसा" देण्याच्या पंचायतींत पडून लोकांचा गैरसमज करूं नये. त्यांचा आपल्याच ह्मणण्याच्या खरेपणाबद्दल हट्ट असेल तर त्यांनी कोर्टांतून ह्याचा निकाल लावून घ्यावा.

---

## यवतमाळ जिल्हा-
## वीरशैव परिषद्

मुक्काम तळेगांव येथे लौकरच भरणार. परिषदेचे अध्यक्ष- श्री गुरुमुर्ति सिद्धाराम स्वामी माजलगांवकर. परिषदेचें उद्घाटन दे. भ. नानासाहेब बामणगांवकर. स्वागताध्यक्षः- श्रीमंत भिवाप्पा वीराप्पा गाढवे, लोही. स्वागतमंडळाचे सभासद नोंदण्याचें कार्य जोरांत सुरुं झालें आहे.

# आडवं गेलेल्या मांजराचा प्रताप

लेखकः— श्री. सिद्रामआप्पा एस्. कुन्हे, अमरावती.

—:०:—

मॅट्रिकची परीक्षा आटोपल्यानंतर मला लाहोरला रहावयास कांहीच तसं कारण नव्हतं. माझी प्रकृति किंचित् नादुरूस्त झाल्यामुळे व विशेषतः मी ज्या महाराष्ट्र-कुटुंबांत उतरलों होतो त्यांच्या अत्याग्रहामुळे,--घरून वरचेवर तांतडीचीं पत्रें आलीं असतांहि--मी थांबलों होतो. त्यांतून माझ्याबरोबरच परीक्षेस बसलेली प्रभाकर व मधुमालती ह्या बहिणभावांच्या जोडीच्या आग्रहापुढे माझ्या भीडस्त स्वभावानें हारच खाल्ली होती.

मधुमालती ही एक हुशार गोड स्वभावाची पोर होती. मोकळेपणाने ती एखाद्या विषयाची चर्चा करावयास लागली म्हणजे आम्हाला तिघांनाहि वेळेचं भान रहात नसे, व त्यांतून तर आता आमच्या परीक्षा संपलेल्या. मग सिनेमा-शो, कॅरम, पत्ते, वगैरेचे कार्यक्रमांचा सारखा धूमधडाका सुरू होता.

एडवर्ड-रोडवरील सिनेमागृहांतून दुसरा शो पाहून रात्रौ १२ च्या पुढे परत आल्यावर आपआपल्या खोलींत झोपावयास जाण्यापूर्वी आम्ही दोघेहि माझ्या आवडीची गोविंदराव जोश्यांची 'ऐकिव तव मधु बोल ! कोकिळे" ही प्लेट लावावयाचा मधुमालतीला नेहमीच आग्रह करीत असूं. रात्रीच्या प्रशांत वातावरणांत गोड आवाजाच्या नादमाधुरीचा व काव्यांतील भावनांचा संगम आमचे मनश्चक्षुपुढे नितांत रमणीय वातावरण नेहमीच निर्माण करीत असे. श्री. गोविंदराव जोशांची 'ऐकिव तव मधु बोल कोकिळे !' ही आमची तिघांचीहि अतिशय आवडती प्लेट होती. व आम्ही तिघेहि तें गाणें नेहमी गुणगुणत असूं ! मधुमालतीचा आवाज अतिशय मधुर होता. ती एकटी दिवाणखान्यांत असली म्हणजे प्रभाकर आंत पाऊल टाकतांना 'ऐकिव तव मधु बोल ! कोकिळे, ऐकिव तव मधु बोल ! नको॑त मजला मैना राघु, साळुंकी चंडोल - !' असे तिला उद्देशून म्हणत प्रवेश करीत असे. त्याचें हें म्हणणें संपतें न संपतें तोंच मी मागून येत - येत म्हणत असे— 'वसंत नाही अजून संपला ! कां झालीस अबोल ?? ' असं म्हणून, किंबहुना ह्या गोड चिडवणुकीने आम्ही मधुमालतीकडून प्लेटबरहुकूम कितीतरीवेळा हें पद म्हणवून घेत असूं.

मधुमालती एवढी शिकलेली पण तीहि शकुन-अपशकुनांवर व शुभाशुभ वेळावर भरंवसा ठेवणारी फारच हलक्या मनाचीं मुलगी होती.

परीक्षा आटोपलेली, परीक्षकांचे पुढे 'पेपर्स'-चे गठ्ठे पडलेले, अर्थातच आता त्या एकवेळ उत्तरें लिहिल्या गेलेल्या 'पेपर्स' मध्ये तिच्या सुरू असलेल्या देवळांतील प्रदक्षिणा, तिचे नेमधर्म, व ती करीत असलेल्या नवसांमुळे, कांही फरक का पडणार होता ?

परवां ती प्रभाकरला म्हणाली कीं, ती खात्रीने नापास होणार ! कारण काय ? तर सकाळी ती देवदर्शनाला गेली असतांना तिचा धक्का लागून देवळांतील पणती उपडी झाली व विझली. तिच्या खोलींत तिच्या मोत्या कुत्र्याने कावळ्यानी वरून टाकलेलें हाडूक आणून टाकलें. भिंतीवर पाल चुकचुकली. आम्हाला तिच्या ह्या शंकेखोर स्वभावाचें नेहमीच हसूं येई.

परवांच्या प्रकरणांमुळे तर तिच्या स्वभावाची कमालच वाटली. झालं काय कीं, मी परत गांवीं

येणार म्हणून वनभोजनाचा विचार ठरला होता. वनभोजनाचा विचार हा कांही नव्याने ठरला नव्हता. प्रत्येक वेळीं बेत ठरे व कांही ना काही कारणामुळे फिसकटून जाई, व ह्याचा कार्यकारण-भाव मधुमालती एकाद्या अपशकुनाशीं जोडी. परंतु कांहीहि झालं तरी ह्या वेळी 'वनभोजना'-ला शालिमार बगिच्यांत जावयाचेंच असें तिने मनाशीं ठरविलें होतें. कारण मी दुसरे दिवशी लगेच परत स्वगृहीं यावयास निघणार होतो.

आदल्या रात्रीपासूनच दुसऱ्या दिवसाच्या 'वनभोजना'-ची कोणपण मधुमालतीने तयारी चालविली. तिने आपल्या सगळ्या मैत्रिणींना तसेंच प्रभाकरच्या मित्रांनाहि बोलाविलें होतें. पण तिच्या ह्या साऱ्या उत्साहांत वरचेवर होणाऱ्या अपशकुनांनी विरजणच पडत असे.

ती उजाडलंहि नव्हतं तेव्हाच उठली तों तिला घुबडाचा आवाजच ऐकूं आला. घाईघाईने कुंकू लावावयास गेली तों करंडाच उपडा झाला. टेबलाला हाताचा धक्का लागल्यामुळे तिच्या एका हातांतील बांगड्याच वाढवल्या, स्वयंपाकघरांतून माजघरांत जातांना तिच्या उजव्या दंडावर पाल पडली. ह्या वरचेवर होणाऱ्या अपशकुनांमुळे तिची मनःस्थिति गोंधळून गेली व "वनभोजन" धडपणें पार पडत नाही असं तिचं मन तिला सांगूं लागलं

सकाळी ८॥-९ चा सुमार असेल. मी गांवी परत जाणार म्हणून माझ्याकडे माझा एक नवीन स्नेही भेटावयाला आला. मी, प्रभाकर, व तो स्नेही, गप्पा मारीत बसलों होतो. मधुमालती अजून बाहेर आली नव्हती. प्रभाकरने आंत जाऊन तिला चहा आणावयास फर्माविलें.

चहा घेऊन ती दिवाणखान्यांत आली, तिचे आमच्या स्नेह्यांकडे लक्ष गेलें मात्र तों तिच्या हातून 'ट्रेच' गळून पडला व साऱ्या कपबश्या फुटल्या. ह्याचें कारण माझा स्नेही गेल्यावर मला कळलें तें ऐकून तर मला आश्चर्याने वेडच लागण्याची पाळी आली. कारण माझा मित्र हा जातीनें "तेली" होता व सकाळीच तेल्याचें तोंड पहाणें हें 'अशुभांतलें अशुभ' ह्या सार्वत्रिक समजुतीचा मधुमालतीचे मनावर झालेला परिणाम व 'तेल्याचें तोंड दिसल्यामुळे वनभोजन यशस्वी होणे शक्य नाही ही तिची खात्री! आतां ह्या समजुतीला काय करावें !!

दुपारी निमंत्रित मंडळींना बोलावण्यासाठीं मधुमालती मोटारींत बसली मात्र! तोंच "मांजर आडवं गेलं." झालं, ह्यापुढे तिच्या-च्यानेहि धीर धरवला नाही. "शालिमार गार्डन"-मधील वनभोजन घरीच उरकण्यांत आलं. अशा तऱ्हेनं आडवं गेलेल्या मांजरानं आमच्या वनभोजनांत विष कालवून पुरता सूड उगवला. मी त्याच दिवशीं रात्रीच्या गाडीने घरीं परत यावयास लाहोर सोडलें.

---

# वीरशैवांतील चळवळी

## मध्यप्रांत वीरशैव युवक परिषद भरविण्याची खटपट.

### प्रमुख कार्यकर्त्यांचे पत्रव्यवहार.

वीरशैव तरुण संघ, नागपूर, हेड ऑफीस-इतवारी, मस्कासाथ.नागपूर तारीख ६-९-१९३६. रा. रा. श्रीयुत तुकाराम नारायण काटकर यांसः—सा. न. वि. वि. पत्र पाठविण्यास कारण कीं, नागपूर येथील वीरशैव-तरुणसंघाने मे महिन्यांत मध्यप्रांतीय वीरशैव-युवक-परिषद् भरविण्याचें ठरविलें आहे. ह्या महत्वाच्या कार्याकरिता आपल्यासारख्या उत्साही व समाजसुधारक तरुणांच्या मदतीची अत्यंत आवश्यकता आहे. आजपर्यंत मध्यप्रांतांत अशी कोणतीहि परिषद् भरली नाही व तीमुळे समाज सुधारण्याचें कार्य अल्प प्रमाणांत होऊं शकलें नाही. आजपर्यंत पुष्कळ ठिकाणीं परिषदा व महासभा भरून त्यांत समाजाचे एकीकरणाचे व समाज-सुधारणेचे ठराव पास करण्यांत आले. परंतु ठराव पास करण्यापलीकडे कांहीहि निष्पन्न झालें नाही. मध्यप्रांतांतील नागपूर येथे भरणारी वीरशैव युवक परिषद् ठराव पास करण्याकरिताच भरणार नसून, ठरावाची अंमलबजावणी प्रत्यक्ष कृतिरूपाने वीरशैव जनतेसमोर करण्याकरिता भरणार आहे ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. मी आपले नवमतवादी लेख ' वीरशैव संजीवनी "-मधून वाचले आहेत, व म्हणून मला पक्की खात्री आहे कीं, आपण आमच्या परिषदेसंबंधीं विचारांशीं सहमत व्हाल. आपण आमच्या प्रांतांतील उत्साही समाजसुधारक तरुण व नवमतवादी लेखक आहांत म्हणून मी आपणास आपलें मत अजमाविण्याकरिता हें पत्र पाठविलें आहे. नागपूर-वीरशैवतरुणसंघाने आपल्यासारख्या समाजप्रेमी तरुणांच्या भरवशावरच ही परिषद् यशस्वी करून दाखविण्याचें निश्चित केलें आहे. तेव्हा आह्मी आपणास ह्या परिषदेच्या कार्यास मदत करण्याची नम्र प्रार्थना करतों, व आपण परिषदेसंबंधी आपले विचार आह्मांस पत्रद्वारे शक्य तितक्या लवकर देण्याची विनंती करितों. पत्राची वाट पहात आहे.

आपला नम्र सेवक—विश्वेश्वर गजानन डोंगरे, सेक्रेटरी, वीरशैव तरुणसंघ, इतवारी, किराणा ओळ, नागपूर सिटी.

---

तुळशीराम नागय्यास्वामी काटकर, मु. पो. चिमूर, जि. चांदा C. P. श्री. वि. ग. डोंगरे, सेक्रेटरी, वी. त. संघ नागपूर यांसः- सा. न वि. वि. आपलें ता. ६-९-३६ चें उद्देशपत्र ' तुकाराम नारायण काटकर, चिमूर ' ह्या पत्त्यावर ता. १०-९-३६ ला मला पोहचलें. माझ्या लेखावरील संक्षिप्त नांवामुळे असा भ्रम होणें संभवनीय आहे. असो !

आपण घोषणा केलेल्या स्तुत्य उपक्रमाबद्दल आपण - निदान आह्मा नवमतवाद्यांचेतर्फे तरी अभिनंदनास पात्र आहांत यांत तिळप्रायहि शंकेला स्थान नाही. आपली इच्छाच आहे तर मी माझेकडून होईल तेवढें सहाय्य तनमनाने करूं शकेन पण आपले पत्रांतील " आपण आमच्या

प्रांतांतील उत्साही समाजसुधारक तरुण व नवमतवादी लेखक आहांत ह्मणून मी आपणास आपलें मत अजमावण्याकरिता हें पत्र पाठविलें आहे. नागपूर - वीरशैव - तरुण - संघानें आपल्यासारख्या समाजप्रेमी तरुणांच्या भरवंशावर ही परिषद् यशस्वी करून दाखविण्याचें निश्चित केलें आहे" ह्या विधानांतील अधोरेखांकित विचार मात्र मला खरोखरच हास्यास्पद वाटतात. वैयक्तिक सामर्थ्यानें जर अशीं वादग्रस्त कार्यें यशस्वी होऊं शकलीं असतीं तर आपणास मला विचारणा करण्याचें कांहीच प्रयोजन उरलें नव्हतें.जसे आपण तसाच मी एक नवसुधारणामतप्रेमी आहे.

आजपर्यंत बऱ्याच नवविचारपुरस्कर्त्यांचें विचार 'वी. संजीवनी'.तून प्रसृत झाले आहेत. त्या अर्थी त्या सर्वांचा अशा महत्वाच्या प्रसंगी आपण सल्ला घ्यावयास पाहिजे अशी माझी आपणास हार्दिक सूचना आहे. कोणतींहि दुर्लभ वा कठिण कार्में संघटणेनेच सिद्ध होतात. वैयक्तिक मतें कितीहि सत्य असलीं, तरी त्यांस समाजाच्या सक्रिय सहानुभूतिशिवाय समाजांत अस्तित्व नाही. "सत्य हें वस्तुत: लंगडें आहे. त्याच्या संरक्षणाकरिता त्यास सामाजिक शक्तीची जोड द्यावी लागते." हें शॉपेन हॅवर ह्या थोर तत्ववेत्त्याच्या तत्वाचा जर आपण सद्सद्विवेकपूर्वक विचार केला असता तर उपर्युल्लिखित अधोरेखांकित विधानानें वैयक्तिक भार घालून मला आपण मदत न मागतां, मी एक नवमतवादी या नात्याने ह्मणूनच माझ्याशीं विचारविनिमय केला असता. अशी माझी खात्री आहे. तरी आपण विचारणा केली आहे त्या अर्थी आपल्या उद्दिष्ट कार्यांत आपला प्रांतीय ह्मणून सहभागी होणें माझें आद्य कर्तव्य आहे.

आपला समाज पृथक् पृथक् प्रमाणांतच कां होईना पण सर्वच महाराष्ट्रांत नि बाहेरसुद्धां पसरला आहे. त्या अर्थी आपल्या प्रांतापुरतेंच कूपमंडूक ध्येय सामाजिक क्रांतीच्या प्रश्नांत योग्य ठरत नाही. याकरिता सर्वसम्मत अशी व्यापकच घटना हवी आहे. ह्मणून सर्व भागांतील प्रमुख नवमतवाद्यांचें या कामीं सहाय्य घेणें आपणास अत्यंत आवश्यक आहे, व त्याकरिता अमरावती ( वऱ्हाड ) येथील वीरशैवांतील 'नवमतवादा'.चे तरुण व विद्वान् आद्यप्रवर्तक श्री. वि. तु. ऊर्फ बाबुराव चौधरी, बी. ए, यांचा प्रथम सल्ला घ्यावा. आणि याच मताचे पुरस्कर्ते पुसदचे श्री. एकलारे वकील, चांदूर-बाजारचे डॉ॰ आप्पाराव संगेकर, श्री. सिद्रामआप्पा एस. कुऱ्हे अमरावती, दारव्ह्याचे श्री. आर. शंभूनाथ स्वामी, साताऱ्याचे श्री. नारायण स्वामी मडवली; नागपूरचे श्री. नथ्थुआप्पा आदेत्रार, सोलापूरचे झुंझे व धुम्मा प्रीडर्स प्रभृति महाशयांचे तसेंच समाजाचें दुसरें प्रमुख अंग स्त्रिया यांच्यांतूनहि मतें व सहाय्य मिळविणें अगत्याचें आहे. म्हणून अमरावती येथील सौ. शांताबाई सातेकर व कु॰ रत्नावंती कुऱ्हे सोलापूरच्या सौ. सरदार व कटप; अक्कलकोटच्या सौ. पटणे आणि मोमिनाबादच्या श्रीमती महादेवीबाई वाघमारे प्रभृति नवविचारसरणीच्या भगिनीवर्गांचेंहि सहाय्य, मत व वर्चस्व प्रस्तुत कार्यांत गोवण्यांत यावें. संघटणेचें चतुर्विध बळ जितकें अधिक तितकी कार्यांत-कृतींत-यशस्विता अधिक. नुसते आम्ही नि तुम्ही ह्मणून कसें चालणार। 'सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील त्याचें।' ह्या समर्थांच्या सामर्थ्यवान् वचनांतच सारें सार गोविलें आहे. तेव्हा आतां विशेष पाल्हाळ तो काय लिहावें ? क. कृ. लो. असावा.

चिमूर
ता. ११-९-३६

आपला विनीत
तु. ना. काटकर

## लिंगायतांचें नवें उपहारगृह

### अमरावतींत गणेशभुवनः-

येथील रूढिप्रिय पुराणमताभिमानी श्री. शंकरआप्पा गाढवे ह्यांचे ज्येष्ठ चिरंजीव व श्री. महादाप्पा एकलारे, कपाशीचे दलाल, ह्यांचे जामात श्री. बाबा गाढवे, व कै. श्रीमंत विश्वनाथ आप्पा बिडवई, ह्यांचे चिरंजीव श्री. लक्ष्मणआप्पा

ह्या उभयतांनी ता. १९-९-३६ शनिवार रोजी गणेशचतुर्थीचे मुहूर्तावर एक गणेशथिएटर-जवळील इमारतीवर 'उपहारगृह' उघडण्याचा समारंभ केला. त्याप्रीत्यर्थ सायंकाळी पानसुपारीस सर्वच प्रतिष्ठित मंडळीस निमंत्रणें होतीं. दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, अण्णासाहेब हुंडेकर, चौधरी, वगैरे वीरशैव ; व वीर वामनराव, डॉ. बापट, वगैरे वीरशैवेतर प्रतिष्ठित मंडळी उद्घाटन व पानसुपारीसमारंभास उपस्थित होती. गाढवे-विडवईच्या ह्या नव्या उद्योगांत आम्ही यश चिंतितों.

**'किर्लोस्कर-' मासिकाचा खास २०० वा अंक**(.—संपादक श्री. शं. वा किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी, जि. सातारा ).—नवमतवादाला उचलून धरणाऱ्या या मासिकाचा सप्टेंबर महिन्याचा अंक खास २०० वा अंक म्हणून प्रसिद्ध झाला आहे. आमच्या समाजांतील स्त्री-पुरुषांनीहि 'किर्लोस्कर'-चें वाचन केल्यास नवमतवादासंबंधी त्यांच्या मनांतील गैरसमज बऱ्याच अंशीं दूर झाल्याशिवाय राहणार नाहीत. 'किर्लोस्कर'-ला आम्ही उत्कर्ष इच्छितों.

**अमरावती - वीरशैवसमाज - गणेशोत्सव**

सालाबादप्रमाणे यंदाहि वीरशैवसमाजाचा गणेशोत्सव श्री. गंगारामआप्पा चाकोते ह्यांच्या वाड्यांत उत्तम तऱ्हेने पार पडला. यंदाचे गणेशोत्सवाचें वैशिष्ट्य म्हणजे येथील तरुण कार्यकर्ते श्री. सदाशिव आप्पा चाकोते ह्यांची समाजाचे अध्यक्षस्थानीं व श्री. महादेव चनबसआप्पा एलगुंदे व श्री. मनोहर रुद्राप्पा मिटकरी ह्यांची सेक्रेटरीज म्हणून झालेली योजना होय. त्यामुळे गणेशोत्सवांत काव्यगायन, कविताच्या मेळ्या, श्री. फकिराप्पा हेगु व दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचीं व्याख्यानें झालीं. विशेषतः दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचें "खऱ्या वीरशैवाचीं लक्षणें" ह्या विषयावर उद्बोधक व नवविचारपरिप्लुत भाषण झालें.

उत्सवांत स्त्रियांच्या हळदीकुंकवाचाहि एक कार्यक्रम झाला. हळदी-कुंकवाला वीरशैवसमाजांतील सर्वच प्रमुख स्त्रिया हजर होत्या. हळदीकुंकवाचे प्रसंगीं सौ. लक्ष्मीबाई मिटकरी ह्या सुशिक्षित भगिनीने येथील प्रसिद्ध कॉंग्रेसकार्यकर्त्या सौ० पार्वतीबाई पटवर्धन ह्यांना जमलेल्या वीरशैव महिलासमाजासमोर "उपदेशपर दोन शब्द" सांगण्याकरिता योग्य शब्दांत विनंती केली. सौ. पार्वतीबाईनी 'महिलांचे कर्तव्या' विषयीं सुंदर भाषण केलें. शेवटी सौ. वत्सलाबाई चाकोते ह्यांनी सौ. पार्वतीबाईंचे व प्रसंगाला आलेल्या भगिनींचे समर्पक शब्दांत उत्कृष्ट आभार मानल्यावर "हळदीकुंकू" व पानसुपारी देण्यांत आली. अशा तऱ्हेने ह्या तरुण कार्यकर्त्यांच्या खटपटीने यंदाचा उत्सव मोठ्या उत्साहाने पार पडला.

**सेंदुरपुर मोझरी.**— येथील प्रख्यात दानशूर वीरशैव कै. श्रीमंत भद्राप्पा मालगुजार यांच्या पत्नी, श्री. आनंदराव सेवाळकर यांच्या मातोश्री, व आप्पाजी कोरे यांच्या भगिनी गं. भा. काशीबाई सेवाळकर ह्या ता. १-९-३६ रोजी लिंगैक्य झाल्या हें कळविण्यास अत्यंत खेद होत आहे. त्या सुशील, धर्मनिष्ठ, निगर्वी, धर्मभोळ्या, कट्टया सनातनीय उदार, धार्मिक व समाजकार्यास मदत करण्यांत तत्पर असून गोरगरीबांच्या पालनकर्त्या होत्या. वृद्धावस्था असूनहि अतिथी - अभ्यागतांचे आदरसत्कार करण्यांत सदा तत्पर असत. मरणसमयीं त्यांचें वय साठ वर्षांचें होतें. त्यांचे मृत्युमुळे कुटुंबांतील मुख्य आधारस्तंभ गेला आहे. असो. परमेश्वर त्यांचे आत्म्यास सद्गति देवो. ॐ शांति.

**मुंबई:— रा. कल्याणशेट्टीचा सन्मान**

वीरशैव- स्नेहवर्धक मन्डळ मुंबई, या संस्थेच्या विद्यमानें मंगळवार ता. १५-९-३६ रोजीं ८॥ वाजतां मंडळाच्या ऑफिसांत 'सुदर्शन'-चे संपादक श्री. कल्याणशेट्टी यांचा सन्मान करण्यांत आला व त्याच प्रसंगीं त्यांचेबरोबर

असलेले कर्नाटक-लिंगायत मर्चंट्स असोसिएशनचे अध्यक्ष शेट मल्लिकार्जुनप्पा इंदिगुंद व कालिगी अयप्पा शास्त्री यांचाहि सन्मान करण्यांत आला.

## नासिक जिल्हा वीरशैव मेदार परिषद्

मनमाड:-येथे गेल्या १९, २०, २१ तारखांस सदर परिषदेचें पहिलें अधिवेशन श्री विश्वेश्वरस्वामी वडांगळीकर यांचे अध्यक्षतेखालीं मोठ्या यशस्वितेनें पार पडलें. सभेस हुबळी, मुंबई, पुणे, नगर, धुळे, वगैरे ठिकाणचे मिळून २०० चे वर मंडळी हजर होती. सभेंत खालील ठराव पास झाले. :- बादशहा पंचम जॉर्ज; उज्जनी सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामी, दे. भ. बामणगांवकर, व हिरेमठ वकील, यांच्या पत्न्या वगैरेंच्या निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव. समाजांतील व्यक्तींनी आपल्या नांवामागे धंदावाचक 'बुरुड' किंवा 'मेदार' हे शब्द न लावतां 'लिंगायत' असें म्हणावें. लग्नादि समारंभाचा खर्च कमी करून सार्वजनिक संस्थांना देणग्या देण्यास प्रोत्साहन देणारा ठराव. स्त्री-पुरुष शिक्षणप्रसार. औद्योगिक उन्नति. शुद्ध धर्माचरणाचा पुरस्कार. विरक्त-पंचाचार्यवाद मिटविण्याबद्दल विनंती. वगैरे ठराव पास झाले, असें गंगाधर लक्ष्मण सोनवणें, सेक्रेटरी, ना. जि. मेदार मंडळ, हे कळवितात.

## नाशिक जिल्हा वीरशैव परिषद्

नासिक:-- आगाऊ जाहीर केल्याप्रमाणे नाशिक-जिल्हा-वीरशैव-परिषदेचें अधिवेशन गेल्या महिन्यांत ता. १२ व १३ रोजी मोठ्या उत्साहाने पनवेलचे श्रीमंत आत्माराम महादेव अटवणे ह्यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें. अधिवेशनास 'वंदे मातरम्' ह्या राष्ट्रगीताने सुरुवात झाली. परिषदेला खोलापूरहून श्री. कल्याणशेट्टी वकील, संपादक 'सुदर्शन', बार्शीचे श्री. रामलिंगस्वामी परांडकर, संपादक 'वीरशैव गर्जना', धुळ्याचे श्री. शंकरराव कानडे, बी. ए., मुंबईचे डॉ. वडगांवकर, वगैरे मण्डळी हजर होती. परिषदेंत खालील महत्वाचे ठराव पास झाले.

## सिद्धाराम स्वामींचें आगमन व सन्मान.

श्रीहनुमान व्यायाम प्रसारकमंडळातर्फे बर्लिन (जर्मनी) येथील ऑलिंपिक सामन्यांत भाग घेण्याकरिता गेलेले श्रीसिद्धरामस्वामी माजलगांवकर हे इतर खेळाडूंबरोबर रविवार ता. १७ सप्टेंबर रोजी दुपारी एक्स्प्रेसने उमरावतीला परत आले. खेळाडूंच्या जाहीर सन्मानार्थ उमरावती-नागरिकांची जाहीर सभा त्याच दिवशी सायंकाळी गणेश-नाटकगृहांत ना. दादासाहेब खापर्डे ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. तींत वीरशैवांच्या तर्फे महाराष्ट्रहितसंवर्धक मंडळाचे 'स्वागत' मंडळावरील प्रतिनिधी श्री. अण्णासाहेब हुंडेकर, म्यु. कौन्सिलर, ह्यांनी हार घातला. तसेच माहेश्वरवर्गातर्फे श्रीगुरुमूर्ति करवसय्या स्वामी लासीनकर, लासिनमठसंस्थान, ह्यांनी हार घालून स्वामींचें स्वागत केलें. त्याच सन्माससमारंभाचे वेळी वीरशैव-शिक्षणप्रसारक मंडळातर्फे श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे व वीरशैव प्रेमसंवर्धक मंडळातर्फे श्री. हेगु वकील ह्यांनी हार घातले. विशेष हकीकत पुढील अंकीं.

## दुसरे दिवसाची बैठक

परिषदेच्या दुसरे दिवसाचे बैठकीस ता. १३ रविवारी सकाळीं १० वाजतां सुरुवात झाली. या बैठकींत एकंदर आठ ठराव पास झाले.

१. उज्जनी मठाचे जगद्गुरु महास्वामी यांच्या अकालीं लिंगैक्याबद्दल दुःखप्रदर्शन.

२. नाशिक जिल्ह्यांतील वीरशैवसमाजाच्या आर्थिक उन्नतीसाठीं एक निधि जमवावा.

३. वीरशैव विद्यार्थ्यांसाठीं नाशिक येथे एक वसतिगृह स्थापन करणें.

४. ठरावांची अम्मलबजावणी करण्यासाठीं एक कार्यकारी कमेटी स्थापन करण्यांत यावी.

५. मुंबई येथील महाराष्ट्र- वीरशैव असोसिएशनला सम्मति.

६. श्रीत्र्यंबकेश्वर ज्योतिर्लिंगास पाणी घालण्याचे वेळीं कित्येक प्रसंगीं वीरशैवसमाजांतील मंडळीस जे अडथळे केले जातात ते होऊं नयेत. अडथळे झाल्यास त्याबद्दल योग्य ते इलाज करण्यांत यावेत.

७. लग्न वगैरे कार्यप्रसंगीं जास्त खर्च करूं नये.

८. हिंदी राष्ट्रीय सभेबद्दल आदर व येत्या कायदेमंडळाच्या निवडणुकीचे वेळीं राष्ट्रीयसभेच्या उमेदवारासच प्रत्येक वीरशैव समाजियन मतदारांनीं मतें द्यावीं.

ठरावावर श्री. भागाप्पा गुळवे, दगूआप्पा जालनेकर, कल्याणशेट्टी वकील, परांडेकर स्वामी, वगैरेंचीं भाषणें होऊन ठराव सर्वानुमतें सम्मत होऊन बैठकीचें काम दुपारीं १२ वाजतां संपलें. ता. १३ रविवारीं दुपारी २ ते सायंकाळीं ७ वाजेपर्यंत विषयनियामक कमिटीची बैठक चालू होती. नंतर परिषदेच्या कामास ७ वाजल्यानंतर सुरवात झाली व पुढील तीन ठराव पास झाले.

९. शेतकी - खात्याची मदत घेऊन नासिक जिल्ह्यांतील वीरशैवसमाजांतील शेतीचा धंदा करणारांनी आपल्या शेतीची सुधारणा करावी.

१०. नाशिक येथील प्रसिद्ध कॉंग्रेसभक्त व वीरशैव पुढारी दे. भागाप्पा विठोबाप्पा गुळवे, यांस पार्लमेंटरी बोर्डानें मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या येत्या निवडणुकीचें तिकीट द्यावें अशी या परिषदेची पार्लमेंटरी - बोर्डास अत्याग्रहाची विनन्ती आहे. तिकिट मिळाल्यास दे.भ.गुळवे यांस निवडून आणण्याचा नासिक जिल्ह्यांतील वीरशैवसमाज पराकाष्ठेचा प्रयत्न करील.

११. गवळी व डोंबे या दोघांस या जिल्ह्यांत ३-४ पिढ्यांपासून निराळें मानलें जात आहे. यापुढे या जातीचें एकीकरण करण्यांत यावें व त्यांचेबरोबर रोटीव्यवहार करण्यांत यावा. या ठरावावर अनुकूल बाजूने ५-६ व प्रतिकूल बाजूने ५-६ वक्त्यांचीं भाषणें झालीं. परांडेकर स्वामी ( सम्पादक 'वीरशैवगर्जना' ) हे प्रतिकूल बाजूने बोलले. ठरावावर कडाक्याचा वादविवाद झाला. बहुतेक वृद्ध व जुन्या मताचे लोक या ठरावास प्रतिकूल होते. तरी ठराव बहुमताने पास झाला. बाकीचे दहाहि ठराव सर्वानुमतें पास झाले. आभारप्रदर्शन होऊन परिषदेचें काम रात्री दहा वाजता संपलें परिषदेस यशचिंतनपर अनेक पुढाऱ्यांचे संदेश आले होते.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती

' वीरशैव संजीवनी ' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा, कारण हें पत्र पाक्षिक आहे; व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग वामणगांवकर ह्यांनीं ' अरुण ' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील ' वीरशैव संजीवनी ' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १५ ऑक्टोबर १९३६ ( अंक २० वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥


# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें


ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)


नवें वर्ष १ लें ) मिति आश्विन कृ० ३० शके १८५८ ( अंक २० वा.


# कै० लक्ष्मीबाईंच्या जीवनांतील बोधप्रद गोष्टी

## भाग दुसरा

[ संग्राहकः—श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., सहसंपादक, 'वीरशैव संजीवनी' ].

पहिल्या भागांत एका प्रसिद्ध साधूच्या कृपेने अर्थात दैवयोगाने कल्पना नसतांहि नानासाहेबांचे व लक्ष्मीबाईंचें लग्न कसें जुळलें याची माहिती दिली. लग्नानंतर सरासरी वर्षपर्यंत तरी आपल्या आयुष्याला सार्वजनिक सेवेचें वळण लागेल ही नानासाहेबांना कल्पना होती किंवा नाही याची शंकाच आहे. आणि सार्वजनिक आयुष्यांतील पतिबरोबर आपत्तींशीं आपल्यालाहि तोंड द्यावें लागेल ही लक्ष्मीबाई-नाहि कित्येक वर्षेपर्यंत कल्पना नसेल. कुठे तरी पगारी लिखापढी करावी व पोट भरावें हीच कल्पना लग्नाच्या वेळी नानासाहेबांना असेल, आणि अशा पतीला नीट - नेटके करून जेवूं घालावें व स्वस्थ झोपावें आपलीकडे कांही कर्तव्य आहे हें लक्ष्मीबाईंनाहि कळत नसेल. पण

लग्नानंतर थोड्याच दिवसांनी नानासाहेबांना एकाएकी राजकारणाच्या आखाड्यांत उतरण्याची बुद्धि झाली.

नानासाहेबांना त्या वेळेच्या सुधारकाप्रमाणे शक्य त्या प्रमाणांत आपली स्त्री असावी असें वाटत असे. लक्ष्मीबाईचे प्राथमिक शाळेंत दोन वर्ग झाले होते. ह्यापुढील शिक्षण वडील आतेच्या नजरेला न पडतां भीतभीत देण्याची नानासाहेबांना बुद्धि झाली. त्यांना शिकवलेलें लवकर वाचतां येई व लिहितांहि येई. पण जीभेंत कांही दोष असल्यामुळे उच्चार बरोबर येईनात. त्यामुळे नानासाहेबहि शिकवतांना कंटाळत व लक्ष्मीबाईहि शिकावयास कंटाळत. शेवटीं कोणीच घरात नसताना त्यांनी मनाशींच वाचावें, व मनन करावें. पण पुढे त्यांना चुलतसासूचा सहवास घडला. ती बाई तापट व लिहिणें वाचणें शिकणें म्हणजे बिघडणें होय ह्या समजूतीच्या. तिच्या रागावर लक्ष्मीबाईने कोणाला न कळत पाटीहि फोडली व पुस्तकें चुलींत घालून चहा केला. नानासाहेबांना मात्र त्यांनी ही हकीकत सांगितली. त्यांना हसूं आलें. आतेला मात्र ह्या मनाईबद्दल वाईट वाटलें.

पुढे लवकरच लक्ष्मीबाई संसारपात्र ठरल्या व त्यांना माहेरून आणण्याकरिता नानासाहेब गेले. परत येतांना नागपूरला मामाकडे मुक्काम केला. आम्ही उमरावतीला निघालों, म्हणून सीताबर्डीवर एका स्नेह्याकडे पत्नीसह येऊन राहिले. तेथे पोलके शिवून घेतलें व पुणेरी जोडा लक्ष्मीबाईकरिता त्यांनी खरेदी केला. आणि स्नेह्याच्या पत्नीमार्फत हा थाट आपल्या पत्नीने करावा म्हणून प्रयत्न केले. कसेंतरसें पोलकें अंगांत घातलें, भांगाला थोडें वाकडें वळणहि दिलें, व कांहीकेल्या कुंकू लहान करून घेईनात. शेवटी त्याच स्थितींत स्टेशनवर जाण्याकरिता टांगा आला. टांग्यांत बसतांना पायांतील पुणेरी जोडा घसरून पडला. पुन्हा उचलून नानासाहेबांनी घालावयास दिला. स्टेशनवर टांग्यांतून उतरतांना पुन्हा तो निसटला. कसाबसा पायांत घातला पण सवय नसल्यामुळे लक्ष्मीबाईना सरळ चालतां येईना. पाय घासीत चालत

नानासाहेबांनी उभयतांची मोठ्या हौसेने सेकंडक्लासची तिकिटें काढलीं, व त्या डब्याकडे उभयता, सामान हमालाच्या डोक्यावर देऊन, निघाले इकडे लक्ष्मीबाईनी पायांतील जोडा लवकर चालतां यावें म्हणून काढून हातांत घेतला हे नानासाहेबांना सेकंडक्लासच्या डब्याजवळ येईपर्यंत कळलें नाही. सामान डब्यांत ठेवलें व पायांत जोडा घालून एका बाजूला बसण्याकरिता लक्ष्मीबाईना डब्यांत चढविलें. त्यांच्या आयुष्यांत सेकंडक्लासचा डबा पाहण्याचा पहिलाच प्रसंग. आगगाडी व तिचा तिसरा वर्ग हा मात्र बराच परिचयाचा. हा डबा साहेबांचा, तेव्हा यांत बसावयाचें नाही म्हणून तोंड हिरमुसलें करून लक्ष्मीबाई उभ्याच. इतक्यांत इतर प्रतिष्ठित व नानासाहेबांच्या ओळखीचे कांही शिष्ट उतारू आंत येऊं लागले. नानासाहेबांची तारांबळ उडाली. शेवटी एका कोपऱ्यांत लक्ष्मीबाईला बसविले व शेजारी नानासाहेब बसले. बडनेर स्टेशन येईपर्यंत लक्ष्मीबाईनी तोंड वर केलें नाही, व तोंडावरचा पदर वर घेतला नाही.

बडनेर स्टेशन म्हणजे उमरावतीला येणाऱ्याचे घरच असतें. तेथे पोलकें व जोडा घेऊन नाना-साहेबांनी आपल्या ट्रूंकांत कोंबला. तेव्हा कोठे बडनेर ते उमरावती हा प्रवास लक्ष्मीबाईना सुखाचा वाटला. आणि घरीं येण्यांत कोणी काही आपल्याला बोलणार नाही असेंहि त्यांना वाटले. ह्या प्रसंगाने नानासाहेबांनी पत्नीला कोणतेही नवे चाळे शिकविण्याचें टाळलें. पुढें ह्या सेकंडक्लास मध्ये प्रसंगानें बसल्या. प्रसंगानें बाहेर पडतांना चपलाहि घातल्या. थंडीचे गरम पोलके त्यांनी घातलें. पण हा नित्यक्रमांतील नवा ... नवऱ्याला आवडतो म्हणून त्यांनी स्वीकारला

आणि ह्यापैकीं अमुक हवें असा कधी शब्दहि त्यांनी नानासाहेबांजवळ उच्चारला नाही.

स्वतंत्र छापखाना काढून वर्तमानपत्र चालविणे हा नानासाहेबांच्या सार्वजनिक आयुष्याचा आरंभ. आत्या, मामा व लक्ष्मीबाईची नातलग मंडळी ह्या कल्पनेला अर्थात् विरोधी होती. जो मुलगा उडाणटप्पू निघणार नाही असें वाटत होतें तो उडाणटप्पू निघाला असें ह्मणूं लागले, व जे तसाच निघेल असें. ह्मणत त्यांना आपलें भाकीत खरें होत आहे ह्मणून आनंदहि वाटे. नानासाहेबां-पेक्षा लक्ष्मीबाईच्या कानावर हीं बोलणीं नेहमी येत. पतीच्या निंदेची गोष्ट थट्टेंतहि सहन करावयाची नाही हा त्यांचा सहजस्वभाव. आणि त्यांनी चिडावें. ह्मणून पतिनिंदा कारण नसतांहि त्यांच्या कानीं घालण्याचा कांहींचा प्रयत्न. पण ह्या सर्व गोष्टी थट्टेंतील असोत वा खऱ्या असोत, लक्ष्मी-बाईनी पतीला कळविल्यावाचून राहूं नये. त्या गोष्टीला वर्ष वा सहा महिने लोटले तरी पतीची गांठ पडतांच आठवण ठेवून सांगण्यास त्यांनी मात्र विसरूं नये.

ह्याच परिस्थितींत लक्ष्मीबाईजवळून नानासा-हेबांनी एक एक दागीना मागून न्यावा व छापखान्यांत घालावा. नानासाहेबांची आत्या सुखी होती, व तिचें नानासाहेबांवर व आपल्या भास-सुनीवर प्रेम होतें. हे दोघेहि दागीने नाहीसे करण्याइतके लबाड निघतील ही मात्र त्या माउलीला कल्पना नव्हती. अशा प्रकारें बरेच दागीने कमी झाले. पण कोणतासा सण आला. त्या सणाला दागीने घालून देवाधर्माला चालावें म्हणून आतेसासूचा लक्ष्मीबाईला आग्रह. त्या दागीन्यावाचून चालूं लागल्या. म्हातारीला तें पटें ना. भाससून दागीन्यावाचून दिसावी हा त्या म्हातारीला कमीपणा वाटे. म्हातारीने लक्ष्मीबा-ईला किल्ली मागितली व लक्ष्मीबाईने दिली. पेटी उघडून पाहते तों त्यांत दागीने कमी. काय झाले ह्मणून म्हातारीने प्रश्नावर प्रश्न केले. पण लक्ष्मीबाईनी हूं कीं चूं न करण्याचा सत्याग्रह चालविला. हे दागीने चोरी गेले व ते ह्या पोरीने कोणा तरी आपल्या नातलगास फसून दिले अशी त्या म्हातारीची समजूत झाली.

आणि लक्ष्मीबाईवर न रागावणारी म्हातारी ह्या वेळीं क्रुद्ध झाली. लक्ष्मीबाईला रडत बसण्या-पलीकडे कर्तव्यच उरलें नाही. पण नवऱ्याने दागीने मागितले व मीं दिले हें वाक्य मात्र त्यांनी आपल्या तोंडून उच्चारलें नाही. हा प्रकार घरांत चालूं असतांच नानासाहेब घरांत आले. म्हातारीने घडलेला प्रकार सांगितला. बायको रडत आहे व सत्य काय हें म्हातारीला सांगत नाही हें पाहून सत्य सांगणें अवश्य आहे असें नानासाहेबांना वाटलें. आणि दागीने मींच मागि-तले ह्मणून तिने मला दिले व मीं ते काका तांबे यांजकडे गहाण ठेविले वा विकून छापखा-न्यांत घातले, असा खरा वृत्तांत आपल्या प्रेमळ आतेसमोर नानासाहेबांनी निवेदन केला. ह्या-मुळे भाससूनेवरचा राग भाच्यावरच वळला व नानासाहेब जे घराबाहेर पडले ते कशाला घरांत येतात ? शेवटी दुसऱ्या दिवशी म्हातारीने समजावून आणले व दागीने गेले तरी ते जुगा-रांत वा व्यसनांत गेले नाहीत अशी म्हातारीची नानासाहेबांनी नम्रतापूर्वक समजूत घातली.

समजूत घातली व सर्व पुन्हा सुखाने एकत्रच राहूं लागले हें खरें. पण सर्व आप्तेष्टांतील वडीलधाऱ्या माणसांत नानासाहेब अविश्वासाला पात्र झाले. त्यांच्या नशीबीं हें पाप आलें तर नवलच नाही. पण लक्ष्मीबाईहि नवऱ्या-आहारीं जाणाऱ्या आहेत ह्मणून त्यांच्याहि नशीबीं माहेरच्या माणसाकडून व सासरच्या वडीलधाऱ्या माणसांकडून अविश्वासाला पात्र होण्याचें पाप आलें. पण दोघाहि पति-पत्नीच्या स्वभावांत बेफिकीरपणा हा एक गुण सर्वसाधा-रणपणें सारख्याच प्रमाणांत वावरत असल्यामुळे त्यांना ह्याचें कांहीच वाटेना. पण लक्ष्मीबाईना

घरांत चोरासारखें वाटूं नये म्हणून नानासाहेब त्यांच्याजवळ रुपये आणून ठेवीत व ते किती आहेत हें एका सजातीय अशा वृद्ध शेजारीण बाईच्या सहाय्याने लक्ष्मीबाई मोजून ठेवीत.व आपण चुकलों कीं बरोबर आहों ह्याची खात्री त्या करून घेत. त्या म्हातारीने हळूंच न कळत एखादा दुसरा लांबवावयाचा. ह्याप्रमाणे शंभररुपयांत २५ चोरीला गेले तेव्हां चोर उघडकीला आला. आणि आपला हा मूर्खपणा प्रथम नवऱ्यास व नंतर आतेसासूस सांगितला. नानासाहेबांना ह्याचें कांही वाटलें नाही. पण त्यांच्या आतेला, हे दोघेहि नवरा-बायको संसाराला व घर चालवावयाला नालायक वाटले.

कां वाटणार नाही ? पैसा जपून ठेवणे, जपून खर्च करणे व राखणें हीच ज्यांची इतिकर्तव्यता असते त्यांना ह्यांत संसारांतील नालायकी दिसली तर मोठें नवल नाही. ह्यांत थोडा निष्काळजीपणा असेल, पण मनाचें मोठेंपण व उच्चदृष्टि मात्र प्रत्ययास येते. शिक्षणाने व संस्काराने ही दृष्टि नानासाहेबांत आली तर नवल नाही. पण लक्ष्मीबाईत कशी आली ? पतिवर निर्व्याज प्रेम व त्याची निष्ठापूर्वक लक्ष्मीबाईस झालेली वाढ ह्यामुळेच त्यांच्या मनाचें औदार्य व सहनशीलता हे दोन सद्गुण प्रत्ययास येऊन ते वाढीस येऊं लागले. ते इतके वाढीस येऊं लागले कीं, पुढे १९०९ मध्यें नानासाहेबांवर सरकारी अवकृपा झाली व जबर दंड झाला. दंडाला मुदत मिळाली. मुदतीच्या दिवशी नानासाहेबांच्या स्नेही मंडळीने बरीच रक्कम जमविली. पण रु. १०० कमी पडले. कोर्ट उठणार व नानासाहेब तुरुंगांत जाणार हें कळतांच हातांतील कांही आंगठ्या जवळ होत्या त्या लक्ष्मीबाईंनी चटकन काढून दिल्या व नानासाहेब तुरुंगांत न जातां घरीं आले. तो आनंद गगनांत मावेनासा लक्ष्मीबाईंना झाला असला तर नवल नाही. ह्या दंडावर अपील झालें. दंड कमी झाला. पण लक्ष्मीबाईंनी दिलेल्या दागीन्याइतका ह्मणजे रु. १०० चा कायम झाला. इतरांचे रु. ९०० मात्र चुकते झाले. हा दुसरा भाग येथेच पुरा करूं.

---

# बालसंगोपनाची एक दिशा

लेखिकाः—सौ० गंगाबाई पटणे, हेडमिस्ट्रेस, गर्ल्सस्कूल, अक्कलकोट.

शैशवावस्था ही अति नाजुक अशा पुष्पासमान आहे. कुसुमविकसनाला ज्याप्रमाणे हवा, पाणी, अन्न, उष्णता, सूर्यप्रकाश हीं अत्यंत जरूर आहेत, त्याप्रमाणे शिशुजीवनाला वरील सर्व गोष्टींची आवश्यकता आहे. एखादी सुंदर व मनोवेधक कलिका ज्याप्रमाणे वाऱ्याने डुलते, रंगाने व वासाने सर्वांचें मन मोहून घेते, उष्णतेने उमलते, व प्रकाशाने खुलते, तद्वत् बालक वरील वस्तूंच्या मदतीने आपल्या लीलेने व तेजाने चित्ताकर्षक, मनमोहक व निसर्गरमणीय बनतें. पण आपल्या ह्या हिंदुस्थानांतली बालसुमनें उमलण्यापूर्वींच गळतांना पाहून व त्यांचा अमानुष रीतीने चाललेला संहार पाहून हृदय विदीर्ण होतें. जगांतील इतर कोणत्याहि देशापेक्षा हिंदुस्थानांत बालमृत्यूचें प्रमाण जास्त असावें यापरती राष्ट्राला दुसरी लाजिरवाणी गोष्ट कोणती ? जन्मादारभ्य शेंकडा २५ मुलें रोगी असतात व शेंकडा ३३ जन्मतांच यमसदनास जातात, असा हिंदुस्थानांतल्या डॉक्टरांचा अभिप्राय आहे. तेव्हा या राष्ट्रसंपत्तीचा ऱ्हास कमी करणे व आरोग्यदृष्ट्या ती बलवान् व ओजस्वी बनविणें हें राष्ट्राचें कर्तव्य नाही काय ? आजच्या या लेखांत या बालमृत्यूला अल्प प्रमाणांत कां होईना, आळा कसा घालतां येईल याविषयीं चार शब्द लिहिण्याचें योजिलें आहे.

आरोग्यवर्धनाला ताजीं फळें, दूध, भाजीपाला, ह्यासारखें पौष्टिक अन्न, शुद्ध हवा व पाणी, पुरेसे कपडे, ऋतुमानाप्रमाणे योग्य असा व्यायाम, स्वच्छंदी, आनंदी व खेळाडू वृत्ति हीं लागतात. ह्याबद्दल दुमत नाही. पण जेथे हिंदुस्थानांतल्या तृतीयांश लोकांना एकभुक्तच रहावें लागतें, जेथे लोकांची वार्षिक प्राप्ति दहा रुपयांपेक्षा जास्त नाही, तेथे पौष्टिक अन्न मुलांना देण्याची गोष्टच बोलावयास नको हें जरी खरें असलें, तरी शुद्ध हवा, पाणी, व सूर्यप्रकाश, ह्यांची सुदैवाने व परमेश्वरी कृपेने हिंदुस्थानास केव्हांहि व कधींहि वाण पडणार नाही. वरील गोष्टीस एक पैसाहि खर्च करावयास नको, व त्या गोष्टींचें वैपुल्यहि आपल्याकडे आहे. शिवाय आपल्या उष्ण देशांतील जनतेस कपड्यांचीहि फारशी जरूरी नाही. तेव्हा ज्यांत 'अ' व 'ड' व्हिटॅमिन्स भरपूर आहेत असा सूर्यप्रकाश व कपडे ह्यांचेयोगें तनदुरुस्ती कशी ठेवितां येईल याचाच आपणांस विचार करावयास हवा. या लेखांत श्रीमंत, सुखी, व दैववान् अशा मुलांचा विचार करावयाचा नसून, श्रमजीवी लोकांच्या आरोग्याचाच प्रमुखत्वें विचार करावयाचा आहे.

सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी आपल्या देशांतील खेडोपाडीं अत्यंत व प्रशंसनीय अशी चाल प्रचलित

होती. नूतन जन्मलेल्या लहान मुलांचें शरीर तैलमर्दनानें तुळतुळीत करून त्यांना बालार्काच्या किरणांत प्रत्यहीं तास दोन तास ठेवावयाचें. त्या वेळीं अंगावर अर्थात् कोणताहि कपडा घालावयाचा नाही. मग त्यास हरभऱ्याच्या डाळीच्या पिठानें चोळून स्नान घालावयाचें, व अशा तऱ्हेनें अंगावरील स्निग्धांश कमी करावयाचा. ही चाल अद्यापिहि कांही कांही खेड्यांत प्रचलित आहे, मात्र ती हळूंहळू नामशेष होत चालली आहे ही दुःखाची गोष्ट होय. कांही स्त्रिया व मुली जेव्हा न्हातात तेव्हा तेलाचा मुबलक उपयोग करून त्या सूर्यातपस्नान करतात हें सुप्रसिद्धच आहे. पाश्चात्य देशांत जेथे क्वचितच सूर्यदर्शन होतें व जेथे सूर्यदर्शन होणें महाद्भाग्य समजतात तेथे क्षयरोग्यासाठी सूर्यासारखा कृत्रिम प्रकाश देणाऱ्या दिव्यांचा उपयोग करूं लागले आहेत. व 'क्ष' किरणांचा उपयोग होऊं लागला आहे. आमचेकडे मात्र जवळ जवळ बाराहि महिने सूर्यप्रकाश उपलब्ध असतां त्याचा पुरेपूर फायदा घेण्याचें आम्हीं टाळावें ही खरोखर नामुष्कीची गोष्ट होय.

कपड्यांच्या बाबतींत तर आश्चर्यकारक गोष्टी पाश्चात्यांनी अंमलांत आणिलेल्या आहेत. ही कपड्यांची योजना, अत्यल्प खर्चाची, शास्त्रशुद्ध, बहुगुणी, व फलप्रद, अशी झालेली आहे. पायांत चपला, ढुंगणास लंगोटी अगर चड्डी, अंगांत फ्रॉक किंवा शर्ट, अति ऊन असेल त्या वेळी डोकीला पांढरी शुभ्र हलकी पण उन्हापासून रक्षण करणारी हॅट, झाला पोशाख! नाहीतर आमचेकडे ड्रेसचें केवढें थोतांड असतें! प्रथम फ्रॉक, नंतर शर्ट, नंतर जाकिट, नंतर कोट, नंतर पँट, व खाली बूट. काय बिशाद आहे हवेचा झोत व सूर्यकिरण आंत जाईल तर! ही पोषाखाची तऱ्हा भर उन्हाळ्यांत असते; मग थंडीच्या दिवसांतला आमचा जमानिमा म्हणजे कडेकोट बंदोबस्तच तो! एकट्या कपड्यांचेंच वजन मुलाच्या वजनाच्या निम्याने! असो.

शाळेंत ४ ते १३ वर्षांची मुलें घेण्यांत येतात व हा वर्ग ३ महिने व वर्षभर, प्रकृतिमानाप्रमाणे चालतो. वर्ग एकाच जागीं भरविण्यांत येत नसून, ते फिरते असतात. याकरिता प्रत्येक विद्यार्थ्यास घडीची खुर्ची व टेबल यांची एकात एक सोय केलेली हलकी व त्यांना सहज उचलून पाठीशीं घेतां येण्याजोगी वस्तु देतात. विश्रांतीचे वेळी व अभ्यासाच्या वेळीं मुलांची बैठक दिसण्यास मोठी विचित्र पण अत्यंत शास्त्रशुद्ध व आरोग्यदायक अशी असते. मुलांना पोटावर निजवितात. पाठीवर नव्हे. अगर सतरंजीवर आपली मुलें जशी कुबड काढून वांकून वांकडी-तिकडी, पाय ताणून अगर गुडघ्यांत मान घालून बसतात तशीहि नव्हे. आपली वर सांगितलेली पद्धति सदोष आहे. त्याचे योगानें पाठीच्या कण्यास वक्रता, छातीस पोक, दृष्टीस मांद्य व खांद्यास कुरूपता येते. पाश्चात्य देशांत मुलें पोटावर निजल्या निजल्या वाचूं अगर लिहूं शकतात. एवढेंच नव्हे तर ही बैठक त्यांना मनापासून आवडतेहि. वर्ग चालू असतांना मात्र तीं मुलें बाकांचा व खुर्च्यांचा उपयोग करतात हें सांगणें नकोच.

अशा रीतीनें सृष्टीशीं समरस झालेल्या फुलपांखराप्रमाणे नाचऱ्या, बागडऱ्या, खेळाडू व आनंदी वृत्तीच्या मुलांच्या जीवनावर, चारित्र्यावर, संस्कृतीवर व आरोग्यावर वरील शाळांचा कसा इष्ट परिणाम होत असेल हें का सांगावयास पाहिजे? अशा शाळेंत शिस्तीचा भंग, छडीचा उपयोग, व असभ्य वर्तन होणें अशक्य. वर सांगितलेल्याप्रमाणे अनुकरणीय अशा शाळा हिंदुस्थानांत ठिकठिकाणी केव्हां निर्माण होतील त्या खऱ्या; पण तूर्त तरी या विषयास जोराने चालना मिळाली व शाळांकडून व विशेष पालकांकडून आपल्या " छोट्या बाबालोगास " भरपूर सूर्यप्रकाश, हवा, शक्य तितके कमी कपडे, योग्य व्यायाम, व बैठक, गोडगोड शब्द, व दयार्द्र दृष्टि यांचा एकसमयावच्छेदेंकरून फायदा मिळाल्यास, लिहिलेल्या लेखाचें चीज झालें असें म्हणण्यास हरकत नाही.

# माहेश्वर आणि वीरशैव

## उत्तरार्ध

लेखकः—श्री. विश्वनाथ लक्ष्मण आप्पा कुर्डी, रोहिणखेड.

मागील अंकी आपल्या समाजांत वीरशैव आणि माहेश्वर यांमधील वैमनस्य कसें वाढत आहे हें थोडक्यांत दाखविण्यांत आलें आहे, आणि त्याचा समाजाच्या प्रगतीस कसा प्रतिबंध होतो याचाहि ओझरता उल्लेख करण्यांत आला आहे. म्हणून नुकत्याच प्रगतिपथाकडे जाऊं पहात असलेल्या वीरशैवसमाजास त्याच्या प्रगतिपासून परावृत्त करणाऱ्या सर्व गोष्टींचा उच्छेद करणें इष्ट आहे. आणि त्याकरिता समाजांतील प्रत्येक वर्गानें म्हणजे माहेश्वर, सनातनी, वीरशैव व नवमतवादी वीरशैव, यांनी आपलें एकमेकाविषयींचें समाजहिताच्या दृष्टीने वागणुकीचें धोरण कसें ठेवावें म्हणजे आपसांत घर्षण होणार नाहीं, याविषयीहि मी माझे अल्पमतीप्रमाणें थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत करीत आहें.

सदरहू लेखाच्या पूर्वार्धांत सांगितल्याप्रमाणे वीरशैवसमाजांत दुफळी होऊन त्यामुळे समाजाचें हित न होतां अनहितच होणार हें निश्चित आहे; म्हणून असें अनहित टाळण्यास समाजानें काय करणें इष्ट होईल तें थोडक्यांत पाहूं.

व्यक्ति तितक्या प्रकृति या उक्तीप्रमाणे मनुष्यप्राण्यांत मतभेद हा राहाणारच. परंतु तो मतभेद तात्विक स्वरूपाचा व योग्य असल्यास ठीक असते. हल्ली आमच्या समाजांत मात्र तात्विक मतभेद कमी दिसत असून पक्षांध मतभेद वाढत्या प्रमाणांत दिसून येत आहे; व तो इतक्या प्रमाणांत कीं, त्यामुळे व्यक्तिशः एकमेकावर टीकांची व शिव्यांची झोड उडत असते; आणि अशा गोष्टी वृत्तपत्रांतूनच जास्त वाचावयास मिळतात. याकरिता वृत्तपत्रकारांनी उगीच वितंडवाद उत्पन्न होऊन ज्याची शिवीगाळीपर्यंत मजल पोहोचेल अशा लेखाला अगर मजकुराला जागाच देत जाऊं नये अशी त्यांना नम्र विनंती आहे. परंतु उपस्थित प्रश्नाला मुद्देसूद व तत्वदृष्ट्या महत्वपूर्ण आणि योग्य असें उत्तर ज्यांत असेल अशा मजकुरालाच वृत्तपत्रांत स्थान मिळाल्यास आपसांत ऐक्य जरी वाढणार नाही तरी निदान मतभेद वाढणार नाही हें निश्चित आहे. मनांत द्वेषबुद्धि आहे तोपर्यंत ती तोंडावाटे अगर लेखणीवाटे केंव्हाना केव्हा तरी बाहेर आल्याशिवाय राहणार नाही. म्हणून प्रत्येकाच्या मनांत प्रेमबुद्धि व निर्विकल्पता असावी. कारण त्याशिवाय पक्षोपपक्षांत ऐक्य व प्रगति होणार नाही. अशा प्रकारची प्रेमबुद्धि व हित होण्याकरितांच 'वीरशैव हितसंवर्धकमंडळ' व 'वीरशैव प्रेमसंवर्धक मंडळ' ह्या संस्थांचा उदय झाला हें समाजाचें भाग्यच समजलें पाहिजे.

आता सनातनी व नवमतवादी ह्यांचेकडे वळूं. सनातनी वीरशैव हे नवमतवाद्यांना 'तुम्ही शिक्षणामुळे बिघडलां आहांत, तुम्हाला देवधर्म कांहीच नाही, तुम्ही हॉटेलांत जातां, व्रत-उपोषण यांचा तुम्हास कंटाळाच आहे' वगैरेसंबंधाने तिरस्कारयुक्त वाणीनें बोलतात. परंतु 'त्यांत कांही अर्थ नाही' असें म्हणून कांही सुशिक्षित लोक त्यांची हेटाळणी करितात. सनातन्यांच्या सर्वच

म्हणण्यांत अर्थ नसतो असें विचाराआधींच ह्मणणें हेंहि रास्त होणार नाही. आमच्या पूर्वजांनी आह्मास सर्व दृष्टींनी हितकारक अशा गोष्टींचा लाभ व्हावा म्हणून त्यांनी त्यांचा धर्मांत अंतर्भाव करून ठेवला. उद्देश हाच कीं, नियमबद्धतेमुळे त्यांचा लाभ मनुष्यप्राण्यास जरूर व्हावा. उदाहरणार्थ उपोषण करणें हें एक आपल्या धर्मांतील जुनें तत्व आहे. त्याचें आचरण केल्याने मुख्यतः आरोग्यविषयक फायदा मनुष्यास होऊन चित्तशुद्धि व एक प्रकारचा सात्विकपणा मनुष्याच्या अंगीं येतो. यावरून उपोषण ही किती महत्वाची बाब आहे हें समजून येईल. तेव्हा हें जुने तत्व आचरणांत आणण्यास अगर अन्य पद्धतीने त्याचा लाभ करून घेण्यास नवीन मार्गाचा अवलंब केल्यास हरकत नाही. परंतु अशा अमोल जुन्या तत्वास आह्मीं अजिबात झिडकारून टाकणें हेंहि आमच्या हातून होणार नाही. कारण कायदेशीर गोष्टींचा अव्हेर आह्मी जाणून-बुजून कसा करणार ? तसेंच, सर्व सनातनी तत्वें चालू काळांत सर्वस्वीं लागू पडतीलच हेंहि ह्मणणें योग्य होणार नाही. बरें एकमेकांनी एकमेकावर टीका करण्यापासून व नावें ठेवण्यापासून दोहोंनाहि कांहीच फायदा होण्यासारखा नसतांना, पूर्वी सांगितलेल्या प्रमाणे परस्परटीका बंद करणें फायदेशीर होईल यांत मुळीच शंका नाही.

आता समाज व माहेश्वर यांचे संबंध पाहूं. जंगमांचासुद्धा समाजाशीं सेवकवृत्तीचा संबंध असावा. त्यांनी विद्यासंपन्न होऊन आपल्या ज्ञानाचा फायदा देत फिरत राहिल्यास व मागील अंकांत सांगितल्याप्रमाणे भक्तिरसपूर्ण जीवन ठेवल्यास अशांनाच जंगम या सदरांत गणण्याची प्रथा अंमलांत आणिली पाहिजे. त्याचप्रमाणें अशाच माहेश्वरांना मानण्याची व त्यांची योग्य संभावना करण्याची ही नवीन प्रथा सुरु केली पाहिजे; म्हणजे संघटितपणा येऊन बुवाबाजीसहि आळा बसेल.

आतां फक्त शेवटचा मुद्दा राहिला आहे. तो ह्मणजे आमच्या समाजांतील कांही वीरशैव ( सुशिक्षित व अशिक्षित ) बंधूंना लिंग जवळ ठेवण्यास लाज वाटते. वीरशैव लिंगायत म्हणवितात परंतु लिंग मात्र जवळ नाही. हें वीरशैव ह्मणविणाऱ्यास शोभत नाही. या जगांत संसारांतील व्यापामुळे मनुष्यास सर्व जगाचा पालनकर्ता असा परमेश्वर त्याची आठवणहि येत नाही. ती आठवण आपणास वारंवार येण्यास परमेश्वराचें कोणत्याहि साकाररूपाने आपल्याशीं सान्निध्य असणें जरूर आहे हें तत्व लिंग जवळ बाळगण्याच्या मुळाशीं आहे. म्हणून सर्व वीरशैवांनी विशेषतः प्रमुख व सुशिक्षित लोकांनी या पद्धतीचा पुरस्कार चालू ठेवल्यास त्याचा परिणाम अशिक्षितांवरहि होऊन लिंग जवळ बाळगण्याची आपल्या समाजांतील एक विशिष्ट पद्धति बराच काळपावेतो जिवंत राहील. याप्रमाणे समाजांतील चालू परिस्थितीचें थोडक्यांत विवरण करून त्यावर माझे अल्पमतीप्रमाणे मीं कांही सूचनाहि केल्या आहेत. परंतु मागील अंकांत सांगितल्याप्रमाणे वरील सूचना सर्वांना पटतीलच असें नाही. ह्मणून विनंती कीं, हंस - क्षीरन्यायाने जें जें रुचेल तिकडे लक्ष असूं द्यावें व बाकीचें सोडून द्यावें. एवढें सांगून मागील लेखाचा उत्तरार्ध संपवितों.

---

# चहाच्या अपमृत्यूने जगावर कोसळणारीं संकटें!!!

लेखिकाः— कु० "शामलता".

## महाशय चहाराज ह्यांचें व्याख्यान!

गेल्या उन्हाळ्यांतीलच गोष्ट. उकाडा फार होत होता व संध्याकाळीं थोडसं बाहेर पडावं असं माझ्या मनांत आलं व मी मधूला विचारतांच तोहि चटकन् तयार झाला. शिवाय मला कांही 'कापड-खरेदीचं' निमित्त होतंच बाहेर पडायला!

चौकांतून थोडं पुढे जातांच समोरच्या लोकमान्य-थिएटरांत सारखी गर्दी लोटत होती. तेथे कुणा तरी बड्या वक्त्याचं व्याख्यान असावं म्हणून आम्ही दोघंहि आंत गेलों.

तों सारं थिएटर स्त्रीपुरुष प्रेक्षकांनी चिकार भरून गेलेलं दिसलं! विशेषतः शाळेंतील मुलांमुलींनी तर अगदी व्यासपीठापर्यंत आघाडी मारली होती. इतकी सारी गर्दी कां? तर म्हणे—महाशय चहाराज "चहाच्या अपमृत्यूने जगावर कोसळणारीं संकटें" ह्या विषयावर व्याख्यान देणार होते. चहा जर जगांतून नाहीसा झाला तर अशी कोणती अनर्थपरंपरा जगावर कोसळणार आहे ह्याचा आम्हाला कांहींच उलगडा होईना! व साहजिकच जिज्ञासेने आम्हीहि त्या प्रेक्षकांच्या गर्दीत सामील झालों.

व्यासपीठावर अध्यक्षांचे खुर्चीवर पंडित दुधगीर हे आरूढ झाले होते. जवळच 'महाशय चहाराज' गुलाबी रंगाचा पेहराव करून सभेकडे मोठ्या अहंभावाने पाहत होते बॅरिस्टर शंकरपाळे, प्रो० पेढे, मिस्टर एन्. चिवडा, आय. सी. एस्., डॉ. लड्डु, नामदार भजे, शेठ धुम्रचंद धुराळे, इत्यादि पुरुष मंडळी व्यासपीठावर प्रामुख्याने चमकत होती. शिवाय श्रीमती जिलबी, मिसेस बर्फी, कु. मिसळ, व उसळबाई चमचमे, पंडिता खिरबाई गोडे. मिस करंजीबाई नर्स, डॉक्टरीण पुरी, इत्यादि भगिनीहि हजर होत्या. सभेच्या कामाला सुरुवात होते न होते तोंच: सरदार श्रीखंड्याची मोटार पों—पों करीत थिएटरांत आली. त्यांनी व्यासपीठावर आपल्या बासुंदीदेवीसह प्रवेश करितांच जिकडे तिकडे गंभीर शांततेचें वातावरण निर्माण झालं. अध्यक्षांनी वक्त्याची रीतसर ओळख करून दिल्यावर महाशय चहाराज प्रचंड टाळ्यांच्या कडकडाटांत भाषण करावयास उभे राहिले. "आज ज्या महत्वाच्या विषयावर मी बोलणार आहें त्याची खरी योग्यता व महत्व जर लोकांना कळलं तर जगावरील संकटांची परंपरा थांबेल! चहा हें जगांत एकच पेय आहे कीं, ज्याला कोणतेंहि सुसंस्कृत सरदार कायद्याने

निर्बंध घालू शकत नाही. राजमहालांत, झोपडींत, इतकेंच नव्हे तर वाहतुकीच्या रस्त्यावर कुणी उभे राहून पितों म्हटलें तरी जगांतील कोणताहि कायदा तुह्माला आडवा येत नाही. चहाच्या साम्राज्यांत खरा साम्यवाद आहे. तेथें स्त्री व पुरुष हा बिलकूल भेद नाही. पिण्याचा सर्वांना सारखाच अधिकार आहे. चहाने समाजांतील अनावश्यक जातीभेद, अस्पृश्यता, इतकेंच नव्हे तर हिंदु-मुसलमान हे अराष्ट्रीय भेदाभेद नाहीसे केले आहेत. एकाच ईश्वराची लेंकरं ह्मणून आपण बंधुभाव उत्पन्न करण्याचा जरी प्रयत्न केला तरी तो व्हावा तसा यशस्वी अजून झाला नाही! चहाने एकाच देवतेचे सारे 'उपासक' असा आत्मीयभाव सर्व पिणाऱ्यांच्या ठिकाणी उत्पन्न करून, विश्व-बंधुत्वाच्या कल्पनेला खरें मूर्त स्वरूप दिलें आहे. चहाखेरीज प्रातःस्मरणीय असं दुसरं दैवत जगांत एकहि नाही. प्रत्यक्ष सृष्टिकर्त्या परमेश्वराचा एक वेळ विसर पडेल, परंतु चहाचा विसर कोणालाहि व केव्हाहि पडणें शक्य नाही. चहामुळेच शाळा-कॉलेजांतील यशस्वी विद्यार्थ्यांचें प्रमाण वाढविलें आहे. चहामुळेच कोर्ट-दरबाराचें इतकेंच नव्हे तर लढणाऱ्या सैन्याचेंहि 'भान' ठिकाणावर ठेवून जगाचा 'गाडा' सुरळीत ठेवला आहे.

"कुठलाहि पाहुणा आला किंवा तुह्मी कोणाच्याहि घरीं गेलांत व 'चहाचा कप' जर समोर आला नाही तर त्याच्या साऱ्या शिष्टाचारावर 'पाणीच' पडलं म्हणून समजावं!! लग्नाचं शुभमंगलम् होण्यापूर्वीची सुरुवात—वरपक्षाकडून पहावयास येणाऱ्या चार शिष्टांच्या पुढे मुलींनी भरून आणलेल्या 'चहाच्या कपा'-पासूनच होते. चहा हा सर्व ऋतुंत सारखाच फायदेशीर आहे. तो उन्हाळ्यांत थंड, हिवाळ्यांत उष्ण, व पावसाळ्यांत समशीतोष्ण असतो. चहा आणि आळस ह्यांचे विळ्या-भोपळ्यासारखें वैर आहे. चहाला गुंगी माहीत नाही. उलट, असलेली गुंगी तो नाहीशी करतो. अशी जीवनांतील रोजच्या गरजेची वस्तूच एकाएकी नाहीशी झाली तर जगावर केवढे अनर्थ ओढवतील! विद्यार्थी वेळेवर शाळेंत येऊं शकणार नाहीत, सबंध २ वर्षे उनाडकी करून त्यांना २ वर्षांचा अभ्यास १ महिन्यांत करतां येणार नाही. शाळेची शिस्त बिघडेल, ह्मणजे सारी भावी पिढीच गारद होईल. सैन्याची शिस्त बिघडेल. कोर्ट-दरबारची कामें थंडावतील. यंत्रावरील मजुरांचे हात लुले पडतील. लेखकांच्या लेखण्या मंदावतील. साऱ्या सृष्टीवरील उत्साहाचें तेज निष्प्रभ होईल. सगळीकडे "अवकळा" पसरेल. जगांतील कोट्यावधि मजूरांना केवळ एका 'कपाने' अन्नाची विस्मृति पाडणारा 'चहा' नाहीसा झाला तर कोट्यावधि भुकेकंगाल बेकारांना आपल्या खऱ्या परिस्थितीची जाणीव होऊन ते उद्या 'क्रांती'च्या वेडाने घराबाहेर पडतील. साऱ्या सृष्टीवर 'अवकळा' पसरल्यासारखें होईल—चहाचा अपमृत्यु ह्मणजे जगाच्या रहाटगाडग्याला खीळच होय."—(सगळीकडून प्रचंड टाळ्यांचा कडकडाट झाला—जयघोषांत महाशय चहाराज खाली बसले.)

भाषण संपतांच सभेंत हाः हाःकार उडाला. बॅ. शंकरपाळे ह्यांनी पोट फुगवून घेतलें, मि. चिवड्यांचा तळतळाट झाला, डॉ. लड्डूंनी तोंड शिवलें, नामदार भजे लाल पडले, श्रीमती जिले-बीबाई स्वतःभोंवतीच गुंडाळल्या गेल्या, मिसेस बर्फी पिवळ्या पडल्या, मिस करंजीबाई मुरडल्या गेल्या, अशा ह्या सगळ्या गडबडींतून मधुकरला पुढे करून थिएटरबाहेर वाट काढली व 'कापड खरेदी'चं काम विसरून परिस्थिती 'ऑरेंज पिको'-चा डबा खरेदी करून घरी आलों व दोघाहि बहिण-भावांनी झोपेतून उठून आधी २ कप चहा करून घेतला व मग हळू अभ्यासाला व इतर कामाला लागलों.

# प्रायश्चित्तसमारंभ कीं नवमतवादाचा खून?

लेखकः—
आर. बी. जगदंबे,
इंदूर (माळवाप्रांत)

श्री वीरमूर्ति सिद्धरामस्वामी माजलगांवकर यांचे सन्मानसमारंभाचे बरोबर प्रायश्चित्त-समारंभ करण्याचें ठरविलें, हें आमचे मतें अयोग्य व अपमानास्पद आहे. ते परदेशीं गेले म्हणून प्रायश्चित्त; पण रावबहादूर कंबळी किंवा अंगडी व्हाईसरॉय किंवा गव्हर्नर यांचे पार्टीला असतांना त्यांचेकडून काय प्रायश्चित्तें घेण्यात येतात? तसेंच, नानासाहेब बामणगांवकर, राजाभाऊ डांगरे, किंवा स्वतः मी, जेलमधून आलों असताना काय प्रायश्चित्त घेण्यात आलें? जेलच्या आंत-सुद्धां दुसरें परदेशच असतें असें ह्मणावयास कांहीच वावगें होणार नाही. आमचे समाजाची गाडी सरळ रुळावर हल्लीच्या काळीं तरी चाल-णार नाही हें खास. जोपर्यंत आपण देशस्थ किंवा कोकणस्थ ब्राह्मणाचें धोरण स्वीकारणार नाही, तोपावेतो आमचा समाज पुढे येणें अशक्य आहे. बाहेर वाटेल तें करा, पण घरांत सोवळें-पळीपंचपात्र सांभाळा. व जसजसें कालचें स्वरूप बदलतें, तद्वत् ते सुद्धा आपलें स्वरूप बदलवीत रहातात. आमचे प्रायश्चित्तसमारंभाची बातमी इतर समाजाचे नजरेस आल्यास आह्मास रानटी म्हटल्याशिवाय रहाणार नाही. तरी समाजबंधुनो, जुन्या लोकांना बळी पडूं नका.

तुह्मास माहीत आहे. आज आमचा समाज सर्व बाजूंनी खालावलेला आहे. अगोदर त्यांची भाषा, दुसरे, घरांतील रहाणी. तिसरें, जगाचें व्यवहारज्ञान. एवढेंच त्यांना माहीत आहे कीं, जेवण झाल्यावर त्याच पानांत तोंड धूवून घाण करायची, व रिकामटेकडे असल्यामुळे दुसऱ्याची निंदा करीत सुटायचे, व माझें घर हेंच माझें जग ह्यापलीकडे त्यांना कशाचीहि आवश्यकता भासत नाही. मला माहीत आहे कीं, श्री. बामणगांवकर प्रायश्चित्तसमारंभास दाद देणार नव्हते. पण जुन्या लोकांचें मन दुखवूं नये एवढ्याकरितांच करण्याचें ठरविलें असेल. पण याचा परिणाम श्री. माजलगांवकरांचे मनावर काय होईल याचा विचार केला काय? हें आमचें कृत्य इतर समाजास हास्यास्पद नाही काय? आजचें जग फक्त परमेश्वराचे भरवशावर चालत नाही. तसें जर असतें, तर जुलमी इंग्रजाचा नायनाट परमेश्वर कां करीत नाही? स्त्रियांचा ईश्वर कुठें पळाला? ईश्वराची शक्ति जगांत नाही असें आमचें ह्मणणें नाही. पण अशा नेभळट धार्मिक भावनांत परमेश्वराचा कांही एक संबंध नाही. आज परदेशांतून विजय मिळवून आलेल्या व्यक्तीला जर एवढ्या प्रायश्चित्ताचा समारंभ, तर उद्यां जर वेळेनुसार अस्पृश्यांबरोबर सहभोजन करावयाचा प्रसंग आला तर आमचा लिंगायत-समाज घरें सोडून अरण्यांत पळेल कीं काय असें वाटावयास लागतें. जोपावेतों समाजाची नवी 'स्कीम' तयार करून अंमलांत येणार नाही, तोपर्यंत समाजाची बिघडलेली घडी सुधा-रणें अशक्य आहे.

# स्वामी माजलगांवकर व प्रायश्चित्तवाद

( संपादकीय )

सर्व लिंगधाऱ्यांत पोटजाती राहूं नयेत व त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार क्रमाक्रमाने कां होईना पण होऊं लागावा अशी आमची इच्छा आहे. ती इच्छा 'संजीवनी'त अनेकदा स्पष्ट शब्दांत प्रतिपादन केली आहे. महासभा व इतर वीरशैवांतील नवमतवादी ह्याशिवाय अधिक कांही प्रतिपादन करतात असें आह्माला वाटत नाही. 'संजीवनी'-कार काय, किंवा 'संजीवनीं'-तील कोणताहि लेखक काय, त्यापलीकडे गेला नाही.

पण उमरावतीचे श्री. माजलगांवकर स्वामी हे जर्मनींतून परत आल्यावर वाढोणेकर स्वामीकडून व वसमतनगरच्या लासिनमठसंस्थानच्या श्रीगुरु करवसय्या स्वामीकडून प्रायश्चित्तविधी करून घेतील अशी बातमी ता. १५ च्या 'संजीवनीं'-त प्रसिद्ध होतांच कांहींच्या पोटांत दुःखलें. वाढोणेकर शंकरअय्यास्वामी हे उमरावतींतील कोणत्याहि स्वामीपेक्षा विद्वान् आहेत हें मी जाणतों, आणि वसमतनगरचे लासिनकर पट्टाधिकारी हे योग्य अधिकारी पुरुष नव्हेत असें ह्मणण्याचीहि प्राज्ञा उमरावतींत एकाहि माहेश्वराची नाही. पण नांवाच्या व्यक्तिद्वेषापाई अर्थाचा अनर्थ करून कांही व्यक्तींनी प्रायश्चित्तविधीच नको व करावयाचा असलाच तर निदान तो अनधिकृत व्यक्तीकडून नको असें 'सुदर्शन'-मध्ये लिहिलें ह्याचा अर्थ आह्माला तरी समजत नाही.

आमचे स्थानिक मित्र श्री. सोमाप्पा गाढवे हे स्वतःला येथील वीरशैव-प्रेमसंवर्धक मंडळाचे संचालक व चिटणीस समजतात. त्यांनी 'सुदर्शन'-मधील लेखांत 'स्वामी लासीनकर उमरावती' हे खोटे शब्द वापरून बातमींतील अर्थाचा अनर्थ करावा हें त्यांच्यासारख्या स्वतःला जबाबदार समजणाऱ्यास शोभत असेल तर शोभो; पण सदर संस्थेचे जबाबदार चालक श्री. शंकरआप्पा पारडकर, महादेवआप्पा एकलारे, श्री. रघुनाथआप्पा हेगू वकील, वगैरेंना हें मान्य असेल असें निदान आह्माला तरी वाटत नाही. कारण 'संजीवनी'-च्या बातमींत वसमतनगरचे करबसय्या लासीनकर हे स्पष्ट शब्द असतां जो सद्गृहस्थ उमरावतीचे लासीनकर करबसय्या असें लिहितो तो सद्गृहस्थ कांही जबाबदार आहे असें कसें ह्मणावें ? असो. पण हा प्रश्न महत्वाचा नाही.

मुख्य प्रश्न माजलगांवकर स्वामींनी परदेशगमन झाल्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावें किंवा नाही हा आहे. स्वामी माजलगांवकर हे ब्रह्मचारी व मठाधिकारी असून, भक्तवर्गांना तीर्थोदक देऊन पावन करणारे आहेत. ह्यांच्यासारखा अधिकारी पुरुष आजवर परदेशीं गेला नाही, व असा प्रायश्चित्ताचा प्रश्न उत्पन्नहि झाला नाही. माजलगांवकर स्वामींना कोणतेंहि प्रायश्चित्त घेण्यास न सांगतां त्यांचें तीर्थोदक पूर्वीप्रमाणे सुरु राहील असें सर्व समाजाने त्यांना अभिवचन दिलें होतें असें मानणें चूक आहे. रूढीने 'परदेशगमन' हें इतकें पाप मानलें कीं, तें प्रायश्चित्तानेहि दूर होत नाही. पण रूढी समाजांत गुणाची वृद्धि कालानुरूप वाढ होऊं नये ह्मणून आडवी येते. ह्मणून ती मोडावी व कार्य होतांच खुषीने प्रायश्चित्त

घेऊन पूर्वपदास यावें, एवढा नवा पायंडा रूढ करावा हाच निरोप देणारांचा विचार—निदान आमचा तरी एवढाच विचार होता.

तथापि प्रायश्चित्त म्हणजे बुवाबाजी आहे व त्याची गरज नाही असा प्रचार जर कांहींना करावयाचा असेल तर त्यांनी प्रथम स्वतः वीरशैव म्हणवून घेऊं नये असाच अर्थ प्राप्त होतो. 'सुदर्शन'-मधील लेखकाची ओळख पटावयाची असल्यास 'सोमाप्पा' हें नांव सांगून ओळख पटत नाही; तर पुढे बापाचें नांव 'लक्ष्मणआप्पा', उपनांव 'गाढवे', धर्म वीरशैव व पोटजात दीक्षवंत वा शीलवंत एवढें सांगावेंच लागतें. अर्थात् जो धर्म आपण जन्माने वा स्वखुषीने स्वीकारला आहे, त्याची कांही तरी बंधनें पाळणें, स्वतःची ओळख पटविण्याकरिता जरूरच आहे. अलिंग्यांशी अन्नोदकव्यवहार बंद ही वीरशैव-धर्माची मुख्य किल्ली. हा व्यवहार जाहीरपणें सुरूं झाला कीं रूढीबद्ध वीरशैवधर्म त्याचा सुटलाच. वीरशैवांतील कोणता नवमतवादी आज असें म्हणतो कीं, मी वीरशैवेतरांशीं जाहीरपणें रोटी-बेटीव्यवहार करूनहि वीरशैव राहूं शकेल ? स्वतः एखादा धाडसी असें करणारा निघेलहि. पण आजच्या कायद्याने त्यालाहि सवलत मिळावयाची नाही. म्हणजे समाईक कुटुंबाच्या मालमत्तेवर त्याचा हक्क कायद्याने चालावयाचा नाही. येथेच त्याचें वीरशैवधर्मत्व नष्ट होतें. त्रैवर्णिकांत सुधारकांचा सुधारक असला तरी तो मौज करून घेतो व कुटुंबांत हक्क प्रस्थापित करून घेतो; अगर सगोत्र विवाह करावयाचा असला तर दत्तविधानाचें सोंग उरकून घेतो. 'संजीवनी'-त बदफैली मठाधिकाऱ्यावर टीका आली व येईल. पण त्याचा अर्थ मठसंस्था व त्यांचें कार्य, माहेश्वरवर्ग व त्यांचें कर्तव्य, ह्यांचा समाजाशीं संबंध तुटावा वा तोडावा असा नव्हे. तो तुटला तर कायद्याने प्रस्थापित झालेलें कुटुंबत्व नष्ट होतें. हें सोमाप्पा गाढवे ह्यांस कळलें असतें तर प्रायश्चित्त नको असा ध्वनि त्यांनी काढला नसता.

प्रायश्चित्त नच घेतलें तर सोमाप्पा गाढवे, त्यांचें मंडळ,व त्यांचे पंचाचार्य- प्रासादिक माहेश्वर, माजलगांवकरांचें तीर्थ पूर्ववत् घ्यावयास तयार आहेत काय ? असतील, तर त्या सर्वांनीं सह्यांनिशीं आम्हाला जाहीरपणें कळवावें. आम्ही त्यांच्या सामाजिक धैर्याबद्दल अभिनंदन करूं. पण त्याचबरोबर ही गोष्ट वीरशैव व त्यांची संघटना ह्यांना बाधक आहे हेंहि म्हणावयास आम्ही कचरणार नाही. दुसऱ्या एका लेखकाने माजलगांवकर वाटलेच नाहीत तर प्रायश्चित्त कशाला ? त्याचप्रमाणे बामणगांवकर तुरुंगांत गेले होते तेव्हा त्यांनी प्रायश्चित्त घेतलें होतें काय ? असा प्रश्न टाकला आहे. प्रायश्चित्ताने अंतःशुद्धि होत नाही हें आम्हालाहि मान्य आहे. पण सार्वजनिक हितबुद्धीने जर परदेशगमनाचें वा तुरुंगांत जाण्यायेण्याचें कर्म घडलें तर त्याला प्रायश्चित्त घ्याच असा भिक्षुकशाहीकडून आग्रह होईल. व त्याकरिता दक्षिणेच्या रूपाने भारी दंड देण्याचा प्रसंग येईल तर तें प्रायश्चित्त बुवाबाजी गाजविणारांचें आहे व समाजाला अधोगतीला नेणारें आहे असें आम्ही म्हणू व तें घेणारहि नाही, व तसा प्रसंग माजलगांवकर स्वामीवर असता तर त्यांनाहि आम्हीं जाहीरपणें विनविलें असतें कीं, महाराज ! प्रायश्चित्त घेऊं नका. पण बामणगांवकरांनी स्वखुषीनेच तुरुंगांतून आल्यावर प्रायश्चित्तें घेतलीं आहेत व देणारांनीहि आनंदाने दिलीं आहेत. माजलगांवकर स्वामीचा प्रकारहि स्वखुषीचाच आहे. त्यांना कोणी प्रायश्चित्त घ्याच ही शिक्षा फर्मावीत नाही; तर ते ज्या मठसंस्थेचे प्रतिनिधी आहेत त्या मठसंस्थेच्या घटनेला स्वखुषीनेच प्रायश्चित्त घेऊन ते मान देत आहेत. व असा मान त्यानी दिलाच पाहिजे. नाही तर चोरहि उद्या प्रायश्चित्त नाकारून घटनेंत विघटना होईल.

आद्य शंकराचार्य जगताला असत्य मानणारे होते. पण 'यद्यपि सिद्धं लोकविरुद्धं ना करणीयम् नाचरणीयम्' असा सिद्धांत प्रतिपादन करणारे होते. त्याचा अर्थ असा कीं,

लोकरूढीने कांहीं घटना समाजांत प्रस्थापित होत असतात व त्यांना मान देण्यांत लोकसेवा घडत असते. स्वामी माजलगांवकर ज्या मठाच्या गादीवर आहेत त्या मठसंस्थांची कायद्याने प्रस्थापित झालेली रूढी परदेशगमनाला अनुकूल नाही. पण स्वखुषीच्या प्रायश्चित्ताने त्या घटनेला मान दिला नाही व सत्कार्यार्थ परदेशगमनाचें पुण्य जर त्यांनी पदरांत पाडून घेतलें नाही तर एखादा दुसराच माजलगांवकर पुढे येईल व ह्या उमरावतीच्या माजलगांवकर - मठास योग्य वारस राहिला नाही म्हणून हक्क सांगू लागेल. ह्या प्रसंगीं कांही रूढीबद्ध हक्क सांगावे लागतात. माजलगांवकरस्वामींनी प्रायश्चित्त घेतलें नाही तर त्यांच्या शिष्यत्वास कायद्याने बाध येण्यासारखा आहे. तो बाध यावा अशी का प्रायश्चित्त घेऊं नये म्हणणारांची इच्छा आहे ? वास्तविक उमरावतींत हा वाद व्यक्तिविषयक द्वेषाने निर्माण झाला असल्यामुळे तिकडे लक्ष न देतां स्वखुषीने पण जाहीरपणें प्रायश्चित्त घेऊन मोकळे होणें हेंच व्यवहारदृष्ट्या योग्य. नाहीच घेतलें तर आम्ही मात्र स्वामीला अपंक्त मानणार नाही; पण त्याचबरोबर पूर्ववत् पूज्यहि मानणार नाही. अपंक्त एवढ्याचकरितां मानणार नाही कीं, समाजाच्या अशा वृत्तीने अशा लोकांत घटनेबाहेर कायमचे जाण्याची प्रवृत्ती होऊं नये म्हणून.

---

# वीरशैवांतील चळवळी

## आमच्या कार्यकारी मंडळाची सभा

### पारवा

रविवार ता. २७ सप्टेंबर १९३६ रोजीं सायंकाळीं ६ वाजतां मु. पारवा जि. यवतमाळ येथील श्रीमंत बाबासाहेब देशमुख, जहागीरदार, मंडळाचे अध्यक्ष, ह्यांचे वाड्यांत महाराष्ट्र-वी. हि. सं. मंडळाचे कार्यकारी व घटनाकमिटीची सभा आगाऊ जाहीर केल्याप्रमाणें भरली होती. अध्यक्षस्थानीं श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार हे होते. मंडळाचे उपाध्यक्ष श्रीमंत रामचंद्रशेट कुळी, रोहिणखेडकर, दे. भ. नानासाहेब बामणगांवकर अमरावती, श्रीमंत बी. के. उर्फ बापुसाहेब हिंगमिरे, हिंगणघाट, श्रीमंत गोविंदराव बेंद्रे चिखली, वि. तु. चौधरी अमरावती, वगैरे सभासद हजर होते. पुसदकर श्री. आप्पासाहेब एकलारे वकील मंडळाचे उपाध्यक्ष, श्रीमंत बाबासाहेब व बाळासाहेब मुखरे, तहाहयात सभासद, हे कांही अपरिहार्य कारणामुळे गैरहजर होते. श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर हे आजारी असल्यामुळें व श्रीमंत बाबुराव बाळाप्पा कॉंट्रॅक्टर पुळे पुण्यास कांही जरुरीच्या कामांकरितां गेल्यामुळे हजर राहूं शकले नाहीत. कारंजास वऱ्हाड-मध्यप्रांतीय वीरशैव परिषद् भरणार असल्याचें निश्चित झाल्यामुळे स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्रीमंत भाऊराव विभूते हे श्रीमंत रामलिंग आप्पा बाळाप्पा पापडे, श्री. नानाआप्पा होनराव गिरमल आप्पा बाळाप्पा विभूते-नागनाथ आप्पा पापडे, वगैरे स्वागतमंडळाचे सभासदासह प्रांतिक परिषदेच्या

मागणीकरिता जातीने हजर होते. शिवाय श्रीगुरु रामशंभु पुराणिक, दारव्हा; श्रीगुरु गंगाधरअय्या वैद्य, बाबुपेठ चांदा; श्रीमंत आप्पाराव रामाप्पा कोल्हे, उमरावती; श्री. माधवराव शेटे, यवतमाळ; ही मंडळी खास निमंत्रणावरून सभेला हजर होती. दारव्ह्याचे श्री. नामदेव आप्पा कोरे हे सभेच्या वेळेवर मार्गांतील अडचणीमुळे येऊन पोहचले नाहीत तरी ते मागाहून आले.

### सभेंत खालील ठराव पास झालेत

**ठराव १ ला.:—** महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाचे कार्यकारी मंडळावरील अमरावती जिल्ह्याचे प्रतिनिधी व सभासद दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या पत्नी कै. सौ. लक्ष्मीबाई बामणगांवकर ह्यांच्या निधनाबद्दल ही सभा सादर दुःख व्यक्त करते, व दे. भ. नानासाहेबांच्या दुःखांत सहानुभूति व्यक्त करून त्यांचे दुःखांत ही सभा वाटेकरी आहे असें नम्रपणें त्यांना कळविते.

**ठराव नं. २ व ३:—** हे घटनेविषयी होते व तेहि पास झाले.

**ठराव नं. ४ :—** श्री. गुरुमूर्ति सिद्धराम स्वामी माजलगांवकर हे जर्मनी येथील ऑलिंपिक शारीरिक खेळांतील सामन्यांत यश मिळवून परत आल्याबद्दल ही सभा त्यांचें सानंद स्वागत करते, व त्यांचे स्वागतसत्कारसमारंभाकरिता योग्य तो खर्च करावा.

**ठराव ५ वा:—** नववीरमाहेश्वरमंडळाची घटना दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी तयार करुन ती प्रसिद्ध करावी व त्याकरिता नववीरमाहेश्वरमंडळाचे संचालक श्रीगुरु रामशंभु पुराणिक, श्रीगुरुमूर्ति सिद्धरामस्वामी माजलगांवकर, श्रीगुरु करवसअय्यास्वामी लासिनकर, अमरावती, श्रीगुरु हरेश्वर उमाकांत स्वामी खामगांव, श्रीगुरु. गंगाधर अय्या वैद्य चांदा, श्रीगुरु. घाडुळकर तळेगांव, वगैरे मंडळीची सल्ला घ्यावी. घटनाप्रसिद्धिनंतर एखाद्या मध्यवर्ति ठिकाणीं माहेश्वर मंडळीची सभा बोलावून व तींत ती घटना मंजूर करून घेऊन ह्या मंडळाची स्थापना करावी.

**ठराव ६ वा :—** 'महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळाने जंगमवर्ग हा समाजव्यवस्थेस आवश्यक आहे ह्या समजूतीने परिस्थिति व कालानुसार त्या वर्गांत सुधारणा घडवून आणण्याच्या उद्देशाने निघणाऱ्या नववीर-माहेश्वरमंडळास योग्य ती सल्ला व त्या मंडळास संवर्धक असें वातावरण चळवळीने निर्माण करावें, व हा वर्ग समाजास आदर्शभूत व उपकारक व्हावा अशी खटपट करावी.' ह्या प्रकारची मागणी संचालकाकडून महाराष्ट्र वी. हि. सं. मंडळाकडे झाल्यावरून ह्या मंडळाची सहानुभूति राहील असें अभिवचन ही सभा नववीरमाहेश्वरमंडळाच्या संचालकांस देत आहे.

**ठराव ७ वा:—** कारंजेकर वीरशैव मंडळींचेतर्फे स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्रीमंत भाऊराव विभूते, मंडळाचे सेक्रेटरी नागनाथ आप्पा पापडे, व सभासद नानाप्पा होनराव, गिरमलआप्पा विभूते, रामलिंग आप्पा पापडे, वगैरे मंडळींनी "वऱ्हाड मध्यप्रांतीय वीरशैव परिषदेची" मागणी वजा विनंती केली तिला ही सभा मान्यता देते. वरीलप्रमाणे सभेंत ७ ठराव पास झाले व सभेचें काम सायंकाळी ७॥ वाजतां संपलें असें मंडळाचे ज. सेक्रेटरी कळवितात.

---

### देवणी.

येथें वीरशैवांची संख्या जास्त प्रमाणांत असून आपसांत अनैक्यता होती. हें पाहून येथील तरुणांचे पुढारी श्रीमान् मल्लिकार्जुनराव पाटील यांनी सर्व वीरशैव तरुणांची ऐक्यता घडवून वीरशैवसमाज स्थापन केला.

तारीख १८।१२।३५ रोजीं श्री. वीरशैवसमाजाचे नेते श्रीमान् संग्रामआप्पासाहेब वकील व प्रभूरावजी वकील सिद्धरामप्पा शेटकार वगैरे

मंडळींना देवणी येथे बोलावून अधिकाऱ्यांची निवडणूक करविली, व समाजहितोपदेश करविला. एक भव्य सभा भरविली. सभेंत जयनिनाद होत होता. जनता आनंदित होती. खालीलप्रमाणे निवडणूक झाली.

श्री. गदगप्पा अण्णा मानकरी, अध्यक्ष. श्री. चन्नाप्पा मसकले, हिशोबतपासनीस. श्री. गुरलींगप्पा घटब्याळे, कोषाध्यक्ष. श्री. वीरभद्रप्पा मुरके, मंत्री. श्री. गुरपादप्पा बेळुरे, पुस्तकाध्यक्ष, समाजचिटणीस. समाजाला देणगी ह्मणून खालील सद्गृहस्थांनी अभिवचनें व नगदहि कांहीं दिलें.

अभिवचनें

श्रीमान माधवराव देसाई ४० ( टीन ) अभिवचन. श्री. गुंडेराव पाटील २५ रुपये. श्री. गुरबस पाटील ५ रु.. श्री. विश्वनाथ मंती ५ रु. श्री. बंडप्पा मजगे ५ रु.

नगदी देणाऱ्या व्यक्ति

श्री. झराप्पा पाटील २ रु.; श्री. शंकरस्वामी १ रु.; श्री. शरणप्पा लक्षटे १ रु.;श्री. प्रभुरावजी वकील ३ रु.; श्री. संगप्पा कटे १ रु.; श्री. शिवलिंगप्पा पटणे ४ रु.[साह्य]; श्री. नागप्पा गारटे ४ रु.; श्री. गुराप्पा धनुरे ४ रु.; श्री. विश्वनाथ गारटे २ रु.;श्री. संगाप्पा लांडगे १ रु.; श्री. संग्रामप्पा कडगे १ रु.; श्री. बसप्पा चनाळे १ रु.; श्री. वीरभद्र मुरके ४ रु.;

याप्रमाणे रक्कम वसूल झाली आहे.

## लातुर

२५-९-३६ रोजी ५० वर्षांपासून समाजाशीं भिन्न असलेले रा. महादप्पा शिवलिंगप्पा अंकलकोटे राहणार इंद्रठाण ( रेणापूर ) यांच्या प्रार्थनेनुसार त्यांच्या कुटुंबांतील सर्व मंडळींना वीरशैवदीक्षा देऊन पंक्तिपावन करून घेण्यात आलें आहे. यापुढे यांच्याशीं रोटी-बेटीव्यवहार करण्यास कोणतीच हरकत नाही. यांच्याबरोबर सहभोजनास १५० मंडळी हजर होती.

यांच्या सदाचाराबद्दल मोठमोठ्या लोकांचे योग्य अभिप्राय आहेत. लातूर-वीरशैवांच्या या स्तुत्य कामगिरीबद्दल कोणीहि धन्यवाद देईल यांत शंका नाही.

## सांगली

सांगली संस्थान वीरशैव-परिषदेचें अधिवेशन ता. २६-२७ सप्टेंबर रोजी श्री. पंडित आप्पा चिकोडी, बी. ए., एम्. एल् सी., ह्यांचे अध्यक्षतेखाली सांगली येथे यशस्वीपणें पार पडलें. इतर ठरावाबरोबरच मठसंस्थान व मठाधिकाऱ्याविषयीं पुढील महत्वाचा ठराव पास झाला.

ठरावः—"आपल्या समाजांतील मठसंस्था ही अत्यंत उपयुक्त अशी सामाजिक संस्था असल्याने समाजाच्या धारण, पोषण व उन्नतीस अत्यावश्यक आहे. परंतु कांहीं मठाच्या हल्लींच्या परिस्थितीवरून ते समाधानकारक रीतीनें कार्य करीत नाहीत असें दिसतें. मठव्यवस्था लोकमतानुवर्ती असावी असें या परिषदेचें मत आहे. ह्मणून मठाधिकार देताना योग्य व सदाचारी बटूची निवड करण्याबद्दल व ह्या बटूकडून खालीलप्रमाणें करारपत्रः- "मी धर्म-समाज-हितासच मठाचा उपयोग व त्याच्या उत्पन्नाचा विनियोग करून स्वतः धर्मतत्वाप्रमाणें सदाचाराने वागेन व समाजसेवेंतच आयुष्य कंठीन. असें न वागल्यास मला त्या मठाधिकाऱ्यापासून काढून टाकण्याचा अधिकार समाजास राहील; नंतर समाज सांगेल तेथे व सांगेल तसें रहाण्यास मी कबूल आहें. अशा आशयाचें करारपत्र करून घ्यावें अशी या परिषदेची शिफारस आहे."

## महाराष्ट्र वीरशैव हि सं. मंडळवृत्त

### खानदेशविभागांत

### दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांचा दौरा

वीरशैवसंजीवनी वृत्तपत्र व महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ ह्यांचे प्रचारकार्यार्थ दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, श्रीमंत राजाभाऊ शेट कुळी, रोहिणखेडकर मंडळाचे उपाध्यक्ष, चिखलीचे श्रीमंत गोविंदराव बोंद्रे, व मंडळाचे ज. सेक्रेटरी श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., हे खानदेश-विभागांत ता. ३ नोव्हेंबर ते १० नोव्हेंबरपर्यंत दौरा काढणार असल्याचें समजतें.

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांचे धुळें येथील "सरस्वती व्याख्यानमालेंत" मंगळवार ता. ३ नोव्हेंबर १९३६ रोजीं सायंकाळी ६ वाजता 'मराठी वाङ्मय व व्यवहार" ह्या विषयावर मालेतर्फे व्याख्यान हाणार असल्याचेंहि कळतें.

## शोचनीय निधन

नागपूरला श्री. तानबाजी दलाल म्हणून एक जंगमाचें प्रसिद्ध घराणे आहे. त्यांचे शिक्षित पण धाकटे चिरंजीव म्हणजे दारव्ह्याचे श्री. रामलिंगस्वामी पुराणिक ह्यांचे जामात ता. ८ ऑक्टोबर रोजीं मृत्यु पावल्याचें दुःखद वर्तमान ऐकून सर्व वीरशैवांना हळहळ वाटत आहे. परमेश्वरानें मृतात्म्यास शांति द्यावी व सर्व कुटुंबाने दुःख गिळून भावी आयुष्य विधिघटना म्हणून शांततेनें कंठावें.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरूं होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरूं होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा; कारण हें पत्र पाक्षिक आहे, व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगावकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १ नोव्हेंबर १९३६ ( अंक २१ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# माहेश्वरवर्गांत सुधारणावादी खळबळ उडविणारे !!

## "वी० संजीवनी"चे दोन नवमतवादी व उद्बोधक लेखक

गुरुवर्गीय नवमतवादी लेखक.



श्री. तु. ना. काटकर, अध्यापक, चिमूर (C.P.)

वऱ्हाड-वीरशैवांतील तरुण कार्यकर्ते व लेखक.



श्रीमंत डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर, H M.D.I.,
चांदूर बाजार.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति कार्तिक कृ० ३ शके १८५८ ( अंक २१ वा.

# वीरशैव-हितसंवर्धक-मंडळाची भूमिका

रोहीणखेड, जिल्हा बुलठाणा, येथे श्रीमंत रामप्पाशेट कुळी ह्यांच्या सद्प्रवृत्तीने श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या वीरशैव-परिषदेपुढे 'महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळा' ची योजना आम्ही ठेवली होती. परिषदेच्या विषयनीयामक मंडळांत आमच्या योजनेवर चर्चा होऊन मंडळाची घटना तयार करण्याकरिता एक कमिटी नेमली व परिषदेंत तसा ठरावहि झाला. त्याप्रमाणे घटना-कमिटीची बैठक होऊन ती कायम केली व वाचकांच्या माहितीकरिता ती आजच्या अंकांत प्रसिद्धहि केली आहे.

वऱ्हाड-मध्यप्रांतांतील मूठभर वीरशैवांना 'महाराष्ट्र' ह्या नांवाखाली सदर मंडळ स्थापन करण्याचा काय अधिकार असा एक प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे. कोणत्याहि कार्याची मुहूर्तमेढ उभारावयाची झाल्यास ती प्रथम थोड्या व लहान समजल्या जाणाऱ्या लोकांकडूनच उभारली जाते. गंगेसारखी महानदीसुद्धा उगमाच्या ठिकाणी थेंब थेंब पाण्यानेच वाहत असते, व पुढे तिचें मोठें पात्र बनतें आणि तीच गंगा पतितोद्धारी म्हणून पुढे गणली जाते. हा मानवी कर्तृत्वाचा नियम नव्हे, तर निसर्गरूपी परमेश्वराचीच ही सहज कृति होय. तेव्हां हें जें घडलें तें निसर्गाच्या न्यायानेच घडलें.

महाराष्ट्र-वीरशैव हितसंवर्धक मंडळांत मध्य-प्रांत-वऱ्हाड-खानदेश-मोगलाई ह्यांतलि मराठी जाणणारेच वीरशैव येऊन बसतील व त्यांनीच ह्यांत येऊन बसावें हीच कांहीं ह्या मंडळाची मर्यादित भूमिका नाही, तर मराठी जाणणारा वा त्यावर प्रेम करणारा कोणताहि वीरशैव मंडळाचे उद्देश व घटना मान्य करून ह्या मंडळांत येऊन बसतो व मंडळाची सेवा करण्यास व मंडळाकडून सेवा घेण्यास पात्र ठरतो. तथापि कोणीं आपल्या सोयीकरिता वा कांहीं विवक्षित मर्यादेकरिता स्थानिक स्वरूपाचें मंडळ स्थापन केलें तर त्याला उत्तेजन देणें हें आमचें व आमच्या मंडळाचें कर्तव्य आहे. म्हणून ज्यांना आपल्यापुरत्या संस्था स्थापन करावयाच्या असतील व ज्यांनी केल्या असतील त्या सर्व संस्था आमच्या मंडळास उपकारकच होतील- त्या उपकारक होतील अशीच महाराष्ट्र-वीरशैव - हितसंवर्धक - मंडळाची घटना व उद्देश आहेत. तेव्हा महाराष्ट्र - वीरशैव - हितसंवर्धक-मंडळ कोणास आडवें येईल अशी कोणाहि सुज्ञाने कल्पना करून घेऊं नये.

आमच्या मंडळांत एकदाच २५० रु. वा त्यापेक्षा अधिक देणगी देणारांनाच वाव आहे असें नाही, तर कमीत कमी सालाचे रु. २ देणारांना-सुद्धा वाव आहे. इतकेंच नव्हे तर ज्यांना रु.दोनहि देण्याची शक्ति नाही, पण जे मंडळाचे कांहीं स्वयंप्रेरणेने कार्य करतील, त्यांना-सुद्धा हक्काने मंडळांत येऊन बसण्याचा अधिकार आहे. अशा प्रकारें सर्व प्रकारच्या श्रीमंत व गरीब अशा स्त्रीपुरुषांना प्रभूने प्रेरणा केल्यास मंडळाची सेवा करण्याचा व सेवा घेण्याचा अधिकार आहे. अशा प्रकारें समाजरूपी शिवदेवाशीं तद्रूप होऊन शिवपूजन करण्या-करिता चालत्या-बोलत्या शिवदेवाचें मंदिर उघडें झालें आहे. कारण प्रत्येक वीरशैव हा साक्षात् चालता-बोलता शिवच होय. त्यांच्या हृदयीं शिवाचें वास्तव्य आहे ही प्रत्येक वीरशैवाची प्रत्येक वीरशैवाविषयीं कल्पना असावी व असणें हेंच खऱ्या शिवभक्तीचें मूळ लक्षण. म्हणून प्रत्येक वीरशैव एकमेकाचें भक्तिभावाने पूजन करीत आहे हें चित्र दिसणें हेंच खऱ्या समाजसंघटनेचें लक्षण होय.

माहेश्वरमूर्तिसह लिंगधारी बंधूंना भोजन घालणें व शिवपूजनाचें पुण्य जोडणें ही वीरशैवांत अनंतकाळची चाल आहे कालमानाने ह्या चालींत आज शैथिल्य आलें असेल; पण अजून ती प्रथा कमी-अधिक प्रमाणांत सुरूंच आहे. ह्या प्रसंगीं यजमान प्रथम माहेश्वरापासून तो साधारण लिंगधाऱ्यापर्यंत सर्वांच्या इष्टलिंगाची व नंतर सर्व मूर्तींचें पूजन करीत असतो आणि नंतर संकल्प सुटून भोजनाला सुरुवात होत असते. त्यांत इष्ट-लिंग म्हणजे साक्षात् शिव व त्याचेच चालतें-बोलतें प्रतीक म्हणून इष्टलिंगधारकाचें शरीर. ह्यास्तव पुढे त्यांचीहि पूजा. भोजनोत्तर ह्या सर्वांचा संतोष म्हणजे साक्षात् शिवाचा संतोष ही भावना असते व होते. ह्याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, प्रत्येक वीरशैवाने प्रत्येक वीरशैवाच्या ठिकाणीं शिवस्वरूप पाहून त्यांचेंच मनोभावें पूजन कराव-यास शिकावें.

ह्याप्रमाणे प्रत्येक वीरशैवाने वीरशैवाचें पूजन करावयास शिकणें व तत्पर असणें ह्यांत समाज-धारणेला पोषक असलेल्या धर्माची खरी किती आहे. ह्या पूजनामुळे समाजबंधूंची चिंता वाहणें ही आपल्यावर एक आवश्यक जबाबदारी असते. चार वर्ण, चार आश्रम, व चार पुरुषार्थ हीं परि-णत झालेल्या समाजधर्माचीं खरीं लक्षणें होत. त्यांत विषमतेला वाव नाही, तर शुद्धबुद्धियुक्त कर्तव्यशक्तीला वाव आहे. आणि हेंच वीरशैव-धर्माचें बसवेश्वरपूर्व व बसवोत्तर असें परिणत झालेलें स्वरूप आहे. आपआपल्या घरीं चार वर्णांचे चार वीरशैव व्यवहारकर्म करीत आहेत, पण ते एकाच भक्तीने एकाच शिवदेवाचें पूजन करितां-करितां चार आश्रमांतून व चार पुरुषा[illegible]

यांतून शेवटच्या स्थितींत गेले म्हणजे तेथे विषमता आहे असें कोण म्हणेल आणि त्यांत अष्टावर्णांचे हेतु, पंचाचाराचा उगम आणि षट्स्थलाची प्राप्ति नाही असें तरी कसें म्हणणार ? बसवकालीन शिवशरणांच्या ज्या कथा आहेत त्यांत परिठाचें परिठत्व सुटलें, चांभाराचें चांभारत्व दुरावलें, असा उल्लेख नसून, हे सर्व भिन्नवर्णीय शुद्धबुद्धीच्या कर्तव्यानें बद्ध झाल्यामुळे चारहि वर्णांतील पुरुष एकमेकांच्या गळ्यांतील ताईत होऊन बसले होते. महाराष्ट्रांतील संतकाळ हा ज्याप्रमाणे वर्णव्यवस्थेतील साम्य सिद्ध करणारा झाला तद्वतच व तत्पूर्वी बसवकाळ हा तेंच साम्य सिद्ध करणारा झाला. आज ही स्थिति आपल्याला उत्पन्न करावयाची आहे. आणि प्रत्येक वीरशैवानें वीरशैवाचें मनोभावें पूजन करून वीरशैव उन्नत होत असल्याची व झाल्याची संघशः गर्जना करावयाची आहे. 'वीरशैव हितसंवर्धक मंडळ' महाराष्ट्रीय वीरशैवांत तीच भावना जागृत करण्याकरिता निर्माण झालें आहे. अर्थात् ह्या संस्थेच्या आधारें आपण सर्व एकमेकांचे शिव म्हणून पूजन करावयास शिकणार व संघटित होऊन कालपरत्वें उत्कर्षाचें शिखर गांठणार.

'वीरशैव हितसंवर्धक मंडळा'-ला कोणत्याहि स्थानिक संघटनेशीं वा संस्थेशीं फारकत करावयाची नसून, त्या सर्व संस्थांचें कार्य आपल्याच पोटांत समाविष्ट झालें आहे आणि ते आपण सर्व एकच आहोंत हीच भावना वाढवावयाची आहे. म्हणूनच कोणत्याहि स्थानिक-संस्थेच्या चालकानें ह्या मंडळास हातभार लावला तर मंडळाच्या कार्यकारी मंडळास त्याला येऊन बसतां येते. आज महाराष्ट्रीय वीरशैवांची समाजस्थिति असावी तशी समाधानकारक नाही. मठसंस्था मोडकळीस येऊन कर्तव्यभ्रष्ट होत आहेत. विवाहसंस्था अनियमित झाल्या आहेत शिक्षणाच्या सोयी नाहीत, आर्थिक स्थिति मंदावली आहे. त्यामुळे औदासिन्य, मत्सर, ह्यांची वाढ होऊन समाजाची प्रगति कुंठित झाली आहे. 'वीरशैव-हितसंवर्धक मंडळा'-सारख्या मध्यवर्ती संस्थेकडून मठसंस्था ह्या ह्याच स्थितींत कशा कार्यक्षम होतील, शिक्षणाचा कसा प्रसार होऊं लागेल, आर्थिक स्थिति परस्परसहकार्यानें कशी सुधारेल, विवाहसंस्थांत पावित्र्याची वाढ होऊन भावी पिढी सुदृढ व संस्कृतिसंपन्न कशी तयार होईल, ह्या विचारांचें इतकें बीजारोपण करावयाचें कीं, सर्व वीरशैव एक व वीरशैव वीरशैवाकरितांच मरतील व जगतील ही भावना त्यांच्यांत जागृत होईल.

युवकांच्या वा तरुणांच्या ज्या निरनिराळ्या संस्था सर्वत्र स्थापित झाल्या आहेत व होत आहेत त्यांचें सहकार्य संपादणें व त्यांना सहकार्य देणें हें आमच्या संस्थेचें पहिलें कार्य आहे. हें कार्य करीत असतां गुरु-विरक्तवाद वा बसव-पंचाचार्यवाद ह्यांना दुय्यम स्थान देऊन सर्व वीरशैवमात्रांत स्नेहभाव उत्पन्न होईल असें कार्य करावयाचें आहे. म्हणून प्रथम 'वीरशैव हितसंवर्धक मंडळा'-चे सभासद जिकडे-तिकडे पाठवून सदर मंडळास स्थानिक स्वरूप प्राप्त करून देण्याचा उद्योग सर्व वीरशैवांनी वीरशैवांचें पूजन आहे ह्या भावनेनें केला पाहिजे. श्रीमंत बाबासाहेब देशमुख ह्यांच्यासारखे कुलीन व श्रीमंत सद्गृहस्थ संस्थेला अध्यक्ष लाभले. श्रीमंत काशीनाथआप्पा आडगांवकर आणि श्रीमंत रामाप्पा शेठ कुल्लीसारखे सर्व प्रकारचे साहाय्यक संस्थेच्या कार्याची धुरा खांद्यावर घेऊन पुढे आल्यामुळे ही संस्था लवकरच रजिस्टर होऊन, कार्यतत्पर व सुविद्य महाराष्ट्रीय वीरशैव तरुण ह्या संस्थेच्या छत्राखाली येऊन संस्थेच्या कार्याचा विजयध्वज उभारतील अशी उमेद आहे.

# नवमतवाद व नववीरमाहेश्वर मंडळाची आवश्यकता!

( पूर्वार्ध )

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

" प्रसंगानुसार वागण्यांतच धर्माचें व राष्ट्राचें संरक्षण आहे "

श्रीमनू.

## दोन शब्द

शीर्षक वाचतांक्षणींच आजच्या प्रसंगीं माझ्या लिखाणाचा ओघ काय आहे हें धूर्त वाचकांच्या लक्षांत येऊन गेलेंच असावें. पण वाचकांच्या अपेक्षेपुढे आजची मजल आहे. श्री. **बाबुराव चौधरींच्या 'नवमतवादा' च्या** लाटेनंतर ज्या अनेक लाटा समाजसागरांत उपस्थित झाल्या त्यांतलीच **श्री० सिद्धाराम- स्वामी माजलगांवकर** यांनी जर्मनीस जातेवेळीं कल्पित करून ठेवलेली व तिला पुढें **श्री० रामशंभुस्वामी पुराणिक** यांनी चालना दिलेली आजची प्रस्तुत लाट त्या सर्वांत वरच्या दर्जाची असून, विचारार्ह आहे. करिता त्यासंबंधाने कोणत्याहि नवमतवादी चिकित्सक अंतःकरणी पुरुषास ही योजना पटेल याच दृष्टीने व ध्येयाने आज येथे दोन शब्द लिहिण्याचें आह्मींहि ठरविलें आहे.

## मंडळाची आवश्यकता कां ?

पृथ्वीच्या पाठीवरील आज जिवंत असलेल्या दरेक धर्मांच्या इतिहासाकडे आज आमच्या समाजांनी उघड्या नेत्राने अवलोकिल्यास त्यांत त्यांना कालमानाप्रमाणे दरेक धर्मांत बदल होत आलेला आहे हेंच प्रामुख्याने आढळून येणार आहे. ५ व्या शतकांत वैदिक धर्माचीं तत्वें लंगडी पडूं लागल्यामुळे बौद्ध धर्म बोकाळला नि मुख्य धर्म ठरला गेला. पण २०० वर्षें लोटल्यानंतरहि ह्मणजे ८ व्या शतकांत **श्रीमदाद्य शंकराचार्यांनी** कंबर कसून कालमानाप्रमाणें धार्मिक मतांची पुनर्घटना उभारल्यामुळे त्याचें अस्तित्व आज आपल्यास बघावयास मिळत आहे हें आपलें भाग्यच समजा. ह्मणून आज आपणास आपल्या 'वीरशैव धर्मा'-तंच काय पण पुनश्च **हिंदुधर्माच्या** तत्वांतहि बदल करण्याचा काल आला आहे. नि आचार्यपीठावरून **डॉ. कुर्तकोटींनी** धर्मजागृतीचें रणशिंगहि फुंकलें आहे. याच्या उलट वीरशैवांच्या आदर्श आचार्यपीठावरील दांभिक विभूति कशा घोरत पडलेल्या

आहेत याचा प्रत्यक्ष पुरावा **डॉ. आ. सो. संगोकर,** यांनी 'आमच्या मठाधीशांची दिनचर्या' या वी. सं.-तील १-७-३६ च्या अंकांतील लेखाच्या द्वारें उत्तम प्रकारें आमच्या वाचकांपुढे ठेवलाच आहे. याकरिताच आचार्य विद्वान् नि सुसंस्कृत पाहिजे. यावरून आज एवढेंच अनुमान काढावयाचें आहे कीं, आमचे लोक पदाधिकारावर येतांच दांभिकपणा कसा फैलावतात नि दुरुपयोग कसा करितात, स्वतःच्या अवडंबराशिवाय जगाची तर दूरच राहो पण ज्यांच्या माथ्या आपण आज या पदावर येऊन पोहचलों आहों त्यांच्यांतदेखील काय चाललें आहे याचेंसुद्धा भान राहत नाही, आचार्यपीठाचें कर्तव्य काय तें कळत नाही. अवडंबरांतच सारें धर्मतत्व गोविलें आहे याची भुरळ पाडतात. म्हणावें महाराज, तें विसरा आता. तुमच्या ओंजळीनें पाणी पिण्याचे दिवस आता संपुष्टांत आले आहेत. उलट, आह्मालाच आता आपणास पाणी पाजावें—नव्हे, दाखवावें लागणार आहे. ह्मणूनच आजच्या प्रसंगीं "नववीरमाहेश्वर मंडळा"-च्या घटनेचा विचारविनिमय करण्याचा सुयोग आला आहे. आचार्य सुविद्य नि चाणाक्ष असते तर 'नववीरमाहेश्वर मंडळा' ची मध्यस्थी उपस्थित करण्याचें कारणच उरलें नव्हतें.

## मंडळाचें प्रादेशिक क्षेत्र.

श्री. चौधरींनी मागील एका अंकीं याच भागांतील कांही माहेश्वरांचीं नांवें सुचवून प्रस्तुत स्वरूपाचें एखादें मंडळ स्थापावें अशी सूचना केली होती. पण ती सूचना आमचे मताला अगदींच संकुचित वाटते. याचें कारण असें पहा. हा प्रश्न केवळ वऱ्हाड-मध्यप्रांतांतीलच वीरशैवांकरिता नसून, अखिल वीरशैवसमाजाकरिता आहे. म्हणून निव्वळ आपल्या भागापुरतेंच बघून चालावयाचे नाहीं. अशानें द्वंद्व निर्माण होतील नि उद्दिष्ट कार्याच्या सामर्थ्यशक्तींत कमीपणा येईल. यद्यपि या मंडळाच्या स्थापनेचा विचार करितांना मंडळाचें क्षेत्र जेवढें वाढवितां येईल तेवढें वाढविण्याचा प्रयत्न करावा ह्मणजे—आपला समाज वऱ्हाड-मध्यप्रांत, कर्नाटक निजाम, युक्तप्रांतप्रभृति भागांत दूरवर पसरला आहे त्या अर्थी त्या प्रत्येक भागांतून लोकसंख्येच्या प्रमाणांत मंडळाकरिता सभासद घेण्यांत यावे. उद्देश इतकाच कीं, सर्व भागांतून एकदम नवमतवादाला चालना मिळावी. अमूक एखादा भाग वगळला गेला आहे, नि ते आमचे बांधव सनातनीच राहून नवमतवाद्यांचे विरुद्ध आपल्या मताचें वर्चस्व प्रस्थापित करण्यास्तव असे आस्तिन्यांतच निखारे राखून ठेवायला नकोत. जें कांही करावयाचें तें एकदम करून सोडावें. ह्मणून ज्या-ज्या भागांतून मतें मिळवितां येतील त्या त्या सर्व भागांतून मतें मिळवूनच असल्या "नववीर माहेश्वर मंडळा"-ची स्थापना करण्यांत यावी. ह्मणजे सर्व भागांत एकदम नवमताची जागृति करण्यास सोपें होईल, नि कोणाहि कर्मठास उपरोधिक शिष्टाई करण्यास वाव नि स्थळ शिल्लक राहणार नाही. आपल्या भागापुरतेंच जर आपण असें मंडळ नियोजिलें तर ह्या आप्पलपोटेपणाचा फायदा आपल्या सनातन्यांना चांगल्या प्रकारें घेतां येईल. ह्मणजेच आपल्या भागांतील सनातनी इतर भागांतील सनातन्यांचें सहकार्य घेतील नि आपली अर्थात् नवमतवाद्यांची बाजू पंगू करण्याचे प्रयत्न चालवितील. यद्यपि या 'नववीरमाहेश्वर मंडळा'-ची योजना करितांना विस्तृत दृष्टि ठेवूनच हें कार्य पूर्ण यशस्वी करून सोडलें पाहिजे. किंवा हें जर शक्य नसेल तर प्रत्येक विभागांत असल्याच तऱ्हेची प्रांतवार मंडळें स्थापण्याची घटना चालविली पाहिजे. अशीं दरेक विभागांतील मंडळें स्थापून झाल्यावर त्यांच्यावरील एक विशिष्ट मंडळ ह्मणून त्यांच्यांतूनच पुनः निवडक माहेश्वरांची निवड करून "**अखिल भारतीय नववीरमाहेश्वर मंडळ**" स्थापण्यांत यावें, व या मुख्य मंडळाच्या योजनेप्रमाणें

पायऱ्यानुक्रमानें अखिल-भारतीय- वीरशैव-समाजाचे सूत्र हाकलण्यांत यावें नि धार्मिक निर्बंध नवमताच्या तत्वावर आंखून व ते कृतींत उतरवून नव्या तत्वान्वयें नव्या जगांत नवा वीरशैवधर्म दिसूं लागावा हीच आमची हार्दिक प्रबळ इच्छा आहे.

## भव्यतेमुळे अशक्यतेची शक्यता

एखादें असंभाव्य विधान बोलून जाणें वा कोणत्याहि प्रकारचे शक्य अथवा अशक्य लेख लिहून काढणे म्हणजे कांही कार्य घडवून आणणें नव्हे, तर उलटपक्षीं हें जितकें सोपें नि सरळ आहे तितकेंच त्या कार्याची पूर्ति करणें अवघड वा अशक्य आहे. प्रस्तुतची योजनाहि याच न्यायाची आहे. म्हणून ती येथेच सोडून देण्यांत आमचा पुरुषार्थ आहे असेंहि कोणी कबूल करणार नाही. तर अशक्य भासणाऱ्या गोष्टीहि शक्य करून दाखविण्यांतच पुरुषांचा खराखुरा पुरुषार्थ आहे. पण पुरुषार्थ कितीहि असून उपयोग नाही. त्याला संघशक्तीच्या सामर्थ्याची जोड हवी आहे. मग मात्र कार्य कितीहि भव्य नि अशक्य असलें तरी तें शक्य कोटींतील म्हणतां येईल.

संघशक्ति निर्माण व्हावी कशी हा भयंकर प्रश्न आहे. ज्या मूठभर समाजांत 'एकी'-चा लोप होऊन विरक्तवाद, पंचाचार्यवाद नि बसवादि अनेक वाद उपस्थित होऊन, 'बेकी'-चा उदय झाला आहे त्या ठिकाणी जुनें घालवून 'नवें' निर्माण करायचें म्हणजे कांही सामान्य कोटिक्रम नव्हे. त्यासाठी भरभक्कम यत्नांचाहि उपयोग केल्यास निष्फळ होईल. म्हणून 'बेकी'-चा नायनाट करा नि मग नवमतवादाच्या अत्युच्च ध्वजाखाली फक्त 'समाजसत्ता' हा एकच वाद निर्माण करा कीं कसलेहि नि कितीहि भव्य वा अशक्य 'साध्य' असलें तरी तें 'शक्य' आहे.

## धार्मिक तत्वांचें क्षेत्र

आज जगाच्या पाठीवर असेहि कित्येक प्रदेश आहेत कीं, तेथील जनतेस 'धर्म' म्हणजे काय चीज आहे याचा त्यांना पत्ताहि नाही. पण त्याहि ठिकाणी सामाजिक कार्य व्यवस्थित चाललेलें आढळून येईल. कित्येक सुधारणेच्या शिखरावर पोहचलेल्या राष्ट्रांनी तर धर्माच्या वेड्या साफ झुगारून दिलेल्या आहेत. पण तेथेहि सामाजिक जीवन अगदी घड्याळाच्या काट्याप्रमाणे तोलून चाललेलें दिसून येईल. याचा अर्थ कोणींहि उलट करून घेण्याचें कारण नाही. पुढे मांडण्याचें तात्पर्य एवढेंच कीं, धार्मिक बंधने नसण्यापेक्षा असणें चांगलें. पण तीं कालमानाप्रमाणें चालण्यास परवडतील अशींच पाहिजेत. धार्मिक बंधनाचा मुख्य उद्देश विसरून गतानुगतिकत्व प्राप्त झालें आहे. तेंच आज नको आहे. हिंदु, बौद्ध, इस्लाम व ख्रिश्चन ह्याच चार धर्मांनी आज पृथ्वीवरील पांची खंड व्यापले आहेत. त्यांतील पहिले दोन धर्म हिंदुस्थानचे असून, हिंदुधर्म म्हणजे एके काळी सर्वांत श्रेष्ठ गणिला जात असे. किंबहुना त्याची श्रेष्ठता स्वामी विवेकानंदासारख्या विभूतीने आखिल जगतास पटवून देऊन कबूल करण्यास भाग पाडले होते. पण आज त्याच धर्माचे लोक परधर्मांत जाऊं देण्यापर्यंत त्या धर्मात पाळी आली आहे. तेंच ख्रिश्चन - इस्लामधर्मांकडे पहावें, तर आज त्यांच्या धर्मांची बंधनें किती विस्तृत नि उदारस्वरूपाची झालीं आहेत हें त्यांच्या धर्मांच्या वाढत्या प्रमाणाच्या तत्वावरून नि योजनेवरून सहज कळून येण्यासारखें आहे. मग आता कोणता धर्म श्रेष्ठ समजावा ? मूळ मुद्दा काढावयाचा तो एवढाच कीं, प्रसंगोपात्त जो धर्माची मर्यादा आखील तोच धर्म नि धर्मात्मा श्रेष्ठ. निदान हें आजच्या काळांत तरी कबूल केलेंच पाहिजे.

स्वधर्माच्या पोकळ स्वाभिमानाच्या आहारीं न पडतां ज्या धर्माची मतें विचारी मनाला पटतात त्याची कबूली देणें ह्मणजे हा कांही गुन्हा नाही. तो जर गुन्हा ठरत असेल तर गुन्हेगार बनूं नका. अर्थात् स्वधर्माच्या आकुंचित तत्वांत उदार अंतःकरणाने बदल करा. आजच्या प्रसंगीं ही आमची स्पष्टोक्ति आगांतुक होणार नाही अशी आमची मनोमन खात्री आहे. मुख्य धर्माच्या ध्येयाची नि तत्वाची जर आज अशी दैना येऊन पोहचली आहे तर त्याच्या उपधर्मांची एवढी हीन स्थिति राहिल्यास मोठेसें आश्चर्य नाही. उलट, तसें न होणें हेंच आश्चर्य होईल. पण तें कांही असो. जगांतील मुख्य चार धर्मांच्या बरोबरीने जर आज हा पांचवा ' वीरशैवधर्म ' नेऊन बसवावयाचा असेल तर त्याच्या धार्मिक तत्वांत आज अगदींच उलथापालथ घडवून आणणें अत्यावश्यक आहे. व याचकरिता आज आह्मांला ' नववीर माहेश्वरमंडळाची ' जरूर भासत आहे. त्याविना त्याला नवीन स्वरूपाचें तेज प्राप्त होण्याची आशा दिसत नाही.

---

# वीरशैवांतील पोटजाती व त्यामुळे होणारे घोटाळे

लेखक.—श्री० वैजिनाथआप्पा एन्० कापसे, पिंजर ( वऱ्हाड ).

---

प्रत्येक समाजाकडे थोडें सूक्ष्म दृष्टीने पाहिलें असतां ते आपआपल्यापरीं सर्वांगीण उन्नति कडे जाऊं पाहात आहेत. ह्या सर्वांचें कारण थोडें बुद्धीला चालना देऊन बघितल्यास उच्च शिक्षण हें होय !

चोहोंकडे शिक्षणप्रसारक संस्था व तत्संबंधी प्रचारकार्य आपले पुढारी करीत असतां, आमच्या खेड्यांमधून वीरशैव-पोटशाखेंतील घोटाळे अजू. नहि अस्तित्वांत असावे ही फार लाजिरवाणी गोष्ट आहे.

रायचूर येथे जून महिन्यांत झालेली अखिल-भारतीय वीरशैव महासभा व एप्रिलमध्ये रोहिणखेड येथे झालेली परिषद् म्हणजे वीरशैवसमाजांत क्रांति घडून आणणाऱ्या सभा नव्हत असें कोण म्हणेल ?

एकीकडे आमचे पुढारी समाजाचा गाडा सामाजिक, बौद्धिक, आर्थिक सुधारणेच्या उच्च अशा ध्येयाकडे नेत असतां त्यांस मुठभर कर्मठांनी मागे ओढण्याचा प्रयत्न करावा हें त्यांना उचित नव्हे. नवमतवादी हें आपलें इच्छित ध्येय गाठल्याशिवाय केव्हाहि राहणार नाहीत. तेव्हा थोड्याशा कमी पुराणमतवाद्यांनी आह्मांस उगीच त्रास देण्यांत काय बरें होईल. स्वतः ते मात्र हास्यास्पद होतील. अशा लोकांना माझे मित्र श्री. बाबुराव चौधरी, तसेच पसवचे सुप्रसिद्ध

वकील आप्पासाहेब एकलारे, चांदूर-बाजारचे डॉ. आप्पाराव संगेकर, गुरुवर्गीय चिमूरचे श्री. काटकर, व दारव्ह्याचे श्री. रामशंभु पुराणिक, महिलावर्गांतील अमरावतीच्या कु. रत्नावती कुन्दे, व अक्कलकोटच्या सौ. गंगाबाई पटणे, तसेंच लघुकथालेखक श्री. सिद्रामआप्पा एस्. कुन्दे, वगैरे सुधारणावादी लेखक 'वीरशैव संजीवनी'-तून मधून-मधून सन्मार्गरूपी डोस देत आहेतच.

आकोला, मूर्तिजापूर, कारंजा, दारव्हा, मंगरुळपीरमधीलखेडी-पिंजर, पातूर, गिंम, मोहरी, मोहगण, खडीधामणी, शेलूबाजार, ह्या सर्व खेड्यांमधून बहुतेक दोनच म्हणजे शीलवंत व दीक्षावंत शाखेंतील लिंगायत आहेत. परंतु ह्या परस्परांचे बेटीव्यवहार तर राहोच परंतु सर्रास रोटीव्यवहारदेखील अद्यापि सुरूं नाहीत ही फार लांच्छनास्पद गोष्ट आहे. व ह्यापुढेहि ही प्रथा किती वर्षे चालेल हें कळत नाही. ह्याकरिता पुढाऱ्यांनी इकडे अवश्य लक्ष द्यावें.

काँग्रेससारख्या संस्थेचें लक्ष आज फैजपूरसारख्या खेड्यामध्ये वेधलें आहे. तेव्हा आमच्या वीरशैव पुढाऱ्यांचें देखील लक्ष खेड्याकडे कां लागूं नये ? अंधश्रद्धेने, धर्माचे पांघरुणाखाली दडपलेल्या दीन-अज्ञान अशा बांधवांस ज्ञानरूपी अमृत पाजून व त्यांना खऱ्या धर्माची व आपले कर्तव्याची जाणीव करून देऊन सन्मार्गाचें उच्च असें ध्येय गाठण्याचा सुगम मार्ग तुमच्याशिवाय कोण बरें दाखविणार ! तेव्हा श्री. नानासाहेब बामणगांवकर व त्यांचे साहाय्यक यांना मी नम्र विनंती करितों कीं, जोपर्यंत आपण अशा लोकांना धर्माची खरी जाणीव करून दिली नाही तोपर्यंत समाजसुधारणा व संघटना होणेंच मुळीं शक्य नाही.

कोणत्याहि का होईना, सभेंतील ठरावाप्रमाणे तें कार्य जर प्रत्यक्ष कृतींत घडलें तरच ह्या सभेचें महत्त्व सर्वांना पटतें, नाही तर नुसते कागदी ठराव पास करून काय उपयोग !

तेव्हा श्री. नानासाहेब बामणगांवकरांना मी फिरून विनंती करतों कीं, आपण वेळांत वेळ काढून आपल्या फुरसतीचे वेळीं ह्या आमचे भागास दौरा जरूर काढाल अशी मला उमेद आहे. याबद्दल मी व्यक्तिशः आपणांस आग्रहाची विनंती करीत आहें.

वीरशैव सुशिक्षित तरुणांनो, फाजील धर्मकर्मठ सनातन्यांना सोडून द्या, खरा धर्म तोच कीं ज्यांत सत्य आहे. तरी सत्यास सोडूं नका. स्वतःच्या हिंमतीवर व कर्तबगारीवर पुढे या, आणि आपल्या ज्ञातिबांधवांना सुसंस्कृत करा. नैतिक भावनेची प्रबळ इच्छा धारण करा. परस्पर प्रेम वाढेल असें करा. म्हणजे तो सच्चिदानंद दयाघन प्रभु तुमची इच्छा पूर्ण करील.

---

# वीरशैवसमाज व सुधारणा

लेखक.— श्री० कृष्णाप्पा रुद्राप्पा कल्लुरे, चांदा.

लेखांक १ ला

## वीरशैवांना तरी नवमतवाद नवा नाही ! मग भीति कां ?

जो कां सर्वा भूतांचे ठायीं । द्वेषातें नेणेंचि कांही ॥ आपपरु नाही । चैतन्या जैसें ॥१॥

' ज्ञानेश्वर '.

चैतन्यांत जशी आपपरभावना नाही, अथवा वरुणदेवता गोमातेला पाण्यासमान किंवा व्याघ्राला विषासमान भिन्नरुचि देत नाही, तेंवि दीनादुबळ्यांना किंवा थोरा-मोठ्यांना, शत्रूंना किंवा मित्रांना, पाप्यांना किंवा पुण्यवंतांना अभाग्यांना अथवा समाग्यांना, मूर्खांना किंवा सुबुद्धांना इतरत्र पंचमहाभूतें समतेनेच सुखदुःखाची जाणीव देत असतात.

उदाहरणार्थ, मनोमयी निवासस्थानाला पोहोचण्याकरिता जलवायु व लोहादि निरनिराळे मार्ग असून, त्या मानाने कमीआधिक त्रास झाला तरी ध्येयदृष्टि एकत्र आहे. नवविधाभक्तिचीहि आक्र मणशक्ति अशीच आहे.

तात्पर्य, सर्व जग समतेच्या तत्वाने जखडलेंले आहे. प्रत्येक धर्माचीहि गोष्ट अशीच आहे. अनेक धर्मपंथीय लोकांचा सर्वसामान्य सिद्धांत एकच असतांना आमचा वीरशैवधर्मच ह्याव्यतिरिक्त राहणें शक्य नाही.

राज्ययंत्र व्यवस्थित चालण्याकरिता जसें कायद्याचें बंधन आवश्यक आहे, त्याप्रमाणे मानवी जीवन भवाब्धींतून पार पाडण्याकरिता त्याला धर्मबंधनांची जरुरी आहे. संस्थापकांच्या हटवादाने कां होईना, आज उभ्या जगांत निरनिराळे धर्मपंथ असले तरी त्यांतील अंतर्गत वरिष्ठ ध्येय एकच आहे. म्हणून ते त्याज्य नव्हेत.

आमचा वीरशैवधर्म ह्याला कोणी विश्वधर्म ह्या नांवाने संबोधितात. ह्याच्या अनादित्वाबद्दल कांही अन्यपंथीय सज्जनांचा माहितीच्या अभावीं संशय होता तो हैद्राबाद, गुलबर्गा, वगैरे ठिकाणीं शास्त्रज्ञ व न्यायाधीशांच्या वादविवादावरून दूर झालेलाच आहे.

सत्तेच्या बलावर तैमूर्लंग किंवा औरंगजेब वगैरे अविंध राजांनी हिंद संस्कृतीला अविंध बनविण्यांत जी दंडुकेशाही केली त्यामुळे आपले आचारधर्मकार्यें सुरळीतपणें कायम ठेवण्याकरिता आमच्या पूर्वजांनी किंवा धर्मोद्धारकांनी आज वीसाव्या शतकांत अस्पृश्यतानिवारण, ग्रामोद्योगसंघ म्हणून महात्मागांधींनी नवमतप्रतिपादनाची जी लाट उपस्थित केली, ती किती तरी शतकांपूर्वीच आमच्या वीरशैवमतोद्धारक बसवेश्वरमहाराजांनी सुरूं केली इतकेंच नसून, आसेतुहिमाचल तिचा प्रसार केला. सुधारक राज्यकर्त्यांची आणि देश, प्रांत, जिल्हा, तालुके, व गांवपंचायतसभा आजच्या तदनुषंगाने अधिकाऱ्यांना धरून जशी घटना आहे तशीच पंचसिंहासनें, पठि ह्या स्थानपरत्वें जगद्गुरु, आचार्य, पटाधीश, चरंति व मठाधिपति अशी आमच्या समाजाची घटना आहे. व्हाइसरॉयनीं सोडलेला हुकूम गांवच्या नव्हे लहानश्या खेड्यांतील पोलीसपाटलाला पोहचून त्याची बिनचूक अंमलबजावणी

होते. तद्वत् आमच्या मुख्य सिंहासनस्थानीं सोड-लेला धर्मपर हुकूम एकलटिक्या खेडवळ स्मशा-नवासी वीरशैव व्यक्तीला पोंहचतो. लिंगागी म्हणून एक, त्यांत भेदाभेद नाहीं. लिंगागी [ महार, चांभार, तेली, माळी, क्षत्रिय, ब्राह्मण ] एका समतेच्या तत्वावर वागविले जातात.

माहेश्वर ( स्वामीवर्ग ) म्हणजे लिंगी ब्राह्मण, वीरभद्र ( वीरमुष्टी ) म्हणून जी एक शाखा आहे ती क्षात्रतेज प्रकट करणारी क्षत्रिय, व्यापार, शेती करणारे वाणी म्हणून जी संज्ञा आहे ती वैश्य ह्या सदराखालीं, व तेली, माळी, महार, चांभार जो लिंगधारी वर्ग आहे तो सेवाधर्मांत गणला गेला आहे. तात्पर्य भगवद्-वचनानुसार 'गुणकर्मविभागशः' वर्णाश्रम-व्यवस्था साधलेली आहे. धर्मराजांनी 'लिंगी ब्राह्मण हे अलिंगी ब्राह्मणाप्रमाणे दान घेण्यास पात्र आहेत किंवा नाही असा प्रश्न केला होता. त्यावरून, व जंगम आणि वाणिज्य या शब्दोत्पत्ती-वरून,भाषा-उत्पत्तिबरोबरच आमच्या धर्मांचा उगम आहे. तेव्हा वैदिकत्वाबद्दल वादच उपस्थित होत नाही. असो.

लिंगायनी अलिंग्याचे मुखावलोकन केल्यास प्रायश्चित्त घ्यावें अशी एक शास्त्राज्ञा आमच्या धर्मांत आहे. नव्हे कर्नाटकांत तर पवित्रकार्यी ती अंगवळणीं पडून गेलेली आहे. ती जरी आज अन्यथा गमत असली तरी तिचें मूळ ध्येय आमच्या वीरशैव व्यक्तींनी पायांतील एक वाहन जरी खरेदी केलें तरी त्यापासून होणारें उत्पन्न [ पैसे ] लिंगागीव्यतिरिक्त समाजांत जात नाही. परदेशांत पैसा जाऊं नये, स्वदेशीच वस्तु वापरली जावी, म्हणून आजच्या देशभक्त नेत्यांची घोषणा आहे ती परदेशांत तर काय पण परसमा-जांतहि जाऊं नये ही आमच्या नेत्यांची इच्छा आज नवी नाही, ती जुनी आहे. अर्वाचीन नाही; प्राचीन आहे. आज नवमतवादी म्हणतात; कांहीं विटाळ-शीपणाचा अथवा सुतकाचा विटाळ कसला आहे! हॉटेल व खानावळींतून आपली भूक शमवून आत्मारामास शांत केलें तर कुठें बिघडलें! वगैरे प्रश्न पुढे मांडतात. ठीक. आमच्या पूर्वजांनी गुरुपादोदकानीं हा विटाळ पूर्वीच धूवून काढला आहे,गेल्या सत्याग्रहकाळीं आमच्या चांदाला सरकारी चंदनी बगीचा सत्याग्रही जनतेने बेचिराख केला होता. पण आमच्या तत्ववेत्त्यांनी भस्म-लेपनाचें महत्व प्रतिपादन करून साऱ्या भारतां-तील चंदनीबगीचे केव्हांच उद्ध्वस्त करून टाकले. म्हणून कदाचित आज त्यांची किंमतहि बहुमोल असेल. स्त्रीस्वातंत्र्य व्हावें म्हणून सारे समाज आज अविश्रांत परिश्रम घेत आहेत. आमच्या धुरीणांनी स्त्रीपुरुषांना, मुलामुलींना, जन्मतःच लींगधारण आवश्यक ठेवून समानतेच्या तत्वावर केव्हांच स्त्रीस्वातंत्र्य देऊन ठेवलें आहे. विधवा-विवाहाचें बंड केव्हांच मोडून टाकलें आहे. लिंगागी तेवढा एक समजून स्वामी लोकांनीं रोटी-व्यवहाराला बाध ठेवला नाही. कांहीं शाखांत तर बेटीव्यवहाराला बाध न ठेवल्यामुळे डॉ. गौर यांचें मिश्रविवाहाचें बिल केव्हांच पास झाल्या-सारखें आहे. म्हणूनच डॉ. आंबेडकरांना तुम्हांला जर धर्मांतरच करावयाचें असेल तर पाश्चात्यांच्या ख्रिस्तधर्मांची किंवा मुस्लिमधर्माची दीक्षा न घेतां आह्मां वेदप्रणीत लिंगागी समाजाची. दीक्षा घेऊन आपली संस्कृति कायम ठेवा असें आव्हान आजचे लिंगागी अधिकारी देत आहेत. ह्याचें कारण **आह्मांला नवमतवाद नवा नाही.** आमच्या दैनिक आचरणांत तो येऊन गेला आहे. असें असतां आमचे सनातनी वीरशैव उगीच शब्द-वाद टाकून भितात कां! आचरण व कृति निराळी ह्याचेंच आह्मा तरुणांना वाईट वाटतें. ही राहणी कोणालाहि ज्ञानप्रद ठरेल. सांप्रत भारतांतील प्रत्येक समाजांत राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे बाबतींत झपाट्याने जागृति नव्हे वाढ होत असतांना, आमच्या समाजानें अजूनहि मागें राहणें शक्य नाही.

# नवमतवादी, व श्रीगुरुमूर्ति सिद्धरामस्वामीचा प्रायश्चित्तविधी.

लेखक.—डॉ० आप्पाराव सोमाप्पा संगेकर, एच्.एम्. डी.आय्., चांदूर बाजार.

[ 'सुदर्शन', सोलापूर, ता० २६ ऑक्टोबर ३६ चे अंकावरून ]

"वी. संजीवनी"-चे ता. १५ सप्टेंबरचे अंकांत श्री. सिद्धराम स्वामीचे आगमनाविषयी व नंतरच्या कार्यक्रमाविषयी वी. चळवळीच्या सदरांत एक बातमी प्रसिद्ध झाली आहे. त्यांत प्रायश्चित्तविधीसमारंभहि होणार असल्याची एक बातमी आहे. ह्या बातमीच्या अनुरोधाने उमरावती येथील श्री. सो. ल गाढवे ह्यांनी ता. २८-९-३६ च्या "सुदर्शनां"-त एक लेख लिहून नवमतवाद्यांवर व 'वी. संजीवनी'-च्या धोरणावर टीका केली आहे. रा. गाढव्यांच्या नांवावर ह्या टीकेच्या निमित्ताने कां होईना जे सुधारणावादी विचार प्रदर्शित केले ते त्याचे नांवावर ते ज्यांच्या भोवती फिरतात त्या मंडळीचे जर प्रामाणिक विचार असतील तर नवमतवादी किंवा सुधारणावादी व अमरावतींतील स्थानिक पुराणमतवादी व त्याची विरोधाची कारणेंच नाहीशीं झालीं असें मोठ्या आनंदाने ह्मणावें लागतें. श्री. सिद्धराम स्वामी जर्मनीस जातेवेळी त्याना बहिष्काराची धमकी देणारे किंवा ते गेल्यावर त्यांना आह्मी बहिष्कृत करू असे ह्मणणारे गाढवे यांचें इतक्या लौकर प्रामाणिक मतपरिवर्तन झालें असल्यास हा एक सुधारणावाद्यांचा नैतिक विजयच ह्मटला पाहिजे. गाढवे यांचे जर सिद्धराम महाराजांना समाजांत पावन करून घेऊन मिसळवितो अशी खात्री असल्यास त्यांनी तसें जाहीर करावें व त्यांची पंचाचार्य-प्रासादिक माहेश्वर ह्मणविणारी व प्रेमसंवर्धक मंडळांतील किती कार्यकर्ते आपल्या सह्यांनिशीं पाठिंबा देतात ह्याचीहि यादी प्रसिद्ध करावी ह्मणजे त्याबरोबरच नवमतवादी किंवा सुधारणावाद्याच्या पक्षाला मिळणाऱ्या नवीन अनुयायांच्या संख्येचीहि लोकांना कल्पना येईल व ह्या नूतन अनुयायांचें स्वागत व अभिनंदन करण्यास आह्मा सर्वांनाच बरें पडेल.

श्री. गाढव्यांनी "सुदर्शनां"-तून वस्तुस्थिति माहित असतांना जी टीकेची दिशा घेतली आहे ती मात्र चुकीची आहे. त्यांनी प्रामुख्याने खालील प्रश्न उत्पन्न केले.

(१) "वी. संजीवनी'-चे धोरणाप्रमाणे 'प्रायश्चित्तविधीला' संमती किंवा त्याचा पुरस्कार हें विसंगत नाही काय ?

[२] "वी. संजीवनी"-चें धोरण नममतवादी व प्रायश्चित्तविधी ह्यांचा 'समन्वय' कसा करावा ?

वी. "संजीवनी"-त प्रायश्चितविधीबद्दल प्रसिद्ध झालेली बातमी वी. चळवळीचे सदरांत बातमीवजा प्रसिद्ध झाली आहे. ती अग्रलेखांत किंवा

संपादकीय मजकुरांत प्रसिद्ध झालेली नाही. त्यामुळें " वी. संजीवनी "-चे धोरणाचा व त्या बातमीचा कांही संबंध येत असेल असें आम्हाला वाटत नाही. बातमी कशीहि असली तरी ती प्रसिद्ध करणें हें वृत्तपत्रकाराचें काम आहे व ह्या न्यायाने प्रायश्चित्तविधीची बातमी प्रसिद्ध झाली असावी. ता. १५-१०३६ चे " वी. संजीवनीं "-त ' स्वामी माजलगांवकर व प्रायश्चित्तवाद ' यावर संपादकीय विचार व अर्थातच संजीवनीचें धोरणहि प्रसिद्ध झालें आहे. त्याबाबत गाढव्यांनी एकंदर समन्वय लावीत बसावें. परंतु नवमतवादी व " वीरशैव संजीवनी " ह्यांचा मात्र धोरणाचे दृष्टीनें गाढवे समजतात तसा संबंध नाही एवढें मात्र खरें. शिवाय ही बातमी सिद्धरामस्वामी येथे येऊन पोंचण्यापूर्वीच प्रसिद्ध झाल्यामुळे ते येथे आल्यावर तिच्या सत्यासत्यतेचा विचार करून नंतर "सुदर्शन"-कडे टीका करावयास गाढव्यांनीं धूम ठोकावयाची होती. परंतु वाईटांतूनहि चांगलें निघतें ह्मणतात त्या न्यायाने गाढव्यांच्या ह्या " वी. संजीवनी "-चे धोरणावर तुटून पडण्याच्या घिसाड घाईतून स्वतः गाढवे नवमतवादी असल्याची जाहीर कबूली मात्र बाहेर पडली व एका दृष्टीनें नवमतवाद्यांचा हा फायदाच झाला.

२. "वी.संजीवनी"चें धोरण व नवमतवादी यांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. "वीरशैव संजीवनीं"-त इतरांप्रमाणें नवमतवाद्यांचे लेखांना स्थळ मिळतें एवढेंच. ह्याचा अर्थ "वी.संजीवनी"चें धोरण नवमतवादीच आहे किंवा असावें असें कुणींहि समजण्याचें कारण नाहीं. "वीरशैव संजीवनी"चें धोरण सुधारणावादी आहे एवढें मात्र खरें. प्रायश्चितविधी होऊं नये ह्याच मताचे सर्व नवमतवादी असावेत; निदान नवमतवाद्याच्या पुढाऱ्यापैकी ' प्रायश्चितविधी '-च्या आवश्यकतेविषयी अधिकृतरीत्या स्वाक्षरीने लिहिलेलें किंवा ह्या विधीस पाठिंबा किंवा समर्थनार्थहि कांहीं लिहिलेलें नाहीं. कारण प्रायश्चितविधीचा प्रश्न हा मनस्वास्थ्य व चित्तशुद्धीचा असल्यामुळे, केव्हांहि वैयक्तिक स्वरूपाचा आहे असें नवमतवाद्याचें मत आहे. तेव्हा प्रायश्चित्तविधी घेणें किंवा न घेणें हा सर्वस्वी श्री. सिद्धराम स्वामींचे भावनेचा व मनाचा प्रश्न आहे. ह्यामुळे नवमतवाद्याची आपल्या मताची कोणावरहि जबरदस्ती करण्याची इच्छा नाही. अर्थातच स्वामींवरहि ते करणार नाहींत. नवमतवादी मतस्वातंत्र्यवादी आहेत. ते जसे आपल्या मतस्वातंत्र्याकरिता झगडतात, तद्वतच ते इतरांनाहि मतस्वातंत्र्य देतात व त्याच्या मतस्वातंत्र्याची तरफदारी करतात. तेव्हा नवमतवादी हे प्रायश्चित्तविधी करूं नये ह्या मताचे जरी असले तरी तो वैयक्तिक प्रश्न असल्यामुळें, प्रायश्चित्तविधी झाला तरी त्याचा विधिनिषेध नवमतवाद्यांना कांहीच नाही. हा वैयक्तिक प्रश्न आहे, व ह्मणून नवमतवादी ह्या प्रश्नावर उदासीन आहेत व राहतीलहि. परंतु वैयक्तिक प्रश्नाला जर सामुदायिक स्वरूप प्राप्त होऊं लागलें तर नवमतवाद्यांचें तत्संबंधीं धोरण व कार्याची दिशा आपोआपच बाहेर पडेल.

---

# वीरशैवांतील चळवळी

## नववीरमाहेश्वरमंडळाची घटना

**रामशंभू पुराणिक, दारव्हा लिहितात.—**

तारीख १५-९-३६ चे "वी.संजीवनी"-पत्रांत मी "नववीरमाहेश्वर मंडळाची आवश्यकता" हा लेख लिहून त्यावर अनुकूल-प्रतिकूल मतें मागविलीं होतीं. त्याप्रमाणे बरींच अनुकूल मतें आमच्या माहेश्वर मंडळीकडून माझेकडे आतांपर्यंत आलीं आहेत, आणि ह्मणूनच आज आमच्या नववीर-माहेश्वर-मंडळाच्या घटनेचा कच्चा खर्डा तयार करून मी आज प्रसिद्ध करीत आहें. तरी या घटनेंतील नियमांत कांही दुरुस्ती वगैरे करणें असल्यास तसें मला कळविण्याची आमच्या माहेश्वर बंधूंना विनंती आहे. आजवर माहेश्वर-मंडळाच्या असल्या संस्थापनेबद्दल आमच्या समाजामधून एकहि प्रयत्न करण्यात आला नाही.

अमरावती येथे १-२ व्यक्तींनी पंचाचार्य प्रा. माहेश्वरमंडळ काढण्याचा प्रयत्न केला होता असें श्रीगुरु माजलगांवकरांच्या उपाध्यक्षत्वाच्या राजीनाम्यावरूनच काय तें तेवढें कळलें होतें. बाकी त्या बाबतींत कुठेच कांही बातमी नाही, व आता तर तेंहि नांव ऐकूं येत नाही. पंचाचार्य किंवा कोणतेंहि माहेश्वरमंडळ आपल्या प्रांतांत अस्तित्वांत नसल्यामुळे श्रीगुरु माजलगांवकरांचे स्वागतसमारंभाचे वेळी माहेश्वरवर्गातर्फे श्रीगुरु करबसय्या स्वामी लासिनकर मठसंस्थान अमरावती ह्यांना संस्थेच्या अभावीं माहेश्वरवर्गा-तर्फे हार घालावा लागला. तेव्हा असल्या मंडळाची अतिशय जरूर असल्याबद्दल कुणाहि सुज्ञांचें दुमत होणार नाही अशी आमची पूर्ण खात्री आहे. आणि आह्मीं जी घटना आज प्रसिद्ध करीत आहोंत त्यावरून आमच्या समाजहिता-बद्दलची कल्पना सर्रास सर्वांनाच रुचेल आणि पचेल अशी आह्माला खात्री आहे.

**संस्थेचें नांव.—** मध्यप्रान्त-वऱ्हाड-नववीर-माहेश्वरमंडळ असें आहे.

**संस्थेचा उद्देश.—** ह्या प्रांतांतील सर्व प्रकारच्या माहेश्वरवर्गीय बंधूंची संघटना घडवून आणणें हा असून, सर्व प्रकारचा वीरशैवभक्तवर्ग आणि माहेश्वरवर्ग ह्यांत अधिकाधिक सलोखा, प्रेम व आपलेपणा वृद्धिंगत व्हावा हा ह्या संस्थेचा उद्देश आहे. त्याकरिता माहेश्वर बंधूंना काला-नुरूप शास्त्रोक्त अशा आपल्या कर्तव्याची जाणीव करून देणें व तें कर्तव्य करीत असतां त्यांच्या हक्काच्या संरक्षणार्थ भक्तवर्गाच्या सहाय्याने झटणें हें कार्य ही संस्था करील.

कोणत्याहि माहेश्वराने कोणत्याहि भक्तवर्गा-कडील कोणतीहि क्रिया धर्म, रूढी व परिस्थिति ह्यांस अनुसरून केली असतां त्याचें अभिनंदन करणें व त्याच्याविषयीं आपलेपणा कायम ठेवणें.

माहेश्वराचे भक्तवर्गाकडे काय कर्तव्य आहे ह्याची त्या वर्गांत जागृति करण्याचा उद्योग करणें.

मठसंस्थामध्यें मठाधिकाऱ्यांची परंपरा अधिक उज्ज्वलतेने चालवून मठसंस्था अधिक कार्यक्षम कशा होतील व भक्तांच्या आदरास पूर्ववत् कशा प्राप्त होतील ह्याची चिंता वाहणें.

माहेश्वराने माहेश्वरास कोणत्याहि सबबीवर दूर लोटणें अनिष्ट असून, शास्त्र, रूढी व परिस्थिति ह्याला सोडून कांहीं दुष्कृत्य एखाद्याकडून घडलेंच तर फार थोड्या व सुलभ प्रायश्चित्ताने त्याला आपल्यांत घेण्याचा उपक्रम सुरूं करणें, त्याचप्रमाणें माहेश्वर व माहेश्वरांचा स्त्री-वर्ग ह्यांच्यासंबंधानेंहि तीच वृत्ति जागृत ठेवणें.

सर्व प्रकारच्या भक्तवर्गांत आपलेपणाची भावना उत्पन्न करण्याचा सतत उद्योग करणें.

सभासद.—ह्या संस्थेचा उद्देश मान्य असलेल्या १८ वर्षांवरील कोणाहि माहेश्वरास व त्याच्या स्त्रीवर्गास दरसाल एक रुपया देऊन ह्या संस्थेचे सभासद होतां येईल.

आश्रयदाते—कोणत्याहि भक्तवर्गास एक रुपया किंवा त्यापेक्षा अधिक देणगी देऊन संस्थेचे आश्रयदाते होतां येईल.

कार्यकारी मंडळ—सभासदांच्या वार्षिक सभेंतून एक अध्यक्ष, दोन उपाध्यक्ष, दोन चिटणीस, एक खजीनदार व सात कार्यकारी मंडळाचे सभासद निवडले जातील व ह्या कार्यकारी मंडळानें आपल्या सभेंतून संस्थेच्या उद्देशाला अनुसरून कार्य करीत रहावें.

त्याप्रमाणें घटनेचा कच्चा खर्डा प्रसिद्ध केला आहे. ही घटना मान्य करण्याची वा तींत कांहीं दुरुस्त्या सुचविण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनी आपलीं नांवें एक महिन्याच्या आंत मला कळवावीं. म्हणजे त्यांची सभा बोलावून तींत घटना पूर्ण केली जाईल. आणि नंतर पंचवीस सभासद होतांच त्यांची सभा बोलावून तींत कार्यकारीमंडळ निवडलें जाईल व संस्था स्थावर झाल्याचें रीतसरपणें जाहीर होईल.

## नववीरमाहेश्वरमंडळास सर्वत्र पाठिंबा.

नववीरमाहेश्वरमंडळाचे संचालक द्वारघ्याचे श्रीगुरु रामशंभु पुराणिक कळवितात.—नववीरमाहेश्वरमंडळाचे आवश्यकतेविषयी मी ता. १५ सप्टेंबर ३६ च्या 'वी. संजीवनी'तून लेख लिहिल्यानंतर खालील माहेश्वरवर्गीय पटाधिकारी व कार्यकर्त्यांनी संदेशद्वारा व कांहींनी प्रत्यक्ष भेटींत आमच्या योजनेस सहानुभूति व पाठिंबा आतापर्यंत व्यक्त केला.

१ श्रीपट्टधरमूर्ति श्रीगुरु महंतअय्या गुरु देवलिंग अय्यास्वामी हिरामठ संस्थान (मोठा मठ) अमरावती. २ श्रीगुरुमूर्ति वे. शा. संपन्न श्रीशिवशंकरस्वामी गुरु शंभुलिंगस्वामी देशिकेंद्र वाढोणेकर, मठसंस्थान वाढोणा. ३ श्रीगुरुमूर्ति सिद्धरामस्वामी माजलगांवकर भीमाशंकरमठसंस्थान अमरावती. ४ श्रीगुरुमूर्ति षडाक्षरीस्वामी गुरु रेवणसिद्ध स्वामी लासिनकर मठसंस्थान अमरावती. ५ श्रीगुरु करबसअय्या गुरु षडाक्षरी अय्या लासिनकर मठसंस्थान अमरावती. ६ श्रीगुरु गंगाधरअय्या गुरु प्रभुअय्यास्वामी सिद्धगिरमठसंस्थान अमरावती. ७ श्रीगुरु. सिद्धैयास्वामी जंगम सिद्धगिरमठसंस्थान अमरावती. ८ दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, अमरावती. ९ श्रीगुरु राजेश्वर अय्या गुरु पंचाक्षरीअय्या, आकोला मठसंस्थान. १० श्री. तु. ना. काटकर, अध्यापक, चिमूर चांदा. ११ श्रीगुरु. गंगाधर अय्या वैद्य चांदा. १२ श्रीगु. महेश्वर अय्या जंगम, मु. दिग्रस. १३ श्री. हरेश्वर एम्. घाटूळकर, तळेगांव. १४ श्री. स्वामी सिद्धलिंग मठसंस्थान, तळेगांव. १५ श्री. विश्वनाथ अय्या देवलिंग अय्या जंगम चांदूरबाजार, १६ श्री. बाळलिंगस्वामी, यवतमाळ. १७ श्री. गणपत बापूजी वासमकर, दारव्हा. १८ श्री. कोंडालिंग बसवलिंग फोटोग्राफर तुपटाकळी.

## 'वी.गर्जने'तील श्रीगुरु माजलगांवकराची विपर्यस्त मुलाखत.

श्रीगुरु० रामशंभू पुराणिक, ज. सेक्रेटरी, " यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषद्", लिहितात:—

" वीरशैव गर्जना " ता. १५-१०-३६ चे अंकांत माजलगांवकराची मुलाखत आर. एम्. एकलारे, सेक्रेटरी, वी. प्रे. सं. मंडळ, ह्या नांवाने प्रसिद्ध झाली आहे. यवतमाळ-जिल्हा-परिषदेच्या अध्यक्षस्थानीं श्रीसिद्धरामस्वामीची जी योजना 'वी. संजिवनी 'तून जाहीर झाली आहे त्याविषयीं मुलाखतीचे द्वारा वाचकांचे मनांत शंका उत्पन्न करण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न करण्यांत आला आहे. श्रीसिद्धरामस्वामीची मुलाखत घेतात एक, छापतात दुसरेच, व चौकशीअंतीं साराच ' फार्स ' असा कांहीसा प्रकार माझ्या,अमरावती येथे येऊन समक्ष चौकशी केली असतांना, उघडकीस आला.

श्रीसिद्धरामस्वामींना तर " मुलाखत " त्यांचे नजरेस आणून दिल्यावर नवलच वाटलें, व ते ह्मणाले कीं, हा निव्वळ खोडसाळपणा आहे व ह्या मुलाखतीमुळें कुणीहि माझेसंबंधी गैर-समज करून घेऊं नये. "

शिवाय मुलाखतीत " जी विपर्यस्त हकिकत " छापली आहे तसा कांही प्रकार असता तर स्वत: श्रीसिद्धरामस्वामींनी स्थानिक ' वी.संजीवनी ' पत्रांतून स्वतःच्या सहीने खुलासा प्रसिद्ध केला असता. जेथे खुद्द स्वामीचेंच असें ह्मणणें तेथे त्या मुलाखतीलाच काय किंमत ! ! :—

त्यांतून नवलाची गोष्ट ही कीं, श्री. भाऊसाहेब हेगु ह्या नांवाचे अमरावतींत कुणी गृहस्थच नाहीत किंवा असल्याचे कुणाच्या माहितींतहि नाही. तेथे लोकांच्या माहितीत ३ च हेगु आहेत. १ श्री. फकिराप्पा हेगु वकील; २ श्री. करवीर आप्पा हेगु, के. जी. देशपांडे वकिलाकडील कारकून; व ३ रे श्री. मल्लिकार्जुन आप्पा हेगु, तेथील देवीचे देवळांतील कारकून. पुन्हा नवीनच निघालेल्या वी. प्रे. सं. मंडळाचा आर. एम्. एकलारे नांवाचा कुणी सेक्रेटरीहि नाही व स्वतः स्वामीहि ह्मणतात कीं, प्रसिद्ध केलेला मजकूर ' खोड-साळपणाचा आहे. ' एकूण कशाचाच कशाला पत्ता नाही.

यवतमाळ-जिल्हा-वीरशैवपरिषदेचे बाबतींत स्वागतमंडळाचा ज. सेक्रेटरी ह्या नात्याने मला एवढाच अधिकृत खुलासा करावयाचा आहे कीं, " यवतमाळ-जिल्हा-वीरशैव-परिषदेचे बाबतींत ' वी. संजीवनी 'तून आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या किंवा पुढेहि प्रसिद्ध होणाऱ्या बातम्याप्रमाणें परिषदेचें कार्य होईल. तेव्हां इतरत्र प्रसिद्ध होणाऱ्या खोट्या बातम्या किंवा मुलाखती ह्यावर कुणीहि विश्वास ठेवून परिषदेबाबतींत गैरसमज करून घेऊं नये एवढीच विनंती आहे.

---

## जाहीर अभिनंदन.

**नागभीड, B. N. Ry.,** येथील लोकप्रिय डिस्ट्रिक्ट कौन्सिलर **श्रीमंत महादेवराव चिलुरे,** सावकार, यांच्यासह यांच्या पक्षाचा नागभीड येथील सॅनिटेशन निवडणुकींत प्रचंड बहुमताने सतत दुसऱ्यांदा विजय झाला. त्याप्री-त्यर्थ त्यांचें आह्मी अभिनंदन करतों.

---

## हिंगणघाट.

येथील बालभारतसमाजाचे विद्यमानें २ रा विजयादशमीउत्सव वीरशैवसमाजाचे प्रसिद्ध स्थानिक पुढारी श्रीमंत बी. के. ऊर्फ बापुसाहेब हिंगमीरे ह्यांचे अध्यक्षतेखालीं मोठ्या समारंभाने रविवार ता. २५-१०-३६ रोजी पार पडला. उत्सवांत अमरावती येथील भारत-आयुर्वेद-विद्या-

ल्याचे प्रसिद्ध चालक वैद्य हरिहरराव ऊर्फ भैय्यासाहेब देशपांडे [ वाङ्मयविशारद ] ह्यांचेंहि " हिंदुसंघटणा "-वर उद्बोधक व्याख्यान झालें. श्रीमंत बापुसाहेबांनी योग्य शब्दांत अध्यक्षीय समारोप केला.

---

[ ता. १९-१०-३६ चे "सुदर्शन", सोलापूर, वरून ]

## श्री. पंचाक्षरी जंगम

### मु. लासीनमठ अमरावती यांस—

तुम्ही आषाढ महिन्यांत इतरत्र तसेंच कारंजा येथेहि वर्गणी जमविण्याकरिता आला होतां. वर्गणी गोळा करतांना आपण [१] लासिनमठांत श्रावणपुराण लावणें आहे व समाप्तीचे जेवणाकरितां खर्च; (२) काशीयात्रेस तुम्हाला जावयाचें आहे; (३) तुम्हाला लग्न करणें आहे; अशीं निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळीं कारणें सांगितल्याची वदंता आहे. बाकी आमचेकडे तुम्ही " पुराणसमाप्ति व जेवणखर्च " हेंच कारण सांगितलें. आमच्या कारंजा येथील मंडळींनी यथाशक्ति मदत केली. परंतु लासिनमठांत श्रावणांत पुराण झाल्याचेंही कळलें नाही व जेवण केव्हां होणार याचाहि अजून उलगडा होत नाहीं. तेव्हा खरा प्रकार काय आहे त्याचा जरूर खुलासा करावा, व वर्गणी गोळा करण्यांत आपला काय उद्देश होता हेंहि जाहीर करावें. म्हणजे तुमचेसंबंधी निष्कारण गैरसमज होणार नाहीं. नाहींतर तुमच्या एका उदाहरणामुळें एक वेळ गैरसमज झाल्यास, बिचाऱ्या गरीब व सत्पात्र जंगमांनाहि दक्षिणा किंवा वर्गणी समाजांत मिळणें कठिण जाईल.

तुम्ही काशीयात्रेला खरोखरीच जाणार आहांत काय ? व जाणार असाल तर केव्हां ? तसेच, तुम्ही लग्न करणार आहात काय ? हा प्रश्न विचारण्याचें कारण म्हणजे यापूर्वी तुम्हीं दोन वेळा लग्न केलें, व फारकती देऊन बायका टाकल्या व ह्यामुळे तुम्ही 'लग्न करणार' ह्या बातमीवर आमचा मरवंसा बसत नाही. श्रावणांत लासिनमठांत पुराण झालें नसल्यामुळे अर्थातच समाप्ति व जेवणाचा कांही प्रश्नच उत्पन्न होत नाही. तरी जमा केलेली वर्गणी आपण कोणत्या कार्यांत खर्च करणार आहां ह्याचा हिशेबासह खुलासा केला म्हणजे लोकांचा गैरसमज होणार नाही. जमविलेली वर्गणी एकतर आपण ज्याची त्याला परत करा, किंवा आम्ही सुचवूं त्या वीरशैवांच्या एखाद्या शिक्षणसंस्थेला देऊन टाका, अशी तुम्हांस विनंती आहे. तरी ह्या बाबतींत तुम्हीं योग्य तो हिशेबासह खुलासा केल्यास तुमचेसंबंधी व जमविलेल्या वर्गणीचे हेतुसंबंधी गैरसमज नाहीसा होईल. व इतरहि जंगमांना दक्षिणा देण्यास बरें पडेल.

आपला,

सेक्रेटरी, वऱ्हाड मध्यप्रांत वीरशैव परिषद्

---

# महाराष्ट्र–वीरशैव–हितसंवर्धक मंडळ

# घटना व नियम

## १. नांवः—महाराष्ट्र–वीरशैव–हितसंवर्धक–मंडळ.

## २. उद्देश

वीरशैवांच्या सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक व आर्थिक उन्नतीचे प्रयत्न करणे व समाजांत बंधुभाव व ऐक्य वाढेल अशी काळजी घेणे. त्याचप्रमाणें वीरशैव-भगिनीवर्गांतहि शिक्षण व संघटना निर्माण करण्याचा प्रयत्न करणे. आणि हें साधण्यासाठी 'वीरशैव संजीवनी' पाक्षिक कायमचें टिकाऊ करणें.

## ३. घटना

**सभासदांचे वर्गः—** १ तहाहयात सभासद, २ सन्मान्य सभासद, ३ हितचिंतक सभासद, ४ सामान्य सभासदः—

[अ] दरवर्षी १० रु. आगाऊ वर्गणी देणारे.

[ब] दरवर्षी ५ रु. आगाऊ वर्गणी देणारे.

[क] दरवर्षी २ रु. आगाऊ वर्गणी देणारे.

व (५) स्वयंसेवक सभासद, असे ७ वर्ग केले आहेत.

## ४. सभासद होण्याचा अधिकार

महाराष्ट्रांतील वयाची १८ वर्षे पूर्ण झालेल्या कोणत्याहि लिंगधारी व्यक्तीस संस्थेच्या कोणत्याहि वर्गांतील सभासद होण्याचा अधिकार राहील.

## ५. सभासदांचें वर्गीकरण, स्पष्टीकरण

**(१). तहाहयात सभासदः—** जे एकदाच आगाऊ रु. २५० किंवा त्यापेक्षा आधिक रक्कम संस्थेस देतील ते संस्थेचे तहाहयात सभासद मानले जातील, व त्यांना कार्यकारी मंडळांतहि सभासद म्हणून हक्काने बसतां येईल.

**(२) सन्मान्य सभासद.—** जे दरसाल रु. २५ प्रमाणे १५ वर्षेपर्यंत न चुकतां आगाऊ वर्गणी देण्याचें कबूल करतील ते सन्मान्य सभासद गणले जातील. व तीं १५ वर्षे संपल्यावर तेच हक्काने मंडळाचे तहाहयात सभासद होतील.

**(३) हितचिंतक सभासदः—** जे सभासद दरसाल रु. १५ आगाऊ देण्याचें कबूल करतील व देतील ते हितचिंतक सभासद गणले जातील.

**(४) सामान्य सभासदः—**

[अ] दरवर्षाला १० रु. आगाऊ वर्गणी देणारे.

[ब] दरवर्षाला ५ रु. आगाऊ वर्गणी देणारे.

[क] दरवर्षाला २ रु. आगाऊ वर्गणी देणारे.

(५) स्वयंसेवक सभासदः— वीरशैव बंधूंची जी स्थानिक संस्था व तिच्या मार्फतची जी व्यक्ति नं. ४ मधील [अ] [ब] [क] च्या सभासदांची ५० रुपये रकमेची आगाऊ वर्गणी गोळा करून संस्थेच्या कचेरींत भरणा करील, किंवा कचेरींत पाठवून देईल, त्या भरणा करणाऱ्या संस्थेला वा त्या व्यक्तीला त्या वर्षांपुरता संस्थेचा स्वयंसेवक सभासद होण्याचा मान मिळेल, किंवा स्वतंत्रपणें एखाद्या वीरशैव व्यक्तीने जरी ५० रु. रकमेचे [अ] [ब] [क] वर्गांतील वर्गणी वसूल केलेले सभासद मिळवून दिले तरी त्या व्यक्तीसहि स्वयंसेवक-सभासद होण्याचा मान मिळेल.

### ६. सर्वसाधारण सभेचें सभासदत्व व त्यांचे हक्कः—

कलम (४) मध्यें नमूद केलेले सभासदांचें वर्गीकरण व कलम ५ मध्ये केलेलें स्पष्टीकरण ज्यांना लागू पडते अशा सर्व प्रकारच्या सभासदांना त्या संस्थेच्या सर्वसाधारण सभेचे सारखेच हक्क राहतील. पण ज्यांची ज्या वर्षांची आगाऊ वर्गणी आली नसेल त्यांना सदर सभेंत मत देण्याचा अधिकार राहणार नाही. सभासद नं. ४ [अ] [ब] [क] पैकी कोणाचीहि नवीन वर्षाच्या पहिल्या सहा महिन्यांच्या आंत जर वर्गणी आली नाही तर एक महिन्याची मुदत देऊन त्याचे सभासदत्व नाहीसें करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास आहे. सन्मान्य सभासद व हितचिंतक सभासद यांची नवीन वर्षाची वर्गणी ६ महिन्यांच्या आंत जर आली नाही तर त्यांनाहि एक महिन्याची मुदत देऊन त्यांच्या सभासदत्वाचे सर्व हक्क कार्यकारी मंडळाला नाहीसे करण्याचा अधिकार आहे. ह्या सर्वसाधारण सभेंत बसलेल्या सर्व सभासदांना प्रत्येकी एकच मत देण्याचा अधिकार राहील.

### ७. कार्यकारीमंडळ

कार्यकारी मंडळांतील सभासदांची संख्या सर्वसाधारणतः कमीत कमी १५ व जास्तीत जास्ती २५ असावी. परिस्थितिनुसार ही संख्या कमी-जास्त करण्याचा अधिकार त्या वेळच्या कार्यकारी मंडळाला राहील.

### ८. सन्मान्य सभासदांना

तहाहयात सभासदाचा दर्जा प्राप्त होईपर्यंत १०ला १ असे कार्यकारी मंडळावर प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क राहील.

### ९. हितचिंतक सभासदांना

२० ला १ असे कार्यकारी मंडळावर प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क राहील.

### १०. सामान्य सभासदाला

[अ] वर्गाला ३० ला १, [ब] वर्गाला ५० ला १, व [क] वर्गाला १०० ला १ ह्याप्रमाणे कार्यकारी मंडळावर प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क राहील.

### ११. स्वयंसेवक सभासदांना

१० ला १ ह्याप्रमाणे कार्यकारी मंडळावर प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क राहील.

### १२. कार्यकारी मंडळाची निवडणूक

दर दोन वर्षांनी होईल, व मंडळाची मध्यवर्ती मुख्य व कायम कचेरी सामान्यतः अमरावतीस

राहील व तिची जागा बदलण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास ( पूर्ण सभासदांचे ⅔ सभास-दांचे बहुमताने ) राहील.

१३. नवीन कार्यकारी मंडळावर अधिकारी (अध्यक्ष, उपाध्यक्ष खजिनदार व सेक्रेटरीज ) ह्या नात्याने असणाऱ्या सभासदांना पुढील कार्यकारी मंडळावर Ex-officio सभासद ह्मणून असण्याचा, त्यानंतरचे नवें कार्यकारी मंडळ निवडले जाईपर्यंत अधिकार राहील.

१४. कार्यकारी मंडळाला घटनेंत कांही बदल करणें आवश्यक वाटल्यास—सभेंत हजर असलेल्या ⅔ बहुमताने " सर्वसाधारण सभेपुढे " ठेवावा व सर्वसाधारण सभेने आपल्या बहुमताने तो मान्य केल्यास त्याप्रमाणे घटनेंत बदल घडवून आणावा.

१५. कार्यकारी मंडळाचे सभेला ⅓ सभासद हजर असले ह्मणजे कोरम झाला असें समजून सभेचें काम चालू ठेवयास हरकत नाही, व कोरमच्या अभावीं स्थगित झालेली सभा दुसऱ्या दिवशींच ठेवण्यात यावी व अशा स्थगित सभेला कोरमची गरज नाही.

१६. कार्यकारी मंडळाची सभा कमीत-कमी वर्षा-तून ३ वेळा भरवावी व सर्वसाधारण सभासदांची सभा वर्षातून कमीत - कमी १ वेळ भरवावी.

१७. कार्यकारी मंडळाने आपल्या सभेंतून एक अध्यक्ष, दोन उपाध्यक्ष, एक खजिनदार, एक हिशेब-तपासनीस व एक जनरल सेक्रेटरी निवडावा व ह्या जनरल सेक्रेटरीच्या मदतीकरिता दोन जॉईंट सेक्रेटरीज आपल्यांतून निवडण्याचा आधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

१८. संस्थेच्या उद्देशाप्रमाणे आणि सर्वसाधा-रण सभेंत धोरण ठरेल त्याप्रमाणे कार्य करण्याचा प्रचार करण्याचा, खर्च करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास राहील. व त्यांच्यातर्फे अध्यक्ष व जनरल सेक्रेटरी अथवा त्यांचे अधिकार प्राप्त झालेला गृहस्थ ह्या अधिकारांची अंमलबजावणी करील.

१९. अध्यक्ष व जनरल सेक्रेटरी ह्यांना कांही प्रसंगीं संस्थेचा उद्देश तडीस नेण्याकरिता कार्य-कारी मंडळांत मंजूर झालेल्या खर्चापेक्षा अधिक खर्च करण्याचा अधिकार आहे. पण ती रक्कम रुपये ५० पेक्षा अधिक असूं नये.

२०. अध्यक्षांची संमति घेऊन, जरूर पडल्यास कार्यकारी मंडळाची बैठक बोलाविण्याचा जनरल सेक्रेटरीला अधिकार राहील, व सर्वसाधारण सभांचे बाबतींत कमीत कमी आठ दिवस अगोदर सभेच्या लेखी पत्रिका मंडळाचे सभासदाकडे सूचनार्थ रवाना करील. त्याचप्रमाणें कार्यकारी मंडळांतील एकंदर ⅓ संख्येला सभा बोलवावी असें वाटेल तर त्यांची लेखी मागणी होतांच अध्यक्षांनी व सेक्रेटरींनी लागलीच सभा बोलवावी.

२१. सर्वसाधारण सभासदांची सभा मात्र दरवर्षाला कमीत कमी एक वेळ सोयीच्या ठिकाणीं बोलवावी.

२२. नवीन कार्यकारी मंडळ वा अधिकारी निवडले जाईपर्यंत जुनेंच कार्यकारीमंडळ व अधिकारी काम करीत राहतील.

## खजिनदार

२३. खजिनदारांनी रु. ५०० पेक्षा जास्त त्याचेजवळ असलेली रक्कम बँकेंत संस्थेच्या नांवावर ठेवावी व संस्थेसाठी खर्च करण्याकरिता पैसे काढण्याचा अधिकार खजिनदारास दिला आहे.

२४. ज. सेक्रेटरींनी ऑफिसचे चालू खर्चाकरितां रु. ५० ची रक्कम फक्त ठेवावी. रु.५० पेक्षा जास्त रक्कम त्याचेजवळ असल्यास ती तावडतोब खजिनदाराकडे पाठवावी.

२५. कचेरींत वर्गणी वसूल आलेल्या प्रत्येक सभासदाचें नांव व पत्ता सभासदाच्या रजिस्टर बुकावर नोंदला जावा, व त्यांच्या नांवाची पोच "वीरशैवसंजीवनी" पाक्षिकांत छापली जावी. त्याचप्रमाणे संस्थेचे हिशेब, कार्य, वगैरेचा 'वीरशैवसंजीवनी'-तून प्रसार व्हावा.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १५ नोव्हेंबर १९३६ ( अंक २२ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना. ०रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नांची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वर्गणी सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेख येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरुराचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

# महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे खजिनदार व तहाहयात सभासद.

मंडळाचे खजिनदार.



श्रीमंत काशिनाथ आप्पा शंकर आप्पा धाके
तहाहयात सभासद, आडगांव
( आकोला जिल्हा, वऱ्हाड )



मंडळाचे तहाहयात सभासद.



श्रीमंत बाबुआप्पा गुंडाप्पा करणे
कोऱ्हाडी ( अमरावती जिल्हा, वऱ्हाड. )

॥ श्रीशिव प्रसन्न ॥


# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति मार्गशीर्ष शु० १ शके १८५८ ( अंक २२ वा.


# पारवा येथील सुप्रसिद्ध श्रीगणेशमहोत्सव

[ लेखकः—श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., सहसंपादक, 'वीरशैव संजीवनी'].

"तुमची सारी सभासद मंडळी जर हजर राहूं शकत असली तर पारव्यालाच कार्यकारी मंडळाची सभा बोलवा, व सभा संपल्याबरोबर लगेच मी कुणालाहि परत जाऊं देणार नाही; गणपतीविसर्जनानंतर १ जास्तीचा दिवस ठेवून घेऊन मगच मी सर्वांना परत जाऊं देईन."

वरील उद्गार यवतमाळ मुक्कामीं आमच्या महाराष्ट्र वी. हितसंवर्धक मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत र. ह. ऊर्फ बाबासाहेब देशमुख ह्यांनी, "मी ह्यापुढची सभा यवतमाळला बोलावूं कीं दुसऱ्या एखाद्या सोयीस्कर जागीं बोलावूं" असा प्रश्न केला असतांना काढले.

वरील उद्गारांत बाबासाहेबांचा समाजकार्या-विषयींच्या आवडीबरोबरच निगर्वी व मनामिळाऊ स्वभाव, पाहुण्याविषयींचें अगत्य, चार चांगली मंडळी आपल्याकडे यावीत व त्यांचे सहवासांत आपण रहावें अशी उत्कट इच्छा, इत्यादि गुणहि ओतप्रोत भरलेले दिसतात.

पारवा येथील गणेशोत्सव हा वऱ्हाडांत पहिल्या दर्जाचा व प्रसिद्ध गणेशोत्सव आहे. पारवेकर जहागीरदारांच्या कित्येक पिढ्यांपासून आज जें उत्सवाचें मोठें स्वरूप आहे तशाच तऱ्हेचा उत्सव पूर्वापार चालत आला आहे.



असें म्हणतात कीं, २-४ पिढ्या-पूर्वीच्या जहागीरदारांनी ह्या गणेशोत्सवांत अफूचा मोदक खाल्ला असतांनाहि त्यांना कांहीं इजा झाली नाही. आपले घराण्यावर श्रीगणेशाची कृपा आहे ह्या भावनेनें तेव्हांपासून हा उत्सव उत्तरोत्तर मोठ्या प्रमाणांत होत आहे. जवळ जवळ आसपासचीं सारीं खेडीं ह्या उत्सवांत जेवून जातात, व ५०-६० हजार लोकांना ह्या प्रसंगानें अन्नदान होतें, व उत्सवाचा एकंदर खर्च ८ ते १० हजार रुपयांवर होतो. दरवर्षी येणारे गायन, वादन, कीर्तन, वगैरे निरनिराळ्या कलेंतील कलावंत सोडून, प्रत्येक वर्षी नवीन लोक येतात व त्यांना त्यांचे योग्यतेप्रमाणे बिदागीहि मिळते. मुंबई येथे वास्तव्य करणारे वऱ्हाडचे प्रसिद्ध गवई नथ्थुबुवा, मुर्तिजापुरचे मृदंग व तबलावादनपटु शंकरराव, अमरावतीचा प्रसिद्ध सनई वाजविणारा " कचऱ्या मांग ", महादेवाच्या पोह्यांतील गाणें म्हणणारी गोपिका मांगिन, ही मंडळी तर हजर होतीच, परंतु ह्यांचेखेरीज पुण्याचे प्रसिद्ध प्रवचनकार तांबेशास्त्री, उत्कृष्ट पेटी वाजविणारे मुरादाबादचे पं० भीष्मदेव, वरणगांव (खानदेश)चे सतारवादनकुशल मि० हरीभाऊ मनुभाऊ, वगैरे कलावंत हजर होते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पारवा येथील श्रीगणेशाच्या महोत्सवाला यात्रेचेंच स्वरूप प्राप्त झालें आहे, व कार्यक्रमाविषयीं बोलावयाचें म्हणजे रसिक श्रोते व कलावंतांचें तेथें एक छोटेसें संमेलन भरत असतें.

अफूच्या मोदकाची हकिकत अशी कीं, 'गुळाची भेलकी समजून अफूच्या ढिगांतूनच अफू घेऊन चुकून मोदक तयार करण्यांत आला होता. व तो श्रीगणरायासमोर नैवेद्य म्हणून ठेवल्या गेला. व पुढे मग प्रसादाचे वेळीं ही चूक लक्षांत आली. परंतु गजाननाचा प्रसाद फेकूनहि द्यावयाचा नाही व अफूचें विष दुसऱ्याला तरी प्रसाद म्हणून कसं वाटावं ? ह्या पेंचांतून श्रीमंत बाबासाहेबांचे पूर्वजांनी स्वतःच अफूचे मोदक खावयाचे ठरवून व अर्थातच ते खाल्ले

प्राण वांचणे अशक्य ह्या समजूतीनें सर्व निरवानिरव करून—त्यांनी तो प्रसाद ग्रहण केला व एका खोलींत पडून राहिले. परंतु आश्चर्याची गोष्ट ह्मणजे त्यांच्या जिवाला यत्किंचितहि इजा झाली नाही. तेव्हा श्रीगजाननाची आपले घराण्यावर पूर्ण कृपा आहे ह्या श्रद्धेने त्या वेळपासून श्रीगणेशोत्सवाचें वाढतें प्रमाण आहे. इतर कार्यक्रमाखेरीज विशेष ह्मणजे 'अन्नदान.' हें ह्या उत्सवांत फार मोठ्या प्रमाणावर होतें. त्यांतून सर्वांप्रमाणें गोरगरीबांनादेखील पुरणाची पोळीच मिळाली पाहिजे ही अखंडित पूर्वापार चालत आलेली चाल अजूनहि रूढ आहे. महाराष्ट्र वी. हितसंवर्धक-मंडळाचे कार्यकारी व घटनासमितीच्या सभेच्या निमित्ताने बहुतेक सारीच मंडळी आली होती. बुलढाणा जिल्ह्यांतून चिखलीचे गोविंदराव वोंदरे, मंडळाचे उपाध्यक्ष श्रीमंत रामभाऊ शटकुश्री, कारंजेकर श्रीमंत भाऊराव विभूते, पापडे, वगैरे मंडळी तर हजर होतीच परंतु हिंगणघाटचे मंडळाचे तहाहयात सभासद श्रीमंत बापूसाहेब हिंगमिरे, आपले स्नेही श्री. फुलझेले मास्तर ह्यांचेसमवेत पाऊस-पाण्याचा त्रास सोसूनहि हजर होते. पुसदकर श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, तसेच इजारदार बंधुद्वय बाबासाहेब व बाळासाहेब मुखेर, हे कांही अपरिहार्य कारणांमुळे उत्सवांत हजर राहूं शकले नाहीत ह्याबद्दल बाबासाहेबांना बरें वाटलें नाही.

स्थानिक व परगांवच्या वीरशैवांखेरीज दरवर्षी मोगलाई व वऱ्हाड-मध्यप्रांतांतील शेकड्यांनी हजर राहणारा व वाढतें प्रमाण असणारा जंगम भिक्षुकवर्ग ह्याहि वर्षी हजर होता. ह्यांतच समाजकार्यबुद्धीने प्रेरित झालेले दारव्हयाचे श्रीगुरु रामशंभु पुराणिक व चांद्याचे प्रसिद्ध श्रीगुरु गंगाधर अप्पा वैद्य हीहि सुशिक्षित मंडळी हजर होती, व त्यांनी महाराष्ट्र-वी. कार्यकारी मंडळाचे बैठकींत माहेश्वरवर्गाच्या सुधारणेकरिता संघटित प्रयत्न करण्यास सुकर जावें ह्मणून एक मंडळ काढण्याच्या बुद्धीने 'नववीर माहेश्वर मंडळा'-विषयीं एक महत्वपूर्ण ठराव मांडून पास करून घेतला.

उत्सवांत दुसरी महत्वाची गोष्ट ह्मणजे मंडळाचे सदस्य चिखलीचे तरुण वीरशैव कार्यकर्ते श्रीमंत गोविंदराव वोंदरे ह्यांनी केलेलें उत्कृष्ट कीर्तन होय. कीर्तन करणें हा व्यवसाय नसतांनाहि श्रीमंत गोविंदरावांनी उत्कृष्ट कीर्तन करून धंदेवाईक कीर्तनकारांकडून वाहवा मिळविली.

ह्या सर्व निमंत्रित सन्माननीय पाहुण्यांच्या सुखसोयीकडे व एकंदर व्यवस्थेकडे श्रीमंत बाबासाहेब जातीने पहात होते. यवतमाळ येथील त्यांच्या बंगल्यांतून दारव्हाला उत्सवाला नेण्यापासून तों परत उत्सव संपल्यावर यवतमाळच्या बंगल्यांत आणून पोंचविण्यापर्यंतची सारी व्यवस्था यांत्रिक शिस्तीने सुरू होती. परंतु ह्या निमंत्रित पाहुण्यांच्या चांदीच्या ताट-वाट्यांच्या आगतस्वागतापेक्षा श्रीमंत बाबासाहेबांचे औदार्याविषयी सादर स्वाभिमान वाटण्यासारखी घटना ह्मणजे हजारों गोरगरीबांना होणारें अन्नदान होय! राजप्रासादासारख्या भव्य वाड्याच्या दिंडीदरवाज्यावरील मजल्यावर आह्मी सर्व पाहुणे मंडळी उतरलों असतांना खाली गढीचे जवळ हजारो गोरगरीब शिस्तवार बिलकुल कल्ला-हल्ला न करतां आपल्या जेवणाच्या पाळीची वाट पहात बसले आहेत, सर्वांच्या अंतःकरणांतून देशमुखघराण्यांतील राजबिंड्या उदारधी बाबासाहेबांच्या बद्दल दुवा निघत आहे हें दृश्य अवलोकन केल्यावर कुणा सहृदय अंतःकरणाच्या माणसाच्या नेत्रावाटे गहिंवरून आनंदाश्रु येणार नाहीत!

ह्या गणेशोत्सवाचें व अन्नदानाचें स्वरूप पहातांच जगन्नाथाच्या रथोत्सवाचें चित्र कुणाच्याहि मनःचक्षुसमोर उभे राहील. तेथे 'जगन्नाथ का भात और जगत् पसारे हात' असा विश्वबंधुत्वाच्या न्यायाने जातपात लक्षांत न घेतां केवळ धार्मिक श्रद्धेने प्रसाद ह्मणून ग्रहण करतात. तसाच धार्मिक श्रद्धेचा प्रकार पारवा येथे श्रीगणेशोत्सवांत नजरेस पडला. हजारो गोरगरीब पंगतींत जेवावयाला बसतात पण शेजारी बस-

लेला मनुष्य कोणत्या जातीचा आहे ह्याची चुकूनहि चौकशी करीत नाही. देशमुखांकडील श्रीगणेशाचा प्रसाद ग्रहण करणें एवढेंच तेथे धार्मिक श्रद्धेच्या पोटीं उत्पन्न झालेलें उद्दिष्ट असतें. हजारो लोक येतात-जेवतात, पण कुठे गडबड नाही, खरकटी पत्रावळी पडलेल्या कुठे दिसल्या नाहीत, सारीकडे अगदी शांतता–सुव्यवस्था होती. व ह्या दहा दिवसांत उत्सवाचे साऱ्या कार्यक्रमावर श्रीमंत बाबासाहेब, श्री. भाऊसाहेब एलकुंचवार, व श्री. बाळाभाऊ, ह्यांच्या सल्लेने व समवेत, जातीने देखरेख ठेवतात. श्रीमंत बाबासाहेब हे तरुण, सुशील, शांत, धार्मिक वृत्तीचे पण खाजगी रीतीने इंग्रजी शिक्षण व्यवहारापुरतें घेतलेले असे विचारशील गृहस्थ आहेत. वऱ्हाडांत जीं देशमुखांचीं घराणीं आहेत त्यांत ह्या घराण्याचा वतनदारी देशमुख ह्मणून पहिल्या प्रतीचा दर्जा आहे. श्रीमंत बाबासाहेब हें तालुका-बोर्डाचे अध्यक्ष होते. यवतमाळ डिस्ट्रिक्ट-बोर्डात ते सभासद होते, व आहेत. बेंच-मॅजिस्ट्रेटहि आहेत. केळापूर तालुक्यांत ह्यांच्या देशमुखी जहागिरीचा बराच मोठा विस्तार आहे व हें कुटुंबहि विस्तारलेलें आहे. तथापि खुद्द बाबासाहेब हे आठ आण्यांचे ह्या वतनदारीचे मालक असून, राहिलेल्या आठ आण्यांत अनेक भाऊबंदांना ते वाटा देतात, व तो त्यांच्या मार्फतच पोंचता होतो.

असा उदारधी व समाजकार्यप्रेमी पुरुष महाराष्ट्र वी. हि. संवर्धकमंडळाला अध्यक्ष व "वी. संजीवनी" वृत्तपत्राला आश्रयदाता मिळावा हें त्या दोन्ही संस्थांचें आह्मी परमभाग्य समजतों. श्रीमंत बाबासाहेबांना दोन मुलें व एक मुलगी अशीं तीन अपत्यें आहेत.

अन्नदानप्रसंगीं हजारो गोरगरीबांचे समूहांत त्यांची व्यवस्था पाहण्याकरिता बाबासाहेब वावरत असतांना त्या हजारो अतःकरणांतून निघणारा देशमुखघराण्याविषयींचा 'दुवा व नेत्रावाटे टपकणारे आनंदाश्रु पाहिले ह्मणजे गहिंवरून असं वाटतं कीं, "लाख मरो पण लाखाचा पोशिंदा न मरो!"

'परमेश्वर बाबासाहेबांना त्यांच्या पुत्रादिकांसह आयुरारोग्य देऊन त्यांच्या घराण्याच्या विमल कीर्तींत त्यांच्या सत्चारित्र्याची भर पाडो व श्रीगणेशमहोत्सवाचे रूपाने देशमुखघराण्याची कीर्ति दिगंत गाजो' एवढीच त्या जगन्नियंत्याजवळ अखेरची प्रार्थना आहे.

## -* "वी० संजीवनी"चा खास अंक *-

"वी.संजीवनी"ला येत्या जानेवारी १९३७ पासून दुसरें वर्ष लागत आहे. तरी १ जानेवारी १९३७ चा "खास अंक" काढावयाचें आह्मीं योजिलें आहे. तरी आमच्या लेखक व लेखिकावर्गानीं आपल्या फोटोच्या ब्लॉक्ससह खास अंकाकरितां सामाजिक विषयावर 'लेखकांस सूचना' लक्षांत घेऊन लेख पाठविण्याची कृपा करावी. तसेच, आतांपर्यंत जे "वी. संजीवनी"कडे लेख पाठवूं शकले नाहीत त्या वीरशैवांतील विद्वान् व मान्यवर लेखक-लेखिकांनाहि फोटोच्या ब्लॉकसहित लेख पाठविण्याची नम्र विनंती आहे.

खास अंकाकरितां लेख २० डिसेंबरचे आंत "वी. संजिवनी"चे ऑफिसांत पोंचतील अशा बेतानें पाठवावेत.

मॅनेजर.— 'वी. संजीवनी.'

# वीरशैवसमाज व सुधारणा

लेखक.— श्री० कृष्णाप्पा सद्राप्पा कल्लुरे, चांदा.

लेखांक २ रा

## वीरशैवांना तरी नवमतवाद नवा नाही ! मग भीति कां ?

*यदा यदा प्राणशिवैक्यभाजां हानिर्भवेत् भूमितले गणेश : ।*
*तदा तदा मर्त्यकुलेऽवतीर्यसंभवं कुर्वतिहि धर्मसंस्थाम् ॥*

सूप्रभेद्दागम्

अर्थः—ज्या ज्या वेळी शिवधर्माची हानि होते त्या त्या वेळी हे माझे गुणधर्म संरक्षिण्यासाठी मृत्युलोकीं अवतार घेऊन धर्मोत्कर्ष करितात.

ह्या किंवा गीतावचनानुसार परमेश्वर अवतार घेईलच. तो अवतरेल तेव्हा अवतरेल. म्हणून आपणांस आपला प्रयत्न टाकतां कामा नये. शिवाचा अवतार शिवाजीमहाराज झाले नसते तर हिंदसंस्कृति नांदली नसती म्हणतात. हें जसें सत्य आहे, तद्वत् 'आमचा संगमबसवेश्वर झाला नसता तर आमचा लिंगांगीसमाज जिवंत राहिला नसता असें म्हणण्यांत आम्हाला कांही प्रत्यवाय नाही. शुद्ध ध्येयवादी समाजसुधारक आम्ही अवतारअंशीच समजून चालतो. त्यानी आज लिंगांगीसमाजांत मुख्यतः सार्वत्रिक शिक्षण-प्रसार केला पाहिजे व तो करीत असतांना किंवा समाजोन्नतीचा धडा शिकवीत असतांना अथवा नवमत प्रतिपादन करीत असतांना ऐक्यता (एकी) साधली पाहिजे. यथार्थ पाहिलें असतां आमच्या समाजांत भक्त व महेश असे केवळ दोनच भेद आहेत. तेव्हा नेत्यांनी पक्षातीत राहूनच आपलें एककार्य साधलें पाहिजे. आमचा अधिकारीवर्ग इकडे लक्ष देईल अशी आशा बाळगावी तर त्यांचे मठ म्हणजे शृंगारवाडेच होऊन बसले आहेत. दुर्दैवाने ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाप्रमाणे लिंगांगी महेश्वर व महेश्वरेतरवाद उपस्थित होऊं नये म्हणजे बरे निभावलें ! असो.

तूर्त तरी आमच्या समाजसेवकांनीच ह्या समाजसुधारणेच्या चळवळीकडे अवश्य लक्ष देऊन तदनुरोधाने रोगी पाहून मात्रा दिली पाहिजे. जितकें व जसें पचेल तितकें व तसेंच अन्न द्यावें. नाहीपेक्षा नवमतवाद म्हणून एकामागून एक इंजेक्शन देऊं लागलों तर तें पचनीं पडणार नाही! नवमतवादी ह्या नांवाखाली मन मानेल ती घटना नको. विधर्मीय राज्यकर्त्यांचा गळफांस आमच्या-भोंवती पडल्यामुळे आम्हांला आमचीं प्राचीन तत्वें सोडून नवमनोवृत्तीचें चटकदार तत्व गोड वाटणें साहजिक आहे. म्हणून आमची तत्वें वाईट हें संभवनीय नाही. आपण आजच्या सिनेमासृष्टींत फ्याशनला बळी पडून स्त्रीस्वातं-त्र्याची वाहवा करितो, पण तिकडें पहा ! जर्मनीचे सर्वसूत्रधारी हिटलर स्त्रीस्वातंत्र्य हिरावून घेऊन पराकाष्टेचा युक्तिवाद करितात. आमचीं विवाहबंधनेंच आज अमेरिकेसारखी सुख-संपन्न राष्ट्रें योग्य समजतात. म्हणूनच कोणत्याहि कार्यास घाई नको.

सुखाअंतीं दुःख व दुःखाअंतीं सुख किंवा उन्नतावस्थेनंतर विपन्नावस्था व विपन्नावस्थेनंतर उन्नतावस्था या बहुश्रुत म्हणींची परंपरा चालू असते तिथी-वार-नक्षत्रें पुनःपुनः येत असतात. किंवा फिरत्या चक्राचे कणे ज्याप्रमाणे तेच ते पुनः पुनः पहावयास मिळतात तीच परंपरा निर्जीव वस्तूवरून तो सजीव अशा मोठमोठ्या प्राण्यापर्यंत, त्याचप्रमाणे मोठमोठ्या राष्ट्रापासून धर्मालाहि लागू आहे. ज्या भूतलावर ख्रिस्तीधर्माचें नांवहि नव्हतें त्याच ख्रिस्त धर्मानुयायांची लोकसंख्या इतर बौद्ध-महंमदी धर्मानुयायापेक्षा आज किती तरी अधिक आहे. हा सर्व प्रभाव कशाचा? काळचक्राचा. आमच्या समाजांतील ह्या फिरत्या काळचक्राचे सुखसंपन्न कणे आतां पूर्वस्थानीं आलेले आहेत. म्हणूनच ह्या वेळीं आम्हीं आपल्या समाजसुधारणेच्या कार्यी गुतलों पाहिजे. मात्र, ह्या सुधारणेची किंवा नवमतवादाची, गेल्या. १ ऑगष्ट १९३६च्या 'वी.संजीवनी'-तील आमचे मित्र रा. काटकर यांनी सुचविलेल्या उपायाने कां होईना, कोणत्याहि सनातनी किंवा सुधारणावादी मताभिमान्याला जेणेंकरून चीड येईल अशी मांडणी नको. उपरिनिर्दिष्ट तत्वाला बाध येणारे नसून लिंगांगी तत्वाला धरून पाहिजेत, तरुणांनो. आपल्याला हॉटेलांतील खुशखुशीत भजे-शेव खावयाचे आहेत ना! सुग्रास बाहेरचें अन्न पाहिजे ना! तर लिंगायत-हॅाटेल उघडण्याचा प्रयत्न करा. गावोगांवीं खानावळी उघडा. निदान त्याचे उत्पादक तरी लिंगधारी बनवा. अनायासें त्यांना एक प्रकारचा नवीन धंदा दिल्याचें श्रेय आपणांस लाभेल. जेथपर्यंत मुस्लिम-हॉटेलमधून चहा पाणी मिळते तेथपर्यंत महंमदानुयायी हिंदु हॉटेलचा चहा घेत नसतो हें ध्यानीं घ्या. आम्हांला बोध घ्यावयाचा आहे तो गुणांचा आहे, दुर्गुणांचा नको. आज अखिलभारतांत धर्मांतराची लाट उसळली आहे. त्यांना लिंगांगी बनवा, व आज जो ६० लाख लिंगायतसमाज आहे तो किती तरी मोठा करून सुखसंपन्न करा. आमच्या ऐकण्यांत आहे कीं, किती तरी वीरशैव अज्ञान व दारिद्र्यामुळे ख्रिस्ती व महमदीय पंथाला बळी पडत आहेत. त्यांना जाऊं देऊं नका, व बळी पडले आहेत त्यांना शुद्ध करून शुद्धीसंघटन करा. लिंगदेह लिंगधारी बनवा. आमचे मठाधीश जे सुखशयनीं लोळत पडले आहेत त्यांना जागें करून त्यांचे मठ ह्या पाठशाळा करा. मात्र मुसलमान मुसलमानाकरिता, ख्रिस्ती ख्रिस्त्याकरिता, तद्वत् लिंगायत लिंगायताकरिता मेला पाहिजे हा उद्देश मात्र विसरूं नका. हें काय समाजोन्नतीचें लहानसहान कार्य आपणापुढे आहे? कितीतरी तर्पे ह्यांत आपणांस घालवितां येतील. अशा रीतीने समाजाकरिता आपण तनमनधनाने झटत असतां दिवाभीतरूपी समाजकंटे कितीहि ओरडूं लागले तर ते आपण होऊनच स्वस्थ राहतील.

बंधुंनो,

जर्मनांचा जर्मनी, इंग्रजांचा इंग्लंड, फ्रेंचांचा फ्रान्स, हिंदूंचा हिंदुस्थान, तद्वत् लिंगांग्यांचा लिंगराष्ट्र बनवा. काय स्वतंत्र राष्ट्रांप्रमाणें आमची कर्नाटकी एक भाषा, कर्नाटक एक देश, एक राजा, एक देव, एक धर्म कोण्या एका काळीं नांदत नव्हता काय? मग तो पूर्वपदीं आणणें—नव्हे त्याची पुनर्घटना करणेंच आजचें आपलें मुख्य कर्तव्य आहे. नवीन म्हणून कांहीं नाहीं. सर्व जुनेंच आहे. ह्यांतच आपल्याला सर्व कांहीं साठलेलें दिसेल. म्हणून आपल्याला भिण्याचें कांहीं एक कारण नाहीं.

# नवमतवाद व नववीरमाहेश्वर मंडळाची आवश्यकता!

( उत्तरार्ध )

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

'प्रसंगानुसार वागण्यांतच धर्माचें व राष्ट्राचें संरक्षण आहे"

श्री मनू.

## मूळ धर्मतत्वांचा हेतु नि आजचें सामाजिक जीवन

कोणा एका पंडिताने 'अर्धवट ज्ञान हें विषाप्रमाणे आहे' असा चिरकाल टिकण्यालायक वाकप्रचार निर्माण करून ठेविला आहे. यावरून घ्यावयाचें तर ज्ञान मिळवायचें तें पूर्ण मिळवावें; किंवा अपरोक्ष अज्ञान रहावें; असाच याचा गुह्यार्थ निघतो. आणि आम्हालाहि पण आजच्या कालमानाप्रमाणे हेंच तत्व प्रशस्त वाटतें. कारण अर्धवट ज्ञानामुळेच आज आमच्या समाजाची गति कशी बहकलेली आहे याचा प्रत्येक सुज्ञ नवमतवाद्यांना चांगला अनुभव आहे. धर्मपालनाचें धोरण ओळखण्याचीहि त्यांच्यांतील सदसद्विवेकबुद्धि लोपली आहे. करितां जें कार्य एकाच्या सहानुभूतीवर सहजासहजीं पार पडावयाचें त्याकरिता द्रव्याचें नि श्रमाचें अलोट सामर्थ्य खर्ची घालण्यास भाग पाडीत आहेत. म्हणून आज नवमतवाद्यांना 'नववीरमाहेश्वर मंडळा' स अस्तित्व द्यावें लागत आहे. आता मंडळ स्थापन झाल्यावर काय करावयाचें याचाहि थोडासा उल्लेख केल्यास अप्रासंगिक होणार नाही. त्यांचें पहिलें कार्य धर्मांचा मूळ कोणता नि तो कायम ठेवून त्याच आधारें आपल्याला नवमताच्या बंधनाची उभारणी करितां येईल किंवा नाही. आजच्या युगांत अशक्य तें कांहीच नाही. त्या अर्थी ती करितां येणारच! पण ती कोणत्या स्वरूपांत नि कसकशी प्रचारांत आणतां येईल याचे निश्चित निर्बंध आंखणें हा असावा. ह्मणून सध्या येथे फक्त उद्देश तेवढा सुचवून ठेवीत आहें. पुढलें कार्य मंडळाचें आहे. तरी पण ओझरती रूपरेषा दिल्याशिवाय रहावत नाही.

वीरशैवांचें हिंदुसमाजांतील आजचें जीवन ह्मणजे केवळ 'जितं मया' असेंच आहे. बिचाऱ्यांना बळी पडून धर्म धर्म ह्मणतां ह्मणतांच कर्मठांबरोबर सुधारकांनाहि पुराणकाळचींच वांगीं खावीं लागताहेत. मग मूळचा वीरशैवधर्म सुधारकांचाच असला तरी त्याचा आजच्या सुधारणावादी जगांत काय उपयोग? ह्मणून आमची अखिल वीरशैवांतील माहेश्वरवर्गास नि इतर समाजबांधवांस अंतःकरणापासून एवढीच विनवणी आहे कीं,

जर तुम्हास वीरशैवांचें कांही अंशीं तरी हित साधायचें असेल तर (१) वीरशैवधर्माचें धार्मिक क्षेत्र चिरंजीव होईल असें नवीन तत्वावर कायम करा; [२] तो अखंड उत्क्रांत होत राहील अशी त्याबद्दल दक्षता बाळगा; व [३] इतर धर्मांप्रमाणे ह्याहि धर्मीयांना इतर—निदान हिंदूंत तरी—धर्मीयांत राजरोसपणें सामाजिक, व्यावहारिक, नि धार्मिकप्रभृति क्षेत्रांत वावरतां येईल पण त्यामुळे दोषी न ठरायला मोकळीक राहील, इतकी आपल्या धर्माची बंधनें ढिलीं व्हावींत. त्याशिवाय 'वीरशैव' हा मूळचा आध्यात्मिक सुधारक असला तरी आजच्या जगांत त्याला आध्यात्मिक वा सामाजिक सुधारक ह्मणतां येणार नाही. स्वधर्मांतील उपविभागणींत त्यांचें क्षेत्र कितीहि वाढविलें (वाढविणें कठीणच ह्मणा) तरी इतर धर्मांत जोपर्यंत त्याला वाव मिळणार नाही, तोपर्यंत त्याचा काय उपयोग?

मा. मु. करबसवय्यास्वामी व नानासाहेब वामणगांवकर-प्रभृतींनी आपलें धाष्टर्य सरसावलें नसतें तर मा.मु. माजलगांवकरांना जर्मनीस जाण्याचा संस्मरणीय असा सुयोग येऊं शकला असता काय? नागपुर येथील दे. भ. राजाभाऊ डांगरे यांचें नांव माहित नसलेला वीरशैव विरळाच. मागल्या सत्याग्रहाच्या चळवळींत त्यांना तुरुंगांत जाण्याचा सुयोग आला, नि ते वीरशैवसमाजाच्या मतें प्रायश्चित्ताचे धनी बनले. सुटकेनंतर जरी त्यांना स्वतःस त्याबद्दल कांहीच वाटत नव्हतें, तरी पण केवळ जात्यपवादास्तव — प्रायश्चित्त घेऊन निर्दोष व्हावें — ह्मणून नागपुरांतील ज्या अनेक वीरमाहेश्वरांचा सल्ला घेतला त्यांतच त्यांनी वी. मा. नानाजी पेन्टय्यास्वामी पल्लेकार यांचाहि सल्ला घेतला. त्या वेळी त्यांना प्रश्न केला कीं, 'तुह्मास जर तुमचें मन केलें हें योग्य केलें नाही असें सांगत असेल तर प्रायश्चित्त घेणें रास्त होईल.' त्यावर त्यांनी उत्तर दिलें कीं, 'याबद्दल मला तर कांहीहि वाईट वाटलें नाही व माझ्या ध्येयामुळे केव्हाहि मला मीं निंद्य कृत्य केलें असें वाटणार नाही.' शेवटीं मा. मु. नानाजींना असाच निर्णय द्यावा लागला कीं, 'तर मग प्रायश्चित्ताची कांहीच जरूर नाही'. यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं, हा मनाच्या शुद्धाशुद्धतेचा प्रश्न आहे. पण **वैय्यक्तिक मतें कितीहि सत्य असलीं तरी बहुजनसमाजापुढें तीं असत्य ठरतात.** ह्याच न्यायान्वयें अखेरीस श्री. डांगरेंना निव्वळ समाजाच्या धारणेकरितां जें करावयाचें तें करावेंच लागलें. असो! उदाहरणाचा मतितार्थ एवढाच कीं, दोन्ही मतांचें ध्येय आमच्या समाजापुढे ठेवायचें हाच होता.

हिंदुसमाजाच्या उच्चवर्णीयांकडे पहावें तर त्यांचें अनुकरण कोणासहि घेण्यालायक आहे. ब्राम्हणवर्णीयांत त्यांच्या मूळ हेतूच्या दृष्टीने पाहिलें तर आजच्या युगांत किती तरी अघोर नि निंद्य कामें त्यांच्यांत होतात, पण ते परस्परास मात्र कधीं दूषण देणार नाहीत;तर उलट डोळेझांक करितील वा दूषित बाजू सावरून घेतील. पण आपलें बिंग वा कमीपणा इतरवर्णीयांच्या नजरेस येऊं देणार नाहीत. आणि आमचा समाज तर काय? क्षुल्लकशा गुन्ह्याबद्दलहि गुन्हेगारांची नालस्ती चव्हाट्यावर आणण्यास कमी करीत नाहीत. पण बिचाऱ्यांना माहित नाही कीं, त्यांची नालस्ती, त्यांचा कमीपणा, उघडकीस आणण्यांत आपण आपल्याच समाजाचा नि त्याबरोबरच स्वतःचाहि कमीपणा जगाच्या निदर्शनास आणीत आहेंत. तर मग प्रश्न आहे कीं,

## आजचे खरे माहेश्वर कोण?

ह्याचें स्पष्ट उत्तर आह्माला असेंच देतां येईल कीं, ज्याला स्वतःच्या धर्माची कांही तरी चाड आहे, कालमानाची ओळख आहे, प्रसंगाचें गांभीर्य ज्याला ओळखतां येते आणि कार्यांनी

माहिती जाणतां येते, मग ते अमरावतीचे नानासाहेब **वामणगांवकर** असोत, वा नागपूरचे नानाजी **पल्लेवार** असोत, वा इतस्ततः कोठेलीहि नि **कोणीहि** असोत, तात्विकदृष्ट्या ह्या वृद्धक वा तरुण व्यक्ति माहेश्वरपदाला शोभणाऱ्या आहेत. आमची मनोमन खात्री आहे कीं, माहेश्वरपदीं ज्या व्यक्ती ( जात ) मानल्या जातात त्या **माहेश्वरदेवास** असा हा मानवांतील भेदभाव मान्य असेल काय? नाही. त्याला हें मान्य असणें कालत्रयीं शक्य नाही, व शक्य होणार नाही. हेंच कोणासहि प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. ज्या अर्थी ह्या जातीस एवढा मोठा देवतुल्य दर्जा देण्यांत आला आहे, त्याचा तरी मूळ हेतु अभेदत्व हाच होता, नि आजच्या काळांत तोच हेतु ' नवमतवाद ' नि ' सुधारणा ' ह्या शाब्दिक देवतांसभोंवती सहेतुक घिरट्या-प्रदक्षिणा घालीत आहे तें उगीच नाही, तर त्याच्या मुळाशीं असा हा मूळ हेतु कायम आहे ह्मणून होय.

आणखी या भागावर किती तरी लिहितां येण्यासारखें आहे. परंतु संपादकमहाशयांच्या सूचनेची मला एकदम आठवण झाल्यामुळे, पुढील दोन वाक्यांत ह्या लेखाचा शेवट करूं या.

आतापावेतो जो हा एवढा पाल्हाळीत ऊहापोह केला, त्याचा मूळ उद्देश वीरशैवांच्या आचार्यपीठावरील आचार्य निव्वळ नामधारी उरले आहेत, त्यांच्यांतील नाममहात्म्यापलीकडे ह्यांच्यांत कांही उरलें नाही, त्यांची वृत्ति गतानुगतिकत्वाने चळली आहे, भीरुता आली आहे, आजच्या सुधारलेल्या नवमतवादी जगांत त्यांची मतें पचनीं पडत नाहीत, व आमच्या मतांचा त्यांना बाऊ वाटतो, म्हणून हा " नववीरमाहेश्वरमंडळाच्या आवश्यकतेचा " प्रश्न उद्भवला आहे. पण त्याची उभारणी सारासार विचारांतीं नतमतवादाच्या तत्वावर व्हावी अशी आमचीच काय पण दरेक नवमतवादी वीरशैवाची आकांक्षा असलीच पाहिजे असा आमचा मनोमन विश्वास आहे. म्हणून ' नववीरमाहेश्वरमंडळें ' उदयास यावींत-किंबहुना आणावींत, नि वीरशैवांच्या वीरत्वाला शोभेल अशीच पुनर्घटना तयार करून अनिर्बंधित नियंत्रणाखालीं अखिल जगताबरोबरच वीरशैवधर्मीयांनाहि पुढे येण्याचा मार्ग खुला व्हावा एवढीच सदिच्छा प्रकट करून, वरेंच वाढवलेलें लिखाण संपवितों.- इत्यलम्.

संपूर्ण

---

# वैवाहिक बंधनाचा मूळ हेतु?

लेखक.- सिद्रामआप्पा एस्. कुन्हे, अमरावती.

जगांतील इतर जीवजंतूंपेक्षा मानवी जीवन श्रेष्ठ प्रतीचें मानलें गेलें आहे. कारण त्याचा शेवट चांगल्या आणि उच्च अशा स्थितीमध्यें होतो, आणि याच उच्च स्थानाकडे जाणाऱ्या मार्गावर पदार्पण करण्यासाठी त्याचे प्रथम-प्रवेशद्वार ह्मणून मानवी जीवनांत विवाहाचें बंधन घालण्यांत आलें आहे. या बंधनाच्या योगाने तरुण-तरुणींच्या भावना निगडित होतात, त्यांच्या जीवनांत एक प्रकारची नवीन चेतना आणि जिज्ञासा यांची मुहूर्तमेढ रोवली जाते, उभयतां१

आपापल्या जीवनवैशिष्ट्यानुकूल श्रेष्ठ अशा स्थानाकडे जाण्याचा आपल्यापरीं प्रयत्न करीत असतात. त्यांच्यामध्यें साहाजीकच समभावसंवेदनामुळे एक प्रकारची आकर्षणशक्ति उत्पन्न होते. ही आकर्षणशक्ति नैसर्गिकच असते. ह्या जीवनाला पवित्र आणि धार्मिक बनविण्यासाठीच विवाहाचें बंधन घालण्यांत आलेलें आहे. या स्त्रीपुरुषसंयोगाला निसर्गाचा पूर्णपणें पाठिंबा आहे. आणि तोच मानवी जीवनाला अज्ञानी अवस्थांतून बाहेर काढून अत्यंत महत्वपूर्ण अशा उच्चस्थानाकडे घेऊन जातो, आणि स्त्रीपुरुषांना गंभीर, उदार, आणि धर्मभावनायुक्त बनवितो. विवाहोत्तरच स्त्रीपुरुषांचे एकमेकांचे सान्निध्याने परस्पराविषयी प्रेम-आकर्षण वाढत जातें.

जगाच्या अनादिकालापासूनच ही विवाहाची जी रूढि चालत आलेली आहे त्यांतील मूळ उद्देश हाच आहे, व निसर्गहि आपल्यापरीं ह्या उद्देशानुकूल मदत करीत असतो. आमच्या देशांतच फक्त हें विवाहबंधन घालण्यांत आलेलें आहे आणि इतर देशांत मुळींच नाही अशी पुष्कळ लोकांची चुकीची समजूत आहे. विवाहाचा जो मूळ उद्देश आहे, आणि त्यामध्ये जी मानवी जीवनाची हितेच्छा आहे, ती अखिल विश्वांत सारख्याच प्रमाणांत रूढ आहे. कोणत्याहि देशांतील रूढीचें परिशीलन करण्यापूर्वी तेथील धर्मावर प्रथम नजर टाकणें आवश्यक आहे. कांहीं देशांतील निव्वळ विषयांध तरुण-तरुणीच्या प्रेमलीला पाहून आपणाला थोडसं चमत्कारिक वाटेल. कारण तेथे विवाह ह्मणून कांहीं बंधन आहे किंवा नाही, किंवा जीवनाचें पावित्र्य आणि महत्व यांची तरी कल्पना आहे कीं नाही, याचीच प्रथम शंका उत्पन्न होते. तिकडील ह्या प्रकारामुळे दिशाभूल होण्यासारखी आहे. फार पुरातन कालापासून चालत आलेल्या या रूढींत थोड्या-फार प्रमाणांत फरक असूं शकेल, परंतु त्यांच्या उद्देशांत किंवा कार्यकारण भावांत मुळीच फरक नाही.

तरुण-तरुणींच्या सौंदर्यसौष्ठवांत आणि योग्यतेंत नेहमी फरक असूं शकतो. वैवाहिक जीवनाचें प्रेम हेंच यशस्वितेचें व सौख्याचें लक्षण आहे, आणि प्रेम चिरकालीन टिकवण्यासाठी स्त्री-पुरुषांची समान योग्यता असणें जरूर आहे. शिक्षण, सौंदर्य, वगैरे गोष्टींत जोपर्यंत उभयतांमध्यें साम्य नाही तोपर्यंत चिरकालीन प्रेम उत्पन्न होणें शक्य नाहीं. सद्यःस्थितीला वैवाहिक बंधनांत जें एक प्रकारचें शैथिल्य दिसून येतें त्याचें कारण झालें तरी हेंच आहे. जेथे स्त्रीपुरुष वैवाहिक जीवनाने संतुष्ट नाहीत तेथे परस्परांमध्ये साम्य नसतें हेंच असंतुष्टतेचें खरें कारण आहे. सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीच्या विवाहपूर्व कल्पनांनीच वैवाहिक जीवनाला भलतीच कलाटणी दिली आहे. सुखसमाधानाने जसा विवाह पार पडावयास पाहिजे तसा पडत नाही. विवाहानंतर उभयतांमध्यें जमीन-अस्मानाचें अंतर पडत जातें, आणि ह्मणूनच प्रेम उत्पन्न होणें अस्वाभाविक होऊन बसतें. केवळ भावनेमुळेच अमृताचें विष होतें आणि विषाचेंहि अमृत बनवितां येतें. त्याप्रमाणेच विवाहबंधनाचें झालेलें आहे. आम्ही त्याविषयींची पवित्र भावना विसरल्यामुळेच अनेक प्रकाराने असंतुष्ट आहोंत, आणि ह्मणूनच त्याच्या पावित्र्याचें अपावित्रतेंत आणि संतोषाचें असंतोषांत रूपांतर होत चाललें आहे.

स्त्री ही केवळ निर्जीव वस्तूप्रमाणें सुखोपभोगाचें साधन गणलें जात आहे. एखादा वृद्ध एखाद्या नवयौवनसंपन्न बालिकेबरोबर विवाह करून चैनीचा संसार करण्याची मनांत इच्छा करितो, एखादा कुरूप मनुष्य सौंदर्यप्राप्तीची मनीषा उरीं बाळगून त्याची मजा चाखूं पाहतो, किंवा एखादा अशिक्षित, सुशिक्षित बालिकेचें पाणीग्रहण करून गृहजीवन सुखी करूं पाहतो, हा काय विवाह ह्मणावयाचा ? हें काय परस्परांचें मीलन ह्मणावयाचें ? पुरुषवर्ग संपत्तीच्या फाजील बुद्धींत स्त्रीरत्नांची जी लूट करूं पाहतो, तें

स्त्रीरत्न निर्जीव नाही. तर तें सजीव असून, त्यालें रूपसौंदर्य असें अवास्तव खर्च करणें योग्य समजत नाही. तें स्त्रीरत्न सजीव आहे परंतु त्याला वाचा नाही. आणि ह्मणूनच त आपल्या मनोभावना उघडपणें समाजापुढें मांडूं शकत नाही किंबहुना मांडूं शकते, परंतु तेहि आपल्या मूक भाषेने. आणि नित्याच्या व्यवहारांत सोन्या-सारख्या घराची माती होऊन जाते. तिथे प्रेमाचें अस्तित्वच रहात नाही, तेथे जीवन-सौख्याचा तर लवलेशहि बाकी रहात नाही.

अंध, पंगू, लुले, आणि अशक्त अशा प्रकारच्या कोणत्याहि पतीबरोबर जन्म काढलाच पाहिजे असें म्हणण्याची विचारसरणी ही एकतर्फी व समंजसपणाची खास नाही. काय ह्मणे त्यांची सेवा-चाकरी केल्यानेच आपल्या जीवनाची सार्थकता होते. विवाह हा केवळ वासनात्मक जीवनाची मर्यादा आहे हें निःसंशय आहे. या मर्यादेच्या योगानेच स्त्री-पुरुष आपापली चित्तवृत्ति ताब्यांत ठेवूं शकतात, स्वार्थाचा नायनाट होतो. धार्मिक व नैतिक ज्ञान वाढत जाऊन तामसी वृत्तीचा नाश होतो. वासनेचा स्वैरपणा मानवी जीवन सुखी करतोच असें नाही, विवाहबंधन पूर्णपणें नाहींसें करावें या मताचे पाश्चात्य लोकसुद्धा नाहीत. कारण ते हळूहळू त्याच्या विरुद्ध जाऊं लागले आहेत. वास्तविक ते लोक सुशिक्षित आहेत, ध्येयासाठी मरणारे आहेत, परंतु मानवी जीवनांत जोपर्यंत फरक होत नाही तोपर्यंत त्याचें यथार्थ असें फळ मुळीच दृष्टीस पडणार नाही.

आपलें जीवन सुखसमाधानाने घालवीत नाहीत असे किती तरी विवाहित स्त्री-पुरुष आढळतील. गृहस्थाश्रमामध्ये सुखजीवनाचा अनुभव घेणारी अशीं किती सांपडतील. परंतु विवाहाला ' बंधन ' आणि गृहस्थाश्रमाला ' जंजाळ ' असेंच संबोधण्यांत कित्येकांना भूषण वाटत असतें. हें असें कां ? हीच स्थिति कायम राहिली तर सती जाण्याच्या पद्धतीप्रमाणे विवाहबंधनहि केवळ इतिहासांत नांवमात्र होऊन राहील, आणि ह्मणूनच त्याला नीट वळण लावणें प्रत्येकाचें आद्य कर्तव्य आहे.

---

# आजच्या समाजघटनेंतील स्त्रियांचा दर्जा

लेखिकाः— कु० शामलता.

सोन्यापेक्षां अधिक मौल्यवान् रत्नें ! रत्नापेक्षां अधिक इष्ट ज्ञान. परंतु ज्ञानाइतकीच मौल्यवान अशी स्त्री — सद्गुणी स्त्री आहे. स्त्रियांना केवळ अलंकार किंवा महाल सुख देत नाहीं. त्यांना उत्साहाचे व प्रेमाचे दोन शब्द पाहिजेत, प्रेमाचा गोड स्पर्श पाहिजे, व हृदयाची धडधड ऐकून अंतःकरणाचे बोल समजून घेणारं हृदय पाहिजे.

÷ ÷ ÷

पुरुषांच्या सार्वजनिक, राजकीय व आर्थिक परिस्थितींत सुधारणा घडवून आणण्याच्या प्रवृत्तीला त्यांच्या मार्गांत स्त्रियाच काय त्या मध्यें

धोंड येतात, असले निराशेचे शब्द पुष्कळ वेळां नवतरुणांच्या तोंडून निघालेले ऐकावयाला येतात. याचें कारण काय बरें असावें ? स्त्री ही पुरुषांच्या मार्गांतील धोंड आहे अशी एकजात समजूत करुन घेणें म्हणजे स्त्रीजातीच्या नैसर्गिक प्रवृत्तीविषयीं अज्ञानच दाखविणें आहे. कांहीं अपवाद खेरीज केल्यास योग्य संधि मिळतांच स्त्री ही पुरुषाच्या मार्गांतील धोंड नसून सहचारिणी आहे असेंच दिसून येईल. दुराग्रहानें स्त्रियांना मार्गांतील धोंडच म्हटल्यास त्यांनाहि पुरुषांना वाकड्या शिंगाचे मारके बैल म्हणावें लागेल. परंतु असले निरुत्साही उद्गार मानवासारख्या श्रेष्ठ दर्जाच्या इभ्रतीला लांच्छनास्पद असे सर्वथैव भेकाड उद्गार आहेत, व हे उद्गार, किंवा याच जोडीचे दुसरे अंत:करणाला हादरून सोडणारे वाक्बाण ज्या स्त्रियांच्या दैवीं अहर्निश ऐकावयाची पाळी पतीकडून येत असल्यास, त्या तरुणींच्या मनाची काय बरे अवस्था होत असेल ह्याची कल्पना किंवा जाणीव अनुभवाखेरीज, अथवा त्याच परिस्थितीशीं झगडणाऱ्या स्त्रियांना जास्त कळेल हें केव्हाहि निस्संशयच आहे.

सर्व शक्तिमान् ईश्वरानें नैसर्गिक सहजलीलेने बनविलेलें स्त्रीजीवनच असें आहे कीं, ज्याच्या पुण्याईनें ही सृष्टि अढळ राहूं शकली; आणि आपली कीर्ति अमर केली आहे. अशा पावित्र्याच्या खाणीला मानवांनी आपल्या कुशाग्र व तैलबुद्धीनें कृत्रिम कृतीनें निर्जीव बाहुली बनविली. पुरुषांची स्त्रियांकडे बघण्याची दृष्टि म्हणजे स्त्री ही केवळ पुरुषांची विलासदासी होय. त्यांना त्यांच्या इच्छेला लाथाडून हवें तसें वागवावयाचें, त्यांच्या मानापमानाकडे लक्ष न देतां वाटेल तसले घाणेरडे शब्द बोलायचे, इतकेंच नव्हे तर कोणतीहि महत्वाची गोष्ट किंवा विचाराच्या बाबतींत सल्ला न घेतां उलट ‘ त्यांना काय कळतें, बायकाची अक्कल कालीदासांत तळली किंवा शेक्सपियरमध्ये घोळली तरी ती चुलीपुरती ती चुलीपुरतीच असणार ! ’ ह्या अहंभावाने पुरुष स्त्रियांना तुच्छ लेखून ‘ हम करेसो कायदा ’ या न्यायानें वागवितात. त्यांना वाटतें, आपणच काय ते शहाणे, बुद्धिमान्, अक्कलवंत. तेव्हा असल्या गर्विष्ट अरेरावी वृत्तीच्या शहाण्यांपुढे बायकांची अल्पमति कोठे कोठे पाजळणार आहे, व त्यांच्या हक्काची परमावधी कोठपर्यंत गेली आहे, हें स्पष्टच दिसतें.

लहान मुलांच्या करमणुकीकरिता म्हणून वडील माणसं त्यांना निर्जीव खेळणीं देऊन त्यांची बालिश वृत्ति खुलवितात, व थोडाच काळ कां होईना त्यांना सुखसागराचा अनुभव घ्यावयास लावतात. तद्वतच स्त्रिया ह्याच कोणी संसाररूपी भवचक्रांत पुरुषांच्या करमणुकीचे, चैनीचे, एक प्रकारचें सजीव खेळणेंच आहे. आणि पुरुषांचें भाग्य किती अत्युच्च शिखरावर आहे कीं, स्त्रियांसारखें कोमल नाजुक, सुंदर, पण भावनायुक्त हळव्या हृदयाचं सजीव खेळणें ईश्वराने आमच्या स्वाधीन केलं आहे, असे पुरुषवर्ग समजून त्यांचा उपयोग करून घेतात.

चूल आणि मूल यापलीकडे स्त्रियांना अधिक कोणतेंच कार्य करण्याचें समजत नाही हीच स्त्रियांकडे बघण्याची दृष्टि आपल्या समाजांत आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाही. ह्या विचारतरंगामुळेच कीं काय, मानवाच्या आयुष्यरूपी जीवनांत अग्रगण्य असलेला, तसेंच अनादि कालापासून रूढ झालेला संसाररूपी रथ स्त्रियांच्या सल्लामसलतीच्या, किंबहुना स्त्रीपुरुषांच्या समान हक्काच्या, मताच्या, योग्य मिलाफाच्या अभावी तो योग्य मार्गाकडे हाकारण्यास कठिण झालें आहे, व हा संसाररूपी भवसागर सर्वांगसुंदर उत्तम तऱ्हेने तरून जाण्यास अत्यंत कष्टप्रद तसेच जाचक झाल्यास नवल तें काय ! असली परिस्थिति उत्पन्न होण्याचें एकमेव कारण म्हणजे “ स्त्री ही भोग्य वस्तु आहे, तिला मानपानाच्या इच्छा–आकांक्षा कांही नाहीत, आवडी-नावडी नाहींत, ह्या पाशवी वृत्तीनें त्यांना मनसोक्त छळावें, त्यांतच जणुं कांही स्वर्गतुल्य

आनंद भरला आहे, आणि सर्वांत मुख्य ह्मणजे स्त्री ही पुरुषांच्या गळ्यांतील लोढणं असून पिढ्यानपिढ्या (?) वडिलोपार्जित हक्काची वस्तु आहे असा मनुष्यांचा बनलेला ठाम ग्रह होय.

स्त्रियांविषयी असली हलकी मनोवृत्ति सर्वच पुरुषांची असते असें नाही. कांहींना स्त्रियां-विषयी कळकळ असते, पण असे फारच थोडे. शेकडा ५ पुरुष आपल्या समाजांत स्त्रियांविषयी साहानुभूति व कळकळ बाळगणारे आहेत तर शें० ९५ अनास्था बाळगणारेच आढळून येतील. दुसऱ्या प्रकारच्या माणसांच्या संगतींत असलेल्या कित्येक चतुर, हुशार, तसेच व्यवहारदक्ष असलेल्या स्त्रिया "मूग गिळून बुक्क्यांचा मार" ह्याप्रमाणे आपलें जीवन अत्यंत कठिण, खडतर, परिस्थितींत घाल-वितात. कारण त्यांचें जीवनरूपी पुष्प रजनीच्या काळ्याकुट्ट अंधकारांत पिचत पडलेलें असतें. अर्थात् असल्या आयुष्यात त्यांच्या मनाला कोणत्याच प्रकारची गोडी, आनंद, उत्साह, न वाटतां, उलट असलें कष्टप्रद आयुष्य: कंठण्या-ऐवजीं लवकरच आपल्या आयुष्याची अमावास्या झाली तर सोन्याहून पिवळें होईल या भीतीच्या कृष्णछायेने तिचें हृदय व्याप्त होऊन जातें, याचा कोण विचार करतो ?

ज्याप्रमाणे मेघावडंबरांत व मुसळधार पाव-सांत वीज क्षणांत चमकावी किंवा साहारा वाळवंटांत दैवदुर्विलासाने एखादा प्राणी सापडावा व तो पाण्यासाठी तळमळत असतां अचानकपणें त्याला मृगजळ दिसावें व त्यांत कांही क्षणापुरता कां होईना आनंद व्हावा परंतु अखेर फसगत होऊन दारुण निराशा नशिबीं यावी, तद्वतच स्त्रियांच्या काळवंडलेल्या व अश्रूंनी भिजून गेलेल्या चेहऱ्यावर तिच्या उभ्या आयुष्यांत समाधानाचें हास्य क्षणभरच चमकतांना दृष्टोत्पत्तीस येतें. असल्या परिस्थितींत असतां त्यांना आपल्या पतीच्या कृतिरूपी आचरणाने कसा बरं आनंद होईल. त्यांचें "भग्न हृदय" पुरुषांचें समाधान करूं शकणार तर नाहीच नाही; शिवाय पतीच्या कार्यांत मदतगारहि होणार नाही. याचें सर्वथैव कारण ह्मणजे त्या **पतीला** कोणत्याहि कार्यांत पुरुषाप्रमाणें स्त्रिया समरस न होतां त्यापासून अलिप्त राहातात. स्वतःचें मत स्पष्टपणें देण्यास कचरतात, व ह्मणूनच इतर समाजांतील स्त्रियां-प्रमाणें आपल्या मागासलेल्या समाजांतील स्त्रिया पुढे न येतां अज्ञात असल्याप्रमाणे आहेत. या वृत्तीचें पूर्णपणें ज्ञान पुरुषवर्गांत नाही यासारखें समाजाचें अधिक दुर्दैव तें कोणतें असणार ?

तात्पर्य काय, तर स्त्रियांकडे गृहराज्याचा अधि-कार प्राप्त झाला आहे. अर्थात् तो हमाली कामाचा हक्क. तिचें राज्य पूर्ण स्वतंत्र तर नाहीच, पण या साम्राज्यांत स्वराज्याचाहि उपभोग तिच्या वाट्याला येत नाही. ह्याचाच अर्थ ती "दिलेल्या दामाची अन् सांगितलेल्या कामाची धनीण !" कारण तिचें पोट परावलंबी असल्यामुळे तिला कसल्याहि प्रकारची कुरकूर न करतां पुरुषांचें वर्चस्व स्वीकारावें लागतें; इतकेंच करून न थांबतां " असे पति देवचि ललनांना तयासी अन्य भावना ना " ह्या रूढ असलेल्या कल्पनेनुसार स्वतःच्या आकांक्षांना तिलांजली देऊन खुशीने पुरुषांच्या आधारें अशा पाशवी वृत्तिरूपी होम-कुंडांत आपल्या सर्वस्वाचा बळी देण्यास तत्पर रहावं लागतं. अहाहा ! काय ही स्वार्थत्यागाची मीमांसा! परंतु स्वार्थमय जगांतील पुरुषी साम्राज्यांत त्याचें महत्व वाटत नाही. खरोखर स्त्री ही पावि-त्र्याची खाण, सहनशीलतेची एकमेव देवताच होय.

तेव्हा जर पुरुषाने स्त्रीवर्गाकडे सहानुभूतिपूर्ण आदराने पाहिलें व त्याच्या मताला किंमत दिली तर त्यांच्या कोणत्याहि कामांत किंवा संकटप्रसंगी पत्नी समरस होऊन सहकारी व मदतगार होईल. स्त्री ही उत्साहाची लता आहे. या लतेला मानव-रूपी वृक्षांनी योग्य प्रकारें सांभाळ केल्यास स्त्रिया ह्या पुरुषांच्या गळ्यांतील लोढणं अथवा त्यांच्या मार्गांतील प्रतिस्पर्धी न होतां प्रेम, शांती, आणि

कर्तव्य या त्रिकुटाच्या संयोगाने पतीची मार्गदर्शिका होईल, व सहकार्यरूपी पुरुषांच्या गळ्यांतील एक आदर्शवत् अशा अमोल्य "ताईताची" जागा पटकावील. स्वतःच्या जीवाकडे न पाहातां कसल्याहि परिस्थितींत पतीच्या प्रेमळ सहवासजन्यरूपी स्वर्गाच्या, कर्तव्याच्या, ध्येयांत भाग घेईल, व त्या वातावरणांत स्वच्छंदाने प्रवेश करून बुद्धिरूपी तेजाने अधिक चमकूं लागेल. स्त्रियांना समान हक्क दिले, आणि त्यांच्या कार्यांत पुरुषांनी सक्रीय साहानुभूति दाखविल्यास, आपल्याहि समाजांतील स्त्रिया मागसलेल्या न राहतां पुढे येतील, व आपल्या अंगच्या कृतीने प्रत्येक गृहिणी आपापल्या परीने घरांतील साहारा वाळवंटाचें रण निर्दाळून नंदनवन स्थापन करील. मानवी संसारांत परिस्थितीची अशी एखादी लाट येतें कीं, तिच्या भरतीबरोबरच जर स्त्रीपुरुषांनी आपलें जहाज हांकारलें तरच आपण भाग्याच्या किनाऱ्याला जाऊन पोहचूं व त्या किनाऱ्यावर ध्येयरूपी मनोऱ्यांत सुखाने कालक्रमणा करूं. पण जर का ती लाट तशीच जाऊं दिली तर साऱ्या आयुष्याचा प्रवास उथळ पाण्यांत व दुखांत कंठावा लागेल याचें तिला जात्याच पूर्णपणें ज्ञान असतें. शेवटी प्रामुख्याने सांगावयाचें ह्मणजे स्त्री ही पुरुषांची मार्गदार्शिका आहे. जीवितांतील एक उत्साही मित्र आहे. उभयतांच्या सहकार्यावर संसाराचा पाया उभारलेला असतो. ती पुरुषाबरोबर दुःखहि सहन करिते, त्याचप्रमाणे तिचा सुखावरहि तेवढाच हक्क आहे, समान हक्क आहे. तेव्हा विचारी, सुशिक्षित, तसेच, समंजस बांधवांनी कृपा करून स्त्री ही पुरुषांची दासी किंवा मार्गांतील धोंड आहे असा समज न करून घेतां स्त्री ही पुरुषांची अत्यंत जिवलग सहचारिणी आहे, ह्मणून सामाजिक जीवनलढ्यांत त्यांचें समानहक्काने सहकार्य घ्यावें अशी सर्व बंधूंना माझी नम्र विनंती आहे.

---

# नवमतवादाचें नकली नाणें
## अर्थात्
# प्रायश्चित्तप्रकरणाचे काळे-गोरे रंग

लेखकः— श्री. बुधाप्पा शिवाप्पा कापसे, कॉंट्रॅक्टर, सिताबर्डी, नागपूर.

*( टीपः—१५ ऑक्टोबर १९३६ च्या 'वी. संजीवनीं'-त " [illegible]तसमारंभ, कीं नवमतवादाचा खून ?" या मथळ्याखाली आलेला लेख वाचून जे विचार सुचले, ते या लेखांत ग्रथित केले आहेत. )*

---

आजकाल कांही लोकांना स्वतःला नवमतवादी ह्मणवून घेण्यांत फार धन्यता वाटते, आणि ह्मणून तो अधिकार प्राप्त करून घेण्याची एकहि सुवर्णसंधि हे लोक वायां जाऊं देत नाहीत. नवमतवादाची झूल पांघरून प्रत्येक सामाजिक वादाची वासलात लावण्यांत यांच्यासारखे पटाईत हेच लोक. समाजांतील विचारांचे आणि अनेक शक्तींचें "आदान-प्रदान" कांही नियमित तत्वांवर सुरळीतपणें चालण्यासाठी व समाजपटाचे कुजटलेले धागेदोरे काढून त्या ठिकाणीं नवीन वीण करून आणि विस्कटलेली घडी डौलदार बनविण्यासाठी विचारप्रधान व अव्वल बुद्धिमत्तेच्या पोटीं या नवमतवादाच्या रूपेरी नाण्याचा जन्म झाला आहे. परंतु या अस्सल नाण्याच्या झगझगीत प्रकाशाने फक्त लोकांचे डोळे दिपले, त्यांच्या वृत्ति बधिर झाल्या,

म्हणून त्यांना नवमतवादाची खरी ओळख पटणें कसें अशक्य झालें याचा नीट उलगडा होतो. आणि अशा प्रकारें नवमतवादाच्या विकृत स्वरूपाची खस्त व सवंग झालेली ही बीज वाटेल तिथे उपयोगांत येऊं लागली. समाजांत प्रचलित असलेली प्रत्येक गोष्ट समाजघटनेस विघातक आहे, तिचें निसंतान केलें पाहिजे, व फार प्राचीन कालापासून चालत आलेली जुनी व कुजलेली परंपरा त्याज्य असते, अशा प्रकारचें प्रतिपादन ह्मणजेच नवमतवाद नव्हे, किंवा निव्वळ कल्पनेच्या आहारीं पडून प्रत्येक नवीन गोष्ट समाजाच्या चौकटींत आणून बसविणें यालाहि बुद्धिवंत तयार होतील असें वाटत नाही. जुन्या मतांची हकालपट्टी व नव्या मतांचा अभिषेक एवढीच कल्पना नवमतवादाच्या मुळाशी. नाहीं ही गोष्ट खरे नवमतवादी जसे जाणून आहेत तसेच स्वतःला नवमतवादी ह्मणविणाऱ्यांनीहि ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. समाजघटनेचा पाया ज्या तत्वांवर घडविण्यात आला आहे, तीं तत्वें हारखून--पारखून त्यांचा प्रचलित समाजप्रकृतीच्या दृष्टीने फोलपणा लक्षांत आला ह्मणजे त्यांना मूठमाती देणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे व त्याऐवजी निखळलेला पाया भक्कम भरण्यासाठीं ज्या नवीन व भरीव तत्वांची गरज भासेल, तीं तत्वें अंमलांत आणणें हेंहि क्रमप्राप्तच ठरतें, आणि इथेच नवमतवादाचें खरें कार्य आहे व नवमतवादाचें वास्तव स्वरूप हेंच आहे. नाही तर हरेक गोष्टीना नवमताचें स्वरूप देणें हास्यास्पद ठरतें व ही गोष्ट खरे नवमतवादी जाणून आहेत.

विधवांनी कुंकूं लावावें किंवा नाही किंवा निव्वळ भष्मच लावावें, स्त्रियांनी विकच्छ व सकच्छ नेसणे करावे, पुरुषांनी शेंडी ठेवावी अगर ठेवूं नये, अशासारखे वाद निर्माण करून नवमतवाद्यांचा आव आणणें ह्मणजे खऱ्या नवमतवाद्याच्या प्रामाणिक भूमिकेला हास्यास्पद स्वरूप आणण्यासारखें आहे. आणि स्वामी माजलगांवकरांनी प्रायश्चित्त घ्यावें कीं घेऊं नये हासुद्धा वाद वरील अनेक वादासारखा फोलच नाही काय ? हा ज्याच्या–त्याच्या इच्छेचा प्रश्न आहे. या वादाशीं आणि समाजाच्या पायाभूत तत्वाशीं अर्थाअर्थीं कांहीच संबंध नाही. जुलूमजबरदस्तीचा रामराम हा केव्हाहि वाईट. पण इच्छेच्या पोटीं कोणी एखादी गोष्ट करीत असला, तर त्याविरुद्ध नवमतवादाचा खून म्हणून ओरड करून डोळ्यांत पाणी आणण्यासारखें काय आहे ? नवमतवादाच्या खूनाची ओरड करणारे काय नवमतवादाच्या शरीराकडेच पाहतात हें ह्यावरून दिसत नाही का ? नवमतवादाचाहि आत्मा अमर आहे.

## आभारप्रदर्शन

पश्चिम–खानदेशांतील वीरशैव पुढारी व धुळ्याचे प्रसिद्ध व्यापारी श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ सिद्धाप्पाअण्णा मोगलाईकर हे महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळाचे २५० रु. आगाऊ वर्गणी देणारे पहिल्या वर्गाचे सभासद ( तहाहयात सभासद ) झाले ह्याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहोंत व ह्याबद्दल मंडळातर्फे आह्मी त्यांचें जाहीर अभिनंदन करतों. तसेंच, श्रीमंत बाबुराव बाळाप्पा बिल्डिंग काँट्रॅक्टर धुळे हे मंडळाचे वार्षिक २५ रु. वर्गणी देणारे दुसऱ्या वर्गाचे सभासद [ सन्मान्य सभासद ] झाल्याबद्दल आह्मी त्यांचेहि आभारी आहोंत, व मंडळातर्फे अभिनंदन करतों.

वि. तु. चौधरी ज. सेक्रेटरी.<br>
रा. वि. डांगरे सेक्रेटरी<br>
महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळ

स्वामी माजलगांवकरांची भूमिका कांही सामान्य मनुष्याची भूमिका नव्हे ! अधिकारांचीं वस्त्रं त्यांच्या अंगावर आहेत. एका मठाचे ते स्वामी आहेत. धर्माचा भगवा झेंडा त्यांच्या हातांत आहे. आणि अशा अधिकारी लोकांनी तडकाफडकी वाटेल ती गोष्ट केली, मग ती कितीहि चांगली असो; तरी समाजांत धरणीकंपाचे धक्के बसल्याशिवाय रहात नाहीत. समाजाच्या विचारशक्ति नष्ट होतात, भावना उचंबळून येतात, आणि समाज एकदा भावनेच्या आहारीं गेला ह्मणजे अशा अधिकारी महानुभावाची अमानुषी गत

होते. सामाजिक सुधारणा ह्या हळूं हळूं पायरी-पायरीने झाल्या पाहिजेत. त्या दृष्टीनें पाहिलें तर स्वामी माजलगांवकरांनी स्वखुशीने प्रायश्चित्त घेतल्यास ते अभिनंदनास पात्र होतील. धर्म हिंदुस्थानांत तरी अजब वस्तु आहे. आणि तो रूढींत नसला तरी अनेक कालापासून चालत आलेल्या रूढींचा नायनाट करण्यापूर्वी त्या खरो-खरच समाजप्रगतीस विघातक आहेत कीं काय हें पाहिलें पाहिजे. परदेशगमन हें रूढीने पाप मानलें आहे, व ही समजूत समाजाला अहित-कारक असली तरी त्यावर प्रायश्चित्ताचा उपाय आहे. ह्या प्रायश्चित्ताच्या रूढींत विघातक असें कांहीच नाही परदेशगमन करूनहि प्रायश्चित्त घेऊन मनुष्य आपल्या समाजधर्मांत सुखाने नांदूं शकतो, तर त्याविरुद्ध हल्ला करण्याचें काय कारण आहे? अन् एखाद्या साधारण मनुष्याने हा प्रायश्चित्त-विधी झुगारून दिला तर आह्मीं तिकडे लक्षहि दिलें नसतें. पण इथे संबंध येतो तो धर्मांतील एक उच्च स्थान मंडित करणाऱ्या अधिकारी व्यक्तीचा, आणि हा संबंध जाणला तर आपल्या बांधवांना तीर्थ देऊन पावन करण्याची शक्ति ज्यांत आहे अशा महानुभाव व्यक्तीने प्रायश्चित्त-विधी केला नाही तर फायदा होण्याऐवजी नुकसानच होणार आहे हें विसरतां कामा नये. आणि दुसरें, समाज हंसतील म्हणून हा प्राय-श्चित्तसमारंभ करूं नये असें ह्मणणें तर निव्वळ वेड-गळपणाचें आहे.दुसऱ्याच्या हंसण्यास भिऊन स्वतः-च्या समाजांत फेरबदल करणें म्हणजे सामाजिक सुधारणा करणें नव्हे,तर तें आंधळें अनुकरण होय.

देशस्थ आणि कोंकणस्थ ब्राह्मणांचें धोरण स्वीकारण्यापेक्षा आपल्या समाजप्रकृतीस पचनेल असें धोरण स्वीकारणें हें केव्हाहि हितकारक आहे, नाहीतर अजीर्णच होण्याचा जास्त संभव. इतर समाजांतसुद्धा आतांपर्यंत प्रायश्चित्तविधीचा आचार चालू होता. न्या. रानडे, आगरकर, ह्यांच्या पिढींतच ह्या आचारावर केवढी वादाची धूळ उडविण्यांत आली हें हिंदुसमाजाच्या इतिहा-सवाचकांना माहितच आहे, आणि शेवटीं हळूं-हळूं आपोआपच ही रूढी समाजांतून कशी नाहीशी झाली याचेंहि ज्ञान त्यांना आहेच. तेव्हा इतर समाज रानटी म्हणून आपल्या समाजाकडे पाह-तील ही भीति निराधारच नाही का?

धर्माचें सूक्ष्म शरीर तत्वांचें बनलें असलें, तरी स्थूल शरीर हें रूढींनी व आचारधर्मांनीं मढ-विलेलें असतें. रूढींचा धर्माशीं कांही एक संबंध नाही असें ह्मणणाऱ्यांच्या हें लक्षांत आलेलें दिसत नाही. आचारधर्म व रूढी ह्या, सूक्ष्म धर्मतत्वें ज्यांना कळूं शकत नाहीत अशा सर्वसाधारण लोकांसाठीं असतात, परंतु ह्या धर्मतत्वाशीं समरस झालेल्या अवतारी पुरुषांना आचारधर्माची कांही एक आवश्यकता नसली, तरी लोकसंग्रहास्तव त्यांना तो पाळावा लागतो. परमेश्वराचा अवतारी पुरूषसुद्धां स्वतःला जगाच्या बंधनांनी बांधून घेत होता तें एवढ्याचसाठीं. आणि ह्मणूनच स्वामी माजलगांवकरांनी जर स्वखुषीने प्राय-श्चित्तविधी केला तर त्यांनी आपल्या मठाधि-कारास व दर्जास शोभेसें सत्कृत्य करून त्यांच्या शिष्यवर्गाची मान्यता मिळविली असें आह्मी समजूं.

## वीरशैवांतील चळवळी

**धुळे:**—दे.भ. नानासाहेब बामणगांवकर,श्रीमंत रामभाऊ शेटकुळी रोहिणखेडकर,व श्री. बाबुराव चौधरी,वगैरे मंडळी मंगळवार ता.३ रोजी सकाळचे गाडीने येथे आले. स्टेशनवर श्री. बाबुराव बाळाप्पा बिल्डींग-कॉंट्रॅक्टर, व श्री.पंढरीनाथआप्पा झाडबुके, वगैरे वीरशैव मंडळी स्वागताकरिता हार वगैरे घेऊन हजर होती. स्वागतानंतर दे. भ. नानासाहेबांना बिन्हाडीं पोंचविण्यांत आले. त्यांचा श्री. बाबुराव कॉंट्रॅक्टर ह्यांचेकडेच मुक्काम होता. रात्रो श्री.मलकार्जुनआप्पा बोपशेटी,चीफ ऑफिसर, धुळे-म्यु. कमेटी, ह्यांचे घरीं-वीरशैवं-धर्मविषयक चर्चा-त्मक वादाविवाद व दे.भ. नानासाहेबांचें व्याख्यान झालें. सभेला श्रीमंत सिद्धाप्पाअंण्णा मोगलाईकर, श्री. बाळाआप्पा कॉंट्रॅक्टर,श्री.राचाप्पा लगडे, श्री. पंढरीनाथ आप्पा झाडबुके, श्री.शंकरआप्पा कानडे, श्री. गणपतआप्पा बाभूळगांवकर,बाबुराव कॉंट्रॅक्टर, शाहीर मुचाटे, वगैरे मंडळी प्रामुख्याने दिसत होती. सभेंत तरुण मंडळीहि बरींच हजर होती.

दे. भ. नानासाहेब,रामभाऊ शेटकुळी, चौधरी, वगैरेना श्री.सिद्धाआप्पा मोगलाईकर, श्री. नरहरी-आप्पा लांडे, श्री. पंढरीनाथआप्पा झाडबुके, वगैरे मंडळीकडे चहापाव्यीं व पानसुपाऱ्या झाल्या, व ' वीरशैव संजीवनीचे 'हि बरेचजण वर्गणीदार झाल्याचें समजतें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १ डिसेंबर १९३६ ( अंक २३ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियः वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति मार्गशीर्ष व० ३ शके १८५८ ( अंक २३ वा.

# कै० लक्ष्मीबाईच्या जीवनांतील बोधप्रद गोष्टी

भाग तिसरा

[ लेखकः—श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., सहसंपादक, 'वीरशैव संजीवनी' ].

मागच्या दोन भागांत कै. लक्ष्मीबाई बामणगांवकर ह्यांच्या आयुष्यक्रमांतील कांही आठवणी १९०९ इ. पर्यंत देण्यात आल्या. १९०९ मधील राजकीय आपत्तींतून नानासाहेब मुक्त झाल्यावर ते वीरशैवांच्या सामाजिक व धार्मिक चळवळीकडे वळले. ह्या काळांतच 'वीरशैव संजीवनी'ला त्यांनी जन्म दिला. त्यांचे नागपूर–सेक्रेटरीएटमध्यें नोकर असलेले कै. शंकरस्वामी मठमवार हे मामा वगैरे त्यांना सहाय्यकारी झाले. कै. लक्ष्मणआप्पा कुरझडकार, लॅन्डरेकॉर्ड सुपरिन्टेन्डेन्ट, हेहि त्यांना मदतगार होते. अशा प्रकारें सर्व आप्तेष्टांचा त्यांच्यावरील रुसवा जाऊन, सासरे व मामसासरे हेहि नानासाहेबांकडे सहानुभूतीने पाहूं लागले! त्यामुळें १९०९ ते १९१३ हा काळ लक्ष्मीबाई

व नानासाहेब ह्यांच्या दांपत्यसुखाच्या परमावधीचा काळ होय. ह्या अवधींत हें दांपत्य मनमोकळेपणानें व उभयतांहि बरोबरीचे स्नेही ह्या नात्यानें वागूं लागले. ह्मणजें 'पति' ह्मटला कीं स्वामित्वाच्या उर्मठ भावनांनी पछाडलेला व पत्नी ह्मटली कीं, ती गुलाम ही भावना उभयतांच्या मोकळेपणामुळें निघून गेली होती. तथापि कोणाहि वडिलधाऱ्या माणसासमक्ष हें उभयतांचें बरोबरीचें स्नेहसंवर्धन मात्र प्रगट होत नसे. तथापि हे उभयतांहि एकमेकांना आपले समजणारे आहेत एवढी मात्र सर्वांत समज झाली होती. घरांतील वडीलधारी माणसें उगीच लक्ष्मीबाईवर रागवली तर नानासाहेब खोटे रागावल्याचें सोंग करीत व हे सोंग पाहून लक्ष्मीबाई हासत रहात. त्यामुळे सर्व वडीलधाऱ्यांचा रागहि मावळे व ते त्या दांपत्यास नाटकी ह्मणत—पण आपलेपणा कायम ठेवून ह्मणत.

जेवणाच्या प्रकारांत थोडें बिघडलें, वाढण्याची पद्धत चुकली, पाट वाकडा बसला वा पाण्याचें भांडें उलट दिशेला मांडलें, कीं नानासाहेबांच्या तळव्याची आग मस्तकाला जायची. ताट फेंक, पाट फेक, असे ते करावयाचे व घराबाहेर जाऊन सोमेश्वरआप्पा सुपारे वा महादेवआप्पा हुंडेकर ह्यांच्या घरीं जाऊन जेवत. जेवल्यावर मात्र शांत होत. मग घरीं येत. आणि ह्मणायचे कीं, हा परंपरेचा दोष माझ्यांत आहे. कारण त्यांचे वडील भाकरीला काळा डाग दिसला कीं त्यांच्या आईवर रागावत हें त्यांना स्मरत होतें.आणि घरांत नेमका त्याच बाबतीत माझा राग अनावर होतो. पतिराजांची ही खोड लक्ष्मीबाईंनी लवकरच ओळखली होती, व त्या शक्य ती काळजी घेत व ही काळजी घेणें त्यांच्या इतकें अंगवळणीं पडलें होतें कीं, मृत्यूच्या काळांतहि त्या तें अमुक अमुक तऱ्हेने झालें कीं नाही ह्याची शब्दांनी नानासाहेबांच्या जेवणाच्या वेळी काळजी घेत. नानासाहेबांना घरची लहान मूल सहन व्हायची नाही; पण बाहेरच्या ढोवळचुका पचविण्याची संवय. प्रथमपासूनच ह्याबद्दल लक्ष्मीबाई बरोबरीच्या नात्यानें नानासाहेबांना टोमणे देत असे व त्याला तेहि प्रत्युत्तर देत. त्यामुळें उत्तराला प्रत्युत्तरें मार्मिकपणें देण्याची संवय लक्ष्मीबाईंना झाली होती. पण ती इतकी सुप्त होती कीं, अगदींच अंतरंगांत वावरूं लागल्यावाचून कोणाच्या निदर्शनाला येत नसे. त्यामुळें नानासाहेब बोलण्यात खोळसाळ पण लक्ष्मीबाई भावडया व निबोलक्या अशीच सर्वत्र ख्याती. नानासाहेबांनी खोळसाळपणा केला कीं, त्याला थोडक्यांत असें खोंचदार उत्तर लक्ष्मीबाईकडून मिळे कीं पुन्हा तोंड काढावयास वाव नसे. ही गोष्ट बरोबरीच्या स्नेह्यांत सांगितली तर ते नानासाहेबांच्याच कल्पनेचा खेळ समजत. व हे स्नेही घरीं चहाला आले कीं लक्ष्मीबाईच्या कानावर हा सर्व चहाटळपणा जाईल असें बोलत. पण चहा देण्याकरितां त्या समोर आल्या तरी हें काही ऐकलें आहे व त्याचा काही आपल्यावर परिणाम झाला आहे हें त्यांच्या चेहऱ्यावरूनसुद्धा दिसावयाचें नाही.

ह्यामुळें त्यांना बोललेलें समजत नाही अशीच लक्ष्मीबाईविषयीं नानासाहेबांच्या स्नेही मंडळींची समजूत. नानासाहेबांच्या एकाहि स्नेह्यांशीं त्या आयुष्यात चुकून बोलल्या नाहीत. कांही उत्तरें द्यावयाचींच झालीं तर तीं घरांतील दुसऱ्या माणसामार्फत दिलीं जात. नानासाहेब एकटे जेवायला बसले, व बोलायला लक्ष्मीबाईसुद्धां समोर नसल्या तर ते आपल्याच मनांतील तरंगांत इतके रंगत कीं, जेवण पूर्ण होण्यापूर्वी हात धुवावयास पाटावरून उठत. तेव्हा लक्ष्मीबाईंनी हात धरून पुन्हा पाटावर बसवावें व वाढावें आणि नानासाहेबांनी त्यानंतर एखादी पोळी व भात गट्ट करावा. ह्या प्रकारामुळें व दुसऱ्या कांही विसरभोळपणा वृत्तीमुळे आपल्या नवऱ्याला जेवणाचीहि भूक

नाही अशी लक्ष्मीबाईची समजूत झाली होती. त्यामुळें एकमेकांना बावळट ह्मणण्यात व ठरविण्यात ह्यांचा बरोबरीच्या नात्याने घरगुती हास्यविनोद होत असे व काळ आनंदांत जात असे. ह्याच सुमारास लक्ष्मीबाईचा कांही दिवस ओटले, पण त्यांना तें सहन होईना. सारख्या विव्हळत. गर्भाशयाची अपूर्ण वाढ हा दोष होता. त्यामुळे त्यांच्या वेदना चुकविण्याकरिता व त्यांचा प्राण वाचविण्याकरिता गर्भ दूर करणें हा तज्ञांनी उपाय सुचविला होता. व तोच उपाय पुढे अपाय झाला. त्याचेच मेंदूवर परिणाम झाले. मेंदूच्या विकृतींतूनच असाध्य रोग शरीरास जडले, व त्यांतच त्यांचा अंत झाला. तथापि १९०९ ते १९१३ हा काळ दंपत्यांत बरोबरीचें नातें उत्पन्न करणारा, एकमेकांवर पूर्ण विश्वास ठेवणारा व त्यापासून खरें दांपत्यसुख देणारा होता.

पण ह्याच वर्षी नानासाहेबांचें पोषण करणारी आत्या निवर्तली. मामाहि निवर्तले. आश्रयदाते कै. लक्ष्मणआप्पा कुरझडकारहि निवर्तले. आतेच्या निधनानें तर नानासाहेबांवर फारच मोठी आपत्ति कोसळली. कारण आतेची थोडी शेती होती त्या शेतीच्या उत्पन्नांतून सर्व पागे व कांहीं जंगम माल होता तोहि नानासाहेबांच्याच ताब्यांत होता. आत्या जिवंत होती तोपर्यंत त्या शेतीचा व जंगममालाचा सर्व फायदा नानासाहेबांनाच मिळे. आत्या विधवा. तिला स्थावर माल विकण्याचा अधिकार नव्हता. कारण आतेचा पुतण्या वारसदार होता. आत्या निवर्तल्यामुळे शेती सहजगत्या पुतण्याकडे गेली व ती त्याच्याकडेच जावी अशी नानासाहेबांनीहि त्यास कोर्टांतून मदत केली. पण कांही जंगममाल नानासाहेबांजवळ आहे हें त्या पुतण्यास अवगत होतें. हा जंगममाल आतेनें नानासाहेबांना व त्यांच्या पत्नीला दिला होता हें सर्व शेजारी–राजारी जाणत होते. त्यामुळे हा माल पुतण्यास देऊं नका असें सर्व शेजारी ह्मणत होते, व शेजारीहि कै. अंबादासपंत देवरणकरासारखें वयोवृद्ध, प्रतिष्ठित व प्रसिद्ध सावकारासारखे होते. पण मु. नारोडा ता. दर्यापूर येथील नानासाहेबांच्या आतेचा पुतण्या ह्मणें कीं, आपण शिकलां–सवरलां आहांत तेव्हा मिळवून घ्याल, पण माझे बच्चे-कच्चे जगतील तर ते आशीर्वाद देतील; नाहीतर ते शाप देतील. नानासाहेबांवर ह्या शापाचा विलक्षण परिणाम झाला, पण लोभहि सुटेंना. शेंवटी लक्ष्मीबाईवर हा निर्णय नानासाहेबांनी सोपविला, कारण नानासाहेबांच्या आतेनें मरतांना सर्व दागिने लक्ष्मीबाईकरिताच ठेंवले होते. तेव्हा तें तिचें धन आहे, ती देईल तर माझी हरकत नाही, ह्मणून नानासाहेबांनी आपला लोभ लक्ष्मीबाईच्या पाठीमागें लपविला. लक्ष्मीबाईला विचारलें कीं ते दागिनें तुझ्या मालकीचे खरे; पण हा पुतण्या आहे, हा खरा वारसदार, तेव्हा ते त्याचे त्यास द्यावयाचे कीं ठेवावयाचें हा प्रश्न तूंच सोडीव. त्या पुतण्यानें लक्ष्मीबाईचे पाय धरले आणि ह्मटलें कीं, माझ्या चुलतीनें शिकवलें, लगीन करून दिलें, सर्व कांही केलें ते नावाकरिताच; तेव्हा आतां तरी तिच्या कुळांतील मुलाबाळांना जगूं द्या व त्यांचा आशीर्वाद घ्या.

लक्ष्मीबाईवर ह्या गोष्टीचा लागलीच परिणाम झाला आणि आईबापाकडील दागिनें सोडून आतेसासूचे होते तेवढे सर्व दागिनें त्या पुतण्याच्या पदरांत घातले व 'देव आह्माला सर्व देईल, कोणतेंहि कमी पडू देणार नाही,' असे शब्द लक्ष्मीबाईच्या मुखांतून निघाले. ह्या वेळीं घरांत लक्ष्मीबाई, नानासाहेब, व तो पुतण्या; हे तिघेच इसम होते. उमरावतीचे कै. बापुभाया मटपटी हे नानासाहेबांचे चुलत चुलते. त्यांच्याच घरीं त्या वेळी नानासाहेब रहात होते. खाली हा प्रकार घरांत सुरूं आहे हें त्या वृद्ध पुरुषाला अवगत होतें पण लक्ष्मीबाई सर्व दागिनें त्या पुतण्याच्या पदरांत

टाकतील ही कल्पना नव्हती. सरासरी ८०० ते ९०० रु. किमतीचे दागिनें होते ह्मणतात. पण लक्ष्मीबाईनी तें पुतण्याच्या पदरांत टाकतांच तो लागलीच निघून गेला. पुन्हा त्यानें कधीच नानासाहेबांस व लक्ष्मीबाईस तोंड दाखविलें नाही. स्त्रिया ह्या जास्ताच दागीन्याच्या व धनाच्या हौसी व लोभी असतात. त्यामुळे हा प्रकार नानासाहेबांकडून घडेल पण लक्ष्मीबाईकडून घडणार नाही असेंच सर्वांना वाटे. खुद्द नानासाहेबच ह्या कल्पनेने लोमास्तव लक्ष्मीबाईच्या मागे लपले होते. पण लक्ष्मीबाईनी दागिनें दिले व तो पुतण्या निघून गेला. हें पाहतांच--आपण आजच दरिद्री झालों पण स्त्री अत्यंत उदार आहे हें दृश्य पाहताच नानासाहेब गहिवरले व हे उभयता एकमेकांच्या गळ्यात गळा घालून रडूं लागलें वरून चुलते-चुलती खाली आले. शेजारी-पाजारी जमले. जवळच मामसासऱ्याचे घर, तेहि धावून आले. सर्वंच उभयतांस मूर्ख ह्मणून हिणवूं लागले. कारण हा जंगममाल जर दिला नसता तर तो कांही जबरदस्तीने वा कायद्यानें पुतण्याच्या पदरांत जात नव्हता हें स्पष्ट असतांहि, घरांतलें धन दिवसाढवळ्या लुटून दिलें, हा सांसारिकाचा मूर्खपणाच ! आणि मूर्ख ह्मणवून घेण्यात व सर्वांचीहि हिडीसपिडीस ऐकण्याचे ह्या उभयतांच्या नशीबीं आलें व ते आयुष्य इतकें कंटाळवाणें झालें कीं, पुढें बापुआयाचें घर सोडून अंबादासआप्पा हेगूच्या ओसाड वाड्यात ह्या उभयतांना रहावें लागलें. त्यांत नानासाहेब आजारी पडले. ते दरिद्री झाले ह्या कल्पनेनें छापखान्याच्या धंद्याला उतरती कळा आली. शेवटी छापखाना विकला व 'संजीवनी' बंद पडली. हे दिवस ह्मणजे वनवासाचेच दिवस होत. शेवटी नानासाहेबांची सासू जवळ आली व तिनें धीर देत देत व दागीने मोडून मोडून १९१६ पर्यंत नानासाहेबांना इभ्रतींत जगविलें. ह्या काळाने हे पतिपत्नी व सासू हें कायमचे संसारदृष्ट्या एकजीव झाले.

---

# सुगृहिणी होण्यास--
# शिक्षणाची गरज आहे काय?

लेखिका.—श्रीमती महादेवी वाघमारे मोमीनाबाद.

आज आपल्या देशाची स्थिति पूर्णपणें बदलली आहे. पाश्चात्य देशांतील सुधारणेच्या बऱ्याच गोष्टी येथे आल्या आहेत; आगगाड्या-आगबोटी सुरु होऊन व्यापार व कारखानें वाढले आहेत; छापखानें येऊन पुस्तकें व वर्तमानपत्रें वगैरेचा प्रसार झाला आहे. पोस्टखातें सुरु होऊन पत्रव्यवहार वाढला आहे.

लोकांना आपलें गांव सोडून नोकरी, उद्योगधंदा, व्यापार, यासाठी लांब लांब जावें लागत आहे. देशाचा राज्यकारभार कायद्यांनी चालत

आहे. स्थानिक-स्वराज्य व कौन्सिलें यांत लोकांना प्रतिनिधी निवडण्याचे हक्क मिळाले आहेत.

अशा बदललेल्या काळांत राहावयाचें, ह्मणजे प्रत्येक मनुष्याला निदान लिहितां-वाचतां आलेंच पाहिजे. इतर सुधारलेल्या देशांत सक्तीचें प्राथमिक शिक्षण पूर्वीच सुरु झालें आहे, व तेथें आज निरक्षर मनुष्य सांपडणें कठीण आहे. आणि त्याच्या उलट आज आपल्या देशाची स्थिति आहे. आपला देश अज्ञानांत झोपा घेत आहे. त्याला जागें करण्याकरितां सक्तीच्या शिक्षणाची आवश्यकता आहे.

शिक्षण सक्तीचें करण्याला मुख्य अडचण पैशाची आहे. आज आपल्या देशांत सुमारे १० स्त्रिया साक्षर आहेत किंवा नाहीत याची शंकाच आहे. आणि त्या साक्षर करण्याकरितां आमच्या लोकांची मनें वळवावीं लागतील. स्त्रीशिक्षणाकडे त्यांचें लक्ष लागलें पाहिजे. ह्याकरितां शाळा उघडाव्या लागतील. व पैशाची जरुरी आहे. सरकार व लोकलबोर्डें ह्यांनी पैशाची तरतूद केली पाहिजे.

दुसरी गोष्ट मोठी कठीण आहे. ती ह्मणजें सरकार पैसा खर्च करून शाळा उघडील व उघडल्या पण आहेत. त्यांचा उपयोग आपल्या मुली व मुलें शाळेंत पाठवून येथील लोक घेतील किंवा नाही याची शंकाच आहे. परमेश्वरापाशी माझी हीच प्रार्थना आहे कीं, हे देवा, तूं आमचा स्त्रीसमाज अज्ञानांधःकारांत घोरत पडला आहे, त्याला जागें करून पुरुषवर्गासारखा आमच्या स्त्रीवर्गाने फायदा करुन घ्यावा असें कर, व त्यांना सद्बुद्धी आणि साक्षर होण्याची बुद्धि दे. ह्या देशांतील स्त्रिया साक्षर झाल्याने आमच्या समाजाला कितीतरी फायदे होणार आहेत. कारण, त्या साक्षर झाल्या ह्मणजे त्यांना स्वतःचें पत्र स्वतः लिहितां व वाचतां येईल, इतर मनुष्यास जें देण्या-घेण्यासंबंधीं व्यवहार होतील त्यांत त्या फसणार नाहीत. त्यांना वर्तमानपत्रें वाचतां येऊन त्यांचें ज्ञान वाढेल; स्त्रिया मूळच्या भोळ्या असतात. त्यांच्या भोळेपणाचा फायदा बरेच कपटी पुरुष व इतर लोक घेतात. बिचाऱ्या स्त्रिया अशिक्षित असल्यामुळें सध्याच्या जीवनकलहांत त्या फार दुःखी व अपात्र झाल्या आहेत, व शिकलेल्यांची मजल अक्षर ओळखण्याच्या पलीकडे गेली नसल्यामुळें, गृहशिक्षण, बालसंगोपन, इतिहास, इत्यादि अत्यावश्यक विषयांचें ज्ञान त्यांना नसल्यामुळें त्यांचें जीवन फार निरस झालेलें आहे. बहिणींनो, काय तुह्माला आपला समाज सुशिक्षित व्हावा असें वाटत नाही काय? नाही असें कसें होईल? कोणाला वाटणार नाही आपला स्त्रीसमाज सुशिक्षित व्हावा. असें सर्वांनाच वाटतें. तर मग आपला समाज सुशिक्षित करण्याचा प्रयत्न करा. त्या सुशिक्षित झाल्या ह्मणजे भोळ्या समजूतींना व अडाणी चालीरीतींना बळी पडणार नाहीत. भोळ्या समजूती व अडाणी चालीरीती बदलण्याचा त्या प्रयत्न करतील, त्यांची राहणी सुधारेल, आणि त्या आपला कामधंदा अधिक चांगल्या प्रकारें करतील. प्रत्येक पालकाने आपल्या मुलीस व मुलांस लहानपणीं शाळेंत पाठविलेंच पाहिजे. न पाठविल्यास तो गुन्हा होईल असा कायदा करून सक्तीनें शिक्षण द्यावें लागेल तेंव्हां कोठे आमचा समाज साक्षर होईल.

## स्त्रियांना शिक्षण दिल्यापासून फायदे, व न दिल्यापासून तोटे :—

स्त्रियांना शिक्षण न दिल्यापासून होणारे तोटेः— त्या अज्ञान असल्यामुळें आपल्या घरांतील माणसांशीं व इतर लोकांशीं कसें वागावें व त्यांच्याशीं कसें बोलावें हेंच कळत नाही.

आपल्या पतीबरोबर आपण कसें वागलें असतां त्यांना आपणापासून सुख मिळेल किंवा सुख होईल हें त्यांना न समजल्यामुळें त्या पती-पत्नीस संसारामध्यें किती दुःखें भोगावीं लागतात याचीं उदाहरणें पुष्कळच माझ्या बघण्यात येतात. कितीकदा एकमेकांस उपास पडलेले आहेत. मग अशा संसारांत सुख व आनंद मिळणें किती कठीण आहे. ज्या पत्नीला पतीचे सुखाचे शब्द नाहीत किंवा ज्या पतीस पत्नीपासून सुख नाही तो संसार सुखाचा होईल काय ? केव्हांहि होणार नाही. जी प्रजा होईल ती तरी चांगली होईल काय? केव्हांहि होणार नाही.

स्त्रियांना शिक्षण दिल्यापासून फायदे:— शिक्षणापासून चांगली गृहिणी तयार होते. सुगृहिणीची लक्षणें-ती आपल्या पतीचा जो आनंद तोच तिचा आनंद व त्याचें जे दुःख तेंच तिचें दुःख असतें. तिची मुद्रा नेहमी प्रसन्न असते, व असेल त्या स्थितींत समाधान मानण्याइतकी ती सुज्ञ असते. ती गृहदक्ष असते. साधा पण मिष्ट व स्वच्छ स्वयंपाक करण्यांत ती चतुर असते. पोराबाळांची व पाहीपाहुण्यांची योग्य व्यवस्था ठेवते. ती काटकसरी व सोशिक असते. इतरांचें वैभव पाहून त्यांच्याप्रमाणें आपणहि वागावें किंवा असावें असल्या वेडगळ व त्रासदायक समजुतीचा संभव तिला होत नाही. तिला दागिन्यांचा सोस नसतो. ती सद्गुणांची चहाती असते. एखाद-दुसऱ्या दुर्गुणाची चाहूल तिला आपल्या नवऱ्याकडून किंवा इतरांकडून लागल्यास ती चटकन सुधारणा करते. कुटुंबांत व्यर्थ वादाचें कारण उत्पन्न करून चिंता खेद किंवा वैताग यांचा घरांत प्रवेश होऊं देत नाही व इतरांच्या आनंदात विरजण घालीत नाही. ती मधुर-भाषणी सर्वांशीं प्रेमानें वागणारी व अंतःकरणानें उदार असते. तिच्या वाढत्या वयावरोबर तिचे सद्गुणहि वाढत असतात.

प्रिय भगिनींनो, विचार करा आणि तुह्माला सुपत्नी, सुकन्या, सुभगिनी, होण्याची इच्छा असेल तर अज्ञानांधकारांतून ज्ञानरूपी प्रकाशामध्यें यावयाचें असेल तर आधी शिक्षण घ्या आणि पुरुषवर्गात स्त्रिया याच राष्ट्राच्या उद्धार करणाऱ्या देवताच आहेत अशी पूज्य भावना उत्पन्न करा. प्रिय भगिनींनो, पुरुष असो कीं स्त्री असो, माझ्या मते दोघे सारखे आहेत. त्यांचें पावित्र्य स्फटिकासारखें व काचेच्या बाटलींतून पाणी घातलें ह्मणजे जसें स्वच्छ दिसतें, तसें त्या पावित्र्याचें तेज आपल्या मुखावर दिसलें पाहिजे. ह्या जगांत शीलाला व पवित्रतेला सुजन लोक मान देतात तो मान तुह्माला घेण्याची इच्छा असेल तर सुशिक्षित होण्याचा प्रयत्न करा.

---

चरित्र

# परमहंस श्रीकोंडय्यास्वामी महाराज

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

महाराजांच्या कृपाप्रसादानें महाराष्ट्रीय वाचकांस आज त्यांचा परिचय करून देतांना मला हार्दिक आनंद-स्फूर्ति होत आहे.

## अपूर्व योग

महाराजांची ख्याति मी बरेच दिवसांपासून ऐकत होतो, व दर्शनाची फार प्रबळ इच्छा होती. पण त्यांच्या दर्शनाचा योगायोग मला पुष्कळ दिवसपर्यंत आला नाही. याचें कारण घाब्याचा मार्ग फारच त्रासाचा व एकट्याच्या गैरसोयीचा होता हें होय. पण ह्मण आहे ना 'इच्छा तसें फळ'.आमच्या इच्छेप्रमाणें अकल्पितपणें स्वामींच्या दर्शनाचा अपूर्व योग शेवटी आलाच.

१९३१ च्या सप्टेंबर मासाचे ते दिवस होते. गणेशोत्सवाची सर्वत्र धामधूम चालली होती. त्या सुमारास चांद्याचे श्री. कृष्णाप्पाजी कलुरे यांनी नागभीड येथील श्रीमंत शंकरराव चिलुरे यांना महाराजांच्या दर्शनास जाण्याकरिता ह्मणून बोलावणें केलें. वेळ फारच अल्प होता. श्रीमंतांना काय? बातमी मिळताच लागलीच तयारी केली, व मी त्यांचा बालमित्र या नात्यानें त्यांनी मलाहि दर्शनास चालण्यास विचारणा केली.— यावेळीं मला जो आनंद झाला तो येथे लेखणींत उतरणें शक्य नाही.— पण मी पडलों गुलाम—व्यवसायी. वेळेवरच सुट्टी मंजुर करायची कशी? तशांत संस्थाधिकारी कडक वृत्तीचे. त्यांना विचारणेंच ह्मणजे महापाप! घटकाभर विचाराच्या गटांगळ्यांत पडलों खरा, पण शेवटीं मोठी हिंमत बांधून त्यांचेकडे एकदाचा गेलों व 'महाराजांचे दर्शनास जाण्याची माझी तयारी झाली आहे' असें त्यांचे कानावर घातलें. अधिकारी जमदग्नीचे अवतार खरे! पण क्षणभर विचार केला नि जाण्यास परवानगी दिली. मला वाटलें महाराजच त्यांच्या जिव्हेवर येऊन बसले. अस्तु.

नंतर लगेंच अडीचच्या गाडीनें आह्मी सर्व चांद्यास रवाना झालों. त्या दिवशीं रात्रीचा आह्मा सर्वांचा मुक्काम श्री० कलुरे यांचेकडेच झाला. दुसरें, आह्मी व आणखी कांही चांदेकर मंडळींनी मिळून दोन किरायाच्या मोटारी केल्या व दुपारी १२–१ चे सुमारास सिरोंचा-रोडने घाब्याच्या मार्गाला लागलों. बल्हारशहा ओलांडल्यावर वनश्रीची शोभा व मार्गाची वळणें वगैरे सृष्टिसौंदर्य बघून ध्येयाची भ्रान्ति पड-ल्याशिवाय राहिली नाही. नंतर मुख्य रोड सोडून आडमार्गाने गेल्यावर घाबागांवाचे अलीकडेच ४ मैलांवर रस्त्याच्या नादुरुस्तीमुळे आमच्या मोटा-रींना विश्रांति देऊन सर्वांना पायीच जावें लागलें.

## प्रथमदर्शन

आमचा हा प्रवास स्त्री-पुरुष संमिश्रित असा होता. मोटारी सोडल्यावर वनश्रीची व ओढ्या-नाल्यांची शोभा लुटत आह्मी मार्ग आक्रमूं लागलों. एकंदरीत उल्हास पाहून या वेळी आह्मी एखाद्या महान् यात्रेस चाललों ही कल्पना प्रत्येकाच्या मनांत डोकावल्यावांचून राहिली नाही. वरुन आह्मावर बारीक बारीक गुलाबी पावसाचा वर्षावहि सारखा चालला होता. अशा एकंदरीत उल्हसित वातावरणांत सायंकाळी दीपोदयाच्या वेळीं महाराजांच्या मठांत येऊन पोंहोचलों. माझ्याशिवाय बहुतेकांना यापूर्वी महाराजांचें दर्शन घडलें होतें. तरी पण प्रत्येकाला दर्शनाची जिज्ञासा नव्हे तळमळ लागली होती. एकदाचे सर्वांनी श्रींच्या चरणावर मस्तक ठेविले नि महाराजांचे समोवार आपापलें आसन स्थिर केलें. महाराजांनीहि— तेलगू भाषेत — सर्वांना सांत्वनपर गौरविले.

### —दर्शनांत मला काय वाटलें—

मी पूर्वीपासूनच स्वतः सुधारक मताचा असल्यामुळे साधुसंताच्या व बुवा-महाराजांच्या किंवा भजन-पूजवाच्या पासून शक्य तितका अलिप्त राहण्याचा प्रयत्न करितों. पण या मनोहर मूर्तीनीं पात्र माझ्या ह्या नास्तिक मताचें खरोखरच हरण केलें. ह्या मूर्तीचें मला दर्शन होतांच मी हार्दिक सेवक बनलों. मला ती मूर्ति ह्मणजें परमहंस वाटली. महाराजांच्या रूपानेच हे श्रीशिव अवतरले आहेत असें वाटूं लागलें.

श्रींच्या वयोमानाचें निदान मला निश्चित करितां आलें नाही. पण बांधा ठेंगणा असून शरीरयष्टि टणक आहे. चष्म्याची जरूर नाही. वर्ण गौर असून कान्ति तेजस्वी आहे. अंगावरील एकहि केस काळें राहिलें नाही. मुखांतील दंतावळी नामशेष झाल्या आहेत. डोक्याला रजताच्या तारांप्रमाणें शुभ्र केस असून छातीवर बर्फाप्राय शुभ्र दाढी रुळत होती. अंगांत बाराबंदी असून, ढुंगणास पंचा अगर छोटें धोतर, भालावर भस्माचे त्रिपुंड्र व गळ्यांत लिंग आणि रुद्रमाळा अशी एकंदरीत महाराजांची सगुणस्वरूपी मन हरणारी मूर्ति होती.

## कुलपरिचय

धावा येथेंच महाराजांचा पुतण्या रहातो. याचें वय ५०-५१ इतक्यांत असावें. त्यांची व आमची दुसरे दिवशी सकाळीं याच मठांत भेट झाली. भेटीच्या वेळीं श्री० कलुरे होते. त्यांना महाराजांचें चरित्र तयार करावयाचें होतें. ह्मणून त्यांनीच चिकित्सक प्रश्नांनी पुरेशी माहिती काढूनट िचून घेतली.त्याचाच येथें अनुवाद करितों.

ते ह्मणाले "आह्मी जन्मजात जंगमवंशीय असून आमचे उपनांव -आमचे कृतिप्रमाणेच अभेद (अ+भेद)-वार असें आहे. काकाचे-महाराजांचें —वयाला आज नव्वदी उलटली असून, आमच्या वंशांतील हे तिसरे कोंडय्या' आहेत. यापूर्वी होऊन गेलेल्या याच नांवाच्या दोनहि व्यक्ति हुबेहूब यांचेच प्रतिबिंब होत्या. आमच्या काकांचें लग्न शिंदेवाही येथील प्रसिद्ध सोमेश्वरमहाराज या कुलीन व अधिकारी घराण्यांतील कन्येशी झालें होतें. पण ती अल्पवयांतच कालवश झाल्यामुळे तेव्हांपासून महाराज संसारिक सुखांतून अलिप्त झाले.

# श्री सिद्धरामस्वामी प्रायश्चित्तप्रकर्णाचा पूर्वरंग.

## स्वामींनी शुद्धिकरण केलें नाही तर पुढे काय ?

लेखक—श्री. सोमेश्वरआप्पा ह्मराप्पा कोल्हे, सेक्रेटरी, वीरशैव शिक्षण प्र. मंडळ, अमरावती.

श्री सिद्धारामस्वामी जर्मनीहून परत आल्यापासुन ज्या कांहीं स्थानिक घडामोडी सुरू आहेत व त्या बाबतींत ज्या 'सुदर्शन', 'वी. गर्जना', वगैरे वृत्तपत्रांतून उलटसुलट विपर्यस्त बातम्या व मुलाखती प्रसिद्ध होत आहेत, व महत्वाची गोष्ट ह्मणजे स्वतः श्रीसिद्धाराम स्वामींनी ह्या बाबतीत मूग गिळून बसणें, वगैरे गोष्टींमुळें बाहेरगावच्या वाचकांना व वीरशैवांना येथील स्थानिक वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान होणें दुर्लभ झालें आहे. त्यांतून श्रीगुरु वाढोणेकरस्वामी ह्यांचेबरोबर सिद्धाराम स्वामींनी माजलगांवाला जाणें, तेथून कांहीं-हि शुद्धीकरणाचा विधी न करतां परत येणें परंतु त्यांचेबरोबर आणि जेवलेल्या कांहीं फिरस्ती व भिक्षुकी जंगमांनी ते परत येतांच, स्वामी शुद्ध होऊन आले आतां कांहीं हरकत नाही असें भासवून जंगम-वर्गाच्या एक-दोन पंक्ती उठविणें, स्वामीची शुद्धि न झाली तरी आह्माला ते नुसते पंक्तिपावन आहेत पण मठाधिकारी नाहीत असें ज्यांचें मत आहे त्यांचेबद्दल आह्माला कांहींच ह्मणणें नाहीं ! परंतु ते शुद्ध होऊन आले ह्या गैरसमजूतीखाली जे त्यांना पंक्तिपावन समजत असतील व मठाधिकारी समजत असतील त्यांचेकरितां हा मुद्दाम खुलासा करावा लागत आहे. सिद्धारामस्वामीबरोबर माजलगांवाला गेलेले श्रीगुरु वाढोणेकर स्वामी आह्मी विचारले असतां ह्मणतात कीं, त्या ठिकाणीं शुद्धि वगैरे किंवा दीक्षाविधी वगैरे कांहींहि झाला नाहीं. तेथील पट्टाधिकाऱ्यांशीं सिद्धारामस्वामींचें कांहीं खाजगी बोलणें झालें, व आह्मी दोघेहि परत आलों. ह्या सर्व प्रकारामुळें श्रीसिद्धारामस्वामी–प्रकरणाची ते येथून जर्मनीस जाण्यापासून तो परत येईपर्यंत थोडक्यांत खरी हकिकत सांगणें भाग आहे.

स्वामी जर्मनीस जाणार असें कळतांच येथील वीरशैवांत ४ पक्ष उत्पन्न झाले. १ ला श्री. चौधरी वगैरे नवमतवाद्यांचा—ज्यांचें ह्मणणें कीं; परदेशगमन हें निषिद्ध नाही, व त्याला परि-स्थिति-कालानुसार प्रायश्चित्ताची किंवा शुद्धि करण्याची गरज पडूं नये. हें नवमतवाद्यांचें ह्मणणें. लगेच ह्यांच्या दुसऱ्या टोकाला जाऊन श्री. बाबाराव व कांहीं सनातनी

मंडळीचें ह्मणणें कीं, परदेशगमन हें निषिद्ध आहे, पाप आहे, ह्याला प्रायश्चित्तच नाही. ह्या एका टोकाला नवमतवादी व दुसऱ्या टोकाला सनातनी ह्यांच्यामधील दे. भ. नानासाहेब व सर्वसाधारण वीरशैवांचा तिसरा सुधारणावादीपक्ष ह्यांचें ह्मणणें असें कीं, परदेशगमनाला अजिबात निषिद्ध मानणें योग्य नाही, त्यावरहि शुद्धीकरण अथवा प्रायश्चित्त-विधीचा तोडगा आहे. चौथा पक्ष श्री. हेगु वकील, कीं जे धड ना नवमतवादी वा सुधारणावादी ना सनातनी अशा अर्धवटांचा पक्ष आहे. पण हा संख्येने अतिशय किरकोळ पक्ष असल्यामुळें त्याचें कांही महत्व नव्हतें व शेवटी हा पक्ष ता. ३०-१०-३६ च्या पाथरकर-मठांत भरलेल्या सभेंत श्रीमंत सोमाप्पा मेंडसे, चौधरी, डॉ. संगेकर प्रभृति मंड-ळींनी "प्रायश्चित्ताची गरज नाही" असें जाहीर करतांच त्यांच्यात सामील झाला म्हणतात.

सर्व वीरशैवांनी एकमुखाने सिद्धाराम-स्वामीस जावयाच्या वेळीं निरोप दिला ह्याचें मुख्य कारण ह्मणजे जाण्यापूर्वी सिद्धाराम स्वामींनी दे. भ. नानासाहेब वामणगावकरांना व मला स्वतःला परदेशाहून परत येतांच स्वखुशीने शुद्धीकरण करून घेईन हें खाजगी तऱ्हेने दिलेलें आश्वासन होय, व ह्या आश्वासनामुळेंच नानासाहेबांच्या पुढारीपणा-खाली सर्वांनी एक होऊन प्रसंग साजरा केला. म्हणूनच ह्या प्रसंगाची 'सुदर्शन थिएटरां-तील जाहिरसभा' मी माझ्या सहीनें बोलाविली होती. श्रीसिद्धारामस्वामींच्या शुद्धि-करणविषयक आश्वासनाची गोष्ट ता. ३०-१०-३६ च्या पाथरकरमठांतील सभेंत नाइलाजानें नानासाहेबांना अखेर जाहीर करावी लागली असें समजतें. कारण परत आल्यावर श्रीसिद्धाराम स्वामी, मी प्रायश्चित किंवा शुद्धिकरण करतों किंवा करत नाही किंवा मी माजलगांवला जाऊन शुद्धीचा कांही विधि केला किंवा नाही हें जाहीररीत्या कांहींच सांगत नाहीत. व जसा मनुष्य भेटावयाला जातो तशा तऱ्हेच्या ते गोष्टी करतात. ह्यामुळे ह्या प्रकरणाचा कांहीं निकाल लागेल, निदान लौकर लागेल, असें वाटत नाहीं. दे. भ. नानासाहेब वामणगावकर हे त्यांना अपंक्त मानावयाला तयार नाहीत परंतु ते सिद्धारामस्वामींना पवित्र व मठाधिकारी समजावयाला तयार नाहीत हें त्यांनी जाहीर केलें आहे. व आह्माला खात्री-लायक बातमीवरून समजतें कीं, सध्या दे. भ. नानासाहेब हे माजलगावकर-मठसंस्थानच्या प्रांतभर पसरलेल्या व परप्रांतस्थ अन्य शिष्यवर्गाची यादी करीत आहेत व सर्वांना आपलें मत लेखी कळवून लौकरच सर्व शिष्यवर्गाची ह्या प्रश्नाचा विचार करण्याकरिता सभा बोलविणार आहेत. माजलगावकरांचे शिष्यवर्गात श्रीमंत बाबासाहेब पारवेकर, रावसाहेब माधवराव व श्रीमंत बसवंतराव वगैरे पारवेकर जहागीरदार देशमुख मंडळी आहेत. तशीच कारंजा येथीलहि कांहीं प्रतिष्ठित मंडळी आहेत. आमच्या माहितीप्रमाणें अमरावती येथें दे. भ. वामणगांवकर, श्रीमंत रामाप्पा गव्हाणे, व श्री. चौधरी असे तीनच शिष्य आहेत. हें सर्व लिहिण्याचा अर्थ एवढाच कीं, श्रीसिद्धारामस्वामीचें प्रकर्ण एवढ्यातच थांबेल असें दिसत नाही. श्रीसिद्धाराम स्वामीच्या कांही सल्लागारांनी त्यांना काशीबनारसकडे शिक्षणाच्या निमित्ताने जाऊन कांहीं वर्षे राहून मग येथे परत यावें असाहि सल्ला दिल्याची बातमी आहे. परंतु ह्या द्राविडी प्राणायामांत स्वामी पडतील असें आह्माला वाटत नाही. कारण त्यांच्या पश्चात् हा वाद थांबेलच किंवा ते परत आल्यावर ह्या वादाला तोंड फुटणारच नाही असें नाही. तसेंच कुणि असाहि सल्ला दिला म्हणतात कीं तुम्हाला भक्तवर्गाची पर्वा करावयाचें कांहीच कारण नाही. तुमच्या मठाचे तीन-चारशें रुपये

वार्षिक उत्पन्न तुम्हाला पुरेसें आहें. परंतु केवळ २५-३० रुपये महिन्याच्या उत्पन्नाच्या भरंवशावर तें भक्तवर्गाची ह्यापुढे बेपर्वाईनें वागतील ह्या बातमीवर आमचा भरवसा बसत नाही. ह्या वादाचा काय तो भलाबुरा निकाल सिद्धारामस्वामींनी लौकरच लावून घ्यावयाला पाहिजे एवढें मात्र खरें !!

कांहींचें ह्मणणें कदाचित् असें असेल कीं, पारटकरमठांतील सभेंत कांहीं वीरशैवांनी "स्वामींना शुद्धीकरणाची गरज नाही असें मत दिलें मग आतां शुद्धीकरणाचा प्रश्न कां उत्पन्न व्हावा ? आमच्या मतें हा प्रश्न इतर वीरशैवांचा जरी असला तरी तो प्रामुख्याने माजलगावकरांचे शिष्यवर्गांनी व त्यांच्या पंथांतील गुरुवर्गांनी सोडविण्याचा आहे, व त्या दिवशी सभेंत त्यांच्या शिष्यापैकी श्री. वामणगांवकर व चौधरी असे दोघेच तेथे हजर होते व दोघांचीहि मतें भिन्न होतीं. स्वामींच्या शिष्याखेरीज इतर वीरशै-वांचें मत निर्णायक किंवा बंधनकारक होऊं शकत नाही. कारण इंदूरच्या संस्थानिकाच्या अधिकारपदाचा प्रश्न किंवा राजनिष्ठे-विषयींची मान्यता जशी इंदूर संस्थानच्या प्रजाजनांनीच देणें आवश्यक व योग्य ठरेल व ग्वाल्हेरसंस्थानच्या प्रजाजनाच्या मान्यतेला किंवा राजनिष्ठेला जशी कांही किंमत नाही किंवा तो जशी हास्यास्पद ठरेल, तद्वतच इतर वीरशैवांच्या मताचेंहि आहे. व ह्या-करिताच श्री. नानासाहेबांनी माजलगांव-करांचे सर्व शिष्यवर्गाच्या विचारविनिम-याकरता हा प्रश्न पुढें ढकलला असावा.

त्या दिवशीच्या सभेंत श्री. नानासाहेबांनी "शुद्धिकरण झाल्याखेरीज सिद्धरामस्वामींना मठाधिकारी मानावयाला मी तयार नाही" असें जाहीर केलें ह्मणतात, व असें जाहीर करतांच तेथील पटाधिकारी माहेश्वरमूर्तींनीहि दुसरे दिवशी श्री. शंकरआप्पा पारटकरांकडील जेवणाची आमंत्रणें नाकारल्यामुळे जेवण बंद पडले ह्मणतात. माजलगांवाहून परत आल्यावर १-२ ठिकाणीं जंगमवृंदाची जेवणें झालींत त्यांत माजल-गांवकरांचें बरोबर दे.भ. वामणगांवकर, ववयोर-माहेश्वरमंडळाचे संचालक दारव्ह्याचे शामशंभु पुराणिक व येथील दोन पटाधिकारी व भिक्षुक जंगम मंडळी हजर होती. विशेषतः आश्चर्याची गोष्ट म्हणजे "परदेशगमन निषिद्ध आहे ह्याला प्रायश्चित्तच नाही" विदाव दीक्षाविधी होऊन कानफातरी पुन्हा झाल्याच पाहिजेत. असं सनातनी मत असणारे दादाशास्त्री कीर्तनकारहि पंक्तीला हजर होते म्हणतात.

दे. भ. नानासाहेब ह्यांना ह्या बाबतीत आम्ही खुलासा विचारला असतां ते म्हणाले कीं, 'वी. संजीवनीं'त जाहीर केल्याप्रमाणें मी जसं इतरांच्या पंक्तीला बसतो तद्वत् सिद्धारामस्वामीच्या पंक्तीला बसावयाला माझी कांहीं हरकत नाहीं. परंतु ते शुद्धिकरण करीपर्यंत मी त्यांना गुरु किंवा मठाधिकारी ह्मणून मानावयाला तयार नाही. ह्या एकंदर प्रकारावरुन व श्रीगुरु वाळोणेकर व दे. भ नानासाहेब वामणगांवकर ह्यांच्या सांगण्यावरुन सिद्धाराम स्वामींनी अजून प्रायश्चित्त विधी किंवा शुद्धीकरण केलें नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे. आह्माला नवमतवाद्यांच्या विषयीं कांहींच लिहावयाचें नाही कारण त्यांची धांव फारच पुढे आहे व त्यांची व आमची मतें जुळत नाहींत. पारटकरमठांचे सभेंत तर श्री. चौधरी ह्यांनी नवमतवाद्यांतर्फे स्पष्ट सांगितल्याचें समजतें कीं, सच्चरित्र व अधिकारी पुरुषांचे पादतीर्थानें पावन होणें ही मूळ भावनाजन्य धार्मिक कल्पना व त्यामुळे पूर्वापार पडलेली चाल ही प्रशंसनीय व योग्य आहे व असा एकादा सत्पु-रुष कुणि असला व त्याचे एखाद्याने भावनावश होऊन पादोदक प्राशन केलें तर त्याला माझा

विरोध नाही. हा व्यक्तिगत प्रश्न आहे. परंतु ह्या केवळ पूर्वापार कल्पनेंच्या आहारीं जाऊन ह्या रुढीला सार्वत्रिक स्वरुप देण्याचा प्रयत्न करणें किंवा ही रुढी तशीच पुढे चालूं देणें योग्य नाही. तेव्हा आज ह्या रुढीला विकृत स्वरुप प्राप्त झाल्यामुळें ह्या रुढ चालीला समाजात स्थान नाही. तेव्हा श्रीसिद्धराम स्वामींनी कुणाचें पादतीर्थ घेऊं नये व त्यांचेंहि कुणी घेऊं नये. चारित्र्याचे प्रभावी तीर्थोदकाचे रुढीला अंधश्रद्धेमुळे ढोंगी बुवाबाजीचें स्वरुप प्राप्त होऊं पहात आहे व ह्मणूनच माहेश्वराचे पादतीर्थ घेण्याच्या अनिष्ट रुढीला समाजांतून गचांडी मिळणें आवश्यक आहे, अशा तऱ्हेचें नवमतवाद्यांचें धोरण असल्यामुळें ह्या प्रायश्चित्त-प्रकर्णाबाबत त्यांच्या मताचा विचार करणें अवाठायी व अप्रासंगिक आहे. बाकी एवढें खरें कीं, नवमतवाद्यांचे मनांतून प्रायश्चित्त वा शुद्धिकरणविधी होऊं नये असें जरी असलें तरी ते अशा विधीला जाहीर विरोध करतील असें वाटत नाही. कारण ते आज अल्पमतांत असल्याची त्यांना जाणीव आहे व आपला विरोध परिणामी प्रभावी ठरणार नाही ही गोष्ट ते ओळखून आहेत. व ह्मणूनच ते प्रायश्चित्त-विधी झाला किंवा न झाला तरी आह्माला त्याचा विधिनिषेध नाही, हा व्यक्तिगतप्रश्न आहे, अशी भाषा बोलतात. तेव्हां प्रायश्चित्तविधीच्या आवश्यकतेअनावश्यकतेचा प्रश्न किंवा त्यासंबंधीचा विधिनिषेध किंवा सोयरे-सुतक नवमतवाद्यांना नाही. तर हा प्रश्न दे. भ. नानासाहेब वामणगांवकरांचे नेतृत्वाखालील आह्मा सुधारणावाद्यांचा हा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे.

कारण मठसंस्था ह्या लोकांना शुद्धि करणाचा मार्ग सांगून समाजाला आपल्या धार्मिक व नैतिक वजनाखाली आणणाऱ्या आहेत. अशा स्थितींत एकाद्या मठधिकाऱ्याने शास्त्रदृष्टया व रुढिदृष्टया शुद्धि करुन न घेतां राहणें ह्मणजें मठसंस्थांच्या पूर्वापार रुढीवर—संस्कारावर समाजावरील धार्मिक व नैतिक वर्चस्वावर स्वतःच घाला घालणें होय, व समाजालाहि अशा तऱ्हेने घाला घालण्यास प्रवृत्त करुन शिकवण देणें होय!

---

# 'संजीवनी' चें दुसरें वर्ष

## आकार वाढणार, वर्गणी तीच

### खास अंक बंद.

ह्या वर्षाचा २४ वा अंक बंद ठेवून वर्ष दुसरें अंक पहिला हा अधिक पृष्ठांचा खास अंक काढण्याचें आह्मीं ठरविलें होतें. पण खास अंक न काढतां जानेवारी ता. १ च्या अंकापासून संजिवनीचा आकार वाढविण्याचे आह्मीं ठरविलें आहे. ह्मणजें नव्या वर्षापासून 'संजीवनी'-ला २४ पानें राहतील. ह्मणजें हल्लीच्या आकारापेक्षां दीडपट आकार राहील. पण वर्गणी आहे तीच कायम राहील. ह्मणून ता. १५ डिसेंबरचा अंक बंद न राहता तो नित्याप्रमाणें निघेल.

तरी नव्या वर्षाच्या १ ल्या अंकाकरितां आमच्या लेखक व लेखिका-वर्गानी आपल्या फोटोच्या ब्लॉकसह सामाजिक विषयावर "लेखकास सूचना" लक्षांत घेऊन लेख पाठविण्याची कृपा करावी. तसेच आतापर्यंत जे "वी. संजिवनी" कडे लेख पाठवूं शकले नाहीत त्या वीरशैवांतील विद्वान् व मान्यवर लेखक-लेखिकांनाही फोटोच्या ब्लॉकसहित लेख पाठविण्याची नम्र विनंती आहे.

मॅनेजर.—'वी. संजीवनी.'

# श्रीगुरु सिद्धरामस्वामी व शुद्धिकरणाची आवश्यकता

लेखकः—श्री. सिद्धैया जंगम कारभारी सिद्धगीर मठसंस्थान अमरावती.

आमच्या लिंगायतसमाजातल्या कांही तरुण सुशिक्षित नवमतवाद्यांनीं माजलगांवकर यांच्या प्रायश्चित्ताबद्दल, त्यांनी तें घेऊं नये म्हणून, बरीच चळवळ माजविली हें मला बरोबर दिसत नाही. कारण तुम्हाला माहीत नाही असें मला वाटतें. साक्षात् परमेश्वरानें पारमेश्वरागमनात सातव्या पटलांत ४० व्या श्लोकांत गिरजादेवीला स्पष्ट सांगितलें आहे कीं, 'न मांसं भक्षयेल्लिंगीनाप्यपेयंपिबेत्क्वचित् ॥ नाभक्ष्यं भक्षयेद्देवी नानावश्यनिमित्तकैः ॥४०॥ अर्थः—लिंगी मनुष्यानें मांसभक्षण करूं नये, अपेयपान करूं नये, आणि अनेक अवश्यनिमित्तें आलीं तरी अभक्ष भक्षण करू नये. पुन्हा सातव्या पटलांतला ४२ सावा श्लोक 'नाद्यादलिंगिनश्चान्नं दुष्टं चान्नमलिंगिना ॥ पापवेद्गृहमागत्य दद्यादन्नमलिंगिने ॥ अर्थः- अलिंगीजनाचें अन्न भक्षण करूं नये इतकेंच नव्हे तर त्यांनी पाहिलेलेंदेखील भक्षण करू नये असें सांगितलें आणि परमेश्वरांनी आगमनात असेंहि सांगितलें आहे कीं, अतिक्षुद्राहून महाशुद्र जरी असला तरी अष्टावर्णाप्रमाणें व षट्स्थलाप्रमाणें जो वागतो व माझ्या शिवलिंगाचें नेहमी शुद्ध अंतःकरणाने ध्यान व निस्सीम भक्ति करितो तो मला फार आवडतो. त्याच्याशी सहभोजन करण्यास कांहीं हरकत नाही. परंतु मूळच्याच लिंगधारी मनुष्याने माझें इष्टलिंग फेकून दिलें व धर्मभ्रष्ट झाला तर त्याचें मला दर्शन नको व तो मला प्रिय नाही असें त्या जगन्नियंत्या परमेश्वरानें आपल्या धर्मग्रंथात सांगून ठेवलें आहे. हें मी शोधत नाही व माझी सांगण्याची प्राज्ञाहि नाही; तर वर दिलेल्या दृष्टांताचा नीट विचार करून वागणें हेंच माजलगांवकरांचें आद्यकर्तव्य आहे व यांतच त्याचा लौकिक व मानमरतबा आहे. कोणत्याहि मनुष्यानें गुण किंवा कलाकौशल्याची विद्या संपादन केली म्हणजे धर्मभ्रष्ट व्हावें लागतें काय किंवा धर्माची उन्नति केली पाहिजे हें मला समजत नाही. स्मृतींत सांगितल्याप्रमाणे 'धर्मो रक्षति रक्षितः' तर धर्माचें रक्षण करून वाटेल तें करा परंतु धर्म सोडल्यावर या आपल्या लिंगायतधर्मात काय अर्थ आहे असें माझें मत आहे. तर या सर्व गोष्टी लिहिल्यास इथले नाही पण मोगलाईंतले माजलगांवचे मुख्य संस्थानचे अधिपती महाराज यांना आमची गोष्ट पटेल असें मला वाटतें. बरें असो, तर इथले माजलगांवकराचे शाखेच्या मठसंस्थानिक सिद्राम अय्या हे माझ्याहून किती जरी लहान असले व यांचे जन्मल्यापासून तों आजपर्यंत यांचें चरित्र जरी मला माहित असलें तरी जरी मी संस्थानिक असलो व मोठा वयोवृद्ध जरी झालों तरी एका डिग्रीने माझ्यापेक्षा फार मोठे आहेत म्हणून प्रार्थना करून सांगतों कीं, शुद्धी करण्याविषयी स्वतःची जरी बुद्धी नसली तरी 'लोकापवादात् भयं' या म्हणीप्रमाणें लोकापवाद यानी पदरीं पाडून घेऊं नये. म्हणून येथे कोणाला न विचारता एकदम यानी आपल्या मुख्य संस्थानाकडे जाऊन आपली कायिक-वाचिक-मानसिक दोषपरिहारार्थ शुद्धीकरण करून यावें अशी माझी नम्र विनंती आहे. इतक्याउपर मर्जी त्यांची.

ॐ नमःशिवाय पदपंकजाभ्याम्

# महाराष्ट्र-वीरशैव-परिचयपट

## २५. श्री. घाटुळकर कुटुंब तळेगांव दशासर.

(१) श्री. हरेश्वर मल्लिकार्जुन घाटुळकर, माहेश्वर गुरुमठ, साखर-खर्डी. वय ५०. विवाहित. पोलीस पेन्शनर व शेती. मॅट्रिक्युलेट, मराठी येते. वीरशैवांची लोकसंख्या १०. सालिना खर्च ८०० रु. परोपकारार्थी सालिनाखर्च १००. परोपकारार्थ बाहेर खर्च करण्याची इच्छा १०० रु. (२) सौ० चंद्रभागाबाई घाटुळकर वय ४० मराठी येते. (३) चि. सौ. अंबुताई (त्यांची कन्या) वय २२ मराठी ४था वर्ग. (४) कु० कुमुदिनी वय ६ प्रायमरी शाळेत जाते. (५) कु० सिंधु वय ३.

## २६ श्री चौधरी कुटुंब उदगीर. (निझामस्टेट)

१ श्री. माधवराव आप्पाराव हावा चौधरी दिक्षवंत गुरुमठ-हावगीस्वामी मठ उदगीर वय ४८ विवाहित, व्यापारी, मराठी साहावी-पर्यंत शिक्षण, वीरशैवांची लोकसंख्या २००० सालिनाखर्च ६०० रु. परोपकारार्थ सालिनाखर्च २० रु. परोपकारार्थ बाहेर खर्च करण्याची इच्छा २५ रु. (२) शंकरराव माधवराव चौधरी, वय २१, विवाहित, मराठी ४ वर्ग (३) चि. हणमंतराव वय १६, अविवाहित, प्रायमरी शाळेत शिकत आहे. (४) सौ० शिमव्वाबाई वय ३० मराठी येते, (५) चि० सौ० राधाबाई वय १४ मराठी येते. (६) कु० रत्नाबाई वय १२ मराठी ३ री पास (७) कु० गंगाबाई वय ९ वर्षे. प्रा० शाळेत जाते. (८) कु० सुशिला वय २ वर्षे,

## २७. लातुरचे मठपति कुटुंब—

(१) शंकरस्वामी पंचाक्षरीस्वामी मठपती पोटजात-वीरशैव गुरुमठ रुद्रमुनिस्वामी मंगरुळ (जि० सोलापूर) वय ६५ विवाहित मराठी व वैदिकज्ञान धंदा-धार्मिक कामें. वीरशैवांची लोकसंख्या ४००० सालिना कौटुंबिक शैक्षणिक व धार्मिकखर्च २३० रु. परोपकारार्थं १०० रु. (२) मल्लिकार्जुन शंकरस्वामी—वय ३० विवाहित धंदा व्यापार मराठी येते. (३) महादेवस्वामी शंकरस्वामी वय २० विवाहित मराठी ६ वी पास धंदा व्यापार, ४) सौ० लक्ष्मीबाई भ्र० शंकर-स्वामी वय ५५ अशिक्षित (५) सौ० पार्वतीबाई भ्र० मलकार्जुनस्वामी वय २३ (६) सौ० काशीबाई भ्र० मलकार्जुनस्वामी वय २२ (७) सौ० नागाबाई भ्र० महा-देवस्वामी वय १५ मराठी ४ थी. (८) कु० शारदाबाई शंकरस्वामी वय १५ मराठी ४ वर्ग.) [९] चि० रेवणसिद्ध शंकरस्वामी वय १३ अविवाहित प्रायमरी शाळेंत जातो. (१०) चि० काशिनाथ शंकरस्वामी वय ११ प्रा० शाळेत जातो. (११) कु. पद्मिनबाई विश्वनाथ मल्लिकार्जुन वय ४. (१२) कु० विश्वनाथ मल्लिकार्जुन वय ४ (१३) कु. गुरुलिंग मल्लिकार्जुन वय २.

## २८. कापसे कुटुंब कल्याण.—

(१) श्री. मन्मथआप्पा शिवाप्पा कापसे शिलवंत लिंगायत, परंपरागत गुरुमठ लांबि-थकंर, वय ४१ विवाहित रेल्वेत वकाकंची नोकरी, मॅट्रिकपर्यंत, सालिना धार्मिक वगैरे खर्च

१० रु.; करण्याची इच्छा ५ रु. (२) सौ० सुभद्राबाई वय ३४ शिक्षण मराठी ४ थी. (३) चि० नागोराव मन्मथआप्पा वय १४, अविवाहित, इंग्रजी ४ थीत शिकत आहे. (४) कु० शांताबाई वय १० प्रा. शाळेंत जाते. (५) चि० दत्तात्रय वय ६ प्रा० शाळेंत जातो. (६) चि. गजानन वय ४.

२९. घामणकर माहेश्वर कुटुंब वनोजा.—

(१) श्री. रुद्रय्या महादय्या घामणकर, मु. वनोजा पो० शेलुबाजार ता० मंगरुळपीर जि० आकोला, परंपरागतमठ साकरखेडी वय ४९ विवाहित, हेडमास्तर व्हं. मि. स्कूल. शिक्षण नॉर्मलट्रेनिंग वीरशैवाची लोकसंख्या १२ सालिना कुटुंबातील धार्मिक खर्च ३०० रु. परोपकारार्थ सालिना ५० रु.; करण्याची इच्छा ४० रु. (२) गं. भा. ति. बायजाबाई ( आई ) वय ७५ अशिक्षित [ ३ ] सौ. पिसाबाई ( बहिण ) वय ५५ अशिक्षित धंदा बोर्डिंगातील स्वयंपाक. ( ४ ) सौ. काशीबाई वय ४० बाळबोध लिहतां-वाचता येते. (५) चि. काशिनाथ (पुतण्या) वय १८ विवाहित मराठी ७ वी पास [ ६ ] चि. महादेव वय ११ विवाहित मराठी ५ वीत शिकत आहे. ( ७ ) कु. चंद्रभागा वय ७ प्राथमिक शाळेत जाते.

---

# वीरशैवांतील चळवळी

## श्रीगुरुमूर्ति परांडकर स्वामींचें आगमन व सत्कार.

अखिलभारतीय गुरुवर्य संघाचे अध्यक्ष व 'वीरशैव गर्जने'चे संपादक श्रीगुरु. राचलिंगस्वामी परांडकर हे गुरुवार ता. २६ नोव्हेंबर रोजी सकाळी मेलनें येथे आले. दे. भ. नानासाहेब वापगांवकर ह्यांचेकडे त्यांचा मुक्काम होता. रात्री येथील पाथरकरमठांत स्वामींचा सन्मान करण्यांत आला. दे. भ. नानासाहेबांनी स्वामींना धार्मिक उपदेशपर दोन शब्द सांगण्याची विनंती केली· श्री. गुरु परांडकर स्वामींनी मठाधिकारी व गुरुवर्गांनी आपले शील व चारित्र्य-संवर्धनाकडे लक्ष देऊन भक्तवर्गावर आपलें नैतिक वजन वाढवावें व भक्तवर्ग व गुरुवर्ग ह्यांनी परस्परसहानुभूतीने व एकमताने संघटना करून समाजकार्य करावें अशा आशयाचा उपदेश केला. सभेला श्रीगुरुमूर्ति पट्टाधिकारी पाथरकर व मोठा मठ-संस्थानचे स्वामी श्रीगुरु बाळोणेकर शिवशंकरस्वामी वादाशास्त्री कितनकार, दानाप्पा जोगुरे श्री. देवणसिद्धाप्पा चाकोते, श्री. सोमाप्पा मेंडसे, आंबेकर, डॉ. संगेकर, चौधरी, श्री. वैजिनाथ आप्पा कापसे पिंजरकर, श्री. सिद्रामआप्पा एस. कुन्हे, श्री. कवीश्वराप्पा हेगु वगैरे मंडळी हजर होती.

स्वामींनी दुसरे दिवशी श्री. रामभाऊ कोनळाडे ह्यांचें गांधी-चौकातील चित्रकला-प्रदर्शन, तसेच 'उदय' व 'वी. संजीवनी' कार्यालय, अखिल-भारतीय आयुर्वेद विद्यालय, वगैरे संस्थांना भेट दिली. चित्रकला-प्रदर्शनाचे मालक व उत्साही कार्यकर्ते श्री. रामभाऊ आप्पा कोनळाडे ह्यांनी स्वामींचा व त्याच

दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, वैद्य हरि-हरराव ऊर्फ भैयासाहेब देशपांडे, श्री. वैजिनाथ आप्पा कापसे पिंपरकर, डॉ. आप्पाराव संगेकर, चौधरी, वगैरे मंडळींचा हार वगैरे घालून सत्कार केला व पानसुपारी दिली. स्वामींनी "चित्रकला प्रदर्शना" बद्दल समाधान व्यक्त करून आपला अनुकूल अभिप्राय व्यक्त केला, व सोलापूर-बार्शीकडील भागांत प्रदर्शन आणावयास सांगितलें. "वी. संजिवनी" कार्यालयांत स्वामींना "वीरशैव शिक्षण प्र." मंडळातर्फे अध्यक्ष दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, महाराष्ट्र वीरशैव हि. संवर्धक मंडळातर्फे डॉ. संगेकर, व "वी. संजिवनी कार्यालया"-तर्फे श्री. चौधरी ह्यांनी पुष्पहार समर्पण करून स्वामींचा सत्कार केला. "वी. संजिवनी"-च्या समाजकार्याविषयीं व तिनें केलेल्या जागृतीविषयीं स्वामींनीं समाधान व्यक्त केलें.

### श्रीसिद्धारामस्वामींचे प्रायश्चित्ताविषयीं स्वामींचें मत.

श्रीगुरु परांडकर स्वामी अखिल भारतीय गुरुवर्गसंघाचे अध्यक्ष असल्यामुळें त्यांचे श्रीसिद्धराम स्वामींचे प्रायश्चित्त प्रकर्णाबाबत अधिकृत मत विचारण्याकरितां येथील माहेश्वर व इतरहि मंडळी आली होती. महाराजांनी खाजगी तऱ्हेनें चर्चेतून व सभेनंतरहि आपलें खालील-प्रमाणें मत जाहीर केलें. "श्री. माजलगांवकरांनी प्रायश्चित्त घ्यावें हें दे. भ. नानासाहेबांचें जें मत आहे तें बरोबर आहे व श्री. सिद्धारामस्वामींनीं त्यांच्या धार्मिक अधिकाराच्या दृष्टीनें शास्त्रदृष्ट्या प्रायश्चित्त घेणें जरूर आहे." स्वामींच्या वरील निर्णयाला सर्व माहेश्वरांनी संमति दिल्याचें कळतें.

शुक्रवार ता. २७ रोजी सायंकाळी मेलनें मुंबई-मार्गानें स्वामी रवाना झाले. जातांना स्वामींनी पंचाचार्य प्रा० माहेश्वरमंडळास देणगी म्हणून २ रु. दिले.

× × × ×

### पंचाचार्य—मंडळास विनंती.

स्वामी परांडकरांनी पंचाचार्य प्रा० माहेश्वर-मंडळास देणगी म्हणून दिलेले २ रु. आमचे ऑफिसांत जमा आहेत. तरी योग्य व जबाबदार अधिकाऱ्यांनी ते घेऊन जावे.

व्यवस्थापक, 'वी. संजीवनी.'

### "गंगाबाई काडादी दवाखाना."

सोलापूर येथील उदारधी व समाजप्रेमी श्रीमंत नागप्पा अण्णा काडादी व श्रीमंत महेप्पाअण्णा काडादी ह्या बंधुद्वयांनी आपले परमपूज्य मातोश्रीचे स्मरणार्थ एक धर्मार्थ दवाखाना गुरुवार ता. १९-११-३६ रोजी उघडला. ह्या धर्मार्थ दवाखान्याचा उद्घाटनसमारंभ चित्रदुर्गसंस्थानचे श्रीमन्महाराज निरंजन जगद्गुरु श्रीजयदेव मुरघाराजेंद्र महास्वामी ह्यांचे हस्तें झाला. श्रीमंतांनी आपल्या पैशाचा विनियोग कोणत्या सत्कार्यांत करावा व परोपकाराचें खरें कृत्य कोणतें ह्याचा धडा सर्व धनिकांना घालून दिला ह्याबद्दल आम्ही श्रीमंत काडादी बंधूंचें अभिनंदन करतों.

### जळगांव—चाळीसगांव.

'वी. संजिवनी'चे प्रचारार्थ श्री. बाबुराव बाळाप्पा बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टर धुळें व श्री. बि. तु. चौधरी अमरावती, हे ७-११-३६ ह. रोजी आले होते. जळगांव येथील गुरुवर्गीय डेपुटी कलेक्टर श्री. एस. के. वडियारसाहेब ह्यांचीहि त्यांनी भेट घेतली. श्रीगुरु० वामनांचु पुराणिक ह्यांचें नवचीन माहेश्वर मंडळाचे योजनेविषयी समाधान व्यक्त करून आपली सहानुभूति व पाठिंबा असल्याचें त्यांनी सांगितलें. श्री. सिद्धेश्वर आप्पा नगरे प्रभृति वीरशैव मंडळींनी महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळास आपली सहानुभूति व पाठिंबा असल्याचें सांगितलें. लोकरच ह्या भागांत मंडळाची सभासद-नोंदणी सुरू होणार असल्याचें कळतें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष १ लें ) ता० १५ डिसेंबर १९३६ ( अंक २४ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

## उदय

हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे० भ ना० रा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

## सुदर्शन

हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रातील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

## वीरशैव गर्जना

अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

# वीरशैव संजीवनी

जुनें वर्ष चौथें

ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय: ।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:
स्त्रिय:वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष १ लें ) मिति पौष शु० २ शके १८५८ ( अंक २४ वा.

# संजीवनीचें पहिलें वर्ष संपलें.

## चारशें पृष्ठांचा इतिहास

शिव देवाच्या दयेनें 'संजीवनी'चें पहिलें वर्ष आज पूर्ण झालें. आजचा अंक हा चोवीसावा अंक आहे. आणि 'संजीवनी' पाक्षिक असल्यामुळें तो ह्या वर्षाचा अखेरचा अंक असतो. एका वर्षात एकंदर ४०० पृष्ठांचा मजकूर आम्ही वाचकांपुढें ठेवला. इतकेंच नव्हे तर ह्या वर्षी जें विषय आमच्या समाजांत प्रामुख्याने चर्चेकरितां पुढें आले ते. सर्वच सारांश-रूपाने का होईना पण 'संजीवनी'त प्रसिद्ध झाले. त्यामुळे पहिल्या वर्षांतील ४०० पृष्ठांचा एक ग्रंथ नवीन वाचकांच्या हातीं जर आही दिला तर १९३६ मधील वीरशैवांत झालेल्या खळबळीचा तो एक बोधप्रद, मनोरंजक व चिरकाल टिकणारा इतिहास होईल. ह्या इतिहासाची अनुक्रमणिका कशी राहील हें पुढील अंकीं प्रसिद्ध होईल. पहिल्या वर्षाचे जे 'संजीवनी'चें वर्गणीदार झाले नसतील त्यांना पहिल्या वर्षी 'संजीवनी'त काय आलें हें पहावयाचें असेल तर त्यांच्या सोयीकरितां 'संजीवनी'च्या चोवीस अंकांतील एकंदर ४०० पृष्ठांचा ग्रंथ रु. ३ देऊन विकत घ्यावा, आणि परिशीलन करावें अशी सोय पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें करून ठेवली आहे. जे वर्गणीदार झाले नसतील व ज्यांना व्हावयाचें नसेल त्यांनी हा ग्रंथ संग्रहीं ठेवला तर वीरशैवांचा इतिहास संग्रहीं ठेवल्यासारखें होईल.

## तीनशे रुपयांचें नुकसान

पहिलें वर्ष पूर्ण झालें ह्मणून आह्मी कृतकृत्य झालों असें सांगण्याचा आमचा हेतु नाही. आणि आरंभाला सांगितल्याप्रमाणे 'संजीवनी' धंदा ह्या नात्याने फायदेशीर झाली असेंहि नाही. 'संजीवनी'ला आस्थापूर्वक उत्तेजन देणाऱ्या लहान-मोठ्या सर्व महात्म्यांनी तीनशेच्यावर 'संजीवनी'ला वर्गणीदार मिळवून दिले व तितके वर्गणीदार झाले हें खरें. तेवढ्याने छपाईचा खर्च भागला असेल. पण छपाई हाच कांही पाक्षिकाचा खर्च होऊं शकत नाही. ह्मणच आहे कीं, लग्न करूनम्पहावें आणि नंतर खर्च पहावा. तसेंच 'संजीवनी'चें झालें. नाही ह्मणतां ह्मणतां निराळ्या कारकूनाची आवश्यकता वाटलीच. ऑफिसची निराळी सोय करावी लागली. जादा टपालखर्च वाढला. व प्रचारकाचा प्रवासखर्चहि आंगीं बसला. चित्रें न देण्याचा संकल्प होता; पण द्यावीं लागलीं. अशा प्रकारें खर्च वाढल्यामुळें रु. ३०० चें पहिले वर्षी आह्माला नुकसान झालें एवढें मात्र खरें.

## पुढील वर्षाचा वाढता आकार

पहिल्या वर्षी रु. ३०० नुकसान झालें ह्याबद्दल आह्माला वाईट वाटतें. वाईट वाटणें स्वाभाविक आहे. कारण 'संजीवनी'ची उभारणी कोणाहि एका व्यक्तीच्या आश्रयावर नाही तर सर्वसामान्य सर्व प्रकारच्या महात्म्यांच्या शुभ चिंतनावर आहे. पहिलें वर्ष घरगुती अडचणींत गेल्यामुळें 'संजीवनी'कडे जावें तसें आमचें लक्ष गेलें नाही. नव्या वर्षी हें लक्ष गेलें तर पहिल्या वर्षी झालेल्या नुकसानीबद्दल आह्माला वाईट वाटणार नाही. परमेश्वर पहिल्या वर्षापेक्षा दुसऱ्या वर्षी 'संजीवनी'कडे अधिक लक्ष द्यावयास आह्माला समर्थ करील अशी उमेद असल्यामुळें दुसऱ्या वर्षी अधिक धाडसानें पाऊल टाकण्याचा आह्मी संकल्प सोडला आहे. कारण आतापर्यंत १६ पृष्ठांचा अंकच आह्मी वाचकांचे हातीं देत होतों; पण नव्या वर्षापासून २४ पृष्ठांचा ह्मणजे सध्यापेक्षा दीडपट आकाराचा अधिक मजकूर देण्याचें आह्मीं ठरविलें आहे. अर्थात् मजकूर अधिक देणार ह्मणून वर्गणी अधिक घेणार असें मुळीच नाही. वाचकांची जास्त तितकी अधिक सोय करावी हाच ह्याच्या मुळाशीं मुख्य हेतु.

## सगळी भिस्त वाचकांवर

महाराष्ट्रांत वीरशैवांची लोकसंख्या मुळांतच कमी. त्यांत साक्षरतेचें प्रमाण तर फारच कमी. अशा स्थितींत वर्तमानपत्र खुशीने वाचून कांही बोध घेणारे महाभाग तर त्याहून कमी. त्यांतहि पैसे भरून वाचणारे सद्गृहस्थ तर विरळाच. आणि त्यांची सांपत्तिक स्थितिहि यथातथाच. त्यांत 'संजीवनी' एकच एक पत्र नाही तर 'संजीवनी'ला मागें टाकणारीं गुरुवर्यसंघाचे काशीं येथील 'वीरशैव गर्जना' व सोलापूरचें 'सुदर्शन' हीं वर्तमानपत्रें गतीनें साप्ताहिक. अशा अवस्थेंत 'संजीवनी'-कडे, महिन्यांतून दोनदा दिसणाऱ्या 'संजीवनी'कडे आस्थापूर्वक नजरेनें कोण पाहणार? ज्यांनी आस्थापूर्वक नजरेनें पाहिलें व जें पाहतील ते 'संजीवनी'वर उपकार करणारे महा-भागच होत. त्या महाभागांची कृपा उत्तरोत्तर वाढत गेली तर 'संजीवनी' पहिल्या वर्षापेक्षाहि दुसऱ्या वर्षी अधिक कार्यतत्पर होईल अशी आह्माला उमेद आहे. ह्मणून पहिल्या वर्षाच्या वाचकांनी नव्या वर्षाकरिता आगाऊ वर्गणी पाठविण्याची कृपा करावी अशी आमची त्यांना प्रार्थना आहे. अधिक नवीन वर्गणीदार मिळवून दिले व ती संख्या ५०० पर्यंत नेण्याची मेहनत घेतली तर 'संजिवनी'चें कार्यक्षेत्र चिरकाल टिकणारें व अधिक व्यापक होईल.

**'संजीवनी'चें कार्यक्षेत्र.**

'संजीवनी'तून वाङ्मयविषयक लेख व अवांतर माहीती यावी अशी कित्येकांची सूचना आहे. पण ती योग्य नाही. कारण वाङ्मयाचें व इतर विषयांचें क्षेत्र इतकें वाढलें कीं, त्याची माहिती देण्यास 'संजीवनी' फार अपुरी पडणार. अर्धवट ज्ञान हें केव्हांहि वाईट असल्यामुळे तसा अर्धवटपणा करणें आह्माला योग्य वाटत नाही. त्याकरितां निरनिराळीं पत्रें व मासिकें आहेत. त्यांचेंच वाचकांनी परिशीलन करावें. 'संजीवनी'चें क्षेत्र वीरशैवसमाजापुरतें मर्यादित आहे, व ही मर्यादा संभाळूनच 'संजीवनी'ला वीरशैवांची संघटना करावयाची आहे. आणि त्या द्वारे वीरशैवांचा धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, व औद्योगिक उत्कर्ष चिंतावयाचा आहे. ह्याकरितां राजकीय क्षेत्रांतील व सामाजिक क्षेत्रांतील मतभेद गौण मानून वीरशैव सारा एक हीच एक भावना सर्व वीरशैवमात्रांत उत्पन्न करण्याचें कार्य 'संजीवनी'ला हातीं घ्यावयाचें आहे व शक्य तोंवर तेंच तडीस नेण्याचा उद्योग करावयाचा आहे.

**आक्षेपकांची मनोवृत्ति.**

त्या दृष्टीनें 'संजीवनी'नें पहिल्या वर्षी काय केलें हा येथें प्रश्न उत्पन्न होतो. वास्तविक पहिल्या वर्षाचे २४ अंक ते काय आणि ते काय करणार? टांकीच्या घावांनी कोणत्याहि दगडाला देवपण येत नाहीं. मग 'संजीवनी'लाच कसें येणार? 'संजीवनी'ला जरी देवपण आलें नाहीं तरी 'संजिवनी'नें कित्येक दगडांना हालविलें, हासविलें, रडविलें, रुसविले व प्रसंगी वनवन फिरविलें. वास्तविक हा 'संजिवनी'चा पराक्रम नव्हे तर हा ज्याच्या–त्याच्या मनांत उठणाऱ्या कल्पनांच्या लाटांचा खेळ आहे. 'लेकीस सांगे व सुनेस लागे' असा वाक्प्रचार आहे. आणि 'मनुष्याचें मनच मनुष्याच्या मोक्षास व मरणास कारण होतें अशी देववाणी आहे. ह्या वाक्प्रचारांत व देववाणींत भरलेल्या सत्याचाच तो खरा प्रकार.

> **पुढील अंकीं**
> **सोलापुरांत झालेला**
> **चितकलदुर्ग महास्वामींचा संचार**
> आणि
> **कलूषाचा गोंधळ**
> **अवश्य वाचा**

**निंदकाचे घर शेजारी**

'संजीवनी'–त 'नवमतवादी' प्रगट झाले, काहींनी बेछूट लेख लिहिले, काहींनी जंगमांच्या आचारविचारावर कडक टीका केली, ह्यापलीकडे 'संजीवनी'त वीरशैव–समाजाची मूळ घटना उद्ध्वस्त होईल असें कांहीच आलें नाही. आलेल्या टीकेंत व्यक्तिद्वेषापेक्षा तत्वनिष्ठाच प्रखर होती. पण व्यक्तिद्वेष होता असें मानलें, तरी जो तसा नाही त्यास तें कां झोंबावें हा प्रश्न राहतोच. शिवानी हालाहल पचविलें. आह्मी त्याचें रूप ह्मणवितों–निदान तसें होऊं इच्छितों. तेंव्हां वर्तमानपत्रांतील दोन शिव्या कां पचनीं पाडतां येऊं नयेत? ह्यावरुन 'संजीवनी'तील सर्व लेखकांचा आह्मी बचाव करतों व त्यांची पाठ थोपटतो असें मात्र कोणीं समजूं नयें. आमच्यांत व 'संजीवनी'-तील लेखकांत अनेक दोष असतील व आहेतहि. कोणताहि मनुष्य निर्दोष नसतो. मनुष्य ह्मटला कीं तो दोषाला व चुकीला पात्र असतोच. पण निंदक मात्र स्वतःला दोषरहित समजून बोलतात

व चालतात ह्मणून वाद माजतो, हेंहि त्याबरोबर लक्षांत ठेवलें पाहिजे. अशा परिस्थितींत 'संजीवनी'ने जेथे वाद नव्हता तेथे वाद उत्पन्न केला व करूं नये त्यांची निंदा केली. अशा एकतर्फी आरोळ्या मारण्यांत न्याय कसा आहे? तथापि निंदकाचें घर शेजारीं असलें तर कार्यनाश होत नाही.

## 'संजीवनी'चा सुपंथ

'संजीवनी'चे अंक चाळून पाहिले व त्यांतील कोणताहि लेख घेतला तरी त्यांतून कोणाचीहि निंदा झाली असें कोणालाहि दाखवितां येणार नाही. पण त्यांत माझी निंदा आहेच ह्मणून कित्येकांनी कित्येकांविरुद्ध कारण नसतां अद्वातद्वा बोलावयाला सुरुवात केली, व त्याला जर 'संजीवनी'तून चिमटे घेतले गेले असले तर 'तेरीबी चूप और मेरी बी चूप' हाच त्याला उपाय होता. पण कित्येकांनी बुरखे घेऊन व कित्येकांनी उघड नांव घेऊन इकडे तिकडे पलायन केलें, व लांबून वार करण्याचा उद्योग केला. 'संजीवनी'त वीरशैवांतील सर्व प्रकारच्या लेखकांना वाव मिळतो. टीका-प्रतिटीका करण्याचा मार्ग सर्वांना सारखा मोकळा आहे. पण टीकेला मर्यादा पाळ ह्मटलें कीं रुसला, जागा नाही, थोडे थांब ह्मटलें कीं, गाल फुगाविलेच. हा प्रकार जेव्हा दिसू लागला, तेव्हा ज्याला जिकडे मार्ग दिसेल तिकडे जाऊं देणें हेंच योग्य होतें. आणि त्याबद्दल आह्माला विषाद वाटण्याचें कारण नव्हतें व नाही. फक्त ह्या परिस्थितींतून आह्मी पक्षपाती कसे ठरतो हेंच आह्माला कळत नाही. आणि कोणी उगीच तसें मानत असला तरी त्याबद्दल आह्माला ग्यावेसेंहि वाटत नाही. तरी झालें तें व होत आहे तें योग्यच आहे असाहि मात्र आमचा आग्रह नाही. प्रत्येकाचें मन गंगेसारखें निर्मळ होईल तर आहे ह्या परिस्थितींतूनच चंगळ होईल. तथापि तोपर्यंत वाट पाहणें उचित आहे. आणि हें असें ठिकठिकाणी घडून येणें हें मनुष्यस्वभावाप्रमाणे योग्य आहे. पण त्याकरिता सुज्ञांनी आपला मार्ग मात्र सोडूं नये.

## अहं शिवास्मीची भावना

ह्मणून 'संजीवनी'वर कोणीं आरोप केले तर त्याला उत्तर-प्रत्युत्तर देऊन वेळ घालविणें व सन्मार्गावरून ढळणें आह्माला उचित् वाटत नाही. तेव्हां वरील दोष आमचा वा 'संजीवनी'चा असला तरी 'संजीवनी'ने पहिल्या वर्षांत कांहीच केलें नाही असें मात्र नाही. गुरुविरक्तवादापासून 'संजीवनी' अलिप्त राहिली व उभयतांनाहि एकाच शुद्ध भावनेनें 'संजीवनी'ने नमन केलें आणि बसवदेवाचा जयजयकार केला. कारण हे सर्व एकाच घटकाचे अवयव. पोटानें हात नको ह्मणणें व हातांनी डोकें नको ह्मणणें हें जितकें हास्यास्पद तितकेंच गुरुविरक्तवादांत एकमेकांनीं एकमेकांचे नव्हेच असें ह्मणणें आहे. सर्व वीरशैवसमाज व सर्व लिंगधारी ह्यांच्यांत ज्याला एकीकरण घडवून आणावयाचें आहे त्यांनी गुरु, भक्त, बसव, विरक्त, असा भेद करून चालणार कसें? हा भेद जे पाडतात ते एकीकरणाचे मित्र नव्हत. एकीकरणाच्या भावनेंत जे विवा चालतात तें वीरशैव सारे एक घटक होत असें मानणारे नाहीत हेंच उघड होतें. व्यवहारांत नाना भेद असतील व वैरभावाने एकाचे अनेक होऊन ते सर्वच एकमेकाचे तोंड पहात नसतील. पण लिंगधारी ह्मणून, अष्टावरणांचे व षट्स्थळाचे अधिकारी ह्मणून, सर्वांमधी असलेल्या शिवदेवाने हाक मारली असतां 'अहं शिवास्मि' ह्मणून सर्वांनी शिवदेवाकडे तोंड फिरवावयास पाहिजे व तेथे सर्व व्यवहार एक क्षणभर तरी विसरावयास पाहिजेत.

## हृदयांतील हालाहल

मी गुरु नाही, मी विरक्त नाही, मी बसव नाही, मी भक्त नाही, मी शरण नाही,

तर मी शिव आहें, "मी तो तूं आहेस व तूं तो मी आहे हो क्षणभर तरी मनाची भावना व्हावयास पाहिजेच पाहिजे. शरीर, आत्मा, इष्टलिंग व वस्त्र ह्यांचा हा असा अन्योन्यसंबंध आहे. ही भावना ज्या अष्टावरणांनी जागृत केली जाते त्या अष्टावर्णाच्या चहात्यांनी, आज कोठे व कोणत्या वेळीं सर्व लिंगधारी एकाच शिवाचे शिवमय घटक आहोंत असें शिकलों व शिकवितों? महासभेचें व्यासपीठ ह्याकरितां मोकळें आहे, कां एखादें विरक्तपीठ ह्याकरिता मोकळें आहे? कीं एखादें गुरुपीठ ह्याकरिता मोकळें आहे? का 'सुदर्शन' कचेरींत हे सर्वव्यापी शिवाचें दर्शन घडतें, कीं 'वीरशैव गर्जनेंत' घडतें? का 'कर्नाटक संदेश' ह्याची ग्वाही देतो? का 'वीरशैव संजीवनी' ह्याचें द्योतक आहे? आह्मी सर्वच शिवाचे होऊं पाहतो पण आपसांतील मत्सरबुद्धीने शिवापासून आह्मी सर्वच दूर जातो. कारण शिव फक्त आमच्या वाचेवर नाममात्र आहे, पण हृदयांत एकमेकाविषयीचें हालाहल उतरलें आहे. अरेरे!

## 'संजीवनी'ची प्रार्थना

'संजिवनी'ची आरंभापासून प्रार्थना ही की, शिवदेवा, मी कसा असा पापी कीं, मला एकीकरण पाहिजे ह्मणतो व मी दुसर्‍यावर तुटून पडतो? देवा, मी असा कसा गुरु की, मी गुरु ह्मणवितो व भक्तांना दूर लोटतो? मी असा कसा विरक्त व बसवभक्त कीं, गुरु ह्मणविणारे सर्वच मला त्याज्य वाटावेत? ज्यांनी-त्यांनी आपल्या स्थानावर योग्य अधिकारानुरूप असणें असें मानणें ह्यांत तुझें पवित्र स्वरूप समजल्याची खात्री आहे. आपद्धर्म ह्मणून एखाद्यावेळीं ही भावना मुरडावी लागत असेल; पण शिवदेवाचें संघटित स्वरूप ह्मणून त्याला मान्यता कां देऊं नये? एखाद्या भक्तानें विशिष्ठ प्रसंगानें घरच्या घरीच लिंगधारणा आपल्या अपत्यास केली तर त्यांत गुरु-भक्त- नातें नव्हतें असें गुरुने ह्मणणें व भक्तानेंहि तसें मानणें ह्मणजे गुरुनें गुरुत्व विसरणें व भक्तानें भक्तत्व सोडणेंच होय. आपद्धर्म ह्मणून कांही गोष्टी घडून आल्या तरी मूळावर घाला घालण्याचें प्रत्येकानें टाळलें तर एकीकरणाचा व शिवमय होण्याचा क्षण काय दूर आहे? पण अंतःकरणांत शिवाखेरीज हालाहलाचाच कुंभ भरलेला आहे त्याला काय करावें? कोणींहि कोणाला लिंगधारणा करणें ह्यांत गुरुभक्तसंबंध तत्वदृष्टया अभिप्रेत असतोच. पण व्यवहारदृष्टया आणि वतनदारीचा विचार करितां त्यांत दोष येतो. एकीकरणाच्या पुरस्कर्त्यांनी आपद्धर्म ह्मणून हा दोष प्रांजलपणें मान्य करणें व तो प्रांजलपणा पोटांत घालणें ह्यांत उभयतांचीहि शिवतादात्म्यदृष्टि प्रतिबिंबित होते. पण शिव आमच्या वाचेवर आहे, हृदयांत नाही.

## रोहिणखेड-परिषदेचें वैशिष्ठ्य

अशा प्रकारें शिवाऐवजी हालाहलाचे कुंभ आमच्या हृदयांत भरले आहेत ह्मणून आत्मशुद्धि-करितां वा प्रायश्चित्ताकरितांच 'संजीवनी'नें पहिल्या वर्षी नुसते लेख लिहून न थांबतां संघटनेच्या कृतीला सुरवात केली आहे. वीरशैवांच्या प्रांतिक परिषदांचा जन्म हें त्या संघटनेचें बीज होय. त्यांतूनच महाराष्ट्रीयांचें वीरशैवहित-संवर्धक मंडळ जन्माला आलें व तें हळूहळू वाढूं लागलें. सदर परिषदेंतच वीरशैवांच्या त्रैवर्णिक-त्वाची गर्जना झाली. मठाधिकाऱ्यांनी प्रसंगी गृह-स्थाश्रम स्वीकारावा आणि मठसंस्था ही सार्वज-निक मालमत्ता असल्याची ग्वाही द्यावी ह्या ठरावानें खळबळ उडाली आहे यांत संशयच नाही. पण खळबळ करणारांत गैरसमजाशिवाय मात्र नवा

अर्थ कोणताहि नाही. वास्तविक त्या ठरावाच्या द्वारें आम्ही किंवा रोहिणखेड-परिषदेनें कोणतीहि नवीन गोष्ट सांगितली नाही. खरें शास्त्र व रुढी ह्यांची त्यांत योग्य संगती आहे एवढेंच. पण त्यांत कित्येकांना शास्त्रविरोध दिसला व दिसतो. कित्येकांना परंपरेवर घाला दिसूं लागला. कित्येकांना मठसंस्थांच्या मूळावर घाला दिसूं लागला आणि जिकडे तिकडे गैरसमज उत्पन्न करणारांचा तांडा पसरुं लागला. पण त्यापूर्वी टीकाकारांनीं वा निंदकांनीं दृष्टि थोडी आत्मसात् केली असती तर त्याला शिवमय अशा शुद्ध वृत्तीचा शुभ्र व तेजस्वी तारा दिसला असता.

## वीरशैवांचें वर्णत्व

वीरशैवांत फक्त त्रैवर्णिकत्व आहे असें ह्मटल्यानें चौथा वर्ण वीरशैवानी नाकारला अर्थात् वर्णभेद मान्य केला नाही असाहि कित्येक वर्णाभिमानी आरोप करतात. कित्येक असेंहि ह्मणतात कीं, वर्णव्यवस्था नसतांना रोहिणखेड–परिषद वा 'संजीवनी' वर्णव्यवस्था वीरशैवांत कां घुसडते? ह्या योगानें एकीकरणाच्या कल्पनेला बाध येतो असें ह्मणणारे एकीकरणवादी कोण आहेत व एकीकरणाची त्यांची कल्पना काय आहे त्याचा आह्माला बोध होत नाही. वर्णव्यवस्था ही मानवी जीवनाची नैसर्गिक व स्वाभाविक व्यवस्था आहे; ती एकीकरणाच्या कधींच आड येत नाही. त्या व्यवस्थेंत होणारा बिघाड दूर केला तर एकीकरण जवळ आहे. नाहीतर दूर आहे. गुरुवर्यसंघ, विरक्तवादी व बसवनिष्ठ असे तीन पक्ष सध्या वीरशैवांत पडलेले आढळतात. त्या तिन्ही पक्षांचा आधार अष्टावर्ण व षट्स्थळ हे आहेत. त्यांत गुरुभक्तनात्याची, ध्येयांची, व व्यवहाराची जी सांगड घातली आहे त्यांत वर्णव्यवस्थेचा बोध होऊं शकतो. अशा परिस्थतींत ती नाही असें ह्मणणें चुकीचें ठरतें. वर्णव्यवस्थेला जन्मजातीचें जेव्हां स्वरुप येतें व गुणांचा जेव्हां लोप होतो तेव्हां मात्र सदर व्यवस्थेंत कालानुरूप फरक करणें जरूर पडतें. आणि तेंच एकीकरणाचें खरें बीज होय. असें एकीकरण करूं इच्छिणारांना वर्णव्यवस्था नाकारण्याचा काय अधिकार? म्हणून वर्णव्यवस्थेला जन्मजातीचें स्वरुप देणाऱ्यांना जशी ती नाकारतां येत नाही तशीच एकीकरणाच्या चाहत्यांनाहि ती मुळांत नव्हतीच व पुढेहि राहूंच शकत नाही असें म्हणतां येत नाही हा वर्णव्यवस्थेचा त्रिकालाबाधित असा शास्त्रशुद्ध सिद्धान्त आहे.

## वर्णव्यवस्थेंतील एकीकरण

अशा प्रकारें वर्णव्यवस्था कबूल केल्यानंतर सर्व वीरशैवांत एकच एक आपलेपणाची भावना रुजवावयाची असली तर त्यांना प्रथम वर्णव्यवस्थेचा बोध करुन दिला पाहिजे हें ओघानेंच येतें. आज आमची समाजस्थिति अशी विलक्षण आहे कीं, त्यांत अमका अमुक वर्णांतील आहे असें बोट दाखवून म्हणणें धोक्याचें आहे. पण शास्त्र व रुढी ह्यांनी गुणाची वाढ करुन कोणालाहि कोणत्याहि वर्णांत प्रवेश करुन घ्यावयास वाव ठेंवला आहे. प्रथम गुरु व भक्त हें नातें असतें. पण पुढे तादात्म्यस्थितींत दोहोंतहि साम्यभाव प्रगट होतो. त्यालाच भक्तिमार्गाची व ज्ञानमार्गाची ऐक्यता म्हणतात. म्हणून सामान्य जन खऱ्या गुरुच्या पायावर ज्या श्रद्धेने लोटांगण घेंतात त्याच श्रद्धेनें खऱ्या ज्यांच्या चरणींहि लीन होतात. येथें जन्मजात आडवी आणतों म्हटलें तरी आडवी येत नाही. उलट अधिक हास्यास्पद ठरतें. हा पूर्वापार अनुभव आहे. अशा प्रसंगी जन्मजात ही निव्वळ वरगुती बाब ठरते व सामुदायिक दृष्टया तिला सहज गौणत्व येतें. म्हणूनच व्यष्ठिरुपधर्मापेक्षा समष्टिरुप धर्म हा फार मोठा आहे असें शास्त्रकारांचें मत आहे. तें गुरुवर्यसंघास, विरक्तवादास व बसवनिष्ठास सर्वांसच तत्वदृष्ट्या मान्य होण्यासारखें आहे.

## समष्टी व व्यष्टिस्वरूप

सर्व वीरशैवांची त्रैवर्णिकांत गणना केल्यानें समष्टिरूपधर्माचा आश्रय केल्याचें पुण्य आहे. त्यांत कोणाचाहि वैयक्तिक धर्म वा जात बिघडत नाही. फक्त चौथ्या वर्णाचा त्यांतून लोप होतो. पण लोप होतो म्हणजे काय? वर्णव्यवस्था म्हणजे मानवी समाजव्यवस्था होय ही कल्पना मान्य केली म्हणजे चौथा वर्ण सर्वत्र व सर्व व्यक्तींत सुप्तावस्थेंत असतोच असतो. राजांतहि स्वतःच्या सेवेचा गुण असतो. प्रत्येक मनुष्यांत व स्त्रींत असतो. मग प्रत्येक गुरुंत व प्रत्येक विरक्तांत असला तर नवल काय? हजारो वर्षांपासून ज्यांना परंपरेने लिंगधारणा आहे, ज्यांना अष्टावर्णाचे अधिकार परंपरेनें असलें आहेत, त्या लिंगधाऱ्यांतील विशिष्ठ वर्गांत व पोटजातींतच चौथा वर्ण साठविला आहे अशी एकाद्या गुरुवर्याने, एकाद्या विरक्ताचार्यानें वा एकाद्या बसवनिष्ठानें मानणें म्हणजे आपण पतितोद्धार करूं शकलों नाही व आपली परंपरा शुद्ध व सोज्वळ राखूं शकलों नाही अशी अनेक शतकानंतर कबूली देणें नव्हे काय? वीरशैवांत अनेक पोटजाती आहेत. प्रत्येक पोटजातीचे गुरुहि रूढ आहेत. तेव्हां प्रत्येक पोटजात अष्टावर्णातील नव्हे असें आज कां व कसें मानावें? म्हणून सारे वीरशैव त्रैवर्णिकांत येतात अशी समष्टिरूप धर्मस्वरूपाची गर्जना केली तर त्यांत एकीकरणाचें बीज असून व्यष्टिधर्मावरहि आघात नाही हेंच स्पष्ट सिद्ध होतें.

## लिंगसृष्टीचा व्यवहार

शिवाय मानवी सृष्टीचे लिंगसृष्टि व लिंगेतर सृष्टि असे दोन भाग केले, व लिंगसृष्टीचा सर्व व्यवहार लिंगमय अर्थात् शिवमय परमेश्वराशीं एकरूप असतो असें मानलें तर चौथा वर्ण लिंगेतर सृष्टींत आहे असें मानणें व तसें स्पष्ट सांगणें हाहि हेतु सर्व वीरशैव त्रैवर्णिकांत येतात असें सांगण्यांत आमचा आहे. जन्मतः प्रत्येक मूल व प्रत्येक मुलगी शूद्र असते. पण जन्मतःच लिंगधारणा होतांच वीरशैवांतील प्रत्येक मुलास व मुलीस द्विजत्व येते. इतर सृष्टींत स्त्रियांना जन्मभर शूद्रत्व राहते व पुरुषांना आठव्या वर्षी मौंजेने वा यज्ञोपवीतसंस्कारानें द्विजत्व वा त्रैवर्णिकत्व येते. लिंगसृष्टीचा व लिंगेतर सृष्टीचा हा भेद स्पष्ट निदर्शनाला यावा व प्रत्येक लिंगायतांना आपल्या निजस्वरूपाची ही जाणीव व्हावी म्हणून प्रत्येक वीरशैव द्विज आहे व तो त्रैवर्णिकांत येतो हें 'संजीवनीला' व रोहिणखेड-परिषदेला गर्जून सांगावें लागलें. ह्यांत सर्व पोटजाती व आजचे गुरुत्रयंवादी, विरक्तवादी व बसवनिष्ठ ह्या सर्वांची एकाच समाजघटकांत एकाच मुख्य सूत्रानें गठडी बांधली असा स्पष्ट होतो.

## एकीकरणाची खरी भावना

एकाच पोटजातीचे, एकाच शाखेचे लोक असले तरी खाण्यापिण्यात ते एकमेकाचें तोंड पहात नाहीत हा नित्याचा व्यवहार आहे. तेव्हा सरसकट रोटीबेटीव्यवहार हेंच एकीकरणाचें लक्षण होय असा सिद्धान्त बांधता येत नाही. ही बाब ज्याच्या-त्याच्या खुषीची असी व्यक्तिगत धर्मांतील आहे. ह्मणून त्याकरिता सामुदायिक दृष्टीने रणकंदन माजविणें सर्वस्वी अयोग्य आहे. लिंगधारी सारे द्विज आहेत ह्या भावनेने प्रत्येक खेड्यांतील, प्रत्येक मोहल्ल्यांतील, वा प्रत्येक मठाच्या हद्दींतील, झाडून सारे लिंगधारी स्त्री- पुरुष, मुलाबाळासह आठवड्यांतून वा महिन्यांतून ठरीव वेळीं गुरु-विरक्त, गुरु- भक्त, स्त्री पुरुष सर्व भेद विसरून 'अहं शिवास्मि' ह्या प्रार्थनेकरिता पांच मिनिटांकरिता जरी एकत्र झाले तरी संघटना व

एकीकरण होईल, परस्परांत सख्य वांदेल व वीरशैव बरिशैवाकरितां झटेल. इतकेंच नव्हे तर काल केवढाहि उलटा चालत असला तरी कालाच्या गतीला थापड देऊन वीरशैव हा वीरशैव म्हणूनच जिवंत राहील. नाहीं तर गुरु- भक्त, गुरु विरक्त, बसव बसवविरोध अशा वादापायीं बुडत चाल- लेला वीरशैव आजच्या भांडकुंदळांनी बुडविला म्हणून तरुण पिढी त्यांचा धिक्कार करील. आणि शिवसायुज्यतेला पोंहचलेले पंचाचार्य, ते प्रभुलिंग, ते सिद्धेश्वर, ते बसवदेव, ते सर्व शिवशरण, आजच्या भांडकुदळांना शिव्याशाप देतील.

## मठसंस्थांचें सार्वजनिक स्वरूप

मठसंस्थांचा कांही नाहो तरी अशा एकीकर- णाच्या कामीं उपयोग व्हावा म्हणुन मठसंस्था ही सार्वजनिक मालमत्ता होय अशी गर्जना रोंहीणखेड परिषदेंत झाली. पूर्वी बेल चढण्याच्या रुपाने, अनेक पुण्यतिथीच्या रूपाने असें एकीकरण प्रत्ययास येत असे. सध्या भक्तवर्गांत बेकारी माजली. मठसंस्थांची उत्पन्नें बुडालीं म्हणून मठांचा व्हावा तसा समाजसंघटनेंस उपयोग होत नाहीं व त्या संस्था कित्येक ठिकाणी बेचिराख होऊं लागल्या. ती मालमत्ता सार्वज- निक आहे अशी जाणीव झाली तर विकणारा विकणार नाही व गहाण ठेवणारा गहाण ठेवणार नाही असा त्याचा परिणाम होतो. इतकेंच नव्हें तर असा प्रकार कोठें घडला व कोणीं उद्योग केला तर तें खरेदीपत्रक व गहाणपत्रक रद्द होऊं शकतें. हें सत्य सर्वांच्या प्रत्ययास यावें म्हणून हा ठराव झाला. पण कित्येक स्वामी म्हणविणारांनी सार्वजनिक शब्दाचा असा अर्थ केला कीं, मठ- संस्थांवर भक्तांची मालकी चालावी व भक्त- वर्गांनी त्या विकून खाव्यात. आतां असा अर्थ करणाऱ्या अक्कलवंताच्या अकलेला हंसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं. एकाद्या मठाला पंच नेमले असले तरी त्या पंचांवाहि मठसंस्थेची अफरातफर करीतां येत नाही. केली तर मठाच्या स्वामींपेक्षाहि तो कडक शिक्षेला पात्र होतो असा स्पष्ट अर्थ मठसंस्था सार्वजनिक आहे असें म्हटल्यानें होतो.

## गृहस्थाश्रम व मठसंस्था

आता मठसंस्थांचा अधिकार ब्रम्हचाऱ्यास असावा कीं गृहस्थाश्रम्यास असावा हा एक प्रश्न मात्र वादग्रस्त आहे. कानका झालेला माहेश्वर, पट-चर अधिकार असलेला पीठाधिकारी, आचार्यपीठाधीश व विरक्त- पीठाधीश हे सर्व ब्रम्हचारी असावेत, आश्रम- धर्मांतून परिणत होत होत ते सायुज्यपदास पोहोंचले अशी प्रथा परंपरेने नाही. तरी कांहीं ठिकाणी कानका झालेला माहेश्वर गृहस्थाश्रमी होतो व तो गुरुचेंच नांव लावून तीर्थप्रसाद देत असतो. पूर्वपरंपरा वा शास्त्राधार येथें कां आडवा आला नाही? रोहिणखेडला ठराव झाल्यावरोबर मात्र शास्त्र बिघडलें असें कां वाटावें? सगळेच मठा- धिकारी अनाचारी असतात म्हणून हा ठराव केला नाही तर विद्यार्जनापुरता ब्रम्हचारी पुढें गृहस्थाश्रमीं, पुढें वानप्रस्थाश्रमीं व तद- नंतर सन्यासधर्मी परिणत व्हावा व ते एकाच मठाच्या परंपरेतून वाढू लागावें आणि मठसंस्थांना कुलीन, सदाचारी व ज्ञानी असे अधिकारी अखंडित लाभावे म्हणून मठसंस्थांत गृहस्थधर्माची प्रथा पाडावी असें रोहिणखेड- परिषदेनें म्हटलें. विद्यार्जनाच्या काळीं जो ब्रम्हचारी असतो तो वीस-पंचवीस व- पर्यंत पटाधिकारी राहिला व पुढे त्यानें गृह- स्थाश्रम स्वीकारला तरी मठावरील त्यांचें स्वामित्व नष्ट होत नाही, तर कारभारी म्हणून तो तेथे राहूं शकतो.

## आश्रमधर्म व मठ

फारच झालें तर पट-चर हे अधिकारी जातील, तदनंतर कांही दिवस गादी मोकळी ठेवून पुढें आपल्या मुलास त्याने ते अधि- कार द्यावेत आणि आपण हळू हळू वान- प्रस्थाश्रमांतुन संन्यासश्रमांत जाण्यास शिकावे. निरनिराळ्या दीक्षाविधीचा अर्थ तरी आश्रमधर्मांची परिणती हाच आहे. व ही

परिणती सुरू झाली तर शास्त्राचा व रुढीचा बर्व रोहिणखेंडच्या ठरावाने कसा बदलतो? म्हणून गुरुपदाचें वा विरक्तपदाचे अधिकार प्राप्त व्हावयास बालब्रम्हचारी हाच एक नियम लागू नसावा तर गृहस्थाश्रम करणाऱ्याला असावा आणि त्यानंतरचे आश्रमधर्म ज्याचें परिणत होतील त्यालाहि प्रसंगीं गुरुपदाचा व विरक्तपदाचा अधिकार लाभावा. अशी प्रथा क्रमाक्रमानें सुरू केली तर मठसंस्थांचें पावित्र्य वाढूं लागेल कीं घटूं लागेल ? हा विचार नवा आहे, पण तो सुज्ञांपुढे चर्चेला ठेवणे अधिक महत्वाचें आहे. रोहिणखेड–परिषदेंत 'संजीवनी'द्वारा हा विचार पुढे आला व त्याची अनुकूल-प्रतिकूल चर्चा सुरु झाली हें एक कार्य होय. निदान एका नव्या कार्याचें त्यांत बीज आहे, व त्या बीजाचा उद्या वृक्ष होईल आणि एकादें तरी आचार्य-पीठ वा विरक्तपीठ ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम व सन्यास ह्या आश्रमधर्मांतून परिणत झालेल्या व्यक्तीस लाभलेलें आमच्या पिढीस नाही तरी आमच्या पुढच्या पिढीस दिसेल असा आम्हांला भरंवसा आहे.

## वर्षाअखेरचें मागणें

नुसते लेख लिहिणें एवढेंच 'संजीवनी 'चें कार्य नव्हे, तर 'संजीवनी 'तून प्रगट होणाऱ्या विचाराप्रमाणें कार्याची प्रणालिका सुरू होणें व करणें असें व्यापक 'संजीवनी'चें कार्यक्षेत्र आहे. ह्याचें बीज पहिल्याच वर्षी वीरशैवहित–संवर्धक मंडळ स्थापण्यांत, मठसंस्थांना योग्य ती चालना देण्यांत, एकीकरणाचें बीज समष्टि-दृष्टीने शोधण्यांत, रोहिणखेंड-परिषदेंत झालें आहे, व त्याचा अनुकूल-प्रतिकूल ध्वनि सर्व वीरशैवांतून निघूं लागला आहे. झाले तें व होत आहे तें कार्य पूर्णपणें निर्दोष आहे व योग्य आहे असा कांही आमचा हट्ट नाही. पण शास्त्र, पूर्वपरंपरा, व सद्यःस्थिति लक्षांत ठेऊन ज्यांना ज्यांना विचार करावयाचा आहे त्यांनी प्रांतिक परिषदांतून वीरशैवहितसंवर्धक मंडळांतून, 'संजीवनी 'तून वा इतरत्र पत्रांतून त्यावर मोकळेपणाने चर्चा करावी, द्वेष व मत्सर बाजूला सारून चर्चा करावी, प्रसंगीं अल्पमत व बहुतमत ह्यांतहि रंगावें :– एवढें करून जें मंथन होईल त्यांतून मात्र सत्यरूप अमृत बाहेर पडेल. हें अमृत जे देव असतील त्यांनीं घ्यावें. आणि जे शिव असतील त्यांनीं दानवांच्या रक्षणार्थ, त्या मंथनांतून निघणारें हालाहल पचवून दाखवावें. पण सर्वांनीं आपले विचार व आचार एकाच समाजाच्या कल्याणाकरिता आहेत ह्याच एका भावनेने चालू ठेवावेत म्हणजे मतभेदांतहि ऐक्य असतें व दिसतें हें प्रत्ययास येईल. तो प्रत्यय यावा ह्याचकरितां 'संजीवनी' आज पहिल्या वर्षांतून दुसऱ्या वर्षांत प्रविष्ट होत आहे. ज्ञात्यांचा आशीर्वाद असावा हें मागणें आहे. शिवदेव, प्रथम आमच्या निंदकांचें, नंतर चहात्यांचें व मग समाजाचें व सर्वामागून आमचें कल्याण करो अशी त्याच्याजवळ अनन्यभावें प्रार्थना करून पहिल्या वर्षाचा समारोप करूं या.

---

## वर्गणीदारास विनंती

पुढील म्हणजे १-१-१९३७ च्या अंका पासून वी. संजिवनीला दुसरें वर्ष लागत आहे. ज्यांचेकडे ता. १–१–३६ पासून अंक सुरुं आहे व ज्यांची वर्गणी डिसेंबर अखेर संपते त्यांनी पुढिल वर्षाची २॥ रु० वर्गणी खालील पत्त्यावर मनिआर्डरने पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक,
'वी. संजीवनी'

# माजलगांवकर-प्रकरणाची वावटळ

माजलगांवकर स्वामींच्या प्रायश्चित्त-प्रकरणाची वावटळ शांत होईल असा आम्हाला विश्वास वाटत होता. पण हें प्रकरण आतां इतकें चिघळलें गेलें कीं, त्या प्रकरणाचा विचार करणेंसुद्धां सुज्ञास तिरस्काराचें वाटूं लागलें. पण हा काय प्रकार आहे त्याची यथोचित् कल्पना वाचकांना देऊन त्या प्रकरणाची रजा घेणें आम्हाला आतां योग्य वाटतें. येथील माजलगांवकरमठांतील प्राथमिक शिक्षण घेतलेल्या एका तरुण मठाधिकाऱ्यासमोर जेंव्हां देशी व्यायामाच्या खेळाच्या सामन्यांत भाग घेण्याकरिता येथील श्री हनुमान-व्यायाम प्रसारक मंडळाच्या खेळाडूबरोबर जर्मनीमध्यें जाण्याचा प्रश्न उत्पन्न झाला, तेंव्हां सहजगत्या त्यांनी कांहीं माहेश्वरापुढें व भक्तवर्गापुढें धर्मदृष्टया हा प्रश्न ठेवला. कांहींनीं परदेशगमन धर्मबाह्य असल्याचें सांगितलें व त्याला प्रायश्चित्त अर्थात् शुद्धि नाहीं असाहि निर्णय दिला. कांहींनीं, खुषीनें प्रायश्चित्त घेतलें म्हणजे चालेल, असा सल्ला दिला; व त्या सल्ल्यावर भरंवसा ठेवूनच स्वामी जर्मनीला गेले, व जातांना वऱ्हाडांतील सर्व वीरशैवसमाजातर्फे त्यांना मोठ्या थाटानें ना. खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं निरोप दिला. येथवर झालें तें योग्यच झालें.

पण माजलगांवकर स्वामी परत येतांच ते 'स्वखुषीनें प्रायश्चित्त घेणार' अशी बातमी 'संजीवनी'त प्रसिद्ध झाली. ह्यांत काय पाप होतें ईश्वर जाणे. पण प्रायश्चित्ताची जरुरी नाहीं व प्रायश्चित्त घेतलें कीं स्वामींचा मठावरील हक्क जाणार अशी एक कपटनाटकी विचारसरणी प्रगट झाली व ती बाहेरगांवच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्धहि झाली. तींत कपट कसें आहे हें आम्हीं एका लेखांत दाखविलेंहि होतें. तथापि त्यानंतर उमरावतींत अनेक सभांतून चर्चा झाली व कित्येकांच्या बिन्वारसी मुलाखतीहि प्रसिद्ध झाल्या. त्यांतून प्रायश्चित्ताची गरज नाहीं हाच ध्वनि निघाला, आणि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, आम्हाला ज्यांच्याविषयीं व्यक्तिशः पराकाष्टेचा आदर वाटतो त्या गुरुमूर्ति राचलिंगस्वामी पर्हाडकर स्वामींनी चालविलेल्या गुरुवर्यसंघाच्या मुखपत्रांतून म्हणजे बार्शीच्या 'वीरशैव गर्जनें'तून व सोलापूरच्या विरक्तभक्त व बसवनिष्ठ अशा 'सुदर्शन'-मधून निघाला. अर्थात् तीं उभयपत्रांच्या विद्वान् संपादकांचीं अधिकृत मतें नव्हतीं हें आम्ही जाणतों, पण दोन्ही पत्रें एकाच वीरशैवसमाजाच्या घटकाची असून त्यांतून हीं विचित्र मतें प्रसिद्ध व्हावींत ह्याचें आम्हाला आश्चर्य वाटलें व प्रायश्चित्त घेणें योग्य कां हें आम्हीं आपलें मत प्रतिपादन केलें.

'वीरशैव गर्जना' व 'सुदर्शन' हीं पत्रें गुरुविरक्तवादांतील असलीं तरी लिंगधारियांची लिंगधारियांकरिताच आहेत. 'सुदर्शन' एकीकरणवादी असलें तरी लिंगधाऱ्यांतील एकीकरणवादीच आहे. लिंगी व अलिंगी ह्यांतील एकीकरणाचा प्रश्न कोणापुढेंच नाहीं. 'वीरशैव गर्जना'-काराचा गुरुवर्य – वीरशैव-समाज असो, वा 'सुदर्शन'-काराचा विरक्त

या बसवदेवाचा वीरशैव समाज असो; त्याची रचना व उभारणी मुळापासूनच सर्व व्यवहार लिंगीच असावेत अर्थात् लिंगायतांनी लिंगायतां-शींच खाण्यापिण्याचे, रोटीबेटीचे सर्व व्यवहार करावेत या मुख्य तत्वावर झाली. त्यांतहि भेदा-भेद आहेत हा प्रश्न वेगळा. पण हें मुख्य तत्व कोणासहि विसरतां येत नाही.

ज्या काळांत ह्या तत्वावर समाजाची उभारणा झाली त्या काळांतील आचार-विचार पाळणें योग्य असेल; पण त्याच्या योग्यतेचा विचार येथे अनुचित आहे. तथापि लिंगधाऱ्यांचे लिंगधाऱ्यांशींच सर्व व्यवहार असावेत असें नाही. ते आपद्धर्माचे प्रश्न शास्त्राने व रूढीनें सोडविले आहेत, व सुटलेहि आहेत. म्हणूनच वीरशैवसमाज टिकून राहिला आहे. लिंग हरविलें, चुकून भलत्याशीं व्यवहार घडला, कीं तो समाज-बाह्य झाला असें नाहीं; तर त्यास कसें समाजात घ्यावें ह्याचे नियम आहेत व त्या नियमाची रीतहि प्रचारांत आहे. त्यामुळे सद्हेतूने वा दुर्हेतूने एकाद्याकडून समाजबाह्य वर्तन घडलें तर त्यास पुन्हा पावन करून घेण्याची प्रथा समाजांत कायम आहे. त्यामुळे समाज कायम राहतो व समाजबाह्य राहण्याचा कोणावरहि प्रसंग उद्भवत नाही.

सध्याच्या काळांत लिंगधाऱ्यांचे लिंगधाऱ्यांतच व्यवहार व्हावेत हें बंधन कित्येकांना जाचक वाटतें, व ही बंधनें शहरनिवासी साक्षर वा निरक्षर अशा वीरशैव तरुणांकडून तुटत चाललीं हें आपणहि आपण नजरेनें पाहतों, त्याबद्दल कुठे प्रायश्चित्त देण्याघेण्याचा प्रश्न उद्भवतो? असा कित्येक प्रश्न करतात. पण सोडून हॉटेलांत चहा घेणारा, जेवणारा, व बोर्डिंगमध्ये इतरांचे हातचें खाणारा, बारकममध्ये पाणी पिणारा, किंवा चोरी वा जारकर्म करून तुरुंगांत जाणारा, दारू पिणारा हा वासे-नगारे वाजवीत व समाजाची संमति घेत घेत हें कर्म करतो असें मुळीच नाही. आणि हें त्याचें पाप सिद्ध करितां येणें शक्य होत नसल्यामुळे, पचत असलें तर नवलहि नाही. पण तो व्यक्ति त्याचें परिमार्जन निराळ्या तऱ्हेनें करीत नसेलच असेंहि मानण्याचें कारण नाही. म्हणून असे प्रश्न ज्याच्या-त्याच्या खुषीवर ठेवून समाज मोकळा झाला आहे. तेव्हां आज व्यक्तिगत आचार कोणाचे काय घडतात हा प्रश्न विचारांत घेऊन स्वामी माजलगावकरांनी प्रायश्चित्त घ्यावें कीं न घ्यावें हा प्रश्न सोडविणें वेडेपणाचें व मूर्खपणाचें आहे असें आम्हाला वाटतें.

देशभक्तीकरिता एखादी व्यक्ति जाहीर-पणें तुरुंगांत जाते, विद्यार्जनार्थ अनेक विद्यार्थी परदेशीं जातात, तेथील सर्व अन्नपाण्याचे व्यवहार धर्मदृष्टया व समाजदृष्टया लिंगधा-ऱ्याशींच होतात असें कोणीहि शपथेवर सांगू शकत नाही. आणि जातिधर्मास सोडून असा व्यवहार राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरिता वा विद्या-देवीच्या प्राप्तीकरिता झाला असतां एकंदर समाजाने व त्याच्या चालीरीतीने त्याला पुन्हा पूर्ववत् पोटांत घेण्याचें ठरविलें असतां त्या समाजाच्या विधीला शरण न जाणें म्हणजे बापाला बाप न म्हणण्याचें पाप करणें होय, अशी निदान आमची तरी प्रामाणिक समजूत आहे. पण परोपकारार्थ तुरुंगवास वाट्याला आला असतां, कांही झालें तरी जातीनें वा धर्मानें त्याला पोटांत घेण्याचें नाकारलेंच असतें, अथवा विद्यार्जनार्थ परदेशगमन घडलें असतां समाजाने त्याला पोटांत घेण्याचें टाळलेंच असतें, तर त्या जातीपेक्षा व धर्मापेक्षा माझा देश व माझी विद्या फार मोठी म्हणून तीं बंधनें झुगारावयास आम्हीं सांगितलें असतें. व अनेकांनीं त्याचाच अंगीकार आजच्या काळांत केला असता. आणि त्यामुळे समाज अनेक थोर पुरुषांना मुकला असतां. पण समाजाने त्या सर्वांना खुषीनें प्रायश्चित्त देऊन पोटांत घेण्याचें ठरविलें.

सुदैव आमचें कीं, आमची धर्मजातमाउली इतकी उदार कीं, आपद्धर्मं म्हणून आम्ही कोठेहि गेलों व परत येतांच तिला नमन केलें तर ती आम्हाला मांडीवर घेऊन कुरवाळते, लिंबलोण ओवाळते आणि लाडीकपणानें चुंबन घेते. अशी उदार वीरशैवधर्मजात-माउली ज्यांना लाभली ते परदेशीं जाऊन वा तुरुंगांत जाऊनहि आज तिच्या मांडीवर खेळत आहेत. प्रत्येक धर्म वा जात कांही विशिष्ठ विधींत संकलित झालेली असते. तिला स्वखुषीने शरण जाणें, ह्यांत आईला नमन आहे. ह्यांत पाप नसून पुण्य आहे. ह्यांत स्वतःच्या बाटवेगिरीची ग्वाही नसून धर्ममातेचें सालंकृत पूजन आहे. पण दुर्दैव आमचें कीं, स्वामी माजलगांवकर म्हणतात कीं 'मी काय बाटलों म्हणून प्रायश्चित्त घेऊं?' आणि तेंहि जाहिर काय म्हणून'? शिवाय मला समाजानें जो निरोप दिला तो मी शुद्ध आहे ह्या भावनेचाच होता ना ?

समाजाने जो मोठ्या प्रेमाने एकमुखी निरोप आपल्याला दिला त्यांत आपण तेथून आल्यावर स्वखुषीनेंहि प्रायश्चित्त घेणार नाही व समाजाला आपले म्हणणार नाही असें का आपण जाहीरपणें सांगितलें होतें ? जो प्रश्न आतांना नव्हता, तो होता असें समजून प्रेमाने व आदराने निरोप देणाऱ्या समाजावर लादूं पाहणें, स्वयंस्फूर्तीनें नसेल, तर एखाद्या दुसऱ्या आचरटाच्या सल्ल्याने लादूं पहाणें म्हणजे समाजाने प्रगट केलेल्या आदरबुद्धीला लाथेनें तुडविणेंच होय. म्हणून जर्मनीला जाताना समाजाने दिलेला निरोप म्हणजे समाजाने आपल्या धर्मजातमाउलीला आदरपूर्वक वमन करू नको असें सांगणेंच होय. म्हणून असें जे म्हणतात ते समाजद्वेष्टे होत. ते समाज–धर्म–जात ह्यांची पूर्वापार बंधनें तोडणारे होत. म्हणून अशा लोकांनी प्रायश्चित्त घेऊं नये असें बहुमतानें ठरवून सांगण्याचा जरी बहाणा केला तरी अशा दहा–पांच टारगटांचें बहुमत म्हणजे उमरावतीचें बहुमत नव्हे व तें उमरावतीच्या वीरशैवसमाजाचेंहि मत नव्हे. शिवाय आईला आई ह्मणणें व बापाला बाप ह्मणणें हा प्रश्न जर बहुमताने सोडविण्याचा प्रसंग आला तर दुर्दैव नव्हे काय? व ही बहुमताची थट्टा नव्हे काय?

तथापि स्वामींनी प्रायश्चित्त घेऊं नयें व घेतल्यावाचूनच आम्ही त्यांना पंक्तिपावन केलें व त्यांचा तीर्थप्रसादहि रूढ केला ह्यांत आनंद मानावयाचा असेल तर अशा धैर्यादपि महाभागांनीं साक्षीदारानिशीं आपलीं नावें जाहीर कां करूं नयेत? शीलवंत म्हणविणारे, दीक्षावंत म्हणविणारे, स्वामी म्हणविणारे, असे धैर्यादपि महावीर जर पुढे आले तर अलिंग्याशीं उघडपणें व्यवहार करणाराशीं धर्म.जातीचें बंधन उघडपणें तोडून व्यवहार करणारे, सुधारकांतले सुधारक होत म्हणून आम्ही त्यांच्या पायावर लोटांगण घालूं. पण तसें धैर्य एकालाहि होत नाही. अशा स्थितींत बहुमताची घमेंड मारणें शुद्ध वाचाळता नव्हे काय? आणि हें वाचाळ लोक स्वामी माजलगांवकरसारखे एक अल्पवयी लेकरू आपल्या व्यक्तिगत मत्सरासाठीं फजीत करीत आहेत हा शुद्ध गाढवपणा आहे असें सरळ आम्हीं म्हटलें तर गाल कां फुगावेत? आणि उगा उघळली जाईल अशी घमेंड कां मारावी?

सत्यवाणी बोलावयास 'संजीवनी'कार भिणार नाहीत. सत्य बोलण्याकरितां मरण तुच्छ समजणें हा 'संजीवनी'काराचा धर्म आहे. 'संजीवनी' म्हणजे बडवेगिरी नव्हे. 'संजीवनी' म्हणजे लोचट शाब्द्याची लोचट वाणी नव्हे. म्हणून माजलगांवकरांनी आपणहून प्रायश्चित्त घेणें योग्य नव्हे असें संजीवनी प्राणांसींहि म्हणणार नाही. आणि असें कोठें बहुमत आहे हेंहि मानणार नाही. आंबाडांत कोण काय करतो हा येथें प्रश्न नसून, उजेडांत कोण काय बोलतो हा येथें प्रश्न आहे.

म्हणे शुद्धिकरण शब्द वापरा, प्रायश्चित्त शब्द वापरू नका. वास्तविक दोन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत. शब्दाला कां भीतां? लोकांस तीर्थोदक देऊन पवित्र करणाऱ्या एका छोट्या स्वामीस असें भ्यावयाला कां शिकवितां? आम्ही दोन वेळ जाहीरपणें राजकीय बंदी म्हणून तुरुंगांत गेलों, आपणहून दोन्ही वेळ प्रायश्चित्त घेतलें, आणि तें त्या वेळीं वर्तमानपत्रांतून जाहीरहि केलें. कां जाहीर केलें? तर वीरशैव-धर्माची आतमाउली थोर हृदयाची आहे हें दिसावें व तिचें पूजन करण्याचें अल्पसें तरी पुण्य लाभावें म्हणून, समाजघटनेला धारण करण्यांत कोणाहि समाजाच्या लेकरास कोणताहि कमीपणा नाहीं हें प्रगट व्हावें म्हणून. 'उलट' स्वामी माजलगांवकरांनी आपणहून प्रायश्चित्त घेणें ह्यांत त्यांची धर्म-भक्ति व समाज-भक्ति प्रगट होत असून, समाजांतील लेकरांना पुनीत करण्याचा त्यांचा अधिकार अधिक उज्ज्वल होतो. व प्रायश्चित्त घेतलें असतां [illegible] होईल.

पण त्यांना अशी सल्ला देण्यापूर्वी ते माजलगांवाहून आपल्या गुरूकडून प्रायश्चित्त घेऊन आले म्हणून ज्यांनी खोटीच हूल उठविली व कित्येक सन्माननीय पट्टाधिका-यांना जाळ्यात ओढलें त्यांनीं त्यांत कोणतें पुण्य संपादन केलें? नकळत घडलें तें पाप नव्हे म्हणून ते स्वामी दोषीहि नाहीत. पण ज्यांनी हूल उठविली ते दोषी आहेत. ह्यांत त्यांनी पंचाचार्यप्रणित गुरुवंशाची भक्ति प्रगट केली, कीं बसवप्रणित लिंगांगी एकीकरण साधलें? साराच घोटाळा मात्र माजवून ठेवला. आणि हा कोणीं केला? तर जे माहेश्वर ह्मणवितात व जे पंचाचार्य माहेश्वर ह्मणवितात त्यांनीं. कारण वीरशैवांची सुधारणा ज्यांना करावयाची आहे, वीरशैवांत एकीकरण ज्याला घडवावयाचें आहे, तो कोणीहि असला तरी, जर्मनींत जाऊन अलिंगांपाशीं जाहिरपणें ज्यांचा व्यवहार झाला त्यानें स्वखुषीनें प्रायश्चित घेऊन मोकळें होऊंच नये असें कसें म्हणेल? पण असे विचित्र लोक उमरगावतीत निघाले. त्यांच्या मतांना 'वीरशैव गर्जनें'तून व 'सुदर्शन' मधून वाव मिळाला आणि तेच ह्या शहरांतील बहुमत आहे म्हणून स्वामी माजलगांवकरहि अशा लंगड्या बहुमताला बळी पडले. कारण काय? तर प्रायश्चित्त घेतलें कीं मठ जातो ही त्यांची पोरकट भावना झाली, व कांहीं मूर्खांनी करून दिली. आम्हाला ह्यांत माजलगांवकरांचा राग येत नाही; तर पोरकट बुद्धीने नव्हे तर द्वेषबुद्धीने ज्यांनीं नेसूचें डोक्याला गुंडाळलें त्या एक दोन व्यक्तीच्या हीन कारवायांचा मात्र राग येतो. आणि तोहि त्यांच्या धर्म व समाज ह्याच्याबद्दलच्या विचित्र समजुतीबद्दल येतो. एवढें सांगून तूर्त ह्या विषयाची आम्ही रजा घेतों.

ना. रा. बा.

---

चरित्र

# परमहंस श्रीकोंडय्यास्वामी महाराज

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

## कांही अद्भुत चमत्कार

महाराजांचे बरेच जनास बरेच चमत्कार नि साक्षात्कार घडलेले आहेत. त्यांपैकी कांही येथे देतों

निझाममध्ये (स्थळ आठवत नाही) एकदा एका मोठ्या समारंभाचे प्रसंगीं महाराजहि हजर होते. प्रथमपासूनच महाराज हिंदूंतील स्पृश्यास्पृश्यता व खाण्यापिण्यांतील विषमता मानीत नाहीत. महाराजांच्या अशा ह्या आचार-विचारांमुळे कर्मठ वीरशैव लोकांनी या समारंभांत त्यांना वाळींत घालण्याचे ठरविलें, व पंक्तीचे वेळी महाराजांचें पात्र मुद्दाम सर्वांपासून अलग घातलें. महाराजांना अंतर्ज्ञानानें तो सारा खेळ कळून चुकला, व लगेच ते तेथून नाहींसे झाले. अनायासेच ब्याद टळली ह्मणून कर्मठांना जो हर्ष झाला तो येथे काय वर्णावा!

चार-पांचशे मंडळींची ती पंगत होती. पात्रें पूर्ण वाढून झाल्यावर सर्वांनी इष्टलिंगावर बिल्व वहाण्याच्या रूढीजात प्रथेप्रमाणें याहिवेळीं आरती होऊन प्रथम महेश्वरांचे लिंगावर बिल्व वहाण्यास आले. पण लिंगालय उघडून पहातात तों आंत इष्टलिंग नाहीं. पांचवें लिंगधाऱ्यांचीहि तीच गत. सर्वत्र एकच आश्चर्याची छटा पसरली. ओळख पटण्यास उशीर लागला नाही. सर्वांचे डोळे उघडले. महाराजांचेंच हें अद्भुत कृत्य आहे अशी सर्वांची खात्री पटली. मग महाराजांचा शोध करा. पण महाराज ह्मणजे खरोखरीचेच महाराज ते. शोध-शोधून दमल्यावर शेंवटी महत्प्रयासानें जवळच्याच एका टेंकडीवर ते मिळाले. तेव्हां त्याच पंक्तीला महाराजांना अग्रस्थानीं आपल्यांत घेऊन बसल्यावर पुनः सर्वांचे इष्टलिंग इष्टस्थळीं परत झळकूं लागलें.

दुसरी गोष्ट, निझामस्टेटमधील चशूर नामक गांवीं एकदा महाराजांनी प्रसंग-परत्वें दगडाच्या नंदीस चारा चारला होता, अशी आहें.

उपर्युल्लेखित चमत्कार आमचे वाचकांस कदाचित् असंभाव्य व काल्पनिक युगांतील वाटतील. पण ज्ञानेश्वरांनी चालविलेली भिंत, किंवा एकनाथमहाराजांनी बोलाविलेले स्वर्गींचे पितरप्रभृति-दृष्टोनें पाहिल्यास त्यांत अशक्य तें काय आहे?

वरील दोन्ही चमत्कार महाराजांच्या पूर्वायुष्यांतील आहेत. पण अगदीं अलीकडील एक उत्कृष्ट उदाहरण - नव्हे दाखला वाचकांसमोर ठेवतों.

पंढरपूर येथील एका ब्राह्मणास सद्‌गुरु पाहिजे होता. ह्मणून त्यानें अनुष्ठान मांडलें. त्यांत साक्षात्कार होऊन कथन करण्यांत आलें कीं, चांदा ( C. P. ) जिल्ह्यांतील घावा गांवीं श्रीकोंडय्या महाराज आहेत त्यांना तूं गुरु कर. त्यानंतर तो ब्राह्मण त्यांचा शोध काढीत घाव्यास गेला, व स्वतःचा हेतु प्रकट करुन पंढरपुरास चालण्यास विनंति केली. महाराजांनी ती मान्य करुन 'मी येतो, तूं चाल' असें सांगितलें. महाराजांचे शब्दावर श्रद्धा ठेवून तो निघून गेला. गांवीं पाय ठेवल्यावर पहातो तों महाराज चंद्रभागेंतून नावेवर येत आहेत. नावाड्याकडे शोध काढला असतां तोहि विस्मयाने चकित झाला. नंतर मोठ्या सत्कारसमारंभाने भजन व दिंड्यांच्या गजरांत महाराजांची मिरवणूक घरीं नेली व सर्वांनी त्यांचा उपदेश घेतला. नंतर कांहीं दिवस तेथे राहून महाराज परत स्वस्थानीं आले.

तिकडे ब्राह्मणांनी वीरशैव-लिंगायत गुरु केल्यामुळे तेथील ब्राह्मणांनी त्यास वाळीत टाकलें. ह्मणून पुन: महाराजांस पंढरपुरास जाण्यांत आलें. त्या वेळीं त्यांच्या अधिकारी दैवीय शक्तीने त्या सर्वांचा गैरसमज दूर होऊन त्यांच्यावरील बहिष्कार उठविला गेला." (हा प्रसंग लेखकांनी स्वत: त्या ब्राह्मणाचे तोंडून ऐकला आहे. ब्राह्मणाचे नांवाचें विस्मरण झाल्यामुळे तें येथे देतां आलें नाहीं.)

महाराजांचे पुतण्याकडून व तसेच तेथील कांही शिष्यांकडूनहि इत्यादि माहिती आम्हांस मिळाली. आमच्याप्रमाणेच पुन: तेथे लांब लांबचे बरेच दर्शनिक यात्रेकरु आले होते, व सबंध दिवसभर प्रासादिक भजनाची मंगळ उडाली होती.

## स्नान, संध्या व प्रसाद

आज मठाच्या आवारांत आह्मास सर्वत्र धामधूम दिसत होती. उत्साह व आनंद दरवळत होता. दहाचे सुमारास सर्वांचे अलग अलग स्वयंपाक तयार झाले. नंतर सर्व स्त्रीपुरुषांनी मिळून महाराजांस अभ्यंगस्नान घातलें. नंतर महाराजांनी यथाशास्त्र इष्टलिंग-पूजा आटोपली. श्रींचीहि सर्वांनी पूजा करुन तीर्थप्रसाद घेतले व शेवटीं चढाओढीचे सामन्यांतून कोणा एकाने स्वयंपाकांतून महाराजांचें ताट वाढून आणलें. पण महाराजांस त्यांतील दोन घांसहि खाण्यास मिळाले किंवा नाही शंकाच होती. कारण प्रसाद ह्मणून प्रत्येकानें एकेक घांस लांबविला. याप्रमाणे अनेकदा अनेक जातींनी ताटांत अन्न आणून घालायचें व त्यांच्या हातचा प्रसाद ह्मणून तो जंगम ब्राह्मणापासून तो खालच्या जातीपर्यंत सेवन करावयाचा. खरोखर तो प्रसंग ह्मणजे मला मोठा गमतीचा – नव्हें सुधारणेचा कळस भासला. पण ती सुधारणा ह्मणतां येईल का हा प्रश्न आहे.

## स्वभावधर्म व आठवणी

महाराजांचा स्वभाव प्रेमळ असून लहान-थोर, गरीब-श्रीमंत, आपले-तुपले, असा भेदभावविरहीत आहे. त्यांना पैशाची मुळीच इच्छा नाही. उत्पन्न पुष्कळ होतें पण तें स्वार्थी शिष्यांच्या खिशांत जातें. त्यांना पैशाची मुळींच पर्वा नसते. ते कोणाच्याहि मताप्रमाणे वागत नाहीत. त्यांचे मनास वाटेल त्याप्रमाणे आचरतात. लहरीचा प्रश्न आहे. मुसलमानांचा तर फारच द्वेष करितात.

महाराजांची मातृभाषा तेलगू असून व्यवहारांतदेखील बहुतकरुन तीच वापरतात. लिपीसुद्धा तीच येते. महाराज पूजेशिवाय कधीहि भजन वगैरे किंवा ईश्वरनामस्मरण वगैरे उघडपणें करितांना आढळले नाहीत.

अग्निकुंडप्रभावळयांसारखी कार्ये फार आवडतात. त्यांना कागदावर नंदीपिंडी व रांगोळ्या काढण्याचा मोठा हव्यास आहे. त्यांचा फुरसत

तीचा वेळ बहुधा याच कामांत जातो. भाविक लोक ह्या त्यांच्या कृति फ्रेममध्यें बसवून हार्दिक-भक्तिभावाने पूजतात. महाराजांनाहि नंदीपिंडी-शिवाय दुसऱ्या देवतांचा लळा नाही.

### तात्पर्य व आशीर्वाद

कोणीहि दर्शन घेतलेलो व्यक्ति अशीच कबूली देईल कीं, 'विभूति खरोखरच अधिकारी असून परम उच्च पदाला पोंहचली आहे. ते मानवाचे शिव वा नराचे नारायण झाले आहेत. एखाद्या तीर्थाप्रमाणे नेहमीं सेवकगण लांब लांबचे त्यांचे दर्शनास जातात. कधीकधी इच्छेप्रमाणें महाराज स्वतःहि फिरतीवर निघतात. इतकी वयोवृद्ध मूर्ति खरी; पण अंगांत अप्रतिम चपळता आहे कीं तरुणांनीहि त्यांचेपुढे शरमावें; सुप्रसिद्ध संत श्री तुकडे महाराज यांनीं आपले नागभीड येथील एका मुक्कामांत 'स्वामींचा दर्जा असामान्य आहे' असे आदरणीय धन्योद्गार काढले आहेत. तेथे माझ्यासारख्या यःकश्चित् पामराने अशा पुण्यपुरुषांचा शाब्दिक परिचय तो काय करुन द्यावा! हे स्वतः प्रकाशमान् आहेत. सूर्याला कोणीं दाखवायला नको. महाराज आज ह्यात आहेत. त्यांच्या अशा ह्या वृद्धाप-काळांतहि त्यांचें आरोग्य वाखाणण्यासारखें आहे. दर्शनेच्छूंनी त्यांच्या दर्शनाचा लाभ एक वेळ अवश्य घेऊन आयुष्य सार्थकीं लावावें.

याप्रमाणे दोन दिवस महाराजांच्या सांनि-ध्यांत घालवून तिसरे दिवशीं सकाळीच अति-कष्टावर आम्हीं सर्वांनी श्रींचा आशीर्वाद घेतला.

---

विशेष माहितीकरितां जिज्ञासूनें श्री. कृ. स. कलूरे, चांदा,—कृत चरित्र वाचावें.

---

# वीरशैवांतील चळवळी

### खुलासा.

मी गेल्या ता. १५-११-३६ च्या "वी. संजी वनी"त "पारवा येथील सुप्रसिद्ध श्रीगणेश-महोत्सव' ह्या मथळयाखाली लिहिलेल्या लेखांत "बाबासाहेब हे आठ आण्याचे ह्या वतनदारीचे मालक असून राहिलेल्या आठ आण्यांत अनेक भाऊबंदांना" असे जें प्रसिद्ध झालें आहे त्या-ऐवजी त्या आठ आण्यांत फक्त श्रीमंत रावसाहेब माधवराव देशमुख जहागीरदार, श्रीमंत बाजीराव देशमुख, श्रीमंत बसवंतराव व नरसिंगराव देशमुख, हे जहागिरीत मालक आहेत. तसेच, ज्यांनी अफु घेतली असें प्रसिद्ध झालें आहे ते रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांचे आजे होत व त्यांचें नांव श्रीमंत माध-वराव यशवंतराव देशमुख असें होतें.

वि० तु० चौधरी

### उदगीरचें बातमीपत्र

उदगीर येथें हैद्राबाद-प्रजाशिक्षण-परिष-देहून तारीख २४ नोव्हेंबर ३६ इ. रोजीं मोमीनाबादचे सुप्रसिद्ध आणि समाजकार्य-धुरंधर वीरशैव धर्माभिमानी श्री. व्ही. एस. शेटे वकील यांचें आगमन झालें. वीरशैवसमाज उदगीरच्या कार्यकर्त्यांची इच्छा होती कीं, त्यांनी वीरशैवसमाजास भेट द्यावी आणि आपल्या दीर्घ अनुभवाचा लाभ येथील कार्य-कर्त्यांना मिळावा. त्याप्रमाणे श्री. शेटे वकील यांना विनंती केली असतांना श्री. शेटे वकील साहेबांनी प्रवासाचे श्रम झाले असताहि रात्री ९ वाजता वीरशैवसमाजमंदिरास भेट देऊन आपल्या सामाजिक जीवनाचे [ ११ ] वर्षांचे अनुभव सांगत असतांना अत्यंत कळकळीने

वीरशैवांच्या शिक्षणाची अवनती किती झाली आहे आणि आतां जगांतील इतर समाजाबरोबर आपला समाज सुशिक्षित होण्यास काय काय उपाय योजावयास पाहिजेत, याबद्दल अत्यंत कळकळीचें भाषण केलें, व सुधारणेचे आधारस्तंभ शिक्षणच होय हें सांगून स्त्रीशिक्षणाची आवश्यकता व समाजांतील आचार्यविरक्तवादाबद्दल अत्यंत विषाद प्रदर्शित करून या वादाचा अंत करण्याचा उपायहि त्यांनी सांगितला.

यानंतर समाजांतील गुण-दोषांचें विवेचन करून, विवाहसंस्थेंत सुधारणा व स्वावलंबीपणा व इतर किरकोळ बाबीवरहि अत्यंत कळकळीचें भाषण केलें. श्री० शेटेसाहेबांच्या जनतेवर फारच उत्तम परिणाम झाला. असें सेक्रेटरी, वीरशैवसमाज, उदगीर (निजाम), हे कळवितात.

मोमिनाबाद:—सोमवार ता.५ ऑक्टोबर रोजी येथें वीरशैव वार्षिकोत्सव उदगीरचे वीरशैव पुढारा श्रीमान् संग्रामअप्पा वकील ह्यांचे अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने पार पडला.

उत्सवांत श्रीगुरु स्वामीच्या पालखीची मिरवणूक, भजन, तसेच सामाजिक विषयावर उद्बोधक व्याख्यानें झालीं. मोमिनाबाद येथील वीरशैवांचे पुढारी व उत्साही कार्यकर्ते श्री. श्री एम. शेटे वकील ह्यानाच ह्या प्रसंगाचें सारें श्रेय आहे. उत्सवाचे अध्यक्ष श्रीमान् संग्रामअप्पा ह्यांचें नवविचारपरिप्लुत व महत्त्वपूर्ण असें समारोपाचे भाषण झालें असें समजतें.

नागपूर अनिष्ट रुढीस गचांडी:—नागपूर येथील भिक्षुक वृत्तीचे जंगम व स्थानिक वीरशैवांत बऱ्याच दिवसांपासून तेढ सुरु आहे व त्याचें कारण ह्मणजे वीरशैव तरुण मंडळांने सुरु केलेल्या नवीन समाजसुधारक चळवळी होत. आतां जवळ जवळ ह्या भिक्षुक वृत्तीच्या जंगम वर्गावर बहिष्कार पडल्यासारखें झालें आहे.

धुळपादुका किंवा जंगमाच्या पायाचें तीर्थ घेणे ही जशी रुढी बंद होत चालली आहे तशीच प्रेतसंस्काराचे वेळीं समाधीवर जंगमानी पाय देण्याची हिडीस चाल बंद करण्याविषयीं बऱ्याच दिवसांपासून नवमतवादी हांकाटी करीत आहेत.

परवा येथील एका वीरशैवाचे प्रेतसंस्काराचे वेळीं जंगमाला समाधी पाय देण्यास बंदी करण्यांत आल्याचें एक बातमीदार कळवितात. स्तुत्य व अनुकरणीय. उशिराने कां होईना पण अनिष्ट रुढिविरुद्ध मोहिम सुरुं करण्याची वीरशैवांत सद्बुद्धि झाली ह्मणावयाची?

## माजलगांवकरस्वामी प्रायश्चित्त

माजलगांवकरस्वामींनी माजलगांवला जाऊन गुरुकडून प्रायश्चित्त घेतलें अशीं श्री. पचाक्षरस्वामी जंगम यांजमार्फत हूल उठवून येथें घोटाळा उडवून दिला होता. पण पं.प्रा. माहेश्वर मडळाचें अध्यक्ष श्रीगुरु पटचरमूर्ति मल्लिकार्जुनस्वामी पाथरकर ह्यांच्या नजरेला ही गोष्ट येतांच प्रायश्चित्त घेणें अवश्य आहे असा त्यांनी व त्यांच्या माहेश्वर मडळांनी निर्णय दिला, आणि शुक्रवार ता. ११ रोजीं पाथरकरमठांत झालेल्या पुण्यतिथीच्या भोजनास माजलगांवकरांना निमंत्रण दिलें नाही. माजलगांवकरस्वामी तर कधी गुरुची पुण्यतिथीहि करीत नाहीत असें माहेश्वर मंडळाचें मत होत चाललें. गुरुवर्यसंघाच्या वार्षी येथील 'वीरशैव गर्जना' पत्राने 'धार्मिक तत्वास अनुसरुन प्रायश्चित्त घेणें जरूर आहे' असा ता. १० डिसेंबरच्या अकांत अभिप्राय दिला. तात्पर्य काय कीं, येथील सर्व माहेश्वरबंधूंनी एकमुखाने माजलगावकरांनीं प्रायश्चित्त घेणें जरूर आहे असा अभिप्राय व्यक्त करून त्याप्रमाणे वागण्यास सुरुवात केली आहे. आणि कोणतेहि प्रमुख भक्त त्यांना बोलावित नाहीत हेंहि स्पष्ट झालें. असें एक माहेश्वर लिहितात.

Reg. No. N — 645

# वर्गणीदारांस विनंती

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात म्हणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, म्हणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा; कारण हें पत्र पाक्षिक आहे, व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांची थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग वामणगावकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना-पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ जानेवारी १९३७ ( अंक १ ला

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

## —* "वीरशैव संजीवनी" चा लेखकवर्ग *—



श्री. व्ही. एम्. शेंड वकील, मोमिनाबाद.



श्री० चंडाप्पा रेवणसिद्धाप्पा
झुंजे वकील, सोलापूर.



श्रीमती महादेवी वाघमारे मोमिनाबाद
संपादिका-वी. सं. स्त्री-विभाग

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय: ।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:
स्त्रिय:वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति पौष व० ५ शके १८५८ ( अंक १ ला.

# सोलापुरांत चित्रकलदूर्ग महास्वामी

सुप्रसिद्ध विरक्तमठाधीश श्रीमन्नि· रंजन जगद्गुरु मुरघाराजेंद्र श्रीजयदेव महास्वामी संस्थान चित्रकलदुर्ग ह्यांचें आगमन सोलापूर शहरीं नुकतेच झालें. कै० आप्पासाहेब वारद ह्यात असतांना पंचवीस वर्षांपूर्वी हे महास्वामी सोलापूरात आले होते. ह्या महास्वामींच्या आगमनाचा व सुस्वागताचा तो संस्मरणीय असा सोहळा आम्हीं स्वत: त्या वेळी जातीने पाहिला होता व त्या वेळच्या 'वीरशैव संजीवनी'त त्या सोहळ्यावर एक स्फूर्तिप्रद अशी लेखमालाहि आम्हीं लिहिली होती. वीरशैवसमाजाचे जगद्गुरु म्हणविणारे हे महास्वामीच प्रथम कित्येक वर्षांनी संचारार्थ निघाल्यामुळे कर्नाटक व महाराष्ट्र ह्यांतील सर्व प्रकारची वीरशैव जनता महास्वामींच्या सत्कारार्थं अत्यंत उत्साहाने व जीवेंभावें झटत असल्याचा प्रत्यय येत होता. त्यांतच त्या वेळी कांही शहरांत ह्या महास्वामीच्याच अड्डपालखीच्या बिरुदावलींतून 'व्यासंतोळ'-प्रकरणाचा वाद उद्भवला होता, आणि वीरशैव व वीरवैष्णव अशा वादास रंग चढून प्रकरण मुंबई—हायकोर्ट व मुंबईचे गव्हर्नर ह्यांच्याकडे गेलें होतें. व त्यांत महास्वामींच्या मिरवणुकीस व अड्डपालखीस सरकारी परवाने लाभले होते. सोलापूर हें महाराष्ट्रांतील प्रमुख शहर. तेथे वीरशैवसमाजाची वस्तीहि मोठी — आणि कै. रा. ब. आप्पासाहेब वारदासारखे वीरशैवांचे

प्रमुख नेते रहात असल्यामुळे व त्यांचें सरकारी दरबारी आणि इतर वर्ग - जाती ह्यांवर वजन असल्यामुळे महास्वामींच्या आगमनास त्या वेळीं विशेषच महत्व प्राप्त झालें होतें.

## अधिक शहाणे व अधिक झगडणें

सोलापुरांतच नव्हे तर पुणे वगैरे शहरांतहि महास्वामीच्या अड्डपालखीची मिरवणूक मोठ्या थाटानें निघून वीरशैवसमाजाची ही संघटित देवता होय व तीविषयीं आदरभाव बाळगला पाहिजे ही मनोवृत्ति इतर समाजबंधूंतहि जागृत झालेली दिसत होती. अशा प्रकारें अखिल वीरशैवांचें स्वरूप महास्वामींत केंद्रीभूत झाल्याचा देखावा त्या वेळीं महाराष्ट्रांत दिसला, आणि सोलापूर शहरानें व महाराष्ट्रानें हजारो रुपये दक्षिणा देऊन त्यांचें त्या वेळीं मनोभावें शुद्ध मनानें पूजन केलें. त्या वेळीं आतांप्रमाणें गुरु-विरक्तवाद प्रचारांत नव्हता. बसवदेव कीं पंचाचार्य असा वादहि रंगला नव्हता. आता-च्याच पोटजाती त्या वेळींहि कायम होत्या. पण धर्म व समाज हा प्रश्न उत्पन्न झाला कीं सर्व पोट-जाती एक होऊन समाजाच्या विराट स्वरूपांत तल्लीन होत असत. आज त्याच पोट-जातींच्या एकीकरणाचे प्रश्न अधिक धाडसानें पुढें आले, पूर्वीपेक्षा साक्षरता वाढली, सर्व कांही झाले; पण पूर्वीपेक्षाहि वाद अधिक वळावून दुफळी स्पष्ट होऊं लागली. आणि सुंदोपसुंदां-प्रमाणे आह्मी वीरशैव आपसांत झगडूनच मर-णार कीं काय अशी भीति उत्पन्न होऊं लागली. ज्या सोलापूरशहरांत एकेकाळीं महास्वामीच्या आगमनार्थ एकोपा होता त्याच सोलापूर शह-रांत त्याच स्वामींच्या आगमनप्रसंगीं झालेली लाथाळी पाहून कोणा स्वाभिमानी वीरशैवाचें अंतःकरण हादरून जाणार नाही ?

## महास्वामी व महाराष्ट्र

पंचवीस वर्षांपूर्वी महास्वामींनी जो दक्षिणा सोलापूरांतून व महाराष्ट्रांतून मिळविली तिचा कोणताहि वाटा कोणत्याहि स्वरूपानें महारा-ष्ट्रांत आला नाही ह्मणून एक वाद आहे. पण दिलेल्या दानावर यजमानाचा हक्क नसतो. ह्मणून तो वाद दात्याच्या दृष्टीनें आह्मी गौण समजतों. परंतु आपलें आग-मन महाराष्ट्रांत झालें असतां व महाराष्ट्रानें त्यांचा त्या वेळीं कल्पनातीत गौरव केला असता त्याची स्मृति ह्मणून महाराष्ट्रांत महास्वामींनी कांहीं तरी करावयास पाहिजे होतें. ऐहिक सुखाचा चाहता चक्रवर्ती राजासुद्धां युद्धांत पतन पावलेल्या शिपायाचे स्मारकस्तंभ उभा-रून कां होईना पण स्मारक करतो—तसें कांहींतरी स्मारक रहावें व त्याचा त्यांच्या असंख्य भक्तगणांना सामुदायिक तऱ्हेनें उपभोग घेतां येईल अशी योजना महास्वामींना आखतां आली असतीं व येईल. तरी आह्मी हा महास्वामींच्या इच्छेचाच प्रश्न समजतों. पण महाराष्ट्र व कर्नाटक ही भावना, महास्वामी व त्यांचे सल्लागार यांच्या अंतःकरणांत उदित आहे अशी समजूत मात्र महास्वामीविषयीं महा-राष्ट्रांत पसरली आहे ही गोष्ट महास्वामींच्या नजरेस अत्यंत नम्रतापूर्वक भावनेनें आणणें आह्मी आपलें कर्तव्य समजतों. तथापि सोलापु-रांत महास्वामींच्या आगमनानें जी अंतर्गत लाथाळी लागल्याचें उघडकीस आलें त्याला कारण हीच एक गोष्ट आहे असें मात्र नव्हे.

## महास्वामी व सोलापूरांतील वाद

सोलापुरांत काडादी बंधू ह्मणून अत्यंत श्रीमंत असे वीरशैव व्यापारी आहेत. वडीला-प्रमाणेंच काडादीबंधूंचाहि चांगला लौकिक आहे. इतकेंच नव्हे तर विद्येचें महत्व त्या बंधूंना कळलें असून आपली संपत्ति समाजकार्यार्थ लागावी अशी इच्छाहि त्यांच्यांत निर्माण झाली आहे. त्यांनी वीरशैवांकरिता वसतीगृहाची योजना करून त्यांत विद्यार्थ्यांना ज्ञानदानाचा लाभ होत आहे. त्याच काडादेबंधूंनी आईच्या इच्छेनुसार पन्नास हजार रुपये खर्च करून धर्मार्थ

दवाखाना व प्रसूतिगृहाची योजना केली आहे. ह्याच्या उद्घाटनसमारंभार्थ महास्वामींना पाचारण झालें. महास्वामी आले व हा समारंभहि पार पडला. परंतु त्यानिमित्तानें सोलापुरांतील वीरशैवांत माजलेला गोंधळ मात्र समाजाच्या फाटाफुटीचे व आपसांतील द्वेषबुद्धीच्या वाढीचें निदर्शक आहे हें प्रत्ययास आलें. सोलापूर व बार्शी येथे वीरशैवांची अधिक वस्ती असून, तेथे वीरशैवसमाजाचें महाराष्ट्रांतील नेतेहि राहतात व विद्वज्जन असे स्वामीहि आहेत. शिवाय 'सुदर्शन' व 'वीरशैव गर्जना' अशीं प्रमुख पत्रेंहि तेथेच प्रसिद्ध होतात. त्यामुळे तिकडील वातावरणाचे महाराष्ट्रांतील इतर भागांवर विलक्षण परिणाम होतात, आणि मुख्य शहरांतील फाटाफूट सर्वत्र प्रसृत होते. हा समाजाला रोग जडतो. त्या योगाने प्रगति कुंठित होते. वरे वादांत कांही विशेष तत्व आहे आणि त्या तत्वाचा बोध होण्याकरिता वाद असला तर वाद नकोच असेंहि कोणी म्हणत नाही. पण ह्या वादांत असें कांही तत्व तरी आहे काय?

## 'गर्जने'-ची साक्ष

दवाखान्याचा उद्घाटनसमारंभ हा कांही वादाचा विषय नव्हे व तो नव्हताहि. पण क्षोभाच्या भरांत 'काडादि बंधूंनी वसतीगृहाच्या स्थापनेच्या वेळीं जसें गव्हर्नरास पाचारण केलें होतें तसेंच ह्याहि वेळीं कां केलें नाही?' असें कोणी म्हटलें असेल तर हा काय वाद आहे? व त्यांत कांही तत्व आहे? काडादि बंधूंच्या "धर्मार्थ दवाखान्याचा उद्घाटनसमारंभ ता. १६-१२-३६ रोजीं चित्रदुर्ग सन्याशी यांच्या हस्तें करण्यांत आला. असलें महत्वाचें कार्य या बंधुद्वयानीं चांगल्याशा प्रसिद्ध अधिकाऱ्याच्या हस्तें केलें असतें तर हें पवित्र कार्य अधिक निर्विघ्नपणें पार पडलें असतें. ज्याप्रमाणें वसतिगृह मुंबईचे ना. गव्हर्नरसाहेब ह्यांचें हस्तें उघडण्यांत आलें तशा प्रकारची योजना या वेळीं व्हावयास पाहिजे होती" असें 'वीरशैवगर्जने'च्या ता. ३ डिसेंबरच्या अग्रलेखांत लिहिलें आहे. ह्यावरून वाचकांचा असा समज होण्याचा संभव आहे कीं, दवाखान्याच्या उद्घाटनास चित्रकलदूर्ग महास्वामीस बोलावले ह्मणूनच सोलापुरी वादाचें रण माजलें. 'वीरशैव गर्जना' पुढे ह्मणते कीं, 'पंचमहाजगद्गुरुपैकीं कोणाचे हस्तें हा समारंभ केला असता तर सध्या सोलापुरात जो गोंधळ माजला आहे तो माजला नसता? ह्यावरून पंचाचार्य जगत्गुरुकडून हा समारभ व्हावयास पाहिजे होता; तो चित्रकलदूर्ग जगत्गुरुकडून झाला ह्मणून गोंधळ झाला असेंहि वाचकांचें मत होण्याचा संभव आहे. पण वस्तुस्थिति तशी नाही.

## वादाचें मूळ कोठें आहे ?

चित्रकलदूर्ग-जगद्गुरुकडून हा समारंभ झाला ह्मणून जितका आनंद आह्माला वाटतो तितकाच आनंद हा समारंभ पंचाचार्यसिंहासनाधीशाकडून झाला असतांहि आह्माला वाटला असता. इतकेंच काय पण खुद्द 'वीरशैव गर्जना' कार व 'सुदर्शन'कार जरी उद्घाटनाचे अधिकारी ठरले असते तरी आम्हाला वैषम्य न वाटतां आनंदच वाटला असता. कारण कोणत्याहि दवाखान्याचें उद्घाटन म्हणजे धर्माधर्मचर्चेची बाब नव्हे, गुरु-विरक्तवादाचें तें स्थळ नव्हे. म्हणून येथे विरक्तापेक्षा गुरु चांगला असें म्हणावें ? हें स्थळ जर ह्या वादाचें मानलें तर ज्या काडादीबंधूंनी वसतीगृहाच्या समारंभास ज्या गव्हर्नरास पाचारण केलें तो गव्हर्नर काय एखाद्या विरक्तपीठाचा वा एखाद्या गुरुपीठाचा अधिकारी होता म्हणून पाचारण केलें म्हणावें? वसतीगृहाचें उद्घाटन व दवाखान्याचें उद्घाटन ही बाब धर्माधर्मचर्चेबाहेरची आहे, गुरु-विरक्त-कर्तव्याबाहेरची आहे, ती धार्मिक व सामाजिक विधीबाहेरची आहे हें प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे

वीरशैवसमाजघटनेच्या दृष्टीने चित्रकलदुर्ग महास्वामींना 'जगद्गुरु' म्हणावे कीं नसते 'संन्याशी' समजावे हा दवाखान्याच्या उद्घाटनाचा विषय नव्हे. उद्घाटनसमारंभाला योग्य अशीच ती व्यक्तिशः विभूति आहे हें एक मान्य करून बोलणें ह्यांत अधिक थोरपणा आहे. ह्यांत व्यक्तिद्वेष प्रतिबिंबित होत नाहीं व तत्त्वनिष्ठाहि सुटत नाहीं.

## गुरु-विरक्त-वादांतील तुच्छता

पण ह्या वादाच्या मुळाशीं गुरु–विरक्तवाद आहे हें मात्र नाकारता येत नाहीं. पण तो दवाखान्याच्या उद्घाटनामुळें निर्माण झाला एवढेंच मात्र ह्यांत सत्य नाहीं. तो वाद इतक्या थराला गेला कीं, गुरु म्हणविणारे विरक्तांना कःपदार्थ समजतात व विरक्त गुरु म्हणविणारांना झिडकारतात. पंचाचार्यांचा जेथें जयजयकार होतो तेथें बसवाच्या नांवाचा उच्चार होत नाहीं व जेथें बसवाच्या नावाचा उच्चार होतो तेथे पंचाचार्यांच्या नांवाचा उच्चार होत नाहीं. गुरु,विरक्त,बसव, भक्त व शरण ह्यांपैकीं कोण पहिले, कोण मागचे, कोण लिंगोद्भव व कोण मनुष्यजन्मधारी हा वाद आज आम्हीं घालणें व एकमेकांना तुच्छ लेखणे अत्यंत निंद्य आहे. कारण सर्वच एका शिवदेवाचे घटक व तेथेच सर्व अंतर्धान पावणारे पावन आहेत ही घोषणा सर्वच करतात. पण तें शिवाचें स्वरूप विसरून जेव्हां झगडतांना दिसतात तेव्हां आजचे आम्ही गुरु, विरक्त, बसव वा भक्त आपल्या पूर्वजांचें कोणी आहो असें सिद्ध करतो कीं काय? ह्याला प्रथम कारण कोण हाहि येथे महत्वाचा प्रश्न नाही.दोन्हीं पक्षांकडील लोक आपआपल्या जगद्गुरुचे चहाते असले व त्यांनी आपल्याच जगद्गुरूंना मानावयाचें ठरविलें तरी त्यांत कांहीं बिघडत नाही. बिघडण्यासारखें जर कुठे कांहीं असेल तर मी आणि माझे जगद्गुरु तेवढेच शिव व इतर वीरशैव ते सारे तुच्छ अशी जी एक निंद्य वृत्ति दोन्हीं पक्षांत दिसते ह्या वृत्तीत बिघडतें. पंचाचार्यपीठाधीश काय किंवा विरक्तपीठाधीश काय हे उभयताहि एकाच शिवाचें प्रतीक आहेत असें समजून एकमेकांनी एकमेकांच्या भावना न दुःखविणें ह्यांत मोठेंपणा आहे, दिलदारी आहे. ह्या दिलदारीच्या अभावामुळेंच सोलापूर व बार्शी ह्या भागांतील वीरशैवबंधूंत गुरु–विरक्तवादाने फूट पडली, व व्यक्तिद्वेष बळावला.

## रेवणसिद्धमंदिराचा विरक्त

सोलापूर येथें दवाखान्याच्या उद्घाटनार्थ चित्रकलदूर्ग महास्वामी येत असतांना त्यांनी सोलापूरस्थ वीरशैवसमाजांतील पंच महाजन छोटे वगैरे मंडळीस जा. नं. १०-११-३६ ४३३७ चें आज्ञापत्र पाठविलें. त्याप्रमाणें महास्वामींच्या दर्शनार्थ, स्वागतार्थ व पाद्यपूजेप्रीत्यर्थ सोलापुरांतील श्रीमंत बाबासाहेब वारद, नागप्पा अबदुलपूरकर, झुंजें,देशमुख बंधू,कारंजे, घुम्मा चव्हाण, पटणे वगैरे प्रमुख वीरशैव पुढारी रेवणसिद्धमंदिरांत एकत्र झाले, व तेथे थोडा वेळ थांबावे ही प्रार्थना करण्याकरितां श्री. सिद्रामप्पा घुम्मा वकील व श्री. सिद्रामप्पा पटणें सामोरे गेले असतांना त्यांची विनंती अमान्य करून श्रींची मोटार एकदम सिद्धेश्वरमंदिराकडेच निघाली. ता. १८ नोव्हेंबरला श्री घुम्मा व पटणें यांच्या सहीचें जें एक पत्रक निघालें त्यावरून असें दिसतें कीं, श्रीमन्निरंजन निजगुणस्वामी, बसवीरस्वामी, वगैरेंनी आगाऊच पुढें जाऊन श्रींनी रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्यांचें स्वागत घेऊं नये असें श्रींना कळविलें असावें.कोणीहि कळवो. पण श्रींना कोणीं तरी कळविलें व श्रींनी रेवणसिद्धमंदिरांतील स्वागत नाकारलें एवढें मात्र खरें. श्रींसारख्या दर्जाच्या पुरुषांनी प्रतिष्ठित पुढाऱ्यांचें स्वागत नाकारणें हें अनुचित आहे एवढें मात्र खरें. कारण तेथे जमलेले पुढारी

जबाबदार होते. गुरु-विरक्तवादाला वळी पडून एकाचा दुसऱ्याकडून अपमान व्हावा ही त्यांच्या ठिकाणी वृत्ति नव्हती व नाही, हें आम्हीहि जाणतों.

## महास्वामींचा कलुषा

विरक्त-पीठाधीश शहरांत येवो वा पंचाचार्य पीठाधीश शहरांत येवो त्या सर्वांचा त्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणें व बिरूदावलीप्रमाणे सन्मान करणें व राखणें ह्यांत वीरशैवधर्माची खरी महती आहे हीच एक गोष्ट ते जाणत होते. उज्जयनी-महास्वामीच्या स्वागताला ह्या सद्बुद्धीनेच हें पुढारी पुढे होते. आणि ह्याच बुद्धीने सोलापूरच्या विरक्त बटूंना पंचाचार्यपीठाधीश उज्जयनी महास्वामीच्या स्वागतांत ढवळाढवळ करूं दिली नाही. ह्यांत कोणी कोणाचा दर्जा हलका करावयाचा हा प्रश्न नसून ज्याचा-त्याचा त्याच्याच इतमामाप्रमाणें दर्जा राखावयाचा हाच महत्वाचा प्रश्न होता. परंतु तो समाधानकारक सुटला नाही ह्यांत कोणाचें दुर्दैव प्रतिबिंबित होतें? चित्रकलदुर्गचे श्री. महास्वामी ज्या अतिवर्णाश्रमी वृत्तीच्या पीठाचे दर्शक ह्मणवितात त्या पीठाच्या उच्च दर्जाला हा कमीपणा आहे. वर्णाश्रमीयांना पचवून वा आपलेसे करून अतिवर्णाश्रमत्व सिद्ध करणें व त्याचा सहजगत्या प्रत्यय आणून देणें ह्याकरिता आलेली सुवर्णसंधि चित्रकलदुर्ग महास्वामींनी गमावली व तीहि क्षुद्रवृत्तीच्या लोकांच्या सांगण्यावरून. कारण 'सुदर्शन' असें लिहितें कीं, 'विशिष्ठ व्यक्तींनी, विशिष्ठ जागेंत जमण्याचा हट्ट धरावा ही गोष्ट विशिष्ठ हेतूशिवाय, शक्य आहे काय?' ह्यावरून रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्या सन्माननीय व्यक्ति व रेवणसिद्धमंदिराची जागा ह्यावरून 'सुदर्शन' पंथीयांचें मन कलुषित झालेलें दिसतें. आणि हीच कलुषित वृत्ति ह्या वादास कारण झाली हें स्पष्ट होतें.

## जयजयकाराला भिणें

म्हणूनच 'सुदर्शन' व 'गर्जना' हीं तिकडील पत्रें एकमेकांविषयींच्या दुरभिमानानेंच नव्हे तर एकमेकांच्या जगद्गुरुविषयींचा ह्यांचा अभिमान इतक्या तीव्रटोकाला गेला कीं, त्या अभिमानास दुरभिमानाचें स्वरुप आलें व तो टाकाऊ वाटू लागला. 'वीरशैव गर्जने'ला उद्घाटनास गव्हर्नर बरा वाटावा, पण चित्रकलदूर्ग महास्वामी बरे वाटूं नयेत; आणि 'सुदर्शन' कारास रेवणसिद्धमंदिर हें पंचाचार्यपीठाधीशाचेंच मंदीर आहे म्हणून त्याज्य वाटावें व त्या जागेंत स्वागतास जमणें म्हणजे पंचाचार्यपीठास विरक्तपीठानें शरण जाणे होय असें भासावें हाहि दुरभिमानच होय. ह्या दुरभिमानांत उभयतांचेंहि तत्वपूजन नाही. ह्या दुरभिमानांत उभयतांचीहि जगद्गुरुभक्ति स्पष्ट होत नाही. ह्या दुरभिमानात पीठाच्या परंपरेचा हक्काचा खरा स्वाभिमानहि व्यक्त होत नाही.सोलापुरचे रेवणसिद्ध मंदिर हें पंचाचार्यपीठाधीशाचें मंदिर असेल पण प्राचीनकाळची ही विभूति सर्वमान्य होतीना? रेवणसिद्ध, प्रभुदेव व सिद्धेश्वर ह्यांच्या लीला पुराणांतरीं वर्णन केल्या आहेत. त्यां पैकीं एकानेंहि रेवणसिद्धास झिडकारलें नाहीं. उलट नमिलें आहे. मग चित्रकलदुर्ग महास्वामी स्वागत घेण्याकरिता त्या मंदिरांत गेले असते तर मंदिरांतील मूर्तीने काय त्यांचें पीठ व त्याचे पूर्वापार हक्क काढून घेतले असते? आम्ही म्हणतों तेथे पंचाचार्यांचा—माजी पंचाचार्यांचा जयजयकार झाला असता व तो चित्रकलदूर्ग महास्वामींनी ऐकला असता तरी त्यांना काय कमीपणा होता? चित्रकलदुर्ग महास्वामींनी काय कधीं हिपहिपहुर्योची गर्जना ऐकली नाही? कां कधी लोकमान्य टिळक व महात्मा गांधी ह्यांचा जयजयकार ऐकला नाही?

## वर्णाश्रमत्व व अतिवर्णाश्रमत्व

'हिप हिप' च्या गर्जनेने कोणतेही विरक्त-पीठ जर बादशाही पीठ बनलें नाहीं व कोणा-सहि महात्माजी वा टिळक हें पद प्राप्त झालें नाहीं तर रेशणसिद्धमंदिरांत प्रवेश केल्यानें व तेथील पंचाचार्यांचा जयजयकार ऐकूनच काय काय बदल झाला असता? तद्वतच आजचे पंचाचार्यपीठाधीश वा जगद्गुरु जर बसव-देवाचा जयजयकार ऐकू लागले तर त्यांत त्यांच्या कोणत्या हक्काची हानि आहे? कोणीहि कोणाचाहि जयजयकार केला व कोणीहि कोणाचाहि जयजयकार ऐकला तरी कोणाचें अतिवर्णाश्रमत्व नष्ट होत नाही व कोणाचा वर्णाश्रमधर्महि बुडत नाही. वर्णाश्रमत्व काय, वा अतिवर्णाश्रमत्व काय, ही एकाच वीरशैव धर्माची व समाजाची परस्परपूरक व पोषक अशीं अंगें होत. अष्टवर्णाचे अधिकार व षट्-स्थलांचा दर्जा परस्परपूरक अशा अंगावर उभारला आहे. म्हणून गुरु असा वा विरक्त असा अशा परस्परपूरक अंगाचा कोणीहि स्वाभिमानाच्या वा द्वेषाच्या अतिरेकांत त्याग करणें म्हणजे वर्णाश्रम्यांनीं वर्णव्यवस्था बिघडविणें होय आणि अतिवर्णाश्रम्यांनी आपल्या हाताने आपल्या एकीकरणाच्या वृत्तीवर बोळा फिरविणें होय असें निरपेक्षतेने आम्हाला म्हणावेसें वाटतें. पंचाचार्य जगद्गुरूंची पीठें हीं वर्णाश्रमाची साक्ष देत असतील व विरक्त-पीठें हीं अतिवर्णाश्रमाची साक्ष देत असतील असें आम्ही वादाकरिता गृहीत धरतों, आणि दोघांहिपुढें अति नम्रभावें असा सवाल करतों कीं, वीरशैवांतील ह्या दोन्ही भागांचें जगद्गुरुत्व कशांत शिल्लक आहे? निव्वळ विद्वत्ता, निव्वळ धर्मपरायणता, निव्वळ त्याग-वृत्ति, निव्वळ आत्मभाव, ह्यावर हें जगद्-गुरुत्व प्रतीत होत नाहीं. तसें असतें तर सोलापूरच्या समाधिस्थ शरणमूर्तींत व हुब-ळीच्या सिद्धारूढ स्वामींत प्रतीत झाल्याचा हा अनुभव आला असता.

## धर्मघटनेचा अभिमान नष्ट होत चालला

राजाचें राजेपण वा वतनदाराची वतनदारी आज जी प्रतीत होते ती परंपरेने व वहिवाटीने प्रतीत होते. तद्वत प्रत्येक पीठास जो अधिकार परंपरेनें लाभला, जी बिरुदावली प्राप्त झाली, जे हक्क चालत आले आहेत, त्यांत त्या व्यक्तीचें जगद्गुरुत्व आहे. मग ती व्यक्ती विद्या, विनय व धर्म ह्यांनी विभूषित असो वा नसो. विद्या, विनय धर्म व शील ह्या गुणांचें वास्तव्य ज्या ज्या पीठाच्या व्यक्तींत अधिक प्रमाणांत असेल ती व्यक्ति त्या पीठाच्या दर्जांत व हक्कांत अधिकाधिक कालानुरूप भर घालील हें सांगावयास नकोच. पण आजचें 'जगद्गुरुत्व' मग ते गुरुपीठाचे असो वा विरक्तपीठाचें असो पूर्वापार हक्काच्या व वहिवाटीच्या पोषणांत आहे हें कोणत्याहि पक्षानें कधींहि विसरतां कामा नये. विरक्त जगद्गुरु व पंचाचार्य जगद्गुरु हे आपसांतील कलहापायीं एकमेकांच्या पूर्वापार हक्कावर गदा आणून एकमेकांचे हक्क काढून घेण्याचा उद्योग करतील तर ते सर्वच आपआपल्या हाताने आपल्या हक्कावर गदा आणीत आहेत असाच त्याचा अर्थ होतो. एखाद्या शहरीं एखाद्या कोर्टानें पंचाचार्य जगद्गुरूंची अड्डपालखी व बिरुदावलीची मिरवणूक बंद पाडली तर दुसऱ्या ठिकाणी विरक्त जगद्गुरूंच्या अड्डपालखीला व बिरुदावलीला अडथळा येईल हें सांगावयास नकोच. अशा रीतीनें एकमेकांनी एकमेकाच्या जगद्गुरुत्वावर गदा आणण्याचा वा विरोध करण्याचा उपक्रम करणें म्हणजे वीरशैव धर्माची वा जातीची चालत आलेली घटना आपण आपल्या हाताने विस्कळित करतो असें दर्शविणें होय. दोन्ही पक्षांचे जगद्गुरु व त्यांचे अनुयायी एकमेकांच्या मत्सराने इतके अंध झालेत कीं, त्यांना मूळ घटनेचा अभिमान सुद्धां राहिला नाही.

## स्वागत नाकारून काय फायदा ?

सोलापूरच्या रेवणसिद्धमंदिरांत चित्रकल-दुर्गमहास्वामींनी स्वतःच्या सल्लेनें वा कोणाच्याहि सल्लेनें न जाणे आणि तेथील पंचाचार्य अभिमान्याचे स्वागत न घेणें ह्यांत त्यांनीं हल्लीच्या वादावर विजय मिळविला असेल वा नसेल; पण त्यांनीं मूळ धर्मघटनें-वर व आपल्याहि परंपरेवर घाला घालून घेतला असें आम्हाला कष्टाने म्हणावें लागतें. आम्हीं चित्रकलदुर्गच्या महास्वामींच्या जगद्गुरु-त्वाच्या अधिकारापुढे नम्र होऊन आणि त्यांची अगाध विद्वत्ता व त्यांची सामुदायिक थोर दृष्टि ह्यांपुढें मान तुकवून अशी प्रार्थना करतों कीं, रेवणसिद्ध, बसवेस्वर, प्रभुदेव सिद्धाराम हे एकेकाळीं परस्परांत विलीन झाले आहेत ना? त्या सर्व विभूती एकेकाळी एकमेकांना पुज्य समजू लागल्या होत्या ना? आणि त्या सर्वांच्या मीलनशक्तीच्या पुण्याईवरच आपले परमपूज्य जगद्गुरुत्वाचा अधिकार चालत आले ना? असें जर आहे तर मग आपण रेवणसिद्धमंदिरांत सोलापूर येथे कां गेला नाहीं? तेथें पंचाचार्यांचा झालेलां जयजयकार आपण कां ऐकला नाहीं? बसवेश्वर व अनेक पंचाचार्य हे समकालीन होते व ते सर्व एकाच अनुभवमंडपांत होते असें ऐतिहासिक पुराव्यानीं सिद्ध करणारांनीं, त्यांच्यापैकीं एकाच्या मंदिरांत जाण्याला व तेथे जयजयकार ऐकण्याला, व तेथील भक्तगणाचें पंचाचार्य-अर्पित भक्तगणांचे शुद्ध बुद्धीने स्वागत घ्यावयास महास्वामीला नकार देण्यास कां भाग पाडावें? व महास्वामींनी तरी कां नकार द्यावा?

### श्रींचे चुकलें व चुकविलें

पूर्व आचार्य, बसव, प्रभुदेव व चन्न-बसवेश्वर ह्यांच्या काळांत परिणत झालेल्या आजच्या वीरशैवसमाजघटनेचा अपमान आहे, उच्छेद आहे. आपसांतील रागापायीं व द्वेषापाई आपण आपल्या मूळावर घाला घालतों हें न कळण्याइतके जेव्हां विद्वान् व अधिकारी पुरुषहि अंध बनतात तेव्हां त्यांत तत्वनिष्ठा प्रतिबिंबित होत नाही व अधिका-राचा सदुपयोगहि आढळून येत नाही. ह्मणून सोलापूरकरांचें रेवणसिद्धमंदिरांतील प्राथमिक स्वागत नाकारण्यांत श्रींचें तत्वतः चुकलें, व त्यांना चुकविलें. चित्रकल-दूर्ग महास्वामीचे चुकले व त्यांच्या अनुयायानी चुकविले हें मात्र सत्य आहे व तें सत्य वीरशैव-धर्मातील प्राचीन आचार्य, बसवादिशरण, आणि प्रभुदेवादि शून्यसिंहासनाचे जनक ह्यांच्या शिवरूप शक्तीपुढें निवेदन करणें प्रत्येक वीर-शैवाचें कर्तव्य आहे. ह्यानंतर महास्वामींना श्री. बाबासाहेबांनी बिन्नाव दिला असेल, काडादी बंधूंनी त्यांच्या सन्मानार्थ समारंभ केले असतील, स्थानिक हिंदुमहासभेचें महास्वामींना मानपत्र लाभलें असेल, बाराहजारच काय पण पन्नास हजार समुदायांत महास्वामींची आडुची पालखी निघाली असेल; नाही असें नाही. पण शून्यसिंहासनाधीश विभूतीं व तिचे बांधळे अनुयायीं आजच्या पंचाचार्य जगद्गुरुच्या द्वेषा-पायीं पूर्वपरंपरेला झिडकारतात, त्या विभूतीं-चाहि अवमान करतात हें जें चित्र नव्या पिढीस दिसलें तें मात्र हिडीस आहे.

## गुरु-विरक्तांची बुवाबाजी

वीरशैवांतील ही तरुण पिढी विरक्तपंचाचार्य-वादास बुवाबाजीचा वाद ह्मणू लागली तर तिला आपण कोणत्या तोंडाने नांव ठेवणार? विरक्त जगद्गुरु असा, वा पंचाचार्य जगद्गुरु असा. वा यापैकीं कोणीं कोणाचेहि अनुयायी असा; पण आपण एका शुद्ध व सोज्ज्वल परंपरेचे प्रतिक आहांत, व त्या प्रतिकाचेच भक्त आहांत तेव्हां आपसांतील रागापायीं व द्वेषापायीं एकमेकांच्या पूर्वजांचा धिक्कार

करण्यास शिकणें व शिकविणें हें अत्यंत अनुचित आहे. ह्यांत धर्मघटवा-उच्छेदाची भावना स्पष्ट दिसते. ह्यामुळें तरुणपिढी गुरुवर्गाच्या व विरक्तवर्गाच्या बुवाबाजीवर हल्ला चढविते व ती एक प्रकारची नास्तिक व नवमतवादी अशी तयार होतें. ह्यांतच धर्मघटनेच्या नाशाचें बीज आहे. सध्याचा विरक्त-पंचाचार्यवाद हा वाद नव्हे; तर हे धर्मनाशाचें बीज आहे व तें वाढत आहे. म्हणून हें धर्मावरील संकट होय असें आमचें स्पष्ट मत आहे. पंचाचार्यभक्तांनी बसवादि शरणांच्या जयजयकारास नकार भरणें व विरक्तपीठानें पंचाचार्यविभूतीचा जयजयकार टाळणें म्हणजे धर्मघटनेच्या उच्छेदाची तयारी करणें नव्हे काय? कर्नाटकांतून चालत आलेलें हें धर्मउच्छेदक चित्र महाराष्ट्रांतील वीरशैवांच्या केंद्रस्थानीं असलेल्या सोलापूर-बार्शी ह्या शहरांत प्रगट व्हावें हें महाराष्ट्रांतील वीरशैवांचें दुर्दैव होय. परवा पुरुषाराजेंद्र महास्वामींचे पाय सोलापूरला लागतांच जी उभयपक्षांच्या अनुयायांनी एकमेकावर माणुसकी सोडून हस्तपत्रकांतून व वर्तमानपत्रांतून धुळवड उडविली तो अयोग्य आहे. आणि उभयतांच्याहि धर्मभावनांना ती लांच्छनास्पद आहे असें आम्हाला उभयपक्षांविषयीं पराकाष्ठेचा आदर वाटत असूनहि म्हणावें लागतें.

---

# वीरशैव-पुरोहितवर्गांवरील सामाजिक जबाबदारी

लेखकः-- आंबणपा महांतपा बहिरोपाटील, सीनियर बी. ए., विलिंग्डन कॉलेज, सांगली.

जर आपण आज वीरशैवसमाजाकडें दृष्टि फेंकली तर आपला समाज प्रत्येक बाबतींत मागसलेला आहे असें आपणास दिसून येईल. राजकारण घेतलें तर त्यांत अगदी थोडे वीरशैव सांपडतील. बरें, व्यापारांतदेखील मारवाडी किंवा गुजर लोकांप्रमाणें पुढे सरसावलेले वीरशैव क्वचित् निघतील. शेवटी, धर्माकडे दृष्टि वळविल्यास तींच गोष्ट आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. निरनिराळ्या पंचाचार्यविरक्त व इतर पक्षामध्यें चाललेला वितंडवाद व तेढ हे आपल्या वीरशैवधर्माच्या खऱ्या स्वरूपाचा नाश करीत आहेत. अशा या सर्वांगीण अवनतीचें कारण पाहूं लागल्यास आपल्या समाजांतील शिक्षणाचा अभाव हेंच मुख्य कारण होय अशी आपली खात्री होईल. ह्यावरून शिक्षणाचें मूलभूत महत्व किती आहे हें दिसून येईल.

कोणत्याहि अनिष्ट बाबतींत सुधारणा करावयाची झाल्यास ती गोष्ट इतकी अनिष्ट व अहितकारक होण्यास कोणती कारणें आहेत याची चिकित्सा प्रथम व्हावयास हवी. मग आपण शिक्षणांत कां मागासलेले आहोंत याचा विचार होणें जरूर आहे. एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसते कीं, शिक्षणासाठी पुरेसा द्रव्यनिधि झालेला नाही हें एक प्रमुख कारण होय, कारण पैशाच्या मदतीशिवाय शिक्षणाचा फैलाव फारसा होऊं शकत नाहीं. आतापर्यंत पुष्कळांनी "शिक्षण" या विषयावर लेख

लिहिले आहेत, अनेकांनी शिक्षणप्रसाराकरितां व शिक्षणफंडाकरितां दौरे वगैरे काढलेले आहेत. परंतु अजून शिक्षणकार्याकरितां विद्वान महाराष्ट्रांत तरी धनसंचय होऊं शकला नाही. ज्याप्रमाणें एखाद्या रोगावर निरनिराळें औषध व उपचार करावे लागतात तद्वतच शिक्षणकार्याकरिता फंड वगैरे जमविण्यास निरनिराळें प्रकारचे उपाय योजावे लागतात. वर सांगितलेल्या उपचारांनी कित्येकांच्या पदरीं अपयशहि आलें असलें, तरी आणखी एक उपाय शिल्लक आहे व त्याचाच वहापोह प्रस्तुत लेखांत करावयाचा आहे. आजपर्यंत शिक्षण-फंड जमविण्याबाबत आपल्या समाजांतील गुरुवर्गानें क्वचितच भाग घेतला असेल. ह्मणून त्यांनीच पुढाकार घेणें जरूर आहे.

## गुरुवर्गाने पुढाकार कां घ्यावा ?

वर आपल्या समाजाची नीट बारकाईने पहाणी केली तर आपणास असें दिसून येईल की, समाजांत सर्वांपेक्षा जास्त व विलक्षण वजन व वर्चस्व जर कोणाचें असेल तर या गुरुवर्गांचें. कारण बहुतेक सर्व वीरशैवांना— निदान कमी व अशिक्षित वीरशैवांना तरी — असें वाटतें की, आपल्या ऐहिक सुखाबरोबर जरूर असलेलें पारमार्थिक शांतिसुख व मोक्षप्राप्तीची या गुरुवर्गाच्या उपदेशाने व सेवेनें खचित प्राप्ति होईल. मग जवळजवळ शिवसमान मानल्या गेलेल्या गुरुवर्गानें आपल्या वीरशैवभक्तांना 'शिक्षणाकरिता मदत करा' असा उपदेश केल्यानंतर ते त्यांचे शब्द ओलांडतील असें क्वचितच घडूं शकेल. मध्ययुगांत युरोपमध्यें रोमन कॅथॉलिक पंथाचे मुख्यधर्मगुरु जे पोप यांनी आपल्या लेखणीच्या फटकाऱ्यासरशी स्वधर्मीय राजामध्यें राज्याची विभागणी करून दिल्याची व त्यांच्या आज्ञेपुढें मोटमोठे सत्ताधिकारी देखील थरकांप झाल्याची उदाहरणें इंग्लंडच्या इतिहासांत नमद आहेत. यांच्या- इतकी सत्ता किंवा वजन आतांच्या आपल्या किंवा इतरांच्या गुरुवर्गामध्यें राहिली नाही ही गोष्ट खरी; परंतु येवढें मात्र खास कीं, नुसत्या शब्दांच्या व उपदेशाच्या जोरावर शिक्षणाकरिता फंड जमविणें हें वीरशैव-पुरोहितवर्गाला अगदी शक्य आहे.

त्याप्रमाणें, शिक्षणफंड वगैरे जमविण्यास गुरुवर्गास वेळेची फुरसत असते व लांबलांबचे दौरे काढण्यास त्यांना द्रव्यसहाय्यहि भक्कम असते. त्यांच्या मानानें इतर लोकांत आपआपल्या दररोजच्या उदरनिर्वाह व इतर व्यवसायांत गुंतून गेल्या असल्या कारणाने अशीं सामाजिक कार्यें करण्यास मिळावी तितकी सवड मिळत नाही. मग सहाजिकच प्रश्न उद्भवतो कीं, गुरुवर्गाच्या कार्याची रूपरेखा कोणती?

## शिक्षण-फंडावर दक्षिणारूपी बुरखा चढवावा

सर्व गुरुवर्गांनीं एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवावी कीं, शिक्षणार्थ फंड जमविण्याच्या कार्यास त्यांनीं धार्मिक स्वरूप द्यावें. वास्तविक पहातां शिक्षण ही एक सामाजिक बाब आहे. मग शिक्षणाला धार्मिक स्वरूप कसें द्यावें? परंतु जर थोडा खोल विचार केला तर यांत अवघड असें कांहीच वाटणार नाही. धर्म या संस्थेचें मुख्य व्यापक ध्येय ह्मणजे मानवाचा उत्कर्ष करणें हें होय. ह्मणजे, जर एखादी गोष्ट मानवजातीच्या उत्कर्षाला कारणीभूत होत असेल तर त्यास धर्म ह्मणणें किंवा निदान धर्मांइतकें पवित्र व उच्च कार्य ह्मणणें यांत कांही वावगें नाहीं. मनुष्यप्राण्याचें पूर्णत्वाचें द्योतक ह्मणजे शिक्षण असें स्वामी विवेकानंदाने ह्मटलें आहे, व तें अगदीं खरें आहे. मग शिक्षण किंवा शिक्षणकार्यालाच धर्म ह्मणणें यांत वावगें असें कांहीच होत नाही. इतका सर्व खुलासा करण्याचें कारण ह्मणजे शिक्षण—इंग्रजी शिक्षण किंवा औद्योगिक बौद्धिक शिक्षण इत्यादि शब्दांनीं गुरुवर्गांनीं बुजून जाऊं नयें व शिक्षणास धार्मिक

स्वरुप देतां यावें ह्मणून, त्याचप्रमाणें शिक्षणासारख्या अशा पवित्र व उच्च अशा सामाजिक कार्यास मदत करावयाची ह्मटल्यास बहुजनसमाजास अगदी जिवावर येते. परंतु तेंच एखादे धार्मिक कार्य (उदाहरणार्थ महेशांना भोजन व दक्षिणा वगैरे) असलें ह्मणजे त्यावर वीरशैवांच्या उड्या पडतात – मग ते अनाठायीं कां असेना! हा त्यांच्या मनाचा कल आपण पूर्ण लक्षांत घेतला पाहिजे आणि याच गोष्टीचा आपण पूर्ण फायदा करून घेतला पाहिजे. विशेषतः जगद्गुरुचेंच वीरशैव बहुजनसमाजावर जबरदस्त वजन असल्याकारणाने आपल्या नेहमीच्या दौऱ्यावर असतांना त्यांनी या गोष्टीकडे विशेष लक्ष दिल्यास बरें होईल.

जोपर्यंत वीरशैवसमाज प्रायः अशिक्षित आहे तोपर्यंत तरी लेख-प्रवचनांच्याद्वारें शिक्षणकार्याकरिता फंड जमविणें शक्य दिसत नाही असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. कारण जे लोकच मूळ अशिक्षित आहेत व कित्येकांना शिक्षण कशाशीं खातात हें माहीत नाही त्यांना शिक्षणाचें महत्व व उपयुक्तताहि कळणें अगदी अशक्य आहे. अशा या रोगावर एकच मारक औषध ह्मणजे वर सांगितलेला प्रयोग हा होय.

शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं, वीरशैव पुरोहितवर्गानें हा स्तुत्य उपक्रम करून पहावा व त्यांना शंभरटक्के यश येईल असा माझा भरवसा आहे. व शिक्षणापासून दुरावलेल्या आपल्या समाजास अशा थोरवीने उपकृत करून समाजाचे धन्यवाद घ्यावेत व अशा रीतीनें आपला वेळ व श्रम सत्कारणीं खर्चं करून धर्माचा खरा प्रसार करावा अशी एवढीच त्यांना माझी सविनय विनंती आहे.

# ‘संजीवनी’चें सिंहावलोकन

ले०—श्री. तु० ना० काटकर, चिमूर.

## मुलाचे पाय पाळण्यांत

सेवाधर्माचें जीवनरहस्य सामाजिक प्रवीणतेंत आहे. पण तें सर्वांनाच कसें साधतां येणार? त्याकरिता तरवारीचे वार, तोफा-बंदुकींचें वार, नि त्या सर्वांवरहि वरचढ असे वाक्‌बाणांचे वर्षाव निधड्या छातीवर सहन करून कणखर बनावें लागतें. याच आयुष्यपथावर आज "वीरशैव संजीवनी" आहे.

तिचा उदयच मुळीं छत्तीशीच्या क्षितिजावर झाला. तरी पण केवळ एक वर्षाकरिता जन्मास

घातलेल्या आपल्या गोंडस अपत्याच्या पहिल्या वाढदिवसाप्रीत्यर्थ तिचे कोडकौतुक पहाण्याचा सुदिन आज उगवला आहे. किंबहुना आज तिचें इ. स. १९३६ मधून १९३७ त "नव्या-प्रथमांका" नें उर्जितावस्थेंत पदार्पण होत आहे. मग अशा घडामोडीच्या प्रसंगी कोणासहि तिचें मनः-पूर्वक स्वागत कां नाही करावेसें वाटणार? हें स्वागत केवळ तिच्या नाममहात्म्याचें नाहीं; तिच्या महनीय कामगिरीचें आहे. तिच्या आयुष्यक्रमाच्या पहिल्याच वर्षाच्या अगदीं बाल्यावस्थेकडे सिंहावलोकन केलें असतां 'मुलाचे पाय पाळण्यात' कसे दिसतात ह्याची साक्ष ओळख तिनें अखिल समाजाला करून दिली आहे.

त्यामुळें महाराष्ट्रीय वीरशैवानें धर्माच्या सत्य स्वरूपाकडें लक्ष वेधलें व त्यांतीलच कित्येक पुरस्वीय नि भक्तवर्गीय लेखक–लेखिकांनी काळमानाचा ओघ ओळखून आपापल्या लेखांतून धार्मिक व सामाजिक नवमताचें प्रतिपादन करून ठेवलें आहे. त्यामुळें 'नवमताचा धर्मभास्कर' उदयास आल्याचा, त्याची वर्धमान उल्हसित किरणें ग्वाही पटवीत आहेत, नि त्यांना त्याचा पुढीलवि समाज योग्य प्रकारें सदुपयोग करून घेऊन धार्मिक आचारांतील रोगजंतुतुल्य खुजट मतांचा नायनाट करण्याच्या प्रयत्नास लागले आहेत. अशीच जर हीं किरणें होत गेली तर आमचा 'वीरशैवधर्म' सदा सर्वकाळी वर्धमान तळपणार यांत संदेह तो काय मानावा ?

अधिकारी वाणींतून निर्मिलें आहे 'बोले तैसा चाले त्याची वंदावी पाउलें' हेंच ब्रीद 'वी.सं.' चे आहे. उदरांतील बालक कसें निपजेल हें कोणी सांगावें ? पण ह्याला कित्येक अपवाद आहेत. वीर-अभिमन्यूने चक्रव्यूहभेदाचें शिक्षण आईचे उदरांतच घेतलें ना ? तद्वतच 'वीर-शैवसंजीवनी'चें झालें. 'केसरी' प्रभृति नियतका-लिकांतून तिच्या जन्मापूर्वीच तिच्या ध्येयाची घोषणा करण्यांत आली नि जन्मास येतांच इच्छित कार्याचें कंकण बांधलें जाऊन निर्भीडपणें आपला मार्ग आक्रमूं लागली. पण तिचें हें कार्य अखंड टिकून राहणें तिच्या वाढत्या प्रसारावर आहे. ह्मणून तसले प्रयत्न वीरशैवधर्माभिमान्यांकडून व संचालकाकडून केलें जावेत, त्याशिवाय दुसरा सुगम मार्ग नाही .ह्यासंबंधीं आम्हीं 'वी. सं.' चे अंक नं.२ मध्यें 'संजीवनीचें कार्यक्षेत्र' ह्या मथळाखाली सुचविलेल्या धोरणाचा अवलंब केल्यास ही अडचण सहजासहजी दूर होणारी आहे.

'संजीवनी'चें जन्मनक्षत्रकालाप्रमाणें तिच्यावर अनेक प्रतिकूल प्रसंग ओढवले. त्यांतलेच स्वध-र्मीय प्रमुख पत्रांचे सनातनी प्रतिकूल मतप्रचार; कै० लक्ष्मीबाई बामणगांवकरांचा आजार व मृत्यू नि त्यामुळें 'वी. सं.'च्या जन्मदात्या नाना-साहेबांवरील अपूर्व गंडांतर, नि अशा प्रसंगा-निमित्तानें तिला तिच्या ध्येयानुकूल लाभलेले दुय्यम संपादक श्री० चौधरी व त्यांचे सहकारी मित्र श्री० एकलारे वकील व दे.भ. राजाभाऊ डांगरेप्रभृति व त्यामुळे तिचे दुरावलेले कार्य अशा अनेक भिन्नभिन्न परिस्थितीचें दृश्य मनः-चक्षूपुढें उभे केलें असतां क्षणभर तरी वाचकांची मति बावरल्याविना राहणार नाही.

एवंच तिच्या एक वर्षाच्या गतआयुष्याचे सिंहावलोकनावरून तिचेवर वेळोवेळीं झालेल्या खडतर व अवघड संकटांना तोंड देऊन त्यांतून तिने आपला मार्ग कसा अगदीं सुकर नि सरळ करून घेतला आहे. हें आजच्या वाचकांच्या हातीं आलेल्या अंकावरूनच कळून येणार आहे. याचें सर्व श्रेय तिचा सांभाळ करणाऱ्या निःस्पृह वाच-

वगार सुधारणा वादी संपादक व नवमतवादी सहसंपादक या जोडीकडेच जाते. यावरून आज असेंच म्हणावें लागत आहे कीं, पूर्वजन्माचे राहिलेले समाजऋण फेडण्याकरिताच तिचा पुनर्जन्म झाला आहे यांत मुळीच शंकेला स्थान नाही. म्हणूनच आजच्या प्रसंगी व्यक्तिशः मी त्यांचें हार्दिक अभिनंदन करून "वीरशैव संजीवनी"स सोन्याचे दिवस लाभण्याचा अनुकुल काळ प्राप्त होवो। एवढीच सदिच्छा त्या निर्गुणनिराकार दयाघन प्रभूठायीं व्यक्त करून लेखणी खाली ठेवितों.

# प्राचीन शिवशरण व अर्वाचीन वीरशैवसमाज-पुढारी

ले.-शांतलींग भगवान ह्यापसें, सेक्रेटरी, वीरशैव तरुण-संघ, अहमदनगर.

समाजाचा उद्धार करण्यासाठी कालानुसार महापुरुष अवतरतात असें जें भाविकांचें ह्मणणें आहे तें कांही खोटें नाही. निरनिराळ्या काळीं समाज निरनिराळ्या कारणांनी पोळला जात असतो व त्या त्या काळीं महान् विभूति अवतरून निरनिराळ्या साधनांनी त्या पीडादायक कारणाचें निवारण करीत असतात. या विभूतींचीं नांवें, मार्ग व समय भिन्न असला तरी त्यांचें ध्येय, भावना व तत्व हीं एकच असतात. १२ व्या शतकांत शिवशरणांनी कर्नाटकांत जें अद्भूत कार्य केलें तसलेंच कार्य हल्ली महाराष्ट्रांत वीरशैव पुढारी करीत आहेत.

त्या काळीं सामाजिक असमता व धार्मिक मूर्ख कल्पना, ह्यामुळे समाज बहुतांशेंकरून पीडित झाला होता. यज्ञांतील पशुहनन, जन्मजात उच्चनीचपणाची कल्पना, व बाह्यावडंबराखाली चाललेला अनाचार यांचें फार बंड माजलें होतें. हे दुष्ट प्रकार नाहीसे करण्यासाठी महानुभाव बसवेश्वरासारख्या शिवशरणांनी कर्नाटकांत पुष्कळ अद्भुत क्रांति केली. त्या शिवशरणांत महानुभाव बसवेश्वराबरोबर चन्नबसवेश्वर, अक्कमहादेवी, श्रीप्रभुदेव मोळिगी मारय्या, वगैरे शिवभक्त प्रमुख होते व शरण पेरण्य आपल्या अंतःस्फूर्तीने महानुभावांना मदत करीत होते.

बाराव्या शतकांतील क्रांतीचे मूळ जनक महानुभाव बसवेश्वरच होत. ते अद्वितीय शिवभक्त होते. ते परम करुणाशाली होते. ध्येयावर त्यांची अखंड दृष्टि होती व ते मोठे धैर्यशाली पुरुष होते. चन्नबसवेश्वर उत्साही तरुण होते. त्यांच्यामध्यें प्रचंड कार्यक्षमता होती. तें महाज्ञानीहि होते. सिद्धराम शिवयोगी हे मोठें तपोनिष्ठ होते. अक्कामहादेवी या

वैराग्यशालिनी होत्या. श्री प्रभुदेव तर ह्या क्रांतीला कारण असलेल्या तत्वज्ञानाचें मोठें प्रसारक. मोळिगें मारय्यांनी तर काश्मीरचें आपलें राज्य सोडून बसवेश्वराजवळ येऊन आणि काटक्यांच्या मोळ्या विकून त्यावर उपजीविका करून वीरशैव-मतप्रसार केला. कल्याणपट्टणांतील शिवानुभवमंडपांत हा शिवशरणसमूह ज्या भावना व्यक्त करीत त्यांचा प्रसार दूरदूरगांवच्या लोकांत करण्यास अनेक शिवगण त्या वेळी तयार असत. बिज्जराचे कायदे मोडून समाजहितकारक सुधारणा त्या वेळी महानुभाव बसवेश्वरादि शिवशरणांनी रूढ केल्या.

तत्कालीन शिवशरणाप्रमाणें आताचे समाजपुढारी आहेत. महानुभाव बसवेश्वराप्रमाणें आताच्या क्रांतीचे मूळ पुरुष 'वीरशैव संजीवनी'चे संपादक दे. भ. नानासाहेब बामणगांवकर हे होत. चन्नबसवेश्वराप्रमाणेच श्री. बाबुराव चौधरी हे नानासाहेब बामणगावकरांचे सहाय्यक झालेले आहेत. मोळिगेंमारय्या प्रमाणें द. कृ. उर्फ वावासाहेब देशमुख जाहागीरदार समाजकार्यात सामील झाले आहेत. सिद्धाराम शिवयोग्याप्रमाणें श्री. गु. मु. पाचलींगय्यास्वामी परांडकर आपल्या तपःश्चर्येच्या जोरावर चालू क्रांतीस मदत करीत आहेत. प्रभुदेवा-प्रमाणे 'सुदर्शन'चे संपादक श्री. कल्याणशेटी वकील चालू क्रांतीला महत्वाचें सहाय्य देत आहेत. त्या काळच्या शेकडो शिवगणाप्रमाणे आताहि शेकडो समाजसेवक ठिकठिकाणी कार्य करीत आहेत.

वरील तुलना कांही अंधश्रद्धाळु जनांना रुचणार नाही. पण बसवेश्वरकालीन क्रांतीचें रहस्य ओळखणाऱ्याला इतिहासाची पुनरावृत्ति होत आहे असें वाटल्यावाचून राहणार नाही. शरणकाळी धर्मप्रचाराचें कार्य चालू होतें त्याचप्रमाणे हल्ली सुसंघटित रीतीनें समाजसुधारणेची चळवळ चालली आहे.

शिवशरणांची समाजपुढाऱ्यांशीं तुलना करून शिवशरणांना कमी लेखण्याचा हेतु नाही किंवा समाजपुढाऱ्यांनाहि अवास्तव वर चढविण्याचा हेतु नाही. कोणतीहि सुधारणा करावयाची असली ह्मणजे अशा पवित्रात्म्यांची व स्वात्मार्पण करणाऱ्यांची जरूरी असते हें दाखविण्याचाच ह्या तुलनेचा उद्देश आहे; आपापल्या कालांत ते दोघेहि सारखेच श्रेष्ठ होत.

शरणकाळीं धार्मिक क्रांति झाली, हल्ली सामाजिक क्रांति होत आहे. या क्रांतीस वीरशैवसमाजांतील असलेल्या वर्तमानपत्रांची पुष्कळ मदत होत आहे. वीरशैवसमाजाकरिता असलेल्या वर्तमानपत्रांत 'वीरशैव संजीवनी' हें प्रमुख पत्र आहे. 'वीरशैव संजीवनी'स व 'वीरशैव संजीवनी'चे संपादक दे. भ. नानासाहेब वामणगांवकर यांना उदंड आयुष्य लाभो अशी त्या जगन्नियंत्या शिवचरणीं विनंती करून हा लेख पुरा करितों.

---

स्त्री-विभाग

# वीरशैव महिलांस विनंती

## पहिले दोन शब्द

लेखिकाः—श्रीमति महादेवी वाघमारे; ओमिनाबाद,
संपादिका—'वी. संजीवनी' स्त्री-विभाग

'वीरशैव संजीवनी'च्या पुनर्जन्मानंतर 'संजीवनी'-विषयीं आपला अभिप्राय देतांना आपल्या महिला-वर्गातील प्रसिद्ध विदुषी भगिनी सौ. पंचव्वाबाई सरदार यांनी स्पष्टपणें जाहीर केलें होतें कीं, 'संजीवनी'नें प्रामुख्याने समाजाचा महत्वाचा भाग जो महिला-वर्ग याविषयी विचार केला पाहिजे. या अभिप्रायानुसार थोडचा उशीरा कां होईना 'संजीवनी'-कारांनी स्त्रियांकरितां स्वतंत्र विभाग सुरु करण्याचें जाहीर केलें, आणि त्याप्रमाणें आज आम्हा स्त्रीवर्गाचे जीवनचर्चेकरिता हा स्वतंत्र विभाग सुरु होत आहे ही अत्यानंदाची गोष्ट होय.

वास्तविक या विभागाची संपादकीय जबाबदारी आमच्या सुप्रसिद्ध विदुषि भगिनी सौ. पंचव्वाबाई सरदार यांनीच सांभाळावी. परंतु प्रकृति बरी नसल्यामुळें त्यांना तूर्त ही जबाबदारी आपले शिरावर घेतां येत नाही. म्हणून थोडचा दिवसांकरिता कां होईना अंगीं पात्रता नसूनहि ही जबाबदारी शिरावर घेण्याचें मी धाडस करीत आहें.

'संजीवनी'कार श्रीगुरुमूर्ति बाबासाहेब वामणगांवकर यांनी मोठ्या उदार अंतःकरणाने आह्मा स्त्रीवर्गाची अडचण लक्षांत घेऊन आमचें जीवनचर्चेंकरिता हा स्वतंत्र विभाग काढला याबद्दल सारा महिलावर्ग त्यांचा आभारी आहे. जगातील इतर स्त्रीसमाज कितीहि पुढे गेला असला तरी निदान आह्मा वीरशैव महिलांना कांही कालपावेतो स्वतःची उन्नति करून घेण्यास पुरुषवर्गाच्या साह्याची व सक्रीय सहानुभूतीची अत्यंत जरूरी आहे. तरी आमच्या समाजांतील पुरुषवर्गाने या विभागाकडे परकेपणाने व तिरस्कारबुद्धीने पाहूं नये. आपल्या पत्नी, भगिनी, व मुलींत वाचनाची आवड उत्पन्न करून, त्यांचे अंतःकरणात या विभागाविषयी आवड, आदर, व आपुलकीची भावना निर्माण करावी अशी माझी कळकळीची विनंती स्त्री-दाक्षिण्य बाळगणाऱ्या पुरुषवर्गास आहे.

आमचा महिलावर्ग अत्यंत अज्ञान व निरक्षर आहे. जोपर्यंत साक्षरता आमच्यांत वाढून वाचनाभिरुचि उत्पन्न होणार नाही तोपर्यंत आमची कोणतीहि चळवळ यशस्वी होणार नाही. स्त्रीवर्गास साक्षर बनविण्याची जबाबदारी प्रामुख्याने पुरुषवर्गावरच आहे. आमचें जीवन अद्यापि पुरुषवर्गाच्या स्वाधीनच आहे. आह्मास पुरुषवर्गाच्या साहयाची दरेक बाबतींत जरुरी आहे. ह्मणून उदार हृदयी व महिलाविषयीं कळकळणाऱ्या पुरुषांचें लक्ष इकडे वेधितें. स्त्री हें समाजाचें अर्धांग आहे. हें अर्धांग जोपर्यंत अज्ञान राहील तोपर्यंत वीरशैवसमाजाची उन्नति होणे अशक्य आहे.

आतां मी माझ्या भगिनीवर्गाकडे वळते. वीरशैवभगिनींनो, आपला दर्जा किती तरी श्रेष्ठ व उच्च प्रतीचा आहे. आपल्या प्राचीन भगिनी अक्क महादेवी, कित्तुरचन्नम्मा वगैरे महिलांनी आपल्या ज्ञानतेजाने व कर्तबगारीने साऱ्या जगास दिपविलें परंतु आज आपली स्थिति फार करुणाजनक व शोचनीय झाली आहे. आह्मास आमच्या दर्जाची व श्रेष्ठपणाची जाणीव राहिली नाही. अज्ञान, अंधश्रद्धा व धर्मवेडेपणा, याने आह्मास ग्रासिलें आहे. मातृपद, बालसंगोपन, आरोग्य, पाकशास्त्र, यांचें महत्व आह्मास कळेनासें झालें आहे. यामुळें आमचें जीवन परावलंबी होत आहे. स्त्री ह्मणजे घरची हक्काची मोलकरीण, तिने खावें-प्यावें वस्त्र नेसावें आणि पुरुषांच्या मर्जीप्रमाणे वागावें यापलीकडे आह्मा स्त्रियांना आमच्या हक्काची जाणीव राहिली नाही. आमची स्थिति फार खेदजनक झाली आहे.

आमचे शेजारी असलेल्या ब्राह्मण, जैन-वगैरे ज्ञातींतील स्त्रीसमाज कितीतरी झपाट्याने पुढे येत आहे. त्यांच्या स्वतंत्र संस्था व स्वतंत्र वृत्तपत्रें निघत आहेत. आह्मी मात्र अद्यापि झोपेंतच आहोंत. शिक्षणाची ही जाणीव अद्यापि आह्मास झाली नाही. इतकेंच नव्हे तर शिक्षणाने मुली बिघडतात असें समजणाऱ्या माउल्या आणखीहि आमच्यांत आहेतच. तरी आमच्या वर्गांतील सुशिक्षित व जाणत्या स्त्रियांनी शिक्षणप्रसाराची चळवळ करावी. जागजागीं महिला-ज्ञान-मंदिरांची स्थापना करावी. गांवोगांवीं दारे काढून सभा, प्रवचनें, व कीर्तनद्वारा महिलांत जागृति निर्माण करावी. स्त्रियांनाहि अंतःकरण व भावना आहेत. स्त्रियांनाहि पवित्र कार्यक्षेत्र आहे. स्त्री ही पुरुषाचा गुलाम नसून सहचारिणी आहे. समाजाचा गाडा सुरळीत चालण्याकरिता आपल्या सुधारणेची फार जरुरी आहे. स्त्रीसुधारणा हें महत्वाचें कार्य आहें.

या पवित्र कार्याच्या उद्देशानेंच वीरशैव-महिलांच्या सर्वांगीण उन्नतीकरिता 'संजीवनी' कारांनी हा विभाग सुरू केला आहे. स्वतंत्रपणें स्त्रीजीवनविषयावर चर्चा करण्याची प्रथा आपल्या समाजांत 'संजीवनी'कारच घालीत आहेत. यापूर्वी असा प्रयत्न कोणाकडून झाला नाही. बार्शीच्या कै. सौ. त्रिवेणी बाई इसापुरे, संपादिका 'वीर प्रभा', यांनी आपल्या हयातींत आमच्या वर्गाच्या उन्नतीचा बराच स्तुत्य प्रयत्न केला परंतु वृत्तपत्रद्वारें अशा स्वतंत्र चर्चेची योजना त्यांचेकडूनहि झाली नाही.

वृत्तपत्र हें समाजाच्या उन्नतीचें प्रमुख साधन आहे. या साधनाचा उपयोग आम्हीं अवश्य करून घेतला पाहिजे. महाराष्ट्रीय वीरशैव महिलांना माझी जाहीर नम्रपणाची विनंती आहे कीं, त्यांनी या विभागांत भाग घेऊन आपले विचार, भावना, व अडी अडचणींची जाणीव समाजास करून द्यावी, आणि आमच्यांत संघटना निर्माण करावी.

या विभागांत स्त्रियांचेच, लेख गोष्टी, पत्रें, प्रहसनें, बातम्या वगैरे महिलासमाजास पोषक असें वाङ्मय प्रसिद्ध व्हावयाचें आहे.तरी आमच्या समाजांतील सुविद्य स्त्रियांनी आपआपले लेख नियमितपणें पाठवीत जावें.

तसेंच, आमच्या समाजांतील सुविद्य भगिनी सौ. पंचप्पाबाई सरदार, सौ. भागीरथी बाई कटप, सौ. गंगाबाई पटणें, सौ. शांताबाई सावेकर, कु. रत्नावती कुन्हे, कु० इंदु कापसे, कु० "श्यामलता." इंदुकला क्षीरसागर, वगैरे महिलानी जाहीर झाल्याप्रमाणें या विभागाकरितां निरनिराळया तऱ्हेचे समाजपोषक लेख पाठवावे आणि लेखाची उणीव पडूं देऊं नयें अशी नम्र प्रार्थना आहे.

या विभागाच्या उन्नतीची जबाबदारी सर्वस्वीं आपणा महिलावर आहे. आम्ही प्रयत्न करुन या विभागांस मूर्तस्वरूप दिलें पाहिजे. आणि हातीं घेतलेलें कार्य यशस्वी करुन दाखविलें पाहिजे.इतकेंच नव्हे तर आमच्यांत शक्ति आल्यास आमच्याकरितां आम्ही स्वतंत्र वृत्तपत्र चालवूं अशी धमक व आशा आम्हा महिलांनी बाळगली पाहिजे.

पुन्हा एकवार महाराष्ट्र-वीरशैव-महिलांचें लक्ष इकडे वेधितें आणि आम्हीं हातीं धरलेलें कार्य यशस्वीपणें पार पडो अशी उमामहेश्वरचरणीं नम्र प्रार्थना करुन आपली रजा घेते.

---

लघुकथा १ ली.




## कां ? तर ती "पांढरपायी" ह्मणून !

(ले०:—श्री· सिद्रामआप्पा एस· कुन्हे, अमरावती·)

"काय ह्मणता ?"

"मीं सांगितलें तें अगदी बरोबर आहे, विमलपासून तुह्मांला सुख मुळींच लागणार नाहीं.

"पण आता याला कांही उपाय आहे काय?"

"नसायला काय झालें. मागाहून गणित करुन मी तुम्हास स्वस्थपणानें सांगेन."

"ठीक आहे. तुमची मेहनत अगदींच कांहीं फुकट जाणार नाहीं. फूल नाहीं फुलाची पाकळी कांही तरी....."

"तें चाललंच आहे."

विजापुरांत. विष्णुपंतांना येऊन ८-१० वर्षे झालीं होतीं. विष्णुपंत हा मूळचा कोल्हापूर-कडला राहणारा. ते दोघे भाऊ होते. प्रत्येकाचा परिवार बराच वाढला असल्यामुळें, विष्णुपंत गोडी-गुलाबाने आपल्या भावापासून निघून विजापुरांत आपल्या मुलांमाणसांसह आला होता. दैवयोगाने विजापुरांत येऊन थोडेच दिवस झाले तोंच त्याच्या गोडस्वभावानें त्याचा तेथें चांगलाच जम बसला. त्याला पांच मुलगे व दोघी मुली होत्या. विष्णुपंत व त्याचे दोन मुलगे हे बिल्डिंग-कॉन्ट्रॅक्टरच्या कामावर जात असत. तिसरा तेथील एका व्यापाऱ्याच्या दुकानांत नोकरीस होता. चवथा पानतंबाखूचें लहानसें दुकान चालवीत होता. व पांचवा मराठी शाळेंत जात होता.

विजापुरासारख्या मध्यम गांवांत पांच मुलगे, चार सुना, व आपण, इतक्या मंडळीचा निर्वाह चांगल्या तऱ्हेने होत असून, गेल्या ५-६ वर्षांत त्यानें थोडीशी माया केली होती. आज एकंदरीने पाहातां विष्णुपंतासारखा सुखी फारच विरळा. -परंतु.

परंतु काय ? नशीब हें मोठें विचित्र आहे. विष्णुपंतानें पांचव्या मुलाचें लग्न केल्यानंतर एका वर्षानें या नश्वर जगाचा त्याग केला. वास्तविक त्यांचें वयहि झालेलें होतें. त्यांत विशेष असें कांहीच नाही. आजकाल तर थोडासा विचार केला तर सारेच दिवस तरी अशा तऱ्हेचें सुख भोगणारा मनुष्य क्वचितच पहावयास मिळेल. परंतु मनुष्याची आशा ही कांही और चीज आहे.

विष्णुपंत योग्य वेळीं गेले होते, तरी हा सर्व धाकट्या विमलाबाईच्या पायगुणाचा प्रभाव अशी राधाबाईची खात्री झाली. एकदा हिची लक्षणें कशीं काय आहेत हें पाहण्याकरितां तिनें गांवांतील एका ज्योतिषीबुवास पाचारण केलें व ते आल्यानंतर त्यांचा संवाद काय झाला तो ह्या गोष्टीच्या आरंभीं दिला आहे.

"विमलपासून तुम्हांला सुख मुळींच लागणार नाही." दोन-तीन महिन्यांचा काल मध्यें निघून गेला, तथापि वरील ज्योतिषीबुवांची भविष्यवाणी जणूं काय ते आताच आपल्या कानांत सांगत आहेत असें राधाबाईला वाटे, आणि तिच्या सूडाविषयीं तिची वृत्ति जागृत होई. तिच्यापासून जर आपणांस सुख नाही, तर ही जितकी लवकर नाहीशी होईल तितकी बरी अशी तिच्या मनाची समजूत झाली असल्यामुळें, तिला पोटभर जेवावयाला न वाढणें, सदोदित तिच्या अंगावर खेंकसणे, इत्यादि मामुली उपचार सुरु झाला. पण अशानेंहि तिचें आयुष्य सरेना. अखेर हिला मुळी सासरींच आणावयाची नाही अशा तऱ्हेने राधाबाईनें विमलची माहेरी रवानगी करुन दिली.

होतां होतां वर्ष निघून गेलें. राधाबाईचा वडील मुलगा देवीच्या आजारांत गमावला त्या वेळीं विमल माहेरी गेली म्हणून काय झालें ? पण ती आपलीच सून ना ? मग ती कुठेंही असो, मला सुख लागणें कसें शक्य आहे? आज हिनें वडील दीर टाळला, उद्यां आणखी कोणावर गदा आणील, इत्यादि गोष्टींनी तिच्या मनावर फारस भयंकर परिणाम झाला.

विमल लवकर मरावी म्हणून तिनें आपल्या गांवांतील व बाहेरच्याहि कांही देवतांना बरेच नवस केले होते. पण एकहि देवता अद्यापि तिला प्रसन्न झाली नव्हती. लहानपणीं आळस भुलवितो, तारुण्यांत रूप आणि पैसा यांची भूल पडते. म्हातारपणीं दगडांच्या देवांना संतुष्ट केलें कीं सर्व पापें धूवून निघालीं असे राधाबाईस वाटे आणि याचमुळे तिनें विमलला

आणण्याकरिता मनुष्य पाठविला, व विमल आता जाणती झाल्यामुळे नांदविण्याकरिता मुलाने सांगितल्यावरून नेत आहोत असें विमलच्या वडीलास सांगितलें.

विमल घरीं येताच तिला मारहाण करण्याला सुरवात झाली. घरांत कांगाळी कुणाच्याहि हातून होवो, ती तिच्यामुळें व तिनेच केली असें सर्वांनी ठरवावयाचें आणि तिला मार द्यावयाचा असा बहुतेक क्रम सुरू झाला. राधाबाईचे मुलगे कर्ते–सवर्ते झाले होते खरे पण म्हातारीच्या विरुद्ध कोणाचीहि बोलण्याची प्राज्ञा नव्हती. व ही अशली पायगुणी पोरगी नसलेली काय वाईट ? असा विचार करून तेहि तिच्या जाचाच्या बाबतींत म्हातारीस मदत करीत असत. आता नवरा मात्र यांच्याविरुद्ध होता, पण घरांतील सर्वच मंडळी एक विचाराची झाल्यावर नवऱ्याला कोण विचारणार ?

विमलचें वय १५–१६ वर्षांचें खरें, पण तो तारुण्याच्या भरांत असल्यामुळे तिचे डोळे आकाशांतील ताऱ्याप्रमाणे स्वच्छ व पाणीदार दिसत होते. पोवळयासारख्या आरक्त ओठामधून दतपंक्तीच्या रांगा मौक्तिकहारासारख्या चमकत होत्या. अंगावर जाडे–भरडे कपडे जरी दिसत होते तरी निसर्गनिर्मित सौंदर्यात ते जास्त खुलून दिसत होतें. तिच्या आई–बापांची शिस्त चांगली असल्यामुळे, हा जाच ती बिचारी मुकाट्याने सहन करी. स्त्रीस्वातंत्र्याच्या गप्पा पुष्कळ सभांतून ऐकावयाला मिळतात; पण प्रत्यक्ष आचरणात आपण स्वतः आपल्या स्त्रियांना आपण किती सवलती देतों याचा विचार केला, तर ही गोष्ट स्पष्ट दिसून येणारी आहे. नकुसने टांकली यात बिचारीचा कांहींच दोष नाही हें समजत असूनहि, समाज तिची टवाळकी करावयाला चुकत नाही. हे असें कां व्हावें ? कोण म्हणे ?

एके दिवशी विमलच्या हातानी भाकरी करपल्यामुळे राधाबाईनें संतापून तिच्या डोक्यावर उलथा मारला. बिचारी बेशुद्ध होऊन तासभर निचेष्ट पडली होती. दुसरे दिवशी ती पाण्याला गेली त्या वेळीं हिला कपाळावर खोंक कसली म्हणून इतर बायकांनी विचारलें. पण अश्रूंत पडून घोळ लागला यापेक्षा तिनें काहीं सांगितलें नाही. अशा स्थितीत २–४ महिने निघून गेले. एके दिवशी तिने भाकरी खोरून खाल्ली या आरोपावरून तिच्या गालास व हातास २–३ डाग देण्यांत आले. गरीब बिचारी विमल अगदी असहय होऊन तिला हुंबडा फोडावा लागला. पण याचा परिणाम झाला उलटा ! ही आपली अब्रू घेण्याकरिता ओरडत आहे असें मनांत येऊन तिने रात्रीं तिचे तोंडांत बोळा कोंबून तिला बराच मार दिला. त्या गरीब विमलचा हुंबडा मनुष्यानें जरी ऐकला नाही तरी त्या प्रभूनें तिचें गाऱ्हाणें ऐकलें व दोन–तीन दिवसांतच एके दिवशी पहाटे ४ चे सुमारास तिनें जगाचा अखेरचा निरोप घेतला.

विमल मरावी अशी जरी सर्वांचीच इच्छा होती तथापि ती मरतांच राधाबाईच्या छातीत धस्स झालें. तथापि आपलें बष्टचर्य संपलें या आवेशावर ती आपल्या मनातें धोडें समाधान करून नेई. अखेर उजाडलें. आजूबाजूची मंडळी जमू लागली. एकदाची ही खट्पट गेली म्हणजे आपण मिळविली, याकरिता मुलांची विशेष मंडळी जमण्यापूर्वीच तिला नेण्याची

तयारी केली. पण हिच्या मृत्यूस पासू व दोर कारणीभूत आहेत अशी गुणगुण पोलीसचे कानांवर गेली; मग काय? त्यांना हा वास लागतांच ते तडक विष्णुपंतांच्या घरांत प्रेत उचलण्याचे सुमारास तयार झाले. आणि त्यांनी प्रेताला अटक केली. झालें. घरच्या मंडळींना परब्रह्म आठवलें. आता पुढे काय? वाच्यता करूं दिली तर आपणांस काळ्यापाण्यावर जावें लागेल ही गोष्ट लक्षांत येऊन, शेकडो त्यांनी रुपये मोजून, एकदाचे पोलीस परत फिरविले. पोलिस परत गेले, पण ही बातमी थोडी-च परत जाणार होती. तिचा तर फैलाव जास्तच वाढूं लागला, व विष्णुपंतांच्या मुलाच्या पिशव्या बराबर रिकाम्या होऊं लागल्या. आजपर्यंत मिळवलेले सर्व गेले. आपण भणंग भिकारी बनलों, पुढें तर बोलायलाच नको, तथापि न्यायासना-समोर आपणांस जावें लागलें नाही या एवढ्याच गोष्टींत ते आनंद मानूं लागले. पण, पण काय? या गोष्टीला चारपांच महिने होतात न होतात, तोंच त्यांचे घरांत पटकी शिरली आणि अवघ्या सात दिवसांत घरांतील सर्व मंडळी, राधाबाई खेरीज करून, इन्साफाकरितां परमेश्वराचे घरीं निघून गेली. आणि मग राधाबाईचे हाल किती झाले, हें तिलाच माहीत. आतां विमलचा निष्कारण छळ केल्याबद्दल तिला फार पश्चात्ताप होत होता, पण तो फार उशीरा. पश्चात्तापानें पुनीत झालेल्या हृदयांतून वाहणाऱ्या आसवांनी धुवून जात नाही असें या जगांत कोणतें पाप आहे!

दुःखाच्या अंधःकारांत स्मृतीचा चलच्चित्रपट ठळकपणें दिसतो, यांत नवल तें काय?

---

# काल, आज आणि उद्यां.

लेखकः—श्री वि० तु० चौधरी, बी.ए.

---

काल 'संजीवनी'चा वर्ष संपलें. आजचा अंक नव्या वर्षाचा प्रथमांक ह्मणून वाचकांच्या हातांत पडत आहे. काल आणि आज एक वर्षाचा काळ कसा हां हां म्हणतां निघून गेला. सामाजिक वीरशैव हया अल्प कालाला जरी काही महत्व नसलें तरी व्यक्तींच्या जीवनांत त्याला फार महत्व आहे. तद्वतच 'संजीवनी'च्याहि गेल्या अंकांत दे. भ. नानासाहेबांनी 'संजीवनी'चे संपादक ह्या नात्यानें गेल्या वर्षाचा समालोचनात्मक वृत्तांत वाचकांपुढें सादर केला आहे. तेव्हां पुन्हा त्या बाबतींत लिहून मला दिङ्मात्र करावयाचें नाही. मला माझ्यापुरतेच दोन शब्द लिहावयाचे आहेत.

'संजीवनी 'च्या २ऱ्या व ३ऱ्या अंकांत माझा 'नवमतवाद' हा लेख प्रसिद्ध झाल्यावर त्यावर बरीच अनुकूल-प्रतिकूल टीका झाली व त्या योगाने अप्रत्यक्ष रीत्या कां होईना पण नव-मतवादी विचारसरणीचा एक पक्ष, अल्पसंख्यां-कच का होईना पण महाराष्ट्रांत अस्तित्वांत आहे ही गोष्ट ओघानेंच बाहेर आली. कोण-त्याहि पक्षाचें अस्तित्व हें त्याच्या संख्येवर अवलंबून नसून, तो पक्ष ज्या तत्वांच्या भूमिकेवर उभा आहे त्या तत्वांवर, व त्या तत्वाच्याकरिता प्रसंगीं खडतर स्वार्थत्याग करण्याची पुढारी व अनुयायांची तयारी, ह्यांवर आहे.



'नवमतवाद' हा लेख प्रसिद्ध झाल्यावर व्यक्तिशः माझेसंबंधी बरेच गैरसमजुतीचे ढग निर्माण झालेत, व एक-दोन हित शत्रूंनी तर बुद्धिपुरस्सर प्रयत्न केलेत. परंतु कांही काला-नंतर कां होईना पण नवमतवादाचें खरें स्वरूप लोकांना कळून येंत चालल्यामुळे गैरसमजुतीचे ढग आतां वितळत आहेत. नवमतवाद ह्मणजे कांही धर्मबुडवेपणा स्वैराचार किंवा कोणत्याहि तऱ्हेचा अविचार नव्हे, तर सामाजिक प्रगतीच्या दृष्टीनें सामाजिक व धार्मीक अनिष्ट रूढींत कालमानाप्रमाणें फेरफार किंवा बदलाविषयी प्रामाणिक मत प्रतिपादन करणें होय.

बार्शीचे 'वीरशैवगर्जना' कार श्रीगुरु परां-डकर हे येथे आले असतांना स्थानिक १-२ व्यक्तींनी आमचेविषयीं व आमचे लिखाणा-विषयीं गैरसमज उत्पन्न करण्याचा आटोकाट प्रयत्न केला व "धोधरी धर्म बुडवण्याच्या व जंगमवर्ग नाहीसा करण्याच्या मागे आहेत" अशीहि भली-बुरी त्यांची समजूत करण्याचे प्रयत्न झालेत. परंतु प्रत्यक्ष स्वामी-च्या व आमच्या भेटींत नवमतवादाचें वास्तव स्वरूप त्यांना आह्मीं समजून दिल्यावर त्यांना आमच्या प्रामाणिकपणाची खात्री वाटली व जो कांही मतभेद आहे तो धर्म व जंगमवर्गाच्या सुधारणेच्या प्रामाणिक हेतुमुळेंच आहे अशी त्यांची खात्री पटली व त्यांनी ह्याबद्दल माझे-संबंधीं खाजगी रीत्या व जाहीर सभेंतूनहि गौरवपूर्ण उद्गार काढले. ह्या उद्गारांबद्दल मी श्रीगुरूपरांडकर स्वामीचा अत्यंत आभारी आहें, व हा गौरव माझा व्यक्तीचा नसून आमच्या प्रामाणिक मताचा व कार्याचा आहे असें मी समजतों. ह्या गोष्टीचा येथे मुद्दाम उल्लेख करण्याचें कारण एवढेंच कीं, वैयक्तिक द्वेषाने पछाडलेल्या कांही महानुभावांनी श्रीगुरु-परांडकरासारख्या थोर पुरुषांचा "नवमतवाद व नवमतवादी" ह्यांचेसंबंधी बरी गैरसमज करून देण्याचा प्रयत्न केला व त्यांत खाजगी गोष्टींचाहि अनावश्यक उल्लेख करून भर घाल-ण्यांत आली होती,--तरी अखेर खरी वस्तुस्थिति स्वामींचे निदर्शनास आल्यावर जी त्यांची फट-फजिती व हसें झालें ह्यावरून एकच धडा आम्हाला शिकावयाचा आहे कीं, लोकांनी आपले

संबंधी व आपल्या मतासंबंधी व्यक्तिद्वेषाला बळी पडून स्वार्थपरतेने कितीहि गैरसमज केला तरी आह्मी जर आपल्या मताशीं प्रामाणिक असलों तर कालांतराने गैरसमजाचें ढग वितळून गेल्यावर आमचा विजय हा ठेवलेलाच आहे.

'वी. संजीवनी 'चे संपादक दे. भ. नानासाहेब वामणगांवकर हे नवमतवादी नाहीत, ते सुधारणावादी आहेत. तत्वतः सुधारणावादी व नवमतवादी ह्यांत भेद नाही. तपशिलावद्दल काय तो थोडासा फरक आहे व ह्याचें स्पष्टिकरण "सुधारणावाद व नवमतवाद " ह्या लेखांतून मी पुढेंमागे करीन. तत्वतः आह्मी सर्व एकच असल्यामुळे दे. भ. नानासाहेबांच्या मार्गदर्शकत्वाखाली आह्मी कार्य करीत आहोंत व पुढेंही करूं! तेव्हां सुधारणावादी, व नवमतवादी एकमेकाचे सहकारी कसे हें कोडें कुणालाहि पडावयाला नको.

गेल्या वर्षी 'संजीवनी '-तून बऱ्याच लेखक व लेखिकांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत व ह्या सुधारणावादीलेखांतून पुढील महत्वाचे प्रश्न समाजापुढें चर्चेला आले आहेत. १ जंगमवर्ग व मठसंस्थांची सुधारणा; २ आमच्या विवाहपद्धतींत सुधारणा; ३ पोट-जातींचें एकीकरण, रोटी व बेटीव्यवहार. 'वी. संजिवनी'तून काल उत्पन्न केलेल्या प्रश्नांचा आज विचार करून, व आवश्यक तो समाजव्यवस्थेंत बदल करून, उद्याची समाजव्यवस्था सुधारलेली कशी दिसेल एवढीच आज आपण काळजी घेणे भाग आहे.

ह्या दृष्टीनें विचार केला असतांना सामाजिक परिषदांतून ह्या प्रश्नावर चर्चा होऊन ठरावाच्या रूपानें समाजांत अम्मलबजावणी होणे आवश्यक आहे. मार्च महिन्यांत तळेगांव येथे भरणाऱ्या यवतमाळ जिल्हा परिषदेचें कार्यक्षेत्र त्या दृष्टोनें मर्यादित आहे. पण त्यानंतर लौकरच भरणाऱ्या कारंजा येथील वऱ्हाड-मध्यप्रांतीय परिषदेंत ह्या प्रश्नावर जरूर चर्चा होईल असें आम्हाला वाटतें. पिंजरचे श्री. वैजिनाथआप्पा कापसे ह्यांनी पोट-जातीविषयीं लिहितांनां लिहिलें आहे कीं, शिलवंत दिक्षवंत व पंचम "ह्यांचादेखील कांही कांही ठिकाणी अन्नव्यवहार बंद आहे" अशा तऱ्हेची परिस्थिती पाहुन पोटजातीचे एकिकरणाबाबतीत कमाल नसली तर निदान किमान मर्यादा अधिकृत रीत्या एकाद्या परिषदेंतून ठरावाचे रूपानें ठरविण्याची वेळ आली आहे. कारंजा-परिषदेच्या अध्यक्षस्थानीं धुळयाचे श्रीमंत सिद्धाप्पाअण्णा मोगलाईकर ह्यांची योजना होऊन त्यांचे नेतृत्वाखाली ह्या व इतरहि सामाजिक प्रश्नाचा निकाल लागला तर तो आवश्यक आहे. परिषदेच्या वेळीं वऱ्हाड-मध्यप्रांत खानदेश व इतरहि भागांतुन प्रतिष्ठित व वजनदार कार्यकर्ते पुढारी मंडळी जमतील व श्रीमंत सिद्धाप्पा अण्णासारख्या खानदेशविभागांतील कार्यकर्त्या व वजनदार पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली जे कांहीं ठराव पास होतील त्यांना एक तऱ्हेचे अधिकृत स्वरूप प्राप्त होऊन सर्व वीरशैव त्याला मान्यता देतील. तरी कारंजा-परिषदेच्या स्वागतमंडळीनीं आमच्या वरील सूचनेचा विचार करावा अशी नम्र विनंती आहे.

'वी. संजिवनी 'चे पुनः प्रकाशन करण्याविषयीं दे. भ. नानासाहेबांना ज्या वेळीं आह्मीं जाहीर विनंती केली तेवेळीं त्यांनी ३०० वर्गणीदारांची अट घातली होती व प्रभुकृपेनें ती अट आह्मीं ठराविक कालापूर्वी पूरीहि केली; परंतु अनुभवाने 'वी. संजिवनी'ला टिकाऊ व कायमचें स्वरुप प्राप्त होण्याकरितां

५०० वर्गणीदारांची आवश्यकता असल्याचें कळून आलें. ३०० वर्गणीदार पुरे कराव-याच्या वेळीं खानदेशविभागातून श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर, बाबुराव वाळाप्पा कॉंट्रॅक्टर, निजाम प्रांतातून मोमीनाबादचे श्रीमान व्ही. एम शेटे वकील, उदगीरचे श्रीमान संग्राम आप्पा व प्रभुराव वकील, बुलडाणा जिल्ह्यांतील श्रीमान राम-भाऊ शेट कुल्ली, रोहिणखेडकर, व चिखलीचें श्रीमान गोविंदराव शेंद्रे, यवतमाळ जिल्ह्यातील पारव्याचे जहागिरदार श्रीमंत बाबासाहेब देशमुख व पुसदचे श्री. आप्पासाहेब एकबोटे वकील वगैरे मंडळींनीं आपुलकीच्या भावनेनें 'वी. संजिवनी'चे वर्गणीदार वाढविण्याबाबत सक्रिय मदत केली. आतां तर 'वीं. संजीवनी'चा आकारहि दीडपट वाढविला आहे. हें धाडस साहजिकच वरील व इतरहि आमचे कार्यावि-षयीं सहानुभुति बाळगणाऱ्याच्या मदतीच्या अपेक्षेवरच केलें आहे. तरी वरील सर्व सन्माननीयांना व इतरांनाहि पूर्वी प्रमाणें 'वी संजीवनी'वर प्रेम करून सक्रिय सहानुभूतीची विनंती केल्यास खास अस्थानी होणार नाहीं.

---

# वीरशैवांतील चळवळी

**बार्शी**—निझाम प्रांतातील वीरशैव पुढारी व प्रसिद्ध समाजकार्यकर्ते श्रीमान संग्रामआप्पा शेटकार वकील, प्रभुराव वकील, व शंकरराव वकील वगैरे उदगीरच्या मंडळींनी बार्शी येथील 'वीर-शैव गर्जना' ऑफिस व लिंगायत बोर्डिंगला ता. १५-१२-३६ रोजी भेट दिली, व समयोचित भाषणें केली.

**सोलापूर**:—बार्शीहून उदगीरची पुढारी मंडळी सोलापुरास आली. तेथें ता. १७-१२-३६ रोजी कुंठोजी मठांत ६॥ वाजतां सायंकाळी श्री. संग्रामअप्पा शेटकार ह्यांचें हिंदींत "वीर-शैव संस्कृति" ह्या विषयावर भाषण झालें. व त्यांचेनंतर कर्नाटकगांधी श्री. मंजप्पा अण्णा हार्डीकर ह्यांचेंहि स्फूर्तिदायक भाषण झालें.

**सोलापूर**:— श्रीमन्महाराज निरंजन जग-द्गुरु श्रीजयदेव मुरुघराजेंद्र महास्वामी संस्थान चित्रदुर्ग यांच्या सुवर्णरजतांदोलिकोत्सवानि-मित्त ता. १७ रोजी आढव्या पालखीची मिर-वणूक अपूर्व यशस्वितेनें पार पडली. मिरव-णूकीत ४०००० हजार लोकांनी भाग घेतला होता. त्यांत १५ हजार वीरशैवहि होते असें समजतें.

**चांदा**:— वीरशैवसमाजातील एक लेखक व कार्यकर्ते श्री. कृष्णाप्पा सद्राप्पा कल्हरे ह्यांना मध्यप्रांत-सरकारने जिल्हा-कौंसिलचे सभासद म्हणून नेमले ह्याबद्दल आम्ही त्यांचें जाहीर अभिनंदन करतों.

**यवतमाळ जिल्हा परिषद:—** यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषदेचें अधिवेशन तळेगांव येथे ता. ६ मार्च १९३७ रोजी भरणार आहे. स्वागतमंडळाच्या गेल्या बैठकींत पूर्वी जाहीर केलेले परिषदेचे नियोजित अध्यक्ष अमरावतीचे श्री. सिद्धराम स्वामी मांजलगांवकर ह्यांना कांही कारणास्तव बदलून त्यांचेऐवजी वीरशैवसमाजाचे सन्माननीय पुढारी रोहिणखेडकर श्रीमंत रामभाऊ शेट कुल्ली ह्यांची अध्यक्षपदाकरितां एकमताने निवड केल्याचें समजतें.

## शोचनीय निधन

रोहिणखेड येथील वीरशैवसमाजांतील सुप्रसिद्ध सावकार श्रीमंत लक्ष्मण विठोबा शेट कुल्ली हे आपल्या वयाच्या ५१ व्या वर्षी ता. ११-१२-३६ ला सायंकाळी ६ वाजता कैलासवासी झाले! हे बरीच वर्षे शाळा-कमिटीचे अध्यक्षपदावर काम करीत होते. त्यांच्या स्वभावमाधुर्याचा लौकिक आसपास सर्वत्र पसरलेला आहे. वीरशैवसमाजांतील एक हिरा तर गेलाच पण रोहिणखेड्या जनतेचा पोशिंदाहि नाहीसा झाला!

### श्रीगुरु० गंगाधर स्वामींचें शिवैक्य

वऱ्हाडातील वीरशैवसमाजांतील सर्वांत जुने व पहिल्या दर्जाचे मठसंस्थान साखरखर्डा ह्या गादीवरील श्रीगुरु गंगाधर स्वामी हे नुकतेच शिवैक्य झाल्याचें वृत्त समजतें. स्वामीची अखेरची वर्षे मठसंस्थानच्या पंचाशीं झगडण्यातच गेली व त्यामुळे त्यांना बऱ्याच कष्टांत दिवस काढावे लागले. स्वामीचा शिष्यवर्ग बराच मोठा आहे. पहिल्या दर्जाच्या ह्या मठसंस्थानाचे भांडणापायी वाईट परिस्थिति झाली होती. निदान आतां तरी पंचांच्या देखरेखीखाली सर्व कारभार सुरळीत चालून संस्थानचें भरभराट होवो असें आम्ही इच्छितों.

**शोचनीय निधन:——** धामणगांव (बडा) वऱ्हाड येथील श्रीमंत व वीरशैवांतील धडाडीचे तरुण पुढारी श्री. जानकीरामशेट चोपडे हे २३-११-३६ रोजी लिंगैक्य पावले हें कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें. कै. जानकीरामशेट हे मोठे धर्माभिमानी व पहिल्या प्रतीचे मोठे व्यापारी होते. त्यांच्या निधनाबद्दल ठिकठिकाणी सर्व व्यापाऱ्यांनी हरताळ पाळला होता. परमेश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो.

### वीरशैवखेळाडूंचें फैजपूरास गमन

फैजपूर-कॉंग्रेस-स्वागतमंडळाचे खास निमंत्रणावरून शारीरीक खेळाचे प्रदर्शनार्थ येथील सुप्रसिद्ध हनुमान-व्यायाममंडळास निमंत्रण आलें होतें. ता. २६-१२-३६ रोजी सकाळचे गाडीने ह. व्या. मंडळांतील ५०० खेळाडू गेले. त्यांत श्री. सिद्धरामस्वामी मांजलगांवकर, श्री शंकर आप्पा रामाप्पा गदगकर, श्री महादेव आप्पा चनबस आप्पा एलगुंदे व श्री. नारायण आप्पा गुढे हे चार वीरशैव तरुण खेळाडूहि होते.

स्टेशनवर ह्या मंडळींना मोठ्या उत्साहानें लोकांनी निरोप दिला.

### हुबळी वीरशैव तरुण संघानी केलेला ठराव

१ श्रीमन्निरंजन बिळूर गुरुबसवस्वामी यांच्या निधनाबद्दल दुःखप्रदर्शन. २ वीरशैव धर्मनिष्ठ तत्वप्रचार ३ वीरशैवांच्या पोटजातींचें एकी-

करण. ४ वीरशैवांच्या धंद्यावर उच्चनीचपणाची भावना करु नये. ५ बालविधवेचे पुनर्विवाह करणें व त्यास शुद्ध विवाह मानणे ६ नवीन योजनेत वीरशैवाना कांहीच लाभ नाही याबद्दल विषाद व्यक्त करणे.७ वीरशैव कीर्तनकेसरी शिवमूर्ती शास्त्री हुमकूर याना निजाम प्रांतात

## वाचकांना सूचना

### पुढील अंकीं

आमचे परमस्नेही सोलापुरचे डॉ. जगदेवराव देशमुख ह्यांनीं खऱ्या माहितीचा व समतोल वृत्तीचा सोलापूर येथील चित्रकलदूर्ग महास्वामीच्या आगमनांतील घोटाळयावर लेख पाठविला आहे. तो पुढील अंकीं प्रसिद्ध होईल.

संपादक,– 'वी. संजीवनी'

येण्याची मनाई करण्यात आली आहे तरी मनाई हुकुम रद्द करण्याबाबत निजाम-सरकारांना ही सभा विनंती करीत आहे.८ महासभेचे चिरस्थाई फंड ७५ हजारावर गेले आहेत तरी त्यांतील थोडा भाग या सभेस मिळावा ह्मणून विनंती. याबाबत १ मंडळ नेमण्यात आलें आहे. ९ प्रत्येक तालुक्यात कलाकौशल्यशिक्षण तरुण संघाकडून देण्यात यावें. वाचनालय स्थापून समाजास साक्षर बनविणे. स्त्रीशिक्षण. १० शुद्धी मतांतर केलेल्यांना स्वधर्मात घेणे. इतर जातींची लींगायत होण्याची इच्छा असल्यास शिवदीक्षा देऊन लिंगांगीबनविणे. पंक्तिरहिताना पंक्तिपावन करुन घेणे११ जुने ग्रंथ (हस्तलिखित). शोधून पारवाड वाङ्मयसमितीकडे पाठवणे. १२ पास झालेलें ठराव अमलांत आणण्याकरिता १ मंडळ नेमणे. १३ वीरशैवांच्या संपादकत्वाखाली चाललेल्या वृत्तपत्रांना तरुणसंघांनी प्रोत्साहन द्यावें. २४ जातिभेद कल्पिणाऱ्या पंचाचार्य प्रथेचा व तदनुयायी व्यक्तींचा ही सभा निषेध करीत आहे.

## 'वीरशैव संजीवनी'चें कार्य

श्री. गु. मू. राचलींग शिवाचार्य परांडकर संपादक 'वीरशैव गर्जना' आपल्या आशीर्वादात्मक पत्रांत लिहतात:-- "वऱ्हाड प्रांतातील रा. रावतीस दे. भ. ना. रा. बामणगांवकर यांनी चालविलेल्या 'वीरशैव संजीवनी'ला पहिलें वर्ष संपून ती दुसऱ्या वर्षांत पदार्पण करीत आहे. यापूर्वी ही संजीवनी सुरु होउन २ वर्षे राहून ती बंद पडली. तथापि वऱ्हाड प्रांतीय लोकांच्या सल्ल्यावरुन ती पुन: चालू झाली. त्याबद्दल संपादक आणि आणि सहायक यांचें अभिनंदन करणे जरुर आहे.

'संजीवनी'ची एक वर्षाची कामगिरी वाचकवर्गासमोर आहे.' जुन्या संजीवनीचा नवा अवतार' या लेखांत दे.भ. बाबासाहेबांनीं जे विचार प्रकट केले त्यास अनुसरुन विरक्त पंचाचार्यवाद मिटविण्यासंबंधी त्यांचेकडून जरी योग्य कामगिरी झाली नसली तरी यापुढें त्यांच्या कडून तें कार्य घडून येईल अशी आह्मास आशा आहे.

श्री. बामणगांवकर यांचा नवमतवादाकडे ओढा असल्यामुळे त्यांच्याशीं आमचा तत्वाचा भेद असला, त्यांचीं कांही मतें आचार्यपरंपरेला सोडून असलीं, वीरशैवांत त्रैवर्ण्य सिद्ध करण्यास तयार असले, किंवा पोटजातींतील ऐक्यासंबंधी त्यांचे निराळे विचार असले,तरी ते कांही दिवसांनी पूर्वस्थळावर येतील अशी आमची पूर्ण खात्री आहे.

दे. भ. नाबासाहेबांचें बहुतेक आयुष्य राजकीय उलाढालीत गेल्यामुळें धार्मिक ग्रंथ त्यांच्या वाचनांत आले नाहीत अथवा त्याना फुरसत मिळाली नाही. तथापि त्यांच्या तत्वात यापुढें बदल होईल यात बिलकुल संशय नाही. प्रस्तुतच्या विरक्त पंचाचार्य वादांत आह्मी न शिरतां त्यापूर्वीचा शोध करुन जेणे करुन समाजांत संघटन होईल असें त्यांनीं आश्वासन दिलें होतें. तें अद्यापि अमलांत आलें नाही याबद्दल आह्मास खेद वाटतो. तथापि ते प्रामाणिक बुद्धीने यत्न करतील अशी आमच्या वीरशैव बंधूंनी आशा धरुन 'संजीवनी'स साहय करुन तिला भरभराटीस आणण्याची बुद्धि त्यांना श्री जगदाचार्य देवोत, आणि त्यांच्या आशीर्वादाने 'संजीवनी' चिराय होवो अशी आशा प्रदर्शित करतों"

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ फेब्रुवारी १९३७ ( अंक ३ रा

## ❀ अनुक्रमणिका ❀



दुरुस्ती:— ह्या अंकांत 'अज्ञानाचा कळस' हा लेख ज्या पृष्ठावर सुरु होतो त्या पृष्ठावर व त्यापासून पुढील आठ पृष्ठांवर अनुक्रमांक चुकून ५७ ते ६४ पडले; ते अनुक्रमे ५९ ते ६६ असे वाचावे.

वार्षिक वर्गणी २॥ रु. ❋ किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरूं करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असुन वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जूनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी, हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रातील वीरशैवांच्या सर्व हालचालीची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वांखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

# चित्रकलदुर्गचे महास्वामी



श्रीजगद्गुरु शून्यसिंहासनाधीश सुरघीराजेंद्र

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति माघ व० ६ शके १८५८ ( अंक ३ रा.

# 'सुदर्शन'च्या आव्हानाचा स्वीकार

चित्रकलदुर्गांचे महास्वामी सोलापूरांत आल्यावर सोलापूरच्या वीरशैव-बंधूंत फाटाफूट झाली ही गोष्ट कोणत्याहि प्रकारानें कां होईना पण आतां सर्वत्र महशूर झाली आहे. ह्यासंबंधाने एका पक्षाच्या वतीनें कां होईना पण जी माहिती आम्हास मिळाली त्या माहितीवर आम्हीं आपले विचार ता. १ जानेवारीच्या ' वीरशैव संजीवनी 'मध्ये स्पष्ट केले. असें करण्यापूर्वी दुसऱ्या पक्षाची माहिती मिळविण्याचा आम्हीं प्रयत्न केला नाही असें नाहीं; परंतु आमच्या दुर्दैवाने त्या प्रयत्नास यश आलें नाही एवढें मात्र खरें. पाक्षिक पत्रकार ह्या नात्याने, दुसऱ्याही पक्षांची माहिती यावी म्हणून आम्ही वाट पाहिलो. त्या-करितां एक अंक आम्ही तसाच जाऊं दिला. ह्यापेक्षा अधिक वाट पहाणें योग्य नाहीं असें समजून ' सोलापूरांत चित्रकलदुर्गमहा-स्वामी ' हा लेख आम्हीं लिहिला. हा लेख जरी आम्ही एकतर्फी माहितीवर लिहिला तरी त्यांतील सिद्धान्त कांही चुकले नाहीत ही गोष्ट पुन्हाहि स्पष्ट शब्दानें सांगावीशीं वाटते. सोलापूरच्या ' सुदर्शन ' ला मात्र आमचा हा लेख पक्षपाताचा व असत्यावर उभा-रलेला भासला आणि ता. ११ जानेवारीच्या 'सुदर्शन'ने 'वीरशैव संजीवनी' ला आव्हान दिलें. हें आव्हान कशाकरतां दिलें हें अजून आम्हाला कळत नाही. आम्हीं आपला सरळ मार्ग आक्रमीत असतां ' सुदर्शन ' ला आम्हाला आव्हान देण्याची लहर आली एवढाच आम्हाला आव्हानाच्या लेखाचा तात्पर्यार्थ वाटतो.

## आमचा शुद्ध हेतु

कौरवांनी पांडवांना जुगाराचें आव्हान केलें. जुगार हे त्या वेळी युद्ध मानलें जात असे आणि युद्ध तर वीरांचा धर्म असे. ह्यामुळें पांडवांना कौरवांच्या जुगाराचा स्वीकार करावा लागला. वर्तमानपत्राच्या धंद्यातहि आव्हान हा एक प्रकारचा युद्धधर्म आहे व त्याचा स्वीकार हा

करावाच लागतो. आम्ही 'सुदर्शन' च्या आव्हानाचा स्वीकार केला खरा; पण तो त्यांच्याशी दोन हात खेळून त्याला चीत करण्याकरितां नाही; तर त्याला आपलेसे करण्याकरितां. निदान आत्मदर्शन घडविण्याकरितां. कारण 'सुदर्शन', 'वीरशैव संजीवनी' व 'वीरशैव-गर्जना' असे आम्ही सर्व एकाच समाजाचे, एकाच समाजांतील, बरोबरीच्या दर्जाचे घटक आहोंत. एकाच समाजांतील दोन घटकांनी एकमेकांना नाहींसें करण्याची वृत्ति प्रगट करणें हें आम्ही निंद्य समजतों. तात्पर्य काय कीं, आपसांत युद्ध लागावें, अंतर्गत कलहानें समाज नष्ट व्हावा, ही कल्पनाच मुळी 'वीरशैव संजीवनी' ला रुचत नाहीं. म्हणून 'सुदर्शन' च्या आव्हानाचा आम्हीं स्वीकार करतों खरें व केलाहि आहे; पण त्यांत कलह वाढावा-कलह पेटावा ही मात्र आमची भावना नाही, असें 'सुदर्शन' ला प्रथमच स्पष्ट कळविणें इष्ट आहे.

## महास्वामींविषयींची भावना

विरक्तसिंहासनाधीश व पंचाचार्यसिंहासनाधीश ह्या उभयतांनाहि आम्ही शिरसावंद्य मानतों. पण हें आमचें वंदन वहिवाटीच्या अधिकाराला आहे, व्यक्तीला मात्र खास नाही. आम्ही व्यक्तिपूजन करूं व करावें असें म्हणूं. पण तो प्रसंग निराळा असतो. जगद्गुरुत्वाच्या पूजनांत समाजघटनेचें पूजन असते; व्यक्तीचें नसतें. आणि ह्याच विचाराने प्रेरित होऊन आम्हीं 'सोलापूरांत चित्रकल-दुर्ग महास्वामी, हा लेख लिहिला होता. त्यांत मात्र आमच्याने 'सुदर्शन' च्या मतें दोन अक्षम्य अशा चुका झाल्या. झालेली चूक कबूल न करणें हें सुज्ञांचें कर्तव्य नव्हे. सुमारे, पंचवीस वर्षापूर्वी चित्रकलदुर्ग महास्वामी जेव्हा सोलापूरांत, आलें होतें तेव्हा कै. आप्पासाहेब वारद जिवंत होते हें आह्मी गृहित धरलें ही आमची पहिली अक्षम्य चूक होय असें 'सुदर्शन' ह्मणतो. पण ती आभासात्मक चूक आहे. आणि ती कै. आप्पासाहेब वारद ह्यांचें वैभव, चातुर्य आणि समाजाविषयीं कळकळ अजून आह्मास ताजी आहे ह्मणून झालेली असली तर झाली असेल व होईलहि. पण एवढ्या चुकीवरून आमचा लेख महास्वामीविषयी कलुषित बुध्दीनें लिहिल्या गेल्याचा जो मात्र 'सुदर्शन' नें आरंभीच करून घेतला त्याला काय अर्थ आहे हें मात्र आह्मास कळत नाही.

## कै० वारदांचें अस्तित्व

'वीरशैव समाजाचे जगद्गुरु म्हणविणारे महास्वामी प्रथमच संचारार्थ निघाल्यामुळे कर्नाटक व महाराष्ट्र ह्यांतील सर्व प्रकारची वीरशैव जनता महास्वामींच्या सत्कारार्थ अत्यंत उत्साहाने व जीवेंभावें झटत असल्याचा प्रत्यय येत होता' असें वाक्य प्रथमच आम्ही लिहिलें आहे. अशा स्थितींत श्रीकरितां व श्रीमुळें पंचवीस वर्षांपूर्वीचा सोलापूरचा समारंभ झाला नाही असा अर्थ कसा निघतो? 'पण त्यांच्यासारखें (कै. आप्पासाहेब वारदासारखे) प्रमुख नेते व त्यांचें सरकारी दरबारी वजन असल्यामुळेंच (पंचवीस वर्षांपूर्वीचा महास्वामीचा सोलापूरचा सत्कारसमारंभ) झाला. श्रींच्याकरितांच म्हणून झाला नाही असें भासविलें आहे.' असा 'सुदर्शन' नें आमच्यावर आरोप केला आहे. आणि हा आरोप आमच्या ज्या वाक्यावरून केला तें वाक्य असें:— 'सोलापूर हें महाराष्ट्रांतील प्रमुख शहर. तेथें वीरशैवसमाजाची वस्तीहि मोठी आणि कै. रा. ब. आप्पासाहेब वारदासारखे वीरशैवांचें प्रमुख नेते राहात असल्यामुळें व त्यांचे सरकार-दरबारी आणि इतर वर्गातो ह्यांवर वजन असल्यामुळे महास्वामींच्या आगमनास विशेषच महत्व प्राप्त झालें होतें.' आमचें हें सरळ व बालबोध मराठी वाक्य जर 'सुदर्शन' ला कळलें असतें तर त्यांना भलताच भास उत्पन्न झाला नसता. एक तर कै. वारद त्या वेळी हयात होते असा त्याचा अर्थ होत नाही. त्यांच्यासारखे प्रमुख नेते रहात असलेलें शहर म्हणून सोलापूर शहराचें तें वर्णन आहे. आप्पासाहेब वारद त्या वेळी हयात नसतील. पण त्यांच्यासारखे वीरशैवांतील नेते तेथे त्या वेळी हयात नव्हते असे 'सुदर्शन' ची समजूत कधी झाली कोणास ठाऊक.

## पंचवीस वर्षापूर्वीचें सोलापूर

' सुदर्शन '-कारास मराठी कळत असेल तर त्यांनी वरील वाक्यांतून सदर प्रसंगीं कै. वारद हयात होते असा अर्थ कसा निघतो हें स्पष्ट करून सांगावें. त्यांच्यासारखे नेते त्या वेळी सोलापुरांत रहात होते व त्या सर्वांनी एकोप्यानें महास्वामींचें स्वागत केलें आणि त्यामुळे महास्वामींच्या आगमनास त्या वेळी विशेषच महत्त्व प्राप्त झालें होतें ' असें विवविणें हा आमचा स्पष्ट हेतु. सदर वाक्यांचा अर्थ लक्षांत घेणारांना व मराठी समजणारांना ह्यांत कांहीच विकृत वाटावयाचें नाही. पण श्री पेक्षा आम्ही कै. वारद ह्यांनाच अधिक महत्व दिलें असा ' सुदर्शन 'ने खोटा भास करून घेतला आणि त्याकरितां कै. आप्पासाहेब वारद हयात होते असें खोटें लिहिल्याचा त्यांनी नुसता आरोप आमच्यावर केला. कै. वारद त्या वेळी हयात आहेत असा अर्थ जरी केला तरी ' सुदर्शन 'चें विधान खरें कसें ठरतें हें मात्र आम्हाला कळत नाही. वास्तविक कै. आप्पासाहेब वारद त्या वेळी हयात होते हें आम्हीं लिहिलेंच नाही. पण आम्हीं असें लिहिल्याचा खोटा आरोप ' सुदर्शन 'ने केला. पण मी हा खोटा आरोप केला आणि त्यांतून त्या वेळच्या सोलापुरची बदनामी करण्यांस सहाय्य केलें हें मात्र 'सुदर्शन' कबूल करावयाचा नाही. कै. वारद त्या वेळेला हयात नसतील. पण त्यांच्यासारखे नेते त्या वेळेला सोलापूरांत राहात नव्हते असें का ' सुदर्शन ' चें मत आहे ? असें त्यांचें मत नसतें तर खऱ्याचा खोटा अर्थ करण्याचें त्याला काय कारण होतें ?

सोलापूरचे



( श्रीमन्निरंजन निजगुणस्वामी )

आमच्या लिहिण्यांत खोटेपणाचा अंश असेल तर आम्ही अक्षम्य अपराध केला अशी आनंदानें कबूली द्यावयास प्रांजलबुद्धीने अगोदरच कबूल झालों. खोटेपणा आमच्याकडून झाला नाहीं ही आमची खात्री असतानांहि आम्ही कबूल झालों. पण ' सुदर्शनचा ' खोटेपणा ' सुदर्शन ' च्या पदरांत घातल्यावर ' सुदर्शन 'ने तशी कबूल कां देऊं नये ?

### ' सुदर्शन 'ची मासलेवाईक स्वामिभक्ति

' सुदर्शन ' कार चित्रकलदुर्ग महास्वामीचे भक्त आहेत. आम्हींहि भक्तच आहोंत. पण ' सुदर्शन ' च्या भक्तींत जें नातें चिकटलेलें आहे तें आमच्या भक्तींत चिकटलेलें नाही एवढें मात्र खरें. ह्यामुळे महास्वामीचा गौरव वाढविण्यांची जबाबदारी आमच्यापेक्षा त्यांच्यावर अधिक आहे. ह्या दृष्टीनें आमच्या लिखाणाचा त्यांनीं विपरीत अर्थ करणें योग्य नाहीं. ज्या कै. आप्पासाहेब वारदांच्या चातुर्यानेंच प्रस्तुत स्वामीस चित्रकलदुर्गचे महास्वामीपद प्राप्त झालें त्या स्वामीचा गौरव आप्पासाहेब वारदामुळें झाला असें आम्हीं लिहिलें असतें तरी त्यांत ' श्री ' च्या पदाला कमीपणा काय होता ? उलट श्रींना ही जाणीव आहे व ह्याबद्दल कै. वारद व त्यांचें कुळ ह्यांच्याविषयीं श्रींना विशेष आपलेपणा वाटतो हेंहि तितकेंच खरें. अशी वस्तुस्थिती असताना पंचवीस वर्षापूर्वी सोलापुरी आप्पासाहेब वारदांच्या वजनामुळे श्रींचें स्वागत झालें असें कोणी ह्मटलें तर त्यांत श्रींना कमीपणा आहे असें ज्या ' सुदर्शन 'ला वाटतें तें ' सुदर्शन :

महास्वामींचा गौरव वाढवीत आहे असें कसें ह्मणावें ? कां पंचवीस वर्षापूर्वी कै. आप्पा-साहेब वारद तर नव्हतेच नव्हते, त्यांच्यासारखे वीरशैव नेते ह नव्हते व होते ते सारे बाजार-बुणगेच होते असें मानून आज 'सुदर्शन' आहे ह्मणूनच महास्वामींचे स्वागत सोलापूरांत झालें असें 'सुदर्शन'ला सुचवावयाचें आहे? हा ध्वनि जर 'सुदर्शन'- मधून उमटावयाचा नव्हता तर आमचें साधे वाक्य खोटया माहितीने भरलेलें आहे असें त्याला भासलें नसतें. आणि त्यांत आप्पासाहेबांचाच गौरव आहे, महास्वामींचा गौरव नाही असा 'सुदर्शन'ला भास झाला नसता.

## 'सुदर्शन'चें कमालीचें धैर्य

'सुदर्शन'नें ज्या आमच्या चुकीवर आपलें आव्हान उभारलें तो त्यांचा पायाच वरप्रमाणें ढासळून पडल्यामुळे त्यांच्या लिखाणांतील एकच आमच्यावरील आक्षेप शिल्लक राहतो व त्याचाच विचार आतां करूं. 'विशिष्ठ व्यक्तींनी विशिष्ठ जागेंत जमण्याचा हट्ट धरावा ही गोष्ट विशिष्ठ हेतूशिवाय शक्य आहे काय?' असें वाक्य आह्मी 'सुदर्शन'नें ह्मणून उद्धृत करून त्यावर जें भाष्य केलें तें 'सुदर्शन'ला झोंबलें. आणि त्यानें त्वेषाच्या भरांत 'सुदर्शन'मध्यें तें वाक्य कोठें आहे हें दाखविण्यास आम्हाला आव्हान दिलें. 'सुदर्शन' पत्रांत सदर वाक्य नाही हें खरें. परंतु 'सुदर्शन'कारांचें तें वाक्य नव्हेच असें म्हणावयाचें धाडस 'सुदर्शन'कार करणार नाहीत अशी मात्र आम्हाला खात्री आहे. सोला-पुरांत महास्वामींचें आगमन झाल्यावर घुम्मा पटणे ह्यांच्या सहीनिशीं रेवणसिद्धमंदिरांतील घोटाळयाचा वृत्तान्त प्रसिद्ध होतांच त्याला उत्तर देण्याकरितां 'सुदर्शन'कार श्री. कल्याण शेट्टी ह्यांच्या सहीनिशीं जें पत्रक बाहेर पडलें त्या पत्रकांतील, तें वाक्य आहे. सदर पत्रक श्री.बसव-प्रताप - छापखान्यांतच छापलेलें आहे.अर्थात् ज्या पत्रकाचा बसवप्रताप - छापखान्याशीं संबंध आहे, खुद्द 'सुदर्शन'काराशीं संबंध आहे, त्या पत्रकाचें 'सुदर्शन' कोणीच लागत नाही असें कसें सम-जावें ? हें पत्रक 'सुदर्शन'मध्ये प्रसिद्ध झालें नाही एवढें मात्र खरें. 'सुदर्शन' मध्ये हें पत्रक कां प्रसिद्ध होऊं नये ? 'सुदर्शन'काराच्या ह्या पत्रकांतील धोरण निराळें व 'सुदर्शन'चें धोरण निराळे असा भेद असेल तर प्रश्न वेगळा: तसा भेद आहे हें जोपर्यंत 'सुदर्शन' स्पष्ट करून सांगत नाही तोपर्यंत 'सुदर्शन'शीं सदर पत्र-काचा संबंध पोंहचत नाही असें म्हणण्यांत अर्थ काय ? ह्या बाबतींत आमची चुकी एवढीच कीं, 'सुदर्शन' असें लिहितें असें ह्मणण्याऐवजी 'सुदर्शन'कार असें लिहितात असें ह्मटलें नाही. एवढयाशा शाब्दिक चुकीवर कुभांड रचून 'सुदर्शन' मध्ये तें वाक्य कोठें आहे हें दाखवा ह्मणण्याचें 'सुदर्शन'नें धाष्टर्य करावें हें मात्र आश्चर्य आहे.

## सोलापूरची वस्तुस्थिती

'सुदर्शन'कारांच्या सहीनिशीं असलेल्या पत्रकांतील मतें निराळीं व 'सुदर्शन'मध्यें छाप-लेली वा प्रसिद्ध झालेलीं मतें निराळीं हा भेद आह्मास करितां आला नाही ह्याबद्दल वाईट वाटतें. पण आह्मीं उद्धृत केलेलें वाक्य खोटं आहे व तें 'सुदर्शन'काराच्या पत्रकांतील नाही व तें पत्रक श्री बसवप्रताप - छापखान्यांत छाप-लेलें नाही ही गोष्ट नाकारण्याचें धैर्य 'सुदर्श-न'ला आहे काय ? सदर पत्रकाचा 'सुदर्शन'नें स्वत: धिक्कार केला असता तर पंचाचार्यांच्या नावावर मार्थेफिरूप्रमाणें महास्वामींविरुद्ध पत्रकावर पत्रकें काढणारांना खात्रीनें ऊत आला नसता अशी सोलापुरची वस्तुस्थिति होती व आह्मी त्यानंतर तेथे गेल्यावर हीच वस्तुस्थिती स्पष्ट पाहिली आहे. रेवणसिद्धमंदिरांत झालेली चूक कोणाचीहि असो, पण ती विसरल्या गेली असती, आणि श्री. बाबासाहेब वारदाच्या येथील बिन्हावास जो अडथळा झाला तो झाला नसता आणि झालेला गोंधळ. ह्यानंतर जाहीर मिरवणुकीच्या वेळीं तरी सावरला गेला असता.

पण प्रश्नांतून प्रश्न उत्पन्न होत गेले आणि पुष्कळ वजनदार वीरशैव पुढारी महास्वामींच्या स्वागतापासून जे अलिप्त राहिले ते राहिले नसते. हे सर्वच पुढारी महास्वामीविरुद्ध होतें असें ह्मणावयास आह्मी तयार नाही. त्यापैकी बहुतेकांना महास्वामीविषयीं व त्यांच्या अधिकारांविषयीं आदर आहे हें आह्मी जाणून आहों. असे पुढारी महास्वामीच्या स्वागतापासुन अलिप्त राहणार नाहीत अशी खबरदारी घेणें महास्वामींच्या भक्ताचे व अभिमान्याचें कार्य होतें. असें करतांना स्वतःकडे लहानपण घेणें हेहि त्यांचें कर्तव्य होतें. पण हें कर्तव्य पार पडूं शकलें नाही ह्मणून सर्व घोटाळा झाला हें स्पष्ट आहे. हीच वस्तुस्थिति आह्मीं आपल्या लेखांत पुढे केली होती. पण ती 'सुदर्शन 'ला पक्षांधतेनें प्रेरित झालेली वाटली व वाटते.

## 'सुदर्शन'चा कांगावखोरपणा

पक्षांधता हा कांही दोष नव्हे. परंतु पक्षांधतेच्या नावाखाली एखादा मनुष्य पक्षाचाच घात करावयास प्रवृत्त झाला तर तें मात्र वाईट होय. पक्षांध मनुष्याची प्रत्येक कृति पक्षाला, पक्षाच्या नेत्याला, व पक्षाच्या तत्वाला पोषक असणें हेच खरी पक्षनिष्ठा होय. आणि ती निष्ठा अंध असली तर पक्षाला विशेष उठाव मिळतो ह्यांत संशयच नाही. ह्याच दृष्टीनें पक्षांधता हा दोष मानता येत नाही. पक्षांधतेच्या नांवाखालीं स्वतःचीच प्रतिष्ठा एखादी व्यक्ति मिरवीत असली तर ती व्यक्ति प्रत्येक पक्षाला त्याज्य वाटते. सध्याच्या विरक्तपंचाचार्य-वादांत आपला पक्ष व आपआपल्या पक्षांचीं तत्वें ह्यांकडे दृष्टि देऊन वागणारे लोक फारच कमी. स्वतः-वर दृष्टि देऊन वागणारेच अधिकच. ह्मणूनच हा वाद विकृत स्वरूपाला पोहचला. आणि त्यांचें विकृत स्वरूप कसें हास्यास्पद आहे हेंच आम्ही आपल्या लेखांत दाखविलें होतें. 'वीरशैव गर्जने 'चें स्वरूप व 'सुदर्शन ' चें स्वरूप ह्याकरितांच आम्हीं तुलनेंकरतां पुढे केलें होतें. पण 'वीरशैव गर्जने'नें आमच्या आरोपावर अजून उत्तर दिलें नाही. 'सुदर्शन 'ने मात्र 'सुदर्शन '-कार कल्याणशेट्टीचें पत्रक नाकारून 'सुदर्शन ' ह्यापासून अलिप्त आहे असें भासविण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न हुशार वकीलासारखा असता तर वकीलाच्या हुशारीचें तरी कौतुक केलें असतें. परंतु ज्या वकीलास आपल्या अशीलाचें खरें म्हणणें कळलें नसतें वा आपल्या बाजूला कांहीच पुरावा नाही असें वाटतें तेव्हा तो जसा कांगावखोरपणा करून आपली बाजू सावरण्याचा प्रयत्न करतो तशी 'सुदर्शन 'ची स्थिति झाली आहे. कै. बारद पंचवीस वर्षांपूर्वी महास्वामींच्या स्वागतार्थ जिवत होते असें आम्हीं म्हटल्याचा आमच्यावर खोटा आरोप करणें आणि 'सुदर्शन ' काराचें पत्रक हें 'सुदर्शन ' चें मत नव्हे हें दर्शविणें ह्याला कागावखोरपणाशिवाय दुसरा कोणताहि अर्थ नाही.

## 'सुदर्शन '- चें खरें मत

घुम्मा-पटणे ह्यांच्या पत्रकाला उत्तर देतांना 'सुदर्शन ' कार कल्याणशेट्टी ह्यांनी जें पत्रक काढलें त्या पत्रकातीलच उतारा 'सुदर्शन ' ह्या सदराखालीं आह्मीं दिला. सदर पत्रकांतीलच आवांतर भाग 'सुदर्शन 'नें आम्हाला आव्हान देणाऱ्या लेखांत सारांशरूपानें लिहिला आहे. तो असा—

"श्रीचें आज्ञापत्र ता. १०-११-३६ चें असून त्यांचें आगमन १७-११ ला झालें. एवढया अवधींत श्रींच्या स्वागतसत्कारार्थ ह्या पुढाऱ्यांनी कोणती योजना निश्चित केली? श्रींच्या आगमनाची बातमी सर्व समाजाला जाहीर करणें त्यांचें कर्तव्य असतां त्याप्रमाणे त्यांनी तें कर्तव्य बजावलें काय? श्रींना तरी शिष्टाचाराप्रमाणें पत्र-निरोप देऊन स्वागताची जागा वगैरे कळविली होती काय? असें कांही

न कळल्यामुळे श्रींनी सिद्धेश्वरदेवळांत आगमन होण्याबद्दलचा आपला स्वतःचा कार्यक्रम कळविला असतांहि तो न जुमानतां आपला निराळाच कार्यक्रम ठरविण्यात व तो श्रींनाहि कळविण्याचा शिष्ठाचार न पाळण्यांत श्रींचा अपमान नाहीं काय? शिवाय ही जी १४।१५ मंडळी श्रींच्या कार्यक्रमाचा अव्हेर करून × × × रेवणसिद्धमंदिरांत जमली ती स्वतःच्या मताने जमली कीं समाजाच्या वतीने जमली होती ? ”

ह्या प्रकारचे प्रश्न ता. ११ जानेवारीच्या ‘ सुदर्शन ’-ने आह्माला केले आहेत. आणि ह्यावरच ‘ सुदर्शन ’काराचें स्वतंत्र पत्रक उभारलें आहे. ह्या प्रश्नावरून ‘ सुदर्शन ’ व ‘ सुदर्शन ’-कार एकच असल्याचा बोध होतो. अशा परिस्थितींत आम्हीं दिलेला ‘ सुदर्शन ’ चा उतारा ‘ सुदर्शन ’ च्या कोणत्या अंकांतील आहे म्हणून आम्हाला उलट प्रश्न करण्यांत मातब्बरी काय ? गुन्हेगाराने स्वतःच गुन्हा कबूल केल्यावर अधिक पुराव्याची गरज काय ? तेव्हा ‘ सुदर्शन ’काराचें व्यक्तिशः असलेलें मत आम्हीं ‘ सुदर्शन ’ चें आहे असें म्हटलें तर ह्यांत तत्वहानि कोणती झाली ? ह्यावरून समंजसपणा, योग्यायोग्यता व न्यायप्रियता ह्याची चाड आम्हीं अधिक बाळगली, कीं, ‘ सुदर्शन ’ अधिक बाळगते ह्याचा विचार ‘ सुदर्शन ’ने नव्हे तरी ‘ सुदर्शन ’काराने करावयास पाहिजे होता. पण सारासारविचाराचा जेथें अभाव तेथे सत्याची व न्यायाची चाड राहणें असंभवनीयच.

## उत्पन्न होणारे प्रश्न

‘ सुदर्शन ’च्या वा ‘ सुदर्शन ’काराच्या मनांत जें शल्य सलत होतें तें वरील उताऱ्यांत प्रतिबिंबित झालें. त्यांतून कोणते प्रश्न निघतात हें आपण पाहूं. ( १ ) श्री कडून आपल्या आगमनाचें आज्ञापत्र ज्यांना होतें त्यांनी श्रींच्या सत्काराची कोणतीहि योजना केली नाही काय ? ( २ ) सिद्धेश्वरमंदिरांत ज्यांनी योजना आखली त्यांना श्रींचें आज्ञापत्र होतें व त्यांत सदर आज्ञापत्र ज्यांना होते त्यांच्यांपैकी कोणाचें कोण व कसें अधिकृत प्रतिनिधी सामील झालें होतें ? ( ३ ) रेवणसिद्धमंदिरांत ‘ सुदर्शन ’च्या मतें जे अनधिकृत लोक जमले होते तें ह्मणजे घुम्मा-पटणे पत्रकांत आहेत तेच कीं काय ? तसें असेल तर त्यांत श्रीमन्निरंजन निजगुण स्वामीं, श्री. बाबासाहेब वारद, वगैरे येतात कीं नाहीं ? (४) महास्वामींच्या आगमनाचीं प्रथम अधिकृत वार्ता ‘ सुदर्शन ’कारापेक्षांहि श्री निजगुण स्वामी, श्री. बाबासाहेब वारद व श्री. अबदुलपूरकर ह्यांनाच होती कीं नाही ? ‘ सुदर्शन ’च्या लिखाणावरून वरील चार प्रश्न उत्पन्न होतात. ह्मणून ‘ सुदर्शन ’काराला आह्मी जाहिरपणें विचारतों कीं, सिद्धेश्वरमंदिरांत ज्यांनी स्वागताची तयारी केलीं त्यांत निजगुणस्वामी व बाबासाहेब वारद होते काय ? असतील तर त्या हस्तपत्रकावर त्यांच्या सह्या आहेत काय ? सह्या नसतील तर कोणीं तीं हस्तकपत्रकें काढलीं व कां काढलीं ? त्यांना निराळें आज्ञापत्र होतें काय ? बरे सिद्धेश्वरमंदिरांतील सत्कारसमारंभाला निजगुण स्वामी व बाबासाहेब वारद ह्यांचा आधार होता तर ते रेवणसिद्धमंदिरांत का व कशाकरितां जमले होते ? त्यांच्यासह जे लोक जमले ते सर्व सोलापूर शहरांतील कोणीच नव्हत हें ह्मणण्याचा कल्याण शेट्टींना तरी काय अधिकार ?

## मिटणारा वाद वाढला

वस्तुस्थिति अशी कीं, अवघा सात दिवसांचा अवधी मिळाला. सोलापूर हें विस्तृत शहर. आणि त्यांतहि अनेक शिष्ठ व्यक्ती दूरदूर राहणार. त्या सर्वांना एकत्र जमवून त्या सर्वांकडून श्रींचें पूर्ववत् एकमतानें स्वागत व्हावें ही जबाबदारी

निजगुण स्वामी व बाबासाहेब वारद ह्यांच्याबर होती. सोलापूर शहराचा व तेथील मतमतांत-राचा विचार करतां सात दिवसांचा अवधी अपुरा होता. तरी शक्य ते प्रयत्न करून एकोप्याने ही गोष्ट घडावी असे प्रयत्न अखेरपर्यंत झाले. पण विघ्न येऊ नये तें आलें. तें कां आलें हा एक महत्वाचा प्रश्न आहे. ह्यापूर्वी बार्शी-हून उज्जयनी महास्वामींचें आगमन झालें असतां सोलापूरच्या विरक्तपक्षानें पंचाचार्यपक्षाला अटी घातल्या होत्या. त्या अटींत विशेष कोणतीहि हानि नसल्यामुळें उज्जयनी महास्वामींनी व पंचाचार्यपक्षाने त्या कबूल केल्या. पंचाचार्य सिंहासनाधीश ह्मटला कीं तो बसवनिंदा करतो, करवितो, व ऐकतो, हें खोटें हें ह्याच वेळी सिद्ध झालें. त्याचप्रमाणें पंचाचार्य-सिंहासनाधीश ह्मटला कीं तो विरक्तमठाचा तिरस्कार करतो ही भावनाहि ह्या वेळीं खोटी ठरली. त्याचप्रमाणें विरक्त-सिंहासनाधीश ह्मटला कीं तो पंचाचार्य-सिंहासनाधीशांचा द्वेष्टा अशा ज्या भावना बळावूं लागल्या आहेत त्या ह्या प्रसंगीं दूर व्हाव्यात ह्मणून कांही पंचाचार्याभिमानी गृहस्थांनी महास्वामींना प्रश्न विचारण्याचें मात्र ठरविलें होतें. त्या प्रश्नांची प्रत अजून बाबासाहेब वारद ह्यांच्याजवळ आहे. त्यांत चित्रकलदुर्ग महास्वामींचा अपमान होईल असा एकहि प्रश्न नाही. उलट त्या प्रश्नाची उत्तरें जर महास्वामींनी जाहीरपणें दिलीं तर विरक्तपंचाचार्यवादास कांहीच सौम्य स्वरूप प्राप्त झालें असतें व कदाचित् मिटूनहि होईल.

## मुख्य दोष कोणाचा ?

आम्ही सोलापूरला जानेवारीच्या पहिल्या आठवड्यांत असतांना महास्वामी, निजगुणस्वामी व बाबासाहेब वगैरेशीं आम्ही खाजगी चर्चा केली. तेव्हा आम्हांला असें आढळून आलें कीं, विरक्तपंचाचार्यांचा अपमान करण्याची वा त्यांच्या-विषयीं महास्वामींत अनादराची भावना मुळीच नाही. इतकेंच नव्हे तर रेवणसिद्ध-मंदिरांत महास्वामी जात येत असत, आणि दर्शन घेत असत. 'सुदर्शन' नें सुद्धां पंचाचार्यांनीं बसवेश्वरांचा व विरक्तांचा व विरक्तांनी पंचाचार्यांचा जयजयकार ऐकण्यास हरकत नाही अशी कबूली दिली आहे. इतकेंच नव्हे तर चित्रकलदुर्ग महास्वामींनी पंचाचार्यांच्या उज्जयनीमठांत प्रवेश केल्याचाहि दाखला दिला आहे. असें असतां जे प्रश्न पंचाचार्य-पक्षाने महास्वामींच्या विचारार्थ पुढें करण्याचें ठरविलें होतें त्यांत भयानक व अपमान-कारक कांहीच नव्हतें. त्यांची उत्तरें महास्वामीकडून देवविण्यांत भूषणच होतें. पण तसें करण्यांत कमीपणा आहे असें कांही आततायी अंधभक्तांना वाटलें व त्यांनी महास्वामींना रेवणसिद्धमंदिराकडून परतविलें व ते परतले. हें कार्य 'सुदर्शन' पंथीयांचें आहे असा आमचा आक्षेप होता व 'सुदर्शन' चें आव्हान वाचून तो अधिक खरा ठरला म्हणुन आह्माला विशेष आनंद वाटतो. परंतु ता. ११ चें 'सुदर्शन' ह्मणतें कीं, बुम्मा पटणें ह्यांच्या पत्रकावरून श्रींना निजगुणस्वामींनी व चन्नवार स्वामींनी परतविलें असें 'संजीवनी' ह्मणतें. वास्तविक 'कळविलें असावें' असें आमचें तें अनुमान आहे. पण श्रीमन्निरंजन निजगुणस्वामी व चन्नवीर स्वामी ह्यांचा ह्यांत दोष नाही अशी आमची खात्री झाली. आणि सोलापुरी जाण्या-पूर्वी आमचीं अशी खात्री होती ह्मणुनच त्याच लेखांत लागलींच पुढें 'कोणीहि कळवो' असें ह्मणून आह्मी मोकळे झालों.

## 'सुदर्शन'-काराची दिलगिरी पाहिजे

'सुदर्शन' च्या आव्हानामुळें व त्यावर त्यांनी जें पांडित्य रचलें त्यामुळें हा दोष 'सुदर्शन'-पंथीयाचा आहे हेंच अधिक स्पष्ट झालें. कारण रेवणसिद्धमंदिरांतील स्वागत चुकल्यावर बुम्मा — पटणे ह्यांचें पत्रक निघालें. सदर पत्रकांत स्वागत चुकल्याचाच

वृत्तांत आहे. पण त्या पत्रकाला उत्तर देतांना श्री. कल्याणशेट्टी ( 'सुदर्शन'कार ) ह्यांनी जें पत्रक काढलें तेंच पुढें वादाला कारण झालें. आणि नंतरच इतर पत्रकांचा मारा सुरू झाला. रेवणसिद्धमंदिरांत जमलेले कोण शिष्ठ असा प्रश्न कल्याणशेट्टींनी उत्पन्न केला नसता तर वाद वाढलाच नसता. रेवणसिद्धमंदीरांत जमलेल्या पंचांचा हेतु तसा वाईट नव्हता हें पुढें महास्वामींसहि कळलें. निजगुणस्वामी स्वतः तसे जाहीर करण्यासहि सिद्ध झाले होते. पण दोष 'सुदर्शन' काराचा असल्यामुळे दिलगिरी त्यांची पाहिजे व तें पत्रक चुकीचें आहे असें तरी जाहीर व्हावयास पाहिजे असा प्रश्न पुढें आला. 'सुदर्शन'कारांना स्वतःपेक्षा महास्वामींचा अभिमान असता तर स्वतःच त्यांनीं दिलगिरी व्यक्त केली असती. आणि मिरवणुकीचा समारंभ तरी सलोख्याने व एकोप्यानें पार पडला असता. पण 'सुदर्शन'कारास मी स्वतःच सोलापूरच्या 'वीरशैवां'चा प्रतिनिधी व मीच महास्वामींचा अभिमानी असें ह्मणवून घ्यावयाचें होतें ह्मणून इतरांच्या हेतूवर त्यांनी आरोप केले व त्यांच्या प्रतिनिधित्वाचा नसता प्रश्न उत्पन्न केला. ह्यांत पक्षाभिमान नाहीं, महास्वामींविषयी खरी निष्ठा नाहीं, तर स्वतःची फक्त अहंमन्यता आहे. पण अशा एका व्यक्तीच्या अहंमन्यतेनें जेथे महास्वामींच्या स्वागताचे निष्कारण धिडवडे निघाले तेथें दोष देणारांनी कोणाला दोष द्यावा ? धुम्मा — पट्टणें वस्तुस्थितीच कथन करतात. पण कल्याणशेट्टी हेतूवर आरोप करतात व प्रतिनिधित्वाचा प्रश्न उत्पन्न करतात. अधिकारपरत्वेंच बोलावयाचें झालें तर असा प्रश्न निजगुणस्वामी व वारद ह्यांनी उत्पन्न केला असता तर शोभलें असतें. कारण महास्वामींच्या आगमनाची आज्ञापत्रें ह्यांनाच होतीं.

## गौण मुद्यास प्राधान्य

'सुदर्शन' कार ज्याप्रमाणे प्रगतिपर धोरणाचे आहेत तसेच आह्मीहि आहोंत. पोटजातींचें एकीकरण व्हावें अशी आमचीहि इच्छा आहे. पंचाचार्य–विरक्तवाद पूर्वी नव्हता हें आमचें व 'सुदर्शन'चें मत एकच आहे. तथापि आजचे पंचाचार्यपक्षीय लोक वर्णाश्रमाचें महत्व गातात आणि अतिवर्णाश्रमास हिणवितात ह्मणून 'सुदर्शन'चा राग योग्य असला तरी भलत्याच प्रसंगीं भलते प्रश्न उत्पन्न करून मुख्य समाजघटनेंत बिघाड येईल असें कर्तव्य सुज्ञास शोभत नाही. शिवाय प्रत्येक विरक्त व त्याचा शिष्य एकीकरणवादी आहे अशी ग्वाही कोण देईल ? स्वतः चित्रकल्लदुर्ग महास्वामी प्रसंगीं प्रगतिपर बोलत असतील ह्मणून एकट्या 'सुदर्शन' कारासच त्यांचें जाहीर स्वागत करण्याचा व करविण्याचा अधिकार प्राप्त होतो काय ? कोणते महास्वामी प्रगतिपर मताचे आहेत व कोणते महास्वामी प्रगतिपर मताचे नाहींत हें पाहण्याचे स्थळ वेगळे. आणि अधिकृत महास्वामी सर्व वीरशैवसमाजघटनेचें प्रतीक आहेत म्हणून त्या समाजघटनेपुढें सर्व समाजघटकानीं एक होऊन आदरानें पाहणें हे वेगळे कोणत्याहि अधिकृत महास्वामींच्या आगमनाचा प्रसंग हा एकीकरणनिदर्शकच असला पाहिजे म्हणून महास्वामींच्या जाहीर स्वागतांत एकीकरणवादी व सनातनी ह्या सर्वांनाच वाव देणें जरूर होतें. ह्याकरितां चातुर्याची, मानसिक धैर्याची, व सहनशीलतेची जरूरी होती. निजगुणस्वामी व वारद ह्यांच्याप्रमाणें ती दाखविण्यास जर 'सुदर्शन'कार कचरले नसते आणि धुम्मा–पट्टणें ह्यांच्या पत्रकारावर उर्मट उत्तर देणारें पत्रक त्यांनी खरडलें नसतें व खरडलें होतें तरी कार्यनिष्ठ होऊन तें लीनतापूर्वक परत घेतलें असतें तर सर्व सोहळा एकोप्याने पार पडला

होता. असें ऐक्य झाल्यानंतर जर त्यांनी नम्रपणें असें सुचविलें असतें कीं, महास्वामींच्या प्रगतिपर मतास सर्व वीरशैव नागरिकांचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें एकमुखानें पाठिंबा मिळाला तर ' सुदर्शन 'कार एकीकरणाचें पोशिंदे आहेत म्हणून त्यांचा अधिक गौरव झाला असता. पण त्यांच्या उतावळ्या आणि अहंकारी स्वभावामुळें सोलापूर शहरांतील वीरशैवांत फाटाफूट असल्याचा देखावा निर्माण झाला. अजून पहिल्या पत्रकांतील विधानें कल्याणशेट्टी दिलगिरीपूर्वक परत घेतील तर सोलापूरांतून एकोप्याने महास्वामींस निरोप मिळेल आणि सनातनी व एकीकरणवादी असा वाद जरी चालुच राहिला तरी दोन्ही पक्षांच्या महास्वामींच्या अधिकारास दोन्ही पक्षांचे अनुयायी शहाणपणानें जपण्यास शिकत आहेत हें चित्र सोलापूरला दाखविता येईल. महाराष्ट्रीय वीरशैवांना सोलापूर हें केंद्र असल्यामुळे सोलापूरला हा मान मिळण्यांत महाराष्ट्रीय वीरशैवांच्या समतोल वृत्तीचा जयजयकार होता आणि भांडकुदळ मनोवृत्तीचा सहजगत्या धिक्कार झाला असता. पण सोलापूरला जें घडलें तेंच रंभापूरसिंहासनाधिश पंचाचार्य महास्वामी हुवळीस गेले असतां झालें· ह्यावरून मूळ घटना उध्वस्थ करण्याचा उपक्रम उभय पक्षा तर्फे सुरू आहे हाच बोध होतो. ह्यांत सनातनत्व काय व कोणाचें आणि एकीकरण तरी काय व कोणाचें ?

## गौण मुद्यास प्राधान्य देऊ नका

पण हें सोलापूरांत घडलें नाही म्हणून आम्हाला वाईट वाटतें. ' सुदर्शन ' पत्र महास्वामींच्या बाजूचें असल्यामुळे लीनता घेणें व सर्वांना घेऊन कार्य साधून घेणें ही 'सुदर्शन ' -कारावर ह्या वेळीं विशेष जबाबारी होती. पण ती त्यांना पार पाडतां आली नाही. कोणताहि पक्ष म्हटला कीं, त्यांत शहाणे थोडेच असावयाचे; बाजार — बुजर्‍यांचार भरणा विशेष असावयाचा. आणि वाद मिटत नाही असें दिसतांच बाजारबुणग्यांना ऊत हा यावयाचाच. तसाच प्रकार पुढे घडला. ह्याला कारण ' सुदर्शन ' पंथ आहे हें जें आम्हीं म्हटलें होतें तेंच पुन्हाहि म्हणतों. ह्याबद्दल आम्ही ' सुदर्शन 'ला पक्षपाती वाटू. पण त्याबद्दल आम्हाला भीण्याचें कारण नाही. दोन बाजू ऐकून न्यायाचा काटा कोणा तरी एका बाजूला झुकतोच. त्यामुळें त्या न्यायाधीशाला कोणातरी एका बाजूकडून पक्षपाती म्हणवून घ्यावेंच लागतें. ' सुदर्शन 'कार आपलीच बाजू मांडून थांबले असते तर बरें झालें असतें. पण त्यांनी आम्ही जातीने जंगम म्हणून आमचा जंगमाकडें ओढा असा आमच्यावर आरोप केला. प्रत्येक लिंगधारी हा शिव होय ही भावना आम्ही प्रगट करीत असतांना जंगम जातीच्या अभिमानाचा आरोप करणें व्यर्थ असलें तरी तो ऐकून घेणें व स्वस्थ बसणें जरूर आहे. कारन चित्रकलदुर्गमहास्वामी तरी जन्मजात जंगमपुत्रच आहेत. बॅ. सरदार व त्यांच्या पत्नि सौ. पंचम्मा बाई ह्याहि जन्मजात जंगमच आहेत. सद्यःस्थितींत आम्ही सर्वच दुर्दैवी ! त्याचप्रमाणे महास्वामींनी महाराष्ट्राला मिळालेल्या दक्षिणेंतून उपकृत केलें असतें तर चांगलें झालें असतें असें आम्हीं म्हणतांच महास्वामींच्या औदार्याचें पुराण आम्हाला सांगण्याला ' सुदर्शन 'ने सुरुवात केली. महास्वामी उदार नाहीत व ते समाजकार्यास देणग्या देतच नाहीत असें आम्हीं कधीच म्हटलें नाही. प्रश्न महाराष्ट्रापुरता होता. त्याकरिता कोल्हापुर — सांगलीचा पुरावा देऊन भागत नाहीं. हीं शहरें महाराष्ट्रांत आहेत पण महाराष्ट्रांतील वीरशैवांची

प्रमुख शहरें सोलापूर–बार्शी हींच होत. येथे कोणतो सामुदायिक कार्यांत देणगी मिळाली हा प्रश्न. पण मुख्य प्रश्न बाजूस ठेवून आडमार्गानें जाण्याचा 'सुदर्शन 'चा प्रयत्न आम्हाला तरी प्रशंसनीय वाटत नाही. तथापि हे वादांतील गौण मुद्दे आहेत. पूर्वी जसे सोलापुरी महास्वामींचें स्वागत एकोप्याने झालें तसें सध्या झालें नाही हा मुख्य मुद्दा असून त्याला कारण 'सुदर्शन' पंथ झाला असें आमचें मत होतें, व तेंच आम्ही निर्भीडपणें पुढें मांडलें. आणि 'सुदर्शन 'च्या आव्हानाचा स्वीकार केल्यावरहि तेंच आमचें मत कायम आहे. तथापि ह्याला कारण खुद्द महास्वामी नाहीत, निजगुणस्वामी नाहीत, काडादी बंधू नाहीत, बाबासाहेब बारद नाहीत तर 'सुदर्शन 'कार व त्यांच्या पंथातील कांही व्यक्ति आहेत. तत्वनिष्ठा व कार्यनिष्ठा अधिक जागृत ठेवून आणि स्वाभिमान बाजूला सारून पूर्वग्रहानें दूषित झालेलीं मनें जर आवरलीं असतीं तर झाला हा प्रकार झालाच नसता.

## अखेरची आमची प्रार्थना

आता झालें तें झालें. महास्वामींनी सोलापूरचा निरोप घेतांना रेवणसिद्धमदिरांत जमलेल्या सर्व प्रमुखांना समक्ष बोलावून आशीर्वाद द्यावा. 'सुदर्शन 'कारांसहि बोलवावें. गैरसमज काढून टाकण्याची आज्ञा करावी, आणि आजचे विरक्त असोत, पंचाचार्य असोत, बसवभक्त असोत, वा माहेश्वरभक्त असोत, सर्वांनी सर्वांच्या पुराणपुरुषांचा खुल्या दिलाने जयजयकार करण्याची आज्ञा सोडावी. खुद्द महास्वामींनं हि निरंजनवृत्ति जाहीरपणें प्रगट केल्यावर ही खरी प्रगतिपर वृत्ति त्यांनी जाहीर केल्यावर त्यांच्या जगद्गुरुत्वाला प्रत्येक वीरशैव नमन करील. उज्जयनी महास्वामी सोलापुरीं आले असतांना त्यांनी ह्या बाबतींत आपलें उदार धोरण प्रगट करून सर्वांकडून त्यांनी आपलें स्वागत करून घेतलें. तेव्हा निरंजनवृत्तीच्या चित्रदुर्ग महास्वामींनी तेंच उदार धोरण सोलापूर सोडतांना आशीर्वाद म्हणून जाहीर करावें, आणि आपण सर्वच बाबतींत प्रगतिपर धोरणाचे आहों हें वाद घालणारांनाहि पोटांत घेऊन वीरशैव जनतेच्या मनावर कृपाळू होऊन बिंबवावें. महास्वामी आमची ही जाहीर प्रार्थना मान्य करतील व सोलापूरांतील फाटाफूट दूर करून जातील असा आह्याला भरवसा आहे. 'सुदर्शन 'कारहि ह्या कामीं आह्याला सहाय्य करतील असा आह्याला भरंवसा आहे.

---

# अज्ञानाचा कळस

ले.- बा. निं. चपलगे हिंगणघाट.

वीरशैवसमाजाला अत्यंत लांछनास्पद गोष्ट ह्मटली ह्मणजे स्वतःच्या जातिधर्माचें अज्ञान ही होय. एखाद्याने आपणास जातिविषयी प्रश्न केला कीं, आपण ती 'वाणी आहे' असें उत्तर करितो. ही आपल्या समाजाची अतिशय अपमानास्पद आणि हीन स्थिति होय. आपला जातिधर्म ' वीरशैव लिंगी ब्राह्मण ' असतां आपण ' वाणी ' सांगणें ह्मणजे किती वेभळटपणा आणि धर्मअज्ञानाचा कळस होय; आपणास आपल्या संस्कृतीचा व धर्माचा बिलकुल अभिमान नाही. आपल्या धर्मभावना अत्यंत मेलेल्या आहेत !

समाजाची अशी विपन्नावस्था होण्याचें कारण ह्मणजें धर्मगुरु, त्यांनी दक्षिणेविषयी व पोकळ अधिकाराबद्दल निरर्थक वाद मांडावा, भरपूर दक्षिणा लाटावी, पण आपल्या भक्तांना आणि स्वतःला धर्माबद्दल अवश्य अशी माहिती नसावी याबद्दल थोडीसुद्धां खंती नसावी, धर्मगुरुंना आपल्या कर्तव्याची जाणीव नसावी, ही समाजाच्या हिताला सर्वांत हानिकारक गोष्ट होय. त्यांनी समाजाला धर्माविषयी अवश्य असणारें ज्ञान दिलें पाहिजें.

आपणास आपला जातिधर्म माहिती नाही याची लाज वाटावयास हवी. कित्येकांना ती माहितीदेखील सांगावयास लाज वाटते.लोकांना आपण लिंगी ब्राह्मण आहों असें सांगितलें तर त्यावर त्याचा विश्वास नसतो. ते ह्मणतात 'तुमची जात ह्मणजे वाणी, तुह्मी ब्राह्मण नव्हे'. आणि ब्राह्मण नव्हे ह्मणजें ब्राह्मणाचा वरिष्ट दर्जा तुमचा नाही. परंतु ब्राह्मणजातिधर्माप्रमाणेच लिंगी ब्राह्मण जातिधर्म आहे. दोघांनाहि वेद मान्य आहेत आणि स्वतःचे धर्मगुरु आहेत दोघांचेहि धार्मिक आचारविचार थोड्याफार फरकाने एकच आहेत. एकांत अमुक आचारविचार चांगले असतील तर दुसऱ्यांत तमुक आचारविचार श्रेष्ठ असतील. एकूण एक दुसऱ्यास नांवें ठेवूं शकत नाही. प्रत्येकजण आपला धर्म दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ आहे असें ह्मणतो. पण मला तसें कांहीच म्हणावयाचें नाही.

प्रत्येकाचा धर्म म्हणजे हिंदुधर्म होय. हिंदुधर्माचे गुणकर्मानुसार चार वर्ण विभाग पडतात. ते म्हणजें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. प्रत्येक वर्ण उपयुक्ततेने थोर आहे. वास्तविक पहातां ज्याचें आचार-विचार जसे असतील त्याचा तो वर्ण होईल. मग ब्राम्हण असून त्याचे गुणकर्म जर वैश्याप्रमाणें असतील तर तो जातीने ब्राम्हण पण वर्णाने वैश्य व धर्मानें हिंदु समजला जाईल.

वरील तत्वास अनुसरून, प्रत्येक वीरशैव हा धर्मानें हिंदु आहे, जातीनें लिंगी ब्राम्हण असून वर्णाने तो आपल्या गुणकर्माप्रमाणें ठरला जाईल. पण प्रत्येक वीरशैवानें

आपला जातिधर्म 'वीरशैव लिंगी ब्राह्मण' हाच सांगावयास हवा. व कोणीहि विचारल्यास त्यानें तो बेधडक सांगितला पाहिजे तर तो वीर या नांवास पात्र होईल.

वाणिज्याचा उद्योग आपण फार उचलला ह्मणून आपणास आपल्या जातकुळीचा विसर पडला. ज्ञानार्पणाचें ध्येय मागे पडून द्रव्य-संपादनाचें साध्य प्रमुख झालें ह्मणून आपली अशी हीन स्थिति झाली. पण वाघाचा बच्चा कांही काळ मेंढयाच्या संगतींत राहिल्यामुळे जरी स्वतःचा स्वभावधर्म विसरला असला, तरी त्याला आपल्या स्वरूपाची ओळख होतांच त्यास आपल्या मागील हीन-दीन स्थितीची लाज वाटून, तो स्वतःमध्यें असणारे नैसर्गिक गुणधर्म प्रगट करितो. त्यांचप्रमाणे आपण उच्च जातिधर्माची ओळख करून घेऊन उच्च आचार-विचार धारण करावे.

आपल्या पूर्वजांनी खरोखरच वीराप्रमाणें पराक्रम केला असावा ह्मणून आपणास वीर नांव मिळालें. त्यांनी ईश्वराच्या सतत सहवासाकरितां लिंगधारणा करुन ब्राह्मणाचें परमोच्च असें त्यागी ध्येय दृष्टीसमोर ठेवून ज्ञानसंपादन व ज्ञानार्पण केलें असेल ह्मणून आपणास 'वीरशैव लिंगी ब्राह्मण' हें उचित आणि श्रेष्ठ नामभिधान प्राप्त झालें असलें पाहिजे. तेव्हा आपल्या या थोर 'लिंगी ब्राह्मण' जातीची श्रेष्ठता इतर समाजाला पटवून देण्याकरितां आपण यापुढे आपल्या थोर पूर्वजांचा कित्ता गिरविला पाहिजे.

---

# मुरघी मृगेंद्र मठसंस्थानचा अहवाल

श्री मु. मृगेंद्र मठ संस्थान अंबागेट, अमरावती.

## वार्षिक अहवाल

सदर संस्थानचे स्वामी श्री. गु. मू. कै. मरी स्वामी गुरु चनबसस्वामी यांनी मरणाचें पुर्वी सरासरीं ८ दिवस अगोदर मठसंस्थानचीं योग्य व्यवस्था राहावीं या सद्हेतूनें ता २८-२-१९३६ इ. रोजी एक मृत्युपत्र करुन ठेविलें. त्या मृत्युपत्रांत खालील पंचांनीं मठाची योग्य ती व्यवस्था ठेवावी असें लिहिलें आहे. पंचांचीं नावें :—(१) श्री. सोमाप्पा मेंडसे, (२) श्री. तुकाराम आप्पा चौधरी; (३) श्री. चनाप्पा गदगकर; (४) श्री. नागाप्पा काडादी; (५) श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे; (६) श्री. लिंगाप्पा वड्डे. वरील पंचांत सरपंच श्री. सोमेश्वर आप्पा कोल्हे यांना स्वामींनीच नेमलें आहे. येणेंप्रमाणें पंचांची नेमणूक करुन स्वामी ता० ६।३।१९३६ इ० रोजी कैलासवासी झाले. ता० ६।३।१९३६ पासून पंचांनी मठ आपले ताब्यांत घेऊन मठाची एकंदर ता० ३१।१२।१९३६ पावेतो जी व्यवस्था केली तिचें थोडक्यांत वर्णन खालीलप्रमाणें आहे.

मठाचे दक्षिणदाराजवळचे समाधीवरील तीन तस्मे व वरील गच्ची अजिबात पडून गेली होती ती पंचांनी मठांतील उत्पन्नाचे मानाने आस्ते आस्ते तिन्ही तस्मे व गच्ची नवीन तयार केली. याशिवाय मठाचा बराचा बराचसा भाग नादुरुस्त झालेला होता तोहि पुष्कळ अंशाने

दुरस्त केला. खालीं खर्चखात्यांत जी ५५५॥=॥. रक्कम दाखविली आहे त्यांत नोकरांचा पगार अंदाज ७५ रु. आहे. शिवाय मठ स्वच्छ राहावा ह्मणून पायखाने व मोऱ्या यांतील साफ राहाव्या ह्मणून एक भंगी पगारी महिन्याने ठेविला आहे. त्याचाहि पगार खर्चखात्याचे रकमेंत आहे. या रकमेत दिवा - बत्ती श्रावण मासाचे पूजेचा खर्च व इतर स्टेशनरी खर्च आहे. त्याशिवाय लागलेलीं खर्चखात्याची सर्व रक्कम मकानांची रिपेरी करण्यांत व वर लिहिल्याप्रमाणे तस्मे बांधण्यात लागलीं आहे, व स्वामींची समाधी बांधण्यांत वगैरें खर्च झाला. पंचांनी लोकांचें देणें आपसांत त्यांना बोलावून जितके पैसे कमी देतां येतील तितकीं कोशीस करून लोकांचे देण्याचा निकाल लाविला आहे. मुख्यतः रामधन मोहनलाल कापडाचे व्यापारी यांचे जवळ जवळ ९५ रु० स्वामीकडे घेणें निघत होतें. त्यांनीं पंचांचे विनंतीस मान देऊन ६५ रुपयांत चुकता निकाल केला आहे. त्याचप्रमाणें कमी जास्त प्रमाणांत श्रीनिवास गंगाधर उन्हाळे व अबदुल्ला अहमद अँड सन्स यांचाहि चुकता निकाल केला आहे. शहर म्यु. क. चे चारपांच वर्षांचे पाणीपट्टीचें व घरपट्टीचे पैसे देणें होते त्याचा १२ रु० द. म. प्रमाणें देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें म्यु. क. नेहि कबूल केलें.

श्रीमती काशीबाई येनगुंदे रा. उमरावती इचे मरीस्वामीकडे दीडशे १५० रुपये प्रामेसरी नोट करून घेणें आहेत त्याचा निकाल तिला बिनव्याजी रक्कम द. म. १० ते १५ रुपये देऊन केला आहे. याचप्रमाणें शिवमूर्ती अय्या उर्फ घंटय्या जंगम रा. उमरावती यांचे पाऊणशे रुपयांचे प्रामेसरी नोटेचाहि निकाल केला आहे.

काशीबाई व शिवमूर्ती अय्या यांना दिलेल्या रकमा खालील जमाखर्चांत दर्शविल्या आहेत.

पार्वतीबाई ज. मरीस्वामी यांना ता. ३१-१२-३६ पर्यंत ३१॥।-॥। दिलेल्या आहेत. हेहि रुपये खाली दर्शविलें आहेत.

## जमा खर्च

### ता० १६-३-१९३६ इ. ते ता. ३१-१२-३६ ई. पावेतों

| जमा | नावें |
|---|---|
| १२२९८=॥· मठातील एकंदर ५० खोल्यांचें आलेलें भाडें. | ५५५॥०॥· श्रीखर्च खातें यांत नोकरांचे पगार, दिवाबत्ती, स्टेशनरी. मकावाची रिपेअरी वगैरे किरकोळ |
| | ३१॥।-॥।. पार्वतीबाई ज. मरीस्वामी ईला दिले. |
| | ११०=।. गंगाराम आप्पा वड्डे खातेबाकीचे देणे ( चुकते झाले ). |
| | १०-. श्री कोर्ट खर्च |
| | ६० काशीबाई येनगुंदे |
| | ४८ म्यु. कमेटी. टॅक्स पाणी पट्टी भंगी पट्टी मागील. |
| | ४० शिवमूर्ती अय्या उर्फ घंटय्या जंगम यास प्रो. नोट वरून दिले. |
| | १०२ श्रीनिवास गंगाधर उन्हाळें प्रो. नोट वरून देणे. ( चुकते झाले ). |
| | १५ अबदुल्ला अहमद अँड सन्स खातें बाकीचे दिले ( चुकते झाले ). |

६५
रामधन मोहनलाल कापडाचें व्यापारी दु. उमरावती दि.मु.नं. १४६० चे डिक्रीचे व कापडाचें खाते बाकीचे देणें ( चुकते दिले ).

९२९॥≈॥.
२९९॥–.
सालअखेर निघालेली शिल्लक.

१२२९८७॥.

सही.
सोमेश्वर हमराप्पा कोल्हे
सरपंच
श्री. मु. मृ. संस्थान अंबागेट उमरावती.
ता. ११।१।३७

टीः— सदर जमाखर्च सर्व पंचांनी तपासला असून ता. २-१-३७ ई. च्या संस्थावच्या पंचांच्या सभेंत मंजूर झाला आहे.

येथील मुरघी मृगेंद्र मठसंस्थानचे व्यवस्थापक कै. गरीस्वामी ह्यांनी आपले निघनापूर्वी मठसंस्थानचे व्यवस्थेकरिता पंच नेमले होते- त्यां पंचांतर्फे मठसंस्थान पंचाचे ताब्यांत आल्यापासून आतांपर्यंतच्या मठसंस्थानचे कारभाराचा वार्षिक अहवाल वर प्रसिद्ध केला आहे.

रोहिणखेड येथील श्री पळसिद्धमठाचा प्रसिद्ध केलेला अहवाल चिखलीचे श्रीमंत गोविंदराव बोंदरे ह्यांनी ता. १९-४-३६ चे रोहिणखेड – परिषदेंत वाचून दाखविला होता, व त्या प्रसिद्ध झालेल्या अहवालाविषयीं लिहितांना आह्मीं ता. १ जून १९३६ चे ' संजीवनी 'त " अंबादरवाजाचे आंतील मृगेंद्र मठाचा वार्षिक अहवाल प्रसिद्ध करून नवी पंच मंडळी आपलें नाव सार्थ करून इतरांना उदाहरण घालून देतील काय ? " अशी आशा प्रगट केली होती. आमच्या आशेप्रमाणें पंचांनीं हें अहवालप्रसिद्धिकरण केलें ह्याबद्दल आह्मी पंचांचें अभिनंदन करतों.

" स्थानिक मठसंस्थानें व खानगी इस्टेटीं येथील जुन्या पंचावाबतींतील आमचा अनुभव निराळा आहे, व ह्या बाबतींत आह्मी मठसंस्थानासारख्या सार्वजनिक मालमत्तेच्या संस्थेचे किंवा पंचांच्या ताब्यांत मृत्युपत्रानें आलेल्या इस्टेटीच्या जमाखर्चाचे अहवाल जर प्रसिद्ध होत गेले तर कोणालाहि पंचाच्या किंवा मठसंस्थानांतील व्यवस्थापकांच्या सद्हेतूविषयीं शंका घेण्याचें कांहीच कारण पडणार नाही असें लिहिलें होतें. परंतु दुर्दैवाने वस्तुस्थिति — निदान अमरावती येथील तरी अगदींच विपरीत आहे. जेथल्या तेथेंच " तेरीबी चूप और मेरीबी चूप " ह्या न्यायाने पंचांच्या ताब्यांतील इस्टेटी पचल्या गेल्याचा निदान त्यांचा मृत्युपत्राप्रमाणे योग्य उपयोग न झाल्याचा इतिहास व कटु अनुभव उपलब्ध आहे व सर्व जुन्या पंचांची हाडं अशींच कामें करून रंगली आहेत. "

वरील विधानांच्यामुळे कांही जुनीं, विशेषतः पंच मंडळी नाराज झाल्याचेंहि आमचें कानीं आलें होतें. परंतु ही टीका जुन्या मंडळींचा व विशेषतः पंचांचा अपमान करण्याच्या बुद्धीने मुळीच केलीं नव्हतीं. ह्या जुन्या मंडळीविषयीं आमचे मनांत आदर आहे, परंतु त्यांनीं केलेल्या कारभाराविषयीं मात्र आह्माला नापसंती दर्शविणें भाग आहे. कारण अशी तऱ्हेच्या सार्वजनिक संस्थेचा किंवा ठेवीचा अहवाल किंवा जमाखर्चाच्या हिशेबाचें प्रसिद्धीकरण आतापर्यंत कोणीं केलें नाहीं. मठसंस्थानावर किंवा एखाद्या ठेवीवर नेमलेल्या पंचांपैकी कांही पंच कालवश झाल्यावर शिल्लक राहिलेल्या पंचांनी ती स्वतःचीच मालमत्ता समजून तिचा उपभोग घेण्याचेंच कार्य सुरू केल्याचें आमचे निदर्शनास प्रत्यहीं येत आहे.

अनाथ व गरीब विद्यार्थ्यांचें शिक्षणास मदत व्हावी ह्यां पवित्र व उच्च हेतूनें एखाद्या सन्माननीयानें मरणकाळीं पंचांचे ताब्यात दिलेल्या ठेवीचा उपयोग त्या मृतात्म्यांच्या इच्छेप्रमाणे सहसा होत नाही व यदाकदाचित् झालाच तर त्यांत कितीतरी अडचणी येतात. परिस्थितीनें नाडावलेल्या विद्यार्थ्याला पंचाचे उंबरठे झिजवितांना होणारा त्रास व मानहानि ही आह्माला माहित आहे व त्यांतून पंचांच्या आपसांतील मानापमानाच्या कल्पना ह्याहि त्या विद्यार्थ्यांच्या मदतीच्या बऱ्याचशा आड येतात. मदतीच्या अर्जाचा नमुना एका पंचासमोर नेला असतांना "आधी त्या आप्पासाहेबांची सही घेऊन ये" व त्या निर्दशित आप्पासाहेबांकडे सही मागावयास विद्यार्थी गेला असतांना "त्यांचीच सही आधी आण" अशा तऱ्हेची टोलवाटोलवी हरघडी बिचाऱ्या विद्यार्थ्यांच्या वांटवीं येते. कारण हे जुने पंच एका ठिकाणी कधी बसावयाचे नाहीत व अर्जाचा निकालहि लोकर कधी लागावयाचा नाही अशी नेहमीची चालत आलेली परंपरा व अनुभव.

इतकें लिहण्याचा उद्देश एवढाच कीं, सार्वजनिक हितबुद्धीने कार्यं करण्याची परंपरा फारच कमी दृष्टीस पडते व ह्यामुळेच आह्मांला मृगेंद्रमठाच्या सार्वजनीक हितबुद्धीच्या ह्या "नव्या पंच" मंडळीचें आज जाहीर अभिनंदन करावेसें वाटतें. ह्या "पोरसवदा" मंडळींना कै० मरीस्वामींनी पंच ह्मणून जेंव्हां जाहीर केलें तेव्हां कांही पारंपरिक बुद्रुक पंचांना वाईट वाटून "जुनी मंडळी सारी आटली वाटते ? ऐकलं आप्पा, कांही नाही; सारा पोरखेळ झालां आहे." अशा तऱ्हेचें नवीन मंडळींच्या कार्यक्षमतेविषयी अविश्वास उत्पन्न करणारे कुचेष्टेचे उद्‌गारहि त्यांनी काढले असें ऐकतात.

कांहीहि असलं तरी ह्या नवीन पंचांनी हा अहवाल प्रसिद्ध करून मठसंस्थानाचे जमाखर्चाचे हिशेब व अहवाल प्रसिद्धीकरणाचा आवश्यक पायंडा पाडला व वरील कुचेष्टेवजा तक्रारीला योग्य तेंच उत्तर दिलें ह्यावद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. अर्थातच ज्यांची स्वतःच्या निरपेक्षतेविषयी खात्री आहे व आपलें हिशेब चोख आहेत अशी खात्री आहे ते सर्व स्थानिक मठसंस्था व इतरहि सार्वजनिक ठेवीचे पंच व वहिवाटदार आपलेहि जमाखर्चाचे हिशोब आणि अहवाल प्रसिद्ध करून पुढेमागें उत्पन्न होणाऱ्या लोकापवादाचें आधीच निराकरण करतील अशी आह्माला उमेद आहे. 'मृगेंद्र मठसंस्थानच्या ह्या नव्या व तरुण पंच मंडळींनी निव्वळ अहवालप्रसिद्धिकरणामुळे आपल्यावरील जबाबदारी संपली असें समजूं नये व तसें ते समजत असतील असें आह्मालाहि वाटत नाही. वीरशैव समाजाच्या दृष्टीने 'मृगेंद्र मठ' हें आदर्श मठसंस्थान बनविण्याचें ध्येय डोयासमोर ठेवून ह्या नव्या मंडळींनी समाजासमोर आदर्श पंच म्हणून पुढें यावयाचें आहे.

ह्या पंच मंडळींत श्रीमंत सोमाप्पा शंकरआप्पा ऊर्फ सोमाप्पा अण्णा मेंडसे, श्री. लिंगाप्पा वड्डे श्री. सोमेश्वर आप्पा कोल्हे (सरपंच) ही तरुण कार्यकर्ती समाजांतील पुढारी मंडळी आहेत. मेंडसेघराणें हें व्यापाराबद्दल तर आहेच परंतु सार्वजनिक कार्यांतील निरपेक्ष व निःपक्षपाती मदतीबद्दल व सहानुभूतिबद्दलहि प्रसिद्ध आहे. कै० शंकर आप्पा मेंडसे हे आपल्या ह्या तीन "वीरशैव शिक्षणप्रसारक मंडळा"चे खजीनदार होते, व त्यानंतर त्यांचे कर्तबगार चिरंजिव श्रीमंत सोमाप्पा मेंडसे हे खजीनदार झाले व आजहि आहेत. कोणत्याहि सार्वजनिक व सामाजिक कार्यांत श्रीमंत सोमाप्पा अण्णांनी पुढाकार घेऊन यथाशक्ति मदत केली नाही असें कधीं झालें नाही. शिक्षणफंडाव्यतिरिक्त बऱ्याच गरीब विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचें श्रेय त्यांना आहे. श्रीमंती व सार्वजनिकहितबुद्धि

ह्या दोन गोष्टी क्वचितच एका ठिकाणीं सांपडतात व त्या श्री. सोमाप्पा मेंडसे ह्यांचेजवळ आहेत. श्री. सोमाप्पा कोल्हे व श्री. लिंगाप्पा वड्डे हेहि समाजकार्यकर्ते आहेत व बऱ्याच दिवसांपासून वीरशैव-शिक्षणप्रसारक मंडळाचे सेक्रेटरीहि आहेत.

अशा ह्या कार्यतत्पर व कार्यक्षम सार्वजनिक हितबुद्धीच्या तरुण पंचांच्या ताब्यांत मृगेंद्र मठसंस्थान असल्यामुळे दिवंगत महाराजांचा लौकीक कायम ठेवून सामाजिक उपयुक्ततेच्या दृष्टीनें मृगेंद्र मठसंस्थान इतर मठसंस्थानांचे दृष्टीनें आदर्श होईल अशी आह्माला खात्री आहे.

---

लघुकथा ३ री. स्त्री-विभाग



# गौरीविसर्जन

लेखिका:— इन्दुकला क्षीरसागर.



"आले! आले! आमचे बाबा आले! आई, बाबा आले! आमचे बाबा आले!" शिवनाथ बाबूंना घराकडे येतांना पाहून दारांत खेळत असलेल्या छोट्या छबीचा चिमणा किलकिलाट टाळ्यांच्या तालावर नी पावलांच्या तोलावर सुरु झाला. बाबूजींनी दारांत पाय टाकला न टाकला तों पायांना चिमुकल्या गोजऱ्या हातांचा विळखा पडला. ऑफिसच्या कामकाजांत सहा तासांच्या त्रासाने त्रस्त झालेला जीव प्रफुल्ल मुखानें फुलत्या गुलाबगालफुलाच्या चुंबनांत देहभान विसरला!

सुंदरशा नक्षीदार जपानी ट्रे मधून गरम शिऱ्याने भरलेली प्लेट, आणि "गुडलक" सोनेरी अक्षरांनी चित्रित केलेल्या कपांमधून गरम चहा घेऊन हिमवतीनें हास्यमुखाने बाबूजींच्या खोलींत प्रवेश करीत पतिराजांचें सुस्वागत केलें.

बदामी आकाराच्या सुबकशा छोट्या स्टुलावर ट्रे ठेवून "छबे, ये तूं मजजवळ!" असें ह्मणत छबीला जवळ घेण्याच्या उद्देशानें हिमवतीने हात पुढे केले, पण छबी कसली वस्ताद! उलट ती बाबूजींच्या गळ्याला बळकट मिठी मारीत मिस्किलपणें आईकडे पहात "आमी वाई जा!" असें ह्मणत बाबूजींना अधिकाधिक बिलगूं लागली.

"असं नयें करुं बाळ! माझी छकुली मोठी शहाणी आहे! ये, ये, हा बघ मी तुला शिरा देतें!" असें ह्मणत हिमवतीने जवळ जवळ बळजबरीनेच कां ह्मणाना, बाबूजीजवळून छबीला ओढून घेतलें, आणि छबीला शिरा देण्याऐवजी आधाशीपणाने छबीच्या गुलाबी गालावर मटामट मुके घेत चांगला तांबूस रंग उठवून दिला. छबीचे गुलछबू गाल अधिकच खुलून उठले. हिमवतीच्याहि गालावर प्रमुदपाचाची लाली चढली. बाबूजींनी यांच्या

प्यालयामधून भरून ठेवलेल्या पाण्याने हात—तोंड स्वच्छ धुवून चार चूळ भरून टाकल्या नी टॉवे-लनें हात तोंड पुशीत बाबूजी शेजारच्या आराम-खुर्चीवर बसले. समोरचें स्टूल जरा अधिक जवळ ओढलें. छबीची आईच्या कडेंवर चुळबूळ सुरुं झाली. छबी सरकन् आईच्या कडेवरून खाली आली आणि बाबूजींच्या हाताचा आधार घेऊन जवळच्या मुद्दाम तिच्याच खातर खरिदलेल्या छोटया किर्लोस्कर–चेअरवर ऐटींत चढून बसली. त्या तिच्या या कृतीनें पतीपत्नीच्या हास्याला उकळी फुटली. दोघेहि खदखदा हसूं लागले. आनंदाने दालन दरवळलें. “ आं ? अग पण हें काय ? आज तुला नाही कां चहा घ्यायचा आमच्याबरोबर ? एकच कप दिसतो आहे इथें ! का घेतला आहे अगोदरच ? ” बाबूजी सहजस्मित थट्टेनें उद्गारले.

“नाही . अजून घेतला नाही . घेईन जरा वेळानें . आपण घ्यायचा आधी . ”

“कां ? आणखी कुणाची वाट बघायची आहे कीं काय चहाकरतां आज ? ”

“होय. जरा वेळ बघतेच वाट आणखी. आजच्याच डाकेनें शेषनगरहून जावई बापूचें पत्र आलें आहे, आणि ते आजच या आताच्या साडेपांचच्या ट्रेननें येणार ह्मणून लिहिलें आहे त्यांनी . ” असें ह्मणत झंपरच्या खिशामधून हिमवतीनें एक पत्र काढून बाबुजींच्या हातीं दिलें. बाबूजी पत्र वाचूं लागले. आणि सडकेवरुन कसलासा चालत्या गाडीचा खडखडाट कानावर येतांच हिमवती आतुर दृष्टीनें खिडकीवाटें सडकेकडे पाहूं लागली, पण वाटेनें एक खटारा जात असलेला पाहून किंचित् हिरमुसली—पण रस्त्याकडे रोखल्या नजरेनें पहात उभी राहिली.

“ असं ! एकूण आज जावई बापू येणार आहेत तर ! दैव आमचें ! ठीक आहे ! कसला बाहेर घेऊन येतात कुणाला ठाऊक ! छबे ! ये बाळ, आपण दवकून घेऊं आपला चहा–फराळ ! बसूं दे तिला जावई बापूची मार्गप्र-तीक्षा करीत ! ” बाबूजींनी छबीच्या तोंडांत शिंग्याचे चमचानें घास घालीत आणि मधून मधून आपणहि खात फराळ उरकला. वर चांगले दोन ग्लास गार पाणी पिऊन ढेंकर दिला. कपा-वरलें झांकण बाजूला सारून कपबशी हातांत घेतली. आणि नेहमीच्या सवयीप्रमाणें चहाचा कप तोंडाला लावला. खडखड करीत दाराशी तांगा येऊन खडा झाला. हिमवती चट्कन बाहेर आली आणि गौरीचा हात आपल्या हातांत घेऊन आंत आली. जावई बापू खाली उतरलें, तांगेवाल्याच्या हातावर मनीबॅगमधून एक पावली भिरकावून स्वारीनें दारांत पाय टाकला. छबीने बालिश चंचल वृत्तीनें गौरीकडे येण्याकरिता झाप घातली. बाबूजींच्या हाताला जोराचा धक्का बसून हातांतील कपबशी निखळून पडली. सर्वांगावर चहाचा सडा सांडला. कपबशीचा फारशीवर आपटून चक्काचूर झाला कपाळाला हात लावून बाबूजीनें “गुडलक”च्या तुकड्याकडे पहात एक खेदपूर्ण लांबच लांब निश्वास सोडला.

* * *

“ अक्का, अग ए अक्का ! कोन आहे तें माडीवर बोलावतात तुला. ” माजघरांत आई-जवळ आपली कर्मकहाणी सांगत बसलेल्या गौरीजवळ येऊन छबी लाडीकपणानें सांगू लागली.

“ कशाला ग मला बोलावताहेत ? लबाड कुठली ? ” तिच्या गालावर हळूच एक टिचकी मारीत गौरीनें आपले दोन्ही हात तिच्या कंबरेभोवती आवळून तिला आपल्या जवळ ओढलें, आणि तेवढ्यांतच छबीच्या गोड गोड साखरपाप्याचा गौरीच्या तोंडचा ‘ चक् ’ असा आवाज निघाला.

“ भतल बोलवतात तुला ! तुम्ही तप्पत... ” तिच्या बाहुपाशांतून सुटका करुन घेत धडप-डताना छबीनें पुन्हा हरदास बाबूंचा निरोप गौरीला कळवला.

"जाऊन तरी ये बाई ! बघ तरी काय ह्मणताहेत " असा आईचा छबीच्या निरोपास निर्वाळा ऐकून गौरी चटदिशी उठली. केंस वगैरे जरा नीटनेटके सावरून डोईवरला पदर जरा पुढें करून, पाण्याचा तांब्या घेऊन मंद पावलें टाकीत जिना चढून माडीवर आली.

पडल्या – पडल्याच गौरी वर येत आहे असें पावलाच्या आवाजावरून ओळखून हरदासनें उगीचच कलाटणी घेऊन भिंतीकडें तोंड फिरवलें. गौरी पतीच्या पलंगाशेजारी येऊन उभी राहीली. " उठायच नाही कां ? पाणी आणलं आहे! तोंड – बींड धुवायच. ही मी आलेंच चहा घेऊन, " असें विनयानें बोलत पति-राजाना उठवूं लागली.

" झाली कां इतक्यांतच इकडें यायची आठवण ? "

"मी एकदां वर येऊन गेले; इकडे डोळा लागला होता ह्मणून आईजवळ बसलें होतें खाली बोलत. "

"आमचे मिटलेले डोळे कायमचे केव्हा आणि कसे मिटले जातील याचीच वाटाघाट चालली असेल मायलेकींची ! होय ना ? "

गौरीच्या हृदयाला सप्त सळईचा चरका बसला ! मुखावर करुण छाया पसरली. डोळ्यांत अश्रुबिंदू साठले.

" आईसाहेबांच्या गळ्यांत गळा घालून, आज चार दिवस मी सारखा बघतों आहें, एवढें कसलें रात्रंदिवस हितगुज चाललें आहे इतकें देखील न कळण्याइतपत मी मूर्ख आहें असें का तुला वाटतें ? तुमच्या या जावईपुराणांची पारायणं आमच्या नी तुमच्या आयुष्यापर्यंत हीं अशींच चालायची ! त्याचा शेवट ह्मणजेच तुमच्या – आमच्या आयुष्याचा शेवट ! "
आपले वाग्बाण पत्नीच्या हृदयांत किती खोलवर घुसले आहेत याचें जणु निरीक्षणच गौरीच्या अधोवदन मुखाकडे पहात हरदास-बाबूंनी चालवलें होतें.

गौरीच्या अनुभवाचे जरी हे वाक्प्रहार होते तरी आजच्या वाग्बाणांच्या माऱ्याने गौरीच्या आधीच करपलेल्या अंतःकरणाला ते इतकी जबर प्रहार करीत गेले कीं खळखळा गौरीच्या नेत्रावाटे अश्रूंचा प्रवाह सुरुं झाला. चुरगळलेल्या पारि-जात फुलाची विगलित विकलकळा गौरीच्या मुखावर पसरली. गौरी पदरानें डोळे पुशीत स्फुंदत होती.

" हीं सोंगं-ढोंगं नेंहमीच्याच परिचयांतलीं आहेत. मोठा गळा काढून सारा गांव गोळा करा! पण तेवढे एक राखून ठेवले असेल आमच्या-करितां शेवटल्या रडण्याओरण्यासाठी ! "

" असें नये बोलूं आपण ! आपल्या आधीं मीच मरण मागते आहे देवाला ! सुवासिनीच्या सौभाग्याला भाग्याचेच आहे मी आपल्या देखत डोळा मेले तर ! " गौरीच्या रुध्द कंठांतून एक प्रकारचा कातर आणि करुण आवाज बाहेर पडला. धीराने आवंढा गिळून सजल नेत्रांनी पाण्याचा प्याला हातांत घेऊन गौरी बोलूं लागली ! " उठायचें आतां, चहा तयार झाला असेल . "

" ठाऊक आहें कितीशी कळकळ आहे ती आमची ! आज चार दिवस झाले इथें येऊन. यंत्राच्या ठराविक गतीप्रमाणें मला या माडीवर डांबून सारे व्यवहार चालताहेत. हें मला दिसत नाही वाटतं? रात्रं-दिवस आईबापांशी गुजगोष्टी करीत मैत्री-णींच्या सोबतीत फुलपाखरासारख्या हसत खिदळत तुझा वेळ जातो आहे, आणि आमच्या कपाळी हा एकांतवासाचा बंदिवास ! नाही कुणी घटकाभर बोलायला, कीं नाही कांही साधन क्षणभर करमणुकीला! घडपणें या इथं नुसते बोलायला देखील कुणी तयार नाही ! सासरोबा आपल्याच सरकारी नोकरीच्या बा-बात गरमागरम! तर सासुबाई आपल्या मुलीच्या आवडी-निवडी पुरवण्यांत दंग आणि शेजारच्या सायकाळचा मायकाळचा जमवून तुझी

असतील-नसतील तेवढी आमचीं गाऱ्हाणीं सांगण्यांत गुंग! झक् मारली नी इकडे आलों असें झालें आहे. बस तें कांहीं वाही! आता इथें अधिक वेळ थांबण्याची आमची इच्छा नाहीं! उद्या सकाळच्या सहाच्या गाडीला तयारींत रहा! सांगून ठेवतों!"

"ठीक आहे. जशी आपली आज्ञा. सांगते मी आईला आपली तयारी करून द्यायला."

"अक्का! ये अक्का, चहा तयार आहे. घेऊन जा म्हणते आई!" खालून छबीची हांक आली. गौरी पाण्याचा प्याला पतीराजांच्या हातीं देऊन ओठे पुसीत पण लटकेच हास्य मुखावर धारण करून खाली आली.

हरदास बाबूनें एक संतानी समाधानाचा निःश्वास सोडला. कसे-बसे तोंड-हात धुतले. हात-रुमालानें तोंड पुसीत स्वारी ईझी-चेअरवर आरूढ होऊन कसल्या विचारतंद्रींत निमग्न झाली देव जाणे.

ताज्या बटाटे-पोहयाची भरलेली चांदीची ताटली, फॅमिली-बिस्कीटनीं भरलेली एक सुंदरशी कांचबशी, आणि नक्षीदार पॉट-मधून गरम चहा एका ट्रें मधून हातांत घेऊन गौरी वर आली. मधोमध असलेल्या राऊंड टेबलवर ट्रेची मांडणी करून प्रथम बटाटे-पोहयाची ताटली तिनें पतिराजांच्या समोर एका लहानशा स्टूलवर ठेवून आपण जवळच उभी राहिली. हरदास बाबूनी बटाटे-पोहयावर यथेच्छ ताव मारला. कारण तो त्यांच्या अति-शय आवडीचा पदार्थ होता. गौरीने पाण्याचा ग्लास पुढे केला! घसाघसा पाणी पिऊन शाल्यावर हातरुमालाला हात पुसले. गौरीनें चहा कपांत ओतून बिस्किटांची प्लेट आणि चहाचा कप हातीं दिला. स्वारी चहाचा बिस्कीटासमवेत समाचार घेऊं लागली.

चार-दोन घोट घेतल्यानंतर "मीं सांगीतलेलं लक्षांत आहे ना? उद्या कांहीं झालें तरी मी इथें थांबायचा नाही. पुन्हा बजावून ठेवतों!"

"मी करते आपल्या आज्ञेप्रमाणें तयारी!" हळूंच गौरीच्या कातर स्वरांत शब्द उमटला.

"पण नुसती रिकाम्याहातीं तयारी करून भागणार नाही. रोख पांचशे रुपये घेऊन निघायला पाहिजे."

गौरीच्या मस्तकावर जणुं वज्राघात झाला! तिला घेरी यायला लागली, पण तिने जवळच्या भिंतीचा आश्रय करून कष्टाने कसें तरी स्वतःला सावरलें.

"काय ह्मणतो मी! कळलें ना! पांचशें रुपये मिळालेच पाहिजेत. नाही तर धडगत राहाणार नाही, लक्षांत असूं दे!" हरदासनें हुकमी शब्द उच्चारले.

अधोवदनानें झावरणारें हृदय आवरून रुद्धकंठानें गौरी बोलूं लागली, "पांचशे रुपये कुठून आणि कसे मिळतील बरें!"

'का? न मिळण्याला काय झालें. दरमहा दोनशे रुपये पगार मिळवणाऱ्या बड्या बापाच्या बेटीला पांचशे रुपयें न मिळायला काय झालें? बापाकडून मिळण्याची आशा नसल्यास आईकडून माग. तुझी आईदेखील सहजासहजी तुला पांचशयाचीं मदत करील!"

"आपण काय बोलतां असें! आतां त्या ह्मातान्यांचा आणखी किती अंत बघायचा! परवां दोनच महिन्यांखाली बाबांना नकळत आईने छबीच्या हातांतली बिलवर जोडी तोडून आपल्याला शंभर रुपये पाठवले नी बिलवर चोरीला गेल्याचा बभ्रा केला! आणि आतां…"

" आतां काय ! आतांदेखील तसल्याच कांही कारवाईनें दहा-वीस तोळे सोनें सहज तुझ्या आईला दूर करतां येईल. मातृदेवतेनें आपल्या मुलाबाळांकरतां सर्वस्व अर्पण करण्यांतच खरी कर्तबगारी आहे. करावयाचे आहेत काय आतां वागीनें त्या येरझीला ? "

" असल्या भलत्याच बाबतींत सदान्कदा आई-बापांची माया कसास लावायला आपण मला आज्ञा करणें आपणाला तरी उचित आहे कां ? आपली आज्ञा मान्य करणें हें माझें कर्तव्यच आहे; पण परिणामाकडे तरी कांहीं लक्ष देऊन आपण या दासीला आज्ञा करायची ना ! " गौरी काकुळतीला येऊन बोलूं लागली.

" असं काय ? तर मग असें करा, आपल्या हायस्कुलमधले कांहीं शाळू-सोबती मातब्बर घरांतले असतीलच; आपल्या शाळेच्या आयुष्यांतील पूर्वीची नाजूक ओळख काढून गाठा एकाद्या लक्ष्मीपुत्राला. सहज पांचशे रुपये मिळतील! " तप्त लोहरसाप्रमाणे हे पति-राजाचे शब्द कर्णरंध्रामधुन गौरीच्या हृदयांत शिरून इतके जिव्हारीं झोंबले कीं, जळजळत्या निखाऱ्याची लाली गौरीच्या नजरेवर चढली; संतापानें सर्वांग थरथरायला लागलें; क्रुद्ध वाघीणीच्या भेसूर आवाजांत गौरी बोलूं लागली, " यापुढें अधिक बोलुन माझा संताप भडक-वण्याच्या भरीस पडूं नका ! माझ्याकडून या देहाशिवाय आपल्याला कवडीहि मिळ-ण्याची आशा नाही ! "

गौरीची ही बावरलेली मुद्रा, आणि क्रुद्ध-स्वरांत उच्चारलेले शब्द, हरदासचा संतापाग्नि भडकवण्यास अधिकच आगींत तेल ओतल्या-प्रमाणें कारणीभूत झाले. संतापानें हरदास देहभान विसरला. हातांतला चहाचा कप ताडकन् गौरीच्या कपाळावर भिरकावला गेला. कपा-ळाला भली मोठी खोक पडून भळाभळा रक्त वाहूं लागलें. कपाळीच्या कुंकवाची जागा रक्ताच्या मळवटानें माखली गेली. गौरी मूर्छित होऊन पडली ! हरदास तडक कोटटोपी सांव-रून खाड खाड पाय आपटीत जीन्यावरून खाली आला नी तडाख्यानें बाहेर सटकला.

" काय होतं आहे गौरीला ? " शिवनाथ-बाबूंनी पत्नीजवळ येऊन प्रश्न केला.

" ' चांदणींत लुगड्याच्या सोग्यात पाय अड-कून पडली, नी कपाच्या तुकड्याची कपाळावर खोल जखम झाली ' इतकें म्हणाली मात्र आणि जी निचेष्टित पडली ती अजून कांहीं सावध होत नाहीं ! "

" कर्मणो गहना गतिः ! " बाबूजी उद्गारले! " थांब,! मी डॉक्टरना घेऊन येतो," असें म्हणत झटक्न सायकलवर स्वार होऊन शिवनाथबाबू पंधरा मिनिटांतच डॉक्टरसह गौरीजवळ येऊन दाखल झाले. डॉक्टरनीं गौरीची प्रकृती नीट तपासली, आणि " काळजी करण्याचें कारण नाहीं. होईल लवकरच सावध; मनःसंतापाच्या अतिरेकानें मूर्छा आली आहे इतकेंच. सदुला द्या मजबरोबर. मी औषध पाठवून देतों लागलीच. कपाळावर कोलन वॉटरची घडी सारखीं चालूं ठेवा म्हणजे ताप भडकणार नाहीं " असें सांगून सदूला बरोबर घेऊन डॉक्टर निघून गेले. प्रिस्क्रिप्शन-फॉर्मवर औषधांचें सविस्तर वर्णन,आणि देण्याची सूचना व्यवस्थित लिहून औषधाची बाटली भरून सदूजवळ दिली, आणि " सांग बाबू-जींना कीं मी जुळल्यास रात्रीं आणखी एकदा येऊन पाहून जाईन " असाहि निरोप दिला ! गौरीच्या शुश्रूषेला डॉक्टरच्या सल्ल्याप्रमाणें सुरवात झाली.

"स. वि.वि. आम्हाला इथें येऊन चार दिवस झाले. यापुढें आम्हाला अधिक वेळ इथें थांबतां येणें कसल्याहि हालतींत शक्य नाहीं.

सवर उद्या सकाळच्या गाडीने आम्ही उस-
वरां येथून जाण्याचें ठरवलें आहे. तरी त्या-
प्रमाणें आमची तयारी होईलच. विशेष
सांगायचें म्हणजे, मी बरेच दिवस बेकार
असल्याने खर्चानी अतिशय ओढाताण होत
आहे. नोकरीकरितां अनेक प्रयत्न करून हें
साधत नाही. शिक्षणाकरिता पैशाची मदत नाही.
तरी यापुढें मी काही तरी व्यापार करण्याचें
ठरवलें आहे. आणि तेवढ्याकरिताच मला
पांचशे रुपयांची अत्यंत जरूर आहे. माझी ही
गरज आपण अवश्यमेव पुरवली पाहिजे.
आणि तशी आपली इच्छा नसल्यास, माझ्या
मागणीचा आपणाकडून अव्हेर झाल्यास मी
जन्मभर आपल्याला तोंड दाखविणार नाही.
एवढेंच नाहीं तर आल्या मुलीचीहि आप-
णास भेट होऊं देणार नाही. तुमचाआमचा
नात्यागोत्याचा संबंध उरणार नाहीं एवढें
मात्र शपथेने सुचवून ठेवतों. "

हरदास देव.

ग्रँडगार्डन मधील एका निवांत जागेंत फुल-
झाडांच्या अर्धवर्तुल ताटव्याशेजारी
व्यवस्थितपणें मांडणी केलेल्या सुंदरशा गार्डन-
कोचावर बसून हरदासने वरप्रमाणें निर्वा-
णीचें पत्र आपल्या श्वशुराला लिहिलें. एकदां,
दोनदां, तीनदां, तें नीट बारकाईनें वाचून
पाहिलें. आणि एक समाधानाचा निश्वास सोडून
पुन्हा स्वारी कसलेसे विचित्र हात—वारे
करीत काही तरी निश्चयात्मक विचार करण्यांत
गुंग झाली. पांचदहा मिनिटें लोटलीं असतील-
नसतील तोंच आनंदानें टाळी पिटून स्वारी ताडकन
उभी झाली. पत्र कोटाच्या खिशांत कोंबलें.
फाऊन्टन जागच्या जागी लटकवून, झराझर
पावलें टाकीत स्वारी रस्त्याला लागली. मुखा-
वर एक प्रकारची भेसूर हास्यछटा विलसत
होती. वाटेने चालतांना हरदासची नजर सह-
जच एका कोपऱ्यांतील दुकानाकडे वळली,
त्या दुकानच्या दरवाजावर "देशी दारुचें दुकान"
अशी फळी लागलेली होती. आसपास जरा
बारकाईने निरीक्षण करून हरदास तेवढ्यांतच
कुठें पसार झाला कळलें नाही. पण जवळ-
जवळ अर्धा एकतास हरदास रस्त्याने जातांना
कुणालाहि आढळला नाही एवढें मात्र खरें.
आधींच गौरीच्या अस्थवस्थ अवस्थेने शिवनाथ-
बाबूंची चित्तवृत्ती अगदींच अस्थिर झाली
होती. बाबूजी स्वस्थ डोळें मिटून विचार-
तंद्रींत आरामखुर्चीवर पडले होते. हरदास
एकदम धडपडत दारांत आला. बाबूजीने डोळें
उघडून हरदासकडे पाहिले. हरदासने चटकन
खिशांत हात घालून एक कागद बाहेर काढला व
श्वशुराच्या अंगावर फेकून जवळच्याच एका
खुर्चीवर, खुर्ची खरकन जरा पुढें ओढून, अंग
टाकलें. एक प्रकारचा उग्र वास खोलींत पस-
रला. जावाई बापूच्या उद्दट वर्तनानें आधींच
संतापाने भरलेले असलेले बाबूजींचे डोळे संतप्त
लोखंडाप्रमाण लाल झाले. पत्राची घडी
उलगडून बाबूजी आंतील मजकुराची जसजशी
एकेक ओळ वाची, पुढें पुढें जाऊं लागले तसतसा
त्यांचा श्वासोश्वास अधिकाधिक त्वेषानें
आणि जोराने वाहूं लागला. मेंदु थाड थाड
उडूं लागला. हृदयाची धडपड रेसग्राऊंडच्या
घोडदौडीनें धडपडूं लागली. बाबूजी एकदम
किंचाळलें, " छबे ! तिला जरा इकडे ये
म्हणावें. " बाबुजींचा कर्कश आणि अति
कठोर आवाज ऐकून गौरीच्या शुश्रुषेंत गुंत-
लेली हिमवती धाईधाईने बाबूजींच्या खोलींत
आली आणि म्हणाली , " मला हांक मारली ?"
" होय तुला हांक मारली " असें म्हणून शिव-
नाथ बाबूनी जावयाचें पत्र तिच्या अंगावर
भिरकावून दिलें. हिमवतीनें तें उचलून त्याव-
रून नजर फिरवली. डोळ्यावाटे खळकन दोन
अश्रुबिंदु खाली टपकले. गहिंवरल्या कंठानें
हिमवती बोलू लागली. " गौरोला अपघात
झाला आहे. सडकून ताप भरला, अजूनहि
ती निचेष्टित पडली आहे; तेव्हां आपलें उद्या
निघायाचें कुसें जमेल. ?"

"ताप भरायला नी निचेष्टित पडायला काय झालं आहे? सारीं सोंग-ढोंगं आहेत चार दिवस माहेरी आणीक राहायला मिळावें म्हणून; मला सारें कळतें आहे, आणि कदाचित् आलाहि असेल थोडाफार ताप तर हवापालट केल्यानें होईल लवकरच दुरुस्त" जावाई बापूची ही सैतानी निघृण बडबड उभय पतीपत्नीच्या दुखीःकष्टी हृदयाला सारखी चटके देत होती.

"बरं बाबूजी, माझ्या पैशाच्या मागणीला आपले काय उत्तर आहे हें एकदा कळूं द्या ह्मणजे मला माझा पुढला मार्ग आखायला बरें पडेल" असे शब्द हरदासने उच्चारले मात्र, व एकदम आगीचा भडका व्हावा, बॉबचा स्फोट उडावा, तद्वत् बाबूजी ताडकन खुर्चीवरून उठून हातवारे करीत गर्जना करून बोलूं लागले! "असल्या नादान नीच माणसाला माझ्याकडन एका पैचीहि मदत मिळणार नाही, आणि यापुढे माझीदेखील तुमच्याशी कसलाहि संबंध ठेवण्याची इच्छा नाही. उद्या कशाला, आत्ताच्या आतां माझ्या घरांतून चालते व्हा, निघा, चला.

शिवनाथबाबूंचा अनावर झालेला संताप जावयाच्या प्रथमच प्रत्ययाला आल्याकारणानें क्षणभर हरदास अगदी सर्दच झाला. त्याला कल्पनाहि नव्हती कीं आपले श्वशुर इतपत जमदग्नीचा जाज्वल्य अवतार असतील ह्मणून.

हिमवतीची मात्र अगदी केविलवाणी स्थिति झाली. डोळ्यांमधून अश्रूंचा पूर वाढत्या वेगानें वाहूं लागला. काकुळतीला येऊन हिमवती बोलूं लागली. "असं बोलूं नये आपण, कसेंहि असलें तरी गौरीच्या सौभाग्याकडे पाहून आपण हृदयाचा पाषाण करून ...!"

हिमवतीला पुढें बोलूं न देतां शिवनाथ बाबू चवताळून खेंकसून ह्मणाले "असल्या जावयाचा कपाळमोक्ष केला पाहिजे. उद्धट, उमेंट, नालायकीची परमावधी झाली! कांहीं तरी दया माया याच्याजवळ शिल्लक आहे कां? जरा तरी माणुसकीचा गंध आहे कां उरलेला? ह्मणे पांचशे रुपये द्या! द्या कुठले? आणि कशाला? दारुबाजी, रंडीबाजी, असल्या व्यसनांखाली कवडी किंमतीनें खर्चायला? कन्यादान करतांना चांगले एकशे एकावन तोळे सोनें पोरीच्या अंगाखांद्यावर वाहिलं. जवळ जवळ आजवर भल्या बुऱ्या अडीअडचणी सोसून वर्ष दोन वर्षांत नाही नाही ह्मणतां हजार पंधराशेचा शिक्षणाच्या नांवाखाली चुराडा केला. शेवटी परिणाम काय झाला तो दिसतोच आहे. उडाणटप्पू लोकांच्या संगतीनें स्वतः तर अब्रू गमावलीच पण आम्हाला देखील धुळीला मिळवण्याची महत्त्वाकांक्षा! बस! तें कांहीं नाहीं! गौरीला देखील आजन्म आम्हाला भेटूं देणार नाही अशीं धमकी द्यायला जणू काय या सैतानानें तिला खरेदी केली आहे! जा म्हणावें आतां खुशाल रडत! गौरीचं नख देखील आमच्या जिवांत जीव असेपर्यंत या चांडाळाच्या दृष्टीस पडणार नाही

हरदास प्रथम जरा सर्द झाला होता खरा; सासऱ्याचा संताप पाहून तर त्याच्या धुमसणाऱ्या संतापाग्नीनें एकदम पेट घेतला. हरदास देहभान विसरला. खिशामधून एक तीक्ष्ण पात्याचें शस्त्र काढून शिवनाथ बाबूच्या मस्तकावर शस्त्रप्रहार करून ओरडला, 'जिवंतपणी गौरीचं नख मला दिसूं न देण्याची प्रतिज्ञा पूर्ण झाली ना? आतां बघूं या कोण मला अडवतो तें!" शिवनाथ बाबू धाडकन जमीनीवर कोसळले! रक्ताचे पाट वाहूं लागले. हिमवतीला मूर्च्छा आली! तीहि धाडकन जमीनीवर कोसळली! आंतून सदू धांवत बाहेर आला, आणि मोठमोठ्यानें धांवा धांवा! खून! खून! म्हणून ओरडू लागला. हरदासनें क्रूर वाघाप्रमाणें

गौरीच्या खाटेवर झडप घातली. शिकार दातीं धरून पळत सुटणाऱ्या जंगली श्वापदाप्रमाणे गौरीचे केंस धरून तिला गुरा-सारखी फराफरा ओढीत हरदास बाहेर आला. हरदासचे सर्वांग रक्तानें माखलें होतें. सदूच्या ओरडण्याने आणि छबीच्या आक्रोशाने शेजारची मंडळी धावून आली, आणि झालेला प्रकार पाहून अत्यंत संतापानें हरदासच्या अंगावर धावून गौरीची, त्या एका कोमल आणि असहाय हरणीची त्या नरपशुंच्या हातून सुटका करून हरदासला त्यांनी डांबून ठेवले. शिवनाथ-बाबूचा प्राण केव्हाच निघून गेला होता. पोलीसांना वर्दी देण्यात आली. पोलीसांनी रीतसर पंचनामा करून हरदासला ताब्यात घेतले.

शहरच्या लेडी हॉस्पिटलच्या एका खोलींत एक अत्यंत क्षीण झालेली, मुखावर प्रेतकळा पसरलेली स्त्री एका खाटेवर पडलेली होती. जवळच एक चाळीसेक वर्षांच्या वयाची बाई अश्रु ढाळीत एका छोट्या दोन-अडीच वर्षांच्या बालिकेला पुढें घेऊन बसली होती. सकाळची सात-साडेसातची टाईम. लेडी डॉक्टरनी रोग्याच्या खोलींत प्रवेश केला. रोग्याजवळ जाऊन मस्तकावरून हळूच हात फिरवला. रोग्याने डोळे उघडून सभोवार नजर फिरवली! सडकेवरून आवाज आला "नवा काळ! ताजा अंक! ताजी बातमी! सासऱ्याचा खून करणाऱ्या हरदासला फाशीची शिक्षा! नवाकाळ! दोन पैसे,'....'' हाय!'' अशी एक किंकाळी ऐकूं आली. गौरी गतप्राण झाली! गौरीविसर्जन झालें.

---

# वीरशैवांतील चळवळी

## कै० अण्णासाहेब कथले.

## बार्शीचे सौभाग्य हरपलें !!!

बार्शी शहरचे पिढीजाद नगरशेठ श्रीमंत श्रीनागनाथ संभुआप्पा ऊर्फ अण्णासाहेब कथले हे ता. १४-१-३७ रोजी रात्री १२। वाजता पक्षघाताच्या विकाराने शिवैक्य झाले हें कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें. यांचें वय सुमारे '५४ वर्षांचें होतें. इंग्रजी शिक्षणाचा गंध नसतांना व राजकारण इं. गोष्टींचा व्यासंग नसूनहि त्यांचे बार्शी शहराचेंच काय परंतु

सोलापूर जिल्ह्यांतील पुढारीपणाचे प्रत्येक सुशिक्षित माणमास नवल वाटत होतें. अलीकडील पुढारी ह्मणवून घेण्यास लागणारे गुण ह्मणजे इंग्रजी अगर हिंदीचा अभ्यास व कर्तृत्व, पेहेराव, यापैकी कोणतीच गोष्ट किंवा कला त्यांच्या ठिकाणीं दिसून न येतां, सरकारी धोरण व देशकारण यांचा योग्य समन्वय, प्रत्येक गरीब माणसाच्या अडचणी शहानेच वन्हे तर कृतीनें नाहीशा करण्याची तत्परता, ध्येयावर सर्वस्वी व अढळ विश्वास, धर्मगुरुंनाहि लाजविणारे त्यांचें स्वधर्माचरण असून सर्व धर्माविषयीं सक्रिय सहानुभूती; हिंदु-मुसलमानतेढीचे भूत सर्व देशांत नाचत असतां व सोलापूर शहर त्यांत होरपळून निघालें असतां हिंदूपेक्षां मुसलमान बंधूंचा पूर्ण विश्वास, म्यु. पालटी सारख्या प्रमुख संस्थेत सुरवातीस तोंड पाडून व स्वतः प्रेसिडेंट ह्मणून अगदी अल्पकाळ राहून, गेली २० वर्षे म्यु. पालटीबाहेर राहून स्वतःचे धोरणाप्रमाणें निवडणुकी यशस्वी करून दाखवून आपले प्रभुत्व कायम ठेवणें, या गोष्टी खऱ्या पुढाऱ्याचे निदर्शक नाहीत काय? त्यांच्यात खरा पुढारीपणा आहे किंवा नाहीं याचेकरिता त्याचे धर्माचे व इतर पंथाचे लोकांनीं व्यापाऱ्यांनी, श्रीमंतानी त्यांना वेळोवेळी कसास लावून पाहिले परंतु उत्तरोत्तर जास्तच यशस्वी होत गेले. ते पिढीजात श्रीमंत घराण्यांतील असून प्रमुख व्यापारी, जमीनदार, एका लिमिटेड बँकेचे मॅनेजिंग एजंट, बेंच मॅजिस्ट्रेट, बार्शी कोऑपरेटिव्ह बँकेचें डायरेक्टर, बार्शी येथील वीरशैव विद्या संवर्धिनी मंडळीचे सतत २५ वर्षे प्रेसिडेंट,बार्शी – गोरक्षण संस्थेचे प्रेसिडेंट व बन्याचशा देवळांचे पंच इतका व्याप सांभाळून प्रत्येक गोरगरीबाची दाद लावणें या सर्व गोष्टी पाहिल्या तर त्यांनी श्रीमंती दाखविली नाही, सत्ता गाजविली नाही व ऐषाराम केला नाही, तर ते खरे कर्मयोगी होतें असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होईल काय? बार्शीसारख्या २५ हजार वस्तीच्या शहरांत मुलेमुली व संक्रांतीचा सण असल्यामुळें स्त्रिया सोडल्या तर सर्व नागरिकांनीं म्हणजे जवळ जवळ १० हजार मंडळीनीं त्यांच्या प्रेतयात्रेंत भाग घेतला. हजारो स्त्रीपुरुषानी अश्रु ढाळले व शेंकडो सुवासिनींनी पंचार्त्या ओवाळल्या, पुष्पाहार घातले. त्यांचे सन्मानार्थ म्युनिसिपल-ऑफीस, बालदिनाचा कार्यक्रम, शाळा, हायस्कूल, बाजार, गिरण्या, व वैराग पंढरपुरचा बाजार बंद ठेवण्यांत आला. सोलापूर, पंढरपूर, वैराग, मंगळवेढे, पुणें, बारामती, पुसद, केम, खेड, अवसरी, यवतमाळ, वगैरे ठिकाणांहून मंडळी त्यांचे प्रेतयात्रेस आली. शेकडों ठिकाणाहून सांत्वनपर विद्युत्संदेश आले. प्रेतयात्रेनंतर सोलापूरचे श्रीयुत नागाप्पाअण्णा अबदुलपूरकर, बार्शी – म्युनिसिपल चे प्रेसिडेंट श्रीयुत यावसाने, श्रीयुत साने वकील व श्रीयुत भातकर यांचीं गौरवपर व सहानुभूतिपूर्ण अशी भाषणें झालीं त्यां वेळीं सर्वांना जो गहिवर आला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यांची क्रिया, समाधी, त्यांचे मालकींचे कुलदैवत श्रीमल्लीकार्जुनचे देवालयांत त्यांचे माता पित्याचे समाधीसमोर करण्यांत आली. संध्याकाळी दुखवटयाची जाहीर सभा श्री. ऐनापूर माळतीचे देवालयांत श्रीयुत शहा वकील यांचे अध्यक्षतेखाली झाली. त्यात श्रीगुरु परांडकर स्वामी, पंढरपूरचे श्रीयूत शंकरराव कटप, श्रीयूत साने वकील, सोलापूरचें श्री. देशपांडे शेठ जाजू, श्री. सरसेनमाई श्री. भातकर यांची गौरवपर भाषणें झालीं. दुखवटयाचा ठराव त्यांचें बंधु श्री. दे. भ. भगवंतराव कापसे यांचेकडे पाठविण्यांत आला. बार्शीचे मुसलमान बंधुनीं वरील सभेंत भाग तर घेतला परंतु स्वतःची स्वतंत्र दुखवटयाची सभा करून त्यांनी आपला विश्वास व आदर व्यक्त केला. त्यांचेमागें त्यांना कॉंग्रेसच्या बतीनें मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीस उभे राहिलेले श्री. दे.

भ. भगवंतराव कथले हे बंधु असून दोन अज्ञान मुले व तीव मुली याशिवाय त्यांचे धाकटे बंधु कैलासवासी दादासाहेब कथलें यांचा अज्ञान असा परिवार आहे.

गेल्या वर्षापासून कै. अण्णासाहेबांचे व आमचे संबंध विशेष निकटवर्ति झाले होते. आमचे स्नेही पुसदचे श्रीमंत गोबाजीराव मुखरे ह्यांना त्यांची भाची सौ. माईसाहेब ह्या दिल्या व लग्नसमारंभ कै. अण्णासाहेबांच्याच वाड्यांत वाशीं येथें झाला. ह्या खानगी संबंधामुळे कै. अण्णासाहेब हे आम्हाला आमच्या कुटुंबापैकीच वाटत असत. त्यांच्या निधनामुळें आपल्याच कुटुंबांतील एक कर्तासवरता वाणेदार पुरुष नाहिसा झाल्याचें दुःख आम्हांला होतें. कै. अण्णासाहेबांच्या निधनामुळें सार्‍या महाराष्ट्रीय वीरशैवसमाजाला हळहळ वाटत आहे. कै अण्णासाहेबांचे बंधु भगवंतराव ह्यांच्या दुःखात ह्या भागांतील सारा वीरशैवसमाज सहभागी आहे असें आम्ही प्रदर्शित करूं इच्छितों. ईश्वर मृताचे आत्म्यास शांति देवो.

---

## यवतमाळ-जिल्हा-परिषदेचे

ज. सेक्रेटरी कळवितात.:—

माघ वद्य ९ संवत् १९९३ ता० ६।३।१९३७ रोजी तळेगांव, ता० दारव्हा जि० यवतमाळ, येथे भरणाऱ्या यवतमाळ-जिल्हा-वीरशैव-परिषदेच्या कार्यकारी मंडळ, आणि अध्यक्षांच्या निवडणुकीप्रीत्यर्थ दारव्हा येथे श्रीगुरुमूर्ती वीरलिंग स्वामी यांचे मठांत, वीरशैव सानीम मंडळाचे कार्यालयांत आज रोजी रात्रो सभा बोलावण्यांत येऊन परिषदेच्या अध्यक्षस्थानीं श्रीयुत रामचंद्र शिवबा शेट कुल्ली रोहिणखेडकर, यांची सर्वानुमतें निवड करण्यांत आली. आणि पूर्वी जाहीर केलेल्या अध्यक्षांचे, श्री. स्वामी माजलगांवकर यांचे नांव, त्यांच्या प्रायश्चित्तविषीचे प्रकरण विकोपाला गेले असल्यामुळे, आणि या बाबतीत समाजांत बरीच दुफळी माजण्याचा संभव दिसल्यामुळे कमी करण्यांत आलें. यवतमाळ-जिल्हा-परिषद ही सर्व मताभिमानी व सर्व पक्षांची परिषद आहे व ती त्याप्रमाणें यशस्वी व्हावी म्हणून सर्वच पक्षांना ज्याचेसंबंधी आदर आहे असे वयोवृद्ध समाजपुढारी श्रीमंत रामभाऊ शेट रोहिणखेडकर ह्यांची सर्वानुमतें अध्यक्षस्थानी निवड केली आहे. तसेंच पूर्वीच्या स्वागताध्यक्षांना प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें आपलें स्थान स्वीकारतां न आल्या कारणानें कार्यकारी मंडळाची निवडणुक खाली दिल्याप्रमाणें सर्वानुमतें करण्यात आली.

स्वागताध्यक्षः—श्रीयुत माधवराव बापू-
आप्पा खंदाडे दारव्हा.

खजीनदारः—आनंदराव पिराजी चप्रके
तळेगांव.

सेक्रेटरीजः—रामभाऊ शिवाप्पा शेटे दारव्हा.
„ मलकार्जुन सिवाप्पा जिरगें.
दारव्हा.
„ गणपत अप्पाजी कोरे „
„ बापूराव पुंजाप्पा भाटपूरे „

सभासदः—काशीनाथआप्पा संभूअप्पा तळेगांव.
„ संभूआप्पा ईराप्पा तळेगांव.
„ गणपत आप्पा तंबाखें चिचगांव.
„ रामाप्पा विवेकर नरवेगांव.
„ केशव घोंडाप्पा वडगांव.
„ डोमाप्पा विठोबा „
„ आनंदराव शंकरआप्पा „
„ सदाशिव आप्पा पांडुरंग आप्पा
दारव्हा.

वि. सूचनाः—परिषदेसंबंधी ज्या सद्गृह-स्थांना संदेश, लेख, अगर ठराव पाठविणें अस-ल्यास ता. २८ फेब्रुवारी पर्यंत श्रीरामशंभो पुराणिक दारव्हा या पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

नागपूरः—ता. १५-१२-३६ ला वीरशैव तरुणसंघाचे ऑफिसांत कार्यकारी मंडळाची जादा सभा भरून खालील ठराव एकमतानें पास झाला.

नागपूर येथील गुरुवर्य समाजातील प्रसिद्ध व प्रतिष्ठित कार्यकर्ते श्रीयुत तानबाजी बापुजी माजरखेडे दलाल यांचे जेष्ठ चि. श्री- अन्नाजी माजरखेडे व वी. त. सं. चे कार्यकारी मंडळाचे सभासद व आधारस्तंभ श्री. गोविंदराव माजर-खेडे यांच्या अकाली व आकस्मिक निधनाबद्दल वी. त. सं. ची कार्यकारी मंडळाची ही सभा हार्दिक अंतःकरणपूर्वक दुःख प्रदर्शित करीतें. पर-मेश्वर मृतांच्या आत्म्यांस शांति देवो.

## मुंबई वीरशैव स्नेहवर्धक मंडळ.

सदर संस्थेंचे परेल भोईवाडा येथें असलेलें ऑफीस तारीख १ जानेवारी १९३७ पासून खालीं करून दादर जी. आय. पी. रेल्वेस्टेशन-नजीक माधवजी ठाकरसी बिल्डिंग, पहिला मजला, वायगांव कॅ:सरोड या ठिकाणी आणिलें आहे. तरी सर्व पत्रव्यवहार त्या पत्त्यावर करावा.

सदर मंडळाचे विद्यमानें गुरुवार ता० १४ जानेवारी १९३७ रोजी रात्रो ८॥ वाजतां सदर मंडळाच्या ऑफिसांत संक्रांतीसंम्मेलन-मंडळाचें अध्यक्ष श्री. हरिलिंग घोंडलिंग देवध-रकर यांचे अध्यक्षतेखाली पार पडलें. सुर-वातीस सर्वत्रांचे आभार मानल्यावर मंडळाचे सभासद श्री. गणपत रामलिंग स्वामी बव-बारे यांचें पंचांगवाचन झालें. त्यानंतर मेसर्स देवधरकर, डॉ० वडगांवकर, भा. गो. आडिवरेकर जी० वी० आंधळकर बी. नारायण स्वामी वगैरे सभास-दांनीं मकरसंक्रांतीचें व तिळगूळाचें निरनि-राळ्या प्रकारें विवेचन करून मंडळास बळकटी आणण्यासाठीं चिकाटीनें प्रयत्न करावेत असें प्रतिपादन केलें. याप्रमाणें सदर समारंभ रात्रो १० वाजतां बरखास्त झाला.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ फेब्रुवारी १९३७ ( अंक ४ था

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २॥ रु. } किरकोळ अंकास २ आणे.

---



---

# सोलापूरचे दानशूर वीरशैव पुढारी काडादी बंधू.





कै० श्रीमंत वंडाप्पा अण्णा काडादी ह्यांचे हे उभय चीरंजीव असून हे कर्ते होतांच ह्यांनी वीरशैवांचे बोर्डींग बांधून चालविलें आहे, आणि मातोश्रीच्या स्मरणार्थं एक धर्मार्थं दवाखान्याची सुंदर व भव्य इमारत बांधली आहे. ह्या इमारतीच्या उद्‌घाटनार्थंच चित्रकलदुर्गांचे महास्वामींचें आगमन सोलापूरांत झालें होतें.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय:। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनय: स्त्रिय:वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति फाल्गुन शु० ५ शके १८५८ ( अंक ४ था.

## रावसाहेब अण्णापा नारायण कल्याणी यांचें

# अल्प चरित्र

( लेखक:—मुरलीधर मल्हार पोरे. बी. ए. ).

" Lives of great men all remind us
that we can make our lives sublime. "

Long fellow.

थोरांच्या चरित्रापासून असा बोध घ्यावयाचा असतो कीं, प्रयत्न केल्यास आपणांसहि मोठेपणा प्राप्त करून घेतां येणें शक्य आहे. मोठेंपणा अनेकविध आहे. व्यावहारिक जगांत धनप्राप्तीनें मिळालेला मोठेपणा सामान्य जनास आकर्षक आणि नमुनें-दार वाटतो. याकरितां निकृष्टावस्थेंतून उन्नती करून घेऊन श्रीमंत झालेल्या व्यक्तींचीं चरित्रें सध्यांच्या बेकारीच्या काळांत अनेकांस उद्बोधक होतील असें वाटतें. धनप्राप्ति ही मानवी कर्तृत्वावर बव्हंशानें अवलंबून असतें इतकेंच नव्हें, पण " करणी करे सो नर का नारायण हो जाय ," ही म्हण कर्तुत्ववान् पुरुषांच्या अद्वितीय उत्कर्षामुळेंच प्रचारांत आली असली पाहिजे. आपल्या परिचयाच्या अनेक उदाहरणांवरूनहि या म्हणीची सत्यता

पटविता येईल. बाटल्यांचें दुकान चालणारे जमशेटजी आपल्या कर्तृत्वानें कोट्याधीश बनून, सर जमशेटजी जीजीभाई बारोनेट झाले! धान्याचीं पोतीं मोजणारा कारकून वॉरन हेस्टिंग्स गव्हर्नर जनरल झाले! याच-प्रमाणें आपल्या कर्तबगारीच्या व शहाणपणाच्या जोरावर निकृष्टावस्थेंतून वर जाऊन लोकांना आदर्शभूत असणारीं माणसें किती तरी झालीं आहेत. अशाच कर्तबगार व बुद्धिमान् माणसा-मध्यें रावसाहेब अण्णाप्पा नारायण कल्याणी यांची प्रामुख्यानें गणना होते. यांनीं तीस वर्षांच्या अवधींत दीर्घोद्योग, प्रामाणिकपणा, व्यापार - चातुर्य, प्रसंगावधान, सहकार्य, मुत्सद्देगिरी, बंधुप्रेम, सद्गुण - ग्राहकता, योजकत्व, मित्रप्रीति, दातृत्व, क्षमाशीलता व सहनशीलता या गुणसमुच्चयाच्या बलानें आपली उन्नति करून घेतली आहे. सध्यां तें धनाढ्य व्यापारी, सुखवस्तु व संपन्न शेतकरी, लोकल सेल्फ गव्हर्नमेंटमध्यें प्रमुखस्थानाची जबाबदारी शिरावर घेऊन ती यशस्वी तऱ्हेनें पार पाडणारे लोकाग्रणी, सहकारी सोसायट्या व बँकांमध्ये मनोभावें भाग घेणारे सन्मान्य मेंबर, आणि लोकहि-ताच्या अनेक संस्थांचे मुख्याधिकारी आहेत. अशा या व्यक्तीचें चरित्र लोकांना प्रोत्साहक होईल अशीं खात्री आहे.

रावसाहेब आण्णाप्पा नारायण कल्याणी यांचें पणजे बाळाप्पा महादाप्पा कल्याणी हे कोळें गांवचे सुखवस्तु रहिवाशी असून ते कराड ते चिपळूण बंदर या मार्गानें बैलाच्या पाठीवर मालाची नें आण करून व्यापार करीत. त्यांचा व्यापार त्या काळीं चांगला प्रसिद्ध होता. त्यांच्यामागें त्यांचे चिरंजीव माहादाप्पा हे तसाच व्यापार करूं लागले. माहादाप्पास चार मुलगे होते. १ नारायण २ आप्पा ३ हुच्चि ४ सदोबा हे चौघेहि व्यापारच करीत. रा. आण्णाप्पा कल्याणी यांचे वडिलांचा व्यापार मोठ्या प्रमाणावर व आजे - पणजे यांच्या धर्तीवरच चालला होता. नारायण कल्याणी यांची कोळच्यास दोन तीन घरें आणि अंदाजें ३०० रुपये आकाराची जमीन होती. त्यांना व्यापारांत तोटा आल्यानें २५००० रुपयांस घरें व जमीन सावकाराकडे गहाण देणें भाग पडलें. त्यांचें शके १८१६ सालीं देहावसान झालें. नारायण कल्याणी यांना रेवाप्पा, आण्णाप्पा व शंकरराव असे तीन मुलगे. पैकी रेवाप्पा हे अल्पायुषी असल्यानें नारायण कल्याणी यांचे मागें रा. आण्णाप्पा यांच्यावरच कुटुंबपोषणाचें ओझें पडलें.

रावसाहेब आण्णाप्पा कल्याणी यांचा जन्म शके १८०५, सुभानु नाम संवत्सरें, पौष शुद्ध पंचमी गुरुवार म्हणजे तारीख ३।१।१८८४ रोजीं, त्यांचें आजोळ कुसूर ता. कराड जि. सातारा एथें झाला. त्यांची जन्म-कुंडली खालीं दिली आहे :—




शुभं भवतु

श्री

जन्मपत्रिका स्वस्ति श्री नृपशालिवाहन शके १८०५ सुभानु नाम संवत्सरे दक्षिणायने हेमंतर्तौ, पौषमासे, शुद्धे पक्षे, पंचम्यां तिथौ गुरुवासरे घटी २४ पलानि ३९ शततारका नक्षत्रं घटी २३ पलानि १६ व्यतिपात योग,

घटी ४० पलावि ५९ बालव कर्णः घटी २४ एवं पंचांगम् ॥ सूर्योदयात् गत घटी २८ पलावि ३३ तत्समये राजश्री नारायण कल्याणी धर्मपत्नी सौभाग्यवती काशीनाम्नी तृतीया पुत्रं पुत्ररत्नं प्रसूता॥

रा० आण्णाप्पा यांच्या मातोश्री शके १८१५ व वडील शके १८१६ साली निवर्तल्यामुळे त्यांना आईबापांचे सुख दीर्घ काल लाभलें नाही. वडील बंधूंचीहि इहलोकची यात्रा लवकरच संपल्यामुळे आण्णाप्पा सर्वस्वी पोरके होऊन उघडे पडले. मातापित्याच्या अल्पसहवासांत त्यांना नैतिक व धार्मिक वळण योग्यप्रकारें मिळाल्यामुळे भावी कर्तृत्वास योग्य अशी मनोभूमिका त्यांच्या ठिकाणी तयार झाली. अनेक पिढ्या चालत आलेला व्यापार हेंच त्यांचे वडिलोपार्जित धंदा होय. “ अर्भकाचे पाय पाळण्यांत दिसतात,”या उक्तीप्रमाणें त्यांच्या भावी व्यापारनैपुण्याची पूर्व चिन्हें त्यांच्या बाल्यावस्थेंतच दिसूं लागलीं. लहानपणच्या त्यांच्या आयुष्यांत व्यापारविषयक व्यवसाय व खेळ ते खेळत. शाळेंत असतां ते कराडाहून पाट्या, पेन्सिली, कागद, वेळ, शाई हे जिन्नस आणूत ते विकत. हें त्यांच्या व्यापारविषयक आवडीचें स्पष्ट चिन्ह होय.

रा० आण्णाप्पा हे कोळें येथील मराठी शाळेंत तारीख ११-८-१८९० ला दाखल झाले आणि तारीख २५-१-१८९८ ला त्यांनी शाळा सोडली. त्या वेळच्या उत्तम विद्यार्थ्यांपैकीं ते एक होत. ते ७॥ वर्षें शाळेंत होते. आरंभी राकेला अभ्यास ४।२ महिने, व तीव काढण्यास १।२ महिने. हा वहिवाट विचारांत घेतां त्यांनी ७ इयत्ता पार पाडिलेल्या आहेत. त्यांच्या वेळच्या विद्यार्थ्यांपैकी अगदी थोडे विद्यार्थी वरिष्ठ इयत्तेत जात असत. हा विचार केल्यास ते एक हुषार विद्यार्थी होते हें खास.

वडीलार्जित इस्टेट गहाण पडलेली, वडील मातोश्री व वडील बंधु वारलेले, दुसरें कोणी मिळविणारें नाही, या मुळे रा. आण्णाप्पा यांच्या दैन्यावस्थेला पारावार राहिला नाही. त्यांनी शाळा सोडली त्यावेळीं त्यांचें वय अवघे १४ वर्षांचें. या सर्व बाबी विचारांत घेतल्यास रा. आण्णापा यांना दाही दिशा आठवून काय करावें काय न करावें असें होऊन गेलें असेल. पण या धैर्यमेरु बटूनें न डगमगतां आलेल्या परिस्थितीस धीरानें तोंड दिलें. अल्पवयांत जें सुचलें तें तें केलें, आणि ते नैसर्गिक प्रवृत्तीस अनुसरूनच केलें. त्यांना व्यापाराची हौस फार. पण भांडवल आणि योग्य व्यापारी अनुभव यांची पूर्ण वाण. यामुळें स्वतंत्र व्यापार या वेळीं करतां येणें मुष्कीलीचें झालें.

अशा अत्यंत अडचणीच्या प्रसंगीं रा. आण्णापा यांना नोकरीखेरीज गत्यंतर राहिलें नाहीं. यामुळें त्यांनीं रामचंद्र दामोदर गुजर यांच्या दुकानीं नोकरी पत्करली. ही नोकरी उमेदवारीची असल्यानें पगार अगदीं थोडा म्हणजे कटचाच्या पोटापुरता कसा तरी मिळे. या नोकरींतही त्यांचा प्रामाणिकपणा, व्यवहार–चातुर्य, उद्योग–लालसा हे गुण उठून दिसले. या उमेदवारींत व्यापाराचीं मूलतत्वें कळून आल्यावर व आत्मविश्वास उत्पन्न झाल्यावर त्यांनीं नोकरीस रामराम ठोकला. नोकरीमध्यें शके १८२० पासून १८२३ पर्यंत त्यांचा काल गेला.

शके १८२३ सालापासून ते थोडथोडा स्वतंत्र व्यापार करूं लागले. त्यांच्या व्यापाराचे मुख्य जिन्नस हळद, गूळ, शेंगदाणा, हे होत. वडिलांना या व्यापारांत ठोकर बसली होती, तथापि त्यांची पिढिजाद धंद्यावर प्रीति असल्यामुळे तोच धंदा त्यांनी चालू ठेविला. त्यावर इस्टेट सावकाराकडे गुंतलेली व रोकड भांडवल मुळींच नाही यामुळे प्रथम प्रथम त्यांना काळया मालचा चिंतण्याची पाळी आली.

आरंभींचा त्यांचा व्यापार सत्पत्तीवर चालू झाला. त्यांत दक्षता व धोरण ठेवून ते जोराचा प्रयत्न करूं लागले. उत्तरोत्तर त्यांच्या व्यापारांत त्यांना फायदाहि चांगला होऊं लागला. पुढे थोडयाच कालांत त्यांचें स्वत:चें थोडे भांडवल झालें. यामुळे त्यांना हुरूप येत चालला. ५-६ वर्षे त्यांचा व्यापार किफायतशीर होत गेल्यानें त्यांनी वडिलांच्या हातचें कर्ज भागविण्यास आरंभ केला. शके १८२९ सालापासून शके १८४४ पर्यंत त्यांनी सर्व भागविलें. त्यांच्या कर्जफेडीचें वैशिष्ठ्य ह्मणजे कर्जाची पै न पै सव्याज त्यांनीं सावकाराच्या घरीं नेऊन पोंचती केली. त्यांच्या व्यापाराच्या भरभराटीचें अनुमान त्यांनी भरलेल्या इन्कमटॅक्सवरून करितां येते. ते आरंभी २० रुपये प्राप्तीवरील कर देत. तो वाढत वाढत ५००० रुपयांपर्यंत झाला. त्यांचा कोळचाचा व्यापार सुरळीत चालूं लागल्यावर त्यांनीं सांगलीसहि दुकानें काढिलीं होतीं.

हल्लींही त्यांचा अवाढव्य व्यापार आहे. कोळें, कराड, आणि कराडस्टेशन या तीन ठिकाणीं त्यांचीं दुकानें आहेत. लक्षावधि रुपयांची शेंग, हळद व गूळ यांची खरेदीविक्री ते करितात. मोसममध्यें मालाची वाहातूक करण्यास दोन लॉऱ्या त्यांच्या स्वत:च्या आहेत. शेंगाचे पर्वतप्राय ढीग त्यांच्या दुकानापुढे पडत. शेंगा फोलण्यास, हळद घोळण्यास, त्यांचीं तीन मोठीं इंजिनें आहेत. सध्यां ते सातारा जिल्ह्यांतील १ ल्या नंबरचे व्यापारी असून हळदीचा व्यापार करणारे मुंबई इलाख्यांतील प्रमुख व्यापारी आहेत. व्यापार व शेती याकरितां २०० नोकर त्यांच्याकडे आहेत. व्यापाराच्या सोईकरितां त्यांनीं कराड ते कोळेंपर्यंत टेलीफोन ठेविला असून, त्याकरिता दरसाल ११८० रुपये टॅक्स ते भरतात. त्यांच्या तिन्ही दुकानचें दिशा दाखविण्याचें काम त्यांनी आपणा स्वत:कडे ठेविलें आहे. जलद प्रवास करितां यावा आणि कधींच कामाचा खोटी होऊं नये ह्मणून त्यांच्या दोन टूरिंग कार्स आहेत. तेजीमंदी साधिणें, योग्य प्रसंगीं योग्य दरांत माल खरेदी करणें, चांगल्या-वाईट मालाची परीक्षा करणें, या बाबींत रावसाहेबांचें चातुर्य वाखाणण्यासारखें आहे.

रावसाहेब आण्णाप्पा कल्याणी यांची वडिलार्जित शेती गहाण होती ती त्यांनीं मोकळी केलीच, पण व्यापार करीत – करीतच त्यांनीं नवीन जमीन पुष्कळच खरेदी केली आहे. आजला त्यांची १००० रुपयें साऱ्याची जमीन घरीं ठेवून केली जाते. याशिवाय दुसऱ्यांकडे लावलेली व गहाण घेतलेली जमीन वरील आहे. ते स्वत: शेतकीचें फारच शौकी आहेत ह्मणून ते पुष्कळ शेती घरीं ठेवून ती स्वत: करितात. शेतीस उपयोगी अशीं गाई बैल हीं जनावरें त्यांनीं १५०-२०० पाळलीं आहेत. याशिवाय ह्त्ती घोडे हींहि जनावरें त्यांच्या घरीं आहेत. त्यांच्या बागायत शेतींत ऊस, हळद, यांची सुधारक पद्धतीनें पैदास होते. सुधारलेलीं औतें, रासायनिक खतें, निवडक बीं यांचे प्रयोग ते आपल्या शेतींत करितात. यांची पाणी देण्यास ऑइल इंजिन ठेवलें आहे. यांची शेती ह्मणजे आसपासच्या शेतकऱ्यांना एक अनुकरणीय उदाहरणच आहे. शेतीच्या कामांत त्यांचे धाकटे बंधु श्री. शंकर नारायण कल्याणी हे प्रामुख्याने मदत करितात. तथापि पिकांच्या लागवणींतील धोरण ठरविणें, माल अनुकूल भावानें विकणें, खतांची निवड करणें हीं कामें रावसाहेबांच्या कल्पनेनेंच होतात. आसपासच्या शेतकऱ्यांची सुधारणा व्हावी याबद्दल त्यांची फार खटपट असते. शेतकऱ्यांना ते आस्थेने मदत करून त्यांच्या अडचणी दूर करण्याचा ते सतत प्रयत्न करितात. त्यांच्या कुटुंबातील इतर मंडळींना सुद्धां शेतीं व शेतकरी यांच्याबद्दल कळकळ आहे. रावसाहेब कल्याणी हे कधार

तालुका शेतकी असोशिएशनचे प्रेसिडेंट आहेत. शेतकऱ्यांनी कर्जमुक्त व्हावें ह्मणून देशांतील पुढाऱ्यांचे प्रयत्न चालू आहेत तसे यांचेहि प्रयत्न चालू आहेत. सातारा जिल्हा लँड मार्गेज बँकेची स्थापना हा त्यांच्या प्रयत्नांपैकी एक भाग आहे. या बँकेचे ते चेअरमन सन १९३५ पासून आहेत. शेतकीविषयक प्रदर्शनें भरविण्या-सहि ते मदत करितात. ठिकठिकाणी औतें व बियाणें यांचे डेपो स्थापण्याच्या बाबतींत ते खटपट करितात. कोळें एथें एक असा डेपो स्थापन झाला आहे. शेतकऱ्यांच्या अडचणींची त्यांना पूर्ण जाणीव असून, प्रसंग साधून ते सर-कारच्या नजरेस ह्या अडचणी आणतात. या सर्व दृष्टींनी विचार केल्यास रावसाहेब कल्याणी यांच्या ठिकाणी शेती व शेतकरी यांच्याबद्दल किती आस्था आहे हें स्पष्ट दिसून येतें.

रावसाहेब कल्याणी यांची इमारतींच्या रूपा-नेंहि स्थावर इस्टेट पुष्कळ आहे. वडीलांच्या वेळची २।३ घरें कर्जमुक्त करून त्याशिवाय नवीन ३।४ इमारतीं कोळ्यास बांधिल्या आहेत. कराडासहि नवीन फॅशनची एक भव्य बिल्डींग बांधिली आहे. सातारा एथील गव्हर्नमेंट मिलि-टरी बरॅक्सहि त्यांनी सन १९३२-३३ सालीं घेतल्या आहेत. या बराकी सार्वजनिक हिताच्या कामाकरितां त्यांनी अनेक वेळा मोफत दिल्या आहेत. शिक्षकांचा रिफ्रेशर कोर्स, ग्रामसुधारणा-शिक्षणाचा वर्ग व प्रदर्शन, स्काँऊट जांबोरी या-करितां त्यांनी या इमारती फुकट वापरण्यास दिल्या हीं अगदी ताजी उदाहरणें आहेत.

रावसाहेब कल्याणी यांना लोकशिक्षणाबद्दलहि फार कळकळ आहे. शिक्षणविषयक चळवळींस ते प्रोत्साहन देतात. त्यांनी सातारा जिल्हा स्कूल बोर्डात मेंबर होऊन शिक्षणविषयक काम-गिरी केली आहे. कोळ्यास इंग्रजी क्लास काढण्यास तेच कारणीभूत असून सदर क्लास काढण्यास डिपॉझिट ह्मणून द्यावी लागणारी रक्कम त्यांनी एकटयांनी दिली आहे. कोळ्याच्या शाळेच्या शिक्षणविषयक प्रगतीबद्दल ते सतत काळजी घेतात. अनेक प्रसंगीं शाळेंच्या उन्नति-करितां खासगी मदतहि करितात. वीरशैव लिंगायत बोर्डींग स्थापन करण्याची ते खटपट करीत असून त्यांनी त्या कार्याकरितां ५००० रुपयांची देणगी दिली आहे.

लोकलसेल्फ गव्हर्नमेंट व रावसाहेब कल्याणी यांचाहि निकट संबंध आहे. ते कराड तालु-क्यातील रहिवाशी आहेत ह्मणून प्रथम ते कराड तालुका लोकलबोर्डांत सन १९१७ साला-पासून काम करीत आहेत. ते १९१७ सालापासून तों आतापर्यंत एकसारखे निवडून येत आहेत यावरून त्यांची लोकप्रियता अढळ आहे हें स्पष्ट दिसतें.

सन १९१९ सालच्या हिंदुस्थानच्या सुधा-रणा-कायद्याप्रमाणें जिल्हालोकल-बोर्डाचीं इले-क्शन्स सन १९२३ सालापासून होऊं लागलीं, तेव्हांपासून आतापर्यंत ते सातारा जिल्हा लोकल बोर्डांत निवडून एकसारखे आलें आहेत. ते त्या बोर्डांत स्कूल बोर्ड मेंबर व सन १९३२-३३ सालापासून आतापर्यंत प्रेसिडेंट आहेत. एकसारख्या दोन टर्मला ते जिल्हा-लोकल-बोर्डाचे प्रेसिडेंट आहेत यावरून त्यांचें त्या बोर्डांत वजन आहे हें दिसतें.

ते डेक्कन-ब्रिव्हिजबल-बोर्डाचे सन्माननीय मेंबर आहेत. अशा रीतीने बोर्डाच्या कार्यक्षे-त्रांत ते दीर्घ काल वावरत असून त्यांनीं लोको-पयोगी अनेक कामें केलीं आहेत. वांगव्हॅली रस्ता, कोळ्याचा लोकलबोर्ड दवाखाना, या त्यांच्या कराड तालुक्यांतील संस्मरणीय काम-गिऱ्या होत. जिल्ह्यांत अनेक ठिकाणीं दवा-खाने व गांवोगांवीं बैलगाडीचे रस्तेहि अली-कडे होऊं लागले आहेत. आणि त्या दृष्टीनें त्यांची खटपट नेहमीं चालू असते.

व्यापार व शेतकी हें त्यांचें मुख्य कार्यक्षेत्र आहे. व्यापारामध्यें मोसम साधणें व शेतकीमध्यें योग्य वेळीं योग्य कामें ही त्यांची महत्वाची जबाबदारी ते योग्य रीतीने पार पाडतात. तितक्याच दक्षतेनें ते लोकल बोर्डातहि काम करितात. कारण लोकल बोर्ड ही लोककल्याणाची बाब असल्यानें ते त्यांकडे आत्मीय भावनेनें पहातात.

तथापि एवढ्यानेंच त्यांचें कार्यक्षेत्र संपलें नाही. हे कराडचे बेंच – मॅजिस्ट्रेट होते. त्यांनीं कराड-म्युनिसिपालिटींतहि कांही दिवस काम केलें आहे. सध्या ते कराडचे गांव-मुनसफ आहेत. हें काम त्यांच्या कडे गेल्या पांच वर्षांत आलें आहे. या मुदतींत त्यांच्या न्यायदानानें अनेक लोकांचा निष्कारण होणारा खर्च किती तरी वाचला असेल. गांव–मुनसफ होणारी व्यक्ती अनेक समाजांच्या आवडीची व विश्वासाची असावी लागते. रावसाहेब कल्याणी हे कराड तालुका व गांव यांतील लोकांना प्रिय आहेत हें या अधिकारांच्या जागावरून स्पष्ट होत आहे. ते कराड–शेतकी–असोसिएशनचे प्रेसिडेंट ह्मणून ७/८ वर्षें काम करीत आहेत. ते सातारा लँड मॉर्गेज बँकेचे चेअरमन, कराड कोऑपरेटिव्ह बँकेच्या शाखा–कमेटीचे चेअरमन, सन १९३५ सालापासून आहेत. या त्यांच्या सर्व कामगिऱ्या पाहून सरकारनें त्यांना रावसाहेब ही पदवी सन १९३५ सालीं दिली आहे. आणि सन १९३७ फेब्रुवारीमध्यें होणाऱ्या मुंबई – लेजिस्लेटिव्ह असेंब्लीकरिता उमेदवार ह्मणून उभे राहिले आहेत. या सर्व बाबीवरून रावसाहेब आण्णापा नारायण हे " नृपतिजनपदानाम् दुर्लभः कार्यकर्ता, " अशा दुर्लभ व्यक्तीपैकी एक आहेत हें प्रत्ययास येतें.

# डॉ. देशमुखांची विपरीत विधानें

( लेखकः— श्री. पु. एस्. हिंगमिरे, सोलापूर. )

सोलापूर येथील एक व्याख्यानबाज पुढारी डॉ. जगदेवराव देशमुख यांनी १५ जानेवारीच्या 'संजीवनी'त "चित्रदुर्ग–महास्वामींचा सोलापुरांतील संचार आणि खरा प्रकार" या नांवाचा लेख लिहून सोलापूर–वीरशैवांतील सावळ्यागोंधळाचें खरें कारण विदित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचा तो प्रयत्न सपशेल फसला आहे. त्यांचा लेखहि निःपक्षपातीपणा दर्शविणारा खास नाही. त्यांनी सोलापुरांतील चळवळीचें कारण ह्मणजे 'सुदर्शन'चे संपादक कल्याणशेट्टी वकील व त्यांच्या पक्षाचे लोक हेच आहेत असें ध्वनित केलें आहे. पण मी ह्मणतों, श्री. कल्याणशेट्टी वकील हे तर हुबाला कारण नाही-तच; परंतु ज्या पक्षाची टिमकी वाजविण्याचा प्रयत्न जगदेवरावांनी केला त्याच पंचाचार्यपक्षाचे, जाहिरातींतून अकलेचे दिवे पाजळणारे

दुराराध्य पक्षाच लोकच याला कारणीभूत आहेत. जे स्वकपोलावर प्रतिष्ठितपणाचा शिक्का मारून घेतात, जे "संन्याशांचा अड्डुपालखींत बसलेले थाट्याला पाहवत नाही" असें ह्मणतात, जे निर्लज्जपणानें श्रीमज्जगद्गुरु यांना "गो बॅक" असें ह्मणतात, त्यांनीच अगोदर विसगा करण्यास सुरुवात केली ह्मणून त्या पक्षाचें हे असलें नाजूक लोकच कारणीभूत आहेत.

"गंगाबाई काडादी धर्मार्थ दवाखान्या"च्या उद्घाटनसमारंभाकरितां श्रीमज्जगद्गुरु आले त्या वेळीं त्यांनी नेहमीप्रमाणें श्री. वारद व अवदुलपुरकर यांना आज्ञापत्रें पाठविलीं. या आज्ञापत्रानुसार पंधरा पंच मंडळी रेवणसिद्धेश्वराचे देवालयांत गेली होती. आतां ही मंडळी तेथे कशाकरिता गेली होती हें पाहूं. डॉ. देशमुखांच्या मतें ही मंडळी श्रींचा सत्कार करण्याकरिता गेली होती. पण माझ्या मतें ही मंडळी जमण्याचें कारण कांही निराळेंच होतें. तेथे जमण्याचा हेतु सत्कार करावयाचा नव्हता. या लब्धप्रतिष्ठांना, श्रींना कांही प्रश्न विचारावयाचे होते. कांही कुत्सित कुशंकांचें समाधान करून घ्यावयाचें होतें. आणि श्रींकडून समाधाकारक उत्तर न आल्यास तुमचा सन्मान होणार नाही, "यू गो बॅक" असें ह्मणावयाचें होतें ! या वरील गोष्टीला विनतोड पुरावा सांपडतो. खालील मुद्दे खोडून काढण्याचा प्रयत्न जगदेवरावांनी करावा.

(१) श्रीमज्जगद्गुरुंच्या आज्ञापत्राला अनुसरून श्री. अवदुलपुरकर वारद प्रभृतींनी गांवांतून एक जाहिरात काढावयाला पाहिजे होती. पण ज्यांना श्रींचा सत्कारच करावयाचा नव्हता ते जाहिरात काढण्याच्या भरीस कां पडतील ? ज्या दिवाभीतांना अंधारांतच आपलें कार्य उरकून जावें असें वाटत होतें, ते दर्शनेच्छु भक्तांना कां बोलावतील ? रेवणसिद्धेश्वराचे देवालयांत जमणाऱ्यापकीं पुढाऱ्यांनी आपलें कार्य कुणाच्याहि नजरेस न पडतां, टीका न होतां, पार पाडलें जावें, अशाच हेतूनें भक्ताकरितां जाहिराती प्रसिद्ध करविल्या नाहीत–ह्मणूनच त्यांनी श्री. कल्याणशेट्टी यांच्या विनंतीला लाथाडून श्री. वारद यांना विनंतिपत्रकावर सही करूं नका असा बदसल्ला दिला.

( २ ) या मंडळींना सत्कारच जर करावयाचा होता तर त्यांनी श्रीमज्जगद्गुरूंना अगोदर तसें कां कळविलें नाही ? तसें कळविणें हेंच त्यांचें कर्तव्य नव्हतें काय ? कां आपलें कुणालाहि न कळवितां, श्रींनाहि न कळवितां, त्या बाजूनें मोटार आली कीं श्रींना तेथें उतरून घ्यावयाचें व मग त्यांचा सत्कार करावयाचा ? हीच का सत्काराची रीत ? डॉ. देशमुखसारख्यांना ही गोष्ट अगोदर कळावयास पाहिजे होती. पण दुर्दैवानें त्यांना तीं कळली नाही.

( ३ ) बरें सत्काराकरिता जी रेवणसिद्धेश्वराच्या देवालयाची जागा गांवापासून दोन मैल दूर तीं कां ठरविण्यांत आली ? नेहमीची जी प्रथा सिद्धेश्वरमंदिरांत कोणत्याहि पूज्य व्यक्तीचा सन्मान करावयाची—ती बाजूला करून ही निर्जन जागा कां पत्करण्यांत आली ? "वीरशैव हितवर्धक मंडळातर्फे निघालेल्या जाहिरातीस लाथाडून या पंच मंडळींनीं आपला सवता सुभा कां निर्माण केला ? डॉक्टरसाहेब आपण उत्तर द्या या प्रश्नाचे ! अहो या त्रिपंचक पंचांना आपलीं कार्यें अंधारांत पार पाडायची होतीं, त्यांना सिद्धेश्वरदेवालयांत जमणाऱ्या लोकसमुदायाची भीति वाटली व निशाचराप्रमाणें ते महाशय आडरानांत सत्कार करावयास निघाले!

( ४ ) आडरानांत सत्कार करण्यास जातेवेळीं कांहीतरी नागर-आदरातिथ्याचा अंश त्यांनी नेला असता तर पुढचा प्रसंग टळता

परंतु त्यांच्या कारस्थानाला योग्य असा सत्कार बहुतेक आडवळणींच आहे हें त्यांनी पूर्णपणें ओळखलें, व आडरानांत जायचेंच आहे तर चानटी आतिथ्य तेथें भरपूर करतां येईल ही त्यांची कल्पना, आणि त्यामुळें नागर-नीति त्यांनी पूर्णपणें त्यागिली. श्री मोटारींतून येतील तेव्हा त्यांना वाटेवरून उतरून आणण्यास पंच-प्रवृद्धांपैकी फक्त दोघांना रस्त्यावर उभे केले गेले. श्रीसारख्या पूज्य व्यक्तीला दर्शनासाठी देवळांत मंडळी जमली आहेत तर तिकडे तुम्ही चला असें सांगण्यापेक्षा सर्वच मंडळींनी बीना एक गट होऊन उत्थापन दिलें असतें तर? पण नाही. मुसोलिनीच्या मिजासीनें हे हुकूम फर्माविण्यांतच त्यांना स्वामींचा अपमान करावयाचा होता.

गांवांत "साडेचार वाजतां शुभागमन होणार" अशा जाहिराती निघाल्या होत्या. श्रीमज्जगद्गुरुंना मोटारींतून सोलापुरांत पोहचावयास सहा वाजलेले होते. आणि नेहमीच्या प्रथेनुसार सिद्धेश्वराच्या मंदिरांत जावयाचें ठरलेलें होतें. जवळ जवळ दीड तास उशीर झालेला आणि अशा वेळी या पंचांपैकी दोघेजण विनंति करायला आले; आणि दर्शन देण्यास, देशमुखांच्या म्हणण्याप्रमाणे, पांचदहा मिनिटांपेक्षां जास्त वेळ लागणार नाही असेंही सांगण्यात आलें. परंतु उशीर फारच झाल्यामुळें साहाजिक श्रींनी " उशीर झाला आहे, सिद्धेश्वर देवालयाकडे चला " असें सांगितलें व तें देवालयाकडे गेलें.

यामुळे झालें काय कीं, प्रतिष्ठितांना एकदम रागाचा झटका आला. पारा वर चढूं लागला. मानापमानाच्या व्याख्येचें थर्मामिटर एकदम निखळून गेलें. आपला अतिशय अपमान झाला असें वाटलें या प्रतिष्ठितांना ! अपमानाचें परिमार्जन करण्याकरितां यांनी जाहीराती काढल्या, थिल्लर चिरोटी काढण्यास मदत केली, आणि खरोखर यामुळेच धुळवडीला रंग चांगलाच भरूं लागला ! खरोखरच या पंचांचा अपमान झाला होता काय ? नाही. हें कदापि शक्य नाही. या महाभागांचे कुटिल बेत, श्रींच्या विनंतीनें धुळीस मिळाले, आणि ती उडलेली धूळ यांच्या नाकांत शिरल्यामुळें यांनी कुत्सित जाहीराती चिकटण्याचा परिपाठ ठेवला ! खरोखर ज्या महंतीयांचा " यू सिट् डाऊन " असा झालेला अपमान — खुद्द गव्हर्नरसाहेबांसमोर — होत नाहीं त्यांना या एका साध्या प्रसंगानें अपमान वाटावा? खरें मर्म तरी इथेंच आहे ! आता पसारे यांच्या वाड्यांतील सभेची हालहवाल पाहूं. या सभेच्या वेळीं पंचांनी घातलेला धांगडधिंगा त्यांना बिलकूल साजेसा नव्हता. या पंचांनी जवळ जवळ १५ मिनिटें उशीरा येऊन, पुन्हा, वर सभा मोडण्याचा घाट घालून योग्य ठराव तो नापास करविला, व दुसरा ठराव पास केला. त्यावरून असें ठरलें गेले कीं, श्रींचा सन्मान करावा असें मत या सभेचें आहे. सन्मानास व्यापकत्व आणण्याकरिता धुम्मा व उंबरजे ( रावसाहेब ) यांच्या सहीनिशी जाहीर सभा बोलवावी. पुढें रावसाहेब उंबरजे यांनीं श्री. धुम्मा यांना सभा बोलावण्याचा विचार करण्यासाठीं बोलाविलें असतां श्री. धुम्मा यांनी टाळाटाळ कां केली ? ही गोष्ट गुलदस्तांत ठेवण्याचें कारण काय हें डॉक्टरसाहेब, आपण सांगूं शकाल काय ?

श्री. वारद यांनीं खाजगी मिरवणूक काढली त्यावेळीं बाजारांतील बहुतेक दुकानें बंद होतीं असें विधान डॉ. साहेबांनी ठोकून दिलें आहे. त्या वेळीं बाजारपेठेंतील दुकानें बंद न ठेवणाऱ्या दुकानमालकांची मोजदाद केली असती तर ती आपणाला खास असें विधान ठोकूं देती का ! आपणाला जर लेखीच पाहिजे असेल तर मी तुम्हाला तोहि दाखवूं शकेन. बरें जीं दुकानें बंद होतीं त्यांच्यापैकीं जवळ जवळ ८० टक्यांची

आपण गैरसमजुतीने दुकानें बंद केलीं अशा अर्थाच्या एका पत्रकावर सह्या दिल्या आहेत. त्याहि पुरावा मी दाखवूं शकेल. बरें जीं दुकानें बंद झालीं होतीं तीं बंद करण्यांत दुराराध्य लोकांनी आपली पूर्वपुण्याई खर्च केल्याचें दृष्टोत्पत्तीस येते. याचाहि पुरावा देण्यास मी सिद्ध आहे. पण निषेधार्थ बहुतेक दुकानें बंद होतीं असें ह्मणण्यांत काय बरे अर्थ आहे ? श्रींच्या समोर कोणताहि अप्रिय प्रकार घडूं नये एवढ्यासाठीच श्रींना जलदीनें घरी नेण्यांत आले.

श्रींच्या आडवी-पालखी-महोत्सवाबद्दल आपण कांहीसें असंबद्ध असें लिखाण सरलें आहे. त्याचाहि योग्य परामर्ष घ्यावयास पाहिजे. डॉ. देशमुख ह्मणतात की, २००-३०० ठळक मंडळी काळीं निशाणें घेऊन रस्त्यांतून मिरवत (!) गेली. माझ्या मतें डॉ. देशमुखांना अतिशयोक्तीची अतिशय संवय असावी. अहो, काळीं निशाणवाल्यातर्फे प्रसिद्ध झालेल्या अतिशयोक्तीच्या जाहिरातींतदेखील निषेधकांचा समूह दीडशेपेक्षां जास्त नव्हता असें लिहिलें आहे; आणि तुह्मी एकदम आकडा दुप्पट वाढवितां ? पक्षांध लोकांपैकी दहा पंधरा जणांची ती सुतकी 'मिरवणूक ती काय, पंधराचे ते दीडशें करतात काय, आणि तुह्मी दीडशांची दुप्पट करतां काय? राईचा पर्वत केला तुह्मी ! आणि या सुतकी टोळीला पोलिसांनी रट्टे देऊन हाकलले हें कांही तुह्मी लिहिलें नाही ! आपण पुन्हा लिहितां कीं, ही तीनशें मंडळी ठळक होती. या ठळक लोकांची यादी प्रसिद्ध करायची तयारी असल्यास रुपाईचा खर्च मी द्यायला तयार आहे. ही तुमची एक कोणकडी थाप आहे यार ! वाचकांना आपलें खोटें ह्मणणें पटविण्यासाठी हा कावा आपण केला आहे.

" सदर अडुपालखीच्या मिरवणुकीस सन्मान्य – प्रतिष्ठित लोक गेले नाहींत " असें एक विधान आहे, तें तर सपशेल खोटें आहे. श्री. काडादी, वारद, सिटी मॅजिस्ट्रेट, अत्रे, डॉ. सरदार, शेठ वैकुंठलाल, श्री. कल्याणशेट्टी वगैरे लोक अप्रतिष्ठित आहेत काय ? वरील सर्व लोक प्रतिष्ठित आहेत, ते वरील मिरवणुकीस हजर होते. डॉ. साहेब, आपण मिरवणूक पाहण्यास आला नाहीत, घरांत बसून ऐकलेल्या गोष्टींवर निःपक्षपातीपणानें (!) लिहीत आहांत. अहो तुह्मी बाहेर आलां असतां तर दिसलें असतें तुह्माला ! बाकी पहावयाचें असेल तर त्या महोत्सवाची फिल्म घेतलेली आहे ती पाहून तरी डोळ्यांचें पारणें फेडून घ्या.

आपलें दुसरें – ज्याच्या खोटेपणाला सीमा नाही असें विधान " सोलापुरांतील कांही संस्थांतील एक एक दोन दोन व्यक्तींच्या सह्या गोळा करून आणि त्याला अखिल हिंदूंचें स्वरूप देऊन, अशा प्रकारचें पोकळ वाशाचें मानपत्र महास्वामींना अर्पण करण्याचा फार्सहि मध्ये उरकण्यांत आला. मानपत्रावर सह्या देणारे लोक ज्या संस्थांचे होते त्याच संस्थांमधील बरेच प्रमुख लोक मानपत्रविरोधक व असंमत असे उद्गार काढून त्यांनी जनतेच्या निदर्शनास हा मानपत्राचा केवळ फार्स असल्याचें जाहीर पत्रकाद्वारे मानपत्रसमारंभाचें वेळीच सिद्ध केलें. "

जगदेवराव, हिंदुमहासभेतर्फेच ज्या वेळीं त्यांच्यांतील जबाबदार सेक्रेटरीनें मानपत्रावर सही दिली त्याच वेळीं हें मानपत्र अखिल हिंदूंचें झालें. अखिल हिंदूंचें स्वरूप देण्याची जरूरीच नव्हती. इतर संस्थांनी स्वयंस्फूर्तीनें आपल्या जबाबदार सेक्रेटऱ्यातर्फे सह्या दिल्या; एक एक दोन दोन लुंग्या सुंग्या व्यक्तींच्या सह्या घेतल्या

नव्हत्या, तर त्या सेक्रेटरी अथवा प्रेसिडेंट यांच्या सह्या होत्या. त्याच विधानांतील दुसरा भाग बहुतेकांनी असंमत उद्गार काढले व एक जाहिरात छापली कीं, "हें मानपत्र अखिल हिंदूंचें नाही." व दुसरी एक सहीनिशीं जाहिरात छापली "हो जी दुसरी जाहिरात सहीनिशीं छापली गेली, तींत फक्त चारपांच संस्थांचा नामनिर्देश आहे, आणि त्या संस्थांतर्फे ज्या व्यक्तींचीं नावें छापलीं गेलीं ती सर्व मंडळी जबाबदार पुढारी नव्हती हें तुह्माला पटवून द्यावयास पाहिजे काय? आपण स्वतःच वर लिहितां कीं, मानपत्रावर सह्या एकदोघांच्यान घेतल्या. परंतु मी ह्मणतों, त्या सह्या जबाबदार पुढाऱ्यांच्या होत्या. दुसऱ्या जाहिरातींत ज्यांची नांवें तुमच्यातर्फे छापलीं गेलीं तीं नावें जबाबदार पुढाऱ्यांचीं बिलकूल नव्हतीं. आणि या सह्या मिळविण्याकरिता आपले बंधु श्री. शिवबाळप्पा देशमुख यांनी किती खटपट केली, किती हेलपाटे घातले, किती जणाकडून नकार मिळाला, किती जणाकडून टोले मिळाले, हें सर्व लिहावयास येथे जागा नाही. आपण थापा मारण्यांत अतिशय कुशल आहात असें पुढें वाचून तुमच्या लक्षांत येईल. कांहो, तुह्मी ज्या चार जणांनी आपलीं नावें मानपत्राविरुद्ध जाहिरातींतून काढून घेतलीं त्यांची हकीकतहि छापली नाहीत? डॉ. गोगटे यांची जी सही ह्मणून छापलीं गेली तीं त्यांनी किंवा त्यांच्या बंधूंनीहि दिली नव्हती. ती त्यांच्या नांवावर हिंदुसभेतर्फे त्यांना न विचारतां प्रसिद्ध व्हावी हें कशाचें द्योतक आहे? श्री. कोसंदर व सोनार यांनीहि आपल्या सह्या गफलतीने घेतल्या असें जाहीर पत्रक काढून समाजास कळविलें आहे. श्री. लब्बा यांची ह्मणून जी सही छापली गेली ती जबरदस्तीने—त्यांना आंतला मजकूर वाचूं न देतां घेतली गेली. श्री. लब्बा व श्री. गोगटे यांनीहि जाहीर खुलासा केला आहे. तो डॉक्टरांनी वाचावा. श्री. लब्बा यांनीं तर त्या जबरदस्तीबद्दल कायदेशीर इलाज करणार असल्याचें जाहीर केले आहे! या सर्व खुलासापत्रिका डॉ. नी वाचाव्यात. मला तर वाटतें, डॉक्टरांनी पत्रिका वाचलेल्या आहेत परंतु गुलदस्तांत ठेवण्यानें आपल्या लेखनाला पुष्टि मिळेल असें त्यांना वाटलें, व ह्मणूनच त्यांनीं आपल्या पक्षास मिळालेल्या थपडा निःपक्षपातीपणाने (?) गाळून टाकल्या आहेत. धन्य धन्य तुमच्या निःपक्षपातीपणाची!

आतां डॉक्टरांनी केलेल्या एक-दोन बेजबाबदार विधानाबद्दल लिहून मी लेख संपवितों. वीरशैव हितवर्धक मंडळ हें अचानकपणें जन्मलें असें डॉक्टर लिहितात. मी ह्मणतों कीं, या त्यांच्या विधानावरून त्यांना खास बुद्धिभ्रम झाला असेल. "वीरशैव हितवर्धक मंडळ" अचानकपणें जन्मलें नसून तें जन्मून दोन वर्षांवर दिवस लोटले आहेत. या संस्थेतर्फे दे. भ. मंजाप्पा अण्णा हर्डेकर श्री. टुमकूर शास्त्री श्री. चौधरी ('संजीवनी'चे सहसंपादक) व एकसारे, श्री. संगप्पय्या शास्त्री कर्नूल इत्यादिकांचीं व्याख्यानें-प्रवचनें झालीं आहेत. श्री. टुमकूर शास्त्री यांचें एक व्याख्यान तर खुद्द डॉ. देशमुख यांच्याच अध्यक्षतेखाली झालें आहे. इतकें असूनसुद्धां डॉ. देशमुख यांना त्या दिवसाची आणि या संस्थेची आठवण नसेल तर खरोखरच डॉक्टरसाहेबांची धन्य होय. त्यांनी मग असे लेख लिहिण्याचे प्रयत्न करूं नयेत एवढेंच मी सुचवतों. "सुदर्शन"-सारखीं वृत्तपत्रें समाजकलहास पक्षांधतेनें कारणीभूत होतात "हें एक जातां जातां दुगाण्या झाडण्याच्या इरादयानें केलेलें विधान होय. "सुदर्शन"ची किंमत किती आहे हें डॉक्टरांना त्यांनी 'सुदर्शन' पूर्णपणें वाचल्यास कळेल. फक्त मथळा वाचावयाचा व फेंकून द्यावयाचें अशीच वृत्ति जेथे डॉक्टरांच्या ठायीं, तेथे 'सुदर्शन'मधील स्वारस्य डॉक्टरांस कसें कळणार. आर्यसमाजाच्या आक्रमणाला

ज्यांनी तोंड पाडलें, व वीरशैवांच्या रक्षणाचा ज्यांनी चंग वांधला आहे, अशा ' सुदर्शन ' पत्राबद्दल वस्तुतः डॉक्टरांनीं कांहीहि लिहूं नये. पण डॉक्टरांना, श्रींच्याकडे अशी अशी मागणी 'सुदर्शन 'च्या गुणामुळे ते वंद करण्याची केली केली एवढे कसें तरी घुसडून ' सुदर्शन 'चा बद-लौकिक करावयाचा होता एवढेंच.

माझ्या प्रिय महाराष्ट्रनिवासी वाचकवर्गांनो, वर लिहिलेली हकीकत—टीका ह्मणा हवे तर—ही सत्य आहे. या दोन्हीचाहि तुमच्यापैकी एकानें निःपक्षपातीपणाने अभ्यास करून आपण तिसरा एक लेख लिहावा व सोलापूरांत चालू असलेल्या " सावळागोंधळ " नाटकाचा शेवटचा पडदा पाडावा अशी माझी अंतःकरणापासून इच्छा आहे.

---

# प्रयत्नांतीं परमेश्वर

( लेखकः— पी. एस्. जीरगे, सोलापूर. )

---

Don't grumble and grouse if yon've tried and failed
If yon've come in last in a race you have run
For setbacks are useful if next time you try
To copy the style of the fellow who one.

---

साडे अकरा वाजले. शाळेंत कंपाउंडांत गमत असलेलीं मुलें वर्गांत जाऊन आपआपल्या जागेवर स्थानापन्न झालीं. इंग्रजीचा तास पुरताच असल्याकारणानें मॅट्रिक क्लासांतील मुलें आपला धडा काढून क्लासमास्तरांचे पाठ ऐकत बसले होते. आजचा धडा चालू असता त्यातील कवितेचा अर्थ शिक्षक विद्यार्थ्यांना समजावून देत होते. इंग्लिश विषयांत भाषाप्रभुत्वाने हातखंडा मिळविल्याने शिवाजीस्कूलमधील प्रमुख शिक्षकांत श्री. कोरेगांवकर यांचा अग्रक्रम बोलबाला होता. त्यांत उद्बोधक कवितेचें स्पष्टीकरण करणेचे असल्यानें विद्यार्थ्यांना नानाप्रकारच्या उदाहरणाने प्रयत्नाने कोणतीहि अशक्य गोष्ट मनुष्य शक्य कोटींत आणूं शकतो असें सिद्ध करून दाखविलें. विशेषतः सुप्रसिद्ध अमेरिकन रहिवासी बुकर टी वॉशिंगटन याचें उदारण देऊन, बुकर टी वॉशिंगटन हा निग्रोजातीचा गुलाम पण त्यानें प्रयत्न करून शिक्षण घेतलें, अत्यंत बिकट परिस्थितीतहि आपल्या दलित समाजाला शिक्षण देऊन, मोठी संस्था चालवून त्यांचा उद्धार केला. बुकर टी वॉशिंगटनला पुष्कळ

मानहानि सोसावी लागली तरी प्रयत्नानें शेवटीं त्यांनी आपलें कार्य यशस्वी केलें हें सांगितल्याने बऱ्याच विद्यार्थ्यांच्या मनावर परिणाम झाला. त्यापैकींच विरुपाक्ष हा होता. विरुपाक्ष हा वर्गातील हुशार विद्यार्थ्यांपैकींच होता. त्यांस भाषाविषयाची आवड. या योगाने अत्यंत मनःपूर्वक रीतीने शिक्षकांच्या उपदेशाचें गृहण करून त्यावर त्याने विचारचक्र चालविलें. बुकर टी वॉशिंग्टनसारख्या गुलामाला प्रचंड संस्था स्थापून शिक्षणप्रसाराने गुलामांना पुनीत व त्यांचें बंधविमोचन करतां आलें तसेंच आपणहि आपल्या ज्ञातीला मागासलेपणांतून वर काढूं शकणार नाही? असा त्याने मनाशीं प्रश्न केला, व त्यांचें उत्तर कृतीनेच द्यावयाचें ठरविलें.

कोरेगांव हा लहान वस्तीचा गांव. त्यांत सोमेश्वरगल्ली ह्मणजे व्यापाऱ्यांची वस्ती. तेथेंच विरुपाक्षाने हिंदमाताक्लब काढून त्या क्लबातर्फे एक वाचनालय चालू केलें. दैनिक, साप्ताहिक व मासिकें तेथे आणवीत असत. वाचनालयांत वाचनाकरिता पुष्कळ जण जमत. प्रचलित विषयांचा विचार करीत, व चर्चा करीत व आपला कांहीं वेळ एका उच्च विचाराच्या तंद्रींत घालवीत. असा क्रम बरेच दिवस चालला. हिंदमाता-क्लबाच्या वाचनालयाची उपयुक्तता वाढल्याने दोन वर्षांनी कांही नियम व घटना तयार करून या लहानशा क्लबाचे एक कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें व हळूहळू अमोलिक ग्रंथसंचहि जमू लागला. विरुपाक्षाला आपण लावलेल्या या ज्ञानवेलीला हिरवी पालवी फुटून ती टवटवीत झालेली पाहून आनंद वाटल्यास नवल नाही. या अवधींत तोहि हायकोर्टवकीलीची परीक्षा देऊन वकील ह्मणून आपल्या गांवातच व्यवसाय त्याने सुरू केला. सदरी ग्रंथालयांतील ज्ञानामृततृप्तीने कांही वर्षांनी आळींतील कांहीं सद्गृहस्थांनी गरीब विद्यार्थ्यांना बोर्डींगहि चालू केलें. वाचनप्रियतेनें विचारास चालना मिळाली व विचारसाधनाने आचारसाम्य झालें. वाचनालयांत येणाऱ्या मंडळीपैकी कांहीं सद्गृहस्थांनीं विद्यार्थ्यांचे राहण्या-भोजनाचे निकडीचे प्रश्न सोडविल्याने बरेच विद्यार्थी हायस्कुलांतील शिक्षण संपवून आपलें उदरभरण व्यवस्थित रीतीने करूं लागले व त्यांतील उच्चशिक्षण प्राप्त केलेल्या विद्यार्थ्यांनी पुनः स्वग्रामींच एक शिक्षणसंस्था "हिंदमाता शिक्षण प्रसारक मंडळ" या नांवानेंच काढली व त्यामार्फत एक हायस्कूलहि चालविलें. अशाप्रकारें एका लहान खोलींत स्थापन केलेल्या वाचनालयाचें रूपांतर अशा विस्तृत संस्थेत झाल्यानें आमच्या विरुपाक्षाना किती आनंद झाला असेल! विशेषतः त्या शिक्षणप्रसारक मंडळांत विरुपाक्षप्पा विभुते वकीलांनाच अध्यक्षस्थान देण्यांत आलें व आपल्या या लघुकृतीचा अफाट विस्तार बऱ्याच वर्षांनी प्रयत्नानें साध्य झाला याचें सार आपण मॅट्रिक क्लासमध्ये असतांना आपल्या शिक्षकांनी केलेल्या शीर्षकांतील कवितेच्या स्पष्टीकरणांतच आहे हा विचार त्यांच्या स्मरणांत येऊन गेला!

---

# वाळवी लागलेली वीरशैवसंस्कृति

( लेखकः— डॉ. जगदेवराव अण्णाराव देशमुख, एल्. एम्. एस्. )

अलीकडे वीरशैव संस्कृति बुडाली व बुडविली अशा प्रकारची हाकाटी चोहोंकडून होत आहे, व तत्प्रीत्यर्थ अनेकांकडून अनेक सूचनाहि येत आहेत. परंतु त्यांत संस्कृति कोणीं बुडविली व कशी बुडविली व तिचें पुनरुज्जीवन कसें होईल याचा विचार कोणीहि करीत नाहीत असें दिसतें. एकेकाळीं वीरशैवधर्मावर मात्र जैनधर्मानें एक मोठा आघात केला, परंतु त्या वेळच्या गुरु-विरक्त व शिवशरणभक्तांनी मोठा जोराचा विरोध करून आपलें स्वतःचें मत प्रतिपादन करून वीरशैवधर्मावरची आपत्ति टाळली. त्याचप्रमाणें मुसलमान धर्माचे होत असलेले आघातहि टाळीत आली आहे. हे आघात उघड रीतीने झाल्यामुळे त्याचे दुष्परिणाम लोकांना दिसून त्यांस प्रतिकार करण्याची बुद्धि उत्पन्न झाली. परंतु सध्या एखाद्या घरास वाळवी लागावी व तें घर पोखरून जाऊन पडण्याच्या बेतांत येईपर्यंत मालकाला तिची हरकत नसावी अशाच प्रकारची परिस्थिति निर्माण झालेली आहे. वीरशैवसंस्कृति एवढेंच नांव शिल्लक राहून त्या धर्माचे आचारविचार व बंधनें नष्ट होऊन भस्म लावणें व मनास वाटेल त्या तऱ्हेची शिवपूजा करणें एवढी एकच गोष्ट वीरशैवांत शिल्लक राहिली. धर्म किंवा संस्कृति म्हटल्यानंतर त्याच्यामागे आचारविचार, उदात्त तत्वें संघटना, बंधनें, व पावित्र्य या गोष्टींची जोड असेल तरच ती संस्कृति होऊं शकते व ती टिकते. परंतु बौद्धधर्माचा आघात झाल्यानंतर व वीरशैवसंस्कृतीची पूर्वस्थिति निर्माण झाल्यानंतर गुरु-विरक्त किंवा भक्तवर्ग हा त्या यशानें धुंद होऊन आपआपल्या कर्तव्यापासून च्युत होऊं लागला. अलोट भक्तीमुळें भक्तवर्गांनी गुरु-विरक्तांना अनेक कायमच्या उत्पन्नाच्या सोयी करून ठेवल्या व त्यांची सुखसाधनें वाढविलीं व त्यामुळें भक्तवर्गाच्या धार्मिक आचारविचारावर एक प्रकारचें बंधन गुरुविरक्तांनी घालावयास पाहिजे तेंहि नाहीसें झालें. अशा परिस्थितींत कांही काळ जात असतांना परकीयांचें राज्य हिंदुस्थानावर आलें. त्यांनी कोणत्याहि धर्मावर प्रत्यक्ष असे आघात केले नसले तरी धर्मसंबंधाच्या उदात्त कल्पना, आचारविचार व अभिमान नाहीसा करण्याचा हळू हळू प्रयत्न केला गेला. पाश्चिमात्य राष्ट्रें आधिभौतिक शास्त्राच्या शिखरावर गेल्यामुळें सुखाची साधनें विपुल झालीं, व त्यांच्या सहवासाने, शिक्षणाने, तेंच हें जीवनाचें खरें साधन व साध्य आहे अशा प्रकारची विचारपरंपरा तरुण होतकरु अशा लोकांच्या अंतःकरणावर बिंबत चालली.

गुरु-विरक्तांची आध्यात्मिक वृत्ति नष्ट होऊन आधिभौतिक सुखाकडे, कायमचें उत्पन्न असल्यामुळे, कल अधिक प्रमाणांत वाढूं लागला व आपला सुशिक्षित व अज्ञान समाज वीरशैवसंस्कृतीपासून पारखा होऊं लागला. ह्याबद्दल बेफिकीरी उत्पन्न झाली. त्याचे नकळत परिणाम हळू हळू वाढत जाऊन ज्या वेळेला मनुष्य चोहोबाजूंनी नाडला जातो त्यावेळेला जसा परमेश्वराची आठवण करतो तशीच वीरशैवसंस्कृति नष्ट होण्याचे बेतांत आल्यानंतर सगळ्यांचे

होळें त्यांचेकडें लागूं लागलें. जोपर्यंत परकीय संस्कृतीच्या मागे लागणारे लोक थोडे होते तोपर्यंत त्याच्या मागे लागणाऱ्यांच्या ऐहिक सुखांत भर पडली. परंतु ती संख्या वाढत गेल्यामुळे तें सुख मिळेनासें झालें. त्यामुळे अर्थातच पाश्चिमात्य संस्कृतीशीं समरस झालेल्या अनेक बेकार तरुणांना आपल्या धर्माची आठवण होऊन त्यासबंधाने विचार करण्याची बुद्धि निर्माण होऊं लागली, व व्याख्यान व लेख यांचे द्वारे त्यांचे विचार प्रसिद्ध होऊं लागले. परंतु हें करीत असतांना मूळ संस्कृति व तिचे आचारविचार कोणत्या प्रकारचे आहेत यासबंधी विचार न करतां व त्यावर आपल्या बुद्धीचा उपयोग न करतां पाश्चिमात्य संस्कृतीमुळे त्यांच्या मनावर जे फेरफार झाले त्या परिणामाला पोषक असें कांही सांपडतें कीं काय याच्याकडे दृष्टि देऊन कांही शिवशरणांचीं वचनें आधारभूत धरून तींच धर्माची मूळ तत्वें आहेत असें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न होऊं लागला. परंतु हीं लिहिलेलीं वचनें जरी खऱ्या वीरशैवधर्माभिमान्याचीं आहेत असें धरून चाललें तरी संसाराची व संस्कृतीची आचारविचाराची ठराविक मर्यादा ओलांडल्यानंतर मनामध्यें विरक्तता उत्पन्न होऊन जी एक विचारसरणी आदर्श ह्मणून ठेवली गेली, तो कांही धर्म होऊं शकत नाही. शिवशरणांचीं वचनें हीं जशी उदात्त तत्वांचा विकास करणारीं असलीं तरी त्यांत धर्माचीं सर्व बंधनें शिथिल करण्याचा प्रयत्न केला आहे. जसे हिंदुधर्मापैकींच कांही साधुसंतांनी भागवतधर्म निर्माण करून सर्व भक्तांनी जातीजातीचा किंवा संस्कृतीचा विचार न करतांना, परमेश्वराची भक्ति करीत असतांना सर्वजण एकच आहोंत अशा प्रकारची भावना उत्पन्न करून, सर्व पंथांचे त्या वेळेपुरतें ऐक्य करून संघटना केली. तशाच दृष्टीनें या शिवशरणांच्या वचनांचा उपयोग करून शिवशरणपंथ निर्माण करण्याची इच्छा असल्यास तें एक वीरशैवी संस्कृतीचेंच अंग आहे असें जर अलीकडच्या विद्वानांचें मत असेल, तर ती एक ग्राह्य व योग्य सूचना आहे असें ह्मणतां येणार नाही. कांही शिवशरणांनी आजच्या मितीलासुद्धा न पटणारी अशीं कांही धर्मबाह्य कृत्ये केलीं असलीं, तरी त्यांच्या उपकृत अशा अनेक सद्‌गुणांचा विचार करून, आज सुद्धा त्यांच्या कृतीला प्रतिकूल असूनसुद्धा त्यांना परमेश्वरस्वरुप असें मानीत आले आहेत. उदाहरणार्थ बसवेश्वरासारख्या महान् अशा व वीरशैवसंस्कृतीच्या भक्तांना पूज्य अशा महात्म्याकडून ब्राह्मणाची मुलगी चांभाराला दिली व त्या वेळच्या त्यांच्या भक्ताकडून बाकीच्या अनेक उपकारक गोष्टीमुळें जरी विरोध केला नाही तरी ही गोष्ट वीरशैव संस्कृतीला मान्य आहे असें कोणीं कबूल केलें नाही, व वागलेहि नाहीत. अशा गोष्टीचा आधार घेऊन जर प्रचलित कालाचा विद्वान् लोक त्यांचें अनुकरण करु लागतील व उपदेश करतील तर या कालांतसुद्धा ती गोष्ट कोणाला पटणार नाही. आजच्या परिस्थितींत वीरशैवसंस्कृतीसंबंधी अभिमान उत्पन्न होण्यासारखें व आह्मी वीरशैव आहोंत याची जाणीव सतत तरुणांच्या अंतःकरणांत बाळगण्याला असा एकहि आचार तरुण पिढीपुढें शिल्लक नाही. भस्म लावणें व इष्ट लिंगावर पाणी घालणें एवढी एकच गोष्ट शिल्लक राहिली आहे. आता त्या भस्माचे पट्टे इतके लावले गेले आहेत कीं, त्याचें मूळ स्वरुप नष्ट होऊन वीरशैवसंस्कृति ह्मणजे एक भस्माचा गोळाच आहे अशा प्रकारची समजूत होऊन जर अन्य जात नांवें ठेवूं लागली तर दोष त्यांचा नसून तो आमचा आहे. आपल्याला इष्ट सुधारणा पाहिजे असल्या व धर्माची खरी कल्पना लोकांच्या अंतःकरणांत बिंबावी व त्याबद्दल अभिमान उत्पन्न व्हावा अशी जर इच्छा असेल तर लहानपणापासून या कोवळ्या अंतःकरणावर धर्माचे खरे आचारविचार सक्तीने बिंबविणें अत्यंत जरुरीचें आहे.

कारण "आचारो प्रथमो धर्मः" हें तत्व अबाधित आहे याची जाणीव कोवळ्या मनावर होईल तरच त्यांचा धर्माभिमान जागृत होईल व धर्मसुधारणेचें खरें कार्य त्यांचे हातून होईल. धर्मविघातक अशा कांही चालीरीती जर शिरल्या गेल्या तर त्या नाहीशा करणें हें जरी अत्यंत जरुरीचें असलें तरी त्याचें मूळ स्वरूप न बदलतां त्यांच्या बाह्यांगांत इष्ट तो फेरफार करणें जरुरीचें आहे व अशा प्रकारचा सुरवातीपासूनच प्रयत्न केला गेला तरच खऱ्या धर्मासंबंधीची कल्पना करण्याचा विचार व तो संभाळण्याचा आचार पुढील पिढींत निर्माण होईल. नाहीतर वाळवी लागलेल्या आपल्या धर्मसंस्कृतीची इमारत ढासळल्याशिवाय राहणार नाही एवढी एकच सूचना करून मी आपली रजा घेतों.

लघुकथा ४ थी.

स्त्री-विभाग



# कर्तव्याचें फळ

लेखिका:— 'कु० शामलता'

'आई, मी नाही जाणार जा त्यांच्याकडे आजपासून, मी उपाशी मरेन पाहिजे तर, पण जाणार नाही.'

"बाळा! असें करून कसें चालेल बरें! आपण गरीब मा..."

"तें कांही मला समजत नाही. मी पुन्हा कधीहि जाणार नाही एवढंच काय तें पूर्वं ठरविलें आहे. आई, आपण गरीब झालों म्हणून काय हा गुन्हा आहे? तो ईश्वरी कोप आहे. जगच्चालक प्रभू ज्या स्थितींत ठेवील त्या परिस्थितींत सुखानें कालक्रमणा करणं हेंच मी माझें ध्येय ठरविलें आहे. मग श्रीमंतांनी आपणा गरीबांच्या कष्टाचें मोल न करितां अपमानानें — अहंभावनेने का वागावें हेंच मला कळत नाही."

"अरे असं काय बरं करतोस! तुझी तत्वें सर्वस्वीं खरीं असलीं तरी या धनलोलुप जगाला पटतील तेव्हां ना! तीं मोठ्याची माणसं, आपण गरीब! त्यांनी दोन शब्द कसेहि बोलले तरी ऐकून घेतले पाहिजेत. त्याशिवाय आपला कसा निभाव लागेल? जा बरं तू आपला शाहाणा माझा बाळ तो!"

सकाळची वेळ होती. सूर्यदेव उदयाचलावर आरूढ झाला होता. त्याचे स्वागतार्थ उषादेवी आपलें पीतवस्त्र नेसून व हातांत रंगीबेरंगी माला घेऊन हसतमुखानें अभिनंदन करण्यास तयार

झाली होती. विहंगवृंदहि पाहाटेच भूपाळ्या ह्मणत सूर्यदेवाला आळवीत होता. अशाप्रमाणें सर्व प्राणिमात्रांस सूर्यनारायणाच्या पंच पंच उषःकालानें नवचैतन्य प्राप्त झालें होतें. अशा वेळी एका चंद्रमौळी झोपडींत वरीलप्रकारचें भाषण चाललें होतें.

लक्ष्मीबाई ह्या कांही वर्षांपूर्वी जहागीरदारीण बाई होत्या. परंतु कालाला त्यांचे वैभव पाहवलें नाही. दुर्दैवानें अकस्मात् त्यांचे पतिवर कालाची उडी पडली, व त्या दुःखात चूर होऊन गेल्या. तशातच त्यांच्या आई-वडीलास निर्घृण कालानें त्यांच्यापासून हिरावून नेलें. मग त्यांच्या शोकास काय विचारावें !

अशा प्रकारच्या भवचक्रांत त्या असतां,त्यांचे आप्तेष्टांनी त्यांना सर्वस्वीं बुडविलें. त्याचा परिणाम ह्मणजें त्यांचेवर पोळपाट-लाटणें घेऊन फिरण्याची पाळी आली. अशा परिस्थितींतहि त्या जीव मुठींत धरून राहिल्या होत्या. कारण त्यांचा प्राण अत्यंत लाडका लहान मुलगा, त्याचे आशेवर त्या आपला आयुष्यमार्ग कंठीत होत्या. आप्तेष्टांनी बुडविल्यावर त्यांनी आपलें बिऱ्हाड एका लहानशा झोपडींत केलें, व त्यांत त्या राहूं लागल्या. " कधी कोणाचें दळण दळावें, कधी भांडीं घांसावीं, व मिळेल तें शिळें पाळें अन्न खावें, असें त्यांचे बरेच दिवस गेले. नारायण १०-१२ वर्षांचा झाला तेव्हां तो भिक्षा मागावयास जाऊं लागला. नारायणाचें ज्ञान-कौशल्य, त्याच्या बोलण्याची हातोटी, व शालीनतेचा प्रभाव रावसाहेब नावाच्या बड्या पण कनवाळू गृहस्थावर पडून त्यांनी त्यास आपल्या घरीं नोकर ह्मणून ठेवून घेतलें. सुरुवातीस नारायणाचे दिवस बरे गेले. पण पुढेपुढे त्याला फार त्रास होऊं लागला. गरीबाचा मुलगा व त्यांतून नोकर, मग काय ' हम करे सो कायदा ' याप्रमाणें वाटेल त्यानें वाटेल तें बोलावें. त्याला भोईजड काम सांगावें, रावसाहेबांच्या पश्चात् हें सर्व चाळें त्यांचे घरांतील माणसें करीत. असल्या तीन त्रिपट कामांमुळें व अपमानामुळें तो फार त्रासला व " उपाशी मरेन पण नोकरी करणार नाही, व इतःपर रावसाहेबाकडे जाणार नाहीं " याची वाच्यता आरंभी झाली आहे. अखेर आईनें त्याची खूप समजूत घातली व शेवटे ' तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, आजच्या दिवस तरी जा ' अशा काकुळतेच्या स्वरानें त्याला सांगितलें. तेव्हां आपल्या प्रेमळ आईच्या शपथेकरितां न जाण्याची केलेली प्रतिज्ञा मोडून तो कामावर हजर झाला. कारण मायलेकराची त्याचेवरच सर्व भिस्त अवलंबून होती. परंतु नारायणाच्याने तें काम झेपेना असें पाहातांच रावसाहेबानी त्याला पूर्ण रजा दिली.

माणसाच्या उत्कर्षाच्या भरभराटीच्या कालांत त्याचे आप्तेष्ट " असतील शितें तर मिळतील भुतें " ह्या ह्मणीप्रमाणें खाऊं लागून त्याची हांजी हांजी करतात, पण त्याच्या पडत्या कालात तेच मित्र साहानुभूतिपूर्ण सुखाचा शब्दहि बोलावयास तयार नसतात याचें प्रत्यंतर लक्ष्मीबाईला आलें पण उपयोग काय? त्या परिस्थितीने गांजून गेल्या. हृदयांतील होत असलेली खळबळ स्पष्टपणें समाजापुढे मांडण्याची त्यांच्यांत प्राज्ञा नव्हती इतकेंच.

नारायणाचा शाळेंतील एक श्रीमंत मित्र होता. त्याने नारायणास आपले घरीं घेऊन जावें. तेथे रंगनाथास शिकविण्यासाठीं मास्तर येत असत. तेव्हा त्याचेंबरोबर नारायणानें अभ्यास मन लावून करावा. जात्याच बुद्धि चलाख असल्यामुळें मास्तरने जें जें शिकवावें तेवढें त्याच्या अचूक लक्षात राही. असे बरेच दिवस गेल्यावर, शिक्षणाच्या साहाय्यानें नारायणाचीच मति विकास पावून तो रंगनाथापेक्षा जास्त प्रमाणांत हुशार झाला. मास्तरांनी

रंगनाथास प्रश्न विचारला कीं नारायणानें त्या प्रश्नाचें समर्पक उत्तर द्यावें. यामुळें मास्तरचें लक्ष साहजीकच त्याचेकडें लागलें. पुढें नारायणाच्या कुशाग्र तैलबुद्धीनें तो भराभर परीक्षा पास होऊं लागला. लक्ष्मीबाई रंगनाथाचे घरीं स्वयंपाक करण्यास राहिल्यामुळे नारायणाचा बी. ए. पर्यंतचा शिक्षणक्रम आटोपला. हा १० वर्षांचा काळ हां हां ह्मणतां लोटला गेला. रंगनाथाच्या वडीलांच्या सहाय्यानें नारायण व रंगनाथ बी.ए. होऊन इंग्लंडला आय. सी.एस. च्या परीक्षेसाठी निघणार होते. नारायण एके दिवशी संध्याकाळी बागेतून फिरत फिरत येत असतां एका घराला आग लागलेली त्यानें पाहिली तेव्हां तो क्षणाचाहि विलंब न लावतां जीवावर उदार होऊन तिकडे वळला असतां वाटेंत त्याला नोटांचें पुडकें सांपडलें. तें कोणाचें आहे असा तो विचार करीत असतां त्याला " अहो माझ्या बाळांना वाचवा हो " असला दीन आवाज ऐकूं आला तेव्हां तो तडक तिकडे गेला व स्वतःचा जीव धोक्यांत घालून केवळ कर्तव्याकरितां त्यानें जळणाच्या घरांत प्रवेश केला आणि एका लहान मुलाला व तेरा – चौदा वर्षांच्या मुलीला आगीच्या जबड्यांतून सुरक्षित बाहेर आला. या वेळी त्याच्या कपड्यांनी पेट घेतला होता. परंतु कर्तव्याच्या आनंदांत त्याला त्याचें भानहि नव्हतें. परंतु लोकांनी ते विझवले. त्याच्या धारिष्टाबद्दल लोकांत त्याची फार वाहवा होऊं लागली. त्या मुलांच्या आईबापास नारायणास कुठें ठेवू अन् कुठे नाही असें होऊन गेले. कारण मनुष्याची किंमत किंवहुना योग्यता त्याच्या वंशजाच्या कीर्तिमुळें ठरत नसून ती ज्याच्या त्याच्या अंगच्या सुकार्यावरून ठरत असते. विशेषतः त्याच्या त्यागी जीवनावरून केलेल्या स्वार्थत्यागांत आढळून येते. नारायणानें नोटेचा शोध सुरु केला असतां तो पुडका आपणासारख्यांचाच निघाला, व त्यांनी तो त्यास बक्षीस ह्मणून दिला, व आपली मुलगी प्रेमला हिचें नारायणाशीं लग्न करून दिलें. नारायणानें आपल्या आईची व प्रेमलेची नीट व्यवस्था लावून तो विलायतला परीक्षेसाठी निघून गेला. पुढें दोन वर्षांनी आय. सी. एस. ची परीक्षा उत्तीर्ण होऊन आपल्या मातृभूमीला परत आला, व प्रेमलेशीं आपला संसार थाटला. अशा प्रकारें प्रतिकूल परिस्थितीशीं झगडून गरीबींतील अडचणीला न जुमानतां दुःखासारख्या अनेक अनुभवांचे टक्के–टोणपे खाऊन केवळ कर्तव्यरूपी ध्येयाच्या जोरावर नारायण हा खरोखरच दालीनरूपी नराचा नारायण झाला, व आपल्या अंगच्या सौजन्यानें लोकांत प्रामुख्यानें चमकूं लागला.

---

स्त्री-विभाग

# स्त्रियांचें गाढ अज्ञान व केविलवाणें दौर्बल्य

लेखिकाः— श्रीमती महादेवी बाघमारे, संपादक, स्त्री-विभाग.

बंधुनो, जगांतील प्रत्येक समाज, प्रत्येक राष्ट्र, घडाडीने उन्नतीच्या पायऱ्या विद्यामातेच्या साहृचाने चढत असतां ज्याने त्याने आपलाच गाडा पुढे हाकण्याकरिता स्त्रियांना गाढ अज्ञानाखाली ढकलून पायाखाली चिरडावें हें कृत्य प्रत्यक्ष तुमच्या दृष्टिसमोर घडत असतांनादेखील तुम्हीं त्याना उचलूं नये काय? कीं तुह्माला स्त्रीसमाजाची कींव ह्मणून येतच नाहीं?

मला समाजाच्या दुःस्थितीचा कळवळा येऊन मी क्षणोक्षणीं सुस्कारे टाकून आपल्याशींच वरील विचारामध्यें इतकी गढून गेले होते कीं, मला आपल्या शरीराचेंदेखील भान राहिलें नव्हतें. फार तर काय, माझ्या अग्रभागीं माझा बंधु केव्हां येऊन उभा राहिला होता हीदेखील कल्पना करितां आली नाही.

बंधु — प्रिय भगिनी, आज तुझी मुद्रा चिंतेने इतकी व्याकुल झाली आहे, ती काय ह्मणून? चिंता तर क्षयरोगाची बहीण आहे, मग तूं तिला आपल्याजवळ आश्रय कां देतेस?

मी — चिंता करावी असा माझा मुळीच उद्देश नसतां ती मजकडे आपोआपच येते. शिवाय तूं ह्मणतोस त्याप्रमाणें ती कांही चिंता नव्हे, ती एक प्रकारची चितारूपी ठणक आहे. खरोखर इतर समाजाशीं आपल्या समाजाची तुलना करीत असतां माझ्या मनामध्ये आपला समाज गाढ अज्ञानांतून उन्नतीच्या शिखराकडें केव्हा धाव घेईल हीच ठणक सारखी लागून आहे. आणि अगदी योग्य आहे. जोपर्यंत असली ठणक प्रत्येक वीरस्त्रीमध्यें उत्पन्न होणार नाही तोपर्यंत आपणास विद्यामातेच्या मंदिराच्या पायऱ्या चढतां येणार नाहीत. जेव्हां ही ठणक प्रत्येक स्त्रीमध्ये आपला अंमल करील तोच सुदिन. ज्या स्त्रियांना आपली स्वतःचीच जाणीव नाहीं, ज्यांना आपला फायदा कसा करून घ्यावा हेंदेखील कळत नाही, इतकें कीं, आमच्या स्त्रियांमध्ये गाढ अज्ञान आहे, प्रत्येक बाबतीमध्यें आपली हानि करून घेतली आहे अशा स्त्रिया समाजाच्या काय उपयोगी पडणार आहेत? जर एखाद्या स्त्रीला आपली उन्नति करून घ्यावी अशी इच्छा झाल्यास सासू-सासरे घरांतील मंडळीच्या धाकामुळे ती तशीच स्थिति ठेवावी लागते अशी जेंथें स्थिति आहे, त्या स्त्रियांनी काय करावें? स्वतःच्या सुखदुःखाची जाणीव होण्याच्या आधीच बिचाऱ्या असहाय मुलींचा विक्रय करण्यांत येतो ही दुःखाची गोष्ट आहे.

बालविवाहामुळे बिचाऱ्या मुलीचे किती तरी हाल होतात. याची पुष्कळ उदाहरणें आहेत. हंशा

सुंदर असल्या ह्मणजे त्यांच्या पातिव्रत्यावर घाला घालणारे लोक कांही थोडे नाहींत, किंवा कुरूप असल्या ह्मणजे त्यांचे पतीदेव त्यांना सोडून देण्यास तयार असतातच. कसेहि केले तर त्यांच्या दैवीं दुःख आहेच.

बालपणीं लग्न झाल्यामुळे एका भगिनीला आपल्या संसाराला मुकावे लागलें आहे.

माझ्या एका भगिनीची कर्मकहाणी येणें-प्रमाणे आहे. तिला लहानपणापासून देवाला जाण्याचा फार नाद असे. ती आपल्या आई-बरोबर देवाला जात असे, तसेच ती आपल्या सासरी गेल्यानंतरहि रोज देवाला जात असे. एके दिवशी ती रोजच्याप्रमाणे देवाला जात असतां तिचा चिंधीवर पाय पडला ह्मणून तिनें पुन्हां आंघोळ करून देवाची पूजा करून घरी आली. तेव्हा तिचे लुगडे ओले होतें. त्यामुळें तिला घरांतील मंडळी विचारू लागलें की, काय ग तुझें लुगडें ओलें का ? मग काय विचारता! झाला संशय सुरू.घरांतील सर्वांच्या मनावर संशयाचा विलक्षण परिणाम झाला. बिचारीने मनाचा हिय्या करून सर्व उलगडा करावयाचा होता. पण नाही; देवानच जिथे संसार उधळून टाकण्याचे मनांत आणिले होते तिथे सुबुद्धि सुचणार तरी कुठून ?

तु वदचालीची आहेस, आमच्या घरांत राहू नको. असें ऐकून घेऊन बिचारीला आपल्या पतीला व संसाराला मुकावें लागलें. किती दुःखाची गोष्ट आहे! बिचारी हानीं साप-लेली गरीब गाय काय करणार ! कितीकांचें वारंवार आपणास वचन मोडण्याचें पाप लागू नये ह्मणून आपल्या मुलीचें बलिदान करतात, तर कितीकांचे आईबाप आपल्या मुलाचे लग्ना-करितां साट-लोट करून सून घरीं आणितात. बिचाऱ्या मुलींना आयुष्यांतले सारे दिवस जे दुःखांत काढावे लागतात, त्याची खिजगणती कुणीच करीत नाही.

आमच्या हिंदु-कायद्यांत स्त्रियांना कोणत्याहि रीतीचीं सवलत दिलेली नाही. सर्वस्वीं पराधीन व सर्वस्वीं गुलाम होऊन राहण्यासाठी जेवढीं कांही बंधनें निर्माण करतां येणें शक्य होतें तेवढीं सगळी पूर्वीच्या शास्त्रीपंडितांनी घालून ठेविलीं आहेत. पातिव्रत्याच्या कल्पनेनें गुलाम-गिरीला वैभव मानून सुखासमाधानाने राहाणारे दुःखी जीव आमच्या समाजांत पुष्कळ आहेत.

बंधूंनो, स्त्रियांना शिक्षण द्या, त्यांत तुमचें कल्याण आहे. बंधूंनो, स्त्रियांना पंगू बनवूं नका. स्त्रियांना शिक्षण न देण्याविषयी जुने लोक हल्ला चढ-वितात तो वेडेपणाचा आहे. जी विद्या पुरु-षाना मोठ्या योग्यतेला चढविण्याला मदत करतें तीच विद्या स्त्रियांना अवनतीला नेण्याचा प्रयत्न करील काय ?

ज्या ज्ञानाच्या योगाने पुरुष शीलवान् बनतो त्याच ज्ञानाच्या योगानें स्त्री शीलापासून दूर राहणार काय ?

स्त्रियांना मन आहे,त्यांनाहि देवानें डोकें दिलें आहे. पण त्यांच्या डोक्याला विचार करण्याची संवय नाही. जमीन ही सुपीक आहे पण बी पेरल्यावांचून कशी पिकणार ? पिकणारच नाही. तसेंच बुद्धीचें आहे. बुद्धि असली तरी शिक्षणावाचून तिचा विकास होणार नाहीं. आमच्या बंधुवर्गापैकी कोणी तरी स्त्रियांचा वाली निघून जुलूम-जबरदस्तीने शिक्षण देण्याचा प्रयत्न करील अशी आशा आहे.

माझ्या प्रिय भगिनींनो, सद्वर्तन आणि सद्-गुण केवळ असून चालत नाही तर या दोन गुणांचा योग्य ठिकाणी उपयोग करण्यास शिकले पाहिजे, व ते तुह्मीं शिकत असतां तुह्माला लोकांची निंदा सहन करावी लागली, हाल – अपेष्टा सोसावी लागेल, ह्मणून तुह्मी

शिक्षण घेण्याचें सोडूं नका. आपलपोटेपणा, अप्रामाणिक वर्तन, दुसऱ्याच्या सुखदुःखासंबंधी बेपर्वाई व श्रीमंतीची घमेंड असली ह्मणजे त्यांचा शेवट कसा वाईट होतो, तसेच सद्गुण, सद्शील, यापासून मिळालेल्या सुखात मुबलक संपत्तीचा लाभ झाल्याप्रमाणें वाटतो.

लोकांना सामाजिक विषयाकडे लक्ष देण्यास वेळ मिळत नाही, किंवा सुचत नाही, कोण जाणें ? ह्यामुळे खरोखर जर कोणाचें नुकसान होत असेल, तर तें महिलासमाजाचें होत आहे.

स्त्रियांनी आपला फायदा करून घ्यावा. स्त्रियांना शिक्षण देण्याकरिता चळवळ करावी व कांहीं स्त्रियांच्या चळवळीमुळें सभेस स्त्रियांना पाठविण्याची व त्यांत त्यांना भाग घेऊं देण्याची इच्छा पुरुषवर्गांत दिसून येत असली तरीं ती इतकी अल्प प्रमाणात आहे कीं, त्याबद्दल समाधान व्यक्त करुन पुरुषवर्गाची स्त्रियांच्या बाबतींत दृष्टि बदलली असें मुळींच मानण्याचें कारण नाही. स्त्रियांनी सभेला जावें, कार्यक्रमास मदत करावी, पुरुषांनी हात वर करून ठरावाला संमति दिली कीं स्त्रियांनी लगेच त्यांना आपली अनुकूलता दाखवावी, व पुढाऱ्यांनी सभेला महिलासमाजामुळें फार शोभा आली ह्मणून त्यांची स्तुति करावी, पण या सर्व दगदगींत स्त्रियांच्या दृष्टीने स्त्रियांच्या पदरात कांही पडलें काय ? याचा जर विचार करू लागले तर निराशाच दिसून येते. इतकेंच नव्हे तर त्यांत पुरुषाचा स्वार्थ आढळून आल्याखेरीज राहणार नाही. आमच्या स्त्रियांचा आज-काल्च्या चळवळींत कांहींच फायदा झालेला नाही. स्त्रियांच्याभोंवती निर्माण केलेल्या जुलमाच्या जाळयाचा एकहि धागा तुटलेला नाही.

स्त्रियांच्या बाबतींत पुरुषाची कठोर दृष्टि निवळली असें ह्मणावयास कोठेंच जागा दिसत नाही; उलट ती कठोर होईल कीं काय ह्याची भीतिच वाटते. लग्नाची वयोमर्यादा वाढवावी असा कायदा झाला तर पुरुषवर्ग तो रद्द करून घेण्याचा प्रयत्न करतील. पुरुषांप्रमाणें स्त्रियांना पुनर्लग्न करण्यास धार्मिक हक्क द्या असें कोणीं ह्मटलें कीं त्यावर पुरुषवर्ग रागावल्याशिवाय राहाणार नाही.

कायद्याचें तर नांवच काढूं देणार नाहीत. स्त्रियांना इस्टेटींत समान हक्क असावेत असें कोणीं ह्मटलें कीं, लगेच पुरुषवर्ग खवळल्याशिवाय राहणार नाहीं. बरोबरीनें हक्क मिळविण्याची स्त्रियांची भाषासुद्धा ऐकून घेण्यास पुरुषवर्ग तयार नाहीत ही दुःखाची गोष्ट आहे.

———

# वीरशैवांतील चळवळी

### श्री मन्विर शैव धर्म संस्था मुंबई

अगाऊ जाहीर झाल्याप्रमाणें सदर संस्थेंतर्फे ता. ३१ माहे जानेवारी १९३७ रविवार रोजी सांयकाळीं ४ ( स्टँ. ट. ) वाजतां मा. मू. सोंडकर स्वामी यांच्या हॉलमध्ये मुंबई येथील माहेश्वर मंडळीची सभा भरली. त्या सभेंत मुंबईतील सर्व भागांतील बहुतेक माहेश्वर हजर होते. ह्या सभेंतील वैशिष्टय ह्मणजे पूर्वनियोजित अध्यक्ष डॉ. हरीभाऊ दाजीआप्पा मसकर यांनी सभेच्या सुरुवातीच्या अगोदर एक तास येऊन संस्थेचे उद्देश वगैरेबद्दल जमलेल्या मंडळींमध्यें चर्चा करुन कांहीं मंडळींच्या शंका-कुशंकांचें संपूर्ण निरसन करुन सभेस सुरुवात केली. मा. मू. पांडूरंग भावलिंगस्वामी सोंडकर यांनी अध्यक्षस्थान डॉ. हरीभाऊ दाजीआप्पा मसकर यानीं स्वीकारावें असा ठराव मांडला, व त्यास मा. मू. सदाशिव देवलिंगस्वामी महालम यानीं अनुमोदन दिल्यानंतर अध्यक्ष स्थानापन्न झाले. नंतर, श्रीमद्वीरशैव – धर्मसंस्थेचे उत्साही कार्यकर्ते श्रीयुत गुरुलिंग बाळाप्पा आंधळकर यांनी या संस्थेची प्रथमपासून इत्यंभूत माहिती देऊन, हल्लीच्या परिस्थितीनुसार ह्या संस्थेस अधिक जोरदार चालना मिळण्याकरितां, या संस्थेच्या अंतर्गत असें एक "वीर माहेश्वर मंडळ" स्थापन करणें हें सांगितलें. नंतर खालील ठराव सभेपुढें मांडण्यांत आले.

ठराव १ ला "श्रीमद्वीरशैव-धर्मसंस्थेंतर्फे आज रोजी या संस्थेच्या उन्नतीच्या प्रीत्यर्थं व संस्थेंचा कार्यभाग सोपा करण्याकरितां एक "माहेश्वर मंडळ" स्थापन करण्यात यावें, असा ठराव मा. मू. पांडूरंग भावलिंग स्वामी सोंडकर यानी आणला व त्याला मा. मू. सदाशिव देवलिंग स्वामी महालम यांनी अनुमोदन दिल्यानंतर श्रीयुत गुरुलिंग बाळाप्पा आंधळकर व मा. मू. गणपतस्वामी आवधारे या दोघानीं उत्कृष्ट भाषण केलें, व हा ठराव एकमतानें पास झाला.

ठराव नं. २ रा–हें मंडळ "श्री मद्वीरशैव धर्म संस्था मुंबई" यास जबाबदार राहून व त्या संस्थेच्या अंतर्गत काम करुन त्यानें तिला चालना द्यावी, या अर्थाचा ठराव मा. मू. बाबू नारायणस्वामी यांनीं मांडला व मा. मू. गणपतरावस्वामी आवधारे यांनीं अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानु मतें पास झाला.

ठराव नं. ३रा.-मा. मू. रामलिंगस्वामी बेल व विरलिंगस्वामी अवदारे हे या संस्थेच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकीं होते व ते लिंगैक्य झाल्यामुळे समाजाचें मोठें नुकसान झालें आहे. तरी त्यांच्या निधनाबद्दल आजची ही सभा दुःखप्रदर्शन करीत आहे,आणि त्यांच्या कुटुंबाकडे हा ठराव पाठविण्याविषयीं अध्यक्षांना ही सभा अधिकार देत आहे. असा ठराव मा.मू.विश्वनाथ कोंडलिंगस्वामी यानी आणिला

व यास मा मू. मोरलिंगस्वामी यांनी अनुमोदन दिल्यावर सर्वांनीं उभें राहून हा ठराव पास केला.

ठराव नं. ४:— वीरशैव लींगायत के. को. सोसायटीचे मेंबर्स वाढविण्याचा या मंडळातर्फे प्रयत्न करण्यांत यावा असा ठराव मा. मू. गणपत स्वामी अवदारे यांनीं मांडला व त्यास मा. मू. हरिभाऊ महापुंडे यांनी अनुमोदन दिल्यावर सर्वानुमतें पास झाला.

ठरावनं. ५.– या "वीरमाहेश्वर मंडळ"चें काम चालविण्याकरितां एक कार्यकारी मंडळ निवडण्यांत यावें असा ठराव मा. मू. पांडूरंग भावलिंग स्वामी सोंडकर यांनी मांडला. यास मा. मू. सदाशिव देवलिंग स्वामी महालय यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें पास झाला व खालीलप्रमाणें कार्यकारी मंडळाची निवडणूक करण्यांत आली व यास या मंडळाचे नियम वगैरे करण्यास अधिकार देण्यात आला आहे.

कार्यकारी मन्डळ,

अध्यक्ष:—डॉ हरीभाऊ दाजीआप्पा मसकर ( उंबरगांवकर )

उपाध्यक्ष:—मा. मू. पांडूरंग भावलिंगस्वामी सोंडरकर

जनरल—से० मा. मू. विश्वनाथ कोंडलिंग स्वामी मुररसिद्ध

सेक्रेटरी:—मा. मू निळकंठ गणलिंग स्वामी

,, मा. मू कृष्णलिंग शंकर स्वामी

,, मा. मू. हरीलिंग महादलिंग स्वामी

ऑडिटर:—मा.मू बाबू नारायण स्वामी

खजिनदार:—मा. मू बाळलिंग लक्ष्मण स्वामी बेल,

सभासद:—मा. मू. घोंडलिंग महादलिंग स्वा

२ ,, मा. मू. सोनलिंग कृष्णलिंग स्वामी

३ ,, मा. मू सदाशिव देवलिंग स्वामी महालय

४ ,, मा. मू. तानलिंग चापलिंग स्वामी

५ ,, मा. मू. महादलिंग भाऊलिंग स्वामी पोहेकर.

६ ,, मा. मू. सखाराम भावलिंग स्वामी मुररसिद्ध

७ सेक्रेटरी मा. मू. सिताराम भावलिंग स्वामी

८ ,, मा. मू. विठलिंग कृष्णलिंगस्वामी विभूते,

अशा तऱ्हेने मंडळ निवडण्यांत आले आहे.

यानंतर समारोपादाखल अध्यक्षानीं भाषण करतांना समाजाला स्वतःच्या परिस्थितीची जाणीव होऊन त्याच्या उन्नतिकरितां दृश्य स्वरूपांत कांहीं तरी करण्याची स्फूर्ति उत्पन्न झाल्याबद्दल तेथें जमलेल्या मंडळींचें अभिनंदन करून त्यांच्या हातीं सभेचें धुरीणत्व देऊन त्याच्यावर जो विश्वास दाखविला त्याबद्दल त्यांचे आभार मानले. नंतर समाजाच्या परिस्थितीचें वर्णन करून, हें "वीर महेश्वर मंडळ" स्थापन करण्याचीं कारणें सांगून, तें मंडळ टिकून राहण्याकरिता प्रत्येकानें स्वार्थ, द्वेष, ईर्षा, व चढाओढ टाकून देऊन आपुलकीच्या भावनेने एकमेकांशी सहकार्य केलें पाहिजे, शिवाय आपापल्या कर्तव्याकडेच हमेशा लक्ष देऊन कार्य करणें कसें जरूर आहे, हें निरनिराळीं उदाहरणें देऊन सर्वांना पटवून दिलें व त्याचा समाजावर परिणाम उत्कृष्ट रीतीने दिसून आला. शेवटी मा मू. निळकंठ गणपतस्वामी यांनी थोडक्यात पण मुद्देसूद भाषण करून अध्यक्षाचे आभार

घातले, व नंतर अध्यक्षांना हार तुरे समर्पण करून सभा विसर्जन करण्यांत आली. सभे-नंतर मा. मू. पांडुरंग भावलिंगस्वामी सोंड-कर यांच्याकडून जमलेल्या मंडळीना पानसु-पारी देण्यांत आल्यावर सर्वत्र मंडळी आनंदानें आपापल्या घरीं गेली.

आपला नम्र,
कों. मा. महाजन,
सेक्रेटरी,
" श्री महेश्वरशैव धर्म संस्था मुंबई "

---

## पुढील अंकीं

१. डॉ. जगदेवराव देशमुख व श्री. हिंगसिरे ह्यांच्या लेखांतील सत्यासत्य.

२. बाळेहाळ्ळीस्वामीवर ' तरुण कर्नाटक ' व 'शरणसंदेश' पत्रांत येत असलेल्या टीकांचा विचार आणि ॲ पावटे ह्यांच्या आव्हानास उत्तर असे ' खास संपादकीय ' लेख येणार आहेत.

संपादक ' उदय '

## मुंबई वीरशैव स्नेहवर्धक मंडळ,

सदर मंडळाची पहिली वार्षिक सभा सदर मंडळाच्या ऑफिसांत रविवार ता. १० 'जाने-वारी १९३७ रोजीं सायंकाळीं चार वाजतां श्री. पुरलिंग वाळाप्पा आंबळकर यांचे अध्यक्षते-खालीं भरून तींत पुढील कामें झालीं.

[१] मंडळाचा सन १९३६.३७ चा अहवाल मंजूर करण्यांत आला.

(२) आजपर्यंत मंडळाचा कारभार एकसूत्री—ह्मणजे संचालकाचे अधिकारांत चालत असे; तो तसा न चालवितां अध्यक्ष व कार्यकारीं मंडळ नेमून चालवावा असें ठरलें व त्याकरितां तयार केलेली घटना मंजूर करण्यांत आली. तसेच त्यांत कांही अपुऱ्या गोष्टी असल्यास मेसर्स देवधरकर, आंबळकर व जे. जो. सोमे-श्वरकर यांनी त्या पूर्ण करुन घ्याव्यात असें ठरलें.

(३) संस्थेस ज्या अनेक सद्‌गृहस्थांनी उदार अंतःकरणानें मदत केली त्या सर्वांचे आभार मानण्यांत आले.

(४) श्री. कल्याणशेट्टी हे आपलें ' सुदर्शन 'पत्र संस्थेस देणगी ह्मणून पाठवीत असल्याबद्दल त्यांचे आभार मानण्यांत येत आहेत, व हीं देणगी अशीच चालू राहील अशी त्यांस विनंती आहे.

[५] मंडळाच्या कामाकाजास 'सुदर्शन' 'वीर-शैव गर्जना,' व 'वीरशैव संजीवनी' तसेच स्थानिक पत्रें:—नवाकाळ लोकमान्य, व स्वराज्य या पत्रांच्या चालकांनी वेळोवेळीं स्थान दिल्यामु-ळेच मंडळास इतक्या अल्पावधींत प्रसिद्धी मिळाली याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यांत येत आहे.

[६] वार्षिक सहा रुपये भरणाऱ्या सभासदां-तून पुढील वर्षाकरतां कार्यकारी मंडळ निवडण्यांत आले.

१ अध्यक्षः—हरीलिंग धोंडलिंग देवधरकर.

२ उपाध्यक्षः—डॉ. गणेश बळवंत वडगां-वकर.

३ खजिनदारः—जगन्नाथ गणलिंग सोमे-श्वरकर.

४ ऑडिटरः—नारायण धोंडलिंग देवधरकर.

५ ऑफिस सेक्रेटरीः—श्री० भिकलिंग गोपलिंग किल्लेकर.

६ उत्सव ,, ,, कोंडिबा मारुती महाजन.

७ ग्रंथसंग्रह व वाचनालय ,, ,,सखाराम गणलिंग आंबेकर.

८ वक्तृत्व सेक्रेटरी व प्रचारक ,, ,,मोरलिंग महादलिंग जंगम.

### सभासद

९ गणपत महादलिंग किल्लकर.
१० बाळलिंग आप्पालींग दरचुरकर'
११ सदाशिव देवलिंग स्वामी महालम,
१२ शंकरदादा मरामने.
१३ गुरुलिंग बाळाप्पा आंघळकर.
१४ एस्. बी. सुकाली.

याशिवाय आणखी २ सभासद अध्यक्षांनी निवडून घ्यावे असें ठरलें. येणेंप्रमाणें एकंदर १५ सभासदांचें एक कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

(७) सन १९३६ साली ज्या कार्यकर्त्यांनी आपला अमोलिक वेळ खर्चे करून मंडळाचें कार्य वाहून नेलें त्यांचे आभार मानण्यांत आले.

(८) सदर मंडळ स्नेह व सेवा या नात्यानें चालविलें जात असल्यामुळे सर्व बांधवांनी त्यास आपुलकीनें मदत करावी अशी विनंती आहे.

वरीलप्रमाणें कामे होऊन सभा सायंकाळीं ७॥ वाजतां बरखास्त झाली.

आपला.
भिकलिंग गोपलिंग किल्लेकर.
(१८-१-३७) सेक्रेटरी.

---

### वीरशैव उमेदवार

सातारा जिल्ह्यातील एका जागेकरितां साताऱ्याचे श्रीमंत रावसाहेब अण्णाप्पा कल्याणी हे मुंबई प्रांतिक असेंब्लीकरितां एक उमेदवार उभे राहिले आहेत. ह्याचप्रमाणें सोलापूर जिल्ह्यातर्फे बार्शीचे श्रीमंत भगवतआप्पा कपाळे हेहि उमेदवार आहेत. ह्याचप्रमाणें कुलाबा जिल्ह्यातूनहि नाशिक वीरशैव जिल्ह्यापरिषदेचे अध्यक्ष उभे आहेत. महाराष्ट्रांतील ह्या तिन्ही वीरशैव उमेदवारांना आम्ही यश चिंतितों.

### दिवाण ब० कंबळी ' सर ' झाले

मुंबई–सरकारचे शिक्षणमंत्री दिवाण ब० बा. कंबळी ह्यांना नुकतीच ' सर ' ही पदवी मिळाली आहे ह्याबद्दल वीरशैवांतून त्यांचें अभिनंदन होत आहे.

### चित्रकलदूर्ग महास्वामी

चित्रकलदूर्गचे महास्वामी सोलापूरहून अक्कलकोटला गेले होते, तेथे ह्यांच्या अडु पालखीची टोलेजंग मिरवणूक निघाली. महास्वामींना मानपत्र वगैरे देऊन गौरविलें. श्रींची ' भाषणेंहि ह्यांच्या थोर दर्जाला शोभेशी उदार मनोवृत्तीची दर्शक झाली. ता. ३ रोजीं श्री. अक्कलकोटहून सोलापूरला परत आले. त्यावेळी अक्कलकोटच्या वीरशैव बंधु भगिनींनी मोठ्या थाटानें श्रींना निरोप दिला व श्रींचा आशीर्वाद घेतला.

पंचाचार्य सिंहासनाधीश बाळेहाळळी महास्वामी ह्यांचा मुक्काम हुबळीस आहे. तेथें ह्यांची थाटाचे अडुपालखीची मिरवणूक मोठ्या निघाली. महास्वामींची व कांही विद्वान् शास्त्री यांची प्रवचनें तेथे होतात, सर कंबळी महास्वामीच्या दर्शनाला गेले होतें. ' तरुण कर्नाटक ' व ' शरण संदेश ' ह्या पत्रांत भक्त माहेश्वर वादाचे प्रश्न विचारण्यांत येतात. हुबळीचें डॉ. पावटे ह्यांनी तर महास्वामींना वादाचें जाहीर आव्हान दिलें आहे. डॉ. पावटे ह्यांनी विचारलेल्या प्रश्नांत भयसूचक असें कांही नाही. पण ह्याला आव्हान न ह्मणता शंकानिरसन ह्मटलें असतें तर डॉ.पावटे हे खरेच शरण आहेत असें वाटलें असतें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ मार्च १९३७ ( अंक ५ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ ना० रा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— ' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी, हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालीची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— ' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रात अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— ' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—* जुनें वर्ष पांचवें *—

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति फाल्गुन व० ४ शके १८५८ ( अंक ५ वा.

# चित्रकलदूर्ग महास्वामींचे चेले

## 'सुदर्शन'चें दळण

सुदर्शन' नें आह्माला आव्हान देतांना प्रथमतःच मुख्य मुद्दा टाळला होता. त्या आव्हानाचा आह्मीं स्वीकार केल्यावर त्यांनीं पुन्हा मुख्य मुद्दा बाजूला सारून पाहरानांत शिरण्याचा प्रयत्न केला. कैं. बाप्पासाहेब वारद पंचवीस वर्षांपूर्वी जिवंत होते किंवा नाहीं हा कांहीं वादाचा मुद्दा नव्हता. त्याचप्रमाणें रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्या पंचाचा हेतु वाईट होता हें ह्मणणारें पत्रक श्री. कल्याणशेट्टी ह्यांनी लिहिलें असतांना तें 'सुदर्शन'चें मत कीं 'सुदर्शन'काराचें मत होतें नव्हता. तर रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्या पंचाविरुद्ध महास्वामीचें मत त्याच्या अंधभक्तांनी कलुषित केलें व महास्वामी तेथून परतले. इतकेंच नव्हे; तर तेथून महास्वामी परतल्यावर रेवणसिद्धमंदिरांतील पंचांचा अपमान करणारें पहिलें पत्रक श्री. कल्याण-शेट्टी ह्यानीं काढलें व तेथून वाद भडकला हाच आमचा मुख्य आक्षेप होता. ह्या मुख्य आक्षेपाला 'सुदर्शन' नें काय उत्तर दिलें हाच महत्वाचा प्रश्न आहे. ह्मणून अवांतर भागावर त्यांनीं कसें दळण दळलें हें आह्मीं पहात नाहीं व त्याला उत्तर देऊन उगीच क्षुल्लक गोष्टीबद्दल आह्मीं वाद वाढवून जागा अडवीत नाहीं.

## 'सुदर्शन'चा कबूली जबाब

घुम्मा पटणे ह्यांच्या पत्रकाला उत्तर ह्मणून जें पत्रक श्री. कल्याणशेट्टी ह्यांनीं काढलें तें

'एक समाजघटक' ह्या नात्याने स्वतंत्र व वैयक्तिक ह्या नात्यानें काढलें अशी ते स्पष्ट कबूली देतात. अर्थात् 'सुदर्शन'ला ह्या पत्रकापासून ते अलिप्त ठेवूं इच्छितात. 'आव्हान'-पर लेखांत ह्याहि कबूलीचा वास येंत नव्हता म्हणून वाद उत्पन्न झाला. 'सुदर्शन'चे नव्हे व 'सुदर्शन'कारहि नव्हे; पण 'सुदर्शन'चे संपादक म्हणून दर्जा असलेले श्री. कल्याणशेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., ह्यांचें तें वैयक्तिक जबाबदारी-वरील पत्रक आहे हें उघड झालें आणि ह्यांतच सत्य बाहेर आलें ह्याबद्दल आम्हाला आनंद वाटतो. आणि तें पत्रक वैयक्तिक जबाबदारीचें असलें तरी त्या पत्रकाचें मंडन करण्याकरिता 'सुदर्शन'नें धैर्यानें पुढे सरसावलें ह्याबद्दल 'सुदर्शन'चें अभिनंदन करणेंहि अवश्य आहे. तरी पण तें 'सुदर्शन'चें मत होतें असें मात्र कोणीं समजूं नये हा त्यांचा आग्रह आहेच आहे.

## 'श्रीं'चें आज्ञापत्र व 'सुदर्शन'

'श्रीं'चें आज्ञापत्र समाजाला होतें असें 'सुदर्शन' म्हणतें. परंतु ज्या पंचांना तें आज्ञापत्र होते ते समाजाचे कोणी तरी लागत होते ही गोष्ट त्याबरोबर नाकारतां येंत नाही. परंतु ह्या पंचांनी ही वार्ता समाजाला कळविण्याची जबाबदारी पार पाडली नाही आणि स्वागताची तयारी केली नाही म्हणून 'सुदर्शन'चा आक्षेप. हें कार्य एका स्थानिक संस्थेनें केलें असें श्री. हिंगमिरे ह्यांचें म्हणणें. परंतु सिद्धेश्वरमंदिरांत जे स्वागतार्थ बहुजन जमले ते व रेवणसिद्धमंदिरांत जे थोडे जमले ते वेगवेगळे घटक होते असें समजून रेवणसिद्धमंदिरांतील निवडक पंचांच्या हेतूवर आरोप करणें हें शिष्टसंमत खास नाही. महास्वामींच्या स्वागताच्या प्रसंगी गुरु-विरक्तवाद वा गुरु-भक्तवाद पुढें आणणें, वा तत्पूर्वीची एकामेकांविषयींची कलुषित मनें पुढे करणें आणि तेंवढ्यावरून महास्वामींचें स्वागत तूं कोण करणार व मीच करणार असा अट्टाहास करणें ह्यांत सार्वजनिक हितबुद्धीचा अभाव आहे हें नाकारतां येत नाही. श्री. घुम्मा-पटणे ह्यांच्या हस्तपत्रकांत महास्वामी रेवणसिद्ध-मंदिरांत येऊं शकले नाहीत एवढाच मजकूर आहे. अर्थात् महास्वामींचेंहि स्वागत करावें ही बुद्धि त्यांच्यांत जागृत असल्याची त्यांत कबूली आहे. पण कल्याणशेट्टींनी त्या पत्रकाला उत्तर देतांना नुसत्या शंका-कुशंका काढून पंचांविषयीं गरळ ओकलें आहे. सोलापूरांतील वादाला जाहीर-पणें अद्वातद्वा तोंड फुटावयास महास्वामींचा दर्जा कोणास मान्य नव्हता हें कारण नव्हे; त्यांचें स्वागत करावयाचेंच नाही हा कोणाचा दुराग्रह होता हेंहि नव्हे, तर कल्याणशेट्टीपक्ष व रेवणसिद्धमंदिरांतील पंच ह्यांचे संबंध सुखाचे नव्हते हेंच होय. आणि ह्याला कारण घुम्मा-पटणे-पत्रक नसून कल्याणशेट्टी-पत्रक होय ही गोष्ट ह्या वादाकडे जो निरपेक्षतेने व सार्वजनिक हितबुद्धीनें पाहील त्याला कबूल करावी लागेल. पण श्री. कल्याणशेट्टी व 'सुदर्शन' हा आपल्यावरील दोष टाळूं पाहतात, ह्यांत त्यांच्या बाजूला सत्य नाही, न्याय नाही, पक्षनिष्ठाहि नाही व महास्वामीवरील निष्ठाहि नाही हें आम्हीं स्पष्ट केलें म्हणून त्यांचा आम-च्यावर रोष झाला आहे. पण सत्यकथनार्थ तो आम्हाला सहन करणें अवश्य आहे. वादाला कारण झालेले घुम्मा-पटणे-पत्रक व खुद्द कल्याण-शेट्टींचें पत्रक हीं दोन्ही 'सुदर्शन'ने प्रसिद्ध करावींत व तीं वाचून कोणत्याहि निरपेक्ष वाचकाने निर्णय द्यावा. आमची खात्री आहे कीं, दोन्ही पत्रकें वाचून श्रीं. कल्याणशेट्टी ह्यांचा दुराग्रह हेंच ह्या वादाचें खरें मूळ होय असेंच आमच्याप्रमाणें मत देईल. असो.

## 'बसवराज'-पत्राचे प्रताप

हावेरी येथें 'बसवराज' नांवाचें 'कानडी' पत्र प्रसिद्ध होतें. त्यांत "श्री. बामणगांवकरांचे ब्राह्मणी जाळ" हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्याचें मराठी भाषांतर आमच्याकडे आलें

आहे, व ' सुदर्शन ' नेंहि तें भाषांतर प्रसिद्ध केलें आहे. श्री. वामणगांवकर हे पूर्वीपासून राष्ट्रीय वृत्तीचे व ' केसरी-'शीं संबंधी ह्मणून त्यांनी वामणगांवकर ह्यांच्यावर ' ब्राह्मणी ' असा आरोप करून, जंगमजातीचे अभिमानी ह्मणून ह्मटले आहे. हा लेख लिहावयास कारण काय? तर चित्रकलदुर्ग-महास्वामीविषयीं जे लेख आह्मीं लिहिले तें ' संजीवनी ' ने चित्रकलदुर्ग-महास्वामी व त्यांचे अनुयायी हटवादी आहेत असें ह्मटलें, हें. शिवाय आह्मी जंगम जातींत जन्मलों हें दुर्दैव होय असें आह्मीं ह्मटलें. एवढ्यावरून ' बसवराज ' पत्राला आह्मी जातिनिष्ठ वाटतो कां? चित्रकलदुर्ग-महास्वामी हटवादी आहेत असें आह्मीं ह्मटलें नाहीं. त्यांचे अनुयायी ह्मणवि-णारांत असा वर्ग आहे हें आह्माला नाकारतां येत नाही. पंचाचार्य-महास्वामी हटवादी नाहींत व त्यांच्या अनुयायांत दुराग्रही नाहीतच असें आम्ही म्हणत नाही हें मात्र खोटें आहे. कर्नाटकांत पंचाचार्यांचे अनुयायी काय धुडगूस घालतात हें आम्हाला समजत नाहीं हें मात्र खरें. परंतु चित्रकलदूर्ग-महा-स्वामीच्या आगमनानिमित्त जो वाद सोला-पुरांत सुरु झाला त्याचसंबंधी आम्हीं लिहिलें. वीरशैवसमाजांत जन्मजात रूढ होऊं नये; पण झाली आहे. आणि मनुष्याच्या पूर्ण ओळखी-करितां जातीचा उच्चार करण्याची अजून आव-श्यकता आहे हेंहि खरें आहे. त्यामुळें आम्हाला आमची जन्मजात लपवितां येत नाहीं व त्या जातीची इकडे संघटना व्हावी एतदर्थ माहेश्वरमंडळास आम्हीं चालना दिली तर त्यांत काय बिघडलें? आणि एवढ्यावरून आम्ही जन्मजातीचे अभिमानी कसे ठरतो? आणि ठरलों तरी हा दोष नव्हे. परंतु बसवराज पत्राचें म्हणणें असें कीं, संजीवनीचें धोरण स्पष्ट असावें. दुधारीचें लिखाण नको. बसवराज पत्रा-करितां आम्हीं आपलें धोरण स्पष्ट सांगतों. (१) वर्ण व जात हे शब्द आह्मीं भिन्नभिन्न अर्थाचे मानतों. वर्ण शब्दाने धंद्याचाच फक्त बोध होतो. जात शब्दाने जन्मजातीचा बोध होतो. (२) वीरशैवधर्मांत वर्ण मानला आहे; पण जन्मजात मानली नाहीं. (३) वीरशैवांतील सध्याच्या जन्मजात पोटजाती नाहीशा व्हाव्यांत व त्यांच्यांत खुषीनें रोटीबेटीव्यवहार सुरु व्हावा असें आमचें स्पष्ट मत आहे. (४) बसवादि शरण ह्याच मताचे होते असें मात्र आम्ही आग्रहाने म्हणणार नाहीं. पण सद्यः-स्थितींत संघटित होण्याकरितां रूढींत बदल करणें अवश्य आहे म्हणून म्हणणार. (५) आजचे सारे विरक्त व सारे पंचाचार्य व त्या उभयतांचे अनुयायी अधिक रूढीप्रिय आहेत. म्हणून आम्ही उभयतां हि दुराग्रही मानणार. (६) वीरशैवांचे मूळ द्राविड जात व संस्कृति आहे हा सिद्धांत आम्ही चुकीचा मानतों. आर्यलोक, द्राविडलोक, आणि ह्या उभयतांच्या संस्कृतीनें पुढें कालानु-सार परिणत झालेला वैदिक धर्म व समाज चार वर्ण, चार आश्रम व चार पुरुषार्थ ह्यांत परिणत झाला, आणि ह्यांतील आधारभूत तत्वावरच अष्टावर्ण व षडस्थळाची वीरशैव संस्कृति उभारली असल्यामुळें वैदिक संस्कृतीच वीरशैवसंस्कृतीचें मूळ होय असें आम्हीं मानतों. (७) बसवदेव वीरशैवसंस्कृतीचा उत्पादक नसून उद्धारक होय व त्याच्याविषयीं विरक्त व पंचाचार्य ह्या सर्वांनाच आदरभाव हवा. (८) विरक्त जगद्गुरु व पंचाचार्य जगद्गुरु ह्यांचे परंपरागत हक्क सर्वच वीरशैवांनी भेदाभेद न ठेवतां मान्य करावेत व आणि नंतर उभयतां-पुढें मतभेदाचे प्रश्न असल्यास आदरभावानें ठेवावेत. इतकेंच नव्हे तर उभयपक्षांतील बुवा-बाजी कमी होईल असे प्रयत्न करावेत. (९) वीरशैवांतील कोणत्याहि जन्मजातीने वीरशैवां-तील दुसरी जन्मजात कनिष्ट आहे असें मानूं नयें. (१०) वीरशैवांतील कोणत्याहि जन्मजातीं-तील भक्तवर्गाला तो कुलीन व सज्जन असला तर संस्काराने व आश्रमधर्मानें गुरुपदाला चढण्याचा अधिकार आहे व तशी रुढीहि आहे. ह्या रुढींत

आजन्म ब्रह्मचाऱ्याचीच प्रथा नको तर वानप्रस्थाश्रम स्वीकारणाऱ्या विद्वान् व कुलीन सद्गृहस्थालासुद्धां हा संस्कार व अधिकार देणें इष्ट आहे. ह्या प्रकारचीं आमचीं स्पष्ट मतें आहेत. 'बसवराज' ला तीं आमच्या जंगमजातनिष्ठेची वाटत असलीं तरी त्यांत आमचा दोष आहे असें आह्माला वाटत नाही. कारण मूळच्या अलिंगी बसवास ज्या जंगमाने लिंगधारणा केली त्या श्रेष्ठ व उदार धोरणाचे जंगमाचे खरे वंशज हीच उदार धोरणाची गर्जना करीत राहतील. आणि 'बसवराज' काय, 'सुदर्शन' काय, ह्या सर्वांना कोपिष्ट वच्चे ह्मणून प्रेमानेंच चुचकारतील व आपल्या पोटांत घेतील. ह्याशिवाय 'बसवराज' ला अधिक उत्तर देऊन त्याची समजूत घालण्याची आमची इच्छा नाही.

## बाळेहळ्ळी महास्वामी व करवीरप्पा

बाळेहळ्ळीचे महास्वामी धारवाडास असताना धारवाड–म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष श्री. करवीरप्पा त्यांना भेटले. तेव्हा 'प्रचारांत असलेल्या गोष्टी सोंडतां येत नाहीत, वर्णभेदाच्या रूढीचा बलिष्ट पुरावा आहे. त्यामुळे वर्ण भेद असणें अवश्य आहे, बसवेश्वर हे महात्मा होते व ते मतोद्धारक होत पण ते आह्मांला पूज्य आहेत असें ह्मणणें ह्मणजे पीठाला लांछनास्पद होय. भक्त आपल्या ज्ञानानें महेशस्थलाला पोंहचतो हें खरें पण तें कृतींत आणणें योग्य नव्हे. आपल्या धर्मास वेद हेच आधारभूत आहेत' असें महास्वामी म्हणाल्याचें 'तरुण कर्नाटक' मध्ये प्रसिद्ध झालें आहे. आणि त्यावरून करवीरप्पानीं महास्वामीचे पुढील दोष असल्याचे प्रसिद्ध केले आहे. (१) वर्णभेद आहेत. (२) बसव महात्मा असले तरी सिंहासनाधीशाला पूज्य नाहींत. [३] भक्त ज्ञानानें महेश बनला तरी कृतींत त्याला तो मान देतां येत नाहीं. (४) वीरशैवधर्माला वेदाचाच आधार.

## करवीरप्पाचे अर्थ काय ?

वीरशैवधर्मांत वर्णभेद आहेत. कारण वीरशैवांत सर्वच धंदे करणारांचा समावेश झालेला आहे. परंतु लिंगधारणेचे त्यांना संस्कार झाल्यामुळें त्या सर्वांचा त्रैवर्णिकांतर समावेश होऊं शकतो. आणि म्हणूनच सर्व वीरशैवांना अष्टावर्णाचा व षट्स्थळप्राप्तीचा सारखाच अधिकार दिला आहे. जन्मजाती वीरशैवांत रुढीनें अस्तित्वांत आल्या; पण मूळ धर्मघटनेनें वा समाजघटनेनें त्याचा समावेश केला नाहीं. ही जन्मजातीची रूढी नाहीशी होईल. त्याकरिता श्रेष्ठ जाति व कनिष्ट जाति असा झगडा मात्र समाजांत रुढ होऊं नये. तेव्हा बाळेहळ्ळी स्वामी वर्णभेद म्हणजे जन्मजात भेद मानत असतील व तेंच त्यांचें मत असेल तर महास्वामी निव्वळ रुढीप्रिय शास्त्री आहेत असेंच आम्हाला म्हणावें लागेल. परंतु करवीरप्पाहि वर्णभेद म्हणजेच जन्मजात भेद समजत असतील तर तेहि शब्दाचा अर्थ समजून न घेतांच बोलतात असेंच ह्मणावें लागेल. रोटीबेटीभेद ज्या समाजांत नसतो त्याहि समाजांत वर्णभेद असतो. उच्चनीचभावना असते. तसेंच कुलीन व अकुलीन ह्या भावनाहि असतात. ह्मणून वर्णभेद ही समाजाची सहज अवस्था आहे. एक गुरुपुत्र विरक्त सिंहासनाधीश असतो, दुसरा गुरुपुत्र पंचाचार्य सिंहासनाधीश असतो, तिसरा नुसताच शास्त्री असतो, चवथा शंख फुकतो आणि पांचवा घेंदेमीठाचें पोतें घेऊन बसतो. ह्या पांचांत जन्मजात भेद नसतो, रोटीबेटीभेदहि नसतो. पण दर्जाभेद असतो. त्यामुळे ह्यांत एक प्रकारची विषमता असते व ती नांदतेहि. तेव्हा वर्णभेद नको ह्मणजे हा दर्जाभेदहि नको असें समजावयाचें काय ? आ० कंबळी व त्यांच्या घरचा स्वयंपाकी एकाच पोटजातीचे व शाखेचें असलें तरी मांडीला मांडी लावून बसत नाहीत. तेव्हां ही दर्जाभेदामुळे पडणारी विषमताहि नसावी असें ह्मणा-

वयाचें असेल तर सर्वांची सांपत्तिक स्थितीहि एक व दर्जाहि एकच असावयास पाहिजे. वर्णभेदामुळेच जातिभेद निर्माण झाला हा सिद्धान्त जर खरा मानला तर गुरुस्थळ, विरक्तस्थळ, माहेश्वर स्थळ, भक्तस्थळ हीं षट्स्थळभावनाच नष्ट करावी लागेल. ह्मणून करवीर-आप्पांना वर्णभेद व जातीभेद हे दोन्ही नको असतील तर त्यांनी विरक्तहि नको व गुरुहि नको असेंच ह्मणावयास पाहिजे. आणि तसें झालें तर भक्त तरी कशाला हवेत? करवीरआप्पाच्या मताने ते वर्णभेद व जातिभेद ह्या शब्दाचा एकच अर्थ करतात कीं दोन निरनिराळे अर्थ करतात हें कळत नाहीं. म्हणून त्यांना काय हवें व काय नाहीं ह्याचा बरोबर स्पष्ट बोध होत नाहीं. म्हणुन बाळेहळ्ळी महास्वामींनीं काय उत्तर दिलें ह्याचा बोध बरोबर होत नाहीं.

## बसव व बाळेहळ्ळी स्वामी

बसवेश्वरास महात्मा मानावयास बाळेहळ्ळी स्वामी तयार आहेत. पण ते सिंहासनाधीशाचे दैवत होत नाहीं एवढेंच त्यांचें म्हणणें. कारण भक्त हा ज्ञानानें माहेश्वरपदाला पोहचला; पण संस्कार नसल्यामुळे तो भक्ताच्याच दर्जाचा राहील ही जी महास्वामीची विचारसरणी आहे ती तर्कशुद्ध आहे. रंकांतीलच एक पुरुष राजा होतो. रंकांतील पुष्कळ व्यक्तींत राजपदाच्या लायकीचे गुण असतात. पण राज्याभिषेक झालेल्यालाच राजा म्हणावें लागते, इतरास म्हणतां येत नाहीं. ह्याच न्यायाने बसवासारख्या प्रमुख भक्तास माहेश्वरपदाचे, गुरुपदाचे वा विरक्तपदाचें संस्कार नसल्यामुळें अशा पदाधिकाऱ्यास बसवदेव आदरणीय वाटले तरी पूजनीय वाटावयाचे नाहीत. तसें झालें तर संस्काराची उपयुक्तता जी समाजस्वास्थ्याकरितां समाजनियंत्यांनी मानली त्या संस्काराला फाटाच द्यावा लागेल. वास्तविक पाहिलें असतां योग्य भक्तास संस्कार झाला असतां त्यास गुरुपदाचे व विरक्तपदाचे अधिकार लाभावेत असा करवीरआप्पाचा प्रश्न असावा. त्याला जर स्वामीकडून नकार लाभला असेल तर बाळेहळ्ळी स्वामीनी शास्त्राचा व रुढीचा खून पाडला असें आह्मी ह्मणू. पण करवीरआप्पाचें ह्मणणें काय ह्याचाच जेथें 'तरुण कर्नाटक'च्या ता. ८ फेब्रुवारीच्या 'सुदर्शन'मधील उताऱ्यावरून बोध होत नाही तेथे महास्वामी अमुकच बोलले हें खरें कसें मानावें? परंतु गुरुपदाच्या संस्कारावाचून कोणत्याहि योग्य भक्तास गुरुपदाच्या व विरक्तपदाच्या महास्वामींनी पूजनीय मानावें असें मात्र आह्मी ह्मणणार नाही. आणि तोच अर्थ जर बाळेहळ्ळी महास्वामींचा असला तर योग्य आहे असेंच ह्मणावें लागेल. तद्वतच वीरशैवधर्मास वेद आधारभूत आहेत हेहि महास्वामींचें मत आह्माला मान्य आहे. कारण वेदांनी जन्मजात विषमतेचा प्रसार केला नाही. वर्णभेद मानला पण तो गुणाने मानला. जन्मजात विषमता हा रुढीदोष आहे, शास्त्रदोष नाही, आणि ह्याच अर्थानें बाळेहळ्ळी महास्वामींनी वर्णभेद मानणें अवश्य आहे असें ह्मटलें असेल तर तें पूर्ण योग्य आहे. परंतु वेद वर्णभेदाचे अतएव जातीभेदाचा पुरस्कार करणारे असल्यामुळें आणि वीरशैवसंस्कृति ही वैदिक संस्कृतिपासून पूर्ण स्वतं व बसवनिर्मितच आहे अशा बुद्धीने जर करवीर आप्पाचे प्रश्न असले तर ते त्याज्यच आहेत.

## 'शरणसंदेश' व बाळेहळ्ळी स्वामी

परंतु करवीर आप्पाचें तरुण कर्नाटकांतील मत जसें अर्थशून्य आहे तसें 'शरणसंदेश' ह्या पत्रांतील नाही. शरणसंदेशाने पुढीलप्रमाणें बाळेहळ्ळी महास्वामींचें मत सांगितलें आहें. (१) वीरशैवांत ब्राह्मणादि वर्ण आहेत. (२) वीरशैवांत भक्त व माहेश्वर अशा दोन जाती आहेत. (३) हे वर्ण व ह्या जाती जन्मतःच श्रेष्ठ व कनिष्ठ आहेत- अर्थात् हें मत बाळे-

हळ्ळी महास्वामींचें खरें असल्यास ते वर्णभेद ह्मणजे जन्मजात श्रेष्ठकनिष्ठ–भेद मानतात हेंच उघड होतें. हें मानवी प्रगतिपर अशा समाजशास्त्राला धरून नाही. ह्याकरिता 'संस्कारामुळे भक्तच गुरु व जंगम बनूं शकतो हें 'शरणसंदेश 'कारांचें मत योग्य व स्पष्ट शद्बांत आहे. परंतु वीरशैवांचा अंत्यसंस्कार दहनविधीनें होत नाही, समाधीनें होतो, ह्मणून ते अति वर्णाश्रमी होत असें ह्मणून वर्णधर्माचा सर्वस्वीं त्याग हो जी भूमिका त्यांनी वर्णन केली आहे तेथे मात्र त्यांचा व आमचा तात्विक भेद आहे. अतिवर्णाश्रम ह्मणजे आश्रमधर्माची शेवटची पायरी होय. त्या पायरीला प्रत्येक वीरशैव जातोच. ह्मणून वीरशैवांचें अंत्यविधी समाधी–स्वरूपाचे होतात हें जरी खरें तरी वर्णव्यवस्थेंतून ही समानता निर्माण करण्याची रीत असल्यामुळे वर्णधर्माचें अस्तित्व मानलेंच नव्हतें असें ह्मणणें तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध होत नाहीं एवढेंच आमचें म्हणणे. वर्णधर्म हा एक जलाशय होय आणि अतिवर्णाश्रमी वृत्ति ही त्या जलाशयांतील कमलपत्राची दर्शक होय. दोन्ही एकमेकांशी संलग्न असतात व दिसतात. पण कमलपत्राला जसा जलाचा स्पर्श होत नाही तद्वतच वर्णधर्मापासून अतिवर्णाश्रमी वृत्ति स्पर्शरहित असते. येवढ्यावरून जलाशयाचा व कमलाचा संबंध नसतोच हें जसें मानतां येत नाही तसेंच वर्ण व अतिवर्ण यांचे संबंध आहेत. आणि हाच 'शरण संदेश 'कारांत व आमच्यांत तात्विक भेद आहे. तेवढाच बाळेहळ्ळीस्वामी व 'शरण संदेश' ह्यांत असेल तर उत्तम. पण तसा असणें शक्य नाही. पण त्यांची मतें रुढीविलासी शास्त्र्यासारखी आहेत म्हणून ते पंचाचार्य सिंहासनाधीश म्हणून आह्माला मान्य असले तरी हीं त्यांची अप्रगतिपर व कोती मतें आह्माला मान्य नाहीत. हीं मतें आह्माला मान्य नाहीत ह्मणून त्यांच्या पूर्वापार अधिकारास विरोध करावा अगर विघ्न करावें हें मात्र आह्मांस मान्य नाही. तथापि बसवेश्वरांचें महात्मापद त्यांनी मान्य करून बसवेश्वराचा जयजयकार करण्यास बंदी करणाऱ्या आपल्या अंध भक्तांना त्यांनी जो चोप दिला तो मात्र वर्णनीय आहे. त्याचप्रमाणें विरक्तमहास्वामींनीहि जुन्या पंचाचार्यांविषयी आदरभाव प्रगट करण्याची प्रथा पाडावी व तीहि जाहीरपणें पाडावी – तरच ते खरे प्रगतिपर मताचे. बिन्नाव व दक्षिणा घेण्याकरिता प्रगतिपर बोलणें हें प्रगतिपर मताचें लक्षण नव्हे. बाळेहळ्ळी महास्वामी व शिवरूप उज्जयनी महास्वामी ह्यांनी जाहीरपणें बसवनिंदेचा निषेध केला असता त्याबद्दल त्यांचें अभिनंदन न करणें हा चित्रकलदूर्ग–महास्वामींच्या चेल्यांचा दुराग्रह नव्हे काय ? हल्लीचे पंचाचार्य व त्यांचे शास्त्री पंडित जन्मजात विषमता मानतात व प्रतिपादन करतात म्हणून त्याबद्दल दोष देणें हें जसें योग्य, तद्वतच योग्य कृत्याबद्दल अभिनंदन करणें हेंहि योग्य. पण सर्वस्वींच निषेध करीत राहणें यांत मूळावरच आघात करणें होय. ह्मणून चित्रकलदुर्गमहास्वामींच्या नांवावर मिरवणाऱ्या चेल्यांची ही स्थितीच आम्हाला मान्य नाही.

## सोलापूरचे श्री. हिंगमिरे.

सोलापूरांत चित्रकलदूर्गमहास्वामींच्या आगमनाप्रीत्यर्थं जो वाद सुरू झाला त्यासंबंधी आह्मीं जें लिहिलें तें एकतर्फी माहितीवर लिहिलें असा आमच्यावर 'सुदर्शन' चा आरोप. डॉ. जगदेवराव देशमुख ह्यांच्यासारख्या समतोल वृत्तीच्या व विरक्त – पंचाचार्यवादांत कोणाहि एका पक्षाला नसणाऱ्या सुविद्य माणसाकडून आलेला लेख ता. १५ जानेवारीच्या 'संजीवनी'त आह्मीं प्रसिद्ध केला. त्याला उत्तर ह्मणून सोलापूरचे श्री. ए. एस्. हिंगमिरे ह्यांचा आलेला लेख ता. १५ फेब्रुवारीच्या 'संजीवनी'त प्रसिद्ध केला. हे दोन्ही लेख प्रसिद्ध करण्यांत आमचा हेतु एकच कीं, वादांतील दोन्ही पक्षांची माहिती

वाचकांना मिळावी. वास्तविक पाहिलें असतां डॉ. जगदेवरावांच्या लेखांत जी सद्बुद्धि प्रगट होते ती श्री. हिंगमिरे ह्यांच्या लेखांत प्रगट होत नाही इतकेंच नव्हे तर डॉ. जगदेवराव देशमुख व रेवणसिद्धमंदिरांत श्रींच्या स्वागतार्थ जमलेले पंच ह्यांना खाऊं कीं गीळूं ह्या बुद्धीनें सदर लेख हिंगमिरे ह्यानी लिहिलेला प्रतीत होतो. सार्वजनिक हितबुद्धीनें वाद उत्पन्न झाला असतां एकमेकास गीळण्याच्या बुद्धीनें वाद घालणें सुज्ञपणाचें लक्षण नव्हे. हा सुज्ञपणा श्री. हिंगमिरे ह्यांच्या लेखांत स्पष्ट दिसुन येत नाही हें आह्मीं जाणलें असतांहि आह्मीं त्या लेखास जें स्थळ दिलें तें एवढ्याच-करितां कीं, दोन्ही बाजू आमच्या वाचकापुढें यावयात.

## डॉ० देशमुखांचें मत

डॉ. देशमुख ह्यांनीं आपल्या लेखांत वादाची प्रस्तावना करताना [१] चित्रकलदुर्ग-महास्वामी 'गंगाबाई दवाखान्यां'च्या उद्घाटनार्थ खाजगी रीतीनें येणार होते. (२) श्रीमन्निरंजन विजगुणस्वामी चित्रकलदुर्गास जाऊन त्यांनी महास्वामीची आज्ञापत्रे श्री. वारद व श्री. अबदुलपुरकर ह्यांना आणलीं. [ ३ ] सदर आज्ञापत्रांत वीरशैव-समाजांतील पंच, महाजन, शेटे वगैरे मंडळीस स्वागतार्थ पाचारण होतें, श्री. हिंगमिरे ह्यांनीं आपल्या उत्तरांत ह्यांपैकीं एकहि गोष्ट खोटी असल्याचें लिहिलें नाहीं. अर्थात् येथपर्यंतचा प्रश्न वादग्रस्त नाहीं हें उघड होतें. मग वाद कोठून सुरू झाला ? तर [ ४ ] श्रींचें आगमन जरी खाजगी होतें तरी ज्यांचे नांवीं आज्ञापत्र आलें त्या अर्थी श्रींच्या सत्कारार्थ रेवणसिद्धमंदिरांत जमावें. आज्ञापत्र अनपेक्षित व उशीरा आलें तरी श्रीविषयीं आदर व्यक्त करण्याकरितां श्रीरेवणसिद्ध-मंदिरांत जमावें असें ठरलें. अर्थात् ही गोष्ट ज्यांना आज्ञापत्रें आलीं होतीं त्यांनीं आपसांत ठरविली होती. [ ५ ] परंतु वीरशैव-हितसंवर्धक मंडळाचे नावावर सेक्रेटरी श्री. कल्याण शेट्टी ह्यांनीं एक पत्रक काढून श्रीसिद्धेश्वरमंदिरांत महास्वामींच्या स्वागतार्थ जमावें हें जाहीर केलें. श्रींचे श्री. कल्याणशेट्टीना व त्यांच्या वीरशैवहितसंवर्धक मंडळास आज्ञापत्र नसतांना त्यांना हा सवतासुभा निर्माण करण्याचें कारण नव्हतें असें डॉ. देशमुख लिहितात. पण हा सवता सुभा निर्माण करणें श्री. कल्याणशेट्टींनां जरूर होतें असें श्री. हिंगमिरे ह्मणतात. कारण रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्यांचा हेतू श्रींचें स्वागत करावें हा नव्हता तर 'गो बॅक' ची आरोळी ठोकावी हाच होता असें हिंगमिरे ठासून सांगतात पण पुरावा देत नाहीत. फक्त ज्यांना आज्ञापत्र आलें होतें त्यांनी आपल्या सहीच्या जाहीराती वाटल्या नाहीत ह्मणून दर्शनेच्छु भक्तांना न कळवितां हें कार्य घडवून आणावें अशा दुष्ट हेतूचा आरोप हिंगमिरे करतात. वादाचें किल्मिषरूपी बीज येथेंच आहे.

## हिंगमिऱ्यांचीं खोटीं विधानें

सुम्मा पटणे ह्यांनी काढलेल्या पहिल्या पत्रकांत रेवणसिद्धमंदिरांत जमलेल्या पंचांचीं नावें दिलीं आहेत. त्या सर्वांचा व्यक्तिगत दर्जा सोलापूरवासीयांना तर अवगत आहेच पण महाराष्ट्राच्या बहुतेक भागांत त्या सर्वांना ओळखणारे लोक आहेत. खुद्द निजगुणस्वामी व त्यांपैकीं बहुतेक सर्वच ह्यांचे संबंधहि चांगले असताना ते पंच रेवणसिद्धमंदिरांत महास्वामींना बोलावून 'गो बॅक' ह्मणण्याइतके असभ्य आहेत असें मानणें सर्वथैव अनुचित आहे. ह्या पंचांत कांही कडवे पंचाचार्यांचे अभिमानी असतील; कांही जन्मजातीचा अभिमान धरणारे असतील ; पण महास्वामींना स्वागतार्थ बोलावून त्यांना 'गो बॅक' ह्मणण्याइतके क्षुद्र

वृत्तीचे होते असें कोणालाहि ह्मणतां येणार नाही. पण ते तसे होतें हें गृहीत धरूनच सिद्धेश्वर-मंदिरांतील स्वागत श्री. कल्याणशेट्टींनी जाहीर केलें हेंच उघड होतें. अवधी थोडा असल्यामुळें ह्मणा वा कोणत्याहि कारणामुळें ह्मणा, पंचांनी श्रींच्या आगमनाची वार्ता जाहीर केली नाही ही पंचांची चूक वाटली व ती पंचाची चूक भरून निघावी ह्या एका सद्बुद्धीनें सिद्धेश्वर-मंदिरांत स्वागताची तयारी केली गेलीं असती तरी वाद माजला नसता असें डॉ. देशमुखांच्या लेखावरून वाटतें. सिद्धेश्वरमंदिरांतीलच स्वागत घ्यावें व रेवणसिद्धमंदिरांतील स्वागत घेऊं नयें ह्याकरिता जी कारवाई झाली त्या कारवाईत परस्परांच्या कलुषित मनाचा कळस झाला आहे. ह्याला हिंगमिरे असें उत्तर देतात कीं, आम्ही रेवणसिद्धमंदिरांत जमणार आहोंत ही खबर महास्वामींना देणें पंचांचें कर्तव्य होतें. महास्वामींना ही खबर नव्हती याला पुरावा काय ? सिद्धेश्वरमंदिरा-कडेच चला अशी खबर श्रींना वेळेवर गेल्याचें कळलें तेव्हां रेवणसिद्धमंदिरांतील पंचांनी घुम्मा पटणे ह्यांना पुढें पाठवून थोड्या वेळाकरितां तरी स्वागत घेऊन जावें अशी महास्वामींना विनंती केली होती असें डॉ. देशमुख म्हणतात. ह्यावरून श्रींना त्यापूर्वी रेवणसिद्धमंदिरांत स्वागतास यावें लागेल ही बातमी असावी असा बोध होतो. पण ह्या बाबतींत आगाऊ बातमी कोणाची होती व श्रीसिद्धेश्वरमंदिरांतच कां गेले; रेवणसिद्ध-मंदिर कां टाळलें ह्यांतील सत्य महास्वामी-शिवाय अधिकृतपणें सांगावयास कोणीहि समर्थ नाही. म्हणून कल्याणशेट्टी व हिंगमिरे ह्यांनी पंचांच्या हेतूवर केलेलें आरोप हे सत्य होत नसून पंचाविषयींच्या त्यांच्या कलुषित मनाचेच निदर्शक ठरतात. म्हणून रेवणसिद्ध मंदिरांतील स्वागत व चुकविता जर सिद्धेश्वर मंदिरांतील स्वागत घडवून आणलें असतें तर पंचाच्या हलगर्जीपणामुळे स्वागतांत पडलेलें न्यून आह्मीं भरून काढलें अशी जर कल्याण-शेट्टी हिंगमिरे मंडळींनी द्वाही फिरविली असती तर त्यांची मुक्तकंठानें आह्मींहि स्तुतीच केली असती. निदान सिद्धेश्वरमंदिरांतील स्वागत झाल्यावर आणि रेवणसिद्धमंदिरांतील स्वागत चुकल्यावर घुम्मा-पटणे ह्यांनी श्रींच्या दर्शनाचा व स्वागताचा लाभ घडला नाही ह्मणून जें दिलगिरीदर्शक पत्रक काढलें त्यावर सिद्धेश्वर-मंदिरांत श्रींचें स्वागत करण्याची जबाबदारी घेणाऱ्या कल्याणशेट्टींना त्यांच्या हेतूवर आरोप करणारें पत्रक काढण्याची गरज नव्हती. कारण त्या पत्रकांत श्रीविषयींचा आदर व्यक्त कर-ण्यांत आलेला आहे.

## श्री· कल्याणशेट्टींची चूक

श्री. कल्याणशेट्टी व पंच मंडळी ह्यांच्यांत मतभेद असेल पण श्रींचें स्वागत हें येथे उभ-यतांना सारखेंच शुभ असल्यामुळे व श्रींचें स्वागत चुकल्याची घुम्मा-पटणे ह्यांनी दिलगिरी व्यक्त केल्यावरहि पंचाचा हेतू वाईट होता हें जाहीर करणारें पत्रक कल्याणशेट्टींनीं काढण्यांत कोणता पुरुषार्थ संपादन केला ? श्री व पंच ह्यांचीं मनें कलुषित आहेत हेंच त्यांनी जाहीर केलें कीं नाही ? हें जाहीर करतांना श्रीविष-यींचा आदरभाव होता कीं पंचाविषयींचा द्वेष-भाव होता कीं स्वत:ची भलत्याच प्रसंगानें प्रतिष्ठा वाढवून घेणें हा हेतू होता कांहींच कळत नाही . आणि हिंगमिरे तर ह्याच पत्र-काची तरफदारी करण्याला पुढें आले आहेत. सोलापूरांत काळीं निशाणें किती निघालीं व पुढें काय झालें ह्या इतिहासाच्या कथनांत कांहीच अर्थ नाही . श्रींच्या स्वागताचा कलह सोलापू-रांत, उत्पन्न झाला व तो कल्याणशेट्टींच्या पत्र-कामुळे उत्पन्न झाला हें जें उघड झालें तें झालें. ह्या वादांत मुद्दे निघतात ते असे कीं, श्रींचें आगमन खाजगी असतांना, त्याला सार्वजनिक स्वरूप देण्यांत हेतु काय ? आणि असें सार्व-जनिक स्वरूपच द्यावयाचें होतें तर त्याकरितां

समस्त वीरशैवांची सभा बोलावून तींत तसें स्वागतमंडळ कां नेमलें नाहीं ? कल्याणशेट्टींच्या पत्रकावरुन स्वागत एकतर्फी व एकपक्षीय झालें हाच बोध होतो. कारण कल्याणशेट्टींचें वीरशैवहितसंवर्धक मंडळ ह्मणजे समस्त सोलापूरवासीय वीरशैव मंडळीची प्रातिनिधीक संस्था नव्हे ? हें मंडळ 'अचानक जन्मलें' असे डॉ. देशमुखांनीं ह्मटलें म्हणून त्यांच्यावर तुटून पडणाऱ्या श्री. हिंगमिरेप्रभृतींनी त्यांच्या प्रातिनिधीक स्वरूपाची साक्ष कां दिलीं नाहीं ? प्रातिनिधिक स्वरूप काय असतें ह्याची जाणीव हिंगमिरे ह्यांना नाही असें नाहीं. कारण पंचांनीं यांना आगाऊ स्वागताची खबर कां दिली नाही वगैरे प्रश्न त्यानी उत्पन्न केलें आहेत. हेच प्रश्न सिद्धेश्वरमंदिरांत जनतेला बोलावणाऱ्या कल्याणशेट्टींना त्यांनी केले असते तर हिंगमिऱ्यांची निःपक्षता दिसली असती. सिद्धेश्वरमंदिरांत लोक पुष्कळ जमले असतील, मिरवणूकीला जनसमाज खूब लोटला असेल, पण ही मिरवणूक सोलापूरांतील समस्त वीरशैवांच्या कोणत्या प्रातिनिधीक संस्थेतर्फे होती ह्याचें उत्तर हिंगमिरेहि देत नाहीत, कल्याणशेट्टीहि देत नाहीत, 'सुदर्शन'हि देत नाही व 'सुदर्शन'कारहि देत नाहीत. नुसते हेतूवर आरोप करण्यापलीकडे त्यांच्याजवळ कांही नाही. समस्त वीरशैवांची सभा बोलावून तींतून जाहीर स्वागत करावयाचें असें श्री. पसारे ह्यांच्या घरीं जमलेल्या सभेंत ठरल्याचा एक वृत्तांत डॉ. देशमुखांच्या लेखांत आहे. त्याला हिंगमिरे ह्यांच्या लेखांत उत्तर नाहीं. सत्य बाजूला नसलें तर टवाळीशिवाय शिल्लक उरत नाहीं. तसाच प्रकार हिंगमिऱ्याच्या लेखाचा आहे व 'सुदर्शन'नें 'संजीवनी'कार संतापलें, बेभान झालें हा शेरा लिहून व्यक्त केला आहे. कोणत्याहि सार्वजनिक हितबुद्धीच्या गृहस्थानें सदर कार्य करतांना न संतापणें हेंच उचित. हा स्वभाव आमच्या अंगवळणीं पडला आहे. 'सुदर्शन' च्या टीकेस या 'बसवराज'च्या हल्ल्यांत संतापून जाण्याइतकें आम्हाला काहींच वाटत नाहीं. उलट ह्या उभयतांच्या अज्ञानाची कीव करावीशी वाटते. वामणगांवकर निराळे 'उदय.'कार निराळे व 'उदय' निराळा; तद्वतच 'संजीवनी'कार व 'संजीवनी' निराळे. ह्यांचें नाते 'सुदर्शन-'कारापेक्षां आम्हाला अधिक कळतें. म्हणूनच पत्रकार व्यक्ति सार्वजनिक हितबुद्धीनें जाहीरपणें बोलू लागली, पत्रकाद्वारे बोलूं लागलीं, तरी या व्यक्तीचें मत व त्या पत्राचें मत नैतिक दृष्टया — कायदेशीर दृष्टया नव्हे — एकच असतें हें 'सुदर्शन'कारास कळावयाचें नाही. कारण ते वकीली करतात. त्यामुळे कोर्टीत पक्षकाराकरिता मांडलेलें मत आपले मत नव्हे हें मानण्याची यांना अधिक संवय असणें संभवनीय आहे. म्हणून त्यांना हे नैतिक बंधन कळत नसलें तर कळविणें — शिकविणें संजीवनीकार — गुरुपत्र ह्या नात्याने आमचे कर्तव्य आहे. क्रोधवश होऊन आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेणें आमचें कर्तव्य नव्हे हें अजून आम्हीं त्यांना प्रेमादरपूर्वक सांगतों.

---

# वीरमाहेश्वरमंडळ

लेखकः—
श्री. नारायण स्वामी
मलवडी ( सातारा. )

पुष्कळ दिवस आजारी असलेल्या माणसाला जरा बरें वाटूं लागलें कीं, किती किती खाऊ असें होऊन जातें ! आणि तें तो मनाप्रमाणे जर खाईल तर पुन्हां आजारी पडण्याची पाळी येते. आमच्या वीरशैवसमाजाचीहि कांही अंशीं तशीच अवस्था झाली आहे! शतकानुशतकें घोरत पडलेला समाज नुकताच कोठें जागा होत असल्याचें अस्तित्व चालूं असलेल्या चळवळीवरून दाखवूं लागला आहे ! निरनिराळ्या संस्था जन्मास येऊं लागल्या आहेत. सध्याचें युग संघशक्तीचें आहे. प्रत्येक घराणें, प्रत्येक पोटजात, जातींतील पोटभेद, समाज, राष्ट्र, सर्वांच्यावर असलेला 'अखिल जागतिक राष्ट्रसंघ,' आपापल्या परीने संघटनेचें कार्य करीत आहेत. हिंदुसमाजांत जितक्या जाती आहेत, जवळ जवळ तितक्याच जाती आमच्या वीरशैवसमाजांतहि आहेत! त्या सर्वांमध्यें, आपण एका विशिष्ट पंथाचे अनुयायी आहोंत, इतकी जाणीव कांही बोटावर मोजण्याइतक्या व्यक्तीखेरीज झालेली नाही ! प्रत्येक समाज आपापसांतील पोटभेद, मतभेद, सर्व बाजूला ठेवून आपली संघटना जोरदार करीत आहेत. असें असतांना आमच्यांतील कांही माहेश्वर मंडळी आपला स्वतंत्र संघ स्थापून फक्त माहेश्वरांचीच उन्नति करून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत ! माहेश्वरवर्ग हा भिक्षुक–परोपजीवि आहे. सर्व वीरशैव पोटभेदांना शिक्षण देण्याची जबाबदारी पूर्वींच्या रूढिप्रमाणे त्यांच्यावर आहे. वीरशैवांतील इतर जातींकडून जेव्हा या उपाध्यायवर्गास भिक्षा, दक्षिणा वगैरे अन्नरूपाने जें कांही मिळेल त्याच्यावरच बहुधा यांची मदार असे. परंतु अलीकडें शंभर वर्षांत झालेली राजकीय उलथापालथ व यांत्रिक क्रांति यांच्यामुळे वीरशैवसमाजाचीच काय परंतु हिंदुस्थानांतील अखिल जातींची धार्मिक बंधनें, रुढि, वगैरे शिथिल झालीं आहेत. आचार–विचारांत जमीन–अस्मानाचा फरक पडला आहे, आणि त्याचा पडसाद वीरशैवसमाजांत ऐकूं येणें अपरिहार्य आहे ! व त्याचा परिणाम ह्मणजे भक्तवर्गाकडून माहेश्वरमूर्तींना मिळणाऱ्या मिळकतींत कमतरता येणें हा आहे! अशा या काळीं माहेश्वरवर्गानें आपली धार्मिक उन्नति करून घेण्याचा कितीहि प्रयत्न केला, लिंगार्चन, शिवार्चन, रुद्र, महिम्न, संकल्प, निरनिराळें संस्कार, शास्त्रें, धर्मग्रंथ वगैरे सर्व गोष्टींत पारंगत अशा माहेश्वरमूर्ति निर्माण करण्याचा प्रयत्न केला, तरी ज्या समाजावर या वर्गाची उपजीविका चालणार आहे त्याची स्थिति जोपर्यंत सुधारत नाहीं, त्याला जोपर्यंत दिवसांतून दोन वेळ सुखाने अन्न खाण्याची परिस्थिति निर्माण होत नाही, तोपर्यंत हा समाज या वेदशास्त्रसंपन्न माहेश्वरमूर्तींना एक वेळ तरी कसे जेवूं घालणार हा एक मोठाच प्रश्न आहे !

वीरशैवांच्या निरनिराळ्या संस्था असतांना, माहेश्वरवर्गाकरिता स्वतंत्र संस्था स्थापणें जरुरीचें आहे असें आह्मांस वाटत नाही. ज्या ठिकाणीं वीरशैवांची संस्था आहे परंतु ती केवळ नाममात्रच आहे ती आपलें कर्तव्य ध्येयाप्रमाणे बिलकूल बजावीत नाही अथ ठिकाणीं तर ही संस्था कार्यक्रम करण्यास

जबाबदारी माहेश्वरवर्गावरच असतांना ती सोडून - किंबहुना तिच्यांत भेद पाडून, दुसरी संस्था स्थापन करण्याचें कारण काय ? त्या संस्थांचें ध्येय जर माहेश्वरवर्गाच्या उन्नतीच्या आड येत असेल तर तें आकुंचित ध्येय प्रगल्भ करणें त्यांच्याखेरीज इतरांच्या हातीं आहे असें त्यांना वाटतें काय ?

एकट्या माहेश्वरवर्गांतसुद्धा मराठी भाषा जाणणारेच पण स्थानपरत्वें एकच शब्द किंचित् वेगळा हेल काढून बोलणाराचे निरनिराळे गट पडूं शकतात. उदाहरणादाखल मुंबईत--सातारा जिल्ह्यांतील, ' वाईदेशी,' पुणे जिल्ह्यातील 'पुणेरी' अहमदनगर जिल्ह्यांतील 'नगरी,' ठाणें, कुलाबा, रत्नागिरी जिल्ह्यांतील ' कोकणी ' असे भेद आहेत ते निराळेंच !

माहेश्वरमंडळस्थापक प्रिय माहेश्वरमूर्ति या मंडळाची स्थापना करीत असतांना स्थापन करण्याचें कारण असें सांगतात कीं, आह्मी स्वतःची उन्नति करून घेऊं. परंतु त्यावर आमचें असें ह्मणणें आहे कीं, अखिल – वीरशैव-समाजाची उन्नति झाली तर त्यांत माहेश्वर वर्गाची उन्नति नाही का होणार ? माहेश्वरवर्ग वीरशैवसमाजाचा मार्गदर्शक असतांना माहेश्वरेतर संघटनाविरहित आपल्या वीरशैव समाजाला सोडून स्वतःची उन्नति कसा करून घेणार ?

पूर्वीच्या संस्था निस्वार्थी, अविश्रांत श्रम करणाऱ्या, संघटनाचतुर कार्यकर्त्यांच्या व कार्यक्रमाच्या अभावीं बंद करून ठेवून त्या नाममात्र कागदावर जिवंत असणाऱ्या संस्थेचेंच दुसऱ्या संस्था काढण्याऐवजी पुनरुज्जीवन करणें जास्त महत्वाचें आहे ही गोष्ट कोणीहि नाकबूल करणार नाहीं !

एकाच वीरशैवसमाजांत निरनिराळ्या कार्यक्षमरहित संस्था असल्याने इतर समाजांना जोरदार संघटनेऐवजी आपल्या समाजांत बराच विस्कळितपणा एकमेकाविषयीं गैरसमज असल्याचें दर्शवीत नाहीत काय ?

वीरशैवसमाजांतील कांही तरुण आणि संघटना करूं इच्छिणारे कार्यकर्ते आपसांतील पोटभेद, क्षुल्लक मतभेद, कोत्या कल्पना, यांना तिलांजली देऊन संघटना करण्याचा जोरानें प्रयत्न करीत असता, उन्नतीच्या मार्गावर एक एक पाऊल पुढें टाकीत असतां, स्वतःला नवमतवादी ह्मणवून घेणारे लोकच निरनिराळें पोटभेद दृढ करण्याचा प्रयत्न करीत आहेत ! संघटनेचें एक पाऊल पुढे टाकण्याऐवजीं मागें टाकीत आहेत !

आह्मांला असें वाटतें कीं, या वीर अगर नववीर माहेश्वरमंडळप्रस्थापकांनी अस्पृश्य समजल्या गेलेल्या डॉ. आंबेडकर यांच्या मानीव अस्पृश्यसमाजानें किती थोडक्या काळांत आपली उन्नति करून घेतली ! अखिल – भारतवर्ष आसेतुहिमाचल गदगदा हलवून सोडला ! त्याचें मर्म व्यापकपणांत आहे कीं सवत्या सुभ्यासारख्या क्षुद्र विचारांत आहे ? ( सवतासुभा वेगळा अस्पृश्य-मतदारसंघ हा नसून, अस्पृश्यांतील निरनिराळ्या पोटजातींतून अस्पृश्य तितका एकच अशी भावना उत्पन्न करणें ) याची माहिती उपरोल्लिखित नवमतवाद्यांना आह्मीं देणें ह्मणजे " आजोबाला नातवानें शिकविणें "-च नव्हे काय ?

# दुर्दैवी वीरशैवसमाज

ले.– कुमार चनबसप्पा वाय. रामपुरे सोलापूर.

वीरशैव–बंधूभगिनींनो, आजच्या वीरशैव-समाजाची सद्यस्थिती काय आहे हें सर्वांना माहित आहेच. कांही ह्मणतात बसवदेव श्रेष्ठ व कांही ह्मणतात पंचाचार्य श्रेष्ठ. असें ह्मणून झगडत असतांना पुढील पिढीवर काय परिणाम होईल याचा कोणीं विचार केला आहे काय ? ज्याप्रमाणें घरात लहान मुलांना शिक्षण देऊं, ज्याप्रमाणें त्यांना आपण वागावयास शिकवू, त्याप्रमाणे ते शिकतील व वागतील. जर आपण त्यांना वाईट रीतींने वागावयास शिकवूं तर ते वाईट बनतील. जर चांगल्या रीतीनें वागावयास शिकवू तर ते चांगले बनतील. त्याचप्रमाणें घररूपी समाजाचा विद्यार्थीरूपी मुलगा होईल यांत शंका नाही.

सारासार दृष्टीनें विचार केल्यास सध्या समाजांत जी लाथाळी चाललेली आहे ती पंचाचार्य श्रेष्ठ किंवा बसवदेव श्रेष्ठ असें नसून त्याचे नांव पुढे करून ढोंगी पुढारीपणाचे सोंग घेण्याकरिता चाललेल्या खटपटी व लटपटी आहेत. वास्तविक पाहतां पंचाचार्यपेक्षां बसवेश्वर कमी नाहीत किंवा पंचाचार्य बसवेश्वरापेक्षा कमी नाहीत. जरी ते श्रेष्ठ–कनिष्ट असले तरी ते आपल्यापेक्षा शतपटींनें खास श्रेष्ठ आहेत. तेव्हा आपल्यापेक्षा श्रेष्ठ असणाऱ्या व्यक्तीची निंदा करणें म्हणजे घुबडानें सूर्याची निंदा करण्यासारखेंच आहे. आणि ढोंगी पुढाऱ्यानो, जरी तुह्मी स्वतःचा बडेजाव वाढविण्याकरितां त्या दोघा समसमान असलेल्या पूज्य महात्म्यावर कितीहि शिंतोडे उडविले तरी त्याला कांहींच किंमत नाही. ज्याप्रमाणें राजा चाललेला असो किंवा एखादा क्षुल्लक भिकारी चाललेला असो त्याच्यावर भुंकण्याची कुत्र्याची संवयच असतें त्याचप्रमाणे पूज्य महात्मा बसवेश्वर व पंचाचार्य या सिंहाच्या नांवांचे कातडें पांघरलेल्या गाढवांनी चालविलेला आहे. ज्या परम पवित्र अशा महात्म्यांनी सर्वांच्या कल्याणाकरिता हा तेजस्वी धर्म स्थापन केला त्या परमपवित्र अशा धर्मवीराच्या नांवाला काळोखी फासण्यासारखें कृत्य आतां तरी सोडा. आज पृथ्वीतलावरील प्रत्येक धर्म आपआपल्या परीनें आपआपली उन्नति करून घेत असतां आपला वीरशैवधर्म मात्र त्याच्या उलट दिशेला चाललेला आहे. धर्मात्मा बसवेश्वर व पंचाचार्य हे एकाच धर्माचे नेते असे ते दोघेहि आपणाला सारखेच श्रेष्ठ आहेत तरी त्याच्याकरिता आपण लाथाळी करीत बसून समाजाच्या अधोगतीला कारण होऊं नका. आज परधर्मीयांचे हल्ले आपल्या धर्मावर चालू आहेत. ते बंद करण्यासाठी तरी पंचाचार्य व बसवेश्वर पार्टीच्या बंधूंनो, ज्याप्रमाणें दोघे आपसांत कितीहि भांडले तरी दुसऱ्यांशीं भांडतांना एक होतात त्याप्रमाणे तुह्मीं दोघेहि हातांत हात घालून वीरशैवधर्माचा जयजयकार करून समाजाला उच्चस्थान प्राप्त करून देण्यासाठी झटत रहा.

स्त्री-विभाग

# पतिसंबंधी कांहीं लक्षांत ठेवण्यायोग्य गोष्टी.

[ लेखकः—निळादेवी भंडारा. ]

(प्रत्येक स्त्रीच्या जीवनांत एक असा साथीदार असतो कीं जो प्रकाशापेक्षां सुंदर आणि साखरेपेक्षांहि गोड वाटतो. तो साथीदार म्हणजे 'पति' होय. त्यांच्यासंबंधात एक नवविवाहित वधू पुढील मनोरंजक गोष्ट सांगते.)

पतिदेवासंबंधानें एक लेख लिहावा अशी माझी पुष्कळ दिवसांची इच्छा होती, आणि त्यासंबंधानें मी त्यांच्याजवळ गोष्टहि काढली. तेव्हा ते म्हणाले, " खबरदार, ऐसा लेख लिखोगी तो. गर्दन तोड दूंगा. तुम क्या जानो की पति कैसे होते है. अभी तो एकहि पतिसे काम पडा है. " मीं मौन धारण केलें. परंतु पुष्कळ दिवसांपासून मनांत धरलेली इच्छा आज सफल होत आहे, आणि लिहिण्यास हें होत आहे कीं, मला या लेखांत माझ्या 'गर्दन तोड दूंगा'-वाल्या पतिकडूनच पुष्कळ सहाय्यता मिळाली.

लेख लिहितांना असा विचार आला कीं, पति आहे तरी कोणती वस्तु? अर्थात् पतीची व्याख्या काय असावी? माझे पतिदेव 'फिलॉसफीचे' प्रोफेसर आहेत म्हणून मीं त्यांना एक दिवस विचारलें, 'पति कशास म्हणतात.' ते म्हणाले, " पति तो बिगडोल जनावर आहे जो.........." इतके ह्मणून चूप राहिले, व हांसत हांसत पुढें म्हणूं लागले, "ओऽऽ मी समजलों, तुह्मी या विषयावर लेख लिहिणार. हम नही बताते." मी ह्मटलें "तुह्मी लग्नाचेवेळी प्रतिज्ञा केली होती कीं मी सगळया गोष्टींनी तुला संतुष्ट ठेवीन." ते म्हणाले, " आणि तूं सुद्धां प्रतिज्ञा केली होती कीं माझी आज्ञा पाळशील आणि आपर करशील." मीं पळ काढला.

असें पाहिल्यास या संसारांत पुष्कळ पति आहेत आणि त्यांच्यावर लेखहि पुष्कळ लिहिता येतील. परंतु माझ्या सर्व भगिनीकरतां मीं त्या गोष्टी लिहीन कीं, ज्या सगळयांना लागूं पडतील.

स्त्रिया जशा एका ठिकाणीं बसतात तसे पति कधीं बाहींत. आणि बसलेहि तरी घराचें बाहेर. घरांत नाहीं. दिवस उजाडतांच घराचे बाहेर पडणें ही त्यांची खास संवय असते. या नियमाविरुद्ध कांहीं उदाहरणें सांपडतील पण तीं फार थोडीं.

दुसरी गोष्ट पतिसंबंधी हीं पाहण्यांत येते कीं, ते बाहेर कोणाचे कसेहि आणि कितीहि हुकूम ऐकतील पण घरीं येतांच लाट साहेब बनतात आणि स्त्रीवर हुकूम सोडूं लागतात. पाणी आणा, साबण आणा, आणा छत्री, आणा जोडे.

तिसरी गोष्ट हीं कीं, स्त्रीबरोबर कोठें जायची वेळ आली तर अशी घाई करून सोडतात

कीं कांहीं विचारु नका. कोट-प्यांट घालून छत्री घेऊन आणि नेहमी नेहमीं हातावरील घड्याळ पाहात ह्मणूं लागतात ' लवकर चला. किती उशीर झाला. आठ वाजलेत. फक्त ५ मिनीटें राहलीत. ओऽऽ, ऐकतें कीं नाहीं ? अर्धी रात्र करशील काय? या प्रकारें ते ओरडत सुटतात. आणि स्त्री विचारी कोठें लुगडे नेसतें, कोठें केंस विंचरते, कोठें आरसा पाहतें, कोठें पावडर फांसतें, कोठें चपला पाहते, कोठें रुमाल शोधूं लागतें, कोठें सेपटी पीन गमावतें. विचारीला तयारी करतां-करतांच नाकीं नव येतात. मला तर वाटतें कीं स्त्रिया या बाबतींत अगोदर बदनाम झाल्या आहेत.

परंतु पतिलोक सगळ्या गोष्टी वेळेवर करतात हेंहि कांहीं दिसून पडत नाही. घरी जेवण्यास कधी वेळेवर येणार नाहीत आणि त्याचें प्रायश्चित्त स्त्रीला वाट पाहात बसावें लागतें. माझा तर हा दृढ विश्वास आहे कीं, पति लोक आपल्या मृत शरिरास अग्नि देण्याचें वेळेशिवाय कधीं वेळेवर उपस्थित होत नाहीत आणि याचा स्त्रियांना कांहीं फायदाहि नाही. कारण आतां सति जाण्याची चालच नाही. प्रत्येक स्त्रीला याचा अनुभव आहे कीं, पति लोक सकाळीं लवकर येऊं ह्मणून सांगून जातात पण नेहमीं उशीरा येतात. आणि सांगूं लागतात, आज पुष्कळ काम होतं. कधीं म्हणतात तुझ्याकरिता लुगडं पाहत होतो. कधीं म्हणतात एका जुन्या मित्राकडे गेलों होतों. इत्यादि:—

पांचवी गोष्ट पतिसंबंधी जी मीं पाहिली आहे ती ही कीं, स्त्रियापेक्षां पुरुष बलवान् समजले जातात. माहीत नाही ही घमेंड सर्व मनुष्यसमाजांत कोठून व कशी फैलावली. याच कारणामुळे माझे पति मला नेहमी " गर्दन तोड दूंगा " अशी धमकी देतात.

ही घमेंड कांही अंशीं खरी असेल. माझे पति स्वतः खरोखरच मजबूत आहेत. गाठोडें बांधण्यात आणि पॉलिशाची शिशी उघडण्यांत एकसारखेंच.

स्त्रीकरितां संसारांत पति सर्वांत अधिक उपयोगी आणि कोणत्याहि कामीं येणारी वस्तू आहे. पति त्या जादूच्या कोठीसारखा आहे की मागितल्यास प्रत्येक वस्तू देऊं शकतो. पति तो रुपया होय कीं ज्या योगें आपण सगळ्या आवश्यक वस्तू घेऊं शकतो, व पुनः जशाचा तसाच पूर्ण बनून राहतो. पति ती पॉकेट बँक आहे कीं जी कोठेंहि आणि कोणत्याहि वेळीं रुपये पैसे देऊं शकते. पति रुपये पैदा करणारी मशीन आणि ओझें वाहणारा भाड्याचा तट्टू. आणखी किती तरी उपयोग आहेत कीं ज्याविषयीं मी लिहूं इच्छीत नाही. सुज्ञ वहिणी स्वत:च ओळखूं शकतील.

पेटी उघडण्यास, ट्रंकांत कपडें रचण्यास, बाटल्यांचे बूच काढण्याकरिता अणि इतर कामाकरिता कीं ज्यांत स्त्रिया मदत घेऊं शकतात. मुलांना खेळविण्यांत ते पटाईत असतात हें तर सिद्धच झालें आहे.

रात्रीच्या वेळीं आणि निर्जन स्थानात तर पति फारच आराम देणारा आणि मनास आनंद देणारा पक्षि आहे. घराच्या चारी बाजूंनी बदमाशांची भीति असेल तर पति मजबूत अशी ढाल समजा. तो घायाळ होईल परंतु जीवांत जीव असेपर्यंत : स्त्रीच्या शरीरावर वार लागूं देणार नाही. प्रवासांत तर पतिइतका उत्तम रक्षक मिळणार नाही.

पति चांगले आणि वाईटहि. परंतु त्याचे गुणावगुण लग्नाचे अगोदरच माहित करून घेतले पाहिजेत. आणि याकरितां कित्येक स्त्रियांना लग्नानंतर पश्चात्ताप होतो. विवाहाचें अगोदर पतीची पारख करणें आणि गुणावगुण समजणें कधी फारच कठीण. आणि मला तर वाटतें कीं ही गोष्ट शक्य होणार नाही.

पति कसाहि असो, परंतु ती आहे फार कामाची वस्तू. मला जर कोणी प्रश्न करील कीं, तुह्मी पतिशिवाय राहूं शकाल काय ? मी चट उत्तर देईन कीं " नाही, एक क्षणसुद्धां माझ्याने राहणें होणार नाही. "

कदाचित् याच कारणामुळें 'पतिला' शास्त्रांत देवता ह्मटलें आहे. परंतु 'देवता आणि राक्षस' दोन्हीहि.

लघुकथा ५ वी.



# कसोटीस उतरलेलें सोनें

लेखक.– बापुराव पुंजापा आडपुरे वडगांव.

मनोहर संध्याकाळीं बाजारांतील आपले पेढीवरून थकून भागुन घरीं येऊन आराम-खुर्चीवर पडला होता. त्याची पत्नी मालती पतीदेवांना पाहतांच ओसरीवरून माजघरांत गेली. बराच वेळ पडून विश्रांती घेतल्या-वर आप्पासाहेब (मनोहर) घरांत जाऊन पत्नीस 'थोडेंसे फराळास देतेस काय?' म्हणून लडिवाळपणाने तिच्या हातास स्पर्श करितांच, 'मला नाहीं माहीत जा. सासुबाईला मागा' म्हणून एकदम मागचे बाजुचे दारानें निघुन गेली. बिचारा आप्पा, नेहमी त्याला याप्रमाणे आपल्या प्रिय पत्नीच्या तुसडया स्वभावाचा परिचय होत होता.

* १ *

आप्पा मूळचा साधारण गरीब होता. आप-ल्या स्वतःच्या कर्तबगारीने व परिश्रमानें व्यापार करून लक्षाधीश व्यापारी बनला होता.

बापु आप्पा गाडगी म्हणून बार्शीकडील एक प्रसिद्ध व्यापारी होते. त्यांची एकूलती एक सावण्यसंपन्न कन्या. मालती चांगली मराठी लिहिता–वाचता येत असुन गृहकृत्यांत दक्ष व हुशार असल्यामुळें आप्पासाहेबांनी आपलीं कन्याची सोवतीण करण्याचे ठरवून लग्न वगैरे विधीयुक्त कार्य सुखासमाधानानें व थाटामाटानें पार पडून मालती आपले नवीन घरी आली.

* २ *

आप्पा नवमतवादी, तरुण, तडफदार असून त्याचा स्वभाव विनोदी असल्यानें जुन्या रुढी व विपर्यस्त चाली त्याला पसंत नव्हत्या. पति घरांत येतांच पत्नीने माजघरांत दडून बसणें, पतीसमोर न येणे, पतीच्या प्रश्नास उत्तर न देणें, या गोष्टीचा आप्पास मनापासुन तिटकारा होता. उभयता पती–पत्नींत विनययुक्त प्रेम असावें. हास्यविनोद करून, उभयतांनीं मोकळया मनानें दिवसभर झालेल्या व्यवहाराचा उहापोह करून, निर्मल प्रेमाने वागुन, संसाररूपी गाडा सुरळीत मार्ग क्रमीत रहावा हीच त्यांची इच्छा. याशिवाय दुसऱ्या मर्यादेची जरुरी भासत नव्हती. परंतु मालतीचा स्वभाव याच्या उलट अबोल, पतीशीं लाजाळू, पुराणमतवादी असून ती कट्टी सनातनी रुढीस धरून होती.

* ३ *

रुढी म्हणजें काय? समाजांत रुढ झालेल्या कल्पना म्हणजेच रुढीं. आजचा नवमतवाद म्हणजें उद्याची रुढीच. मग एवढा त्याचा व गुलबुवा कां वाटावा? नवमत का असेना, तें जर समाजाचे हिताचें असेल तर तें रुढ झालेंच पाहिजे. व खुळचट रुढ कल्पना झुगारुन दिल्याच पाहिजेत असे विचार वरचेवर आप्पा-साहेबास वाटत; तर मालतीचे आपले जुने मत असावयाचें. याप्रमाणें त्यांचे संसारर्थी

गाड्याची दोन चाकें दोन बाजूस धाऊ लागलीं व त्या संसारांत आनंद कोठला असावयाचा!

त्यांचे संसाररूपी गाड्याचा दिवसें दिवस विस्कळितपणाच दिसू लागला. आप्पाचें जो-पर्यंत मालतीवर अतिशय प्रेम आहे अशी घरच्या माणसांची समजूत होती तोपर्यंत तिचें कौतुक करण्यांत कसूर करीत नसत. परंतु आप्पाचें प्रेम मालतीवर पूर्ववत् नाही असें दिसताच तिची उघड निंदा व छळ करण्यास सुरुवात झाली. आपली घरांत आजपर्यंत होत असलेली वाहवारी खरोखर आजपर्यंत आप-लेवर पतीचें असलेले अद्वितीय प्रेमाचें द्योतक होय अशी तिची खरी समजूत होऊन, तिला आपलि वर्तनाचा पश्चात्ताप होऊ लागला. परंतु आपले वर्तनाबद्दल पतिजवळ क्षमा मागुन त्याचे पुन्हा पूर्वप्रेम संपादन करण्याइतका मोकळेपणा तिच्या आंगीं आला नव्हता. घरां-तील नणंदा – जावांचे बोलण्याचा तिला दिवसें-दिवस त्रास होऊ लागल्यामुळे कंटाळून आपा एके दिवशी घरीं येताच म्हणाली, ' मला माझे माहेरी पोचवून द्या. मला तेथे खाण्यापिण्याची काळजी करावी लागणार नाही. जन्मदाते पोस-ण्यास समर्थ आहेत ' असें म्हणून जाण्याचा हट्ट धरून बसली.

" आज माहेरीं जाण्याचा इतका निकडीचा तगादा का लावला? तुझ्याशीं मी तुटक वागू लागलो, माझे बोलणें, चालणें, हांसणें व थट्टा करणें हे तुला आवडत नसून हें मी आपले सर्व सोडून दिलें आहे. तरी तुझी आपली धुस फुस चालू. तुझ्या ह्या हेकेखोर वर्तनानें व प्रेमविरहित वागण्यानें मनाला असे वाटू लागते कीं प्रेमविरहित विवाहसंबंध म्हणजे मीठ न घालता तयार केलेला पदार्थ होय. त्या पदार्थात इतर कितीही गोड मसाले घातले तरी मिठाशिवाय जशी त्या पदार्थाला गोडी येत नाहीं, तो पदार्थ जसा बेचव लागतो, त्या-प्रमाणे प्रेमाशिवाय केलेलें लग्न बेचव होय." आला लाव ( जन्माच्या गाठीं ) तरी कसे म्हणावयाचें असा विचार मनांत येऊन तिच्या-बद्दल आप्पांना अतिशय दुखः वाटून तिटकाराहि आला. लगेच विश्वासु गुमास्त्यास बोलावून सौभाग्यवतीची माहेरी रवानगी केली.

* ४ *

मालती माहेरीं येऊन जवळ जवळ महिना होऊन गेला होता पण तेथें तरी तिला कोठलें सुख लाभणार. पतीप्रेमास आंचवलेल्या पत्नीने माहेरी सुखासमाधानाची आशा करणें व्यर्थ होय असा अनुभव लवकरच आला.

खाण्यापिण्या लक्षाधीशाचें घरी दिलेली कन्या आपण होऊन माहेरीं न बोलाविता येते काय, व घरी पटत नाही असे सांगते, यामुळे माहेरचे मंडळीस वाईट वाटू लागले. त्यांची पूर्वीसारखीं आनंदी व लडिवाळपणाची कौतुकी वागणूक न दिसतां येथेहि आपला छळ होत आहे असें मालतीस वाटू लागलें. आपले पूर्वकर्माचा पूर्ण पश्चात्ताप होऊन माहेरीं येण्यांत खरोखर फार चूक झाली असें वाटून तिनें आपले पतीदेवास पत्र लिहून मनोदय प्रगट केला.

प्राणनाथ:— साष्टांग प्रणिपात वि. विज्ञापना.

आजपर्यंत माझे हातुन झालेल्या अनंत अपराधांची क्षमा करुन अनाथ पत्नीला पदरांत घेण्याची कृपा करावी, अशी आपल्या दासीची हात जोडून विनंती आहे. कळावें.

आपली
' मालती !

वरील पत्र आप्पास मिळतांच तें वाचून त्यांना सखेदाश्चर्य वाटलें. आता तावून-सुलाखून निघा-लेलें खरें बावनकशी सोने मला मिळत आहे, विलंब करून तिच्या मनास त्रास देण्यांत अर्थ नाही, असें वाटून लगेंच तिला घरीं आणलें. तेव्हा-पासून त्यांना मालतीचें स्वभावांत जमीन-अस्मा-नाचें अंतर दिसूं लागलें. पूर्वीचे तुसडे वर्तन जाऊन प्रेमळ वागणी, पतीचे आज्ञेंत दक्षता वगैरे पाहून आप्पांना फारच आनंद वाटू लागला. त्यांचें प्रेमाचे मूळ म्हणून लवकरच वसंतागम-चाचें चिन्ह दिसू लागलें.

लघुकथा ६ वी.

# मग आप्पासाहेब माझं लग्न-- त्यांच्या इस्टेटीशींच लावाना ?

( लेखकः- कुमार सिताराम होनराव शालिग्राम, मॉडेल हायस्कूल अहमदनगर. )

पाकिटांतील चिठ्ठींतील लिहावयाचा मजकूर संपवून त्यानें मान वर केली त्या वेळीं त्याचा चेहरा आनंदानें फुलून गेला होता. लिहिलेला मजकूर स्वतःशींच गालांत स्मितहास्य करून त्यानें पुन्हा एकदा वाचला. त्यांत लिहिले होतें..............

ता. १-११-३६

प्रिय शशिकलाः— तुझं तारीख १० चं पाकिट पोहचलं. लिहिला मजकूर समजला. तूं मागें लिहिल्याप्रमाणें मी कालच बाबांना आपलं याबद्दल विचारलं. तेव्हा त्यांनीं मला पूर्ण परवानगी दिली. तेव्हा तूं चिठ्ठी वाचतांच आप्पाना विचार म्हणजे आपलं करावयाला बरं. ........

( सर्वस्वीं तुझा )
पार्वती कुमार

[ पार्वती कुमारनें आपल्या लहान बहिणीच्या हाताने पाकिट शशिकलेला पाठविलें. ] पाकिट शशिकलेस मिळून चारपांच दिवस झाले.

रात्रीं सुमारे आठाची वेळ ती. बाहेर आकाश निरभ्र होतं. चांदणं पण अगदीं पांढरं शुभ्र पडलं होतं. वारा अगदीं जलद पण शांतपणें झुळ-झुळ शब्द काढीत होता.

अशा वेळीं दोन व्यक्ति खोलींत कंदिलाच्या प्रकाशांत बोलत होत्या.

" म्हणें मी पार्वती कुमारशीं लग्न करणार ! तें कांही नाही. मी म्हणतो, तुला सिद्धाप्पाशींच लग्न लावलं पाहिजे ! मोठी मनुष्यें जें करितात तें. हिताकरितांच करितात. उगीच शहाणपणा नको मिरवूं. तुझ्यापेक्षां पाचे पावसाळे जास्त गेले असतील."

" पण आप्पासाहेब, सिद्धाप्पा मला पसंत नाही '! .......शशिकला आपल्या हातांतील बांगड्यांशीं खेळत पण रागांत उत्तरली.

" काय झालं तुला न पसंत करायला ? नाक नाही कां डोळे नाही ? सिद्धाप्पा चांगले वैतागवाडीचे सावकार आहेत. त्यांना काय कमी ? "

" पण आप्पा, माझं मत नाही त्यांच्याशीं लग्न करावयाला ? "...मान खालीं घालून व मानेला किंचित् झटका मारीत शशिकला बोलली.

" तुझं मत घेण्यासाठीं मी तुला कसंबसं मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलं नाही, तूं सुशिक्षित व गृहकृत्यांत हुषार होशील म्हणून दिलं. पण परिणाम उलट होतो,......ते सौंदर्यवान् नाहीत म्हणून ? अशिक्षित आहेत म्हणून ? कां खेडेगांवचे आहेत म्हणून? त्यांना काय कमी ? इस्टेटदार आहेत ते. तूं कांहीहि कर, मी त्यांच्यापासून १००० रुपये घेतले आहेत. ह्या येत्या वैशाखांत तूं त्यांच्याशीं लग्न लावलं पाहिजे. आप्पासाहेब काडीने दांत कोरीत म्हणाले.

" मग आप्पासाहेब माझं लग्न त्यांच्या इस्टेटीशींच लावाना ? "........

वाऱ्याच्या झुळकीनें समोर आलेल्या केसांच्या बटा कानामागे नेत शशिकला बोलली.

' तें कांही नाही. ' म्हणून आप्पासाहेब दुकानी निघून गेलें.

* *

शशिकला आपल्या अभ्यासाच्या खोलींत आरामखुर्चीवर डोळे मिटून स्वस्थ पडली, त्या वेळीं तिला फार वाईट वाटलें होतें. टपटप

घळद काढून पडलेले ताज्या अश्रूंचे मोत्याप्रमाणें टपोरे थेंब तिच्या लालसर गुलाबी गालांवर स्पष्ट दिसत होते, आणि अद्यापहि मधून मधून एकादा अश्रु तिच्या मिटलेल्या पापण्यांतून निसटून खालीं ओघळून जात होता, आणि त्या वेळीं दातांनीं ओठ घट्ट आवळून धरण्याचा ती प्रयत्न करी पण तिला तो साधत नसे. इतक्यांत तिच्या तोंडून...... "आपल्या ध्यानीं मनीं नसलेल्या व प्रेम नसलेल्या पन्नाशीं उलटलेल्या साधारणतः वडील शोभावा अशा वराशीं वडील पैशाच्या आशेनें लग्न लावविणार ? आणि आपण खेडेंगांवांत अशिक्षित आयुष्यमित्राशीं आपलं तरुण आयुष्य याच्या मागें घालविणार" हे उद्गार निघाले. द्रव्यलोभ्याचा ठेवा एकाएकी नाहीसा व्हावा ह्मणून त्यास वाईट वाटावं, पदवीच्या परीक्षेस बसलेला विद्यार्थी एका मार्कानें नापास व्हावा, विधवा असलेली तरुणी एकांतांत बसून घटकोघटकों आठवणी होऊन तीस वाईट वाटावं, अगदीं त्याचप्रमाणें त्या वेळीं शशिकलेस वाटत होतं ( Because? ).

* * *

शशिकलेचे वडील आप्पा सदाशिव जुनेकर हे कुठं काय कीं किराण्याच्या दुकानीं नोकरीस होते. पार्वतीकुमार हा विश्वनाथ दीनानाथ नवमते, वकील, ह्यांचा मुलगा होता. शशिकला ही गरीब जाणती, हुशार, सुशिक्षित कुमारिका होती. सिद्धाप्पा गवळे हे वंतागवाडीचे सावकार होते. ते किराणा दुकानासोबत सावकारी करीत असत. मुलासाठीं तीन बायका झालेल्या असतात पण फक्त दोन मुली झाल्या. खास मुलासाठीं १००० रुपये देऊन कुमारी शशिकलेशीं ते लग्न करणार ! पार्वतीकुमार व शशिकला हे एकाच हायस्कूलमध्ये एकाच क्लासांत होते, पार्वतीकुमाराशीं लग्न करावं अशी शशिकलेची फार इच्छा होती. नंतर दोन महिन्यांनीं आला वैशाख महिना. झालं सुद्धा लग्न सिद्धाप्पाचं व शशिकलेचं...... शशिकला नांदावयालासुद्धां गेली. ती जशी गेली तशी क्षीण होत चालली ( Because they did not love ) सिद्धप्पानें असं होण्याचं कारण विचारलं कीं शशिकलेनं हुंदक्यावारी न्यावं. साडेतीन महिनें लोटल्यावर पन्नाशी उलटलेलें बाळ आजारी पडून एकाएकी निघून गेले. त्यांनीं उषाशीं लिहून ठेवलेल्या चिठ्ठीकडे शशिकलेचें लक्ष गेलें व ती ती चिठ्ठी आतुरतेनें वाचूं लागली

॥ श्री शिव ॥ ता. १०।११।३६

प्रिय सौभाग्यवती शशिकला:- तूं ज्या वेळीं ही चिठ्ठी वाचशील त्या वेळीं मी कोठें असेन हें तुला माहीतच आहे. मी एकाएकीं निघून गेलों ह्मणून भांबावून जाऊं नको,...... गुलाबाचं सुंदर हुमलेलं ताज फुल स्वतःच्या पायांनीं मातीस मिसळून त्याच कृत्याचा सेकंदान पश्चात्ताप व्हावा त्याप्रमाणें माझं झालं...... काळाकुट्ट आकाशांत हंसरी चंद्रकोर जशी एकाद्या ढगाच्या आड लपून जाते हें तत्व मी केव्हांच विसरलो होतो. तुझा मार्ग तुला मोकळा आहे. तूं मला क्षमा करशीलच ना? हो. हो. करशीलच तूं............

( तुझा )
सिद्धाप्पा

......त्या भरांत शशिकला फार रागांत आली. तुह्मीं तरी काय केलं? अग्नींतून काढलं अन् फुफाट्यांत टाकलं. तुमचं झालं ठीक पण आतां माझं कसं ? मी पुढील तरुण आयुष्य कोणत्या व्यवसायांत घालावं ? नंतर इकडील हकिकतीचें पाकिट शशिकलेनें माहेरीं पाठविलें. आप्पासाहेबानी शशिकलेस बोलावून घेतलें. नंतर ह्मणाले, आतां ठरव तुला कोणता वर करावयाचा ह्मणजे लग्न करावयाला बरं.

'आतां कसं ठरवा? मीं प्रथमच ह्मणाले होतें, तेव्हां तुह्मीं आपले पावसाळे उजाळले; आतां समजलं कीं मोठाली मनुष्यें वाईट विचार धरुन पैसे घेऊन दुसऱ्याचं नुकसानं करितात! इथपर्यंत माझं आयुष्य तुह्मीं घालविलं व कलंक सुद्धा लाविला.'

नंतर दोन महिन्यांनीं पार्वतिकुमारनें विजापूर येथील सिद्धेश्वर संस्थेच्या चालकास ३५ रुपये पाठवून नविन फॅशनचं लग्न शशिकलेशीं आनंदानं लावलं.... नंतर श्री शंकर पार्वती ह्या पुराणातील प्रेमी जोडप्यावत् आधुनिक पार्वती कुमार व शशिकला हे जोडपं नवीन संसारांतून निभवून गेलें.

# अहाहा! जग किती सुंदर आहे!

लेखकः--- कुमार गंगाधर कोठवळे पुलगाव.

वैभवमंदिराच्या सज्जावर सुनील आकाश-प्रांगणाच्या अभ्राखालीं तो उभा होता. विवून तो वर आला होता त्या मोहमयी दृष्टीकडे असंख्य भावनेत्रांनीं बघत होता. पलोरी कोलांचीं चिमुकलीं टुमदार घरं पुनवाच्या तारकानीं भरलेल्या आणि निषि-गंधाच्या मत्त सुवासानं भारलेल्या अनेक बागा, आणि त्यासभोंवतीं पिंगा घालणारे मदजीवी भृंगे, या साऱ्यांकडे तो अनिमिष लोचनांनीं बघत होता. त्याचे विलोल नेत्र, चेतनवती, आणि तेज म्हणत होतें--

## अहाहा! जग किती सुंदर आहे!

श्रीमंताची खास मजलस होती. कंचनीचा विभ्रम कलाविलास उन्मत्त नेत्रांना संतोष-सुखाचं अखंड पान करवीत होता. मदिरा आणि मदिराक्षी यांच्या तृप्त जीवनांत रममाण झालेले ते धुंद जीव, दुःखविस्मृत अवस्थेत देहभान विसरले होते. आयुष्याचें गलबत बेहोषीच्या वेदरकारींत चैतन्योन्मादानें हांकीत होते. त्याचे भारलेले डोळे, अचेतन देहचेतना आणि मद-उन्माद म्हणत होता......

## अहाहा! जग किती सुंदर आहे!

ओह! काय भयंकर आग ही. गवताची गंजच पेटली. आणि हा भयाण वारा पहा कसा सुटला ऐनवेळीं. नुसता हैदोस घालतो आहे. तें गवत...... जळती आग रडत कुठं चालली? आणि हा तर भिकारपुरा अहाहा! झोंपड्या जळायला लागल्या, आणि या पळत्या अर्धनग्न अजाण अर्भकांचे धडपडते जीव, स्वतंत्र उत्तरीय नसल्यामुळं...... बारा-हाती लुगड्याचाचं अर्धवट पदर ओढलेल्या स्वर्णललना, आणि खडी फोडण्याच्या श्रमान थकलेले सुखनिद्रिस्थ महापापी [!] जीव...... आह...... अरेरे...... तीं बाई कां ओरडते आहे? नाहीं आई आहे ती आई...... रडत आहे. तिचं मातृहृदय, स्त्रीहृदय नव्हे......ओं, तिनें त्या अग्निकल्लोळांत उडी घेतली. 'अहाहा' मातृहृदय बरं हें! हृद्यातंच जगाचं सौंदर्य आहे......

## अहाहा! जग किती सुंदर आहे!

---

# अक्कलकोट येथील चित्रकलदुर्ग स्वामींची खरी हकीगत

( एक वीरशैव )

अक्कलकोट--ता. २५-१-३७ रोजीं चित्र-दुर्गस्वामींचें आगमन झालें. त्या आगमनाचा येथ अक्कलकोट येथील कांही मंडळीला यावया करून अक्कलकोट येथे येन केन प्रकारेण मिर-वणूक झाली. ही वाटाघाट मुरघास्वामींनी एक महिना गुप्त तऱ्हेनें चालविली होती. ता.२४

१-३७ रविवार रोजी मुरघास्वामी अक्कलकोटास येणार असें हस्तपत्रिकामधून प्रसिद्ध करण्यात आलें होतें. २३।१।३७ रोजीं राजेश्री कोरेअप्पा यांचे माडीवर कांहीं लिंगायत लोकांनीं जमवून वाटाघाट करतां करतां असें ठरविण्यात आलें कीं, स्वामी उद्या येणार आहेत असें हस्तपत्रिकेंत प्रसिद्ध झालें आहे. परंतु अद्याप आमचें कांहींच तयारी नाही. वास्तव्यास जी तारीख ठरविली आहे ती तारीख पुढें ढकलण्यांत यावी. याचें कारण येवढेंच कीं, सरदारसाहेबांचा वशिला लावल्याशिवाय सरकारी लवाजमा मिळणे कठीण आहे. करितां येनकेन सरदारसाहेबांनी स्वतः जाऊन आपली मीड खर्च करून फक्त बँड वाद्य मात्र मिरवणूकीकरिता मिळविलें. दुसरे, त्याच दिवशीं इकडच्या–तिकडच्या गोष्टी करीत बसले असतांना चित्रदुर्गस्वामींच्या वहिवाटीसंबंधानें सरदार बॅरिस्टर यांनीं असे उद्‌गार काढले कीं, सदरं स्वामीचें बाडवो पालखो बिरुदावळी वगैरे सामान कांहीं नव्हतें व ते आतां वहिवाटींत क्रमाक्रमानें आणल्या गेल्या. त्या वेळीं हें वाक्य ऐकतांच वऱ्याच मंडळींना आश्चर्य वाटून ती स्तब्ध बसली गेली. असें वाक्य सरदारसाहेबांनीं कां काढलें हे देव जाणे. दुसरी गोष्ट अशी कीं, खरें तें आपोआपच बाहेर पडतें अशी जी प्राचीन ह्मण आहे, ती खोटी नाही. असो. ठराविकप्रमाणें स्वामीचे आपल्या अनुयायासह सोलापूराहून आगमन झालेनंतर श्री. मल्लिकार्जून देवळापासून स्वामीची मिरवणूक निघून राजेश्री कोरे यांचे घरी आपली. नंतर संध्याकाळीं श्री मल्लिकार्जून–देवळामध्ये मानपत्र देण्यांत आलें. मानपत्र दिल्यानंतर स्वामी आभार मानते वेळीं स्वतःच्या तत्वाप्रमाणें विशेष करून वीरशैवांनी अस्पृश्योद्धारासंबंधानें जोरदार भाषण करून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

ता. २६ रोजीं वरील विषयास अनुसरून रा. कोरे यांचे घरीं प्रवचन झालें. नंतर स्वामींनीं विचारलें, 'या ठिकाणीं कोणी जंगम आहेत कां?' तेव्हा त्या ठिकाणीं फक्त सदाशिवस्वामी नवणी आहेत. तेव्हां स्वामींनीं श्री पंचाचार्यासंबंधाने निंदा करण्यास सुरुवात केली कीं, पंचाचार्य आपल्या पोटाची आग शांत करण्याकरिता समाजांत गोंधळ घालूं लागलें आहेत. येवढें बोलून गप्प बसले व लगेच निघून गेले.

ता. २८ रोजीं संध्याकाळीं दररोजच्या प्रमाणें प्रवचनास मंडळी आली व त्या मंडळीकडें पाहून त्यात फक्त बसवणप्पा व आण्णाप्पा सोलापूरकर हे दोन्ही आचार्यपक्षीय आहेत परंतु ते शेंडी ठेवलेले नाहीत असें ह्मणून प्रवचनास सुरवात केली. प्रवचन चालू असतां पुन्हा जुठा ( शेंडी ) असे पुन्हा पुन्हा अपशब्द बोलू लागले. मग असे अपशब्द नेहमी वापरू लागलेमुळे चपळगावकर बसवणप्पा पाटील हे उठून स्वामींना असें विचारले कीं, आपण शिखेसंबंधानें बरीच चर्चा केली व वीरशैवानीं शिखा ठेवू नये असें सांगितलें, परंतु त्याचप्रमाणें मोठमोठे विद्वान् शास्त्री पंडित यांनीं शास्त्राधारानें शिखा ठेवली पाहिजे, तसेच कै. आपासाहेब वारद यांनीं आपल्या वीरशैवधर्मग्रंथाचा शोध करून व त्या बाबतींत लाखो रुपये खर्च करून वीरशैवांनी शिखा ठेवली पाहिजे असें प्रतिपादन करितात. तेव्हा भक्तवर्गानी त्यांचें खरें मानावें कीं, आपले आह्मीं खरें मानावें, याबद्दल आपण आह्मांस खुलासा करावा.

अशी जेव्हां बसवणप्पा पाटील यांनी विचारणा केली, तेव्हा स्वामीनी कांहीं तरी अनाधार ( शास्त्रविरहीत ) सांगण्यास सुरवात केली. नंतर ही चर्चा चालू असतांना श्री.१०८ जगद्‌गुरु बाळेहळ्ळी महास्वामी यांचेकडे बढून हुबळी येथे श्री. शिवानंद राजेंद्र महास्वामी यांचा जो अपूर्व गौरव झाला गेला तो त्यांना सहन न झाल्यामुळे त्यांची टीका करण्यास सुरवात केली. त्याचा सारांश असा कीं, हल्ली बाळेहळ्ळी–पीठावर असणारे यांच्या अधिकाराचे

वेळेस होसूरचे पुट्टनशेट्टी व महादेवअय्या यांनी खटपट करून होसूर-सरकारपर्यंत जाऊन त्या स्वामीला गादीवर बसविले, असे ते विचित्र लोक आहेत असें ह्मणाले. नंतर सोलापूर येथे त्यांची स्वतःची जी कांही फजीती झाली यांचे कारण ते सर्व लोक आचार्य-पार्टीचे असल्या मुळे ही परिस्थिती झाली आहे. त्याचप्रमाणें कै. आपासाहेब वारद यांनीं जें ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत ते सर्व चुकीचे आहेत, वगैरे वगैरे निंदाव्यंजक शब्द वापरून लोकांची दिशाभूल करू लागले व मोठ्या रागानें बोलू लागले. व तसेच वारद-पाठशाळेत असलेले जगदीश शास्त्री ह्मणून जे आहेत ते लोकांना पाद्री-प्रमाणें शिक्षा ठेवण्यास उपदेश करित आहेत. ते एक मोठे पाद्रीच आहेत. तसेच त्यांचे अनुयायी तेहि ख्रिश्चन आहेत असे मागे पुढे न विचार करितां बोलू लागले' त्या प्रसंगी त्यांचे जवळ बसलेले निजगुणस्वामीनी त्याना खूण करून हलक्या स्वरांत 'असे बोलू नका' असें बजावीत असतानां सुद्धा ते तसेंचबोलू लागले. तेव्हा बसवण्णा पाटील यांना राग येऊन स्वामीना विचारले कीं, आपण ज्याप्रमाणें अपशब्द वापरतां त्याप्रमाणें त्यांनीं जर वापरले तर आह्मी तुमच्याविषयी असले अपशब्द कानाने ऐकण्याची पाळी आमच्यावर आली हें बरें नाही. तेव्हा जवळ बसलेले निजगुणस्वामी यांनीं असें सांगितले कीं, आपण त्याबद्दल कांही एक बोलू नका व लौकर उठून आपले ठिकाणी चला. तेव्हा स्वामी खुर्चीवरून उठून गेले. या स्वामीच्या भाषणामुळें त्या ठिकाणीं बसणाऱ्या मंडळीमध्यें चर्चा सुरू झाली. तेव्हा दुसरे दिवशीं गुरुवर्गास व भक्तवर्गास जे अपशब्द बोलले त्याबद्दल माफी मागल्याशिवाय प्रवचनास भाग कां घेऊं नये ही चर्चा ज्यावेळी सुरू झाली त्या ठिकाणी आण्णा कापसे होते. तेव्हा आण्णाप्पा कापसे हे असें ह्मणाले कीं, कांही करू नका, आज संध्याकाळीं प्रवचन आहे, तेव्हा समक्ष त्यांना विचारणा करणे बरें. मग कापसे यांचे ह्मणण्यावरून त्या सर्वांनीं कबूल केले.

त्या दिवशीं संध्याकाळीं कोरे यांचे घरीं प्रवचनाविषयीं चौकशी केली तरी प्रवचन नाही असें समजलें. नंतर दुसरे दिवशीहि प्रवचन आहे अशी बातमी समजल्यानंतर सर्व मंडळी गेली, परंतु त्या दिवशींहि प्रवचन नाही असें समजलें, तेव्हा नाइलाजास्तव सर्व मंडळीं आपापले घरी निघून गेली व गांवांत बराच खळबळ उडाली आहे. असे निजगुणस्वामीस समजल्यावर त्या प्रवचनाचे वेळीं बराच गोंधळ होईल आणि स्वामीचे विन्नाव्यास व्यत्यय येईल असे तर्क-वितर्क करूनहि प्रवचने बंद ठेवण्यांत आलीं असें समजलें, व दुसरे दिवशीं ते निघून जाणार असेंहि समजले. तेव्हा अक्कलकोट येथे बिन्नावा न घेतां निघून जाणे हें बरे नाही, ह्मणून दोन-तीन लोकांनी भिडा घालून बिन्नावा केला. तेव्हा या ठिकाणी कांही उपयोग होत नाही, असें समजून आसपासचे वागदरी मैंदर्गी वगैरे ठिकाणीं जाऊन आपली पोळी पिकवावी परंतु त्या ठिकाणीही कांही उपयोग झाला नाही. तेव्हा गांवांतील पट्टी गोळा करावी. इतक्यांत त्या ठिकाणीं अशी एक वार्ता आली कीं, श्री १०८ जगद्गुरु बाळेहळ्ळी महास्वामी या ठिकाणी येणार असल्याचें सांगितलें. तेव्हा या ठिकाणी आपली परिस्थिती नीट राहाणार नाही ह्मणून परत ते सोलापुरास आले.

## के.णा-कोपऱ्यांतील कल्याणशेट्टी

ता. २८।१।३७ रोजी चित्रदुर्गस्वामीचे प्रवचन चालू असताना अक्कलकोट येथे बऱ्याच भानगडी दिसूं लागल्या असें जाणून निजगुणस्वामीचें सांगण्यावरून प्रवचनें बंद ठेवण्यांत अशी संधी पाहून जास्त बोभाट न करितां ता. ३१।१।३७ रोजी कोरे यांचे घरीं मि. कल्याणशेट्टी याने शिखेसंबंधाने व पंचाचार्यांबद्दल आणि दीक्षादि संस्काराबद्दल अनावार आपलें व्याख्यान केलें, आणि त्यांत असेंहि सांगितलें कीं, मैंदर्गी वागदरी वगैरे भागांत कांही उपयोग होत नाहीं तेव्हा आज पांच वाजतां स्वामी

परत सोलापूरास जाणार असें सांगितले व श्री. कल्याणशेट्टी आणि मुरघास्वामी हे निघून गेले. बरें असो. ही त्या कल्याणशेट्टीची परिस्थती पाहून त्याचेसंबंधाने विचार करणें जरूर आहे. कल्याणशेट्टी तुह्मीं कोठेतरी कोना-कोपऱ्यांत व स्वैपाक घरांत भाषण करून लोकांना मी शहाणा आहे असें जाणवून ज्या ठिकाणी चार मंडळी बसलो आहे त्या ठिकाणी आपण वाटेल ते बोलून जात असता हें आपणास शोभतें काय? आपण एका वृत्तपत्राचें संपादक आहांत. त्यांत आपण वाटेल तें जरी लिहिलें तरी चालेल कारण तें वृत्तपत्र तुमचें आहे.

त्यांत तुह्मी वाटेल तें लिहा पण ज्या ठिकाणी कांही समाज जमला आहे त्या ठिकाणी न बोलतां कानाकोपऱ्यामध्यें बोलणें हें बरें आहे कां? आपण धार्मिक ग्रंथ कोणकोणते पाहिले हे आपले भाषणावरून दिसून येत आहे. आपण अधिक प्रसंग बोलून लोकांची मनें कलुषित करणें हें आपणांस बरें नाहीं. तरी यानंतर पुढें आपण असें बोलण्याचें बंद ठेवणें.

दुसरे दिवशी बाजारांतील प्रमुख लोकांनी असें ठरविले कीं, आह्मीं जर त्या ठिकाणी असतो, तर त्या स्वामीपुढें जाहीर सभा करून त्यांना विचारले असतें व त्याना माफी मागण्यास लावून हाकलून दिले असते. पण काय करावे, तो पळून गेला. असो. जो लिंगाईत असो, किंवा दुसरा कोणीहि असो. यापुढे त्यानें कोठेहि अमर्यादित भाषणें करूं नये. अशी निष्-गुणस्वामीनी त्याना परभारे ताकीद केली असें समजतें, व करतीलही अशी आमची खात्री आहे.

[ वीरशैव गर्जना ता. १८-२-३७ वरून ]

---

# वीरशैवांतील चळवळी

## वीरशैव कौन्सिलरांचें अभिनंदन

( पब्लीशरः- ह. चों. देवघरकर अध्यक्ष.

आमच्या मुंबईच्या वीरशैव स्नेहसंवर्धक मंडळाच्या उद्देशांपैकीं ठिकठिकाणच्या वीरशैव बांधवांचा परस्परांशीं परिचय करून देऊन त्यांना समाजोन्नतीचे कामीं मदत करण्यास उद्युक्त करणें हा एक मुख्य उद्देश आहे. त्याला अनुसरून मी नवीन राज्यघटनेखालीं आपल्या मुंबई कौन्सिल व मुंबई असेंब्ली यंत [ साधारण नांवावरून ] जे लिंगायत उमेदवार यशस्वी झाले आहेत त्यांचें प्रथम अभिनंदन करून त्यांची एकत्र माहिती करून देण्याचा प्रयत्न करीत आहें. सदर उमेदवार कोणत्याहि पक्षातर्फे आलेले असोत अगर त्यांची मतें कशींही असोत; परंतु ते लिंगायत आहेत ही गोष्ट आमच्या समाजास भूषणावह आहे. त्यांत मिसेस नागव्वापाटील या महिला उमेदवारामुळे तर आमच्या समाजाला अधिक भूषण प्राप्त झालें आहे. तरी सदर सर्व उमेदवारांनीं आपा-पले पक्षभेद व प्रांतभेद लक्षांत न घेतां परस्प-रांचा परिचय करून घेऊन खेडोपाडीं दूरवर पसरलेल्या आपल्या दीन दुबळ्या व मागासलेल्या

वीरशैवसमाजाकरितां कांहीं तरी भरींव कार्य करण्याची खटपट करावी; अशी जाहीर नम्र विनंती आहे.

## यशस्वी उमेदवारांचीं नांवें व भाग

॥ मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिल ॥

१ श्रीमंत आत्माराम महादेवशेट आटवणे. (कुलाबा, रत्नागिरी.) (२) श्रीमंत सरदार चंद्रप्पा बसवंतराव देसाई तल्लूर. [सोलापूर, विजापूर,. बेळगांव.]

॥ मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली ॥

(१)श्रीमंत रावसाहेब आण्णाप्पा नारायण कल्याणी सातारा दक्षिण भाग. २७०३८ (२) श्रीमंत भगवान संभुअय्या कथले. सोलापूर ईशान्य १३७५७ (३) श्रीमंत सर सिद्धाप्पा तोटप्पा कंबळी. धारवाड उत्तर भाग. ४०७२७. (४) श्रीमंत गिरिमल्लाप्पा राचप्पा नलावडी. धारवाड उत्तर भाग. ३८३०९. (५) श्रीमंत आनंदप्पा ज्ञानप्पा दोडमेटी. धारवाड उत्तर भाग. ३३५४३. (६) श्रीमंत तिम्मप्पा रुद्रप्पा नेशवी.धारवाड दक्षिण भाग १७७७०. (७)श्रीमंत मुरिगेप्पा सिद्धप्पा सुगंधी. विजापूर उत्तर भाग ३५००३. (८) श्रीमंत गुरुसिद्धप्पा कज्जप्पा देसाई. विजापूर उत्तर भाग १८३२३ (९) श्रीमंत शंकर गौडा बसलिंग गौडा देसाई. विजापूर दक्षिण. १५०२४. (१०) श्रीमंत शंकर गौडा तिम्मन गौडा पाटील. विजापूर दक्षिण. ......... (११) श्रीमंत मलगौडा पुनगौडा पाटील. बेळगांव उत्तर भाग. ३१४७५ (१२) श्रीमंत कल्लन गौडा झिटून गौडा पाटील दक्षिण भाग २२९३० (१३) श्रीमंत पराप्पा चनबसाप्पा जकाती बेळगांव दक्षिण भाग २३१८४ (१४) श्रीमंत निगप्पा फकिरप्पा तेल्लीकेरी. कानडा. ......... (१५) श्रीमंत मिसेस नागम्मा विरनगौडा पाटील......... धारवाड

श्रीमंत भगवंतराव कथले यांचा विजय:—सोलापूर-ईशान्य-विभागातर्फे कॉंग्रेस उमेदवार म्हणून उभे राहिलेले लिंगायतसमाजांतील वजनदार पुढारी व कार्यकर्ते वाशींचे श्रीमंत भगवंतराव कथले हे १३७५७ मतें मिळवून निवडून आल्याबद्दल आम्ही त्यांचें जाहीर अभिनंदन करतों.

तसेंच खालील यशस्वी लिंगायत सभासदांचेंहि त्यांच्या यशाबद्दल आह्मीं जाहीर अभिनंदन करतों.

१ श्रीमंत आत्माराम महादेव शेट आटवणे २ श्री. सरदार चंद्रप्पा बसवंतराव देसाई ३ श्री. रावसाहेब आण्णाप्पा नारायण कल्याणी, ४ सर सिद्धाप्पा तोटप्पा कंबळी ५ श्रीमंत गिरमल्लाप्पा राचप्पा नलावडी, ६ श्री. आनंदाप्पा ज्ञानप्पा दोडमेट्टी ७ श्री. तिमप्पा रुद्रप्पा नेशवी ८ श्री. मुरीगेप्पा सिद्धाप्पा सुगंधी ९ श्री. गुरुसिद्धप्पा कज्जप्पा देसाई १० श्री. शंकरगौडा बसलिंग गौडा देसाई ११ श्री. मलगौडा पुनगौडा पाटील १२ श्री. कल्लनगौडा झिटूनगौडा पाटील १३ श्री. शंकरगौडा तिम्मनगौडा पाटील १४ श्री. पराप्पा चनबसाप्पा जकाती १५ श्री. निगप्पा फकिरप्पा तेल्लीकरी. वरील सर्व लिंगायत बंधु विशेषतः मिसेस नागम्मा विरनगौडा पाटील ह्या लिंगायत भगिनीहि मुंबई—असेंब्लींत निवडून आल्याबद्दल आह्मी त्यांचेंहि अभिनंदन करतों.

## उमरावती

स्थानिक कॉंग्रेस उमेदवार व लिंगायतसमाजाची मदत:—पूर्ववऱ्हाडशहरविभागांतर्फे मध्यप्रांत – कौंसिलकरितां उभे राहिलेले कॉंग्रेस – उमेदवार दे. भ. संभाजीराव ऊर्फ नानासाहेब गोखले व श्रीमती दुर्गाताई जोशी ह्यांचे निवडणुकीचे वेळीं लिंगायतसमाजाने एकमतानें पाठींबा दिला व सर्वांनी त्यांनाच मतें दिलीं. विशेषतः श्री. अप्पासाहेब हुंडेकर, श्री, महादाप्पा एकलारे, श्री. सोमेश्वर आप्पा कोल्हे; श्री. सोमाप्पा मेंडसे. श्री. लिंगाप्पा वड्डें, श्री. बाबुराव चौधरी व श्री. हेगु वकील वगैरे मंडळींनी बरीच मदत केली. तसेंच

सौ. लक्ष्मीबाई कोल्हे, सौ. वत्सलाबाई कोल्हे, सौ. वत्सला बाई कापसे, सौ. शांताबाई सातेकर, सौ. अनुसयाबाई वड्डे, सौ. यमुनाबाई कुऱ्हे, कु. रत्नावती कुऱ्हे, वगैरे लिंगायत भगिनींनी स्त्री मतदार आणण्याच्या कामीं बरेच परिश्रम केले - ह्याबद्दल आम्ही सर्वांचें अभिनंदन करतों.

## जाहीर विनंती

सर्वत्र वीरशैव [ लिंगायत ] बंधूंना विनंती करण्यांत येते कीं, तारीख ६-३-३७ ई. रोजी तळेगाव,ता. चांदूर, येथे "यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषद" श्रीमंत रामचंद्र विठोबाशेठ कुल्ली रोहिणखेडकर यांचे अध्यक्षतेखाली भरणार आहे. तरी या परिषदेला स्वतंत्र निमंत्रण-पत्रिका सर्वांना पाठविणे अशक्य असल्यामुळें, समाजहितेच्छूंनी या जाहीर निमंत्रणाचा स्वीकार करून सभेस अवश्य येण्याची कृपा करावी. परिषदेला हजर रहाण्यासाठीं श्रीमंत बाबासाहेब पारवेकर जहागिरदार, दे. भ. नानासाहेब वामणगांवकर, दे. भ. राजाभाऊ डांगरे,श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, डॉ. आप्पाराव संगेकर, श्री. सोमाप्पा मेंडसे, वगैरे मंडळींना निमंत्रणें दिलीं आहेत व बहुतेक सर्व मंडळी परिषदेला हजर राहतील. तरी सर्वत्र लिंगायत बंधूंनी परिषदेला अवश्य हजर रहावें अशी नम्र विनंती आहे.

माधवराव बापूआप्पा खंदाडे
स्वागताध्यक्ष
यवतमाळ जि. वीरशैव परिषद्

### वीरशैव स्नेहवर्धक मंडळ, मुंबई
### प्रो. पांडुरंग वाळलिंग निजामपूरकर, सर्कल इन्स्पेक्टर साहेब, यांचा मुंबईत सन्मान

सोमवार तारीख. २२-२-३७ रोजीं रात्रौ ८ वाजतां मंडळास इन्स्पेक्टर साहेबांनीं भेट दिली. या वेळीं मंडळाचे अध्यक्ष श्री. हरिलिंग घोंडलिंग देवघरकर यांनीं त्यांस पुष्पहार वगैरे अर्पण करून त्यांचा योग्य प्रकारें सन्मान केला, व पाहुण्यांची पुढीलप्रमाणें ओळख करून दिली.

"आपले पाहुणे कुलाबा जिल्ह्यांतील वीरशैवांचे प्रमुख पुढारी व आश्रयदाते आहेत. त्यांच्याच मदतीनें व प्रोत्साहनानें कुलाब्यांतील लिंगायतसमाज पुढें सरसावत आहे. आपल्या इन्स्पेक्टरसाहेबांचें बालपण अत्यंत गरीबींत गेलें. त्यांस कसल्याहि प्रकारची अनुकूलता नसतांहि त्यांनीं स्वतः अनेक तऱ्हेची हाल-अपेष्टा सोसून जेमतेम व्ही. एफ्. ची परीक्षा देऊन, सरकारी नोकरी धरली. सदर नोकरी करून त्यांनीं आपल्या समाजांतील तरुण आप्तेष्टांस हरतऱ्हेचें साह्य करून पुढें आणिलें आहे. सरकारी नोकरी धरून केवळ आपलाच स्वार्थ साधीत न बसतां व त्याचप्रमाणें केवळ पोशाखीपणा न बाळगतां - नोकरीनंतरच्या फुरसतीच्या वेळीं ग्रामोन्नतीसारख्या चळवळींत भाग घेऊन लोकांस परिस्थितीप्रमाणें शेती, व्यापार, वगैरे बाबतींत भाग घेण्यासाठीं सारखे प्रयत्न करीत आहेत. सुदैवानें त्यांची सांप्रतची आर्थिक स्थिति खरोखर समाधान-कारक असतांहि, त्यांनीं आपली मूळची साधी राहणी, उद्योगप्रियता, शेतीची उन्नति, गोर-गरीब वीरशैवांच्या लग्नकार्यप्रसंगीं येणाऱ्या अडीअडचणींचें निवारण करणें यांत जराहि ते मागेपुढें पहात नाहींत! त्यांचें जीवनचरित्र तरुणास खरोखर मार्गदर्शकच आहे; आणि त्यांच्यामुळेच कुलाबा जिल्ह्यांतील लिंगायत-समाज आज पुढें सरसावत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपला समाज संघटित व सुसंस्कृत कसा होईल याची त्यांस सारखी तळमळ लागलेली आहे. व त्यासाठीं ते स्वतः गांवीं फिरून आपल्या लोकांचा समाचार घेत असतात. आपण ज्या वीरशैवसमाजांत जन्मास आलों त्या समाजाकरतां कांहीं न करतां म्हणजे आपण जन्मास येणें व्यर्थ होय असें

# यवतमाळजिल्हा-वीरशैव-परिषद्

मुक्काम:— तळेगांव ता० दारव्हा जि० यवतमाळ येथें

माघ व॥ ९, शं. १९९३, शनिवार ता. ६ मार्च १९३७ रोजी

वीरशैवसमाजाचे वयोवृद्ध आणि सुप्रसिद्ध समाजकार्यकर्ते

**श्रीमंत रामचंद्र बिठोबा शेट कुळी, रोहिणखेडकर.**

यांचे अध्यक्षतेखाली भरणार

वीरशैव (लिंगायत) समाजाच्या सर्वांगीण उन्नतीकरितां या अधिवेशनप्रसंगीं प्रामुख्यानें सामाजिक सुधारणा, शिक्षण, औद्योगिक व्यापारधंदे, वीरशैव आणि वीरमाहे-श्वर यांचे अन्योन्यहितसंबंध वगैरे विषयावर साधक-बाधक चर्चा आणि ठराव पास करण्यांत येऊन तदंगभूत भरीव कार्यक्रमाला चालना देण्याच्या उद्देशानेंच सदरहु परिषद बोलावण्यांत येत आहे. तरी प्रत्येक धर्माभिमानी सद्‌गृहस्थानें या अमुल्य संधीचा फायदा घेऊन परिषदेला हजर राहण्याची कृपा करावी अशी विनंती आहे.

## यवतमाळजिल्हा-वीरशैव-परिषदेचा कार्यक्रम

शनिवार तारीख ६-३-३७ रोजीं सकाळीं ८ ते ९ अध्यक्षांची मिरवणुक ९ ते ११ स्वागता-ध्यक्ष, अध्यक्ष, यांची भाषणें वगैरे. १ ते ३ वर्कींग कमेटीची बैठक ४ ते ८ सभेचें कार्य.

प्रमुख कार्यकर्ते
श्रीगुरुमूर्ति वीरलींगस्वामी तळेगांवकर
श्री. राम शंभो पुराणिक दारव्हा.
नामदेव आप्पाजी कोरे दारव्हा.

सर्वांचा नम्र
माधवराव बापुआप्पा खंदाडे
स्वागताध्यक्ष
यवतमाळजिल्हा वीरशैव परिषद.

---

[illegible] मत आहे." इत्यादि अनेक प्रकारें त्यांची [illegible] करून दिल्यावर त्यांनी सर्वांचे आभार मानले; व नंतर असें सांगितलें कीं, [illegible] वीरशैवसमाजांत शिक्षण व सुधा-[illegible] होण्यासाठीं आपल्या मंडळामार्फत आपण [illegible] चालविला आहे त्यास माझा पूर्ण [illegible] आहे. आपण कोंकण प्रांतांत जर [illegible] बोर्डींग वगैरे काढण्याचा पुढाकार [illegible], तर त्यास आपणहि मदत करूं. [illegible] सभा, परिषदा, वगैरे भरविण्या-[illegible] मी खटपट करून आपलें साह्य घेईन. [illegible] आपला वीरशैवसमाज इतका आहे [illegible] कल्पना आजपर्यंत आह्मास मुळींच [illegible]. परंतु श्री. हरीभाऊ देवधरकर वगैरेंच्या [illegible] आज आपल्या भेटीचा सुयोग येऊन आपणाशीं विचारविनिमय करण्याची सुसंधि मिळाली आहे. या भेटीपासून सामाजिक सुधा-रणा व संघटना यांत अधिक तऱ्हेने भाग घेण्याची स्फूर्ति मिळाली आहे.

त्यानंतर डॉ. वडगांवकर यांनीं सदर मंड-ळाची कामगिरी तसेंच महाराष्ट्रीय वीरशैवांनीं आपापले पक्षभेद व प्रांतभेद विसरून एकीनें कार्य करण्यास कसें पुढें आलें पाहिजे याची पाहुण्याजवळ सविस्तर चर्चा केली, व आमच्या कार्यास सक्रीय पाठिंबा द्यावा अशी विनंती केल्यावर पुन्हा एकवार सर्वांचे आभार वगैरे मानून सभा बरखास्त करण्यांत आली. असें मंडळाचे सेक्रेटरी श्री. भिकलिंग गोपलिंग किल्लेकर कळवितात.

Reg. No. N—645

# वर्गणीदारांस विनंती

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गावीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरू होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात म्हणून वाटणावळीसह, व परगावच्या टपालखर्चासह, म्हणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरू होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: लेखकांस सूचना :—

आमचेकडे लेख अगर लघुकथा पाठवावयाची झाल्यास त्यांतील मजकूर कोणींहि ५०० शब्दांवर लिहिलेला नसावा. बातमीवजा मजकूर असल्यास तो फारच थोडक्यांत असावा; कारण हें पत्र पाक्षिक आहे, व बातमीप्रसारापेक्षा विचारप्रसार हें त्याचें ध्येय आहे. गेल्या शेदीडशे-वर्षांत ठिकठिकाणी जे आदर्शभूत असे प्रमुख स्वामी, शास्त्री, व भक्त झाले असतील व हयातहि असतील त्यांचीं थोडक्यांत चरित्रें आमच्याकडे आल्यास त्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार होईल. तरी ही गोष्ट विचारांत घेऊनच लेखकांनीं लेख पाठवावेत अशी विनंति आहे.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगावकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ मार्च १९३७ ( अंक ६ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे० भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू कारितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल् एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालीची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः—'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियः वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति चैत्र शु० ३ शके १८५९ ( अंक ६ वा.

## मॅ. पावटे ह्यांना आमचे नम्र सवाल

हुबळीचे सुप्रसिद्ध व वयोवृद्ध वकील मॅं. सिद्रामप्पा हुंडप्पा पावटे ह्यांच्या व्यासंगाविषयी व समाजसेवेच्या कळकळींविषयी आह्माला पराकाष्ठेचा आनंद वाटतो वीरशैवसंस्कृतिविषयींची त्यांची मतें निव्वळ कल्पनावर आधारलेलीं नाहींत तर वसवपुराणादिग्रंथाचाहि त्यांनी खोल अभ्यास केला आहे आणि वैदिक संस्कृतींतील गर्हणीय भाग वगळून त्यांतील उदार मतावर वीरशैवसंस्कृति कशी उभारली आहे हें त्यांनी आम्हां स्पष्ट करून सांगितलें आहे. त्यांच्या या प्रयत्नावरून आह्मी त्यांना सध्याच्या काळातील सुविद्य वीरशैवांतील आद्यशरण म्हणून आदरपूर्वक संबोधतो. अशा सुविद्य व त्यांतहि वयोवृद्धापुढें कांही शंका विचारावयाच्या असल्या तर त्या नम्रपणानें विचारून आपलें समाधान करून घेणें इष्ट आहे. नाही तर लहान तोंडी मोठा घास घेतल्यासारखी हास्यास्पद अवस्था व्हावयाची.

मॅं. पावटे हे आमच्यापेक्षा वयानें व ज्ञानानें वृद्ध असल्यामुळे त्यांच्यापुढे नम्र होऊन बोलणें हें जसें आमचें कर्तव्य आहे तद्वतच पंचाचार्य सिंहासनाधीश बाळेहळ्ळी महास्वामी अधिकारारूढ असल्यामुळें त्यांच्याशीं वाद घालतांना वा त्यांना कांही शंका विचारावयाच्या असल्यास त्यांच्या अधिकारापुढे सनम्र होऊन बोलणेंच सर्वतोपरी उचित आहे. निदान मॅं. पावटे ह्यांच्यासारख्या शरणावे

तरी सनम्र होऊन बोलणें अधिक उचित् होय. परंतु अँ. पावटे ह्यांनी बाळेहळ्ळी महास्वामींना आव्हान केलें आहे. आव्हान बरोबरीच्या लोकांस करावें. एखाद्या पट्टदेवरूस वा एखाद्या शास्त्रयास आव्हान केलें असतें तर तें शोभलें असतें. पण सिंहासनाधीशाला आव्हान देणें ह्मणजे शरणानें शालीनतेची मर्यादा सोडणें होय. ह्याचा परिणाम असा होतो कीं, पंचाचार्यभक्तांपैकींहि कोणीहि कोणाला आव्हान देऊं शकतो. दुसऱ्यापैकीं कोणांत वा आपल्यापैकीं कोणांत ही उद्धटवृत्ति प्रतिबिंबित होणार नाहीं ह्याची जबाबदारीने काळजी घेणें योग्य होय. ही योग्यतेची मर्यादा 'शरणसंदेश'-कारानें बाळेहळ्ळी महास्वामीसंबंधी बऱ्याच मोठ्या प्रमाणांत टीका करतांना संभाळली ह्याबद्दल 'शरणसंदेश'-कार स्तुतीस पात्र आहेत.

जगद्गुरु सिंहासनाधीश विरक्तस्वामी असो वा गुरुस्वामी असो, त्यांच्यापुढे मतभेद व्यक्त करूं नये वा नम्रतापूर्वक त्यांच्याशीं वाद घालूंच नयें असें आमचें मत नाही. वाद घालावा ; पण महास्वामींच्या अधिकाराच्या व आपल्या अधिकाराच्या मर्यादा संभाळून वाद घालावा, इतकेंच आमचें ह्मणणें. अँ. पावटे ह्यांनी आव्हानपर भाषा वापरून आपल्या अधिकाराचें त्यांनी अतिक्रमण केलें ह्याबद्दल त्यांना पश्चात्ताप होत असेल अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. अँ. पावटे ह्यांनी आव्हान केल्यावर त्या आव्हानाचा बाळेहळ्ळी सिंहासनाधीशांनी स्वीकार करणें उचित् होतें. उद्धट शरणालाहि आशीर्वादाच्या गोड शब्दानें नम्र करण्याची शक्ति महास्वामींच्या वाणींत पाहिजे व ती बाळेहळ्ळी महास्वामींत आहे अशी आमची समजूत. असें असतां सदर आव्हान त्यांनी नाकारलें हें योग्य झालें असें आह्माला वाटत नाहीं. बाळेहळ्ळी महास्वामींनी चालविले. त्या चळवळींत अँ. पावटे ह्यांनी पुढीलप्रमाणें तीन मुद्दे असतात ह्मणून सांगितलें आहे.

(१) श्री. बसवेश्वर हे गुरुपीठांना वंद्य नव्हत.

(२) निरंजन जंगम अथवा विरक्त हे गुरुपीठांना वंद्य नसून विरक्त हे गुरुपीठाचे शिष्य होत.

[ ३ ] अष्टावरण पंचाचाराने युक्त वीरशैवांत जातीभेद आहेत.

बाळेहळ्ळी महास्वामींचे हे तीन मुद्दे ते कोणत्या अर्थानें पुढे करतात ह्याची आह्माला माहिती नाही. 'वीरशैवगर्जना' ह्या पत्रांतसुद्धा ह्या तीन मुद्यांचें विवरण आलेलें वाटत नाहीं. परंतु बसव हा भक्त वा शरण दर्जातील थोर पुरुष असल्यामुळें संस्कारानें गुरुपदारूढ झालेल्या पुरुषाला तो पूजनीयच असला पाहिजे असा आग्रह धरणें योग्य नव्हे. पण त्याचा जयजकार बंद पाडणें, त्यांनी केलेल्या पुण्यपावन उपदेशाची थट्टा करणें, व त्याच्याविषयीं अनादर व्यक्त करणे, हें वीरशैवसमाजघटनेंतील कोणत्याहि गुरुला सर्वतोपरीं लांछनास्पद आहे व असावें हें कोणाहि वीरशैवास कबूल करणें जरूरच आहे. बाळेहळ्ळी महास्वामी बसवेश्वरांस आदरणीय मानतात, फक्त पूजनीय मानीत नाहीत. गुरुच्या दर्जानें भक्तदर्जाला शरण जाणें ह्मणजे गुरुभक्तनात्यांत बिघाड आणणेंच होय. हा बिघाड येऊं नयें हीच इच्छा असावी. विरक्त महास्वामीसुद्धा हा दर्जा बिघडावा असा मताचे असतील असें आह्माला वाटत नाही. गुरुस्वामीपुढे वा विरक्तस्वामीपुढें भक्त गेला कीं आडवा पडतो व शरण जातो ह्यांतच व्यवहारदृष्ट्या गुरुभक्तनातें प्रतीत होतें. गुरु-भक्त दोघेहि अंतर्ज्ञानी असले तर हा व्यवहारभेद पाळूनहि ते एक रहात असतील. तेव्हां ह्या पहिल्या प्रश्नाला उत्तर देणें कठीण नव्हतें व नाहीं.

दुसऱ्या मुद्यांत निरंजन जंगमाकडे गुरुपीठाचे शिष्यत्व आहे. वास्तविक वहिवाट अशी कीं, गुरूचा शिष्यच दीक्षेने वा संस्काराने विरक्तपदीं वा निरंजनपदीं जातो. प्राथमिक शाळेंतील मुलगाच बी. ए. होतो, एम्. ए. ह्या निरंजनपदाने गुरुपद प्राथमिक शाळा होय असें ह्मटलें तर बिघडले कोठें? निरंजनपद व गुरुपद ह्यांत श्रेष्ट-कनिष्ठभेद करणें अयोग्य होय. वीरशैवसमाजघटनेंत दोन्ही पदांचा समावेश झालेला आहे. गुरुपद हे डोळे होय व निरंजनपद हे हृदय होय. डोळे व हृदय ह्यांत श्रेष्ठ कोण व कनिष्ट कोण असा भेद करणें शहाणपणाचें नाही. आज हा भेद पडला आहे. विरक्त हा गुरूस हलके समजतो व गुरु हा विरक्ताला हलके समजतो. तेव्हां ह्याबद्दल दोष द्यावयाचा झाला तर दोघांनाहि द्यावा लागेल. वास्तविक हा भेद भक्तांच्या अज्ञानावर चैन करणाऱ्या विरक्तांनी व गुरुनीं निर्माण केला आहे. ह्मणून दोघांनाहि दोष देणें हेंच तिऱ्हाइतास उचित आहे. वास्तविक अधिकृत महास्वामींनी गुरु व विरक्त ह्यांची समाजाला अधिकारपरत्वें आवश्यकता आहे असें ह्मणून मोकळे होणे आणि जे विरक्त गुरूकडे तिरस्कारानें व अपमानानें पहात असतील त्यांच्याकडे आह्मीहि तिरस्कारानें पहातो हें स्पष्ट बोलणेंच अधिक उचित्. कारण शास्त्रदृष्ट्या आणि रुढिदृष्टया हा भेद नाही. उभयताहि आपआपल्या स्थानांत व अधिकारपरत्वें सारख्याच दर्जाचे आहेत हें जाहीरपणें सांगणें बाळेहळ्ळी स्वामीला शक्य होतें व आहे.

तिसऱ्या मुद्याच्या समर्थनार्थ अष्टावरण पंचाचारांत जन्मजात विषमता नाहीं हें स्पष्ट करणेंच उचित होय. ह्यांत शास्त्रांना व रुढीला कोणताहि बाध येत नाही. पण जन्मजात विषमता मानली आहे अशी भाषा बोलून कांहीं पंचाचार्यभक्त उगीच वाद माजवीत आहेत. जन्मजात रुढ झाली आहे ही गोष्ट खरी, पण शास्त्रानें ती रुढ केली असा अर्थ नसून, परस्परसंघटनेचा अभाव ह्यामुळें ती रुढ झाली. ही रुढी वाईट असली तरी परस्परप्रेम, सलोखा व संघटन जसजसें वाढेल तसतशी ही रुढी नष्ट होईल ही भाषा उघडपणें बोलावयास आजच्या पंचाचार्यभक्तांचें कोणतें शास्त्र बिघडतें हें आह्मांसहि कळत नाही. अष्टावरणपंचाचाराचे अधिकार जेथें जेथें परंपरेनें सुरू आहेत तेथे तेथे प्रसादभेद नाही असेंच शास्त्रानें सांगितलें आहे. खुद्द वे. शा. सं. काशीनाथ शास्त्री ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या सर्व संस्कृत ग्रंथांतून हेंच बाहेर येतें. अशा परिस्थितींत अष्टावरण पंचाचारांत जन्मजात विषमता शास्त्रानें मानली नाहीं हें स्पष्ट करावयास कोणत्याहि पंचाचार्य महास्वामीस कमीपणा नाहीं. पण हे वर्णभेद व जातिभेद जन्मतः आहेच असें सांगण्यात उगीच कालाचा अपव्यय करतात व नव सुशिक्षितांतून आदर कमी करून घेतात.

एकंदर पंचाचार्य–विरक्त व भक्तवादांत पुढील मुद्दे आहेत. [१] भक्तावर दक्षिणेचें वर्चस्व रहावें ह्मणून दोन्ही पक्षांचे महास्वामी एकमेकास हलके समजण्याचा धंदा अलीकडे करू लागले. (२) जन्मजात श्रेष्ठ–कनिष्ठभेद आहे असें ह्मटल्याशिवाय भोळे श्रद्धाळू आपणास दक्षिणा देणार नाहीत व आपली भिक्षुकी वतनदारी टिकणार नाही ही भीति. [ ३ ) कांहीं विरक्त महास्वामी उदारमतवाद बोलू लागले व रुढ जन्मजात विषमतेचा नायनाट करण्याच्या मिषाने लिंगधाऱ्याकडून जेथें पंचाचार्य बिन्नाव घेत नाहीत तेथे बिन्नाव व दक्षिणा घेऊं लागले त्यामुळें भिक्षुकी वतनावर हल्ले होऊं लागले आणि वाद भरास आला. (४) योग्य भक्तवर्गांतून गुरुपदावर जाण्याची रुढि असतांना सध्याच जन्मजात गुरुपदाचा अभिमान उत्पन्न होणें ह्यांतहि भिक्षुकवर्गाविषयी भक्तवर्गात वाढत चाललेली तेढच कारण आहे आणि ह्मणूनच गुरुवाचून व जंगमावाचून घरच्या घरीं लिंगधारणादि विधी करण्याची प्रथा रुढ होऊं

लागली. अशा स्थितींत डॉ. पावटे ह्यांनी वादाला उत्पन्न केलेले पुढील तीन मुद्दे ह्मणजे.—

(१). श्रीबसवेश्वर हे सर्व वीरशैवांना व गुरुपीठानाहि वंद्य आहेत.

(२). निरंजन जंगम अथवा विरक्त हे गुरुपीठांना वंद्य आहेत.

(३). अष्टावरण पंचाचारयुक्त वीरशैवांत जातिभेद नसून गुरुजंगम स्थळ विशिष्ठ जातींना राखून ठेवलेलें नाहीं.

डॉ. पावटे ह्यांचे वरील तीन मुद्दे योग्य असले व ते सहज सिद्ध होण्याजोगे असले तरी वाढलेला वाद कमी कसा होईल ? पहिल्या मुद्यांतील सवाल विरक्त व पंचाचार्य ह्या दोन्ही महास्वामीला करावयास पाहिजे. बसव-शब्दाचा अध्यात्मपर अर्थ करून ध्यानार्थ बसव वंद्य मानूं असेंहि एकादा चतुर वादाकरितां कबूल करील. परंतु ऐतिहासिक बसवमूर्ति आदरणीय मानावयास कोणाचेंच काही नुकसान नाही. दुसऱ्या मुद्यांतील निरंजन जंगम मात्र गुरु-पीठाधीश वंद्य मानणार नाही. कारण भक्तघरचे संस्कार करणें हा गुरुपीठाचा अधिकार; तो अधिकार निरंजन घेऊ लागले ह्मणून त्यांच्याविषयीं वंद्यभाव बाळगणें त्यांना अनुचित वाटेल. तिसरा मुद्दा कबूल केला तरी रुढी हळू हळू बदलेल असें ह्मणून कोणासहि मोकळे होतां येईल. ह्मणून डॉ. पावटे ह्यांनी उपस्थित केलेले तिन्ही मद्दे सुटले तरी त्या योगानें वाद कमी होईल अशी जी त्यांची कल्पना आहे ती सर्वस्वीं व्यवहार्य नाही. कारण सर्वच विरक्त व त्यांचे शिष्य आणि सर्वच पंचाचार्य व त्यांचें शिष्य ह्यांचा आज विचार केला तर उभयपक्षांत अंधरूढीप्रियांचाच भरणा आज अधिक आहे. तो नवा वर्ग दोघांतहि हळूं हळूं वाढत आहे. तो संघटित करणें आणि त्याची वाढ करणें हेंच योग्य होय. तसें झालें ह्मणजे त्या नवेंच वाढीला लागलेले दिसेल व जुनें आपोआपच कुंठित झालेलें आढळेल. ह्याकरितां विरक्तपीठ व गुरुपीठ वगळून एक नवी संघटना जन्मास आणावयास पाहिजे. त्यांत गुरु-विरक्तवादापासून आह्मी अलिप्त असून दोघेहि वंद्य पूर्वजांचे प्रतीक ह्मणून आह्मास सारखेच वंद्य आहेत ही पहिली घोषणा पाहिजे. वर्णभेद ह्मणजे जातिभेद नव्हे तर व्यावहारिक दर्जाभेद होय व तो आडवा न येऊं देतां जी वैदिक संस्कृति परिणत झाली तीच वीरशैवसंस्कृति आगम-निगमानें प्रसृत केली. श्री. बसवदेवानें वचनद्वारा तिचा प्रसार केला ही दुसरी गर्जना पाहिजे. परंपरागत अष्टावरण पंचाचारयुक्त वीरशैवांत शास्त्रानें जन्मजात विषमता मानली नाही व आह्मीहि मानणार नाही ही तिसरी गर्जना पाहिजे. गुरु-भक्त हा जन्मजात भेद नव्हे तर तो संस्कारभेद आहे व योग्य कुलीन व सुविद्य भक्तास संस्कारानें गुरु संस्कार करून घेण्याची रूढी चालूच पाहिजे ही चौथी गर्जना. नव्यास व जुन्यास शुद्धिसंस्कार करून त्यांना पावन करणें हें वीरशैवधर्माचें मुख्य सूत्र असून त्याला वतनदार भिक्षुकाकडून अडथळा आल्यास स्वयंप्रेरणेंने कोणत्याहि योग्य वीरशैवाने ते संस्कार करून त्यास वीरशैवांत पचवून घेणें ही पांचवी गर्जना. ब्रह्मचाऱ्याने वा गृहस्थानें जोपर्यंत संन्यासदीक्षा घेतली नाही तोपर्यंत शेंडी राखणें वा मुंडन करणें वा बाल ठेवणें हा ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न असून त्यावर धर्म व धर्माचे संस्कार अवलंबून नाहीत ही साहावी गर्जना. आणि अष्टावरण पंचाचारयुक्त सर्व वीरशैव आपसांत प्रेमभावानेच वागू ही सातवी गर्जना.

ह्या सात गर्जनेने युक्त असें महासभेचें ध्येय बनावें व त्या महासभेचा सर्वत्र प्रसार होणें ह्यांतच सांप्रतचा हीनभाव दूर करणें होय.

[illegible] अँ. पावटे ह्यांचें आव्हान एकट्या [illegible] महास्वामीस नसून तें सर्व वीरशैव-[illegible] आहे. त्याचें उत्तर पंचाचार्यभक्तांनीं व [illegible]भक्तांनीं देणें व त्या सर्वांनी तसे संघ-[illegible] होणें व तसा प्रयत्न करूं लागणें हेंच शहा-[illegible] आहे. ह्याकरितां अँ. पावटे ह्यांनीं [illegible] शब्द परत घेऊन आपले सवाल विरक्त [illegible] पंचाचार्य ह्या सर्वांच्या संघ भक्तापुढे सार-[illegible] अधिकारांत जातील असे व्यक्त करावेत. [illegible] आह्मी ज्या सात गर्जना सांगितल्या त्या [illegible] ध्येयांत ग्रथित होतील असे त्यांनीं [illegible] करावेत. ह्या आमच्या नम्र सवालांत [illegible] चुकलें असेल तर ती चुकीहि त्यांनीं [illegible] नजरेला आणावी. परंतु कोणत्याहि [illegible] हे प्रश्न ठेवून सुटावयाचे नाहीत [illegible] समाजच एका ध्येयाचा व एकाच [illegible] बनेल असे प्रयत्न झाले पाहिजेत हें [illegible] विसरतां कामा नये.

[illegible]संस्कृतीच्या आरंभकाळीं व बसव-[illegible] वीरशैवधर्मीयांत सध्यासारखा जन्मजात [illegible] मानण्याचा प्रघात नव्हता हें खरें [illegible]. वैदिकधर्माच्या आरंभकाळींहि हा प्रघात [illegible]. ह्याचकरिता कोणत्याहि धर्मप्रवर्तकाचें [illegible] व मूळ पाहूं नये असा प्रघात पडला. [illegible] महर्षि, ब्रह्मर्षि, अवतार, लिंगोद्भव, [illegible] असें धर्माचें मूळ मानण्याची प्रथा [illegible]. हेतु हा कीं, जन्मजातीची उच्चनीचता [illegible] एकाच धर्मात भेद पडूं नयेत. पण आज [illegible] आहेत. अष्टावरण पंचाचार प्रणित वीर-[illegible] जन्मजात शीलवंत, दीक्षवंत, पंचाळ, [illegible], माळी, कोष्टी, गवळी, बारी, बुरूड, [illegible] भेद मानण्याची प्रथा रूढ झाली. ह्याला [illegible] नसला तरी तशी चाल रूढ झाली [illegible] व मिथ्या अतिरेकाने आपसांत वैमनस्य [illegible] आहे. कर्नाटकांत सर्वच वीरशैव पोट-[illegible] नव्या शिक्षणाचा संस्कार झाल्यामुळे [illegible] दिवसानुदिवस रंग चढत चालला. तशांत विरक्त-पंचाचार्यवाद उत्पन्न झाला आणि कांही चतुर विरक्त प्रगतिपर भाषा बोल-ण्यांत वाकबगार झाल्यामुळे नव्या शिक्षितांचा ओढा तिकडे जाऊं लागला, आणि पंचाचार्य-पक्षाला आपल्या अस्तित्वाची जाणीव ठेवण्या-करिता जन्मजात जातीच्या रूढीवर जोर द्यावा लागला. त्यामुळे प्रगतिपर मताच्या सुशिक्षितांचा त्यांच्याकडे कमी ओढा होऊं लागला, आणि ह्यामुळे विरक्त-पंचाचार्यवाद ह्मणजे सुधारक व दुर्धारक वाद होय असें प्रत्ययास येऊं लागलें.

पण वस्तुस्थिति याहून निराळी आहे. स्वतःला जन्मजातीनें श्रेष्ठ मानणारे लोक निव्वळ पंचा-चार्य शिष्यवर्गांत आहेत व विरक्त शिष्यवर्गांत नाहीत असें ह्मणतां येत नाही. विरक्त जगद्गुरु वीरशैवांतील निलगीर ह्या पोटजातीकडे भिक्षाव घेतात ह्मणून सर्वच विरक्त व विरक्तशिष्य तसें करतील असें मानतां येत नाहीं व करीतहि नाहीत .फक्त मतप्रचार होतो. अंधश्रद्धेला व अप्र-गतिपर रूढीला पाठबंद बसावयाला सुरुवात होते. पण ती सुरुवात कालानेच केली आहे. आणि ह्या कालाने तर आजच्या कित्येक पंचाचार्यवाद्यांनाहि नमविले आहे. अशा स्थितींत एकदा पंचाचार्यपक्षच जन्मजात विषमता मानतो असें ह्मणून त्या पक्षावर तुटून पडणें योग्य नाही. पं. काशिनाथशास्त्री वा एखादा-दुसरा पंचाचार्य सिंहासनाधीश व्यक्तिशः जन्म-जात विषमता बोलत असेल तर तें त्या व्यक्तीचें मत ह्मणून समजावें. त्यांत सर्व पंचा-चार्य पक्ष आला व येतो असें समजून जाहीर आव्हान देणें ह्मणजे आपल्या बाजूला उगीच अधिक शत्रू करून घेणें होय. अँ. पावटे ह्यांच्या जाहीर आव्हानाने असाच एक प्रकार घडला असें आह्माला वाटतें शिवाय ह्या बाबतींत जाहीर वादविवाद व्हावयाचा ह्मणजे उभयपक्षी मान्य असलेले शास्त्रग्रंथ निश्चित व्हावयास पाहिजेत. कित्येक शास्त्राने तर रूढीलाहि प्राधान्य दिलें आहे. इतके इतके वर्षांची कडी

आहे ह्मणून मी जन्मजात आहे असें मानतो असें एकाद्या शास्त्र्यानें उत्तर दिलें ह्मणजें वादाचा प्रश्नच आटपतो. ह्याच भावनेने जन्मजात मानणें शास्त्रसंमत आहे असें एकादा शास्त्री ह्मणत असला वा आचार्य ह्मणत असला तर तो हे आगमविरुद्ध बोलला असें श्रॅ. पावटे ह्मणतील. पण त्याच आगमावरून रुढी पडली व त्याच रुढीवर व त्याच आगमास धरून शास्त्र तयार झालें असल्यामुळें मूळ पुरुष मानतो; पण त्याचे मघले वंशज मी मानीत नाहीं असें ह्मणून जर श्रॅ. पावटे मोकळें होतील तर शास्त्रीय वाद त्यांच्या आंगावर येईल.

ह्याकरिता श्रॅ. पावटें ह्यानीं जाहीर आव्हान ह्मणून उत्पन्न केलेले प्रश्न नुसत्या आगमाच्या वा शरणाच्या वचनाने शास्त्रीय दृष्टया सुटणारे नाहीत तर त्या आगमानंतर व शरणांच्या वचनानंतर पडलेली वहिवाट व त्या वहिवाटीचे बनलेलें शास्त्र व शास्त्रसंमत संस्कार ह्या दृष्टीनेंच सुटतील. ह्मणून बाळेहळ्ळी महास्वामीस जाहीर आव्हान देणाऱ्या श्रॅ. पावटे ह्यांच्यासारख्या शीलसंपन्न विद्वान् व वयोवृद्ध शरणास आह्मी नम्र सवाल करतों कीं, नुसते आगमच आपण मानता, कीं आगमानंतर रुढीवर निर्माण झालेले शास्त्रीहि आपण मानता ? नुसतीं बसववचनेंच आपण मानता, कीं बसवचरित्र लक्षांत घेऊन त्या वचनाच्या मागें असलेली भूमिका आपण मानता ? वास्तविक हे रुढी बदलण्याचे प्रश्न रुढी बदलूनच सुटतील. वाद व शास्त्रीय वाद घालून सुटावयाचे नाहीत. कारण मूळावर अनेक कालानें आघात करून रुढी व रुढीप्रिय शास्त्र इतकें बलवत्तर झालें कीं, त्या योगानें अंधश्रद्धाळूचा वर्गहि बलवत्तर झाला आहे. ह्या वर्गावर स्वतंत्र टीका करूनच रुढी बदलून घेतली पाहिजे. तो रुढी बदलून ध्यावयास महासभेची घटनाच सप्तगर्जनेवर उभी करणें आणि विरक्त वा पंचाचार्यसिंहासनाधीशाना हें आमचे कोणी नव्हत असें ह्मणण्याचा प्रसंग उत्पन्न करणें हेंच निरपेक्षतेचें व पक्षपातशून्यतेचें लक्षण होय. श्रॅ. पावटे ह्यांच्या आव्हानांत एकपक्षीयत्व असल्यामुळे तें सदोष आहे असें ह्मणतात. आह्मांला अतिशय वाईट वाटतें.

प्रस्तुतचा विरक्त–पंचाचार्यवाद मिटवून जन्मजात विषमता कमी करण्याचा उद्योग जर जाहीर सवालानें करावयाचा झाला तर दोन्ही पक्षांना व दोन्ही पक्षांच्या स्वामींना व त्यांच्या सर्व अनुयायांना खालीलप्रमाणें सवाल करणेंच योग्य ठरेल.

( १ ) सर्व वीरशैवसमाजाची विरक्त व गुरुपीठाच्या पूर्वजांनीं सेवा केली ह्मणूनच वहिवाटीनें तुह्माला पीठाचे अधिकार प्राप्त झाले असतांना ते अधिकार आपसांतील भांडणानें कमी होतील असें तुह्माला वाटत नाही काय ? तसें झालें तर मूळ समाजघटनेवर तुह्मी उभयता हल्ला चढवीत नाही काय ? असा हल्ला चढविण्यास रुढीचा व शास्त्राचा उभयपक्षास कोणता आधार आहे ?

( २ ) भक्तगृहीचे धार्मिक संस्कार व गृहकृत्यें करण्याचा वहिवाटीने अधिकार गुरुपीठाचा कीं विरक्तपीठाचा ? दक्षिणेच्या लालसेनें त्यांत एकमेकांनीं ढवळाढवळ करणें हें गुरुपीठाच्या व विरक्ताच्या अधिकारास शोभतें काय?

( ३ ) समाजाच्या वाढीकरिता शुद्धीकरणाचे संस्कार चालू असणें हें रुढीनें व शास्त्रानें रूढ असतां त्याला प्रसंगीं कोणाचाहि स्वार्थबुद्धीनें अडथळा आला तर तें कृत्य भक्तवर्गानें उरकून घेतलें तर अशा भक्ताना आपण का दोष द्यावा ? आणि अशाच अडचणीने एकाद्या भक्तानें घरांतले संस्कार घरांतच केले तर तो अष्टावरणपंचाचारापासून तुटतो ह्याला तद्वतः काय आधार ?

(४). अधिक उत्पन्नाच्या मठांनी वहिवाटीचा खर्च वजा जाता राहिलेल्या शिल्लक रकमेचा खर्च वीरशैवांचें शिक्षण, उद्योग, इत्यादि, ह्याकडे करण्याची तयारी आहे काय?

(५) गुरु-पीठ वा विरक्त-पीठ ज्या भक्तवर्गांकडे प्रसादग्रहणार्थ वहिवाटीनें रूढ आहे त्या भक्तवर्गांना आपल्या पोटजाती विसरण्याचा उपदेश कां करण्यांत येत नाही? तद्वतच अष्टावरण पंचाचारयुक्त अशा ज्या अनेक जन्मजाती आहेत त्या सर्वांकडे गुरु व जंगम [ अतिथि, निरंजन, विरक्त, पांयस्थ वगैरे सर्व ] प्रसादार्थ जाणें रूढ असतांना जन्मजात विषमता मानली आहे हें ह्मणणें ह्याला आधार काय? आणि आधाराशिवाय ज्यांना भक्त ऐक्य साधणार नाही त्याला इलाज काय?

(६) गुरुपीठाला वा विरक्तपीठाला वा भक्तवर्गातील कुलीन, सुशील व सुविद्य इसमाला जन्मजाती वा भेद न मानतां योग्य संस्कार करून अधिकार देण्याची रुढी वा वहिवाट आह्मी चालू ठेवूं हें उभयपक्षांनी जाहीर कां करू नये?

[७] कोणत्याहि शरणाची, गुरुची वा विरक्ताची निंदा आह्मी ऐकणार नाहीं, करणार नाहीं, व करण्यास कोणालाहि उत्तेजन देणार नाहीं आणि रुढी व शास्त्र तसें सांगत नाहीं हें खरें आहे ना?

असे सात जाहीर प्रश्न दोन्ही बाजूला विचारतो. पण प्रश्न विचारतों ह्मटलें कीं, विरक्तपक्षाशहि अपमान झाल्यासारखें वाटतें व गुरुपक्षाशहि अपमान झाल्यासारखें वाटतें. सोलापुरांत असेच कांहीं प्रश्न विचारले जाणार ह्मणून रेवणसिद्धमंदिरांत चित्रकलदूगु महास्वामीस जाऊं दिले नाहीं, आणि हुबळीस डॉ. पावटें ह्यांनीं जाहीर आव्हान केलें असता बाळेहळ्ळी स्वामीकडून त्यास उत्तर नाहीं. ह्याकरितां उभयपक्षाकरितांच जाहीर प्रश्न असावेत व ते सर्वच ठिकाणी दोन्ही पक्षांच्या महास्वामीस विचारावेत. तरच ह्या वादाचा भावी संघटनेला उपयोग होईल. तेव्हां डॉ. पावटे व त्यांचे मित्र आमच्या नम्रतापूर्वक सवालाचा ते शांततेनें विचार करतील अशी आह्माला उमेद आहे.

---

# फॅशनचें समर्थन

लेखकः— डी. के. ढोले, मुंबई.

ता. १ ऑगष्टच्या 'वीरशैव संजीवनी'च्या अंकांत " चौधरींचा नवमतवाद व सुवर्णमध्य " या लेखांत शेवटीं शेवटीं 'फॅशनने बेकारी वाढते' असा अर्थ दर्शविणारें एक वाक्य ध्वनित केलें गेलें आहे. या श्री. तु. ना. काटकर यांच्या विधानावर टीका करण्याचा माझा उद्देश नाही; पण हा मुद्दा वाचून मला जे विचार सुचले ते खालीं मांडीत आहें. खालील लेखांत वापरलेले गांवढळ शब्द-प्रयोग व परिस्थितीचें चित्र सातारा-सोलापूर-दरम्यानच्या भागांतलीं आहेत.

---

जगाच्या आदिपासून अंतापर्यंत प्रतिदिनीं सुधारणा होत आली आहे. तो त्याच्या शेवटापर्यंत होत राहणार! यावर कोणीं आणि कितीहि टीका केली तरी ती निरुपयोगी आहे. या बाबतींत "हाथी चलत है आपनें गतमे" हें उदाहरण बरोबर लागू पडतें. प्रथमतः जगाच्या सुरुवातीला मनुष्यप्राणी अगदीं रानटी अवस्थेंत होता, हें सर्वत्र महशूर आहेच. म्हणून तेव्हांपासूनच्या सर्व गोष्टींचा परिवर्तनिक इतिहास न देतां गेल्या शंभर वर्षांच्या पासूनची हकीगत तुलनेदाखल पाहूं.

आमच्या समाजांतील पुष्कळसे लोक आज निकृष्टावस्थेंत पोहचलेल्या खेडेगांवांतील रहिवाशांच्या (पांच हाती धोतर, बाराबंदी अथवा पैरण, पागोटें) वेषांत राहात असत. बिनकांठाची हातमागावरील दहा हाती धोतरें डबल करून नेंसत असत. ज्यांचा फक्त आपल्या समाजांतील गरीब स्थितींतील लोकांत लग्न-प्रसंगीं आहेरासाठी उपयोग करतात तें पागोटें व सणावरी बाराबंदी असा पेहेराव असे. याचा अर्थ असा नव्हे की त्यांच्याजवळ भारी किंमतीचा पोशाख वापरण्यास पैसा नव्हता; तर त्या वेळची दुर्मिळता हें होय. पण पुढे जसजसें ब्रिटिश–राज्यकर्त्यांच्या भाईबंदांनी हिंदुस्थानांत निरनिराळ्या तऱ्हेचें कपडे व व्यवहारोपयोगी वस्तु विकण्यास सुरवात केली तेव्हांपासून आमच्या पोशाखांत फरक पडूं लागला. बिनकांठाची अरुंद आणि दुंडी धोतरें जाऊन, दाभणकाठी धोतरें आलीं. आणखी दहा वर्षांनी त्यांत सुधारणा होऊन गोम, बुगडी, रुद्रफुली, गंगाजमनी, वगैरे अनेक – प्रकार (डिझाईन)च्या काठांची धोतरें निर्माण होऊं लागलीं. ही अवस्थी

...राव होऊं लागली तसतसी ती हळूं हळूं ...यात येऊं लागली. पुढें कांही वर्षांनी ढवल ...ची पद्धति कमी कमी होऊं लागली. ...पि ती फक्त त्या पिढीच्या वृद्ध माणसांतच ...ली. त्यांच्यापुढील पिढीनें आपल्या ...लांच्या पुराण्या चालीस 'चॅट' दिली. ...ही पद्धति इतकी !नामशेष झाली कीं, ती ...ती की नाही याची माहितीहि नाही.

...च गोष्ट बारावंदीची! बाराबंदी बेततांना (...ग कसतांना) जर पाहाल तर त्यांतून ...कपटा (पीस)-ही वाया जात नाही. आतां ...ढें तो शिंपी ...शिवाय 'गळा कापून' तो कपडा'व इतर ...च्या भागाचें कापड वाया घालवितो, ...वेळीं इतकी काटकसर केली जात होती. ...आतां इतकी 'चाढचावर मूठ' कां ...जात ? याचें उत्तर असें देतां येईल ...की, त्या व त्यापूर्वीच्या काळीं आपल्या ...स्थानांत सर्व कापड फक्त हातमागावरच ...विणलें जात असे, आणि त्या वेळच्या लोकसं... ...ला तें पुरण्याइतकें नसे. आणि दुर्मिळ ...किंमत जास्त पडते या नेहमीच्या ...सिद्धांताप्रमाणे गरीब स्थितींतील बहुजनसमा... ...गजाच्याइतकें कापड वापरणें अशक्य ...होत असे. याच परिस्थितीमुळें बऱ्याचशा ...लोकांना आपणाजवळ बहुजनसमाजाप्रमाणेंच ...कृश आवरणावर राहणें भाग पडें. किंबहुना ...त्या वेळचा तो शिष्टसांप्रदायच समजला जाई.

विशेषतः उन्हापासून, डोक्यावर वाहाणाऱ्या ...ओझ्यापासून, वगैरे आघातापासून संरक्षण व्हावें ...म्हणून डोक्याला आच्छादनाची नैसर्गिक जरुरी ... आपण विचार करीत असलेल्या काळीं ...-बीडबीत बंदीच्या मागावर पागोट्यांची ...पैदास होत असे. आज केवळ सम... ...जाणाऱ्या पोशाखाच्या पद्धतींत कमीत ...कमी ...हात लांबीचें पागोटें वापरलें जावें.

जसजशी विणकऱ्याच्या धंद्यांत सुधारणा होऊं लागली तसतसे लांब कपड्याचे माग अस्तित्वांत येऊं लागले, आणि त्याचेंच प्रत्यंतर रुमालांत झालें. प्रथम पागोट्याला वापरल्या जाणाऱ्या सुताचें पागोट्यापेक्षां रुंद असे पटके व त्यानंतर चौरस रुमाल अस्तित्वांत आले. त्यांत सुधारणा होऊन धोतराप्रमाणें उपरिनिर्दिष्ठ कांठ आले, व त्यांत जरीची भर पडली. जरींत पुन्हा सुधारणा होऊन उभे - आडवे पट्टेसुद्धा निर्माण झालेले आज आपल्यांतील श्रीमंत व्यापाऱ्यांच्या डोक्यावर दिसून येतें. उचित काळ इंग्रजी अमदानीच्या सुरवातीचा किंवा कांहींसा पूर्वीचाहि असेल. त्या वेळच्या परिस्थितीकडे पाहातां सरदार वगैरे लोकांत एकशेंआठ हात लांबीच्या 'वस्या,' खूप लांब पागोटी निरनिराळ्या शिंदेशाही, होळकरशाही, पुणेरी, मावळी, घाटी वगैरे प्रकारच्या घाटणीनें बांधण्यांत येत असत. अंगांत लांब अंगरखा, तुमानी, कमरेला हलकाभारी गुंडाळलेला दुपेटा, असा असें.

सांगायचा मुद्दा एवढाच कीं, अरुंद-दुंडी—हातसुताचे-हातमागावर विणलेले कपडे जाऊन पांच हाताऐवजीं दहा बारापर्यंत गोणपाटाइतक्या जाडीपासून गिरणीचें सूत, गिरणीची विणकर, विष्णु-लक्ष्मी कॉटन ( कोरी, धुवट, तलम, मॅन्चेस्टर, ) पर्यंत धोतरांनीं मजल मारिली. त्याहीपुढें जाऊन लेंगा ( विजार ), पॅन्ट, हाफपॅन्ट येथपर्यंत मजल गेली आहे. बाराबंदीच्या ऐवजीं खांद्यावर बंद बांधण्याचे, उजव्या बाजूच्या खांद्यावर एकच बटन, चंची ठेवण्याकरितां पोटावर खिसा असलेले कुडतें, दंडकी, बिनगळपट्टीचा सदरा, गळपट्टीचा सदरा, शर्ट व त्यावर जॅकिट, लॉन्ग कोट, शॉर्ट कोट, हाफकोट पर्यंत रूपांतर झालें आहे. शिरस्त्राणाऐवजीं वापरण्यांत डोक्याचें रक्षण करणाऱ्या पागोट्याच्या जागीं कानटोपी, पटका, फेंटा, रुमाल, व गोल मखमलीची फोल्डींग गंधर्वकप, केसाची-कॅप-टोपी ही येऊन बसली.

त्याचप्रमाणें पादत्राणाच्याहि बाबतींत जुनें दोन कोनी व दोन दोन शेर वजनाचें जोडे जाऊन त्या जागीं ' उदमाबू धराचे ' शिरवळी, पुणेरी कोल्हापुरी वहाणा कोल्हापुरी कोंकणी, मद्रासी काबुली-चढाव बूट, शू, पंपशू वगैरे पर्यंत मजल गेली आहे.

हा फरक झालेला आहे असें प्रत्येक माणूस सांगूं शकेल याबद्दल तर शंकाच नाहीं. मग ही एवढी तफावत कां पडावी ? या प्रश्नाचा विचार करणें भाग आहे. वेदकाळीं वल्कलें नेसून ऋषि-मुनी इहलोकीं वास्तव्य करीत असल्याचें पुराणग्रंथांतील वर्णनें सांगत आहेत. त्यानंतरच त्या काळीं ही परिस्थिति जवळ जवळ बुद्ध राजांच्या काळाअखेरपर्यंत होती असें ह्मणाव-यास हरकत नाहीं. मुसलमानी सलतनत कायमची स्थापिली तेव्हांपासून पोषाखांत फरक पडला. तेव्हांपासूनच झालदार, चोपदार, मानकरी, सरदार, सुभेदार यांचे पोशाख बादशहाच्या पोशाखाशीं व दाढीशीं साम्य दर्शविणारें बनूं लागले व हीच पद्धति किंचित् फरकानें मराठशाहींतहि होती. त्याचें कारण मराठशाहीनें जरी महाराष्ट्रापासून, अटकेपार झेंडा लावी-पर्यंत विस्तीर्ण झाली होती तरी नामशेष झालेल्या दिल्लीच्या मोंगलांच्या वजिरीची वस्त्रें शिंद्यांनी आटोकाट प्रयत्न करून सवाई माधवरावांच्या अंगावर घालून पुण्याच्या शनिवारवाड्यापासून तों वानवडी येथील आपल्या छावणी ( शिंद्यांच्या छत्री ) पर्यंत दिल्लीच्या सुलतानांच्या वजीराच्या ह्मणजे भारी किंमतीच्या पठाणी पोशाखात, हत्तीवरून मिरवणूक काढण्यांत महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबुवा यांना कमीपणा वाटला नाहीं का वाटली? आजहि हिंदुस्थानावर ब्रिटिश राज्यकर्ते राज्य करीत असल्यानें त्यांच्या पोशाखाशीं साम्य दर्शविणारे ( मोजे, बूट, कोट, पॅंट, सूट, कॉलर, नेंकटाय, हॅट व मिशांची गच्छन्ती ) पोशाख प्रत्येक जण आपापल्या ऐपतीप्रमाणें हलके भारी वापरीत असतो. पौराणिक काळीं वेद, उपनिषदें, धनुर्वेद, आयुर्वेद वगैरे निर्माण झाली तर मुसलमानी रियासतींत आयुर्वेदाचें स्थान युनानी शास्त्रानें पटकावलें आणि इंग्रजी अमदानींत आयुर्वेद, युनानी पद्धति मागें पडून त्या जागीं मेडिकलची प्राणप्रतिष्ठा झाली. निरनिराळीं यंत्रें, शोध वगैरे लागले. समाजवाद, राष्ट्रीयवाद, फॅसिझम, नवमतवाद, समाजसत्तावाद निर्माण होऊं लागले. या सर्व उलथापालथीवरून एकच गोष्ट दिसून येते ती ही कीं, ' यथा राजा तथा प्रजा. ' ज्या काळीं जे राज्यकर्ते असतात, त्यांच्याच सर्व गोष्टींचे लोक अनुकरण करतात. हा बदल होत असतांना जुन्या वळणाच्या मंडळीचे डोळें दिपून टाकतो. याच बदलाला श्री. तु. ना. काटकर फॅशन असें ह्मणतात. पण ही फॅशन एका विशिष्ट राजकीय परिस्थितीनें निर्माण होते असें माझें मत आहे. तिला कोणी आळा घालूं ह्मणेल तर शक्य नाहीं. वर दिलेलें पोशाखाचें उदाहरण सार्वत्रिक आहे. व्यक्तिविषयक देऊनहि सांगतां येणें शक्य आहे. नमुन्यादाखल खालीं एका विद्यार्थ्याचें उदाहरण घेऊं. कारण फॅशनचा प्रथम भोक्ता जर कोणी असेल तर तो विद्यार्थी होय.

एका खेडेंगांवचा विद्यार्थी आपल्या गांवीं मराठी व्हर्न्याक्युलर इयत्तेपर्यंतचें शिक्षण आटोपून तालुक्याच्या अथवा शिक्षणाची सोय असलेल्या गांवीं आला. त्यानें आपल्या गांवीं सर्रास वापरीत असलेले पागोटे आतां फक्त त्याच्या एकट्याच्याच डोक्यावर असल्यामुळे इतर विद्यार्थी त्याला ' रुमाल्या ' अगर ' पागोट्या ' असें ह्मणून हाक मारून कुचेष्टा करूं लागल्यामुळे त्या विद्यार्थ्यानें सर्वांप्रमाणें टोपी घातली, तर खेडेगांवांतील लोकांच्या दृष्टीनें ; ती फॅशनच नाहीं कां झाली ? तोच विद्यार्थी जेव्हां प्राथमिक शिक्षण आटोपून हायस्कुलांत प्रवेश करता झाला, तर आपला नेहमीचा ' काळा गोटा' डोक्यावर घेऊन जाईल. पण त्याला त्यांनी

सबंधु कोणत्या नावांनें हांक मारतील ? ना वगैरेंना अनायासें हा विद्यार्थी करमणुकीचा विषय होऊन बसेल! हा त्रास चुकविण्यासाठी जर वरील विद्यार्थ्यानें पाश्चात्य संस्कृतिप्रमाणें केस ठेवले तर त्याचे मराठी शिक्षणाध्यायी मुले कुरकुर करणार नाहीत; पण मूळच्या त्यांचे 'लंगोटी यार' आपसांत '...... चा तो तरी बघा – आह्माला माहीत आहे तुह्मी कोणी शिकत आहात ते! बायकाप्रमाणें केंस ठेवले नाहीत तर हा मुलगा इंग्रजी शिकत नाही असें कां कोणी ह्मणतील ?' वगैरे वगैरे त्यावर शब्दबाण सोडून त्याला बेजार नव्हे तर थट्टा करतील. घरची वडीलधारी मंडळी जर समंजस असतील, आजूबाजुच्या परिस्थिती-कडे डोळे उघडे ठेवून पाहात असतील, तर त्यांना मुलाचा हा फरक योग्य असाच वाटेल. पण तेच जर का पुराणांत प्रमाण – पुराणमता-भिमानी असतील तर काय विचारता? नुसता गहजब उठवून देतील! वेळेवर जेंवावयालासुद्धा त्या विद्यार्थ्याला मिळणार नाही. इकडे येते वेळीं सकाळ पूर्वीचा तुळतुळीत गोटा करून आलों असतो तर बरें झालें असतें असें घटकोघटकीं त्याला वाटूं लागेल. इतकेंच नव्हे तर स्वतः नापिताला-न्हाव्यास बोलावून स्वतःच्या देख-रेखीखाली उत्तम तऱ्हेचा गुळगुळीत......बनवून समाधानाचा सुस्कारा सोडतील पण हा फॅशनच्या पायी भोगलेला त्रास विद्यार्थ्यास घरींच भोगावा लागतो.

आमच्या समाजातील लातूरचे सुप्रसिद्ध देशि-केंद्र स्वामींचा त्यांच्या मासिकाच्या पृष्ठभागावर ...साहित्य समोर घेऊन बसलेल्या आणि ...वरील कुंतलसंभाराचा भांग पाडलेला ...प्रसिद्ध झाला होता. मासिकांत काय ...आहे या गोष्टीचें मुळीच अवलोकन ...करतां, मुखपृष्ठावरील फोटो पाहूनच ...धर्ममार्तंडांनी नाकें मुरडल्याचें लेख-...पूर्ण स्मरणांत आहे.

हीच गोष्ट सिनेमाला लावतां येण्यासारखी आहे. सिनेमाच्या द्वारें बसल्या जागीं निरनि-राळ्या ठिकाणचे देखावे, रीतिभाति, लढाया, वगैरे व्यवहारोपयोगी कित्येक गोष्टींचें ज्ञान थोड्या खर्चांत प्रवासाची दगदग न करतां होतें ; ह्मणू-नच शाळाखात्यानें मॅजिक लॅन्टर्नच्या द्वारें ज्ञान देण्याचे प्रयोग सुरू केले आहेत. असें जरी असलें, तरी सिनेमा पहाण्याला विरोध करणारे वाडवडील व पालक मुंबईसारख्या ठिकाणी शेंकडा पन्नास पेक्षा कमी सांपडतील असें मला वाटत नाहीं. ह्याचप्रमाणें आणखी कित्येकहि गोष्टीपायीं सहज कांही नकळत, आणि मुद्दामहि खर्च करावा लागतो. वर दिलेल्या पोशाखाच्या परिवर्तनाचें स्वरूप नकळत सहज-गत्या घडून आलें आहे. आता मुद्दाम फॅशन करणें कां जरूर पडतें याचें एक उदारण देऊं.

हल्लींचें युग जाहिरातीचें व 'भपक्या'चें आहे. 'एक नूर अदमी व दसनूर कपडा' ही ह्मण याला पुष्टि देते. वर उल्लेखिलेला विद्यार्थी हायस्कुलांतून अथवा कॉलेजांतून आपला शिक्षणक्रम आटोपून बाहेर पडला ह्मणजे त्याला नोकरी शोधावी लागते हें सूर्यप्र-काशाइतकें स्पष्ट आहे. नोकरी शोधण्यासाठी तो जेव्हा अर्जाची व क्वॉलिफिकेशन्‌ची भेंडोळी घेऊन फिरत असतो तेव्हा दारावरचा शिपाई भिकार कपडेवाल्या अर्जदारास आंत जाऊं देत नाही. बाहेरच्या बाहेरच बोळवण करतो. तोच अर्ज-दार उद्यां चार पैसे भाडें देऊन अंगावर उत्तम व भपकेदार (सूट) कपडे धारण करून जर कालच्याच पट्टेवाल्याजवळ गेला तर तो त्याला मॅनेजरची गांठ घालून देईल! (हा त्या पट्टेवा-ल्याचा दोष नव्हे. पट्टेवाल्याला ज्या अधिकाऱ्यानें नोकरीस ठेवले आहे त्याच्या हुकुमाचा असतो.) भेटीनंतर नोकरी मिळणें अगर न मिळणें ही गोष्ट बाजूस ठेवली असतां, भेट तरी होऊं शकते. बावळट ऊर्फ साध्य

पोशाखवाल्यास यदाकदाचित् मॅनेजरची मुलाखत झाली तरी नोकरी मिळणें कठीण पडतें. त्याच्या विद्वत्तेचा दर्जा पोशाखाच्या किंमतीवरून ठरला जातो. ही विद्यार्थ्यांची गोष्ट झाली. परंतु जे कारागीर आहेत, त्यांच्या बाबतींतहि हीच गोष्ट अनुभवास येते. साध्या पोशाखातला हुशार कामगार नोकरी मागण्यास गेला असतां, मॅनेजर त्याला "तुझ्याच्यानें तूं सांगतोस इतकें काम होणें शक्य नाही असें तुझा पोशाखच सांगतो" असें ह्मणुन त्याची संभावना करतो. याच्यापेक्षा रद्दड काम करणारा, बूटासुटांतील कामगार गेला, तर त्याच्या त्या पोशाखाच्या वजना-(इम्प्रेशन) नें मालक दबून जाऊन कामाची परीक्षा (ट्रायल) न घेतांहि एकदम पगार सांगुन कामावर ठेवतात. अनुभवानंतीं सदर मॅनेजर मालकांना आपली चूक कळून येतें ही गोष्ट निराळी. परंतु चांगल्या पोशाखामुळे कांही वेळेला फायदाहि होतो, किंवा फायदा करून घेण्यासाठीं चांगल्या फॅन्सी पोशाखाची 'फॅशन' करणें जरुरीचें असतें, हें मात्र निर्विवाद होय. वरील उदाहरण स्वानुभवसिद्ध आहे.

वरील विवेचनावरून शंभर वर्षांपूर्वीपासून आजपर्यंत इतकें परिवर्तन झालें. हें परिवर्तन होत असतांना समाजांतील पुराणमतवादी कांही तरुण, बराचसा वृद्धसमुदाय, आपापल्या कालांत आपापल्या परीनें कसून विरोध करीत होता, सध्या करीत आहे, व पुढें करीत राहणार हीच गोष्ट जाणणारे पूर्णपणें जाणून आहेत. हा विरोध करीत असतांना त्यांच्या जिवाचा कोण अट्टाहास ! कोण तो भयंकर संताप !! याची कल्पनाच करणें बरें ! दुसरी मौजेची गोष्ट अशी कीं, हजारों वर्षांपूर्वी घडलेल्या गोष्टींतील ध्रुवबाळाचें वय आजहि सातच वर्षांचें वर्णण्यांत येतें, त्याप्रमाणें मनुष्य नेहमी किशोरच न राहतां यौवन व वृद्ध या तिन्ही अवस्थांतून जातोच. तो बालपणीं इतर आपल्या सवंगड्याकडें पाहून आपणहि तसेच छंद करण्याचा हट्ट धरीत असतो. यौवनावस्थेंत 'न-खरा' करीत असें, व उतारवयांत 'बाबा' बनल्यावर आपल्या मुलांना मात्र आपण बालपणीं केलेल्या हट्टाप्रमाणें तीं करूं लागलीं असतां त्यापासून परावृत्त करण्याचा 'पोक्त उपदेश(?)' आपले लहानपणचें वर्तन विनचूक विसरून करीत असतो. व "अलिकडची पुढि-याच वगा काय वकली निघलिया, थोरल्या माणसानं सांगितलेल्या हिताच्या गुष्टी कुणि ऐकत न्हाइत" असें बेधडक सांगत सुटतो. या पोक्तांना एखाद्या 'पुंडा' नें जर 'आपण आपल्या बालपणांत व तारुण्यांत काय काय ढंग केले हो ?' असें विचारलें तर उडवाउडवीची व अतिशयोक्तीची "आमच्या येळला असं न्हवतर बाबा ! आह्मी तुमच्या एवढ्या हुतुतवा काय वडलांच्या शब्दाच्या बाहीर जात न्हवुतु. तीस वर्सापावतुर तर मी विडी वडतुया हृय त्यासनी ह्माहीत न्हवते" असें उत्तर देतो. या उत्तरातच तो स्वतः तीस वर्षापूर्वीच्या अर्ध्याअधिक काळापासून विडी ओढण्याला सूरवात केली असल्याचा व इतके दिवस पंधरा सोळा वर्षें वडिलांना बेमालूम फसविल्याचा कबुली जबाब देतो, व एवढ्या एकट्या विडीच्या प्रश्नावरच हृया वृद्धाच्या ढंगाची परिसमाप्ति झाली असें ह्मणणें धाडसाचें होईल. उदाहरणादाखल एवढें बस्स आहे. एखाद्या नदीच्या प्रवाहांत एकादें आंब्याचें शुष्क पान पडावें आणि त्यानें "मी प्रवाहाबरोबर खाली वाहात न जातां, पडलों त्याच ठिकाणीं स्थिर राहीन !" असा दुराग्रह धरावा, पण हा दुराग्रह प्रवाह चालू देतो काय ? मुळीच नाही. त्याप्रमाणे अनादि कालापासून होत आलेल्या सुधारणांना, फरकांना, कोण अडवून धरणार ? जो कोणी मोठ्या अट्टाहासाने "मी सुधारणा होऊं देणार नाहीं; माझें 'जुनें तेंच सोनें' आणि त्याप्रमाणें मी माझ्या—समाज,

शोवरे-शायरे, भाऊबंद, वगैरे यांना निदान पाश्या खास 'मालकी'च्या बायका - मुलांना हरी वागायला लावीव असें ह्मणेल त्याची हो वडवड वायफळ आहे, अनाठायी आहे, असेंच ह्मणावें लागेल. एकूण काय, 'आजची फॅशन उद्याची रूढी बनते!'

फॅशननें बेकारी वाढते काय? यासंबंधींची चर्चा पुढें करूं.

---

स्त्री-विभाग

# धर्मात्मा

लेखिका:—सौ. शांता गंगाधरआप्पा सातेकर.

'पाणी पाणी' हे शब्द करुण स्वरांतल्या भिकाऱ्यानें काढले. सकाळपासून भिक्षा मागत फिरतां-फिरतां तो थकून गेला होता. भगवान सहस्ररश्मि आपल्या प्रदीप्त किरणांनी नभोमार्ग आक्रमीत होता. अंगांत धड वस्त्र नव्हतें, पायांत जोडा नव्हता, शरीरावरून घामाचे लोट वहात होते, शरीर उन्हामुळे अगदी लाल भडक झालें होतें. तो तहानेनें अगदी व्याकुळ झाला होता. परंतु त्याला पाणी मिळालें नाही. त्याच्या मनांत विचाराची कालवाकालव सुरूं झाली. त्यावेळ त्याच्या मनांत असाहि विचार येई कीं आपण पूर्वजन्मीं असें कोणतें पाप केलें असावें कीं ज्या पापाचें फळ आपण या जन्मीं भोगतो आहो कीं आपल्याला एखाद्या पाण्याचा एक थेंबहि देखील मिळू नयें. कधीं त्याचे मनांत असा विचार येई कीं, ईश्वर हा खरोखर मोठा अपराधी आहे. त्यानें या नश्वर जगांत दुर्दैवी प्राण्यांना निर्माण तरी कशाला केलें? या वीतभर पोटाच्या खळगी-करितां मनुष्याला किती कष्ट सहन करावे लागतात, त्रास भोगावा लागतो, मानहानि, सत्कृत्य, दुष्कृत्य, उद्योग वगैरे सर्व कांहीं खटा-टोप केवळ या उदरनिर्वाहाकरितां करावा लागतो. या कुडीमध्यें जोपर्यंत प्राण आहे तों-पर्यंत या शरीराला सर्व कांहीं गोष्टींची आव-श्यकता आहे. तोपर्यंत या शरीराला किंचित् थोडी देखील वेदना सहन होत नाही. मृत्यूनं-तर मात्र तो निश्चित होतो, व संसाराच्या या यातायातीपासून मुक्त होतो. वीतभर पोटाचा खळगा जर ईश्वरानें दिला नसता तर मानवी प्राणी या जगांत आहे त्यापेक्षा फार सुखी झाला असता यांत शंका नाही अशी विचारांची कालवाकालव त्याच्या मनांत चालूं असतां तो एका शिवालयाजवळ येऊन पोहचला. तेथें त्याला नादमधुर घंटीचा व मनु-ष्याचा आवाज ऐकूं आला. देवालयाच्या पायरी-

जवळूनच त्यानें देवाला नमस्कार घातला. नमस्कार घालतांना आपले पाय लववितांना त्याला फार प्रयास पडले. कारण त्याला आपल्या शरीराचा तोल सांभाळावा लागत होता. त्याचे ओठ कोरडे पडले होते. कंठ सुकून गेला होता. अंगात त्राण उरला नव्हता.

"दादा, मला पाणी देता का हो? मला पहा केव्हाची तहान लागली आहे" हे शब्द ह्या दुपारच्या उन्हामुळे कोमेजून गेलेल्या, ओठ शुष्क झालेल्या. व कंठ कोरडा झालेल्या तृषा-र्तांचे मुखावाटें मोठ्या करुण स्वरात बाहेर पडले. "चल चालता हो इथून! मी अगदीं एकाग्र चित्तानें महादेवाची पूजा करीत असतांना माझ्या पूजेमध्यें विघ्न उत्पन्न केलें आणि शुभ देवाकरितां आणलेलें पूजाजल तुला देऊं होय? शंभू देवापेक्षांही तूं श्रेष्ठ झालास काय? मूर्ख कुठला. माझ्या समोरून चालता हो पाहूं" हें शब्द क्रोधानें लाल झालेल्या व डोळे विस्फारलेल्या व पूजा करीत असलेल्या पुजाऱ्याचे मुखावाटें मोठ्या आवे-शानें बाहेर पडले.

"दादा, मला पाणी द्या हो? माझा जीव पाण्यासाठीं तळमळतो आहे पहा. तुम्हाला मला पाणी दिल्यानें जीवदान दिल्याचें पुण्य लागेल." पुन्हां एकदा तो भिकारी आर्तस्वराने त्या पुजाऱ्यास म्हणाला.

"चल, माझ्या दृष्टिआड हो पाहूं, नाही तर धक्के मारून घालवून देईन." हे शब्द त्या कठोर हृदयी पुजाऱ्याचे मुखावाटे मोठ्या रागानें बाहेर पडले.

'दादा, मला पाणी' कोणतीहि गोष्ट कमीत कमी तीनदां करीत असतात असा वि-चार करून भिकाऱ्यानें तिसऱ्यानें व शेवटचेच असें हे शब्द अति करुण स्वरात बाहेर काढले. पुजारी कठोर अंतःकरणाचा होता. त्याचें मन द्रवलें तर नाहीच पण उलट त्यानें बाहेर येऊन त्या भिकाऱ्याच्या डोक्यांत फुलपात्र मात्र जोरानें हाणलें.

भिकारी मात्र तात्काळ व त्याच ठिकाणी मुर्च्छीत होऊन पडला. पुजाऱ्याचें अंतःकरणांत त्या वेळीं चरस झालें असावें असें त्याच्या चर्येव-रून दिसलें. लगेच त्याला शिव्याशाप देत तो पुजारी आंत देवळांत गेला व पूजा करूं लागला! दयेचा लवलेश नसलेल्या कठोर हृदयी पुजाऱ्याच्या पूजेनें त्याला स्वर्ग-प्राप्ति होईल असें का त्याला वाटतें?

तीर्थयात्रा केल्यानें किंवा उपास-तापास केल्यानें किंवा धर्माचें अवडंबर माजविल्यानें देवपण प्राप्त होत नाहीं; तर त्याला मन शुद्ध पाहिजे.

---

# यवतमाळ-जिल्हा वीरशैव परिषद्

## तळेगांव येथील यशस्वी अधिवेशन !

### अध्यक्षांचें मननीय भाषण !!

### मुसावळचे श्रीमान् गणपतराव बारजिभे

### वकिलांचें उद्घाटनप्रसंगीचें उद्बोधक भाषण !!!

### दीड हजार प्रतिनिधींतील अपूर्व उत्साह !!!

( आमच्या खास बातमीदाराकडून )

[ब]ऱ्याच दिवसांपासून वृत्तपत्रांत गाजत असलेलें यवतमाळ जिल्हा वीरशैवपरिषदेचें अधिवेशन बुलढाणा जिल्ह्याचे सुप्रसिद्ध वीरशैव पुढारी श्रीमान् रामभाऊशेट कुल्ली रोहिणखेडकर ह्यांचे अध्यक्षतेखाली तळेगांव मुक्कामी उत्साहांत यशस्वितेने शनिवार ता. ६ मार्च रोजीं पार पडलें.

शुक्रवार ता. ५ मार्च सायंकाळपासून जिल्ह्यांतील खेडयापाडयांतून प्रतिनिधींची यावक सुरु होती. सायंकाळी परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत रामभाऊ शेट कुल्ली हे दे. भ. नानासाहेब वामणगांवकर, श्रीगुरु पटचरमूर्ति [illegible] अय्या (मोठा मठ) हिरेमठ अमरावती, श्री. आप्पाराव संगेकर, चांदूर बाजार वगैरे मंडळीसह कारंजामार्गाने मोटारनें सायंकाळी ६ वाजतां दारव्हा येथे येऊन पोंहचले. रात्रीच्या गाडीने मुसावळहून श्रीमंत गणपतराव बारजिभे, बी. ए. एल एल. बी. वकील व श्री. बाबुराव चौधरी बी. ए. हेहि येऊन पोंचले. सर्व पाहुणे मंडळींचे अध्यक्षासह शनिवारी सकाळीं ८ वाजतां आगमन झालें. स्वागतमंडळासह स्वागताध्यक्षांनी अध्यक्षांचें स्वागत करून अध्यक्ष व दे. भ. नानासाहेब वामणगांवकर ह्यांचे गळ्यांत पुष्पहार घालून स्वागतसत्कार केल्यावर अध्यक्षाची मिरवणूक निघाली. मिरवणुकींत बहुतेक सर्व प्रतीनिधि तळेगांव येथील प्रमुख नागरिक हजर होते.

परिषदेकरिता खास उभारलेल्या मंडपांत ९ वाजतां अध्यक्षाची मिरवणूक येऊन पोंचल्यावर परिषदेच्या कामास सुरुवात झाली. प्रथमतः परिषदेचे प्रमुख कार्यकर्ते श्री. नामदेव आप्पाजी कोरे ह्यांनी, कांहीं अपरिहार्य कारणांमुळे परिषदेस हजर न राहूं शकलेल्या पुढील वीरशैव कार्यकर्त्यांच्या कडून यशचिंतनपर आलेले संदेश वाचून दाखविण्यांत आले. महाराष्ट्र-वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे अध्यक्ष

श्रीमंत व. कृ. उर्फ बाबासाहेब देशमुख जहागिरदार पारवा, मंडळाचे अध्यक्ष श्रीं. आप्पासाहेब एकलारे बी. ए. ( ऑनर्स ) वकील पुसद ह्यांच्या सामाजिक कार्याचा गौरवपूर्ण उल्लेख करुन व महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ व मंडळाचे मुखपत्र पाक्षिक 'वीरशैव संजीवनी' हे त्यांच्याच प्रोत्साहनाची व सक्रिय मदतीचीं दृश्य फळें आहेत असें सांगून त्यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयी विनंती केली, व भुसावळचे प्रसिद्ध लिंगायत कार्यकर्ते व वकील श्रीमंत गणपतराव बारजिभें ह्यांना परिषदेचे उद्‌घाटन करण्याविषयीं विनंती केली.

अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर

परिषदेचे अध्यक्ष



श्रीमंत रामभाऊ शेट कुल्ली रोहिणखेडकर

श्रीमंत गणपतराव बारजिभे हे ह्मणाले:— कांही अपरिहार्य अडचणीमुळें मी आपल्या प्रांतातील दोन परिषदांना हजर राहूं शकलों नाही तेंव्हा निदान ह्या परिषदेला हजर राहून इकडील कार्यकर्त्यांचा परिचय व्हावा ह्याहि उद्देशानें मी आलों.

रावसाहेब विश्वनाथआप्पा बारजिभे वकील यावल, श्री. व्ही. एम्. शेटे वकील मोमिनाबाद, मे. जतकर तहसिलदारसाहेब पुसद, श्री. तु. ना. काटकर चिमूर, श्री. बी. आर. मुंबें वकील सोलापूर, श्री. धुंडिराज विठोबा फुलझेले संपादक " शैवप्रबोध " हिंगणघाट, श्री. राचाप्पा इराप्पा पटणशेट्टी. सेक्रेटरी वीरशैव तरुणसंघ मंगळवेढें, श्री. सिध्दैय्या जंगम कारभारी सिद्धगीरमठ अमरावती, श्री. शंकर बाबूराव कटप सेक्रेटरी वीरशैव तरुणसंघ पंढरपूर, श्री. नामदेव आप्पा कोरे सावदा, श्री. वी. नारायणस्वामी मलवडी व श्री. डी. के. होले मुंबई·

वरील यशर्तचितपर संदेश वाचून झाल्यावर मागाहून श्रीमंत बाबासाहेब बारद सोलापूर, श्रीमंत बापूसाहेब हिंगमिरे हिंगणघाट, डॉ. जी. बी. वडगांवकर मुंबई. वगैरे मंडळीचेंहि यशचिंतनपर संदेश आले.

परिषदेचे स्वागताध्यक्ष श्रीमंत माधवराव बापुआप्पा खंदाडें दारव्हा ह्यांनी आपलें पुढील आशयाचें भाषण केलें.

( स्थलाभावास्तव पुढील अंकीं )

स्वागताध्यक्षाचें भाषण झाल्यावर श्रीगुरु रामशंभु पुराणिक ह्यांनीं समयोचित शब्दांत परिषद भरविण्याचे प्रयोजन व त्या बाबतींत बालब्रह्मचारी श्रीगुरुमूर्ती वीरलिंग स्वामी तळेगांवकर ह्यांचा पुढाकार वगैरे हकिकत सांगून परिषदेच्या अध्यक्षस्थानीं श्रीमंत रामचंद्र शेटकुल्ली ह्यांचें नांव सुचविलें. ह्या सूचनेला अमरावतीचे श्री. दादाशास्त्री किर्तनकार ह्यांनी योग्य शब्दांत अनुमोदन दिलें. तळेगांवदशासरचे श्री. हरेश्वर स्वामी पादूककर ह्यांनीहि अनुमोदन दिलें. शेवटी श्री. बाबुराव चौधरी बी. ए. ह्यांनी श्रीमंत रामभाऊशेट कुल्ली

...ल्या प्रांतातील कार्यकर्ते श्री. बाबुराव ...व पुराणिक वगैरे मंडळींनी ही परिषद ...ल्या बहरवस्तीच्या गांवीं न भरवितां ह्या ...पासून ५—६ मैल एकीकडे अस... ...तळेगांवसारख्या खेडेगांवीं कां भरवली ...र्ते मला एक मोठें गूढ पडलें होतें. व ही ...यशस्वी तरी कशी होईल ह्याची मला ...होती. परंतु प्रत्यक्ष परिषदेच्या मंडपांत ...असे राहिल्यावर माझा समज चुकीचा ...असें मोठ्या प्रांजळपणाने कबूल करावं ...व परिषदेच्या सूत्रचालकांच्या दूरदृष्टीच्या ...बद्दल त्यांचं करावं तेवढं कौतुक थोडच ...शहराऊ लोकांत समोतालची परिस्थितीच ...ला नैसर्गिक रीत्या मदत करीत असते। ...खेड्यातून सुधारणावादी वातावरण तयार ...लें म्हणजे मूळालाच हात घालणे होय ...दृष्टीनें खेड्यांतील ह्या परिषदेचा ...हा उपक्रम अनुकरणीय व स्तुत्य होय.

...र समाजाच्या मानानें आपला समाज ...लेला आहे. इतर समाज ...निराळ्या तऱ्हेने उन्नतीच्या मार्गानें लागले ...आपला समाज अजून अज्ञानावस्थेंत ...इतर कारणांबरोबर शिक्षणाचें दुर्भिक्ष हें ...व महत्वाचें कारण आहे. तें नाहीसें ...करिता आपल्यामधील सर्व पुढारी ...खटपट करावयास पाहिजे. 'सार्वज... ...फंड' वगैरे गोळा करावयास पाहिजे.

...-पंचाचार्य अशासारख्या अनाठायीं ...ह्यापुढे समाजांत स्थान मिळूं नये. ...एक ह्या भावनेने सर्वांनी संघ... ...होऊन समाजोन्नतिकरिता झटावयास ...वरील आशयाचे श्रीमंत गणपतराव ... वकील ह्यांचें परिषदेच्या ...भाषण झाल्यावर परिषदेचे नियो... ...अध्यक्ष ह्यांचें पुढीलप्रमाणे फळकळीचें ...झाले.

(...समासतव पुढील अंकीं)

परिषदेला यवतमाळ जिल्ह्यातील खेड्यापाड्यातून १००० — १५०० पुरुष प्रतिनिधि व शे-दीडशें स्त्री प्रतिनिधी जमले होते. त्यांतील परिषदेंत व विषयनियामक-कमिटींत पुढील माहेश्वर वीरशैवमंडळी प्रामुख्यानें दिसत होती.

श्री कल्लयास्वामी पंढरपुर, श्री. बाळाभाऊ कवाडी नाशिक, श्री. दादाशास्त्री कीर्तनकार अमरावती, श्रीगुरु पटचरमूर्ति महंत अप्पा गुरुदेवलिंग अय्या हिरेमठ (मोठामठ) अमरावती, दे. भ. नानासाहेब वामणगांवकर, अमरावती, श्री. हरेश्वरस्वामी घाटुळकर तळेगांव, श्री. रामशंभु पुराणिक दारव्हा, श्रींगुरु गुरुसिंग स्वामी कारंजा, श्री. बाळलिंगस्वामी यवतमाळ, श्री. नागलिंग स्वामी अडगांव, श्री. कोंडलिंग-स्वामी फोटोग्राफर तुपटाकळी, श्री. मलकार्जुन अय्या गीरड, श्री. गंगाधर मास्तर कुष्टा, श्रीं. मलकार्जुन अय्या पुसद, श्री. विश्वनाथ अय्या वडगांव, श्री. राजेश्वर स्वामी लोही, श्री. मलकार्जुन अय्या कवठा, श्री. बार्बालग दाभडी, श्री. विश्वनाथ अय्या पुलगांव, श्रीं. शिवलिंग स्वामी हिवरा, श्री. सदाशिव अय्या दिग्रस.

श्रीमंत गणपतराव बारजिभे वकील भुसावळ, श्रीमंत रामचंद्र आप्पा उर्फ मामासाहेब काळें पापळपारवा, श्रीमंत तुकाराम आप्पा लोही, श्री. शिवानंद आप्पा गाढवे लोही, डॉं. आप्पाराव संगेकर चांदूर बाजार, श्री. बाबुराव चौधरी बी. ए. अमरावती, श्री. तेलंग पुणें, श्रीमंत आनंदराव शेवाळकर मालगुजार शेखापूर मोझरी, श्रीमंत बापुराव पाटील आमला, श्री. डोमाप्पा घोरपडें वडगांव, श्री. केशवराव घोंडाप्पा वडगांव, श्री. आनंदराव भुरे वडगांव, श्री. बापुराव भाटपुरे वडगांव, श्री. सोनाप्पा सखाराम आप्पा वडगांव, श्री. शेषराव आप्पा पाटील हाटग, श्री. कृष्णाप्पा पाटील पारडी, श्री. बंडाप्पा

घांटरे वसली, श्री. सखाराम आप्पा निकडे वाई, श्री. गणाप्पा मिटकरी गिभा, श्री. काशिनाथ आप्पा गिभा, श्री. गणपतआप्पा वाढोणा श्री. विश्वनाथ आप्पा अडगांव.

कारंजाची खालील मंडळी हजर होती. श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूते, श्रीमंत सोनाप्पा वयाप्पा पांगरे, श्री. कृष्णाप्पा वीर, श्री. त्रिंबकआप्पा वीर, श्री. बानाप्पा होनराव, श्री. जगन्नाथ आप्पा होनराव, श्री. विश्वनाथआप्पा तांवळे, दे. भ. सदाशिव आप्पा बोनते, श्री. नागनाथआप्पा पापडे.

## भोजनसमारंभ आटोपल्यावर

विषयनियामक कमिटीची बैठक अध्यक्षांच्या निवासस्थानीं दुपारीं ३॥ ते ५ वाजेपर्यंत झाली व बैठकींत एकंदर ९ ठराव पास झाले. त्यांतील ठराव ७ वा "धर्म व जातीचे संघटणेच्या दृष्टीनें निरनिराळे धर्म व जाती आपआपसांतील अनावश्यक पोटजाती निरनिराळ्या स्वरुपांत मोडीत आहेत, वीरशैवसमाजाच्या दृष्टीनें पोटजातींचें एकीकरण होणें आवश्यक आहे. निदान शीलवंत, दिक्षवंत, पंचम, ह्यांत सर्वांस रोटीबेटीव्यवहार होणें आवश्यक आहे व तो तावडतोब सुरू करावा अशी ह्या परिषदेचीं विनंती आहे" हा दारव्हयाचे श्री. नामदेव आप्पा कोरे ह्यांनी पुढे मांडला व त्याला नेरपरसोपंताचे श्री. रामचंद्र आप्पा भगत ह्यांनी अनुमोदन दिलें.

ह्या ठरावाला कारंजाचे देशभक्त सदाशिव आप्पा बोनते ह्यांनी पुढील उपसूचना मांडली.
" वरील ठरावांत निदान हा शब्द काढून तेथे एकंदर वीरशैवांत रोटीव्यवहार सुरु करावा. "

वरील सूचनेला श्री. बाबुराव चौधरी यांनी अनुमोदन दिलें.

दुसरीं उपसूचना दे. भ. नानासाहेब वाघ-णगांवकर ह्यांची होती व तिला श्री. हरेश्वर स्वामी घाटूळकर ह्यांनी अनुमोदन दिले.

" वीरशैवांतील ज्या पोटजातींना अष्टावर्णाचे अधिकार असतील व वहिवाटीने ज्या पोटजातीच्या येथे गुरु व जंगम रूढ असेल त्या सर्व पोटजातींत रोटीव्यवहार उघडपणें व्हावयास कोणतीहि हरकत नाही असें या सभेचें मत आहे. "

वरील ठरावाला पंढरपूरचे श्री. कल्लय्या स्वामी, नाशिकचे बाळाबुवा कबाडी, अमरावतीचें दादाशास्त्री कीर्तनकार, व श्रीमंत रामचंद्र आप्पा काळे पापळपारवा ह्यांनी विरोधादाखल भाषणें केलीं. दे. भ. सदाशिव आप्पा बोनते कारंजा, श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी उपसूचनेवर जोरदार व मुद्देसूद भाषणें केलीं व विषयनियामक कमेटीत उपसूचनांसह मूळ ठराव पास झाला असताही ठराव मांडणार श्री. नामदेव आप्पा कोरे, दे. भ. सदाशीव आप्पा बोनते व श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी वरील ठराव उपसूचनासह पुन्हा अधिवेशनात मांडून त्यावर दोन्ही पक्षाकडून बरींच चर्चा झाल्यावर एकीकरणाचा ठराव मताला न टाकता तो अनिर्णयितच ठेवावा ह्मणजे पुढे कारंजा येथे भरणाऱ्या प्रांतिक परिषदेंत मोकळ्या मनानें दोन्ही पक्षाला परिस्थितीनुरूप आपलें बलाबल ह्या महत्वाच्या प्रश्नावर जोरवतां येईल, व असला महत्वाचा ठराव घाईनें पास करून घेण्यापेक्षा ह्या ठरावावर पूर्ण चर्चा होऊन एकीकरणविषयक साधक-बाधक विचाराचे प्रवाह समाजांत सोडून द्यावेत, व ह्या बाबतीत मध्यंतरी लोकमत तयार करावयास दोन्ही पक्षांस पुरेसा वेळ मिळाल्यावर मग अशा महत्वाच्या प्रश्नावर ठरावाच्या रूपानें ह्या भागांतील कार्यकर्त्यांनी निश्चित धोरण ठरवावें, ह्या उद्देशाने श्री. बाबुराव चौधरी, दे. भ.

सदाशीव आप्पा बोनते, श्री. नामदेव आप्पा शेवरी वगैरेनी विषयनियामककमेटींत एकीक-रणाचा ठराव मांडण्यापूर्वीच ठरविले होते असें सांगितलें व त्याप्रमाणें खुल्या अधिवेशनांत त्या ठरावावर साधक बाधक भाषणें झाल्यावर हुजूरबाजारच्याचे श्रीमंत रामचंद्र आप्पा ऊर्फ मामासाहेब काळे ह्यांनी ह्या प्रश्नाबावतींतील विचार पुढें ढकलावा अशी सूचना आणतांच श्री. शेवरी श्री. बोनते श्री. नामदेव आप्पा शेवरी वगैरे मंडळींनी सूचनेला विरोध न करतां ते धोरण स्वीकारलें, व श्रीमंत मामासाहेब काळे ह्यांची सूचना पास होऊं दिली. परिषदेला सुरुवात सायंकाळी ५॥ वाजतां स्वागतपर भाषणें झाली. परिषदेंत दे. भ. नानासाहेब वामणगांवकर, दे.भ. सदाशीवआप्पा बोनते, श्री. शेवरी, श्रीगुरु रामशंभु पुराणिक, श्री. कल्ल्यास्वामी पंढरपूर, श्री. दादाशास्त्री कीर्तन-कार, वगैरे मंडळींची निरनिराळ्या ठरावावर अनुमोदक भाषणें झालीं. परिषदेंत एकंदर ८ ठराव पास झालेत. दुखवट्याचा ठराव श्रीमंत नागनाथ शंभु आप्पा ऊर्फ बाप्पा साहेब कथले ह्यांचे शोचनीय निधनाबद्दलचा होता. तो सर्वांनी उभे राहून पास केला.

अध्यक्षांचे योग्य समारोपानंतर परिषदेचे प्रमुख कार्यकर्ते श्री. रामशंभो पुराणिक यांनी अध्यक्ष, पाहुणें, व प्रतिनिधी मंडळी, तसेच ज्यांच्या परिश्रमानें ही परिषद यशस्वी होऊं शकली त्या सर्व सन्माननीय सहकाऱ्यांचे आभार मानले. अशा रीतीनें रात्री १०॥ वाजतां परि-षदेचें काम यशस्वी तऱ्हेनें पार पडलें. सकाळच्या अधिवेशनप्रसंगीं ज्यांच्या परिश्रमानें ही परिषद यशस्वी होऊं शकली असे तळेगांवचे बालब्रह्मचारी श्रीगुरु. वीरलिंगस्वामी हे व्यास-पीठावर अध्यक्षांशेजारी बसले होते. सायंका-ळच्या अधिवेशनप्रसंगी कारंज्याचे बालब्रह्-मचारी श्रीगुरुमूर्ति गुरुलिंगस्वामी हे व्यास-पीठावर अध्यक्षांशेजारी होते. अशा तऱ्हेने सर्व माहेश्वर व वीरशैवांनी ही परिषद एकोप्याने पार पाडली.

## सभेंत पास झालेले ठरावः—

### ठरावः— १ ला

मध्यप्रांत, वऱ्हाड व खानदेश ह्या भागांतील वीरशैवबंधूंत संघटना व्हावी, परस्परांत सख्य, प्रेम व एकोपा नांदावा ह्याकरितां परस्परांनी परस्परांचे द्वेषभावानें दोष काढणें, तो वाढ-विणें, आणि भेदाभेद निर्माण करून त्याची वाढ करणें बंद करावें अशी सर्व वीरशैव-मात्रांस व स्वामीवर्गास ह्या परिषदेची कळकळीची प्रार्थना आहे.

सूचकः— दे. भ. नानासाहेब वामणगांवकर

अनुमोदकः— श्री. ह्रेश्वरस्वामी घाटुळकर व
दे. भ.सदाशिव आप्पा बोनते.

### ठरावः— २ रा

प्रत्येक वीरशैवानी ८ व्या वर्षी कुलगुरु-कडून दीक्षा घ्यावी असें या सभेचें मत आहे.

सूचकः— श्री. कल्लयास्वामी पंढरपूर.

अनुमोदकः— श्री. दादाशास्त्री कीर्तनकार
अमरावती.

श्री. पटचरमूर्ति महंत अप्पा गुरु
देवलिंग अय्या हिरेमठ अमरावती.

### ठरावः— ३ रा

मध्यप्रांत वऱ्हाड व खानदेश ह्या भागांतील वीरशैव बंधूंत शिक्षणाचा प्रसार कमी असल्या-मुळें त्याची वाढ होईल ह्याकरितां जिल्हावि-हाय वा प्रांतानिहाय एकोप्यानें प्रयत्न करणें व त्याकरितां एखादें केंद्र प्रस्थापित करून ह्यांतून गरीबांना फी व पुस्तके पुरविणें अत्यंत जरुरीचें आहे. ह्या दृष्टीनें अमरावती येथें चाललेलें वीरशैवशिक्षणप्रसारक मंडळाचें कार्य प्रशंसनीय

असून त्याच संस्थेला प्रत्येक जिल्ह्यांतील वीरशैव बंधूंनी सहाय्य दिलें तर तीच संस्था अधिक कार्यक्षम होईल अशी उमेद असल्यामुळे सदर संस्थेला मदत करावी अशी ह्या परिषदेची समस्त वीरशैव बंधूंना विनंती आहे.

सूचकः—डॉ. आप्पाराव संगेकर

अनुमोदकः—श्री. विश्वनाथआप्पा तांदळें.

ठरावः—४ था

वीरशैवांची संघटना होऊन व त्यांच्यांत संघटित स्वरूपाची जागृति व्हावी एतदर्थ स्थापन झालेल्या महाराष्ट्र-वीरशैव-हितसंवर्धक मंडळास, सदर मंडळाची संघटना व नियम वाचून सर्वांनी त्याला उत्तेजन द्यावें अशी प्रार्थना आहे. त्याचप्रमाणें प्रांतांत माहेश्वर मंडळीची संघटना व्हावी ह्मणून चाललेल्या स्तुत्य प्रयत्नाबद्दल ही परिषद चालकांचें अभिनंदन करते.

सूचकः—श्री. बाबूराव चौधरी.

अनुमोदकः—श्री. रामशंभू पुराणिक.

ठरावः—५ वा

वीरशैवांच्या ज्या मठसंस्था आहेत त्या सार्वजनिक असल्यामुळे त्या व त्यांची मालमत्ता गहाण ठेवण्याचा, विकण्याचा, वा गहाण घेण्याचा वा विकत घेण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं. आणि ह्या कायदेशीर हक्काचा सर्वत्र प्रसार होऊन त्याबद्दल सर्वांत जागृति होणें अवश्य आहे असें ह्या परिषदेचें मत आहे.

सूचकः—श्रीगुरु गुरुलिंगस्वामी

अनुमोदकः—दे. भ. नानासाहेब वामणगांवकर

ठरावः—६ वा

वीरशैवसमाजांतील माहेश्वर व भक्त वर्ग ह्यांचे संबंध अत्यंत सलोख्याचे राहून परस्परांनी परस्परांच्या हितार्थ झटण्याचा प्रयत्न करावा अशी ह्या परिषदेची उभयवर्गास प्रार्थना आहे व त्याकरितां मठादि संस्थांचा अनाथालयाकरितां, बोर्डींगाकरिता वा पाठशाळाकरितां उभयवर्गाच्या सलोख्याने याचा तो उपयोग होऊं लागला अशी ह्या परिषदेची विनंती आहे.

सूचकः—श्री. तेलंग

अनुमोदकः—श्री. सोनाप्पा पांगरे.

ठरावः—७ वा

मुंबई कायदे कौन्सिलाचे निवडणुकींत यशस्वी झालेल्या सर्व वीरशैव उमेदवारांचे ही परिषद जाहीर अभिनंदन करते.

सूचकः—श्रीमंत आनंदराव शेवाळकर.

अनुमोदकः—श्री. गणपत आप्पा कोरे.

बार्शींचें कै. अण्णासाहेब कथले ह्यांचे शोचनीय निधनाबद्दल अध्यक्षांनी खालील ठराव मांडला व सर्वांनीं उभे राहून आपली सहानुभूति व्यक्त केली.

ठराव ८वा

बार्शींचे प्रसिद्ध व्यापारी व वीरशैव पुढारी कै. श्रीमंत अण्णासाहेब कथले ह्यांचे निधनाबद्दल ही परिषद दुःख व्यक्त करते. व त्यांचे कुटुंबियांस आपली सहानुभूति प्रदर्शित करते.

**चुकीची दुरुस्तीः**— ह्या अंकांत पृष्ठ १३८ वर रकाना १ मध्ये ओळ ३ नंतर चुकून निराळा मजकूर उतरला गेला आहे, ओळ ३ नंतर त्याच पृष्ठावरील दुसऱ्या रकान्यांतील मजकूर वाचावयास सुरुवात करावी, व नंतर ह्या दुसऱ्या रकान्यांतील सर्व मजकूर संपल्यावर, उपर्युक्त रकाना नंबर १ मधील ओळ ४ पासूनचा मजकूर पुढे वाचावा.

# वीरशैवांतील चळवळी

**बळेगांवः—पुण्यतिथी महोत्सव**

येथील बालब्रह्मचारी श्रीगुरुमूर्ती वीरलिंग स्वामी ह्यांचे सुप्रसिद्ध गुरु कोंडलिंग स्वामी ह्यांचा पुण्यतिथीमहोत्सव दरवर्षी फार मोठ्या प्रमाणांत साजरा होत असतो. ह्या वर्षी श्रीगुरुमूर्ती वीरलिंग स्वामी ह्यांच्या परिश्रमानें यवतमाळ–जिल्हा–परिषदहि येथे भरल्यामुळे एकंदर सर्व उत्सव मोठ्याच प्रमाणावर साजरा झाला. महाराजांची पुण्यतिथी माघ वद्य ९ ला साजरी झाली. श्री. दादाशास्त्री कीर्तनकार ह्यांचें हरि काला व दहिहांडी, श्रीरामकृष्णबुवा पिंपळगांवकर ह्यांचे कीर्तन, ता. ६ रोजी रात्री श्रीगुरुपादुकांची मिरवणूक वगैरे कार्यक्रम झाला.



श्रीमंत गोधाजीराव मुखरे इजारदार बोरी, पुसद.

**जाहीर अभिनंदन**

पुसदः— श्रीमंत गोधाजीराव ऊर्फ बाबासाहेब मुखरे इजारदार बोरी ह्यांचेवर इं. पि. को. ३०२ व १०९ ह्या कलमाखाली यवतमाळ येथील सेशन कोर्टात मुकद्दमा सुरूं होता. आपसांतल्या वैमनस्यामुळे उत्पन्न झालेल्या ह्या मुकद्दम्यांतून ता. १०।३।३७ रोजी ते पूर्ण निर्दोषी ह्मणून सुटल्याबद्दल आह्मी त्यांचें अभिनंदन करतों.

## मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांतिक वीरशैव परिषद्

कारंजाः— मध्यप्रांत–वऱ्हाड–प्रांतिक–वीरशैवपरिषदेच्या स्वागतमंडळाची सभा शुक्रवार ता. ६।३।३७ रोजी रात्री ८॥ वाजता बारलिंगाचळ्या देवळांत भरली होती. सभेंच्या

अध्यक्षस्थानीं श्रीमंत भाऊराव विभूतें, स्वागताध्यक्ष, हे होते. सभेला अमरावतीहून दे. भ. बानासाहेब बामणगांवकर व श्री. बाबुराव चौधरी व दारव्हयाहून श्री. रामशंभु पुराणिक, श्री. नामदेव आप्पा कोरे, श्री. रामभाऊ शेटें, वगैरे मंडळी आली होती.

कारंजातील खालील वीरशैव मंडळी हजर होती.

श्रीगुरु गुरुलिंग स्वामी, श्री. प्रभुअय्या, श्रीमंत सोनाप्पा पांगरे, श्री. कृष्णाप्पा वीर इंजिनियर, दे. भ. सदाशिवआप्पा बोनते, श्री. विश्वनाथ आप्पा तांदळे, श्री. बापुआप्पा बेलोरे, श्री. रामलिंग आप्पा पापडे, श्री. शेशाप्पा, श्री. नागाप्पा होनराव, श्री. नागाप्पा पापडे, श्री. विश्वनाथ आप्पा विभूते, श्री. रामलिंग आप्पा कोरे, श्री. शंकर आप्पा तोडकरी, श्री. काशिनाथ आप्पा पत्रे, श्री. नागाप्पा राजूरकर, श्री. देवाप्पा साबरे, श्री. जगन्नाथ आप्पा होनराव, श्री. गिरमल आप्पा विभूते, श्री बापुराव कल्याणकर, श्री. सोमनाथ आप्पा पापडें, श्री. सोमनाथ आप्पा विभूते, श्री. नारायण आप्पा शेटे, श्री. सदाशिव आप्पा होनराव, व श्री. बाबुआप्पा. सर्वांनुमतें खालील गोष्टी ठरल्या.

१. **श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर ह्यांना परिषदेचें अध्यक्षस्थान द्यावें.**

२. परिषद मेच्या दुसऱ्या आठवड्यांत भरवावी.

३. स्वागतमंडळाला मदत करण्याकरिता पोटकमिटीची निवड करण्यांत आली.

४. स्वागतमंडळाच्या सभासदाची फी रु. २५, १०, ५, व ३ असावी.

प्रतिनिधीची फी रु. १ असावी. ज्या प्रतिनिधींना जेवण्याची, राहण्याची व्यवस्था स्वागतमंडळाकडून करवून घ्यावयाची असेल त्यांना १ रु. जास्तीचा पडेल.

५. प्रेक्षकांना मोफत अधिवेशनाला हजर राहतां येईल.

परिषदेच्या प्रचारकार्यास व प्रतिनिधी मिळविण्याकरिता खालील मंडळी जिल्हाविहाय नेमण्यांत आली.

यवतमाळ जिल्हाः—श्रीगुरु वीरलिंग स्वामी तळेगांवकर

श्री. आप्पासाहेब एकलारे वकील पुसद, श्री. रामभाऊ शेटें, श्री. नामदेव आप्पा कोरे, श्री. रामभाऊ पुराणिक, श्री. माधवराव बंदाडे, श्री. डोमाप्पा घोरदडे, श्री. लक्ष्मण आप्पा डबरे,

अमरावती जिल्हाः—श्री. अण्णासाहेब हुंडेकर, श्री. महादेव आप्पा एकलारे, श्री. नानाप्पा एकलारे, श्री.सोमेश्वरआप्पा कोल्हे, डॉ.आप्पाराव संगेकर, श्री. कृष्णाप्पा करणे, श्री. चौधरी.

बुलढाणा जिल्हाः—श्रीगुरु हरेश्वर उमाकांत स्वामी खामगांव, श्रीमान् रामभाऊ शेट कुल्ही रोहिणखेडकर, श्री. गोविंदराव बोंबरे, श्री. राणाप्पा मिटकरी जानेफळ, श्री. सदाशिव आप्पा भंगीरे, श्री. रोडाप्पा वाकतकर.

आकोला जिल्हाः—श्रीमंत काशिनाथ आप्पा अडगांव, श्री. विश्वनाथ आप्पा अडगांव, श्री. वैजिनाथ आप्पा कापसे पिंजरकर, श्री. विश्वनाथ आप्पा पांगरे, श्री. सोनाप्पा पांगरे, श्री. आप्पा पेंटें, श्री. काशिनाथ आप्पा कारंजकर, बाळापूर.

मध्यप्रांतः—दे. भ. राजाभाऊ डांगरे, श्री. बापुसाहेब हिंगमिरे, श्री. महादेवराव जुननकार, श्री. आनंदराव शेवाळकर.

श्री. जगन्नाथ आप्पा होनराव, श्री. नागनाथ आप्पा पापडे, ह्यांना मदतनीस ह्मणून श्री. आप्पा पुंजाप्पा पेंटे ह्यांची स्वागतमंडळावर सेक्रेटरी ह्मणून निवड करण्यांत आली.

वरीलप्रमाणें स्वागतमंडळाच्या सभेंत परिषदेच्या तयारीच्या दृष्टीनें वरील गोष्टी ठरल्या असें श्री. नागनाथ आप्पा पापडे व श्री. जगन्नाथ आप्पा होनराव स्वागतमंडळाचे सेक्रेटरीज कळवितात.

---

## रावसाहेब कल्याणी यांचें ठिकठिकाणी अभिनंदन

मुंबई - लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या सातारा जिल्ह्याच्या दक्षिणभागाच्या निवडणुकीचा निकाल लागून तींत रावसाहेब कल्याणी हे दुसऱ्या नंबरनें निवडून आले. निकाल जाहीर होतांच सातारा शहरीं त्यांच्या स्नेही सोबती मंडळींनी ४० वर हार त्यांना घातले. कराड येथील प्रमुख ४-५ व्यापाऱ्यांनी त्यांचें थाटानें अभिनंदन केलें. कोळें एथील मंडळी त्यांच्या आगमनाची वाट पहात होती. ते कोळयाच्या हद्दींत येतांच बेंड, ताशे, इत्यादि वाद्यांच्या गजरानीं त्यांचें स्वागत केलें. कोळयाच्या रस्त्यांतून त्यांची मिरवणूक काढली होती. मुलांच्या शाळेजवळ बालवीरांच्या कमानींतून त्यांना नेलें. नंतर शाळेच्या पटांगणांत शाळेतर्फे हार समर्पण झाला. या इलेक्शनमध्येहि त्यांच्यावर असणारें जनतेचें प्रेम अढळ राहिल्याचें त्यांच्या प्रत्ययास आल्यानें भाषण करितांना त्यांचा कंठ इतका सद्‌गदित झाला कीं, तो त्यांना बोलू देईना. ह्मणून त्यांनी आपलें भाषण थोडक्यांत आटोपलें. त्यानंतर चावडींत प्रचंड जनसमूहांत ग्रामस्थ, ग्रामपंचायत, व इतर इष्ट मित्र यांचें ५-६ हार त्यांचे गळयांत घातले गेले. श्री. कृष्णापा पाटील यांनी लिहून आणलेलें छोटेसें अभिनंदनपर भाषण वाचून दाखविलें. त्यांत ते ह्मणाले "रावसाहेब कल्याणी यांना निवडणुकींत यश मिळाल्याबद्दल आह्मी ग्रामस्थ त्यांचें अभिनंदन करतों. रावसाहेबांना शेतकरी, मजूर, व्यापारी यांच्या अडचणींची पूर्ण जाणीव असून आजपर्यंत ते लोकल बोर्डें, म्युनिसिपालिटी, सहकारी सोसायटया, शेतकी असोसिएशन्स्, लँडमार्गेजबँक, ह्यांमध्ये काम करीत आले आहेत. लेजिस्लेटिव्ह असेंब्ली हीहि लोकांच्या प्रतिनिधींची संस्था आहे. इतउत्तरहि त्यांना असेंच यश मिळो अशी आमची ईश्वराजवळ प्रार्थना आहे." यानंतर रावसाहेब उत्तरादाखल बोलले, "कोळयांतील इनामदार व ग्रामस्थहो, तुह्मी माझें अभिनंदन केलें याबद्दल मी तुमचा आभारी आहें. कारण आजपर्यंत तुह्मी माझ्यावर विश्वास ठेवून वरचेवर तुह्मीच मला पुढें केलें आहे. आतांपर्यंत तुमची सेवा निरपेक्ष बुद्धीनें केली आहे. मुंबई—लेजिस्लेटिव्ह असेंब्लींमध्येंहि तुमची सेवा करण्याची संधि तुह्मी मला आणून द्याल अशी माझी खात्री होती ह्मणून मी निवडणुकीस उभा राहिलों व तींत तुह्मींच मला यशस्वी केलें याबद्दल तुमचा मी ऋणी आहे. या ऋणाची फेड तुमची निरपेक्ष बुद्धीने सेवा करणें हीच आहे असें मी समजतों. तुमच्या हिताच्या बाबी करतांना मजबद्दल जर तुह्मांस कांहीं शंका आली तर तीबद्दल मजजवळ विचारपूस करुन सुधारणा करण्यांस मला सुचवा. त्याप्रमाणें मी सुधारणा करीन. तुह्मी अभिनंदन केल्याबद्दल तुमचे आभार मानून मी भाषण संपवतों.

या दिवशीं विंग, ता.कराड, एथेंही रावसाहेब यांना हार घालण्यांत आला. या वेळी विंगच्या ग्रामस्थांनी रावसाहेब व पाहुणें मंडळींना दूध व पानसुपारी दिली.

---

विजापूर श्रीसिद्धेश्वर देवस्थान संस्थेची

## वीरशैवविवाहाची नवयोजना.

### ३५ रुपयें खर्चातच लग्न.

वीरशैवसमाजांत लग्नकार्यांत व विवाहसमारंभाप्रीत्यर्थ अवाढव्य खर्च होत असतो व त्यापायीं कित्येक कुटुंबें कर्जबाजारीहि होतात. ह्मणून अनाठाई खर्चास कात्री लावून अगदी थोड्या खर्चांत विवाहसमारंभ करविण्याची एक योजना विजापूरचे श्रीसिद्धेश्वरसंस्थेने आंखली आहे. लग्नकार्यास अवश्य लागणारी प्रशस्त जागा, मांडव, भांडीकुंडी, वाजंत्री, वगैरे जमविण्यास प्रत्येकास निदान १५ दिवस तरी सहज लागतात, व इतकें करूनहि कित्येक वेळेला वरीलपैकीं बऱ्याच गोष्टी मिळूं शकत नाहीत ह्मणून फार त्रास होतो. शिवाय खर्चहि फार येतो. ह्मणून हा सर्व त्रास वाचविण्याकरितां वरील विजापूरसिद्धेश्वरसंस्थेनें श्रीसिद्धेश्वर-देवालयांतच वीरशैवविवाहसमारंभ एका दिवसांतच करण्याची योजना आंखली आहे. अशा विवाहाला फक्त ३५ रु. अंदाजी खर्च येईल. ह्मणून या सुसंधीचा फायदा वीरशैवसमाजबांधवांनी अवश्य घ्यावा अशी विनंती आहे. विवाहेच्छुंनी खालील नियम पाळले पाहिजेत.

[ १ ] वधुवरांतील परस्पर देण्याघेण्याचे करारमदार त्यांनी आपसांतच पुरे करावेत.

[ २ ] वधुवर उभयपक्षांचे आप्तेष्ट मिळून १५ माणसेंच असावीत. जास्त असल्यास जादा खर्च द्यावा लागेल.

[ ३ ] कायद्याप्रमाणें व शास्त्राप्रमाणें वधुवरांच्या वयोमर्यादा अनुक्रमे १४ व १८ पूर्ण असाव्या.

[ ४ ] कांही वीरशैव पोटजातींत ह्मणजे ज्यांच्यात पुनर्विवाहाची ( उघडी ) चाल नाही अशांना गरीबीमुळे वधु मिळत नाही, ह्मणून बरींच वर्षें अविवाहित स्थितींत काढावीं लागतात. तेव्हा अशा परिस्थितींतील वर, कोणत्याहि वीरशैव पोटजातींतील वधूशीं विवाह लावण्यास सिद्ध असेल, अथवा वीरशैवपोटजातींतील वधू न मिळाल्यास वीरशैवेतर हिंदू कन्येशीं विवाह करण्यास तयार असल्यास त्या मुलीला वीरशैवधर्मदीक्षा देऊन शुद्ध करून शिवाचारयुक्त करून विवाह लावून देण्यांत येईल.

[ ५ ] ज्या कोणास मोठें जेवण वगैरे देणें असल्यास त्यांनी त्याची सूचना, आमंत्रितांच्या संख्येसह दोन दिवस आगाऊ दिल्यास योग्य खर्च घेऊन जेवण्याची व्यवस्था करण्यांत येईल. मात्र जेंवण्याचें आमंत्रण देणेंचें व बोलण्याचें काम ज्याचें त्यांना करावें लागेल.

[ ६ ] विशेष खुलाशाकरिता खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.

सेक्रेटरी:— श्रीसिद्धेश्वर संस्था, विजापूर.

---

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ एप्रिल १९३७ ( अंक ७ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वकशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर

॥ श्रीमज्जगद्गुरु पंचाचार्याः प्रसीदंतु ॥



**श्रीमद्रंभापुरी वीर सिंहासनाधीश्वर**
**श्री १०८ जगद्गुरु**
**शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामिनाम्**

---

(ह्यांचा संचार धारवाड, हुबळी वगैरे भागांत नुकताच झाला. त्या वेळी विरक्त वा बसवपक्षीयांनी त्यांना विरोध असल्याचें दर्शविलें. असें कर्नाटकांतील वर्तमानपत्रःवरून स्पष्ट होतें.)

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—* जुनें वर्ष पांचवें *—

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः ।
शिवधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें )    मिति चैत्र व० ५ शके १८५९    अंक ७ वा.

# यवतमाळ-जिल्हा-परिषद्

## मु० तळेगांव ता. ६-३-३७

## स्वागताध्यक्ष व अध्यक्षांचीं भाषणें

श्रीमंत मांधवराव बापुआप्पा खंदाडे, स्वागताध्यक्ष, ह्यांचें भाषणः—

आजचा दिवस हा खरोखरच सोन्याचा उगवला आहे ! आजची तिथी ही खरोखरच पुण्यपावन तिथी आहे. आज यवतमाळ - जिल्हा-वीरशैव-परिषदेच्या, आणि एका महात्म्याच्या पुण्यतिथीनिमित्त, जमलेला हा जनसमूह पाहून आह्माला आनंदाचें भरतें आलें आहे. आज इथे उपस्थित असलेल्या पाहुणे मंडळींत, आमच्या यवतमाळ जिल्ह्यांतील वीरशैवसमाजाच मध्ये तर अखिल महाराष्ट्रांतील वीरशैवसमाजाला भूषणभूत असलेले श्रीमंत बाबासाहेब पारवेकर जहागीरदार जरी हजर राहूं शकले नाहीत तरी त्यांनीं परिषदेला यशचिंतनपर संदेश पाठविला आहे हें आमचे आह्मी महद्भाग्य समजतों. तसेंच, इतरहि वजनदार, समाजहितेच्छु, गर्भश्रीमंत मंडळी, आणि आमच्या प्रांतांतील एक वजनदार पुढारी देशभक्त नानासाहेब बामणगांवकर यांनी आजच्या परिषदेला आपला अमूल्य वेळ खर्ची घालून इथे येण्याचें श्रम घेतले हे आमचें महद्भाग्यच ह्मणायचें. आज इथे जमलेल्या

मंडळीत श्रीमंतापासून तों मजूरापर्यंत सर्व वर्गांच्या समाजबंधूंनी भाग घेतला आहे. त्या सर्वांचे मी स्वागतमंडळाने माझ्याकडे दिलेल्या स्वागताध्यक्षपदावरुन सुस्वागत करतों. तें सर्वत्रांनी अंतःकरणपूर्वक गोड करुन घ्यावें. वास्तविक, स्वागताध्यक्षाचा मान मजकडे घेण्याइतपत् माझी समाजसेवक या नात्यानें अणुमात्रहि पात्रता नसतांना, मला आज जमलेल्या पाहुण्यांचें स्वागत करण्याचें महद्भाग्य आणि सुवर्णसंधि स्वागतमंडळानें उदारमनानें दिली आणि समाजसेवेला उद्युक्त केलें ह्याबद्दल मला अत्यानंद होत आहे.

आजच्या प्रमुख पाहुणें मंडळींत आजचें सभाध्यक्ष श्रीमंत रामचंद्र शेट कुल्ली यांची सुशिक्षित समाजबंधूंना नव्याने ओळख करुन देण्याची जरी तितकीशी अवश्यकता नसली, तरी इथें जमलेल्या बऱ्याच मंडळींना ते अपरिचित आहेत अशी माझी समजूत असल्यानें मी अध्यक्षांची सर्वांना प्रथम ओळख पटवुन देतों. श्रीमंत रामचंद्र शेट कुल्ली हे रोहिणखेड येथील एक गर्भश्रीमंत सद्गृहस्थ आहेत. त्यांची व्यावहारिक वर्तणूक अत्यंत साधी, आणि सामाजिक मतें नव्या—जुन्या दोन्ही पिढ्यांना उद्बोधक आणि मार्गदर्शक अशीं असल्याकारणानें वीरशैवसमाजांतच नव्हे तर इतरहि समाजांत त्यांनी बरेंच वरच्या दर्जाचें स्थान पटकावलें आहे. त्यांची समाजसुधारणेची तळमळ तर इतक्या पराकोटीची आहे कीं, अहोरात्र त्यांना आपल्या समाजाची उन्नतावस्था कशी करावी ही फिकीर लागलेली असते. आणि इतर समाजाच्या दृष्टीने बराच मागे राहिलेला आपला वीरशैवसमाज इतरांच्या बरोबरीनें कार्यक्षम कसा करावा, ह्याकरिता त्यांचे अहोरात्र परिश्रम चालू आहेत. इतकेंच नाही तर, सी. पी. वऱ्हाड, अगर खानदेश ह्या भागांत इतका समाजसुधारक पुढारी दुसरा कोणी असेल असें निश्चित मला तरी वाटत नाही. त्यांनी दोनदा आपल्या गांवीं वीरशैव-परिषद् बोलावून समाजजागृतीचे कार्याला चालना दिली, आणि आज जी इथें सभा बोलावण्यात आली तिलाहि सर्वस्वीं उत्तेजन ह्याच अध्यक्षमहाशयांचें आहे. इतकेंच नव्हे तर नानासाहेब वामणगांवकरांच्या 'संजीवनी'-लाहि पुनर्जन्म द्यावयाला ज्या कांही व्यक्ती कारण आहेत त्यांत पहिलें स्थान अध्यक्षांचें आहे. इतके वयोवृद्ध असतांहि त्यांचा दांडगा उत्साह कुठल्याहि तरुणाला मागे टाकील अशा उमेदीनें ते नेंहमीच सामाजिक सुधारणेंकरिता तत्पर असतात. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मला परिषदेला हजर राहतां येईल कीं नाही असें पत्राने आह्याला कळवून देखील आज ते इथें उपस्थित झाले आहेत ह्याबद्दल आह्मी त्यांचे अत्यंत आभारी आहोत.

आह्मी ही " यवतमाळ-जिल्हा-वीरशैव परिषद " रहदारीला अतिशय कष्टदायक अशा एका आडमार्गाच्या खेड्यांत बोलावली, आणि इथे येणाऱ्या आमच्या पाहुणें मंडळींना अतिशय त्रास झाला हें आह्मी जाणून आहोंत. यथा तितक्या प्रमाणांत आह्मी पाहुण्याची सेवा-शुश्रुषा करण्याची कितीहि पराकाष्ठा केली तरी थोडी - फार गैरसोयहि व्हायचीच आणि ही होणारी गैरसोय पाहुण्यांनी मनावर न घेता आह्माला त्याबद्दल क्षमा करावी अशी मी सर्वत्रांना विनंती करतों. आह्मी या आडमार्गाला सभा बोलावण्यात चूक केली, असाहि आमचे-वर आरोप करण्यात येत आहे. इतकेंच नाही तर 'यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषद' जिल्ह्याच्या ठिकाणीं कां बोलावलीं नाही' याबद्दल आमच्या-वर कांही यवतमाळकरांचा बराच रागहि झाला आहे. पण दूरदृष्टीने या गोष्टीचा विचार केल्यास आह्मी ही परिषद खेड्यांतून बोलावण्यांत चूक केली वाही असेंच कुणीहि आपल्या शहरवासी सुशिक्षितांना ह्मणेल !

ग्यारांत कुठे काय चालले आहे ह्याची वर्त-मानपत्रें, मासिकें, वगैरेंच्या वाचनानें आणि इतरहि अन्य साधनांनी सामाजिक माहिती मिळत गेल्याकारणानें समाजकार्याची थोडी-फार जाणीव तरी असूं शकते, परंतु खेड्या-पाड्यामधून तुरळक तुरळक वस्ती करून राह-णाऱ्या आणि अशिक्षित अशा बहुजनसमाजाला त्याची गंधवार्ताहि असूं शकत नाही. आणि म्हणूनच, बहुजनसमाज हा कोणत्याहि सामा-जिक चळवळीपासून अलिप्त असतो. आणि बहुजनसमाजाच्या या अलिप्तपणामुळेंच कोण-तेंहि समाजकार्य व्हावें तसें सुंदर होत नाही. आणि व्हावा तितका जोम कुठल्याहि सामा-जिक कार्यांत निर्माण होत नाही. आणि शेवटी कोणतेंहि कार्य नीटपणें तडीस न जातां शहरांतील समाजसुधारकांना निरुपायानें हताश होऊन स्वीकृत कार्य नाउमेदीने अंगा-वेगळें टाकण्याचा प्रसंग उद्भवतो, आणि केलेल्या श्रमाचें चीज न होतां उदासीनपणें हात टेकावे लागतात. कोणत्याहि कार्यपूर्तीला बहुजनसमाजाच्या सहानुभूतीची अत्यंत आव-श्यकता असते ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाही. आणि असा बहुसंख्य वीरशैवसमाज आपल्या यवतमाळ जिल्ह्यांत जिथे आज ही परिषद भरविण्यांत आली त्या खेड्याच्या आसपास बराच विस्तृत पसरला असल्यामुळे, आपण खरी समाजसुधारणा आधी खेड्या-पासून केली पाहिजे अशी खरी परिस्थिति आज आपल्यासमोर उभी असल्यानें, मुद्दाम येथेंच हा उपक्रम केला आहे. तसेच आजच्या परिषदेचें सर्व श्रेय येथील नवतरुण मठाधिपती श्रीगुरुमूर्ती वीरलिंगस्वामी यांनाच देणें मला उचित आहे. कारण त्यांनी तनमनधनें-करून या परिषदेची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन आज आह्माला या परिषदेची संधि मिळवून दिली. त्यांच्या वयोमा-नाकडे पाहिल्यास, इतरत्र वसणाऱ्या महान् महान् मठाधिपतींनाहि आज त्यांनी एक प्रकारें, जंगमाचें खरें कर्तव्य कोणतें आणि खरी पुण्यतिथी कशाला ह्मणतां येईल याचा उत्कृष्ट धडा दिला आहे असेंच कुणीहि कबूल करील. ज्या वयांत चैनचमन करून सुखांत लोळावे अशा तारुण्यातहि त्यांची ही सामाजिक कार्याची कळकळ पाहून खरोखरच धन्यता वाटते. स्वामीचा स्वभाव अत्यंत साधा, सरळ वृत्ति निगर्वी, आणि आपलेपणानें कुणाच्याहि अंतःकरणात आदरबुद्धि निर्माण होईल अशी वर्तणूक, खरोखरच वाखाणण्यासारखी आहे. श्रीगुरुमूर्ति वीरलींग स्वामी, हे भक्तघराण्यांतून दीक्षासंस्काराने जंगमवर्गात दाखल झालेले असलें तरी खऱ्या जन्मजात जंगमांनाहि आपल्या वर्तणुकीने लाजविण्याइतके उच्च ध्येयवादी आहेत ही गोष्ट मला प्रामुख्याने सांगावीशीं वाटते. आणि अशा उज्ज्वल चारित्र्याच्या स्वामीला वीरशैवसमाजच काय, परंतु इतर समाजहि कसा पूज्य मानतो याचें ताजें उदा-हरण आज आपल्यासमोर उभें आहे. आज जिथें लोकवस्तीच्या मानानें शेंकडा एक तरी लिंगायत असेल कीं नाहीं याची शंका असतांना, इतर समाजाच्या सहकार्याने जिथें आज 'यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषद' यशस्वी करण्यांत येत आहे ती काय स्वामीच्या विषयी असलेल्या आदरबुद्धीशिवाय ? इथें वास्तव्य करणाऱ्या वीरशैवसमाजापैकीं कोरे हें घराणें प्रमुख आहे. पण त्या कोरेघराण्यातील नामदेव आप्पा आणि गणपत आप्पा कोरे हे दोघेहि बंधू आज व्यापारधंद्याच्या निमित्तानें दारव्ह्यास वस्ती करून राहिले आहेत. आणि त्यांनीहि प्रमुखपणें यांत भाग घेतला आहे. आजच्या सभेचे अध्यक्ष आणि इतरहि पाहुणे मंडळी आज इथें एकाच उद्देशाने जमली आहे.तो उद्देश ह्मणजें समाज-सुधारणेची तळमळ हाच होय. आपल्या समा-जाची औद्योगिक, शैक्षणिक, आणि इतरहि मार्गाने उन्नती कशी करून घेतां येईल याची चर्चा करून कांहीं तरी मार्ग आखले जावेत

आणि त्या परीने समाजसुधारणा आपणाला करतां यावी ही तळमळ प्रत्येकाच्या अंतःकरणांत जागृत आहे. परिषदेमधून नुसते कागदी ठरावच पास करून घेण्यांत अर्थ नाही. अर्थ म्हणजे पैशाची हानी आणि वेळेचा दुरुपयोग असें न होतां काही तरी भरीव कार्यक्रम आखून तो सुरळीत पुढे चालविणें ह्यांतच परिषदेची खरी पूर्णता आहे. आणि अशा प्रकारें ही परिषद यशस्वी करण्याकरिता आजच्या परिषदेपुढे येणाऱ्या प्रत्येक ठरावावर मनमोकळेपणें चर्चा करून, प्रत्येकाने आपापल्या अडीअडचणी, आणि मतें उघडपणें सभेपुढे मांडून यांत भाग घ्यावा, आणि काही तरी सभा बोलावण्याचें सार्थक झालें. अशी भरीव कामगिरी करून दाखवून आपल्या वीरशैवसमाजाला वोज वाढवावा अशी मी सर्वांनांना विनंती करतों. आणि मनोभावें आलेल्या पाहुण्यांचें सुयश चिंतन करून उपस्थित पाहुण्यांनी हें अल्प स्वागत सुस्वागत समजावें अशी मी पुन्हा एकदा प्रार्थना करून आपलें भाषण संपवितों.

---

## श्रीमंत रामभाऊ शेट कुल्ली, परिषदेचे अध्यक्ष, ह्यांचें भाषण :—

आपण मला ह्या परिषदेचें अध्यक्षस्थान देऊन माझा जो गौरव केला त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें.

अलीकडे महाराष्ट्रांतील आपल्याकडील भागांत घोंडबे, नाशिक, वगैरे ठिकाणीं वीरशैव-परिषदा भरून, सामाजिक जागृतीस चालना मिळाली आहे. त्याप्रमाणें ही यवतमाळ-जिल्हा-वीरशैव-परिषद भरण्याचा योगायोग घडून आलेला असून, अशा परिषदा भरण्याचे उपक्रमांतून कांहीतरी परिणामकारक भरीव समाज-कार्य घडून येईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

सोलापूर, धारवाड, वगैरे भागांतील वीरशैव-समाजाचे मानानें पाहतां, मध्यप्रांत, वऱ्हाड, खानदेश, वगैरे भागांतील आपला वीरशैवसमाज शैक्षणिक, आर्थिक, धार्मिक वगैरे सामाजिक सुधारणेच्या बाबतींत बराच मागे पडलेला आहे.

चालू युग विचारजागृतीचें असून, या काळांत व्यक्तिशः आपल्यापुरताच विचार करून चालावयाचें नाही. समाजांत शैक्षणिक, आर्थिक, धार्मिक, वगैरे बाबतींत सर्व प्रकारें सुधारणा घडवून आणण्याचे; प्रयत्न पुढारी मंडळीकडून जारीने सुरू झाले पाहिजेत.

कोणत्याहि सुधारणेस मूळ पाया शिक्षणाचा असून, समाजांत सार्वत्रिक शिक्षणाचा प्रसार होऊन त्या शिक्षणावरोबरच, औद्योगिक व नैतिक शिक्षणाची जोडहि मिळाली पाहिजे. अलीकडे केवळ पुस्तकी शिक्षणावरच सर्व भर दिला जात असून, उद्योगी शिक्षणाकडे (कष्ट करण्याच्या प्रवृत्तिकडे ) दुर्लक्ष होऊं लागलें आहे. त्यामुळे शिक्षणापासून फायदा न होतां समाजांत बेकारीचें वातावरण निर्माण होऊं लागलें असून, कष्टाळू व स्वावलंबी वृत्तीचा ऱ्हास होत चालला आहे. अशा प्रकारच्या बेकारीचें प्रकरण समाजांत दिवसेंदिवस जास्त वाढत चालल्याचें स्पष्टपणें दिसत असून, त्यावर कांही तरी उपाययोजना होणें जरूरीचें आहे.

मध्यप्रांत, वऱ्हाड, व खानदेश या भागांतील वीरशैवसमाजांत उच्च शिक्षण घेतलेले विद्यार्थी हाताच्या बोटावर मोजण्याइतकेहि नाहीत. अशी स्थिति असण्याचें कारण हेंच कीं, आर्थिक दृष्ट्या उच्च शिक्षण घेणें ज्यांना सोयीचें असतें असे विद्यार्थी शिक्षणसंपादनाचे बाबतींत प्रमाद ठेवतात, व ज्यांना शिक्षण संपादन करण्याविषयीं आस्था असते त्यांना द्रव्याभावीं शिक्षण घेणें कठीण होतें. पैकीं धनिक विद्यार्थ्यांचे बाब

शीत उपदेशापलीकडे समाजाला कांही करतां येत नाही. परंतु मनांत इच्छा असून द्रव्याभावी जे विद्यार्थी उच्च शिक्षण घेऊं शकत नाहींत अशा विद्यार्थ्यांकरिता उच्च शिक्षणाची सोय असलेल्या ठिकाणीं " वीरशैव बोर्डिंग " सारखी संस्था काढण्यांत येऊन ती कायम स्वरूपांत चालण्याकरिता समाजाकडून शिक्षण-फंडाची व्यवस्था होणें जरूरीचें आहे परंतु आपले समाजांत सामाजिक बावतींत पैसा खर्च करण्याची प्रवृत्ति नसल्याने सामाजिक फंडाकरिता पैसे देणें समाजांतील धनिक वर्गास बरेंच जड वाटत असतें. आपल्या समाजानें या बाबतींत इतर पुढारलेल्या समाजांचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवलें पाहिजे. चैनीकरिता होणाऱ्या अनाठायीं खर्चाला आळा घालून, आपल्या समाजानें वरील-सारख्या उपयुक्त संस्थेस आर्थिक मदत केल्यास शैक्षणिक कार्य बऱ्याच अंशीं सुलभ होण्यासारखें आहे. ही बाब समाजांत शिक्षणविषयक औत्सुक्य उत्पन्न होण्यावर अवलंबून आहे. ह्याकरिता वरील प्रकारचे शैक्षणिक कार्यास पुढारी मंडळी-कडून चालना मिळाली पाहिजे.

पंनास वर्षांपूर्वी आपला वीरशैवसमाज आर्थिक दृष्ट्या बराच पुढे गेलेला होता. ज्या ज्या गांवीं वीरशैवसमाज होता त्या त्या गांवचीं बहुतेक व्यापारी सूत्रें वीरशैवसमाजाचे हातांत होतीं. कालमानपरिस्थितीनें व्यापारी धोरणांत बदल होऊन पूर्वीचें धोरण निरूपयोगी होत चाललें आहे. शिक्षणाच्या अभावीं चालू परिस्थितीतील व्यापारी धोरणास वीरशैवसमाजाला इतर ( गुजराथी कच्छी वगैरे ) समाजाप्रमाणें तोंड देतां आलें नाही. वीरशैवसमाज हा बहुतेक व्यापारावर अवलंबून असल्याने व पूर्वीचें व्यापारी धोरण समाजास अवगत होत असल्याने सावकारी व शेती या धंद्याचे तुरळक अपवादीं सोडून बहुतेक वीरशैवसमाजाची परिस्थिति आर्थिक दृष्ट्या दिवसेंदिवस कठीण होत चालली आहे. त्यांत आणखी लग्नकार्यं वगैरे प्रसंगीं जास्त खर्च करण्याच्या रूढीची भर पडत असल्याने समाजस्थिति शोचनीय झालेली आहे. लग्नकार्यप्रसंगीं जास्त खर्च न करण्याची प्रथा समाजांतील धनिक व पुढारी मंडळींनी सुरू केल्यास समाजांतील लग्नकार्यांत अनाठायीं होणाऱ्या खर्चाच्या रूढीला आळा घातल्यासारखें होईल.

वीरशैवसमाजांत धार्मिक गुरुवर्ग व भक्तवर्ग यांचा पूर्वीपार परस्परसंबंध प्रेमभावाचा व भक्तिभावाचा असून त्याप्रमाणें गुरुवर्गाकडून समाजाला पोषक असें ज्ञान मिळत असे. याप्रमाणें समाजहितोपदेशद्वारां समाजहित साधण्याचें कार्य गुरुवर्गाकडून उत्कृष्ट रीतीने होत असे व त्यायोगें गुरुवर्ग आणि भक्तवर्ग याचें परस्परसंबंध जिव्हाळ्याचे राहून प्रेमाची व भक्तीची भावना समाजांत व्यवस्थितपणें जागृत राहात असे. अलीकडे त्या भावना बऱ्याच अंशीं लोपत चालल्या असून, दिवसेंदिवस परस्पराविषयी तुसडेपणाचें वातावरण निर्माण होत चाललें आहे. अशा अनिष्ट वातावरणास आळा घालणें जरूरीचें असल्याने गुरुवर्गांतील व भक्तवर्गांतील पुढारी मंडळींनी समाजसुधारणेच्या कार्यांत एकत्र भाग घेऊन जाऊन समाजकार्य निरभिमानाने सुरळीतपणें शेवटास नेत जावे. ह्याप्रमाणें गुरुवर्ग व भक्तवर्ग यांनी आपापले योग्य कर्तव्याची जाणीव बाळगून निरलसपणें समाजकार्य करीत गेल्यास त्याचा परिणाम गोड झालेला दिसून येईल.

पूर्वी वीरशैवसमाजांत कालमानपरिस्थितीला धरून समाजसंघटनेचे बाबतींत रोटी-बेटीव्यवहारास प्राधान्य दिलें जात नव्हते तरी पण निरनिराळ्या लिंगायतसमाजांत संघटनात्मक प्रेमाचें एकीकरण नांदत होतें. अलीकडे सर्व भरतखंडांत निरनिराळ्या हिंदु जातीमध्यें कालमानपरिस्थितिप्रमाणें रोटीबेटी ( विशेषतः रोटी ) व्यवहाराचे बाबतींत

मद्यंतर पडलेलें असून, बऱ्याच निरनिराळ्या हिंदू जातींत रोटीव्यवहाराचे बाबतींत एकीकरण सुरु झालेलें आहे. त्याप्रमाणे परिस्थितिनुरूप वीरशैवसमाजांतहि एकीकरणास योग्य अशा निरनिराळ्या लिंगायत पोटजातींतहि रोटीव्यवहाराचें एकीकरण होण्याबद्दलची नवमतवादी तरुण वीरशैवांत चळवळ सुरू होण्याचीं लक्षणें दिसत आहेत. या चळवळीबद्दल समाजांत मतभेद असून सनातनी विचारच्या वीरशैवांच्या मतें ही चळवळ वीरशैवधर्मास अयोग्य असून, सुशिक्षित नवमतवादी वीरशैवांच्या मतें ही चळवळ समाजसुधारणेस पोषक अशी आहे. या मतभेदाबद्दल साधक – बाधक विचार करून पाहतां महाभाग श्री बसवेश्वरकाळांत वरील एकीकरणाची चळवळ मोठ्या व्यापक स्वरूपात होऊन त्या काळांत ती चळवळ समाजाच्या सर्वांगीण सुधारणेस पोषक झालेली आहे. पुढे बसवकालानंतर मध्यंतरीच्या काळांत निरनिराळ्या राजसत्तेच्या परिणामाने सर्व हिंदुसमाजाप्रमाणें वीरशैवसमाजांतहि जातीभेद व पोट–जातीभेद निर्माण झालेले आहेत. अलीकडील राजसत्तेचा चालू काळ व्यापक स्वरूपाचा असून भरतखंडांतील सर्व समाजांचें दळणवळण कमोजास्त प्रमाणांत हिंदुस्थानाबाहेरील जगाशीं वाढत चाललें आहे. त्या योगें इतर समाजांत व्यापक दृष्टीच्या विचारांची जागृति उत्पन्न होऊन निरनिराळ्या जातीजातींतील रोटीव्यवहाराचें भेदाभेदाला बराच आळा बसलेला दिसत आहे. अशा व्यापक दृष्टीच्या परिस्थितींत वीरशैवसमाजांतील जातीभेद व पोटजातीभेद पूर्वीप्रमाणें जास्त काळ टिकणें शक्य नाही. जुन्या काळच्या विचारप्रवर्तक सनातनीयांकडून पूर्वीप्रमाणें जातिभेद टिकविण्याचे प्रयत्न झाल्यास त्यांचें तें धोरण या व्यापक दृष्टीच्या काळांत आकुंचित दृष्टीचें ठरून निरर्थक होत जाईल. करितां सनातनी मताचे वीरशैव बांधव साधक बाधक विचार करून एकीकरणास योग्य व समाजसुधारणेस पोषक अशा एकीकरणाच्या चळवळास सहानुभूति दर्शवितील अशी अपेक्षा आहे. तसेंच सुशिक्षित नवमतवादी बंधूंहि एकीकरणास योग्य व समाजसुधारणेस पोषक अशाच तऱ्हेचेंच एकीकरण करण्याचे प्रयत्न समाजसुधारणेस बाधक न होतील अशा प्रकारें निरपेक्षपणें करीत राहिल्यास त्या तऱ्हेनें या एकीकरणाच्या चळवळीस समाजाकडून सहानुभूति मिळत जाईल ही उमेद आहे.

स्त्री-विभाग

# मानवी जीवनांत महत्वाकांक्षेचें स्थान

लेखिका:— ‘ कु० शामलता ’

## इच्छा ! आशा ! महत्वाकांक्षा !

हे तिन्ही शब्द जरी भिन्न दिसले तरी वास्तविक पाहतां आशेंतून महत्वाकांक्षा व इच्छेतून आशा. तेव्हा अर्थातच इच्छेचे विस्तृत स्वरूप म्हणजेच महत्वाकांक्षा होय. एखाद्या वस्तूविषयीं अभिलाषा बाळगून ती वस्तू किंवा ध्येय साध्य करून घेण्याकरितां अहर्निश झगडून तीं वस्तू आपलीशी करून घ्यावी अशी जेंव्हा इच्छा होते तेंव्हा मनुष्य तिच्याविषयीं

...वावी बनतो, व आशा सफल होतेशी वाटली ... लागलीच आशेचें महत्वाकांक्षेंत रूपांतर होतें.

...राजा असो वा रंक असो, महत्वाकांक्षा ... असावयास हवी. इच्छा आहे ह्मणून ... आहे, व आशेपायीं महत्वाकांक्षा उद्भ... या तिन्ही कारणसमुच्चयामुळेच सृष्टमय ... राहाटी आपल्या ज्ञानरूपी परीघकक्षे... योग्य मार्गास बिन्धोकपणें चालली आहे. ... सर्वस्वी श्रेय महत्वाकांक्षेलाच आहे असे ... अतिशयोक्ति होणार नाही. परंतु ...कांक्षा ही प्रत्येकाला असतेच हें ... खरें नाही, तरी जगांतील प्रत्येक ... मनीषा धरायलाच हवी. ...जोशी मुंगी ! ह्मणतात स्वतःच्या तिप्पट ... उचलते. कां ? तर स्वतःचें वारूळ तोंडो... करण्याची महत्वाकांक्षा असते ह्मणून. दुसरे ... ह्मणजे चिमुकल्या चिमणीचेंच घ्या. ..., कितीहि उंच झाड असलें तरी त्याचा शेंडा ...ण्याचा ती आपल्यापरी कसून प्रयत्न करते. ... कारण काय बरं असेल? तर तिला शक्य... उंचावर घरटें बांधण्याची महत्वाकांक्षा ... हृदयांत वांघते ह्मणूनच ना ! मुंगीचे ... वारूळ, तसेच हरवऱ्याच्या झाडावर ... घरटें आढळणे, शक्य तरी आहे का? ... ह्मणजे यःकश्चित् कीटकामध्ये जर मह... ...कांक्षा असतात, तर सर्वश्रेष्ठ मानवांत मह... ...क्षेचें स्तोम अथवा स्वरुप अधिक विस्तृत ... असावयास पाहिजे.

पुष्कळ जण ह्मणतात, अहो ! परिस्थिति ... मग महत्वाकांक्षेचें खूळ उरांत बाळ... काय करावयाचें ? परिस्थिति अनुकूल ... हे दुबळी पुरुषाचें लक्षण होय. पण ... परिस्थिति- पालटून अनुकूल परिस्थि... ...क्रमण करण्यास जरा प्रयत्न करावयास ... पाचोचे ढेकूळ पाण्यांत पडतांक्षणीच ... नामशेष व्हावें तद्वतच मनोरथाचे ... मनोरेच होऊन मातीमोल व्हावे, या... ... हें कोणतें असणार!

हें जरी खरें असलें, तरी कल्पनेंचे मनोरे उभारतांना होणारा कल्पनातीत आनंद तरी कां बुडवावा ! कर्तव्याचा आनंद हा क्षणिक नसून चिरकाल टिकणारा असतो. मग कल्पनारूपी मनोऱ्याचें साम्राज्य स्वहस्तानें, स्वबुद्धीच्या चातुर्यानें अखिल जगांत ( स्वपरिकोशांत ) निर्माण करणाऱ्या महात्म्यांचा आनंद काय वरं वर्णावा? असलाच आनंद चाखण्याचा किंवा अनुभवण्याचा प्रत्येक स्त्री – पुरुषांनी प्रयत्न केला तर त्यांच्या आयुष्याचा एकहि क्षण दुःखांत जाणार नाही. ते नेहमी आनंद-सुखसागरांत बुडून जातील हेंहि तितकेंच खरें आहे.

नेहमीं मनुष्यांनी महत्वाकांक्षी असावें. मात्र चिमणीने चंडोलभरारीची महत्वाकांक्षा धर-ल्यास तें हास्यास्पदच होणार ! एखादें राष्ट्र उदयास येते तेव्हा मुळाशी राज्यकर्त्यांची महत्वा-कांक्षाच त्याला कारणीभूत होते. मुठभर मावळमेळ्यांच्या साह्यानें शिववानें हिंदवी साम्राज्याचा तिरंगी भगवा झेंडा महाराष्ट्रांत रोवला ना ! पण ह्या अल्पशा मावळमेळ्याच्या साह्याबरोबर जर महात्वाकांक्षारूपी ध्येयासा-रखें अमोल शस्त्र शिवरायास नसतें तर हिंदवी साम्राज्याचा भगवा झेंडा अटकेपार फडकलेला ऐकूंहि आला नसता.

प्रत्येक मनुष्यप्राण्याला महत्वाकांक्षा असावी, परंतु दुसऱ्याच्या पोटावर पाय देऊन स्वतःचे पोट भरण्याची हाव नसावी. ह्यापेक्षा ती नसलेली काय वाईट ? निस्वार्थीपणानें दुस-ऱ्याचें कल्याण करणारा; व आपल्यावरून दुसऱ्याचा आत्मा ओळखून दीन – अनाथांच्या गरजा भागवण्याची महत्वाकांक्षा खरोखर अतुलनीयच होईल. चौर्यकर्मांत निष्णात होण्याची महत्वाकांक्षा कुणालाहि अक्कल खर्चून तिजोऱ्या, कुलुप, किल्ल्या करण्याची अक्कल शिकविते. पण त्यांच्या असल्या मह-त्वाकांक्षा दुसऱ्याच्या जीवावर बसरवी होतात.सर्व

जग जिंकण्याची महत्वाकांक्षा धरणारा नेपोलीयन, औरंगजेब, शिकंदर इत्यादि राजे महत्वाकांक्षी होते. त्याचप्रमाणें शिवाजीही होता. परंतु शिवाजीच्या अतुल स्वार्थत्यागामुळे त्याच्या महत्वाकांक्षेत व वरील तिघांच्या महत्वाकांक्षेत महदंतर आहे. कारण पहिल्या तिघांची महत्वाकांक्षा ह्मणजे केवळ राज्यतृष्णा होती व शिवाजीची ह्मणजे स्वतःच्या मायभूमीचें स्वातंत्र्य, स्वधर्मरक्षण, गोवधबंदी ह्या उच्च तत्वाच्या सात्त्विकतेंत गुंफली गेली होती. ह्मणूनच त्याचें महत्वाकांक्षारूपी ध्येय उच्च दर्जाचे होते. तेंव्हा असे जर अनुकरण निस्वार्थीपणानें मानवानें केलें तर त्याला खरा ध्येयवादी ह्मणावा.

चिमणीची चंडोलभरारीची महत्वाकांक्षा जरी हास्यास्पद तशीच कौतुकास्पद होऊं शकेल; पण स्वार्थी कपटी कावळ्याची देहास यत्किंचितही न दुखवतां ईश्वरदया 'एका डोळ्याच्या कोपऱ्यातून काण्याडोळ्यानेंच दुसऱ्याचे हस्तगत करण्याची महत्वाकांक्षा...छे हें महत्वाकांक्षेच्या सदरांत मोडूंच शकत नाही. ही कल्पना ना कौतुकास्पद ना हास्यास्पद. पण तिरस्करणीय मात्र ठरते. आणि ह्मणूनच जिवाच्या तिप्पट ओझे वाहून भरलेल्या मुंगीच्या वारूळाप्रमाणे कावळ्याचें घरटें कधीच भरूं शकत नाही.

महत्वाकांक्षा नसणें ह्मणजें जवळ जवळ ध्येयशून्य जीवित कंठण्यासारखें आहे. जे पानावर पडेल तें खावयाचें, जें खाल्ले तें पचवावयाचें, पडेल तें काम करावयाचें व उरलेला वेळ दुसऱ्याच्या निंदाचेष्टा—कुचेष्टा करण्याचे काम पुन्हा पूर्ववत् सुरूं ठेवावयाचें ! दुर्दैवाची तसेच खेदाची गोष्ट ह्मणजें असल्या वृत्तीला ' मानववृत्ति " हें नांव खास शोभणार नाही. अशा प्रकारचें जीवन व्यतीत करणारे मानव आपल्या समाजांत बहुसंख्याक आहेत. त्यांना स्वातंत्र्य ह्मणजे काय हेंच जेथे माहित नाही, तर स्वातंत्र्यरूपी अमृताची माधुरी त्यांनी काय चाखावी ? आज सर्व जगभर ब्रिटिशांचा साम्राज्यरूपी भडक झेंडा बहुतेक सर्व देशावर फडकतो आहे तो कांही तो महत्वाकांक्षाविहीन असूनहि फडकतो असें नाही. त्यांनी आपल्या महत्वाकांक्षेच्या बळावर पंचमहाभूतांनाहि जिंकलें. मग माणसाची बुद्धी त्यापुढें काय पाजळणार आहे? आज कित्येक वस्तूवर " made in England" असा छाप आढळतो. याचे सर्वथैव कारण सर्व बाजारपेठेवर इंग्रजांचा ताबा बसवावा हें होय. परंतु बुद्धिप्रधान चतूर अशा इंग्रजांच्या महत्वाकांक्षेचें फळ आपण भोगीत आहोत. तेव्हा तितक्याच, किंबहूना जास्त महत्वाकांक्षेच्या सामर्थ्यानें आपणहि त्यांना जिंकण्याचें धारिष्ट करुन पुढे सरलें पाहिजें, आणि तसा प्रयत्न करुन हिंदुस्थानला स्वातंत्र्य प्राप्त करण्याच्या कार्यात यशस्वी होईनच अशी महत्वाकांक्षा प्रत्येकानें आपल्या हृदयाशीं बाळगल्यास दुधात साखर घातल्याप्रमाणें अथवा सुवर्णाच्या कोंदणांत हीरा शोभल्याप्रमाणेंच होईल. आपली मातृभूमि पारतंत्र्यांत खितपत पडली आहें. ती स्वातंत्र्यप्राप्तीस्तव हिंदवीरांना आर्तस्वरानें टाहो फोडीत आहे. तेव्हा नवयुवकांनी तिला तिचें दास्यविमोचन करण्याची जर महत्वाकांक्षा धरल्यास खात्रीने हिंदमातृभूमीला सुवर्णमय स्वातंत्र्याचेच भाग्याचे दिवस लाभणार. ही प्रेरणा प्रत्येक नववयुक आचरणांत आणील तो सुदिन !!!!! ..............

प्रत्येक विद्यार्थ्यानें तर महत्वाकांक्षेसारखी मात्रा अवश्य मिळवावी ! कारण पाटीदप्तर हातीं घेऊन दुडुदुडू धावणारा विद्यार्थीच उद्याचा उदयोन्मुख राष्ट्राचा आधारस्तंभ आहे. त्याच्याच तोंडाकडे हिंदभू करुण वदनानें पहात आहे. कळवळून ती त्यांना जागृत इशारा करीत आहे कीं कुणी नाही तर नाहीं पण प्रत्येक विद्यार्थ्यांनी तरी महत्वाकांक्षेचा ओनामा गिरवावाच गिरवावा!

# महाराष्ट्रीय वीरशैवांचें एकीकरण

## व

## कारंजा-परिषदेचें महत्व

( संपादकीय )

कर्नाटक व तैलंग ह्या भागांत वीरशैवांची वस्ती अधिक आहे. त्यामुळें एकीकरणादि सामाजिक प्रश्नांना तिकडें लवकर चालना मिळते. वीरशैवांत पोटजाती अनेक आहेत. त्या कर्नाटकांतच आहेत व महाराष्ट्रांत नाहीत अशांतला प्रकार नाहीं. शिवाय महाराष्ट्रांत वीरशैवांची वस्ती फारच तुरळक कीं, एखाद्या खेड्यांत एकटेच घर असणें. चुकून एखाद्या गांवीं दोन-तीन घरें असलीं तर पोटभेदामुळे त्यांचा एकमेकांना सामाजिक व धार्मिक कार्यांत उपयोग होत नाहीं. त्यामुळें संघटना व उत्कर्ष ह्यांना मोठा अडथळा येतो. ह्या सर्व परिस्थितीचा विचार करितां महाराष्ट्रांतील वीरशैवांत एकीकरण व्हावें आणि पोटजाती नाहींशा व्हाव्यात असे प्रयत्न करणें जरूर आहे. हा प्रयत्न आज नव्याने होतो अशांतला भाग नाहीं. मागील दोन-तीन पिढ्यांचा महाराष्ट्रांतील इतिहास पाहिला तर हे प्रयत्न झाले आहेत व दर गांवीं कमी-अधिक प्रमाणांत होतच आहेत असें दिसून येईल.

लिंगधारी वीरशैवांत ज्या पोटजाती रूढ आहेत त्या धंद्यावरून वास्तविक ज्याला ज्याला लिंगधारणा रूढ आहे त्यांना अष्टावरणाचे, पंचाचाराचे, व षट्स्थलाचे अधिकार प्राप्त होतातच. परंतु कित्येकांच्या धंद्यांतील वेळेच्या अभावामुळें गुरुपरंपरा व जंगमपरंपरा त्यांना राखतां आली नाहीं, अथवा कित्येकांना हीं धार्मिक कृत्यें वेळेवर घडावींत ह्मणून स्वतःतच गुरु वा जंगम निर्माण करण्याची प्रथा पडली असेल हें निराळें. तथापि ह्यामुळें लिंगधारणा परंपरेनें रूढ असलेले वीरशैव अष्टावरणादिकांचे अधिकारी नाहींत असें ह्मणतां येत नाही. ह्याकरितां पिढ्यानूपिढ्या जो लिंगधारी आहे तो अष्टावरणाचा अधिकारी आहे असें समजून गुरु ह्मणविणाऱ्या वर्गानें त्यांना आपलें ह्मणणें व जंगमादिकांनी त्याच्याकडे प्रसाद ग्रहण करणें उचित आहे. पोटजातीच्या एकीकरणाचा हा खरा पाया होय.

हा पाया हळू हळू घालण्याचें काम महाराष्ट्रांत आणि मध्यप्रांत, वऱ्हाड, व खानदेश ह्या भागांतील वीरशैवांत अनेक पिढ्यांपासून सुरूं आहे. ज्या पोटजातीकडे गुरु वा जंगम रूढ नव्हता त्यांच्याकडे तो रूढ करण्याची प्रथा कित्येक पट्टाधिकाऱ्यांनी व माहेश्वरांनीं सुरूं केली आहे. लिंगधाऱ्यांत दीक्षादि संस्कार रूढ व्हावेत ह्मणून गुरुवर्गाकडून आज सर्वत्र प्रयत्न होत आहेत. त्या प्रयत्नांतच पोटजातींच्या एकीकरणाचें बीज साठविलें आहे. कारण दीक्षादिसंस्कार ज्यांचा ज्यांचा सुटला ते सर्व लिंगधारी आज एकाच

मालिकेंत येऊन बसतात. ह्यापैकी एकालाहि मी दीक्षवंत वा शीलवंत आहे अशा उच्चनीच भावनेने इतर लिंगधारी बंधूंकडे पाहातां येत नाही. तथापि दीक्षादि संस्कार सुटल्यावर जे अशा भावनेनें पाहूं लागले त्यांच्यामुळेच दुही अधिक वाढली व ती कित्येक ठिकाणीं इतकी तीव्रतेला गेली कीं, एकीकरण शक्य ह्मणण्या- पेक्षां दुहीच शक्य आहे असें वाटूं लागतें. ह्यांत धर्मतत्वाची व समाजतत्वाची विटंबना आहे हें ह्या लोकांच्या लक्षांत येत नाही. आणि ज्या ठिकाणीं अशा लोकांच्या आहारीं गुरु वा जंगमवर्ग गेला तेथें तर दुहीचा कळसच झाला.

महाराष्ट्रांतील वीरशैवांच्या सुदैवानें गुरुवर्ग व माहेश्वरवर्ग संघटित होत आहे व हा वर्ग दीक्षाविसंस्कार जागृत करण्याचा प्रयत्न करीत आहे. परंपरेने लिंगधारणा करणाऱ्या प्रत्येक वीरशैवाला हा दीक्षासंस्कार झाला व त्यांच्या येथे ह्या निमित्ताने जर गुरु वा जंगमपरंपरा सुरु झाली तर एकीकरणाचा पाया दीक्षासं- स्काराच्या पुनरुज्जीवनाने घातला गेला असें मोठ्या अभिमानाने ह्मणावें लागेल.ह्मणून प्रत्येक लिंगधारी पोटजातीनें दीक्षादिसंस्कार करुन घ्यावेत आणि गुरु वा जंगम आपल्याकडे त्या निमित्ताने भोजनास वा प्रसादास येतात हें जाहीर वा सिद्ध करीत रहावें. गुरुवर्गाच्या व माहेश्वराच्या संघटनेंतून हा प्रकार रूढ होऊं लागला तर माहेश्वरवर्गाने फार मोठें कार्य सुरूं केलें ह्मणून त्यांचा नव्या पिढींत अधिक गौरव होईल. यवतमाळ जिल्ह्यांतील तळेगांव मुक्कामी मार्च सहा तारखेला रोहि- णखेडचे सुप्रसिद्ध वीरशैव पुढारी श्रीमंत राम- चंद्रशेट कुल्ली ह्यांच्या अध्यक्षतेखाली जी यव- तमाळ जिल्ह्यांतील वीरशैव – परिषद् झाली तींत दीक्षाविधीसंस्काराची जागृति करणारा ठराव एकमतानें जो पास झाला त्याचें आह्मांला ह्या दृष्टीनेच महत्व वाटतें.

हा ठराव रूढ करण्याची जबाबदारी माहेश्व- रवर्गावर आहे.त्यांनी जे परंपरेने लिंगधारी आहेत पण ज्यांच्याकडे कोणत्याहि कारणानें गुरु वा जंगम रूढ नाहीं त्यांना दीक्षा देऊन त्यांच्यावर गुरुपरंपरा लादणें अवश्य आहे. वतनदार गुरु वा माहेश्वर ह्यांनींच हें काम करावें असें नाहीं तर कोणत्याहि अधिकृत वा अनधिकृत माहेश्वरानें हें काम सुरु ठेवावें.पण त्यांना नित्य गुरु जंगम मिळेल अशी व्यवस्था करुन सुरुं ठेवावें. आणि इतरांनीं ह्या कार्याची कुचेष्टा न करितां घरीं बसून कां होईना पण शुभाशीर्वाद देण्याचें पुण्य संपादन करावें. अशा अर्थानें व अशा प्रकारें दीक्षादि संस्कार रूढ झाले तर सर्व पोटजातींचें एकीकरण जवळ येईल. त्या- करितां मजबूत भूमिका तयार होईल. कारण दीक्षासंस्कारानें आज अष्टावर्णांचे अधिकारी कोण आहेत हें स्पष्ट होईल. काला- च्या ओघांत जे संस्कार लोपले त्यांत दीक्षा- संस्कार लोपला व तो नाहीसा झाला. संस्कार नाहीसा झाला ह्मणून आजच्या परंपरागत लिंगधाऱ्या सर्वंच लहानमोठ्या पोटजातींना अष्टावरणादि संस्काराचा अधिकार नाही असें मात्र कोणासहि ह्मणतां येणार नाही व तसें कोणीं कोणाला ह्मणूंहि नयें.

कारण धर्मदृष्टया व समाजदृष्टया संस्कार अवश्य आहेत, आणि तें वरिष्ठ व कनिष्ट ह्मणवि- णाऱ्या सर्व वीरशैव जातींचेच सुटले आहेत. तेंव्हा सर्व लिंगधाऱ्यांचा दर्जा आज एक आहे असें शास्त्रदृष्टया मानावयास कांहीच हरकत नाही. ही परिस्थिती दिसूं लागली ह्मणूनच पोटजातींची विषमता दूर करुन पुनर्घटनेचा विचार सुरूं झाला. गेल्या पन्नास–शंभर वर्षां- तील वीरशैवांतील घडामोडी लक्षांत घेतल्या तर ज्या पोटजातींच्या येथे गुरु वा जंगम रूढ नव्हता तो होऊं लागला. ज्या पोटजाती एकमे- कांचें तोंड पहात नव्हत्या त्या आपसांत

...नें पिणें करूं लागल्या आणि कित्येक ...ल्यांशीं सोयरसंबंधहि सुरूं झाले. सहजगत्या ...रू झालेल्या ह्या गोष्टींची एके काळीं कुचेष्टा ...ली असेल! पण त्या गोष्टी समाजांत आता ...इतक्या पचल्या कीं, त्याबद्दल कुणी कुणाला ...नें डिवीत नाहीं. ही परिस्थिति स्पष्ट दिसत ...तां, ह्या पोटजातींत सरसहा हा रोटीबेटी-...व्यवहार सुरूं करा असें जाहीरपणें आजहि ...होतें ह्मटलें कीं, कांहीं दुराग्रही लोक उगीच ...ह्याविरोध करतात.

...तळेगांव - परिषदेंत वीरशैव तरुणांनी ह्या ...विषयाला जाहीरपणें तोंड फोडलें आहे. ...आणि कारंजा येथील प्रांतिक परिषदेंत ह्या ...विषयावर वाद होईल हें स्पष्ट होत आहे. ...कारंजा येथील प्रांतिक परिषदेला कांहीं ...नियम नसल्यामुळे जे स्वागतमंडळाचे ...सभासद असतील व जे अधिकृत प्रतिनिधी असतील त्यांनाच ह्या विषयावर अनुकूल वा प्रतिकूल ...बोलतां येईल व मत देतां येईल. ह्याबाहेरची ...कोणी व्यक्ति महत्वाची असली तर अध्यक्ष ...त्याला बोलण्यास परवानगी देतील हें निराळें, परंतु ...असे नियमबद्ध वादविवाद सुरूं होणें हें जागृ...तेच्या दृष्टीनें इष्ट आहे. कारण रोटीबेटीव्यव-...हाराचा ठराव होतांच जे कोणी कोणाकडे ...रोटीबेटीव्यवहार करीत नसतील ते करूंच ...लागतील असें नव्हे. पण जे करीत असतील ...त्यांना सहजगत्या नैतिक पाठिंबा मिळेल एव-...ढाच ह्याचा अर्थ आहे. शिवाय ज्यांच्या मनात ...ह्या गोष्टी करावयाच्या आहेत, पण जे ...समाज अनुकूल नाहीं ह्या समजूतीनें धैर्य-...हीन होतात, त्यांना प्रांतिक परिषदेच्या निर्णं...यानें धैर्य येईल. शास्त्रदृष्ट्या व धर्मदृष्ट्या ...ज्यांना ह्या गोष्टीला विरोध करावयाचा ...असेल त्यांनी खुशाल करावा. विरोधाचा हक्क ...कोणीहि कुणाचा हिरावून घेऊं शकत नाहीं. ...परंतु शास्त्र व धर्म ह्यांच्या मर्यादा पुढे आल्या ...कीं एक विशिष्ठ जबाबदारी अंगावर येते.

ती ही कीं, दीक्षादिसंस्कार पुनरुज्जीवित करण्याचा जसा उद्योग सुरू आहे व होतो त्याच-प्रमाणें जे दीक्षा घेऊं लागले त्यांच्यांत प्रसाद-भेद राहूं नये व प्रसंगीं त्यांच्यांत विवाह झाले तरी हरकत करूं नये. दीक्षादिसंस्कार जागृत करणारांची एकच निराळी पोटजात बनली तर चालेल. पण तेंहि नाहीं व हेंहि नाहीं असा प्रकार घडत असेल तर त्या क्रिया-शून्य शास्त्र व धर्म ह्या नांवाला किंमत येणार नाहीं. आह्मी स्वतः शास्त्र व धर्म बोलणारांत आणि निव्वळ परिस्थितीवर लक्ष देऊन पोटजातीं नष्ट व्हाव्या ह्मणणारांत संगति निर्माण करूं इच्छिणारे आहोंत ह्मणून तळेगांव-परिषदेंत आह्मीं पुढीलप्रमाणे ठराव सुचविला होता. "ज्या वीरशैवांना कोणत्याहि प्रकारें अष्टावरणादि सर्व संस्कार रूढ असलेले दिसतात त्या वीरशैवांत पोटजातींत प्रसंगी रोटीबेटीव्यवहार झाला तरी समाजानें व गुरु-जंगमादि वर्गांनें त्यास हरकत घेऊं नये." अष्टावरणसंस्कारांत गुरु व जंगम व लिंग ह्यांचें महत्व विशेष आहे, व तें इतकें आहे कीं, जेथे ह्या तिहींपैकीं एक आहे तेथे ह्या तिन्हींचें स्वरूप कोणत्यां ना कोणत्यां प्रकारें रूढ असतेंच. अशा अष्टावरणाच्या अधिकाऱ्यांनी पोट-जातीं मोडण्याचा क्रमशः उद्योग सुरू केला तर सर्व वीरशैवांच्या अंतर्यामीं असलेला शिव-देव अधिक प्रसन्न होईल व तो पतित होत चाललेल्या आजच्या समाजावर कृपा करण्यास सज्ज होईल.

कारंजा – परिषदेंत आह्मीं हाच ठराव आणणार आहोत. आमच्या तरुण मित्रांना ही संगती पसंत पडणार नाहीं. त्यांनी वीरशै-वांत पोटजाती राहूं नयेत व सर्व वीरशैव-मात्रांत रोटीबेटीव्यवहार रूढ व्हावा असा ठराव खुशाल आणावा. ह्याकरितां त्यांनी आमच्याशीं दोन हात खेळावेत व आह्मीहि त्यांच्याशीं वादविवादांत दोन हात खेळूं.

ह्याशिवाय जो तिसरा वर्ग आहे व त्याला जुनें तेवढेंच सोनें वाटतें त्यांनीहि आपलें ह्मणणें पुढे करावें. समाजरूपी शिवदेवापुढे तिघेंहि आपआपलें ह्मणणें रूजू करूं आणि तो देव कोणीकडे कौल देतो तें पाहूं. तरी ह्याप्रमाणें कारंजा-परिषदेंत चर्चा होणार असल्यामुळे ती अत्यंत महत्वाची होणार हें सर्वांनी जाणून सर्वच मतांच्या वीरशैवबंधूंनी स्वागतमंडळाचे सभासद व प्रतिनिधी होऊन ह्या सभेचें अधिवेशन पार पाडण्यास झटणें अगत्याचें आहे.

---

# ' श्रीमद्वीरशैवधर्मा '-ची इतिहासांत सनद

( ले.— श्री. तु. ना. काडकर, चिमूर. )

वर्तमानचें ' बौद्धिक युग 'आहे. ज्याच्या बुद्धीला जे ग्राह्य वाटेल तें तो स्वतः सभा-महासभांतून अथवा नियतकालिकांतून विश्वापुढे आणण्याचा प्रयत्न करितो. समोर आणलेला प्रश्न जितका अधिक जिव्हाळ्याचा तितकी त्याचे पूर्ततेकडे आकर्षकता अधिक. श्रीमद्वीरशैवसंस्कृति अतिप्राचीन वेदाद्यप्रणित खरीच; पण तिचा उठावदारपणा जितका ठळक असावयास पाहिजे तितका नाही, हें खास. याचें कारण मधल्या मोंगल व मराठेशाहीच्या काळांत वीरशैवसंस्कृतीच्या रश्मी ज्या प्रमाणांत प्रखर पडावयास हव्या होत्या त्या न पडतां उलट गार झाल्या हें प्रमुख होय.

मराठेशाहीनंतर इंग्रजी सत्ता रुजली, नि इंग्रजी सत्तेसमवेतच इंग्रजी व मराठी शिक्षणास चालना दिली गेली. ह्या काळी वीरशैवसंस्कृतीचें अस्तित्व निर्वीर्यावस्थेंत होतें, त्यामुळे तिचा प्रकाश त्या वेळीं पडूं शकला नाही.

पाश्चात्य सुधारणेबरोबरच ग्रंथनिर्मितीची लाट उसळली व भराभर बुद्धिग्राह्य असे सांप्रतिक नि ऐतिहासिक क्षेत्रांत मराठी नि इंग्रजी ग्रंथ निर्माण होऊं लागले. ह्या काळीं ऐतिहासिक संशोधनमंडळांत जिज्ञासू स्वाभिमानी प्रतिभासंपन्न वीरशैवांचो जोड लाभूं शकली नाही. तसेंच, दुसरें कारण वीरशैवांचे मूळधर्मग्रंथ कन्नड व तेलगू लिपींतून असल्यामुळे या भाषेत्तरसंशोधकांना त्यांचें आकलन न झाल्यामुळे साह्य घेतां आलें नाही. एवंच अशा दुहेरी अनिर्वाह्य कारणामुळे जे एकदां ' श्रीमद्वीरशैवधर्म ' व त्याचे धर्मभास्कर नि धर्मोद्धारक संशोधनांतून गळले गेले ते त्यांना पुनः इतिहासांत स्थान प्राप्त होण्याचा अनुकूल काळ आजतागायत आलेला नाही. तो आज चालून येण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

वीरशैवसंस्कृतीचा कोठल्याहि मराठी क्रमिक इतिहासांत नामनिर्देश नाही. असें असल्यामुळे

त्याचें अस्तित्व ज्या प्रमाणांत आज ठळक दिसावयास हवें तसें दिसत नाहीं. म्हणूनच विधर्मीयांत त्याची कांहींहि चर्चा अथवा वाद आढळत नाहीत. ज्ञानार्जनाचें मुख्य साधन शाळा व ग्रंथ. कोणत्याहि कर्त्याचा इतिहास तुम्ही हातांत घेऊन त्यांची पानें चाळा म्हणजे तुम्हास त्यांत हिंदु व तसेंच बौद्ध, जैन, शीख-प्रभृति धर्मांचे किंबहुना विदेशीय इस्लाम, ख्रिस्त प्रभृति आधुनिक धर्मांचेहि मथळे ठळक तुमचे दृष्टीस पडतील; पण याच भारतांतील अतिप्राचीन धर्म जो आपल्या वीरवृत्तीनें आज-पर्यंत टिकून राहिला त्या 'श्रीमद्वीरशैवधर्माचें' नांवनिशाणहि तुह्मास कोठे आढळणार नाहीं. ह्याची कारणें काय तीं उपर्युल्लेखिलेलींच आहेत.

आजचा समय वीरशैवांच्या पुनरुद्धाराचा आहे. मान्यवर विद्वान् संशोधक त्याचे अनुयायी आहेत. त्याचा आज कायदेकौंसिल व एज्युकेशन – बोर्डापर्यंत शिरकाव झाला आहे. जनसेवा हेंच कंकण त्यांचे हस्तास विराजित आहे. जनता ही जनार्दनाची सेवा असून त्यांतच त्यांचा उद्धार आहे. पण स्वतःच्या उद्धारापेक्षा स्वधर्माचा उद्धार उच्चतम आहे, नि स्वराज्यापेक्षांहि स्वधर्माची योग्यता थोर आहे, व स्वधर्माचा उद्धार करण्यातच उद्धार-कर्त्यांचा अंतिम उद्धार आहे. ह्मणून आमच्या सत्ताधीश वीरशैव महाशयांनी या स्वधर्मउद्धा-राकडे लक्ष वेधून त्यांस इतर धर्मांप्रमाणें एज्युकेशन – बोर्डाकरवीं मराठी व इंग्रजी शैक्षणिक इतिहासक्रमांत त्यांचें प्रमुख स्थान होण्याप्रीत्यर्थ आपले प्रयत्न खर्ची घालणें आज अत्यावश्यक आहे अशी आमची त्यांना प्रेमादरपूर्वक सूचनात्मक विनंती आहे.

हल्लीं वीरशैवधर्माच्या सर्वांगीण उत्कर्षाकरितां जे अनेक मार्गांनी अनेकांकडून प्रयत्न चालले आहेत त्यापैकींच हा एक मुख्य नि प्रकाशमान् मार्ग आहे. विचार करा ह्मणजे पटेल. ( यावर विस्तृत विचार पुढे स्वतंत्र लेखांत मांडले जातील ). पण एवढें मात्र खरें कीं, या मार्गांनी विधर्मीयांच्या ठिकाणीं जी जागृति सहजासहजीं सुलभतेनें होईल ती इतर प्रयत्नानें दुरापास्त आहे.

आजपर्यंत आमचे अवलोकनांत जेवढे ह्मणून ऐतिहासिक ग्रंथ आले त्यांत फक्त प्रो. ओतुरकरकृत ( आधुनिक ) 'हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास'यांत काय तो दहापांच ओळींत वीरशैवधर्माचा उल्लेख केला असल्याचें स्मरतें. तो तितकाच जरी असला तरी खऱ्या चिकित्सक व जिज्ञासू ऐतिहासिक संशोधनाचें प्रतीक आहे. ह्मणून त्यांचे मार्ग व स्वतः प्रोफेसर साहेब धन्यवादास पात्र आहेत.

जसा आमच्या स्वधर्मांतील सत्ताधीश अधिकारी महाशयांना तसाच कोणत्याहि चळवळीचें आधारस्तंभ जी नियतकालिकें त्यांना व त्यांच्या कर्त्यांना नि तसेंच सामाजिक कार्यकर्त्यांनाहि या महत्त्वाच्या कामीं तनमनधनेंकरून झटण्या-प्रीत्यर्थ हार्दिक इषारा आहे.हें आमचें व्यक्तिशः कार्य नाही. वीरशैव ह्मणविणाऱ्या सुविद्य आबालवृद्धांचे, सानथोरांचें, गरीब-श्रीमंताचें व सत्ता नि असत्ताधीशांचेंहि आद्यकर्तव्य आहे. ह्मणून या प्रकरणीं सभामहासभांतून ठराव पास केले जाऊन त्यांची दाद वरिष्ठ अधिका-ऱ्याकडे लावली जावी. याच न्यायानें येत्या 'वऱ्हाड–मध्यप्रांत वीरशैवधर्म परिषदे'त उपर्युल्लेखित ठराव आमच्या धर्मबांधवांच्या विचारार्थ पुढे ठेवण्याचें आह्मींहि नियोजिले आहे. जोपर्यंत शिक्षणक्रमांत सक्तीनें वीरशैव-धर्माचा समावेश होत नाही तोपर्यंत त्याची विधर्मीय लोकांत विद्यार्थ्यांकरवीं जागृति होत नाही व त्याची महती वीरशैवाबाहेरील जगांत जाऊं शकणार नाहीं. आजचे विद्यार्थीच भावी कालांतील विद्वान् पंडीत–महापंडीत आहेत हें विसरून चालणार नाही.

प्रिय वाचक हो! आज आरंभ झालेल्या नवीन राज्यघटनेबरोबरच या नवीन स्तुत्य उपक्रमास प्रारंभ व्हावा याच सद्बुद्धीनें माझें अल्प मत आपणासमोर ठेविलें आहे. व याचा आपण हार्दिक स्वीकार कराल अशी मला पूर्ण उमेद आहे.

लघुकथा ७ वी.




( लेखक— कुमार सिताराम होनराव, अहमदनगर )

ह्मणे माझ्या डोळ्यांदेखत लग्न झालं पाहिजे!....... मी ह्मणतो असली ह्मातारी व ह्या मतांची माणसं असाच काय ह्मणून हट्ट धरुन बसतात कोणास माहीत?...... अर्थात् त्यांनाच तें माहीत.... आमचं लग्न होणार नाही की काय?... कां तुह्मीच असतांनाच होईल?... तें कांही नाहीं. माझं शिक्षण पुरं झाल्याशिवाय मला लग्नाची जरूर नाहीं...

* * *

सोमवार होता, घड्याळानें सांयकाळचे पांच ह्मणून ठोके नुकतेच दिले होते. विश्रांतीकरिता उतावीळ असल्यानें होतां होईल तों लवकर भराभर मार्ग आक्रमण करणाऱ्या रविनाथाची सोनेरी तिन्ही सांजचो लांवलचक किरणं जिकडे तिकडे भूपृष्ठावर खुशाल पसरलीं होतीं. शीत वातावरणात गार वाऱ्याच्या मधून मधून झुळकी येत होत्या.... आणि दुमजली घराच्या एका खिडकीतून वरील शब्दसमूह ऐकावयास येत होते..............................

* * *

— आज रस्ता चुकला वाटतं लिलाताई?... ताईनीं खोलींत पाऊल टाकलेलें पहातांच त्रिवेणीबाई तांदुळ निवडीत असतां पहात आणखी ह्मणत होत्या ......सरासरी आठ दिवस झाले असतील आपण इकडे आलेल्यां...........

अहो आपण कां आला नाही तिकडे? ...कां आह्मीच इकडे येण्याचा मक्ता घेतला वाटतं ?......बरं राहूं द्या नेहमीच आपलं, .......काय चाललं होतं..........ताई हंसत हंसत नेंहमीच्या तऱ्हेनें ह्मणाल्या.

अहो कांही नाही. जयलिंगला ह्मटलं येत्या फाल्गूनमध्यें लग्न उरकावयाचें. त्याचं ह्मणणं आहे, माझं शिक्षण पुरं झाल्यावर करावं.

खरंच त्रिवेणीबाई, तुह्मीं असच करा, जयलिंगचं शिक्षण त्याच्या मनाप्रमाणें झाल्यावरच लग्न करा. त्याचे कारण, एकदां लग्न झालं कीं मुलगा अगर मुलगी संसारांत गुंग होण्याच्या रंगाला येतात. .......ताई ह्मणाल्या, लिलाताई, हे सर्व फॅशनचे चोचले आहेत. आतां त्यानं अगदींच ताळमेळ सोडला..... परवा शेजारच्या सुमनला कोण पहावयास आले होते,......काय पण बाई ! त्यानें तिला नाही नाही ते प्रश्न विचारले, लिहावाचायला येत कां ?...चहा कॉफी येते कां ?...परंतु उत्तरें पसंतीची मिळाली नाही ह्मणून ते निघून गेले. स्वतः मुलगी पाहण्याची कुठली रीत ? आणि बायकाना लिहावाचायला काय करावयाचं ? चुलीजवळ बसतां आलं ह्मणजे झालं......आपलं चुल बरं......बरं ?......त्रिवेणीबाई, तांदुळांतील खडा बाजूस टाकीत ह्मणाल्या.

असं कसं ह्मणता येईल ? चुलीजवळ बसतां आलं ह्मणजें मुलींचं जन्माचं सार्थक झालं अशी का तुमची समजूत आहे ? मुलींना शिक्षण द्यावं ... ...लिलाताई तांदुळ घेत ह्मणाल्या.

पण असं होतं कां तुमच्या—आमच्यावेळेस ? आणि आपल्या वेळेस केव्हा लग्न ठरत ते तिसऱ्याच्या कानीं सुद्धा जात नसे. आत तर फोटोपासून तयारी.........किंचित् अभिमानाचा आव आणत बाई बोलल्या.

अहो, अलीकडे सुशिक्षितांनीं फोटोची चाल काढली, ती फार उत्तम आहे. त्यांवरून वर-वधुची सर्व माहिती समजते आणि त्रिवेणीबाई आजकाल आपल्या समाजांत तरुण सुशिक्षित अविवाहितांनीं आपल्या आईबापाजवळ सुशिक्षितच बायको करण्याबद्दल हट्ट धरं लागले, आणि ह्याच हट्टाला जाणून मनांत शिक्षण देण्याची आवड नसतां बळजबरीनें शिक्षण थोडं बहुत देऊं लागले. सुशिक्षित मुलगी असली ह्मणजे तिचा स्वतःच्या संसारांत फार उपयोग होतो..................

तो कसा काय फायदा होतो संसारांत ? विव्वां वर करीत बाई ह्मणाल्या.

सुशिक्षित मुलगी सौभाग्यवती असली ह्मणजे संसारांत व्यवस्थितपणा, नियमितपणा, स्वच्छपणा, हे अवश्य असे गुण वरीं चालत येतात आणि स्वैंपाकसिद्धो शास्त्रोक्त, स्वच्छ बनते, आणि पुढेमागें घरांत पाळणें हालत असले ह्मणजे त्यांची ठेवण, प्रत्येक बाबतीत स्वच्छपणा येथे उपयोगाला येतो.......
ह्यामुळें मुलाची प्रकृति लहानपणापासून निरोगी व सशक्त राहते......वरील नियमाकडे दुर्लक्ष होत असल्यामुळेच हिंदुस्थानची दर वर्षाची बालकमृत्युसंख्या इतर मृत्युसंख्येपेक्षा जास्त असते. ह्या घातक परिणामाला कारण माता सुशिक्षित नाहीत, आणि अशी तिसरी गोष्ट—आजकालच्या परिस्थितींत संसारांत पडलेला मनुष्य पैशाच्या काळजीनें आणि संसाराच्या घोरानें गांगरून जातो. पैसा जरूरीइतका पतिच्या शक्तीनें मिळत नसल्यास, सुशिक्षीत बायको, गृहकृत्य करूनहि थोडा फार पैसा मिळण्यास मदत करते, तशी अशिक्षित बायको मुळीच करणार नाही.

मग तर ताई ? लिहावाचायाला काय करावयाचं मुलीला ? फक्त शास्त्रोक्त स्वैंपाक आला ह्मणजे झालं......बाई ह्मणाल्या.

म्हणजे शास्त्रोक्त स्वैंपाक आला म्हणजें झालं वाटतं ? पण त्रिवेणीबाई, तो शास्त्रोक्त शाळा शिकल्यावांचून थोडाच येणार? मुलींना आजकालच्या धक्क्या-बुक्कीच्या जगांत काय हालचाल चालली आहे हें नको का समजावयाला ? मुलींना काय करावयाचे असं म्हणून लबाड जगांत कसं चालायचं ? त्रिवेणीबाई, ह्यांच तुमच्या-आमच्या कोत्या समजूतीनें आपला वीरशैवसमाज सुशिक्षित राहण्याबद्दल फार मागें राहिला. त्याला इतर समाजाप्रमाणें पुढे धावण्याची खटपट तुमच्या-आमच्या सारख्या मताच्या व्यक्ति नाहींशीं करीत आहेत.

बरं ताई ? मुलींना जर शिक्षण आपण देत बसलों, आणि मुलगी १०–१२ वर्षांची झाली कीं गांवांतील लोक तिच्या आईबापाला बाहेर तोंड काढूं देत नाहीत. मुलाची गोष्ट निराळी. मुलगा कितीही मोठा झाला, व समाजांत हवा तसा वागूं लागला तरी चालतो, पण मुलगी १२ च्या वर्षांत आली कीं आपल्या-भोळसर मागासलेल्या समाजाची दाह होते. म्हणजेच, तिळाचें पापड उकळत्या तेलांत टांकताच जशी तिळाची गत होते, त्याप्रमाणें आपल्या समाजाची स्थिती होते. मग हा कुठला न्याय? अहो ती बिचारी काशीबाई चप्पल – चष्मा घालून शाळेंत " बाई " ह्मणून ३०—४० रुपये पगार मिळविते. तिच्या पतिला कुठं काम नाहीं वाटतं. तरी पण लोक तिच्या नांवाने ओरडतात. ह्या अशा मुली शिकल्या सवरल्या ह्मणजे नट्टेपट्टे करावयाला शिकतात, आणि लोक अश्याप्रमाणें टिंगल उडवितात.

— अहो त्रिवेणीबाई, सध्याच्या फॅशनेबल जगांत टीका, टिंगल व असे नट्टे-पट्टे चालावयाचेच. नट्टे पट्टे केल्यांनीं तरी स्वच्छपणा व्यवस्थीतपणा अंगी बाणतो आणि असं आहे, ऐकावं जनाचं ...........मनाचं ! ·जगाच्या तोंडाकडे कुठपर्यंत पहात बसाल तुम्ही ? जग आहे.

जग दुतोंडी आहे एवढेंच नव्हे तर त्याच्या एकाहि तोंडातील जिभेला हाड नसते...... वरच्या आवाजांत ताई बोलल्या.

लिलाताई मला आतां सर्व समजलं. जाऊं द्या आमच्या वत्सलेला इंग्रजी शिकण्याला. मग तर झालं ........पानाचा डबा पुढें घेत बाई म्हणाल्या

मध्येच सहाचे घड्याळाचे टोले वाजले... चांदीच्या अष्ठकोनी नक्षीदार करंड्यांतुन सौभाग्यवतीची खूण जी ती बाईंनी ताईच्या कपाळी लावून हातांत पानाचा विडा देऊन गोड गोड निरोप दिला.

---

# जुन्या मताचा पुरस्कार करणाऱ्या सुशिक्षितांचें कर्तव्य

( लेखक— श्री. त्रींबक कृष्णाप्पा वीर, कारंजा. )

सुधारणेचा सर्वांत:पुराच्या बाहेर संचार होऊ नये ह्मणून डोळयांत तेल घालून खडा पाहरा करणाऱ्या नानाविध धर्मकल्पनांशीं तुमुल संग्राम करण्यास ज्यांस स्फुरण यावें, ज्याच्या-भोवती उभारलेल्या प्रचंड लोकमततटास हासळून पाडण्यास ज्ञानतोफास ज्यांनी सरबती द्यावी, व त्यास गराडा घालणाऱ्या रूढीखंदकावर क्रियासेतु बांधण्यास ज्यांनी प्रवृत्त व्हावें, अशा विचारसंपन्न लोकांनी दुराग्रहाच्या भरी पडून व शुष्क बाबतीत दुही माजवून मुख्य उद्देशाची हेळसांड होऊं द्यावी ही मोठी दुर्दैवाची गोष्ठ आहे!

आज ज्या निरनिराळ्या परिषदा ठिकठिकाणीं भरत आहेत, त्या सगळीकडे एकी होऊन सर्व वीरशैवसमाजांत नवीन मताचा पुरस्कार केला जावा यासाठी आहेत. परंतु त्यांत नेहमी मतभेद होत आहेत. कांही सुशिक्षित वीरशैव बंधु अशिक्षितांप्रमाणेच वागतात. परंतु स्वतास सुशिक्षित ह्मणवून घेऊन जुन्या मताच्या पारड्यांत आपलें मत टाकतात ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. व त्यामुळेंच मतभेद होतो. आज–काल अशिक्षित वर्गांत अशी परिस्थिति आहे कीं, आपल्या आसपास राहणाऱ्या सुशिक्षितानें जी बाजू चांगली ह्मणून ग्राह्य मानली असेल तिचाच अंगीकार सगळ्यांनी करावयाचा. कारण स्वतः अर्थशून्य लोक अशा आजोबाच्या हातच्या विहिरीचें पाणी पिणाऱ्या सुशिक्षित लोकांच्या निष्कारण नादीं लागून कितपत सुधारणा करतील हें उघडच आहे.

आतां परवाचीच गोष्ट पहा. तळेगांव येथे परिषद भरली होती. त्यांत सर्व लिंगायत जातींत सर्रास रोटीबेटीव्यवहार सुरु व्हावा हा ठराव मांडला गेला होता. व तो परिषदेंत पासहि होत होता. परंतु ठराव मांडणारांनी एकीकरणाचा प्रश्न लांबणीवर टाकण्याची सूचना तटस्थ राहून पास होऊं दिली. कारण आमच्या अज्ञात वीरशैव बांधवास शीलवंत, दीक्षवंत आणि पंचम याशिवाय लिंगायत लोक असणाऱ्या पोटजातींतील

यांच्या इतक्याच उच्च अशा पंचांत मोडतात हें अजून माहीत नाही! दुर्दैवच ह्मणावयाचें आमचें! तर अशा लोकांना जर अजून पंथ ठरवण्याची पंचायत पडतें, तर मग ठराव पास होऊन अंमलांत आणणें किती दुरापास्त आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच; याचें एकच कारण कीं, परबुद्धि आणि शिक्षणाचा अभाव. इतर जातीकडे पाहा. ते स्वमताचें लोक आहेत, व ते लोक धर्म सुधारण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. त्याचप्रमाणें जर आपणास या प्रस्तुत वादांतील एक बाजू (सुधारणेच्या दृष्टीनें नवमतवादी लोक) उचलून धरणार नाहीं तर आपली गति त्रिशंकुप्रमाणें झाल्याशिवाय राहणार नाही.

आज जर दुसऱ्या एखाद्या धर्माच्या गृहस्थानी आपल्या धर्माची निर्भर्त्सना केली तर आपल्यातील प्रत्येक वीरशैव त्याच्याबरोबर झुंजू शकला पाहिजे इतकी त्याची तयारी झाली पाहिजे. व जर त्याची इतकी तयारी झाली तर त्यांना जुन्या रुढीच्या लोकमततटास आपल्या ज्ञानाचे सुरुंग लावून त्याचा पार चुरा उडविण्यास किती वेळ लागणार?

इतकें केलें कीं, आजोबाच्या विहीरीचें पाणी आटल्यामुळें तहानेनें व्याकूळ झालेले सुशिक्षित लोक आपोआप गोड पाण्याचा झरा शोधीत-शोधीत येतील व आपली बाजु यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाही.

त्यांच्याविरुद्ध एक का दोन असे किती तरी आरोप करितां येतील. पण आह्मास इतकें माहीत आहे कीं, 'शहाण्यास शब्दाचा मार' व या न्यायाप्रमाणें आह्माला इतकी खात्री आहे कीं, ते यशस्वी पक्षाचें अनुकरण करुन, त्याप्रमाणें आपल्या वीरशैव बांधवास एकीच्या मालिकेंत ओवून त्यांना सुधारण्याचा थोडासा तरी प्रयत्न करतील.

---

# विवाह आणि वैवाहिक जीवन

( लेखक:—श्री. बाबाप्पा एन. चपळगे, हिंगणघाट. )

श्री तु. वा. फाटकर उत्तम लेखक आहेत येवढेंच नव्हे तर वीरशैवसमाजाची सर्वांगीण सुधारणा व्हावी अशी कळकळीने आस्था बाळगणारे हे एक समाजसुधारक आहेत ह्मणून कोणाहि सुज्ञ वीरशैवास आनंदच वाटेल. तथापि बालविवाहाची मीमांसा ते ज्या तऱ्हेनें करूं पहातात आणि पुराणमतवादीयास अज्ञ आणि मूर्ख ह्मणू पहातात हे त्यांचे विचार सर्वस्वी बुद्धीच्या निकषावर उतरत नाहीत. ते ह्मणतात कीं, 'आईबाप आपल्या मुलामुलीचे हितचिंतक तर नाहीतच नाहीत; पण उलट अनाचाराला पोषक व आपल्या डोळ्यादेखत आपल्या मुलामुलींना मृत्यूच्या स्वाधीन करण्याचें श्रेय संपादणारे नव्हते काय? अशा अविचारी मातापित्यांना 'शतशः धिक् धिक् ज्ञानं नीतिशून्यम्'. पुढे ते बालविवाहाची उत्पत्ति देतात कीं, 'बालविवाहाची' राक्षसी प्रथा मध्येच कशी रुढ झाली हा मोठा विचारार्ह प्रश्न आहे.

पण ह्याला आमचें एकच उत्तर आहे. देशकाल-परिस्थितिनुरूप केवळ जनतेच्या अज्ञानामुळें ही चाल रुळली गेली असावी......' इत्यादि विचारसरणी प्रगत करून सनातनीयांवर जें अनीतीचें आणि अविचाराचें खापर फोडलें तें बरोबर नाही. मी त्यांना असा सवाल करतों कीं, बालविवाह हे 'अनाचाराला' व 'कुविचाराला' पोषक व्हावेत ह्मणून त्यांना समाजांत अधिष्ठान देण्यात आलें होतें का?

बालविवाह सद्यपरिस्थितीला घातक आहेत हें मत आह्मास पूर्ण मान्य आहे. पण समाजांत ते रूढ कां झालेत आणि आतां ते कां नकोत याविषयीचे प्रामाणिक विचार आह्मी नमूद करतों. 'मुलगी वयाला लायक झाल्यावरच तिचा विवाह कां होत होता, आणि सीतादेवी 'माझें वय तेव्हा पूर्ण १८ वर्षांचें होतें' असें कां ह्मणू शकली? याविषयी विचार केला तर त्याला आमची सर्वश्रेष्ठ आश्रमव्यवस्था कारणीभूत होय असें ह्मणावें लागेल. ब्रह्मचर्याश्रमाची व्यवस्था अतिशय उत्तम होती व त्या आश्रमाचे नियमहि कडक रीतीनें पाळले जात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्यांना आपली मुलें ८ ते १२ वर्षांच्या दरम्यान विद्यासंपादनार्थ गुरुगृहीं पाठवावीं लागत. तेथे त्यांना एक तपापेक्षाहि जास्त काळ वेदशास्त्रपठणांत घालवावा लागत असे. पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि श्रेष्ठ दर्जाचें शिक्षण दिलें जात असे. वेदांतील कित्येक सूक्तें स्त्रियांनीहि केलीं आहेत. गुरुच्या आज्ञेनें घरी आल्यावर मुलांचें वय साहजिकच २५ चे वर व मुलींचे १६ चे वर असे. या पद्धतिमुळें बालविवाहाचा शिरकाव होण्यास वाव नव्हता. पण शिक्षणाची मर्यादा जसजशी कमी होत गेली तसतसे बालविवाह प्रचारांत येत गेले.

बालविवाहाचें दुसरें सबळ कारण ह्मणजे आह्मांवर १५०० वर्षे सतत अबाधित असणारी मोंगलांची आसुरी सत्ता ही होय. आमची सनातन वैदिक संस्कृति ज्या कालीं परकीयांची गुलाम बनली तोच दुर्दैवी काल आमच्या अनिष्ट बालविवाहास कारणीभूत झाला. मुसलमानी सत्तेनें आमच्या पवित्र आर्यस्त्रियांवर जें अनन्वित अत्याचार सुरू केले तेच आमच्या घातकी बालविवाहास कारणीभूत झालेत. मुसलमानांचा पहिला हल्ला सिंधवर होऊन महंमद कासीमनें हजारो सुंदर स्त्रिया इराणला दासी ह्मणून रवाना केल्या. महंमद गझनवीने लक्षावधी स्त्रिपुरुषास गुलामगिरीचा अहेर केला. शिकंदर लोदी व औरंगजेब यांच्या राक्षसी राजवटींत अबलांवर असह्य अत्याचार झालेत. उलटपा काळजाच्या पोर्तुगीजांनी, हिंदूंनी हिंदुधर्मविधीप्रमाणें लग्न करतां कामा नयें असे कायदे केलेत.

वरील भयंकर अत्याचारानें हिंदूंना जीविताची शाश्वती उरली नाही. तरुण अशा पोरी जर लग्नाविरहित राहूं लागल्या तर मुसलमानांची पापी दृष्टि त्यांचा घात करीत असे. लग्न झालेल्या तरुण मुलींवरच जर इस्लामियांचे हल्ले होऊन त्यांच्या पातिव्रत्याची, नव्हे त्यांच्या सर्वस्वाची होळी होत असे तर तरुण अविवाहित कुमारिकांवर त्यांचा किती गहजब होत असेल याची बरोबरच काय पण थोडीसुद्धां कल्पना मला करवत नाही. आणि याचकरिता आमच्या आर्यस्त्रियांची नीति—हिंदुसंस्कृतीचें वैशिष्टय – रक्षण करण्याकरिता आमच्या पूर्वजांनी बालविवाहास चालना दिली. मुलीचें लग्न ती तारुण्याच्या बहरांत येऊन मुसलमानाच्या डोळ्यात भरण्यापूर्वीच तिच्या शूर पतीशीं करून दिल्या जात असे. तसल्या परिस्थितीच्या काळीं असल्या रुढीमुळेंच आमचें शील रक्षण करण्यास बरीच मदत झाली. बालविवाहाच्या ढालेवरच त्या काळीं आह्मी मोंगली अत्याचार अडवूं शकलों. अशा त्या बालविवाहात 'अकलमंदी' नसून 'अज्ञान' होतें ह्मणणे योग्य होईल का? इत्यादि

च्छेवर वृक्ष वाढावा, प्रवाशानी त्याच्या शीतल-च्छायेंत चंडांशूच्या तापापासून आपलें रक्षण करावें, दीर्घ कालानंतर तो वृक्ष जीर्ण व्हावा, प्रवाशांच्या पथावर त्याच्या कुजलेल्या खांद्या वाड यांव्यात आणि प्रगतिपथ मोकळा करण्या-करिता नवप्रवाशानीं त्या जीर्ण वृक्षाचा समूळ उच्छेद करावा हें ठीकच. पण त्यानें बजाविलेल्या कामगिरीची ओळख विसरून त्याबद्दल अनादर व्यक्त करणें, ह्मणजे केवळ कृतघ्न-पणाच होय. १५०० वर्षांच्या सतत चालू असलेल्या अत्याचारामुळें ही रूढी अशीच कायम ठेवणें भाग पडलें आणि ह्मणून ती इतक्या वर्षांच्या सहवासानें समाजाच्या रोमरोमीं भिनली आहे. ती एकदम कशी निघूं शकेल.

बालविवाहाचें तिसरें कारण ह्मणजे आमच्यांत एकदाच बोकाळलेली अनीति होय. ज्ञानेश्वरापासून तों रामदासापर्यंतचा इतिहास पाहिल्यास आमची नीति किती भ्रष्ट झाली होती हें कळेल. समर्थ त्या काळाचें वर्णन करितात कीं,

नीतिमर्यादा उडाली । भक्ति देवाची बुडाली ॥
बुद्धी पापाचा कंटाळा । येतो हव्यास आगळा ॥
ऐसा सुबुद्धी नावडे । मन धावें पापाकडे ॥
ह्मणे रामदास ह्मणें । पुण्य उणें पाप दुणें ॥

अशा या बेबंद परिस्थितीमुळेंच बालविवाह रूढ झाले. त्या काळचे कित्येक उन्मत्त गुंड उद्योग व्यवसायामुळे तरुण कुमारिका भ्रष्ट करीत. अशा भीषण परिस्थितीनेंच बालविवाह समाजांत दृढतर केलेत.

बालविवाहाचें चवथें कारण आमच्या देशाचें [illegible] होय. पाश्चात्य संस्कृतींत बालविवाह जवळ जवळ केव्हांच न दिसून येणाऱ्या पुष्कळ कारणांपैकीं पहिलें ह्मणजें त्यांच्या नीतीचें [illegible] असमानांत तर आमचें पृथ्वीवर आहे. दुसरी गोष्ट, स्वतंत्रता. तिसरी, उदरंभरणासाठी [illegible] लागणारे कष्ट. चवथें कारण, त्यांची थंड हवा चैतन्यास कारण होऊन त्यांना सतत कर्तव्यतत्पर ठेवीत असते आणि कर्तव्यतत्परता ही वैवाहिक सुखाची लालसा कमी करते. याउलट आमची स्थिति आहे.

आतां संततीच्या दृष्टीने बालविवाह हे सर्वस्वीं सदोष आणि प्रौढविवाह अगदीं निर्दोष असेंहि ह्मणतां येणार नाही. बालविवाहापासून जसे ज्ञानेश्वर, रामदास, शिवाजी सारखें महात्मे निर्माण झालेत तसेंच प्रौढविवाह अभिमन्यु, भरत ( दुष्यंतपुत्र ) यासारख्या अलौकिक व्यक्ति प्रसूत करते झाले. बालविवाहापासूनची प्रजा जशी अशक्त, कुचकी, रोगी, त्याचप्रमाणें प्रौढविवाहाची प्रजा आपणास सद्यस्थितींत नजरेस येते. यावरून बाल वा प्रौढविवाह हें सशक्त आणि तेजस्वी संततीस कारणीभूत होऊं शकत नाहीत तर शरीराचा सशक्तपणा आणि ब्रह्मचर्याश्रमांतील अपूर्व तयारीच जास्त श्रेष्ठ ठरते.

याप्रमाणें आह्मी बालविवाहासंबंधी सामान्यतः विचार केला. यावरून बालविवाह उत्तम असें आमचें मत आहे असें बिलकुल समजूं नये. इंग्रजांच्या सत्तेचा उदय ज्या कालीं आमच्या देशांत झाला तेव्हांच आमच्या बालविवाहाचा अवतार संपला. इंग्रजी सत्तेने आमच्या जीवनास बरीच शांतता प्राप्त केल्यावर आणि पाश्चात्य संस्कृतीचें सतत संघर्षण चालूं असतां ही आत्मघातकी रुढी बंद न होणें हें आमचें मोठेंच दुर्दैव समजलें पाहिजे. बालविवाहाच्या चालीमुळें आमची आयुष्यमर्यादा तर कमी झालीच; परंतु तीबरोबर ऐहिक आणि पारलौकिकतेची—उन्नति तर राहोच—पण पीछेहाट होऊन—घसरगुंडी होतां होतां—आह्मी आजच्या बुद्धिनष्ट, वीर्यलुप्त आणि संस्कृतिभ्रष्टतेस प्राप्त झालों.

गेल्या ५०—६० वर्षांत बालविवाहाचा वाद घुसळतां घुसळतां त्यांतून शारदा-नवनीत

निर्माण झालें. बालविवाहाचा पुरस्कार करणाऱ्या रुढीप्रिय अज्ञानी लोकांना अर्धवट सनातनीय सुशिक्षितांनी 'जीवशास्त्र व मानसशास्त्र' यांचा पाठिंबा दिला. परंतु १२-१३ वर्षानंतर मुलीचें लग्न करणें हें 'जीवशास्त्र व मानसशास्त्रदृष्टया अनिष्ट नाही,' याविषयी त्या त्या शास्त्रांत निपुण असलेल्या जगत्मान्य यूरोपीय विद्वानांचीं मतें प्रसिद्ध झालीं. वुइल्यम् मॅकडोनाल्ड ह्मणतो, 'मानसिक व्यभिचार वगैरे कोणतेहि संभव दाखवून बालविवाहाचें समर्थन करणें शक्य नाहीं. या बाबतीत विशेष आवश्यक गोष्ट ह्मणजे घरीं व शाळा-कॉलेजांतून तरुणजनांचा स्वाभाविक व वारंवार परिचय घडून येणें ही आहे. यामुळें आपल्या आवडीप्रमाणें पतीची निवड करण्याची मुलीला योग्य संधि मिळते.' कारसॉन्डर्स प्रसिद्ध करितो कीं, 'जीवशास्त्रांतील कोणत्याहि विचाराअन्वयें ऋतुप्राप्तीनंतरहि लग्न कांही काल लांबणीवर टाकणें हेंच श्रेयस्कर आहे. बालपणींच माता झालेली मुलगी व तिची प्रजा यांना अतिशय त्रास आणि यातना भोगाव्या लागतात.' यावरून आमचा वीरशैवसमाज योग्य तोच धडा घेतील असें आह्मास वाटतें. प्रौढ विवाह प्राचीन काळीं प्रचारांत होते यावर सविस्तर विवेचन श्री. काटकर यांनी सोदाहरण केलें आहे, तेव्हा त्याचें पुन्हा चर्वण करण्याचे प्रयोजन नाहीं.

आतां छद्मीशब्दांचे विषारी बाण सोडण्यापेक्षां बिवाहाने संघटनेला मदत होते हें ह्मणणें सामान्य बुद्धीस अतर्क्य नाहीं. आंतर्जातीय मिश्रविवाह वीरशैवांत घडून यावे असें आमचेंहि पूर्ण मत आहे. पण ते घडून येण्याकरिता शिक्षणाचा व संस्कृतीचा प्रसारहि वीरशैवांत जोराने व्हावयास पाहिजे. आह्मांला जी संघटना करावयाची आहे ती केवळ गोल दगडांची नव्हे! अशा गुळगुळीत दगडांचा ढीग जरी एकत्र केला तरी तो ढासळण्यास वेळ लागणार नाही. त्याचे आम्हांस घासून-पुसून चौकोनी दगड बनवून अभेद्य तट बनवावयाचा आहे ह्मणजे तो अनंतकालात ढासळणार नाही.

श्री. काटकर यांनी उच्च-कनिष्ट यांच्यामध्ये विवाह झाल्याची जीं उदाहरणें दिलीं त्यांतच जातीभेदाचें मूळ आपणास दिसून येईल. त्या काळीं असवर्ण विवाहास सुरुवात झाली त्याच वेळी जातीचें मूळ समाजांत घुसल्या गेलें. बुद्धिमान् ब्राह्मणांनी असंस्कृत आणि अज्ञ लोकाशीं जेव्हा व्यवहार सुरु केला तेंव्हाच उच्च संस्कृतीस उतरती कळा लागली. या व्यवहारापासून झालेली प्रजा तेजस्वी व होती तेजहीन निघाली. अशाच कारणानी एकीची वेकी होऊन असंख्य जाती निर्माण झाल्यात असें आपणास इतिहासांत आढळेल. हा अनिष्टपणा जर आह्मास टाळावयाचा असेल तर बहुजनसमाजास सुशिक्षित व सुसंस्कृत बनविले पाहिजे. वीरशैवांतील भाषेचा आणि पोषाखाचा गांवढळपणा घालविला पाहिजे. त्याचप्रमाणें वरिष्ठ जातींतील समाजासारखी आपली गृहव्यवस्था व आचारविचारशिक्षणाची जोड देऊन स्वत: धारण करणें प्राप्त आहे. तेव्हां बुद्धिपुरस्सर मला तरी असें ह्मणता येईल कीं, प्रथम शिक्षण आणि संस्कृतीचा प्रसार विश्वविद्यालया संस्थांतर्फे करून सहभोजन व मिश्रविवाह यांना दुय्यमस्थान द्यावें. अशा रीतीनें आमची सुधारणा जरी मुंगीच्या पायानें होईल तरी ती हत्तीच्या पायाइतकीच मजबूत आणि चिरस्थायी होईल. सुशिक्षित समाजाने अज्ञसमाजास निःस्वार्थीपणानें मदत करून आणि दोघांनी एकत्र होऊन जर शिक्षणाचा रथ भरधांव सोडला तर तो थोडक्याच कालावधींत सहभोजन आणि मिश्रविवाह यांच्या सरहद्दीवरच नव्हे तर त्याच्या पलीकडे जाऊन धडकेल!

मिश्रवांतजातीय विवाहावर जरी आह्मास फारसा जोर देतां येत नसला तरी प्रौढसंमतिविवाह वीरशैवास टाळणें फलदाई होणार नाही. वधूनें आपल्या आवडी-निवडीप्रमाणें योग्य वर पसंत करणे ही चाल नवी नसून ती पूर्वी प्रचारात होती हें खालील पुराव्यावरुन सिद्ध होईल.

'स्त्रियो योषामर्यंति वधूयोः
परिप्रीता पन्यसा वार्येण ।
यस्तवृधंवति यत्सुपेशाः
स्वयं सा मित्रं वनुते जनेचित् ॥

'युक्त वधू' त्यांना वरण्याची इच्छा असणाऱ्या वराच्या संपत्तीलाच भुलतात. तथापि सुंदर आणि सुस्वभावी मुली त्यांना प्रिय असलेल्या वरालाच वरतात.'

प्रौढविवाह प्रचारांत आल्यास संमतितत्व-प्रचारांत येऊन वधूवरें महत्त्वाकांक्षी होतात व प्रजानिर्मितीहि योग्य प्रमाणांत व उत्तम अशी चालते. प्रौढविवाह होत नसल्यानें आमची प्रजा वर्षेंवर्षीं खालावलेली दिसते. ही स्थिति टाळण्याकरितां लोकांनी एकदम स्वयंवरेंच अंमलांत आणावीं असें आगरकर सांगत. 'जीं स्वयंवरें नाहीत त्या सर्वांस आह्मी बालविवाह समजतो ! ज्याचें त्याने लग्न करणें ह्मणजे स्वयंवर, एकाने दुसऱ्याचें लग्न करणें ह्मणजे बालविवाह, असें आगरकरांचें विवाहाबद्दलचें तेजस्वी मत होतें. '

(अपूर्ण)

---

# वीरशैवधर्मसंस्थांचे अस्तोदय न होतां पूर्णोदय होण्याची चिन्हें

(लेखक—पांडुरंग भावलिंग स्वामी सोंडकर, उपाध्यक्ष, वी. मा. मंडळ मुंबई.)

अनादि काळापासून जगाची संस्कृति व सुधारणा चालू आहे आणि पुढेहि तशीच चालू राहील असें दिसतें. प्रत्येक विशिष्ट काळीं [illegible] सुसंघटित समाज, समाजाची अगर [illegible] सुधारणा करण्याचें काम आपलें आहे असें समजत आले आहेत. आजहि युरोपिअन [illegible] जग सुधारण्याचा मक्ता आपलेकडे [illegible] असें प्रामाणिकपणें समजतात असें दिसतें. [illegible] जगाची अगर समाजाची सुधारणा [illegible] या शब्दप्रयोगाची जास्त छाननी करणे [illegible] आहे. प्रस्तुतच्या जगाकडे नजर [illegible] बल आणि सामर्थ्य यांनी संपन्न व सुसंघटित असे युरोपिअन समाज हे तदितर जग हें उपभोग्य वस्तु आणि आपण स्वतः उपभोक्ते असें समजतात असें प्रांजलपणें दिसतें, व जगांतील संपत्ति जातीचें आक्रमण करून, आपलें स्वतःचें सुखस्वास्थ्य वाढविण्याच्या कामाकडे त्याचा उपयोग करीत असतात. व तें जास्तीतजास्त काळ टिकावें ह्मणून जरूर तेवढें सुखस्वास्थ्य, इतर जगास अगर समाजास उपलब्ध करून देणेंचा अस्त झालेला दिसतो. अशा स्थितींत प्रत्येक स्वतःचें पायावर अगर सुसंघटितेच्या सामर्थ्यांवर उभा राहून कार्यक्षम होणाऱ्या सुसंघटित समाजापुढें हें

स्वार्थमूलक आक्रमणशीलतेचें ध्येय, हें संस्कृतीचें ध्येय ह्मणून ठेविलें जाईल तर सर्व समाज व मनुष्यजात केवळ एकमेकांस भक्षण करणाऱ्या अशा एक प्रकारच्या हिंस्त्र श्वापदांचा कळप होऊन राहील. क्रियाप्रतिक्रियारूप रहाटगाडग्याच्या फेंऱ्यात एकेक समाज अगर मनुष्यजात दुसऱ्या मनुष्यजातीवर आक्रमण करीत करीत उदयास्त पावेल. हे भरती — ओहोटीचें हेलखावे खात असतां समष्टीरूप समाजाची व मनुष्यजातीची उत्क्रांति व सुधारणा कांहीच न होतां मानवी पशुवृत्तीच, निरनिराळे पेहेराव घेऊन जगांत वावरतांना दिसेल. मनुष्याच्या स्वभावांत पालट होऊन त्याच्या वृत्तींत मृदुलता, कारुण्य, शांति, कोणत्याहि समाजाच्या प्रमुख कार्यकर्त्यांबद्दची जिज्ञासा, आदर, प्रेम, आपुलकीची भावना, व सभ्यपणा, हे गुण सहजप्रवृत्तीने उदयास आलेले दिसणें हेंच आपण साधारणत: मानवी संस्कृतीचें पर्यवसान समजतों. हे गुण पुढारलेल्या समाजामध्ये विशेष प्रमाणांत सहज प्रवृत्तीनें पैदा होत असलेले दृष्टीस पडतात. वीरशैवधर्मसंस्कृतींत मात्र वर दाखविलेल्या गुणांचा लोप झालेला दिसण्यांत येंतो हें वीरशैवधर्माचें दुर्दैव समजलें पाहिजें व हेंच वीरशैवधर्मसंस्थाचे अस्तोदयाला कारणीभूत आहें असें कष्टानें ह्मणावें लागतें. अट्टाहासानें उत्पन्न करणारें, समाजसुधारणासारखे प्रयत्न यशस्वी होत नाहीत. अर्थात् आपला समाज व इतर समाज अथवा उपभोक्ता व उपभोग्य असें जगाचे दोन भाग पाडून अधिकाधिक, लौकिक, आर्थिक भरभराट साधण्याचा अखंड प्रयत्न करणें, हें समाजसंस्कृतीचें ध्येय समजण्यांत मोठी चूक होत आहे. हेंच ध्येय समजून जगांत अनेक मानवजाती व समाज, कांही काळ चमकून, लय पावल्या. त्याच्या चमकी ह्याच संस्कृति व सुधारणा समजल्या गेल्या. हेंच ध्येय समजणाऱ्या प्रस्तुतच्या समाजाचीहि तशीच गति होईल, व पुढेंहि तसेंच होत राहील. अखिल वीरशैवसमाजसंस्कृति व सुधारणा साधण्याच्या कामीं हें ध्येय अगदी निरुपयोगीं आहे, असें आमचें मत आहे. तेव्हा असुरी प्रवृत्तीचा लोप होऊन, सात्विक बुद्धीचाच प्रभाव वाढला पाहिजे.

---

# वीरशैवांतील चळवळी

## मध्यप्रांत-वऱ्हाड-वीरशैव प्रांतिक परिषद्.

### अधिवेशन दुसरें.

कारंजा, ता. मूर्तिजापूर, जि. अकोला, येथें भरणार आहे. अध्यक्षस्थानीं धुळें येथील सुप्रसिद्ध वीरशैव पुढारी श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर यांची योजना झाली आहे. परिषदेच्या तारखा ८ व ९ मे १९३७ आहेत.

### उद्देश

मध्यप्रांत आणि वऱ्हाडमधील वीरशैवांचे ( लिंगायत ) प्रांतिक अधिवेशन ता. ८ व ९ मे रोजीं कारंजा मुक्कामीं भरणार आहे, पंधरावीस वर्षांपूर्वी अशीं प्रांतिक अधिवेशनें भरत ह्या भागांतील सर्व वीरशैवबंधू संघटित होण्याचा मार्ग काढीत असत. गतवर्षी असें प्रांतिक अधिवेशन बुलढाणा जिल्ह्यांतील रोहिणखेड मुक्कामी

…ल पुढारी श्रीमंत रामचंद्रशेठ कुल्ली …च्या परिश्रमानें श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबा… देशमुख पारवा, पाहूपळचे सुप्रसिद्ध …गीरदार, ह्यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या …तन्हेनें पार पडलें व अनेक कार्यांस … अधिवेशनानें चालना दिली.

### परिषदेचे अध्यक्ष

…वतमाळ - जिल्हा - वीरशैवपरिषदेचें …धिवेशन तळेगांव मुक्कामीं नुकतेच पार पडलें. …नें श्रेयहि रोहिणखेड–परिषदेच्या सूत्रधा… …आहे. कारंजा येथें ता. ८ व ९ मे …रणारें प्रांतिक अधिवेशन धुळें येथील … सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ सिद्धाप्पा अण्णा …ईकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरत आहे. …देश व व्हाड ह्यांचे संबंध जुळले जावेत … अध्यक्षस्थानीं धुळें येथील वीरशैवांचे … नेते श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा ह्यांची …स्थानी स्वागतमंडळानें एकमुखी योजना … आहे. त्यामुळें मध्यप्रांत,वऱ्हाड व खानदेश … भागांतील वीरशैवांत साखळी जुळविली … व विशिष्ठ प्रकारच्या वीरशैवसंघटनेला तेज … असा स्वागतमंडळास पूर्ण भरंवसा आहे.

### स्वागतमंडळाचे सभासद

…षदेचें अधिवेशन यशस्वी व्हावें ह्मणून …मंडळाची योजना केली आहे. आणि … २५, १०, ५ व ३ फी देणाऱ्या कोणाहि … बंधूस स्वागतमंडळाचे सभासद होण्याचा …कार आहे.स्वागतमंडळाच्या प्रत्येक सभासदाला …देच्या प्रतिनिधीचे सर्व हक्क राहतील.

### परिषदेचे प्रतिनिधी

… दोन रुपये देऊन परिषदेचे प्रतिनिधी … त्यांच्या उतरण्याची व जेवण्याची … स्वागतमंडळाने करण्याचें योजिलें आहे. … प्रतिनिधींना जेवण्याची व उतरण्याची … नको असेल त्यांना प्रतिनिधी–फी १ … परिषदेला येणाऱ्या प्रत्येक प्रति- … पाहुण्याने बरोबर आपापला बिछाना … पाचे मांडें आणावें अशी स्वागत- … विनंती आहे.

### परिषदेकरिता स्वयंसेवक

परिषदेला येणाऱ्या प्रतिनिधींना उतरण्याच्या जागीं आणणे, त्यांची सर्व व्यवस्था पाहणें, प्रसंगीं जेवण काढण्यास मदत करणें, वगैरे कामाकरिता स्वयंसेवक बंधूंची गरज आहे. तरी हीं कामें करून वीरशैव बंधूंची सेवा करण्याची ज्यांची तयारी असेल त्यांनी आपलीं नावें पूर्ण पत्त्यासह आगाऊ कळवावीं व त्यांनी परिषदेच्या आदल्या दिवशीं येथे येऊन पोहो-चावें. त्यांच्या जेवण्याची मोफत व्यवस्था स्वागत-मंडळामार्फत होईल, व त्यांना परिषदेला कोण-तेहि पैसे न पडतां हजर राहतां येईल. ह्या-पैकीं कांही स्वयंसेवक सुबुद्ध असल्याचे आढ-ळल्यास त्यांना विषयनियामक मंडळांत बस-ण्याचा व सभेच्या वादविवादात भाग घेण्याचा हक्क राहील, व तो स्वागतमंडळाचे अध्यक्ष आपल्या अधिकारांत अशा योग्य इसमास बहाल करतील. तरी स्वयंसेवक होऊं इच्छि-णारांनी आपलीं नांवें लवकर दाखल करावीत.

### प्रेक्षकवर्ग व भगिनी.

प्रेक्षक ह्मणून जे परिषदेच्या स्थानीं येतील त्यांना कोणतीहि फी पडणार नाहीं. पण परि-षदेच्या जागेंत जेवढ्या प्रेक्षकांची व्यवस्था होईल तेवढ्यांनाच आंत सोडले जाईल. ज्या भगिनी परिषदेला येतील त्यांना कोणतीहि फी पडणार नाहीं. परिषदेंत वादविवाद करण्याचा वगैरे त्यांना हक्क राहील. तरी सुविद्य भगिनींनी परिषदेला अवश्य यावें अशी विनंति आहे.

### परिषदेंतील विषय व ठराव.

परिषदेपुढें ज्या प्रतिनिधीला ठराव आणाव-याचे असतील त्यांनी ते ता. १ मेच्या आंत स्वागतमंडळाकडे पाठवावेत. ज्या अधिकृत प्रतिनिधींचे ठराव आगाऊ येतील तेच परिषदेचे विषयनियामक मंडळ चर्चेला घेईल. आयत्या-वेळीं कोणताहि ठराव प्रतिनिधीला आणतां येणार नाहीं. तथापि कोणत्याहि ठरावाला विषयनिया-मक मंडळांत उपसूचना आणतां येईल, व अध्य-क्षांच्या परवानगीनें परिषदेंतहि अशी उपसूचना

आणता येईल. पण परिषदेच्या विषयनियामक मंडळांत जे ठराव व ज्या उपसूचना चर्चेला येणार नाहींत त्यांना अधिवेशनांत परवानगी दिली जाणार नाहीं. प्रत्येक वक्त्यानें अध्यक्षाची आज्ञा प्रमाण मानलीच पाहिजे.

### प्रतिष्ठित पाहुण्यांची व्यवस्था

परिषदेचे अध्यक्ष व जे चांगले प्रतिष्ठित सद्गृहस्थ परिषदेला येतील त्यांच्याकरिता निराळ्या खास जागा स्वागतमंडळ राखून ठेवणार आहे. पण त्यांनीं जागेबद्दल व बरोबर येणाऱ्या मंडळींच्या संख्येबद्दल स्वागतमंडळास आठ दिवस तरी आगाऊ कळविलें पाहिजे.

### परिषदेंत एकीकरणावर वाद

ह्या प्रांतिक परिषदेंत पोटजातींच्या एकीकरणावर सर्व बाजूंनीं वादविवाद होईल असा रंग दिसतो. ह्याकरिता सनातनी, नवमतवादी व सुधारणावादी वगैरे सर्व वीरशैव बंधूंनी यावें, आणि प्रतिनिधी व स्वागतमंडळाचे सभासद होऊन वादविवादांत भाग घ्यावा व योग्य वाटेल त्या बाजूला मत द्यावें अशी विनंती आहे व अध्यक्ष ती खबरदारी घेतील. विषयनियामक मंडळांत, वादविवादांत भाग घेणारे वक्ते निश्चित होतील व त्यांचा वेळहि मुक्रर होईल.

### परिषदेचा कार्यक्रम

परिषदेचे अध्यक्ष ता. ८ रोजीं सकाळीं येतील. त्यांचें स्वागत होऊन त्यांना उतरण्याच्या जागीं पोहचतें केले जाईल. दुपारी ४ च्या पुढे नाटकगृहांत परिषदेला सुरुवात होईल. ह्या प्रसंगीं अध्यक्ष व पाहुणे ह्यांना मिरवत सभास्थानीं आणण्यांत येईल. नंतर स्वागताध्यक्ष व अध्यक्ष ह्यांचीं भाषणें झाल्यावर विषयनियामक मंडळ निवडण्यांत येईल व विषयनियामक मंडळाच्या कामाला सुरुवात होईल. दुसऱ्या दिवशीं सकाळीं व दुपारी अधिवेशनाच्या बैठकी होऊन रात्री अधिवेशन संपेल.

### जाहीर विनंती

तरी मध्यप्रांत — वऱ्हाड व खानदेश ह्या भागांतील वीरशैव बंधु - भगिनींनी स्वागतमंडळाचे सभासद, प्रतिनिधी व स्वयंसेवक होऊन हें अधिवेशन यशस्वी करण्यास सर्वतोपरी सहाय्य करावें अशी स्वागतमंडळाची प्रार्थना आहे.

आपले नम्र

भाऊराव देवाप्पा विभूते, स्वागताध्यक्ष.<br>
सोमाप्पा नथाप्पा पांगरे, खजिनदार,<br>
सदाशिवआप्पा शंकरआप्पा बोनटे ज. सेक्रेटरी.<br>
विश्वनाथआप्पा दगडाप्पा तांदळे " "<br>
नागनाथआप्पा मारोतीआप्पा पापरे सेक्रेटरी<br>
जगन्नाथआप्पा सदाशिवआप्पा होनराव "<br>
आप्पा पुंजाप्पा पेटें "<br>
स्वागतमंडळ, म. प्र. वी. प्रां. प., कारंजालाड,<br>
वऱ्हाड.

ता. क.:— परिषदेबाबतीत पत्रव्यवहार जनरल सेक्रेटरीच्या नांवावर करावा.

---

### मिरज

येथें ता. १४ मार्च रोजीं संध्याकाळीं ४ वाजता अखिल-भारतीय-वीरशैव माळी समाजोन्नति कार्यकारी मंडळीची सभा भरली होती. मिटिंगकरतां सर्व जिल्ह्यांतून मंडळाचे सभासद हजर होते. मिटिंगचें काम श्री. शंकरराव बलवंतराव माळी यांचे अध्यक्षतेखालीं ५ तास चालून बऱ्याच महत्वाच्या गोष्टींचे निर्णय करण्यांत आले. पैकीं महत्वाच्या बाबी:- ( १ ) प्रेस उभारून वर्तमानपत्र सुरू करणें, ( २ ) एक लाख रुपये फंड जमविणें, ( ३ ) मंगळवेढ्याचें परिषदेंत पास झालेल्या ठरावांचा प्रसार करणें, ह्या होत. प्रत्येक सभासदानें चर्चेंत मनःपूर्वक भाग घेऊन कार्यक्रमता व्यक्त केली. झालेल्या ठरावाप्रमाणें प्रत्येक सभासदानें कार्य करण्याची हमी घेतल्यामुळें उत्साही वातावरणांत सभेचें काम रात्री ९ वाजता समाप्त झालें. असें एक बातमीदार कळवितात.

Rajashri 27 20001.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ एप्रिल १९३७ ( अंक ८ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बापणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— ' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जूनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवाच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— ' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रात अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— ' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

## महाराष्ट्रांतील पंचाचार्यमताचे पुरस्कर्ते



## श्रीगुरु राचलिंगस्वामी परांडकर

संपादक:— 'वीरशैव गर्जना', बार्शी.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियः वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें.) मिति वैशाख शु० ५ शके १८५९ (अंक ८ वा.

# नवमतवादी व येती कारंजा-परिषद्

## एकीकरणाच्या ठरावाचे

## दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांचे आव्हानाचा स्वीकार !!

( लेखकः—वि. तु. चौधरी बी. ए., अमरावती. )

आमच्या महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळानें आपल्या प्रांतांत वीरशैवांची एक परिषद् भरवावी असा ठराव पास केल्यानंतर मंडळाचा ज. सेक्रेटरी, ह्मणून साहजिकच ती परिषद् कुठें यशस्वी तऱ्हेनें भरवितां येईल ह्याची चिंता मला होती. तोंच कारंजा येथील आमच्या स्नेही मंडळीने हा मान कारंजासच मिळू द्यावा ह्मणून इच्छा प्रदर्शित केल्यामुळें ती तेथेंच भरविण्याचें अखेर निश्चित झालें, व सर्व कार्यकर्ती मंडळी जोमानें कामाला लागली.

प्रांतिक परिषदेविषयी समाजांत जागृति उत्पन्न व्हावी ह्मणून त्यापूर्वी एकादी जिल्हा-परिषद् भरविण्यात आल्यास त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या उत्साहाच्या वातावरणांत प्रांतिक

परिषदेच्या कार्यकर्त्यांनाहि काम करावयास सोपडावें हाहि उद्देश अशी परिषद भरविण्याच्या मुळाशीं माझा होता, व ही इच्छा प्रदर्शित करतांच माझे स्नेही व यवतमाळ जिल्ह्यांतील प्रसिद्ध कार्यकर्ते श्री. रामचंद्र पुराणिक, श्री. नामदेव आप्पा कोरे, श्री. राममाऊ घोटे वगैरे मंडळींनी यवतमाळ-जिल्हा-परिषद् भरविण्याचें अभिवचन देऊन त्याप्रमाणें श्रीगुरुमूर्ति वीरलिंग स्वामी व श्रीमंत माधवराव खंदाडे ह्यांच्या स्वागतमंडळानें तळेगांव मुक्कामीं अपेक्षेबाहेर यशस्वितेनें पार पाडली, हें जिल्हा-परिषदेला हजर असणाऱ्यांच्या, किंवा परिषदेचे अध्यक्ष व इतरांचींहि भाषणें व परिषदेंत पास झालेले ठराव वगैरे वाचून कुणाच्याहि लक्षांत येईल.

दे. भ. नानासाहेबांनी आपल्या लेखांत जे लिहिलें आहे कीं, तळेगांव-परिषदेंत वीरशैव तरुणांनी ह्या विषयाला ( पोटजातींचें एकीकरणें ) जाहीरपणे तोंड फोडलें, ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पोटजातीं-एकीकरणाचा ठराव कारंजा-परिषदेपुढे मांडल्या जावा व त्या दृष्टीनें साधक-बाधक विचारांचे प्रवाह समाजांत सुरू होऊन तो ठराव परिषदेपुढें मांडावयास आवश्यक अशी पार्श्वभूमि तयार व्हावी, एवढीच ह्या प्रश्नाला चालना देवून विषयाला परिषदेत तोंड फोडणाऱ्याची इच्छा व हेतू, व तो हेतु सफळ झाल्यावर, साहाजिकच “ हा प्रश्न लांबणीवर टाकावा”ही श्री. रामचंद्र आप्पा ऊर्फ मामासाहेब काळे, पारवा, ह्यांची सूचना सर्व तरुण मंडळींनी तटस्थ राहून पास होऊं दिली अशीवस्तुस्थिति आहे.

तळेगांव-परिषदचें विषयनियामक-कमेटीत पोटजाती-एकीकरणाबाबत श्री. नामदेव आप्पा कोरे ह्यांनी मांडलेला, व नेरपरसोपंतचे श्री. रामचंद्र आप्पा भगत ह्यांनी अनुमोदन दिलेला मूळ ठराव पुढीलप्रमाणे होता. धर्म व जातीचे संघटनेच्या दृष्टीनें निरनिराळे धर्में व जाती आपआपसांतील अनावश्यक पोटजाती निरनिराळ्या स्वरुपांत मोडीत आहेत. वीरशैवसमाजाच्या दृष्टीनें पोटजातीचें एकीकरण होणें आवश्यक आहे. विदान शीलवंत, दिक्षवंत, पंचम, ह्यांत सर्रास रोटीबेटी-व्यवहार होणें अवश्यक आहे व तो ताबडतोब सुरु करावा.”

### गुरु व जंगम अधिकृत “ एकीकरणाचे पुरस्कर्ते ”



(दे. भ. नानासाहेब् बामणगांवकर.)

ह्याला दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी पुढीलप्रमाणें उपसूचना मांडली व त्याला श्री. हरेश्वर मलकार्जुन घाटूळकर ह्यांनी अनुमोदन दिले.

श्री. बामणगांवकरांची उपसूचना:—‘वीरशैवांतील ज्या पोटजातींना अष्टावरणाचे अधिकार असतील व वहिवाटीने ज्या पोटजातींच्या येथें गुरु व जंगम रूढ असेल त्या सर्व पोटजातींत रोटीव्यवहार उघडपणें व्हावयास कोणतीहि हरकत नाही.”

श्री. नामदेव आप्पा कोरे ह्यांच्या ठरावांत एकीकरणाची मर्यादा “ विदान शिलवंत वि-

... पंचम " ह्यांनी ठरविली आहे व त्यांत "रोटीबेटीव्यवहार " हा शब्द आहे. ह्मणून वरील ठरावाला आह्मा तरुण मंडळीचा विरोध होता व आहे.

श्री. बामणगांवकरांचे उपसूचनेंत बेटीव्यवहार हा शब्द नसून रोटीव्यवहार हा मुत्सुद्दीत शब्द जरी आहे तरी त्या उपसुचनेत 'गुरु व जंगम रुढ असेल त्या पोटजातींत' असें एकीकरणाला कांटेरी कुंपण घालण्यांत आलें आहे. ह्मणून आह्मी श्री. बामणगांवकरांचें उपसूचनेच्याहि विरुद्ध होतो.

आह्मा तरुण मंडळीतर्फे ...रंबाचे दे. भ. सदाशिव आप्पा बोनतें ह्यांनी जी उपसूचना मांडली व जिला ... अनुमोदन दिलें ती उपसूचना पुढीलप्रमाणें होती:—

"श्री. नामदेव आप्पा कोरे ह्यांच्या वरील ठरावांत 'निदान' हा शब्द काढून ... 'एकंदर वीरशैवांत रोटी व्यवहार सुरु करावा.'"

आह्मी वरील उपसूचना ...ण्याचें कारण आह्माला ... ठरावाचें मर्यादित स्वरूप पसंत नव्हतें, ... श्री. बामणगांवकरांचे "गुरु व जंगम ह्यांची रुढ वहिवाट" ही ... पसंत नव्हती, हें आहे.

आह्मी सुधारणावादी किंवा नवमतवादी ... पोटजातीतील बेटीव्यवहाराला खरोखर अनुकूल असावयास पाहिजें होतें ते न व्हातां आह्मी विरुद्ध कां ? असें कित्येकांना मोठे गूढ वाटेल. किंबहुना आमचें हें लिहिणें किंवा वर्तन नवमतवादाला विसंगत आहे, असें ह्मणून आमचे बरेचसे हितशत्रु टीकेची कोल्हे-कुई सुरूं करतील. परंतु पोटजातींतील बेटीव्यवहारांबाबतीतील आमचें संपूर्ण सांगोपांग विवेचन पुढील अंकीं वाचल्यानंतर मग वाचकांनीं काय ती साधक - बाधक टीका करावी.

श्री. नामदेव आप्पा कोरे ह्यांच्या पोटजातीच्या एकीकरणाच्या ठरावांतील शीलवंत, दिक्षवंत व पंचम ही तटबंदी जरी श्री. बामणगांवकरांच्या उपसूचनेत फोडलेली दिसली तरी त्यांत गुरु जंगमाच्या रुढ वहिवाटी " चें कांटेरी कुंपण घातलेलें दिसतें, व हे कांटेरी कुंपण पोटजातीच्या एकीकरणाला नसावें असें आह्मी मंडळींचें स्पष्ट मत आहे.

वीरशैवसमाज अधिकृत सर्रास एकीकरणाचे पुरस्कर्ते.



(श्री. वि. तु. चौधरी, बी. ए.)

नवमतवादी लोक हे धर्मविध्वंसक आहेत व ते जंगमवर्ग समाजांतून नाहीसा करावा अशा मताचे आहेत अशा तऱ्हेची हाकाटी नवमतवादाच्या विरुद्ध नेहमी करण्यात येते. किंबहुना ज्या पोटभरू जंगमाच्या पोटावर नवमतवाद्यांच्या विचारसरणीमुळें व मतप्रचारामुळें पाय पडला आहे व त्यांच्या बुवाबाजीला कांहीसा आळा बसला आहे असे कांहीं जंगम 'नवमतवादी जंगमवर्गाच्या मुळांवर आले आहेत' अशा तऱ्हेचा मतप्रचार उघड उघड करूं लागले आहेत. व ह्या त्यांच्या मतप्रचाराला श्री. बामणगांवकरांच्या उपसूचनेच्या विरुद्ध मूळ ठरावाला जीं आह्मीं उपसूचना आणली

होती त्यामुळे अधिक जोराची चालना मिळेल ह्याची आम्हाला कल्पना आहे. परंतु म्हणून आम्हाला घाबरण्याचें किंवा आपला प्रामाणिक मतप्रचार बंद करण्याचें कांहीच कारण नाही. उलट गेल्या ता. १-४-३७ च्या वी. संजीवनीत श्री. वामणगांवकरांनी जें " पोटजातीच्या एकीकरणाच्या मर्यादित ठरावाच्या रूपाने जे आव्हान दिलें आहे त्याचा आम्ही जाहीरपणे स्वीकार करतों. तळेगांव-परिषद आटोपल्यावर एकीकरणाचे ठरावावर पत्रद्वारा व प्रत्यक्ष भेटीत मध्यप्रांत—वऱ्हाडांतील कांहीं प्रसिद्ध नवमतवादी कार्यकर्त्यांशीं जें बोलणें झालें त्यावरूनच आम्ही ' श्री. वामणगांवकरांचे आव्हान स्वीकारलें आहे, व प्रांतिक परिषदेंत नवमतवाद्यांच्या तर्फे एकीकरणावर स्वतंत्र असा ठराव आमच्या पक्षातर्फे मांडण्यांत येईल.

दे. भ. नानासाहेब वामणगांवकर व त्यांचे पक्षाविरुद्ध आम्ही व नवमतवादी पक्षीय मंडळी अशा तऱ्हेचा लढा प्रांतिक परिषदेंत दिसणार आहे. परंतु हा लढा अपरिहार्य आहे. हा प्रामाणिक मतभेदाचा प्रश्न आहे व ही गोष्ट श्री. नानासाहेब व आम्ही सर्व जाणून आहोंत. व ह्यांत वैयक्तिक व खाजगी स्नेहसंबंधाच्या विरोधाचें कांहीहि कारण नाही.

आम्ही श्री. वामणगांवकरांचे उपसूचनेच्या विरुद्ध असण्याचीं कारणें सविस्तरपणें परिषदेसमोर मांडूच, परंतु साधारणतः ह्या ठिकाणीं एवढेंच लिहूं इच्छितों कीं हा प्रश्न निव्वळ 'गुरु व जंगम ह्यांच्या रूढ वहिवाटीवर' अवलंबून ठेवूं नये. तो प्रश्न वीरशैवसमाजाचे शिष्टसंमत बहुमतावर अवलंबून ठेवावा. ह्याचा अर्थ आम्ही जंगमवर्गाचे विरुद्ध आहों असा नाही. आम्ही लोक जंगमवर्गाचे किंवा जंगमसंस्थेच्या मुळींच विरुद्ध नाही. किंबहुना समाजसंघटनेच्या दृष्टीने तोहि वर्ग समाजांत आवश्यक आहे. परंतु तो वर्ग समाजसंघटनेंच्या आड येत असेल, उपकारक न होतां अपकारक होत असेल, व जंगमसंस्थेंतील ज्या विकृतीमुळे ह्या वर्गाचें किंवा संस्थेचें पुढारीपण समाजास अपकारक होत असेल, तो ह्या वर्गांतील किंवा संस्थेतील विकृती किंवा दोषस्थळें कालपरिस्थित्यनुरुप दोन्ही वर्गातील भक्त व माहेश्वरवर्गीय पुढाऱ्यांनी एके ठिकाणी जमून नाहीसी करणें आवश्यक आहे, व जेणें करून जंगमवर्ग किंवा जंगमसंस्था अखिल—वीरशैवसमाजाला उपकारक पुरोगामी व उद्धारक ठरेल असे तांतडीचे प्रयत्न करण्याची वेळ आली आहे असे आमचें म्हणणें आहे. व ह्याचा अर्थ " नवमतवादी जंगम वर्गा "-विरुद्ध आहेत असा कुणास घ्यावयाचा असेल तर तो त्यांनी खुशाला घ्यावा.

श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर ह्यांचे येथील लग्नसमारंभातः- साखरखर्डा येथील स्वामी शिवैक्य झाल्यामुळे तेथील संस्थानचे नवीन पटाविषयी जाहीर विनंती वाचून दाखवितांना ता. ३१ मार्च रोजी सकाळी आडगांव येथे तेथे जमलेल्या ५-७ शे वीरशैव मंडळीसमोर माहेश्वरवर्गासंबंधी नवमतवाद्यांचे तर्फे मी जें बोललों त्याचाहि आशय वरीलप्रमाणेंच होता. नवमतवादी हे माहेश्वरवर्गाचे विरुद्ध आहेत असा तऱ्हेचा कांगावा व ढोंगी प्रचार काहीं लोक करीत आहेत. ह्याला आमचें उत्तर एवढेंच कीं, आम्ही माहेश्वरवर्गाचे किंवा जंगमसंस्थेच्या मुळीच विरुद्ध नाही. जंगमवर्ग हा वीरशैवांचा " पुढारी वर्ग " आहे हें आमचें शिरोभूषण आहे व ज्या अर्थी हें महत्त्वाचें भूषण व सामाजिक अलंकार आहे त्या अर्थी हें भूषण मस्तकीं धारण करतांना तें मस्तकावर धारण करण्यापूर्वी बरोबर आहे किंवा नाहीं हा त्या शिरोभूषणाच्या योग्यायोग्यतेसंबंधीची चर्चा करण्याचा आमचा हक्क आहे व ह्याचें कारण

त्व कीं, ह्या आमच्या परमपूज्य शिरोभू-षणात जरी कांही दोष असले तर त्याकडे पहून इतर समाजानी हसू नये व आपल्या समाजावही त्याचे हसे होऊं नयें एवढेंच आमचें म्हणणें आहे !! "

वरील आमच्या विचारसरणीचा शांतपणें विचार केल्यास आह्मीं जंगमवर्गाच्या विरुद्ध आहोंत किंवा तो नाहीसा व्हावा अशी आमच्या मनाची इच्छा आहे अशा तऱ्हेचा अनाठायीं आरोप करण्याचें धाष्टर्य कुणी करणार नाही अशी आह्माला उमेद आहे.

एकीकरणाचा प्रश्न गुरु व जंगम ह्यांचे वहिवाटीवरच सर्वस्वीं अवलंबून ठेवूं नये असो वीरशैवसमाजाने शिष्टसंमत बहुमतावर सोडावा. ज्यांतच त्यात माहेश्वरवर्गंहि येतोच.

'पोटजातीचे एकीकरण' ह्यात संघटनेच्या दृष्टीनें समाजसुधारणेचा शुद्ध हेतू आहे. व तो सामाजिक सुधारणेंत हेतु शुद्ध व पवित्र असावा. त्यांत व्यावहारिक बाबीची गैरवाजवी मिसळ किंवा पैशाच्यां देवघेवीचा संपर्क मुळीच नको. व म्हणून हा प्रश्न केवळ गुरु व जंगम ह्यांचे मर्जीवर किंवा दक्षणेच्या कमी अधिक संख्येवर अवलंबून नसावा हीच आमची अंतिम कळकळीची इच्छा आहे. पोटजातीचे एकीकरणांत माहेश्वरवर्ग वजिवात नक्को किंवा त्या वर्गावर बहिष्कार घालावा असें आमचें म्हणणें नाही; तर तो प्रश्न सर्व वीरशैवसमाजाने जिव्हाळ्याचा म्हणून बहुमतानें सोडवावा. त्यात माहेश्वरवर्ग आलाच. आमचें म्हणणें एवढेच की कोणत्याहि सामाजिक सुधारणेंत 'उदरंभरणाचें' किंवा 'आमची आर्थिक कल्याणा'चे व्यावहारिक स्वरूप नको. व ज्या ठिकाणी सामाजिक सुधारणेच्या नावाखाली 'आर्थिक कल्याणाची' दृष्टि धरून कोणी घेत असेल किंवा सामाजिक सुधारणेवर व्यावहारिक स्वरूपाची भूल असेल त्या सर्व ढोंगी सामाजिक सुधारणांना आमच्या पक्षाचा तीव्र विरोधच राहील.

'पोटजातीचें एकीकरण' करण्याबाबतीत कांही गुरुवर्गीयांनी, लिंगायत बुरुड, व लिंगायत गवळी ह्यांचेकडून फसवून वर्गणी गोळा करून साफ घशांत घातल्याची कांही एकीकरण न केल्याची आह्माला उदाहरणें माहित आहेत. व अशा स्वरूपाच्या बऱ्याचशा तक्रारी नेहमी ऐकूं येतात.

तत्वत: ज्या ठिकाणी पोटजातीचें एकीकरण होणें आवश्यक आहे तेथें दक्षिणेच्या कमी रकमेमुळे होत नाही व ज्या ठिकाणी तत्वत: एकीकरण होणें अनावश्यक आहे त्या ठिकाणी दक्षिणेची रक्कम फुगल्याबरोबर केल्या जाते. अशा परिस्थितीला आळा घालावा व सामाजिक सुधारणेला आर्थिक व व्यावहारीक स्वरूप येऊं नये तर एकीकरणाच्या रुपानें होणाऱ्या सामाजिक सुधारणेचें व संघटनेचें स्वरुप शुद्ध व सोज्ज्वल असावें ह्मणून आमचा दे. भ. नानासाहेबांच्या 'गुरु व जंगम रुढ वहिवाटी'च्या मताला विरोध आहे व आह्मीह या विषयावर आमच्या पक्षातर्फे स्वतंत्र ठराव परिशदेपुढे मांडू.

अपूर्ण

---

# विवाह आणि वैवाहिक जीवन

लेखांक दुसरा

( लेखक:—श्री. बाबाप्पा पनू. चपळगे, हिंगणघाट. )

शारदा–कायद्यानें आमच्यातील बालविवाहास जरी आळा बसला तरी अजून पुष्कळच बालविवाह घडून येणें ही गोष्ट आह्मास भूषणावह नाही. या कायद्याने विवाहापूर्वी जो काल दिला त्याचा योग्य विनियोग आह्मीं करावयास हवा. सद्यःपरिस्थितिप्रमाणें आह्मी उच्च परीक्षा उत्तीर्ण होणें तर आवश्यकच आहे, पण त्याबरोबरच इतर उपयुक्त ग्रंथांचें पठण, शरीरसंपत्ति, कला, व्यवहार इत्यादि गोष्टींत मुलांनी तसेच मुलींनी पारंगत होऊन आपल्या गृहस्थाश्रमाचा पाया भक्कम बनविला पाहिजें. जेव्हा आह्मी सुशिक्षित-सुसंस्कृत होऊं तेव्हाच 'प्रौढसंमतिविवाहास' –स्वयंवरास लायक ठरूं.

लहान मुलांना सुशिक्षित आणि सुसंस्कृत बनविण्याची बरीच जबाबदारी त्यांच्या पालकांवर पडते. त्याचप्रमाणें त्यांचे आचार–विचार वडिलमाणसाप्रमाणें बनतात. स्टिव्हनसन् ह्मणतो कीं, " Art for art " is their motto; and the doings of grown folk are only interesting as the raw material for play. " कलेकरिता कला असें त्यांचें ध्येय असतें; आणि वडिलधाऱ्या मंडळीचे आचार हेंच फक्त (त्यांच्या) खेळांतील आवडता कच्चा माल होय. याकरिता आमच्या वडील मंडळीचा आयुष्यक्रम अतिशय उज्ज्वल असावयास पाहिजे. ह्मणजे त्याचप्रमाणें—नव्हे त्याहिपेक्षां जास्त तेजस्वी आयुष्यक्रम आमच्या भावी पिढीचा होईल.

ह्या दृष्टीनें आह्मी आपल्या समाजांतील वैवाहिक जीवनाकडें दृष्टि फेकली तर तेथें आमची फारच निराशा होते. याचें कारण आमचा समाज स्त्रियांना शिक्षण आणि स्वातंत्र्य देण्यास तयार नाही. त्याचबरोबर पुरुषांची स्त्रियांवर असलेली अरेरावी सत्ताहि आह्मास भोवते. आमच्या भगिनींचा त्यांच्या पतिगृहीं थोडा देखील अधिकार चालत नाही. आमच्यापेक्षांहि जास्त प्रमाणांत ग्रीक लोक आपल्या स्त्रियांना स्वातंत्र्य देत नसले तरी त्यांचें स्त्रियाविषयीं उदारमत आणि प्रेंम खरोखर वाखाणण्याजोगे आहे. पतिगृहीं आलेल्या १५ वर्षे वयाच्या पत्नीबद्दल तिचा पति आपल्या अंतःकरणांतील सहानुभूतीनें ओलेचिंब विचार बोलून दाखवितो:—

" The greatest pleasure to me will be this, that, if you prove yourself my superior, you will make me your servent, and there will be no fear lest with advancing years your influence will wane; nay the better companion you are to me and the better guardian of the house to our children,........"

वर तूं पवहून श्रेष्ठ ( गुणांनी ) होसील, पला आपला दास ( गुलाम नव्हे ) बनविण्याची पात्रता आणशील, तर त्यातच मला सर्वोत्कृष्ट आनंद होईल. आणि कांही वर्षे निघून गेल्यावर तुझी किमत कमी होईल अशी भीति वाटण्याचें कांहीच कारण नाही. इतकेंच नव्हे तर तूं माझी उत्तम सखी आहेस, घरादाराची काळजी वाहणारी योग्य सत्ताधारी आहेस.

ही विचारसरणी ज्या काळची आहे तो काळ खचित स्त्रीस्वातंत्र्याचा नव्हता. मग आज तर स्त्रीस्वातंत्र्याची नौबत चौफेर झडत असतां वीरशैवसमाजानेंच तेवढा आपला रानटी-पणा सोडू नये याला काय ह्मणावें ! आपल्या प्राचीन काळीहि स्त्रियांची योग्यता किती श्रेष्ठ होती हें आपणास खालील उदाहरणाव-रून कळेल.

अघोरचक्षुरपतिघ्न्येधिवापशुभ्यः सुमनसुवर्चाः ।
वीरसूर्देवकामास्योना शनो भवद्विपदेशं चतुष्पदे ॥

'तुझे डोळे शांत असूं दे. नेंहमी आनंदी व सुंदर रहा. पतीच्या सुखाला जप आणि पशूचें पालन कर. पराक्रमी पुत्रांना जन्म दे. देवाच्या ठिकाणी भक्ति ठेव. आणि घरातील सेवकांचें आणि पशूचें संगोपन कर;

त्याचप्रमाणें:—

सम्राज्ञी श्वशुरेभव सम्राज्ञी श्वश्चांभव ।
ननांदरीसम्राज्ञीभव सम्राज्ञी अधिदेवृषु ॥

'सासू, सासरा, दीर आणि नंदा यांच्यावर तुझा अधिकार चालू दे.'

यावरून हेंच सिद्ध होत नाही का कीं आतां तरी आपण आपल्या स्त्रियांची योग्यता कशी ओळखावी, याकरितां झटावें. आज तरुण आणि तरुणी जर एकत्र जमले तर त्यांच्यांत कांही तरी काळे बेरे आमच्या समाजाच्या तीक्ष्ण दृष्टी-स दिसून येते. ते सरळ आणि निर्मळ अंतःकरणाचे असतील तरी यांच्या मनांत आपले त्यांच्याविषयी पापच दिसतें. त्यांत कांही वच दिसलें तरी त्यांचो कुटिल बुत्ति कल्पनेनें एखादा काळा डाग निर्माण करतील, आणि त्या काळ्या डागाचेच मग ते ढगांत रूपांतर करतील. ही आमची वाईट आणि अजागळ दृष्टि बदलावयास हवी. तरुण मुलांमुलींनी एकत्र जमून थोडावेळ एकत्र भाषण केलें तर त्यांत वाईट तें काय आहे ? एकमेकांचें हृद्गत सदसद्विचार – परस्परास निवेदन केले तर त्यांत दोष कोणता ? आमच्यातील हा पृथक्-पृथक्पणा जावयास नको का ? या योगानें आमचे विचार तर उत्क्रांतीस पावतीलच पण त्याहिपेक्षा समाजाची नीति जास्त बळकट होईल. याकरतां आमच्या समाजानें आपल्या कोत्या दृष्टीची बंधनें तटा-तट तोडून तिला उदार आणि व्यापकतेचा लगाम घालावयास नको कां ?

आतां 'सहवासोत्तर प्रौढविवाह' असावेत कीं नसावे याविषयी जर मला कोणी प्रश्न करील तर ते नसावेत असेच मी उत्तर देईन. याच्या कारणोपैकीं कांही कारणें ह्मणजें, सह-वासोत्तर विवाहाची सांगड बालू पाहण्याची विचित्र तऱ्हा, दुसरे सर्वसाधारण समाजाच्या दृष्टीनें हित वा अनहित; त्याचप्रमाणें त्याचा नीतीवर होणारा परिणाम.

ज्या दोन भिन्न व्यक्तींचा सहवासोत्तर विवाह घडून यावयाचा त्या दोन व्यक्ती थोडा काल कां होईना एकत्र येणें मुष्कील. एकत्र आल्याच तर वडील माणसासमोर एकमेकांचे गुणदोष कळणे त्याहिपेक्षां जास्त कठिण. कारण भावी पतिपत्नि या दृष्टीनें एकमेकांच्या गुणावगुणांचा परिचय होण्याकरितां खुल्या दिलाचें वातावरण पाहिजे. वडिलधाऱ्या मंडळीसमोर आमच्या विचारांची जी मुस्कटदाबी होते ती एकमेकांचा स्वभाव कळण्याच्या मार्गात आडवी येते. असें एवढेंहि वजा करून

आमच्या हृदयाचे पडसाद एकमेकांच्या हृदयांत निनादित झाले तर ठीकच, नाहींतर सहवासोत्तर विवाहाच्या आग्रहास्तव तोच प्रयोग अनेकवेळां जनतेच्या प्रेक्षकांसमोर करणें भाग पडेल. त्याबरोबरच होहि गोष्ट विसरून चालणार नाही कीं, तरुणांचीं हृदयें—मन—भावनामय असतात. प्रत्येकास वाटतें कीं, आपणास सुंदर-सुरेख-पत्नी वा पति मिळावा. आणि दिखाऊ सुंदरतेवरून आमचा पुष्कळसा तरुण वर्ग वश्य होत होतो. आणि त्यांतच लक्ष्मीचा वरदहस्त असला तर मग विचारावयासच नको. मग-एकमेकांच्या गुणावगुणांचें प्रतिबिंब परस्परांच्या हृदयांत पहावयास न सांपडलें तरी मोरोपंतांनी आपल्या केकावलींत म्हटल्याप्रमाणें—' न जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषही चांगलें '— वदून यावयास वेळ लागणार नाही. या नियमास अपवाद ठरणार नाहीत असें नाही; पण सर्वसाधारण समाजाच्या दृष्टीने पाहिल्यास वरील गोष्ट आह्मांस नाकबूल करितां येणार नाही.

आह्मीं ' परस्परांच्या धोक्याची स्थळें ' जरी पूर्ण जाणून असलों तरी समाजाच्या दृष्टीने—बहुजनसमाजाच्या दृष्टीने पाहिल्यास वीरशैवांत सर्वच शुकाचार्य वा प्रतिभीष्म नाहीत. प्रत्यक्ष तपोनिधी विश्वामित्राला मेनकेने भुरळ घातली. हजारो अप्सरांच्या नंदनवनात रुळणारा दुष्यंत रानांत उमललेल्या गोंडस मधुर पुष्पापुढें—शकुंतलेपुढें—विरघळून गेला. त्या ठिकाणी वीरशैवातील रजो व तमोगुणी नवसुशिक्षित तरुणांचा काय केवा ! वा सनातन वीरशैवसमाजा, आजच नव्हे तर अनंत भविष्यकाळाच्या उदरांत केव्हा तरी नीतीच्या परमोच्च शिखरावर चढून पूर्णत्वानें सहवासोत्तर विवाहाच्या हातांत हात घालू शकशील का !

समजा एखाद्या सुंदर तरुणीवर एखाद्या सुशिक्षिताचें प्रेम जडलें—नव्हे तिच्या प्रेमामुळें तो पूर्ण पागल बनला. आणि त्या महामायेने जर त्यावर आपल्या प्रेमाची पाखर घातली नाहीं तर अविचाराच्या भरांत भावनेंच्या भरांत कोणकोणत्या गोष्टी घडून येतील, हें आमचे सहवासोत्तरवादी सांगू शकतील काय? आमच्या समाजांत विवेकी आणि नीतिमान् तरुणीं सांपडणार नाहीत असें आमचें म्हणणें मुळींच नाही — एकवार नव्हे — तर त्रिवार नाही. पण बहुजनसमाजाच्या दृष्टीने असा वर्ग अत्यंत अल्प प्रमाणांत असावयाचा. आणि तेवढ्याचकरितां समाजांत सर्रास सहवासोत्तर विवाह घडवून आणणें अत्यंत चुकीचें व धोक्याचें होईल.

सनातन वैदिक धर्माच्या वैशिष्ट्यापैकीं नीति हें जगताला दिपविणारें रत्न आमच्याजवळ आहें. त्याचा जेणेंकरून सांभाळ होईल त्याकडेच आह्मास बघावयाचें असतें. पाश्चात्य स्त्रियांच्या नीतीची कल्पना आमच्या दिव्य नीतीच्या पासंगालाहि बसणार नाही. त्यांच्यांत सहवासोत्तर विवाह असले तरी आमच्या बहुजनसमाजास ते हानिकारकच होतील. व्यक्तीनी स्वतःच्या जबाबदारीवर प्रीतिविवाह वा सहवासोत्तर विवाह घडवुन आणल्यास त्यास आमची बिलकुल हरकत नाही. पण सर्वसाधारण समाजदृष्ट्या ' प्रौढसंमतिविवाह ' च सुपरिणामी ठरतील. आमच्या—तरुण तरुणींच्या रोजच्या व्यवहारांतील — सबळ वागणुकीकडे जर आमचा समाज उदार बुद्धीने पाहील तर तेंवढेच हल्ली पुष्कळ होईल.

गतधवांच्या पुनर्विवाहावर श्री. काटकर यांनी प्रतिपादिलेले विचारांना आमचा पूर्ण पाठिंबा आहे. त्याविषयी येवढेंच आह्मी म्हणूं शकतों कीं — ज्यांचे पति वा ज्यांच्या पत्नि तरुणपणीं दिवंगत झाल्यात त्यांच्यांतच समयतों पुनर्विवाह घडून आला तर दुधांत साखर पडल्याप्रमाणें होईल. विधवांचे पुनर्विवाह प्राचीन

...हीहि होत असत हें एका सूक्तांत 'पती... चितेवर निजलेल्या पत्नीला उठवून ... पुन्हा लग्न करण्यास सांगितलें आहे' ... सिद्ध होईल.

...र्नार्यभिजीवलोकं गतासुमेतमुपशेषएहि ।
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं
पत्युर्जनित्वमभिसंबभूथ ॥

'हे स्त्रिये ऊठ. ज्याचें आयुष्य नष्ट झालें त्याच्याजवळ तूं निजली आहेस. तेथून उठून या सजीव माणसाच्या लोकांत परत ये व तुझ्याशीं लग्न करून तुझा हात धरुं इच्छिणाऱ्याची तूं पत्नी हो'.

समाप्त

---

# बसव-वचनापासून काय शिकावें ?

[ संपादकीय ]

## राजाचाहि राजा बसवराजा

सुप्रसिद्ध बसवदेव हे एक वीरशैवांत नामांकित शरण होऊन गेले आहेत. ही विभूति वीरशैवांमध्यें जन्माला आली नसती तर वीरशैवधर्म व संस्कृति अस्तित्वांत ... असें इतिहासकारांना अभिमानपूर्वक ...हि आलें नसतें. वीरशैवांत बसवपूर्वकाळीं ...बसवकालानंतर अनेक प्रकारचे थोर लोक ...ले आहेत. त्यांत आचार्यांच्या योग्यतेचे, ...च्या वा शूर योद्धयाच्या लायकीचे, उत्कृष्ट ...धारी, कलाप्रिय, विद्वान् व कवि अशा ...रीति अनेक पुरुष आहेत. पण त्या सर्वांत बसवदेवांची योग्यता फार मोठी आहे. बसवदेवांत ...धारी अर्जुनाचा पराक्रम नसेल, इंग्लंडचे ...मंत्री प्रधान लॉईड जॉर्ज ह्यांचें त्यांच्यात ...राजकारणचातुर्य नसेल, आद्यशंकराचार्यांच्या ...वाणीचा गंगौघ त्यांच्या मुखांतून ...वाहत नसेल, वा दाता कर्णाचें वा राजा ...हरिश्चंद्राचें सत्यवादित्वहि त्यांच्या ठिकाणीं नसेल; हें सर्व कबूल; असें असूनहि एका वैदिक पंथाचा प्रवर्तक, कानडी वाङ्मयाचा झरा, ह्मणून बसवदेवाकडेच आज अभिमानानें बोट दाखवावें लागतें.

## वाङ्मयांतील प्रभुत्व

ह्याचें कारण असें आहे कीं, त्यांचें सर्व शरीर व वाणी शिवमय बनली होती. शिवमय जगांतच ते वावरत होते आणि शिवमय जगाकडे आत्मभावनेनें पाहणें हा त्यांच्या इंद्रियांचा, आत्म्याचा, व बुद्धीचा सहजस्वभाव झाला होता. त्यामुळें त्यांच्या वचनवाणींतून जें जन्माला आलें त्यानें त्यांच्या अस्तित्वाची साक्ष वाङ्मयसेवकांना जशी पटली तशीच इतिहासज्ञांनाहि पटली. शिवाय हृदयींचे बोल बोलून सामान्य जनतेच्या हृदयाचा ठाव घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या वचनवाणींत असल्यामुळें आणि 'बोले तैसा चाले' असा त्यांचा आचार असल्यामुळें जनतेच्या हृदयांतील हे

लागलीच ताईत बनलें. त्यांचें वचनवाङ्मय आजहि जिवंत आहे. कानडी वाङ्मयाला बसवदेवाचें वचनवाङ्मय हें आजहि हृदयस्थानीं आहे. बसवदेवाची वचनवाणी जन्माला आली नसती तर कानडी वाङ्मयाला हृदय व त्याचबरोबर मस्तक उरलें असतें की नाही ह्याची शंका आहे. मराठी वाङ्मयाला ज्ञानेश्वराची ओवी, तुकोबारायाची अभंगवाणी, आणि समर्थाचा दासबोध ह्यांनी उजाळा आला एवढेंच नव्हे तर वैदिक धर्मातून जें भक्ति, वैराग्य, व ज्ञान निर्माण झालें तें मराठींतून ह्याच महानुभाव संतांनी पुरवलें. त्यांच्याहि पूर्वी कानडी वाङ्मयाला हें ज्ञान कानडींतून कोणीं प्रथम पुरवलें असेल तर तें बसवदेवांनीच पुरवलें.

## बसववचनप्रभाव

हीच एक सर्वांत मोठी कृति त्यांच्या हातून घडल्यामुळे ऐतिहासिक काळचा वीरशैव कोण तर तो बसवदेव होय असें वीरशैवेतरांच्याहि मुखांतून सहजगत्या निघतें. बसवदेव नुसतेंच शिवभक्तप्रधान असते तर हा असा चिरकाल टिकणारा लौकीक त्यांना लाभला नसता. नुसतेच धनाढ्य व्यापारी वा शेट्टी असते तरी त्यांना हें कीर्तिवैभव लाभलें नसतें, वा नुसतेच आचार्य वा पंडित किंवा संस्कृत शास्त्रकार असते तरी हें लौकिकमंदिर त्यांना लाभलें नसतें. बहुजनसमाजाच्या भाषेंतून आपल्या हृदयींचे बोल जो बहुजनाच्या हृदयावर ठसवितो तोच अखंड कीर्तीच्या मंदिरांत जाऊन बसतो. ही एक गोष्ट लक्षांत घेतलीं ह्मणजे बसवपूर्वकालीन वा बसवसमकालीन किंवा तदनंतरचे दुसरे वीरशैव ह्या चिरकालीन कीर्तिध्वजाचें कां अधिकारी झाले नाहीत ह्याबद्दल कोणालाहि हेवा वाटण्याचें कारण नाही. बसववचनें कानडींतून तर प्रसिद्ध झालींच आहेत, परंतु इंग्रजींतूनहि त्या वचनांचीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं आहेत. सोलापूरच्या 'सुदर्शन 'कारांनीं ' बसव-बोध' प्रसिद्ध करून मराठींतून ह्या वचनाचा आस्वाद दिला आहे. ह्या वचनग्रंथांचें परिशीलन केलें ह्मणजे बसवकालीन वीरशैवांची समाजस्थिति आजहि दृष्टिसमोर उभी राहते. आणि त्यांतून ही समाजस्थिति निर्माण करणारा खरा कोण ह्याचा ऐतिहासिक दृष्ट्या सहज बोध होतो. वीरशैवांत व बसवदेवाच्या चहात्यांत आज अनेक पक्ष पडले आहत. कित्येक बसवदेवास सवर्णोद्धारी ह्मणतात व झिडकारितात, कित्येक बसवच वीरशैवधर्माचा मूळ पुरुष व त्यानेच वैदिक धर्माची तत्त्वें सोडून हा निराळा धर्म उत्पन्न केला, त्यामुळे धारण हे वीरशैवांचे आद्य पुरुष होत असें ह्मणण्याचीहि प्रथा पडली.

## बसववचनाचें संशोधन

बसव-वचनाचें संशोधन करुन त्यांतूनच ह्या दृष्टीने विचार करितां कोणतें सत्य बाहेर पडतें हेंच आपणाला पहावयाचें आहे. कारण एखादा प्रख्यात कवि, साहित्यकार, वा ग्रंथकार ज्या काळांत निर्माण होतो त्या काळाची छाया त्याच्या ग्रंथांत पदोपदीं आढळते. ऐतिहासिक स्थिति शोधण्याचा हा एक न्याय्य मार्ग आहे. बसववचनांत शिव हेच जगताला आधारभूत असलेलें परब्रह्म मानून त्याचीच उपासना सांगितली आहे, आणि भक्ति, ज्ञान, व वैराग्य ह्यांचा त्यांत उपदेश केला आहे. माहेश्वर स्थळांच्या ६ व्या वचनांत ' सगुण आणि निर्गुण तुझे ठायीं अव्यक्त जाण ' । ' तव डोळा आणि वदन बाहू आदि सर्वांग जाण- ' । ' वरावर सृष्टीशीं व्यापून राहसी संगमेशा ' असें जें त्यांनीं ह्मटलें आहे ह्यावरुन इष्टलिंगाच्या ठायीं व गुरुच्या ठिकाणी कोणत्या विश्वव्यापी परमेश्वरशक्तीचें रूप बसवदेव पहात होते ह्याचा स्पष्ट बोध होतो. इतकेंच नव्हे तर सृष्टीचा आद्यकर्ता नावानें अनेक असला तरी तो एकच आहे. तो एकापेक्षां अधिक आहे असें ह्मणणें ह्मणजे मूर्खाचें लक्षण होय, असेंहि बसवदेवानें महेशस्थळाच्या २० व्या वचनांत

ह्मटलें आहे. आणि ' अखिल सृष्टीचा एक पिता। ...जे बोलति वेद संहिता ' असें त्याच वच... ...नांत ह्मणून, वेदादिसंहितांचा आधार त्यांनी ...घेतला आहे. अर्थात् वेदांतील निसर्गो... ...पासनेला ज्ञानोपासनेचें स्वरूप आल्यावर, आणि वेदान्तपरिणत झालेल्या काळांतील ही कल्पना आहे. आज आठशें – नऊशें वर्षांपूर्वी खरी वेदांचें वैदिकत्व वेदान्तानेंच प्रगट होत होतें. त्याच ज्ञानाची छाया बसववचनावर पडली असल्यामुळे बसवकाळीं परिणत झालेल्या वैदिक-धर्माव्यतिरिक्त बसवदेवानें नवीन सांगितलें आहे असें ह्मणून त्या थोर पुरुषाला वैदिकेतर ठरविण्याचें धाडस जे बसवभक्त करतात त्यांच्या बसवभक्तीच्या अज्ञानाची कींव करावीशी वाटते.

## बसवतत्त्वाची मूळ कल्पना

बसवदेव मूळचे यज्ञोपवितधारी, जन्मजात ब्राह्मण होते. त्यांनी यज्ञोपवितसंस्कार सोडला, व इष्टलिंग-धारणेचा संस्कार संगमगुरुकडून घेतला म्हणून त्यांचें वैदिकत्व नष्ट होत असेल तर ...था याज्ञिकावाचून कोणालाहि वैदिक ...रेतील ह्मणवितां येणार नाही. वैदिकाचें ...येय स्वर्ग आहे. वेदान्त्याचें ध्येय मोक्ष आहे. ...शैवांचें ध्येय कैलास आहे. वैष्णवाचें ध्येय वैकुंठ आहे. भक्तस्थळ वचन ३० मध्ये ब्रह्म-पद, विष्णुपद, वा रुद्रपद ' यांचा कांही मजला ...नको नाही ' तर तुझ्या भक्ताठायीं जडो माझे ...मन ' हेंच मागणें त्यांनी देवाजवळ मागितलें आहे. कारण भक्तस्थळ १३९ मध्ये ' देव ...लोक नाही, इंद्र लोक नाही. इहलोकी पाही ...हे लोक ' असें ह्मणून कैलास वा स्वर्ग हा ...तुझ्याजवळ आहे ' असा त्यांनी बोध ...केला आहे. ऐक्यस्थळ वचन ५ मध्ये ही कल्पना ...स्पष्ट केली नाही. दुर्जनाचा वास वा सहवास ...हेच नरक असून खऱ्या भक्ताचें स्थान ही त्याची वाराणशी होय व त्याचें घर हें कैलास होय ही सत्यरूप कल्पना केली आहे. ह्यावरून शिवजीवैक्यभाव पूर्ण झाल्यावर त्याला कैलासाकरिता निराळें स्थळ शोधावें लागत नाहीं हेंच खरें. ह्यावरून वैदिकांतील खरा वेदान्ती जर कोणी प्रथम कर्नाटकमध्यें जन्माला आला असेल तर तो बसवदेव होय असेंच ह्मणावें लागतें. तसें ह्मटलें तर तें सत्यकथन ठरतें. परंतु बसव-देवानें जातिभेद मानला नाही ह्मणून त्यास वैदिकेतर ह्मणण्याचा प्रघात कांही बसवभक्तांनी पाडला आहे. पण तोहि कसा चुकीचा आहे हें आतां पाहूं.

## इहलोकींच सर्व आहे.

मोक्ष, मोक्ष, स्वर्ग, वैकुंठ, कैलास वगैरे ह्याच लोकीं आहेत हें मानल्यावर शिव-जीवैक्य साधणें तें ह्याच देहीं होय इकडे ह्या थोर शरणाचें लक्ष गेलें तर अनुचित कांही नाही. खरा शिवभक्त तोच कीं, जो मृत्यूला कःपदार्थ समजतो. मृत्यूला न भीण्याची निर्भय वृत्ति निर्माण झाली कीं, देहासंबंधी आसक्ति दूर होते. अर्थात् तो संसारांत राहूनहि संसारापासून अलिप्त असतो. संसारिकांची ही अलिप्तावस्थाच त्याची अतिवर्णाश्रमी स्थिति होय. ह्मणूनच प्रसादस्थळाच्या ३० व्या वचनांत ' इष्टलिंगधारी महानुभावास देहबाधा स्पर्श करीत नाही ' असा त्यांनी संदेश दिला—नव्हे स्वानुभव सांगितला. ह्याच वचनांत ' खऱ्या जंगमास धनाची व मनोविकाराची बाधा नसते.' असें ह्मणून ह्या ... आहार सात्विक असावा असें त्यांनी त्याच वचनांत प्रतिपादन केलें आहे. ह्मणजे अष्टावरणादि पंचाचाराने षट्स्थलप्राप्ति होऊन लिंगैक्यप्राप्ति होते.

## पूर्वविचाराची पूर्ण स्मृति

ह्याप्रमाणें इष्टलिंगधारी भक्त, जंगम, गुरु वगैरेंची त्यांनी खरी योग्यता व खरी स्थिति

वर्णन केली आहे. बसवदेव हें 'भक्त भंडारी' आहेत अशी त्यांची स्तुति त्यांच्याच काळीं त्यांच्या कानावर येई. स्तुति हा 'सोन्याचा शूळ' आहे असें त्यांनी भक्तस्थळ वचन ३८६ मध्ये ह्मटलें आहे. ह्या सुळामुळे अहंकाराची जखम झाली आहे. तेव्हा हें शिवदेवा, तूं जंगम-रूपानें ये व माझें रक्षण कर अशी त्याने ह्या वचनांत शिवस्वरूप असणाऱ्या जंगमाची प्रार्थना केली आहे. जंगमाच्या ठायीं शिवाचें रूप तो पाही. असे अधिकारी शिवरूप जंगम हे त्या काळीं वावरत होते. त्यांना जन्मजाति वगैरे पण त्यांचा अधिकार शिवरूप होण्या-इतका होता. हे अधिकारी जंगम बसवदेवानें निर्माण केले असें नाही तर ते त्या काळीं होते व त्या पूर्वकाळापासून वावरत आले होते हेंहि उघड आहे. हे जंगम इष्टलिंगधा-रणा करीत असत. कोणाला करीत असत ? पूर्वधर्म, जात, गोत ह्याबद्दल ज्याला अवि-श्वास वाटे व ज्याची लिंगभक्तीवर श्रद्धा असे त्याला गुरु-जंगमहस्तें एकदा लिंगधारणा झाली कीं तो जर आपल्या पूर्वीच्या जातिकुळाचा विचार करूं लागला तर त्याला अघोर नर्क आहे असें भक्तस्थळ ८९ मध्यें बसवदेवांनी कळवळून सांगितलें आहे.

## वीरशैवांत भेदाभेद नाही

अर्थात् लिंगधारी वीरशैव ह्मटला कीं, त्याचे वर्णधर्माप्रमाणें धंदे अनेक असले तरी शिवभक्त हीच एक त्याची जात, हेंच त्याचें कूळ. शिवभ-क्तियुक्त ब्राह्मण असो वा अंत्यज असो, तो मला समान आहे. शिवभक्तिहीन ब्राह्मण वा अंत्यज हे मला श्वपच होत. अशा प्रकारें एकच एक शिवमय सृष्टि बसवदेवानें आपल्या दृष्टिसमोर ठेवली असा भक्तस्थळांतील वचन ८५ वरून बोध होतो. वैदिक धर्माच्या वर्ण-सृष्टीच्या उत्पादकानें वर्णभेद हा धर्मभेदानें क्षम्य असला तरी परमेश्वराला त्याचे हे सर्ववर्णीय भक्त सारखेच होत असेच मानले आहेत. शिवमय सृष्टींत वावरणारा व त्या सृष्टीशीं तन्मय झालेला बसवदेवच शिवभक्ताचे धंदे निराळे असले ह्मणून तेवढ्यावरून त्यांच्या शिवरूप अंतःकरणाला दूर कसा मानील ? तो सारखेच मानावयाचा. आणि जे असे खरे शिवभक्त असतात व खरे जंगम व गुरु असतात त्यांनी असा भेदभाव मानावा हें तो कसे प्रतिपादन करील? ह्मणूनच महेशस्थळ वचनात १०१ मध्ये त्याने शिवभक्तांत शिवप्रसादग्रहण करण्याच्या वेळीं भोजन वगैरे प्रसंगीं भेदाभेद करूं नये असें सांगितलें. अशा प्रसंगी भेदाभेद मानणारी वृत्ति ही एक माहारीण असून तिला शिवभक्तीच्या शुद्ध गंगोदकामध्ये धुतली तरी ती जशी अपवित्र तशीच ही वृत्ति होय असा त्यांनी व्यर्थ भेदाभेदवृत्तीवर कोरडा उडविला आहे. आणि 'भक्ताशीं धरिता जातीचा व्यवहार, तुझे माझें शीर मातद्रोही' असें ह्मणून भक्तस्थळ वचन ४५१ मधून संगमदे-वास विनविलें आहे.

## मालिन्य दूर केलें

ह्यावरून व्यवहारांत निरनिराळे धंदे असले, वर्णभेद असले, तरी तेवढ्यावरून शिवभक्तांत कोणताहि भेद नाही व असूं नये ही बसवदेवाची इच्छा होती व त्या इच्छेचा त्यांनी प्रसार केला. ह्या प्रसाराकरिता लाग-णारें जंगम नवे निर्माण केले असें नव्हे, तर होते त्या सद्प्रवृत्तांना चालना दिली. लिंग-धारणेचा व दीक्षेचा प्रघात नव्हता असें नाही. हा विधी नवा निर्माण केला, असेंहि नाही. तर त्याचा खरा हेतु स्पष्ट करून सांगितला. यज्ञांतील हिंसा त्याज्य मानावी ही प्रवृत्ति बसवपूर्वींच वैदिकांमध्ये आली होती. तेव्हा यज्ञांतील हिंसेवर त्यांनी कोरडे ओढले ह्यांत त्यांनी नवें अवैदिकत्व कांही प्रतिपादन केलें असें होत नाही. तद्वतच वीरशैवधर्म नवा प्रतिपादन केला व शोधला असेंहि स्पष्ट

होत नाही. फार झालेंच तर मालिन्य दूर केलें असें ह्मणतां येईल. बसवकाळापूर्वी व बसवकाळी मठ होते, जंगम होते, लिंगधारणा होती, भक्त होते, दीक्षा होती, सर्व कांही होतें. पण ह्या पुरुषाला शिवभक्त होण्याची बुद्धि झाली व त्यांनी आपल्या हृदयांतील शिवमय भावना वचनरूपानें प्रगट करून आणि भक्त व जंगम ह्यांचें ऐक्य करून मालिन्य दूर केलें.

### शास्त्राचा आधार

तें इतकें दूर केलें की, त्यानंतर चन्नबसवेश्वरकाळीं शून्यसिंहासन स्थापन झालें. अनेक वीरशैव शास्त्रीपंडित ग्रंथ संघटित झाले. त्या सर्वांच्या ग्रंथांतून एकच सूत्र दिसूं लागला. तत्पूर्वीचे ग्रंथ कोणते हें ऐतिहासिक दृष्ट्या निश्चित सांगतां येत नसलें तरी पंचाचार्यप्रभाकरांनी प्रसिद्ध केलेल्या सर्व संस्कृतग्रंथांतून बसववचनास वा त्याच्या हृदयांतील प्रवृत्तीस बाध येईल असा आधार सांपडणें अशक्य झालें आहे. तें विवेचन एकदा करावयाचें आहे व त्याकरिता हें स्थळ नव्हे.

### बसवराजला उत्तर

अशा प्रकारें बसवदेव ही थोर विभूति झाली व ती धर्मप्रवर्तकाच्या योग्यतेची झाली असें जरी आम्ही ह्मटलें, तरी आमच्या 'अधिकृत विरक्तांनी' त्या आचार्यांना पूज्य मानण्याचा आह्मी आग्रह धरीत नाही. ह्मणून 'बसवराज' नांवाच्या कानडी पत्रानें आह्मांला दोष दिला आहे. श्रीराम व श्रीकृष्ण ह्या विभूतींतील व्यक्तिमत्व पाहून त्यांत देवत्व आल्यावर त्यांची पूजा सुरू झाली तर नवल नाही. बसवराजांचा व बसवदेवाच्या उज्ज्वल चारित्र्याचा 'बसव' ह्मणून अध्यात्मस्वरूप तयार झालें आहे. तें स्वरूप आठवावें व मी आठवितों असा कोणाहि अधिकृत विरक्तास व आचार्यास जबाब देण्याला कांहीच हरकत नाही असें आह्मीं ह्मटलेलें 'बसवराज' ला स्मरत नसेल. पण नुसताच बसवभक्त पूज्य मानावा ह्मणजे भक्तदर्जा गुरु वा विरक्तदर्जानें पूज्यत्वानें मानावा हा जर 'बसवराज'-चा आग्रह असेल तर ती सामाजिक व धार्मिक अराजकता होय ह्मणून आह्मी तिचा निषेधच करूं. आमच्या लिखाणांतील हें मर्म 'बसवराज'-च्या बसवदेवप्रणीत शिवभक्तीला पटलें असतें तर आह्मांला दोष देण्याचें त्याला कांहीच कारण नव्हतें. पण अज्ञान वृत्तीनें कोणी दोष देऊंच लागला तर देईना बिचारा !

### आमची प्रार्थना

बसवजयंतीचे उत्सव सर्वत्र सुरूं होतील. अशा प्रसंगीं बसववचनांतील परिस्थितिनुसार योग्य सत्य वाचकांपुढे आलें व तेंच सत्य सर्वत्र सदर उत्सवांत प्रतिबिंबित झालें तर आजच्या वीरशैवांच्या उत्कर्षाला तें पोषक होईल अशी आमची समजूत आहे. बसवदेवांनी योग्य भक्त व योग्य जंगम व गुरु यांचें इतकें सहचर्य घडवून आणलें कीं, ह्यांनी एकमेकांची निंदा करूं नयें, कोणी कोणाचे दोष काढूं नयेत, कोणीं कोणांत भेद मानू नये असा कळकळीचा उपदेश करण्यांत व तो आचरून दाखविण्यांतच ह्या महानुभावाचें अल्प आयुष्य खर्ची पडलें. पण तें शिवरूप होऊन खर्ची पडलें. आदर्श चरित्ररूपानें ते आज आपणा पतितांचा उद्धार करण्याकरिता उरलें आहेत. त्याचें मनन करावें समाज संघटित करावा, ह्यांतच खरी बसवभक्ति आहे. आणि गुरु, लिंग व जंगम ह्यांच्या ऐक्यस्थळाच्या प्राप्तीचा आनंदरूप सोहळा आहे. ह्मणून गुरु, जंगम, व भक्त, ह्या सर्वांनी बसवदेवाचा जयजयकार करून पावन व्हावें व सर्वांना पावन करावें अशी आमची प्रार्थना आहे.

---

# स्वधर्माचें संवर्धन कसें होईल !

लेखकः— डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर, एच्. एम्. डी. आय., चांदूरबाजार वऱ्हाड.

"जेऊं नका नी शिवूं नका या दोन गोष्टीमुळे आज तुमचा धर्म रसातळाला जात आहे."

— डॉ॰ एस्. बेंजॉमीन.

समाजसंजीवन करून समाजाला चांगलें जीवन, तरतरी, हुषारी, आणण्याची व्यवस्था केल्यावर ज्यांच्या योगानें ऐहिक व पारमार्थिक श्रेष्ठत्व प्राप्त होईल अशा प्रकारचें संवर्धन कसें होईल याचें नीट परिशीलन करावयास पाहिजे. समाजांत समता व स्वस्थता स्थापन करणारी धर्म ही एक शक्ति आहे. त्यामुळें समाजांत स्वस्थता स्थापन होत नसेल तर तो धर्म काय कामाचा ? ज्या योगें समाजाची शक्ति कमी होत असेल व जो शक्ती समाजाला संख्येनें व बलानें कमी करीत असेल ती शक्ति काय कामाची ? त्या शक्तीनें समाजाचें संजीवन व राष्ट्राचें संरक्षण होत नसेल तर तिचा काय उपयोग ? ज्याचेपासून इहलोकीं शत्रूपासून पराभव होतो तो धर्मच नव्हे. ज्याला चिकटून राहिल्यानें अभ्युदयाचे ऐवजी अवनति होत असेल तो धर्म काय उपयोगी ? मोक्ष ह्मणजें स्वातंत्र्य ज्याने लाभेल तोच खरा धर्म. जो सर्वांना समत्वाने पाहून ईश्वराप्रत पोहोचवितो तोच धर्म. या सर्व गोष्टींचा विचार करून अशाच धर्माचें संवर्धन केलें पाहिजें. समाजांत बुवाबाजीचें प्रस्थ माजल्यानें सनातन सत्यधर्माचा लोप होऊन आचारच धर्म ह्मणून समजूं लागले. आचार हे परिस्थितिनुरूप बदलतात. असा बदल होत असतां भिक्षुकशाहीच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटेनासा झाला, व हेच लोक धर्म बुडाला ह्मणून ओरड करूं लागले. बुवाबाजीमुळे समाजांत कर्मठपणाचा प्रसार झाला. सकाळी उठल्यापासून यज्ञयागादि कर्मांत वेळ घालवून धर्माचें मुख्य तत्त्व जें ऐहिक व पारमार्थिक लाभ तिकडे दुर्लक्ष होऊं लागलें. निव्वळ कर्मठपणांत चूर झाल्यामुळे आपल्या समाजाची काय अवनत दशा होत चालली आहे हें बघण्यास कोणाला वेळ आहे ? निव्वळ सोवळं—ओवळं देवदेवतार्चन केलें कीं आपण उत्तम धर्माचरणी ह्मणून समजूत वळावली! स्वसमाज व स्वराष्ट्र धारणा ही जी धर्माची मुख्य बाजू ती अजिबात दृष्टिआड झाली. धर्माचें असलेलें खरें स्वरूप विसरून समाजांत ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, शूद्र, इत्यादि चातुर्वर्ण्यात्मक समजूत वळावली व स्वतःचे वैभवाला मुकण्याची वेळ आली. धार्मिक संघटन करावयास हवें होतें तें केलें नाही. शुद्धीकरणें व्यक्तिशः थोडीं-फार केली पण तीं सरसहा पचविलीं नाहीत. होऊं आपला समाज बलहीन होत असेल तर होऊं द्या, पण धर्म शुद्ध राखा, या भ्रामक समजुतीनें आपण समाजबल व धर्मबल गमावून बसलों. आपसांत एकजूट करावी व आपलें गेलेलें वैभव परत मिळवावें हा सुविचार सोडून कुविचारानें स्वार्थासाठीं झगडतो आहों. उलट-पक्षी पाश्चात्य संस्कृति जेव्हा तराजूचे राजकारण पुढे करून आली तेव्हा त्यांचा 'फोडा व झोडा' या राजनीतीला बळी पडून स्वतःचे स्वातंत्र्याला तिलांजली दिली. आमच्या असंघटित व विस्कळीत धर्माचा त्यांनी फायदा उठविली.

आपल्या अंतःकरणांतील ठेवा जो धर्म कीं ज्याचे जिवावर आह्मी आपलें जीवित सफल करूं शकतो त्या धर्मालाहि पोखरून बरेचसे लोक जबरदस्तीने परधर्मात नेले. धर्माच्या इतिहासांतराचें परिशीलन केल्यास असें आढळून येईल कीं, आह्मीं अक्षम्य चुका केल्या, आणि त्याचें प्रायश्चित्त ह्मणून आज सामाजिक, धार्मिक, व शैक्षणिक बाबतींत आह्मी मागें पडलों. बलसंवर्धनाला आवश्यक अशी कोणती गोष्ट असेल तर ती सामुदायिक शुद्धीकरण होय. आपणातील बरेचसे लोक भ्रष्टीकरणाला बळी पडले आहेत. त्याना वाटेल त्या उपायांनी आपले धर्मात घेतलें पाहिजे. आपल्यांतील मुलें, सामाजिक जाचाला कंटाळलेल्या स्त्रिया, व पुरुष, यांचा शत्रू जबरदस्तीनें बाटवून आपली संख्या वाढवीत आहेत याची जाणीव आह्माला केव्हा होणार ? कित्येक प्रसंगीं आप-ल्यांतील धर्मभोळ्या समजुतीचा फायदा घेऊन केवळ विहोरीत पाय टाकल्यानें अथवा पाणी शिंपडल्यानें आपली गावेच्या गांवे नाही का भ्रष्ट झालीं ? त्यांना आपले शत्रू बनूं देण्यापेक्षां मित्र करून धर्माची गळती थांबविण्यासाठी त्यांना स्वधर्मांत घेऊन स्वधर्माचें संवर्धन केलें पाहिजे. ज्या मायावी उपायांनी परधर्मीयांनी आपली हानि केली त्याच, किंबहुना त्याहिपेक्षा सुलभ उपायांनी आपल्यातील धर्मगुरूंनी धर्माचें संवर्धन केलें पाहिजे. आपणांतील एकाहि व्यक्तीस फटकूं न देता, गेलेल्यास परत आणल्याखेरीज आज तर-णोपाय नाही. बालविवाह, वस्त्रांकित सोवळें ओवळें, परदेशगमन, यासंबंधीच्या शास्त्रमर्यादा जशा बदल्या काळाला अनुरूप करून घेण्याची नवी रूढी पाडली ह्मणून आज त्याचे आपणास कांहीच वाटत नाही, तद्वत् जातिभेद नष्ट कर-ण्याची रूढी पाडली पाहिजे.

धर्माच्या सहनशीलतेची परमावधि झाली. आता धर्माचा लंबक प्रतिकाराकडे झुकला पाहिजे. अपात्री दान, आताताथी व अवेळी धर्मावलंबन हे आजच्या काळी दौर्बल्याचें लक्षण ठरले जाईल. धकाधकीच्या मामल्यांत टिकून रहाव-याचें असेल तर प्रगमनशीलच बनलें पाहिजे.

---

# विरक्तपंचाचार्यवाद व समाजपुढाऱ्यांचें कर्तव्य

( लेखकः— शांतलिंग भगवान हापसे, अहमदनगर. )

कलकल अति चाले । कार्य तें सर्व राही ॥
नवयुग जरि आलें । आपणा ऐक्य नाही ॥

“विरक्तपंचाचार्यवाद” हें एक वीरशैव-समाजावर संकट दिसत असून सदर आपले समाजात दुफळी होण्याची चिन्हें आज स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. विरक्तपंचा-चार्यवाद प्रथम कर्नाटकांत उत्पन्न होऊन नंतर महाराष्ट्रांत आला. महाराष्ट्रांत हा वाद आल्या-

नंतर या वादाला आमच्या पुढाऱ्यांनी योग्य वेळी पायबंद घातला असता तर हल्ली समाजामध्ये चालू असलेला गोंधळ माजला नसता. परंतु आमच्या पुढाऱ्यानी असें न करितां या वादाला महाराष्ट्रांत चालवा देऊन या वादाचें स्वरुप उग्र बनविलें असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. असो.

चित्रदुर्गचे श्रीमज्जगद्गुरु मुरघाराजेंद्र महास्वामी महाराष्ट्रात सोलापुर येथील गंगाबाई काडादी दवाखान्याचे उदघाटनसमारंभाकरिता आले होते, व ता. १६-२-३७ रोजी सोलापुराहून परत गेले आहेत. एवढ्या अवधींत महास्वामींच्या सोलापुर व अक्कलकोट येथें झालेल्या गौरवावर पंचाचार्यपक्षांतील कांही लोकांनी 'वीरशैवगर्जना,' व 'वीरशैवसंजीवनी'-मध्ये टीकात्मक लेख लिहून विद्रिस्थ असलेला पंचाचार्यविरक्तवाद जागृत केला. महास्वामींच्या गौरवावर लेख लिहून लेखणी झिजविण्याचें कांही कारण नव्हतें. पण विरक्तमहास्वामींचा गौरव कोठेहि होऊं नये, व सदर स्वामीबद्दल द्वेषभाव सदर लेखकाचा वाटत असल्यास नवल नाही.

चित्रदुर्गमहास्वामींच्या सोलापुर येथे निघालेल्या मिरवणुकीस ( आडुपालखीमहोत्सव ) पंचाचार्यपक्षीयांनी ज्याप्रमाणें रस्त्यावरील दुकाने बंद ठेवणें, काळीं निशाणें दाखविणें, इत्यादि अडथळे उत्पन्न केले, त्याच प्रकारे बाळेहूळ्ळी महास्वामींच्या हुबळी येथें निघालेल्या मिरवणुकीस ( आडुपालखीमहोत्सव ) विरक्तपक्षीयांनी अडथळे उत्पन्न केले. अशाप्रकारें दोन्ही महास्वामींच्या ( जगद्गुरु ) मिरवणुकप्रसंगीं दोन्ही पक्षांतील लोकांनी अडथळे उत्पन्न करून आपल्या क्षुद्र मनोवृत्तीचें प्रदर्शन केलें, व विरक्तपंचाचार्यवाद हवा आहे असें दाखवून दिलें.

विरक्तपंचाचार्यवादाला अशा तऱ्हेने चालना मिळून या वादाचा फैलाव समाजांत हल्ली एखाद्या रोग्याच्या साथीप्रमाणें होत असला तरी या वादाचें समाजांतून उच्चाटन होण्याकरिता किंवा या बाबतींत कांही तरी तडजोड व्हावी याकरिता आह्मी ज्यांना आज आमचे पुढारी समजतों त्या दे. भ. नानासाहेब वाघणगांवकर, श्री. गु. रार्चालग स्वामी परांडकर, श्री. कल्याणशेट्टी वकील व प्रमुख पुढारी मंडळीकडून प्रयत्न व्हावयास पाहिजे होते, पण असें अद्याप कोणाकडून झालेले नाही. 'सुदर्शन' व 'वीरशैव गर्जना' हीं पत्रें पक्षपातीं असल्यामुळें या पत्राकडून अथवा या पत्राचे संपादकाकडून हा वाद मिटण्याची आशा धरण्यांत अर्थ नाही. राहिल्यापैकी 'वीरशैवसंजीवनी.' 'वीरशैवसंजीवनी'नें निःपक्षपातीपणानें आपले स्पष्ट विचार या वादाबाबतींत दिल्यास ( मांडल्यास ) हा वाद मिटण्याची पुष्कळ आशा आहे. पण 'वीरशैवसंजीवनी' निःपक्षपाती असून, केव्हा केव्हा पंचाचार्यपक्षाच्या आहारीं जाते. मग हा वाद कसा थांबणार, व या वादाचें समाजांतून उच्चाटन कसें होणार ?

### यावर एकच एक उपाय

'सुदर्शनने,' 'वीरशैवगर्जनेने,' 'वीरशैव संजीवनी'ने व अखिल वीरशैवाने, "एकमेकां करु सहाय्य अवघे धरु सुपंथ" हें संतवचन हृदयांत साठवून, पक्षांधता सोडून, आपसांतील सर्व मतभेद विसरुन, सर्व शक्ति संघटित करुन, या वादाची हकालपट्टी करावी ह्मणजे हा वाद थांबेल, व या वादाचें समाजांतून उच्चाटन होऊन समाजांत दुफळी होण्याचें संकट टळेल.

( सदर लेख कोणत्याहि प्रकारचे पक्षपातीपणानें लिहिलेला नसून, निःपक्षपातीपणानें लिहिलेला आहे. )

स्त्री-विभाग

# आमचें बालसंगोपन

[ ले०—श्रीमती महादेवी वाघमारे मोमीनाबाद ]

मला वाटतें, संसारी माणसाला चिंतेचा व असंतोषाचा प्रसंग आपल्या घरांतल्या वरांव पुनःपुन्हा येतो तो स्वतःच्या लहान मुलबाळांवरुन. वास्तविक पहातां लहान मुलें म्हणजे संसारांतील एक मोठा आनंदाचा ठेवा होय. कवि त्या आनंदाचें वर्णन करतात तें खोच नाही. परंतु हें जितकें खरें तितकेंच लहान मुलांमुळे नानाविध मानसिक यातना भोगण्याचा प्रसंग आईबापांवर येतो हेंहि खरें. कारण, आईबापांना साहजिकपणेंच नेहमी असें वाटत असतें कीं, आपली मुलें सुविद्य व्हावींत. परंतु, लहान मुलें तर विद्येचें आणि सद्वर्तनाचे धडे घ्यावयास सहसा तयार नसतात. तीं हट्ट करतात, दांडगाई करतात, आणि मारामारी करणें, खोटें बोलणें, अशा गोष्टींची आवड दाखवितात. त्यांच्या या गोष्टी पाहिल्या कीं आईबापांस साहजिकपणें मोठी चिंता वाटते कीं आपली मुलें वाईट निपजणार. अशी चिंता वाटली कीं तिच्या निवारणाचा उपाय म्हणून धाक दाखवून मारण्याचा आणि प्रसंगीं देहदंडहि करण्याचा मार्ग आईबाप स्वीकारतात. ह्या उपायामुळें आपणास हवा तो परिणाम घडण्या-ऐवजी नको तेच परिणाम बहुतेक घडतात. मग आईबापांच्या चिंतेंत भर पडते, मुलांच्या ठिकाणी आईबापाच्या प्रेमाविषयी शंका उत्पन्न होते, व संसारांतील आनंदाचें रम्य स्थानाचा नाश व्हावयाचें होतें.

आपल्या समाजांत बालशिक्षणाविषयी आई-बापांच्या व शिक्षकांच्या मनांत गाढ अज्ञान असल्याचें दिसून येतें. आईबापांना व शिक्षकांना वाटतें कीं, आह्मांला जे जे ठाऊक आहे तें तें मुलांच्या मनांत कोंबणें हाच शिक्षणाचा खरा अर्थ. मुलांना शिकवून मोठें करणें ह्मणजे आम्ही ज्या गोष्टींस चांगलें म्हणतों व वाईट म्हणतों त्या त्या गोष्टींस तसेच चांगले-वाईट म्हणावयाची संवय त्यांच्या ठिकाणी उत्पन्न करणें. ज्ञान लहान मुलांच्या डोक्यांत कोंबणें, भय व जबरदस्ती हीं शिक्षणांचीं साधनें, अशाच समजुतीनें आईबाप, वडीलधारी माणसें, आणि शाळेंतील शिक्षकहि लहान मुलांशीं वागत असल्याचें आपल्या समाजांत दिसून येतें.

लहान मुलांची गोष्ट मात्र अगदी निराळी असते भर पावसाळा संपल्यावर बियांचे मोड जमीन दुभंगून बाहेर पडावेत तसेच लहान मुलांच्या ठिकाणच्या त्यांच्या निसर्गदत्त प्रेरणा बाहेर फुटूं पहात असतात. मुलांचा उत्शृंखलपणा असें आपण ज्याला नांव देतो तो उत्शृंखलपणा ह्मणजें केवळ स्वभावसिद्ध प्रेरणांचा जोर होय. वडील माणसांना तो वाईट वाटला तरी तो तसा मानतां येणार नाहीं. आणि तो तसा मानण्याचें आई-बापांनी सोडून दिल्यास बालसंगोपनाचें काम पुष्कळ; सुखकर होईल.

लहान मुलांच्या अंगच्या प्रवृत्ति आपल्या आपल्या मोठेपणाच्या दृष्टीने दुष्ट आणि वाईट वाटण्यासारख्या असतात हें जरीं खरें, तरी त्या प्रवृत्ति पाहतां त्यांचा आपण जितका बाऊ करतों तितका करण्याचें कारण नाही.

लहानपणीं एकसुद्धा किडा-मुंगी मारली नाही, किंवा एकदासुद्धा फुलपाखराचे पंख तोडले नाहीत, किंवा खोटें भाषण अथवा चोरी केली नाही असा एक तरी माणुस दाखवितां येईल काय? पण ज्यांनी लहानपणीं मुके पक्षी पकडले, कुत्र्याच्या शेपटीला फटाकडचा बांधल्या, वर्गांत मास्तरांना खुशाल खोटया गोष्टी सांगितल्या, व प्रसंगीं चार-दोन आण्यांची चोरीहि केली, तींच सारीं माणसें आज मोठी होऊन समाजांत कसो अधिक-मोठेंपणाने वागत आहेत कीं नाही?

त्यांच्या लहानपणच्या प्रवृत्ति कायम टिकण्याऐवजी सापाची कात गळावी तशा गळून पडल्याच ना? लहान मुलांच्या या गोष्टी वाईट वाटण्यासारख्या असतात, त्या योग्य कालीं नाहीशा होतात असें मानावयाला हरकत नाही.

लहान मुलास धाक दाखवून त्यांजवर करडा दरारा ठेवून आणि त्यांत उठतां-बसतां धासाची दहशत घालून त्यांजकडून विद्या करून घ्यावी आणि त्यांच्या अंगीं सद्गुणाचें बीजारोपण करावें अशी समजूत ज्या समाजांत असते, त्या समाजांतील एकंदर आचार-विचाराची उभारणी धाक दपटशा, आणि बहुधा यांवरच झालेली असणार असें आपण खुशाल मानावें उलट, ज्या समाजांत मुली मुलांच्या स्वतंत्र वृत्तीत व कर्तृत्वबुद्धीस शक्य तितका वाव देऊन त्यांस शिकवावें आणि शिस्त लावावी अशा मताची मी आहें.

समाजांत मोठी माणसेंहि पापपुण्याच्या कचाटयांत गुदमरून न जातां पुष्कळशा मोकळेपणाने आपलें कार्य पार पाडीत असतील अशी कल्पना करावयास कांही हरकत नाही असें मला वाटतें. मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी बापापेक्षा आईवरच अधिक असते. आईवार ह्मणजे मुलांच्या भावतांचें उत्कृष्ट प्रतिबिंब दाखविणारा आरसाच असतो.

कर्तव्यपालनाची खूबीच ही आहे कीं, जी व्यक्ति आपल्या मनाविरुद्ध असणारी गोष्ट सुद्धां कर्तव्य ह्मणून करिते त्या व्यक्तीला कर्तव्यपालनाचें समाधान लाभतें. परंतु ज्यांच्याकरितां हें कर्तव्यपालनाचें दिव्य केलें जातें त्यांना मात्र सद्बुद्धि जागृत असल्यास ओशाळगत व्हावें लागतें.

---

# महाराष्ट्र-वीरशैव-परिचयपट

**३०. श्री. शेटकार कुटुंब उद्‌गीर**

(१) श्री. संग्रामप्पा हवगीराव शेटकार मु. उदगीर जिल्हा बिदर निजामस्टेट. दीक्षावंत गुरुमठ कवळासमठ, उज्जयनी सिंहासन वय ३४ विवाहित हायकोर्ट वकीली, व शेती, मराठी येते. वीरशैवांची लोकसंख्या २००० परोपकारार्थ सालिनाखर्च रु.२५०, रु.१०० परोपकारार्थ बाहेर खर्च (२) सौ. हिराबाई शेटकार वय ३० मराठी प्राथमिक शिक्षण. (३) गं. भा. मातोश्री भागिरथीबाई शेटकार वय ६० (४) चि. उमाकांत वय १४ अविवाहित इंग्लिश तिसरा वर्ग. (५) कु. यमुनाबाई वय १० मराठी २ रा वर्ग. (६) कु. शिवम्मा वय ८ वर्षे मराठी २ रा वर्ग. (७) कु.

शांताबाई वय ५ वर्षे ( ८ ) कु. सुशिला वय ३ वर्षे ( ९ ) कु. चंद्रकला वय १ वर्षे.

३१. श्री. भस्मे कुटुंब लोणंद

(१) श्री. विठ्ठल सिद्राम स्वामी भस्मे मु. लोणंद ता. कोरेगांव जि. सातारा. जंगम, गुरुमठ वाई क्षेत्र वय ५८ विधुर भिक्षुकी प्राथमिक मराठी शिक्षण, वीरशैवांची लोकसंख्या ५० सालिना धार्मिक खर्च रु. १०. (२) श्री. कृष्णा आय्या विठ्ठलस्वामी वय ३१ विवाहित धंदा व्यापार, मराठी ७ वी. सालिना धार्मिक खर्च रु. २५ परोपकारार्थ खर्च रु. १०. (३) श्री. शंकर अय्या विठ्ठल स्वामी वय २९ विवाहित, व्यापार, मराठी येते, (४) श्री. रुद्रय्या विठ्ठल स्वामी वय २७ विवाहित, व्यापार. मराठी ७ वी. (५) श्री विश्वनाथ विठ्ठल स्वामी वय १५ अविवाहित, इंग्रजी १ लीत जातो. (६) सौ० सोनुबाई भ्र. कृष्णाअय्या वय २५ गृहकृत्य मराठी ४ इयत्ता (७) सौ. भागिरथीबाई भ्र. शंकर अय्या वय २० विवाहित गृहकृत्य, मराठीं ५ इयत्ता. (८) सौ. रुक्मिणिबाई भ्र. रुद्राय्यास्वामी वय १८. (९) कु कुसुम कृष्णा अय्या, वय ५

३२. श्री. साखरपेकर कुटुंब बडोदा:-

(१) श्री शंकर गोविंद साखरपेकर कोकणस्थ लिंगायत, गुरुमठ सातारा जिल्ह्यांत आहे वय ३० विवाहित रेल्वे क्लॉर्क, लेखनव्यवसाय इंग्रेजी शास्त्रज्ञ, मॅट्रिक्युलेट रेल्वे लोअर ग्रेड एक्झामिनेशन. वीरशैवांची लोकसंख्या १०-२५ धार्मिक कार्यात सालिना होणारा खर्च रु. २५. परोपकारार्थ सालिना खर्च ५० रु. परोपकारार्थ खर्च करण्याची इच्छा ५० रु. (२) श्री. दत्तात्रय सदाशिव साखरपेकर वय ४१ विवाहित पोलिस, पाटील [ वाडाजुन जि. सातारा ] शेती. मराठी येते. वाडाजुन येथें वीरशैव लोकसंख्या २००. (३) सौ. पार्वतीबाई शंकर साखरपेकर वय १९ मराठी ३ इयत्ता. (४) गं.भा. मथीबाई गोविंद साखरपेकर वय ४८ (५) श्री. गणपत गोविंद साखरपेकर वय १२ अविवाहित इंग्रजी १ लीत आहे, (६) श्री. राजाराम दत्तात्रय साखरपेकर वय ११ अविवाहित इंग्रजी १ लीत आहे.

३३. मंगळवेढ्याचे बुरुकुल कुटुंब.—

(१) श्री. सिद्रामआप्पा गुरुपादप्पा बुरुकुल मंगळवेढा जि. सोलापूर शिलवंत वय ४५ विवाहित धंदा शेती व व्यापार मराठी व कानडी ३ रा वर्ग. वीरशैवांची लोकसंख्या ७०० सालिना कुटुंबातील खर्च ५०० रु. परोपकारार्थ खर्च २० रु. सालचा जास्तीचा करण्याची इच्छा ५ रु., (२) श्री. पट्टदेवरु चनबसय्या आलूरकर [ मठसंस्थान आलूर ] (३) सौ. संगव्वा सिद्राम बुरुकुल वय ३२, (४) श्री. मल्लाप्पा सिद्रामप्पा बुरुकुल वय १४ अविवाहित मराठी ७ इयत्ता व इंग्रजी ३ (५) मुरग्याप्पा सिद्रामप्पा बुरुकुल वय ८ वर्षें अविवाहित (६) गुरुपाद सिद्रामप्पा बुरुकुल वय १॥ वर्षें ( ७ ) कु. राचव्वा सिद्रामप्पा वय १२ अविवाहित. (८) चि. निलव्वा सिद्रामप्पा वय ३॥ वर्षें.



सूचना:—वर्गणीदारांच्या मानानी अजून परिचयपट पुरेसे भरून आले नाहीत तरी ते भरून पाठविण्याची त्वरा करावी. ज्यांचेजवळ नसतील त्यांनी खालील पत्यावर मागणी करावी.

व्यवस्थापक— "वी. संजीवनी"

# " उगीच नाहीं मी ! "

(लेखक० वी. नारायण स्वामी मलवडी, सातारा)

बाई बाई. माझ्या नांवानं लोक तर 'सारखं ओरडतात. मी काय असं त्यांचं वाईट करतें? जिकडे जावं तिकडं माझ्याविषयीं [illegible]! माझं नांव घेतल्याखेरींज एकाला-सुद्धां सकाळचा चहाचा कडू (?) घुटका घेववत नाही! लहाना-थोरांच्या जिभेवर माझ्या नांवाचा अलीकडे नुसता शिमगा! जगाच्या सुरवातीपासून मी पाहतें कीं माझी एकानें-सुद्धां निंदा केली नाहीं असं नाहीं. काय मेल्यांचीं बोलणीं तरी! एकेक तर माझ्या पाठीमागं हात धूवूनच लागले आहेत जसं! मला अगदीं सळो की पळो करून सोडलं आहे. कित्ती-कित्ती माझा छळ करतात ते! ह्मटलं लोकांच्या जीव-नांत थोडी सुखाची भर घालावी. पण छें ग बाई! अगदीं उलटच! त्यांना तरी काय ह्मणा-यचं? हो पण ह्मणतात ना " गाढवाला गुळाची काय चव ! ' त्यांतलाच हा प्रकार!

मागासलेल्या देशांत – समाजांत माझं तर त्यांना पित्तच येतं. माझं नुसतं नांव काढलं तर त्यांच्या मस्तकांत तिडीक उठती ! मग तोंड पाहण्याच तर दूरच! ह्मणे मी दिवाळं काढते, अधोगतीच्या मार्गाला नेते! अहा हा! ! काय पण, वाटत नाहीं जरा बोलायला. निघाल्यीं असतील दिवाळीं; पण तीं कोणाचीं? माझे नुसते, जे बैल होतात त्यांचीं !

युरोपांतच काय पण इतर बहुतेक देशांत मी सर्वसाधारण 'कॉमन'च होऊन बसली आहे. हिंदुस्थानात तर चहालासुद्धां प्रथम 'अग अग ह्मशी नो मला कांग नेशी' वृत्तीचे सनातनी बहाद्दर ॲलिम्युनियमच्या कपबशींतून फुंकून फुंकून व मिशा न भिजतील याची खबरदारी घेऊन गोड घुटके घेतांना नाहीं कां पाहात! माझ्याखेरीज तर लोकांची इकडची काडी तिकडे हालत नाहीं. मी सर्वांची आवडती झाली आहे. काय तें त्यांचं निष्कपट प्रेम! मी त्यांच्या देहयात्रेंतील एक जरूरीचीच होऊन राहिली आहे. माझ्यामुळेंच ते कूपमंडूक वृत्तीची सीमा ओलांडून आज सर्वांत वरचा नंबर त्यांनीं पटकाविला आहे. आज माझ्या-मुळेंच तर ते कपाळाचा हात काढून छातीवर ठेवून खऱ्या सुखासाठी जगांत झगडत आहेत!

मी लहानापासून ते 'अंगं गलितं पलितं मुंडं' पर्यंत कित्ती-कित्ती उपयोगाची आहे! मी दिसायला व वागायला जरी छानछोकी असली तरी जगाच्या कल्याणाकरितां पृथ्वीवर मी जन्माला आली आहे. पण मी कल्याण-स्टेशनवर कधीं उतरेन कोण जाणे बाई! बाळांनो, मी तुमच्यापेक्षां जास्त पावसाळे जगांत घालविले आहेत. व आणखी कितीतरी घालवावे लागतील याची तुह्मा अज्ञान विरोध-कांना काय कल्पना बर! मला तुह्मांपेक्षां थोडी तरी जास्त अक्कल आहे, ह्मणून मी सांगते, असं निराश – हताश होऊं नका. आशावादी व्हा! आणि अशाश्वत जगांत शाश्वत सुखासाठी झगडा. दुबळे-भित्रे-बावळट आणि दुःखाचे गुलाम होऊं नका. उगीच नाहीं मी!

माझी आठवण ह्मणून मी पुन्हा एकदां आपणा सर्वांना माझं नांव जातां जातां सांगतें, मी फॅशन आहें फॅशन!

# वीरशैवांतील चळवळी

**श्री. कल्लय्या स्वामी निराश झाले**

अमरावतीः--कासेगांव पंढरपूर येथील एक जंगम श्री. कल्लय्या हे तळेगांव-परिषद् आटो-पल्यापासुन वऱ्हाडांत प्रचारार्थ फिरत आहेत. त्यांचा हेतु दक्षिणा मिळविणें व येत्या कारंजा-परिषदेपुढे येणाऱ्या एकीकणाचे विरुद्ध मत-प्रचार करणें, असा दिसतो. 'एकीकरण ठरा-वां'चें पुरस्कर्ते दे. भ. नानासाहेब वामणगां-वकर ह्यांचे गैरहजरीचा फायदा घेऊन येथील दादाशास्त्री वगैरेंनी खटपट करून माहेश्वरवर्गातर्फे श्री. कल्लया स्वामींचे व्याख्यान आहे असें सांगून बसवेश्वरचौकांत रविवार ता. ११-४-३७ रोजी रात्रौ सभा बोलावली. ८॥ च्या सभेला जवळजवळ रात्रौ १०॥ ला सुरुवात झाली. व ज्या माहेश्वर-वर्गातर्फे सभा होती त्यापैकी ३-४ जणच तेथें हजर होते. व सभा कुणातर्फे व कशाकरितां आहे हेंच कळेना ! व अखेर सर्वानुमते श्री. फकीराप्पा हेगु ह्यांनाच अध्यक्षस्थानीं बसवून सभेला सुरवात करावी लागली. श्री. कल्लय्या स्वामी ह्यांनी धार्मिक विषयावर बोलण्याऐवजी कारंजा परिषदेपुढे येणाऱ्या एकीकरणाच्या ठरावाविषयीं या सभेत बोलायला सुरवात केली व त्यानंतर श्री. फकीरआप्पा हेगु ह्यांचेंहि ह्याच विषयावर भाषण झालें. श्री. महादाप्पा एकलारे व श्री. ... वगैरेंचीहि भाषणें झालीं. श्री. कल्लय्या फकीरआप्पा वगैरेंनी जेव्हा नवमतवाद्यांच्या ... निष्कारण त्यांचेवर गैरमुद्देसूद टीका केली तेव्हा श्री. त्रिंबक आप्पा कापुसकरी, श्री. ...आप्पा कोल्हे व श्री. मनोहरआप्पा मिटकरी ह्यांनीहि विरोधादाखल भाषणें केलीं. श्री. त्रिंबक आप्पा ह्यांनी तर सभा बोलाविणाऱ्यांना उघड आव्हानच केलें कीं ह्या ठिकाणी एकीकरणाचे ठरावावर भाषणें होणार आहेत असें तुम्ही आगाऊ जाहीर कां केलें नाही ? म्हणजे विरुद्ध पक्षीय व नवमतवादी लोकही सभेला हजर राहिले असते. बोलावितां एका कार्याला, व समोर मांडतां दुसरेंच, ही जमलेल्या लोकांची फसवणूक नव्हे काय ? अशा तऱ्हेने सवाल टाकून सभा बोलाविणाऱ्यांचा डाव उघडकीस आणला व त्यांना निरुत्तर केले. व श्री. कल्लय्या स्वामीचेहि सर्व मुद्दे समयोचित भाषण करून खोडून काढले परंतु श्री. त्रिंबक आप्पाच्या नवमतवाद्यांच्या पाठिंब्यादाखल भाषणामुळें सभेचा रंग आपल्याला प्रतिकूल होत आहे असें दिसतांच अध्यक्षांनी श्री. कापुसकरी ह्यांना मध्येच भाषण बंद करावयास लाविलें.

सभेचे अध्यक्ष श्री. फकिरआप्पा हेगु ह्यांच्या ह्या अरेरावी वर्तनाबद्दल मागा-हून बरीच टीका झाली.

सभेंत बरीच अनुकूल व प्रतिकूल भाषणें झाली.

श्री. कल्लय्या स्वामी व श्री. दादाशास्त्री ह्यांनीं एकीकरण-पुरस्कर्त्यांच्या विरुद्ध ठराव-मांडण्याविषयीं खलबत सुरु केलें होतें. परंतु अध्यक्षांनी सभेचा रंग आपणास अनुकूल दिसत नाही व ठराव पास होईल अशी मी हमी देत नाही म्हणून सांगितल्याचें कळतें. व म्हणून ठराव मांडण्याची चळवळ जाग-च्याजागीच थंडावली. त्यामुळें "एकिकरण पुर-

स्कर्त्यांच्या विरुद्ध" सभा भरविण्याचा सारा खटाटोप व्यर्थ गेला ह्मणून श्री. कल्लय्या व श्री. दादाशास्त्री ह्यांची मनें खट्टू झालीं ह्मणतात. श्री. वामणगांवकरांचे हजरीत नाही तर निदान गैरहजरीत तरी आपल्याला बहुमत मिळत नाही हें पाहून श्री. दादाशास्त्री ह्यांना वाईट वाटणें साहाजिकच आहे.

सभेंत येथील वीरशैव पुढारी व म्यु. कौंसिलर श्री. अण्णासाहेब हुंडेकर हेहि हजर होते. व ते ह्मणाले कीं "एकिकरण – पुरस्कर्त्यांच्या विरुद्ध ठराव सभेपुढें असेल तर मलाहि बोलावें लागेल,"

अध्यक्षानी खुलासा केला कीं ठराव वगैरे कांहीं आह्मी मांडीत नाही; ही निव्वळ चर्चा आहे असें जाहिर केले. व सभेचा रंग पाहून सभा आटोपतीच घेतली.

अशा तऱ्हेनें श्री. कल्लय्यास्वामीची अमरावतीस निराशा झाली व यवतमाळप्रमाणें कसा तरी घाईनें ठराव पास करून घेण्याचा हेतु अमरावतीस साधला नाही. शेवटी श्री. करवीर आप्पा हेगू, कारंजा–परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर ह्यांना स्वतःतर्फेच एक पत्र पाठवून "एकीकरणाचा ठराव" परिषदेपुढें येऊं देऊं नका ह्मणून विनंती करणार असल्याची बोलवा आहे. ह्या वैयक्तिक पत्राची मोगलाईकर काय वासलात लावतात तें समजेलच. असा द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षां ह्या सवातन्यांनी आपला एकिकरणविरोधी स्वतंत्र ठराव परिषदेंत मांडून पहाणेंच शहाणपणाचें ठरेल! असें सभेला हजर असणारे एक गृहस्थ कळवितात.

## आडगांव येथील अभिनंदनीय विवाह

महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळाचे सन्माननीय सभासद श्रीमंत काशिनाथ आप्पा बाके ह्यांची कन्या चि. सौ. कां. जानकीबाई ह्यांचा विवाह चिखलीचे श्रीमंत मलकाप्पा बोंदरे (मंडळाचे तहाहयात सभासद, ह्यांचे कनिष्ट चिरंजीव श्री. राजाभाऊ बोंदरे ह्यांचेशी आडगांव येथे सोमवार ता. २९ मार्च रोजी गोरजमूहूर्तावर झाला.

उभयपक्षी विवाहप्रसंगाला ५–७ शे वीरशैव मंडळी जमली होती. जालनाचे श्रीमंत तात्याप्पा टाले, रोहिणखेडकर श्री. राजाभाऊशेट कुल्ली, नागपूरचे दे. भ. रावभाऊ डांगरे वगैरे मंडळी होती.

आह्मीं वधुवरांना दीर्घायुरारोग्य व अभिष्ट चिंतन करतों.

ता. ३१ मार्च रोजी सकाळी वधूचें मंडपांत जमलेल्या वीरशैव मंडळी समोर "साखरखेर्डा-मठसंस्थानचे नवीन पटा विषयी" श्रीमंत रामभाऊ शेट कुल्ली, श्रीमंत गोविंदराव बोंदरे, व श्री. बाबुराव चौधरी, ह्यांचीं भाषणे झालीं.

सुरुवातीला "नवीन पटाविषयीचें जाहीर विनंतीपत्रक" वाचून दाखविण्यापूर्वी श्री. चौधरी ह्यांनी "नवमतवादी व जंगमवर्ग" ह्यांवर प्रास्ताविक भाषण करून नंतर विनंतीपत्रक वाचून दाखविलें.

## यवतमाळची हास्यास्पद सभा

यवतमाळ येथें ता. २३।३।३७ ला वीरशैवांची श्री. रा. सा. माधवराव देवराव देशमुख यांचे अध्यक्षतेखाली जाहीर सभा झाली. त्या सभेस पंढरपूरचे श्री. गु. मु. कडय्या स्वामी कासेगांवकर, लोहीचें श्री. गु. मु. प्रभु अय्या, रामगांवचे श्री. गु. शंकर अय्या. उदेपूर, चिचगांव, सुकळी, डोर्ली, वगैरे बरेच ठिकाणची मंडळी हजर होती. त्या सभेंत जो ठराव पास झाला तो खालील ठराव प्रसिद्ध कराल अशी आशा बाळगून आपणांकडे पाठविला आहे.

वीरशैवहितसंवर्धक–मंडळ समाजविघातक कार्य करीत आहे अशा तऱ्हेचे तळेगांव ता. दारव्हा येथील पुण्यतिथीप्रसंगी वृत्तांत-

...होऊं आलें. हें त्यांचें कृत्य यवतमाळ येथें ...व रोजी भरलेल्या सभेला मान्य नसून त्यासंबंधी ही सभा निषेध व्यक्त करीत आहे. हा ठराव रा. नारायणराव हमदापुरे यांनी मांडला असून, याला अनुमोदन रा. महादेव ...आप्पा पुनतकार यांनी दिलें. हा ठराव सभेंत एकमतानें पास झाला. असें रावसाहेब माधवराव देवराव देशमुख जहागीरदार, सभेचे अध्यक्ष, कळवितात.

टीपः—आमचे मित्र रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेचा वृत्तांत त्यांच्या सहीनिशीं आमच्याकडे प्रसिद्धीकरितां आला आहे. सदर ठरावांत तळेगांव दारव्हा येथील वीरशैवहितसंवर्धक-मंडळाची कृति समाजहितविघातक ठरविली आहे. वास्तविक तळेगांव दारव्हा येथे वीरशैवहितसंवर्धकमंडळाची कोणतीहि सभा भरली नाही. इतकेंच नव्हे तर तेथील परि-षदेशीं व सदर परिषदेंत पास झालेल्या चर्चेशी वा ठरावाशीं मंडळाचा कोणताहि संबंध नाही. ती तेथे जमलेल्या व्यक्तींचीं मतें होत. त्यांच्याशीं मंडळाचा संबंध नाही. सदर परिषदेने वीरशैवहितसंवर्धकमंडळ, वीरशैव-शिक्षण-प्रसारक मंडळाबद्दल सहानुभूति दाखवा असा ठराव केला ह्मणून कां वीरशैवहितसंवर्धक-मंडळ निषेधार्ह आहे ? वास्तविक पाहिलें असतां तळेगांव-परिषदेंत कांही व्यक्तींनी प्रतिपादन केलेलीं मतें सदर ठराव पास कर-णारांना मान्य नसावीत असें दिसतें. तेव्हा त्या व्यक्तींचा व त्यांच्या मतांचा त्यांनी निषेध केला असता तर ठराव करणारांचीं हेतु तरी उघड झालें असतें. पण वीर-शैवहितसंवर्धकमंडळाच्या कृतीचा खोटा व निष्कारण निषेध करून निषेध करणारांनीं आपलें अज्ञान प्रगट केलें आहे व ह्या अज्ञा-नांत रावसाहेबहि सामील झाले आहेत. पण आम्ही ह्या सर्वांना नम्रतापूर्वक एवढेंच सांगतों कीं, अशा मार्गानें वीरशैवहितसंवर्धक-मंडळावर आपण केवढेहि खोटे आरोप केले तरी वीरशैवहितसंवर्धकमंडळाचें कार्य चाले-लच चालेल. शेजारणीनें कोंबडा मारला ह्मणून का सूर्य उगविण्याचें थांबतें ?

संपादक 'वीरशैव-संजीवनी'

## पापळः— अभिनंदनीय पुनर्विवाह

महाराष्ट्रीय वी. हि संवर्धक मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागीरदार ह्यांचे जहागिरीतील पापळ गांवी श्री. गणप्या-स्वामी ह्यांची बाल विधवा कन्या चि. बबी हींचा श्री. पर्वय्या सदाशिव राजापुरे मठस्थ जंगम तळोधी मोकासा ता. गडचिरोली जि. चांदा ह्यांचेशीं पाट किंवा गंधर्व ह्यांतील रूढ अनिष्ट प्रकारबंद करून शास्त्रोक्त लग्नपद्ध-तीनें सायंकाळी झाला.

सायंकाळी नवऱ्या मुलास वाजतगाजत मारो-तीवर नेण्यांत आले. त्यानंतर वधुवरांना नवीन कपडे घालण्यात आले, व नंतर पंच कलश स्थापन करण्यात आल्यावर मंगलाष्टकें ह्मणून विवाह लावण्यांत आला. ह्यानंतर कार्यास जमलेल्या मंडळींना पानसुपारी वगैरे देण्यांत आली. ह्या अनुकरणीय पुनर्विवाहा-बद्दल आह्मी पापळकर सुधारणावादी वीरशैव बंधू चि अभिनंदन करतों.

## पुण्यतिथीमहोत्सव
## तळेगांव तालुका दारव्हा
### ( कार्यकारी मंडळाकडून )

येथे सालबादप्रमाणें यंदाहि माघ व॥ ९ तारीख ६-३-३७ ईसवीस परमपुज्य ब्रह्मचारी महाराज वीरलिंग स्वामी यांचे गुरुचे पुण्यति-थीचा समारंभ मोठ्या थाटानें पार पडला.

ता. ५-३-३७ ई. शुक्रवारपासून जनसमुदाय जमण्यास सुरवात झाली. ता. ६-३-३७ पावेतो सुमारे २-२॥ हजार (दोन अडीच हजार) लोक जमले होते.

विशेष सांगावयाचें तें हेंच कीं, या वर्षी गुरुकृपेमुळें आणि ब्रह्मचारी महाराज यांचे सत्कर्मबलपुण्याईनें खेड्याचे मानानें अवाढव्य जमलेल्या लोकसमुदायाची सेवा तळेगांववासीय लोकांनी एकदिलानें करून दाखविली. आमच्या डोळ्यासमोर फैजपूर–कॉंग्रेसचे खेडेगांवीं दोन लाख जनसमुदाय जमल्याचें – उदाहरण होतेंच. वरून आमची या वर्षी अशी फजिती होते की काय असें भासूं लागलें होतें. परंतु गांवकरी कार्यकारी मंडळ याचें कुशलतेनें समारंभ फारच पोक्तशीर विभावला.

## कार्यक्रम

शनिवार ता. ६–३–३७ सकाळीं काला आणि वीरशैव परिषदेचे अध्यक्ष यांची मिरवणूक नंतर ११ ते ७ वाजे पर्यंत भोजनसमारंभ रात्रौ यवतमाळ जिल्हा वीरशैव परिषद्, कीर्तन व गुरु महाराचांचे पालखीची मिरवणूक रविवार सकाळीं दहीहांडी.

## खेडेगांवांतील लोकांस नमुनेदार उदाहरण

याच समारंभाचे वेळीं ता. ६–३–३७ इसवी रोजी यवतमाळ-जिल्हा वीरशैव-परिषद भरविण्यांत आली होती. परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत रामचंद्रआप्पा सेठ कुल्ली रोहिणखेडकर, स्वागताध्यक्ष माधवराव बापुआप्पा खंदाडे दारव्हा खजिनदार आनंदराव पिराजी चावके तळेगांव त्याचप्रमाणें परिषदेंत वाटाघाट करणारें नानासाहेब बामणगांवकर, चौधरी, व दादाय्या शास्त्री उमरावतीकर.

श्री. कल्लय्या स्वामी पंढरपूरकर, रामचंद्र-अप्पा पहापळकर, तसेंच दारव्हा, कारंजा यवतमाळ वगैरे मंडळींनी बोधपर भाषणें करून शेवटीं हार तुरे यांचे गजरांत समारोप करून परिषदेला व पुण्यतिथीउत्सवास शोभा आणली होती. याबद्दल आह्मी त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

पुण्यतिथीउत्सव व वीरशैव परिषद साजरी करून दाखविण्याकरितां तऱ्हाळा, वाई, पिंचगांव, लोही, दारव्हा व तळेगांव या गांवचे व इतर मंडळीनी जो त्रास सहन केला तो प्रशंसनीय आहे. तसेंच श्रीयुत रामचंद्रबुवा पिंपळगांवकर व श्रीयुत दादय्या शास्त्री उमरावतीकर यांनी कीर्तनद्वारें ज्ञानामृत पाजलें याबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहोंत.

अशा प्रकारचे प्रसंग खेड्यातून निभाऊन नेण्याचें कार्य खेड्यांतून लोकांनी अवश्य लक्षांत घ्यावें.

सदरहू प्रसंगी तळेगांवचे पाटील छगुमीया व इतर हिंदु मुसलमान मंडळी यांची एकी असल्यामुळें हा प्रसंग फारच खूब दिसत होता.

## सदरहू प्रसंगांतील जमा खर्च

( श्रीगुरु वीरलिंगस्वामी गुरु कोरलिंगस्वामी तळेगांव याजकडून )

| | | |
|---|---|---|
| १ | नारायणराव सावकार कुणबी | रु. १२ |
| २ | आनंदराव पिराजी चावके | " २२ |
| ३ | हरिसा चतुरसा हेडमास्तर | " ११ |
| ४ | सखाराम लोखंडे तेली | " ११ |
| ५ | लटुजी सावकार धनगर | " ११ |
| ६ | लखमीचंद चुनिलाल मारवाडी | " १२ |
| ७ | शिवलाल मारवाडी | " १२ |
| ८ | गनुजी तेली | " १० |
| ९ | कीसन खोडे कुणबी | " १० |
| १० | छ्यामुमीया देशमुख | " १५ |
| | | १२६ |
| | ही ठोक वर्गणी | " १४९ |
| | चिल्लर वर्गणी | |
| | | " २७५ |
| | एकंदर तळेगांवची वर्गणी | " २०० |
| | एकूण परगांवची वर्गणी | |
| | | " ४७५ |
| | एकूण सर्व वर्गणी | |

| जमा रुपये | | नावें रुपये. | |
|---|---|---|---|
| २७५ | खुद्द तळेगांवची देणगी. | ३९०॥≈। | अन्न सामुग्री सर्व |
| २०० | परगांवची देणगी | १६४॥।- | चिल्लर खर्च |
| ४७५ | एकूण देणगी. | ५५५।≈। | |

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ मे १९३७ ( अंक ९ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



टीप:—ह्या अंकांत सुरुवातीपासून १६ पानांचे पृष्ठांक चुकून १८७ ते २०२ असे पडले आहेत; ते १९५ ते २१० असे वाचावेत.

वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

# जाहिर नोटीस

श्रीक्षेत्र काशी व पांडे बार्शी इलाहाबाद येथील व इतर सर्वत्र धुरंधर पटचर मूर्ति व वीरशैव धर्माभिमानी सर्व भक्तांना खाली सही करणारे यांजकडून या नोटीशीद्वारे जाहीर करण्यांत येते कीं श्रीक्षेत्र बनारस काशी येथ श्री वृद्ध मठ उज्जनी सिंहासनाधीष्ठ महंत नागलींग स्वामी मठ संस्थान पांडेकर या नावाने आमचा मठ आहे, या मठात श्री महंत नागलींग स्वामी यांनी आपल्या हयातीत आम्हाला दीक्षा व कानका विधी करून मुख्य शिष्य मठाधीकारी म्हणून मान्य केले. व तद अनुसार आम्हाला चरपट अधीकार ही पण झाला आहे. असे असता बरेच दिवसापासून धुंडीराज उर्फ सिद्राम स्वामी हे विनाकारण झगडे उपस्थित करीत होते ते झगडे आम्ही कौ. श्रीमंत नागनाथ शंभू आप्पा कथले रा० बार्शी व श्री० भगवंतराव शंभूआप्पा कथले [ मॅं. के. कौ. मुंबई ] यांच्या आश्रयाने व मध्यस्तीने मिटवून त्यांना पंच व्यवस्थापक मान्य केले आहे. पण अजून धुंडीराज उर्फ सिद्राम स्वामी हे पंचाच्या निर्णयाला झूगारून देऊन अरेरावीपणाने सर्वस्वी एकट्याचाच हक्क दाखवून मठाचा कारभार करीत आहे. व त्यांत त्यांनी मठाची नुकसानही बरीच केली आहे. व तो त्यांचा कार्यक्रम अजूनही चालू आहे. तो असा कीं, त्यांनी स्वधर्मशास्त्राविरूद्ध स्वतःचे हयातींत व पश्चातही रजिष्टर व्यवस्था पत्रकाद्वारे कुलमुखत्यार म्हणून परकीज जातीचा इसम नामे बचौगीर गुरू बनवारीगीर गोसावी हा नेमीला आहे. त्या यांने मठाच्या धार्मिक इभ्रतीला धक्का बसल्यावाचून राहणार नाही. वरील कुलमुखत्यार नेमण्यास अगर मठाची कोणतीही इस्टेट गहाण, विक्री अगर कोणत्याही तऱ्हेनें अफरा-तफर करण्याचा अधीकार कोणालाच नाहीं. तेव्हां अर्थातच श्री. धुंडीराज स्वामी यांनाही नाहीं, व तसे त्यांनीं केले असल्यास व पुढें करणार असल्यास मठाच्या / इस्टेटवर बंधनकारक होणार नाहीं. तरी या नोटीशीनें सर्वांना कळविण्यात येते कीं वरील कुलमुखत्यार बेकायदेशीर असून तो रद्द करण्यांत आला आहे. व त्याच प्रमाणें श्री. धुंडीराज अगर मुखत्यार यांच बरोबर कोणीही व्यवहार केल्यास तो बातल ठरविला जाईल.

वं संस्थानाचे इस्टेटीची लागवण, भाडे, अगर दुसरे कोणतेही उत्पन्न श्री. धुंडीराज स्वामी याना दिल्यास त्याजवर कोर्ट मार्फत कायदेशीर इलाज केला जाईल ता. १७-४-२७

सही

दः महंत चर मूर्ति शिवलिंग स्वामी गुरु महंत
श्री नागलिंग स्वामी पटचर मुर्ति पांडेकर

# संजीवनीची नवी व्यवस्था

अरुण छापखाना व उदय पत्र हे आम्हीं पांच वर्षांच्या करारानें विकत घेतले होते. ह्या पाच वर्षांत त्याच्या मालकी हक्काची आम्ही पूर्णपणें फेड करून आज अरुण-उदयचे पूर्णपणें मालक झालो आहोंत.

अरुण-उदयचा पसारा फारच वाढता असल्यामुळें त्याच्याकरितां स्वतंत्र व योग्य जागेची अवश्यकता आहे. उमरावती शहरवाचनालयानें आपल्या मैदानांत अशी जागा बांधावयास आम्हाला परवानगी दिल्यामुळे तेथे इमारत बांधण्याचे आम्ही योजिले आहे. ह्यांच इमारतीत वीरशैव संजीवनीची कचेरी व वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे ऑफिस याची व्यवस्था करून त्यांत धार्मिक पुस्तकाचें वाचनालय आणि वीरशैव हितसवर्धक-मंडळाच्या अध्यक्षाचें व कार्यकारी अशा सर्व सभासदांच्या फोटोचें अनावरणसमारंभ करून 'वीरशैव संजीवनी 'ला कायमचे स्वरूप खात्रीपूर्वक देता येईल अशी निश्चित योजनाहि करणार आहोत.

ह्या कायम योजनेतून संजिवनीला पगारी असा सहसंपादक नेमणे, वीरशैहितसंवर्धक मंडळाच्या कार्याच्या प्रसाराला प्रचारक नेमणे व त्या प्रचारकांच्या प्रवासखर्चाची सोय करणे वगैरे कामें आह्माला करितां येतील.

ह्या योजनेच्या चिरस्थायी त्वाकरितां संजीवनीच्या वाचकाजवळ आम्हाला थोडी योजना करावी लागेल. तद्‌वतच वीरशैवहितसवर्धकमंडळाचहि आम्हास सहाय्य घ्यावें लागेल.ह्या योगानें ' संजीवनी ' कायमचे स्वरूप धारण करण्यास समर्थ होईल अशी आह्माला पूर्ण आशा आहे.

व्यवस्थापक, वीरशैव संजीवनी, उमरावती.

# धुम्मा-पटणे पत्रकाचे जनक

[ श्रीमहास्वामी मुरघाराजेंद्र जगद्गुरु हे सोलापूर येथे आले असतांना रेवणसिद्ध मंदिरांत प्रथम त्यांची पाद्यपुजा व्हावी ह्मणून प्रसिद्ध वीरशैव पुढारी जमले होते. पण ती पूजा होऊं शकली नाही. म्हणून दिलगीरी प्रदर्शित करणाऱ्या पहिल्या पत्रकाचे जनक. ]

सोलापूरचे सुप्रसिद्ध वकील.



श्री. सिद्धराम बसाप्पा धुम्मा वकील.

सोलापूरचे प्रसिद्ध व्यापारी.



श्रीमंत सिद्रामप्पा पटणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

...ह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
...ङ्गधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

...नें वर्ष २ रें ) मिति वैशाख व० ५ शके १८५९ ( अंक ९ वा.

## महाराष्ट्र-वीरशैव--हितसवर्धक मंडळ व

# ह्या भागांतील परिषदा

(लेखक:—श्री. वि० तु० चौधरी, बी.ए, ज. सेक्रेटरी, म. वी.-हि.-संवर्धक मंडळ,अमरावती.)

" पंढरपूरचा कळलाव्या कल्लय्या ",

ता. ८-४-३७ ची 'वीरशैव गर्जना' व ता. १५-४-३७ ची 'वीरशैव संजीवनी' ह्या वृत्तपत्रांत यवतमाळ येथें. श्रीमंत बावसाहेब माधवराव देशमुख ह्यांचे अध्यक्षतेखाली ...शैवांची बाहिर सभा होऊन त्यांत पुढील ...राव माल्याचें प्रसिद्ध झालें आहे. ठरावः— ...वीरशैव हितसंवर्धक मंडळ समाजविघातक कार्यं करीत आहें, अशा तऱ्हेचे तळेगांव, ता. दारव्हा, येथील पुण्यतिथीप्रसंगी दृष्टोत्पत्तीस आलें. हें त्यांचें कृत्य यवतमाळ येथे आजरोजी भरलेल्या सभेला मान्य नसून, त्यासंबंधी ही सभा निषेध करीत आहें.' मांडणार श्री.नारायणराव हमदापुरे, अनुमोदन देणार श्री. महादेव आप्पा जुननकार. सभेला हजर असणाऱ्यांत पंढरपूरचे श्री. कल्लय्यास्वामी, लोहीचे श्री. गु.प्रभुअय्या, रामगांवचे श्री.गु.शंकरअय्या, वगैरे.

ह्या बाबतीत मंडळातर्फे मला एवढाच अधिकृत जाहीर खुलासा करावयाचा आहे कीं,

तळेगांव येथे वीरशैवहित सं. मंडळानें कांहीहि समाजविघातक कार्य केलें नाही. पुण्यतिथीच्या प्रसंगी तेथे यवतमाळ-जिल्हा-वीरशैव-परिषद भरली होती. त्या परिषदेचा व मंडळाचा कांहीच संबंध नाही. परिषदेचें स्वतंत्र स्वागत-मंडळ होतें व त्यांचेकडून ही परिषद भरविण्यात आली. मंडळाचे कांही सभासद परिषदेला हजर राहिले व आपली वैयक्तिक मतें व ठरावही तेथें मांडले. तीं परिषद सर्व वीरशैवांना मोकळी होती. तशीच ती मंडळाचे सभासदांनाहि होती. तेथें मांडल्या गेलेले ठराव किंवा तेथें प्रदर्शित केलेलीं मतें हीं व्यक्तिशः प्रत्ये-कानी आपल्या जबाबदारीवर प्रदर्शित केलीं आहेत. त्याचा मंडळाशीं किंवा अधिकृत धोर-णाशीं कांही संबंध नाही. मंडळाचे सभासदांत व कार्यकारी मंडळांत सनातनी, सुधारणावादी, व नवमतवादी अशी सर्व पक्षीय व मताची मंडळी आहेत. परिषदांतून ठरावांच्या रूपानें प्रदर्शित केल्या जाणारें मत हें साधारणतः वीरशैवबहुजनसमाजाचें मत असतें. तें म. वी. हि. सं. मंडळाचें अधिकृत मत नव्हे. तरी ह्या विभागांत भरणाऱ्या परिषदा व मंडळ ह्यांचा धोरणांच्या बाबतींत कांही संबंध नाही. तेव्हा मंडळाबाबतींत कुणींहि गैरसमज करून घेऊं नयें व गैरसमज करण्याचा प्रयत्न करूं नयें.

तळेगांवप्रमाणें कारंजा-प्रांतिक-परिषदेबाब-तींतहि मंडळाचें धोरण राहील.

महाराष्ट्र वी. हि. संवर्धकमंडळाच्या कार्य-कारीमंडळाच्या बैठकींत जरी प्रांतिक परिषद भरविण्याबाबतीत ठराव पास झाला असला व त्याप्रमाणें ती भरविण्याकरितां जरी मंडळाच्या कांही सभासदांनी खटपट केली असली व करीत असले तरी परिषदेचा किंवा त्यांत पास होणाऱ्या ठरावांचा व मंडळाचा कांहीहि संबंध नाही. परिषद ही सर्वपक्षीय असते व ती सर्व मतवाल्यांना खुली असते व आहे. प्रत्येक पक्षानें आपलें मत परिषदेसमोर ठरा-वाच्या रूपानें मांडावयाचें व ज्या ठरावाला बहुमत मिळालें व जो परिषदेंत पास झाला त्याला त्या भागांतील बहुमत अनुकूल आहे असें समजावयाचें असा रिवाजआहे. त्यांत कुणाहि मंडळाचा किंवा विशिष्ट पक्षाचा संबंध नाही.

वरील खुलाशावरून तळेगांव-परिषद, कारंजा-परिषद, किंवा इतर परिषदा ह्यांचा व म. वी. हितसंवर्धकमंडळाचा किंवा त्या मंड-ळाच्या धोरणाचा कांहीं संबंध नाही हें कुणाहि निःपक्षपाती वाचकाच्या लक्षांत येईल.

## श्री. कल्लय्याचा कळकळेपणा.

मला त्या ठरावापेक्षां, ही सभा रावसाहेब माधवराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली भरली ह्याचेंच अधिक नवल वाटतें, व ह्या बातमीवर मीं विश्वास ठेंविला नसता; परंतु ह्या सभेची हकीकत खुद्द रावसाहेबांनी आपल्या सहीनिशी लिहून पाठविल्यामुळें ती शंका राहिली नाही. दे. भ. बाबासाहेब बामणगांवकर ह्यांचेनंतर आजपर्यंत श्रीमंत रावसाहेब माधवराव देशमुख ह्यांचेंच नावाचा एक सुधारक समाजकार्यकर्ता ह्मणून लौकीक असे. समाजकार्याची व सार्वजनिक कार्याची बरीचशी पुण्याई त्यांचे पदरीं आहे. तसेच त्यांचे मोठेच मेहुणे श्री. मारोतिआप्पा गाढवे हेहि आपल्या जामाताप्रमाणेंच सार्वजनिक कार्य करीत असत व ह्या प्रांतात निदान इकडच्या भागांत ह्या दोघांच्या खटपटीने वीरशैवसमाजांत बरीचशी जागृति झाली आहे.

पोटजातीएकीकरण हा प्रामुख्यानें ज्या संघाचा उद्देश आहे (निराळा उद्देश असल्यास तसे त्यांनी जाहीर करावें) असा वीरशैवऐक्य-संवर्धक संघहि कांही वर्षापूर्वी श्रीमंत माधवराव देशमुख ह्यांच्या अध्यक्षतेखाली निघाला होता. किंबहुना श्रीमंत रावसाहेब देशमुख व श्री.

मारोती आप्पा गाढवे ह्या दोघांच्या खटपटी-नेच हा संघ निघाला होता. श्री. मारोती आप्पा गाढवे ह्यांनी तर आपल्या घरांतील विहीर अस्पृश्यांना खुली करुन दिली होती व त्याबद्दल त्यांचेवर सामाजिक बहिष्कारहि पडला होता व बराचसा त्यांना त्यामुळें त्रास झाला.

माझें ह्मणणें एवढेंच कीं, ह्या जोडीनेंच प्रथमतः एकीकरणाच्या व इतरहि सामाजिक सुधारणांना चालना दिली होती. व श्रीमंत रावसाहेब तर वाखाजलेले सुधारक आहेत व ह्या सुधारकाग्रणीच्या चळवळीमुळे व प्रत्यक्ष आचारधर्मीमुळेच आह्मा तरुण मंडळींना सार्वजनिक कार्याची प्रेरणा झाली. तेव्हा रावसाहेबांसारख्या सुधारकांतल्या सुधारकानी सनातन्यांच्या सभेंचे अध्यक्ष व्हावे व पुढारीपण घ्यावें ह्यासारखा विरोधाभास किंवा दैवदुर्विलास तो दुसरा कोणता ?

आमचा अजूनहि रावसाहेबांच्या सुधारणाप्रिय मतावरील व सार्वजनिक कार्याच्या आवडीवरील विश्वास उडाला नाही. त्यांना पंढरपूरचे श्री. कल्लय्यास्वामीनी तळेगांव-परिषदेबाबतीत कांही तरी विकृत हकिकत सांगितली असावी. कारण कल्लय्यास्वामींच्या सनातनी मतांना किंवा प्रचाराला तळेगांव-परिषदेंत कुणीहि विचारलें नाही, व पुढे इकडील भागांत त्यांना त्यांचे कल्पनेप्रमाणें दक्षणा देणारे " अंधश्रद्धाळू भगतगण " हि दिसले नाहीत ह्मणून त्यांचे अंगाचा तिळपापड झाला असावा. व ह्याचें कारण म. वी. हितसंवर्धक मंडळाचा प्रचार अशी त्यांनीच समजूत करुन घेऊन त्यांनी गांवोगांव मंडळाचे विरुद्ध मतप्रचाराचें कार्य आरंभिलें असें दिसतें, व अशा तऱ्हेच्या हकिकती लोही, घाटंजी, पारवा, आमला, चांदूरबाजार, यवतमाळ वगैरेकडील मंडळींनी आह्माला कळविल्या आहेत. यवतमाळ येथील सभा हा त्या उपद्व्यापापैकीच एक उपद्व्याप दिसतो. यवतमाळखेरीज कुठेहि समाजाच्या कळ लावण्याला यश आलें नाही, व त्यांची कुठेहि डाळ शिजली नाही, ही त्यांत महत्वाची गोष्ट आहे. पंढरपूरच्या आगांतुक दक्षणा गोळा करणाऱ्या जंगमापेक्षा मंडळाच्या सन्माननीय व जबाबदार कार्यकर्त्यांची माहिती व त्यांचें कार्या— वरील ह्या विभागांतील वीरशैवसमाजाचा विश्वास अधिक आहे हेंच कल्लय्याच्या " कळ लावण्याच्या " अपेशाचें सार आहे.

श्री. कल्लय्या ह्यांनीं अमरावती येथेहि अशा तऱ्हेचे लावालावीचे उपद्व्याप केलेत व कार्यकर्त्यांच्याविषयी स्वकपोलकल्पित बऱ्या-वाईट गोष्टी पसरविण्याचा चांगल्या प्रतिष्ठित घरांतून प्रयत्न केला. परंतु त्यांना त्यांत यश आलें नाही व ता. ११–४–३७ रोजीं श्री. फकीराप्पा हेगु ह्यांच्या अध्यक्षतेखाली " बसवेश्वरचौकांत " भरलेल्या सभेंत ते " विरोधी ठराव " तर पास करूं शकले नाहीतच परंतु श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे, श्री. त्रिंबक आप्पा कापुसकरी व श्री. मनोहर आप्पा मिटकरी ह्यांनी सडेतोड भाषणें करुन श्री. कल्लय्याच्या ' मनाचे मनोरे ' ढासळून टाकलेत व त्याचा डाव उधळून लावला. त्यांना गांवात अपेक्षेप्रमाणें दक्षिणा मिळाली कीं नाही हें मला माहित नाही; परंतु येथे त्यांचा डाव त्यांचे अंगलट आला ही गोष्ट मात्र जाहीर आहे.

एकंदर वरील खुलाशावरुन " यवतमाळची सभा " ही श्री. कल्लयाच्या कळीचा नमूना आहे ह्यापलीकडे त्याला किंमत नाही. आह्माला रावसाहेब देशमुख ह्यांच्या सुधारणाप्रिय मताविषयी माहिती आहे व महाराष्ट्र वी. हितसंवर्धक मंडळाचें ध्येय व धोरण वी. समाजाची सर्वांगीण सुधारणा करणें हें असल्यामुळे त्याला रावसाहेबांचा विरोध असण्याचें कांहीहि कारण नाही. तसेच, परिषदा व मंडळ ह्यांचा कांहीही संबंध नाहीं व तसा कुणी गैरसमज करून घेऊं नयें व करूं नयें हीच सर्वांना नम्र विनंती आहे.

# येत्या प्रांतिक परिषदेपुढील कार्य

(ले०—श्री. तु० ना० काटकर चिमूर.)

केल्याने होत आहे रे, आधी केलेंचि पाहिजे ॥

—श्रीसमर्थ

## हेतु, महत्व, नि घटना

आधुनिक युगांत वीरशैवामध्यें परिषदांचा फारच सुळसुळाट सुटला आहे. ह्मणून हा परिषदांच्या चढाओढीचा काल निर्मिला आहे ह्मणावें, कीं वीरशैवांत समाजोन्नतीचें वारें संचरलें आहे ह्मणावें? ह्याचा निर्णय एकदम ठोकून देणें ह्मणजें केव्हांहि अविचारीपणाचें होईल. वरचेवर अनेक परिषदा बोलावून विचारांचा खल करणें ह्मणजे कांहीं समाजोन्नति ह्मणता येणार नाही. अनेक परिषदा भरविण्यापेक्षा वर्षांतून एखादीच निर्णयजन्य परिषद भरविली गेली तर ती समाजाच्या हिताच्या बाजूनें अधिक फायदेशीर होईल.

जिल्हानिहाय परिषदा भरवून विचार-विनिमयास अवसर मिळत असला तरी खर्चाचा बोजा वाढून 'आरंभशूर' किताब मिळायला उशीर लागणार नाहीं. त्यापेक्षा प्रांतिक सभेसच जिल्ह्या–जिल्ह्यांतून प्रतिनिधी बोलावण्यांत यावे व त्यांतूनच त्यांच्या मतांचें सहकार्य घेतलें जावें.

आपल्या समाजाच्या संख्येच्या मानानें विचार केला असतां जिल्हावार परिषदा भरविणें ह्मणजे खरोखरच पैशाची व्यर्थ धुळधाण करण्यासारखें आहे. तोच पैसा अनाथांच्या उन्नतिप्रीत्यर्थ वा दुसऱ्या सद्कार्यांत खर्ची घातला तर यापेक्षांहि सार्थकी लागेल. एवढ्यावरुन आमचें मत परिषदा भरविण्याच्या विरुद्ध आहे असा दुराग्रह होऊं देतां उपयोगाचा नाही. हा केवळ कालमानाच्या दृष्टीनें सुचवावयाचा विचार आहे. यावर कोणी अशीहि तोड सुचवील कीं, प्रांताचा, किंवा राष्ट्राचा, कारभार चालवितांना त्याचे पोटविभाग पाडण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. पण राष्ट्राचा राज्य-कारभार नि वीरशैवांच्या परिषदांची घटना ही जरी योजनेच्या उपयुक्ततेच्या तत्वानें सहधर्मी असली तरी आर्थिक नि लोकसंख्येच्या बाजूनें दोन ध्रुवांमधील अंतराएवढी भिन्न आहे. ह्मणून तीच घटना आमच्या परिषदांच्या बाबतींत निदान आजच्या बेकारीच्या काळांत तरी स्तुत्य होणार नाही. दोहोंत फरक असेल तो एवढाच. ह्मणून आज जिल्हावार परिषदा भरविण्यापेक्षां प्रांतवार परिषदा भरविणेंच अधिक उपयुक्त आहे. व त्यांतच समाजाचें एकीकरण, उन्नति नि पैशाचा सदुपयोग व विचारांचें सहमत आहे.

हेतुपुरस्सर परिषदा भरविण्यांत येतात पण हेतु मात्र सफळ होत नाहीं. ह्याला कारण आमच्या बहुसंख्यसमाजाचें अज्ञानतम जीवन हें प्रमुख आहे. पण त्यावर रामबाण गुणकारी उपाय ह्मणजेच परिषदा भरवून सुज्ञांच्या सोज्ज्वल मतांचा पगडा त्यांचेवर बसविणें हा होय. तसाच दुसरा सहजासहजी सरळ मार्ग

ह्मणजे शिक्षणाची वाढ. परिषदांच्या जागृती-बरोबरच तितक्याच आपुलकीनें आपल्या समाजांत सर्वत्र शिक्षणप्रसार करण्याबद्दल द्रव्यसहाय्याचीहि आज फारच आवश्यकता आहे. ह्मणून ह्या गोष्टीकडें सारख्याच आपुलकीनें लक्ष देणें हें समाजधुरीणाचें आद्य कर्तव्य आहे.

इच्छा आहे तेथें मार्ग आहे. पण ते ते प्रयत्न त्या-त्या मार्गानें झाले पाहिजेत. मंदिरावर कळस एकदमच चढत नाहीं. तो चढविण्याकरितां प्रथम नाना यत्नांचाच पाया घालावा लागतो, नि तो चिरकाळ टिकावा अशी इच्छा असेल तर त्याकरितां त्याचा पायाहि तितकाच भरभक्कम असावयास पाहिजे. पण त्या दिशेने आजच्याहि काळांत आमच्या समाजाचे प्रयत्न दिसत नाहींत.

आजपर्यंत महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतून लहान-मोठ्या बऱ्याच परिषदा भरविण्यात आल्या, पण चिरसंस्मरणीय अशी कामगिरी एकाहि परिषदेकडून झाली नाहीं. ह्मणून त्या झाल्या तशा गेल्या असें ह्मणणें अनाठाई होणार नाहीं.

गतसालीं बुलढाणा जिल्ह्यांतील रोहिणखेड येथें प्रांतिक परिषद भरविण्यांत आली, नि या वर्षी आकोला जिल्ह्यांत कारंजा (लाड) येथें भरविण्याचें निश्चित झालें. दोन्ही परिषदा प्रांताच्या एकाच टोकाला. त्यामुळें त्यांचा फायदा सर्वांनाच सारख्या प्रमाणांत घेतां येत नाहीं. गतवर्षी पश्चिमटोकाला किंवा निदान मध्यवर्ती भागांत तरी व्हावयास हवी होती. जेव्हां ह्या परिषदा दरसाल नवीन नवीन भागांतून होत जातील तेव्हांच त्यांचें महत्व सर्वांना कळून येईल. नाहीं तर गतवर्षी रोहिणखेडला नि यंदा कारंज्यास ह्मणजे विचारांतीं दोन्ही परिषदा एकच स्थळीं झाल्या ह्मटल्यास कांहीं हरकत नाहीं. ह्मणून त्याचा फायदा सर्वांना घेतां येणें शक्य नाहीं. व समाजजागृतीचें दृष्टीनें अशी योजना अगदींच जरी नसली तरी बऱ्याच अंशानें निरुपयोगाची ठरते.

## योग्यायोग्य

उपरिनिर्दिष्ट विचार जरी प्रांत व प्रांतांतील समाजजागृतीचे बाजूनें सर्वथैव योग्य असले तरी द्रव्यसहाय्याच्या नि व्यवस्थेच्या बाजूनें योग्य होणार नाहींत हें आह्मी पूर्णपणें जाणून आहोंत. ह्मणूनच ज्या स्थळीं द्रव्याचें साहय मिळेल, कार्यकर्त्यांची सहानुभूति दिसेल, तेथेच परिषद बोलवावी लागेल. त्यावर दुसरा कांही उपाय नाहीं. ह्मणूनच कोणीहि अमक्याच विशिष्ट स्थळीं परिषद भरवा अशी सक्ति करीत नाहीत. कारण आजच्या काळांत जर अशी उदार आस्था बाळगणारे वीर बोटावर मोजतां येण्याइतकेहि सांपडणे दुर्लभ. असें केलें पाहिजे, नि तसें करा, ह्मणणारेच फार. ह्मणून जें होत आहे तें शक्य त्या योजनेनें चांगलेंच होत आहे. चालत्या गाड्याची खिळोटी काढण्यात कांही तथ्य नाही.

## प्रांतिक परिषदेचा अंतिम हेतु

ही जरी " मध्यप्रांत – वऱ्हाड " ची प्रांतिक परिषद् भरत असली तरी तिच्या नियोजित स्थळावरुन तिचा अंतिम हेतू अति उच्च प्रकारचा आहे असें आमच्या मतें वाटतें. कारण ती जरी मध्यप्रांत-वऱ्हाडांत भरत असली तरी मध्यप्रांत, वऱ्हाड, खानदेश-प्रभृति प्रांतांच्या सीमेवर भरत आहे. ह्मणून प्रांतिक सदराखालीं जरी ती भरत असली तरी तिची लालसा " महाराष्ट्र "–जागृतीची दिसत आहे. महाराष्ट्राला केंद्रस्थ पडावें ह्मणूनच कारंजा स्थळ पसंत केलेलें दिसतें. आणि ह्या दृष्टीनें तिचें महत्व फार आहे. ह्मणून तिचें कार्यहि तितकेंच उदारवादी व उच्च दर्जाचें असावयास हवें.

## परिषदेंपुढील कार्य

हल्लीं नवमतवाद, सामाजिक एकीकरण, व ह्यांस सनातन्यांचा विरोध, अशा सर्वच मतांना तोंड फुटलें आहे. नि ह्या तिन्ही मतांत सह-मत होणें कदापिहि शक्य दिसत नाही. पण समर्थोक्ति आहे 'केल्यानें होत आहे रे.' त्याबरोबर 'आधी केलेंचि पाहिजे' ह्या तत्वास अनुसरूनच याशिवाय आणखीहि कांही कार्य जनताजनार्दनापुढे ठेवण्याचें आम्हीं ठर-विलें आहे. त्यावर आमच्या सुशिक्षित सुहृ-दांनी बुद्धिग्राह्य विचार करावा.

(१) "वीरशैवधर्मास नि धर्मोद्धारकांस मराठी, हिंदी व इंग्रजी इतिहासाच्या शिक्षण-क्रमांत सक्तीने प्रवेश मिळण्याबद्दल सरकार-कडे वीरशैवसमाजाची एकमतानें मागणी."

ह्याच विषयावर मागील 'वी. सं.' चें अंकांत सकारण ऊहापोह केला आहे. त्यावरून ह्या कार्याची आवश्यकता स्वधर्माभिमानी कार्यकर्त्यांच्या ध्यानांत सहज जागृत होईल. ह्मणून येत्या परिषदेंतहि हा प्रश्न उचलून धरणें अगत्याचें आहे.

(२) "नवमतवादाच्या तत्वावर सामाजिक एकीकरण".

ह्या कुतुहलजन्य प्रश्नावर आजपर्यंत अने-कांचें मत प्रसृत झालें आहे. आज हा कांही नव्याने राहिला नाही. बौद्धिक निकषावर ह्या मताची उभारणी होणार आहे. त्यामुळे शास्त्र-पुराणमतवादी समजून-उमजूनहि विरोध करि-तात. आजचें शास्त्र-पुराण हेंच त्या काळचें नवमत होतें. नवमतवाद हा भूतकाळीं होताच, वर्तमानकाळीं आहेच व भविष्य-काळीं रहाणारच. नि शाब्दिक प्रामाण्यवादी त्याला असाच विरोध सुरुं ठेवणार! यांत कांही शंका नाही. पण कालमानाप्रमा-णेंच समाजाची घटना राहील तरच तो समाज वा धर्म जगाच्या बरोबरीनें पदार्पण करील. नाहीतर त्याच्या गर्जना वृथा आहेत. आमच्या बुद्धिजीवी समाजानी जग रोजच्या रोज किती पुढे पुढें चाललें आहे याचा विचार करावा, नि उपरिनिर्दिष्ट तत्वावरच सामाजिक एकी-करणास पाठिंबा द्यावा. त्याशिवाय तुह्मी कितीहि सुधारणांचा डोल्लारा रचला तरी तो एक दिवस ढांसळल्यावांचून रहाणार नाही हें ध्यानांत असूं द्या. आणि शेवटीं लिंगायतचा लिंगायतच ह्मणून तुमचा-आमचा जगांत हंशा नि मान-हानी होणार! आणि ह्याचें श्रेय शेवटी कोणांस लाभणार हें सांगण्याची कांही जरूर नाही. ह्मणून केवळ शाब्दिक अट्टाहास सोडा नि बौद्धिक प्रामाण्यास चालना द्या.

(३) "मठसंस्थांचा कारभार कायद्यानें पंचा (ट्रस्टी) च्या तंत्रानें चालविण्याबद्दलचे हक्क समाजानें मिळविणें."

ह्या हक्काची समाजास जरूर काय? ह्या मताचाहि कांही समाज निघेल. आजचा काळच असा आहे कीं, कोणी गांधीची बाजू घेतली कीं त्यावर कांही विचार न करितां दुसरा पक्ष गव्हर्मेंटची बाजू घेतो. पण प्रत्येक ठिकाणी विचार केल्यास आज मठसंस्थास ट्रस्टीची किती आवश्यकता आहे हें कळून येणार आहे. वास्त-विक पहाता मठसंस्था ह्या समाजाच्या सर्वांगीण उद्धाराकरितां आहेत. पण स्वार्थापुढें ते आपलें कर्तव्य विसरले, नि स्वतःच्या चैनी-खातर वाटेल तसा उपयोग करूं लागले आहेत. किंबहुना संस्थांच्या व्यवस्थेकरितां असलेल्या स्थावर—जंगम द्रव्यनिधींचाहि दुरुपयोग नि धुळधाण होत आहे. आज अल्पस्वल्प प्रमाणांत तरी दृष्टींस पडतात पण या संस्थाकडे अशीच डोळेझांक झाली तर कांही कालानीं त्या नादार स्थितींत दिसल्यावाचून रहाणार नाहीत. ह्मणून या प्रश्नाकडे आज तावडतोब लक्ष देणें अत्यंत जरूरीचें आहे. तरच समाजाची इभ्रत

...यावेल, वि संस्थांच्या द्रव्यनिधींचा सदुपयोग होईल. आजच्या समाजोद्धाराच्या काळांत आमच्या पुढारी वर्गानें मठसंस्थांचा कारभार आपले हातांत घेऊन व्यर्थ अवाठायी खर्ची होणारा पैसा सार्थकी लावावा अशी आमची त्यांना विनंती आहे.

(४) "बसवीर" माहेश्वर मंडळाची स्थापना व त्याचें कार्य अस्तित्वांत आणलें जावें, ह्यावर स्वतंत्र विचार." सन १९३६ चे 'वी. सं.'तून आलेलें आहेत, तेव्हा पुनः चर्वण करण्याची जरूर नाही.

(५) "प्रांतिक परिषदा दरसाल प्रांताच्या भिन्न भिन्न भागांत बोलावून त्यांचा फायदा सर्व समाजास दिला जावा "

प्रस्तुत लेखाच्या पूर्वभागांतच या कल्पनेचें महत्त्व येऊन गेलें आहे. तेव्हा पुनः येथे द्विरुक्ति करण्याचें प्रयोजन नाही.

प्रिय वाचक हो ! उपरिनिर्दिष्ट पांच प्रश्न आपणापुढे आणून देण्याचा यथामती प्रयत्न केला आहे. त्यांतून आपणास जें ग्राह्य वाटतील त्यांस एकमतानें पाठिंबा देण्यास विसरू नका. यांत बळजबरीचा सवाल नाही. प्रत्येकाच्या तर्कशुद्ध अनुभव बौद्धिक मताची आवश्यकता आहे. आयुष्याकडे बघा नि कार्याची तत्परता बाळगा. " केल्यानें होत आहे रे " ह्मणून " आधी केलेंचि पाहिजे. "

---

लघुकथा ८ वी.

# शीलवंताचें हाड की हाडूक ???

लेखकः— **त्रिवेणीतनय.**

" शीलवंताचं हाड पाहून आप्पासाहेबांनी यमुना दिली खरी, पण ते तिच्या गळ्यांतील शेवटी हाडूकच ठरलं !!! "

अजूनहि तो प्रसंग आठवला ह्मणजे अंगावर शहारे येतात! " जळगांव जळगांव " पोर्टरच्या आरोळ्यांनी जवळ जवळ माझी झोंप मोडली, व मला एकदम यमूनेचें स्मरण झालें.

मल्लिकार्जुनांनी, मी मुंबईहून निघण्यापूर्वी, मुद्दाम मला पत्र पाठवून तिची भेट घेऊन येण्याविषयीं सुचवून ठेवलें होतें, व त्याप्रमाणें मी तिला एक्सप्रेसच्या वेळेवर येऊन भेटण्याविषयीं लिहिलें होतें.

मी खिडकींतून बाहेर डोकावलं, तों यमुना आपल्या ४—५ मुलांचा परिवार घेऊन उभी होती. माझ्याकडे लक्ष जातांच "ते बघा गाडींत मामा आहेत" असें तिने ह्मणतांच "मामा, मामा!" ह्मणून मुलें ओरडूं लागली. अर्थातच मला गाडींत स्वस्थ बसणं शक्यच नव्हतं! मी चटकन् खालीं आलों.

जळगांवस्टेशनवर १५-२० मिनिटांपेक्षां गाडी जास्त थांबत नव्हती.

थंडीचे दिवस. सकाळी ७-७॥ ची वेळ. अंगभर घड वस्त्र नसल्यामुळे यमुना थंडींत कुडकुडत होती, आणि मुलेंहि आईच्या त्याच फाटक्या वस्त्राच्या आश्रयाने उभीं होतीं.

मीं बरोबर आणलेलीं खेळणीं व खाऊ त्यांना दिला, तीं त्यांत रंगलीं, बाह्य परिस्थितीचा त्यांना विसर पडला.

यमुनेंत कोण पण फरक पडला होता! जवळ जवळ ७ वर्षांनंतर मी तिला पहात होतो.

विरनिराळ्या विषयांवरील आमच्या वादविवादांत खटयाळपणानें एखादाच सूचक प्रश्न करून आपल्या बुद्धीची चमक दाखविणारी तल्लख पोर, भावजयींना नाना विनोदी चेष्टा-कुचेष्टांनी भंडावून सोडणारी आप्पासाहेबांच्या घरांतील मूर्तिमंत चालता - बोलता आनंद ह्मणजे यमुना!

तिचें तें करपलेलें स्वरुप व त्यावरील ह्यातारपणाची अवकळा पाहून माझ्या हृदयाला चरकाच बसला! तिचं लग्न मनोहरशीं झालं असतं तर!

पण सुशिक्षित व कर्तबगार मनोहर शीलवंत नव्हता, तो पंचम होता. शिवमूर्ति, ते शिलवंताचं ह्याड, ह्याड कसलं? ह्याडूकच तें! केवळ माईसाहेबांच्या दूरच्या नात्याच्या नाजुक आधारावर स्वरुप-सुंदर यमुनेच्या पाणीग्रहणाकरिता तो शीलवंत ह्मणून बोहल्यावर चढूं शकला! ना घड सुशिक्षित वा कर्तबगार. श्रीमंत ह्मणावं तर तेंहि नाही. उलट व्यसनी आणि कमालीचा लहरी. परंतु हो माईसाहेबांचा दूरचा नातलग, व माईसाहेब ह्मणजे आप्पासाहेबांच्या द्वितीय संबंधाचें कुटुंब! तिचं मन मोडण्याचं धैर्य आप्पासाहेबांना झालं नाही, व त्याचाच परिणाम ह्मणजे यमुनेच्या—त्यांच्या प्रथमपत्नीच्या मुलीच्या संसाराचा-आयुष्याचा सत्यानाश करण्यात झाला!

गरीब बिचारी यमुना!

तिच्या असहाय्य अवस्थेकडे पाहून मला चमत्कारिक झालं. एका क्षणांतच ह्या दैवी घटनेचा चलच्चित्रपट माझ्या मनश्चक्षूसमोरून निघून गेला. मीं विषय बदलण्याकरितां तिला विचारलं,

"शिवमूर्ति कसा नाही आला भेटावयाला?"

"तें मिलावर कामावर गेलेत." तिनें कष्टानें उत्तर दिलें.

"तुला बरं वागवितो ना?"

"होय! बरंच ह्मटलं पाहिजे, चार कच्च्याबच्च्यासह अजून जिवंत ठेवलंय!!"

इतक्यांत गाडीनें शिटी फुंकली.

"मलकार्जुनला तुझ्या भेटीला पाठवूं काय?"

"कशाला? तुह्मी भेटलांत एवढंच पुरे! आणि दादा तरी येऊन काय करणार? आणि त्यांनी तरी माझ्या संसाराला कुठं कुठं ठिगळ लावावं! त्याला मी सुखी आहें ह्मणून सांगा. मुलं सारखी त्याची आठवण करितात. दादा वहिनींना ह्मणावं कीं यंदा महालक्ष्म्याला आमच्याकडेच सारींजण या, आणि तुह्मीदेखील यांतावद यायला विसरूं नका?"

इतक्यांत गाडी सुटली. दोघांच्याहि डोळ्यांत तरंगणाऱ्या अश्रूंमुळे आह्मी एकमेकांना अस्पष्ट दिसत होतो. अंतर्यामीं भावनांचें कोण कोलाहल सुरु होतें!!

तिची लहान मुलें हातांत खेळणीं घेऊन आनंदाने सारखे बेहोष नाचत होते.

*  *  *

आमच्या स्टेशनमध्यें गाडी शिरतांच मी सामानाची आंवराआवर केली. गाडी थांबली. तोंच मल्लिकार्जुनानें डब्यांत येऊन सामान-देखील काढावयाला सुरुवात केली व त्या धांदलींत च त्याने 'यमुना भेटली किंवा नाही, तिचें कुशल आहेना? ' ह्मणून प्रश्न केलाच.

'मल्लिकार्जुन आधीं घरीं चल. मग आपण सावपणें बोलूं ' असें ह्मणून मी ते वेळीं टाळलं.

मी त्याला " यमुना भेटली होती , सुखरूप आहे" असें टांग्यातून सामान उतरवीत असतांना सांगून, त्याला दुपारी त्याच्याकडे जाऊन गप्पा मारण्याचें अभिवचन देऊन, मी घराकडें वळलों.

टांग्याचा आवाज ऐकतांच 'पुष्पा'ला कडे-वर घेऊन माझ्या स्वागतार्थ " शांता " दारांत सस्मित उभी होती !

" हें काय ? भाऊजींना चहाकरितां-देखील थांबवलं नाही ? ही कोण बाई मुल-खावेगळी तऱ्हा !! " शांता ह्मणालीं. मला पहातांना माझ्याकडे झेंप घेण्याकरितां आईच्या कडेवर त्या चिमुरडीची काय पण धडपड सुरुं होती. !

पुष्पा ! सुखदुःखाच्या लाटांनी हेलकावणाऱ्या आमच्या जीवनांतील समाधानाचं व विश्रांतीचं हे एक स्थान होतं ! आमच्या खेळीमेळीच्या संसारांतील ती ' भुलभुलावणी ' होती !

माझ्याकडें यायला गुलाम कशी आतुर झाली होती !

" जिकडचं तिकडेच जायचं! मुंबईहून तुझ्या-करितां काय आणलंय तें घेतल्याखेरीज मुळीच त्यांचेजवळ जाऊ नको " शांता तिला अडवून ह्मणाली.

मी हमालाला सर्व सामान घरांत ठेवावयाला सांगून, पुष्पा-चा एक गोड पापा घेतला व [illegible] काढून स्नानगृहात शिरलों. माझं स्ना[illegible] जाणं ही जेवणाची नोटीसच समजून [illegible] पाटपाणी करून जेवणाची तयारी केली. माझं कशाकडेंच लक्ष नव्हतं. माझ्या आठवणीतून यमुनेची करुण कहाणी जातां जाइना ! माझ्या आव-डीचे बहुतेक सारे पदार्थ पानांत वाढलें असूनहि, व जवळजवळ अर्धे जेवण मी मुखस्तंभासारखे संपविल्यामुळे, शांता साहजिकच चिडली.

जेवीत असतानां पानांतील पदार्थांच्या गुण-दोषांची चर्चा व पदार्थ करणारीच्या सुग-पणाची तारीफ किंवा कौतुक हा स्त्रीस्वभा-वांतील एक नाजूक भाग आहे. त्याकडे पुरुषांचें किंचित् दुर्लक्ष झाल्यास त्यांच्या अंगाचा तिळपापड होतो.

माझ्या मित्रगृहीं ह्या माझ्या अक्षम्य अपराधाबद्दल आमच्या वहिनीकडून जेवतांना माझी नेहमीच हजेरी घेण्यात येत असते.

माझ्या ह्या गुन्ह्याबद्दल शांता मला एक सणसणीत व्याख्यान ऐकविणार अशी माझी अटकळ होती, व ती अखेर खरीहि ठरली!!

शांता चिरडून ह्मणाली,'नाही तरी बायकांचा जन्मच मुळीं व्यर्थ. मी सारे आवडीचे पदार्थ तयार करून वाढलेत, पण एकाहि पदार्थाचं कौतुक केलं काय? मघापासून पहातें आहे. एक शब्द घड बोलतील तर शपथ! जेवणांत तरी कुठं लक्ष आहे!! नाही तरी एकाद्या दिवशी भानावर बसल्यासारखंच करणं होतंय. तुह्माला त्या सभा, व्याख्यानें, ही

लेख ह्यांतच सारा आनंद वाटतो. आणि पायाला तर जसा कांहीं भोंवरा बांधला आहे! चार दिवस कांहीं घरीं राहणं होत नाही!! बरोबरच्या चार मैत्रिणी उगीचच ह्मणतात कीं, तुझं नशिब चांगलं ह्मणून तुला असा नवरा लाभला. कुणि ह्मणतात "शांताने गौरीहरा "ची चांगली पुजा केली होती." आणि जी-ती माझा हेवा करते. मेल्यांना माझी सुखं-दुःख कळत नाहीत तोंवरच! त्यांना काय माहीत कीं इकडे कधी कधीं वेडाची लहर येते ह्मणून" माझं शांताकडे लक्ष गेलें तों तिच्या डोळ्यात पाणी तरारतांना दिसलें. मी चटकन् भानावर आलों. "वेडी कुठली! अग मी त्या यमूनेच्या विचारांत होतो."
"असं हो! यमुना वन्स भेटल्या वाटतं—सख्या बापानं बिचारीचा संसार नासला. मला काय माहित कीं तुह्मी वन्संच्या परिस्थितीच्या दुःख पूर्ण विचारांत मग्न झाला होतां ह्मणून? नाही तरी इकडच्या सारखं कोवळं मन कुणाचंच नाही! मी आपली वेडी ह्मणून उगीच टीका करीत बसते. खरोखर बायकांना बुद्धी कमी ह्मणतात तेंच खरं!! बाकीं, माझं नशीब ह्मणूनच मला इकडच्या पायाचा लाभ झाला!!!".

विशुद्ध प्रेमाच्या पोटीं उत्पन्न होणारी ही रुसण्या-फुगण्याची वादळें आमच्या नितांत रमणीय वैवाहिक जीवनांत आनंदाची भरच घालीत असत.

*　　*　　*

मी आणि शांता, उभयतांच्या पूर्ण संमतीनें झालेला आमचा विवाह, आणि आमचा "खेळी-मेळीचा संसार!!

यमुना आणि शिवमूर्ति ह्या विषम जोडप्याचा जबरदस्तीचा विवाह आणि त्यांचा विसकटलेला संसार!!

## हें चित्र, आणि तें!!!

यमुनेच्या स्वरूपांत साऱ्या स्त्रीगणाची असहाय्य स्थिति माझ्या डोळ्यासमोर उभी राहिली! त्यांचा विष्प्रेम संसार व सामाजिक कुचंबणा माझ्या सदसद्विवेक बुद्धीला सारखी धक्के देत होती.

मी, मनोहर व मल्लिकार्जुन असे तिघेहि एकाच शाळेंत सहाध्यायी होतो. मल्लिकार्जुनचें घर साधारणतः मध्यावर असल्यामुळें आह्मी सर्व त्याच्याकडे अभ्यासाला किंवा गप्पा मारावयाला एकत्र जमत असूं! मल्लीकार्जुन शीलवंत, मी दिक्षवंत व मनोहर पंचम असे तिघे तीन पोटजातीचे असलो तरी ह्या क्षुल्लक भेदाभेदाची कधी चुकूनहि कल्पना आमच्या मनांत आली नाहीं. आह्मी सर्व मोकळेपणानें एकमेकांकडे जेवावयाला येत असूं! मनोहर तर जवळ जवळ आह्माला आमच्या कुटुंबियांपैकींच वाटत असे. मल्लिकार्जुनचे घरांत त्याचे वडील आप्पासाहेब, त्याची बह्मिण यमुना, व सापत्नमाता माईसाहेब, अशी मंडळी होती. यमुना आमच्यापेक्षा ३-४ वर्षांनी लहान, आह्मी सर्व हायस्कुलांत जात होतो तें वेळीं ती कुठे इंग्रजी १ ल्या वर्गात जात असे. बाकी ती स्वरूपाने जशी सुंदर तशी बुद्धीनेंहि चलाख होती. आमची सर्वांची इच्छा तिनें हायस्कूलपर्यंत शिकावें अशी होती. परंतु माईसाहेब ह्या मुलींच्या शिक्षणाच्या अगदीच विरुद्ध होत्या. शिक्षणानें मुली बिघडतात असं त्यांचं ठाम मत होतं. 'मुलीला चूल आणि मूल सांभाळतां आली म्हणजे तिच्या जन्माचं सार्थक झालं, शिकून साहेबांच्या खुर्चीला खुर्ची लावून थोडंच बसावयाचं आहे?' असं त्यांचं म्हणणं असे. त्यांच्या ह्या एकंदर बोलण्यावरून त्या लौकरच यमुनाचं शिक्षण बंद करतील अशी आह्मा सर्वांचाच खात्री

होतो. खुद्द आप्पासाहेबांच्याहि मनांत यमु-नेचं शिक्षण बंद करुं नये असं होतं. परंतु त्यांचं माईसाहेबांसमोर कांही चालेना. शिवाय यमुनेचं शिक्षण बंद करण्यात माईसाहेबांचा दुसराच हेतु होता. त्यांचे मनांतून यमुनेला त्यांच्या दूरच्या एका नातलगाला पोरक्या शिवमूर्तीला द्यावं असं होतं. शिवमूर्ती कांही फारसा शिकलेला नव्हता! यमुना जर जास्त शिकली व तिचं बरंवाईट तिला कळाव-यास लागलं तर शिवमूर्तिच्याच काय पण तिला पसंत नसलेल्या कोणत्याहि पोराच्या गळ्यांत आपल्यालाच नव्हे तर खुद्द आप्पासाहे-बांनाही बांधतां येणार नाही. ही भीति माईसा-हेबांच्या मनांत होती, व त्यामुळे त्यांनी अखेरीस यमुनेचं शिक्षण आप्पासाहेबांकडून बंद करवलं! आप्पासाहेब विचारे काय करणार! पोरीच्या भवितव्यापेक्षा दुसरपणच्या बायकोचं मन राखणं त्यांना जास्त जरूरीचं वाटलं!

बिचाऱ्या यमुनेला ह्या गोष्टी कळत नव्हत्या असं नाही. पण ती काय करणार? मल्लि-कार्जुन आणि यमुना, सख्खी बहिण-भावंडं, आप्पासाहेबांचीच मुलें खरी, पण त्यांचं म्हणणं ऐकून घेण्याचे आप्पासाहेबांच्या मनांत मुळींच होतें नव्हतं! माईसाहेब! उतार-वयांतील दुसरपणची बायको. तिची ते मर्जी थोडीच मोडणार!! ना घड पाहिलेल्या लहरी व अशिक्षित उडाणटप्पूबरोबर आपलं लग्न होणार ह्या कल्पनेनं यमुनेचं मानसिक स्वास्थ्य केव्हांच हिरावून घेतलं होतं. यमुनेच्या सुख-दुःखाचा प्रश्न आपण धिटाईने पुढे होऊन सोडवावा असं मात्र नाही ह्याची मल्लिकार्जुनाच्याहि मनाला खंत वाटत होती. यमुनेच्या खोलींत कितीतरी वेळां दोघा बहिणभावांना अश्रु-पूर्ण नेत्रांनी हितगूज करतांना मीं पाहिलं होतं? मल्लिकार्जुनाच्या मनांत किंबहुना आमच्या सर्वांच्या मनांत यमुना मनोहरला द्यावी असं होतं. मनोहर हुषार, खेळाडू व सार्वजनिक कार्याची आवड असणारा कर्तबगार विद्यार्थी होता. हायस्कुलांतील विद्यार्थ्यांच्या सर्व संस्थां-तून कुठं अध्यक्ष तर कुठे सेक्रेटरी तो असावयाचाच!! हायस्कुलांत अशी एकहि सार्वजनिक चळवळ होत नसे कीं, जिचें पुढारीपण मनोहरला नसे. शिक्षकवर्गांत देखील त्याचेसंबंधी आदर असे. विद्यार्थ्यांच्या कोणत्याहि सार्वजनिक प्रश्नावर त्याचें मत ते विचारीत. त्याच्या लेखाला नामांकित मासिकांतून नेहमीच प्रसिद्धी मिळत असे स्वतः यमुनेच्या मनांतून देखील मनोहरशींच लग्न व्हावं असं वाटत होतं व मी ह्या बाबतीत आप्पा साहेबांकडे बोलणं करावं असंहि तिने मला सूचविलं होतं. मनोहर आणि यमुना! खरोखर ही अनुरूप जोडी होती. दोघांनाहि एकमेकांच्या आवडी-निवडी, स्वभाव, पूर्णपणें कळले होते व दोघां-च्याहि अंतर्यामीं आपला विवाह व्हावा असें वाटत होतें. पण दैवघटना कांही और होती!!

यमुना शीलवंत व मनोहर पंचम ही पोट-जातच त्यांना आडवी येत होती. यमुनेच्या आग्रहामुळे मल्लिकार्जुनानें व मीं देखील १-२ वेळ आप्पासाहेबाजवळ मनोहर विषयीं मध्यस्थी केली, व त्यांनीहि अखेरीस अनु-कूल मत प्रदर्शित केलें होतें. अशा तऱ्हेनें आप्पासाहेबांचा किल्ला हस्तगत झाल्यामुळें लौकरच यमुना व मनोहर ह्यांचें शुभमंगल सावधान होणार ह्या आनंदात आम्ही सर्व गर्क होतो. परंतु घरातील हें आनंदी वाता-वरण माईसाहेबांना पहावलं नाही. त्यांच्या साऱ्या व्युहावर ह्या लग्नामुळें पाणी पड-णार होतं.

त्यांनी आमच्या ह्या आशेच्या मनोऱ्या-खालीं नाना युक्त्या-प्रयुक्त्यांनी जबरदस्त सुरुंग भरण्याचें काम सुरूं केलें होतें. व एके दिवशी संधी साधून अखेरीस त्यांनी आपलें अक्राळ-विक्राळ स्वरूप प्रगट केलें व आप्पासाहेबावर आपली सरबत्ती सुरूं केली.

"सदान कदा घरांत मुलीच्या लग्नाची बोलणीं चालतात, पण चुकून मला कुणी विचारीत असतील तर शपथ. मला कांहीच का किंमत नाही ? कीं मी आपली दिल्या भाकरीची अन् सांगितल्या कामाची मोलकरीण आहे ? हो, मोलकरीणच नाही तर काय ? ही माझी सख्ख मुलगी थोडीच आहे ! मी तिची सावत्र आई! तिचा बाप, भाऊ, घरांत कारभार करावयाला असल्यावर ! मी चोम्बडी उगीच आपली वटवट करते ? "

" सावत्र जरी असली तरी तूं तिची आई आहेसना! " आप्पासाहेब नरमाईच्या स्वरांत बोलले. माईसाहेबांनी स्त्रियांचें राखीव व यशस्वी शस्त्र ह्मणून रडावयाला सुरवात केली, व हुंदके देतच त्या ह्मणाल्या " गप्प बसाहो! मला असली तोंडदेखली मायावी बोलणीं समजतात. अयदीच मेलो कशी लाज सोडली आहे. मनाची नाही तर निदान जनाची तरीं ठेवावयाची होती. " जातीसाटी माती खावी " लागते म्हणतात आणि घरांत पहावं तर सारा भ्रष्टाकार ! शिकलेल्यांच्या काय बाई तऱ्हा ! काय तर म्हणें त्या पंचमाच्या कारट्याला ही शिलवंताची मुलगी द्यायची. कांही कुळ-शील तर बघावयाचं होतं ! साराच कसा [illegible]रणा चालवला आहे ? इकडचं डोकं तर ठिकाणावर आहेना ? पोरं नाचतात तसें तुम्हीहि नाचायला लागले ! माझ्या पोटची पोर असती व शिलवंतात जर मुलगा मिळाला नसता तर खंडोबाला मुरळी सोडली असती. पण पंचमाच्या कारट्याला कधीहि दिली नसती. पण माझी कुठं यमुनेवर सत्ता आहे. तिच्यावर सत्ता आहे तिच्या बापाची व तिच्या भावाची ? मी कोण ! वेठीस धरून आणलेली मोलकरीण! माझ्याशीं गंधर्व लावण्यापूर्वी यमुनेला शिवमूर्तीला देण्याचं आत्याला वचन दिलं होतं. काही तर गंधर्व लागत नव्हतं हें ह्तक्यातच विसरलां वाटतं ? शिवमूर्ति मनोहरइतका शिकला नसेल. पण नुसत्या शिक्षणाला काय चाटावयाचें आहे? कांही कुळशील पहावयाला नको कां? शिवमूर्ति,कसंहि असलं तरी शीलवंताचं हाड आहे !!!

माईसाहेबांच्या ह्या आविर्भावानें आप्पासाहेब साफ जमीनदोस्त झाले! उतारवयांत मोठ्या मुष्किलीने मिळालेल्या तरुण बायकोच्या ह्या निर्वाणीच्या शस्त्रापुढे कोणता नवरा टिकाव धरूं शकतो ह्मणून आप्पासाहेब टिकतील! व पुन्हा " उद्यां हात पाय दुखल्यावर आप्पासाहेब ! कोणी कोणाच्या कामीं पडत नाही! मुलगा, मुलगी, किंवा सून, ही उपयोगी पडणारी नव्हत. त्याला हक्काचंच माणूस पाहिजे " हें त्यांच्या सध्या – सोयऱ्यांचे दूरदर्शीपणाचं तत्वज्ञान व पोक्तपणाचा सल्ला ते विसरले नव्हते. ते आर्जवी स्वराने ह्मणाले,

" हे बघ, तूं उगीच डोक्यांत राख घालून घेऊं नकोस! माझी नितकीच तुझीहि यमुनेवर सत्ता आहे. आजच कांही मनोहरशीं तिचं लग्न लावलं नाही ? तुला वाटेल तिथे तूं तिला देऊं शकतेस !!! "

आप्पासाहेबांच्या बदललेल्या निश्चयाची बातमी मला त्या दुर्दैवी बहिण – भावंडाकडून कळली होती, व घरांतील एकंदर गंभीर वातावरणाव-रूनहि मला अजमास करतां आला. परंतु उगीच आपला खडा टाकून पहावा ह्मणून मी आप्पासाहेबांना सूचक प्रश्न करून पाहिला. परंतु दारूच्या कोठारावर पडलेल्या ठिणगीनें जसा भडका उडावा तद्वतच सर्व वातावरण गरम झालें. मीं भीत – भीतच म्हटलें, " मग आप्पासाहेब वैशाखांतली कोणती लग्नतिथी ठरवायची ? कारण मनोहरच्या सुट्टीचेहि ते दिवस आहेत।'

"यमुनेच्या लग्नाची तिथी आम्ही आमच्या पोरीनें काढणार ! व जर मनोहरला सुट्टी नसली तर दुसरा कोणी मुलगा मिळेलच ?" आप्पासाहेबांनी उत्तर दिलें.

"म्हणजे तुम्हीं पुन्हा विचार बदलला वाटतों ?"

"मी साफ माझी मुलगी पंचमाला देत नाहीं. दुसरा कितीहि चांगला सुशिक्षित असला, तरी तसा नको. मला "शीलवंताचं हाड पाहिजे."

आप्पासाहेब, पण यमुनेला काय वाटेल ?" से म्हणाली.

काय संबंध आहे तिच्या वाटण्या न वाटण्याचा ? दिली गाय तिची आशा कश ? मी यमुनेला शिवमूर्तीला दिली आहे व तिच्या बरे – वाईट वाटण्याचा यांत प्रश्न नाही ! मी तिचा बाप आहें. मी ज्याच्या हातीं तिचा हात देईन त्याच्यामागे तिला निमूट गेलं पाहिजें पोरी म्हणजे गायीसारख्या. ज्या खुंटाशी बांधावी तिथे निमूट चारा खाल्ला पाहिजे. मी तिचा बाप आहेना ? तिच्यापेक्षा चार पावसाळे मीं जास्त पाहिले आहेत. मी कांही तिचा शत्रू नाही. मला तिच्या बऱ्या–वाईटाची काळजी आहे. तूं आणि तो मल्लिकार्जुन मनोहरच्या फाजील शिक्षणामुळे तुमचीं डोकें फिरली आहेत, तुम्ही मला शहाणपण शिकवूं नका." आप्पासाहेब गरजलें.

प्रराच प्रंच आटोपला. माईसाहेबांची किल्ली कोपऱ्यांतच बसलेली दिसली.

आप्पासाहेबांसारख्या म्हाताऱ्याला न शोभ-णारी माईसाहेबांसारखी तरुण व सुस्वरूप बायको मिळाली ह्याचें कारण माईसाहेबांच्या बापाजीच शिवमूर्तीला यमुनेला देण्याचें आधिच वचन झाले होतें हें बिंग अशा रीतीनें फुटलें पडलें !!

आपल्या उतारवयांतील हौशीकरितां म्हाताऱ्यानें आपल्या पोटच्या पोरीचा गळा अशा रीतीनें कापला. यमुना व शिवमूर्तीचें अखेर लग्न झालें.

त्यानंतर २ वर्षांनीं मनोहरची हुशारी व कीर्ति ऐकून हुबळीकडील एका प्रसिद्ध शील-वंत लिंगायतानें आपली सुस्वरूप मुलगी हुंड्यासह मनोहरला दिली. ह्यामुळे आप्पासाहेबाला आपलं धोरण चुकलं म्हणून वाईट वाटलं.लौकरच नामांकित वकील म्हणून मनोहर गावांत प्रसिद्धीस आला.

आज ७ वर्षांनंतर !!

७ वर्षांत किती तरी घडामोडी झाल्या. आप्पासाहेबांना शिवमूर्तिच्या नाना व्यसनांच्या हकिकती यमुनेची मारहाण, गांजणूक व छळ अशा कितीतरी गोष्टी ऐकावयाला येत असत. मुलीच्या प्रेमाखातर 'जांवईबापूंना' त्यांनी कांही दिवस घरीं ठेवून पहाण्याचा प्रयोग केला. पण त्यामुळे शिवमूर्ति आप्पासाहेबांकडून पैसें काढण्याकरिता यमुनेला जास्तच त्रास देई. शेवटी एके दिवशीं शिवमूर्ति आप्पासा-हेबांशीं कडाक्याचं भांडण करून यमुनेला घेऊन निघून गेला.

आप्पासाहेबांना आम्हा मुलांचे न ऐकतां यमुनेचं जबरदस्तीनें लग्न करून दिल्या-बद्दल पश्चात्ताप होत असे, व ह्याला सर्वस्वीं कारणीभूत झालेल्या माईसाहेबांचे व त्यांचेंहि मधून मधून भांडण होई.

रोज सायंकाळी पत्नीसह मोटारींतून फिरा-वयास जाणाऱ्या मनोहरकडे पाहून ते म्हणत, मींच चांडाळानें माझ्या मुलीचं हें भाग्य हिरावून घेतलं, व शीलवंताचं हाड म्हणून पोरीच्या गळ्यांत अखेरीस हाडूकच बांधलं !!!

× × ×

# कारंजाला नवमतवाद्यांना आव्हान

( संपादकीय )

आमचे नवमतवादी तरुण मित्र श्री. चौधरी ह्यांनी कारंजा येथील प्रांतिक परिषदेंत आमच्या आव्हानाचा स्वीकार केल्याचा दाखला गेल्या अंकीं लेख लिहून पटविला आहे. आम्ही आमच्या तरुण मित्रांना आव्हान दिलें व त्यांनी त्याचा स्वीकार केलेला पाहून कित्येकांना हें नाटक वाटतें. ह्यांत कांही मतभेद आहे अशी त्यांना कल्पनाहि येत नाही. कारण जे एका ठिकाणी बसतात, उठतात, खातात व पीतात त्यांच्यांत मतभेद कसले व ते एकमेकाविरुद्ध झगडतात कसे अशी शंका कित्येकाना येऊन ते ह्या तात्त्विक पण महत्वाच्या वादांत वाद नाहीच असें समजतात. तात्त्विक मतभेद ह्मटला कीं, हाडवैर व्हे व त्या योगाने कोणाचे कांही खाजगी स्नेहसंबंध विघडतात असेंहि नाही. पण ह्या विवेकी व उदार वृत्तीचा ज्यांच्यांत अभाव आहे आणि सार्वजनिक जीवित व धर्म आणि समाजशास्त्राच्या मूलभूत सिद्धांन्ता-विषयीं जे शुद्ध अज्ञानी असतात, फक्त धर्म हा शब्दच ज्यांच्या तोंडीं बसलेला असतो, अशांच्या अशा कल्पना असल्या तर नवल नाही. पण त्यांच्याविषयीं मला कांहीच बोलावयाचें नाही. कारण हा अज्ञानी वर्ग ह्यानंतर आपो-आपच नाहीसा होणार आहे. एकाचा मृत्यू व दुसऱ्याचा जन्म हा सृष्टिक्रम आहे. जे जन्माला आले आहेत व येणार आहेत ते कसे आहेत व त्यांनी कसे निघावें हाच माझ्यापुढे प्रश्न आहे.

ह्याकरितांच तळेगांव-परिषदेंत श्री. नाम-देवआप्पा कोरे ह्यांच्या ठरावास नव्यांना नायबंद घालणारें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. तेथें आयत्या वेळींच ह्या सर्व गोष्टी घडल्यामुळे मूळ ठराव कोणता, त्याला उपसूचना रीत-सर कोणती, वगैरे गोष्टी निश्चित करणें सभा-शास्त्रदृष्ट्या कठीण होतें. ह्मणून वाद लांबविला आणि कारंजा-परिषद ह्या वादाच्या दृष्टीनें एक रणक्षेत्र बनलें. निदान बनणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. ज्या अर्थी वाद लांबला आहे त्या अर्थी त्याची परिषदेच्या वा सभेच्या नियमाप्रमाणें योग्य मार्गानें चर्चा होणें अवश्यच आहे. मग निर्णय कांहीहि लागो. त्यांत नवमतवादी आह्माला जिंकतील किंवा आह्मी त्यांना जिंकू. पण त्यांच्यांत - आमच्यांत वैर नसलें तरी तात्त्विक मतभेद आहे एवढें खरें. एकाच कुटुंबांत सर्वंच वरणभात खाणारे असतात. पण त्यांत एकाला मीठ अधिक पाहिजे व दुसऱ्याला अधिक अलोनी पदार्थ चालतात. असा चवीचा फरक असतोच. एव-ढ्यावरून कुटुंब जसे विभागल्या जात नाही व स्वयंपाकहि जसा व्यर्थ जात नाही तसेंच आमचें व आमच्या नवमतवादी मित्रांचें आहे. आमचे नवमतवादी तरुण मित्र मीठ अधिक खाणारे दिसतात. आह्मी जरा अळोनी खाणारे आहों. तरी ते व आह्मी एका घरीं, एका समाजांत, व एका संस्थेंत नांदू शकतो. मत-भेद झाला असताहि ऐक्यांत भंग होऊ नये व कार्यनाश होऊ नये ही सुज्ञांना चिंता वहावीच लागते. त्याप्रमाणें आह्मीं उभयताहि वागण्याचा प्रयत्न करतों. ह्यांत कांही दोष आहे असें आम्ही कसें समजावें ? ह्मणूनच मी नवमतवाद्यांत बसतो-उठतो ह्मणून त्यांच्यांत

व यांच्यात मतभेद नाही असें ह्मणणाराचें समाधान करण्यात अर्थ नाही.

कारंजा-परिषदेकरितां पुढील तीन ठराव श्री चर्चेकरितां पाठविले आहेत. आणि ते वी॰ 'संजीवनी'-च्या अंकात जाहीर केले आहेत. कारंजा-परिषदेला येणाऱ्या सन्मान्य प्रतिनिधींना त्यावर विचार करावयास मिळावा ह्मणून ते शेष शब्दांत ह्याच अंकीं आगाऊ जाहीर केले आहेत. ते असे.:—

ठराव १ ला.

'ज्या वीरशैवांना परंपरेनें अष्टावरणाचे अधिकार प्राप्त झालि आहेत आणि ज्यांच्या येथें दीक्षाविधीच्या संस्काराने वा अन्य कारणाने गुरु अथवा जंगम रूढ आहे त्या सर्व वीरशैवां-तील भिन्न पोटजातींत प्रसंगोपात अन्नोदक व्यवहार झाला असेल अगर होईल किंवा लग्नादि शोणितसंबंध झाला असला अगर येईल तर त्याबद्दल कोणीं कोणास नांवे ठेवून समाजात निष्कारण कलह माजविणें आणि वेरभेद निर्माण करणें म्हणजे वीरशैव-धर्मतत्वाच्या मूलग्राही समान हक्कावर घाला घालणेंच होय असें ह्या परिषदेचें मत आहे."

ठराव २ रा.

वीरशैवांतील कोणत्याहि पुरुषाकडून अगर स्त्रीकडून धर्म व समाजरूढी ह्या-विरुद्ध कांही कृत्य घडल्यास व त्याबद्दल त्या पुरुषाला अथवा स्त्रीला पश्चात्ताप होऊन त्यांनी समाजांत वा धर्मात येण्याची इच्छा प्रगट केल्यास सर्व समाजनियंत्या पंचांनी आणि सर्व धर्म गुरूंनी वा जंगमानी त्यांना धर्मदृष्ट्या विशेषपूर्वक पूर्वपरंपरेस अनुसरून निःस्वार्थ व निरपेक्ष बुद्धीने पावन करून घेण्यांची प्रथा नैतिक निश्चयानें चालू ठेवावी अशी ह्या परिषदेची समाजाला व धर्मगुरूंना विनंति आहे. अशा कृत्याला कोणत्याहि सबबीवर कोणींहि अडथळा आणणें म्हणजे समाजाच्या व धर्माच्या ऱ्हासाला कारण होणें होय असें या परिषदेचें मत आहे.

ठराव ३ रा

सर्व वीरशैवमात्रांना दीक्षाविधीचा संस्कार होणें योग्य आहे. पण ही रूढी बंद झाली.तथापि धर्मगुरूंनी पुन्हा दीक्षेचे संस्कार रूढ करण्याचा स्तुत्य प्रयत्न चालविल्याबद्दल दीक्षा घेणारांचे व देणारांचे ही परिषद मनःपूर्वक अभिनंदन करते. आणि सर्व वीरशैव बंधूना अशी विनंती करते कीं त्यांनी आपसांत कोणताहि भेद न मानतां सर्वांनीं दीक्षाविधीचे संस्कार करून घ्यावेत व धर्मगुरूंनी दीक्षा संस्काराचा पुनरु-द्धार करून सर्व वीरशैवमात्रांत अष्टावरणाची आणि गुरु व जंगम रूढ असल्याची ह्या॰ पुढच्या एका पिढींत साक्ष पटवावी अशी या परिषदेची विनंति आहें.

पैकीं दुसरा व तिसरा ठराव फारसा वादग्रस्त होईल असें मला वाटत नाहीं. तथापि नवमत-वादाचे पुरस्कर्ते श्री. चौधरी ह्यांचा गेल्या 'संजीवनीं'तील लेख वाचला असतां हे दुसरे दोन्ही ठराव वादावाचून जातीलच असें निदान मला तरी वाटत नाहीं. कारण श्री. चौधरींना 'गुरु जंगमाच्या रूढ वहिवाटीचें कुंपण' नको आहे.हें कुंपण मी पहिल्या ठरावांत जसें घातलें आहे तसेंच दुसऱ्या दोन्हीं ठरावांत मीं घातले आहे. गुरु व जंगम हे नवमतवादी मित्रांना कुंपणासारखें जाचक व बंधनकारक वाटतात. पण मला तसें वाटत नाहीं. ह्याचें मुख्य कारण असें कीं, तरुणांना बंधनापलीकडे जावेसें वाटतें तर मला त्यांना बंधनांत ठेवावेसें वाटते. पोपटाला पिंजऱ्याचे बंधन आवडत नाहीं हें खरें. पण पोपट पिंजऱ्यांत असला तर तो धन्याला आनंद देण्यास समर्थ होतो व असतो हेहि तितकेच खरें. वीरशैवसमाज धन्यासारखा आहे. तरुणाचा वा नवमतवाद्यांचा

पोपट हा जर गुरुजंगमबंधनाच्या पिंजऱ्यांत राहिला तर वीरशैवसमाजाच्या उत्कर्षाला व आनंदाला तो अधिक कारणीभूत होईल अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

माझ्या ठरावांत अष्टावरण, पंचाचार व षट्स्थळादि वीरशैवसमाजघटनेच्या मूळ तत्वास आधार आहे. ह्मणून गुरु व जंगम ह्यांना मीं प्राधान्य दिलें आहे. त्यांत व्यक्तिमहत्वाचा प्रश्न नाही; तर तत्वबोध आहे. वीरशैव-समाजाची जी मूळ शास्त्रशुद्ध रचना आहे तिच्या मूळाशीं असलेल्या बीजाची उपासना होत राहूली तरच वीरशैवसमाजाची सुधारणा होऊं शकेल. अशी सुधारणा होऊन मूळच्या शास्त्रशुद्ध तत्वाकडे आपल्याला जातां आलें तर पहावें ह्याकरिताच माझे ठराव आहेत. आमचा पहिला ठराव काळजीपूर्वक जर कोणीं वाचला तर त्याला त्याचे तीन भाग पडलेले आढळतील. त्यांत मूळ समाजरचनेचें तत्व काय त्याचा बोध असून त्या तत्वाप्रत आपण जावें हा स्पष्ट ध्वनि आहे. पण आज रुढीनें व परिस्थितीनें कोठे आहे ह्याचाहि त्यांत स्पष्ट बोध असून त्याला फक्त विरोध करण्याची प्रवृत्ति राहू नये एवढीच साधी मागणी माझ्या ठरावांत आहे. नव्यानी कार्टेरी कुंपणांत राहण्याचें मान्य केलें तर मूळ समाजघटनेंतील समाजहक्काची त्यांना जाणीव होईल. आणि आपला पूर्वज आपल्या सारखाच उदारमतवादी होता हें त्यांना कळेल. त्या पूर्वजाचा मी वंशज आहें हें जर त्यांस कळलें तरच संस्कृतीचा अभिमान व तिची परिणतावस्था त्यांना पटून ते सर्व वीरसमाज-घटनेचें खरे भावी प्रणेते बनतील. नव्याची आस्था ह्याकरिताच मी शक्य तोंवर करतों. ह्यांत जुन्याची अनास्था आहे असें मात्र नाही. वास्तविक जुन्यावर नवा मुलामा चढ-विण्याचा—नव्हे जुनेच अधिक तेजःपुंज बन-विण्याचा ह्यांत प्रयत्न आहे.

परंतु जुन्याचे अभिमानी ह्मणविणारेहि मला नव्यात ढकलतात. आणि प्रश्न करतात कीं, नव्या संस्थांनी, परिषदांनी वा सभांनी कांहींहि ठराव केले तरी ते आह्माला बंधनकारक नाहीत. कोणताहि ठराव आज कोणालाहि बंधनकारक नाही हें सर्वांनाच कळतें. मग अशा लोकांनी एखाद्या घरांत चोरून जमून निषेध करतों ह्मणण्याचा तरी उद्योग कां करावा? निषेधाचा उद्योग सुरु आहे ही कबूली देण्यांतच नव्या जागृतीच्या प्रखर तेजाने जुन्याच्या नावाखाली नांदणाऱ्या खोडांचे डोळे दिपलें असा पुरावा मिळतो. सनातनी ह्मणविणारे खरे सनातनी असते तर कोणाला कोणताहि प्रयत्न करण्याची जरूरी नव्हती. सनातन्याना खरें सनातनत्व पटावें व त्याचें सूत्र बट्यापर्यंत भीडावें आणि अशी परंपरेची वीरशैवसंस्कृति परिपक्व होत रहावी ह्या हेतूने माझा ठराव तयार झाला आहे. जुन्या गंगेस, नव्या यमुनेस आणि पूर्वसंस्कृतीच्या सरस्वतीस पोटांत घेऊन भागीरथीचें रूप धारण करणारे माझे ठराव आहेत. नव्यांचा व जून्यांचा ह्या दोघांचाहि मला प्रचंड विरोध होणार हें मी जाणून आहें. पण शिवदेवाची उज्ज्वल व सत्यमय शक्ती माझ्या पाठीशीं उभी असल्यामुळे ह्या दुहेरी माऱ्यांतून मी सहीसलामत पार पडेल असा मला विश्वास वाटतो. तथापि अपयश झालें तरीं त्याची मला खंती नाहीं. आज अपयश आलें तरी उद्या यश येईल हा विश्वास आहेच. ह्याशिवाय आज अधिक कांही न लिहितां वाचकांनी आणि कारंज्याला येणाऱ्या सन्माननीय अशा प्रतिनिधींनी माझ्या तिन्ही ठरावांचा साधक-बाधक रीतीनें विचार करावा ह्मणून ते आगाऊ प्रसिद्ध केले आहेत. विशेष चर्चा परिषदेंत आपण सर्वच मिळून प्रेमळ भावानें करुं व सर्वांच्या अंतःकरणांत परिषदेच्या रूपाने नटलेला शिवदेव शुद्ध रहावा? रणावें पूर्ण.

# नवमतवादी व येती कारंजा-परिषद्

## एकीकरणाच्या ठरावाचे

## दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांचे आव्हानाचा स्वीकार !!

( लेखकः—वि. तु. चौधरी, बी. ए. अमरावती. )

"...ध चाललेल्या नवमतवाद्यांचे चळवळीवरून त्यांचा हेतु फक्त येवढाच आहे कीं, आपल्यात ...ल्या पोटजाती उद्योगधंद्यानें पडल्या आहेत त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार प्रचारांत आणला तर त्यांच्या योगानें परस्पर लोकसंख्या वाढून इतर समाजाप्रमाणें आह्मी पुढे येऊन आपलें भरीव कार्य करूं असें त्यांचें ठाम मत ठरलें आहे. त्यांचा हेतु शुद्ध आहे त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें योग्य आहे. परंतु त्यांना आमचें असें ह्मणणें आहे कीं, वीरशैवांत पोटजाती आहेत. त्याच्याशी रोटीबेटीव्यवहार केल्याने संघटणा होऊन शक्ति वाढेल हें मत मात्र चुकीचें आहे."

वीरशैव गर्जना ८–४–३७.

गेल्या अंकांत आमच्या नवमतवादी पक्षातर्फे दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांचे गुरुजंगमाधिकृत एकीकरणाचे ठरावांविरुद्ध स्वतंत्र ठराव कुणाकडून तरी मांडल्या जाणार आहे हें मीं जाहीर केलें आहेंच. ... दे. भ. नानासाहेब बामणगांवकर ह्यांच्या ठरावाच्या विरुद्ध नवमतवाद्यांचा ठराव ह्या बातमीमुळे सर्वांना मोठे नवलच वाटत आहे, व जिकडे–तिकडे खळबळ सुरू आहे. दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांचा व आमचा राजकीय बाबीप्रमाणेंच सामाजिक बाबींतहि मतभेद आहेत ही गोष्ट जाहीर आहे. आह्मी दोघेंहि कॉंग्रेस–सभासद असलों तरी त्यांचा ओढा लोकशाही–स्वराज्य–पक्षाकडे आहे तर आमचा कल कॉंग्रेससाम्यवादी पक्षाकडे आहे. व ही गोष्ट आह्मी दोघेंहि जाणून आहोंत. तद्वतच सामाजिक बाबतीत दे.भ. नानासाहेब बामणगांवकर हे सुधारणावादी आहेत तर आमची मंडळी नवमतवादी अर्थात् क्रांतिवादी आहेत व अर्थातच राजकीय, त्या-बरोबरच सामाजिक प्रश्नाकडे पहाण्याच्या आमच्या दृष्टिकोनांत राजकीय परंपरेमुळें व वयोमावाप्रमाणे फरक पड-णारच !! दे. भ. नानासाहेब बामणगांवक-रांना गुरु जंगम अधिकृत एकीकरण पाहिजे ह्याचा सरळ अर्थ हाच आहे कीं, जंगम-वर्गाच्या सामाजिक स्थानाला व वर्चस्वाला धक्का लागूं नये ही त्यांची कळकळीची इच्छा आहे. स्वतः ते जंगम किंवा गुरुवर्गीय आहेत. ह्मणून आपल्या वर्गाचें सामाजिक महत्व कमी

होऊं नये व त्यांचें समाजावरील प्रभुत्व अखंड रहावें ह्या स्वार्थी मनोवृत्तीचा आह्मी त्यांचे-वर आरोप करीत नाही. हा प्रामाणिक मत-भेदाचा प्रश्न आहे व हीं त्यांची प्रामाणिक मतें आहेत हें मला त्यांच्या सहवासांत नेहमी राहत असल्यामुळे माहित आहे. आह्माला जंगमवर्गाचें सामाजिक महत्वहि कमी करावयाचें नाही व त्यांचे वर्चस्वालाहि धक्का लावण्याची इच्छा नाही. उलट ह्या जंगमवर्गाच्या ह्या महत्वाला व वर्चस्वाला पावित्र्याचा व सदाचरणाचा उजाळा द्यावा ह्याच हेतूनें आमची सर्व खटपट आहे.

" प्रत्यक्ष जंगमरूपशिवाचे " किंवा "भगवें असेल तेथे नमस्कार करा " ही विचारसरणी आहे तशीच कायम रहावी, किंवा त्यांत दुरुन दुरुन थोडी – फार डागडुजीवजा सुधारणा करावी असा दे. भ. नानासाहेबांच्या "समाजिक घटना व पारंपरिक संस्कार" कायम रहावे ह्या विचारसरणीचा थोडक्यांत निष्कर्ष आहे.

'प्रत्यक्ष जंगमरूपशीवाचे भेद वसे कांही,' ही जंगमवर्गाकडे पहाण्याची विचारसरणी जोपर्यंत जंगमवर्गात शिवस्वरुपाचें पावित्र्य व सदाचार होता तोपर्यंत ठीक होती. व अशा, महान् शिवस्वरूपी होऊन गेलेल्या जंगम विभूतीसं-बंधी आह्माला आदर आहे.

आमचं ह्मणणं एवढंच कीं, जंगमवर्गासंबं-धीची समाजांतील ही रूढ विचारसरणी आहे तशीच कायम ठेवावयाची कीं काय ?

" भगवें दिसेल तेथे नमस्कार करा " ही विचारसरणी अजिबात चुकीची आहे. हें मान-सिक दौर्बल्य आहे, व समाजाला बौद्धिक गुला-मगिरीची शिकवण देणें होय !

[illegible]ला नमस्कार अस्थानीं तर नाही ना? योग्य पायावरच आपलें मस्तक ठेवल्या-जाते ना ? अपात्रीं दान तर होत नाही ना ? हें जिज्ञासेनें पहाण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीचा अर्थात् समाजाचाहि आहे.

"प्रत्यक्ष जंगमरूप शिवाचे किंवा भगव्या कप-ड्याला नमस्कार करा " ह्या विचारसरणी-मुळें पुष्कळशा खोट्या व आपमतलबी स्वार्थ-साधू ढोंगी ऐतखाऊंना समाजांत भगव्या कप-ड्याच्या आवरणांखाली स्वैरसंचार करावयास मिळतो. किंबहुना " भगवें वस्त्र "हा समा-जांतील स्त्री पुरुषांत स्वैरपणें फिरण्याचा व नाना चाळे करण्याचा परवानाच होऊन बसला आहे. व त्यामुळें सच्चरित व सद्-वर्तनी महानुभाव व ढोंगी बुवाबाजी करणारे गलेलठ्ठ निरंजन ह्यांत भेद करणें किंवा विवेक करणें मोठे कठिण होऊन बसते व पुष्कळवेळा बिचाऱ्या सत्पुरुषांनाहि समाजांत विष्कारण त्रास होतो.

तेव्हा " भगव्या वस्त्राला नमस्कार करा " ह्या विचारसरणीमुळें ढोंगी बुवाबाजीला उत्ते-जन मिळतें व सत्चरित्र जंगमाला विष्कारण त्रास होतो. व तो तसा होऊं नये, सत्चरित्र व सद्वर्तनी जंगमाचा समाजांत आदर व सत्माव व्हावा, ह्मणून आह्मीं ही अनिष्ट विचारसरणी समाजांतून नाहीशी व्हावी ह्मणून " योग्य-ठायी माथा लववा व योग्यतेप्रमाणे सत्कार करा ही गुरुवर्गाविषयीची नवी शिकवण समाजांत रूढ व्हावी ह्मणून खट-पट करीत आहोंत. कारण त्या योगाने समा-जांतील अंधश्रद्धेचें युग संपून जिज्ञासु व बौद्धिक प्रगतीच्या युगाला प्रारंभ होणार आहे.

" एकीकरणाची चळवळ " किंवा कारंजा परिषदेपुढील एकीकरणाचा ठराव हा धर्म-विध्वसंक आहे, त्यायोगें धर्मावर संकट आहे व धर्म रसातळाला जाणार आहे, अशी कांही प्रामाणिक सनातनी व आमचे कांही हितशत्रू हांकाटी करीत आहेत.

...व संनातन्याच्या दृष्टीनें ज्याला "[illegible]गव्ह ...ंटे पंक्तेचे" महत्व आहे त्या "वीरशैव० ...गीतील" संपादकीय मजकूरांतील कांही ...न आम्हीं वर उद्धृत केला आहे. त्यांत त्यांनी ...ख लिहिले आहे कीं, पोटजाती ह्या धंद्यानी ...ल्या आहेत व संघटणेच्या दृष्टीनें नवमतवा... ...ल्या एकीकरणाच्या शुद्ध हेतूबद्दल त्यांचें ...अभिनंदन करणें जरूर आहे.

...वादाचा किंवा मतभेदाचा प्रश्न ह्मणजे "पोटजातीचें एकीकरणामुळे संघटण ...होतें किंवा नाही?" 'वीरशैवगर्जना' कारां... ...च्या मतें तें होत नाही. आमच्या मतें तें ...होतें. ह्याचा सरळ व स्पष्ट अर्थ हा आहे ...की वी. गर्जनाकार श्री. परांडकर स्वामी, सुधा... ...कारी वामणगावकर किंवा आम्ही नवमत... ...वादी लोक ह्या सर्वांचे पोटजातीचें एकीकरण ...हें धर्मबाह्य किंवा धर्मद्रोही कृत्य नाही ...ह्यावर एकमत आहे.

...नवमतवाद्यांना धर्मविध्वंसक ह्मणणाऱ्यां... ...सनातन्यांनी त्यांच्याच पक्षाच्या सन्माननीय ...पुढाऱ्यानें वर दिलेले विचार वाचावेत अशी ...आमची आग्रहाची त्यांना नम्र विनंती आहे.

## ...पोटजातीचे एकीकरण धर्मबाह्य नाही

...पोटजातीचें एकीकरण करण्याचा प्रयत्न ...करणें ह्मणजे धर्मद्रोह ...नव्हे. समाजसंघटणेच्या दृष्टीनें तें ...उपयुक्त की अपनुयुक्त एवढाच आता वादाचा ...प्रश्न उरला. आमच्या मतें पोटजातीचे एकीक... ...रण (ह्मणजे रोटीव्यवहार) समाज संघ... ...टणेस पोषक व तें उपयुक्त आहे. उपयुक्तता किंवा ...अनुपयुक्ततेच्या प्रश्नावर वादाची केवढीहि रणें ...गाजविली किंवा माजविली तरी त्याची आह्माला ...पर्वा नाही. परंतु धर्मनिष्ठेचा मक्ता आह्मालाच ...आहे व धर्म कळण्याची बुद्धि फक्त आह्मालाच ...ईश्वराने दिली आहे ह्या खोट्या आविर्भा...

वानें नवमतवाद्यांना ज्यावेळीं धर्मद्रोही विध्वंसक ह्मणून संबोधण्यांत येते त्या वेळीं मात्र ह्याची किंवा येते.

## —: वर्गणीदारांस सूचना :—

ज्यांचें वर्ष संपलें आहे परंतु अजून ज्या वर्गणीदारांकडून वर्गणी आली नाही त्यांनी खालील पत्त्यावर ताबडतोब मनिऑर्डरने वा. व. २॥ रु. पाठवावी. नाहीतर अंक बंद करण्यांत येईल. निजाम प्रांतांत व्ही. पी. करतां येत नाही. तरी जुन्या व नव्या वर्गणीदारांनी खालील पत्त्यावर ताबडतोब आपली वर्गणी पाठवावी. किंवा आमचे स्नेही श्री. व्ही. एम. शेटे वकील मोमिनाबाद ह्यांचेकडे भरणा करून पावती घेतल्यास चालेल. परंतु त्याबद्दल श्री. शेटे वकील ह्यांचेकडून आमचे-कडे पोंच आल्याशिवाय अंक सुरू रहाणार नाही, किंवा सुरू केल्या जाणार नाही.

व्यवस्थापक— 'वी. संजीवनी'

भस्माचे त्रिपुंड सदैव कपाळावर धारण करणाऱ्या व तो पुसटल्या जाऊ नये ह्मणून खिशांत भस्माचा गोळा व छोटा आरसा ठेवणाऱ्या, गळयांत टपोरे रुद्राक्ष घालून तोंडाने शिवनाम घेणाऱ्या पण अशुद्ध मताच्या ढोंगी सनातन्याची व परमेश्वराची जितकी ओळख व जानपछान आहे किंवा त्याला जितकी ईश्वराची माहिती

आहे तितकीच ईश्वराची माहिती किंवा ओळख पुजाअर्चेचे निव्वळ ढोंग न करणाऱ्या आह्माला किंवा कुणाहि नवमतवाद्याला आहे.

नवमतवाद्यांचा वीरशैवसमाज अधिकृत " पोटजातो एकिकरणाचा ठराव " कारंजा परिषदेत पास होणार नाही असेंहि भविष्यें वर्तविणें व तशा तन्हेच्या कंडया पिकविणें सुरु आहे. आमचा ठराव कारंजा – परिषदेत पास होईलच असं आमचं ह्मणणं नाही.! कदाचित तो पास होणारही नाही ! ह्मणून तो परिषदेपुढे आणूं नये असेंहि नाही.

ठराव पास होवो किंवा नापास होवो आह्मी तो आणणारच. ठराव पास होणें किंवा नापास होणें ह्यावर त्या ठरावाचे महत्व नाही. कारण शिक्षणाच्या अभावीं बहुजनसमाजांत सामाजिक प्रश्नाचे बाबतीत जशी जागृति व्हावयास पाहिजे तशी अजून झाली नाही. योग्य धार्मिक शिक्षणाच्या अभावीं अंधश्रद्धेनें पंगू बनलेल्या मनावरील परंपरेचा पगडा अजून कायम आहे. ह्या दिशेने आतां तर कुठे नवमतवाद्यांनी प्रयत्न सुरुं केलें आहेत. एवढ्या थोड्या अल्पावधींत समाजांत आमच्या मतानुकूल विचारसरणी तयार झाली असेल व आह्माला हमखास बहुमत मिळेलच ह्या खोट्या आशेंत आह्मी मुळींच नाही. परिषदेपुढे मांडण्यांत यावयाचा ठराव हें आमचें प्रामाणिक मतप्रदर्शन आहे, व तें करण्याचा आमचा हक्क आहे. कॉंग्रेसमध्यें कॉंग्रेससाम्यवादी पक्षाचें बहुमत नसतांहि तो पक्ष जशी आपली विचारसरणी कॉंग्रेससमोर अल्पमतांत असतांही मांडत असतोच व अप्रत्यक्ष रीत्या आपली क्रांतिवादी विचारसरणी बहुजनसमाजासमोर मांडून हळूंहळूं आपलें संख्याबल वाढवीत आहे, ( ही गोष्ट कॉंग्रेस–साम्यवादीपक्षाच्या कॉंग्रेसमधील वाढत्या संख्याबलाचा व देशातील विचारसरणीच्या इतिहासाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास कोणाच्याहि ध्यानांत येईल. ) नवमतवादीपक्षाचा ठराव परिषदेमध्यें जरी नापास झाला, फेटाळल्या गेला, किंवा त्याला १०–५ च जण जरी पाठिंबा देणारे मिळाले तरी नवमतवाद्यांना निराश होण्याचें कांहीहि कारण नाही व ते निराशहि होणार नाहीत. त्यामुळें नवमतवाद्यांच्यावर उपहासात्मक टीकेचा वर्षाव होईल, हेंहि ते जाणून आहेत, व त्याचा आह्माला कांहींच विधिनिषेध नाही. किंबहुना सामाजिक निंदा,टीका, किंवा उपहास, हे जणूं कांही आह्मा नवमतवाद्यांच्या पाचवीलाच पुजले आहेत.

समाजसुधारणेंच्या प्रामाणिक उद्देशाने समाजांतून अनिष्ट रूढी नाहीशा व्हाव्यात ह्मणून समाजसुधारकांनी लोकविलक्षण नवविचार व कल्पना समाजापुढे फेकल्या ह्मणजे अनिष्ट रूढीच्या अस्तित्वावर ज्या समाजघटकांचें अस्तित्व किंवा चैन सुरुं असते ते सर्व प्रतिगामी घटक यांनें पोटावरच पाय पडल्यामुळें एक होऊन " अनाचार झाला, धर्म बुडाला" असा निष्कारण ढोंगी हलकल्लोळ करीत असतात, व हे सर्व प्रतिगामी घटक एक होऊन सुधारकांवर व त्यांचे नवविचारावर हल्ले चढवीत असतात. ह्या दोन घटकांचे "हल्ले व प्रतिहल्लयांच्या " क्रियेंत व प्रतिक्रियेंत समाजाच्या सर्वांगीण उन्नतीला पोषक अशीच समाजघटना अखेर शिल्लक राहते. ह्या धकाधकींतून बाहेर पडलेली सामाजिक घटना सर्वस्वी नवीहि नसते व जुनीहि नसते.

तेव्हा नवमतवाद्यांनी आपलें बळ हें परिषदेंतील यशापयशावर जोखावयाचें नसून त्यांच्या स्वतंत्र विचारसरणीच्या समाजांतील वाढत्या पाठिंब्यावर जोखावयाचें आहे, व अर्थातच समाजापुढे नवीन कल्पना फेंकणे, त्या रुजविणें व पचनीं पाडणें ह्याला सामाजिक जीवनांत कालावधि लागणारच! तेव्हां नवमत-

वाचांनी आजच्या यशापयशावर अवलंबून न राहतां विशाल भविष्यकाळांतील उज्ज्वल भवि-तव्याकडे नजर देणेच आवश्यक आहे.

आमच्या गेल्या अंकांतील लेखांत " सरसि एकीकरण " हा शब्द वाचून आह्मी मंडळी अवगोळंकार किंवा वर्णसंकर करण्याच्या विचारांत आहोंत अशी कांही लोकांनी निष्कारण ओरड सुरुं केली आहे. आमचा तसा मुळीच उद्देश नाही. सरसि ह्यांचा अर्थ unrestricted. हा शब्द घालण्याचें कारण एवढेच कीं पोटजातींच्या एकीकरणाला दे. भ. वानासा-हेब वामणगांवकरांच्या ठरावांतील गुरु-जंगमाच्या रुढ वहिवाटीचे नियंत्रण नको; हाच सरसि ह्या शब्दाचा अर्थ किंवा तो शब्द योजण्यांत हेतु आहे. आमचें ह्मणणें एवढेच कीं, पोट-जातींच्या एकीकरणाचा प्रश्न वीरशैवसमाजांचे शिष्टसंमत बहुमतानें सोडवावा. त्याला गुरु-जंगमाच्या वहिवाटीचें नियंत्रण किंवा बंधन घालावयाला नको.

पोटजातींतील एकीकरणाची मर्यादा ही वीरशैवसमाजानें आपल्या बहुमतानें ठरवून घ्यावी, ती मर्यादा ठरवितांना गुरु जंगमाच्या रुढ वहिवाटीचा विचार किंवा बंधन नको एवढेच आमचे पहाणें आहे व उद्देश आहे.

पोटजातीच्या एकीकरणाच्या ठरावाची भाषा अजून आमच्या पक्षातर्फे निश्चित झाली नाही तरी तो ठराव साधारणतः पुढील अर्थाचा राहील.

" वीरशैवसमाजसंघटणेच्या दृष्टीने पोट-जाती मोडणें आवश्यक आहे. तरी कालपरि-स्थितिनुरूप योग्य पोटजाती मोडण्याचे ठरवून त्याप्रमाणें रोटीव्यवहाराचा आचार सुरू करावा"

आह्मी पोटजातींतील बेटीव्यवहाराचे का विरुध्द आहोत. ह्याचीं कारणें स्थलाभावामुळे ह्या अंकीं देऊं शकत नाही ती परिषदेपुढे सांगूच व जागा असल्यास ह्या विषयावर एक स्वतंत्र लेखहि लिहू.

प्रांतातील सर्व नवमतवाद्यांना व ज्यांना आमची विचारसरणी पसंत आहे अशा वीरशैवबांधवांना आमची नम्र विनंती आहे कीं, सर्वांनी परिषदेचे प्रतिनिधीं-तिकिट विकत घेऊन परिषदेला जास्त जास्त संख्येनें हजर रहावें व आपल्या पक्षातर्फे मांडण्यांत येणाऱ्या पोटजातीच्या एकीकर-णाच्या व इतरहि ठरावाला पाठिंबा द्यावा.

तद्वतच आमच्या सनातनी व सुधारणावादी बंधूनाहि आमची नम्रविनंती आहे कीं त्यांनी-हि प्रतिनिधि बनून परिषदेला हजर रहावें. आपल्या प्रांतांत परिषद भरावी ह्मणून मी जरी ह्या प्रश्नाला चालना दिली असली व म. वी. हितसंवर्धक मंडळानें जरी तसा स्वरूपांचा ठराव पास केला असला व परिषद यशस्वी व्हावी ह्मणून आह्मीं सर्व खटपट करीत असलो तरी परिषद ही कांही माझी, मंडळाची किंवा कुणाहि एकाची मिरासदारी नाही; ती सर्व वीरशैव समाजाची आहे व त्यावर सर्वांचाच हक्क आहे. ती नवमतवाद्याचीं तशीच सुधारणावाद्यांची व सनातन्याचीहि आहे. ह्या समाजरुपी विराट स्वरुप परमेश्वराजवळ प्रत्येक पक्षानें आपली प्रामाणिक मतें मांडून यशापयशाचा कौल घ्या-वयाचा आहे. तरी सर्व वीरशैवबंधू - भगि-नींना वैयक्तिक मतभेद विसरुन परिषदेत भाग घेऊन ती यशस्वी करण्याविषयीं नम्र विनंती आहे.

# समाजांतील पोटजाती व जातीभेद कसे मोडतां येतील ?

( लेखकः—आप्पाराव महालिंग आप्पा जटाळे. अमरावती. )

वीरशैवांतील ज्या पोटजातींना अष्टावर्णाचे अधिकार असतील व वहिवाटीनें ज्या पोटजातीचे येथे गुरु व जंगम रूढ असेल तेथें सर्व पोटजातीत रोटीव्यवहार होण्यास कोणतीहि हरकत नाहीं व वीरशैवांतील पोटजातीचे व जातीभेदाचे एकीकरण करण्यासाठी खालील उपाय योजावेत व ते उपाय योजण्याकरितां नवमतवादी तरुणांनी पुढें आलें पाहिजे व जातीभेदाचे व पोटजातीचे ऐक्य करण्यासाठी वेगवेगळ्या संस्था ठियठिकाणी ह्मणजे (ज्या ठिकाणीं वीरशैव लिंगायतांची वस्ती असेल तेथें) व अशा प्रकारच्या संस्था प्रत्येक ठिकाणी प्रस्थापित होण्याचें कारण प्रत्येक पोटजातीस आपल्या प्रगतीची जबाबदारी आपल्या स्वतः-वरच आहे असें त्यांना वाटूं लागेल व अशा तऱ्हेने वीरशैवसमाजांतील जातीभेद झटकच व पोटजातीभेद पुढें आणण्यास व ऐक्य करण्यास या संस्थाचाच उपयोग जास्त प्रमाणांत होईल हल्ली अस्तित्वात असलेला जातीभेद व पोटजातीभेदाचे ऐक्याचे एक जूट करण्याचे कार्य हाती धरलें पाहिजे व या कार्याकरिता शीलवंत, दिक्षवंत, व पंचम यांतील प्रमुख संस्थांनीं हे कार्य हाती धरण्याचे मनांत ठरविलें तर कांहीच वेळ लागणार नाही. परिस्थीतीनुरूप आपल्या समाजातहि पोटजाती व जाती भेद रोटीव्यवहाराचे एकीकरण होण्यासाठी नवमतवादी तरुणांनी चळवळ सुरूं केली पाहिजे. या चळवळीबद्दल वीरशैव-समाजांत मतभेद असून, सनातनी विचारांच्या-मतें हीं चळवळ वीरशैवसमाजासुधारणेस पोषक अशी नाही.

हल्लीच्या देशाच्या परिस्थितीच्या मानानें पाहिलें असतां ऐक्य करण्याची चळवळ फार मोठ्या व्यापक स्वरूपाची होऊन बसलेली आहे, आणि नवमतवादी तरुणांना हीच चळवळ सध्या करणें सोईस्कर पडेल. पोटजाती व जातीभेदाचें ऐक्य झालें ह्मणजे पुढें दुसरें कार्य करण्यास अवसर मिळेल. तसेंच, लींगायत समाजांतील संस्थानीं व संस्थेतील वजनदार कार्यकर्त्यां माणसांकडून जातींतील लोकांस पोटजाती व जातीभेंद मोडण्याचा प्रचार केल्यास व प्रचार करणाऱ्या कार्यकर्त्यांचा परिषदेतून किंवा सभेंतून गौरव करून अशा प्रकारचे प्रसंग वारंवार घडवून आणण्यास प्रोत्साहन दिल्यास मध्यमवर्गांतील लोकांना. आंतर्जातीय विवाहाची आज जी भिती वाटत असेल ती हळुहळु कमी होत जाऊन पोटजातींतील विवाह एक सारखें चालु होतील व पोटजातींतील विवाह चालु झाले ह्मणजे त्याबरोबर रोटीव्यवहार चालु होण्यास कोणतीच हरकत येऊं शकणार नाहीं. एकदां समाजामध्यें रोटीबेटीव्यवहार सुरू झाले ह्मणजे समाजोन्नती लवकर होईल. व त्याबरोबर जातीभेंदाचे व पोटजातीचे ऐक्य झालें ह्मणजे समाजामध्ये ' शिक्षणसंस्था '

निर्माण करण्यास व त्या चालविण्यास कांहीच अडचण भासणार नाही, व मग कोणतेहि कार्य एकजूटीने करतां येईल. तसेंच चालू असलेल्या शिक्षणसंस्थेकडे समाजांतील सुशिक्षित लोकांनी जास्त लक्ष पुरविलें पाहिजे. जोपर्यंत समाजशिक्षणक्रमांत लक्ष देत नाही तोपर्यंत त्यांची विधर्मीय लोकांत विद्यार्थ्यांकरवीं जागृति होत नाही व समाजाची उन्नती होणें शक्य नाही. तसेंच, आंतरजातीय विवाहास मध्यमदर्जातील लोक विवाह करण्यास प्रतिकुल असतात परंतु अश्या प्रकारच्या विवाहामुळे आपण आपल्या जातींत तिरस्कृत व कमी दर्जाचें होऊं आणि मुलाबाळास पुढे त्रास होईल असें त्यांना वाटतें व आपल्यावर सामाजिक बहिष्कार होईल असें वाटतें.अशा प्रकारचें कार्य प्रत्येक संस्थेतील व्यक्तीनें करण्याचें धाडस दाखविलें तर ह्या संस्था उत्तम दर्जाला व उन्नतीला जाऊन पोहोचतील.

हल्ली सुधारलेल्या काळांत वीरशैवांतील जातीभेद व पोटजाती एक झाल्या अशी दृढ भावना झाली पाहिजे. हा शीलवंत व तो दिक्षवंत असा भेद होतां कामा नये. आज विचार करण्यासारखी गोष्ट ह्मणजे वीरशैवांतील ऐक्य ढासळत आहे. त्याकरितां वीरशैवांतील जातीभेद व पोटजाती समूळ नाहीसें केलें पाहिजे. हें घडवून आणण्याकरितां अखिल भारतीय वीरशैव परिषद भरविणें जरुरीचें आहे व जेथें वीरशैवाचे संघ असतील त्यांनी तेथें येऊन सर्व संघ एकत्रित करून आपला कार्यक्रम आखावा.ज्यांचें पंक्तीव्यवहार चालतात त्याच्याशीं बेटीव्यवहार अवश्य झाले पाहिजे व समाजांतील जातीने आपण सर्व वीरशैव बंधु आहों अशा भावनेनें सर्व भेद विसरून आपल्या ऐक्याचा मार्ग स्वीकारला पाहिजे. सर्व वीरशैवसंघास व नवमतवादी तरुणास माझी नम्र विनंती आहे कीं, याबद्दल विचारविनिमय करून एकत्र परिषद बोलवा व आपसांतील भेद विसरून सर्व वीरशैव जातीभेदाचें व पोटजातीचें कल्याण होईल असा कार्यक्रम आखा. ह्मणजें सर्वांचे हित होईल. व संघटित कार्य झाल्यावर आज समाज निस्तेज आहे तो उद्यां उन्नतीला पोहोंचेल.

सृष्टींतील पुष्पराजी फुलविणारे व्यासंगी माळी आज हवे तेवढे सांपडत असले, तरी मानवतेचा सुकून जाणारा फुलबाग पुन्हा टवटवीत करण्याचें श्रेय संपादणारे समाजधुरीण माळी बागवान फार क्वचित प्रमाणांत दृष्टीस पडतात. आणि त्या दृष्टीने सामाजिक उन्नती घडवून आणण्यासाठीं अहर्निश धडपडणाऱ्या कार्यकारी व्यक्तींची समाजास फारच गरज भासते.

प्रिय वाचक हो! आज आरंभ झालेला हा माझा पहिलाच लेख आहे, व मला माझ्या सद्बुद्धीने सुचलेलें माझें विचार आपणासमोर ठेवीत आहे, व याचा आपण स्वीकार कराल अशी मला पुर्ण उमेद आहे.

---

# वीरशैवांतील चळवळी

अभिनंदन:— म. वी. हितसंवर्धक मंडळाचे सेक्रेटरी व आमचे स्नेही श्री. रोडाप्पा चिमणाप्पा वाकतकर, डोणगांव, जि. बुलढाणा, हे वकीलीच्या अखेरच्या परीक्षेंत पास झाल्या.

बद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों व ते लौकरच सुरुं करणार असलेल्या वकीलीच्या धंद्यांत आम्ही त्यांना यश चिंतितों.

### वी. प्रांतिक परिषद् – वार्ता

कारंजा:-- गेल्या आठवड्यापासून प्रांतिक परिषदेच्या तयारीला श्री. सोनाप्पा पांगरें, नागनाथ आप्पा पापडे, देवाप्पा साखरकर, श्री. विश्वनाथ आप्पा तांदळे, श्री. जगन्नाथ आप्पा होनराव, वगैरे स्वागतमंडळांतील मंडळी जारीनें लागलें आहेत. श्री. रामशंभु पुराणिक, श्री. नामदेव आप्पा कोरे, वगैरेनी यवतमाळ जिल्ह्यात प्रचारकार्य सुरुं केलें आहे. नागपूर-वीरशैव-तरुणसंघाची मंडळी व दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूरविभागांत परिषदेचें प्रचार-कार्य करीत आहेत. डॉ. आप्पाराव संगेकर, श्री. रामभाऊशेट कुल्ली, व श्री. चौधरी ह्यांनी नुकताच खामगांव, रोहिणखेड, बुलडाणा, मलकापूर, चिखली, बाळापूर वगैरे ठिकाणी जाऊन बुलडाणा जिल्ह्यातील दौरा संपविला व ही सारी मंडळी स्वागतमंडळाला मदत करावयाला ता. १-च्या पुढे कारंज्यासच रहाणार आहेत.

परिषदेला श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागीरदार, पारवा; आप्पासाहेब एकलारे वकील, पुसद; श्री. अण्णासाहेब हुंडेकर, श्रीमंत सोमाप्पा अण्णा मेंडसे अमरावती, व प्रांतांतील इतरहि सन्माननीय पुढारी मंडळी, तशीच मोगलाईतून श्रीमंत तात्याप्पा ईश्वर आप्पा टाले जालना, श्रीमान् संग्रामआप्पा शेटकार व प्रभुराव वकील उदगीर श्री. कल्याणशेट्टी वकील सोलापूर वगैरे प्रांताबाहेरील सन्माननीय वीरशैव पुढारीहि परिषदेला हजर राहणार असल्याचें कळतें.

परिषदेत इतर ठरावाबरोबर " पोटजातींचे एकीकरणावर " सनातनी सुधारणावादी व नवमतवादी ह्यांचा तिरंगी सामना होणार असा रंग दिसतो.

## श्री गुरु परांडकर
### १९३४ व १९३७
### एकीकरणवादी व विरोधी
### परस्परविरोधी देखावे
### खामगांवची वी. धर्म परिषद
### श्री. गु. परांडकर विसरतील पण आम्ही कसे विसरणार?

खामगांव ता. २६ व २७ मे १९३४ रोजी खामगांव येथे भरलेल्या अखिल भारतीय वीर-शैव धर्मपरिषदेत पास झालेला एकीकरणाचा ठराव–त्याला. श्री. गु. परांडकरांची पुष्टि होती.

ठराव ९ वा:—" वीरशैवसमाजातील पक्षभेद व शाखाभेद यांचे समाजोन्नतीचे दृष्टीने एकीकरण असणें. "

ठराव मांडणार:—श्री. काशीनाथ आप्पा मोहोरे

अनुमोदक:—श्री दौलतप्पा

पुष्टि देणार:—श्री. गुरु. परांडकर स्वामी

ह्याखेरीज " अस्पृश्यतानिवारण व शुध्दी " हेहि ठराव ह्या परिषदेत पास झाले.

### महाराष्ट्र वीरशैव असोसिएशन मुंबई

महाराष्ट्र वीरशैव असोशिएशनचे कामाला सुरुवात लवकरच व्हावी याकरिता आमच्या माहितीप्रमाणें व दुसऱ्या प्रसिध्द वीरशैव-पुढाऱ्यांच्या मदतीने तूर्त एक वर्षाकरिता कार्यकारी मंडळ निवडलें. त्यांत प्रांतवारी सभासद निवडून घेतले आहेत. वऱ्हाडांतील पुढील वीरशैव सद्गृहस्थांना असोशिएशनचे कार्यकारी मंडळावर सभासद ह्मणून घेतले आहे: असें सेक्रेटरी कळवितात.

वऱ्हाड:---दे. भ. नानासाहेब खामणगांवकर, रावसाहेब माधवराव देशमुख जहागिरदार, श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, श्री. बाबुराव चौधरी, बी. ए., व डॉ. आप्पाराव संगेकर,

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ मे १९३७ ( अंक १० वा

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर पुरें करितां येते.

व्यवस्थापकः—'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हे साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जूनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी. हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः—'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः—'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा ये चान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियः वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति अ. ज्येष्ठ शु० ६ शके १८५९ ( अंक १० वा.

# वीरशैवसमाज-एकीकरण व रूढी

( लेखकः—श्री. सिद्रामप्पा बसाप्पा धुम्मा वकील. )

आपल्या वीरशैवधर्माच्या उत्पत्ती-कालाचा शोध करूं लागल्यास प्राचीन वेदकालाकडेंच आपणांस धाव घ्यावी लागेल. त्या वेळेचे सुमारास आपणांस परमपूज्य आदरणीय अशा श्रीमद्जगद्गुरु रेणुकादि शिवावतारी पंचाचार्यांकडूनच आपल्या धर्माची स्थापना झालेली दिसेल. त्या काळी हयात असलेल्या मानव प्राण्यांत आपल्या धर्माचा प्रसार करावा ह्मणून उपरिनिर्दिष्ट महामत-पंचाचार्यांनी या भूतलावर अवतार घेऊन धर्मप्रसार केली, व ज्यांना ज्यांना ह्मणून आपल्या धर्मांची मूलतत्वें पसंत पडलीं त्या सर्वांना एकत्र करून आपला समाज अस्तित्वात आणला !

आपल्या धर्मस्थापनेंनंतर ज्यांनी तो प्रथम अंगिकारिला व आपल्या देहावर इष्टलिंग-धारणा करून त्यांतील तत्वाचें आचरण करण्यास सुरुवात केली त्यांना 'पंचम' ही संज्ञा देण्यात आली, व त्यांचेपुढें आपली धर्मतत्वें ह्मणजे 'पंचाचार', अष्टावरण, व षट्स्थळें हीं आचरणासाठीं ठेवण्यात आलीं. पण आपल्या समाजांतील त्या त्या काळच्या निरनिराळ्या व्यवसायबंधूंना एकसमयावच्छेदेंकरून

सारख्या प्रमाणात हीं तत्वें अंमलांत आणितां येईना ह्मणून पंचमाशिवाय त्यांतूनच आणखी दोन वेगळे वर्ग दीक्षावंत व शीलवंत या नावाने निर्माण झाले. ज्यांनी दीक्षाविधीचा संस्कार करून घेतला ते दिक्षावंत झाले व त्याहिपेक्षां जास्त शीलाचरण करण्याचें ज्यांनी पत्करिलें त्यांस शीलवंत असें संबोधण्यात येऊं लागले. शीलाचाराच्या कमी-अधिक प्रमाणाच्या दृष्टीनें पंचम, दिक्षावंत, व शीलवंत असे जरी तीन वर्ग निर्माण झाले तरी सर्वांचा धर्म व धर्मतत्वें एकच असल्यामुळे व सर्वांना त्या बाबतीत सारखाच अधिकार असल्यामुळें त्या सर्वांचा धार्मिक दर्जा सारखाच होय यांत शंका नाही.

शीलाचारानें निर्माण झालेल्या वरील वर्गांशी आमच्या समाजांतील लोकांच्या निरनिराळ्या दृष्टीनेंहि ह्मणजे तेली, तांबोळी, माळी, गवळी घाटी, बणगार, हाटगार, कोष्टी, शिंपी वगैरे इतर-हेचे धंदे कांही जणांनी वंशपरंपरा आपल्याच घराण्यांत चालू ठेवल्यानें त्याची त्या त्या धंद्याच्या नांवाने वेगवेगळ्या पोटजातींत गणना करण्यात आली व त्यांनींसुद्धां आपल्यां धंद्याच्या लोकांशींच निकट संबंध ठेवून रोटी-बेटीव्यवहारादि कार्येहि आपआपल्या पोटजातीच्या मर्यादेंतच करण्यास सुरुवात केली. आपल्यांतील कांही लोक शेतीच्या धंद्यावर निर्वाह करूं लागले परंतु आपल्यांतील बाकीचा बहुजन-समाज भुसार-किराणादि मालांचा व्यापार करणारे असल्यामुळें आह्मां वीरशैवांस सर्वसाधारणपणें "वणजय्या" अर्थात् वनीया अथवा बेपारी समजण्यांत येऊं लागले. एवंच आपल्या समाजांतील कोणीहि लिंगधारी मनुष्य, मग तो पंचम असो, दिक्षवंत असो, शिलवंत असो, अथवा वरील पोटजातीपैकी कोणत्याही धंद्याचा मनुष्य असो, तो रानांत रावणारा कुणबी असो किंवा शहरांतील धनाढ्य व्यापारी असो, फार काय तो एखाद्या मोठ्या हुद्यावरचा अधिकारी असो, या वर्गांचा वीरशैव ह्मणून धार्मिक दृष्टीनें दर्जा सारखाच आहे हें कोणाहि सुज्ञ माणसांस कबूल करावें लागेल. परंतु अशी वस्तुस्थिति असतां वरील निरनिराळ्या वर्गांतील व धंद्यांतील लोकांमध्ये धार्मिक दृष्ट्याहि जन्मजात उच्च-नीचपणा असल्याचा भास कां होतो? हाच प्रश्न हल्ली आमच्या समाजापुढें दत्त ह्मणून उभा आहे, व याचें सरळ उत्तर देण्याचा कोणीं प्रयत्न केल्यास त्यांस "आपल्यांतील आजपर्यंत चालत आलेली अंधरूढी" असेंच ह्मणावें लागेल. अशी असल्या रुढीचा आमच्या समाजांत केव्हां व कसा शिरकाव झाला याचा तपास करूं गेल्यास आपल्या हद्दा भरतखंडांतील ज्या वैदिक धर्मांचा आपला धर्म एक पंथ समजला जातो त्यांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चातुर्वर्णीयांच्या रचनेकडे आपणांस थोडीशी दृष्टि फेकावी लागेल. एका एकत्र कुटुंबातील चौघा भावांत कुटुंबाचें अस्तित्व टिकून त्याची सर्व कामे सुरळीत चालावीं ह्मणुन ती कामे वर्दी ज्यांचें-त्यांचे लायकीप्रमाणे वाटून घेण्यात येतात त्याचप्रमाणें हिंदुधर्म व समाज टिकविण्यासाठीं "गुणकर्मविभागशः" समाजाची वाटणी करून त्यांतून वरील चार वर्ण उत्पन्न करण्यांत आले, व ते त्या वेळेंपासून आजतागायत अस्तित्वांत आहेत. विद्वत्तेप्रमाणें वरील व लायकीप्रमाणें एकत्र कुटुंबांतील चौघा भावांचा दर्जा कमी-अधिक असला तरी कुटुंबाचे दृष्टीनें त्या सर्वांचा दर्जा सारखाच असतो; तद्वतच वरील चातुर्वण्यांतील हिंदूंचा सामाजिक दर्जा ज्यांच्या त्यांच्या गुणकर्माप्रमाणें कमी-अधिक असला तरी धार्मिक दृष्ट्या तो सर्वांचा सारखाच असणें इष्ट आहे. तरी सुद्धां वरील वर्णांपैकी शेवटच्या ह्मणजे शुद्रवर्णाच्या लोकांकडे पाहिलें असतां त्यांनी समाजसेवकांची कामें पत्करिल्यामुळें त्यांना सर्वांत हलक्या दर्जाचे समजण्यात येऊन गेल्या अगणित वर्षांपासुन त्यांची गणना अस्पृश्यांत करण्यात आली तर ह्याचें कारण काय? असा

कोणी प्रश्न केला तर त्यालाहि वरीलप्रमाणेंच "आमच्यांतील चालत आलेली अंधरूढी" हेंच उत्तर द्यावें लागेल. ह्मणून ज्या अवाढव्य हिंदुसमाजांत वरीलसारख्या अन्याय्य रूढींचा प्रवेश झाला व ज्या समाजांतील लोकांशीं आमचाहि नेहमी संबंध येतो त्यांची थोडीबहुत छाया आमच्या समाजावरहि पडून त्यांतहि कांही अयोग्य रूढींचा प्रवेश झाला असल्यास त्यांत आश्चर्य तें काय ?

कोणत्याहि समाजांत, कोणत्याहि काळीं, कसलीहि रूढी पडो. पण त्यात न्याय, सत्य व समता असेल तरच ती चिरकाल टिकणार ! जर तसें नसेल तर ती रूढी कितीहि प्राचीन कालची असो तरी मनुष्यप्राणी हा स्वभावतः ज्ञानवंत असल्यानें त्यास केव्हांना केव्हांतरी आपल्यावर होत असलेल्या अन्यायाची जाणीव झाल्याविना राहणार नाही व ती जाणीव एकदां का झाली कीं तो आपल्या मानेवरील अन्यायाचें जूं-मग तें आपल्या बंधूंचे असो वा इतर कुणाचे असो-शक्य तितक्या लवकर खाली फेकून दिल्याशिवाय राहणार नाही ! व याच न्यायाने आपल्या या हिंदुसमाजांतील उपेक्षित 'शूद्र' हिंदु-बांधवांना त्यांच्यावर वरिष्ठांकडून होत असलेल्या अन्यायाची जाणीव झाली व त्यांच्या माथीं मारलेला अस्पृश्यतेचा डाग यापुढे धूवून काढावा ह्मणून त्यांनी जोमाने हिंदुस्थानभर चळवळ सुरूं केली व त्यांतील इंगित जाणून महात्मा गांधीजी-सारख्या अग्रमान्य पुढाऱ्यानें त्यांत लक्ष घालून त्यास पाठिंबा दिल्यामुळे ती चळवळ लवकरच यशस्वीहि होईल ! तद्वतच आमच्या समाजांतील उपरिनिर्दिष्ट वर्गातील व पंथातील लोकांचा धार्मिक दर्जा सारखा असूनहि त्यांच्यांत जन्मजात उच्चनीचपणा मानण्याची अयोग्य रूढीं पडली आहे व ती वरील कारणामुळें लवकर नाहीशीं करून त्यातील प्रत्येकानें प्रत्येकाचें धर्मकार्यात समान हक्काने मिळून मिसळून रोटी-बेटी व्यवहारादि कार्ये एकोप्यानें घडवून आणणें व समाजसामर्थ्य एकवटून वाढविणें हें प्रत्येक खऱ्या वीरशैवाचें मुख्य व आद्य कर्तव्य होय, व असें करण्यात शास्त्राधारांचीहि कोठें आडकाठी असल्याचें दिसून येत नाही, व तसें असण्याचा संभवहि नाही. कारण वरील सर्वजण सारख्या दर्जाचे वीरशैव असून, व अष्टावरण वगैरेंचा अधिकारहि सर्वांना सारखा असून,सर्वांकडे आमच्यांतील धर्मगुरुंना प्रसादग्रहण करण्याची पूर्वापार वहिवाट आहे. असें असतां पंचमानें दिक्षावंताचे व शीलवंताचे घरीं व दिक्षावंतानें शीलवंताचें घरी त्यांचें कार्याचे वेळीं जाऊन भेदाभेद न मानतां त्यांचेसह भोजन करावें, परंतु शीलवंतानें दिक्षवंताचे व पंचमाचे अगर दीक्षवंताने पंचमानें घरीं गेऊन फक्त त्याचें कार्याचेवेळीं हजर व भोजनाचें वेळीं गैरहजर राहण्याऐवजीं भोजनांत सुद्धां भाग घेऊन त्याची परतफेड कां करूं नये ? यांस कोणी समंजस उत्तर देऊं शकेल काय ? व आपल्या धर्मबांधवांशींच आपण करीत असलेला हा "पंक्तीप्रपंच" कोणास तरी पटेल काय? व तो असाच पुढें चालू ठेविल्यास आपल्या समाजांतील शांतता व, एकोपा टिकेल काय ? याचा आमच्या समाजबांधवांनीं अगदीं निर्विकार मनाने व शांत चित्ताने विचार करावा !



(सिद्रामप्पा बसप्पा घुम्मा वकील.)

वरील रूढीचे समर्थनार्थ निदान पंचम, दिक्षवंत व शीलवंत यांचे बाबतींत तरी त्यां-च्यांतील कमी--अधिक श्रीमंतीशिवाय दुसरें कांहीच ह्मणतां येणार नाही; मात्र वरील धंदेवा-ल्यांच्या बाबतींत त्यांच्या घरच्या धंद्याचे घाणीचे व अस्वच्छतेचें कारण पुढे करण्यात येईल व त्यांत थोडेसें तथ्य असलें तरी (व जर खरें तेंच कारण असेल तरी) ती अडचण ह्या धंदेवाल्याकडून केव्हांच नाहीशी करतां येईल!

सारांश:— ख्रिश्चन मुसलमानादि परध-र्मीयांकडून हिंदुसमाजावर होणारे धर्मांतराचे हल्ले परतविण्यासाठी व हिंदु-धर्म कायम टिकविण्या-साठी तिचें संख्यादल वाढविणें शक्य नसल्यास निदान घटूं न देण्याचा प्रयत्न करणें व त्यासाठी शुद्धीसंघटणेचाहि अवलंब करणें जसें क्रमप्राप्त झालें आहे, तसेंच आपल्या समाजांत दिवसेंदिवस वाढत चाललेल्या दुफळीचा व अस्वस्थतेचा विचार करतां समाजस्वास्थ्यासाठी व तिच्यांत बळकटी आणण्यासाठी आपल्यातील अन्याय्य रूढीना चाट देऊन जरूर त्या सर्व वर्गा-तील व पोटभेदांतील समाजबांधवांचें एकीकरण करणें अगदीं अनिर्वाह झालेलें आहे! या बाबतींत समाजबांधवांनी अगर पुढाऱ्यांनी कोणत्याहि प्रकारच्या दुराग्रहास बळी न पडतां आपल्यापुढें समाजसुधारणेचें ध्येयच आपलें कर्तव्य समजावें. यास प्रथमप्रथम कांही पुराण-मतवाद्यांकडून अगर स्वार्थी लोकांकडून विरोध होण्याचा संभव आहे, तरी आपली सत्य बाजू त्यांचेपुढें ठेवून त्यांची संमती मिळविण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा विरोध फार वेळ टिकणार नाही. सर्वसाधारण जनता न्यायप्रिय असल्यामुळें या चळवळींत आपणांस यश येणार नाही अशी निराशा न बाळगतां प्रत्येकाने आपापल्यापरीं या चळवळीस मदत करावी अशी माझी विनंती आहे.

---

लघु निबंध

# शिक्षणसाम्राज्याच्या पलीकडे

( लेखक:—बी. एस. मिसे. )

हल्लीं शिक्षणसाम्राज्याचे दोन मुख्य विभाग आहेत. ज्याप्रमाणें वसाहतींचें स्वरा-ज्य उपभोगणाऱ्या प्रजाजनांची स्थिति असते त्या-प्रमाणें प्राथमिक व दुय्यम शिक्षण घेणाऱ्या प्रजाजनांची स्थिति असते. हायस्कूलमध्यें मिळणाऱ्या शिक्षणाला वसाहतीचें शिक्षण ह्मणण्याचें कारण विद्यार्थ्यांना निदान मॅट्रीक पास होईपर्यंत तरी गुरुजनांच्या आज्ञेंत राहावें लागतें. परंतु मॅट्रीकच्या परीक्षेचें कुंपण ओलां-ड्यावर ज्याप्रमाणें एखादे वनांतील फुलपाखरूं आनंदाने उडत असतें त्याप्रमाणें आमची स्थिति होते. कॉलेजमध्ये शिक्षण घेणारे विद्यार्थी पूर्ण स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या प्रजाजनांमध्ये असतात.

कॉलेजमधील अभ्यासक्रम हा फार खर्चाचा असल्यामुळें बहुतेक विद्यार्थ्यांना शाळेला

सोडचिठ्ठी द्यावी लागते. शाळेंतील शिक्षण संपल्यानंतर " आतां काय करावें ? " हा प्रश्न उपस्थित झाल्यांबरोबर डोळ्यापुढें काजवे चमकूं लागतात. कारण पुष्कळ विद्यार्थी ध्येय अनिश्चित स्वरूपाचें असून त्यांचे मुख्य ध्येय अर्थिस हें असतें. दरवर्षी आपल्या प्रांतामधील हजारों तरुण मॅट्रीक पास होऊन बेकार होतात याचें कारण ह्मणजें त्यांनी वरील ध्येय डोळ्यासमोर ठेवल्याने त्यांना पुष्कळांची धावपळ करून शेवटी नकारात्मक उत्तर मिळाल्यावर हिरमुसलें तोंड करून घेण्याची पाळी येते. जो तो नोकरी मिळविण्यासाठीं वणवण करणार, तेव्हां सर्वांना नोकरी मिळणें दुरापास्त असतें. शेवटी एखादी दहा - पंधरा रुपयांच्या चाकरीवरच खितपत पडण्याची आयुष्याच्या अंतापर्यंत पाळी येते. परंतु हें जरी त्यांच्या मानानें हीन प्रतीचें भासत असलें तरी सांप्रतकाळच्या भिकाऱ्याप्रमाणें दारोदार भिक्षा मागण्यापेक्षां किंवा कांही न करतां बेंकार फिरणें ह्यापेक्षां श्रेष्ठ प्रतीचेंच ठरतें.

ह्या जगतांत विद्यार्थ्यांना विद्यालयांतून बाहेर पडल्यावर ज्याप्रमाणें आपल्या मालकीचें जनावर दुसऱ्यास विकलें असतां त्या जनावराची स्थिती त्या ग्राहकाच्या घरीं होते तशीच हल्ली विद्यार्थ्यांची होते. शाळेमध्ये किंवा कॉलेजमध्यें घालविलेलें आयुष्य पुष्कळ मौजेंत सुखांत जातें. परंतु ह्या विश्वामध्ये स्वतःसाठीं जेव्हा काटेरी मार्गाचा अवलंब करावा लागतो तेव्हा डोळ्यांमधून अश्रूप्रवाहास सुरवात होते. शेवटी ह्या जगामध्यें आपलें निभावयाचें नाही ह्मणून कोणी विषप्राशन करतात, कित्येक तलावांत अथवा आगगाडीखाली पडून या अमोल नरदेहाला मातीमोल ठरवितात, आणि ज्या मातापित्यांनी त्यांच्याकडे पाहून सुखाचे दिवस लाभतील या आशेने त्यांनी स्वतःच्या पोटाला चिमटा देऊन आपणाला शिक्षणामृत देण्याकरतां पुष्कळ पैसा खर्च केला त्यांच्यावर दुःखाचे डोंगर असल्या कृत्यांनी कोसळतात! त्यांच्या आनंदसाम्राज्याचा विस्तार कमी कमी होत जातो.

" दुःखाच्या दुर्गम मार्गांतून गेल्याशिवाय यशोमंदिर केव्हाहि गांठतां येत नाही " असें जें थोर माणसें ह्मणतात त्यांच्याकडे लक्ष देऊन जरी प्रथम प्रसंगीं आपणाला थोडें दुःख अथवा त्रास झाला तरी तो सहन करण्याची हिंमत आपल्या अंगांत आणली पाहिजे. बेकारी—बेंकारी ह्मणून रडत बसण्यापेक्षां एखादा उद्योगधंदा हस्तगत करतां आला तर त्याकरतां असह्य अडचणी भोगून त्यांत तरबेज झाल्याशिवाय राहूं नये. ह्या बेकारी शत्रूविरुद्ध आपणांस तोंड द्यावयाचें असल्यास आपणाला पोझीशन Position कडे न पाहतां वाटेल तो धंदा करण्यास तयार असलें पाहिजे. "where there is a will there is a way" ह्या ह्मणीप्रमाणें आपणाला अनेक विचार सुचतील. " रिद्धी सिद्धी ज्याचे घरी तेथें लक्ष्मी वास करी " अशी जी ह्मण आहे तिचा उपयोग नुसता वाचनीय दृष्ट्या न करतां कृतीनें केल्यास खरोखरच तिचा प्रभाव आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल.

निव्वळ नोकऱ्या मिळविण्याकरितां धडपड न करतां जर दुसऱ्या तऱ्हेनें आयुष्य कंठतां येईल असें मनांत आणलें तर हजारो उद्योगधंदे आपल्यापुढें आहेत. पण ह्यावरून हल्लीं शिक्षण घेऊच नये हें ह्मणणें मात्र अयोग्य ठरेल. कारण थोडाफार तरी आंग्लविद्येचा संस्कार झाल्यावर इतर राष्ट्रांत कोणकोणत्या हालचाली, नवीन शोध, निरनिराळे उद्योगधंदे, आणि इतर उपयुक्त माहिती झाल्याखेरीज राहत नाही. ह्याकरतां विद्यार्थीबंधूंनीं आपलें शिक्षण संपल्यावर कोणतें तरी निश्चित ध्येय ठरवून त्या ध्येयाला हस्तगत करून घेण्याची इच्छा मनांत आणली तर त्यांना ह्या जगतांत आपलें आयुष्य उत्तम तऱ्हेनें चालवितां येईल व शिक्षणसाम्राज्यानंतरचा प्रश्न सुटेल ?

लघुकथा ९ वी.

# श्रीबसवजयंती

( लेखकः-- नामदेव आप्पाजी कोरे, दारव्हा. )

आई, आज जयंती ना ग ?

हो, बाळ. आज बसवजयंती.

मग आज गोल गोल पोळ्या नाही केल्या ?

आता दुपारी करू.

दुपारी नाही जा. आता कर.मला तर आताच भुक लागली आहे.

दुपारचे बारा वाजुन गेले असतील. बसवजयंतीच्या वर्षाचा सणाचा दिवस, पण अद्यापि राधाबाईचे घरची चूल पेटली नव्हती. पेटून करणार तरी काय ? घरांत सणाचेच काय पण रोजची भाजी-भाकरी करण्याचेंहि साहित्य नव्हतें. राधाबाई शेजारचे आप्पाचे घरी रोज मजुरी, दळण कांडण, करून कसा तरी उदरनिर्वाह करीत असे. आज त्यांचेच घरचे लहान माधवला म्हणून पोळीचें वाढण दिलें होतें. तेंच जेवण माधवला पोळी खाण्यास सांगून राधाबाई आपले कामास निघून गेल्या होत्या. माधव पोळी जेवीत असतां घरांत मांजर आली. माधव तिला भ्याला, व आई आई करून रडु लागला. तितक्यांत मठातील गुरंदय्याया येऊन सांगु लागला, जा, तिकडे तुझी आई गेली, पाहा. दाखविलेल्या वाटेने माधव जाऊ लागला – नव्हे गेला. थोड्या वेळानें राधाबाई परत आल्या पण त्यांना माधव दिसला नाही. त्यांनी सारा गांव शोधला पण पत्ता नाही. गरीब बिचाऱ्या राधाबाईंना रडूं कोसळलें. काय असेल तें असो. गुरंदस्वामी मात्र खुशीत येऊन राधाबाईची बरीच समजूत घालीत होते.

× × ×

राधाबाईचे पती बसाप्पा वाण्याचें (किराणा) दुकान करून छोटासा पण टुमदार संसार करीत असत. राधाबाईस बरेच दिवस मुल-बाळ झालें नव्हतें. अखेर त्यांचे वीसावे वर्षी त्यांची पुत्रमुख पाहण्याची हौस देवानें पुरविली. माधव चार वर्षांचा झाला नाही तोंच बसाप्पास देवाचे घरी हजरी देण्यास जावें लागलें. आता तर राधाबाई अनाथ – अगदीच अनाथ झाल्या. दळण-कांडण करून कसे तरी सहा महिनें काढले. पण आज तर तिचा आशेचा किरण दुर्दैवानें त्यांच्या जवळून हिरावून नेला होता! तिचा माधव आज हरवला होता! असो.

× × ×

रात्रीची वेळ, आकाश काळेकुट्ट झालें होतें. अंधार मी म्हणत होता. डोळ्यांत बोट घातलें तरी दिसत नव्हतें. सर्वत्र शांतता पसरली होती. अशा वेळीं एक मोटार झपाट्यानें चालली होती. इतक्यांत ड्रायव्हरला रस्त्याचे मध्यभागीं कांही तरी दिसलें. मोटार उभी राहिली. ड्रायव्हरने पाहिलें तों एक लहान बालक बेशुद्ध झालेलें होतें. मोटार थांबलेली पाहतांच मालकाने 'काय आहे' असें विचारलें.

एक लहान मूल आहे.

जिवंत, कीं मेलेलें ?

बेशुद्धावस्थेंत आहे.

पाहू, असें ह्मणत एक वडें लिंगायत व्यापारी जोडपें मोटारींतून बाहेर आलें. ड्रायव्हरनें इतक्यांत तें मूल उचलून धरलेंच होतें.

अग किती सुंदर हें मूल आहे. ( सौभाग्यवतीकडे पाहात ).

बरोबरच ( सुस्कारा टाकीत बाईसाहेब उद्गारल्या ), पण माझ्या नशीबीं असलें पुत्रसुख कोठें आहे ? कोण्या दुर्दैवी मुलाला असल्या स्थितींत टाकलें असेल ? मला जर ईश्वरानें असलें पुत्ररत्न दिलें असतें तर –

पण हें सुंदर पोर आपलेंच आहे असें आपण समजू. आज बसवजयंतीचे दिवशीं ईश्वरानें ही आपणास एक देणगी दिली नव्हे काय ?

खरेंच गडे, हे आपलेच पोर ह्मणून आपण जर प्रसिद्ध केलें तर काय हरकत आहे ?

तेंच तर मीहि पण ह्मणतों. पण तू अशी काय विचार करिते ?

पण गडे, तें मूल अलिंगी आहे वाटतें.

छे, काय ही कल्पना. ईश्वरानें दिलेल्या देणगीला अशा मलस्याच कल्पनेवर अव्हेर करावयाचा काय ?

पण......

हे आता घरीं बोलू.

ड्रायव्हर, आण त्या पोराला इकडे. हं निर्जीव तेथें नीट. हळूच अं. चलाव जलदी.

भरंरंदिशी मोटार निघून गेली.

* * *

बाळ, तुला आई हवी ना ? ही पाहा तुझी आई बरें, जाय तुझ्या आईजवळ जाऊं; सौभाग्यवतीकडे बोट दाखवीत आप्पासाहेब उद्गारले.

या नव्या घरांत येऊन माधवाला पंधरा दिवस झाले होते. तेथील सर्व नवीन नवीन पाहून त्याला कसेंसें वाटे. रोज त्याला आपलें आईची आठवण होऊन रडत असे. पण आता मात्र कळी खुलूं लागली होती. आता आईचे आठवणीचें रडें न येतां फक्त उदास वाटत होतें. आप्पासाहेब व बाईसाहेब यांचे प्रेमळ सहवासानें तो आपल्या खऱ्या आईला विसरत चालला होता. या नव्या आयुष्यक्रमांत त्याला आता सुख वाटूं लागलें होतें. आप्पासाहेब व बाईसाहेबांस त्याचें बोबड्या बोलाचें फारच कौतुक वाटत असे.

सकाळची चहापाण्याची वेळ होती. मंडळी दिवाणखान्यात चहापाणी करीत बसली होती. माधव इकडून तिकडे करीत खेळत होता. मध्येच एकादा चहाचा घोट घेऊन लाडूवर हात मारीत होता. इतक्यांत शिपायानें तारेचें पाकीट आणून आप्पासाहेबांस दिलें.

“ आपले इस्टेटीची व्यवस्था बरोबर नाही, ताबडतोब या ” अशी कर्नाटककडील आलेली तार होती.

बाईसाहेबांनी विचारलें, ‘ काय आहे ’ ?

आप्पासाहेबांनी तारच पुढें टाकली.

मग तुह्मी जाणार काय ?

हो. गेले तर पाहिजेच. कारण काय घोटाळा आहे समजत नाही.

मग कधीं निघावयाचे? आपण सर्वच जाऊं. मलाहि माहेरकडील मंडळीची बरेच दिवसाची भेट नाही, तर भेटून येऊ. पण माधवाला ?

हं त्यांत काय आहे. नागपूर-मेलनें निघालेंच पाहिजे.

आप्पासाहेबांची कर्नाटकांत त्यावर जंगम [illegible] इस्टेट होती.

ते वऱ्हाडांत व्यवस्था पाहण्याकरितां ठेवले होते. परंतु त्यांनी व्यवस्था बरोबर न ठेवल्यामुळें कांहीं घोटाळा झाला होता. ह्मणून त्यांचे मित्रांची वरील तार आली होती.

तार मिळतांच आप्पासाहेब सहकुटुंब सहपरिवारें (माधवासह) नागपूरमेलनें निघून कर्नाटकांत आपले गांवीं दाखल झाले. आप्पासाहेबांनी चार सहा महिन्यांत आपल्या इस्टेटीची व्यवस्था नीट लावून, सौभाग्यवतीसह वापस वऱ्हाडांत आले. अर्थात् ची. माधवाला शिक्षणाकरितां ह्मणुन तेथेंच ठेवले.

जसा काळ लोटत चालला तसा माधव खऱ्या आईला विसरत चालला. चार सहा वर्षांत तर त्या गोष्टी त्याला स्वप्नवत् वाटूं लागल्या? लवकरच शिक्षण संपादन करुन तो खास कर्नाटकी आप्पा बनला.

* * *

माधवाचें शिक्षण लिंगराज — कॉलेजमध्यें अगदी व्यवस्थेशीर आटोपत आलें होतें. शेवटच्या वकीलीच्या परीक्षेचे पेपर देऊन चार-सहा दिवस झाले असतील, रिझल्ट खात्रीलायक (पास) लागेल असें वाटत होतें.

बेळगांवचें मेन रोडवरील एका बंगल्यांत एक तरुण जोडपें बसलें होतें. तरुणाचें वय सुमारे वीस वर्षांचें असून अंगलोट मजबुत होता. तरुणीचें वय १६ वर्षांचें दिसत होतें. तिचा केतकीसारखा गोरा रंग होता. नाकाडोळ्यानें नीटस असून थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे ती सर्वांगसुंदर होती. दोघांचेंहि शिक्षण एकाच ठिकाणी झाल्यामुळें त्यांचे स्वभावगुण एकमेकास पटत होते. त्यांच्यांत प्रेमाचा अंकुर बरेच दिवसापासून वाढत होता. पण आपले शिक्षणापुढें या प्रेमजाळयांत सध्याच नको ह्मणुन परीक्षा आटोपल्यावर या बाबतींत बोलण्याचा दोघांनीहि आपापले मनांत निश्चय करुन ठेवलेप्रमाणें दोघेहि विचारमग्न बसले होते.

मालती, मी आज किती तरी दिवसापासुन तुह्मास एक प्रश्न विचारणार होतो. आज विचारुं काय?

हो, विचारा की?

विचारुं मग? मालती, मी माझे हृदयमंदिरांत ह्या हृदयस्वामिनीची प्रतिष्ठापनाच करुन ठेवली आहे. त्याला आपणाकडून पूर्ण संमतीची फक्त उणीव आहे. ती भरुन निघाल्यास मी धन्य होईन.

खरोखर आपल्याच तोंडचे हे शब्द आहेत काय?

देवा, अहाहा, आज तूं मला पूर्ण सुखी केलें. मी तुझा कसा उतराई होईन?

छें, भलतेंच.

पण प्रिये, याला तुझे वडील परवानगी देतील काय?

हो, बहुतेक तर देतीलच; चला आपण त्यांनाच विचारुं.

* * *

माधवराव, तुमचें ह्मणणें ठीक आहे. पण यात एक मोठी अडचण आहे समजलांत.

अडचण ती कसली?

मालती ही माझी औरस कन्या नसून एक निराश्रित पाळलेली धर्मकन्या आहे.

इतकेंच ना? प्रेमापुढें मला आणखी कशाचीच पर्वा नाहीं. आपली परवानगी असेल तर मी तिला आपली जन्माची सोबतीण करण्यास तयार आहें.

माधवराव, वऱ्हाडांत मी एकदा प्रवासांत असतां एके ठिकाणी अगदी एकटीच शालींत गुंडाळून टाकलेली ही (मालती) होती. तिच्या गळ्यांत मात्र ताईतवजा लिंग होतें. त्यांत इस्टांप असून चार शब्द लिहिलेली एक चिठ्ठी होती.

ही कुलशीलसंपन्न वीरशैव कन्या असून दुष्याच्या व्यापारानें माझें साऱ्या संपत्तीची विल्हेवाट लागल्यानें हें माझें अपेशी मुख समाजापुढें दाखविणें लाजीरवाणें वाटत आहें. एकदेच सांपत्तीक अडचणीचा धक्का बसून हिची आई इहलोक सोडून गेली आहे. आपण एकाच गोत्रसूत्राचे असलेवरून मुद्दाम आपणास पाहून मी हिला ठेवून जात आहें. तरी हिचे पालनपोषन करा. देव आपलें कल्याण करोल.

आपला दुर्दैवी
' सिद्धाप्पा '

ही पहा ती शाल व चिठ्ठी, असें ह्मणून पुढे टाकली.

मग तुह्मी माझा अंगीकार नाहींचा करणार ? तुह्मी माझा तिरस्कार करीत असाल. कारण—

( कातरस्वरांत मालती ह्मणाली )

छे मालती, तसें होणें शक्यच नाही. मी इतका क्षुद्र मनाचा नाही, द्रव्य व मानापमानास हापापलेला ! प्रेम ही बाजारांत पैश्यानी विकत मिळणारी वस्तु नव्हे.

लगेच वाङ्निश्चय ठरून दोघांना सर्व परिस्थती अनकूल असतांहि, विजापूरच्या श्री. सिद्धेश्वर संस्थेला वीरशैवविवाहाच्या नव-योजनेप्रमाणें फक्त पसतीस रुपये देऊन संस्थें-तर्फे विधियुक्त लग्नप्रसंग एका दिवसांत पार पडला. मालतीचे माहेरकडील संस्था, वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळ, व महाराष्ट्र हितसंवर्धक मंडळ, अमरावती, यांस मोठमोठ्या देणग्या देऊन लग्नाचे खर्चात झालेली बचत समाजो-पयोगी कार्यात खर्च करून समाजास नवीन धडा घालून दिला.

* * *

दुपारची वेळ. नवपरिणीत जोडपे एका दिवाणखान्यात गुजगुज गोष्टी करीत बसले होतें. इतक्यांत परीक्षेचे रिझल्टची तार आली. उभयता पहिल्या नंबराने पास झाली होती.

मालती, आपले परीक्षेचे रिझल्टची आनंदाची बातमी बाबास कळवावयास पाहिजे.

हो ह्मो. त्यापासून त्यांना फार आनंद होईल.

माधवानें पत्रलिखनसाहित्य घेऊन तो पत्र लिहिणार, तोंच टपालवाल्याने टपालचें पुडकें समोर आणुन टाकलें. त्यांतील पत्र घेंऊन वाचू लागले. तें पत्र वडीलांचे मित्राचें होतें. पत्र वाचल्याबरोबर माधवाचा चेहरा फिक्का पडला. ' मालती, बाबास देवाज्ञा झाली ' कातर-स्वरांत माधव उद्‌गारला !

अं ?. हें दुसरें पत्र कोणाचें ?

स्वतः बाबांचे हातचे लिहिलें आहे. तें पत्र वाचूं लागला.

चिरंजीव प्रिय माधव यास आशीर्वाद

हें पत्र जेव्हा तुझ्या हातीं येईल तेव्हा माझा आत्मा हें नश्वर जग सोडून गेला असेल. तुला आता एक गुप्त गोष्ट सांगावयाची आहे. माधव, तूं माझा मुलगाहि नव्हे व मी तुझा बापहि नव्हे.

हें वाचल्याबरोबर माधवाचे तोंडून एक आश्चर्योद्‌गार निघाला.

काय आहे ? मालतीने विचारलें.

तिकडे लक्ष न देतां माधव पुढे वाचूं लागला.

वीस एक वर्षांपूर्वीची गोष्ट. आपले वीरशैवांचा ' बसव जयन्ती ' नावाचा मुख्य सण. त्या दिवशी आह्मी मोठ्या मठांत बसव-जयंती—उत्सवाकरितां गेलों होतो. परत येत असतां गावाचे बाहेर तूं आह्मास बेशुद्ध अवस्थेत पडलेला सांपडला. आह्मास औरस संतती नसल्यामुळें पुत्रवत् पालन पोषण करुन उत्तम शिक्षण दिलें. बराच तपास करितां तूं बसाप्पा गोरटें यांचा कुलशीलसंपन्न मुलगा असून तुझी आई राधाबाई मोल मजूरी करून मठाशेजारी राहत असते. [illegible] मधुन-मधुन द्रव्यसहाय्य करीत [illegible]

इच्छा नसतांहि ती नाईलाज ह्मणून मोठ्या कष्टानें स्वीकार करीत असते. आता माझ्या इस्टेटी-बद्दल लिहितों.

"कर्नाटकांत असलेली माझी सारी स्थावर जंगम इस्टेट 'वीरसींगी एज्युकेशन फंडास' दिली असून, त्याचें वृईल परभारे ट्रस्टीकडे पाठविण्यात येईलच. तुला कांही ठेवलें नाही असातला भाग नाही. वऱ्हाडांत असलेली सर्व स्थावर जंगम इस्टेट व पेढया हे तुझ्या नावानें ठेवल्या आहेत. यापुढें तू वकीली किंवा नोकरी वगैरे न करिता व्यापार करून समाजाची उर्जितावस्था करावी. जास्त काय लिहु! तावडतोब येऊन वरीलप्रमाणें व्यवस्था लावावी."

'आप्पासाहेब'

माधव-मालती वऱ्हाडांत येऊन आपले गांवी त्यांनी राधाबाईचा प्रथम तपास केला. लव-करच एका वयोवृद्ध ह्मातान्यानें त्यांना राधा-बाईने घर दाखवून त्यांची भेट करून दिली. माधवानें आपली सारी हकिगत सांगून आईस ओळख करून नमस्कार केला. माध-वाचे कानाजवळील लसाचे चट्टयाने राधा-बाईची तावडतोब ओळख पटली. राधाबाईने माधवास पोटाशी धरलें. आता मातृप्रेमाची थोरवी जेवढी वर्णन करावी तेवढी थोडीच आहे. त्यांचा आनंदवेग ओसरल्यावर ( मालतीची भेट करून ) बाळ, ही कोण ह्मणून विचारलें. माधवानें तिची सारी हकिगत सांगून, तुमी सून आहे असें सांगितलें, त्या वेळी तर राधा-बाईचे आनंदास पारावार राहिला नाही. बाळ माधव, जयंतीला आज बरोबर वीस वर्षे झालीं, त्याच दिवशी तू हरपला होता. श्री बसवाचे कृपेनें हरपलेलें रत्न मला मिळाले ह्मणून आजची श्रीबसवजयंती फार आनंदानें करूं या. ॐ शांतिः

# सातारा जिल्हा वीरशैव लिंगायत बोर्डिंग

(लें०— वि० बं० सगरे.)

सातारा जिल्ह्यात सुमारे ३५–४० हजार लिंगाईतांची वस्ती आहे. त्याचा मुख्य धंदा शेती व व्यापार असून सध्याचे आर्थिक परिस्थितीमुळे व शिक्षणाचे अभावामुळे समाज दिवसेदिवस हलाखीत येत आहे. समाजात संघटण नसलेमुळे व तो जिल्ह्यात अल्पसंख्य असून ठिकठिकाणी विखुरला असल्यामुळे एकत्र जमून समाजाचे उन्नतीप्रीत्यर्थ कांही उपाय होत नाहीत. एके वेळीं व्यापारांत अग्रे-सर असणारा हा समाज हल्ली परावलंबी बनत चालला आहे व सामाजिक व आर्थीक बाबतींत पूर्वापार चालत आलेलि रूढीलाच चिकटून रहाणेंचे अंधानुकरणामुळे समाजात उत्क्रांति होत नाही, तरी या सर्व अधोगती टाळण्यासाठी समाजनेत्यांनी व कार्यकर्त्यांनी वेळींच सावधगिरी बाळगिली पाहिजे. कर्नाटक प्रांतीं या बाबतींत आपले समाजांत बरीच जागृति चालली असून, शिक्षणविषयक व व्यापार मोठमोठ्या संस्था चालू आहेत व इतर बाब-तीतहि ते आपले बांधव प्रगतीचे मार्गावर आहेत याबाबत आपणास आनंद व समाधान वाटत आहे. परंतु त्या दृष्टीने महाराष्ट्रीय वीरशैव जागृत होऊन संघटित झाला पाहिजे व आपले उत्कर्षासाठी त्यांनीं अहर्निश झटले पाहिजे. व शिक्षणविषयक एखादी मोठी मध्यवर्ती संस्था निघणें जरूर आहे.

या दृष्टीने सातारा जिल्ह्यात कांही कार्य घडावें, बोर्डींगसारखी एखादी उपयुक्त

...संस्था निघाली, ह्मणून २-४ वेळा प्रयत्नहि झाले आहेत. प्रथम सन १९२८ सालीं पाडळी-करांचे श्री. भाऊसाहेब पटाणें यांचे अध्य-क्षतेखालीं सभा झाली. कांही आकडे पडले व कांही रक्कम गोळा झाली; परंतु कांहींच झालें नाही. त्यानंतर आमचे जिल्ह्यांतील श्रीमान ...साहेब गुदगे ईनामदार मायणी यांना ...ची होऊन एक मोठी रक्कम या शिक्षण-कार्यास देणेंबद्दल योजिले व त्यावरून त्यांचेच ...री मायणी मुक्कामी १९३२ सालीं जिल्ह्यां-तील प्रमुख वजनदार पुढारी मंडळींची सभा झाली. परंतु " स्वताला विशेष झळ न लागता ...र्व प्रश्नांची काहीना मोठी हौस " असले-मुळें ह्मणा अगर समाजाचें दैन्य संपलें नसले-मुळें ह्मणा, त्या वेळी कांही कार्य घडून आलें नाही. मात्र कार्याची तळमळ राहून गेली व विशेषतः आमचे जिल्ह्यातील दानशूर श्रीमंत गुदगे इनामदार यांचे वीस हजार रुप-यांचे आशेवर कार्यास धैर्य उत्पन्न झालें व ...ता स्थितींत समाजाचें सुदैवानें योग्य शिक्षण-प्रेमी धुरीणाचे प्रेरणेमुळें या ५।६ महिन्यांत पुन्हा कार्यास जोरात चालना मिळून २।४ खाजगी सभा जिल्ह्यांतील प्रमुख कार्यकर्त्यां-च्या होऊन बोर्डींगचे कार्यासाठी ३७ हजाराचे आंकडे पडून आतापर्यंत सुमारे १३॥ हजार रोख रकमाहि जमा झाल्या. मध्यंतरी निव-डणुकीचे धामधुमींत या कार्यास थोडे शैथिल्य प्राप्त झालें होतें. परंतु त्या निवडणूकीमध्यें जिल्ह्यांतील वजनदार पुढारी रावसाहेब कल्याणी हे निवडून आलेमुळे समाजात संघ-टन वाढून एक प्रकारचा आत्मविश्वास वाढला व त्या प्रयत्नांनी अखेर ता. १८।४।३७ ई. रोजी कराड मुक्कामी रावसाहेब कल्याणी यांचेच दिवाणखान्यांत श्रीमंत आणासाहेब गुदगे यांचें अध्यक्षतेखाली कार्यकर्त्यांची सभा होऊन जाहीर सभा ता. २३।५।३७ रोजी कराड मुक्कामी होणेंचे निश्चित झालें आहे. तरी सदर प्रसंगी सर्व लिंगाईत बंधुंनी हजर राहून शिक्षणासारख्या पवित्र कार्यास सक्रीय सहां-नुभूती दाखवावी अशी विनंती आहे.

---

# मध्यप्रांत वऱ्हाड-प्रांतिक वीरशैव परिषद

## अधिवेशन दुसरें

**शनिवार, रविवार ता० ८ व ९ मे १९३७ ई.**

## कारंजा - वऱ्हाड

स्वागताध्यक्षः— **श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूते ह्यांचें भाषण**

(शनिवार ता. ८ मे इ. रोजी दुपारीं ' पद्माकर थिएटरांत जमलेल्या प्रतिनिधींचे स्वागत करित असतांना केलेलें भाषण:—

आमचे विनंतीस मान देऊन, आपुल्या कामधंद्याची व उन्हातान्हाची गैरसोय सोसून, दूरदूरच्या गांवाहून या परि-षदेस आलेल्या आपणा सर्वां-चें माझें सन्माननीय सहकारी श्रीमंत सोमाप्पा पांगरे व स्वागतमंडळांतील सर्व सभासदांचें तर्फे मी साभार स्वागत करितों, व त्याबरो-बरच अत्यंत मनःपूर्वक हेंहि सांगूं इच्छितों कीं, हें स्वागत केवळ औपचारिक रीत्या मी करीत

नाहीं, तर तें यापूर्वी कधींहि न जमलेला हा ज्ञातिबांधवाचा एवढा मोठा समुदाय आमच्या कारंज्यासारख्या लहानश्या गांवीं जो आज माझे डोळ्यासमोर दिसत आहे त्यामुळें मनास होणाऱ्या आनंदाच्या सहजोद्गारांनी मी आपलें स्वागत करीत आहें. ज्यांना स्वागताचे प्रसंग वरचेवर येत असतील त्यांचें बाबतींत कदाचित् कृत्रिमता व औपचारिकत्वाचा भाग अधिक असण्याचा संभव आहे, परंतु आमचे कारंजानिवासी वीरशैवसमाजाला तरी हा अशा तऱ्हेचा पहिलाच सामुदायिक संमेलनाचा आनंदाचा अपूर्व प्रसंग असल्यामुळें आमची सर्वांचीं अंतःकरणें उल्हासानें प्रफुल्लित झालीं आहेत, व या आनंदाच्या भावनेस येथील स्थानिक समाजातर्फे व स्वागतमंडळातर्फे शाब्दिक स्वरुपांत वाचा फोडण्याचें नैमित्तिक काम माझेकडे सोंपविण्यात आल्यामुळें तें मी यथामति थोडक्यांत पार पाडण्याचा प्रयत्न करीत आहें.

(२) प्रांतिक सामाजिक परिषदेसारख्या कामाची जबाबदारी अशा कामाचा आह्मास पूर्वानुभव नसतांनादेखील, आह्मीं आपण-होऊन व आनंदाने स्वीकारली याची कारणें अनेक आहेत. पैकीं एक प्रमुख कारण असें आहे कीं, बुलढाणा जिल्ह्याचे वयोवृद्ध व सन्माननीय पुढारी श्रीमंत रामभाऊशेट कुल्ली यांच्या प्रेरणेनें गेल्या वर्षी रोहिणखेड मुक्कामी प्रथम प्रांतिक परिषद झाल्यापासून व तेथे "वीरशैव हितसंवर्धक मंडळ" स्थापन झाल्यापासून यातील समाजकार्यकर्त्यांनी "वीरशैव संजीवनी" द्वारा व इतर रीतीनें जें समाजजागृतीचे नवचैतन्य निर्माण केलें व समाजोन्नतीचे मार्गाकडे समाजास प्रवृत्त केलें, त्याचें श्रेय जसे रोहिणखेड-परिषदेला मिळालें, तसेंच-त्यापुढील महत्वाची पायरी ह्मणजे सामाजिक एकीकरणाच्या प्रारंभाचें श्रेय ज्या परिषदेस मिळणार ती परिषद् आमच्या कारंजास भरुन वीरशैवांच्या भावी सामाजिक वैभवसंपन्न इतिहासांत आमच्या या इतिहासप्रसिद्ध व पुरातन कारंज्या गांवासहि उच्च व सन्मानाचें स्थान मिळावें हें होय.

(३) आजपावेतो सामाजिक कार्याचे दृष्टीनें आमचे गांवास अगर आमचे आकोला जिल्ह्यास विशेष तऱ्हेचें श्रेय घेतां आलें नाही याची आह्मास जाणीव आहे ; परंतु ह्याला कारण आमच्या वऱ्हाडप्रांताचें केंद्र जे उमरावती शहर, ज्या ठिकाणी साधारणतः वीरशैवांची संख्या बरीच जास्त आहे, येथील समाजाग्रणी श्री० नानासाहेब वामणगांवकर यांच्या पंचवीस वर्षापूर्वीच्या समाजजागृतीच्या प्रथम-प्रयत्नास लोकांनी अज्ञानामुळें व गैरसमजुतीमुळे पाठिंबा दिला नाहीं व त्यामुळें सामाजिक चळवळीची व समाजकार्याची ज्योत - जी त्यांनी एकवेळ पेटविण्याचा प्रयत्न केला ती-प्रकाशित राहिली नाहीं हेंच होय.

(४) आह्मास असें नक्की आठवतें कीं, अंदाज २५ — २६ वर्षांपूर्वी चालु पिढींतील सुधारणावाद्याचे आद्यप्रवर्तक व मार्गदर्शक श्री. नानासाहेब वामणगांवकर यांनी अशाच तऱ्हेची सामाजिक परिषद उमरावती येथे भरविली होती व सामाजिक एकीकरणाची व समाजकार्याची मुहूर्तमेढ रोंवण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्या काळीं शिक्षणाचें व समंजसपणाचे अभावामुळें समाजाची मनोभूमिका तयार नसल्यामुळें त्याचे बीजारोपणास किंचित् अंकूर जरी इतःस्ततः फुटलें, तरी त्याची वाढ व फलश्रुती समाजास यापूर्वी उपभोगितां आली नाही. यामुळे निराश होऊन त्यांनी आपल्या कार्यकर्तृत्वाचा मोर्चा देशसेवेकडे वळविला पण त्यामुळे आमची समाजप्रगति मंदावली; तरी पण ह्या मध्यंतरीच्या काळांतहि त्यांनी व त्यांचे सहकारी समाजसेवक श्रीयुत अण्णासाहेब हुंडेकर वगैरे मंडळींच्या प्रयत्नांनी वऱ्हाडशिक्षणप्रसाराचें व लोकजागृतीचें बरेंच कार्य साधारणपणें होत गेलें.

मध्यप्रांतांतहि सन्माननीय पुढारी श्री. राजाभाऊ डांगरे यांच्या प्रयत्नांनीं व मार्गदर्शकत्वाखाली शिक्षणप्रसार व समाजजागृती होऊन समाजकार्य करण्यासाठी "नागपूर वीरशैवतरुण संघ" स्थापन झाला, व समाजोन्नतीचें कार्य सुरूं झालें.

खानदेशांतहि आजच्या परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. सिद्धाप्पा अण्णा मोंगलाईकर यांच्या उदार आश्रयामुळे व सतत प्रयत्नामुळे शिक्षणप्रचार व समाजजागृति होत गेली.

महाराष्ट्राच्या या निरनिराळ्या विभागांतील कमी-अधिक शिक्षणप्रसारामुळे व अल्पस्वल्प लोकजागृतीमुळेच या विभागांना संघटित होण्यासारखी समाजाची मनोभूमिका तयार होत आहे अशीं चिन्हें दिसूं लागतांच "वीरशैव संजीवनीचे" समाजांत पुन्हा सिंचन सुरूं झालें व जुन्या-नव्याच्या सुवर्णमध्याचा जणुं योग साधण्यासाठीच कीं काय उदारमतवादी जुने पुढारी व सुधारणावादी नवीन तरुणपिढी ही समाजकार्यासाठी श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारशा ह्यांच्या नेतृत्वाखाली एकत्रित होऊन "महाराष्ट्र वीरशैवहितसंवर्धकमंडळाच्या" रूपाने समाजोन्नतीचे कार्यास लागली व त्याचें दृश्य फळ ह्मणजेच आजची ही प्रांतिक परिषद होय.

(५) वीरशैवेतर समाजाचे मानानें, किंबहुना कर्नाटकविभागांतील वीरशैवसमाजाचे दृष्टीनें देखील, आपल्या महाराष्ट्रीय वीरशैवसमाजानें पूर्वीच कोठें सामाजिक परिषदा भरवाव्यात, व समाजकार्याच्या संस्था काढाव्यात, हें दृश्य ह्मणजे आपला समाज इतरांच्या मानाने फारच उशीरा जागा होत असल्याचें स्पष्ट चिन्ह होय; परंतु "गतं न शोच्यम्"–"गतकाळाचा शोक पुढां," या न्यायानें त्याबद्दल आतां अधिक उहापोह करीत न बसतां, आह्मी आतांपर्यंत झालेल्या उशीराबद्दल प्रायश्चित्त व भरपाई ह्मणून शक्य तितक्या अधिकाधिक वेगानें, चिकाटीनें, संघशक्तीनें, परस्परसहानुभूति व सहकार्यानें, व्यापक दृष्टीने व उदार अंतःकरणानें जर सर्वजण सर्वांगीण समाजउन्नतीच्या कार्यास लागलों तर अजूनहि थोडक्याच अवधींत आपला समाज कार्यक्षम बनून इतर समाजांत स्पर्धेने व मानमान्यतेने टिकाव धरून आपली प्रगति व वैभव संपादन करून घेईल अशी आशा बाळगण्यास पुष्कळशी जागा आहे.

(६) महाराष्ट्रासारख्या विस्तीर्ण प्रांतात आपला समाज इतस्ततः विस्कळीत रीतीने जरी पसरलेला आहे तरी त्याची एकंदर लोकसंख्या कांहीं कमी नाही ; शिवाय आपला प्रधान धंदा व्यापार असल्यामुळे सांपत्तिक दृष्टचाहि आपली प्रगति होणें कांहीं कठीण नाही, परंतु सुसंघटित व सामुदायिक प्रयत्न होण्यासाठी समाजांत एकीकरणाची व शिक्षणप्रसारक संस्थांची फारच जरूरी आहे. कारण वर्षातून एकदां परिषदेचे १।२ दिवस निघून गेले ह्मणजे त्यानंतर सतत बारा महिने खरें कार्य करणाऱ्या ह्या संस्थाच असतात आणि संस्था कडून जे सतत व टिकाऊ कार्य होतें तसे नुसत्या परिषदांनी अगर सभांनी, अगर व्यक्तिशः होऊं शकत नाहीं; तेव्हां या दृष्टीनेंहि कांही भरीव-कार्याची दिशा या परिषदेत ठरवून त्याचे अल्पसें श्रेयहि आह्मा कारंजेकरास मिळावें अशीं आमची इच्छा आहे.

( ७ ) आपल्या ह्या परिषदेत धार्मिक, शैक्षणिक, आर्थिक व औद्योगिक अशा सर्व तन्हेच्या विषयांवर चर्चा व ठराव होतील हें स्पष्ट व स्वाभाविकच आहे. परंतु वर्तमानपत्री आगाऊच झालेल्या अनुकूल व प्रतिकूल गाजावाजावरून ही कारंजाची परिषद वीरशैवातील पोटजातींच्या एकीकरणावरील ठरावामुळे महत्वपूर्ण होणार आहे, हें सुचिन्ह मला

दिसत आहे. परिषदेपूर्वीच या विषयाची चर्चा वर्तमानपत्रीं झाली हें एका तऱ्हेनें बरेंच झालें आहे; कारण त्यामुळे लोकांना आपले मनाची व मताची तयारी करण्यासहि अनायासेंच योग्य ती आगाऊ सधि मिळाली आहे, व आह्माला अशी पूर्ण उमेद आहे कीं, ज्या अर्थी १९३४ साली श्रीगुरु ष. ब्र. शंभुलिंग शिवाचार्य बृहन्मठाध्यक्ष विजापूर ह्यांच्या अध्यक्षतेखाली खामगांव येथे भरलेल्या अखिल भारतीय वीरशैव धर्मपरिषदेत बार्शीचे 'वीरशैवगर्जना' कार श्री गुरु परांडकर स्वामींनी पुष्टि देऊन पोटजातीचे एकीकरणाचा ठराव पास करून घेतला, गेल्या वर्षी रायपूर येथे मुंबईचे दिवाणबहादूर एम्. टी. कंबळी यांचे अध्यक्षतेखाली भरलेल्या महासभेनें पोटजातीएकीकरणाचे ठराव पास केलेले आहेत, त्या अर्थी याहि परिषदेंत सदहुं ठराव आपले नियोजित अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर यांचे अनुभविक मार्गदर्शकत्वाखाली योग्य रीतीने सहज पास होऊन त्या ठरावामुळे ही कारंजा-परिषद अत्यंत महत्वपूर्ण अशी होईल.

आकोला जिल्ह्यातील आमचें कारंजा हें गांव उमरावती व यवतमाळ जिल्ह्यासहि अगदीच जवळचें असलेमुळें साधारणतः एकंदर वऱ्हाडांतील या परिषदेस येणाऱ्या प्रतिनीधींना जरी तें फार गैरसोयीचें झालें नसेल तरी पण मध्यप्रांत, खानदेश व इतर दूरच्या विभागांतून येणाऱ्या प्रतिनीधींना मात्र हें गांव बरेच सोयीचें वाटत असेल / याची आह्माला पूर्ण जाणीव आहे ; शिवाय आह्माला याचीहि जाणीव आहे कीं, आह्मी आपल्यापरीं यथाशक्ति आपणा सर्वांच्या स्वागताची कितीहि तयारी केली व वरदास्त ठेवण्याची कितीहि शिकस्त केली तरी ती आपल्या सर्वांच्या मान-मान्यतेच्या, योग्यतेच्या, व सुखसोयीच्या दृष्टीनें ती अपुरीच पडण्याचा संभव आहे ;- परंतु आह्मीं आपल्या मनाचें समाधान याच एका जाणीवेनें मानून घेतों कीं, आपण सर्वजण या कारंज्यासारख्या लहानशा गांवीं दूरदूरहून आलेले आहांत ते, आपणा सर्वांच्या अंतःकरणांत समाजभक्तीची व समाजसेवेची लहान—मोठीं जिवंत कारंजीं यापूर्वीच उसळत होतीं व त्यांच्या प्रभावी शक्तीमुळे आपण येथे येण्याचे श्रम घेतले आहेत ; व त्यामुळेच आमच्या स्वागतांतील उणीव व गैरसोयींकडे आपण सर्वजण उदार अंतःकरणानें दुर्लक्ष करून, परस्परप्रेमानें व सहकार्यानें ही परिषद सोयीची व यशस्वी करून घ्याल असा आह्मास भरवंसा आहे. या परिषदेतील संमेलनामुळे हें आमचे कारंजागांव निमित्तमात्र होऊन आपल्या सर्वांच्या हृदयांतील समाजभक्तीची व समाजसेवेची जी लहान मोठी कारंजी आहेंत, त्या जिवंत कारंज्यांचें पाणी जर अधिक जोरदार होऊन पुन्हा आपआपल्या ठिकाणी परत गेल्यावर आजूबाजूच्या आमच्या सर्वतोपरीं अज्ञान व पूर्वापार रूढीच्या दडपणामुळे अप्रागतिक होऊन दीन व दुबळ्या बनलेल्या आमच्या रुक्ष समाजावर जर तें पाणीं शिंपडण्यात आलें व त्यामुळे सर्व प्रांतामध्यें इतःस्ततः विखुरलेला हा आमचा समाज जर पुन्हा सचेतन होऊन नवपल्लवांनी व नवांकुरांनी वाढूं लागला व बहराची व फळपुष्पांची आशा दाखवूं लागला तरच ह्या आपल्या समाजाची ही विस्तीर्ण बाग पुन्हा एकदा रम्य, स्पृहणीय, सुसंपन्न व वैभवशाली होईल अशी आशा व उमेद आहे.

या परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर, सन्माननीय पाहुणे मंडळी व येथे जमलेल्या सर्व प्रतिनीधी वीरशैव बंधु-भगिनींचें मी पुन्हा एकदा मनःपूर्वक स्वागत करितों व हें आमचें प्रेमाचें स्वागत व आदरातिथ्य आपण सर्वजण अधिक प्रेमानें व उदार अंतःकरणाने गोड करून घेऊन परस्पर-सहकार्यानें व सलोख्यानें ही परिषद यशस्वी करून त्या श्रेयाचे सर्वजण वांटेकरी व्हाल अशी आशा बाळगून, आजच्या परिषदेचे सन्माननीय नियोजित अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर ह्यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीची स्वागतमंडळातर्फे नम्र विनंती करून मी आपली रजा घेतों.

# तळीखेडची यात्रा व सर्वधर्मपरिषद

सेक्रेटरी, व्यवस्थापक मंडळ, सर्वधर्मपरीषद तळीखेड.

निजाम इ. ता. नीलंगा तळीखेड येथे प्रतिवर्षानुसार या वर्षी चैत्र शु. १२ ते १४ (१८५९) ता २२ – २३ – २४ एप्रिल १९३७ पर्यंत तीन दिवस श्री सोमेश्वर यात्रा समारंभ मोठ्या थाटाने पार पडला. ठिकठिकाणाहून सुमारे पांच सहा हजार यात्रिक आले होते. या प्रसंगी सर्वधर्मपरिषद, व्यायाम, शक्तिप्रयोग, कुस्त्या वगैरे कार्यक्रम उत्तम झाले वीरशैवसमाज, आर्यसमाज, सनातनसमाज, इ. सर्वधर्मावलंबी मोठमोठे विद्वान शास्त्री भजनीक आले होते. ता २२ रोजी भजनपूजन जंगमार्चन ब्राह्मसंतर्पण व रात्री व्याख्यानोपदेश झाल्यावर दुसरे दिवशी ता २३ सोमवारीं मध्यान्हीं ठीक बारा वाजता सर्वधर्मपरिषद सुरु झाली. अध्यक्षस्थानास श्री परमपूज्य न्यायतर्क आदि शास्त्रपारंगत स्वामी अमरेश्वराचार्य महाराज देवाचार्य सं. मठ शाहजहान अवराद यांच्यासारखे महान् विद्वान् होते ह्मणून सभेला विशेष शोभा आली होती. प्रथम सिद्धरामआप्पा हेग्गापुरकर यांचे हिंदीत बसवपर सुश्राव्य भजन झाल्यावर श्रीयुत शरणप्पा माका प्रचारक वीरशैवसमाज उदगीर, श्रीमति शरणम्माबाई पं० गोविंदाचारी सनातनधर्मसंस्थासंस्थापक नीलंगा, पं. मुनिंद्रदेव आर्यसमाजी आगरा इ. महानुभावांची अत्यंत उद्बोधक व्याख्यानें झाली. नंतर अध्यक्षमहाराज अमरेश्वराचार्य यांनी विद्वत्तापूर्ण आपलें भाषण हिंदीत आरंभिलें. प्रथम स्मार्त वैष्णव, जैन, बुद्ध, शिख, फार्सी, आर्यसमाज ब्राह्मसमाज वगैरे सर्व प्राचीन व अर्वाचीन धर्मांचे सविस्तर विवेचन करून अखेर वीरशैवधर्माविषयी बोलतांना असे ह्मणाले कीं, वीरशैवमत जैनबौद्धमतापेक्षा प्राचीन असून हे एक हिंदुसमाजांमध्ये स्वतंत्र व प्रगतिशील मत आहे, वीरशैवांची संस्कृति आर्यसंस्कृति पासून भिन्न नाही. यांचेंमध्यें इतर मताप्रमाणे जरी वर्णव्यवस्था नसली तरी लिंगांगी लोकांना अतिवर्णी अत्याश्रमी ह्मणता येत नाही, जसे अन्यसमाजी लोकांना वेद उपनिषदादि ग्रंथ मान्य आहेत तसेच यांनाहि मान्य आहेत. पंचसूतक ज्याप्रमाणें मानवसमाजमात्रास मानणे उचित आहे त्याप्रमाणेंच लिंगायत लोकांनाहि शास्त्र व विज्ञानदृष्टीने मानणें आवश्यक असलें तरी बसवेश्वरानी का मानले नाहीत याचें ही मी अजून विचार करीत आहे. काशीनाथ शास्त्री, हुर्डेकर, पावटे, वगैरे पक्षांध लोक प्राचीन पवित्र वीरशैवमतास नवीनच एक विशिष्ट स्वरुप देऊं पहातात, परंतु या योगानें पुढे कोणता भयंकर अनर्थ उद्भवेल याचें साधक—बाधक आलोचन सूज्ञ पक्षरहित लोकांनी आता केलेंच पाहिजे असे उद्गार काढले. शेवटी लिंगधारणेंची उपयुक्तता आधुनिक नवमतवादी लोकांनाहि मानावी असें तर्कवादानें सिद्ध करुन लिंग या शब्दाचा अर्थ मिमांसक, नैयायीक, वैयाकरणी वगैरे शास्त्रकार कोणत्या रितीने करतात याचें समर्पक वर्णन त्यानी सर्वत्राना पटण्यासारखे केलें. लिंगास योनी शिश्न ह्मणून कुचेष्ठा करणारे आर्यसमाजी लोक त्यावेळी सभेंत चू न करता मूग गिळून गप बसले होते. सभेत यद्यापि आर्यसमाजी लोक सर्वापेक्षा जास्त होते तरी त्यां लोकांचा लिंगायत समाजापुढे कांहीच प्रभाव पडला नाही. एकूण सभेचें कार्य शिस्तीनें व शांततेनें होऊन संध्याकाळ ६ ला सभा बरखास्त झाली.

ता. २४ रोजी नेहमीप्रमाणें व्याख्यानोपदेश झाल्यावर सोलापूर बार्शी लातूर वगैरें कडून आलेल्या प्रसिद्ध पैलवानांच्या जंगी कुस्त्या तलवार, भाला, बर्ची, सुदर्शनचक्र वगैरें मर्दानीखेळ व अनेक प्रकारचें शक्ती प्रयोग आणि सामाजिक बोधपर नकला, महात्मा गांधी वगैरे राष्ट्र वीरांचा पोवाडा आदि कार्यक्रम होऊन पैलवान वगैरेंना योग्य बक्षीसहि देण्यात आलें, या महत्कार्यास श्रीमंत आप्पासाहेब विश्वनाथप्पा हत्ते सिंधखेडकर यांची पूर्ण मदत तळीखेडकरांनीच सहानुभूती असती म्हणून दरवर्षी सदरी समारंभ यशस्वीतेनें होत आहे. अशा धर्मप्रेमी वीरपुरुषांना चिरायु प्राप्त होवो. हीच आमची सदिच्छा आहे.

सेक्रेटरी, व्यवस्थापक मंडळ सर्वधर्म परिषद तळीखेड.

मु. सिंधखेड { ता. १—५—३७

# कारंजा-परिषदेंत पास झालेले ठराव

### ठराव पहिला

श्रीमज्जगद्गुरु सिद्धलिंग शिवाचार्य उज्जयनिसिंहासनाधीश हे शिवैक्य झाल्याबद्दल आणि बार्शीचे सुप्रसिद्ध वीरशैवपुढारी नागनाथ आप्पा कथले, काटोल ( जि. नागपूर ) येथील वीरशैव महिला परिषदेच्या प्रमुख कार्यकर्त्या सौ. वेणूताई, चिखली ( जि. बुलडाणा ) येथील श्रीमंत रंगाप्पा बोंद्रे, रोहिणखेडचे लक्ष्मण आप्पा कुल्ली हे कैलासवासी झाल्याबद्दल मध्यप्रांत-वऱ्हाड वीरशैव प्रांतिक परिषद् अंत:करणपूर्वक आपलें दुःख व्यक्त करते.

हा ठराव अध्यक्षाकडून पुढे आला व सर्वांनी उभे राहुन पास केला.

### ठराव दुसरा

मध्यप्रांत-वऱ्हाड शाळाखात्यांत वार्षिक पत्रकामध्ये जातवारीचें जे खानें असतात त्यांत ब्राह्मण, जैन, ख्रिश्चन, पार्शी, हिंदु वगैरे जातींच्या विद्यार्थ्यांकरिता जसे खाने राखले जातात तसाच एक खाना वीरशैव ( लिंगायत ) जातीच्या विद्यार्थ्यांकरिता राखला जावा अशी मध्यप्रांत-वऱ्हाड वीरशैव प्रांतिक परिषदेची शाळाखात्याच्या डायरेक्टरला विनंती आहे.

सूचकः—नारायण वैजिनाथ घंटे

अनुमोदकः—तुकाराम आप्पा कापसे. ठराव सर्वांनुमतें पास

### ठराव तिसरा

वीरशैवसमाजामध्यें पुरुष आणि स्त्री ह्या उभयतांना अनादिकालापासून धर्मशास्त्रदृष्ट्या समान हक्क आहेत. ह्या हक्काची अंमलबजावणी कालमानानुसार योग्य तऱ्हेने होऊं लागावी अशी ह्या परिषदेची वीरशैव मात्रांना विनंती आहे.

सूचकः—रामचंद्र आप्पा काळे

अनुमोदकः—सदाशिव आप्पा बोबडे. ठराव सर्वांनुमतें पास

### ठराव चौथा

मठसंस्था ह्या धर्मोपदेशक कार्य करण्याकरिता निर्माण केल्या गेल्या असाव्यात. परंतु आज प्रापंचिक प्रवेशामुळे, किंबहुना स्वार्थीपणा

र्तनानें खाली गेल्या आहेत. ह्या संस्था सार्वजनिक उत्पन्नावर चालत असल्यामुळें त्यांच्यावर पंचकमेटी नेमणें अवश्य आहे असें ह्या परिषदेचें मत आहे.

सूचकः—जी. जी. कापसे

अनुमोदकः—वीरन्नाप्पा मारोती आप्पा

उपसूचनाः—' ह्या पंचकमिटीनें कर्जापायीं दुसऱ्याच्या ताब्यांत गेलेल्या मठसंस्था परत मिळविण्याचा उद्योग करावा. '

सूचकः—रामभाऊ डांगरे

अनुमोदकः—एस्. जी. जगदंबे.

चीगुरुमूर्ति पर्शाडकर स्वामी व श्री. कल्लय्यास्वामी ह्यांनी ठरावाला विरोधी भाषणें केलीं.

शाहीर मुचाटे व श्री. डांगरे ह्यांनी ठरावास अनुकूल भाषणें केलीं.

ठराव उपसूचनेसह बहुमतानें पास.

## ठराव पांचवा

गतवर्षी रोहिणखेड येथें भरलेल्या वीरशैवपुढाऱ्यांच्या परिषदेमध्ये ' वीरशैव हितसंवर्धकमंडळ ' ह्या नांवाची संस्था स्थापन करण्यात आली. त्या संस्थेचे उद्देश आणि कार्य हें दोन्हीहि वीरशैवसमाजाच्या उन्नतीस परिपोषक आहेत. सबब त्या संस्थेस प्रांतिक सभेने मान्यता देऊन त्या संस्थेचें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत करावें असें या सभेचें मत आहे.

(ब) मार्च ता. ६ सन १९३७ रोजी भरलेल्या खटेगाव येथील जिल्हा–परिषदेचा व वीरशैवहितसंवर्धक मंडळाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष कांहीहि संबंध नाही. असें असून जिल्हा–परिषदेच्या कार्यक्रमास व धोरणास प्रतिकूल असलेल्या कांही व्यक्तींनी जाहीर रीतीनें वीरशैवहितसंवर्धक मंडळाविरुद्ध निष्कारण विरोध व्यक्त केला. हें त्यांचे कृत्य बेजबाबदार, अर्थशून्य, आणि वस्तुस्थितीचें अज्ञान निदर्शक आहे असें ह्या सभेचें मत आहे.

सूचकः—श्री. राजाभाऊ डांगरे

अनुमोदकः—श्री. रामशंभो पुराणिक

ठरावाच्या ' अ ' भागाला श्री. अमदापुरे व कल्लय्यास्वामी ह्यांनी विरोध केला.

प्रथम ' अ ' भागावर मतें घेतां दोन विरुद्ध प्रचंड बहुमतानें तो पास झाल्यावर सर्व ठराव मतास टाकतां तो सर्वानुमतें पास झाला.

## ठराव सहावा

अमरावतीचे श्री. माजलगांवकर ह्यांनी अमरावतीच्या हनुमान व्यायाम शाळे तर्फे जर्मनीत जाऊन जागतिक खेळांत भाग घेऊन जें अद्वितीय यश संपादन केलें व वीरशैवसमाजाचें नांव जगाच्या इतिहासांत अजरामर केलें त्याबद्दल ही परिषद त्यांचें मनःपूर्वक व हार्दिक अभिनंदन करते.

सूचकः—श्री. आर. एन. हेगु वकील

अनुमोदकः—श्री. महादेव आप्पा एकलारे

सर्वानुमतें पास.

## ठराव सातवा

वीरशैवांतील कोणत्याहि पुरुषाकडून अगर स्त्रीकडून धर्म व समाजरूढी ह्याविरुद्ध कांही कृत्य घडल्यास व त्याबद्दल त्या पुरुषाला वा स्त्रीला पश्चात्ताप होऊन त्यांनीं समाजांत वा धर्मांत येण्याची इच्छा प्रगट केल्यास, तसच इतर जातींतील अगर धर्मांतील लोकांनी वीरशैवधर्म स्वीकारण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास (सर्व) समाजनियंत्या पंचानी (आणि) किंवा धर्म गुरु (वा) अथवा जंगम ह्यांनी धर्मदृष्ट्या विधिपूर्वक ( पूर्वपरंपरेस अनुसरून ) निःस्वार्थ व निरपेक्षबुद्धीने पावन करून (घेण्याची प्रथा अधिक निश्चयानें चालू

ठेवावी) आपले धर्मात सामील करून घेण्याची प्रथा अधिक निश्चयानें चालू ठेवावी अशी ह्या परिषदेची समाजाला व धर्मगुरूना विनंती आहे. अशा कृत्याला कोणत्याहि सबबीवर कोणींहि अडथळा आणणें ह्मणजे समाजाच्या व धर्माच्या न्हासाला कारण होणें होय असें या परिषदेचें मत आहे.

× ×टीप-- जाडया टाइपांत दिलेले शब्द × मूळ ठरावांत उपसूचनेच्या रूपानें अधिक घातले आहेत. त्याऐवजी मूळ ठरावांत काय होतें हें कंसात व्यक्त केले आहेत. ह्या योगाने मूळ कोणता व उपसूचना कोणती ह्यांचा बोध वाचकास होईल. - संपादक.

मूळ ठराव आणणार- ना. रा. बामणगांवकर.

अनुमोदक- रामशर्मा पुराणिक,

उपसूचनेचे सूचक - एस. टी. बारसकर

अनुमोदक -- राजाभाऊ डांगरे वगैरे.

उपसूचना मूळ ठरावाला धरून नसल्यामुळें ती उपसूचनाच होत नाहीं ह्मणून ती नियमबाह्य ठरवावी अशी श्री. बामणगांवकरांनी अध्यक्षांना विनंती केली. अध्यक्षांनी उपसूचना चर्चेस घ्यावी किंवा नाहीं ह्यावर सभेचें मत घेतलें. बहुमतानें चर्चेस घ्यावी असें सभेचें मत असल्याचे अध्यक्षांच्या नजरेस आलें व उपसूचनेवर चर्चा सुरु झाली.

मतें घेतां उपसूचनेला १९४ मतें मिळाली. पुढे मूळ ठराव उपसूचनेसह मतास घालतां तो सर्वांनुमतें पास झाला.

## ठराव आठवा

वीरशैवांची संस्कृति ही याज्ञिक आर्यसंस्कृति नसून द्रवीड संस्कृतीची सुधारलेली संस्कृती आहे ह्मणून वीरशैवात चातुर्वर्ण्य नाहीं आणि मनुस्मृति आदि धर्मशास्त्र वीरशैवांना लागू नसल्यामुळें वीरशैवांतील कोणत्याहि पोटभेदास शूद्राची संज्ञा लागू होत नाहीं असें परिषदेचें प्रामाणिक मत आहे.

सूचक-- संग्रामप्पा वकील,

अनुमोदक-- होडप्पा वाकतकर,

वक्ते-- कल्याणशेट्टी

विरोधक-- कल्लय्या, दादाशास्त्री

ठराव बहुमतानें पास.

## ठराव नववा

सर्व वीरशैवमात्राना दीक्षाविधींचा संस्कार होणें योग्य आहे. पण ही रूढी बंद झाली. तथापि धर्मगुरूनी पुन्हा दीक्षेचें संस्कार सुरु करण्याचा स्तुत्य प्रयत्न चालविल्याबद्दल दीक्षा घेणाराचे व देणारांचे ही परिषद मनःपूर्वक अभिनंदन करते. आणि सर्व वीरशैव बंधूंना अशी विनती करते कीं, त्यांनी आपसांत कोणताहि भेद न मानतां सर्वांनी दीक्षाविधीचे संस्कार करून घ्यावेत व धर्मगुरूनी दीक्षासंस्काराचा पुनरुद्धार करून सर्व वीरशैवमात्रात अष्टावरणाची आणि गुरु व जंगम सर्व असल्याची ह्यापुढच्या एका पिढींत साथ पटवावी अशी या परिषदेची विनंति आहे.

सूचक- ना. रा. बामणगांवकर

अनुमोदक-- श्री. पुराणिक.

विरोधक-- एस. टी. बारसकर.

ठराव प्रचंड बहुमताने पास.

## ठराव १० वा

ज्या अर्थी धारवाड व रायचूर महासभेनें वीरशैवांतील पोटजातींचें एकीकरण करण्याची घोषणा एकमतानें केली आहे, व १९१४ साली

…गांव येथें भरलेल्या अखिल भारतीय वीरशैवधर्मपरिषदेनें ह्या ठरावाला पूर्ण पाठींबा दिला आहे, व ह्या ठरावाचा प्रचार श्री. …रोतीआप्पा गाढवे ह्यांनी ऐक्यवर्धक संघातर्फें सुरु केला आहे. व निजाम प्रांतात व कर्नाटकांत ह्या ठरावाचा प्रचार जोरानें सुरु आहे, आणि नागपूरला तर तरुण वीरशैवसंघातर्फें ह्या ठरावाचा प्रचार व प्रत्यक्ष अंमलबजावणी जारीनें सुरु आहे त्या अर्थी ही सभा …थें जमलेल्या सर्व बंधूभगिनींनी ह्या ठरावाचा प्रचार व अंमलबजावणी तावडतोब सुरू करावी अशी विनंति आहे.

सूचक— राजाभाऊ डांगरे,

अनुमोदक— सदाशिव आप्पा बोनते, एकलारे वकील

विरोधक— ना. रा. बामणगांवकर,

७ विरुद्ध मतें पडून ठराव बहुमतानें पास झाला.

---

मध्यप्रांत वऱ्हाडप्रांतिक वीरशैव परिषद्

# अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ अणासाहेब मोगलाईकर यांचें भाषण

शनिवार ता० ८ मे इ. रोजी दुपारी कारंजा मुक्कामी भरलेल्या मध्यप्रांत-वऱ्हाड प्रांतिक वीरशैव-परिषदेचे अध्यक्ष या नात्याने श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ अणासाहेब मोगलाईकर, धुळे (प. खानदेश) ह्यांनी जें भाषण केलें तें जसेच्या तसें पुढें दिलें आहे:-

---

बंधुभगिनींनो, आज आपण केलेल्या अपूर्व स्वागताबद्दल प्रथम मी आपले आभार मानतों. या परिषदेच्या अध्यक्षपदाच्या बहुमानाचें आमंत्रण दिल्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. या दोन …वस या ठिकाणी आपल्या समाजाची …ची परिस्थिति व भावी सुस्थिति याबद्दल होणारा वादविवाद व विचारविनिमय हे सुव्यवस्थितपणें व शांततेनें शेवटास नेऊन यशस्वी करण्याची मोठी जबाबदारी आपण माझ्यावर टाकली आहे. मला वाटते माझ्यापेक्षा योग्य माणसाची निवड या कामीं झाली असती तर बरें होतें; परंतु मजविषयीच्या आपलेपणाच्या भावनेमुळे व प्रेमामुळे आपण माझी निवड केलीत व ही परिषद पूर्ण यशस्वी रीतीनें पार पाडण्याची भिस्त बहुजनसमाजरूपी श्रीशिवदेवावर ठेवून व आपल्या कळकळीच्या आग्रहावरून मीहि त्याचा स्वीकार केला

असो, अध्यक्षपदाची ही संधि दिल्याबद्दल मी आपले पुन्हां एकदा आभार मानतों.

आजच्यासारखें परिषदेचें पहिलें अधिवेशन यवतमाळ जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध जहागीरदार श्रीमंत बाबासाहेब देशमुख ह्यांच्या अध्यक्षते-खाली रोहिणखेड येथे यशस्वी पार पडलें. प्रांतांतील सर्व लिंगाईत बांधवांना एकत्र जमवून समाजाच्या निरनिराळ्या बाबींचा विचारविनिमय करण्यास संधि आणून दिल्या-बद्दल मी कारंजेकरांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

आपला वीरशैवसमाज वऱ्हाड खानदेशांत ठिकठिकाणी विखुरलेला आहे. आपले समाजाची जास्त संख्या कर्नाटकांत असून ते बरेच पुढारलेले व प्रगतिपथावर आहेत. यापुढे ह्मणजे उत्तर हिंदुस्थानांत व बंगाल वगैरे बाजूकडे मात्र आपली संख्या मुळीच नाही ह्मटलें तरी चालेल. परंतु श्रीक्षेत्र काशी व अगदी उत्तर टोकाला श्रीक्षेत्र केदार या ठिकाणी जी आपली प्राचीन पंचाचार्यपीठें आहेत, त्यावरून आपला वीरशैव-धर्म अखिल हिंदुस्थानांत प्रचलित होता असें सिद्ध होतें. हिंदुस्थानांत वेदकालापासून तो महाभारताचे कालापर्यंत जसा धार्मिक बाबतीत फरक होत गेला तसा समाजरचनेंतहि होत गेला. त्यानंतर मात्र हिंदुधर्मांत वर्णाश्रम व तदनुरोधानें जाती पडून जी एक नवीन समाज-रचना निर्माण झाली तिचा प्रभाव सर्व धर्मावर पडून तीच रूढ झाली. भारतकाळानंतर हिंदुस्थानांत समतावादी बौद्धधर्माची प्रचंड लाट आली व ती हिंदुस्थानांतून पार नाहीशी झाली. मात्र त्यांतील अहिंसा भूतदया वगैरे उत्तम तत्त्वांचा स्वीकार करून श्रीशंकराचार्यांनी हिंदु-धर्मास नवीन वळण लाविलें. त्याचप्रमाणें आपल्यांतील पंचाचार्यांनीं वेदागमाचे आधारें बहुजनसमाजास ज्ञानामृत पाजून बौद्ध,जैन व वैदिक धर्मांच्या मंथनांतून आपले सनातनी वीरशैव मत शीरसलामत कायम ठेविलें. पुढे मात्र ज्याप्रमाणें महाराष्ट्रांत श्री नामदेव, संत तुकारामांनीं भागवतधर्माला नवीन वळण लावून बहुजनसमाजास परमेश्वरप्राप्तीचा सुलभ मार्ग मोकळा केला; त्याप्रमाणें श्री-बसवेश्वरानें प्राचीन आचार्यांनीं व पुरातनानीं जो धर्म पुरस्कारिला होता तोच अष्टावरण व पंचाचारांनीं युक्त असा नवीन वळणाचा वीरशैव-धर्म शिवानुभवमंडपांतून सर्व जगास सांगितला. अस्तु.

आतां धर्म हा केवळ नावावर अवलंबून नसतो; किंवा त्याचें वर्चस्व देखील नुसत्या नांवावरून ठरत नसतें. मनुष्यमात्राची नीतिमत्ता ही उच्चतम शिखराला व अगदीं पूर्णतेला पोच-विणें हेंच खऱ्या धर्माचें अंतिम कार्य होय आणि अशी नीतिमत्तेची भूमिका तयार झाल्यावर आपल्यामध्यें असणाऱ्या परमात्मांशाचा विकास करून त्याच्याबद्दल जाणीव उत्पन्न करणें हें खऱ्या धर्माचें ध्येय होय. अशा प्रकारचें उच्च ध्येय आपल्यामधील भूतदयेचा पूर्ण विकास झाल्याशिवाय कसें साध्य होईल बरें? नुसता श्रद्धाळू कर्मठपणाचा समुदाय ह्मणजे धर्म नव्हे. अलीकडील शास्त्रीय शोधांनी असें स्पष्ट दाखविलें आहे की, आकाश हें परमेश्वराचें निवासस्थान नव्हे. प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांतच ईश्वर आहे. त्याची जाणीव होऊन भूतदया, समता, परस्परसहानुभूति व सहन-शीलता इत्यादि उच्च तत्त्वांचा विकास करणें ह्मणजेच परमे-श्वराला जवळ करणें होय. खरें बोलणें ह्मणजेच स्वर्ग, खोटे बोलणे ह्मणजे नर्क, सत्कर्म हाच स्वर्ग, दुष्कर्म हाच रौरव, भूतदया व नम्रपणा हाच कैलासाचा मार्ग व क्रूरपणा आणि उद्धट वर्तन हा नरकाचा मार्ग होय. अशा तऱ्हेनें सदुपदेश करून उच्चकोटीची मनोरचना उत्पन्न करण्याचें पवित्र कार्य आमचे गुरुवर्गाचें असतांना, ते आपणातच वरेच

वर्षापासून विरक्त व गुरुस्थळ असा वाद माजवून लढा चालवीत आहेत. सर्व समाजामध्यें एकी होण्याकरितां दीर्घ प्रयत्न चालू असतां अशा वेळीं या दोन्ही मठाधिकारी पक्षांमध्ये वाद उत्पन्न होऊन त्यांची वाढ व्हावी; ही अत्यंत शोचनीय गोष्ट होय! विरक्त व गुरुस्थळ ह्या दोन्ही धर्मसंस्था आह्मांस पूज्य आहेत. समाजाच्या हिताकरितां दोन्हीं संस्थाचें अस्तित्व व त्यांची जोपासना अवश्य आहे. दोघांचेंहि कार्यक्षेत्र निरनिराळें असें आखून देण्यात आलें असून, समाजाच्या कल्याणाकरितां



(श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा मोगलाईकर)

व समाजाच्या सेवेसाठीं त्यांनी पण पूर्ण आपले जबाबदारीने आपलें कर्तव्य बजाविलें पाहिजे. आपल्या भक्तांना व अनुयायांना त्यांच्या नैतिक उन्नतीकरितां आणि अध्यात्मिक बलवृद्धीकरितां मार्गदर्शक होऊन स्वतःच्या पवित्र व निष्पाप आचरणानें त्यांना आदर्शभूत होणें हेंच त्यांचें मुख्य कर्तव्य नव्हें काय? ते असें करीत असतांना त्यांना परोपरीने भक्तवर्गानें साहाय्य करणें हेंहि भक्तांचें कर्तव्य होय.

आपल्या समाजाचा बराच भाग शेतकीचा धंदा करणारा आहे. शेतकऱ्यांची स्थिति हल्लीं अगदीं कींव करण्यासारखीच आहे. त्यांचीं अल्प प्रमाणांची शेतें दिवसें-दिवस कमी किंमतीचीं ठरत आहेत. त्यांच्या जमीनींतील सत्व कमी-कमी होत चाललें असून, पिकांचें व भावाचें प्रमाण खाली येत चाललें आहे. जमीनमशागतीची साधनें अगदीं जुनीं असून त्यांच्या लागवडीचे प्रकार अगदी मागासलेले आहेत. कर्जबाजारीपणामुळे त्यांचे हातपाय जखडले जाऊन त्यांच्या श्रमाचें श्रेय व जमिनीचें उत्पन्न हें तिऱ्हाईत सावकाराच्या मात्र घशांत पडत आहे. त्यामुळें स्वतःच्या जमिनीवर राबणारे ते सावकाराचे गुलाम बनले आहेत. को-ऑपरेटिव्ह सोसायटी, लँड मॉर्गेज बँके-सारख्या उपयुक्त संस्थापासून शेतकरी मंडळींनी अवश्य फायदा करून घ्यावा. खेड्यांतील शेकडों कुटुंबें आपलीं घरेंदारें सोडून व शेतीवाडींकडे दुर्लक्ष करून गिरण्यांतून मोलमजूरी करण्याकरितां शहरांचा आश्रय करितात. अशा प्रकारचें वर्तन ह्मणजे पुढे ओढवणाऱ्या आपत्तीची प्रस्तावनाच होय. त्यामुळें एकदां पूर्ण सौख्याचा आनंद अनुभवणारी आमची खेडवळ सुखी कुटुंबें या घुरकट शहरांच्या फुफाट्यांत सांपडून जास्त यातना भोगींत आहेत. शेतीसुधारणेंबद्दल शेतकी कमिशनचे असे उद्‌गार आहेत कीं, "आपली राहणीं सुधारून उच्च करावी अशी प्रबळ इच्छा शेतकऱ्याला असल्याशिवाय व त्याला लागणारी मनाची तयारी व शरीरसामर्थ्याची पात्रता जवळ असल्याविना शास्त्रीय ज्ञान, बुद्धीमान कायदे व चांगला कारभार या त्रयींपासून मिळणाऱ्या सुसंधीचा फायदा घेण्याची पात्रता अंगी असल्याशिवाय, कोणाहि शेतकऱ्यांची खरी ह्मणण्यासारखी शेतकीमध्यें प्रगति होणार नाही. शेतीच्या सुधारणेंस व प्रगतीला लागणाऱ्या सर्व साधनामध्यें शेतकऱ्यांचें स्वतःचें ध्येय हें प्रमुख होय."

आमचे व्यापारी जरी द्रव्यप्रेमी आहेत, तरी मोठमोठ्या व्यापारांत शिरण्याची त्यांच्यांत धडाडी नाही. व्यापारी कार्यक्षेत्रांत ते अगदीं पुराणमतवादी आहेत. हल्लींच्या सुधारलेल्या परिस्थितींत व्यापारांतदेखील सुधारणा करून ते विस्तृत करण्यास हल्लीं पुष्कळ वाव आहे. आमच्या व्यापारी बंधुंनी एकत्र होऊन संघशक्तीच्या जोरावर व्यापारवृद्धी करण्या॰ करितां नवीन मार्ग शोधून काढावेत.

आमच्यामधील मुलांच्या शिक्षणाकडें दृष्टि फेकली तर शिक्षणामध्यें आमच्याइतका मागासलेपणा दुसऱ्या कोणत्याहि समाजांत आढळणार नाही. उच्च शिक्षणाच्या बाबतींत अगदींच निराशा दिसते. आपण आपल्या मुलांच्या उच्च शिक्षणाकडे काळजीनें लक्ष पुरविलें पाहिजे. त्याचप्रमाणें धंदेशिक्षण व शेतकीशिक्षणाकडेहि आपण दुर्लक्ष करितां कामा नये. विणकाम, रंगकाम वगैरे निरनिराळ्या धंद्यांत देखील आपलीं मुलें शिकून तयार झालीं पाहिजेत. तेणेंकरून आपले तरुण स्वावलंबी बनून, संपन्न होण्याच्या मार्गाला लागतील.

त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षण व त्यांचे आपल्या समाजांतील अस्तित्व ह्याबद्दल मी माझीं मतें आपल्यापुढे मांडितों.

आपल्या समाजांत स्त्रीशिक्षण मुळींच नाही असें ह्मटलें तरी चालेल. त्यामुळे स्त्रिया अगदींच अज्ञानी राहिल्या. त्यांचे विचार कोते व आकुंचित बनले, त्यांच्या भावना अगदीं खालच्या पायरीवर येऊन बसल्या, त्यांच्या श्रद्धाळूपणाचा व सोवळेपणाचा अतिरेक झाला. साक्षरतेविषयीं व सुशिक्षणाविषयी त्यांना तिटकाराच वाटूं लागला. हे सर्व दोष नाहीसे करणें अवश्य आहेत. त्यांच्या मार्गांतील निर्बंध नाहींसे करून त्यांना स्वाभाविक तत्त्वावर उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें पाहिजे.

बालविवाह अजिबात बंद झाला पाहिजे. हुंडा व कन्याविक्रयासारख्या निंद्य प्रथांतानाहि अजीबात फांटा दिला पाहिजे. हुंडापापी कांहीं घराणीं रसातळाला गेलेलीं आहेत. अशिक्षितांचा प्रश्न वेगळा काढिता, सुशिक्षितच हुंड्याला जास्त हपापले आहेत. ज्यांनी सुधारक ह्मणून समाजांत मिरवावयाचे, तेच लोक हुंडा ह्या नांवाखाली नाना तऱ्हेनें पैसा उकळण्याच्या युक्त्या काढून समाजांत असल्या जुन्या व

> ## पुढील अंकीं
>
> कारंजा–परिषदेची समग्र हकिकत स्थलाभावी या अंकांत देतां आली नाही. परिषदेची विस्तृत हकिकत पुढील अंकीं देण्यांत येईल.

घातक चालींना चालना देऊन, समाजाचे पाय मागें ओढण्याचा सारखा प्रयत्न करीत आहेत.

शारीरिक बाबतींत आमच्या समाजाची बरीच हेळसांड झालेली दिसते. खेड्यांतील रहिवाशांच्या अज्ञानामुळें व त्यांच्या लालावलेल्या परिस्थितीमुळें साथीच्या रोगापासून त्यांना आपला बचाव करून घेणें कठीण झालें आहे. उलटपक्षी शहरांतील सुखवस्तु व चैनी वागणुकीमुळें लागूं नयें ते दुर्गुण अंगीं जडून क्षयासारखे घातुक रोग फैलावत जाऊन शरीरसंपत्तीचा ऱ्हास होत चालला आहे. तरी शहरवासीयांनीं त्यांच्या शारीरिक उन्नतीस योग्य वळण देऊन व आपल्या सुशिक्षितपणाचा लाभ

खेड्यांतील बांधवांना देऊन त्यांची शारीरिक व मानसिक उन्नति करण्याचा प्रयत्न करावा.

बंधु-भगिनींनो ! आपण जर जगाकडे पाहिलें तर अल्पसंख्याक ह्मणून ह्मणविणारे लोकसुद्धां की जे परंपरेनें अज्ञानांत खितपत पडलेले होते ते आतां सुस्थिति घेतांच व नव्या विचाराचें वारें सुरु होतांच खडबडून जागे झाले आहेत व आपली उन्नति करून घेण्याकरितां सारखी खटपट करीत आहेत. तरी आपणहि संघशक्तीचे जोरावर आपल्या भावी पिढीस उत्तम तऱ्हेनें शिक्षण देऊन नव्या जगाशीं तोंड देण्यास त्यांना समर्थ करण्याचा प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजलें पाहिजे. व असें करीत असतांना आपणासमोर आपले प्राचीन आचार्यांचे व शिवशरणांचे उज्ज्वल कित्ते पुढे ठेवून आपणांस वागले पाहिजे. कोणतीहि गोष्ट करतांना जुन्या-नव्यांची योग्य ती सांगड घालून नेहमी सुवर्ण-मध्य साधण्याचा प्रयत्न करावा. ह्मणजे समाजातील सर्व विचारांच्या घटकांचें त्या मानानें समाधान होऊन ते एकीने वागण्यास सज्ज राहतील. असो. आतांपर्यंत आपण माझे भाषण शांत चित्तानें ऐकून घेतलें त्याबद्दल आपलें व स्वागतमंडळाचे एकवार आभार मानुन मी आपली रजा घेतों.

---

# वीरशैवांतील चळवळी

### लातूर येथील शुद्धी

कांही दिवसापुर्वी किल्ले कल्याण (बसव) येथे शंकरय्या वल्लव घुळय्या वय २३ हे ईस्लामी धर्माच्या आहारी गेले होते त्यांना आज लातूर-वीरशैवसमाजातर्फे दीक्षा देऊन शुध्द करून लिंगायत धर्मात परत घेतले. त्यांचें ईस्लामी नांव शेकूल ईस्लाम हें बदलून पूर्वीचेच नांव ठेवण्यात आलें. आणि सहभोजनहि झालें. असें रा. वीरशैव समाज कळवितात. (लातूर)

### श्रीबसवेश्वर जयंति-उत्सव

वीरशैवांचे केंद्र जें कर्नाटक, सोलापूर, वगैरे भागांत श्रीबसवजयंतीउत्सव मोठ्या थाटामाटानें मोठ्या प्रमाणांत दरसाल साजरा करण्यांत येत असतो. परंतु अत्यंत खेदाची गोष्ट अशी कीं, अद्यापि महाराष्ट्रांतील पुष्कळशा वीरशैवापासून या उत्सवाचें लोण पोहचलेलें दिसत नाही. ह्मणून अद्यापि पुष्कळशा खेडवळ लोकांना बसवजयंतीचें महत्त्व कळलेलें दिसत नाही. आणि यामुळेच वीरशैवसमाजांत व्हावी तशी धर्मजागृती झालेली दिसत नाहीं.

वीरशैवांतील शेंकडा ९० लोक खेड्यांत वस्ती करून राहात आहेत. यापैकी बऱ्याचशा लोकांना बसवेश्वर कोण होते, त्या महात्म्यानीं कोणती विशेष कामगिरी केली, त्यांनी वीरशैवावर कोणते उपकार केलेत, वगैरे कांहीच माहीत नसून बसवेश्वरजयंती कोणते दिवशीं असते हेंहि माहीत नसावें, ही तर अत्यंत लाजीरवाणी गोष्ट होय. तरी सुज्ञ ह्मणविणाऱ्या प्रत्येक वीरशैवानें शक्य तितका आटोकाट प्रयत्न करून लेखनद्वारा याहिपेक्षा उत्तम मार्ग ह्मणजे खेड्यांत राहणाऱ्या गरीब श्रद्धाळु व अशिक्षित बंधु-वर्गाकडे जाऊन ह्यांचेशीं सलोख्यानें मिळून मिसळून वागून आपले भाषणद्वारा त्यांचे-मध्ये बसवेश्वरजयंतीचा प्रचार करावा व श्री

बसवेश्वरांचे वचनामृताची गोडी वीरशैवांना लावावी. उत्सव प्रत्येकानें आपापल्या घरीं वेगवेगळा न करितां सर्व वीरशैवांनी त्यास सामाजिक स्वरुप देऊन एके ठिकाणी एकत्र करावा अशी माझी सर्व वीरशैवांना अत्यंत नम्र विनंती आहे. असें श्री. गं. शि. तळेगांवकर, एस्. टी. सी. इंग्लिश टीचर, एदलाबाद. पू. खा. दे, हे कळवितात.

## सातारा जिल्हा अखिल वीरशैव लिंगायत शिक्षण परिषद्

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें सातारा जिल्हा वीरशैव लिंगायत शिक्षणपरिषद रविवार ता. २३ मे १९३७ इसवीं रोजी कराड मुक्कामी होणेचे निश्चित ठरलें असून, सोमवार ता० २४ मे १९३७ रोजी श्री. भाऊसाहेब वटाणें यांनी बोर्डींगसाठीं देणगी म्हणून दिलेले इमारतीचा उद्घाटनसमारंभ होणार आहे. तरी सर्व लिंगायत बंधुंनी ( लींगधारी सर्व पोटजातीसह ) अवश्य यावें अशी विनंती आहे. अध्यक्षांचें नांव व सभेचा कार्यक्रम मागाहून लवकरच प्रसिद्ध होईल.

अध्यक्ष:—सातारा जिल्हा वीरशैव लिंगायत शिक्षण संस्था

## ' संचालितं विदर्भ पंचांगम् " शके १८५९

प्रकाशक:—पं. भगूरकर, अमरावती,
कि. एक आणा.

हें पंचांग खास वऱ्हाडकरतांच तयार केलें असून तें शास्त्रशुद्ध धर्मशास्त्रोपयोगी असून दृक्प्रत्यय देणारें आहे. यांत राशीभविष्य मासफलासह असून विस्तृत पर्जन्यवृष्टी, वऱ्हाडचें राशीभविष्य कापसाची तेजी-मंदी, खास स्त्रियांकरतां भविष्य, इत्यादि भरपूर माहिती आहे. ज्योतिषी वर्गाकरतां दैनिक स्पष्ट रवि क्रांतिसह असून ग्रहांच्या युत्या, प्रतियुत्या, केंद्र त्रिकोणादि योगांच्या तारखा दिल्या आहेत. आजपर्यंत इतक्या भरपूर माहितीचें दुसरें कोणतेहि पंचांग आमच्या पहाण्यांत नाही. पृष्ठ ७२ असून किंमत फारच अल्प आहे. सर्वांनी या पंचांगाचा अवश्य संग्रह करावा.

## पवनी जिल्हा भंडारा

वीरशैव लिंगायत समाजातील धर्मात्मा शिवराम आप्पा तुपकर, सेवानिवृत्त हेडमास्तर, इंग्लिश स्कूल, पवनी. हे यंदाचे त्रैवार्षिक निवडणूकीमध्यें पवनी म्युनिसिपाल कमिटीचे उपाध्यक्ष ( व्हाईस प्रेसिडेंट ) निवडून आले ह्याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

## जाहीर सूचना

निजाम प्रांतिक वीरशैव परिषद व महिला सम्मेलन व्यायामप्रदर्शन व वीरसमाज उदगीरचे वार्षिकोत्सव उदगीर येथे ता० २१।२२। २३।२४ मे सन १९३७ ई. तदनुसार मिती वैशाख शुद्ध ११।१२।१३।१४ शके १८५९ ला करणे निश्चित झाले आहे. याच प्रसंगी श्री. मनिरंजन महादेव स्वामी सर्वभूषण आणि सोलापूरचे सुप्रसिद्ध बॅरिस्टर श्री. एम्. एस्. सरदार हाय कोर्ट जज्ज अक्कलकोट व श्री. सौ. पंचव्वाबाई सरदार सोलापूर आणि अन्य स्थानाचे विद्वान् उपदेशक भजनिक पुढारी यांचें आगमन होणार आहे. याकरिता सर्व धर्मप्रेमी बंधुंना विनंती आहे कीं, या वेळी आपल्या मित्रमंडळीसहित आगमन करून अमुल्य उपदेशामृतपान करावें.

भवदीय धर्मवीर मंत्री
वीरशैवसमाज उदगीर.

## अहमदनगर

ता. १५-४-३७ रोजी अहमदनगर जिल्हा तरुण-संघाची बैठक होऊन खालील कार्य झाले. (अध्यक्ष) श्री. बोंबलेट गोविंद संगवे (पाथर्डे)

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ जून १९३७ ( अंक ११ वा.

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे

# संजीवनीला एक हजाराचें कर्ज द्या

## प्रत्येकाने दहा रुपयांचा कर्जरोखा एक ते पांच घ्यावेत.

( ना० रा० वामणगांवकर, मालक, अरुण-उदय व संजीवनी, यांजकडून )

'वीरशैव संजीवनी ' पाक्षिक ज्या छापखान्यांत छापलें जातें तो 'अरुण' छापखाना व 'उदय' पत्र हे मी १९३२ च्या जानेवारींत पांच वर्षांत रक्कम फेडीन ह्या करारानें विकत घेतलें होतें. १९३६ अखेरपर्यंत पांच वर्षें पूर्ण झालीं आणि सर्व रक्कम फेडून 'अरुण' छापखान्याचा व 'उदय' पत्राचा मी आतां पूर्णपणें मालक बनलों. 'संजीवनी' प्रसिद्ध करण्यात जें मला नुकसान येतें व पुढेंहि कांहीं दिवस येईल तें मला माझ्या 'अरुण' छापखान्यांतून व माझ्या 'उदय' पत्रांतून भरून काढावें लागतें व काढावें लागणार.

धंद्याच्या दृष्टीने व्याप फार वाढल्यामुळे छापखान्याची जागा फारच कमी पडते आणि त्यामुळे धंदा अधिक प्रमाणांत वाढविण्यास फार त्रास होतो. इतकें कशाला, जागेमुळे हें अशक्य होऊन बसलें. 'अरुण' 'उदय'चा धंदा वाढवून 'संजीवनी' जर मला फुकट काढतां आली तर 'संजीवनी'च्या वर्गणीदारांच्या जोरावर एक चांगला सहसंपादक पोसतां येईल, धार्मिक ग्रंथांचें वाचनालय वाढवितां येईल, अशीं किती तरी कामें वीरशैवसमाजाकरितां करावयास मी समर्थ होईन.

आज 'अरुण' उदय' करितां व संजीवनीकरिता चांगल्या प्रशस्त इमारतीची गरज आहे. शहराच्या मध्यभागीं अशी योग्य व प्रशस्त जागा ५० ते ७५ रुपये दरमहा भाडें देऊनहि मिळत नाही. शिवाय इतकें भाडें देऊन धंदा चालविणें सद्यःस्थितींत कठीण आहे. मी अगदीं काटेतोलपणाने खर्च करतों म्हणून 'अरुण'-'उदय' व 'संजीवनी' ह्या सर्वांचा मिळून दरमहा एक हजाराचा खर्च आज भागवूं शकतों. जागेच्या भाड्यांत काटकसर करितां यावी म्हणून उमरावती-शहरवाचनालयाची ९०×४० फूट मोकळी जागा इमारत बांधण्याकरिता मला मिळाली आहे. तेथे योग्य अशी इमारत बांधण्याकरितां सरासरी रु. ३००० नगदी पाहिजेत. इमारत जुलै अखेरपर्यंत तयार झालीच पाहिजे. इमारत तयार झाल्यावर दरमहा रु. ५० माझे वाचणार. एवढ्यांत 'संजीवनी'चें छपाईत येणारें नुकसान भरून निघतें.

याकरिता सदर इमारत बांधण्याकरिता संजीवनीतर्फे मला कांही तरी मदत पाहिजे. म्हणजे इमारत बांधण्याला येणाऱ्या रु. ३००० खर्चापैकीं एक हजाराचा खर्च तरी आज संजीवनीकडून मदत घ्यावयाची. अर्थात 'संजीवनी'च्या शंभर वर्गणीदारांची वर्गणी पांच वर्षांची आगाऊ घ्यावयाची असें मीं ठरविलें आहे. संजीवनीची वार्षिक वर्गणी रु. २॥ आहे. पांच वर्षांची वर्गणी रु. १० आगाऊ दिली तर पुढील २॥ रुपये वर्गणीदारांचे वाचतात. म्हणून जे वर्गणीदार संजीवनीचा दहा रुपयांचा एक कर्जरोखा खरेदी करतील त्यांना पांच वर्षेपर्यंत संजीवनी फुकट मिळेल. अशा प्रकारें जे वर्गणीदार आगाऊ वर्गणीत एक रु. १० चा कर्जरोखा खरेदी करतील त्यांना व जे वर्गणीदार नसतील व ज्यांना होण्याची इच्छा नसेल त्यांनासुद्धां एक ते पांच पर्यंतच रु. १० किंमतीचे कर्जरोखे विकत घेता येतील. रु. दहाच्या एका रोख्याचे पांच वर्षांत रु. १२ प्रमाणे फेड करण्यांत येईल. पांच वर्षांनी रु. १२ मिळणें हा ज्याला उशीर वाटतो त्याला दरसाल रु. २ प्रमाणें सहा वर्षांत रु. १२ मिळतील अशीहि व्यवस्था केली आहे.

अरुण-उदय संस्था आज सतत अठरा वर्षे सुरू आहे. माझ्याकडे मालकी हक्क येऊन आज सहावें वर्ष सुरू आहे. ही संस्था मी हयात असेपर्यंत बंद पडणारी नसल्यामुळे आणि तोपर्यंत संजीवनीहि प्रसिद्ध होत राहणार असल्यामुळे संजीवनीचा दहा रुपयांचा कर्जरोखा खरेदी करून पांच वर्षांत बारा रुपये मिळविणें वा दरसाल रु. २ प्रमाणें फेड करून घेऊन सहा वर्षांत रु. १२ मिळविणें ... ह्यांत स्वार्थाबरोबरच परमार्थहि आहे. पांच वर्षांचे वर्गणीदार म्हणून एक कर्जरोखा घ्या, वा ह्याव्यतिरिक्त एक, दोन, तीन, चार व पांच कर्जरोखे घ्या, पण संजीवनीच्या वर्गणीदारांत, चहात्यांत वा आश्रयदात्यांत एकंदर शंभर कर्जरोखे खपले म्हणजे कार्य पूर्ण झालें. शंभराच्या वर आम्हास कर्जरोखे विकावयाचे नाहीत. कर्जरोखें तारीख १५ जून पासून तो आगष्ट १९३७ अखेरपर्यंतच फक्त विकत मिळतील. त्यानंतर कर्जरोखे विकत मिळावयाचे नाहीत.

संजीवनी चिरस्थायी करण्याकरिता ज्यांना ही मदत करावयाची असेल त्यांनी ता. १५ जून पासून मनिऑर्डरी-मॅनेजर, 'वीरशैव संजीवनी', ह्या नावावर पाठविल्या म्हणजे त्यांच्याकडे कर्जरोखे बरोबर पोस्टाने रवाना होतील. कोणी किती कर्जरोखे घेतले व 'संजीवनी'ला ह्या प्रकारच्या कर्जाची मदत केली, त्या सर्वांची नांवें पूर्ण पत्त्यासह संजीवनींत प्रसिद्ध होतील. तरी आमच्या प्रेमळ वाचकांनी व संजीवनीच्या चहात्यांनी दहा रुपयांच्या कर्जाचे असे एकापेक्षा अधिक म्हणजे पांचापर्यंत असे शंभर कर्जरोखे विकत घेऊन वा खपवून ह्या वेळी संजीवनीस मदत करावी, अशी प्रार्थना आहे. आम्ही देणगी मागत नसून कर्ज मागतों. आणि तेंहि एक कर्जरोखा दहा रुपयां प्रमाणे विकून पांच वर्षांनी रु. १२ देऊं ह्या हिशेबानें मागतों. ह्यांत मदत असून फायदाहि आहे. तरी नांवें नोंदवावींत व लागलींच मनिऑर्डरी पाठवाव्यात अशी प्रार्थना आहे.

ना० रा० बामणगांवकर,
मालक—अरुण-उदय. संजीवनी. उमरावती.
तारीख १६-५-१९३७ इ.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

| | |
|---|---|
| ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय: ।<br>लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशय: ॥<br>पारमेश्वरागम प. १ (५६) | मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:<br>स्त्रिय:वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्<br>भगवद्गीता अ.९ (३२) |

नवें वर्ष २ रें ) मिति अ. ज्येष्ठ व० ७ शके १८५९ ( अंक ११ वा.

# अमरावतीच्या ७२ बाटोड्यांचे चाळे!!

( लेखक—एक अमरावतींकर सनातनी वीरशैव )

गेल्या वर्षीच्या बसवजयंतीच्या निमित्तानें अमरावती येथें एक प्रेम की द्वेष संवर्धक मंडळ स्थापन झालें. रोहिणखेड येथें स्थापन झालेल्या वीरशैवहितसंवर्धक मंडळाशी स्पर्धा करणें व वितंड वादाचा प्रचार करणें हें ह्या मंडळाच्या गाढवे संचालकांचें पवित्र ध्येय. त्याकरिता कांही लोक एकत्र केले व हे सर्व निरनिराळ्या कारणानें एकत्र झाले. कारंजा येथे भरलेल्या वीरशैव प्रांतिक परिषदेला शह द्यावा आणि तिला मोडून-तोडून टाकून आपली कर्तबगारी प्रांतांतील नव्हे तर इतर प्रांतांतील प्रमुख वीरशैवांच्या नजरेला आणावी ह्मणून त्यांनी उद्योग केला. ह्या कामाकरिता पंढरपूरचा फल्लय्या वांवाचा एक आपाळ बंगम त्यांनी हाताशीं धरला, आणि कपाशीची दलाली करून थकलेले व हातांत टाळ चिपळ्या घेऊन मिरवीत असलेले एक बृहस्पतितुल्य दादाशास्त्री नामें हेहि त्यांच्या तैनातींत पडद्यांतून व पडद्याबाहेरून होते.

श्री. नानासाहेब बामणगांवकर हे वीरशैवांची सुधारणा करतांना जेंथे तेथे अष्टावरण, पंचाचार व षट्स्थळ सांगतात, आणि अष्टावरणाचे अधिकारी जेवढे वीरशैव आहेत तेवढे द्विज आहेत असें प्रतिपादन करतात, ह्मणून नानासाहेबांच्या ठरावांना ह्मणून पाडणें व त्या ठरावांच्या मोहक शब्दजालांना व भिर्णे हा ह्या वीरशैव तत्वज्ञानाचा बुरखा घेतलेल्या कांही अज्ञान तिर्यक्पंडितांचा कारंजा येथें धंदा होता. हा धंदा नावलौकीकाला याचा

ह्मणून इकडून — तिकडून जमा केलेले लोक भाड्यानें कारंजा येथे आणले. भाड्यानें आणले ह्मणजे त्यांचे वाटखर्चाचे, खाण्यापिण्याचें व प्रतिनिधींच्या फीचे पैसे खर्च करुन आणलें एवढाच आहे. वास्तविक तेथे काय होणार आहे व तेथे काय करावयाचें आहे ह्याची त्यापैकीं एकालाहि जाणीव नाही.

एका वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं ज्यांच्या बोलण्यांत व चालण्यांत कधींच संबंध नसतो असे अर्जनवीस, वकीलाचे कारकून व नामधारी वकील हे ह्यांचे पुढारी. नाहीं ह्मणावयास कवडीच्या हिशोबानें प्रपंचाकडे पाहणारा एकादा दुसरा दलाल व व्यापारीहि ह्यांचा पुढारी ह्मणून पुढें पुढें करीत असे. ह्या ७२ च्या वाटोड्या टोळीचें हृद्‌गत प्रगट करणारी हस्तपत्रकें कारंजा-परिषदेंत वाटलीं गेलीं. कारंजा — परिषदेंत सरसहा रोटीबेटीव्यवहार होणार ह्मणून चला व परिषद् ह्मणून पाडा अशीं हस्तपत्रकें अनेकांच्या खोट्या व लबाडीने सह्या घेऊन ह्या लोकांनी वाटलीं. हीं हस्तपत्रकें पाहून फक्त यवतमाळच्या चार — दोन सज्जनांना हो टोळी आपल्याचप्रमाणें खऱ्या व प्रामाणिक सज्जनांची आहे असें वाटलें होतें. यवतमाळचे श्री. हमदापुरे हे प्रामाणिकपणेंच सनातनी वृत्तीचे. सदर सनातनी वृत्तीचा जय व्हावा ह्मणून त्यांनीच फक्त प्रामाणिकपणें प्रयत्न केले. स्वागतमंडळाचे सभासद झाल्यावर स्वागतमंडळाच्या सभासदांना व प्रतिनिधींना परिषदेंत भाग घेतांना सारखेच हक्क आहेत हें कळल्यावर त्यांनी वा त्यांच्यापैकी कोणीहि स्वागतमंडळाची फी परत मागण्याचा वा स्वागतमंडळाचें तिकीट घेऊन ती फी पूर्णपणें न देण्याचा बाजारू मारवाडी कावा अमरावतीच्या वितंडवादी कंपूप्रमाणे केला नाही.

यवतमाळचे श्री. हमदापूरे, पाहपळचे श्री. रामचंद्र आप्पा काळे वगैरे कांही लोक शुद्ध सनातनी होते व त्यांना कांहीं तत्व होतें. परिषदेंत त्यांची वागणूकहि शिष्टसंमत, शुद्धास शोभेसी होती पण उमरावतीचे त्यांना लाग-लेले सोंगाडे सनातनी हेच खरे वितंडवादो ऊर्फ वाटोडे होत ह्याची ह्या विचाऱ्यांना काय जाणीव! कल्लय्या व दादाशास्त्री हे वितंडवाद्यांच्या टोळींत वावरतात, वितंडवादाचे वाटोडें कातडे त्यांच्या आंगावर आहे, हें ह्या सभ्य गृहस्थांना अवगत नव्हतें.

कारंजा — परिषदेत वीरशैवांतील एकीकरणाचा ठराव येणार होता. त्यांत वीरशैवेतरांच्या एकीकरणाचा ध्वनि बिलकूल नव्हता. पण वीरशैवेतर महारमांगाशीं हे खाणेपिणें करणार व सवगोळंकार करणार असें खोटेंच सांगून ह्यांनी एकीकरणाच्या ठरावाविरुद्ध लोकमत कलुषित करण्याचा उद्योग केला. 'वीरशैव गर्जना' हें पत्र शुद्ध सनातनीयांचें ह्मणविते. सदर पत्राच्या संपादकानें १९३४ मध्ये खामगांव येथील भारतीय वीरशैवधर्मपरिषदेंत जो एकीकरणाचा ठराव केला तोच येथें आला असतां व तोच पास झाला असतां त्यावर 'वीरशैवगर्जने'नें आकांड-तांडव करावें आणि परिषदेविषयीं वाटेल तें लिहावें हा जर सनातनी धर्म असेल तर तो बार्शी व पंढरपुरांतच पचेल; मध्यप्रांत—वऱ्हाडांत पचावयाचा नाहीं. इतकेंच नव्हे तर खानदेश व मोगलाई ह्या भागांतहि असल्या बुवाशाहीस ह्यानंतर किंमत राहणार नाही हें गर्जनाकाराच्या नजरेस कारंजा येथे आलेंच आहे.

कारंजा — परिषदेला जे विरोधक होते ते कसे वितंडवादी ऊर्फ वाटोडें होते ह्याचें प्रदर्शन ७२ इसमांच्या सह्यांच्या एका हस्तपत्रकांत त्यांनीच केलें आहे. 'वृत्तपत्रांच्या खोट्या बातमीदारांना अमरावती-वीरशैव-जनतेचें सणसणीत उत्तर' ह्या नावाचें एक हस्तपत्रक कारंजा येथें वाटलें गेलें. त्यावर उमरावतीच्या ७२ वीरशै-

वांच्या सह्या आहेत. पण त्या सह्या फसवून व आधारात घेतल्या आहेत. सदर पत्रकांत प्रसिद्ध केलेला वाटोडखाना ऊर्फ सबगोलंकार इतका निंद्य व तिरस्करणीय आहे कीं, आपद्धर्म ह्या नांवाखाली अलिंग्याशीं भक्ष–अभक्षणांचा व्यवहार झाला पाहिजे हाच त्यांतून बोध होतो. उमरा-वतीच्या माजलगांवकर–मठांतील एक जंगम ब्राह्मणांचे प्रयोग करून दाखविण्याला यात्रेला गेला ह्मणून त्याचें अभिनंदन करणें हा प्रसंग निराळा. त्याबद्दल कोणीच वीरशैव अभिनंदन करावयास चुकावयाचा नाहीं. परंतु यात्रेतील प्रवासांत अलिंग्याशीं व्यवहार घडला (खाण्यापिण्याचा) पण तो आपद्धर्म आहे व त्याला शास्त्रानें तसें करण्यास मुभा आहे ह्मणून येथील जनता (७२ सह्यांची ) कोण-त्याहि दोष लावीत नाही ' अशी उघड व निर्लज्जपणाची गर्जना आपद्धर्माच्या नांवाखाली कोणताहि वीरशैव—जो अष्टावरणाचा अधि-कारी आहे व त्याच कुळांतील आहे तो करा-वयाचा नाही. 'संजीवनी'काराप्रमाणेंच ' वीरशैव गर्जना ' कारहि अशा प्रसंगीं वामधात्र कां होईना; पण कांही तरी विधी झाला पाहिजे व त्यालाच तेंहि प्रायश्चित्त ह्मणतात. गर्जनाकार हे अखिल भारतीय गुरुवर्य संघाचे चिटणीस आहेत पण त्यांचें हें मत वैयक्तिक आहे असा ह्या ७२ तिर्यक्पंडितांनी सदर हस्तपत्रकांत घेरा मारला आहे.

एवढाच घेरा मारून हे ७२ तिर्यक्पंडित थांबले असते तर त्यांच्या अकलेचा ' सर्व-श्रेष्ठ ' अखिल भारतीय स्वरूपांत प्रगट झाला नसता. ह्मणून 'वीरशैव गर्जना'काराचें मत हें 'अखिल भारतीय माहेश्वर मंडळाचें मत नव्हे ' असा निर्णय हे भारतीय माहेश्वरमंडळाचे ७२ छापील बच्चे देतात. ह्या ७२ ना भार-तीय माहेश्वराच्या नांवावर बोलण्याचा अधि-कार पंढरपूरच्या कल्लय्यानी दिला, कीं दादा-साहेबी नांवाच्या उमरावतीच्या हरदासांनी दिला, कांहींच कळत नाही. का हें हस्तपत्रक लिहिणारा कोणी लिंगोद्भव आचार्य आहे ? आणि तो शास्त्राच्या व कायद्याच्या भट्टींतून भाजून काढलेला आहे ? ' आपद्धर्म ह्मणून अलिंग्याशीं व्यवहार घडल्यास शास्त्रानें मुभा दिली आहे ' असें दुराग्रहानें ह्मणणाऱ्यांस आपद्धर्म कशाला ह्मणतात व शास्त्र कशाशीं खातात हें तरी कळलें काय? आपद्धर्माला मर्यादा आहे. अन्नावाचून मर-ण्याचा प्रसंग आला तेव्हा विश्वामित्रानें सडलेल्या कुत्र्याचें मांस खाल्लें होतें. रोगी मरतच असला तर निषिद्ध औषध देऊन त्यांना जगवीत असतात. पण जगल्यावर शास्त्रा-र्थाच्या गोष्टी करणारास हें कळावयास पाहिजे कीं, त्या आपद्धर्माला-सुद्धा प्रायश्चित्त आहेच आहे. परंतु आपद्धर्मातून पार पडल्यावर प्रायश्चित्त नाहीच व तें शास्त्रांत नाहीच हें ठासून सांगतांना ह्या ७२ तिर्यक्पंडिताच्या छबेल्या ह्मोरक्यानें एक जरी शास्त्राचा आधार दिला असता तरी बरें झालें असतें ?

एकाद्या अस्सल दीक्षावंताच्या वा शीलवंताच्या मुलास नवरी मुलगी मिळत नाही अशी परिस्थिति प्राप्त झाली आणि मूर्तिजापूर-सारख्या गांवीं एकाद्या धनगरानें एकाद्या लिंगधाऱ्याकडे एकादी मुलगी पाळण्याकरतां दिली अशी कल्पना केली व तिच्याशीच त्या मुलाचे कोणताहि धार्मिक विधी संस्कारादाखल व प्रायश्चित्तादाखल न करतां गंधर्व लागलें तर हाहि आपद्धर्मच आहे काय?

जातींत आवडीची छेलछबेली बायको मिळत नसली तर जातीची पूर्वीची बायको टाकून अलिंगी पेन्शनर डिस्ट्रिक्ट जज्जाच्या दासीच्या मुलीशीं रजिस्टर विवाह करून संसार करणें, पुढे तिचाहि कंटाळा करून दुसरीच्या शोधांत

फिरणें हाहि आपद्धर्मंच आहे काय ? वैधव्य कंठतां कंठतां पुढें गंधर्व झालें व लागलीच सहा महिन्यांत बाळंतीण होण्याचा योग येणें हाहि आपद्धर्मंच काय ? शहरांतून सहज फिरतां फिरतां तहान लागली वा भूक लागली ह्मणून जो अलिंग्याच्या हॉटेलांत खाऊं पिऊं लागतो तर तोहि आपद्धर्म आहे काय? स्वतःची बायको कुरूप असल्यामुळें दुसऱ्या अलिंगी मित्राच्या गोऱ्या गोमटया बायकोवर नजर ठेवून तिला मुंबईला पळवून नेणें व तेथे वीरशैव – आश्रम सांपडला नाही ह्मणून "परदारगृहांत" तिच्यासह चैन करणें हाहि आपद्धर्मंच आहे काय ? केवळ शैक्षणिक सांपत्तिक अडचणीसाठी आपल्या नापसंतीची बायको आपद्धर्म ह्मणून स्वीकारून ती आपल्या कामवासनेच्या तृप्तीकरतां पुरी पडत नाही ह्मणून आप्तेष्टांच्या मुलीवर व स्त्रियांवर प्रेमवृष्टि करीत राहणे हेंहि प्रेमसंवर्धनाच्या आपद्धर्मांतील तत्व आहे काय ? पायाचें तीर्थ देऊन भक्तांना पावन करणारा एखादा जंगम, प्रथम स्वपसंतीनें केलेल्या एक नव्हे तर दोन बायकांना फारकत देतो आणि दर लगीनसराईत तिसरी करावयाची ह्मणून फंडबाजी करतो हाहि आपद्धर्मंच काय ? परंपरागत दारिद्र्यांतून मुक्त होण्याकरितां मित्राच्या ठेवी पचविणें आणि त्याच्या अंतकाळीं त्याला तोंडहि न दाखविण्याचा कृतघ्नपणा व्यक्त करून त्याच धनावर चैन करण्याचा धंदा चालावा एतदर्थ एखाद्या अलिंगी डॉक्टराकडे ओघारांत खाणें पिणें करणें हाहि आपद्धर्मंच काय ? ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीच्या मिषानें अलिंगी गुरु करून त्याच्या हातचा मदिरापानाचा प्रसाद सेवन करणे हाहि एखाद्या ह. भ. प.चा वा वे.शा.सं.चा आपद्धर्मंच काय ?

५० वर्षांपूर्वी जे शीलवंत,व दिक्षावंत पंचमाशी काचाराशी वा अन्य पोटजातीशीं कोणताहि रोटी व बेटी व्यवहार करीत नसत तेच आतां दोन पिढ्यापासून रोटीबेटीव्यवहार करतांना आढळतात व ते सर्व एकमेकांना पचनीं पाडतात. हेंहि सर्व आपद्धर्मानेंच घडलें ह्मणावें काय ? ज्या ७२ जणांनी अलिंग्याशीं होणाऱ्या अशोदकव्यवहाराची आपद्धर्म ह्मणून घोषणा केली ते अलिंग्याशीं–मग ते स्पृश्य असोत वा अस्पृश्य असोत, यांच्याशी आपद्धर्म ह्मणून व्यवहार चालावयास हरकत नाही अशीच गर्जना करतात हेंच उघड होतें. हेच वितंडवादी ऊर्फ बाटोडे होत अशी स्पष्ट ग्वाही ७२ चें हस्तपत्रक देतें. आणि ह्या ७२ मध्यें अशांचाच भरणा आहे ह्मणून हा ७२ बाटोड्यांचा एक संघ बनला असें कोणीं मानलें तर तो दोष कसा व अन्याय कसला?

"ह्यावरून बामणगांवकर स्वतःचें वर्तन शुद्ध नसतांना × × × परोपदेशे पांडित्य करतों" असें ह्मणणारे हे ७२ जसे बोलतात तसेच चालतात असें मानणेंच सर्वथैव उचित आहे. आपद्धर्म ह्या सदराखालीं येणाऱ्या वरील सर्व अडचणी कोणतेंहि प्रायश्चित्त न घेतां व तदनुरूप कोणताहि धर्मविधी न करितां ७२ सहयाजींनीं पचविला असला तर नवल काय? लिंगावरील बिल्वपत्र उचलून हे ७२ सहयाजी छातीला हात लावून सांगतील काय कीं, वरील प्रकारच्या आपद्धर्मांत सांपडलेले महाभाग आमचे आज कोणीच नाहीत व त्यांपैकीं कुणाच्याहि सह्या सदरहू पत्रकावर नाहीत ? पण ह्या सर्व बाटोड्यांना अशी कृती केलेली चालते, ती पचवितांहि येते. तथापि वीरशैवांतील पोटजातींच्या एकीकरणाचा ठराव नको व तशी उघड कृती नको. जे जाहीरपणें जसे बोलतात तसेंच करतात तेच खऱ्या शिवाचे भक्त होत. अवांतर चांडाळ होत धर्मशास्त्र दृष्टया हे सर्व चांडाळ होत.

अरेरे ! ७२ च्या हस्तपत्रकावर आमच्या मतें अशाच्याच चांडाळवृत्तीच्या लोकांनी सह्या गोळा केल्या आहेत ह्मणूनच आपद्धर्माला

चुकूनहि प्रायश्चित्त नाही असा भारतीय वीरशैवांचा कपोलकल्पित शास्त्रार्थ सांगावयास हे पुढें सरसावले असावेत. अशांना अलिंग्याशीं झालेला व्यवहार उघडपणें चालतो असें वाटून कारंजा-परिषदेला जमलेले प्रतिनिधि आपल्याला भोजनपंक्तींत घेणार नाहीत ह्या कल्पनेनें च की काय त्यांना आपल्या बाटोड्या टोळीपुरती निराळी व्यवस्था करावी लागली असें कांही लोक तेथे बोलत असत. ह्या वितंडवाद्यांच्या ऊर्फ बाटोड्यांच्या ठोळीला रविवारच्या परिषदेंत "दे. भ. नानासाहेब बामणगांवकरांच्या संरक्षणात शुद्ध संघटनाच्या शास्त्रोक्त विधीच्या ठरावात आपद्धर्मांत प्रायश्चित्त नाही व विधी नाही" अशी आणखी बाटोडी उपसूचना, ह्या बाटोड्या टोळीचे म्होरके श्री. हेगु वकील व श्री. महाराणा एकलारे ह्यांना आणावयाची होती. ती अध्यक्षांनी आणूं दिली नाहीं. म्हणून हे बाटोरे अध्यक्षावर नाराज झाले. मोर्शीचे बाळकर ह्यांची उपसूचना पुष्कळ बरी म्हणण्याचा प्रसंग आहे. कारण तींत परधर्मांतील कोणी स्त्री वा पुरुष खुशीने वीरशैवधर्मात येऊं बघला तर त्याला विधिपूर्वक स्वधर्मात—स्वसमाजांत नव्हे — घ्यावें एवढेच नाना—साहेबांच्या ठरावांत सुचविलें आहे. अलिंग्याशीं होणाऱ्या व्यवहाराला आपद्धर्म म्हणून प्रायश्चित्त नाही असें म्हटलें असतें तर लिंगी व अलिंगी ह्यांचा सवगोलंकार केल्याचें श्रेय त्या बाटोड्या ऊर्फ वितंडवाद्यांच्या टोळीला मिळालें असतें. पण अध्यक्षांनी व परिषदेंतील सूज्ञमंडळ्यांनी ह्यांची सवगोलंकारी वृत्ति ओळखली व त्यांना रविवारी सकाळींच शह मिळाला.

एकीकरणाच्या ठरावावर आपणाला सवगोलंकार करतां आला नाही म्हणून दुपारी येणाऱ्या एकीकरणाच्या ठरावावर काय करितां येतें हें ते पाहूं लागले. एकीकरणाचा ठराव अष्टावरणधारी वीरशैवांच्या पोटजातींनाच बांधलेला आहे, व त्या एकीकरणाची व्याख्याहि निश्चित नाहीं. असें ग्रामगांवचा ठराव त्यांत बांधला गेला असल्यामुळें आपल्या स्वैराचारास आळा बसला हें जाणून ७२ तिर्यक-पंडिताच्या नाय़कांनी परिषदेंतून पलायन केलें. ह्या पलायनपटूत माजलगांवकर हेहि होते. 'यः पलायते स जीवति' ह्या आपद्धर्मसूत्राचा अवलंब करून त्यांनी आपल्या हातानी आपलें तोंड काळे करून घेतलें. ज्यांच्या गुणाबद्दल परिषद एकमतानें अभिनंदन करते त्यांनीहि पलायन करणाऱ्या टोळींत सामील होणें म्हणजे वीरशैव-घटकाशीं प्रतारणा करणेंच नव्हे काय ? ह्या पळपुट्यांच्या टोळींत जे स्वामी व जंगम सामील झाले त्यांनासुद्धा हाच सवगोलंकार पाहिजे होता हें उघड झालें. असे स्वामी आतां वीरशैव गर्जनेत वीरशैवांच्या शुद्ध एकीकरणाविरुद्ध गर्जना करावयास मात्र चुकावयाचे नाहींत. आपद्धर्माच्या नांवाखाली अलिंग्याशीं झालेला व्यवहार ज्यांना उजळमाथ्यानें चालतो त्यांना सर्व वीरशैवमात्रांतील एकीकरणाची शुभेच्छा चालत नाही हा अन्याय आहे, जुलूम आहे, हाच वितंडवाद आहे. पण हे सवगोलंकारी लोक अन्याय व जुलूम करण्याकरिताच अस्तिन्या सावरून कारंजा येथे चालून आले होते. पण शेवटी तेच तोंड काळे करून परतले. आता गर्जनेत केवढाहि ओरडा केला तरी ह्या कूपमंडुकांना मध्यप्रांतात, वऱ्हाडांत, खानदेशांत व मोगलाईत किंमत राहिली नाही. म्हणे बामणगांवकरांचें आचरण शुद्ध नाही. उमरावतीच्या ७२ सहधर्मीपेक्षा ह्या महाभागाचें शील इतकें श्रेष्ठ व शुद्ध आहे कीं, तितका नीतिशुद्ध पुतळा हजारांत एकादाच. तेव्हा अशा बाटग्या बोडगुळांनी आपलें आचरणच अगोदर पहावें व नंतरच बोलावें हेंच उत्तम !

# नवमतवादी व पोटजातींतील बेटीव्यवहाराचा प्रश्न?

( लेखकः--श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., )

## वीरशैवसमाजसंघटनेच्या दृष्टीनें पोटजातीचे एकीकरणाची आवश्यकता.—

पोटजातींतील रोटीव्यवहाराची आवश्यकता आह्मीं आतापर्यंत निरनिराळया प्रसंगी व्याख्यानद्वारा व लेखांतून प्रतिपादिली आहे. व त्याप्रमाणें कारंजा येथें भरलेल्या वीरशैव प्रांतिक परिषदेत नवमतवाद्यांनी मांडलेला पोटजातींतील सरसि एकीकरणाचा ठराव प्रचंड बहुमतानें ता. ८ व ९ मे रोजी भरलेल्या दुसऱ्या अधिवेशनांत पासहि झाला आहे. व त्याप्रमाणें आचाराला व अंमलबजावणीलाहि सुरुवात झाली आहे. श्री. एस्. जी. ऊर्फ नानासाहेब जतकर ( लिंगायत माळी ) पुसदचे तहसीलदार ह्यांचे मुलीचे लग्नप्रसंगीं एकीकरणाचे ठरावाची श्री.आप्पासाहेब एकलारे, बी.ए. (ऑनर्स), वकील, पुसद, व श्रीमंत बाबासाहेब मुखरे इजारदार, तसेच सौ नर्मदाबाई एकलारे व सौ. नलिनी ऊर्फ माईसाहेब मुखरे ह्यांचे नेतृत्वाखाली पुरुष व स्त्रीसमाजांतूनहि पूर्णपणें व यशस्वी रीतीने अम्मलबजावणी झाली. ह्याचें श्रेय श्री. बाबा विश्वनाथ आजेगांवकर व स्थानिक स्वामिवर्ग ह्यांचा आहे. एकुण काय कीं, नवमतवाद्यांनी पोटजातीचे एकीकरणाचें तत्व प्रतिपादन केलें, प्रांतिक परिषदेंतून आपला ठराव पास करून घेतला व त्याप्रमाणे अंम्मलबजावणी सुरुं केली आहे.

हा सर्व प्रकार सुरुं असतांना व पोटजातीचें एकीकरण ह्याचा अर्थ " रोटी व्यवहार " हें अनेकवार स्पष्ट व उघडपणें लिखाणांनी व व्याख्यानद्वारा जाहीर प्रसिद्ध केलें असतांहि श्रीगुरु परांडकर किंवा त्यांची कांही सनातनी मंडळी पोटजातींतील एकीकरण ह्मणजे फक्त सहकार्य, प्रेमभाव, व सलोखा वाढविणें असा अल्पमतवाल्याच्या करतां सोईस्कर असा नवीनच पळवाटीचा संकुचित अर्थ काढत असले तर खुशाल काढोत !

एकीकरण ह्याचा अर्थ सहकार्य किंवा प्रेमभाव वाढविणें एवढाच सरळ व स्पष्ट त्यांतून निघत होता तर जवळ जवळ १॥—२ महिन्यापासून श्री परांडकरांची " वीरशैव गर्जना " सारखी अग्रलेखातून व इतरत्रहि माझ्यावर व माझ्या नवमतवादी सहकाऱ्यावर डुगाण्या कां झाडीत होती ? ह्यांचा आपसांतील सहकार्य नको होवें काय ?

पंढरपूरक्षेत्रांतील आपला वडिलोपार्जित क्षेत्रोपाध्यायाचा व पंढेगिरीचा धंदा सोडून कल्लय्यासारखे कळकळीचे प्रचारक कारंजा—परिषदेच्या आधी १-१॥ महिना साऱ्या वऱ्हाडांतील खेड्यापाड्यांतून कां फिरवल्या गेले ? साध्या सलोख्याच्याहि हे विरुद्ध होते ह्मणून कीं काय ? श्रीगुरु परांडकरापासून वोट तहत एखाद्या लुंग्यासुंग्या सनातन्यापर्यंत आपल्याला बहुमत अनुकूल नाही असें पाहतांच पाय आपटीत व वोटें मोडीत सभास्थान सोडून जाण्याची रायचूर, नाशीक, व कारंजा, येथेहि अनिष्ट प्रथा कां पाडण्यात आली ? परस्परप्रेमभाव वाढविण्याच्याहि ते विरुध्द होते ह्मणून कीं काय ?

ह्याचा उघड व सरळ अर्थ एवढाच कीं "एकीकरणाचा अर्थ सहकार्य व प्रेमभाव" हा परामून मनःस्थितींतून पळवाटीकरिता काढलेला अर्थ आहे.

"सरसि एकीकरण" ह्याचा अर्थ गुरुजंगमाचे रूढ नियंत्रणाविरहित शिष्टसंमत वीरशैव बहुमतानें पोटजातींत सुरुं करावयाचा "बेटीव्यवहार" हा आहे. नवमतवाद्यांच्या ह्या सरळ व स्पष्ट भूमिकेचा आपआपल्या सोयीनुसार कोणी कसाहि अर्थ काढो.

## पोटजातींतील बेटीव्यवहारांचा प्रश्न

"बेटीव्यवहाराचा प्रश्न" रोटीव्यवहारापेक्षां बराचसा भिन्न आहे. रोटीव्यवहाराला जसें सार्वजनिक व सामुदायिक स्वरूप आहे व त्याचे जसे सामुदायिक हितानहिताचे प्रश्न गुंतले जातात तसा प्रश्न बेटीव्यवहाराचा नाही. तो व्यक्तिगत निराळ्या स्वरुपाचा पण जास्त महत्वाचा आहे. व ह्मणूनच आह्मीं एकीकरणाचे व्याख्येतून बेटीव्यवहाराचा प्रश्न अजिबात वेगळा काढला आहे. बेटीव्यवहाराचा प्रश्न हा सामुदायिक स्वरुपाचा नाही. तो दोन व्यक्तींच्या उभ्या आयुष्यातील सुखदुःखाचा प्रश्न आहे. दोन जीवांच्या आवडी-निवडीवर पूर्ण सम्मत सहकार्याच्या यशस्वितेवर हा सामाजिक प्रश्न अवलंबून आहे. अर्थातच ह्या प्रश्नाकडे सार्वजनिक किंवा सामुदायिक दृष्टीनें पाहतां येत नाही तर समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने वैयक्तिकमतप्राधान्यानेंच हा प्रश्न सोडवावयाला पाहिजे.

व हा प्रश्न कायद्यानी सज्ञान झालेल्या ह्मणजे १८ वर्षे वयाची मुलगी व २१ वर्षे वयाचा मुलगा ह्यांनी आपल्या संमतीनें सोडवावयाला पाहिजे. आह्मी पोटजातींतील बेटीव्यवहाराच्या विरुध्द आहोत; कायद्यानें सज्ञान झालेल्या पोटजातींतील वधुवरांच्या विवाहाविरुध्द नाही.

आह्मी बेटीव्यवहारांच्या विरुध्द कां ? तर "बेटीव्यवहार' ह्यांत जी अंतर्भूत कल्पना आहे त्या कल्पनेच्या आह्मी विरुध्द आहोत.

"बेटीव्यवहार" ह्या शब्दांतून पित्याच्या मुलीवरील मालकी हक्काचा अर्थ अभिप्रेत होतो व "कन्यादान" ह्याहि शब्दांतून तोच अर्थ बाहेर पडतो. ह्या दोन्ही शब्दांतून निघणाऱ्या अर्थाच्या चौकटीत मुलीच्या संमतीला कुठेच जागा मिळाल्यासारखें दिसत नाही.

विवाहविषयक नवमतवाद्यांचीं मतें स्पष्ट आहेत. प्रीतिविवाह व सहवासोत्तर विवाह हे पहिल्या दर्जाचे होत. परंतु आजच्या समाजव्यवस्थेंत हे अपवादात्मकच समजल्या गेले पाहिजेंत व ह्मणून ते विचारांतहि घेणे योग्य नाही.

परंतु बालविवाहाची चाल समाजांतून अजिबात बंद व्हावयास पाहिजे व ह्यापुढील विवाह "प्रौढसंमतिविवाह" ह्याच तत्वावर व्हावेत असें आह्मा सर्व मंडळीचें मत आहे व त्याप्रमाणे प्रचारकार्य सुरुं आहे व आनंदाची व नवमतवाद्यांना समाधानाची

गोष्ट अशी कीं, ५ वर्षांपूर्वीचा काळ व आजची सामाजिक परिस्थिती ह्यांत महदंतर पडलें आहे व शारदा-कायद्यामुळेंहि बालविवाहाला बराचसा आळा बसला आहे. मुलामुलींना पहाण्याच्या पद्धति झपाट्यानें बदलत आहेत. "मला सुशिक्षित वधू पाहिजे व माझी वधू लग्नापूर्वी मलाहि ( इतर मंडळी प्रमाणे ) पाहूं द्या " अशा तन्हेची इच्छा मुलांनी कांही ठिकाणी प्रदर्शित केल्यामुळे, किंबहुना तसा हट्टच धरल्यामुळे, सवेच तरुण अविवाहित सुशिक्षित मुलांत हा अनायासेच मतप्रचार होऊन गेला व बहुतेक सर्वांच्याच तोंडीं ही भाषा आतां येऊं लागली आहे. दिसावयाला साधारण चालेल किंबहुना सुंदर नसली तरी चालेल पण मुलगी शिकलेली पाहिजे! ह्या मतप्रचारामुळें समाजांत मुलींच्या शिक्षणाला जोराची चालना मिळाली आहे. परिषदेत मुलींच्या शिक्षणाचा ठराव पास करून जें कार्य इतक्या झपाट्यानें होऊं शकलें नसतें तें कार्य विवाहाच्या दृष्टीनें समाजांतील सुशिक्षित मुलींच्या वाढत्या मागणीमुळे झालें आहे. पडद्याआड कां होईना पण मुलामुलींच्या संमतीचाहि प्रश्न हळूहळू सुटत असल्याचें प्रत्यहीं आमचे कानीं पडत आहे! ह्याचें सारें श्रेय विवाहाकडे पहाण्याच्या तरुण मंडळीच्या बदलेलल्या नव्या दृष्टीलाच आहे. स्त्रीशिक्षणावर वेळी-अवेळी टीका करणाऱ्या सनातन्यांच्या घरांतील मुली-बाळींची रांग शाळेत जाताना पाहून कुणाला समाधान वाटणार नाही ? ?

"तुह्मीं सांगता तसेंच आह्मी वागूं, किंबहुना दोन पावले पुढेही टाकूं, मात्र आह्मी तोंडानें तशी कबूली देणार नाही," पण आह्माला शिव्या देतदेतच आमच्या मताप्रमाणें वागूं असाच जर सनातन्यांचा प्रत्येक सामाजिक प्रश्नावर व बाबींत हेका असला तर आह्माला त्यांत कांहीच वाईट वाटत नाही. "खुशाल आह्माला शिव्या द्या पण आमच्या मताप्रमाणें वागा!" ह्यांतच नवमतवाद्यांचा आपल्या विजयाचें समाधान आहे. कारण आह्माला आमच्या वैयक्तिक मोठेपणापेक्षा किंवा निंदास्तुतीपेक्षा नवमतवादी मतप्रचारालाच जास्त महत्त्व आहे. किंबहुना तेंच आमचें ध्येय आहे.

साधारणतः विवाहविषयक आह्मी आमची मतें नवमतवाद ह्या लेखांतून स्पष्ट केली आहेतच. आमचे चिमूरचे माहेश्वरवर्गीय लेखक व तरुण मित्र श्री. तु. ना. काटकर ह्यांनीहि वीरशैवसमाजात प्रौढसंमतीविवाह रूढ करण्याच्या कल्पनेला व प्रचाराला आपल्या " नवमतवाद व सुवर्णमध्य " ह्या लेखांतून मान्यता दिली आहे. श्री.काटकर ह्यांचे वैवाहिक मतावर टीकात्मक लेख लिहिणारे हिंगणघाटचे श्री. बाबाप्पा एन्. चपळगें ह्यांनीहि खालीलप्रमाणें आपल्या विवाह व वैवाहिक जीवनांत खालीलप्रमाणे उद्गार काढले आहेत:- " व्यक्तींनी स्वतःच्या जबाबदारीवर प्रीतिविवाह वा सहवासोत्तर विवाह घडवून आणल्यास त्यास आमची बिलकूल हरकत नाही पण सर्वसाधारण समाजदृष्ट्या प्रौढसंमति विवाहच सुपरिणामी ठरतील. आमच्या तरुण तरुणीच्या रोजच्या व्यवहारांतील सरळ वागणूकीकडे जर आमचा समाज उदार बुद्धीनें पाहील तर तेवढेंच हल्ली पुष्कळ होईल." एकंदरित बालविवाह कुणालाच नको आहे. आमच्या प्रौढसंमतिविवाहाच्या कल्पनेलाच दोघांचाहि थोडा-फार पाठिंबा आहे.

आतां आपण पोटजातींतील " बेटीव्यवहाराच्या प्रश्नाकडे पाहूं ? "

पोटजातींतील रोटीव्यवहाराचे प्रश्नाला आह्मी सार्वजनिक किंवा सामुदायिक ह्मटलें आहे व बेटीव्यवहाराला वैयक्तिक ह्मटलें तें कां तें आपण पाहूं?

रोटीव्यवहाराचे वेळीं 'पंक्तीला' हजर असणारा सामाजिक घटक ह्या नात्यानें तो सामुदायिक प्रसंगाला हजर असतो व इतराचे बरोबर आपले सामाजिक बंधुत्वाचें नातें कायम ठेवून व एकीकरणाचें तत्वाला बाध येऊं देतां सर्वांच्याच करतां साधारणतः सर्वांचेच आवड-निवड लक्षांत घेऊन तयार केलेल्या पदार्थांच्या वाढपांतून आपल्या समोरील पात्रांवरील पदार्थांचा स्वतः-च्या आवडीनिवडीचे वैशिष्टय अखेर कायम ठेवून समाचार घेतो. ह्याचा अर्थ तो सामुदायिक प्रसंगांत आपले आवडीनिवडीचे वैशिष्ट्याला‌हि प्राधान्य देत नाही. पण त्या-बरोबरच आपली आवड-निवडहि सोडत नाही. साधारण जनसमुदायाच्या आवडी – निवडींत ज्याचे सामुदायिक किंवा सार्वजनिक स्वरूप ठरलेले ह्या अंदाजानें आपली आवड-निवड मिळवून घेतो व आपल्या आवडी-निवडीच्या पटतील तेवढेच पदार्थ तो खातो. स्वतःच्या घरीं मात्र तो आपल्या आवडी-निवडीप्रमाणें रोज जेवण करतो. घरचा स्वयंपाक किंवा जेवण व सामुदायिक प्रसंगांतील स्वयंपाक किंवा जेवण ह्यांत जो सूक्ष्म फरक सामुदायिक व व्यक्तिगत स्वरूपाचा आहे तोच फरक रोटी-व्यवहार व बेटीव्यवहार ह्यांत आहे, हें पूर्ण विचारांती कोणाहि सूज्ञ वाचकाच्या लक्षांत येईल.

वरील विधान साधारण वाचकाच्या दृष्टीनें क्लिष्ट होण्याचा संभव आहे. माझें ह्मणणें इतकेंच की, रोटीव्यवहाराच्या प्रश्नापेक्षां बेटीव्यवहाराचा प्रश्न भिन्न स्वरूपाचा आहे.

पोटजातींतील विवाहाला आमची संमति किंवा पाठिंबा जरूर आहे. बेटीव्यवहाराला नाहीं. विवाह व बेटीव्यवहार ह्यांतील तत्वतः भेद वरील स्पष्टीकरणावरून स्पष्टपणें लक्षांत येईल.

पोटजातीचें एकीकरण होणें आवश्यक आहे व त्याकरितां आपण प्रचारकार्य व आचार सुरु करतो ह्याचा अर्थ आपण सामाजिक प्रगती व सुधारणेला उत्तेजन देतो असा आहे. तेव्हां एकीकडे आपण अशा तऱ्हेनें प्रगतिपर धोरण स्वीकारावयाचें व दुसरीकडे बेटीव्यवहाराला संमति किंवा पाठिंबा द्यावयाचा हे दोन प्रकार परस्परविसंगत आहेत.

### बेटीव्यवहार ह्याचा अर्थ.

पालकांनी स्वतः पंक्तिपावन होण्याच्या स्वार्थी इच्छेनें कायद्यानें सज्ञान न झालेल्या आपल्या मुलाचें किंवा मुलीचें लग्न लावणें ह्याला आह्मी "बेटीव्यवहार" किंवा बालविवाह समजतो व अर्थातच ह्याला कुणाहि प्रगतिपर विचारी माणसाचा पाठिंबा मिळणें शक्य नाही.

पोटजातींतील कायद्यानें सज्ञान झालेल्या दोन वधुवरांच्या पूर्ण संमतीच्या विवाहाला जर केवळ पोटजातीचीच अडचण येत असली तर ती रोटीव्यवहारानें समाजानें दूर करावी – ती अडचण त्यांना भासूं देऊं नये, हेंच एकीकरणांतील रोटीव्यवहाराच्या आचारधर्माचें उद्दिष्ट आहे. पोटजाती मोडण्याकरितां वाटेल त्या पोटजातींतील वाटेल तशा मुलींशीं लग्नें लावत सुटणें हा उद्देश खास नाहीं. कारण "विवाह हा दोन व्यक्तींचा खाजगी प्रश्न आहे, तो त्यांनीं आपली वैयक्तिक व सामाजिक जबाबदारी ओळखून सोडवून घ्यावयास पाहिजे, व वडिलधाऱ्या मंडळींनी हें कार्य सुकर व्हावें ह्मणून आवश्यक तेथें सल्ला व मदत केली पाहिजे" हें आमचें स्पष्ट मत आहे. केवळ सुधारणा करण्याच्या उद्देशानें आपल्याला नापसंत असलेल्या मुलीशीं किंवा मुलाशी लग्न लावावयास तयार होणें ह्यासारखा दुसरा मूर्खपणा कोणताहि नाही. हा सुधारणेचा खून आहे.

आम्ही पोटजातींतील विवाह हे कायद्याने सज्ञान झालेल्या वधुवरांचे शक्य तों सहवासोत्तर किमानपक्षीं प्रौढसंमतिविवाहाचे तत्वावरच झाले पाहिजेत असें ह्मणतों. ह्याची कारणें पुढील आहेत.

(१) कायद्यानें सज्ञान झालेल्या ह्या पोट-जातींतील वधुवरांचे विवाहाची व त्या योगानें होणाऱ्या भल्या-बुऱ्या सामाजिक परिणामांची जबाबदारी त्यांचेवरच असते. अशा प्रौढ वधुवरांचे इच्छेवर पालकांचे अनिष्ट दडपण येण्याची भीति कमी असते.

( २ ) पालकांनी स्वतःचा सुधारणावाद ह्मणून जर आपल्या कायद्यानें अज्ञान मुला-मुलींचीं लग्नें लावून दिलीं, व पुढे ती सज्ञान झाल्यावर पालकांचे हें करणें त्यांना बरे वाटलें नाही तर त्यांना पश्चात्ताप होईल. दुसरे, जर समाजाची तितकी तयारी नसली व ह्या जोडप्यांवर सामाजिक बहिष्कार पडला तर त्या बहिष्काराच्या परिणामाची आंच पालकांच्या सुधारणावादामुळे जर ह्या जोड-प्याला जाणवूं लागली तर त्यांना आपले विवाह आपल्याच जातींत झाले असते तर हा निष्कारण सामाजिक त्रास स॒हन करावा लागला नसता असेहि पश्चात्तापाचे विचार त्या तरुण जोडप्यांचे मनांत येणे संभवनीय आहे, व जर ह्या सामाजिक बहिष्काराला किंवा मुला । नेटाने तोंड देण्याचें नैतिक धैर्य ह्या जोडप्यांत कमी पडलें तर त्यांना घटस्फोट किंवा फार-कतीखेरीज इलाज राहणार नाही. हें स्पष्ट लिहिण्याचें कारण अशीं एक दोन १-२ उदा-हरणें आमचेसमोर आहेत. त्यांत पुरुषापेक्षा बिचाऱ्या स्त्रीवर्गाचेंच विशेष नुकसान होतें. तेव्हा अशा तऱ्हेचें प्रसंग टळावेत ह्मणून काय-द्यानें सज्ञान झालेल्या वधुवरांचाच विवाह होणें आवश्यक आहे.

( ३ ) अज्ञान मुलामुलींना त्यांचा पोटजा-तींत स्वतःच्या कांही स्वार्थी हेतूला बळी पडून जर विवाह ( बेटीव्यवहार ) लावून देऊं लागले तर तें केव्हाहि अयोग्यच. कारण ह्या 'पोटजातींतील विवाह' घडवून आणण्यांत विवाहानंतर जें 'सामाजिक बऱ्यावाईट परि-स्थितीचें वादळ' उत्पन्न होतें त्यांत त्या अज्ञानी अर्भकांना ढकलून देण्याचा पालकांना तरी काय अधिकार आहे ?

ही व इतरहि वरींचशीं कारणें देतां येतील. सांगावयाचा मुद्दा एवढाच कीं 'पोटजातींतील विवाहा'-मुळे पश्चात्तापाचें प्रसंग त्या वधुवरां-वर येऊं नयेत ह्मणून व ऱ्या प्रागतिकतेचें लक्षण ह्मणून पोटजातींतील विवाह हे असे तों सहवासोत्तर, निदान किमानपक्षीं कायद्यानें सज्ञान झालेल्या प्रौढ वधुवरांच्या पूर्ण संमतीनेच व्हावयास पाहिजेत.

आमचा पोटजातींतील बेटीव्यवहारास जो विरोध आहे व होता हें आता सर्वांच्या लक्षांत आलें असेलच. आमचा कायद्याने सज्ञान झालेल्या पोटजातींतील वधुवरांचे विवाहास पूर्ण पाठिंबा आहे. उलट, वरील तत्वाप्रमाणे न घडणारे पोटजातींतील विवाह हे "बेटी-व्यवहार किंवा बालविवाह" ह्या सदरांत येत असल्यामुळे आमचाच काय पण कुणाहि सुज्ञ नवमतवाद्याचा त्यांना विरोधच राहील.

# कारंजा-परिषदेचें साग्र वृत्त

( आमच्या खास प्रतिनिधीकडून )

'वीरशैव संजीवनी' व इतर वृत्तपत्रांतून पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें मध्यप्रांत-वऱ्हाड-प्रांतिक वीरशैव परिषद् गेल्या महिन्याच्या ८ व ९ तारखांस कारंजा (लाड) जि० आकोला येथें घुळे येथील श्रीमंत सिद्धाप्पा नरसाप्पा ऊर्फ अण्णासाहेब मोगलाईकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या उत्साहानें व यशस्वी रीतीनें पार पडली. परिषद भरण्यापूर्वीच एकीकरणाच्या ठरावावर पत्रकें व हस्तपत्रिका व सभांतून जें रण माजलें होतें त्यावरून परिषदेला बराच रंग चढणार असा अंदाज व्यक्त करण्यांत येत होता व तो अखेरीस खराच ठरला, आणि परिषदेचें महत्वहि वाढलें.

## अध्यक्षांचें आगमन

शुक्रवार ता० ७ मे पासूनच कारंजा येथे मध्यप्रांत, वऱ्हाड, खानदेश व महाराष्ट्रांतील वीरशैव-प्रतिनिधी व पाहुणे येऊं लागलें होते. स्वागतमंडळानें त्यांची उतरण्याची व्यवस्था म्युनिसिपल प्राथमिक शाळा नं. २ व श्री. अण्णासाहेब ... ह्यांच्या सराईत उत्तम तऱ्हेची ठेवली होती. शनिवार ता. ७ मे रोजी सकाळी ७॥ च्या गाडीनें परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा हे आपल्या ... श्री. बाबूराव बाळाप्पा कॉन्ट्रॅक्टर, श्री. बोपशेट्टी चीफ ऑफिसर धुळे, शाहीर मुचाटे, श्री. ... शिवलिंगाप्पा झाडबुके, श्री. लगडे वगैरे मंडळी धुळ्याहून आली होती. ते परिवारासह कारंजा स्टेशनवर येऊन पोचले. स्टेशनवर त्यांना स्वागतमंडळातर्फे हारतुरे अर्पण करण्यांत येऊन त्यांचें स्वागत करण्यांत आलें. श्री. मुळजी जेठा ह्यांच्या बंगल्यांत अध्यक्ष व श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारवा ह्यांची उतरण्याची खास सोय करण्यांत आली होती. स्टेशनपासून निवासस्थानापर्यंत अध्यक्षांची मिरवणूक काढण्यांत आली होती.

## उपस्थित प्रतिनिधी व निमंत्रीत

परिषदेला दुपारी ४ वा. पद्माकर नाटकगृहांत सुरवात झाली. प्रतिनिधी, निमंत्रित पाहुणे, प्रेक्षक व भगिनी ह्यांनी पद्माकर-नाटकगृह चिकार भरलें होतें. व्यासपीठावर स्वागताध्यक्ष व श्रीमंत द. कृ. ऊर्फ बाबासाहेब देशमुख जहागीरदार पारवा, श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर, श्री. गु. परांडकर स्वामी, श्रीमंत रामभाऊशेट कुल्ली रोहिणखेडकर, श्री. बोपशेट्टी चीफ ऑफिसर, श्री. बाबुराव बाळाप्पा घुळे, श्री. विश्वनाथ आप्पा पांगरे कारंजा, श्री. नानासाहेब जतकर तहसिलदार पुसद, श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, दे. भ नानासाहेब बामणगांवकर, श्रीमंत सोमाप्पा मेंडसे व श्री. मल्लाप्पा कुऱ्हे अमरावती वगैरे मंडळी प्रामुख्यानें दिसत होते. बाहेरगांवहून आलेल्या निमंत्रित पाहुण्यांत श्री. गु. परांडकर स्वामी, संपादक "वीरशैव गर्जना", बार्शी, श्री. कल्याणशेट्टी वकील, संपादक "सुदर्शन",

सोलापूर, श्रीमान संग्राम आप्पा घोटकार, हाय-कोर्ट वकील उदगीर, वगैरे हे प्रमुख होते. ह्याखेरीज श्रीमंत बाबूआप्पा कोकर्डेकर, श्री. विश्वनाथ आप्पा कुल्ली, श्री सदाशिव आप्पा भंगीरे मलकापूर, श्री. वैजिनाथ आप्पा बोंद्रे चिखली, श्रीमंत वरसिंगराव देशमुख जहागीरदार पापळ, श्री. अण्णासाहेब हुंडेकर अमरावती, श्री. बापुसाहेब हिंगमिरे हिंगणघाट, श्री. बारजिभे बी. ए. यावल, श्री. हेगु वकील, श्री. महादेव आप्पा एकलारे, श्री. बाबुराव चोधरी, श्री. बाबुराव गाढवे मोर्शी, दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूर, श्री. गजाननराव कापसे खापा, श्री. सिद्धराम स्वामी माजलगांवकर, वाढोणेकर श्री. शिवशंकर स्वामी, श्री. शिवाय नमः कारंजा, श्री. काशिनाथआप्पा कारंजेकर वगैरे, श्री. रामचंद्रबाबु व गणपतराव काळे व इतरहि प्रमुख मंडळी व शेकडो प्रतिनिधी प्रमुखत्वानें दिसत होती. भगिनीवर्गांत सर्व स्थानिक प्रतिष्ठित भगिनीवर्ग हजर होता व अमरावतीहून श्रीमति त्रिवेणीबाई कापसे व सौ. शांताबाई शेतेकर ह्याहि आल्या होत्या. प्रतिनिधी, प्रेक्षक, निमंत्रित, व भगिनी मिळून एकंदर सुमारें हजार–दीडहजार समाज परिषदेकरितां हजर होता.

## परिषदेला सुरुवात

'वंदे मातरम्' राष्ट्रगीतानें परिषदेच्या कामकाजाला उत्साहजनक वातावरणांत सुरुवात झाली. राष्ट्रगीत सुरुं असतांना अध्यक्षांसह श्रीस्वामी परांडकर वगैरे सर्व मंडळी उभी होती. राष्ट्रगीतानंतर स्वागताध्यक्ष श्रीमंत भाऊराव देवाप्पा विभूतें कारंजा ह्यांचें स्वागतपर भाषण झालें. (तें गतांकी दिलेंच आहे.) श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर ह्यांनी परिषदेचें अध्यक्षस्थान मंडित करावें अशी स्वागतमंडळातर्फे त्यांनी सूचना आणली. तिला स्वागतमंडळाचे सरचिटणीस श्री सदाशिवआप्पा बोवते ह्यांनी अनुमोदन दिलें. 'वीरशैव गर्जना'-कार स्वामी परांडकर ह्यांनी सामान्यतः बार्शीतर्फे या सूचनेला अनुमोदन दिलें. उमरावती जिल्ह्यातर्फे श्री. नानासाहेब बामणगांवकर, यवतमाळ जिल्ह्यातर्फे श्री. आप्पासाहेब एकलारे, नागपूर व मध्यप्रांत विभागातर्फे श्री. वामनराव डांगरे, बुलठाणा जिल्ह्यातर्फे श्रीमंत रामचंद्रशेठ कुल्ली ह्यांनी अध्यक्षाच्या सूचनेंला दुजोरा दिला, व त्यानंतर अध्यक्ष रीतसर स्थानापन्न झाले. स्वागताध्यक्षांनी अध्यक्षांच्या गळयांत टाळयांच्या गजरांत पुष्पहार घालून त्यांचा सन्मान केला. श्री० बामणगांवकर ह्यांनी वऱ्हाड-मध्यप्रांत वीरशैव शिक्षण प्र. मंडळातर्फे व श्रीमंत बाबासाहेब देशमुख जहागिरदार ह्यांनी महाराष्ट्र वी. हि. संवर्धक मंडळातर्फे अध्यक्षांना हार घातला. त्याचप्रमाणे 'वीरशैव गर्जना'कार स्वामी परांडकर व वीरशैव हितसंवर्धक मंडळाचे अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब पारवेकर व 'सुदर्शन'-चे संपादक श्री. कल्याणशेट्टी ·ह्यांनाहि हार घालण्यांत आले.

## परिषदेला आलेले संदेश

स्वागतमंडळाचे सरचिटणीस श्री. सदाशिवआप्पा बोनते ह्यांनी यानंतर परिषदेला आलेल्या संदेशापैकी निवडक संदेश वाचून दाखविले. परिषदेला प्रामुख्यानें पुढील लोकांचे संदेश आलें होते. ना बाबासाहेब खापर्डे, रेव्हेन्यु मिनिस्टर, ना. बियाणी, मि. छोटे वकील मोमिनाबाद, श्रीमंत बाबासाहेब वारद सोलापूर, बॅ. सरदार, सो. पंचशासरदार, श्री. कटप श्री. मुंजे व घुम्मा वकील सोलापूर वगैरे.

## अध्यक्षांचें भाषण

संदेशवाचनानंतर श्री. रोहिणखेडकर ह्यांनी एक छोटेसें पद ह्मणून दाखविलें व त्यानंतर अध्यक्षांचें भाषण झालें. ( तें असेंच्या असें गतांकी दिलें आहे. ) अध्यक्षांच्या भाषणानंतर श्री. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी विषयनियामक मंडळा० संबंधी खुलासा केला. सर्व अधिकृत प्रतिनिधींना व स्वागतमंडळाच्या सभासदांना विषयनियामक कमिटींत बसतां येईल ; याशिवाय अध्यक्षाबरोबरचे निमंत्रित पाहुणे ह्यांनाहि बसतां येईल. विषयनियामक मंडळाची अशी ही विस्तृत व व्यापक योजना केलेली आहे असें त्यांनी सांगितलें, व त्यानंतर सायंकाळी ५॥ वा. च्या सुमारास परिषदेचें पहिल्या दिवसाचें कामकाज संपलें.

## विषयनियामक मंडळाची बैठक

विषयनियामक मंडळाच्या बैठकीला भोजनोत्तर रात्रौ ९ वा. सराईमध्ये सुरुवात झाली. परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत सिद्धाप्पा अण्णा हे अध्यक्षस्थानीं होते. श्री.नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी प्रास्ताविक भाषण करून दुसऱ्या दिवशी खुल्या अधिवेशनांत जे ठराव चर्चेला यावयाचे त्यांची सभासदांना माहिती करून दिली. विषयनियामक मंडळांत एकीकरणाच्या ठरावावर बरीच कडाक्याची चर्चा झाली. बऱ्याच प्रतिनिधींनी चर्चेत भाग घेतला. कोणत्याहि ठरावावर मतें न घेता खुल्या अधिवेशनांतच ठराव मताला टाकण्यांत यावेत असें ठरलें. त्यामुळे विषयनियामक मंडळाची बैठक अपेक्षेपेक्षा लवकर रात्रौ १२ वाजताच्या सुमाराला संपली.

## परिषदेचा दुसरा दिवस

परिषदेच्या खुल्या अधिवेशनाला रविवार ता. १ मे रोजी पद्माकर-नाटकगृहांत सकाळीं ८ वा. श्री. सिद्धाप्पा मोगलाईकर यांच्या अध्यक्षतेखाली उत्साहजनक वातावरणांत सुरुवात झाली. सकाळच्या अधिवेशनांत एकंदर ७ ठराव मंजूर झाले. (हे सर्व ठराव शब्दशः गतांकीं दिले आहेत.) पहिला ठराव दुखवटयाचा होता. तो अध्यक्षाकडून मांडण्यांत आला व सर्वांनी उभे राहून मंजूर केला. दुसरा ठराव शाळाखात्यांत लिंगायतांचा एक खाना असावा अशी मध्यप्रांत-वऱ्हाड-शिक्षणखात्याचें डायरेक्टरला विनंती करणारा होता. तो श्री. नारायण वैजनाथ शेरे ह्यांनी मांडला व त्याला श्री. तुकाराम आप्पा कापसे ह्यांनी पाठिंबा दिल्यावर टाळ्यांच्या गजरांत मंजूर झाला. स्त्रीपुरुषांना समान धार्मिक हक्क असावे या आशयाचा तिसरा ठराव श्री. रामचंद्रआप्पा काळे ह्यांनी आणला. त्याला श्री. जगन्नाथआप्पा होवराव व सदाशिवआप्पा ह्यांनी पाठिंबा दिला. वरील तिन्ही ठराव चर्चेशिवाय मंजूर करण्यांत आले.

## मठसंस्थानासंबंधीचा ठराव

मठसंस्थानसंबंधीच्या चवथ्या ठरावानंतर श्री. जी. जी. कापसे ह्यांनी मांडला. हा ठराव कोणाचे हक्क हिरावून घेण्यासाठी मांडण्यांत येत नाही असा प्रारंभीच श्री. कापसे ह्यांनी खुलासा केला. श्री. वीरणाप्पा मारोतीआप्पा ह्यांनी ठरावाला दुजोरा दिला. ' गुरुवर्यांचें खाजगी वागणुकीमुळे ज्या संस्था कर्जरूपाने दुसऱ्याच्या ताब्यांत गेल्या त्या परत मिळण्याची या ठरावान्वयें स्थापन होणाऱ्या पंचकमिटीनें खटपट करावी ' अशा आशयाची उपसूचना श्री. रामभाऊ डांगरे ह्यांनी आणली. हा ठराव वादग्रस्त असल्यामुळे त्यावर बरीच चर्चा झाली. पंढरपूरचे कल्लप्पा स्वामी ह्यांनी मूळ रावाला विरोध केला, व मठसंस्था जीवशीवऐक्याकरितां अनादिकालापासून चालत आली आहे, भक्तवर्गाची अवास्थाच मठसंस्थेची अवहेलना

होण्याला कारण आहे, पंचांचे ताब्यांत मठ-संस्था गेल्यास तिचा कारभार सुरळीत चालेल कीं नाही याचाहि विचार करा, हा धार्मिक प्रश्न असून त्यासबंधीचे अधिकार जगद्गुरूला आहेत असें प्रतिपादन करून व हा ठराव घातक आहे असें सांगून ठरावाला त्यांनी विरोध केला. शाहीर मुचाटे ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना श्री. कलय्यास्वामी ह्यांनीं केलेली विधानें खोडून काढलीं व जंगमापेक्षा भक्तवर्गच समाजोन्नतीकरितां जास्त प्रमाणांत झटत आहे असें सांगितलें. स्वामी परांडकर हे ठरावाला विरोध करतांना ह्मणाले, "मठसंस्थांच्या हातून धार्मिक कार्य होत नाही हें ह्मणणें साफ खोटें आहे. या संस्थांतून पाठशाळामार्फत शैक्षणिक कार्य होत आहे. केवळ स्वामीकरितां कांही इनाम व जहागिरी सरकारनें दिल्या. त्या पंचांच्या ताब्यांत मिळणार नाहीत, व ह्मणून हा ठराव मंजूर करून तुह्मी समाजाचें अनहित कराल. बटूचे स्वाधीन कांहीच अधिकार राहणार नसल्यामुळे तो बटू होण्याला विरोध करील." नागपूरचे श्री. वामनराव डांगरे ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना परिणामकारक भाषण केलें, व ठरावाला विरोध करणारे लोक वस्तुस्थितीचा विपर्यास करीत आहेत असें सांगितलें. उपसूचना प्रथम मताला टाकण्यांत आली. ती मंजूर झाली. त्यानंतर उपसूचनेसह हा ठराव मताला टाकण्यांत आला. तो टाळ्यांच्या गजरांत मंजूर झाला.

## स्वामी माजलगांवकरांचें अभिनंदन

स्वामी माजलगांवकर जर्मनींत जाऊन आल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणारा पाचवा ठराव उमरावतीचे श्री. हेगु वकील ह्यांनी आणला. श्री. महादेव आप्पा एकलारे ह्यांनी ठरावाला पुढील आशयाची उपसूचना आणली:— स्वामीचे प्रायश्चित्तासंबंधी जो वाद उत्पन्न झाला तो नाहीसा व्हावा; त्यांना कोणत्याहि तऱ्हेनें प्रायश्चित्त घेण्याचा प्रसंग आणू नये, व जर्मनीत जाण्यापूर्वी त्यांचा जो मान होता तो कायम रहावा." ही उपसूचना ठरावाचा भाग होऊ शकत नाहीं या मुद्यावर अध्यक्षांनी नियमबाह्य ठरविली व मूळ ठराव टाळ्यांच्या गजरांत सर्वानुमतें मंजूर झाला.

## वीरशैव हितसंवर्धक मंडळाला पाठिंबा

वीरशैव हितसंवर्धक मंडळाला पाठिंबा देणारा ठराव मंडळाचे एक सेक्रेटरी श्री. राजाभाऊ डांगरे नागपूर ह्यांनी मांडला व मंडळावर जे विनाकारण आरोप करण्यांत आले आहेत त्याचा अधिकृत खुलासा केला. ठरावाच्या दुसऱ्या भागाचें त्यांनी विशेष स्पष्टीकरण केलें, व मंडळावर करण्यांत आलेले आरोप ही गैरसमजावर उभारलेली वाळूची भिंत आहे असें सांगितलें. दारव्हयाचे श्री. शाम शंभु पुराणिक ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना तळेगांव-परिषदेच्या स्वागतमंडळाचा सेक्रेटरी या नात्याने या ठरावांतील दुसऱ्या भागासंबंधी अधिकृत खुलासा केला. ठरावाच्या दुसऱ्या भागाला श्री. कलय्या स्वामी ह्यांनी विरोध केला व मंडळावर आरोप करणाराचा निषेध न करता आपुलकीची भावना निर्माण करा असें सांगितलें. श्री. डांगरे ह्यांनी स्वामी कलय्या ह्यांच्या विधानांना उत्तर देतांना अशी पृच्छा केली की मंडळाचा निषेध करणारांनी आपला निषेध मागे घेतला आहे काय ? तळेगांव-परिषदेशीं मंडळाचा संबंध नव्हता हें सेक्रेटरी या नात्यानें त्यांनी जाहीर केलें, व निषेधाचा ठराव मागे घेण्याची सूचना विरोधकांना मान्य आहे काय अशी विचारणा केली. ज्या सभेंत मंडळाचा निषेधपर ठराव झाला होता त्या सभेचे श्री. अमदापुरे ह्यांनी असें सांगितलें की, सभेच्या नियमानुसार सूचकाला ठरावांत फेरबदल करण्याचा अधिकार असतो, मंडळाच्या निषे-

...चा ठराव परत घ्यावयाला तयारी दर्शविली नाही. ठरावाचा दुसरा भाग प्रथम मताला टाकण्यांत आला. तो १-२ मतें विरुद्ध पडून प्रचंड बहुमतानें मंजूर झाला. यानंतर दुसऱ्या भागासह मूळ ठराव मताला टाकला असतांना तो सर्वानुमतें मंजूर झाला.

## विद्यार्थ्यांचे बोधप्रद संवाद

यानंतर वीरशैव विद्यार्थ्यांचे बोधप्रद संवाद झाले. रोहिणखेड येथील पुढील ४ विद्यार्थ्यांनी या संवादांत भाग घेतला होता — विश्वनाथ ओंकार साखळेकर, शिवलिंग गंगाधर अय्या, मोतीराम ओंकार कोठाळे, त्र्यंबक लक्ष्मण कुल्ली, रोहिणखेडचे श्री. विश्वनाथआप्पा कुल्ली, यांनी हे संवाद रचले होते. त्यांना शाहीर पुराटे ह्यांच्यातर्फे एक रौप्यपदक देण्यात यावयाचें जाहीर करण्यात आलें. डॉ. संगेकर, पांढुरं बाजार, व श्री. सोमाप्पा पांगरे यांनी संवाद ह्मणणाऱ्या मुलांना खाऊ ह्मणून प्रत्येकी एक-एक रुपया दिला. संवादाचा कार्यक्रम सकाळी ९॥ पासून पंधरा मिनिटें सुरू होता. तो उपस्थित असणाऱ्यांना फारच आवडला.

## परजातीय व धर्मीयांचा वीरशैवधर्मांत प्रवेश

ठराव नं. ७ श्री. बाबासाहेब बामणगांवकर यांनी मांडला. 'पश्चात्तापेन शुद्ध्यते' अशी सुरुवात करणारा हा ठराव होता. त्याला श्री. रामचंद्र पुराणिक ह्यांनी पाठिंबा दिला. 'इतर जातींतील वा धर्मांतील लोकांनी वीरशैव-धर्मांत येण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास धर्मगुरूंनी व समाजानें विचार करावा' अशी महत्वाची उपसूचना या ठरावावर मोर्शीचे श्री. एस्. टी. बारसकर ह्यांनी आणली. तिला श्री. कापसे ह्यांनी अनुमोदन दिलें. 'मूळ्या ठरावाशीं उपसूचना तत्वतः विरुद्ध आहे. ह्मणून ती मला मंजूर नाही. उपसूचना आणणारांनी फार तर वेगळा ठराव आणावा' असें श्री. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी सांगितलें. श्री. राजाभाऊ डांगरे ह्यांनी उपसूचना आपल्या ठरावाविरुद्ध नाही, आपल्या ठरावाला ती पोषक आहे, असें सांगितलें. श्री. बामणगांवकर ह्यांनी एकंदर चर्चेला उत्तर देतांना जें जोरदार भाषण केलें त्यांत उपसूचनेला विरोध करून त्यांनी आपल्या मूळ ठरावाचें समर्थन केलें. 'समाजाची आहे ही स्थिति जोपर्यंत सुधारतां येत नाही तोपर्यंत दुसऱ्यांना धर्मांत घेऊन वाढ करतो ह्मणणें — दुसऱ्यांना पचवून घेतों ह्मणणें ह्मणजे थापा मारणें होय. ह्मणून ही उपसूचना पोरांची आहे' असें श्री. बामणगांव-कर ह्यांनी सांगितलें. ठरावांतील 'धर्म व रूढी' हे शब्द वगळण्यांत यावेत अशी दुसरी उपसू-चना श्री. एकलारे ह्यांनी आणली. ती नियमबाह्य ठरविण्यात आली. श्री. बोरसकर ह्यांनी आणलेली पहिली उपसूचना ग्राह्य आहे कीं नाही यावर मतें घेण्यांत आलीं. ती ग्राह्य आहे असें बहुमतानें ठरलें, व यानंतर उपसूचनेवर रीतसर चर्चा सुरू झाली.

## नवमतवाद्यांचा पहिला विजय

उपसूचनेला दुजोरा श्री. राजाभाऊ डांगरे ह्यांनी दिला व उपसूचनेंतील शब्दांचें स्पष्टी-करण केलें. संख्याबल ह्मणून कांही बल आहे. धर्माच्या प्रसाराला आळा घालू नका असें त्यांनीं प्रतिपादन केलें स्वामी पराडकर ह्यांनी उपसूचनेला विरोध केला. ही उपसूचना धर्माला बाधक आहे. आजच्या जातिभेदांत तीमुळे भर पडेल, अशा उपसूचनेनें समाजाची संघटना न होतां विघटना होईल, या मुद्यावर त्यांनी भर दिला. श्री. संग्रामाप्पा शेटकर वकील उदगीर ह्यांनी हिंदीत भाषण करून ठरावाला पाठिंबा दिला. दुसऱ्या जातींना पचविण्याची शक्ति जर आपण ठेवली नाही तर थोडपोच

दिवसांत आह्मी नामशेष होऊं असें त्यांनी सांगितलें. या उपसूचनेनें समाजाची शकलें होतील या मुद्यावर विरोध केला. श्री. कल्याणशेट्टी, संपादक 'सुदर्शन' ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना 'वीरशैव हा जर धर्म असेल तर कोणालाहि या धर्मात घेण्याचा हक्क आहे' असें प्रतिपादन केलें. मूळ ठरावाचा सूचक ह्मणून एकंदर वादविवादाला श्री. बामणगांवकर ह्यांनी उत्तर दिलें. त्यांत ते ह्मणाले, "उपसूचनेला धरून कोणींहि भाषणें केलीं नाहीत. धर्माचें तात्विक स्वरूप केव्हाहि कोणास उघडें असतें. हा मार्ग समाजानें बंद केला नाही. वीरशैव धर्म उदार आहे ही गोष्ट मलाहि मंजूर आहे. या धर्मात दुसऱ्याला मनाई आहे असें नाही. ह्मणून ही उपसूचना आणून त्याला पाठिंबा देण्यांत अर्थ नाही. श्री. बारसकर ह्यांची उपसूचना मताला टाकण्यांत आली. ती १९४ वि. ५१ अशा प्रचंड बहुमतानें मंजूर झाली. नवमतवाद्यांचा हा पहिला दणदणीत विजय होय. उपसूचनेसह मूळ ठराव मताला टाकला असतां एक (कलय्या स्वामी पंढरपूरकर) विरुद्ध प्रचंड बहुमतानें टाळ्यांच्या गजरांत मंजूर झाला व सकाळचें अधिवेशन संपलें.

## दुपारचें अधिवेशन

रविवारी दु.३॥ वा. परिषदेच्या कामकाजाला सुरवात झाली. दुपारच्या अधिवेशनांत वीरशैव संस्कृति दीक्षाविधिसंस्कार व एकीकरणविषयक तीन ठराव मंजूर झाले. [ गतांकीं चद्दश: प्रसिद्ध करण्यांत आलेले ठराव नंबर ८, ९ व १० ] वीरशैव-संस्कारासंबंधीचा आठवा ठराव उदगीरचे वकील श्री. संग्रामआप्पा शेटकर ह्यांनी मांडला. 'आमची संस्कृति द्रवीडांच्या संस्कृतीपासून कशी निर्माण झाली हें सांगुन त्यांनी समजावून सांगितलें. वीरशैवांत चातुर्वर्ण्य नव्हते, हे असे घडले हें त्यांनी सांगितलें. श्री. रोडाप्पा वाकतकर ह्यांनी या ठरावाला अनुमोदन दिलें. श्री. दादाशास्त्री व पंढरपूरचे कल्लय्या स्वामी ह्यांनी ठरावाला विरोध करणारीं भाषणें केलीं. श्री. कल्याण शेट्टी संपादक 'सुदर्शन' ह्यांनी मुद्देसूद भाषण करून पाठिंबा दिला. ठराव मताला टाकला असतां बहुमतानें मंजूर झाला.

## एकीकरणाचा महत्वाचा ठराव

नववा ठराव दीक्षाविधिसंस्काराचा होता. तो श्री. नानासाहेब बामणगांवकर ह्यांनी मांडला. त्याला श्री. पुराणिक ह्यांनी अनुमोदन दिलें. श्री. एस. टी. बोरसकर ह्यांनी नवमतवादाच्या आधारें या ठरावाला विरोध करणारें भाषण केलें. ठराव मताला टाकला असता १ (बोरसकर) विरुद्ध प्रचंड बहुमतानें मंजूर झाला. यानंतर पोटजातींतील एकीकरणांच्या घोषणेंला पाठिंबा देणारा महत्वाचा चर्चात्मक ठराव नवमतवाद्याचें पुढारी नागपूरचे दे. भ राजाभाऊ डांगरे ह्यांनी टाळ्यांच्या गजरांत मांडला. उमरावतीचे श्री. हेगु वकील ह्यांनी शिस्तीचा प्रश्न (Point of Order) उपस्थित करून 'ता. १ मे पूर्वी हा ठराव स्वागतमंडळाकडे आलेला नाही ह्मणून तो चर्चेला घेऊं नये', असें अध्यक्षाना सुचविलें; स्वागतमंडळाचे सरचिटणीस श्री. सदाशिवआप्पा बोनते ह्यांनी 'हा ठराव याच विषयावर आलेल्या इतर ठरावाचें एकीकरण करून त्यांच्या सूचकांच्या संमतीनें तयार केला आहे' असा अधिकृत खुलासा केला, व विषयनियामकमंडळांतहि हा शिस्तीचा प्रश्न आला होता असें सांगितलें. त्यावर श्री. हेगु वकील ह्यांनी 'अध्यक्षांनी निर्णय (ruling) द्यावा, तो आह्माला मान्य आहे' असें आश्वासन दिलें. अध्यक्षांनी आपल्या निर्णयांत श्री. डांगरे ह्यांना ठराव मांडावयाला सांगितलें. त्याबरोबर विरोधीपक्ष परिषदेंतून बहिर्गमन करूं लागला.

### विरोधी पक्षाचें बहिर्गमन

'अध्यक्षांचा निर्णय आह्मी मान्य करूं असें विरोधी पक्षाचे एक ह्मोरके श्री. हेगु वकील ह्यांनी सांगितलें असतांहि अध्यक्षां-च्या निर्णयाविरुद्ध ( ठरावाविरुद्ध नव्हे ) विरोधी पक्षाचे इतर ह्मोरके परिषदेंतून बहिर्गमन करण्याला आपल्या अनुयायांना सांगू लागले, व त्यांत आपण पूर्वी काय आश्वासन दिलें याचा विचार न करतां श्री. हेगु हेहि सामील झाले. विरोधी पक्षानें बहिर्गमन करावयाचें तेंहि शांतपणें न करतां 'चला-उठा' असा गोरडा केला- त्यामुळे ५ मिनीटें परि-षदेंत अशांतता होती. परिषदेच्या शिस्तीच्या नियमाविरुद्ध होत असलेल्या या अशांततेच्या बहिर्गमनाबद्दल सर्वांनाच आश्चर्य वाटलें. 'ज्यांना बाहेर जावयाचें असेल त्यांनी शांतपणें बाहेर जावें' असें जाहीर करण्यांत आलें. सुमारे ४०-५० लोक बाहेर निघून गेलें. त्यानंतर ठरावावर चर्चा सुरू झाली.

### श्री० डांगरे ह्यांचें जोरदार भाषण

आपला ठराव मांडताना श्री. पत्राभाऊ डांगरे ह्यांनी जें भाषण केलें त्यांत त्यांनी सुरुवातीला विरोधी पक्षाच्या बहिर्गमनाचा उल्लेख केला. ते ह्मणाले, "प्रतिपक्षाजवळील डाव संपले ह्मणून ××× हर लावून ते पळाले. या लोकांनी हें सर्व आधीपासूनच ठरविलें होतें कोणताहि समंजम मनुष्य असें कार्य करणार नाही. या लोकां-कडून असें अश्लाघ्य वर्तन होईल अशी अपेक्षा नव्हती: हा ठराव नामंजूर झाला तरी खेळाडू वृत्तीनें तो पराजय सहन करण्याला मी तयार आहें. माझा हेतु विरोधी पक्षाचें ह्मणणें ऐकून घ्यावयाचा होता. पण आपली लायकी-ची परिषद् चालवावयाची नाही हें पाहून त्यांच्या अल्पज्ञानाची मला कींव येते. त्याब-द्दल परमेश्वर त्यांना माफी करावी. (हंशा)

श्री. वामणयांवकर ह्यांच्या ठरावावर श्री. वारसकर ह्यांनी जी उपसूचना आणली ती-मुळे व श्री. शेटकर वकील ह्यांच्या ठरावामुळे माझ्या ठरावाच्या १०० मैल पुढें समाज गेला आहे. धारवाड, रायचूर, खामगाव-महा-सभांचा मीं ठरावांत उल्लेख केला आहे. परंतु त्यांत चूक असल्यास ती दुरुस्त करण्यांची कबूली ( Subject to Correction ) देऊन मीं हा उल्लेख केला आहे."

आपला ठराव समग्र वाचून दाखवून श्री. डांगरे पुढे ह्मणाले, "हा ठराव शिफार-सवजा आहे. हा ठराव आणण्यांत माझा कोण-ताहि वाईट हेतु नाही. समाजऐक्या-साठीं हा ठराव मीं आणला आहे. समाजाची स्थिति आज वाईट झाली आहे. धर्माचा डोलारा केव्हा कोलमडून पडेल हें कळत नाही अशी आज स्थिति. सोयीकरिता घरात जर आपण पाहिजे तसा बदल करतो तर धर्म हा तर केव्हाहि परिवर्तनशीलच आहे. तेव्हा त्यांत परिस्थित्यनुरूप सुधारणा केलीच पाहिजे. ह्मणून या ठरावांत शिफारस केलेली सुधारणा मंजूर करा" श्री सदाशिवअप्पा बोनते ह्यांनी ठरावाला अनुमोदन दिलें. 'पलायन करून विरोधी पक्षानें आपली बाजू मांडण्याचें स्वतःत सामर्थ्य नव्हतें हें उघड केलें. समाजांत बेकी व्हावी याचें त्यांनी दिग्दर्शन केलें" असें श्री. बोनते ह्यांनी आपल्या भाषणांत सांगितलें.

### श्री. एकलारे ह्यांचें भाषण

ठरावाला पाठिंबा देतांना पुसदचे श्री. आप्पासाहेब एकलारे वकील ह्मणाले, "विषयानियामक कमिटींतील विरोधकांच्या वृत्तीवरून केवळ विरोधाकरितांच ते विरोध करीत होते असें दिसून आलें आहे. आजच्या

प्रकाराबद्दल माझ्याप्रमाणें आपणालाहि वाईट वाटेल असें मला वाटतें. विरोधकांचें ह्मणणें मुदतीच्या आंत ठराव आलेला नाही हें. पण हा ठराव येणार याची त्यांना पूर्ण ' नोटीस ' मिळाली होती. ती मिळाली नसती तर सह्यांचा गोळा करून हिरवीं, पिवळीं, पांढरीं पत्रकें त्यांनी वाटलीं नसतीं. त्यांनी आपला रागरंग पाहून पळवाट काढली. " या प्रश्नाकडे धार्मिक दृष्टीनें पाहिलें. ना. कंबळी यांच्यासारखे अध्यक्ष असतांना हे ठराव मंजूर होतात; व त्यावरून या एकीकरणाला धर्माचा पाठिंबा आहे हें उघड आहे. आजच्या परिस्थितींत पोटजातींचें निर्मूलन केल्याशिवाय आपल्या समाजाचें संघटन होणार नाही. "

### श्री. वामणगांवकर ह्यांचें भाषण

या ठरावावरील चर्चेंत भाग घेतांना श्री. वामणगांवकर ह्मणाले, "या ठरावावरील माझी कालची [ विषयनियामक मंडळांतील ) भूमिका 'न धरी शस्त्र करीं,न करी युद्ध, गोष्टी सांगेन युक्तिच्या चार,' असें होतें. पण या तीरावरून त्या तीरावर नवमतवाद्यांना स्वस्थपणें पोहून जाऊं देण्याची माझी इच्छा नाही. एकीकरणाच्या प्रश्नांतील खरें-खोटें समजून आज नाहीं उद्यां मुलांकडून—नातवंडाकडून आचरण घडवून आणावें असा या ठरावांतील उद्देश आहे. मला हा ठराव शिखंडीप्रमाणे वाटतो. हा ठराव काय आहे हें विरोधकांना कळलें नाही. या ठरावावर बोलणारे कांहीं वक्ते वाईट उद्देश धरून बोलतात असा गैरसमज धरून ते आले होते. वास्तविक त्यांना जे पाहिजे तेंच या ठरावांत आहे. व्यवहारात काय अंमलांत आणावयाचें हें या ठरावांत कांहींच सांगितलें नाही. या ठरावांत निव्वळ सदिच्छा आहे. निव्वळ प्रचार आहे. ठरावांत काय आहे हें समजून न घेता निव्वळ वाऊ करून नव विरोधक निघून गेले. "

यानंतर १९३४ सालांतील ' वीरशैव मठ ' च्या एका अंकातील खामगांव—परिषदेंत पक्षभेद व शाखाभेद ह्यांचें एकीकरणाचा जो ९ वा ठराव झाला तो वाचून दाखवून श्री. वामणगांवकर पुढे ह्मणाले, " एकीकरणाच्या व्यवहार्य स्वरूपाचा यांत उल्लेख नाही. आपला ठराव सवगोलंकार आज करा या मताचा नसून एकीकरणाची इच्छा दर्शविणारा आहे. रोटीबेटीव्यवहार करा असेंहि ह्मणणारा हा ठराव नाही.

सकाळी माझ्या ठरावावर जो उपसूचना श्री. बोरसकर ह्यांची आली तीपेक्षाहि कनी दर्जाचा हा ठराव आहे. ह्मणून तो मंजूर करू नये असें माझें मत आहे. "

### श्री संग्रामाप्पा वकील ह्यांचें भाषण

उदगीरचे श्री. संग्रामाप्पा चोंटकर वकील ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना हिंदींत भाषण केलें. " रायचूर–परिषदेत मी हजर होतो व तींत ' स्टॅंडिंग कमिटी' व वकिंग कमिटी-चा सभासद होतो. मी असा विश्वास देतों की, हा ठराव तेथे मंजूर झाला होता. तेंव्हि लासोनकरमठाचे लोक उठून गेले होते. एकीकरणाचा अर्थ परस्पर रोटीव्यवहार झाला पाहिजे. खाण्यापिण्यांत 'जो भेद करील तो रौरव नरकांत जाईल असें. बसवेश्वरानें ह्मटलें आहे." असें त्यांनी आपल्या भाषणांत सांगितलें. नागपूरचे श्री. वामनराव डांगरे ह्यांनी ठरावाला पाठिंबा देतांना खामगांव-परिषदेंतील ठरावाची अंमलबजावणी नागपूर येथे कशी करण्यांत येत आहे हें थोडक्यांत सांगितलें.

### एकीकरणाला परिषदेची मान्यता

ठरावावरील एकंदर वादविवादाला उत्तर देतांना श्री. राजाभाऊ डांगरे ह्मणाले, " श्री.

वामणगांवकरांनी जी आपली भूमिका स्पष्ट केली त्यावरून त्यांना चांगलीं उपमा द्यावयाची झाली तर एका प्रेमळ आईची देतां येईल. गोरा-गोमटा पोऱ्या असला ह्मणजे शेजार-पाजारच्यांची दृष्ट लागू नये ह्मणून ती त्याला काजळाचे बोट लावते. त्याप्रमाणें त्यांनी आपल्या ठरावास लोकांची. दृष्ट लागू नयें ह्मणून गालबोट लावलें. याबद्दल मी त्यांना पुनश्च धन्यवाद देत आहें. " श्री. वामण-गांवकरासारख्या प्रेमळ विरोधकाचे आभार मानून त्यांनी आपलें भाषण संपविलें. एकीक-रणाचा ठराव मताला टाकला असतां ७ विरुद्ध प्रचंड बहुमतानें, टाळ्याच्या कडकडा-टांत मंजूर झाला. कारंजा-परिषदेंत झालेला सुधारकांचा हा दुसरा प्रचंड विजय होय.



## विरोधकांच्या कारवायांवर प्रकाश

सकाळी संवादाबद्दल जाहीर करण्यात आलेलें पदक अध्यक्षांचे हस्तें त्यानंतर देण्यांत आलें. त्याप्रमाणें कु० पंचकुला हिला परिषदेस स्वागत गीत गाईल्याबद्दल एक पदक देण्यांत आलें. श्री० भिमाप्पा मिसे, उमरावती, या तरुणाचें यानंतर थोडक्यात भाषण झालें. विरोधकांच्या सहवासांत ते परिषदेला आल्या-मुळे त्यांनी त्यांच्यांतील कारवायावर चांगला प्रकाश पाडला व त्यांनी निरनिराळ्या प्रकारांवर विचारमंथन करून सह्या कशा मिळ-विल्या हे सांगितलें.

## अध्यक्षांचें समारोपाचें भाषण

अध्यक्षांनी समारोप करतांना जें भाषण केलें त्यांत " या दोन दिवसांत समाजाबद्दल विचार-विनिमय करून परिषद शांतपणें व सुरळीतपणें पार पाडण्याबद्दल आपण संधि आणून दिली याबद्दल मी आपलें मनःपूर्वक आभार मानतो " असें सांगितलें.

## आभारप्रदर्शन.

श्री. सदाशिव आप्पा बोनदे ह्यांनी आभार-प्रदर्शन करतांना, गैरव्यवस्था झाली असेल तर दिलगिरी प्रदर्शित करून चुकाबद्दल क्षमा मागितली. वऱ्हाडांतील हीच सर्वांत मोठी परिषद होय. फूट पडू नये ह्मणून आह्मी शक्य ते प्रयत्न केले असेंहि ते ह्मणाले. मदत करणारांचे आभार मानतांना त्यांनी पुढीलजणांचें आभार मानलें:— १ थिएटर दिल्याबद्दल मॅनेजर. २ सराईबद्दल श्री.नानासाहेब दहिहांडेकर. ३ अध्यक्षासाठी बंगला दिल्याबद्दल श्री. मुळजी जेठा. ४ नं. २ ची शाळा दिल्याबद्दल नगराध्यक्ष. ५ आमंत्रित पाहुणे - विशेषतः स्वामी परांडकर, कल्याण शेट्टी; उदगीरचे संग्रामाप्पा; बारजीभे; गोगशेट्टी; बाबासाहेब पारवेकर जहागीरदार, श्री. वामणगांवकर; श्री. महादेवआप्पा हुंडेकर; ६ गांवांतील पुढील सद्गृहस्थ श्री. बापूसाहेब हुडे, रावसाहेब गोपाळराव डॉक्टर; श्री. बापूराव सोनोने.

त्याचप्रमाणें राजाभाऊ डांगरे, अध्यक्षांचे, भगिनीचें व परगावच्या व गावच्या सद्गृहस्थाचें आभार मानले. श्री. वामणगांवकर ह्यांनी अध्यक्षांच्या आभाराला दुजोरा देतांना परप्रांतातील पाहुण्याचें विशेष प्रमाणांत आभार मानले, व त्याचें अभिनंदन केलें. "ही परिषद यशस्वी करण्याचें श्रेय शिशुपालांना आहे" असें सांगून, विरोधकांचे त्यांनी प्रथम आभार मानले. व विषयनियमक मंडळामध्ये मला माझ्या कांही मित्रांना दुखवावें लागलें याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी असें सांगितलें.

अध्यक्षांचे परवानगीने श्री. बाबूराव चौधरी ह्यांनीं सामाजिक कार्याला मदत करण्यासंबंधीची दोन जाहीर पत्रकें आानंतर वाचून दाखविलीं.

श्री. बापूसाहेब धुडे ह्यांनी कारंजानागरिकांतर्फे परिषदेला उपस्थित असलेल्या पाहुण्याचें आभार मानले.

श्री. राजाभाऊ डांगरे ह्यांनी नागपूर प्रांतातर्फे अध्यक्षांचे आभार मानले.

श्री. त्र्यंबकआप्पा साखरे ह्यांनी एक पद्य म्हणून दाखविलें व त्यानंतर 'वंदे मातरम्' राष्ट्रगीत होऊन परिषद रविवारी १ वा.-च्या सुमारास संपली.

---

# 'वीरशैव संजीवनी'चा निरोप

"वी. संजीवनीच्या" पुनर्प्रकाशनाशीं व त्या पाक्षिकाचा व माझा कोणत्या तऱ्हेचा संबंध आहे हे सर्व वाचकांना विदितच आहे. परंतु पुनर्प्रकाशनानंतर कांही दिवसांनी दे. भ. नानासाहेबांनी आपलेपणानें माझेवर सहसंपादकत्वाचीही जबाबदारी टाकून जो विश्वास प्रगट केला होता व आपलेपणानें निभवून घेतलें ह्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे परंतु ह्यापुढे ता. १-६-३७ पासून माझा वकीलीचा व्यवसाय व इतरहि कांही वैयक्तिक अडचणीमुळे सहसंपादक म्हणून निकटवर्ती संबंध ठेवणे शक्य नाही. अर्थातच वी. संजीवनीवरील माझे पूर्वीचे प्रेम व इतर जिव्हाळ्याचे संबंध कायमच आहेत व पुढेहि राहतील. वी. संजीवनीतून लेखनद्वारे सेवा करितांना जाणून बुजून नव्हे तर अजाणतेपणाने कुणासंबंधी माझेकडून एखादा उणा उपरा शब्द प्रसिद्ध केला गेला असेल किंवा कुणाची मनें दुखावलीं असतील तर प्रेमळ अंतःकरणानी माझ्या समाजसुधारणेच्या सद्हेतूकडें लक्ष देऊन क्षमा करावी. वी. संजीवनीच्या लेखकांनी आपले लेख, बातमीपत्रें ह्यापुढे माझ्या खाजगी पत्त्यावर पाठवूं नयेत.

ज्यांनी मला माझ्या ह्या कार्यात वेळोवेळी साहाय्य करून उत्तेजन दिले त्या सर्व सुहृदांचे, हितचिंतकांचे तसेच प्रामाणिक विरोधकांचेहि मी आभार मानतों. व पूर्ववत् वी. संजीवनीवर आपले प्रेम कायम ठेवावें अशी नम्र विनंती करतों.

अमरावती
१-६-१९३७

आपला नम्र
वि० तु० चौधरी,

# वीरशैवांतील चळवळी

## कारंजा-परिषदेंत पास झालेल्या एकीकरणाच्या ठरावाची अंमलबजावणी

पुसद:—महाराष्ट्रवीरशैव हि. संवर्धकमंड-ळाचे संस्थापन झालें तेव्हांपासूनचे एक प्रमुख सभासद व पुसद येथील लोकप्रीय तह-सिलदार मि. एस्. बी. ऊर्फ नानासाहेब घतकर यांची कन्या सौ. कां. लक्ष्मी बाई यांचा विवाह श्री. मल्लिकार्जुन आप्पा चेंडकी ( जि. विजापूर ) यांचेशी ता. १३ रोजी पुसद येथे झाला.

कारंजा येथे एकीकरणाचा ठराव पास झाल्यावर त्याची लौकरच अंमलबजावणी होणें आवश्यक आहे अशा तऱ्हेची चर्चा मध्य-प्रान्तांच्या पुढारी वर्गात झाली व अंमल-बजावणीचा प्रथमप्रयोग यवतमाळ जिल्ह्यातील एक वीरशैवपुढारी श्री. आप्पासाहेब. एकलारे वकील पुसद ह्यांचे नेतृत्वाखाली वरील लग्न-प्रसंगी पुसद येथे करण्याचें ठरलें. श्रीं. नाना-साहेब घतकर हे लिंगायत माळी पोटशाखे-तील असल्यामुळे त्याचे येथील लग्नातच एकी-करणाचे ठरावाची अंम्मलबजावणी करणें वगैरे मंडळींना इष्ट वाटलें.

लग्नप्रसंगाला बाहेरगांवाहून सर्वांस एकी-करणाचे पुरस्कर्ते श्री. बाबुराव चौधरी, बी. ए, श्री. मारोती आप्पा ऊर्फ बाबुराव गाढवे, मोर्शी, कारंजा-परिषदेचे स्वागताध्यक्ष श्रीमंत भाऊ-राव रेवाप्पा विभूते, कारंजा, वगैरे मंडळी मुद्दाम हजर राहिली होती.

लग्नप्रसंगाला व पंक्तीला गांवातील व आसपासच्या खेड्यापाड्यातून वीरशैव मंडळी हजर होती.

श्रीमंत भोसाजीराव ऊर्फ बाबासाहेब मुळरे व श्री. आप्पासाहेब एकलारे वकील ह्यांच्या यशस्वी नेतृत्वाखाली व श्रीगुरु चनबसअय्या-स्वामी मठाधिकारी, श्री. पुंजाया स्वामी, श्री. मारोती अय्या श्री. परमेश्वरअय्या श्री. मल्ला-कार्जुन अय्या वगैरे प्रमुख माहेश्वर वर्गीय व श्रीमंत बाबा विश्वनाथ आजेगांवकरासारख्या अनुभवी व वजनदार भक्तवर्गीयांच्या मदतीने सर्व मंगल प्रसंग आनंदाने पार पडला. श्री. रामलिंग आप्पा बिबेकर, श्री. भुजंगाप्पा वगैरे मंडळींनी प्रथमपासूनच सर्व कार्यात उत्साहाने मदत केली.

सहभोजनाला श्रीगुरु चनबसअय्या स्वामी, पुंजाय्या स्वामी, मारोती अय्या, परमेश्वर अय्या मल्लकार्जुन अय्या, वगैरे माहेश्वर तसेच श्रीमंत भाऊराव विभूते, कारंजा, श्री. बाबुराव गाढवे मोर्शी, श्री. बाबुराव चौधरी अमरावती, श्री. बाबासाहेब मुळरे, श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, श्री. बाबा विश्वनाथ आजेगांवकर, श्री. महादेव एकनाथ ऊर्फ बंडाप्पा नागठाणे बोरी, श्रीमंत शिवाजीराव आनंदराव व माधवराव पाटील माळकिन्हीकर, श्री. भुजंगाप्पा, श्री. रामलिंगआप्पा बिबेकर वगैरे स्थानिक प्रमुख व इतरंहि गांवची व बाहेरगांवची मिळून १००—१५० चे मंडळी सहभोजनांत सामील झाली होती. पुरुषवर्गाप्रमाणे सौ. नर्मदाबाई एकलारे व सौ. नलिनी ऊर्फ माईसाहेब मुळरे ह्यांच्या नेतृत्वाखाली सर्व वीरशैव भगिनींनी सहभोजनांत भाग घेऊन वीरशैवांत पर-स्परउच्चनीचजातिभेद नाहीत हें सिद्ध केलें. कारंजा—परिषद आटोपून पुरते ५—६ दिवस लोटतात न लोटतात तोंच परिषदेंत पास झालेल्या एकीकरणाचे ठरावाची अंम्मलबजा-वणी श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, श्री. बाबासाहेब मुळरे, श्री. बाबा विश्वनाथ आजे-गांवकर ह्यांनी यशस्वी तऱ्हेने करून दाखविली ह्याबद्दल पुसदभागातील वीरशैव त्यांना धन्यवाद देत आहेत असें एक प्रत्यक्षदर्शी कळवितात.

**दे.भ.बामणगांवकरांची नोटीस व वीरशैवसमाजांत खळबळ**— कारंजा-परिषदेत जी कांही निरनिराळीं हस्तपत्रकें वाटण्यांत आलीं त्यांतील वृत्तपत्रांच्या खोट्या बातमीदारांना 'अमरावती-वीरशैव जनतेचें सणसणीत उत्तर' ह्या हस्तपत्रकांवर अमरावती येथील ७२ वीरशैव व्यक्तींच्या सह्या छापल्या आहेत. त्यांत 'ध्वनितः दे. भ. बामणगांवकरांचें आचरण शुद्ध नाही व ते माजलगांवकरांना प्रायश्चित्त कां घ्यां ह्मणतात?' अशा अर्थाचा कांहीं मजकूर आहे. सदहूं पत्रकांवर ज्या ७२ जणांनी सह्या केल्या होत्या त्या सर्वांचेकडे ता. २५ रोजी दे. भ. बामणगांवकरांनी नोटीसवजा पत्र पाठविलें आहे. व ज्यांचेकडून योग्य खुलाशाची उत्तरे येणार नाहीत त्यांच्यावर ते योग्य इलाज करणार असल्याचें समजतें. वरील प्रकारामुळे येथील लिंगायतसमाजांत बरीच खळबळ उडाली आहे. बऱ्याचशा मंडळींनी 'आह्मांला फसवून सह्या घेण्यांत आल्या' असें दे. भ. बामणगांवकरांना लेखी व तोंडी कळविल्याचेंहि समजतें.

## सोलापूरचा-विवाह

सोलापूरचे सुप्रसिद्ध व्यापारी व दानशूर शेट हरी भाई देवकरण ह्यांचे पणतू रतीलाल गांधी यांना विवाह शेठ मोतीचंद यांची कन्या कु. मालिनी हिच्याशीं मोठ्या थाटाने जेव्हा झाला तेव्हा सोलापूरातील प्रमुख वीरशैव-पुढारी रावसाहेब थोबडे. श्री. सातप्पा चव्हाण, श्री. अबदुलपूरकर वगैरे हजर होते. वधूवर दोघेहि सुशिक्षित आहेत.

## नागपूरांत बसवजयंति

नागपूरच्या वीरशैवतरुणसंघातर्फे श्री. मार्कंडवार, बी. ए. एल्. एल्. बी., यांच्या अध्यक्षतेखाली सालाबादप्रमाणें श्रीगुरु नानाजी पेन्टय्या यांचे मठांत बसवजयंतीचा उत्सव मोठ्या थाटानें पार पडला. रुद्राभिषेक, मिरवणूक व जाहीर सभा असा हा कार्यक्रम होता. सभेंत श्री. राजाभाऊ डांगरे, कुरसकार वकील, जेठी आप्पा, नारायण आप्पा गडुवार, जुनवकार, बी. डांगरे इत्यादिकांचीं स्फूर्तिदायक भाषणे होऊन कारंजा-परिषदेंतील एकीकरणाच्या ठरावास संमति देण्यात आलीं.

## इंटर परीक्षेत उत्तीर्ण झाल्याबद्दल अभिनंदन

श्री. का. ना. मिटकरी अमरावती, श्री. बा. नि. चपळगे हिंगणघाट, व श्री. आर. एस. जुननकार नागपूर हे नागपूर यु०च्या इंटरच्या परिक्षेत यशस्वीपणें उत्तीर्ण झाल्याबद्दल आह्मी त्यांचे अभिनंदन करतो.

## मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण

अमरावती श्री. भिमाप्पा शिवलिंगआप्पा मिसे हें ह्या वर्षी खाजगी तर्हेने नागपूर युनि.चे मॅट्रिकच्या परिक्षेस बसलें होतें. त्यांत ते यशस्वीरीतीने उत्तीर्ण झाल्याबद्दल आह्मी त्यांचें अभिनंदन करतों. वयाच्या १६ व्या वर्षी मॅट्रिक पास होणारे हेंच ह्या भागांतील लिंगायत विद्यार्थी आहेत.

**बार्शी:**— सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेचे ३ रें अधिवेशन बेळगांव लिंगराज कॉलेजचे विद्वान् प्रिन्सिपॉल डॉ. एस. सी. नंदीमठ एम. ए. पी. एच डी ह्यांचे अध्यक्षतेखालीं ता. ५ व ६ जून १९३७ रोजी बार्शी येथे भरणार आहे. स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्रीमंत काकासाहेब झाडबुके आहेत.

तसेच, सोलापूर जिल्हा - वीरशैव महिला-परिषदेचें १ लें अधिवेशनहि बार्शी येथें ता. ५ व ६ जून १९३७ ला सोलापूरच्या सौ. पंचव्वा बाई सरदार ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरणार आहे. स्वागताध्यक्षिका सौ. शांताबाई गावशाने ह्या आहेत.

आह्मी दोन्हीं परिषदांना यश चिंतितों

**महाराष्ट्र वी० असो मुंबई:**— महाराष्ट्र वीरशैव असोसिएशन मुंबई ह्या संस्थेच्या कार्यकारी मंडळावर मध्यप्रांतविभागातर्फे दे. भ. राजाभाऊ डांगरे नागपूर व श्रीमंत बी.के. ऊर्फ बापुसाहेब हिंगमिरे, बिल्डिंग मास्तर हिंगणघाट, ह्यांना सभासद ह्मणून निवडल्याचे असो.चे सेक्रेटरी कळवितात. स्तुत्य व अभिनंदनीय.

# संजीवनीला एक हजाराचें कर्ज द्या

प्रत्येकाने दहा रुपयांचा कर्जरोखा

... घ्यावेत.

वर्ष २ रें ) ता० १५ जून १९३७ ( अंक १२ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे

दे.भ.वामणगांवकरांची नोटीस व वीरशैवसमाजांत खळबळ— कारंजा-परिषदेस जी कांही निरनिराळीं हस्तपत्रकें वांटण्यांत आलीं त्यांतील वृत्तपत्रांच्या खोट्या बातमीदारांना 'अमरावती-वीरशैव जनतेचें सणसणीत उत्तर' ह्या हस्तपत्रकांवर अमरावती येथील

बी. डांगरे इत्यादिकांचीं स्फूर्तिदायक भाषणें होऊन कारंजा-परिषदेंतील एकीकरणाच्या ठरावांस संमति देण्यांत आली.

**इंटर परीक्षेत उत्तीर्ण झाल्याबद्दल अभिनंदन**

श्री. का. वा. मिटकरी अमरावती, श्री. बा. नि. चपळगे हिंगणघाट, व श्री. आर. एस.

# संजीवनीला एक हजाराचें कर्ज द्या

## प्रत्येकाने दहा रुपयांचा कर्जरोखा एक ते पांच घ्यावेत.

( ना० रा० बामणगांवकर, मालक, अरुण-उदय व संजीवनी, यांजकडून )

'वीरशैव संजीवनी ' पाक्षिक ज्या छापखान्यांत छापलें जातें तो 'अरुण' छापखाना व 'उदय' पत्र हे मी १९३२ च्या जानेवारींत पांच वर्षांत रक्कम फेडीन ह्या करारानें विकत घेतलें होतें. १९३६ अखेरपर्यंत पांच वर्षे पूर्ण झालीं आणि सर्व रक्कम फेडून 'अरुण' छापखान्याचा व 'उदय' पत्राचा मी आतां पूर्ण पणें मालक बनलों. ' संजीवनी ' प्रसिद्ध करण्यांत जें मला नुकसान येतें व पुढेंहि कांहीं दिवस येईल तें मला माझ्या 'अरुण' छापखान्यांतून व माझ्या 'उदय' पत्रांतून भरून काढावें लागतें व काढावें लागणार.

धंद्याच्या दृष्टीने व्याप फार वाढल्यामुळे हल्लीची जागा फारच कमी पडते आणि त्या-मुळे धंदा अधिक प्रमाणांत वाढविण्यास फार त्रास होतो. इतकें कशाला, जागेमुळे हें अशक्य होऊन बसलें. 'अरुण' 'उदय'चा धंदा वाढवून 'संजीवनी ' जर मला फुकट काढतां आली तर 'संजीवनी'च्या वर्गणीदारांच्या जोरावर एक चांगला सहसंपादक पोसतां येईल, धार्मिक ग्रंथांचें वाचनालय वाढवितां येईल. अशीं किती तरी कामें वीरशैवसमाजाकरितां करावयास मी समर्थ होईन.

आज 'अरुण' उदय' करितां व 'संजीवनीकरितां' चांगल्या प्रशस्त इमारतीची गरज आहे. शहराच्या मध्यभागीं अशी योग्य व प्रशस्त जागा ५० ते ७५ रुपये दरमहा भाडें देऊनहि मिळत नाही. शिवाय इतकें भाडें देऊन धंदा चाल-विणें सद्यःस्थितींत कठीण आहे. मी अगदीं काटेतोलपणाने खर्च करतों म्हणून 'अरुण'-'उदय' व 'संजीवनी ह्या सर्वांचा मिळून दरमहा एक हजाराचा खर्च आज भागवूं शकतों. जागेच्या भाड्यांत काटकसर करितां यावी म्हणून उम-रावती-शहरवाचनालयाची ९०×४० फूट मोकळी जागा इमारत बांधण्याकरिता मला मिळाली आहे. तेथे योग्य अशी इमारत बांधण्या-करितां सरासरी रु. ३००० नगदी पाहिजेत. इमारत जुलै अखेरपर्यंत तयार झालीच पाहिजे. इमारत तयार झाल्यावर दरमहा रु ५० माझे वाच-णार. एवढ्यांत 'संजीवनी'चे छपाईत येणारें नुक-सान भरून निघतें.

ह्याकरिता सदर इमारत बांधण्याकरिता संजीवनीतर्फे मला कांही तरी मदत पाहिजे म्हणजे इमारत बांधण्याला येणाऱ्या रु. ३००० खर्चापैकीं एक हजाराचा खर्च तरी आज संजी-वनीकडून मदत घ्यावयाची. अर्थात् 'संजीवनी'च्या शंभर वर्गणीदारांची वर्गणी पांच वर्षांची आगाऊ

घ्यावयाची असें मीं ठरविलें आहे. संजीवनीची वार्षिक वर्गणी रु. २॥ आहे. पांच वर्षांची वर्गणी रु. १० आगाऊ दिली तर पुढील २॥ रुपये वर्गणीदारांचे वाचतात. म्हणून जे वर्गणीदार संजीवनीचा दहा रुपयांचा एक कर्जरोखा खरेदी करतील त्यांना पांच वर्षेपर्यंत संजीवनी फुकट मिळेल. अशा प्रकारें जे वर्गणीदार आगाऊ वर्गणीत रु. १० चा एक कर्जरोखा खरेदी करतील त्यांना व जे वर्गणीदार नसतील व ज्याना होण्याची इच्छा नसेल त्यांना सुद्धां एक ते पांच पर्यंतच रु. १० किंमतीचे कर्जरोखे विकत घेता येतील. रु. दहाच्या एका रोख्याचे पांच वर्षांत रु. १२ प्रमाणे फेड करण्यात येईल. पांच वर्षांनी रु. १२ मिळणें हें ज्याला उशीर वाटतो त्याला दरसाल रु. २ प्रमाणें सहा वर्षांत रु. १२ मिळतील अशीहि व्यवस्था केली आहे.

म्हणून एक कर्जरोखा घ्या, वा ह्याव्यतिरिक्त एक, दोन, तीन, चार व पांच कर्जरोखे घ्या, पण संजीवनीच्या वर्गणीदारांत, चहात्यांत वा आश्रयदात्यांत एकंदर शंभर कर्जरोखे खपले म्हणजे कार्य पूर्ण झालें. शंभराच्या वर आम्हास कर्जरोखे विकावयाचे नाहीत. कर्जरोखे तारीख १५ जून पासून तो आगष्ट १९३७ अखेरपर्यंतच फक्त विकत मिळतील. त्यानंतर कर्जरोखे विकत मिळावयाचे नाहीत.

संजीवनी चिरस्थायी करण्याकरिता ज्यांना ही मदत करावयाची असेल त्यांनी ता. १५ जूनपासून मनिऑर्डरी मॅनेजर, 'वीरशैव संजीवनी' ह्या नावावर पाठविल्या म्हणजे त्यांच्याकडे कर्जरोखे बरोबर पोस्टाने रवाना होतील. कोणीं किती कर्जरोखे घेतले व 'संजीवनी'ला ह्या प्रकारच्या कर्जाची मदत केली, त्या सर्वांची नांवें पूर्ण पत्त्यासह संजीवनींत प्रसिद्ध होतील. तरी आमच्या प्रेमळ वाचकांनी व संजीवनीच्या चहात्यांनी दहा रुपयांच्या कर्जाचे असे एकापेक्षा अधिक म्हणजे पांचापर्यंत असे शंभर कर्जरोखे विकत घेऊन वा खपवून ह्या वेळी संजीवनीस मदत करावी, अशी प्रार्थना आहे. आम्ही देणगी मागत नसून कर्ज मागतों; आणि तेंहि एक कर्जरोखा दहा रुपयांप्रमाणे विकून पांच वर्षांनी रु. १२ देऊं ह्या हिशेबाने मागतों. ह्यांत मदत असून फायदाहि आहे. तरी नांवें नोंदवावींत व लागलींच मनिऑर्डरी पाठवाव्यात अशी प्रार्थना आहे.

## इमारतीचें कंत्राट दिलें

अरुण-उदय व वीरशैव संजीवनी कचेरीं करितां बांधावयाच्या इमारतीचे कंत्राट मुंबई येथे वीस वर्षेपर्यंत इमारतीचे बांधण्याचे काम केलेले सुप्रसिद्ध कंत्राटदार श्री. रु. वि. शेंडे ह. मु. खेलडा, ता. मूर्तिजापूर, जि. अकोला ह्यांना दिलें आहे. आश्रम पूर्ण होऊन ता. १ आगष्टला त्याचा उद्घाटनसमारंभ होईल. तरी ता. १५ जूनपासून 'वीरशैव संजीवनी'-चे कर्जरोखे घेणारानी मनिऑर्डर पाठवून आपली नावें प्रसिद्ध होतील अशी काळजी घ्यावी.

व्यवस्थापक, 'वीरशैव संजीवनी'

अरुण-उदय संस्था आज सतत अठरा वर्षे सुरू आहे. माझ्याकडे मालकी हक्क येऊन आज सहावें वर्ष सुरू आहे. ही संस्था मी ह्यात असेपर्यंत बंद पडणारी नसल्यामुळे आणि तोपर्यंत संजीवनीहि प्रसिद्ध होत राहणार असल्यामुळे संजीवनीचा दहा रुपयांचा कर्जरोखा खरेदी करून पांच वर्षांत बारा रुपये मिळविणें वा दरसाल रु. २ प्रमाणें फेड करून घेऊन सहा वर्षांत रु. १२ मिळविणें ह्यांत स्वार्थाबरोबरच परमार्थहि आहे. पांच वर्षांचे वर्गणीदार

तारीख
१६-५-१९३७ इ.

ना० रा० बामणगांवकर,
मालक—अरुण-उदय संजीवनी. उमरावती.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

–※ जुनें वर्ष पांचवें ※–

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः । लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥

पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य ये.ऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्

भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति ज्येष्ठ शु० ७ शके १८५९ ( अंक १२ वा.

# कारंजा येथील यशस्वी अधिवेशन

## कारंजा-परिषदेचें महत्व

कारंजा जि. आकोला (वऱ्हाड) येथे घुळघाचे श्री. सिद्धाप्पा अण्णा मोगलाईकर ह्यांच्यासारख्या समतोल वृत्तीच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली मध्यप्रांत – वऱ्हाड-वीरशैव प्रांतिक परिषदेचें दुसरें अधिवेशन यशस्वी तऱ्हेने पार पडलें, ह्याचा वृत्तांत आमच्या वाचकांना वाचावयास मिळालाच आहे. सदर अधिवेशनाला आतां एक महिना होऊन गेल्यामुळें, त्या अधिवेशनांत पास झालेल्या ठरावांचा सर्व दृष्टींनी व समतोलपणाने विचार करावयास वेळ आहे, ह्मणूनच आह्मीं सदर परिषदेंत पास झालेल्या ठरावावर आजच्या अंकांत आपले विचार मांडण्याचें ठरविलें आहे. कोणतीहि परिषद ह्मटली कीं तिचें महत्व तींत पास झालेल्या ठरावावर अवलंबून असतें.

## परिषदेंत समाजाचें हृदय

वास्तविक कारंजा-परिषदेंत नवें असें कांहीच अद्भुत घडलें नाही व तींत असा कोणताहि बेछूट ठराव पास झाला नाहीं. कारंजा-परिषदेंत पास झालेल्या ठरावांचा विचार करितां सदर परिषदेंत आजच्या समाजस्थितीचें

हृद्गत मात्र प्रगट झालें हेंच कोणा-लाहि कबूल करावें लागेल. परिषदांचा मूळ हेतूहि ह्याच असतो. परिषदांचे निंदक असोत वा स्तुतिपाठक असोत, त्या सर्वांना परि-षदांपासून जर कांही शिकाव-याचें असेल तर हेंच शिकावयाचें कीं, आज समाजाचें हृद्गत काय आहे. तेंच त्यांनी ह्या परिषदेंतून समजावें.

## परिषदेचें शिवरूप

कारंजा-परिषदेला जो समुदाय लोटला होता, जे स्वागतमंडळाचे सभासद होते, जे प्रतिनिधी होते, जे सन्माननीय पाहुणे हजर होते—मग ते परिषदेंत अखेरपर्यंत बसणारे असोत वा परिषदेंतून अखेर अखेर जाणारे असोत, ते सर्व वीरशैवसमाजांतील जबाबदार घटकच होते अशी आमची तरी प्रामाणिक समजूत आहे. निदान त्यांपैकीं एकाला वा कोणीं कोणाला बेजबाबदार ह्मणणें—ह्मणजे सर्व घटकांच्या रूपानें नटलेला अभंग स्वरू-पाचा साक्षात् शिवदेव त्याच्या अंगाची कुचेष्टा करून आपले शिवद्रोही रूप प्रगट करणेंच होय. अशा प्रकारें जो उघडपणें शिव-द्रोह करतो तो वीरशैव ह्मणविण्यासच पात्र ठरत नाही. ह्मणून परिषदेच्या एकंदर कार्यक्रमाकडे पास झालेल्या ठरावाकडे व तींत घडलेल्या प्रकाराकडे पहात असतां कोणाला नांवें ठेवून आपले शिवद्रोही रूप आह्मांला प्रगट करावयाचें नाही.

## परिषदेचें शक्तिविशिष्ठ स्वरूप

जबाबदार वीरशैवांनी घटनात्मक परिषदेंत बसणें, उठणें, व बोलणें व तींत भाग घेणें ही एक शिवदेवाची उपासनाच होय. सिद्धांत-शिखामणीकारानें काय व बसवदेवानें काय विधिपूर्वक लिंगधारी हा दुसरा शिवच होय असें मानलें आहे. अशा योग्य लिंगधाऱ्याचे योग्य प्रतिनिधी जेंथे जमतात तेथे पावित्र्य नव्हतें असें मानणें ह्मणजे आपण आपल्या मनाचें अमंगलस्वरूप प्रगट करणेंच होय. ह्मणे अध्यक्ष भोळे होते व ते अमदद्याच्याच हातांत खेळत होते; परिषदेंत इतकेच बसले व परिषदेंतून इतके पळाले ! जो परिषदेंत बसला तोहि शिवच व जो पळाला तोहि शिवच होय. परंतु शिव हा शक्तीनें विशिष्ठ अस-ल्यामुळे एक बसला व एक उठला असा प्रकार घडला तर ह्यांत शिवदेवाचें शक्ति-विशिष्ठ स्वरूपच प्रगट झालें. राजा धर्माला दुर्योधनांतहि सुयोधनत्व दिसलें. देवदैत्यांच्या झगड्यांत दोहोंतहि परब्रह्माचें स्वरूप पाह-णारे ब्रह्मर्षि झाले आहेत व तेच अखेर ब्रह्मपदाचे अधिकारी होऊन सर्व विश्वाच्या उत्पादक व संहारक शक्तीचे आधारस्तंभ बनले. ह्मणून शिवरूपब्रह्माची शक्ति ज्यांना ह्या परिषदेंत वावरतांना दिसली व दिसते त्यांना परिषदेंत कांही वावगें घडलें असें मुळी वाटावयाचेंच नाही.

## आचारवंत व शीलसंपन्न वीर

मध्यप्रांत-वऱ्हाडमधील वीरशैवांचा विचार करितां श्रीमंत बाबासाहेब देशमुख पारवेकर, श्रीमंत श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर, श्रीमंत कोकर्डेकर, श्रीमंत रामचंद्रशेट कुल्ली, ह्यांच्या-सारखे धर्मशील व परंपरागत आचार-विचाराचे कृतीनें संरक्षण करणारे महाभाग फारच थोडे सांपडतील. तद्वतच परिषदेचे अध्यक्ष व स्वागताध्यक्ष आणि कारंजा येथील वीरशैव बंधू हेहि आचारसंपन्नच आहेत. अशा आचा-रवंत महाभागांना ज्या परिषदेंत वैगुण्य-वाटत नाही व अखेरपर्यंत वाटलें नाही त्या परिषदेंत कांही दोष होता असें कोणत्या आचारसंपन्न व शीलसंपन्न वीरशैवांना वाटेल ? छे ! असा एकहि खरा वीरशैव परिषदेवर

झाला नाही व असा खरा एकहि गुरु वा शंभ परिषदेवर नाराज झाला नाही असें जे आह्मांला वाटतें तेंच खरें! कांही थोड्यांच्या रुसण्या–फुगण्याचा प्रकार ही शिवप्रभूची माया होय. शिवदेव तांडवनृत्य करतो, रुद्राक्षमाळा धारण करतो, प्रसंगीं रुद्ररूपहि प्रगट करतो, ह्मणून तो आनंदरूप व कल्याणकारक नाही असें कोणी मानतात काय? जे मानतात त्यांना तो तसाच दिसतो. ह्मणून जे भक्त माझ्याकडे जसे पाहतात, त्यांना मी तसा दिसतो असें शिवदेवाचें ह्मणणें आहे व तें ह्याहि परिषदेच्या बाबतींत खरें आहे.

### परिषद् व शिवाचें रूप

ह्याकरिता कोणी आले कसे व गेले कसे ह्या गोष्टीची भवति न भवति करणें अत्यंत गौण आहे. परमेश्वराच्या मंदिरांत येणाऱ्या भक्ताचें मन बाहेरच्या खेटरांत असतें ह्मणून त्यालाहि जशी देवदर्शनाला बंदी नाही, व जो 'देह जावो अथवा राहो पण शिवरूपी दशा यावो' ह्या भावनेनें शिवदर्शनाला येतो त्यालाहि मंदिर तितकेंच मोकळें असतें. ह्याच न्यायानें परिषदेंत झालेल्या ठरावावर व प्रगट झालेल्या मतावर अनुकूल वा प्रतिकूल चर्चा करण्याचा प्रत्येक वीरशैवास अधिकार आहे. परिषद वगैरे संस्था लोकमत–निदर्शक असतात. लोकमत आज जसें असतें तसें उद्यां राहत नाही, व उद्यां जसें असतें तसें परवा राहत नाहीं. खुद्द परमेश्वराचें रूपच विश्वाच्या उत्पादनकाळीं ह्रासरें असतें, विश्वाच्या रक्षणकाळीं वीररूप असतें, व संहारकाळीं रौद्ररूप असतें. परमेश्वराचें रूप जर प्रसंगानें ह्याप्रमाणें बदलतें तर लोकांचेंच रूप कां बदलावयाचें नाही? लोकांना आधार मूळ परमेश्वराचाच ना? ह्मणूनच जे जे लोकांत दृष्टीस इच्छा व माया असते असें परमेश्वरास अनुसरून ह्मणावें लागतें.

कारंजा–परिषदेत जें घडलें त्यांत परमेश्वराचें आजचें रूप प्रगट झालें असें ह्मणून तें स्वरूप पाहणें व त्यापासून बोध घेणें हेंच सुज्ञाचें कर्तव्य आहे.

### हितसंवर्धक मंडळाचें हित

ह्या कर्तव्यबुद्धीनें परमेश्वराकडे पहावयाचें ह्मणजे परिषदेकडे व्यक्तिदृष्टीनें न पाहणेंच शहाणपणाचें. अमुक कार्य अमुक व्यक्तीनें केलें, अमुक कार्यांत अमुक व्यक्तीने भाग घेतला, इतकेंच नव्हे तर अमुक कार्यांत अमुक व्यक्तीचा वास आला ह्मणून तें कार्य कितीहि चांगलें असलें, समाजहितकारक असलें, तरी त्याचा नाश करण्याची प्रवृत्ति कांही लोकांत उत्पन्न झाली तर तो परमेश्वराचाच द्रोह होय. परिषदांत वा लोकांच्या संस्थांत बसावयाचें तर लोक होऊन अर्थात् आपणहि परमेश्वररूप होऊनच बसलें पाहिजे. परमेश्वररूप व्हावयास ज्याप्रमाणें यम–नियम–धारणा असते तद्वतच लोकरूपानें प्रगट होणाऱ्या परमेश्वराशीं तद्रूप व्हावयाचें झाल्यास यम–नियम–धारणा ह्या असतातच व त्या पाळाव्या लागतातच. कारंजा येथे भरलेली प्रांतिक परिषद ही म. वीरशैव हितसंवर्धक मंडळांतील सभासदांच्या खटपटीनें भरली. ह्या मंडळांतील ही परिषद भरली ह्मणून ह्या परिषदेंत व्यक्त झालेलें मत मंडळाच्या प्रत्येक सभासदास बंधनकारक आहे असें नव्हे. परिषदा बोलावून संमेलनें भरवून वीरशैवमात्रांचें हृद्गत समजून घेणें व त्यावर विचार करणें हेंच मंडळाचें कार्य होय. ह्मणून मतभेदाचा वा मतवैचित्र्याचा प्रश्न उत्पन्न झाला असता वीरशैवहितसंवर्धक–मंडळावर आघात करणें हें सभ्यतेचें लक्षण नव्हे असा कारंजा–परिषदेनें धोरा मारला. आणि असल्या पवित्र संस्थांचा कोणी चुकून वा द्वेषबुद्धीनें निषेध केल्याचा बहाणा केला असता त्याच्या प्रसिद्धीकरणास वीरशैव

ह्मणविणाराने जागा देणें ह्मणजे कांही तरी करून जागा भरण्याचा उद्योग करणेंच होय. मतमतांतराच्या गलबल्यांतून वीरशैवहितसंवर्धकमंडळ घुतल्या तांदूळासारखें शुद्ध निघालें हा ह्या परिषदेचा पहिला विशेष होय.

## मठसंस्था व पंचव्यवस्था

परिषदेंत पास झालेला चौथा ठराव हीहि एक महत्वाची बाब आहे. वास्तविक मठसंस्थांच्या कोणत्याहि बाहत्यास ह्या ठरावाला विरोध करण्याचें कारण वंव्हतें व नाही. मठसंस्थांच्या पवित्र उद्देशाबद्दल, त्यांना मिळणाऱ्या सार्वजनिक उत्पन्नाबद्दल, कोणाचाहि मतभेद नाही. पण त्यावर पंचकमिटी नेमावी व त्या कमिटीने बुडीत गेलेल्या संस्था परत मिळवाव्यात असें ह्मटलें की वाद उत्पन्न होतो. हा वाद कां उत्पन्न होतो? तर प्रस्तुत मठाधिकारी व पंच ह्यांचे संबंध ठिकठिकाणी सलोख्याचे नाहीत हेंच होय. पंच नेमले गेले कीं मठांचे इनाम वगैरे बुडतात असें जें ह्मणतात त्यांना पंच शब्दाचा अर्थ कळत नाही व पंचाचे कायद्याने मर्यादित होणारे अधिकारहि कळत नाहीत. वास्तविक हाहि ठराव शिफारसवजा आहे. ह्या ठरावानें पंच ह्मणविणारास सत्याचा दाखला दिला व सर्वच स्वामी ह्मणविणारास दुराचाराचा दाखला दिला असें नाही. मठसंस्था व पंच ह्यांचे काय संबंध होते व असावेत ह्याचें कालानुसार हृद्गत व्यक्त करणें ह्यापलीकडे ह्या ठरावास अर्थ नाही. पण पंच नेमा ह्मटले कीं, मठावरील आमचें स्वामित्व नष्ट होतें असें ज्यांना वाटतें व आसविलें जातें त्यांना त्यांचेंच मन खातें हेंहि ह्यावरून उघड होतें. असें ज्यांचें मन उघड होतें त्यांच्याविषयी भावी पिढीत आदर वसत राहील असें कोण मानील? आदर वसावा असें वाटत असेल तर भावी पिढीच्या मनोवृत्तीकडे लक्ष देऊन आपला पाय मजबूत करण्याचा उद्योग करणें हेंच शहाणपणाचें. पण हें शहाणपण वाळविण्याऐवजी जे शहाणपणापासून दूर पळतात तेच आपलें अधःपतन आपल्या हातानें करून घेतात त्याला दुसरा काय करील?

## बारसकर व बामणगांवकर

ह्यानंतर सातवा ठराव पासपस्त झाला. आणि तो श्री. बारसकर ह्यांच्या उपसूचनेमुळे झाला. इतर धर्मातील वा समाजांतील लोक वीरशैवधर्मांत खुषीने येत असले तर त्यांना पावन करून घेऊं नये असें ठराव आणणारांचें ह्मणणें नव्हतें व नाहीं. परंतु मूळ ठराव प्रस्तुतच्या वीरशैवांतील अंतर्गत दोष घालविण्याकरितां व अंतर्गत मजबूती साधण्याकरितां आहे ह्मणून इतरांना घेण्याचा उपक्रम ह्यांत घालू नये. ह्यास्तव ही उपसूचना होत नाहीं, तो निराळा स्वतंत्र ठराव होईल, असें सातवा ठराव आणणाऱ्या श्री. बामणगांवकरांचें ह्मणणें होतें. पण ती उपसूचना मान्य करावी अशी परिषदेची इच्छा दिसली, आणि बहुमतानें ती पासहि झाली. सदर उपसूचनेंनें मूळ ठरावाच्या धोरणांत कांही बाबनींत फरक केला. इतरांना विधिपूर्वक स्वधर्मांत घेतल्यानें धर्मांत तर फरक होतच नाहीं; पण रूढींतहि फरक होत नाहीं. कारण धर्मांत कोणीहि आले तरी निरनिराळ्या पोटजातीच्या रूढीप्रमाणे तेंहि निराळी पोटजात ह्मणून धर्मांत राहतील. परंतु विधिपूर्वक कोणी स्वधर्मांत घ्यावे ह्या बाबतींत ह्या उपसूचनेंने फरक केला. श्री. बामणगांवकरांच्या ठरावांत 'समाजनियंत्या पंचांनी आणि धर्मगुरु वा जंगम ह्यांनी घ्यावें' असें होतें. ह्यांतील 'आणि' शब्द काढून 'किंवा' शब्द उपसूचनेनें मान्य केला. पंच गुरु व जंगम ह्यांच्या एकोप्याला मूळ ठरावांत वाव होता तर उपसूचनेनें पंच, गुरु व जंगम हे सर्वच प्रसंगानुरूप कोणालाहि घेऊं

वकील व कोणालाहि घेणार नाहींत ही वृत्ति 'किंवा' हा शब्द 'आणि' ह्याऐवजी घालून उपसूचनेने प्रगट केली.

## निषेधकांची अलिंगी वृत्ति

ह्यावरून आज ठिकठिकाणीं पंच, गुरु व संघ ह्यांच्यांत एकसूत्रीपणा नाहीं व परस्परांची परस्पराविषयीं मनें शुद्ध नाहींत हेंच पांच्या ठरावाप्रमाणें व्यक्त झालें. वीरशैव-समाजघटनेंत गुरु व भक्त हे दोनच मुख्य वर्ग (ह्मणजे जाति नव्हेत). हे दोन वर्ग परस्परावलंबी व परस्परांत सहकार्य करूं लागल्यावाचून वीरशैवांची अष्टावरणधारी समाजघटना कशी टिकेल? व वीरशैव कसा राहील? ह्याचा विचार उभयतांनीं ह्यानंतर तरी गुण्या गोविंदाने करण्यास पुढें सरसावलें पाहिजे. एवढा चांगला सरळ बोध ह्या परिषदेने केला असतां तीपासून कांहीं निष्पन्न झालें नाही असें जे ह्मणतात ते दगड होत. मग ते नांवाने गुरु असोत वा भक्त असोत, असेंच कोणाहि निरपेक्ष व निःस्वार्थी मनुष्याला ह्मणावें लागेल. टाळी कधी एका हाताने वाजत नाही हें कोणींहि विसरूं नये. ह्याच ठरावाला 'आपद्धर्म ह्मणून अलिंग्याशीं व्यवहार झाल्यास प्रायश्चित्त नको' असेंहि सूचित करणारी उपसूचना येऊन, मूळ ठरावाची घाण करण्याचा व वीरशैवांच्या मूलभूत घटनेवर आमूलाग्र आघात करण्याचा जो कांहींचा हेतु होता तो अध्यक्षाच्या चातुर्यनि मात्र ढळला. ह्यांत अध्यक्षांनी त्यांची इभ्रत राखली. नाही तर आपद्धर्माच्या नांवाखाली अलिंग्याशीं व्यवहार करूं इच्छिणारे ह्मणून हे महाभाग ह्या परिषदेंत उघड झाले असते. अशा रीतीने जे अध्यक्ष ह्यांच्या अज्ञानाचा कौशल्याने गोंधळ घालतात ते त्यांना भोळे वाटावेत हें नवल नाही काय? पण नवल कसलें? 'पावसापुढे गीता वाचल्यावर त्याला फाळचाच गोंधळ वरा वाटला' तर त्याला सुज्ञ व धीरोदात्त अध्यक्षमहाराज काय करतील? परिषदेच्या भोळसट निषेधकांनी ह्या गोंधळांत आपलें स्वरूप प्रगट केलें ह्याबद्दल अध्यक्ष महाराजांना त्यांची कीव येत असेल व कोणालाहि येईलच.

## आर्यसंस्कृति व द्राविड संस्कृति

तद्वतच उद्‌गीरचे श्री. संग्रामआप्पा वकील ह्यांनी सुचावलेला आठवा ठराव हाहि वादग्रस्त नाही. परंतु तो कित्येकांना वादग्रस्त वाटला आणि अजून वाटतो. सदर ठरावांत याज्ञिक आर्यसंस्कृति हें वीरशैवसंस्कृतीचें मूळ नव्हे असें ह्मटलें आहे. ह्यांत ऐतिहासिक व शास्त्रीय दृष्टीनें खोटें कांहीच नाही. वीरशैव संस्कृति जर मूळांतच याज्ञिक संस्काराच्या विरुद्ध आहे तर ह्यांत चुकलें काय? तद्वतच सदर ठरावांत मनुस्मृति वगैरे धर्मशास्त्रावर वीरशैवांचे संस्कार उभारले नाहीत असेंहि ह्मटलें आहे. ह्यांत तरी खोटें व गैर काय आहे? स्मृतिमान्य पंचसूतकांचा सर्वच वीरशैवाचार्यांनी धिक्कार केला आहे. अशा स्थितींत स्मृति आह्मास मान्य आहे ह्मणणारांना वीरशैवांच्या आचार्यांचा धर्म तरी समजला असें कसें ह्मणावें? दुसरें असें कीं, ह्या ठरावांत वीरशैव संस्कृति ही द्राविड संस्कृतीचें सुधारलेलें स्वरूप होय, द्राविडीयन ह्मटलें कीं, ते गोंड, कोरकु, भिल्ल वगैरे शुद्र व अतिशूद्र होत असा कित्येक अज्ञानानें अर्थ घेतात. हा अर्थ चुकीचा आहे. आर्य लोकांपूर्वी ह्या देशांत दक्षिणेंकडे द्राविडीयन लोक वसाहती करून होते व तेहि सुधारलेले होते असें इतिहासज्ञ ह्मणतात. आर्य व द्राविड हे दोघेंहि ह्या देशाचे मूळ रहिवासी नव्हत. गोंड, कोरकु, वगैरे हे खरे मूळचे रहिवासी.

## वीरशैव हे द्विजच

वास्तविक हा विषय परिषदेच्या कक्षेत घेण्यासारखा नाही. तो निबंधांचा वा स्वतंत्र

व्याख्यानाचा व तज्ज्ञांनीच विचार करण्या-सारखा विषय. परंतु वीरशैवांत जन्मजात चातुर्वर्ण्य नाही म्हणून ही संज्ञा वीरशैवां-तील कोणत्याहि पोटजातीला लागू होत नाही हें दाखविणें हाच ह्या ठरावाचा मूळ उद्देश. रोहीपखेड-परिषदेंत वीरशैव तेवढे द्विज होत ही गोष्ट ह्याच अर्थानें पोखरयांत व मोघम्या शब्दांनी पुढें केलेली आहे. परंतु चातुर्वर्ण्य-व्यवस्था मूळ आर्यांची कीं द्राविडीयन्सची, ती जन्मजातनिदर्शक द्राविडयन्सनी केली कीं आर्यांनी केली हा तत्वाच्या दृष्टीनें वादग्रस्त प्रश्न आहे. आणि तो असल्या परिषदांत उपस्थ होणें योग्य नव्हतें. तथापि वीरशैवांत शूद्र नाहीत, आहेत ते सारे द्विजच आहेत हें दाखविणें हा ह्या ठरावाचा मूळ व मुख्य उद्देश असल्या-मुळे ह्या ठरावांतील ऐतिहासिक वादविवा-दाच्या भागाकडे दुर्लक्ष करावें लागलें. वीरशैवांत शूद्र हा वर्ग नाहीं असें म्हटलें कीं कित्येक अज्ञ पंडितांना ह्यांत धर्म बुडाल्याचा भास होतो. आणि वीरशैवांत शूद्र आहेत अशी कबूली दिली कीं, धर्म कायम आहे असें वाटतें. अज्ञानी वेडें व खुळे ह्यांच्या ह्या कल्पना आहेत. योग्य गुरुकडून योग्य शिष्यासच लिंगधारण-दीक्षा प्रथम झाली आहे व तो त्यामुळे शिवरूप झाला आहे असें शास्त्रानेंच मान्य केलें आहे. म्हणून जेवढे लिंगधारी गुरुकडून वा जंगमा-कडून लिंगधारणा करून घेतात तेवढे अष्टावर-णाचे अधिकारी व जे अष्टावरणाचे अधि-कारी ते सारेच द्विज होत असा शास्त्रकारांचा सिद्धान्त आहे. परंतु लिंग धारण-दीक्षेविरहित कित्येकांनी स्वखुषीनें लिंग प्रसाद म्हणून बांधले आहे. त्यांना लिंगधारणा गुरु वा जंगम करीत नसतो. पण अशा पोटच्या जाति वीरशैव ह्या सदरांत येतच नाहीत. त्या येतात असें मानून शूद्र हा वर्ग वीरशैवांत आहे अशी कबूली देणें म्हणजे पूर्वकालीन गुरुंनी ज्यांना लिंगधारणदीक्षा देऊन पावन केलें त्यांच्या समाजहेतूत व घटनेंत ढवळाढवळ करणेंच होय. कडीनें पोटजाती पडून भेदाभेद माजला असेल. पण शास्त्राने व पूर्वगुरुंनी हा भेदाभेद मानला नाहीं. ही कबूली पूर्वगुरुंच्या शाखेंत व परंपरेंत वावरतो म्हणणारास द्यावीच लागेल. न दिली तर ते 'बापाशी बाप न म्हणे' ह्या न्यायानेंच 'गुरुशी गुरु न म्हणें' ह्या वृत्तीनें वागतात असेंच म्हणावें लागतें. तात्पर्य काय कीं, ह्या ठरावांतील 'द्राविडीयन' ह्या शब्दानें आणि चौथा वर्ण वीरशैवांत नाहीं असें म्हटल्यानें जे ह्या ठरावाविषयी गैर-समज करून देतात व घेतात ते धर्मशास्त्र व इतिहास ह्यांत अज्ञ आहेत. कोणताहि सम-जदार मनुष्य ह्यांच्या कोल्हेकुईस किंमत द्यावयाचा नाही. एकूण वीरशैवमात्र द्विज होत हीच गोष्ट कारंजा-परिषदेने पुन्हा निरा-ळ्या भाषेत ध्वनित केली.

## दीक्षाप्रचाराचा हेतु

अशा प्रकारचे हे वादग्रस्त ठराव प्रचंड बहुमतानें पास झाल्यावर श्री. वामणगांवकरांचा नववा ठरावहि प्रचंड बहुमताने पास झाला. सदर ठरावांत दीक्षाविधीच्या प्रचारास महत्व देऊन सर्व वीरशैवमात्रांत अष्टावरणसंस्कार रूढ होऊन सर्वत्रांत गुरु व जंगम रूढ अस-ल्याची साक्ष पटावी अशी सदिच्छा प्रगट केली आहे. अर्थात् अष्टावरणधारी वीरशैवांत एकीकरण शास्त्रोक्त मार्गानें घडावें अशी इच्छा ह्यांत स्पष्टपणें व्यक्त केली आहे. गुरु-जंगम व अष्टावरण ह्यांचें कुंपण सर्व वीरशैव म्हण-विणारांचा घातलें आहे. ह्या कुंपणावर हल्ला चढविला गेला होता. पण तें साधलें नाही. त्यामुळे आचार्यप्रणित शास्त्रसंमत सुधारणेचा ह्याच ठरावांत विजय झाला आहे, आणि ह्यावरच उभारलेला एकीकरणाचा ठराव पुढे चर्चेला आला. एकीकरणाचा ठराव अस्पष्ट आहे. कारण धारवाड, रायचूर, व खापगांव येथील ठरावाचा ह्यांत हवाला दिला

आहे. महासभांत व धर्मपरिषदेंत कांहीहि ठराव झाला ह्मणून तसाच ठराव प्रांतिक वा जिल्हापरिषदेनें करावा हें तत्व आह्मास मान्य नाही. प्रत्येक प्रांताने व जिल्ह्याने आपल्यासील वस्तुस्थिति स्वतंत्रपणें सांगणें हें त्यांचें स्वतंत्र कर्तव्य आहेच आहे. शिवाय एकीकरण ह्याचा अर्थहि निश्चित व मर्यादित नाही. खामगांव-परिषदेंत पंचम, दीक्षवंत, शीलवंत, टाकळकार यांचें एकीकरण व्हावें हा ठराव १९३४ मध्येंच पास झाला. तोच येथेंहि पास झाला तर आश्चर्य नाही. वास्तविक आह्मी तर सर्व वीरशैवधर्मांत शास्त्रानें रोटीबेटीव्यवहारभेद नाही असेंच ह्मणतों. आणि शक्य तितके त्याच ध्येयानें वागतों. पण रुढीने हा भेद पडला आहे. आणि तो समाजांतून क्रमानें सलोख्याने निघावा आणि शक्य तितका एकोप्यानें निघावा, ह्मणून उपेक्षाकरितां एकीकरणवाद्यास नांवें ठेवणें चांगलें नव्हे इतकेंच नाही तर असें करणें समाजहितविघातक आहे. ह्या सदिच्छेचा एक ठराव श्री. वामणगांवकरांनीं आगाऊ प्रसिद्ध केला होता. परंतु विषयनियामक मंडळांत त्यांनी तो परत घेतला.

### एकीकरणाचा ठराव व वाद

परत घेण्याला कांही कारणें आहेत. कांही विरोधक वृत्तीच्या सज्जनांची समज अशी कीं, चौधरी व वामणगांवकर हे एकच आहेत व त्यांचीच ही परिषद आहे. तेव्हां ह्यांच्यातर्फे जें जें येईल तें बरें असलें व पटण्यासारखें असलें तरी हाणून पाडावयाचें असा कित्येकांनी चंग बांधला आहे असें परिषदेपूर्वी कानावर येत होतें. परंतु विषयनियामक मंडळाला सुरुवात होतांच ह्या वातावरणांत कांहीच अर्थ नाही हें प्रत्ययास आलें. शिवाय विषयनियामक मंडळाला सुरुवात होण्यापूर्वी एकीकरणावर ठराव पाठविणारांना एकत्र जमण्याची व आपला ठराव निश्चित करण्याची सूचना विषयनियामक मंडळाची रचना जाहीर करतांना श्री. वामणगांवकरांनी केली होती. त्याप्रमाणे ते एकत्र झाले व त्यांनी आपला ठराव तयार करुन तो श्री. राघाभाऊ डांगरे पाटलांच्या करलेल्या वक्त्याकडे सादर करण्याचा अधिकार दिला. विषयनियामक मंडळांतच सदर ठराव ता. १ मे पूर्वी आलेला नाही अशी तक्रार आली होती. पण जे एकीकरणावर ठराव होते तेच सर्व एकत्र झाले आहेत हें स्पष्ट सांगितलें गेलें. त्याप्रमाणे परिषदेंत ठराव चर्चेला येणार हेंहि निश्चित झालें. तथापि परिषदेंत पुन्हा तक्रार झाली कीं, ठराव ता. १ पूर्वी आला नाही. स्वतः अध्यक्षांनी अशी तक्रार करणारासहि एक ठराव आणण्यास स्वतःच्या अधिकारांत परवानगी दिली. मग राघाभाऊ डांगरे यांसच त्यांनी परवानगी दिली तर कुरकुर कां? पण कुरकुर करणारांनी ती केली आणि परिषदेबाहेर पडण्याचें सोंग केलें. त्यामुळें परिषद व तिचें कार्य अधिकच खुलून उठलें. ह्मणून हे विरोधकहि शिवच होते असें आम्हचें ह्मणणें.

### यश आलें; पुढील अधिवेशनाची तयारी करा.

ह्यामुळे उलट परिषदेला अधिकच महत्व आलें. आणि परिषदेंत पास झालेल्या ठरावाप्रमाणें एकीकरणवाद्यांनीं पुसद येथें सहभोजन केलें. वास्तविक पास झालेल्या ठरावांत भयानक कांहींच नव्हतें. त्यांत लिंगधाऱ्यांत अर्थात् अष्टावरणाच्या अधिकाऱ्यांत सहभोजन घडावें हा जसा अर्थ आहे, तसाच भोजनाव्यतिरिक्त सहकार्य साधावें हाहि अर्थ आहे. फक्त एकमेकांना नांवें न ठेवतां जे ज्या साधनानें एकीकरण करतील त्यांना त्या साधनाचें करुं द्यावें

व त्या साधनाचा प्रचार करावा. पण कांहीं मायेकिस विरोधकांना आपसांत एकीकरण हा शब्दच वावडा. कांहीं चालत नाहीं तेव्हां निघून जाणें व परिषदेला महत्व आणणें हींच त्यांना शिवदेवाने बुद्धि दिली. श्री. वामणगांवकर वगैरे सातजण बसून राहिले व त्यांनी सदर ठरावास विरोध केला. विरोध, ठराव विहित अर्थाचा नाहीं ह्मणून होता. एकीकरणाचा ठराव व कृति ह्या प्रांतांत नवी नाहीं. घरोघर एकीकरण झालें आहे व पचलें आहे. पण ठराव पानें चर्चा करणेंच कित्येकांना वाईट वाटत होतें. जाहीर घोषणा करण्यांत अंतर्यामीं साक्ष असलेला परमेश्वर बोलत असतो. त्यामुळें सदर घोषणेला परमेश्वरी आज्ञेचें स्वरूप प्राप्त होतें. आणि तीच पुढे शास्त्राज्ञा ह्मणून प्रचलित होते. 'श्री. गु. मू.' 'वे. शा. सं' वा 'ह. भ. प' चा शब्द ह्मणजे शास्त्र नव्हे हे त्यांना गजुंन पटवावयाचें आहे त्यांना ह्याच पंथांतून गेलें पाहिजे. ह्या घटनेवरून हे आपस पेंशील हेच परमेश्वर बाहुलीक तें अंतरलेले. ह्मणून सदर परिषदेंत कोणीं कोणाचा पराभव केला नाही व कोणीं कोणाला जिंकलें नाहीं; तर सर्व प्रतिनिधींच्या रूपानें प्रगट झालेल्या परमेश्वरानें आपलें रहस्य व आनंदस्वरूप समाजहित-कारणीं प्रगट केलें. हें ज्या परिषदेत व्यक्तिरूपणें घडलें अशी ही महाराष्ट्रांतील वीरशैवांची पहिलीच परिषद होय आणि ती कारंजे-करांनीं यशस्वी केली. कांहीं उद्धटांनी केलेला अपमान सहन करून यशस्वी केली ह्या-बद्दल त्यांना धन्यवाद देणें व ज्या प्रतिनिधींनी कारंजा येथें येऊन अधिवेशन यशस्वी करण्यांत अत्यंत कष्ट सहन करून सहाय्य केलें त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. पुढील परिषद त्याहिपेक्षा यशस्वी होईल असा आम्हाला भरवसा आहे.

---

लघुकथा १० वी.

# आमची दानधर्मपद्धति

लेखक.–कुमार सिताराम होनराव अहमदनगर.

आहेत का घरांत ? ......असा कोठूनसा प्रश्न माझ्या कानावर आदळला. ......सकाळचा आठाचा प्रसंग होता, चहापाणी नुकतंच संपलं होतं, मी आपली पी. कंन्नेची " ब्रॅन्डीची बाटली " हा भाग वाचण्यांत गर्क होऊन गेलो होतो, आणि त्यांतील नायक मी बंडनालाच्या ब्रॅन्डीच्या बाटलीच्या कल्पनेशीं मी समरस झालों असतांना...... वरील प्रश्नांनी माझ्या मनाचा छंद नाहीसा केला. मला चीड येऊन मी पुस्तकांत बोट ठेवीत दारांतून डोकावून पाहिलें तों...... रुद्राक्षमाळा धारण केलेला. जटाधारी, वरील सर्व शरीर भस्मांनी सुशोभित केलेलं, उंच असा एक लठ्ठ गृहस्थ घरांत शिरला. त्यांना कांहीं तरी

गैरसमज झाला असेल ह्या हेतूने मी प्रश्न केला. कोण पाहिजे ?

कोण नाही, तूं असलास तरी हुपकत नाही, आणि तुझे वडिल असले तरी दुधांत साखर पडल्यासारखे होईल.........

हातांतील चंबुगवाळ सावकाशपणे खाली ठेवीत स्वारी खमंग उत्तर देत आसनस्थ झाली.

मी तर गारच झालों. चेअरवर पुस्तक ठेवून चांगलेंच उत्तर द्यावें ह्या हेतूनें मी बाहेर आलों......तोंच बाहेर काय गडबड आहे हें पाहण्याकरितां दादासाहेबहि बाहेर आले.

× * ×

आमच्या दादांचा देवधर्म, अतिथीसत्कार, ह्यांतच बहुतेक वेळ जाई. त्यांच्या दानधर्माविषयी कल्पना जुन्या काळच्या असून माझ्या मतें त्या चोपट होत्या, त्यांचे सत्पात्रीं दान करणें ह्मणजे अन्न, शिदा, दक्षिणा ह्या मिशिषाने लठ्ठ ढोंग्यांना पोसावे हें होय, त्यांच्या आणि माझ्या सत्पात्राविषयीच्या कल्पनेंत फार अंतर होतें. त्यांचे सत्पात्र ह्मणजे जंगमभिक्षुक. ते केव्हांहि येवोत कांहीं तरी ते देत. त्यांच्यावर दादांची अढळ श्रद्धा होती. उलटपक्षीं, माझें असें मत आहे कीं, जे गरीब, असाह्य, दीनदुबळे, आहेत अशांना सर्व रीतीने मदत करावी — " सत्पात्रीं दान करणें " ह्या विषयावर जरी एकमेकांचे विचार उलट होतें तरी पितृ आणि पुत्राच्या प्रेमांत कसलाहि खळ पडला नाहीं. "

* * *

— महाराज काय पाहिजे ? बसीव दरबार ह्यांच्या.

— आप्पा ? यांना दोन कप चहा ठेव पाहूं, आणि बंब पण पेटव यांनी स्नान केलेलंहि दिसत नाहीं ... जा ... छे बुवा अगदींच अतिथीसत्कार कमी झालाय अलीकडे अन् ही कारटीं शिक्षणानें इतकी बेलगामी झालीं कीं त्यांना माणसांची कदरच नाहीं बिलकूल...... — अरे खांबासारखा उभा काय राहिला...... जा ...... मी सरळ आंत गेलों. सर्व तयारी करून टॉवेल दोरीवर ठेवला व चहा देण्याला बाहेर आलों. तों दोघेंही गप्पा मारण्यात गुंग होऊन गेले होते.

× * ×

........चहा पाणी, स्नान, शिवपूजा, भोजन सर्व कांहीं संपलें.

* * *

आपला इकडे येण्याचा उद्देश मला समजला नाही ? ......दादासाहेबांनी पानाचा डबा पुढे घेत शांततेनें विचारलें. माझा इकडे येण्याचा उद्देश ह्मणजे आम्हीं आतां काशीरामेश्वरला जाणार आहोंत. हे पहा श्रीमंत शिवाप्पा नानाप्पा कडकबादचे जहागिरदार त्यांना आम्हीं हें सांगितल्याबरोबर ५० रुपये त्यांनी मला दिले. तेव्हा म्हटलं आपणाकडून कांहीं.........

हें पहा, सत्याचें दान कधीं वाया जात नाहीं, हा जननमरणाचा फेरा कांहीं केल्या चुकत नाही. म्हणून म्हणतो......पानाचा विडा दादांच्या हातांतून घेत गृहस्थ उद्गारला. बर ? आपणाला केव्हा निघायचं ? दादा म्हणाले. .......मला दुपारी ३ च्या गाडीला गेलेच पाहिजे. गृहस्थ म्हणाला.......हे घ्या, म्हणून दादानी झटदिशी तिजोरीतून पांचाच्या पांच नोटा दिल्या. तितक्यांत " आयुष्यमस्तु " हा आशीर्वाद गृहस्थानी दिला ( कां बर असा आशीर्वाद गृहस्थ देणार नाही ? जोपर्यंत

बाबासारख्याना लुटायाला मिळतं तोपर्यंत त्यांचा यजमानांचा आयुष्य कां नको. )

*   *   *

आप्पासाहेब, तांगा पहा बरं......गृहस्थानें घड्याळाकडे पाहत इच्छा दर्शविली.

मी प्रश्नार्थक मुद्रेनें दादाकडे पाहिलें. जा पाहा तांगा म्हणून दादा माझ्यावर खेकावले.... तोंड दाबून बुक्क्यांचा मार ह्याप्रमाणें माझी गत झाली आह्मी तिघेही तांग्यांत बसून स्टेशनकडे निघालो. स्टेशनवर पोहचल्यावर एक म्हातारी पैसा मिळण्याच्या आशेने आली व म्हणाली, ओ शेट साब, एक पैसा द्याओ. लई पुण्य होईल हो, मला दिला तांब्याचा पैसा देव देईल तुम्हा सोन्याचा पैसा. शेटसाब तुमच्या पाया पडतेहो, माझा एक पैसा ईश्वराजवळ रुजू होईलहो, ...... अहो यांना काय धर्म करावयाचा फाटके तुटकें कपडे घालून जगाला गरिबी दाखवितात. दानधर्म करावा तर सत्पात्रीं करावा. त्या म्हातारीस झिडकारुन गृहस्थ म्हणाला.

*   *   *

अशा दुसऱ्याच्या संपत्तीवर बोकडाप्रमाणें चरणाऱ्या लठ्ठ भोंदु भिक्षुकाला पंचवीस रुपयें कांहीं कुरकुर न करितां देतात ते २५ रुपये आमच्या दादाना कैलासाचें दार उघडतील काय आणि त्या म्हातारी बिचारी एका पैसा संबंधानेंह वाटतो की आपला पसा सत्पात्री जात आहे किंवा नाहीं! ह्यालाच कां सत्पात्री दान म्हणावयाचें. जिच्या प्रामाणिकपणाची साक्ष कोणालाहि होण्यासारखी होती ती म्हातारी पैशाला महाग होते काय? "सत्पात्रीं दान करावं" ह्या अष्टाक्षरी मंत्रानें दादांना भुलवून टाकलें ह्यांत संशय नाहीं काय ? एकीकडे पितृभक्तीचें दडपण आणि दुसरीकडे असल्या भोंदु लोकाविषयी आलेला तीव्र तिरस्कार यांच्या असल्या ओढाताणींत मी तांग्यांतून खाली केंव्हा उतरलों हें माझें मलाच माहीत नाहीं.

---

# एका अवनत विद्यार्थ्याचे आत्मोद्गार

( लेखकः—सांभप्पा सिद्धप्पा मोगलाईकर, धुळे. )

हाय हाय ! परमेश्वरा काय केलेंस हें ! तुझ्या एकेकाळीं आवडत्या असलेल्या भक्ताला तूं हल्ली, मेल्यावर, यमयातना कशा भोगावयाच्या त्याची त्या मृत्युलोकावर रंगीत तालीम करुन घेतो आहेस कीं काय असें मला वाटतें ! परमेश्वरा, माझी स्थिति पाहून सह्याद्री पर्वताच्या वरील काळ्या पाषाणालासुद्धां अश्रूंची गंगा वाहवावीशी वाटेल, पण तुझ्या हृदयनिर्घृणत्वांत मात्र रतिभरहि विकृति होत नाहीं बा ! पण दोष कोणाचा ? माझ्याच कर्माचा. मग स्वकर्माच्या सदसत्फलांचें खापर ईश्वराच्या माथीं फोडण्यांत असम्य गुन्हा करणाऱ्या मला सहस्रशः धिक्कारिलें तरी तें अपुरेंच पडेल. कर्में पाप स्वताला दुःख व्हावे

मर्दीन करावयाचीं, मग तीं अधर्म्य, अन्याय्य अयोग्य किंवा अघोर असलीं तरी चालतील ; त्यांचीं फळें मात्र चांगलीं इच्छावयाचीं ! मग असा वाईट कर्में करून ईश्वराच्या नांवानें ठणठण उठविणाऱ्या मानवजातींवरील कलंक सारीं नद्यांनीं, सरोवरांनीं महासागरांनीं धुवून काढला तरी जाणें शक्य नाहीं.

अहाहा ! तो काल किती आनंददायक होता. त्या वेळीं माझे मित्र माझ्याजवळ होते. बालगोपाळांच्या गुलाबी गट्टींत होणाऱ्या गमतीदार आनंदानें, गवळयाच्या गराड्यांत गर्जणाऱ्या गोपालकृष्णाच्या आनंदालाहि क्वचित् प्रसंगीं लाजविलें असतें. त्या वेळीं माझा अभ्यास पहिल्या नंबरचा होता. रणभेरीची रणगर्जना ऐकून जसे युद्धावर जाणाऱ्या वीरांचे बाहू स्फुरण पावत तसे परीक्षेच्या वेळीं होणाऱ्या घंटेच्या घणघणाटानें माझें हृदय आनंदानें स्फुरण पावून उडूं लागे.

मी शरीरयष्टीनेंहि कांहीं कमी नव्हतों. मला पुष्कळ पहिलवान ह्मटलेलें अजून स्मरतें. मी सर्वांना प्रिय असें. मी रोज ईश्वरभक्तीत नियमानें कांहीं वेळ खर्च करी. थोडक्यांत मी उन्नतीच्या शिखराजवळ जाऊन पोहोंचलों होतों.

तो दिवस, तो माझा सत्यानाश करणारा दिवस, मला अजून आठवतो. दुधानें भरलेल्या भांड्यांत एकादा विषबिंदु पडावा किंवा गरीब, गोंडस गाईच्या कळपांत व्याघ्र शिरावा तद्वत् माझ्या संतोषमय जीवनांत कुबुद्धि घुसली. “ आधीं बुद्धी जाते व मग शक्ति जाते ” याचें पूर्ण प्रत्यंतर मला आलें. मला कुसंगतीचें स्वरूप ग्रहण लागलें. माझ्या सोबत्यांनी मला वाईट नाटकें व अश्लील सिनेमे पहावयास येण्याचा आग्रह धरीला व मलाहि ‘ आक्काबाईचा ’ फेरा असल्यामुळें त्यांच्या आहारीं पडावें लागलें. त्याच वेळीं मला वाईट कादंबऱ्या वाचण्याची संवय लागली. एकदां लागलेलें व्यसन दुर्दमनीय असतें असा व्यसनशास्त्राचा नियम आहे. दारुड्याचा अथवा चहाभक्तांचा ‘ एकच प्याला ’ अथवा गांजेकसांचा ‘एकच झुरका’ जसा कधींहि संपत नाहीं, तद्वतच माझी ‘ एकच कादंबरी ’ अनेकत्व व अनंतत्व पावली. कादंबरीच्या निशेनें झिंगल्यामुळें मला माझीं विद्यार्थिदशेंतील कर्तव्यें नीट दिसेनात. माझें अभ्यासाकडील लक्ष कमी झालें व मी गर्वांत गेलों. ज्या गोष्टीविषयीं गर्व होतो. ती गोष्ट हातची जाण्याची ‘गर्व’ ही पूर्वसूचनाच आहे.

माझे प्रेमळ आईबाप व गुरुजन यांच्या सदुपदेशाला मीं त्या वेळीं जुमानिलें नाहीं. एकेंकाळीं स्वाभिमानानें व संतोषानें जीवित आक्रमणाऱ्या मला अपमानाचे शब्द ऐकून घेऊन स्वस्थ बसावें लागत आहे. तोंड वर काढण्याची सोय नाहीं. याला कारण ? मनोदौर्बल्य, कुबुद्धि कुसंगति ! धिक्कार ! धिक्कार !!

एक वेळ अशी होती कीं मी डोंगरांतील घाटाच्या वळणावर उभा होतों ह्मटलें तरी चालेल. एकीकडे दरी होती व दुसरीकडे पर्वत होता. तेव्हां माझ्या पुढें दोन मार्ग होते. एक तर उन्नतीचा व दुसरा अधोगतीचा. परंतु मीं दुर्बुद्धीमुळें उन्नतीच्या शिखरापासून जों जों खालीं येऊं लागलों तों ‘बुडत्याचा पाय खोलांत’ या न्यायाप्रमाणें मी दरींतच वाऊन पडलों.

तरीहि कांहीं बिघडलें नाहीं. आतां मी जागा झालों आहें. मला उपरती झाली आहे. मला पश्चात्ताप झाला आहे. सध्या सुज्या पश्चात्तापानें पापें जळतात व पापें जळाल्यानें

मन शुद्ध होतें. हे परमेश्वरा, मज दीनावर दया करून व यांचे अपराध पोटीं घालून मला शक्ति, बुद्धि, उत्साह व यश द्या, अशीं आपल्या चरणीं माझी नम्र प्रार्थना आहे. थोर पुरुषांची स्मृति मला धीर देईल. इतक्या खोल दरींतहि मला आशेचा किरण दिसत आहे. त्याच्या अंधुक प्रकाशांतच कां होईना मी माझ्या अधोगत स्थितींत उत्तम सुधारणा करण्याचा प्रयत्न या क्षणापासून करणार आहें, व परमेश्वराच्या कृपेनें त्यांत यश मिळवीन असा मला आत्मविश्वास आहे. आणि असा प्रयत्न सर्व अवनत विद्यार्थ्यांनी तरी कां करूं नये ?

---

# गु. परांडकरांची वर्तमानपत्रबाजी ऊर्फ असत्यप्रियता ?

( लेखकः—श्री. वि० तु० चौधरी, बी. ए., )

वऱ्हाड—मध्यप्रांत प्रांतिक वीरशैव परिषदेचें कारंजा येथें? — कारंजा—परिषदेचें ता. ८ व ९ मे रोजी अधिवेशन पार पडल्यापासून व बरेंच दिवस वर्तमानपत्रांत गाजलेला नवमतवाद्यांचा " सरसि एकीकरणाचा ठराव अखेर प्रचंड विरोधांतहि बहुमतानें पास झाल्यापासून वृत्तपत्रांतून त्या परिषदेबाबतींत भिरनिराळ्या दृष्टिकोणांतून लिखाण बाहेर पडत आहे. " सरसि एकीकरण "—बाबतींत सुधारणावादी सनातनी व नवमतवादी असा तिरंगी सामनाच कारंजाला होता. कारंजा—परिषदेंत प्रत्यक्ष हजर असणाऱ्या सम्माननीय पाहुण्याकडून तरी निदान सत्य वस्तुस्थितीचें आपणांस ज्ञान मिळेल अशी जर साधारणतः परिषदेला प्रत्यक्ष हजर न राहणाऱ्या वीरशैवांची अपेक्षा असली व त्यांनी त्या दृष्टीनें जर वृत्तपत्रे वाचलीं, तर त्यांत त्यांचा काय दोष ? परंतु त्यांना वस्तुस्थितीचा विपर्यास करणारीं वर्णनें व माहिती वाचावयास मिळाली तर त्यांची केवढी निराशा होते.

सामान्य माणसापेक्षा विशेषतः गुरुवर्गाकडून समाज सभ्यता, निरभिमानवृत्ति, पक्षातीतपणा, वगैरे सद्गुणांची अपेक्षा करतो; परंतु श्री. गुरु परांडकर ह्यांचा ता. २० मे १९३७ च्या 'वी. गर्जने' तील अग्रलेख वाचला ह्मणजे मला निदान परिषदेस प्रत्यक्ष हजर असणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें तरी वरील अपेक्षेची निराशा होते. वऱ्हाड—मध्यप्रांत प्रांतिक परिषदेच्या दृष्टीनें श्री. गु. परांडकर एक सन्मावनीय पाहुणे म्हणजे त्यांची मध्यस्थाची

भूमिका होती व त्यांना परिषदेंत अध्यक्षांचे बरोबरीने सन्मानाने वागविण्यात आलें होतें. परंतु दिला गेलेला सन्मान अनाठायीं होता असें त्यांनी त्रयस्थाची भूमिका सोडून विरोधकांच्या गटांत घुसून जे वस्तूस्थितीचा विपर्यास करणारें लिखाण लिहिलें ह्यावरून जाहीर झालें आहे. परिषदेविषयी विपर्यास करणारे लेख जर बुद्धिपुरस्सर प्रसिद्ध करण्यास आले तर प्रसंगोपात त्यांना आवश्यक तीं उत्तरें देण्यांत येतीलच. तूर्त श्री. गु. परांडकरांनी लेखांतून वस्तुस्थितीचा विपर्यास करणारी जी विधानें केली आहेत त्यांनाच मी उत्तरें देतों.

। अध्यक्षांचे शांतवृत्तीमुळें नवमतवाद्यांचा परिषदेंत सुळसुळाट होऊन त्यांना वाटेल तसा गोंधळ घालण्यास वाव मिळाला.

विरोधी पक्षाच्या हिरव्या-पिवळ्या हस्तपत्र कोणी वूक्षून जाऊन विरोधकांच्या आहारीं न जातां निरपेक्ष व समतोल वृत्तीनें अध्यक्षांनी परिषदेचें काम यशस्वीपणें पार पाडलें—ह्यालाच जर उपरोधिकपणानें श्री. परांडकरांना अध्यक्षांचा भोळा स्वभाव व शांतवृत्ति म्हणावयाची असेल तर त्यांनी तसें खुशाल म्हणावें.

नवमतवाद्यांना परिषदेंत त्यांचे स्पष्ट बहुमत नसतांना अध्यक्षांचे " भोळा स्वभाव व शांतवृत्ती " चा फायदा घेण्याचें व गोंधळ घालण्याचें काहीच कारण नव्हतें.

वीरशैव सनातन्यांनी मात्र परिषदेंत पुरता गोंधळ घालून घेतला. कारंजा-परिषदेंत "वीरशैव एकीकरणाचा " ठराव नवमतवाद्यांच्या कडून येणार हें जाहीर झाल्यापासून जिकडे-तिकडे त्या ठरावाचा बराबाईट गाजावाजा सनातन्यांकडून चालला होता.

एकादी जंगी कुस्ती ठरली असली म्हणजे जशी बरेच दिवसांपासून पहिलवानाची कसरत व त्याला खुराक सुरू असतो तद्वतच पंढरपूरचे कल्लय्यास्वामीसारखे क्षेत्री पंडे प्रचारक प्रांतभर फिरविण्यांत आले. " चला उठा पहातां काय ? आपल्या धर्मावर घाला आला आहे. सवगोलंकार होणार ! चांभार-मांग एक होणार !! कंबरा बांधा, कारंजाला चला, ती चौधरी धर्म बुडवूं पहातो आहे त्याला विरोध करा " अशा तऱ्हेचा प्रचार जारखा १॥—२ महिन्यांपासून रात्रंदिवस सुरू होता. अमरावतीला तर तत्वनिष्ठेमुळे नव्हे तर केवळ व्यक्तिद्वेषानें बेभान झालेले स्वयं-सेवक रात्री १२-१ वाजताहि लोकांना उठवून त्यांचें मत नसताहि केवळ वैयक्तिक वजन व नात्यागोत्याची किंवहुना त्यांनें मयत वडि-लांचे मैत्रीचीहि आठवण देऊन सह्या घेत होते. प्रत्येक घरातील कर्ता पुरुषच काय पण त्याच घरातील लहान सहान पोरासोरांच्या व नोकरा-चाकरांच्याहि सह्या घेऊन १५०-२०० शे वीरशैवांच्या घरांतून फक्त ८९ सह्यांचेंच पत्रक अखेर बाहेर पडलें, व त्यांतहि प्रामाणिक मतविरोधाचे असे हाता-वरचे बोटावर मोजण्याइतकींहि माणसें नाहीत. असो. इतका सगळा जोरांचा आटापिटा करून व काही हस्तपत्रके तयार करून तीं परिषदेचे सुरवातीसच वाटण्यांत आलीं. ता. ८ रोजी सकाळीं श्री. गुरु परांडकर हे अध्यक्षा-समवेत स्टेशनवर उतरल्यापासून ता. ६ मे वीरशैव "गर्जने"चे अंक ज्यांत " धर्मांध नंदन चौधरीची मखलाशी " हा लेख आहे ते अंक सरसहा वाटण्यांत आले. हेतु हाच कीं, माझेविरुद्ध व्यक्तिशः व नवमतवाद्यांचे विरुद्ध साधारणतः परिषदेंतील वातावरण प्रक्षुब्ध व्हावें, व आम्हां सर्व नवमतवाद्यांचेकडे सर्व प्रतिनिधींनी " धर्मद्रोही चांडाळ " म्हणून पाहावें व आमचा परिषदेंत सर्वत्र उपहास

व्हावा एवढाच सर्व खऱ्याखोट्या सनातन्यांच्या उठाठेवींच्या मुळाशीं हेतु होता.

ह्या सर्व विरोधीपक्षाच्या कारवाया व हालचालीकडे नवमतवाद्यांचेंहि लक्ष होतें. त्यांनीहि आपल्या पक्षाच्या पुढाऱ्यांची खानगी बैठक बोलावून तींत पक्षातर्फे जें निरनिराळें " सरांस एकीकरणाबाबत ठराव होते त्या सर्व ठरावांचा मिळून एकच ठराव तयार केला व ज्यांचे ज्यांचे ठराव " सरांस एकीकरणावर आले होते त्या सर्वांनी ह्या ठरावांत आपलें मुद्दे आले

> ## पुढील अंकीं
>
> सोलापुर जिल्हा परिषदेचा वृत्तांत
> आणि
> तींतील ठरावाचें मर्म
> प्रसिद्ध होईल.

आहेत ह्या समजुतीने आपले ठराव व उपसुचना मागे घेतल्या. नवमतवाद्यांचे तर्फे हा ठराव मांडण्याचा मान नागपूरचे सुप्रसिद्ध देशभक्त राजाभाऊ डांगरे ह्यांना द्यावयाचा ठरला व त्या ठरावाला कारंजाचे प्रसिद्ध देशभक्त व परिषदेचें ज. सेक्रेटरी सदाशिव आप्पा बोनदे ह्यांनी अनुमोदन द्यावें व श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, श्री. कल्याणशेट्टी वकील, सोलापूर, शाहीर मुचाटे धुळे, श्री. गुरु. रामशंभु पुराणिक, वगैरे व मी. स्वतः पाठिंब्या-दाखल बोलावें असें ठरलें होतें. ठरावाला विरोधादाखल बोलणाऱ्यांची विषयनियामक कमेटीत यादीहि जाहीर झाली होती. श्री. दादाशास्त्री किर्तनकार, श्री, कल्लय्या स्वामी श्री. फकिराप्पा हेगु वकील, श्री. आवंखे श्री. करवीर आप्पा हेगु, व स्वामी परांडकर हे विरुद्ध भाषण करणार. हे सर्व विषयनियामक कमेटीत ठरुन त्याप्रमाणें जाहिरहि झालें होतें. परंतु श्री. फकिराप्पानीं (आपलें त्या ठरावावर विरोधी भाषण आहे हें माहीत असूनहि) वेळेवर हा ठरावच परिषदेपुढे येऊं शकत नाही अशी "पॉईंट ऑफ ऑर्डर" आणली. अर्थात अध्यक्षांनी त्याची " पॉईंट ऑफ आर्डर" चुकीची आहे असें सांगून परिषदेपुढे ठराव चर्चेला मांडावयाला दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांना परवानगी दिली.

"आम्ही अध्यक्षांनी कांहींहि निर्णय दिला तरी तो मान्य करुं" असें अभिवचन देणारे श्री. फकिराप्पा वकील वगैरे मंडळी अध्यक्षांचे निर्णयाविरुद्ध निषेध म्हणून सभागृह सोडून चालते झाले.

वरीलप्रमाणें खरा प्रकार घडला आहे.

ह्यांत कुणाला अध्यक्षांचे शांतवृत्तीचा व भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन गोंधळ नवमतवाद्यांनी घातला की " अध्यक्षांचा निर्णय आम्ही मान्य करुं " असें आधी अभिवचन देऊन नंतर सभेंतून बाहेर पडणाऱ्या दिखाऊ सनातन्यांनी मांडला हें सुज्ञ वाचकांनीच आपल्या मनाशीं ठरवावें.

(२) श्री. गु. परांडकर लिहितात "सभेंतील तीन चतुर्थांशपेक्षा अधिक लोकांना हे ठराव नापसंत होते. म्हणून ते लोक सभा सोडून गेले. इतकेंच नव्हे तर दुसरीकडे निषेधपर सभा भरविली."

ह्यावर 'वीरशैव गर्जने'च्या मुखपृष्ठावर सभें-तून बाहेर पडलेल्या लोकांनी आपल्या सह्यां-विशीं एक पत्रक प्रसिद्ध केलें आहे, त्यांतील त्यांच्या विधानांना 'स्वागतमंडळ' स्वतंत्रपणें उत्तर देईलच. परंतु त्यावर ४९ लोकांच्या सह्या आहेत व एवढेच लोक सभेंतून बाहेर

पडले होते. श्री. परांडकर ह्यांचा ४९ व्यक्ती-बाच जर परिषदेतील $\frac{3}{4}$ लोक समजत असतील तर त्यांच्याच हिशेबाप्रमाणे सर्व परिषदेंत ६५-६६ च प्रतिनिधी हजर होते असेंच त्यांचें ह्मणणें आहे काय? व ते ४९ उठून गेल्यांवर परिषदेंत १६-१७ च शिल्लक होते असें स्वामी परांडकरांचें ह्मणणें आहे काय? व जर स्वामी परांडकरांच्याच ह्मणण्याप्रमाणे $\frac{3}{4}$ लोक बाहेर पडलें ह्मणजे बहुमत बाहेर पडलें असेंच त्यांचें म्हणणें असलें तर प्रत्यक्ष पाठीशीं बहुमत असतांना छातीठोकपणें अल्पमतवाद्यांचा पाडाव करून त्यांचेवर विजय मिळविण्याचे सोडून त्यांना सभागृहातून गर्भगलिताप्रमाणें पळायवाचीच बुद्धि का सुचली ??

आणि स्वामी परांडकरांच्या मताप्रमाणें जर परिषदेंतून $\frac{3}{4}$ बहुमत बाहेर पडलें व तें जर ४९ लोकांचें होतें तर सर्व परिषद ६५-६६ लोकांची होती. मग दुपारी "एकीकरणाचा ठराव परिषदेच्यापुढे येण्यापूर्वी सकाळचे अधिवेशनात दे. भ. नाबासाहेबांच्या ठरावाला मोर्शीचे श्री. पारसकरांनी उपसूचना आणली त्या वेळीं १९४ विरुद्ध ५१ हीं मतें किंवा इतके प्रतिनिधी कोठून आले ? व ह्या उपसूचनेवर ह्याशिवाय पुष्कळ प्रतिनिधी तटस्थ राहिले होते. तेव्हां ह्या सर्वांची बेरीज तर कितीतरी जास्त होते, व जर ४९ हेच $\frac{3}{4}$ बहुमत की जे परिषदेतून निघून गेले व मग थिएटरांत १६-१७ माणसेंच उरलीं असतील मग श्रीमंत बाबासाहेब पारवेकर जहागिरदार, श्रीमंत रामभाऊशेट कुल्ली, पुळयाची मंडळी, श्रीमंत काशिनाथ आप्पा आडगांवकर, दे. भ. राजाभाऊ डांगरे, श्री. आप्पासाहेब एकलारे व ह्या सर्वांचे बरोबर आलेली प्रतिनिधी मंडळी, मोर्शीचे श्री. बापूराव गावंडे, नागपूरचे तरुण संघाची मंडळी वगैरे लोक हे गेलें कोठे ? नागपूर, वर्धा, मोर्शी, चांदापूर, बडनेर, अमरावती, वाशिम, यवतमाळ, वगैरे ठिकाणाहून २०-२० व २५-२५ प्रतिनिधींचे गट आले होते ते सर्व ह्या विरोधकांचें पाऊल थिएटरबाहेर पडतांच आतल्या आंत अंतर्धान पावले काय? व खुद्द कारंजाचे प्रतिनिधी कुठे गेले होते ? आमचें ह्मणणें इतकेंच कीं, स्वामी परांडकरासारखे सन्माननीय पुरुषहि पक्षांधतेनें वस्तुस्थितीचा विपर्यास करावयास मागे—पुढें पाहात नाहीत !

स्वामी परांडकरांनी लिहिलें आहे कीं " दे. भ. वामणगांवकर व मि. चोधरी ह्यांनी तरी परिषदेला शिस्त लावावयाला पाहिजे होती. " यावरून वी. गर्जनेंत एकाठिकाणी अप्रत्यक्षरीत्या माझा परिषदेचें सूत्रधार व चालक म्हणून उपरोधिकपणानें का होईना पण उल्लेख केलेला दिसतो !

परिषदेचा मला सूत्रधार किंवा चालक म्हटले तर मला त्यांत मुळींच वाईट वाटत नाही, कारण त्यांत बरेचसें सत्य आहे. परंतु आम्ही सभेला शिस्त लावण्याचा प्रयत्न केला नाही किंवा सभेंत शिस्त नव्हती ही गोष्ट साफ खोटी आहे. विरोधकांच्या परिषदेचा बिघाड करावयाचा व तिचा बोजवारा उडविण्याच्या प्रथमपासूनच्या निरनिराळ्या कारवायातून परिषद यशस्वीपणें पार पडली हें एवढेंच एक शिफारसपत्र परिषदेंतील शिस्तीला पुरेसें आहे. स्वामी परांडकरांच्या 'वी. गर्जने'-तील सर्व विधानांना खऱ्या वस्तुस्थितीची वाचकांना जाणीव करून देण्याच्या बुद्धीनें मीं उत्तरें दिलीं आहेत.

फैजपूर-कॉंग्रेस भरण्यापूर्वी विरोधकांचे कडून मोठमोठे मथळे देऊन " फैजपूरचे फजितपूर होणार !! " म्हणून वर्तमानपत्रांतून भविष्यें वर्तविण्यात येत होतीं. परंतु लो. अण्णांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे फैजपूरचें फजितपूर

तर झालें नाहीच पण फत्तेंपूर झाले ! तद्वतच कारंजा-परिषदेचेंहि झालें आहे. ती भरण्यापूर्वी त्या परिषदेसंबंधी निरनिराळ्या स्वरुपाचा विरोधी प्रचार व बातम्या उठविण्यांत येत होत्या. ' वी. गर्जने'तून तर सनातन्यांना धोक्याची सूचनाहि एका प्रवाशाकडून जाहीर करण्यांत आली होती कीं, ' सांभाळा, परिषदेच्या स्वयंपाकव्यवस्थेंतील आचारी सर्व हलक्या पोटजातींतील आहेत. तरी जेवणाऱ्यांनी सावध असावें.' ह्यापेक्षां लोकांना बुजगावण्याकरिता क्षुद्र प्रचार आणखी कोणता असूं शकेल ? आणखी अशाहि वल्गना देंकल्या आहेत कीं जर ही परिषद यवतमाळ अगर अमरावती येथे भरविली असती तर ह्या विरोधकांनीं नवमतवाद्यांस प्रचंड बहुमताने चीत केलें असतें. पण बाल्याबाईस मिशा लावल्याने ती जशी काका होत नाही त्यांचेंच प्रत्यंतर त्यांना अमरावती किंवा यवतमाळ येथे आलें असतें. परंतु त्यांना आपली शंकाच फेडून घ्यावयाची असेल तर कोठेंहि परिषद बोलावून आपली ताकद त्यांनी अजमावून घ्यावी.

इतक्यात सगळ्या विरोधी वादळांतून कारंजा-परिषद यशस्वीपणें सहीसलामत बाहेर पडली म्हणून जर विरोधकांचीं डोकीं ठणकत असलीं व परिषदेविषयी विपर्यस्त बातम्या पसरविल्या जात असल्या तर त्यांत भरविणाऱ्यांचेकडे कसा दोष येऊं शकतो ?

ह्याच वी. गर्जनेच्या मुखपृष्ठावर निषेधकांचें ४९ सह्यांचें जें पत्रक छापलें आहे त्यांतील विधानांचा योग्य तें उत्तर परिषदेचे अध्यक्ष व स्वागतमंडळातील जबाबदार लोक देतीलच. त्यांतील " एकीकरणाचे ठरावाकरितां बहुमत मिळावें ह्मणून प्रतिनिधींची तिकिटें विनामुल्य वाटण्यांत आलीं " असेंहि एक बाल्टचीचें विधान आहे. त्यालाहि योग्य तें उत्तर मिळेलच ! लिंगी सांपडले नाहीत ह्मणून अलिंग्यांनाहि बहुमत करण्याकरितां विनामूल्य तिकीटें वाटलीं. एवढं ह्या विरोधकांनी ह्मटलें नाही हाच उपकार समजावयाचा ??

आपल्याच माणसांना आपण स्वतः जास्तीची तिकीटे खरेदी करून विनामूल्य वाटून ती परिषदवाल्यांनीच वाटलीत ह्मणून उलट तक्रारी करावयाला लावावयाच्या? किंवा प्रतिनिधींच्या तिकीटा सारखी तिकीटें छापखान्यांतून छापवून घेऊन तीं आपापल्या गटांतील माणसांची नांवे लिहून विनामूल्य वाटल्याचा पुरावा ह्मणून कुणालाहि दाखविता येईल ?

स्वागतमंडळातर्फे परिषदेचा जमाखर्च रीतसर प्रसिद्ध झाल्यावर असल्या आरोपांना योग्य तें उत्तर मिळेलच.

कारंजा-परिषदेत नवमतवाद्यांचे बहुतेक सर्व ठराव पास झालेत ह्याचाच अर्थ त्यांचे ह्मणणार बहुमत होतें हा आहे. ह्यातारीने कोंबडा झाकला तरी जसा सूर्य उगवल्यावांचून राहत नाही तद्वतच सनातनी विरोधकांनी आपल्या विरोधाचे स्वरुपाखाली नवमतवादी विचारसरणी दडपण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी ती तर्कशुद्ध व बुद्धिप्रधान धार्मिक समजूतीवर उभारली असल्यामुळें अखेर प्रभावी ठरून बहुमताच्या रूपाने व कृतीनें परिषदांतून प्रगट झाल्याशिवाय राहणार नाही हेंच स्वामी परांडकरांना त्यांचें विषयीचा वैयक्तिक आदर कायम ठेवून आमचें स्पष्ट उत्तर आहे.

# कारंजा परिषद

## विरोधकी बुडबुड्यांचे अंतरंग ! नाक गेले पण अपशकून झाला नाही !!

( लेखकः—श्री. भिमाप्पा शिवलिंगआप्पा मिसे, उमरावती. )

मध्यप्रांत-वऱ्हाड प्रांतिक वीरशैव परिषद कारंजा येथे ता. ८–९ मे १९३७ रोजी भरली. त्यांत मुख्य ठराव ह्मणजे पोटजातींतील शरीर एकीकरणाचा होता हें अगोदरच बहुतेक वृत्तपत्रांतून जाहीर झालें होतें. आणि हा ठराव बहुमताने पास होईल अशी आमच्या उमरावतीनिवासी दिखाऊ सनातनी लोकांना भीति वाटूं लागली, व ह्यामुळे हा ठराव फेटाळल्या जावा ह्मणून ह्यांनी अगोदरपासूनच तशा प्रकारची तयारीहि चालविली होती. पण दुर्दैव त्यांचें कीं, एवढी मोठी तयारी करून निरनिराळी हिरवी, पिवळी हॅंडबिलें काढून आणि त्यावर शहरांतील कांही लोकांच्या सह्या (त्यांच्या मताविरुद्ध देखील) घेऊन ती हॅंडबिलें कारंजा-परिषदेंत वाटली. परंतु एवढेहि करून शेवटी जेंव्हा एकीकरणाचा ठराव बहुमताने पास होतो असा रंग दिसला तेव्हा सभेंतून कांही मंडळी बाहेर पडली पण ठराव बहुमताने पास झाला. त्यांना कदाचित् वाटलें असेल कीं, आपण जर एकदम सर्व बाहेर आलों तर सभा बरखास्त होईल; पण तसे न होतां निमंत्रित पाहुणे व प्रतिनिधी सर्व जागच्या जागीच बसले व आमचे बहुतेक उमरावतीनिवासी (सुधारलेले सनातनी ) फक्त बाहेर येऊन आपल्या बिऱ्हाडीं परत आले. काय करतील बिचारे! त्यांच्याकडून होईल तेवढी खटपट त्यांनी केली. ८ तारखेला संध्याकाळी आपल्या बिऱ्हाडीं अध्यक्षांना बोलावलें व आपली निळी पिवळी हॅंडबिलें त्यांना वाचावयास दिलीं, आणि त्यांना सांगितलें कीं, जवळ जवळ आमच्या उमरावतीतर्फे १५० घरांपैकीं १०१ सह्या आमच्याच फॅवर आहेत. वास्तविक खरी वस्तुस्थिति अशी नव्हती. हॅंडबिलवर घेतलेल्या सह्यांपैकी बहुतेक सह्या बनावट होत्या. त्यांतच कांही सह्या अशा होत्या कीं, सह्या करणारांना बिचाऱ्यांना कांही परिषदेविषयीं माहिती नव्हती. अशा वेळेस आमच्या येथील मंडळी त्यांना ह्मणायची कीं, 'तुह्मांला काय तुह्मी आपल्या सह्या करा, तिथे थोडंच कांही तुह्माला यांव लागतं.' अशा प्रकारें परिषदेच्या सुरवातीच्या अगोदर जवळ जवळ १५ दिवसांपासून रात्री दहा-दहा अकरा-अकरा वाजतां प्रत्येकाच्या घरी जाऊन व निरनिराळ्या तऱ्हेच्या थापा देऊन व नात्यागोत्यांचे वजन टाकून अवध त्या बऱ्या-वाईट प्रकारें सह्या उपटल्या. तरी शेवटी बिचाऱ्यांची निराशा झाली. एवढी जंगी तयारी एकीकरणाचा ठराव येणार ह्मणून केली आणि शेवटी हा

ठराव वेळेवर आणला त्यामुळें नियमबाह्य आहे अशी ओरड केली, ९ तारखेला सकाळी वामणगांवकरांच्या ठरावावर आलेली उपसूचना पास झाली त्यावेळी खरोखर ही उपसूचनाच ह्या एकीकरणाच्या ठरावाच्याहि पुढे १०० मैल होती आणि तेव्हांच आमच्या उमरावतीकरास परिषदेचा खरा रंग कळला. ह्मणूनच जेव्हां सकाळची परिषद आटोपून उमरावतीकर मंडळी जिन्हाडीं आली तेव्हां एकमेकांतच मतमतांतर झालें. एकजण सराईच्या रस्त्यानेच ह्मणत होते की, झालं आतां काय रंग पालटला. दुसरे त्यांच्यापैकीच कोणी ह्मणें कीं चला आपले बेडस् गुंडाळा व मोटार आणा. कोणी ह्मणें नाही नाहीं नवमतवाद्यांना शेवटपर्यंत विरोध करा अशा प्रकारचें उद्गार आमच्या उमरावतीच्या सुधारलेल्या सनातन्यांच्या तोंडून निघाले होते. कांही मंडळी पंढरपूरच्या कल्लय्यास्वामीवरच उखडली कीं त्यांनी अमरावतीकरांना सर्व प्रांतात दौरा करून सनातन्यांचे बहुमत आहे ह्मणून थापा दिल्या व ह्या थापामुळे निष्कारण त्यांना परिषदेला येण्याजाण्यांच्या खर्चात पडून फजित व्हावें लागलें. शेवटी जेवण झाल्यावर एक बैठक बोलावली व ठरविलें कीं, दुपारी एकीकरणाचा ठराव आला की सर्वजण उठून या वा रे वीरशैवांनो, परिषदेला प्रथमच आले तरी कशाला? असा जर तुह्माला तुमच्याचतर्फे निकाल हवा होता तर जशी पांच सात हुंडविळें काढलीं तसेच एक मोठें, पत्रक काढून पोष्टानीच अध्यक्षाकडे पाठवून द्यायच असत आणि आपल्या तर्फेचा निकाल लावून घ्यायचा असता! दुसरें ह्यांचें ह्मणणें असें कीं, जरी नवमतवाद्यांना वाटत असलं की ठराव आपणांस अनुकूल आहे तरी वस्तुस्थिति तशी नव्हती. आमचें असें उत्तर आहे कीं, सर्व परिषदेपैकीं, तुह्मी उमरावतीकर कांही २०-२५ जण .. मंडळी निघून आली ह्मणून कांही सर्वच मते तशी नव्हती. ज्या वेळेस ह्या ठरावावर मतें घेण्यांत आलीं त्या वेळेस हा ठराव सर्वांनुमतें पास झाला व फक्त ७ मतें विरुद्ध पडलीं. ह्यावरून कोणता सुज्ञ असें ह्मणेल कीं ठराव नामंजूर झाला ह्मणून ?

शिवाय ह्या कांहीं लोकांचें ह्मणणें असें कीं, विषयनियामक कमिटींत हा ठराव ज्या वेळेस चर्चेला घेतला त्यावेळेस भवती न भवती होऊन शेवटी घ्यावा असें ठरलें ह्मणूनच ना तुह्मी दुसऱ्या दिवशी विषयनियामक कमेटींत ९ जण विरोधी वक्ते ह्मणून नांवें नोंदविलीं? ह्यावरून मला असें वाटतें कीं आमचा (नवमतवाद्यांचा) अध्यक्षांचें शांतीमुळें सुळसुळाट जर झाला नाहींच पण तुमचा मात्र तुमच्या पाशीं बोलण्यास वक्तृत्व शिल्लक राहिलं नाही ह्मणून तडफडाट झाला व त्या तडफडाटांत तुह्मी सभेतून पळ काढला; व आजीबाईच्या तळतळाटाप्रमाणें हातबोटे मोडून व नाकें मुरडून आकांडतांडव करून विरोधाचा फुगीर बुडबुडा अधिक फुगविण्याचा हास्यास्पद निरर्थक प्रयत्न केला. परंतु त्यामुळें त्यांचा विरोधाचा हेतु सिद्धीस तर गेला नाहीं परंतु उलट ह्या विरोधकांच्या बुडबुड्याचे अंतरंग मात्र व्यक्त झालें व सत्यमेव-जयते ह्या तत्वानुसार सभेचें काम व उद्देश सफल झालें.

वर वर्णन केलेल्या अमरावतीच्या विरोधी गटातील खऱ्या वस्तुस्थितीची माहिती मला असण्याचें कारण एवढेंच कीं, मी उमरावतीहून निघण्यापासून तों ठराव पास होईपर्यंत त्यांच्यातच होतो. परंतु त्यांच्या व्यक्तिद्वेषाला बळी पडून केलेल्या कारवायांची मला चीड आल्यामुळें माझी खरीं मतें मी प्रगट केलीं. अखेर विरोधकांनीं जरी काय साधलें ? बाहेरगांवाहून आलेल्या निरनिराळ्या सन्माननीय प्रतिनिधींना केवळ व्यक्तिद्वेषाला बळी

पडून आपली प्रामाणिक मतें सुधारणावादी असतांना सनातन्याचें फातडें पांघरायला यांपैकी समजदार व सुशिक्षित माणस कशी तयार होतात येवढे मात्र स्पष्ट दाखवून दिलें व अमरावतीचा बदलौकिक करण्याचें श्रेय पदरीं घेतले. वरें इतकेंहि करून परिषदेचा बोजवारा उडाला किंवा नवमतवाद्यांना अपयश आलें तर नाहींच परंतु ज्याप्रमाणें कांही लोकांना स्वतःचें नाक कापून लोकांना अपशकून करण्याची जन्मजात संवय असतें परंतु दुर्दैवानें ह्या ठिकाणी अपशकून तर झाला नाहींच पण विचाऱ्याचें नाक मात्र गमावलें.

---

# वीरशैवांतील चळवळी

## माहेश्वर भक्त मिश्र विवाह

नागपूर येथे ता. ३ जून रोजीं माहेश्वर व भक्त ह्या दोन पोटजातींत मिश्रविवाह मोठ्या आनंदानें पार पडला. सदर विवाहास सर्व नवमतवादी सुधारक व सनातनीय ह्या सर्वांचा पाठिंबा मिळाला. नागपूर येथे सुप्रसिद्ध तानबा स्वामी ह्मणून एक शुद्ध माहेश्वराचें घराणें आहे. यांचे धाकटे चिरंजीव पोमय्या स्वामी यांच्याशी उमरावतीचे ह. भ. प. दादाशास्त्री किर्तनकार यांची कुमारिका अन्नपूर्णाबाई हिचा विवाह झाला. दादाशास्त्री ह्यांचे वडील हे उमरावतीच्या लिंगवंत जातीतील पडोळे घराण्यांतील होते. अर्थात् उमरावतीचे सुप्रसिद्ध नवमतवादी पुढारी श्री. शि. तु. चोधरी, बी. ए., ह्यांच्या वडिलांचे ते सख्खे मामा होते. त्यांना यशी-वैराग्यकडील एक माहेश्वरजातीय पत्नी मिळाली. दादाशास्त्री कीर्तनकार हे ह्या पतिपत्नीचे चिरंजीव होत. दादाशास्त्री यांचा विवाहसुद्धा उमरावतीच्या पाथरकर व मोठा मठ ह्यांच्या पीठावर बसलेल्या पूर्व माहेश्वरजातीय अधिकाऱ्यांच्या पूर्वाश्रमीच्या बहिणीशीं झाला. त्या वेळी सनातनी, माहेश्वरवर्गात मोठी खळबळ उडाली होती. परंतु दे. भ. नानासाहेब बामणगांवर ह्यांच्या सासूबाई श्रीमति चंद्रबाई भुसारे ह्यांच्या मध्यस्तीनें व त्यांच्याच आप्तापैकी श्री. तानबा स्वामी ह्यांच्या मुलांना दादाशास्त्री यांची मुलगी देऊन पूर्वी असलेली अढी एकदम मिटविण्यांत आली. अशा तऱ्हेनें माहेश्वर व भक्त ह्या वर्गात मिश्रविवाह होऊन ह्या दोन पोटजातींत एकीकरण साधल्याचें पुण्य ज्यांनी ज्यांनी घेतलें त्या सर्वांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. सदर विवाहास उमरावतीचे श्री. कुऱ्हे, मेन्डसे, जोगुरे, हुंडेकर, चाकोते, वगैरेनी द्रव्यसहाय्यानें मदत केली; बामणगांवकर ह्यांच्या सासूबाईंनी दोन्ही पक्षावर वजन आणून हा विवाह साधला. नागपूरचे गुरुमूर्ति सिद्धलिंग स्वामी हे दादाशास्त्री ह्यांच्या पत्नीचे मामा असल्यामुळे ते ह्या विवाहास अनुकूल होते व त्यांनी ह्यांत प्रामुख्यानें भाग घेतला हें सांगावयास नकोच. ह्या मिश्र विवाहानें ह्या भागात एकीकरणवादी वीरशैवांस फार मोठें उत्तेजन मिळालें.

इतकेंच नव्हे तर कारंजा—परिषदेंत एकीकरणाला ज्यांनी विरोध केला होता तेच सर्वच ह्या विवाहाचे पुरस्कर्ते बनल्यामुळे ह्या भागांतील एकीकरणाचे विरोधकच नेस्तनाबूद झाले. ह्या विवाहामुळें वीरशैवांतील पोटजातींत अन्नोदक व्यवहारच नव्हे तर पोटजातींत मिश्रविवाह होऊन सर्व वीरशैवमात्र एक झाल्याचें चित्र लवकरच दिसेल ह्यांत संशयच नाही. म्हणूनच श्री. दादाशास्त्री कितनकार ह्यानंतर एकीकरणविरोधी राहिले नसून एकीकरणाचे कर्ते पुढारी बनले म्हणून सर्व एकीकरणवादी व नवमतवादी आपले पुढारीपण त्यांना देतील तर तें घेणारच नाहीत असें नाही. दादाशास्त्री हे नवमतवादी श्री. चौधरीचे मामा असल्यामुळे एकीकरणाचें पुरस्कर्तृत्व सहजगत्याच त्यांच्याकडे जातें. अशा प्रकारें हा अनुकरणीय विवाह ज्या दोन कुटुंबांत घडला, ज्यांनी घडविला व ज्यांनी सर्व मतभेद विसरून ह्या विवाहास सहाय्य केलें त्यांचे आम्ही पुन्हा एकदा अभिनंदन करतों, व ह्या वधूवरास दीर्घायुरारोग्य चिंतून त्यांचा संसार सर्व दृष्टीनें परमात्मा सुखावह करो अशी त्याची प्रार्थना करतों.

---

## शोचनीय निधन

हिंगणघाटचे बी.के. उर्फ बापुसाहेब हिंगमिरे विड्हिंगमास्तर ह्यांच्या वृद्ध मातोश्री शुक्रवार ता. ४ जून रोजी शिवैक्य पावल्या त्या बरेच दिवसापासून आजारी होत्या. मरणसमयीं, त्यांचें वय ७८ वर्षाचे होतें. ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो.

## साखरखेर्डा मठसंस्थान

कारंजा-परिषदेच्या वेळी साखरखेर्डा मठसंस्थानाचे पटाविषयी खालील सन्माननीय वीरशैव पुढाऱ्यांचें सहीचें पुढील हस्तपत्रक वाटण्यांत आलें. सर्वच वीरशैव बांधवास विनंती करण्यात येतें कीं, श्री पशुसिद्धस्वामी संस्थान साखरखेर्डा येथील संस्थानचें गादीवरील पीठाधिकारी थोडे दिवसापूर्वी शिवैक्य झाल्यामुळे त्या संस्थानचे गादीवर परंपरा चालत आलेल्या रीतीप्रमाणें नवीन पट होण्याची जरुरी असून त्या गादीवर संस्थानच्या योग्यतेला शोभेल असा सुशिक्षित योग्य बटूची योजना सर्वानुमतें करण्याचा विचार आहे. त्याबद्दल काशी, सोलापूर, हुबळी, भागाकडे पत्रव्यवहार सुरु आहे. तरी संस्थानचे सर्व प्रेमी वीरशैव बंधु ह्या कार्यास आर्थिक व शारीरिक दृष्टया हस्तें परहस्तें सर्व प्रकारें मदत करतील अशी आशा आहे.

### आपले मत्र

दत्तात्रेय कृष्णराव देशमुख जहागीरदार पारवा यवतमाळ, ईश्वरआप्पा गणाप्पा टाले जालना, काशीनाथ शंकरआप्पा घाके आडगांव, रामचंद्र विठोबा शेठ कुल्थी रोहिणखेड, मलकाप्पा सदाशिवाप्पा चोंदरे चिखली, गोविंद रंगाप्पा चोंदरे चिखली, बाबुआप्पा गुंडाप्पा करणें कोकणा, लक्ष्मण सिद्धलिंग मादोला, हरेश्वर उमाकांत आया खामगांव, शिवशंकर ईश्वरआप्पा चिंचोली मादोला, घोंडाप्पा नारायण आप्पा तोंडे चिखली, भाऊराव देवाप्पा विभुते कारंजा काशीनाथआप्पा कारंजकर बाळापूर, कोंडाप्पा तुकारामआप्पा मिठकरी बार्शीटाकळी, शिवाप्पा नथाप्पा लामबाडें सातगांव, गोविंद गोपाळ शेठ माकोडी, गणाप्पा पवारकर कळमेश्वर, मार्तंडआप्पा गुणाप्पा कसेकर,

---

## बालसन्मित्राचा वाढदिवस

मालवणचे एक बालवाङ्मयसाहित्यसेवक श्री. रा. मा. मिसाळ यांचें बालवाङ्मय आज पंचवीस वर्षे सान्या महाराष्ट्रभर प्रसिद्ध असून त्यांच्या बालसन्मित्राचा संचार मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व भागांत आहे.

मालवण येथें ता. १०-५-३७ रोजीं बालसन्मित्राचा चौथा वाढदिवससमारंभ श्री. रा. बा. सावंत यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. त्या वेळीं सात-आठशे मंडळी हजर होती.

या समारंभाच्या वेळीं श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि, सरदार माधवराव किबे, श्री. काकासाहेब कालेलकर, श्री. एस. के. पाटील श्री. य. वि. केतकर इ. निरनिराळ्या दर्जाच्या थोर थोर लोकांकडून आलेले अनेक संदेश वाचून दाखविण्यांत आले. त्यावरून, तसेंच त्यांच्या वेळीं विद्वान् स्त्रीपुरुषांनीं केलेल्या भाषणांवरून श्री. मिसाळ यांच्या कर्तबगारीची व सेवा कामगिरीची कल्पना सभेस असलेल्या लोकांस चांगलीच पटली.

श्री. मिसाळ यांच्या हातून बालवाङ्मयाची सेवा अखंड घडो आणि त्यांच्या बालसन्मित्राची उत्तरोत्तर भरभराट होवो !

---

## चुकीची दुरुस्ती

'वी. संजीवनी'-च्या गेल्या अंकांत 'कार्य-परिषदेचे साग्र वृत्तां'-त पृष्ठ २५८ स्तंभ १ वर खालून दुसऱ्या ओळीच्या वर पुढील ओळ नजरचुकीमुळें सुटली आहे.

"पाठिंबा दिला. श्री. डी. बी. अनवाणे यांनी ठरावाला "

'स्वामी मावलगावकरांचें अभिनंदन' ह्या शीर्षकाखालील चवथी ओळ वाचल्यानंतर या छिलेली व. नजरचुकीनें सुटलेली ओळ वाचावी. व नंतर पुढील ओळ वाचावी.

## कवलापूरचे

अखिल भारतीय वीरशैवमाळी समाजोन्नति परिषदेचे ३रे अधिवेशन यशस्वीपणे पार पडलें.

चित्रदुर्ग स्वामींशी वीरशैवमाळीसमाजाचे पुढारी श्री. कुदळे यांनी केलेल्या पत्रव्यवहारास मान्यता:—

### परिषदेचा स्वामींना सवाल.

( बातमीदाराकडून )

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें कवलापूर सं. सांगली येथें ता. २९ व ३० मे रोजी परिषदेचें अधिवेशन मोठ्या थाटामाटानें पार पडलें. परिषदेकरितां मुद्दाम मंडप उभारण्यांत येऊन गांवच्या प्रमुख रस्त्यातून निशाणें व तोरणें लाविलीं होतीं. ठिकठिकाणी कमानी उभारून त्या शोभेंत अधिक भर टाकली होती. मंडपांत एक उंच सिंहासन करून त्यावर अध्यक्ष विराजमान झाले होते. त्यामुळे मंडपांत अपूर्व शोभा आली होती.

कार्यक्रमांत ठरल्याप्रमाणें ता. २९ रोजी सकाळी परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. महादेवप्पा गुरप्पा जतकर हे ठिकठिकाणच्या पानसुपाऱ्या घेत घेत मोटारीनें आले. गांवच्या वेशींतून मिरवणूक काढण्याची स्वागतमंडळाने आगाऊच तयारी करून ठेवली होती. बरोबर १० वाजतां निघालेली मिरवणूक अध्यक्ष उतरण्यास केलेल्या जागीं येण्यास २॥ तास लागले. अध्यक्षांना निरनिराळ्या जिल्ह्यांतून पानसुपारीची आमंत्रणें केलीं होतीं त्यामुळें ता. २१ पासून सोलापूर स्टेट, सातारा जिल्हा, बेळगांव जिल्हा, वगैरे . . . . पानसुपाऱ्या घेण्यांत त्यांचे बरेच दिवस गेले. त्यावरून माळीसमाजांतील वाढता उत्साह दृग्गोचर होत आहे.

तारीख २९ रोजी संध्याकाळी बरोबर ४-१५ ला अधिवेशनास सुरवात झाली. प्रथम स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्री. कुंडलिकराव यांचे स्वागतपर भाषण झालें. अध्यक्षाची रीतसर

दिवस होऊन हारतुरे झाल्यावर संदेशवाचन, पुढे अध्यक्षांचें भाषण १। तास झालें. त्यानंतर राव डी. बी. माळी व श्री. कुदळे यांचीं भाषणें होऊन पहिल्या दिवसाचें काम संपलें.

## दिवस दुसरा.

दुसरे दिवशी सकाळी ९ वाजता परिषदेस सुरवांत झाली. रात्री विषय-नियामक मंडळीनें पास केलेले ठराव क्रमशः परिषदेपुढे घेण्यात येऊन ४ ठराव पास झाले, व सकाळचे काम संपविलें. दोन प्रहरी कवलापूरापासून ९ मैलावर असलेल्या तासगांव येथे प्रो. विश्वनाथराव माळी यांनी अध्यक्षांना पानसुपारीचें आमंत्रण दिलें होतें. तिकडे पानसुपारीचा समारंभ आटोपून अध्यक्ष परत आलेवर संध्याकाळी पुन्हा चार वाजता परिषदेच्या कामास सुरवांत झाली. त्या वेळी त्याच दिवशी परिषदेस आलेले संदेश वाचून दाखविण्यात आले. ते संदेश 'सुदर्शन' पत्राचे संपादक श्री. कल्याणशेट्टी व श्री. चनबसाप्पा झापुरे वागदरी यांचे होते. परिषदेचें काम रात्री ८ वाजेपर्यंत चालून बरेच महत्वाचे ठराव पास करण्यांत आले. ते ठराव पुढील अंकीं प्रसिद्ध करण्यांत येतील.

परिषदेस सोलापूर,कोल्हापूर,सातारा, विजापूर, बेळगाव वगैरे भागातून स्त्री पुरुष मिळून सुमारे ५००-६०० प्रतिनिधी हजर होते. व्यासपीठावर श्री. एस. माळी वकील बेलहोंगल, राव. डी. पी. माळी, एस एंस कुदळे, विरावार माळी, बागलकोटे, इदाते, गोविंदराव माळी, शंकरराव माळी बी. आर. माळी रामचंद्र माळी वगैरे उपस्थित होते.

कर्तव्यच्युत अशा विरक्त व पंचाचार्य स्वामींना मान न देण्याबद्दल मंगळवेढयाचे परिषदेत ठराव पास झाला आहे. त्या ठरावास अनुसरून वीरशैव माळीसमाजाचे कर्तुत्ववान् पुढारी श्री. कुदळे ह्यांनी चित्रदुर्गचे स्वामी श्रीमन्महाराज निरंजन जगद्गुरु श्री मुरघा राजेंद्र यांच्याशी सहकार्याचा हात पुढे करून स्वामी कर्तव्य करण्याविषयीची विनंती केली होती. परंतु त्या स्वामींनी आपलें कर्तव्य पायाखाली तुडवून वीरशैव माळी समाजास मोठा धक्का दिला आहे. श्री. कुदळे व स्वामी यांचे दरम्यान जो पत्रव्यवहार झाला आहे तो श्री कुदळे यानी परिषदेपुढे मांडला व परिषदेने त्यास मान्यता दिली. स्वामींनी केलेलें कृत्य अनुचित आहे असा ठराव पास करून अध्यक्षांनी स्वामी बरोबर पुन्हां पत्रव्यवहार करून अनुचित कृत्याला अधिक खुलासा द्यावा व त्यांतून स्वामींचें कृत्य निषेधास पात्र दिसलें तर उघड निषेध करावा.

अशी ठरावास पुस्ती जोडण्यात आली. त्या ठरावावर अनेकांची भाषणें झाली. व प्रत्यकाचे तोंडून स्वामी-कृत्याचे आश्चर्य व्यक्त झालें.

चालू अधिवेशनास माळीसमाजातील अनेक व्याख्याते उपस्थित होते. त्यामुळे प्रत्येक ठरावावर अनेकांची व्याख्याने होऊन ठरावाची उपयुक्तता पटविण्यांत आली. कोणताहि ठराव घाईनें पास न करता प्रत्येक ठरावावर चांगली चर्चा झाली. त्या कारणाने परिषदेचें वातावरण शेवटपर्यंत उत्साही होतें. या परिषदेमुळें वीरशैव माळीसमाजांत लौकर सुधारणा घडून येईल अशी प्रत्येकास खात्री वाटल्यास नवल नाही.

---

# वीरशैवसंजीवनी

वर्ष ३ रें ) ता० १ जुलै १९३७ ( अंक १३वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र अमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नांची त्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वर्गणीदार सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
अमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याणशेट्टी, बी. ए. एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठीतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवी वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

वीरशैवसमाजांतील

# पाहिला आदर्श व अभिनंदनीय प्रीतिविवाह

नवमतवाद्यांचे पुढारी



श्री. वि. तु. ऊर्फ बाबुराव चौधरी बी ए.,

'वी० संजीवनी'-च्या लेखिका



सौ. रत्नप्रभा चौधरी.

श्री. बाबुराव चौधरी बी.ए., व कु. रत्नावती मल्लाप्पा वुन्हें ह्यांचा विवाह नागपूर येथे ता. १७-६-३७ रोजी झाला.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—॥ जुनें वर्ष पांचवें ॥—

# वीरशैव संजीवनी

| | |
|---|---|
| ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥ | मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् |
| पारमेश्वरागम प. १ (५६) | भगवद्गीता अ. ९ (३२) |

नवें वर्ष २ रें ) मिति ज्येष्ठ व० ७ शके १८५९ ( अंक १३ वा.

# सोलापूर-जिल्हा-वीरशैव-परिषद्

## बार्शी येथील ३ रें यशस्वी अधिवेशन

[ बार्शी येथे ता० ५ व ६ जून रोजी सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेचें अधिवेशन बेळगांव येथील लिंगराज कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. एस्. सी. नंदीमठ, एम्. ए., पी एच्.डी., यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रीतीने पार पडलें. या परिषदेचे स्वागताध्यक्ष व अध्यक्ष ह्यांचीं भाषणें व परिषदेंत मंजूर झालेले ठराव पुढें दिले आहेत ]

सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेचें स्वागताध्यक्ष

### श्री. गणपत रामलिंग ऊर्फ काकासाहेब झाडबुके यांचें भाषण

प्रिय प्रतिनिधि, बंधुभगिनींनो आणि इतर सद्गृहस्थहो,

आज या ठिकाणीं सोलापूर-जिल्हा-वीरशैव-परिषदेचें तिसरें अधिवेशन भरत असून ह्या प्रसंगी आपणा सर्वांचें हार्दिक स्वागत करण्याचें भाग्य मला लाभलें याबद्दल मी आभारी आहें.

## शिक्षण

हल्लीचा काल हा विशेषतः सामुदायिक जागृतीचा काल आहे व ह्मणून सामुदायिक रीतीनें आपल्या समाजाच्या स्थितीचें निरीक्षण करून घेऊन, त्यांत सुधारणा कोणत्या प्रकारें करतां येईल, अभ्युदय ह्मणजे व्यावहारिक उन्नति कोणत्या प्रकारें होईल, याचा विचार अशा परिषदा भरवून होणें अत्यंत जरूरीचें भासतें. समाजाचे उन्नतीचे मार्ग, एका गांवास जाणाऱ्या जशा दाहा वाटा असतात त्याप्रमाणें वेगवेगळे आहेत. यापैकीं शिक्षण हा एक मार्ग आहे. शिक्षण हें व्यक्तीच्या किंवा समाजाच्या सुखाचें साधन आहे. खरें शिक्षण ह्मणजें केवळ लिहितां-वाचतां येणें अगर उत्कृष्ट भाषाज्ञान होणें हें नव्हे. भाषाज्ञान हें केवळ साधन आहे आणि त्या साधनाच्या द्वारें व्यक्तीच्या काय किंवा समाजाच्या काय, अभ्युदयाकरितां नाना प्रकारचें आधिभौतिक,— अध्यात्मिक वगैरे ज्ञान संपादन करणें हेंच ध्येय असावयास पाहिजे. या दृष्टीनें विचार केल्यास समाजांतील सर्व मुलामुलींना प्राथमिक शिक्षण मिळालेंच पाहिजे. पण आपल्या समाजाकडे पाहिलें तर कींव येण्यासारखी स्थिति आहे. आपला समाज या बाबतींत पुष्कळ मागे आहे. ह्मणून आपल्या समाजांत जेणेंकरून साक्षरता वाढेल असा प्रयत्न निश्चयानें परंतु चिकाटीनें प्रथम व्हावयास पाहिजे. दुय्यम शिक्षणहि व्यवहारापुरतें सर्वास-मुलांस व मुलींस-मिळेल अशी तजवीज करणें जरूर आहे. यानंतरच्या शिक्षणासंबंधानें मात्र शिकणाराची आवड, बुद्धिमत्ता, लायकी वगैरे पाहून केवळ बौद्धिक उच्च शिक्षण द्यावयाचें किंवा औद्योगिक अगर व्यापारविषयक उच्च शिक्षण द्यावयाचें हें ठरविलें पाहिजे. अशा रीतीनें शिक्षणक्रमाची निवड करून, बौद्धिक औद्योगिक, व्यापारविषयक केंद्रें काढीज करण्याची पात्रता आपल्या समाजाच्या विद्याव्यांत उत्पन्न केल्यास व लहान लहान धंदे शास्त्रीय पद्धतीनें पण घरगुती उद्योगानें व मोठे उद्योगधंदे जॉइंट स्टॉक पद्धतीनें करण्याचें शिक्षण दिलें गेल्यास सर्व तऱ्हेच्या शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें होईल, व त्याचा परिणाम कांहीं अंशीं तरी बेकारी निवारण्यावर होईल.

## स्त्रीशिक्षण व धर्मसुधारणा

शिक्षणाचा प्रसार स्त्रीपुरुषांमध्यें सरसहा झाला ह्मणजें त्यांची विवेकशक्ति जागृत होईल, व धर्मामध्ये इष्ट सुधारणा घडवून आणणें सोपें होईल. शिक्षणाभावीं-विशेषतः स्त्रियांमध्यें - कूपमंडूकवृत्ति दिसून येते. ती शिक्षणानें नाहींशी होऊन सारासार विचार करण्याची पात्रता त्यांच्यांत येईल. आचार व विचार कालमानाप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें बदलत जातात असें प्रत्यहीं आपल्या अनुभवास येतें. धारीए रक्षण करतो तो धर्म अशी एक धर्माची व्याख्या आहे. तिचें तात्पर्य तरी आचारांची परिवर्तनशीलता हेंच आहे. आपद्धर्म ह्मणून धर्मांत जे अपवाद सांगितलेले असतात त्यावरूनहि परिस्थितीप्रमाणें आचारांत फरक करणें शास्त्रास धरूनच आहे असें दिसून येते. "नीतीला अगर व्यवहाराला विरोधी अशी जर एखादी गोष्ट धर्माच्या नांवाखाली करावी लागत असेल तर केवळ धैर्याच्या बुद्धीनें अथवा आळसानें अगर निसर्गपणें वागतां यावें ह्मणून जर कोणी धर्मसंबंधें तोडूं लागेल, तर तें त्याचें करणें योग्य होणार नाहीं [illegible] फरक करण्यासंबंधींच्या योग्य उदाहरणाचा दाखला द्यावयाचा झाल्यास परदेशगमनांतील धार्मिक आडकाठी दूर करणें हा देतां येईल. कारण व्यावहारिक उन्नतीस त्याची आवश्यकता आहे. परदेशगमन करूनहि, परदेशास जाणारा मनुष्य अभक्ष्य भक्षण अगर अपेय पान करणार नाहीं तर त्यास धार्मिकदृ

प्रायश्चित्ताचीहि जरुरी नाहीं; पण सुधारलेल्या पद्धतीनें प्रायश्चित घेतल्यानें काम भागत असल्यास कार्याकडे नजर देऊन पुराणमतवादींनी व नवमतवाद्यांनीहि थोडी सहिष्णुता दाखविली पाहिजे. सारांश, केवळ स्वैराचाराकरितां आचारबंधनें झुगारून द्यावयाची ही वृत्ति जशी त्याज्य आहे तशीच 'तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणः क्षारं जलं का पुरुषाः पिबन्ती' या न्यायानें केवळ वाडवडिलांनीं विहीर खोदलेली आहे म्हणून तिचें खारें पाणीच पीत राहणें हीहि गोष्ट अदूरदर्शीपणाची आहे.

### पोटजातींचें एकीकरण

धर्माचें तात्त्विक स्वरूप बहुधा शुद्ध असतें. त्याप्रमाणें वीरशैवधर्म हा अष्टावरणाचे अधिकार मिळालेल्यांना समान मानणारा असून त्यामुळें त्यांच्यांत हल्ली उच्चनीच असे भेद उत्पन्न झाले आहेत; व पोटजाती अनेक झाल्यामुळे व त्यांचें संघटन होणें कठीण झालें आहे. ह्या बाबतींत सुधारणा घडवून आणण्याची जबाबदारी विचारवंत अशा माहेश्वरवर्गावर आहे. तरुण पिढी समाजाला पुढें घेऊन नेण्याचें काम करीत आहे व म्हणून खऱ्या सनातनी लोकांचें काम प्रसंगविशेषीं उपयोगांत आणल्या जाणाऱ्या ब्रेकांप्रमाणें आहे, एंजीन कायमचें बंद करण्याचें नाही. म्हणून नव्या किंतु योग्य विचाराच्या वाऱ्यासहि उभे न राहणारांची उपेक्षा करून, विचारी असा जो मध्यमवर्ग आहे त्याची सहानुभूति व तरुणांची मर्यादित घडाडी अशा जोडगोळीनें सध्या हें पोटजातीच्या भेदबुद्धीचें पिशाच्च नाहींसें करून पोटजातीचें एकीकरण केलें पाहिजे.

### आर्थिक उन्नति

समाजाची सर्वांगीण उन्नति होण्याकरितां ज्या ज्या गोष्टी करणें अवश्यक आहे त्यांत आर्थिक उन्नतीचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे व ती घडवून आणण्याकरितां चिकाटीच्या व नेटाच्या प्रयत्नाची जरुरी आहे. आपला भाग विशेषतः कृषिप्रधान असल्यामुळें आपल्या समाजांतील बराचसा वर्ग शेतकीचा धंदा करीत आहे. शिवाय आपल्या समाजाची नैसर्गिक वृत्ति व्यापारी असल्यामुळें आपल्या समाजांत व्यापारी वर्गहि बराच आहे. तथापि त्यांची व्यापाराची दिशा मर्यादित स्वरूपाची आहे. साधारणपणें अडतीचा धंदा व फुटकळ किरकोळ धंदा करणारा वर्ग बराच आहे. हल्लीच्या व्यापारी क्षेत्रांत, विशेषतः परदेशी मालाच्या आयातीने अत्यंत घडामोड झालेली आहे. आणि त्यामुळें व्यापारधंदा यशस्वीपणें करून दाखविणें हें त्या धंद्यांतील विशिष्ट ज्ञान घेतल्याशिवाय दिवसेंदिवस शक्य होणारें नाही. व्यापारी शिक्षणाच्या मिळालेल्या ज्ञानावर धडाडीनें व्यवहार करणारे काही कर्तृत्ववान् गृहस्थ आपल्या समाजांत आहेत. तथापि त्याहून आणखी कर्तृत्ववान् माणसें पुढे यावयास पाहिजेत.

व्यापार या शब्दाचा सूक्ष्मपणें विचार केला तर, आपल्या नित्याच्या राहणीस लागणाऱ्या कापड, साखर, रंग, कांच, आगपेटी, साबण, कागद, कातड्याच्या जिनसा, स्टेशनरी, खेळणी वगैरेचाहि समावेश यांत होतो. ह्या वस्तू गरिबापासून श्रीमंतास कमीजास्त प्रमाणात, नेहमीं लागणाऱ्या आहेत. या मालांचे विक्रीचे आंकडे पाहिले तर हा माल जितक्या मोठ्या प्रमाणांत इकडे तयार व्हावयास पाहिजे तेवढा तो होत नाही. त्यांतील बऱ्याचशा मालाचा खप परदेशी मालाचा होत असतो. हेच जिन्नस आपले आपण वापरण्याकरितां तयार करणें यांत काही विशेष आहे असें नाही. तथापि, तें आपणाकडून अद्याप होत नाहीत ही गोष्ट खरी. वरील वस्तूंची अगर जिनसांची पैदास करण्याकरितां व हल्लींच्या

बाजारच्या चढाओढींत त्या टिकविण्याकरितां, नवीन नवीन धंदे व कारखाने कसे चालवावे व टिकवावे याचें विशिष्ट शिक्षण आपल्या समाजानें घेतलें पाहिजे व धंद्यास लायक अशी तज्ज्ञ माणसें तयार केलीं पाहिजेत. केवळ आपल्या शेतांत अगर भागांत पिकलेला माल बाजारांत आणून विकणें अगर आपल्या प्रांतांत न पिकणारा माल दुसऱ्या प्रांतांतून आणून येथें विकणें यास व्यापार हें जरी नांव असलें तरी त्याची किंमत व्यापारी इतिहासांत बऱ्याच खालच्या नंबरावर लागते.

चैनीचे पदार्थ सोडून दिले तरी नित्योपयोगी लागणाऱ्या वस्तूंची पैदास कारखानें वगैरे काढून व्हावयास पाहिजे. त्याशिवाय हल्लींच्या बेकारीला आळा बसून आर्थिक उन्नति होऊं शकणार नाही. पोटास महाग झालेला मनुष्य अगर समाज जगांत कांहीहि काम करुं शकत नसतो ही गोष्ट निश्चित आहे. आणि गरीबवर्ग जगविण्याचा ह्मटलें, तर वरीलप्रमाणें व्यापाराचा दृष्टिकोन वाढवून त्यांची तरतूद केल्याशिवाय हा प्रश्न मिटण्यासारखा नाहीं. तेव्हा आपल्या वर्गानें याहि प्रश्नाचा कळकळीने विचार करावयास पाहिजे.

कोणता माल कोणत्या देशांत खपण्यासारखा आहे, वाहतुकीचीं कोणतीं साधनें किफायतशीर होण्यासारखीं आहेत, कोणता माल कोठून आणणें श्रेयस्कर आहे; तो आणल्यानंतर त्याचें पक्क्या मालांत रूपांतर करण्यास कसल्या शास्त्रीय ज्ञानाची जरूरी आहे व त्यास काय खर्च येतो वगैरे गोष्टींचें यथार्थ ज्ञान असल्याशिवाय मोठ्या प्रमाणावर यांत्रिक पद्धतीनें चालविलें जाणारे उद्योगधंदे किफायतशीर चालवितां येणार नाहीत, व यशस्वी करून दाखवितां येणार नाहीत. आपल्या समाजाचा पिढीजात धंदा व्यापार आहे व तो कुशलपणें करून दाखविण्यांत स्वारस्य आहे. औद्योगिक बाबतींत सुधारणा झाली पाहिजे व ही गोष्ट लक्षांत आणून त्या दिशेनें प्रथमचा प्रयत्न लोकप्रिय कै. रावबहादूर अप्पासाहेब वारद यांनी सुरु करून दाखविला आहे व त्या प्रकारें त्यांनी आपल्या समाजास एक प्रकारचा धडा घालून दिला आहे. तेव्हा ही गोष्ट विचारांत घेऊन आपला समाज या बाबतींत कांहीतरी भरीव कामगिरी करील अशी आशा आहे.

दुसरा प्रश्न शेतीच्या धंद्याचा. सुमारें सन १९३१ सालापासून धान्यांच्या किंमती अत्यंत उतरल्यानें सरकारधारा भागवून आपला उदरनिर्वाह थेमतेम चालविणें हेंहि शेतकरीवर्गास कठीण होऊन बसलें आहें. त्यांतहि दुष्काळासारख्या आपत्ति ओढावत आहेत. धंदेशिक्षणासंबंधी वर जें ह्मटलें आहे तेंच येथेहि ह्मणतां येईल. शेतकीच्या धंद्याचें विशिष्ट ज्ञान संपादन केलेली माणसें पुढे येतील, तर शेतीचा धंदा उर्जितावस्थेस येऊन पिकाची पैदास वाढून कांही अंशानें कांही लोकांचा पोटापाण्याचा प्रश्न सुटेल. सुधारलेल्या देशांतील शेती करण्याची तऱ्हा व पिकें काढण्याची पद्धत ही आपल्यापेक्षा पुष्कळच सुधारलेली आहे. आपल्या प्रांतातील जमीनींच्या कांही भागाचा मगदूर, उंची पीक काढण्या इतका नसला तथापि, आधुनिक सुधारलेल्या पद्धतीचें शिक्षण घेऊन शेती केल्यास व चांगल्या तऱ्हेचें बीं बियाणें वापरल्यास, तसेंच, आधुनिक पद्धतीची व जास्त कामें देणारीं औतें वापरल्यास शेतकीवर हल्लीहून जास्त माणसांची गुजराण होऊं शकेल व त्या प्रकारें समाजाची आर्थिक उन्नति होऊं शकेल असें ह्मणण्यास जागा आहे. या साधनांनी आपलें साध्य प्राप्त करून घेण्याकरिता महाराष्ट्र व वऱ्हाड प्रांतांतील पुढाऱ्यांनी, कर्नाटकांतील फंडाप्रमाणें मोठा शिक्षण फंड काढणे जरूर आहे. पीठाधीपति,

मठपति व त्यांच्या खालील अधिकारी अशी जी धार्मिक अधिकारीपरंपरा आपल्या समाजांत रूढ आहे ती नष्ट न करितां तिचीच पुनर्घटना करून ती समाजोन्नतीला पोषक होईल अशी योजना करणें समाजहितदृष्ट्या अवश्यक आहे. अशा रीतीनें अनेक तऱ्हेची कामगिरी आपल्या परिषदेस करावयाची आहे. आपल्या सुदैवानें आपणांस डॉ. नंदीमठासारखे विद्वान्, बुद्धिमान् व कार्यक्षम कर्णधार लाभले आहेत, अखिल भारतीय शिक्षण परिषदेसारख्या अगर अखिल धर्मपरिषदेसारख्या जबाबदारीच्या संस्थेच्याहि अध्यक्षांचें काम करण्याची पात्रता आपल्या नियोजित अध्यक्षांच्या ठायीं आहे, अर्थात् त्यांच्या अनुपमेय धुरीणत्वाखालीं आमच्या परिषदेचें काम विचार व कृति या दोन्ही गोष्टींनी वर्णन करण्यासारखें होईल यांत तिळमात्र संदेह नाही ; ह्मणून आजच्या आपल्या परिषदेचें अध्यक्षस्थान त्यांनीं स्वीकारावें अशी सूचना मी स्वागत-मंडळातर्फे करतों.

---

## सोलापूर-जिल्हा-वीरशैव-परिषदेचे अध्यक्ष

# डॉ. नंदीमठ यांचें महत्वाचें भाषण

विनयपूर्वक प्रस्तावना केल्यावर अध्यक्ष ह्मणाले:-

पूर्वीच्या कोणत्याहि वेळेपेक्षा आज आपणांमध्ये संघटनेची विशेष आवश्यकता आहे. आपणांस संघटन निरनिराळ्या तऱ्हांनीं करितां येईल, परंतु त्यामध्ये प्रमुख ह्मणजे राजकीय, धार्मिक, सामाजिक, व आर्थिक दृष्टीनें आपणांत संघटना होणें हाच सध्यांच्या उन्नतीचा मार्ग आहे, हें आपणा सर्वांस मान्य होण्याजोगें आहे.

सध्यांच्या धकाधकीच्या काळांत राजकीय गोष्टीमध्ये संघटनेची अवश्यकता किती आहे हें आपणांस निराळें सांगणें मुळीच नको. हिंदुस्थानांत किती पक्षोपपक्ष आहेत? प्रत्येकजण आपापल्या परीनें संघटित होण्याचा प्रयत्न करीत आहे. परंतु यांत जर सर्व पक्षांचें संघटन होईल तर किती आनंदाची गोष्ट आहे! समाज हा ज्याप्रमाणे अनेक व्यक्तींचा बनला आहे; त्याप्रमाणें राष्ट्र हें अनेक समाजांचें बनलें आहे, व ह्मणून प्रत्येक समाज आपापल्या परीनें संघटित होईल तर उत्तम होणार आहे. माझें आज आपणांस संघटण केल्यावर काय करावें याविषयी मुळीच कांही सांगणें नाही. सध्याच्या लोकसत्तेच्या युगांत व ज्यावेळेस सरकार जबाबदार राज्यपद्धति लोकसत्तात्मक पक्षांच्या हवाली करीत आहे-अशा वेळेस तर या संघटनेची आवश्यकता तीव्रतर आहे. आपण अगोदर संघटना करावी. व त्याचा उपयोग देशांतील व आपल्या समाजातील नेते जसा सांगतील तसा खुशाल करावा परंतु अगोदर संघटना करून सज्ज व्हा. आजच्या राजकारणांत आपल्या समाजास कित्येक कारणांमुळे ही जरुरी अधिकच आहे हें आपणा सर्व विचारी लोकांस पटेलच. आपल्या समाजाचें व समाजातील घटकांचें वैशिष्ठ्य अबाधित राहून हें आरंभास

करावयाचें आहे हें मात्र आपण विसरतां कामा नये. 'संहतिः कार्यसाधिका' किंवा Unity is Strength हें तत्व ध्यानांत ठेवणें अत्यावश्यक आहे. आतां मी धर्मविषयक विचारासंबंधी थोडें बोलणार आहे.

आज आपल्या समाजामध्ये दुर्दैवानें अनेक चिरफळ्या व मतभेद धर्मासंबंधी विषयांत झालेले दिसतात. शैवधर्म हा जगांतल्या अतिप्राचीन अशा धर्मांपैकीं एक धर्म आहे हें आपणांस सांगण्यास नको. हे शैवमत पुढे पुढे गरजेप्रमाणें अधिकाधिक वाढत गेलें व त्यांत अधिक आवश्यक अशा अंगांचा समावेश हळूं हळूं करण्यांत आला. या शैवसिद्धांतांतील वीरशैव मत हा एक अत्यंत महत्वाचा पंथ आहे. हिंदुस्थानांत दसवी सनाच्या दहाव्या शतकापूर्वी हें शैवमत निरनिराळ्या प्रकारांनी प्रचारांत आलेलें स्पष्ट दिसतें. यांतील 'त्रिक सिद्धांत' काश्मीरमध्ये प्रचलित होता व त्याचा उत्पादक अभिनवगुप्त हा होता. तामिळ देशांत या त्रिकसिद्धांतापेक्षांहि पुरातन असें एक शैवमत यापूर्वी चालूं होतें व यास '६३ पुरातनर' नांवाच्या संतांनी चालना दिली होती, हें या धर्माचा इतिहास जाणणाऱ्या मंडळींस माहीतच आहे. याचेंच पुढील परिणत स्वरूप ह्मणजे शैवसिद्धांत होय. गुजराथ, बंगाल, व मध्यहिंदुस्थानांत पण याच वेळीं या सिद्धांताच्या आचार्यांनी शैवसिद्धांत प्रचलित व लोकप्रिय केला होता. कर्नाटकांतहि त्रिक मत शैवसिद्धांत, पाशुपत व काळामुख या विविध पंथांचे अनुयायी इ. स. च्या १० व्या शतकापूर्वी आढळून येतात. पाशुपत मताचा उल्लेख महाभारतांत येतो. उपनिषदांतून या शैवधर्माची महती गाइलेली आहे. शिव व ऋग्वेदकालीन रुद्रदेवता एकच हें पण उघड आहे. शिवलिंगाबद्दल अनेक तर्ककुतर्क लढविलेले आहेत. परंतु या ठिकाणीं मला आपणास सांगावेसें वाटतें कीं, लिंग याचें महत्व प्रकाशाचा किंवा ज्योतीचा स्रोत एवढेच आहे. पूर्वी याचा उगम कसाहि असला तरी ज्ञानवृद्धि झाल्यावर असे खोटें गैरसमज विद्वान् माणसांकडून होऊं नयेत. वेदकालीन अग्नीत लिंगाचें साम्य असणें शक्य आहे असें वीरशैवांच्या धर्माच्या पुस्तकांचा अभ्यास करणारांस निश्चित आढळून येईल. अधिक पुरावा अलिकडे मोहेंजोदारो येथे उपलब्ध झालेला आहे. शैवांच्या कित्येक पुराणवस्तु या वेळी ह्मणजे इ. स. पूर्वी तिसऱ्या वर्षसहस्त्रांत आढळलेल्या आहेत. या ठिकाणीं आपणांस ही गोष्ट मी स्पष्टपणें सांगण्याची परवानगी घेतो कीं धर्म हा कांही कोणा एका पुरुषानें स्थापिलेला नव्हें तर अनेक सत्पुरुषांनी वर्षें प्रेरित होऊन प्राकृत जनांच्या उद्धारासाठी प्रपंचित केलेला आहें. ही गोष्ट केवळ वीरशैव पंथाबद्दलच नव्हे तर इतर धर्मांनाहि तेवढ्याच पूर्णत्वानें लागू आहे. तेव्हां आपल्यामध्यें श्रीबसवाचार्य व पंचाचार्य यांपैकीं कोणीं धर्मस्थापना केली यासंबंधी जे लढे चालू आहेत ते निर्विवाद चुकीच्या समजुतीमुळे चालूं आहेत हें आपणांस व सर्व समंजस लोकांस मी सांगावयास नको. दोघेहि शिवाचेच भक्त आहेत व दोन्ही पंथ शिवभक्तीचाच प्रचार करणारे आहेत. हा लढा कां चालूं रहावा हें मला तरी मुळींच समजत नाही. आपली सध्यांची गरज मी सांगितल्याप्रमाणे आपल्या सर्वांगीण उन्नतीकरितां पाहिजे असलेली संघटना होय व ह्मणून अशा लढ्यांत आपण आपल्या वेळेचा व्यय करूं नये अशी आपणांस माझी नम्र विनंती आहे. आपल्यास करण्याजोग्या गोष्टी पुष्कळ आहेत व त्याकडे आपल्या सर्व शक्ति व पैसा यांचा प्रवाह वळविणें आवश्यक आहे. उदाहरण ह्मणून कांहीं सूचना मी आपणांस करतों:—(१) आपणांस जुनी हस्तलिखितें छापतां येतील. (२) आपणांस

संशोधनाकरितां शिष्यवृत्त्या देतां येतील. (३) उत्तम ग्रंथालयें स्थापितां येतील. (४) व सर्वांत महत्वाची गोष्ट ह्मणजे आपल्या धर्मासंबंधीची माहिती इतर भाषांतून छापून कांही गैरसमज आपल्या धर्मासंबंधी असलेला तो नाहींसे करतां येईल. असो. अशा तऱ्हेच्या सुधारणांकडे आपण एकमतानें सर्व शक्ति एकवटून लक्ष द्यावें अशी आपणांला माझी प्रार्थना आहे.

आतां आपण सामाजिक बाबींकडे थोडे लक्ष देऊं. अगदीं आरंभापासून या समाजानें वरच त्या सामाजिक सुधारणांकडे लक्ष दिलें आहे. ज्याप्रमाणें बसवेश्वरांनी वेळ आली त्याप्रमाणें आम्हीं समाजसुधारणा केली. इतकेंच नव्हे तर आमच्या धर्ममताच्या सर्व अनुयायांत सर्वांना समानता दिली आहे. वीरशैव धर्माचें हें एक वैशिष्ठ्य आहे, हें आपल्या ध्यानांत ठेवा. लिंगधारण करणाऱ्यांत भेद नाहीं, वैषम्य नाहीं, तर समता आहे; असें श्रीबसवांचें स्पष्ट मत आहे. आचार्यांचें पण मत असेंच आहे. आपल्या धर्माचार्यांनी घालून दिलेल्या या धड्याकडे व त्यांनी प्रसृत केलेल्या तत्वांकडे आपण पुन्हा वळले पाहिजे. ऐक्य, समता, परमत सहिष्णुता, दीनदयालुत्व व सहानुभूति यांची शिकवण आपण आपल्याशी करून प्राचीन धर्मगुरूंच्याप्रमाणे हे सगळे गुण आचरणांत आणले पाहिजेत. असें होईल तर समाजाचें कल्याण होईल. आपली सर्वांगीण उन्नति अगदी लवकर होईल हें पक्कें समजा.

पूर्वीच्या आर्थिक जीवनांत वीरशैवांची स्थिति किती उन्नत आहे याची साक्ष इतर कोणताहि समाज देईल. दक्षिणेंतील व्यापार यांच्याच हातीं होता. महाराष्ट्रांतील कोनाकोपऱ्यांतहि अजूनसुद्धां आपणास आपले वीरशैव बंधु व्यापार करीत असतांना आढळून येतात. मारवाडी व गुजराथी प्रत्येक लहानमोठ्या गावांत सांपडतात. त्याचप्रमाणें त्यांतील कांहीं लोकांची निर्भयता व निष्ठूर व्यवहार सोडला तर आपले बंधुहि एकेकाळीं इतक्या दूरवर पसरले होते. व्यापार-उदीम हाच त्याचा धंदा. त्यांच्यामुळे त्यावेळेस आर्थिक जीवन शक्य व सुकर झालें. कर्नाटकांत शेतीहि पण त्यांच्या हातांत होती. शेतीभाती, व्यापार, विणकाम, सुतारकी, विसाटकाम, यासारखे लहान-मोठे धंदे त्यांच्या मालकीचे होते. देशांतील काम अशा तऱ्हेनें याच लोकांनीं पत्करल्यामुळें देशांतील संपत्ती त्यांनीं वाढविली—व अशी संपत्ती वाढविणें हेंच काम ठरवून त्यांनीं त्यांत पूर्ण लक्ष घातलें हें सूर्यप्रकाशाइतकें उघड आहे. असें असल्यामुळें या समाजाची आर्थिक स्थिती पूर्वीं फार समाधानकारक होती, व बवळ जवळ आदर्शभूत होती असें मीं ह्मटलें तर त्याबद्दल दुमत होण्याचें कारण नाहीं. परंतु चालू काळांतील सुधारणा व वृत्ति ही ओळखून त्याबरोबर राहण्याचें या समाजांतील घटकांस न जुळल्यानें सध्यां आपण मागासलेलों आहोंत. हें सुधारणें अर्थातच आपल्याच हातीं आहे. भगवद्गीतेंत ह्मटलेच आहे—उद्धरेदात्मनात्मानं नात्मानं अवसीदयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः ॥ आपण मागें राहिलों, आपण आपलें स्वत्व गमावलें, ही खरोखर खेदाची गोष्ट आहे, व जितक्या त्वरित आपण आपली उन्नती करून घेतली पाहिजे. आपण गमाविलें तें आपण भरून काढलें पाहिजे. त्यांत आपण इतर कोणाचाहि तोटा करीत नाहीं.

आतां शैक्षणिक गोष्टीकडे वळूं. आपल्या समाजाचा लौकिक या बाबतींत फार उज्ज्वल आहे, हें विसरून चालणार नाहीं. कर्नाटकांत तरी मला पक्के माहीत कीं, याच समाजाच्या लोकांनी इंग्रजींत Three Rs. ज्याला ह्मणतात ते लेखन, वाचन, गणित वगैरे शिक्षण लोकांना दिलें आहे, त्यांत त्यांनीं जात, गोत, देश इत्यादि कोणत्याहि गोष्टीकडे लक्ष व

देतां हें पवित्र कार्य केलेलें आहे. या समाजाचे मठ ह्मणजे पवित्र विद्यापीठेंच होत. त्यांतून ह्मातारेकोतारे, लहानतरुण, स्त्रीपुरुष, आबाल-वृद्ध सर्वांना शिक्षण देण्यांत येई. ह्मातार्‍या स्त्रीपुरुषांना पुराणें वगैरें सांगून व इतर असेच वैदिक कार्यक्रम वगैरे शहाणे करण्यांत येई व तरुण आणि मुलें यांना त्या वेळचें शाळेंतील शिक्षण देण्यांत येई. त्या वेळच्या समाजांतील आणखांची मतें उदार Catholic होतीं व त्यांनीं मनुष्यमात्राच्या उन्नतीची चिंता केली व ह्मणून अशा मठांना सर्वांकडून व सर्व जातींकडून व धर्मांकडून साह्याय्य व आदर मिळत असे. आज या गोष्टीकडे आपलें लक्ष मी वेधूं इच्छितों. असा उदारपणा आपण पूर्वपरंपरेमुळें प्रकट करुन इतर लोकांचा आपणाविषयीं गैरसमज ( तसा असल्यास ) आपण शक्य तितक्या लवकर काढून टाकिला पाहिजे व प्रयत्न जितका व्यापक व त्वरित होईल तितकें बरें. त्याचप्रमाणें दुसरी गोष्ट आपण ध्यानांत ध्यावी ती हीच कीं, आपला फायदा, दुसर्‍याचें नुकसान न करतां आपण करुन घेतला, व त्यामुळे जर इतर मंडळी आक्षेप घेऊं लागली, तर त्यांत अर्थात् कांहीं महत्व नाहीं हें आपण लक्षांत ठेवावें. असो. कर्नाटकांतील आपला समाज जागृत झाला असून त्यांनी शैक्षणिक सोयी पुष्कळ केल्या आहेत. त्यांच्या स्वतःच्या शाळांचें जाळें आहें, कॉलेज आहें, विद्यापीठ आहे, व इतरहि संस्था आहेत. व त्यांचें कार्य उत्तम चालू आहे हें आपणास सुपरिचित आहे. अशा तर्‍हेची व्यवस्था आपल्या समाजानें महाराष्ट्रांत केलेली नाही. ती आपणास अधिक लवकर करुन या दुर्लक्षाचें परिमार्जन करणें अवश्य आहे हें मी आपणास सांगतों. कृपा करुन आपण राग मानूं नका. शिक्षण ही एक मशाल आहे. त्या मशालीनें सर्वत्र चकक प्रकाश पडला कीं अज्ञानांधकार लागलीच नाहीसा होईल. सध्याचें उदार शिक्षण आपणास आवश्यक आहे. मनें शिक्षणानेंच सुसंस्कृत व उदार होतात.

मी नुकतेंच वाचलें कीं, कांही दिवसांपूर्वी सातारा येथील आपल्या समाजबंधूंनी शिक्षण-प्रसारक निधी स्थापण्याविषयी ठराव केला व मी असेंहि ऐकिलें कीं त्यांनी एक मोठी रक्कम गोळा केली आहे. आपण त्याचें अनुकरण करुन अशा शिक्षणनिधी जमा करुन या कामास आरंभ करावा अशी नम्र सूचना मी आपणास करितों. बेळगांव, विजापूर, धारवाड, बल्लारी हे जिल्हे व ह्मैसूरचें राज्य या ठिकाणी अशा तर्‍हेनें निधी जमा झाले असून त्यांचा उपयोग तेथल्या स्थानिक विद्यार्थ्यांस होत आहे हें आपण पहातच आहां. विद्यार्थ्यांना शक्य तें सर्व साहाय्य करण्याकरितां त्यांतून पैसे मिळतात. पण हिज एक्झॉल्टेड हायनेस दी नायझॅम H. E. H. Nizam यांचे राज्य व आपल्याकडील विभागांत अशा तर्‍हेचा प्रयत्न झालेला नव्हता. परंतु नुकत्याच उदगीर येथें भरलेल्या निजाम-वीरशैव प्रांतिक परिषदेंत अशा प्रकारचा शिक्षणनिधी स्थापण्याचा ठराव पास झाला असून कार्यास सुरवातहि पण झाली आहें हें सुचिन्हच असून, या शिक्षणफंड लवकर यशस्वी होवो असें मी इच्छितों. बार्शी व सोलापूर येथेंहि अल्प प्रमाणांत शिक्षणफंड असल्याचें मी ऐकतों. परंतु आपल्या विद्यार्थ्यांच्या गरजांच्या प्रमाणांत हे फंड पुरेसे नसून मोठ्या शिक्षणफंडाची आवश्यकता आहे. ही खेदाची गोष्ट आहें कीं आपल्या समाजाची मदत करण्याची इच्छा असूनहि केवळ पुढार्‍याच्या अभावीं हें कार्य होण्याचें राहिलें आहे. पहिल्याप्रथम आपणास फार मोठा निधी गोळा न करतां आला तरी कांहीं हरकत नाहीं. लहान निधीसुद्धां मूळची रक्कम असली तर 'तैल-बिंदुरिवाम्भसि ' याप्रमाणें पुढें तो वाढेल. तेव्हां लहान निधिसुद्धां चालेल. आरंभास प्रत्येक बीज लहानच असतें. माझ्या कानावर अशी एक तक्रारवजा सूचना आली आहे कीं, ह्मैसूर व कर्नाटकांतील आमचे

…बंधु आपणांस फार साहाय्य करूं शकत …आहेत. अशय तेवढी मदत ते कमिटीस यावि… …षयीं आपण अगदीं निःशंक असावें, असा …यांच्या आपणांस मला द्यावासा वाटतो. …आर्थिक गरज भागविल्यानंतर जें साहाय्य …आपणांस करतां येण्यासारखें असेल तें सर्व आपणांस मिळेल याविषयीं आपली खात्री असू… …ना, त्यांच्या वतीनें मी आपणांस दृढ विश्वासपू… …र्वक सांगतों कीं त्यांची आपणाविषयीं पूर्ण सहा… …नुभूति आहे. परंतु त्यांच्या अडचणीहि पुष्कळ आहेत म्हणून त्यांस साहाय्य करीत आलेलें नाहीं.

…बंधुहो! आतांपर्यंत मला जें जे सुचलें व …विचाराई वाटलें तें मीं आपणापुढें मांडलें आहे त्यांतील विचार आपण हंसक्षीर न्यायानें ग्रहण करालच. सध्याची वेळ फार कसोटीची आहे व संघटनेची आवश्यकता अतिशय आहे. केवळ महा-सभा अगर परिषदा भरवून कार्यें होत नाहींत. प्रत्यक्ष कार्याचे फळ पदरांत पडेल त्यावेळेस कार्य झालें असें समजावें. सरते शेवटी आपण मजसारख्या सामान्य माणसास अध्यक्षपद देऊन माझा जो गौरव केला आहे त्याचा अतिक्रम न करतां मी आज बोललो आहें. अतिक्रम झाला असल्यास आपण उदार मनानें त्याबद्दल क्षमा करावीं अशी विनंती करुन, व व आपल्या कार्यास सदोदित यश यावें अशी प्रार्थना करुन मी आपली रजा घेतों.

---

# बार्शी वीरशैव परिषदेंतील ठराव

बार्शी येथे डॉ. नंदीमठ ह्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेंत खालील ठराव पास झाले.—

(१) श्रीसिद्धलिंग शिवाचार्य उजनी, श्री. …ळकूर महास्वामी, कै. आण्णासाहेब कथले, …कै. थोंडे व हिंकुळे कुर्डुवाडी वगैरेंच्या निध-…नाबद्दल दुखवटयाचा ठराव. (२) सम्राट …एडवर्ड यांच्या राज्यारोहणाबद्दल अभिनंदन. (३) दि. ब. कंबळी यांना 'सर', गदगचे …रावसाहेब मानवी यांना रावबहादूर, व कऱ्हा-…डचे श्री. कल्याणी, पंढरपूरचे श्री. नेंवाळे, …गावचे श्री. शेटे यांना 'रावसाहेब' या …पदव्या मिळाल्याबद्दल अभिनंदन (४) …मुंबई कायदेमंडळाच्या निवडणुकीत यशस्वी …झालेल्या सर्व लिंगायत उमेदवारांचें अभिनंदन. (५) सोलापूरचे श्री. काडादी बंधु यांनी …शिक्षण व धर्मार्थ दवाखाना यासाठीं दिलेल्या …देणगी देण्याबद्दल व सातारा-जिल्हा-…शिक्षणफंडास देणग्या दिलेल्या सर्व सद्गृह-स्थांचें अभिनंदन करणारे ठराव अध्यक्षाकडून मांडण्यांत आले.

(६) अक्कलकोट संस्थानांत कानडी मातृ-भाषा असणारी लोकसंख्या निम्याहून जास्त असल्यानें त्यांच्या शिक्षणसौकर्यार्थ संस्था-नांत शक्य त्या ठिकाणीं कानडी शाळा उघ-डण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांना विनंती करणारा ठराव मांडण्यांत आला. तो पास झाला. ठराव ७ वाः—वीरशैवांच्या सर्व प्रका-रच्या धर्मपीठावर नवीन अधिकाऱ्याची प्रस्था-पना करीत असतां ते सुशील सुसंस्कृत सुशि-क्षित व अत्यंत प्रौढ असण्याबद्दल पूर्ण विचार करून त्यांची प्रस्थापना व्हावी असें परि-षदेचें मत आहे. त्याचप्रमाणें धर्मपीठाचा कारभार विस्कळीत व अव्यवस्थित होऊं नये म्हणून त्या मठसंस्थानच्या हद्दीतील योग्य

व लायक अशा पंचांच्या संमतीने धर्मपीठाचा कारभार चालेल अशी व्यवस्था त्या पीठावरील प्रस्तुत अधिकाऱ्यांनी करावी, अशी या परिषदेची विनंती आहे. " हा ठराव पंढरपूरचे शंकर बापूराव कटप यांनी मांडला. त्याला मेसर्स महादेव सावळाराम भिंगे पंढरपूर, सी. आर. बेलुरे व सी. आर. वांगी सोलापूर, यांनी अनुमोदनपर भाषणें केल्यावर हा ठराव सर्वानुमतें पास झाला. त्यानंतर (८) समाजांतील वाढत्या बेकारीला आळा बसून व्यापारधंदा उर्जितावस्थेस येण्याकरिता व सहकारी बँका, पतपेढ्या, गिरण्या वगैरे स्थापण्याबद्दलचा असा ठराव मि. भादुले पंढरपूर यांनी मांडला. त्यावर श्रीमंत गणपतराव बटाणे, व शांतलिंग भगवान ह्यापसे अहमदनगर यांचीं अनुमोदनपर भाषणें झालीं व तो सर्वानुमतें पास झाला. (९) " परधर्मीय लोक वीरशैवांतील अज्ञानी व गरीब अशा स्त्रीपुरुषांना व मुलांना फसवून व जुलुमजबरदस्तीनें आपल्या धर्मांत ओढण्याचा प्रयत्न करतात, त्याचा योग्य प्रतिकार व्हावा म्हणून अशा धर्मांतरितांना व अशांच्या वंशजांना शास्त्रोक्त रीतीनें शुद्ध करून वीरशैवधर्मांत घ्यावे व संघटन करावें असें या परिषदेचें मत आहे. " हा ठराव अक्कलकोटचे श्री. वीरभद्रप्पा लोकापुरे यांनी मांडला. त्याला श्री. एस्. एम्. कल्याणशेट्टी वकील संपादक 'सुदर्शन' यांनी अनुमोदन दिलें. त्याला श्री. कल्लय्या कासेगांवकर पंढरपूर यानें आपल्या शिरस्त्याप्रमाणें विरोध केला. त्यावर श्री. सी. आर. वांगी सोलापूर व श्रीं. प्रभुराव वकील उदगीर यांनी अनुकूल भाषणें केलीं. यावर श्री. भंडारे, श्री. निंबर्गी, श्री. महालिंगप्पा होसाळी वैराग, यांचीं अनुमोदनपर भाषणें झाल्यावर ठराव मतास घालतां तो ३ विरुद्ध सर्व, अशा प्रचंड बहुमतानें पास झाला. त्यानंतर (१०) ठिकठिकाणीं वीरशैव-तरुणसंघ स्थापणेंबद्दलचा ठराव श्री. पाटील पंढरपूर यांनीं मांडला, त्याला श्री. शंकरराव पाटील अक्कलकोट यांनी अनुमोदन दिलें. नंतर (११) लग्नांतील अवाढव्य खर्चास आळा घालण्याविषयींचा ठराव एम्. एस्. भिंगे यांनी मांडला, त्याला श्री. भादुले वकील पंढरपूर, रामलिंगप्पा शिवशेट्टी (?) [illegible] धंत दुधनी, यांनी अनुमोदन दिलें. नंतर (१२) विरक्तपंचाचार्यवादाचा निषेध करण्याबद्दलचा ठराव डॉ. जगदेवराव देशमुख एल्. एम्. अँड एस्. (नॅशनल, कलकत्ता) यांनी मांडला. त्याला मेसर्स शिवाप्पा साखरे, शंकर सिद्राम सोलापूरे व च. रा. वांगी सोलापूर, महालिंगप्पा होसाळी वैराग यांनी पुष्टि दिल्यावर तो सर्वानुमतें पास झाला. ह्यावरून सदर परिषद 'सुदर्शन'च्या विरक्तपक्षाची नव्हती व 'गर्जने'च्या पंचाचार्यपक्षाची नव्हती हें अधिक उघड झालें. त्यानंतर (१३) व्या ठरावानें वीरशैवांनी वीरशैवेतरांशीं वागतांना सार्वजनिक स्थळीं स्पृश्यास्पृश्य भेद मानूं नये " असा ठराव पास झाला.

त्यानंतर (१४) वा पुढील ठराव अध्यक्षांकडून मांडण्यांत आला, :—" वीरशैवांत भक्त, महेश, प्रसादि, प्राणलिंगी वगैरे आचारक्रियाज्ञानावर भेद उभारलेले असल्यामुळे वीरशैवसंस्कृती ही याज्ञिक संस्कृतिहून भिन्न आहे. ह्मणून स्मृत्यादि ग्रंथ वीरशैवांना मान्य नाहीत. यास्तव वीरशैवांतील कोणत्याहि पोटभेदाच्या इसमास, 'शूद्र' ही संज्ञा लागू होत नाही, ह्मणून वीरशैवांना वीरशैवाचार व त्यांचे धर्मशास्त्र यास अनुसरूनच न्याय मिळावा अशी या परिषदेची विनंती आहे. " हा ठराव एकमतानें पास झाल्याचें जाहीर करण्यांत आलें.

त्यानंतर वृत्तपत्रातून बराच गाजावाजा झालेला व श्री. परांडकरस्वामी व त्यांच्या अनुयायांनीं करून विरोधाचा प्रयत्न केलेला वीरशैवएकीकरणाचा ठराव पुढे आला, तो

(१५) "वीरशैव-धर्मांतील सर्व पोटजातींचें एकीकरण करून त्यांच्यांत परस्पर सरीस संबंध होण्याकरिता त्यांच्यांत परस्पर रोटीव्यवहार होणें अवश्य आहे, असें या परिषदेचें मत आहे." हा ठराव सोलापूर येथील पुरुषार्थ'चे संपादक यांनीं मांडला. या ठरावाला ... बं. एम्. एस्. सरदार यांनी अनुमोदन दिलें. ह्या ठरावास डॉ. जगदेवराव देशमुख यांनी उपसूचना मांडली कीं,— "कुलगुरुपरंपरेप्रमाणें धर्मशास्त्राप्रमाणें दीक्षा घेऊन पावन झालेल्या पोटजातींतील व्यक्तींशीं अष्टावरणादि धार्मिक क्रियेच्या वेळी व इतरत्र अन्नोदक-व्यवहार परस्पर करून घेण्यास मुळींच हरकत नाही." त्या उपसूचनेला उमरावतीचे दे. भ. ना. रा. बामणगांवकर यांनी अनुमोदन दिलें. ही उपसूचना नापास झाली व मूळ ठराव बहुमताने पास झाला. नंतर परिषदेचे मुख्य कार्यकर्ते श्री. जी. जी. गावसानें बी.ए., एलएल. बी. वकील, यांनीं सर्वांचे आभार मानून परिषद यशस्वी केल्याबद्दल सर्वांविषयीं योग्य शब्दांत आपली कृतज्ञता व्यक्त केली. श्री. ना. रा. बामणगांवकर यांनीं पाहुणेमंडळीतर्फें स्वागतमंडळाचे व सर्वांचे आभार मानले. तसेंच डॉ. देशमुख सोलापूर, श्री. कस्तूरप्पा डिग्गे अक्कलकोट, श्री. चोळ्ळी, मैंदर्गी, व श्री तोडकरी वकील उस्मानाबाद वगैरेंनी आभार-प्रदर्शनपर भाषणें केलीं, व परिषद पूर्णपणें रात्रौ १ वा यशस्वीपणें पार पडली. सदर परिषदेस बार्शी, सोलापूर, पंढरपूर, माढा वगैरे ठिकाणची जिल्ह्यांतील प्रमुख मंडळी तर होतीच पण श्रीमंत गणपतराव ज्ञानोबा बटाणे कऱ्हाड, श्री. शामसंगो पुराणीक धारवाड, व्ही. जी. लोकापुरे, कस्तूरप्पा डिग्गे अक्कलकोट श्री. संग्रामप्पा शेटकर वकील व श्री. प्रभुराव वकील उदगीर, नागनाथराव वकील भालकी, शांतलिंग भगवान ह्यापसे अहमदनगर ना. पा. बामणगांवकर अमरावती याशिवाय परळी, उस्मानाबाद, उदगीर, पुणे वगैरे ठिकाणची प्रमुख मंडळी हजर होती.

# सोलापूर-जिल्हा-वीरशैव-महिला-परिषद्

## अधिवेशन १ लें

[सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेच्या वेळीच ता. ५ व ६ मे रोजी बार्शी येथे सोलापूर जिल्हा वीरशैव महिला परिषदेचे पहिलें अधिवेशन सौ. पंचम्माबाई सरदार ह्यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें. या परिषदेच्या स्वागताध्यक्ष व अध्यक्ष ह्यांची भाषणें आणि परिषदेंत मंजूर झालेले ठराव पुढें दिले आहेत.]

### स्वागताध्यक्षः— सौ. शांताबाई दगडूआप्पा गावसाने यांचे भाषणाचा सारांश

सौ. पंचम्माबाई, प्रतिनिधि व प्रेक्षक भगिनींनो व बंधुंनो,

आज आपणां सर्वांचें स्वागत करण्याचें भाग्य मला लाभलेलें आहे व आमचे विनंतीस मान देऊन आपण उपस्थित झालांत ह्मणून आपलें मनःपूर्वक स्वागत करण्यास मला फार आनंद वाटतो.

आपला समाज रसातळाला जाण्याच्या अनेक कारणांपैकीं स्त्रियांची हेळसांड हें एक मुख्य कारण आहे. स्त्रियांना समतेनें वागविण्याची धर्माज्ञा असतांना व लिंगधारणा, प्रसाद, पूजा, तीर्थ, मंत्र वगैरे बाबतींत समान अधिकार असतांना अशा तऱ्हेनें आपणांस वागविण्यांत येत नाही. आपणांला माहीत आहे कीं, युरोप-अमेरिका आज सुधारणेच्या कळसास पोहों-चलीं आहेत. आज स्वातंत्र्य, उच्च संस्कृती, वैभव हीं त्यांच्या दाराशीं लोळण घेत आहेत. अशा शूर व संपन्नमान् राष्ट्रांतील पुरुष, स्त्रियांना जें महत्त्व देऊन वागवितात ते काय मूर्ख आहेत ? असें ह्मणणें ह्मणजे आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन करणें होय. दूर कशाला ; आपल्या देशांतील पारशी, कायस्थ, शेणवी, ब्राह्मण, प्रभु, गुजराथी, भाटी वगैरे समाज आपल्या फार पुढें आहेत ही गोष्ट तर नाकबूल करतां यावयाची नाही ? मग त्या समाजांतील पुरुष स्त्रियांना कसे वाग-वितात हें पाहिल्यास आपणांस माझ्या ह्मण-ण्याची प्रचीति येईल. अर्थात् त्यांच्यामध्ये जे दोष असतील ते टाळण्याचीहि खबर-दारी घेणें अगत्याचें आहे.

स्त्रियांना पुरुषांची अर्धांगी संबोधण्यात येतें. परंतु अर्धांग जर अडाणी, कोत्या विचा-राचें, थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे निरु-पयोगी असेल तर पुरुषांची अर्धांगवायूच्या माणसासारखी स्थिती झाल्यास नवल नाही!

भगिनींनो, उत्तम गृहिणी होणें हेंच ध्येय शेंकडा ९९ स्त्रियांचें असतें व असावें असें माझें मत आहे. व त्याकरितां उत्तम मातृ-धर्माचें ज्ञान, इंग्रजी लिहितां-वाचतां येणें, धर्म व नीतिविषयक ग्रंथ वाचतां येऊन त्यांतील मर्म समजणें, जगांत काय चाललें आहे हें कळण्याइतका वर्तमानपत्रांशी परिचय असणें, आरोग्याचें अवश्यक ज्ञान, शिशुसं-गोपन, वगैरेसंबंधी शिक्षण मिळाल्यास आपली खरी सुधारणा झाल्याखेरीज राहणार नाही.

आपल्यांतील कांही बंधु " न स्त्री स्वातं-त्र्यमर्हति " किंवा ' चूल व मूल ' हेंच स्त्रियांचें ध्येय समजतात. मला हीं दोन्ही सुभाषितें मान्य आहेत. परंतु या दोन्ही वच-नांचा जो विकृत अर्थ लावण्यांत येतो तो मला कबूल नाही. स्वातंत्र्य ह्मणजे स्वैरा-चार नव्हे व चूल व मूल हें मी वर सांगि-तल्याप्रमाणें सुगृहिणीपणाचें लक्षण होय. " यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः । " किंवा " जिच्या हातीं पाळण्याची दोरी, ती जगातें उद्धारी " हीं किंवा अशीं सर्व सुभाषितें माझ्या विधानाची सत्यता पटवितील.

याशिवाय धर्माच्या नावाखाली फाजील सोवळेपणा, बालविवाहाचा प्रघात, हुंड्याची अनिष्ट चाल, लग्नकार्यामध्यें बेसुमार खर्च या व अशा कितीतरी बाबी आहेत की ज्यांचा विचार होऊन त्या ताबडतोब नाहीशा करणें अत्यावश्यक आहे.

माझे अल्प विचार मी आपणांपुढें मांडले आहेत. आजच्या आपल्या नियोजित अध्यक्षीण-बाई सौ० पंचव्वाबाई यांची तळमळ व आज-पर्यंतची कामगिरी आपणांस उन्नतीच्या मार्गावर नेईल असा पूर्ण भरंवसा वाटत आहे. शेवटी मी येथें जमलेल्या भगिनींचे आभार तर मानतेच परंतु ज्या सर्व बंधूंनी येथें जमण्यास आह्मांला उत्तेजन व वाव दिला त्यांचे पुन्हा एकदा आभार मानून, स्त्रियांच्या सुधारणे-बरोबर समाजसुधारणेची ईश्वर त्यांना बुद्धि देवो अशी प्रार्थना करून श्री० सौ० पंचव्वा-बाई यांनी या महिलापरिषदेचें अध्यक्षस्थान सुशोभित करावें अशी मी विनंति करून आपलें वेळेवाकडे भाषण संपवितें.

# सोलापूर-जिल्हा वीरशैव महिला-परिषद, बार्शी,

# अधिवेशन १ लें

## अध्यक्ष:— सौ. पंचव्वाबाई सरदार, सोलापूर.

यांनी ता. ५ जून १९३७ रोजी केलेलें

## अध्यक्षीय भाषण.

पूज्यनीय स्वागताध्यक्ष व माझ्या बंधुभगिनींनो!

आजरोजीं सोलापूर जिल्ह्यांतील महिलांची ही परिषद् भरून महिलांच्या उन्नतीकरितां एकत्र विचारविनिमय करण्याची ही अपूर्व संधि या जिल्ह्यांत प्राप्त दिल्याबद्दल मी माझ्या बार्शीकर बंधुभगिनींचें मनःपूर्वक अभिनंदन करते.

भगिनींनो! या सुधारणेच्या कालांत प्रत्येक समाजांत शिक्षणप्रचार झपाट्यानें होत असून, यथाशक्त्यापरीने तो सुधारत आहे. अगदी मागासलेल्या समाजांतील स्त्रीपुरुषांत शिक्षणाबद्दल तीव्र इच्छा दिसत असून शिक्षणप्रसाराचें कार्य चालत आहे. त्या दृष्टीनें वीरशैवसमाजांत व्हावी तशी शिक्षणाची प्रगति व जागृति झालेली नाही. वीरशैवसमाज हा मुख्यतः शेतकी व व्यापारउदीम करणारा असल्यानें या समाजांतील पुरुषांतच शिक्षणाचा अभाव आहे. मग स्त्रीयांतील शिक्षणाची गोष्ट तर दूरच राहो! वास्तविक स्त्रीपुरुषवर्गांत भेदभाव करून स्त्रियांना पुरुषापेक्षां कमी लेखून ज्ञानाचें दार त्यांना बंद करण्याची चाल पुष्कळ अनेक शतकांपासून आपल्या देशांतील समाजांत पडली आहे. बुद्धकालांत भगवान बुद्धदेवांच्या प्रयत्नाने स्त्रीवर्गातहि अद्भुत क्रांति होऊन स्त्रियांनीहि धर्मप्रसाराच्या कार्यांत भाग घेतला. भगवान बसवेश्वरांनीं स्त्रीसमाजांत महत्वाची जागृति उत्पन्न केली. पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि धार्मिक व सामाजिक समान हक्क मिळाले. लिंगधारण, मंत्र, तीर्थ, पादोदक, प्रसाद, दीक्षा, वगैरे सर्व संस्कारांत स्त्रियांनाहि पुरुषाप्रमाणेंच समान हक्क मिळाले. त्यामुळे अक्कमहादेवी, नीलांबिका, मुक्तायक्का सत्यक्का वगैरे असंख्य शिवशरणी नांवारूपास येऊन आपल्या अतुल बुद्धिसामर्थ्याने त्यांनी वीरशैववचनवाङ्मय भूषविलें आहे. अशा उदात्त विचाराच्या समाजांतील हल्लींचा स्त्रीवर्ग अगदीं कोत्या विचाराचा आकुंचित वृत्तीचा व ज्ञानहीन असा राहिला आहे. याला कारण शिक्षणाचा अभाव हेंच होय. शिक्षण व संघटना हा समाजोन्नतीचा पाया होय. शिक्षणाशिवाय कोणत्याहि समाजाची प्रगति होणार नाही. 'ज्ञानेन हीनः पशुभिः समानः' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. मनुष्याला विद्येनेच श्रेष्ठत्व मिळालें आहे. परंतु हें विद्येचें सामर्थ्य आमच्यांत नसल्यानें आम्हीं कमकुवत बनलों आहोंत.

स्त्रियांना शिक्षण द्यावें किंवा देऊं नये हा प्रश्न आता जुना झाला असून, स्त्रियांनाहि शिक्षण अवश्य आहे, हें सत्य सर्वमान्य झालें आहे. आतां प्रश्न काय तो स्त्रियांना कोणतें शिक्षण द्यावें ? त्यांनाहि हल्लींच्या पुरुषवर्गाप्रमाणें शाळा-कॉलेजचें शिक्षण द्यावें किंवा कसें ? ज्या शिक्षणामुळे पुरुषवर्गच बेकार व बेहिंमती बनतो, असलें शिक्षण स्त्रियांना द्यावे किंवा काय? वगैरे प्रश्नावर मतभिन्नता दिसते. परंतु आमच्या समाजाच्या दृष्टीनें हा प्रश्न कांहीं तातडीचा नाहीं. कारण आमच्या समाजांत स्त्रियांना साक्षर करण्याचा प्रश्न, त्यांच्या प्राथमिक शिक्षणाचा प्रश्नच प्रमुख आहे. कारण आमच्या स्त्रीवर्गांत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा एक तरी पडेल कीं नाही याची शंका आहे. आणि स्त्रियांना प्राथमिक शिक्षण देऊन साक्षर करण्याबद्दल मतभेदास मुळीच जागा नाहीं. ह्मणून माझी सर्व बंधु-भगिनींना आग्रहाचें सांगणें आहे कीं, मुलांना ज्याप्रमाणें शाळेंत पाठविण्याची दक्षता घेण्यांत येते, त्याचप्रमाणें मुलींनाहि शाळेंत पाठविण्याची दक्षता घ्यावी, ह्मणजे स्त्रीवर्ग साक्षर होण्यास विलंब लागणार नाहीं. तरी स्त्रीशिक्षणाच्या महत्वाच्या बाबीकडे आमच्या समाजानें अवश्य लक्ष पुरवावें.

## आरोग्य व शिशुसंगोपन

स्त्रियांच्या दृष्टीनो काळजी घेण्यासारखी महत्वाची बाब ह्मणजे त्यांच्या आरोग्याबद्दलची होय. आपल्या समाजांतील मध्यम व मोठमोठ्या घराण्यांतील स्त्रियांत आरोग्याची हेळसांड होत असलेली दिसते. व्यायामाचा अभाव, नियमित खाद्यपेय वगैरे अनेक कारणांमुळे त्यांच्यांत रोगांचा फैलाव होऊन त्या बऱ्याच अंशीं अल्पायुषी होत असलेल्या दिसतात. क्षयरोगासारख्या भयंकर रोगाला बऱ्याच अभागी भगिनी बळी पडतात. विशेषतः आरोग्यज्ञान नसल्यानें व आरोग्याचे ढोबळ नियमहि न पाळल्याने बऱ्याच स्त्रिया रोगी होतात. गरोदरपणा व बाळंतपणांत बऱ्याच स्त्रियांमध्यें रोगांचा प्रादुर्भाव होत असतो. थोड्याशा आरोग्यज्ञानानें या सर्व गोष्टी सहज टाळतां येतात. स्वच्छ व टापटिपीच्या राहणीचें महत्व, व रोग उत्पन्न होण्याची कारणें, वगैरे बाबींचे थोडेसें ज्ञान जरी असलें तरी बऱ्याच रोगांना प्रतिबंध करतां येतो. त्याकरितां स्त्रियांना आरोग्य व प्रथमोपचाराचें ज्ञान अगदीं अवश्य असतें. हें ज्ञान संपादण्यास फार कष्ट करावे लागतात अशांतला भाग नाहीं. आठवडा—पंधरवड्यांत अशा प्रकारचें उपयुक्त ज्ञान सहज मिळवितां येतें. आणि अशा प्रकारचा प्रयत्न सोलापूर तालुक्यांतील शेळगी व कुंभारी येथें एक एक आठवडा आरोग्यवर्ग उघडून करण्यांत आला व त्यांत बऱ्याच स्त्रियांनी प्राविण्य मिळविल्याचें दिसून आलें ह्मणून अशा प्रकारचे प्रयत्न सर्वत्र झाल्यास आरोग्याचें ज्ञान स्त्रियांना सहज होईल. सशक्त व निरोगी मातेच्या पोटींच सुप्रजा निर्माण होते हें लक्षांत ठेवून, स्त्रियांच्या आरोग्याची काळजी घेऊन त्यांना आरोग्यज्ञान देणें इष्ट व अवश्य आहे. अशा प्रकारचें आरोग्यज्ञान असल्यास स्त्रियांना आपल्या शिशुसंगोपनाचीं महत्वाची जबाबदारी सहज उत्तम रीतीने पार पाडतां येईल. कारण तान्हया मुलांना अगदी क्षुल्लक कारणावरून लहानसहान आजार होतात. अशावेळीं त्या आजाराची कारणें शोधून काढून त्यांवर उपाययोजना करणेंच सुमातेचें कर्तव्य असतें. परंतु आपल्याकडील स्त्रीवर्ग आरोग्यज्ञानांत अनभिज्ञ असल्यानें, अंधधर्मभोळेपणा जास्त प्रमाणांत असल्यानें, आजाराचा संबंध देवाकडे लावून नाना देवदेवतांस नवस करणें, भोंदुवैद्याच्या भूलथापानें भुलून गंडेदोरे, मंत्रताईत यांतच कालहरण करणें वगैरे गोष्टी करतात. त्यामुळें रोग बळावून प्रसंगीं अपत्य गमावण्याची उदाहरणेंहि पुष्कळ झालीं आहेत. आरोग्यज्ञानानें

अनेक बालकांचे अपमृत्यु सहज टाळतां येतील. ह्मणून स्त्रीवर्गाला अशा प्रकारच्या आरोग्यज्ञानाची अत्यंत जरूरी असते. या गोष्टीकडे आमच्या भगिनींनी अवश्य लक्ष पुरवावें.

## हस्तकलाकौशल्य

स्त्रियांना सहजसाध्य होण्यासारखी व त्यांच्या कल्पनाशक्तीला चालना देणारी बाब ह्मणजे हस्तकलेची. कलेची आवड स्त्रियांमध्ये स्वभावतः असते. शिवणें, कशिदा काढणें, वगैरे गोष्टी त्यांना अगदीं अल्पावधींतच साध्य होतात. गृहकृत्य आटोपल्यावर बऱ्याच स्त्रियांना पुष्कळसा वेळ रिकामपणाचा मिळतो. त्याच भगिनी हा रिकामपणा निद्रेंत किंवा निष्कारण गप्पागोष्टींत घालवितात. त्याऐवजी हस्तकलेचें उपयुक्त काम केल्यास विश्रांतीहि मिळाल्याप्रमाणें होऊन संसारास लागणाऱ्या अनेक वस्तु घरच्याघरींच सहज तयार करतां येऊन खर्चाची बचत होईल व तेवढीच संसारास मदत होईल. टॉवेल्स, हातरुमाल, अंगरखे, टोपी, चोळ्या, लहान मुलांचे लोंकरीचे मोजे, कानटोप्या, उशांची अभ्रें वगैरे असंख्य गोष्टी त्यांना अगदीं सहज करतां येतील. आणि कामांत बदल झाल्यानें विश्रांतीहि मिळाल्याप्रमाणें होईल. तरी अशा उपयुक्त कार्याकडे आमच्या भगिनी- वर्गानें लक्ष घातल्यास त्यांना बऱ्याच गोष्टींचें ज्ञान मिळून त्यांच्या कल्पनाशक्तीस वाव मिळेल व रिकामपणाचा कंटाळा येणार नाही.

## सुग्रणपणा

स्वयंपाकांत सुग्रणपणा असणेंच सुगृहिणीचा अलंकार होय. चूल आणि मूल हेंच स्त्रियांचें कार्यक्षेत्र होय असें कित्येकजण ह्मणतात. हें जरी खरें असलें तरी तेवढेंच त्यांचें मुख्य कार्यक्षेत्र आहे असें नव्हे; ह्मणून स्वयंपाकघरांत प्राविण्य मिळविणें हें स्त्रियांचें कर्तव्यच ठरतें. या बाबींतहि कलेला बराच वाव आहे. नाना प्रकारची पक्वान्नें उत्तम रीतीनें बनवितां येणें हा मोठा सद्गुण असून तें स्त्रियांना भूषण आहे. आणि पक्वान्नांत प्राविण्य मिळविण्यांत आपला रिकामपणाचा वेळ आमच्या भगिनींनी खर्च केला तर तोहि वाया जाणार नाही. सोलापूर येथे भरणाऱ्या हस्तकलाकौशल्याच्या प्रदर्शनांत यंदा पक्वान्नांचा विभाग उघडण्यांत आला होता. त्यावेळीं प्रदर्शनांत आलेली असंख्य तऱ्हेची पक्वान्नें पाहिल्यास कोणासहि आश्चर्य वाटलें असतें. घरच्याघरींच नानाप्रकारची पक्वान्नें करतां येऊं लागल्यास बाजारांतील खाद्यपेयें आणून रोग विकत घेण्याची गरज राहणार नाहीं. असो.

## बालविवाह

येथपर्यंत स्त्रियांना अवश्य अशा ज्ञानाबद्दल विवेचन केलें. आतां स्त्रियांच्या उन्नतीस पायबंद घालणाऱ्या व पर्यायानें सर्व समाजाचीच प्रगति खुंटविणाऱ्या कांही अनिष्ट रूढीचा विचार करूं. आपल्या समाजांत रूढ झालेली अत्यंत घातुक रूढी ह्मणजे बालविवाहाची होय. मुलीचा जन्म झाल्यादिवसापासून तिला चांगली कशीं वाढवावी, सुशिक्षणसंपन्न व सुविचारी कशीं बनवावी, याचा विचार करण्याऐवजी तिला कुठें द्यावी, कशीं हातावेगळी करावी, याचा विचारच घरांत चालू असतो. त्यामुळे तिला जुळेल तेथे व जुळेल त्या वेळीं कोठे तरी देऊन टाकण्याचा प्रयत्न बहुतेक ठिकाणी होत असतो. त्यामुळे अगदीं बालवयांतच कांही ठिकाणी तरी दहा वर्षें वयाच्या आंतच मुलींची लग्नें होत असलेलीं दिसतात. त्यामुळे त्यांचें शिक्षण तरी होत नाहीच परंतु त्यांची शारीरिक वाढहि खुंटते. या बालविवाहामुळेच समाजांत असंख्य बालविधवा दृष्टीस पडतात.

या बालविवाहामुळेंच आपल्यांत विधवापुनर्विवाहाचा अतिरेक झालेला दिसून येतो. या बालविवाहामुळे आपल्यांतील तरुण तरुणींना अकालीं वृद्धत्व येऊन अपमृत्युचें प्रमाण वाढत आहे. या बालविवाहामुळेच असंख्य बालमृत्यु होऊन प्रजा खुजी व रोगी होत आहे. या बालविवाहामुळेंच अनेक कुटुंबांत असंतोष माजून सोडचिठ्ठीसारखे प्रघात प्रचारांत येत आहेत. या व याप्रमाणें असंख्य दोषांस कारणीभूत होणाऱ्या अनिष्ट व घातुक अशा बालविवाहाच्या रूढीस पायबंद घालणें, समाजोन्नतीच्या दृष्टीनें अत्यावश्यक आहे. या दृष्टीने अलीकडे देशांत प्रयत्न चालू आहेत हें सुचिन्ह होय, व याच उद्देशानें शारदा-कायदाहि पास करण्यांत आला. परंतु तो कायदा इतका लवचीक व ढिलाईचा आहे कीं त्यापासून बालविवाहप्रतिबंधास फारसा उपयोग झालेला नाही. ह्मणून याहिपेक्षां परिणामकारक कायदा अस्तित्वांत आणण्याची पराकाष्ठा करण्यांत आली पाहिजे. त्याशिवाय या घातुक रूढीस आळा बसणार नाही. बालविवाहाप्रमाणेंच समाजघातास व ऱ्हासास कारणीभूत होणारी रूढी ह्मणजे जरठकुमारी-विवाह व कन्याविक्रय हे होत. मुलींना विक्रीच्या वस्तू समजून शेळयामेंढ्याप्रमाणें त्यांची विक्री करणें, पैशाकरितां पोटच्या पोळपाला एखाद्या ह्याताऱ्या-कोताऱ्याला कुरूप दरिद्र्याला किंवा अंध पंगूलाहि देणें ही गोष्ट हृदयशून्यतेचें चिन्ह असून दयाधर्माच्या व नीतीच्या विरुद्ध आहे. स्त्रियांनाहि पुरुषांप्रमाणेंच मन, बुद्धि विवेक व भावना आहेत असें समजून त्याप्रमाणें वागण्यांतच माणुसकी आहे. ह्मणून आपण मनुष्य या संज्ञेस पात्र होण्याकरितां अशा घातुक प्रकारांना आळा घातलाच पाहिजे.

## विधवाश्रमाची अवश्यकता

आपल्या समाजांतील आणखी एक निकडीची बाब ह्मटली ह्मणजे आपल्या समाजांतील विधवांची असहाय्य व शोचनीय स्थिति होय. एखाद्या दुर्दैवी स्त्रीवर ऐन तारुण्यांत दुर्दैवाचा घाला पडला तर तिची स्थिती अगदींच अनुकंपनीय होते. घरांत सर्व ऐश्वर्य असूनहि व नवऱ्याच्या हयातींत पूर्ण मालकी असतांनाहि आकस्मिक वैधव्याने तिला मोलकरणीची अवस्था प्राप्त होते. नवऱ्याच्या जिंदगीवर तिची काडीचीहि सत्ता चालत नाही. आपली वैधव्यावस्था खडतर काबाडकष्टांत व घरांतील निर्दय माणसांचे कठोर शिव्याशाप ऐंकण्यांत घालवावी लागते. या असह्य जाचाला व त्रासाला कंटाळून कित्येक भगिनी आत्महत्येस प्रवृत्त होतात. कित्येकांना उपजीविकेचें साधन नसल्याने केवळ उदर भरण्याकरितां पुनर्विवाह करण्याचे प्रसंग येतात. कित्येक सुशिक्षणाच्या अभावीं नरपशूंच्या मुलथापास फसून जातात. अशा रीतीने अभागी विधवांची स्थिति शोचनीय होते. ह्मणून विधवांची स्थिति सुधारून सुशिक्षणानें त्यांना स्वावलंबी बनविण्याच्या उद्देशानें ब्राह्मणसमाजांतील पुढाऱ्यांनी ' सेवासदन ' हिंगणें येथील ' अनाथ विधवाश्रम ' वगैरेसारख्या उपयुक्त संस्था स्थापून विधवांची स्थिति सुधारण्याचे स्तुत्य प्रयत्न केले आहेत. अशा उपयुक्त संस्थांची आपल्या समाजांत अत्यंत जरूरी आहे. अशा संस्थेंच्या स्थापनेंमुळे आपल्या समाजांतील विधवाविवाहअतिरेकास आळा बसून स्त्रियांना स्वावलंबनाचा मार्ग दाखविल्यासारखें होईल. तरी या महत्वाच्या प्रश्नाकडे समाजधुरीणांनी अवश्य लक्ष द्यावें.

## आपला धर्म

धार्मिक बाबींत स्त्रियाच प्रमुख असतात व स्त्रियांमुळेच धर्म राखला गेला आहे ही गोष्ट निर्विवाद होय. धार्मिक परंपरा स्त्रियांमध्ये जितकी जाज्वल्य असते तितकी पुरुषांत

[illegible] नाही. आज आपल्या धर्माला अनेक [illegible]मुळे शिथिलता आली आहे. त्यांतून [illegible]-पंचाचार्यवादानें तरी समाजांत मत-[illegible] माजून दुफळी पडली आहे. आप्तांआप्तांत [illegible], फार काय पण पतिपत्नीतसुद्धा [illegible] उत्पन्न होत आहे, ही अत्यंत शोचनीय [illegible] होय. ह्मणून हा गुरुविरक्तकलह [illegible] लवकर मिटेल तितकें तें समाज-[illegible] होणार आहे. या कलहामुळे परमपूज्य [illegible] सोमवृषभादि शिवशरणांची व आचा-[illegible] निष्कारण निंदानालस्ती होत आहे. [illegible] धर्मतत्वांचा प्रसार वाढून पाहून निष्कारण [illegible] वाढल्यामुळे धर्मबाह्य आचरणास [illegible] मिळत आहे. तरी हा वाद शक्य तितक्या [illegible] मिटवून दुफळीच्या आगींतून समाजाची [illegible] करणें हें प्रत्येक स्त्रीपुरुषाचें कर्तव्य [illegible]. वास्तविक वीरशैवांना इष्टलिंगाशिवाय [illegible] देव नाही. ज्याप्रमाणें पतिव्रतेला एका [illegible]शिवाय गति नाही त्याप्रमाणे भक्ताला [illegible] इष्टलिंगभक्तिशिवाय मुक्ति नाही. असें [illegible] आमच्या भगिनीवर्गात इष्टलिंगाकडे [illegible] करून नाना देवतांची भक्ति-उपासना-[illegible] करण्याकडे प्रवृत्ति वळावत आहे. इतकेंच [illegible], हिंदूंच्या असंख्य देवता अपुऱ्या वाटूनच [illegible] काय कांही भोळ्या व अज्ञ भगिनींचें लक्ष [illegible]मानांच्या पीरा-फकिरांनाहि नवस कर-[illegible], मरिआई, ह्मसोबा, खंडोबा, विठोबा, [illegible] आदि देवांना व दर्ग्यातील पीरांनाहि [illegible] दाखविण्यापर्यंत कांहींची मजल गेली [illegible]. इतकेंच नव्हेतर श्राद्धपक्ष करणें, सत्य-[illegible] करणें, पंढरपूरची वारी करणें, [illegible]तर देवदेवतांची नांवें आपल्या मुलांना [illegible] वगैरे प्रकार आमच्या महाराष्ट्रीय भगि-[illegible] विशेष दिसतात. अशा अनेकविध भक्तीनें [illegible] आपल्या एकनिष्ठ भक्तीस तर मुक-[illegible], पण आपल्या सर्वा संस्कृतीसहि पारखे होत आहोत. ह्मणून आमच्या भगिनीवर्गानें भगवान् बसवेश्वरांचे खालील वचन लक्षांत ठेवून इष्टलिंगाची वीरभक्ति करण्यास सुरवात करावी. "देवनोब्ब नाम हलवु । परम पति-व्रतेगें गंडनोब्ब । मत्तोंदक्केरगिदरे किवीमूग कोयिवनु । हलव देवर्मजल तिंबुवर ने नेंबे कूडलसंगमदेवा ।" ह्मणजे देव एकच आहे परंतु त्याला नांवें मात्र अनेक आहेत. पति-व्रतेला पती एकच असतो. जर ती आपल्या पतीकडे दुर्लक्ष करून अनेक पुरुषांना पती समजूं लागली तर ज्याप्रमाणें ती शिक्षेस पात्र होते त्याप्रमाणें वीरशैवाने एकदा स्वीकारलेल्या एका इष्टलिंगावरच भक्ति केली पाहिजे. असें न करतां नाना देवदेवतांची पूजा करून त्यांना नैवेद्य दाखवून त्यांचें उच्छिष्ट खाणारे पतित होतात. तरी आपल्या धर्मनियमाप्रमाणे वागून तीव्र स्वधर्माभिमानाचें बाळकडू बालवयापासूनच बालबालिकांच्या मनावर ठसविलें पाहिजे.

## महिलासंघ

आपल्यांत परस्परदळणवळण वाढून सामा-जिक प्रेमवृद्धि होण्यास व सामाजिक आणि धार्मिक कार्यक्षेत्रांत काम करण्यास शिकण्यास आपणास वारंवार अशा महिलापरिषदांतून किंवा ठिकठिकाणीं महिलासंघ स्थापून त्या संघांतून एकत्र जमून विचारविनिमय करण्यास शिकलें पाहिजे. एकत्र जमण्याची आपली संवय नाहींशी झाली असल्यामुळें आपलें जीवन, घरांतल्या मर्यादित व आकुंचित वातावरणांत कूपमंडूकाप्रमाणे बनलें आहे, ह्मणून विचार-जागृतीस वाव मिळून प्रत्यक्ष सामाजिक कार्य करतां येण्याकरितां ठिकठिकाणीं महिलासंघ स्थापणें अत्यावश्यक आहे. तरी या दृष्टीनें प्रयत्न करण्याबद्दल माझ्या भगिनीवर्गाला माझे आग्रहाचें सांगणें आहे.

# सोलापूर जिल्हा वीरशैव महिला परिषदेंतील ठराव

## अधिवेशन १ लें

सोलापूर जिल्हा वीरशैव महिला परिषदेच्या पहिल्या अधिवेशनास ता. ६-६-३७ रोजीं सकाळीं ९ वाजतां श्री. औंधकर यांचे थियटरांत सौ. पंचव्वाबाई सरदार यांच्या अध्यक्षतेखालीं सुरवात झाली. प्रथम उज्जयनीचे महास्वामी, बिळूर महास्वामी व बार्शीचे प्रसिद्ध नगरशेठ श्री. अण्णासाहेब कथले यांच्या निधनानिमित्त दुःखप्रदर्शनाचा ठराव पास झाला. नंतर हिंदुस्थानचे बादशहा सहावे जॉर्ज व सम्राज्ञी एलिझाबेथ यांच्या राज्यरोहणानिमित्त अभिनंदनपर ठराव पास करण्यांत आला.

नंतर सौ. ताराबाई ह्युमाने यांनीं, स्त्रियांना धार्मिक शिक्षण देण्याविषयींचा ठराव मांडला. त्याला सौ. सरस्वतीबाई वैरागकर यांनी रीतसर अनुमोदन दिल्यावर श्री गुरव्वाबाई मठपती, सौ. भागीर्थीबाई कटप वगैरेंची या ठरावाच्या पुष्ठयर्थ भाषणें झालीं. ठराव मतास घालतां सर्वानुमतें पास झाला. नंतर सभाधीटपणा येण्यासाठी व स्त्रियांना जरूर असलेल्या विषयांची माहिती मिळण्यासाठीं ठिकठिकाणी भगिनीमंडळें स्थापण्याविषयींचा ठराव सौ. गौरव्वाबाई झाडबुके यांनी मांडला. या ठरावास सौ. शशिकला गुळवे यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला.

नंतर बालिकापासून प्रौढ स्त्रियापर्यंत सर्वांना शिक्षण देण्याविषयींचा ठराव सौ. प्रयागबाई रकटे यांनी मांडला. त्याला सौ. पद्मावाई देशमुख जहागीरदार मालकी, सौ. विभूति, सौ. कटप, यांनीं अनुमोदन दिल्यानंतर ठराव सर्वानुमतें पास झाला. पुढें श्री. सिद्धव्वाबाई तपकीरे बार्शी यांनी हुंड्याच्या चालीला समाजांतील जाणत्या व पुढारलेल्या माणसांनी आळा घालून ती चाल नष्ट करून टाकण्याविषयींचा ठराव मांडला. त्याला सौ. मैनाबाई रामलिंग पत्रे यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला. नंतर समाजांचें चांगल्या तऱ्हेनें संघटन होण्याकरिता मराठी बोलणाऱ्या लिंगायत समाजाच्या भागांत कानडी शिक्षण देण्याची सोय होण्याविषयींचा ठराव सौ. चंपाबाई खलीपे यांनी मांडला. त्याला सौ. पद्मावाई जहागीरदार मालकीकर यांनी अनुमोदन दिलें. परिषदेच्या अध्यक्ष सौ. पंचव्वाबाई सरदार यांनीं या ठरावावर अत्यंत मुद्देसूद, विचारपरिप्लुत व विवेचनात्मक भाषण करून सदर ठरावास पुष्टि दिली. ठराव मतास घालतां सर्वानुमतें पास झाला. नंतर स्त्रियांना व प्रसंगीं मुलींच्या शाळांतून सक्तीने स्वसंरक्षणाइतकें शारीरिक शिक्षण देण्याचा ठराव कु. सुमंगला सरदार यांनी मांडला. सौ. भागीर्थीबाई पिसे यांनी अनुमोदन दिलें. या ठरावावरहि अध्यक्षांचे फार वेळपर्यंत भाषण झालें, व हा ठराव सर्वानुमतें पास झाला. नंतर समाजांतील बालविवाहाची अनिष्ट रूढी बंद पाडण्याविषयींचा ठराव सौ. भागीर्थीबाई वायगांवकर यांनी मांडला. त्याला सौ. चंपाबाई योगीराज पिसे यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला. वीरशैवांना इष्टलिंगाशिवाय दुसरा देव नाहीं

वरें असतांना इतर देवदेवतांची पूजा करण्याची अविष्ट प्रवृत्ति आपल्या समा-जांत वळावत असल्यामुळें ही प्रवृत्ति नाहींशी करून सर्व भगिनींनी 'इष्टलिंग' पूजाच करावी अशाविषयींचा ठराव कु. सुमंगला सरदार यांनी मांडला. त्याला कु. शांता देवणें यांनीं अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वांनुमतें पास झाला.

नंतर अध्यक्षांचें समारोपाचें भाषण होऊन आभारप्रदर्शनपर भाषणें झाल्यानंतर फोटोचा कार्यक्रम झाल्यानंतर परिषदेचें काम आटोपलें.

---

# वीरशैवांतील चळवळी

## पहिला अभिनंदनीय आदर्श प्रीतिविवाह.

( आमच्या बातमीदाराकडून )

'वी. संजीवनी'चें माजी सहसंपादक व नव-तरुणांचे पुढारी श्री. वि. तु. ऊर्फ बाबुराव चौधरी, बी. ए., ह्यांचा श्री. मल्लाप्पा शिरप्पा कुऱ्हे ह्यांची ज्येष्ठ कन्या कु० रत्नावती कुऱ्हे ह्यांचेशीं गुरुवार ता. १७।६।३७ रोजीं नागपूर येथें गोरजमुहूर्तावर विवाह झाला. कु० रत्नावती कुऱ्हे ह्या "कु. श्यामलता" ह्या नांवानें 'वी. संजी-वनी'च्या वाचकांना लेखनद्वारा परिचित आहेत. विवाहाला वधुवरपक्षीय आप्तेष्ट मंडळी व श्री. चौधरींची बरीचशी स्नेही मंडळी हजर होती. श्रीमंत रामभाऊशेट कुळ्ळी रोहिण-खेड, श्रीमंत गोपाळराव मुसरे इजारदार पुसद, श्री. आप्पासाहेब एकलारे वकील, श्रीमंत आनंदराव शेंवाळकर मालगुजार, सेवापूर मोसरी, दारव्ह्याचे श्रीगुरु विरलिंग स्वामी, नामदेवआप्पा, व गणपतआप्पा कोरे, श्री. खंबाडे, कारंजाचे श्री. विश्वनाथआप्पा तांदळें, चांदूर-बाजारचे डॉ. आप्पाराव व बाळासाहेब संगेकर, आडगांवचे श्रीमंत ओंकारआप्पा व गोपाळआप्पा धाके, अमरावतीहून श्रीगुरु. करबसअय्या स्वामी लासीनकर, श्री. दादाशास्त्री किर्तनकार, श्री. कोल्हे, अंबेकर, एलगुंदे, मुचळंबे, नागठाणे, हातोले, चाकोते, मिसे, डॉ. भिवापूरकर, डॉ. मुल्हेरकर, शंकरराव फणसाळकर, श्री. काशिरावबापु देशमुख, सुर्जीअंजनगांवहून श्री. गणेशलाल, सदाशिवराव पवार, सुरजलाल, श्री. अबदुल अजीज नबाब, आष्टीहून आप्पासाहेब देशपांडे वगैरे मंडळी आली होती. खुद्द नागपूरची बरीच निमंत्रित स्नेही मंडळी जमली होती. त्यांतील कांही प्रमुख पुढीलप्रमाणें—रे. भ. पुनमचंद

शंका, जनरल आवारी, दे. भ पन्नालालजी देवडिया सौ. विद्यावती देवडिया, श्री. बजरंग ठेकेदार, M. L. A., डॉ. लक्ष्मणराव कोकर्डेकर, डॉ. विष्णुपंत पांडे, श्री. मामासाहेब लातुरकर. सिव्हिल सुपरिन्टेंडेंट, श्री. यशवंतराज मुदलीयार. सर्कल इन्स्पेक्टर ऑफ पोलिस, श्री. मदन गोपाल नायडू, दे. भ. राजाभाऊ डांगरे, श्री. विठ्ठलराव डांगरे, श्री. तानबाजी जंगम दलाल, श्री. गजानन आप्पा डोंगरे, श्री. शामराव मास्तर मेवकुदळे, जे. व्ही. कुरझाडकर वकील, श्री. वामनराव डांगरे, श्री. विश्वेश्वर आप्पा डोंगरे, श्री. बी. एस्. सालपेकर, वगैरे मंडळी विवाहप्रसंगीं हजर होती.

वधुवरांना बरेच शुभसंदेश आले होते त्यांतील कांही प्रमुख पुढीलप्रमाणें:— ना. बाबासाहेब खापर्डे, मध्यप्रांतसरकारचे दिवाण, माजी दिवाण बॅ. रामराव देशमुख, वऱ्हाड प्रा. कॉंग्रेस कमेटीचें अध्यक्ष व कौ. ऑफ स्टेटचे मेंबर ना. ब्रिजलालजी बियाणी, "वीरशैव गर्जना "कार श्रीस्वामी परांडकर, बार्शी, दे. भ. नानासाहेब बामणगांवकर, मि. समिउल्लाखान मालगुजार सिर्री, श्री. पी. वाय. देशपांडे वकील, वैद्य हरिहरराव ऊर्फ भैय्यासाहेब देशपांडे, श्रीमंत येसुसंगई सोनासंगई अंजनगांव सुर्जीकर, श्री. आप्पासाहेब देशपांडे, दे. भ. डॉ. पिंपरकर परतवाडा, धूगांवकर श्री. आप्पासाहेब देशपांडे, श्री. नानासाहेब जतकर तहसिलदार पुसद, श्री. कृष्णाप्पा कल्लुरे चांदा, श्री. एस्. टी. बारसकर मोर्शी, श्री. शंकरराव आगाशे पुणें, डॉ. भगवानसिंग पुसद, श्री. कल्याणकर पुसद, श्री. सोमेश्वरआप्पा कोल्हे, श्री. लिंगाप्पा वर्ते, श्री. दिनकरराव दीक्षित, श्री. यशवंतराव हुर्णे, श्री. जयवंतराव देशमुख, श्री. बाबाआप्पा एन्. चपळगे हिंगणघाट, वगैरे.

सकाळी ११॥ वाजतां श्रीगुरु करबसय्या स्वामी लासिनकर ह्यांचे पौरोहित्याखाली आवश्यक धार्मिक व शास्त्रशुद्ध विधीनें विवाह लावण्यात आला, व सायंकाळीं ६॥ वाजतां नवमतवाद्यांच्या पद्धतीप्रमाणें वधुवरांनी एकमेकांना हार घालून, आलेल्या पाहुणे मंडळींचें स्वागत करण्यांत आल्यावर, अमरावतीचे प्रसिद्ध ब्राह्मणेतर पुढारी श्री. काशिरावबापू देशमुख ह्यांनीं वधुवरांचें गुणवर्णन व परिस्थितीनिदर्शक अशीं स्वकृत मंगलाष्टकें म्हटलीं.

दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांनी उपस्थित मंडळींना वधूवरांची ओळख करून दिली व ज्या परिस्थितींत हा विवाह घडून येत आहे तिची व वधुवरांच्या ध्येयनिष्ठ स्वार्थत्यागाची थोडक्यांत माहिती देऊन, वीरशैवसमाजांतील ह्या पहिल्याच व आदर्श प्रीतिविवाहाचें अभिनंदन केलें.

सौ. विद्यावती देवी देवडिया, नागपूर-म्यु. कौंसिलर, व प्रसिद्ध राष्ट्रीय कार्यकर्त्या ह्यांनी मानवी जीवनांत विवाहाचें स्थान व स्त्रियांचा सामाजिक दर्जा, तसेच विवाहसंस्थेकडे पहाण्याची सामाजिक प्रचलित सदोष दृष्टि व ती बदलण्याची आवश्यकता वगैरे स्त्रीजीवनविषयक महत्वपूर्ण माहितीने भरलेलें भाषण केलें, व स्त्रीवर्गातर्फे वधुवरांचें अभिनंदन केलें. श्री. बाबुराव चौधरी ह्यांनी स्वतःतर्फे व वधू सौ. वसंतप्रभा चौधरी ह्यांचेतर्फे जमलेल्या सर्व पाहुणे मंडळींचें

त्यांनी उपस्थित राहून दाखविलेल्या सहानुभूतिबद्दल, आभार मानले.

नंतर पुष्पहारांनी मंडित केलेल्या मोटारींतून वधुवरांची मिरवणूक काढण्यांत आली. मिरवणूकींत दे. भ. पुनमचंद रांका, जनरल बावारी, दे. भ. पन्नालालजी देवडिया, श्री. सौ. विद्यावती देवडिया, श्री. बजरंग ठेकेदार, श्री. चैतन्यदास अग्रवाल, दे. भ. राजाभाऊ डांगरेप्रभृति मिरवणुकीच्या अग्रभागीं होते. जवळ जवळ ५—६ शें प्रतिष्ठित व सन्माननीय नागरिक मिरवणूकींत शामील झाले होते. वधुवरांनी देवदर्शन घेतल्यावर शेठ पुनमचंद रांका ह्यांचे येथें मिरवणूक थांबली. तेथे दे. भ. पुनमचंद रांका यांनी वधुवरांना हार समर्पण केलें, व जमलेल्या सर्व मंडळींना पानसुपारी दिली. अशा तऱ्हेने वीरशैवसमाजांतील हा पहिलाच आदर्श प्रीतिविवाहाचा समारंभ संपला.

---

वी. तरुण संघ नागपुर तर्फें अभिनंदनः—
श्री. बाबुराव चौधरी बी. ए. व सौ. रत्नप्रभा चौधरी ह्यांचे प्रीतिविवाहानिमित्त अभिनंदन व सन्मानार्थ संघाचे ऑफिसांत शनिवार ता. १९ रोजी रात्रौ ८॥ वाजता सभा भरली होती. सभेला स्त्रीवर्गहि बराच जमला होता. प्रथम दे. भ. राजाभाऊ डांगरे, वामनराव डांगरे, श्रीमति पार्वतीबाई हंबे ह्यांची भाषणें झाली. सर्वांनी सौ. रत्नप्रभा चौधरी ह्यांच्या स्वार्थत्यागाची व धैर्याची वाखाणणी करून विरोधी परिस्थितींतहि अखेर आपलें ध्येय गांठलें म्हणून ह्या प्रीतिविवाहाबद्दल उभयतां वधुवरांचें अभिनंदन केलें. श्री. बाबुराव चौधरी यांनी प्रौढसंमतिविवाह व सहवासोत्तर विवाह यांची थोडक्यांत मिमांसा करून आपल्या ह्या विवाहाबद्दल सहानुभूति व्यक्त करण्याकरितां केलेल्या गौरवाबद्दल सर्वांचे आभार मानले. सौ. रत्नप्रभा चौधरी ह्यांनी स्त्रीजीवनांत विवाहाचा प्रश्न किती महत्वाचा आहे व तो प्रत्येकांनी आपली सामाजिक जबाबदारी ओळखून कसा सोडवून घ्यावयास पाहिजे हें थोडक्यांत सांगून, मंडळीचे आभार मानले. सभेला हजर असलेले श्री. जेठी आप्पा भुसावर ह्यांनी वधुवरांचे अभिनंदनार्थ स्वकृत काव्य ह्मणून दाखविले. संघाचे अध्यक्ष श्री. सालपेकर ह्यांनी उभयता वधुवरांना व चांदूरबाजारचे निमंत्रित पाहुणे डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांना हारतुरे व अत्तर-गुलाब देऊन सन्मान केला.

सभेला श्री. तानबाजी जंगम दलाल, श्री. महादेव सिद्धाप्पा नखाते, श्री. गजानन आप्पा डोंगरे, श्री. राजाराम आप्पा मेनकुदळें, श्री. गंगाधर आप्पा मार्कंडवार श्री. जेठी आप्पा भुसावार, श्री. बळीराम आप्पा पेठकर, श्री. गणपती आप्पा सोंदरे, श्री. आत्माराम आप्पा मेनकुदळें, श्री. बुलाप्पा जुननकार, श्री. कमलाकर बावरे, दे. भ. राजाभाऊ डांगरे, श्री. जे. व्ही. कुरझाडकर वकील, श्री. विश्वेश्वर आप्पा डोंगरे वगैरे प्रमुख मंडळी होती. असें बी. एस. सालपेकर, संघाचे अध्यक्ष, कळवितात.

सौ. विद्यावती देवडिया कडील फलाहार व सन्मानः—रविवार ता. २० रोजी सौ. विद्यावती देवडिया, म्यु. कौंसिलर, ह्यांचेकडे वधुवरांना एक छोटेंखानी फलाहाराची पार्टी देण्यांत आली. पार्टीला वधुवराखेरीज दे. भ. राजाभाऊ डांगरे, श्री. बी. एस.

चालपेकर, श्री. वामनराव डांगरे, श्री. विश्वेश्वर आप्पा डोंगरे, श्री. भिमाशंकर आप्पा कोल्हे अमरावती, श्री. बाळासाहेब संगेकर चांदूरबाजार, वगैरे मंडळी होती. विद्यावती बाईंनी आपल्या १—२ सुंदर कविताहि पेटीवर गोड कंठानें ह्मणून दाखविल्या.

### श्री गजानन आप्पा डोंगरे ह्यांचेकडे

सन्मानः-- वधुवरांचा श्री. गजाननआप्पा डोंगरे ह्यांचेकडे पानसुपारी व हार वगैरे रविवारी रात्रौ १० वाजतां अर्पण करण्यांत आले.

### दे. भ. राजाभाऊ डांगरे यांची मेजवानी

दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांनी सोमवार ता. २१ रोजी सायंकाळी वधुवरांना एक पाटाची मेजवानी दिली. श्री. भिमाशंकर आप्पा कोल्हे श्री. बाळासाहेब संगेकर वगैरे मंडळीहि होती.

---

## अमरावती

### वीर वामनराव जोशींचा आशीर्वाद

वऱ्हाडांतील पहिल्या दर्जाचे देशभक्त व स्वार्थत्यागी कॉंग्रेस – कार्यकर्ते वीर वामनराव जोशी हे प्रकृतिचे अस्वास्थ्यामुळें नागपूरला विवाहप्रसंगीं हजर राहूं शकले नाहीत. वीर वामनराव व श्री. बाबुराव चौधरी ह्यांचें गुरुशिष्यांचें नातें असल्यामुळे नागपूरहून विवाह आटोपून अमरावतीस येतांच श्री. बाबुराव चौधरी व सौ. रत्नप्रभा चौधरी हे उभयतां वीर वामनरावांचा आशीर्वाद घ्याव-यास गेले होते. वीर वामनराव व त्यांच्या पत्नी सौ. राधाबाई जोशी ह्यांनी उभय-तांना मंगल आशीर्वाद दिला.

---

### वीरशैव नवयुवकांचे तर्फे सन्मान

मंगळवार ता. २२ रोजी रात्रौ श्री. भिमाशंकर आप्पा कोल्हे ह्यांचे माडीवरील दिवाणखान्यांत वीरशैव नवयुवकांनी जपूर पानसुपारीचा कार्यक्रम केला, व उभयतां वधुवरांचें अभिनंदन केलें. श्री. वणाप्पा हेरे ह्यांनी हार समर्पण केल्यावर वधुवरांनी सर्व जमलेल्या मंडळीचे आभार मानले. येथील कॉलेजांतील विद्यार्थी व चांदूर बाजारचे कवि श्री. राठोड ह्यांनी प्रसंगाला अनुरूप कांही कविता गाऊन दाखविल्या.

---

### शिर्डी (ता. आर्वी)

शिर्डीचें मालगुजार मे. समिउल्लाखान ह्यांनी मुद्दाम निमंत्रण पाठ-वून उभयतां वधुवरांना शुक्रवार ता. २५-६-३७ रोजी बोलाविले होते. श्री. चौधरी ह्यांचेबरोबर त्यांची ५-६ स्नेही मंडळीहि आली होती. मे. समिउल्लाखानसाहेब ह्यांचे-कडें पानसुपारी व सत्कार करण्यांत आला. त्याचप्रमाणें श्री. नानाआप्पा कोल्हे, श्री. विश्वनाथ आप्पा कापसे, श्री. छगनलाल चांडक, श्री. बुद्धाप्पा कापुसकरी, श्री. जनार्दन सोनार, वगैरे मंडळीकडेहि वधुवरांना पान-सुपारी झाली.

**मोर्शी**:—श्री. आप्पासाहेब वानखडे, एम्. ए., एल्. एल्. बी. वकील, ह्यांचेकडे श्री. बाबु-राव चौधरी व सौ. रत्नप्रभा चौधरी ह्यांना अल्पोपहार व पानसुपारी देण्यांत आली.

पांढूर बाजारः--श्रीमंत सोपाप्पा महा-
[illegible] संवेकर, म्यु. कमेटीचे व्हाईस चेअरमन,
[illegible] श्री. बाबुराव चौधरी व सौ. [illegible]
[illegible] चौधरी ह्यांना विवाहानिमित्त सोम-
वार ता. २८-६-३७ रोजी थाटाची मिज-
[illegible] व पानसुपारी झाली, व गांवात द्रुत-
[illegible] पानसुपारी व सन्मान झाला.

### अहमदनगर

अहमदनगर. ता. १५-६-३७ रोजी अ.
[illegible] तरुणसंघाची पहिली बैठक शहरतरुण-
[illegible] अध्यक्ष श्रीयुत शांतलिंग भगवान
[illegible] ह्यांच्या अध्यक्षतेखालीं संघाच्या
[illegible] भरुन खालील तीन ठराव पास
[illegible], त्या वेळी सभासदांची संख्या निम्म्या-
[illegible] पुष्कळशी अधिक होती. त्यांत सावळे-
[illegible] शेठ, सोळसे, व पाहुण्यापैकीं मुंबईचे मि.
[illegible] के. होले, हेहि हजर होते.

ठराव १:— अहमदनगर शहर त.संघाची
[illegible] जि. तरुण संघाला अ. जि. वीरशैव
[illegible] भरविण्याबद्दल विनंती करणें.

ठराव २:—नगर मधील वीरशैवांच्या
[illegible]भूमिकरितां असलेंल्या जागेला कुंपण
[illegible].

ठराव ३:—परवांच्या मुंबईमधील दंग्यांत
[illegible] श्री. ह. भ. भाऊसाहेब चांदेकर
त्यांच्या दुःखांकरितां सर्वांनी उभे राहून
[illegible] पास करणें

( सर्वांनी उभे राहून हा ठराव पास केला )
[illegible] ३ ठराव पास झाले व सभा
[illegible] झाली.

आपला
(कुमार सिताराम होनराव सेक्रेटरी, अ.
[illegible] सं. )

---

" सोलापूर येथील एक वीरशैव विद्यार्थी श्री. शिवणप्पा महांतप्पा पाटील हे मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. ए. परीक्षेत सेकंड क्लास ऑनर्समध्यें उत्तीर्ण झाले. अर्थशास्त्रासारख्या कठिण विषयामध्यें उत्तम रीतीनें ऑनर्स मिळविणारे सोलापूर जिल्ह्यांतील हे पहिलेच वीरशैव विद्यार्थी होत. "

---

## लिंगायत-कोकणस्थ-विवाह

सावंतवाडीः-- सावंतवाडी येथें रविवार ता. १३ जून रोजी चराठें येथील डॉ. भागवत यांच्या आश्रमांत सांगलीचे सेवानिवृत्त मामले-दार श्री. केशवराव पटवर्धन यांच्या कन्या कु. कमलाबाई पटवर्धन यांचा श्री. नीळकंठ बापू बुरले नांवाच्या लिंगायत गृहस्थाशीं वैदिक पद्धतीनें पण सर्व अनवश्यक आचारांना फांटा देऊन विवाह झाला. श्री. बुरले हे अथणीचे असून व्यवसायपरत्वें गेली ५ वर्षे सांगलीस असतात. ब्राह्मणलिंगायतांतील एक प्रतिलोम प्रेमविवाह या दृष्टीनें हा विवाह उल्लेखनीय वाटतो.

या विवाहेच्छु वधुवरांना वेंगुर्लें येथील जातपाततोडकमंडळांच्या कार्यवाहकांनीं शक्य ते सहाय्य केलें. विवाहसमारंभास जातपाततोडक मंडळाचे चिटणीसद्वय, भय्यासाहेब केळूसकर, दादा महाजन, प. जि. नाडकर्णी वकील, मे. द. शिरोडकर व सावंतवाडीची तरुण मंडळी मिळून सुमारें ४५ लोक हजर होते. विवाहसमारंभानंतर श्री. केळूसकर यांनीं मंडळाचे उद्देश व कार्य यांच्या संबंधानें माहिती सांगितली व वधुवरांचा सर्वांना परिचय करुन दिला. भोजनोत्तर श्री. नी. बा. बुरले यांनीं स्वतःची माहिती सांगून मंडळीचे आभार मानले. डॉ. भागवत व श्री. मे. द. शिरोडकर यांनीहि या प्रसंगीं वधुवरांचें अभिनंदन करणारीं छोटी भाषणें झालीं.

# आभारप्रदर्शन.

मानवी जीवनांत विवाहाला महत्वाचें स्थान आहे व त्यामुळे त्याला विरोधाची पार्श्वभूमि असली तर विशेष महत्व प्राप्त होतें. व अशा परिस्थितीत सहानुभूति दाखविणाऱ्यांच्या सहानुभूतीलाहि मोल चढतें. नागपूर मुक्कामी गुरुवार ता. १७-६-३७ रोजी कु. रत्नावती मल्लाप्पा कुन्दे ह्यांचेशीं झालेल्या माझ्या विवाहप्रसंगी शुभसंदेशाचे रूपानें माझ्या कांही पितृतुल्य स्नेह्यांनी व बरोबरीच्या सोबत्यांनी जी सहानुभूति दाखविली त्यामुळें मला आनंद झाला आहे व सार्वजनिक कार्याच्या दृष्टीनें एक तऱ्हेचा हुरुप आला आहे. साधारण परिस्थितींतील माणसाला 'लोकांची सहानुभूति' हेंच सार्वजनिक कार्यातील मोठ्यांतलें मोठें भांडवल होय !

माझ्या विवाहप्रसंगीं आपली सहानुभूति व्यक्त करण्याकरिता मध्यप्रांत-सरकारचे दिवाण बा. बाबासाहेब खापर्डे, माजी दिवाण डॅ. रामराव देशमुख, वऱ्हाड प्रां. कॉं. कमेटीचे अध्यक्ष व कौंसिल ऑफ स्टेटचे सभासद बा. ब्रिजलाल बियाणी, वीर वामनराव जोशी, बार्शीचे "वीरशैव गर्जना"कार स्वामी परांडकर दे. भ. नानासाहेब वामणगांवकर, सिरींचे मालगुजार शे० समिउल्लाखान, कॉमरेड पी.वाय. ऊर्फ बाबासाहेब देशपांडे वकील, ह्या विविध कार्यक्षेत्रांतील मोठ्यातल्या मोठ्या कार्यकर्त्या सन्माननीय सज्जनापासून तो माझ्या साधारणांतल्या साधारण मित्रां-पर्यंत सर्वांनी शुभाशीर्वादाचें मंगल संदेश पाठवून मला कृतज्ञ करून ठेवले आहे!

नागपुरांतील माझ्या विवाहनिमंत्रणपत्रिकेवर सह्या करणाऱ्या दे. भ. पुनमचंद रांका व सौ. विद्यावती देवडीया प्रभृतिसंबंधीं तर बोलावयालाच नको! यांनी तर सर्व कामांत जबाबदारीनें पुढाकार घेतला होता. माझे स्नेही व ज्ञातिबंधु दे. भ. राजाभाऊ डांगरे ह्यांचे तर घरींच जणु विवाहाचा मांडव पडला होता. आपल्या लहान भावाचेच लग्न आहे ह्या भावनेनें दे. भ. राजाभाऊ व त्यांच्या कुटुंबांतील थोरापासून तो पोरापर्यंत सारीं माणसें शेंवटपर्यंत झटत होती.

व आमच्या समाजांत "क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे" ह्या ध्येयानुरुप सामाजिक सुधारणेचें कार्य करणाऱ्या नागपूरच्या वी. तरुण संघांतील सर्व सभासद विशेषतः संघाचे अध्यक्ष श्री. सालपेकर श्री. विश्वेश्वर डोंगरे, श्री. वामनराव डांगरे वगैरे मंडळींनी तर स्वयंसेवकांच्याही उत्साहाला लाजविणाऱ्या उत्साहानें सर्व प्रसंगीं भाग घेतला. वरील सर्व माझ्या सन्माननीय स्नेह्यांचे, त्यांनीं दाखविलेल्या सहानु-भूतिबद्दल मी जाहीर आभार मानतों.

तद्वतचः— हा विवाह कुणाहि व्यक्तीचा मानापमानाचा मुळीच प्रश्न नव्हता व तो तसा कुणींहि समजू नये. नव्या व जुन्या विचारसरणीचा तो झगडा होता. तरी देखील माझेकडून कुणाचा जाणून बुजून किंवा अजाणतेंपणानें अपमान झाला असेल, कुणाची मनें दुखावलीं असतील, तर every thing is fair in love and war" (प्रेम व युद्ध ह्यात सर्वच क्षम्य असते) ह्या इंग्रजी म्हणीकडे लक्ष देऊन उदार अंतःकरणानें सर्वांनी मला क्षमा करावी एवढीच नम्र विनंती आहे.

अमरावती<br>
२९-६-३७ इ.

वि० तु० चौधरी.

वरील आभारप्रदर्शनांत श्री. बाबुराव चौधरी ह्यांची धर्मपत्नी ह्या नात्यानें मीहि सहभागी आहें.

सौ० रत्नप्रभा चौधरी.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ जुलै १९३७ ( अंक १४ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. ) ( किरकोळ अंकास २ आणे

# सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेचे प्रमुख कार्यकर्ते.



श्री. गणपत रामलिंग ऊर्फ काकासाहेब झाडबुके,
सो. जि. वी. परिषदेचे स्वागताध्यक्ष.



श्री. डी. जी. गावसाने,
बी. ए., एल् एल्. बी.,
परिषदेचे प्रमुख कार्यकर्ते



सौ. शांताबाई गावसाने, स्वागताध्यक्ष,
सो. जि. वीरशैव-महिला-परिषद.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—∗ जुनें वर्ष पांचवें ∗—

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति आषाढ शु० ८ शके १८५९ ( अंक १४ वा.

# सोलापूर-जिल्हापरिषदेचें कार्य

संपादकीय

सोलापूर जिल्ह्याची तिसरी वीरशैव-परिषद बार्शी येथे जूनच्या पांच-सहा तारखांना बेळगांवच्या लिंगराज कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. नंदीमठ यांच्या अध्यक्षतेखाली पार पडली. पार पडली इतकेंच नव्हे तर पूर्वींच्या दोन्ही अधिवेशनापेक्षाहि ती अधिक यशस्वी झाली असें म्हणावयास आह्माला तरी कांहींहि हरकत दिसत नाहीं. पूर्वींच्या दोन अधिवेशनापेक्षां विशेष असें नवीन अधिक या परिषदेंत जरी कांहीं घडलें नाहीं तरी सोलापूर जिल्ह्याला महाराष्ट्रांतील वीरशैवांत अग्रगण्याचा मान आहे; तेव्हां ह्या जिल्ह्याची प्रातिनिधिक परिषद पर्यायाने सर्व महाराष्ट्रीय वीरशैव बंधूंना वळण लावूं शकते इतकें तींत सहजच सामर्थ्य आहे. कारण सोलापूर-जिल्ह्यांत वीरशैवांची लोकसंख्या सर्वांत अधिक. त्यामुळें श्रीमंत, कुलीन व संस्कारसंपन्न वीरशैवांची घराणींहि ह्या जिल्ह्यांत अधिक. शिवाय सध्या सर्वत्रच साक्षरतेचा प्रसार अधिक होत असल्यामुळे नव्या शिक्षितांचा भरणाहि ह्या जिल्ह्यांत विशेष प्रमाणांत आढळला तर नवल नाहीं. ह्या सर्व प्रकारानें सोलापूर जिल्ह्याला महत्व असल्यामुळे सोलापूर जिल्हा हे महाराष्ट्र वीरशैव बंधूंना

केंद्रस्थानीं आहे. आणि ह्मणून सदर जिल्ह्यांतून निर्माण होणारी चळवळ वा विचार हे महाराष्ट्र–वीरशैवबंधूंस विशेष उपकारक झाले तर नवल नाहीं.

## परिषदेची उत्पत्ति

सोलापूर येथें १९०७ मध्यें वीरशैवमहासभेचें अधिवेशन मोठे यशस्वी तऱ्हेनें पार पडलें होतें. कै. आप्पासाहेब वारद वगैरे महासभेचे प्रमुख जवक सोलापूर शहरांत पद्मात असल्यामुळें तेव्हांपासून ह्या भागांत नव्या जागृतीचें व संघटनेचें वारें सारखें संचरत आहे. शिक्षणविषयक प्रसाराकरितां फंडाच्या स्थापनेची व्यवस्था करणें, विद्यार्थ्यांकरितां छात्रालयांची स्थापना करणें, वगैरे बाबतींत प्रथम ह्या जिल्ह्यानेच आघाडी मारली. तथापि प्रांतिक भाषावार वीरशैवांची संघटना करण्याकरितां परिषदा वगैरे बोलावणें हा उपक्रम सोलापूर जिल्ह्यांत अलिकडेच सुरू झाला. तत्पूर्वी ही जागृति मध्यप्रांत–वऱ्हाडांत झाली, आणि नंतर सातारा येथे महाराष्ट्र—वीरशैवधर्म–परिषद सोलापूरचे निजगुण स्वामी यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. पण त्यानंतर सर्वत्र एक प्रकारें थंडावाच आला होता. पुणें येथे 'वीरशैव केसरी' १९२९ मध्ये निघू लागल्यानंतर सोलापूर–जिल्हा–परिषदेचें पहिलें अधिवेशन बॅ. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली पंढरपूर येथें पार पडलें. दुसरें अधिवेशन डॉ. जगदेवराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें व तिसरें अधिवेशन डॉ. नंदीमठ यांच्या अध्यक्षतेखाली बार्शी येथे नुकतेंच झालें. ह्याप्रमाणें तीन अधिवेशनें जिल्हा – परिषदेची दोन तीन वर्षांच्या अंतरानें कां होईना पार पडणें हेंच विशेष.

## परिषदेचें महाराष्ट्रीय स्वरूप

सोलापूर – जिल्हा – परिषदेचें बार्शी येथें अधिवेशन होण्यापूर्वी दुर्दैवानें श्रीमंत अण्णासाहेब कथले यांच्यासारखा वीरशैवांचा एक मोहरा कैलासवासी झाल्यामुळें परिषदेवर दुःखाची छटा पसरली होती हें खरें. पण परिषदेचें कार्य त्यांच्याच पुण्याईनें पार पाडण्यांत श्रीमंत झाडबुके व श्री. गवसाने वकील पुढे आल्यामुळें परिषद यशस्वी व प्रातिनिधिक स्वरूपाची होऊं शकली. शिवाय परिषदेला जिल्ह्याबाहेरील डॉ. नंदीमठ यांच्यासारखा विद्वान्, बहुश्रुत, शांत आणि मुंबई — विद्यापीठाच्या सिनेटमध्ये काम केलेला पुरुष अध्यक्षस्थानीं लाभल्यामुळें सदर जिल्हा – परिषदेला सहजच जिल्ह्याची मर्यादा सोडून अधिक व्यापक स्वरूप प्राप्त झालें होतें. त्यांतच उमरावतीचे दे. भ. बाबासाहेब बामणगांवकर, कऱ्हाणचे वटाणे, उदगीरचे श्री. संग्रामप्पा व प्रभुदेवराव वगैरे सन्माननीय व प्रसिद्ध पुढारी हजर राहिल्यामुळें अखिल महाराष्ट्राच्या प्रतिनिधींची परिषद असें तिला सहजच रूप प्राप्त झालें. आणि परिषदेंतील सर्व ठरावहि तसेच आहेत. परंतु सोलापूर–जिल्हा–परिषद योग्य तऱ्हेनें प्रातिनिधिक स्वरूपाची नव्हती अशी टीका परिषदेंत भाग घेणाऱ्या व्यक्तींकडून तिकडील वर्तमानपत्रांत होत असलेली आह्मी ऐकतों. आणि ह्याला कारण सोलापूर जिल्ह्यांतील जागृतीचे आधारस्तंभ जे श्रीगुरु परान्डकर स्वामी हे ह्या प्रसंगाला हजर नव्हते हें होय.

## परांडकरस्वामींची गैरहजेरी कां ?

वास्तविक पाहिलें असतां परान्डकर महाराज इंदूरला एका लग्नाकरितां गेले होते व तेथून ते मुंबईला परतल्यावर मुंबईत त्यांना परिषदेचे बरेच दिवस खाजगी कामाकरितां घालविणें भाग होतें. ह्या त्यांच्या अडचणींचा अर्थ असा होऊं शकत नाहीं कीं, त्यांनी ही परिषद मुद्दाम बहिष्कृत केली होती. ही परिषद

[illegible] त्यांना बहिष्कृत करावयाची असती तर सोलापूर-जिल्हा-परिषदेच्या कार्यकारी मंडळानें [illegible] कार्याध्यक्षांनी तिला मान्यता दिलीच नसती. [illegible] शिवाय त्याचे बार्शी-पंढरपूरचे अनेक अनुयायी [illegible] हजर होते ते तरी कशाचे दर्शक ? तात्पर्य [illegible] की, परान्डकरस्वामींनीं वा त्यांच्या पक्षानें [illegible] परिषद बहिष्कृत केली होती अशी हूल [illegible] ह्मणजे ज्या परिषदेंत आपण भाग [illegible] व जी यशस्वी केली ती परिषद पूर्णपणें [प्रा]तिनिधिक नव्हती अशी कबूली देणेंच होय. [illegible] बार्शी-परिषदेच्या निवकांनी, व स्तुतिपाठ-[illegible], वैयक्तिक रागालोभाच्या भरांत भलतीच [illegible] देणें ह्मणजे आपल्या ह्यातानेंच आपलें [illegible] कापून घेणें होय. अस्तु.

### परिषदेचें प्रतिनिधिक स्वरूप

सोलापूर-जिल्हा—परिषदेला बॅ. सरदार '[illegible]'कार कल्याणशेट्टी, डॉ. जगदेवराव [illegible], पंढरपूरचे श्री. कटप व कल्लय्या [illegible] वगैरे जे सर्व प्रमुख व कार्यकर्ते [illegible] हजर होते ह्यांत ह्या जिल्ह्यांतील [illegible] प्रकारच्या वीरशैवांच्या मनोवृत्ती प्रातिनि-[धिक] स्वरूपाने हजर होत्या हेंच स्पष्ट होतें. [illegible] परिषदेंत पोटजातींच्या रोटीव्यवहाराच्या [illegible] ठराव पास होऊं नयें ह्मणन [illegible] संबंध नसलेल्या अनेक वीरशैवांच्या [illegible] घेण्याचा उद्योग झाला होता. परंतु [प्राति]निधिक स्वरूपाच्या परिषदेने एकीकर-[णाच्या] ठरावास प्रचंड बहुमताने होकार [illegible] ही गोष्ट एकीकरणविरोधकांना—[illegible] आकारतां येत नाही. ह्मणून परिषदेंत [illegible] होणाऱ्या वा पराभूत होणाऱ्या [illegible] परिषदेचें प्रातिनिधिक स्वरूप नाका-[illegible] आपलें हसें करुन न घेणें हेंच योग्य. [illegible] परिषदेबरोबरच महिलापरिषदेचें सौ. [illegible] सरदार यांच्या अध्यक्षतेखाली [illegible] झाल्यामुळें सोलापूर-जिल्हा-परि-[illegible] विशेष महत्व आलें होतें. आणि हें बार्शीच्या महिलातर्फे महिलापरिषदेच्या स्वागताध्यक्ष ज्या सौ. गवसानें ह्यांच्या कर्त-बगारीमुळेच. सोलापूर—जिल्हा-परिषदेंत सौ. मडकी व श्रीमती मठपतीणबाई ह्या तिघींचीं जीं अखेर भाषणें झालीं त्यामुळें बार्शी-अधिवेशनानें असें प्रत्ययास आणून दिलें कीं, पुरुषाच्या खांद्याशीं खांदा भिडवून वीरशैवांतील भगिनीवर्गसुद्धां समाजकार्यांत भाग घ्यावयास पुढे येत आहे हें ह्या परिषदेचें पहिलें वैशिष्ठय होय. आणि तें महाराष्ट्रीय वीरशैवांना पूर्णपणें अनुकर-णीय आहे ह्यांत संशयच नाही.

### कारंजा-परिषदेचा परिणाम

कारंजा येथें मध्यप्रांत—वऱ्हाडची परिषद झाल्यानंतर उदगीर येथे मोगलाईविभागाची बॅ. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली परिषद झाली. ह्या परिषदेवर कारंजा—परिषदेची तर पूर्ण छाया पडलीच होती; पण ह्या बार्शी—परिषदेंत जे सर्व ठराव पास झाले त्यांचा विचार करितां तीहि कारंजा-परि-षदेचीच नक्कल झाली असें ह्मणावयास कोण-तीहि हरकत नाही. कारंजा — परिषदेंत जसा वादविवाद झाला तसाच बार्शी—परिषदेंतहि झाला. पण उदगीर—परिषदेंत ह्याच गोष्टी वादविवाद न होता पार पडल्या. कारंजाच्या—परिषदेंत वादविवाद झाला नसता; पण सोलापूर जिल्ह्यांतील उगीच भांडणाऱ्या मनोवृत्ति कारंजा येथें हजर होत्या व त्यांची पूर्वीपासून छाया पडली ह्मणून वादविवाद उत्पन्न झाला. तेव्हां ह्या उगीच वादविवादाची छटा बार्शी-परिषदेंत दिसली तर आश्चर्य काय ? वास्त-विक बार्शी येथे झालेला वादविवाद व मत-भेद हा वादविवाद नव्हता व मतभेदहि नव्हता, तर परस्पराची परस्पराविषयीं कलु-षित असलेलीं मनेंच तेथे प्रगट झालीं. तसें प्रगटीकरण होऊं नये ह्मणून अध्यक्षांनी

विषयनियामक मंडळांतच काळजी घेतली होती. शेवटी फक्त एकीकरणाच्या ठरावावर हा बुडबुडा फुटला. — खरें पाहिलें असतां हा ठरावहि एकमतानें पास होण्याची परिस्थिति असतांना फुटला — ह्मणून दुराग्रही लोकांच्या मानसिक अवस्थेची कींव करावीशी वाटते.

## वादाची कारणें

सध्या आपल्या महाराष्ट्रांतील वीरशैवांतच नव्हे तर सर्वत्र पसरलेल्या समाजांत ज्या गोष्टीवर वादाचें रण पडलें व रण वाढतें आहे त्याचें वर्गीकरण खालीलप्रमाणें पडतें. (१) वीरशैवपंथाचा वा धर्माचा उत्पादक बसवदेव कीं दुसरा कोणी आचार्य? (२) वीरशैव संस्कृतीचें मूळ द्राविड संस्कृती कीं आर्यसंस्कृती ? ((३) गुरु श्रेष्ठ कीं विरक्त श्रेष्ठ ? [४] गुरु-वर्ग हा जन्मजात आहे कीं भक्तवर्गातूनहि गुरु उत्पन्न होणें श्रेयस्कर आहे ? (५) मठ संस्था सार्वजनिक आहे कीं वैयक्तिक मालकीची आहे ? (६) पोटजातीचे रोटी व बेटी व्यवहाराने एकीकरण व्हावें कीं, न व्हावें ? ह्या सहा गोष्टींच सर्व वाद साठविलेला दिसतो. हा वाद बहुधा अज्ञानमूलक कल्पनावर उभारलेला आहे. आणि त्यामुळे व्यक्तिद्वेष प्रज्वलित होऊन त्याच्या ज्वालांत मूळ संघटनेची सर्वव्यापी तत्वे भस्म होत आहेत. प्रत्येक वर्तमानपत्र आणि प्रत्येक परिषद ह्याच वादाने गजबजलेली दिसते. तशांत विवाहपद्धति कोणती योग्य हाहि एक प्रश्न नवमतवादी ह्मणविणारांनी उत्पन्न केल्यामुळें विवाहपद्धतीच्या वादालाहि कारण नसतां तोंड फुटलें आहे. वरील सहा प्रकारचे वाद जसे अज्ञानमूलक आहेत तसाच हाहि आहे.

## द्रावीडांचा वीरशैवांशीं संबंध नाही.

ऐतिहासिक सिद्धान्त समोर ठेवून विचार केला असतां बसवदेव हाच मूळचा उत्पादक असें आग्रहानें ह्मणणें ह्यांत बसवदेवावरील श्रद्धा प्रतिबिंबित होत असली तरी ऐतिहासिक सत्य प्रतिबिंबित होत नाहीं. त्याचप्रमाणें अमुकच आचार्य वीरशैवधर्माचा प्रणेता होय असाहि ऐतिहासिक सिद्धान्त निश्चितपणें सांगतां येत नाही. ह्मणून ह्यावरच वादाचें रण उभारणें व चिघळवीत करितां, पण उभारणें ह्यांत आजचा समाज संघटित होण्यास मदत होत नाहीं. त्याचप्रमाणें द्रावीड-संस्कृतीवर वीरशैवसंस्कृती उभारली आहे असा सिद्धान्त लोकणेंहि अज्ञावमूलकच आहे. यज्ञसंस्कारावर वीरशैवसंस्कृती उभारलेली नाही हें जरी खरें, तरी यज्ञसंस्कारास द्रावीडांनी सर्वस्वीं झुगारलें होतें हें ह्मणणेंहि पोरकट आहे. यज्ञसंस्कृतीच्या हिंसामय प्रकारास बुद्ध व जैन यांचा खरा विरोध. द्राविडांचा विरोध नव्हता. आर्य व द्रावीड लोकांत युद्धं व झगडे झाले असतील; परंतु त्यांचे मूळ स्त्री, संपत्ति, व मुलुख, हरण करण्यांत आहे. धर्म व धर्मसंस्कार नव्हेच. त्याचप्रमाणें चातुर्वर्ण्याची कल्पना जेंव्हा परिणत होऊं लागली तेंव्हा कोठे संस्कार व धर्म ह्या कल्पना संघटित होऊं लागल्या. त्यांत द्राविड व आर्य हे दोघेहि समाविष्ट झाले होतें. संस्कारांत तीन वर्णांचा समावेश झाला, आणि संस्कारविहीन जे राहिले -- मग ते आर्य असोत वा आर्येतर असोत. द्रावीड असोत वा अन्य असोत, वा येथील मूळचे रहिवासी असोत, त्या सर्वांना चौथ्या वर्णात घालून चातुर्वर्ण्याच्या नांवाखाली संस्कार झालेले व संस्कार न झालेलें असे दोन वर्ग करण्यांत आले. पुढे जन्मजात परंपरेनें ज्यांनी संस्कार घालविले ते त्रैवर्णिकांत गणले गेले आणि जे संस्कारशून्य राहिले त्यांना जन्मजातीनें शूद्र ह्मणण्याची प्रथा पडली.

## कानडी अप्रबुद्धता

ह्यामुळे द्राविड किंवा आर्य लोक ह्यांपैकीं कोणीच चातुर्वर्ण्याचे जनक वा पोषक नव्हत. परंतु कर्नाटकमध्ये सुधारकांचा असा एक वर्ग निघाला कीं, चातुर्वर्ण्यपद्धति ही आर्य लोकांची आहे व द्राविडांचीं नव्हे असें ह्मणून द्राविडीयन्स हे सध्याच्या जन्मजात विषमतेचे वाटेकरी नव्हत असें ह्मणण्याची त्या पद्धती आणि तिकडील एकीकरणवादी वीरशैव विद्वानांनी ह्यावरूनच द्राविड-संस्कृतीशीं नातें लावलें. पण ह्या प्रकारानें त्यांच्या एकीकरणास कसा जोर चढतो हें मात्र आह्माला कळत नाहीं. उलट, आधुनिक विद्वान् ह्मणविणारे लोक इतिहास-दृष्टीनें अगदींच अप्रबुद्ध आहेत असें स्पष्ट होऊं लागलें. ही अप्रबुद्धता सनातनी ह्मणविणाराकडून दिसली तर नवल नाहीं. पण आधुनिक पंडितहि जेंव्हा द्राविड-संस्कृतीवर वीरशैवसंस्कृतीचें मूळ उभारतात तेंव्हा त्यांची कींव येते. कींव ह्मणूनच कारंजा-परिषदेंत द्राविड-संस्कृति हा शब्द राहिला. पण 'यज्ञसंस्कृतीवर' वीरशैवसंस्कृतीचें मूळ उभारलेलें नाही हें खाजगी रीत्या आह्मीं सुचवून, इतिहासाच्या प्रमेयांत सर्वस्वीं अज्ञान असलेल्यांची नांगी मोडून टाकली होती. आणि कारंजा-परिषदेवर लिहितांना भलतेच ऐतिहासिक वाद परिषदेपुढे वा सर्वसामान्य जनतेपुढें न येणेच योग्य असें आह्मीं लिहिलें होतें. बार्शी-परिषदेच्या प्रसंगींहि हा वाद खाजगी रीत्या उपस्थित झाला होता. पण डॉ. नंदीमठासारख्या इतिहासज्ञानीं द्राविड-संस्कृति हा शब्द काढावयास लावला, आणि यज्ञ-संस्कृतीपासून, स्मृत्यादि ग्रंथापासून, वीरशैव-संस्कृति व संस्कार हे सर्वस्वीं भिन्न असून, वीरशैवांची संस्काराच्या बाबतींत लिंगसृष्टि ही सर्वस्वी भिन्न असून वीरशैवांत शूद्र हा वर्णच नाहीं असा अधिकृत ठराव बार्शी-परिषदेत सर्वानुमतें पास झाला. ह्यांत आनंदाची गोष्ट ही कीं, हा ठराव अध्यक्षाकडून आला व तो अध्यक्षांनीं आपल्या विद्वत्तापूर्ण भाषणामुळें सर्वानुमतें पास करुन घेतला. मध्यप्रांत-वऱ्हाडच्या रोहिणखेड-परिषदेत वीरशैवांत फक्त त्रैवर्णिकच आहेत, चौथा वर्णच नाहीं, अशी जी गर्जना करण्यांत आली होती त्या तत्वाचा बार्शी-परिषदेंत एकमुखानें विजय झाला ह्याचें हें द्योतक आहे. त्याचप्रमाणें पंचाचार्य -विरक्त-वाद हा समाजहितविघातक आहे असा डॉ. जगदेवराव देशमुख ह्यांनीं आणलेला ठरावहि सर्वानुमतें पास झाला. मनुष्याच्या अज्ञानावर उभारलेले वाद ह्या दोन महत्वाच्या ठरावामुळेच नाहीसे झाले असें ह्मणावयास कोणतीहि हरकत नाही.

## बार्शी-परिषदेचा अनुभव

अशा प्रकारें वादविवादाचे बरेच ठराव सर्वानुमतें व प्रचंड बहुमतानें पास झाले हा ह्या परिषदेचा विशेष होय. शुद्धिसंघटनेचे, गुरुवर्ग व मठसंस्था ह्यांच्या सुधारणेचे ठरावहि पास झाले आहेत. परंतु मठसंस्था ही वीरशैवांची सार्वजनिक बाब होय असें ह्मटलें कीं कित्येक मठाधिकाऱ्यांचा गैरसमज होतो. वास्तविक कोणाहि मठाधिकाऱ्यांचा हक्क ह्या योगानें हिरावला जात नाही. पण मठसंस्थांची विक्री वगैरे करण्यास ह्यामुळें बाध आणतो ह्मणणारास आणतो येतो इतकेंच. तथापि असा ठराव केला कीं, मठाधिकाऱ्यांच्या परंपरागत वर्तनास बाध येतो अशीच कांहींची समजूत झाली. ही समजूत व्हावयास भक्तवर्ग ह्मणविणारांत व गुरुवर्गीय ह्मणविणारांत जी तेढ उत्पन्न झाली तीच कारणीभूत झाली आहे. ह्मणूनच बहुतेक वाद तत्वविषयक नसून वैयक्तिक स्वरूपाचे आहेत असें जें आह्मी प्रथमपासून ह्मणतों त्याचा प्रत्यय आह्माला बार्शी येथे शेवटीं शेवटीं आलाच.

## एकीकरणाचा ठराव

मठसंस्था व धर्माधिकारी सुधारले पाहिजेत,- मठसंस्था सार्वजनिक बाब आहे, विरक्त-पंचाचार्यवाद समाजविघातक आहे, शुद्धीसंघटनेस सक्रीय पाठिंबा, वीरशैवांत शूद्र हा वर्णच नाही, इत्यादि ठराव पास झाल्यावर वीरशैवांतील पोटजातींत सर्रास अन्नव्यवहार व्हावा ह्या ठरावावरच वाद कां माजावा हें आश्चर्य आहे. पंढरपूर येथें भरलेल्या व होटगी येथे भरलेल्या सोलापूर जिल्ह्याच्या वीरशैव-परिषदांत जे ठराव पास होतात तेच ठराव येथे परस्परपूरक स्वरूपानें झाले असतां त्यावर रण माजवण्याची वृत्ति प्रगट होणें ह्यांत एकीकरण नसून बेकीकरणच आहे. पंढरपूर-परिषदेंत पोटजातींत सर्रास रोटी-व्यवहार व्हावा हा ठराव पास झाला होता. आणि होटगी-परिषदेंत कुलगुरुपरंपरेकडून दीक्षा घेऊन पावन झालेल्यांत अन्नोदक व्यवहार झाल्यास हरकत असूं नये असा ठराव दुरुस्त झाला होता. वार्शी-परिषदेंत श्री. कल्याणशेट्टी ह्यांनी पंढरपूरचा रोटीव्यवहाराचा ठराव आणला होता आणि डॉ. जगदेवराव ह्यांनी होटगीपरिषदेचा ठराव सदर ठरावास उप-सूचना ह्मणून आणली होती. सूचना व उपसूचना ह्यांत तत्व एकच ग्रथित झालेलें असतें. पण कल्याणशेट्टींना उपसूचना एकीकरणास निष्कारण विरोधी वाटली. गुरुकुलपरंपरा हे शब्द जर उपसूचनेंत नसते तर कदाचित् त्यांनी उपसूचनेचा स्वीकार केला असता. गुरुवर्ग आहे हा वाईट आहे असें गृहीत धरलें तरी, वा गुरुवर्ग हा जन्मजात आहे असें ह्मणणारे आज कांही गुरुवर्गीय असले तरी, कुलगुरुपरंपरेनें दीक्षासंस्कार होऊंच नये असें का कल्याण-शेट्टींना वाटतें ? वास्तविक ह्या प्रसंगीं गुरुवर्ग चांगला की वाईट हा प्रश्नच उद्भवत नाही. त्याचप्रमाणे गुरुवर्ग जन्मजातीय असावेत कीं भक्तवर्गीय असावेत असा प्रश्नहि उत्पन्न होत नाही. ह्या बाबतींत योग्य तो ठराव सदर परिषदेंत वाद न होतां झाले असतो कुलगुरु-परंपरा ह्या शब्दास श्री. कल्याणशेट्टींनी व त्यांच्या मित्रांनी भिणें ह्याचा अर्थ आह्माला समजत नाही. वीरशैवांत भक्त, महेश, प्रसादि प्राणलिंगी वगैरे आचारक्रियाज्ञानावर भेद उभारले आहेत ही गोष्ट श्री. कल्याणशेट्टींना मान्य आहे.

## खोट्या समजुतींचा गोंधळ

ही गोष्ट धर्मपरंपरेस मान्य असल्यामुळेच कुलगुरुची परंपरा प्रत्येक वीरशैवाला लागू आहे. जितक्या पोटजाती तितक्या पोटजातीनी आपली कुलगुरुपरंपरा आज निर्माण करून ठेवली आहे व ती बहुधा रूढहि आहे. ह्या रूढींत ह्यानंतर बदल व्हावयाचाच असला तर गुरु न निर्माण करण्याची प्रथाच रूढ होईल. जन्मजातीचें स्वरूप ह्या परंपरेला येणें ह्यानंतर शक्यच नाही. तेव्हा कुलगुरुपरंपरा राखून दीक्षासंस्कार करून अन्नोदक व्यवहार करा असें ह्मणणें ह्यांत समान संस्कारा-बरोबरच रोटीव्यवहार घडवून आणणें होय. समान संस्कार व समान रोटीव्यवहार ह्यांत पोट-जाती मोडल्या तर मोडतील. संस्कारभेद कायम राहून रोटीव्यवहारानें पोटजाती कशा मोड-तील ? आजचा ब्राह्मण व मराठा एकत्र जेवतात, पण संस्कारभेदामुळे ब्राह्मण तो ब्राह्मण ठरतो आणि मराठा तो मराठा ठरतो. असा प्रकार होऊं नये ह्मणून कुलगुरुपरंपरेने दीक्षा-संस्कार होऊन अन्नव्यवहार व्हावा असें ह्मण-णारी डॉ. देशमुखांची उपसूचना एकीकरण-विरोधी आहे अशी श्री. कल्याणशेट्टीची का समजूत व्हावी ? पण तशी समज झाली. आणि एकीकरणाच्या ठरावावर कारण नसतां वाद झाला. ह्या वादांत श्री. कल्याणशेट्टींनी जय मिळविला हें खरें, पण उपसूचना अंगीकारून एकीकरणाचा ठराव सर्वानुमतें पास करून घेण्यांत अधिक शहाणपण

…अधिक एकीकरणनिष्ठा प्रत्ययास आली असती. तथापि उपसूचनेला पंढरपूर व बार्शी येथील श्रीगुरुमूर्ति परान्डकराचे अनुयायी अनुकूल आहेत असें दिसताच कल्याणशेट्टींनीं, विरोधक स्वतः आपल्या जवळ येत आहेत हें पाहून, त्यांची उपसूचना मान्य करण्यांत व ती पच-विण्यात त्यांना पोटात घेतल्याचें श्रेय लाभलें असतें. परंतु तसें करणें व त्यांच्या शब्दांना मान देणें ह्मणजे आपला पराभव कबूल करणें होय अशी उगीच खोटी समजूत करुन घेऊन उपसूचना नापास करण्यातच आपला विजय आहे अशी आढयता मिरविणे ह्यापलीकडे त्या ठरावावरील वादविवादास अर्थ नव्हता.

## दोन एकीकरणवादी

शिवाय बार्शी, सोलापूर, पंढरपूर, सांगली, मिरज वगैरे भागांत ब-याच पोटजातीकडे गुरु व जंगम रूढ आहेत. न्हावी, परीट, बुरुड वगैरे लिंगधारी जाती मात्र अलग दिसतात. त्यांना गुरुकडून दीक्षा देवविणें आणि त्यांच्या-कडे उघड अन्नोदकव्यवहार करुन त्यांना समान संस्काराचा व आचाराचा दर्जा प्राप्त करुन देणें अवश्य असल्यामुळे तसे सक्रीय प्रयत्न करणारें मंडळ स्थापन होणें व त्या मंडळाचें परिषदांतून अभिनंदन होणें हेंच खरें एकीकरण होय. हें एकीकरण प्रत्यक्ष घडवून आणावयाचें असलें तर निद-र्शी युक्तिप्रयुक्तीने देवाण—घेवाण करणेंच त्यागाचें व कर्तव्यनिष्ठेचें लक्षण होय. परंतु एकीकरणाच्या ठरावांतील चर्चेच्यावेळीं एकीकरणवाद्यांत ह्याचा अभाव दिसला व स्वतःच्या प्रतिष्ठेच्या ढोलाशिवाय दुसरा कोणताहि ढोल दिसला नाही असें आह्माला मोठ्या खेदानें ह्मणावें लागतें. एकीकरण-विरोधीसुद्धां अधिक व्यक्तिद्वेष्टे आहेत हें आह्मीं कबूल करतों. पण कालाचा ओघ लक्षांत घेतां ही पिढी खुंटणारी आहे हें लक्षांत घेऊन, ख-या तत्वनिष्ठ एकीकरणवाद्यांनी स्वतःची प्रतिष्ठा बाजूस ठेवून अशा विरोधकास चुचकारुन मारण्याचा प्रयत्न केला तर ते लव-कर मरतील व आपला संप्रदाय वाढेल. श्री. कल्याणशेट्टीपक्ष व डॉ. जगदेवरावपक्ष हे दोन्ही एकीकरणवादीच, पण पहिला स्वप्रतिष्ठा राखून एकीकरणवादी झाला आहे, तर दुसरा तत्वनिष्ठ एकीकरणवादी आहे. अष्टा-वरणत्व मान्य असलेल्यांत आह्माला ऐक्य लागत असल्यामुळें त्यांतील गुरुकुलपरंपरा ह्या शब्दांस विरोध करणें ह्मणजे तत्वतः अष्टावरणविरोधी वृत्ति निर्माण करणें होय. आणि कल्याणशेट्टीपक्षानें जरी आपला ठराव पास करून घेतला असला व त्याचा बार्शी-परिषदेंत विजय झाला असला तरी हा विजय अष्टावरणाच्या तत्वास विरोध करुन त्यांनी मिळविला असें आह्माला ह्मणणें भाग आहे.

तथापि ही त्या परिषदेंतील गौण बाब आहे. विरक्त–पंचाचार्यवाद हा समाजहितविघातक आहे, वीरशैवसमाजघटनेंत शूद्रवर्णाला थारा नाहीं, हे दोन ठराव तात्विक निर्णयाच्या दृष्टीनें महत्वाचे असून, ह्यावरच भावी समाजसंघट-नेचा पाया उभारला जाणार असल्यामुळें गुरु–विरक्तवादामुळें ज्या सोलापूर जिल्ह्यां-तील खोट्या पक्षोपपक्षाभिमानानें सर्व महारा-ष्ट्रांत धुमाकूल घातला त्यास ह्याच जिल्ह्याच्या परिषदेत मूठमाती मिळाली ह्याबद्दल सदर परिषदेचा मनःपूर्वक गौरव करावासा वाटतो. स्वागताध्यक्ष श्रीमंत झाडबुके, त्यांचे मित्र, सहकारी, स्वागतमंडळ, व चिटणीस श्री. गवसाने वकील, यांच्या निःस्वार्थ व निरपेक्ष कर्तृत्वाचें आह्मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

---

# वीरशैवधर्माची मूलतत्वें

( ले.—कृष्णलिंग शंकरस्वामी मठळाचार्य, सेक्रेटरी, वी. ना. मंडळ, मुंबई )

कुत्र्याचें शेंपूट १२ वर्षें नळींत घातलें तरी वांकडे तें वाकडेंच अशी जी ह्मण आहे त्याप्रमाणेंच आह्मी धर्माभिमानी सुधारक ह्मणून आपलें॰ स्वतःवरी दिवा ओवाळून कित्येक वीरशैवबंधू ह्मणवून घेणाऱ्यांची अशी कांहीं चमत्कारिक स्थिति झालेली आहे. धर्माचें शास्त्र-उल्लंघन करावें तर उपासमार होऊन, जीवनचरितार्थ होण्यास अपरिहार्यच होतें. बरें धर्मबाह्य रहावें तर फुकट धर्माभिमान बाळगून वीरशैव ह्मणवून घेण्यास, अंगीं पात्रता बाणत नसल्यामुळें, समाजाच्या मानास वा इभ्रतीस धक्का बसून, मानखंडना होते. आता करावें तरी काय ? अशी कुचंबणा झालेली आहे.

अशाच अनिष्ट रूढीच्या बंधनांनी तो समाज अलिंग्याचें अन्नोदक खाण्याचें दास्य-त्वांत बळी पडून, कुंभकर्णासारखा कित्येक वर्षें घोरत पडलेला दिसतो. ' आत्मज्ञानं-विना पार्थ मुक्तिर्नास्ति न संशयः॥ ' या वेदवाक्याप्रमाणें आपण कोण व करतो काय याची पूर्ण जाणीव नसल्यामुळे व ज्ञानाचा भरपूर साठा नसल्यामुळे, आरंभिलेले आपलें उद्योग सिद्धीस जात नाहीत व आपले सिद्धांत चुकलेले ठरून अज्ञान मात्र समाजाच्या अगर जगाच्या दृष्टोत्पत्तीस येतें. अशा वेळेस प्रत्यहीं अनुभव असतां, पुनः हतभाग्य होऊन निराशेने चांगल्या कृत्यांनाही खो घालण्यास तयार होऊन ' करतो हें चांगलें करतां ' असेंहि ह्मणण्यास प्रवृत्त होत नाही तर त्यास कुत्र्याचें शेपटीखेरीज दुसरी उपमाच देतां येत नाही.

पण आमच्या धर्माभिमानी सुधारकांनी वीरशैवधर्माच्या पूज्य भावनेच्या विचारशून्यतेची व धर्मबाह्य अविचाराची कमाल केली. ती छपविण्याकरिता, सुधारणेस वाहिलेल्या एका वीरशैवबंधूनें, परंपरागत पाळत आलेल्या, कट्टें, सनातन धर्माभिमान्यास असा प्रश्न केला आहे कीं, तुमच्या गृहांत देखील ख्रिश्चनधर्माचा शिरकाव होऊं लागला तर ह्याची कांही तजवीज करणार किंवा नाही ? हा प्रश्न पाहून आह्मास खरोखर हसूं आलें. तेव्हा मी व माझे मित्र खूपच हसलों. कारण ज्यास स्वयंसुधारक धर्माभिमानी ह्मणतात, त्यास त्याच्या शून्य गृहाची जर आवश्यकता वाटत नाही तर त्यास हा प्रश्न करून तरी काय उपयोग ! त्याच्या दृष्टीने पाहिलें असतां, स्वतःचें नाक कापून घेऊन दुसऱ्यास अपशकुन करण्याएवढेंच आहे. आमच्या धर्माभिमानी सुधारकांची धार्मिक, सामाजिक, आर्थिक, मतें तरी किती अपरिपक्व, असमंजस, व समाजविघातक असतात, हें वेळोवेळीं लिहावयास आह्मीं लेखणी चालविलीच आहे. ' विशब्दें नोच्यते विद्या॥ शिवजीवैक्यबोधिका ॥ तस्यां रमन्ते ये येषां ॥

वीरशैवास्तु ते मताः १ ॥ ' या वेदवाक्यावरून वीरमाहेश्वर व वीरगणाधीश्वर असे दोन भेद जरी असले तरी पंचम, शीलवंत, दीक्षवंत, तेली, माळी, तांबोळी, गवळी, तिळोरे, माळी, वगैरे भक्तवर्गाकडे स्वामी (जंगम) दीक्षा घेत असून फक्त पंचमभक्त-लांच वर दाखविलेल्या भक्तवर्गांना धंद्या-मुळे अर्थेम दर्शवीत गेल्याची रुढी परंप-रागत चालत आलेली आहे. आणि तीं नांवें त्यावरून पडलेलीं आहेत, असा आगम,-शिवप, परमेश्वरागम, शास्त्राधार पण सांगत आहे. सदर भक्तवर्ग अलिंग्याचें अक्षोदक तीर्थ स्वीकार न करतां, ते सनातन धर्माचें अभिमानी वीरशैवच आहेत. तरी त्या जातींचा ( पोटजातींची ) आज ना उद्यां रोटी, बेटी, व्यवहार, सुसंघटितपणा, व एकीं होण्यास कांहीं कालावधि लागेल असें मला वाटत नाहीं. विकल्परहित राहून समाजाविषयीं प्रेमा बाळगून इतर देवतेबद्दल व अलिंग्याचे पादोदकहि न घेण्याबद्दल अगदीं दक्ष राहून व पाप क्रियाबद्दल निष्प्रीय राहून, करपीठावर इष्टलिंगपूजा करणारा व पूर्वेत एकाग्र चित्तानें तल्लीन होऊन जाणारा तोच वीरशैव होय ! असा सधारन अर्थ असून श्री. गणपत महादेव शिव किल्लेकर यांनीं ता. १८-३-३७ रोजीं 'वीरशैव गर्जने'च्या अंकांत ' वीरमाहेश्वर हे वीरशैव तरी आहेत काय ? ' अशा तऱ्हेचें वेडे, वांकडे, आचरटपणाचें लिखाण लिहिलें आहे, तें अगदीं निराधार आहे. त्यांनीं असें लिहा-वयास नको होतें. तरी सेक्रेटरी महाशयांना मला वी. मा. मं. सेक्रेटरी या नात्यानें उपदेश करावे की, अगोदर धर्मशास्त्राचा अभ्यास करून, धर्मतत्वें नीट वाचून ज्ञान संपादन करा, आणि मग तरी लेख लिहावयास शिका. या लेखामध्ये आपले वरेंचसें अज्ञान दिसत आहे. कारण सनातन वीरमाहेश्वरसमाज व वीरशैव समाजाचा आपणापयश असा हूपखूळा राहिलेला नाहीं, अलीकडे समाजांत जागृति झालेली असून, भावी समाजांत खळबळ उडाल्याशिवाय राहणार नाहीं हें नीट लक्षांत ठेऊन लिहिण्याचें धाडस करावें. हें वेळींच सुचवीत आहे. अशा तऱ्हेचें आचरटपणाचें ध्येय स्वीकारलेले हे स्वतः कार्यतेकच असून त्यांच्या हातून, एकी, सुसंघटितपणा, व समाज-सुधारणा अशीं वगैरेचीं कामें पार न पडतां, कार्य करण्याची हातोटी वगैरे साधनांची शक्ति पण अंगीं न आणतां समाजाची दैना दैना उडवून समाजांची विस्कळीत घडी केल्या-पलीकडे त्यांच्या हातीं कांही लाभेल असें तरी मला वाटत नाही.

उपनिषद् अध्याय ७ खंड ८

' बलेन लोकस्तिष्ठति बलमुपास्वेति ॥ संयोबलं ब्रह्मत्युपास्तेयावद्बलस्य ॥ गतंतत्रास्य यथाकामाचरो भवति ॥ '

बल हें विज्ञानाहून अधिक आहे. एक बलवान शंभर विज्ञानवंतांनादेखील कापायला लावतो. मनुष्य बलवान होतो तेव्हां तो उठतो, उभा राहून सेवा करितो, सेवा करून गुरुला प्रिय होतो, गुरुला प्रिय होऊन तो द्रष्टा होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञाता होतो, कार्यकर्ता होतो, विज्ञानवंत होतो, प्रमुख कार्य-कर्ता होतो, बलाच्या योगानें देव, मनुष्य पशु पक्षी, तृण, वनस्पति, पृथ्वी व अंतरिक्ष स्थित आहेत. बलाच्या योगानें सर्व लोक व समाजहि स्थित आहे. ह्मणून कार्यकर्त्यां ह्मणविणाऱ्या मनुष्यानें बलाची उपासना करावी. जो या बल-स्वरूपी ब्रह्माची उपासना करितो, तो समाजांत यथेच्छ संचार करून व आधिपत्य मिळविण्याची आकांक्षा धरून, समाज सुसंस्कृत करण्याचें ध्येय गांठण्यास समर्थ होतो. हल्लीच्या उदयोन्मुख समाजांनी ही गोष्ट लक्षांत ठेवून नवीन घटना धर्म व नीति यांस अनुसरून वर्तन ठेविलें तरच त्यांची संस्कृति पचनी

पडून, नवीन सुधारणा भक्कम पायावर उभी केल्याचें श्रेय पदरीं पडेल. नुसतें दांभिक सामर्थ्य दाखवून दुसऱ्या समाजांवर आक्रमण करून अल्पावधी प्रभुत्व भोगील परंतु त्यांतील व्यक्तीस, स्वातंत्र्य व समता यांची हटकून प्राप्ती होईल असें सांगतां येणार नाहीं. पण नीति, समता, व धर्म तत्वानीं सामर्थ्यवान समाज, स्वतः सामर्थ्य, समता, व स्वातंत्र्य उत्पन्न करून तीं दुसऱ्यास देण्यास आदर्शभूत मार्गदर्शकच होईल. आणि अशा रीतीनें समाजांतील कलहाचें बीज कमी करण्याची हातोटी साधल्यामुळें अशा स्वतंत्र व नीतिधर्मतत्वांनी सामर्थ्यवान झालेल्या समाजांनी झटल्यास काय वावगें होईल काय? समाजाची सर्व साधारण नीतिमर्यादा वाढविणें हेंच संस्कृति व सुधारणा यांचें प्रथमकार्य आहे. किंबहुना समाजांतील व्यक्तींची साधारण नीतिमत्ता, हें सुधारणा मोजण्याचें एक परिमाण आहे, असें आमचें मत आहे. कोणत्याहि समाजांचें विभाग न करितां सर्व मानवजातीच्या व समाजाच्या जीवनविकासास व कर्तव्यास प्रेमाने सहकार्य करून मदत करणें व त्याकरितां हर एक प्रकारची साधनसंपत्ति निर्माण करणें अगर करवून देणे हें संस्कृतीचें ध्येय आहे. हें ध्येय आपल्या हातून पुरें झाल्याचें समाधान हाच मोक्ष, अथवा विश्रांति आहे. याप्रमाणें ज्या संस्कृतींत दृष्टीस पडेल तीच संस्कृति पूर्ण असल्यामुळें कार्य कर्तबगारी करण्यास व समाज दीर्घ काळ टिकविण्यास समर्थ आहे.

---

लघुकथा ११ वी.

# कांहीं समाजचित्रें

( लेखक:—कु० गंगाधर कोठवळे, पुलगांव. )

## चित्र १ लें

आप्पासाहेब !

कोण ? दिनकरपंत ? या कीं.

काय! ऑफिसची तयारी वाटतं!

होय.

वापहो, आप्पा, आमचं सान्निध्य नकोसं झालं आहे वाटतं आपणाला.

कां बुवा ?

अहो नाहींतर काय? सारखा बघतोंय, अहोरात्र आपल्या अर्धांगींच्या तोंडाची टकळी सुरूं. नेहमी कशा बगदीं भांजरागत गुरगुरतांना दिसतात.

'असं होय?' डोकीवर टोपी चढवीत आप्पा ह्मणाले.

अहो पळायचंच. चार भांडी एके ठिकाणीं जशीं ह्मणजे एकमेकांना लागायचींच आणि ई तशा, गुरगुरण्याची कला मांजरातच तेवढी शूं शकते असा कांहीं प्राणीशास्त्राचा धार नाहीं. श्रीमंतीच्या बहकल्या धूरानं उन्मत्त तरुणी देखील मांजरांचशा आक्रडमा- ला शोभतात!

बरं! मला वेळ होतो आहे. Excuse सायंकाळीं करूं ह्याचा सारासार विचार... ह्मणून आप्पासाहेब घराबाहेर पडले.....

*     *     *

आप्पासाहेब इंपिरियल बँकेमध्यें एक कार- कून होते. स्वभावानं गाय होते. आईच्या हाहाकाराला विकला जाऊन त्यांनी लग्न केलं होतं. जरी पितृसुखाला कायमचे आंच- वले होते तरी ह्या जगाच्या साम्राज्यांत ते कधींच उघडे पडले नव्हते. वारंवार मातृ- प्रेमाचा ओलावा ह्या खडकाळ मानवसाम्रा- ज्यांत त्यांना मिळत असल्यामुळे नैराश्य त्यांच्या वांट्याला क्वचितच येत असे. मायेच्या प्रेमाची पांखर घालून त्यांची आई सदा- सर्वकाळ त्यांना आनंदी ठेवण्याचा प्रयत्न करी.

...हृदयच तें!

*     *     *

...मनांत शुक्राचा तारा लुकलुकतो तद्वत् ताराबाईचा ( आप्पासाहेबांच्या पत्नी. ) लौकिक ...मुखी आ करून फोफावित होता. ...कुंपण असलेल्या बगिच्यांत कांटेरी ...झाडं दृष्टोत्पत्तीस यावीं तद्वत ...बाईंच्या सुमनोहर व शुभ्रचर्मावगुंठित ...सर्वत्र अभंग काळा प्रस्तर होता. ...नाजूक शरीरयष्टीच्या पडद्याच्या ...हृत्तटलावर विश्वकर्म्यानं कोरून ठेव- ...मांडखोर व कजाग स्वभावाचा ठसा

दडून बसला होता. लग्नानंतर त्या ठशाच्या वारंवार कॉपीज निघूं लागल्या. बायकोच्या सुधारणेची ते धीरानं वाट बघत होते. परंतु हा प्रकार नदी वाहून गेल्यावर कोरडे पाय ठेवून पैलतीरीं जाण्याची हांव करण्यासारखाच होता.

अशांत बाळूचा पाळणा घरीं.........

×     ×     ×

फार नाही, तरी गुडघ्यावर चालण्यांत बाळू फारच पटाईत झाला होता. एकदां कुठंशी बाळूनं, भाजीकरिता चिरून ठेवलेल्या भोपळ्याची एक चिरी तोंडांत घातली. विमलाबाई ( आप्पासाहेबांच्या मातोश्री ) देवपूजा करीत होत्या. त्यामुळं त्यांना त्यांच्या तोंडांतील चिरी काढणं शक्य नव्हतं. ह्मणून त्या जराशा ओरडून ह्मणाल्या...अरे लुच्चा, ठेव ती चिरी खालीं. झालं. इंजक्शन दिलं गेलं, गंगायमुना वाहूं लागल्या.

कांही कामानिमित्त ताराबाई शेजारीं गेल्या होत्या. बाळूचा तो पंचमांत लागलेला आवाज, त्यांच्या शरीरयष्टीच्या दोन्ही ऐवयछिद्रांत नेऊन आदळण्याची कामगिरी वायुदेवानं एका निमिषाधर्शीं पार पाडली. ताराबाई, जिथं बाळराजांच्या आक्रोशसंगीताचे स्वरालाप चालू होते तिकडे गेल्या ; व केली त्यांनी आपल्या तोंडाळ तोफखान्याची अजस्र गोलंदाजी सुरू. "बाई, बाई, बाई, माझीं कार्टी- सुद्धां नजरेसमोर नकोशीं झालीतनं! ते मुठींत नाहींत ह्मणून तुह्मांला येवढं फावतं. कसा माझा अगदीं छळवाद मांडला आहे. देवा नारायणा! तुलाच रे डोळे! कायस मेलं ह्मणतातना कीं -- कोणाची होऊं नयें बाईल नि कुणाचें होऊं नये चाकर ! यापुढं जी नवऱ्याची बायको होईल ती शेण खाईल...."

झालं, चुलीला मिळाल्या वाटाण्याच्या अक्षता. ज्वालामुखीप्रमाणं इतके दिवस मनांत घुमसत असलेल्या द्वेषाग्नीचा आज स्फोट झाला; व त्याचं पर्यवसान अखेर डोकीं फोडाफोडी पर्यंत झालं होतं. ताराबाईनी आज ' हरहर महादेव ' ह्मणून कायतो सोक्षमोक्ष लावण्याचा जणूं विडाच उचलला होता. इकडे, दिवसभर काम करून शिणलेल्या आप्पासाहेबांच्या कानावर ह्या गोष्टी घालून त्यांच्या मनास दुःख देण्यास विमलाबाईचं मातृहृदय धजत नसे.

*        *        *

सायंकाळी हा प्रकार आप्पासाहेबांना समजलाच.... कोंबडं झाकलं ह्मणून तांबडं फुटा-यचं रहात नाही. शेजारच्या सत्यप्रभेनं सारी हकीगत त्यांना सांगितली. त्यांचं मन त्यांना वारंवार बजावीत होतं कीं, आप्पासाहेब, पायांतील वहाण पायांतच ठेविली पाहिजे. कपडे काढण्याकरितां ह्मणून ते वर गेले तों काय ? ताराबाई... क्षणभर त्यांना रामरा-ज्याभिषेकाच्या वेळच्या कैकेयीचाच भास झाला. ......आप्पासाहेबांनी जवळच टांगलेला वेत घेतला आणि...... माडीवर सप् सप् असा आवाज फक्त ऐकूं येत होता.

*        *        *

बाळू... ह्या मोहमयी जगाच्या वातावर-णाचा किंचिन्मात्रहि गंध नसलेलं अजाण अर्भक तें ! आपल्या झोंपाळ्यांत सुखनिद्रिस्थ होतं.

आयुष्यांतील दीर्घ व प्रखर वाळवंटांत बाळपणींचा काळ मोठा मनोहर असतो नाही ?

दुसरेंच दिवशीं सकाळीं ताराबाईंचा अचे-तन देहसौष्ठव, पाताळेश्वराचं दार उघडल्या-मुळंच कीं काय, नवचैतन्योन्मादानं पुलकित होऊन शेजारच्या विहिरींत पाण्याच्या पृष्ठ-भागावर कोमेजलेल्या फुलाप्रमाणं तरंगतांना आप्पासाहेबांच्या दृष्टीस पडला.

मौक्तिकहारांतून मौक्तिक गळून पडावे, तद्वत् दोनच पर्जन्यटिपें त्यांच्या नेत्रावाटें बाहेर पडलीं, बाकीच्यांनी त्या बालसूर्याच्या कोमल किरणांनी दिपून गेल्यामुळं आपली मुखकमलें नेत्रांतच कुण्ठ केलीं.

---

# पक्षभेदाचे काटेरी कुंपण तोडून संघसंघटनेचा वेल लावाल काय ?

## पुणेकर वीरशैव बांधवांना नम्र विनंती

[ लेखक—श्री. विश्वनाथ आण्णाप्पा घटाणे, रायमोहकर. ]

आज आपण पुष्कळ वृत्तपत्रांत वाचून व ऐकून आहोत कीं आजपावेतो बहुतेक ठिकाणी शहरोशहरी व खेडोपाडी निरनिराळे वीरशैवसंघ स्थापून संघटनेनें व शिस्तीनें आपापल्या समाजांतील सुशिक्षित तरुणांची बेकारी घालवून शिक्षणाची अर्थात् धंदेशिक्षण व विश्वविद्यालयात शिक्षणाची फंड वगैरे सोय करीत आहेत. आपसांतील पोटभेदाचें कसें उच्चाटन करावें वगैरेसारखें प्रश्न ते जारीनें सोडवण्याचा प्रयत्न करीत आहेत पण आमचा पुणें-वीरशैवसमाज काय करीत आहे ? दुसऱ्या-समाजाची गोडवी गाऊन प्रोत्साहन देत आहे आपल्या समाजामध्यें दुफळीचें तांडव माजून संघटनेचें व समाजाचें मात्र अनहित करीत आहे. पुण्यासारख्या सुशिक्षित श्रीमंत व उत्साहक तरुणांना हें शोभण्यासारखें नाही. पुणें हें निरनिराळ्या धर्माचें व तत्वज्ञानाचें व शिक्षणाचें केंद्रस्थान आहे. भिन्न भिन्न मताचे भिन्न भिन्न संस्कृती व आचारविचाराचे आगर आहे हें तर इतिहासप्रसिद्ध आहे, परंतु पुणें-वीरशैवसमाजाची कारकीर्द कोणा-शीहि सांगता येणें शक्य नाहीं. तरी वीरशैव-बंधूंनो, विचार करा. तरुण ही समाजाची उमलती फुलें आहेत. वीरशैवबांधवांनो चिकित्सक दृष्टीनें आपल्या परिस्थितीचे सुक्ष्मा-वलोकन केल्यास समाजाचे भेसुर चित्रच दिसेल. वीरशैवसमाजाची सर्वांगीण उन्नति व्हाव-याची असेल तर अखिल वीरशैवांची संघ-टना करा व संघ स्थापून समाजोन्नती करा. संघशक्ती ही नवशक्ती आहे. संघटनाच नव-जीवन होय. शिक्षणाची शिस्तीची व स्वार्थ-त्यागाची आपल्या समाजांत आवश्यकता पाहिजे व प्रत्येक समाजास आहे. वीरशैव तरुणांनो, संघटनेंच्या सामर्थ्यावर समाजाचे स्वातंत्र्य किंवा पारतंत्र्य, जगणें किंवा मरणें, सुख अथवा दुःख, अवलंबून आहे. समाजाच्या प्रगतीसाठी उद्धारासाठी व उन्नतीसाठी स्वार्थ-त्याग करून कायावाचामनें सेवा करून प्रसंगीं आपल्या जीवाचें कुरबान करण्यास प्रत्येक स्त्री पुरुष सिद्ध व्हावयास पाहिजे. आपण आपल्या स्वधर्माचें समाजोन्नतीचे व सन्माननीय मानव ह्मणून वागावयाचें असेल तर संघटनेचें सामर्थ्य वाढविण्याकरिता सर्व प्रकारचे मतभेद-पक्षभेद उच्चनीचभाव या सर्वांना मुठमाती देऊन ह्या एकाच कार्या-वर ( संघटनेवर ) आपली सर्व शक्ति कायेने मनानें वाचेने व धनानें एकवटली पाहिजे. वीरशैवतरुण-तरुणींनो, संघटनेची चळवळ करा. संघटना हीच समाजतारक व उद्धारक शक्ति आहे.

# सहवासोत्तर प्रौढविवाह

(ले०—नवमतवादी तु० ना० काटकर, नागभीड B. N. Ry.)

## पूर्वभाग

" वीरशैव गर्जने "-च्या २० मे १९३७ चे अंकांत कु. सुमनने श्री. चौधरींनें प्रतिपादिलेल्या सहवासोत्तर प्रौढविवाहपद्धतीवर अगदीच अनास्था प्रकट केली असून समर्थनाची पृच्छाहि केली आहे. त्यांना हें उत्तर आहे.

## शीलं परं भूषणम्

नवमतवाद हा अविरत आहे. मागला नवमतवाद आज आपणास रूढीच्या स्वरूपांत बघायला सांपडतो वा आजचा नवमतवाद भविष्यकालांत ह्याच अवस्थेंत बघायला सांपडेल. तुह्मी कोणतीहि बाव घ्या. ती सतत आचरणानें " रूढी "च्या उदरांत गेलेलीच आढळेल. एखादी नवीन प्रथा समाजांत सुरूं करायची झाली कीं, तेथे नवमतवाद उद्भवतो. ह्याच तत्वाला अनुसरून कु० सुमननें प्रस्तुत विवाहपद्धति नवमतवादाचे प्रश्नामागें दडविली आहे. एवढेंच नव्हे तर मान्यता दिली असून पुनः विकृतीहि निर्मिली आहे. त्यांच्या प्रश्नाचें योग्य तें उत्तर श्री. चौधरी त्यांना देतील वा देणार आहोत; पण आमच्या बौद्धिक मताला जें पटतें त्याप्रमाणें आह्मीहि त्यांना उत्तर देण्याचा यथामति प्रयत्न करीत आहोंत.

सहवासोत्तर प्रौढसंमतिविवाहाचा रवल आजच्या युगांत पृथ्वीवरील सुधारलेल्या निर निराळ्या राष्ट्रांत जाणून बुजून कमीअधिक प्रमाणांत चालविलेला आहे. ह्याचें कारण बौद्धिक मताची प्रगति. पण ती अभावयुक्त आहे. कारण प्रगति ही कर्तव्याच्या आड छपून बसली आहे. कर्तव्य करा कीं प्रगति केव्हांहि पूर्णांशानें मोहरा गाठल्याशिवाय हमखास रहाणार नाही. निव्वळ बौद्धिक मताच्या शाब्दिक तत्वावर भवति न भवति चालवूं बघता, पण त्याच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीला मात्र अद्यापि तोंड देत नाही ह्याचें कारण शीलाची साशंकता, मतीचा कमकुवतपणा नि उच्छृंखळता हें होय. भावनाच्या ठिकाणच्या विकृतीवर जो मात करीत नाहीं तोपर्यंत ह्या शंकाकुशंका उद्भवावयाच्याच. पण ह्यांतूनहि शिरसलामत पार पडणारे कित्येक भीष्म आहेत. ह्मणूनच लावण्यवती ललनाच्या सान्निध्यातहि ड्यूक ऑफ विंडसर प्रभृतींची शुद्ध समाधी कायम टिकूं शकते.

' शीला ' ची महती सनातनी नवमतवादी सुशिक्षित व अशिक्षित लोकांत तशीच स्वराष्ट्रीयांत व परराष्ट्रीयांतहि आहे. मग ती पटवायला परभाषेतील सुभाषितांची काय

जरूर ? परवश्यांना शीलाची किंमत आहे व आह्मास काय ती नाहीं ? तसेंच जर असतें तर "शीलं परं भूषणं" प्रभृति ह्मणी समाजांत आदर्शवत् ठरल्याच नसत्या. 'शील' हें जगांतील हरेक व्यक्तींना परम भूषण असून, त्याच शीलाची सहवासोत्तर प्रौढविवाहपद्धतीला आत्यंतिक आवश्यकता आहे. 'शील' गेल्यावर मग उरलें काय ? तें गेलें कीं त्याबरोबरच सर्व सद्गुणांचा लोप झालाच ह्मणून समजा. ह्मणून प्रत्येकानें कसें वागावयास हवें हें काय येथे नमूद करावयास पाहिजे?

## देवांचे धिंडवडे

परनाधीन झालेला श्रीशंकर, कामातुर झालेला ब्रह्मदेव, शंकुतलेला बघून विघळलेला दुष्यंत वा मेनकेच्या सौंदर्यावर उडी घालणारा विश्वामित्र असा हा आह्मां हिंदु-वीरशैवांच्या देव-देवतांचा, राजामहाराजांचा नि ऋषिमुनींचा आदर्शवत् इतिहास. मग काय चांगलाच आधार सांपडला! पण पुढच्याला ठेंच लागली तरी मागच्यानीहि जाणून बुजून ठेंचा खाव्यात ह्यांतच आमच्या रुढीप्रियांचें खरें ब्रीद आहे, नि नवतींत विषयोपभोगाची मजा आहे. मग तो रूढी कशी बरे पालटतां येईल ?

पूर्वजांनी – नव्हे, प्रत्यक्ष परमेश्वरांनीं व्यभिचारकर्म करायला कमी केलें नाहीं; मग 'मानव' हे तर त्यांचे सर्वस्वीं अनुकरण करणारे निस्सीम भक्त आहेत. ते तरी बापडे कशाला कमी करतील.

बुद्धिवन्त ह्मणविणाऱ्या सुज्ञांनों ! तुमचा ह्या पोथ्या-पुराणांतील दंतकथावर विश्वास बसतोच कसा नि ह्यांचा आधार घेताच कोणत्या तोंडानें ह्याचीच आह्माला कींव येते. असले शीलविरोधक आधारावर सिद्धता शाबीत करण्याची बुद्धिजीवी मिमांसा ह्मणतां येईल काय ? कीं हें गतानुगतिक अंध अनुकरणात्मक धोरण. ह्याचा बुद्धिवादीयांनीच निर्णय लावावा.

पुराणांत पराचा कावळा कसा झाला आहे नि त्यांत सत्यांश कितपत आहे ह्याची आपणास भूरळ पडली आहे. असले लटके आधार देऊन समर्थन करण्याचा हा काळ नव्हे, व तें मान्य करायला आजचा बुद्धिवादी समाज दुधखुळा नाहीं. अशा मिथ्या आधारानें स्वतःतर कमकुवत बनतां यांत कांहीं संशय नाहीं. पण त्याबरोबरच दुरभ्यास नि भावी पिढीसहि बनवितां. बुद्धिवंतांनी असले भ्रांतमूलक दाखले घेऊन समर्थन करणे योग्य होणार नाहीं. त्यांनी बुद्धीच्याच निकषावर आपल्या मतांचें खंडन करावयास हवें, नि अशा प्राचीन पाखंड इतिहासाची दूषित प्रथा भावी होतकरू पिढीवर पडण्यापूर्वीच पोथ्या-पुराणादि महारोगाची होळी करावी. तरच त्यांना सहवासोत्तर संमतिविवाहाची भाषा बोलतां येईल नि अंगिकारतां येईल. आजच्या कर्मवादी जगांत पोथ्या-पुराणादि असत्य पोताड्यांची जरूर नाहीं. ज्या वेळीं ज्याची आवश्यकता तेंच सत्य हें पोथ्यापुराणांतील खुळचट मतांचें युग नाहीं. बौद्धिक मताचें 'चक्षुर्वै सत्यं' युग आहे.

परश्वराचे या जगांतील अस्तित्व सगुण सविकार आहे काय ? परमेश्वर ही एक सर्वसामर्थ्यवान अशी अदृश्य स्वरूपांत असलेली दिव्य शक्ति आहे हें तत्व आपणास मान्य आहे किंवा नाहीं ? मान्य असल्यास मात्र आमचा कांहीं सवाल नाहीं. पण ह्याच्याहि पुढें बुद्धीच्या वादावर पदार्पण करणारा निरिश्वर नि निधर्मी रशिया सतत १८-१९ वर्षांपासून स्वातंत्र्यसुख मनस्वी उपभोगीत आहे. पण परमेश्वर जर निर्गुण निर्विकार आहे तर तो कामाधीन होऊं शकेल काय ? वैषयिक सुख उपभोगूं शकणें शक्य आहे काय ? असल्या ह्या पोथ्या-पुराणांतील खोट्या नाट्या विकृत कल्पनांवर भरंवसा राखु बघणाऱ्यांनी सहवासोत्तर प्रौढ विवाहपद्धतींत साशंकता वि अनास्था निर्माण न केल्यास आश्चर्य तें काय ?

जर परमेश्वर संगुण स्वरूपांत नाहीं तर तो कामाधीन होऊच कसा शकतो ? उलटपक्षी वैवाहिक पद्धति हाणून पाडण्याकरितां नमुनेदार उदाहरण ह्मणून हे ईश्वराचें घिडवडें नाहींत काय ? तुह्मी त्यास कितीहि निंद्य प्रकारें दूषण द्या. पण तो परमेश्वर मात्र या सर्व विकारा-पासून अलिप्त आहे हें खास. परमेश्वरावर असले निंद्य आरोप गतानुगतिक तरवानें ठेवणें हें निदान सुशिक्षित बुद्धिवंतांना तरी शोभत नाहीं. हें बुद्धीला ताण न देतां निव्वळ अंधानुकरण आहे, किंबहुना हा परमेश्वरावर जुलूम आहे ह्मटल्या-सहि हमखास अतिशयोक्ति होणार नाहीं.

## आदर्शवत् नेपाळी विवाहपद्धति

आमचा समाज जगाची भाषा बोलतो. अमे-रिका, जर्मन, रशिया, इंग्लंड प्रभृति राष्ट्रांची तशीच परमेश्वराच्या काल्पनिक लीलांची व घिडवड्याची साक्ष देतो पण आपल्याच राष्ट्रांत कित्येक कालापासून चालत आलेल्या नेपाळसारख्या स्वतंत्र संस्थानाकडें उघड्या नेत्रानें बघण्याचें साम-र्थ्य मात्र सरसावत नाहीं. सामाजिक, राजकीय, नी विज्ञानाच्या दृष्टीनें नेपाळ संस्थान कितीहि मागासलेलें अथवा सनातनी असलें तरी त्यांची स्वयंनिर्णित सहवासोत्तर प्रौढसंमत्तीविवाहपद्धति नि घटस्फोटाची सोपी तऱ्हा ही मात्र खरोखरीच एखाद-दुसऱ्या समाजानें-धर्मीयानें नव्हे तर अखिल जगतानें अनुकरण्यास योग्य अशीच आहे.

नेपाळी जीवनांत स्त्री-पुरुष समान दर्जाचे असेच समान हक्काचे लेखिले जातात. दोघेहि सहकार्यानें वागतात. आपल्याकडे दोन पुरुष असे एकत्रित असतांना कोणाच्याहि अंतः-करणांत कांही किल्मिष डोकावत नाहीं तद्-वतच नेपाळी जनतेंत एक स्त्री व एक पुरुष एकत्रित नव्हेतर एकांतांत वावरतांना आढ-ळल्यास कोणाहि नेपाळीचे मनांत शंकाकुशंका उद्भवत नाहीं. मग इतरांना ( नेपाळी खेरीज ) त्यांचे नवल वाटलें नि त्यावर शंकाकुशंका लढविल्या तर त्यांत विशेष तें काय आहे ? ज्या रंगाच्या चारशींतून बघावें त्याच रंगांत निसर्गांत पालट झालेला दिसेल. म्हणून विश्वे थोडेच बदलणार आहे !

नेपाळमध्यें कोणीहि भिन्न भिन्न स्त्री-पुरुष परस्पराकडे जातात येतात, फिरायला जातात, एकांतांत बसतात, कामावर जातात, शेतावर नि बागबगीच्यांत राबतात, पण पतिपत्नी खेरीज करून त्यांच्यांत वैषयिक विकार जागृत होत नाहीत. भिन्न भिन्न स्त्री-पुरुष म्हणजे केवळ पुरुषच वा स्त्रियाच म्हणजे 'मानव' ज्यांना म्हणतात त्या संज्ञेला आदर्शवत् असे शोभणारें आहेत. म्हणून त्यांच्यांत सहवासो-त्तर प्रौढविवाह हा सर्रास रूढ आहे. करितां अशीच शुद्ध नीति हरएक व्यक्तीच्या ठिकाणी जागृत होणें अत्यंत आवश्यक आहे.

ह्या त्यांच्या नैतिक गुणामुळें परस्पराचे हितसंबंध नि स्वभावधर्म कळून घेण्यास त्यांना एकत्रित रहावें लागलें तरी त्यांच्यांत 'शीला' ची भ्रष्टता होत नाहीं इतके त्यांचे सद्‌गुण थोर पदाला पोहचले आहेत. मग पर-स्पर उमेदवारांचें स्वभावधर्म जुळण्यावर पुढील विवाह अवलंबून असतो. स्वभावधर्म जुळणें ह्मणजें वैषयिक सुखाचा मासला बघणें नव्हे. ज्यांना नीतीची इभ्रत आहे त्यांना ह्या हल-कट सुखाची पर्वा काय असणार ?

जेथें स्त्री-पुरुषांचे समान हक्क आहेत नि शीलाची कदर आहे तेथे घरनजीव पुरुषांना वडीलधाऱ्यांच्या नजरबंदीची दिक्कत कशाला हवी ? पण ज्यांना वैषयिक सुख ह्मणजेच 'शील' गमते त्यांच्यावर कितीहि कडक नजरबंदी राखली तरी त्याचा काय उपयोग ? ह्मणून शीलाचा प्रश्न हा ज्याचा त्याच्या-करितां आहे. मग पुरुष असो वा स्त्री असो, शीलाची दिक्कत ही प्रत्येक समंजस व्यक्तीला आहेच. त्या ठिकाणी परस्परांतील चोचल्याची कथलाची शंकाकुशंका काढायची ह्मणजे चोराच्या मनांत चांदणें पाडण्यासारखें आहे. एखाद्या बाबी-वर जितकें नियंत्रण अधिक तितका त्या गोष्टीचा भंग करण्याची प्रवृत्ति जास्त हा मनुष्यजातीचा अनुभवानें निघालेला सिद्धांत आहे.

# आमची सांगलीची सफर

( लेः—रामशंभो पुराणीक )

कुठल्याहि सफरीचें प्रवासवैचित्र्य खरो-खरच आनंददायक असतें. तशातहि मित्रांच्या सहवासात हा योगायोग जुळून आला ह्मणजे कांही औरच मौज ! दे. भ. नानासाहेब आमणगांवकरासारख्या बहुश्रुत आणि विद्वान् सज्जनाच्या सहवासांत आमच्या सांगलीच्या सफरीला ता. ३१-५-३७ रोजी सुरुवात झाली. दे. भ. नानासाहेब आणि मी सकाळी १-३० चे मेलनें प्रथम पुण्यास जाण्याचे नक्की ठरवून त्याप्रमाणें रेलवेस्टेशन वेळेवरती गांठलें. स्टेशनवर नानासाहेबांच्या स्थानिक मित्रमंडळींनी, मोहीमेवर जाणाऱ्या विजयी वीरांना साजेसा नमस्काराच्या आरोळ्यांनी निरोप दिला. बराच लांबचा प्रवास, आणि त्याच मुदतीचा नानासाहेबांचा सहवास, आणि आपणास आता नानासाहेबाकडून अखंड ज्ञानामृत प्राशन करायला मिळणार या कल्पनेने माझें हृदय आनंदाने नाचूं लागलें. निर-निराळ्या विषयावर चर्चा करीत आह्मी त्यांच्या गप्पागोष्टींत इतके रंगून गेलों कीं, किती स्टेशन ओलांडलीं गेले याचीहि कल्याण-पर्यंत आह्माला दाद नव्हती. नाही ह्मणा-यला आमच्या गप्पाष्टकांत स्टेशनमध्ये ट्रेन थांबली की पुन्हा ती तिथून सुटेपर्यंत रेल्वे-स्टेशनवरील उतारुंची धावपळ, आणि चहा-विक्रेत्याच्या कर्कश आणि भसाडया आवाजाने आमच्या तंद्रीचा थोडासा भंग होई असे तितकेंच. असा मजेमजेत आह्मी प्रवास करीत एकदांचे कल्याण गाठलें. प्रातः-काळी वगैरे उरकून प्रभातीच्या जगन्मित्राशी आपणाशी मनोरपणें हस्तांदोलन करून जाग-णाचा धकवा घालविला. वऱ्हाडच्या उन्हा-ळ्याने तापल्या तव्यावर भाजून निघालेले आमचे देह सह्याद्रीच्या गार वाऱ्यानें ताजे-तवानें बनून आह्माला बरीच हुशारी वाटली. कल्याण ते पुणें हा प्रवास सकाळचा अस-ल्याकारणानें मार्गातील वनशोभा पहात, आणि कांही विशिष्ट अशा स्थळाची महत्व-पूर्ण माहिती मिळवीत आह्मी एकच्या सुमा-रास पुण्यास पोंचलों. पुण्याला आमचा मुक्काम 'केसरी' संस्थेच्या गेस्ट-हाऊसमधे होता. 'केसरी' संस्थेची व्यवस्थापक मंडळी आणि संस्थेतील शिस्त कल्पनातीत वाखाणण्यासारखी आहे. लोकमान्यांनी मांडून ठेवलेला अजस्त्र पसारा, पण सर्व कांही कारभार यंत्राप्रमाणें सुव्य-वस्थित पाहून मला अत्यंत कौतुक वाटलें. याचें सर्व श्रेय तात्यासाहेब केळकरांना आहे. पुण्यास पोंचल्यानंतर देशभक्तीचें वेड किती चमत्कारिक असतें याचा मला नानासाहे-बांच्या सहवासांत चांगलाच अनुभव आला. उठतां-बसतां पावलों पावलीं राजकारणाच्या साधक-बाधक चर्चेशिवाय दुसरा विषय ह्मणून नाहीं. जो भेटेल तो ' हं कसं काय आमणगांवकर, तुमच्या प्रांतात कसें काय चाललें आहे ? कांग्रेस काय ह्मणते ? लोकशाहीबद्दल काय बोलतात लोक ? ' राजकारणाशिवाय दुसरी बात ह्मणून नाहीं. त्यात आणखी एक जादा भर ह्मणजे, मुंबई प्रांताचे दिवाण श्री. जम्नादास मेथा यांची गांठ पडली. त्यांचाहि मुक्काम ते दिवशी 'केसरी गेस्ट हौस' मध्येच असल्या कार-णानें राजकारणाच्या कितंनाच्या वाढत्या रंगात मी देखील चांगलाच रंगून निघालों. आह्मी आप

त्याच रंगांत दंग होतो खरे, पण तिथेही अमरावतीच्या एका तारेनें चांगलाच बदरंग उधळून दिला. नवमतवाद्यांचे पुढारी ह्मणून ज्यांची सर्वत्र ख्याति आहे आणि ज्यांचा आदर्श प्रीतिविवाह नुकताच नागपूर मुक्कामीं मोठ्या थाटांमाटानें आणि विशेष गाजावाजानें तारीख १७ रोजी उरकला [गेला] त्या त्या वेळच्या निश्चयी व सत्शील कुमारिकेला दे. भ. वामणगांवकर आणि पुराणिक यांनी पुण्यास फुस लावून नेली आहे, त्यांचेवर नीट नजर ठेवा, '' अशा आशयाची तार मुलीच्या वडिलांनीं त्यांच्या विश्वासांतील अशा एका डिटेक्टिव्हला पुण्यास केली. आह्माला ही बातमी कळतांच, संतापानें मस्तक तर भणाणलेंच, परंतु तार करणाराच्या मूर्खपणाचेंहि हसें आलें. देशभक्तांच्या मागें सरकारी ससेमिरा तर असतोच पण त्याच्याच जोडीला हें एक नवीनच कुलंगडें आमच्या अंगाशीं चिकटविणाऱ्याचीं खरोखरच कींव आली. या तारेचें उत्तर ह्मणून तार करणाऱ्यांची नानासाहेबांनी योग्य ती हजेरी पत्रद्वारें घेतली हा प्रश्न निराळा. पण जें झालें तें हें असें झालें.

## पुणें तें सांगली

आह्मी पुण्यास असतांनाच सांगलीचे एक प्रतिष्ठित नागरिक श्री. हरिहर कृष्णाप्पा रिसवडे यांचेकडून त्यांचे बंधूचें लग्नाची निमंत्रणपत्रिका आह्माला आल्या कारणानें आह्मी दोन तारखेस रात्रीचे पॅसेंजरनें सांगलीस जाण्यास निघालों. संस्थानी मुलुखांत पाऊल ठेवण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग असल्याकारणानें पुणें स्टेशनवरील सदर्नमराठा-रेलवेस्टेशनवर पाय ठेवतांच संस्थानी गचाळपंथी कारभाराची कल्पना-मला तरी निदान तो रेलवेचा कारभार पाहूनच पटायला लागली. ते डबे, ती गर्दी, आणि तो सारा थाटमाट, सगळेंच कांही नाविन्यसें भासायला लागलें. थर्डक्लासमधील तो कोंडवाड्याचा कोंडमारा पाहून आह्मी तिकीटें बदलून इंटरची तिकीटें खरीदलीं खरीं, पण समाधानकारक असें कांही शेंवटपर्यंत वाटलें नाही. याच स्टेशनवर धुळयाचे सुप्रसिद्ध शाहीर मुचाटें यांची गाठ पडली. तेहि सांगलीसच लग्नसमारंभाला निघाले होते. त्यांची गांठ पडतांच कुशलक्षेम विचारून त्यांना कुठेंतरी जागा पटकावण्याचा मीं सल्ला दिला. पण बिचाऱ्याला शेवटपर्यंत उभ्यानें प्रवास करावा लागला हें जेव्हा आह्माला दुसरे दिवशी कळलें तेव्हा मीं सहजच त्यांना ह्मटलें, ' करायची होती सुरुवात, " चलगड्या मावळ प्रांतात " या तुमच्या आवडत्या छबुडीला, आणि आवेशांत मारायची होती बैठक पोवाड्याच्या आणि डफातुणतुण्याच्या झुंबडीत ! ' तेव्हा ते हसले आणि ह्मणाले, अहो त्या गर्दींत आमचे डफतुणतुणें कसें शाबूत राखतां येईल या विवंचनेंत सारी रात्र काढावी लागली. बरे झाले त्या आयुधाच्या गवसण्या खोलल्या नाही. नाहीतर त्यांचा कपाळमोक्ष केव्हा आणि कसा झाला असता कळलें देखील नसतें. येनकेन प्रकारेण आह्मी बुधगांवला उतरून श्री. रिसवडे यांनी मुद्दाम आमचेकरिताच स्टेशनवर पाठवलेल्या मोटारनें सांगलीला तारीख ३ ला सकाळी जाऊन पोंचलों.

सांगली हें गांव छोटेसें शहरवजा असून हवा अतिशय उत्कृष्ठ अशी आहे. शहराची रचना सुव्यवस्थित, रस्ते भरपूर रुंद, व्यापारी लोकांत जैन आणि लिंगायत यांचा विशेष भरणा असून, सदासर्वदा व्यापारी पेठ गजबजलेली. विशेष असा व्यापार हळद, शेंगदाणे, गूळ, आणि सराफी चांदी सोन्याचे भांडी व डागदागीनें वगैरेचे बाजार अतिशय दणाणलेले असतात. त्यांतूनहि श्रीगजाननमिल, सरस्वती मिल, भावे आणि सन्सची छोटीशी पण नमुनेदार अशी लुगड्याची मील, आणि लोखंडी नांगर व इतरहि उपयुक्त अशा जिनसांच्या लोखंडाचा कारखान्यांनी सांगली शहराच्या

भरभराटीत चांगलीच भर घातली आहे. पण ही व्यापारी भरभराट कशी काय टिकून राहील याबद्दल बरीच हाकाटी ऐकावयाला आली. संस्था- नच्या राजेसाहेबानीं जो एक नवा व्यापारी कायदा पास करण्याचा अट्टाहास धरला आहे आणि त्या बाबतींत वर्तमानपत्रांमधूनही मागे बरीच खळबळ माजलेली वाचण्यांत आली ती गोष्टी खरी असल्याची बोलवा कानावर आली. अनेक प्रतिष्ठित व्यापाऱ्यांनी बुधगांव स्टेटच्या हद्दीत लांबमुदतीच्या करारानें बऱ्याच मोठ्या जागेचे ब्लॉक्स खरीदले असून काहींनी तर बांधकामहि सुरू केलें आहे. हें पाहून सांगली मात्र संस्थानिक बरेच गडबडल्याचे ऐकि- वांत आलें. आणि नवा कायदा अमलांत आण- ल्यानें तर राहोच पण पूर्वीपेक्षांही बऱ्याच सवलती ते स्थानिक व्यापाऱ्यांना द्यायला तयार आहेत. आमच्या सांगलीच्या मुक्कामांत राजपरिवाराची भेट घेण्याची आमची इच्छा असतानाहि राजेसाहेब विलायतेला सुफ- रीवर सपरिवार असल्यामुळें हा योगायोग जुळून आला नाहीं. गांवातील राजवाडा जुन्या पद्धतीनें बांधलेला असा भव्य आहे. पण सध्या राजेसाहेबांचें वास्तव्य बुधगांव ते सांगली रोड- वरील सरकारी बागेंतील बंगल्यातच असते. येथील प्रेक्षणीय स्थळांत अगदी उच्च दर्जाचें गणपतीचें मंदिर फारच सुंदर असें आहे. या शिवाय गावांतच पारिजात फिल्म कंपनीचा स्टुडिओ असल्या कारणानें आह्मी मुद्दाम तेथे गेलों असतां नटवर्य गणपतराव बोडस, आर्टिस्ट केळ- कर, वगैरे वगैरे मंडळीची गाठ घेतली. 'सावकाराची मुलगी' या बोलपटाचे चित्रीकरण तेथे सुरू होते. मंडळीनी, आह्मी तिथे गेल्याबरोबर, खुल्या दिलानें आमच्याशी तासभर बोलपटाच्या बाबतींत चर्चा केली. अल्पोपहार झाल्यावर आह्मी सर्वांचा निरोप घेतला. सुप्रसिद्ध नाटककार काकासाहेब खाडिलकरांच्या दत्त- मंदिराकडे जाऊन त्यांची भेट घेण्याची फार इच्छा होती. पण त्यांचा मुक्काम तिथें नस- ल्यामुळें आमची निराशा झाली.

ज्यांचेकडे आह्मी लग्नसमारंभाला गेलों होतो ते श्रीमान रिसवडे सांगली शहरांतील एक प्रति- ष्ठित व्यापारी असून श्री. हरिहर अप्पा रिस- वडे हे प्रामुख्यानें सार्वजनिक चळवळींत भाग घेतांना आढळतात. सांगली शहरांत अशी एकहि संस्था नाही कीं जिचेशीं श्री. हरिहर- अप्पाचा थोडादेखील संबंध नाहीं. प्रत्यक्ष संस्थानच्या दरबारांतहि वेळप्रसंगीं स्वतः राजे- साहेब त्यांची सल्लामसलत आपुलकीच्या भावनेनें घेत असतात. त्यांचा स्वभाव अतिशय मनमिळाऊ आणि मोकळा असून सांगली येथील वीरशैव बोर्डींग तर सर्वस्वीं त्यांच्याच खट- पटीनें आजवर चालले आहे. थोड्याच दिवसां- पूर्वी सांगली संस्थान वीरशैव परिषद यशस्वी- पणें पार पडण्यास श्री. हरिहर अप्पा रिसवडे आणि त्यांचे सहकारी मित्र श्री. हिरेमठ वकील व श्री. माळगीशेट यांचेच श्रमाचें चीज होय. त्यांचे येथील लग्नप्रसंगाचा विशेष ह्मणजे, वीरशैवांतील उच्चवर्णीय (बुरुड, न्हावी, आणि इतर महार चांभारादि लिंगधारी वर्गाशिवाय) इतर पोटजातींतील रोटीव्यवहाराला सरांस- मुभा देण्यांत आली होती. दोन दिवसांचा लग्नसोहळा आनंदानें पार पडला. घरच्या लग्नाच्या लगीनघाईत- देखील श्री. हरिहर अप्पानी एक अभिनव योगायोग ह्मणजे, श्री. नानासाहेबांच्या पुनर्विवा- हाचा जुळवून आणण्याचा घाट घातला, आणि वधूपरीक्षेच्या परीक्षेला बसण्यास मामासाहेबांना भाग पाडलें. सांगलीनजीकच्याच सोनीगांवचीं एका कुलशीलवान माहेश्वर मठपतींची द्वितीय- कन्या वधू ह्मणून नानासाहेबासमोर उभी करण्यांत आली. उभयपक्षी देवाणघेवाणाच्या भाषेत उभयतांनी आपापली परिस्थिति खुल्या दिलानें बोलून दाखविली. यथोचित चर्चा झाल्या- नंतर, नानासाहेबांनीं या बाबतींत अॅर्ग्युमेंट देण्याचें काम आमचेंकडे सोंपवलें आणि आह्मीहि 'मुलगी आह्माला पसंत आहे. अवश्य करा,' असा सल्ला ठोकून दिला. आणि अधिक विचार- विनिमयाकरतां थोडा अवधी मागून घेऊन

रात्रीच्या गाडीनें सोलापूर जिल्हा वीरशैव परिषदेकरतां बार्शीस जाण्यास निघालों.

ता. ४ रोजी रात्रीचे गाडीनें आह्मी सांगलीवरून बार्शीस जात असतांना मिरजस्टेशनवर सो. जि. परिषदेचें अध्यक्ष प्रि. नन्दीमठ यांची गाठ पडली. उभयपक्षी कुशलक्षेम विचारपूस होऊन गाडींत गर्दी कमी असल्याकारणानें झोपायला मिळालें. कुडुंवाडी स्टेशनवर गाडी पोंचताच अध्यक्षांचा आणि नानासाहेबांचा शोध काढीत कांही बार्शीची मंडळी आली. त्यांची आणि आमची गाठ पडतांच त्यांनी आह्माला उतरून घेतलें, व मोटारने आह्मी व अध्यक्ष बार्शीस निघून गेलों.

अध्यक्षांना आणि नानासाहेबांना अर्थात् मलाहि श्रीमंत कै. अण्णासाहेब कथले यांचेकडेच उतरण्याची सोय केली होती. प्रातःविधी, स्नानसंध्या अल्पोपहार वगैरे आटोपून मोठ्या थाटामाटानें अध्यक्षाची मिरवणूक बार्शी शहरामधून काढण्यात आली. या मिरवणुकीसमवेतच महिलापरिषदेच्या अध्यक्ष सौ. पंचव्वाबाई सरदार यांचीहि मिरवणूक होतीच. ठरल्याप्रमाणें बार्शी-परिषदेला सुरवात झाली. सोलापूर–जिल्हा–वीरशैव परिषद, आणि महिलापरिषद, सुव्यवस्थितपणें पार पडल्या. वास्तविक स्वागतमंडळाच्या निवडणुकीची वेळोवेळी झालेली बदल वर्तमानपत्रामधून वाचण्यांत आली तेव्हा परिषद कशी काय निर्विघ्नपणें पार पडते इकडेच सर्वांचे डोळे लागले होते. पण कार्यकारी मंडळाच्या कर्तबगारीनें आणि स्वागताध्यक्ष श्री. काकासाहेब झाडबुके यांच्या उदार आणि धोरणी स्वभावानें व अध्यक्ष प्रि. नंदीमठ यांच्या समतोल धोरणाने वादग्रस्त प्रश्नाची कोडीं कुशलतेनें सोडवलीं गेलीं. या परिषदेमधील एक न्यून मलाच नव्हे तर बऱ्याच लोकांना जाणवलें तें हें कीं, सोलापूर आणि बार्शी हीं शहरें वीरशैवांची महाराष्ट्रातील केंद्रस्थानें असतांना प्रत्यक्ष सोलापूर बार्शी शहरांतील असें फारच थोडें प्रतिनिधी सभेला हजर होते. या उदासीनतेला, मतभेदाशिवाय, आणि वैयक्तिक विरोधाभासाशिवाय, दुसरें कांही कारण असेल असें मला तरी वाटत नाही. कार्यकारी मंडळानें पाहुण्यांची व्यवस्था उत्कृष्टपणें राखली होती. उत्तरेश्वरांच्या भव्य मंदिरांतील भोजनप्रसंगीं एक प्रकारचा सात्विक आनंद आणि खुल्या दिल्यानें चाललेले संवाद, चर्चा, बसववचनांच्या उदगीरकरांच्या गर्जना यांनी मंदिरातील वातावरण दरवळलेलें असे. सभेचा दोन दिवसांचा कार्यक्रम ठरल्याप्रमाणें आटोपता घेतांना रात्रीचे दोन वाजले. येंन केन प्रकारेण सभेचा कार्यक्रम आटोपला. सवडींत सवड साधून श्री. काकासाहेब झाडबुके यांनी अध्यक्षांना आणि आह्माला आपल्या जयशंकर–मिलमध्यें अल्पोपहार देऊन आमचा गौरव केला. सभेचा स्वतंत्र रिपोर्ट प्रसिद्ध झालाच आहे. सबब ह्या विषयाची पुनः चर्चा करण्याचें कारण नाही.

बार्शी शहर तालुक्याचें गांव असलें तरी गावची रचना व्यवस्थित अशी दिसली. व्यापारी पेठेचें महत्व बार्शीला अधिक आहे. वीरशैवांतील पांच दहा घराणीं बरींच श्रीमंत आहेंत. व्यापाऱ्यांतहि विशेष भरणा लिंगायतांचा आहे. श्री. गावसानें हे म्युनिसिपल–चेअरमन आहेत असें ऐकलें. येथे एक वीरशैव–बोर्डिंग-हाऊस आहे. पण गांवातील मतभेदामुळें तिथली व्यवस्था जितकीं उत्कृष्ट असायला पाहिजे तितकी नाही हें पाहून वाईट वाटलें. असा प्रकारें एकदाचा बार्शीचा कार्यक्रम आटोपून आह्मीं अध्यक्षांबरोबरच सोलापूर गाठलें.

सोलापूरला आमचा मुक्काम श्री. डॉ. जगदेवराव देशमुख यांचिकडे होता. तेथील बऱ्याच स्थानिक वीरशैवपुढाऱ्याशीं आमच्या गाठी—भेटी झाल्या, परिषदेबाबत आणि इतरहि सामाजिक बाबतींत आमच्या सोलापुरच्या दोन दिवसांच्या मुक्कामांत बरीच चर्चा झाली. सोलापुर

हें वीरशैवांचें मुख्य केंद्रस्थान. परन्तु तिथली फाटाफूट आणि एका पक्षाबद्दल दुसऱ्या पक्षाची द्वेष पाहिली म्हणजे अतिशयच अंतःकरणाची चलबिचल होते. सोलापुर येथील रेवणसिद्ध मंदिर, सिद्धेश्वरमंदिर, मल्लिकार्जुन मंदीर, हीं प्रेक्षणीय स्थळें, सोलापुरातच नव्हे तर अखिल हिंदुस्थानातहि, नांव घेण्यासारखीं आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्ति नाही. सिद्धेश्वरमंदि-राची विशिष्ट प्रकारची रचना, सभोवती पस-रलेला जलाशय, खरोखरच अतिशय चित्तवेधक आहे. संध्यासमयीं मंदिरासभोवतीच्या जला-शयावर किनाऱ्यावरील विद्युद्दीपांच्या प्रकाश-लहरी पसरलेल्या पाहून एक प्रकारें आनंदाचें भरतें येतें. सोलापुरच्या मुक्कामांत असतांना, श्री. मुंजे वकील यांचे बरोबर सामाजिक सुधा-रणेबाबत बरीच खुल्या दिलाची चर्चा झाली. एकूण वर्तमानपत्रांतील पक्षोपपक्षाचा शिमगा सर्वांचा किळसवाणा झाला आहे हें खरें. खरी समाजसुधारणा कशी करता येईल याबद्दलची तळमळ समाजांतील प्रत्येक समंजस व्यक्तीला लागलेली आहे. पण यांतून जुन्या-नव्या मत-वाद्यांना पटेल असा मार्ग शोधून काढायला पुढें पाऊल टाकायला कुणीहि धजत नाहीं. संमेलनामधून सामोपचाराच्या देवाण-घेवाणीचा मार्ग आक्रमिला न जाता पक्षोप-पक्षाच्या भांडखोरपणांत एकमेकाची उखाळी-पाखाळी काढल्याशिवाय दुसरे कांहीं आजवर तरी निष्पन्न झाल्याचें आढळत नाहीं. वादवि-वाद वाढवून विघटना करण्यात कांहींना मौज वाटते आणि संघटना व्हावी म्हणून नुसता कोलाहल मात्र माजवला जातो. यावर एकादा सरळ साधा मार्ग कुणीं शोधून काढल्यास आणि त्या मार्गानें खरोखरच सामाजिक संघ-टना घडून आल्यास खरें समाजहित साधणार आहे. एकूण काय, या प्रवासांत, बार्शी-सोला-पुरकडील सामाजिक परिस्थितीचें जें चित्र पहा-वयास मिळालें तें हें असें चित्रविचित्र होतें.

एकदांचें या परिस्थितीचें निरीक्षण करून, आणि सोलापुरांतील प्रेक्षणीय स्थळें पाहून, आम्ही पुण्याचा मार्ग धरला.

पुण्याच्या पुरत्च प्रवेशांत आम्ही पुण्याचे सुप्रसिद्ध श्रीमान आणि एकेकाळचे पुणें-म्युनि-सिपालिटीचे चेअरमन श्री. अप्पासाहेब मानूर-कर यांचेकडे मुक्काम ठोकला. अप्पासाहेबांचा दिलदार स्वभाव आणि वृद्धावस्थेतदेखील कामांचा उरक पाहून एक प्रकारें समाधान वाटलें. पुणेंच तें ! जगांतील यच्चयावत् चळवळीचें महाराष्ट्रांतील केंद्रस्थान म्हणजें पुणें, आणि मी ज्यांचेबरोबर प्रवास करीत होतो ते नानासाहेब म्हणजे कट्टे चळवळ्यांचे पुरस्कर्ते. असा एकहि दिवस गेला नाही कीं आज कुठें कांहीं नाही. या मुक्कामांत सोन्यामारुती-सत्याग्रहीसंम्मेलनाला आम्ही पाहुणे म्हणून हजर. सद्यस्थितीवर नानासाहेबांचें पुण्यास सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत व्याख्यान, व रात्रंदिवस राजकारणाची चर्चा, असा थाट चालायचा. एके दिवशी पुण्यातील जगप्रसिद्ध प्रभातचा स्टुडिओ पहाण्याचाहि योगायोग जुळून आला. श्री. दामले यांनी नानासाहेबां-करितां मुद्दाम आपली मोटर पाठवून भेट घेण्याची विनंती केली. प्रभातचा स्टुडिओ म्हणजें एक प्रभातनगरच बसले आहे. शांताराम बापू त्या वेळीं तेथें नसल्यामुळे त्यांची आमची गाठ पडली नाही. पण श्री. दामले, एस्. फत्तेलाल व इतर कांही मंडळीच्या गांठी पडल्या. श्री. दामले, व एस्. फत्तेलाल यांचेशीं त्यांनी दिग्दर्शिलेल्या सन्त तुकाराम बोलपटा-बाबत बराच वेळ चर्चा झाली आणि त्यांनी-देखील हें कबूल केलें कीं, या बोलपटानें आम्हाला कल्पनेबाहेर यशस्वी केलें. महा-राष्ट्रीय भाषेचें आकुंचित क्षेत्र आमच्या कलोपासनेला अतिशय अपुरें पडतें. आम्ही हिंदीमधून आमचे बोलपट दिग्दर्शित करतों खरे, पण हिंदी भाषा निरनिराळ्या प्रांतां-मधून निरनिराळ्या वळणाची असल्यामुळें आम्हाला विलायती फिल्म कंपन्यांगत यशाचा वाटा मिळण्याची मारामार पडते, आणि आमच्या महत्वाकांक्षा व्हाव्या तितक्या फलद्रूप

होत नाहींत. कलेच्या भरारीला खरोखरच त्रिभुवन देखील अपुरें वाटावें यांत नवल तें कसलें? या कलाकारांच्या सहवासांत दोन तास केव्हा नी कसे निघून गेले हें आम्हाला कळलें देखील नाही. थोडा अल्पोपहार घेऊन आम्ही परतलों. बिऱ्हाडीं येतांच नानासाहेबांच्या वधूपरीक्षेचा 'फेवर रिझल्ट' सांगलीहून आलेला आमचे हातीं पडला. आणि पुनरच आम्ही सांगलीच्या तयारीस लागलों. सांगलीस श्री. शिरवडे यांनी नानासाहेबांना एकदाचें चतुर्भुज करण्याचें ठरल्याप्रमाणें तारीख २१ रोजीं नानासाहेब चतुर्भुज झाले. सांगलीस दे. तात्यासाहेब सावकरांची भेट झाली. श्री. बिलोपाले वैद्यांचे घरी त्यांचें समागमे अल्पोपहार, पानसुपारी व खाजगी चर्चा झाली. येथील वीरशैव बोर्डिंगमध्ये श्री. बाबासाहेबांचें 'वीरशैवसंघटना' या विषयावर व टिळकमंदिरांत श्री. भोपटकर यांचे अध्यक्षतेखाली 'प्रचलित राजकारण' ह्या विषयावर व्याख्यानें झाली. सांगलीकरांचा निरोप घेऊन आम्ही तारीख २५ ला निघालों. वाटेंत किर्लोस्करवाडीस उतरण्याची आमची इच्छा होती. परंतु कांहीं अडचणीमुळें आम्हाला तें साधतां आलें नाही. शेवटी पुणें व मुंबईचा एक दिवसाचा मुक्काम करून आम्ही तारीख ३० रोजी सकाळी अमरावतीस येऊन पोचलों.

---

# अशास्त्रीय वाद संगती.

लेखकः—
एक धर्माभिमानी

धर्म, अर्थ, काम, मोक्ष सिद्धीकरतां परस्परांचे सहाय्यानें स्त्रीपुरुष दोघेंहि लग्नबंधनसंबंधाने जीवनरथाला जोडले जाणें यालाच खरा विवाह म्हणतां येईल. संतानवृद्धीकरतां प्रजोत्पादन करणें हें स्त्रीपुरुषांच्या जीवनांतील मुख्य अंग आहे. वीरशैवधर्मशास्त्रानुसार विवाहसंस्कार करण्याचा अधिकार धर्मगुरुंचा नसून मठपतीचा आहे. कांही ठिकाणच्या मठपतींना हे विवाहविधी धर्मशास्त्रानुसार अवगत नसल्याकारणाने कांहीतरी थोतांडी मतानें विवाहकार्य उरकलें जातें. वास्तविक पंचकलशस्थापना करून सूत्राधारे विवाह उरकला जाणें इष्ट आहे. ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यासी वगैरे चतुर्थाश्रम आहेत. त्यांत श्रीमज्जगद्गुरु पंचाचारी हे गुरुवर्गीय गणले जातात. आमच्या वीरशैवसमाजांत दीक्षा शिक्षा करण्याचे सर्वाधिकार या आचार्यपीठाचे आहेत. सन्याशांत (विरक्तांना) लग्नविधीसंस्कार नाही तर कोणतेहि प्रापंचिक व्यवहार स्वतः उरकण्याचा मुळींच अधिकार नाही असें शास्त्र आहे. विरक्त सन्याशानीं कैवल्यपदाप्राप्तीकरतां सर्वसंगपरित्याग करून अरण्यवास पत्करावा, स्वतःच्या मोक्षप्राप्तीकरतां काया झिजवणें हाच सन्यास ( विरक्त ) धर्माचा मुख्य उद्देश. इतराकरतां स्वतःच्या तपश्चर्येचें बल खर्च करण्याचें त्यांना कांहींच कारण नाही. विरक्त त्यालाच म्हणतां येईल कीं, ज्याने सर्वसंगपरित्याग करून जगाचा संबंध कायमचा तोडला आहे. त्यांना आप्त नाही, इष्टमित्र नाही, शिष्यसांप्रदाय नाही, भक्त नाहीं, किंबहुना या जगांत ते स्वतः एकटे एकच आहेत. त्यांचा मार्ग शून्य म्हणजे प्रापंचिकांच्या व्यवहारविरहित असा असतो. पतिपत्नी, संतती, संपत्ती, प्रजोत्पादन, वगैरे विषयांची चर्चा देखील त्यांनी करूं नये, आणि इतरांनी केलेली ऐकूं नये. प्रापंचिकांच्या कुठल्याहि व्यवहारांत त्यांनी भाग घेऊं नये. विवाह हा आयुष्यांतील अत्यंत मंगल प्रसंग. त्या प्रसंगी मुंडन केलेले बोडके सन्याशी विरक्त मंडपात असणें हें अमंगल होय. विशेषतः वधूवरांच्या वरीच लग्नमंडप उभारून, पंचांग-

…च्या प्रतिमारूप पंचकलशस्थापना करून कुणकुसय सुत्राधारें लग्नकार्य करणें हा वीरशैवांचा मुख्य लग्नविधी.

परंतु जर का एकादा सन्यासी [विरक्त] अशा प्रकारच्या लग्नप्रसंगात भाग घेत असेल तर तो स्वतः आपल्या सन्यासधर्मापासून पतित होईल. आणि त्याची सारी तपश्चर्या मातीमोल होईल. मंगलकार्य म्हटलें म्हणजे, धर्मशास्त्रशास्त्रसंमत अशा विविध विधीनें सर्व प्रकारे मंगलमय असणें अत्यावश्यक आहे. असें असतां थोड्याच दिवसापूर्वी कोल्हापूर येथील चित्रकलदुर्ग शून्यसिंहासनाधीशांच्या मठांत एक वीरशैवाचा विवाह झाला हें ऐकून मला अतिशय वाईट वाटलें. प्रत्यक्ष विरक्तपदाधिकारीहि त्या प्रसंगीं तेथें हजर होते. आणि त्यांनी स्वतः हा विवाहसमारंभ घडवून आणला. स्वताला विरक्त म्हणवणाऱ्या महास्वामीकडून हा विवाह घडून आल्यामुळें इकडील वीरशैवांत एक प्रकारें स्वामीविषयीं अनादर उत्पन्न झाला आहे. चित्रकलदुर्गच्या महास्वामींनी कोल्हापूर येथील स्वतःच्या मठांत असा विवाहविधी करण्यास कशी संमती दिली याबद्दल खरोखरच आश्चर्य वाटतें. जें झालें तें ठीक झालें. होऊं नये ती गोष्ट होऊन गेली. तरी पण इतःपर असा प्रकार कुठल्याहि मठसंस्थांत होऊं नये अशीच कुणाचीहि इच्छा असणार. या लेखानें कुणाचाहि अपमान करावा, अगर कुणालाहि दुखवावें, असा लेखकाचा हेतु नसून, केवळ धार्मिक दृष्ट्या अधर्म होऊं नये एवढीच लेखकाची सदिच्छा आहे.

# वीरशैवांतील चळवळी

## अभिनंदनीय आणि अनुकरणीय उपक्रम

सोलापूरचे सुप्रसिद्ध पुराणमतवादी वकील श्री. बंडप्पा रेवणसिद्धप्पा झुंजें यांनीं आपल्या मुलाच्या लग्नप्रसंगी उदारहस्तें ६८१ रु. च्या देणग्या १३५ संस्थांना देऊन जे दातृत्व प्रगट केलें तें खरोखरच अभिनव आहे. या प्रसंगीं त्यांनीं भेदाभेदरहित वृत्ति धारण केली हें विशेष आहे. लग्नप्रसंगीं असतील नसतील तेवढ्या पैशांची पुरवण्यांत अवाढव्य खर्च करून कर्जबाजारी बनलेले नष्ट होऊन कपाळावर हात मारून हाहाकार करीत बसणाऱ्या व्यक्तींची अनेक उदाहरणें आपणास पहावयास सांपडतात. पण श्री. झुंजे यांनीं फाजिल स्तोमाला गचांडी देऊन आपल्या दातृत्वानें इतरांना उपयुक्त असा धडा घालून दिला, याबद्दल कुणिही त्यांचे अभिनंदन करील. श्री. झुंजे यांचे उदाहरण डोळ्यापुढें ठेवून जर का प्रत्येकानें हा उपक्रम आपल्या आर्थिक परिस्थितीनुरूप सुरू केला तर आज कितीतरी सार्वजनिक कार्यकर्त्या संस्था नावारूपाला येऊन उमेदीनें कार्यतत्पर होतील. श्री. झुंजें यांनी "वीरशैव संजिवनी" चीही अशा प्रसंगी आठवण ठेवून पांच रुपयांची देणगी दिल्याबद्दल आम्ही त्यांचे हार्दिक अभिनंदन करतों आणि उत्तरोत्तर त्यांच्या प्रत्येक कार्यांत उत्कर्ष चिंतून वाढत्या उमेदीनें अशाच प्रकारें निरंतर समाजसेवा करण्यास त्यांना दीर्घायुष्य लाभो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करतों.

— संपादक, वीरशैव संजिवनी.

महाराष्ट्र वी. हित संवर्धक मन्डळाला सोलापूरचे प्रसिद्ध वकिल व समाजपुढारी श्री. बंडाप्पा रेवणसिद्धाप्पा झुंजें ह्यांनी आपले मुलाचे लग्नप्रसंगी देणगीदाखल पांच रुपये देऊन अनुकरणीय उदाहरण घालून दिल्याबद्दल मन्डळातर्फे मी त्यांचें जाहीर अभिनन्दन करतों.

वि. तु. चौधरी ज. सेक्रेटरी.

## अभिनंदन

श्री. चंद्राप्पा रेवणसिद्धप्पा मुंजे वकील सोलापूर यांनी आपले चि. शिवशंकर आपा मुंजे यांच्या विवाहप्रसंगी १३५ निरनिराळ्या धार्मिक संस्थांस देणगी देऊन आपले विश्वबंधुत्वाबद्दल उदार अंतःकरण दाखविले याबद्दल हरेक वीरशैवच काय पण हरेक मानव प्राणी, मग तो कोणत्या का धर्माचा असेना, आभार मानल्याशिवाय रहाणार नाही.

अशा मंगलप्रसंगीं श्री. "वीरशैवबालसमाज" लातूर या संस्थेस रु. ५ ( पांच सुतीं ) देणगी देऊन उपकृत केले याबद्दल सदरील संस्था त्यांची आभारी आहे.

वीरशैवसमाजावर असलेलै प्रेम दिवसें दिवस वृद्धींगत होऊन वीरशैवसमाजाच्या सर्वांगीण उन्नतिप्री त्यचं याहिपेक्षा ज्यास्त नमुनेदार कार्य मुंजेघराण्याकडून घडो अशी उमामहेशाजवळ आमची प्रार्थना आहे.

आपला

श्री. 'वीरशैवबालसमाज' लातूर. ग. ब. वडगांवकर

## नवे सहसंपादक नेमले

' वीरशैव संजीवनी '-च्या सहसंपादकाचें काम आमचे तरुण मित्र श्री. वि. तु. चौधरी, बी. ए. यांनीं आजवर केलें. ह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत, परंतु आतां त्यांनीच तें कायद्याचा अभ्यास पूर्ण करण्याकरितां स्वखुषीनेच सोडल्यामुळें, ह्या अंकापासून चांगले नाटककार व लेखक श्री. रामशंभो पुराणिक यांच्यावर आम्ही सहसंपादकाची सर्व जबाबदारी टाकली आहे. तरी संजीवनीच्या बाबतींत आतां सर्वस्वीं तेच पत्रव्यवहार वगैरे करतील. कळावे.

ना. रा. बामणगांवकर,
संपादक- ' वीरशैव संजीवनी '

## से. महाराष्ट्र-वीरशैव असोसिएशन मुंबई.

महाराष्ट्र—वीरशैव बांधवांस विनंती करण्यांत येतें कीं, आपल्या महाराष्ट्र-वीरशैवांकरितां आजपर्यंत मध्यवर्ती संस्था नव्हती, यामुळे महाराष्ट्र-वीरशैवांची एकी करून, समाजाची उन्नति होण्यास अडथळे उत्पन्न होत असत. ती अडचण दूर करुन, महाराष्ट्रांचें व हिंदुस्थानचें मुख्य शहर ( तोंड ) मुंबई, अशा प्रसिद्ध शहरांत वरील संस्था स्थापन झाली आहे. तिचा वर्षारंभ ता. १ जुन १९३७ पांसून सुरुं झाला आहे. या संस्थेमध्यें प्रत्येक जिल्ह्यांतील प्रमुख पुढाऱ्यांना कार्यकारी मंडळांत घेतलेले आहे. तरी सर्व बांधवांनी अशा संस्थेस स्वतः मेंबर होऊन, दुसरे पुष्कळ मेंबर करुन, संस्थेस मजबूत केलें पाहिजे. ज्यांना संस्थेचें हेतु, उद्देश, आणि पावतीपुस्तकें पाहिजे असतील त्यांनी पत्रव्यवहार करावा अशी विनंती आहे. व कार्यकारी मंडळींतील ज्यांनी अजून वर्गणी पाठविली नाही त्यांनी लवकर मनिऑर्डर करुन पाठवून द्यावी अशी विनंती आहे.

## गुरुभक्तवर्गांतील विवाह

म्हैसूर हायकोर्टाचे सेवानिवृत्त जज्ज श्री. पी. महादेवय्या यांचे चिरंजीव श्री. सदाशिवप्पा यांचें लग्न बिसर येथील श्री. पत्रें विरुपय्या यांची कन्या सौ. कां. सर्वमंगला देवी यांचेशीं नुकताच झाल्याचें जाहीर झाले आहे. या विवाहांतील जोडप्यांत वर भक्तवर्गापैकीं असून वधू माहेश्वर गुरुवर्गापैकीं आहे असें कळतें. या विवाहाच्या बाबतींत तिकडील भागांत सर्वत्र वधुवरांचें अभिनन्दन करण्यांत येत आहे.

## स्थलांतर

नवमतवादी तु. ना. काटकर यांचे बिमूराहून नागभीर B. N. Ry. येथे त्यांचे जन्मभूमींत स्थलांतर झाले आहे. वाचकांनी नवीन पत्त्याकडे लक्ष द्यावें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ ऑगस्ट १९३७ ( अंक १५वा

## ❁ अनुक्रमणिका ❁



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे

## उदय

हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे० भ. ना० रा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

## सुदर्शन

हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवाच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

## वीरशैव गर्जना

अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

# वधुवरयो : शुभं भवतु ॥



सांगली येथील सुप्रसिद्ध रिसवडे घराण्यांतील श्री. **शंकरराव** ऊर्फ **मनोहर** कृष्णाप्पा रिसवडे, बी. ए., आणि त्यांच्या धर्मपत्नि श्रीमती **इरव्वा** ऊर्फ **पार्वतीबाई** रिसवडे.

(वरील दंपत्याचे विवाहप्रसंगाची खुलासेवार माहिती आजचे अंकांत दुसरीकडे दिली आहे.)

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—* जुनें वर्ष पांचवें *—

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः ।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति आषाढ व० ९ शके १८५९ ( अंक १५ वा.

# आमच्या विवाहपद्धतीचा विचार

वीरशैवांची विवाहपद्धति विचारांत घ्यावयाची ह्मणजे विवाहांत कलश पांच हवेत कीं सहा हवेत, तो वैदिक पद्धतीने करावयाचा कीं पुराणमार्गानें करावयाचा, सकाळी करावयाचा कीं सायंकाळीं करावयाचा, ह्या धार्मिक विषीवर चर्चा करावयाची नसून, तिचा मूळ उद्देश काय व तो सफल कसा होईल ह्याविषयीं विचार करणें होय. परमेश्वराच्या सृष्टींत मानवी जीव निर्माण होऊन त्यांत विधीघटनेनें स्त्री व पुरुष असा भेद जेव्हां उत्पन्न झाला असेल तेव्हां विवाहाला कांही उद्देश असेलच असें ह्मणता येत नाहीं. पशु व पक्षी ह्यांतहि असा भेद विधीघटनेने निर्माण केला आहे. त्यांच्यांतहि रतिक्रीडा सुरू आहे व त्यापासूनहि त्यांच्यात संततीची वाढ होऊन त्यांच्या वर्गाचीं परंपरा सुरूच आहे. आरंभीच्या स्त्री–पुरुषांत अशीच अवस्था असावी — नव्हे होतीच. पण पुढे मनुष्याच्या बुद्धीचा व कर्तृत्वाचा विकास होत गेला आणि त्यामुळे विवाहाला उद्देश आला.

आरंभाला असा उद्देश नव्हता हें सगळेच कबूल करतात; पण मनुष्याची पहिली आई कोण व बाप कोण ह्याचा जेव्हां आजचा मनुष्य विचार करतो तेव्हां त्याला आपला मूळचा पूर्वज पशु–पक्षाप्रमाणें स्वेच्छाचारी व

निर्बंधावस्थेंत होता हें कबूल करावयास लाज वाटूं लागली. त्यामुळें ब्रह्म व माया ह्यांचा क्रम उत्पन्न करून सर्व मूळ ईश्वरी लीलेवर उभारले गेले. आजचा शुद्ध नवमतवादी ह्यालाच निर्बंधावस्था ह्मणतो. ह्या निर्बंधावस्थेला आजचा सनातनी रानटी ह्मणेल एवढेंच. तात्पर्य काय कीं, मूळ अवस्था एकच होती हें जरी सर्वांस मान्य असलें, तरी शब्दाबद्दल झगडा सुरु होतो. पण ह्या झगडयांत पडल्यानें मूळ तत्वाचा विचार होतोच असें मात्र नाही. मनुष्य-प्राणी हा जात्याच बुद्धीजीवी प्राणी असल्या-मुळें धर्म, प्रदेश, संस्कृति, कला, शोध व शास्त्र ह्यांत तो परिणत झाला, आणि ह्यांच्या परिस्थितीनुसार विकासाकरितां धर्म, संस्कृति, देश, जात, कुळ ह्यांत तो विभागला गेला. आणि ह्यांतूनच पुढें कुटुंब-व्यवस्था निर्माण झाल्यामुळें, विवाहसंस्थेत धर्म, संस्कृति, देश, जात व कुळ ह्यांचीं बंधनें येऊन हिंदु ह्मणविणाऱ्या लोकांची प्रचलित विवाहपद्धति सुरू झाली. पण ती आरंभीच्या निर्बंध स्थितींतून परिणत झाली.

ह्या विवाहपद्धतीचें आजचें प्रचलित स्वरूप असें कीं, मुलाच्या व मुलीच्या विकासाचा प्रथम विचार न करितां मुलाच्या व मुलींच्या पालकांनीं जात, कुळ, धर्म व संस्कृती पाहून धार्मिक विवाहानें त्या उभयतांना बद्ध करून टाकणें. परंतु कुटुंबव्यवस्था परंपरेनें चांगल्या परिणतावस्थेंत रहावी ह्याचकरितां व ह्याच उद्देशानें विवाहसंस्था निर्माण झाली व तोच उद्देश सदर संस्थेच्या मुळाशीं होता हें मात्र नाकारतां येत नाहीं. वीरशैवांची समाजघटना ही कुटुंबव्यवस्थेवरच चालू आहे. ह्मणून वीरशैवांच्या विवाहालासुद्धां धर्माचें, समान संस्कृतीचें, स्वरूप आहेच. बसवदेवांनी आपल्या वचनांत पत्नि ही समानधर्मी असावी असें प्रतिपादिलें आहे. धर्म व जात जेथें समान नाहीं असा विवाह बसवदेवांनीं मान्य केला असें एकहि बसव-वचन नाहीं. स्वतः बसवदेवानें जो विवाह केला तोसुद्धां समानधर्म व समान जात पाहूनच केला. तात्पर्य काय कीं, विवाह-संस्थेचा उद्देश कुटुंब, त्या कुटुंबाचा धर्म, त्याची संस्कृती, व जात, यांचा परंपरागत विस्तार करणें हाच आहे. ह्मणूनच कुळशील, जात, सूत्र, गोत्र, वगैरेची बंधनें विवाहास रूढ झालीं. कुटुंबाच्या जीवनाची व विकासाची कल्पना पूर्वीपेक्षां आतां बदलत आहे. त्यामुळें जुन्या बंधनांतील विवाहपद्धतींत नाना प्रकारचे दोष उत्पन्न होऊं लागले.

शेतकी, व्यापार व भिक्षुकी ही वीरशैव मात्राच्या जीवनाची साधनें. शेतकी फायदेशीर नाहीं. व्यापाराच्या विकासार्थ गांव, प्रांत व देश सोडणें जरूर असतें. भिक्षुकीला वतनदारी स्वरूप देण्यांतहि चूक झाली. खऱ्या भिक्षुकाला प्रवा-सच चांगला; पण हीं नवी साधनें अंगवळणी नाहीं. ह्मणून जुन्या चालीरीतीस आज कूप-मंडूकवृत्तीचें स्वरूप आलें. एकाद्यास प्रवासाची स्फूर्ति झालीच तर आईबाप, तोंडात पाणी घालावयास जवळ पाहिजे, ह्मणून त्यास धरून ठेवतात. पत्नीलाहि बेजारी असलेले आईबाप सोडून जाणें धोक्याचें वाटतें. आणि एकंदर सर्वच कुटुंबजीवनाचा व्यवहार बिघ-डतो. वीरशैवांतील वाढतें दारिद्र्य, घटती धर्म-बुद्धी, संस्कृतीचा उत्तरोत्तर होत असलेला ऱ्हास, जर थांबवावयाचा असला, तर कुटुंब-व्यवस्थेचें जें मूळ विवाहव्यवस्था तीच मूळांत पूर्वपदावर आणली पाहिजे असेंच कोणाहि सुज्ञास ह्मणावें लागेल. अल्पवयी व अकाली विवाह होणें हा शारीरीक धर्मप्रमाणें दोष होय. आणि शारदा-कायद्याप्रमाणें विवाह झाले तर हा दोष नाहीसा होणारच आहे व होतहि आहे. पण गांवोंतल्या गांवांत फार झाले तर दहापांच मैलांत आणि जातींतल्या जातींत व पोटजातींतल्या पोटजातींतच विवाह

...र्ते मर्यादित होऊं लागलें आणि समानधर्म ...समान संस्कृतीत विवाह होणें दुरापास्त ...झाल्यामुळे धर्म, संस्कृती व जात ह्यांचें जें ...पूर्वी एकीकरण होतें तें बिघडलें. आणि आजच्या ...विवाहव्यवस्थेनें कुटुंबाचा विकास न होता ...हानि होऊं लागली. जात, धर्म व संस्कृती ...यांचें पूर्वी एकीकरण होतें. जीं बंधनें एके... ...काळी सुखकारक होतीं तींच आज विघा... ...क वाटतात. ज्या पद्धतीनें शंभर वा पन्नास ...संपूर्ण कुटुंबाचा विकास केला तीच पद्धत ...विवाहाबाबत आज कायम असली तरी मूळां... ...तील श्रेष्ठ तत्वज्ञान विसरलें गेल्यामुळे विना... ...क वाटतें इतकेंच.

...विवाहित वधुवरें एकमेकांचा पसंत पड... ...णारे असोत वा नसोत, असली तरी समानधर्मी, ...समगुणी, संस्कृतींतील आणि समानध्येयाची ...असलींच पाहिजेत. त्याशिवाय तात्कालीक ...प्रेमाला पुढे प्रीतीचें स्वरूप येत नाही, आणि ...कुटुंबाचा विकास पुढे समानध्येयप्राप्तीच्या ...दृष्टीनें समानधर्मानें व समान गुणाने होत नाही. ...म्हणून वधूनें वर पसंत करावा कीं वरानें ...वधू पसंत करावी हेंच एक विवाहाचें मूळ ...ध्येय नाही. कोणत्या कुटुंबाचा कोणत्या ...दिशेनें कसा आपणाला विकास करावयाचा ...आहे ह्याची जाणीव वधुवरांना असणें हेंच मात्र ...विवाहाचें ध्येय असावें. पुष्कळदा दोन्ही कुळांच्या ...पूर्वपरंपरेच्या संस्कारानें वधूवरांत ही जाणीव ...असते व त्यांचा विवाह कुटुंब, धर्म व देश ...यांना फायदेशीर होतोच. पण जेथे उभय... ...तांची पसंती असते पण समानधर्म नसतो तेथे ...त्यांच्या विवाहांत बिघाडहि होतो. तेव्हां ...उत्तम विवाह कोणता? तर ज्या विवाहांतील वधूवराकडून धर्म, संस्कृती, देश व जात ह्या दृष्टीनें कुटुंबाचा उद्धार केला जातो तोच. नवरा-बायकोंत वारंवार काडीमोड होण्याची मुभा असणें ह्यांत उभयतांचें स्वातंत्र्य प्रतिबिंबित होत असलें तरी उभयतांना विवाहाचें ध्येय मान्य झालें होतें असें कोणताहि पुरुष व स्त्री ह्मणावयाची नाहीं. ज्या समाजांत वा ज्या जातींत अथवा ज्या देशांत ही काडीमोड रूढ आहे त्याहि समाजांत अशा वधूवरांना किंमत येते असें मुळींच नाहीं. अशा दोषाने समाजांत विवाहित जोडप्यांना किंमत आली कीं विवाह हा एक स्वेच्छाचार आहे एवढाच बोध व्हावयाचा.

ह्मणून कोणत्याहि वधुवरानें परस्परप्रीतीने विवाहित व्हावें वा मातृपितृकुलाचारपद्धतीने विवाहित व्हावें. पण आपला समान धर्म, समान ध्येय, समान संस्कृती व समान कुटुंबव्यवस्था चालवावयाची आहे किंवा नाही ह्याचा विचार करून व त्यांतील सर्व सुखदुःखाना उभयतांना तोंड देता येते कीं नाही ह्याचा विचार करून विवाहबद्ध व्हावें. आणि अशांनाच विवाहबद्ध करण्याची कल्पना जागृत रहावी. ह्याकरिता प्रसंगीं पोटजातींच्या बंधनास लाथ मारतां आली तर मारावी पण धर्म, संस्कृती व समान गुण ह्यांस मात्र लाथ मारू नये. विवाहसंस्थेचा ज्या कल्पनेनें जन्म झाला ती कल्पना अशा दूरदृष्टीने अंमलांत आलेली दिसली तर आमच्या विवाहपद्धतीनें मूळ उद्देश कायम ठेवला असेंच होईल. परंतु मूळ उद्देश सुटणारा विवाह हा विवाहच नव्हे; मग तो जुने ह्मणविणारे जुन्या तऱ्हेनें करोत वा नवे ह्मणविणारे नव्या तऱ्हेने करोत.

# सहवासोत्तर प्रौढविवाह

( ले०—नवमतवादी तु० ना० काटकर, नागभीड B. N. Ry. )

उत्तरभाग

*" वीरशैव गर्जने "-च्या २० मे १९३७ चे अंकांत कु. सुमनने श्री. चौधरींनें प्रतिपादिलेल्या सहवासोत्तर प्रौढविवाहपद्धतीवर अगदीच अनास्था प्रकट केली असून समर्थनाची पृच्छाहि केली आहे. त्यांना हें उत्तर आहे.*

## जो न्याय स्त्रियांना तो पुरुषांना नको काय.

चटोर तरुणांना एकापेक्षां एक अशा अनेक तरुणी उपभोगण्याची इच्छा असते तशीच चटोर तरुणींनाहि असते. ह्मणूनच द्रौपदीची इच्छा सहाव्या कर्णांवर गेली होती ह्मणतात ना ? तात्पर्य काय कीं, हीं चटोरपणाची भावना पोथ्या-पुराणामुळें चालत आलेली आहे, आणि ती ह्यांच्या नाशासमवेतच ह्या चटोर कल्पनाहि हळूंहळूं पण दीर्घ प्रयत्नानें नाहींशा होतील. पण प्रथम ह्या विकृत कल्पनांचा बडेजाव फैलावणाऱ्या अंधश्रद्धावान् वाङ्मयाची राख करावयास हवी.

कारण. कीं, एका पतीशिवाय जशी स्त्रीची काया शीलभ्रष्ट होऊं शकते ही भावना कावेबाज पुरुष जातीनें जितकी जाज्वल्य स्वरूपांत वसत ठेवली आहे तितकीच पुरुषांची काया एका पत्नीशिवाय शीलसंपन्न राहुं शकत नाही याची स्वार्थसाधू बुद्धीने अजिबात भ्रांत पाडली आहे. हा असला भेदबुद्धीचा कावेबाज न्याय कोठला ?

जो न्याय स्त्रियांना तो पुरुषांना नको काय? परस्परांना समान हक्काची जाणीव जोंवर होत नाही तोंवर हें चालावयाचेंच. ह्मणून हा प्रत्येकाच्या मनोविचाराचा प्रश्न आहे. हें निदान समंजस स्त्री-पुरुषांना पण विशेषतः स्त्रियांनाच कळावयास पाहिजे. पण बापड्यांना शिक्षणाच्या अभावीं तें कसें कळणार ! ह्मणून ह्या सर्वांचा पाया शिक्षण आहे, व त्याचा कळस चढविण्यासाठी समंजसानें झटणें आजचें आद्य कर्तव्य आहे.

मनुष्य मनुष्यस्वभावाची पारख करूं शकतो. पण त्यासहि ज्ञानाची आवश्यकता आहे. ह्मणून सुशिक्षित उमेदवाराखेरीज सहवासोत्तर विवाह होणें दुर्गम आहे. आतां प्रश्न उरला स्वभावाच्या लपवा-छपवीचा. विवाहपूर्व सहवासाचा मूळ हेतूच हा कीं, विवाहानंतर मतभिन्नता होऊन घटस्फोटाचा प्रसंग येऊं नये, व ही गोष्ट ह्या पद्धतीनें शक्य आहे. पण विवाहाकरितां ह्मणून विवाहपूर्वकालीन सहवासांत कृत्रिमपणा आणून वेळ मारुन नेणारेहि कांही

...अपवादात्मक निघतील. पण त्यांत कोणाचें ...णार आहे? चोरी करणारास त्याच्या ...चें फल मिळणार हें ठरलेंच आहे.

...! पण हा प्रसंग येऊं नये ह्मणून ह्या ...चा अवलंब. ते खरेंच, पण असले प्रसंग ... अपवादात्मकच निपजतील. कोणतीहि ...निर्मितांना अपवाद हे निघायचेच. ...हि दृष्टीनें जो न्याय स्त्रियांना तोच ...ना, वा जो पुरुषांना तोच स्त्रियांना. अपवा... ...भीति बाळगून कसें चालणार! अपवाद ...-निघतांच; सरास रूढीचें स्वरूप येईल. ...मानेच कोणतेंहि कार्य सिद्धीस जात ..., ह्मणून आरंभी अशा शंका निर्माण होणें ...भाविकच आहे.

...पद्धतीवर एवढा जोर देण्याचा हेतु ... की, ज्या दोन भिन्न जीवांना विवाहाच्या ...नी बद्ध झाल्यानंतर आपलें अमुल्य असें ...आयुष्य मनाजोगें जावे ह्मणून आज जी ...पद्धत आहे त्यापेक्षां ही स्वयनिर्णयांची ...किती तरी पटीनें नव्हे तर विवाहपद्ध... ...श्रेयस्कर ठरणार आहे. करितां अशिक्षिता... ...नाहीं तरी निदान सुशिक्षिताकडून तरी ...पद्धतीस चालना मिळावयास पाहिजे.

...सहवासोत्तर विवाह हा केवळ प्रौढ विवाहच ... न जातां तो कायद्यानें वयात आलेल्या ...नी स्वयंनिर्णयाने सोडवावयाचा प्रश्न ... ह्मणून हा सहवासोत्तर विवाह ...' तरुण-तरुणींना थारा देण्यासाठी ...' शीला ' ची महती वळावण्याकरितां ...शीलाची किंमत ही ज्या अर्थीं हरेक ...पुरुषास आहे त्या अर्थीं विवाहपूर्व सह... ...हा ...सदाचरण राखण्यासाठी आहे, ...उपभोगण्यासाठीं नाहीं, हें सुज्ञास ...पटावयास हवें? एकदां मतें जुळून विवाह ...ही मग काय वसंत ऋतूंतील बहरच

फुललेला! नन्तर खुशाल सुखोपभोगाची मजा लुटावी. मग अनीतीचा शिरच्छेदच झालेला असतो, कि ' शीला ' या मधुगंध उभयतांत सळसळून दरवळणार. मग ह्या मधुमीलनांत राष्ट्रस्वातंत्र्याचा हर्षहि फिका वाटावा ह्यांत आश्चर्य तें काय मानावें?

आजवर जशी कित्येक लेखकांनी लटकी उदाहरणें देऊन या मतांचें खंडन करण्याचा प्रयत्न केला गेला तसेंच आणखीहि कित्येक पाहिलेलीं उदाहरणें आह्मासहि माहित आहेत. पण त्यांत कांहीं तथ्यांश आहे काय ?

## ' पूर्वदिव्य ज्यांचे त्यांना रम्य भावि काल '

देवादिकांचे, पुराण पुरुषाचे वा परकीयांचे अतिशयोक्तिपूर्ण आदर्श समाजासमोर आपण्याचा प्रयत्न करुं इच्छिणाऱ्यांनीं आपल्या अगदीं सन्निध व ह्यात असलेल्या " नेपाळी लोकांचा " चालूं आदर्श समोर ठेविल्यास आपल्याच राष्ट्राची परंपरा नि वर्तमानकाळाचा वाद इच्छित मार्गांनें परिणत तरी करितां येईल.

मनुष्याच्या अंगीं चटोरपणा जडायला त्याचे पूर्वजच त्यांचे गुरु आहेत. मनुष्य स्वभावतःच अनुकरणप्रिय असल्यामुळें तो वडीलधाऱ्यांचे वा थोरामोठ्यांचें अनुकरण प्रत्यक्ष निरीक्षणानें वा ऐकिवतेनें करणार! तेव्हां झालें तें होऊन गेलें पण समंजसानें तरी नैतिक धोरण सुधारावयास हवें कीं नाहीं? मीमांसकाच्या मनाला ह्या गोष्टी पटतात, कबुलीं देतात, पण त्याप्रमाणें वळतां मात्र येत नाहीं. ह्याचा अर्थ काय ? जाणून बुजून वैषयिक भावना जागृत करायच्या, ' विवाह वा स्त्री-पुरुष

संघटण ' ह्मटलें कीं एकदम तेथें दत्त ह्मणून वैषयिक भावना निर्माण्च्हीच. शुद्ध प्रेम मात्र निर्मिणार नाही.

प्रेम ही शुद्ध चीज आहे. प्रेम ह्मणजें लैंगिक भावना नव्हे. पण आजच्या जगांत रूढीने बळावलेल्या भावनेमुळें प्रेमाचें रुपांतर लैंगिक स्वरूपांत होत चाललें आहे. प्रेमाचा प्रश्न उद्‌भवला कीं तेथें लैंगिक भावना धावल्याच ह्मणून समजा. ह्याला कारण आदर्शवत् पोथ्या-पुराण, सनातन्याचा गैरसमज, नि शंकेखोराचा बाजार. अशा ह्या विकृत भावना रोमरोमांत भिनलेल्या आहेत. दोन भिन्न स्त्री-पुरुष एकत्र आढळले कीं ते केवळ वैषयिक भावनेनेंच असतात अशा सन्हेची आमचीं मतें बनलीं असल्या-मुळेंच नुसत्या कुशंका उद्‌भवतात. दुसरें काय ?

कःपदार्थ अति मागासलेल्या नेपाळसारख्या पुराणमतवादी समाजांत सहवासोत्तर प्रौढ-विवाहपद्धति रूढीनें कायम राहिली आहे. पण सुधारलेल्या बुद्धिवादी लोकांना ती पटूं नयें ह्मणजें काय आहे?

पण जेथें स्त्री-पुरुषांचा समान दर्जा आहे, मनाचा विचार आहे, शीलाची दिक्कत आहे, तेथेंच स्त्री-पुरुषांच्या संघटनेच्या शुद्ध प्रेमाचा आवर्श आहे. हेंच तत्व रूढीनें कां होईना पण नेपाळी जीवनांत ओथंबलेलें आहे. ' पण त्या ठिकाणी सहवासोत्तर प्रौढविवाह आजच्या ' चटोर ' जगांत सुद्धां सर्रास चालूं आहे. त्यांच्यांत बोक्याचें स्थळ नाही, शंकाकुशंकाचा बाजार नाही, वा ' चटोर ' जीवनांची चाड नाही. जेथे ज्यांना देवादिकांचा पाठपुरावा घेतां येतो तेथें असल्यास नवल नाही. ह्मणून उपयुक्त ' चटोर ' कल्पना अजिबात नाहीशा व्हाव्या अशी इच्छा करणारांनी प्रथम चटोर-वाङ्मयपरिपोषक ग्रंथाना जितमाती द्यावी त्याशिवाय दुसरा सरळ नि सोपा मार्ग नाही.

## कु० सुमन

कौमार्यावस्थेंतहि आपल्या सुमनाला केवळ शाब्दिक गताधारावर भावी सहवासोत्तर प्रौढ-विवाहपद्धतींतील धोक्याची स्थळें कशीं बरें दिसूं शकलीं? एवंच, पोथ्या-पुराणावर आपला दृढ विश्वास आहे ह्मणायचा ! मग पूर्वदिव्य तुमचें तुह्माला लखलाभ असो. बुद्धिवाद्यांना मात्र भावी अनंत काल रम्य आहे.

माझ्या उत्तरानें आपलें मन दुखावेल पण असें होऊं देऊं नका. उत्तर देतांना केवळ वस्तुस्थितीकरितां ह्मणून अशी भाषा अंगि-कारावी लागली. त्याला माझा निरुपाय आहे. राग मानूं नका. सामाजिक युद्धांत हें चाला-यचेंच. कारण कीं ह्या वादविवादाच्या मंथ-नांतूनच सत्व बाहेर पडणार आहे. इत्यलम्.

---

एक सत्यकथा

# एका अबलेची करुण कहाणी

(ले.—डॉ० आप्पाराव सोमाप्पा संगेकर, चांदूर-बाजार.)

**देवाच्या नांवाखाली चालबेला धर्माचा बाजार व बाह्यावडंबराच्या मोहाने अज्ञजनांच्या डोळ्यांत फेकलेली धूळ, दांभिकता यांचा नाश करण्याकरिताच परमेश्वराने माझे पोटी जन्म घेतला असें तिला वाटलें.**

बाररूममध्ये गप्पाष्टके मारण्याचा कंटाळा आल्यानंतर, नवीनच वकीली सुरू केलेल्या वकीलाला मनोरंजनाकरिता कांही तरी हवें असतें. नाही ह्मणावयास आमच्या बाररूमजवळ फौजदारी कोर्ट असल्यामुळें कांहीं हृदयद्रावक खटले ऐकण्यास मी जात असे. एके दिवशी पट्टनशेट्टी, फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट, यांचे कोर्टांत मी जाऊन बसलों. ते दिवशी तेथें एक खटला सुनावणीस निघाला. एका बालिकेने केलेल्या भ्रूणहत्येचा खटला होता. अकराचे ठोके पडतांच दारवाणाने पुकारा केला. सबइन्सपेक्टरसह कैदी व दोन साक्षीदार कोर्टांत दाखल झाले. प्रास्ताविक नेहमीचा प्रश्न विचारल्यावर खटल्यास सुरवात झाली. बाईने एखाद्या यांत्रिक बाहुलीप्रमाणें डोळ्याच्या पापण्या न लावतां सांगण्यास सुरवात केली. बाईंनी मठांत असतांना स्वामीजींचे कृपाप्रसादाने आपणास अपत्यप्राप्ति झाली व पुढे आपल्या मठाची बदनामी होऊ नये ह्मणून माझ्या मुलाचा एके दिवशीं बुवाजींनी शिष्याकरवी खून केला, व माझेवर वृथा आळ घातला असें सांगितलें. बाईची जबानी झाल्यानंतर बाईला पोलीस-पहाऱ्यांत जेलच्या दिशेने रवाना व्हावें लागलें. खटला संपला व मी आपले घरीं गेलों. त्या बाईची ती केविलवाणी मुद्रा पाहून मला फार वाईट वाटलें व अशा असहाय्य अबलेस आपणास सहाय्य करितां येईल काय या विचारांत मी मग्न झालों.

माझें वडील सोलापुरास वकीलीचा धंदा करीत असत. त्यांचा तेथें बरीच मिळकत होती. झाडाखाली झाड वाढत नाहीं ह्मणून मी सातान्यास राहून धंदा करीत असे. वडीलांची प्रकृति बरी नसल्याची वार्ता आली व मी सोलापूरास जाण्यास निघालों. वडीलांची प्रकृति बरीच खालावलेली दिसली. वडीलांची प्रकृति दुरस्त झाल्यावर मी परत यावयास निघालों. गाडींत झोपलों असतां ती बाई फांसावर लटकविल्या जात आहे व तिची सुटका करण्याकरितां मी तिचे अंगावर जाणार इतक्यांत मला पोलीसांनी घट्ट धरलें, असें स्वप्न दिसलें. डोळे उघडून पाहिलें तों माझें मलाच वाईट वाटलें. घरी येऊन पोहोचतांच दुसरे दिवशी पोस्टमन एक पिवळा लिफाफा घेऊन दारावर आला. मी लिफाफा कुतुहलतेनें फोडून वाचूं लागलों तों कोर्टाने मला त्या असहाय्य अबलेचे वादारी वकील ह्मणून नेमल्याचें कळलें. आपणास त्या बाईची सुटका

करण्याचें श्रेय मिळणार या आशेनें मी फार आनंदी झालों. आरोपीजवळून साद्यंत हकीकत मिळविण्याकरितां जेलमध्यें गेलों. मला आपणाला सोडविण्याची संधि परमेश्वरकृपेनें मिळाली हें मीं तिला सांगितलें व तिला खरी हकीकत सांगण्यास विनन्ती केली.

'माझें नांव यमुना. माझें आईबाप इन्फ्लयुएन्झानें मरण पावल्यावर माझें पालन-पोषण माझें वृद्ध आजोबानीं केलें. वयाच्या नवव्या वर्षी माझा विवाह एका होतकरू तरुणाशीं करण्यात आला, व तेथून एक वर्षानी मला वैधव्य प्राप्त झालें. आजोबा मोठें कर्मठ व सनातनी वृत्तीचे होते. घरची थोडीशी जमीन व ज्योतीषाचा जोडधंदा असल्यामुळें घरची सांपत्तीक स्थिती बरी होती. शिक्षणानें मुली बिघडतात या सनातन तत्वाचे ते पुरस्कर्ते होते. त्यामुळें त्यांनी मला मुळीच शिक्षण दिलें नाहीं. माझी बहीण व मेहुणा पुण्यास रहात असे. दिवसामागून दिवस गेले. आजोबा आणि त्या नीतीच्या चिमकल्या घांत जगाच्या रोजच्या व्यवहारात कांहीहि फरक पडला नाहीं. मी स्वयंपाकपाणी करावे व दिवसभर आजोबाचे पोथीपुराण व टापटीप ठेवण्यात वेळ घालवावा. माझी आत्याबाई हुमनाबादेंतील हरीहर स्वामीचे मठांत रहात असे व तेथून येथे आल्यावर तेथील गुरुमहिमा, श्रावणपुराण, पुण्यतिथी वगैरेचें चटकदार वर्णन करीत असे. मला तीं वर्णनें ह्मणजे रोजच्या कंटाळवाण्या आयुष्यातील विश्रामस्थानें वाटत व तीं वर्णनें मी शांत चित्तानें ऐकीत असे. गेल्या वर्षी आजोबा शेजारचे महालींग आप्पाबरोबर काशीयात्रेस निघून गेले, व मला माझे आत्येबाईजवळ हुमनाबादेस ठेवून दिले. मठांत निरनिराळी मंडळी निरनिराळे उद्देशानें येत असे. आपल्यास अत्यन्त प्रिय अशी वस्तू गुरुमहाराजांकरवीं परमेश्वराला अर्पण करणाऱ्या पतिव्रतेपासून तों या दिव्य मठींतील काळोखाचा फायदा घेऊन कनक व कांता यांचा चापून अपहार करणारे लुच्चे लोक, या सर्वांची येथें ये जा असे. ईश्वराच्या नांवावर येथे स्वर्गसुखाची व पुण्याईची उघड विक्री होई. महाराज सांगतील ती पूर्वदिशा समजली जात असे. अश्या ठिकाणी सामान्य पामराच्या नीति-अनीतीचा कोठें थांग लागणार! महाराजांनी किंवा त्यांच्या पट्टशिष्यानीं एखाद्या नाविन्य शिष्यिणीवर अनुग्रह करावा व त्या शिष्यिणीचा इतर जनानीं हेवा करावा जेथें महाराजाची आज्ञा पाळणें हें पुण्य व त्याचा अवमान हें पाप समजल्या जात असे तेथें बिचाऱ्या यमुनेची काय स्थिति होत असेल याचा वाचकानींच विचार करावा. तिचें रूप सुंदर होतें व तिला जगाचा मुळीच अनुभव नव्हता. काळोखाच्या कोठडींत रहाण्यावर काजळाचें डाग हें लागणारच. जें व्हायचं तें झालं. माझें आत्येबाईनीं व महाराजांच्या शिष्यिणींनी गर्भपात करण्याचा बराच प्रयत्न केला परंतु तो निरर्थक ठरला. मठातील पापमय व कृत्रीम वातावरणातदेखील तिच्या मातृप्रेमानें उचल खाल्ली व जीव गेला तरी बेहेत्तर पण भृणहत्या करायची नाही असें ठरलें. सोयीप्रमाणें सैतानदेखील आपल्या कृत्यार्थं परिमार्जन करतो त्याप्रमाणें महाराजांनी तिला गर्भपाताचा उपदेश केला. सामोपचारानें ऐकेना ह्मणून तिची मठांतून हकालपट्टी केली. समाजात असा एक वर्ग आहे कीं, त्याला विषयशील कृत्ये केलेलीं चालतात परंतु आपल्या कृत्याचा पुरावा जगजाहीर होऊं नये असें वाटतें. स्वामी या पंथाचे अध्वर्यु होते. एका गरीब बालविधवेचा अनुनाथ त्यांना वावगा वाटला नाही परंतु त्यापासून होणारें मूल, मठस्थ दुष्कृत्याचा पुरावा ह्मणून, जिवंत रहावें हें बरें वाटलें नाही. ह्मणून, आपल्या मठांतून हकालपट्टी झाल्यावर ती आपल्या बहिणीकडे पुण्यास निघून गेली. तिची स्थिती पहातांच, यापुढें तुला माझ्या घरात ठवणे योग्य नाही ह्मणून मेव्हण्यानी सांगितलं,

पांच रुपये देऊन मुंबईस रवानगी ... बाळंतपणास वेळ असल्यामुळें डॉक्टरांनी ... राहू दिले नाही. परत ती हुम- ... देऊन मठांतील एका पडक्या ... बाळंतीण झाली.

... नावाखाली चाललेला धर्माचा ... व बाह्यावडंबराच्या मोहानें अज्ञज- ... डोळ्यांत फेकणारी धूळ-दांभिकता याचा ... करण्याकरितांच परमेश्वरानें जन्म घेतला ... असा वाटलें, व तिची चितातुर मुद्रा आनंदमय ... इतक्यांत आत्याबाई आल्या, व तुझ्या- ... कट महाराजांनी नाहींशी केली, देवलिंग ... करवी तुझ्या मुलाचा शेवट करण्यांत ... असें तिला सांगितलें. यमुना बेशुद्ध झाली.

... हुशार झाली नी खटला सुरू झाला. ... नं. १ देवलींग यानें आपण मुलाला ... करिता खड्डा खोदला हें कबूल केलें. ... नं. २ शंकराप्पा महाराजाचे पट्टशिष्य, ... देवलींगाचे खड्डा खोदला परन्तु तो यमुनेचे ... खोदला अशी जबानी दिली. देव- लींगने यमुनेचे नांव घेतलें नाही हे बचावाचे दृष्टीनें बरें झालें, परंतु शंकराप्पाचे जबानीवर काय तोड द्यावी हें समजेना. आत्याबाईकडून खरी हकीकत कळेल ह्मणून बोलाविलें. देवलिं- गानें महाराजाचे सांगण्यावरून मुलाचा खून केला व शंकराप्पानी पंचवीस रुपये दिले असें आत्यांनी सांगितलें. वकीलसाहेबांनी ही बातमी तावडतोब पोलीसला कळविली, व स्वामींचे मठास गराडा देऊन स्वामी व त्यांचे शिष्यगण यांना अटक करून वहीखातें जप्त करण्यांत आलें. देवलींगास खून करण्याकरितां पंचवीस रुपये दिल्याचा लेखी दाखला वहिखात्यांत मिळाला. यामुळें यमुना निर्दोष सुटली. महाराजासहित सर्वांस कमी जास्त शिक्षा झाल्या.

या घटनेस आज पांच वर्षें होऊन गेलीं. महाराज व त्यांचे शिष्यगण आपल्या कृत- कर्माची फळे भोगीत आहेत ! आता तरी समाज जागृत होईल काय ? समाज यमुनेस मिस- ळून घेण्यास तयार आहे काय ? हा प्रश्न अजूनहि तिला भेंडसावीत आहे.

---

# “ रोठाचा सण व सद्भक्त ”

(लेखकः--ष. ब्र. सद्गुरु श्रीकुमार नागलिंग स्वामी गुरु संगय्यास्वामी विरक्त संस्थान देऊळगांव-राजा वऱ्हाड )

आपले पट्टशिष्य शिवशरण त्र्यंबकराव ... साकरे पळूरकर यांचे मुखातून रोठाचें ... धर्मोपदेशक अमृतवाणी निघाली ... प्रसिद्ध करीत आहों. तरी गुरुकृपेस ... असणारे सद्भक्त वीरमाहेश्वरांनी गोड ... त्याची व घेतील अशी आशा आहे. ... राष्ट्रांतील वीरशैवात धर्मज्ञानाच्या अभावी ... वीरशैवमतविरोधी रूढी पडल्या आहेत, त्यापैकींच हा रोठाचा सण पाळण्याची रूढी- देखील बऱ्याच महाराष्ट्रीय वीरशैवांत, विशेषतः वऱ्हाड-खानदेश वगैरे भागांत, वीरशैव- बांधवाकडून पाळण्यांत येत आहे. हें अयोग्य असून, त्याबद्दल वीरशैवांत जागृती व्हावी हें योग्य आहे. प्रथम रोठाचा सण ह्मणजे काय याचा खुलासा करणें इष्ट होय. हा रोठाचा सण श्रावण महिन्यांतील नागपंचमी झाल्यावर

येणारा प्रथमरविवारचे दिवशीं करतात. त्या-दिवशीं काणू व राणूबाईच्या मूर्तीची स्थापना एका पाटावर करून तीन काड्यास एका दोरीची गाठ देऊन त्यांना बसवितात. त्यावर उंची कापड घालून फळ व फुलें वाहून गाणी ह्मणतात. अशी स्थापना करून रोठांस सुरवात होते. रोठ ह्मणजे पुरणपोळी होय. हे रोठ ५-१० वजनी शेराचे बनवितात. हे रोठ दोन प्रकारचे रात्रीचे व दिवसाचें असतात. प्रथमतः दिवसाचे रोठ सूर्योदयाचे आंत सर्व तयार करून सूर्याची पूजा करून त्या सर्व सर्व रोठाचा सूर्यास नैवेद्य दाखवितात, नंतर आपल्या इष्टमित्रासमवेत त्या रोठाचे भोजन करतात. सकाळचे रोठास रात्र दिसूं नये.आणि त्याच दिवशीं पुनः संध्याकाळी रोठ करतात. हे रोठ खाण्यास मात्र इतरांना बंदी असल्यामुळें घरचेच लोक ते रोठ शुद्ध १५ दिवस पर्यंत खातात. असो. अशा प्रकारचा रोठाचा सण असतो. हा सण करणें वीरशैवांना अयोग्य होय. कारण यांत अनेक वीरशैवमतविरोधी गोष्टींचा समावेश झालेला आहे. प्रथमतः काणू व राणूबाईची मूर्ती बनविणें हें मृतिका-पूजेचें व मूर्तीपूजेचें द्योतक आहे. अशा प्रका-रची मूर्तिपूजा वीरशैवमतांत निषिद्ध मानली आहे. दुसरे, यांत सूर्य व चंद्रोपासनेचा समावेश झाला आहे. शिव हाच परब्रह्म, इष्टलिंग हे एकच दैवत, असें समजणाऱ्या आमच्या एके-श्वरवादी वीरशैवमतांत नानादेवत कल्पून त्यांची उपासना करणें व इष्टलिंगाकडे दुर्लक्ष करणें हें धर्मबाह्य वर्तन होय. शिवाय प्रत्येक वीर-शैव जें अन्न ग्रहण करतो ते लिंगप्रसाद या भावनेनेंच होय. ह्मणूनच इष्टलिंगास नैवेद्य अर्पण करूनच अन्नग्रहण करण्याचा संप्रदाय वीरशैवांत आहे. या रोठाच्या बाबतींत सूर्य-चंद्राला अर्पण केलेले रोठ वीरशैवांना लिंगार्पण करतां येत नाहीत, आणि लिंगार्पण केल्याशिवाय ग्रहण केलेलें अन्न निषिद्ध होय. अशा प्रकारें निषिद्ध अन्न ग्रहण करून धर्मबाह्य वर्तन करणें कोणाहि वीरशैवास उचित होणार नाही. याचा प्रत्येक महाराष्ट्रीय वीरशैवानें आपल्या मनाशी विचार करावा आणि मग हा रोठाचा सण पाळावा किंवा न पाळावा याचा विचार त्यांनी आपणच ठरवावा. या ठिकाणी कोणी असा प्रश्न करतील कीं, सण कोणता का असेना गोड गोड खाण्यास धर्माची आड का असावी? असा प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे. तर याला उत्तर हेंच कीं, त्या सणामध्यें अनेक देवदेवतांच्या उपासनेचा प्रश्न आला, व पर-मपूज्य परब्रह्म स्वरूप इष्टलिंगाकडें दुर्लक्ष होऊं लागलें तर वीरशैवांच्या वीरवृत्तीचाच तेथें ऱ्हास होऊं लागतो, व वीरशैव ह्मणजे एकनिष्ठ शिवभक्त या संज्ञेस तो अपात्र ठरतो. ह्मणून अशा प्रकारचे सण त्या त्या देव-तांच्या नांवानें साजरे करून आपली पूज्य भक्ति ढासळेल किंवा भंग पावेल अशी कोण-तीहि कृती किंवा कोणताहि सण करणें अध-र्मच ठरेल. ह्मणून महाराष्ट्र—वीरशैवांनी या सर्व गोष्टींचा विचार करून रोठावर बहिष्कार घालावा, व इतःपर अशा प्रकारे वीरशैवमत-बाह्य गोष्टी आपण स्वतः न करतां व आपल्या इष्टमित्रांनाहि स्वमततत्वाची जाणीव देऊन जागे करावे, व स्वमतानुयायी व स्वधर्मरत बनवावे. कांही ठिकाणी वैष्णव लोक सुद्धां रोठाच्या सणास मुळींच मानत नाही. तो वैष्णवी सण नाही ह्मणून. असें असतां श्रेष्ठ शिवभक्त वीरशैवांनी का करावा? तरी सदर सण न करण्याची व्यवस्था लवकरच अंमलांत आणाल व कळवाल अशी आशा आहे.

चरणः—॥ घारणाची वाचा कटू वाटे बरी ॥
लिंबाची माधुरी काया सुधरे ॥

लिंबाचे झाडाचा रस फार कडू असतो, त्याचे सेवनानें असंख्यात रोग नाहीसे होतात,त्याचप्रमाणें शरणभक्ताची वरील वाचा कडू आहे कठोर आहे. असें म्हणणारांस उत्तर असें आहे कीं,

चरणः— ॥ दिले कठीण उत्तरें ॥
पुढें व्हावयासी बरें ॥

या कठीण उत्तराप्रमाणें वागल्यास त्यास परब्रम्हस्वरूपाची जाणीव झाल्याशिवाय राहणार नाहीं. तरी योग्य विचार होऊन धर्म-बाह्य कृत्य न करावें असें सांगून आटोपतों.

"सोंकरे-ज्ञानयोगमार्ग" हा लेख लवकरच 'संजीवनीतुन' प्रसिद्ध करूं. ज्यास समाधी लावणे शिकणें असेल त्यानें हा लेख जरूर वाचावा.

# श्रीमंत अण्णासाहेब गुदगे इनामदार आयणी
## यांचा
# मुंबईंत सन्मान.

( पब्लीशरः—श्री. जी. किल्लेकर, सेक्रेटरी. )

वीरशैव स्नेहवर्धकमंडळ, मुंबई, या संस्थेच्या ऑफिसांत बुधवार ता. ७–७ ३७ रोजी सायंकाळीं ६ वाजता श्रीमंत अण्णासाहेब गुदगे इनामदार [illegible] सन्मान करण्यासाठीं सभा भरली होती. [illegible] श्री. कोंडोबा मारोती महाजन यांनी [illegible] सूचना मांडून तिला श्री. आंधळकर [illegible] अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष श्री. देवध- [illegible] यांनी समारंभाची सुरवात केली. प्रथम [illegible] आजपर्यंत केलेली कामगिरी व तिला [illegible] कसकशी सहानुभूति मिळत आहे [illegible] केलें व नंतर संस्थेच्या वतीनें [illegible] अण्णासाहेब यांना हारतुरे अर्पण करून [illegible] गौरवपर भाषण केलें. त्यांत प्रामु- [illegible] त्यांनी जी सातारा–बोर्डिंगला २० [illegible] रुपयांची देणगी दिली आहे व महा- [illegible] एका जिल्ह्यांत अनुकरणीय उदा- [illegible] घालून दिलें आहे त्याबद्दल आनंद व्यक्त [illegible] त्यांचें अनुकरण इतर जिल्ह्यांतील [illegible] करावें अशी इच्छा व्यक्त केली, व साता- [illegible] मंडळींनी चिकाटी धरून, प्रस्थापित [illegible] कार्य चिरकाल टिकविण्यासाठीं पुढें [illegible] यांच्या सदरहू उदार देणगीमुळेच अण्णा- [illegible] सन्मान करण्याची सुसंधि आम्हांस [illegible] आली, असें सांगितलें. नंतर पंढरपूरचे [illegible] तरुण कार्यकर्ते श्री. शंकरराव कटप यांचें [illegible] यांच्या कामगिरीविषयीं उत्तम भाषण झालें. त्यांत त्यांनी कै. अण्णासाहेब वारद व कै. वा. अण्णासाहेब कथले यांचा गौरवपर उल्लेख करून त्यांच्याच तोडीच्या एका महा- त्म्याच्या सन्मानसमारंभांत मला भाग घेण्यास संधि मिळाली याबद्दल आनंद व्यक्त करून, ज्या संस्थेच्या वतीनें समारंभ घडून आला त्या संस्थेच्या कार्यकर्त्यांबद्दल गौरवपर उद्गार काढले, व शिवाय त्या संस्थेनें सांप्रत दी महा- राष्ट्र–वीरशैव–असोसिएशन स्थापून जें कार्य हातीं घेतलें आहे त्याचा उल्लेख केला. वीर- शैवएकीकरणाविषयीं कांही शंका उपस्थित केल्या, तसेंच पूर्वी स्थापन झालेला महाराष्ट्र- वीरशैवसंघ, त्याचा उडालेला बोजबारा, त्याचा झालेला परिणाम, व असोसिएशनसं- बंधीचें मत, इत्यादि अनेक मुद्यांवर त्यांनी आपलें मत व्यक्त करून, वीरशैवस्नेहवर्धकमंड- ळाच्या ध्येयाची व कार्याची चांचणी केली. नन्तर श्री. आंधळकर यांनी सांगितलें कीं, आपले पापणीचे दानशूर अण्णासाहेब गुदगे इनामदार यांनी एकदम २० हजार रुपयांची देणगी दिली म्हणूनच बोर्डिंग निघालें आहे. तसेंच तें चिरकाल टिकविण्याविषयीं एक लाख फंड जमविण्याचाहि विचार करीत आहेत, तरी त्यांच्या प्रयत्नांत फुल ना फुलाची पाकळी म्हणून आपण मदत करावी व आपल्या जिल्ह्याचें नांव राखावें. स्नेहवर्धक मंडळानें चांगलें काम केलें आहे. नंतर श्री. जे. जी. सोमे- श्वरकर यांनी अत्यंत मार्मिक असें भाषण केलें.

त्यात त्यांनी सांगितले कीं, 'दाता संसारांत एखादाच, तसेंच वैभव असून त्या ठिकाणीं दानशक्ति क्वचितच असते, आणि अशा तऱ्हेच्या दोन्ही शक्ति ज्यांच्याजवळ आहेत ते कोणी तरी महात्मेच असले पाहिजेत, त्यांची पूर्वपुण्याईच फळाला आली असते, तसेंच दान करण्याचे अनेक प्रकार आहेत, सत्पात्रीं दानच योग्य असतें, अन्नदान करण्याची ह्मणजे अनेक वेळां जंगम-भोजनें घालण्याची चाल आहे, त्यापासून क्षणिक तृप्ती होते; परन्तु त्या सर्वांपेक्षा विद्यादान फारच श्रेष्ठ असून त्यापासून चिरकाल फायदा होतो. श्रीमंत गुदगे साहेबांनी बोर्डिंगास उदार देणगी देऊन लोकांना शाश्वत लाभ होईल अशा प्रकारच्या विद्यार्जनाच्या सोईसाठीं असें सत्पात्रीं दान केलें आहे आणि यामुळे आह्माला मोठा आनंद होत आहे.' नंतर डॉ० वडगांवकर यांनी पूर्वीचे गुदगे आणि आताचे गुदगे यासंबंधी माहिती सांगितली व ह्मणाले, 'गुदगे यांनी अगदीं योग्य ठिकाणीं आणि योग्य अशी देणगी देऊन सातारा जिल्ह्यांत अभिनन्दनीय कार्य केलें आहे आणि आह्मीं त्यांचा जो सन्मान करीत आहों तो त्यांचा नसून त्यांनी जो दातृत्वाचा गुण दाखविला त्याचा करीत आहों. जो शिक्षण फंड जमा झाला आहे व होणार आहे त्याचा उपयोग योग्य दिशेने करण्यावर अवलंबून आहे. पुष्कळसे श्रीमंत लोक आपले नांव राखण्याकरितां दत्तक वगैरे घेतात. दत्तक चांगला निघाला तर ठीक; तथात त्या एकट्याचाच फायदा; पण समाजांतील बालकें हीं आपलींच समजून जर आपल्या संपत्तीचा उपयोग अशा सार्वजनीक संस्थेस देणगीरूपाने केला तर अखिल समाज त्यांचा कायमचा ऋणी राहील व आजन्म नांव काढील.' नन्तर महाराष्ट्र-वीरशैव-असोसिएशनच्या ध्येयाविषयीं स्पष्ट खुलासा करून असें सांगितलें कीं, 'स्नेहवर्धन संस्था ही अत्यन्त पवित्र व उच्च अशा ध्येयानेंच कार्य करीत आहे व तिचें कार्य निस्वार्थीपणानें चाललें आहे, अर्थात् अशा संस्थेच्या पोटीं जन्मास आलेलें महाराष्ट्र-वीरशैव असोसिएशनरूपी बालक आपल्याप्रमाणेंच किंबहुना तिच्याहून अधिक प्रभावी ठरेल. परन्तु त्यासाठीं सर्व समाजांनी त्यांस साह्य करून खाद्यपेय पुरविलें पाहिजे. नन्तर सदाशिव देवलिंग स्वामी महालय यांनीहि त्याच्या देणगीबद्दल व स्नेहवर्धकमंडळाला भेट दिली त्याबद्दल आनंद व्यक्त केला. नन्तर अध्यक्ष श्री. देवधरकर यांनी गुदगेसाहेबांना चार शब्द बोलण्याविषयीं विनंती केल्यावर त्यांनी, "आपण जो माझा गौरव करीत आहा त्याबद्दल मी आपला आभारी आहें. माझ्या देणगीमुळे प्रत्येकाला हर्ष झाल्याचें दिसतें, पण माझ्या हातून अद्यापि कांहीच झालें नाही. माझ्या देणगीमुळेच माझा मान होत आहे. आपल्या समाजात शिक्षणाचा अभाव आहे. आणि त्यामुळे आपलें फार नुकसान होत आहे. शिक्षण नसल्यामुळे वर्तमानपत्रें वाचतां येत नाहीत. व त्यामुळे व्यापारी घडामोडी कळत नाहीत, आपला व्यापार फक्त मुंबई व आपला गांव किंवा जवळच्या शहरांतून ४-२ पोती एवढाच असतो. शिक्षणाभावी व्यापाराचें धोरण नाही, त्यामुळे फायदा होत नाही. आम्हीं तुर्त भाजी भाकरीची सोय केली आहे. तिला तुम्ही सर्वांनी हातभार लावला पाहिजे. तसेंच फंडाचा विनियोग ठीक होईल इकडे पण तुम्ही लक्ष पुरविलें पाहिजे. मुंबईत अनेक तट दिसतात ते नाहीसे झाले पाहिजेत. त्याशिवाय सोयी होणार नाहीत. ते तट कां आहेत हें समजत नाही. आपल्या समाजात ज्ञाते फार कमी आहेत. तसेंच, ज्ञाते कोणास म्हणावें हासुद्धां प्रश्नच आहे. अशा तऱ्हेचे समारंभ नेहमीं व्हावे म्हणजे एका ठिकाणी बसून विचारविनिमय वारंवार होईल व आपसांतील मतभेद नाहीसें होतील. ही स्नेहवर्धकसंस्था चिरायु व्हावी याकरितां प्रयत्न करावा, त्याकरितां त्याग करा, मी कांही तरी मदत करीन."

...तर अध्यक्ष श्री. देवधरकर यांनीं योग्य ...सर्वांचे आभार मानले व मधून मधून ज्या ...शंका आल्या त्याचें सांगोपांग निरसन ...ले. "तसेंच, आपल्यांत पुष्कळ श्रीमंत माणसें ...त्यांच्या श्रीमंतीमुळे तीं आम्हांस दिस... ...त नाहीत। परंतु त्यांच्या चांगल्या काम... ...गिरीमुळे पटकन् दिसतील व त्यांचा गौरव ...ण्याची आम्हांस बुद्धि होईल." इत्यादि आश... ...तें भाषण करून साताराजिल्ह्यांतील ...श्री अण्णासाहेबांच्या कार्यांत सबळ हातानें मदत करावी असें सांगून सभा बरखास्त केली व नंतर पुढील सद्गृहस्थांनीं देणग्यांचे आंकडे टाकले.

१ श्री. शंकरदादा महामणें, वडूज, २५१ रु.; (२) मुंबईतील सातारा जि. लिंगायत समाज ५१ रु. (३) श्री. शंकर मल्लाप्पा होनराव, वासुंबें. ५१ रु. (४) श्री. कोंडिबा मारुती महाजन, विटे. २५ रु. [५] प्रो. गणपत रामचंद्र डोंबे सातारा, (यांजकडून एका शारीरिक खेळाचें उत्पन्न) इत्यादि.

---

# वीरशैवांचें ऐतिहासिक प्राचीनत्व.

श्री. के. जी. कुंदनगार, एम्. ए., प्रोफेसर, राजाराम कॉलेज, कोल्हापुर, यांचें भाषण 'शिवानुभवांत' आलें तें असें:—

...शोकांत शैवधर्मास ग्लानि आल्यानें ...परमेश्वरानें मृगुच्छ (भडोच) नामक ...प्रवेश करून 'लकुली' या नांवानें ...प्रचारांत आणली. परकायाप्रवेशाची ...श्रीशंकराचार्यांच्या चरित्रांतहि आहे. ...प्रणीत आगमांनाच लाकुळागम, लाकु... ...अशीं नांवें आहेत. लाकुळीशाबद्दलचें ...गुजराथ, मारवाड, कर्नाटक वगैरे ...आहेत. हीं आगमतत्वें अनुसरणाऱ्या ...पाशुपत असें नांव होतें. थोड्या दिवसांत ...मतानें सर्व हिंदुस्थान व्यापून टाकिलें. ...काश्मीर देशांत मात्र यांचें थोडेसे ...झाले होतें. त्यांच्या मूळ कारणाबद्दल ...दंतकथा आहेत. लकुळागमांतील ...शैवागमांतील चार आगम, तंत्रसंग्रह या ...हुबळी येथें सुमारें २० वर्षांपूर्वी प्रसिद्ध ...आहेत. शैवागमांत वीरशैवांत सामान्य ...विशेष वीरशैव, व निराभारी वीरशैव, असे भेद दाखविले आहेत. कामिकागमांत षट्स्थळसिद्धांत आहे. त्याला अनुसरून श्री जक्कणाचार्यांनीं सन १४३० मध्यें एकोत्तर शतस्थळ नामक ग्रंथ लिहिला आहे. सारांश, वीरशैव मत नवीन नव्हे, बसवेश्वरा-पूर्वी होतें. परन्तु तें अनुसरणारे मात्र ब्राह्मणच होते, हे विजापूर जिल्ह्यातील मुत्तगी शिला-लेखावरून सिद्ध होतें. सारांश पूर्वीपासून, वेदा-गमे ब्राह्मणांच्याच ताब्यांत होतीं व शैवधर्म अथवा वीरशैवधर्म अनुसरणारे ब्राह्मणच झाले होते.

ही स्थिति बसवेश्वराला योग्य वाटली नाहीं. व ह्मणूनच 'कर्मलतेप्रमाणें असणारे जानवें' श्रीबसवेश्वरांनी तोडून टाकून दीक्षासंपन्न होण्याकरितां ते श्रीसंगमेश्वराकडे गेले. कृत-कर्माबद्दल मनुष्याला अंतःकरणपूर्वक पश्चात्ताप झाल्यास तो मुक्तीस योग्य होय हा त्यांचा उद्देश होता. मग तो मनुष्य कोणताहि उद्योगधंदा

करणारा असो; उच्च असो, नीच असो; गरीब असो श्रीमन्त असो. त्याला दीक्षा देऊन गुरुने मोक्षमार्ग दाखविला कीं झालें. दीक्षा देतांना मात्र तो योग्य कीं अयोग्य याची परीक्षा गुरुने करावी. शिवानुभव मंटपात श्रीप्रभुदेवा-समवेत अशा प्रकारच्या नव्या विचारांची चर्चा करून वीरशैवधर्माचा त्यांनीं प्रसार केला. त्यांच्या वचनांसहि त्याने लोकांना मारून आपलेसे केलें. ब्राह्मणादि अठरा पगड सर्व जातीचे लोक हा धर्म स्वीकारण्यास सिद्ध झाले. श्रीबसवेश्वराची कीर्ति सर्वत्र पसरली. पण ते फार दिवस राहिले नाहींत. बिज्जळ राजाच्या मरणानंतर बसवेश्वर लवकरच संगमेश्वरीं ऐक्य पावले. बिज्जळपुत्र रायमुरारी सोयिदेव हा सैन्यासह चालून आला. बसवेश्वराच्या अनुयायांचे दोन भाग होऊन श्रीचन्नबसवेश्वराच्या अधिपत्याखालीं एक भाग उळवीकडे गेला, व दुसरा श्रीप्रभुदेवांच्या अधिपत्याखालीं श्रीशैलकडे गेला. ह्मणजे श्रीबसवेश्वरांनी प्रचारांत आणून प्रसार करावा ह्मणुन प्रयत्न केलेल्या वीरशैव-धर्मावर एक मोठें गंडांतरच आलें. पण त्या धर्म-तत्वांचें श्री जनसमुदायाच्या अंतःकरणांत रुजल्याने त्याचा समूळ नाश करणें कोणासहि शक्य नव्हतें. पुढे चन्नबसवेश्वर व प्रभुदेव यांच्या अनुयायांना इतर धर्मांच्या पंडितांशीं वाद करावा लागला.

त्या काळीं अद्वैत, वैष्णव व जैन मतांचा प्रचार झालेला होता. त्यांच्याशीं सुमारे दोनशे वर्षेपर्यंत वीरशैव पंडितांनीं सामना देऊन आपल्या मताचें वर्चस्व स्थापन केल्याची अनेक उदाहरणें दिसून येतात. त्यांमध्यें हरिहर राघवांक हे प्रसिद्ध होत. राघवांकाने त्रिभुवनतात नामक पंडिताचा वादांत पराभव करून त्याला वीरशैवदीक्षा दिली. पद्मांकानें इतर मतांचें खंडन करून वीरशैव मत प्रस्थापिलें असें पद्मराजपुराणावरून दिसतें. नीलकंठ शिवाचार्य ( इ. स. १४०० ) यांनी ब्रह्मसूत्र व्याख्यानरूप असा 'क्रियासार' ग्रंथ लिहिला. लक्कणदंडेश, कुमार बंकनाथ, कल्लमठ प्रभुदेव, जक्कणार्य ( सन १४९० ) वगैरेंनीं वीरशैवमततत्वें प्रतिपादणारे ग्रंथ लिहिले. सारांश, श्रीबसवेश्वरानंतरपासून १५ व्या शतकाच्या मध्यापर्यंत वीरशैव पंडितांनीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांना जिंकून धर्मप्रसार केला, पण त्यापुढें धर्मप्रचारकार्य फारसें झालें नाहीं.

इ० स० १५ व्या शतकाच्या मध्यांत वीरशैवधर्मप्रसारकार्य तोंटद सिद्धेश्वर यांनीं आपलें संघटनाकार्य जंगमामार्फत केलें. आचार्य अथवा गुरूंचे त्यांनीं खालीलप्रमाणें वर्गीकरण केलें. ( १ ) विरक्त ( २ ) पट्टाधिकारी व चरंती ( ३ ) गणाचार्य ( ४ ) मठपति ( ५ ) कायक जंगम. आपल्या अधिकारक्षेत्राचा खालील प्रदेशांत संचार करून धर्मोपदेश करणें हें चरमूर्तीचें कार्य त्यांच्याबरोबर किंवा स्वतंत्र संचार करून भक्तांच्या धर्माचरणाची परीक्षा करणें हें कायक जंगमाचें कार्य होय. त्यांचे धर्माचरण योग्य नसल्याचें आढळल्यास ते लोखंडी खिळयाचा खडाव, खांब, वगैरेच्या योगें सत्याग्रह करीत. यजमानानें येऊन धर्मपालनाचें वचन दिल्यास सत्याग्रह बंद करण्यांत येई. त्या काळीं देशांत शांतता नव्हती. ह्मणून हे कायक जंगम आपल्या व चरमूर्तींच्या संरक्षणार्थ हातांत त्रिशूल व कंबरेला कुऱ्हाड वगैरे आयुधें ठेवीत. वीरशैवधर्म स्वीकारण्याची इच्छा कोणास झाल्यास त्याची वार्ता ते चरमूर्तीस व पट्टाधिकाऱ्यांस देत, व पट्टाधिकाऱ्यांच्या सूचनेवरून चरंती त्या ठिकाणी जाऊन त्यांना वीरशैवधर्मदीक्षा देत. या प्रकारें धर्मप्रसार जोरांत होऊन असंख्य लोक वीरशैव झाले.

विरक्त स्वामी आपल्या शिष्यांना धर्मपाठ देत, शिवयोगात निमग्न राहात. त्यांचे शिष्यच पुढें पट्टाधिकारी, चरमूर्ती, गणाचारी, मठपति, वगैरे होऊन आपापले कार्य विविक्तपणें करून वादांत प्रतिस्पर्ध्यांना जिंकीत होते. अशा रीतीनें गोदावरीपासून कावेरीपर्यंत १५ व्या शतकांत वीरशैवधर्म व्यापून राहिला होता.

# "वीरमाहेश्वरमंडळा "चे सेक्रेटरीचे लेखासंबंधी तक्रार

(श्री. ह. घों. देवधरकर, यांजकडून)

श्री. नानासाहेब बामणगांवकर, संपादक 'वीरशैव संजीवनी' यांसी कृ. न. [वि.] वि.—

[आपल्या] 'वीरशैव संजीवनी' च्या ता० [...]-३७ च्या अंकांत "वीरशैवधर्माची [...]" या शीर्षकाखालीं मुंबईच्या वीरमाहे-[श्वर]मंडळाच्या सेक्रेटरीचा लेख प्रसिद्ध केला [आ]हे. सदर लेखास 'कुत्र्याच्या शेपटा'-[शीं] तुलना केली आहे, व आपणहि त्यास [प्र]सिद्धी प्राधान्य दिलें आहे. अशा तऱ्हेचे शब्द [...] 'संजीवनी' सारख्या पत्रांत येऊं [लाग]ले तर ते चेतना व आपलेपणा उत्पन्न करूं [शक]णार नाहीं; तर उलट तिचा वीट व अनादर [होऊं] लागेल व तिचें महत्त्वहि कमी होईल.

[सद]र लेख पूर्वी "वीरशैव गर्जने"च्या ता० [...] च्या अंकांत प्रसिद्ध झाला होता आणि [तोच] लेख आपण ३ महिन्यांनी छापत आहां [...] सदर लेखांत कोणतीं धर्मतत्त्वें [...] विशेष आवडलीं हें आह्मांस समजत [नाहीं]. परंतु तो अगर त्याचेच जे १।२ लेख [प्रसि]द्ध झाले ते आह्मांला पसंत तर नव्हतेच [परंतु] अयोग्य मजकुराचे [होते. त्या]बद्दल मी 'सुदर्शन'च्या तारीख १९-४-३७ [व 'वीर]शैव गर्जने' च्या २२-४-३७ च्या [अंकांत] मजकूरहि प्रसिद्ध केलें आहे व तें आपल्या [वाचण्यांत] आलें असेल. बरें असो. आपण [तो लेख] आता प्रसिद्ध केल्यामुळें मी मिटलेला [वाद] पुन्हां पुढे आणून त्याचें खरें स्वरूप काय आहे हें प्रसिद्ध करणार आहे. व त्यासाठीं दोन्ही पत्रांव्यतिरिक्त मला 'सुदर्शन' कडेच माहिती पाठविली पाहिजे. कारण आपल्या पत्रांत तिला स्थळ मिळेल असें मला वाटत नाहीं. माझे सर्व लेख वगैरे आपण वाचलेच असाल. तसेंच, आपण मुंबई मुक्कामीं आलां असतां आमच्या मन्डळाचें आपल्यावर प्रेम आहे व आपणहि दाखविलेत ही गोष्ट आपणांस माहीत आहेच. तेव्हां आपल्या स्नेहाचे नात्यानें मी वरील लेखासंबंधींच्या येथील कल्पना आपणांस कळविल्या आहेत.

आपल्या सामाजिक पत्रांत वाटेल तो लेखक वाटेल तें लिहून प्रसिद्धीस पाठवितो. त्यांत शब्दप्रयोग व ह्मणी तर कित्येक वेळां न रुचण्यासारख्या असतात आणि त्यावरून आमच्या समाजाची किंमत दिसून येते. तरी यापुढें आपण वरील बाबींविषयीं खुलासा कराल अशी आशा आहे. ह्मणजे आह्मांस त्याप्रमाणें धोरण ठेवण्यास ठीक पडेल. कळावे. असलेल्या स्नेहात वृद्धि व्हावी.

आपला

ह. घों. देवधरकर अध्यक्ष

## संपादकीय खुलासा

श्री. देवधरकर यांचेकडून जें आह्माला पत्र आलें आहे तें सविस्तर वर दिलें आहे. वास्तविक प्रत्येक लेखकाला, आपण सभ्यतेची

लेखक असल्याचीच भावना असते, आणि या भावनेच्या आवेगांत आपण कुणावर व्यक्तिशः टीका करीत आहोंत का काय, आपल्या लिखाणानें समाजहित कितपत साधेल, वा कुणाची मनें दुखावली जातील, याची कल्पना नसतांना लिखणीच्या चक्रव्यूहांत सरसकट लेखक सापडलेला आढळतो. वरील पत्रामधून श्री. देवधरकर यांनी आह्माला कांही प्रश्न विचारले आहेत. ते वाचून खरोखरच सखेदाश्चर्य वाटतें. तारीख १५ जुलैच्या संजीवनींतील ' वीरशैवधर्मांची मूलतत्वें,' हा वीरमाहेश्वरमंडळाच्या सेक्रेटरीचा आक्षेपार्ह लेख त्यांनी गणपत महादेव किल्लेकरांच्या तारीख १८।३।३७ च्या लेखाला प्रत्युत्तर ह्मणून लिहिल्याचा त्यांच्या लेखांत प्रत्यक्ष खुलासा दिला आहे. तो गर्जनेंतील लेख खोडसाळपणाचा आहे असें त्यांनी आपल्या लेखांत प्रतिपादिलें आहे. तरी तो लेख खरोखरच तसा आहे किंवा नाही, याचा श्री. देवधरकरांनी विचार करावा, आणि वाद उपस्थित होण्याला मूळ कारण कोणतें याचा त्यांनी खुलासा करावा. आमची चूक होत असल्यास आणि ती आह्माला दाखविल्यास आह्मी त्यांचे आभारीच होऊं. संपादकीय जबाबदारीची जाणीव असणारा संपादकच विरळा. आह्मी पाठविलेले लेख यापुढें आपण स्वीकारणार नाही अशी शंका तरी देवधरकरांना कां आणि कशी आली कळत नाही. वादग्रस्त लिखाण नको ह्मणणारे लेखक व वाचक शेंकडा शंभरच आढळतात, पण वास्तविक कृतींत ते उतरण्याची जबाबदारी कुणीहि घेत नाही आणि शेवटी बाजू अंगाशीं आली ह्मणजे अंगाचा तिळपापड करुन संपादकाला वरप्रमाणें पत्रे पाठवतात. तरी असें करणें सर्वतोपरीं सर्वांनाच अनुचित होय. यापुढें तरी हा उपक्रम बंद होईल अशी आशा आहे. आणि श्री. देवधरकरांना जर कांही आमचे बाबतींत या लेखानें गैरसमज झाला असेल तर तो त्यांनी काढून टाकावा अशी आमची त्यांना नम्रपणाची सूचना आहे.

---

# वीरशैवांतील दोन तेजस्वी तारे

## परदेशस्थ प्रथितयश विद्यार्थी:—

१ श्री. चंद्रशेखर हळकट्टी, विजापूर, B. Sc. (मँचेस्टर)

२ श्री. एम्. बी. शंकरप्पा होसूर.

विजापूरचे प्रसिद्ध पुढारी व ' नवकर्नाटक ' आणि ' शिवानुभव ' पत्राचे संपादक रावसाहेब पी. जी. हळकट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., यांचे चिरंजीव श्री. चंद्रशेखर हे औद्योगिक उच्च शिक्षणाकरितां इंग्लंडला गेलेले आहेत. तेथें ते नुकतेच मँचेस्टर-विश्वविद्यालयाच्या बी. एससी. [ मेकॅनिकल ] परीक्षेंत दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाल्याचे आनंददायक वृत्त आलें आहे. या यशाबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

श्री. चंद्रशेखर हळकट्टी यांची मॅट्रिक परीक्षा ...पूर-हायस्कूलमधून उत्तीर्ण झाल्यानंतर ...ची एस. वर्ष पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें ... करून पुढे मुंबईच्या व्हिक्टोरिया ज्यु. ...निकल इन्स्टिटयूटमध्यें दाखल झाले. तेथे ... वर्षे त्यांनी कापडाच्या धंद्याचें शिक्षण घेतलें.

...रिस्टर, आय. सी. एस., अगर डॉक्टरींच्या ...करिता विलायतेस जाणारे विद्यार्थीच ... असतात. परन्तु औद्योगिक व धंदेशि-...करिता जाणाऱ्या विद्यार्थ्यांचें प्रमाण ... कमी. त्यांतून आपल्या देशांत कार-... धंदा प्रमुख असल्यानें व देशाच्या संप-... अभिवृद्धीला ह्या धंद्याचीच उन्नति ...भूत होणारी असल्यानें या धंद्याचेंच ... शिक्षण संपादण्याचा निश्चय श्री. हळ-...ट्टींनी केला. या शिक्षणक्रमांतील त्यांचें ... पाहून मुंबई-सरकारनी उच्च शिक्ष-...करिता शिष्यवृत्ति देऊन त्यांना मँचेस्टर-...विद्यालयांत पाठविलें. त्या वेळी याबद्दल ...-कायदेमंडळांत कांही व्यक्तींनी विचित्र ... करून काहूर उठविल्याची हकीकत अने-... स्मरत असेलच. शेवटी एकमताने त्यांना ...यतेस पाठविण्याचें निश्चित झालें.

...प्रमाणें त्यांनी आपला चार वर्षांचा ... अभ्यासक्रम' पुरा करून ते बी. एस ... परीक्षेंत दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण झालें ... शिवाय लंडनच्या 'सिटी अँड गिल्ड्स' ... पहिल्या वर्गात पास झाले आहेत. ... पुस्तकी परीक्षा पास होऊनच व ... लंडनच्या अनेक गिरण्यांतून काम ... त्यांनी प्रत्यक्ष कामाचाहि अनुभव संपा-... आहे. गेल्या वर्षी 'हाय कमिशनरा'च्या ...ने हॉलंड देशांतील अनेक गिरण्यां-... त्यांनी या धंद्याची विशेष माहिती मिळ-... आहे. याशिवाय युरोपांतर इतर देशां-... गिरण्यांतूनहि त्यांनी या विषयाचा अनुभव मिळविला असून, इंग्लंड व जर्मनींतील कांही गिरण्यांतून आणखी सहा महिने माहिती मिळवून ते आपला अभ्यासक्रम पुरा करणार आहेत.

शिक्षणाबरोबरच क्रिकेट, टेनीस, वगैरे खेळां-तील त्यांचें प्राविण्यहि येथे असतांनाच दृष्टो-त्पत्तीस आलें होतें. तेथेहि त्यांनी या बाबतींत बराच लौकिक संपादिला असून त्यांना मँचेस्टर-युनिव्हर्सिटीने "टेनिस स्टार" असा किताब दिला आहे.

आपला शिक्षणक्रम लवकर आटोपून श्री. चंद्रशेखर हळकट्टी यांनी आपल्या मातृभूमीस येऊन आपल्या ज्ञानाचा फायदा आपल्या देश-बांधवांना द्यावा असें आम्ही इच्छितों.

## श्री. एम. बी. शंकरप्पा.

वीरशैवसमाजास व म्हैसूर प्रांतास भूषण-भूत झालेले कै. एम. बसवय्या यांचे श्रेष्ठ चिरं-जीव श्री. एम. बी. शंकरप्पा हें येथील एम एससी. परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यानंतर उच्च शिक्षणाकरिता विलायतेस गेले होते. तेथील विश्वविद्यालयाच्या बी. एम. इ. टी. परीक्षेंत ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण तर झालेच, पण त्या परीक्षेत त्या युनिव्हर्सिटींत ते पहिले आले असल्याची आनंददायक बातमीहि आली आहे. या त्यांच्या अपूर्व यशाबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

## वीरशैव शिक्षण प्रसारक मंडळ

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें वीरशैव शिक्षण प्रसारक मन्डळाची वार्षिक सभा ता. १२ रोजी श्री. महादेवआप्पा हुंडेकर यांच्या घरी भरून सर्वानुमतें नवीन वर्षाकरिता पुढील कार्यकारी-मन्डल निवडले गेलें. अध्यक्ष श्री. रघुरावआप्पा हेगू वकील; उपाध्यक्ष श्रीमन्त सोमेश्वर आप्पा मेन्डसे, चिटणीस श्री. सिद्रामप्पा कुन्हे, व श्री. नानाप्पा महादेवआप्पा एकलारे, असें मंड-ळाचे सेक्रेटरी कळवितात.

# पंधरा वर्षांनंतर

( लेः—राम शंभो पुराणीक सहसंपादक, 'वीरशैव संजीवनी' )

'वीरशैव संजीवनी' पत्राचें माजी सहसंपादक व वऱ्हाडांतील वीरशैवांचे नवमतवादी पुढारी श्री. वि. तु. ऊर्फ बाबुराव चौधरी यांनी तारीख १-६-३७ चे 'संजीवनी'मधून आपण आपला सहसंपादकीय नात्याचा संजीवनीशीं असलेला संबंध स्वखुषीनें सोडल्याचें जाहीर केलें आणि तसें करतांना त्यांनी आपल्या कांही अडीअडचणींचाहि उल्लेख केला आहे. पण ही वार्ता वाचून बाबुरावांच्या सर्व स्नेही मंडळींना, आणि संजीवनीच्या हितचिंतकांना, सखेदाश्चर्य वाटलें. कारण संजीवनीला पुनर्जन्म देतांना श्री. नानासाहेब बामणगांवकरांना संजीवनीच्या बाबतींत पुनश्च हरी ॐ करण्याला उद्युक्त करण्यात प्रामुख्यानें श्रीं. चौधरी यांच्या नांवाचा उल्लेख करणेंच भाग पडलें. श्री. नानासाहेबांना 'उदय'च्या आणि इतरहि वाढत्या व्यापामुळें इतरत्र लक्ष पुरवण्याइतकी सवड क्वचितच मिळत असल्या कारणानें, आणि वीरशैवसमाजाच्या उदासीन वृत्तीचो झळ त्यांना संजीवनीच्या बाबतींत पूर्वी बरीच लागल्यामुळें, त्यांनीं स्वतःला देशसेवेच्या राजकारणाला वाहून घेतलें हें सर्वश्रुतच आहे. तरीपण, श्री. चौधरीसारख्या तडफदार तरुणाच्या सामाजिक सुधारणेच्या महत्वाकांक्षेला दडपून न टाकता, नानासाहेबांनीं मरणासन्न पत्नीच्या आजारानें दडपून गेलेल्या अंतःकरणानेंदेखील बाबूरावांच्या विनंतीला मान देऊन संजीवनीची पुष्पमाला चौधरींच्या गळ्यांत रुळवली, आणि जवळ-जवळ दीड वर्षपर्यंत श्री. चौधरींनीहि संजीवनीचा संसार कुशलपणें थाटून दाखविला. आतां माझ्या संजीवनीच्या संसाराची मला कांहीं काळजी उरली नाही अशा आनंदात नानासाहेब समाधानाचे निश्वास सोडूं लागले, नवनव्या कल्पनांचा साज चढवून व नवोदित लेखक मित्रमैत्रिणींच्या सहाय्यानें संजीवनीला नटून-थटून समाजांत वावरतांना ज्यांनी श्री. चौधरींच्या कारकिर्दीत पाहिली, त्या सगळ्यांनी बाबुरावांच्या संजीवनीवरील प्रेमाचें हार्दिक कौतुकच केलें. पण काय झालें कुणी सांगावें, जें होऊं नये तें कल्पनातीतच झालें. श्री. चौधरींनी संजीवनीची फाडीमोड जाहीर केली. आता कुणी ह्मणतात, हृदयस्वामिनीच्या रत्नहाराची भुरळ बाबुरावांच्या दृष्टीला पडली ह्मणून त्यांनी संजीवनीला झिडकारलें. कुणी ह्मणतात, त्यांना वकीलीचा अभ्यास पुरा करणें आहे ह्मणून त्यांनी संजीवनीला दूर लोटलें. तर कुणी ह्मणतात, कांही इतर प्रापंचिक अडचणीमुळें त्यांनी असें केलें. पण माझा या कुठल्याहि गोष्टीवर मुळी विश्वासच बसत नाहीं. कारण बाबुराव चौधरी कांही इतक्या कमकुवत दिलाचे नाहीत कीं असल्या तसल्या अडीअडचणींना बुजून जाऊन त्यांनी संजीवनीचा संबंध कायमचा तोडावा. ते खंदे लेखक आहेत, धडाडीचे नवमतवादी पुढारी आहेत, सुविद्य आणि सुशिक्षित असे बाणेदार आणि कॉलेजच्या डिग्रीचा मुगुट शिरावर धारण केलेले ते एक नमुनेदार नवतरुण आहेत. त्यांच्या मनगटांत, एकच काय पण शेंकडो कार्यांची समशेर लीलेनें खेळवण्याइतकी सामर्थ्याची धमक आहे. पण हृदय-

…नीच्या रत्नहाराचा स्वीकार करतांना 'द्यूति … वाला, सवतची भासे मला,' असें ह्मणुन … गृहदेवतेनें तर संजीवनीची पुष्पमाला … देण्याला त्यांना अट्टाहासानें भाग पाडलें … वशीहि शंका क्षणभर डोळयापुढे … गेल्यावांचून रहात नाही. पण जरा … यांनें या गोष्टीचा विचार करुं लाग— … आणि आजवरच्या संजीवनीच्या आणि … देवीच्या प्रेमाचें सिंहावलोकन केल्यास, … वेळोवेळीं, भगिनीप्रेमानें जवळ … रत्नप्रभादेवी-( शामलता )—नी तिच्या … आपल्या सहजसुंदर लेखनकलेची … तिची नीटनेटकी वेणीफणी करण्यांत … भाग घेतला आहे, आणि आतांच ती … भगिनी त्यांना इतकी त्याज्य … हें संभवनीय नाहीं. बाबूरावांनी संजी- … संबंध तोडण्याची कारणपरंपरा कांही जरी … तरी तें एक मोठेंच वैगुण्य संजीवनीच्या … घडून आलें ही गोष्ट निर्विवाद आहे.

… आपल्या लाडक्या संजीवनीच्या संसा- … होत असलेली हेळसांड कशी भरून … या विवंचनेंत पुन्हा नानासाहेब पडले; … एके दिवशीं सहज त्यांच्या भेटीस … असतांना, त्यांनी संजीवनीच्या बाबतींत … काय करावें अशी विचारणा केली. … झालें हें फार वाईट झालें, चौघरींच्या … तडफदार जोडीदार संजीवनीला इतःपर … कठीणच आहे. आपल्या आठवणींत … दुसरा कुणी असा असेल तर पहावा … ,' असें मी त्यांना सांगीतलें. पण … फायदा घेऊन श्री. नानासाहेबांनी … बोट माझ्याच डोळ्यांत … सहज लीलेनें प्रयत्न केला. … ध्या आतां संजीवनीचो जबा- … अंगावर, असा सवाल टाकला. पण मी … जबाब दिला कीं, कुठें बाबुराव … आणि कुठें मी! वीशी तीसीच्या नव- … तडफदार जवानाच्या सहवासांत ज्या … आज वीस वर्षांचा काळ कंठला,

तिला माझ्यासारख्या चाळीशी उलटून गेलेल्या, दंतभग्न, सुरकुत्या चेहऱ्याचा सहवास कितीसा आणि कसा सुखकारक होईल याचा आपणच विचार करा. संजीवनीचा संसार ह्मणजे कांही पोरासोरांचा लुटुपुटीचा संसार नव्हे. तिच्या भेटीला येणाऱ्या निरनिराळ्या मतमतांतरांच्या आणि पक्षोपपक्षांच्या मंडळींचें स्वागत करतांना माझी बरीच त्रेधा उडेल. कारण माझ्या अंगांत ती पूर्वीची धमक आज उरली नाही. एका पाहुण्याचें स्वागत करायला जावें तर दुसराच रुसतो. दुसऱ्याची क्षमा मागून त्याला जरा स्थिरस्थावर करावें तर तिसरा 'माझ्याकडे यानीं मुळीं लक्षच दिलें नाही' ह्मणून गाल फुगवतो, तर कुणी ह्मणतो, मला येत्या अंकांतच अग्रमान मिळाला पाहिजे. अशी ही लेखकांची पूर्वपरंपरा माझ्या पुर्वाश्रमीच्या संपादकीय कार्यप्रसंगीं पूर्ण परिचयाची झालेली आहे. येणारा पाहुणा आगांतुक असो वा परिचयांतील असो, संजीवनीच्या घरादारांत दाटी-वाटीनें किती जणांनी एकाच वेळेला ठाणें द्यायचें, आपला पोषाख, आपली भाषा, संजीवनीच्या स्वभावपरिपोषाशीं पटती आहे कीं नाही याचा कांही एक विचार न करता, जरा कुठें नजरचुकीनें थोडा कानाडोळा झाला कीं डोळे फाडायला तयारच असतो. पंधरा वर्षापूर्वी मी जेव्हा 'वीरशैव' नावाचें साप्ताहिकाचा संपादक होतो, तेव्हाचे हे सारे अनुभवाचे माझे बोल आहेत, अनुमानाचे नव्हत. त्यांतूनहि, पंधरा वर्षापूर्वीच्या आणि आजच्या कालपरिस्थितींत परिमाणाबाहेर फरक झाला आहे. आणि आपल्या समाजांत तर कलहाशिवाय आणि वादविवादाशिवाय वा व्यक्तिद्वेषाशिवाय दुसरें कांही कुठें आढळत नाही. वीरशैवांनी नित्य नैमित्तिक लिंगपूजा एकदा न केली तरी चालेल, पण एकानें दुसऱ्याला शिव्या न दिल्या तर तो खरा वीरशैवच नव्हे, अशीच जणू परिस्थिति निर्माण झालेली आहे. आणि याची झळ सार्वजनिक सामाजिक प्रश्नांना वरचेवर लागत असल्यामुळें तीं करपल्यागत नुसती नाममात्र जीव धरून आहेत. अशा परिस्थितींत

पला हा संजीवनीचा संसार सुरळीत चालवणें अतिशय कठीण जाईल, तरी आपण कृपा करून मला ही भीड घालूं नका अशी विनंती मी संजीवनीचे जनक श्री. नानासाहेब यांना केली. परंतु त्यांनी, जणुं कांही माझ्या विनंतीचा विचार न करण्याचेंच कंकण बांधून, कांही असलें तरी तुह्मी संजीवनीच्या सहसंपादकाची जबाबदारी शिरावर घेतलीच पाहिजे अशी आज्ञा केली, आणि गेल्या अंकापासून संजीवनीचा हात माझ्या हातांत दिला.' तुह्मी कांहींच काळजी करूं नका, मी जागत्या डोळ्यांनी या तुमच्या संसाराकडें लक्ष पुरवीन. तुह्माला कांहीहि तसदी–तोशीस विशेष अशी पडूं देणार नाही. वरचेवर माझा सल्ला तुह्माला मिळेल,' असें आपुलकीचें आश्वासन श्री. नानासाहेबांकडून मला मिळालें तेव्हा कुठें मलाहि थोडा धीर आला, आणि मी त्यांची आज्ञा शिरसामान्य समजून संजीवनीच्या सहसंपादकत्वाची जबाबदारी शिरावर घेतली.

नवरामुलगा ह्मणून वाजत–गाजत मोठ्या थाटामाटानें बोहल्यावर चढून नवतरुणींच्या हातांत हात देतांना आणि तिच्या हातांतील पुष्पमाला कंठांत धारण करतांना कुण्याहि नवरदेवाला आनंदाच्या उकळ्या फुटून स्वर्ग दोनच बोटें उरलेला प्रत्यहीं प्रत्येकाच्या आढळांत येतो. क्षणभर माझेंहि तसेंच झालें. पण लग्नसोहळा पार पडून पत्नीच्या संसाराची पुरवापुरव करतांना हा सारा आनंद कुठें मावळतो कुणाला ठाऊक! लग्नप्रसंगीच्या मौक्तिक मुंडावळीच्या मोत्यांनी विभूषित झालेलें मस्तक सुन्न बनून जातें, आणि मुंडावळीच्या मोत्यांचे सर डोळ्यांवाटे अश्रूंच्या मोत्यांनी खळूं लागतात. इतकेंच नाहीं तर कित्येक वेळेला संसाराच्या व्यापसंतापानें मस्तक भणाणून वेडें बनण्याचाहि प्रसंग ओढवतो. केव्हां केव्हां तर नको हा व्याप ह्मणून डोक्यांत राख घालून संसारसंन्यास करण्याची पाळी येते, किंबहुना क्वचित् प्रसंगीं आत्महत्यादेखील करून घेण्याचा दुर्धर प्रसंग कित्येकांवर ओढवतो. एकूण काय की 'सुख पहातां जवापाडे आणि दुःख पर्वताएवढें,' ही जी संसाराला बिनचूक लागू पडलेली ह्मण सर्वस्वी खरी असल्याचें प्रत्येकाच्या प्रत्ययाला येते. या अग्निदिव्यामधून लग्नाआधीच सावधान झालेले नरनारायण खरे समर्थ ठरतात आणि इतरांच्या कपाळीं वाण्याच्या बैलागत संसारसुखाची झापड बांधली जाऊन जन्मभर झांकल्या डोळ्यांनी सुखदुःखाकडे डोळेझाक करून अखेरीस कायमचे डोळे मिटावे लागतात. अशी ही खडतर संसारयात्रा, यांतून सुखासमाधानानें पार होण्यास, सभोंवारचा परिवार ज्या योग्यतेचा असेल त्या मानानें सुखदुःखाचा लाभ होतो. एकेकाच्या संसाराची जर ही तऱ्हा, तर संजीवनीसारख्या सामुदायिक सामाजिक जबाबदारीची खडतर तपश्चर्या किती जडजोखमीची असेल याची वाचकांनीच कल्पना करावी. संजीवनीच्या प्रेमळ हितचिंतकांनीं तिला वरचेवर आपल्या लेखनकलेनें सजवणाऱ्या साहित्यिकांनी, तिच्या निःसीम आवडत्या भगिनी जनांनी, तिच्यावर आजवर जसा लोभ ठेवून, तिच्या वाढत्या संसाराला वेळोवेळीं आपुलकीच्या मदतीनें कुरवाळलें, तद्वतच यापुढेहि वाढत्या लोभवृद्धीने तिला सांभाळून घ्यावे अशी, नाममात्र 'संजीवनी' चा एक सहसंपादक या नात्याने सर्वत्रांना माझी विनंती आहे. आपणा सर्वांचे कुशल क्षेम ध्यानात करण्यांत क्वचित् प्रसंगी आमच्या कडून कांही चूकभूल होत असल्यास आह्मास त्याची जाणीव करून द्यावी, आह्मी अवश्यमेव आपल्या सूचनांचा विचार करूं. मात्र–तसें करतांना इतरांच्या चुकीबद्दल आह्माला प्रायश्चित्त न मिळण्याची खबरदारी घ्यावी इतकेंच! संजीवनीचें ब्रीद राखण्याची जबाबदारी जितपत आमच्या शिरावर आहे, तितपतच तिच्या लेखक मित्रांच्याहि शिरावर ती जबाबदारी आहे हें विसरून चालणार नाहीं.

संपादकीय जबाबदारीची तरवार आमच्या शिरावर लटकत आहे, याची आह्माला पूर्ण

…व आहे. विस्पृह, निःपक्षपाती, पक्षोपपक्ष– …आणि निर्भीड चर्चा करणारा संपादकच …संपादक ह्मणतां येईल हें निर्विवाद आहे. …वरील चतुःसुत्रीपासून कांहीं प्रसंगीं, निष्का- …काहीं मंडळींचा गैरसमज होण्याचे प्रसंग …वर नेहमी येतात, ह्मणून संपादकीय …वाजूला सारून नसती सारवासारव कर- …आम्हाला मान्य नाहीं, आणि कारणही पण …आम्ही आपल्या ध्येयावर रोखल्या …तसे असूं. जरा देखील ढळणार नाहीं, …निश्चित. माजी सहसंपादक श्री. बाबुराव …यांच्या इतपत मी थोर योग्यतेचा …हें मी केव्हांहि विसरणार नाहीं. मीं सह- …ची जबाबदारी शिरावर घेतली, ती, …योग्य माणूस ह्मणून नव्हे, तर केवळ …च्या प्रेमळ अनुज्ञेचा स्वीकार करावा, आणि शक्य तेवढ्या अल्प प्रमाणांत का होईना, समाजसेवा करतां येईल तितकी करावी याच एका जाणिवेनें.

आपण सर्व सन्मित्रांनी जर बाबुरावासारखाच लोभ माझ्यावरहि कायम ठेवला आणि वरचे-वर मदत करून, माझा मार्ग सुकर केलात, तर माझी खात्री आहे कीं, माझ्या हातून संजीवनीची सेवा करण्याचें व्रत यथासांग पार पडेल, आणि संपादकीय नात्याचे कांहीं तरी चीज होईल. संजीवनीच्या सर्व हितचिंतकांना मी आणखी एकदा नम्रपणें विनंती करून, संजीवनी तुमची आहे, तिच्या जोपासनेची काळजी तुह्मालाच वहाणें भाग आहे, अशी प्रेमाची सूचना करून, आशाळभूत नजरेनें आपल्या प्रेमळ शुभाशीर्वादाची याचना करीत आहें.

# …लापूर-जिल्हा-वीरशैव-परिषद् आणि राष्ट्रीय वृत्ति

( लेखकः— डी० के० ढोले, मुंबई. )

सभा, संमेलने, परिषदा वगैरे भरविण्याचा हेतूच हा असतो कीं, त्या बोलावणाऱ्यांना काय हवें, काय नको, हें दिग्दर्शित करणें, …तः परिषदांतून सामाजिक, आर्थिक, राज- …विषयांवर चर्चा होऊन सर्व अथवा …नें निर्णय ठरतो. परिषदेंत पास …ठरावांवरून समाजातील अडी–अडचणी, …क आर्थिक राजकीय मतें व्यक्त होत अस- …एकूण परिषद ह्मणजे राजकीय, सामाजिक …मतें प्रगट करण्याचें एक प्रमुख साधन आहे.

…जून १९३७ रोजीं बार्शीस भरलेलें …तिसरें असून तत्पूर्वी पंढरपूर आणि …या दोघीं सोलापूर–जिल्हा वीरशैवपरि- …दोन अधिवेशनें झालीं होतीं. त्यापैकीं …अधिवेशन पंढरपूरास १९३१ सालीं झालें. यावेळीं पुण्याचा 'वीरशैव केसरी' दर आठवड्यास गर्जना करीत असे. त्याने आपल्या २३ मार्च १९३१ च्या अंकांत एक भला मोठा अग्रलेख लिहून सदर परिषदेवर सांगोपांग चर्चा करून आपलें मत व्यक्त केलें होतें.

अध्यक्षस्थानाबाबत १९३१ च्या १२ जानेवारीस सरकारी रोषास बळी पडलेले वीरशैव–समाजभूषण, नरशार्दूल कै. मल्लाप्पा धनशेट्टी यांना द्यावयाचें होतें; परन्तु वीरशैवसमाजाच्या कमनशिबाने त्यांना केलेल्या कामगिरीबद्दल प्राणाचें मोल द्यावें लागलें. ह्मणून हें स्थान दिवाण बहादूर कंबळींनी स्वीकारावें असी पंढरपूर परिषदेच्या चालकांनी विनंती केली. त्यांनीं महाराष्ट्रीय [कन्नडी नव्हेत], मल्लाप्पासारखे बंडखोर लोक ज्या समाजांत जन्मतात त्या समाजाच्या परिषदेचें अध्यक्षस्थान काय ह्मणून स्वीकारावें? अर्थात् त्यांनीं नकार दिल्यानंतर ओघानेच तें सोलापूरचे बॅ. सरदार यांच्या गळ्यांत पडलें.

सदर परिषदेत पास झालेले पहिले तीन ठराव ( १ ) पंडित मोतीलाल नेहरू व मौ. महंमदअल्ली, [ २ ] कै. मल्लाप्पा धनशेट्टी — यांच्या निधनाबद्दल दुःखप्रदर्शन [ ३ ] गांधी-आयर्विन करारावद्दल समाधान व परदेशी बहिष्कार आणि स्वदेशी अंगिकार असे परिपूर्ण राष्ट्रीय वृत्तीचे ठराव पास झाले. त्यामुळे सोलापूर-जिल्ह्यांतील वीरशैव राष्ट्रीय वृत्तीचे असल्याचें जाहीर झालें,खरी वस्तुस्थितीहि अशीच आहे कीं,सोलापूर शहरांतील बहुसंख्य वीरशैव जनतेने राष्ट्रीय चळवळींत प्रामुख्यानें भाग घेऊन आपली कामगिरी हिंदी स्वातंत्र्याच्या इतिहासांत अजरामर करून टाकली. त्याचप्रमाणें बार्शी व इतर तालुक्यांतील वीरशैवांनींहि आपापल्यापरी राष्ट्रकार्याचा रथ शक्तिनुसार ओढलाच !

या परिषदेनंतर वीरशैवसमाजाचे ' कर्नाटकी ' पुढारी पूर्वीचे दिवाण बहादुर व आताचे सर कंबळी दिवाण असतांना अहमदनगर जिल्ह्यांतील जामगांवचे एक वीरशैव बांधव श्री.गंगाधर गुळवे हे नाशिकच्या पोलिस कॉलेजची परीक्षा उत्तीर्ण होऊन आले होते.सदर गुळवे यांनीं फांशी गेलेल्या मल्लाप्पा-धनशेट्टीच्या जातींत केवळ जन्माला आल्याचा गुन्हा केल्यावरून त्यांना नोकरी मिळूं शकली नाहीं. आणि आमच्या दिवाण बहादुरांनी केवळ महाराष्ट्रीय म्हणून ओळखसुद्धां घातली नाहीं. कारण महाराष्ट्रीय वीरशैव मल्लाप्पा प्रमाणेंच बंडखोर असतात व कानडी न येणारे म्हणजे संस्कृतिहीन वीरशैव आहेत, अशी त्यांची साधार समजूत आहे.

पंढरपूर-अधिवेशनानंतर बरोबर सहावर्षांनी बार्शी-अधिवेशनांत राष्ट्रीय-वृत्तीचा नूर अजिवात पालटून गेला.नवी स्वायत्तता मिळाल्यानें, किंवा दिवाण बहादुरांना ' सर ' की मिळाल्यानें, पुन्हां हंगामी दिवाणपद प्राप्त झाल्यानें, अथवा बेळगांव-कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉ.नंदीमठ अध्यक्ष लाभल्याने वा बार्शीच्या जयशंकर मिलचे मॅनेजर श्री.झाडबुके स्वागताध्यक्ष झाल्यानें पूर्वी लावलेली राष्ट्रीयवृत्तीची ज्योत मालवली गेली, व त्या जागीं राजनिष्ठेची संस्थापना होऊं शकली. तिचें मूर्तिमन्त उदाहरण म्हणजे राजा-राजोळा ( पोकळ ) दीर्घायुष्य चिंतणें व सरसाहेबांचें अभिनंदन करणें हे ठराव पास झाले. पंढरपूरपासून बार्शी-पर्यंतचा सहा वर्षांचा काळ गेला,त्यांत असा कोणता फरक पडला कीं वीरशैवसमाजाचे उदयोन्मुख-स्वातंत्र्यदिशेकडें वळलेलें मुख त्यानें अगदीं पराङ्मुख होऊन राजनिष्ठेकडे फिरावें? शैव नांवामागें 'वीर' हीं अक्षरें लावणाऱ्या समाजानें अक्षरें व कृति यांची फारकत करून पारतंत्र्य-शासनापुढें मस्तक नम्र करावें या गोष्टीने राष्ट्रीय वृत्तीला तर आहेच आहे परंतु वीरशैवांतील 'वीर' या शब्दालासुद्धां काळिमा फांसला यांत शंका नाहीं.

गेल्या सहा वर्षांत महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र या विभागांत वीरशैवसमाजाच्या बऱ्याच परिषदा झाल्या; पण समाजाला लाजिरवाणें पास झालेले ठराव आढळत नाहीत. उलट नाशीक-जिल्हा वीरशैव-परिषदेनें तर राष्ट्रीय कॉंग्रेसचें ध्येय मान्य असल्याचा ठराव पास केला. असें असतां,सोलापूर-जिल्ह्यांतील वीरशैवांच्या मनगटावर अशी कोणती गोणी पडली होती कीं, तिनें फार रग लागली होती म्हणून ही रग [दुःख] कमी करण्यासाठीं लांगूलचालनी ठराव पास करणें तिला भाग पडलें ?

कांहीं ' शिष्टां 'च्या कारवायांनी व प्रतिनिधींच्या जाणतेपणानें जरी सोलापूर-जिल्हा-वीरशैव-परिषदेवर राजनिष्ठेची छाप पडली असली तरी वीरशैवांतील वीर रक्त स्वस्थ बसूं देत नाहीं याचें प्रत्यंतर, परिषदेच्या ठरावांची शाई वाळते न वाळते तोंच सोलापूरास शाहीर हरिभाऊ भंडारे यांच्या पोवाड्यांच्या प्रसंगीं झालेल्या लाठी हल्ल्याबाबत पकडलेल्या देशभक्तांच्या संख्येंत बहुसंख्य लिंगायत पकडून, सरकारनेंच सिद्ध केलें आहे.(त्याबद्दल सदर सातहि वीरांचें आम्ही अभिनन्दन करतों.) वेळोवेळीं वीरशैवसमाज अशीच राष्ट्रीय वृत्ति दाखवून राजनिष्ठांच्या डोळ्यांत अंजन घालीत रहाणार यांत शंका नाहीं.

पंढरपूरचे अधिवेशनांत कै. मल्लाप्पा धनशेट्टी यांच्या संबन्धी दुःख प्रदर्शित करणारा ठराव पास केल्याने त्यांच्या तळमळणाऱ्या आत्म्यास ( असल्यास ) किंचित् समाधान वाटतें तोंच पुन्हा त्यांच्याशीं प्रतारणा करून बार्शी-परिषदेनें त्यांच्या व समाजाच्या राष्ट्रीय जखमेवरमीठ चोळलें, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल काय ?

॥ वंदेमातरम् ॥

# अरुण, उदय, आणि संजीवनी, कार्यालयाच्या

## * टिळकाश्रमाचा *

# उद्घाटनसमारंभ

## तारीख १७ आगस्ट १९३७

**मंगळवार रोजीं सायंकाळीं साडेसहा वाजतां होणार.**

अध्यक्ष:—दे. भ. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर.

स्वागताध्यक्ष:—श्री. लोकनायक मा. श्री. अणे.

चिटणीस:-- श्री. ल. रा. सोंटे, नारायण जानराव देशमुख, घों. ल. लिमये (बी. ए, एल्एल्. बी.,) ह. अ. असनारे, (बी.ए., एल्एल्., बी.,) मोतीलाल बंसगोपाल, नारायणसिंग खुशालसिंग सराफ, रा० दि. भवाळकर.

आमच्या सर्व हितचिंतकांना आणि आश्रयदात्यांना स्वागतमंडळातर्फे प्रार्थना आहे कीं, ता. १७ आगष्ट रोजी सायंकाळी ६॥ वाजतां होणाऱ्या टिळकाश्रमाच्या उद्घाटनसमारंभास अगत्यपूर्वक येऊन आमच्या कार्यास आणि टिळकाश्रमास आपण आपली सहानुभूति दाखवाल आणि आपलें स्वागत करण्याची संधि द्याल अशी आशा आहे. क. हे. वि.

विनंति:—स्वागतमंडळानें केलेल्या वरील विनंतीस मान देऊन आपण अगत्य येण्याची कृपा करावी.

अमरावती
ता० १।८।३७

आपला नम्र

ना० रा० बामणगांवकर

चालक, अरुण - उदय - संजीवनी.

# वीरशैवांतील चळवळी

## वधुरवयोः शुभं भवतु ॥

सांगली येथील एक सुप्रसिद्ध समाजकार्यकर्ते आणि वीरशैवांचे पुढारी, श्री. हरीहर कृष्णाप्पा रिसवडे यांचे बंधू श्री. शंकरराव कृष्णप्पा रिसवडे, बी. ए., यांचा विवाह तारीख ३-६-३७ रोजीं निजामस्टेट मधील मुंगशी ( बार्शी ) चे इनामदार श्रीमंत रेवणसिद्धप्पा धर्मराव सारवरे यांच्या भगिनी ईरव्वाबाई यांचेबरोबर सांगली येथील रिसवड्यांच्या गिरणींत मोठ्या समारंभानें व आनंदानें पार पडला. सदरहु लग्नसमारंभास गांवांतील सर्व व्यापारी व प्रमुख अधिकारी मंडळी हजर होती आणि परगांवाहूनहीं बरीच मंडळी आली होती. अमरावतीचे दे. भ. नाना साहेब वामणगांवकर, दारव्हयाचे श्री. वा. शं. पुराणिक, आणि धुळयाचे सुप्रसिद्ध शाहीर मुचाटे हे या प्रसंगातील प्रमुख पाहुणे ह्मणून उपस्थित होते. श्री. शंकरराव रिसवडे यांचेशीं संस्थानचे युवराजांचा जिव्हाळयाचा स्नेहसंबंध असल्यामुळें, युवराजाकडुन इटलीसारख्या परदेशांतूनहि वधूवरांना शुभाशीर्वादपर संदेश आणि आहेरादाखल पन्नास रुपये आले; याबद्दल युवराजांचें हार्दिक अभिनंदन उलट तारेनें करण्यांत आलें.

या विवाहसमारंभांतील विशेष ह्मणजे, लिंगायतांतील बहुतेक पोटजातीचें सहभोजन घडवून आणून सभा—परिषदांमधून ठराव पास करण्यांत मौज नसून, ते कृतीनें सिद्ध करण्यातच खरी कर्तबगारी आहे हें श्री. रिसवडे बंधूंनी सिद्ध करून दाखविलें. अन्नदान वगैरे यथोचित होऊन हा लग्नसमारंभ आनंदानें पार पडला. श्री. शंकरराव रिसवडे हे पुढील शिक्षणाकरिता कोल्हापूर साईक्स लॉं कालेंजमध्यें दाखल झाले आहेत. आणि त्यांच्या सुशिक्षणाला साजेशा त्यांच्या पत्नी ईरव्वा ऊर्फ पार्वतीबाईहि सुशिक्षित आणि गृहकृत्यांत दक्ष अशाच आहेत. वधूवरांना दीर्घायुष्य, आणि संततीसंपत्तीचा लाभ होऊन समाजकार्यरत होण्याचीं सद्बुद्धी तो जगच्चालक परमात्मा त्यांना देवो अशीच सर्वांची इच्छा असणार !

( आजच्या अंकांतील फोटो वरील श्री. श्री. शंकरराव रिसवडे आणि त्यांच्या पत्नी श्रीमती पार्वतीबाई यांचा आहे. तो प्रसिद्ध करता दिल्याबद्दल आह्मी त्यांचे अत्यंत आभारी आहों. )

---

## अभिनंदनीय यशस्वी विद्यार्थी

या वर्षी खालीलप्रमाणें, वीरशैव गुरुकुल, सिकंदराबाद आणि " श्री विश्वाराध्य गुरुकुल, काशी, या संस्थांमधून वार्षिक परिक्षेत यशस्वी [ पास ] झालेल्या विद्यार्थ्यांचे आह्मी हार्दिक अभिनंदन करतों.

श्री विश्वाराध्य गुरुकुल, काशी, ( बनारस )

श्री विश्वाराध्य गुरुकुल, काशी, ( बनारस ) ॥

१ वृजमन्डळ युनिव्हर्सिटी मथुरा :— वेदान्ताचार्य श्री. वागीश शिवाचार्य मुद्देकर

२ संस्कृत असोशिएन कलकत्ता :— काव्यतिर्थ :— द्वितीयश्रेणी; श्री. गुरुशांत शिवा-गोसगशिवाचार्य मुतनाळ व्याकरण माध्यम द्वितीयश्रेणी

३ श्री. सदाशिवशास्त्री रावलुडकी न्यायमध्यम द्वितीयश्रेणी.

४ श्री. शंकरशास्त्री बेकनाळ व्याकरणाद्य :--

५ श्री. शिवानंद स्वामी अहीरवाडी दर्शन संपूर्ण माध्यम द्वि. श्रेणी

६ गव्हर्न्मेंटकॉलेज बनारस : -- श्री. शंकरशास्त्री बेकनाळ प्रवेशपरिक्षा

७ श्री शिवानंद स्वामी अहीरवाडी काव्यतिर्थ

८ वीरशैव गुरुकुल सिकंदराबाद : — श्री. गुरुसिद्ध शर्मा

( श्री. गुरुसिद्ध शर्मा हे निजाम प्रांतीय [illegible]देशांतील पहिलेच काव्यतिर्थ आहेत. )

## शोचनीय निधन

दारव्हा येथील सुप्रसिद्ध नागरिक, यवतमाळ-जिल्हा-वीरशैव-परिषदेचे स्वागताध्यक्ष श्रीमन्त माधवराव बापुआप्पा खंदाडे यांची सुशील धर्मपत्नी सौ. रेणाबाई सोमवार ता. १९।७।३७ रोजी रात्री ११॥ वाजता शिवैक्य पावल्या. ह्या बरेंच दिवसापासून आजारी होत्या' यवतमाळ जिल्हा-परिषदेच्या वेळीं तर फार अत्यावस्थ होत्या परन्तु परिषदेच्या वेळीं धीर देऊन पडल्या ठिकाणीच सर्व व्यवस्था पाहुण्यामन्डळीची करवून घेतली. मरणसमयीं यांचें वय ४५ वर्षांचें होतें. त्यांचा स्वभाव धर्मभोळा पतिभक्तीपरायण व व्यवहारदक्ष होता. त्यांचे मरणाने खंदाडे घराण्याला फार दुःख झालें आहे त्यांत आम्ही सहभागीं आहो. ईश्वर-मृताचे आत्म्यास शांती देवो.

Reg. No N— 645

# वर्गणीदारांस विनंती

'वीरशैव संजीवनी' ची एक वर्षाची वर्गणी गांवीं व परगांवीं २॥ रुपये ठेवली आहे. वर्गणी मनिऑर्डरीनें आगाऊ आल्यावांचून अंक सुरूं होणार नाहीं. चालू वर्षांत केव्हाहि वर्गणीदार होणारास वर्षाचे २४ अंक बरोबर मिळतील.

उमरावती शहरांत अंक वाटावे लागतात ह्मणून वाटणावळीसह, व परगांवच्या टपालखर्चासह, ह्मणून वर्गणी सालची २॥ रुपये आगाऊ ठेवली आहे.

वर्षाचे २४ अंक पूर्ण होतांच पुढील वर्षाची आगाऊ वर्गणी आली तरच पुढील अंक सुरूं होतील. व्ही. पी. केली जाणार नाही. करितां व्ही. पी. करा असें कोणींहि लिहूं नये.

नमुना-अंक ज्याला पहावयाचा असेल त्याच्याकडून पोष्टाची दोन आण्याची तिकिटें आगाऊ आलीं पाहिजेत. अगर दोन आणे देऊन किरकोळ अंक विकत घेतला पाहिजे.

## —: संग्रहणीय अमुल्य ग्रंथ :—

'वीरशैव संजीवनी'-चे मागील वर्षांत प्रसिद्ध झालेले सर्व अंक आह्मी मुद्दाम उत्कृष्ट बाईंडीगसह पुस्तकरुपाने विक्रीस ठेविले असून बांधणीसह प्रत्येक बुकाची किंमत तीन रुपये ठेवली आहे. पुस्तकांत भरपूर चारशे पृष्टें असून समाज विषयक सर्वांगीण चर्चा, उद्बोधक लेख, आणि वार्षिक चळवळी वगैरे विषयांनी सर्वां सुंदर आणि संग्राहक असा हा ग्रंथ अवश्य संग्रही ठेवा. आणि आपल्या ग्रंथ भांडारांत अमूल्य अशी भर घाला. पुस्तकाची व्ही. पी. केली जाणार नाही मागणीपत्राबरोबर तीन रुपयाची मनिऑर्डर पाठविणे

संपादक, 'वीरशैव संजीवनी' उमरावती.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगावकर ह्यांनीं 'अरुण' छापखान्यांत छापून उमरावती नमुना पेठ येथील 'वीरशैव संजीवनी' कचेरींत प्रसिद्ध केलें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ ऑगस्ट १९३७ ( अंक १६ वा

## अनुक्रमणिका

पृष्ठांक



वार्षिक वर्गणी २।। रु. किरकोळ अंकास २ आणे.



कै॰ लक्ष्मीबाई बामणगांवकर

कै॰ लक्ष्मीबाई बामणगांवकर,
यांच्या

# वार्षिक श्राद्ध पुण्यतिथी

निमित्त

तारीख १४-८-३७ शनिवार रोजीं लक्ष्मीबाईच्या समाधीवर रुद्राभिषेक, महापुजा समारंभ सकाळी १० वाजतां होऊन जंगमार्चन व अन्नदान वगैरे कार्यक्रम यथासांग पार पडला.

त सें च :—

वरील प्रसंगा निमित्त श्री. नानासाहेब बामणगांवकरांच्या पुनर्विवाहित धर्मपत्नी सौ॰ इंदिराबाई यांनीं सुवासिनींना हळदीकुंकू व वाने देऊन आपल्या मृत भगिनीच्या स्मरणाची सादर प्रेमसेवा केली.



सौ॰ इंदिराबाई बामणगांवकर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

[ब्राह्मणा]: क्षत्रिया वैश्या:शूद्रायेचान्य जातय: ।
[लिंगधारण]मात्रेण शिवा एव न संशय: ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:
स्त्रिय:वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

[नवें] वर्ष २ रें ) मिति श्रावण शु० ९ शके १८५९ ( अंक १६ वा.

# आजच्या मठसंस्थांचा उपयोग

आजच्या वीरशैवसमाजांत मठसंस्थांचा प्रचार फार झाला आहे. तो केव्हा व कसा झाला ह्या-विषयीं खोल चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. परन्तु सर्वसंगपरि[त्यागी] असे शिवयोगी निर्माण होऊं लागले, [त्यां]च्या कृपाप्रसादावर ज्या समर्थ गृहस्था-[ंची] श्रद्धा बसली त्यांनी शिवयोग्यांच्या [नांवा]वी भूमि अर्पण केली, तेथे पूजा-अर्चा [करावी] आणि अनाथांना अन्नदान व ज्ञान [द्यावें] म्हणून ज्या सोयी करून दिल्या, त्या-[मुळें] मठसंस्थांचा विकास झाला. फार मोठ्या उत्पन्नाचा व परंपरेचा हक्क उपभोगू पाहणारे नामांकित मठ गेल्या सातशें ते पांचशे वर्षांतच वाढीला लागले व त्यांपैकीं बऱ्याच मठांना स्थायिकत्व प्राप्त झालें.

गेल्या शंभर वर्षांत मठसंस्थांना मात्र हळूं हळूं उतरती कळा येऊं लागली. तत्पूर्वी मात्र त्यांची सारखी वाढ होतच होती. ज्या भागांत वीरशैवांची वस्ती आहे त्या भागांत मठांचा प्रसार अधिक असला तर नवलच नाही; परन्तु जेथे पांच-पन्नास वीरशैवांची घरें आहेत तेथ-पर्यंत ह्या मठसंस्थांची वाढ होऊं शकली. मग हे वीरशैव कोणत्याहि भागांत कोठपर्यं-तहि जावोत व कसेहि राहोत; परंतु जवळपास मठसंस्था अस्तित्वांत आणून संघटितपणें रहात

एवढें मात्र खरें, व त्यामुळेच मठसंस्थांचा प्रसार इतर कोणाहि पंथीयापेक्षा वीरशैवधर्मीयांत अधिक प्रमाणांत होऊं शकला. ज्या वेळीं हा प्रसार होऊं लागला त्या वेळीं श्रद्धा होती व त्या श्रद्धेवर उभारलेली एक संघटना बळकट होती एवढें मात्र खरें.

भक्त व माहेश्वर हे परस्परांना पूरक असे दोन वर्ग. त्यांत स्त्रियांसह त्रैवर्णिक सर्व अधिक, चार आश्रमधर्मांचे व चार पुरुषार्थांचे त्यांनी अष्टावरण, पंचाचार, व षट्स्थळ ह्यावर उभारणा केली. आणि ह्याद्वारे अशी बळकट संघटना अस्तित्वांत आणली कीं, जेथे भक्त आहे तेथें माहेश्वर आहे व जेथे माहेश्वर आहे तेथें भक्त आहे असें मनोहर व देदिप्यवान् दृश्य सर्वत्र दिसूं लागलें. ह्या दृश्याचें एकेकाळचें प्रतीक ह्मणूनच मठसंस्थांची वाढ दिसते.

अष्टावरणाची चिन्हें व तदनुरूप श्रद्धेवर उभारलेली क्रिया समाजांत एकेकाळीं अस्तित्वांत होती ह्मणूनच हे दिसत होते त्यामुळेच समाजाच्या एकंदर सुखदुःखाचा विचार मठसंस्थांत होत असे, विवाह जुळविणें, विवाह होणें, अनाथत्व दूर करणें, एकमेकांची ओळख होणे, एकमेकांच्या अडचणी एकमेकांना कळणें व त्या दूर करण्याचा प्रयत्न करणें, हीं कार्यें मठसंस्थांच्या मार्फत एकेकाळीं चालत असत. त्यामुळे लिंगधाऱ्यामध्ये संघटना अस्तित्वांत होती. मठाधीशासंबंधाने आदर; श्रीमन्त व सुखवस्तु लोक मठाधीशावर श्रद्धा ठेवणारे व त्यांच्याच आश्रयानें इतरांची वाढ होणें व इतरांच्या मदतीला धावणें ही क्रिया सतत सुरू होती. त्यामुळे पतितोद्धार व एकमेकास सहाय्य करुं आणि अवघे लिंगधारी ह्मणून सुपंथ धरूं अशी घोषणा आमच्या जुन्या संघटनेतून दिसत असे.

अर्थात् ही संघटना अध्यात्मवादावर उभारली होती. शरीर जगण्यापुरतें अन्न मिळविण्याचा उद्योग झाला, ऊन व पाऊस ह्यापासून निवारण होण्याकरितां संरक्षित स्थान लाभलें, संततीच्या वाढीकरितां योग्य विवाहसंस्था रूढ होत असली ह्मणजें उरलेला वेळ आध्यात्म-विचारांत घालवून त्या द्वारें सामाजिक व व्यावहारिक संघटना होत असे. ह्मणूनच गुरु-दर्शनार्थ मठांत शिष्यवर्ग एकत्र होत असे, ज्ञान ऐकत असे, तेथील धार्मिक विधीला मदत करीत असे, अनाथ स्त्री पुरुष व पांथस्थ मठाचा आश्रय करुन रहात व तेथूनच ते पुन्हा उद्योग करीत व उद्योगास लागत. लोकसंख्येच्या वाढीबरोबर मठसंस्थांची वाढ झाली. प्रत्येक शाखेचे मठ वाढले व शिष्यहि वाढले. पोटजाती वाढू लागल्या ! पण त्यांचेहि मठ मठाधिकारी अस्तित्वांत येऊं लागले. अशा प्रकारें एक काळच्या आध्यात्मिक संघटनेचें मूळ असलेल्या मठसंस्थांची आवश्यकता समाजाच वाटली आणि समाजसंघटनेची आवश्यक शक्ति ह्मणून आमच्या समाजसंघटनेचें ह्मणूनच केंद्र-मठसंस्थांची वाढ झाली.

परंतु उत्पन्न होणाऱ्या कोणत्याहि गोष्टीला कालाचें ठरीव बंधन असतें. मग ती गोष्ट मानवी दृष्टीने चांगली असो वा वाईट असो. देहाला, मग तो देह अवतारी पुरुषाचा असो वा महान् विभूतीचा असो, कालाचें बंधन असतें. तसें नसतें तर सर्वच थोर पुरुष आपल्या देहासकट आजहि डोळ्यांना दिसले असते. पण दिसत नाहीत. कारण काय ? पुढे ज्याचें त्यानें करून घ्यावें व परंपरा चालवावी ही शिकवण आंगीं मुरावी ह्मणून, जेथे ही शिकवण आंगीं मुरत नाही तेथे ऱ्हासाला सुरवात होते. गेल्या शंभर वर्षापासून ऱ्हासाला सुरवात झाली आहे. भक्त-माहेश्वरसंबंध चांगले

...हि नाहीत. मठसंस्थाविषयी आदर उरला ...ठ. मठाधिकारी कुचेष्टेला पात्र झाले. मठ- ...ला उजाड पडूं लागल्या: आहेत त्यांचीं विलास. ...तें बनलीं व मुख्य कार्य नाहीसें झालें.

...काळाबरोबर जीवन-कलहाची साधनें बदलत ...ली. काळाबरोबर ज्ञानाचें स्वरूप व साधनहि ...लतें. ह्याची जाणीव ना भक्तांना ना ...कारांना. त्यामुळे जुनें सर्वच विस्कळित ...तें. बाप-लेकराची जशी ताटातूट व्हावी ...से भक्त-माहेश्वरसंबंध विस्कळीत झाले. ...मठ असो वा पंचाचार्य असो, तो बडु पाल- ...ता पिरवो वा पायधल चालो, त्यांची ...मुकता दुरावत चालली. ह्मणून पूर्वीइतका ...मठाविषयीं आदर राहिला नाही. ज्यांना ...मठ आहे व ज्याच्याविषयीं आदर आहे ते ...तें जुन्या जीवनकलहाच्या साधनावर समृद्ध ...मलेला परंपरेंतील आहेत. तेच स्वत:ला न ...समजणारे अतएव सनातनी समजतात. खरा ...सनातनी वर्ग हाच. पण ह्या वर्गाची प्रत्येक ...जी खाली खालीं चालली आहे हें त्यांना ...कळत नाही. जे तसे आज दिसत नाहीत ते ...हि ऱ्हास पावणारेच आहेत ह्याची त्यांना ...कल्पना नाही. असो.

...वरची सर्व कारणपरंपरा लक्षांत घेऊन ...संस्था पुन्हा पूर्ववत् पूर्वचिन्हांनी युक्त ...या समाजघटनेच्या केंद्रस्थानीं आणता येतील ...त्यांची उपयुक्तता वाढविता येईलच असें ...ही. आर्यसमाजाच्या गुरुकुलपरंपरेच्या ...किंबहुना आज उतरती कळा लागत चालली, ...आज त्या गुरुकुलाचें अनुकरण ...कसें साधेल? मग काय मठसंस्था मठ ...आणि व समाज असाच ऱ्हासाला जाऊं द्यावा? ...हि नाही. परन्तु कालाचा विचार करून ...मठांची उपयुक्तता पटवून द्यावयास ...काय? वीरशैव व्यापारानिमित्तानें प्रवास करीत. त्यांच्या प्रवासस्थितींतील उतान्याची जीं स्थानें तींच मठसंस्था ह्मणून पुढे अस्तित्वांत आलीं. सगळ्याच मठसंस्था योग्य शिवयोग्याच्या पुण्याईच्या फळानें अस्तित्वांत आल्या नाहीत. उतारूंनीं उतरावें, अनाथांनी जगावें, सामाजिक घडामोडीच्या पंचायती व्हाव्यात, नित्य जाण्यायेण्याने सर्वांचा परिचय घडावा, असे प्रकार मठांतून घडत असत.

आज समाजावरील आपत्ति दूर करण्याकरितां अनाथबालिकाश्रम निघतात. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय व्हावी ह्मणून वसतीगृहें निघतात. वधू कोठे आहे व वर कोठें आहे ह्यांच्या शोधार्थ वा परीक्षणार्थ निरनिराळीं साधनें अस्तित्वांत येत आहेत. जेथें आज मठ आहे त्या मठामागे पंचवीस वीरशैवांची तरी घरें आहेत. आणि त्या घरावर कसा तरी एक मठ जगतोच. ह्या पंचवीस घरांच्या दानवीवर पांच विद्यार्थी व पाच अनाथ जेवूं घालावयाचे व त्यांच्या उतरण्याची सोय व्हावी एवढें जरी प्रत्येक मठानें केलें तर आज शक्य नाही काय? तितकें धान्य तो मिळवूं शकतो, आणि अनाथाकडूनच तेवढ्यांना तो जेवूं घालूं शकतो व स्वत:हि आनंदानें जेवूं शकतो. परंतु मठाधिकाऱ्यांना विलासी शिष्यांच्या चैनीच्या जीवनकलहाचें वेड लागल्यामुळे त्यांचीच परोपकारबुद्धि नष्ट झाली आहे. त्यामुळें त्याचेच त्याला होत नाही मग इतराकडे तो कसा पाहील.

घरबारी ह्मणून जें मठ आहेत त्यांनी जर अशा परोपकारबुद्धीनें मठाचा उपयोग केला तर त्यालाहि जगतां येईल व दुसऱ्यासहि तो जगवूं शकेल. परन्तु ध्येय पाहिजे. तें ध्येयच सुटलें. जेवूं घालावयाचे व जेवावयाचें ह्याचवर बहुतेक मठसंस्था वाढल्या असता त्यांतील

तेंवढेच दुरावलें. दीक्षाविधी मठांतच व्हावा, लग्नें मठांतच व्हावीं, भोजनें मठांतच व्हावीं. त्याचा ठराव मोबदला मात्र घ्यावा. आणि यजमानाचे श्रम वाचवून त्याचे कार्य ठराव पद्धतीने, ठरींव वेळेत व ठरीव संख्येंत करून देण्याचा उपक्रम सदासर्वदा व्हावा. हें जर आजहि नव्या पद्धतीने मठांत कार्य सुरू झालें तर मठसंस्थांची उपयुक्तता वाढेल व समाजसंघटनाहि सुरूं होईल.

परंतु हें न. करितां कोणी तीर्थ नको ह्मणतो ह्मणूनच वाद चालतों, आणि त्याकरिता शिक्षणाचा व ज्ञानाचा वैरी बनतो. नव्या काळांत कोणी तीर्थ घेवो वा न घेंवो; पण त्याला वीरशैव ह्मणविण्याकरितां विधी तर करावेच लागणार ना ? ते विधि मठांच्या द्वारे सहजपणें होऊं लागले व त्या योगानें परोपकार होऊन कांहीं लोकांस अन्नदान सुरु असलें व उतरण्याची व्यवस्था होत असली तर मठसंस्था आजहि जीव धरतील. पण त्या दृष्टीनें जर कोणीच विचार करणार नाहीं तर शंभर वर्षानन्तर मठहि दिसावयाचा नाहीं आणि संस्कारहि दिसावयाचे नाहीत. ह्मणून भक्त असा वा माहेश्वर असा, संस्काररुपानें शंभर वर्षांनन्तरहि जिवन्त रहावयाचे असेल तर मठसंस्थांची उपयुक्तता वाढविली पाहिजें. आणि ते गुण आंगीं येतील व हे गुण अंगीं आलेले शिष्य ह्यानन्तर मठसंस्थांना लाभले पाहिजेत. मग ते शिष्य घरबारी असले तरी चालतील. सगळेच मठ घरबाऱ्यांचे झाले तरी हवेत. चित्रकल्लदूर्गांचा विरक्त मठ, आणि पंचाचार्यांचा प्रत्येक सिंहासनाचा मठ असा घरबाऱ्याचा झाला तरी हवा. मठांत योग्य शिवयोग्याची समाधि व पादुका ह्या वंदनीय व्हाव्यात. चालू शिष्य वन्दनीय बनविण्याचा ह्व्यास धरण्याचा उद्योग व करणेंच उत्तम.

---

श्रीमज्जगद्गुरु

# स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

## संदेश १ ला.

संपादक, ' वीरशैव संजीवनी, ' यांसी,—

स्वामी कंदर्पानंद, संस्थान पाक-नगर, यांचे सन्निधीहून शतकोटी शुभाशीर्वाद. त्याहिपेक्षा जास्त आशीर्वाद आमचेकडून तुह्माला द्यावयाचा असता, पण हा तुमचा-आमचा पहिलाच परिचय असल्या कारणानें, अधीक आशिर्वादाचे ओझें सहन करण्याइतकी ताकद तुमच्या अंगीं आहे कीं नाही याची आह्माला शंका आल्या-मुळें तूर्त इत्यलम् ह्मणून पुढे जात आहोंत.

परवांचे आमचे प्रमुख शिष्य आणि संस्था-धिकारी लसूणलिंग शास्त्री, सौभाग्यवती ...बाईसह सपत्नीक आमच्या दर्शनास आले असतांना, आपण संपादित असलेले वीरशैव संजीवनी नावाचें पत्र आमच्या अवलो-कनांत आलें. आह्मी अत्यानंदाने त्या पत्राकडे पाहिलें, नव्हे तें पत्र पाहून आमची दृष्टि फिरली, आणि, बरें झालें कुटलेल्या ...पाच्या पुड्या बांधायला चांगला ...कागद मिळाला असें समजून आह्मी त्यावर झडप घातली. कारण, वीर-शैव नव्हे तर इतरहि कुठलें का असेना, वर्तमानपत्र दिसलें कीं आह्मी आपले त्याचा वरप्रमाणें उपयोग करायला उत्कृष्ट साधन ह्मणून उंदरावर झडप घालायला टपलेल्या मांजराप्रत टपून असायचे. कारण, आह्माला पत्रें वाचण्यांत कांहीच गोडी वाटेना. यावरून आह्माला मुळी मुळाक्षरें वाचतांच येत नव्हतीं असें कुणीं समजूं नये. आमचें अगाध ज्ञानभांडार आणि तपःसामर्थ्य पाहून, कुठलाहि नास्तिक माणूस आमच्या भजनीं लागला. नाही असें सहसा आढळायचें नाही. आमच्या मुखावाटें निघणारा मंत्रोपदेश, आह्मी उच्चारलेले शब्दप्रयोग, आमच्या कंठामधून निघणारा एकादा श्लोक वा संकल्पमंत्राचा अर्थ लाव-ण्याची एकाचीहि माय अजून व्याली नाही. प्राकृत जनांना तर कळायचा नाहीच, पण मोठमोठ्या शास्त्री - पंडितांनाहि आमच्या सुसंस्कृत ( ! ) वाणीचा अर्थ कळायचा नाहीं. न कळू द्या ! न कळू द्या ! यांतच आमच्या गुरुत्वाची खरी गुरुकिल्ली आणि भोळ्या-भाबड्या भक्तांना नादीं लावण्याची बागड बिल्ली आहे. पण हे तुह्मी कुठेहि बोलणार नाही असा आह्माला आत्मज्ञानप्राप्त विश्वास

वाटत असल्यानें सहज ह्मणून हें फक्त आपणा-सच विदीत करीत आहोंत, अस्तु. आमच्या लसुणलिंग शास्त्रींना आमच्या चारित्र्यांतिल मखिनमखवी माहित असल्या कारणानें, त्यांनी आमचा मनोदय जाणून आह्माला नम्रतापूर्वक विनंती केली कीं, स्वामिन् हें संजीवनी पत्र एका उच्च दर्जाच्या संपादकानीं, श्रीयुत--नव्हे श्रीवा आणि या संपादकाचा छत्तिसाचा आकडा अस-ल्यामुळे मी यांच्या मागें उगीच श्रीचे लचांड लावूं इच्छीत नाही, आपले साध्यासुध्या शब्दातच सांगतो, नारायणराव ऊर्फ नानासाहेब वामणगांवकर यांनीं हे वीरशैवकरितां खास पत्र ह्मणून अमरावतीस काढलें आहे.

"काय ! नारायणराव नावांच्या गृहस्थानें हें वीरशैवाकरितां काढलेलें पत्र आहे काय? फेंका! फेंका ! ते जाळा ! फाडून फाडून चिध्या करा त्याच्या ! वीरशैवाकरितां पत्र काढ-ण्याचा त्या नारायणाला काय अधिकार ! आह्मी वीरशैव काय इतक्या कमी दर्जाचे अक्कलशून्य आहोंत असें वाटलें काय त्या ब्राह्मणाला? नारायण या नावावरूनच आमची खात्री झाली कीं, ते ब्राह्मणच आहेत. आह्माला वर्तमानपत्रामधून शिव्या खायच्या किंवा खायच्या असतील तर त्या आमच्या वीरशैवांनीच दिलेल्या आह्मी पचवूं शकतो. इतरांनी व्र काढलेला देखील आह्मा वीरशैवांना खपायचा नाहीं ! भस्माच्या चुटकीसरसे भस्म करुन टाकूं इतरांना आह्मी. उगीच नाही आह्मी पंचाचार्य ! विरक्तांशीं आमचा वितंडवाद कितीहि विकोपाला गेला असला तरी तेहि कांही कमी आहेत असें समजूं नये कुणीं! आडव्या तिडव्या पालख्यांच्या मिरवणुकी काढून समाजेतरांना झटक्यासरसे सरळ मार्गावर आणण्याची धमक आहे त्यांच्याहि तपःसामर्थ्यांत. पण जाऊं दे ! उगीच वाच्यता कशाला ! उचला तें पत्र, माझ्यासमोरून फेंका बाजूला!"

असा आह्मीं एकच गिल्ला चालवलेला पाहून आणि आमचा रुद्रावतार लक्षांत घेऊन कार-भारी थरथरायला लागले, आणि चाचरत बोलूं लागले, महाराज, वामणगांवकर हे ब्राह्मण नव्हत, ते एक माहेश्वरवर्गीय वीरशैव आहेत.

"काय ह्मणता, नारायणराव माहेश्वर आहेत? छट्, शक्य नाहीं ! मुळीच संभवनीय नाही. ते माहेश्वर असते तर त्यांचें नांव नारायण कसें ? काय त्यांना दुसरें तिसरे नांव धारण करता येत नव्हते ? ज्यांनी आपल्या नावापुढें लिंग हें प्रबोधचिन्ह धारण केलें नाहीं त्याला आह्मी माहेश्वरच काय पण वीर-शैवांच्या कोणत्याहि पोटशाखेंपैकी मानायला तयार नाहीं. नारायण, राम, कृष्ण, या नावांचा नुसता उच्चार देखील आह्मी वीरशैवधर्माभिमानी लोकांनी करुं नये. ती विष्णु पूजकांचीं नांवे, शैवांची नव्हत. त्यांतून आह्मी तर काय, नुसते साधे सुधे शैवच नसून वीरशैव आहोत असा रोखठोक जबाब आह्मीं दिला.

" स्वामिन्, आपण ह्मणता तें अक्षरशः खरें आहे. पण जी होऊं नयें ती गोष्ट होऊन गेली. या वऱ्हाड--मध्यप्रांतातील लोकांना मुळीं आपला असावा तितका जाज्ज्वल्य धर्माभिमानच नाही पण तें तूर्त जाऊं द्या! आणि नावनिशीनें या पत्राकडे न पहातां जरा दूरदृष्टीनें आपण जर ही 'संजीवनी' वाचूं लागाल तर नावात जिवंत नांव नसून कृतींत खरें नांव आहे असा शिक्का आपण जर या पत्राला दिला नाहीं तर मी स्वतःचेंच काय पण संपादका--सहसंपादकाचें देखील नांव बदलून देईन ! माझा निर्धारी स्वभाव स्वामींच्या चांगलाच परिचयाचा आहे हें मीं नव्यानें सांगायला नकोच."

असें ह्मणून कारभाऱ्यांनी संजीवनीचें पुस्तक आमच्या चरणारविंदी समर्पण केलें. पण

...ही वर्तमानपत्रालाच काय, पण पुस्त- ...ग्रंथाला, धर्मग्रंथाला अगर पुराणाला ... यावज्जन्म स्पर्श न करण्याचीच जवळ ... आम्हीं प्रतिज्ञा केली होती. कारण ... आयुष्यांत तशी आम्हाला कांहीं गर- ... शी भासली नाहीं. नुसत्या पंचाचार्य- ... र रेवोट्या ओढण्याचें काम आम्ही ... प्रमाणें, भायत्या बिळावरील नागोबाप्रमाणें ... वजावून आमचा दरारा आजवर ... राखला होता. सबब आम्ही आमच्या ... शास्त्र्यांना आज्ञा केली कीं, तुम्हीच ... वाचावा त्यांत कांहीं धार्मिक चर्चा अस- ... । आमची अनुज्ञा शिरसामान्य करून, ... आम्हाला साष्टांग प्रणिपात करून, कार- ... 'संजीवनी' वाचूं लागले. आम्ही जरा नीट ... सिंहासनावर आरूढ झालों. कोथीं- ... बाईकडून, थोडा सुंठीचा आणि आव- ... शोरावळा मागवून घेतला, चांदीचे ... आणि सुवासिक पाण्याचा ... पण जवळ घेतला. ... यापूर्वी आम्हा वीरशैवसमाजाचीच ... काही मुखपत्रें आम्हाला वाचून दाख- ... आमच्या शास्त्र्यांना आजच्याप्रमाणेंच ... आणि जसजसे त्यांचें वाचन ... लागलें तसतसे आम्हाला त्यामधील ... कानावर आदळतांच, मळमळा- ... ओकाऱ्या यायला लागल्या, इत- ... वर पित्तप्रकोप होऊन सर्वांगावर ... यायला लागल्या. आम्ही त्या प्रकोप- ... वटांच्या वटा तोडायला लागलों खाज- ... आमची शंखाकृती वाढलेली नखें, ... कारट्याच्या नखागत झीजून नाहीशी ... सर्वांगाची लाही झाली, आणि आम्ही ... अवतार चांगला पोतेभर गेरु अंगाला ... वसलों, शेर दोनशेर मोरावळा, ... वगैरेचा खुराक आमच्या उदरांत ... झाला. तरी व्हावा तसा कांही आराम वाटला नाही. एकाएकीं असें कां झालें म्हणून आमचे पट्टशिष्य लसूणलिंग तर घाबरून जाऊन त्यांच्या तोंडचें पाणी पळालें, आणि त्यांच्या हातांतील तीं वर्तमानपत्रें जेव्हां गळून पडलीं, तेव्हां कुठे आमची प्रकृती नीट पूर्ववत् ताळ्यावर आली.

" महाराज आतां बरें वाटतें ना आपल्याला, असा सनम्रपणें आमच्या कोथींबीर बाईंनी आमच्या अंगावरून आपला नाजूक हात फिर- वीत जेव्हां आम्हाला विचारलें तेव्हा, होय आतां बरें आहे, पण लक्षांत ठेवा, पुन्हा हीं असली वर्तमानपत्रें आमच्या समोर मुळीच आणित जाऊं नका ! हा सारा प्रताप या वर्तमानपत्रांचा ! असा आम्हीं इषारा दिला. तेव्हांपासून कुणीहि कुठलेहि वर्तमानपत्र आमच्या नजरेस न पडूं देण्याची खबरदारी घेत असे. पण आज आमच्या कारभाऱ्यास काय वाटलें कुणाला ठाऊक, संजीवनीचा अंक घेऊन ते आमच्या समोर हजर झाले. आम्हाला पूर्वानुभव वरप्रमाणें असल्यामुळें, आणि कार- भाऱ्यांनी हें एक चांगलें पत्र आहे, आजच प्रथम आपल्या चरणाजवळ येंत आहे, यात शिव्याराळ शिमगा, अगर घाण इतरांसारखी नाही, या पत्राचे संपादक महाशय या धंद्यातील आज दोन तपाचे अनुभवी असे विद्वान् आहेत, ते देशभक्त आहेत, तसेच समाजहितचिंतकहि आहेत. राष्ट्रीय वृत्तीचे असे दुसरेंहि एक उदय नावाचें पत्र ते काढीत असतात, अशी बरीच प्रशंसा आमच्या कारभाऱ्याच्या तोंडून आम्हीं ऐकल्यामुळे आम्ही त्यांना तें वाचण्यास परवा- नगी दिली होती आणि कदाचित् तसा कांहीं प्रसंग आल्यास पूर्वोल्लेखित औषधावगुंठित साधनांनी सज्ज होऊनच आम्ही बसलों होतो. पण कर्मधर्मसंयोगाने तसा कांहींच प्रसंग न

उद्भवतां अथपासून इतिपर्यंतचे संजीवनी पत्राचें वाचन विविक्तपणें पार पडलें, आणि आम्ही कयास बांधला कीं या पत्राचे संपादक आचार्यवर्गापैकी तर नाहींतच नाही पण भक्तवर्गांपैकीं देखील नाहींत. कारण ते जर आचार्यवर्गाचे असते तर भक्तवर्गावर कुरघोडी करणारी कुर्रेबाज भाषाशैली त्यांच्या पत्रांतून भरमसाट भरलेली आढळली असती; सनातन धर्मतत्त्वांचा सोवळा ओवळा गोंधळ त्यांच्या पत्रांत खच्चून भरला असता; ते जर भक्तवर्गाभिमानी अगर कोणत्याहि भक्तकुळांत जन्मले असते तर गुरुवर्गीय आचार्यांची अगर जंगमाची त्यांनी झाडून चंपी उडवली असती. त्यांची पाद्यपूजा निरनिराळ्या धर्तीने बोलाफुलांनी पूर्ण केली असती. त्यांच्या पादोदकावर पादत्राणांतील चिंधोडें उडवले असते, सर्रास रोटी बेटीच्या व्यवहाराचें समर्थन करतांना नुसते तोंडातोंडी का होईना सर्वांना महार-भंगीचांभाराच्या पंक्तीला बसविण्यांत मुळीच पंक्तीप्रपंच केला नसता. पण असे कांहींच या पत्रामधून दिसले नाही, अतएव आम्ही अगदीच आश्चर्यानें दिग्मूढ बनलो, आणि या संपादकांनीं जवळ जवळ दोन तपें संपादकीय व्यवसायांत घालवूनहि यांना जेव्हां भांडणें लावण्याची अजून अक्कल आली नाहीं, तेव्हां असल्या मठ्ठड डोक्याच्या संपादकाला आपण तरी कांहीं शुभाशीर्वादवर संदेश पाठवून आपल्या प्रसादानें तरी हे संपादक कांही भाग्यलावे होतात कीं काय हें पहाण्याच्या उद्देशानेंच हा शुभाशीर्वादपर संदेश पाठविला आहे. शुभं भवतु इति शुभाशिर्वाद.

( स्वामीजींनी पाठविलेल्या संदेशाबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहों. यापुढेहि असेंच पादप्रसाद पाठविण्याचें स्वामींनी आश्वासन दिलें आहे याबद्दल आम्हास अत्यानंद होत आहे. )

# लेखक व लेखनकला

लेखकः—
चन्द्रप्पा रेवणसिद्धप्पा
मुंजे वकील,
सोलापूर.

लेखनकला ही एक समाजजागृतीची जिवंत कला आहे. गाढ निद्रेंत घोरत पडलेल्या समाजाच्या कानांत जोराचा आघात करून त्यास दक्ष बनविणारी ती एक प्रबल शक्ति आहे.

स्वरूप देहाध्यास भूलून भडकलेल्या व ... वळी पडून स्वैराचारी बनलेल्या तरुणांच्या उच्छृंखल मनोवृत्तीस आळा घालून ... सन्मार्गास लावणारी ती एक अजब ... आहे. वृद्ध मनुष्याचे त्याच्या जीर्ण व ... शरीरयष्टीप्रमाणें क्षीणत्वास पावलेले कुबुद्धि ... जाळून टाकणारी ती एक प्रबल ज्वाला आहे. पर्वाचें तारू समुद्रांत तुफान सोडून खडकावर आपटून त्यांचे छिन्नविच्छिन्न तुकडे ... करण व आपल्याबरोबर असलेल्या ... जीव धोक्यांत घालणाऱ्या अज्ञ नावाड्यास सुमार्ग दाखविणारी ती एक जागती ... आहे. समाज व राष्ट्र सुसंघटित करून ... त्यामध्ये जिवंतपणा आणणारी ती एक ... आहे. अनेक तऱ्हेचें सृष्टींतील रम्य ..., मानवी स्वभाववैचित्र्य, आयुष्यांतील ... प्रसंग, प्रपंचातील विविध अनुभवांचे चित्र रेखाटणारी ती एक विद्या आहे. ... ऐश्वर्याशी समरस होण्याची व मनुष्यास ... साधनाकडे प्रवृत्त करण्याची ती एक ... प्रभा आहे. परमेश्वराच्या गूढ प्रमेयांत प्रवेश करून खुद्द परमेश्वरस्वरूपाचें रहस्य ... ज्ञान देणारें लेखनकला हें एक ... साधन आहे.

लेखक हा लेखनकलेमध्यें त्या त्या विषयांची ... प्रतिभासंपन्न पाहिजे तरच त्याचे लेखन प्रभावी व परिणामकारक ठरेल. लेखकाचे दोन प्रकार करितां येतील. एक स्वाभाविक स्फूर्ति व कला असलेला, व दुसरा अभ्यासाने व संवयीनें लेखक बनलेला. या दोहोंपैकीं पहिल्या लेखकाचें लिखाण सुंदर, प्रतिभासंपन्न असते, व परिणामकारक ठरतें. दुसऱ्या प्रकारचा लेखक अभ्यासानें व व्यासंगाने आपले मुद्दे जगापुढे मांडू शकतो. परंतु त्यांत स्वाभाविक अशी लेखनकलेची लकब नसल्यामुळे ती तितकी परिणामकारक ठरत नाही.

लेखनकलेस स्वाभाविक स्फूर्ति तर पाहिजेच परन्तु सृष्टींतील भिन्न भिन्न वस्तूंशीं व स्वभावाशीं तादात्म्य होण्याची कला लेखकांमध्यें पाहिजे. शिवाय लेखक हा ज्या भाषेमध्यें आपले विचार प्रदर्शित करितो त्या भाषेचें ज्ञान त्यास पूर्णपणें अवगत पाहिजे. योग्य काळीं, योग्य स्थळीं, जी जी शब्दरचना पाहिजे ती ती शब्दरचना करण्याचें कौशल्य लेखकाचें आंगीं पाहिजे व आपले जे विचार असतील ते सुरस भाषेंत सुसंगत रीत्या व्यक्त करण्याची लेखकाचे आंगीं कुवत पाहिजे. ज्या ज्या विषयांवर लेख लिहावयाचा त्या त्या विषयाचें मनन करून व ग्रंथाधारें त्याचें ज्ञान संपादन करून आपले विचार सप्रमाण कसे मांडावेत याची अगोदर आपल्या मनाशीं नीट छाननी करून, मग ते लोकांसमोर उत्तम भाषासरणींत मुद्देसूद मांडावेत. आपल्या लेखांतील मुद्याचा साधक-बाधक विचार करून आपल्या लेखांमध्ये त्याचा नीट ऊहापोह करावा व ज्या

विषयासंबंधीं आपण लिहीत आहोंत त्या विषयास अनुकूल असा रसपरिपोष व कोटिक्रम करावा. आपल्या लेखाच्या समर्थनार्थ ग्रंथाचे आधार असल्यास ते द्यावेत. तर्कशुद्ध, पायाशुद्ध व भाषाशुद्ध लेखनशैलीच कांहीं तरी ओजस्वी व प्रभावशाली ठरेल.

कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, लो० टिळक, शिवरामपंत परांजपे, अच्युत बळवंत कोल्हटकर, या लेखकांच्या महाराष्ट्र-भाषेंतील लेखांनीं समाजामध्ये नूतन विचार-क्रांति घडवून आणिली व राष्ट्रामध्ये जागृति करून एक प्रकारचें नवचैतन्य उत्पन्न केलें हा त्यांच्या प्रभावी लेखणीचाच परिणाम आहे. कै. अण्णासाहेब किर्लोस्कर, देवल, गडकरी, आणि श्री. खाडीलकर यांच्या नाटकांनींहीं नाटयक्षेत्राच्या वाङ्मयांत बरीच भर पडली आहे. कै. हरि नारायण आपटे, प्रो. फडके आणि श्री. हडप यांच्या कादंब-यांनींही नवे नवे विचार, निरनिराळे प्रसंग व व्यक्तिस्वभाव यांचें वर्णन करून जगाचें चित्र सर्वांसमोर परिणामकारक भाषेंत ठेविलें आहे. त्याप्रमाणेंच श्री. खांडेकर वगैरे लघुलेखकांनींहि आपल्या लघुकथालेखनकौशल्यानें समाजापुढें अनेक हृदयंगम दृश्यें दाखवून समाजास वळण लावण्याचें कामीं बरीच मदत केली आहे. प्रो. अत्रे यांची विनोदी नाटकें व लघुकथा आणि इतर वाङ्मय आणि कै. गडकऱ्यांचें 'रिकामपणची कामगिरी' वगैरे हास्यरसपरिप्लुत मार्मिक कोटया व टीका यांनीं भरलेले वाङ्मय यानें समाजांतील दरसंशोधन वगैरे प्रसंगांचें यथोचित वर्णन करून मनुष्यहृदयाचा मासलेवाईक नमुना जगापुढें ठेविला आहे.

ह्या सर्व गोष्टी वीरशैवेतर महाराष्ट्रीय लेखकांच्या झाल्या; परंतु वीरशैवांमध्यें महाराष्ट्रांत आजपर्यंत असे कसलेले लेखक झाले नाहीत ह्मणून श्री. गुरुलिंगप्पा आंधळकर मुंबई यांनीं 'आजकालचे महाराष्ट्रीय वीरशैव लेखक' या विषयावर 'सुदर्शन'-मध्ये ता. १९-७-३७ रोजीं एक लेख प्रसिद्ध केला आहे. सदर लेखांत श्री. आंधळकर यांनीं वीरशैवांचीं हल्लीं तीन वर्तमानपत्रें आहेत, त्यांतून बऱ्याच लेखकांचें लिखाण प्रसिद्ध होतें, परंतु महाराष्ट्रीय वीरशैवांमध्यें उत्तम लेखकांची बरीच वाण आहे असें ह्मटलें आहे. गोष्ट खरी आहे. सात-आठ वर्षांपूर्वीं वीरशैवांचीं वर्तमानपत्रेंच मुळीं नव्हतीं. त्यामुळें महाराष्ट्रीय वीरशैवांच्या लेखनाला आपल्या लेखप्रसिद्धीस जर स्थानच मिळत नव्हतें तर त्यांनीं तरी काय करावें? हल्लीं वीरशैवांमध्यें मराठी भाषेत जीं तीन वर्तमानपत्रें प्रसिद्ध होतात त्यांतून लेख लिहिण्याबद्दल कांहीं महाराष्ट्रीय वीरशैव लेखकांचा कल झाला आहे ही मोठया आनंदाची गोष्ट असली तरी वीरशैवांतील सुशिक्षितवर्गाचें लक्ष या गोष्टीकडे जसें जावयास पाहिजे तसें जात नाहीं ही मोठया दुःखाची गोष्ट आहे. हल्लीं जीं तीन वर्तमानपत्रें प्रसिद्ध होतात त्यांतून धार्मिक, सामाजिक, राजकीय, औद्योगिक, शेती, या विषयांवर माहितीपूर्ण असे लेख प्रसिद्ध होत नाहीत. ते प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत. त्या त्या विशिष्ट विषयाचें पूर्ण ज्ञान प्राप्त करून घेण्याकडे वीरशैवांतील सुशिक्षितांनीं आपलें लक्ष वळविलें पाहिजे व त्या त्या विषयावर माहितीपूर्ण असे लेख प्रसिद्ध केले पाहिजेत. वीरशैवांच्या धार्मिक व आर्थिक उन्नतीकरितां त्यांचेमध्यें जागृति घडवून आणणारे लेखहि प्रसिद्ध करण्याकडे महाराष्ट्रांतील वीरशैव लेखकांनीं लक्ष्य घातलें पाहिजे व वीरशैवधर्म कायम टिकवून सर्वांची आर्थिक उन्नति कशी घडवून आणतां येईल एतद्विषयक लेख लिहिण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत.

श्री. आंधळकर यांच्या ह्मणण्याप्रमाणें वरील तिन्हीं वृत्तपत्रांतून कांहीं बरें-वाईट लिखाण प्रसिद्ध होते ही गोष्ट खरी आहे. अशा लेखकांचा उपसर्ग आमच्या समाजांत बराच जाणवतो ह्मणून अशा लेखकांची हजरी वर्तमानपत्रांतून घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असे लेखक आपण सव्यसाची लेखक आहोंत,

...समाजामध्ये श्रेष्ठ स्थान आहे, अशा गर्वभाराने ...होऊन समाजावर हवी तशी लेखणी ...पाहतात हें श्री. आंघळकर यांचें ह्मणणें ...आहे. वरील सत्य हें वर्तमानपत्रांतील लेख- ...सें लागू आहे तसेंच तें त्याच्या संपाद- ...लागू आहे. वरील कांहीं संपादक— ...हेहि निष्कारण असत्य प्रतिपादन करून ...त्या तत्वांचा प्रचार करून इतर ...वर हवी तशी लेखणी चालवितात तेव्हां ...प्रतिकार इतर वर्तमानपत्रांतून होणें हें ...वच होतें. कोणाहि ...प्रामाणिक बुद्धीनें ...विचार प्रगट करावे व ज्यास ते विचार ...नाहीत त्याने ते विचार युक्तिवादानें ...खोडावे व आपल्या ह्मणण्याची सत्यता ...द्यावी. परंतु त्यामध्यें परस्परद्वेषबुद्धि, ..., हीं दिसूं नयेत. लेखकाचे सार्वजनिक ... व वर्तन याचेवर टीका करावी; परंतु ...विशिष्ट वर्तनाची चर्चा लेखामध्ये न ...याची खबरदारी लेखकानें घेतली ... व्यक्तिविशिष्ट वर्तन जेव्हां सामा- ...गोष्टीवर दुष्परिणाम घडवून आणणारें ...स्वार्थी व स्वप्रतिष्ठेचें असतें तेव्हां त्या ...विषयक वर्तनाबद्दलहि कधीं कधीं टीका ...चा प्रसंग उद्भवतो. तथापि त्यांतूनहि ...तरी चांगल्या व सत्य गोष्टींचें प्रतिपा- ...दन व्हावें लागतें. एखादा लेखक समाजावर ...शी लेखणी चालवितो व आपण श्रेष्ठ ...गर्वभाराने मंडित होतो तेव्हां त्याच्या ...ला आळा घालण्याकरितां व त्याचा गर्व ...करण्याकरिता प्रतिपक्षीयांनी उत्तर ...पुढे सरसावणें हें त्याचें कर्तव्यच आहे. ...प्रतिपक्षाचें असत्य प्रतिपादन हिकेनासे ...झणजे पुष्कळदा स्वस्थ बसण्याचा प्रसंग ...लेखक काय लिहितो याचें मन जाण- ...वाचकवर्गांहि तसाच चाणाक्ष व मर्मज्ञ ...आणि त्यास प्रत्युत्तर देणारा लेखक ...लेखनकलानिपुण पाहिजे. परंतु त्याच्या ...सत्यांश असला तरच त्याचें लेखन- ...कांही तरी कार्यभाग घडवून आणील-मग हें धार्मिक असो, सामाजिक असो, अगर इतर कोणतेंहि असो.

सत्याचा व अनुभवाचा आधार असलेलें स्फूर्तिदायक लेखन हें एक लेखकाच्या हातांतील तीक्ष्ण शस्त्र आहे. त्या शस्त्राच्या तीक्ष्ण धारे-पुढें असत्य व अननुभवी तत्वें व त्यांचें प्रति-पादन करणारे लेख टिकाव धरीत नाहीत. स्वपक्षसमर्थनार्थ कितीहि पांडित्य केलें तरी अखेर तें निष्प्रभावीच ठरतें.

श्री. आंघळकर यांनी आपल्या लेखांत कांही महाराष्ट्रीय वीरशैव लेखकांचीं नांवें देऊन वर्गवारी केली आहे, व त्यांचे तीन वर्ग पाडले आहेत. कोणत्या वर्गांत कोणता लेखक येतो त्यांचीं नांवेंहि त्यांनीं दिलीं आहेत. ही वर्गवारी बरोबर अगर चुकीची आहे हें ठरविण्याइतकी कुशाग्रबुद्धि मजमध्यें नसल्यामुळे मी त्याब-द्दल कांहीच लिहूं शकत नाही. श्री. आंघ-ळकरापेक्षां जास्त कुशाग्रबुद्धीचे लोक कांही वेग-ळींच वर्गवारी करतील. लेखकांच्या लेखनकलेचें मर्म जाणणारा हा निःपक्षपाती, सुज्ञ व रसिक असावा लागतो. आपल्या विचाराशीं लेखकाचे जुळते नसले ह्मणजे आपण त्यास खालच्या कोटींत ढकलूं व आपल्या विचा-रांशीं ज्यांच्या लिखाणांतील विचार जुळतात त्यास आपण अगदीं वरच्या कोटींत ढकलूं हा बुद्धिभेदाचा परिणाम आहे. एकंदरींत कसें का असेना, महाराष्ट्रीय वीरशैव लेख लिहूं लागले ! त्यांत कांहीं अष्टपैलू लेखक असतील, व कांहीं जोडपैलू असतील; पण आपणांस लेखक आहेत याची जाणीव तरी वीरशैव वाचकांस होऊं लागली आहे हें एक वीरशैवसमाजाचें भाग्य व सुचिन्हच आहे. महाराष्ट्रीय वीरशैवांत लेख लिहिण्याची स्फूर्ति उत्पन्न होऊन लेखनकलेमध्यें ते निष्णात होवोत व असाच उत्तरोत्तर महाराष्ट्रीय वीरशैव लेखकवर्ग वाढत जाऊन त्याचे हातून जनसेवा घडो व मराठी वाङ्मयांत वीरशैव हें उच्च स्थान पटकावोत अशी शुभेच्छा प्रदर्शित करून हा लेख पुरा करतों.

---

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील—

## मौजेची प्रश्नोत्तरें:—

**१ द. श. ना. इंदूर :**

श्री. बाबुराव चौधरी यांनी संजीवनीचा संबंध सोडल्यामुळें त्यांच्या मित्रपरिवाराला अतिशय वाईट वाटतें. पण हितशत्रूंना ?

[ स्वतःवरूनच ओळखा म्हणजे झालें! ]

**२ र. पुं. गा. पुणेः—**

सोलापूर येथील मुंबें वकीलांनी मुलाच्या लग्नाप्रीत्यर्थ अनेक संस्थांना देणग्या देण्याचें स्वारस्य काय ?

( नामाचा महिमा ! दुसरें काय ? )

**३ ग. ज्ञा. र. उदगीर:—**

गुरुवर्गाची एक गुप्तसभा भरणार आहे असें 'सुदर्शन'-मधून वाचण्यांत आलें. या सभेच्या मुळाशीं कोणता गुप्त कट असावा अशी आपली कल्पना आहे ? ( गुरुवर्गाच्या गुप्त गुहागारापर्यंत पोंचण्याइतके लांब कान करा म्हणजें ऐन वेळेस दुगाण्या झाडून ...... गोंधळ माजवतां येईल.)

**४ कुमारी स. नागपूर.**

नवमतवाद्यांच्या सहवासोत्तर विवाहपद्धतीचा अवलंब करण्यांत शीलसंरक्षण होईल अशी आपली कल्पना आहे काय?

( स्वानुभवानेंच याचें समाधानकारक उत्तर आपणास मिळूं शकेल ! )

**५ चं गु. जं. मलकापूर.:—**

मी एक होतकरु लेखक आहे. तेव्हां आपण आपल्या 'संजीवनी' पत्रामधून माझे लेख प्रसिद्ध करीत जाल अशी आशा आहे. आणि प्रसिद्ध लेखांचे सर्व अंक माझेकडे विनामूल्य पाठविण्यास आपण चुकणार नाही अशी माझी खात्री आहे.

(तूर्त कोरड्या आश्वासनीय फुकट्या वाचकांच्या यादींत आपलें नांव दाखल करून घेण्याबद्दल म्यानेजरला हुकूम दिला असून, लेखाच्या योग्यतेनुरूप त्याला स्थळ मिळेलच ! )

**६ म. ह. कि. मुंबई.:—**

आह्मी वरचेवर आपलेकडे लेख पाठवितो, परन्तु आमचा एकहि लेख आपण आपल्या संजीवनीमधून प्रसिद्ध करीत नाही, हें असें कां ?

( संजीवनीला शेण-शिमगा खेळणें बेशरमें वाटतें म्हणून ! )

**७ क. रा. पां. यवतमाळ:—**

आपली संजीवनी निघाली तेव्हांपासून आमचें नांव आपल्या रजिष्टरांत दाखल असतांना, आपण आमचेकडे पांच रुपयांच्या व्ही. पी. नें अंक पाठवला आणि पत्रद्वारे मागील आणि चालू वर्षाची वर्गणी रुपये पांचची व्ही. पी. केल्याचें कळवलें, हें आपलें कृत्य आमच्या इभ्रतीला कमीपणा आणणारें आहे याचा आपणास कसा विसर पडला ?

[ मळमळीत सौभाग्यापेक्षां, ढळढळीत वैधव्य बरें, अशा समजूतीने घडलेली ही घोडचूक ! )

**८ पं. ग. चि. कोल्हापूर:—**

अलीकडे आपल्या संजीवनीमधून स्त्रियांचे लेख मुळींच येत नाहीत याचें कारण काय?

( एकाद्या स्त्रीच्या नावांवर तर स्वतः लेखक म्हणून नांव कमावण्याची आपली ही युक्ति नाहीं ना?)

लघुकथा १३ वी.

# सहभोजनसमारंभ

[ लेखक:— कु० सिताराम होनराव ( जन्मजात-पंचम ) अहमदनगर. ]

एक दिवाणखाना. एका कोपऱ्यांत पोस्याचें तळवट, त्यावर लांबलचक सतरंजी, दोन-तीन भिंतीला टेकलेलें लोड, जवळच पानांचा अस्ताव्यस्त पडलेला [illegible], पलीकडे कोपऱ्यांत पान थुंकण्यासाठीं [illegible] टोपीप्रमाणें " पिकदाणी " पड[illegible], अलिकडें कोपऱ्यांत एक-दोन चपलेचें [illegible], एक ब्राम्हणी फॅशनचा जोडा, खोडा[illegible] लगत पडलेलीं समाजाची तीन वर्तमान[illegible], तेथे जवळच पडलेला सोंगट्याचा पट, [illegible] नानाफडणीसांच्या फॅशनचें दोन एक [illegible], एक गंगाजमूना उपरणें अडकविलेलें ......नुकतांच. शिवपूजा करून उठलेला शिवा[illegible] सदरा अंगांत चढवीत होता.

[ ......पुरेश व सुधा हे बहिणभाऊ शिवा[illegible] समारंभास जाण्याकरिता येतात...... ]

......कायरें शिवानंद, येतोस ना? चल आपण [illegible] जाऊं.......कोटाचे शेंवटचे बटन [illegible] सुरेश घाईनें म्हणाला, ...सहभोजन[illegible] कोणता ? पोटजातीविषयींचा ना ? [illegible] सुरेश मी म्हणतो ह्या पोटजातीमधील [illegible] काय करावयाचे रोटीबेटींव्यवहार [illegible]?...... सदऱ्याचें बटन लावीत शिवानंद म्हणाला,......काय करायचें म्हणजे ? ते आपल्या समाजांत गणले जातात म्हणून. ते लिंगधारी आहेत म्हणून......सुरेश म्हणाला. ......अरे सुरेश ! हे पोटजातींतील लोक अलिकडें आपल्याप्रमाणें वागूं लागले; अगोदर हे पुष्कळसे प्रमाणावर वीरशैवांबाहेर वागत होतें. पूर्वींच्या त्यांच्या वागणूकीमुळें आपण नाही [illegible]याशीं बुवा रोटीबेटीव्यवहार करणार ?......शिवानंद आपल्या खऱ्या भाव-नेनें सुरेशला म्हणाला......शिवानंद, आतां त्याची वागणूक पहा. अगदी वीरशैवधर्मास पाहिजे अशी आहें. हे पहा शिवानंद आज-काल सर्व धर्म आपआपल्या योग्यतेनें समाज-धर्मं वाढवावा म्हणून प्रयत्न करीत आहेत. ह्यामुळे एकमेकांच्या धर्माची पायमल्ली होत चालली आहे. सद्य:स्थितीला पैशाच्या अड-चणीनें कित्येक दुसरा धर्म स्वीकारीत आहेत. .......नाकावरील चष्मा हातात घेत डोळे पुशीत सुरेश म्हणाला. पोटजातींतील लोकांशीं रोटीबेटीव्यवहार केला नाही तर नाहीं कां चालणार ? ............... कपा-ळांवरील आठ्या त्रासिक मुद्रेनें दर्शवीत शिवानं-दांनीं प्रश्न केला ...... पुन्हां तोच प्रश्न ? शिवानंदास सुरेश म्हणाला, पोटजातीमधील लोकांशीं रोटीव्यवहार केल्यावर सर्वंत्र सर्व वीरशैव

लिंगधारी समाज मोठा दिसेल, दुही असलेली दिसणार नाहीं. सर्वत्र कार्यें प्रेमळ भावनेनें बाती बांधव प्रेमानें यंत्राप्रमाणें कट्‌ कट्‌ न करितां सुरळीत चालतील. श्रीशिवशंकराच्या ठिकाणीं हा पंचम, हा शिलवंत, हा बुरुडलिंगायत, हा साळी लिंगायत वगैरे भेदाभेद मुळीच नाहीं. श्री शंकर येथून तेथून एकच आहेत,.........

कोटाच्या डाव्या हाताच्या खिशांतील हात-रुमाल काढून चष्म्याच्या कांचेचीं भिंगें पुशीत सुरेश एका सुविचारानें शिवानंदास ह्मणाला, ......एवढेच कशाला ? श्री बसवेश्वर भग-वानपूर्वी ३–४ शतके दक्षिणेंत चोळ राजा होऊन गेला होता, त्याच्या पदरी झाड-लोट व घोड्याची निगा राखणारा पोल मजूरी करणारा "मादर चन्नय्या" नांवाच्या अस्पृ-श्याच्या घरीं एक दिवस श्री शंकर आंबली प्याले. राजाचे नित्याचे पांची पक्वान्नांचें बोस-मार्चे ताट न स्वीकारतां श्रीशंकरांना अस्पृश्याचीच आंबली कां आवडली ? यावरुन खुद्द श्री. शिवाच्या ठिकाणीं असा जातिभेद मुळीच नाही हें दिसून येतें ...... पाठीवरील वेणीच्या लालरिबनशीं खेळत सुधा उत्तरली. असं कुठं आहे ? शिवाय मूल जन्माला आल्यापासून त्याच्या गळ्यांत हा पंचम, हा शिलवंत, हा साळी लिंगायत, तो गवळी लिंगायत, वगैरे अशी चिठ्ठी अगर खूण श्री शंकरापासून येते काय ? आज पाश्चात्य लोकांच्या सहवासाने हा सुधा-रणेचा काळ असल्यानें जगाला फॅशनेबल राहण्याची उत्सुकता लागते, ह्यामुळे जो तो सुधारक पद्धतीनें वागतो. ह्या कारणानें धर्मा-चरणें कमी कमी होत चालली आहेत. असें असतांना पोकळ अभिमान धरुन आपआपसांत द्वेष, विंडवाद. करण्यांत काय महत्व मिळतें ......... सुरेश लोडाला टेकून पंख्यानें वारा-घेत ह्मणाला ...... पांच सुरेश ? शिवा आपल्या घरीं समजा मनुष्य आजारी भयंकर असला, तर आपण प्रसिद्ध सिव्हिल सर्जनला तांग्यांतून बोलावितो व त्याला त्याच्या बुटा-बुटासह रोगी जेथें असेल तेथे नेतो ना ! ......... रोगी त्याच बाजावळील सोल्यांत असणार ?

डॉक्टर ह्मणेल त्याप्रमाणें औषध, फी, वगैरे देतो. त्या वेळीं आपण विचार करीत नाही कीं, हें देशी औषध आहे कीं विलायती आहे, डॉक्टर हिंदु आहे कीं मुसलमान आहे, कीं ख्रिश्चन–युरोपियन आहे. अशा वेळीं आपण डॉक्टरच्या हाताचे डोस देताच ना ? रोगी आपला नातलग वगैरे असतो ना ? डोस देतांना मग आपला धर्म कोठें गेला ? सर्वच काही आजारी पडल्याशिवाय राहत नाही, व डॉक्टरचें औषध घेतल्याशिवाय राहात नाहीत यांतून जे गळाले असतील असे कट्टे अभिमानी सनातनी केव्हा तरी लग्नकार्यांत एकत्र पंक्तीला भोजनाला बसतातच. असे सनातनी अगदी बोटावर मोजण्याइतके तरी सांपडतील कां? असो. पण शिवानंद, आपल्या पोटजातीमधील बांधवांच्या हाताचें अन्न खाल्ल्यानें आपला धर्म बुडतो काय ? आपण बाटतो काय ? तुमच्या–आमच्या मतें पोटजातींतील लोकांशीं फक्त रोटीव्यवहार करतां येत नाही तर बेटीव्यवहार कसे पार पाडतां येतील? सुधा रुमालानें सहज तोंड पुशीत उत्तरली...... पण मग सुरेश, शिलवंत, साळी लिंगायत, गवळी लिंगायत, वगैरे पोटभेद कशामुळे पडले अस-तील ? ........शिवानंद ह्मणाला ...शिवाय, आज ज्या आपल्याला पोटजाती दिसतात त्या उत्पन्न होण्याचें कारण ह्मणजे आपल्या धर्माची वाढ ज्या महान् पुरुषानें केली तो महान् पुरुष ह्मणजे श्रीभगवान बसवेश्वर ह्यांच्यावेळीं सर्व वीरशैव एका कुटुंबांतील मनुष्याप्रमाणें एका विचारानें राहत होती, आणि जसे कुटुं-बांतील मनुष्ये निरनिराळ्या नोकऱ्या अगर धंदे करितात तसें त्या वेळीं वीरशैव निरनि-राळे धंदे करीत. त्यामुळे जे एकाच प्रकारचे

...रीत त्याचा त्याच नावाचा जातधर्म ...होता. ह्यामुळे आपणास निरनिराळे ...विराग मूठभर वीरशैवसमाजांत दिसत ...सुरेश बोल पित्याने शिवानंदास ...होता......मध्येच पदपाळानें वहाचे ...वाजविले......अगदी खरं आहे. आपण ...सर्व बातां चहा घेऊं व आजच्या पोट-...जातीच सहभोजनसमारंभाला जाऊं... ...हंसत शिवानंद म्हणाला.

[ तिघेहि सहभोजनसमारंभास जातात. ]

* * *

...चार दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांत व सर्व ...जाहीर झालें होतें तो दिवस आजचा ...शहरपंचाच्या वाड्यांत सर्व वीरशैवा-...पोटजातीमधील लोक सर्व सनातनी ...पंचानगरचे × × × महाराज ...अध्यक्षतेखाली दिवसां १० वाजतां ...सहभोजनसमारंभ होणार होता ह्या समा-...शहरांतील " वीरशैव तरुण मंडळ " ...रचून आणला होता. समारंभ चांगल्या ...पार पडला.

* * *

...विश्वनाथ आप्पा कळकळे [ शिवानंदाचे ...] हे प्रसिद्ध किराणा मालाचे दुकानदार ...हे मजूर गरीब बिचाऱ्या लोकांत व्याज-...खेळ खेळत असत, त्यांनी आपल्या ...च्या गुणानें आपल्याजवळ बरेंच पाणी ...होतें. हे. म. वसंतराव भोपळे ( सुधेचे ...वडील ) कुठल्याशा ऑफिसांत ...पगारावर नोकरीस होते, दोघेहि पंचम ...दोघेहि एकाच गल्लीत राहात असत, ...सुधारणेचे बाबतींत मत विरुद्ध होतें. ...सर्वांचे सुरेश, सुधा, शिवानंद, एकाच ...वागत असत. ते तिघेहि प्रसंग येतील त्या ...पुराणमतवाद्याबरोबर चर्चा करीत ...मतभेद दूर करीत, व त्याला ...प्रवास मिळवीत. परंतु शिवानंद हा सुरेश सुधेच्या विचारानें समारंभास गेला होता. दुसऱ्या दिवशी फळी-पुढाऱ्याने दोघांच्या वडिलांना फळीबाहेर टाकलें ( फळी-पुढाऱ्यानें बरं का? कपाडवरवाले - पुढाऱ्यानें नाहीं. ) फळीत घेण्यास १०० रुपये प्रत्येकीं लागत असत, ही त्यांची अट होती. वे. म. वसंतरावनी व विश्वनाथ आप्पानी ती अट कबूल केली नाहीं. त्यांनी प्रत्येकी १०० रुपये व १०० रुपये असे २०० रुपये गरीब विद्यार्थ्यांस शिक्षणा-करितां मदत म्हणून वाटले. हें ऐकताच फळी-पुढाऱ्याचें पाणी पळालें. फळी-पुढाऱ्यांची निराशा झाली, फळी पुढारी फक्त ५ - ७ एकीकडे राहिले, बाकी सर्व एकीकडे राहिले. हा १०० रुपये मागण्याचा परिणाम झाला. वस्तुतः सनातनी फक्त ५-७ मंडळी एकीकडे राहिली.

---

## परलोकचा परवाना

साखळी, ता. चिखली जिल्हा बुलढाणा येथील सुप्रसिद्ध माजी बेंच मॅजिस्ट्रेट रावसाहेब, सखारामअप्पा साखळीकर हे नुकतेच शिवैक्य पावल्याचें कळतें. राव-साहेब हे एक अत्यंत रुबाबदार आणि मा बाप सरकारांचे एकनिष्ठ सेवक होते. त्यांचा या भागांत बराच दरारा होता, आणि सर्वच सरकारी अधिकाऱ्यांशी हे सदासर्वदा मिळून मिसळून वागत असत. वीरशैवसमाजांतील एक कर्तबगार पुरुष परलोकचा परवाना मिळवून कैलासवासी झाल्याबद्दल त्यांच्या कुटुंबियांना जें दुःख झालें त्यांत आम्हीहि भागीदार आहों. रावसाहेबांच्या कर्तबगारीला योग्य असेंच शांतिस्थान त्यांच्या आत्म्यास तो परमात्मा देवो.

# वीरशैव सनातन्यांना इषारा !

[ लेखक—श्री. नारायण स्वामी, मलवडी, (सातारा). ]

( व्यापारी आणि ज्यांना गिरणबाबु या उपहासिक नांवानें संबोधले जातें असे सांच्यावर काम करणारे वीरशैवसमाजांतील मजूर सोलापूर, बार्शी, गोकाक, मुंबई, वगैरे ठिकाणीं शेकडोंनी, उंच सोंडांतुन रात्रंदिवस ओकणाऱ्या; आपल्यामध्ये काम करणारांच्या अंगांतील रक्त शोषणाऱ्या; भांडवलदारांची पोटें फुगविणाऱ्या गिरण्यांतून आज काम करतांना दृष्टीस पडतात. अशा रोज वेगवेगळया परिस्थितींत वावरणाऱ्या वीरशैव मित्रांतून खालील संवाद अलीकडे घरोघरी ऐकूं येऊं लागले आहेत. त्यापैकीं एक खालीं दिला आहे. )

चरलिंग ह्मणाला, "नवमतवाद्यांना उद्देशून कांही सनातनी लेखक ह्मणतात, 'कर्नाटकांत व महाराष्ट्रांत नवमतवादी तरुणांचा भरणा बराचसा आहे, आणि आमच्या-सारख्यांना त्यांचीं गय करून चालणार नाहीं. गय जर केली तर आपल्या समाजाची ते पाळेंमुळें खणून काढतील.'"

"अरे बापरे ! समाजाचीं पाळेंमुळें नवमतवादी खणणार ? पाळेंमुळें खणायचें काम आह्मी करितों कीं आजची विषम समाजपद्धति हें काम करते ? सदर लेखकानें आमच्यासंबंधी लोकांचा कांही तरी गैरसमज करून देण्याचें काम चालविलेलें दिसतें ?" चार्पालिंग बिडी पेटवीत ह्मणाला.

"गैरसमज, तो कसला बुवा ?" चरलिंग हातांतील पुस्तक टेबलावर आपटीत ह्मणाला.

"गैरसमज नाहीतर काय? हें पाहा, आह्मी गिरणींतील सांचावर काम करणारे लोक सकाळीं साडेसात वाजतां गिरणींत कामावर येतों, आणि दुपारी अवघ्या एक तासांत माय-खळ्यापासून दादरला घरीं जाऊन जेवून ये कसे यायचें ? अँ ? दुपारीं भूक लागते ह्मणून आह्माला हॉटेलांत कांहीतरी खाल्ल्याशिवाय गत्यंतरच नाही! आणि आह्मी खातोंहि! कारण सकाळीं घरच्या चहाला जिथं एक पैशापेक्षा जास्त दूध मिळेंना तिथं दशम्यांना दररोज अगदीं कोरें बिनपाण्याचें दूध घ्यायला रोज दोन आणे कोठून आणणार ? समज, दुधातल्या दशम्या जरी रोज खायला लागलों तरी नळावर पाणी पितांना बाकीचे लोक, 'शिवे' शिवतातच कीं नाहीं? त्या वेळी आमचें सोवळे कितीहि प्रयत्न केला तरी कसें पाळलें जाणार ? एवढेच नव्हे तर ते आपले मठपती देवलिंग स्वामी, सणादिवशीं संकल्प सोडायला येतात ना, ते पण गेल्या रविवारी मी नळबाजारांत गेलों होतों तेव्हां 'बुद्धदेव', हॉटेलांत भज्यावर सपाटून ताव मारतांना दिसले. हॉटेलांतील तीं कपबशा विसळणारी कोंगाड्यांची पोरें सर्व पदार्थ तयार करतात, टेबलावर आणून ठेवतात, आणि तें आह्मी खातों. ही गोष्ट समाजमान्य नसली तरी मुंबईतील शेंकडा पंचाण्णव — व साधारण गांवी शेकडा पंचवीस लोकांना मान्य झाली आहे।

तूं कबूल करशील ना ? मग आह्मी लोकांच्या हातून बनविलेले पदार्थ तर आपल्या समाजांतील निरनिराळ्या जातींतील लिंगी लोकांच्या इकडे परस्पर करण्यास धार्मिक परवानगी कां नये ? ही प्रामाणिकपणें मागतो, हें समाजघटनेची पाळेंमुळें खणतो ? ह्मणविणाऱ्यांनीं, आह्मी ज्या तत्त्वाचा करतों त्याच तत्वाप्रमाणें चोरून व पंचायतींत बसल्यावर ढोंगीपणानें धर्मनिष्ठेंचा हल्ला चढावावयाचा वीरशैवसमाजघटनेची पाळेमुळे कोण काढीत आहेत, या गोष्टीचा घडावर ठेवून नीट विचार कर बरें ! कोणतेंहि कार्य कायदेशीर करूं इच्छितों तुह्मी तेंच कार्य कित्येक दिवसांपासून करीत आहांत यापैकीं प्रामाणिक ?"

"तुम्हीच."

"अरे चरलिंग, परिस्थितीमुळे ज्या ज्या करणें जरुर आहे त्या त्या गोष्टींना आपला पवित्रा बदलून परवानगी नको ? हें असें करीत असतांना लेखक आमच्यावर आमच्या समाजाची सणणारे हे लोक आहेत, असा मारणें, ह्मणजे लोकांची दिशाभूल करणें काय ?"

"तुमं ह्मणणं खरं आहे" चरलिंग ह्मणाला.

"आपल्या वीरशैवसमाजाची सध्या अव- होऊं लागली आहे असें कांही व्यक्तींना असावें असें दिसतें. ही गोष्ट तुला काय ?" चापलिंगनें विचारलें.

"आपल्या समाजांत अनेक अधिकारी मंड- आपल्या कर्तबगारीनें वीरशैवसमाज सेवा व आज नेत आहेत. दे. भ. दामणगांवकरांनी 'वीरशैव संजीवनी'चे सहा अंक भरतील एवढा मजकूर शिल्लक आहे !' असें 'वी. संजीवनी'च्या एका अंकांत ह्मटलें होतें. इतका उदयोन्मुख लेखकवर्ग असतांना मी ही गोष्ट कबूल करायला मुळींच तयार नाही." चरलिंग ह्मणाला.

"कांहीं सनातनी लेखक ह्मणतात, 'वीरशैवसमाज अनेक वर्षें असाच जिवंत रहावयास पाहिजे.' मी त्याच्यापुढे जाऊन विचारतों, अनेक शतकांनंतर तरी काय व्हावयास पाहिजे ? तो बंद पडावा असें कां त्यांना वाटतें? कांही समजत नाही ! अनेक राज्यक्रांत्या, धार्मिक आंदोलनें, सामाजिक स्थित्यंतरें, पाहात व अनुभवीत, वीरशैवसमाज आजहि जिवंत आहे,' हें वाचून मला अशी शंका येते कीं, बुद्धधर्माखेरीज हिंदुस्थानाबाहेर अगर हिंदुस्थानात कोणकोणते समाज आज नामशेष झाले आहेत ? 'प्रत्येक पिढीबरोबर प्रत्येक समाजाला व जातीला एक जबर धक्का बसत असतो. असे धक्के खात सुद्धां आज वीरशैवांची लोकसंख्या पसतीस लाख उरली आहे.' हें ह्मणणें मला मुळीच पटत नाही. माझें ह्मणणें असें आहे कीं, प्रत्येक पिढीबरोबरचा तीस-चाळीस वर्षांचा काळ बदलत असतो. तेवढ्या काळांत होणाऱ्या सुधारणा, राजकीय, सामाजिक, धार्मिक आंदोलनें, समाजावर त्या वेळीं विद्यमान व्यक्तीकरवीं होत असतात. त्या व्यक्ती धर्म बुडविण्यासाठीं समाजाला किंवा जातीला बुद्धिपुरस्सर धक्का मारतात असें नाही; तर त्या वेळच्या प्राप्त परिस्थितीशीं ते झुंजत असतां, समाजाला सहजगत्या तो धक्का बसत असतो. पन्नास वर्षांपूर्वी जेव्हा गिरण्या, मोटारी, वगैरे हल्लींच्या सुधारणा झाल्या नव्हत्या त्या वेळीं हॉटेलांत खाण्यासंबंधींचे किंवा लिंगायतांतील पोटजातींत रोटीव्यवहार करावा अशी चळवळ करण्याची जरुरच नव्हती ! यावरुन तुला

समजलेंच असेल कीं, आह्मी धर्म बुडविण्यासाठीं, धर्माची पाळें मुळें खणण्यासाठीं बरचा प्रश्न उपस्थित केला नसून, या परिस्थितींत राहून कसें तरी जगत असतां कांहीं धार्मिक बंधनें पाळलीं जात नसल्यास त्याला आमचा नाइलाज आहे, अशा आह्मां श्रमजीवी लोकांत दिवसानुदिवस जास्त भर पडत चालली आहे हें स्पष्ट असतांना, धर्मानें आमच्या जरूरीच्या धार्मिक सवलती न दिल्या तरी लोक आचरणांत आणल्याशिवाय थोडेच राहतात! आणि या स्वरूपाचा धर्माला धक्का बसणारच! श्री बसवेश्वरांनीं वीरशैवसमाजाच्या जुन्या पवित्र्यांत बदल केला-धक्का दिला, त्याप्रमाणें, प्रत्येक धक्याबरोबर आपल्या समाजानें पूर्वीच्या पवित्र्यांत बदल केला ह्मणूनच पसतीस लक्ष, लोकसंख्या आज लेखकांना मोजतां येते. आतां आह्मी ह्मणतों त्याप्रमाणें पवित्र्यांत जर बदल केला नाहीं - रोटीव्यवहाराची सवलत दिली नाहीं-हॉटेलांत खाण्याची सवलत समाजमान्य केली नाहीं, आमच्या परिस्थितींत कुजत असणाऱ्यांना वाटेल ह्मणून समाजाबाहेर टाकण्यांत आले, तर पुढच्या १९४० सालच्या शिरगणती ( खानेसुमारी )-मध्ये ३५ लक्षांवरची ही संख्या खात्रीनें कमी झाल्याशिवाय राहील काय ? ''

" काय रे चापलिंग, तुह्मी नवमतवादी स्वतःला बसवभक्त ह्मणवता, आणि बसवदेवावर अवैदिकत्वाचा आरोप करतां ही गोष्ट खरी आहे काय ? " चरलिंग डाव्या खांद्यावरून पाठीवर लडबडत असलेलें लिंग ( चांदीचा लिंगाळंकार ) पोटाकडे ओढत ह्मणाला.

" तुझा मुद्दा ऐकून मला, तुला एक गुद्दा द्यावासा वाटतो ! " गुद्दा मारण्याचा आविर्भाव आणून मूठ वळवीत चापलिंग ह्मणाला.

" अरे हो ! हो ! हो ! ! ! इतकें संतापायला काय झालं ? "

" संतापलों नाहीं ! सहजच बोलण्याच्या नादामध्ये तसं होतं ! बसवेश्वरपूर्वकालीन जे लिंगायत होते ते लिंगपूजनाचा - मोक्षाचा - समानतेचा अधिकार आह्मां एकट्या नागोजींनाच आहे असें ह्मणत होते. त्यांच्या त्या कूपमंडूक स्वार्थी मताला चाट देऊन बसवेश्वरांनी मोक्षाचा रस्ता सर्वांना मोकळा करून दिला हें आह्मीं सांगतों ह्मणजें बसवदेवांना अवैदिक ह्मणतो काय ? त्यांना अवैदिक ह्मणणारा पक्ष वेगळा असून, त्यांच्याशीं आमचें कांही कर्तव्य नाही. यामुळें बसवदेवांची नालस्ती होते असें तुला व तुझ्या या सनातनी धर्ममार्तंडांना कां वाटावें, हेंच मला समजत नाहीं ! यावरून एवढीच गोष्ट सिद्ध होते कीं, आह्मी जें कांही बोलूं तें सर्व योग्य, हितकर, जरी असलें तरी नवमतवादी ह्मणून त्याज्य असा शिक्का मारायचा! मारा बुवा ! ! बसवदेवांना तत्कालीन लिंगायतांकडून थोडा कां विरोध झाला ? याच्यावरूनच आह्मी बसवदेवांच्या पंक्तींत जाऊन बसण्याची घमेंड मारतों. असें मात्र समजूं नको हो ! त्यांना प्राप्त परिस्थितींत ज्या गोष्टीची उणीव भासत होती ती भरून काढण्याचा त्यांनी प्रयत्न केला. आज आह्माला जी उणीव भासते ती भरून काढण्यासाठीं आह्मी प्रयत्न करतों.

' बसवदेवाविषयीं आमच्या मनांत श्रद्धा तर नाहींच नाही पण वीरशैवघटनेच्या बिजाचीहि त्यांत वाढ नाही,' असें जे लेखक ह्मणतात, त्यांना असें ह्मणण्याला काय अधिकार मिळाला असेल तो असो ! बसवदेवाविषयीं जर आदर नसतां तर आह्मी त्यांचें तत्व प्रतिपादन केलें असतें काय ? वरील उद्गार काढण्याचें धाडस फक्त ते लेखकच करूं शकतात ! "

# अहमदनगरची सफर

( लेखक : — फिरस्ता )

एकदा फिरत फिरत अहमदनगरास आलों. मात्र हें फिरणें पुराणांतील अथवा नऊ ...तील सांप्रदायाप्रमाणें त्रिरात्रींचें नसून ...ही दिवसाचें होतें. त्यामुळें तेथील परि-स्थिति निदर्शनास आली ती समाजबांधवां-पुढे मांडणें आपलें कर्तव्य समजतों.

अहमदनगरामध्यें ६००-७०० वीरशैव लिंगायत कुटुंबें आहेत. व अजमासे दीड हजार लिंगायतांची लोकसंख्या आहे. या संख्येंत ...वंत, पंचम, तिराळी, बुरुड, तेली, गवळी, ...थी जंगम पोटभेदांचा आदि समावेश होतो. महाराष्ट्रांतील इतर ठिकाणाप्रमाणें इथेहि जरी ...र नसल्या तरी दोन कां होईना, पंचमामध्यें ...या( Parties )आहेतच, व ही बेकी जर ...ली तर अहमदनगरास एकीचें गालबोट ...लेले असतें.

ठिकठिकाणी भरत असणाऱ्या परिषदांमध्यें ...अखिल लिंगायत पोटभेद—एकीकरणाचे ...राव पास होत आहेत ही गोष्ट कांही वाईट ...हे. परंतु त्याच्या अगोदर एकाच जातीच्या ...या अनेक फळ्या ( तुकडे ) आहेत ...े एकादे भक्कम ...र बनविण्याचीच जरूरी जास्त असल्याचे ...त्यास येतें.

वास्तविक पाहतां हीं कामें पटाधिकाऱ्यांची ...हेत. त्यांनी प्रत्येक गांवीं जाऊन आपापल्या ...लोकांना एकीच्या सामर्थ्याचा उपदेश करून ...त्याप्रमाणें आचरण करण्यास लावण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे. परंतु या मठाधि-काऱ्यांतच एकी होण्याची, हल्लीं निर्माण झालेल्या परिस्थितीवरून आशा दिसत नाहीं. हें पटाधिकारी आमच्या या कामीं उपयोगी पडतील अशी आशा करणें व्यर्थ ! त्यांना सध्यां विरक्त-पंचाचार्यवादामुळें इकडे लक्ष द्यावयास सवड नाहीं.

ह्मणून असलीं कामें जर कोणी करूं शकेल तर तीं ह्मणजे आमचे नवीन एकीच्या भावनेनें प्रेरित होऊन स्थापित होत असलेले, पक्षभेदा-पासून अलिप्त असलेले असे वीरशैव-तरुण-संघच !

अहमदनगरचा वीरशैव तरुणसंघ गेल्या दोन वर्षांपासून येथें काम करीत आहे. त्यानें आपलें कार्य हळू हळू चालविलें असलें तरी तें भक्कम पायावर उभारलें आहे, यांत शंका नाहीं. वीरशैव—तरुणसंघ स्थापन केल्यानें 'बुद्रुकां'च्या भावनांमध्यें फरक पडणें ही गोष्ट जरी दुरापास्त असली तरी तरुणांचीं मनें काबीज केलीं आहेत यांत संदेह नाहीं. हा संघ फळीच्या पलीकडे राहण्याचा प्रयत्न करीत असला तरी त्यांचे कार्यकर्ते एकाच फळींतील असल्यानें त्याला फळीचेंच स्वरूप आलें ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. असें असलें तरी संघानें, आपलें अस्तित्व ज्या गोष्टीसाठीं आहे, त्या गोष्टीसाठीं अहोरात्र प्रयत्न चालविले आहेत, हें पाहून समाधान होतें.

सदर संघाचें कार्य अहमदनगरापुरतें मर्यादित न राहतां नुकताच जिल्हासंघ स्थापन होऊन त्यानें आपलें कार्यक्षेत्र जिल्हाभर फैलावलें आहे. खुद्द नगर शहरांत लेखक निर्माण झाले आहेत, कार्यकर्ते निर्माण झाले आहेत. एकीसाठीं तळमळ उत्पन्न केली आहे. त्याचप्रमाणें दोन 'फळचा'ची एकी करण्याचा प्रयत्न खाजगी तऱ्हेनें चालविला आहे. तरुणसंघाचे कार्यकर्ते अर्थात् तरुणच असणार ! संघाच्या दुसऱ्या फळींतील तरुणांना तरुणसंघाचे सभासद बनण्याची विनंती केली. या विनंतीचा विरुद्ध फळींतील तरुणांनी मुळीच विचार केला नाहीं पण त्यांना लाजविण्यासाठींच की काय दोन गृहस्थ मात्र या संघाचे सभासद झाले आहेत ! 'वमानें येणारा गुण टिकावू असतो !'

प्रस्तुत फिरस्ता मागें एका गांवीं गेला असतां त्याला आपल्या फळींत दुसऱ्या फळींतील घरें सामील करून घेण्याची अहमहमिका चालू असल्याचें दिसून आलें, पण इथल्या फळयांतील चिवटपणाचा एक हास्यास्पद गुण दिसून येतो कीं, कितीहि कुलवान् घरंदाज व श्रीमंत असलेली दुसरी कुटुंबे आपली फळी सोडून दुसऱ्या फळींत सामील होण्यास आपखुषीने तयार असलीं तरी दुसरी फळी या गोष्टीस बिलकुल तयार नाहीं. कांग्रेस आणि सरकार यांच्यामध्ये मोठा पडलेला पेच काढण्यासाठीं किती प्रयत्न झाले, गव्हर्नर निरनिराळ्या खान्यांच्या प्रसंगीं बोलले, झेटलंडसाहेब गरजले व गांधीजी तिथळला टाइम्स् ऑफ् इंडियाला मुलाखत देते झाले, पत्रकें प्रसिद्ध करते झाले, व शेवटीं बेवचाव नाहींसा होऊन सरकार व कांग्रेस यांच्यांत कधींहि न होणारा आश्चर्यकारक समेट घडून आला. पण बाहेरच्या जगांत वाटेल तो फरक झाला, पश्चिमेचा (?) सूर्य पूर्वेला उगवला तरी, तिखट (?) दूध आमटीप्रमाणें मधुर (?) लागूं लागलें तरीं, नगरच्या परिस्थितींत फरक पडणें शक्य नाहीं असो प्रत्येक फळींतील घटकाची समजूत असल्यानें दुफळी नाहीशी होणें अपरिहार्य आहे असाच सूर निघतो.

तरुणसंघ तर ही परिस्थिती घालविणार अशी छातीला हात लावून घोषणा करतो. त्यानें दुसऱ्या फळींतील लोकांना असें पत्र पाठविण्याचें ठरविलें आहे कीं, "तुम्ही आमच्यांत येऊन मिळा, नाहीतर आम्ही तुमच्यांत विलीन होतो. या गोष्टीवर तुम्ही अर्थात् नेहमीप्रमाणें मूग गिळून उत्तर देणार नाहीं, तरी पण आम्ही ही गोष्ट वीरशैवांची आधुनिक वेस जी नियतकालिकें तिच्यांत प्रसिद्ध करून तिच्या वेसीवर टांगू, आणि कसे उत्तर देत नाही तें पाहूं. मोठमोठें 'समंध' सुद्धां पंचाक्षऱ्यांच्या प्रयत्नानें बोलते होतात, तर वीरशैवांच्या मानगुटीवरील हे दुहीचे समंध आम्ही गाडल्या वाचून मुळींच राहाणार नाहीं." पाहूं काय होतें तें ! दुसऱ्या सफरीच्या वेळीं दिसेलच !

---

# अभिनंदन

श्री. गं. भा. त्रिवेणाबाई मडके ह्या कैलासवासी झाल्यात. त्यांचे स्मरणार्थ त्यांचे दत्तकपुत्र श्री. रा. रा. महादेवआप्पा बजाप्पा मडके ह्यांनी वऱ्हाड-मध्यप्रांत-वीरशैव-शिक्षणप्रसारक मंडळास ५ रुपयांची देणगी दिल्याबद्दल वरील संस्था त्यांची आभारी आहे असें संस्थेचे सेक्रेटरी कळवितात. वरील देणगी मिळविण्याबाबत गु. मु. पंचाक्षरीस्वामी गु. देवणिकर स्वामी लाखीवकर यांनी जी मदत केली त्याबद्दल संस्था त्यांची आभारी आहे.

से. वी. शि. प्र. मंडळ अमरावती.

# कोर्टाच्या मार्गावर

['वीरशैव संजीवनी' चे संपादक श्री. नानासाहेब बामणगांवकर यांचेवर खालीलप्रमाणे अब्रुनुकसानीची नोटीस ता. १५-७-३७ रोजी पोष्टमार्फत वजावली गेली, आणि त्या नोटीसीचें उत्तरहि श्री. बामणगांवकरांनी तेच दिवशी दिलें. आलेली नोटीस आणि तिचें उत्तर खाली सविस्तर दिलीं आहेत.]

## नोटीस

डब्ल्यू. आर. वऱ्हाडे,
बी.एससी., एलएल. बी., वकील,
आदितवारी, नागपूर, ह्यांजकडून—

श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर,
संपादक, मुद्रक व प्रकाशक,—
"वीरशैवसंजीवनी",
रा. उमरावती, यांस——

माझे पक्षकार श्री. तानबास्वामी व.॥ गुरुस्वामी दलाल, रा. नागपूर, मस्कासाथ, घर नं. १३|१९, ह्यांचे विनंतीवरून आपणापुढील नोटीस देण्यात येत आहे. पावल्याचें स्वीकारण्याची मेहरबानी करावी.

"वीरशैव संजीवनी"-चे ता. १५-६-१९३७ इ.चे अंकात (वर्ष २ रें अंक १२ वा) पान २८५ व २८६ वर "वीरशैवांतील चळवळी" ह्या शीर्षकाखालील 'माहेश्वरभक्त मिश्रविवाह' ह्या उपशीर्षकाखाली कांही मजकूर माझ्या पक्षकाराचा मुलगा नामे सांभस्वामी ह्याचे विवाहासंबंधी आहे. तो मजकूर माझ्या पक्षकाराला स्वतःच्या व स्वतःच्या समाजाच्या दृष्टीस धक्का पोचविणारा वाटतो.

कारण, त्याचा झोक, माझ्या पक्षकाराचें घराणें व उमरावती येथील श्री. दादास्वामी कीर्तनकार ह्यांचें घराणें, ह्यांत उदित झालेला हा पतिविषयक संबंध माहेश्वर व भक्त ह्या दोन पोटजातींत मिश्रविवाहाचे स्वरूपाचा आहे असा आरोप करण्याकडे आहे.

तसेंच, माझ्या पक्षकारानें हा विवाह नवमतवादी व एकीकरणवादी यांशीं जुळविला व स्वतःची सनातनीयांतून एकीकरणवादी व नवमतवादी यांत अधोगति करून घेतली असें सुचविलेलें आहे.

तसेंच, माझा पक्षकार काळजीपूर्वक आपणास हें विदित करूं इच्छितो कीं, दादाशास्त्री किर्तनकार ह्यांचें घराणें माहेश्वरघराणें आहे, व उपर्युक्त विवाह मिश्रविवाह नाही. तेव्हा वरील विधानें हीं खोटीं, दुष्टबुद्धीची आणि माझ्या पक्षकाराचा दर्जा कमी करण्याकरता, त्याचे घराणें एकीकरणवादी व नवमतवादी झालें अशी अफवा प्रसृत करण्याकरता, व तो व त्याचें घराणें ह्यांवर तिटकारा व कांळीमा आणण्याकरिता, मुद्दाम प्रसिद्ध केलेलीं आहेत. ह्यामुळें माझ्या पक्षकारास स्वतःची मानखंडना झालीसें वाटते, व आपल्या समाजाचे मताचें दृष्टीनें आणि नागपूर येथील व हिंदु-

त्यावांतील अन्य भागांतील सनातनीयांचे दृष्टीने स्वतःचा दर्जा कमी झाला असें वाटतें.

" वीरशैव संजीवनी " चे संपादक, मुद्रक, व प्रकाशक ह्या नात्यानें, वर उल्लेखिलेल्या, व ज्याने माझ्या पक्षकाराची इज्जत कमी केली, त्या मजकुराचे प्रसिद्धीला आपण जबाबदार आहां. माझे पक्षकाराची इच्छा अशी आहे कीं, आपण तीं विधानें जाहीर रीतीनें परत घ्यावींत, व तीं विधानें खोटी व चुकीचे माहितीवर उभारलेली होतीं असें प्रसिद्ध करावें. शिवाय मजकडे किंवा माझे पक्षकाराकडे आपण एक लेखी माफीपत्र दाखल करावें, आणि त्यांना तें हवें वाटल्यास प्रसिद्ध करण्यास अधिकार द्यावा. शिवाय तुह्मीहि तें " वीरशैव संजीवनी " त प्रसिद्ध करावें. ह्याप्रमाणें आपण ही नोटीस पावल्यापासून एक आठवड्याचे आंत केलें पाहिजे. तसें तुह्मी न केल्यास, आपल्याविरुद्ध जरूर वाटेल ती कारवाई करण्याचा सल्ला माझ्या पक्षकारास देणें मला भाग पडेल.

ही नोटीस, व आपलें माफीपत्र, ह्या बाबतींत कांही झालें तरी, नुकसानभरपाई व नुकसान मागण्याचा हक्क कायम राहील.

नागपूर
ता. १४।७।३७

सही
डब्ल्यु. आर वऱ्हाडे
तात्यास्वामी व० बापुस्वामी
ह्यांचे सल्लागार.

---

# नोटीशीचें उत्तर

ता. १५-७-३७.

श्री. ना. रा. बामणगांवकर

संपादक, प्रकाशक व मुद्रक,
" वीरशैव संजीवनी "
उमरावती, याजकडून—

श्री. डब्ल्यु. आर. वऱ्हाडे, इतवारी, यांस—

तुमचे पक्षकाराकरितां तुमचेकडून नोटीस ता. १४-७ ची मिळाली. मी आपला व आपल्या पक्षकारांचा अत्यंत आभारी आहे.

सनातनी, नवमतवादी, हे शब्द बेअब्रूकारक नाहींत, आणि त्या योगानें कोणीच कोणाची बेइज्जत करीत नसतो. भावनावश होऊन आपल्या पक्षकारास जर नवमतवादी व एकीकरणवादी हे शब्द अपमानास्पद वाटत असतील तर त्याबद्दल वाईट वाटतें.

तुमचे पक्षकार हे ' शुद्ध माहेश्वर घराणें आहे. हें तुमच्या पक्षकारास आक्षेपार्ह वाटलेल्या मजकुरांत आह्मीं कबूल केलें आहे. फक्त त्यांच्या वडिलांचे वडील हे मूळचे दीक्षवंत होते एवढेंच ह्मटलें आहे. दीक्षेनें भक्ताचा माहेश्वर होतच नाहीं, असें नाही; होतात; पण वहिवाटीनें शुद्ध माहेश्वर घराणें समजत नाहींत. ते समजूं लागावें व जुनी सनातनी वहिवाट मोडली जावी अशी आमची इच्छा असल्यामुळें व त्यांत तुमच्या पक्षकाराच्या शुद्ध माहेश्वर घराण्यानें पुढाकार घेतल्यामुळें ' संजीवनीं 'त आह्मीं त्यांचें उलट अभिनंदनच केलें आहे व करीत करूं. तेव्हां त्या मजकुरांत असत्य विधान नाहीं आणि अब्रूला विघातक असें कांहीं नाहीं. तो मजकूर तुमच्या पक्षकारास बेअब्रूकारक वाटतो त्याबद्दल मला अतिशय दिलगिरी वाटते. कळावें.

ना. रा. बामणगांवकर
संपादक, प्रकाशक, व मुद्रक
" वीरशैव संजीवनी " उमरावती.

# वीरशैवांतील चळवळी

## कै० श्रीमान सोमाप्पा संगेकर

[illegible] बाजार येथील म्यु. नोटीफाईड एरि- [illegible]ध्यक्ष, स्कुल कमेटीचे अध्यक्ष, व सन्मा- [illegible] वीरशैव नागरीक हे वयाच्या ४७ व्या



[illegible]लोकवासी झाले. कै. सोमाप्पा हे ह्या [illegible] वीरशैवांतील प्रसिद्ध सावकार व [illegible] होते. त्यांचा त्यांच्या कुळाशी कधीहि सावकार ह्या नात्याचा संबंध नसे, व कुळांवाहि सावकारी तगादा माहीत नव्हता. सर्व कुळांना शक्य तों सूट देऊन आपले स्नेहसंबंध पूर्ववत् कायम ठेवीत असत व ह्यामुळेच सर्व वर्गांचे हिंदुमुसलमानांचे वगैरे त्यांच्यावर प्रेम असे.

श्रीमंत सोमाप्पा हे पूर्ण राष्ट्रीय वृत्तीचे होते. गेल्या कौंसिल निवडणुकींत त्यांचे चिरंजीव डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांनी कॉंग्रेस-उमेदवारांना केलेल्या मदतींत त्यांची पूर्ण साहानुभूति होती. स्थानिक चळवळींना व राष्ट्रीय कार्याला ते नेहमी सक्रीय मदत करीत असत. गांवांतील त्यांच्या वजनामुळे त्यांना बेंच मॅजिस्ट्रेट करावे अशी कांही सरकारी अधिकाऱ्यांची इच्छा होती. परंतु बेंच मॅजेस्ट्रेटीकरितां अधिकाऱ्यांच्या बंगल्याभोंवती कराव्या लागणाऱ्या प्रदक्षिणा किंवा पार्ट्या ह्या गोष्टींचे कै. सोमाप्पा ह्यांच्या स्वभावाला वावडें होतें. नुकतीच पर्वा "ओटघटकेचे मंत्री राघवेंद्रराव" ह्यांनी १००० रु. एका फंडाला वर्गणी देणाऱ्याला बेंचमॅजिस्ट्रेट बनविण्याची नवी किमया

काढली होती. व कै. सोमाप्पा ह्यांच्या मित्रांनींहि त्यांना गळ घातली होती. परंतु कै. सोमाप्पांनीं स्पष्ट उत्तर दिलें कीं, "मला अशी खुशामती मॅजेस्ट्रेटी नको." अशा रीतीनें कै. सोमाप्पा ह्यांची राष्ट्रीय वृत्ति वेळोवेळी प्रकट होत असे. त्यांचे घरात सर्व मुलें सध्य तों खादीच वापरतात. सामाजिक बाबतींत ते पूर्ण सुधारणावादी होते व त्यामुळे त्यांचें घराणें हें ह्या भागांत सुसंस्कृत ह्मणून ओळखल्या जातें. त्यांचे सोयरेसंबंध इकडील प्रसिद्ध घराण्यांशीं आहेत. त्यांच्या मृत्युमुळें चांदूरबाजार येथील एक वजनदार पुढारी नाहीसा झाला आहे. गेले २–३ महिन्यापासून ते छातीच्या विकारानें आजारी होते व अखेर ते गुरुवार ता. ५ ऑगष्ट रोजी दुपारी बारा वाजतां निधन पावले. त्यांच्या निधनाची वार्ता गांवांत पसरतांच बाजार, शाळा, वगैरे सर्व बंद होऊन गांवांत सर्वत्र हरताळ पडला, व एक तऱ्हेची स्मशानशांतता पसरली होती. अमरावतीस तारेनें हें वर्तमान कळतांच त्यांची नात्यागोत्याची व सर्व स्नेही मंडळीं चांदूर बाजारला गेली. गांवातील सर्व भजनी मेळे दिंड्या वगैरे जमून त्यांच्या प्रेतयात्रेंत सर्व हिंदु मुसलमानांनी भाग घेतला. जवळ जवळ ४–५ हजारांचा जनसमुदाय त्यांच्या प्रेतयात्रेंला जमला होता. त्यांचे स्नेही मे० नबाब रियायत-अली, सेकंड क्लास बेंच मॅजिस्ट्रेट, हेहि हजर होते. दुसरे दिवशी श्रीमान् दादासाहेब गणोरकर ह्यांचे अध्यक्षतेखालीं शोकपर सभा शाळेत भरविण्यांत येऊन दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला.

तसेच सर्व नागरिकांची श्री. माणिकराव चर्जन ह्यांचे अध्यक्षतेखाली सभा मंगळवार ता. १०–८–३७ रोजी सायंकाळी भरली होती. सभेंत नारायणराव मास्तर, दे. भ. नानासाहेब नगरनाईक, यांचीं दुखवट्याची भाषणें झालींत व सभेंत दुखवट्याचा ठराव पास झाला.

कै० सोमाप्पा ह्यांच्या अकाली निधना मुळें संगेकर घराण्याचे तर अपरिमित नुकसान झालें आहेच, परंतु ह्या भागांतील वीरशैव समाजाचीहि कधीही भरून न येणारी हानि झाली. कै० सोमाप्पाच्या पाठीमागें त्यांची ५ मुलें आहेत. श्री. गंगाधर आप्पा, डॉ. आप्पाराव, श्री. दिगांबर ऊर्फ बाळासाहेब, काशिनाथ व विश्वनाथ. पैकी श्री. दिगांबर आप्पा हें कॉलेजांत इंटर मध्यें शिकत आहेत व चि. काशिनाथ व विश्वनाथ हे ए. व्ही स्कूलांत जातात. ज्येष्ठ चिरंजीव श्री. गंगाधर आप्पा ह्यांना परमार्थाचा व साधुसंतांचें सहवासाचा विशेष नाद असल्यामुळें ते घरातील व्यवहाराकडे तितकेसें लक्ष देत नाहींत-त्यामुळें कै० सोमाप्पाच्या निधनामुळें त्यांचें मधले चिरंजीव डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांचेवरच सर्व कुटुंबाचा व इस्टेटीचे देखरेखीचा भार पडला आहे. डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांच्या दुःखांत आह्मीहि सहभागी आहोंत. जगरहाटीकडे पाहून डॉ. आप्पाराव संगेकर ही आपत्ति धैर्यानें सहन करतील असा आह्माला भरंवसा आहे. ईश्वर मृताचे आत्म्यास शांति देवो ! !

## महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ वृत्त

कांहीं अपरिहार्य कारणांमुळे बरेंच दिवसांत न भरलेली वरील मंडळाची कार्यकारी मंडळांची बैठक आश्वीन महिन्यांत पापळ ता० पांढरकवडा मुक्कामी भरणार असल्याचें कळतें. सभेपुढें, कारंजा थी. प्रांतिक परिषदेत पास झालेल्या महत्वाच्या ठरावासंबंधी मंडळाचें धोरण काय असावें, थी. पंजिकशीच्या कर्यंशोध्याचे [illegible] विचार, आतापर्यंतच्या मंडळाच्या कार्याचा अहवाल, वगैरे विषय सभेपुढे येणारसें समजतें.

मंडळाचे ज० सेक्रेटरी श्री. वि. तु. चौधरी ह्यांनी कायद्याचा अभ्यास पूर्ण करण्याकरितां कांहीं दिवस सेवानिवृत्त होण्याकरितां रजेविषयीं अध्यक्षाकडे लिहिल्याचें कळतें व कदाचित् त्यांचे गैरहजरींत काम चालविण्याकरितां कुणाला तरी तात्पुरते ज० सेक्रेटरी निवडण्याचा प्रश्नहि सभेपुढे येईलसें वाटतें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ सप्टेंबर १९३७ ( अंक १७ वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

काढली होती. व कै. सोमाप्पा ह्यांच्या मित्रांनींहि त्यांना गळ घातली होती. परंतु कै. सोमाप्पांनीं स्पष्ट उत्तर दिलें कीं, "मला अशी खुशामती मॅजेस्ट्रेटी नको." अशा रीतीने कै. सोमाप्पा ह्यांची राष्ट्रीय वृत्ति वेळोवेळी प्रकट होत असे. त्यांचे घरात सर्व मुलें शक्य तों खादीच वापरतात. सामाजिक बाबतींत ते पूर्ण सुधारणावादी होते व त्यामुळें त्यांचें घराणें हें ह्या भागात सुसंस्कृत ह्मणून ओळखल्या जातें. त्यांचे सोयरेसंबंध इकडील प्रसिद्ध घराण्यांशीं आहेत. त्यांच्या मृत्युमुळें चांदूरबाजार येथील एक वजनदार पुढारी नाहीसा झाला आहे. गेले २–३ महिन्यापासून ते छातीच्या विकाराने आजारी होते व अखेर ते गुरुवार ता. ५ ऑगष्ट रोजी दुपारी बारा वाजतां निधन पावले. त्यांच्या निधनाची वार्ता गांवात पसरतांच बाजार, शाळा, वगैरे सर्व बंद होऊन गांवांत सर्वत्र हरताळ पडला, व एक तऱ्हेची स्मशानशांतता पसरली होती. अमरावतीस तारेने हें वर्तमान कळतांच त्यांची नात्यागोत्याची व सर्व स्नेही मंडळीं चांदूर बाजारला गेली. गांवातील सर्व भजनी मेळे दिंड्या वगैरे जमून त्यांच्या प्रेतयात्रेंत सर्व हिंदु मुसलमानांनी भाग घेतला. जवळ जवळ ४–५ हजारांचा जनसमुदाय त्यांच्या प्रेतयात्रेंला जमला होता. त्यांचे स्नेही मे० नबाब रियायत-अली, सेकंड क्लास बेंच मॅजिस्ट्रेट, हेहि हजर होते. दुसरे दिवशी श्रीमान् दादासाहेब गणोरकर ह्यांचे अध्यक्षतेखालीं शोकपर सभा शाळेत भरविण्यांत येऊन दुखवटयाचा ठराव पास करण्यांत आला.

तसेच सर्व नागरिकांची श्री. माणिकराव चर्जन ह्यांचे अध्यक्षतेखाली सभा मंगळवार ता. १०–८–३७ रोजी सायंकाळी भरली होती. सभेत नारायणराव मास्तर, दे. भ. नानासाहेब नगरनाईक, यांचीं दुखवटयाची भाषणें झालींत व सभेंत दुखवटयाचा ठराव पास झाला.

कै० सोमाप्पा ह्यांच्या अकाली निधनामुळें संगेकर घराण्याचे तर अपरिमित नुकसान झालें आहेच, परंतु ह्या भागातील वीरशैव समाजाचीहि कधीही भरून न येणारी हानि झाली. कै० सोमाप्पाच्या पाठीमागें त्यांची ५ मुलें आहेत. श्री. गंगाधर आप्पा, डॉ. आप्पाराव, श्री. दिगांबर ऊर्फ बाळासाहेब, काशिनाथ व विश्वनाथ. पैकी श्री. दिगांबर आप्पा हें कॉलेजांत इंटरमध्यें शिकत आहेत व चि. काशिनाथ व विश्वनाथ हे ए. व्ही स्कूलांत जातात. ज्येष्ठ चिरंजीव श्री. गंगाधर आप्पा ह्यांना परमार्थाचा व साधुसंताचें सहवासाचा विशेष नाद असल्यामुळें ते घरातील व्यवहाराकडे तितकेसें लक्ष देत नाहींत-त्यामुळें कै० सोमाप्पाच्या निधनामुळें त्यांचें मधले चिरंजीव डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांचेवरच सर्व कुटुंबाचा व इस्टेटीचे देखरेखीचा भार पडला आहे. डॉ. आप्पाराव संगेकर ह्यांच्या दुःखांत आह्मीहि सहभागी आहोंत. जगद्गुरूंकडे पाहून धैर्यानें डॉ. आप्पाराव संगेकर ही आपत्ति सहन करतील असा आह्माला भरवंसा आहे. ईश्वर मृताचे आत्म्यास शांति देवो ! !

## महाराष्ट्र वीरशैव हितसंवर्धक मंडळ वृत्त

कांहीं अपरिहार्य कारणांमुळे बरेंच दिवसांत न भरलेली वरील मंडळाची कार्यकारी मंडळांची बैठक आश्वीन महिन्यांत पापळ ता० पांढरकवडा मुक्कामी भरणार असल्याचें कळतें. सभेपुढें, कारंजा वी. प्रांतिक परिषदेत पास झालेल्या महत्वाच्या ठरावासंबंधी मंडळाचें धोरण काय असावें, वी. संजिवनीच्या कर्जाउलग्याचे विकीचा विचार, आतापर्यंतच्या मंडळाच्या कार्याचा अहवाल, वगैरे विषय सभेपुढे येणारसें समजतें.

मंडळाचे ज० सेक्रेटरी श्री. वि. तु. चौधरी ह्यांनी कायद्याचा अभ्यास पूर्ण करण्याकरितां कांहीं दिवस सेवानिवृत्त होण्याकरितां रजेविषयी अध्यक्षाकडे लिहिल्याचें कळतें व कदाचित् त्यांचे गैरहजरींत काम चालविण्याकरितां कुणाला तरी तात्पुरते ज० सेक्रेटरी निवडण्याचा प्रश्नहि सभेपुढे येईलसें वाटतें.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ सप्टेंबर १९३७ ( अंक १७वा

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

## उदय

हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे० भ० ना० रा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरूं करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती ( वऱ्हाड )

---

## सुदर्शन

हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जूनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्‌ एल्‌. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगावीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

## वीरशैव गर्जना

अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

...णाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
...धारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

...वें वर्ष २ रें ) मिति श्रावण व० ११ शके १८५९ ( अंक १७ वा.

## अमृत बिंदू

भाताचें पकादें शित आढळतांच कावळा आपल्या जातभाईंना पाचारण करतों, धान्याचे चार-दोन कण दृष्टीस पडतांच कोंबडा साद घालून आपल्या भाईबंदांना जमवतो.

कावळ्या - कोंबड्यासारखे
निर्बुद्ध पक्षी
स्वतःच्या
जातभाईकरितां
अशाप्रकारें आपल्या
उदार प्रेमाची खैरात करीत
असतांना, आह्मी सुबुद्ध मानव
प्राण्यांनी आपल्या जातभाईशीं आपुलकीच्या
प्रेमळ भावनेनें न वागणें हीनपणाचें नाही का ?

बसवदेव

# समाजसुधारणेचा रागरंग

(लेखकः— राम शंभो पुराणिक, सहसंपादक, संजीवनी.)

जगांतील कोणताहि यच्चयावत् समाज ह्मटला कीं त्याच्या सामाजिक चालीरीती त्याचें धर्मशास्त्र, तदंगभूत धर्मग्रंथ, धर्मगुरु, आणि रुढी परंपरा. या बंधनांच्या कक्षेंतच तो बसला पाहिजे. हीं पूर्वपरंपरा प्रत्येक समाजाला लागूं असल्याशिवाय समाजघटनांची सामाजिक व्यवस्था रीतसर आणि सुरळीत चालणें अशक्य. मग तो समाज बौद्धधर्मीय असो, ख्रिश्चनधर्मीय असो, इस्लामधर्मीय असो, अगर आणखीहि इतर दुसरा कोणता असो, त्याला सामाजिक बंधनें झुगारुन बंधनाच्या पलीकडे जातां येणार नाहीं.

वरील जागतिक तत्वानुसार आह्मीं ज्या एका वीरशैव (लिंगायत) समाजाचे घटक ह्मणून अभिमानाने मिरवतों, त्या समाजांतील धार्मिक बंधनें आह्माला पाळलींच पाहिजेत आणि ह्मणूनच, अष्टावरण, पंचाचार, आणि षट्स्थळांच्या त्रिकोणभूमिकेंतच आह्मी स्वतःला बांधून घेणें अवश्य आहे. हें अवजड-अवघड बंधन आह्मालां नको ह्मणून अनिबंधक वर्तन करावयाचें असेल तर एका विवक्षित समाजाचें घटक ह्मणून मिरवण्याचा तरी आह्माला काय अधिकार?

प्रत्यक्ष जगच्चालक परमात्म्यानें देखील स्वतःला स्वखुषीने मायेचें बंधन घालून घेतलें. आतां कुणी ह्मणेल कीं, परमात्मा अनिबंध, अनिर्वाच्य, निर्गुण, निराकार असतांना, तुह्मी परमेश्वराला देखील मायेच्या बंधनांत अडकूं टाकतां हें कसें? पण, आमचा अशा शंकेखोरांना असा सवाल आहे कीं, — जगच्चालक प्रभुदेवाचें अवतारकार्य बंधनाकरतां नाहीं तर कशाकरितां? परमात्मा जर निर्गुण निर्विकार, तर तुह्माला त्याची भक्ति करण्यांत तरी स्वारस्य काय? तुमच्या भक्तिभावाला बळी पडून त्यानें तरी तुमच्याकरितां कां धावून यावें? जगांतील अनेक व्यक्तिमात्रांच्या सुखदुःखाची काळजी त्यानें तरी कां वहावी? आणि जर तो असा आपल्या भक्ताकरितां संकटकालीं उडी घेतो आहे हें खरें मानायचें झालें, तर तो देखील बंधनातीत नाही हें उघड नव्हे का? 'भक्ती आकळीला। दयाघन भक्ती आकळीला' या अभंगवाणींतील भावार्थ परमेश्वरानें स्वतःला भक्ताच्या जातगोताची, त्याच्या उच्चनीचतेची, वा कशाचिहि क्षिती न बाळगतां, केवळ त्याच्या प्रेमळभक्तीचें बंधन स्वतःला घालून घेतलें हेंच नव्हे कां?

एकूण काय, बंधनातीत राहून सुखासमाधानानें कुणालाहि जगांत धडपणें वावरतां येणार नाही. आतां कालपरिस्थितीनुरूप हीं बंधनें किती आवश्यकची

[त]र किंवा शिथिल ( सैल ) करायची [हे] पहाणें तितकेंच अगत्याचें आहे. नव्या [पद्धती]प्रमाणें समजा एखाद्या सुशिक्षित, अपटूडेट [मु]लाला साहेबी पोषाखवाल्या गृहस्थानें [त्या]ला अगर शोभा ह्मणून गळ्याला नेक-[टाय] (गळपट्टी) बांधला तर त्याची गांठ देतांना ती [ठ]राविक आकारापर्यंत आवळण्यांतच शोभा [आहे]; आणि जर का तो मनसोक्त आवळण्याचें [धा]डस करील तर गळफास लागून त्याला [आपल्या] सुखासुखानें स्वर्गाला जावें लागेल. तद्वतच, [सम]जा एकादा पुराणमतवादी कट्टर सनातनी [योगमा]र्गानें ब्रह्मरंध्री आत्मा नेण्याची नाक-[दाबण्या]ची कसरती करतांना ठराविक प्रमाणांत ती [के]ल्यासच त्याचें उद्दिष्ट साध्य होईल; [प]ण जर का तो अट्टाहासानें, कसा परमेश्वर [येऊन] भेटत नाही तें पहातों ह्मणून नाके-[वर] खूपच ताण देऊन श्वासोश्वासाचा [कोंड]मारा करील तर परमेश्वराला त्याच्या-[कडे] खालीं येण्याऐवजीं त्यालाच ह्मणजे [त्या]च्या आत्म्यालाच वर जावें लागेल.

[आ]पल्या सामाजिक व्यवहारांत तरी [असें] दुसरें कार्य अधिक-उणें प्रमाण लागू [होणा]र ? सदसद्विवेकबुद्धीच्या कसोटीवर चालू [परिस्थि]तीशीं जुळतील, आणि सहजपणें समा-[जाला] रुचतील—पचतील अशा सुधारणा [कोणा]ला नकोशा आहेत ? पण — ['जुनें तें] सोनें' अशा अट्टाहासानें जुनें [तें सोनें]ी, वाह्मी ह्मणतो तेंच खरें, आमच्या [पूर्वज]ांच्या चालीरीती, जीं धर्मशास्त्रें, आणि [त्या]ंतील वरी वाईट ( वाईट तर त्यांत कांही [असें] त्यांना वाटतच नाही ह्मणा ! ) बंधनें [आपल्या] समाजाला घालून दिलीं आहेत, ती [आहेत तशी]च तशीच यावच्चंद्र दिवाकरौ [आ]पण सगळ्यांनी पाळलींच पाहिजेत, त्यांत [का]ं तिळमात्रहि फरक होतां कामा नये, ह्मणून ठाण [मांडून] बसतात. आणि नव्या मनूंतील, नव-तरुणांचा कांहीं प्रसंगीं या अवजड बंधनांनी कोंडमारा होऊं लागतांच जरा का बंधनाच्या पलीकडे त्यांचें पाऊल पडलें कीं धर्म बुडाला असें समजून धरणीकंपाच्या धक्क्यानें जमीन-दोस्त झालेल्या राजप्रासादागत, त्यांच्या हृद-याला हादरा बसतो.

वास्तविक, समजा, एकादा नवतरुण उच्च शिक्षणाकरतां परदेशगमन करून परत आला, तर त्याला प्रायश्चित्त दिल्याशिवाय पंक्तीपा-वन करून घ्यायचे नाहीं हा सनातन्यांचा अट्ट-हास; तर प्रायश्चित्त मुळीं घ्यायचेंच नाहीं हा नवमतवाद्यांचा हडेलहप्पी अट्टहास ! अशाच प्रकारची अनेक उदाहरणें आपापसांतील तेढीला कारणीभूत होऊन समाजाची एकी होण्याऐवजी बेकीचें भूत थैमान घालून समाजसुधारणेच्या घोषणेला बेकीचें विकृत स्वरुप प्राप्त होते. तसें पाहूं गेल्यास दूरदृष्टीने विचार करतां, आत्मा हा कधीहि भ्रष्ट होतच नाहीं, आणि भ्रष्ट झाल्यास, त्याला अग्नी दिल्याशिवाय दुसरें प्रायश्चितहि शुद्ध करून घेण्यास अपुरे आहे. मग काय एकाद्यानें, हॉटेलांत चहा घेतला, जाळा त्याला, एकाने अलिग्याच्या हातचें अन्न घेतलें, घाला त्याला भट्टींत; एकाद्या बाईचें चुकून वाकडे पाऊल पडलें, जाळा तिला जिवंत; अशा प्रकारें प्रायश्चित्त देण्याचीच प्रथा सुरु करावी लागेल. पण तसें करणें कोणत्याहि धर्मशा-स्त्रांत शिष्टसंमत समजले जात नाहीं-जाणार नाही. नुसत्या चित्तशुद्धीकरितांच प्रायश्चित्तविधीची योजना धर्माचार्यांनीं करुन ठेवली आहे. प्राय-श्चित घेण्यानें अब्रूला कमीपणा येतो, अगर अजूनहि आपला समाज इतका मागसलेला आहे, असें ह्मणून इतर समाजांतील लोक आह्माला हंसतात अशी मंडनमिश्री भाषा वापरुन नवमतवादी आपलें समर्थन करुं

पहातात. पण तुह्मी जर वीरशैवसमाजाचे एक घटक ह्मणवतां तर सामाजिक बंधनें तुह्माला पाळण्यांत कमीपणा तो कां वाटावा हेंच कळत नाही. प्रायश्चित्त घेतल्यानें, तें घेणाऱ्या व्यक्तीच्या रंगा-रूपांत कांही अजब फरक होऊन तो नराचा-नरसिंह, अगर न घेतल्यास माकडाचें बुबड होतो असातला भाग नाही. इथें प्रश्न काय तो सामाजिक बंधने पाळण्याचा आहे.

आज आह्माला प्रायश्चित्त नको ह्मणणारे उद्या आह्माला जवळ शिवलिंग बाळगण्याचीहि जरूर नाही असें ह्मणू लागतील. खुशाल ह्मणावें ज्यांना वाटेल त्यांनीं तसे. पण अशाच प्रकारें एकेक बंधन झुगारून जर आमच्यांतील शहाणे [?] नुसते नामधारी वीरशैव राहून समाजसुधारणेची टिमकी वाजवून जगाला भूरळ घालूं लागले, तर त्यांच्या या टिमकीला मधुर मुरलीचा निनाद समजून इतरांनी कां आणि कसें भुलावें कळत नाही.

आपल्या समाजाला उत्तरोत्तर उर्जितावस्था प्राप्त व्हावी असें सर्वांनाच वाटतें.

वीरशैवसमाजाची सर्वांगीण उन्नती व्हावी ही तळमळ प्रत्येक समाजहितचिंतकाला किती जिव्हाळपानें लागून राहिली आहे असें आजवरच्या सभासम्मेलनांच्या अहमहमिकेनें सहज सकृद्दर्शनीं कुणालाहि वाटल्यावाचून राहणार नाही. पण नुसत्या सभा भरवून, ठराविक साच्यांचे भाराभर ठराव पास करून घेऊन, नुसत्या शाब्दिक चळवळीशिवाय दुसरें कांहीं काडीमात्र निष्पन्न झाल्याचें आजवर आढळून येत नाही. ह्मणूनच या समाजसुधारणेला आह्मी नाटक हें नांव दिलें तर बिघडलें कुठें ? एखाद्या भटक्या नाटककंपनीनें चार चारगट पोरेसोरे जमवून कुठेंहि आपला चार-दिवसांचा मुक्काम टाकावा, आणि लोकांची चारदोन घटका करमणूक करण्याकरता जलसेवजा नाटकें करून स्वतःच्या चरितार्थापुरतें साधन पहावें; ना त्याला रंग ना रूप. ललितकलेचा गंध नाही, गायनविद्येचे जन्माचे वाकडें असतांना देखील आह्मी प्रति तानसेन ह्मणवून मिरवण्यापैकींचा सारा प्रकार. असल्या पोटभरू कंपन्यांच्या नाटकातील पात्रांना त्यांच्या स्टेजवरील अभिनय संभाषणाशिवाय इतरत्र जशी कवडीची किंमत नाही, तद्वतच आमच्या समाज सुधारकाग्रणी ह्मणवणाऱ्यांची गत आहे. कोणत्याहि कार्याला सर्वस्व समर्पण केल्याशिवाय यशाची आशा करणें व्यर्थ आहे. श्री. बालगंधर्वांनी नटसम्राट ही पदवी धारण केली ती नुसत्या बोलाफुलांनीं नव्हे, कर्तबगारीच्या आणि समरसतेच्या जोरावर त्यांनी बालपणींचा लौकीक आज पन्नाशी उलटून गेल्यावरहि कायम राखला आहे.

आर्यसमाजिस्ट स्वामी दयानंदांनी जगांतील कित्येक आत्तातांना तोंड देत देत जो एक धर्मध्वज उभारला, त्याला त्यांच्या अनुयायांनी आजवर रक्ताचें पाणी करून नावारूपास आणला इतकेंच नव्हे तर आजहि सर्वत्र त्यांचा यशोदुंदुभी अखिल भारतवर्षात दुमदुमतो आहे. याचें कारण नुसतें वाक्पटुत्व नसून, कर्तबगारी. ईस्मालच्या अनुयायांनीं तर स्वतःचें वर्चस्व अखिल जगावर प्रस्थापित करण्याखातर रक्ताचे पाट वाहवले, आणि आजहि प्रत्येक मुसलमान ईस्लामच्या नावाखातर आपलें शीर हातावर घेऊन धर्माखातर मरायला तयार आहे! ख्रिस्ती मिशनऱ्यांनीदेखील आपल्या देवबाप्पाच्या लाडक्या लेकरांची संख्या मेंढराच्या कळपानें वाढवण्याची युक्तिप्रयुक्तीनें, कुठे ऋणालयें खोलून, तर कुठें शाळा-कॉलेजें काढून, तर कुठे दुष्काळाच्या निमित्तानें अनाथांचें आश्रयदाते बनून, समाजसेवेच्या तरवारीच्या दुधारी धारेनें इतर समाजाचा फन्ना उडवण्याचा सपाटा लावला आहे.

…रिवाराखे अस्पृश्य, कीं ज्यांना रहा… घर नाही, आणि अब्रू झांकण्याइतपत… पांघरुण नाही, खायला सडक्या-कुजक्या… उकीरड्यावर फेकलेल्या जिनसा… कसलाहि उदरनिर्वाहाचा आसरा… अशा हीनदीन परिस्थतींतहि, समाज… ची कळकळीची चळवळ करून साऱ्या… लक्ष आपल्या समाजाकडें वेधायला… …लें.

…:—

…वीरशैवसमाजानें यापैकी कांही केल्याचें… चित्र आज कुणी दाखवील का ? आज… शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे… प्रत्येक समाजहितचिंतक बोलतो आहे खरा. …शो ? नांव कशाला ? पांच-दोन शिक्षण… [ बोर्डिंग् ] आमच्या वीरशैवसमाजांतील… प्रमुख शहरीं नांवापुरत्याच, ( नांव घेण्या… एकहि नव्हे ! ) आहेत, पण काय, … गावंढळ ह्मणीप्रमाणे, …गा नी धिंगाणा, हेंच त्याचें सर्टिफिकेट. …र एखादी तरी शिक्षणसंस्था व्यवस्थित… आहे असें कांहीं आढळून येत नाहीं. …हातीं घेतलेलें कार्य सुरळीत चाललें… वीरशैव कसले ? व्यवस्थितपणाचा… देखील आमच्या वीरशैवसमाजाला… करणारा आहे असाच जणुं चंग बांधुन… समाजांतील कार्यकर्ते, समाजसुधार-… आखाड्यांत उतरले आहेत.

…भस्म कपाळावर फासून, रुद्रा-… मखमली रेशमी कोपीन, पायीं चांदी… मढवलेल्या पादुका, आणि एकाद-… भरजरी अंगवस्त्र ( ? ) इतका थाटमाट… आमच्या आचार्यांची सर्वस्वी समाज-… …।

तसेंच, कपाळावर भस्म, गळ्यांत भला थोरला मसजिदवजा लिंगाकार, अंगांत बाराबंदी, डोकीला पांढरा फटफटीत फेटा, अंगावर एखादे पांढरें उपरणें, पायांत नगरी जोडा आणि अहोरात्र दुसऱ्याला हिणवणें हीच आमच्या सनातन्यांची समाजसुधारणा !

सैल पांढरी शुभ्र विजार, कोपऱ्यापर्यंत बाह्याचें एक उघड्या गळ्याचें हाफशर्ट, पायांत वहाणा, डोकीवरील पिंजारलेले केस, आणि मिशाला हरताळ ( नव्हे, बादशाही साबू ) लावून सनातन्यांवर दुगाण्याझाडण्याचा उद्योग करीत, धार्मिक, सामाजिक बंधनांना लाथेखाली तुडवीत, दिमाखानें मिरवणें ही आमच्या नवमतवाद्यांची समाजसुधारणा ! बायकांच्या बाबतींत तर न बोललेलेंच बरें! हा असा समाजसुधारणेचा विचित्र रागरंग असल्यानंतर आजच्या धकाधकीच्या काळांत आमच्या वीरशैवसमाजाला परमेश्वर तरी कसा तारणार हें कोडें ज्यांचें त्यांनीच उलगडावें !

---

# नवमतवादी समाज-चित्रें

लेखकः--
श्री नारायण स्वामी,
मलवडी (सातारा).

तो:—अग ए, चहा कर बघु लौकर, मला पुन्हा बाहेर जायचंय !

ती:—अगदीं लगेच ? जरा बसायचं गडे थोडा वेळ तरी !

तो:—बसतो ग ; पण चहाच्या तयारीला लाग पाहूं.

ती:-- चहा केव्हांच तयार झालेला आहे.

तो:-- चांगलं !

ती:-- आलंच पुन्हां तुमचं च्यांऽगलं !

तो:-- अग ती मला संवयच झाली, त्याला मी काय करूं ?

ती:— 'संवय झाली' असं ह्मणून कसं चालेल ? घाणेरड्या संवयी — नाकांत तंबाकू भरायची, च्यांऽगलं, नाहीतर कमालच केली ह्मणायची, असे ठोकळे पुढे करायचे; हें सर्व घालवण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

तो:— लागलीस आतां मलाच शिकवायला. मास्तरीण असलीस तर त्या तुझ्या गांवच्या मुलींची ; माझी नव्हेस !

ती:— इश्श् मेलं ! हें काय भलतंच ! पण आपल्या व्यंगाबद्दल लोक तोंडावर बोलत नसतात, हें कसं तुमच्या लक्षांत येत नाही ?

तो:— अग, तोंडावरच काय पण लेखी पत्र लिहून चेष्टा करणारी झांकली माणकं आहेत हें तुला कसं समजत नाहीं ? वेडीच अगदीं !

ती:-- ह्मणे वेडी ! दिसतंच की कुणाला वेड लागलय तें ! ही हातभर लांब घेंडीच सांगेल कीं !

तो:-- च्यायला ! घेंडीत का वेड ठेवलेलं आहे ?

ती:— त्याचंच तें एक लक्षण दिसतं !

तो:— ह्मणजे ! तूं तर सुधारणेची माझ्यावर ताण केलीस !

ती:— वा ! मला अगदीं इतकी खेडवळ समजू नका बरं !

तो:— छें बुवा ! तूं उद्यां सांगशील 'हें गळयांत कशाला ठेवलंत दोन शेराचं लिंग!'

ती:— अलबत सांगेन. मला नाही आवडत असलीं ढोंगं ! ह्यातान्या माणसाच्या अगदी शेंपट्या धरून नाही चालायचं ! त्यांच्यापेक्षा आपण थोडं थोडं पुढे गेलं पाहिजे संधी साधून!

तो:—शाबास ! आज तरी तूं माझ्यापुढे आहे खास ! तुझ्यापुढें 'मी' अगदीं खरोखरच 'फीबल' ठरतो. बरं चहा दे पाहूं कुठें तो!

ती:— ह्या ! हळू हळू ! इतकी घाई कशाची झाली ! फुंकर मारून प्या कीं, आणि

...कुठं जाणार हो फिरायला ? मी तरी ... वाई !

तो:— का ? जेंवण वगैरे काही करा... वाच ?

ती:— कसलं जेंवण सावकाश; आधी फिरून ...ऊं थोडं !

तो:— इतकी जेंवणाला कंटाळलीस ?

ती:— का नाही कंटाळणार ? पुरा एक ...ना झाला घरांत बसून. ह्मणें ' चल नोकरी ...र मुंबईला. मी लावीन कुठें तरी तिकडे ...ला शाळेत तुला. '

तो:— वा ! काय जास्त दिवस नाहीं झाले ...रिकामे बसून. मी तर वर्षांच्या वर्षं घरीं ...बसतो !

ती:— बसाल कीं. पण मला नाहीं दिव... पडायच चुलीजवळ. त्या महेश्वराची ... अन् मी तुमच्या सांगण्यानं माझी ...मास्तरकी अजिबात सोडली नाहीं ! ...तर मला कांही घराबाहेर काय असतं ...नसतं केव्हांच !

तो:— छे छें ! लाडके, अशी नाराज होऊं ... मी तुझ्यासाठीं बघतो की इकडेंच खट... आतां कशाला जायचं त्या खेड्यांत.

ती:— बरं, तर खरं कोणाच्या वशिल्यानें ...मिळवतां तें.

तो:— हं ! कित्येक पडले आहेत वशिले ...सारखे. नांव ऐकशील तर थक्कच होशील.

ती:— ऐकूं तर खरं कुठल्या कुठल्या साहे... ...ओळखी आहेत त्या.

तो:— नंबर एक, नंदीशेठ. नंबर दोन –

ती:— पुरे करा –

तो:— थांब, जरा धीर धर. महत्वाचा असा आणखी एक आहे; तो ह्मणजे लठ्ठ.

ती:— चला. पुरे झालं. मला त्या तुमच्या चौपाटीच्या गप्पा नाहींत ऐकायच्या ! मला आपली गांवीं परत जाऊन माझी नोकरी पुन्हा पकडावयाला पाहिजे एवढं खरं.

तो:— बर बर जाशील गांवीं. पण पाहशील कीं तुला आधीं मी इकडेच नोकरी देईन तें.

ती:— उजेड पडणार तोंडावर ! पुढें काय करणार तें मला ठाऊक आहे. मी आपली इथं आहे तोंपर्यंत तरी मला दाखवा हो मुंबईचं काय असेल नसेल तें सगळं.

तो:— सगळं ह्मणजे काय ? राणीचा बाग, हँगिंग गार्डन् —

ती:— विसरलेंच होतें. खरंच आतां कुठं हो चाललांत तुह्मी फिरायला ?

तो:— कुठें नाहीं ग, आपला येतोय जरा चौपटीवरून पाय मोकळे करून.

ती:— देव पावला. मीहि येतें तर मग चौपाटीला.

तो:— आतां नकोस ग. जाऊं केव्हां तरी

ती:— तें कांहीं नाहीं.

तो:— थांब आधीं ! सांगतो तुला सगळं व्यवस्थित ! पण एक चिमटी —

ती:-- बरंच झालं एकार्थी. कोंबा ती बुकणी खाकांत, तोंपर्यंत मी हें पातळ बदलतें.

तो:-- नको नको ! लाडके, हात जोडतो. आतां तरी येऊं नकोस माझ्याबरोबर.

ती:— तें कांहीं नाहीं. तुह्मी अशी नेहमींच टाळाटाळी करता. आतां मी येणारच.

तो:-- नको ग. अशी काय तूं अगदीं 'चित्रा' तल्या 'ती' सारखी करतेस ? जाऊं कीं सवड काढून केव्हां तरी. आतां हट्ट करूं नकोस, हूं मी जातो हूं !

ती:— बं हूं ! तें कांही नाहीं. मी पातळ बदलीपर्यंत थांबा. नाहीतर लिंगाचा दोर पकडून ठेवीन.

तो:-- कमालच केलीस ह्मणायची ? अग सोड, लिंग सोड, वाटल्यास शेंडी धर.

ती:— इतके कां घाबरतां आतां ?

तो:— गळ्यांतलं लिंग कशी धरतेस ? लोकं काय ह्मणतील हें पाहिलं तर !

ती:— बरं मग कांही धरीत नाहीं. थांबाल ना तोंपर्यंत ?

तो:— हो ! थांबतों.

ती:-- आतां कसे वठणीवर आलांत !

( ती अप्सरेसारखी चमकत, आणि तो 'फीवल' सारखा रडत चोपाटीकडे जातात ! )

---

[बाल]वाचकांकरता:—

# [यु]क्तिबाज वीरभद्र

लेखक:—
डॉ. काशिनाथ शंकर लखापति,
जी. ए. एम्. एस्.

[वीरभद्र]:— बाबा तरी काय आहेत पहा, [...] पहावं तेव्हां सारखं मला काम करायला [...]. बरं कांही घरांत दुसरी मुलं-माणसं [...]. आता आपणहि पण जरा वेडयाचच [...] घेऊन, टाळाटाळ करून किंवा बाबांनाच [...] सोडून, यांतून सुटका करून घेतली [...]. या कामाखाली शिकण्याच्या नावानं तर [...] एवढं पूज्य झालं आहे. ( बाबा आंतून, [...], ये बाळया ह्मणून हाक मारतात. ) [...] चालीच त्यांच्या हाकेला सुरवात. [...] जरा गंमत करूं या. (जातो).

[बाबा]:— ( आंतून ) ए बाळ, ए बाळ, काय [...] कारट्याला इतक्या हाका मारल्या तरी [...] आहे कां कुठें शाळेंत तरी जातो कां? तेंहि [...] अरे बाळ, ए बाळ, ए बाळया !

[वीरभद्र]:— ओ! ओ! बाबा, काय आहे?

[बाबा]:— ( कावपिचक्या देऊन ) कारट्या, [...] इतक्या हाका मारल्या तरी तुला [...] नाही.

[वीरभद्र]:— पण बाबा, मला एकच हाक [...] आली.

[बाबा]:— काय, तुला एकच हाक ऐकूं आली [...] बाळ-बाळ ह्मणून घसा कोरडा झाला [...]

वीरभद्र:-- हं, हं, बाळ-बाळ ह्मणून मी ऐकलं, पण मला वाटलं कीं, तुह्मी कुणातरी लहान मुलाला हाक मारताय. कारण आह्माला शाळेंत मास्तरांनी बाळ ह्मणजे लहान मूल असा अर्थ सांगितला आहे.

बाबा:-- अगदीं अकलेचा खंदक दिसतोस मला तर !

वीरभद्र:-- तो कसा हो ! खंदकांत तर पाणी असतं, आणि मग माझ्यांत?

बाबा:-- पुरे झालं आपलं ज्ञान. जा, त्या मनीला घेऊन ये इकडं. ( वीरभद्र जातो. ) अलीकडं हा दिवसेंदिवस जास्तच वेडयासारखा करायला लागलाय. ( वीरभद्र येतो. ) कारे ! तिला नाहीं आणलीस ?

वीरभद्र:-- बाबा, ती आपल्या पिलांना पाजीत कणगींत पडली आहे. तेव्हां ह्मटलं, ...

बाबा:-- हात टेकले बाबा तुझ्या ज्ञानापुढं !

वीरभद्र:— हं, बाबा तुह्मी खोटं बोलताय; कुठें हो हात टेकलेत? मास्तरांनी तर सांगितलं आहे कीं, " खोटे कधीं बोलूं नये. "

बाबा:-- पुरे कर बडबड. कामाच्या नावानं तर अगदी पूज्य; तोंड मात्र सारखं चाललंय. जा. आता तरी आपल्या मनीला घेऊन ये.

( वीरभद्र जातो. ) आतां या लेकाला काय उपाय योजावा, हें मला तर अगदी सुचेनासं झालंय. ( वीरभद्र येतो. )

वीरभद्रः— बाबा, तिला झोप लागली आहे.

बाबाः— बरं, मीच येतो पाहून. मी येई-पर्यंत पाटी घेऊन बैस, आणि मधून मधून त्या बाळवणाकडे जरा पहा. ( बाबा जातात. वीरभद्र पाटी घेऊन येतो. इतक्यांत सदाशिव येतो.)

सदाशिवः— अरे वीरभद्र, चलतोस ना हिंडायला? ( बाबा येतात. सदाशिव निघतो. )

वीरभद्रः— बरं तर, तूं पुढे चल भी इतक्यांत आलोंच.

बाबाः— ( चापट मारून ) कारट्या, तरी ! घोरडांनी दाणें खाल्लें ना ! तरी मी पहायला सांगितलं होतं !

वीरभद्रः—मग मी पहातच होतो कीं, तिकडे घोरडांनी दाणे खाल्ले तेव्हां. तुह्मी मला पहायलाच सांगितलं होतं.

बाबाः— धन्य झाली तुझ्या शहाणपणाची! आणि ही पाटी कशाला रे आणलीस !

वीरभद्रः— बाबा, तुह्मीच ह्मणाला होता किं हो ! कीं पाटी घेऊन बैस ह्मणून.

बाबाः— आतां मीच मूर्ख ठरायची वेळ आणली यानं. असल्या कारट्यांचा काय उपयोग [चापट मारत मारत] चल. चालता हो येथून.

वीरभद्रः— झाली एकदाची सुटका कशी

## छान ! छान ! असा थोडा तरी आपलेपणा दाखवीत चला !

ता. १८-७-३७ रोजी सायंकाळी ६ वाजता सांगली-वीरशैव-लिंगायत-बोर्डिंग-मध्ये सांगलीचे सुप्रसिद्ध व्यापारी व श्री बालाजी-स्पिनींग अॅन्ड वीव्हींग मीलचे मालक व सांगली चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष शेठ जयनारायणजी शिवनाथ यांचे अध्यक्षतेखाली सभा होऊन रमेत रबकवीचे सुप्रसीद्ध V. B. आरबली ( लिंगायत ) व सांगलीचे जंबुराव बाबाजी आरवाडे ( जैन. ) सांगली संस्थान रयत असेंब्ली मध्यें प्रचंड बहुमतानें निवडुन आल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्याकरिता सांगली-वीरशैवसमाजातर्फे त्यांचें जाहीर अभिनंदन करण्यांत आलें, व अभिनंदनपर बऱ्याच वक्त्यांचीं भाषणें झालीं. त्यांतील प्रमुख वक्त्यांचीं नांवें एम. एस. हिरेमठ वकील, दीपचंद भायचंद वकील, मोकरे वकील, पाटील वकील. म्यु. मेंबर अमीनशहेब, खेराडकर, दंकाडे, खोकले, वगैरेनी वरील दोघा नामदारांचे गुणवर्णन करून त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें, व गुरसीदप्पा वस्त्रर यांनी आभारप्रदर्शन, व दडगे-सेवारी, रीसवडे यांनीं हारतुरे अत्तर पानसुपारी देऊन सर्वांना अल्पाहार देण्यांत आला. असें एक बातमीदार कळवितात.

लघुकथा १४ वी.

# विद्यार्थी शिवकांत

[ लेखकः—कु० सिताराम होनराव अहमदनगर. ]

...वेळीं दारिद्र्याची मूर्तिमंत सांवली त्याच्या खोलीत वास करीत होती. ...अभ्यास करण्याकरितां फाटके गोण... ...व त्याच प्रकारच्या कामा— ...एक पातेली, आणि नेसल्या धोतरा— ...एक धोतर, थंडीला पांघरण्यासाठी, व ...फाटका शर्ट व कोट अन् ...करितां एक मोडकी ट्रंक ....... ...ऐश्वर्य होतें ........ सकाळची ...प्रशांत वेळ. तो अगदीं विचारांत ...होता, " आपल्याला शिक्षणासाठीं ...आश्रय मिळेल कां ? शिक्षणक्रम सुर— ...कां ! ........... असे किती ...शिक्षणाबद्दल मनरूपी चित्रपटां— ...निघून गेले ......... त्यानें ...डोळे ...... आपल्या जागृ... ...करून घेतली, व सभोवार त्यानें ...त्याच्या डोक्यांत कल्पना आली व ...कोटाच्या खिशांत हात घातला, ...अंतःकरणाचा एक उसासा ...........

*

*

...शाळेंत स्पोर्टिंगची वावटळ चालू ...वर्गणीला Compulsion ...कापटीचरांच्या ... ह्मणण्याप्रमाणें ...खेळांत भाग घेतला होता, व प्रत्येकांत त्यानें चांगलें बक्षीस मिळविलें होतें. चित्रकलेच्या प्रदर्शनामध्यें त्यानें चांगलें ड्राइंग काढून ठेवलें होतें. त्यांत पहिल्या नंबरचें त्याचें ड्राइंग निवडून आलें व त्याला पांच रुपये बक्षिस मिळाले होतें. .........

* * * *

... शिवकांत हा एक शिक्षण घेणारा होतकरु, गरीब, हुशार, तरुण विद्यार्थी होता. आई बाप लहानपणीं वारल्यानें मावशीनें त्याचा संभाळ केला होता, व शिक्षणक्रम चालविला होता. शाळेंत असतांना त्यानें सायकल— वरून दोन—तीन मित्रांसमवेत तालुक्यांतील खेड्यांत जाऊन समाजांतील संजीवनी, गर्जना, सुदर्शन ह्या वर्तमानपत्रांची माहिती अशि— क्षित वर्गाला सभा भरवून त्यांत व्याख्यानाच्या रूपानें ते सांगत असत, व समाजांतील तन—मन— धन खर्च करून समाजसेवा करणाऱ्या पुढा— ऱ्याची ते शाब्दिक रूपाने ओळख करून देत असत, असा त्यांचा मे महिन्यांतील व नाताळच्या सुट्टींतील क्रम असे. परंतु राहिलेल्या ठिकाणीं एकटी मावशी असल्यामुळे व शिक्षणास पैसे नसल्याने मिळालेले पांच रुपये घेऊन त्यानें नंदापुरमधील बोर्डींगमध्यें प्रवेश केला ...........

* * * *

बोर्डींगच्या सर्व मुलांत हा दिसून येत होता, कारण त्याचा अभ्यास, मनमिळावूपणा, व व्यवस्थित वागणूक होय. शाळेतसुद्धा सर्व टीचर लोकांना तो आवडूं लागला. श्रीमंत (वीरशैव) विद्यार्थी त्याची मैत्री करूं लागले. .......... रविवारचा सुट्टीचा दिवस. शिवचंद्राच्या घरीं कसली पार्टीची गडबड होती. चंद्रानीं कांतला घरीं फराळाला सांगितलं होतं......कांताची माहिती चंद्रानी दोन दिवसांपूर्वी आपल्या आईवडि-लांना सांगितली होती.....साहाजिकपणें त्यांची सर्वांची इच्छा कांतला पाहण्याची झाली...

......कांत घरी आला......

...फराळ झाल्यावर...

इकडच्या-तिकडच्या गप्पा दोघांनी मार-ल्यावर सुमन छोटयाश्या ट्रे मध्ये तीन कॉफीचे कप घेऊन आली. टेबलावर ट्रे ठेवीत पहिली चोरटी नजर कांतावर तिने टाकली.......

...कांताची नजर, सुमनच्या नजरेला भिडली... ........ कपबश्यामधील कॉफी संपली, ...... कांताची व चंद्राची चांगलीच मैत्री जमून गेली. त्या मैत्रींत सुमनची भर पडूं लागली........ प्रत्येक ठिकाणी ते तिघे असावयाचेच असें झालें......कांतानी आपल्या मनमिळावूपणा व प्रेमळ भाषाशैलीनें सुमनचें मन आकर्षून घेतलं होतं. उलट, सुमनलाहि कांतविषयीं आपले-पणा वाटत होता......

......परीक्षा जवळ आली.......

चोहोंकडे विद्यार्थी-विद्यार्थिनी रात्रीचे दिवस समजून पुस्तकांत डोकं खुपसून बसल्याचे दिसू लागले......शेवटचा आज पेपर होता... ...तिघांनी चांगला अभ्यास केला होता....... ......रिझल्ट लागला.....तिघेहि पास झाले... ...कांताचा पहिला नम्बर आला... कांत चंद्राच्या आईबापांना आवडूं लागला. सुमन-विषयीं कांताच्याहि मनांत बराच अनु-कूल ग्रह झाला....नेहमींच्या नियमानें ते फिरा-यला निघाले ......चंद्राचे डोकें दुखत होतें ह्मणून तो गेला नव्हता......दोघेहि खूप लांब गेले...कोणीच कांही बोलले नाही...दोघांच्या डोक्यांत एकमेकांविषयीं आपलेपणा वाटून त्यांचे विचार त्यांच्या डोक्यांत एकमेकाविषयीं थैमान घालूं लागले ... सुमन बोलली:—काय कांत, आज कां स्तब्ध ? ......पांच मिनिटांनी... "सुमन, तुला माझें हृदय मोकळें करून सांगा-वयाचें आहे. मी पांच दिवसांनी बोर्डींगमध्ये जाणार आहें" ......

"खरच तूं पुन्हा बोर्डींगमध्यें जाणार?" सुमन ह्मणाली

"नाही जाऊं तर कुठें राहूं?" कांत ह्मणाला.

"बोर्डींगमध्यें नाही राहिले तर चालणार नाही कां ?" ती ह्मणाली.

"हो चालेल तर काय झाल;" तो ह्मणाला.

"मग कारे जातोस ?" ती ह्मणाली.

......पुढील कांताचं व सुमनचं काम निसर्गानें केलें......कांत सुमनला घेऊन आपल्या गांवी मावशीकडे आला......लवकरच कांतला ५० रुपये महिन्यावर नोकरी लागली ......दोघेहि आनंदांत राहूं लागले.

---

## 'आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः' असें होऊं देऊं नका !

कऱ्हाड येथील वीरशैवबोर्डिंगातील विद्या-र्थ्यांनीं धर्मवीर गणपतराव बटाणे यांचे अध्य-क्षतेखाली वक्तृत्वोत्तेजक मंडळाचा उद्घाटन-समारंभ साजरा केला असें वाचण्यांत आलें.

उपक्रम स्तुत्य आहे, पण निर्वेधपणें तो चालू रहाण्यांत मौज. नाही तर नाममात्र, असें होऊं देऊं नका ! आगे बढो कदम कदम !

श्रीमज्जगद्गुरु

# स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

## संदेश २ रा.

अहो 'संजीवनी' चे संपादक महाराज, शुभं भवतु कल्याणम् हा आमचा शुभाशीर्वाद आपलें कोट कल्याण करील ही खात्री बाळगा.

[illegible] तुम्हीहि मात्र आमचा शुभाशीर्वाद [illegible]ण्यापासून नाही नाही त्या मौजा करा[illegible] लागलां म्हणायचे! एकूण काय, लवकरच [illegible] आपल्या 'संजीवनी'ला मौजेची फुलसाणी [illegible]र असा रंग दिसतो. मागील अंकातील [illegible]जीवनीच्या टपालांतील मोजेची प्रश्नोत्तरें' [illegible] मौजेची आहेत यात शंका नाही. पण [illegible] बुवा! धार्मिक, अगर सामाजिक [illegible]हटलें की तें सोवळे नेसलेल्या गबाळग्रंथी [illegible]प्रमाणें नेहमी आपलें मिळमिळीत [illegible] असावें हें बरें! नाहीतर उगीच [illegible]नंदाने नाचूं लागून, त्यांतील खुमासदार [illegible] हसायला लागल्यावर स्वास्थ्य [illegible] आपल्या टपालानें अचूक शरसंधानाची [illegible] बजावली आहे हें खरें; पण ती [illegible] जिव्हारी झोंबल्यास, या मौजेंची [illegible] होणार खास! कारण उण्याअंगी [illegible], हें तत्व कसें खोटें ठरणार ?

आपण मात्र सडेतोडपणानें जे उत्तराचे चुरचुरीत अंजन निर्माण केलें तें क्षणभर डोळ्यांमधून, आनंदाचे अगर दुःखाचे पाणी गाळायला भाग पाडील, आणि मस्तकशूळ थांबवील यांत संशय नाही.

बाकी तुम्हीहि बरेच खमंग भेटलांत म्हणायचे आम्हाला. कुठल्याहि सवर्णीय — अवर्णीय वृत्तपत्राकडें ढुंकूनहि पहायचें नाही अशी आम्ही घोर प्रतिज्ञा केली असतांनादेखील, संजीवनीबद्दल आम्हाला अत्यादर वाटायला लागला, आणि आमच्या कारभाऱ्यांना, लसुणलिंगशास्त्र्यांना, आम्ही संजीवनीचा प्रत्येक अंक बिनचुक आम्हाला वाचून दाखविण्याची आज्ञा केली. आणि आपली मौजेची प्रश्नोत्तरें आम्हाला तरी फार फार, फार काय अगदी बेहद हॉटेलातील कांद्यांच्या भज्यासारखी खुसखुशीत आणि लज्जतदार वाटली. अरे पण हो! सध्या चातुर्मास चालूं आहे, नाही कां ? कांद्याचें नांवदेखील आम्हीं सनातन्यांनी सध्या वर्ज केलं आहे. आणि हॉटेलचें! शांतं पापम शांतं पापम्! अहो लवड तरी बोलूं नका, सटी सहामासी. पण इतका अवघी कुणाला आहे? केव्हा एकदा चातुर्मास संपतो नी केव्हा

एकदा सवेंचा पण साजरा करून चातुर्मासाचे उट्टे या कांद्यावर काढून घेतो इकडे सनातन्यांचे डोळे लागले आहेत.

संपादकमहाराज, पण कांद्याच्या प्राकृत नांवावरून एक भलतेंच संकट आमच्यावर ओढवूं पहात आहे. नाममात्र आमचा संबंध कांद्याशीं चिकटवून आमच्यावर देखील कांही मन्डळींनी बहिष्कार घातला आहे. अहो बहिष्कार म्हणजे काय विचारतां, बरे झाले पावसाळा सुरू आहे, नाहीतर कडक उन्हाच्या संतापांत आम्हाला खुशाल वाळींत टाकले असते. तरी आम्ही त्यांना निक्षून सांगितलें कीं, आमच्या गुरुमहाराजांना कांदे अतिशय आवडत असत, आणि मी महाराजांचा अतिशय आवडता शिष्य असल्यामुळे माझें नांव त्यांनी कंदर्पानंद ठेवून आपल्या तोंडाची हौस भागविण्यासाठीं हें असें केलें. अर्थात् माझे सुसंस्कृत कंदर्पानन्द हें नांव तुम्ही प्राकृत कांद्याशीं चिकटवूं नका ! पण त्या शहाण्याच्या कांद्यांनी माझे कांही एक ऐकून न घेतां, माझ्या पुराणाला देखील बंदी केली, आणि लसुणलिंग शास्त्र्यांशीं संधान बांधून सौ. कोथिंबीर बाईसह आंतल्या आंत सहभोजनाने प्रसंग श्रावण मासांतील जंगमार्चन (घर उरकणें) खुषाल उरकून घेऊं लागले. बरें आहे म्हणावें बच्चाजी! तुमच्या तोंडी जर चातुर्मास संपताच पाणी सोडायला न लावीन तर आजवरच्या तपश्चर्येचं जहाल पाणी माझ्या अंगीं उरलें नाहीं असें समजून खुशाल नांव बदलून देईन म्हणावें !

सनातन्यांनी आमच्यावर बहिष्कार घातला आहेना? घालूं द्या. आम्ही नवमतवादी मंडळीवर आमच्या नांवाची इतकी छाप पाडली आहे कीं, "चातुर्मास-बीस हम कुछ नही जानते', असा रोख ठोक जबाब देऊन ते निरंतर माझ्या चरणावर लोळण घेतात, आणि भक्तिभावानें आमचा प्रसाद स्वीकार करतात. कारण त्यांना कांहीं तरी अक्कल आहे ? इतर समाजामधून फसकशा सुधारणा होताहेत हें ते पूर्णपणें जाणतात. आपल्या वीरशैवसमाजावर मुसलमानांचा बराच डोळा आहे, आणि ते वाटेल त्या थापा मारून आपल्या इस्लामी धर्माची वाढ करण्यास अहमहमिकेने पुढें सरसावतात. न जाणो, आमच्यावरहि असा कांहीं प्रसंग आल्यास, आमच्यांतील कंदर्पानंदासारखा प्रमुख आचार्य जर इतर धर्मीयांच्या तावडींत गेला तर वीरशैवधर्माची कधींहि भरून न निघणारी अशी हानि होऊन मानहानीहि होईल, हीं त्यांना पूर्णपणें जाणीव आहे. नवमतवादी मंडळीनी चंग बांधून आमचे प्रतिक म्हणून गळयांत लिंगाऐवजी एकेक कांदा अडकवून सनातन्यांची खोड तोडावी असें फर्मान आम्ही आमच्या नवमतवादी शिष्य मंडळींना देत आहोंत,आणि ते अशा प्रकारे स्वधर्माचा, स्वगुरुवर्गाचा जागता अभिमान बाळगून वागतील असा आम्हाला पूर्ण विश्वास आहे.

आमच्या बुवाबाजीविरुद्ध नवमतवादी कुरकुरतात ही गोष्ट आम्हाला तरी साफ खोटी असावी असें वाटतें. आताचे नवमतवादी कांहीं इतके दुधखुळे नाहींत. स्वार्थसाधू सनातन्यांच्याच पोटाची पोटदुखी आमच्या विरुद्ध उमळते आहे असेंच आम्ही म्हणतों. आम्ही स्वामी लोक आतां कांहीं इतके भोळे राहिलों नाहीं कीं वाटेल त्या यजमानाच्या कच्छपी लागून, शिरापुरीचे विळावे छोडीत, मखरच्या गिरद्यावर शिष्यिणीच्या हातून पादसेवा घेत चार दोन महिने यजमानांच्या घरीं लोळत पडावे, नी एकाचें दिवाळें वाजवून वाजागाजानें दुसरा एकादा भोळसर यजमान गळी उतरवण्याखातर हत्ती-घोड्यांच्या मिरवणुकींत मिरवावे. झाली एवढी तपश्चर्येची उधळपट्टी बस झाली, अंगा पोवत विचार करून स्वामी

लोकांनी यापुढें मुळींच कुण्याहि यजमानावर प्रबळ झाडण्याच्या भानगडींत पडूं नये असाच आम्ही आपल्या स्वामींच्या मन्डळांत ठराव पास करून घेणार आहोंत. मग बसा म्हणावें खुशाल कोकलत, यजमानांना ! कधीकाळी एकादा यजमान फारच ...पालूं लागला तर खुशाल दुगाण्या झाडून त्याची हवेलंडी उडवावी, म्हणजे पुन्हा कोणीहि आम्हा लोकांच्या वाटेला म्हणून फिरकायचा नाही. आम्हा लोकांना कांही असा ताम्रपट ...शंभूदेवानें दिला नाही कीं यजमानांची ...निस्तरण्याकरितांच तुम्हा स्वामी लोकांचा जन्म आहे म्हणून. सेपन्नास रुपयांच्या दक्षणेवर आणि मिष्टान्नावर विकत घेण्याइतकी स्वस्त आमची पुण्याई आतां उरली नसून, तपश्चर्येची तनसडीहि न गमावतां समाजसुधारणा करण्याची बोलकी कला आम्ही साध्य करून घेतली आहे हें अजून देखील या लोकांना कळत नाही हें समाजाचें दुर्भाग्यच नव्हे कां ? न कळूं द्या ! मरेना का समाज ! एवीं-तेवीं आम्हा वीरशैवांना त्यातूनहि स्वामी समर्थांना तर कुणाच्याच मरणाचें सुतक नाही. मग एवढी फिकीर तरीं कां करायची या समाजीष्टांची? भरभक्कम उत्पन्नाची बाब पुरवून ठेवली आहे आमच्या गुरुकृपेनें ! खुशाल चैन चमन करीत उधळपट्टी करून मोक्षाला जाऊं ! आणि पाहूं कोण कुणाला हसतो तें !

—:शुभम् भवतु इतिः—

## ...लफुलाला गांठ पडेल तो सुदिन !

...र्शी येथील वीरशैवसमाजाचे एक प्रमुख ...ते, आणि सोलापूर-जिल्हा वीरशैव-परिषदेचे ...अध्यक्ष श्री. काकासाहेब झाडबुके यांनी ...तील प्रतिष्ठित मंडळींना जमवून, आप...तील दुहीला फाटा देण्याचा स्तुत्य उपक्रम ...ला. कांहीतरी निमित्तमात्र क्षुल्लकसा कार...ण नसतेच फाटे फोडून फाटाफूट कर...णाऱ्या कांही गुलहौसी मंडळींना आनंद वाटत ...सतो, आणि अशींच कारणें आपसांतील ...वाजवण्याला कारणीभूत असतात. पण ...ऱ्या समाजहितचिंतकाच्या हृदयाला मात्र ...दुहीच्या दुधारी धारेचे वार असह्य होऊन, ...त्याला आपापसांत सलोखा आणि प्रेम ...करून असा मार्ग आक्रमण करण्याची अहोरात्र ...तळमळ लागलेली असते. शब्दशः हीच तळमळ ...श्री. काकासाहेबांना अहोरात्र असल्यामुळे त्यांनी ...सर्वांना जुळवून आणली, आणि सामाजिक ...हितासाठी, मानापमानाची पर्वा न करितांहि, वीरशैव तेथून सगळेच एका दर्जाचे, या भावनेनें जें एकीचें बीज पेरलें, त्याचा फोफावलेला वृक्ष सामाजिक सुधारणांच्या सुगंधित फुलाफळांनी बहरलेला दृष्टीस पडला तर कुणाला आनंद होणार नाही ? श्री. काकासाहेबांचाच कित्ता इतरांनी गिरवल्यास समाजोद्धार होणार नाही कां ?

---

## ‘ कौमुदी ’ ची कुरापत

बेळगांव येथील लिंगराज कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. नंदीमठ, यानी कौमुदीनें आपल्या लिखाणांत आमची बदनामी केली अशा आरोपावरून इं. पि. को. ५०० च्या कलमान्वये, ‘कौमुदी’च्या सहकारी मित्रांवर फिर्याद दाखल केली असें समजतें. ‘कौमुदी’ सारख्या अल्लड कुमारिकेवर, डॉ. नंदीमठाची गहरी नजर फिरली म्हणायची एकूण ! पुरुषाची जातच निष्ठुर यांत शंका नाहीं.

# टिळकाश्रमाचा उद्घाटनसमारंभ.

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें 'अरुण-उदय संजीवनी-कार्यालया'चा उद्घाटनसमारंभ तारीख २१ आगष्ट रोजी सायंकाळी मोठ्या थाटामाटानें आणि अत्यंत उत्साहानें साजरा झाला. टिळकाश्रमाचें बांधकाम अजून अपुरें असतांनादेखील सजावटींत कांही न्यून राहिलें असें कुणालाहि वाटलें नाही. टिळकाश्रमाचा ९०X४० चा हॉल आणि लायब्ररीच्या आवारांतील पटांगण, इतकेंच नाही तर मागील आणि पुढील बाजूचा सडकांतीदेखील इतका अलोट लोकसमुदाय सदरहू समारंभाला लोटला होता कीं, स्वयंसेवकांना आणि सरकारी पोलीस पार्टीला व्यवस्था ठेवतांना बरेच श्रम झाले।

टिळकाश्रमाचा दर्शनी भाग तर इतका नमुनेदार आणि ऐटदार बांधण्यांत आला आहे कीं, इतकी सुंदर इमारत वऱ्हाडांत तरी दुसरी क्वचितच असेल. मध्यभागी लोकमान्यांचा अर्धपुतळा प्रस्थापित केलेला असून त्यांच्या मुखपत्राचे 'केसरी'चे बोधचिन्ह दोन्ही बाजूला दोन सिंहांच्या प्रतिमा उभ्या करून, लोकमान्यांचे हे एक वऱ्हाडांतील पहिलें आणि अपूर्व स्मारकच श्री. नानासाहेब बामणगांवकरांनी टिळकाश्रमाच्या रुपानें उभारून आपली लोकमान्यांवरील दृढ भक्ति व्यक्त केली.

सदरहू समारंभास हनुमानव्यायामशाळेचें बँडचें पथक, आणि स्वयंसेवकदळ, तत्परतेनें हजर असून त्यांनी आपली कामगिरी अतिशय चोख बजावली.

उद्घाटनसमारंभ साडेसहाला होणार हें जाहीर असतांना देखील दुपारचे चार वाजल्यापासूनच प्रेक्षकांची आणि निमंत्रित पाहुणें मंडळीची टिळकाश्रमाच्या जागेंत गर्दी जमूं लागली. आणि एवढा भव्य मंडप; पण ऐनवेळेला येणाऱ्या बऱ्याच मन्डळींना शेवटी तिष्ठत उभे रहावें लागलें.

सभामन्डप लतापल्लवांच्या तोरणांनी, सुंदर छत व विजेच्या रोषनाईनी सुशोभित करून, वऱ्हाडांतील प्रमुख राष्ट्रीय वीरांचे फोटो लावून, सजवण्यांत आला होता. अध्यक्षांना बसण्याकरितां जन्या पद्धतीचे सिंहासन मांडून लोड-तक्याची व्यवस्था केली होती, आणि खुर्च्या टेबलांना फाटा देण्यांत आला होता.

प्रथम नगराध्यक्षांच्या हस्तें टिळकाश्रमाच्या महाद्वारावर राष्ट्रीय निशाण चढविण्यात आलें; नियोजित अध्यक्ष ना. डॉ. खरे यांची मोटार टिळकाश्रमाच्या जवळ येतांच बँडवादन आणि स्वयंसेवकांच्या मुजऱ्याने अध्यक्षांचें स्वागत करण्यांत आलें, आणि टिळकाश्रमाचा अध्यक्षासमवेत फ्लॅश लाईटच्या सहाय्यानें फोटो घेण्यांत येऊन, अध्यक्षांनी आश्रमांत प्रवेश केला तेव्हा सर्वांनी उभे राहून त्यांचें स्वागत केलें.

श्री. वीर वामनराव जोशी यांची कन्या कु. मधुताई यांचे 'वंदे मातरम्' हें राष्ट्रगीत होऊन समारंभाला सुरुवात झाली. श्री. बामणगांवकर यांनी 'अरुण उदय, संस्थे'च्या स्थापनेपासून तों आजवर त्याचें कसकसें परिवर्तन होत गेलें हें थोडक्यांत विशद करून सांगितलें, आणि बाहेरून आलेले संदेश, आणि आश्रमाला मिळालेल्या देणग्या, यांची खुलासेवार माहिती सांगितली. त्यांत श्री. लोकनायक अणे बाबासाहेब वारद सोलापूर, देवधरकर मुंबई, रिसवडे सांगली, यांचेहि संदेश होते.

उद्घाटनसमारंभाचें स्वागताध्यक्ष श्री. बाबासाहेब खापर्डे हे भाषण करायला उभे राहिल्यावर काही कांग्रेसभक्त (?) म्हणवून घेणाऱ्या मंडळींनी थोडा गोंधळ माजवण्याचा प्रयत्न केला, पण शेवटी त्यांना सडेतोड उत्तर अध्यक्षांकडून मिळाल्यावर त्यांचीं तोंडे बंद झालीं.

अध्यक्षांनी प्रथम लोकमान्यांच्या फोटोचें टाळ्यांच्या कडकडाटांत अनावरण करून लोकमान्यांना वंदन केलें. लोकमान्यांच्या गुणगौरवपर अध्यक्षांचें भाषण झाल्यावर, अत्तर, गुलाब, हारतुरे, पानसुपारी, वगैरे समारंभ यथासांग पार पडला.

टिळकाश्रमाचें मुख्यप्रवेशद्वार अध्यक्षांच्या हस्तें उघडलें जाऊन आश्रमांच्या महाद्वारावरील टिळकांच्या अर्धपुतळ्याचें आवरणहि अध्यक्षांच्या हस्तें उघडलें गेलें तेव्हा लोकमान्यांच्या नावाचा जयघोष करीत लोकांनी टिळकपुतळ्याला वंदन केलें. अशाप्रकारें हा गोड समारंभ पार पडला.

# कालीमाताकी जय !

(खालील बातमी जर खरी असेल तर कालीभक्त कालभैरवस्वामींना आमची अशी शिफारस-वजा सूचना आहे कीं, त्यांनी आपल्या शाक्तपंथाच्या शाखा गावोगांवीं स्थापन कराव्यात. म्हणजे वीरशैवांतील नवमतवाद्यांचे हे जगद्गुरु म्हणून मिरवतील. कारण शाक्तपंथीयांचे जें मुख्य ध्येय, मद्यपान आणि यज्ञयागादि कर्मकांडाच्या नावांखालो पशूंचें बली देऊन प्रसाद म्हणून मांसाहार करणें, हें उद्दिष्ट अनायासेंच साध्य होण्याजोगें आहे. )

संपादक, संजीवनी.

[ ले.:— श्री. वीरेश्वर, बेंगळूर नगर. ]

बाळेहोन्नूर (बाळेहळ्ळी) पीठावरील हल्लींच्या स्वामी महाराजांचा मुक्काम हैसूर संस्थानांतील शिवमोग्गा येथे ... तेथे त्यांचें श्रावणिक महाव्रतोद्यापन ... आहे. या श्रींच्या नेतृत्वाखालीं या व्रताचें ... म्हणून 'भद्रकाळी देवीला अभिषेक, ... सहस्रनाम जपपूर्वक पूजा, कुंकुमार्चना, ... वेदोपनिषद्गीतादिग्रंथपारायण वगैरे ... आहेत. या सर्व पूजाविधीबद्दल एक ... प्रसिद्ध करण्यांत आली असून, त्या ... पूजेचे दरहि नमूद केले आहेत. ...:—भद्रकाळी सहस्रनाम कुंकुमार्चन ... ३ रुपये, भद्रकाळी त्रिशती कुंकुमार्चन ... रु. २, व भद्रकाळी अष्टोत्तरशतपूजेला ... पैसे दर असून, प्रत्येकानें आपापल्या ... नुसार वरील फी देऊन पूजेचें पुण्य ... पाडून घेण्याबद्दल त्या जाहिरातींत ... पण करण्यांत आली आहे. ही भद्र-... देवीची पूजा, होमहवन, उपनिषद्गीता-... कुंकुमार्चन वगैरे समारंभ म्हणजे ... बाळेहळ्ळी स्वामींच्या 'श्रावणिक महा-... व्रताचा 'चीफ अंगें होत असें म्हणतात.

बाळेहळ्ळी श्रींचें हें आचरण पाहून खऱ्या वीरशैवांना संताप आल्याशिवाय राहील काय? त्याचें खंडन करण्यास ते सिद्ध झाल्याशिवाय राहतील काय ? त्यांनीं पारायणास ठेवलेले उपनिषद्गीतादि ग्रंथ वीरशैवग्रंथ आहेत काय? ते वीरशैवधर्मग्रंथ नसता त्यांचा नव्यानें संबंध जोडून पारायण करण्यातील उद्देश तरी काय असावा ? वीरशैवधर्मतत्वांचे आगर, वीरशैवधर्मकलिजा असे सर्वमान्य श्रीबसवादि शिवशरणाचें वचनशास्त्र जरी या स्वामींना कांही कारणानें मान्य वाटत नसलें, तरी वीरशैवसंस्कृत ग्रंथ काय कमी आहेत ? वीरशैवधर्माचे स्वतंत्र ग्रंथ या धर्मगुरुला मिळालेच नाहीत काय ? सिद्धांतशिखामणी हा एकच ग्रंथ यांना पुरेसा नाही काय ? सर्व पुरातन कानडी धर्मग्रंथांत श्री बसवादि प्रमथांच्या तत्वांचेंच विवेचन असल्यानें ते ग्रंथ कदाचित् श्रींना झेपत नसले, तरी वीरशैव-संस्कृत धर्मग्रंथांनाहि कांही तोटा नाही. शिवा-द्वैत मंजरी, वीरशैव सिद्धांत सुधारक, सिद्धांत सारावळी, लिंगधारणचंद्रिका, वीरशैवेंदुशेखर, वीरशैवानंदचंद्रिका, वगैरें शेंकडो संस्कृत ग्रंथ

नाहीत काय? असे संस्कृत भाषेतील धर्मग्रंथ असले तरी श्रीबसवादिप्रमथ तत्वानुरुप तत्वेंच त्यांत सांपडणार या भीतीनेच ते सर्व वीरशैव ग्रंथ त्याज्य ठरविल्याचें दिसतें. तसें नसतें तर वीरशैवांचे एक जगद्गुरु ह्मणवून घेण्यास पुढे होणाऱ्या या स्वामींनीं अवीरशैव अशा प्राकृत ( भवि ) धर्मांच्या धर्मग्रंथांच्या पारायणाचा हव्यास कां धरिला असता? असो.

आतां मूर्तिपूजाविषयाकडे वळूं:— बाळेहळळी-पीठाधिकारी संचारांत असतांना बाळेहळळी अशा श्रीवीरभद्राची मूर्ति जवळ बाळगण्याचा त्यांचा प्रघात बऱ्याच वर्षांपासून आहे. पूर्वीच्या इतिहासाचें स्मरण रहाण्याकरितांच हा प्रघात पडला. ( पूर्वी बाळेहळळी येथील वीरभद्र मूर्तीचा जैन लोकांनीं उच्छेद करून ती नदींत टाकून दिली होती. पुढे श्रीरेवणसिद्ध महास्वामींचे नातू श्रीदिगंबरमुक्तिमुनि यांनी परमतीयांचें खंडन करून त्या वीरभद्र मूर्तीची त्याच जागीं प्रस्थापना केली व तेथेच बाळेहळळीचा मठ स्थापिला असा इतिहास आहे. ) श्रीवीरभद्र जवळ बाळगण्याचा बाळेहळळी-पीठाधिकाऱ्यांचा प्रघात असला तरी त्या श्रीवीरेशमूर्तीची पूजा गौण समजण्यांत येऊन पुरातन वीरशैव संप्रदायाप्रमाणे त्या गुरुपीठावरील स्वामींच्या पादपूजेलाच प्राधान्य देण्यांत येत असे. त्या पीठावरील आजपर्यंतचे महास्वामी देखील वीरशैवाचरणांसच प्राधान्य देत आले आहेत. परंतु त्याच पीठावरील हल्लींच्या स्वामींचें आचरण मात्र त्या सर्व परंपरेस विरोधी असें होत आहे. यांनीं वीरशैवाचारासच गौणत्व देऊन श्रीवीरभद्राच्या विग्रहपूजेस प्राधान्य देण्यास सुरुवात केली आहे. दोन वर्षांपूर्वी ह्मैसूरास गेल्यावेळीं राजवाड्यांत वीरभद्रविग्रहाची पूजा व आरती करून मूर्तिपूजकांप्रमाणें त्या विग्रहाचें तीर्थ घेऊन ह्मैसूर महाराजांनाहि तेंच दिलें. अशा रीतीनें मूर्तिपूजेला प्राधान्य देऊन त्यांनीं वीरशैवाचरणाला गौणत्व दिलें व आपल्या पुरातन गुरूंच्या आचरणाशीं द्रोह केला.

आतां या शिवमोग्गा मुक्कामांत तरी त्यांनीं मूर्तिपूजेंत एक पाऊल पुढेच टाकलें आहे. कोणीहि पुरातन वीरशैव गुरूंनीं ज्याची कधींहि पूजा केली नाहीं, ज्या मूर्तीशी वीरशैवांचा संबंध नाहीं, अशा भद्रकाळीदेवीची पूजा इतक्या वैभवानें व अट्टाहासानें करण्याचें प्रयोजन काय ? त्याची अवश्यकता तरी कोठें आहे ? एका शिवाव्यतिरिक्त दुसरा देव नाहीं असें एकेश्वरी वीरव्रत वीरशैवांचें नाहीं काय ? गुरुकृपेनें धारण केलेल्या इष्टलिंगाशिवाय वीरशैवांनी दुसऱ्या कशाचीहि पूजा करूं नये असा उपदेश हेच स्वामी करीत नाहींत काय ? हीच वीरशैव धर्माची आज्ञा नाहीं काय ? मग भद्रकाळी देवीच्या मूर्तीची पूजा उपनिषद्गीतादि अवीरशैव ग्रंथपारायण वगैरे गोष्टी वीरशैवांनीं व्रतरूपानें कराव्यात काय ? या गोष्टींचें समर्थन स्वामींच्या पक्षाच्या लोकांनीं कितीहि बुद्धिकौशल्यानें व युक्तिवादानें केलें तरी खरी वीरशैव जनता याला ' भवि. लोकांचेंच आचरण होय ' असें ह्मटल्याशिवाय रहाणार नाहीं.

' बसवराज ' हावेरी: ता. १६-८-३७

---

## मेनी मेनी थँक्स मि. आर्वीकर

सोलापुर येथील काडादी—वसतीगृहांतील विद्यार्थी जगन्नाथ शंभु आर्विकर यांना शैक्षणिक चित्रपटावरील उत्कृष्ट निबंध लिहिल्याबद्दल पहिल्या नंबरचें बक्षिस, प्रगत शिक्षण मंडळाचे वतीनें ता. २१ रोजी हिंदुस्थानचलच्चित्रसंघाचे अध्यक्ष सर फिरोज शहा सेठना यांचे हस्तें देण्यांत आलें. ' विद्वान् सर्वत्र पुज्यते ' हेंच खरें नाहीं कां ?

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील—
# मौजेची प्रश्नोत्तरें:—

१ द. रा. आ. सोलापूर:—

वीरशैवांतील बरेच लोक अलिंगयांच्या हॉटेलांतून चहापान आणि फराळ करतात तेव्हा असें करणें आपल्या धर्माला अनुचित आहे असें नाहीं कां आपणास वाटत ?

( लिंगायतेतरांच्या हॉटेलांत जाणारे हौसी लोक, कदाचित् भस्माचा गोळा आणि गुरु-पादोदकाची वाटली खिशांत घेऊन जात असावे; आणि चहाफराळादि प्रसंगी फराळाचें देणाऱ्या पोऱ्याला लांबलचक भस्माचा पट्टा फासुन पादोदकाचे चार थेंब चहापानापूर्वीं घेतले कीं सारीं असतील-नसतील तीं पापें धुवून निघतील अशी त्यांची खात्री असेल तर ! )

२ पं. लि. गु. पुणे:—

मी एक अविवाहित तरुण आहें. पण एका ज्योतिष्याने मला नुकतेच असें सांगितलें कीं, तुझा चार—सहा महिन्यांचे आंतच खात्रीने योग आहे !.

( आपण सहवासोत्तर विवाहाचे पुरस्कर्ते असल्यास—असला ॲक्सीडन्ट घडला तर नवल नाही ! )

३ सि. कै. पा. बेळगांव:—

माझ्या मुलीकरितां एकादे चांगलेसें स्थळ तुमच्या बाजूला असल्यास कळविण्याची कृपा करावी. मुलगी सध्या मॅट्रिकच्या वर्गांत शिकत आहे, सुस्वरूप, सुदृढ, अशी सोळा वर्षांची आहे. तिच्या स्थळाकरतां जिवाला सारखी तळमळ लागून राहिली आहे.

( आपण मुलीला कॉलेजांत घालायला चुकू नका ह्मणजे विचूनक, सहजासहजीं तुह्माला न कळतदेखील सारें कांही ती स्वतःच जुळवून घेईल. तुह्माला काडीचीहि तोशीस लागू देणार नाही. बेफिकीर रहा ! )

४ को. गो. दि. नाशिक:—

आपले कालरोजी संजीवनीची वर्गणी पाठविण्याबद्दलचें कार्ड आल्यावरून आमची वर्गणी सात महिन्यापूर्वीच संपली असें कळलें. आपल्या पत्राची भरभराट व्हावी असें इच्छून यापुढें संजीवनी बंद करावी असें कळवतों.

( संजीवनीच्या भरभराटीची, संजीवनी बंद करून, आपण जी कळकळ दाखविली, त्याबद्दल आह्मी देखील आपलें अभिनंदन करून, मागील सात महिन्यांतील चवदा अंक तुह्माला बक्षीस देत आहोंत. नाहीतरी ते आपल्या पदरीं पडलेच आहेत ह्मणा ! )

५ स्वा. शि बार्शी:—

हल्लीं जंगमाविरुद्ध जी एक प्रकारची अनास्था वीरशैवसमाजांत उत्पन्न होऊं लागली आणि मठाधीशांच्या चारित्र्यहीनतेबद्दल सरास सर्वत्र जी ओरड ऐकूं येते, याला आळा घालतां येणार नाहीं कां ?

( कां नाहीं ? भिक्षांदेही करणाऱ्या जंगमवर्गानी जन्मसिद्ध हक्काची शंखघंटाची मिरासदारी आणि उदरनिर्वाहाची चोपदरी ओरड करणाऱ्यांच्या गळयांत टाकून दुसरा

एखादा पेशा पत्करावा, आणि मठाधीशांनीं स्वतःच्या संपत्तीचा गोळा समाजसुधारकांच्या गळी देऊन स्वतः भस्माच्या गोळ्यावर संतुष्ट रहावें ह्मणजे सगळें सुरळीत होईल.

६ रं. म. लो. सांगली:—

वीरशैवांत जातिभेद नाहींत असें ह्मणणारे लोकच पोटजातीमधून सहभोजन आणि बेटीव्यवहाराचें समर्थन करतात हें कसें? का नुसताच बोलघेवडेपणा?

(समाजसुधारकांच्या आखाड्यात उतरल्याशिवाय यांतील मख्खी तुह्माला कळायची नाही. जर तुह्माला कांहीं धर्मेंडखोर लोकांनीं खालच्या पायरीवरून वरच्या पायरीवर चढण्याचा मज्जाव केला असेल तर खुशाल भ रमसाट विधाने ठोकून उड्या मारीत चला, कृति मात्र बोलल्याप्रमाणें करू नका. नाहीं तर 'बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊलें' अशी गत होईल.)

७ प्र. शं. हिं. हिवरा:—

पुण्याच्या एका चवदा वर्षाच्या ब्राह्मणाच्या मुलीनें लकडी पुलावरून महापुरांत उडी घेऊन नदीपार पोहून गेल्याचें वृत्त मी नुकतेच वाचलें. अशी एकादी बालिका आपल्या वीरशैवांत कधी काळीं निपजेल कां?

(सध्यां वीरशैवांतील शेंकडा नव्याण्णव मुली संसाराच्या गावंढळ गढूळ कल्पनांच्या डबक्यांत नाकातोंडात पाणी जाईपर्यंत जीवापाड मेहनत करून पोहण्याचा सराव करताहेत; पुढें मागें सवयी सवयीनें नदीपारच काय पण जगापार देखील होतील, दम धरा!)

८ द. भि. पं. फलटण:—

आमचे गावांतील एक वीरशैवतरुण कांही दिवसापूर्वीं बाटून मुसलमान झाला आहे, पण आतां त्याला शुद्ध करून घेण्याकरतां कांही लोक खटपट करताहेत. तेव्हा हा शुद्धीसमारंभ घडवून आणण्यास कांही धार्मिक अडचणी आड येतील कीं काय?

(जगद्गुरुंना भरपूर दक्षिणा आणि टोलेजंग बिछावा समर्पण करा, आणि शुद्धीसमारंभप्रसंगी त्याच्या दाढीमिशीचें मुंडन करण्याच्या भानगडींत न पडतां खुशाल त्याला दीक्षा देऊन एकाद्या मठाचा सर्वाधिकारी बनवा, ह्मणजें नवमतवादीहि खुष होतील आणि सनातनीहि तनतनाट करणार नाहीत. वीर आणि पीर दोघेहि जुळी भावंडें आहेत या कल्पनेलाहि अशा शुद्धीसमारंभानें मूर्त स्वरुप दिल्याचें आपल्या पदरीं पुण्य लाभेल आणि त्या हजरती जवानाचें पापक्षालन होऊन तो पुनीत होईल.

---

# यालाच 'साठी बुद्धी नाठी' ह्मणतां येईल कां?

'तरुण कर्नाटक' पत्राचे संपादकावर बेल्लुरी तिथीप्पा यांनी अब्रुनुकसानीचा दावा लावला होता. त्या प्रकरणात त्यांना साठ रुपये दंड ठोठावला गेला. पण या प्रकरणांत सर्वस्वीं मी जबाबदार आहें आणि माझेच सांगण्यावरून सदहु लिखाण 'तरुण कर्नाटकांत' प्रसिद्ध झाल्याचें अॅडव्होकेट पावटे यांनीं कोर्टांत सांगीतल्यावरून, त्यांचेवरहि खटला भरण्यांत आला आहे असें कळतें. एकूण स्वतःवरहि एखादा असा खटला उपस्थित करवून घेऊन संपादकाच्या लायकीचा शिक्कामोर्तब समाजाकडून मिळवण्याची तर श्री. पावटे यांची महत्वाकांक्षा नाही नां? ह्मातेला मोल नाहीं आणि ह्मातारचळाला तोल नाही हेंच खरें!

# विश्वविद्यालयांत वीरशैववाङ्मयाचें स्थान

कानडी वाङमयांत श्रीबसवादि शिवशरणांनीं निर्मिलेल्या वचनवाङमयाचें महत्त्व किती आहे हें आतां सर्वांना समजून चुकलेंच आहे. वचनवाङमयानें केवळ कानडी भाषेलाच शोभा आली आहे असें नसून, हिंदुस्थानांतील भाषांपैकी कानडी भाषेस यामुळे एक वैशिष्ठ्य प्राप्त झालें आहे. अलीकडे विश्वविद्यालयांतहि या वचनवाङमयाला प्रवेश मिळूं लागलेला आहे हें समाधानकारक होय. म्हैसूर, मुंबई, वगैरे विश्वविद्यालयांच्या उच्च परीक्षांकरिता हल्लीं वचनग्रंथ नेमण्यांत येत आहेत. 'शिवानुभव' मासिकांतून वचनवाङमयाचें प्रसिद्धीकरण व प्रसार झाल्याचाच हा परिणाम होय.

म्हैसूर-विश्वविद्यालयाच्या यंदाच्या बी. ए. परीक्षेला श्रीबसवेश्वराच्या वचनांतील 'माहेश्वरस्थलवचनें' नेमण्यांत आलीं आहेत. बी. ए. [ऑनर्स] करितां श्रीबसवेश्वर वचनग्रंथाचें पान १ ते ७८ पर्यंतचा भाग व अक्कमहादेवी, देवर दासिमय्या व श्रीचन्नबसवेश्वर यांची वचनें नेमलीं आहेत.

त्याचप्रमाणें मुंबई–युनिव्हर्सिटींतहि, 'वचन-शास्त्रसार' भाग १ मधील कांहीं भाग आज अनेक वर्षांपासून बी. ए. व एम. ए. परीक्षेस नेमण्यांत आले आहेत. सन १९३६ च्या बी. ए. परीक्षेला अक्कमहादेवीची वचनें लावण्यांत आली होतीं, व सन १९३८ च्या एम्. ए. परीक्षेकरितां मग्गी मायिदेवकृत 'शिवानुभव सूत्र', प्रभुदेवांची वचनें व घनलिंगाची वचनें नेमण्यांत आलीं आहेत.

यामुळें या वचनवाङमयाचा विमर्शात्मक अभ्यास करून वीरशैवधर्मतत्त्वें समजण्यास विद्यार्थी व प्रोफेसरांना अनुकूलता मिळाली. मुंबई–युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. परीक्षेला 'कर्नाटकसंस्कृती' ह्मणून एक विषय ठेवलेला आहे. इ. सन १९३६ च्या एम्. ए. ला 'वीरशैवसंस्कृति' असा एक विषय होता. त्यांतील प्रश्नपत्रिकेंतील कांहीं प्रश्न येथें देत आहोंत. त्यावरून वीरशैववाङमयांतील महत्त्वाचे ग्रंथ मराठी भाषेमधून प्रकाशित होणें किती आवश्यक आहे हें दिसेल. ते प्रश्न असे होतेः— (१) पिंड व ब्रह्मांड यांच्या उत्पत्तीचें विवरण करा? (२) शिवतत्वें कोणती? आत्मोन्नतीच्या कार्यांत त्यांचें महत्व काय आहे? (३) शक्ति, भक्ति, लिंग यांतील उपभेद कोणते? षट्स्थलशास्त्रांत त्यांचें महत्व कोणतें? (४) षट्स्थलें कोणतीं? विरुपाक्ष पंडितांनी त्यांचें विवेचन कोणत्या प्रकारानें केलें आहे? (५) लिंगपूजेंत कोणकोणते भेद आहेत? त्यामुळें मनुष्याची आत्मोन्नती कशी होते? (६) अर्पण आणि प्रसाद यांच्यातील धार्मिक महत्त्वाचें विवरण करा? त्यांच्यात कोणते उपभेद आहेत? अक्कमहादेवीनें ती कशी अनुभविली? (७) वीरशैवधर्मांत पंचाक्षरी मंत्राचें महत्व काय आहे? (८)अक्क महादेवीनें अनुभवलेल्या शिवानुभव पद्धतीचें विवरण करा. (९) 'भावचिंतारत्ना'चें धार्मिक व सांस्कृतिक महत्व कोणतें?

यावरून विश्वविद्यालयांतून वीरशैव संस्कृतीचा अभ्यास सुरुं होण्यास वचनवाङमयप्रकाशनच कारणीभूत आहे ही गोष्ट वीरशैवांच्या

लक्षांत आल्याशिवाय राहिली नसेल. अशा प्रयत्नामुळेंच समाजाची व धर्माची योग्यता वाढते यांत संशय नाही.

वीरशैव वाङमयांत, या वचनवाङमयाशिवाय इतर अनेक काव्यें, पुराण, रगळी, शतकें, त्रिपदी, वगैरे ग्रंथ आहेत. ते सर्व फार महत्वाचे आहेत. ते अद्यापि प्रकाशित झालेले नाहीत. मात्र हरीहर कवीचें ३०—४० 'रगळी' [काव्य] 'शिवानुभवा'तून प्रसिद्ध झालेले आहेत. यापैकीं कांही मॅट्रिक्यूलेशन परीक्षें-करिता पाठ्य पुस्तकें ह्मणून नेमण्यांत येत असल्याचें दिसून येतें. त्याचप्रमाणें अनेक महत्वाचें ग्रंथ वीरशैववाङमयांत आहेत. त्यांचेंहि प्रकाशन लवकर न झाल्यास ते सर्व ठेवल्या ठिकाणींच नाश पावण्याचा संभव आहे.

वर सांगितल्याप्रमाणें वीरशैववाङमयाचा अभ्यास विश्वविद्यालयांतील उच्च परीक्षांना नेमण्यांत आला असतां, त्यांचा अभ्यास अद्यापि वीरशैवसमाजाच्या 'पाठशाळांतून' व्यवस्थित-पणें होऊं नये, ही शोचनीय गोष्ट होय. (इतकेंच नव्हें तर कांही वीरशैव पाठशाळांतून या वचनवाङमयास विरोध व तिरस्कार दाखविण्याचा शहाणपणाहि दाखविण्यांत येतो, हें अत्यंत लांछनास्पद होय.) त्या पाठशाळांतूनहि वचनवाङमयासारखे वीरशैवसंस्कृतीचे महत्वाचे ग्रंथ पाठ्य पुस्तकें ह्मणून नेमण्यांत येणें अत्यावश्य नव्हे काय? त्यामुळे तेथें शिकणाऱ्या सत्ताधिकारी विद्यार्थ्यांना पुष्कळ उपयोग होऊन त्यांना वीरशैवसंस्कृति व वीरशैवधर्मतत्वें यांचें खरें ज्ञान होईल. ह्मणून या महत्वाच्या बाबीकडे वीरशैव-पाठशाळाचालकांचें, अध्यापकांचें व सर्व वीरशैव जनतेचें लक्ष जाणें अवश्य आहे; व तसें ते लक्ष देतील अशी आशा आहे.

'शिवानुभव'

ऑगस्ट १९३७.

---

# धनिकांना ही आपत्ति तर वाटणार नाही?

**श्री. एच. जी. सोमशेखरशर्मा**

एम. एससी.

बेंगळूरचे श्री. एच. जी. सोमशेखर शर्मा हे एक गरीब घराण्यांतील लिंगायत विद्यार्थी असून त्यांनीं स्वतःच्याच प्रयत्नानें शिष्यवृत्या वगैरे मिळवून काशी येथील बनारस-हिंदु-युनिव्हर्सिटींत आपला अभ्यासक्रम नुकताच पुरा केला आहे. बनारस-हिंदु-युनिव्हर्सिटींत बी. एससी. परीक्षेंत गणीत विषय घेऊन ऑनर्समध्ये पहिल्या वर्गांत येणें अत्यंत कठीण असतें, परंतु सन १९३४ मध्ये ते बी. एससी. ऑनर्सच्या परिक्षेंत पहिल्या वर्गांत तर आलेच पण सर्व युनिव्हर्सिटींत ते पहिले आले. व त्यांना त्याबद्दल 'शिवप्रसाद गुप्त सुवर्ण पदक' मिळालें. त्याचप्रमाणें एम. एससी. परिक्षेतही ते पहिल्या वर्गांत पहिले आले. अशा तैलबुद्धीच्या विद्यार्थ्यानें केंब्रिज-विश्वविद्यालयांत गणित विषयाच्या संशोधनाकरितां जाणें अवश्य आहे असा अभिप्राय पं. मदनमोहन मालवीयजी व रँ. नारळकर यांनीं व्यक्त केला असून, त्याप्रमाणें त्यांना केंब्रिज—युनिव्हर्सिटींत प्रवेशहि मिळाला आहे. परंतु घरच्या गरीबीमुळे विलायतेचा खर्च भागणें पूर्ण अशक्य आहे. तरी अशा विद्यार्थ्यांना सहाय्य करून समाजाचें भूषण बाणणें प्रत्येक धनिक वीरशैवाचें कर्तव्य असून या बाबतींत—शिरसंगी फंडाच्या कमेटीनेंहि सहानुभूतीनें लक्ष पुरवून शक्य तें सहाय्य, सौकर्य व अनुकूलता करून देणेंच इष्ट होय. [पण हे गरिबाचे लंगडे तट्टू भरभक्कम शिफारशीच्या स्वारासह शीरसंगी—फंडाच्या अध्यक्षापर्यंत पोंचायला पाहिजे.]

# शीलाचें अमोल मोल

ले.:— शिलवती.

'शीलं परं भूषणम्' याचा सरळ अर्थ शीलाचें अमोल मोल असा नाही कां होणार ?......

शील नसलेल्या वस्तूची कवडी किंमत तरी जगाच्या बाजारपेठेंत असतें कां ? ......

निर्जीव कागदाच्या चिटोऱ्यावर साधासुधा खरडलेला मजकूर, किंवा कार्डावर लिहि-लेली खुशालीची वार्ता, खुशाल कुणीहि परकीयानें तिच्या उघड्या-नागड्या स्वरूपाचा फायदा घेऊन उघड्या डोळ्यानें वाचून दात विचकावे; पण तेंच सीलबंद पाकीट, त्यांतील मजकूर कवडी किंमतीचा असो वा बहुमोलाचा असो, प्रणयी जोडप्याच्या गुजगोष्टींचा असो वा प्रेमासक्त आशुक— माशुकांच्या पाणचट प्रणयचेष्टांचा असो, त्याचें सील तोडून वाचण्याचा प्रयत्न कुणींहि केल्यास तो कायद्यानें गुन्हा ठरतो ना ? ......

निर्जीव वस्तूच्या सीलाची जर ही गोष्ट इतकी मोलाची मानली जाते, तर सजीव स्त्रीपुरुषांच्या शीलाची किंमत अमोल असल्यास नवल काय ? ........

पंचमहाभूतांच्या प्रलयकालीं जगाची उलथापालथ होते........

अनेक राजाधिराजांची साम्राज्यें धुळीस मिळतात .........

पृथ्वीमोलाचीं सुंदर देवमंदिरें जमीनदोस्त होतात ........

उत्तुंग पर्वतराजी भूगर्भांत दडपल्या जातात .........

अथांग जलाशयाची जागा वालुकामय टेकड्यांनी व्यापली जावे .........

हे सारे प्रकार निसर्गाच्या पापण्याच्या उघडझापींत झटक्यासरसें घडून येतात. पण — या धामधोमीतहि पूर्वस्मृतिचिन्हांची जागती आठवण, शीलांच्या हृत्पटलांवर लेखद्वारें कोरून ठेवलेली अनेकदां आपल्याला पहावयास सांपडते ना ?

यांतच शिलेचें शील आहे असें नाही कां आपणाला वाटत ?

शीला दुभंगली कीं सारेंच आटोपलें असें नाहीं कां होत ?

प्रखर उन्हाच्या संतापानें तप्तहृदय शिला आक्रोश करून शीलाजिताच्या क्षिरपणीनें शीलाचें अमोल मोल जगाला पटवून देतात ना ? ........

निर्बुद्ध पशुपक्षी देखील स्वजातियाशी खेळीमेळीनें एकत्रित वागतांना एक दुसऱ्याच्या शीलाला दुखवीत नाहीं. त्यांनाहि भावना आहेतच, पण कधी चिमणीनें कावळ्याला किंवा कोकिळेनें बैलाला आपलें शील विकल्याचें कुणीं ऐकलें वा पाहिलें आहे काय ? ........

मग माणसासारखे सुबुद्ध स्त्रीपुरुष विवाहपूर्व वा विवाहोत्तर मित्रत्वाच्या नात्यानें परस्परांशी सलोख्यानें वागून प्रेम करूं लागल्यास, शीलभ्रष्टतेचा शिक्का त्यांच्या माथीं कां बसावा ? हें कोडें उलगडण्यासारखें नाही कां ? .........

शीलाचें अमोल मोल माणुसकीला माहीत नसते कां ? .........

सुबुद्ध सुशिक्षित माणसें पशुपक्षाहूनहि नीच कोटीला पोंचलेली असतात कां ?

या सर्व प्रश्नांचे एकमेव उत्तर ह्मणजे : —

दुबळ्या निघृण अंतःकरणाची स्वतःची आंधळलेली काळी कुळकुळीत दृष्टि. याशिवाय दुसरें काय असूं शकणार ?

# वीरशैवांतील चळवळी

## हें तरी खरें कशावरून मानायचें!

### कै रा. ब. आप्पासाहेब वारद यांचें स्मारक :—

सोलापूरचे नगरभूषण कै. रा. ब. आप्पासाहेब वारद यांचें कांहीं तरी योग्य स्मारक करण्याचा विचार गेल्या कांहीं दिवसांपासून शहरांत चालू असून त्याकरितां शहरांतील कांहीं प्रतिष्ठित नागरिकांची एक सभाहि पण बोलावली असल्याचें कळतें. वास्तविक हें स्मारक मागेच व्हावयास पाहिजे होतें, व त्याप्रमाणें आज बऱ्याच वर्षांमागे थोडासा प्रयत्नहि पण झाला होता. आता या स्मारकाला चालना मिळाली तें योग्यच होय. कांहीच न करण्यापेक्षां उशीरा कां होईना पण कामास सुरुवात झालेली बरीच आहे. कै. आप्पासाहेब वारद हे येथील केवळ वीरशैवसमाजासच नव्हे तर सर्व शहरासच भूषणभूत होते. त्यावेळीं त्यांच्या औदार्याचा हात लागला नाहीं अशी एकहि सार्वजनिक संस्था या शहरांत सांपडणार नाहीं. येथे गिरणीची स्थापना करून कापडगिरणीच्या धंदास त्यांनीच प्रोत्साहन दिल्यामुळे हे आज इलाख्यांतील प्रमुख औद्योगिक केंद्र शहर बनलें आहे. त्यामुळे योग्य तें स्मारक करून त्यांच्या अलौकिक कार्याची जाणीव ठेवणें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्यच आहे. ह्मणून हल्लीं चालू असलेल्या स्मारकाच्या योजनेत प्रत्येक नागरिकानें भाग घेऊन स्मारकास शक्यतितक्या लवकर मूर्त स्वरुप द्यावें अशी आमची सोलापूरच्या नागरिकांना अत्याग्रहाची विनंती आहे. [केवळ वचने किं दरिद्रता असें मात्र होऊं नये.]

---

## वीरशैव स्नेहवर्धक मंडळ, मुंबई.

सदर मंडळाच्या विद्यमानें सालाबादप्रमाणें सोमवार ता० २३-८-३७ रोजीं सकाळीं ८॥ ते ९॥ च्या दरम्यांन मंडळाच्या ऑफिसांत 'सामुदायिक शिवपूजाविधी' मोठ्या थाटानें व भक्तिभावानें पार पडला. पुरोहिताचें काम शि० घ० प० श्री० जगन्नाथ गणलिंग सोमेश्वरकर M. E., यांनीं सशास्त्र केलें. सदर प्रसंगीं जी दक्षणा जमली ती मंडळास मदत ह्मणून मिळाली व अशा रीतीनें समारंभ समाप्त झाला. असें मंडळाचे सेक्रेटरी कळवितात.

---

## —:अमरावतीवृत्त:—

ता. १६-८-३७ रोजी रात्री ८॥ वाजतां श्रीयुत चाकोते यांचे दिवाणखान्यांत वीरशैवसमाजाच्या गणेशोत्सवाचें १८ वें वर्ष साजरें करण्याचें उद्देशानें सभा भरून त्यांत खालील कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

अध्यक्ष:— दिगंबर सोमाप्पा ऊर्फ बाळासाहेब संगेकर.

उपाध्यक्ष:— गंगाराम आप्पा रामाप्पा ऊर्फ आप्पासाहेब चाकोते.

सेक्रेटरीज:— एम्. सी. येलगुंदे. बी. एस्. मिसे.

वरील सभेस चांदूरबाजार येथील डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर. एल्. एम्. ॲन्ड एस्. आय. आणि शिर्डीचे श्रीयुत नानासाहेब कोल्हे हे नवयुवकसुद्धां हजर होते. असें मंडळाचें सेक्रेटरी कळवितात.

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ सप्टेंबर १९३७ ( अंक १८वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे० भ० ना० रा० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचे असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— ' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथें निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जूनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवांसंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— ' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— ' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—* जुनें वर्ष पांचवें *—

# वीरशैव संजीवनी

(ब्राह्म)णाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
(लि)ङ्गधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ. ९ (३२)

(न)वें वर्ष २ रें ) मिति भाद्रपद शु० १० शके १८५९ ( अंक १८ वा.

## अमृतबिंदू

आपला समाज दारिद्र्याने गांजलेला, अज्ञानांधःकारांत
खितपत पडलेला असतांना त्याच्या उत्कर्षाची
यत्किंचित्‌हि काळजी न वाहतां,
शतकोटी जंगमार्चना करून
आणि
अनेक क्षेत्रांच्या
ठिकाणी अन्नछत्रें उघडून
मोक्षसाधताची अपेक्षा करणें
ह्मणजे खऱ्या मानवधर्माची उपेक्षा करून
ऐश्वर्यमदाची टिमकी वाजविणें नव्हे का ?

बसवदेव

# सावधान !

लेखकः—
राम शंभो पुराणिक,
सहसंपादक, संजीवनी.

सावधान या चतुराक्षरी शब्दाचा अर्थ धोक्याची सूचना; या शब्दाचा खरा अर्थ ज्या महात्म्यांनी ओळखला तेच जगद्वंद्य ठरले.

स्वामी समर्थ रामदासांचीच गोष्ट घ्याना. लग्नमंडपांतील कुंकुमांकित अक्षतांचा लाल रंग पाहून, ही धोक्याची सूचना आहे असा समर्थांनीं कयास बांधला, आणि स्वतःच्या लग्नाची लग्नमंडपात घुसलेली आगगाडी बोहल्याच्या रुळावरुन अंतःपट फोडून उलथण्याच्या बेतांत असतानांच संसाराच्या चक्राखालीं चिरडून मरण्यापेक्षां 'सावधान' अशी सूचना मिळतांच जीवानिशीं पळून जाऊन लाख मोलाचा जीव जगवला ह्मणून हा अपघात टळला. 'सावधान' च्या मागे 'शुभमंगल' शब्दाचे जाळें, जमलेल्या भटाभिक्षुकांच्या कोळघांनी भरभक्कम हलकल्लोळांच्या आरोळघांनी त्यांच्यासभोवती फेकून, त्यांना अडकवण्याचा प्रयत्न केला; पण समर्थांनी त्यालाहि न जुमानतां जी धूम ठोकली, ती पुन्हा ह्मणून लग्नाची बेडी गळयांत अडकवून न घेण्याच्याच भीष्मप्रतिज्ञेनें. आणि असें झालें ह्मणूनच त्यांना समर्थाच्या पदवीला चढता आलें.

पण सगळया जगांतील यच्चयावत् मानवानी जर असा निर्धारच केला असता कीं लग्न ह्मणून करायचे नाहींच, तर जगाचा वाढता पसारा संपुष्टांत येऊन, आज पृथ्वीच्या पाठीवर कोणतें दृश्य दिसलें असतें याचा विचार वाचकांनींच करावा.

विश्वनिर्माणकर्त्या परश्वरानेंच माया, ब्रह्म, स्त्रीपुरुष, नरमादी, अशी जोड निर्माण करुन जगाचा अफाट पसारा वाढवण्यालाच उत्तेजन दिलें.

पूर्वकालीं जेंव्हा मानव प्राण्यांची तुरळक लोकसंख्या होती, आणि ज्या काली विवाहाचें प्रतिबंधक बंधन समाजावर लादले गेलें नव्हतें, तेंव्हा ही अमक्या पुरुषाची बायको, किंवा हा तमकीचा नवरा, असे शब्दच मुळीं प्रचारांत आले नव्हते. कांही लोक, पांच–दहा स्त्री पुरुषांच्या जमावानें, तर कांही शेंपन्नासांच्या टोळीनें, एकत्र राहून उदरनिर्वाहार्थ, कंदमुळे, फुले–फळें खाऊन, अगर प्रसंगोपात मांस भक्षण करुन, आपला चरितार्थ चालवीत असत. आणि पशुवृत्तीसारखें प्रजोत्पादन करुन, लोकसंख्या वाढवीत असत. त्या काळी, पुत्रानें आईपासून. भावानें बहिणीपासून, संतती निर्माण केल्याचे दाखले आजहि पूर्वेतिहासाची पाने चाळल्यास दृष्टीस पडतात.

अशाच प्रकारें कांही काल लोटल्यानंतर तशाहि परिस्थितींत कांही तरी सामाजिक बंधनें निर्माण करण्याची आवश्यकता भासूं लागली. आपापसांतील असूयेचाहि कदाचित्

हा परिणाम नसूं शकेल. गृहस्थाश्रमात पतिपत्नीचें
... अवश्य आहे, त्यावाचून सुरळीत संसार-
... चालणें अशक्य, असा अनुभवाती पूर्व-
...तील लोकांनी पोक्त विचार करून विवा-
...पालण्यात आलें. पण तें आजच्या इत-
... फक्त स्थितीचें नव्हतें हें खास. ' जो
...तो कान पिळी ' या न्यायाने एकेका
...पांच, दहा, देखील स्त्रियांची लग्न-
... एकसमयावच्छेदें धारण करतां येत
... तसेच, एका स्त्रीलादेखील पांच-दहा
...शी संभोग करण्याची मुभा असे. पाति-
... आणि कुलशील यांचा काटेकोर विचारच
... विचारांत घेतला जात नसे.

पण आजकाल परिस्थितीनुरूप सर्वच कांही
... आहे, तेव्हा पूर्वसंस्कृतीचा विचार
... ठेवूनच आज आपल्याला समाजांत
...तील, आणि सहजासहजी पचतील अशाच
... वागायला हवें ही गोष्ट नाकबूल
... येणार नाही. आमच्यामधील
... लोक, जगातील कांही विवक्षित देशांतील
...कडे बोट दाखवून, तर कांही अशिक्षित
...ची उदाहरणे पुढे करून स्वतःच्या मतांचें
... करून इतरांची मतें चुकीची आहेत असें
...विण्याचा प्रयत्न करतात.

... आपण विवाहपद्धतीचाच नुसता
... करूं. विवाह हा मनुष्यमात्रांच्या
...तील मध्यबिंदु आहे. विवाहबंधनानें
...लेल्या दोन जीवांच्या सुखदुःखाचा समा-
... विवाहांत भरलेला असून, जर उभय
...ची मनें एकमेकांविषयी पूर्णपणें प्रेमा-
... असतील तर तिथे मतभेदाचा
... मुळी न उद्भवतां त्यांचें आयुष्य
... आनंदात जाईल आणि
... पाहून कांहीं निराळें असतें असी
... त्या दंपत्याच्या अंतःकरणांत डोका-
... नाही. उलटपक्षी, कांहीं प्रतिकूल परि-
स्थितीचें अवडंबर निर्माण झाल्यानें, अगर वडिल-
धाऱ्यांच्या मर्जीखातर बाहुला-बाहुलीच्या लुटू-
पुटूच्या खेळांप्रमाणें घडून येणारे विवाह, आणि
असल्या विवाहबंधनाचा गळफास गळी पडणारे
पतिपत्नी कितपत सुखासमाधानानें नांदत
असतील त्याचें उत्तर म्हणजे ' नको हा संसार,
मेलेले पुरवले ' अशाच बोलफुलांनी नर्क-
वासाच्या यातना भोगीत कंटाळवाणे जीवित
कंठीत असलेले आढळतात.

एकूण, पतिपत्नीच्या नात्यांत शुद्ध प्रेमाचें
अग्रस्थान पाहिजे. नुसता वरकरणी प्रेमाचा
पोरखेळ असल्यास संसाराचा खेळखंडोबा
झालाच म्हणून समजा. आतां ही प्रेमनिर्मिती,
पत्नी महाराष्ट्रांतील तर पती कर्नाटकांतील,
जन्मात कधी कुणी एकमेकांची नुसती नांवें-
देखील ऐकलेलीं नसतात मग प्रत्यक्ष पहाण्याचें
तर दूरच, अशा दोन अपरिचित जीवांची सांगड
वडिलधाऱ्या मंडळीच्या मध्यस्थीनें, अथवा एखाद्या
धंदेदाईक दलालामार्फत जुळवून, लग्नप्रसंगी,
भटाभिक्षुकांच्या ' शुभमंगल सावधानच्या '
आरोळ्या कितीहि कंठरवाने ओरडून आकाश-
पाताळ एक केलें तरी उभयतांचीं तोंडें हम-
खास एकत्र जुळून वधुवर एकजीव होतील
हें कशावरून खरें मानायचें ? एकाचे आकाशा-
कडे तर दुसऱ्याचें पाताळाकडे तोंड
फिरवण्याचेच प्रसंग शेकडा नव्याण्णव ओढ-
वायचे.

यावर पुराणमतवादी जीर्णरुढीप्रिय सना-
तनी असा सवाल करतात कीं, काय हो, हें
वीसावें शतक सोडलें, पण इतकें कशाला,
या वीसाव्या शतकांतील अलीकडची पांच-पंच-
वीस वर्षें सोडलीं तर प्रेम ही काय चीज
आहे हें तरी कुणाला माहीत असेल की नाही
देव जाणे. वाडवडिलांनी मुलगी पाही तर
मुलगा पसंत करायचा, काय जी लग्नासंबंधी
बोलणी व्हायची तीं झालीं कीं तिथीनिश्चय,

आणि घुंघटाच्यानें लज्जाचा वार उडायचा. वराव वरी झाली कीं कमीतकमी आठ-दहा वर्षानंतर पतिपत्नींची एकांतात चोरट्या-पावली अंधारात गाठ पडायची, एकमेकांचीं तोंडें वडीलधाऱ्या मंडळींसमोर दिवसा तर कधी एकमेकांना बघायला मिळायचीच नाहीं पण रात्रीदेखील काय व्हायचें असेल तें अगदी अंधारात, गुपचुप. तोंडांतून ब्र देखील न काढतां ! असा पडदपोशी कुलीनपणाचा संसार करून दहावीस पोरावाळाचे आई बाप झालेले लोक काय कमी आहेत? त्यांचे नाहीं कुठें अडले या तुमच्या प्रेमावाचून! प्रेम ह्मणें प्रेम, सारे चवचाल चाळे, लाजलज्जा गुंडा-ळून नुसता धिंगाणा घालायला मिळावा कीं झाले प्रेमवीर !

आता नवमतवाद्यांच्या विवाहकल्पनाची मीमांसा करणेंहि चुकीचें होणार नाही. विवा-हरज्जूने दोन जीव एकत्र निगडीत व्हायचे आहेत ते विवाहपूर्व एकत्रित वास्तव्य करू लागल्यास एकेकांना दुसऱ्याच्या अंतःकर-णाची भली बुरी साक्ष पटूं लागेल. प्रत्येकाची मतें किती सोज्ज्वळ आहेत हें कळेल, कोणाच्या रागाचा पारा कितींशी आंच लागली असतां कल्प-नातीत चढूं शकतो, आणि कसल्या गोड बोलांनी कोण किती हुरळतो हें सहजासहजी कळून, पुढें या वधुवरपरीक्षेचा रिझल्ट किती मार्कांनी पास-नापास होण्यांत होतो हें पाहूनच विवा-हाला सम्मती देण्यांत आयुष्याच्या सुखदुःखाचा प्रश्न सोडवतां येतो. अर्थात् सहवासोत्तर विवाह-पद्धतीचा अवलंब करणें आज तरी जरुरीचें आहे. ही नवमतवाद्यांची भूमिका !

खरे पाहूं गेल्यास सहवासोत्तर, या शब्दांतच सनातन्यांना सैतानाचें स्वरुप आढळतें, तर नव-मतवाद्यांना, प्रेमळ मित्राचा भास होतो. पण दोन्ही पक्षांचे नुसते आभासच आहेत हेंहि तित-केंच खरें आहे.

वास्तविक सहवासोत्तर विवाहपद्धति, निरपेक्ष, निष्काम, आणि शुद्धांतःकरणानें आचरणांत आणली गेल्यास, अतिशय उत्कृष्ट परिणाम होईल. पण आवडत्या कुत्र्याला पाय चाटूं देण्याची चट लावली कीं तें तोंड चाटायलाहि मागेपुढें पहात नाही असाच अनुभव या सहवा-सोत्तर विवाहपद्धतींत शेकडा शंभर टक्के नसला तरी नव्याण्णव टक्के आल्यावाचून रहात नाही. आणि यामुळेच सनातन्यांचे या-विरुद्ध काहूर आहे हें कुठल्याहि नवमतवाद्याला नाकबूल करतां येणार नाहीं.

सहावासोत्तर विवाहाचें रूपांतर समागमोत्तर अर्थात संभोगोत्तर होण्यांतच जर व्हायचें असेल तर असले विवाह न झालेलेच बरे असें कोणीहि ह्मणेल.

स्त्री जात, ही जात्याच अत्यंत कोमल अंतःकरणाची आणि हळव्या हुरळत्या स्वभावाची असल्या कारणानें सहवासप्रिय तरुण आपल्याशीं प्रेमाची प्रता-रणा करतो आहे कीं, खरोखरच जीवाभावाचें जिव्हाळ्याचें प्रेम करतो आहे याची तिला नीटशी ओळख पटवून घेण्याइतकी तीक्ष्ण बुद्धिमत्ता नसते. आणि सहवासप्रिय तरुण तर आपल्या प्रेमाचें मोहनीजाल घटके-घटकेंनी घट्टपणें आवळीत असतो.

पहिल्या भेटींत अगदी आदबीनें दूर उभे राहणारे आणि लाजाळूपणाने बोलतांनादेखील खालच्या मानेनें पहिली भेट संपवणारे तरुण तरुणी, दुसऱ्या भेटींत जरा पुढें जाऊन डोळ्याला डोळा भिडवूं लागतात. एकमेकांचें हंसऱ्या चेहऱ्यानें स्वागत करूं लागतात. तिसऱ्या भेटींत एकासनावर पण जरा अंतरानें बसणारे दोन जीव प्रेमाच्या जादूनें भारले जात जात शेवटी एकमेकांना खेटून बसण्यासहि

नसत नाहीत. आणि अशा खेटाखेटीची
हुर होतांच विनधोकपणें पट्टाविनोदाची
सह करीत चुंबनाच्या चबुतऱ्यावर चढतात
आणि शेवटीं आलिंगनाच्या मोहपाशांत सांपडून
पहल्या साध्या-सुध्या सहवासाचें संभोगात रुपांतर
व्हावयाशिवाय उभयतांचें एकमेकावर खरें प्रेम
आहे असें खात्रीत धरावयाला निदान पुरुष
तरी केव्हांहि तयार नसतो. आपणा उभय-
तांच्या विमल आणि पवित्र (?) प्रेमांत,
शरीर आडकाठी असणें आपल्याला बुवा
मुळीच पसंत नाहीं. मैत्री तीच कीं जिथे कस-
लाहि भेदभावाला मुळीच वाव नाहीं. अशा
प्रकारें प्रेमाचें समर्थन करून वेळ प्रसंगीं एकां-
तांत संधान बांधून शीलवती कुमारिकेचें बळ-
जबरीनें तरी शील भ्रष्ट करण्यांतच याला
प्रेमिताचें सार्थक वाटूं लागतें, आणि त्या
बिचारीला मात्र निरर्थक जगांतून तोंड काळें कर-
ण्याचा प्रसंग येतो.

एखादाचित् असल्या सहवासप्रिय प्रेमी
जोडप्याचें लग्न झालेंच तर चार
दिवसांच्या चांद रात्रीच्या हनीमूनची
धुंदी ओसरली जाते आणि क्षुल्लकशा
कारणावरून 'उगीच कशाला दिमाख मिर-
वतेस, ठाऊक आहे मोठी पतिव्रता लागून
गेलीस ती, लग्नाआधी मन मानेल तसले
चाळे करणाऱ्या तुझ्यासारख्या चवचाल बाय-
कोला, मी पदरांत घेतली नसती तर एव्हांना
तुझ्या धंद्याशिवाय दुसरी गत उरली नसती,'
असा वर्मी-वर्मी टोमणा — टोमणा कसला,
अंगारी तापलेल्या सांडसाचे डाग देण्यांत
त्याला मौज वाटते; तर तिला जीव नकोसा
होतो! तेव्हां सहवासोत्तरविवाहांत देखील,
'सावधान' या भयसूचक सूचनेकडे लक्ष देणें
जरूरी असल्याचें आहे.

मुलांची किमान विवाहवयोमर्यादा काय-
द्यानें १४×१८ ही ठरवली गेली असतांना—
देखील कांहीं लोक अजूनहि ८×१२ च्या वधु-
वरांचीं लग्नें उरकून घेतात. तर कित्येक
सुशिक्षणाच्या नावाखालीं ३०×४० च्या टोका-
पर्यंत लग्नाचें नांवदेखील काढूं देत नाहीत.
वास्तविक कायद्याचा प्रश्न बाजूला ठेवला
तरी व्यवहारज्ञ माणसाला निदान हिंदुस्था-
नच्या हवापाण्याचा विचार करतां १४×१८
चीच वयोमर्यादा मान्य करणें उचित आहे.
१४×१८ या वयोमर्यादेंतील शेवटले वर्ष-सहाम-
हिनें जर कां सहवासप्रिय तरुण-तरुणीला
चार बरोबरीच्या स्नेहयासोबत्यांसह बालवि-
ण्याची, पण गुप्तरीत्या जरा थोडी करडी
नव्हे प्रेमळपणाची देखरेख घरांतील वडील-
धाऱ्या मन्डळीनें सावधानतेनें राखून जर कां
सहवासोत्तरविवाहपद्धती अंमलांत आणली गेली
तर सावधानच्या मागें नुसते शुभमंगल
या शब्दाचें अवडंबर न लावताहि सहवासोत्तर
विवाहाचें शुभमंगल साधतां येईल अशी
आमची खात्री आहे.

---

# लेखक व लेखनकला

लेखकः—
शं. गो. साखरपेकर
बडोदे.

'वीरशैव संजीवनी'च्या १६ व्या अंकामध्यें " लेखक व लेखनकला " ह्या विषयावर श्री. मुंजे वकीलासारख्या अनुभवी लेखकानें लेख लिहून, लेखनकला ह्मणजे काय, लेखनकला कशा प्रकारची पाहिजे, लेखक कसे हवेत, याचें दिग्दर्शन थोडक्यांत पण मननीय केलें आहे. वीरशैवांत तसे कसलेले लेखक आज संख्यावंध नाहीत, ही दुर्दैवाची गोष्ट होय. तथापि जे आहेत, त्यांची योग्य किंमत या लेखांत करावयास हवी होती. परन्तु जसे श्री. आंघळकर त्यांच्या लेखांत श्री. मुंजे वकीलांचें नांव चुकून विसरले ( मुद्दाम नव्हे ), तसे श्री. मुंजे वकीलसुद्धा थोडेबहुत चुकले. चूक होणें हा देहस्वभाव आहे.

मराठी—वीरशैव—साहित्यक्षेत्रांतच नाही, परन्तु मराठी साहित्यक्षेत्रांत ज्या वीरशैवांचीं नांवें आढळतात, त्यांचा नामनिर्देश त्या लेखांत करावयास हवा होता. असे कसलेले लेखक आणि लेखनकलानिपुण ' वीरशैव संजीवनी ' व 'उदय'चे संपादक श्री. ना. रा. बामणगांवकर, ' सुदर्शन 'चे संपादक श्री. सि. भ. कल्याणशेट्टी B. A. LL. B. आणि बॅ. सरदार हे होत. बामणगांवकर हे महाराष्ट्रांत प्रख्यात व्याख्याते, लेखक आणि संपादक आहेत. 'धनुर्भंग' आणि 'आत्मतेज' हीं दोन संगीत नाटकें, आणि 'नामदार A. S. S.' व 'शिपाई' ह्या दोन नाटिका त्यांच्या प्रसिद्ध आहेत. त्यांना २६ व्या महाराष्ट्र–नाटयसंमेलनाचे अध्यक्षपदाचा बहुमान मिळाला आहे. ह्या नात्यानें केलेलें भाषण मननीय आहे. हे लेखनकलानिपुण नव्हेत काय ? त्याचप्रमाणें श्री. कल्याणशेट्टी ह्यांचीं महाराष्ट्र–नाटयविभागांत तीन नाटकें आहेत. त्यांनी ' कन्यादान,' 'ब्रह्मघोटाळा,' व ' सचिवसत्वपरीक्षा ' अशीं तीन नाटकें लिहिलीं आहेत. ब्रह्मघोटाळा भारतनाटयमंडळी वजवीत असे. सचिवसत्वपरीक्षेचे तर कानडी भाषांतर होऊन, आज स्टेजवर आहे. बॅ. सरदार विविध विषयावर लेख लिहीत असतात. त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत किंवा नाहीं, हें मला माहित नाहीं. त्या तीन लेखकांना " लेखक व लेखनकला " च्या यादीत स्थान न देणें ह्मणजे आपण शून्याभिमानी आहोत, असें जगजाहीर करण्यासारखे नव्हे काय ! श्री. मुंजे वकीलासारखे बहुश्रुत माझ्या मताशीं दुमत होणार नाही, असा भरवंसा आहे. श्री. मुंजे वकील सुद्धां वीरशैव–मराठी लेखकांत उत्तम लेखक आहेत आणि ते त्यांनी त्यांचा " वीरशैव लेखसंग्रह " प्रसिद्ध करून सिद्ध केलें आहे. ते लेखक आहेत, हें निर्विवाद आहे. तसेंहि नमूद करण्यास मला आनंदी आनंद होत आहे. परंतु ते कोणत्या वर्गाचे आहेत ते " ठरविण्याइतकीं कुशाग्रबुद्धि मजमध्ये नसल्यामुळें कांहीच लिहूं शकत नाहीं ...... "

श्री. मुंजे वकीलांना कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, लो. टिळक, शिवरामपंत परांजपे, कै. अच्युत बळवंत कोल्हटकर, कै. अण्णासाहेब किर्लोस्कर, देवल, गडकरी, श्री. खाडीलकर, कै. हरि नारायण आपटे, प्रो. फडके, श्री दप्तरी, आणि श्री. खांडेकर ह्यांच्या-

…चे विविध विषयाचे लेखक आणि लेखन-
…निपुण आमचा लेखकवर्ग हवा आहे.
…तु असें लेखनकार्य करावयास कारणें
…णतीं ? तशी स्फूर्ति येण्यास प्रसंग कोणते ?
…वाला कलेचें रूप द्यावयास साधनें कोणतीं?
…चा विचार करणें अवश्य आहे. ह्या बहु-
…क लेखकांना समाजाचे दोष सहन झाले नाहीं
…न ते दोष सुधारण्यासाठीं व समाज-
…सुधारणा करण्यासाठीं तलवारीच्या तीक्ष्ण धारे-
…ची लेखणी उचलली. समाजाचे दोष सुधा-
…ण्यासाठीं, समाजाचे गुण काय आहेत आणि
…कोणत्यामुळे काय सुधारणा करण्यासारखी
…हे तें पटवुन देण्यास धैर्य पाहिजे. तसें
…र्य असल्याखेरीज समाजावर लेखणी
…लवत नाहीं. वेळप्रसंगी अशा लेख-
…ला समाजाचे आघातप्रत्याघात सहन करावे
…लागतात. ही तयारी जेव्हां लेखकांची असते,
…तेव्हा परिणामकारक साहित्य निर्माण होतें.
…क महान् लेखक तसेहि तयार असून, समा-
…जाची रचना, समाजाचा धर्म, समाजाचा अन्य
…जांशी संबंध वगैरे विषयांचें ज्ञान संपादन
…न लेखनकार्य केलें आहे, त्यामुळे हृदयस्पर्शी
…वाङ्मय निर्माण झालें आहे. त्यांच्या लेखन-
…कला कलेचें रूप द्यावयास कलाकारदृष्ट्या
…नी स्वधर्म, स्वभाषा, आणि समाजाचें
…वाङ्मय प्राचीन वाङ्मयाचें अध्ययन करण्यास
…नी केलें आही. हे महान् लेखक स्वधर्मशास्त्र
…णि समाजरचनेचें रहस्य समजण्यास समर्थ
…आणि अद्यापि आहेत. ज्यांना अशी
…वढती त्यांनासुद्धां पुरेसें ज्ञान मिळावयास
…स आहे. ह्या साहित्यिक लेखकासारखेच
…वैष्णव लेखकाने त्या प्रसंगी धर्माचें परिवर्तन
…नये म्हणून आटोकाट प्रयत्न केला.
…धर्माच्या लेखकांस वेद, उपनिषदें,
…नेश्वरी, तुकारामाची गाथा, रामदासाची
…दासबोध, कालीदासाची नाटकें, भव-
…ग्रंथ वगैरे ग्रंथांचें अध्ययन करण्यास
…योग येतो. ह्मणूनच त्यांना

सहज धर्म आणि समाजाचें ज्ञान होतें आणि लेखनकार्य हातीं घेतल्याबरोबर धर्म आणि समाजाची आदितत्वें नजरेबाहेर जात नाहीं. जेव्हां अशा तयारीनें, एकच ध्येयाने आणि स्वयंस्फूर्तीनें लेखक लिहीत असतात, तेव्हांच उत्तम ग्रंथ निर्माण होतात.

स्वधर्माच्या रक्षणासाठीं, स्वसंस्कृतिसाठीं, स्वसमाजरचनेच्या हितासाठीं, भारताचार्य वैद्यांनी महाभारत आणि रामायणाचें मंथन करून अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. डॉ. केतकरांनी ज्ञानकोश २५ विभागांत प्रसिद्ध करून विविध विषयांचें ज्ञान उपलब्ध केलें आहे. कै. वि. ल. भावे यांनी प्राचीन मराठी साहित्याची भूमिका तयार केली. भक्तपरायण पांगार-करांनी भक्तांचें रसाळ वाङ्मय लोकांच्या नजरेस आणलें. कै. सि. म. फडके ह्यांनी 'वेदांतविदर्शन' लिहून स्वधर्माची महती वाढविण्यासाठी अन्य पंथांच्या आचारविचारावर ( वीरशैव पंथावर सुद्धां ) टीका करून लेखन-सुख घेतलें. श्री. वामन मल्हार जोशी ह्यांनी आर्यसंस्कृतीला आदर्शभूत अशींच मुख्य पात्रें आपल्या ग्रंथात रंगविलीं. लो. टिळक यांनी "गीतारहस्य" नांवाची टीका लिहून, लोकांना गीतेचें अध्ययन करण्यास व निष्काम कर्म करण्यास प्रवृत्त केलें. श्री. दिवेकर शास्त्रींनी आपल्या ग्रंथांत धर्माच्या नांवाखाली चाललेल्या गोंध-ळावर जोराचा हल्ला केला आहे. डॉ. भांडा-रकरांनी हिंदुधर्माचा इतिहास संशोधन करून, लोकांना तुलनात्मक अभ्यास करण्यास साधन केलें. श्री. तुळजापूरकरांनी "माझे रामायण" लिहून अन्यपंथाचे वैगुण्य नजरेस आणलें व आपली महती प्रस्थापित केली. प्रो. यं. बा. दांडेकरांनी स्वपंथाची महती वाढविण्यासाठी समजल्याशिवाय अन्यपंथाची ( वीरशैव पंथाची सुद्धां ) नालस्ती केली. श्री. पेंडसे यांनी "महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास" लिहून स्वधर्माचा छोटासा इतिहास उपलब्ध केला.

जेव्हां अशा लेखकांनी स्वधर्माचें अध्ययन करून, समाजरचना कशी आहे हें ज्या त्या वेळेस जाहीर केलें, तेव्हा साहित्यिक विषयांच्या लेखकानें त्या कक्षेंत राहून, कालमानाप्रमाणें समाजपोषक असेंच साहित्य निर्माण केलें. वीरशैवेतर एकादा लेखक वीरशैवमतपोषक पात्र रंगविण्यास समर्थ होईल काय ? नाहीच. वीरशैवमतपोषक पात्र रंगविण्यास, लेखकांनी वीरशैवधार्मिक वाङमयांत तन्मय झालेंच पाहिजे, हें निर्विवाद आहे.

म्हणून वीरशैवसंस्कृतींत विशेष काय आहे ह्याचें ज्ञान होण्यास आपल्या समाजाची रचना, शरणांचा अनुभव, शरणांच्या वचनांचें अध्ययन, मठांचा हेतु, पंचाचार्यांनी स्थापन केलेल्या सिंहासनांचा उद्देश, श्री. बसवांचें अद्भूत कार्य, श्री. महानुभाव बसवाची समता, अनुभवमंडपाचा हेतु व त्यांचें कार्य, लिंगधारणासारखी विशिष्ट पद्धत, आगमाचें अध्ययन वगैरे विषयांत आपला भावी लेखकवर्ग विद्यार्थीदशेंतच तन्मय होईल तेव्हांच समाजपोषक उत्तम साहित्य निर्माण होईल. हल्लीं वीरशैव-मराठी वाङमय कोणत्या दशेंत आहे, त्याचें मी दिग्दर्शन "वीरशैव मराठी वाङमयाची साधनें" नांवाचा लेख लिहून, सुदर्शनच्या अंक ४६ व ४७ मध्यें केलें आहे. म्हणूनच प्रथमतः प्राचीन वीरशैव मराठी वाङमयसंशोधन करण्याची आवश्यकता आहे. त्यानंतर कै० रावसाहेब वारद यांनी वारदग्रंथमालेतून जे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत, त्यांचें अध्ययन जारीनें सुरू झालें पाहिजे. त्या ग्रंथाचा प्रसार नाहींसारखा झाला आहे. जोपर्यंत धर्माच्या मुख्य तत्वांची माहिती नाहीं, तो पर्यंत स्वधर्मपोषक उत्तम वाङमय निर्माण होणें अशक्य. आपल्या धर्माचे प्रवचनकार, वक्ते, व कितंनकार सुद्धां फार नजरेस पडत नाहींत. म्हणूनच वीरशैवतरुणांना स्वधर्माची माहिती कशी असणार ? लिंगधारणाशिवाय जर त्यांना कांहीच माहित नसेल तर जशी पुस्तकें वाचतील तसेंच वागतील; त्यांत नवल काय आहे ! थोडक्यांत, वीरशैवधर्माचें रहस्य मराठींत उपलब्ध झालें पाहिजे. तेव्हांच लेखक स्वतःच्या लेखनाला वीरशैवकलेचें रुप सहज देऊं शकेल, व वीरशैवलेखकाला आणि वीरशैव लेखनकलेला मराठी वाङमयांत उच्चस्थान मिळेल. कानडी वीरशैवमय आहे. तामील व तेलगुत वीरशैवधर्माचा सार आहे, तर मराठी पण वीरशैवसारामृत कां होऊं नये ? वीरशैव महाराष्ट्रांत आहेत, मराठी त्यांची मायबोली आहे, म्हणूनच मराठी वीरशैवसारामृत झाली पाहिजे. श्री. महानुभाव बसवेश्वरांनी १२ व्या शतकांत "वीरशैव मत मंडळ" स्थापन करून, जशी कानडीला वीरशैवमय बनविली, तशी मराठीला, वीसाव्या शतकांत कां होईना, वीरशैवसारामृत बनविली पाहिजे. वीरशैव लेखक हे ध्येय डोळ्यासमोर ठेवून प्रयत्नाला लागतील तेव्हांच "लेखक व लेखनकला" आदर्शभूत होऊन मराठी वाङमयांत उच्चस्थान प्राप्त करील. इति शिवम् ॥

---

# कल्पित योगायोग

लेखकः— सत्यवादी.

आपल्या शहरांतीलच प्रसंग आहे हा ! एका सार्वजनिक संस्थेच्या खास कारून कांही जाडी देशभक्त मंडळी— कांहीं अगदीच काडी मन्डळीहि होती, उतरली ह्मणजे स्वर्गावरून देवदूता- विमानानी नव्हे, पण देवदूतासारखा मात्र त्यांचा झाला खरा. मोठ्या त्यानें शहरांतील ठरलेले न ठरलेले ऐनवेळी, उपटसुंभासारखे उपस्थित देखील सारे समारंभ, कुठे गुण्या तर कुठे धोडपाशा कुटाळकंपू कुर- गार पडले. त्यांतल्या त्यांत विशेष कुठल्याहि समारंभांत उघळला व कांही मंडळींचा जो विरस झाला शेवटी शेवटी हिप, हिप, हुर्योच्या मरून निघाला. देशभक्त पाहु- पंक्तीचा लाभ आपणास मिळाला क्रियेकांच्या तोंडाला पाणी सुटलें कांची तोंडें तोबरा दिलेल्या घोडपा- शाळू होती. जमलेल्या देशभ— भाषणाच्या रूपानें कुठे आपल्या तोंडाची , मारेफटक्यासारखे सटके ओढीत वेळी, तर कुठे स्तुतिस्तोत्रांचा गुलाल प्रेक्षकांना रंगवून-रंगवून सोडले.

देशभक्तीच्या डौल्यानें सर्वपरि- शी आणि त्यातून आतां तर काय गांधी टोपी डोक्यावर चढवलेली, आणि तिरंग्याचे फडफड मोटारीच्या टाकीवर , अशा थाटामाटात मिरवणाऱ्या देश- मंडळीला निरोप देतांना, मल्या- कांची एकच गर्दी मोटारीशेजारी आणि ती जमलीहि पण तशीच.

देशभक्त आणि मंडळीचे प्रमुख मोटारींतील फ्रंटसीटवर ड्रायव्हर शेजारी आरूढ झालेले, आणि त्यांच्या मागच्या बाजूला प्रमुखांची एक अत्यंत आवडती देशसेविका आणि एक साधारण स्नेही बसलेला, मोटरचा सेल्फ स्टार्टर ओढून, भर्रर्रर्र असा आवाज निघूं लागला. नमस्काराची एकच गर्दी उसळली, आणि आतां मोटार चालू होणार, एवढ्यांतच एक खादी- धारी धडपडत त्या गर्दीमधून वाट काढीत पुढे सरकले, आणि गयावया करून हात जोडीत, 'प्लीज वन् मिनिट ओन्ली,' असें ह्मणून खादीच्या उपरण्यातून दोन हार बाहेर काढून ते देशभक्तांच्या गळ्यांत घालण्याची धडपड करूं लागले.

पण : —

दोन्ही हारांतील पेचक तारांनी एकमेकांना इतके घट्ट आवळून धरले होतें कीं ते आपली गांठ सोडायला तयारच होईना.

त्यांची गुंतागुंत सोडवण्याची वरीच पराः काष्टा करूनहि त्या पेचक तारांनीं एकमेकांना न सोडण्याचाच सत्याग्रह सुरुं केला.

शेवटी राहू द्या आता ! आणा ते तसेच इकडे असें ह्मणत प्रमुखांनी बाहेर डोकावले, आणि याच वेळेला प्रमुखाच्या आवडत्या देश- सेविकेनेहि बाहेर डोके काढले. तरी हाराचीहि गांठ आतां कांहीं सुटत नाहीं अशी खूणगाठ बांधून खादीधारी सद्गृहस्थानें, दोन हारांतील दोन्ही वरच्या बाजू एक प्रमुख देशभक्ताच्या आणि एक देशसेविकेच्या कंठांत कशाबशा अड- कवून दिल्या, आणि गुंतागुंतीच्या खालच्या बाजू मोटर बाहेर गुरफटलेल्या राहिल्या. असा हा हारांतील पेंचक ताराचा पेंच प्रसंग पाहून प्रेक्ष- कांमधून, कुणी हीप हीप हुर्योच्या फुलाची उधळण केली, तर कुणी शुभमंगल सावधान ह्मणून टाळ्या पिटल्या. असा हा आजचा अकल्पित योगायोग ह्मणा अगर संयोग ह्मणा होता खरा !

( एक विनोदी लेख. )—



# गजाननाची भूलोकची सफर

( लेखकः— राम शंभो पुराणिक, सहसंपादक. )

आमचा उत्सव आतांशा अहमहमिकेनें भूलोकीं साजरा केला जात असतो असा संदेश आमचे प्रमुख दरबारी अधिकारी मूषकराज यांनी आह्माला निवेदन केला, आणि महाराज, आपण एकदां तरी अवश्य हा उत्सव पहाण्यास भूलोकीं चलावें, असा आग्रह धरला. आह्मीं अंतर्ज्ञानानें सर्व कांही जाणलें होतेंच, आणि ह्मणूनच, उगीच कशाला विषाची परीक्षा पहा, नकोच तें, असें ह्मणून टाळाटाळी केली. परंतु त्याचा कांही एक उपयोग झाला नाही. आपण जर भूलोकीं येणार नसलां तर मीहि आजपासून आपली चाकरी सोडून देईन, असा धाक आमच्या विश्वासू मूषकराजांनी घातल्यावरुन आह्मीं येण्याचें कबूल केलें, आणि त्याप्रमाणें आह्मी भूलोकीं आल्यानंतर आह्मांला कसकसे गोड आणि कटु अनुभव आले ते या सफरेमधून वाचकांना विदित केले आहेत. यांत एक अक्षर देखील असत्य नाही. कारण आह्मी देवलोक खोटे कधींच बोलत नसतो. आमचे पिताजी कैलासवासी भोलेनाथजी यांचा पुण्यपावन श्रावणमास सुरुं झाला की आमच्याहि जन्माचे डोहाळे चितारी आणि कुशल कारागिरांना झपाट्यानें सुरु होतात, आणि हे डोहाळें पुरवण्याकरितां नदीकांठची माती, कुणी राख मिसळून तर कुणी घोड्या-गाढवाची लीद मिसळून, कुणी कुणी तर पांच-पंचवीस वर्षापूर्वीची लहान-मुलाबाळांच्या लघुशंकेने बरबटलेल्या अंथरुणांतील रुईचे लोंदे मिसळून दगडानी ठेंचून चेंचून, लत्ताप्रहारांनी चांगली खुंदून खांदून आमच्या जन्माची माती माती करतात, आणि आह्मी याविरुद्ध तक्रार करुं लागल्यास, टक्के टोणपे खाल्ल्याशिवाय मोठेपणा नाही, आणि टाकीचे घाव सोसल्याशिवाय दगडाला देवपण नाही, अशा गप्पा मारुन आह्माला गप बसवतात.

कधीं कधीं तर कुटाळ टवाळ लोक, एखादी गरोदर बाई रस्त्यानें जात असलेली पाहून आमच्या नांवाचा लागलीच उल्लेख करुन ' अरे गणपती आला रे आला ' ह्मणून शिमगा करायला कचरत नाहीत. फाल्गुन मास असला तरीं त्यांना भाद्रपद दिसूं लागतो. तेव्हां अशा कुचेष्टेखोरांना देऊं का एकेक सोंडेचा फटकारा, आणि पाडूं का यांची ती फिदफिदणारी बत्तीशी, असें मनांत येतें, पण जाऊं द्या. " नंगेसे खुदा डरे, " असें

[illegible] स्वस्थ बसावें लागतें झालें. आमच्या [illegible] माती करणाऱ्या एका कारागिराने [illegible] छे, छे, छे, काय, ही थाण तुह्मी माझ्या [illegible] शरखी रद्दे चढवून बसवतां ' असें [illegible] बरोबर असें कांही चोख उत्तर दिलें [illegible] एवढ्यां तो गृहस्थ ह्मणाला, ' अहो गजा-[illegible] महाराज, मी आईच्या उदरीं असतांना [illegible] आईदेखील चिकण माती, चुलीच्या [illegible] झालेली राख, नेहमी खाऊन त्या राख-[illegible] रद्दे नेहमी आमच्या अंगावर चढ-[illegible], आणि आह्मी आतून कुरकुरूं लागल्यास [illegible], बाळ तू पुढे मोठा कलाकुशल [illegible] तयार करणारा कारागीर होशील. [illegible] तू तसा व्हावास अशी माझी फार फार [illegible] असल्यामुळे तर मी हा खुराक चालू [illegible] आहे. हें ऐकून आह्मी देखील चकित [illegible] आणि स्वस्थ बसलों.

[illegible] माणूस आमचा खरा भक्त, ह्मणून [illegible] त्या कुटुंबाबद्दल अतिशय आदर [illegible]. कारण आमच्या गलेलठ्ठ पोटाशीं [illegible] इतरांचें क्वचित् जुळतें. आणि [illegible] व्यसनेषु सख्यं,' या न्यायानें तेच [illegible] अतिशय जवळचे असे स्नेही वाटू [illegible]. इतर समाज आमच्या पोटाकडे वांकड्या [illegible] पाहून आमची कुचेष्टा उडवतो, पण [illegible] मुळींच कांहीं तसली धास्ती [illegible] तर आह्मी बारा बारा महिने [illegible] कडे ढुंकूनहि पहात नाहीं. आधी [illegible], आणि नंतर दुसरे सारे, हा आमच्या [illegible] अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे. [illegible] एखादी फेरी करायची ह्मणून आह्मी [illegible] येतो खरे, पण आमच्या नावानें [illegible] पाहून आह्माला शेवटी जल-[illegible] प्रसंग येतो.

[illegible] एकाद्या वेळेला एकाद्या मित्रानें दुस-[illegible] कुठें जरा शिफारस केली, तर

तिसरा लागलीच टोमणा मारून ह्मणतो, ' कशाला उगीच बातां झोंकता, ठाऊक आहे, गुळाचाच गणपती आणि गुळाचाच नैवेद्य, इतके सवंग आमचें नांव आताशा लोकांच्या तोंडीं झालें आहे. बाकी गुळाचा गणपती आजवर केलेला आह्मीं तरी कधीं पाहिला नाहीं; गुळाचा नैवेद्य मात्र, गुळाची कातरमोड पोळी चघळतांना आमच्या चांगलाच परिचयाचा झालेला आहे.

एकादे गलेलठ्ठ पोर चढत बसले असतांना त्याची आई देखील ह्मणते कीं, अरे उठना तेथून, बसलास काय गणोबासारखा फतकल मारून! एकूण काय, वाटेल त्याने आणि वाटेल तेव्हां जाड-जुड प्रस्थ पाहिलें कीं खुशाल आमच्या नावानें खडे फोडावेत आणि ह्मणूनच तर बारा बारा महिनेदेखील आह्मी कधी या भूलोकावर ढुंकूनदेखील पहात नाही. आमचे कान आणि नाक एवढें लांब होण्याचें कारण कुणाला सांगितलें तरी खरें वाटायचें नाहीं. पण प्रतिज्ञेवर सांगतों कीं, एकदा काय झालें, आमच्या आई पार्वती, आणि कैलासनाथ, आमच्या बरोबर भूलोकीं चलरे गजानना तुझा उत्सव पहायला आपणहि मृत्युलोकीं येणार ह्मणून हट्ट धरून बसले. आह्मी कांकू करूं लागलों. कारण आह्माला माहित होतें कीं, आमची मृत्युलोकच्या लोकांनी चालवलेली विदुषकी थट्टा पाहून कैलासनाथ संतापतील आणि आईसाहेब चरफडतील. ह्मणून ' कशाला आपण तसदी घेतां, मीच दहा दिवसांची ही सफर पुरी करून येतों,' असें विनवून सांगितलें. पण ते ऐकेनात. शेवटी त्यांनीच आपला हट्ट पुरा केला, आणि आई-साहेब आणि कैलासनाथासह आह्मी मृत्यु-लोकीं आलों. बरोबर मूषकराज होतेच. बरे झाले नंदीला बरोबर आणले नव्हते, नाही-तर त्या संतापी बैलोबानें काय धुमाकुळ माज-वला असता न कळे. षण्मुख आमचे वडेभाई, त्याला तर मी मुद्दामच मुकांडी दिली, नाही-

तर त्या राजश्रीने माझी चांगलीच उडवली असती. आईसाहेबांच्या हातांत नव्हे गळयात, हात घालून आमचे वडील कैलासनाथ जेव्हा रस्त्याने आमच्या उत्सवाची मौज पहात चालले, तेव्हा हे कोण विचित्र शोकीन, संन्यासी-महाराज, भर रस्त्यानें बायकोच्या गळयांत हात घालून मिरवताहेत आणि एकीला काय अगदी डोकीवर नेऊन बसवली आहे! असें ह्मणून लोक टवाळकी करूं लागले. आह्मी खालच्या मानेनें चालतो होतो. लागलीच एका घरापुढे थांबून कैलासनाथ संतापानें ह्मणाले, कायरे गजानना, ही तुझीच प्रतिमा काय ? उंदरावर बसायचें सोडून घोडयावर बसायला केव्हापासून शिकलास? 'अगबाई खरंच, गजानना, हेरे काय, पडला-बिडलास तर हातपाय मोडेल ना' असें पार्वतीबाई ह्मणाल्या. एवढयांत आमच्या उंदराजीला काय वाटलें आणि कसे बेंटघाला अचूक दिसलें न कळे, दात खाऊन कचकचून ओरडला, अहो आईसाहेब, आईसाहेब, तो घोडा नव्हे, गाढव आहे गाढव.' कारण कारागिरानें घोडयाचे कान बरेच लांब केल्यामुळे आणि आमच्या अजस्त्र भारामुळे तें जनावर खरोखरच गाढवाइतकें उंच दिसत होतें. 'आणि खरोखरच एक हात तुटला आहे गजानन महाराजांचा, ती पहा त्याला पट्टी चढवली आहे' उंदराजी उद्गारले.

'- होय का ? तरी मी ह्मणतच होते!' अशी पार्वतीमाईनी त्याला साथ दिली.

दुसऱ्या घरी आह्मी गेलों. पाहतो तों काय, वाघाच्या जबडयांत हात घालून आह्मी ठाण मांडून उभे !

तिसऱ्या घरी काय तर चंद्रावर आह्मी झोंके घेत आहोंत.

चवथ्या घरी, हरणाच्या रथावर चढून मारे धूम ठोकीत पळतो आहोंत.

तर पांचव्या घरीं, गाईच्या कळपांत कृष्णा-सारखी मुरली वाजवीत बसलेले आहों.

सहाव्या ठिकाणी आह्मी एका भल्या भरभक्कम मल्लाशीं कुस्ती खेळतो आहोत, तर सातव्या ठिकाणी एका भल्या मोठ्या सापावर निजलेले आहोंत.

अशा अनेक विकृत स्वरूपांत आमच्या प्रतिमा पाहून आईना आणि वडिलांना अतिशय सखेदाश्चर्य वाटलें. इतक्यावर थांबलें असतें तरी पुरे, पण आमचें दुर्दैवच हात धुवून पाठीस लागलेलें, तें कसें संपणार? कळस झाला! एका ठिकाणी तर आमची हिऱ्यामाणकाची मुकुट-कुंडलें, आणि भरजरी पितांबर, हिरावून घेऊन आह्माला चार आण्याचा खादीपंचा आणि अर्धा आण्याची खादी टोपी दिली गेली!

एकाने आह्मी नको नको ह्मणत असतांना दळजबरीनें आह्माला सायकलवर चढवले, पण ती सायकल सर्कशीतील हत्तीच्या मायकलीइतकी मजबूत नसल्यामुळे सायकलची चाकें आमच्या भारानेच जमीनींत पुरली गेली, आणि आह्मी लवंडलों. बरें झालें मूषकाने हात दिला ह्मणून हातापायांवरच पिडा टळली, आणि जीव बाबूत राहिला.

एकानें तर आह्माला सूट, बूट, कोट, आणि विलायती हॅट चढवून थेट साहेब बनवले, तर दुसऱ्याने, विजार आणि रुमी टोपी आणि वर दाढी देखील चिकटवून इस्लामी पेहरावांत आमचे सोंग उभें केलें. हें दृश्य पाहून मात्र आईसाहेबांचा संताप अनावर झाला आणि त्यांनीं माझे दोन्ही कान धरून असे हालवले की, मलाहि जन्माची आठवण राहिली. "आई-साहेब रागानें सारख्या मला शिव्या देत होत्या आणि ह्मणत होत्या, तरी तुला मी हजारदां बजावलं असेल की, असल्या खुळचट लोकांच्या नादीं लागूं नकोस ह्मणून; पण ऐकतो कुठें.

पहा बरे कसें मातेरें चालवलें आहे या चहा-टळ लोकांनीं तुझें. त्यांना कांहीं दुसऱ्याच्या मुलावाळांची अशी थट्टा करायला जरा तरी लाजा वाटताहेत कां? पण आपलाच दाम खोटा, दुसऱ्याला तरी दोष देण्यांत अर्थ काय?

तेव्हां आह्मी जरा धीटाईनें बोलूं लागलों कीं, 'आईसाहेब, अहो हें मुद्दामच केलं आहे. कारण असें कीं, नेहमी आमचा उत्सव आला कीं हिंदुमुसलमानांची भांडण-तंटे आणि मारामाऱ्या खुनाखुनी ठरलेली; तेव्हां तो टाळण्याची ही युक्ति एका कल्पक कारागि-रानें आपल्या अजब डोक्यामधून शोधून काढली आहे. आणि या कल्पकतेबद्दल शांततेचं नोबल प्राईस, ( आह्मीं इंग्रजी बोलतो ह्मणून आश्चर्य वाटूं देऊं नका. कारण, चवदा विद्या आणि चौसष्ट कलांचें अधिपतित्व आमच्याकडेच आहे. ) यंदा या कारागिराला मिळणार आहे. कहांका काफरोंका गजानन आया है, हम नही हमारे मसजीदके सामनेसे उसकू जाने देगें, आणि असे प्रसंग आह्मावर वारंवार ओढवल्या-मुळे आह्माला कित्येकदा जलसमाधीऐवजी, बसल्याजागीच जिवाची माती मातींत मिस-ळून घ्यावी लागली आहे. यापुढे तसं कांही एक होण्याची धास्ती नसून हिंदुमुसलमान एकदिलानें या भूलोकीं वास्तव्य करण्याचें हें अमोघ साधन होऊन बसणार आहे. मुसलमानासहि वाटूं लागेल कीं, गजाननानें हमसेभी मुरूक करलिया ! पण आमच्या या चपंट-पंचरीनें आईसाहेबांचें समाधान न होतां, त्या उलट अधिक संतापल्या आणि ह्मणाल्या, गप बैस, तूंच तसा नेभळट आहेस, पोर, पुन्हां ह्मणून तू त्यांच्या संगतीला रहाणार नाहीस, अशीच अद्दल घडवते तुला, असें ह्मणून माझे कान पिरगाळले तों सुपासारखे लांब होईपर्यंत कांही सोडले नाहीत. आणखी किती ओढवणार होती कुणाला ठाऊक, पण इतक्या-त आमचे वडील कैलासनाथ, आधीच अति-शय संतापो तडपतीचें, मध्येच ओरडून ह्मणाले, सोड सोड तूं त्याला, मीच त्याला चांगली समजावणी देणार आहे आतां, असें ह्मणून माझा एक हात धरून मला फरफरत त्यांनी आपल्याकडे ओढले. या त्यांच्या सहजासहजी ओढण्याला आईसाहेब थोडीच ऐकणार? त्यांनीहि आमचा एक हात घट्ट धरून आह्माला आपलेकडे ओढायला सुरुवात केली. या आई बाबांच्या ओढाताणींत माझ्या दोन हातांचे चार हात झाले. तेव्हां कुठें त्यांचा राग थोडा शांत झाला. तरी पण " पाहूनच घेऊ दे तूं या वात्रट लोकांबरोबर कसकसले रंगढंग करतो आहेस ते आज पुरे-पुर, तुमचा मुलगा वाईट लोकांच्या संगतीने बिघडत चालला, अशी आजवर बऱ्याच देव-देवतांची तक्रार होती, ती अगदीं खरी होती अशी आज आमची खात्री होऊं लागली, असें ह्मणत कैलासनाथांनीं मला एक जोराचा धक्का, नव्हे एक बुक्का माझ्या पाठींत देऊन मला पुढें ढकललें. वडिलांच्या बुक्क्यानें माझी पाठ जी पुढे सरकली ती पोटांत घुसून माझें पोट वर आलें.

आह्मी जरा पुढें जाऊं लागलों. एका-ठिकाणी टाळमृदंगाचें भजन मारे आलाप घेऊन घेऊन चाललें होतें. पण विठ्ठलाच्या नांवाशिवाय, त्या भजनांतून माझें नांव कुठेंहि ऐकायला न मिळाल्यानें, ' पाहिलेस कां ? उत्सव तुझ्या नावाचा, आणि रडगाणें गातात दुसऱ्याच्या नावानें. केवढा तरी तुझ्याबद्दल आदर आहे या उडाणटप्पू लोकांच्या अंतःकर-णांत, असें ह्मणून आईसाहेबांनी टोमणा मार-लाच. जरा पुढें गेलों तों एक नायकीण आमच्या मूर्तीसमोर ' कसा पिकला गहू हुरबरा, बाळपणीच्या नाना तऱ्हा ' अशी लावणी गात होती,हें पाहून तर आईसाहेबांचें पित्तच खवळलें, आणि त्या कांही तरीं पुटपुटतच 'चला, चला इथून, ताळच सोडला आहे मेल्यानी,' असें ह्मणत पुढे सटकल्या; आह्मीहि मागून मुकाट जाऊं लागलों.

एका सार्वजनिक गणपतीजवळ एका देश-भक्ताचें व्याख्यान चाललें होतें. तो बसा

फोडून-फोडून कुणाला तरी शिव्या देण्यांत दंग झाला होता. कांही लोक शेम-शेमचा मारा करीत होते, तर कांही टाळया पिटीत होते, पण माझ्या नांवाचा आणि माझ्या जन्माचा वा माझ्या उत्सवाचा खरा अर्थ नांवाला देखील कुणी उच्चारून बोलत असला तर शपथ.

एका ठिकाणी तर एका नाच्या पोऱ्याला स्त्री वेष चढवून, गचाळ गावंढळ लावण्याचा धुमाकुळ चालला होता. हे सारे किळसवाणे प्रकार पाहून कैलासनाथांच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्यांनी संतापातिरेकानें आपले तिन्ही नेत्र इंगळासारखे लाल करून जो माझ्या मुस्काटांत भडकवली कीं नाही, झटक्यासरसे माझें नाक सोंडेसारखे लांब होऊन एक दात अर्धा तुटलेला आणि दुसरा एक शाबूत असे बाहेर पडले, आणि बाकीचे दांत जे थोबाडांत गाडले गेले ते पुन्हा म्हणून वर आले नाहीत. 'चला चला इथून, या भूलोकच्या वात्रट लोकांचा वारा देखील संबंध नको आहे,' असें ह्मणून आह्मांला पुढे ढकलीत कैलास-नाथ कैलासाला जाण्याच्या तयारीला लागले. आह्मी गांवाबाहेर येतो न येतो, तोंच उंदराजी मध्येंच ह्मणाला, आईसाहेब, ठीक झालं आपण बरोबर, ऋद्धीसिद्धींना आणलें नाही, नाहींतर आज खूपच गम्मत झाली असती. तेव्हा आई-साहेब ह्मणाल्या, त्या मुली कांहीं याच्या-सारख्या खुळचट नाही आहेत. एकवीस मोद-कांची लालूच दाखवली कीं भाळल्या आपल्या. त्या महाखमंग आहेत. खऱ्या भावभक्तीनें जो त्यांच्या चरणावर जीवप्राण ओवाळून टाकील त्याच्याकडेच त्या दृष्टि वळवायच्या; असें बोलत बोलत आह्मी चाललों आहोत तोंच गांवाबाहेरील एका आम्रपल्लवाच्या मंडपांत एका सिंहासनावर आमची शेंदुरचर्चित मुर्ति-जवळच रिद्धी सिद्धी आमच्या दोन्ही बाजूला उभ्या असलेल्या अशी आईसाहेबांना आढळल्या. त्यांच्या तोंडून चटकन उद्गार निघाले, 'अगबाई, या पोरी तर इथें दिसताहेत, तेव्हा आह्मी सगळेजण आश्चर्यानें तिकडे पाहूं लागलों. नव्या पद्धतीने सजवलेली आरास नाहीं, कीं थाटमाट नाहीं, आपला सगळा साधासुधा कारभार, आणि आमच्या मुर्तिसभोंवार जम-लेली सारी मंडळी, अगदी गरीब स्थितींतली खरी, पण आनंदाने, भाविकपणें, 'गणराया लवकर येई, भेटी सकलाला देई,' असें ह्मणून आह्मांला आळवतांना दिसली. तपासाअंतीं असें कळलें कीं ते सारे लोक महार मांग, चांभार, वगैरे अस्पृश्य मानले गेलेले लोक आहेत, आणि आपली अस्पृश्यता धुवून निघावी, आणि गण-रायांनी आपणाला पतीतपावन करून घेण्याची इतरांना बुद्धि द्यावी ह्मणून ते आह्मांला आळ-वीत आहेत. आतां आपली चांगलीच कंबक्ती आली अशी आमची खात्री झाली. कारण आधींच आमची इतरत्र चाललेली शोभा पाहून आई आणि वडील संतापलेले; त्यांतून तू महार-मांगासारख्या अस्पृश्यांच्या घरीं देखील आतांवा जाऊं लागलास कां, असें ह्मणून कोणती शिक्षा आणखी आतां आह्मांला भोगावी लागणार आहे या विवंचनेंत आम्ही खालच्या मानेनें उभे असतांना या लोकांनाच आमच्या गजाननाची खरी महती कळली, आणि या असल्या गोरगरीबांची खरी भावभक्ती, असें म्हणुन आईसाहेबांनी आणि कैलासनाथांनी त्यांना शुभाशिर्वाद दिला, आणि आम्हाला बजावून सांगितलें कीं, या खऱ्या गोरगरीब भक्तांच्या निर्मळ भावभक्तीला पाहून आमचा संताप पार विरून गेला; आणि ह्मणूनच इतरां करितां नसलें तरी या असल्या भोळ्या भाविक लोकांकरितां गजानना, आह्मी तुला दरवर्षी दहादिवसांची सफर या भूतलावर करण्याकरितां परवानगी देत आहोंत, तरी पण इतरांच्या पातकाकरितां तुला जल-समाधी ही घ्यावी लागणारच. असा शाप देऊन कैलासनाथ पार्वतीमाईसह कैलासी निघून गेले, आणि आह्मी आमच्या मूषकराजासह दहा दिवसांचा भूतलावर मुक्काम ठोकला. एकूण, कर्म न चुके परमेष्टी हेंच खरें!

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील— मौजेची प्रश्नोत्तरें:—

द. पों. पु. कल्याण:—

मी एका कुलीन वीरशैव घराण्यांतील पण समतवादी विचारांचा तरुण असून नुकतेच मी हे 'पॉप्युलर शू स्टोअर' नावाचें जोडयाचें दुकान काढलें आहे. पण कांही सनातनी वीरशैवांनीं मला बहिष्काराची धमकी देऊन माझेशी अन्नोदकव्यव हार बन्द केला आहे. तेव्हां मी यापुढे कसें वागा- वें हें आपण सुचवाल अशी आशा आहे.

(आपल्या हातांची जोडयाचे स्टोअर अस- तांना देखील लोक आपणास भीत नाहीत, तेव्हां आश्चर्य आहे ह्मणायचें. आमचा तोडगा पसंत पडल्यास पहा घेऊन ट्रायल. एकाद्या कुलवंत चांभाराच्या (अर्थात् लिंगधारी) मुलीशी संधान जुळवून तिला आपल्या धंद्याची भागीदारीण बनवून घ्या. ह्मणजे हेच बहिष्कार घालणारे लोक तुमच्या दुकानासभोंवती हात पोटीत घुटमळत फिरतील आणि जसे आपण व्यवसायांतील पहिले जोडेवाले तसेच पहिले समा- जसुधारक ह्मणून आपला सर्वत्र डंका वाजेल.

वि. ग. को इगतपुरी

आमचा मुलगा कॉलेजमध्ये शिकत होता, परंतु आर्थिक अडचणीमुळें यंदा त्याला कॉलेज सोडावें लागलें. पण तेव्हांपासून तो अतीशय उदासीन असून दिवसे दिवस खंगत चालला आहे. तेव्हां कसें करायचें ?

(त्याला कुमारी आसव ( ? ) चे डोसेस भरपूर मिळतील अशी तजवीज करा. लवकरच बरसा गुण येईल.)

श. म. लो. दर्यापूर:—

यवतमाळ जिल्ह्यातील एका खेडयांत एका बाईला चार पायांचे आणि दोन तोंडाचे अर्धनारी नटेश्वरासारखें मूल झाल्याचें मीं नुकतेंच वाचलें; ही गोष्ट खरी असेल कां ?

(खऱ्या-खोटयाची इतकी शहानिशा करून एखाद्या श्रेमुर्तीच्या अवताराला जन्म देण्याची तर आपली महत्वाकांक्षा नाही ना ? तसें झाल्यास चक्षुर्वैसत्यंचा आपणास खास अनुभव येईल.)

रा. गो. ठो. लातूर:—

आपल्या संजीवनीमधून प्रसिद्ध होणारे प्रत्येक लिखाण आपणच स्वतः लिहून दुसऱ्याच्या नांवावर प्रसिद्ध करीत असतां असा एकानें आपलेंवर आक्षेप घेतला आहे, तेव्हां याचा खुलासा कराल कां?

(शंकेखोरांनी मुसतां शंख न करतां ' जावे त्याचे वंशा तेव्हां कळ,' हेंच उत्तर.)

शं भ. बु. बोरगांव

आपले 'टपालांतील मौजेची प्रश्नोत्तरें' हें सदर अंतःकरणाला आनंदाच्या गुदगुल्या करणारें आहे खरें, पण कित्येकदा ते पुष्कळांच्या वर्मी लागण्या- सारखें आहे असें नाही कां आपणाला वाटत ?

(गोड गुलकंदानें मुरलेले रोग बरे होत नाहीत असा तज्ञांचा अनुभव असल्या कारणानें,नव्या पर्तीनें इंजेक्शनच्या सुया टोंचण्याचा उपक्रम खरोखरच यशस्वी झाला आहे असें नाही कां आपणास वाटत?)

रा. ग. डा. नागपूर

आपलें लिखाण नेहमीच दुटप्पी असतें. कधीं आपण नवमतवाद्यांची बाजू सावरतां तर कधी नव- मतवाद्यांच्या बाजूनें सनातन्यावर घसरतां, हें कसें? केव्हांहि झालें तरी मनुष्याला ध्येय एक असावें.

(सनातनी आणि नवमतवादी या दोन्ही पक्षांनीं स्वतःचे एक ध्येय ठरवलेलें नसल्या- मुळें दोन्ही पक्षांचा समन्वय करणारा काटेकोर ध्येयाचा तराजू आज तरी कुठल्याहि बाजारपेठेंत कुणाहि त्रयस्थाच्या हातांत सांपडणार नाहीं.)

# कै० श्रीमंत रा. ब. आप्पासाहेब वारद

## —* स्मारक फंड *—

# जाहीर विनंती

सोलापूरचे प्रसिद्ध नागरिक व मुंबई इलाख्यांत नावाजलेले व्यापारी व शेतकी व औद्योगिक धंद्यांतील पुढारी, कै० रा. ब. आप्पासाहेब वारद यांच्या निधनास २५ वर्षे होऊन गेलीं असून, त्यांच्या स्मारकाबद्दलचा प्रश्न अनेक कारणांमुळे अद्यापि राहून गेला आहे. त्यांनी आपल्या आयुष्यांत जीं लोकोपयोगी व सार्वजनिक कामें घडाडीनें केलीं त्याची आठवण विशेषत: महाराष्ट्र व कर्नाटक भागांतील लोकांना अद्यापि ताजी आहे. त्याचप्रमाणें वीरशैवसमाजासंबंधी धार्मिक व सामाजिक बाबतींत त्यांनी केलेली प्रशंसनीय कामगिरी महशूर आहे. त्यांचे विचार व सार्वजनिक धोरण प्रागतिक व राष्ट्रीय स्वरूपाचें असल्यामुळें त्यांचेविषयीं इलाख्यांतील विद्वान् पुढाऱ्यांना कौतुक व आदर वाटत असे. अशा थोर विभूतीचें स्मारक, तरुण पिढीस आदर्श होण्यासाठी व त्यांचेविषयीं आपणांस वाटणारा आदर मूर्त-स्वरूपानें व्यक्त करण्यासाठी त्यांच्या नांवलौकिकास साजेल अशा रीतीनें शक्य तितक्या लौकर करणें हें आपलें कर्तव्य आहे. या कामासाठी येथील कलेक्टर मे. लॅम्निकसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं सार्वजनिक सभा भरून खालीं सह्या करणाऱ्या लोकांची स्मारक कमेटी नेमण्यात आली आहे व स्मारक-फंड गोळा करून त्यासंबंधीची सर्व व्यवस्था करणेंचें काम त्यांचेकडे सोपविण्यांत आलें आहे. स्मारकाचे बाबतींत विचारविनिमय होऊन सदर स्मारक, व्यापारी कॉलेज, व्यापारी शाळा, स्मारक हॉल, व सार्वजनिक चौकांत पुतळा, यापैकी एखादें करावें असें सध्या ठरलें आहे. स्मारक निधी ज्या मानानें जमेल त्याअन्वयें स्मारकाचें स्वरूप मुक्रर करण्यात येईल. कै० आप्पासाहेबांचे निधनानंतर स्मारक-फंडास सुरवात झाली होती व त्या वेळी जमलेली ४।५ हजार रुपयांची रक्कम हल्लींच्या स्मारक-फंडांत समाविष्ट केली जाईल.

या स्मारक-फंडास सढळ हातानें मदत करण्यास सर्वांना आग्रहाची विनंती आहे. ज्यांना या महत्कार्यास मदत करणें असेल त्यांनी आपली उदार देणगी स्मारक-फंड-कमेटीचे चेअरमन अथवा सेक्रेटरीज यांजकडे देऊन पावती घ्यावी अशी विनंती आहे.

## —: स्मारक-फंड-कमेटी :—

| | |
|---|---|
| रा. ब. डॉ. मुळे, (चेअरमन) | श्री. नागप्पा बंडप्पा कानडी, |
| दि. ब. नी. चिं. लिमये, | शेठ रावजी सखारामजी दोशी |
| खा. ब. इमामसाहेब, | श्री. मल्लिकार्जुनप्पा आप्पाराव पाटील, |
| बॅ. एम्. एस्. सरदार, | श्रीमंत चंद्रभान गिरजी, |
| शेठ वैकुंठलाल ठाकोर, | डॉ. जगदेवराव देशमुख, |
| श्री. भाऊसाहेब खडकीकर, | श्री. बाबूराव जक्कल, |
| श्री. नागप्पा अबदुलपुरकर, | श्री. शिवबाळप्पा देशमुख, } सेक्रेटरीज |
| शेठ लोणकरण चंडक, | श्री. एस्. एम्. कल्याणशेट्टी वकील, } सेक्रेटरीज |

# मुंबईच्या लिंगायत-फंडाची दुःस्थिति.

[ लेखकः— मल्लिकार्जुनप्पा अप्पाराव पाटील, सोलापूर ]

(वरील लेख ता. ६ सप्टेंबरचे 'सुदर्शन' मध्ये प्रसिद्ध झाला आहे. नुकताच संजीवनीचे सह-संपादक श्री. पुराणीक यांनी 'समाजसुधारणेचा रागरंग' हा लेख संजीवनीमधून प्रसिद्ध केला त्यांत आमच्यांतील बोर्डींगस व फंड वगैरेची कशी दुर्दशा आहे याचा उल्लेख केला आहे. आणि त्यांच्या विधानांना हें ताजें उदाहरण कसें पुष्टिदायक आहे हें अवश्य वाचून खात्री करून घ्यावी. प्रत्येक ठिकाणी फंडगुंडाचाच बाजार बोकाळलेला दृष्टीस पडतो. आणि आमच्या समाजाकरितां पैसा नाही ह्मणून जी हाकाटी केली जाते ती किती अयोग्य आहे याचा वाचकांनीच विचार करावा. )

— संपादक, संजीवनी,

मुंबई-लिंगायत-फंडाची स्थापना सन १९०१ साली झाली. यास आज ३६ वर्षे पुरी झालीं असलीं, तरी त्याची प्रगति न होता, अनवस्थाच होत आली आहे. हें पाहून प्रत्येक लिंगायत गृहस्थास खेद झाल्याशिवाय राहणार नाही. मुंबईसारख्या शहराच्या प्रमुख ठिकाणीं एक स्वतंत्र इमारत असावी, व्यापार-उद्योगाच्या निमित्तानें येणाऱ्या आणि सरकारीकोर्ट-कामकाजाकरितां येणाऱ्या गृहस्थांची व विद्यार्थ्यांची राहण्याची, जेवणाची, सोय व्हावी, आणि कॉलेजमध्यें उच्च शिक्षण घेणाऱ्या होतकरू गरीब विद्यार्थ्यांस सहाय्य व्हावें, इत्यादि उद्देशाने कै. रा. रा. आप्पासाहेब वारद यांच्या प्रेरणेने, मुंबईतील सर्व लिंगायत व्यापाऱ्यांच्या पूर्ण संमतीनें ही संस्था स्थापन केली. कोणत्याहि व्यक्तीवर विशेषसा बोजा पडूं नये, ह्मणून प्रत्येकाच्या मार्फत चालणाऱ्या खरेदी-विक्रीच्या व्यवहारावर मर्यादित असा धर्मादाय बाब ठरवून त्याप्रमाणें वसूल घ्यावयाचा व इमारतीकरितां मुंबईबाहेरील कर्नाटकात व इतरत्र रकमा व देणग्या मिळवाव्या, असें ठरविण्यांत येऊन, कार्यकारी मंडळीहि नेमली गेली. याप्रमाणें कामास आरंभ झाला. परन्तु त्याचें पाऊल पुढें न पडतां, एकसारखी पिछेहाटच होत चालली आहे. धर्मादाय ठरल्याप्रमाणें आकारून लोकांकडून पैसे वसूल केले जातात. परंतु त्याची वसूली कार्यकारी मंडळीकडून सक्तीने करण्यांत येत नाही, व फंडाचा हिशोबहि प्रसिद्ध केला जात नाही. कित्येक व्यापाऱ्यांकडे मोठमोठ्या रकमा येणे आहेत त्या त्यांच्याकडून वसूल करण्यांत येत नाहीत. कांहींच्या दुकानदाऱ्याहि बन्द झाल्या आहेत, आणि कांहींच्या दुकानदाऱ्या बंद होण्याच्या पंथास लागल्या आहेत. पुष्कळ मोठी रक्कम जमा राहिल्यास कित्येकांस न देण्याची वासना उत्पन्न होते. परंतु ती रक्कम धर्मादायाची असल्यानें, केव्हाहि कायद्यानें वसूल करण्यांत येते. वेळेवर वसूली न केल्याबद्दलची जबाबदारी अध्यक्षादि अधिकारीवर्गावर येते, याची जाणीव त्यांना असावयास पाहिजे. तसेंच, ते सर्व एकाच व्यापारी वर्गातले असल्यामुळें निर्भीड रीतीनें आपलें कर्तव्य बजावीत नाहीत. अलीकडे पुष्कळ चर्चा झाल्यामुळे संस्था रजिस्टर

करण्यांत आली असून, अजमासे ३० हजारावर रक्कम बँकेत ठेवण्यांत आली आहे. याणखी कमीतकमी ५०-६० हजारावर रक्कम लोकांकडे येणें आहे, व इमारतीकरितां जागा घेऊनहि २५ वर्षें होत आलीं आहेत. त्या जागेचें मुईभाडे वगैरे भरण्यात येते, परंतु बांधकामाचीं अगर रिकामी जागा तरी भाड्यानें देण्याची काळजी घेण्यात येत नाही. ही गोष्ट अधिकारीवर्गास कमीपणा आणणारी आहे. टीकालेख प्रसिद्ध झाल्यानंतर कांही सद्गृहस्थांनीं आपल्याकडील रकमा देऊन टाकिल्या आहेत. अलीकडे वसुलीची व्यवस्था अगदी उत्तम चालविली आहे. लौकरच इमारतीच्या कामासहि सुरवात करणार आहोंत, ह्मणून सध्याचे अध्यक्ष श्री. हुंदीगुंदीं यांनी उत्तरादाखल पत्रकहि प्रसिद्ध केलें. त्यास ३ वर्षें झालीं. अनेकवेळा समक्ष विचारणा केली. परंतु त्याप्रमाणें वर्तन मात्र घडून येत नाही. अस्पृश्यासारख्या समाजाच्या स्वतंत्र इमारती मुंबई-सारख्या शहरीं असाव्यात, परंतु लिंगायतासारख्या व्यापारी समाजाची स्वतंत्र इमारत असूं नये, ही गोष्ट आपल्या लिंगायतसमाजास अत्यंत लांछनास्पद आहे. अनेक गृहस्थाकडून देणग्या मिळवून सहज इमारतीचें काम पूर्ण होईल. व्यापाऱ्यांकडे जमा असलेल्या रकमेंतून ते त्या पैशाचा आपल्या इच्छेप्रमाणें खर्च करतात. कांहींजण रक्कम फंडाकडे देण्याचें नाकारितात, परंतु ती रक्कम त्यांच्या स्वतःची कांहीं नसून लिंगायतसमाजाच्या धर्मादायाची वसूल केलेली ती रक्कम आहे. ती फंडाकडेच दिली पाहिजे. तसें देत नसल्यास चॅरिटेबल ॲक्टाप्रमाणें वसूल करण्याचा अधिकार प्राप्त होतो. करितां वेळींच या गोष्टीकडे समाजांतील प्रमुख मंडळींनीं लक्ष घालून व्यवस्था करावी, व या फंडाची सुव्यवस्था व शिस्त लावण्याकरितां योग्य, जबाबदार अशा अधिकाऱ्यांची नेमणूक करून, येणें असलेल्या रकमा वसूल करून पुढें वेळच्या वेळीं वसूल केल्या जातील अशी तजवीज व्हावी. आपल्या समाजांत अनेक ठिकाणी लहान मोठे फंड आहेत. बहुतेकांची जवळ जवळ अशीच दुःस्थिती आढळून येते. धारवाड-लिंगायतफंड, कै. शिरसंगी फंड, या फंडाची व्यवस्था तेथील जिल्हाधिकाऱ्यांच्या हातीं असल्यामुळे, ते सुव्यवस्थितपणें चालत आहेत. हा लेख केवळ सार्वजनिक हितबुद्धीनें लिहिला आहे. त्यांत कोणाचेहि मनें दुखवावीं असा मुळीच हेतु नाहीं. या फंडाशीं संबंध असलेल्या सद्गृहस्थांनीं सहानुभूतिपूर्वक विचार करून, ते आपलें कर्तव्य पार पाडतील अशी मी आशा बाळगतों. —सु.

---

# शोचनीय निधन

अमरावती येथील एक प्रतिष्ठित सद्गृहस्थ श्री. मल्लाप्पा कुऱ्हे यांच्या पत्नी व संजीवनीच्या लेखिका शामलता यांच्या मातुश्री सौ. यमुनाबाई ता. ८-९-३७रोजी रात्री १२ वाजतां कैलासवासी झाल्या. बाईचा स्वभाव अत्यंत मोकळा, मनमिळावू असा असून, त्या संसारदक्ष, आणि पतिधर्मपरायण अशा कुलशीलवती होत्या. त्यांच्या मागे त्यांचीं आज अल्पवयी अशी अपत्यें असून, उतारवयांत श्री. मल्लाप्पा यांचेवर आणि शामलता देवीवर हा दैवी घाला पडला, याबद्दल त्यांच्या या महद्दुःखात आह्मीहि अल्पांशानें भागीदार आहोंत. त्यांना या दैवी आपत्तीला तोंड देण्याचें सामर्थ्य आणि मृतात्म्यास सद्गति देवो अशी त्या जगन्नियंत्याला प्रार्थना आहे.

# संस्कृति-स्वाभिमानाचा उकल

[ लेखकः— तु. ना. काटकर, नागभीड. ]

## प्रस्तावना

लेख वाचतांना वाचकांना निराधार शब्दा-डंबरामुळे निसत्व बोध होणें संभवनीय आहे. तो होऊं नये ह्मणून लेखांत लिखाच्या सोईकरितां उपयोगिलेल्या नवीन शब्दरचनेचा प्रारंभीच खुलासा केलेला बरा. ह्मणून तो येथे देत आहें.

लेखांतील नवीन शब्दप्रयोग ह्मणजे 'मूल-मानव' 'द्रवीडार्य' 'अनार्य', ह्या शब्दांचें स्पष्टीकरण करण्याचा हेतु इतकाच कीं, द्रवी-डांचा पूर्वकाली निवासी प्राचीन हिंदुस्थानांत मुख्य वात होती पण त्यांना 'रानटी'—शिवाय दुसरें नांव नव्हतें. तें बरें न वाटून ते ह्या देशांतील सर्वांध ह्मणून त्यांना 'मूलमानव' ह्या नांवानें संबोधिलें आहे. रानटी अवस्था हा त्यांचा दोष नाही. हा त्यांच्या परिस्थितीचा परिणाम ह्मणजे प्रतीक आहे, नि ह्याच अवस्थेतून प्रत्येक संस्कृती आली आहे. तेव्हा त्यांनाच तसें काय ह्मणून संबोधायचें ? 'द्रवीडार्य' हें द्रवीड आणि आर्य या दोन्ही संस्कृतींचा अवलंब करणारे मान-वांकरिता उपयोगिलें आहे.

'अनार्य' हें मूलमानव द्रवीड नि आर्य यांव्यतिरिक्त जे यूची, शक, हूण नि तत्सम इतर टोळ्या प्राचीन हिंदुस्थानांत आक्रमक म्हणून आल्या त्यांनाच फक्त या नांवानें संबोधिलें आहे.

लेखाची मांडणी कालाचा संदर्भ धरून फक्त संस्कृतीच्याच तत्वावर केली आहे. विस्तार-भयास्तव इतर तात्विक नि किरकोळ भाग मुद्दाम वगळला आहे. संस्कृतीची निर्णयात्मक संमति आपणा सर्वांकडून मिळाल्यावर पुनश्च संकलन करतांना वगळलेल्या भागाचाहि त्यांत समावेश केला जाईल. म्हणजे वीरशैवसंस्कृति नि त्याच्या समकालीन संस्कृतीची सांगड घातली जाईल.

आतां प्रश्न उरला कालाचा. तो ह्या लेखमालेच्या पुढील एका लेखांत स्वतंत्र येईल. त्यावर नि त्या त्या कालांत येणाऱ्या शैव, लिंगायत नि वीरशैवसंस्कृतीच्या भागा-वर तर्कशुद्ध संशोधक बुद्धीनें मनन करून योग्यायोग्याचा निर्णय लेखकास कळविल्यास लेखक त्यांचा हार्दिक आभारी राहील. आता प्रस्तुत विषयाला आरंभ करूं या.

### प्रचलित हिंदुस्थान

आजकालच्या जगातील नानाविध क्रांतिमय पण बुद्धिग्राह्य मतमतांतराच्या लाटांचा परि-णाम हिंदूंवर नि तसाच व तितक्याच प्रमाणांत वीरशैवांवर सारखा होत असल्यामुळे, त्यांचें प्रत्यक्ष प्रत्यंतर समाजसागरांत उद्भवणाऱ्या निरनिराळ्या वीचींत आहे. विचक्षण मेंदूंतून निर्माणाऱ्या ह्या विलक्षण वीचि म्हणजे नवमतवाद, समाजसत्तावाद; कच्छवाद; वैवा-हिक प्रश्नांची मीमांसा; धार्मिक मतांचा खल

नि त्यांतलीच आणखी महत्वाची लाट म्हणजे ' द्रवीड–आर्यसंस्कृतीवाद ' ही एक आहे.

प्रचलित हिंदभूवर, तत्पूर्वी भरतखंड आर्यावर्तावर, नि त्याच्याहि पूर्वी निनावी असलेल्या भूप्रदेशावर, ज्या ज्या परकीयांच्या स्वाऱ्या झाल्या त्यांत इंग्रज हे अगदीं शेवटचे आहेत. पण ह्यांचें उगमस्थान बघण्याकरितां आपणास कालगणनेच्या अधिकाधिक मार्गे म्हणजे उगमाकडे गेले पाहिजे. कारण कीं, महोदधीच्या तळाशीं जाऊन अवलोकन केल्याशिवाय तेथें काय आहे ह्याचा शोध लागायचा नाही. म्हणून आपणास संशोधक पंडितांच्या दृष्टीने निश्चित झालेल्या कालगणनेप्रमाणें प्रथम इ० स० पूर्वी ५००० वर्षावर उतरले पाहिजे.

कारण कीं, इतिहासकार इ. स. पू. पाचव्या सहस्त्रकापासूनच संस्कृतीची गणना करितात. तत्पूर्वी या निनावी भूप्रदेशावर मूळचे जे रहिवाशी रहात होते ह्यांच्या अस्तित्वाशिवाय जास्त कांहींहि उहापोह करीत नाहीत. याचें कारण आर्यसंस्कृतीचा स्वाभिमान इ. स. पू. ५ व्या नि ४ थ्या सहस्त्रकांस इतकें महत्व प्राप्त झालें आहे.

## मूळमानव

पण मूळचे रहिवाशी कोण ? त्यांची संस्कृति काय ? ह्याचाहि उहापोह त्याबरोबरच झाला असता तर कोणासहि दुमत करून घेण्यास कांहींच कारण नव्हतें.

ह्या सुवर्णभूमींत निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या विदेशीय मानवांनीं पदार्पण करून आपापल्या सामर्थ्याचे बलावर आपआपलें आसन स्थिर केलें आहे. त्यांतलेंच पहिले आक्रमणकर्ते द्रवीड आहेत. ह्यांनीं इ.स. पू. ५००० वर्षांचे सुमारास किंवा इतर कांहीं विद्वानांचे मतें तर त्याच्याहि पूर्वकाळीं आपला अंमल प्राचीन हिंदुस्थानांत स्थापित केला असावा असें अनुमान आहे, व तो पुढे हजार वर्षेपर्यंत स्वसामर्थ्यावर मन मानेलपणें चालविला. ह्यांच्या पूर्वी जे मूळचे मानव ह्या देशांत रहात होते त्यांच्या त्या वेळच्या रहाणीच्या अस्तित्वावरून नि संशोधकाच्या कालगणनेवरून तेच ह्या मायभूमींतील ' मूळमानव ' समजले जातात. शास्त्रीयदृष्ट्या इतर मानवाप्रमाणेंच ह्यांचे जंत, किडा, बेडूक नि माकड ह्यांचें परिणत मानवी कोटीचें स्वरूप ह्याच भूमींतील आहे कीं द्रवीडपूर्व मानवावस्थेंतच ह्यांचेहि येथें कोण्या निराळ्या प्रदेशांतून आगमन झालें ह्याबद्दल निश्चितता करितां येणें आवांक्याबाहेरचें आहे. पण संशोधकदृष्ट्या ' मूळमानव ' हेच ह्या मायदेशांतील मूळ रहिवासी मानलें जातात हें खास.

## कालवंदन

संस्कृतीचा उहापोह करण्यापूर्वी संस्कृति म्हणजे काय ह्याचें स्पष्टीकरण केलेलें उत्तम. कै० डॉ. केतकर संस्कृतीचा अर्थ ' जातिराष्ट्रादि संघाच्या सामुच्चयिक जीवितक्रमाचें साकल्य ' असा देतात. ह्यापेक्षाहि सोपा नि सरळ भाषेंत द्यावयाचा झाल्यास हिंदुसमाजोद्धारक महादेवशास्त्री दिवेकर यांची व्याख्या ' मानवी मनावरील ठसे ' अशी आहे.

ह्याच तत्वानुरोधें तर्क वाढविल्यास आपल्या असेंच प्रत्ययास येईल कीं, मनुष्य हा नैसर्गिक प्रभावाच्या वर्चस्वाचा 'पुरस्कर्ता आहे. म्हणून तो निसर्गाचा दास आहे. पण आजच्या बुद्धिवादी वैज्ञानयुगांत हें तत्व लटकें पडून उलट झालेलें आढळेल. आज ह्या मानवांनी आपल्या बौद्धिक सामर्थ्यावर नैसर्गिक शक्तींना देखील दास्यत्व पत्करण्यास भाग पाडलें आहे. ह्यावरूनच मनुष्यमात्राची सातत्यवृद्धिंगतावस्था कळून येणार आहे व आणखी हा चिमुकला मनुष्य काय काय करून सोडील हें कोणी सांगावें !

एवढी जरी उन्नतावस्था प्राप्त झाली आहे तो पण ते आपला कल पुढें हाकलतां-हाकलतांच आपली संस्कृति जितक्या मागें नेतां येईल तितक्यामागें नेण्याचा दरेक राष्ट्र नि समाज प्रयत्न करितो. ह्याचें खरी कारण काय असावें ? तर 'मूळ नि आद्य' संस्कृतीचा स्वाभिमान. पण ज्या ज्या वेळीं ज्या ज्या धर्मांच्या, स्थानांच्या, आदर्शांचें वर्चस्व राहील त्यांचे त्यांचे संस्कार-ठसे त्या त्या काळीं त्या त्या समाजावर बिंबित होतात. हा दोष कोणाचा ? समाजाचा ? नाही. तर त्या त्या वेळच्या कालमानाच्या स्वामित्वाचा आहे. म्हणून तो सद्गुणच मानला पाहिजे. कारण की, 'कालाय तस्मै नमः' कालापुढे शिर न लववणारा असा कोण आहे ?

## मूळ संस्कृतीचा उगमकाल

(ख्रिस्त स. पू. ५१०० वर्षें; तत्पूर्व काळ)

प्रचलित हिंदभूमींत लक्षावधी मानवी पिढ्या होऊन गेल्या पण त्या सर्वांच्या बारसा नि वाताव्यास सदैव हजर असलेले सूर्य, चंद्र, तारागण, पंचमहाभूते नि तसेच विंध्य, सह्याद्रि, नगाधिराज हिमालय प्रभृति पर्वत आणि गंगा सिंधू यमुना नर्मदा प्रभृति नद्या ही निसर्गनिर्मित भूरचनाच काय ती मूलमानवांच्याहि वेळीं जशी होती तशीच आजहि कायम आहे. किंबहुना आजच्या भौतिक युगांत तर शास्त्रज्ञांनी अखिल जगताला वेडावून सोडलें आहे. एक टोळी हताश होऊन परत जाते न जाते तर दुसरी त्याचा अंत घेण्यास तयारच, असा हा काळ आहे. पण तो मात्र आपला अंत लागू देत नाहीं, नि त्यामुळें जिज्ञासु मानव अधिकाधिक उत्सुक नि अधिर होत आहेत.

अर्वाचीन सोधीच्या नि सुधारणेच्या काळांत जर त्याचें एवढें महात्म्य, श्रद्धा नि वेड आहे, तर मग अज्ञानयुगात त्याला मूर्तिमंत देव मानत असल्यास त्यांत शंका ठेवितां येईल काय ?

श्रीशंकराचें निवासस्थान कैलास, नि कैलास हें हिमालयाचें शिखर आहे, त्या अर्थी त्यावर श्रीशिवाचें वास्तव्य असलेंच पाहिजे असा मूलमानवांचा द्रवीडांचा नि आर्यांचाहि समज होता, किंबहुना श्रद्धावान लोकांचा आजहि आहे. पण अज्ञानयुगांत मूलमानवांचा भुतांखेतांवर होता. मनुष्ययोनीच्या प्राथमिक स्थितींत असें राहणें साहजिकच आहे नि ह्यांचा उगम असा असणें संभवनीय वाटतें.

मनुष्ययोनीच्या उत्क्रान्त अवस्थेबरोबर त्याच्या ठिकाणीं बीजरुपानें सुप्तावस्थेंत असलेल्या विकार नि विवेक ह्यांचा उगम झाला असला पाहिजे. पण अपक्व मनावर विकारी शंकाकुशंकांचा प्रादुर्भाव होऊन भूतबाधादि शक्तींचें प्राबल्य बळावलें असावें. त्यामुळें त्याच शक्तींच्या भयानें अज्ञावतेंतील विनम्र वृत्तिमुळे त्यांच्या आराधनेंत होणें शक्य आहे. पण पुढें पुढें या भुतांखेतांच्या आराधनेचें रुपांतर मनुष्याच्या उत्क्रांत बुद्धीबरोबर भुतांचा स्वामी भूतेश्वर—श्रीशंकराच्या पूजाअर्चा नि आराधनेंत झालें असलें पाहिजे.

मूलमानवांच्या चालीरीती फारच मागासलेल्या होत्या, परंतु देवाचा बागुलबोवा मात्र ह्यांच्या पुरेपुर बोकांडी होता. ह्यांना भूत भूतेश्वर नि स्वतःची संस्कृती नि वर्चस्व ह्यांची कल्पनाहि नसावी. मानवावस्थेंत ह्यांचें रुपांतर होऊन सुद्धां अकलेचा उपयोग भैषाचाराकडेच होता. मनुष्याच्या ठायीं अक्कल प्रकटल्याबरोबरच निसर्गसिद्ध दैविक धाक संचरला असला पाहिजे. तेव्हांच इतक्या प्रथमावस्थेंतहि त्यांच्यांत शिवाचे वास्तव्यस्थानाची कल्पना, आदर, भक्ति नि भीति ह्यांची ओळख झाली होती. म्हणून ते शिवाचीच आराधना करीत नि शिवालाच भजत, असें म्हणण्यास कांही प्रत्यवाय नाही.

( अपूर्ण )

# कांहीं तरी करताहेत, हें खरें ना ?

**अंधारांतील उजेड:—**

'संजीवनी'चे मागील अंकांत 'कौमुदीची कुरापत,' आणि 'साठी बुद्धी नाठी' अशा शीर्षकाखाली दोन बातमीपत्रें प्रसिद्ध झाली आहेत. त्या बाबतींत आमचेकडे एका स्नेहघाकडून खुलासा आला आहे. याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक आभारी आहोंत.

'कौमुदीची कुरापत,' या सदरांतील बातमी ह्मणजे, लिंगराज कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. नंदीमठ यांनी जी कौमुदीवर अब्रुनुकसानीची फिर्याद लावली ती योग्यच आहे असें दिसतें. कौमुदी ही इतकी अकरताळी पोर असेल असें आह्माला वाटलें नव्हतें. पण हिनें तर अगदी कॉलेजकुमारीवरहि ताण केली. कॉलेजच्या मुली सवंगड्यांशींच लपंडावाचे खेळ खेळतात, पण कौमुदीनें प्रत्यक्ष कॉलेजच्या प्रिन्सिपालवरच कुटाळ आरोप केले आहेत. डॉ नंदीमठापेक्षा, हिला टेलरिंग कॉलेजचा प्रिंसिपाल अधिक आवडतो ह्मणे! आवडायचाच तो. कारण झंपरचे आणि लुगड्याच्या आंतील अंडरवेअरची मापें घेतांना तो जी अंगलट करतो, ती अंगलट कौमुदीच्या अंतस्थ अंतःकरणाला आनंदाच्या उकळ्या फोडीत असेल. मोटार क्लीनरबद्दलहि तिला विशेष आदर वाटू लागतो तो कां? तर फुकटांत फेरफटका मारून चोरून मारून गंजलेल्यां नी गांजलेल्या यांच्या शरीरयष्टीचे क्लीनींग त्यांच्या हातून करवून घेण्यात कौमुदीला मौज वाटत असेल. मास्तरांनी, अगर प्रोफेसरांनी, ह न रहातां ह च्या पुढची कला विद्यार्थीनींना शिकवावी अशी कौमुदीची अनावर इच्छा असल्यास तिनें कॉलेज सोडून सिनेमांत प्रवेश करावा. त्यांना भाषेचें ज्ञान नाही असाहि आक्षेप कौमुदीनें डॉ. नंदीमठावर केला आहे. 'कौमुदीला हवी असेलली' नेत्रपल्लवी, करपल्लवी अगर पादपल्लवी भाषा प्रिन्सिपालसारख्या सुसंस्कृत सज्जनाजवळ नसण्यांतच शोभा आहे. तसल्या भाषेचा सवतासुभा, रंगेल तरुणांच्या तांड्यांतच कौमुदीला सहज मिळण्यासारखा आहे.

कौमुदीला प्रिन्सिपाल नंदीमठांचेच लिंग कसें आणि कां बोचले कळत नाहीं. यज्ञोपविताच्या पुळचट सुताशीं कौमुदीचें सूत जमतें, आणि लिंगराज कॉलेजच्या प्रिन्सिपालचे लिंग सात पडद्यामधूनहि तिला बोचूं लागतें हें नवलच नव्हे कां ? उगीच हात दाखवून अवलक्षण करण्याचा कौमुदीनें जर अकरताळेपणा केला नसता तर डॉ. नन्दीमठानाहि तिला अशा प्रकारें हात दाखवावा लागला नसता. असल्या बाचरट पोरींना तंबी दिल्याशिवाय यांचे चवचाल चाळे थांबायचे नाहींत; आणि ह्मणूनच डॉ. नंदीमठांनी जें केलें तें यथायोग्यच ह्मणायचें.

'साठी बुद्धी नाठी' नव्हे तर, 'पाठीस लागलेल्यांच्या नाकावर काठी,' असेंच ह्मणावें लागेल आतां ! हो ! असेंच !

[illegible]ॲडव्होकेट पावटे यांनीं स्वत:वर तरुण कर्ना-[illegible] खटला ओढवून घेतला नसून, ती बातमी [illegible]पणें प्रसिद्ध केल्याचें आह्मांला खात्री-[illegible] कळलें आहे. तरी ह्मटलें हें कसें ? [illegible] फासावर चढणाराला मुक्त करण्याइतकी [illegible] कर्तबगारी, ते ॲडव्होकेट पावट्यासारखे [illegible] नामांकित वकील हा फासा स्वत:वर [illegible] घेण्याइतके अप्रबुद्ध याच केसमध्ये [illegible] कळले? तिर्पाप्पा बळ्ळोळी यांनी मुद्दामच [illegible]यांची व्यक्तिशः बेअब्रू करणारी हँड-[illegible] वाटून त्यांना डिवचले, आणि ही बातमी [illegible]पणें प्रसिद्ध करणाऱ्या बातमी-[illegible] आह्मालाहि निराळ्या प्रकारें बनवले. [illegible] खरी हकीगत कळल्यावरून दिलगिरी [illegible] करण्याशिवाय दुसरें तरी काय अधिक [illegible] घेण्यासारखें आहे.

---

किणी ( ता. अक्कलकोट )

[illegible] श्रावण मासानिमित्त [illegible] तरुण मंडळीनीं दररोज प्रभातफेरी [illegible] ते श्रीबसवेश्वर व श्रीसिद्धरामेश्वर [illegible] भजन करीत असत. पादपूजा, प्रसाद, [illegible] कार्यक्रमहि यथासांग पार पडत होता. [illegible] चनमल्लय्यास्वामींनीं बसविलेला एक [illegible]प्रयोगहि करण्यांत आला. वीरशैवसमा-[illegible] जागृति बरीच झाली आहे. (—सु.)

---

लातूर

[illegible] बालसमाजाचा १२ वा [illegible]त्सव येथ्या ता. ८-९-३७ रोजीं [illegible] येथील प्रसिद्ध वकील श्री० हणमंतराव [illegible]कर यांच्या नेतृत्वाखालीं झाला असून, [illegible] समाजजागृती, व संघटण, शिक्षण, व्यायाम, [illegible] वगैरें विषयांवर व्याख्याने [illegible] आहेत. ( सु. )

---

वीरशैवांतील असली रत्नें एकसुत्रांत गोवलीं गेली तर समाजोद्धार होणार नाही कां?

( आमच्या खास बातमीदाराकडून )

मौजे सदलगा, ता. चिकोडी, जि. बेळगांव येथील पिढीजात दानशूर आणि समाजा-भिमानी सावकार श्रीमंत मल्लाप्पा अण्णा-हालापनावर हे एक तरुण कर्तबगार, आणि समाजकार्यास सढळ हाताने मदत करणारे असे उदारधी सज्जन गृहस्थ आहेत. कै. सातप्पा गुराप्पा अणा हालापनावर यांच्या स्मरणार्थ दर-वर्षी श्रावणमासीं शिवनामस्मरणसप्ताह, भजन, पादपूजा किर्तनें व्याख्यानें व सढळ हस्तें अन्नदान करीत असतात. गतवर्षीचे श्रावणमासीं त्यांनी १००० वीरशैवेतरांना लिंगधारणा, दीक्षाविधी, वगैरे समारंभ करुन वीरशैवधर्माचे घटक बनवून घेतले, याबद्दल ते खरोखरच अत्यंत स्तुतीस पात्र आहेत. त्यांनी एक धर्मशाळाहि सदर गांवीं बांधली असून गोरगरिबांचे ते जिव्हाळ्याचे कैवारी आहेत. स्वत:चा आणि इतरांचा उद्धार करणारे असले समाजभूषण कुणाला आदरणीय वाट-णार नाहीत?

---

## दे. नानासाहेब बामणगांवकरांचा दौरा

संजीवनीचे संपादक दे. नानासाहेब बामण-गांवकर यांना गणेशोत्सवाप्रीत्यर्थ बऱ्याच ठिका-णची व्याख्यानाची निमंत्रणें आलीं होतीं; त्यात सांगली, कोल्हापूर, पुणे, नगर, मुंबई वगैरे भागांतीलहि बरींच निमंत्रणें होतीं, परंतु कार्यबाहुल्यामुळे लांबची निमंत्रणे त्यांना स्वीकारतां आलीं नाहीं. तरी दर्यापूर, मंगरु-ळीर, वांदुरा, खामगांव, आर्वी, वर्धा, हिंगणघाट येथे त्यांची व्याख्यानें झालीं. सांगली-कोल्हापूरकडे येत्या नाताळांत बहुतेक ते दौऱ्या-वर जातील अशी खात्री वाटते.

## अमरावतीचें बातमीपत्र

येथील वीरशैवसमाजातर्फे सालाबादप्रमाणें श्री. कोल्हे यांचे घरी ( बसवेश्वर चोकांत ) गणेशोत्सवाचा कार्यक्रम मोठ्या थाटानें सुरु आहे. वीरशैवसमाजातील प्रमुख समाजसेवक श्री. दिगंबर सोमाप्पा उर्फ बाळासाहेब संगेकर, अध्यक्ष, श्री. गंगाराम रामाप्पा उर्फ अण्णासाहेब काकोते, उपाध्यक्ष श्री. एम्. सी. एलगुंदे, आणि बी. एस्. मिसे, सेक्रेटरी आणि इतरहि कोल्हे बंधु, वगैरें तरुण आणि उत्साही कार्यकर्त्यांनीं सदरहू उत्सवांत हौसेनें भाग घेऊन उत्तम प्रकारें उत्सव यशस्वी करण्याची पराकाष्टा चालवली आहे हें खरोखरच त्यांना भूषणावह असून ते इतरांना अनुकरणीय आणि अभिनंदनीयच आहे. .

वीरशैवसमाजगणेशोत्सव मंडळानें आपली गुणग्राहकता लोकादरास पात्र होईल असाच पुढीलप्रमाणें कार्यक्रम आखला आहे.

॥ श्री ॥

# वीरशैव समाज गणेशोत्सव

### वर्ष १८ वें

स्थळः— बसवेश्वर चौक ( दहिसाथ )

ता. ८-९-३७ श्रीची स्थापना.
ता. ९-९-३७ श्री.रा.शं. पुराणीक यांचें व्याख्यान
ता. १०-९-३७ त्रि. ग. कुळकर्णी यांचें काव्यगायन
ता. ११-९-३७ श्री. हरिहरराव देशपांडे यांचें व्याख्यान
ता. १३.९-३७ भेंड्याची फायनल
ता. १४-९-३७ बासरीवादन.
ता. १५-९-३७ दादासाहेब आसरकर यांचा आर्केष्ट्रा
ता. १६-९-३७ कु.मथुताई जोशी यांचा मेळा
ता. १७ ९-३७ हळदीकुंकु ४ ते ६ व नानासाहेब बामणगांवकर यांचें व्याख्यान
ता. १८-९-३७ पानसुपारी वेळ ८ ते १२
ता. १९-९-३७ श्रीचें विसर्जन.

---

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ आक्टोबर १९३७ ( अंक १९वा

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

[ब्राह्मणाः] क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। [लिंग]धारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

[न]वें वर्ष २ रें ) मिति भाद्रपद व० १२ शके १८५९ ( अंक १९ वा.

## अमृतबिंदू

सर्वांगावर भस्मलेपन करून, गळ्यांत रुद्राक्षमाला
अडकवून, जटाभाराने मस्तक मढवून अगर
अंगावर भगवी वस्त्रें धारण करून
थाटामाटांत लिंगपूजेचें अवडंबर
माजवणाऱ्या ढोंगी संन्यासी
वृत्तीला भाळण्या-
इ त का
परमेश्वर दुधखुळा
नसून, परोपकारार्थ देह
झिजवून परहितार्थ सर्व-
स्वाचा सन्यास करणारा सद्-
भक्तच शिवदेवाला अधिक आवडतो
आणि अशावरच परमेश्वर संतुष्ट असतो.

[ब]सवदेव

# आह्मा वीरशैवांतील प्रमुख दोष

वीरशैवसमाजाची घटना पंचाचार्यप्रणित माना वा बसवप्रणित माना, पण ती अध्यात्माच्या विकासावर उभारली आहे. ध्यान, धारणा व शीवजीवैक्य हेंच वीरशैवमात्रांचें पूर्वपरंपरागत ध्येय ह्मणून वीरशैवांत शिवजीवैक्य साधणाऱ्या शिवयोग्यास आणि तदंगभूत शरणास आमच्या जुन्या वाङ्मयांत जितकें गौरविलें आहे तितकें इतरांस गौरविलें नाही. ह्या सर्वांच्या पुढें विद्वान् व बुद्धिवान् पंडितांची जशी डाळ शिजली नाही तशीच मोठमोठ्या क्षत्रीय वीरांची, राजांची, प्रधानांची, सेनानींची, वीरांगनांची, कलाज्ञानांची उद्योगशील पुरुषांची, ह्या कोणाचीच डाळ शिजली नाही. शिवयोगी व शिवशरण ह्यापलीकडे इतर पेशाचे थोर पुरुष वीरशैवांत उत्पन्न झाले नाहीत असें नाही. पण त्यापैकी कोणासहि गौरवावें ही प्रथा आमच्या वाङ्मयांत नाही.

बसवदेव राजदरबारी होते. चन्नबसवेश्वरांनाहि राजकारण करावें लागलें. पण ह्या उभयतांच्या राजकीय प्रसंगाचें कोठेंहि बुद्धिगम्य असें वर्णन सांपडावयाचें नाही. ह्याचें कारण एकच. आणि तें, 'शिवजीवैक्यविद्येकडे लक्ष देणें हेंच एकच एक मुख्य कार्य समाजघटनेपुढे प्रामुख्याने ठेवलें गेलें हेंच होय. शिवजीवैक्यविद्येचें ज्ञान करून घ्यावयाचें ह्मणजे ध्यानधारणेला अधिक प्राधान्य येतें. गुरु व भक्त हा भाव प्रामुख्याने रूढ होतो व तो झाला आहे. ह्या विद्येंत अनेक गुण असले तरी श्रद्धेचा तींत अतिरेक होतो आणि समाजघटनेला चांगल्या गुरुच्या अभावीं बुवाबाजीचें हिडीस रूप येतें. ही बुवाबाजी क्रमप्राप्त आहे असें मानलें तरी तींतून समाजसंघटना बळकट व्हावयास मदत होऊं शकत नाहीं. कारण निव्वळ शिवजीवैक्यज्ञानप्राप्तीवर उभारलेल्या व परिणत झालेल्या स्वभावांत लौकीक दृष्टया असा एक दोष उत्पन्न होतो कीं तो पुरुष लौकीक व्यवहारापासून सहजच अलिप्त राहतो, आणि सामान्य जन त्याच्या आशीर्वादावर आपला लौकीक व्यवहार अवलंबून ठेवतात.

परंतु राजा, व्यापारी वा गृहस्थ हा निव्वळ महान् विभूतीच्या आशीर्वादावर लौकीक व्यवहार संभाळूं लागला तर राजा राजपदास मुकतो, व्यापारी व्यापारास मुकतो, आणि गृहस्थ गृहपदास मुकतो. आमची समाजव्यवस्था आज ह्यामुळेच विस्कळित झाली. कारण कालचा श्रीमंत आज भिकारी झालेला दिसतो. कालची लक्षाधीश व्यापाऱ्याची पिढी आज कवडीमोल झालेली प्रत्ययास येते. आज वीरशैवसमाजांत वाढतें दरिद्र्य आहे. निव्वळ मजूरी व अज्ञान हा ह्या समाजांतील बहुमताचा दर्जा असलेला प्रत्ययास येतो. ह्यात्र मूळ स्वरूपांतून धर्मगुरु जन्माला येतात. त्यामुळें तेथे वेषावाचून खरें ज्ञान अधिक प्रमाणांत

हूं आढळणार ? ह्यामुळेच पूर्वसंस्कृतीची परंपरा आज चालू दिसत नाही. तींत विस्कळितपणा आला व कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत उरला नाही. मनुष्याचा लौकीक व्यवहार निराळा व पारलौकीक व्यवहार निराळा हें समजून जेथल्या तेथें उपयोगांत आणण्याचा उपक्रम जर सुरूं असता तर हें दैन्य प्राप्त झालें नसतें.

आमचे एक व्यापारी मित्र आहेत. त्यांच्या आजोबानें व्यापारावर चांगलाच पैसा मिळविला. पैसा मिळूं लागल्यावर देव, धर्म, गुरु, ह्यांत तो योग्य प्रमाणांत खर्च करण्याची प्रथाहि त्यांनीं सुरू केली. आजोबाचा धर्मशील पुरुष ह्मणून लौकीक वाढूं लागला, व अधिक पैसा येऊं लागला, मुले, मुली, सुना व नातू ह्यांच्यावर परिणाम असा झाला कीं, देव-धर्मावरील श्रद्धेमुळेंच हें सर्व वैभव आपल्याला प्राप्त झालें. तेव्हां आजोबाप्रमाणें देवधर्म पालन करणारे व्हावे ह्मणून तिकडेच सर्व लक्ष जाऊं लागलें. धंदा पुढें ढकलूं लागला. घरांत आजार व मृत्यु ह्यांनीं ठाणें दिलें तरी देवधर्माच्या नांवाखाली जप-जाप्य, ठाणकेठुणके, व नवस सुरू. इतकेंच नव्हे तर भूमिगत द्रव आढळेल व देवधर्म आपणास तारील ह्मणून तोहि उद्योग सुरूं. शेवटीं दुकान लुटला गेला; पण लौकीक व्यवहार ढासळला तो ढासळलाच. शेवटी दिवाळें पदरीं आलें आणि भिकारी ह्मणून लौकीक वाढला. लौकीक व्यवहार असा उभारला गेला नसता तर ही अवस्था आली नसती.

लौकीक व्यवहारांतील माणसानें पारलौकीक व्यवहाराकडे लक्ष द्यावें, परंतु त्यावर लौकीक व्यवहार अवलंबून ठेवूं नये. ठेवला ह्मणजे ही अवस्था यावयाचीच. ह्या अवस्थेंतून तारावयास कोणताहि बुवा धांवत येत नाहीं. पण देवाकडे बोट दाखवूनच कालक्रमणा करावी लागते. लौकीक व्यवहार हा परिस्थितीप्रमाणें संभाळावा लागतो. पण जे परिस्थिती पहात नाहीत आणि पारलौकीक व्यवहारांत मग्न होऊन लौकीक परिस्थितीविषयीं अज्ञ होतात ते शेवटी दोहोंलाहि मुकतात. दोन व्यवहारांचीं दोन्ही क्षेत्रें संभाळावयाची असल्यास आश्रमव्यवस्थाच समाजांत योग्य मार्गानें रूढ असावयास पाहिजे. तिचा अभाव हेंच असंघटित असण्याचें कारण. आणि तीच आमची लौकीक व पारलौकीक व्यवहारांतील अधोगती. तींतून समाजानें मुक्त व्हावें ह्मणून नव्या विचाराचे वारे समाजांत संचरू लागले. नवें शिक्षण कांहीं अंशानें आमच्यांतहि प्रसृत होऊं लागलें. त्याकरिता लहान मोठे फंड, शाळा, कॉलेज व बोर्डींग हींहि अस्तित्वांत आलीं. सरकारी अधिकार, पदवी, व पैसा, कांहींना मिळूं लागला. तथापि हें सर्व मिळून संघटित होण्याकडे व त्या संघटित स्वरूपानें सर्व समाज संघटित करण्याकडे मनाचा ओढा नाही.

मात्र बुद्धीचा ओढा आहे. बुद्धीचा ओढा आहे ह्मणूनच निरनिराळ्या संस्था, पत्रें, फंड, व संघ अस्तित्वांत येत आहेत. परंतु त्यांत सुव्यवस्था, संघटितपणा, नाहीं. ह्मणूनच मनाचा ओढा नाहीं असें ह्मणावें लागतें. सार्वजनिक काम करावयास बुद्धीची तयारी असली तरी मनाची तयारी असावयाला वेळ लागतो. एकादा उदार झाला व त्याने देणगी दिली तरी तिचा उपयोग स्वतःच्या प्रतिष्ठेकडे व स्वतःच्या तंत्राने व्हावा असेंच त्याला वाटतें. सार्वजनिक मनें व अंतःकरणें तयार नसल्यामुळें कोणावर विश्वास नाहीं. आणि ह्या परस्पर विश्वासाच्या अभावीं अनेक संस्था, संघ व फंड थंड पडून राहतात असा प्रत्यय येतो. हीं मनें कां तयार होऊं नयेत? पूर्वजांचा शिवयोगज्ञानाकडे विशेष ओढा. ह्यामुळे स्वतःकडे

फक्त दृष्टि द्यावयाची, इतराकडे दुर्लक्ष. आणि अनुयायीवर्ग, ह्या शिवयोगाच्या आत्मज्ञानावर विसंबून त्यांच्या आशिर्वादावर जगूं इच्छिणारा. त्यामुळे व्यवहारसृष्टीचे अंग जें देवाण-घेवाण तें आमच्यांत उत्पन्न झालें नाही. ह्मणून आत्मज्ञानाऐवजी आत्मकलह अधिक वाढला. एकमेकाविषयी वैषम्य हा आमचा सहजस्वभाव बनला. आणि ह्या सार्वजनिक दृष्टीनेंच स्वभावाची वाढ झाल्यामुळें बुद्धि उत्पन्न झाली पण मन मात्र सार्वजनिक वृत्तीपासून अलग राहिलें.

धर्मादाय फंड वगैरे ह्यामुळेंच निरुपयोगी ठरले. पण आतां हीच स्थिती चालूं द्यावयाची काय ? निःस्वार्थवृत्तीने सार्वजनिक कामाला वाहून घेणारे लोक निर्माण व्हावयास पाहिजेत. व त्यांनीं सार्वजनिक दृष्टि समाजांत निर्माण केली पाहिजे. त्याकरितां पाया घालावा. ज्या धर्मादाय फंडाचा दुरुपयोग होत आहे असें वाटत असेल ते सर्व फंड सरकारच्या ताब्यांत जाऊन सरकारमार्फत ते त्या त्या कार्याला खर्च होतील ह्याचे प्रयत्न करावेत. जे फंड व ज्या संस्था व्यवस्थेशीर असतील त्या संस्था रजिस्टर करुन फंड कोणत्याहि व्यक्तीजवळ न ठेवतां बँकेंत राहील अशी व्यवस्था करावी. आणि ह्यानंतर कोणतीहि संस्था रजिस्टर झाल्यावाचून व तिचा फंड बँकेंत ठेवल्यावाचून कोणत्याहि फंडास कोणींहि मदत न करणेंच योग्य. ज्या मठसंस्थांना उत्पन्न असेल त्यांनीसुद्धा आपल्या संस्थांवरील विश्वस्थ रजिस्टर करुन ते कायद्याने योग्य कारभार करतील अशी व्यवस्था लावून टाकणेंच उत्तम. तरच सार्वजनिक संघटनेला लागणारें मन आमच्यांत तयार होईल व असलेला दोष योग्य मार्गानें घालविण्याचा आह्मीं उद्योग केला असें होईल.

---

# संस्कृति-स्वाभिमानाचा उकल

[ लेखकः— तु. ना. काटकर, नागभीड. ]

## अश्मयुग

### लिंगोद्भव नि धारणा

मूलमानव संस्कृतीच्या एवढ्या मजलेवर येऊन पोहचले होते अशा सुमारास ह्मणजे इ. स. पू. ५००० च्यां समयास इराणमार्गे ऐतिहासिक …च्या पहिल्यांदाच ह्या परकीय द्रवीड नामक …कांनी निनांवी भूप्रदेशांत ( हिंदुस्थानांत ) …रकाव केला. तेव्हा मूलमानवाशीं त्यांची …ठ पडली. पण मूलमानव हे मानवावस्थेच्या …शी प्रथमावस्थेंत होते. त्यांनीं त्यांचें …त्व बिन्‌विरोध अंगीकारून स्थिर होऊं …. मूलमानव व द्रवीड यांच्यांत सुधार- …च्या दृष्टीनें विशेष असा फरक नव्हता. …ांत परधान शहाणा' इतकाच उभयतांत …क. तरी पण हज़ार-आठशे वर्षेपर्यंत ह्यांनी …च्यावर आपलें पूर्ण स्वामित्व गाजविलें. …न त्यांचे पुढे पुढे द्रवीड संस्कृतींतच मीलन …कें ह्याचें कारण द्रवीडांचे बहुसंख्याबल. …न आचार विभागला जाऊन अतिसान्निध्या- …नें परस्पर अखेरीस द्रवीडी संस्कृतीच्या सद- …वालींत कोंबले गेले, नि ह्मणून मूलमानव …नि द्रवीडहि शिवउपासक बनले. शिव- …च्या नि उपासनेचा प्रसार सर्वत्र पसरला. …रूप उपासनेचें रुपांतर कैलासाचे सगुण …रूपांत केलें. शिवसंज्ञक देवता चराचर व्यापा- …न असून तिच्या या व्यक्तीचें द्योतक लिंग



आहे. ह्मणून इतस्ततः स्थूल लिंगाची स्थापना नि पूजा—अर्चा सुरुं झाली, व त्यासमवेतच शिवालयाची जरुरी भासून ते तयार केले गेले असले पाहिजेत. किंबहुना श्रद्धा, आसक्ति, नि भक्ति यांच्या आवश्यकतेनुरुप स्थावर लिंगोपासकांचे प्रेमाची आसक्ति बळावून लिंगाला हृत्पटलावर धारण केलें गेलें असावें. कारण प्रेम हें आंधळें आहे. कित्येकांना तशी जरूरहि भासली नसावी. हें हल्लींच्या देखाव्यावरून अनुमान काढल्यास चुकीचें ठरणार नाहीं.

शिवउपासक लिंगी व अलिंगी दोन्ही असा- वेत. शिवाचे उपासक ते शैव जसे लिंगायत शैव आहेत तसेच अलिंगीहि शैव आहेत.

लिंगायत शैवापेक्षां अलिंगायत शैवांची संख्या बऱ्याच पटीनें अधिक आहे. ह्याचें कारण असें असलें पाहिजे.:—

हिंदु संस्कृति मूलतःच श्रद्धावान् आहे. पण त्या संस्कृतींत ( धर्मांत ) कालगतीने एखाद-दुसराच साधू संत, महात्मा अवतरत असतो. ह्याच तत्वान्वयें द्रविडीयन काळीं निस्सीम सगुणउपासक शिवभक्त जीवशिव एकवटून लिंगधारणेशीं तद्रूप झाले असले पाहिजेत. पण ह्यांचीच परंपरा पुढे ह्याच चिन्हांनी जाती-धर्मांत परिणत होऊन सामुदायिक बनली असली पाहिजे. ह्मणून हा सेवाधर्मी पंथ अल्प-संख्याकच राहिला. ह्याप्रमाणें मूलमानवाच्या शिवोपासनेच्या संस्कृतीचें स्थित्यंतर शिवलिंगधा-रणेंत व द्रवीडांच्या सुधारणेंतील सगुण भक्तीच्या जीवश्चकंठश्च प्रेमांत झालें असावें.

## द्रवीड-आर्यलढा

### ( इ. स. पू. ४००० चे नन्तर )

इ. स. पू. ४ थ्या सहस्रकाचे सुमारास उत्तरआशियांतून वायव्यमार्गानें आर्यनामक लोकांची दुसरी टोळधाड द्रवीड राज्यांत आली. पण द्रवीड लोकांची सुधारणा शिवोपासना नि रानटी चालीरीती ह्यांचेपलिकडे गेली नव्हती.

प्रत्येक समाज स्वतःच्या संस्कृतीस श्रेष्ठ नि दुसऱ्यास कनिष्ठ लेखतो ह्याच नियमान्वयें आर्य लोक द्रवीडापेक्षां सुधारलें असल्यामुळें स्वतःला ' आर्य ' ह्मणजे ' श्रेष्ठ ' ह्या नांवानें संबो-धीत. आर्यांची सामाजिक परिस्थिती जरी सुधारलेली होती. तरी पण ती द्रवीडी थाटा-चीच होती. यज्ञयागाची कर्में नि पंचमहाभूता-वरील दैविक श्रद्धा हेंच ह्यांच्या संस्कृतीचें वैशिष्ट्य होतें. ह्यांचा समुच्चय द्रवीडापेक्षां मोठा होता. तरी पण द्रवीडांनीं सुखासुखी त्यांना ठाव दिला नाहीं. जसा आर्यांना आपल्या श्रेष्ठ संस्कृतीचा स्वाभिमान होता तसाच नि तितकाच द्रवीडांनाहि आपल्या संस्कृतीचा श्रेष्ठ पणा वाटत होता. ह्मणूनच ती त्यांनी टिकविली. पण त्यामुळें शेंकडो वर्षें त्यांची भांडणातच गेलीं. आर्यांच्या एकामागून एक अशा अनेक टोळ्या द्रवीडभूमींत आल्या नि त्यामुळें त्यांचें संख्याबल वाढून शेवटीं त्यांना स्थिर होऊं द्यावें लागलें. पण हा त्यांचा परस्परांतील द्वेषाचा लढा शेंकडो वर्षें चालुन कालान्तराने अति सान्निध्य-साहचर्यामुळें शिथिलता नि विस्मृतींत विलीन झाला.

अशा तऱ्हेने द्रवीडभू उत्तरेस सिंधूपासून अनुक्रमें आर्यावर्त, कोसल, नागदेश, नर्मदा नि तिच्याहि दक्षिणेस महाकोसलप्रभृति दक्षिण भागांपर्यंत आर्य, द्रवीड नि एखाद्या-दुसऱ्या मूलमानवांनी व्यापली गेली. पण आर्यांचें संख्याबल अधिक असल्या कारणानें त्यांच्या सुधारलेल्या आचार-विचार नि संस्कृतीस विशेष महत्व आलें. ज्यांचें बल त्यांची सत्ता राहणारच.

यानंतर शक, यूची, हूण वायव्यमार्गानें आणि मंगोलियन पाल प्रभृति अनार्थ लोकांच्या टोळ्या पुनः द्रवीडार्यभूमींत उतरल्या व येथे स्थिर झाल्या. पण ह्या क्षुल्लक असल्यामुळें यांचें प्राबल्य कोणासच जाणवलें नाही. त्यामुळें द्रवीड नि आर्य यांच्या संस्कृतींत त्यांच्या इच्छेनुरूप संमीलन होऊन ह्याच संस्कृतीचे पुरस्कर्ते त्यांना व्हावें लागलें.

## द्रवीडार्य संस्कृति वर्णसंकर

ह्याप्रमाणें निरनिराळ्या काळीं निर-निराळ्या टोळ्यांतील ' जनां ' चे या भूमींत प्रवेश होऊन ते स्थिर झाल्यावर दोन संस्कृती-शिवाय तिसऱ्या संस्कृतीच्या वर्चस्वाचें अस्तित्व नामशेष झालें. बाद राहिला तो आर्य-द्रवी-डांचा. पण एका घरात नांदूं लागल्यावर

...ंतीहि प्रबल वैमनस्य असलें तरी ते नेह-...च्या सहवासाने दुरावतेंच, ह्याच तत्त्वा-...प्रमाणें कालांतराने ह्यांच्यांतील रागद्वेषाचा ...य होऊन परस्परसंस्कृतींचा परस्परांत ...स्वीकार झाला असें 'ऋग्वेद' सांगतो.

...प्रत्येकाला स्वतःच्या संस्कृतीचा निस्सिम ...अभिमान होता. प्रत्येकांची प्रचारकार्यें चालू ...ंच होतीं. त्यामुळे संबंधपरत्वें आर्यांचे ...द्रविड नि द्रवीडांचे आर्यहि व्हावे लागलें. ...भागांत ज्यांची सत्ता प्रबळ त्याप्रमाणें ...संस्कृतीची धारणा करावी लागली. त्यामुळे ...एक. द्रवीड-आर्य ओळखणें दुस्तर झालें.

...'जन' समुदाय अवाढव्य जातीभेदाचा प्रश्न ...आर्यांत वर्णाश्रम होते. पण त्यांच्यांतील ...-शूद्रादि आरंभीची स्वाभिमानी वृत्ती ...जाऊन त्यांच्यांतील चातुर्वर्ण्यांत 'रोटी-...'-व्यवहार सुरु झाले. कालान्तराने आर्य, ..., मूळमानव, नि अनार्य या सर्वांचे संस्कृती-...भिमानाला बळी पडून टिकविलेल्या द्रवीड ...आर्य ह्या दोन संस्कृतींत वर्णसंकर .... त्यामुळे मूळचे द्रवीड कोण नि आर्य ... ह्याचा निर्णय ठरविणें त्यांचे ..., एवढा प्रचंड कालौघ वहावल्यावर, ...ं दुरापास्त होऊन बसलें.

## ...लिंगांगी वर्णाश्रम नि वीरशैव.

...'वर्ण मया सृष्टं गुणकर्मविभागशः ॥

...र्यांनी ह्या कर्मभूमींत प्रवेश केला तो ...व्यवस्थेत. हा काल इ. स पू. ४००० ...होता हें निर्विवाद आहे. येथे प्रवेशल्या-...त्यांनी आणली चातुर्वर्ण्यसंस्कृती शुद्ध ...ण्याची बरीच प्रवृत्ति होती व त्यांनी ...काल टिकविली. पण मनुष्य हा ...परिस्थितीचा दास आहे. द्रवीड-...संकर झाला खरा; पण तो प्रत्येकाच्या

संस्कृति-स्वाभिमानांत. आर्यांत वर्ण आहेत हें उघड दिसत होतें. त्यांचाच स्वीकार द्रवीड नि द्रवीडार्यांत झाला हें मान्य करायला आजची प्रजा तयार नाही. द्रवीड या शब्दांत कमीपणा भरला आहे.

उभयतांच्या आराधना देवतांचा पगडा भिन्न भिन्न होता. पण उभयतांचे 'गुण' आणि 'कर्म' सहधर्म्य होते. द्राविडीयन लिंगांगी शिवोपासक जनतें-तहि आवश्यकतेनुरूप वर्णव्यवस्थेचें वारें संचरलें; नि आराधना करणारा महेशोपासक लिंगायत ब्राह्मण अर्थात् माहेश्वर हा एक वर्ण केवल ईशस्तवन नि आराधना एवढ्याकरितांच राखला नि पोसला गेला. सर्वांनी जर एकच एक कार्य करूं ह्मटलें तर संस्कृतीच मुळीं टिकायची नाही. ह्मणून आपल्या संस्कृतीचें रक्षण करणारा लिंगांगी क्षात्रतेजी वर्ग विलग करून त्यांना वीरभद्र ह्या वर्णांत अस्तित्व देण्यांत आलें.

उपासना नि संरक्षण ह्यांची व्यवस्था अशा तऱ्हेने द्विवर्णगटांत विभागली गेली असावी. कारण, मनुष्य हा मूळचाच अनुकरणप्रिय आहे. पण माहेश्वर, वीरभद्र व इतर कृषिप्रधान जनतेचे जीवन कंठायचे कसे ? हा जेव्हां प्रश्न त्यांचे-समोर आवश्यकतानुरोधे येऊन पोंहचला असेल त्यावेळी त्यांच्यांत जो कृषिवल, वाणिज्य, गुण-कर्मी जनवर्ग होता तो लिंगांगी वाणी अर्थात् वैश्यवर्ण गणला गेला.

अशा तऱ्हेनें ह्या त्रैवर्ण्याश्रमाची निपज द्रवीडार्यवर्णसंकरांतून झाली. पण यांच्यांत चवथा वर्ण कां उद्भवला नाहीं, व जरूर कां भासली नाहीं? तर लिंगधारणेपूर्वी ह्या संस्कृ-तींतील प्रत्येक व्यक्ति शूद्र मानली जाते. शिवाय शूद्राचीं कर्में अनार्य नि आर्यांच्या शूद्र वर्णांतून होतच होतीं. त्यामुळे जरूर भासली नाहीं. जे आजच्या धारणेनीं चालले आहेत ती उगम-कालचीच अखंड परंपरा आहे.

ह्याप्रमाणें आर्यांच्या सहवासगमनानें त्यांच्या खांद्याला खांदा भिडवून ह्या शैवमार्गी त्रैवर्णिकांनी आपली अल्पसंख्याक संस्कृति आपल्या 'वीर' वृत्तीने एवढ्या प्रचंड प्रतिकूल वातावरणात कायम राखून "वीर - शैव" हें आर्यांकडूनच मिळविलेलें नामाभिधान त्यांनी सार्थ केलें आहे.

### पंचाचार्य व त्यांची जागती ज्योत

वर्णाश्रमव्यवस्थेबरोबर समाजाची धारणा झाली खरी; पण ती अखंड चालविण्याकरितां सत्ता ही हवीच. पण ती व्यक्तिगत उपयोगाची नाहीं. प्रस्तुत काळचाच हा वाद वैदिक अथवा तदोत्तर काळांत असणें संभवनीय आहे. ह्मणून द्रवीडार्य संस्कृतीत अशा समाजधारणेची आवश्यकता भासली जाऊन समाजसूत्रें समाजाच्या हातीं ह्मणजे समाजमान्य 'पंचा'च्या हातीं दिलीं गेलीं असलीं पाहिजेत. अर्थात् समतेच्या बुद्धीनें ह्या पंचांत माहेश्वर, वीरभद्र, नि वैश्य (भक्त) ह्या त्रैवर्णिक 'जनां'चाहि समावेश असलाच पाहिजे. 'पंच' ह्मणजे पांच व्यक्ति असा याचा अर्थ नव्हे. पंच ह्मणजे पंचायतसंस्था-समाजशकट हाकारण्याचें कार्य पंचांच्या हातीं आल्यानंतर ह्यांच्यांतून कार्यधुरीण अद्वैतमतवादी मिश्र जनांचा उदय झाला नि स्वतःची भक्ति, ज्ञान, कर्तव्यकर्म, ह्या त्रयीच्या अद्वैत-सामर्थ्यावर 'आचार्य' पदाचे धनी बनले.

वीरशैवांतील कांहीं भाविक भक्तांचा समज पंचाचार्यांचा उद्भव-अवतार-पार्थिव लिंगांतून झाला असा आहे. पण हें बुद्धिवाद्यास पटत नाही. ती केवळ आंधळी श्रद्धा आहे. त्यावर बुद्धीजीवी लोकांचा विश्वास जडत नाही. न जडणें स्वाभाविकच आहे. जशी श्रीसंत तुकाराम बुवांच्या सदेहस्वर्गारोहणाची कल्पना, तशीच ही पंचाचार्यउद्भवाची आहे. ह्मणून श्री पंचाचार्यांचा जन्मोद्भव पार्थिव लिंगांतून झाला नाही तर पार्थिव लिंगाचा उद्भवपंचाचार्यांपासून झाला आहे.

हिंदु-वीरशैवांचा कल पूर्वीपासूनच भक्ति नि भावडचा भाविक कल्पनांनीं ओथंबलेला आहे. त्यामुळें संस्कृतीच्या उत्कर्षास असें एकांगी वळण आलें. आणि भौतिक प्रगतीला तो सर्वस्वीं पारखा झाला आहे.

अवाढव्य विस्तारलेल्या ह्या प्राचीन हिंदभूमींत वीरशैवांतून कालमानपरत्वें अधिकारी पुरुष निर्माण झाले नि त्यांना ज्ञात असलेल्या भागांतून आपल्या संस्कृतीची अखंड जागती ज्योत राहावी ह्मणून राष्ट्राच्या चारी भागांत वीरशैवधर्मपीठाची संस्थापना केली असली पाहिजे. पण ती आरंभी उत्तरहिंदुस्थानांत नि नंतर कालमानाच्या आवश्यकतेनुरूप क्रमाक्रमाने वर्चस्वकालीं दक्षिणभागीं संस्थापना झाली असावी.

द्रवीडांतील लिंगपूजा आर्यांनी स्वीकारल्याचा ठळक उल्लेख चतुर्वेदांतील आद्य असा जो ऋग्वेद नंतरचा यजुर्वेद नि उपनिषदांतहि सांपडतो ह्यावरूनच लिंगायत संस्कृतीचें महत्व कळून येणार आहे. ह्मणून तिचें महत्व फक्त ह्या आर्यावर्तांतच कुपमंडूकास्थेंत राहिलें नव्हतें तर प्रचारकांनी तिची ज्वाला आर्यावर्ताबाहेर इजिप्त-इटली-प्रभृति परराष्ट्रांत नेऊन पोंहचविली होती हें आज तेथे सांपडणाऱ्या शिवलिंगावरून सिद्ध होत आहे.

इ. स. च्या ८ व्या शतकांत हिंदुधर्मउद्धारक श्रीमदाद्य शंकराचार्यांनी आपल्या अद्वैत मताचा प्रचार चारी कोपऱ्यांत केल्यावर ती परंपरा सतत चालावी ह्मणून बद्री, पुरी, रामेश्वर नि द्वारका ह्या चार धामांची ज्या उद्देशाने योजना केली गेली त्याच उद्देशाने तत्पूर्व काळीं श्री. विश्वाराध्य, पंडिताराध्य,

...राम, दारुकाचार्य नि रेणुकाचार्य पंचा-...र्यांनी आपापल्या मतप्रचाराच्या काळीं अनु-... श्रीक्षेत्रकाशी, श्रीशैल्यमल्लिकार्जुन, ...नाथ सिद्धेश्वर नि कोल्लिपाकी ह्या स्थळीं ...स्थापनेच्या रुपानें धर्माचे अभेद्य किल्ले ...कन ठेविले आहेत. त्यांचीच ती ... जागती ज्योत आजतागायत कायम ...ली. ह्मणून सध्याकाळीं सर्वत्र प्रकाश ...लेला दिसत आहे.

## धर्मप्रचारक अर्थात् जंगम

...एवंच, वीरशैवांच्या उत्कर्षकालीं ही ...ठ'-संस्थापना झाली आहे. ...काल ह्मणजे सुमारे इ. स. पू. ३००० ... इ. स. ८०० हा असला पाहिजे असा ...आधार सांपडतो.

...पृथक् पृथक् प्रमाणांतच कां होईना पण ...स्थानच्या सर्व भागांत वीरशैव हल्ली सुद्धां ...लेले आहेत. ह्याचें कारण आचार्यांची ...पिरीं त्यांनी चेतवून तेवत ठेविलेली ज्योत ...शिवाय दुसरें काय असणार ? उत्तरप्रदेशीं ...र भागांत अलिंगी पण वीरशैवसंज्ञक ... स्वरूपाचा पंथ आहे, व ते महेश्वर ...) हा परब्रम्ह मानतात. म्हणून ही ...शी परंपरासुद्धा संस्कृतीचाच स्वाभिमान ... काय ?

...अशा प्रकारें लिंगायत-वीरशैव-धर्म व ...च्या वाढीच्या आवश्यकतेनुरूप मुख्य धर्म-...च्या उपशाखा 'मठ' संस्थांची स्थापना ... गेली असावी, नि प्रचारकार्याच्या प्रसारा-...र फिरत्या प्रचारक महेश्वरांचाच 'जंगम' ... नामाभिमान मिळालें असावें. देशोदेश ..., स्वमताचा प्रचार करायचा, तर मग ... नि उदरंभरण कशावर चालणार ? ...यजमानाकडून मिळणाऱ्या मदतीवर. त्याचें रुपांतर पुढे माधुकरींत होऊन, 'भिक्षा' व्यवसाय पत्करणें भाग पडलें असलें पाहिजे. धर्माचा प्रचार नि माधुकरी किंवा राजसत्ता नि तरवार हे अगदी जवळचें नातें आहे. ज्या वेळी ज्याची जरूर भासली त्यावेळी त्याचा अवलंब झाला.

पण प्रचारकार्य आटोपल्यावर ह्मणा, अगर बंदी झाल्यावर वा जरूर संपून ह्मणा, पण प्रचार करणे स्थिरावलें, नि लोभ व आवश्यकता ह्यांच्याबरोबर 'भिक्षांदेही' बळावली. तोच आज व्यवसाय या नात्याने सर्वच माहेश्वरांत स्वाभिमान होऊन बसला आहे. पण मूळचा हेतु मात्र हमखास हा नव्हता.

## वैदिक कालांतील द्रवीडार्य संस्कृति व तिचे सुपरिणाम

प्राचीन कालांतील चार सहस्रकांत वेदकाल अति महत्वाचा आहे. इतका महत्वाचा काल आजपर्यंत पुनः निर्माण झाला नाहीं. त्या कालांतील वाङ्मयनिर्मिती तर सर्व जगाला आदर्श होऊन बसली आहे. आर्य प्राचीन हिंदुस्थानांत स्थिरस्थायिक झाल्यावर त्यांच्या ज्ञानाची ज्योत अधिकाधिक प्रकाशत गेली, व त्याचे सुपरिणाम जगमान्य असलेले 'वेद' निर्मिण्याकडें झाला.

ह्यावरून आर्यांची बुद्धिमत्ता ज्ञान नि पांडित्य कळून येणार आहे. सूर्याला मुद्दाम पणतीनें दाखवून देण्याची जरूर नाही. त्यांचे महत्व त्याच्या रचनेंत आहे. द्रविडार्यांतहि ह्या वेळी ज्ञानवृद्धी बरीच ह्मणजे त्यांच्या बरोबरीनें झाली होती हें त्यांनी स्वबलानें नि ज्ञानाने स्थापन केलेल्या वर्णव्यवस्थेवरून कळून येणार आहे. म्हणूनच आर्यांनीसुद्धां द्रवीड-द्रवीडार्य-संस्कृतीचा अवलंब केला होता हें ऋग्वेदांत वर्णिलेल्या शिवपूजेच्या आधारावरुन

सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. हे " जो प्रत्यक्ष पराक्रमच आहे, जो जटाधारांनी मंडित आहे आणि ज्याचा आश्रय अखिल वीर ( शैव-मार्गाचा पुरस्कारकर्ते वीरशैव ) करीत असतात त्या रुद्रास ( शिवास ) आम्ही हें स्तोत्र अर्पण करीत आहों.......तो आपल्या हातांत आवश्यक वाटणारीं औषधें धारण करून आम्हास सौख्य, अभय व सुरक्षितपणा यांचा लाभ करून देवो. हे रुद्रा, आमच्यांतील थोर किंवा सान यांपैकीं कोणालाहि इजा होऊं देऊं नको.......... वीरपुरुषास आश्रयभूत झालेल्या देवा, तुझ्याजवळील उत्कृष्ट वैभव तेवढें आम्हाकरितां असूं दे. तूं द्विगुणित सामर्थ्यवान् असल्यामुळे आम्हांस सुरक्षित ठेव... सर्व वनस्पतींचे माहेरघर मानलेल्या हिमालय पर्वताच्या अत्युच्च शिरोभागीं तुझें वासस्थान आहे...अग्नि व रुद्र हे एकच आहेत ही कल्पना मान्य झाली होती...शिव, शंभू, व शंकर ही शुभसूचक नांवें त्यांच्या कल्याणप्रद गुणावरून त्यास पडलीं.......आर्यांनी हें दैवत पूज्य मानिलें.......कालगतीनें अनार्यांचा ( मूलमानव, द्रवीड व अनार्य ) आर्यांत मिलाफ झाल्यावर वेदमार्गीयांतहि हीं पूजा सुरूं झाली असावी. " ह्या ऋग्वेदांतील मराठीं भाषांतरित उताऱ्यावरून आर्यपूर्वसंस्कृतीचा आदर व तिचें स्थान स्पष्ट होत आहे.

## —: वीरशैवांचें स्थान :—

ज्या अर्थी आर्यपूर्वसंस्कृतीला वेदांत स्थान आहे त्या अर्थी द्रवीड-आर्यऐक्य तत्पूर्वीच झालें असलें पाहिजे हें उघड आहे. ह्मणून वेदकालाचे पुरेपूर संस्कार वीरशैवांवर झाले आहेत. ह्मणून वीरशैव हे आधुनिक कोणत्याहि आगांतुक कारणानें उदयास आले नसून त्यांची त्यांची संस्कृति ( धर्म ) वैदिक काळांतूनच आलेला आहे. ह्मणून तो वैदिक धर्म समजला पाहिजे.

## —: वेदादि ग्रंथ संकलन :—

वैदिक कालांत वेदांचा उगम झाला, पण त्यांचें संकलन झालें नाही. तें स्तोत्रांत असल्यामुळे पाठांतर करकरवून ते बराच कालपर्यंत वंशपरंपरेनें टिकविले गेले, व लेखनकलेची अनुकूल परिस्थिती प्राप्त होतांच त्यांचे विषयविभागणीप्रमाणें ऋग्वेद यजुर्वेद, सामवेद नि अथर्ववेद असा चार ग्रंथविभागांत त्यांची वाटणीं केली गेली. वेद पौरुषेय असून त्यास दिलेलें श्रुति हें नांव यथार्थ आहे.

धर्मवेडे लोक ते मनुष्यप्रणीत मानीत नाहीत, देवप्रणीत ( अपौरुष ) मानतात. पण ती नुसती मानण्याची ह्मणजे हट्टारेटावीने देवत्व ( महत्व ) आणण्याची आस्तिक महत्वाकांक्षा आहे. बुद्धिजीवी लोकांना हें पटत नाहीं. पण वेदाचें महत्व त्यांनाहि आहे.

इ. स. च्या १२ व्या शतकांत श्रीबसवेश्वरांनी गुरुगृहीं वीरशैवधर्माचा अभ्यास केला आहे हें इतिहासमान्य आहे. त्यावरून तत्पूर्वकालीन वीरशैवधर्मग्रंथ निर्माण झालें असले पाहिजेत. पण तो काळ आणि ग्रंथकर्ते निश्चित नाहीत. पण धर्माच्या समकालाबरोबर वीरशैवांच्या ग्रंथांचा काळ वेदांच्या समकालीन मानल्यास निव्वळच अतर्क्य ठरणार नाहीं. वीरशैवांनी धर्माच्या स्वाभिमानाबरोबरच धर्मग्रंथांचीहि निपज वीरशैवांतील अधिकारी पुरुषाकडून झाली असली पाहिजे. तेव्हांच ते बसवकाळीं असूं शकणें संभवनीय आहे.

## रामायण-महाभारतकाल

द्रवीडार्य वर्णसंकरानंतर सत्ता नि हट्टारेटावीमुळें ज्यांनी मुद्दाम द्रवीड संस्कृतीचा अवलंब केला नि ती टिकविली त्यांचा असुर संज्ञेत समावेश होता. पुढें वैदिक कालोत्तर रामायण नि महाभारतकाळीं त्यांच्या मातंग

...यांचें राम, कृष्ण प्रभृति आर्य राजाकडुन ...ना जमीनदोस्त करण्यांत आलें. द्रवीड ...यांना कोणी वाली नेता उरला नाहीं. ह्या- ...ळे द्रवीडी प्रबळ सत्ता तरी निदान लयास ...ली, व येथून द्रवीडसंस्कृति ही मृतावस्थेंतच ...ली.

...आर्य नामाभिधीत संस्कृतीचें ठसेच मुळीं ...खोल आहेत. त्यामुळे त्यांचा स्वाभिमान ...यांपासूनहि दुरावत नाहीं. आज तुह्मी ...यांनाहि प्रश्न घाला कीं, तुझी संस्कृती कोणती? ...तो निस्सीम स्वाभिमानाने सांगेल कीं ' मी ...र्य आहे ' 'आर्यांचा वंशज आहे.' ही किमया, ...याद, ' आर्य ' ह्या नाममनोहर सुंदर ...ब्द, ज्ञानी परमप्रिय शब्दांत आहे.

## अखेर सर्व आर्य

...ह्मणून अखेर सर्व आर्य असा वेदकालाचा ...तिम परिणाम आहे. ह्या वेदकालीन वाङ- ...यनिर्मितीच्या ज्ञानभांडारामुळे सर्वास ज्ञानाचा ...सार झाला. सर्वत्र समान सत्ता, समान ...र्म, समान हक्काने समतेच्या तत्वावर समाज- ...चना तयार झाली. पण सुधारणावादी मिश्र ...ज्ञानपद्धतिमुळें पितृसावर्ण्य नि मातृसावर्ण्य ...समाजरचनेने जातींचा उगम झाला, नि ती ...यांच्या आवश्यकतेनुरूप वाढत जाऊन वैदिक ...कालीच जातिधर्माच्या सामुच्चायिक स्वाभि- ...मानात परिणत झालें. ह्मणून रामायण—महा- ...भारतकाली समाजरचनेंत चातुर्वर्ण्यसत्ता ...अस्तित्वांत असून जातिधर्म उघड दिसत होता. ...यांच्या शेंकडोगणती जाती त्यांचीच वृद्धिगता- ...वस्था आहे.

## कालनिर्णय
### खि. स. पू. ५००० ते खि. स. २० वें शतकापर्यंत

...ऐतिहासिकदृष्ट्या ' वीरशैव संस्कृतीचा ...उगम, वृद्धि नि संस्कार ह्यांचा यथासांग नि यथामति चर्चा देण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला हें माझ्या प्रेमळ वाचका- कडे सोपवितों.

प्रश्न उरला तो निश्चित कालनिर्णयाचा. काळाचा निर्णय देताना अमक्या एका शतकांत अमक्या वर्षी अमुक प्रसंग घडला असा निर्णय ठोकून देणें हें अगदींच निराधार ठरणार आहे. पण कालमानाच्या संस्कारानुरूप कालाचा अंदाजजनकात्मक निर्णय लावतां येण्यासारखा आहे तो असा —

(१) इ.स.पू. ५००० वर्षाचा पूर्वकाळ

मूलमानव; त्यांचीं उत्पत्तिमीमांसा, त्यांची संस्कृति ( आचार-विचार ) नि राहणी, ह्या- वरून शिवउपासनेचा उगमकाल मानतां येईल.

(२) इ.स.पू. ५००० ते इ.स.पू. ४००० प.

द्रवीडांचा प्राचीन हिंदुस्थानांत प्रवेश, त्यांच्या चालीरीतींचें वर्चस्व, ईश्वरावरील प्रेम नि त्यायोगें मूलमानव नि द्रवीड संस्कृ- तीचें ऐक्य, लिंगोद्भव नि धारणा.

(३) इ.स.पू. ४००० ते इ.स.पू. ३००० प.

आर्यांचा प्रा. हिं. त. प्रवेश, द्रवीडआर्यांचा लढा, द्रवीडार्यसंस्कृतिवर्णसंकर; लिंगांगी वर्णाश्रम नि वीरशैव, वेद नि वेदांगनिर्मिती, पंचाचार्य उगम नि पीठसंस्थापना, ग्रंथनिर्मिती मठस्थापना प्रचारक ( जंगम ) नि भिक्षांदि- हींचा उगम.

(४) इ. स. पू. ५०० ते इ. स. ८०० प.

वेदादि ग्रंथसंकलन, तसेंच शैव वैष्णव पंथी धर्मग्रंथ नि पुराणनिर्मिती, बौद्ध जैन प्रभृति पंथांचा उगम नि ऱ्हास; श्रीमदाद्य शंकराचार्य नि वैदिक धर्माचें हिंदु संस्कृतींत पुनरुज्जीवन.

## (५) इ. स. ८०० ते ११०० पर्यंत

हा सर्वांगीण सुंदर काल आहे, पण हा काल वीरशैवांच्या दृष्टीनें ह्मणावा तसा ठळक गेला नाहीं. ह्याचें कारण इ. स. पू. ८०० ते इ. स. ८०० पर्यंतचा काल वैदिक संस्कृतीच्या दृष्टीनें दिवसानुदिवस अपकर्षाचाच गेला. त्यामुळे इ. स. ८०० ते ११०० हा काल वीरशैवांचेहि दृष्टीनें अगदींच नाममात्र गेला. पण श्रीकृष्णसारख्या थोर विभूतीचेः—

। यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
।। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।
। परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
।। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।

ह्या गीतावचनात आहे. आणिः—

। उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
।। परमात्मेति पुरुषं प्रकृतीं च गुणैःसह ।।

ह्या ब्रीदाप्रमाणें श्रीबसवेश्वरासारखा प्रत्यक्ष 'महेश्वर' वीरशैवांच्या उद्धाराकरिता इ. स. च्या १२ व्या शतकांत अवतरला गेला.

## (६) इ. स. १३०० ते १९०० पर्यंत

हा काल गुंतागुंतीचा असून मोंगलादि नाना संस्कृतींच्या संस्काराचा आहे. त्यामुळे अल्पसंख्याक 'वीरशैवां' स हा काल मृतवत् घालवावा लागला. १९ व्या शतकांत महर्षि दयानंदप्रणीत आर्यसमाजाचा उगम झाला, व त्यानें आपला बराच पराक्रम वीरशैवसंस्कृतीवर खर्ची घातला. हें मला तसेंच आपणा सर्वांस विदित आहेच.

## (७) २० वें शतक

हें शतक तर आपणा सर्वांच्या रहस्याचें आहे. ह्मणून सोडलेली माला पुनश्च गुंफायला आरंभ करूं या.

## प्रचंड क्रान्तीकारक वीरशैवधर्मोद्धारक श्रीबसवेश्वर

ह्या महात्म्याची योग्यता, थोरवी नि कार्य सर्वश्रुत आहे. पण ती निराधार नाही. त्यांनी वयाच्या १८ व्या वर्षापर्यंत गुरुगृहीं ब्रह्मचर्यव्रतानें राहून वीरशैवधर्मग्रंथांचें संपूर्ण अध्ययन केलें, नि नंतर 'अद्वैत' सिद्धान्तावर मृतकळा आलेल्या वीरशैवधर्माचा पुनरुद्धार केला नि रक्षण केलें. एवढेंच नव्हे, तर सन १९३७ सालांत आवश्यकतेनुरूप प्रांतिक नि जिल्हानिहाय सभामहासभांतून पास झालेला म. व. प्रां. स. चा ठराव नं. ७ – "इतर जातींतील अगर धर्मांतील लोकांनीं वीरशैवधर्म स्वीकारण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास समाजनियंत्या पंचांनीं (पंचाचार्यांनीं) वा धर्मगुरूंनी धर्मदृष्ट्या विधीपूर्वक आपले धर्मांत सामील करून घेण्याची प्रथा अधिक निश्चयानें चालू ठेवावी" ह्या ठरावाचें उद्धारकार्य श्रीबसवेश्वरांनें १२ व्या शतकांतच धडाडीनें पार पाडलें नि आपलें 'कालपुरुषत्व' प्रकट केलें. ह्मणून ज्ञानकोशकार कै० डॉ० केतकर ह्मणतात — "बसवाचें कार्य मोठे होतें. बसवाची मतें सर्व हिंदुस्थानभर पसरली असती तर आज ज्या सुधारणांसाठी तडफड चालली आहे ती सुधारणा घडवून आणण्याचें श्रेय बसवास मिळालें असतें."

भारताचार्य श्री. चिं. वि. वैद्य म्हणतात — "उद्योगाचें महत्व व श्रेष्ठत्व प्रतिपादणारा व भिक्षा बंद करणारा असा हिंदुस्थानांतील पहिला तत्ववेत्ता बसव होय."

साहित्याचार्य श्री० पांगारकर यांचें म्हणणें तर जैन, बौद्ध, इस्लामप्रभृति पंथांच्या मतमतांतराच्या वेळीं 'बसवपंथानें वैदिक धर्मावर उपकारच केला' असें आहे.

थोरांच्या शब्दांत थोरांची महती एकवाक्य-
तेंत असल्यावर लेखकास लेखनावडंबर वाचका-
पुढें मांडण्याचे निष्कारण श्रम कशाला हवे.
पण एवढें मात्र खरें कीं, आज सुधारणेंच्या
काळांत म० गांधी, बॅ० सावरकर, श्रीसंत
तुकडे महाराज प्रभृति धर्ममहात्मे ज्या कार्या-
करितां आपले सर्व आयुष्य खर्ची घालीत अस-
तांना देखील त्यांच्या कार्याची पूर्तता होत
नाहीं, तेंच कार्य म० श्रीबसवेश्वराने ८००
वर्षांपूर्वीच्या सनातनकाळांतदेखील यशस्वी
करून सोडलें. ह्यावरूनच तो किती क्रान्ति-
कारक मतांचा होता हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट
आहे. तेंव्हा आतां जास्त लिहिणें नलगे.

## उपसंहार

कालमानपरत्वें धर्माची बंधनें ढिलीं सोडील
तोच खरा धर्म नि धर्मोद्धारक समजला जाईल.
म्हणून श्री० बसवेश्वराची गणना श्रीपंचाचार्य,
श्रीमदाद्य शंकराचार्य, स्वामी विवेकानंद, महर्षि
दयानंद, म० गांधी प्रभृति थोर अद्वैत तत्व-
निष्ठ महात्म्यांच्या मालिकेंत आहे. वीरशैवांच्या
सध्याच्या काळमानाप्रमाणें दे० भ० बामणगांव-
कर, श्री० कल्याणशेट्टी, श्री० झुंझे, श्री. राम-
रावो पुराणिक, श्री. चौधरी प्रभृतीचें कार्य ऐति-
हासिक दृष्टया वरील मालिकेंतच येणार
आहे इतकें त्यांचें कार्य उदार बुद्धीचें व महत्व-
पूर्ण आहे. पण आज ते आपल्यांत आहेत ह्मणून
त्यांचें आपणांस महत्व वाटत नाही. असतु,

सांगावयाचें तात्पर्य काय, तर वीरशैवध-
र्माच्या मूळ संस्कृतीचें बीज रोवले गेलें ते
इ. स. पू. ५००० चे आद्यकाळीं. त्याचें
संगोपण केलें तें त्यांच्या स्वाभिमानी सान-
वीरांनी. ह्मणून आज त्याचें अस्तित्वानें
सुंदर फुलें-फळें उमलून उपभोगायला सांप-
डत आहेत. तर असा हा प्राचीन कालापासून
चालत आलेला धर्म आहे. तो श्रेष्ठ
आहे कीं कनिष्ठ आहे, द्रावीडीयन आहे कीं
आर्यन आहे, वैदिक आहे कीं आधुनिक आहे,
हें वाचकांनीच ठरवावें. आमचें तर असें मत
आहे कीं, आर्य, द्रवीड, वा इतर कोणत्याहि
शब्दावडंबरांत स्वाभिमान बाळगणें व्यर्थ
आहे. तसा बाळगल्यास तो स्वाभिमानच मुळीं
नव्हे. आर्य झाले तरी ते मानव, नि द्रवीड
झाले तरी ते मानव, किंवा मूलमानव झाले
तरी ते मानव. आर्यांनी हिंदुस्थानांत प्रवेश
केल्यावर ज्या अवस्थेंत द्रवीड आढळले त्याच
अवस्थेंत आर्य देखील तत्पूर्वकालीं कधी तरी
असलेच पाहिजेत. एवंच, द्रवीडांची सुधारणा
मागाहून झाली तीच आर्यांची त्यांचे पूर्वकाळी
झाली. पण दोन्ही ' जन ' मानवी संस्कृतीं-
चेच होते. पाळण्यांतील बाळ मूळचाच पंडीत
वा महापंडीत राहत नाही. त्याच्यावर संस्कार
घडतील त्याप्रमाणें तो पुढें निपजत असतो.
हा निसर्गसिद्ध सिद्धांत आहे नि ह्या सिद्धां-
तान्वयें आर्यांचा एक काळ रानटी अवस्थें-
तील हमखास असलाच पाहिजे. ह्मणून तो
स्वाभिमान मूलमानव, द्रवीड वा आर्य ह्या
संस्कृतीचा न ठेवितां ' मानव ' संस्कृतीचाच
मानावयास हवा.

आज आर्यांचे वंशज कोण, नि द्रवीडांचे
वंशज कोण, हें, गोंड, भिल्ल, कोरकू, माळे
प्रभृति जंगली जाती सोडून, सुधारलेल्यांचा
निर्णय देणें दुरापास्त होऊन बसलें आहे.
द्रवीडार्यकाळीं द्रवीडार्य संकर झाले तेंव्हाच
दोन्ही संस्कृतींचा उल्लेख वेदांत दिला गेला.
एवढेंच नव्हे तर पुढे वर्णसंकरामुळेच पितृसावर्ण्य-
मातृसावर्ण्य प्रभृति भानगडी उपस्थित झाल्या
होत्या हेंहि पण स्पष्ट आहे. ह्मणून हा कोळसा
उगाळावा तितका तो काळाच उमटणार आहे.
ह्मणून द्रवीड तेच आर्य नि आर्य ते द्रवीड.
एकानी दुसऱ्यास हलक्या दर्जाचें लेखणें हा
परंपरेंत चालत आलेला मानवी स्वभाव आहे.
तेवढ्याने मानवाचें मानवत्व नष्ट होत

नाहीं. ह्मणून सर्व 'मानव'-संस्कृति एकाच दर्जाची आहे. नि 'मानव' संस्कृतीचा स्वाभिमान राहील तर नाना धर्मांच्या वितंडवादाचे किल्ले दुभंगून मानवसंस्कृतीचें विश्वव्यापकत्व तळपल्याशिवाय राहणार नाहीं. पण असा दिवस उदयास येईल तो सुदिन.

डॉ० वा. का. किर्लोस्कर यांचा बुद्धि-ग्राह्य वाटणारा 'जीवनांतील संकटपूर्ण अशा-श्वतीमुळें मनुष्यानें खचून जाऊं नये व त्याला आशेचा आधार द्यावा ह्मणून धर्मभावनेचा उगम झाला' हा सिद्धांतच सर्व संस्कृतीचा पाया आहे. तेव्हां आतां अधिक विस्तृत लिहिणें नको. कोणत्याहि धर्माच्या वा संस्कृतीच्या मुळाशीं हाच हेतु आहे ह्मणून तो परस्परास उच्च-नीच समजतो. हा मनुष्याचा धर्मच होऊन बसला आहे. तेवढ्यावरून तो त्या लाय-कीचा होऊं शकत नाहीं. प्रत्येक मानव श्रेष्ठ आहे ह्मणून जगांतील हें भेदाभेदाचे किल्ले नष्ट करावयाचे असतील तर प्रथम हिंदु, बौद्ध, वीरशैव, ख्रिस्त इस्लाम, प्रभृति संस्कृतींनीं 'मानव' हा एकच स्वाभिमान बाळगावयास पाहिजे. तेव्हांच मानवी धर्माची विश्वव्यापकता वाढेल. ह्मणून आपल्यासमोर असलेला उज्ज्वल भविष्यकाल संस्कृतीच्या व्यर्थ संकुचित स्वाभिमानांच्या खलनिर्णयांत वेचण्यापेक्षां उद्दिष्ट कर्तव्यकर्मांत खर्ची घालणें अधिक आवश्यक आहे.

सारांश, जे वर्ण पूर्वी होते ते आजहि आहेत. पण त्यांचें निराळ्या नामाभिधानांत रूपांतर झालें आहे. ह्मणून आज हिंदुसंस्कृतीचें संरक्षण युरोपियन क्षत्रिया (मिलिटरी) कडुन केलें जातें हा सर्व कालाचा प्रताप, दुसरें काय ? जशी सत्ता तशी संस्कृति.

आजपर्यंत ह्या भूमीस निरनिराळ्या काळीं निरनिराळी नांवें मिळालीं आहेत, व आज हिंदुस्थान ह्मणून सर्व जगांत ओळखला जातो. ह्मणून तिचें मूलत्व थोडेंच उठून पळालें आहे!

ह्मणून आजचे वीरशैव हे आजहि मूल-मानव आहेत, द्रवीड आहेत, आर्य आहेत, वैदिक आहेत, नि हिंदुसुद्धा पण आहेत. नाहीं काय ? तिच्यावर वैदिक कालाचा संस्कार झाला, इस्लामांचा झाला, मराठ्यांचा झाला, बसवकालाचा सुधारणावादी संस्कार घडला, पण ह्या सर्व संस्कृतींच्या जाळांतून त्यांनीं आपली मूळ संस्कृति राजाश्रय प्रभृति कांहीं नसतानादेखील केवळ वीरवृत्तीनें टिकवून 'वीरशैव' हें नामाभिधान खरोख-रीच सार्थ केलें आहे. यांतच त्यांचा स्वाभि-मान-श्रेष्ठत्व आहे.

प्रिय वाचक सुहृदांनो ! ही विस्तारलेली लेखमाला आज संपूर्ण झाली आहे. तेव्हां पुनश्च मला आपणास एकवार हार्दिक विनंती करावयाची आहे. ह्या लेखांतून ज्या स्थळीं विसंगतपणा आला असेल तो लेखकाच्या दृष्टो-त्पत्तीस आणून देऊन त्याचे सकारण स्पष्टी-करण केल्यास लेखकावर त्यांचे अनंत उपकार राहतील, एवढीच नम्र विनंती करून आपणा सर्वांचा निरोप घेतों.

समाप्त

# लिंगायत, त्यांचा धर्म व संस्कृति

(जुलै २५ च्या 'बॉम्बे क्रानिकल'च्या अंकांत 'लिंगायत, त्यांचा धर्म व संस्कृति' अशा शीर्षकाखाली मिस्. व्ही. टी. लक्ष्मी, एम्. ए., यांनीं एक लेख इंग्रजीमधून लिहिला आहे. त्याचें सारांशरूपानें भाषांतर करून संजीवनीच्या वाचकासाठीं आह्मी प्रसिद्ध करीत आहोंत.)

—सं. सं.

शिवाची संस्कृति ही हिंदुस्थानांतील एक अत्यंत प्राचीन व सुविख्यात संस्कृतींपैकीं होती. ऋग्वेदांत रुद्र हा एक ... देव ह्मणून उल्लेखिला होता.

यजुर्वेदकालांत शिवाच्या—शंकर व महादेव ह्या द्विविध स्वरूपास प्राधान्य देण्यांत आलें. भगवद्गीतेने शिव हा सृष्टीचा नियामक ह्मणून उल्लेख केला.

इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकापावेतो हिंदुस्थानांत शिवधर्म आपल्या उच्च ध्येयासह चालू होता. पण त्यांतील कडक नियम, त्यांतील 'सोहम्'-विषयक 'तो मीच' व 'मी तोच' हे ... विचार, व त्याचे पुरस्कर्ते जे ब्राह्मण ... अलिप्तपणा, ह्यामुळें अन्यजातीयांचें ...खाली धार्मिक क्रांति सुरू झाली, व ... शेवट जैनधर्म व बुद्धधर्माच्या स्थापनेंत झाला. ह्या धर्मांचा संदेश — प्रेम हें ज्ञानाहून श्रेष्ठ, मुक्तीपेक्षा सेवा उत्तम, असा होता.

पण हे नवीन निघालेले धर्महि कांही अंतस्थ कारणामुळे मागे पडले, व उलट शैवधर्माच्या पुनरुज्जीवनास वाट मोकळी झाली. पण ह्या ... इ. स. च्या चौथ्या शतकांत केवळ ... थोडे लोकच शैवधर्म जाणत. ह्यामुळे ...पक्षाभिमानाने शिवपूजा सुरु झाली.

तेव्हां त्याऐवजी व्यापक दृष्टीचे लोकांनी शिव व विष्णु ह्यांचें हरिहरस्वरूप एकत्व, आणि शिव, विष्णु, ब्रह्म ह्यांचें त्रिमूर्तिस्वरूप एकत्व, हीं तत्वें रूढ करण्याची पराकाष्ठा केली. पण त्याचा कांही परिणाम न होतां, पक्षनिविष्ठ पंथाचे स्वरूपांत शैवधर्म बराच काळ चालू राहिला. मात्र जैन व बुद्धधर्माचें प्राबल्य कमी करण्याचें सामर्थ्य त्यांत उरलें नव्हतें. पुढे सहाव्या व नवव्या शतकांत जैन व बुद्धधर्माची पाखंडी धर्मश्रद्धा नष्ट करण्याचे हेतूनें काश्मीरमध्ये "शैवाईत स्कूल" स्थापून शैवधर्माचे पुनरुज्जीवनास पुनः चालना देण्यात आली. ह्याबद्दल ह्या वेळच्या कार्यकर्त्यांचे आभार मानले पाहिजेत.

यांचा पुढारी श्रीशंकर होता. ह्यांनी कडव्या धोरणाने व दयाळू अंतःकरणाने शैवधर्मांतील सर्व दोष काढून टाकले, आणि तो उत्तम स्वीकार्य बनविला. दहाव्या शतकांत दक्षिण-हिंदुस्थानांत शैवधर्माच्या पाशुपत पंथाची चांगली भरभराट झालेली दिसते. ह्या लोकांचा एक पंथ ह्मणून महाभारतांतील शांतिपर्वांत त्यांचा उल्लेख केलेला आहे; व पाशुपतसंस्कृतीची स्तुति केलेली आहे. हिचा संस्थापक लकुलिश ह्याचा उल्लेख वायुपुराणांत व कूर्म-पुराणांत आहे. पाशुपताचा किंवा लकुलमन्याचा

शैवधर्म हा जुन्या शैवधर्माचाच पुनरवतार होता. जुन्या वैदिक धर्मांत व ह्यांत कांहीहि भेद नव्हता. खरी वस्तुस्थिती अशी होती कीं, शैवधर्म हा वैदिक निष्ठेविरुद्ध नव्हे, तर वैदिक नियंत्रणाविरुद्ध झगडत होता.

ह्या शैवधर्मानें, नजीक येऊन ठेपलेल्या शिवदेवासच विशेष महत्व दिलें. आणि पुनः एकदा कलचुरीसचा राजा बिज्जल किंवा बिज्जन ह्यांचे कारकीर्दीत बसव ह्यांचे नेतृत्वाखाली शिवपूजा विशेष प्रामुख्याने सुरु झाली. दीर्घपरिश्रमान्तीं सुधारलेल्या चालीरीती व संस्कार अंतर्भूत करून, शैवधर्मास पुनः चालना देण्यांत आली. ह्या विशिष्ठ चालीरीतींच्या शिवभक्तांच्या किंवा शिवपूजकांच्या "वीरशैव" नांवाच्या पंथांत, त्यांतील उच्चतम तत्वें पटून, "लिंगायत" किंवा 'लिंगवंत' ह्मणून बहुसंख्य लोक स्वखुषीनें दीक्षा घेऊन येऊन मिळाले.

- हे लिंगायत व साधारण शैव ह्यांत बाह्य भेद हा होता कीं, लिंगायत हे चांदीच्या डब्यांत एक छोटें लिंग आपल्या गळ्यांत किंवा खांद्यावर किंवा कंबरेभोवती नित्य स्वतःजवळ बाळगीत असत.

हे स्वतःला शैवधर्माचे कट्टे कैवारी ह्मणवीत असत. हे शूर, धाडसी व करारी होते. ह्यांच्या समाजसंस्थेंत ब्राह्मण व इतरहि बऱ्याच जातींचे लोक असत. ह्यांनी आपला मुख्य धंदा दुकानदारी व व्यापार हा ठरविला. ह्यांतील ब्राह्मण, ज्यांना आराध्य ह्मणत, हे वीरशैवांची मातृभाषा जी कानडी, तींत उत्तम प्राविण्य संपादून तिचें उत्तरेकडून नित्य होणाऱ्या मराठीच्या आक्रमणकालांत जतन करीत, व शेतकऱ्यांची सेवा करीत. बाकीचे बुद्धिमान व प्रगमनशील वीरशैव देशांत व परदेशांत भरभक्कम व्यापार करीत असत.

ह्या वीरशैवांचे धार्मिक व आचारविषयक विशेष पुढीलप्रमाणे होते.।-लिंगाची व शिववाहन नंदीची पूजा; वेदांचे अधिकारास अमान्यता, आत्म्याचे पुनर्जन्मावर अविश्वास, बालविवाहपद्धतीचा तिरस्कार; विधवा-विवाहास मान्यता व त्याचा प्रचार, करीत.

गुरु, लिंग व जंगम ( उपदेशक, मूर्ति, व सहधर्मी ) ह्या तीन मुख्य गोष्टींचा आदर राखण्यांतच सारें पुण्य आहे असे त्यांचे विचार असत. आणि उपदेष्टा किंवा शासक बनण्याचा अधिकार-जंगमाचें किंवा पूजकाचे कानांत पवित्र मंत्र उपदेशील व स्वतःचे गळ्यांत, खांद्यावर, किंवा कंबरेभोवती लिंग बाळगील अशा त्यांच्या जातींतील कोण्याहि पुरुषास किंवा स्त्रीस असे.

मांसभक्षण, पान खाणें, किंवा दारु पिणें, ह्या बाबतींत प्रतिबंध असे. आणि तांबड्या रंगांत रंगविलेलें भगवें वस्त्र गुरु घालीत असत. ( राइसेस गॅझेटिअर, व्हॉल्युम १ पान ४७६. )

वीरशैवधर्माचे थोर संस्थापक व त्यांचे अनुयायी ह्यांनी देशाचे प्रगतिकरिता शेतकऱ्यांची पुढीलप्रमाणे सेवा केली :— हिंदुस्थानपुढें त्यांनी उत्तम व व्यापक धर्म ठेविला; इतकेंच नव्हे तर जातिसंस्था, यात्रा, व तपाचरण ह्यांवरील अंधश्रद्धेचा फोलपणा साऱ्या जगाच्या निदर्शनास आणला; बालविधवांना पुनर्विवाहाचा उपदेश करून त्यांचा दुःखभार कमी केला; वयांत आल्यावर विवाह करण्याची प्रथा लोकप्रिय बनविली; त्यांची कानडी भाषा समृद्ध बनविली, आणि लोकप्रिय व संस्कृतिविषयक भक्कम वाङ्मय निर्माण केलें; उत्साही, प्रगमनशील व श्रीमंत अशा ह्या व्यापाऱ्यांनी आपलें सर्व सामर्थ्य व शक्ति आपल्या देशाची व्यापारांत भरभराट होईल अशा मार्गानें योजिली.

[अशा] प्रकारें धर्मकार्यांत काय, समाजकार्यांत [का]य, वाङ्मयकार्यांत काय किंवा व्यापारांत [का]य, प्रत्येक चळवळीचे कार्यांत वीरशैवांनी [आ]पल्या देशाचे सर्वांगीण उन्नतीसाठी हविर्भाग [अ]र्पिला. अर्थात्, त्यांच्या सेवेचें मोल कधींहि दुर्ल-[क्षि]लें जाणार नाही किंवा विसरलें जाणार नाही.

वीरशैवधर्मोद्धारक बसव ह्यांचे स्वतःचे [वि]चार जरी कालाचे मानानें पुष्कळ पुढें गेलेले [हो]ते, तरी साधी राहणी व उच्च विचारसरणी [हे] जगजाहीर आदर्श त्यांनी आपणापुढें बाळ-[ग]ले. त्यांची अशी खात्री होती कीं, लोकांचें [धा]र्मिक जीवन हें त्यांच्या सामाजिक उन्नतीशीं [नि]गडित झालेलें आहे. राईस ह्यांचे [श]ब्दांत सांगावयाचें ह्मणजे, बसव ह्यांनी [धा]र्मिक सुधारणा करतांनाच सामाजिक क्रांति [घड]वून आणिली.

मतांच्या साधेपणाचे बाबतींत वीरशैवधर्माचें बुद्धधर्माशीं साम्य आहे, तर तात्त्विक दर्जाचे बाबतींत त्याचें हिंदुधर्माशीं साम्य आहे. त्यांत ख्रिश्चनधर्मासारखें प्रेमाला महत्व आहे; इस्लामधर्मासारखें शांति व सुव्यवस्था ह्यांना महत्व आहे. अशा प्रकारें इ. स. च्या बाराव्या शतकांत मुख्यतः कानडी व तेलगु प्रांतात एकेकाळीं उच्च ध्येयानें परिपूर्ण असा हा वीरशैव पंथ गाजत होता. नास्तिकवादाचें सीमेवर पोंचलेल्या जैनधर्माचे आगामी अनिष्ट परिणामांना तोंड देण्यासाठीच तो तसा बन-विण्यात आला होता. त्यांतील ब्राह्मणांच्या वर्चस्वास अमान्यता, व प्रौढविवाह व विध-वाविवाह ह्या गोष्टी स्तुत्यर्ह होत. हिंदु-स्थानच्या धर्मरत्नमुकुटांत ह्या आणखी एका धर्मरत्नाची उत्कृष्ट भर पडली हें सत्य आहे.

---

## वीरशैव संजीवनीच्या टपालांतील —

## मौजेची प्रश्नोत्तरें :—

**[सौ]. शां. गु. पनवेल.**

कानावरील फुगे आणि वाकडा भांग काढून [वे]णी-फणी न केली तर पतिराज रागावतात, [आ]णि तशी वेणी-फणी पाहून सासूबाई संताप-[ता]त व माझ्या वेचाळीस कुळांचा रोज उद्धार [क]रतात. तेव्हा मी यापुढे वागायचे तरी कसें ?

( आपण कानावरील केसांच्या फुग्यानीं [आप]ले कान झाकून घेण्याऐवजी पूर्ण झाकत [जा]वें. ह्मणजे आपल्याविषयीं कोण काय बोलतो [हें] आपणास मुळींच ऐकायला येणार नाहीं. )

---

**[र]. वें. गा. अमळनेर.**

बारा वर्षांच्या आंतील दहा मुलें, मी, आणि [म]ाझी, एवढा परिवार; आणि पगार मिळतो अवघा बारा रुपये. मीठ-भाकरीहि षडपोटभर मिळत नाहीं. त्यांतून दहा महिन्यांचें तान्हे मूल असतांनादेखील दोन महिन्यांनी पुन्हा नवा पाळणा हलण्याचा योगायोग आहे. काय करावें कांहीं सुचत नाहीं. नको हा जीव, मरण येईल तर बरें असें वाटतें.

( दशावताराचे जनक ह्मणून आपला आज-वरचा लौकीक यापुढें एकादश रुद्राचे उत्पादक ह्मणून सर्व जगांत गाजेल. आणि यापुढे महा-रुद्रासारखें ब्रह्मचर्यव्रत पाळून, झाडून साऱ्या वर्तमानपत्रांतील ' संततीनियमनांच्या जाही-रातीची पारायणें उभयता पतिपत्नींनी नित्यनैमित्यिकपणें वाचण्याचें ठरवल्यास, पुढील आपत्ति टळेल, आणि सुखानें मरता तरी येईल.

**म. घ. पा. सोलापूरः—**

आमचे येथील श्रीसिद्धेश्वरांचे यात्रेवर येथील म्युनिसिपालिटीनें कर बसविण्याचा ठराव केला आहे, गांवामधून निषेधाच्या सभा भरता-हेत. पण श्रीसिद्धेश्वर हें वीरशैवांचें पूज्य दैवत असल्याकारणानें प्रत्येक ठिकाणी वीरशैवांच्या सभा भरुन याबद्दल निषेध करणें जरुरीचें आहे.

( म्युनिसिपालिटी ही 'पब्लिक वूमन' असल्यामुळे वाटेल त्या रुपानें पैसे मिळवणें हा ती आपला जन्मसिद्ध हक्कच समजते. आणि कुठल्याहि म्युनिसिपालिटीनें आजवर फुसक्या निषेधाला न जुमानता सर्रास हेच उद्योग चालवले आहेत. सत्याग्रहाची साथ मिळाल्याशिवाय तिच्या या नाचरेपणाला रंग येणार नाही. जवाबमर्दांच्या जथ्यांनी सत्याग्रहाची तबलेथाप मारली कीं ती सरळ पावलें टाकायला लागेल.)

**कु. चं. भं. शहापूर**

माझ्या वडिलांनी चार महिन्यांपूर्वी एका तरुणाला माझ्या लग्नाचें वचन दिलें. परंतु आतां कांही मतभेद झाल्यावरुन माझ्याकरितां दुसरें स्थळ शोधण्याच्या ते उद्योगांत आहेत. तेव्हां अशा प्रसंगीं मी कसें वागावयाचें हें कृपा करुन कळवाल का ?

[ वडिलांच्या मतभेदांत आपला मतभेद समाविष्ट होत नसल्यास, रुक्मीणीसारखी स्वयंवरपत्रिका एकाद्या भटामार्फत अगर दमयंतीसारखी एकाद्या हंसामार्फत आपल्या प्रियकराला पाठवून त्यांत आत्महत्येचें एक कलम, लटकेंच घालायला मात्र विसरुं नका, म्हणजे सगळे कांही सरळ आणि सुरळीत होईल. खरोखर आत्महत्या मात्र करण्याच्या भानगडींत पडूं नका!

**ना. म. स्वा. खामगांव**

इतर समाजामधून जशीं विधवाविवाहमंडळे स्थापण्यांत आलीं आहेत, तसेंच एकादें विधवाविवाहमंडळ आपल्याहि समाजांत असणें अत्यंत जरुरीचें आहे असें आपणांस नाही का वाटत ?

(तरुण विधवांकरतां कुठेहि स्थळ मिळण्याची सोय असते. परंतु वयातीत, चाळीसी उलटलेल्या विधवांकडें कुणीहि लक्ष देत नाही. तेव्हा निदान त्यांची तरी आपल्या समाजमंडळानें सोय करणें अवश्य आहे. असल्या वयोवृद्ध बायकोंना संसार भुरलेल्या-मोरावळयागत, नवऱ्याला गोड वाटून पित्त भडकण्याची मुळीच धास्ती उरणार नाही.)

**अ. दा. दे. परभणी**

आमची पन्नासी उलटलेली, आणि 'ती' तिशीच्या घरांत. पण घरांत मुलबाळ नसल्यामुळे 'ती' नेहमी उदासीन असते. यामुळें क्षणभरहि सुख म्हणून नाही. तेव्हां कसें करायचें?

( आपण स्वतः बाळगुटी आणि आपल्या 'ती'ला बाळंतकाढयाचा खुराक चालू करा, आणि झोपायच्या खोलींत, पनवेलच्या आयुर्वेदिक फार्मसीचें 'सुखी संसार' हें चित्र लावायला विसरुं नका, या त्रिभुवनमान्य त्रिसुत्राधारें, आपल्या उदरीं 'त्रैमुर्ति अत्रितनयारे,'चा अवतारहि कदाचित् जन्माला येण्याची हुषखास खात्री आहे.)

**ह० रे. हा. पुणें.**

येथील शंकर नावाच्या जंगमाला सात शेर भेंडयांची चोरी केल्याबद्दल मॅजिस्ट्रेटनी दोन महिन्यांची शिक्षा दिली.

( भवति भिक्षांदेहीं करुन मूठभर पीठ मिळवण्यापेक्षां चुटकीसरसा हात मारुन दोन महिन्यांची विश्रांती करण्याचा नवा धंदा आत्मसात करणाऱ्याचे कोण कौतुक करणार नाही? नाविन्यांतच नावलौकीक आहे! )

**रा. गो. का. नाशिक.**

सोलापुरास मागील महिन्यांत उज्जयनी सिंहासनाचें महास्वामीं, सिद्धेश्वर शिवाचार्य, आणि हिमवत केदारचें महास्वामीं निळकंठ शिवाचार्य हे आले आणि तावडतोबच चार तासांचाहि मुक्काम न करतां निघून गेले. असें कां ?

( आपापसांत लाथाळी माजवून काळ्या निशाणांच्या मिरवणुकीचें स्वागत घेण्याची कला त्यांना अवगत नव्हती म्हणून त्यांनी यःपलायतेस जीवती, केलें असेल!

# लेखक व लेखनकला

लेखकः—
बंडाप्पा रेवणसिद्धप्पा
झुंजे वकील,
सोलापूर.

'वीरशैव संजीवनी'च्या चालू सालच्या सोळाव्या अंकांत 'लेखक व लेखनकला' हा लेख मीं प्रसिद्ध करून लेखकास सर्व काय गोष्टी आवश्यक आहेत व लेखनकलेच्या आंगीं किती शक्ति आहे याची थोडक्यांत रूपरेषा दिली आहे. सदहूं लेखांत जे कांहीं विचार मीं प्रगट केले आहेत त्यावरून सर्वसाधारणपणें लेखनकलेची थोडीशी कल्पना येऊन वीरशैवांतील नवीन लेखकवर्गास ती थोडीशी तरी मार्गदर्शक होईल या हेतूने माझ्या अल्प बुद्धीच्या मनास जें मुख्य मुख्य विचार सुचले ते संक्षिप्त रीतीनें मी प्रगट केले आहेत.

सदहूं लेख प्रसिद्ध झाल्यावर ता. १३-९-३७ च्या 'सुदर्शन'-च्या व चालूं सालच्या वीरशैव संजीवनीच्या अठराव्या अंकांत लेखक व लेखनकला असा मथळा देऊन श्री.शं.गो. साखरपेकर, सोरे, यांनीं एक लेख प्रसिद्ध केला आहे.

प्रथमतः त्यांनी त्यांच्या लेखांतील 'कसलेले आणि लेखनकलानिपुण श्री. बामणगांवकर, श्री. कल्याणशेट्टी वकील, बॅ. सरदार या वीरशैव लेखकांचा व त्यांचे लेखांचा मीं माझ्या संजीवनींतील लेखांत उल्लेख केला नाहीं' असें म्हणून माझेवर रोष प्रगट केला आहे व रागाचे आवेशांत 'शून्याभिमानी' हा आरोप मजवर केला आहे.

वास्तविक सदर लेखांत मी वरील तिघांचे व इतर वीरशैव लेखकांचे नांवांचा श्री. आघ-लेकर यांनी ता. १९-७-३७ च्या 'सुदर्शन'च्या अंकांत कांहीं महाराष्ट्रीय वीरशैव लेखकांचीं नांवें देऊन त्यांची वर्गवारी केली आहे असे त्यांचे नांवाचा पुनरुच्चार न करितां थोडक्यांत उल्लेख केला आहे. तीं नांवें सदर सुदर्शनचें अंकांत त्यांनीं पाहिलीं असतीं तर त्याना तीं समजलीं असतीं व मी माझ्या लेखाचे शेवटीं वीरशैवांत लेखक आहेत याची जाणीव वाचकांस होऊं लागली आहे असें ह्मटलें आहे. वीरशैवांकडून महाराष्ट्रभाषेंतील वर्तमानपत्रांतून कोणाकोणाचे लेख प्रसिद्ध होतात, कोण कोण कोणत्या वर्तमानपत्राचे संपादक आहेत, व त्यांच्या वर्तमानपत्रांतील इतर लेखकांचा दर्जा काय आहे हें वाचकवर्ग जाणतातच. मी त्यांचा दर्जा उच्च-नीच करून कशास सांगावयास पाहिजे ? निरनिराळा वाचकवर्ग आपापल्या बुद्धीनुसार त्यांचा दर्जा वेगवेगळा ठरवील इतकेंच मीं आपल्या लेखांत ह्मटलें होतें, आणि तें माझ्या प्रामाणिकबुद्धीला जसें पटतें तसें तें श्री. साखरपेकर यांच्याहि प्रामाणिक बुद्धीला पटेल असें मला वाटतें. मी माझे लेखांत लेखाचें मर्म जाणणारा वाचकवर्ग मर्मज्ञ पाहिजे असें ह्मटलें आहे. पण तो तसा नाहीं याची सत्यता श्रीं. साखरपेकरसारख्या सुज्ञ माणसां-कडून पटविली जाऊन त्यांनी माझ्या लेखाचा विपर्यास करून 'शून्याभिमानी' हा आरोप मजवर लादण्यांत त्याचें पर्यवसान करुन त्यांनी आपला उतावीळपणा जगजाहीर केला आहे ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे.

रमणीय उद्यानांत जाई, जुई, मोगरा, चमेली, गुलाब अशी नानाविध सुवासिक पुष्पें असतात व त्यांचा सुगंधहि निरनिराळा असतो. त्याच

उद्यानांत कांही कण्हेरी, जास्वंदीसारखी परिमळ नसलेली फुलेंहि असतात. तीं सर्व देवास वाहतात. देव जसा तीं सर्व धारण करितो त्याचप्रमाणे समाजरूपी देवास समाजांतील व्यक्तींनी लेखरूपाने जीं फुलें वाहिलेलीं असतात तीं सर्व समाजरूपी देव प्रेमानें आपल्या शिरावर धारण करून त्यांची आवडनिवड आपल्याशीं करीत असतोच. तशी आवडनिवड करण्यास परीक्षकांचीं बुद्धीहि तीव्र लागते. मानवी मानानें लेखकाचे लेखांतील गुणदोषाचा निर्विकार मनानें विचार न करिता अज्ञपणें लेखकांचा नंबर लावण्याचा प्रयत्न केला तर मानवी स्वभावाचा चित्रविचित्र नमुना दृष्टीस पडून त्याच्या कोत्या बुद्धीचें मात्र प्रदर्शन होईल. अशी नक्की वर्गवारी करून लेखकांचे भेद पाडणें ह्मणजे आपला बुद्धिभेद प्रगट करणेंच होय. कारण प्रत्येक फुलांतील सुवासाचा परिमळ जसा वेगवेगळा असून त्यांची खुमासहि वेगवेगळी असते त्याप्रमाणेच वेगवेगळ्या लेखकांच्या वेगवेगळ्या लेखांची खुमासहि वेगवेगळी असते.

मीं माझ्या लेखांत प्रामाणिक बुद्धीनें व निर्विकार हेतूने लेखकांकरिता ज्या गोष्टींचें वर्णन दिलें आहे त्याचा विचार करण्याचे अगर माझ्या सूचना चुकीच्या अगर त्याज्य आहेत हें दाखविण्याऐवजी अमक्या अमक्या वीरशैव लेखकांचे नांवांचा मीं पर्यायानें उल्लेख केला असूनहि तो केला नाही असें भासविण्यांत श्री. साखरपेकर हे विचाराऐवजी विकारवश झाले हें पाहून मला खेद वाटतो. मी सदहूं लेख वीरशैवत्वाच्या अभिमानानें प्रेरित होऊन वीरशैववर्गाने लेखनकलेकडे लक्ष देऊन वीरशैवांत चांगले लेखक निर्माण व्हावेत याच सद्धेतूनें लिहिला आहे. माझे 'वीरशैव लेखसंग्रहां' तील लेख हेहि सर्वसाधारण लिहितांवाचतां येणाऱ्या समाजास समजण्याकरिता सोप्या व सरळ भाषेंत लिहिलेले असून ते समाजस्थितीचे वस्तुस्थितिनिदर्शक आहेत. समाजास आरशाप्रमाणें समाजाचें स्वस्वरूप दाखवून सुधारणा घडून यावी या एकाच सद्भावनेनें प्रेरित होऊन वीरशैवसमाजाबद्दल मला वाटत असलेला अभिमान हेंच एक कारण मला सदहूं लेख लिहिण्यास प्रवृत्त करण्यास कारणीभूत झालें हें सदर लेखावरून दिसून येईल. मी कांही उत्तम लेखक नाही. मी केवळ विद्यार्थी या दृष्टीने समाजहितप्रेरित होऊन माझे विचार लेख लिहून प्रदर्शित करण्याचा प्रयत्न करीत आहे. माझे लेख कोणत्या वर्गात घालावे याची वर्गवारी करण्याची कुशाग्रबुद्धि दाखविण्यापेक्षा त्यांतील वस्तुस्थितीचें जें वर्णन दिलें आहे त्याचें मनन करून समाजसुधारणेचे कामीं त्याचा उपयोग करण्याची कुशाग्रबुद्धि दाखवावी व आपल्या वीरशैवसमाजाची उत्तरोत्तर होत असलेली अवनति शिघ्र थांबवावी एवढाच काय तो माझ्या लेखसंग्रहांतील व इतर लेखांचा मथितार्थ आहे.

श्री. बामणगांवकर, श्री. कल्याणशेट्टी वकील, श्री. बॅ. सरदार, यांचेबद्दल मला प्रेम व आदर वाटत आहे. श्री. बामणगांवकर हे वीरशैवांतील ज्ञानवृद्ध, लेखनव्यवसायवृद्ध, आहेत. ते उत्तम लेखक, वक्ते व संपादक आणि लेखनकलानिपुण आहेत हें मीच काय पण सर्व महाराष्ट्रांतील वीरशैव व वीरशैवेतर लोकहि जाणतात. सूर्याला कांही मशालीनें दाखवावें लागत नाही. त्यांचे पंक्तींत श्री. साखरपेकर यांनी आपल्या बुद्धीप्रमाणें श्री. कल्याणशेट्टी व श्री. बॅ. सरदार यांस बसविलें तरी त्याबद्दल मला अभिमान व आनंदच वाटत आहे. कारण माझ्या वीरशैवसमाजांतील लेखक हे आज ना उद्या श्री. बामणगांवकरांसारख्या उच्च दर्जाचे व्हावेत हीच माझी भावना केव्हांहि स्वाभाविकच असणार. पण अशी नुसती वर्गवारी करण्यापेक्षा लेखकांच्या लेखांतील गुणदोष दाखवीत गेल्यास लेखकास एक प्रकारचें शिक्षण मिळून आपल्या लेखांत सुधारणा करण्याची त्यास संधि मिळेल असें माझें मन मला सांगते.

श्री. आंबळकर त्यांच्या लेखांत माझें नांव चुकून विसरले (मुद्दाम नव्हे) तसें मी सुद्धां बहुत चुकलों असें अविचारानें चुकीचें विधान श्री. साखरपेकर यांनी ता. १९-७-३७ या 'सुदर्शन'चा अंक न पाहतां व 'वीरशैव संजीवनी'तील सोळाव्या अंकांतील माझ्या लेखांत श्री. आंबळकर यांनी सदर 'सुदर्शन'चे अंकांत कांही वीरशैव लेखकांची नांवें व वर्गवारी दिली आहे या वाक्याचा अर्थ लक्षांत न घेतां आपल्या संजीवनींतील लेखांत केलें आहे.

कै. चिपळूणकर, आगरकर, लो. टिळक, इत्यादि लेखकवर्गास लेखनकार्य करावयास प्रेरणा व स्फूर्ति आपण शोधून पहिल्यास त्यांच्या ठायीं असलेली समाजहिताची खरी कळकळ, निःस्वार्थबुद्धि व धैर्य हेंच होय. त्यांना समाजाचे दोष सहन झाले नाहीत, ते दोष सुधारण्यासाठी व सुधारणा करण्यासाठी तरवारीच्या धारेसारखी लेखणी त्यांनी उचलली, समाजाचे दोष पटवून देण्यास लेखकाचे आंगीं धैर्य पाहिजे वगैरे गोष्टी खऱ्या आहेत. त्यांचें कार्य नुसती बडबड करण्याचें अगर सभा भरवून ठराव पास करण्याचें तोंडी धैर्य नव्हतें; तर त्यांनी आपापली मतें धैर्यानें प्रतिपादन केली. इतकेच नव्हे तर धैर्यानें आचरणांत आणिली व अनेक प्रकारचे हालअपेष्टा भोगिल्या. पण ह्या प्रकार वीरशैवांमध्यें आढळून येत नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. ह्मणूनच लेखकास सत्याचा आधार असावे असें मीं संजीवनींतील माझ्या लेखांत प्रतिपादन केलें आहे. एरव्हीं परिणामकारक वाङ्मय तयार होत नाहीं. लेखकानें आपल्या लेखाचे साधनें कोणतीं, समाजाची रचना, धर्म, इतर लोकांशीं संबंध वगैरे विषयांचें ज्ञान संपादन करून घेऊन नंतरच लेख लिहावेत; तसेंच प्राचीन वाङ्मय, स्वधर्म, स्वभाषा यांचेंहि ज्ञान असणें अवश्य आहे, व वीरशैव लेखकांनी वेद, उपनिषदें, कै. रा. ब. वारद यांनी मराठींत प्रसिद्ध केलेले धर्मग्रंथ, शरणांची वचनें, वगैरे सर्वांचाच सूक्ष्म अभ्यास करून त्यांचा खरा अर्थ विपर्यास न करितां लोकांस समजावून सांगणें हें त्यांचें कर्तव्य आहे; एकाच ध्येयानें आणि स्वयंस्फूर्तीनें वीरशैव लेखक लेख लिहितील तरच उत्तम ग्रंथ निर्माण होऊन हृदयस्पर्शी वाङ्मय निर्माण होईल हाच माझ्या संजीवनींतील लेखाचा निष्कर्ष आहे. वीरशैवेतर धर्मलेखकांनीं धर्मांचे परिवर्तन होऊं नयें ह्मणून जसे आटोकाट प्रयत्न केले तसेच वीरशैव लेखकांकडूनहि व्हावेत असेंहि मी माझ्या लेखांत सूचित केलें आहे.

त्यानंतर श्री. साखरपेकर यांनीं स्वधर्म-स्वसंस्कृतीसाठी वगैरे भारताचार्य वैद्य, कै. वि. ल. भावे, भक्तपरायण पांगारकर, वगैरे लेख लिहिले आहेत व त्यांपैकीं कांहींनीं प्रसंगीं अन्य पंथाची ( वीरशैव सुद्धां ) नालस्ती केली आहे असें त्यांनीं लिहिलें आहे. तशा तऱ्हेची नालस्ती त्यांनीं केली असल्यास त्यांना प्रत्युत्तर देऊन त्यांच्या लेखांचें खंडण करणें सयुक्तिक आहे असा मीं माझ्या लेखांत उल्लेख केला आहे. ज्यांच्या नजरेखालून ते लेख गेले असतील व ज्यांनीं वीरशैवधर्मग्रंथांचा अभ्यास केला आहे त्यांनीं अभिमानानें उत्तर देण्यास पुढे सरसावावें. विद्यार्थीदशेंत वीरशैवधर्मविषयक वाङ्मयाचा अभ्यास करण्याची संधि वीरशैवविद्यार्थ्यांस मिळाली तर बरेंच. परंतु लेखनकलेच्या विद्यार्थिदशेंतच ज्या ज्या विषयावर लेख लिहावयाचे त्या त्या विषयाचें ज्ञान, मग तें धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक अगर इतर बाबींचें असो, पूर्णपणें संपादन करावें, तरच उत्तम वाङ्मय निर्माण होईल. प्राचीन वीरशैव व इतर वाङ्मय संशोधन करून थोडक्यांत वीरशैवधर्माचें खरें रहस्य मराठींत उपलब्ध व्हावें हीच माझीहि पण इच्छा आहे. या कामाकरितां श्रीमहानुभाव बसवेश्वरांच्या 'वीरशैवमतमंडळाप्रमाणें 'वीरशैव धर्मग्रंथ संशोधक व प्रसारक मंडळ' स्थापन करून निर्विकार बुद्धीनें, प्रामाणिकपणें, आस्थेनें व चिकाटीनें त्या कामीं प्रयत्न होऊन वीरशैवधर्माचें खरें सारामृत मराठींत प्रसिद्ध झालें पाहिजे.

हल्लीं त्या दिशेने प्रयत्न न होतां आपापसांत कलह करण्याचें, मी थोर तूं थोर ह्मणण्याचे विचारांचा परिणाम सबंध निष्क्रिय बनण्यामध्यें व समाजांत फाटाफूट होऊन वेगवेगळया व्यक्तींच्या आंगीं असलेल्या वेगवेगळया गुणांचा परिपोष न होतां व समाजास त्या गुणाचा उपयोग न होतां दुराग्रहामुळें ते गुण वायां जात आहेत व सर्वांस मान्य होईल असें वीरशैवसारामृत तयार होत नाहीं ही मोठया दिलगिरीची गोष्ट आहे. या घातक दुर्गुणांचा त्याग करून आपले मतभेद बाजूस ठेवून वीर–शैवसमाजाच्या हिताकरितां व उत्कर्षाकरितां एकदिलानें प्रयत्न करीत गेल्यास या समाजा-इतका भाग्यवान् समाज दुसरा कोणीहि नाहीं असें नमूद करण्यास आनंद वाटेल. परमेश्वर हें कधीं घडवून आणील तें आणो. तूर्तचा काळ मात्र वरील कलहादिकांमुळें फार संकटाचा आहे हें मात्र खरें.

वरील सर्व गोष्टींचा विचार करून श्री. साखरपेकर यांनीं मनोविकारास बळी पडून पोलिसी अगर पॉलिसी वृत्ति धारण करून माझ्यावर ' शून्याभिमानी ' हा जो वृथा आरोप त्यांनी केला आहे त्या आरोपांतून न्यायाधिशाची शांत, समतोल, निःपक्षपाती न्यायी बुद्धि धारण करून त्यांनीं केलेला आरोप आपल्याकडे परत घेऊन ते मला निर्दोष ह्मणून मुक्त करतील असा माझ्या प्रामाणिक बुद्धीस भरंवसा वाटतो.

श्री. साखरपेकर यांनीं 'सुदर्शन'च्या अंक ४६ व ४७ मध्यें ' वीरशैव मराठी वाङमयाची साधनें ' यावर लेख लिहून व ' लेखक व लेखनकला ' या त्यांच्या लेखांतहि कांहीं माहिती उद्धृत करून आपल्या ज्ञानाचा वाचक-वर्गास लाभ करून दिला आहे त्याबद्दल वाचक–वर्गांबरोबर मीहि त्यांचा आभारी आहें. आपल्या ज्ञानाचा उत्तरोत्तर त्यांनीं आपल्या समाजास लाभ करून द्यावा अशी त्यांस प्रेमळ विनंति आहे.

---

## आधुनिक योगीराज बसवेश्वर

बेट बालकुंदा (जि. गुलबर्गा )बेट बालकुंदा हे एक कल्याणपासून दोन मैलावर छोटेसें गाव आहे. येथे गेल्या फाल्गुन महिन्यांत गोकाक तालुक्यांतील कोळवी गांवचे श्रीशरण बसवण्णाप्पा कोळवी यांचे आगमन झालें. सदर शरण बसवण्णाप्पा यांनी आपल्या दैवी शक्तीची प्रचीति अक्कलकोट संस्थानांतील नागणसूरकरांनाहि दिलेली आहे. त्यांचें आगमन झाल्यावर बालकुंदा गांवातील लोकांनी त्यांचा सत्कार केला. परंतु पुढे त्यांनीं गिरप्पा धनगर यांच्या पाण्यानी स्नान केल्याबद्दल ग्रामस्थांनी त्यांच्यावर बहिष्कार घातला. परंतु शरणांच्यां अद्‌भुत तपोबलानें तेथील विहीरहि कोरडी पडल्याचें पाहून गावचे लोक शरणांना शरण गेले. तेव्हा कोरडया पडलेल्या विहिरीस पुनः पाणी पूर्ववत् आलें. सर्वांनी शरणांना धन्यवाद दिले. पुढे चैत्र शु॥ २ रोजी बालकुंदा येथील पुरातन श्री. बसवेश्वराच्या देवळाच्या पूर्वेस तीस गज अंतरावर नीलम्मा (श्री बसवेश्वरांची धर्मपत्नी) यांची गुहा आहे असें श्रीशरण बसप्पानी सांगितल्यावरून हजारों लोकांना ती जागा खणण्यास लावण्यांत आलें. हें खोदकाम बरेच दिवस चालू राहिलें. मजुरांच्या मजूरीत हजारों रुपये गेले. याशिवाय दररोज पांच-सातशें लोकांचा दासोह सुरु होता. इतका खर्च श्रीशरणबसप्पा कसे करतात याचें सर्वांना आश्चर्य वाटतें. असो. अशा रीतीनें हल्ली नीलम्माची गुहा उघडण्यांत आली असून, प्रतिअमावास्येस तेथे मोठी यात्रा भरूं लागली आहे. भजन, कीर्तन, नाटक, कुस्त्या, वाद्यें, वगैरे कार्यक्रम होत असतात. आलेल्या सर्व मंडळींचा जेवणखाणेचा खर्च, इनाम, बक्षीसें, वगैरेचा खर्च कोळवी श्रीशरण बसवण्णाप्पा कसे करतात याचें सर्वांना आश्चर्य वाटतें. गेल्या नागपंचमीच्या दिवशीं श्रीशरण बसवण्णाप्पांनी शेकडों माताभगिनींना चोळखण लुगडी वगैरेंचा आहेरहि केला. अनेकांचे असाध्य रोगहि व विशेषतः महारोगीहि शरणांनी दुरुस्त केले आहेत.

त्यांच्या अद्‌भुत शक्तीबद्दल कोणास संशय असल्यास त्यांनी बालकुंदा येथें समक्ष येऊन खात्री करून घ्यावी असें चन्नप्पा सिद्रामण्णा मठ बालकुंदा हे कळवितात. [ — सु० ]

# श्रीमज्जगद्गुरु स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

## संदेश ३ रा.

जगाच्या कल्याणा कंदर्पविभूती ।
देह समर्पिती, परोपकारे ॥

( —कंदर्पोपनिषद् )

संपादक शिरोमणी, यांस, स्वामी सन्निधीहून कोट्यानकोटी शुभाशीर्वाद, उपरी:—

नुकताच आमच्या तप:सामर्थ्यानें जो एक अद्भुत चमत्कार घडून आला, तो अतिशय महत्वाचा आणि आमच्या दिगंत कीर्तीचा पुरावा ह्मणून आह्मी आपला आज अधिक वेळ न घेतां त्या चमत्काराचीच इत्थंभूत हकीकत आपणास विदित करीत आहोंत.

परवांचा, गुरुवार वाटतं ! हो गुरुवारचाच दिवस होता. आह्मी कंदर्पोपनिषदावर आमच्या शिष्यवर्गांना प्रवचन सांगत बसलों होतों. श्रोतृवृंद अत्यंत तल्लीनतेने डोळे मिटून आमच्या प्रवचनामृताची माधुरी कान उघडे ठेवून चाखीत होता. इतक्यांत बाहेर कांहींतरी गलबला ऐकूं येऊं लागला. काय आहे हें, ह्मणून सर्व श्रोते आणि आह्मीदेखील आपलें प्रवचन आटोपतें घेऊन, कसली धांदल आणि कसला गोंधळ ह्मणून तारदृष्टीनें पाहूं लागलों आणि एकतानतेनें ऐकूं लागलों.

इतक्यांत आमच्या कारभाऱ्यांची लसुणलिंग शास्त्र्यांची चिमुरडी पोर, मिरचीताई, धांवत पळत येऊन आह्माला सांगायला लागली, 'महाराज, बाहेर बघा तर कशी गम्मत आहे ती! ' अग पण गम्मत कसली, तें तरी सांगशील कीं नाहीं, कां उगीच आपली गम्मत ह्मणून टाळ्या वाजवून नाचते आहेस वेड्यासारखी,' असा आह्मी तिला प्रश्न केला. पण ती कसली वस्ताद ' अहो ते तुह्माला सांगून नाही कळायचें, तुह्मी प्रत्यक्षच पहा तरी,' असे ह्मणून आमचा हात धरून जवळ-जवळ ओढीतच आह्माला ती आमच्या मठाच्या महाद्वाराकडे घेऊन आली, इतर मंडळींचाहि महाद्वारांत एकच घोळका जमला आणि पहातो तों काय!

एका मस्तुकड्या कुत्र्याच्या गळ्यांत उकीरड्यावरील घाणमातीनें बरबटलेलें एक मोडकें टोपल्याचें शिप्तर कोणीं तरी अडकवलेलें; आणि त्याच्या पाठीशीं 'अरे सिंह आला रे सिंह आला,' ह्मणत कांही वात्रट कारटीं एक

घाणेरडे टीनाचें टीप मारे ढोलग्यागत बड-वीत सुटले आहेत, आणि तें कुत्रें आधींच खरजेनें पिडून, त्याच्या मस्तकावर कसली तरी जखम झालेली, आणि त्यामधून किडयांची बुळबुळ गळती लागलेली ! भला-बुरा, स्त्री-पुरुष मुलेंबाळे, जनावरे, वगैरेचा, कांहीं एक विचार न करतां तें कुत्रें दिसेल त्याला चावायला धावत आहे, आणि त्याला कुणी लाथा मारताहेत तर कुणी धोंडे मारुन पिटाळताहेत, तर कुणी त्याला बड-ग्याचा प्रसाद देत आहेत, अशी ती एक आमच्या मिरचीबाईची गम्मत होती. होतां होतां शेवटीं बिचारें तें कुत्रें भुंकत-भुंकत, बिचाऱ्याला धड भुंकताहि येईना, आमच्या दाराकडे येऊं लागलें, तेव्हां कांहीं मंडळी त्याला हाड्हूड करुन पिटाळूं लागली. मिरची तर चटकन उठून आमच्या गळ्याला बिलगली. तेव्हां त्या कुत्र्याची दीन-वाणी स्थिति पाहून आमच्या मंडळींना आम्ही धीर देऊन सांगितले, अरे असें घाबरतां कां ? ही टारगट पोरें याला सिंह सिंह ह्मणून याच्या पाठीशीं लागलीं असलीं तरी हा सिंह नव्हे, हें बिचारें कुत्रें आहे, त्याला इतकें भिण्यांचें कांहीच कारण नाही. जरी हें पिसाळलेलें असलें तरी याची विषबाधा आपणाला मुळींच बाधणार नाहीं. आमच्या गुरुजींच्या कृपेनें असे कांही प्रभावी मंत्र आह्माला प्राप्त झाले आहेत कीं चुटकीसरसें या कुत्र्याला ताळयावर आणतां येईल. आणि—

'तुझे दारीचा कुतरा । नको मोकलूं दातारा,'

असें ह्मणत, 'हें आपण देऊं ते तुकडे चघ-ळीत आपले पाय चाटूं लागेल. तुह्मा-लोकांना चमत्कारच पहायचा असेल तर हा पहा,' असें ह्मणून आह्मी जरा पुढें सरकलों, पण कोथींबीर बाईनी आह्माला मागे ओढून बजावलें कीं, 'नका, नका, महाराज, तें पिसाळलेलें कुत्रें आहे, आपणालाहि तें चावा-यला मागें पुढें पहाणार नाही, त्याला पिटाळून लावा इथून! हाणा त्याच्या पाठींत सोटा!' असें ह्मणून खरोखरच एक धोंडा उचलून त्याचा कपाळमोक्ष करायला ती तयार झाली. पण पण आह्मीं तिला तसे कांही न करुं देतां

'सर्वांभूतीं एकची प्राण । श्वानसुकर समसमान
दया जयाचें भूषण । तोची जाणें धर्मात्मा '
(कंदर्पोपनिषद्).

असें सांगून त्या केविलवाण्या कुत्र्याकडे कृपादृष्टीनें पाहताच तें चांगलें गुबगुबीत आणि गलेलठ्ठ श्वान सर्व व्याधीपासून मुक्त होऊन आमचे पाय चाटीत असल्याचें सर्वांच्या प्रत्य-याला आलें. आह्मी त्याचे पाठीवरुन हात फिर-वताच त्या श्वानाचें मनुष्यप्राण्यांत रूपांतर झालें पण त्याचें तोंडच तेवढें कुत्र्याचें राहिलें. असें कां ? ह्मणून आह्माला विचारलें असतांना, आह्मीं सांगितलें कीं, इतक्यातच याला पूर्णपणे मनुष्य बनवण्यात मौज नाहीं, कांहीं माणु-संकीची लक्षणें आमच्या सान्निध्यांत राहून जर हा शिकला, आणि कुत्र्यासारखें भुंकणें, आणि वाटेल त्याला चावा घेणें हे दुर्गुण जर यानें टाकल्याचें आमच्या प्रत्ययास आलें तरच याला पूर्णपणे मनुष्य बनवण्यांत येईल. आणि जर कां हे पूर्वीसारखेंच पिसाळलेलें राहिलें तर पुनश्च याला शाप देऊन त्याचें पूर्वयोनींत रुपां-तर करुन त्याचा कायमचा कपाळमोक्ष करणें कांहीं कठीण नाही. पाहूं या काय काय चमत्कार आणखी पुढें घडून येतात तें

शुभं भवतु. इति शुभाशीर्वादम् —

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ आक्टोबर १९३७ ( अंक २०वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. ‖ किरकोळ अंकास २ आणे

वीरशैव समाज सार्वजनिक गणेशोत्सवांत



अचाट शक्तींचे प्रयोग करणारे प्राणाचार्य खोडे.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति आश्विन शु० १० शके १८५९ ( अंक २० वा.

## अमृत बिंदु

प्रपंचाकरतां पैसा आवश्यक असला तरी
सदासर्वदा धनसंचयार्थ इष्टानिष्टतेचा
कांहींच विचार न करितां,
कपटाचरणाने वा अन्या-
यानें, पैशाला
परमश्रेष्ठ
परमेश्वर समजून,
अहर्निश द्रव्यार्जनांतच -
आयुष्याची परिमिती
समजणाराला शांतिसुखाचा
लाभ स्वप्नांत तरी होईल का ?

बसवदेव

# कै. आप्पासाहेब वारदांचें स्मारक

सोलापूरचे सुप्रसिद्ध नागरीक आणि अखिल वीरशैवांचे निसर्गदत्त पुढारी कै. रा. ब. आप्पासाहेब वारद ह्यांच्या स्मारकाची अपूर्ण राहिलेली योजना पूर्ण करण्याचा संकल्प सोलापूरच्या नागरिकांनी व वीरशैव पुढाऱ्यांनी अलीकडे सोडला हें वाचून आह्माला अतिशय आनंद झाला आहे. जी गोष्ट ह्यापूर्वीच व्हावयास पाहिजे होती ती आज कां होईना पण पूर्ण करण्याचा संकल्प सुटला ह्याबद्दलच आनंद मानला पाहिजे.

कै. आप्पासाहेब, ज्याला गर्भश्रीमंत ह्मणतात अशा घराण्यापैकीं नव्हत. त्यांचे चुलते कै. चनबसप्पा वारद हे कांही व्यापार करीत. त्यांचीं रु. ५० हजारांची इस्टेट हें कै. वारदांचें खरे भांडवल. त्या भांडवलावर व परमेश्वराने दिलेल्या बुद्धीवर त्यांनी आपला व्यवहार उभारला आणि आप्पासाहेबांनी ' व्यापाऱ्यांचा राजा ' असा बहुमान मिळवून घेतला.

लक्षावधि रुपयांच्या उलाढाली व लक्षावधी रुपयांचा दानधर्म त्यांच्या हस्तें त्यांच्या हयातींत घडला ही गोष्ट सर्वत्र महशूर आहे. अर्थात् अशा प्रकारें ज्यांचें जीवन-आयुष्य जातें अशा पुरुषाच्या सहज उपकारावर अनेक कुटुंबे वाढतात, जगतात, व लौकिकाला चढतात. आप्पासाहेबांचे ज्यांचेवर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष उपकार झाले आणि ज्यांच्या आयुष्याचा उद्धार झाला असे अनेक नागरिक खुद्द सोलापूर शहरांतच आहेत व गेल्या वीस वर्षांपूर्वी तर ते अत्यंत चांगल्या स्थितींत होते. ह्यांत नुसते वीरशैवच आहेत असें नव्हें तर अनेक वीरशैवेतरहि आहेत.

उपकारकर्त्याच्या ऋणांतून मुक्त होणें शक्य नाही पण उतराई होण्याची जाणीव आपल्या ठिकाणी आहे एवढें जरी आप्पासाहेबांनी उपकृत केलेल्या लोकांना वाटलें असतें व त्यांनी सामर्थ्यानुरूप कांही दिलें असतें तर आप्पासाहेब वारदासारख्या दैदिप्यमान वीरशैवरत्नाचें स्मारक सोलापूर शहरानें ह्यापूर्वीच उभारलें असतें. सोलापुरांतील नुसत्या वीरशैवसंघांत जरी ही प्रेरणा झाली असती तरी हें कार्य ह्यापूर्वीच तडीस गेलें असतें. परंतु हयगय झाली आणि हें कार्य मागें पडलें. ह्याला कारणें अनेक असतील ही गोष्ट आह्मी मान्य करतों; पण त्या कारणांत आह्मा वीरशैवांतील असंघटित वृत्ति हें एक कारण आहे हें मात्र नाकारतां येत नाही.

सोलापूर शहरांतील कै. आप्पासाहेबांच्या कोणत्याहि चाहत्यास कोणत्याहि सबबीवर कोणताहि दोष देण्याची आमची इच्छा नाही. परंतु तेथील वीरशैवांत असंघटितपणाचा दोष आहे. हा दोष तेथेंच आहे व इतरत्र नाही असें

नाही. सोलापूर हें महाराष्ट्रांतील वीरशैवांचें केंद्र असून, तेथूनच महाराष्ट्रांतील वीरशैवांना चालना मिळते. तशांत कै. आप्पासाहेब वारदांनी वीरशैवग्रंथमाला प्रसिद्ध केली नसती, संस्कृतपाठशाळा चालविली नसती, आणि १९०७ साली वीरशैव महासभेचें अधिवेशन भरविलें नसतें, तर आह्मा महाराष्ट्रांतील वीरशैवांना आज वीरशैव ह्मणवितां आलें असतें कीं नाही ह्याची आह्माला तरी शंकाच आहे.

निदान आपण वीरशैव आहों व वीरशैवांकरिता आपणाला कांहीं ना कांहीं तरी कर्तव्य आहे ही प्रेरणा आह्माला तरीं कै. आप्पासाहेबांच्या ह्या उद्योगामुळेच मिळाली, हें कबूल करितां येत नाही. सहवास व आश्रय ह्याचा जरी आह्माला लाभ झाला नव्हता तरी स्फूर्तीला कारण त्यांचेंच कर्तृत्व झालें. हा उपकार लहानसहान नसतो. सोलापूर, बार्शी, विजापूर, मुंबई, वगैरे भागांतील कित्येक वीरशैवांना आप्पासाहेबांमुळें प्रत्यक्ष जीवन लाभलें आहे. त्यांनी लौकीक व समृद्धिसुख उपभोगलें आहे. अशांनी अशाच्या स्मारकाला हातभार लावण्यास पुढे येणें हें त्यांचें पहिलें कर्तव्य होय. पण आता आप्पासाहेबांच्या निधनाला पुष्कळ वर्षे लोटल्या. त्यांच्या अनुयायीवर्गांतहि उलटापालट झाली. तरी जाणीव असणे हें सद्भावनेचें लक्षण असतें. मी शिवाचीं कोणत्याहि प्रकारें प्रतारणा करणारा नव्हे हें दाखविणें ही ह्यांत सद्वृत्ति आहे.

पूर्वीच स्मारक झालें असतें तर आजच्या नागरिकांच्या वडिलानें कदाचित् रु. १०० दिले असते. आज त्या नागरिकाचा लेक जिवंत असेल, निदान नातु असेल; त्यानें एक दिवस उपाशी राहून वडिलाच्या व आजाच्या शिरावरील ऋण फेडावें ह्मणून दोन आणें दिले तरी स्मारक उभारलें जाईल. परंतु पूर्वीचें समाधान आज नाही. तरी पूर्वीचा असंघटितपणा आज आहेच. सोलापूर शहराला — तेथल्या व्यापारपेठेला, भूषणभूत असा नामांकित नागरिक लाभला, आणि तोहि वीरशैवसमाजाला लाभला, ह्मणून प्रत्येक हाडामासाच्या वीरशैवाच्या नसानसांतून कै० आप्पासाहेब माझे होते व मी त्यांचा आहे ही भावना तात्काळ प्रगट झाली असती तर हें स्मारक केव्हांच झालें असतें. आजहि जरी ही भावना प्रगटित झाली तरी स्मारक यशस्वी व्हावयास वेळ लागणार नाही. संघटितपणाला समाजांत ह्या निष्ठेची प्रथम आवश्यकता असते. ती पूर्वीहि कमी होती, व आज तर त्याहून कमी. तथापि जो कांहीं अंश निष्ठेचा जागृत आहे त्याचाच फायदा घेऊन स्मारकाची उभारणा तात्काळ झाली तर निष्ठेच्या आजच्या बीजाचाच वृक्ष होईल व सर्व वीरशैवसमाज संघटित करण्याचें बीज पेरलें असें पुण्य स्मारक-कमिटीला लाभेल.

स्मारकासंबंधी आदर असला, तें उभारलें जावें अशी इच्छा असली, त्यास मदत करावी ही मनांत तळमळ असली, तरी अमका ह्यांत कर्ता आहे ना मग तो येईल माझ्याकडे, आल्यावर त्याने माझें कोणतें बरें केलें वा त्यानें मला अमक्या कार्यांत कां मदत केली नाही हें मला त्यास विचारतां येईल अशी एक भावना कांही मदत करूं इच्छिणारांच्या मनांत उत्पन्न होत असते. ही भावना वाईट आहे. मुख्य हेतु बाजूस राहून दुय्यम हेतूला ह्यांत प्राधान्य मिळतें. बरें, मदत घेणारे जे असतात त्यांपैकी कांही लोक असे असतात कीं, अमका अमुक वृत्तीचा आहेना, तर त्यांचा पैसा न चालेल ह्मणून तोहि ध्येयच्युत होत असतो. तात्पर्य काय कीं, काम करणारे व कामाला मदत करूं इच्छिणारे ह्या दोघांतील ध्येयनिष्ठा नाहीशी होऊन जेव्हा व्यक्तिनिष्ठा बळावते तेव्हा कार्यास विघ्न येते. ह्याच स्वरूपाच्या विघ्नामुळें स्मारक लांबणीवर पडलें असलें पाहिजे.

आणि आज ज्या अर्थी स्मारककमिटी नेमून पुन्हा कार्य सुरू झालेलें दिसतें त्या अर्थी कै. रा. ब. आप्पासाहेब वारदांचें उपयुक्त उत्साहवर्धक आणि ध्येयसूचक स्मारक सोलापूर शहरीं लवकर उभारलें जाईल अशी आह्माला पूर्ण उमेद आहे.

कै. आप्पासाहेबांविषयी ज्यांना ज्यांना आदर आहे, ते सोलापूरचे आदर्श नागरिक ह्मणून ज्यांना आदर आहे, त्यांनी जातीपंलीकडे दृष्टि देऊन इतरांनीहि आश्रय दिल्यामुळे ज्या राष्ट्रीयवृत्तीच्या पुरुषांना त्यांच्याविषयी आदर आहे, ते वीरशैवांचे श्रेष्ठ नेते, त्या समाजाचें एक प्रणेते व कल्याणकर्ते ह्मणून ज्यांना आदर आहे, त्यावीरशैवांनो—मग तो वीरशैव महाराष्ट्रांतला असो कीं कर्नाटकांतील असो, तो सोलापूरांतील असो वा बार्शी, कोल्हापूर, पुणे वा उमराकतीकडचा असो, त्यानें हे माझ्या समाजाच्या उत्कर्षाचें ध्येयसूचक प्रातिक आहे ह्मणून ह्या स्मारकाला आपणहून हातभार लावला पाहिजे.

'वीरशैव संजीवनी' ने पूर्वी आप्पासाहेबांचा उत्कर्षकाल पाहिला आहे. त्यांच्या कैलासवासाच्या निधनवार्तेवर दुःखाची बेलफुले अश्रुसिंचनाच्या रूपानें वाहिलेली आहेत. त्या महाभागाचें स्मारक होतें हें ऐकून 'संजीवनी'ला अत्यानंद झाला आहे. ह्या स्मारकाला 'संजीवनी' तर्फे रु. २५ आजच्या प्रसंगी आह्मी जाहीर करतों. 'संजीवनी' पंधरवाड्याचा पोटगी खर्च भागविण्याला समर्थ नाही हें जरी खरें, तरी एका पंधरवाड्याचा अर्धे उपास करून ह्मणजे एका अंकाचे अर्धे नुकसान सहन करून हे रु. २५ स्मारककमिटीला देणार आणि सर्वांनी असाच देणग्यांचा वर्षाव करून हें स्मारक तात्काळ उभे करण्यास स्मारक कमिटीस समर्थ करावें.

अनेक गुरुमूर्ति, विरक्तमूर्ति आप्पासाहेबांनी राजपदाला पोंहचविल्या आहेत. त्यांनी स्वतः व आपल्या शिष्यवर्गाकडून असाच देणग्या देवविल्या तर स्मारक लवकर कसें उभारलें जाणार नाही? सचोटीनें नवी दृष्टि धारण करून लक्ष्मी कशी प्रसन्न करून घ्यावी, नीतिमान व भूषणभूत असे नागरिक कसें बनावें, आणि लक्ष्मीचा उपयोग गरीबांचा उत्कर्ष करण्याकडे व गुणी जनांचें पूजन करण्याकडे कसा करावा हें आप्पासाहेबांच्या चरित्रक्रमानें शिकविलें आहे. प्रत्येक शहरास व गांवाला जर असा आदर्शभूत वीरशैव नागरिक मिळाला तर वीरशैवधर्माचें, समाजाचें कल्याण झालें व तो समाज उत्कर्षाला चढला असें चित्र नाही कां दिसणार ? असे वारद आजहि ठिकठिकाणी असतील, ते जागे होऊन जर कै. आप्पासाहेब वारदांच्या स्मारकार्थ धावत येतील, तर अनेक वारद सर्वत्र पसरलेले असल्याचें संघटित चित्र दिसूं लागेल, व त्यांच्यापासून त्यांच्या गांवासहि धन्यता लाभेल. गुरु, लिंग, जंगम आणि प्रसाद ह्यांत समरस होऊन शिवमय होऊन रंगणारे आपण वीरशैव ही शिवमय वृत्ति आपल्यांत बिंबली असेल तर हें शिवपूजन आहे, समाजरूपी समाजाचें शिवपूजन आहे, असें समजून ह्या स्मारकाला मदतीचा वेल उचलला पाहिजे. आणि प्रत्येक वीर असा आदर्शवत् पुरुष होईल हें चिंतिलें पाहिजे. ह्या स्मारकांत भावी समाजाचें चित्र आहे ह्मणून हें स्मारक जितक्या लवकर तयार होईल तितक्या लवकर तयार व्हावें असें आह्माला वाटतें.

# जाहीर सूचना.

येथीत ग्रामदैवत श्रीसिद्धेश्वरचे दरसालचे मकरसंक्रांतीचे यात्रेचे वेळीं येथील गड्डयावर भरणाऱ्या यात्रेवर कर बसविण्याबाबत येथील म्यु. कडून श्रीसिद्धेश्वर देवस्थानचे प्रेसिडेंटकडे ता. २७-२-३७ रोजीं पत्र पाठवून देवस्थानच्या पंचांच्या कांहीं सूचना असल्यास त्या कळविण्यास लिहिलें होतें. त्यावरून ता ३-४-३७ रोजीं देवस्थानची जनरल मीटींग भरून सदरहू यात्रेवर म्यु. नें कर कां बसवूं नये, याबद्दल खालील कारणें ता. १४-४-३७ रोजीं म्यु. कडे देऊन माहिती पुरविली आहे. तरीसुद्धां वरील बाबतींत सोलापूर म्यु. कडून सदरहू यात्रेवर कर बसविण्याबाबत ता. १८-८-३७ रोजीं (कास्टींग व्होटच्या आधारानें-सभासदांची समसमान मतें पडल्या वेळीं अध्यक्षांचे जादा मतानें ) ठराव पास करण्यांत आला आहे. ह्मणून सार्वजनिक जनतेच्या माहितीसाठीं सदरहू कर बसविण्याविरुद्ध देवस्थाननें दिलेल्या कारणांचा तपशील खालीं दिला आहे. तीं कारणें येणेंप्रमाणें.

१ म्युनिसिपल सबकमिटीच्या रिपोर्टांत पंढरपूर, नाशीक, त्र्यंबकेश्वर, आळंदी, जेजूरी, या ठिकाणीं म्यु. नें यात्रेवर कर बसविला आहे. त्याप्रमाणें सोलापुर म्यु. नेंहि यात्रेवर कर बसवावा असा अभिप्राय दिलेला आहे. त्यावर आमचे ह्मणणें असें आहे कीं, सदरी ठिकाणें नुसती क्षेत्रेंच ह्मणून प्रसिद्ध असून यात्रेंच्या निमित्त होणाऱ्या व्यापाऱ्यावर तेथील लोकांचे व म्यु. चें उत्पन्न अवलंबून आहे, व यात्रेंच्या वेळीं परगांवचेच यात्रेकरु स्थानिक रहिताशांपेक्षां पांचपट—दसपट अधिक तेथें येत असल्यानें त्यांच्या स्वच्छतेकरितां व सोयीकरितां म्युनिसिपालिटीस स्वतंत्र कर बसविण्याचे जरूर वाटतें. त्याप्रमाणें सोलापूर शहरची स्थिति नाही. तें विशेषतः क्षेत्र ह्मणून प्रसिद्ध नसून व्यापारी पेठ ह्मणूनच प्रसिद्ध आहे. यात्रेकरितां ह्मणून बाहेरील लोक फारच थोडे येतात. यात्रेच्या वेळीं म्युनिसिपालिटीस करावा लागणारा खर्च यात्रेकरुंकरितां केला जात नसून, तो मुख्यतः गड्डयावरील व सोलापूर शहरांतील लोकांच्याच सोईकरितां करण्यांत येतो. सोलापूर शहर हें व्यापारी केंद्र असल्यामुळें व येथील गिरण्यांचा मोठा व्यापार असल्यामुळे येथील म्यु. स. सर्व सालभर व्यापारावरील जकातीचें उत्पन्न होतें. शिवाय यात्रेंत जे लोक म्युनिसिपालिटीस मालाचे जकातीचे रुपानें अप्रत्यक्षपणें कर देतात, तेच लोक यात्रेचे वेळीं गड्डयावर दुकानें लावतात. जशी गांवांत स्वच्छता ठेवण्याची जबाबदारी म्युनिसिपालिटीवर आहे तशी यात्रेचे वेळींहि लोकांची सोय करणें हें म्यु. चेंच काम आहे. यात्रेंत मालाची नें-आण व खप अधिक होत असल्यानें व त्यांत हिंदुमुसलमान सर्व जातींचा संबंध येत असल्यानें म्युनिसिपालिटीस जकातीचें उत्पन्न वाढत असतें व म्यु. चे दरसालचें उत्पन्न बारालाखपर्यंत असलेलें पाहून यात्रेचे वेळीं येथील लोकांच्या सोयीसाठीं दरसाल म्यु. नें फक्त आठशें-नऊशें रुपये खर्च केल्यास तो वसूल करण्यासाठी पुन्हा नवीन कर बसविल्यास गांवांतील लोकांवर दुप्पट कर बसविल्याप्रमाणें होणार आहे. व तें अन्यायाचें झाल्याशिवाय राहणार नाहीं.

२ यात्रेवर कर बसविण्याचें ठरविल्यास वरील नंबर एक मधील लिहिलेल्या कारणा- वरून यात्रेच्या वेळीं यात्रेसाठीं ह्मणून आलेले यात्रेकरू लोक कमी असल्याकारणानें व्यापारा- साठी मालाची नें—आण करणारे हिंदु-मुस- लमानहि सर्व व्यापारी लोकांवरच तो कर बस- विल्यासारखा होईल; तसेंच गिरण्यांत तयार झालेल्या मालाचे खरेदीसाठीं यात्रेच्या वेळीं येणाऱ्या खरेदीदारावरहि यात्रेचा कर बसवि- ण्याचा संभव आहे. तर तसें होणें इष्ट होणार नाही.

३ येथील म्युनिसिपालिटीचे जकातीचें दर वरचेवर वाढत असल्यामुळे सोलापूरचे आस- पास असलेल्या बार्शी, माढे, मोहोळ, कुर्डूवाडी, विजापूर, अक्कलकोट वगैरे लहान-मोठ्या ठिकाणीं सोलापूरचा बाजार वाटून गेला आहे; व सदरी ठिकाणचा बाजार जसजसा वाढूं लागला तसतसा सोलापूरचा बाजार दिवसें- दिवस कमी होत चालला आहे. शिवाय विजा- पूर येथे अलीकडे कांही वर्षांपासून श्रीसिद्धेश्वर यात्रा येथील यात्रेच्याच वेळीं दरसाल भरूं लागलेमुळे बरेच कर्नाटकांतील यात्रेकरूं लोक तिकडेच जातात; ह्मणून सोलापुरची यात्राहि सालोसाल फारच कमी होत चालली आहे. अशा परिस्थितींत यात्रेकरूंवर कर बसविल्यास थोड्याच दिवसांत सोलापूरची यात्रा व व्यापार बंद होण्याची भीति आहे व तसें झाल्यास व्यापाऱ्यांची बरीच मोठी नुकसानी होणार आहे. सबब कर बसवूं नये.

४ सदरी यात्रा फार प्राचीन काळापासून— सुमारे आठशे वर्षांपासून चालत आली असल्या कारणाने तिच्या पुरातन काळाकडे, व अगदीं अलीकडे आपली म्युनिसिपालिटी स्थापन झाले- पासून सदरी यात्रेच्या वेळीं म्यु. कडून होत असलेल्या खर्चाकडे पाहतां आतांच त्यावर कर बसवून भाविक लोकांची आणि व्यापारी लोकांची मनें अगदीं लहानशा रकमेसाठीं म्यु. नें दुखवूं नयेत.

५ पंढरपूर, नाशीक, आळंदी, जेजुरी, ही सर्व मुख्य क्षेत्रांचींच ठिकाणें असलेमुळे व त्यांस क्षेत्राशिवाय अन्य महत्व नसलेमुळे तेथील यात्रे- करूंवर कर बसविला आहे. तशी स्थिति सोला- पूर शहरची नसून व तें व्यापाराचें केंद्र असून, व्यापारापासून म्युनिसिपालिटीस बरेंच उत्पन्न होत आहे. सबब यात्रेकरितां ह्मणून आगळी जादा कर बसविला जाऊं नये.

६ सदर यात्रेंत दरसाल येथील होम-मैदा- नावर जनावरांचा मोठा बाजार भरत असतो व त्यावेळीं जनावरांची खरेदी-विक्री फार मोठ्या प्रमाणावर होते. यात्रेंवर कर बस- विल्यास सदरी जनावरांचे खरेदी—विक्री करणाऱ्या गरीब शेतकरी लोकांवरहि कर बसविण्याचा संभव आहे. तसेंच झाल्यास त्याचा परिणाम सोलापूरच्या आसपासचे गरीब शेत- करीवर्गावर होऊन जनावरांचे खरेदीविक्रीचे व्यवहारावर वाईट परिणाम होईल व शेतकीचें धंद्यास उत्तेजन द्यावें ह्मणून जनावरांचें प्रदर्शन वगैरे त्या वेळीं भरविण्याचें सरकारचें व देव- स्थानचें प्रयत्नास बाध येईल.

७ सोलापूर म्यु. चे हद्दीबाहेरून व आस- पासचे खेड्यांतून नेहमींप्रमाणें सदरी यात्रे- मध्यें हजारों लोक येथील गिरणींत दररोज कामावर येतात. तसेंच भाजीपाला वगैरे घेऊन येणारे बरेच लोक रोज शहरांत व्यापार करून परत आपल्या गांवीं जातात. तेव्हा त्यांचेवरहि यात्रेच्या दिवसांत कर बसविला जाईल याचाहि विचार व्हावा.

८ वरील कोणत्याहि कारणाचा विचार न करितां शेवटीं यात्रेवर कर बसविण्याचें ठर-

[स]िद्धेश्वर यात्रेच्या दिवसांत सुमारे ६ आठवडे- [प]र्यंत (ह्मणजे डिसेंबर जानेवारी) या [क]ालावधींत वाढणाऱ्या व्यापारावर त्याचा परि- [णा]म होऊन सोलापूर शहरचे व्यापाऱ्याचे व [प]र्यायानें जकातीचे वगैरें स्वरूपानें म्यु. चें हि [नु]कसान होईल याचाहिं विचार म्यु. नें करावा.

१ ता. २०-१२-३६ रोजीं भरलेल्या म्यु. [च्या] सबकमिटींत हजर असलेल्या वरील देव- [स्थान]च्या प्रतिनिधींनी ( मी व श्री. शिवबा- [ळप्]पा देशमुख ) म्यु. च्या प्रतिनिधीसमोर [व]रील सर्व तक्रारी ठेविल्या होत्या व या कामीं [पू]र्वी या बाबतींत म्यु. ने दोन स्पेशल सब्- [क]मिटया नेमल्या होत्या. त्या कमेटीचे रिपोर्ट- [प्र]कर्णात नाही. तें सर्व कागदपत्र सामील करून [व] आमचे पंचांचा रिपोर्टंहि त्यांत दाखल करून [स]र्व कागदपत्रें मे. लीगल रिमेंब्रन्सरकडे पाठ- [वू]न त्यांचे मत मागवावें व तें देवस्थान-कमे- [टी]कडे विचाराकरितां पाठवून सोलापुर-नाग- [रि]कांची मतें या बाबतींत मागवून जरूर तो [ठ]राव म्यु. नें पास करावा असें त्यांस कळविलें [हो]तें. तरी त्याचा विचार न करितां त्रोटक [मा]हिती देऊन नंतर म्यु. ने सोलापूरी भरणाऱ्या [या]त्रेवर कर बसवावा असा ठराव म्यु. चे सब् [क]मिटीने केला आहे तो योग्य नाही.

सदरी यात्रेवर सो. म्यु. ने कर बसवूं नये [म्ह]णून देवस्थानने वरील कारणें सुचविलीं [आ]हेत. याशिवाय इतर योग्य कारणें असल्यास [ती] पुढे करून सोलापूरच्या सर्व जनतेने सद- [र]हू कर बसविण्याविरुद्ध जरूर ते सर्व उपाय [ता]बडतोब करावेत. ता. ६—९—३७

एस्. बी. घुम्मा वकील, ऑ. सेक्रेटरी
श्रीसिद्धेश्वर देवस्थान, सोलापूर.

---

## श्रीसिद्धेश्वर देवस्थानतर्फे खुलासा !

### नंबर १

ता. ६-९-३७ चे येथील 'सुदर्शन' चे पुरवणींत 'श्रीसिद्धेश्वर यात्रेवरील कर, देवस्थानपंचांचीं कर्तव्यपराङमुखता' या मथळ्याखालीं कांही मजकूर आला आहे व त्यांत " या महत्वाच्या बाबीकडे श्रीसिद्धेश्वर- पंचांचें कसें दुर्लक्ष झालें आहे व या बाबतींत त्यांनी आपल्यातर्फे कर न बसविण्याबद्दल कोणतीहि बाजू मांडली नाही. किंवा त्याचा प्रतिकारहि केला नाही. लोकजागृति करण्यासहि त्यांनी कोणती कामगिरी केली नाही " वगैरे मजकूर लिहून देवस्थानविषयी जनतेंत गैरसमजूत करण्याचा विनाकारण प्रयत्न झालेला आहे. सदरी बाबतींत देवस्थानचे प्रतिनिधीबरोबरोबर वाटाघाट करण्यासाठीं नेमलेल्या म्यु.च्या सबकमेटीच्या वेळी देवस्थान- तर्फे मी व मि. शिवबाळप्पा देशमुख या दोघांनी म्यु. चे सभासदांशीं वाटाघाट करून सदरी यात्रेवर म्यु. ने कां कर बसवूं नये याची कारणें दाखविलीं होतीं. त्यानंतर म्यु. सब- कमेटींनें केलेल्या रिपोर्टावर म्यु. च्या जवरल कमेटींत ठराव होऊन, देवस्थानच्या कांही सूचना कर न बसविण्याबद्दल असल्यास पाठ- विणेंबद्दल म्यु. कडोन देवस्थानकडे लिहून आलें. त्यावर देवस्थान-कमेटीनें म्यु. कडे सूचना ता. १४-४-३७ रोजीं पाठविल्या. त्याबद्दलची माहिती याउपरहि म्यु. नें यात्रेवर कर बसविणेबाबत ठराव करून लोकांच्या तक्रारी मागविल्या तर त्या देवस्थानचे सेक्रेटरीनें तपशीलवार छापून प्रसिद्ध कराव्या ह्मणून ता. ३-४-३७ रोजीं देवस्थान-कमेटीनें ठराव केला. त्याप्रमाणें जनतेच्या माहितीसाठी व जागृतीसाठी मी त्या छापून ता. ६-९-३७ रोजी प्रसिद्ध केल्या आहेत. यावरून देवस्थानने वरील बाबतींत योग्य ती काळजी घेऊन

आपलें कर्तव्य योग्य त्या वेळी योग्य प्रकारें बजाविलें आहे हें सर्वांस दिसून येईल ! असें असतां देवस्थानविषयक गैरसमज उत्पन्न करणारा मजकूर आपल्या पत्रांत योग्य चौकशी न करितां छापून प्रसिद्ध करण्याची घिसाडघाई 'सुदर्शनकार' नेहमी कां करतात याचेंच आश्चर्य वाटतें! वरील हकिकतीवरून कालच्या (५-९-३७ च्या) कल्पतरूंतील 'कुंजविहारी' नें लिहिल्याप्रमाणें वस्तुस्थिती नसोन सदरी यात्रेवर कर बसविण्याचे कामीं देवस्थानपंचांची मुळीच संमती नव्हती हेंच जनतेस दिसून येईल ! ता. ६ - ९ - ३७.

एस. बी. धुम्मा वकील, ऑ. सेक्रेटरी.
श्रीसिद्धेश्वर देवस्थान सोलापूर.

---

# श्रीसिद्धेश्वर देवस्थानतर्फे खुलासा

## नंबर २.

श्री सिद्धेश्वर यात्रेवर येथील म्यु. ने कर कां बसवूं नये यांचीं कारणें म्यु. ला वेळोवेळी कळविण्याचें कामीं येथील श्रीसिद्धेश्वर देवस्थानचे पंचाकडून हयगय व कसूर झाली असें भासविण्याचे हेतूनें येथील 'सुदर्शन' कारांनीं आपल्या ता. ६।९।३७ च्या पुरवणींत 'श्रीसिद्धेश्वर पंचांची कर्तव्यपराङमुखता' या मथळ्याखालीं जो असत्य मजकूर लिहिला होता तो तसाच राहूं दिल्यास देवस्थानविषयीं ह्मणजे देवस्थानचें वरील बाबतींतील कामगिरीविषयीं जनतेत गैरसमज उत्पन्न होऊन देवस्थानपंचास विनाकारण दोषारोप लावण्यात येतील या भीतीनें देवस्थान सेक्रेटरी ह्मणून लगेच त्या दिवशीं 'श्रीसिद्धेश्वर देवस्थानतर्फे खुलासा' या मथळ्याखालीं मी जाहीर पत्रिका छापवून गांवांत सगळीकडे प्रसिद्ध करविल्या. त्यांत जेव्हां जेव्हां ह्मणून सोलापूर म्यु. नें श्रीसिद्धेश्वर देवस्थानकडून यात्रेवर बसविण्यांत येणाऱ्या कराबाबतींत माहिती मागविली अगर सदरी कर बसविण्याविरुद्ध देवस्थानच्या कांहीं हरकती असल्यास त्या कळविण्याबद्दल म्यु. नें विचारणा केली, त्या त्या सर्व प्रसंगी म्यु. स जरूर तो माहिती वेळेवर पुरविण्यांत अगर त्यास देवस्थानच्या तक्रारी कळविण्यांत देवस्थान-कमेटीकडून हयगय व कसूरी मुळींच झालेली नाहीं. त्याचाच खुलासा करून शेवटीं मात्र वरीलप्रमाणें वस्तुस्थिती असतां याची अगाऊ चौकशी (देवस्थानचे ऑफिसांत अगर म्यु. ऑफिसांत) सुदर्शनकारांनीं न करितां सदरी पुरवणींतील मजकूर छापून प्रसिद्ध करण्याची घिसाडघाई कां केली याबद्दल प्रगट केलें होतें आणि मला अद्यापिही प्रामाणिकपणें असेंच वाटतें कीं, अशा परिस्थितींत सुदर्शनकारांनीं श्रीचे पंचाविषयीं वरील पुरवणींतील मजकूर छापवून प्रसिद्ध करण्याची खरोखरच घाई मुद्दाम कां केली याबद्दल आपणा सर्वांनाहि माझ्याच प्रमाणे आश्चर्य वाटत असले पाहिजे ! सदरी माझ्या खुलाशांत सुदर्शनकाराविषयी, मी एकही अपशब्द वापरला नाहीं अगर अवाक्षरही लिहिलेले नाहीं. एवढेंच नव्हे तर त्यांत त्यांचा नामनिर्देशसुद्धां केलेला नाहीं. तरीपण माझ्या सदरी साध्या खुलाशानेंच सुदर्शनकार मजवर अगदीं गरम होऊन त्यांनीं पुन्हां आपल्या ता. १३ - ९ - ३७ च्या अंकात 'श्री. सिद्धेश्वर पंचाचें तोंड एकदाचे उघडले.' या मथळ्याखाली पुन्हा पूर्वीच्याच मजकुराचें लांबलचक 'येळकोट' गायिले आहे. व त्यांत सदरी

प्रकाराने मी त्यांच्यावर आग पाखडली आहे व त्यांत खोडसाळपणाचा मजकूर लिहिला आहे, असा त्यांनीं मजवर वृथा आरोप करून माझ्या नांवाचा व धंद्याचा अयोग्यपणें उल्लेख केला आहे एवढेंच ह्मणून स्वस्थ न बसतां त्या झोंपीं गेलेल्या ( अशी ' सुदर्शन 'कार्याची तरी समजूत आहे. ) सिद्धेश्वर पंचांना श्री-सिद्धेश्वर तलावरक्षणाचे बाबतींत व यात्रेवर कर बसविण्याविरुद्ध खटपट करण्याचे बाबतींत आपणच जागृती केली अशी आपल्याच वर्तमान-पत्रांत आपणच बढाई मारून आपली पाठ आपणच थोपटून घेतली आहे ! येथील ग्राम-दैवत श्रीसिद्धेश्वरचे देवस्थानाबद्दल व श्रीसिद्धे-श्वराचे देवस्थानबद्दल व श्रीसिद्धेश्वर सभोंवती असलेल्या पवित्र तलावा-बद्दल येथील जनतेंत व श्रीचे पंचांत पूर्वपरंपरे पासून किती वितात प्रेम वसत आहे, व त्याबद्दल त्यांना किती अलोट आदर वाटत आहे हें आज-पर्यंतच्या वरील बाबतींत झालेल्या चळवळी-वरून व यात्रेवर कर बसविण्याविरुद्ध हल्लीं चालू सर्व जातींच्या लोकांकडून गांवांत ठिक-ठिकाणी भरत असलेल्या जाहीर सभांवरून व त्यांतील भाषणावरून कोणासहि सहज दिसून येण्यासारखें आहे. श्रीसिद्धेश्वर तलावाबाबतीं-तील हकीकत थोडक्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें आहे. ती अशी:—

श्रीसिद्धेश्वर तलावाचे मालकीबद्दल व वहि-वाटीबद्दल येथील म्युनिसिपालिटी व श्रीसि-द्धेश्वर देवस्थान पंच कमेटी यामध्यें वाद उपस्थित होऊन शेवटीं म्यु. कडून तलावाचें पाणी स्वच्छ नाहीं या निमित्ताने तलावाचे बदर करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. त्यावेळीं देवस्थानकडून म्यु. विरुद्ध येथील दिवाणी कोर्टांत सू॥ नं. ११३५ चा दावा दाखल करून सदर कामास मनाई आणून लाविली व त्याचे काम पुढे बरेच दिवस चालून त्यांत आपसांत तडजोडीच्या अटी ठरविण्यासाठीं वाटाघाटी सुरू झाल्या. त्याचा वेळेवर निकाल लागेना ह्मणून पुन्हा दावा दाखल करण्यास कोर्टाची परवानगी ठेवून घेऊन पंचांकडून दावा काढून घेण्यांत आला. त्यानंतर वरील अटी ठरविण्याच्या वाटाघाटी म्यु. व देवस्थान कमेटी यामध्यें सन १९२६ पर्यंत चालू होत्या व देवस्थानकडोन जें काम कळवावयाचें होतें ते म्यु. स कळविण्यांत आलें होतें. त्यावर म्यु. कडून पत्रव्यवहार बंद ठेवण्यांत आला. अशा परिस्थितींत सुमारें १० वर्षें गेल्यानंतर गेल्या सालीं पुन्हां म्यु. प्रेसिडेंटकडून सदरी तलावाच्या पसंत करण्याच्या अटींबद्दल देव-स्थानकडे लिहून आलें. त्यावर पुन्हां सर्व प्रकरणं पाहून उत्तर देण्यासाठीं कमेटीनें मुदत मागितल्यावरून म्यु. प्रेसिडेंट यांचें ता.

## चुकीची दुरुस्ती

संजीवनीचे मागील अंकी पृष्ठ ४४३ वर कॉलम चारमध्यें इ. स. पू. ५०० ते ८०० प. असें छापलें गेलें आहे ते इ. स. पूर्व ३००० ते इ. स. ८०० पर्यंत असे पाहिजे.

१३ - १० - ३६ चे तीन महिन्याची मुदत दिल्याबद्दलचें उत्तर देवस्थानकडे आलें. व या मुदतीच्या आंतच ह्मणजे ता. १३ - १ - ३७ च्या आंतच ता. २७ - १२ - ३६ चे कल्पत-रूच्या अंकांत ता. १३-१०-३६ चे मे० कले-क्टर सा॥ चे श्रीसिद्धेश्वर तलावाबाबतचें म्यु. स आलेलें पत्र म्यु. कडून प्रसिद्ध कर-ण्यांत आलें, व त्यावेळीं अद्यापि देवस्थान कडून म्यु. स. उत्तर गेलें नसलेमुळें पुन्हां ता. १ - २ - ३७ रोजीं म्यु. प्रेसिडेंटकडून देव-

स्थावचे सेक्रेटरी यांस वरील बाबतींत उत्तर पाठविण्यासाठीं [ Final reminder ] [ अखेरची सूचना ] पाठविण्यांत आली त्याप्रमाणें देवस्थान-कमेटीकडून सदरी तलावा० बाबतींत जरूर त्या १७ अटींची यादी म्यु. प्रेसिडेंटकडे ता. १४ - ४ - ३७ रोजी पसंती साठीं पाठविण्यांत आली व तो विषय म्यु. पुढें अद्याप विचारासाठीं आहे. असें असतां मे. कलेक्टर साहेबांच्या नुसत्या वरील पत्रावरून सदरीं तलावावरील पूर्वापार असलेली देवस्थानची मालकी व कबजा नाहींशीं होऊन आताच नव्यानें त्यावर म्यु. चा मालकी व कबजा उत्पन्न होणें शक्य नाहीं अशा परिस्थितींत सदरीं कल्पतरूच्या अंकाचा उल्लेख करून म्यु. ला देवस्थान-तलावाचा कबजा देण्यांत आला वगैरे मजकूर " कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ " होऊं पाहणाऱ्या सुदर्शनकारांनीं आपल्या ता. १३ - ९ - ३७ च्या अंकांत लिहून जनतेची विनाकारण दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला आहे. यावरून वरील सर्व बाबतींत लोकजागृती घडवून आणण्याचें श्रेय काल जन्मास येऊन आज डोळे उघडलेल्या " सुदर्शन" नें आपल्या कडे घेण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे लहान तोंडीं मोठा घांस घेण्याचा हास्यापद प्रयत्न करण्याइतकेंच शहाणपणाचें आहे ! काय ह्मणें " आमचा कटाक्ष देवस्थानच्या व्यवस्थेकरितां स्वतःच नेमून घेतलेल्या पंच ह्मणून घेणाऱ्या कांहीं विशिष्ट व्यक्तींच्या कार्यक्षमतेबद्दल आहे. " अहो ' सुदर्शनकार ' पंच ह्मणवून घेणाऱ्या कांहीं जणांवरच आपला ( त्यांची खासगी कारणें कोणतीं कां असेना ) जर घुस्सा असेल तर त्याचे उट्टें ' वडयाचें तेल वांग्यावर या न्यायानें सदर देवस्थान-कमेटीवर कां काढतां? खासगी अगर इतर गोष्टींचा संबंध देवस्थानसारख्या सार्वजनिक कार्याशीं लावं नये एवढी साधी गोष्ट सुद्धां आपल्यासारख्या पंडिताम समजूं नये काय ? पवित्र आमच्या समाजाचें व देवस्थानचें ! बरें असो. श्री गुरु कृपेनें आपल्या हातांत ' सुदर्शन ' या चांगल्या नांवाच्या वर्तमानपत्राचें चालकत्व मिळालें असतां त्यांत अशा मजकुरांचें ' कुदर्शन ' कां करितां ? आपण आमच्या समाजांतील एक सुशिक्षित व सुज्ञ लेखक ह्मणवितां; तर पत्राच्या एडिटरवरील भारदस्तपणाची जबाबदारी ओळखून व सत्याची चाड बाळगून निर्विकारपणें व निःपक्षपणें जनसेवा करण्यासाठींच आपली लेखणी चालवा ! नाहीं तर अशा आत्मघातकी व खुनशी लिखाणानें ' नांव सोनुबाई पण हातीं कथलचा वाळा ' याप्रमाणें ' नांव सुदर्शन पण मजकुरांत कुदर्शन ' अशीच आपल्या पत्राची गत होईल ह्मणून यापुढें तरी सावध रहा !

माझ्या सदरी ता. ६ - ९ - ३७ च्या खुलाशांत " देवस्थानविषयीं " ह्मणजे देवस्थानकारभाराविषयींच आपण टीका करितां, गैरसमजूत पसरवितां, असेंच माझें ह्मणणें असल्याचें मी दर्शविलें आहे, व त्याच अर्थानें " देवस्थान विषयीं " हा शब्दप्रयोग मी त्यांत एक दोन वेळांच केलेला नसून, सहा सात वेळां केलेला आहे. ह्मणून

' देवस्थानाविषयीं ' ह्मणजे श्री सिद्धेश्वर-देवताविषयीं अगर त्यांचे पावित्र्याविषयीं सदरी पुरवणींतील आपली टीका नसून देवस्थानचे कारभाराविषयीं आपली टीका आहे हेंच मी स्पष्ट जाणवलें आहे. व याच अर्थानें सर्व जनतेने माझा सर्व खुलासा वाचला आहे. असे असतां या माझ्या साध्या व सरळ भाषेंत लिहिलेल्या खुलाशांत सदरी देवाबद्दल अगर तिच्या पावित्र्याबद्दल तुह्मी टीका केली याचा गंधहि व नियतां वरील अर्थावेंच मी तो शब्द वापरला असा आपण कुतर्क करून व त्यांत न निघणारा अर्थ बळेंच, अंगावर ओढून घेऊन

...लट मलाच त्याबद्दल आव्हान करितां यांत "तूं नाहीं तर तुझा बाप" असें ह्मणून ...णत्या तरी निमित्तानें श्रीसिद्धेश्वर देवस्था-...च्या पंचाशीं भांडण उकरून काढण्याची ...ढंगी वृत्तीच स्पष्ट होत नाहीं काय ?

...शाच कारणासाठीं जर आपल्या 'सुदर्शन' ...चा अवतार झाला असल्यास चालूं ठेवा तर ...पलें धोरण तसेंच आपलेच हात व आपलेच ...ॉ. भुसारें गल्लींतील ता. ९-९-३७ च्या

## संजीवनीचे उदार आश्रयदाते

पुण्याचे सुप्रसिद्ध व्यापारी. श्रीमंत अप्पासाहेब मानुरकर यांनी 'संजीवनी'चे पांच कर्जरोखे खरेदी करून आमच्या कार्याला सहानुभूतीपर मदत केल्याबद्दल संजीवनी त्यांची अत्यंत आभारी आहे.

...हीर सभेंत श्रीयुत वागीं यांनीं ह्मटल्या-...प्राणें हल्लींची वेळ खरोखरीच आणिबाणीची ...सल्यामुळे महत्वाच्या कार्याकडें लक्ष देण्याचें ...सोडून तुमचे हात धरून तुमच्या या आवडत्या ...ग्यांत अडथळा आणण्यास या वेळीं कोण मध्यें ...पडणार ? आपण सदरी सभेंत हजर असूनहिं ...तेथील उपदेशाकडे मुद्दाम दुर्लक्ष करून आपले एळकोट पुन्हा चालूं ठेविलें व ता. १३-९-३७ च्या अंकांत देवस्थान-कमेटीवर आपल्या नीदास अनुसरून पुन्हां लांब लांब दुगाण्या झाडून जातां जातां शेवटीं मात्र या निष्कारण वादांत ( हा वाद आपणच प्रथम सुरूं केला ) आपला उत्साह व वेळ खर्च करण्याबद्दल व मुख्य कार्याकडे दुर्लक्ष न करण्याबद्दल आपण देवस्थान-कमेटीला मानभावी उपदेश केला आहे, व आह्मीहि वरील वादांतील विषयांबद्दल शंका कुशंकांना माजी नगराध्यक्ष व विद्यमान म्यु. कौं. रा. ब. बॅरिस्टर दिवाकर यांचे अध्यक्षतेखालीं ता. १४-९-३७ रोजीं येथील किराणे-लोखंड गल्लींतील यात्रेवर कर बसविण्याविरुद्ध भरलेल्या नगरवासीयांच्या जाहीर सभेंत एका वक्त्याच्या बोलण्यावरून व अध्यक्षांच्या सूचनेवरून जाहीरपणें आपलेसमोर उत्तरें देऊन खुलासा केल्यामुळे व सदरी सभेचे अध्यक्ष यांनीं सुद्धां शेवटी आपल्या भाषणांत देवस्थानकडून वरील बाबतींत जरूर ती काळजी घेण्यांत आली असल्याचें जाहीर केलें असल्यामुळें आह्मी आपला सदरी उपदेश यापुढें अंमलांत आणण्याचा विचार केला आहे. पण आपणच आपला वरील उपदेश 'बोले तैसा चाले' यास अनुसरून प्रथम अंमलांत आणून 'निष्कारण' वादांत आपला वेळ ( अमोल्य असल्यास ) व आपल्या सुदर्शनचे रकाने [ महत्वाचे असल्यास ] यापुढें खर्ची घालूं नये अशी सुदर्शनकारास कळकळीची व मित्रत्वाची सूचना देऊन मी त्यांची रजा घेतो.
ता. १७-९-३७

एस. बी. धुम्मा, वकील, ऑ. सेक्रेटरी,
श्रीसिद्धेश्वर देवस्थान सोलापूर.

# राज-राजेश्वरांच्या संगतींत

श्रीमन्महाराज निरंजन जगद्गुरु श्रीजयदेव मुरघाराजेंद्र महास्वामीं यांच्या चित्रदुर्ग बृहन्मठास श्रीमन्नाल्वडि कृष्णराज वडियर म्हैसूर यांनीं आपले मुख्य प्रधान सर मिर्झा इस्माइल व इतर दरबारी प्रमुखांसह ता. १४-९-३७ रोजी सकाळी ९। वाजतां भेट दिली. सदर समारंभाकरितां ठिकठिकाणचा लक्षावधि जनसमुदाय जमला होता. मठापासून २ मैलपर्यंतच्या राजरस्त्यावर गुढ्या तोरणांनी शोभा आणली होती. मठाच्या महाद्वाराजवळ एक भव्य मंडप व मंडपापासून तों मठाच्या महाद्वारापर्यंत ११ कमानी उभारण्यात आल्या असून, राष्ट्रध्वजहि ठिकठिकाणी फडकत होते. थाटास अप्रतिम होती.

## महाराजांचें आगमन व स्वागत

चित्रदुर्गास ता. १३ रोजीच महाराजांचे आगमन झालें होतें. ता. १४ रोजी सकाळीं मठास भेट देण्याचा कार्यक्रम जाहीर झाला होता. दर्शनोत्सुक लोकांची मनस्वी गर्दी उसळली होती. मठाचें एजंट आपल्या मठ-संस्थानच्या सर्व लवाजम्यानिशीं महाराजांस सामोरे गेले. महाराजांचें आगमन होतांच त्यांच्या सन्मानार्थ २१ तोफांची सलामी देण्यात आली. सर्व जनतेच्या आदरयुक्त अभिवादनाचा आत्मानंदाने स्वीकार करीत महाराजांची मोटार मठाच्या महाद्वारांत येतांच श्रीजगद्गुरु महास्वामींनी इतर ठिकाणाहून आलेल्या अनेक स्वामींसह महाराजांचें स्वागत केलें. श्रीजगद्गुरुसमवेत मठांत प्रवेश करुन मठाच्या मूल स्वामीच्या समाधीचें महाराजांनी दर्शन घेऊन त्यांनी महास्वामींना 'ही समाधी कोणाची?' असा प्रश्न केला. त्यावर "ही समाधी आठवे जगद्गुरु श्रीमुरघास्वामी यांची" असें सांगून त्यांचें संक्षिप्त चरित्र सांगितलें. तेथून श्रीमहास्वामीसह महाराज, सर मिर्झा, श्री. देवराज अरस वगैरे मंडळींनी मठाच्या दुसऱ्या मजल्यावरील 'जयदेव' दिवाणखान्यांत प्रवेश केला. तेथील उच्चासनाजवळ येतांच श्रीमंत महाराजांनीं महास्वामींना उच्चासनारोहण करण्याविषयीं भक्तिभावानें विनंती केली. त्याप्रमाणें श्रीमहास्वामी उच्चासनारूढ झाल्यावर महाराजांनी आपलेबरोबर आणलेले दोन भारी किंमतीची भरजरी वस्त्रें, भरजरी रेशमी भगव्या रंगाचे शेले २ जरीचे धोतर जोड १, जरीचे बुट्टेदार रेशमी मुकटे २, काश्मिरी भरजरी हिरव्या शाली २, दक्षिणा म्हणून रुपयांच्या थैल्या, पुष्पहार, नारळ, वगैरे जिनसा श्रींच्या पायावर अर्पण करुन महाराजांनी नमस्कार केला. त्यानंतर श्रींनीं महाराजांना शुभाशीर्वाद देऊन आसनावर बसण्यास सांगितलें, व त्यांना आशिर्वादादाखल सुवर्ण जरतारी माला, जरीचा फेटा, जरीचा शेला १, जरकाठीं रुमाल, भस्म, गौरिशंकर जपमाळ, कंठमाला, स्फटिकलिंग, व १० धर्मग्रंथ दिले. त्याचा महाराजांनी भक्तिभावयुक्त विनयानें व हसतमुखानें स्वीकार केला व भस्म धारण केलें.

**त्यांचें संभाषणः**—कुशल प्रश्नोत्तरें झाल्यानंतर श्री म्हणाले "आपण बिलायतेस जाऊन आरोग्यलाभ संपादिल्याबद्दल आम्हाला अत्यानंद होत आहे."

महाराज-महास्वामी! ते सर्व आपणासारख्या [illegible]हिमाशाली पुरुषांच्याच कृपेनें होय.

श्री.—आपले दिवाण सर मिर्झासाहेबांची [illegible]च्या मठांवर फार भक्ति आहे. आम्ही [illegible]ठांत असतांना तीन वेळा व संचारांत अस-[illegible]ना आमच्यापरोक्ष दोन वेळा अशा एकंदर [illegible] वेळां त्यांनी मठाला भेट दिलीं आहे. [illegible]या वेळीं सर मिर्झा इस्माईल हे नम्रतापूर्वक [illegible] जोडून विनयानें हसत मुखानें जवळच उभे [illegible]ते.) ८०० वर्षापूर्वी श्रीबसवादि शिवशर-[illegible]णी आपल्या अवतारकार्यानें वीरशैवमताचा [illegible]चार केला, असें सांगून वचनशास्त्राचें महत्व, [illegible]आगमसार ह्मणजे वचनशास्त्र होय, हें त्यांनी [illegible]बसवेश्वराची कांही वचनें व वेदमंत्र यांचीं [illegible]तुलना करून सांगितलें, व (१) महास्वा-[illegible]च्या रहदारी हक्काचे पुस्तक (२) पंच-[illegible]च्या पंचाचार्यांनी चित्रदुर्गपीठास लिहि-[illegible]ल्या विनंतीपत्राचें छापील पुस्तक, (३) [illegible] संपादने (४) प्रभुदेव वचनें (५) बस-[illegible]वचनें (६) हरिहर रगळी (७) बस-[illegible]व रगळी (८) प्रभुलीला संग्रह (९) [illegible] महादेवी वचन व (१०) शिवानुभव [illegible]. असे वीरशैवधार्मिक ग्रंथ दिले. श्रींच्या [illegible] व विद्वत्तापूर्ण भाषणानें महाराज आनं-[illegible]दानें सद्गदित झाले व ह्मणाले.

" श्रीजगद्गुरु महास्वामी ! आपण शिक्ष-[illegible]प्रसार व इतर महत्कार्यांत परिश्रमपूर्वक [illegible]केल्या अप्रतिम कार्यानें ह्मैसूर संस्थानालाच [illegible]तिगौरव प्राप्त झालेला आहे. "

[illegible]त्यानंतर थोडा वेळ संभाषण झाल्यानंतर [illegible]हाराजांनी श्रींसमवेत मठाची व तेथील उद्या-[illegible]नी वगैरे पहाणी केली. मठाच्या दोन्ही [illegible]जूचे दोन विस्तीर्ण व भव्य तलाव, त्यासो-वती सर्व जातींच्या लोकांच्या चाललेल्या भोज-नाच्या पंक्ति वगैरे पाहून महाराजांना अत्या-नंद वाटला व त्यांनी धन्योद्गार काढले. नंतर थोड्या वेळानें महाराज जाण्यास निघाले, तेव्हा महास्वामींच्या व महाराजांच्या नावांनी जय-तेनें भक्तिपूर्वक स्वयंस्फूर्तीनें केलेल्या जयजय-कारनिनादानें आसमंत व नभोमंडळ दुम-दुमून गेलें, व महाराज आपल्या मोटारींतून परत गेले.

चित्रदुर्गभागांत पाऊस झाला नव्हता. त्यामुळे सर्व जनता हवालदील झाली होती. परंतु या उभय महापुरुषांच्या या चिरस्मरणीय भेटींच्या दिवशीच सकाळी ३ तास उत्तम व जोराचा पाऊस झाल्यानें जनतेचा आनंद द्विगुणित झाला.

अन्नसंतर्पण:—श्रीमन्तमहाराज ह्मैसूर यांचीं चित्रदुर्गशहरास भेट होणार व दर्शनोत्सुक लोकांची अतोनात दाटी होणार हें जाणून गोरगरीबांच्या जेवण्याच्या व्यवस्थेकरितां सरकारकडून ५ हजार रुपये जिल्हाबोर्डाचे प्रेसिडेंटकडे पाठविण्यांत आले होते. परंतु पाण्याच्या अभावीं ही व्यवस्था शक्य नाही, ह्मणून त्यांनी ते रुपये सरकारकडे परत केले. पुढे या बाबतींत श्रीजगद्गुरु महास्वामींना विचारण्यात आलें. त्यांनी सांगितलें कीं, येणाऱ्या-जाणाऱ्याच्या अन्नसंतर्पणाकरिताच आमच्या मठांत दासोह चालू असतो, तेव्हा त्याकरिता पैसे पाठविण्याचें कारण नाही." मठाच्या आवारांतील आमराईंत त्याप्रमाणें तीन-चार दिवस सर्वांच्या भोजनाची सोय करण्यांत आली होती. दररोज १५।२० हजार लोकांना सकाळ—संध्याकाळ भोजन बृहन्मठाच्या व्यवस्थेखाली व मठा-च्याच खर्चानें मिळालें. भोजनाची सर्व व्यवस्था दावणगिरीच्या प्रमुख वीरशैव नागरिकांनी मोठ्या आस्थेनें व परिश्रमानें ठेवली होती.

सदर चिरस्मरणीय प्रसंगाच्या स्मरणार्थ श्रीजगद्गुरु महास्वामींनी दहा हजार रुपयांची उदार देणगी सार्वजनिक कल्याणाच्या कार्याकरितां सरकारकडे दिली, व आजपर्यंतच्या औदार्यांत भर घातली.

सदर समारंभाकरितांच ह्मणून मुद्दाम बेंगलूर, टुमकुर नेलमंगल, शिवमोग्गा, न्यामती, लक्ष्मेश्वर, मुळगुंद, गुब्बी, ब्याडगी शिरसी, गुडगेरी, राणेबेन्नूर दावणगेरी शिकारपूर, बळ्ळारी, शिराळकोप्प. अरसीकेरी हुबळी, धारवाड, वगैरे दूरदूरच्या ठिकाणाहून प्रमुख पुढारी भक्त प्रदेश, पट्टाधिकारी व विरक्त स्वामी वगैरे हजारो मंडळी आली होती. स्पेशल ट्रेन्स, मोटारी, व गाड्या सोडण्यांत आल्या होत्या. त्या दिवशीं सुमारें ७५ हजार जनसमुदाय हजर होता. अशा प्रकारचा हा अपूर्व समारंभ चिरस्मरणीय रीतीनें पार पडला.

—सु.

---

नाट्यछटा

# भा स !

लेखक:—
शि० ल० खोत,
ज्यू. बी. अे.,
राजाराम-कॉलेज.

त्या दिवसाची आठवण झाली ह्मणजे हृदय थरारून जाते अगदीं. तो दिवस ह्मणजे माझ्या जीवितांतील एक जादुमय क्षणच होता !

त्या दिवशीं जॉनसनचे " Lives of the Poets " हें पुस्तक वाचून मनाला फार त्रास झाला होता. रात्रीचें जेवण झाल्यानंतर कॉनन डॉईलची ' Speckled Band ' ही गोष्ट वाचण्यास सुरवात केली, पण खिडकींतून येणाऱ्या चंद्रप्रकाशानें माझं मन भारलंच जणूं असं मला वाटलं. पुस्तक तसेंच टेबलावर ठेवून बाहेर व्हरांड्यांतून आकाशाकडे एकवार पाहतांच माझे पाय हळूहळु रस्त्यावरून पुढें जाऊं लागले. बरें, रात्रीच्या वेळेला जायचं तरी कोठें हा प्रश्न होताच ना ? यावेळीं महाद्वार-रोडवर तरी काय मजा असणार ? बुराटलेल्या शहरांत रस्त्यावरील शांतता धारण करणाऱ्या धुळीखेरीज असणार तरी काय ? मीं विचार केला, शहराबाहेर कोठें तरी दूर माळावर जायच. अन् त्याच क्षणीं मी बाझा मार्ग पुढें आक्रमूं लागलों.

वाऱ्याच्या मंद लहरीबरोबर मधुर संगीत निर्माण करण्याचा प्रयत्न करणारी वृक्षपर्णें आकाशांतील इतस्ततः पसरलेल्या ढगाकडे पाहून हसत होतीं. ढगहि तसे विचित्र होतेच ह्मणा. तरी पण आकाशांत विहार करणें हा त्यांचा हक्कच नाहीं का ? रस्त्याच्या दोहों बाजूला उभीं असणारीं झाडें आपल्या सावलीच। वाच पहात होतीं. मी तसाच त्या

[illegible]तून पुढें जात होतो. पायवी हरण विसे-[illegible] झालें ह्मणजे जसा इतस्ततः पहातो त्या-[illegible] मी त्या वृक्षपर्णातून चंद्राकडे पहात [illegible]तो. इतक्यांत रस्त्याच्या एका बाजूला पस-[illegible] माळ आयत्या हिरवळीद्वारे मला हांक [illegible] होता. मीहि तसाच सरळ गेलों [illegible]कडे, व एका विस्तीर्ण शिलेवर बसलों.

चंद्र तसाच चमकत होता. पण क्षणांतच [illegible]वर काळें अभ्र पसरलें मला फार [illegible] वाटलें व मी साहजिक " जीवित ह्मणजे [illegible] दुःखपर्यवसायी नाटकच आहे. सुखाने नील-[illegible]रांत तरंगणाऱ्या चंद्रालादेखील दुःख [illegible] ना ? ........... " असे उद्‌गारलों [illegible] चंद्राच्या शीतल प्रकाशांत यशवन्तचे "वन्दन तुज मायभूमि .......... " हें पद [illegible] लागलों. " मरणाच्या दाढेमधि चाललों [illegible] " येथपर्यंत ह्मणतांच कसला तरी आवाज [illegible] लागला. माझें हृदय कम्पित होऊं लागलें. [illegible] होताच तसा तो आवाज.

तो मधुर आवाज एका रमणीच्या पदसं-[illegible]चा होता. ती माझ्यासमोरून तशीच जात [illegible]. मी तिच्या मुखाकडे पहात होतो. चंद्रकि-[illegible] तिच्या केसांशीं खेळत होते. तिच्या मुखावर [illegible]सीमाच झालेली मला दिसत होती. [illegible]च्या बागेतील ती एक सुंदर कलिकाच होती. [illegible] भारदस्त वक्षःस्थलावर यौवनरसाची सीमा [illegible]पणें दृग्गोचर होती. मला वाटलं तिला [illegible] मारावी पण हे माझ्यासारख्याला [illegible] दिसणार नाहीं मला [illegible] झालें नाही म्हणा–मी तिच्याशी [illegible] शकलों नाही. अन् ती दृष्टिआड होत [illegible]ना तिचा वाऱ्याने उडणारा पदर मात्र [illegible] माझ्या दृष्टिसमोर चित्राप्रमाणें उभा [illegible]हे.

तिची पुनरेकवार भेट व्हावी, तिला निदान आणखीं एकदा तरी पहावें म्हणून मी अजूनहि त्या दिशेला फिरावयाला जातो पण कुठली ती भेटायला.

अन् निराशेनें जेव्हा परत येतो तेव्हा कदाचित् ती एक समाजपीडित युवति नसेल कशावरून ? जीवितालां गांजलेलीं एक कलि-काच असेल ती. सामाजिक बंधनांनी गुरफ-टलेला तो जीव कदाचित् जागतिक मर्यादा ओलांडून अनंताशीं आत्मसात झाली नसेल कशावरून...असे एक वा हजार विचार डोक्यांत येतात पण त्या माळावर फिरावयास जाण्यास मी केव्हाहि चुकत नाही. अन् त्याच माळा-वर बसून दूरच्या झाडांत तिचीं यौवनकांति विजेसारखी चमकत असल्याचा भास होतो मला. जीवन हा एक मृगजळासारखाच भास नाही कां ? आपण बहुतेक सर्वजण पिशा-चाप्रमाणें भासामागूनच धांवत नाही कां ? आपलें सौख्य सुद्धां भासच वहे तर काय? " भास ! भास !! भास !!! " असेंच मी स्वप्नांतसुद्धां बरळतों.

---

लघुकथा १५ वी.

# मधु - मीलन

[ लेखकः— श्री. शं० कृ० रिसवडे, बी. ए. सांगली. ]

‘नलिनी माझी आवडती मैत्रीण. पांचवीपर्यंतचें तिचें व माझें शिक्षण आगरकरांनी स्थापन केलेल्या हायस्कूलमध्ये झालें होतें. शामरावांनी तो पांचवींत असतांनाच तिचें लग्न चुंबनपूरच्या विलासराव इनामदाराशीं ठरविलें होतें. लवकरच तिचा लग्नसोहळा उरकला व तिला शिक्षणाला कायमचा रामराम ठोकावा लागला.

“ विलास-राव हे फारसे शिकलेले नव्हते. घरचे श्रीमंत, मग त्यांना शिक्षणाची काय जरूरी ? कॉलेजांतील पहिलें वर्ष त्यांनी चैनींत घालविलें. त्यामुळें त्यांचा शेवटीं जो निकाल लागावयाचा तो लागला. तशांत लग्न झालेलें. नववधू घरीं आलेली, मग शिक्षणाला कोण विचारतो !

“ मी क्लबमधून जेवण करून नुकतेच आले होतें कॉनन डॉइलची ‘ Round the Red Lamp ’ ही कादंबरी वाचीत कॉटवर पडले होतें. कॉलेजला जाण्यास अद्यापि अर्धा तास अवकाश होता. माझ्या इतर सहचरी मला गप्पा छाटण्यास बाहेर बोलावीत होत्या. पण कोणास ठाऊक, मला आज कंटाळा आला होता त्या गप्पांचा. इतक्यांत विमलने माझ्या नांवाचे पाकीट माझें हातीं आणून दिलें. पाकीटावर चुंबनपूरचा शिक्का होता. त्यावरून तें नलिनीचे असले पाहिजे हें मी ताडले तें मी गडबडीने फोडले व वाचूं लागले, ”

चुंबनपूर,
२६-१०-१९३७.

प्रिय प्रतिभे,

फार दिवसांनी पत्र लिहीत आहे त्याबद्दल क्षमा कर. खरं सांगूं, पत्र लिहिण्यास मला सवडच मिळत नव्हती इतके दिवस ! लग्नानंतरचें मला वाटतें हें दुसरेंच पत्र !

“ पत्रांतील मजकूर वाचून तुला आश्चर्य वाटेल, पण आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाही. जें खरें आहें तें मीं लिहीत आहें. पण ह्यातील मजकूर दादांना कांहीएक कळवूं नको मात्र !

“ स्वारीच माझ्यावर किती प्रेम होतं हें मी तुला मागील पत्रीं कळविलें होतेंच. प्रारंभी त्यांना माझा क्षणभरहि वियोग सहन होत नसे. नेहमी तासचेतास गुजगोष्टीं करीत बसावयाचे. त्यांचं प्रेम स्वार्थी व कपटी होतं हें खास ! त्यांना आतां माझ्याबद्दल यत्किंचित्‌हि आदर वाटत नाही. घरांतील मोलकरणीप्रमाणं सध्या माझी स्थिति झाली आहे.

माझ्या दुःखांचा पाढा तुला वाचून दाखवून तुझ्या कोमल मनाला मी व्यर्थ दुःख कां द्यावें ? तें माझें मला सहन केलें पाहिजे. नशीब माझें ! त्यांत दोष कोणाचा ?

तूं मात्र एकंदरींत सुखी आहेस. प्रभाकरची व तुझी मैत्री कशी काय आहे ? वगैरे लग्नाची गाठ पडत असेलच म्हणा. शिवाय रोज कोठेंतरी फिरावयास जात असालच! प्रतिभे! मीं थट्टा केली ह्याबद्दल रागावूं नकोस बरं. पाहूं !

दादांना मी आजच खुशाल असलेचें पत्र पाठविले आहे. पण प्रतिभे ! तुला पुन आठवण करून देत्ये कीं, तूं माझ्याबद्दल त्यांना एकहि अक्षर कळवूं नकोस.

तुझी अभागी मैत्रीण
नलिनी.

ता. क.

खरं सांगावयाचं म्हटलं तर मी येथे फार कंटाळलें आहे. तेव्हा चार दिवस विश्रांतिस्तव मी उद्या तुझ्याकडे मेलनें येत आहें ! प्रभाकरांची व माझी ओळख करून देशील ना?

× × ×

" कोणास ठाऊक, पत्र वाचून माझें मन अस्वस्थ झालें ! नलिनीचे बाबतींत जसें झालें तसें माझेहि प्रभाकरांचे बाबतींत होणार नाहीं कशावरून ? मनाशी विचार करीत तशीच कॉटवर पडले. तो कॉलेजची घंटा झाली. लगबगीनें एक नोटबुक हातीं घेतलें; खोलीला कुलूप लावलें, व कॉलेजचे बाहेर पडलें.

" कॉलेजचे गेट जवळ आलें तों पोर्चमध्यें प्रभाकर मित्रमंडळीशीं मोठमोठ्याने गप्पा मारीत व सिगारेटचा धूर सोडीत उभे होते. तास सुरू होण्याचे पूर्वी किंवा तास संपल्यानंतर कॉलेजातील मुलांना गप्पा झोडणें व टवाळी करणें ह्याखेरीज कोणता उद्योग असतो ? आज प्रभाकरांचा चेहरा आनंदी होता पण त्या मानानें मी मात्र जरा दुःखी होतें. मला येतांना पाहून तें जरा हंसले. मी थेट लेडीजरूममध्यें गेलें.

" तास सुरू होण्याची घंटा झाल्याबरोबर मी प्रोफेसरांच्या पाठोपाठ जाऊन क्लासमध्यें बसलें पण आज माझें लक्ष प्रोफेसरांचे लेक्चरकडे मुळीच लागेना. डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. तास केव्हां एकदाचा सुटतो असें झालें होतें. शेवटी तास एकदाचा संपला ! खोलींत जाऊन झोप काढावी कीं काय ह्याविचारांत मी थोडावेळ व्हरांड्यांत उभी होतें तों ........

' कां आज बावरलेली वृत्ति दिसते ? कांहीं कमी जास्ती वडीलांच्याकडून लिहून आले आहे वाटतें ?' प्रभाकर म्हणाले.

' नाहीं '

' मग तूं उदास कां आज ? '

' सांगेन आज फिरावयास गेल्यावर '

' बरें ते असूं दे ! उद्या शनवार ना ? तेव्हां कॉलेज सकाळीं

' मग ह्यांत विशेष असें काय आहे ? '

' दोन प्रहरी Love Parade चे सिनेमाला भेट देऊं या म्हणतो. '

तें आतां नक्की सांगतां येत नाहीं '

' कां '

' पहाटचे मेलनें नलिनी येणार तेव्हां नको का तिचा विचार घ्यायला ?

'तें कांही नाही चालावयाचे ! तुला आलेच पाहिजे '

' बरें पाहूं ' असे ह्मणून मी खोलींकडे निघून आले.

* * *

'' नेहमीप्रमाणें प्रभाकर ५॥ वाजतां खोली-कडे आले, आह्मी दोघांनी चहा घेतला व फिरावयास बाहेर पडलों. मला आज फिर-ण्यात देखील आनंद वाटत नव्हता. तेव्हां मीं ह्मटले,

' आज दररोजच्या इतकं लांब जावयाचं नाही ! मला भारी कंटाळा आला आहे आज.'

' बरें, तुझी मर्जी ! पण प्रतिभे, आतां मला सकाळचें उदासपणाचें कारण सांगणार आहेस ना ? विसरलीस वाटते ? '

' नाही. मला त्या टेकडीवर जाऊन बसूं या ! इतकें ह्मणून आह्मीं आमचा मोर्चा टेक-डीकडे वळविला. तेथे गेल्यावर मी नलिनीची सर्व हकीगत प्रभाकरांना सांगितली व पत्रहि दाखविलें. तेव्हां ते ह्मणाले,

' आतां कांही नाहीं. तुला उद्या नलिनीसह मॅटिनीला आलेच पाहिजें. अनायासे तेथेंच तुला माझी व नलिनीची ओळख करुन देतां येईल.'

' पण तिच्या मनांत इतक्या लवकर ओळख करुन द्यावयाची नसली किंवा तिला जाग्र-णाचा त्रास झाला असला तर. '

' तर मग काय ! हेंच ना. '

' होय '

प्रेमाकरितां मनुष्य काय करीत नाहीं ? सांग पाहूं ?'

' बरं '

' आतां कसं छान बोललीस ! थँकस् हां !'

इतके अगदीं आभार मानण्याचें कांही कारण नाही ! ' वेळ फार झाला तेव्हा परत जाऊं या का ? '

' चल ना ' असें ह्मणून आह्मीं उठलों व मार्गक्रमण करुं लागलों तों प्रभाकर म्हणाले,

' एकूण तुझ्या नलीनीची अशी ट्रॅजीडी जाली म्हणावयाची. '!

' त्याला उपाय नाही ! याला कारण पुरु-षांचें स्वार्थी प्रेम ! '

' प्रतिभे ! सर्वत्र माणसे प्रेमाचे बाबतींत स्वार्थी का असतात ? दोन हृदयांचें संम्मीलन होण्यास सारख्या आचार-विचाराचे स्त्री-पुरुष नकोत कां? उद्या ३॥ ची आठवण राहील ना ?'

× × ×

' फोडा ते आपले चुनाळ ' मीं जरा रागानें ह्मटलें.

' घड्याळावर कां संक्रांत कोसळली ?'

' नाही ह्मटलं किती वाजले आपल्या घड्याळांत ? बायकामाणसांनी कितीवेळ बाहेर वाट पहावयाची ! '

' अस्स होय, जरा उशीर झाला त्याबद्दल कां इतकी सलामी '

बरं राहू द्या ; हा वादविवाद ; उद्या एक नवीन घड्याळ घेऊन या ह्मणत्ये.'

' आता तें तुझ्याकडून मिळणार आहे ना लवकर ? का खरें कीं नाही नलु ? '

' नलु ! त्यांचं तूं कांहींएक ऐकूं नकोस. पहा बरं तिकडे तो नायक आणि नायिका यांचा विवाहसमारंभाचा सीन. '

' ती पार पडली आतां तु ऽ ? '

'प्रतिमे ! तुझ्या वल्लभाचे नांव ग काय?'

'गप्प रहा, चावट कुठली.'

'प्रभाकर प्रतिमेचें नशीब बलवत्तर खरें'

'तें कसं काय नलु ?'

तुमच्यासारखा सुशिक्षित आदर्श तरुण ...मल्यावर आणखी काय पाहिजे तिला ?'

'पण तिच्या मनांत आलें तरच ना हें ?'

'काय पण छान प्लॉट आहे. तो हीरो ...व कसा हिरॉइनच्या सान्निध्यांत मजा ...रीत आहे.' मी एकदम उद्गारले.

'मग तुह्माला कोणी प्रतिबंध कां केला आहे'

"याचक्षणी मी सहजमुद्रेनें खालीं पाहूं लागले. प्रभाकरांना भावनावेग आवरता न आल्यामुळे सिनेमांतील काल्पनिक रोमॅन्स सोडून माझे प्रात्यक्षिक रोमान्समध्यें गूढ होऊन गेले—इतका वेळ कीं, नलुने सिनेमा संपल्या-नंतर 'चलायच ना घरीं' असा इषारा दिल्या-वर कोठें भानावर आले.

"आह्मी तिघेहि रस्त्यानून गप्पा छाटीत जात होतो. नलूला आमचें तत्व चांगलें पटलें. पतिपत्नीच्या सहानुभूतीने संसार सुखावह होतो हें ती चांगली समजली. माझं जीवन प्रभाक-रांच्या शीतल सान्निध्यात किती सुखावह झालं आहे. त्या दिवसापासून नलुसुद्धा आमचे आदर्श डोळ्यापुढे ठेवून वागत आहे. जीव-नाचे मधु-मीलन तें हेंच !' असें कुणास वाटणार नाही?

---

# वीरशैव समाज सार्वजनिक गणेशोत्सव

## वर्ष १८ वें

### बसवेश्वर चौक अमरावती.

( वी. ग. कार्यवाहांचे कडून )

'संजीवनी'च्या १५-९-३७ च्या अंकांत "वीरशैव समाज गणेशोत्सव बसवे-...न चौक'" येथील कार्यक्रम प्रसिद्ध झाले ...; ते सर्व कार्यक्रम मोठ्या उत्साहाने व ...णाने पूर्णपणे यशस्वी रीतीनें पार पाडण्यांत ...ले. संजीवनीचे सहसंपादक श्री० रामशंभो ...णीक व अमरावतीमधील देशभक्त श्री० ...हिराव देशपांडे ह्यांचीं "गणेशोत्सवाची ...ति" व "महात्मा गांधी आणि भावी हिंदी राजकारण" ह्या विषयांवर अनुक्रमें मोठी मार्मिक व जोरदार भाषणें झालीं. देश-भक्तीचे घुटके पाजणारे असें श्री. एन्. जी. कुळकर्णी ह्यांचें काव्यगायन, व मनाला हलवून सोडणारा असा श्री. बादासाहेबांचा ऑर्केस्ट्रा अगदी झोकांत झाला. ता. १३-९-३७ ला मंडळांचा जोरदार सामना होऊन त्यांत "बाल वीरशैव समाज" यशस्वी झाला. ता. १४-९-३७ ला प्राणाचार्य सोडे ह्यांचे

अद्भुत शक्तीचे प्रयोग अमरावतीच्या वीरशैव-समाजामधील तरुण कार्यकर्ते श्री. लिंगाप्पा वट्टे ह्यांचे अध्यक्षतेखाली सतत १ तास चालले. कार्यक्रमाला बराच समाज जमला होता. प्रयोग चालू असतां प्रत्येक प्रेक्षकाचें हृदय भीतीने हलत होतें. श्री. खोडे ह्यांना कांही सद्गृहस्थांतर्फे खाजगी बक्षीसें देण्यात आलीं. ता. १५-९-३७ ला कु. मथुताई जोशी यांचा मेळा झाला. ह्या मेळयाची स्थापना स्वातंत्र्याच्या व्यासपीठावर झालेली होती. 'समान हक्क' 'स्त्री स्वातंत्र्य' ह्या प्रमुख विषयांवर ह्या मेळयाद्वारे मोठें मार्मिक व टीकात्मक विवेचन करण्यांत आलें. ह्यावर दीड हजार स्त्री-पुरुषांच्या समुदायांत मेळयाचा कार्यक्रम झाला. ह्या कार्यक्रमामुळे वीरशैव-समाजगणेशोत्सवाची नटी अमरावती-मधील कित्येक जनतेच्या श्रवणावर मोहक नृत्य करूं लागली. यंदाच्या गणेशोत्सव-मंडळाचे अध्यक्ष श्री. बाळासाहेब संगेकर यांनी स्वत:तर्फे राधिकेची भूमिका करणाऱ्या कु० तारा साठे ह्या मुलीला एक रौप्यपदक दिलें. ता. १७-९-३७ ला गणेशोत्सवमंड-ळातर्फे समाजांतील व इतर स्त्रियांकरिता हळदी-कुंकवाचा कार्यक्रम नेमला होता. व्याख्यानासाठी सौ. कमलाबाई ठाकुर, बी. ए., सौ. कमलाबाई शिदोरे, बी. ए., व देशसेविका सौ. पार्वतीबाई पटवर्धन ह्यांना पाचारिले होते. ह्या स्त्री वक्त्यांचीं भाषणें मोठी बोध-पर व सन्मार्गदर्शक झालीं. भरपूर स्त्रीसमाज जमला होता. ता. १८ व १९ ह्या दिवशी सतत १५ तास पर्यंत सर्वांना पानसुपारी झाली. स्थापना व विसर्जन हें तर होणारच ! एकं-दरीत यंदाच्या गणेशोत्सवानें अमरावती शह-रांत नंबर लावला.

( १. ) मेळ्यांच्या सामन्यांत उत्तीर्ण झाल्याबद्दल "बाल वीरशैव समाजाला," ( २ ) अचाट शक्तीच्या प्रयोगाबद्दल "प्राणाचार्य खोडे" ह्यांना, ( ३ ) व ऑर्केस्ट्राबद्दल श्री० दादासाहेब बासरकर ह्यांना, वीरशैवसमाज - गणेशोत्सवमंडळा-तर्फे रुपेरी पदकें देण्यांत आलीं.

सर्व कार्यक्रम आटोपल्यानंतर कार्यकारी मंडळाचा व कार्यकर्त्यांचा फोटो काढण्यांत आला.

एम्. सी. दलगंदे }
बी. एस्. मिसे. } सेक्रेटरीज

## वर्गणीचा हिशेब

| | | | |
|---|---|---|---|
| ६१॥।-॥ | एकंदर वर्गणी जमा झाली. | ५७॥- | एकंदर गणेशोत्सवाचा खर्च |

४।८॥ शिल्लक आहे.

ह्या सर्व वर्गणीपैकी २० रुपये परगावाहून व बाकीची अमरावतीमधून झाली.

चांदुर बाजारचे रहिवासी डॉ० आप्पाराव संगेकर ( अध्यक्ष चांदुर बाजार सर्कल कांग्रेस कमेटी ) ह्यांनी आपल्या परमपूज्य वडि-लांचे-कै० सोमाप्पा संगेकर ह्यांचे-स्मरणार्थ गणेशमंडळास ५ रुपयांची देणगी दिली.

खजिनदार — बी. व्ही. कोल्हे.

टीप : — ज्या वर्गणीदाराला वर्गणीच्या हिशेबाविषयीं तपशीलवार विशेष चौकशी करावयाची असेल त्यांनी बसवेश्वरचौकांत भेटावें.

आभारप्रदर्शन —

वीरशैवसमाजाचा गणपति ह्या नावावर जी वर्गणी परगांवच्या सद्गृहस्थांनी आम्हांस दिली; तसेच अमरावतीमधील समाजघट-कांनी मोठ्या सहानुभूतीनें जी वर्गणी दिली त्याब-

...मी सर्व वर्गणीदारांचे हार्दिक आभार मानतों. ज्यांनी शारीरिक वा बौद्धिक मदत केली, त्यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत केली, त्या सर्वांचा मी फार ऋणी आहे. तसेच स्त्री विभागामधील सेक्रेटरीज कु० कमल कापसे, सौ० प्रभाताई चौधरी, सौ० वत्सलाबाई ...होळे व इतर स्वयंसेविका ह्या सर्वांच्या अमोल मेहनतीचें मोल माझें आभारप्रदर्शन ...सें करूं शकेल न कळे! आमची कारकीर्द यशस्वी झालेली पाहून मन आनंदसागरांत विहार करूं लागतें; पण ह्याचें श्रेय मला ...सून कार्यकर्त्यांनाच आहे हें विसरून कसें चालणार!

दि० सो० ऊर्फ बाळासाहेब संगेकर, अध्यक्ष, वीरशैव समाज ग० उत्सव वर्ष १८ वे.

आमचे उपाध्यक्ष —

ह्या ठिकाणी आम्हाला फक्त श्री. जी. आर. चाकोते ह्यांच्या उपाध्यक्षत्वासंबंधीच अधिकृत खुलासा करावयाचा आहे. वीरशैवसमाज-गणेशोत्सव वर्ष १८ वे चें कार्यकारी मंडळ निवडण्याकरिता ता. १६-८-३७ ला सभा भरल्याचें मागे आम्हीं जाहीर केलेंच होतें. तेव्हां कार्यकारी मंडळ हें बहुमताने निवडण्यांत आलें होतें. त्या सभेला श्री. जी. आर. चाकोते हे जातीनें हजर होते. त्यांचें नांव त्यांच्या संमतीनें सुच-विण्यांत आलें होतें व नंतर त्यांना बहुमतानें निवडण्यांत आलें. ता. ८-९-३७ ला श्रींची स्थापना झाल्यापासून तों ता. १७-९-३७ पर्यंत सर्व कार्यक्रम मंडळाच्या संमतीनें झाले, व ता. १७ कीं १८ ला कार्यकारी मंडळाचे उपाध्यक्ष श्री. चाकोते हे बुलेटीन नं. १ द्वारे जाहीर करतात कीं, "मला उपाध्यक्ष कोणीं, कसें व केव्हां केलें" हें माहीतच नाही. बरें झालें कीं हें त्यांनी १९३८ मध्यें जाहीर केलें नाही. निवडणुकीनंतरच नव्हे तर जवळ जवळ गणेशोत्सव संपत आल्यानंतर ह्मणजे १६-८-३७ पासून तों ता. १७-९-३७ पर्यंत श्री. चाकोते हें कुंभकर्णी निद्रेच्या बाहारीं पडले होते व ते पुढे सुद्धां तसेच राहिले असते. परंतु त्यांना ह्या निद्रेंतून कांही कुटिल कार-स्थानी शिष्ठ विघ्नसंतोष्यांनीं जागें केले हें अगदी निश्चितपणें बुलेटीन नं १ वरून सिद्ध होतें. श्री. चाकोते ह्यांचा स्वभाव व हाडाने नरम आहेत, हे ह्या विघ्नसंतोषी लोकांना पूर्ण माहीत असल्यामुळे त्यांनीं आपली शान खर्च करतांच श्री. चाकोते हे गोल तांब्याप्रमाणें बरबळले, दुसरे कांही नाही. बाकी बुलेटीन द्वारे प्रतिपादलेलीं मतें ही श्री. गंगाराम आप्पा चाकोते ह्यांची स्वतःची मतें नाहीत हें आह्मी पूर्ण जाणून आहों. चाकोते ह्यांच्या सहृयांची किंमत तर चाकोताच्या भाजीइतकीच स्वस्त आहे. श्री. चाकोते ह्यांनी बुलेटीन नं १ काढल्यानंतर उपाध्यक्ष म्हणून आम्हाला सही दिली व चार कार्यकर्त्यांकडुन केल्या गेलेल्या पार्टी-ला सुद्धां ते हजर होतें. इतकें असून त्यांनी पुन्हा ता.६-१०-३७ ला दुसरे बुलेटीन काढलें. त्यांत तर कांही अश्लील शब्द-प्रयोग वापरून आपल्या अंगावरील उपाध्य-क्षाची जबाबदारी बेजबाबदारपणें झुगारून देण्याचा त्यांनी पराकाष्ठेचा प्रयत्न केला. "ह्या समाजाच्या काढल्या गेलेल्या फोटोंत मी उपाध्यक्ष ह्मणून नव्हतो तर पेंटिंगच्या कामाबद्दल माझा सन्मान करण्याच्या दृष्टीनें ह्या समाजाचें आमंत्रण होतें ह्मणून हजर होतों" असें जाहीर केलें. पण ह्यांनी उत-राई होण्यासारखे पेंटिंगचें काम तरी कोणतें केलें हाच मोठा प्रश्न आहे. फोटोमध्ये ते उपाध्यक्ष ह्मणूनच त्यांना पुष्पमाला अर्पण करण्यांत आली होती हें अगदी सत्य. व ह्मणूनच त्यांना अध्यक्षांच्या उजव्या बाजूला बसण्याचा मान दिला गेला होता. श्री. गंगा-धर आप्पा चाकोते हे उपाध्यक्षपदाचा राजी-नामा देईपर्यंत किंवा कार्यकर्त्यांनी त्यांना काढून टाकोपर्यंत ते कायदेशीर रीत्या ह्या

मंडळाचे उपाध्यक्ष आहेतच आहेत हें अगदी निश्चित. ह्याला जबरदस्त आधार ह्मणजे त्यांची सही. श्री. चाकोते हे उपाध्यक्ष आहेतच हें सहीवरून सिद्ध होत असल्यामुळे त्यांनी स्वदस्तुरीनें काढलेल्या दोन बुलेटीनला योग्य ती किंमत देण्याइतकी सारासार बुद्धिमता समाजाला आहेच. आणि ह्मणूनच आह्मी त्यांच्या सहीच्या बुलेटीनला उत्तर देण्याच्या भानगडींत पडलों नाही. जर एकदां ह्या कार्यांत आह्मी घुसलों तर श्री. चाकोते व त्यांचे सल्लागार लगेच च् च् प् प् म् म् करूं लागतील हें आह्मी जाणून आहों.

आपले नम्र

एम. सी. एलगुंदे

बी. एस्. मिसे.

कार्यवाह वी. ग. मंडळ. वर्ष १८ वें.

---

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील— मौजेची प्रश्नोत्तरें:—

## गो. ग. बि. कोल्हापूर.

मी कपाशीचा दलाल आहें. पन्रतु आमचे भागांतील कपाशीचें पीक यंदा बिलकुलच बुडालें असल्यानें उपाशी रहाण्याचा प्रसंग उद्भवला आहे. तरी या बेकारीला कांही उपाय सुचवाल का ?

( अवश्यमेव ! हंगामी दलाली बंद झाली तर कायम दलाली सुरुं करा ! जुळवाजुळव-मंडळाची स्थापना करुन, समाजांतील जुन्या-पुराण्या विधूर-विधवांचे पुनर्विवाह जुळवून यथेच्छ दलाली मारण्याचा धंदा पत्करा ! समाजकार्यधुरंधर अशी आपली कीर्ति सर्वत्र पसरून समाजस्वास्थ्य कायम राखल्याचेंहि पुण्य आपल्या पदरीं पडेल. स्वार्थ आणि परमार्थ दोन्ही साधतील. )

---

## ए. म. ना. ( पुणे )

आमच्या एका मित्राच्या डोक्यांत आतांशा सिनेमाचें बरेंच वेड शिरलें आहे. अहोरात्र सिनेमा नटीच्या नावाशिवाय नांव नाही कुठ-ल्याहि गोष्टीचें ! प्रमुख सिनेमानटीं, शांता-आपटे, दुर्गा खोटे, वगैरे वगैरे ह्मांडून सान्या नटीशीं अतिशय सलोखा असल्याचें तो नेहमी बरळतो, आणि मी 'सिनेमाकंपनीत जाऊं का असें मला वारंवार विचारतो आहे. मला त्याची लायकी माहीत असल्यावरुन, त्याला नकार द्यावा असें वाटतें. पण तो ऐकायला तयार नाही. तेव्हां कसें काय करायचें ?

( पण आपण आधीं खात्री करुन घ्यावी कीं आपला मित्र स्वप्नांत बरळतो कीं 'S' बीयचा बार भरुन त्या नशेंत नसल्याच बाता झोंकतो. त्याला आपल्याकडून 'एस्' हेंच उत्तर हवें आहे तर आपण तें खुशाल देऊन त्याचा एकाद्या नटीने डी. बिलिमोरीया केल्यावर आपण त्यांचा एक फोटो काढून घ्यावा. )

---

## र. वि. फु. कारंजा.

घरच्या गरीबीमुळे शिक्षणाची आबाळ झाली, पण कांही ऋणानुबंधाने बायको शिक-

...ती मिळाली. परंतु तिचे चोचले पुरवण्यास ...मीमुळें मी अगदींच असमर्थ आहे. तेव्हा कसें ...रायचें ?

( सोपी युक्ती. बायको श्रीमंताची पोर असल्याने, तिच्यापुढें नेहमी लांगूलचालन करीत ...ता घोळीत असा. तिचा प्रत्येक शब्द ...लायची तयारी ठेवा, ह्मणजे ती स्वतःच्या ...हेराहून ठराविक रक्कम मनिऑर्डरनें बोला... ...ल, आणि चहापाण्यापासून तों फुलाच्या ...गजऱ्यापर्यंत स्वतः बरोबर आपली ही ...हाल होऊं देणार नाही ! )

---

...ु. स्था. सातारा

...उंब्रज येथील एक जंगमानें स्वतःच्या मुलीचा ...शंकराला बळी दिल्याचे मीं नुकतेच वाचलें ...हे. तेव्हा हा मनुष्य कीं सैतान ?

श्रीयाळ राजाचा आधुनिक अवतार! श्रीयाळानें चिलयाचा बळी देऊन श्रीशंकराला प्रसन्न ...रून स्वर्गारोहण केलें; हाहि शंकराचा ...भक्त ( ! ) अंदमानच्या स्वर्गावर [! ] ...याचा उद्धार करून घेईल.

---

...ु. का. नगर

परवा मी पुण्याला गेलों असतांना बुधवार ...ौकात एक आकस्मिक ॲक्सीडंट झाला. एक ...ायकलवर बसलेली तरुण पोर धाडदिशी ...ायकलसह माझ्या अंगावर येऊन आदळली. ...णि उलट मलाच ' नॉन्सेन्स ' ह्मणूं लागली.

( कदाचित् ती 'प्रेमवीर'कडे घाईघाईने ...ाली असेल आणि त्याच आनंदात ती ...ाली असतांना तुमच्या अंगावर कोसळली. ...णि नॉन्सेन्स ह्मणून तुह्माला प्रेमवीर ...नवलें, झालें ! भाग्यवान् आहात बुवा !

...शां. ह. हुमनाबाद

कामानिमित्त मला घरी येण्याला बराच ...शीर होतो. ह्मणच आमची सौ, रोज माझी हजेरी घेते. सध्यां तर हें प्रकरण इतकें विकोपाला गेलें कीं, पुन्हा ह्मणून घरीं तोंड दाखवूं नये असें वाटतें. पण आपले ठराविक वेळेला पाय घराकडे वळतात, आणि तिच्या तणतणाटाला ऊत येतो.

( यावरून एकतर आपली ती सुंदर असावी, किंवा कुरूप असल्यास आपण दुसरीकडे जीवाची करमणूक करून घेत असावे अशी जबर शंका तिला येत असावी. आपण बाहेरख्याली नाही अशी तिची समजूत पटवण्याखातर तिला बरोबर घेऊन फिरत चला, ह्मणजे तिलाहि आपल्या स्वरूपाचें प्रदर्शन उघडयावर मांडतां येऊन आपलाहि कार्यभाग पार पडेल.

---

## डॉ० नंदीमठ विरुद्ध 'कौमुदी'

बेळगांव येथील प्रसिद्ध लिंगराज कॉलेजचे विद्वान् प्रिन्सिपॉल डॉ. नंदीमठ यांची बेअदबी करणारा मजकूर पुणें येथे नुकत्याच निघालेल्या ' कौमुदी ' नामक मराठीं पत्रांत ता. ३१-७-३७ चे अंकांत प्रसिद्ध झाला ह्मणून सदर पत्राचे मुद्रक व प्रकाशक यांच्यावर डॉ. नंदीमठ यांनी इं. पि. कोडकलम ५०० प्रमाणे बेळगाव-सिटी मॅजिस्ट्रेट कोर्टांत फिर्याद दाखल केली आहे. त्याचें कामकाज कोर्टांत सुरू आहे.

---

## पुसद येथील बातमीपत्र

—" पुसद येथील सुप्रसिद्ध श्रीयुत बाबा महाजन यांचे एथील श्रीगणेशोत्सवांतील चढाओढींच्या कार्यक्रमांत विद्यार्थीवर्गाच्या टिपऱ्याचे खेळात व गाण्यात वीरशैव विद्यार्थी शिवलींग बाबा आजेगांवकर उमर वर्षे १२ यांस श्री. भुजंगाप्पा महाबाप्पा यांनी एक रौप्यपदक अर्पण केलें व तसेंच श्री. गोपीनाथ सुतार यांनीहि सदहूं विद्यार्थ्याचे कौशल्याबद्दल पारितोषिक ह्मणून एक रौप्यपदक अर्पण केलें व उत्सवाचे चालकांनी सदहुं विद्यार्थ्याचें अभिनंदन केलें. असें एक पुसदचे बातमीदार कळवितात.

# वीरशैवांतील चळवळी

## " श्री क्षेत्र परळी " निजाम

प्रतिवर्षाप्रमाणें श्री. गुरुलिंग स्वामींचा उत्सव मि. भा. शु., ११, ता.,१६.९३७ रोज गुरुवारी रात्रीं श्रीची पालखीतून मिरवणूक निघून ता. १७-९-३७ रोज शुक्रवार १२ वाजतां स्वस्थळीं आली. जनसमुदाय हजार-बाराशेवर जमला होता. बरेच गांवच्या दिंड्या आल्या होत्या. नियमाप्रमाणें आरती होऊन प्रसाद देण्यांत आला.

श्री. वीरशैव बालसमाजाच्या विद्यमानें श्री. वी.बा. स. चा पंचम वार्षिक उत्सव वीरशैवसमाजातील धर्माभिमानी व समाजप्रेमी असे सुप्रसिद्ध पुढारी श्रीमंत एकनाथप्पा धोंडे पेनूरकर यांच्या नेतृत्वाखाली मोठ्या घडाडीने साजरा करण्यांत आला. श्री. सांबओपळेंनी संस्थेचा संक्षिप्त रिपोर्ट वाचून दाखवल्यावर श्री. गु. सोमशास्त्री, वि. महादेवप्पा धोंडे पेनूरकर व श्री. नीळकंठप्पा थोटे पिंपळगांवकर वगैरे वक्त्यांची विद्या, समाजसुधारणा, या विषयावर मुद्देसूद व समयोचित भाषणें झालीं. यानंतर अध्यक्षानी समारोपादाखल भाषण करून समाजास ५ रु. देणगी दिली. सेक्रेटरी यांनी अध्यक्षास हारतुरा घालून त्यांचे आभार मानिले. तसेच पाहुण्यांमंडळीचे आभार मानून खालील ठराव पास करून सभा विसर्जन करण्यांत आली असें जाहीर केलें.

सभेंत, (१) निजाम सरकारला दीर्घायुष्यचिंतन, (२) परळी येथील कै. बसलिंगप्पा चौधरी यांचे निधनाबद्दलचा दुखवटयाचा ठराव, (३) सोलापूरचे श्री. मुंजे वकील यांनी इतर संस्थाप्रमाणेच येथील बालवीरसमाजाला हि ५ रुपयाची देणगी दिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन. (४) परळी येथील श्री. मन्मथअप्पा बल्लाळ यानी संस्थेस २२१ पुस्तकें दिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन, (५) सुदर्शनकरांनी सुदर्शनपत्र विनामुल्य दिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन, वगैरे ठराव पास होऊन सभेचें काम आटोपलें. असें बालसमाजाचे सेक्रेटरी कळवितात.

---

## बार्शी येथील बातमीपत्र

बार्शी—म्युनिसिपालिटीचे सन्माननीय सभासद श्री. काकासाहेब झाडबुके यांनी आपल्या सभासदत्वाचा राजीनामा दिल्यामुळें या संस्थेचें अत्यंत नुकसान होणार आहे, या गोष्टीची जाणीव त्यांचा ज्यांना थोडासा सहवास झाला असेल त्यांनासुद्धा होईल; मग ज्यांना त्यांचा दीर्घकाल सहवास घडला आहे त्यांना तर ती होईलच होईल यांत तिळमात्र संदेह नाही. श्री. काकासाहेब यांनी अध्यक्ष या नात्यानें किती समतोलपणानें, मनमिळाऊपणानें, व जबाबदारपणानें काम केलें आहे हें आपण जाणतच आहों. ते केवळ या संस्थेचेच भूषणभूत आहेत एवढेंच नव्हे, तर ते या नगरांतील प्रमुख व्यापारी, कार्यक्षम असे गिरणीचे एजंट, परोपकाराच्या व सार्वजनिक कार्यांत कळकळीनें भाग घेणारे असे प्रभावी पुढारी असल्यामुळे, ते आपल्या शहराला ललामभूत झालेले आहेत. तेव्हा अशा कार्यक्षम व लोकप्रिय सभासदाचा काही काळ तरी होणारा वियोग दुःसह वाटणें साहजिकच आहे. परंतु जनतेच्या हितासाठी पुनः लोकरच ते या

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ नोव्हेंबर १९३७ ( अंक २१वा

## अनुक्रमणिका



वार्षिक वर्गणी २॥ रु. } किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० शा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— 'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवातील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल्. एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— 'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः— 'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

— जुनें वर्ष पांचवें —

# वीरशैव संजीवनी

…ह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
…ङ्गधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

…नवें वर्ष २ रें ) मिति आश्विन व० १४ शके १८५९ ( अंक २१ वा.

## अमृत बिंदु

इतरांच्या गुणांवगुणाकडे काकदृष्टि लावून स्वतःच्या
गुणावगुणांची उपेक्षा करण्यापेक्षा आधी अंतर्दृष्टीनें
स्वतःच्याच गुणावगुणांची पारख करून
आत्मोन्नतीचा मार्ग आक्रमण
करणारासच अजातशत्रु ह्मणून
जगांत मिरवतां येईल.

बसवदेव.

# शिवाचें वसतीस्थान व त्यांचें अतिवर्णाश्रमत्व

वीरशैव ह्मटला कीं तो शिवाचा कडवा उपासक आणि शिवमय होऊन राहणारा योगी, असें त्याच्या पूर्वसंस्कृतीचें आनंदमय व रम्य असें चित्र डोळ्यापुढें उभें राहतें. एकीकडे याज्ञिक संस्कृतीचा प्रचार रूढ असताना शिवाचें त्याच वेळीं वास्तव्य होतें जसा इतिहासाचा आजहि पुरावा मिळतो. शिवाच्या वास्तव्यस्थानाचा अशा ऐतिहासिक दृष्टीने विचार करणें आजहि मनोरम व बोधप्रद आहे. याज्ञिक संस्कृति ह्या देशांत रूढ होण्यापूर्वी येथें कांहीं संस्कृति नव्हतीच असें कांहीं ह्मणतां येत नाहीं. आर्य लोक ह्या देशांत उत्तरेकडून आले व याज्ञिक संस्कृतीला धरून राहूं लागले ह्याबद्दल इतिहासज्ञांत आज वाद राहिला नाहीं. ज्याला वैदिक काळ ह्मणतात त्या काळांत आर्य लोक आजच्या पंजाब प्रांताच्या पलीकडे आले नव्हते. ह्मणजें एकेकाळीं दिल्ली व आग्रा ह्यापलीकडे आर्य पसरले नव्हते हेंहि उघड होतें. इतकेंच नव्हे तर ह्या मर्यादेपलीकडच्या प्रदेशाविषयीं त्यांना एक प्रकारचा तिटकारा वाटत असे हें उघड होतें.

अथर्ववेदाच्या पिप्पलादशाखेंत ' रोग्याच्या अंगांतील ताप काशीच्या लोकांच्या वाट्याला जावो अशी प्रार्थना केल्याचा उल्लेख आढळतो. " गंधारिभ्यो मूजवद्भ्यो काशीभ्यो. मगधेभ्य: ।। प्रेष्यज्जनमिव शेवधिं तक्मानं परिदद्मसि ।। " ५ । २२ । १४ ह्यावरून वैदिक कालापासून तों स्मृतिकालापर्यंत काशी, अंग, वंग, मगध व कोशल इत्यादि येथील देश व त्यांतील लोक ह्याविषयीं आर्यांना आपलेपणा तर वाटत नव्हताच पण उलट त्यांच्या आचाराविषयीं त्यांना तिटकारा वाटे. स्मृत्यादिग्रंथांत आग्नेय-पंजाब-दिल्ली-आग्रा ह्यांत समाविष्ट झालेल्या प्रदेशालाच ब्रह्मर्षिदेश, ब्रह्मावर्तदेश ह्मणून अत्यंत पूज्य व पावन मानले असा उल्लेख सांपडतो. ह्याचें कारण एकच कीं, दिल्ली-आग्राविभागापलीकडे आर्य ह्मणविणारांचा प्रवेश झाला नव्हता. त्या वेळीं शिवाचें वास्तव्य काशींत होतें व शिवाचीच संस्कृति इतरत्र सर्वत्र पसरली होती असेंच अनुमान निघतें.

प्रथमचे आर्यलोक शिवाला आपले दैवत ह्मणून मान देत नसत. दक्षयज्ञविध्वंसनाची जी कथा आहे ती ह्या गोष्टीची साक्ष आहे. दक्षाच्या सती नामक मुलीचें शिवाशीं लग्न झालें होतें, आणि शिवदेव जांवई ह्मणून दक्षाकडे रहावयासहि गेले होते. परंतु सासरे-जांवई ह्यांचें फार दिवस पटलें नाहीं. कारण उभयतांच्या अनुयायांच्या आचारविचारांत फरक होता. त्यामुळें श्वशुरांनाच नव्हे तर सासूबाईंनासुद्धां जांवईबुवा आवडेनासे झाले. आपल्या आईबापाची ही वावड सतीने ह्मणजे पार्वतीने शंकराच्या कानावर घातली. हें ऐकताच शिवदेव रागावले आणि

र सोडून परत काशी येथे रहावयास
े. वायुपुराणाच्या बाराव्या अध्यायांतील
, ३०, ३१ व ३२, हे श्लोक वाचले
ां वरील कथेचा भाग स्पष्टपणें लक्षांत
. पुढे महादेव काशीला निघून गेल्यानंतर
नें यज्ञसमारंभ करण्याचें ठरवलें. इतर
ना बोलावलें, परंतु शिवदेवास पाचारण
े नाही. स्कंध वगैरे पुराणांत शिवाने दक्षाचा
मान केला होता ह्मणून बोलावले नाही
े वर्णन आहे. पण वायुपुराणांत जें कारण
ितलें आहे तेंच अधिक महत्वाचें दिसतें व
रच विचार करणें जरूर वाटतें. ह्मणजे
वेळच्या आर्यसंस्कृतींत व त्या वेळच्या
संस्कृतींत काय फरक होता ह्याचा स्पष्ट
होतो.

वायुपुराण अध्याय ८८ श्लोक २७, २८,
, ३२, ३३ मध्ये दक्षाने महादेवास अर्थात
ास कां बोलावले नाही ह्याची कारणें
ीं आहेत. ' अहो, त्याचा वंश निराळा,
निराळा, गोत्र निराळें, वृत्ति निराळी,
ार निराळे, त्याचें सर्वच कांहीं अगम्य.
ा ब्राह्मण ह्मणावें तर त्याला वेद येत
ीत, क्षत्रीय ह्मणावें तर तारणापेक्षां मारण
त्याचा उपक्रम, वैश्य ह्मणावें तर अगदीच
ंचन, शूद्र ह्मणावें तर तसें ह्मणावयास
नाहीं. तो यज्ञोपवित वापरतो पण तें सर्पांचें.
तो विचित्र व वर्णाश्रमातीत आहे. ' "एवं
श्रमातीतः कोऽसौ सम्यङ्न कीर्त्यते" असें
े ह्मटलें आहे. ह्मणजे चौथ्या आश्रमांत
वस्थेला माणूस गेला ह्मणजे तो वर्णाश्र-
ीत होतो अशी ज्ञान्याची अवस्था वेदांत्यांनी
न केली आहे, ती अवस्था दक्षास त्यावेळीं
रिचित होती व त्यास तिचा बोध होईना.
न शिवाविषयीं तो मूढ बनला होता. आर्यांचे
ाची कल्पना त्या वेळीं स्वर्गापलीकडे गेली
ती. स्वर्ग ही सुखाची कल्पना भौतिक
वादाच्या ध्येयाला धरून आहे. तेव्हां भौतिक
वाद्यास ह्मणजे त्या वेळच्या आर्यांना शिवाची
वैराग्यवृत्ति त्याज्य वाटली तर नवल काय ?

तात्पर्य काय कीं, आरंभीच्या वेदकाळी
आर्यसंस्कृति व शिवसंस्कृति असा लढा
होता. त्यामुळें पंजाब–दिल्ली–आग्रा ह्या टापू-
पलीकडच्या मुलखाविषयीं आर्यांना आदर
वाटत नव्हता. शिवसंस्कृतीचें मूळ वैरा-
ग्यावर उभारलें असल्यामुळे नाना तऱ्हेचे संस्कृ-
तिहीन लोकहि शिवाच्या आश्रयास रहात
नसत. अशांचें संरक्षण करणें शिव आपलें
कर्तव्य समजे. ह्मणून शिव सर्वसामान्य जन-
तेचें आवडतें दैवत बनला. यज्ञसंस्कृतीच्या
प्रसारापेक्षा शिवसंस्कृतीचा प्रसार वेदकाळींहि
फार होता असें जें इतिहासकार ह्मणतात
त्याचा आजहि तसा त्याना प्रत्यय येतो. दक्षानें
आपल्याकडील यज्ञाला मुद्दाम शिवाला
पाचारण केलें नाहीं ह्मणून " वेदवादविपन्नधी"
अशी नंदीनें दक्षाची निंदा केली आहे
ह्मणजे वैदिक कर्मानें हुरळून जाऊन बुद्धिभ्रष्ट
झालेला. शेवटी पार्वती त्या यज्ञास गेली.
तेथे तिचा अपमान झाला. तिने यज्ञांत उडी
घेतली. शिव रागावले. वीरभद्रानें यज्ञ मोडला
व दक्ष मारला. पण पुढे ब्रह्मदेवानें शिवाचा
राग शांत केला आणि शिवानें दक्ष जिवंत
केला. येथे दोन अनुयायांत समेट झाला,
आणि महादेवाचा आर्यांच्या देवांत समावेश
होऊं लागला. शिव हा मोंगोलियन होता. तो
द्राविडियन नव्हे. द्राविडीयन त्याचे अनुयायी
बनले, पण आर्यांच्या देवांत शिवाचा समावेश
झाल्यानंतर बनले. ह्मणूनच रामहि शिवपूजक
होता; पण यज्ञ सोडलेला नव्हता. आणि राव-
णहि शिवपूजक होता; पण यज्ञत्याग केलेला
नव्हता असा रामायणाच्या अध्ययनावरून प्रत्यय
येतो.

राम आणि रावण ह्या उभयतांचा विचार करितां, रामावर शिवसंस्कृतीची अधिक छाप पडली होती असें दिसतें. कारण शिवदेवाच्या वैराग्यवृत्तीचें प्रतिबिंब जितकें रामचरित्रांत आढळतें तितकें रावणचरित्रांत आढळत नाहीं. कारण शिवाचें वास्तव्य काशीक्षेत्रांत असल्यामुळें त्या संस्कृतीची छाप पुढे अयोध्या वगैरे भागांत विशेष पडली तर नवल नाही. पुढे रामरावणयुद्ध झाल्यावर बिभिषण वगैरेंच्या सान्निध्यानें दक्षिणेकडेहि ह्या संस्कृतींची छाप पडत गेली. परंतु शिवसंस्कृति ही स्वतंत्र संस्कृति आहे. तिची छाप द्राविडीयन व आर्य ह्या दोघांवरहि पडत गेली हें मात्र विसरतां येत नाही. आणि ही शिवसंस्कृति शिवाच्या निवासामुळें प्रथम काशीक्षेत्रांत उगम पावली व तेथेंच तिचें केंद्र बनलें. शिव हा मोंगोलियांतून हिमालयमार्गानें काशी येथे निवासार्थ येऊन राहिला; पण त्या वेळी काशीक्षेत्राला काशी हेंच नांव होतें असें मात्र ह्मणतां येत नाही. इ. स. पूर्वी १६०० वर्षें अगोदर मनूनें स्थापलेलें एक राजघराणें राज्य करीत होतें. त्यांत काश नावाचा राजा राज्य करीत होता. त्यावरून काशी हें नांव रूढ झालें असें ह्मणतात. तथापि शिवानंतर काशी येथे जे राजे झाले ते शिवभक्तच झाले. दिवोदास नावाचा राजा जेव्हा मुक्त झाला तेव्हा त्याने शिवलिंग लोकांकरिता ठेवलें अशी पुराणांतरीं कथा आहे. शिवसंस्कृतीच्या व आर्यसंस्कृतीच्या अनेक झटापटी झाल्या. त्यांचें केंद्र काशीक्षेत्र होय. येथेंच ह्या दोन संस्कृतींत समेट झाला. सांख्यायन श्रौतसूत्राच्या १६-२९-६ ह्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, बलजातूकर्ण्य नांवाच्या एका ब्राह्मणानें ह्या दोन संस्कृतींतील समेटाचें कार्य शेवटास नेलें ह्मणून त्याला काशी, विदेह, व कोशल ह्या तीन देशच्या राजांचें पौरोहित्य लाभलें. तात्पर्य काय कीं, शिवाचें वास्तव्य काशी हें असें खरें, तद्वतच शिवसंस्कृतीचा उगमहि तेथेंच व शिव व आर्य ह्या दोन संस्कृतींचा समेटहि तेथेंच प्रथम झाला. वीरशैवांच्या मूळाशीं असलेली शिवजीवैक्य साधणारी कल्पनाहि प्रथम दक्षिणेकडे उगम पावली नसून, काशीक्षेत्रांत उगम पावली आणि दक्षिणेंत बसवेश्वरकाळांत तिचा विशेष प्रसार पुढे झाला. ह्या आमच्या ऐतिहासिक सत्यास हा एक आणखी पुरावा मिळतो. ह्मणून शिवाच्या निवासस्थानाचें व त्याच्या अतिवर्णाश्रमत्वाचें ऐतिहासिक विवेचन आज वाचकांपुढे ठेवलें आहे.

---

# लेखक व लेखनकलावादाचा समारोप

( लेखकः— ह० धो० देवघरकर, मुंबई. )

लेखनकला ही तरवारीच्या धारेपेक्षां तीक्ष्ण असून सांप्रत ती तिच्यापेक्षांहि श्रेष्ठ आहे. आपण तिचा सावधानपणें उपयोग करण्यास जर चुकलों तर किती अनर्थ ओढवतील याची कल्पना करवत नाही! समाजाचा उज्ज्वल भविष्यकाळ लेखकांच्या उच्च विचारसरणीवरच अवलंबून असतो असा माझा समज आहे.

वरील विषयावर आपल्या तिन्ही पत्रांतून श्री. भुंजे वकीलसाहेब व वीरशैव-वाङ्मयसंशोधक श्री. अण्णासाहेब साखरपेकर बडोदा यांचे साधक-बाधक टीकात्मक लेखहि प्रसिद्ध झाले आहेत.



( ह. धो देवघरकर. )

सदर विषयाचा इतिहास असा की, मुंबईचे आमचे स्नेही श्री. दादासाहेब आंधळकर यांचा ' आजकालचे महाराष्ट्रीय वीरशैव लेखक' हा लेख ' सुदर्शन 'च्या ता. १०-८-३७ च्या अंकांत प्रसिद्ध झाला. सदर लेखांत त्यांनी त्यांच्या समजुतीनें वर्गवारी लावून नांवेंहि प्रसिद्ध केलीं. तसेंच, कांही सूचनाहि केल्या.

सदर लेख प्रसिद्धीस जाण्यापूर्वी माझ्या पाहाण्यांत आला होता. वर्गवारीमुळे त्यावर टीकास्त्र सुटेल असें त्या वेळींच मीं त्यांस सांगितलें होतें. श्री. आंधळकर यांनीं तें जाणूनच लेख पाठविला. आपल्या पत्रांतून भारदस्त लिखाण बाहेर पडावें, टीका सात्त्विक व सभ्यपणाच्या असाव्यात, वेडीवांकडी तत्वें प्रतिपादन करण्याचा हट्ट बंद करावा, व आपल्या एकंदर वीरशैव लेखकांना आपला दर्जा अधिकाधिक वाढविण्याचा हुरूप येऊन त्यांच्या हातून लोकोपयोगी असें संग्राह्य वाङ्मय निर्माण व्हावें, हाच त्यांचा शुद्ध हेतु होता. त्यांच्या परीक्षणांत कांही व्यक्तीचे नंबर वरखालीं झाले आहेत हें जरी खरें असलें, तरी तेवढ्यावरून यांना दोष न देतां, उलट, रागरुसवा व टीका यांची पर्वा न करतां, एका चांगल्या विषयाची आपल्यांत चढाओढ लावली याबद्दल त्यांचें अभिनंदन करून त्यांत श्री० भुंजे व साखरपेकर यांनीं सात्त्विकपणें टीका प्रतिटीका करण्यांत आपला जो अमूल्य वेळ खर्च केला व बऱ्याच सत्य गोष्टी बाहेर आणल्या त्याबद्दलहि मी त्यांचा गौरव करतों.

सदर टीकेंत — आपल्यामध्यें लेखकवर्ग आहे व होत आहे; त्यास जर योग्य वाव व मदत मिळेल तर तो प्रभावी झाल्या-वांचून राहणार नाहीं; हीच गोष्ट सिद्ध झाली आहे.

वीरशैवेतर लेखकांची जी यादी प्रसिद्ध करण्यांत आली आहे त्याबद्दल कुणाचेंहि दुमत होणार नाहीं. परंतु आधुनिक लेखकांचो वाङ्मय-निर्मिती लक्षांत घेतली तर त्या यादींत बसण्याजोगे किती तरी लेखक काळाच्या जबड्यांत साह्याभावीं खितपत पडले आहेत असें दिसेल. वरील लेखक नामांकित होण्याचीं, तसेंच अखिल लोकांत त्यांचीं नावें दुमदुमण्याची कारणेंसुद्धा विविध प्रकारचीं आहेत. सदर लोक ज्या समाजांत जन्मास आले होते, त्या समाजाचा उदो उदो करण्यांत त्यांनीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केलें नाहीं, तर आपल्यापुढे 'मानवसमाज' ही बुद्धि ठेवून सत्या-विषयी पडलेली भ्रांति नाहींशी होण्यासाठीं आपल्या लेखनकलारूपी संजीवनीनें अनेक — विचारांत क्रांति घडवून आणण्यांत पुढाकार घेतला. त्यांची ग्रंथनिर्मिती कोणत्याहि वर्गास कोणत्याहि काळांत वाचनीय असून, शिवाय स्फूर्तिदायक आहे. आणि ह्यामुळेच लोक त्यांचीं नावें वारंवार घेऊन आपल्यापुढें आदर्श ह्मणून ठेवीत असतात.

मागासलेल्या समाजाची गोष्ट नेहमी अशीच असते कीं, तो कोणतीहि सुधारणा सर्वांच्या मागून स्वीकारूं लागतो; व सोडतांनासुद्धा सर्वांच्या मागूनच सोडण्यास तयार होतो. कोणतीहि नवीन गोष्ट त्याला अगोदर पटत नाहीं; पण पटल्यास मात्र ती टाकण्यास धजत नाहीं. यासाठीं तो आपल्या जीवाचें अनदीं रान करील! आणि याच न्यायानें आपल्या लोकांना मुळांत शिक्षण मिळण्यास फार उशीर झाला व त्यामुळें आपल्या सर्वच गोष्टी आता उशिरा होणार!

आपला बहुजनसमाज फारच सनातनी असून अनेक बंधनांनीं जखडलेला आहे. त्यांतून बाहेर पडल्यास साह्य मिळणार नाहीं या भीतीनेंच लेखकवर्ग जरा विचार करून लिहितो. बाहेरील समाजाशीं टक्कर मारण्याइतका तो प्रभावशाली नाहीं. तसेंच, आपल्या समाजांत अद्यापि पुरेसा वाचकवर्गहि तितका तयार नाहीं. या दुहेरी पेंचानें लेखकवर्ग आंतल्या आंत गुदमरत आहे.

इतर समाजांत नुसत्या नांवावरून ग्रंथ व पत्रें यांचा खप होतो. आणि त्यामुळेंच निरनिराळ्या लेखकांना मोबदला मिळूं शकतो, व त्याच्या जोरावर आपलें लिखाण प्रभावी व उपयुक्त होण्यास साधनसामुग्री मिळवून आपल्या चरितार्थासाठीं द्रव्यार्जनहि करतां येतें. तसेंच वीरशैवेतर लेखकांचे लेख व पत्रेंहि सार्वजनिक स्वरूपाचीं असल्यामुळें अखिल लोक वाचीत असतात. ह्मणजे त्यांचा वाचकवर्ग मोठा असतो. आणि ह्मणून पत्रकर्त्यांना आपल्या लेखकवर्गाला मोबदला देतां येतो. शिवाय आपलीं पुस्तकें, मासिकें, व पत्रें अधिक आकर्षक करतां येतात. आपल्या लोकांनाहि तीं फार आवडतात. ते दोहोंची तुलना करतात. आपली पत्रें त्यांस कमी दर्जाचीं वाटतात व त्यामुळे ते त्यांस मदत करण्यापासून परावृत्त होतात. परंतु त्यांचीं ही चूक आहे. आपल्या पत्रांची गोष्ट जर आपण पाहिली तर आपला वाचकवर्ग फार थोडा; तशांत, फुकट वाचणारे फार. वर्षभर अंक पाठवून अनेक वेळां विनंती करूनहि वर्गणी येत नाहीं असाच आपल्या संपादकमहाशयांचा पुष्कळांच्या बाबतींत अनुभव असणार! त्यांना पत्र जगविणेंसुद्धां मुष्कील होऊन बसतें, मग लेखकाला मोबदला काय देणार? मोबदला नाहीं ह्मणून लेखक तरी आपला अमुल्य वेळ खर्चून व आर्थिक नुकसान सोसून लेख कितीसे लिहिणार? तसेंच, चरितार्थासाठीं द्रव्यार्जनाचा

हवा पाठीमागें असल्यामुळें आपलें लिखाण सर्वोत्कृष्ट व प्रभावशाली होण्यासाठीं - मीठ-मसाला कोठून व कसा मिळविणार ? त्याच्याशिवाय वाङमयरूपी पदार्थ चवदार कसा होणार ? तेव्हा माझ्या या लिखाणाचा उद्देश हाच कीं, आपल्या लेखकवर्गाला पुढें आण-ण्याचें काम आपलीं जीं पत्रें करीत आहेत त्यांस भरपूर आश्रय मिळवून दिला पाहिजे. तीं संपन्न झाल्यास, आपल्या वाचकवर्गांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी आपल्या लेखकवर्गाला प्रोत्साहन मिळावें ह्मणून यथाशक्ति पारितो-षिक देतील. तसें होत गेल्यास लेखकवर्गंहि बाकबगार होण्याचा प्रयत्न करील.

आपल्या समाजांत आज बरेच लेखक आहेत. त्या बहुतेकांचा लेखसंग्रहहि तयार असेल ! परंतु श्रीमंत झुंजे वकीलसाहेब यांनींच आपल्या हिंमतीवर आपला लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें आहे. स्वतः ते मोठ्या तळमळीचे व निगर्वी लेखक असून, वरच्या दर्जाचेच आहेत. त्यांचा लेखसंग्रहहि चांगला आहे. परंतु त्यास कितीसा आश्रय मिळाला आहे हें तेच जाणूं शकतील ! त्यांच्याप्रमा-णेच 'सुदर्शन' ग्रंथमाला व 'संजीवनी' संग्रह यांची तऱ्हा असावी! आणि आपल्या या उदा-सीनतेमुळेच कोणत्याहि लेखकाला आपला संग्रह प्रसिद्ध करण्याचें धाडस होत नाही.

आपले बहुतेक लेखक स्वसमाजाकडे पाहूनच लेख लिहिण्याचा प्रयत्न करीत असतात. आणि ह्मणून आपल्या लेखकांना क्षेत्र फारच आकुंचित पडत आहे. त्यामुळें एकमेकांचे पाय एकमेकांस ओढून हाणामारी करण्याचे प्रसंग वारंवार येत आहेत. करतां आपल्या वीरशैव लेखकांनी यापुढे सामाजिक क्षेत्रांतून पदार्पण करून श्री. नानासाहेब वामणगांवकर, आण्णासाहेब साख-रपेकर, आण्णासाहेब कल्याणशेट्टी, इत्यादि लेख-कांप्रमाणें विविध विषयांवर लेखमाला लिहून वीरशैव व वीरशैवेतर या दोघांसहि उपयुक्त अशी कामगिरी करण्याचा प्रयत्न करावा.

श्री. साखरपेकर तर गुजराथी पत्रांतूनहि लिखाण लिहीत असतात. अशा लेखकांचा आपल्या समाजातून जर मदत मिळूं शकेल तर ते आपल्या बुद्धीप्रमाणें उपयुक्त ग्रंथ-निर्मिति करतील अशी माझी खात्री आहे.

श्री. नानासाहेब वामणगांवकर तर वीर-शैवांचे मराठींतले टिळक आहेत असें आह्मी समजतों. वेळप्रसंगी आह्मीं त्यांच्याकडे बोटहि दाखवितो. पण त्यांच्या व्यवसायाला मात्र आमच्याकडून मदत होत नाही याचें वाईट वाटतें. आणि मदत नसल्यामुळेच त्यांच्या-कडून आपल्याला जशी कामगिरी व्हावी ह्मणून वाटते तशी होत नाही ! आपल्या वीरशैव-समाजाची सर्वांगीण उन्नति व्हावी अशी खरी इच्छा जर आपणांस झाली असेल तर यापुढें आपल्या हातून एकमेकांस खाली ओढण्याचा प्रयत्न होणार नाही व वाङमयसेवकांना निराश केलें जाणार नाही अशी मी आशा करतों.

आपल्या निरनिराळ्या पत्रांत जे लेखक चमकत आहेत त्यांनीसुद्धां टीका करतांना सात्विकपणा ठेवावा. सूडाची भावना बाळगूं नये. इतकेंच नव्हे तर तसाच कांही महत्वाचा प्रश्न असेल तर परस्परांत विचार-विनिमयहि करावा, आणि त्यासाठीं श्री. आंधळकर यांनी वीरशैव लेखकांची एक जंत्री करण्याचें काम चालू केल्याचें समजतें. ती प्रसिद्ध झाल्यास ठीकच होईल. तिचा फायदा घेऊन 'वीरशैव-वाङमयसेवकसंघ' या नावाची एक संस्था स्थापन करू या ! माझ्या मतें सदर कामगिरी आपल्या कोणातरी संपादकमहाशयानेच पत्करावी, ह्मणजे कार्य झपाट्याने होईल. सदर संघामार्फत लेखसंग्रह,

ग्रंथ, वगैरे प्रसिद्ध करण्यांत यावेत. स्वत:ची प्रकाशनसंस्था काढावी, ह्मणजे सहकारी तत्वानें वाङमयप्रसार होईल. लेखकांस अल्प-स्वल्प मोबदला व प्रसिद्धी मिळण्याची आशा वाटेल व त्यामुळे ते आपलें लिखाण प्रभावी करण्याचा प्रयत्न करतील. माझ्या विधायक सूचनांचा प्रेमळपणें विचार करून सदर विषयावरील टीका-प्रतिटीका यापुढे बंद होईल अशी मी आशा करून, 'वीरशैव वाङमय सेवक संघ' स्थापन करण्याच्या प्रयत्नास लागावें अशीं माझी सप्रेम सूचना आहे. तिच्याकडे वाङमयसेवकांचें लक्ष वेधेल काय ?

---

लघुकथा १६ वी.

# गोड आभास

( लेखक:— मा० भी० सोलापुरे, कोल्हापूर. )

पहाटेची प्रशांत वेळ !

चित्रकार आपल्या कुंचल्याच्या फटकाऱ्यानं आणि रंगाच्या मोहक मिश्रणानं निर्जीव वस्तूंत सजीवतेचा भास उत्पन्न करतो. तो आभास असल्याची जाणीव असतांनाहि आपला दील त्याच्याकडं कां खेचला जावा ?

तीच तर कलावंताची कला !

पण निसर्ग हा जगतांतील अखिल चित्रकारांपेक्षांहि कुशल नाही का ?

कारण त्याच्या कुंचल्यांतील चापल्य आणि रंगाच्या मिश्रणांतील कौशल्य कुणाच्याहि ठिकाणी आढळव येत नाही.

सुधाकर टेकडीच्या आड लपून आपल्या अमृतमय धवल किरणांचा सृष्टिदेवीवर वर्षाव करीत तिच्या पाठीवरून ममतेनं हात फिरवीत होता.

कितीहि झालं तरी बायका ह्मणजे लाजाळूचं झाडच !

नाहीतरी सृष्टिदेवी किती लाजली होती!

सर्वांगावर आनंदाचे रोमांच उभें राहिले होते.

तिचं मुखं आरक्त झालं होतं.

आणि ती तिरप्या नजरेनं सुधाकराकडे पाहात होती.

बरं, सुधाकरचा दबाव कांही कमी नव्हता !

त्याच्या आगमनाबरोबर विहंगादिकांचें मधुर कूजन सुरु झालें होतें.

सर्व जगतावर उत्साहाचें वारें खेळत होतें.

भ्रमरादिगण पुष्पांच्या कानांत " हें पहि-लंस कां कोण आलं आहे तें ! " असें कुजबुजत होते. मुदित अंतःकरणानं वनचरें इतस्ततः विहार करीत होती.

अशावेळी सभोंवती रम्य अशा निसर्गाच्या कोंदणांतील गर्द राईंत एका निर्झराच्या कांठीं मी बसले होतें. हृदयसागरास आनंदाचं भरतं आलं होतं. मनांतील आनंदसागराच्या लाटे-वर बसून मी स्वैर विहार करीत होते. त्या निर्झरांतील गोड जलाचं मीं मनमुराद प्राशन केलं. जल कसलं, अमृतच तें ! आणि माझ्या आंगांत उत्साहाचं वारं शिरलं. मी भिरीभिरी हिंडू लागले. त्या रम्य वनांत बराच काल हिंडले मी. त्यातील आनंद मनमुराद चाखला. मनाला कसलीशी हुरहुर लागली. मला एक मार्ग दिसला. मी तसंच पुढं जात होते. पुढं सपाट प्रदेशच लागला.

मीं लांबवर नजर टाकली. पण भयाणतेशि-वाय दुसरं कांही नाही. दचकत दचकत पुढंच जात होते मी, तों एक भयंकर दरी आढ-ळली ! माझं धैर्य खचलं. ही दरी मी एकटी कशी ओलांडणार ? हा प्रश्न माझ्यापुढं आ वासून उभा राहिला. अगदींच अभावितपणें सुर-वात झालेल्या माझ्या या अज्ञात यात्रेचा अंत पुढं आणि केव्हा होणार याचीच मला भीति पडली ! असीम उदासीनता उराशीं बाळगून एखाद्या वेडीप्रमाणं मी अगदी एकटी-एकटी त्या विराट स्वरूपी भयाण प्रदेशांत भटकत होते.

तोंच एकाएकी कुणाच्यातरी मुखांतील मधुर शब्दाचा मला आभास झाला; आणि कानांत " हा वेडे ! मी इथं आहे ना ! पहा तुझ्या हृदयांत शोधून " असं कुजबुजलं. मी आतुर नजरेनं चहूंकडं पाहिलं, तों लांबवर एक मनोवेधक असं देवालयाचं शिखर दिसूं लागलं. एकूण, मला त्या देवळांत गेलें पाहिजें तर ! आयुष्यांतील अंतिम ध्येयच तें ! सात-समुद्र ओलांडण्याचं माझ्या आंगांत सामर्थ्य आलं, आणि मी ती दरीं सहजतेनं ओलां-डून गेले. मी कसं घाबरलें याचंच मला अति आश्चर्य वाटून माझं मलाच हसूं आलं !

थोडंसं पुढं जाते तों आपला नीळसर रंगाचा अंचल सांवरींत जाणारी सरिता भेटली. तेथेंच एक नौका दिसली मला. त्यांत बसून यथेच्छ जलविहार करावा असं वाटूं लागलं. पण त्यांतील सुकाणू कोण धरणार ? मी एकटीच त्या अफाट सरितेंत बुडणार तर नाही ना ? सहचरी हवाच त्यांत विहार करण्यास ! हृदयाशीं मुके बोल बोलणारा सोबती हवाच आयुष्यांत ! त्याविना जीव-नांतील गूढ कसं उकलणार ? जीवनसंगी-तांतील तारा तालबद्ध अशा कशा छेडल्या जातील ! अशा विचारांत मी उभी होते. तोंच पुन्हा पूर्वीचेच बोल ऐकूं आले. त्या बोलांत कोणती जादू भरली होती न कळे ! त्या आभासमय स्वरलहरींतील प्रत्येक शब्दानं जणुं काय माझें प्राणच बांधून टाकले होते !

मीं झटकन उडीं मारून नावेंत बसलें. आणि कुणीतरी हळूंच येऊन माझे डोळे झांकले. पुरुषाचा मादक स्पर्श तो ! मी माझा देहभाव विसरलें. दोघांनीं खूप जलविहार केला. दमलें मी आणि मला भूकहि लागली. त्यांनी झट-कन एका गगनचुंबित वृक्षावर चढून अमृ-तफलं काढलं. फळेंहि आणलीं. ते झाडांवर असतांना मला भीति वाटली !

पण त्यांच्या मनांत भीतीचा लवलेशहि नव्हता ! एका वृक्षाच्या छायेखालीं उभे होतो आह्मी. त्यावेळीं स्नेहभावनेच्या कंपनानं माझं शरीर थहरून गेलं होतं ! आह्मी खालीं बसलों, व नंतर मी त्यांच्या हृदयावर डोकं टेंकून कितीतरी वेळ बसलें होते ! हृदयाचं सुरेल संगीत ऐकण्यात तंद्री लागली होती मला!

थोडयाच वेळांत आह्मीं लपंडाव खेळण्यास सुरवात केली. आम्रवृक्षाच्या दाट झाडींत व सुगंधित पुष्पाच्या दाट वेलींत ते अधून-मधून लपत होते. मी त्यांना शोधून दमलें तरी ते दिसले नाहींत मला ! मी घाबरलें. दाहीं दिशांना हांका मारल्या. अनिलाकरवी निरोप-सुद्धां पाठविला. तरी ते आलेच नाहीत ! मला कितीतरी राग आला. पण त्या रागाचं पर्यवसान मुळूमुळू रडण्यांत झालं. तें हळूच आले आणि मला आपल्या बाहुपाशांत घट्ट धरून माझ्या कंपित अधरावर सुधासिंचन केलं. मी त्यांना लपेटलं होतं. जणूं कांही वृक्षाला विळखा घालणारी वेलच !

त्या रम्य, सुखमय आभासांतच मी मग्न असतांना मला आईनं जागं केलं. ती कायसं ह्मणत होती " इंदु ! किती ग उशीर हा उठायला ! उद्यां सासरीं असंच का करणार ! "

आईच्या बोलण्याकडं माझं लक्ष नव्हतं. त्या वेळीं माझ्या मनांत कसल्या विचारांनी खळबळ उडविली होती तें नाही मला सांगतां येत !

---

## वीरशैव संजीवनीच्या टपालांतील —

## मौजेची प्रश्नोत्तरें:—

**पु. य. पो. परळी.**

समाजसुधारणेंवरच चर्चा करीत असतांना कांही मतभेदावरून एका इसमाशीं माझा वाद झाला. अशा वादप्रसंगीं त्या इसमाने मला ' नंगा ' ह्मणून माझी बेअदबी केली. सबब मीं त्याला कोर्टांत खेचून त्याचेवर डीफेमेशनची केस करणें योग्य होईल कीं नाही?

( आपली बेअब्रु करणारावर डीफेमेशनची केस करणे हेंहि एक समाजकार्यच आहे. पण बोधयाची सूचना ह्मणून कळवून ठेवतों कीं समजा, न्यायाधिशाला 'नंगा' या शब्दाचा अर्थ कळला नाही, आणि प्रत्यक्ष पुराव्यानें शाबिती करण्याचा प्रसंग आल्यास भर कोर्टांत तुह्मी ' नंगे ' होणार काय?)

**गु. शं. ना. पंढरपूर.**

आपल्या वीरशैवसमाजाइतकी स्वाभिमान-शून्यता इतरत्र कुठें तरी असेल का ? आज चार वर्षांपासून मीं येथें वकिली करीत आहे. पण लिंगायतामधून उभ्या आयुष्यांत मला चारच इसमाकडून वकिलपत्र मिळाले, आणि माझ्याच बरोबरीनें बाररूममध्यें बसणाऱ्या लिंगायतेतर वकिलांकडे लिंगायत पक्षकारांची सारखी गर्दी असते. यावरून कित्येक वेळेला असेंहि मनांत येतें कीं धर्मांतर करून या लिंगायतांचा कायमचा संबंध तोडून टाकावा.

( लिंगायतांच्या स्वाभिमानशून्यतेबद्दलची आपली कुरकुर अगदींच अनाठायी असेल असें

…ाही तरी ह्मणणार नाही; पण डोक्यांत …व घालून धर्मांतर करण्यात अर्थ नसून कर्त- …बगारीने धंदा करण्यांतच अर्थ भरला आहे …हें आपण विसरतां. लिंगायतेतरांपैकीं आज- …र वितीं पक्षकारांना आपण आपल्या कर्त- …बगारीनें यशस्वीं करून दाखविले याचा …दाखला काढा आणि चार लिंगायतांच्या जोडीला …मंडळीसची तरी भरती इतरांची आहे अशी …खास खात्री असल्यास धर्मांतर करण्याचे …कारण नाही; आणि उलटच प्रमाण पडल्यास …खुशाल धर्मांतर करून इस्लामी धर्माची …सेवा घ्या अगर अंबेडकरांच्या गोटांत शिरा.)

…. स. लो. कर्जत.

मी नुकतेच वाचलें कीं, ब्रह्मदेशांत असा …क नवीनच रोग उद्भवला आहे कीं, …चुंबन' हेंच त्या रोगावर रामबाण औषध …आहे. हें खरें असेल कां ?

(तसला रोग आपल्याकडेहि उद्भवला तर …बरं होईल अशी आपली इच्छा दिसते आणि …त्याचा पहिला प्रयोग स्वतःवर व्हावा याची …उत्सुक डोळ्याने आपण मार्गप्रतीक्षा करीत …आहां कीं काय अशीहि शंका येते. प्रत्यक्ष …रोग नाहीं तरी ढोंगीपणाने कां होईना, …… पहा ट्रायल अेकदा ह्मणजे आपोआपच …कोडें उलगडलें जाईल. )

… नि. रे. इस्लामपुर

आमचे येथील एका इसमाजवळ बराच …सार्वजनिक फंड जमा आहे. त्याचा विनियोग …समाजांतील गरीब विद्यार्थ्यांना शिक्षणाप्रीत्यर्थ …व्हावा असें आमच्या येथील चार शिष्टमंडळींनी …जाऊन तशी त्याला विनंती केली, पण तो …इसम या विषयावर चकारशब्दहि बोलत नाहीं. …तर कसें काय करायचें ?

(सार्वजनिक फंड गडप करणें हाच आपला …प्रसिद्ध हक्क आहे अशी त्यांची समजूत असेल. …आणि या त्याच्या हक्कावर तुम्हीं गदा घाला- …यला टपल्यानंतर, त्यानें या बाबतीत' मौनं सर्वार्थ …साधनम्' ध्येय ठेवणें उचित नाहीं असें तरी कसें म्हणावें ? यावर जालीम उपाय म्हणजे आपणहि दुसरा एकादा सार्वजनिक फंड गोळा करून मिळून टाकावा, आणि प्रतिपक्षाला नामोहरम करावें.)

ह. ब. भि. मुंबई.

वीरशैवांतील बेकारांची जिल्हावार जंत्री तयार करून त्यांच्या पोटापाण्याची शक्य तो तजवीज करण्याच्या उद्देशाने आह्मी इथें एक मंडळ-स्थापन केलें आहे, आणि त्याच्या शाखा सर्व मोठ मोठ्या शहरामधून उघडण्याचा आमचा मानस आहे. तेव्हां आजच्या प्रसंगी हें करणें अत्यंत जरुरीचें आहें कीं नाहीं यावर आपलें मत द्याल अशी आशा आहे.

( वीरशैवसमाजाकरिता आपणास बेकारांची जंत्री तयार करण्याची तसदी घेण्याचें कांहीच कारण नाही. शेंकडा शंभराचा बेकारी नंबर तर नुसते जंगम पटकावतील. आणि शेकडा पाऊणशे इतरामधूनहि आपणास खात्रीने मिळूं शकतील. एकूण 'शेंकडा पावणेंदोनशे बेकारांचा समाज' असें जाहीर करायला आपणास कांहींच रकत ना…ी.)

स्वा. शा. काशी-

भस्मधारण हेंच वीरशैवांचें भूषण. पण आताशां नवमतरुण मंडळीमधून याला अजि-बातच फाट दिल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें, या-बद्दल अतिशय वाईट वाटतें.

[तरुणांबद्दल आपण केलेलें विधान चुकीचें आहे असें मी आपणास सिद्ध करून देऊं शकतो. आजकालच्या तरुण-तरुणीमध्यें भस्मधारणेचा इतका जाज्वल्य अभिमान बळावला आहे कीं, नुसते भस्माचे दोन पट्टे कपाळावरच न फासतां, नव्या स्वरुपांत साऱ्या तोंडावर फेस पावडरचे (अर्थात भस्माची सुधारुन वाढवलेली आवृत्ति ) लपेटन केल्याशिवाय त्यांना चैन पडत नाही इतकेंच नाही तर घरांतील लहान लहान बालकांना देखील ते या भस्माच्या बुकणींत घोळवून लोळवून पांढरें फट्ट बन-वतात. आपल्यासारख्या सनातन्यांच्या चश्म्या-मधून इतकें ठळक भस्मलेपन आपणास दिसूं नयें याचें नवल वाटतें ?]

कर्तबगारांच्या ओळखी

# वीरशैवांतील कर्तृत्ववान् पुरुष

## श्री० कृष्णाप्पा सद्राप्पा कलुरे यांचा

# अल्पपरिचय

( लेखकः—तु. ना. काटकर, नागभीड. )

धमंवेडे दुर्बळ मतीचे लोक ह्मणतात, प्रचलित कलियुग आहे. बुद्धीजीवी ह्मणतात बौद्धिक युग आहे. इतिहासकार ह्मणतात लोहयुग आहे. नी संशोधक ह्मणतात विज्ञान-युग आहे.

पण आह्मी ह्मणतों हें कर्तृत्ववानाचें 'कर्तृत्व-युग ' आहे.

बारा वर्षांपूर्वी जो पुरुष गुलामगिरीच्या शृंखलांनीं बद्ध झालेला दिसावा तोच आज पूर्ण स्वातंत्र्य उपभोगीत असलेला एक राष्ट्रसेवक ह्मणून दिसत आहे!

ह्या गूढगुंजनाचें रहस्य तरी किती मनोरम आहे!

अत्यंत दारिद्र्यावस्थां, पण पापभीरु शीलवान मातापित्यांच्या उदरीं इ. स. १८९५ सालीं गोकुलअष्टमीस आरमोरी ( चांदा ) येथें घराशेजारोच सायंसमयीं श्रीकृष्णाची पार्थिव पूजा चालली असतां चरित्रनायकाचा जन्म झाला. वीरशैवसांप्रदायाप्रमाणें जन्मनांव ' रेवणसिद्ध ' ठेवण्यांत आलें. तरी पण जन्माष्टमीच्या पूजनकालांत जन्म झाल्यामुळे ' कृष्ण ' हेंच आवडतें नांव होऊन बसलें नी आज ते नामांकित व्यापारी असले तरी ' कृष्णाप्पा मास्तर ' ह्या गोंडस नावानेंच ओळखले जातात.

आईबापाचा आवडता जीवश्चकंठश्च पहिला बाळ, तशांत दारिद्र्यानें गांजलेल्या कुलांत जन्मलेला, पण तोच आपले पांग फेडील या आशेवर पोटाला चिमटा घेऊन त्याला वयाच्या सहाव्या वर्षी शाळेंत घातलें. आईनें जंगलांतून मोळ्या आणाव्या तर वडिलानें चार-दोन आण्यांची मजूरी करावी नि कसाबसा संसार चालवावा. ह्या अवधींत कृष्णापांना आणखी चार भावंडें

असली. संसाराचा वाढता खर्च नि व्याप
यामुळें मातापित्याबरोबर कित्येकदां कृष्णा-
नाहि माध्यान्हाची भ्रांत पडूं लागली. एकदां



( श्री० कृष्णाप्पा सद्राप्पा कलुरे. )

असा करुण प्रसंग आला कीं, घरांत चार
हि नव्हते. मुलगा तर भुकेने विव्हल
झाला. करावें काय ?......प्रसंग आला कीं
सुचतो. शेवटीं जातें कुरतडलें. जात्यांतील
-भाकून राहिलेलें पीठ काढलें नि
लहानसें रिपटें करून कृष्णास
लावें लागलें. तर कित्येक वेळां पोटाची
मिळविण्याकरितां आईबरोबर चार-
टिपण्याकरितां रानोमाळ फिरावें लागे,
आपला शाळेचा अभ्यासहि संभाळावा लागे.
प्रतिकूल वातावरणांतून अनुकूल मार्ग
कृष्णाप्पा प्रतिवर्षी चांगल्या वरच्या
काने परीक्षा उत्तीर्ण होत गेले. किंबहुना
वेळीं त्यांची हुशार विद्यार्थी ह्मणून ख्याति
, व त्यांच्या ह्या हुशारीचें बीज मध्यप्रांतांचे
साहेब ह्यांनी योग्य असें पारितोषक
केलें.

वयाच्या १३ व्या वर्षी कृष्णाप्पांचे माध्यमिक शिक्षण पूर्ण झालें. आकांक्षा प्रबळ होती. त्यांना प्रवेशचा अभ्यास करावयाचा होता. पण हुशार, शीलवान नि गरीब विद्यार्थी ह्मणून कृष्णाप्पांना त्यावेळीं हुशार विद्यार्थ्यांना दिली जाणारी शाळेंतील पांच रुपये वेतनाची मॉनिटरची जागा दिली गेली. पण कृष्णाप्पा ध्येयवादी, परोपकारी नि करारी बाण्याचा होता. त्याला वाटले, पांच रुपयाचे मागें लागलों तर आपल्या आकांक्षेची इतिश्री येथेंच व्हायची. ह्मणून त्यांनीं पांचाचे ऐवजीं अडीचच रुपयाची आशा धरली नि आपल्याच एक सहाय्यक दुसरा सहाध्यायी मिळवून आपल्यांतील अर्धा वांटा त्याला दिला. नि आळीपाळीनें मॉनिटरचें काम करूं लागले. सकाळी स्वतःचा अभ्यास करावा नि दुपारीं विद्यार्थी शिकवावे. आज ते चांद्याचे एक नामांकित व्यापारी ह्मणून नांदताहेत. पण जन्मभूमीच्या ठिकाणीं ते गेले तर अजूनहि त्यांना त्यांचे बालसंवंगडी ' अडीच रुपयाचा बकरा आला ' म्हणून विनोदानें संबोधितात तेव्हां कृष्णाप्पांना त्याच्यांतच आपुलकीचा अनुराग वाटतो. पण आज त्यांची दरमहा अडीच रुपयाचे ऐवजी अडीचशें रुपयांची प्राप्ती आहे. चाळीशीं उलटली पण कर्तव्यदाक्षिण्य चिकाटीनें वास करीत आहे. ' राखावीं बहुतांचीं अंतरें ' ह्यांतच त्यांची लोकसेवा नि ' शहाणे करून सोडावें सकळ जग ' अशीच प्रामाणिक सदिच्छा, शत्रूचेंहि नुकसान व्हावें अशी स्वप्नांतदेखील कुइच्छा नाहीं. शक्य तोंवर अनीति न घडतां सचोटीचा व्यापार वि जुन्या पौराणिक रुढीला चिकटून राहून नवमतवादाला फेटाळण्याचा हेतु नाहीं अशी तर्कशुद्ध विचारसरणी असून, जशांत तसें मिसळण्याची स्वाभाविकता आजहि कायम आहे.

कृष्णाप्पांच्या सातत्याला बहर आला नि ते वयाच्या १४ व्या वर्षी प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होऊन नागपुरचे मराठी ट्रेनिंग कॉलेजांत प्रविष्ट

झाले. तेव्हा त्यांची तेथें सर्वांत लहान नि हुषार विद्यार्थी म्हणून प्रसिद्धी होती. भाषा--निबंधलेखन ह्या विषयांत पहिल्या क्रमांकाचें बक्षीस प्रि० वा. के. ओक ह्यांचे हस्तें त्यांना मिळालें.

कॉलेजमध्ये प्रवेशण्यापूर्वी गरीबाला मुलगी मिळणेंहि शक्य नव्हतें. पण होतकरू विद्यार्थी म्हणून चांदा येथील श्रीमान् मलम्मा घारणे यांनीं आपली कन्या कृष्णाप्पांना अर्पण केली. पण कृष्णाप्पा दरिद्री नारायण कोणी लुगडे पुरवा तर कोणी धोतर पुरवा अशा तऱ्हेनें हा बालविवाह एकदाचा आटोपला, नि येथून कृष्णाप्पाच्या भाग्योदयाला खरा खरा आरंभ झाला, व सर्व तऱ्हेनें परिवर्तन घडत आलें.

कॉलेजमधून उत्तीर्ण होतांच चांदा-जिल्हा-बोर्डाच्या नागभीड येथील माध्यमिक शाळेंत अध्यापकाच्या व्यवसायास प्रारंभ झाला नि संसाराचा सर्व भार कृष्णरावांवर पडला. ह्या काळींच वाचनाभिरुचि प्राप्त होऊन 'जें जें आपणाशीं ठावें तें तें दुसऱ्याशीं सांगावें' ह्या तत्त्वान्वयें लेखनकलेची प्रवृत्ति झाली. हा जर्मन-इंग्लंड-महायुद्धाचा काल होता. राष्ट्रजीवनाच्या क्रान्तीला झपाट्यानें सुरुवात झाली होती. त्यांतच कुचघाडा, गडिसुर्ला प्रभृति स्थळीं स्थलांतर, पगारवाढ नि लेखनकलेची वृद्धिंगतावस्था ह्यांची योग्य सांगड साधून पांच वर्षांनीं चांदा-जिल्हा-बोर्डांतून चांदा स्थानिक स्वराज्य संस्थेंत परिवर्तित झाले. लगेंच त्यांच्या हुषारीमुळें त्यांना रीट्रेनिंग कोर्स संपादण्यास पुनः एकवर्षाकरितां नागपूरास धाडण्यात आले. ह्यावेळीं मानसशास्त्रासारख्या गहन विषयांत विद्वान् सुपरिंटेंडेन्ट श्री० शिवराम हरि गोखले यांचेकडून पहिल्या क्रमांकाचें पारितोषक मिळविलें. तेथून परत येतांच कृष्णरावांची मुख्याध्यापकाचे जागेवर नेमणूक झाली. नवीन शिक्षणपद्धतीला भुलून अधिकाऱ्यांनी मुख्य अध्यापकाचे जागीं जुन्या अध्यापकांना एकीकडे सारून मुकररी केल्यामुळें, जुने अध्यापक रुष्ट झाले, नि कृष्णरावांच्या कार्याची किंमत होत नाहीं म्हणून नोकरीला कंटाळलें. ह्या अवधींत कृष्णाप्पांचें वऱ्हाड-बालापत्रक, चित्रमयजगत्, मुक्तगुच्छमाला, शिक्षणप्रकाश, नि श्रद्धानंदप्रभृति नाणावलेल्या नियतकालिकांत लेख नि काव्यें येऊं लागले. 'चांदा जिल्हा प्राथमिक शिक्षण संघ' स्थापन करण्यांत येऊन दरवर्षी सन्माननीय देशभक्तांच्या पुढाकाराखालीं मोठमोठ्या परिषदा भरविण्यांत येऊन शिक्षकांच्या दृष्टीनें उत्तमोत्तम ठराव पास करण्यांत आले नि ह्या संस्थेच्या कार्यवाहापासून कृष्णरावांना अध्यक्षपदाचा सुद्धा प्रामुख्यानें मान मिळाला. नि येथूनच कृष्णरावांच्या समाज व राष्ट्रकार्याची जीवननौका चालू झाली.

शहरांतील सर्व साधनसामुग्रीचें साहय झाल्यामुळे, आधीच रुजत असलेल्या विचाराला झपाट्यानें चालना मिळाली. पण ह्या १२ वर्षांच्या पारतंत्र्याच्या कालांत स्वतंत्र मनोवृत्तीला पोषक पाणी मिळत नसे, नि स्थानिक संस्थेच्या लोगिरभरतीं सभासदांशीं नमून वागणें म्हणजे प्राणांत वाटे. आतां ही रुपेरी शृंखला नको, ह्यापेक्षां स्वतंत्र वृत्तीनें भीक मागणेंच बरें, असें वाटूं लागलें, नि एक तप बसें-बसें पुरें होतांच दृढनिश्चयानें गुलामगिरीला कायमचें पुरून टाकलें.

'स्त्रीयश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति कुतो मनुष्यः' ह्या न्यायानें येथून आयुष्याच्या निराळ्या स्थित्यंतरास सुरवात झाली. चांदा येथील एका धनिकानें किराण्याचें मोठें ठोक दुकान उघडलें होतें. तेथे एक पातिदार म्हणून कृष्णरावांना अनायासें स्थान मिळालें. जन्मांत कधीं त्यांनीं हा धंदा न केलेला, किंवा त्यांतील अंतरंग त्यांना न कळल्यामुळे हा धंदा अनीतीचा नि अत्यंत पापमूलक आहे म्हणून भीति वाटें पण योगायोग कांहीं अतर्क्य असतो.

असे B. P. येथील प्रसिद्ध सिद्धरामप्पा ज्ञानयोगी महाराज यांचेकडे कृष्णाप्पा यांनी विचारणा केली. त्यांनी त्यांना गृहस्थाश्रमाचे (इतर आश्रमापेक्षां) महत्व पटवून देत असतां "संसारांतील बायका, मुले, आप्त हें अतिथी आहेत, नि गृह ही दुसऱ्यावर उपकार प्रेम—कसें करावें ह्याची प्रयोगशाला आहे. तेव्हां त्यांच्या पोषणार्थ कांही तरी नफा मिळवून निधी मिळविणें जरुर आहे. वजन खोटें देणें किंवा एक माल दाखवून दुसरा माल देणें हें पाप आहे. केवढाहि नफा मिळविणें हें पाप नव्हें" असें पटवून दिलें. त्यावेळी श्री. कलुरे यांनीं ह्या धंद्याचा स्वीकार केला. किंबहुना 'स्वभावनियतंकर्म कुर्वन्नाप्नोति किल्मिषम्' ह्या गीतेच्या शिकवणीचें बीज कलूरे यांच्यांत आनुवंशिक संस्काराने होतेंच. ह्मणूनच कीं काय, एकाच वर्षांत ह्या एवढ्या मोठ्या थोर व्यापाऱ्यांत उत्तम व्यापारी ह्मणून गणले जाऊं लागले. मुंबई, मद्रास, कलकत्ता, कानपूर प्रभृति मोठमोठ्या नगरांतून ठोक माल मागवूं लागले, नि लांब लांबच्या सफरी काढून निपजस्थानांची माहितीहि मिळविली, व आपला अनुभव जनास सादर केला. केवढा हा व्यासंग! पण लबाडी न करितां इतरापेक्षां माफक भावानें ग्राहक जमवूं लागले. अडीच रुपयांऐवजी आतां अडीचशें तीनशें रुपयांचें उत्पन्न काढूं लागले.

श्री. कलुऱ्यांनी पारतंत्र्याच्या शृंखला तोडल्यामुळे त्यांच्या स्वतंत्र विचाराला नि कार्याला चालना मिळाली. भीरुत्वाचा लवलेश उरला नाही. कर्तृत्वाकरितां सर्व क्षेत्र खुलें झालें. गुलामगिरी झुगारून देतांच चांदा येथील स्थानिकस्वराज्य संस्थेच्या उमेदवारीत शिरकाव केला. कांग्रेस व राष्ट्रीयपक्षांत राहून शक्य त्या देशसेवेला सुरवात करण्यांत आली. मराठी—मध्यप्रांतीय कांग्रेस—सभासदाचाहि एकदां त्यांना मान लाभला, नि हल्लीं तर ते चांदा—जिल्हा हिंदुमहासभेचे चिटणीस; चांदा—नगर—स्थानिकस्वराज्य मतदार—संघाचे अध्यक्ष; श्रद्धानंद—अनाथाश्रमाचे सदस्य—नि चांदा—जिल्हा—बोर्डाचे प्रमुख सभासदप्रभृति क्षेत्रांत विराजमान आहेत.

असहकारितेच्या कालांत 'चांदा ट्रेड असोसिएयन संस्था' स्थापन करून शक्य ती मदत केली. चांदा येथे प्रतिवर्षीं सार्वजनिक गणेशोत्सव होत आहे. त्याचेंहि बरेंच मोठें श्रेयश्री. कलुरे यांनाच आहे.

कृष्णाप्पा कलुरे मास्तर ह्मटले की जशास तसें मिळालें ह्मणून समजावें. त्यांच्या भवरथाचें दुसरें चक्र ह्मणजे प्रेमळ नि सत्त्विक सुस्वभावी श्रीमती सीताबाई यांच्या सहकार्याचा लाभ ह्मणजे कृष्णरावांच्या राहिलेल्या उणीवांची पूर्तता. दिवसाची कोणतीहि घडी असो. आलेल्या अतिथींचा प्रेमळपणानें योग्य सत्कार झालाच पाहिजे. त्रास ह्मणून कधी बघितला नाही. आपल्या कार्यीं सदा दक्ष. एवंच वयाच्या १२ व्या वर्षांपासून आज ३० वर्षांच्या कालांत ह्मणजे ४२ वर्षे वयाला लोटली एवढ्या कालांत वैय्यक्तिक नि सार्वजनिक अशीं अनेक सत्कार्यें पार पाडलीं. 'राखावीं बहुतांची अंतरें, भाग्य येते तदनंतरें' हा तर त्यांचा ध्येयमंत्र आहे. ह्मणून आज त्यांचा एक प्रसिद्ध सन्मान्य नागरिक ह्या नात्यानें लौकिक आहे. नुसत्या व्यापारोन्नतीचे व द्रव्यसंपादनाचे ध्येय मनःचक्षूंपुढे न ठेवितां प्रपंचाबरोबर परमार्थहि कसा साधतां येईल व शक्य तों जनसेवेच्या कार्यांत कसें पडतां येईल नि गरीब दुबळ्या जनतेचा मार्ग कसा सुकर होईल ह्याची विवंचना करण्यांत आज त्यांचें उत्फुल्ल आयुष्य 'कृष्णभुवनां'त जात आहे. त्यांना उदंड आयुष्य लाभो नि त्यांच्याकडून अनेक सत्कार्यें घडो! एवढीच कोणीहि सदिच्छा धरणार!

शब्दचित्र

# जीवाच्या नंदादीपास

लेखकः—
शि० ल० खोत,
ज्यू. बी. ए.,
राजाराम कॉलेज.

तुझ्या तेजस्वीं प्रकाशानें कितीं चेतना मला मिळत होती! पण आतां तो सर्व प्रकाश एकाएकीच नाहींसा झाल्याने जीव कसा भयभीत होत आहें. आयुष्याचा सर्व प्रवास मला आतां गडद अंधःकारातून करावा लागणार ह्मणून हृदय कम्पित होऊं लागतें व डोकें भ्रमू लागतें; व तासन् तास दिग्मूढ होऊन जातों. तुझ्या उजेडाने मला माझा जीवनमार्ग फुलांनीं पसरलेला दिसत होता, पण आज मी अचानकपणें दुःखाच्या खोल अशा दरीमध्ये एकाएकीच पतन पावलों आहें. तुझ्या आल्हाददायक प्रकाशांत माझा जीवनक्षरा इंद्रधनुष्याच्या रंगांनी चकाकत होता, पण त्यांतील मासे मारण्यास मी समर्थ कसा होणार ? तुझ्या विद्युत्चमकींनें मी दुःखाच्या दाट अरण्यांतून सुखाची हरणें मारण्यासाठीं मजेनें हिंडत होतो, पण आतां त्याच अरण्यांत भीतीची पिशाच्चें मला भेडसावतात. सर्व जगाला उजेड देणारा सूर्य मला मात्र अंधारच देतो, हा काय खरा न्याय आहे ?...... तुझ्या ठिकाणीं मात्र माझा जीवन-नभ प्रकाशित करण्याची इच्छा दिसत नाही यावद्दल माझं हृदय फुटून जातं !

आजचा हा दिवस, कीं ज्यावेळीं तूं माझ्याकडून आत्मीयतेची साक्ष घेणार होतेस. त्या आजच्या वेळेला मला माझा शोक आवरतां येत नाही आणि ब्राउनिंगचें Men and Women पुस्तक वाचतांना एकाएकीच वरील आत्मीयतेच्या साफल्यतेची सिद्धता आतां अशा स्थितींत अशक्य आहे हें पाहून मन घाबरून जात आहे अन् दुःखाचा जोरदार प्रवाह याच लिखाणांतून पुढे पुढे उचळीत आहे.

जागतिक मर्यादांनीं चुराडलेल्या हृदयास आतां प्रातःकाली उचळलेल्या सुवर्णप्रभेची चकाकी कशी मिळणार ! अेकहि दिवस असा गेला नाहीं कीं ज्या दिवशीं तुझ्या मागील वागणुकीची तेजस्वीं चित्रें कल्पनेने काढिलीं नाहीत अगर तुझ्याशीं काल्पनिक वादविवाद केले नाहीत !

माझ्या अप्रकट मनामध्यें तर तूं मला कांहीतरी मागील गोष्टी सांगत असतेस, मी त्या चित्तपूर्वक अेकत असतो, पण एकाएकीच जगाच्या गलबल्यानें क्षणभर भानावर येतो, पण काय ? अंतरीची आस सफल होणार कशी ?

जग हें न्यायी लोकांसाठीं नाही अशाच भावनेने वागले पाहिजे मला. जिकडे पहावें तिकडे औदासिन्य. ते दिवसापासून कॉलेजमध्येंदेखील माझा जीव रमत नाही. अप्रगट मन एकाएकीच डोकें वर काढिते, तुझी शोचनीय स्थिति प्रचंड वादळाची कल्पना देते, आणि तद्वतच मीहि पण वाऱ्यानें उडणाऱ्या धुळीप्रमाणें जीवनप्रवाहातून वाहिला जात आहें.

अशी परिस्थिति नसती तर आजचा दिवस किती सुखाचा गेला असता ! आजपर्यंत किती बोललों असतो, किती पूर्णत्वाला पोहों-चलों असतो, किती मजा मारली असती ? पण ही सारी कल्पनाच !

जगांचा विसर पडत होता मला तुझ्या सान्निध्यांत ! पण आतां काय ? क्षणाक्षणाला गतसौख्याबद्दल वाईट वाटतें व पुनः गेलेले दिवस येणार नाहींत ह्मणून जीव घाबरा होतो. गतसौख्याची गोड स्मृति हा अेकच दुःखाचा सूक्ष्म झरा !

मागील गेले पांच-सहा महिनें ह्मणजे काळघाकुट्ट ढगांतून १/१०० सेकंदभर चमकणाऱ्या बिजलीची चमकच होय ! पुनः दुसऱ्याच क्षणीं जिकडे-तिकडे अंधःकार !! मात्र, अेवढें खरें कीं सर्व आयुष्यभर माझ्या हृदयावर अेकप्रकारची दुःखमय छटा तरंगत राहणार ........जीवनसंगीत अस्पष्ट होणार, आणि मी मात्र दुःखदरींतून आत्म्याची शोकजन्य गाणीं गात कसाबसा फिरत राहणार ?

माझे सर्व दोष विसर, पण मला मात्र केव्हांहि विसरूं नकोस बर ?

नीलाकाशांतून अस्वस्थपणें फिरणारा,

—विहंगम

---

# श्रीमज्जगद्गुरु स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

संदेश २ रा.

अहो, शुभाशीर्वाद ह्मटले संपादकमहाराज. अरे पण हो ! तुह्मीं कांही आमच्या त्या हृषासारखे, कुठल्याहि, आणि कसल्याहि पीठाचे, ज्या अर्थी ज्वारी, बाजरी मक्का, चणे, वाटाणें, फुटाणें, निदान गहूं, तांदुळ, असल्या कोणत्याहि जिनसेच्या पीठाचे अधिकारी नाही, त्या अर्थी तुह्माला महाराज ह्मणून संबोधणें ह्मणजे धडधडीत इतर पीठाधिकाऱ्यांचा अपमान करणें आहे. कारण, महाराज ह्मटला कीं तो आयत्या पीठावर रेघोट्या ओढणारा, आणि 'आंधळे दळते आणि कुत्रे पीठ खातें,' अशा उदार बुद्धीने जागत्या डोळा डोळे मिटून चैनीने कालक्रमणा करणारा असेल तोच खरा महाराज या संज्ञेला पात्र होतो. महाराज या संज्ञेला राजे आणि सन्यासी हे दोनच प्राणी लायक आहेत. असें असतांना

आह्मी तुह्माला महाराज ह्मणून संबोधिलें खरें, पण ते केवळ गमतीचें समजून तुह्मी महाराजांच्या व्याप्तीपलीकडे निरंतर रहावें अशी बोलण्याची सूचना देत आहोंत. असतु. आह्मीं यापूर्वी तुह्माला जो संदेश दिला होता त्याचें प्रत्यंतर अद्यापि नीटपणें अनुभवाला येण्याची मुदत आणखी थोडी वाढवून पुढे काय काय चमत्कार होतात इकडे दृष्टि लावून बसलों आहोंत आह्मी सध्या! वरचेवर कमी-अधिक कळवूंच ह्मणा तुह्मांला त्या बाबतींत!

आतां दुसरा विषय ह्मणजे श्रावणमास संपला, भाद्रपदांतील गणेशोत्सवाच्या मौजा ओसरल्या, आणि पितृतिथ्यांची तांदळपिठी बासुंदीहि खलास झाली, आणि विजयादशमीचें देवीचें नवरात्र उलटून माडीपौर्णिमेची कोजागिरी कोसळली, इतके सारे सणासुदीचे दिवस ह्मणजे खाण्यापिण्याचा चंगळ; पण यंदा काय झालें कुणाला ठाऊक, अपशकूनच झाला लेकाचा! इतकी टंगळ मंगळ झाली कीं, या दिवसांत खाऊन मरायचे हें आमचें व्रत, पोटावरून हात फिरवीत कढवट ढेकर देत लोळत पडायचे ते दुसरे दिवशी जेवणाचें नांव निघालें की उठून पळायला लागायचे, असा दरसालचा कार्यक्रम; पण यंदा पाठपोट एक होण्याचा प्रसंग आला. एका तरी यजमानानें आमंत्रण दिलें असेल तर त्या यजमानाचीच शपथ!

नाहींच तें आतां जमायचें! धर्म बुडाला! नास्तिकपणाचा कळस झाला! या नव्या चवचाल वृत्तीच्या लोकांना मुळीच धर्माभिमान उरला नाहीं, त्याचेंच हें फळ खरें! त्याचेंच हें फळ. यापुढे आपण तर ठरवून टाकलें आहे. अगदी प्रतिज्ञा केली आहे की, यापुढे धर्माच्या नावाचें एक अक्षर देखील न उच्चारतां राजकारणांत भाग घ्यायचा! आणि एकदम अशी कांही क्रांति करून दाखवायची कीं 'न भूतो न भविष्यति,' आणि देशभक्त, राष्ट्रप्राणाचार्य ह्मणून मिरवायचे! नुकताच आह्मी आतां राजकारणाचा अभ्यास करून-बसून करण्याचें ठरवलें आहे. इतकेंहि असून आतां बिशाद आहे का कीं मी राष्ट्रसूत्रधार होणार नाही असें छातिठोक सांगण्याची कुणाची! देशभक्ती – देशभक्ती ती काय चीज आहे, आणि ती कशी करावी हेंच आजपर्यंत जेवढे ह्मणून देशभक्त होऊन गेले, होऊन गेले कसले, लोकांनी त्यांना बनवले आणि ते बनले; आणि खरे सांगायचे ह्मणजे खरोखरच बनले झालें! आह्मी मात्र तसे मुळीच बनणार नाही. नाममात्र देशभक्त बनण्याची आमची मुळींच नाहीं, इच्छा आणि प्राण गेला तरीच काय पण प्राण गेल्यावरदेखील आह्मी नाममात्र देशभक्त बनणार नाहीं, नामशेष होऊं पण नांव कमावून दाखवूं अशा महत्वाकांक्षेने आह्मी या मार्गावर पाऊल ठेवले आहे. हो, नसत्याच धार्मिक, चळवळी नी वळवळी त्या आतां किती किती दिवस करायच्या? आता तेच ते भस्माचे पट्टे, तेंच तें पादोदक, नि तेच ते बिल्वावे. ह्याशिवाय दुसरें काय उरलें आहें? आता त्या धर्माडंबराच्या नावात नुसते धर्माचें नांवच नाममात्र उरलें आहे. धर्म ह्मणजे कांहीं पोरखेळ नव्हे, असें ह्मणावें तर नुसत्या पोरखेळाशिवाय दुसरे तिसरे आज तरी काय उरं दिलें आहे? या चळवळ्या लोकांनी धर्मसुधारणेच्या नावांत सुधारणा, क्रांती, वगैरे वगैरे जाडेजुडे शब्दच तेवढे ऐकून घ्यायचे. बाकी सारे ॐ फस्. आतां कुणी असें ह्मणेल कीं, काय हो, कंदर्पानंदजी आपण आपल्या सन्यासी वृत्तीला कंटाळून जे राजकारणांत पडायचें ठरवलें आहे असें ह्मणतां तर तुमचा तो यतीधर्म सोडून तुह्मी स्वतः धर्मबाह्य वर्तन करणें हें तुह्माला उचित आहे कां? महाराज, देशकार्य ह्मणजे सुळावरली पोळी आहे पोळी! येरागबाळाचे तें काम नव्हे. वास्तविक तुह्मी इतक्या उच्च

सनावर विराजमान आहांत कीं, मोठमोठे राजे महाराजेंदेखील तुमच्या चरणावर भक्ति-भावानें विलीन होतात. परवाचेंच उदाहरण तुम्हाला माहित आहे ना ? असायलाच पाहिजे. तरण तो लोकोत्तर सोहळा एवढ्यांतच विसम-रणा जाणें शक्य नाही. म्हैसूर नरेश जगद्-गुरूंच्या दर्शनार्थ आले, केवढी मौल्यवान् वस्त्रे आणि किती भरगच्च गुरुदक्षिणा गुरुचरणी त्यांनी अर्पण केली, आणि केवढा चिरस्मरणीय समारंभ झाला. तेव्हा हे सारे तपोबलाचे आणि श्रद्धेचें फळ आहे असें नाही का आप-णास वाटत? खरें ह्मटलें तर आपण धर्मा-कर्मं रहाण्यांतच आपली पृथ्वीमोलाची किंमत आहे. असें असतांना हे कार्य नवीनच उपजलेचें वेड आपल्या डोक्यांत शिरलें तें कळत नाही. पण आह्मी ह्मणतों, आह्मालाहि सारे कांहीं कळतें आहें. पण तशी तपश्च-र्या करण्यात उगीच देह कष्टवायचा, आणि उपलक्षणाच उपटायची याशिवाय लोक कल्याण तें आह्मी काय साधणार! गोरगरी-बांच्या जीविताशीं निगडित होऊन त्यांची दुःखें वेशीवर टांगायची, सभासंमेलनामधून मोठमोठ्या गर्जना करीत प्रतिपक्षावर शिव्या-शापांचो लाखोली वहायची. मारे जयजयका-राच्या गर्जना आणि टाळ्यांच्या कडकडाटांत मिरवणुकीने लाखो लोकांच्या समुदायामधून मोटारीतून मिरवीत जायचें, अस्पृश्योद्धाराच्या अवडंबराखाली अस्पृश्यांच्या वस्तींना भेटा देत त्यांचा उद्धार करायचा, ओढतां येतील तितके परधर्मीय आपल्या हिंदुधर्मांत ओढायचे आणि त्यांची नांवें बदलून, त्यांना गोमुत्रादि पंचगव्याने स्नानें घालून त्यांच्याशीं सहभोज-नाचा फार्स करायचा, आणि हिंदुधर्म की जय ह्मणून हिंदुधर्माची दिव्य पताका स्वर्गापलीकडेहि फडकवण्याची महनीय कामगिरी करायची, आणि समजा इतकेंहि करून जर कांग्रेसवाले हे हिंदुमहासभेचे पुरस्कर्ते आहेत असें ओरडा-यला लागले तर त्यांच्या नावानें बोटें मोडून मुसलमानवार्जीणो कांग्रेस ह्मणून साऱ्या जग-भर डांगोरा पिटायचा, इतकें असूनहि मुस-लमानांतील कांही बडी मंडळी कांग्रेस ही हिंदु-धर्माभिमानी आहे असा टाहो फोडायला पुढें सरसावली आहे त्यांनाहि रोख ठोक जबाब द्यावयाचा. एकूण काय कीं, 'आई जेवूं घालीना आणि बाप रडूं देईना,' अशी जी आज कांग्रेसप्रारब्ध्या हिंदुस्थानच्या एका बड्यासंस्थेची स्थिती झाली आहें, ती सुधारण्याकरितां आणि तिला सर्वतोपरीं सुखाचे दिवस येण्याकरितां आह्मी लोकांनीं यांत अवश्य भाग घेणें आज अगत्याचें होऊन बसले आहे अशी आमची खात्रीपूर्वक भावना बनल्या कारणाने आज आह्मी देशभक्तीची दीक्षा घेऊन प्रसंगोपात तुरुंगवासाची शिक्षाहि भोगायला तयार आहोंत. आता तर काय ह्मणे तुरुंगातील कैद्यांना या कांग्रेसच्या राजवटींत सरसहा बंधमुक्त करण्याचेच घोरण जिकडे तिकडे सर्रास सुरु झाल्याचें आह्मीं ऐकलें आहे आणि ह्मणून आह्मी कांग्रेस-भक्त ह्मणून कुणाला कितीहि शिव्या हासडल्या तरी आमचा उदोउदो करून तुरुंगाऐवजी तुरंगावर बसून आमची मिरवणूकच निघायची हें हमखास ठरलें आहे. आज काळी निशाणें आह्मालां दाख-वायची कुणाचीहि छाती नाहीं. कारण आज जो तिरंगी निशाणाला मान आहे तो प्रत्यक्ष सरकारच्या युनियन जॅकला देखील नाहीं. वंदे मातरम हे राष्ट्रगीत आज जितक्या आस्थेनें गाईले जाते तितक्या आस्थेनें पोथ्या-पुराणा-कडे देखील कुणी ढुंकून न पहाण्याचा हा काळ आहे. भगवद्गीताहि नुसती नावापुरती आज जीव धरून बसली आहे. वन्देमातरम हें जीवाहून प्यार होऊन बसलें आहे. एकूण खरोखरच हा सारा राष्ट्रीय सोहळा हृदय उचंबळुन येण्यासारखा भव्य आणि अद्वितीय दिव्य आहे असें कोण ह्मणणार नाही ? पुराणांत देवदेवतांनी विमा-नामधून पुष्पवृष्टि करण्याच्या अनेक भाकड-कथा वर्णिल्या आहेत त्या झूट असाव्या असें आजवर आह्मालां वाटत असे; पण आज आमचे

देशभक्त प्रत्यक्ष विमानारोहण करून पृथ्वीवरील आपल्या भक्तजनांना कागदी हुंडविल्सच्या वृष्टीनें उत्तेजनपर संदेश देतात हें केवढें आमचें सद्भाग्य. पण कुचेष्टेखोर लोक स्वदेशभक्तीच्या नावाखाली मोटारी उडवून, विमानांत बसून, पृथ्वीपर्यटन करून, मेजवान्या झोडीत या देशभक्तांना चंगळ करायला पाहिजे, गोरगरीबाकडून वर्गण्या वसूल करून भरभक्कम फंड जमवायला पाहिजेत आणि ते गडप - करून चैनचमन करायला पाहिजे, आणि वर देशभक्तीचा डांगोरा मिरवायला पाहिजे, असें बडबडतात; पण या त्यांच्या बडबडण्याला डबक्यांतील बेडकांच्या वरळण्याहून कवडीची तरी अधिक किंमत आहे असें निदान देशभक्तांना तरी वाटण्याचें कांहीच कारण नाही. कारण, ' हाथी चालत अपने घूनमो, कुत्तर भुकत वाको भुकवा दो, ' अशाच तत्वानें देशभक्तांनी आपली सहनशक्ती वाढवण्याचें व्रत घेतलें पाहिजे. तेव्हांच कुठे कट्टा देशभक्त ह्मणून मिरवण्याला तो लायक होतो अशी आमची ठाम समजूत आहे. देशभक्त झाले तरी माणसेंच कीं नाहींत? त्यांनाहि अंतःकरण आहे, सुखंचमेचयनंचमे, चैनंचमे, हा मानवी हक्क त्यांनी जर सोडून दिला तर त्यांनी या जगाच्या उलाढाली तरी कां ह्मणून करायच्या? त्यांनीं सन्यास घेऊन तपोवनामधून दाढ्या मिशाच्या जंगलाची वाढ करून स्वतःच्या संसाराची राख अंगाला फासून अरण्यरुदन करीत कां बसूं नये? पण पोक्त विचारांतीं आज तपस्वी, सन्यासी, यांची जगाला, त्यांतून आपल्या हिंदुस्थानला तर काडीचीहि गरज उरली नाहीं, हाच सिद्धांत ठरून गेला आहे. महात्माच व्हायचे असले तर देशकार्यी तनमन अर्पण करून, चार हाताच्या सुतकी फडक्यावर सूत कातीत बसण्यानेहि महात्मा होऊं शकतो, आणि सभोवती झापड बांधलेल्या ठराविक रिंगणामधून, अडाणी अशिक्षितापासून तों तहत मोठमोठ्या मी मी ह्मणणाऱ्या, अतीरथी महारथींनाहि बैलोबा बनवून फिरवतां येते हें महात्मा गांधींनी सिद्ध करून दाखविलें आहे. आणि खरें सांगायचें ह्मणजे त्यांनीच आह्मांला असा गुप्त संदेश पाठविला आहे कीं, माझ्याकडून आतां वयोमानाप्रमाणें हें राष्ट्राच्या ह्योरक्याचें जोखंड झेंपेनासें झालें आहे तेव्हां आपल्या सारख्यांनीं हें जू मानेवर घेऊन इतर . तूतं बैलोबाच्या जोडीस उभें रहावें. लौकरच बाय चॅन्स माझी जागा तुह्माला देण्याचें मी अश्वासन देतों. ही गुप्त गोष्ट गुप्त ठेवण्याचें त्यांनी आह्माला कळकळीने कळवल्यावरून तूर्त तरी याचा स्फोट न करण्याचें आह्मीं ठरवलें आहे. आणि इतःपर देशभक्तीचें कंकण धारण करून स्वामी कंदर्पानंदाऐवजी महात्मा कंदर्पानंद अशी आमची जाहीरात जगभर फडकू लागल्याचें लवकरच सर्वांना आढळून येईल. आमचे प्रायव्हेट सेक्रेटरी ह्मणून लसुणलिंग शास्त्र्यांना. आणि खास देशसेविकाच्या प्रमुख ह्मणून कोथींबिरबाईंना आणि बालवीराच्या पथकावरील प्रमुख मिरची ताईना बनवण्याचे आह्मी आजच अश्वासन देऊन ' न भूतो न भविष्यति, अशी क्रांती आमच्या कारकिर्दीत या भारतवर्षात घडवून आणूं असें खात्रीपूर्वक अश्वासन द्यायला आह्माला आज अत्यानंद होत आहे. अस्तु. '

( शुभम् भवतु इति शुभाशीर्वादम् )

वन्दे मातरम्

# सन्मित्राच्या गांठीभेटी

**वीरशैव गर्जना** — पांचव्या वर्षाच्या वाढदिवसानिमित्त गर्जनेने आपला अंक ता.१४ ऑक्टोबरचा खास अंक, अर्थात् कव्हरपेज तीनरंगी छापून आणि अंतरंगातहि नव्या-जुन्या लेखकांचे उद्बोधक लेख आणि पंचाचार्यांचें आणि लेखकांचे फोटो प्रसिद्ध करून अगदीं छान सजावटीने प्रसिद्ध केला आहे. सदर अंकांतील, अनेक लेखकांचे शुभसंदेश, आणि लेख वीरशैव गर्जनेच्या आजवरच्या कामगिरीचें यथातथ्य रेखाटलेले चित्र आहे असें कुणीहि ह्मणेल. संपादकीय लेखांतील कांही उतारे खरोखरच अतिशय मननीय असेच आहेत. त्यांतील एकच उतारा देण्याकरतां देणें अनुचित होणार नाहीं.'गुरुवर्गच आपल्या धर्मज्ञानापासून च्युत झाल्यामुळे व स्वतः तो बेफिकीर बनल्यामुळें आपल्या वीरशैवधर्माचा ऱ्हास उत्तरोत्तर वाढत आहे. या गोष्टीकडे लक्ष देऊन जो गुरुवर्ग अद्यापि जसा जागृत व्हावा तसा झाला नाहीं. तो यापुढे लवकरच जागृत व संघटित होऊन धर्मसंरक्षणाची काळजी घेणार नाहीं तर वरचेवर या धर्मास उतरती कळा लागून तो नामशेष होत जाईल. वरील विवेचनावरून धर्मसंरक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर किती जड्डतर आहे याची कळकळीची साक्ष संपादकीय खुलाशांत नाही असें कोण ह्मणेल? आणि याच कळकळीनें आजवर गर्जनेने आपलें ध्येय ठेवून धर्मसुधारणेचें कंकण धारण करून तें त्यांच्या यथायोग्यपणें आजवर त्यांनी पार पाडलें याबद्दल गर्जना खरेखरच स्तुतीस पात्र आहे. आणि यापुढेहि द्विगुणित उत्साहानें कार्यतत्पर होण्यास परमेश्वरानें त्यांना दीर्घायुष्य द्यावें आणि जनतेनेहि त्यांच्या या कार्यांत त्यांना सढळ हस्तें मदत करून उत्तेजित करावें.

**सुदर्शनः**—साप्ताहिक सुदर्शन नियमितपणें नित्य भेट देते याबद्दल संजीवनी त्यांची अत्यंत आभारी आहे. तसेंच, किर्लोस्कर, समाजस्वास्थ्य, सह्याद्री, कर्नाटकबंधू, नवकर्नाटक-ज्ञानमंदिर, लोकमत, वगैरे सन्मित्रांच्याहि नियमित भेटीबद्दल आह्मी त्यांचे अत्यंत आभारी आहोंत.

तसेंच, मालवण येथे प्रसिद्ध होणाऱ्या बालसन्मित्राचा 'बाललेखांक' नुकताच प्रसिद्ध झाला आणि नित्याप्रमाणें तो संजीवनीच्या भेटीस आला याबद्दल त्यांचेहि आभार मानणें अवश्य आहे.बालसन्मित्राच्या या अंकाची अंतर्बाह्य सजावट अगदी नमुनेदार अशी असून, बालकांचें मनोरंजन करून त्यांच्या बुद्धीचा विकास हळुवार हसतां-खेळतां करण्यांत बालसन्मित्रानें जें यश कमावलें तें खरोखरच अत्यंत कौतुकास्पद आणि संपादकांच्या अभिनंदनार्थ सर्वस्वीं उचित असेंच आहे. उत्तरोत्तर बालसन्मित्राचा उत्कर्ष, इतरांच्या शुभाशीर्वादावर अवलंबून असून त्यांच्या कर्तबगारीत समावलेला आहे असेंच नाही का आमच्याप्रमाणेंच इतरांनाहि वाटणार?

---

## डॉ॰ नंदीमठ विरुद्ध 'कौमुदी'

बेळगाव येथील लिंगराज कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ.नंदीमठ यांनी जी 'कौमुदी'वर अब्रुनुकसानीची फिर्याद दाखल केली आहे तिची तारीख १६–१०–३७ दिली गेली होती. परंतु आरोपीतर्फे हें प्रकरण आपसांत मिटविण्याकरतां मुदत मागितल्यावरून २९ १० पर्यंत मुदत दिली गेली होती. बघू ,,१ काय होते तें ?

# वीरशैवांतील चळवळी

## सौ० शांताबाई चिलुरे यांचें कैलासगमन

" कैलासवासी " ह्या पंचाक्षरांत किती कल्पनातीत हृदयद्रावक कठोर सत्य भरलें आहे. तें उपपद शांताबाई ह्या नांवामागें जोडण्यास माझ्या कसे कंठावर येत आहे. पण जोडल्याविना विधी कोठे आहे !

कै. शांताबाई ह्या नागपीड येथील कै. श्रीमान बुचाप्पा सोमाप्पा चिलुरे यांच्या कनिष्ट स्नुषा, सावरगांडीचे श्री. नयाप्पा हजारे यांची एकुलती एक कन्या नि श्रीमंत ऋषिराव चिलुरे यांच्या धर्मपत्नी आ त.

सुमारे ४ वर्षांपूर्वीपासून शांताबाईंना रजदोषाची शिकायत होती नि नियमित रजोदर्शनाचे वेळीहि त्रास होत असे. पण त्याकडे दुर्लक्षिल्यामुळे ती बाधा विकोपास गेली नि सुमारे दीड महिन्यापूर्वी एकाएकी तिने आपले ठाणें कायम केलें, त्यानंतर सर्वच प्रकारचे उपचार करण्यात आले. पण रोगाने कोणाचहि दाद दिली नाही. अन्नहि चालेनासें झालें. अशक्तता फार वाढली. नि दुःखाचेंहि प्रमाण वाढत चाललें. वेदना सहन होईनाशा झाल्या. तेव्हा शेवटी आजपर्यंत टाळीत आलेल्या शस्त्रक्रियेचा अवलंब करावा लागला.

नागपूर येथील डागा-मेमोरियल-हॉस्पिटलमध्ये नेण्यात आले. गुरुवार ता १४-१०-३७ विजयादशमीचे दिवशी दुपारी ३ वाजतां ऑपरेशन यथास्थित पार पडलें. दुसरे दिवशी शुक्रवारी रात्री १२ वाजेपावेतो काळजी करण्यासारखी प्रकृति नव्हती. पण अशक्ततेमुळें स्पष्ट बोलतां वगैरे येत नव्हतें. पण मिणमिण दिवासुद्धां मालवतांना पेट घेतो ह्मणतात. तसेंच झालें. मामुली माणसाप्रमाणें ती बोलू लागली, नि स्वस्थानास चलण्याबद्दल पतिराजाजवळ आत्यंतिक घाई करूं लागली. पण तसें करणें शक्य नव्हतें. घरच्या मंडळीस नि जवळच्या नर्सेसना अखेरचा प्रणाम केला नि अखेरीस २-३० वाजण्याचे सुमारास शांताबाईचे कैलासमार्गें प्राणोत्क्रमण झालें.

नंतर ही न ऐकण्यासारखी दुःखद वार्ता तारेने स्वस्थानी कळविण्यांत आली. शनिवार ता. १६—१०—३७ रोजी सुमारे सकाळी ८ वाजतां बाजारचौकांत तार येऊन पोहोचली. तत्क्षणींच बाजारांत नि गांवांत विजेसारखी वार्ता पसरली नि सर्वत्र औदासिन्याचें वातावरण पसरलें. लगेच स्पेशल मोटार ठरवून आह्मी सर्वच येऊन प्रेतयात्रेकरितां नागपूरास जाणाऱ्या मोटारींत जाऊन बसलों. तेवढ्यांत म्हणजे १०-३० चें सुमारास कांही नागपूरकर मंडळीसह शान्ताबाईच्या निर्जीव देहाची मोटार येऊन थडकली नि दुःखाचा एकच कहर माजला. २-३ तास श्रीमंतांचे वाड्यास जत्रेचें स्वरूप आलें होतें. नंतर दुपारीं २ वाजण्याचे सुमारास प्रेतयात्रा निघाली. प्रेतयात्रेंस स्मशानापर्यंत वीरशैव नि वीरशैवेतर असा बराच समाज उपस्थित होता.

मरणसमयीं शान्ताबाईचें वय केवळ १९-२० वर्षांचें होतें. त्यांचा नेहमीं प्रेमळ, हसतवदन

वि नांवाप्रमाणेच शांत स्वभाव ह्या त्यांच्या एवढयाशा अल्पायुष्यांतील चिरस्मरणीय आठवणी आहेत. शान्ताबाईच्या कैलासगमनानें चिलूरे घराण्यांत जी उणीव पडली ती कदापिहि भरून निघणें संभवनीय नाहीं. पण चिलूरे-हजारे कुटुंबांत नि आप्तेष्टांत आज दिवाळीसारख्या आनंदाच्या सणांत जी दुःखाची जखम झाली आहे तीहि भरून येणें शक्य नाहीं. ईश्वर शान्ताबाईच्या अमरात्म्यास शान्ति देवो !

---

# शोचनीय निधन.

— मुसावळ येथील वीरशैव-समाजांतील प्रमुख धर्माभिमानी श्री. महादेवअप्पा नथाप्पा राजगीरे हे वयाच्या ७० व्या वर्षी शिवैक्य पावले. त्यांच्या स्मशानयात्रेला गांवातील लिंगायत व लिंगायतेतर बरीच मंडळी हजर होती. महादेवअप्पाचा स्वभाव अतिशय निगर्वी आणि मनमिळाऊ असल्या कारणानें गावांत त्यांचें बरेंच वजन होते. ते धार्मिक वृत्तीचे असून सामाजिक कार्यात पुढाकाराने भाग घेत असत. त्यांच्या मागे त्यांचे सुविद्य चिरंजीव श्री. नागनाथ अप्पा हे एरंडोल-म्युनिसिपालीटींत हेड-क्लार्कचे जागेवर काम करीत आहेत. याशिवाय त्यांना एक मुलगी आणि त्यांची धर्मपत्नीहि आहे. त्यांचे कुटुंबांतील मंडळीवर ईश्वरी नेमानेमाप्रमाणें हा जो प्रसंग ओढवला, त्यात आम्हीहि, अल्पांशानें भागीदार आहोंत. श्री. नागनाथ अप्पांनी जगरहाटीकडे लक्ष देऊन आपलें दुःख आवरावें. तो शिवप्रभू मृतात्म्यास अखंड शांती देवो.

---

## क्रीडांगणावर

( फ्रेंडस् युनियनमधील सर्व विजयी खेळाडू वीरशैव आहेत हेंच विशेष ) —ःसं. सं.

ता. २०-१०-३७ व ता. २१-१०-३७ रोजीं सोलापुर येथील पार्कमैदानावर घो बाजी धनराज गिरजी शील्ड मॅचेस पैकी फ्रेंड्स युनिअन व आंध्र टीम याचेमध्ये क्रिकेट मॅच झाली. पहिल्या इनिंगमध्ये फ्रेंड्स युनिअनच्या १४९ धांवा झाल्या. त्यांचे कॅप्टन मि. नानासाहेब जक्कल यांच्या ६६ धावा झाल्या. मि. आप्पासाहेब थोबडें यांच्या २३ धांवा झाल्या. मि. अर्जुन यांचें बोलिंग उत्तम झालें. त्यांनी आठ विकेट्स् घेतले.

आंध्र-टीमच्या पहिल्या इनिंगमध्यें १७५ धांवा झाल्या. त्यांचे कॅप्टन मि. बाबुराव झुंजें यांनी २७ धांवा काढल्या, व मि. बळी यांनी ५० धांवा काढल्या व शेवटपर्यंत ते औट झाले नाहीत. मि. तरळ यांनी ५१ धांवा काढल्या. मि. घाटणेकर व मि. कौंतम यांची बोलिंग छान झाली.

दुसऱ्या इंनिंगमध्ये फ्रेंड्स युनिअनच्या पांच औट १३० धांवा झाल्या व नंतर त्यांनी आपला खेळ संपल्याचें जाहीर करून आंध्र-टीमला खेळू दिले. त्यांचे १ औट ७१ धांवा झाल्या. टाईम मेक अप् झाल्यामुळे पहिल्या इनिंगवर निकाल होऊन आंध्र टीम विजयी झाली. मेसर्स जक्कल, थोबडे ब्रदर्स, मेसर्स बळी, झुंजे, तरळ, दंडगळ यांची बॅटिंग फारच प्रेक्षणीय झाली.

सदहू मॅच पहावयास विष्णूलक्ष्मी मिलचे मॅनेजर मे. कुक्सन, कलन, टूर्नमेंट-कमिटीचे अध्यक्ष मि. लाईट, इंपीरियल बॅंकेचे मॅनेजर मि. इंचक्लिफ् आणि गावांतील प्रमुख मंडळी बरीच हजर होती. एकंदर प्रेक्षकवर्ग सात-आठ हजारांचेवर होता. एकंदरीत मॅच फारच प्रेक्षणीय झाली. असें एक प्रेक्षक कळवितात.

---

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ नोव्हेंबर १९३७ ( अंक २२वा

## ❁ अनुक्रमणिका ❁



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० श० बामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नाची ह्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येताच वर्षभर बक्षीस, सुरू करितां येते.

व्यवस्थापकः—'उदय'
उमरावती (वऱ्हाड)

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल् एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः—'सुदर्शन'
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचलिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडिताचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः—'वीरशैव गर्जना'
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति कार्तिक शु० १२ शके १८५९ ( अंक २२ वा.

## अमृत बिंदू

आलेल्या आपत्तीला भिऊन हातपाय गाळून
नुसता तोंडाने परमेश्वराचा धावा
करीत बसण्याने परमेश्वर
धावून येत नाही —
त र
आपत्तीशीं
झुंजण्यांतच यशाची
गुरुकिल्ली हमखास सांपडते आणि
अशाच्याच मदतीला परमेश्वर धावून येतो.

बसवदेव

# वीरशैवांचा सांपत्तिक ऱ्हास.

एक काळ सर्वच धर्मीयांना व सर्वच संस्कृतींच्या अभिमान्यांना ह्या देशांत असा होता कीं, जेथे संपत्तीचें व संततीचें सुख सारखे असे तेथेच धर्माच्या चालीरीतीचें व संस्कृतीचें दृष्य वाढीला लागलेलें दिसे. वैभव, सत्ता, संपत्ति, वगैरेंत गुणहि असा कीं, त्याची प्रत्येक कृति समाजांत वंदनीय व अनुकरणीय ठरते. वीरशैवधर्माचा प्रसार ज्या काळी व ज्या कारणानी झाला त्याची मीमांसा केली तरी हाच बोध स्पष्ट होतो. एखादा शिवयोगी आपल्या तपश्चर्येच्या बलावर एखाद्या अरण्यात बसलेला असावयाचा, त्रस्त झालेला राजा, शेट्टी, वा गृहस्थ, ह्याला त्या योग्याचें दर्शन घडावें, योग्यानें आशीर्वाद द्यावा, आणि गृहस्थाचें ऐहिक कल्याण व्हावें. असा योग घडला ह्मणजे योग्यांचें निर्जंव अरण्य उद्यान बनावयाचें, झोपडीचा महाल बनावा, आणि योगबलावरील श्रद्धा व्यक्त करण्याकरिता कांही आचार स्वतः भक्तांनी आचरूं लागावे व इतरांनी त्याचेच अनुकरण करावें. प्रस्तुतच्या अनेक धर्मपंथांची अशीच वाढ झाली आहे. वीरशैवधर्महि असाच वाढीला लागला.

क्षात्रकर्म करणारांनीं क्षात्रकर्म करावें, वैश्यकर्म करणारांनीं वैश्यकर्म करावें, शेती करणारांनी शेतकी करावी, पण त्यांत यश लाभावें वा आत्मोन्नति व्हावी ह्मणून प्रसन्न झालेल्या शिवयोग्याच्या प्रसादाचें चिन्ह ह्मणून कांहीं आचार आचरावे. वीरशैवांत अनेक पराक्रमी राजे, सेनांनी, शेट्टी, वगैरे लोक झालेलें जे आढळतात ह्याचें कारण मुख्यतः हेंच. इंग्रजी राजवटीचें दळणवळण समाजांत रूढ होण्यापूर्वी वीरशैवांत वतन व संपत्ति ह्यांची वाढ जितकी होती तितकी आज नाही. उलट, पन्नास वर्षापूर्वी संपत्तीने व संख्येने वीरशैव जितके व जसे होते तसे आज राहिले नाहीत. उलट, दिवसानुदिवस होती त्यापेक्षांहि वाईटच परिस्थिति प्राप्त होत आहे.

आमच्या ह्मणण्याची सत्यता ज्यांना शोधून पहावयाची असेल त्याने वीरशैववस्तींतील प्रत्येक गांवची वा शहरची गेल्या पन्नासवर्षांची पाहणी करावी. पन्नास वर्षापूर्वी जेथे हजार घरे वीरशैवांची असत तेथें आज शंभर नाहीत असा प्रत्यय येईल. पूर्वीच्या हजार घरांत जितके समृद्ध व सुखी वीरशैव सांपडत तितके आज सांपडत नाहीत. उलट पूर्वीपेक्षां साक्षरता आज अधिक आढळते हें मात्र नाकारतां येणार नाही. तथापि ही स्थिति पाहून वीरशैवधर्म व समाज ऱ्हास पावत आहे असेंच कोणालाहि ह्मणावें लागेल व ह्मणतात. पूर्वीच्या चालीरीती बदलू लागल्या, पूर्वीची श्रद्धा डळमळूं लागली, पूर्वीची दानत बिघडली, ह्मणून धर्म ऱ्हास झाला असें ह्मणणारा एक सनातनी वर्ग आहे.

तो ह्या ऱ्हासाची कारणें पूर्वीच्या चाली ह्मणजेच धर्म, तो बुडू लागला ह्मणून वीरशैवांना ऱ्हासकाळ प्राप्त झाला असें ह्मणेल.

जुनें सर्व बदललें तरी वीरशैवांचा सांपत्तिक ऱ्हास जर झाला नसता, उलट तो संपत्ति वाढतीच राहिली असती, तर वीरशैवसमाज नव्या काळानुसारहि संघटित व मजबूत दिसला असता. पण एका संपत्तीच्या ऱ्हासामुळें जुनेहि कायम नाही व नवेहि संघटित होत नाही. त्यामुळे 'ना हिंदु व ना यवन' अशी आज आमची स्थिति झाली आहे. त्रिकाल लिंगपूजा भक्तिपूर्वक करणारे वीरशैव आज नाहीत असें नाही; पण ते दिवसानुदिवस सांपत्तिक ऱ्हासाच्या अडचणींत सांपडून तीं कुळें अन्नाला मोताद होत आहेत. अशांना धर्मभ्रष्ट ह्मणण्याचीहि सनातनीयांना सोय नाहीं. तेव्हा बाह्यरूपानें धर्म कायम असून ज्या अर्थीं संपत्तीचा ऱ्हास होत चाललेला प्रत्ययास येतो त्या अर्थी संपत्ति-ऱ्हासाचीं कारणें ह्याशिवाय दुसरीं असली पाहिजेत हें उघड होतें.

संपत्ति आपलीशी करण्याला एकेकाळीं तरवारीचा पराक्रम, तराजूचा तोल, आणि शेतीवरील मेहनत हींच सोपी साधनें होतीं. ह्याच साधनांत गर्क होऊन मनुष्याने उन्मत्त होऊं नये ह्मणून त्याला आत्मोन्नतीच्या सुखाची चटक लावली. एकीकडे ही चटक इतकी वाढली कीं त्याचा व्यवहार सुटला व तो त्या चटकेंतच मग्न झाला. दुसरीकडे व्यवहाराची इतकी धुंदी चढली कीं, उन्माद येऊन व्यवहाराचें तारतम्य सुटलें. हीं दोन मुख्य कारणें आमच्या संपत्ति-ऱ्हासाचीं होत. आमच्या संपत्ति-ऱ्हासाला आजची जागतिक मंदी कारण असेल; पण आजची धनोत्पादक साधनें आह्माला उपलब्ध नाहीत, त्याची वाढ करण्याचें बळ नाहीं, त्यामुळें संपत्तीची वाढ होत नाहीं. उलट ती संपत्ति इतकी नाहीशी होणार कीं, पुढील एक दोन पिढ्यांत वीरशैव नाममात्र जर उरले तर ते मजूर व कामगार ह्या वृत्तीनेंच राहणार. वीरशैव आज वैश्यवृत्तीचे होते ही ख्याति आहे. पण उद्या ती राहील काय ? आणि मजूर व कामगार वृत्ति आली तर धर्म व संस्कृति ही कशी समाजात कायम राहणार? ह्मणून आजचा वीरशैव सुधारक असो वा दुर्धारक असो, त्याला प्रथम वीरशैवांतील संपत्तीचा ऱ्हास थांबवून ती वीरशैवांत कशी वाढेल ह्याचाच विचार करणें अवश्य आहे. तेव्हां ह्या दृष्टीने आमच्यांतील परंपरागत गुणदोषाची चर्चा तज्ञांनीं सुरू करणें अवश्य आहे.

पंचाचार्य पहिलें कीं विरक्त पहिले, गुरु पहिले कीं भक्त पहिले, हे वाद आजच्या समाजस्थितीला पोषक नाहींत. त्याचप्रमाणें नवे व जुने हा वादहि पोरकट आहे. समाजाला ज्यावेळेला जें पाहिजे तें त्याला प्रथम देणें हें खऱ्या समाजनियंत्याचें पहिलें लक्षण. बसववचनें केवढीहि उपलब्ध केलीं, आणि पंचाचार्यांनी शिवाचे पंचमुख जरी आज उत्पन्न केलें तरी वीरशैवांची संपत्ति वाढत नाहीं. आणि संपत्तीच्या वाढीवाचून कोणत्याहि धर्माचें व संस्कृतीचें मूळ समाजांत जीव धरून रहात नाहीं. ह्याकरितां प्रथम संपत्तीच्या वाढीला लागणारे गुण आमच्यांत वाढतील ह्याच विचार सर्व वीरशैववाङमयसेवकांनीं केला पाहिजे

शब्दचित्र

# विस्मृतीचें समाधान

लेखकः—
श्री० शि० ल० खोत,
राजाराम कॉलेज.

दुःखनिराशारूप अंधःकारानें भरलेल्या जगांत प्रत्येक मानव सौख्यासाठीं एकसारखा धडपडत असतो; पण थोड्याच जणांना त्याच्या प्राप्तीचा मार्ग समजतो. माणसाला कधीं दुष्प्राप्य गोष्टीबद्दल आसक्ति उत्पन्न होते, तर क्वचित् कधीं इष्ट वस्तूची शक्यता आणि आवड या दोन्ही गोष्टीं असतांनाहि एकादी काल्पनिक अडचण दोहोंच्या मीलनांत उत्पन्न होते व यायोगे उत्पन्न होणारा भावना-कल्पनांचा खेळ जगत्‌रंगभूमीवर दृष्टोत्पत्तीस येतांना आयुष्याच्या वैचित्र्याची थोडीफार कल्पना आपल्या मनांत आल्यावाचून रहात नाहीं ! जोड तोड, मीलन आणि विरह, इत्यादि परस्परविरोधी गोष्टींनीच आपलें जीवित बनलें असल्याने, सुखापेक्षा दुःखच मनुष्याच्या वाट्यास येत असतें. भावनाप्रधान माणसांनीं तर सुखाची मोठीशी आशा बाळगतां कामा नये. तथापि विस्मृतिपासून मिळणाऱ्या सर्वश्रेष्ठ सौख्यासाठीं प्रयत्न केला तर जीवित ह्मणजे मूर्तिमंत सौख्य आहे असें प्रत्येकाला वाटल्यावाचून राहाणार नाहीं.

विस्मृतीसारखें जगांत दुसरें सौख्यच नाहीं. निसर्गांत जी आश्चर्यकारक रमणीयता आपणास आढळून येते त्याचें कारणहि हेंच. काट्यातून आपली उत्पत्ति झाली आहे ही गोष्ट गुलाबाची फुलें विसरतात, ह्मणूनच तीं मानवी मनाला आपल्या सुवासाने अत्युच्च जागीं नेऊं शकतात. वाऱ्यानेंच आपली पानें गळून पडतात ही गोष्ट झाडें विसरतात ह्मणूनच तीं कधीं कधीं वाऱ्याच्या मंद लहरीनें नाचूं शकतात, व टागोरसारख्या कवींना उच्चत्तम सौख्य देतात. आपल्यावर पुष्कळ वेळा काळेकुट्ट ढग पसरतात याचें आकाशाला विस्मरण होतें ह्मणुनच तें सुर्योदय-सूर्यास्तांच्या वेळीं रंगीबेरंगी होऊन माणसाला मोहून टाकितें. आपणाला ओहटी लागते हें समुद्र विसरुन जातो ह्मणूनच भरतीच्या वेळीं फेंसाळलेल्या जलपृष्टानें मानवी हृदयांत हर्षलहरी उसळवितो. हें आयुष्य दुःखमय आहे व जीवित वळवाच्या पावसासारखें आहे ही गोष्ट पक्षी विसरतो ह्मणूनच त्याला आकाशांत स्वैर वृत्तीने भराऱ्या मारतां येतात. आपल्याला ग्रहण लागतें व आपला क्षय होतो ही गोष्ट चंद्र विसरुन जातो ह्मणूनच तो पौर्णिमेच्या दिवशीं शीतल किरणांनीं जगाला आल्हादित करुं शकतो. फार तर काय, दगडासारखा निर्जीव पदार्थदेखील, गवंड्याच्या टाकीनें झालेले घाव विसरतो ह्मणूनच इमारतीला अपूर्व शोभा आणतो. हीं सर्व उदाहरणें विस्मृतीनें होणाऱ्या अनंत सौख्याची साक्ष नाहीं का देत ?

अशी वस्तुस्थिति असतांनादेखील, मनुष्यप्राणी मात्र गतायुष्यांतील सुखदुःखाचा विचार करण्यामध्यें बराच वेळ दवडतो.

तो गतसौख्याला विसरूं शकत नाहीं. उलट-पक्षी तींच सौख्यें पुनः एकदा भोगण्याची इच्छा त्याच्या मनामध्यें प्रबळ होते व ती मिळेनाशी झाली ह्मणजे निराशेच्या शोकजन्य क्षितीजाखाली अदृश्य होते. पूर्वी भोगलेल्या दुःखाची जाणीव माणसाच्या हृदयांत असली तर वर्तमानकाळामध्ये त्याला मजा वाटेनाशी होते, व भविष्यकाळच्या नसत्याच कल्पनिक भीतीनें गांगरुन जातो व जीवीताविषयीं द्वेषाचें मूलभूत कारण ह्मणजे स्मृति हेंच होय. या द्वेषामुळें जगाचें नुकसान किती होतें! मोठ-मोठी युद्धें, राष्ट्रांमधील दुही, समाजांतील तंटे व व्यक्ति-व्यक्तीमधील गैरसमजुतीमुळे होणारे घोटाळे हीं सर्व नाहींसी कर-ण्याकरितां मनुष्यानें विस्मृतीची कास नको का धरायला ?

निरुद्योगाच्या वेळीं तर मनुष्याच्या चित्तच-क्षुसमोरुन, भूतकालातील स्मृति-चित्रें एका-मागून एक झरझर जातांना त्याची सारासार-विचारशक्तिदेखील नष्ट होते. अशा वेळीं तो भावनेच्या जाळ्यांत गुरफटून जातो; व त्यास मानवी जीवित असह्य होऊन तो निराशेचे व दुःखाचे निःश्वास टाकीत तास न् तास बसतो. अशा प्रकारची आपत्ति टाळण्यासाठीं विस्मृतीच्या विभवमंदिरांत पाऊल नको कां टाकावयाला ?

विस्मृतीचा ईश्वरी प्रसाद लहानापासून थोरा-पर्यंत सर्वांना मिळतोच मिळतो. एकाद्या गुन्हेगार मनुष्यालादेखील विस्मृतीनें मानसिक स्वास्थ्य मिळणें अवश्य. उलटपक्षी जर त्याला आपल्या अपराधाची जाणीव असेल तर त्याची सदसद्वि-वेकबुद्धि त्याच्या मनामध्ये भीतिदायक विचा-राची पिशाच्चें निर्माण करुन त्याला सुखातिश-याच्या उंच कड्यावरुन एकाएकी दुःखाच्या खोल अशा दरींत लोटून देईल व कदाचित् या दुःखातिरेकानें तो आत्महत्याहि करण्यास मागें-पुढें पहाणार नाहीं. अशा प्रकारचे प्रसंग टाळ-ण्यासाठीं मनुष्याने विस्मृतीची शिकार करणें अगदीं आवश्यक आहे.

ज्या गोष्टी सुखाच्या आड येतात त्या मनु-ष्याने विसरण्याचा प्रयत्न करावा. विस्मृतींत ही एक अद्भुत जादूच आहे असें ह्मटल्यास त्यांत अतिशयोक्ति कांहींच नाही.

---

# 'सुदर्शन'कार, व देवस्थान-पंच-वादाचा समारोप.

## श्रीसिद्धेश्वर-देवस्थानतर्फे खुलासा.

### नंबर ७.

ता० २८-८-३७ रोजीं येथील म्यु. ने श्री सिद्धेश्वर यात्रेवर कर बसविण्याबद्दल ठराव केला. त्या बाबतींत श्रीसिद्धेश्वर देवस्थानकडून त्यापूर्वीच, यात्रेवर कर कां बसवूं नये याची जीं कारणें म्यु. स कळविण्यांत आलीं होतीं त्यांस, सदरी कामीं म्यु. नें ठराव करून लोकांच्या हरकती मागविल्यानंतर, देवस्थान-सेक्रेटरींनी लोकजागृतिसाठीं छापून प्रसिद्धी द्यावी असें ठरलें होतें. त्याप्रमाणें म्यु. कडून वरील हरकती मागविण्याबद्दलची जाहिरात ता. ५-९-३७ च्या ('कल्पतरु'चे) अंकांत प्रसिद्ध झाल्यानंतर त्याच्या दुसऱ्या दिवशीं मीं तीं कारणें 'जाहीर सूचना' ह्मणून प्रसिद्ध केलीं. पण त्याच तारखेच्या 'सुदर्शन'च्या पुरवणीमध्यें 'श्री सिद्धेश्वर पंचांची कर्तव्यपराङ्मुखता' हा संपादकीय लेख प्रसिद्ध झाला. ह्मणून सदरी यात्रेवर कर कां बसवूं नये याबद्दलची देवस्थाननें म्यु. स कशी कशी माहिती दिली हें जनतेच्या नजरेस आणण्यासाठीं मीं खुलासा नंबर १ चा प्रसिद्ध केला, व 'सुदर्शन'कारांनी पंचांवर टीका करण्यांत विनाकारण घाई केली हें दाखविलें! त्यावर ता. १३-९-३७ च्या अंकांत 'श्रीसिद्धेश्वर पंचांचें तोंड एकदाचें उघडलें' या मथळ्याखालीं त्यांनी पुन्हा दुसरा लेख लिहून यात्रेच्या विषयाबरोबरच विनाकारण श्रीसिद्धेश्वर तलावाचाहि त्यांत संबंध आणिला; व त्यांत मे. कलेक्टर साहेब सोलापूर यांनी म्यु. स पाठविलेल्या ता. १३-१०-३६ च्या पत्राचा उल्लेख करून त्यांतील एका वाक्याचा अर्थ 'श्री सिद्धेश्वर तलावाचा कबजा म्यु. स दिला' असा करून, जनतेची दिशाभूल केली! वास्तविक पाहतां, गांवांत यात्रेचा कराचा विषय चालूं असतां त्यांत तलावाचा विषय आणणें इष्ट नव्हतें, व त्यांतले त्यांत सदरी पत्रांतील वाक्याचा अर्थ देवस्थानचे हितास बाधक असा करणें चुकीचें होतें. ह्मणून वेळीच खुलासा न केल्यास वस्तुस्थितीचा विपर्यास होण्याचा संभव असल्यामुळे, आणि याशिवाय सांगावयाचें ह्मटल्यास मला सदरी वाक्याचा खरा अर्थ जाहीर करण्याविषयीं सुदर्शनकारांनी उघड आव्हान दिल्यामुळे, मला या बाबतींत नं. ५ चा खुलासा काढून त्याचा खरा अर्थ व खरी परिस्थिती जनतेपुढे ठेवावी लागली! एवढ्यानेहि 'सुदर्शन'कारांचें समाधान न होतां त्यांनी पुन्हा आपल्या ता. ११-१०-३७ च्या पत्राचे पुरवणींत 'खरें इंगित बाहेर पडलें' या लेखानें पुन्हा लोकांच्या गैरसमजुतींत अधिक भर घातली! ह्मणून मला पुन्हा नंबर ६ चा खुलासा काढावा लागून, ज्या

सदरहु पत्रांतील वाक्याचे अर्थाबद्दल सुदर्शन-कारांनी इतका डांगोरा पिटविला, त्या पत्राला, माझ्या सदरी खुलासा नंबर ५ मध्ये दिलेल्या कारणांवरूनच, कायद्याच्या दृष्टीनें मुळीच महत्व येत नाहीं असें मुंबईतील एका नामांकित वकीलानें मागाहून देवस्थानास सल्ला दिल्याबद्दलची हकिकत मला प्रसिद्ध करावी लागली! तरीसुद्धां वरील पत्राचें मुसळच सगळें केरांत गेलें तरी, त्या पत्रातील एका वाक्याचे अर्थाबद्दल सुदर्शनकारांनी फिरून ता. १८-१०-३७ च्या अंकांत पूर्वीपासून चालू ठेविलेला 'निष्कारण वितंडवाद' पुन्हा उघडपणें चालू ठेवून आपल्या हट्टी स्वभावांचेंच समर्थन करावें यांत कोण शहाणपणा! वरील सर्व प्रकारावरून या निष्कारण वितंडवादास प्रथम कोणीं जन्म दिला व तो कोणीं वृद्धिंगत केला हें ठरविण्याचें काम सुदर्शनकाराप्रमाणें मी मजकडे न घेतां जनताजनार्दनाकडे सोपवितों.

येथील माजी नगराध्यक्षद्वय रा. ब. बॅरिस्टर दिवाकर व श्रीयुत बाबुराव जक्कल, संपादक 'सोलापूर समाचार', यांनी आह्मास व 'सुदर्शन'कार यांस बोलावून देवस्थानच्या दृष्टीने पत्राबाबतींत व तलावाबाबतींत आतांपर्यंत पुरेशी चर्चा व खुलासा झाल्याकारणाने याबद्दलचा वाद यापुढे देवस्थानचे हिताचे दृष्टीनें आह्मी दोघांनी बंद ठेवावा; असें न झाल्यास वादाचें रूपांतर व्यक्ति-द्वेषांत होऊन देवस्थानवरहि अनिष्ट परिणाम ओढवतील असें कळविल्यावरून व आह्मा दोघांसहि तें पटल्यावरून, यापुढे हा वाद मिटविण्याचे आह्मींहि ठरविलें आहे. व ता. १८-१०-३७ चे 'सुदर्शन' पत्रात जाहीर झाल्याप्रमाणें वरील सूचना येण्याचे अगोदर सुदर्शनकारांचा "निष्कारण वितंडवाद" पुन्हा छापून तयार असलेमुळेच तो त्यांस प्रसिद्ध करावा लागला; पण या त्यांच्या "निष्कारण- वितंडवादास" पूर्वीप्रमाणें जोरकस उत्तर देऊन आह्मी त्यास यापुढे जिवंत ठेवूं इच्छीत नाही. पण ज्या अर्थी त्यास प्रसिद्धी मिळाली आहे त्या अर्थी सौम्य कां होईना पण नाईलाजाने त्याची थोडीबहुत हजेरी घेणें जरूर आहे!

"तलावाचा कबजा म्यु. स. दिला, व तलावाचा कबजा घेण्याचा हक्क प्राप्त झाला, ह्या दोन्ही वाक्यांच्या अर्थांत असलेला फरक माझा खुलासा नंबर ६ मध्ये मीं अगदी स्पष्टपणें खुलासेवार दाखविला असूनहि, तो अद्यापि सुदर्शनकारांस दिसत नाही, ह्मणून ते मलाच उलट मतिमंद ह्मणत आहेत 'सुदर्शन'कार व आह्मी या दोघा वकीलांनी न्यायाधिशाचे ठिकाणी असलेल्या वाचकापुढे या बाबतींत आपआपली बाजू मांडली आहे. तर त्याचा त्यांनी विचार करून या दोघांत कोण 'मतिमंद' याचा न्याय-निवाडा देण्याचें काम वाचक न्यायाधिशांवरच आह्मी सोपवितों!

देवस्थानचे प्रेसिडेंट व म्यु. प्रेसिडेंट असे एकाचवेळी व एकाकाळी असलेले श्री. नागप्पा अण्णा अबदूलपूरकर यांनी फक्त म्यु. प्रेसिडेंट ह्मणून मे. कलेक्टर साहेब यांस (देवस्थान-कमेटीचे परवानगीशिवाय व संमतीशिवाय) लिहिलेल्या पत्रामुळे देवस्थानचें जर कांही नुकसान होणें शक्य नाही तर सदरी तलाव-प्रकर्णात श्रीसिद्धेश्वर देवस्थान व म्यु. यांचे हितसंबंध परस्परविरोधी असले तरी देवस्थान-प्रेसिडेंटचे जागेचा राजीनामा देण्याची मुळीच जरूरी नाहीं, असें सदरी नागप्पाअण्णास वाटलें असल्यास सुदर्शनकारांचा दोष वा रोष पंचकमेटीवर कां? म्यु. प्रेसिडेंट यांना त्यानें लिहिलेल्या वरील पत्रामुळें देवस्थानचें कांही नुकसान झालें कीं काय एवढाच प्रश्नाशीं देवस्थानचा संबंध! "म्यु. प्रेसिडेंटचें हें पत्र देवस्थान-कमेटीस बंधनकारक नाही" व सदरी पंचकमिटीला

मान्य करावेंच लागेल असें आमचें ह्मणणें नाही " याच मताचेंच जर सुदर्शनकार आहेत, तर " वरील दोन्ही संस्थांवच्या हित-संबंधात परस्परविरोध असलेमुळें सदरी अबदुलपूरकर यांनी देवस्थान—प्रेसिडेंटच्या जागेचा राजीनामा देणेच न्याय्य झालें नसतें का ? असा प्रश्न पुन्हा विचारण्यांत सुदर्शन-काराचा मुद्दा तरी कोणता ? वरील कार-णावरून अशा परिस्थितींत त्यांनी राजीनामा द्यावा कीं नाही हा सर्वस्वीं रा. अबदुलपू-रकर यांचा खाजगीं प्रश्न होत असल्यामुळें, देवस्थानच्या दृष्टीने त्यास महत्व येत नाही. परंतु श्रीसिद्धेश्वर-तलावावरील कबजाचे बाब-तींत सुदर्शनकारांनी केलेला वरील अर्थ मात्र देवस्थानचे तलावावरील हक्कांचे दृष्टीने फारच अनर्थकारक असल्यामुळे त्यास आह्मी योग्य शब्दांनी हरकत घेतली असतां सुदर्शनकारास त्याचा राग कां यावा हेंच समजत नाही.

आतां सुदर्शनकारांच्या वरील निष्कारण वितंडवादांतील शेवटच्या पॅराग्राफांत " वास्त-विक यात्रेवरील कर व श्रीसिद्धेश्वर-तलाव या दोन्ही प्रकरणांत आमचा व देवस्थान-पंच-कमेटीचा मतभेद तरी कोठें आहे ? " असें एक वाक्य झळकत आहे. खरें पाहता सुद-र्शनकारांनी अशी समतोल दृष्टि प्रथम पासूनच ठेंविली असती तर हा निष्कारण वाद मुळी जन्मासच आला नसतां ! बरें असो ! आतां तरी आमची व सुदर्शनका-रांची वरील दोन्ही बाबतींत पूर्ण एक-वाक्यता झाली असल्याकारणानें वाद वाढ-विण्यासाठी खोगीरभरतीच्या त्यांच्या निष्का-रण वितंडवादांतील इतर बिनमहत्वाच्या मुद्यास पुन्हा पुन्हा उत्तरें न देतां मौनव्रत धारण करणेंच आह्मास इष्ट वाटतें; पण कोणत्याहि महत्वाच्या मुद्यांस सुदर्शनकारानें व आमचें एकमत असल्यास त्यांतील किर-कोळ मुद्यांवर पुन्हा मांडण उकरून त्यांनीं वाद उपस्थित करूं नये ह्मणून त्यांस शेंवटी नम्र-पणाची सूचना करून मी त्यांची रजा घेतों.

ता. १८—१०—३७

एस्. बी. धुम्मा वकील,<br>ऑ. सेक्रेटरी,<br>श्रीसिद्धेश्वर-देवस्थान, सोलापूर.

( वरील पत्रक प्रसिद्ध करण्यापूर्वी पत्रक नंबर ३, ४, ५, ६, ची पत्रकें आमचेकडे प्रसिद्धीकरतां आलीं होतीं. परंतु हा सोलापूरचा स्थानिक वाद असल्याकारणानें आणि ' संजी-वनी ' चे आवांक्याबाहेर प्रसिद्धीपत्रकांचा मज-कूर असल्याकारणानें आह्मीं वरील पत्रकें छापण्यास घेतलीं नाहीत, त्याबद्दल कुणीहि गैरसमज करून घेणार नाहीं अशी आशा आहे. 'सोलापूरसमाचार'चे ता. २० ऑक्टोबरचे अंकामधून वरील वादाचा समारोप दोन्ही पक्षांच्या समेटानें झाल्याचें कळतें आहे. तरी हा समेटाचा समारोप उभयपक्षांतील मंड-ळींनी मनमोकळेपणानें करून वादाला मूठ-माती दिली याबद्दल ते खरोखरच अभिनं-दनास पात्र आहेत. वास्तविक इथवरहि हें प्रकरण चिघळावयास नको होतें. कारण उभ-यपक्षांतील मंडळी समंजस, समाजकार्याची कळकळ बाळगणारी आहेत, हें आह्मीं नव्यानें सांगावें असें नाहीं. मतभेदाचें रूपांतर व्यक्ति-द्वेषांत न होऊं देतां प्रसंगोपात थोडी पड घेऊनहि चुकलेला मार्ग कसा सरळ करतां येईल इकडे लक्ष देऊन उभयपक्षांनी वाग-ण्यातच खरा शहाणपणा आहे असें कोण ह्मणणार नाही ?

—सं. सं. )

लघुकथा १७ वी.

# कुस्करलेली कलिका

( लेखकः— श्री. शं० कृ० रिसवडे, बी.ए., सांगली. )

किती अट्टल आहेस रे वसंता तूं !

विश्वास हांसत हांसत ह्मणाला.

ते कसा काय बुवा ! वसंत उद्‌गारला.

तें सर्व सांगतो; चल पाहूं तुझ्या खोलीकडे.

तें कां ?

तुला एक गोष्ट विचारणार आहे.

ती कोणती ? विचारना येथें !

अरे, रस्त्यावर विचारण्यासारखी नाही

बरें, चल तर. असें ह्मणून ते खोलीं-कडे निघाले. वाटेंत विश्वासला त्याच्या ओळखीचा एक मित्र भेटला. विश्वासने त्याला आपल्याबरोबर वसंतचे खोलीकडे नेलें. त्याच्या चर्येवरून तो फारच घोरणी व चलाख दिसत होता.

विश्वास ! हा रे कोण ? वसंत आश्चर्यानें ह्मणाला.

हा एक माझा परमप्रिय मित्र होता. आतां मात्र नाही. याचं नांव श्रीधर.

बरं विचार आतां काय विचारणार आहेस तें.

आज सकाळीं तुझ्याकडे कोणतें मासिक आलें आहे ?

सह्याद्री.

त्यांत तुझा व तुझ्या पत्नीचा ब्लॉक छापून आला आहे ना ?

तुला रे काय माहीत ?

सांगितलं तुझ्या एका मित्रानें.

कोण बरं तो ?

तें काय करावयाचे तुला? हुं आटप, दाखव पाहूं तो अंक.

अरे ! काय पाहाणार आहेस त्यांत तूं ? आहे झालं काहींतरी.

असं कसं ह्मणतोस ? त्याबद्दल तुमचें उभयतांचें अभिनंदन केलें आहे ना सर्वांनी ?

अभिनंदन ? आणि तें कशाबद्दल ? श्रीधर औत्सुक्यानें ह्मणाला.

माहीत कां नाही तुला ?

नाही !

अरे ! परवा ह्यानें प्रेमविवाह केला ना !

वा! शाबास Congratulations! मीं कसें वाचलें नाही ?

मग आता पहा तर प्रत्यक्ष. वसंत दाखवतोस कां नाही ?

अरे जरा दम धरशील का नाही ? असें ह्मणून वसंताने सकाळीं आलेला संह्याद्रीचा अंक विश्वासचे हातीं दिला.

विश्वास व श्रीधर मिळून तो पाहूं लागले.त्यांत वसंत व त्याच्या पत्नीचा आर्टपेपरवर पाश्चिमात्य पद्धतिनुसार फोटो होता. फोटो फारच आकर्षक व सुंदर होता. त्याचेवरती अनुकरणीय मिश्रविवाह व वधुवर चिरायु होवोत असें लिहिलें होतें. त्याचे खालीं वसंत व त्याच्या पत्नीचें नांव बोल्ड टाईपमध्ये छापिलें होतें.

अग्रलेखांत संपादकानीं वधुवरांचें अभिनंदन केलें होतें व त्यांना दीर्घायुष्य, संतती, संपत्ति, प्राप्त होवो, व लोकसेवा त्यांचे हातून घडो, अशी इच्छा प्रदर्शित केली होती. तो फोटो पाहून श्रीधराची मुद्रा कांहीशी चमत्कारिक झाली हें त्याच्याकडे पाहणाराच्या सहज लक्षांत आलें असतें.

वसंतनें हें सर्व ओळखलें व ह्मणाला,

विश्वास ! कसा काय आहे रे ब्लॉक ?

छान

आमची पोझीशन कशी काय आवडली रे तुला ?

सांगायला का पाहिजे ?

काय श्रीधर ! तुझें काय मत आहे ?

अरे ! ही तर विनोदिनी !

विनोदिनी ? ही कोण ? वसंत औत्सुक्यानें ती कोण आहे हें जाणण्याच्या तीव्र इच्छेनें ह्मणाला.

ही ना? माझ्या मामीकडे येत्यें. ती वर्स आहे ह्मणे !

कोठें राहात्यें ?

तें मला नाही माहीत. सुमती मामीला आहे सर्व माहीत,

घेऊं कां मी हें मासिक मामीला दाखविण्याला? हा विनोदिनीचाच फोटो!

अरे ! हा विनोदिनीचा फोटो नव्हे. तूं वेडा कां आहेस ? हा फोटो पाहून तुझी मामी काय ह्मणेल तुला ?

ती आश्चर्यचकित होईल.

खरंच कां श्रीधर ? हा विनोदिनीचा फोटो?

नाही तर ! विचार ना हवं तर विश्वासला.

विश्वास, तूं पाहिली आहे कां ?,

हो . परवा मी व श्रीधर " व्हाइट वे "-नें जात होतो तेव्हां श्रीधरनें ' ही पहा विनोदिनी ' ह्मणून मला दाखविली एक ' कुमारिका '.

मग खरंच कां हा फोटो तिच्यासारखा आहे ?

खरं सांगूं ! ह्या फोटोंत व तिच्यांत बरेंच साम्य आहे.

मग दाखवशील कां एकदां ती मला ?

तें कसें जुळणार बुवा ? तिची व माझी मुळीच ओळख नाही.

पण सुमतीची आहे ना ?

होती. पूर्वी होती. पण आतां नाही.

हें कसं काय ? आश्चर्य ह्मणावयाचें! ही भानगड काय आहे?

सांगेन ! उद्या सकाळीं माझे खोलीकडे ये ह्मणजे पाहूं. असें ह्मणून विश्वास व श्रीधर खोलींतून बाहेर पडले. वसंताच्या मनाला मात्र सारखी तळमळ लागून राहिली होती. ही विनोदिनी कोण ? कोठें राहतें ? तिची व आपली ओळख होऊं शकेल का ? एक ना हजार विचार त्याच्या डोक्यांत थैमान घालीत होते.

दुसरे दिवशीं वसंत विश्वासचे खोलीकडे गेला. त्या वेळीं विश्वास कोठें बाहेर गेला होता. वसंत त्याचे खोलींत बसून टेबलावरील पुस्तकें पाहूं लागला तों त्यांत त्याला सुमतीकडून आलेल्या प्रेमपत्रिका सांपडल्या. त्या पाहून त्याला आश्चर्य वाटलें. पुनः कांही सांपडतात का ह्या उद्देशानें तो सर्व पुस्तकें व वह्या बारकाईनें पाहूं लागला तोंच त्याला एक युवतीचा फोटो सांपडला.

वसंतनें तो फोटो हातांत घेतला व त्याकडे तो सारखा टक लावून पाहूं लागला. तो फोटो फारच उत्कृष्ट होता. शांती व पावित्र्य जें ह्मणतात तें त्या कलिकेच्या चर्येवरुन स्पष्ट दिसून येत होतें. त्या फोटोखालीं विश्वासनें "कुस्करलेली कलिका" असें स्वाक्षरांनीं लिहिलें होतें. वसंत त्या फोटोकडे किती तरी वेळ पहात राहिला.

शेवटी त्याला प्रेमपत्रिकांची आठवण झाली तो त्या वाचूं लागला. सुमतीनें आपलें सर्व प्रेम त्या पत्रिकेंत व्यक्त केलें होतें. सुमतीनें एका पत्रिकेंत "आतां या जन्मीं तरी भेट होणें शक्य नाही" असें लिहिलें होतें. वसंत थोडा वेळ गोंधळून गेला. काय करावें हें त्याला समजेंना. इतक्यांत

कोण ? वसंत का ? ह्मणून त्याच्या पाठीवर विश्वासची थाप बसली. "अरे ! आज मी तुला हें सर्व दाखविणार होतो. तुझ्यामुळें माझाहि कार्यभाग साधणार आहे. पण पहा, हें सर्वस्वी तुझ्यावर अवलंबून आहे. जर का ह्यातील थोडेबहुत बाहेर पडलें तर सुमतीच्या जन्माचे व तिच्याबरोबर माझेंहि वाटोळें होणार आहे.

बरं, सांगतोस ना आतां ?

पण इतकी गडबड हवी कशाला ?

मला विनोदिनीबद्दल भारी उत्कंठा लागली आहे.

ती कां बरें !

मला एक मजा करावयाची आहे.

ती कोणती ?

विनोदिनीला हा फोटो दाखवून आश्चर्यचकित करुन टाकावयाचें आहे दोघींना माझ्या मनांत.

पण हें सर्व जुळणार कसें ?

श्रीधरमार्फत !

श्रीधर! पक्का Sherlockholmes आहे.

तें कसं काय ?

अरे ! तुला काय माहीत ? त्यानं तर इतकं केलं !

काय केलं ?

आमच्या प्रेमांत बिब्ब घातला !

तो कसा काय ?

सांगतों ऐक ! " असें ह्मणून विश्वासनें आपली करुण कहाणी सांगण्यास प्रारंभ केला.

" वसंता ! मी सुंदरवाडीस असतांना तेथेंच सुमतीची व माझी ओळख झाली.

तिच्या घरची परिस्थिती अत्यंत गरीबीची होती. घरीं ती, तिची थोरली बहीण, व तिचे ह्यातारे वडील इतकीच काय ती मंडळी होती. आई, ती लहान असतांनाच ह्या सर्वांना सोडून गेली होती. माझें व तिचें प्राथमिक शिक्षण तेथील मराठी शाळेंत पुरें झालें. तेव्हांपासूनच आमचें एकमेकांवर प्रेम जडलें होतें. थोडयाच दिवसांनीं तिच्या वडीलानी ह्या दोघांची लग्नें एकदमच उरकून टाकलीं. पण दैवाची लीला किती विचित्र!

" लग्न होऊन दोन—चार वर्षे होतात न होतात तों सुमतीचें सौभाग्य नष्ट झालें. ती आपल्या वडीलांचे घरी रहाण्यास आली. त्यानंतर थोडयाच दिवसांनी तिची थोरली बहीण एका अर्भकास जन्म देऊन मातेच्या भेटीस निघून गेली. विधुर झालेला घनश्याम मास्तर त्या अर्भकास घेऊन सुंदरवाडीस रहाण्यास आला. सुमतीनें त्या अर्भकाची जोपासना उत्तम प्रकारें केली. — तोच हा श्रीधर होय!

" मी सुमतीचे घरीं नेहमी जात येत होतो. तिला मधून-मधून लेख, कविता व निबंध लिहून देत होतो व ती तें आपल्या नांवावर मासिकांतून प्रसिद्ध करुन, योग्य तो मोबदला मिळवून पोट भरीत होती. पुढें मीं तिला फार खटपट करुन शाळामास्तरणीची नोकरी मिळवून दिली. त्या दिवसापासून मात्र तिचें माझ्यावर अत्यंत प्रेम जडलें!

" घनश्याम मास्तर विधुर झालेला. शिवाय सुमती मुलींचे शाळेंत मास्तरीण, तर हा मुलांचे शाळेंत मास्तर. मग त्याचें मन तिच्याकडे कां आकर्षलें जाऊं नये? योग्य संधि पाहून त्याने तिला तसें बोलूनहि पण दाखविलें, पण तिनें त्याच्या ह्मणण्याला पूर्ण नकार दिला. कांहीं झालें तरी सुमतीला वश करावयाचें त्यानें ठरवलें होतें. तसा तो दुष्ट होताच!

" पुढें उन्हाळयाची सुट्टी झाली. प्रेक्षणीय स्थळें पाहण्याचें निमित्त सांगून त्यानें तिला श्रीधरसह दूर मदनपूरास पळवून नेली. तेथें तिच्या इच्छेविरुद्ध त्यानें तिच्याशीं पुनर्विवाह केला. महीना दीड महीना तिच्या वडीलानें तिची वाट पाहिली पण शेवटीं त्याला ही बातमी समजली तेव्हां त्याचा धीर खचला व त्यांतच त्याचा अंत झाला!

" हें वर्तमान ऐकून माझ्या मनाची स्थिति फार केविलवाणी झाली. मला तिच्याबद्दल सारखी हुरहूर लागली होती. इतक्यांत तिचें पत्र आलें. पत्राप्रमाणें मी तिला भेटण्यास मदनपुरास गेलों. वडीलांच्या मृत्यूची हकीगत ऐकून तिला अतोनात दुःख झालें. तिला तिच्यां वडीलाखेरीज जिव्हाळयाचें दुसरें कोणीहि नव्हते या जगांत!

घनश्याम मास्तर आमचे प्रेमाचें बाबतींत पूर्ण अज्ञानी होता. आमचा सर्व पत्रव्यवहार श्रीधरमार्फत चालत होता. पण आह्मी पळून जाण्याच्या आदल्या दिवशी श्रीधरनें आमचा सर्व पत्रव्यवहार आपल्या वडीलांचे नजरेस आणला! तेव्हां तो रागानें लाल झाला व ह्मणाला, सुमती, मी तुला एक वेळ दया करतो. तुला माहीत नाही, समाज कसा आहे तो! लोकांना जर हें समजलें तर मला त्यांना तोंड दाखविणें मुष्कील होईल! तुझ्या ह्या अशा दुर्वर्तनाबद्दल मला तुला सोडूनहि देणें भाग पडेल कदाचित्! यापुढे मला असले चाळे मुळीच खपणार नाहीत! विश्वासला मात्र प्रसंगीं जीवाला मुकावें लागेल!

सुमतीनें मला हें वर्तमान कसें तरी कळविलें. जीव बचावण्यासाठी ह्मणून मी सुंदरवाडीस निघून आलों तों दुसरे दिवशी सुमतीचें पत्र आलें. त्यांत तिनें आता या जन्मीं तरी भेट होणें शक्य नाही असें लिहिले होतें. अशा रीतीनें

मी प्रेमाचे बाबतींत सर्वस्वीं निराश झालों आहे. विनोदिनीमार्फतच जर कांही झालें तर होऊं शकेल वसंता !

त्या दिवशी त्या दोघांनी मिळून विनोदिनीचा पत्ता काढला. त्या वेळी ती कोठें बाहेर गेली होती. चार वाजता घरीं याहण्याबद्दल एक चिठ्ठी तेथेच टेबलावर लिहून ते तेथन निघून गेले.

चार वाजले !

ते दोघे विनोदिनीकडे निघाले !

त्यावेळीं त्यांच्या मनांत निरनिराळे विचार-तरंग वहात होते !

आम्हाला पाहून तिला काय वाटेल ? तिच्याशीं प्रथम काय बोलावयाचें ? तिला ही हकीगत कशी सांगावयाची ? ही ऐकून ती काय म्हणेल ? एक ना हजार विचार त्यांच्या डोक्यांत त्या वेळीं चालले होते !

विनोदिनी घरीं आहे कां ? वसंतनें विचारलें, त्याबरोबर एक साधारण मध्यम वयाची स्त्री घरातून बाहेर आली.

आतांच ती बाहेर गेली तुम्हाला बसवून घेण्यास सांगून ! असें म्हणून तिनें त्यांना दिवाणखान्यांत नेलें व बसविलें. लगेच आपण विनोदिनीला बोलावण्यास शेजारी गेली.

विनोदिनी त्यांना पाहून प्रथम बुचकळयांत पडली ! तिला त्याची मुळीच ओळख नव्हती. हे कोण असतील हा प्रश्न तिच्यापुढे सहाजिकच उद्भवला. तोंच वसंतने बोलण्यास सुरवात केली.

आम्ही सुमतीकडून आलों आहे !

ठीक आहे ना ती ?

आहे झालं बिचारी ! विश्वास निःश्वास टाकून म्हणाला.

कां ? कांही कमी-जास्ती का कांहीं घडलें आहे ? तो मास्तर तिला भारी त्रास देतो ! तिला आतां जीव नको झाला आहे अगदी! कालच तिचं पत्र आलें आहे कीं, आज पांच वाजतां एक्सप्रेसनें इकडें येत आहे म्हणून!

वा ! योगायोग म्हणतात तो हाच ! वसंत एकदम म्हणाला.

विनोदिनी त्यांना तशीच सोडून आंत चहा सांगण्यास निघून गेली तोंच सुमती टांग्यांतून खाली उतरली.

विश्वासनें तिला 'सुमती' म्हणून हांक मारली. त्याबरोबर ती आपलें देहभान क्षण-भर विसरली. तिला गतस्मृत्याची त्या क्षणीं ती हांक ऐकतांच आठवण झाली. ती थोडा-वेळ स्तब्ध उभी राहिली. क्षणभरानें ती भानावर आली; तों तिचा विश्वास तिच्या-समोर हातांत 'सह्याद्री'चा अंक घेऊन उभा असलेला दिसला. त्याने तो अंक तिच्या हातांत दिला. ती तो उघडून पाहूं लागली तों तिला वसंत आणि वनमाला ह्यांचा फोटो दिसला. वनमालेच्या फोटोंत व विनोदिनींत सादृश्य पाहून ती थोडावेळ गोंधळून गेली. पण विश्वासनें तिला फार वेळ बुचकळयांत ठेवली नाही. त्याने तिला घडलेला सर्व वृत्तान्त सांगितला.

ह्या फोटोमुळें तर तुझी आज भेट झाली, तो म्हणाला. तेव्हांपासून तिचा आनंद गगनांत मावेना.

---

# मल्लिकार्जुनप्पा आप्पाराव पाटील
## यांचा
# अल्प परिचय

( ले०--श्री. मल्लिकार्जुन एस. कोरे, सोलापूर. )

कोणत्याहि जीवनांत दीर्घायुष्य, धडाडी, जिवंत उत्साहाचा वाढता विकास, यांचा सुंदर समन्वय झालेला क्वचितच आढळतो. धडाडीच्या सार्वजनिक कार्यकर्त्यांचा उज्ज्वल इतिहास ह्मणजे पुढच्या पिढीला उत्साहाचे परमश्रेष्ठ पीयूषच. नभांतून निखळलेल्या तेजस्वी ताऱ्याची तेजाळ दीप्ति, नभःपटलावर पहाटे पसरलेली लाल गुलाबी रंगछटा, हे निसर्गाचे नाजूक साज जरी क्षणिकच असले, तरी त्यांचें अस्तित्व रसिक मनाला जाणविल्याशिवाय कसें राहतील? मोठ्या लोकांच्या जीवननदीचा ओघ लवकरच आटतो व त्यामुळें त्यांच्या जीवननदीवर कालाधीनतेची दाट हिरवळ पसरलेली असते परंतु त्यांच्या कर्तव्यकिरणांची दीप्ति थोडीच मावळते! साधारणतः सार्वजनिक कार्यकर्त्यांचें आयुष्य फारच थोडें असलेले आढळतें. सुदैवानें ज्यांना दीर्घायुष्याची जबरदस्त जोड मिळाली आहे असे धडाडीचे सार्वजनिक कार्यकर्ते ह्मणजे सोलापूरचे श्री. मल्लिकार्जुनप्पा अप्पाराव पाटील. यांचा जन्म सोलापूर येथील सुप्रसिद्ध वाडगौडा घराण्यात शके १७९० आश्विन व॥ १३ ता. १४ ऑक्टोबर १८६८ रोजी झाला. परवा ऑक्टोबर ता. १४ रोजी त्यांना ६९ वर्षें पूर्ण होऊन ७० वें वर्ष सुरू झालें. सहाजिकच अभ्यासु मनाला असल्या थोर माणसाच्या असामान्य व्यक्तित्वाला कोणकोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या याची आच लागलेली असते. त्यानिमित्तानें त्यांच्या आयुष्याची अस्पष्ट छटा रंगविण्याचा यथामती प्रयत्न करणार आहें. जशी वसुधेची नितांत रमणीयता निसर्गाच्या सुंदर साजानेंच अधिक खुलून दिसते, रजनीनाथ चांदण्याच्या चंदेरी किरणांतच शोभून दिसतो, तद्वत् प्रसिद्ध पुरुषांच्या चरित्राला त्यांच्या पूर्वजांच्या पराक्रमी इतिहासाची साथ असली तर अधिकच उठावदार होते. तेव्हां पाटील घराण्याचा उज्ज्वल इतिहास थोडक्यात वाचकांपुढें मांडण्याचा माझा मानस आहे.

सोलापूर शहर हें सोळा गांवें मिळून बनलेलें आहे. त्यापैकी एका गांवची पाटीलकी या सदर 'पाटील' घराण्याकडे होती. राज्यविस्ताराच्या अघोर तृष्णेमुळें अहमदनगरच्या निजामशाहींत आणि दिल्लीच्या मोगलशाहींत कायमची तेढ होती. औरंगजेब जेव्हां दक्षिणेंत स्वारीकरितां निघाला तेव्हां साहजिकच निजामशाही व मोंगलशाही यांच्यामध्यें मोठी लढाई झाली. त्या वेळेला याच पाटील घराण्यातील

पूर्वजांनीं मोठा पराक्रम गाजवून औरंगजेबाला यश मिळवून दिलें. तेव्हां औरंगजेबानें खुषीनें या घराण्याला 'बहिरी' या नावाची अगदी उच्च पदवी बहाल करून एक मोठी जहागीरहि बक्षीस दिली. ती पदवी व जहागीर दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतहि याच घराण्याकडे अबाधित चालू राहिली. परंतु 'पाटील' घराण्याविरुद्ध कांहीं कारवाया केल्या गेल्यामुळें ती पदवी व जहागीर तात्पुरती तहकूब करण्यात आली. याला कारण काय ? तर पाटीलघराण्याची स्वामिभक्ति व बाणेदारपणा ! हें प्रकरण दुसऱ्या बाजीरावापुढे चौकशीस असतांनाच पेशवाई बुडाल्यामुळें प्रकरण येथेंच मिटलें.

श्री. मल्लिकार्जुनप्पा पाटील हे मोठे अधिकारीहि नाहीत किंवा आंग्लविद्येच्या पदव्यांची 'लाङ्गुलें' हि त्यांनी लावून घेतली नाहीत. तसें पहावें तर ते मोठे श्रीमंतहि नाहीत. परंतु त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेची बिजली मोठमोठ्या पदवीधरांनाहि दिपविण्यासारखी आहे. अडीअडचणीच्या कडेकपाऱ्यांतहि त्यांच्या कल्पकतेची धौडदौड अगदी बेफाट आहे. कोणत्याहि व्यवस्थेतील त्यांची करडी नजर, किंवा कामाचा दांडगा उरक 'मी' 'मी' ह्मणणाऱ्या 'अहंमन्यां' ना देखील गुडघ्यांत मान घालायला लावील.

श्री. पाटील यांचें शिक्षण व्यापारी शाळेंत झालें. पण एवढ्या तुटपुंज्या शिक्षणावरच त्यांनी स्वतःच्या असामान्य व्यक्तित्वाचा व अनुभवाचा मोठा मांडव उभा केला. असो. त्यांचा शिक्षणक्रम आटोपल्यावर ते येथील प्रसिद्ध व्यापारी रावजी आप्पा ढेपे यांच्या येथे राहिले व व्यापाराची सर्व माहिती मिळविली. अशा रीतीनें त्यांनी बाजारपेठेंत पदार्पण केलें. नंतर कै. रा. ब. श्रीमंत अण्णासाहेब वारद यांच्याकडे नौकरीस राहिले. मध्यंतरी कै. रा. ब. श्रीमंत आण्णासाहेब वारदांच्या मनाला श्री. पाटील यांच्या बुद्धिसामर्थ्याची कल्पना पूरेपूर पटली. कै. श्रीमंत अण्णासाहेब वारद जरी मोठे गर्भश्रीमंत होते, तरी पण त्यांची हृदयाची श्रीमंती फारच प्रभावशाली होती. गुणग्राहकता, रसिकता, व्यवहारपटुत्व प्रगमनशीलता, वगैरे बाबतींत श्रीमंतांनी तर अत्युच्च शिखरच गाठलें. ह्मणून तर त्यांची स्मृति प्रत्येक लिंगायताच्या हृदयसंपुटांत साठलेली आहे. त्यांच्या अगाध कर्तृत्वशक्तीची विस्मृती कालत्रयींहि होणें शक्य नाहीं. असो. अशा थोर माणसांच्या पदरीं श्री. पाटील राहिले. मग काय ! त्यांच्या बिनमोल गुणाचें खरें मोल कळूं लागलें. रत्नपारख्याच्या हातींच रत्नाची पारख होते. नाहीं तर गाजरपारख्यांनी गारगोटी ह्मणून केव्हांच दूर लोटलं असतं. अशा रीतीनें अनुकूल वातावरणांत श्री. पाटलांची फारच बढती झाली. इतकी कीं, कै. रा. ब. श्रीमंत आप्पासाहेब वारदांनीं सन १८९६ मध्ये काढलेल्या मिलचे आपल्या वतीनें श्री. पाटलांना एजंट नेमलें. पुढे कांही दिवसांनी राजस्थान गिरजी नरसिंग गिरजी महाराजांनीहि त्यांना आपल्यातर्फे एजंट नेमले. सतत १५-१६ वर्षे मिलचे एजंट ह्मणून श्री. पाटलांनी बजावलेली कामगिरी सर्वप्रसिद्ध आहे. इतकी कीं, अजून देखील त्यांना 'एजंट पाटील' या आडनावांनीच संबोधिलें जाते. प्रामाणिकपणा, कामाचा दांडगा उरक, कर्तव्यदक्षता, आणि कोणतेहि काम कसली कुचराई व कसूर न ठेवतां करायचें हा त्यांचा प्रामाणिक कटाक्ष !

कै. रा. ब. आप्पासाहेब वारदांचे मृत्यूनंतर १३।१४ वर्षे त्यांच्या इस्टेटीचें ट्रस्टी ह्मणून, नंतर शिवयोगमंदिर–संस्थेचे जनरल मॅनेजर ह्मणून बजावलेली कामगिरी प्रसिद्धच आहे. श्री. पाटील यांच्या ठिकाणी सार्वजनिक कार्यें

करण्याची हौस व अनिवार इच्छा लहानपणापासूनच अगदी उत्कट दिसून येते. सर्वसामान्य माणसांना वाचनाची गोडी लागावी ह्मणून इ. स. १८९१ मध्यें चाटी गल्लींत स्नेहप्रसारक—लायब्ररी स्थापन केली. १९०४ मध्ये ' लिंगायत असोसिएशन ' या नावाची संस्था काढून त्यांनी तिच्याकरिता परिश्रमाची पराकाष्ठा केली. सध्या सोलापूर येथील पांजरापोळमध्यें जें अनाथालय अस्तित्वांत आहे त्यांचें श्रेय श्री. मल्लिकार्जुनप्पा पाटील यांच्याकडेच आहे. कारण इ. स. १९०७।८ सालीं जेव्हा नरसिंग गिरजी मिलकडून पांजरापोळला मदत देण्याचा प्रश्न उद्भवला होता त्यावेळीं. नरसिंग गिरजी मिलचे त्यावेळचें एजंट श्री. पाटील यांनी पांजरापोळमध्ये अनाथ माणसाकरिता जर अनाथालय स्थापन केलें तर गिरणीकडून ती मदत देण्यांत येईल अशी अट ठेवण्यात आली यांचा योग्य परिणाम होऊन तेव्हापासून अनाथालय अस्तित्वांत आलें. ही स्तुत्य गोष्ट १९०७।८ च्या पांजरापोळच्या रिपोर्टांत नमूद केलेली आहे. १९०७ येथे अखिल भारतीय वीरशैव महासभा भरली होती. त्यावेळी हें वीरशैवमहासभेचे जनरल सेक्रेटरी होते. श्री सिद्धेश्वर देवळात मंटप बांधण्याचा प्रश्न उद्भवला. प्रथम ती गोष्ट अशक्य होऊन बसली. परंतु यांच्याच प्रयत्नानें मंटप बांधण्याचें कार्य यशस्वी झालें. इ. स. १९०९ मध्ये श्रीमद्वीरशैवमहाजनसभा स्थापन करून पुष्कळ वर्षें स्वतःचे नेतृत्वाखाली तिचें कार्य चालवून संस्था नांवारूपास आणली व पुष्कळ वर्षें अनाथविद्यार्थ्यांच्या शिक्षणाचीं व जेवण्याची सोय लावली. तसेंच, मोफत वाचनालय स्थापून शैक्षणिक व नैतिक क्षेत्रांत वरील विद्यार्थ्यांस मदत केली. ही लायब्ररी सर्वांना मोफत ठेवण्यात आली होती. सन १९०७ सालीं भरलेल्या वीरशैव-महासभेबरोबरच हस्तकलाकौशल्यप्रदर्शन व महिला-परिषद भरविण्याचें श्रेय श्री. पाटलांनींच संपादिलें. सन १८९६ या सालांतील भयंकर प्लेगाचे वेळीं व नंतर इन्फ्लुएंझाचे साथींत त्यांनी प्रसंगीं प्राणहि पणास लावून केलेली अलौकिक कामगिरी कोणाच्याहि हृत्पटलावरून पुसटून जाणें शक्य नाही. सन १९१९ सालीं विजापुरास प्रांतिक परिषद भरली होती. तिचे स्वागतउपाध्यक्ष श्री. पाटील हेच होते. सदर परिषदेंत ब्राह्मणेतरवादानें विघ्नांची वावटळें उठलीं. परंतु पाटलांनीं अतुल कल्पकतेच्या जोरावर हीं विघ्नें दूर घालविलीं. या त्यांच्या कर्तबगारीबद्दल अध्यक्ष कै. ना. विठ्ठलभाई पटेल व श्री. पांडुरंगराव देसाई यांची मुक्तकंठानें स्तुति केली. इ. स. १९२० मध्यें सोलापुरांत भरलेल्या प्रांतिक परिषदेचेंहि श्री. पाटील सेक्रेटरी होते. सन १८९७, १९१४, १९२० या सालांतील दुष्काळसमयीं दुष्काळनिवारणसंस्थेचे सेक्रेटरी ह्मणूनहि त्यांची कामगिरी अत्यंत उल्लेखनीय अशी झाली आहे. श्री. पाटील हे कॅटल-फीचनचे सेक्रेटरी असल्यावेळीं तेव्हांचे कलेक्टर मे. कुरेशीसाहेब यांनीं त्यांची तारीफ केली. बागलकोट येथील महासभेंत श्री. पाटलांचें जें भाषण झालें त्यावरून त्यांच्या व्यवहारचातुर्याची कोणासहि कल्पना येईल. कापसाच्या पैदाशीसंबंधीं सोलापूर जिल्ह्यांत केलेली अतुलनीय कामगिरी कांहीं लहान सहान नव्हे. तेव्हां येथील प्रदर्शनांत झालेलें भाषण अजूनहि कित्येकांच्या स्मरणांत असेल. कै. रा. ब. श्रीमंत अण्णासाहेब वारदांच्या पुण्यतिथीचे पुरस्कर्ते, संक्रांतीची यात्रेंत सुधारणा, पंचांना स्वकर्तव्याबद्दलची जाणीव देणें, हिंदुमुसलमान दंग्यात सत्य बाजू मांडून झटणें वगैरे विविध वातावरणांतील कामगिरी खरोखर आदर्श ह्मणूनच राहील. श्रीसिद्धेश्वर-तलावप्रकरण तर सर्वत्र गाजलेलेंच आहे. या तलावप्रकणीत तरी श्री. पाटलांनीं जिवाचें रान करून लिंगायतांच्या अभिमानाचा विजयध्वज मोठ्या डौलाने डोलविला. श्री. पाटील हे साहित्यिक ह्मणूनहि चमकलेच आहेत.

केसरी, ज्ञानप्रकाश, काळ, स्वराज्य ( सोलापूर ) कर्मयोगी, कल्पतरु, वगैरे पत्रांतून यांचें भारदस्त व विचारपरिप्लुत लिखाण प्रसिद्ध झालें आहे व होत आहें. विशेषतः 'सोलापूर समाचार' पत्राचा ज्युबिली अंक व 'सुदर्शन' पत्राचा श्रीसिद्धेश्वर खास अंक यांत आलेले लेख अत्यंत मननीय असे आहेत.

श्री. पाटील जरी स्वधर्माबद्दल कट्टे स्वाभिमानी व कडकडीत शीलाचरणी असलें तरी त्यांच्यांत परधर्मीविषयी असहिष्णुता मुळीच दिसूव येत नाही. हे जसे कट्टे धर्माभिमानी आहेत त्याप्रमाणेच 'स्त्री शिक्षणा'-ची आत्यंतिक आंच यांच्या अंतःकरणाला लागलेली दिसून येईल. याचें मूर्तिमंत प्रतिक म्हणून यांच्या सुशील व सुविद्य पत्नी कै. सौ. 'विद्यावती' भागीरथीबाई पाटील यांच्याकडें अंगुलीनिर्देश करावा लागेल. कै. सौ. 'विद्यावती' भागिरथीबाई पाटील यांनी आपल्या हयातींत महिलावर्गाच्या उन्नतीप्रीत्यर्थ केलेल्या प्रसिद्ध व प्रशंसनीय कामगिरीचें श्रेय बहुतांशीं श्री. पाटील यांच्याच प्रोत्साहनाकडे आहे. गुलाब काटयांनी वेष्टिलेला असला म्हणून काय त्याचा कोणीं अव्हेर केला आहे? तद्वत्, स्पष्टवक्तेपणाचा निर्भीड स्वभावाचा टणकपणा जरी त्यांच्यांत असला तरी त्यांच्या हृदयाची मृदुलता कोणालाहि हवीशीच वाटणार! हरीभाई देवकरण हायस्कूलची होमग्राऊंडची घालविलेली जागा परत देवस्थानकडें मिळवून देण्याचें श्रेय श्री. पाटलांकडेच आहे. सतत सोळा वर्षे म्युनिसिपल कौन्सिलर म्हणून त्यांनी केलेली बहुमोल कामगिरी अगदी अलौकिक आहे. सॅनिटरी कमिटीचे चेअरमन म्हणून केलेलें निःपक्षपातीपणाचें कार्य कोणालाहि हेवा वाटण्याजोगेंच आहे. यासंबंधी म्युनि. अॅडमिनिस्ट्रेटिव्ह रिपोर्टांत अत्यंत स्तुतिपर उल्लेख नमूद केलेला आहे. येथील पाठशाळेची व्यवस्था श्री. पाटलांनी सतत १२ वर्षे पाहिली आहे. येथील विद्यार्थ्यांचा पद्धतशीर अभ्यासक्रम ठरवून त्यांना कलकत्ता संस्कृत-असोसिएशनकडें परीक्षेस बसण्याची सोय मुख्यतः यांनीच केली. याचा कर्नाटकीय संस्थाहि पुरेपूर फायदा घेत आहेत. श्री. पाटील हे लोकमान्य टिळकांचे पक्के पुरस्कर्ते आहेत. आणि त्यांच्या 'केसरी' पत्राचे सतत पंचेचाळीस वर्षे वाचक व वर्गणीदार आहेत.

समर्थविद्यालयाच्या फंडाकरितां लोकमान्यांबरोबर ते दौऱ्यावर गेले होते. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणेचे वेळीं महाराष्ट्रीय वीरशैवांचें मत कळविण्याकरितां येथे सभा भरविण्यांत ते प्रमुख होते. वयाच्या मानाने ते जरी 'खचलेले' दिसत असले तरी कर्तव्यतत्परतेंत 'कसलेलें' आहेत. या उतारवयांतहि त्यांच्या दांडग्या उत्साहाचा वाढता जोम अजून आहे तसाच आहे. सन १९३० सालीं सोलापुरांत जो मार्शल लॉ पुकारण्यांत आला त्या वेळीं जनतेवर झालेल्या जुलुमाचें परिमार्जन करण्याच्या कामीं बराच मोठा पुढाकार घेतला. श्री. मल्लप्पा धनशेट्टीप्रभृतींच्या फांशीविरुद्ध त्यांनी कर्नाटक प्रांतांत, जीवाची तमा न धरतां, ठिकठिकाणीं व्याख्यानें करुन व दौरा वगैरे काढून बरेंच चैतन्य व जागृति निर्माण केली. अगदीं अलीकडचें उदाहरण घ्या ना! परवाच त्यांनीं एक मोठें कार्य हातीं घेतलें आहे. तें म्हणजे बागलकोट येथे एक नवीन मिलची स्थापना! हें कार्य मूर्तस्वरूपांत येण्याची सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. या त्यांच्या कार्यांत त्यांना ईश्वर सुयश देवो अशी माझी प्रार्थना आहे.

त्यांच्या जीवनावर प्रकाश पाडणारीं पुष्कळशीं कार्यें त्यांच्या हातून झालीं आहेत. परंतु स्थलसं-

कोचास्तव त्यांचा नामनिर्देश मला करतां येत नाही. असो. सारांश इतकाच कीं, श्री. मल्लिकार्जुन आप्पाराव पाटील हे ' सोलापूरचा जिवंत इतिहास ' आहेत असें जरी म्हटलें तरी त्यांत अतिशयोक्तीचा अंश आहे असें निदान मला तरी मुळींच वाटत नाहीं.

शेवटीं, त्यांना दीर्घायुरारोग्य लाभून त्यांचें आदर्श जीवित आम्हा तरुणांच्या उन्नतिप्रीत्यर्थ कारणीं लागो व त्यांच्या हातून अशींच मोठमोठालीं कृत्यें पार पाडून त्यांच्या उज्वल इतिहासाची परंपरा जनताजनार्दनाला ते पटवून देवोत याशिवाय माझी दुसरी अशीं कोणती सदिच्छा असणार ?

---

# दि कर्नाटक लिंगायत

## एज्युकेशन सोसायटी, बेळगांव.

( अशा प्रकारची एकादी उपयुक्त संस्था महाराष्ट्रीय वीरशैवांकरिता वऱ्हाड-मध्यप्रांतांतील धनिकांनी स्थापन केल्यास खरी समाजसुधारणा केल्याचें महत्पुण्य लाभणार नाही का ? --सं सं

इ. स. १९१६ सालीं बेळगांव येथें शिक्षणप्रसार करण्याच्या उद्देशाने ही सोसायटी स्थापन झाली. मुंबई इलाख्यांतील सर्व भागांत व विशेषतः बेळगांव, धारवाड, विजापूर व सोलापूर या जिल्ह्यांत शिक्षणसंस्था काढून त्याप्रीत्यर्थ दुय्यम व उच्च प्रकारचें शिक्षण देणें, तसेच व्यापारी, औद्योगिक, शिक्षण देऊन समाजाची सर्वांगीण उन्नती करणें, हा या सोसायटीचा मुख्य उद्देश आहे.

सोसायटीच्या सभासदांची वर्गवारी

(१) महाआश्रयदाते-सोसायटीला रु. २५००० किंवा त्याहून अधिक रक्कम देणारे.

(२) आश्रयदाते:—रु. १,००० किंवा त्याहून अधिक देणारे.

(३) सामान्य सभासद:--रु. २०० किंवा त्याहून अधिक देणारे.

(४) हितचिंतकः—प्रतिवर्षी रु. १० देणारे.

(५) हयाहयात सभासदः--सोसायटींत २० वर्षे नोकरी करणारे.

(६) ऑनररी सभासदः— सोसायटीने निवडलेले.

पूर्ण स्वार्थत्यागबुद्धीनें ही संस्था लोकसेवा करीत असून, ती सर्वस्वीं लोकाश्रयावर अवलंबून आहे. सदर सोसायटीनें चालविलेल्या सर्व शिक्षणसंस्था सर्व जातींच्या व समाजाच्या विद्यार्थ्यांना खुल्या असून त्यांत कोणत्याहि प्रकारच्या मर्यादा अगर बंधनें नाहीत. हरिजन व इतर मागासलेल्या वर्गांना, त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षणाला विशेष सवलती देण्यांत येतात.

सोसायटीनें हल्ली खालील निरनिराळ्या संस्था चालविल्या आहेतः—

(१) गिलगंची अंर्टाळ हायस्कूल, बेळगांवः— कै. रा. ब. गुरुसिद्धप्पा गिलगंची व रा. ब.

आर. सी. अर्टाळ [ I.S.C. ]यांनी लिंगायत-समाजाच्या शिक्षणप्रसारार्थ जी अत्यंत महत्वाची कामगिरी केली व स्वार्थत्याग करून स्वतः मेहनत घेऊन समाजाची जी बहुमोल सेवा केली आहे, त्याप्रीत्यर्थ त्यांचे नांवें हें हायस्कूल स्थापण्यात आलें आहे. यांत हल्लीं ५० विद्यार्थी शिक्षण घेत असून, ही शाळा अत्यंत भरभराटींत चालली आहे.

(२) लिंगराज कॉलेज, बेळगाव.—

इ. स. १९३३ सालीं हें कॉलेज कै. दानवीर सरदार श्रीमंत लिंगप्पा जयाप्पा सरदेसाई सिरसंगी नवलगुंद यांच्या स्मरणार्थ त्यांच्या नांवाने स्थापन करण्यात आलें आहे. श्रीमंत सिरसंगी सरदेसाई यांनी आपली बारा लाखांची सर्व इस्टेट लिंगायतसमाजोन्नतीस्तव शिक्षण-कार्याकरिता अर्पण केली असल्याचें सर्वप्रसिद्ध आहेच. या कॉलेजमध्ये बी. ए. पर्यंतचें पूर्ण शिक्षण व इंटर सायन्स ( अ व ब ग्रुपचें ) शिक्षण देण्यात येतें.

( ३ ) राजा लखमगौडा सरदेसाई हायस्कूल, धारवाड.—

हें हायस्कूल इ. स. १९२२ सालीं श्रीमंत राजा एल बी. सरदेसाई संस्थान-वंटमुरी यांच्या नावानें स्थापन करण्यात आलें. सदर राजेसाहेबांनीं कर्नाटकांतल्या निरनिराळ्या सार्वजनिक संस्थांना उदार मनाने मदत केलेली असून, सदर सोसायटीला त्यांनी १ लक्ष १० हजार रुपयापेक्षां जास्त देणगी देऊन सोसायटीला ऋणी केलें आहे.

(४) तोंटदार्य प्रेस, धारवाड:—

हा छापखाना सोसायटीनें सन १९२५ साली स्थापन केला असून यांत प्रिंटिंग व बाइंडिंगचे शिक्षण दिलें जातें.

(५) व्यापारी शाळा, धारवाड:—

ही शाळा वरील हायस्कूललाच जोडलेली असून यांत व्यापारविषयक व शॉर्टहॅंड व टाईपरायटिंगचेंहि शिक्षण दिलें जातें.

(६) श्रीबसवेश्वर हायस्कूल, बागलकोट.:—

सदर हायस्कूल सोसायटीनें ७ वर्षें चालवून चांगल्या भरभराटीस आणलें आहे.

याशिवाय सोसायटीनें ॲंग्लो व्हर्न्याक्युलर शाळा (१) बेल्लदबागेवाडी, (२) संवदत्ती, (३) हिरेकेरूर या ठिकाणी चालविलेल्या असून सोलापूर येथेहि गेल्या जून महिन्यांत ए. व्ही. स्कूल उघडलें आहे.

सोलापूर हें १॥ लाख वस्तीचें शहर असून, शिक्षणाच्या बाबतींत बरेंच मागासलेले आहे. या ठिकाणी दुय्यम शिक्षण देणाऱ्या शाळाहि अगदीच अपूऱ्या असल्याने सोसायटीनें हें स्कूल उघडलें आहे. तिचें लवकरच पूर्ण हायस्कुलमध्ये रूपांतर होईल अशी बळकट आशा आहे. तसेंच या शाळेला जोडूनच व्यापारविषयक व औद्योगिक शिक्षणाचेहि वर्ग काढून सोलापूरसारख्या व्यापारी व औद्योगिक महत्वाच्या शहराला अत्यावश्यक व जरूर असलेल्या शिक्षणाची सोय करण्याचाहि सोसायटीचा उद्देश आहे. सोलापूर शहर हें लिंगायतांचें मोठें केंद्रस्थान असून त्याची लोकसंख्या सुमारे ३५००० आहे. ह्मणून तो समाज या संस्थेचा भरपूर फायदा घेईल अशी आशा आहे.

वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊन संस्थेचा पवित्र व उच्च हेतु पूर्ण फलद्रूप होण्याकरितां सर्व शिक्षणाभिमानी लोकांनी हस्तें-परहस्तें मनःपूर्वक मदत करावी अशी विनंती आहे.

एस्. एस्. बसवनाळ,
M. A. M. R. A. S.
जनरल सेक्रेटरी
के. एल्. ई. सोसायटी बेळगांव

# धर्मात्मा

## बसवदेव

ज्या बसवेश्वरांनी वीरशैवधर्माचा धर्मध्वजा अखिल भारतवर्षांत फडकवली, आणि आसेतु हिमाचल वीरशैवधर्मवृद्धीकरतां ज्यांनीं आपल्या सर्वस्वाची आहुती दिली, त्या महाभाग बसवदेवाचें विस्तृत चरित्र संजीवनीच्या नव्या वर्षापासून म्हणजे जानेवारी १९३८ पासून क्रमशः प्रसिद्ध करण्यात येईल.

लेखकानें चरित्र विषयक माहिती सर्वांगपरिपूर्ण अशा उपलब्ध विश्वस्त साहित्यामधून महत्प्रयासाने संग्रहित केलेली असल्यामुळें, बसव-देवाच्या जन्मकालापासूनचा अनेक उद्बोधक स्थित्यंतरें बसवकालीन वीर-शैव मतानुयायी महात्म्यांनीं वीरशैवधर्मरक्षणाकरता केलेली महनीय काम-गिरी आणि तत्कालीं निर्माण झालेलें वाङ्मय, वगैरे गतकालीन वीरशैव वैभवाचा सर्वांगपरिपुर्ण असा इतिहास महाराष्ट्रिय भाषेमधून या चरित्र-रुपाने प्रथमच प्रसिद्ध होत आहे हेंच वाचकांना आढळून येईल.

भाषेच्या दृष्टीनें आबालवृद्धांना हा चरित्रग्रंथ आपल्या धर्माची शिकवण देत देत मनोरंजनहि करील अशाच नव्या पद्धतीनें लेखकाने लिहिला आहे. किंबहुना, आपल्या वीरशैव वाङ्मयातील मराठी भाषेतील हाच पहिला एकमेव उत्कृष्ट ग्रंथ ठरणार. यात शंका नाहीं. या चरित्र-ग्रंथाची जवळ जवळ पांचशे पाने होतील. संजीवनीच्या वर्गणिदारांना तीन रुपयांतच इतर भरपूर मजकुरासोबत अमुल्य असा हा चरित्रग्रंथ आम्ही क्रमशः प्रसिद्ध करून विनामुल्यच देण्याचें साहस करित आहोत हें कुणीही नाकबूल करणार नाही.

लेखकः--
रा. शं. पुराणिक

संजीवनीच्या वाढत्या आकाराबरोबर, कागदाचे भाव भरमसाट वाढले असतांनाहि, आम्ही फक्त नव्यावर्षापासुन आठ आणेच वार्षिक वर्गणींत वाढ केलेली आहे.

पण डिसेंबर ३१ तारखेपर्यंत वर्गणी भरणारांना अडीच रुपये भरूनहि वर्गणिदार होण्याची सवलत आहे. हें लक्षांत असू द्या आणि तावडतोब सवलतीचा फायदा घेऊन वर्गणी पाठवा.

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील— मौजेची प्रश्नोत्तरे :—

**शि. गं. वर्णे.**

वीरशैवांचें आराध्य दैवत श्रीशंकर पार्वती यांचेबद्दल नवमतवादी तरुण तरुणींना-अनादर वाटत असून, या देवतांची भक्ती त्यांना विषासारखी वाटते तें कां ?

[ निर्गुण–निराकार पार्वतीपरमेश्वराच्या भावभक्तीचा पोकळ डोलारा उभा करण्यांत नवमतवाद्यांना मौज वाटत नसून, आत्मा हाच परमात्मा या जाणीवेनें नवमतवादी तरुण तरुणी एकमेकांवर अत्युत्कट प्रेम करतात, तेव्हा यालाहेखील खरें प्रेम अर्थात् खरी भक्ति पण सजीव जीवाची ह्मणजे अन्यार्थानें पार्वतीपरमेश्वराचीच भक्ति ह्मणता येणार नाही का ? ]

---

**शि. क. खो. पट्टणकुड्डी.**

मी आपल्या पत्राकरितां लेख पाठवितो ते स्वतःच्या समाधानाकरिता. आणि ते केव्हा प्रसिद्ध होतील आणि माझे मला केव्हां वाचायाला मिळतील असें मला होऊन जातें. माझे प्रसिद्ध झालेलें लेख मला वेळेंवर वाचायाला मिळत नाहीत अशी तक्रार केल्यास, आपण वर्गणीदार होऊन आमच्या पत्राला उदार आश्रय द्या असें आपण कळवतां. तेव्हा ही माणुसकी कां ?

( माणुसकीकरतां घरादारावर तुळशीपत्र ठेवून दानधर्म करणारा दानवीर नांवाचा एकेका पण परिस्थितीनें भुकेकंगाल असतो हे जाणण्याइतपत आपण आपली दृष्टि तिकडे वळवून पहाल तर बरें होईल. )

---

**. मा. भंडारा.**

आपल्या पत्रात भस्मलेपन रुद्राक्षधारण, भगव्या वस्त्राची महती वगैरेवर सुसंस्कृत असे लेख आल्यास मी वर्गणीदार होऊं इच्छितों. वीरशैवांचें पत्र ह्मटलें कीं त्यांत आगम-निगम शिवपुराण यांचीच चर्चा पाहिजे असें माझें प्रांजल मत आहे. कारण ते धर्मग्रंथ आहेत.

( सुसंस्कृत भाषा जाणणारे आपणासारखे धर्मप्रवण वाचक वीरशैवसमाजामधून आजहि नाहीत असें नाही; पण त्याच त्या शिळ्या शिळोप्याच्या पुराणातील गोष्टी एकजात वाचणारे वाचक शेकडा एक-दोन तरी मिळतील कीं नाही याची आपण हमी देत असल्यास इतर सर्व बाबी झुगारून धर्मग्रंथाचें प्रकाशन आपल्या एकट्या-दुकट्या वाचकाकरिता करण्याइतपत सगळेच कांही कै. वारद नाहीत हें खरें ना ? )

---

**रं. दि. ने. गुंज.**

मी आपलेकडे प्रसिद्धीकरिता पाठवलेलें काव्य आपण प्रसिद्ध केलें नाही, तेव्हा आपणास काय ह्मणावें हेंच कळत नाही. मी तीं कविता एका मैत्रिणीवर मुद्दाम लिहून तिला ती वाचून दाखविली तेव्हा ती बहोत खुष झाली, आणि आनंदानें नाचू लागली.

( शक्य आहे. आपल्या काव्यालंकारानें तिला खूष होणें भाग आहे. कारण त्याशिवाय आपल्याला तिचें प्रेम आणि तिला आपल्याकडून इतर अलंकार कसे उपटता येणार ! आपण इतके तिच्यावर खुषदिल आहांत हें तिने ओळखूनच मुद्दाम लटकेच मुरके मारले असतील अगर नसल्याच तिच्या थयथयाटाला तुह्मी तरी आनंदाचा नाच समजला असाल. बाकी इतकी गचाळ कविता इतरत्र दुसरी असेल कीं नाही याबद्दल शंका आहे. सबब तिच्या योग्य स्थान तिला देण्यात आलें आहे.)

बृहन्महाराष्ट्रांतील वीरशैव ( लिंगायत ) समाजाचें प्रमुख पाक्षिक पत्र

# वीरशैव संजीवनी

येत्या जानेवारीपासून तिसरें वर्ष सुरूं !

नव्या वर्षाच्या सुरवातीस **‘ सं जी व नी ’**

नव्या थाटामाटानें पुढें येणार !

वाढता आकार ! मुखपृष्ठ भरदार !

आणि लेखमालाहि नव्या धर्तीची नमुनेदार !

आणि शिवाय

## —: एक नवी योजना ! :—

## उत्कृष्ट लघुकथेला पांच रुपयांचें रोख बक्षीस !

**वीरशैव संजीवनीचा जानेवारी १ तारखेचा अंक खास लघुकथा अंक म्हणून प्रसिद्ध केला जाईल.**

लघुकथा पाठविणारा लेखक ‘ संजीवनी ’चा वर्गणीदार असला पाहिजे. वर्गणीदार नसणारांना प्रसिद्धी मिळणार नाही. ( स्त्रिया आणि पंधरा वर्षांच्या आंतिल मुलांना हा नियम लागू नाही, पण ते स्वतःच लेखक असल्याचे त्यांनी प्रतिज्ञेवर कळवावे. ) लघुकथा प्रसिद्ध करतांना लेखकाचे नांव वर छापलें जाणार नाही.

निर्णय वाचकांच्या बहुमतावर अवलंबून राहिल. सर्वांत अधिक मतें मिळणाऱ्या लघुकथेच्या लेखकाचा फोटो प्रसिद्ध करण्यांत येऊन त्याला रोख पांच रुपयाचें बक्षिस देण्यांत येईल.

लघुकथा संजीवनीच्या दोन पेजेसपेक्षां कमी आणि चार पेजेसपेक्षा अधिक असूं नये. लघुकथा ता. १५ डिसेंबरचे आंत पाठवून त्यावर ‘ खास लघुकथा अंकाकरितां ’ असें लिहिलेलें असावें.

संजीवनीची वार्षिक वर्गणी येत्या जानेवारीपासून तीन रुपये करण्यांत आली आहे. तरी पण डिसेंबर ३१ पर्यंत वर्गणी भरणारांस अडीच रुपये भरून वर्गणीदार होतां येईल.

**आजच वर्गणीदार होऊन सवलतीचा आणि बक्षिसाचा फायदा घ्या !**

संपादक:—‘ वीरशैव संजीवनी ’

# वीरशैवांतील चळवळी

## वीरशैव तरुण संघ जिल्हा अहमदनगर

### संमेलन २ रे

मंगळवार ता. १९ सकाळी ७॥ चे गाडीने श्री. झुंजे वकील व गुरुवर्य पराण्डकर महाराज आले. स्टेशनवर त्यांचें स्वागतार्थ संघांतील प्रमुख पप्पुशेट भिंगारकर शंकरआप्पा हिंगमीरे, शांतलींग हापसे, संघाचे सेक्रेटरीज् दगडू भागाप्पा होवराव व गणपत भगवान हापसे वगैरे २०-२५ मंडळी गेली होती. गाडी आल्यानंतर संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. शांतलींग हापसें यांनीं श्री. झुंजे वकील गुरुवर्य परांडकर यांना पुष्पहार घालून सर्वांच्या ओळखी करून दिल्या. नंतर उभयतांची शांतलिंग हापसे यांच्या घरी रवानगी झाली. रात्री ८ वाजता श्री. झुंजे वकील व गुरुवर्य पराण्डकर यांना संघाचे अध्यक्ष घोंडूशेट व शांतलिंग हापसे हे सभास्थानीं घेऊन आले. त्यांचें टाळ्यांत स्वागत करण्यांत आलें. नंतर श्री. झुंजे वकील व गुरुवर्य परान्डकर वगैरे स्थानापन्न झाल्यावर 'वंदे मातरम्' गीत झालें. नंतर शांतलिंग हापसे यांचें भाषण झालें. त्यांनीं अहमदनगर जिल्ह्यांत वीरशैवांची लोकसंख्या ५ हजार असून वीरशैवसमाज फार मागासलेला आहे; तर आपण सर्वांना समाजसुधारणे करितां संघटित होऊन कार्य करावयास पाहिजे, सांपत्तिक परिस्थितीचे मानानें वीरशैवसमाज फार मागासलेला आहे; वगैरे सांगून संघाचे सभासद होण्याबद्दल विनंती करून, श्री. झुंजे वकील यांची थोडक्यांत ओळख करुन दिली. व श्री. झुंजे वकील यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी विनंती केली. त्याला श्री. घोंडूसेट सगने यांनीं अनुमोदन दिल्यावर टाळ्यांच्या गजरात अध्यक्ष स्थापनापन्न झाले.

अध्यक्षांचें भाषण — इतर समाज आपली उन्नति करून घेत आहे, व एकीनें कार्य करण्यासाठी संघाची अवश्यकता आहे. राजकीय, औद्योगिक, धार्मिक व सामाजिक उन्नती होणें जरुर आहे. आपसांतील पक्षभेद नाहीसा झाला पाहिजे. प्रत्येक मनुष्यास प्रापंचीक आणि परमार्थिक गोष्टीची कामें करावीं लागतात; पंचाचार, षडस्थळ, अष्टवर्ण, हे पाळणें आपले कर्तव्य आहे. गुरुवर्गानें आपणास धार्मिक माहिती द्यावयास पाहिजे. मनशुद्धिसाठी धार्मिक बंधनें पाळावीं लागतात. धर्म सांभाळून आपला प्रपंच चालावयास हवा. आपल्या समाजांत शिक्षण अगदी कमी आहे. त्याकरिता शिक्षणप्रसार करणे हें आपलें आद्यकर्तव्य आहे आणि निरनिराळ्या व्यापारी कंपन्या काढणे जरुर आहे. आणि निरनिराळ्या व्यापारी कंपन्या काढणें जरुर आहे. तरच आपणास हस्तगत करता येईल. मारवाडी, गुजर, वाणिसमाज व्यापारांत फार पुढे गेला आहे. याविषयी आपण विचार करणे जरुर आहे. धर्माची आणि देशाची उन्नति करणे हें प्रत्येकाचें आद्यकर्तव्य आहे. अशा आशयाचें कळकळीचें सुमारे पाऊण तास भापण केलें. नंतर संघाचा अहवाल सांगण्यांत आला.

अहवाल ( १ ) पंडीत जवाहरलाल नेहरु यांना हार घालण्यांत आला. ( २ ) मुंबई लेजिस्लेटिव असेंब्लीत जे वीरशैव बांधव निवडून आले त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें. ( ३ ) रेणुकाचार्य यांची जयंती करण्यात आली. (४) शिक्षणफंड सुरु करण्यात आला. ( ५ ) लग्नसमारंभातील आहेराविषयीची जुनी पद्धत बंद करुन आहेर हा प्रत्येकानें आपापल्या इच्छेप्रमाणें रोकडीने करण्याचें ठरवून ठिकठिकाणी वरील ठरावाचा प्रचार करण्यात आला. (६) श्री बसवेश्वर व श्री एकोरामाराध्याचार्य यांच्या जयंत्या करण्यांत आल्या. (७ ) अहमदनगर – जिल्हा–वीरशैव–तरुण संघाच्या शाखा उघडण्याचें ठरवून पहिली शाखा अहमदनगर येथे उघडण्यांत आली. (८) संघातर्फे सोलापूर–जिल्हा–वीरशैव परिषदेस एक प्रतिनिधी ह्मणून पाठविण्यात आले ( ९ ) श्री. मुंजें वकील यांनी आपल्या मुलच्या विवाहप्रसंगीं संघास ५ रु. देणगी दिल्याबद्दल त्यांचें आभार मानण्यांत आले. [ १० ] कांग्रेस–मंत्रीमंडळात नामदार लक्ष्मणराव कोळसे पाटील हे निवडून आल्याबद्दल त्यांना हार घालण्यांत आला. ( ११ ) हल्ली वीरशैवांमध्ये हुंडयात देवाण–घेवाणाची जी घातुक पद्धति आहे ती बंद होण्याबाबत ठराव पास करण्यांत आला. ( १२ ) संघाच्या कार्यकारी मंडळाची सभा होऊन, आश्विन शुद्ध १५ रोजी संघाचें दुसरें समेलन भरविण्यांचें ठरलें. याप्रमाणें संघाचा अहवाल वाचून दाखविण्यांत आला. नंतर खालील ठराव एकमताने पास करण्यांत आले.

ठराव (१) श्रीमज्जगद्गुरु पंचाचार्य बाळेहळ्ळी पीठ शाखेचें आणि मानूर मठाचे पटाधिकारी श्री. गिरय्यास्वामी यांचे अमदानींत सदर मठाचे पूर्वीचें वैभव पुष्कळ कमी झालें आहे. तशात श्री. महाराजांचें वय व प्रकृतीचे अस्वास्थ यामुळें मठाचा कारभार व्यवस्थित चालत नाही ह्मणून सदर मठावर सुशील, सुशिक्षीत, सुसंस्कृत, प्रौढ आणि आचारसंपन्न अशा पटाधिकाऱ्यांची स्थापना शक्य तितक्या लवकर करावी अशी श्री. स्वामी महाराज आणि मानूरमठाचें भक्तगण व हितचिंतक यांना ही सभा विनंती करीत आहे.

ठराव मांडणारः—श्री. शांतलिंग हापसे.

अनुमोदनः--श्री. पप्पूशेट भिंगारकर,

पुष्टीः—श्री. गुरुवर्य पराडकर,

ठराव नं २ अहमदनगर – जिल्हा–तरुण संघाने गरीब वीरशैव विद्यार्थ्यांच्या शिक्षणाच्या मदतीकरिता जो शिक्षणफंड उभारला आहे त्यास वीरशैवसमाजबांधवांनी सरळ हातानें सक्रीय मदत करावी.

ठराव मांडणारः—श्री. ढोले.

अनुमोदनः—श्री. रुद्रकेमास्तर,

पुष्टी--श्री. गुरुवर्य पराडकर

ठराव नं. ३ दिवसानुदिवस धार्मिक भावना वीरशैवसमाजांत कमी होऊं लागली असल्याचें दिसून येतें. ह्मणून प्रत्येकाने वीरशैव, पंचाचार, षट्स्थळ आणि अष्टावर्ण अशा धार्मिक आचार – विचारपूर्वक वागावें अशी या सभेची विनंती आहे.

ठराव मांडणारः--सावळेरामआप्पा सोळसे

अनुमोदनः— शंकरआप्पा हिंगमिरे

ठराव नं. ४ अहमदनगर जिल्हा वीरशैवतरुण संघ स्थापन करुन आपलें कार्य संपलें नाही. तर त्या संघांत नगर जिल्ह्यांतील प्रत्येक वीरशैवांनी संघाचे समासद बनून त्यांना कार्यक्षम करावें. आपला धार्मिक समाजिक आणि शैक्षणिक संदेश घरोघर पोहोचता करावा अशी या सभेची प्रत्येक वीरशैवसमाजबांधवास नम्र विनंती आहे.

ठराव मांडणारः—गणपत हापसे

अनुमोदनः—दगडू होनराव

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १ डिसेंबर १९३७ ( अंक २३वा

## ❀ अनुक्रमणिका ❀



वार्षिक वर्गणी २॥ रु. ॥ किरकोळ अंकास २ आणे.

**उदय** हें अर्धसाप्ताहिक वर्तमानपत्र उमरावती येथें दर मंगळवारी व शुक्रवारी प्रसिद्ध होतें. संपादक दे. भ. ना० शा० वामणगांवकर असून सदर पत्र पूर्ण राष्ट्रीय विचाराचें असून वऱ्हाडांतील जनतेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नांची त्यांत सांगोपांग चर्चा असते. वार्षिक वर्गणी टपालखर्चासह रु. ४. मनिऑर्डरनें येतांच वर्षभर वक्तशीर सुरू करितां येते.

व्यवस्थापकः— ' उदय '
उमरावती ( वऱ्हाड )

---

**सुदर्शन** हें साप्ताहिक सोलापूर येथे निघत असून वीरशैवांतील सुप्रसिद्ध वकील श्रीयुत सिद्धमल्लप्पा मल्लिकार्जुनप्पा कल्याण शेट्टी, बी. ए., एल् एल्. बी., हे संपादक आहेत. ह्या कर्नाटकांत लिंगायतांनी चालविलेल्या वर्तमानपत्रांतील वीरशैवांच्या सर्व हालचालींची मराठींतून माहिती दिली जाते व वीरशैवासंबंधी चांगल्या लेखकाचे लेखही येतात. परगांवीं वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह तीन रुपये चार आणे व्ही. पी. खर्चासह आहे.

व्यवस्थापकः— ' सुदर्शन '
सोलापूर

---

**वीरशैव गर्जना** अखिल भारतीय गुरुवर्य संघातर्फे बार्शी येथे श्रीगुरु राचालिंगस्वामी परान्डकर ह्यांच्या संपादकत्वाखाली दर गुरुवारी प्रसिद्ध होते. सदर पत्रांत अनेक शास्त्री पंडितांचे पांडित्यपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. व्ही. पी. व टपाल खर्चासह वर्गणी रु. २ आणे १२ आहे.

व्यवस्थापकः—' वीरशैव गर्जना '
बार्शी जि. सोलापूर.

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

—* जुनें वर्ष पांचवें *—

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याःशूद्रायेचान्य जातयः। लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति कार्तिक व० १४ शके १८५९ ( अंक २३ वा.

## अमृतबिंदू

कसल्याहि मायामोहाला बळी न पडणारा अगर कसल्याहि लोकापवादाला आणि संकटाला न भिणारा खंबीर वीरवृत्तीचा आणि स्वतःच्या ध्येयसिद्ध्यर्थ सर्वस्वाचा प्रसंगोपात संन्यास करणारा कर्मयोगीच खरा जगदुद्धारक होय.

बसवदेव

# वीरशैवसंस्कृतीचें बीज शिवसंस्कृति

ऐतिहासिक दृष्टया आणि संशोधनदृष्टीनें श्रीशिवाचें वास्तव्य कोठें होतें व त्या वेळी आर्यांच्या काशीक्षेत्राविषयीं काय कल्पना होत्या, ह्याचें विवेचन एक-दोन अंकांपूर्वी 'वीरशैव संजीवनीं'तून आह्मीं केलें होते. आता त्यानंतर शिवसंस्कृतीची वाढ कशी झाली व तिचें वीरशैवसंस्कृतींत रूपांतर कसें झालें व वीरशैवसंस्कृतीची वाढ कशी झालेली आहे ह्यांचा संशोधनदृष्टया व ऐतिहासिक दृष्टया येथें विचार करावयाचा आहे. हिंदुस्थानांत प्राचीन इतिहास उपलब्ध नसल्यामुळें वेदमंत्रावरून, उपनिषदांतील कथावरून, स्मृत्यादि पुराणग्रंथावरून, आणि प्राचीन काव्यग्रंथावरून, जूना इतिहास शोधावा लागतो.

निरनिराळ्या प्राणी जीवनांतून मनुष्य हा उत्क्रांत झाला असें आपल्याकडेहि मानलें आहे. मत्स्य, कच्छ, वराह, व नृसिह हे अवतार आपलेकडे मानले आहेत. शतपथ ब्राह्मणांत व तैत्तिरीय संहितेंत कूर्म व वराह अशा अवतारांचें वर्णन आहे. ह्यावरून फार प्राचीन काळीं ह्या सर्व प्राणिजीवनांतून येथे मनुष्य उत्क्रांत झाला होता हें प्रत्ययास येतें. वनस्पतींना सर्पादि व्याघ्र, उंदीर, गज, वानर, अस्वल, नंदी इत्यादि प्राणीमात्रांना पुज्य मानण्याची प्रवृत्ति येथील मनुष्यवर्गात होती. आरंभी मनुष्य ज्या ज्या जीवापासून वाढला असेल त्या त्या वनस्पतींना व प्राण्यांना तो पूज्य मानूं लागला. उत्तरअमेरिकेंत अशा कांही मनुष्यजाती आहेत कीं, त्यांच्यांत एखादें श्वापद, एखादा पक्षी, वा एखादा पशु अद्यापि पूज्य मानला जातो. अशा अनेक मनुष्यजाती प्राचीनकाळीं येथेहि अस्तित्वांत असाव्यात. अर्वाचीन ग्रंथकार अशा निरनिराळ्या मनुष्यजातीच्या संघांना Totemism पद्धत असें समजतात.

रामायणांत रामचंद्रास वानरांचें सहाय्य झालें असें वर्णन आहे. वास्तविक वानरचिन्हांकित असा तो मनुष्यसंघ असावा असें पुष्कळ लोक मत देतात. ज्या शिवाने दक्षाचा पराभव करून तत्कालीन आर्यांस नमविलें त्या शिवाचें वर्णन कसें आहे? तर तो नरखंडमालाधर आहे. शिव काय ह्यावरून नरमांसभक्षक असावा असें मानावें? नाही. तर नरमांस भक्षक असे राक्षस त्याचे अनुयायीं झाले असावेत व त्यांनी आपल्या देवतेला आपलें भक्ष अर्पण केलें असावें. तद्वतच, सर्पभूषणधारी असेंहि त्याचें वर्णन आहे. अर्थात् सर्पांना जिंकणारे वा खेळविणारांनी आपल्या देवतेला अर्पण केलेली हीं आवडती भूषणें होत. व्याघ्रासन बसावयास व गजचर्म अंगावर घ्यावयास समर्थ, असेंहि शंकराचें वर्णन आहे. ह्याव-

वन व्याघ्र मारणारे व हत्तींना आपलेसे करणारे लोक शिवोपासक बनलें असावेत. ह्या वर्णनावरून शिवाच्या अनुचरांत असे निरनिराळे पशु पूज्य मानणारे असे अनेक मनुष्यसंघ होते. ह्मणूनच शिवाचें हें अद्‌भुत वर्णन प्रचलित झालें. दक्षकाळीं खुद्द शिवच जर असा असता तर आर्यानार्यसमेट निघू शकला नसता. शिव हें दैवत ज्या काळांत रूढ झालें त्या काळांत शिवभक्तांतील अनेक मनुष्यसंघांत निरनिराळ्या पशूंना दैवत मानण्याची प्रथा असावीच.

एखाद्या प्राण्याला पूर्वज समजून त्याची पूजा करणें, आपल्या ध्वजावर त्याची प्रतिमा उभारणें, त्या प्राण्याची हत्या न करणें, वगैरे समजुतींच्या जाती हिंदुस्थानांत बंगालमध्ये आजहि आहेत. मुंडारी व आरोआन अशा त्या जाती होत. ही मनुष्याची 'टॉटेमिक' स्थिति होय. ह्यावरून मनुष्याच्या धर्मकल्पनेचें बीज कोठून कसें उत्क्रांत पावलें ह्याचा बोध होतो. शिवकालीं आर्यानार्यांत कलह तर होताच; पण समेटहि होत असे. पण दक्षाने अखेर-पर्यंत शिवाला हविर्भाग न देण्याचा निश्चय केला होता. परंतु शिवाला जें साधलें नाही तें शिवपुत्र गणलेला गणपती ह्यास साधलें असें दिसतें. वेद, स्मृति, पुराणादि ग्रंथांतून गणपतीचें पुढीलप्रमाणें वर्णन सापडतें.

" शंकरपार्वतीचे हे चीरंजीव असून, षडानन कार्तिकेय हा ह्या गणपतीचा बंधू होय. ह्याला हत्तीचें मस्तक असून ह्याचा एक दांत तुट-लेला आहे. तो विघ्नहर्ता असून मंगलकार्य त्याच्या स्मरणाने निर्विघ्नपणें तडीस जातें. मस्तकीं चंद्र धारण केलेला असून, चौदा विद्या व चौसष्ट कला याच्या पत्नींसारख्या आहेत. मूषक हें वाहन. मोदक हें खाद्य; दूर्वा व शमीचा भोक्ता आणि तात्काळ प्रसन्न होणारा असा देव " ह्मणून वर्णन.

अर्थात् बुद्धि देणारी व विघ्न हरण कर-णारी अशी ही देवता होय असें गुणदृष्टीनें ह्मणावें लागतें. ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडळांतील तेवीसाव्या सूत्रांत ' गणानां त्वा गणपति ' असें जे वर्णन आहे तें बृहस्पतीला उद्देशून आहे. गणपति व ब्रह्मणस्पति अशीं विशेषणें त्या सूक्तांत बृहस्पतीलाच आहेत. बृहस्पति हा देवांचा पुरोहित, त्यांचा गुरु, व मुख्य मंत्री. देवावर जेव्हां संकट येत असे तेव्हां तें संकट बृहस्पतीच्या युक्तीनेच दूर होत असे. बृहस्पतीच्या ह्या गुणाचीच कल्पना गणपती ह्या देवतेनें अधिष्ठित केली गेली असें दिसतें. शुक्लयजुर्वेदांत गणपतीलाच तूं निधिपति आहेस असें मानलें आहे. कविपति व प्रियपति अशीहि त्यास संज्ञा आहे. ह्यामुळें यजुर्वेद-काळीं गणपति ही देवता बृहस्पतिपासून वेगळी आहे ही कल्पना रूढ झाली असावी. पण ' गणानांत्वा गणपति ' ह्यांतील गण शब्दाचा अर्थ ' समुदाय ' व ' जन संघ ' असाच सध्या तरी रूढ आहे. परंतु गणशब्द हा वाणीवाचक होय. शब्दाच्या वर्गीकरणास गण ह्मणत असत. ' गणात् गणः ' ह्या निरुक्ता-वरून गणरचना करणाऱ्या ऋतीला बुद्धिमान व विद्वान् समजण्याकरितां गणशब्द वेदकालीं योजीत असत ह्मणूनच तो प्रथम बृहस्पतीला उद्देशून योजिला असे तज्ञ ह्मणतात. ह्या-शिवाय संगतीहि लागत नाही.

शिवकाळीं आर्य हे यज्ञयागादि कर्मानें देवाला प्रसन्न करीत, तर अनार्य हे व्रतादिकांनी देव प्रसन्न करीत. शिवाच्या पराक्रमानें आर्यांना अनार्यांची व्रतकल्पना मानूं लागली होती. हा जो शिवभक्ताचा पहिला आर्यवंश तो व्रतप्रधान बनूं लागला. तरी देव अग्नि-मुख आहे ही आर्यकल्पना त्यांच्याच्याने सुटत नव्हती. ह्मणून व्रत व यज्ञ ह्यांचें एकीं-करण रूढ होऊं लागलें. रामरावण हा असाच

मिश्र काळ होय. यज्ञ करणारे व व्रत करणारे रामरावण दोघेहि. पण रावण अधिक तामस वृत्तीचा व राम अधिक सात्विक वृत्तीचा असा उभयतांत वृत्तिभेद दृग्गोचर होऊं लागला. ह्मणून राम हा आर्य असला तरी शिव-संस्कृतीच्या उदयाची छाया त्याच्यावर इतकी पडली होती कीं, आर्यानार्यमिश्रसंस्कृतीचा अर्थात् समेट वृत्तीचा सात्विक पुतळा ह्मणून रामाची छाप जनतेवर अधिक पडली. गणपतीच्या काळीं हा समेटकाळ रूढ होता. व्रताचा अंगिकार केलेला, पण यज्ञाचा लोभ न सुटलेला अशा संस्कारभ्रष्ट वर्गास जुन्या काळीं 'व्रात' असें ह्मणत असावे असें वाटतें. पुढे व्रात्य हा शब्द विशिष्ठ तऱ्हेनें उपजीविका करणारांना लागू झाला. पण पूर्वी संस्कारहीन आर्यांना तो लावत. गणपत्यथर्वशीर्षाच्या अंतिम मंत्रांत 'व्रातपति' असें गणपतीला ह्मटलें आहे.

'नमो व्रातपतये, नमो गणपतये, नमः प्रमथपतये, नमोस्तु लंबोदरायैकदन्ताय, विघ्नविनाशने, शिवसुताय वरद मूर्तये नमः' ह्या मंत्रावरून गणपति हा व्रात्यांचा पति होता. व्रात ह्मणून जसा एक मनुष्यसंघ होता त्याचप्रमाणें गुरु, गण व विरूप अशीहि मनुष्यसंघाचीं नावें असावीत. ह्या सगळ्या मनुष्यजाति अनार्यांपैकीं होत्या. शिवानुयायांत ह्या सर्वांचा समावेश झाला व ह्या सर्व गणांचा पति ह्मणून गणपति हें शिवपुत्रास नांव रूढ झालें. ह्या सर्व जातींचीं चिन्हें गणपतींत मानली गेलीं ह्मणून ही संघदेवता होय. ह्या सर्वांना चौदा विद्या व चौसष्ट कला देऊन त्यांना उन्नत केलें, त्यांची मंगल कार्यें पार पडूं लागलीं. आज पूर्वपरंपरेला अनुसरुन ज्या ज्या जातींतील सामाजिक व धार्मिक कार्यांत गणपतिपूजन रूढ आहे त्यापैकीं कोणाला आर्य व कोणास अनार्य ह्मणणार? अशा प्रकारें शिवोपासकांत ऐक्य करणारा आर्य व त्यांचा उत्कर्ष करणारा गणपति हा शिवपुत्र निघाला. परंतु आद्य शंकराचार्यांना पूर्वकाळ रूढ करण्याची जेंव्हां अवश्यकता वाटली तेव्हां शिव, विष्णु सूर्य, गणपति व अंबा अशी पंचायतनपूजा रूढ करावी लागली. ह्यांत सूर्य विष्णु ह्या आर्यप्रधान देवता असल्या तरी शिव, गणपति, व अंबा ह्या शिवानुयायी प्रवर्तक देवता होत. ह्या पंचायतनपूजकांत सर्व हिंदु वा आर्यसंस्कृति परिणत झालेली दिसेल. ह्मणून आजच्या शिवोपासकांत कोणत्याहि प्रकारें जुन्या द्रविडियन संस्कृतीचें विशिष्ठ स्वरूप प्रत्ययास येत नाही.

पंचायतनपूजेंतून विशिष्ठ देवतेची पूजा जेंव्हा रूढ झाली तेव्हा शिवाच्या ठिकाणीं पंचमुखाची कल्पना करण्यात आली. येथें शिवाची स्थावर व पार्थिव पूजा मागें टाकणारा वर्ग पुढे येऊं लागला. शिवशक्ति व गण ह्यांचें एकीकरण साधणें हा ह्या नव्या-शिवोपासकांचा हेतु. शिवाचें स्वरूप ॐ स्वरूपाचें असून तें शक्तीनें विशिष्ठ आहे ह्मणून सृष्टि उत्पन्न होते; गण उत्पन्न होतात, चालतात, व तींत विलीन होतात. ह्मणून शिवशक्तिविशिष्ठ असें जें गुरुस्वरूप तें खरें महेशस्वरूप होय व गण हें भक्तस्वरूप होय. अशा प्रकारें शिवगणयोग साधण्याची कल्पना रूढ झाली. वीरशैवसंस्कृतीचें बीज ह्यांत आहे. आणि हें बीज शिवसंस्कृतीपासुन वाढत वाढत वीरशैवसंस्कृति परिणत झाली. ह्मणूनच नाना तऱ्हेच्या शिवभक्तांत वीरशैव हा सर्वश्रेष्ठ होय असें मानण्यांत येऊं लागले. ध्यानयोगावर शिवज्ञान आचरणांत आणणें हा गुरु होय. आणि अवांतर भक्त होत. वीरशैवभक्तवर्गांत जें वैशिष्ठ्य आहे तें हें कीं, मद्य नाही, मांस नाही, अघोर क्रिया नाही, अर्थात् अत्यंत उन्नत अशा मानवांचा संघच वीरशैवधर्माचा प्रवर्तक वा अनुयायी बनला. भक्तवर्गांत निरनिराळीं गोत्रें आहेत.

गुरुवर्गांतहि वर्ग पडलें आहेत. पण त्यापैकी एकातहि मनुष्यजातीच्या मूळ संघाचें प्रतीक प्रत्ययास येत नाही. वीरभद्र, नंदी, षडानन, नाग ह्यांचीं प्रतीकें दिसतील. पण तीं प्राचीन शिवानुयायांचीच होत. ह्मणून वीर-शैवसंस्कृतींत गुरुरूपानें आर्यांचा मूळ बृह-स्पति आहे. लिंग व जंगममुखाच्या ठिकाणी अग्नीची कल्पना केलेली असल्यामुळे आर्यांच्या मूळ याज्ञिक कल्पनेंचें बीजहि आहे. आर्या-नार्यसंस्कृतीचा मिलाफ जो ह्मणतात तो हाच. अशा स्थितींत वीरशैवसंस्कृतीचें बीज द्राविडसंस्कृतींत आहे असें जे वीरशैव विद्वान् ह्मणतात त्यांना आधार काय हें सुज्ञांना कळेल तर शपथ. नाक आणि रंग ह्यावरून जुने आर्य लोक व द्राविडियन लोक ओळखण्याची एक रीत आहे. त्याप्रमाणें दक्षिणेचा विचार करतात. पुष्कळ द्राविडि-यन वीरशैवसंस्कृतींत विलीन झालेले दिस-तील. पण वीरशैवसंस्कृतीवर द्राविडियन संस्कृतीचा परिणाम नसून शिवसंस्कृतीचा अर्थात् आर्यानार्य-समेटसंस्कृतीचाच परिणाम झालेला आहे हेंच प्रत्ययास येईल.

---

# पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर.

( लेखकः— कु० अनसूयात्मज. )

" समाजाच्या चौकटीच्या संग्रहीं असलेले सर्व घटक सलोख्याने वागणें हें आकाश – पाताळ एक होण्याइतकेंच कठीण आहे. "

आधुनिक वीरशैव वीरांनी आपल्या वैभवसंपन्न विवेकाच्या जोरावर वीर-शैवसमाजाची विभागणी चार पक्षांत केली आहे. " समाज " ह्या त्र्याक्षरी नांवाच्या सापळ्यात असंख्य सावजांचा साठा आढळून येतो. ज्या चार पक्षांत समाजाची विभागणी झाली आहे ते पक्ष एका केंद्राचे ठिकाणी केंद्रीभूत होणें ह्मणजे पूर्वेकडून उदयाचलीं येणारा मित्र पश्चिमेकडून उदयास येण्यासारखेंच आहे. ह्या चार पक्षांची गत पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर ह्या दिशांकडे तोंडें करून निघालेल्या चार व्यक्तीप्रमाणेंच आहे. एकाच ठिकाणी जर चार व्यक्ति उभ्या असल्या आणि त्यांचीं तोंडें पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर अशा चार दिशांना असलीं व ते सरळ आपल्या दिशानुक्रमानें मार्ग शोधीत असले तर ते चार दिशांनाच जातील. एका ठिकाणी कधीच मिळ-णार नाहीत. त्याचप्रमाणे समाज ह्या एकाच ठिकाणी चार पक्ष उभे आहेत व त्यांचीं तोंडें उपरिनिर्दिष्ट दिशांकडे आहेत; तेव्हां ते तरी एका विवक्षीत ठिकाणी कसे एक होतील? समाजाच्या भूमंडळांत ज्या चार पक्षांचा स्वच्छंदी विहार अवलोकिला जातो ते चार पक्ष

( १ ) सनातनी ) २ ) सुधारणावादी ( ३ ) नवमतवादी व ( ४ ) मनमानी, ह्या विशिष्ठ नांवानी ओळखल्या जातात. ह्या चार पक्षांनी आपल्या बलानें समाजांत कोणता इष्टानिष्ट दर्जा पटकाविला आहे त्याची रूपरेखा ह्मणजेच खाली वर्णिलेला थोडका मजकूर होय.

( १ )सनातनी.:— ज्या एका आदिशक्ति-पासून ब्रह्म, माया, सत्य इत्यादिकांचा गुण-संचय निर्माण झाला आहे ती आदिशक्ति "सनातन" ह्या नांवानें उल्लेखिल्या जाते. त्या शक्तीपासून निर्माण झालेलीं जीं तत्वें तीं "सनातन तत्वें" व त्या तत्वाबरहुकुम आचरण ठेवणारे "सनातनी" होत. "सनातनीं पुरुष हे अविनाशी आहेत ह्मणून त्यांनी प्रतिपादिलेलीं तत्वें हींसुद्धां अमर आहेत" असें सनातन्यांच्या हृत्पटलावर अगदी ठसठशीत कोरल्या गेलें आहे. सनातन पुरुषाच्या तत्वा-नुरोधाने आपण आपली जीवितयात्रा आक्र-मिली तर तो जन्मदाता आपल्यावर खुष होऊन आपणास अमरपदारूढ करील ह्या आशेचा धवल कर सनातन्यांच्या मनाच्या कुमुदिनीला फुलवीत असतो. आजचे सनातनी ह्मणतात कीं, "सनातन पुरुषाच्या उत्पत्ती-पासून तों आजपावेतों सनातन तत्वें कायम आहेत. त्या तत्वामध्ये अशी कोणती शक्ति वास करिते कीं तीमुळे हीं सनातनी तत्वें ग्रहण करण्याचा मोह पडावा? सूर्य हा एक गोल चेंडू पृथ्वीपासून किती तरी असंख्य योजनें अंतरावर आहे. पण तो एकदा तळपूं लागला ह्मणजे तुह्मी ह्या कुंभिणीवर कितीहि पॉवरचे इलेक्ट्रिक लाईटस, बेबी पेट्रोमॅक्सेस, अथवा नंदादीप लावले तरी ते रविप्रकाशाला मारक होऊं शकत नाहीत. तसेच, निर-निराळ्या प्रकारच्या शिक्षणाची प्राप्ती करून घेऊन जरी विद्वानांनी आपल्या ज्ञानाच्या खाणींतून कितीहि तत्वरत्नें बाहेर काढलीं तरी तीं ह्या सनातनी तत्वासमोर फिकटच पडतील. आपले पूर्वज सनातन तत्वांची कास धरूनच तरून गेले. तेव्हा आपणच त्या तत्वांना कां पारखे व्हावें? आपले पिढ्यान्‌पिढ्यांचे पूर्वज काय मूर्ख होते? सनातन तत्वाच्या पार्श्वभूमीवर सनातनी पक्षाची स्थापना "जुनें तें सोनें" हेंच त्यांच्या नौकेला मार्गदर्शक असणारें दीप-गृह. समाज ह्या एकाच ठिकाणाहून पूर्वेकडे जाण्यास निघालेला पक्ष ह्मणजे सनातन्यांचा होय.

( २ )सुधारणावादी.:—नवीन आणि जुन्या मतांना डाळ व तांदुळ ह्याप्रमाणे मानून त्यांची खिचडी करणारे साहित्यिक ह्मणजेच सुधारणावादी होत. सुधारणावादी ह्मणतात कीं, जुन्यातहि कांही तत्वें सात्विक आहेत व नव्यातहि बरेंच ग्रहण करण्यासारखें आहे. तेव्हा अट्टाहासानें जुनें किंवा नवे ह्या तटास न लागतां त्यांची योग्य सांगड घालणेंच अधिक उपयुक्त होय. एखाद्या गजगतीने चालणाऱ्या मठ्ठ मगजाच्या रेड्यावर बसून प्रवास करणें अथवा एखाद्या पवनगतीनें गमन करणाऱ्या अश्वावर आऊढ होऊन प्रवास करणें हें काम अकलेचें काम होय. त्यापेक्षा एखाद्या मध्यम गतीनें चालणाऱ्या तट्टावर बसून त्याला आपले प्रभावी विवेककोरडे ओढून पुढे दामटणेंच अधिक योग्य नि हितावह. ह्या सुधारणावाद्यांच्या तत्वांत बऱ्हंशीं नूतन मतें व अधून—मधून जुन्या तत्वांची झलक असते. या सुधारणावाद्यांना अर्धवट नवमत-वादी वा नवमतवाद्यांचे नाटकी नमुनें ह्मणणें विशेष गैर होईलसें वाटत नाही.

( ३ ) नवमतवादी:—मराठी राज्याला आप-त्तीच्या घनदाट दरींतून सहीसलामतीने पार पाडणाऱ्या राजाराम, संताजी, धनाजी वगैरे बुद्धिवान्‌ शूर वीरांचा मोगलांचे घोडे पाणी

पीत असतांसुद्धा भीत होते. त्याचप्रमाणे आज नवमतवादी पक्षाचें नांव कानावर पडतांच सनातन्यांचे अंग ह्मणजे बाभुळीचें काटेरी झाडच बनतें. इतका तर नवमतवाद्यांचा दरारा अन् वचक. मातृभूबद्दल, समाजाबद्दल, देशांतील दारिद्र्याबद्दल प्रेम, कळकळ आणि आस्था असणाऱ्यांचे मनांत एकच एक रम्य व स्तुत्य अशी महत्वाकांक्षा वावत असते. आणि ती ह्मणजे आपल्या कार्याच्या विरुद्ध असलेल्या गोष्टी निर्भीस्तपणें दूर झुगारून देणे. समाजाची आगगाडी नवमतांच्या रूळावरून हाकूं इच्छिणारे नवमतवादी सुद्धां " जुनें तें सोनें " ह्या तत्वास नेस्तनाबूद करून त्या ठिकाणी " नवें तें घ्यावें " ह्या तत्वाची स्थापना करण्याचे पाठीस कसोशीनें लागले आहेत; त्यामुळे " पळत्याचे पाठी ब्रह्मराक्षस " ह्या ह्मणीचें नमुनेदार प्रत्यंतर आज वीरशैवसमाजांत ' सनातनी व नवमतवादी ' ह्या द्वयांत दृष्टोत्पत्तीस येतें. 'काय आप्पा, तुह्मी नवमतवाद ह्मणजे समजता तरी काय? अहो, हा निव्वळ आजकालच्या तरुणांचा तमाशा आहे तमाशा. जुनी नैतिक धार्मिक बंधनें पाळण्याची ताकद नाहीं ह्मणून जो तो उठला सुटला कीं बनला नवमतवादी. " नवमतवादी " ह्मणून एकदा शिक्का मारून घेतला ह्मणजें हॉटेलात, खानावळींत, परजातवाल्याकडें खाण्याचे आणि नीतिदेवीला धाब्यावर बसवून गांवातील गल्ल्या धुंडाळण्याचे सर्टिफिकेट त्यांना आपोआपच मिळतें. मग काय ? चैन करतात बेटे! ह्यांच्यासारखे उथळ माथ्याचे अविचारी हुलचिवडे टीकात्मक बुद्धीचे अग्रगण्यस्थान असलेलें उतावळे लोक दुसरीकडें औषधाला ह्मणून सांपडायचे नाहीत. हे काय समाजाला सुधारणार आहेत? अहो नांव कशाला घेता ? हे तर समाजाच्या मुळावर आले आहेत मुळावर ! मुलाचे पाय पाळण्यातच दिसतात. ह्यांची लबाडी तर पहा. नवमतांची उज्वल पताका सर्वत्र फडफडूं लागावी ह्मणून हे नवमतवादी लिखाण लिहितांना मोठेपणाचा मजेदार मखमली मुलामा मढवून लिहितात. वाहवा ! केवढी ह्या नवमतवाद्यांची योग्यता! पावसाळी शिंदोडासारखा ऊत आला लेकांना. अशा प्रकारचीं अगणित मुक्ताफळें सनातन्यांचें मुखांतून अप्रतिहत बाहेर पडतात. समाजाचे बाजारांत सनातनी मुक्ताफळांना कवडी किंमत दिल्या जाते. केवढें हें क्रौर्य ! केवढी ही अदयता !

( ४ ) मनमानी :-सनातनी, सुधारणावादी, व नवमतवादी, ह्या तिन्ही पक्षांच्या पोटामध्यें मनमानी पक्षाचे उमेदवार आहेतच. आमच्या मनानें एकदां कोणतीहि गोष्ट घेतली कीं ती आह्मी करूंच ! मनाच्या सूचनेप्रमाणेच आह्मी वागूं ! हा मनमान्यांचा ठोकळ धडा. कोणाच्या ओंजळीनें पाणी पिणें हें तर त्यांना स्वप्नांतसुद्धा माहीत नसतें. ह्या पक्षाचे जवळ जवळ शेकडा ७५ घटक समाजांत वावरतात. ह्यांच्यांत एकीचा एखादा अणू शोधून काढणें हेंसुद्धा महत्प्रयासाचें व बिकट काम होय. कारण प्रत्येक जण आपआपल्या मनाचा राजा. एकाच प्रकारची विचारसरणी प्रत्येकाच्या मनांतून उत्पन्न होणें ही तर अगदी अशक्य कोटींतील गोष्ट. ज्याचा त्याचा आपल्या मनावर दृढ विश्वास. सनातनी, सुधारणावादी, व नवमतवादी ह्यांना कांहीं तरी मर्यादित मर्यादा आहे; पण मनमानी पक्षाला अमर्यादित मर्यादेच्या कुंपणाशिवाय दुसरें कांहीच बंधन नाही. समाजामध्यें मनमान्यांची संख्या अधिक, त्याचे खालोखाल सनातनी, व तिसरा नंबर पटकाविणारे सुधारणावादी होत. मनमानी व नवमतवादी पक्ष हे एकाच शृंखलेनें घट्ट बांधल्या गेल्यामुळे नवमतवाद्यांची गणना मनमानी पक्षांतच केल्या जाते. नाही तर नवमतवादी पक्ष वीरशैवसमाजांत तिसरा नंबर

पटकाविणाऱ्या सुधारणावाद्यांस पदच्युत करण्यास असमर्थ आहे असें नाही. एखादा सनातनी जर आपला कर वीरश्रीनें हॉटेलांतील चहाचा कप घेण्यास पुढे करील, तर त्याला सनातन्याचें सोंग घेतलेला मनमानी बहुरूपी ह्मणण्यास काय हरकत ? सुधारणावाद्यांचा दुरंगी रंग तोंडास फासून तेल्यामाळयाचें घरीं त्यांना स्वतःचें ताटांत जेवणासाठी घेऊन आपल्या पक्षाच्या तत्वांचा खेरंग उडविणारे वीरशैवसुधारणावादी मनमानी कोंदणांत बसविण्यास काय हरकत ? नवमतवाद्यांना तर राजरोसपणें मनमान्यांच्या प्रभावळींतच गोवलेले ह्मणून संबोधिले जातें. आणि त्यांत बराच सत्यांश आहे. कारण जवळ जवळ सर्व नवमतवादी स्वतःस जे वाटेल तें करण्यांत कधीच माघार घेत नाहीत. संतमालिकेंत स्थानापन्न असलेलें श्री संत घोगले महाराज ह्यांनी मनाची महती खालील श्लोकांत गायिली आहे.

स्वामी फार असाध्य आहे मन हे
ऐकेना कोण्या गती ।
ब्रह्मादि थकले पदांसी मुकले,
तों पाड माझा किती ।
वायु मंद, तयाहुनि जलद हे
नोहेच एक्या स्थळीं ।
यालागीं तुजला अतां शरण मी
आलों गुरु माउली ॥

आयुष्यांतील सर्व घडामोडींचें उगमस्थान मन हेंच होय. मनाच्या पाळण्यांत बसून क्षराक्षर झोके घेणारा मनुष्य मनाला भलतीसलती झुळूक लागतांच कलंडून खाली पडण्यास फारसा वेळ लागत नाही. मनाला लगाम घालणाराच खरा मनमानी होय. अज्ञांनीं मनमानी पक्षाचा आश्रय करणे ह्मणजे स्वतःचा विनाशकाल जवळ ओढवून घेणेंच होय. कारण ज्ञानाच्या अभावाची चाहूल लागतांच मन हें कोण्या खड्यांत उतरवील याचा नेम नाही. मनमानी पक्षांत ज्ञानवंत सुज्ञच हवे. उत्तर दिशेला हवाखोरीसाठी निघालेल्या ह्या पक्षाला इतर पक्षांची अशीच टिकाऊ संगति लाभो.

"समाजाच्या संगीन तिजोरीतील घटक धवाला धक्का देण्याच्या बेतांत असलेल्या व आपआपली तुंबडी तुडुंब भरून घेण्याची हावरी इच्छा असलेल्या वर वर्णित चारपक्षांत चाहूल-दिवाळीच्या हिंदु सणानिमित्त लाविण्या जाणाऱ्या प्रचंड दीपावलीच्या देदीप्यमान् प्रकाशांत माहित होतांच ती यथामति समाजापुढें सादर करण्याचा हळुवार प्रयत्न ज्या माझ्या लेखणीने केला ती 'गुन्हेंगार' तर ठरणार नाही ना?"

---

# शिवयोगी म्हणती त्याला

[ के०—एन्. एम् राजगिरे, एरंडोल (पू. खा.).]

जनहितार्थ जन्मा येतो । शिवयोगी ह्मणती त्याला
कष्टवी आपुल्या देहा । ना ज्याचा निश्चय ढळतो
परदुःखें दुःखित होतो । परसौख्यें प्रमुदित होतो
जनकल्याणास्तव खपतो । उद्धार जगाचा करितो

समतेने सर्वां पाही
निजदेह गणी ना कांही
रात्रंदिन चिंता वाही

त्या पवित्र माहात्म्याला । शिवयोगी ह्मणती त्याला
निर्झरवित जनहृदयांत । प्रेमाचे निर्झरणीला
रुजवितो बीज ऐक्याचें । उजळतो ज्ञानदीपाला
सद्धर्मपथाला नेतो । देइ तो दिव्यदृष्टीला

सत्बोधसुधेचा प्याला
पाजोनी सन्मार्गाला
लावितो लोकसमुदाला

त्या विमुक्त शिवशरणाला । शिवयोगी ह्मणती त्याला
दिव्यत्व मिळे ज्या योगें । नाशिवंत जड देहाला
भव-पाश तुटे ज्या योगें । बंधनें भवाची ज्याला
परमात्मा भेटे ज्यानें । अविनाशी देहात्म्याला

पूज्य त्या महा-पुरुषाला
त्या उज्ज्वल पुण्यात्म्याला
पतितांच्या परमात्म्याला

त्या योग्यांचे ईशाला । शिवयोगी ह्मणती त्याला

लघुकथा १८ वी.

# दोन गुंड

( लेखकः— कु० सिताराम ह्यानराव, अहमदनगर. )

सप्टेंबर महिन्यांतील तो एक अखेरचा रविवार होता. सायंकाळचे सहा साडेसहा वाजले होते. सुधा नेहमी- प्रमाणें फिरावयास जाण्याच्या तयारीस आपल्या ड्रेसिंगरूममध्ये गुंतून गेली होती. तिनें त्यावेळीं काळें जरिकाठी पातळ परिधान केलें होतें. अंगातहि तसाच पण सिल्कचा डबल वेस्टचा ब्लाऊझ घातला होता. आणि तोंडाला स्नो लपेटून त्यावर गुलाबी पावडरहि फासली होती. टपोऱ्या मोत्याप्रमाणें सोन्याच्या मण्याचे तिनें "नेक- लेस" घातले होते. पाठीवरील आधुनिक पद्धतिच्या लावलचक वेणीला तिनें फाटा देऊन अंबाडा बांधून त्यावर दोन आण्यावाली शेवंतीची वेणी घातली होती. नंतर एका हातांत कंगवा घेऊन ती पुन्हा तीनतीनदां प्रत्येक डोळ्यांनी समोरील आरशांत पाहून आपल्या काळ्याभोर केसांना व्यवस्थित ठेवीत होती. कंगवा टेबलावर ठेवून हॅंडकरचिप् आपल्या गुळगुळीत गुलाबी पावडर लावि- लेल्या गुलाबी गालावर फिरवितांच रूमचे दार कोणीतरी ठोठावले असा तिला भास झाला. कोण आहे ? ह्मणून तिने प्रश्न केला.........प्रश्नाचें उत्तर न येतां पुन्हा दार ठोठावल्याचा आवाज मात्र कानी पडला. तिनें रागावून किंचित् मानेला नाजू- कसा हिसका देऊन Who is there? what do you want ? ह्मणून दार उघडलें तों ( मैत्रिण सरला )

काय ग रागावलीस फार आज ? कोणी आलं बिलं वाटत बघायला ? कां चाललं होतं वाचन कुठल्याशा कादंबरीचं......... हंसत हंसत थट्टेनें पण आश्चर्यमुद्रा करीत सरला नेहमीप्रमाणें ह्मणाली.

——इश्श, तुह्माला बाई कांही उद्योगच नाही वाटतें ? कोणी आलं कां ? कोणी गेलं काय ? .......सुधा विषयांतर करण्याच्या विचारांनी ह्मणाली "बरं आज कुठं जाव- याचं फिरावयाला, पार्कमध्ये ना ? ......... सरलेची संमति न घेता सुधा प्रश्नार्थक मुद्रेने ह्मणाली ...........

......दोघीहि पार्कमध्ये जातात,......

त्यावेळीं नुकताच एक लहानसा पाऊस पडून गेला होता. आकाश निळसर होतें, पण पूर्वेकडेच मात्र एक दोन काळेकुट्ट चुक्कर ढग डोकावत होते. आजूबाजूला हिरव्यागार

लहान लहान गवतावर पडून गेलेल्या लहानश्या पावसाचे तुषार पडले होते. रविनाथ आपली सबंध दिवसाची कामगिरी बजावून आपल्या घराकडे जाण्याच्या विचारांत होता. चोहोकडे हिरवेगार दिसत होतें. जणू काय सृष्टिदेवतेने स्वर्गातील राजाधिराज इंद्र महाराज ह्यांच्यापुढें कधी काळीं दरबारी नृत्यगायन केलें होतें त्या सृष्टिदेवतेच्या नृत्यगायनास खुष होवून कीं काय महाराजांनीं आपल्या अंगावरील हिरवी शाल सृष्टिदेवतेच्या अंगावर फेंकली तींच ती हिरवी शाल सृष्टिदेवता आनंदाने पण अभिमानानें त्या दोघींना दाखवीत होती, असा भास होई. सृष्टिदेवतेबद्दल वाऱ्यालासुद्धा आनंद होऊन तोहि त्या दोघींच्या अंगाला झोंबू लागला. वरच्या इलेक्ट्रिक तारांनासुद्धा आनंद होऊन कीं काय त्याहि उड्या मारीत होत्या. असल्या ह्या सृष्टिदेवतेने अभिमानानं हिणवल्याने त्या दोघींना राग येऊन कीं काय कोण जाणे त्यानीं पार्कमधील एका गुलाबाच्या कुंडींतील दोन पांढरे गुलाब तोडले व त्यांचा सुवास घेत दोघींनीं एका दालनांत प्रवेश करून तेथे बैठक मारली.

जागतिक नियमानुसार जेथें मध तेथें मधमाश्या असणारच ! ........................ ... जेथें गुलाब तेथे कांटे असणारच ? ....... ... जेथे पाण्याचें डबके तेथे बेडूक असणारच ? ........आणि जेथे कुमारिका तेथे कोत्या समजूती असलेले अशिक्षित तरुण असणारच? आधार? प्रत्यक्ष वरीलप्रमाणं. कारण शेजारच्याच दालनांत साधारणतः पंचविशीच्या आजूबाजूचे, डोक्यावर साहारा-कलहारीचें वाळवंट धारण केलेले व ओठावर हिमालयाच्या एका दरीचें दाट जंगल स्वीकारलेले, कपडे हलवाई अगर किराणा मर्चंट आहे असें दाखवीत, घोक्याची आतुरतेने वाट पहात असलेले दोन तरुण अशुद्ध भावनेनें त्यांच्या ते कोत्या समजूतीला पाठिंबा देत कार्य अंमलांत आणण्याच्या विचारांत गढून गेले होते. त्यांची कोती खोटी समजूत ह्मणजे हीं कीं हे कोणी तरी publick असले पाहिजेत.

सुधा-सरला, पंधरा मिनिटें विश्रांति घेऊन पार्कमधील शेवटची चक्कर मारण्यास उठल्या. हें पाहून अशिक्षित गुंडहि उठले. त्यांची व आपली समोरासमोर भेट होईल ह्या विचारानें त्यांनी एका लहानश्या पार्कमधील रस्त्याला वळसा दिला. दोघेहि दोघींच्या समोरासमोर आले. त्यांतील एकानें सुधेला धक्का दिला. धक्का लागतांच सुधा जमिनीवर आदळली. हें पहातांच सरलेनें आपल्या उजव्या पायांतील अमृतमंथन फॅशनची एक रुपयावाली चप्पल धक्का मारणाऱ्या गुंडाच्या काळ्या गालावर बसविली ... ——काय झालं ? पाय घसरला वाटतं ? उठा. कुठं लागलं का विशेष ?...... ह्मणून शब्द सुधेच्या कानावर आले व सरलेचा भाऊ सुधाकर सुधेच्या हाताला धरून उठवीत आहे अशी आकृती सरलेच्या नजरेला मिळाली .........

त्या दोन गुंडांनी केव्हाच तावडतोब पलायन केलें होतें........सुधाकरांनी झालेली भानगड विचारली. सुधाकरांच्या हाताचा सुधेला स्पर्श झाल्यावर लटलटत असलेले सुधेचें शरीर स्तब्ध राहिलें. दुःखित झालेला चेहरा पार पळाला. Thank you मि. सुधाकर ह्मणून सुधा फक्त कसेबसे उत्तरली. ...... पहिली प्रेमनजर एकमेकांच्या डोळ्याला भिडली ........ पहिला ओझरता अचानक स्पर्श एकमेकाना घडला ...............प्रेम ही पवित्र भावना एकमेकांच्या हृदयांत उत्पन्न झाली ...............तूं कसा आलास ह्मणून सरलेनं ह्या दोघांच्या विचाराची सांखळी तोडून सुधाकराला विचारलें ...... —— आम्हीं अगोदरच ओळखलं ह्यां त्या दोन मनुष्यांना. तेव्हा मी व मधुकर ( मित्र ) तुमच्या मागेच होतो,.......

...... सुधाकरानें सहज सांगितलें,......

रात्र साडेसाताची होत आलेली होती. आकाशांत निशानाथ नुकताच आपल्या कामगिरीवर जाण्याच्या विचारांत होतो...... ......रस्त्यावरील सार्वजनिक इलेक्ट्रिकचे दिवे लागले होते. रस्त्यावरील मनुष्यांची जाण्यायेण्याची धांदल व आवाज ऐकूं येत होता. मध्येच सिनेमाची गाडी बॅंडसह मिरवत होती. वरील गोष्टीला आज तीन वर्षें झाली असतील. सुधाकर पुण्याला कुठं काय कीं ऑफीसांत ऐंशी रुपयावर नोकरीस होता. सरलेचें पत्र सुधाकराला दिपवाळी सण सरलेच्या भूषणपूर गांवीं करावा असें आलें होतें. सुधाकराला पंधरा दिवसांची सुट्टी दिपवाळीकरितां मिळाली होती. पत्राप्रमाणें सुधाकर बेब्या व सुधा हे दिपवळी साजरी करण्याकरितां गेले होते. ....... तो दिवस भाऊबीजेचा होता. दुपारची चार साडेचारची वेळ होती, दुपारचा चहा नुकताच झाला होता. सुधा बेब्याला थापटीत होती. सरला निरंजनी तयार करण्याकरितां गुंतली होती. अण्णासाहेब [ सरलेचे पति ] टाईम्स ऑफ इंडिया वाचीत होते. सुधाकर किर्लोस्कर मासिकांतील पानावरील मजकूर वाचीत होता. .......... हं बसा सुधोबा गालीच्यावर ह्मणून ओवाळण्याकरतां ताट हातांत आणीत सरला ह्मणाली. सुधाकर गालीच्यावर बसला. सरलेनें सुधाकराला ओवाळले. सर्व मंडळी पान खाण्याच्या तयारीत होती. मध्येच सुधेने आज तीन वर्षापूर्वी पार्कमध्ये पडलेली दोन गुंडांची आठवण करून दिली ...... नंतर सर्व मनसोक्त हंसले. हो त्यावरच तुमचा दोघांचा विवाह झाला, हो ज्याप्रमाणें शकुंतलेचा व दुष्यंत राजाचा विवाह घडून आणण्याला जसा भुंगा कारणीभूत झाला तसा तुझा व सुधा वहिनीचा विवाह घडून येण्याला ते मेले गुंड आले होते. वा, उत्तम, ह्मणून सर्व हंशा पिकला. त्यावेळीं चौघांचीं तोंडें पान खाल्ल्याने रंगून गेलीं होतीं .......... सर्व हंसतात हें पाहून कीं काय बेब्याने रडण्याच्या सुरांत आऽऽऽई म्हणून बोबडी हाक मारली व सुधा बेब्याकडे गेली.

---

## निजामराज्यांत

# निजाम-वीरशैवमहाविद्यापीठ

## व

## एक प्रचंड निधि स्थापन करण्याची जी जोरदार तयारी चालली आहे तिचा संक्षिप्त वृत्तान्त

( लेखकः— श्री. विश्वनाथप्पा हत्ते, सिंधखेड. )

निजाम प्रांतांत वीरशैवांची संख्या मोठ्या प्रमाणांत असून या समाजांत अनेक श्रीमंत असल्या कारणाने याची सांपत्तिक स्थितिहि बरीच आहे. पण शैक्षणिक बाबतींत मात्र हा समाज इतका मागसलेला आहे कीं, या २० व्या शतकाच्या विचारक्रांतीच्या वातावरणांत इतर लहानसान समाजांत—देखील वरचेवर प्रगति होत चालली तरी या आमच्या लिंगायतसमाजांत मात्र तशी नाहीं. याचें मुख्य कारण म्हणजे शिक्षणाची गैरसोय होय. आता कांही कांहीं ठिकाणी शिक्षणाची व्यवस्था झाली असली तरी त्यापासून आमच्या सर्व गरजा पुरविण्यांत येत नसल्या कारणाने विशेष फायदा होत नाहीं. ह्मणून या कालमानास अनुसरून स्वतंत्र रीतीने शिक्षण देण्याचीं एकादी नवीन आदर्श संस्था व गरीब होतकरु विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति वगैरे देऊन योग्य मदत करण्याची व्यवस्था या निजामहद्दींत असणें अत्यंत जरूरीचें असल्या कारणाने ही उणीव आपल्या हाताने शक्य झाल्यास भरून काढावी ह्मणून श्री अमरेश्वराचार्य महाराज वेदांताचार्य शाहजहान अबरादकर यांचे मनांत पुष्कळ दिवसांनीं आकांक्षा होती. परंतु सामाजिक कार्याची आवड नसलेल्या या भागांत आमच्या समाजांत असलें महत्कार्य लवकर घडून येणें ह्मणजें कितीतरी अशक्य आहे, हें या प्रांतांत राहून ज्यांना येथील परिस्थितीचा चांगला अनुभव झाला आहे त्याना सहज कळण्यासारखें आहे. आणि प्रत्येकाचें ध्येय किंवा मनोरथ सहज व सहसा केव्हाहि साध्य होत नसतात. त्या कारणानें श्री अमरेश्वराचार्य यांना आपल्या ध्येयसिद्धीसाठीं येथील परिस्थिति अनुकूल करुन घेण्यास कित्येक दिवस गेले तरी हरकत नाहीं. परंतु उशीरानें का होईना, त्यांच्या महत्वाकांक्षाप्रमाणें एकदा कार्यास सुरुवात झाली व त्यांच्या अविश्रांत परिश्रमाने त्यानीं आरंभ केलेल्या कार्यास मूर्त स्वरुपहि येण्याचें शुभ चिन्ह पाहून कोणा भारतीय वीरशैवास अत्यानंद वाटणार नाही ? ह्या वीरशैवाच्या अगदी जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. असला विधायक व संघटित शिस्तीचा

उपक्रम वीरशैवांच्या इतिहासामध्येच अत्यंत महत्वाचा ह्मणून गणला जाईल.

श्री अमरेश्वराचार्य हे काशी–कलकत्तामध्यें १२ वर्षेपर्यंत राहून न्याय, तर्क, वेदांत इत्यादि शास्त्रांचे संपूर्ण अभ्यास केलेले आहेत. त्यांची प्रचुर विद्वत्ता, गंभीर स्वभाव, निराश वृत्ति, समाजाची खरी कळकळ, उच्च ध्येय वगैरे पाहून कोणासहि त्यांच्याविषयी पूज्य बुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. ह्मणूनच त्यांनीं आरंभ केलेल्या या महत्कार्यांत श्रीमंत दानशूर, अत्यंत धाडसी, वीरशैव धर्माभिमानी व महाप्रभावशाली शरणप्पा फत्तेपूर, श्रीमंत मडिवाळप्पा खेणी रजेरी देशमुख साहेब चिडगोप्पा, विश्वनाथप्पा, विश्वनाथप्पा हत्ते सिंधखेड वगैरे लिंगायतसमाजाचे प्रसिद्ध मुत्सद्दी पुरुषांनी सर्व बाजूनें भाग घेऊन त्या कार्यासाठीं आपली सर्व शक्ति, सर्व सहाय्य, खर्च करण्यास आपल्यावर संपूर्ण जबाबदारी घेतली आहे, ह्मणूनच हें कार्य लवकर चांगले स्वरुपास येऊन यशस्वी होण्यास कांहीच शंका नाहीं.

सदरहू कार्यास आरंभ होऊन ९ महिन्यांचेवर झाले. प्रथम श्रींनीं आमच्या व शरणप्पा फत्तेपूर यांच्यासमक्ष सदर कार्याबद्दल वाटाघाट करून नंतर ता. २७ – १२ – ३६ रोजी हुबळगुंडी मुक्कामी फत्तेपूर यांचे भव्य भवनांत निजाम प्रांतीय सर्वप्रख्यात पुढारी लोकांची बैठक करुन त्यांच्याशीं विचारविनिमय करुन निजाम राज्यांत 'निजाम वीरशैव महाविद्यापीठ' व एक भारी निधि स्थापन करण्याचें ठरवून नंतर लगेच ठरल्याप्रमाणें श्रींनीं आपल्या बरोबर आह्मास व फत्तेपूर कलबेंट्टी अप्पा वगैरे मंडळीस घेऊन निधिसंग्रह करण्याकरितां एक दोन ठिकाणीं दौराकरुन सुमारे २१००० रु० पर्यंत आकडेहि मिळविले आहेत, तसेच त्याच वेळीं लागोपाठ एक महिना तरी निधिसंचयार्थ दौरा झाला असता तर कमीत कमी लाखावर सहज सहायता झाली असती. परंतु त्या वेळीं सुग्गीसरायमुळें व प्रापंचिक अपरिहार्य अडचणीमुळें घर सोडून समाजसेवेकरिता श्री स्वामीमहाराजांबरोबर निधिसंग्रह करण्यासाठीं दौरा करण्यास आह्मास ही सवड झाली नाही. लिहिण्यास अत्यंत दिलगीर वाटते. परंतु श्रीनी मात्र आपलें मठ वगैरे सर्व सोडून ऐषआरामास लाथ मारुन हेच आमचे सर्वस्व, याकरिताच आह्मी जगणार, ह्मणून रात्रंदिवस अनेक कष्ट सहन करुन संस्थेच्या प्रचारकार्यासाठीं अवश्य असलेल्या मुख्य मुख्य स्थानास जाणें, त्या कार्याविषयीं सर्वांच्या मनांत साभिमान सहानुभूति उत्पन्न करणें वगैरे व लवकर हातीं धरलेलें कार्य सिद्ध व्हावें ह्मणून वरचेवर नियोजित पुढारी लोकांना कळकळीचे इशारा करणे वगैरे अगदी महत्वाची अत्युद्भूत पूर्वतयारी आतापर्यंत करीत आले ह्मणून सर्वसाधारण लोकांच्या मनावर देखील सदर संस्थेच्या कार्याबद्दल विशेष परिणाम होऊन आतां सर्व कार्यकर्त्यांचें लक्ष त्या कार्याकडें वेधलें आहे. ह्मणून आतां पुढें निधि जमविण्याचा कार्यक्रम कोणत्या शिस्तीने कोणत्या योजनेनें चालविल्यास तीव्रसिद्धि होईल या बाबतींत साधक बाधक विचारविनिमय करण्यासाठीं पुनः ता. १८-८-३७ रोजीं हुमनाबाद मुक्कामी श्रीमान् देशमुख साहेब रॉय महालिंगराव चि० डगोप्पा यांचे अध्यक्षतेखालीं निजामप्रांतीय सर्व पुढारी लोकांची बैठक भरविली.

त्या वेळीं श्री संस्थेचे उत्पादक अमरेश्वराचार्य स्वामी महाराज, श्री अचलेरी मठचे महास्वामी, वे० शरणय्या शास्त्री काव्यतीर्थ, श्रीमंत शरणप्पा दुबळगुंडी देशमुख साहेब चिडगोप्पा, श्री व्यंकटराव देशपांडे, विश्वनाथप्पा हत्ते, चन्नप्पा साहेब वकील मुस्तापूरे, भीमरावजी

वकील पोलीस पाटील, मडिवाळप्पा साहेब वकील माली पाटील, कलशेट्टी आप्पा पोलीस पाटील, उमरगा, शरणप्पा मलंग, रुद्रप्पा दंडगे, मासाळकर, शंकर शेटे कनकठ, उगरप्पा ओप्पण्णा सरपंच, मडिवाळप्पा शेट्टी, बी. एस. पुराणीक तांडूरकर, बसवंणप्पा अगडी, सोलापूरे, वगैरे मोठमोठे श्रीमंत पुढारी व समाजकार्यकर्ते मिळून सुमारे २०० शे वर लोक हाजर होते. श्रीमंत मडिवाळप्पा खेणी रंजेरीकर हेहि आले होते. परंतु अकस्मात् मोटार बिघडली ह्मणून बैठकीच्या ऐन प्रसंगांत हाजर न होतां नंतर हाजर झाले. श्रीमान देशमुख साहेब रॉय काशीराम देशमुख भालकीकर हे आपल्या घरच्या कांही अपरिहार्य अडचणीमुळे सदर सभेला येऊं न शकले तरी सदर संस्थेच्या महत्कार्याविषयीं त्यांची पूर्ण सहानुभूति पूर्ण व पाठिंबा आहे असें त्यांनी श्री अमरेश्वराचार्य महाराज यांना लिहिलेले पत्रावरून समजून येतें. असेंच अपरिहार्य अडचणीमुळे व श्रावणमासासंबंधी व्रताचरणामुळे श्रीयुत संग्रामप्पा साहेब वकील उदगीर, श्रीमंत जवळे लातूर, श्रीमंत अष्टूरे भालकी, वगैरे सहानुभूतिपर पत्र पाठवून संस्थेबद्दल अत्यंत कळकळ दाखविली आहे.

या हुमनाबादच्या बैठकींत पास झालेल्या अनेक महत्वाच्या ठरावांमध्ये श्री अमरेश्वराचार्य यांच्याबरोबर शरणप्पा फत्तेपूर, मडिवाळप्पा खेणी, विश्वनाथ हत्ते, देशमुख साहेब वगैरे मिळून निधिसंग्रहार्थ सर्व प्रांतभर लवकरच दौरा काढावा व सदर संग्रह करीत असलेला निधी निजाम प्रांतामध्येच एकमेव व्यापक स्वरुपाची, सार्वजनिक हित साधण्याची अत्यंत उच्च धोरणाची असून सर्वाला मान्य व अनुकरणीय होईल असेच विधायक कार्यामध्ये त्यांचा विनियोग केला जाईल ह्मणून यापूर्वी व नंतर ज्या ज्या ठिकाणी निजामहद्दीत फंड गोळा करण्यांत आले आहेत त्याचा समन्वय या मध्यवर्ती निधिमध्येंच केला तर अधिक उपयोग होईल ह्मणूनहि ठराव पास झाले.

## संस्थेचे उद्देश

आधुनिक परिस्थितीला अनुसरून मुख्यत्वें करून ऐहिक सुखसाधनाकडे प्रथमतः विशेष लक्ष देऊन अर्थात् ज्या योगाने विद्यार्थी स्वावलंबी बनून आपली व समाजाची गरज पुरवितील अशाच रीतीने राजकीय, सामाजिक, धार्मिक, व्यापारोद्योग अनेक कलाकौशल्य वगैरेचे शिक्षण देणें.

वरी उद्देशावद्दल व नवीन नियमाबद्दल पुनः समयानुसार सविस्तर माहिती लिहिण्यांत येईल.

## संस्थेचें ऑफिस

सध्या संस्थेचे ऑफीस दुबळगुंडी ( करिमाबाद ) मध्ये असून पुढे समयानुसार अनुकूल होईल त्या ठिकाणी बदलण्याचा अधिकार व दप्तरकाम पत्रव्यवहार वगैरे काम करण्याकरिता एक योग्य ऑनररी सेक्रेटरी आपल्याला पसंत होईल त्यास नियुक्त करून घेण्याचा अधिकार श्री अमरेश्वराचार्य यांचेकडे आहे.

## संस्थेचा अहवाल आता देण्याचें कारण

सदर कार्यास आरंभ होऊन बरेच दिवस झाले असले तरी जोपर्यंत त्यास मूर्तस्वरूप येत नाही तोपर्यंत व्यर्थ वर्तमानपत्राच्या नादाला लागून असें करावें तसें करावें ह्मणून लांबलचक बपकीचें नुस्ते लेख लिहून मोकळे होण्यापेक्षा प्रत्यक्ष कृति करून दाखविण्यामध्येच अत्यंत महत्व आहे असें समजून

श्रींनी आतापर्यंत लेखन वगैरे सदर कार्या-संबंधानें प्रकट करण्यास अवकाश दिला नाही, व अजूनहि देण्याचा त्यांचा विचार नाही. परंतु कांही आमच्या प्रेमी बांधवांनी संस्थेचा विषय आतां प्रसिद्ध करावा ह्मणून आग्रह करीत असल्याकारणानें त्या आमच्या प्रेमी बांधवांच्या आग्रहास्तव संस्थेचा हा अल्प वृत्तांत जाहीर करण्यांत आला आहे. त्यासाठी सदर कार्याविषयीं सहानुभूति असणाऱ्यानी त्या बाबींत सहाय्य–सल्ला–सूचना करण्यासाठी श्रीअमरेश्वराचार्य महाराज वेदांताचार्य फत्तेपूर दुबळगुंडी ( करिमाबाद ) पो. हुमनाबाद निजाम या पत्त्यावर पत्रव्यवहार करावा अथवा समक्ष श्रींना भेटावें अशी आमची सर्व लिंगायत बांधवांना नम्र विनंती आहे.

---

# वीरशैवधर्माची अनीति
## आणि
# विनाशकाळ.

( ले.:—पांडुरंग भावलिंगस्वामी सोंडकर, उपाध्यक्ष, श्री. वी. मा. मंडळ, मुंबई. )

### लेखांक २ रा.

बळाच्या ठिकाणी उंच्छृंखलता हा सहज-गुण असल्यामुळें नीति अगर धर्म-तत्वांबरोबर तें निगडित झालें असतां समाजास अगर समाजबांधवास तें तारक होऊन समाजस्वातंत्र्य व समता वाढविण्यास त्याचा सदुपयोग होतो व धर्म व नीतीचें बंधन नसलेलें सामर्थ्य जगांत अगर समाजांत गुलामगिरी वाढविण्यास कारणीभूत होतें. पूर्वीच्या काळीं उदयास आलेले समाज यामुळेच नामशेष झाले आहेत. हल्लीच्या उदयोन्मुख समाजांनी ही गोष्ट लक्षांत ठेवून धर्म व नीति यांस अनुसरूनच वागलें तरच सांप्रतच्या धूमतडाक्यांत कोणतीहि संस्कृति पचनीं पडून झिम्, झिम्. कां होईना पण जिवंतपणा दाखवील व समाजांत प्रभुत्व भोगण्यास पात्र होईल असें वाटतें. नाहीतर विनाशकाळ आहेच ह्मणून समजावें. कारण नीति व शास्त्र हें धर्माचें मूळ कारण प्रधान असून, त्यावरच समाजरूपी इमारतीचा पाया उभारलेला आहे. असें असून, त्या धर्म, नीति व शास्त्र यांस काटेरी कुंपण घालून पारखे होणें, असें वैयक्तिक जिणें कवडी मोल आहे असें प्रांजळपणें ह्मणावें लागतें.

कोणत्याहि संस्कृतिबद्दल विचार करीत असतां त्या समाजांतील तत्वज्ञान काय होतें व सांप्रत कसें आहे हें समजण्याची आपणास उत्कंठा वाटते. याचें कारण वीरशैवसमाजातील सूक्ष्मतत्वें समजावून घेणाऱ्या सूक्ष्म विचारात्मक बुद्धीची परिणती ज्या मानानें विशिष्ठ संस्कृतींत कमी-अधिक प्रमाणावर आढळून येईल त्या मानावर त्या संस्कृतीचा कमी-अधिक दर्जा ठरविण्याची आपणास संवय लागली आहे. पण तत्वज्ञान म्हणजे तरी काय ! आपणास पदार्थ जसा दिसतो तसा तो नेहमी राहत नाही. त्याचें रूप बदलतें, व तो नाहीसा होतो. पुन्हा तसाच पदार्थ उत्पन्न होतो, व तोहि लय पावतो, हें आपण पाहतो. हा पदार्थ कोठून उत्पन्न झाला व पुन्हा तो नाहीसा झाला तेव्हा तो कोठे गेला, व कशांत राहिला, अशा तऱ्हेचे प्रश्न मानवी बुद्धीपुढे उभे राहणें, व त्यास उत्तर देण्याचा प्रयत्न करणे, ह्यांत जगांतील अगर समाजांतील साऱ्या तत्वज्ञानाचा व पदार्थविज्ञानशास्त्रांचा उदय आहे. शरीर व शरीरांत वावरणारा आत्मा असे प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं दोन भाग आहेत असें आपणास भासतें. नुसतें शरीर ही एक जड वस्तू असून आत्मा ही त्यास चालविणारी एक चैतन्यशक्ति आहे असेंहि आपणास समजतें. व ह्यांत वैगुण्य उत्पन्न होऊन म्हणजे वीरशैव-सनातनधर्माच्या पूज्य भावनेची विचारशून्यता उत्पन्न झाली म्हणजे शरीरभागांचे वियुक्तिकरण होऊन हीं चैतन्यशक्ति शरीरभागास सोडून नाहींशी होते, तिला स्वतंत्र अस्तित्व नाही. मानवी आत्मा म्हणून शरीरवियुक्त अशी काहींच वस्तू नसल्यामुळे, त्याचा विचार करणें योग्य आहे. पहिल्या प्रकारच्या लोकांच्या मतें शरीर किंवा जगतांतील जड भासणाऱ्या वस्तु तदनुषंगानें जगांतील सूक्ष्म शक्ति हीच अभ्यासनीय व चिंतनीय होत, तर दुसऱ्या प्रकारच्या लोकांच्या मतें, आत्मा, तदनुषंगानें मनुष्यांतील सूक्ष्मशक्ति व गूढ तत्वें, ह्याच फेवळ अभ्यसनीय व चिंतनीय होत. ह्यासच अनुक्रमें भौतिकवाद व अध्यात्मवाद अशीं नांवें आहेत. आधुनिक पाश्चात्य जीवसंस्कृति, व जुनी अनादिकाळापासून वंशपरंपरागत चालत आलेली सनातन संस्कृति, यांत ठळकपणें दिसून येणारा फरक याच कारणामुळें उत्पन्न झालेला आहे. पाश्चात्य समाज हे जडवादी आसुरी संस्कृतीचे अनुयायी होऊं इच्छितात, तर सनातनसमाज धर्म व नीतितत्वाप्रमाणें अध्यात्मवादी आहेत. ॥ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥ भगवद्गीता॥ अध्यात्मवादाची पार्श्वभूमिका म्हणून धर्म व नीति यांचें योग्य पालन करून धर्म व नीतिशास्त्राचे बीजारोपण आसुरी प्रवृत्तींच्या वीरशैवसमाजांत वेळोवेळी करण्याचे प्रयत्न करण्यात आले; परंतु त्यांचा विकास काहींच झाला नसावा असें सांप्रतच्या अनुभवावरून तरी म्हणावयास बरीचशी जागा आहे. व आधुनिक भौतिक वादाच्या झपाट्यानंतर ते बहुतेक गेल्यासारखेच दिसत आहेत. धर्म, नीति, व मोक्ष हे पुरुषार्थ व समजता, लौकिक स्वार्थ ह्यांच मनुष्यव्यवहाराचा नियात्मक होऊन बसला आहे. सामाजिक जीवन व व्यष्टिजीवन परस्पराबद्दल अविश्वास, द्वेष, धास्ती, व अप्रेम, यांनी जास्त गढूळ होत चाललें आहे. व हें असेंच अव्याहत चालू राहिल्यास याचें पर्यवसान कशांत होणार! काही तरी विपरीत प्रसंग ओढवून ऱ्हास होईल असेंहि कोणी म्हणतात. परंतु लौकिक स्वार्थ व धर्म, नीति, शास्त्रांच्या विचाराची शून्यता ह्याच प्रभाव हेतु कायम आहे तोपर्यंत कोणतेहि तोडगे योजिले किंवा विषनिराळे प्रयोग केले तरी हा दृष्टिपथांत आलेला विनाशकाळ टळणें महाकठीण आहे.

# धर्मात्मा

ज्या बसवेश्वरांनी वीरशैवधर्माची धर्मध्वजा अखिल भारतवर्षांत फडकवली, आणि आसेतुहिमाचल वीरशैवधर्मवृद्धीकरतां ज्यांनीं आपल्या सर्वस्वाची आहुती दिली, त्या महाभाग बसवदेवाचें विस्तृत चरित्र संजीवनीच्या नव्या वर्षापासून ह्मणजे जानेवारी १९३८ पासून क्रमशः प्रसिद्ध करण्यात येईल.

लेखकानें चरित्र विषयक माहिती सर्वांगपरिपूर्ण अशा उपलब्ध विश्वस्त साहित्यामधून महत्प्रयासाने संग्रहित केलेली असल्यामुळें, बसवदेवाच्या जन्मकालापासूनचा अनेक उद्बोधक स्थित्यंतरें बसवकालीन वीरशैव मतानुयायी महात्म्यानीं वीरशैवधर्मरक्षणाकरता केलेली महनीय कामगिरी आणि तत्कालीं निर्माण झालेलें वाङ्मय, वगैरे गतकालीन वीरशैव वैभवाचा सर्वांगपरिपुर्ण असा इतिहास महाराष्ट्रिय भाषेमधून या चरित्ररुपाने प्रथमच प्रसिद्ध होत आहे हेंच वाचकांना आढळून येईल.

भाषेच्या दृष्टीनें आबाल वृद्धांना हा चरित्रग्रंथ आपल्या धर्माची शिकवण देत देत मनोरंजनहि करील अशाच नव्या पद्धतीनें लेखकाने लिहिला आहे. किंबहुना, आपल्या वीरशैव वाङ्मयातील मराठी भाषेतील हाच पहिला एकमेव उत्कृष्ट ग्रंथ ठरणार यात शंका नाहीं. या चरित्रग्रंथाची जवळ जवळ पांचशे पाने होतील. संजीवनीच्या वर्गणिदारांना तीन रुपयांतच इतर भरपूर मजकुरासोबत अमुल्य असा हा चरित्रग्रंथ आह्मी क्रमशः प्रसिद्ध करून विनामुल्यच देण्याचें साहस करित आहोत हें कुणीही नाकबूल करणार नाही.

---

संजीवनीच्या वाढत्या आकाराबरोबर, कागदाचे भाव भरमसाट वाढले असतांनाहि, आह्मी फक्त नव्या वर्षापासुन आठ आणेच वार्षिक वर्गणींत वाढ केलेली आहे.

पण डिसेंबर ३१ तारखेपर्यंत वर्गणी भरणारांना अडीच रुपये भरूनहि वर्गणिदार होण्याची सवलत आहे. हें लक्षांत असू द्या आणि तातडीनें ह्या सवलतीचा फायदा घेऊन वर्गणी पाठवा.

# अंध श्रद्धेचा सहवास आणखी किती दिवस करणार!!

( लेखकः— रामलिंगस्वामी शाळामास्तर, तमलूर. )

( वी. सं. पाक्षिकाकडे लेख पाठविण्याचें मनांत किती वेळा तरी आलें. परंतु सदर पाक्षिकांत प्रसिद्ध होत असलेले विद्वानांचे भारदस्त व परिप्लुत विचारांच्या लेखापुढें माझ्या या यःकश्चित् पामराचे अप्रबुद्ध विचार "सूर्यापुढे खद्योत" याप्रमाणेंच भासणार या धास्तीमुळे लेखणी उचलण्यास संकोच वाटतो. शिवाय मोजक्या शब्दांतर्गतच लेख असावा ही एक सूचना आमचे संपादकसाहेबांनी ठोठावल्यामुळेच तर जास्तीच धडकी भरते. तरीहि पण आज वेडेवाकुडे शब्दसमुच्चयकुसुमें समाजसेवाप्रीत्यर्थं अर्पण करण्याचें धाडसच केलें आहे. तरी कृपा करून हंस-क्षीर या न्यायानें स्वीकार करणें.)

जगांतील एकंदर घडामोडींकडें सूक्ष्म तऱ्हेनें अवलोकन केल्यास परिस्थितीनुसार प्रत्येक वस्तूचें रूपांतर व बदल होत असल्याचें सतत दिसून येते.

या तत्वानुरोधानें पृथ्वी, पर्वत, सूर्य, चंद्र, तारे इ. निसर्गवस्तूंचेंदेखील नित्यशः स्थित्यंतर चालू आहे हें आपणा सर्वांच्या अनुभवांतलें दृश्य आहे. असा निसर्गसिद्ध अनुभव सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट असतांनादेखील आम्ही मात्र एकाच जीर्ण रुढीवर चालण्याची शपथच घेतली आहे आमच्यावर कितीतरी संकटें येत आहेत व प्रस्तुत परिस्थिती किती नाजूक येऊन ठेपली आहे याकडे मुळीच लक्ष नाही. अशाने आम्हांस सद्गति मिळणार तरी कशी? अरे बाबांनो, जिकडून वारा येईल तिकडे पाठ केलीच पाहिजे. नस्ती डोळ्यांत माती भरून रस्ता दिसेनासा होईल या गोष्टींचा वासला अद्यापि तुह्मांस नाही काय? मग "जुनें तें सोनें" या घातकी ह्मणीलाच सन्निध बाळगून केवळ अंधश्रद्धेनें वागणें ह्मणजे निसर्ग-नियमाविरुद्ध आचरण केल्याचें पाप आमच्या माथीं नाही का बसणार? अवश्य बसेल, व या दुर्धर पापाचीं अनिष्ट फळें खात्रीनें भोगावीं लागतील—नव्हे सध्या भोगीत आहोंत, हें अद्यापि आमच्या प्रेमी बंधु-भगिनींना कसें उमजेनासें झालें याचेंच राहून राहून सखेंदाश्चर्य वाटत आहे.

यावरून माझा भावार्थ 'धर्मबाह्य वागा' असा मात्र करण्याचें कोणीं श्रम घेऊं नयें बरं कां? अशा धर्मद्रोहीचे विचार मीच काय पण कोणीच सुज्ञ असें ह्मणविणारे केव्हाहि सांगणार नाहीत. कारण "धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा" या वेदोक्तानुसार सर्वांना धर्म लागून आहे. धर्म हा केवळ मनुष्यजातीच्या उन्नतिकरिताच आहे. त्याप्रमाणें प्रत्येकास सत्यधर्मत्वानें असणें केव्हाहि उत्तमच. परंतु धर्म आणि धर्मभोळेपणात महदंतर आहे. धर्मभोळेपणा ह्मणजे धर्म नव्हे.

उलट, धर्मभोळेपणा वा अंधश्रद्धा हा धर्मरूपी जुनाट वृक्षाची मुळी विरुपयोगी करण्याचा एक मोठा विषारी कीटक आहे. या कीटकाचा विवेकशराने नाश करणें ह्मणजे धर्माचा नाश करणें ( धर्मबाह्य वागणें ) नव्हे. उलट आपल्या धर्मरूपी वृक्षाचा विस्तार फैलावून फलदायी करणें होय.

ईयरूपें आपला धर्म व आपलें तत्वज्ञान पूर्वीच आमचे महात्म्यांनी न्याय्य व समता या उच्चतम पायावर उभारून समंजस बुद्धीला पटेल व ' यावत्कालदिवाकरी ' टिकेल असेंच रचिलें गेलें आहे. यांत प्रत्येक व्यक्तीस आपला आत्मविकास करून घेण्यास वाव दिला आहे. या विचारानेच आपण वागावें ह्मणून प्रस्तुत चोहोंकडे समाजसुधारक अनेक प्रयत्नानें एकसारखे आपल्या नांवानें टाहो फोडीत आहेत व माझेंहि पण रडणें तेंच आहे.

वस्तुतः आपला धर्म व आपलें तत्वज्ञान मूळांत जितकें बुद्धिप्रधान आहे तितकेंच आता श्रद्धाप्रधान होऊन बसलें आहे. त्यामुळें धर्माची व्याख्याच कांहीं निराळी होऊन राहिली आहे. या वेडगळ समजुतीमुळें परधर्मीय आचारुपी कैचीच्या कचाट्यांत सांपडलों आहोंत. यापुढें आमची काय दशा होईल याची कल्पना असणाऱ्या विचारी जीवांना पराकाष्ठेचें दुःख झाल्यावाचून रहाणार नाही.

अशा परिस्थितींत आमच्या वीरशैवसमाजाचीं सर्वस्वीं नाश करणारी जी अंधश्रद्धा तिचा सहवास आणखी किती दिवस करणार ? सोडा ! सोडा !! तिला आतां सान्निध्यांत फटकूं देऊं नका !!! हिच्या मोहपाशांत बद्ध होऊं नका! तुह्माला खाईल, गिळील-नामनिशाणसुद्धा ठेवणार नाही. आतां तरी डोळे उघडा ! ही अंधश्रद्धा केव्हांहि आपणास अंध मूढ करणार खास ! विचार करा ! विवेकशक्तीला जागृत ठेवा ! व आपला वीरशैव-अर्थात्-विश्वधर्म हें नांव सार्थ करण्याचें पुण्य पदरीं घ्या.

कोणत्याहि समाजाची, देशाची, राष्ट्राची, सर्वांगीण उन्नति, प्रगति, होण्यास आरंभी विवेकमार्गाचाच अवलंब करावा लागतो. ज्यांनीं या मार्गाचा स्वीकार केला ते समाज, ते देश, पुढें गेले. त्यांची भरभराट झाली. ज्यांनी विचारशक्तीला कुलूप लाविलें ते समाज अधोगतीस गेले. त्यांच्या कपाळीं आजन्म पारतंत्र्य, दारिद्र्य, मानहानि इ० चीं लोहबंधनें प्राप्त झालीं. याचा अनुभव प्रत्येकास प्रत्यक्ष पहावयास मिळत आहे. याबद्दल पूर्वकालीन दृष्टांत द्यायला नकोत. ह्मणून बापहो, उठा, विचाररूपी खड्ग हातात घ्या! अंधश्रद्धारुपी शत्रूचा नायनाट करा. विचार हा कृतीचा आत्मा आहे. उच्च विचारांचें कृतींत रूपांतर करणें ह्मणजेच अंधश्रद्धा व धर्मभोळेपणाचा नाश करण्याचें महत्कार्य करणें होय. इतकें सांगुन तूर्त रजा घेतों.

---

## थोरांच्या गांठीभेटी

वऱ्हाड मध्यप्रांतीय वीरशैव-हितसंवर्धक मंडळाचे अध्यक्ष श्रीमान व. कृ. ऊर्फ बाबासाहेब जहागीरदार पारवा हे मागील आठवड्यांत चि. आबासाहेबासह अमरावतीस येऊन गेले. खाजगी बैठकींत श्री. नानासाहेब बामणगांवकर, श्री. चौधरी, व गांवांतील प्रतिष्ठित कांहीं मंडळीबरोबर समाजसुधारणेबाबत बरीच चर्चा होऊन वीरशैव-हितसंवर्धक-मंडळाच्या कार्यकारी सभासदांची सभा लवकरच बोलावण्याबद्दल बोलणें झालें.

---

# श्रीमज्जगद्गुरु स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

## संदेश ४ था.

हं ! कसें काय संपादक लिंगजी, बरें आहे ना ? असायचंच ! आमच्या अगडबंब शुभाशीर्वादाचा प्रताप ह्मणजे प्रताप ! बोलूं ते बोल सोन्यामोत्याचे ! जणु आकाशवाणी ! कां ! कां ! हसायला काय झाले ? अहो यांत आश्चर्य वाटण्यासारखं तर कांही नाहींच, पण खोटंहि टिपुसभर नाही. चार-दोन आमच्या बोलांचे आडाखे तुह्मालाहि पटलेले आहेतच. परवां—परवांचा चमत्कार, तो तुह्माला आह्मी मागच्या, हो, मागच्या महिन्यांत कळवला तो, कसा अगदी नेमका रामबाण लागू पडला तोडगा कीं यंवरे यंव!

दुसरें असें कीं, मागील खेपेस आह्मीं तुम्हाला कळविलेंच होतें कीं आम्ही आता यापुढें देशकार्यी तनू झिजवणार, आणि राष्ट्रभक्त ह्मणून मिरवणार. तें अगदी बरोबर, सुतराम रुपयाचे सोळा आणे कां सतराआणें पार पाडण्याचा आह्मीं निश्चयच केला आहे अचळ अवळ ! प्रतिज्ञाच केली आहे ह्मणाना! आणि ह्मणाना कशाला, खरोखरच आह्मी तशी प्रतीज्ञा केली आहे. पण आह्मीं तशी-प्रतिज्ञा केल्या वेळेपासून आमचे खास कारभारी लसुणलिंग मात्र जरा कांकूं करताहेत. पण आह्मी त्यांना बजावून सांगितलें आहे कीं, कांकूं करा कीं कूंकूं करा, आह्मी एकदा जे बोल बोललों ते स्लेट पाटीवरील अर्थात दगडी पाटीवरील दुध्या पेन्सिलीची रेघ समजा. हो तर काय! ही आमची फत्तरची रेघ ह्मणजे रेघ ! पण आह्मी त्यांना विचारलें कीं, काय हो, तुह्माला आतां इतके भिण्याचें नी घाबरण्याचें काय कारण? हमखास आतां तुह्मी वीर नरीमन ! काय विषाद आहे आतां पुन्हा त्या मुंबईच्या वीर नरीमनाची जगांत तोंड दाखवायला ! त्यांच्या जागेवर हमखास तुमची सुपारी हा ! बच्चमजी उगाच नाही त्याला पळो कीं पळो करून चक्रव्यूहांत पकडला आमच्या जय महात्माजींनी. आता तरी लक्षांत असूं द्या ! कीं असले वीर धुळीला मिळवण्याची कला ज्यांना साधतां येते त्याचाच अखिल भारतवर्षांत जयजयकार होतो. महाराज, जयजयकार, लाख गरीबांच्या घरादारावरून नांगर फिरवल्याशिवाय जसा एक गलेलठ्ठ श्रीमंत उदयास येत नाही, तद्वतच लाख सैनिकांचा बळी दिल्याशिवाय सच्चा सेनापती ह्मणून मिरवता येत नाही. आणि लाख कांग्रेसभक्तांवरून सक्तीचा वरवंटा फिरवल्याशिवाय

सरदार म्हणून मिरवतां येत नाहीं हें खास समजा! आह्मी जे राजकारणांत पडलों तें उगीचच नाहीं. वीर नरीमनांची नामुष्की झाली, त्यानें राजीनामा दिला, आता तो कांग्रेसचा साधा शिपाई देखील ह्मणवून घ्यायला नालायक ठरला आहे. तेव्हा त्याच्या अधिकाराच्या जागेवर खास शिफारसीने आह्मी तुमचें तट्टू ढकलणार आणि आज जरी तुमचे तट्टू मरतुकडे असलें तरीं चार दिवस कांग्रेसनिधीचा चंदीचारा आणि फंडाचा तोबरा तुमच्या तोंडाला लागला कीं चांगले गुबगुबीत असे तुह्मी दिसूं लागाल, आणि आजवर जो एक प्रकारचा गाढवाचा गोंधळ कांग्रेसमध्ये माजून राहिला होता तो तुमच्या घोडदौडीने थयथयाट करीत कांग्रेसच्या राजकारणात घुमघडावयानें धुडगुस घालूं लागेल !

उमलली कळी आमच्या कारभाऱ्याची हें आश्वासन ऐकून ! आणि कां उमलूं नये ? ज्या मुसलमानांनीं जन्मभर कांग्रेसच्या नावांने खडे फोडीत 'मुस्लिम लीग' 'मुस्लिम लीग' ह्मणून आजवर हैदोस दुल्ला गाजवला त्याच लीगचा खोगीर ताडताड उडया मारून झटकन फेकून देऊन कित्ती तरी खुदाइनुर रुमी चाक-लेटी गेंदेहार टोपी झुगारून, गांधी टोपीचे बंदेगुलाम बनले ! उनी शेरवानी ऐवजी नेहरू आणि मुंडेछाट पेहरण पेहरुं लागले. पैजामा नी विजार यांत पूर्वीपासूनच कांग्रेसने भेदभाव ठेवला नाही ! दाढीमिशांना चाट देऊन शेंडी-हो पण चुकलो ! स्लिप ऑफ टंग का कायसं ह्मणतातना विंग्रजीमधून, तस्सं होतयं पहा बोलतां-बोलतां, शेंडीची तर हिंदुनी देखील केव्हाच उचलबांगडी करून बांगडी बायका-प्रमाणे झुलपे कंगाल बनण्याचें कंकण बांधलें आहे. पण यापेक्षाहि सोप्या भाषेंत बोलायचें तर कांकणें भरलीं आहेत असेंच ह्मणणें बहुत साजेल. जाऊ द्या या शेंडी-दाढीचें शेपूट ! अहो महाशयजी, बहांत कुठें? आह्मी बजावून, म्हणजे काय अगदी हडसून खडसून सांगतों, नव्हे भविष्य वर्तवतों कीं, चार दिवसांनीं, मुसलमान देखील हिंदूसारखे गंधाचे टीळे लावून पंढरीच्या वाटे, पुंडलिक वरदे हरि विठ्ठल करीत टाळ-चिपळयांचे पीठ पाडीत नाचतांना तुम्हाला आढळतील ! च्, च्. काय, कांहीं तरी बोलतो असें वाटतें तुम्हाला? अहो हें कांहीं तरी बोलणें नव्हे, कांहीं तरी करतील, आम्ही बोलतो यापैकी, हें अगदीं नक्की समजा ! पण इतकें कशाला ! समजा ! समजा म्हणजे काय ? कल्पना करा ! कल्पनां अशी करा कीं, समजा जशी यंदाची कांग्रेस हरीपुरला भरवण्याचें ठरलें आहे आणि तेथें दुधाळ गाई-ह्मशींची खिल्लारे, खेडुतांची बजबजपुरी, आणखी हें, आणखी तें, वगैरे वगैरे हजारो प्रदर्शनें, हो प्रदर्शनेंच नव्हत तर काय ! पहायला मिळणार आहेत. पण कोणाला ? जो कोणी पैसे खर्च करून, आधी रेल्वेला पोटभर खाऊ घालून, स्वतः अर्धपोटी, उपाशी--तापाशी, धक्के खात, झोपमोड करीत, प्रवासांतील अर्धेमुर्धे सामान विसर-भोळेपणानें गर्दीत सांडीत, तेथवर जाऊन पोचेल त्याला. आणि घरबैठ्या व्यवहार-चतुराला, कांग्रेस - अधिवेशनाच्या भपकेबाज भरभसाट मजकुरांनी भरलेली वर्तमानपत्रे वाचून डोळयांचें नसलें तरी निदान मनाचें तरी समाधान करून घेतां येईल. पुन्हा आपले घरच्या घरी अंथरुणांत गरमागरम लोळत आणि घरच्या सर्व मंडळीसह, सौभाग्यवती आणि बाबालोक यांच्यासह अर्धा आण्यांत कांग्रेसची वारी केल्याचें पुण्य पदरीं पडून पुन्हा आपले नामानिराळेचे नामानिराळे! वाटल्यास तोहि अर्धा आणा, रद्दीवाल्याला वाचलेलें पत्र विकून, वसूल करतां येईल. आणि इतकेंहि करायचें नच जुळेल तर छोटया बन्याच्या प्रभातफेरीच्या कार्यक्रमाला तरी तें खास उपयोगी पडेल. पण बन्याची आई तितकी व्यवहारचतुर असेल तर ! असो ! हो ! काय सांगणार होतो, समजा,

कल्पना करा, असेंच जर पुढील वर्षी पंढर-पूरला कांग्रेसचें अधिवेशन भरण्याचें ठरलें तर हा हिंदु, हा मुसलमान, हा पार्शी हा ख्रिश्चन, हा महार शांतम् पापम, शांतम् पापम्, पंढरीचे बडवे म्हणून सार्‍या इतर जातींना पंढरीनाथाच्या दर्शनाला मज्जाव करणार नाहीत, पण महारमांगासारख्या अस्पृश्यांना देवळाच्या पायरीलाहि शिवूं देणार नाहीत ! एकेकाची टाळकी, पंढरीनाथाच्या पायरीवर आपटून विठ्ठलाला नारळे फोडण्याचा चंग बांधतील ! कारण ब्राह्मण तो ब्राह्मण, आणि महार तो महार, देव विटाळला जायचा ! तें कांहीं आपलें ह्या कांग्रेसवाल्यासारखें धर्मलंड नाहीत, ते कट्टे धर्मगुंड आहेत त्यांना हे असले चवचाल चाळे मुळीच खपायचे नाहीत.

डॉ. अंबेडकरांनी कितीहि धर्मांतरांच्या धमक्या दिल्या, आणि कितीहि अकांड तांडव केलें तरी ते मुळीच ऐकायचे नाहीत. पण पुढील वर्षापर्यंत काय काय घडामोडी आणखी घडून येतील हें कुणीं सांगावें ! कदाचित् सर्व गोलंकारहि होईल.

डॉ. मुंज्यांनी, हिंदुमहासभेच्या प्रतिष्ठित पुढार्‍यांनीदेखील जाहीरपत्रक काढून प्रसिद्ध केलें नाही कां ? कीं मुसलमानांनी भरमसाटपणें कांग्रेसमध्ये घुसण्याचा धूमधडाका चालवला आहे! न जाणो कदाचित् कांग्रेसमध्यें मुसलमानांची भरती अधिक झाल्यास हिंदुसभावाल्यांना नाशीकच्या रामतीर्थात बुड्या मारून आत्महत्या करण्याचा प्रसंग येईल ! तेव्हा आजवर जरी आह्मी कांग्रेसच्या नावानें बोटे मोडून कांग्रेसला शिव्या शाप देत आलों तरी पण आतां नाक मुठीत धरून सर्व हिंदुसभावाल्यांनो, कांग्रेसमध्ये घुसण्याकरीतां दंड थोपटून पुढें व्हावे. आतां तुह्मीच सांगा कीं मुंजांनी आपली दाढी कांग्रेसच्या सेफ्टी रेझरने करून घेण्याची दांडगी इच्छा प्रदर्शित करून 'न भूतो न भविष्यति ' असेंच अजब क्रांति करून घेण्याचें ठरवलें आहे की नाहीं बोला ! याला ह्मणावें मुत्सद्देगिरी. याला ह्मणावा शहाणा माणूस ! नाहींतर दाढी-मिशाला चाट देऊन इस्लामी धर्माला बट्टा लावणारे बॅरिस्टर जीना 'मेरे मुरगीकी एकहि टांग' असें ह्मणत कांग्रेसलाच टांग मारायला नेहमी तयार ! पण बाबारे, कांग्रेस ह्मणजे काय पोरखेळ आहे? हुतु तु तु करून आडव्या-तिडव्या मार्गानें डाव खेळण्यांत ती काय जीनाचा जीन पाठीवर सुखासुखी लादून घेणार आहे ? उलट, जीनांचे मुस्लिम लीगच्या जीन्यावरून घसरून केव्हा दांत पडतील असा प्रसंग येऊन ठेपला आहे ! तसेंच, कांग्रेस ह्मणजे बोटावरची खेळणी वाटताहेत कांही आपल्यातीलच अहंमन्यांना ! पण हडसून खडसून चरक्यावर घरून चांगलें सुतासारखे सरळ करण्याची धमक आहे कांग्रेसच्या अंगीं, हें खूब समजून असा ह्मणावें रायाजी ! महाराष्ट्रांतल्या एका नामांकित वृत्तपत्रानें परवा ह्मणे एका कांग्रेसच्या प्रधानावर कुत्सित टीका केली. लागलीच त्या पत्राच्या संपादकाला चांगली खडखडीत नोटीस मिळाली कीं, माफी मागून दिलगिरी प्रदर्शित करा ! नाहींतर हं ! समजून असा बच्याजी ! असा इंगा दाखवल्याशिवाय कांग्रेसविरोधी लोकांचा मोरपिसा थांबायचा नाहीं. अगदी उचितच केलं आहे नाही का ? त्याशिवाय दमांत जम बसायचा नाहीं आह्मी हें गप्पाष्टकांचिच कां होईना पण राजकारणांत अंथरुणांतल्या अंथरुणांत लोळूं लागल्यापासून आमच्या कोथींबीर बाईना जवळ जवळ मूठभर मास चढल्यासारखें झालें आहे! 'हां ! खबरदार, आह्मी कांग्रेसमन आहोंत ! जीभ आवरून बोला ! ' अशी वेळी— अवेळी त्या आपल्या पतिराजाला, लसुणलिंग शास्त्र्यांनाहि कधीं कधीं धमकी देत असतात ! गर्भगळित होतो बिचारा ! आणि आह्मी राम या त्यांच्या कृत्याला उत्तेजन देतो! कारण प्रमुख देशसेविका बनवण्याचें ठरवलें आहे वा आह्मीं त्या

कोथींबीर बाईना! तेव्हां इतका उमेंट खमंगपणा तिच्या अंगीं मुरल्याशिवाय समजा तथा लाठीहल्याला तोंड द्यायचें झालें, तर तोंडबळापेक्षा असल्या तोंडाळ बोलभांड बायकांचाच अधीक उपयोग होण्यासारखा असतो. छोटी मिरची तांई तर काही विषारूच नका. त्या कारटीला तर स्वर्ग दोनच बोटें उरल्यासारखें झालें आहे! तिची हाताची टकळी चालू आहे कीं तोंडाची टकळी चालू आहे कळतदेखील नाही. सारा दिवसभर चरख्यासारखी गांवभर गरगर 'झेंडा ऊंचा रहे हमारा' असें गुणगुणत फिरत असते.

आणि चिमुरडा घनीदवर, आह्मी त्याला प्रेमानें 'घनीयालाल,' ह्मणतो, तो पाळण्यातल्या पाळण्यांत असा कांही सूर काढतो कीं, 'वंदेमातरम्‌ हें राष्ट्रगीतच त्याच्या सुरेल बाळवतो आहे असा भास होतो, आणि खरोखरच चमत्कार असा होतो कीं, आह्मी सारे तटस्थ त्याच्या पाळण्यासभोवार उभे राहून त्याच्या सूराला सूर मिळवीत गातों झाले वंदे मातरम्‌.

शुभं भवतु इति शुभाशीर्वादम्‌, आणि सोबत कांग्रेसच्या राजवटीचा रजिष्टर्ड ट्रेड मार्क वन्दे मातरम्‌.

---

# नववीरमाहेश्वरांस आग्रहाची विनंती

( लेखकः- सिद्धैय्यास्वामी सिद्धगीर मठ संस्थानचे कारभारी उमरावती. )

**धर्मो रक्षति रक्षतः हे श्रुतीचे वाक्य लक्षात ठेवलें ह्मणजे झालें.**

मे ता. ८-९-३७ ई. रोजी कारंजा वऱ्हाड-परिषदेत सनातनी जुनें मतवादी बरेचसे हजर होते पण त्यांचें मत न घेता वीरशैवांतील नववीरमाहेश्वर ( जंगम ) व नवमतवादी तरुण भक्त मंडळ यांनीच आपलें संमेलन करून लिंगायतांतील पोटजातीचें एकीकरणा विषयी कसा तरी ठराव पास केला. बरें असो. केला तो फार उत्तम केला. अखिल भारतीय लिंगायतसमाजाची संघटना करण्याचा व लिंगायतसमाजाची सुधारणा करण्याचा आपला विचार आहे त्याला आपल्या वीरशैवसमाजात अशी कोणती व्यक्ति आहे कीं आपल्या वरील विचारास कोण संमती देणार नाही? सर्वांतील अशी माझी समजूत आहे, व पक्की खात्री आहे. पण या पोटजातींत बरेचसे घोटाळे आहेत हें आपणाला माहीत नाही. कोणाला एक पिढीनंतर लिंग बांधलेले आहेत, कोणी दोन पिढ्यानंतर लिंग घेतले आहे. कोणी चार पिढ्यानंतर लिंग घेतले आहे, कोणी हल्ली प्रस्तुत घेतले आहे हृपा कांही कांही पोटजातींच्या येथे जंगम आणी सुद्धा त्यांना दीक्षा दिल्याशिवाय हल्ली त्यांच्या येथे भोजनास जात नाही. पण आपण तर ( नवमतवादी व नववीर माहेश्वर) धर्मशास्त्र व धर्म कायदा छपरावर ठेवून हम् करे सो कायदा हा अमलात आणून त्याचा कांही विचार न करिता एकदम सर्रास भोजन सुरू केले तेव्हा तुह्मास काय ह्मणावें हेंच मला समजत नाही. फार आश्चर्य वाटतें तर अशा या लिंगायतांतील पोटजातीचें जे असतील त्यांना दिक्षासंस्कार दिल्याशिवाय त्यांच्याशीं सहभोजन करू नये अशी माझी नववीरमाहेश्वराला व नवमतवादी तरुण सुशिक्षित भक्तमंडळीला आग्रहाची विनंती व आग्रहाची सूचना आहे. पण विशेष सूचना अशी आहे कीं, सर्व हिंदुस्थानांतील तरुण माहेश्वर ( जंगम ) व तरुण लिंगायत वाणी भक्त मंडळी हे सर्व सनातन्याच्याच कुलातले व वंशातले आहेत. दुसरे कोठले नाहीत. परंतु वेळ कालमानचक्र फिरते त्याचप्रमाणें, मनुष्याची बुद्धि फिरते. 'बुद्धि कर्मानुसारिणी' ह्मटल्याप्रमाणें यांची बुद्धि फिरली ह्मणूनच हा नवीन कायदा यांनी काढला. त्यात तो यांचा दोष नाही; तो बुद्धीचा दोष आहे. अस्तु. इतके लिहून मी आपली रजा घेतों!

# वीरशैवसंजीवनी

वर्ष २ रें ) ता० १५ डिसेंबर १९३७ ( अंक २४वा

## ❁ अनुक्रमणिका ❁



वार्षिक वर्गणी २॥ रु. किरकोळ अंकास २ आणे.

## —* सोलापूरचे सुप्रसिद्ध व्यापारी *—

# श्री. मल्लिकार्जुन अप्पा पाटील



[ यांचा अल्पपरिचय ता. १५ 'नोव्हेंबरचे संजीवनी' त आमच्या वाचकांना करून दिला आहे. ]

॥ श्रीशिव प्रसन्न ॥

-* जुनें वर्ष पांचवें *-

# वीरशैव संजीवनी

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रायेचान्य जातयः।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः॥
पारमेश्वरागम प. १ (५६)

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः
स्त्रियःवैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्
भगवद्गीता अ.९ (३२)

नवें वर्ष २ रें ) मिति मार्गशीर्ष शु० १२ शके १८५९ ( अंक २४ वा.

## अमृतबिंदु

चैनीला लालचावलेल्या श्रीमंतांना संकटाला तोंड देणे अशक्य असल्यामुळें खऱ्या सुखसमाधानाला पारखें व्हावें लागतें तर संकटाचा कंटकमय मार्ग पायदळीं तुडविणाऱ्या कंगालाच्या झोंपडींतच खऱ्या सुखसमाधानाची समृद्धी असते.

बसवदेव

# वीरशैवांनीं लघुकथा कशा लिहाव्यात

महाराष्ट्रांतील वीरशैव बघूंत. विशेषतः तरुण-वीरशैव पिढीत लघुकथा लिहिण्याकडे अधिक प्रवृत्ति होत आहे ही आनंदाची तशीच अभिमानाचीहि गोष्ट आहे. कारण लघुकथाकडे प्रवृत्ति ही एक वाङ्मयाचीच सेवा आहे. वाङ्मय हा एक अनेक शाखोपशाखांनी व अनेक पल्लवांनी प्रफुल्ल दिसणारा वृक्ष आहे. लघुकथा ही त्याची एक शाखा आहे. वीरशैव ह्मटला कीं व्यापारी, शेतकरी, मजूर, वा भिक्षुक, एवढीच त्याच्या पेशाची वर्गवारी पडते. व्यापारी व भिक्षुक ह्यांत थोडी व्यवहारापुरती साक्षरता असते पण तिचा उपयोग रोजच्या हिशेबापलीकडे होत नाही. त्यापलीकडे कांही वाचावें, मनन करावें, आनंद मानावा व बोधहि घ्यावा ही प्रवृत्ति त्यांच्यांत नसते. भिक्षुकाची साक्षरताहि त्याच प्रकारची कुंठित झालेली असते. 'लिंगाय धूम समरपेसुपे' एवढें पाठ झालें ह्मणजे भोजन मिळनें व दोन पैसे दक्षिणेचाहि लाभ होतो. अशा परिस्थितीमुळे वाङ्मयाचा सर्वांगीण विकास होणें हें आमच्या समाजांत बंद पडलें असलें तर नवल नाही. बसवदेव व चन्नबसवेश्वर वगैरेंकडून वाङ्मयाची सेवा झाली आहे. पण त्या काळीं वाङ्मयप्रसाराची साधनें निराळीं होतीं. गुरुमुखांतून निघणारें वाक्य शिष्यानें लिहावें व तें पाठांतरानें सांप्रदायिकांत प्रसृत करावें असा क्रम असावयाचा.

गुरुच्या आश्रमाला शिष्याचें पाणी जवळच असावयाचें. भक्तवर्गाकडून रोजचा निर्वाह चालेल असें अन्न मिळावयाचेंच. उरलेला वेळ कसा घालवावा? तर गुरुने बोलावें व शिष्याने टिपावें ह्यांत. अशा प्रकारें वाङ्मयनिर्मिती पूर्वी होत असे व सांप्रदायिकांत तिचा प्रसारहि होत असे. महाराष्ट्रांतसुद्धां संतकाळांत वीरशैवांत असे वाङ्मयसेवक झाले नाहीत असें नाही. परंतु पुढें छापखान्याची यंत्रें रूढ झालीं, वाङ्मयप्रसाराची साधनें उपलब्ध होऊं लागलीं, वाङ्मयांत निरनिराळ्या शाखा प्रचलित होऊं लागल्या, ह्या दृष्टीनें विचार करितां गेल्या शेपन्नास वर्षांत महाराष्ट्रांतील वीरशैवांत वाङ्मयसेवक झाले आहेत काय असा जर कोणीं प्रश्न टाकला तर त्याला आपण काय उत्तर देऊं? ह्याला उत्तर द्यावयाचें ह्मणजे वीरशैवांत शास्त्रचिकित्सक झाले काय? वीरशैवांची सर्व शास्त्रें-पुराणें समोर ठेवून त्यावर साधक-बाधक चर्चा करून वीरशैवांच्या आदिचाली ह्या! मध्ययुगीन चाली ह्या! आधुनिक चालिरीती ह्या! असें स्पष्टपणें ज्यांत कथन केलें आहे असा एखादा ग्रंथ आपल्या समोर दिसला असतां पंचायतनपूजा केव्हा अस्तित्वात आली, शंकराला पांच मुखें आहेत ही कल्पना केव्हा व कोणत्या कारणानें रूढ झाली, वगैरे गोष्टींचें विवेचन ज्यांत आहे, बसवदेव व चन्नबसवेश्वर ह्यांची वचनें समोर ठेवून त्याच्या आधारें तत्कालीन परिस्थितीचा परिचय करून देणें हें बोधप्रद व मनोरंजक

असतें. पण अशी शास्त्रीय वाङ्मयसेवा करण्याची प्रवृत्ति महाराष्ट्रीय वीरशैव विद्वानांत झाली नाही.

विजापूरचे पावसाहेब हलकट्टी हे ह्या दृष्टीने वीरशैवांतील फार मोठे वाङ्मयसेवक आहेत असें मान्य करावें लागतें. हुबळीचे डॉ. पावटे ह्यांची सेवाहि ह्या दृष्टीने अत्यंत महत्वाची. कोल्हापूरचे कै. श्रेष्ठी बी. ए. व गोकाकचे सबरजिष्ट्रार कै. कल्याणशेट्टी बी. ए. हे ह्या दृष्टीनें मराठींतून उद्योग करीत होते. आणि शिवकृपेने ह्या उभयतांना आयुष्य लाभलें असतें तर त्यांनी वीरशैवांची शास्त्र ह्या दृष्टीनें प्रगति कशी झाली हें चिकित्सापूर्वक सांगितलें असतें. निदान त्यांच्या लिखाणाचा गुण हा होता कीं, त्यांनी चिकित्सकांतून चिकित्सक निर्माण करून वीरशैवांचा खरा इतिहास महाराष्ट्रांतील वीरशैवेतरांच्याहि कानावर घातला असता. कोल्हापूरला कवि सुमंतासारखे कवि होते. ते वीरशैवांला भूषण होते. त्या तोडीचा कवि महाराष्ट्रांतील वीरशैवांत आज सांपडावयाचा नाही. दुसरें असें कीं, वाङ्मयसेवक होणें हें आज सोपें काम राहिलें नाही. 'अल्पविद्या महागर्वी' असा जो काळ होता तो निघून गेला. वीरशैवांतहि आधुनिक विद्येचा प्रसार झाला आहे. प्रमाण फारच थोडें आहे हें जरी खरें, तरी त्यांच्या बुद्धीला रमवितां येईल असें वाङ्मय निर्माण करण्याचा गुण किती वीरशैवांत आहे ? असें वाङ्मय अशा सुज्ञांना फुकट वाचावयास दिलें तरी ते रमावयाचे नाहीत. विकत घेण्याचें त्यांना सामर्थ्य नसतें. चुकून विकत घेतलेंच तर त्यांत त्यांच्या बुद्धीला खाद्य आढळत नाहीं.

अशा एकंदर परिस्थितीमुळें खरच वाङ्मय निर्माण होण्यासारखी परिस्थिति महाराष्ट्रीतील वीरशैवांची नाही. शिवा वाढविण्याचा ज्याला हव्यास आहे व पोटाकरितां दोनशें ते चारशें रु. दरमहा सहज जो मिळवितो त्याने जर वर्षाकाठीं १०० पृष्ठें मजकूर लिहून व त्यावर रु. १०० ची सहज दक्षिणा ठेवून वीरशैवांत शास्त्रीय चिकित्सेची दृष्टि निर्माण होईल असें वाङ्मय निर्माण करण्याचा छंद धरला तर तें योग्य कसें होणार नाहीं ? कारण वाङ्मय निर्माण करणें हा पोटापाण्याचा उद्योग नसून तो स्वानंद लुटण्याचा व लुटायला लावण्याचा एक छंद आहे एवढेंच आजच्या वीरशैवांची स्थिति पाहून ह्मणतां येते. ह्या दृष्टीने विचार करितां सोलापूरचे झुंजे वकील ह्यांची प्रशंसा करावी लागेल. बॅ. सरदार व श्री. कल्याण शेट्टी वकील हे ह्या दृष्टीने आज अभिनंदनास पात्रच आहेत. बडोद्याचे श्री. साखरपेकर ह्यांनीहि ह्या प्रयत्नें भर घातली आहे. ह्याशिवाय जुनें भक्तिभावाचे वाङ्मयनिर्मिति महाराष्ट्रांतील वीरशैवांत आहेत. उदाहरणार्थ नाशिक जिल्ह्यांतील वयोवृद्ध स्वामी महाराज काबाडी बुवा हे होत. तात्पर्य काय कीं, घरचे खाऊन घरच्या खर्चानें स्वतःच्या आनंदाकरितां वाङ्मयसेवा करणें हाच आज वाङ्मयप्रचारास आमच्यांत मार्ग मोकळा आहे. त्यांतूनच शास्त्रशुद्ध चिकित्सेचा वर्ग निर्माण झाला तर हवा. पण ती चिकित्सावृत्ति निर्माण व्हावयास फार मोठा व्यासंग लागतो. असा व्यासंग त्यागाशिवाय निर्माण होत नाही आणि त्यागांत तर आह्मी फारच मागसलेले.

पुण्यांत कांही प्रोफेसर असे आहेत कीं, विद्याव्यासंगाप्रीत्यर्थ त्यांनी प्रपंचच केला नाही. रु. १५ वा २० घेऊन वाचणें हाच धंदा व लिहून काढणें हाच त्यांचा प्रपंच. कांही प्रपंच करतात. पण प्रपंचाला ५० रु. आणि व्यासंगाला इतका वेळ व वाङ्मयप्रसाराला इतका पैसा खर्च करावा हीच त्यांची

सदिच्छा. असे त्यागी व छंदी पुरुष महाराष्ट्रांतील वीरशैवांत निर्माण व्हावयास आजची परिस्थिती तरी खास अनुकूल नाहीं. ह्मणून शास्त्रीय वाङ्मयाच्या विकासाला आजची भूमिका अनुकूल नाहीं. तथापि वें वाङ्मय निर्माण होतें त्यावर टीकाकारांचा वर्ग निर्माण झाला पाहिजे. ही टीकाच उद्याच्या वाङ्मयाला पोषक होईल. टीकेंत व प्रतिटीकेंत गुण हा असतो कीं, त्या योगाने वाचकवर्ग निर्माण होतो. निर्बुद्ध व निरक्षर आणि सुबुद्ध व साक्षर हे दोघेहि स्वभावतः कलहप्रिय असतात. कलह ह्मटला कीं त्याला मौज वाटते. आणि मौज वाटू लागल्यावाचून कोठे काय चाललें हें वाचण्याकडे वा ऐकण्याकडे कशी प्रवृत्ति होईल ? ह्मणून कलहप्रिय जगताला झुलविणे हा टीकाकारांत गुण पाहिजे. पण टीकाकार व टीकाविषय हे इतके शिवरूप असावयास पाहिजेत कीं, कलहप्रिय जग आपले कोणी नव्हे. असलेच तर आपलीच लीला आहे एवढेंच वाटावयास पाहिजे. अशा वाङ्मयनिर्मात्यांना शिवजीवैक्यविवेचा आनंद लुटावयास सांपडतो. अष्टावरण व षट्स्थल ह्यांची प्राप्ति— खरी प्राप्ति वाङ्मयानंदांतच आहे ही जाणीव झाल्यावाचून खरें वाङ्मयच निर्माण होत नाही.

लघुकथा व शास्त्रीय वाङ्मय ह्यांत फरक असेल; पण आनंद हा दोहोंतहि आहे. लघुकथा-लेखकास लघुकथा लिहितांना जर आनंद झाला तर ती वाचतांना वाचकास आनंद होईल. वीरशैवांतील तरुणांत लघुकथा लिहिण्याची प्रवृत्ति होत आहे ह्यावरून दोन प्रकारचा बोध होतो. एक तर ह्या आधुनिक तरुण विद्वानांना कथा–कादंबऱ्यापलिकडे कांहीं जग आहे हें दिसतच नसावें; किंवा वाचावयास समजावयास अनुकरण हें सोपे जातें अशी त्यांची समजूत होत असावी. कदाचित् शास्त्रीय ग्रंथ वाचून चिकित्सापूर्वक विचार करावयास लागणाऱ्या बुद्धिमत्तेचा त्यांचे ठिकाणीं अभाव असावा. विद्यापीठांत शिक्षण घेतलेला वा घेत असलेला तरुण जेव्हां लघुकथाकडे वळतो तेव्हां ह्याशिवाय दुसरें काय ह्मणावें ? पण ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, लघुकथा लिहिणें हें गौण वाङ्मयाचें लक्षण आहे असें आह्मीं समजतों. एकाचें हृदय दुसऱ्यास-विशेषतः सामान्यास समजावयाला लघुकथा हा एक अत्यंत सुगम मार्ग आहे. वीरशैवांत अगोदरच वाचकवर्ग कमी. श्रोतृवर्गहि कमी. कारण नवे विचार वा कल्पना कथा-कीर्तनाच्या रूपानें सांगण्याची प्रथा कमी. महाराष्ट्रांत ती जवळ जवळ नाहींच. वाचकवर्ग व श्रोतृवर्ग मिळालाच तर 'पार्वती सांगे महादेवाला गर्भाच्या खुणा' ह्या प्रकारास अधिक. शंकर-पार्वतिसंवादाचें पुराण 'अ' नें वाचावें व निरक्षर 'ब' नें हावभावासह त्याचा अर्थ सांगावा आणि अवांतरानें तो भक्तिभावानें ग्रहण करून नारळ, तांदूळ, वस्त्र व दक्षिणा पुढे करावी हाच थाट. ह्यांत काव्य आहे, वाङ्मयहि आहे, आनंदहि आहे, हें खरें; परंतु प्राप्त परिस्थितिविषयीं अज्ञान आहे एवढाच दोष असल्यामुळे, अशा श्रवणांत व निदिध्यासांत गुंग झालेला पुरुष उत्कर्षाला गेल्याचा अनुभव गेल्या पन्नास वर्षांत येत नाहीं. ही स्थिति घालवून, लघुकथांच्या द्वारे सर्व आबालवृद्धांच्या कानावर नवा विचार घातला पाहिजे.

ह्या दृष्टीनें लघुकथा ज्याला लिहावयाची त्याला सभोवतालची आपल्या समाजाची अंतःस्थिति काय आहे हें समजलें पाहिजे. नव्हे, ह्या स्थितीचें त्याला सूक्ष्म निरीक्षण पाहिजे. एवढ्यावरच थांबतां येत नाहीं; तर ह्या स्थितींतून मुक्त व्हावयास समाजाला काय व कसें वळण लागलें पाहिजे ह्याविषयींहि त्याचे विचार निश्चित पाहिजेत. वीरशैवसमाज ह्मणून त्याचें शरीर एकच असलें तरी अवयवभिन्नता व इंद्रियभिन्नता ही जशी त्या

शरीरांत असते व त्याचा भागच असते तद्व-तच समाजरूपी शरीरासहि अनेक अवयव व इंद्रियें असतात. गुरु, पत्नी, माता, पिता, बंधु, पुत्र आणि मित्र व समाजबंधू ह्यांच्याशीं कसें वागले असतां ऐहिक व पारमार्थिक सुख लाभेल हीं गोष्ट जबाबदारीनें परिस्थितीनु-सार मनुष्य शिकला तरच तो उत्कर्षाला जाईल. आमचे मठ कसे आहेत ? मठांत शिष्य कसे घेतात? भक्तवर्गांतील विषम चाली-रीती कशा व त्यांत सुधारणा कशा व्हाव्यांत, जुनें शिक्षण चांगलें कीं नवें शिक्षण चांगलें, कां कोणतेंच शिक्षण नसलेलें बरें? ' महिम्नः पारंते ' ह्मणणाराच पंडित का बेकन-मेकॉले घोकणाराच पंडित ह्याचाहि विचार झाला पाहिजे. तात्पर्य काय, लघुकथा लिहिण्यापूर्वी लघुकथा कोणाकरितां व कशाकरितां लिहा-वयाची ह्याचा विचार प्रथम परिपूर्ण रीतीनें व्हावयास पाहिजे. ह्मणून लघुकथेला तात्पर्यार्थ पाहिजे. इसापाच्या गोष्टी व पंचतंत्रांतील कथा ह्यांत नीतिपाठ आहे. मनोरंजना-बरोबर नीतिपाठ आहे. ह्याकरितां मनोरं-जनाबरोबर नीतिपाठ देणें असें लघुकथेला ध्येय असावयास पाहिजे. एखादे वेळीं प्रति-पक्षाची प्रबुद्ध रीतीनें थट्टी उडविणें हेंहि लघु-कथेला ध्येय असतें. पण ही कला ज्याला साध्य होते तो फारच मार्मिक व व्यासंगी असतो.

गुरुविरक्तवादांत वा नवमतवाद व सना-तनीवादांत अशा वृत्तीच्या लघुकथा कांही लेखक लिहितात. पण त्यांत त्यांचा त्यांनाच आनंद वाटतो. तिऱ्हाइतास आनंद वाटणें व तो देणें हें जें एक वाङ्मयाचें प्रमुख अंग असतें ह्याचा त्यांत अभाव असतो. लघु-कथेंतील संवाद ह्मणजे मद्यपीठावरील मद्य-प्यांची महासभा नव्हे. लघुकथेला एखाद्या कृतीची कल्पना प्रथम सुचावयास पाहिजे व तिचा आरंभ असा चमत्कृतिपूर्ण रीतीनें करावा कीं, पहिलीं वर्णनात्मक वा संवादात्मक अशीं एक-दोन वाक्यें वाचतांच ती वाचावीच असें वाचकास वाटावयास पाहिजे. त्यांनी ती वाचतांच मित्रास वा इतरास वाचावयास दिली पाहिजे वा सांगण्याकडे त्याची प्रवृत्ति झाली पाहिजे. इतकें त्यांत चित्ताकर्षकत्व पाहिजे. भाषा उगीच क्लिष्ट व अनर्थपूर्ण शब्दांचा संग्रह केलेली नको; तर भाषा साधी, ठसठशीत, पण अर्थपूर्ण व मोजक्या शब्दांची पाहिजे. असे लघुकथालेखक जर वीरशैवांत निर्माण झाले तर निरक्षर वीरशैव उद्या साक्षर होईल आणि त्या लघुकथा वाचून ज्ञान संपादन करण्याची त्यांच्यांत आवड उत्पन्न होईल. भगिनीवर्गहि अशाच प्रकारें उत्क-र्षाला येईल अशी आह्मी आशा बाळगतो.

---

## लातूर

येथे ता. ५-१२-३७ रोजी पांगेकरांचे मठांत सभा बोलावण्यांत येऊन खालीलप्रमाणें कार्य-कारी मंडळाची निवड करण्यांत आली.

व्यवस्थापकः—श्रीमंत शंकरअप्पा उरगें, प्रभुअप्पा जवळे, मन्मथअप्पा कोराळे, मन्मथ-अप्पा राचोटें, चन्नाप्पा अंकलकोटें.

प्रचारक आणि खजीनदारः—श्रीमंत त्र्यंबक-अप्पा गिरवलकर, प्रभुअप्पा निगुडगें, वैजनाथ-अप्पा शेटें वकील, वैजनाथअप्पा कोरे.

कायद्याचे सल्लागारः—श्री. मलकार्जुनअप्पा तोडकर, श्रीं. संग्रामप्पा शेटकार, नागनाथ स्वामी वकील.

सेक्रेटरीः—श्री.देशीकेंद्र स्वामी.

प्रत्येक जिल्ह्यांतील वीरशैवांनीं सभासद वाढवून सभेचें कार्य यशस्वी करावें अशीं विनंतीपूर्वक सूचना सभेचे सेक्रेटरीकडून करण्यांत आली आहे.

# फुलावरील डाग

लेखकः—
श्री० मा० भी० सोलापुरे,
कोल्हापूर.

"खळखळ किती होय ऽऽऽमनीऽऽ" हा चरण मी आपल्याशींच पण किंचित् मोठ्यानं गुणगुणत आणि जिन्याच्या पायऱ्या लगबगीनं चढून वर माझ्या खोलींत प्रवेश केला. नेहमीच्या संवयीप्रमाणं दाराकडं वळून पाहिलं तों तेथें हास्यमुखानं आणि कौतुकानं माझ्याकडे पाहाणारे दोन नेत्र आढळून आले नाहीत. "आं! रजनी गेली कुठं ?" असं ह्मणत कपडेसुद्धा न उतरतां मी तिच्या खोलींत जाऊन पाहातों तों रजनी कॉटवर बसून गादीच्या सुरळीवर मस्तक टेकून हुंदके देत आहे! मी तिच्या जवळ जाऊन ह्मटलं, "असं काय बरं करतेस! अशानं मला किती वाईट वाटतं याची तुला कल्पना आहे का! बाळ गेला तो तूं काय आपल्या अशा रडण्यानं त्याला परत आणणार आहेस थोडंच!"

"बाळ!" माझ्याकडं विस्फारित नेत्रानं पाहात ती ह्मणाली "त्याच्याबद्दल मला किंचित्सुद्धा दुःख वाटत नाही. कठोर हृदयाची ह्मणाल मला. पण त्याबद्दल मी कां दुःख मानू? माझ्या नाशावर उठलेलं पाप तें!"

"मग असा कां बरं त्रास करून घेतेस?"

"तुह्माला मी विनाकारण त्रासांत लोटलं—दुःख दिलं! तुमच्या सुखांत माती कालविली. तुह्माला सध्याच्या जीवनांत सौख्य आहे का? त्यापेक्षा माझाच नाश झाला असता तर किती बरं झालं असतं!"

"वेडी आहेस झालं! कोण ह्मणतो मी दुःखांत आहें ह्मणून? रजनी, फुलावर डाग पडला ह्मणून का आपण सुंदर फूल फेकून देतो?"

"पण अशानं माझं समाधान होत नाही. तो डाग नव्हे काही; मी निर्माल्यच झाले आहे."

"अहो वेडाबाई, पुरें करा तुमचं तत्वज्ञान." असें ह्मणून मी तिच्याजवळ बसून तिचे हात आपल्या हातांत घेतले, आणि तिचे डोळे पुसून ह्मटलं "हूं! हांस पाहू, हांस! हंसली हंसली छबकडी हंसली!" आणि रजनी खरोखरच खुदकन हंसली आणि "अय्या! अजून चहा करावयाचा आहेच की" ह्मणत आंत पळाली.

नंतर आह्मी दोघांनीं चहा घेतला. गप्पागोष्टी केल्या. नेहमींचा कार्यक्रम यथास्थित पार पडला. जेवण झाल्यावर मी सिगारेट ओढीत धूम्रवलयांच्या स्वैर विहाराकडं पाहात बसलों असतांना मला सायंकाळचा प्रकार आठवला, आणि खरंच मलासुद्धां कधीं केव्हां 'तुमी बायको कलंकित आहे' अशी आंतून टोचणी होतेच. पण मी पुरुष असल्यानं

त्याला सहजासहजी दडपून टाकूं शकतो आणि रजनीचं अपराधी मन तिला खात असतं एवढाच फरक! माझ्या दृष्टिसमोर तो सर्व देखावा उभा राहिला. मीं डोळे झांकून घेतले तरी अंतःचक्षू कसे मिटणार? माझ्या दृष्टिसमोरून तो गतकालाचा चित्रपट सरकूं लागला.

त्या दिवशीं अनपेक्षित असं रजनीचं पत्र आलं. आणि आश्चर्यहि वाटलं म्हणा ना! एरव्हीं तिनं कितीहि रुक्षपणानं पत्र लिहिलं असतं आणि त्यांतून माझ्यावरील प्रेमाचा सूर वाहिला असता तर माझ्या आनंदास पारावार राहिला नसता! पण त्यांत अंतःकरणाचे बोल नव्हते, हृदयाची मुकी भाषा नव्हती. जर तिनं माझ्या प्रेमाची कबूली दिली असती तर मीं तें पत्र सोन्याच्या चौकटींत बसविलं असतं! पण त्या पत्रांत रजनीनं माझ्याकडं दयेची याचना केली होती!

ती फारच मोठ्या संकटात आहे, आणि त्याचा परिणाम किती भीषण होणार आहे, याचं तिनं चित्र रंगविलं होतं, आणि शेवटी माझ्याकडं आसरा मागितला होता. असं असहाय्य झाली म्हणूनच ती माझ्याकडं येत आहे, एरव्हीं तें कांहीं शक्य नव्हतं, हें मला सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट दिसत होतं. पण मला असली दीनदुबळी रजनी नको होती, तर बेदरकारपणें जगाचे बंध तोडून 'अदकेपार' होणारी माझी प्रेमदेवता हवी होती.

मीं तिजवर निस्सीम प्रेम केलं होतं ही कल्पनाच मला आता हास्यास्पद वाटत होती. तिच्या सहवासाची अपेक्षा एकेकाळी माझ्या मनांत होती; पण पुजाऱ्यावर दगडाची देवता कधी तरी प्रसन्न झाली आहे का? माझं प्रणय-रम्य स्वप्न उद्ध्वस्त झाल्यामुळे, जीवितांतील ध्येयं स्वाथ मीं कायमचंच उठविण्याचा निश्चय केला. सभोवारच्या पुस्तकांनी सांगितलं, "वेडारे वेडा! भंगलेल्या प्रेममूर्तीच्या चिंतनांतच काळ घालवावयाचा असेल तर जगांत मानाची व महत्त्वाची जागा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा कशाला बाळगिली आहेस?"

पहिल्याच खेपेला हा जबरदस्त तडाखा बसल्यानं, विषाची परीक्षा पुन्हा पाहाण्यात काय अर्थ होता? आरंभिच मिळालेल्या या प्रणय-विफलेच्या जबरदस्त धक्क्याची नुसती आठवण-देखील माझ्या हृदयाचा थरकांप करी.

पण तीच माझं हृदय चिरणारी रजनी माझ्या अखंड स्नेहाची याचना करण्यासाठीं येत होती! हा दैवाचाच विलास नव्हे का?

पत्रांत लिहिल्याप्रमाणं ती आली. मीं दार उघडलं. जीवदानाच्या याचनेची पराकाष्ठा करूनहि न द्रवणाऱ्या क्रूर मारेकऱ्याकडे अगदी शेवटच्या क्षणांत पाहाणाऱ्या निराश आणि हतबुद्ध कैद्यासारखी मला तिची दृष्टि भासली.

प्रातःकालच्या दंवमौक्तिकांनी वेष्टित अशा हंसऱ्या कळीसारखा भासणारा तिचा चेहरा आता भर दोनप्रहरच्या उन्हानें कोमेजलेल्या फुलासारखा मला निस्तेज वाटला. तिच्या त्या खट्याळ डोळ्यांतील तेजानं तर कुठं दडी मारली होती कोण जाणे!

जिनं माझ्यासाठी स्वतःचं दार बंद केलं होतं, तीच रजनी आज माझ्या दारांत याचनेची अपेक्षा करीत उभी होती. ती आंत आली आणि एका खुर्चीवर बसली. अद्यापि कोणीहि बोललं नव्हतं. मी उठून चहाच्या तयारीला लागलों.

"चंद्रकांत, मला नको तो चहा."

"कां?"

" जगाच्या कटु अनुभवानं माझं तोंड इतकं कडु झालं आहे कीं, तें आतां कशानेंहि गोड होणें शक्य नाही. कशाला पाजतोस तो चहा! त्यापेक्षां एखादं विष नाही कां ? म्हणजे सुटेल तरी यातनांतून. "

" हूं ! " असं म्हणत मी विषयाच्या गंभीरतेकडं लक्ष देऊन चहाप्रकरण थांबविलें.

" चंद्रकांत, मी इथं आल्यावर तूं तरी फाडफाड बोलशील, उणी-उत्तरं देशील, आणि तेवढं तरी समाधान मला मिळेल, अशी मला आशा होती. पण तूं तरी मला सहानुभूतीनंच मारतो आहेस. " तिनं मोठ्या आशेनं माझ्याकडं पाहिलं.

" असंच काही समजूं नकोस. भलतीच आशा उराशीं बाळगणं. ............"

" चंद्रकांत, मोठ्या आशेनं मी तुझ्याकडं आलें ! झालं गेलं तें विसरतां येणार नाही कां ! " मोठ्या आर्जवाच्या स्वरांत बोलत होती, आणि ती उठून कॉटवर जाऊन बसली.

एकेकाळी ' चंद्रकांत, तुझ्या प्रेमाला रुकार देऊन मी कोणत्या आधारावर सुखाची अपेक्षा करूं ? तुझ्याजवळ मन गुंतण्यासारखं काय आहे ?' असं विचारणारी कठोर कामिनी आज चंद्रकांताजवळ याचना करीत होती! आज तरी चंद्रकांताजवळ काय होतं ?

"प्रेमभंग काय अगर मानभंग काय, विसरून जाण्यास मनुष्याला मानापमानाची चाड नसती अगर भावना नसत्या तरच या गोष्टी शक्य होत्या ! अगदी कठोरतेनं एखाद्याला धिक्कारणाऱ्या मृदु मनाच्या स्त्रीजातीला निराशा कशी असते हें ठाऊक का कळवावयाला ? त्याशिवाय कां ........ "

अगदीच दीन झालेल्या तिच्या अभिमानास अशा तऱ्हेनं डिवचल्यामुळे क्षणभर मला अघोर समाधान झालं. पण तिच्या जखमेवरची खपली काढून त्यावर असं मीठाचं पाणी ओतायाला नको होतं असं वाटून लगेंच मीं मुख खालीं वळवलं.

कारण ती संकटांत होती आणि तिनं मला मोठ्या संकटांत घातलं होतं ! तेव्हां ........

मी तिच्यावर उत्कटपणें प्रेम करीत होतो. पण तिच्या मनाचा ओढा दुसरीकडे होता. पण तिनं विश्वासानं त्याच्या हातांत दिलेला गळा केसानं कापून, येणाऱ्या जबाबदारींतून मुक्त होण्यासाठीं तिच्या प्रियकरानं कुठें दडी मारली कोण जाणे !

दोन महिने मोठ्या कष्टानं घरच्या मंडळीपासून छपवीत आणलेलं पाप उद्या तिच्या आणि वडीलांच्या तोंडाला काळं फांसणार होतं. म्हणूनच ती झुरणीस लागली होती.

लग्नाच्या नांवाखाली मात्र ह्या कलंक सहज झाकला जाणें शक्य होतें. ! लग्न ! कुमारी मातेचं लग्न!! कोण करणार तिच्याशीं लग्न!!! तिच्यावर जीवापाड प्रेम करणारा, तिच्या दुःखाशीं समरस होणारा, माझ्याशिवाय कोण होता ? आणि म्हणूनच ती माझ्याजवळ माझ्या नांवानं भाळीं कुंकुमतिलक लावण्याची मागणी करीत होती.

कांहींच विचार न करता जुळणाऱ्या गोष्टीपैकीं लग्न आहे असें मला वाटे ना. कुमारिकांचीं पापं छपविण्यासाठीं का लग्नसंस्था निर्माण केली आहे ? वास्तविक स्त्रीसहवासाची अपेक्षाच ज्याला नव्हती तो काय म्हणून बंधनांत पडेल ? ज्या स्त्रीबद्दल

माझें मन विटलें होतें तिच्याबद्दल लग्नाच्या होमहवनांतून का सहानुभूति उत्पन्न होणार होती ?

आमचा जुना स्नेह लक्षांत घेऊन आणि आपल्या लाडक्या मुलीच्या इच्छेस्तव कदाचित् तिच्या वडिलांनी आमच्या लग्नास अनुमती दिली असती, श्रीमंतांचा जांवई होऊन पदोपदीं भास-णाऱ्या अडचणी दूर झाल्या असत्या.

पण पैशांवाचून कितीहि नडलें, तरी अब्रूची चाड असणाऱ्या कोणत्या महत्वाकांक्षी तरुणाला असली कलंकित कुमारी रुचली असती ?

कदाचित् तिच्यावरील माझ्या प्रेमानं विजय मिळविला आणि मी तिच्याशीं लग्न केलं तर तिचं रहस्य झांकलं जाईल. घराण्याची अब्रू वांचेल. पण कर्तृत्वाचा उन्माद चढल्यावर कीर्तीची आणि ऐश्वर्याची स्वप्नें पडत असतांना आपण एका कलंकित कुमारिकेशीं जन्माचें बांधलें गेलों आहोंत हीं टोचणी मनाला लाग-णारच. त्याला काय उपाय ?

होणाऱ्या मुलासाठीं तिला माझ्या आधारावर जगावेसें वाटत असेल; तरी माझ्या जगण्यांत काय स्वारस्य उरणार ? तिला झालेलं मूल उद्यां घरांत रांगूं लागलं म्हणजे माझ्या मनाची काय स्थिति होईल ?

विस्कळित झालेल्या गृहराज्याच्या आधा-रावर सामाजिक जीवनाचा भव्य डोलारा उभा करणं विदान मला तरी शक्य वाटत नव्हतं. पण ................

रजनीशीं लग्न करून मी दुःखाच्या गर्तेंत कां उडी घालावी ? आपल्या जीवनाचा कां चुराडा करून घ्यावा ?

"चंद्रकांत, नकोरे असा निष्ठुर होऊं" हाताच्या तळव्यांत तोंड झांकून रजनी रडत होती.

"मी तुझ्याजवळ प्रेमाची मागणी करीत नाही. केवळ मला माणुसकीचं दान हवं आहे. तें देण्याचा मोठेपणा तूं करणार नाहीस कां ? मीं अशीच रिक्त हस्तानं परतूं म्हणतोस!"

मी द्रवण्याचें कांहीच चिन्ह दिसेना, म्हणून तिनं क्षणभरानं आपली अश्रुपूर्ण दृष्टि हतः बुद्ध होऊन अबाधितपणें कुठंतरी लावली. मी देखील विचारांच्या भारानं स्तब्ध बसलों होतों. मीं विचारांतीं निश्चय केला. निश्च-याचं समाधान माझ्या चेहेऱ्यावर झळकलं. अन् त्याचवेळीं रजीननं माझ्याकडं शून्य दृष्टीनं पाहिलं. मीं स्मित केलं तें हास्य उपहासासाठी नव्हतं तर......

"चंद्रकांत"

"रजनी"

मी पटकन कॉटवर बसून तिला आपल्या हृदयाशीं ओढली. तिनं पण माझ्या गळ्यांत हात टाकून माझ्या हृदयावर आपलं मस्तक टेंकलं. जणूं काय ती माझ्या हृदयाचे बोलच समजून घेत होती ! या दिव्य आनंदाचा उपभोग घेतांना तिच्या नेत्रांतून घळघळ अश्रुधारा वाहात होत्या.

"किती विशाल हृदय आपलं !" रजनी पुटपुटली

"कांहीतरी बोलतेस झालं ! रजनी, तुझ्या हकीकतीनं माझा तोल गेला तो सांवराव-याला इतका वेळ लागला. या जगांत काट्यान वाचून तुला कुठं गुलाब पहायला मिळालाय कां ? मग कांटा बोचला म्हणून फूल कां चुरगळून टाकायचं ! फुलावर डाग पडला म्हणून फुलाचा गुणधर्म कां नष्ट होणार आहे! तसंच, तुझा हा डाग म्हणजे 'कलंकशोभा' च नव्हे कां ?"

त्यानंतर लौकिक विधी पार पडून रजनी माझी झाली. योग्य समयीं तिनं मातृपद गांठलं. त्या बालकाचा पिता कोण ? मी ! होय ! लौकिकदृष्ट्या मीच. पण माझ्या नांवाची बदनामी करण्यास तें फार दिवस टिकलंहि नाहीं. त्यानं लवकरच जगाला रामराम ठोकला.

आणि मी रजनीशीं लग्न केलं नसतं तर ?

तर काय ! आत्महत्या. मग तिच्या......

किंवा पतिता ह्मणून हेटाळणी अन्......

छे ! किती भयंकर विचार !

" स्‌ऽस्‌ऽ " असा माझ्या तोंडून ध्वनि निघाला. कारण मी डोळे मिटून विचारांत मग्न असतांना सिगारेट जळत बोटापर्यंत आली होती आणि तिनं माझ्या बोटांना चटका दिला. पण त्याचवेळी कॉटवर बसून माझ्याकडं पाहात असलेली रजनी खट्याळपणानं हंसून ह्मणाली, " एवढा कसला विचार करताय तो ? "

" अग तुझाच " ह्मणत मी पटकन तिच्याजवळ जाऊन बसलों,

आणि पुढे ?............

पुढे काय ?

हें मीं काय सांगायला पाहिजे !

---

# वीरशैव संजीवनीच्या टपालांतील—

# मौजेची प्रश्नोत्तरें:—

**ग. ना. काटकर नागमीड**

संजीवनीच्या सर्वांगीण उन्नतीविषयी झटावें! ठराविक चाकोरी आजच्या सुधारणेचे कालांत उपयोगाची नाहीं.

( स्तुत्य उपदेश ! पण प्रत्येकानें संजीवनीला नव्या मार्गावर जाण्याकरितां थोडा हातभार लावणे अवश्य आहे असें नाही कां आपणास वाटत! प्रत्येकाने एक एक जरी अधिक दर्जेदार संजीवनीला मिळवून दिला तर द्विगुणित उत्साहाने ती कार्यक्षम होईल असें आश्वासन देता येणे शक्य आहे. )

**आ. स. खाडके, चाळीसगांव**

आपण स्वामी कंदर्पानंदांचे संदेश प्रसिद्ध करीत अहा ते खरोखरच अत्यंत मननीय आणि चूरचुरीत असतात. त्यापुढें धार्मिक चर्चा न करता सार्वत्रिक राजकीय चर्चा करण्याचें स्वामीच्या मागील संदेशामधून जाहीर केलें आहे. तेव्हां हें असें कां? धार्मिक चर्चेकरतां स्वामी अनभिज्ञ आहेत, कीं स्वामीनी स्वखुषीनेंच राजकीय विषयाला वाहून घेण्याचें ठरवलें आहे ?

( आपणास धार्मिक चर्चाच हवी असल्यास स्वामी हातखंडा तो आपली मनीषा पूर्ण करं

शकतात. पण आपण हें समजायला पाहिजे कीं, स्वामी ह्मणजे स्वामी ! ते दुसऱ्याच्या कलानें चालणारे नसून स्वतःच्याच कलाने वागणारे असतात ! आमचे कंदर्पानंद ह्मणजे अजब व्यक्ति! केव्हां कशाची चर्चा करतील याचा नेमच नाही. पण एवढी आह्मी खात्री देऊं शकतो कीं, त्यानी कोणताहि विषय चर्चेला घेतला तरी तो मजेमजेत मंडन करण्यांत त्यांचा हातखंडा हेंच आपल्या अनुभवाला येईल.)

---

ग. शेटे, वडगांव

परवा मी नुकतेच एका मासिकामधून वाचलें आहे कीं, अनैसर्गिक प्रजोत्पादन ह्मणजे एक अजबखाना असून एका वानरीला मनुष्य-संभोगापासून झालेल्या माणसाचा फोटोहि त्यात दिला होता. असल्या संभोगाला शास्त्र-सम्मत ह्मणता येईल का ?

( याचें उत्तर पाहिजे असल्यास आपण प्रो० कर्वे, संपादक 'समाजसेवक', यांचेकडे विचारणा करावी अगर आपणास असले संभोग शास्त्रसंमत आहेत कीं नाही हें सिद्ध करण्याची महत्वाकांक्षा असल्यास आपणहि एकदा पशुसंभोगाचा प्रयत्न करून स्वानुभवानें ठरवावें ह्मणजे कळेल ! )

---

ह. धो. बेडके करमाळे.

परवा एका सामुद्रिक ज्योतिषानें मला लवकरच भार्यावियोग होईल असें सांगितले, आणि तेव्हांपासून 'पुढें काय, आणि कसे करायचें' याच विवंचनेंत मी रात्रंदिवस तळमळतो आहे !

(आपणास भार्यावियोग होऊं नयें असें खरोखरच वाटत असल्यास तावडतोब एकादी भार्या शोधून काढा आणि पहिलीचा वियोग होण्याचें आधींच टाका वार उरकून. बघु बरें कसें ज्योतिषाचें भविष्य खरें ठरतें तें ! एक गेली तरी दुसरी राहील, नाही तर एकसे दो भले ! )

---

सो रा. मटंगे,

यात्रेच्या प्रसंगीं आह्मी येथील देवालयांत दर्शनाला गेलों असतांना आमच्या छबीची शेपटेवजा वेणी कुणी तरी कापून घेतली आणि तेव्हापासून पोर सारखी झुरणीस लागली आहे. काय करावें कांही सुचत नाही.

( आपल्या छबीची वेणी कुणी कापून घेतली का तिनेंच यात्रेच्या निमित्तानें भेटलेल्या आपल्या एकाद्या छबिल्या स्नेह्याला प्रेमाची खूण ह्मणून बहाल केली याची नीट चौकशी करा, आणि तसें कांही असल्यास छबीला थोडी अधिक स्वतंत्रता देऊन हवा-पालटाकरिता बाहेरगांवीं जाण्याची परवानगी द्या ह्मणजे सर्व कांही सुरळीत होईल.)

---

रं. मु. गाढवे, नेर,

गतवर्षीच मुलाचें लग्न झालें, मुलगी उपवर आणि नक्षत्रासारखी. पण दोघांचें मुळीच पटत नाही ! काय करावें ?

( दोघापैकी कुणाच्या पायावर नक्षत्र पडलें आहे हें नीट तपासून पहा, आणि एकाद्या जाहीराती योगीराजाकडून एकादे मोहिनी यंत्र वा ताईत मागवून द्या झालें !

हा तोडगा जर फसला तर आज नाहीं उद्या कशाहि प्रकारें एकादें मुलबाळ झाल्यावर, न पटणाऱ्या गोष्टी देखील पटू लागतात हा अनुभव आपणासहि आल्यावांचून राहणार नाही.)

# श्रेष्ठ आनंद

[ ले०—एन्. एम्. राजगिरे, एरंडोल (पू.खा.). ]

आनंद दे मनाला ।
पीडितांस तोषवितां ।
आनंद त्यांत मानी ।
दुसऱ्यांस मोद होतां ।
मम दीन बांधवांच्या ।
डोळ्यांत अश्रु येतां ।
तें नीर लोचनींचें ।
पाहोन दुःख होतां ।
आहे, असेल माझे ।
देऊन तुष्ट करितां ।
रिझवी मनें तयांचीं ।
दुःखाश्रुपात खळतां ।
हंसती प्रसन्नतेने ।
हंसतों सवेंच हंसता ।
मी हृष्ट होई तेव्हां ।
हृत्कमळ तें विकसतां ।
स्वानंद त्यांत होई ।
आनंद श्रेष्ठ परता ।
नाहीं कुठेंच गमला ।
मज ज्ञात होय आतां ।
हें ज्ञान मज मिळालें ।
झालों, गमे मी ज्ञाता ।
हा हृद्विलास माझा ।
वाढो अशीच ममता ।
सेवेस देह लागो ।
सर्वांभुतींच समता ।
देवो प्रसाद इतुका ।
तो सृष्टिचा नियंता ॥

# भक्त माहेश्वर डोळे उघडतील काय?

( सिद्धरामप्पा बसप्पा घुम्मा, वकील, सोलापूर, )

आपल्या पंचाचार्य – प्रणित पुरातन वीरशैवसमाजांत प्राचीन कालापासून ज्या बऱ्याच भल्या-बुऱ्या चाली आजतागायत चालत आल्या आहेत त्या समाजपोषक आहेत कीं समाजशोषक आहेत त्याचा समाजहितचिंतकांनीं वेळींच विचार केला नाही तर बऱ्याच रूढ असलेल्या वाईट चालीपासून समाजास आज ना उद्या जबर धक्का पोंचल्याशिवाय राहणार नाहीं! अग्निनारायणापासून मनुष्यमात्रास जरी पुष्कळ सुखसमाधान मिळण्यासारखें असलें, तरी त्याचा उपयोग करण्याचे कामीं, कोणाकडून कां होईना, जर का थोडीशी हयगय झाली तर तोच अग्निनारायण हां हां म्हणतां त्याचें असेल नसेल तें सर्वच स्वाहा करून त्या बिचाऱ्यास देशोधडीस लावल्याशिवाय कधींच राहणार नाहीं हा त्याचा नैसर्गिक धर्मच होय, करितां आपल्या समाजांतीलच नव्हे तर इतर कोणत्याहि समाजबांधवांनीं आपल्यांतील कोणत्या चाली समाजतारक आहेत व कोणत्या मारक आहेत याचा नेहमीं विचार करुन, समाजघातक असतील त्या सर्वच चालींचा शक्य तितक्या लौकर समूळ नायनाट करण्याचा एकजुटीनें प्रयत्न करावा. व असें करण्यांत जर कोणीं जरुर ती निर्भीडपणा व निर्भयपणा दर्शविण्यास कुचराई केली, तर आपणच आपल्या समाजाचे वैरी होऊन त्यास आपल्याच हातांनीं मूठमाती देण्याची आपली तयारी दर्शविण्याइतकें आत्मघातकीपणाचें आपलें तें वर्तन होणार नाही काय?

वरील तत्वाच्या अनुरोधानें कोणी आपल्या या वीरशैवसमाजांतील प्रचलित सर्व चालीरीतींची बारकाईने चौकशी केली तर कदाचित् त्यांस अशा बऱ्याच चाली मिळूं शकतील कीं त्यांपैकी कांहींना तरी अगदी तूर्तातूर्त गचांडी देऊन समाजाबाहेर घालविणेंच इष्ट वाटेल, तर बाकीच्यामध्ये जरूर ती सुधारणा केल्यास त्या समाजोपयोगी म्हणून तशाच पुढें राहूं शकतील!

आतां मी आपल्या समाजांतील सर्व चालीरीतींचा वरील धोरणानें विचार केलेला नाही, अगर त्या दिशेनें विचार करण्यास लागणारें जरूर तें धर्मग्रंथवाचन माझें झालेलें नाही हें मला प्रथम नमूद करणें भाग आहे. कां कीं, आमच्या समाजांतील भक्त-माहेश्वरामध्ये पूर्ण धर्मशास्त्रविशारद असे शास्त्री, पंडित व विद्वान् पदवीधर आहेत व त्यांनी मनांत आणल्यास त्यांजकडून या विषयावर वेळीच योग्य प्रकाश पाडण्यात येऊन आमच्या या सर्वांगसुंदर सुधारणेच्या बाबतींत जरूर ती दिशाहि दाखविण्यांत येईल असा मला फार फार भरंवसा आहे!

आतां माझ्या अल्पसमजुतीने आमच्यांतील फक्त एकाच चालीबद्दल मला समाजापुढे माझी तक्रार ठेवावयाची ती ही कीं, आमच्या समाजांत मुख्यतः भक्त व माहेश्वर असे दोन भाग असून, माहेश्वरांमध्ये पुन्हा पंचाचार्य व विरक्त असे दोन वर्ग असून, भक्तांमध्येहि शीलाचाराने पंचम, दिक्षवंत, शिलवंत व धंदेवारीने चाटी, कोष्टी, माळी,

हटगर, बणगर वगैरे निरनिराळे वर्ग पडले आहेत. आपल्या समाजांतील प्रत्येक घटकावयवाचें अंतिम ध्येय ह्मणजे लिंगाचार, सदाचार, शिवाचार, भृत्याचार व गणाचार या पंच आचारांनी युक्त-राहून व गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, भस्म रुद्राक्ष व मंत्र या अष्टावरणाचें सहाय्य घेऊन भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी शरण व एक हीं षटस्थळें ओलांडून शक्ति-विशि-ष्टाद्वैतांतील शिव-जीवरूपांत ऐक्य पावणे ह्मणजेच अखंड मोक्षसाधन करणे हेंच होय ! पण हें मोक्ष साधणें ह्मणजे लिंगागसामरस्य-ज्ञान मिळविणें दररोजच्या प्रापंचिक व्यवहा-रांत मग्न होणाऱ्या व त्यांत वरचेवर उत्पन्न होणाऱ्या अडचणींतून व संकटांतून मुक्त कसें व्हावें याची अहोरात्र काळजी वाह-णाऱ्या भक्तांस कसें शक्य होईल याचा विचार करूनच आमच्या धर्मसंस्थापकांनी आपणांस तो मोक्षमार्ग अगदी सुलभ करून दाखविण्यासाठी गांवोगांवीं मठाची स्थापना करून व त्यांवर गुरुवर्गाची नेमणूक करून त्यांची धर्मकर्तव्येंहि ठरविलीं आहेत ! सदरी मठांतील पट्टाधिकाऱ्यांना आपल्या धर्माचें पूर्ण ज्ञान असणें जरूर असून, त्याप्रमाणें आपल्या भक्तांचें आचरण आहे किंवा नाही इकडे त्यांचें नेहमी लक्ष असणें जरूर आहे. जर कोणा भक्ताचें वर्तन धर्मबाह्य अस-ल्याचें त्यांना दिसल्यास त्यांस योग्य तो उप-देश देऊन अगर जरूर तें शासन करून योग्य मार्गावर आणण्याची जबाबदारी गुरु-वर्गावरच आहे; एवंच, प्रापंचिक भक्तवर्गाला मोक्षप्राप्तीसाठी गुरुवर्गच साधन आहे हें कोणासहि कबूल करावें लागेल. पण जो भक्तवर्ग प्रापंचिक व्यवहार संभाळून व ऐहिक सुख संपादन करून, ज्या गुरुवर्गाच्या कृपेनें मोक्षप्राप्तीचीहि इच्छा करितो, तो गुरुवर्गच प्रथम कसा असावा हाहि एक महत्वाचाच प्रश्न आहे ! कारण गणितासा-रखें एखादें गूढशास्त्र विद्यार्थ्यास नीट सम-जावून देण्यापूर्वी प्रथम शिक्षकास जसें त्याचें पूर्णज्ञान असणें जरूर आहे, तद्वतच भक्त-वर्गास मोक्षमार्ग दाखविण्याचे कामीं प्रथम गुरुवर्गास त्याचें ज्ञान अवगत असणें जरूर नाही काय ? आपला हल्लींचा गुरुवर्ग तसा ज्ञानी आहे काय ? नसल्यास तो कां नाही? याचा विचार समाजहितचिंतकांनीं करूं नये काय ?

वास्तविक पाहतां आमच्या समाजांतील पट्टाधिकाऱ्यांचा आपल्या धर्मातील परमपूज्य अशा श्रीशैल, केदार, काशी, उज्जयिनी व रंभापुरी या पंचसिंहासनापैकीं ज्या शाखे-तील भक्तवर्गाशी गुरु ह्मणून ज्या ज्या गुरुवर्गाचा संबंध येतो त्या त्या सर्व भक्तांना पारमार्थिक ज्ञान देऊन मोक्षपदास पोचवि-ण्याची धार्मिक जबाबदारी त्या त्या भक्तांच्या गुरुवर्गावरच नाही काय ? व ही जबाबदारी पार पाडण्यासाठी वरील गुरुवर्गानी व त्यावर अवलंबून असणाऱ्या आप्तेष्टांनी अगर जंग-मांनी [ जंगम हें माहेश्वरांपैकींच आहेत ] प्रापंचिक व्यवहार करावयाचा नसून, ब्रह्मचर्यव्रत संभाळून, धर्मशास्त्राचें अध्य-यन करून, व पवित्र आचरण ठेवून, भक्तांना धर्मोपदेश करावयाचा व नेहमी मठांत राहून ईश्वरभजन-पूजन व कीर्तन यांतच वेळ घालवून भक्तवर्गांत लिंगपूजेचें अधिक प्रेम उत्पन्न करावयाचें हींच त्यांचीं कर्तव्यें नाहीत काय ? व त्यांच्या कर्तव्याबद्दल अगर समाजकार्याबद्दल भक्तांकडून अगर समाजाकडून अन्न-वस्त्रादिरूपानें त्यांस जें सहाय्य मिळेल त्यावरच त्यांनी आपला उद-रनिर्वाह करावयाचा हीच पूर्वव्यवस्था ठर-लेली नाही काय ? व याचा अंमल भक्त व गुरु या दोन्ही वर्गाकडून योग्य रीतीनें झाला तरच सर्व गुरुशिष्यांस मिळून ह्मणजे पर्यायानें सर्व समाजासच मोक्षसाधन होणार नाही काय ?

पण हल्ली आपल्या समाजांत काय दिसतें तें पहा ! गांवांत कोठें निवांत जागीं मठाची स्थापना झालेली दिसणार नाही ! जर कोठें गर्दीचे ठिकाणीं मठ सांपडलाच तर तो मठासारखा भासणारहि नाही ! कारण सदरी मठाधिकाऱ्यांनी, त्याचें भाडें मिळविण्याचे आशेने, त्याचें केव्हाच वखारींत रूपांतर केलेलें असून, त्यांत केव्हांहि विद्वान गुरु-शिष्यांमध्ये चाललेली धार्मिक चर्चा अगर ईश्वरभजन, अगर कीर्तन, ऐकू न येतां धनवान भाडेकरी यांनी तेथे चालू केलेल्या कारखान्याचा कर्कश आवाजच कानी पडावयाचा ! बरें, समाजहितासाठीच स्थापन केलेल्या या मठांचें उत्पन्न तरी समाजकार्यींच खर्चण्यात येतें ह्मणावें तर तशीहि स्थिती नाही. सदरी मठांचें सर्व उत्पन्न फक्त मठाधिकाऱ्यांच्याच खाजगी सुखसोयींतच अगर त्यांच्या आप्तेष्टांच्या प्रापंचिक (पारमार्थिक नव्हे) अडचणी भागविण्यातच खर्च होत असलेला दिसेल ! मठांत मठाधिकाऱ्यांचे गैरहजेरीमुळें त्यांचें दर्शनहि घडणार नाही ! महत्प्रयासानें त्यांचें दर्शन झाल्यास व त्यांच्या विद्वत्तेबद्दल चौकशी करूं गेल्यास तें बहुतेक ब्रह्मचर्य व्रत पाळीत नसलेले, [ गृहस्थाश्रमी ] धर्मग्रंथ मुळीच न वाचलेले, मोक्षमार्गाचा गंध नसलेले, पण फक्त भगवीं वस्त्रें धारण केलेले असेच असावयाचे ! मुख्य गुरुवर्ग ह्मणविणाऱ्यांची जर ही स्थिति, तर त्याहून कमी अधिकारांच्या इतर जंगमांची कोण अवस्था असेल याची कल्पनाच केलेली बरी !

माहेश्वरवर्गास अन्न, वस्त्र, पैसा वगैरे दान दिल्याने आपणांस मोक्ष प्राप्त होतो ह्मणून आमच्या समाजांत जी अन्नदानाची रूढी पडली आहे तिचे मुळाशीं नुसती दानबुद्धि नसून, आमच्या गुरुवर्गीचें लक्ष फक्त पारमार्थिक विषयाकडे असल्यामुळे व आपणांस प्रपंच साधून परमार्थ मिळविण्यासाठी गुरु-उपदेशाची जरूरी असल्यामुळे, या त्यांच्या उपदेशाबद्दलच जरूर तो मोबदला ह्मणूनच सदरी दान देण्याची प्रथा अमलांत आलेली असावी. परंतु आतां पहावें तों त्यांत या उद्देशाचा मागमूसहि दिसत नाही ! आणि ह्मणूनच आमच्यांतील जंगमवर्गहि आपल्यावरील धर्माची जबाबदारी पार पाडण्यास हल्लीं अगदी नालायख व असमर्थ बनलेला दिसतो ! एवढेंच नव्हे, पण त्यास दिवसेंदिवस अधिक नालायक व असमर्थ आयीतखाऊ व बेजबाबदार बनण्यास आमच्या अंधश्रद्धाळू समाजच कसा कारणीभूत होत आहे हें या वर्गांतील लोकांच्या हल्लींच्या धंद्याकडे व राहणीकडे पाहिल्यास कोणासहि सहज दिसून येईल ! सदरी जंगमवर्गातील बहुतेक व्यक्ती, मग त्यांचा कोणत्या मठाशीं संबंध असो वा नसो, आपल्या गांवांतील लिंगायतांच्या घरोघर दररोज सकाळपासून दुपारपर्यंत "कोरान्न भिक्षा" [ दाणें, पीठ वगैरे ] मागण्याकरिता हातांत काठी धरून आपली चौपदरी फिरवितात व ती भरल्यानंतर घरांतील एका खुंटीस अडकावून दुपारी स्नान वगैरे करून एका भगव्या वस्त्राखाली आपल्या खांद्यास दुसरी चौपदरी अडकावून गांवभर पुन्हा शिवकांतीभिक्षा [ भाकरवगैरे शिजलेलें अन्न ह्मणून फेरी मारून ] भरलेली झोळी घेऊन घरीं परततात ! बरें आपणच फक्त हा धंदा करून आपल्या मुलाबाळांना योग्य शिक्षण व धर्मज्ञान देऊन आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालवितात ह्मणावें तर तेंहि नाहीं ! आपल्या घरांतील पांच वर्षांवरील चटसाऱ्या मुलांना-सुद्धां त्यांच्या हाता-खांद्यास सकाळ - दुपार वरीलप्रमाणें चौपदरी अडकावून त्यांना वरील "कोरान्न भिक्षेस" व शिवकांती भिक्षेस". गांवांत फेऱ्या करण्यास लावतात. आपल्या मुलांवा-

शिक्षण देऊन त्यांस समाजांत योग्य स्थान मिळ-वून देण्याबद्दल विचारहि त्यांस कधीं शिवत नाहीं! वरीलप्रमाणें आपण व आपल्या मुलांनीं गांवांत प्रभात व माध्यान्ह फेऱ्या करुन आणलेल्या अन्नावरच यथेच्छ निर्वाह करुन राहिलेला वेळ व पैसा, कवड्या-सोंगट्या खेळ-ण्यांत, अफू-गांजाचे व्यसनांत अगर नाटकें-सिनेमा पाहण्यांत घालवितात व दुसरे दिवशीं सूर्यनारायणाचें दर्शन घडतांच पुन्हां पूर्वीप्रमाणें बापलेकांनीं आपआपल्या भिक्षापात्रांनां हात घालून वरील फेऱ्या करण्यास सुरुवात केलीच ह्मणून समजा! अशी ही गुरुवर्गासच नव्हे तर सर्व समाजास लाजविणारी परिस्थिती समाजानें यापुढेंहि तशीच राहूं दिली तर आपल्या या गुरुवर्गांतील पुढील पिढी तरी कशी व केव्हां सुशिक्षित होणार? व आमच्या या गुरु-वर्गापासून आह्मा भक्तांस मोक्षमार्ग कधीं व कसा दिसणार ह्याचा समाजानें विचार करा-वयास नको काय?

"अति तेथें माती" या ह्मणीप्रमाणें आमच्यांतील फाजील अंधश्रद्धेमुळें व आत्मघा-तकी दानपद्धतिमुळें आमचे पदरीं पुण्याचा संचय होण्याऐवजीं उलट पापाचाच संचय होतो कीं काय अशी भीतिहि वाटूं लागली आहे! कारण आमच्यांतील जंगमवर्ग अगदी अशिक्षित व अज्ञाणी राहिल्यामुळें व या परिस्थितींतच त्यास समाजाकडून वरीलप्रमाणें सहाय्य होत गेल्यामुळें त्यास आपल्या जबाबदारीची जाणीव-सुद्धां राहिली नाहीं! इतकेंच नव्हे तर त्यापैंकी कांहीं जणांना साध्या नीतितत्वांचाहि विसर पडलेला दिसतो! कारण मी माझ्या स्वतःच्या अनुभवानें असें ह्मणूं शकतों कीं, भिक्षेच्या वेळीं संधी साधल्यास कोणासहि निंद्य वाटणारें असें चौर्य करावयासहि ते मागें पुढें पहात नाहींत! पवित्र मानल्या गेलेल्या व्यक्तींचा, समाजाच्या हयगयीमुळें जर वरील कर्म करण्यापर्यंत नैतिक अधःपात झाला तर अशा व्यक्तींकडून पुढे काय होणार नाहीं याबद्दल अधिक न लिहिलेलेंच बरें!

वरील लिखाणावरुन, मी आपल्या समाजां-तील जंगमवर्गाचे अस्तित्वावर त्यांचें उदर-निर्वाहाचें साधनावरच गदा आणीत आहे असा मात्र कोणीं गैरसमज करुन घेऊं नये, अशी माझी नम्र विनंती आहे. कारण माझा कटाक्ष जंगम-वर्गाचें अस्तित्वावर मुळींच नसून, आमच्यांतील अयोग्य दानपद्धतिवरच आहे हें मीं प्रथमच वर दर्शविलेलें आहे; पण "जंगम" ह्मटला ह्मणजे हल्लींचा "भिक्षाधिश" न दिसतां लक्षाधीशांपेक्षां ज्यास्त योग्यतेचा व सर्वपूज्य असा "मोक्षाधीश" च दिसावा हीच माझी खरी तळमळ आहे. "सत्पात्रीं दान करा" या शास्त्राज्ञेप्रमाणें मुके, आंधळे, पांगळे वगैरे निराश्रितांना जरुर तो दान-धर्म करुन पुण्य संपादन करा व ईश्वरकृपेनें आपणांस शक्य असल्यास गुरुवर्गसुधारणेसाठीं गुरुकुल, पाठ-शाळा, अगर शिक्षणसंस्था निर्माण करा व त्यासाठीं जरुर पडल्यास फंड उभारुन गुरु-वर्गामध्यें योग्य गुरुत्व आणून त्यांजपासून मोक्ष संपादन करा, वाटेल तो उपाय करा पण समाजांतील वरील समाजघातकी दान-पद्धतींत लौकर सुधारणा करा व समाजहित साधा! . . समाजकार्यकर्त्यांचे डोळे आतां तरी उघडतात कीं नाहीं हें पाहावें झालें! आणखीन काय?

---

## अमरावती

बुधवार ता. १-१२-३७ रोजी स्वातं-त्र्यवीर बॅ. सावरकर हे येथें आले असतांना नागरिकांचे तर्फे झालेल्या जाहीर सत्कारसमा-रंभात वीरशैवसमाजातर्फे श्री. भाऊसाहेब हेगु ह्यांनी त्यांस हार घातला.

---

# 'संजीवनी'-ला आश्रय द्या!

## रुपये दहा प्रमाणें मदत करा.

### 'संजीवनी'-ला नुकसान

संजीवनीचें पुनरुज्जीवन करून दोन वर्षे पूर्ण झालीं असून १९३८ च्या जानेवारीपासून तिसरें वर्ष सुरू होतें. गेल्या दोनवर्षांत दरसाल रु. ३०० प्रमाणें आह्मीं नुकसान सहन करीत आहो. ह्या नुकसानींची जबाबदारी आम्ही आमच्या 'अरुण उदय' संस्थेवर टाकली आहे व तीतूनच हें नुकसान आम्हीं सहन करतों.

### 'संजीवनी' चा आकार

१९३८ पासून तों १९४२ पर्यंत हें सतत नुकसान सहन करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. शिवाय आकार वाढवून मुखपृष्ट सुबक करण्याचेंहि आह्मीं ठरविलें आहे. 'संजीवनी' साप्ताहिक करण्याची कित्येकांची सूचना आह्माला योग्य वाटत नाही. कारण वाचकांवर उगीच टपालखर्च बसविणें योग्य नाही. शिवाय साप्ताहिक करून जातीविषयक मजकूर ताजा देण्यासारखा नसतो. सध्याच्या संजीवनी पाक्षिकांत इतका मजकूर असतो कीं, तो वीरशैवांच्या कोणत्याहि दोन साप्ताहिकांपेक्षां अधिक असतो.

### 'संजीवनी' चें धोरण

आमचा प्रतिनिधी ह्यानन्तर ज्या ज्या भागांत जाईल त्या त्या भागांतील वीरशैवांचा इतिहास व प्रमुख घराणीं ह्यांची माहिती तो प्रसिद्ध करूं लागेल. तद्वतच वीरशैवांतील प्रमुख गांवच्या प्रमुखांची चरित्रें जर आह्मांला कोणीं पाठविलीं तर तीं आह्मी आनंदानें प्रसिद्ध करूं. पण तो उद्योग कोणी करीत नाही. 'संजीवनी' ह्यानंतर पांच वर्षे तर आह्मी चालविणारच आहों. त्याकरिता रुपये दहाप्रमाणे आह्मीं आगाऊ वर्गणी मागितली आहे. व कांही कर्जहि मागितलें. तें अद्यापि पूर्ण झालें नाही.

### पांच वर्षांची वर्गणी आगाऊ

तरी पांच वर्षांची वर्गणी रुपये पंधरा भरण्यापेक्षां आगाऊ रुपये दहा देऊन पांच वर्षांचे आगाऊ वर्गणीदार होण्याचा जर निश्चय केला तर पांच वर्षांत वर्गणीदारांचे पांच रुपये वाचणार. असे वर्गणीदार फक्त पन्नास मिळावेंत एवढीच आमची अपेक्षा आहे. तरी रुपयें दहा पांच वर्षांबद्दल आगाऊ पाठवून 'संजीवनी' ला आश्रय देण्याची कृपा करावी.

### 'संजीवनी' चे आश्रयदाते

त्याचप्रमाणें 'संजीवनी' ला पंचवीस आश्रयदाते हवेत. त्यांनी रुपये दहाचे पांच कर्जरोखे घ्यावेत, आणि दरसाल रुपये दहाप्रमाणें सहा वर्षांत साठ रुपयें घेऊन कर्जफेड करून घ्यावी. असे आश्रयदाते आह्माला फक्त पंचवीसच पाहिजेत.

### सविनय प्रार्थना

वर्ष भरताच वर्गणीदारांनी आगाऊ वर्गणी पाठवण्याची कृपा करावी. वर्गणीशिवाय अंक चालू ठेवणें व मग यजमान भेटेल तेव्हा ती तोंड वेंगाडून मागणे हा भिक्षुकी थाट 'संजीवनी' च्या दरबारांत नाही आणि वाचक थोडे मिळाले तरी वाचकांना अशा संवयी लावणें, मग तो वाचक मोठा श्रीमंत असो वा उदार असो वा मोठा विद्वान असो, ह्याच्या आम्ही विरुद्ध आहो. नव्या वर्षाला अंक नकोच असला तर त्यानें तसें स्पष्ट कळवावें. पण वर्गणी केव्हा तरी देऊ पण अंक चालूच रहावा हें धोरण वर्तमानपत्राच्या धंद्याला योग्य नाही. तरी ह्या विनंतीकडे लक्ष देऊन वाचक वागतील अशी आशा आहे.

ना. रा. बामणगांवकर
संपादक, वीरशैव संजीवनी.

# बार्शी-म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत वीरशैवांचा प्रचंड विजय

तारीख २२ - ११ - ३७ रोजी बार्शी-म्युनिसिपालिटीची त्रैवार्षिक निवडणूक अतिशय चुरशीच्या सामन्याने पार पडली. आतांशी कुठलीहि निवडणूक ह्मटली कीं सुखासमाधाने पार पडणें अतिशय कठीण होऊन बसलें आहे. एकेका जागेकरितां तीन तीन चार चार उमेदवार उभे राहून मतदारांची जी एक प्रकारची ओढाताण होत असते, आणि प्रत्येकांना झुलवीत झुलवीत शेवटी खरें मत कुणाच्या वाट्याला येईल तें ऐनवेळेपर्यंत देखील कळणे मुष्कलीचें होऊन बसतें. अशा परिस्थितींत, खरोखरच कर्तृत्वाची परिक्षा होण्याचा हा निवडणुकीचा प्रसंग असतो.

बार्शी-शहर-म्युनिसिपालिटीत निवडून आलेल्या उमेदवारांची वर्गवारी ८ लिंगायत [ वीरशैव ], ६ मराठे, २ ब्राह्मण, ३ मुसलमान, २ अस्पृश्य, आणि १ परदेशी अशा प्रकारें यशस्वी उमेदवारांची यादी आहे. त्यांतहि मुसलमान आणि अस्पृश्य हे जातवारी उमेदवार वगळल्यास हिंदुपैकी इतरांपैकी अर्धा वाटा आज बार्शी येथील वीरशैवसमाजानें पटकावला हें खरोखरच अत्यंत अभिमानास्पद आणि कौतुकास्पद आहे असेंच कुणीहि ह्मणेल.

अशाच प्रत्येक वीरशैव ह्मणविणाऱ्या व्यक्तीने स्वकीय समाजाकरता सहानुभूतीनें जितका स्वार्थत्याग एकमेकाखातर करतां येणें शक्य आहे तेवढा अधिक स्वार्थत्याग करून समाजबंधूंना सदोदीत आपुलकीच्याच भावनेनें लेखून सहानुभूति दाखविल्यास कोणतेंहि कार्य दुष्कर होणार नाही.

बार्शी-म्युनिसिपालिटीचे नामवंत नगराध्यक्ष श्री. गावसानें यांनी आपला अर्ज मागे घेतला असें ऐकण्यांत येतें. आणि अशा कर्तबगार व्यक्तीनें एकदा समरांगणावर टाकलेलें पाऊल कसल्याहि बुजगावण्याला अगर भिडमुरवतीला बळी पडून मागे घेणें आमचे मतें तरी अनुचित होय. श्री. गावसाने यांनीं जर आपल्या एकाद्या समाजबंधूकरिता हा स्वार्थत्याग केला असेल तर त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होईल. पण इतरांकडून त्यांच्या गैरहाजरीत त्यांच्या वाट्याला चाट लागली तर वीरशैवसमाजांतील हा मोहरा निष्कारण गारद बनून आज तरी निर्माल्यवत् झाल्याचें दुःख कुणाहि वीरशैवाला जाणवल्यावांचून रहाणार नाहीं.

यशस्वी उमेदवारांच्या विजयाप्रीत्यर्थ गावांत पानसुपाऱ्यांचा धूमधडाका थाटामाटानें सुरुं असून ता. २४ रोजी रात्रौ किराणा-रोडवर कै. अण्णासाहेब कथल्यांचे तसबिरीला उच्चस्थानी विराजमान करुन लतापल्लवांनी श्रृंगारलेल्या भव्य मंडपांत सध्यांचे म्यु. प्रेसिडेंट श्री. गावसाने, बी. ए. एलएलबी., यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी उमेदवारांचें सन्मानार्थ सभा बोलावण्यांत आली. वक्त्यांचीं रीतसर भाषणें वगैरे होऊन पानसुपारीचा कार्यक्रम थाटा-

माटाने पार पडला. बार्शी येथील वीरशैवांमध्यें एकीचे वारे आणि समाजकार्यांची कळकळ ज्या कै. अण्णासाहेब कथल्यांच्या परिश्रमाने निर्माण झाली आणि ज्या एकीची गोड फळें आज बार्शीनगरस्थ वीरशैवांना चाखायला मिळतात त्यांनी कै. अण्णासाहेवांच्या फोटोचा केलेला गौरव सर्वस्वीं उचितच होय.

तो शिवप्रभू आमच्या बारशी येथील विजयी वीरशैवांना त्यांच्या कार्यीत निरंतर असेंच यश देऊन त्यांना सामाजिक कार्यंतत्पर करो अशी आह्मी आशा करतों.

निवडणुकींतील विजयी वीरांची यादी पुढीलप्रमाणें :—

**वार्ड नं. १**

श्री. बाबुराव भगवंतराव कुदळे.

सर्व निवडणुकींत ज्यांचा नंबर अगदी पहिला आला असे हेच एकटे वीरशैवांपैकीं उमेदवार आहेत.

**वार्ड नं. ३**

१ श्री. गणपत रामलिंग झाडबुके
२ श्री. पाप्पा सदाशिव राजमाने
३ श्री. महादेव भगुअप्पा राजमाने
४ श्री. बळवंत गुरुसिद्ध सोपळ
५ श्री. मलकार्जुन मारुतीअप्पा भातकर

**वार्ड नं. ४**

१ श्री. भिमाशंकर लिंगाप्पा बगळे
२ श्री. रामलिंग शांतलिंग घळपती

---

## श्रीमज्जगद्गुरु
# स्वामी कंदर्पानंदांचे संदेश

संदेश ५ वा.

वन्देमातरम्. संपादकमहाशय नानाराव,—हो, नानासाहेब ह्मणून आह्मीच काय पण आपले सर्व यच्चयावत् स्नेही आणि इतरहि आपणास नानासाहेब या नांवानें संबोधीत असत;] परंतु जसे तात्यासाहेब सावरकरांचे तात्याराव झाले, तसेंच नानासाहेबांचे नानाराव झाले तर त्यांत वावगें असें काय आहे? कांहीच नाही. जें कांही होत आहे तें अगदी योग्य आणि रास्तच होत आहे. आह्मी स्वराज्यसाधनार्थ विप्रजांशीं झोंबी घेत असतांना, सर्व प्रकारें जेणेंकरून त्यांच्याशी फटकून वागतां येईल अशाच प्रकारें सर्वस्वी वागले पाहिजे. आणि ह्मणूनच जसें मुलांचें नांव पाळण्यांत घालून बदलतात, तसेंच

स्वराज्याच्या पाळण्यांत तुमचेंहि नांव राव ह्मणून आह्मी जाहीर करीत आहोंत. राव ही पदवी सर्वस्वी वीर बखराना साजेशी आहे. कारण रावबाजीच्या पराक्रमानें सर्व दुष्मनांना कापायला लावल्याचे अनेक दाखले पूर्वेतिहासांत सांपडतात. आह्माला जी स्वराज्यसंपादनार्थ चळवळ करायची आहे तिचा पायंडा भाषाशुद्धीपासून खोदण्यास आरंभ करणें उचित नाही असें कोण ह्मणेल ? आह्मी ह्मणतो राव या नांवानें संबोधण्यापेक्षां पिटस्, पिंटस्, चांचू, कांकू, कुंगू, अशा जपानी नावानें जर सर्व राष्ट्रभक्त ह्मणवणाऱ्या वीरांना संबोधले गेले तर पुढे येणाऱ्या हिंदुस्थानवरील जपानी आक्रमणाला अनायासें पायबंद घालतां येऊन, जर कां जपानी सैन्यानें, बॉम्बचा मारा करून हिंदुस्थानला पादाक्रांत करण्याचें ठरवलें तर 'अरे बाबांनो, आह्मी तुमच्या जातीचे, तुमचेच जातभाई आहोंत, आह्माला मारुन देशद्रोहीपणाचें पातक तुह्मी कां शिरावरा घेता,' असें रोखठोक उत्तर त्यांना देतां येईल. पहा आमच्या हिंदुस्थानांत साहेब ह्मणून आह्मा हिंदुस्थानीयांपैकी तुमचें विमान कोसळून पडलें नी समजा त्या विमानाचे एंजीनियर वगैरे मरायला लागले तर त्यांना औषध ह्मणून पाजायला एकहि साहेब या उभ्या हिंदुस्थानात तुह्माला मिळणार नाहीं. हें पहा आमचे राष्ट्रपति जंगन्, हे पंतन्, हे संगम् ,वगैरे वगैरे या नावबदलीच्या जोडीला खास जपानी पेहरावाचीहि जोड दिली कीं बस् झालें आपलें काम. मग काय माय व्याली आहे जपान्यांची कीं चीनसारखी हिंदुस्थानची ही चिनी माती बनवायची ! आमच्यातील कांहीं धर्ममार्तंड ह्मणतात कीं ' हिंदु तितका मेळवावा, स्वराज्यासी जुळवावा, म्लेंछांस्पष्ट बगळावा, या कायाकष्टोनी आणि छाति ठोकून, अन्यायानें बडवून घेऊन शत्रुपुढें लढत, आह्मी ह्मणतो रडत रहावे, ह्मणजे आपोआपच स्वराज्य पायी येईल.

पण तें असे एकाद्याच्या पायी घरीं आला ह्मणजे त्याला चक्राकार फिरत राहून चक्रम बनण्याचा प्रसंग येतो तद्वत् मात्र या पायी येणाऱ्या स्वराज्यानें आह्मा हिंदवासियांची गत होऊं नये ह्मणजे मिळवली !

आह्मी जो जपानचा मुद्दाम वर उल्लेख केला आहे कीं जपानचें आक्रमण जर हिंदुस्थानवर आलें तर आपण कसे वागायचे ? या आमच्या विचारसरणीला आणि आह्मालाहि कांहीं इरसाल आसामी वेडयांत काढतील. पण आह्मी ह्मणतों, अशीं स्वप्नें आपल्या सार्वभौम बादशहांच्या पार्लमेंटांतील मुत्सद्यांनाहि पडूं लागल्याचें आणि पुढील आपत्तीला तोंड देण्याचे नुकतेच एका जाडया-जुडया आणि मुरलेल्या मुत्सद्याने बोलून दाखविलेंच आहे. आणि जर का हिंदुस्थानवर परचक्राचा मारा सुरू झाला, बांबगोळयांचा पाऊस पडूं लागला, विषारी वायूंनी हिंदुस्थानचें वातावरण भरून जाऊं लागलें, तर त्या हल्ल्यापासून बचाव कसा करावा हें शिक्षण हिंदुस्थानातील लोकांना आतापासूनच देण्यास सुरुवात करावी, आणि पुढील आपत्तीला तोंड देण्याकरितां हिंदुस्थानातील सिंगापूरसारखीं ठाणीं भरभक्कम पायावर सुधारणा करून अभंग कशीं करावीं याबद्दल आमच्या मा बाप सरकारांची सुप्तावस्था आतां जागृत होऊं लागली. आणि इतके असतांना देखील हिंदुस्थानबद्दल आमच्या सरकारच्या अंतःकरणांत दया-माया नाही असें ह्मणण्याची आता कुणाची छाती आहे?

बाकी समजा कीं, उद्या जर जपानच्या सामन्याला आह्मा हिंदवासीयांना उभें रहाण्याचा प्रसंग आलाच—आलाच ह्मणजे काय ? नेहमीच्या वहिवाटीप्रमाणें आमच्या मायबाप सरकारांनी आमच्या हिंदूंच्याच पलटणी आघाडीवर पाठविल्या, आणि कर्मधर्मसंयोगानें समजा आम्हाला जर अपयश आलें, तर

आमच्या जातभाईना ह्मणजे हिंदूंना आम्हाला वाचवता आले नाही ! नाहीच तें जमायचें ! 'तुमच्या हिंदवासीयांत ती ताकद नाही ह्मणून तर तुमच्याच संरक्षणाकरिता आम्ही आमच्या गोऱ्या फौजेला मनमुराद खायला प्यायला घालून हरहमेश संतुष्ठ ठेवा म्हणून आम्ही तुमच्या कानीकपाळी सारखी ओरड करीत होतो. परंतु तुमच्यांतीलच तुमच्या विश्वासाच्या पुढाऱ्यांना आम्हीं इंग्रजाविरुद्ध मारे गलगा करून, आमच्याविरुद्ध लोकमत बनण्याचा चंग बांधला आणि आतां भोगा तुमच्या कर्माची फळें तुमचें तुम्ही' असें इंग्रजी मुत्सद्दी उद्या म्हणायला तयार होतील. आणि म्हणूनच आतापासूनच पाण्याच्या आधी पळचणीची सोय करावी या न्यायाने आमची अशी सूचना आहे कीं, आमच्यांतील अखिल हिंदु म्हणवणाऱ्या कट्टर सनातनीयांचे एकादें शिष्ठमंडळ जपान – सरकारकडे पाठविण्याची तजवीज करावी. बाकी त्या शिष्टमंडळांत डॉ. मुंजेला अवश्य अध्यक्षस्थान द्यावें आणि या शिष्टमंडळांतील सर्व सभासदांना जपानी नावें देऊन आणि त्यांचे पेहराव बदलून अगदी नक्कल कां होईना पण अस्सल जपानी माल आम्ही आहोंत असें आमच्या शिष्ठमंडळाकडे पाहिल्याबरोबर जपान–सरकारला वाटावें.

दुसरें असें कीं, कदाचित, पण कदाचित् कां, आम्हीं चीनवर स्वारी केली, तेव्हा तुह्मा हिंदुस्थानच्या लोकांना चीनचा पुळका येऊन जपानी मालावर बहिष्कार घालावा असें बोलणारे तुह्मीच हिंदुस्थानांतले लोक नाही कां ? आणि आतां शरणागतीने शिष्टमंडळामार्फत वाटाघाट करायला येतां काय? असा सवाल जर जपान–सरकारनी टाकला तर त्यांनीं मात्र न कचरता खुशाल सांगावें कीं, अहो ती आमच्या नुसती तोंडाची वाफ होती. केव्हांच ती वाऱ्यावर उडून गेली. आतां काय त्याचें? आणि कांही चार टवाळ लोकांची ती टुरटुर आम्ही देवाची शपथ घेऊन सांगतों कीं, शेंकडा एकाह्याने तरी अगदी इमाने इतबारें पाळली असेल तर शपथ ! कोटयावधी रुपयांचा जपानी माल धुमधडाक्यानें हिंदुस्थानच्या बाजारांत खपत होता, खपतो आहे, आणि यावश्चंद्र दिवाकरौ खपेल. पाहिजे तर याबद्दल आह्मी हिंदुस्थानतर्फे आपणास प्रतिज्ञापत्र लिहून देतों. आणि असा डाव टाकला कीं काम फत्ते ह्मणून समजा ह्मणावें ! या एकाच दगडानें आम्हा हिंदु लोकांना दोन पक्षी मारण्याचेंहि यश संपादन करतां येईल. कसें म्हणाल? तर हें पहा, आज जें आमचे इंग्रज–सरकार मुसलमानांना लाडक्या लेकराप्रमाणें वाटेल तसें वागण्याची पूर्ण मुभा देते आणि हिंदूंना पायदळी तुडविते असा जो आक्षेप घेतला जातो, कदाचित् तो खराहि असेल, पण त्याचाहि अनायासेच बंदोबस्त होईल. कारण जपानची संस्कृति हिंदी संस्कृतीशीं शंभरटक्के नसली तरी पाऊणशे टक्के तरी खास जुळण्यासारखी आहे यांत शंका नाही. म्हणूनच सहानेंनें व्याकुळ होऊन ऐनवेळेस विहीर खोदण्याचा अव्यापारेषु व्यापार करण्यापेक्षा ; आतांपासूनच आपली वर्णी लावायची संधि साधून घ्यावी असा आमचा पोक्त सल्ला आहे. काय बिशाद आहे याप्रमाणें फासा टाकल्यास आम्हा हिंदवासीयांचा चक्काचूर करायची जपानला दुर्बुद्धि होईल ? आपल्याला काय, इंग्रजाचें राज्य असो कीं जपान्यांचें असो, गुलाम ते गुलाम. वाटी म्हणायला गोटयांपेक्षा वीट मऊ. निदान आम्ही गुलाम आहोत खरे, पण परकीयांचे नाही, आमच्या हिंदुसंस्कृतीच्याच लोकांचे, अशी फुशारकी मारायलाहि वेळप्रसंगी सोयीचें. हें सारें झालें, पण व्याख्यानांतच याचा समारोप न होतां प्रत्यक्ष कृतीने समारोप करावा अशी आमची आमच्या हिंदु पुढाऱ्यांना कळकळीची विनंती आहे. अस्तु ! वन्देमातरम्.

# धर्मात्मा

ज्या बसवेश्वरांनी वीरशैवधर्माची धर्मध्वजा अखिल भारतवर्षांत फडकवली, आणि आसेतुहिमाचल वीरशैवधर्मवृद्धीकरतां ज्यांनीं आपल्या सर्वस्वाची आहुती दिली, त्या महाभाग बसवदेवाचें विस्तृत चरित्र संजीवनीच्या नव्या वर्षापासून ह्मणजे जानेवारी १९३८ पासून क्रमशः प्रसिद्ध करण्यात येईल.

लेखकानें चरित्राविषयक माहिती सर्वांगपरिपूर्ण अशा उपलब्ध विश्वस्त साहित्यामधून महत्प्रयासानें संग्रहित केलेली असल्यामुळें, बसवदेवाच्या जन्मकालापासूनची अनेक उद्बोधक स्थित्यंतरें बसवकालीन वीरशैव मतानुयायी महात्म्यांनीं वीरशैवधर्मरक्षणाकरतां केलेली महनीय कामगिरी आणि तत्कालीं निर्माण झालेलें वाङ्मय, वगैरे गतकालीन वीरशैव वैभवाचा सर्वांगपरिपूर्ण असा इतिहास महाराष्ट्रीय भाषेमधून या चरित्ररुपाने प्रथमच प्रसिद्ध होत आहे हेंच वाचकांना आढळून येईल.

भाषेच्या दृष्टीनें आबालवृद्धांना हा चरितग्रंथ आपल्या धर्माची शिकवण देत देत मनोरंजनहि करील अशाच नव्या पद्धतीनें लेखकानें लिहिला आहे. किंबहुना, आपल्या वीरशैव वाङ्मयातील मराठी भाषेतील हाच पहिला एकमेव उत्कृष्ट ग्रंथ ठरणार. यांत शंका नाहीं. या चरित्रग्रंथाची जवळ जवळ पांचशे पानें होतील. संजीवनीच्या वर्गणिदारांना तीन रुपयांतच इतर भरपूर मजकुरासोबत अमुल्य असा हा चरित्रग्रंथ आह्मी क्रमशः प्रसिद्ध करून विनामुल्यच देण्याचें साहस करीत आहोत हें कुणीही नाकबूल करणार नाही.

---

संजीवनीच्या वाढत्या आकाराबरोबर, कागदाचे भाव भरमसाट वाढले असतांनाहि, आह्मी फक्त नव्या वर्षापासून आठ आणेच वार्षिक वर्गणींत वाढ केलेली आहे.

पण डिसेंबर ३१ तारखेपर्यंत वर्गणी भरणारांना अडीच रुपये भरूनहि वर्गणीदार होण्याची सवलत आहे हें लक्षांत असू द्या आणि तावडतोब सवलतीचा फायदा घेऊन वर्गणी पाठवा.

# आमची कर्तव्यनिष्ठा.

वीरशैवसंजीवनीचा हा डिसेंबर १५ तारखेचा २४ वा अंक म्हणजे तिच्या दुसऱ्या वर्षाचा शेवटचा अंक होय. पहिल्या वर्षी संजीवनीनें फक्त १६ पानांचाच अंक ठेवून शक्य तों सर्वांगीण समाजचर्चा करण्याची किमानमर्यादा आखली; परंतु हें सोळा पानांचें आकुंचित क्षेत्र दुसऱ्याच वर्षी संजीवनीच्या वाढत्या लोकप्रियतेला आणि वाचकांच्या आकांक्षापूर्तीला अपुरें होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतांच त्याच अडीच रुपयांच्या मोबदल्यांत संजीवनीनें आपला आकार दीडपट वाढवून अधिक विस्तृत क्षेत्र सामाजिक चर्चेकरिता खुलें करून वाचकांची मनोभावें सेवा केली आणि विविध वाङ्मयसंभाराने नटलेल्या संजीवनीची जवळ जवळ ६०० पाने समाजसेवेला समर्पण केलीं. वास्तविक टपालखर्च वजा जातां अवघ्या दोन रुपयांच्या मोबदल्यांत ६०० पानांचा ग्रंथ प्रसिद्ध करून आपल्या आश्रयदात्यांस देणें हें कुठल्याहि व्यापारी धोरणाच्या नफेबाजीच्या काटेतोल न्यायांत बसणें अशक्य होय, असाच आजवरील सर्व प्रकाशकांचा अनुभव आहे. इतक्या स्वस्तपणें म्हणजे दर रुपयास तीनशें पानांचा ग्रंथ प्रकाशित करून कुठलाहि प्रकाशक कितीहि वर्गणीदारांनी मदत केली तरी देणें अशक्य होय हें आम्ही अभिमानानें सांगूं शकतों. मागील वर्षीच्या आढाव्याप्रमाणेच या वर्षीहि संजीवनीला या बाबतींत बरेंच नुकसान सोसावें लागत आहे. तरी पण एक समाजसेवेची कळकळ म्हणूनच आज हा आंतबट्ट्याचा व्यवहार आम्ही शिरावर घेत आहोंत. पुढील वर्षाकरिता [illegible] संजीवनीचा आकार वाढवून आणि सर्वप्रकारे त्यांत अनेक सर्वांगीण सुधारणा करूनहि फक्त आठ आणेच अधिक वर्गणीची याचना करणें आज आम्हाला भाग पडत आहे.

आणि वाढवलेल्या जास्तीच्या आठ आण्यांत खरोखरच आम्ही किती आणि कशी सुधारणा केली आहे हें पुढील तिसऱ्या वर्षाचा पहिला अंक अवलोकन केल्यावर आपणास अनायासेंच आढळून येईल. तरी पण आमच्या हितचिंतक समाजबंधु-भगिनींना आम्ही एक विनंती करण्याचें साहस करीत आहोंत कीं, प्रत्येकानें सढळ हस्तें आणि आपुलकीच्या प्रेमळ भावनेंने आम्हाला शक्य तों जास्तीत जास्त जेवढें सहाय्य करतां येण्यासारखें असेल तेवढें करून आम्हाला द्विगुणित उत्साहित करावें, आणि ही गोष्ट अतिशयच कठीण आहे अशांतला भाग नसून प्रत्येकानें एकच वर्गणीदार मिळवून देण्याचें जर का मनावर घेतलें तरीदेखील सहजासहजी आम्हाला उपकृत करण्याचें पुण्य आमच्या हितचिंतक वाचकांना मिळवतां येईल. आशेवरच कुणीहि झालें तरी जगत असतो हें तत्व सर्वमान्यच आहे. आम्ही कितीहि थोर थोर महत्वाकांक्षा उराशीं बाळगून बसलों तरी त्या आमच्या महत्वाकांक्षांना मूर्त स्वरुप देण्याचें महत्कार्य पार पाडण्याची सर्वस्वीं जबाबदारी आमच्या आश्रयदात्यांच्याच शिरावर आहे हें त्यांनी विसरूं नये एवढीच नम्र विनंती पुन्हा एकदा करावीशी वाटते.

डिसेंबरअखेरपर्यंत वर्गणी भरणारांना [illegible] व रुपये वर्गणीची सवलतीची

मर्यादा अशीच स्पयेच ठेवण्यात आली आहे. या संधीचा आमच्या वाचकांनी अवश्य फायदा घ्यावा एवढीच आमची इच्छा आहे.

आतां चालू वर्षांतील संजीवनीचे घडामोडींत जर कांहीं बदल झाला असेल तर तो फक्त संजीवनीचे माजी सहसंपादक श्री. बाबुराव चौधरी यांनी आपले जागेचा राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागेवर श्री. पुराणीक यांची योजना झाली हाच एक होय! बाबुरावांच्या पश्चात् विद्यमान सहसंपादकांनी जे कांहीं थोडेसें निराळें वळण संजीवनीला दिलें तें बऱ्याच वाचकांना पसंत पडलें असें आमचेकडे त्या बाबतींत बऱ्याच हितचिंतकांच्या झालेल्या पत्रव्यवहारावरून आणि प्रत्यक्ष भेटींतहि आमच्या प्रत्ययाला आलें ही अत्यंत समाधानाची गोष्ट होय.

यापुढेहि नव्या वर्षापासून अगदीच नाविन्यानें संजीवनीला सजविण्याचा आम्हीं निर्धार केला आहे हें आणखीहि एकदा बजावून सांगावेसें वाटतें. कदाचित् यांत अहंभावनेचा दर्प असल्याचाहि कुणी आमचेवर आरोप करतील; पण वृथा वल्गना करण्यातच तो आरोप आमच्यावर कुणालाहि लादता येईल. परंतु आम्ही आमच्या वाचकांना दिलेल्या वचनाला जर जागरूकपणें जागून बोलल्याप्रमाणे आमच्या कर्तृत्वाला कमीपणा न येऊं देण्याचें कंकण धारण केलें तर कुणाच्याहि आणि कसल्याहि आरोपाला भिण्याचें आम्हाला कांहींच कारण नाही आणि या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव यायला थोडाभेदाच जवळच आहे, असें म्हणणेंहि अतिशयोक्तीचें होणार नाही.

आतां शेवटची एकच विनंती करावीशी वाटते ती ही की, आमची व्यक्तिशः कुणावरहि टीका करण्याचें आम्हांला टाळायचे आहे. वाजों आहोत. तरी पण [illegible] कुणाचा काही गैरसमज झाला असल्यास त्यांनी आम्हाला उदार अंतःकरणाने क्षमा करून, संजीवनी आपली आहे, अशा आपुलकीच्या भावनेनें सर्वांनीच तिच्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पहावें, आणि श्रीमतांनीं उदारहस्तें मदत करून, नव्या जुन्या वर्गणीदारांनी अधिक . वर्गणीदार मिळवून देऊन उदित आणि नवोदित वाङ्मयसेवक लेखक-लेखिकांनी तिला वारंवार आपल्या अमूल्य लेखांनीं नटवून संजीवनीचा संसार सुखासमाधानाने थाटलेला स्वतः पाहून इतरांनाही तो आनंददायी होईल अशा प्रकारें तिच्या संसाराची काळजी वहावी एवढीच शेवटची विनंती करून आमच्या वाचकांशी हें द्वितीय वार्षिक हार्दिक अभिनंदन या छोटयाशा प्रेमळ हितगोष्टीनें पूर्ण करतों.

रा. शं. पुराणिक
सहसंपादक, संजीवनी

# जाहिराती देणारांस उत्तम संधि

वि० सू०— बिलाची संपूर्ण रक्कम आगाऊ आल्याशिवाय जाहिरात छापली जाणार नाही.

हँडबिलें वाटावयाची असल्यास एका वेळेस ५ रुपये.

‘ वीरशैव संजीवनी ’-चे जाहिरातींचे दर.

| जाहिरातींचे दर | | १ वर्ष | ६ महिने | ३ महिने | १ वेळ |
|---|---|---|---|---|---|
| सबंध पान | .... | रु. ८४ | रु. ४५ | रु. २४ | रु. १० |
| अर्धे पान | ... | ,, ४२ | ,, २३ | ,, १२ | ,, ५ |
| पाव पान | ... | ,, २१ | ,, १२ | ,, ८ | ,, ३ |
| एकअष्टमांश पान | ... | ,, ११ | ,, ६ | ,, ४ | ,, २ |

‘ वीरशैव संजीवनी ’-च्या एका पानाचा आकार ७ × ५ इंच

कायमच्या जाहिरातीसंबंधी समक्ष भेटावें अगर पत्रव्यवहार करावा.

पत्ताः—— व्यवस्थापक,—‘ वीरशैव संजीवनी ’

C/o.‘ उदय ’ ऑफिस, अमरावती ( वऱ्हाड )

## चांदूर बाजार

वीरशैव तरुणांच्या बेकारीविषयी सक्रीय सहानुभूति दाखविण्याबद्दल मागे हिंगणघाटचे श्रीमंत बापुसाहेब हिंगमिरे ह्यांचें अभिनंदन करण्यांत आलें होतें. आमचे येथील डॉ. आप्पाराव सोमाप्पा संगेकर यांनी मनोहर रुद्राप्पा मिटकरी नांवाच्या गरीब व विवाहित बेकाराला मॅट्रिक पास झाल्यावर बरेच दिवस नोकरी न मिळाल्यामुळें, अखेरीस चांदूरबाजार येथे श्रीं. सदाशिव आप्पा एकलारे व डॉक्टर संगेकर यांनी बरीच खटपट करून कांही दिवसापूर्वी चांदूर बाजार येथील शाळेंत शिक्षकाची जागा मिळवून दिली. गोरगरीबास दाखविलेल्या ह्या सक्रीय सहानुभूतिबद्दल डॉ. आप्पाराव संगेकर व श्री. सदाशिवआप्पा एकलारे ह्यांना येथील वीरशैव-समाज हार्दिक धन्यवाद देत आहे. असें चांदूरबाजारचे एक बातमीदार कळवितात.

## मुंबई वीरशैव स्नेहसंवर्धक मन्डळ
## वीरशैव पुढाऱ्यांच्या गाठीभेटी

शुक्रवार ता. १२ — ११ — ३७ रोजी ‘ गर्जना ’ पत्राचे संपादक श्री स्वामी परांडकर यांनी संस्थेला भेट देऊन कार्यकर्त्या मंडळीबरोबर बऱ्याच विषयावर सामाजिक सुधारणे बाबत चर्चा केली. मंडळाचे कार्याबद्दल समाधान व्यक्त करून स्वामीजी मंडळाचे सभासद झाले आहेत तसेंच ‘ सुदर्शनचे ’ संपादक श्री. कल्याणशेट्टी आणि श्री. सिद्रामप्पा हिंगमीरे या उभतांनीहि भेट देऊन सामाजिक सुधारणेवर चर्चा केली, आणि तेहि संस्थेचे सभासद झाले. संस्थेच्या अभिवृद्धयर्थं लवकरच एक महाराष्ट्र प्रांतीय वीरशैव परिषद मुंबईस बोलावण्याचें ठरलें आहे असें कळतें. उपक्रम स्तुत्य आणि आवश्यक आहे. उत्तरोत्तर मंडळाची भरभराट होऊन समाजकार्य रत होण्यास संस्थेतील कार्यकारी मंडळास तो शिवप्रभु सहाय्य करो अशीच कुणीहि अपेक्षा करील.

हें पत्र संपादक श्री. नारायण रामलिंग बामणगांवकर ह्यांनीं आपल्या ‘ अरुण ’ छापखान्यांत छापून टिळकाश्रमांतील ‘ वीरशैव संजीवनी ’ कचेरींत प्रसिद्ध केलें.